॥ श्री ॥

श्रीएकनाथांचे सहा ग्रंथ.

# एकनाथी भागवत.

आनंदलहरी, स्वात्मसुख, हस्तामलक, शुकाष्टक चतुःश्लोकी भागवत यांसह.

हा ग्रंथ जुन्या हस्तलिखित पोथ्यांवरून

ह. प. विष्णु नरसिंह जोग

यांचे साहाय्यानें पाठ शुद्ध करून

माधव कृष्ण देशमुख

यांनी तयार केला.

तो

गंगाधर गोविंद गोंधळेकर यांनी पुणें येथें आपल्या
भारतभूषण छापखान्यांत छापून पुणें येथें
प्रसिद्ध केला.

शके १८३३.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

आधीं शुद्धिपत्राप्रमाणें ग्रंथ शुद्ध करून मग वाचनास आरंभ करावा.

हल्लीं उपलब्ध असलेल्या छापील पोथ्यांपैकीं एक पोथी घेऊन, त्यांतील जे पाठ अशुद्ध होते, ते जुन्या हस्तलिखित पोथ्यांवरून दुरुस्त केले; व हस्तलिखित पोथ्यांत जेथें निरनिराळे पाठ आढळले, तेथें एक पाठ ओवींत घेऊन, दुसरा निराळा पाठ पृष्ठाचे खालीं दिला आहे. मूळ छापलेली पोथी कोणत्यातरी हस्तलिखित पोथीवरून-च छापलेली आहे; तेव्हां त्यांत पाठ शुद्ध असून, जेव्हां हस्तलिखित पाट निराळा आढळला, तेथें मुळचा छापील पाट कायम ठेवून, हस्तलिखित पोथ्यांतील निराळा पाट पृष्ठाचे खालीं दिला आहे.

हा ग्रंथ छापावयास आह्मीं आरंभ केला, त्यावेळीं आह्मांस पुढील हस्तलिखित पोथ्या पडताळा पाहण्यास मिळाल्या. [ १ ] श्रीएकनाथ महाराजांचे घराण्यांतील प्रसिद्ध हरिभक्तिपरायण नारायणबोवा गोसावी पैठणकर यांच्या संग्रहीं असलेली श्रीएकनाथी भागवताची पोथी; ही पोथी नारायणबोवा यांच्या आजोबानीं त्याकाळी उपलब्ध असलेल्या पोथ्यांवरून आपल्या स्वतःकरितां तयार केली. ही पोथी सुमारें शंभर वर्षांची जुनी आहे. या पोथीस ना. ही संज्ञा दिली आहे. [ २ ] रा. गणेश बळवंत मोडक यांच्या संग्रहीं असलेली श्रीएकनाथी भागवताची जुनी पोथी; ह्या पोथीचा शालीवाहन शक १६३० आहे. या पोथींत तिसरा अध्याय व कांहीं कांहीं अध्यायांचें एक एक पान मिळून दहा पानें कमी आहेत. या पोथीस मो. ही संज्ञा दिली आहे. शिवाय श्रीएकनाथ महाराजांचे किरकोळ ग्रंथांपैकीं नारायणबोवा यांनीं आह्मांस पुढील जुन्या हस्तलिखित पोथ्या पडताळा पाहण्याकरितां दिल्या. [ १ ] आनंदलहरी शके १६०६ [ २ ] स्वात्मसुख शके १६९२ [ ३ ] हस्तामलक शके १७५१ [४] चतुःश्लोकी भागवत शके १७८० व [ ५ ] शुकाष्टक. रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांनीं आपल्या संग्रहीं असलेली चतुःश्लोकी भागवताची पोथी पडताळा पाहण्यास दिली. या सर्वांचे आभार मानावेत तितके थोडेच आहेत.

शुकाष्टकाखेरीज इतर ग्रंथांच्या छापील पोथ्यांचाही आम्हांस फार उपयोग झाला; सबब त्या पोथ्या छापणारांचेहि आम्हीं आभारी आहोंत. शुकाष्टकाची एकच हस्त-

लिखित पोथी आम्हांस मिळाली ती जशीच्या तशीच छापलेली आहे. भागवताच्या कठीण शब्दांवर अर्थाच्या टीपा देण्याचे कामीं रा. रा. महादेव हरी मोडक बी. ए. यांनीं आम्हांस मदत केली, त्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभार मानितों.

श्रीएकनाथमहाराजकृत कोणत्याहि ग्रंथाच्या जुन्या हस्तलिखित पोथ्या ज्यांचे संग्रहीं असतील, त्यांनीं त्या आम्हांस कृपा करून दिल्या, तर त्यांचे आम्हांवर व वाचकवर्गावर उपकार होतील. आमचें छापण्याचें काम झाल्यावर, देणाराचे इच्छेप्रमाणें आम्ही त्याची पोथी त्यास परत देऊं व शिवाय त्या पोथीची एक छापील प्रत त्यास देऊं.

सरतेशेवटीं श्रीसंताचे ग्रंथ छापण्यास आम्हांस सामर्थ्य द्यावें, अशी श्रीपरमेश्वराची व श्रीसंतांची अनन्य भावें प्रार्थना करून, हा लेख संपवितों.

गंगाधर गोविंद गोंधळेकर.

---

श्री

# साधारण अनुक्रमणिका.

॥ श्रीज्ञानेश्वरो जयति ॥

# प्रस्तावना.

सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ॥
भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥ १ ॥

श्री. भाग. अ. २. श्लोक ४५.

टीकाः-सर्वभूतीं भगवंत । भूतें भगवंतीं वर्तत ।
भूतीं भूतात्मा तोचि समस्त । 'मी मी' ह्मणणें तेथें मीपणा नये ॥ १ ॥
सर्वांभूतीं भगवंत पाही । भूतें भगवंताचे ठायीं ।
हें अवघें देखे तो स्वदेहीं । स्वस्वरूप पाही स्वयें होय ॥ २ ॥
तो भक्तांमाजीं अति श्रेष्ठ । तो भागवतांमाजीं वरिष्ठ ।
त्यासी उत्तमत्वाचा पट । अवतारश्रेष्ठ मानिती ॥ ३ ॥

ए. भा. अ. २

सकल भूतभौतिक सृष्टीमध्यें एक परमात्माच भरलेला आहे, असें भागवतधर्म सांगतो, आणि असें सुचवितो कीं, जे कोणी भागवतसंप्रदायानें परमार्थमार्गास लागले असतील, त्यांनीं भिन्न भिन्न स्थावरजंगमादि भूतांच्या ठायीं एक परमात्माच पहावा, व त्या परमात्म्याचे ठायींच हा सर्व विश्वपट विस्तारलेला आहे, असें ओळखावें. या भागवतधर्माच्या आज्ञेप्रमाणें, सर्व भूतमात्रांच्या ठायीं परमात्माच कोंदलेला आहे, व परमात्मस्वरूपांतच सकल भूतसृष्टीची घडी सामावलेली आहे, असें जो जाणतो, तो परमभागवत ह्मणजे श्रेष्ठ भागवतधर्मी होय; हेंच शिरोभागीं दिलेल्या अवतरणश्लोकांत स्पष्ट सांगितलें आहे.

कांहीं लोक आपणास भागवत ह्मणवितात मात्र; पण ते वर सांगितलेलें भागवतधर्माचें रहस्य न जाणून, केवळ उपासनेसाठींच निर्माण केलेल्या देवतादिकांच्या मूर्तीला पूर्ण परमात्मा असें मानतात, आणि या भावनेनेंच त्या मूर्तीचें अर्चनपूजन इत्यादि प्रेमपूर्वक करितात; वरील श्लोकांत वर्णन केलेल्या श्रेष्ठ भक्त भागवतांचे ठिकाणींही ते नम्र होत नाहींत, मग इतर सामान्य लोकांच्या ठायीं भगवद्भावना ठेवून, त्यांच्याविषयीं ते मनांत आदरबुद्धि बाळगतील, ही गोष्ट तर दूरच राहिली. याच कारणानें भागवतशास्त्रकारांनीं अशा पुरुषांची प्राकृतजनांतच गणना केली आहे.

श्लोकः—अर्चायामेव हरये पूजां यः श्रद्धयेहते ।
न तद्भक्तेषु चान्येषु स भक्तः प्राकृतः स्मृतः ॥

श्री. भा. अ. २. श्लोक ४७.

आपणास भागवत ह्मणविणारे कित्येक लोक भेदबुद्धीमुळें ईशाची उपासना क-रि आहेत. पण वरील श्लोकांत वर्णिलेल्या प्राकृत उपासकांपेक्षां जरा अधिक वेकी असल्यामुळें ते ईश्वर, तद्भक्त, अज्ञानी आणि शत्रु यांच्या ठिकाणीं अनुक्रमें , मैत्री, कृपा आणि उपेक्षा करितात; ह्मणून हे मध्यम उपासक असें भाग- ारांनीं ह्मणजे व्यासांनीं ठरविलें आहे:—

ईश्वरे तदधीनेषु बालिशेषु द्विषत्सुच ।
प्रेममैत्रीकृपोपेक्षा यः करोति स मध्यमः ॥

श्री. भा. अ. २. श्लोक ४६.

टीकाः—ईश्वरीं प्रेम पवित्र । भक्तांसीं मैत्री मात्र ॥
अज्ञानीं तो कृपापात्र । उपेक्षा निरंतर द्वेषियांची ॥
हे मध्यम भक्तांची भक्ति । इ. इ.

ए. भा. अ. २

पण जो कोणी खरा भागवत असतो, त्याची तर ' सर्व जग विष्णुमय आहे' अशीच दृढभावना झालेली असल्यामुळें, यालाच तो आपला मुख्य धर्म असें सम तो. तुकाराममहाराजही भागवतधर्मीयांस आपल्या अभंगवाणीनें असेंच सांगतात:

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म ।
भेदाभेदभ्रम अमंगळ ॥ १ ॥
आईका हो तुम्ही भक्त भागवत ।
कराल तें हित सत्य करा ॥ २ ॥
कोण्याही जीवाचा न घडो मत्सर ।
वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे एका देहाचे अवयव ।
सुख दुःख जीव भोग पावे ॥ ४ ॥

या अभंगाच्या तिसऱ्या कडव्यांत, तुकाराममहाराज भागवतसंप्रदायी लोकांस उद्देशून असें सांगतात कीं, कोणत्याही जीवाविषयीं विषमबुद्धि मनांत न धरतां, सर्व जीव परमात्मस्वरूपी आहेत, असें जाणणें, हेंच सर्वेश्वरपूजनाचें वर्म आहे.

परंतु मलिनबुद्धीमुळें अलीकडील कांहीं भागवतसंप्रदायिकांस या रहस्याची ओळखच राहिली नाहीं; ह्मणून सर्वभूतमात्राचे ठायीं ईशबुद्धि ठेवणें तर त्यांज-कडून घडत नाहींच, पण उलट, मूढ जनांकडून परब्रह्माची उपासना घडून चित्तशुद्धि व्हावी व तेणें करून परमात्मज्ञानाची त्यांस प्राप्ति व्हावी, ह्मणून पुराणांतरीं निरनिराळ्या नामरूपानें ज्या कार्यब्रह्मरूपी देवता वर्णिलेल्या आहेत, यांच्या ठिकाणींही, हे भागवतसंप्रदायिक विषमबुद्धि बाळगतातः–

**देवो देवीं मीच पाहीं । हाही निश्चयो त्यांसी नाहीं ।**
**भाव तेते ठायीं । वेगळाला धरिती ॥**

ज्ञा० अ० ७–१४४ ॥

आतां, भिन्न भिन्न देवतांचे उपासक, आपल्याठायीं भिन्नभावना वागवून, आ-स्या उपास्य देवतेखेरीज, इतर देवतांचा कसा धिक्कार करतात, तो प्रकार जरा सविस्तर रीतीनें येथें दाखवितोंः––

१ विष्णूचे उपासक, आपणांस वैष्णव असें नाम धारण करून, विष्णुसमान दुसरें दैवत नाहीं, असें प्रतिपादितात. ते ह्मणतात, कीं " विष्णूचीं जशीं रामकृष्ण नारा-यण इत्यादि अनेक नामें आहेत, तशीं दुसऱ्या देवतांचीं नाहींत. जे कोणी अन्य देवतांना अशीं नांवें आहेत असें मानतात, ते नामापराधी होतात; आणि त्या नामांचें जे कोणी चिंतन करतात, त्यांना त्यांपासून कांहीं लाभ घडतच नाहीं, पण व्यर्थ श्रम मात्र होतात. ब्रह्मदेव व शंकर, हेहि विष्णुउपासकच आहेत, असें अनेक पुराणांत व्यासांनीं वर्णिलें आहे. विष्णु हें दैवत परोपकारी असून, भक्तांचें हित करण्याकरितांच त्यानें शंखचक्रादि चार आयुधें आपल्या हातांत धारण केलीं आहेत. भक्तांविषयीं विष्णु कृपापूर्ण असून, त्याचें सदैव मंगल घडत असतें. देवी, गणपती, सूर्य व शिव हे सर्व त्याच्या आ-ज्ञेत तत्पर असतात; असें उपनिषदें, भारत व पुराणें इत्यादि ग्रंथांवरूनहि स्पष्ट दिसून येतें. विष्णु हा अखिल सृष्टीचा उत्पत्तिकर्ता आहे, व निरनिराळ्या वेळीं अवतार धारण करून त्यानें विश्वाची स्थिति निर्भय केल्यामुळें विश्वधर्ताहि तोच आहे; ह्मणू-नच देव, दानव व मानव या सर्वांना तो उपास्य व पूजनीय झाला आहे. शिव हा विष्णूचा परम भक्त आहे, पण त्यासमान नाहीं. शिव हा स्वतः स्मशानवासी, रुंड-माळा धारण करणारा, अंगाला अमंगल चिताभस्म लावणारा, असा आहे; मग जो दुसऱ्याचें कल्याण कसें करणार ? शिवाचा पुत्र गणपति, हाही शिवाप्रमाणें असे-व्यच समजावयाचा. कारण, त्याचें स्वरूप विलक्षण, ह्मणजे नर व पशु या दोहों-

या अवयवांचें बनलेलें आहे. आतां देवीच्या उपासकांविषयीं विचार केला, तर तेही शेवटीं देवीच्या स्वरूपास जाऊन पोंचतात, असें आहे, व देवीचें स्वरूप तर निंद्य व अपवित्र मानिलें आहे, आणि ती देवी ह्मणजे दोषाची खाण असें समजतात. ती कपटी असून, शिवाच्या तंत्रानें वागणारी असल्यानें, ती स्वतंत्र देवता नाहीं. तेव्हां तिची उपासना निष्फळच व्हावयाची. सूर्यउपासकांचीहि हीच कथा. कारण सूर्याच्या मागें रात्रंदिवस फिरणें लागलें आहे. तो एका स्थानीं कधींच निश्चळ राहात नाहीं. अर्थात् सूर्याच्या उपासकांलाही अहोरात्र भ्रमण करावें लागतें. तात्पर्य कीं, एका विष्णूवांचून शिव गणपति सूर्य देवी ह्यांपैकीं कोणतीहि देवता सेव्य नाहीं, ह्मणून इतर देवतांचा त्याग करून, नित्य सेव्य अशा हरीचीच उपासना करावी. त्याच्या ध्यानपूजनादि विधींचा प्रकार नारदपंचरात्रामध्यें स्पष्ट सविस्तर वर्णन केला आहे, तो पाहावा."

आतां शिवोपासकहि याचप्रमाणें आपल्या उपास्य दैवताच्या एकांगी अभिमानानें, अन्य देवतांसंबंधीं असाच भेद बाळगून असतात. त्यांचें ह्मणणें असें कीं, "शिवासमान इतर दैवत नाहींच. शिवनामानें जी फलप्राप्ति होते, ती विष्णुनामानें होत नाहीं. शिव हा भक्तकामकल्पद्रुम असल्यामुळें, विष्णूनें त्याची उपासना केली, तेव्हां शिवानें त्याला आपलें सर्व ऐश्वर्य देऊन टाकलें, व स्वतः स्मशानवास अंगीकारिला. सर्वांग विभूतिचर्चित करून दिगंबरस्थितीनें शिव काशीपुरींत राहूं लागले. 'विषयसुख वैराग्याची बरोबरी करीत नाहीं,' असा सिद्धांत आपल्या भक्तांस आपल्या अशा प्रकारच्या राहणीनें शिवांनीं स्पष्ट दाखविला. ज्या काशीपुरींत ते वास करितात, त्या ठिकाणीं जो कोणी आपला देह ठेवतो मग तो पुरुष असो अथवा स्त्री असो, त्याला सायुज्यमुक्ति प्राप्त होते, व अति दुःखप्रद अशा गर्भवासांतून तो कायमचा मुक्त होतो. काशींत राहणाऱ्या प्रत्येक जीवास, त्याच्या अंतकालीं शिव असा अद्वयबोध करितात कीं, तेणेंकरून मरणारा लिंगदेहाचा त्याग करून, परब्रह्मस्वरूपीं स्थिर होतो. मोक्षदान देण्यांत शिवजी हे, लहान, मोठा, अधिकारी व अनधिकारी यांचा मुळींच विचार करीत नाहींत, तर सर्वांसच मुक्ति देतात. ह्मणून त्रैलोक्यांत शिवासारखा कोणी दाता नाहीं, अशी त्याची कीर्ति आहे. विष्णूची गोष्ट अशी नाहीं. तो प्राकृत जनाप्रमाणें आपल्या भक्तांचें रक्षण करितो व अभक्तांचा नाश करितो, हें पुराणप्रसिद्ध आहे. रामचंद्रांनीं रामेश्वराची स्थापना केली, या गोष्टीवरूनही शिव सेव्य व विष्णु सेवक, हें सिद्ध होतें. स्कंद पुराणांत व्यासांनीं ह्याचा उल्लेख केला आहे. भारतांत व पद्मपुराणांत जरी विष्णूची महती गायली आहे, तरी अप्पय्या दीक्षितांनीं कै

भारततात्पर्ये वर्णिलें आहे, तें वैष्णवांस माहीत नाहीं. या भारततात्पर्यांत ' शिव हेच एक ईश्वर आहेत व ह्मणून सर्वांत श्रेष्ठ आहेत ' असें सांगितलें आहे. शिवाचें सर्वेश्वरत्व स्पष्ट दर्शविणारा असा एक प्रसंग पुराणांत वर्णिलेला आहे. तो असा कीं एकदां अर्जुनअश्वत्थाम्यांचें युद्ध चाललें असतां, अश्वत्थाम्यानें अर्जुनावर नारायणास्त्र व अग्न्यस्त्र सोडलें, त्यामुळें पुष्कळ सैन्याचा नाश झाला, पण अर्जुनास व त्याच्या सारथ्याचें काम करणाऱ्या श्रीकृष्णास मुळींच धक्का लागला नाहीं, हें पाहून अश्वत्थाम्यानें रथाचा त्याग केला, व धनुर्वेद व धनुर्वेद शिकविणाऱ्या गुरूंचा धिक्कार करून, तो वनांत चालता झाला. तेव्हां व्यास अश्वत्थाम्याजवळ प्रगट होऊन त्याची समजूत करूं लागले कीं, धनुर्वेदाचा व तत्द्रष्ट्यांचा तूं धिक्कार करूं नको. कारण अर्जुन व श्रीकृष्ण हे नरनारायणरूप आहेत. त्यांनीं भक्तिपूर्वक शिवाची उपासना केल्यामुळें, शंकर त्यांना प्रसन्न झाला. व युद्धप्रसंगीं त्यांच्या रथाच्या ध्वजस्तंभावर हनुमंताच्या रूपानें राहून, त्यांचें सदैव रक्षण करण्याचें व्रत त्यानें अंगीकारिलें. ह्मणून त्यांच्यावर सोडलेलीं शस्त्रें व अस्त्रें, हीं निष्फळ होतात. या आख्यायिकेवरून हें स्पष्ट दिसून येतें कीं, विष्णूच्या विभूतिमत्त्वास शिव हेच कारण होत. आणि ह्मणून विष्णूची महती गाणाऱ्या ग्रंथावरूनच शिवाचा महिमा अधिक ठरतो. कारण भारतभागवतादि जे ग्रंथ ' विष्णु हें उपासनार्ह दैवत आहे ' असें प्रतिपादितात, तेच ग्रंथ ' विष्णू हा शिवभक्त आहे, ' असें गौरवून वर्णन करितात. अर्थात् शिव ह्मणजे उपास्याचें उपास्य दैवत, ह्मणून सर्वांत श्रेष्ठ, हें उघड आहे. दुसरें असें कीं, शिव हें अन्वर्थक नांव आहे, शिव ह्मणजे कल्याण करणारी देवता. अर्थात् शिवाखेरीज इतर विष्णु गणपति वगैरे देव अकल्याणरूपी होत, ह्मणून त्यांचा त्याग करून शिवासारख्या कल्याण करणाऱ्या देवाचीच उपासना करणें, हें सर्वांस श्रेयस्कर होय "

आतां गाणपत्य, ह्मणजे गणपत्युपासक काय ह्मणतात याचा विचार करूं— त्यांचें ह्मणणेंहि अशाच प्रकारचें अत्याग्रहाचें असतें. तें असें कीं, " गणपति हाच सेव्य होय. ' कलौ चंडीविनायकौ ' अशा उक्तीच्या आवेशानें, ' गणपति हाच परमउपास्य होय ' असें ते सांगतात, आणि आपल्या ह्मणण्याच्या पुष्ट्यर्थ पुढें दिलेली पुराणांतर्गत आख्यायिका सांगतात. ती आख्यायिका येणेंप्रमाणें:— अति मदोन्मत्त व प्रबल झालेल्या त्रिपुरासुराचें पारिपत्य करण्यासाठीं विष्णुप्रमुख सर्व देव प्रवृत्त झाले, तेव्हां त्यांना प्रारंभीं यश आलें नाहीं. ह्मणून त्यांना सखेद आश्चर्य वाटलें, व असें होण्याचें कारण काय असावें, याचा ते विचार करूं लागले. तेव्हां हरिहरांच्या लक्षांत आलें कीं, विघ्नविनाशन जो गणपति, त्याचें पूजन करून,

ची प्रसन्नता प्राप्त करून न घेतल्यामुळेंच, अंगीकृत कार्यांत आपणांस यश आलें हीं. ह्मणून सर्व देवांनीं पश्चात्तापयुक्त अंत:करणानें गणेशाची आराधना केली, णि नंतर पुन्हा युद्ध करूं लागले, तेव्हां त्रिपुरासुराचा क्षणार्धांत अल्पसायासानें नाश झाला. या आख्यायिकेचें तात्पर्य एवढेंच कीं, ज्याच्या कृपाप्रसादामुळें पुरासुराचा नाश करण्याचें सामर्थ्य हरिहरांमध्यें उत्पन्न झालें, तो गणपति परम पास्य आहे, हें स्पष्ट आहे. व्यासाच्या गणेशपुराणांत व मुद्गलपुराणांत असें सांगि- लें आहे कीं, सर्वांचें आदिकारण गणपति असून, त्याच्या सोंडेंतून हरिहरादि देव र्माण झाले. गणेशाचें एक क्षणभर जरी ध्यान केलें, तरी सूर्याच्या योगानें जसा धाराचा नाश होतो, त्याप्रमाणें सर्व विघ्नांचा नाश होतो. ह्मणून त्या गणेशाची जाच सर्वांनीं करावी."

आतां शक्त्युपासकांचें काय ह्मणणें आहे, त्याचा विचार करूं. ते ह्मणतात कीं, "हरिहरादिक देवांमध्यें अनेक प्रसंगीं जें अतुल सामर्थ्य दिसून येतें, तें त्यांच्या ठायीं वास करीत असणाऱ्या शक्तीमुळें होय. त्यांच्यांत जर शक्ति नसती, तर ते शवत्—चलनादिव्यापारशून्य——निश्चेष्ट पडले असते. त्यांनीं शक्तीची महदुपासना केली असल्यामुळेंच त्यांच्याठायीं अनेक लोकोत्तर कार्यें करण्याचें अद्भुत सामर्थ्य अधिकार प्राप्त झाला. जगतांत शक्ति या नामानें जी प्रसिद्ध आहे, ती भगवती- च होय. ती दोन रूपांनीं नांदते. एक सामान्यरूप व दुसरें विशेषरूप. सर्व पदा- र्थांमध्यें व प्राणिमात्रांमध्यें, आपआपलें काम करण्याची जी स्वाभाविक शक्ति अस- ते, तें भगवतीचें सामान्य स्वरूप होय; व अष्टभुजादि ज्या विशिष्ट मूर्ति, तें तिचें विशेष स्वरूप होय. सामान्यरूपानें वास करणाऱ्या शक्तीचें, भिन्न भिन्न प्राणिमात्रां- च्या ठिकाणीं, न्यूनाधिक्य दिसून येतें. ज्यांत शक्तीचा अगदीं अल्प अंश असतो, त्यास असमर्थ अथवा अशक्त असें ह्मणतात; व ज्यांत शक्तीचें आधिक्य वास कर- तें, त्यास समर्थ असें ह्मणतात. विष्णु शिव गणपति वगैरे सर्व देवांमध्यें शक्तीच्या सामान्यरूपाचा विशेषांश ह्मणजे मोठा अंश असल्यामुळें त्यांच्यामध्यें ईश्वरभाव व दैवी सामर्थ्य दिसून येतें. शक्तीच्या अभावीं, त्यांची स्थिति वर सांगितल्याप्रमाणें शवत् व अमंगल झाली असती— भगवतीच्या सामान्य स्वरूपाचे जसे अनंत अंश आहेत, त्याप्रमाणें तिच्या विशेषस्वरूपाचेहि अनंत अंश, तिच्या विशिष्ट मूर्तीं- मध्यें, कमी अधिक प्रमाणांत वास करीत असतात. तिच्या त्या सर्व साकाररूपांमध्यें 'काली' हें तिचें प्रधानरूप होय. माहेश्वरी वैष्णवी सौरी इत्यादिकांमध्यें, या वि- शेष रूपाचेंच प्राधान्य असतें. भगवतीच्या उपासनेमुळेंच विष्णूला वैष्णवी शक्तीचा लाभ झाला, व शिवाला माहेश्वरी शक्तीचा लाभ झाला. ध्यात्याला ध्येयरूपाची

प्राप्ति होणें, हें ध्यानाचें निःसीमरूप होय. उपासनेची परमावधी झाली, ह्मणजेच ध्याता ध्येयस्वरूपी होतो. विष्णु व शिव सूर्य वगैरे भगवतीचे परमभक्त व श्रेष्ठ उपासक असल्यामुळेंच त्यांना त्या त्या शक्तीचा लाभ घडला. ह्मणून शक्ति हीच सर्वांत उपास्यतम देवता आहे, '' असें शाक्त प्रतिपादन करितात.

आतां सौर ह्मणजे सूर्योपासकांच्या मतें, '' सूर्य हाच श्रेष्ठ व परम उपास्य देव आहे. हरिहरादि देव उपास्य व श्रेष्ठ असले, तरी सूर्यावांचून त्यांची व तदुपासकांची गति अंधाप्रमाणें होऊन राहील. सर्वांचें प्रकाशन करण्यास एक सूर्यच समर्थ आहे. सूर्यावांचून इतर कोणीही प्रकाशन करण्यास स्वतंत्र नाहीं. अग्नि चंद्र, दीप इत्यादिकांच्या ठिकाणीं जें तेज व प्रकाशनसामर्थ्य असतें, तें सूर्यापासून त्यांना प्राप्त झालेलें असतें. केवळ परहितार्थ अहोरात्र अविश्रांत परिभ्रमण करीत असणाऱ्या सूर्यासारखा दुसरा जगाचा हितकर्ता कोण आहे ? कोणीच नाहीं. सर्व कार्यांची उत्पत्ति ज्या काळावर अवलंबून रहाते, त्या काळाचे वर्तमान, भूत व भविष्य हे तीन भेद, सूर्याच्या गतीमुळेंच उत्पन्न झालेले आहेत; ह्मणून सर्वांचा उत्पत्तिकर्ता सूर्यच ठरतो. त्याच्या प्रसन्नतेवर विश्वस्थिति अवलंबून राहाते. त्याच्या अप्रसन्नतेनें ह्मणजे त्याच्या कोपानें, सर्व विश्व दग्ध होऊन त्याचा नाश होईल. सारांश, विश्वाची उत्पत्ति स्थिति व लय, यांना एक सूर्यच कारण होय. अशा या श्रेष्ठ स्वयंप्रकाश सूर्याचीं, निराकार व साकार, अशीं दोन रूपें आहेत. सर्व नामरूपात्मक पदार्थांत तो निराकाररूपानें व्यापून राहिला आहे. वेदांती ' भाति ' या शब्दप्रयोगानें त्याच्या या स्वरूपाचा बोध करितात. निराकार स्वयंप्रकाश सूर्याचें हें रूप, जगाचें अधिष्ठान आहे; व त्याच्याच अज्ञानानें, ह्मणजे हें अधिष्ठान न जाणल्यामुळें, जगत्-रूपी विवर्त सत्यत्वानें भासमान होतो. हा निराकार स्वयंप्रकाश सूर्य साभास अंतःकरणाचे, ह्मणजे अंतर्मुख वृत्तीचे ठायीं स्वयंप्रकाशकत्वानें प्रतीत झाला ह्मणजे ' अहं भानुः ' अशी अंतःकरणवृत्ति उदय पावते, व अज्ञाननिवृत्तिमुळें जगद्विवर्ताचीही निवृत्ति होते. आतां सूर्याचें जें साकार स्वयंप्रकाश रूप, त्याच्या योगानें, दिनोदयाबरोबर त्याचा प्रकाश सर्वत्र भासमान होतो. चंद्र, नक्षत्र, तारांगणें, हीं त्याच्याच प्रकाशानें प्रकाशमान होतात. अशा या दोन रूपांनीं अखिल सृष्टीचें चालकत्व आपल्याकडे ठेऊन, तिचें कल्याण करणारा, स्वयंप्रकाश, अत एव देव जो सूर्य, तोच सर्वांत श्रेष्ठ व परम उपास्य होय. श्रुति ॥ सूर्य आत्मा जगतस्तथुषश्च ॥

अशारीतीनें, व्यासांच्या पुराणांच्या प्रमाणावर, आपल्या ह्मणण्याचें यथार्थस्वरूप स्पष्ट मांडून, तें सिद्ध करूं पाहाणारे भिन्न भिन्न देवतांचे उपासक, आपल्या देवतांचें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याच्या भरांत, इतर देवतांची निंदा करतात. पण मंदबुद्धीमुळें

त्यांच्या लक्षांत असें येत नाहीं, कीं भिन्न भिन्न पुराणांचा कर्ता जो व्यास, तो स्कंद पुराणांत शिव सर्वांत श्रेष्ठ आहे, असें सांगतो; व लागलीच विष्णुपुराणांत, विष्णु सर्वांत मुख्य आहे असें सांगून, गणेशपुराणांत गणपतीकडे सकल प्रभुत्व सोंपवितो; तसें सौर पुराणांत सूर्य सर्वोपास्य देव आहे व इतर देव त्याचे उपासक आहेत असें सांगून, देवी पुराणांत देवीच सर्वांपेक्षां अधिक उपास्य आहे, व हरिहरादि देव तिचे केवळ उपासक होत असें प्रतिपादन करितो. अशा रीतीनें वरवर पाहतां, परस्पर विरुद्ध प्रतिपादनांत व्यासमुनींचा काय हेतु असावा, याचा ते विचार करीत नाहींत, ह्मणूनच दुराग्रहास त्यांच्याकडे आश्रय मिळतो. श्रीव्यासमुनींचा असा अभिप्राय समजावयाचा कीं, विष्णु, शिव वगैरे सर्व नांवें मायाविशिष्ट कारणब्रह्माचीं असून, तीं हिरंण्यगर्भ कार्यब्रह्माचींही बोधक आहेत. ज्या पुराणांत व्यास हे शिव सर्वेश्वर आहे असें सांगतात त्यांत ते शिव शब्दानें कारणब्रह्माचा निर्देश करतात व विष्णुगणेशादि शिवोपासक देवांच्या नांवांनीं कार्यब्रह्माचा अर्थ दाखवितात. याचप्रमाणें विष्णुपुराणांत विष्णु या शब्दानें कारणब्रह्म, व तदुपासक शिवादि देवांच्या नांवांनीं कार्यब्रह्म लक्ष्यांत घ्यावयाचें. गणेशपुराण, सौरपुराण इत्यादि पुराणांतूनही, याच धोरणानें, प्रधान देवता कारणब्रह्मवाचक, व गौण देवता कार्यब्रह्मवाचक समजल्या पाहिजेत. तात्पर्य एवढेंच कीं, सर्वच देव हें कारणब्रह्मस्वरूप आहे व तेंच उपास्य आहे. श्रुति स्मृति व पुराणें, ' विष्णु ' ' शिव ' ' गणेश ' इत्यादि नांवांनीं त्याचेंच वर्णन करतात.

भिन्न भिन्न पुराणांत भिन्न देवतांच्या प्राधान्याचें हें रहस्य उपासकांनीं लक्ष्यांत घेतलें, ह्मणजे त्यांच्यामधील विरोधाचें बीज दग्ध होऊन, त्यांच्यामध्यें भागवतोत्तमाचीं लक्षणें स्फुरूं लागतील व मग:--

" एकं सद्विप्रा बहुधा वदंति " या श्रुतीची सार्थकता मनांत बिंबून, सर्वत्र शांति वास करूं लागेल.

ह्मणून भागवतसांप्रदायिकांनीं विष्णुशिवगणेशादि देवांचे ठिकाणीं भेद न पाहतां व आपल्या उपास्य देवतेखेरीज इतर कोणाचीहि निंदा न करतां, आपल्या उपास्य देवतेची उपासना करावी. पण ती अशी—जी आपली उपास्य देवता आहे, तीच भुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत सर्व लहान मोठ्या भूतांतून व्यापलेली आहे, असें जाणून, त्यांनीं आपल्या इष्ट देवतेचें ध्यानभजनपूजनादि उपासना करावी. या लेखाचे आरंभीं आम्हीं उत्तम भागवत जे सांगितले, त्यांनीं अशाच प्रकारची ईशोपासना केली; व नित्यमुक्त व भेदशून्य आत्म्याला, व्यष्टि स्थूलसूक्ष्मदेहसंघाताचे बंधनांत घालून स्थूलसूक्ष्मसंघताकडून होणाऱ्या बऱ्यावाईट कर्मांचें

फल, देहांतराचे ठिकाणीं भोगावयास लावण्यांत हेतुभूत जी अहंता, ती त्यानीं नाहींशी केली.

**तो मी पुससी कैसा । सर्वभूतीं सदा सरिसा ॥**
**जेथ आपपर ऐसा । भाग नाहीं ॥**
**जे ऐसया मातें जाणौनि । अहंकाराचा कुरुठा मोडौनि ।**
**जे जीवें कर्मे करूनि । भजती मातें ॥**

ज्ञा. अ. ९ वा. ओ. ४०७. ४०८.

देहाहंता नाहींशी करणें, हींच परमार्थांतील मुख्य गोष्ट होय. हेंच तुकाराम-महाराज आपल्या एका अभंगाच्या कडव्याच्या पूर्वार्धांत सुचवीत आहेत.

**थोर ती गळाली पाहिजे अहंता ।**

भगवदुपासकांनीं उपासनेच्या योगानें तरी, हेंच साधावयाचें आहे. परंतु भगवंताचें वर सांगितलेलें सर्वांतर्यामित्व न जाणतां, केवळ मनुष्यासारखा प्राकृत देहधारी देव आहे, असें मानून त्याची उपासना जे करितात, त्यांची, सर्व अनर्थांस मूळ जी देहाहंता, ती नाहींशी होत नाहीं. श्रीनाथमहाराज म्हणतातः—

**" आपणयासारिखा देख । हरी मानी पंचभौतिक ।**
**त्या परममूर्खातें देख । अकल्प दुःख सरेना पैं ।**

चतुःश्लोकी भागवत.

श्रीहरीचें सर्वव्यापकत्व न जाणतां, वर सांगितलेल्या समजुतीनें उपासना जे करितात, त्यांना नरकगति प्राप्त होते, असें, एके प्रसंगीं तुकाराममहाराजानीं स्पष्ट सांगितलें आहे.

**कुंभपाक लागे तयासी भोगणें । अवघाचि जो नेणे देव ऐसा ॥ १ ॥**

सारांश, सर्वांतर्यामी एक परमात्मा आहे, अशा जाणिवेच्या शुद्ध भावनेनें होणाऱ्या उपासनेनें, उपासक आत्मज्ञानसंपन्न होऊन, देहाभिमानशून्य होतसातां, कृतार्थ होतो. अशा शुद्ध भावनेनें तुकाराममहाराज पांडुरंगाची भजनपूजनादि नित्य उपासना करीत असत. त्यामुळें, ते एके दिवशीं नित्य नियमाप्रमाणें देवाची पूजा करीत असतांना एकाएकी त्यांच्या अन्तःकरणामध्यें अशी स्फूर्ति झाली कीं, ज्या उपचारांनीं देवाचें पूजन करावयाचें, ते सर्व उपचार तत्त्वतः देवस्वरूपच आहेत; ह्मणजे देवाला स्नान घालावयाच्या पाण्याच्या रूपानें, एक परमात्माच आहे. तसेंच देवाला लावण्याच्या गंधाच्या रूपानेंही तोच आहे. धूप दीप पुष्प फल तांबूल अक्षता, तसेंच देवाला अर्पण करण्याचीं द्रव्यें आणि नैवेद्य

दाखविण्याचें अन्न, हे सर्व एक ब्रह्म आहे, यांत अन्यथा नाहीं. अशा प्रकारें, सर्वच व जर एक परमात्मा आहे, तर पूजा करणारा मीही परमात्म्याहून भिन्न नसून, तद्रू आहें, हें उघड होतें. अशा प्रकारच्या या भावनेच्या हद्दीवर येऊन, तुकारा महाराज देवास ह्मणतात " तुझी पूजा कशानें करूं ? उपचार तुला अर्पण क कां तुला उपचाराला अर्पण करूं ? कारण उपचार आणि तूं, या दोहोंमध्यें, म तूंच एक प्रतीत होत आहेस.

**कासयानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेह माझा फेडी आतां ॥ १ ॥**
**उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें । तेथें काय माझें वेंचे देवा ॥ २ ॥**
**गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं ॥ ३ ॥**
**फळदाता तूंच तांबुल अक्षता । तरी काय अनंता वाहूं तुज ॥ ४ ॥**
**वाहूं दक्षिणा तरी धातु नारायण । ब्रह्म तेंचि अन्न दुजें नाहीं ॥ ५ ॥**

तुकाराममहाराजांप्रमाणें नाथमहाराजही ' सर्वांघटीं राम भाव शुद्ध ' व शुद्ध भावनेच्या पायावर पांडुरंगाची उपासना करीत असत. नाथमहाराजां तुकाराममहाराजांप्रमाणें एकदां स्थिति झाली. ते ह्मणाले हे देवा, तुझें चरित्र गाध आहे, तरी मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत लहान मोठ्या भूतांतून तुझेंच एक मी पहात आहें; या योगानें माझ्यामध्येंहि मला तूंच दिसत आहेस; आणि भ करण्याला तर भज्याहून ( ज्याचें भजन करावयाचें त्याहून ) भजक भिन्न अ पाहिजे, तरच भजनव्यवहार संभवतो. जेथें मी, तुझा भजक, वर सांगितल्याप्र आपणांस तुझ्याहून भिन्न मानीत नाहीं, तेथें तुझें भजन मीं कसें करावें ? क तुझे भजनप्रसंगीं, तुझ्याहून निराळा मी तत्वत: कोण आहें, असें समजावें ? सर्वरूप तूं आहेस, अशा तुझ्या पूर्ण स्वरूपस्थितीमध्यें तुझ्याहून निराळें मला तुझें सेवन कसें करितां येईल ? अहो देवा, तुही आह्माला मानवी ह्म पण खरोखर तुमचा आमचा संबंध सुवर्णालंकाराप्रमाणें आहे. अशा स्थितींत च्या आमच्यामध्यें निवड व्हावी कशी ?

**अगाध तुझी लीला अकळ कैसेनि कळे ।**
**ब्रह्मामुंगी धरोनि तुझें स्वरूप सांवळें ।**
**तुज कैसें भजावें आपणां काय देखावें ।**
**तुजमाजीं राहून तुजला कैसें सेवावें ।**
**अगा देवा तूं आह्मां ह्मणसी मानवी ।**
**हेमालंकार वेगळे निवडावे केवीं ।**

एकनाथमहाराज

वरील तुकाराममहाराजांच्या व नाथमहाराजांच्या प्रमाणांवरून असें दिसतें कीं, त्यांच्यांतील देहबुद्धि गलित होऊन, ते सर्वांतर्यामीं असणाऱ्या परमात्म्याशीं अभिन्नत्वास पावून, कृतार्थ झाले. याचें कारण हेंच कीं, त्यांनीं भागवतसंप्रदाया-प्रमाणें भगवदुपासना केली; ह्मणजे सर्वभूतांचे ठिकाणीं परमात्म्याचें अभिन्नत्व जाणून, परमप्रीतीनें भगवंताची उपासना केल्यानें, एक वेळ त्यांचे ठिकाणीं असा विचार उत्पन्न झाला कीं, सर्वरूपानें जर एक परमात्मा आहे, तर त्या सर्वांपैकींच आपण एक आहोंत, अर्थात् आपणही परमात्माच आहोंत. अशा आत्मज्ञानानें ते मुक्त झाले. परमात्म्याला एकदेशी मनुष्यवत् स्थूल मानून त्याची पूजा करणारे जे बहिर्मुख उपासक आहेत, ते भगवंताच्या पूजेकडे प्रवृत्त झाले असतां, पूजा-प्रसंगीं गंधफूल देवांना वाहातांना, पुरुषसूक्तादि मंत्राचीं शास्त्रकारांनीं जी योजना केली आहे, त्याचें रहस्य हेंच आहे कीं, ज्या देवाच्या डोक्याला तूं गंध लावित आहेस, त्या देवाचें डोकें एक नसून तो सहस्रशीर्ष आहे; ज्या देवाच्या डोळ्यांकडे तूं पहात आहेस, त्या देवाचे डोळे दोन नसून तो सहस्राक्ष आहे. ज्या देवाच्या पायांवर तूं मस्तक ठेवित आहेस, तो देव दोन पायांचा नसून, सहस्रपाद आहे. ज्या देवाला तूं देवळांत एकदेशी व मर्यादित पहात आहेस, तो देव एकदेशी व मर्यादित नसून " स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशांगुलं " ह्मणजे अवघें स्थिरचर व्यापून तो परमात्मा दशांगुळें उरला आहे, असा आहे. अशा तऱ्हेचें देवाचें विराटत्व व विश्वव्यापकत्व, ज्या मंत्रांचे अर्थांतून सुचविलें आहे, अशाच मंत्रांची योजना शास्त्रकारांनीं देवाच्या सगुण पूजेच्या वेळेस केली आहे; मुखानें हेच मंत्र ह्मणत पूजकानें देवाला गंधपुष्पादि वाहावें, ह्मणजे त्या योगानें पूजकाची एखादे वेळेस तरी मंत्राच्या अर्थाकडे दृष्टि जाऊन, परमात्मा हा आपण समजतों असा एकदेशी नसून, तो विराट्स्वरूप आणि सर्वव्यापक आहे, अशी भावना पूजकाच्या आंतमध्यें उद्भवेल, व या प्रस्तावनेच्या आरंभीं सांगितल्याप्रमाणें ह्मणजे शुद्ध भागवतसंप्रदायाप्रमाणें साधकांकडून भगवदुपासना होऊन, सर्व कृतार्थ होतील. " इति शम् "

श्रीसद्गुरुएकनाथमहाराजांचा अनन्यसेवक

**विष्णु नरसिंह जोग.**

पंढरीचा वारकरी.

# श्रीएकनाथमहाराजांचें अल्पचरित्र.

**एका अंगीं दोन्हीं जाली हीं निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥**
**तुका ह्मणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तोचि देव, देव भक्त ॥**

पूर्ण परब्रह्म अवतार, जो श्रीकृष्णपरमात्मा, त्याचे, त्या अवतारकालीं, पुष्क- भक्त होते. पण त्यांत दोन मुख्य **अंतरंग** भक्त होते. एक **अर्जुन** व दुसरा **उद्ध**- या दोन भक्तांपुढें भगवंतांनीं, इतरांच्या दृष्टीपासून चोरून ठेवलेलें, आपलें परम त्मस्वरूपज्ञानाचें गांठोडें सोडलें. तें आत्मस्वरूपाचें ज्ञान, भगवंतांनीं अर्जुन गीतारूपानें उपदेशिलें व उद्धवास श्रीमद्भागवताच्या एकादशस्कंधाच्या रूप सांगितलें. ह्मणून **गीता व भागवत**, हे दोन्ही ग्रंथ, सर्व वैष्णव वेदाप्रमाणें मानता या ग्रंथांतिल सूत्ररूपानें सांगितलेले व्यापक सिद्धांत, व या ग्रंथाची संस्कृत भा हीं बराच कालपर्यंत जनांस कळत असत. पण जसजसा कलिकालाचा प्रवेश जा होत चालला, तसतसे हे व्यापक सिद्धांत व त्यांची संस्कृत भाषा, हीं लोकांस सम नाशीं झालीं. ह्मणून सूत्ररूपानें संस्कृत भाषेंत सांगितलेले सिद्धांत, विस्तारानें अनेक तऱ्हेचे दृष्टांत देऊन स्पष्ट रीतीनें प्राकृत भाषेंत सांगण्याकरितां, भगवंत पुनः दोन अवतार घेतले. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा अवतार घेऊन भगवंत गीतेवर भावार्थदीपिका [ ज्ञानेश्वरी ] ही टीका केली, व श्रीएकनाथमहाराज अवतार घेऊन, श्रीमद्भागवताच्या एकादशस्कंधावर टीका केली. हेंच एक- भागवत होय.

शके १३७० चे सुमारास, प्रतिष्ठान [ पैठण ] येथें, भानुदास नांवाचे ऋ- देशस्थ ब्राह्मण, महान् भगवद्भक्त व साधु होऊन गेले. विद्यानगर [ विजयन- येथील शूर, पराक्रमी व भगवद्भक्त रामदेव राजानें, पंढरपूर येथील पांडुरंगमूर्ति विद्यानगरास नेली होती, ती पुन्हां भानुदासांनीं पंढरपुरास आ- पंढरपुरास श्रीपांडुरंग आल्यावर, सर्व भक्तमंडळी त्यांस भेटली, व हा भक्तभे योग भानुदासांनीं आणून दिला, ह्मणून श्रीपांडुरंग भानुदासावर संतुष्ट झा " कांहीं वर माग, " **ह्मणून ह्मणाले.** तेव्हां भानुदास म्हणाले, " माझ- आपण अवतार घ्यावा, आणिक माझी इच्छा नाहीं. " तेव्हां रुक्मिणी ' अवश्य ' म्हणून म्हटलें. भानुदासास चक्रपाणी नांवाचा पुत्र होता. चक्र- सूर्यनारायण या नांवाचा पुत्र होता. सूर्यनारायणाच्या पत्नीचें नांव रु

या रुक्मिणीचे उदरीं श्रीविष्णूनीं विश्वहितार्थ शके १४५० चे सुमारास अवतार घेतला. हेच श्रीएकनाथ महाराज होत. एकनाथांच्या जन्मानंतर थोडक्याच कालांत त्यांचे आईबाप निवर्तले, व एकनाथांच्या पालनपोषणाचा सर्व भार त्यांच्या आजावर पडला. एकनाथांस अगदीं लहानपणापासून भगवद्भक्तीचा छंद होता; ते नेहमीं पुराण व कीर्तन ऐकत असत; त्यांनीं कधीं कधीं शास्त्री व पुराणिकांस असे प्रश्न विचारावे कीं, त्यांची मति व युक्ति अगदीं कुंठित होऊन, त्यांस कांहींच उत्तर सुचूं नये. तेव्हां एकनाथांनीं उत्तर देऊन, त्या सर्वांचें समाधान करावें. ते-वेळीं सर्व पंडित, पुराणिक व शास्त्री यांनीं एकनाथांच्या मुखावर हात फिरवून ह्मणावें कीं, बा एकनाथा, तुझ्या ज्ञानापुढें आमचें ज्ञान ह्मणजे सूर्यापुढें चंद्राप्रमाणें आहे. तुझ्या गुणावरुन निंबलोण करावेंसें वाटतें.

पैठणांत एका शिवालयांत प्रहररात्रीं एकनाथ भजन करीत असत. शिव ह्मणजे आदिनाथ गुरुच, तेव्हां आपणास सद्गुरु दृष्टीस पडावे, अशी एकनाथांस इच्छा झाली. इतक्यांत तेथें आकाशवाणी झाली कीं, "देवगिरी गडावर [ दौलताबादचे किल्ल्यावर ] जनार्दनपंत नांवाचे सत्पुरुष आहेत, त्यांस श्रीदत्ताचा अनुग्रह आहे, तरी त्यांचें दर्शन तूं घे." ही आकाशवाणी ऐकून ते घरीं आले, व गांवच्या पुराणिकास ह्मणाले कीं, मला देवगिरीगडावर जनार्दनपंतांच्या दर्शनास जावें असें वाटतें, व दुसरे दिवशीं एकनाथांनीं कोणास न कळवितां दौलताबादेस प्रयाण केलें व जनार्दनस्वामींची गांठ घेतली, व साष्टांगनमस्कार घातल्यावर हात जोडून ह्मणाले कीं, " मला अभयवर द्या व सेवेस असों द्या." मग जनार्दनस्वामींनीं त्यांस आपले जवळ ठेवून घेतलें, व एकनाथ आपल्या सद्गुरुची अनन्यभावें सेवा करीत व त्यांचे तोंडून ज्ञानेश्वरी व अमृतानुभव श्रवण करीत राहिले. एके दिवशीं दौलताबादेवर परचक्र आलें. जनार्दनपंतांस ही खबर कळवावी, तों ते ध्यानस्थ होते. तेव्हां एकनाथांनीं, जनार्दनपंतांचा पोषाख करुन, किल्ल्यावरील सैन्य बरोबर घेऊन परचक्राचा पराभव केला. हें वर्तमान कांहीं वेळानें जनार्दनपंतांस कळल्यावर ते फार खुष झाले. कांहीं दिवसांनीं जनार्दनपंतांनीं एकनाथांस हिशोबदप्तराचें काम सांगितलें. एके दिवशीं जनार्दनपंतांनीं हिशोब पहाण्यास मागितला. तेव्हां 'होय' ह्मणून एकनाथ रात्रीं हिशोब तपासावयास बसले, तों एक आधेल्याची चूक ताळा पाहतांना आढळली. मग त्या चुकीकरितां अडीच प्रहर रात्रपर्यंत एकनाथ हिशोब पहात बसले, तों त्यांस अकस्मात् चूक आढळून ताळा बरोबर पडला व त्या आनंदाचे भरांत एकनाथांनीं मोठ्यानें हांसून, आपल्या मांडीवर चापट मारिली. जनार्दनपंत जवळचे खोलींत होते, त्यांनीं पुढें येऊन विचारिलें कीं, " येवढा कशाचा

आनंद झाला ? " तों नाथांनीं हिशोबांतील चुकीची हकीकत सांगितली. त्यावर जनार्दनपंत ह्मणाले; " असेंच श्रीकृष्णाच्याठायीं चित्त लावावें, तरच संसारीं स्वहित होईल. " नाथ लागलीच ह्मणाले " जी महाराज, हेंच मी मनांत इच्छिलें होतें, व आतां आपण तशीच आज्ञा केली, तर अतःपर मी आपली वाणी उगीच वेंचणार नाहीं. " पुढें जनार्दनपंतांनीं एके दिवशीं विचार केला कीं, एकनाथ हा सद्गुरुभक्त आहे व आपली बहुत सेवा करीत आहे, तर यास एकदा श्रीदत्तदर्शन करविलें पाहिजे. असा विचार मनांत आणून, जनार्दनपंत एकनाथांस आपल्या ध्यान करण्याचे एकांतस्थळीं घेऊन गेले, व तेथें त्यांस साक्षात् श्रीदत्ताचें दर्शन करविलें. श्रीदत्तात्रयांनी नाथांस पहाण्याबरोबर सांगितलें कीं " ह्यास बाल ह्मणों नये. विश्वोद्धार करण्याकरितां हा श्रीविठ्ठलाचा अवतार झाला आहे. याचें कीर्तन ऐकतां बहुजन भक्तीस लागतील. हा वाग्विलास व कवित्वलेखन करील, व प्रासादिक वचनें बोलेल. वेदशास्त्रांचें निजमथित, जें व्यासानें केलेलें श्रीभागवत, त्याचा बहुत प्रांजळ अर्थ हा स्वमुखें निश्चित वदेल. वाल्मीकीकृत रामायणावर हा प्राकृत लेखन करील, व याची कविता पूर्ण वाचितां तेणें जीवास साक्षात्कार होईल. कीर्तनामध्यें हा पदपदांतरें फार वदेल व यावच्चंद्रदिवाकरौ याची कीर्ति राहील. " हें ऐकून जनार्दनपंतांनीं व एकनाथांनीं श्रीदत्तात्रयाचे चरणारविंदीं साष्टांगनमस्कार घातला, व मग कांहीं वेळानें श्रीदत्त अंतर्धान पावले. यानंतर जनार्दनपंतांनीं नाथांस आज्ञा केली कीं, "**सद्गुरुकृपेनें आत्मज्ञानप्राप्ति झाली, तरी सगुणभक्ति सांडूं नये,** ही चित्तांत नीट आठवण ठेव. आतां तुला एक युक्ति सांगतों. ती चित्त देऊन ऐक. या देवगिरीच्या मागें सुलभ पर्वत आहे. तेथें सूर्यकुंडतीर्थ आहे. त्या एकांत रमणीय स्थळीं, जे साधकजन अनुष्ठान करितात, त्यांस पूर्ण साक्षात्कार होतो, अशी ती भूमि पुण्यपावन आहे. तें मार्कंडेयऋषींचें स्थान आहे. तेथें एकाग्र मन करून श्रीकृष्ण ध्यान करावें; आमची खंती न करावी; तेठायीं आह्मी सन्निध आहों. तेथें जर कांहीं अपूर्व दृष्टीस पडेल, तर मग परतून आमच्या भेटीस यावें. " बरकड गुरु ज्ञान सांगतात, पण सगुणभक्तीचें उच्छेदन करितात; तशी स्थिति जनार्दनपंतांची नव्हती. एकनाथ आधींच प्रेमळ सच्छिष्य होते, व त्यांत गुरूंनीं श्रीकृष्णाची उपासना करावयास सांगितली. मग काय ? एकनाथ लागलीच गुरुचरणांस वंदन करून निघाले, व गुरूंनीं सांगितलेल्या स्थळीं अनुष्ठानास बसले. कांहीं काळानें त्यांस श्रीकृष्ण परमात्म्याचें साक्षात् सगुणदर्शन घडल्यावर, ते परत गुरूंकडे आले, व साष्टांगनमस्कार करून गुरूंपुढें उभे राहिले. गुरूंनीं त्यांस पाहतांक्षणींच जाणलें कीं, याचें चिन्ह पालटलें आहे. मग गुरूंनीं, ' काय अपूर्व गोष्ट झाली ' ह्मणून विचारल्यावर, नाथांनीं

आपणास श्रीकृष्णाचें सगुणदर्शन झाल्याचें वर्तमान सांगितलें. पुढें जनार्दनपंत व एकनाथ नाशिकत्र्यंबकास यात्रेस गेले. वाटेंत त्यांची व चंद्रभट नांवाच्या विरक्त व अयाचित वृत्तीनें राहणाऱ्या तपोनिष्ठ ब्राह्मणाची गांठ पडली. चंद्रभट चतुःश्लोकी भागवताचें पुराण सांगतसे. नाशिकास पंचवटींत असतां, जनार्दनपंतांनीं एकनाथांस आज्ञा केली कीं, " तुझ्या माथीं दत्ताचा वरद हस्त आहे, तर चंद्रभटानें बरोबर आणलेल्या चतुःश्लोकी भागवतावर या स्थानीं तूं प्राकृत प्रांजळ टीका कर. पुढें तुला श्रीकृष्ण साहाय्य होऊन, तुजकडून भागवताच्या एकादश स्कंधाचा प्राकृतांत संपूर्ण अर्थ बोलवितील. " या गुरुआज्ञेप्रमाणें नाथांनीं चतुःश्लोकी भागवतावर टीका करून, ती गुरूंस दाखविली. गुरु टीका पाहून फार संतुष्ट झाले, व चंद्रभटानें टीका पाहून असा निश्चय केला कीं, हे गुरुशिष्य म्हणजे साक्षात् शंकरविष्णूचे अवतार आहेत. तो नित्य नेमानें सटीक चतुःश्लोकी भागवताचा पाठ करूं लागला, व कांहीं दिवसांनीं तो विदेहस्थिति पावला; म्हणजे त्याला आपणासकट सर्व विश्व जनार्दनरूपानें भासावयास लागलें, आणि मी व माझा देह, ही स्फूर्ति मनांत आठवेनाशी झाली.

देवगिरीस परत आल्यावर चंद्रभटानें समाधींत बसण्याची इच्छा दाखविल्यावरून, त्यास जनार्दन स्वामींनीं देवगिरीपर्वतावर समाधीस बसविलें, व अविंधाकडून त्रास होऊं नये म्हणून, त्या समाधीवर अविंधाच्या मदारेप्रमाणें आकार बांधून काढला. यापुढें जनार्दनपंतांनीं नाथास आज्ञा केली कीं, " तुम्हीं तीर्थयात्रेस जावें. तीर्थाच्या निमित्तानें तुम्हांस संतदर्शन होईल. तुमचा योगक्षेम श्रीकृष्ण चालवील. बदरीनाथाचें दर्शन घेऊन उत्तरमानस पहावें व दक्षिण रामेश्वराचें दर्शन करून परत आमचेकडे यावें. "

इकडे पैठणास एकनाथांचीं आजाआजी त्यांचा एकसारखा शोध करीत होतीं. गांवच्या ज्या पुराणिकाकडे एकनाथ बसावयास जात होते, त्यास विचारलें असतां; तो म्हणाला, " एकनाथ कोठें गेला हें मला माहीत नाहीं. पण तो देवगिरीस जनार्दनपंताकडे जावयाचें आहे, असें म्हणत होता. " हें ऐकून चक्रपाणी ( एकनाथांचा आजा ) देवगिरीस जाऊन जनार्दनपंतांस भेटला व त्यांस आपलें सर्व वृत्त कळविलें. जनार्दनपंत म्हणाले " एकनाथांस तुम्हीं बाल समजूं नये. तो साक्षात् पांडुरंगमूर्ति आहे. श्रीविष्णूनें विश्वोद्धार करण्याकरितां तुमच्या कुळांत अवतार घेतला आहे. तेव्हां धन्य तुमचें कुळ. त्याचीं एक एक चरित्रें जेव्हां तुम्ही पुढें बघाल तेव्हां तुमची संशयनिवृत्ति होईल. तो हल्लीं यात्रेस गेला आहे. तो उत्तरयात्रा करून सहा महिन्यांनीं पैठणास परत येईल, तर तुम्हीं

या शोधांत असावें व तो तुम्हांला भेटला, म्हणजे त्यास तुम्हीं हें पत्र द्यावें, जे तो पुढें दक्षिणयात्रेस न जातां तुमचेजवळ राहील." असें बोलून जनार्दननीं चक्रपाणीच्या हवालीं पत्र केलें. पत्र घेऊन चक्रपाणी पैठणास आला व ांची वाट पहात शोधांत राहिला. तों नाथ जनार्दनपंतांनीं सांगितल्याप्रमाणें ठ. चक्रपाणीची व नाथांची भेट होतांच चक्रपाणीस आनंदाश्रु आले, व त्यानें ार्दनपंतांचें पत्र नाथांस दिलें. त्या पत्राचा भाव इतकाच होता कीं, "तुला दर्शन होतांच, तीर्थभ्रमण सांडून, जेथें तुला हें पत्र मिळेल, तें तूं वसतिस्थान ावें." त्याप्रमाणें नाथांनीं दक्षिणयात्रेचा बेत रहित करून, ज्या स्थानीं स गुरूचें पत्र मिळालें, त्याच ठिकाणीं वस्ती केली. त्यांची आजाआजी, हीं वांतील घर सोडून नाथांच्या वसतिस्थानीं राहिलीं. त्या स्थलीं नित्य कीर्तन, ाण, व भजन यांची गर्दी उडून राहिली. श्रावणमासीं गोकुळाष्टमीचा उत्सव ला. तेव्हां त्या उत्सवास जनार्दनपंत देवगिरीहून आले होते. चक्रपाणीनें जनाापंतांस विनंति केली कीं, "भानुदासाचा वंश पुढें चालू राहिला पाहिजे, तर ापण एकनाथांस विवाह करण्याविषयीं आज्ञा द्यावी; आम्हीं त्यास पुष्कळ सांगून ाहिलें, पण गृहस्थाश्रम करावा, असें त्यांस वाटत नाहीं; जर आपण त्यांस सांगिलें, तर तो खास ऐकेल." तेव्हां जनार्दनपंतांनीं नाथांस बोलावून आज्ञा केली ीं, "तुला मुली सांगून येत आहेत, तर तूं खुशाल लग्न कर. ृहस्थाश्रमास कांहींएक बाध नाहीं. सर्व आश्रमांत गृहस्थाश्रम अति उत्तम आहे. गृहस्थाश्रमांत राहून, तूं इंद्रियांस नेम लाव, सुखरूप जो स्वधर्म, तो चालीव, सर्वभूतीं पूर्ण दया ठेव, परोपकारीं शरीर झिजीव, ब्राह्मण, अतिथि व क्षुधित यांस अन्नदान कर, यथाविधि विष्णूचें अर्चन कर, प्रेमयुक्त हरिकीर्तन कर, व सर्वकाळ निजप्रीतीनें नामस्मरण कर." तेव्हां नाथांनीं गुरुचरणीं मस्तक ठेवून, हात जोडून "मला आपली आज्ञा शिरसा वंद्य आहे" असें सांगितलें. विजापुरास एक संपन्न ब्राह्मण होता, त्याची कन्या उपवर झाली होती, व तो तिजकरितां वर पहात होता. त्यांस पंढरीनाथांनीं स्वप्नांत सांगितलें कीं, "पैठण येथील सुशील विष्णुभक्त एकनाथ, यांस तूं आपल्या कन्येचें सालंकृत कन्यादान कर." त्याप्रमाणें तो गृहस्थ कन्येस घेऊन पैठणास आला, व त्यानें आपल्या कन्येची पत्रिका चक्रपाणीस दिली. ती पत्रिका नाथांच्या पत्रिकेशीं उत्तम जमते, असें गांवच्या ज्योतिष्यानें सांगितलें. कांहीं दिवसांनंतर एकनाथांचा विवाहसमारंभ फार थाटाचा झाला. नाथांचे विवाहास जी नातेवाईक मंडळी जमली होती, त्यांपैकीं

[illegible] थसेवेची इच्छा करून नाथांजवळ रा-

हिला, व बाकीची मंडळी आपापल्या गांवीं गेली. नाथांच्या परम सुलक्षण पत्नीचें नांव गिरिजाबाई ठेविलें. तिचें जरी पोरवय होतें, तरी घरची रीतभात व वडिलांची मर्यादा कशी ठेवावी, हें ती पूर्णपणें जाणत होती. गृहस्थाश्रमांत नाथ अयाचित वृत्तीनें रहात, व त्यांस जें उदंड अन्नवस्त्र मिळे, त्यायोगें ते ब्राह्मणसंतर्पण करीत; व यातिवर्णाची चौकशी न करितां 'विश्वीं जनार्दन भरला आहे' अशा अनुभवानें, ते सर्वांस अन्नदान करीत. त्यांची सर्वांभूतीं संपूर्ण दया असे. भानुदासांची पूजेची जी पांडुरंगमूर्ति देव्हाऱ्यांत होती, त्या मूर्तीची नाथ नित्य स्वतः सप्रेमभक्तीनें पूजा करीत असत. दोन प्रहरीं ब्राह्मणसंतर्पण व अन्नदान झाल्यावर, तिसरे प्रहरीं पुराण, व रात्रीं कीर्तन होत असे. दिवसानुदिवस नाथांची कीर्ति पुष्पसुगंधाप्रमाणें फैलावयास लागली. याप्रमाणें नाथांचा सोहळा आजाआजींनीं पाहून, सुखानें देहाचें आयुष्य सरतांक्षणीं वैकुंठास प्रयाण केलें. नाथांनीं स्वहस्तें त्यांची क्रिया करून त्यांस सद्गति दिली.

पुढें एके दिवशीं कोणी एक गृहस्थ देवगिरीहून आला व त्यानें जनार्दनपंत वैकुंठवासी झाल्याची खबर नाथांस दिली. सद्गुरुप्रयाणाची बातमी ऐकून, नाथांस खेद वाटला नाहीं; कारण, अविनाश अव्यक्त व परिपूर्ण असा जनार्दन जनीं भरलेला आहे, असा त्यांचा अनुभव होता. त्यांनीं उद्धवास एकांतीं नेऊन फाल्गुन वद्य षष्ठीचा उत्सव करावा असें सांगितलें. उद्धवानें नाथांचे पायांवर मस्तक ठेवून "उत्सव कशाकरितां करावयाचा" असें विचारिलें. तेव्हां नाथांनीं सांगितलें कीं, ही तिथी जनार्दनस्वामींची जन्मतिथी आहे; जनार्दनस्वामींस दत्तात्रयदर्शन याच तिथीस झालें; आह्मास जनार्दनकृपेनें दत्तानुग्रह याच तिथीस झाला; याच तिथीस जनार्दनस्वामींचें देहावसान झालें; हीं चार कारणें झालीं; पुढील होणें आहे (नाथांच्या प्रयाणाची हीच तिथी आहे) तें तूं पहाशीलच" तेव्हां उद्धवानें सर्व साहित्य जमवून मोठ्या समारंभानें उत्सव पार पाडला.

दिवसानुदिवस नाथांच्या पुराणकीर्तनांस अतिशय गर्दी होऊं लागली; श्रवणास येणाऱ्या लोकांस श्रीविष्णुभक्तीची गोडी लागली; क्षमा, दया, शांति व विरक्ति हे गुण त्यांच्यांत वाढूं लागले; नाथांचें बोलणें ऐकून, त्यांनीं असत्य व्यवहार टाकला व धर्मवासना धरून, बहुत प्रीतीनें नामस्मरण करावयास लागले; तेव्हां त्यांच्या अज्ञानदशेचें चिन्ह पालटलें, व त्यांस स्वानुभवेंकरून सिद्धांतज्ञान व्हावयास लागलें. नामस्मरणांत व कथापुराणश्रवणांत त्यांस नित्य नवें प्रेम येतसे; व अशा चढत्यावाढत्या भक्तीनें श्रोत्यांची चित्तवृत्ति वेधली व प्रपंचभ्रांति निरसावयास लागली. याप्रमाणें नाथांचा होत असलेला उत्कर्ष पाहून, प्रेमळ लोकांस संतोष

हावा. पण त्या गांवांतील रिकामटेकड्या लोकांस व वैदिक पंडित ब्राह्मणांस, ना-
ांचा मत्सर वाटावयास लागला, व ते नाथांचा उघड द्वेष व निंदा करावयास
ागले. ते ह्मणावयास लागले कीं, " नाथानें क्षेत्रांत दुकान मांडून, तो समस्त
ाविक लोकांस भोंदीत आहे. त्याचें वक्तृत्व कांहीं मोठें विद्वत्तेचें नाहीं; पण कीर्त-
ांत चार प्राकृत अक्षरें मिळवून तो बोलतो व लोकांचें अंतर मोहित करितो. आ-
ेक सर्व पुराणें सोडून, हा लोकांना भागवतच प्राकृत भाषेंत प्रांजळ सांगतो, व त्या
ोगानें यानें लोकाचें चित्त अगदीं वेधून टाकिलें आहे. भागवतधर्म ऐकून, आमची
जमानमंडळी निष्काम होत चालली; कामनिक व्रतें कोणीच करीतनासे झाले.
ामचे यजमान नाथानें मोहून टाकल्यामुळें, ते आतां आमची प्रपंचउपजीविका
ालवीतनासे झाले. पण आमची गोष्ट एकीकडे राहो. नाथांच्या गोष्टी ऐकून जर
र्व लोक स्वरूपीं मिळावयास लागले, तर ब्रह्मदेव काय करील ? त्याचा सृष्टिक्रम
सा चालावा ? या नाथानें सत्कर्म बुडवून, भक्तिपंथाचें बंड स्थापित केलें आहे.
थ्वींत एक नाथच कां पुराण सांगणारा आहे ? आमच्यांत पुष्कळ विद्वान् पुराणिक
ाहेत, उत्तम वैदिक आहेत, कोणताही यज्ञयाग चालू केला, तर तो बिनचूक यथासांग
ालविणारे आहेत. पण पहा. आम्हांस कोणीच विचारीतनासें झालें. जो उठला,
ा नाथाचीच भक्ति करीत सुटला. हे लोक त्याला विष्णूचा अवतार म्हणतात.
बोवा ! याला काय म्हणावें ! ब्राह्मणांची मिळकत, या एकनाथांच्या भाग-
तधर्माच्या पुराणानें बुडविली. आतां ब्राह्मणांचें व्हावें कसें व धर्म रहावा कसा ? "
प्रमाणें क्षेत्रवासी ब्राह्मणांच्या जल्पना चालू होत्या. इकडे एकनाथ मनांत ब्रह्म-
ावना धरून, सप्रेम भावार्थानें ब्राह्मणांची सेवा करीत. क्षेत्रवासी ब्राह्मणांनीं
ानाप्रकारांनीं त्यांचा छळ केला, तरी नाथांच्या अगाध शांतिसमुद्रांत कांहीं-
क खळबळ होत नसे. ब्राह्मणांनीं देखिली वस्तु मागितली कीं, नाथ
त्यांस देत असत, व वस्त्रेंपात्रें पुरवीत असत. नाथांच्या येथें जशी अन्नशांति
त असे, तशी अन्नशांति दुसरीकडे होत नव्हती. कोणत्याहि जातीचा क्षुधित मनु-
केव्हांहि येवो, त्यास अन्न हें मिळावयाचेंच. नाथांच्या अभेदभक्तीस प्रसन्न
ऊन, पांडुरंगांनीं विठ्ठलपंत हें नाम धारण करून, बारा वर्षें नाथांच्या कीर्तनांत
ृदंग धरिलें. केशवभट हें नाम घेऊन, परमात्मा श्रीहरी, हे बारा वर्षें नाथांच्या
ुराणास श्रोते ह्मणून होते. नाथांच्या घरचें कामीं व पूजेचे कामीं मदत करण्यास
श्रीकृष्ण श्रीखंडे या नांवानें ब्राह्मणरूप धारण करून बारा वर्षें नाथांच्या घरीं माधव-
नें कावडीनें पाणी भरिलें, व आपल्या हातांनीं गंध उगाळून दिलें. याप्रमाणें
तीस वर्षें भगवंतांनीं आपलें निर्गुणनिराकार रूप टाकून, सगुणसाकार होऊन,

ज्या नाथांचे संगतींत काढलीं, त्या नाथांचा महिमा कोठवर वर्णावा ! त्यांच्यासारखे तेच, व त्यांचा महिमा त्यांसच माहीत. नाथांच्या चरित्रांत अनेक चमत्कारांच्या व अपूर्व गोष्टी घडल्या आहेत; अनेक गोष्टी त्यांची अगाध शांति व गांभीर्य दाखविणाऱ्या आहेत; व अनेक प्रसंगीं त्यांची अमर्याद परोपकारबुद्धि व्यक्त झालेली आहे. त्यांचें येथें वर्णन करावयास स्थलसंकोचास्तव जागा नाहीं. त्या गोष्टी महिपतीकृत भक्तलीलामृत, भक्तविजय, संतलीलामृत व संतविजय यांत पहाव्या व रा. सहस्रबुद्धे कृत " श्रीएकनाथ महाराज यांचें चरित्र " व रा. पांगारकरकृत " एकनाथ महाराजांचें संक्षिप्त चरित्र, " हीं पुस्तकें वाचावीं. अभेदभक्तीच्या भूमिकेवर जे भक्त गेले आहेत, त्यांच्यांत व देवांत भेद नाहीं. ज्या ज्ञानशक्तीनें हें सर्व ब्रह्मांडयंत्र यथास्थित चालू आहे, त्या ज्ञानशक्तीशीं ज्यांचें तादात्म्य झालें आहे, ते आपले इष्टहेतु साधण्याकरितां, आपणास हवा तो फेरबदल, त्या यंत्रांत अगर त्याच्या गतींत करूं शकतात. त्यांस अशक्य तें काय आहे ? त्यांची इच्छा हीच सृष्टीची प्रेरकशक्ति होते.

यानंतर नाथ पंढरपुरास श्रीपांडुरंगदर्शनास गेले. त्यांचेबरोबर यात्रेकरितां फार माणसें गेलीं होतीं. श्रीपांडुरंगाचे आज्ञेवरून त्यांचे गरुडपारीं कीर्तन झालें. कीर्तनांत त्यांनीं भानुदासाचें चरित्र वर्णन केलें. त्या वेळीं कीर्तनगजरांत सर्व वैष्णव डोलूं लागले, नादब्रह्मच मुसावलें कीं काय असें सर्वांस वाटलें व संतमहंत कीर्तन ऐकून तटस्थ झाले. पुढें नाथ पैठणास आल्यावर कांहीं दिवसांनीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं त्यांस स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, "अजानवृक्षाची मुळी कंठापर्यंत आली आहे, तर ती एकीकडे करावी." त्याप्रमाणें नाथ आळंदीस श्रीज्ञानेश्वरमहाराजाचे दर्शनास गेले व तेथें श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे समाधींत जाऊन, ती मुळी एकीकडे केली. ज्ञानेश्वरमहाराजांनीं त्यांस आपणापाशीं असलेली, सच्चिदानंदबाबा यांनीं लिहिलेली ज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत दिली, व सांगितलें कीं, हल्लीं लोकांचे वाचण्यांत ज्ञानेश्वरीच्या ज्या प्रती आहेत, त्यांतील पाठ फारच अशुद्ध आहेत; करितां, या प्रतीवरून तुह्मी शुद्ध पाठ प्रचलित करावे. त्याप्रमाणें एकनाथांनीं केलें, हें, ज्ञानेश्वरीच्या शेवटीं एकनाथांच्या ओंव्या आहेत, त्यांवरून कळेल.

नाथांनीं प्रथम चतुःश्लोकी भागवतावर प्राकृत टीका केल्याचें मागें सांगितलेंच आहे. आणखी त्यांचीं पदपदांतरें व अभंग पुष्कळ आहेत. श्रीशंकराचार्यकृत हस्तामलक स्तोत्रावर त्यांची प्राकृत टीका आहे. त्याचप्रमाणें शुकाष्टकावर त्यांची प्राकृत टीका आहे. आनंदलहरी व स्वात्मसुख यांत त्यांचे स्वानुभवाचे उद्गार आहेत. एके दिवशीं संतसज्जन व भाविक लोक, यांनीं नाथांस विनंति केली कीं, भागव-

तांत भक्तिरहस्य उत्तम आहे, तर भागवतावर आपण टीका करावी. निदान एकादश स्कंधांतील उद्धवगीतेवर आपण टीका केली, तर ती लोकांच्या फारच उपयोगी पडेल. हें ऐकून एकनाथांनीं एकादशावर प्राकृत टीकेस आरंभ केला. थोडक्याच दिवसांत दोन अध्याय झाले. ते दोन अध्याय एका ब्राह्मण गृहस्थानें उतरून घेतले व त्यांचें तो नित्यनेमानें पारायण करी. तो गृहस्थ कांहीं दिवसांनीं काशीयात्रेस गेला व नित्यनियमाप्रमाणें तो एकादशाच्या नाथकृत प्राकृत टीकेचे दोन अध्याय, मणिकर्णिका घाटावर वाचावयास लागला. त्या घाटीं एक वेदशास्त्राधीत संन्यासी रहात होता. त्याचे तीनशें विद्यार्थी होते. त्यांपैकीं दोघेजण मणिकर्णिकेवर स्नानास आले असतां, त्यांनीं घाटावर वाचीत असलेल्या गृहस्थास पाहिलें, व "आपण कशाचें पारायण करीतां, हा ग्रंथ कोणता व ही प्राकृत टीका कोणीं केली" वगैरे प्रश्न विचारले असतां, त्या गृहस्थानें एकादशावर नाथांनीं प्राकृत टीका करण्यास आरंभ केल्याचें, व त्या टीकेचे ते पहिले दोन अध्याय असल्याचें सांगितलें. विद्यार्थ्यांनीं तो मजकूर आपल्या गुरूस सांगितला. तेव्हां गुरु क्रोधसंतप्त होऊन त्यांनीं शिष्यांस आज्ञा केली कीं, "तुम्ही या गृहस्थास बरोबर घेऊन पैठणास जा, व नाथांस आमचेकडे घेऊन या; म्हणजे आम्ही त्यास शिक्षा करूं." स्वामींनीं शिष्यांबरोबर पैठण येथील पंडित व ब्राह्मण व धर्माधिकारी यांस पत्र दिलें कीं "तुम्ही भागवतावर प्राकृत टीका कशी होऊं दिली! व्यासांनीं वेदशास्त्रांचें काढलेलें निजमथित श्रीभागवत आहे. त्याहीवर भागवतांतील उद्धवगीत, म्हणजे एकादशस्कंध, हा केवळ उपनिषदर्थ आहे. तुमच्या गांवीं एकनाथ नांवाचा कोणी कवि आहे, त्यानें भागवताच्या एकादशावर प्राकृत टीका मांडली आहे, हें फार अनुचित आहे. तर तुम्ही सर्व ब्राह्मणांनीं एकचित्त होऊन, नाथांस शिक्षा करून इकडे पाठवावा. आम्हीं दोन विद्यार्थी पाठविले आहेत, त्यांच्या पाठीशीं तुम्ही राहून, नाथांस वादांत जिंकावें." स्वामींनीं नाथांसही पत्र दिलें कीं "भागवतावरील प्राकृत लेख घेऊन तुम्ही तात्काळ इकडे येणें." याप्रमाणें पत्रें घेऊन ते दोघे विद्यार्थी पैठणास आले व त्यांनीं बरोबर आणलेलीं पत्रें ज्यांचीं त्यांस दिलीं. नाथांनीं पत्र पाहून म्हटलें "विश्वेश्वरास आमचें स्मरण झालें, यास्तव आम्हांस भेटीकरितां पाचारिलें आहे." नाथांस कांहीं उद्धट शब्द बोलावे, त्यांच्याशीं वाद करावा, हा त्या विद्यार्थ्यांचा हेतु, नाथांचें आचरण पाहून व त्यांच्या कीर्तनपुराणश्रवणानें, जागच्या जागींच जिरला. नाथांनीं लागलीच काशीस जावयाची तयारी केली, व उद्धवास सांगितलें कीं, "नेहमींप्रमाणें विष्णुअर्चन, पुराण, सदावर्त व ब्राह्मणपूजन करावें, रात्रौ हरिकीर्तन करावें." काशीकरांबरोबर प्रवास करीत एकनाथांची स्वारी एक दिवस काशीस पोंचली. विद्यार्थ्यांनीं एकनाथांस मठांत बसविलें,

व आपण, स्वामी शिष्यासह भिक्षेस गेले होते, त्यांची वाट पहात घाटावर बसले. स्वा
आल्याबरोबर, " आपल्या आज्ञेप्रमाणें पैठणचे टीकाकारास घेऊन आलों, आ
णास त्यास काय शिक्षा करणें असेल ती करावी " असें स्वामीस सांगितलें. स्वा
ह्मणाले, " तुह्मी तीनशें विद्यार्थी आहा; तेव्हां एकेकानें त्या टीकाकारास पांच पां
काठ्या माराव्या. इतक्यावर जर तो वांचला, तर मग पुढें काय करावयाचें
पाहूं. " स्वामींची आज्ञा ऐकून, सर्व शिष्यांनीं मनांत विचार केला कीं, स्वामीं
आज्ञेप्रमाणें जर आपण त्यास पांच पांच काठ्या मारल्या, तर तो ब्राह्मण मरेल,
आपणास उगीच ब्रह्महत्या लागेल. तर आपण एक एक जण मठांत जाऊन प्रथ
त्याची स्थिति रीती कशी आहे तें पाहूं, त्याची उपासना कोण व भक्ति कशी आहे
तें पाहून, त्यास ज्ञानप्राप्ति कशी झाली वगैरे विचारूं, व मग काय करणें असेल त
करूं. असें ठरवून एक एक विद्यार्थी मठांत नाथांकडे जाऊन पाहतो, तों नाथांच्य
ठिकाणीं त्यास कृष्णमूर्ति दिसूं लागली. तेव्हां ते सर्व तीनशें यति ह्मणाले कीं, " ही
साक्षात् नारायणमूर्ति विश्वोद्धारार्थ प्रकटली आहे. स्वामींचें आपण ऐकलें असतें,
तर मोठा अनर्थ झाला असता. " असें आपणाशीं ह्मणून त्यांनीं नाथांस
प्रणिपात केला व हात जोडून उभे राहिले. ही सर्व हकीकत, नाथांस न पाहिलेल्या
एका विद्यार्थ्यानें, स्वामींस घाटावर सांगितली. ती हकीकत ऐकून स्वामी अत्यंत
क्रोधायमान झाले. त्यांस वाटलें कीं, हे सर्व यति विद्यार्थी आपले संप्रदायी असतां,
आमची आज्ञा न मानून नाथांस शरण गेले. हा नाथ कांहीं तरी दृष्टीला मोहन
घालतो. मग त्यांनीं शिष्यांस आज्ञा केली कीं, मठांत जेथें आमचें आसन आहे,
तेथें पडदे लावावे; अशाकरितां कीं, त्याची दृष्टि आमच्यावर पडूं नये. स्वामींच्या
आज्ञेप्रमाणें शिष्यांनीं आसना भोंवतीं पडदे लाविले, व स्वामी मागल्या दारानें येऊन
आसनावर बसले, व नाथांस ह्मणाले, " मी सर्व वाद करणाऱ्यामध्यें वरिष्ठ
यति आहें. तुझ्या पदरीं तुझें कपट घालून, आतांच तुला चांगला दंड करितों. "
असें स्वामींचें अभिमानयुक्त भाषण ऐकून, नाथांस कांहीं एक विषम वाटलें नाहीं.
शांतीचे सागरच ते, त्यांनीं मधुर उत्तर दिलें कीं " अहो श्रेष्ठ समर्थ स्वामी, मी
आपणांस सद्भावानें वंदन करितों. कृपा करून मला अनाथाला दर्शन द्या. मज
बाळकाची आपणांस आठवण होऊन आपण मला दर्शनास बोलाविलें, ह्मणून मी दूर पंथ
क्रमून आलों, तर आतां पडदा कां लाविला? मजकडून जर कांहीं अपराध झाला
असेल, तर तो क्षमा करा. मला संस्कृत येत नाहीं. शास्त्रपठण किंवा वेदाध्ययन मी केलें
नाहीं. तुमच्यासारख्याच्या सेवेच्या योगानें किंचित् कवित्वस्फूर्ति झाली, ह्मणून भागवता-
वर यथामति टीका करण्यास आरंभ केला आहे. एकादशाची पहिली पंचध्यायीं झालेली

आहे. इतकाच काय तो ग्रंथ झाला आहे, तो स्वामींनीं पाहून अर्थ ध्यानांत आणावा; व त्यांत जर कांहीं आपणांस दोष दिसला, तर आपण तो ग्रंथ मणिकर्णिकेंत बुडवावा. या महाक्षेत्रांत आपण मोठे ज्ञानसंपन्न साक्षात् नारायण आहांत; आपणांला जर हा ग्रंथ बरा वाटला नाहीं, तर लोकहि या ग्रंथास कसे मानतील ? आतां कृपा करून माझ्यावरील कोपबुद्धि टाका, व मज अनाथबालकाला आपलें दर्शन देऊन माझा उद्धार करा." अशी नाथांची अमृतवाणी ऐकून त्या संन्याशाचा क्रोध गेला, व त्याचे मनांत सत्वगुणाचा प्रादुर्भाव व्हावयास लागला. स्वामींनीं मधला पडदा काढला, व पहातात, तों त्यास पुढें नाथांचे जागीं कृष्णमूर्ति दिसावयास लागली. जें ध्यान महाकवि व प्रेमळ भक्त यांनीं भागवतांत वर्णन केलें आहे, तशीच सगुणमूर्ति दिसावयास लागली. तेव्हां स्वामींस चित्तांत फार अनुताप झाला. अष्टसात्विकभाव त्यांचे ठायीं उत्पन्न झाले व 'त्राहि त्राहि' म्हणून त्यांनीं हात जोडले व साष्टांगनमस्कार घातला. नाथांनीं स्वामींस 'ॐनारायण' म्हणून नमस्कार केला व म्हणाले, "सर्व आश्रमांत तुम्ही श्रेष्ठ असून, हें उलटें काय करितां ?" तेव्हां स्वामी सत्वावस्था अंतरीं जिरवून आसनावर बसले व नाथांची पंचाध्यायी वाचावयास लागले, तों त्यांस नाथांचें अबाधित ज्ञान दिसून आलें. मग गुरु व शिष्य व सर्व संन्यासी यांनीं नाथांस विनंति केली कीं, "एकादशस्कंधाची टीका आपण येथें मठांत आनंदानें राहून संपवावी." नाथांनीं स्वामींची आज्ञा मान्य केली व तेथें राहिले. जितकी टीका रोज होत असे, तितकी संन्यासी गुरु रोज वाची, व मूळ संस्कृताशीं त्याची तुलना करी, तों कोठेंहि किंचित् देखील न्यून आढळेना. याप्रमाणें नाथांनीं तेथें सहा महिन्यांत ग्रंथ समाप्त केला. ग्रंथ समाप्त झाल्यावर स्वामींनीं सरस्वतीपूजनाचा मोठा उत्सव करण्याचा बेत केला; व सर्व साहित्य जमवून गांवांतील विद्वान् ब्राह्मण व पंडित यांस आमंत्रण केलें. स्वामींचा उत्सवाचा बेत व त्याचें कारण ब्राह्मणांस कळल्यावर, सर्व ब्राह्मण म्हणावयास लागले "अहो, स्वामींस वेड तर लागलें नाहींना ? भागवतावर प्राकृत टीका करून पाखंड माजविणारास शिक्षा करण्याचा स्वामींचा अधिकार, तें सोडून, हें स्वामींनीं काय आरंभिलें आहे ? हें पहा वैष्णवी मायेचें विंदान ! तिनें स्वामींस देखील मोह घातला ! हा कलियुगाचा प्रताप खरा !" मग वैदिक, शास्त्री, पंडित वगैरे ब्राह्मण जमून स्वामींस एकीकडे नेऊन म्हणाले "आपल्यासारख्या क्षेत्रदेवता जर असें करावयास लागल्या, तर मग आम्हीं काय करावें ? आपण सगळया विद्येचें मूळपीठ व सर्वांचे वरिष्ठ सद्गुरु, त्यांत चतुर्थाश्रमी, असे आपण सर्व तऱ्हेनें आम्हांस पूज्य आहांत. पैठणकर एकनाथानें प्राकृत भागवत केलें, तें आपण मान्य करीत

भाहां, हें फार विपरीत आहे. श्रीशंकराचार्यांनीं जैनांचे ग्रंथ बुडविले नाहींत का ? ऐसेंच या ग्रंथाचें करावयाचें. तें टाकून उत्सव कसले करितां ? " स्वामींनीं उत्तर दिलें कीं, " एकनाथांस आह्मीं फार छळिलें. हा खरोखर विष्णूचा अवतार आहे, अशी आमची खात्री आहे. तेव्हां तुह्मीं त्याचे ग्रंथाची पूजा करावी. " हें स्वामींचें बोलणें न ऐकून पंडितांनीं तो ग्रंथ मणिकर्णिकेंत झोंकला, तों काय अद्भुत चमत्कार झाला कीं, श्रीभागीरथीनें तो ग्रंथ दोन्ही हात वर करून, वरचेवर झेलला. श्रीभागीरथीचे हातांत रत्नजडित कंकणें होतीं, शोभायमान दिव्य मुद्रिका होत्या; अशा हातांत घेतलेलें पुस्तक पाहून, सर्व अतिशय विस्मित झाले, व सर्व मंडळींनीं जयजयकारानें टाळी पिटली. मठाधीश संन्यासी म्हणाले ' मला चंद्रमौळी पावला ' व त्यांनीं लागलीच मणिकर्णिकेंत उडी टाकून, तो ग्रंथ आपले मस्तकावर धारण करून, ते घाटावर आले. त्यांनीं पंडितांस व ब्राह्मणांस सांगितलें कीं ' नाथांस शरण जा. ' तों सर्व पंडित ब्राह्मण अधोवदन होऊन, नाथांस शरण आले व त्यांनीं कृतकर्माचा पश्चात्ताप झाल्याचें सांगून, क्षमा मागितली. मोठ्या भावार्थानें त्यांनीं नाथांची पूजा करण्याचा हेतु दर्शविला. नाथ ह्मणाले " मी ब्राह्मणांचा दासानुदास आहें, तेव्हां असली अनुचित गोष्ट न करावी. या ग्रंथाची तुह्मी खुशाल पूजा करा, तेणें आह्मांस संतोष आहे. " मग अंबारीसहित एक हत्ती आणविला व त्यावर भरजरी वस्त्रें व भूषणें घालून त्याचे मस्तकास शेंदूर लाविला. ' ग्रंथ घेऊन हत्तीवर बसावें ' अशी सर्वांनीं नाथांस विनंति केली. नाथांनीं सांगितलें कीं " असली अनुचित गोष्ट मी करणार नाहीं. मी तुमचा शरणागत आहें; तुमच्या पायधुळीची मी इच्छा करितों, तेव्हां नुस्ता ग्रंथ अंबारींत ठेवा. " मग अंबारींत ग्रंथ ठेवून टोलेजंग मिरवणूक काढली. नामघोषानें आकाश कोंदून गेलें. बुका फुलें यांचा ग्रंथांवर वर्षाव होत होता. ठिकठिकाणीं नळे चंद्रज्योती व नानाप्रकारचें दारुकाम सोडण्यांत येत होतें. याप्रमाणें आठ दिवस आनंदोत्साह होत होता व आठ दिवस अहोरात्र ग्रंथ मिरवत होता. शेवटल्या दिवशीं नाथांचें कीर्तन झालें. जसा एखादा सजल मेघ तापलेल्या जमिनीवर उदारवृष्टि करितो, तशी नाथांनीं श्रोत्यांवर नाममाहात्म्य, भक्ति व अध्यात्मज्ञान यांची उदार वृष्टि केली. नाथांचीलीनता व त्यांच्या वाणींतील प्रसाद पाहून सर्व आबालवृद्ध म्हणाले ' धन्य आहे नाथाची. हा साक्षात् ईश्वर आहे. ' नंतर पंडित व यतींच्या आग्रहावरून नाथांनीं कांहीं दिवस काशीस मुक्काम केला; व मणिकर्णिकेचे तीरीं एकाग्र अंतःकरणानें बसून, रुक्मिणीस्वयंवराचा ग्रंथ प्रारंभ करून, तो ग्रंथ रामनवमीस पुरा केला. मग नाथांनीं काशीकर मंडळीचा निरोप घेतला. त्यावेळीं क्षेत्रवासी लहानथोर मंडळी व सर्व

यति नाथांस बोळविण्याकरितां आले. नाथांनीं सर्वांस साष्टांगनमस्कार घातला व आपला मार्ग क्रमण्यास सुरुवात केली; व क्षेत्रवासी जन नाथांचे गुण आठवीत परत क्षेत्रीं गेले.

काशीहून परत येत असतां वाटेंत नाथांची व दासोपंताची भेट झाली. दासोपंत यांनीं नित्य गलितपत्रें भक्षण करून, शीत उष्ण सहन करून, एकांतांत फार कडकडीत दत्तोपासना केल्यावर, त्यांस श्रीदत्तात्रयांनीं साक्षात् दर्शन दिलें होतें. यानंतर दासोपंतांनीं जोगाईचेअंब्यास वस्ती केली होती व तेथें त्यांचा मोठा लौकिक होता. दासोपंतांची व नाथांची भेट झाल्यावर दासोपंतांनीं नाथांस आपल्या गांवीं नेलें व महिनाभर ठेवून घेतलें. नंतर नाथ पैठणास यावयास निघाले. पैठण गांवाजवळ येतांच त्यांस, गांवचे लोक बरोबर घेऊन, व दिंड्या, पताका, टाळ, विणे, मृदंग, फुलें, बुक्का वगैरे घेऊन, उद्धव सामोरा आला. नाथांस पहातांक्षणींच उद्धवानें नाथांचे चरणीं मस्तक ठेविलें व नाथांनीं त्यास दोन्ही बाहूंनीं आलिंगन दिलें. अवर्षणांत पाऊस पडला ह्मणजे जसा आनंद होतो, तसाच उद्धवास आनंद झाला. नाथ गांवांत आल्यावर घरीं येऊन त्यांनीं पांडुरंगमूर्तीस साष्टांग-नमस्कार घातला व रात्रौ थोडें कीर्तन केलें. पुढें कांहीं दिवसांनीं गोकुळ अष्टमीचा उत्सव आला. या उत्सवास दासोपंत आले. नाथांचे घरीं ते शिरतात तोंच, श्रीदत्तात्रय हातीं त्रिशूल घेऊन, नाथांच्या द्वारपालांचें काम करीत असलेले त्यांच्या दृष्टीस पडले. दासोपंतांनीं त्यांस साष्टांगनमस्कार केला, तेव्हां श्रीदत्तात्रय ह्मणाले "एकनाथ हा मानवी भक्त नाहीं, हा साक्षात् श्रीपांडुरंगअवतार कलियुगांत विश्वोद्धार करण्याकरितां झाला आहे. जर कोणा दैववान् पुरुषास पूर्वपुण्याचा ओलावा असेल, तर याची सेवा घडेल." 'मी दत्तोपासक साक्षात्कारी' असें जें दासोपंतास वाटत होतें, तें, नाथांचें ऐश्वर्य पाहून पार नाहींसें झालें. गोकुळ-अष्टमीचा सर्व उत्सव झाल्यावर दासोपंतांनीं नाथांचा निरोप घेतला व आपल्या गांवीं गेले.

नाथांचें पहिलें अपत्य गोदूबाई या नांवाची कन्या होती. पैठणांत चिंतोपंत नांवाचे एका गृहस्थास तिला दिलें होतें. तिचे पाठीवर नाथांस पुत्र झाला. त्याचें नांव हरि ठेविलें. नंतर नाथांस कन्या झाली, तिचें नांव गंगाबाई. गंगाबाईस कर्नाटकांत नाथांचा एक जुना सोयरा गृहस्थ रहात होता, त्याचे पुत्रास दिली. नाथांचा पुत्र हरि, हा षट्शास्त्रांत निपुण झाला, व त्यास लोक हरिपंडित ह्मणत असत. गांवच्या कुटाळ लोकांनीं ह्मणावें कीं, "बाप प्राकृत पुराण सांगून अवघे भाविकजन भोंदितो; पण लेक कसा संस्कृत पंडित आहे! बापानें संस्कृत पुराणें लोपविलीं,

तर मुलगा संस्कृत पुराणांचा जीर्णोद्धार करीत आहे ! " याप्रमाणें त्या लोकांनीं हरिपंडितादेखत नाथांची निंदा व त्याची स्तुति करावी. त्यामुळें हरिपंडितास असें वाटावयास लागलें कीं, मी षट्शास्त्री पंडित असून माझा बाप प्राकृत पुराण सांगतो, तर मला ही गोष्ट फार लज्जेची आहे. ह्मणून हरिपंडित काशीक्षेत्रीं जाऊन राहिला. मग नाथांनीं काशीस जाऊन, हरिपंडितास पैठणांत आपणाजवळ राहण्याचा आग्रह केला. हरिपंडित ह्मणाले, " जर तुम्ही माझ्या दोन गोष्टी ऐकाल, तर मी येईन. पहिली गोष्ट ही कीं, तुम्हीं परान्नभोजन करूं नये, व दुसरी गोष्ट अशी कीं, तुम्हीं प्राकृत पुराण सांगूं नये. " नाथांनीं हरिपंडिताचें ह्मणणें कबूल केलें, व हरिपंडित परत पैठणास आले.

पैठणास एक गरीब बाई पाणी भरून पोट भरणारी होती. तिनें नाथांस अति आग्रहानें आपले घरीं भोजनास बोलाविलें. त्या बाईचे घरीं हरी पंडितानें स्वयंपाक करावा, व त्यांनीं व नाथांनीं जेवावें, असें नाथांच्या आग्रहावरून हरिपंडितांनीं कबूल केलें. दुसरे दिवशीं हरिपंडितांनीं त्या बाईचे घरीं स्वयंपाक करून, नाथ व ते स्वतः भोजन करीत असतां, त्या बाईनें मोठ्या प्रेमानें नाथांकरितां स्वतः कांहीं पदार्थ तयार केले होते, ते वाढले; तें पाहून हरिपंडितास फारच क्रोध आला. जेवण झाल्यावर नाथांनीं हरिपंडितास उष्टीं काढावयास सांगितलें. हरिपंडितानें आपली उष्टी पत्रावळ उचलली व त्यावर नाथ जेवलेली पत्रावळ ठेविली; व दोन्ही पत्रावळी बाहेर टाकण्याकरितां उचलणार, तो नाथांच्या पत्रावळीचे ठिकाणीं आणखी पत्रावळ दिसली, ती उचलली तों तिसरी पत्रावळ दिसली. याप्रमाणें, पंडितांनीं नाथांची पत्रावळ काढावी व तेथें आणीक पत्रावळ यावी, असा क्रम चालला. एक हजार पत्रावळींचा ढीग पडला. हरिपंडित पत्रावळी काढतांना दमले. मग त्यांची खात्री झाली कीं, नाथ हे अवतारी पुरुष आहेत. मग त्यांनीं नाथांस पत्रावळींचा मजकूर सांगितला. तेव्हां नाथ ह्मणाले " तुह्मी फार श्रमलांत, आतां पत्रावळी निघणार नाहींत बरें. " मग पंडितांनीं शेवटीं निघालेली पत्रावळ उचलली व पुढें पत्रावळीं निघणें थांबलें. घरीं आल्यावर पंडितांनीं वडिलांचे पायांवर मस्तक ठेवून विनंति केली कीं, "जेथें आपणास शुद्ध भावार्थानें कोणी बोलावील तेथें आपण खुशाल भोजनास जावें व प्राकृत पुराण सांगावें. मी आपणांस ा दोन अटी घातल्या होत्या, त्याबद्दल आपण मला क्षमा करावी. "

पैठणाजवळ एका गांवीं एक अत्यंत दरिद्री ब्राह्मण रहात होता. त्यास फार ुलें होतीं. त्याचा शेवटला गावबा नांवाचा मुलगा मुका होता, तो त्यानें नाथांस देला. नाथांनीं त्यास एके दिवशीं आमचें नांव काय, ह्मणून विचारिलें. तों त्यास

वाचा फुटली व त्यानें 'एकनाथ' असें ह्मटलें. लहानपणीं गावबास खाण्याचा फार नाद असे, जसजसा तो मोठा होत चालला, तसतसा तो फार निवळला. तो अल्प आहार करून रात्रंदिवस भजन करीत असे. एके दिवशीं एकनाथ देवघरांत ध्यानस्थ बसले असतां, तेथें श्रीराम प्रगट झाले. प्रभूस साक्षात् पहातांच नाथांच्या ठिकाणीं अष्टसात्विकभाव उत्पन्न झाले, व त्यांनीं मोठया प्रेमानें श्रीरामचरणीं मिठी घातली. देवांनीं नाथांस हृदयीं आलिंगन दिलें व आज्ञा केली, कीं " श्री वाल्मीकीकृत रामायणावर तूं प्राकृत लेखन कर." त्यावर नाथ ह्मणाले " तुमची सत्कीर्ति सप्तकांड आहे, ती माझ्या मतीस आकळत नाहीं. तथापि कांहीं आर्ष बोलिलों, तर आयुष्य अवधी थोडीच आहे. तर ग्रंथ कसा सिद्धीस जाईल याचा चित्तास संशय वाटतो." त्यावर श्रीरामचंद्र ह्मणाले " तूं संध्या व नित्यनेम तावन्मात्र अल्प करावें, व सर्वदा रामायण लिहावें. मी तुझ्या हृदयांत बसून तुला सर्वकाळ आठवण देईन. तुझा सद्भाव व प्रेमा अद्भुत आहेत, यास्तव, या प्राकृत रामायणास 'भावार्थ रामायण' असें नांव ठेवावें." तेव्हां नाथांनीं " आपली आज्ञा प्रमाण " असें ह्मणून श्रीरामचरणीं मस्तक ठेविलें. मग अयोध्यापति अंतर्धान पावले. मग नाथांनीं सुमुहूर्तावर रामायणास आरंभ केला, व युद्धकांड अध्याय चव्वेचाळीसपर्यंत ग्रंथ संपविला; तेथेंच थांबून, ते ह्मणाले कीं, " आमचा प्रयाणसमय अगदीं संन्निध आला आहे, तर युद्धकांडाचे बाकीचे अध्याय व उत्तरकांड हे गावबा संपवील." लागलीच गावबास बोलवून त्याचे मस्तकीं हात ठेविला, व आपली लेखणी त्याचे हातांत देऊन ह्मणाले कीं, " आमची देहींची जे कविस्फूर्ति, ते तुज असो." अशी त्यांच्या मुखांतून अक्षरें निघतांच, गावबाचे बुद्धीस तत्काल विस्तार झाला, व त्यानें ग्रंथास पुढें चालविलें, तों जशी नाथांच्या ओंवीची मांडणी तसेंच त्याचें बोलणें आहे, असें दिसून आलें व 'मूकं करोति वाचालं' या वाक्याचें प्रत्यक्ष उदाहरण सर्वांनीं पाहिलें. नाथांच्या देखत गावबानें एक अध्याय संपविला व बाकीचा ग्रंथ नंतर पुरा केला.

असो. शके १५२१ चे फाल्गुन वद्य पंचमीस नाथांनीं नेहमींप्रमाणें कीर्तन केलें, व शेवटीं सर्व लोकांस सांगितलें कीं, " उदयीक आमचें प्रयाण आहे, तर तुह्मी सर्वांनीं स्नान करून आम्हास गंगेपर्यंत बोळवावें, मग मंदिरास यावें." हे त्यांचे शब्द ऐकून सर्व जन खिन्न झाले, व त्यांचे डोळ्यांचें पाणी खळेना. नाथांच्या प्रयाणकालाची वार्ता दूरवर लागलीच पसरली व लांब लांबच्या गांवाहून लोक आले. फाल्गुन वद्य षष्ठीस नाथांनीं प्रयोगयुक्त स्नान करून स्वहस्तें धौतवस्त्र नेसून गोपिचंदनाचे द्वादश टिळे लाविले व तुळशीमाळा घातल्या. जनार्दनाचें मनोमय स्मरण करून, स्कंधा

वर वीणा घेऊन, विठ्ठलनामाची गर्जना करीत श्रीपांडुरंगमूर्तीला नमस्कार करून त्या मूर्तीचें रूप ध्यानीं धरून, नाथ गंगेकडे निघाले. वाटेंत त्यांच्यावर बुका व फुलें यांचा वर्षाव झाला. पदोपदीं त्यांच्या पूजा व आरत्या होत होत्या. पुन्हा नाथांचें दर्शन दुर्लभ, ह्मणून अश्रूपूर्ण नयनांनीं लोक त्यांचें दर्शन पोटभर घेत होते पण तृप्ति होईना. बरोबर अनेक दिंड्या पताकांचे भार होते व नामस्मरणाच्या नादानें अंबर कोंदून गेलें. गंगेवर नाथ आले, तों तेथें देव विमानांत बसून आले होते; त्या विमानांची आकाशांत दाटी झाली होती. देवांनीं नाथांवर नीलकमलांची वृष्टि केली. तीं असंख्यात नीलकमळें भूतलावर पडलेलीं सर्व लोकांनीं पाहिलीं. नाथांनीं वाळवंटावर कीर्तनास आरंभ केला. नाथांनीं पहिल्यानें विठ्ठलनामाची गर्जना करून मग भक्तिमहिमा अद्भुत वर्णिला व सर्व लोकांस सांगितलें कीं, " कलियुगीं नामाविरहित आणिक तरणोपाय नाहीं. सर्वभूतीं दया असों द्यावी, हें माझें वचन जीवीं धरा. आह्मी तर मायातीत परिपूर्ण चैतन्यघन आहोंत. तुमच्या हितास्तव आह्मांस मृत्युलोकीं यावें लागतें, " याप्रमाणें कळकळीनें सर्वांस बोध करून त्या करुणामूर्ति नाथांनीं सर्वांस शेवटलें प्रासादिक वचन दिलें; तें वचन वृत्तीवर चांगलें घेतलें, तर सर्वांस अंतरीं बोध होईल. तें नाथांचें शेवटलें प्रासादिक वचन असें आहेः—

॥ अभंग ॥

**जैं धर्माची वाट मोडे । अधर्माची सीग चढे ॥**
**तैं आह्मां येणें घडे । संसारस्थिति ॥ १ ॥**
**नानामतें आणि पाखंडें । कर्मठता अतिबंडें ॥**
**त्यांचीं ठेंचावीं तोंडें । हरिभजनेंकरूनियां ॥ २ ॥**
**जें जें हरिलीलाचरित्र । तें तें माझेंचि स्वतंत्र ॥**
**देवभक्त एकत्र । भेद नाहीं दोघांतें ॥ ३ ॥**
**जो जो अवतार हरि धरी । तो तो मीच अवधारी ॥**
**हरिनामें करितों गजरी । जगदुद्धाराकारणें ॥ ४ ॥**
**सर्वांभूतीं भगवद्भावो । हा भक्तीचा निजनिर्वाहो ॥**
**धर्माचा अनुग्रहो । वाढवावयालागीं ॥ ५ ॥**
**सर्वभूतीं दयाशांति । प्रतिपाळावी वेदोक्ति ।**
**हेंचि एक निश्चितीं । करणें आह्मा लागतें ॥ ६ ॥**

लीलाविग्रही भगवंत । तया ह्मणती नित्यमुक्त ॥
आह्मी काय तेथ । वेगळेंचि असो पां ? ॥ ७ ॥
विश्वरूपीं सृष्टि । अर्जुनातें दावी दिठी ॥
भिन्न भेदाची गोष्टी । बोलों नये सर्वदा ॥ ८ ॥
वत्सहरणींचें चरित्र । वत्स गोवळें स्वतंत्र ॥
पावे पायतन कटिसूत्र । आपणचि जाहला ॥ ९ ॥
एका जनार्दनीं । विश्वरूप गोविंद मानी ॥
भेद धरी तो मनीं । निंद्याहुनी अतिनिंद्य ॥ १० ॥

हा नाथांचा अभंग त्यांचें प्रयाणसमयींचें प्रसादवचन आहे. तो जेव्हां श्रीनाथां सांगितला तेच वेळीं उद्धवानें हातीं पत्र घेऊन लिहून ठेविला. मग विठ्ठलनामाची ग र्जना करून नाथांनीं शेवटीं आरती केली. पुन्हा नामघोष करून नाथांनीं धरणीव नमस्कार घातला व हात जोडून सर्वांस विनंति केली कीं, " आतां सर्वांनीं कृप असो द्यावी. " मग नाथांनीं गंगेच्या पात्रांत प्रवेश केला व नाभिस्थानीं उदव लागेल इतक्या पाण्यांत उभे राहून हरिनामाची गर्जना करून, सर्व लोकांकडू हरिस्मरण करविलें आणि कुडींतून प्राण सोडिले. तेवेळीं देवांनीं पुष्पवृष्टि केलं लोक अतिशोकाकुल होउन त्यांनीं लोकरीतीप्रमाणें नाथांचे देहास अग्नि दिला, व आपापल्या घरीं गेले. दुसरे दिवशीं नाथांचा पुत्र व लोक, राख सावडावयास आले तों त्यांस राखेंत एक काळ्या तुळशीचें रोप व एक अश्वत्थाचें रोप दृष्टीस पडलें. त रोपांचीं हिरवीं पानें व कोवळा लसलशितपणा पाहून, " अश्वत्थरूपानें श्रीनाथ अ वतरला " असें लोकांस वाटलें. क्षेत्रवासी नरनारी त्या स्थळीं सर्वदा सेवा करिता व कृपाळू श्रीनाथ त्यांचे मनोरथ पुरवितात. जसें सूर्यास काडवातींनीं ओवाळावया तसें हें श्रीएकनाथमहाराजांचें अतिअल्प चरित्र त्यांचे चरणीं अर्पण करितों. दत्त त्रयजनार्दन श्रीएकनाथ.

शरण शरण एकनाथा । पायीं माथा ठेविला ॥ १ ॥
नका पाहूं गुणदोष । झालों दास पायांचा ॥ २ ॥
उपेक्षितां मज । तरी लाज कवणासी ? ॥ ३ ॥
तुका ह्मणे भागवत । केलें श्रुत सकळां ॥ ४ ॥

श्रीएकनाथचरणरज,

**माधव कृष्ण देशमूख.**

# श्रीएकनाथी भागवताची अनुक्रमणिका.

# एकनाथी भागवत.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीसरस्वत्यैनमः ॥ श्रीगुरुभ्योनमः ॥ श्रीदत्तात्रेयायनमः ॥ श्रीरुक्मिणीपतिपांडुरंगायनमः ॥

॥ श्लोक ॥ संतोषंच गुरुं वंदे परं संवितदायकं ॥ शातं सिंहासनारूढमानंदामृतभोगदं ॥ १ ॥ भक्त्या भागवतं भावं अभावं *काव्यपाठतः ॥ पठनात् पदव्युत्पत्तिर्ज्ञानप्राप्तिस्तु भक्तितः ॥ २ ॥

ॐ नमो श्रीजनार्दना ॥ नाहीं भवअभवभावना ॥ न देखोनि मीतूंपणा ॥ नमन श्रीचरणा सद्गुरुराया ॥ १ ॥ नमन श्रीएकदंता ॥ एकपणें तूंचि आतां ॥ एकीं दाविसी अनेकता ॥ तरी एकात्मता नमोडे ॥ २ ॥ तुजमाजी वासु चराचरा ॥ ह्मणोनि ह्मणिजे लंबोदरा ॥ यालागीं सकळांचा सोयरा ॥ साचोकारा तूं होसी ॥ ३ ॥ तुज देखे जो नरू ॥ त्यासि सुखांचा संसारू ॥ यालागीं विघ्नहरू ॥ नामांदरू तुज साजे ॥ ४ ॥ हर्षे तें वदन गणराजा ॥ चारी पुरुषार्थ त्या चारी भुजा ॥ प्रकाशियां प्रकाशी वोजां ॥ तो झळकत तुझा निजदंतू ॥ ५ ॥ पूर्वउत्तरमीमांसा दोनी ॥ लागलिया श्रवणस्थानीं ॥ निःशब्दादिवाचा वदनीं ॥ कर जोडूनि उभिया ॥ ६ ॥ एकेचि काळें सकळ सृष्टी ॥ आपुलेपणें ×देखत उठी ॥ तेचि तुझी देखणी दृष्टी ॥ सुखसंतुष्टी विनायका ॥ ७ ॥ सुखाचें पेलेलें दोंद ॥ नाभीं आवर्तला आनंद ॥ बोधाचा मिरवे नागबंद ॥ दिसे सन्नद्ध साजिरा ॥ ८ ॥ शुद्ध सत्वाचा शुक्लांबर । कासे कसिला मनोहर ॥ सुवर्णवर्ण अळंकार । तुझेनि साचार शोभती ॥ ९ ॥ प्रकृति पुरुष, चरण दोनी ॥ तळीं घालिशी वोजावूनी ॥ तयावरी सहजासनीं ॥ पूर्णपणीं मिरवशी ॥ १० ॥ तुझी अणुमात्र जाहलिया भेटी ॥ शोधितां विघ्न नपडे दृष्टीं ॥ तोडिशी 1 संसारफांसाटी ॥ तोचि तुझे मुष्टीं निजपरशू ॥ ११ ॥ भावें भक्त जो आवडे ॥ त्याचें उगेंविसी भवसांकडें ॥ वोढूनि काढिसी आपणाकडे ॥ निजनिवाडें अंकुशें ॥ १२ ॥ सांचे निरपेक्ष जो निःशंक ॥ त्याचें तूंचि वाढविशी सुख ॥ देऊनि हर्षाचे मोदक ॥ निववीसी देख निजहस्तें ॥ १३ ॥ सूक्ष्माहूनि सूक्ष्म सान ॥ त्यामाजि तुझें अधिष्ठान ॥ यालागीं मूषकवाहन ॥

---

१ ईश्वररूपा; एकनाथाचा गुरु, जनार्दनस्वामि. २ संसार, असंसार ही कल्पना. ३ द्वैत, गुरुशिष्य हा भेदभाव. ४ एकरूपता. ५ राहणें. ६ स्थावर-जंगमाला. ७ विशाळ पोटाचा—कारण त्यांत सर्व चराचर मावतें. ८ ह्मणूनच. ९ सत्य. १० निर्विघ्न. ११ नांवाचा गौरव. १२ आनंदरूपच तुझें मुख (५-१४ रूपक ध्यानांत आणावें). १३ धर्म, अर्थ, काम, मोक्ष. १४ तेजानें. १५ जैमिनी-व्यासकृतकर्म-ज्ञान-विचार ग्रंथ. १६ कानाच्या ठिकाणीं. १७ परा-आदिक चार वाणी (परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी). १८ आपल्या रूपानें. १९ वाढलें. २० बेंबींत. २१ भोंवऱ्याप्रमाणें मिरवला. २२ कटिभूषण. २३ जड-चेतन-तत्वें. २४ योगांतील आसनविशेष. २५ थोडीही. २६ पाश. २७ उलगडिसी. २८ निजस्वरूपभाव. २९ सत्य. ३० इच्छारहित. ३१ संतोषविशी. ३२ लहान.

*मो. पाठकः ×ना. देखे. 1 ना. भवबंध.

नामाभिधान तुज साजे ॥१४॥ पाहतां नरू ना कुंजरू ॥ अव्यक्तव्यक्ती परू ॥ ऐसा जाणोनि निर्विकारू ॥ नमनादरू ग्रंथार्थी ॥ १५ ॥ ऐशिया जी गणनाथा ॥ मीपणें कैंचा नमिता ॥ अकर्ताचि जाहला कर्ता ॥ ग्रंथकथा विस्तारा ॥ १६ ॥ आतां नमूं सरस्वती ॥ जे सारासार-*विवेकमूर्ती ॥ चेतनारूपें इंद्रियवृत्ती ॥ जे चाळिती सर्वदा ॥ १७ ॥ जे वाचेची वाचक ॥ जे बुद्धीची द्योतक ॥ जे प्रकाशां प्रकाशक ॥ स्वयें देख स्वप्रभा ॥ १८ ॥ ते शिवा अंगीं शक्ति उठी ॥ जैशी डोळ्यांमाजीं दिठी ॥ कीं रस रसत्वें दावी पुष्टी ॥ फळपणें पोटीं फळाचा ॥ १९ ॥ साखरेअंगीं स्वादु ॥ कीं सुमनांमाजीं मकरंदु ॥ तैसा शिवशक्तिसंबंधु ॥ अनादिसिद्ध अतर्क्य ॥ २० ॥ ते अनिर्वाच्य निजगोडी ॥ चहूं वाचांमाजीं वाढी ॥ म्हणोनि वागेश्वरी रोकडी ॥ ग्रंथार्थी चोखडी चवी दावी ॥ २१ ॥ सारासार निवडिती जनीं ॥ त्या हंसावरी हंसवाहिनी ॥ बैससी सहजासनीं ॥ अगम्यपणीं अगोचरू ॥ २२ ॥ ते परमहंसीं आरूढ ॥ तिसी विवेकहंस जाणती दृढ ॥ जवळी असतां न देखती मूढ ॥ अभाग्य दृढ अतिमंद ॥ २३ ॥ तिचें निर्धारितां रूप ॥ अरूपाचेंचि स्वरूप ॥ तें आपुलेपणें अमूप ॥ कथानुरूप बोलवी ॥ २४ ॥ हा बोलु भला जाहला ॥ म्हणोनि बोलेंचि बोल स्तविला ॥ तैसा स्तुतिभावीं उपजला ॥ बोली बोला गौरवीं ॥ २५ ॥ ते वाग्विलास परमेश्वरी ॥ सर्वांगदेखणी सुंदरी ॥ राहोनि सबाह्यअभ्यंतरीं ॥ ग्रंथार्थकुसरी वदवी स्वयें ॥ २६ ॥ ते सदा संतुष्ट सहज ॥ म्हणोनि निरूपणा चढलें भोजें ॥ परी वक्तेपणाचा फुंजें ॥ मीपणें मज नेदीच येवों ॥ २७ ॥ वाग्देवतेची स्तुति ॥ वाचाचि जाहली वदती ॥ तेथें द्वैताचिये संपत्ती ॥ उमस चित्तीं उमसेना ॥२८॥ तिणें बोल बोलणें मोडिलें ॥ समूळ मौनातें तोडिलें ॥ त्यावरी निरूपण घडलें ॥ नबोलणें बोलें बोलवी ॥ २९ ॥ तिसी सेवकपणें दुसरा ॥ होऊनी रिघे नमस्कारा ॥ तंव ×मीपणेंसि परा ॥ निजनिर्धारा पारुषे ॥ ३० ॥ जेथें मीपणाचा अभावो ॥ तेथें तूंपणा कैंचा ठावो ॥ याहीवरी करिसी निर्वाहो ॥ अगम्य भावो निरूपणीं ॥ ३१ ॥ जैशा सागरावरी सागरीं ॥ चालती लहरियांचिया हारी ॥ तैसें शब्द स्वरूपाकारीं ॥ स्वरूपावरी शोभती ॥ ३२ ॥ जैशा साखरेचिया कणिका ॥ गोडियें भिन्न नव्हती देखा ॥ तैसें निरूपण ये रसाळ सुखा ॥ ब्रह्मरसें देखा रसवृत्ती ॥ ३३ ॥ तेथें मीपणेंसि सरस्वती ॥ 1बैसविलें एकें ताटें रसवृत्ती ॥ तेणें अभिन्न शेष देऊनि तृप्ति ॥ ते हे उद्गार येती कथेचे ॥ ३४ ॥ आतां वंदूं ते सज्जन ॥ जे कां आनंदचिद्घन ॥ वर्षताती स्वानंदजीवन ॥ संतप्त जन निववावया ॥ ३५ ॥ ते चैतन्याचे अलं-

१ मनुष्य आणि हत्ति-गजानन. २ मी अशा अहंकारानें. ३ चालविणारी. ४ बोलविणारी. ५ प्रकाशक. ६ दृष्टि, बाहुली. ७ गोडपणा. ८ फुलांत. ९ पुष्परस. १० साक्षात. ११ निर्मळ. १२ ( नीरक्षीर ) विवेकावरून सारासार निवडीला हंसाचें रूपक केलें आहे. १३ इंद्रियांस अज्ञेय. १४ विवेकी पुरुषरूपी हंस. पा० ' अभाग्य दढ अतिमंद '. १५ वागीश्वरीचें. १६ निश्चित करूं जातां. १७ अव्यक्ताचें. पा० अव्यक्तपणाच. १८ ग्रंथाच्या अर्थाचें चातुर्य. १९ उत्साह. २० अभिमान. २१ मी अशा पृथग्भावानें. २२ स्फूर्ति. २३ स्फुरे. २४ अनिर्वचनीयवस्तु. २५ निघतो. २६ पंक्ति. २७ एके ताटीं. २८ ब्रह्मानंद हेंच पाणी.

*मो. वर्ती. ×मो. मीपणें. 1 मो. बैसविलें

कार ॥ कीं ब्रह्मविद्येचे शृंगार ॥ कीं ईश्वराचें मनोहर ॥ निजमंदिर निवासा ॥३६॥ ते अधिष्ठाना अधिवासु ॥ कीं सुखासीही सोल्हासु ॥ विश्रांतीसी विश्रामु ॥ निजरहिवासु करावया ॥ ॥ ३७ ॥ कीं ते भूतदयार्णव ॥ कीं माहेरा आली करुणव ॥ ना ते निर्गुणाचे अवेवं ॥ निज गौरव स्वानंदें ॥ ३८ ॥ ना ते डोळ्यांतील दृष्टी ॥ कीं तिचीही देखणी पुष्टी ॥ कीं संतुष्टीसी *संतुष्टी ॥ चरणांगुष्ठीं जयांचे ॥ ३९ ॥ ते पहाती जयाकडे ॥ त्याचें उगवे भवसांकडें ॥ परब्रह्म डोळियांपुढें ॥ निजनिवाडें उल्हासे ॥ ४० ॥ तेथें साधनचतुष्टय सायास ॥ न पाहती शास्त्रचातुर्यविलास ॥ एक +धरिला पुरे, विश्वास ॥ स्वयंप्रकाश ते करिती ॥४१॥ ते जगामाजी सदा असती ॥ जीवमात्रातें दिसती ॥ परी विकल्पेंचि ठेंकिजेती ॥ नाहीं ह्मणती नास्तिक्यें ॥ ४२ ॥ मातियेचा द्रोणें केला ॥ तो कोळिकीं भावो फळला ॥ ह्मणोनि विश्वासेंवीण नाडला ॥ जग ठकला विकल्पें ॥ ४३ ॥ एकाएकीं विश्वासतां ॥ तरी वाणी नाहीं निजस्वता ॥ त्यांचे चरणीं भावार्थता ॥ ठेवितां माथा विश्वासें ॥ ४४ ॥ ते नमस्कारितां आवश्यक ॥ करून ठाकती एक ॥ परी एकपणें सेवक ॥ त्यांचाचि देख स्वयें होआवें ॥ ४५ ॥ त्यांचिया सेवेचिये गोडी ॥ ब्रह्मसुखाची उपमा थोडी ॥ जे भजती अनन्यआवडीं ॥ ते जाणती गोडी निजचवी ॥ ४६ ॥ ते प्रकृतीसी पर ॥ प्रकृतिरूपीं ते अविकार ॥ आकारविकारव्यवहार ॥ त्यांचेनि सोचार बाधीना ॥ ४७ ॥ ते भोगावरी न वेठती ॥ त्यागावरी नुठती ॥ आपुलिये सहजस्थितीं ॥ स्वयें वर्तती सर्वदा ॥ ४८ ॥ ते ज्ञातेपण न मिरविती ॥ पिसेपण न दाखविती ॥ स्वरूपकुंजविस्मृति ॥ गिळूनि वर्तती निजांगें ॥४९॥ प्रेमा अंगींचि जिराला ॥ विस्मयो येवोंचि विसरला ॥ प्रपंच परमार्थ एक जाहला ॥ हाही ठेला विभागु ॥ ५० ॥ स्मरण विस्मरणेंसी गेलें ॥ देह देहींच हरपलें ॥ आंतबाहेरपण गेलें ॥ गेलें ठेलें स्मरेना ॥५१॥3स्वप्न, जागृती, जागतां गेली ॥ सुषुप्ति, साक्षित्वें बुडाली ॥ उन्मनीही वेडावली ॥ तुर्या ठेली तटस्थ ॥५२॥ दृश्य द्रष्टेनेंशीं गेलें ॥ दर्शन एकलेपणें निमालें ॥ तें निमणेंपणही विरालें ॥ विरवितें नेलें 4 विरणेनिसीं ॥५३॥ ज्ञान अज्ञानातें घेऊनि गेलें ॥ तंव ज्ञातेपणही बुडालें ॥ विज्ञान अंगीं घडलें ॥ परी नवें जडलें हें न मानी ॥ ५४ ॥ यापरी जे निजसज्जन ॥ तिहीं 5व्हावें सावधान ॥ यावें मज अवधान ॥ हें विज्ञापन बाळत्वें ॥५५॥ सूर्य सदा प्रकाशघन ॥ अग्नि सदा देदीप्यमान ॥ तैसे संत सदा सावधान ॥ यावें अवधान

१ दागिने शिणगार. २ आपलें राहण्याचें स्थल. ३ लोकदयेचे समुद्र. ४ कृपा. ५ किंवा. ६ अवयव. ७ संसाराचें संकट. ८ आपले रूपानें. ९ मोक्षेच्छूला प्रथम ज्या चार गोष्टी संपादाव्या लागतात त्या; ( १ नित्यानित्य वस्तुविवेक, २ इहामुत्र फलभोग विराग, ३ शमादिषट्कसंपत्ति, ४ मुमुक्षुता ). १० कष्ट. ११ ठकले जातात ( लोक ). १२ द्रोणाचार्य ( परिशिष्ट पहा ). १३ ( एकलव्य नामक ) निषादाला. १४ तोटा. १५ नमस्कारित्यास एकरूप करून घेतात. १६ सखोल. १७ सत्य. १८ पिशाच्या प्रमाणें वागणूक. १९ यावयासच. २० विसरण्यासुद्धां. २१ हरवलें ( देह न. लिं. ). २२ राहिलें. २३ मनोलयरूप पांचवी अवस्था. २४ चवथी अवस्था. २५ द्रष्ट्यासुद्धा. २६ नाहींसें झालें. २७ अनुभव. २८ प्रकाशमान.

*मो. तुष्टी. +मो. धरिल्या. 3 ना. जागृती जागतां गेली. 4 मो. विरणेनी. 5 मो. करावें.

हें बालकत्वें माझें ॥५६॥ तंव संत 1 सज्जनीं एक वेळा ॥ थोर करोनि सोहळा ॥ आज्ञापिलें वेळोवेळां ॥ ग्रंथ करविला प्राकृत ॥ ५७ ॥ एकांतीं लोकांतीं ॥ थोर साक्षेप केला संतीं ॥ तरी सांगा जी मजप्रती ॥ कोणे ग्रंथीं प्रवर्तों ॥ ५८ ॥ पुराणीं श्रेष्ठ भागवत ॥ त्याही माजी उद्धवगीत ॥ तुवां प्रवर्तावें तेथ ॥ वक्ता भगवंत तुज साह्य ॥५९॥ आह्मांसि पाहिजे ज्ञानकथा ॥ वरी तुजसारिखा रसाळ वक्ता ॥ तरी स्तुति सांडोनि आतां ॥ निरूपण तत्वतां चालवीं॥६०॥ तुज संतस्तवनीं उत्सावो ॥ हा तंव कळला 2भावो ॥ तरी कथेचा 3 लवलाहो ॥ निजनिर्वाहो उपपादीं ॥६१॥ या संतांचेनि कृपावचनें ॥ एका एकीं आनंदला मनें ॥ तेणें 4वाक्य प्रसाददानें ॥ 5स्वानंदघनें उल्हासे ॥६२॥ जैसे मेघाचेनि गर्जनें ॥ मयूर 6उपरमों पाहे गगने ॥ नाना नवेनि जीवनें ॥ जेवीं चातक मनें उल्हासे ॥६३॥ कां देखोनि 7 चंद्रकर ॥ डोलों लागे चकोर ॥ तैसें संतवदनींचें उत्तर ॥ आलें थोर सुखावित ॥ ६४ ॥ थोर सुखाचा केलों स्वामी ॥ तुमचें पुरतें कराल तुह्मी ॥ तरी वायाचि कां मीपणें मीं ॥ मनोधर्मी वळंगें जो ॥ ६५ ॥ परी समर्थांची आज्ञा ॥ दासां न करवे अवज्ञा ॥ तरी सांगितली जे संज्ञा ॥ ते करीन आज्ञा स्वामींची ॥ ६६ ॥ परी तुह्मीं एक करावें ॥ अखंड अवधान मज द्यावें ॥ तेणें दिठिवेन आघवें ॥ पावेल स्वभावें निजसिद्धी ॥६७॥ अगा तुझिया मनामाजीं मन ॥ शब्दीं ठेविलें असे अनुसंधान ॥ यालागीं निजनिरूपण ॥ चालवीं जाण सवेग ॥ ६८ ॥ आतां वंदूं कुळदेवता ॥ जे 8 एकाएकी एकनाथा ॥ ते एकेंवांचून सर्वथा ॥ आणिक कथा करूं नेदी ॥ ६९ ॥ एकरूप दाविलें मनीं ॥ तंव एकची दिसे जनीं वनीं ॥ एकचि कानीं वदनीं ॥ एकपणें एकवीरा ॥७०॥ ते शिवशक्तिरूपें दोनी ॥ लेऊन मिरवे एकपणीं ॥ एकपणें जाहली गुर्विणी ॥ 9 प्रसवे एकपणीं एकवीरा ॥ ७१ ॥ ते एकरूपें एकवीरा ॥ प्रसवली बोधपरशुधरा ॥ जयाचा कां दरारा ॥ महावीरा अभिमानिया ॥ ७२ ॥ तेणें उपजोनि निर्वाटिली माया ॥ आज्ञा पाळूनि सुख दे पितया ॥ ह्मणवोनि तो जाहला विजया ॥ लवलाह्या दिग्मंडळीं ॥ ७३ ॥ जो वासना सहस्रबाहो ॥ छेदिला सहस्रार्जुन अहंभावो ॥ स्वराज्य करोनि पहाहो ॥ अर्पी स्वयमेवो स्वयातिया ॥७४॥ तेणें मारूनि 10माता जीवविली ॥ तोचि कुलदेवता आह्मां जाहली ॥ परी स्वनांवें ख्याती केली ॥ एकात्मता बोली एकनाथा ॥ ७५ ॥ ते जैंपासोनि *निवटिली ॥ तैंपासोनि प्रकृति पालटली ॥ रागत्यागें शांत झाली ॥ निजमाऊली जगदंबा ॥ ७६ ॥ ×तया वोसंगीं घेऊन ॥ थोर दिधलें आश्वासन ॥ विषमसंकटीं समाधान ॥ स्वनामस्मरण केलिया ॥ ७७ ॥ ते जय जय जगदंबा ॥ उदो ह्मणे ग्रंथारंभा ॥ मतीमाजीं स्वयंभा ॥ योगगर्भा प्रगटली ॥ ॥ ७८ ॥ ज्याचेन कृपाअपांगें ॥ देहीं न देखती देहांगें ॥ संसार टवाळ वेगें ॥ केलें वाउगें भवस्वप्न ॥ ७९॥ आतां वंदूं जनार्दनु ॥ जो भवगजपंचाननु ॥ जनीं विजनीं समानु ॥ सदा

१ बाळपण. २ त्वरित. ३ सांग. ४ एकनाथ. ५ किंवा. ६ चकोर पक्षी. ७ सर्व. ८ चित्त, चिंतन. ९ एकच आहे पुत्र जिला. १० एकपतिका. ११ ऐक्या-अद्वैतावांचून दुसरी. १२ गरोदर. १३ योध्यास. १४ ज्ञानरूपी परशुरामास. १५ भय. १६ मारिली, नाशिली. १७ कार्तवीर्य ( पृ० पृ० ). १८ स्वजातीस-क्षत्रिय कुलास. १९ मांडीवर. २० उदय, आरंभ. २१ लटका. २२ संसाररूपी गजास सिंह.

1 मो. सज्जन. 2 ना. आह्मा भावो. 3 नवलावो. 4 ना. मो. पसायदानें. 5 घन. 6 मो. उपमो. 7 मो. चंद्रकोर. 8 ना. येकाकी. 9 ना. येकपणी येकांगविरा मो. प्रसवे येकपणी येकांगवीर.

संपूर्ण समत्वें ॥ ८० ॥ जयाचेनि कृपाकटाक्षें ॥ अलक्ष्य लक्ष्येंवीण लक्षे ॥ साक्षी विसरली साक्षे ॥ निजपक्षें गुरुत्वें ॥ ८१ ॥ तेणें जीवेंवीण जीवविलें ॥ मृत्यूनें मरणचि मारिलें ॥ दृष्टि घेऊनि दाखविलें ॥ देखणें केलें *सर्वांग ॥८२॥ देह देहीं विदेह केलें ॥ शेखीं विदेहपण तेंही नेलें ॥ नेलेपणही हरपलें ॥ उरी उरलें उर्वरित ॥ ८३ ॥ अभावो भावेंसि गेला ॥ संदेह निःसंदेहेंसी निमाला ॥ विस्मयो विस्मयीं बुडाला ॥ वेडावला स्वानंद ॥ ८४ ॥ तेथें आवडी होय भक्तु ॥ तंव देवचि भक्तपणाआंतु ॥ मग भज्यभजनाचा अंतु ॥ दावी आप्रांतु स्वलीला ॥ ॥ ८५ ॥ नमन नमनेंसी नेलें ॥ नमितें नेणों काय जाहलें ॥ नम्यचि अंगीं घडलें ॥ घडलें मोडलें मोडूनी ॥ ८६ ॥ दृश्य द्रष्टया जाण ॥ दोहीं एकचि मरण ॥ दर्शनही जाहलें क्षीण ॥ देखतेपण गिळोनी ॥ ८७ ॥ आतां देवोचि आघवा ॥ तेथें भक्तु न ये भक्तभावा ॥ तंव देवही मुकला देवा ॥ +देवस्वभावा विसरोनी ॥ ८८ ॥ देवो देवपणें दाटला ॥ भक्त भक्तपणें आटला ॥ दोहींचाही अंतु आला ॥ अभेदें झाला अनंतु ॥ ८९ ॥ अत्याग त्यागेंसि विराला ॥ अभोग भोगेंसि उडाला ॥ अयोग योगेंसि बुडाला ॥ योग्यतेचा गेला अहंभावो ॥ ९० ॥ ऐसियाहीवरी अधिक सोसु ॥ सायुज्ययामाजीं होतसे दासु ॥ तेथील सुखाचा सौरसु ॥ 3अति अविनाशु अगोचरु ॥ ९१ ॥ ' शिवें-शिवाचि-यजिजे ' ॥ हें ऐसिये अवस्थेसि साजे ॥ येऱ्हवीं बोलचि बोलिजे ॥ परी नपविजे निजभजन ॥ ९२ ॥ ये 5अभिन्नसुखसेवे आंतु ॥ नारद आनंदें नाचत गातु ॥ शुक सनकादिक समस्तु ॥ जाहले निजभक्तु येणेंचि सुखें ॥ ९३ ॥ सागरीं भरे भरितें ॥ तें भरितें भरी तरियांतें ॥ तैसें देवेंचि देवपणें येथें ॥ केलें मातें निज भक्तु ॥ ९४ ॥ 6सागरसरितांजीवन एक ॥ परी मिळणीं भजन दिसे अधिक ॥ तैसें एक णेंचि देव ॥ भजनसुख उल्हासे ॥ ९५ ॥ वाम सव्य दोन भाग ॥ परी दोंनामीं एकचि अंग तैसा देवभक्तविभाग ॥ देवपणीं सांग आभासे ॥ ९६ ॥ तेवीं आपुलेपणाचेनि मानें ॥७॥ केलों जनार्दनें ॥ परी कायावाचामनें ॥ वर्तविजे तेणें सर्वार्थीं ॥ ९७ ॥ तो सुखाचें पूर्त- निजसुख ॥ 7दृष्टीसी प्रगटे सन्मुख ॥ तोचि विवेकेंकरूनि देख ॥ करवी 8लेख ग्रंथद्वीप ॥ परी नवल त्याचें लाघवें ॥ अभंगीं घातलें माझें नांव ॥ शेखीं नांवाचा निजभाव॥ अचाट ठाव नुरवीच ॥ ९९ ॥ यया वचनां संतोषला ॥ म्हणे भलारे भला भला ब्रह्म आणि तूंचि संचलों ॥ प्रगट केला गुह्यार्थ ॥१००॥ हे स्तुति कीं निरूपण ॥ ग्रंथपीं पैरी दाख- ज्ञान ॥ साहित्य कीं समाधान ॥ सज्ञानाही जाण कळेना ॥ १ ॥ तुझा नेम ॥ अति- सोलींव विवेकाचा विवेकु ॥ तो संतोषासि संतोखु ॥ आत्यंतिकु उपजवी भोगु ॥ त्यागेंवीण जें जें निघे ॥ तें संतहृदयीं साचोंचि लागे ॥ मुमुक्षुसारंगांचीं पौळि कर्मजाड्याचे तोडिले करितील ॥ ३ ॥ ग्रंथारंभ पडला चोख ॥ मुक्त मुमुक्षु इतर लोक ॥ निजात्मसुख पावती ॥ ४ ॥ येणें वचनामृततुषारें ॥ ग्रंथभूमिका.द्य, मान्य. ७ आकारास.

१ शेवटीं. २ निःसीम. ३ नमस्कार करणारे. ४ उपास्य देवता, न ग. १३ राजा. १४ पाणी इच्छा. ७ एक मुक्तीचा प्रकार, ज्यांत जीवेश्वरांचा अभेद होतो. ८ १९ चित्तास. २० आश्चर्य. ९ खाड्यांत, खळग्यांत. १० पाणी. ११ चातुर्य. १२ शेवटीं. १३ ला. २५ महद्रूप. २६ नदेई. १६ मोक्षेच्छुभ्रमरांचीं. १७ समुदाय. ३१ विषयभोगानें. ३२ ज्ञान.

*मो. सर्वांगें. +ना. देहभावा विसरोनी मो. देहस्वभा. तेहि पाव देउनि माथा. 3मो. अतिविन्यास. 5मो. ये निरभिमानसुख. 6ना. सागरी

एकसरें ॥ फ़लसंभारें सफलित ॥ ५ ॥ कीं निर्जीवा जीव आला ॥ नातरी सिद्धांसी सिद्धिलाभू झाला ॥ कीं निजवैभवें आपुला ॥ प्रियो मीनलो पतिव्रते ॥ ६ ॥ तैसेनि हर्षानंदें ॥ जी जी ह्मणितलें स्वानंदें ॥ तुमचेनि पादप्रसादें ॥ करीन विनोदें ग्रंथार्थ ॥ ७ ॥ श्रीरामप्रतापदृष्टीं॥ शिळा तरती सागरापोटीं ॥ कीं वसिष्ठवचनासाठीं ॥ तपे छाटी रविमंडळीं ॥ ८ ॥ कीं याज्ञवल्क्याच्या मंत्राक्षता ॥ शुष्ककाष्ठांसि पल्लवता ॥ कीं धर्में श्वानें सरता ॥ केला सर्वथा *स्वर्गलोकीं ॥ ९ ॥ तैसें माझेनि नांवें ॥ ग्रंथ होती सुहावें ॥ आज्ञाप्रतापगौरवें ॥ गुरुवैभवें सार्थक् ॥१२०॥ घटितं, एका आणि एकादशे ॥ राशि नक्षत्र एकचि असे ॥ त्या एकामाजीं जें पूर्ण दिसे ॥ तें दशा दशांशें चढे अधिक ॥ ११॥ मागां पुढां एक एक कीजे ॥ त्या नांव एकादश ह्मणिजे ॥ तें एका एकपणेंचि सहजें ॥ आलें निजबोजें ग्रंथार्थें ॥ १२ ॥ तेथें देखणेंचि करूनि देखणें ॥ अवघेंचि निर्धारूनि मनें ॥ त्यावरी एका जनार्दनें ॥ टीका करणें सार्थक ॥ १३ ॥ पाहोनि दशमीचा प्रांत् ॥ एकादशाच्या उदयाआंतु ॥ एकादशीवरी जगन्नाथ् ॥ ग्रंथार्थ् आरंभी ॥ १४ ॥ ह्मणवोनि एकादशाची टीका ॥ एकादशीस करी एका ॥ ते एकपणाचिया सुखा ॥ फळेल देखा एकत्वें ॥ १५ ॥ आतां वंदूं महाकवी ॥ व्यास, वाल्मीक, भार्गवी ॥ जयातें उशनोकवी ॥ पुराणें गौरवी बोलिजे ॥ १६ ॥ तिहीं आपुलिये व्युत्पत्तीं ॥ वाढवावी माझी मती ॥ हेच करीतसें विनंती ॥ ग्रंथ समाप्ती न्यावया ॥ १७ ॥ वंदूं आचार्यो शंकरू ॥ जो कां ग्रंथार्थविवेकचतुरू ॥ सारूनि कर्मठतेचा विचारू ॥ प्रबोधदिनकरू प्रकाशला ॥ १८ ॥ आतां वंदू श्रीधर ॥ भागवत व्याख्याता सधर ॥ जयाची टीका पहातां अपार ॥ अर्थ साचार पैलाभे ॥१९॥ इतरही टीकाकार॥काव्यकर्ते विवेकचतुर॥त्यांचे चरणीं नमस्कार॥ग्रंथीं सादर तिहीं व्हावें ॥१२०॥ वंदूं प्राकृतकवीश्वर ॥ निवृत्तिप्रमुख ज्ञानेश्वर ॥ नामदेव, चांगदेववटेश्वर ॥ ज्यांचें भाग्य थोर गुरुकृपा ॥ २१ ॥ जयांचे ग्रंथ पाहतां ॥ ज्ञान होय प्राकृता ॥ तयांचे चरणीं माथा ॥ निजात्मता निजभावें ॥ २२ ॥ संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवी ॥ मा प्राकृतीं काय उणीवी ॥ नवीं जुनीं ह्मणावीं ॥ कैसेन केवीं सुवर्णसुमनें ॥ २३ ॥ कपिलेचें ह्मणावें क्षीर ॥ मा इतरांचें काय नीर ॥ वर्णस्वादें मधुर ॥ दिसे साचार सारिखें ॥२४॥ जें पाविजे संस्कृत अर्थें ॥ तेंचि लाभे प्राकृतें ॥ ×तरी न मनावया येथें ॥ विषम चित्तें तें कायी ॥ २५ ॥ कां निरंजनीं वसला गांवो ॥ तरी तोचि सेवकां पावनें ठावो ॥ तेथें सेवेसि नवचतां पहाहो॥ दंडी रावो निजभृत्यां ॥ २६ ॥ कां दुबळी आणि समर्थ ॥ दोहींस रायें घातलों हात ॥ तरी दोघींसिहि तेथ ॥ सहजचि होत समसाम्य ॥ २७ ॥ देशभाषावैभवें ॥ प्रपंचपदार्थीं पालटली

---

१ एकदम. २ फळाच्या भारानें. ३ पति. ४ मिळाला. ५ वसिष्ठाचे छाटीनें सूर्याचे बदली काम केलें ( पु० प० ). ६ वाळल्या लांकडास ( पु० प० ). ७ कुत्रा ( पु० प० ). ८ ग्राह्य, मान्य. ९ मैत्र ( जसा लग्नांतील वधुवरांचा ). १० अकरा ( ११-मागें एक पुढें एक एवं एकरूपच ). ११ दशम स्कंधाचा. १२ अखेर. १३ अकरावा स्कंध. १४ शुक्र. १५ शंकराचार्य ( पु० प० ). १६ निरसून १७ ज्ञानसूर्य. १८ चांगदेव. १९ सोन्याचीं फुलें. २० काळी गाय. २१ दूध. २२ पाणी. २३ सं आणि रुचिनें. २४ गोड. २५ एकांतांत. २६ राजा. २७ पवित्र. २८ स्थान. २९ न जात ३० आपल्या चाकरास. ३१ हातीं धरिलें, अंगिकारिलें.

नावें ॥ परी रामकृष्णादि नामा नव्हे ॥ भाषावैभवें पालटू ॥ २८ ॥ संस्कृत वाणी देवें केली ॥ तरी प्राकृत काय चोरापासोनि झाली? ॥ असोत या अभिमानभुली ॥ वृथा बोली काय काज ॥ २९ ॥ आतां संस्कृत किंवा प्राकृता ॥ भाषा झाली जे हरिकथा ॥ ते पावनचि तत्त्वतां ॥ सत्य सर्वथा मानली ॥ १३० ॥ वंदूं भानुदास आतां ॥ जो कां पितामहाचा-पिता ॥ ज्याचेनि वंश भगवंता ॥ झाला सर्वथा प्रियकर ॥ ३१ ॥ जेणें बाळपणीं आकळिला भान ॥ स्वयें झाला चिद्वान ॥ जिंतोनि मानाभिमान ॥ भगवत्पावन स्वयें झाला ॥ ३२ ॥ जयाची पदबंध-*प्राप्ती ॥ पाहों आली श्रीविठ्ठलमूर्ती ॥ कानींचीं कुंडलें जगा ज्योती ॥ करितां ×रातीं देखिला ॥ ॥ ३३ ॥ तया भानुदासाचा चक्रपाणी ॥ तयाचाही सुत सुलक्षणी ॥ तयासि सूर्यनामें ठेवूनी ॥ निजीं निज होऊनी भानुदास ठेला ॥ ३४ ॥ तया सूर्यप्रभाप्रतापकिरणीं ॥ मातें प्रसवली रुक्मिणी ॥ म्हणोनि रखुमाई जननी ॥ आम्हांलागूनी साचची ॥ ३५ ॥ ते हे ग्रंथारंभकाळा ॥ वंदिली पूर्वजमाळा ॥ धन्य निजभाग्याची लीळा ॥ आलों वैष्णवकुळा जन्मोनी ॥ ३६ ॥ ते वैष्णवकुळीं कुळनायक ॥ नारद, प्रल्हाद, सनकादिक ॥ उद्धव, अक्रूर, श्रीशुक ॥ वसिष्ठादिक, निजभक्त ॥ ३७ ॥ ते वैष्णव सकळ ॥ ग्रंथार्थी अवधानशीळ ॥ म्हणोनि वैष्णव कुळमाळ ॥ वंदिली सकळ ग्रंथार्थी ॥ ३८ ॥ उपजलों ज्याचिया गोत्रा ॥ नमन तया विश्वामित्रा ॥ जो कां प्रतिसृष्टीचा धात्रा ॥ गायत्रीमंत्रा महत्त्व ॥ ३९ ॥ जो उपनिषद्विवेकी ॥ तो वंदिला याज्ञवल्की ॥ जो कविकर्तयातें पोखी ॥ कृपापीयूखीं वर्षोनी ॥ १४० ॥ नमन भूतमात्रा 3अशेखां ॥ तेणें विश्वंभरू झाला सखा ॥ म्हणोनि ग्रंथारंभू देखा ॥ आला नेटकौ 4समत्वासी ॥ ४१ ॥ आतां नमूं दत्तात्रेयां ॥ जो कां आचार्यांचा आचार्या ॥ तेणें प्रवर्त्तविलें ग्रंथकार्या ॥ अर्थवावया निजबोधू ॥ ४२ ॥ तो 5शब्दातें दावितू ॥ अर्थू अर्थें प्रकाशितू ॥ मग वक्तेपणाची मातू ॥ स्वयें वदवितू यथार्थें ॥ ४३ ॥ तो म्हणे श्रीभागवत ॥ तें भगवंताचें हृद्गत ॥ त्यासीच होय प्राप्त ॥ ज्याचें निरंतर चित्त भगवंतीं ॥ ४४ ॥ तें हें ज्ञान कल्पादीं ॥ चतुःश्लोकपदबंधीं ॥ उपदेशिला सद्बुद्धी ॥ निजात्मबोधीं विश्रांता ॥ ४५ ॥ नवल तयाचा सद्भावो ॥ शब्दमात्रें झाला अनुभवो ॥ बाप सद्गुरुकृपा पहाहो ॥ केला निःसंदेहो परमेष्ठी ॥ ४६ ॥ तो चतुःश्लोकींचा बोधू ॥ गुरुमार्गें आला शुद्धू ॥ तेणें उपदेशिला नारदू ॥ अति प्रबुद्धू भावार्थी ॥ ४७ ॥ तेणें नारदू निवाला ॥ अवघा अर्थमयचि झाला ॥ पूर्णपरमानंदें धालो ॥ नाचों लागला निजबोधें ॥ ४८ ॥ तो ब्रह्मवीणा 6वाहातू ॥ ब्रह्मपदें गीतीं गातू ॥ तेणें ब्रह्मानंदें नाचतू ॥ विचरे डुल्लतू 7भूमंडळीं ॥ ४९ ॥ तो आला सरस्वतीतीरा ॥ तंव देखिलें व्यास-

---

१ रामकृष्णादि शब्द संस्कृत प्राकृतांत एकरूपच. २ नाथाचा पणजा (प. प.). ३ आवडता. ४ स्वाधीन केला. ५ नाथांचा आजा. ६ नाथांचा बाप. ७ नाथांचे आईचें नांव. ८ खरोच. ९ कर्ता, प्रतिब्रह्मा. १० गायत्री मंत्राचा ऋषी विश्वामित्र आहे. ११ उपनिषदांचा विचार करणारा. १२ वाढवितो. १३ कृपारूप अमृत. १४ सर्वांस. १५ चांगला. १६ दत्तात्रय हे ज० स्वा०चे गुरु, नाथांचे परमगुरु. १७ स्पष्ट करण्यासाठीं. १८ आत्मज्ञान. १९ गोष्ट. २० मनांतील गोष्ट. २१ कल्पारंभीं ब्रह्मदेवास मूळ चतुःश्लोकी भा० सांगितलें. २२ ब्रह्मदेव. २३ तृप्त झाला. २४ हिंडे. २५ नदी विशेष.

*ना. व्युत्पत्ती. ×मो. आरति. 3 मो. अनेका. 4 ना. संमता मो. समसाम्या. 5 मो. तो शब्दीं निःशब्दातें दावितु. 6 मो. वाजवी तूं. 7 ना. ब्रह्मसृष्टी.

ऋषीश्वरा ॥ जो संशयाचिया पूरा ॥ अतिदुर्धरामाजीं पडिला ॥ १५० ॥ वेदार्थ सकळ प्रमाण पुराण ॥ व्यासें केलें निर्माण ॥ परी तो न पावेचि आपण ॥ निजसमाधान स्वहिताचें ॥५१॥ तो संशयसमुद्रांतू ॥ पडोनि होता बुडतू ॥ तेथें पावला ब्रह्मसुतू[1] ॥ नांभी[2] ह्मणतू कृपाळु ॥ ५२ ॥ तेणें एकांतीं नेऊन देख ॥ व्यासास केलें *एकमुख ॥ मग दाविले चारी श्लोक ॥ भवमोचक निर्दुष्ट[3] ॥ ५३ ॥ ते सूर्यातें न दाखवूनी ॥ गगनातेंही[4] चोरूनी ॥ कानातें परते सारूनी ॥ ठेला उपदेशोनी निजबोधू[5] ॥ ५४ ॥ तें नारदाचें वचन ॥ करीत संशयाचें दहन ॥ तंव व्यासासि समाधान ॥ स्वसुखें पूर्ण हों सरलें ॥ ५५ ॥ मग श्रीव्यासें आपण ॥ भागवत दशलक्षण ॥ शुकासि उपदेशिलें जाण ॥ निजबोधें पूर्ण सार्थकू ॥ ५६ ॥ तेणें शुकही सुखावला ॥ परमानंदें[6] निवाला[7] ॥ मग समाधिस्थ राहिला ॥ निश्चळ ठेला निजशांती ॥ ५७ ॥ तेथें स्वभावेंचि जाणा॥समाधि आली समाधाना॥मग परीक्षितीचिया ब्रह्म सदनां[8] ॥ अवचटें जाणा तो आला ॥ ५८ ॥ पहावया परीक्षितीचा अधिकारू ॥ तंव कलीसि केला तेणें मारू ॥ तरी धर्माहूनि दिसे थोरू ॥ अधिकारू पैं याचा ॥ ५९ ॥ कृष्ण असतां धर्म ज्याला ॥ पाठी कलिभेणें[9] तो पळाला ॥ परी हा कलि निग्रहोनि ठेला ॥ धर्माहूनि भला धैर्यें अधिकू ॥ १६० ॥ अर्जुनवीर्यपरंपरा निर्व्यंग ॥ सुभद्रा मातामहीचें[10] गर्भलिंग ॥ तो अधिकाररत्न उपलिंग ॥ ज्यासि रक्षिता श्रीरंग गर्भी झाला ॥ ६१ ॥ गर्भीच असतां ज्या भेणें ॥ स्पर्शों नशके शस्त्र द्रौण्यें[11] ॥ त्याचें अधिकारपण ॥ सांगावया कोण समर्थ ॥६२॥ जेणें[12] रक्षिलें गर्भाप्रती ॥ तया परीक्षी[13] सर्वांभूतीं ॥ यालागीं, नांवें परीक्षिती[14] ॥ अगाध स्थिती नामाची ॥ ६३ ॥ तो अभिमन्यूचा परीक्षिती ॥ उपजला पावन करीत क्षिती ॥ ज्याचेनि भागवताची ख्याती ॥ घातली त्रिजगतीं[15] परमार्थपव्हे ॥ ६४ ॥ अंगीं वैराग्यविवेकू ॥ ब्रह्मालागीं त्यक्तोदकू[16] ॥ तयातें देखोनि श्रीशुकू ॥ अत्यंतिकू सुखावला ॥ ६५ ॥ बाप[17], कोपू ब्राह्मणाचा[18] ॥ शापें, अधिकारू ब्रह्मज्ञानाचा ॥ तयाच्या चरणीं काया वाचा ॥ निजभावाचा नमस्कारू ॥ ६६ ॥ ब्रह्माहूनि ब्राह्मण थोरू ॥ हें मीच काय फार करूं ॥ परि अद्यापि श्रीधरू ॥ चरणालंकारू मिरवितू ॥ ६७ ॥ ह्मणोनि ब्रह्माचा देव ब्राह्मणु ॥ हा सत्य सत्य माझा पणू ॥ यालागीं वेदरूपें नारायणु ॥ उदरा येऊन वाढला ॥ ६८ ॥ ह्मणोनि ब्राह्मण भूदेवें[19] ॥ हे ब्रह्मींचे निजावेव[20] ॥ येथें न भजती ते मंददैव ॥ अतिनिर्दैव अभागी ॥ ६९ ॥ ब्राह्मण प्रतापाचा नवलावो ॥ तिहीं आज्ञाधारकू केला देवो ॥ प्रतिमा[21] प्रतिष्ठेसि पहाहो ॥ प्रगटे आयुर्भावो मंत्रमात्रें ॥ १७० ॥ तंव संत ह्मणती काय पहावें ॥ जे स्तवनीं रचिसी भावें ॥ तेंथे प्रमेय काढिसी नीचनवें[22] ॥ साहित्यलाघवें साचार ॥ ॥ ७१ ॥ गणेशु आणि सरस्वती ॥ बैसविलीं ब्रह्मपंक्तीं ॥ तैशीच संतस्तवनीं स्तुती ॥ ऐक्य-

---

१ नारद. २ भिऊं नको. ३ शुद्ध. ४ आकाशास. ५ आत्मज्ञान. ६ ब्रह्मानंदानें. ७ सुखावला. ८ घरीं. ९ कलीच्या भयानें. १० आजी [ परिक्षितीची ]. ११ अश्वत्थामाचे. १२ ज्या प्रभूनें. १३ पाही. १४ परिक्षिती राजा. १५ तीन लोकांत. १६ पाणी सोडलेला. १७ मोठा, थोर. १८ शृंगीऋषीचा [प. प.] १९ पृथिवीचे देव. २० ब्रह्माचे अवयव. २१ दगडाचे मूर्तीची ब्राह्मणांनीं मंत्रांनीं प्रतिष्ठा केल्यानें तिच्यांत देवत्व येतें. २२ नित्य.

*मो. अभिमुख.

वृत्तीं वदलासी ॥ ७२ ॥ पोटीं कुळ आणि कुळदेवता ॥ स्तवनीं वदलास जे कथा ॥ ते ऐकतांचि चित्त चिंता ॥ विसरे सर्वथा *श्रवणेंची ॥ ७३ ॥ जोचि भावो संतचरणीं ॥ तोचि भावो ब्राह्मणीं ॥ सुखी केलें गुरुस्तवनीं ॥ धन्य वाणी पैं तुझी ॥ ७४ ॥ तरी तुझेनि मुखें जनार्दन ॥ स्वयें वदताहे आपण ॥ हे बोलतांचि क्षण ॥ कळली संपूर्ण आह्मासी ॥ ७५ ॥ चढतें ×प्रेमाचें भरतें ॥ तें नाविक आवरोनि चित्तें ॥ पुढील कथानिरूपणातें ॥ करी निश्चितें आरोहण ॥ ७६ ॥ विसरलों होतों हा भावो ॥ परी भला दिधला आठवो ॥ याचिलागीं सद्भावो ॥ तुमचे चरणीं पहाहो ठेविला ॥ ७७ ॥ उणें देखाल जें जेथें ॥ तें तें करावें पुरतें ॥ सज्जनांमाजीं सरतें ॥ करावें मातें ग्रंथार्थसिद्धि ॥ ७८ ॥ ते ह्मणती भला भला रे नेटका ॥ बरवी आणिली आर्या ग्रंथपीठिका ॥ आतां संस्कृतावरी टीका ॥ कविपोषका वदे वहिली ॥ ७९ ॥ याच बोलावरी माझा भावो ॥ ठेवूनि पावलों पायांचा ठावो ॥ करीं आज्ञेसारिखा प्रस्तावो ॥ करीन पहावो कथेचा ॥ १८० ॥ तरी नैमिषारण्या आंतू ॥ शौनकादिकांप्रति मातू ॥ सूत असे सांगतू ॥ गत कथार्थू अन्वयें ॥ ८१ ॥ मागां दहावे स्कंधीं जाण ॥ कथा जाहली नवलक्षण ॥ आतां मोक्षाचें 1उपलक्षण ॥ सांगे श्रीकृष्ण एकादशीं ॥ ८२ ॥ जो चिदाकाशींचा पूर्ण चंद्र ॥ जो योगज्ञाननरेंद्र ॥ तो बोलता झाला शुक योगींद्र ॥ परिसता नरेंद्र परिक्षिति ॥ ८३ ॥ तंव परिक्षिती ह्मणे स्वामी ॥ याचिलागीं त्यक्तोदक मी ॥ तेचि कृपा केली तुह्मीं ॥ तरी धन्य आह्मी निजभाग्यें ॥ ८४ ॥ अगा हे साच मोक्षकथा ॥ ज्यांसि मोक्षाची आस्था ॥ 2तिहीं पावो देऊनि मनाचे माथां ॥ रिघावें सर्वथा श्रवणादरीं ॥ ८५ ॥ भीतरीं 3देऊनियां कान ॥ 0कानीं शावें निज मन ॥ अवधान करोनि सावधान ॥ कथानुसंधान धरावें ॥ ८६ ॥ बहुत अवतारीं अवतरला देवो ॥ परी या अवतारींचा नवलावो ॥ देवां न कळे अभिप्रावो ॥ अगम्य पहाहो हरिलीला ॥ ८७ ॥ उपजतांचि मायें वेगळा ॥ वाढिनला स्वयें स्वलीळा ॥ बाळपणीं मुक्तीचा सोहळा ॥ पूतनादिसकळां निजांगें अर्पी ॥८८॥ मायेसि दाविलें विश्वरूपें ॥ गोवळां दाविलें 5वैकुंठद्वीप ॥ परी गोवळपणाचें रूप ॥ नेदीचि अल्प पालटों ॥ ८९ ॥ बाळ बाळियांतें मारी ॥ अचाट जगा देखतां करी ॥ परी बाळपणा बाहेरी ॥ तिळभरी नव्हेची ॥ १९० ॥ ब्रह्म आणि चोरी करी ॥ देवो आणि व्यभिचारी ॥ पुत्र कलत्र आणि ब्रह्मचारी ॥ हेही पैरी दाखविली ॥ ९१ ॥ अधर्में वाढविला धर्म ॥ अकर्में तारिलें कर्म ॥ अनेमें नेमिला नेम ॥ अतिनिःसीम निर्दुष्ट ॥ ९२ ॥ तेणें संगेंचि तोडिला संगु ॥ भोगें ³¹ वाढविला भोगू ॥ त्यागेंवीण केला त्यागू ॥ अति अव्यंगू निर्दोष ॥ ९३ ॥ कर्मठां व्हावया बोधू ॥ कर्मजाळ्याचे तोडिले

---

१ मागें, . २ नंतर क्षणभर. ३ चढणें. ४ स्मरण. ५ सात्विक श्रद्धा. ६ ग्राह्य, मान्य. ७ आकारास. ८ सत्वर. ९ आरंभ. १० गोष्ट. ११ पौराणिक. १२ चैतन्यरूपआकाशांतला. १३ राजा. १४ पाणी न पिणें. १५ आपल्या दैवानें. १६ फार खोल. १७ शिरावें. १८ आंत. १९ चित्तास. २० आश्चर्य. २१ अभिप्राय. २२ देवकीपासून दूर. २३ राक्षसी. २४ आई-यशोदेला. २५ महद्रूप. २६ नदेई. २७ पराक्रमी पुरुषास. २८ कमीपणा. २९ तऱ्हा, प्रकार. ३० राखिलें. ३१ विषयभोगानें. ३२ ज्ञान.

***मो. श्रवणार्थें. ×मो. प्रमेयाचें. 1मो. उपलवण. 2 मो. तेहि पाव देउनि माथा. 3मो. देऊनिया. 0 मो. कानीं घ्यावें निजजीवन. 5 मो. दीप.**

भेदू ॥ भोगामाजीं मोक्षपदू ॥ दाविलें विशदूं प्रगट करूनी ॥ १४ ॥ भक्ति भुक्ति मुक्ती ॥ तिहीं केली एकपंक्ती ॥ काय वानूं याची ख्याती ॥ खाऊन माती विश्वरूप दावी ॥ ९५ ॥ त्याचिया *परमात्मचरित्रा ॥ तुज सांगेन परमपवित्रा ॥ परी निजबोधाचा खरा ॥ या अवतारीं पुरा पवाड केला ॥९६॥ एकादशाच्या तात्पर्यार्थीं ॥ संक्षेपें सविस्तरें युक्ती ॥ बोलिलीसे आर्यंतीं ॥ ×परमात्मस्थिती निजबोधू ॥९७॥ तेथें नारदें वसुदेवाप्रती ॥ संवाद निमिजायंती ॥ सांगितली कथासंगती ॥ संक्षेपस्थिती या नांव ॥ ९८ ॥ तेचि उद्धवाचे परमप्रीती ॥ नानादृष्टांत उपपत्ती ॥ स्वमुखें बोलिला श्रीपती ॥ ते कथा निश्चितीं सविस्तर ॥ ९९ ॥ दशमीं निरोधलक्षण ॥ मागां केलें निरूपण ॥ जेथें धराभार 0अधर्मजन ॥ निर्दाळी श्रीकृष्ण नानायुक्तीं ॥२००॥ ज्याचेनि अधर्मभारें क्षिती ॥ सदा आक्रंदत होती ॥ तिच्या साह्यालागी श्रीपती ॥ पूर्ण ब्रह्मस्थिती अवतरला ॥ १ ॥ दुष्ट दैत्य आणि दानव ॥ धराभार राजे सर्व ॥ वधिता झाला श्रीकृष्ण देव ॥ तो गतकथाभाव शुक सांगे ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ श्रीबादरायणिरुवाच ॥ कृत्वा दैत्यवधं कृष्णः सरामो यदुभिर्वृतः ॥
भुवोऽवतारयद्भारं जविष्ठं जनयन्कलिम् ॥ १ ॥

॥ टीका ॥ पूर्णब्रह्म स्वयें श्रीकृष्ण ॥ 6बळी बळराम लोकरमण ॥ निधडे यादव मेळवूनि जाण ॥ दैत्यनिर्दळण श्रीकृष्णें केलें ॥ ३ ॥ जे यादवांसि नयेती वधीं ॥ तेथें श्रीकृष्ण करी बुद्धी ॥ सखे स्वजन गोत्र संबंधी ॥ कलह उत्पादी 7अतिघोर ॥ ४ ॥ उतरावया धराभार ॥ कलहमिसें शारंगधर ॥ मारवी कौरवभार ॥ पंडुकुमर क्षोभवूनी ॥ ५ ॥

॥श्लोक॥ ये कोपिताः सुबहु पांडुसुताः सपत्नैर्दुर्द्यूतहेलनकचग्रहणादिभिस्तान् ॥
कृत्वा निमित्तमितरेतरतः समेतान्हत्वा नृपान्निरहरत्क्षितिभारमीशः ॥ २ ॥

॥ टीका ॥ दुष्ट अकर्मी अतिघोर ॥ ज्यांची सेना 8धराभार ॥ ते वधार्थ करावया एकत्र ॥ कलहाचें सूत्र उपजवी कृष्ण ॥ ६ ॥ येणें श्रीकृष्णसंकल्पोद्देशें ॥ हो सरलें कपट फांसे ॥ तेणें कपटें बांधून कैसे ॥ वधवी अनायासें कौरवभार ॥ ७ ॥ जगीं द्यूत खेळिजे दुष्टें ॥ तेंही आरंभिलें कपटें ॥ धर्मावरी फांसे खोटे ॥ घालिती हटें दुर्बुद्धी ॥ ८ ॥ बाळेभोळे अज्ञानजनीं ॥ तेही गांजिती ना धर्मपत्नी ॥ ते साचेचि धर्माची मानिनी ॥ आणिली बांधोनी सभेमाजीं ॥९ ॥ दुःशासनें धरिले कचें ॥ तेणें वोढिली कचकेंच ॥ तें कर्म त्यांचें त्यांसीच ॥ भंवलें साच त्यांभोंवतें ॥ २१० ॥ वनीं कोणी कोणातें नागवी ॥ तो नागोवा राजा आणवी ॥ सभेसि राजा उगोंणवी ॥ ते मृत्यूची पदवी मस्तका आली ॥११॥ अन्यायेंवीण नागवी रांवो ॥

---

१ स्पष्ट. २ विषयभोग. ३ वर्णू. ४ आत्मज्ञानाचा. ५ विस्तार. ६ आरंभीं आणि शेवटीं. ७ जनकराजा आणि जयंतीचे पुत्र जायंत ऊर्फ आर्षभ हे नऊ बंधु यांचा संवाद. ८ संहार वर्णन. ९ कथन. १० पृथिवीचें ओझें. ११ नाश करी. १२ लोकांस संतोष करणारा. १३ शूर. १४ उत्पन्न करी. १५ पंडूचे पुत्र धर्म आदि. १६ चेववून. १७ कौरवांचें सैन्य. १८ खरेंच. १९ वेणीचे केस. २० प्राप्त झाली. २१ संकट. २२ लूट. २३ लुटी. २४ गाजा.

*मो. परमाद्भुत चरित्रा. ×मो. परमार्थ स्थिति. 0मो. अधर्मी. 6मो. बळी बळ लोकरमण. 7ना. अतिशीघ्र. 8ना. सेनासंभार.

तैं धांवणियां धांवे देवो ॥ द्रौपदीवस्त्राहरण पहाहो ॥ मुख्य अन्यावो हा कौरवांचा ॥ १२ ॥ +अग्निदाहे घरदाहने ॥ धनदारा अपहारणें ॥ घाला घालोनि मारणें ॥ शस्त्रपाणी होणें वधार्थ ॥ ॥ १३ ॥ अवज्ञा आणि हेळण ॥ दुरुक्तीं जें धर्मछळण ॥ हेंचि निमित्तासि कारण ॥ केलें संपूर्ण श्रीकृष्णें ॥ १४ ॥ पतिव्रतेचें वस्त्राहरण ॥ तेणें तत्काळ पावे मरण ॥ हेंच कलहाचें कारण ॥ कुळनिर्दळण येणें कर्में ॥ १५ ॥ ऐसा जो धर्माचा विरोधी ॥ त्यासी देवो अवश्य वधी ॥ यालागीं पांडवांचिये बुद्धी ॥ अत्युग्र त्रिशुद्धी उपजवी कोपू ॥ १६ ॥ भूभारहरणचरित्र ॥ सखे स्वजन सुहृद स्वगोत्र ॥ शास्त्रविवेकी अतिपवित्र ॥ त्यांमाजीं विचित्र उपजवी कलहो॥ ॥ १७ ॥ धराभार हरावया गोविंदू ॥ कळवाळियाचे सखे बंधू ॥ करविला तेथ गोत्रवधू ॥ साह्य संबंधू राज्यभरेंसी ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ भूभारराजपृतनायदुभिर्निरस्य गुप्तैः स्वबाहुभिरचिंतयदप्रमेयः ॥ मन्येऽवनेर्ननु गतोऽप्यगतं हि भारं यद्यादवं कुलमहो अविषह्यमास्ते ॥ ३ ॥

॥ टीका ॥ ऐसे पक्षपाती राजे अपार ॥ अमित सेना धराभार ॥ मारविले अधर्मकर ॥ मिषांतर कलहाचें ॥ १९ ॥ पृथ्वीचे अधर्मसेनासंभार ॥ शोधशोधूनि राजे मारिले अपार ॥ तरी उतरला धराभार ॥ हें शारंगधर नेमनीच ॥ २२० ॥ यादव करूनि अतुबळी ॥ नाना दुष्ट दमिले सकळी ॥ झाले यादव अति प्रबळी ॥ हें नमनीच केवळ श्रीकृष्ण ॥ २१ ॥ न होतां यादवांचें निधन ॥ नुतरे धराभार संपूर्ण ॥ ऐसें मानिता झाला श्रीकृष्ण ॥ कुळनिर्दळण तो चिंती ॥ २२ ॥ अग्नि कर्पूर खाऊनि वाढे ॥ कापुरांतीं अग्नीही उडे ॥ तैसें यादवांचें अतिगाढें ॥ आलें रोकडें निदान ॥ २३ ॥ केळी फळे, तंव वाढे वाढी ॥ फळपाकें माळी झाड तोडी ॥ तैशी यादवकुळाची शीग गाढी ॥ चढली रोकडी मरणार्थ ॥ २४ ॥ फळ परिपाकें, परिमळीं ॥ तें घेऊन जाय माळी ॥ तैशीं स्वकुळफळें वनमाळी ॥ न्यावया तत्काळीं स्वयें इच्छी ॥ २५ ॥ अनंतबाहुप्रतापें ॥ यादव वाढले श्रीकृष्णकृपें ॥ तोचि ×निधनाचेनि संकल्पें ॥ काळरूपें क्षोभला ॥ २६ ॥ अतुलबळें अतिप्रबळ ॥ वाढलें जें यादवकुळ ॥ ते वीर देखोनि सकळ ॥ असह्य केवळ श्रीकृष्णासी ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ नैवान्यतः परिभवोऽस्य भवेत्कथंचिन्मत्संश्रयस्य विभवोन्नहनस्य नित्यम् ॥ अंतःकलिं यदुकुलस्य विधाय वेणुस्तंबस्य वन्हिमिव शांतिमुपैमि धाम ॥ ४ ॥

॥ टीका ॥ मजें गेलिया निजधामा ॥ हेचि प्रवर्ततील अधमा ॥ श्रियोन्मंद अतिगर्व महिमा ॥ मुख्य 0अकर्मा निजहेतू ॥ २८ ॥ हे मदबळें अतिप्रबळ ॥ अतिरथी झाले सकळ ॥ यांसि

---

१ विष देणें. २ हातीं शस्त्र धरणें. ३ वाईट बोलणें. ४ वस्त्र फेडणें. ५ नाश. ६ निश्चयानें खरोखर. ७ स्वकुल जातिवध. ८ पापी. ९ कृष्ण. १० मानीत नाहींच. ११ बलाढ्य. १२ नाश. १३ उरत नाहीं. १४ पृथ्वीचा भार. १५ कुलाचा नाश. १६ कापूर. १७ कापूर जळून गेल्यावर. १८ मरण. १९ पूर्णता. २० सुवास देतें. २१ मरणाचे. २२ रागावला. २३ मी. २४ स्वस्थानीं. २५ द्रव्योन्मदानें चढलेला.

+मो. अग्नि करोनि घर दाहनें. ×मो. निदानाचेनि. 0मो. अधर्मा.

अप्रतिमल्ल दिग्मंडळ ॥ यांतें दमितां केवळ मीचि एक ॥ २९ ॥ हे नाटोपती इंद्रादिदेवां ॥ दैत्यराक्षसां कां दानवां ॥ शेखीं निर्दाळावया यादवां ॥ मागुतें मज तेव्हां पडेल येणें ॥ २३० ॥ तरी आतांचि आपुले दृष्टी ॥ कुळ बांधूं काळाचिये गांठीं ॥ ऐसा विचार जगजेठी ॥ निश्चयो पोटीं दृढ केला ॥ ३१ ॥ यदुवंशवंशजाळी ॥ वाढली श्रीकृष्णकृपाजळीं ॥ तेथें अवकृपेची इंगळी ॥ ऋषिशापमेळीं कपटें पडली ॥ ३२ ॥ ते मुळीं पेटली श्रीकृष्णसंकल्पें ॥ धडाडली ब्रह्मशापें ॥ ते स्वजनविरोधरूपें ॥ काळाग्निकोपें नाशिली ॥ ३३ ॥ ऐसें यदुकुळनिर्दळण ॥ करूनि स्वयें श्रीकृष्ण ॥ निसुर निजधामा गमन ॥ स्वलीला आपण करूं इच्छी ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ एवं व्यवसितो राजन्सत्यसंकल्प ईश्वरः ॥ शापव्याजेन विप्राणां संजन्हे स्वकुलं विभुः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ यापरी आपुलें कुळ ॥ नाश आदरिलें तत्काळ ॥ हाचि विचार अढळ ॥ केला समूळ कुळक्षयार्थ ॥ ३५ ॥ हेंचि कार्य होय कैसें ॥ तें विचारिजे जगदीशें ॥ ब्रह्मशापाचेनि मिसें ॥ कुळ अनायासें नासेल ॥३६॥ इतुकें हें जैं सिद्धी जाय ॥ तैं सरलें अवतारकृतकार्य ॥ मग स्वधामा यदुवर्य ॥ जाऊं पाहे स्वलीला ॥ ३७ ॥ लीलाविग्रही सुंदर पूर्ण ॥ गुण, कर्म, क्रिया, अतिपावन ॥ जगदुद्धारी श्रीकृष्ण ॥ ब्रह्म परिपूर्ण पूर्णावतार ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ स्वमूर्त्या लोकलावण्यनिर्मुक्त्या लोचनं नृणाम् ॥ गीर्भिस्ताः स्मरतां चित्तं पदैस्तानीक्षतां क्रियाः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ जो सकळ मंगळां मंगळ पूर्ण ॥ जो कां गोकुळीं कामरमण ॥ मोक्षाचें तारूं स्वयें श्रीकृष्ण ॥ ज्याचें बरवेपण अलौलिक ॥ ३९ ॥ जो भक्तकामकल्पद्रुम ॥ मनोहर मेघश्याम ॥ ज्याचें त्रिलोकीं दाटुगें नाम ॥ स्वयें पुरुषोत्तम शोभत ॥२४०॥ श्रीकृष्णाचिया सौंदर्या पुढें॥लक्ष्मी भुलोनि झाली वेडें॥मदन पोटा आलें बापुडें॥तेथें कोणीकडे इंद्र चंद्र ॥४१॥ ज्याचें त्रैलोक्यपावन काम॥त्रिलोकींचें बरवेपण॥ भुलोनि कृष्णापाशीं आलें जाण ॥ नाना ×कृष्णलेशें बरवेपण ॥ शोभे संपूर्ण तिहीं लोकीं ॥ ४२ ॥ जो सकळसौंदर्याची शोभा ॥ जो लावण्याचा अतिवालभा ॥ ज्याचिया अंगसंगप्रभा ॥ आणिली शोभा जगासी ॥ ४३ ॥ जो हरिखाचा सोलींव हरिख ॥ कीं सुख सुखावतें परमसुख ॥ ज्याचेनि विश्रांतीसी देख ॥ होय आत्यंतिक विसांवा ॥४४॥ तो अमूर्ति मूर्तिधारण॥कीं सकळलोक *पाळण ॥ शोभा शोभवी श्रीकृष्ण॥ सौभाग्यसंपूर्ण साजिरा ॥ ४५ ॥ घृत थिजलें कीं विघुरलें ॥ परी घृतपणा नाहीं मुकलें ॥ तेवीं अमूर्त, मूर्त मुसावलें ॥ परी तें संचलें परब्रह्म ॥ ४६ ॥ तयासि देखिलियाचि पुरे ॥ देखा, देखी, देखणे, सरे ॥ पाहणें 0पाहतेनिसीं माघारें ॥ लाजोनि वोसरे सलज्ज ॥ ४७ ॥

१ निर्वीर. २ मारिता. ३ शेवटीं. ४ स्वकुल-यादव ५ मृत्यूचे पदरीं. ६ मनांत. ७ विस्तव-८ प्रथमतः ९ भडकली. १० आपसांत कलह. ११ निश्चित. १२ इच्छिलें. १३ चिंतिले. १४ ब्राह्मणांच्या. १५ निमित्तानें. १६ अत्यंत पवित्र. १७ नांव. १८ अपूर्व. १९ व्याप्त, समर्थ. २० प्रद्युम्नरूपानें. २१ अति प्रिय, आवडता. २२ अधिक. २३ तूप. २४ पातळ झाले. २५ मूर्तरूपानें बनलें.

×मो. कृष्णवेशे. *ना. लालन. 0मो. पहातेनिरसी.

दृष्टी घाली, दे ढेंकर ॥ आपण आपुलें शेजार ॥ होवोनियां परात्पर ॥ सुखावे साचार श्रीकृष्णरूपीं ॥ ४८ ॥ श्रीकृष्णाची चाखिल्या गोडी ॥ रसस्वादु रसना सोडी ॥ जया चाखणेपणाची आवडी ॥ चाखते दवंडी चाखोनी ॥ ४९ ॥ नवल तेथींचें गोडपण ॥ अमृतही फिकें केलें जाण ॥ यापरी रसना आपण ॥ हरिरसीं संपूर्ण सुखावे ॥ २५० ॥ लागतां श्रीकृष्णाचा सुवावो ॥ अवघा संसाराचि होय वावो ॥ सेवितां श्रीकृष्णसुगंध भावो ॥ घ्राणासि पहाहो आन नावडे ॥ ५१ ॥ वास सुवासु सुमन ॥ घ्रेय घ्राता आणि घ्राण ॥ कृष्णमकरंदें जाण ॥ विश्रांति संपूर्ण स्वयें येती ॥ ५२ ॥ जयाचेनि अंगस्पर्शें ॥ देहा देहीं देहपणें नसे ॥ अंगचि अंगातें कैसें ॥ विसरे आपैसें देहबुद्धी ॥ ५३ ॥ कठिणा कठिणपण गेलें ॥ मृदूचें मृदुपणही नेलें ॥ श्रीकृष्णस्पर्शें ऐसें केलें ॥ स्पर्शाचें ठेलें स्पर्शत्व ॥ ५४ ॥ तयाचेनि पठणें वाचा ॥ ठावो वाच्यवाचकाचा ॥ नेतिशब्दें पुसोनि *साचा ॥ करी शब्दाचा निःशब्द ॥ ५५ ॥ बोल्ह बोलणेंचि ठेलें ॥ बोलतें नेणों काय झालें ॥ कृष्णशब्दें ऐसें केलें ॥ वाचेचें नेलें वाचकत्व ॥ ५६ ॥ चित्तें चिंतितां पांये ॥ चित्तपणा विसरोनि जाये ॥ मग निश्चिंतपणें पाहे ॥ श्रीकृष्णचरणीं राहे निवांत ॥ ५७ ॥ चित्त, चिंता, चिंतन ॥ तिहींची नुरे आठवण ॥ चिंतितांचि श्रीकृष्णचरण ॥ ब्रह्म परिपूर्ण निजचित्त ॥५८॥ नवल तयाचा ×पराक्रम ॥ पाहतां पारुखे कर्माकर्म ॥ मग कर्मकर्ताक्रियाभ्रम ॥ करी निर्भ्रम पदरजें ॥ ५९ ॥ पाहतां पाउलाचा माग ॥ तुटती कर्माकर्मांचे लाग ॥ कर्माचें मुख्य माया अंग ॥ तिचा विभाग उरों नेदी ॥ ॥ २६० ॥ गाईमागिलीं श्रीकृष्णपाउलें ॥ पाहतां कर्म कैंतेंनसीं गेलें ॥ अकर्म ह्मणतें नाहीं उरलें ॥ ऐसें कर्म केलें निष्कर्म ॥ ६१ ॥ जयाचेनि कीर्तिश्रवणें ॥ श्रोता नुरे श्रोतेपणें ॥ वक्ता पारुखे वक्तेपणें ॥ श्रवणें पावणें परब्रह्म ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ आच्छिद्य कीर्तिं सुश्लोकां वितत्य ह्यंजसा नु कौ ॥ तमोऽनया तरिष्यंतीत्यगात्स्वं पदमीश्वरः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ यापरी उदारकीर्ती ॥ थोर केली अवतारख्याती ॥ जेणें जड जीव उद्धरती ॥ श्रवणें त्रिजगती पावन होय ॥ ६३ ॥ स्वधामा गेलिया चक्रधरू ॥ मागील तरावया संसारू ॥ श्रीकृष्णकीर्ति सुकल्प तारूं ॥ ठेवूनि श्रीधरू स्वयें गेला ॥ ६४॥ नवल त्या तारवाची स्थिती ॥ बुडवूं नेणें कल्पांतीं ॥ श्रवणें तरले नेणों किती ॥ पुढेंही तरती श्रद्धाळू ॥ ६५ ॥ श्रीकृष्णकीर्तीचें तारूं ॥ घालितां आटे भवसागरू ॥ तेथें कोरड्या पाउलें उतारू ॥ श्रवणार्थी नरू स्वयें लाहे ॥ ६६ ॥ जे कृष्णकीर्ति करिती पठण ॥ त्यांच्या संसारासि पडे शून्य ॥ कीर्तिवंत अतिपावन ॥ त्यांतें सुरगण वंदिती ॥ ६७ ॥ आदरें पढतां श्रीकृष्णकीर्ती ॥ पायां लागती चौरी मुक्ती ॥ त्यांचेनि पावन त्रिजगती ॥ परमेंनिवृत्ती हरिनामें ॥ ६८ ॥ श्रीकृष्णकीर्ति-

---

१ रसाची गोडी. २ टाकी. ३ उत्तम वायु. ४ व्यर्थ. ५ अन्य, दुसरें. ६ राहिलें, जिरलें. ७ चरणपाय. ८ मावळे. ९ संबंध. १० कर्त्यासह. ११ नाहींसा होई. १२ तीन लोक. १३ कृष्ण. १४ सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता. १५ फार सुख.

*ना. स्याचा. ×मो. पदाक्रम ना. पादाक्रम.

नामाक्षरें ॥ रिघतांचि श्रवणद्वारें ॥ भींतरील तम एकसरें ॥ निघे बाहेरें गजबजोनी ॥६९॥ तेंव श्रीकृष्णकीर्तिकथागजरीं ॥ तमासि ठाव नुरेचि बाहेरी ॥ धाकेंचि निमे सपरिवारीं ॥ कृष्णकीर्तिमाझारीं परमानंद ॥ ७० ॥ श्रीकृष्णकीर्तिप्रतापप्रकाशें ॥ संसार कृष्णमय दिसे ॥ कीर्ति कीर्तिमंता ऐसें ॥ दे अनायासें निजसुख ॥७१॥ जो देखिलिया देखणें सरे ॥ जो चाखिलिया चाखणें पुरे ॥ जो ऐकिलिया ऐकणें वोसरे ॥ जो चिंतिता मुरे चित्तवृत्ती ॥७२॥ ज्यासि झालिया भेटी ॥ भेटीसि न पडे तुटी ॥ ज्यासि बोलतां गोठी ॥ पडे मिठी परमार्थी ॥ ॥ ७३ ॥ ज्यासि दीधलिया खेवें ॥ खेवाची पुरे हांव ॥ ज्याचें घेतांचि नांव ॥ नासे सर्व महाभय ॥ ७४ ॥ तो सत्यसंकल्प ईश्वरु ॥ स्वलीला सर्वेश्वरु ॥ स्वपदासि शारंगधरु ॥ अतिसत्वरु निघाला ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ ब्रह्मण्यानां वदान्यानां नित्यं वृद्धोपसेविनाम् ॥ विप्रशापः कथमभूद्वृष्णीनां कृष्णचेतसाम् ॥ ८ ॥

॥ टीका ॥ आदरें पुसे परीक्षिती ॥ यादव विनीत विप्रभक्ती ॥ त्यांसि शाप घडे कैशिया रीतीं ॥ तें सांग मजप्रती शुकयोगींद्रा ॥ ७६ ॥ यादव दानें अति उदार ॥ राजे होऊनि परम पवित्र ॥ ब्राह्मणसेवे तत्पर ॥ आज्ञाधर श्रीकृष्णाचे ॥ ७७ ॥ यादव सदा श्रीकृष्णयोगेंसीं ॥ नित्य साधु ब्राह्मण यादवांपासीं ॥ तेथेंचि वसे नारदऋषी ॥ शाप यादवांसी घडे कैसा ॥ ॥ ७८ ॥ दक्षशाप न बाधी श्रीकृष्णापाशीं ॥ म्हणोनि नारद वसे द्वारकेसी ॥ तोचि श्रीकृष्ण असतां अंगेंसी ॥ शाप यादवांसी घडे कैसा ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ यन्निमित्तः स वै शापो यादृशो द्विजसत्तम ॥ कथमेकात्मनां भेद एतत्सर्वं वदस्व मे ॥ ९ ॥

॥ टीका ॥ शापासि मूळ मुख्य संतापू ॥ कैसेनि ब्राह्मणां आला कोपू ॥ कोणेपरींचा दीधला शापू ॥ संक्षेपरूपू सांगा स्वामी ॥ २८० ॥ यादव समस्त सखे बंधू ॥ त्यांसि प्रतिपाळीं स्वयें गोविंदु ॥ एकात्मता स्वगोत्रसंबंधू ॥ त्यांमाजी गृहभेदु घडे कैसा ॥ ८१ ॥ आत्मा वै पुत्रनामासी ॥ हे श्रुति प्रमाण सर्वांसी ॥ तेथें शाप बाधी श्रीकृष्णात्मजांसी ॥ केवीं आलें यासी सत्यत्व ॥ ॥८२॥ कृष्णसंकल्प कुळनाशन ॥ तोचि ब्रह्मशापासि कारण ॥ यालागीं बाधक जाण ॥ होय संपूर्ण यादवां ॥ ८३ ॥ सृष्टी सॄजी पाळी संहारी ॥ हें कृष्ण संकल्पमात्रें करी ॥ तो यदुकुळनिधन निर्धारी ॥ त्याची अवतारथोरी शुक सांगे ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुकउवाच ॥ बिभ्रद्वपुःसकलसुंदरसन्निवेशं कर्माचरन् भुवि सुमंगलमाप्तकामः ॥ आस्थाय धाम रममाण उदारकीर्तिः संहर्तुमैच्छत कुलं स्थितकृत्यशेषः ॥ १० ॥ कर्माणि पुण्यनिवहानि सुमंगलानि गायज्जगत्कलि-

१ आंतील. २ अज्ञानास. ३ नाहींसा होतो. ४ आत्मसुख. ५ आलिंगन. ६ नम्र. ७ दक्षप्रजापतीनें दिलेला शाप. ८ एकरूपता. ९ कृष्णाच्या मुलांस. १० ब्राह्मणांच्या शापास. ११ उत्पन्न करितो.

मलापहराणि कृत्वा ॥ कालात्मना निवसता यदुदेवगेहे पिंडारकं समगमन् मुनयो विसृष्टाः ॥ ११ ॥

टीका ॥ रायासि ह्मणे श्रीशुक ॥ कर्ता करविता श्रीकृष्ण एक ॥ तो शापार्थ आत्यंतिक ॥ आत्मजां अविवेक उपजवी स्वयें ॥८५॥ स्वयें जावया निजधामा ॥ थोर आवडी पुरुषोत्तमा ॥ यालागीं अवशेष कर्मा ॥ मेघश्यामा लवलाहो ॥ ८६ ॥ केव्हां होईल कुलक्षयो ॥ हेंचि मनीं धरी देवो ॥ तो देवाचाचि भावो ॥ शापासि पहावो दृढ मूळ ॥ ८७ ॥ जो कुलक्षयातें चिंती ॥ त्या श्रीकृष्णाची सुंदरमूर्ती ॥ शुक सांगे परीक्षितीप्रती ॥ स्वानंदस्थिति उल्हासें ॥ ८८ ॥ सकळ सौंदर्या अधिवास ॥ धरोनि मनोहर नटवेष ॥ लावण्यकळाविन्यास ॥ आणी जगदीशु निजांगें ॥ ८९ ॥ नवल सौंदर्या वीकं उटी ॥ सर्वांगीं गुंतल्या जनदिठी ॥ कृष्णरूपीं पडे मिठी ॥ होत लुलवटी डोळ्यां ॥ २९० ॥ जैशा गुळीं माशीवरी माशी ॥ तेवीं दिठीवरि दिठी श्रीकृष्णरूपासी ॥ सर्वांगीं वेढूनि चौपांसीं ॥ अहर्निशीं न सांडिती ॥ ९१ ॥ नयन लांचावले लोभा ॥ दृष्टीसि निघालिया जिभा ॥ यापरी श्रीकृष्णशोभा ॥ स्वानंदगाभा साकार ॥ ९२ ॥ तो श्रीकृष्ण देखिला ज्या दिठीं ॥ ते परतोनि मागुती नुठी ॥ अधिकाधिक घाली मिठी ॥ देखे सकल सृष्टी श्रीकृष्ण ॥ ९३ ॥ ऐशी डोळयां आवडी ॥ ह्मणोनि कामिनी *वरपडी ॥ यालागीं गोपिकांसि गोडी ॥ अतिगाढी गोविंदीं ॥ ९४ ॥ श्रीकृष्ण अतिसुंदर मनोरम ॥ ह्मणाल असेल त्यासि विषयधर्म ॥ तरी तो अवाप्तसकळकाम ॥ आत्माराम श्रीकृष्ण ॥ ९५ ॥ श्रीकृष्ण अवाप्तसकळकाम ॥ त्यासि कां द्वारका गृहस्थाश्रम ॥ स्त्रिया, पुत्र, राज्यसंभ्रम ॥ विषयकाम कां भोगी ॥ ९६ ॥ चहूं आश्रमां प्रकाशकू ॥ त्रिलोकीं कृष्ण गृहस्थ एकू ॥ तोचि ब्रह्मचारी नैष्ठिकु ॥ अतिनैटकू संन्यासी ॥ ९७ ॥ कृष्ण देहीं नाहीं दैवबळ ॥ लीलाविग्रही चित्कल्लोळ ॥ त्याचीं सर्व कर्में पावनशीळ ॥ उद्धरी सकळ श्रवणकथनें ॥ ९८ ॥ श्रीकृष्णकर्माचें करी जो स्मरण ॥ +तो कर्में तोडी कर्मबंधन ॥ ऐसें उदार कर्माचरण ॥ आचरला श्रीकृष्ण दीनोद्धरणा ॥ ॥ ९९ ॥ श्रीकृष्ण असेल सकाम ॥ ह्मणाल यालागीं आचरे कर्म ॥ ज्याचें नाम निर्दाळी सकळ काम ॥ तो स्वयें सकाम घडे केवीं ॥३००॥ श्रीकृष्णाचा स्मरतां काम ॥ स्वयें संन्यासी होती निष्काम ॥ सकामाचा निर्दळे काम ॥ ऐसें उदार कर्म आचरला ॥ १ ॥ तेणें अवाप्तसकळकामें ॥ ऐशीं आचरला अगाध कर्में ॥ मानवीं तरावया मनोधर्में ॥ कीर्ति मेघश्यामें विस्तारिली ॥ २ ॥ कैसें कर्म सुमंगळू ॥ कानीं पडतांचि अळुमाळू ॥ नासोनियां कर्ममळू ॥ जाती तत्काळू श्रवणादरें ॥ ३ ॥ श्रवणें उपजे सद्भावो ॥ सद्भावें प्रगटे देवो ॥ तेणें निर्दळे अहंभावो ॥ ऐशी उदार पहाहो हरिकीर्ती ॥४॥ श्रीकृष्णकीर्तीचें स्मरण ॥ कां करितां श्रवण पठण ॥ उद्धरले बहुसाल जन ॥ पुढें भविष्यमाण उद्धरती ॥ ५ ॥ जरी केलिया होती पुण्यराशी ॥ तरी अवधान होय हरिकथेसी ॥ येऱ्हवीं ऐकतां येरांसी ॥ लागे अनायासीं

१ आपल्या स्थलास. २ तेज. ३ फेरे. ४ दृष्टीवर. ५ चारी बाजूंला. ६ सोकावले. ७ उठत नाहीं. ८ ज्याच्या सर्वेच्छा तृप्त होऊन गेल्या आहेत असा. ९ यावज्जीव ब्रह्मचारी. १० गुप्ततात्पर्यांची. ११ थोडें अल्प. १२ ऐकिल्यानें. १३ नाहींसा होतो.

*ना. परवडी. +मो. ते कर्मेचि तोडी कर्मबंधन.

अतिनिद्रा ॥ ६ ॥ जे हरिकथेसि सादर ॥ त्यांच्या पुण्या नाहीं पार ॥ श्रीकृष्णें सुगमोपाव केला थोर ॥ दीनोद्धार हरिकीर्तनें ॥ ७ ॥ श्रीकृष्णकीर्तनें गर्जतां गोठी ॥ लाजल्या प्रायश्चित्तां चिया कोटी ॥ उतरल्या तीर्थांचिया उटीं ॥ नामासाठीं निजमोक्ष ॥ ८ ॥ ऐसा निजकीर्ति-उदारू ॥ पूर्ण ब्रह्म शारंगधरू ॥ लीलाविग्रही सर्वेश्वर ॥ पूर्णावतारू यदुवंशीं ॥ ९ ॥ उतरला धराभार येथ ॥ सत्य न मनी श्रीकृष्णनाथ ॥ यादव उरले अति अद्भुत ॥ हेही समस्त निर्दा-ळावे ॥३१०॥ ये अवतारीं हृषीकेशी ॥ ह्मणे हेंच कृत्य उरलें आह्मासी ॥ निर्दाळोनि निजवं-शासी ॥ निजधामासी निघावें ॥ ११ ॥ तो यादवांमाजीं माधव ॥ काळात्मा देवादिदेव ॥ जाणोनि भविष्याचा भाव ॥ काय अपूर्व करिता झाला ॥ १२ ॥ नारदादि मुनिगण ॥ त्यांसि पाचारोनि आपण ॥ करूं सांगे शीघ्र गमन ॥ स्वयें श्रीकृष्ण साक्षेपें ॥ १३ ॥ ज्यापासूनि संत दूरी गेले ॥ तेथें अनर्थांचें केलें चाले ॥ हें यादवनिर्धनालागीं वहिलें ॥ लाघव केलें श्रीकृष्णें ॥ १४ ॥ भक्त संत साधु ज्यांपासीं ॥ तेथें रिघु नाहीं अनर्थासी ॥ जाणे हें स्वयें हृषीकेशी ॥ येरां कोणासी कळेना ॥१५॥ जेथें संतांचा समुदावो ॥ तेथें जन्ममरणांअभावो॥ हा श्रीकृष्णचि जाणे भावो ॥ तो करी उपावो ब्रह्मशापार्थ ॥१६॥ जेथूनि संत गेले दुरि ॥ तेथें सद्य अनर्थ वाजे शिरीं ॥ हें जाणोनियां श्रीहरी ॥ द्वारकेबाहेरीं ऋषि घाली ॥ १७ ॥ ऋषि जात होते स्वाश्रमासी ॥ त्यांतें *लावी हृषीकेशी ॥ तीर्थविशेषें समस्तांसी ॥ पिंडारकासी स्वयें धाडी ॥ १८ ॥ पिंडारका मुनिगण ॥ श्रीकृष्णें धाडिले कोण कोण ॥ ज्यांचें करितांचि नामस्मरण ॥ कळिकाळ आपण ×स्वयें कांपे ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ विश्वामित्रोऽसितः कण्वो दुर्वासा भृगुरंगिराः ॥ कश्यपो वामदेवो-त्रिर्वसिष्ठो नारदादयः ॥ १२ ॥

टीका ॥जे तपोतेजें दैदीप्यमान॥जे पूर्णज्ञानें ज्ञानघन ॥ ज्यांतें सदा वंदी श्रीकृष्ण॥ते ऋषीश्वर जाण निघाले ॥३२०॥ जो गायत्रीमंत्रासाठीं ॥ करूं शके प्रतिसृष्टी ॥ जो विश्वामित्र महाहटी॥ तोही उठाउठीं निघाला ॥ २१ ॥ जेथें न बाधी उष्णशीत ॥ ते आश्रमीं वसे असित ॥ ज्या-चेनि नामें द्वंद्वें पळत ॥ तोही त्वरित निघाला ॥ २२ ॥ जो सूर्यासि रिघोनि शरण ॥ अश्वाचे कर्णी बैसोनि आपण ॥ पूर्ण केलें वेदपठण ॥ तो कण्वही जाण निघाला ॥ २३ ॥ जो दुर्वासा अत्याहारी ॥ आहार सेवूनि निराहारी ॥ तोही द्वारकेबाहेरी ॥ त्वरेंकरून निघाला ॥ २४ ॥ भृगुचा श्रीचरण ॥ हृदयीं वाहे नारायण ॥ मिरवी श्रीवत्सभूषण ॥ तो भृगुही जाण निघाला ॥ २५ ॥ अंगिरा स्वयें सद्बुद्धि सृष्टी ॥ बृहस्पति जन्माला ज्याचे पोटीं ॥ जो परमगुरु देवांच्या मुकुटीं ॥ तोही उठी गमनार्थ ॥२६॥ कश्यपाची नवल गोठी ॥ सुर-नर-पन्नग जन्मले पोटीं ॥ यालागीं हे काश्यपी सृष्टी ॥ तो कश्यप उठीं निजगमनें ॥२७॥ मुक्तांमाजीं श्रेष्ठ भावो ॥ वेदीं वाखाणे स्वये वामदेवो ॥ तोही द्वारकेहोनि पहावो ॥ स्वयेस्वैंमेवो

१ मौजेसाठीं सगुण झालेला. २ पृथिवीचें ओझें. ३ मानीत नाहीं. ४ कालरूपी. ५ हाका मारून. ६ विघ्नाचें. ७ केलेलें कर्तृत्व. ८ यादवांच्या मरण्याकरितां. ९ रिगाव. १० दुसऱ्यास. ११ तीर्थां-च्या निमित्तानें. १२ पिंडारक नांवाच्या तीर्थास. १३ तत्काल. १४ फार खणारा. १५ देवांस शिरसावंद्य. १६ कश्यपानें केलेली सृष्टि. १७ आपणच.

* मो. घालवी. ×मो. भयें.

निघाला ।। २७ ।। अत्रीची नवल परी ।। तिन्ही देव जन्मले उदरीं ।। श्रीदत्त वंदिजे योगीश्वरीं ।। हे अगाध थोरी अनसूयेची ।। २८ ।। तो स्वयें अत्रि ऋषिश्वर ।। श्रीकृष्ण आज्ञातत्पर ।। पिंडारका अति सत्वर ।। प्रयाण शीघ्र तेणें केलें ।। २९ ।। जो श्रीरामाचा सद्गुरु ।। ब्रह्मज्ञानें अति उदारु ।। ज्याचे *शाटीचा प्रताप थोरु ।। ×लाजवी दिनकरु तपोतेजें ।। ३३० ।। ऐसा जो वसिष्ठ मुनी ।। तो कृष्ण संज्ञा मानूनी ।। निघाला द्वारकेहूनि ।। शीघ्रगमनी पिंडारका ।। ३१ ।। आणि देवर्षि नारद ।। ज्याचाही अगाध बोधू ।। ज्यासि सर्वदा परमानंद ।। अति आल्हाद हरिकीर्तनीं ।। ३२ ।। ब्रह्मविणा स्वये वहातू ।। ब्रह्मपदें गीतीं गातू ।। ब्रह्मानंदें नाचतू ।। निघे डुल्लतू पिंडारका ।। ३३ ।। इत्यादि हे मुनिवरु ।। श्रेष्ठ श्रेष्ठ ऋषीश्वरु ।। शिष्यसमुदायें सहपरिवारु ।। मीनले अपारु पिंडारकीं ।। ३४ ।। एवं पिंडारकीं ऋषि सर्व ।। शापानुग्रही महानुभाव ।। मीनले कृष्णवैभव ।। अति अपूर्व वर्णिती ।। ३५ ।। बाप लाघवी वनमाळी ।। कुलक्षयो घडावया तत्काळीं ।। +कुमरीं ऋषींसी रांडोळी ।। कपटमेळीं मांडिली ।। ३६ ।। निंदा अवज्ञा हेळण ।। करितां ब्राह्मणासी छळण ।। जेथें ब्रह्मद्वेष पूर्ण ।। कुलक्षयो जाण तें ठायीं ।। ३७ ।। ब्राह्मणांच्या कोपापुढें ।। *कुल कायसें बापुडें ।। महादेवाचें लिंग झडे ।। इंद्रपदवी पडे समुद्रीं ।। ३८ ।। तो समुद्रही केला क्षार ।। ऐसा द्विजकोप अतिदुर्धर ।। हें एकाएकाचें चरित्र ।। ते ऋषि समर्थ मीनले तेथें ।। ३९ ।। धरातळीं ब्रह्म ब्राह्मण ।। त्यांचें वचन परम प्रमाण ।। हें सत्य करावया श्रीकृष्ण ।। कुळनिर्दळण स्वयें दावी ।। ३४० ।।

।। श्लोक ।। क्रीडंतस्तानुपव्रज्य कुमारा यदुनंदनाः ।। उपसंगृह्य पप्रच्छुरविनीता विनीतवत् ।। १३ ।।

।। टीका ।। यदुनंदन समस्त ।। क्रीडाकंदुक झेलित ।। एकमेकांतें हाणत ।। ठकून पळत परस्परें ।। ४१ ।। ऐसे नानाक्रीडा विहार ।। करीत आले यदुकुमर ।। अंगीं श्रीमद अपार ।। औद्धत्यें थोर उन्मत्त ।। ४२ अतीतानागतज्ञानवंत ।। ऋषीश्वर मीनले समस्त ।। यांचें वचन यथार्थभूत ।। यांसिही निश्चित ठकूं आह्मी ।। ४३ ।। जें ०अघडतें येऊन पडे ।। तें यांचें वचन कैसें घडे ।। ह्मणोनि ऋषीश्वरांपुढें ।। मांडिलें कुडें यदुकुमरीं ।। ४४ ।।

।। श्लोक ।। ते वेपयित्वा स्त्रीवेषैः सांबं जांबवतीसुतम् ।। एषा पृच्छति वो विप्रा अंतर्वत्न्यसितेक्षणा ।। १४ ।।

।। टीका ।। पहिलेच श्रीमदें उद्भट ।। त्यावरी मांडिलें कपट ।। सांबासी श्रीनट ।। अतिवरिष्ठ बाणला ।। ४५ ।। तो श्यामसुंदर डोळसू ।। अंगीं शोभला स्त्रीवेषू ।। प्रमदावैभवविलासू ।। दावी विन्यासू सलज्ज ।। ४६ ।। नयनीं सोगयाचें काजळ ।। व्यंकट कटाक्ष अतिचपळ ।। सुंदर सुकुमार वेल्हाळ ।। चाले निश्चळ हंसगमनी ।। ४७ ।। वस्त्रें बांधोनिया उदर ।। नावेकें केलें थोर ।। तेणें ते गरोदर ।। दिसे साचार इतरांसी ।। ४८ ।। हात घालूनि सखियांच्या

१ छाटीचा. २ ज्ञान. ३ मिळाले. ४ इंद्राचें राज्य. ५ खारट. ६ ब्राह्मणाचा क्रोध. ७ सर्व. ८ चेंडू. ९ भूतभविष्य जाणते. १० फसवूं. ११ कपट. १२ एका यादवास. १३ शोभला. १४ स्त्रीचा. १५ पात्रलें टाकणें. १६ वांकडे, कुटिल. १७ क्षणभर.

*मो. काठीचा. ×ना. मो. जिंकिला दिनकर. तपोतेजे. +मो. कुमारी ऋषींप्रती राडोळी. *ना. कुलक्षय-तें बापुडें. ०मो. अघ तें येऊन पडे.

खांदीं ॥ चालतां उदर हालों नेदी ॥ विसांवा घेत पदोपदीं ॥ येत ऋषिवृंदीं देखिली ॥४९॥ ऐसा स्त्रीवेष दाखवूनी ॥ नावेक अंतरें राहोनी ॥ येरीं ऋषीं जवळीं येऊनी ॥ लोटांगणी घातलीं ॥ ३५० ॥ पूर्वश्लोकींचा श्लोकार्थ तेथ ॥ +व्याख्यान नव्होचि समस्तें ॥ यालागीं तेंचि येथ ॥ वाखाणिजेतं कथान्वयें ॥ ५१ ॥ छळाचेनि मिषें जाणा ॥ ऋषींसि करिती प्रदक्षिणा ॥ अत्यादरें लागले चरणा ॥ स्वामीच्या दर्शना आह्मी आलों ॥ ५२ ॥ ऐसे यदुकुमर समस्त ॥ अविनीत परी *विनीतें होत ॥ कर जोडोनि राहिले तेथ ॥ मृदु विनवीत मुनीश्वरां ॥ ५३ ॥ स्वामी जी पैल हे सुंदरें ॥ तुमच्या वचनीं भावार्थ थोर ॥ आसन्नप्रसव गरोदर ॥ स्वयें सुकुमार पुसों लाजे ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ प्रष्टुं विलज्जती साक्षात्प्रब्रूतामोघदर्शनाः ॥ प्रसोष्यंती पुत्रकामा किंस्वित्संजनयिष्यति ॥ १५ ॥

॥ टीका ॥ स्वयें येऊन तुह्मांप्रती ॥ तिचेनि न बोलवे निश्चितीं ॥ यालागीं आह्मांहातीं ॥ सेवेसि विनंती करविली ॥ ५५ ॥ तुह्मी *सत्यदर्शी साचार ॥ अमोघवीर्य तुमचें उत्तर ॥ शिरीं वंदिती हरिहर ॥ ज्ञानें उदार तुह्मी सर्व ॥ ५६ ॥ यालागीं हे गर्भवंती ॥ सादरें असे पुसती ॥ पुत्रकाम असे वांछिती ॥ काय निश्चितीं प्रसवेल ॥ ५७ ॥ ऐसे कपटाचेनि वालभें ॥ विनीत कर जोडूनि उभे ॥ तेणेंचि फळें भावगर्भे ॥ छळप्रलोभें पावती ॥ ५८ ॥ कर्म जाणोनियां कुडें ॥ नारद नाचे ऋषींपुढें ॥ मनीं ह्मणे यादवांचें गाडें ॥ निधन रोकडें वोडवलें ॥ ॥ ५९ ॥ जेवीं मुंगिया निघाले पांख ॥ तियेसि मरण अचुक ॥ तेवीं ब्राह्मणछळणें देख ॥ आवश्यक कुळनाश ॥ ३६० ॥ शापीत आलिया द्विजजन ॥ त्यांसि सद्भावें करावें नमन ॥ मारूं आलिया ब्राह्मण ॥ मस्तक आपण वोडवावें ॥ ६१ ॥ त्या ब्राह्मणासि जें छळण ॥ तें जाणावें विषभक्षण ॥ विषें निमे भक्षित्याचा प्राण ॥ कुळनिर्दळण द्विजच्छळणें ॥ ६२ ॥ अविद्य सविद्य न ह्मणतां जाण ॥ धरातळीं ब्रह्म ब्राह्मण ॥ त्याचें करूं जातां छळण ॥ कुळनिर्दळण आवश्यक ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ एवं प्रलब्धा मुनयस्तानूचुः कुपिता नृप ॥ जनयिष्यति वो मंदा मुसलं कुलनाशनम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ऐकें परीक्षिती नृपवरा ॥ यापरी यादवकुमारां ॥ निधनाचा भरला वारा ॥ तें ऋषीश्वरां छळूं गेले ॥ ६४ ॥ कपट जाणोनियां साचार ॥ थोर कोपले ऋषीश्वर ॥ मग तिहीं काय वाग्वज्र ॥ अति अनिवार सोडिलें ॥ ६५ ॥ अरे हे प्रसवेल जें बाळ ॥ तें होय सकळ कुळा काळ ॥ निखळ लोहाचें मुसळ ॥ देखाल सकळ तुह्मी मंदभाग्य ॥ ६६ ॥

॥ श्लोक ॥ तच्छ्रुत्वा तेऽतिसंत्रस्ता विमुच्य सहसोदरम् ॥ सांबस्य ददृशुस्तस्मिन्मुसलं खल्वयस्मयम् ॥ १७ ॥

१ सर्व, पूर्ण. २ वर्णिजेत. ३ निमित्तानें. ४ उद्धट. ५ नम्रासारखे, बाह्यात्कारी. ६ सुंदरी, स्त्री ७ सत्य. ८ प्रेमानें. ९ खोटें. १० आलें. ११ पुढें करावें. १२ अविद्वान्. १३ विद्वान्. १४ नाशाचा १५ शापरूपी वज्र. १६ मृत्यु.

+मो. व्याख्यानी नव्हे संमत. *मो. विनीतवंत. *मो. तत्त्वदर्शी.

**॥ टीका ॥ ऐकूनि शापाचें उत्तर ॥ भयभीत झाले कुमर ॥ सोडूनि सांबाचें उदर ॥ अतिसत्वर दाविती ॥ ६७ ॥ तंव तें लोहमय मुसळ ॥ देखतें झाले तत्काळ ॥ मग भयभीत विव्हळ ॥ एकाकी सकळ दचकोनि ठेले ॥ ६८ ॥ नासावें यादवकुळ ॥ ऐसा श्रीकृष्णसंकल्प सबळ ॥ तोचि झाला लोहाचें मुसळ ॥ जाण तत्काळ ऋषिवाक्य सत्यें ॥ ६९ ॥ जें जें ब्राह्मणांचें वचन ॥ तें तें अन्यथा होंनेदी श्रीकृष्ण ॥ ब्राह्मणाचें जें वदे वदन ॥ तें स्वयें श्रीकृष्ण सत्यत्वा आणी ॥ ३७० ॥ देखोनि ऋषीश्वरांचा कोपू ॥ ऐकोनि कुलक्षयाचा शापू ॥ यदुकुमरां अति संतापू ॥ भयें कंपू सूटला ॥ ७१ ॥**

॥ श्लोक ॥ किं कृतं मंदभाग्यैर्नः किं वदिष्यंति नो जनाः ॥ इति विव्हलिता गेहानादाय मुसलं ययुः ॥ १८ ॥

**॥ टीका ॥ आह्मी मंदभाग्य करंटे ॥ ऋषीश्वर कोपविले *शठें ॥ निजघाता झालों पैठे[१] ॥ कुलक्षयो कपटें जोडिला ॥ ७२ ॥ काय ह्मणती नगरजनें ॥ कां छळूं गेले हे ब्राह्मण ॥ चिंताक्रांत म्लानवदन ॥ मुसळ घेऊन घरा आले ॥ ७३ ॥**

॥ श्लोक ॥ तच्चोपनीय सदसि परिम्लानमुखश्रियः ॥ राज्ञ आवेदयांचक्रुः सर्वयादवसन्निधौ ॥ १९ ॥

**॥ टीका ॥ सभेसि वसुदेव उग्रसेन ॥ बळिराम आणि अनिरुद्ध प्रद्युम्न ॥ यादव बैसले संपूर्ण ॥ एकला श्रीकृष्ण तेथें नाहीं ॥ ७४ ॥ सभे सांबादि आले सकळ ॥ पुढां ठेवूनि लोहमुसळ ॥ शापु सांगीतला समूळ ॥ मुखकमळ अतिम्लान ॥ ७५ ॥**

॥ श्लोक ॥ श्रुत्वाऽमोघं विप्रशापं दृष्ट्वा च मुसलं नृप ॥ विस्मिता भयसंत्रस्ता बभूवुर्द्वारकौकसः ॥ २० ॥

**॥ टीका ॥ ऐकून द्विजांचा परमकोपू ॥ यादवां सुटला अहाकंपू ॥ मिथ्या नव्हे ब्रह्मशापू ॥ भयें संतापू सर्वांसी ॥ ७६ ॥ प्रत्यक्ष देखोनि मुसळ ॥ थोर सुटली खळबळ ॥ नगरनागरिकां हलकल्लोळ ॥ यादवकुळ उरे कैसें[४] ॥ ७७ ॥ ऐक राया परीक्षिती ॥ सबळ भविष्याची गती ॥ वृत्तांत श्रीकृष्णासी न सांगती ॥ विचार आपमतीं तिहीं केला ॥ ७८ ॥**

॥ श्लोक ॥ तच्चूर्णयित्वा मुसलं यदुराजः स आहुकः ॥ समुद्रसलिले प्रास्यल्लोहं चास्याऽवशेषितम् ॥ २१ ॥

**॥ टीका ॥ आहुक राजा उग्रसेन ॥ तेणें लावूनि लोहघण ॥ मुसळ करोनियां चूर्ण ॥ समुद्रीं जाण घालविलें ॥ ७९ ॥ त्या मुसळाचा *मध्यकेवळ ॥ चूर्ण नव्हेच अतिप्रबळ ॥ उरला वज्रप्राय केवळ ॥ तो समुद्रीं तत्काळ झुगारिला ॥ ३८० ॥**

॥ श्लोक ॥ कश्चिन्मत्स्योऽग्रसील्लोहं चूर्णानि तरलैस्ततः ॥ उह्यमानानि वेलायां लग्नान्यासन् किलैरकाः ॥ २२ ॥ मत्स्यो गृहीतो मत्स्यघ्नैर्जालेनान्यैः सहार्णवे ॥ तस्योदरगतं लोहं स शल्ये लुब्धकोऽकरोत् ॥ २३ ॥

---

१ नाहींसें व्हावें. २ पात्र. ३ गांवांतले लोक. ४ कोणत्या उपायानें. ५ मधला गाभा.

***मो. शाठ्यें. *मो. केवळ.**

॥ टीका ॥ समुद्रलाटांचे कल्लोळ ॥ तेणें लोह चूर्ण सकळ ॥ प्रभासे लागोनि प्रबळ ॥ उठिले तत्काळ येरिकारूपें ॥ ८१ ॥ लोहकवळ मीनें गिळी ॥ त्या मीनातें समुद्रजळीं ॥ अन्यत्र मत्स्यसहित जाळीं ॥ मत्स्यघ्न आकळी निजलाघवें ॥ ८२ ॥ तो मत्स्य मत्स्यघ्नें विदारी ॥ तंव लोह निघे त्याचे उदरीं ॥ देखोनि हरिखला तो भारी ॥ हें आतुडे करीं तो सभाग्य ॥ ८३ ॥ मत्स्योदरींचें लोह जाण ॥ याचें अचुक संधान ॥ अगाध पारधी साधे पूर्ण ॥ यालागीं त्याचा बाण लुब्धकें केला ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ भगवान ज्ञातसर्वार्थ ईश्वरोऽपि तदन्यथा ॥ कर्तुं नैच्छद्विप्रशापं कालरूप्यन्वमोदत ॥ २४ ॥ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे विप्रशापोनाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

॥ टीका ॥ कोणी न सांगतां हें देखणें ॥ जाणीतलें सर्वज्ञें श्रीकृष्णें ॥ परी द्विजशाप अन्यथा करणें ॥ हें निजमनें स्पर्शेना ॥ ८५ ॥ म्हणाल हें नव्हेल त्यासी ॥ पालटवेना द्विजशापासी ॥ जो निर्माण्या आणी गुरुपुत्रासी ॥ श्रीकृष्ण कळिकाळासी नियंता ॥ ८६ ॥ पाहुनि कळिकाळाचे दांत ॥ देवकीचे गत गर्भ आणित ॥ ईश्वरा ईश्वर श्रीकृष्णनाथ ॥ जाणे सर्वार्थ निजसिद्धी ॥ ८७ ॥ निद्रा न मोडितां निळभरी ॥ मथुरा आणिली द्वारकेभीतरीं ॥ श्रीकृष्ण काय एक न करी ॥ तेंही ममता नधरी कुळाची ॥ ८८ ॥ निजकुळक्षयो जरी जाहला ॥ तरी अन्यथा न करी ब्राह्मणबोला ॥ ब्राह्मणें पायेंरा जरी हाणीतला ॥ तो हृदयीं धरिला पदांकु ॥ ८९ ॥ तेंचि श्रीवत्सलांछन ॥ सकळ भूषणां भूषण ॥ हृदयीं मिरवी श्रीकृष्ण ॥ यालागीं पूर्ण ब्रह्मण्यदेव ॥ ३९० ॥ श्रीकृष्ण शिरीं वंदी ब्राह्मण ॥ अन्यथा न करी ब्राह्मणवचन ॥ यालागीं ब्रह्मण्यदेवो पूर्ण ॥ वेद बंदिजन वर्णिती ॥ ९१ ॥ *ब्राह्मणरूप स्वयें श्रीहरी ॥ यालागीं ब्राह्मणांचा कैवारी ॥ कुळक्षयो जाहला जरी ॥ तरी द्विजांवरी ×कोपेना ॥ ९२ ॥ ऐकोनि ब्राह्मणांचा शापु ॥ न धरी मोहाचा सटाटोपु ॥ म्हणे सिद्धी गेला कृतसंकल्पु ॥ कुळक्षयानुरूपु संतोषे ॥ ९३ ॥ यापरी श्रीगोविंद ॥ काळरूपें मानी आनंद ॥ कुळक्षयाचा क्षितिबाधू ॥ अल्पही संबंध धरीना ॥ ९४ ॥ पूर्ण संतोष श्रीकृष्णनाथा ॥ पुढिले अध्यायीं ज्ञानकथा ॥ अतिरसाळ स्वानंदता ॥ अवधान श्रोतां मज द्यावें ॥ ९५ ॥ जेथें नारद आणि वसुदेवा ॥ संवाद होईल सुहावा ॥ जनक आणि आर्षभदेवा ॥ प्रश्नोत्तरीं जीवा स्वानंद दाटे ॥ ९६ ॥ ते रसाळ ब्रह्मज्ञानमात ॥ चाखवीन निजपरमार्थ ॥ एका जनार्दना विनवित ॥ श्रोते कृपा करितु अर्थावबोधें ॥ ३९७ ॥ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे परमहंससंहितायां एकाकारटीकायां विप्रशापो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥ ॥ अध्याय ॥ १ ॥ ॥ ओंव्या ॥ ३९७ ॥ ॥ मूळ० ॥ २४ ॥ ॥ मिळून एकंदर संख्या ॥ ४२१ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभंभवतु ॥

१ लाटा. २ मासे मारणारा धीवर. ३ मेलेल्या. ४ गेलेले. ५ लाथ. ६ स्तुति करणारे. ७ पक्षपाती. ८ आवडला. ९ ब्रह्मज्ञानाची गोष्ट. १० अर्थज्ञानानें.

*मो. ब्रह्मरूप. ×भा. क्षोभेना.

# अध्याय दुसरा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णायनमः ॥ जय जय देवाधिदेवा ॥ भोगिसी गुरुत्वें सुहावा ॥ विश्वीं विश्वात्मा ये सद्भावा॥तूं कृपेनें जेव्हां अवलोकिसी ॥१॥* ते विश्वीं जो विश्ववासी॥त्यातें विश्वासी ह्मणसी ॥ तेणें विश्वासी प्रसन्न होसी॥तें पायांपासीं प्रवेशु॥२॥त्या चरणरेणु कृपादृष्टी॥ अहं माहं सुटल्या गाठीं ॥ एकसरें तुझ्या पोटीं ॥ उठाउठी प्रवेशलों ॥ ३ ॥ यालागीं तूं निजात्ममाये ॥ याहेतू जंव पाहों जायें ॥ तंव बापपण तुजमाजी आहे ॥ अभिनव काय मांगावें ॥ ४ ॥ येथें मातापिता दोन्ही ॥ वेगळालीं असतीं जनी ॥ ते दोन्हीं एक करोनी ॥ एकाजनार्दनीं निजतान्हें ॥ ५ ॥ आतां उभयस्नेहेंस्नेहाळा ॥ वाढविसी मज बाळा ॥ परी नीच नवा सोहळा ॥ संभ्रम आगळा निजबोधाचा ॥ ६ ॥ शिव शक्ति गणेशु ॥ विश्व विष्णु चंडांशु ॥ ऐसा अलंकार बहुवसु ॥ निजविलासु लेवविशी ॥ ७ ॥ यापरी निजबाळा ॥ लेणीं लेवविशी स्वलीला ॥ आणि लेईलेपणाचा सोहळा ॥ पहाशी वेळोवेळां कृपादृष्टीं ॥ ८ ॥ बाळका लेवविजे लेणें ॥ तयाचें सुख तें काय जाणे ॥ तो सोहळा मातेनें भोगणें ॥ तेवीं जनार्दनें भोगिजे सुख ॥ ९ ॥ आपल्या चिद्रत्नांच्या गांठी ॥ आवडी घालिशी माझ्या कंठीं ॥ यालागीं माझ्या पाठोवाठीं ॥ निजात्मदृष्टी स्वयें धावें ॥ १० ॥ समर्थ जयाचा जनकु ॥ त्यास मानिती सकळ लोकु ॥ एका जनार्दनें एकु ॥ अमान्य अधिकु मान्य कीजे ॥ ११ ॥ बाळक स्वयें बोलों नेणे ॥ त्यासि माता शिकवी वचनें ॥ तैशीं ग्रंथकथाकथनें ॥ स्वयें जनार्दनें बोलविजे ॥ १२ ॥ तेणें नवल केलें येथ ॥ मूर्खाहातीं श्रीभागवत ॥ शेखीं बोलविलें प्राकृत ॥ एकादशार्थ, देशभाषा ॥ १३ ॥ परिसोनि प्रथम अध्यावो ॥ उगाचि राहिला कुरुरावो ॥ पुढें कथाकथनीं ठावो ॥ कांहीं अभिप्रावो दिसेना ॥ १४ ॥ आपण करावा प्रश्न ॥ तंव हा सांगेल कृष्णनिर्धन ॥ यालागीं राजा मौन ॥ ठेला धरोन निवांत ॥ १५ ॥ जाणोनि त्याचा अभिप्रावो ॥ बोलता जाहला शुकदेवो ॥ तो ह्मणे मोक्षाचा प्रस्तावो ॥ तो हा अध्यावो परीक्षिती ॥ ॥ १६ ॥ हा एकादश अलोलिक ॥ श्लोकाहून श्लोक अधिक ॥ पदोपदीं मुक्तिसुख ॥ लगटलें देख निजसाधकां ॥ १७ ॥ ऐसें ऐकतांचि वचन ॥ राजा जाहला सावधान ॥ मुक्तिसुखीं आवडी गहन ॥ अवधानें कान +सर्वांग केलें ॥ १८ ॥ ऐसा देखोन परीक्षिती ॥ शुक अत्यंत सुखावे चित्तीं ॥ तो ह्मणे अवधानमूर्ती ॥ ऐक निश्चितीं गुह्यज्ञान ॥ १९ ॥ द्वितीयाध्यायीं निरूपण ॥ नारद वसुदेव संवाद जाण ॥ निमिजायंतांचे प्रश्न ॥ मुख्य लक्षण भागवतधर्म ॥ २० ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुकउवाच ॥ गोविंदभुजगुप्तायां द्वारवत्यां कुरूद्वह ॥ अवात्सीन्नारदोऽभीक्ष्णं कृष्णोपासनलालसः ॥ १ ॥

१ ब्रह्मसुख. २ विश्वरूप. ३ अवलोकिसी. ४ चरणकमलाच्या कृपेनें. ५ एकदम. ६ माझ्या आत्म्याची माय. ७ आश्चर्य. ८ अधिक. ९ आपल्या बालकास. १० अलंकार. ११ स्वात्मदृष्टीनें. १२ एकनाथ. १३ जाणत नाहीं. १४ ऐकून. १५ परीक्षिति. १६ श्रीकृष्णाचें मरण. १७ लागलें. १८ अत्यंत लक्ष्यामुळें सर्व गात्रेंच कर्णमय झालीं. १९ जनकराजा आणि आप्तबंधु.

*मो. ते विश्वीं जो विश्वासी. +मो. सर्वांगें.

॥ टीका ॥ जो मुक्तांमाजी अग्रगणी ॥ जो * ब्रह्मचारियां शिरोमणी ॥ योगि वंदिती शुकु-टस्थानीं ॥ जो भक्तमंडणीं अतिश्रेष्ठ ॥ २१ ॥ जो ब्रह्मरसाचा समुद्र ॥ जो निजबोधाचा पूर्णचंद्र ॥ तो बोलता जाहला शुकयोगींद्र ॥ श्रोता नरेंद्र कुरुवंशीचा ॥ २२ ॥ तो ह्मणे व्यासा-चाही निजगुरु ॥ आणि माझाही परमगुरु ॥ श्रीनारद महामुनीश्वरु ॥ त्यासि अति आदरु श्रीकृष्णभजनीं ॥ २३ ॥ द्वारकेहूनि स्वयें श्रीकृष्ण ॥ पिंडारका पाठवी मुनिगण ॥ तेथूनि नारद आपण ॥ द्वारकेसि जाण पुनः पुनः येतसे ॥ २४ ॥ हो कां जे द्वारके आंत ॥ नरिघे भय कळिकाळ ×कृतं ॥ जेथें स्वयें श्रीकृष्णनाथ ॥ असे नांदत निजसामर्थ्ये ॥ २५ ॥ दक्षशाप नारदासी पाही ॥ 'मुहूर्त एक राहों नये एकेठायीं' ॥ तो शाप हरिकीर्तनीं नाहीं ॥ यालागीं तो पाही कीर्तननिष्ठ ॥२६॥ ज्याची गाइजे कीर्तनीं कीर्ती ॥ तो द्वारके वसे स्वयें श्रीपती॥ तेथें शापबाधेची नचले प्राप्ती ॥ यालागीं नित्यवस्ती नारदासि तेथें ॥ २७ ॥ नारदासि पूर्ण ब्रह्मज्ञान ॥ त्यासि कां श्रीकृष्णमूर्तीचें ध्यान ॥ श्रीकृष्णदेह चैतन्यघन ॥ यालागीं श्रीकृष्ण-भजन नारदासी पढियें ॥२८॥ यापरी श्रीकृष्णभजन ॥ मुक्तासि पैढियंतें पूर्ण ॥ त्यासि नभजे अभाग्य कोण ॥ तेंचि निरुपण शुक सांगे ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ कोनु राजन्निंद्रियवान्मुकुंदचरणांबुजम् ॥ न भजेत्सर्वतोमृत्युरुपास्य-ममरोत्तमैः ॥ २ ॥

॥ टीका ॥ ऐके बापा नृपवर्या ॥ येऊनि उत्तमा देहा या ॥ जो नभजे श्रीकृष्णराया ॥ तो गिळिला माया अतिदुःखें ॥ ३०॥ ज्या भगवंतालागोनी ॥ माथां धरोनि पायवणी ॥ सदाशिव बैसला *निजासनीं ॥ महाश्मशानीं निजवस्ती ॥ ३१ ॥ पोटा आला चतुरानन ॥ +इतरांचा पाड तो कोण ॥ देहा येवोनि नारायण ॥ नभजे तो पूर्ण मृत्युग्रस्त ॥ ३२ ॥ त्यजुनि परमात्मा पूर्ण ॥ नानासाधनें शिणती जन ॥ त्यासि सर्वथा दृढबंधन ॥ न चुके जाण अनिवार ॥ ३३ ॥ सांडोनिया श्रीकृष्णचरण ॥ इंद्रादिदेवांचें करितां भजन ॥ ते देव मृत्युग्रस्त पूर्ण ॥ मा भंज-त्याचें मरण कोण वारी ॥ ३३ ॥ असोनि इंद्रियपाटव्य पूर्ण ॥ जो नभजे श्रीकृष्णचरण ॥ त्यासि सर्वत्र बाधी मरण ॥ क्षणक्षणा निर्दाळी ॥ ३४ ॥ तो नारद महामुनीश्वरु ॥ मुक्त होऊनि भजनीं तत्परु ॥ द्वारकेसी वसे निरंतरु ॥ त्यासि श्रीकृष्णीं थोरु अतिप्रीती ॥३५॥

॥ श्लोक ॥ तमेकदा तु देवर्षि वसुदेवो गृहागतम् ॥ अर्चितं सुखमासीनमभि-वाद्येदमब्रवीत् ॥३ ॥

॥ टीका ॥ धन्य धन्य तो नारदु ॥ ज्यासी सर्वी सर्वत्र गोविंदु ॥ सर्वदा हरिनामाचा छंदू॥ तेणें परमानंदु सदोदित ॥३६॥ जो श्रीकृष्णाचा आवडता ॥ ज्यासी श्रीकृष्ण आवडे सर्वथा॥ ज्याचेनि संगें तत्वतां ॥ नित्यमुक्तता जडजीवां ॥ ३७ ॥ तो नारद एकवेळां ॥ स्वानंदाचिया स्वलीळा ॥ आला वसुदेवाचिया राउळीं ॥ तेणें देखोनि डोळां हरिखेला ॥ ३८ ॥ केलें साष्टांग

१ श्रेष्ठ. २ आत्मबोधाचा. ३ द्वारकेजवळील एक क्षेत्र. ४ जात नाहीं. ५ यम. ६ प्रिय. ७ दुर्दैवी. ८ चरणोदक, गंगा. ९ ब्रह्मदेव. १० मृत्यूनें गिळिला. ११न भजणाराचें. १२ इंद्रियांचें सामर्थ्य. १३सर्वां भूतीं. १४ घरीं, राजगृहास. १५ हर्षला, संतोषला.

*मो. ब्रह्मचर्या. ×मो. कृत्य. *ना. महस्नीं +ना. ईश्वराचा.

नमन ॥ बैसो घातलें वरासन ॥ +ब्रह्मसद्भावें पूजन ॥ श्रद्धासंपूर्ण मांडिलें ॥ ३९ ॥ नारद तोचि नारायण ॥ येणें विश्वासें करि पूजन ॥ हेमपात्रीं चरणक्षाळण ॥ मधुपर्कविधिपूर्ण पूजा केली ॥ ४० ॥ पूजा करोनि सावधानीं ॥ वसुदेव ×बैसोनि सुखासनीं ॥ हृदयीं अत्यंत सुखावोनी ॥ काय ओल्हादोनी बोलत ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ वसुदेवउवाच ॥ भगवन्भवतो यात्रा स्वस्तये सर्वदेहिनाम् ॥ कृपाणानां यथा पित्रोरुत्तमश्लोकवर्त्मनाम् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ स्वलीला कृपा केली तुह्मीं ॥ तेणें परम सभाग्य जाहलों जी मी ॥ तुमचेनि आगमनें आह्मी ॥ कृतकृत्य स्वामी संन्निधिमात्रें ॥ ४२ ॥ चुकलिया निजजननी ॥ बालक दीन दिसें जनीं ॥ त्यासि मातेच्या आगमनीं ॥ संतोष मनीं निर्भर ॥ ४३ ॥ त्याहुनि श्रेष्ठ तुमची यात्रा ॥ नित्यसुखदात्री भूतमात्रां ॥ स्वलीला तुह्मी मही विचरा ॥ दीनोद्धारालागुनी ॥ ४४ ॥ मातेच्या आगमनीं निजबाळा ॥ दृष्टि उत्संगीं नीच नवा सोहळा ॥ तुमची यात्रा दीनां सकळां ॥ भोगवी स्वलीला निजात्मसुख ॥ ४५ ॥ माता सुख दे, तें नश्वर ॥ तुमच्या आगमनीं अनश्वर ॥ नित्यचित्सुखचिन्मात्र ॥ परात्पर तर *भोगावया ॥ ४६ ॥ तुह्मी भगवद्धर्ममार्गगामी ॥ तैं तुमची भेटी लाहों आह्मी ॥ जैं पुण्यकोटी निष्कामी ॥ प्रयागसंगमीं केलिया ॥ ४७ ॥ नारदा तूं भगवद्रूप ॥ तुझी भेटी करी निष्पाप ॥ तुवां कृपा केलिया अल्प ॥ स्वयें चित्स्वरूप ठसावे ॥ ४८ ॥ तुझेनि भक्तीसी महिमा अमूप ॥ तुझेनि वाढला भक्तिप्रताप ॥ तुझेनि भक्ति भगवद्रूप ॥ तूं चित्स्वरूप निजानिष्ठा ॥ ४९ ॥ तूं भक्तिप्रकाशक दिवटा ॥ कीं भक्तिमार्गींचा मार्गद्रष्टा ॥ नारदा तुझा उपकार मोठा ॥ भक्तीच्या पेंठा वसविल्या तुवां ॥ ५० ॥ मुख्य भागवतशास्त्र पूर्ण ॥ तुवां व्यासासि उपदेशून ॥ प्रकट करविलें दशलक्षणें ॥ दीनजन उद्धरावया ॥ ५१ ॥ नारदा तूं देवासमान ॥ हेही उपमा दिसे गौण ॥ तेंचिविषयीं निरूपण ॥ वसुदेव आपण निरूपी ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ भूतानां देवचरितं दुःखाय च सुखाय च ॥ सुखायैव हि साधूनां त्वादृशामच्युतात्मनाम् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ देवापासोनी भूतसृष्टी ॥ सुखदुःखें शीणे मोटीं ॥ अतिवृष्टि कां अनावृष्टि ॥ भूतकोटी आक्रांत ॥ ५३ ॥ त्या देवापरीस साधु अधिक ॥ हें साचचि मज मानलें देख ॥ देवचरितें उठी सुखदुःख ॥ साधु निर्दोष सुखदाते ॥ ५४ ॥ त्याहीमाजी तुजसारिखा ॥ जोडल्या कृपाळु निजात्मसखा ॥ तैं पेंठे पिके परमात्मसुखा ॥ हा महिमा या लोकां कदा नकळे ॥ ५५ ॥ दिधल्या सुखासी माणुती ॥ च्युती होनेणे कल्पांतीं ॥ ते अच्युतात्मस्थिति ॥ तुजपाशीं निश्चितीं नारदा ॥ ५६ ॥ तुझिये महिमेपाशीं ॥ मुदलें देवो नये तुकासी ॥ तेंही सांगेन मी तुजपाशीं ॥ यथार्थेसी नारदा ॥ ५७ ॥ देवाचा अवतार होय ॥ दासां सुख, दैत्यां भय ॥ तेथें

---

१ आनंदी होऊन. २ येण्यानें. ३ आपल्या सान्निध्यानेंच. ४ अतिशय. ५ येणें, फिरणें. ६ स्वच्छंदें. ७ कधीं नाहींसे न होणारे. ८ फार. ९ दिवा, मशाल. १० मार्ग दाखविणारा. ११ दहा लक्षणीयुक्त. १२न्यून,कमी. १३उत्पन्न होतें. १४बाजार. १५हानि. १६ब्रह्मपणानें असणें. १७साक्षात् ईश्वर. १८तुलनेस.

+भो. ब्रह्मभावें. ×भो. बैसवी. *भा. भोगवा.

तेसें विषम आहे ॥ हें नसमाये तुजमाजी ॥ ५८ ॥ तूं देवांचा आप्त होसी ॥ दैत्यही विश्वासता तुजपाशीं ॥ रावणें तुज नेऊनि एकांतासी ॥ निजगुह्यासी स्वयें सांगे ॥ ५९ ॥ देव रावणें घातले बंदीं ॥ तो रावण तुझे चरण वंदी ॥ शेखीं रामाचा तूं आप्त त्रिशुद्धि ॥ विषम तुज-मधीं असेना ॥ ६० ॥ जरासंध कृष्णाचा वैरी ॥ तुझी चाली त्याच्या घरीं ॥ आणि कृष्णाचे सभेमाझारीं ॥ आप्तत्वें थोरी पैं तुझी ॥ ६१ ॥ नाम घेवों नेदी देवांचें ॥ हें बिरुद हिरण्यकशि-पूचें ॥ त्यासि कीर्तन तुझें रुचे ॥ विषमत्व साचें तुज नाहीं ॥ ६२ ॥ लांचुगी बुद्धी सदा दे-वांसी ॥ तैशी नाहीं तुम्हां साधूंसी ॥ ऐक त्याही अभिप्रायासी ॥ यथार्थेंसी सांगेन ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ भजंति ये यथा देवान् देवा अपि तथैव तान् ॥ छायेव कर्मस चिवाः साधवो दीनवत्सलाः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ जे जैसे देवां यागीं यजिजेती ॥ तैसीं तैसीं त्यां फळें देव देती ॥ नभजत्यातें विघ्नें सूचती ॥ ऐसी गती देवांची ॥ ६४ ॥ जैसा जैसा पुरुष वेंठे[11] ॥ तैसी तैसी छाया नेटे ॥ सेवीं भजनें देव प्रसन्न मोठे ॥ येरवीं उफराटे विघ्न करिती ॥ ६५ ॥ जंव जंव सूर्य प्रकाशतसे ॥ तंव तंव छाया सवेंसी वसे ॥ निजकर्मे देवही तैसे ॥ कर्मवशें प्रसन्न ॥ ६६ ॥ सूर्यअस्तमानीं छाया नासे ॥ अभजनें देव क्षोभती तैसे ॥ एवं लांचुगे देव ऐसे ॥ तूंही अनायासें जाणसी ॥ ६७ ॥ इतर देवांची कथा कोण ॥ थोरला देव लांचुगा पूर्ण ॥ तोही न भेटे जीवें[14] घेत-ल्याविण ॥ भेटल्याचे, आपण गर्भवास सोसी ॥ ६८ ॥ त्याचें जीवेंसी सर्वस्वें भजन ॥ केल्या निजांग देऊनि होय प्रसन्न ॥ परी नभजत्याच्या गृहा जाण ॥ विसरोनी आपण कदा न वचे ॥ ६९ ॥ तैसी तुमची नोहे बुद्धी ॥ दीनदयाळ त्रिशुद्धी ॥ तूं तंव केवळ कृपानिधी ॥ ऐक ते विधी सांगेन ॥ ७० ॥ तुवां व्यास देखोनी सज्ञान ॥ उपदेशिलें गुह्यज्ञान ॥ ध्रुव-बाळक अज्ञान ॥ म्हणोनि जाण नुपेक्षिसी ॥ ७१ ॥ प्रल्हाद उपदेशिला जेव्हां ॥ दैत्यपुत्र न म्हणसी तेव्हां ॥ तुझिया कृपेचा हेलावा ॥ तो निजविसांवा दीनासी ॥ ७२ ॥ केवळ वाटपाडा देख ॥ भजनेंवीण एकाएक ॥ महाकवि केला वाल्मीक ॥ असुर आवश्यक वंदिती त्यासी ॥ ७३ ॥ देखोनि ज्याचिया ग्रंथासी ॥ सुख वोसंडे[21] सदाशिवासी ॥ ऐसा तूं कृपाळू होसी ॥ अनाथासी कुवासा ॥ ७४ ॥ वरिवरी दाविसी मिथ्या कोप ॥ कोपोनि छेदिसी त्याचें पाप ॥ शेखीं[23] सायुज्याचे दीप ॥ दाविसी सद्रूप दयाळुवा ॥ ७५ ॥ तुम्ही अच्युतात्मे निजनिर्धारी ॥ म्हणोनि देवो तुमचा आज्ञाधारी ॥ तुम्ही म्हणा त्यातें उद्धरी ॥ येऱ्हवीं हातीं न धरी आमोतें ॥ ७६ ॥ ऐसा तूं दीनदीक्षागुरु ॥ ब्रह्मज्ञानें अतिउदारु ॥ तरी पुसेन तो विचारु ॥ निजनिर्धार सांगावा ॥ ७७ ॥

---

१ उजरेणारे. २ न राहे. ३ अत्यंत. ४ प्रवेश, वहिवाट. ५ प्रतिज्ञा, बाणा. ६ न्यूनाधिक. ७ लःच-खाणार. ८ यज्ञांत. ९ पूजिति. १० निर्माण करिती, आणिती. ११ मुरडे, फिरे. १२ नाचे, फिरे. १३ जवळजवळ. १४ भक्ताने आपला प्राण अर्पण केल्याशिवाय. १५ सर्वभावानें. १६ जात नाहीं. १७ कंटाळा करीत नाहीस. १८ लाट. १९ वाटा लुटणारा. २० देव. २१ भरे, प्राप्त होई. २२ मिथ्या. २३ शेवटीं. २४ हातास.

॥ श्लोक ॥ ब्रह्मंस्तथापि पृच्छामो धर्मान्भागवतांस्तव ॥ यान् श्रुत्वा श्रद्धया मर्त्यो मुच्यते विश्वतोभयात् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ आदरें ह्मणे देवऋषीसी ॥ आजि सकळ पुण्यें आलीं फळासी ॥ मायबाप तूं घरा आलासी ॥ निजसुखासी दायक ॥ ७८ ॥ कृपा केली मागील शिष्यां ॥ तेचि कृपेचा घाली ठसा ॥ मज तुझा पूर्ण भरंवसा ॥ सोडवी भवपाशापासूनी ॥७९॥ तुझेनि दर्शनें कृतकृत्यता ॥ जरी मज जाहली तत्त्वतां ॥ तरी भागवतधर्मकथा ॥ कृपेनें वस्तुता सांगावी ॥ ८० ॥ ऐसे सांगावे भागवतधर्म ॥ जेणें निरसे कर्माकर्म ॥ श्रद्धेनें ऐकतां परम ॥ जन्ममरण हारपे ॥ ॥ ८१ ॥ भवभय अतिदारुण ॥ त्या भयाचें माया, निजकारण ॥ तिचें समूळ होय निर्दळण ॥ ऐसे धर्म कृपेनें सांगावे ॥ ८२ ॥ मज नाहीं अधिकार पूर्ण ॥ ऐसें विचाराल लक्षण ॥ ते विषयींची हे विनवण ॥ सावधान अवधारीं ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ अहं किल पुराऽनंतं प्रजार्थो भुवि मुक्तिदम् ॥ अपूजयं न मोक्षाय मोहितो देवमायया ॥ ८ ॥

॥ टीका ॥ मज अधिकार नाहीं पूर्ण ॥ हें मी जाणतां आपण ॥ मागें म्यां केलें भगवद्भजन ॥ तें तूं कथन अवधारीं ॥ ८४ ॥ म्यां पूर्वी आराधिलें देवराया ॥ तें भजन ममतो नेलें वाया ॥ प्रलोभविलों देवमायां ॥ पुत्रस्नेहालागोनी ॥ ८५ ॥ मज देव तुष्टला प्रसन्नपणें ॥ 'मागमी तें देईन' ह्मणे ॥ तेथें मायां ठेंकिलें मजकारणें ॥ 'माझा पुत्र होणें' मी मागें ॥ ८६ ॥ तो हा माझा पुत्र श्रीकृष्ण ॥ परी मज न सांगे ब्रह्मज्ञान ॥ तोचि वैदी माझे चरण ॥ ह्मणे बाळक पूर्ण मी तुझें ॥ ८७ ॥ यापरी श्रीकृष्णापाशीं । ज्ञानप्राप्ती नव्हे आह्मासी ॥ कृष्ण परमात्मा हृषीकेशी ॥ हें निश्चयेंसी मी जाणें ॥ ८८ ॥ श्रीकृष्ण जन्मला माझिया कुशीं ॥ ह्मणोनि ज्ञान श्रद्धा हे मजपाशीं ॥ *तेणेंचि तुष्टला देवर्षि ॥ निजकृपेंसी उद्धरीं ॥ ८९ ॥ जे मायेनें ठकिलें तोंडेंकोडें॥ते माया समूळेंसी उडे ॥ ऐसें सांगिजे रोकडें ॥ बहु बोलोनि पुढे काय काज ॥९०॥

॥ श्लोक ॥ यथा विचित्रव्यसनाद्भवद्भिर्विश्वतोभयात् ॥ मुच्येमह्यंजसैवाद्धा तथा नः शाधि सुव्रत ॥ ९ ॥

॥ टीका ॥ मायाजळें भवसागरु ॥ भरला असे अतिदुस्तरु ॥ त्याचा उतरावया पैलपारु ॥ होय तूं तारूं मुनिराया ॥ ९१ ॥ त्याचें सकळ जळ क्षार ॥ माजी सांवेजें अनिवार ॥ एकएक चराचर ॥ गिळिलें साचार निजशक्तीं ॥ ९२ ॥ लाटांवरी अचाट लाटा ॥ मोहाचिया अतिदुर्घटा ॥ आदळती अविवेकतटा ॥ धैर्याचिया कांठा पाडित ॥ ९३ ॥ अहंकुवावो वाजतां थोरु ॥ अवघाचि खवळे भवसागरु ॥ 'मीमाझेंनि' गजरें थोरु ॥ अतिदुर्धरु गर्जत ॥ ९४ ॥

१ आत्मसुखास. २ संसारपाशापासून. ३ कृतार्थता. ४ नाहींसें होते. ५ नाश. ६ विनंति. ७ एक. ८ पूजिलें. ९ अपत्य प्राप्त्यर्थ. १० फसविलें. ११ पासून. १२ पोटीं, उदरीं. १३ आपल्या कृपेनें. १४ मोठ्या कपटानें. १५ काम. १६ मायारूप जलाचा. १७ पलीकडची कड. १८ खारट. १९ प्राणि, जलजंतु. २० आपल्या शक्तीनें २१ फार मोठाल्या. २२ अहंकाररूप वायु-वाहटूळ. २३ मीमाझेंपणाचे. २४ 'मी आणि माझें' हा अहंकाराची गर्जना.

*मो. तेणेंचि तूं तुष्टलासी देवर्षी.

नानावासनांचा वळसा ॥ पाहेपां भवंताहे कैसा ॥ येथें तरावया धिंवसा ॥ नव्हे सहसा सुरेनरां ॥ ९५ ॥ क्रोधाचें प्रबळ भरतें ॥ भरी द्वेषाचिया तरियोतें ॥ असूया तिरस्कारांची तेथें ॥ चिराणी उंने अतिरति ॥ ९६ ॥ कामपर्वताचीं शिखरें ॥ विषमें भासती अपारें ॥ आशे इक्लोळीं वरी थोरें ॥ झाडें विषयांकुरें वाढलीं ॥ ९७ ॥ संकल्पविकल्पांचे मीनें ॥ निंदेच्या सुसरी दारुण ॥ अहंद्वेषाचे नक्र पूर्ण ॥ सागरीं जाण तळपती ॥ ९८ ॥ एवढा हा भवसागरू ॥ शोषिता अगस्ती तूं साचारू ॥ तुझेनि भवाब्धिपैलपारू ॥ पावों हा निर्धारू जाहला आह्मां ॥ ॥ ९९ ॥ याचा विश्वतोभय हेलीवा ॥ तो आह्मां न बाधी तुमच्या कणवीं ॥ अप्रयासें नारदेवा ॥ मरणोर्णवा मज तारी ॥ १०० ॥ पायीं उतरून भवसागरू ॥ साक्षात् पावों परपारू ॥ ऐसा भागवतधर्म विचारू ॥ तो निजनिर्धारू प्रबोधी ॥ १ ॥ ऐकोनि वसुदेवाची उक्ती ॥ नारद सुखावला चित्तीं ॥ तोचि अभिप्रावो परिक्षिती प्रति ॥ शुक सुखस्थिती सांगत ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुकउवाच ॥ राजन्नेवं कृतप्रश्नो वसुदेवेन धीमता ॥ प्रीतस्तमाह देवर्षिर्हरेः संस्मारितो गुणैः ॥ १० ॥

॥ टीका ॥ सांगतां वसुदेवाचा प्रश्न ॥ श्रीशुक जाहला स्वानंदपूर्ण ॥ नारद वोळला चैतन्यघन ॥ चिन्मय जीवन मुमुक्षां ॥ ३ ॥ श्रीशुक ह्मणे नरदेवा ॥ भावो मीनला नारदाच्या भावा ॥ ऐकोनि प्रश्न, सुहावा ॥ तो ह्मणे वसुदेवा धन्यवाणी ॥ ४ ॥ परिसतां हा तुझा प्रश्न ॥ चित्सुखें प्रगटे नारायण ॥ ऐसें बोलतां नारद जाण ॥ स्वानंदें पूर्ण वोसंडला ॥ ५ ॥ रोमांच उचलले अंगीं ॥ स्वेद दाटला सर्वांगीं ॥ आनंदाश्रु चालिले वेगीं ॥ स्वानंदरंगीं डुल्लत ॥ ६ ॥ सप्रेम मीनलिया श्रोता ॥ जें पूर्ण सुखावेना वक्ता ॥ तें तो जाणावा अवघा रिता ॥ कथासारामृता नव्हे भोगी ॥ ७ ॥ ऐकतां वसुदेवाचा प्रश्न ॥ नारद सुखावे पूर्ण ॥ मग स्वानंदगिरें गर्जोन ॥ काय आपण बोलत ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ नारद उवाच ॥ सम्यगेतद्व्यवसितं भवता सात्वतर्षभ ॥ यत्पृच्छसे भागवतान्धर्मांस्त्वं विश्वभावनान ॥ ११ ॥

॥ टीका ॥ नारद ह्मणे सात्वतश्रेष्ठा ॥ वसुदेवा, परमार्थनिष्ठा ॥ धन्यधन्य तुझी उत्कंठा ॥ तूं भावार्थी मोठा भागवतधर्मी ॥ ९ ॥ ज्याचे धर्मांचेनि प्रश्नोत्तरें ॥ ॥ हें विश्व अवघेंचि उद्धरे ॥ हें विचारिलें तुवां बरें ॥ निजनिर्धारें श्रीकृष्णजनका ॥ ११० ॥ तुझेनि प्रश्नोत्तरें जाण ॥ साधक निस्तरती संपूर्ण ॥ साधकांचें नवल कोण ॥ महा पापी पावन येणें होती ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ श्रुतोऽनुपठितो ध्यात आदृतो वाऽनुमोदितः ॥ सद्यः पुनाति सद्धर्मो देवविश्वद्रुहोऽपि हि ॥ १२ ॥

१ भवरा. २ धैर्य. ३ देव, मनुष्यांस. ४ खाड्यांस, खांच खळग्यांस. ५ हेवा. ६ कांडेर. ७ वाढे, उठे. ८ विषयवासनारूप पर्वत. ९ लहान, मोठी. १० शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे कोंम. ११ मासे. १२ हिंडतात. १३ जन्म मरणरूप समुद्र. १४ सर्वत्र भय देणारा. १५ उसळी लाट. १६ कृपेमुळें. १७ श्रमावांचून. १८ मरणसमुद्रापासून. १९ तुमच्या पायांनीं होडींत बसून नव्हे. २० बोलणें. २१ अभिप्राय. २२ मुमुक्षूंना. २३ मिळाला. २४ आनंदानें. २५ भरला. २६ उभे राहिले. २७ घाम. २८ मिळाला असतां. २९ सगळा. ३० आनंदयुक्तवाणीनें. ३१ यदुश्रेष्ठा. ३२ तरतील उद्धरतील.

॥ टीका ॥ भागवतधर्माचेनि गुणें ॥ एक उद्धरती श्रवणें ॥ एक तरती पठणें ॥ एक निस्तरती ध्यानें संसारपाश ॥ १२ ॥ एक श्रोतया वक्तयांतें ॥ देखोनि सुखावती निजचित्तें ॥ सद्भावें ' भले ह्मणती त्यातें ' ॥ तेही तरती येथें भागवतधर्मे ॥ १३ ॥ हें नवल नव्हे भागवतधर्मा ॥ जो कां देवद्रोही दुरात्मा ॥ आणि विश्वद्रोही दुष्टात्मा ॥ तोही तरे; हा महिमा भागवतधर्मी ॥ ॥ १४ ॥ हृदयीं धरितां भागवतधर्म ॥ अकर्म्याचें निर्देळी कर्म ॥ अधर्म्याचे निर्देळी धर्म ॥ दे उत्तमोत्तमपदप्राप्ती ॥ १५ ॥ जेथें रिघाले भागवतधर्म ॥ तेथें निर्देळें कर्माकर्म विकर्म ॥ निंदा, द्वेष, क्रोध, अधर्म ॥ अविद्येचें नाम उरों नेदि ॥ १६ ॥ ते भागवतधर्मी अत्यादर ॥ श्रद्धेनें केला प्रश्न तुवां थोर ॥ निजभाग्यें तूं अति उदार ॥ परमपवित्र वसुदेवा ॥ १७ ॥ तुझें वानं पवित्रपण ॥ तरी पोटा आला श्रीकृष्ण ॥ जयाचेनि नामें आह्मी जाण ॥ परमपावन तिहीं लोकीं ॥ १८ ॥ तो स्वयें श्रीकृष्णनाथ ॥ नित्य वसे तुझिया घरांत ॥ तुझिया ऐसा भाग्यवंत ॥ न दिसे येथ मज पाहतां ॥ १९ ॥ वसुदेवा तुझिया नामता ॥ वासुदेव ह्मणती अनंता ॥ तें वासुदेव नाम स्मरतां ॥ परमपावनता जगद्वंद्य ॥ १२० ॥

॥ श्लोक ॥ त्वया परमकल्याणः पुण्यश्रवणकीर्तनः ॥ स्मारितो भगवानद्य देवो नारायणो मम ॥ १३ ॥

॥ टीका ॥ ज्याचेनि श्रवणें वाढे पुण्य ॥ज्याचेनि नामें +झडे भवबंधन॥तो सद्यःस्मरविला तुवां नारायण ॥ तुझी वाचा कल्याण वसुदेवा ॥ २१ ॥ तुझा अजि ऐकतांचि प्रश्न ॥ चित्सुखें प्रगटला नारायण ॥ मज तुझा हा उपकार पूर्ण ॥ तूं परमकल्याण वसुदेवा ॥२२॥ आशंका ॥ ऐकोनि नारदाचें वचन ॥ ह्मणें विकल्प धरील मन ॥ ' यासि पूर्वी *होतें विस्मरण ॥ आतां जाहलें स्मरण वसुदेवप्रश्नें ' ॥ २३ ॥ ज्यांची ऐसी विकल्पयुक्ती ॥ ते जाणावे ×आत्मघाती॥ तेही अर्थीची उपपत्ती ॥ ऐक निश्चितीं शुक सांगे ॥ २४ ॥ अग्नि, कुंडामाजी स्वयंभ असे ॥ तो घृतावदानें अतिप्रकाशे ॥ तेवीं सप्रेमप्रश्नवशें ॥ सुख उल्लासे मुक्तांचें ॥ २५ ॥ सप्रेमभावार्थी मीनल्यां श्रोता ॥ मुक्तही उल्हासें सांगे कथा ॥ तेथील सुखाची सुखस्वादुता ॥ जाणे जाणता मर्मज्ञ ॥ २६ ॥ यालागीं मुक्त, मुमुक्षु, विषयीजन ॥ *भागवतधर्मी निवती संपूर्ण ॥ तोचि वसुदेवें केला प्रश्न ॥ तेणें नारद पूर्ण सुखावला ॥ २७ ॥ जे कां पूर्वपरंपरागत ॥ जीर्ण भागवतधर्म येथ ॥ सांगावया नारद ०सुनिश्चित ॥ उपपादित इतिहास ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ अत्राप्युदाहरंतीममितिहासं पुरातनं ॥ आर्षभाणां च संवादं विदेहस्य महात्मनः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ ऐसेचि अर्थी विदेहाचा प्रश्न ॥ संवादी आर्षभ नवजण ॥ ते भागवतधर्म जीर्ण ॥

१ तरतील उद्धरतील. २ देवांचा द्वेष करणारा. ३ जगतांचें वैर करणारा. ४ वैकुंठपद. ५ नासे. ६ अज्ञान, माया. ७ वर्णूं. ८ फार पवित्र. ९ वसुदेवाचा पुत्र ह्मणून वासुदेव. १० नाहींसें होतें. ११ संसाराचा बंध. १२ कदाचित्. १३ संशय. १४ युक्ति, कल्पना. १५ स्वयंभु. १६ तुपाच्या आहुतीनें. १७ मिळाला. १८ आनंदानें. १९ सुखाची गोडी. २० मार्मिक. २१ समाधान पावतात. २२ जुने. २३ सांगत आहे. २४ जनकाचा. २५ ऋषभ देवाचे कवि प्रभृति नऊ मुलगे.

+मा. तुटे. *मा. होतें काय. ×मो. निजघाती. मा. निजात्मघाती. *मो. धर्मै. ०मो. सुचित.

इतिहास संपूर्ण सांगेन ऐक ॥ २९ ॥ आर्षभ कोण ह्मणशील मुळीं ॥ त्यांची सांगेन वंशावळी ॥ जन्म जयांचा *सत्कुळीं ॥ नवाची जाली ब्रह्मनिष्ठ ॥ १३० ॥

॥ श्लोक ॥ प्रियव्रतो नाम सुतो मनोः स्वायंभुवस्य यः ॥ तस्याग्नीध्रस्ततो नाभी ऋषभस्तत्सुतः स्मृतः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ स्वायंभुमनूचा सुत ॥ जाणा नामें प्रियव्रत ॥ त्याचा आग्नीध्र विख्यात ॥ नाभी त्याचा सुत सूर्यवंशीं ॥ ३१ ॥ त्या नाभीपासूनि ज्ञानविलास ॥ ऋषभ जन्मला वासुदेवांश ॥ मोक्षधर्माचा प्रकाश ॥ जगीं सावकाश विस्तारिला ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ तमाहुर्वासुदेवांशं मोक्षधर्मविवक्षया ॥ अवतीर्णं सुतशतं तस्यासीद्वेदपारगम ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ऋषभ वासुदेवाचा अंश ॥ ये लोकीं मोक्षधर्म विश्वास ॥ प्रवर्तावया जगदीश ॥ हा अंशांश अवतार ॥ ३३ ॥ त्याचें पंचमस्कंधीं चरित्र ॥ सांगितलें सविस्तर ॥ त्यासि जाहले शतपुत्र ॥ वेदशास्त्रसंपन्न ॥ ३४ ॥ त्यांहीमाजी जो ज्येष्ठपुत्र ॥ अतिशयें परमपवित्र ॥ ऐक त्याचेंही चरित्र ॥ अति विचित्र सांगेन ॥ ३५ ॥ ऐसा तो ऋषभाचा पुत्र ॥ जयासी नाम भरत पवित्र ॥ ज्या नावाची कीर्ति विचित्र ॥ परम पवित्र जगामाजी ॥ ३६ ॥ तो भरत राहिला जे भूमिकेसी ॥ ह्मणूनि भरतवर्ष ह्मणती तयासी ॥ सकळ कर्मारंभीं करितां संकल्पासी ॥ ज्याचिया नामासी स्मरताती ॥ ३७ ॥ ऐसा आत्माराम जरी झाला ॥ तरी विषयसंग नव्हे भला ॥ यालागि त्याचा वृत्तांत पुढिला ॥ सांगेन सकळां तो ऐका ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ तेषां वै भरतो ज्येष्ठो नारायणपरायणः ॥ विख्यातं वर्षमेतद्यन्नाम्ना भारतमद्भुतम ॥ १७ ॥

॥ टीका ॥ जो ज्येष्ठपुत्र भरत जाण ॥ तो नारायणपरायण ॥ अद्यापि भरतवर्षउच्चारण ॥ त्याचेनि नांवें जाण विख्यात ॥ ३९ ॥ नामें ज्यासी केलें उदंड ॥ यालागीं त्यातें ह्मणती भरतखंड ॥ आणीकही प्रताप प्रचंड ॥ त्याचा वितंड तो ऐका ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ स भुक्तभोगां त्यक्त्वेमां निर्गतस्तपसा हरिम् ॥ उपासीनस्तत्पदवीं लेभे वै जन्मभिस्त्रिभिः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ तेणें दिग्मंडळ जिंकिलें ॥ समुद्रवलयांकित राज्य केलें ॥ नानाविध भोग भोगिले ॥ जे नाहीं देखिले सुरवरीं ॥ ४१ ॥ अनुकूल स्त्रियापुत्र ॥ अनुकूल मंत्री पवित्र ॥ अनुकूल राज्य सर्वत्र ॥ भोगिले विचित्र नानाभोग ॥ ४२ ॥ ऐसे भोग भोगिल्यापाठीं ॥ सांडूनि वलयांकित राजसृष्टी ॥ स्वयें निघाला जगजेठी ॥ स्वहितदृष्टी हरिभजना ॥ ४३ ॥ जे राज्यवैभव भोगिती ॥ त्यांसि कदा नव्हे या विरक्ती ॥ भरतें केलें नवलख्याती ॥ सेविला श्रीपती भोगत्यागें ॥ ४४ ॥ तो तेणेंचि जन्में जाण ॥ व्हावा मोक्षासी आरोहण ॥ जाहलें जन्मांतरकारण ॥ तेंहि विंदान सांगेन ऐक ॥ ४५ ॥ संनिहितें मृत्युकाळीं ॥ मृगी

१ ऋषभ देव. २ कृष्णाचा अंश. ३ तेज. ४ वाढविला. ५ शंभर पुत्र. ६ विष्णूची सेवा करणारा. ७ भरतखंड हा शब्द. ८ प्रसिद्ध. ९ बहुत. १० विशाळ. ११ देवांनीं. १२ भोगिल्यानंतर. १३ समुद्रवलयांकित. १४ वैराग्य. १५ विषयभोगांचा त्याग करून. १६ अन्यजन्मासकारण. १७ लक्षण. १८ जिचा तिण्याचा वेळ जवळ आला आहे अशी. १९ हरिणी.

*मो. स्वकुळीं.

जळ प्राशितां जळीं ॥ ऐकोनि पंचाननाची आरोळी ॥ उडाली तत्काळीं सत्राणें ॥ ४६ ॥ धाकें गर्भ तिचा पडतां जळीं ॥ भरत स्नान करी ते काळीं ॥ देखोनि कृपा कळवळी ॥ काढी तत्काळीं दयाळुत्वें ॥ ४७ ॥ मृगी नयेचि परतोन ॥ *मातृहीन तें अतिदीन ॥ भरत पाळी भूतदयेनें ॥ मृगममतो पूर्ण वाढविली ॥ ४८ ॥ स्नान संध्या अनुष्ठान ॥ करितां मृग आठवे क्षणक्षण ॥ आरंभिल्या जप ध्यान ॥ मृगमय मन भरताचें ॥ ४९ ॥ आसनीं भोजनीं शयनीं ॥ मृग आठवे क्षणक्षणीं ॥ मृग न देखतां नयनीं ॥ उठे गजबजोनी निजध्यानत्यागें ॥ १५० ॥ ममता बसली मृगापाशीं, ॥ ×मृग वना गेला स्वइच्छेसीं ॥ त्याचा खेद करितां भरतासी ॥ काळ आकर्षी देहांतें ॥ ५१ ॥ यालागीं सांचाचि जाण ॥ 'ममतेपाशीं असे मरण' ॥ जो +निर्मम संपूर्ण ॥ त्यासि जन्ममरण असेना ॥ ५२ ॥ भरत तपियें थोर अंगें ॥ तेथें काळ कैसेंनि रिघे ॥ ममतासंधी पाहोनि वेगें ॥ मृत्यु तयोगें पावला ॥ ५३ ॥ देहासि येतां मरण ॥ भरतासि मृगाचें ध्यान ॥ तेणें मृगजन्म ऽपावोनि आपण ॥ जन्मांतर कारण जाहलें ऐसें ॥ ५४ ॥ कृपेनें केला जो संगु ॥ तोचि योगियां योगभंगु ॥ यालागीं जो निःसंगु ॥ तोचि अभंगु साधक ॥ ५५ ॥ मृगाचेनि स्मरणें निमाला ॥ यालागीं तो मृगजन्म पावला ॥ जो श्रीकृष्णस्मरणें निमाला ॥ तो कृष्णचि जाहला देहांतीं ॥ ५६ ॥ 'अंतकाळीं जे मती ॥ तेचि प्राणियांसि जाण गति' ॥ यालागीं श्रीकृष्ण चित्तीं ॥ अहोरातीं स्मरावा ॥ ५७ ॥ परी मृगदेहीं जाण ॥ भरतासि श्रीकृष्णस्मरण ॥ पूर्वी केलें जें अनुष्ठान ॥ तें अंतर जाण कदा नेदी ॥ ५८ ॥ मागुता तिसरेनि जन्में पाहे ॥ तो जडभरत देह लाहे ॥ तेथें तो निर्ममत्वें राहे ॥ तेणें होय नित्यमुक्त ॥ ५९ ॥ बहुतांजन्मींची उणीवी ॥ येणें जन्में काढिली बरवी ॥ *निजात्मा आकळोनि जीवीं ॥ ०ब्रह्मपदवी पावला ॥ १६० ॥ ऋषभपुत्रउत्पत्ती ॥ शतबंधु जाण निश्चितीं ॥ त्यांत हे ज्येष्ठाची स्थिती ॥ उरल्यांची गती ते ऐका ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ तेषां नव नवद्वीपपतयोऽस्य समंततः ॥ कर्मतंत्रप्रणेतार एकाशीतिर्द्विजातयः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ नवें नवांखंडांप्रती ॥ ते केले खंडाधिपती ॥ एक्यायशींजणांची स्थिति ॥ कर्ममार्गीं होती प्रवर्तक ॥ ६२ ॥ उरले जे नवजण ॥ सकळभाग्याचे भूषण ॥ ब्रह्मज्ञानाचें अधिष्ठान ॥ ऐक लक्षण तयांचें ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ नवाभवन्महाभागा मुनयो ह्यर्थशंसिनः ॥ श्रमणा वातरशना आत्मविद्याविशारदाः ॥ २० ॥

॥ टीका ॥ ऋषभकुळीं कुळदीप ॥ स्नेहसूत्रेंवीण देदीप्य ॥ नवहीजाण स्वयें सद्रूप ॥ सायुज्य-

---

१ सिंहाची. २ फार वेगानें. ३ भयानें. ४ कळवळ्यानें. ५ हरिणाची माया. ६ खडबडून. ७ मृत्यु. ८ खरेंच. ९ ममतारहित. १० तापसि. ११ दुसरे जन्मास. १२ मरण पावला. १३ देहाचे शेवटीं. १४ रात्रंदिवस. १५ फसवीत नाहीं. १६ नड दिवस. १७ तेल वातीवांचून प्रकाशमान.

* ना. मातृस्नेहें. × ना. मृग मृगीसवें गेला स्वेच्छेसी. +ना. निर्ममता. ऽमो. पावें. *ना. निजात्मता. ०ना. परब्रह्म.

स्वरूपप्रकाशक ॥ ६४ ॥ आत्माभ्यासीं परिश्रम ॥ करून निरसिलें कर्माकर्म ॥ यालागीं ते *कृतश्रम ॥ निजनिश्रम स्वयें जाहले ॥ ६५ ॥ शाब्दबोधें सदोदित ॥ ब्रह्मज्ञानें पारंगत ॥ •शिष्यप्रबोधीं समर्थ ॥ परमाद्भुत अतिदक्ष ॥ ६६ ॥ ते ब्रह्मविद्येचें चालतें डिंब ॥ +त्यांचे भेदेव ते ब्रह्मकोंब ॥ ते ×ब्रह्माचें पूर्णबिंब ॥ स्वयें स्वयंभ परब्रह्म ॥ ६७ ॥ दशादिशा येकूचि दोरा ॥ भरूनि पांघरुणं मुनीश्वरा ॥ वारा वळून कडदोरा ॥ बांधिला पुरा [1] ग्रंथिरूप ॥६८॥ आकाशाच्याठायीं ॥ अंबरत्व केलें नाहीं ॥ तेंचि चिदंबर पाहीं ॥ एकाचि नवांही पांघरूण ॥ ६९ ॥ प्राणापान कवळुनि देहीं ॥ गांठी केली नाभीचेठायीं ॥ तंव जीवग्रंथी सुटली पाहीं ॥ सोचि नवांही कडदोरा ॥ १७० ॥ ऐसें परब्रह्मवैभवें ॥ निहाळले निजानुभवें ॥ त्यांची सांगेन मी नांवें ॥ [2] यथागौरवें तें ऐक ॥ ७१ ॥ ज्यांचें नाम ऐकतां ॥ कांपत कळिकाळ पळे मागुता ॥ संसार तुर्भेवी माथा ॥ नाम स्मरतां ज्यांचें ॥ ७२ ॥ त्यानामांची कीर्ती ॥ आईक सांगेन परिक्षिती ॥ ज्यांचेनि नामें ओंतुडे मुक्ती ॥ जाण निश्चितीं भाविका ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ कविर्हरिरन्तरिक्षः प्रबुद्धः पिप्पलायनः ॥ आविर्होत्रोऽथ द्रुमिल-
श्चमसः करभाजनः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ कवि, हरि, अंतरिक्ष, ॥ प्रबुद्ध, पिप्पलायन, देख, ॥ आविर्होत्र, द्रुमिल, सुटंकें ॥ चमस, निर्दोषें करभाजन ॥ ७४ ॥ [3] इये नवही नांवें जाण ॥ यांचें करितां नामस्मरण ॥ सकळपापां निर्दळणें ॥ हे महिमा पूर्ण नामाची ॥ ७५ ॥ यांची परमहंसस्थिती ॥ सांगेन मी तुजप्रती ॥ ज्यांचेनि पावन होय क्षिती ॥ त्या या नवमूर्ती पुण्यपूज्य ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ तएते भगवद्रूपं विश्वं सदसदात्मकम् ॥ आत्मनोऽव्यतिरेकेण
पश्यन्तो व्यचरन्महीम् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ ते वेगळे दिसती नवांक ॥ परी भगवद्रूपें अवघे एक ॥ संतासंत जग अनेक ॥ आपणासगट देख एकत्वें पाहती ॥ ७७ ॥ त्यांसी तंव असंतता ॥ उरली नाहीं सर्वथा ॥ संत ह्मणावया पुरता ॥ भेद नाहीं तां, चिन्मयत्वें ॥ ७८ ॥ जग परिपूर्ण भगवंतें ॥ आपणावेगळा नुरे तेथें ॥ तंव भगवद्रूपसमस्तें ॥ भूतें महाभूतें स्वयें देखे ॥ ७९ ॥ हेही देखते देखणें ॥ तेही स्वयें आपण होणें ॥ होणें नहोणें येणें जाणें ॥ हीं गिळूनि लक्षणें विचरती महीं ॥१८०॥

॥ श्लोक ॥ अव्याहतेष्टगतयः सुरसिद्धसाध्यगंधर्वयक्षनरकिंनरनागलोकान् ॥
मुक्ताश्चरंति मुनिचारणभूतनाथविद्याधरद्विजगवां भुवनानि कामम् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ वैकुंठ कैलास सुरसिद्धस्थानें ॥ सप्तपाताळादि गमनें ॥ एवं श्लोकोक्त चवदाभुवनें [4] स्वेच्छाविचरणें कामनारहित ॥ ८१ ॥ त्यांसि जीवीं नाहीं विषयासक्ती ॥ यालागीं [5] कुंठेना त्यांची गती ॥ इच्छामात्रें गमनशक्ती ॥ सुखें विचरती निष्काम ॥ ८२ ॥

१ नाहींसें केलें. २ आश्रमरहित. ३ आत्मस्वरूपाविषयीं निभ्रांत. ४ शब्दज्ञानानें. ५ अवयव. ६ ब्रह्माचे अंकुर. ७ आकाश हेंच ज्यांनीं अंबर ह्मणजे वस्त्र मानिलें. ८ प्राण आणि अपान हे दोन वायु. ९ जानवें. १० परिपक्व झाले. ११ उचलीत नाहीं. १२ मिळे. १३ सुलक्षण. १४ निष्पाप. १५ नाश. १६ पवित्र. १७ परमेश्वराचे रूपी. १८ द्वैत. १९ न सांपडे. २० चवदा लोक. २१ आपल्या इच्छेनें हिंडणें.

*मो. कृष्णश्रम. •ना. प्रबोधनी. +मो. त्यांचे नांव तें ब्रह्मकोंब. ×मो. ब्रह्मविद्येचे. 1 मो. निजग्रंथीरूप. 2 ना. यथान्वयें. 3 मो. एवं. 4 ना. अनिच्छा. 5 मो. खुंटेना.

॥ श्लोक ॥ त एकदा निमेः सत्रमुपजग्मुर्यदृच्छया ॥ वितायमानमृषिभिरजनाभे महात्मनः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ जेथें मनाचा प्रवेशू नाहीं ॥ त्यांची पायवाट तेठायीं ॥ ऐसे स्वइच्छा विचरतां मही ॥ आले ते पाही कर्मभूमीसी ॥ ८३ ॥ मही विचरतां वितंड॥ पातले ते अजनाभखंड ॥ तेथ विदेहाचा याग प्रचंड ॥ मीनले उदंड ऋषीश्वर ॥ ८४ ॥ याग वेदोक्तविधी निका ॥ कुंड, मंडप, वेदिका ॥ आवो साधोनि नेटका ॥ विधानपीठिका अतिशुद्ध ॥ ८५ ॥ *स्रुक्स्रुवा त्रिसंधानें ॥ विस्तारूनि परिस्तरणें ॥ अखंड वसुधारा दंडायमान ॥ ऋषिमंडळे होम करिती ॥ ॥ ८६ ॥ होम होतां संपूर्ण ॥ पूर्णाहुतिसमयीं जाण ॥ येतां देखिले नवही जण ॥ दैदीप्यमान निजतेजें ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ तान् दृष्ट्वा सूर्यसंकाशान् महाभागवतान्नृप ॥ यजमानोऽग्नयो विप्राःसर्वएवोपतस्थिरे ॥ २५ ॥

॥ टीका ॥ अमितसूर्यांचिया कोटी ॥ लोपती नखतेजांगुष्ठीं ॥ तो भगवंत जिहीं धरिला पोटीं ॥ त्यांची तेजाची ×गोष्टी अलौकिक ॥ ८८ ॥ त्यांचिया अंगप्रभा ॥ सूर्य लोपताहे उभा ॥ जिहीं प्रभेशी आणिली शोभा ॥ चैतन्यगाभा साकार ॥ ८९ ॥ ते *भगवद्भाववैभव ॥ भागवताचें निजगौरव ॥ भक्तीचे भाग जे कां नव ॥ ते हे जाण सर्व मूर्तिमंत ॥९०॥ नवखंडपृथ्वीचे अलंकार ॥ नवनिधींचें निजसार ॥ नवरत्नांचेंही निजभांडार ॥ ते हे साकार नवहीजण ॥ ९१ ॥ कीं ते नवही नारायण ॥ स्वयें प्रगटले आपण ॥ नवही नृसिंह जाण ॥ देदीप्यमान पैं आले ॥ ९२ ॥ ओव्हानिले तिन्ही अग्नी ॥ उभे ठेले त्यांतें देखोनी ॥ ते हे भागवत देखती नयनीं ॥ इतरां लागुनी दिसेना ॥ ९३ ॥ +येतां देखोनि तेजोमूर्ती ॥ ऋत्विज आचार्य उभे ठाती ॥ सामोरा धांवे विदेहनृपती ॥ स्वानंदस्फूर्ती सन्मानीं ॥ ९४ ॥ सवेग घाली लोटांगण ॥ मुगुट काढोनि आपण ॥ मस्तकीं वंदोनियां चरण ॥ पूर्ण आदरें जाण आणिता जाहला ॥ ९५ ॥

॥श्लोक ॥ विदेहस्तानभिप्रेत्य नारायणपरायणान् ॥ प्रीतः संपूजयांचक्र आसनस्थान् तथाऽर्हतः ॥ २६ ॥

॥ टीका ॥ त्यांतें जाणोनियां भगवत्पर ॥ विदेहा ¹आल्हाद थोर ॥ त्यांचे पूजेसि अत्यादर ॥ स्वयें सादर पैं जाहला ॥ ९६ ॥ श्रद्धा चरणक्षालन ॥ धूप दीप सुमन चंदन ॥ पूजा मधुपर्क विधान ॥ केलें संपूर्ण यथायोग्य ॥ ९७ ॥

---

१ कर्माचे भूमीवर मृत्युलोकीं. २ विशाळ. ३ आले. ४ 'अजनाभ' याचा प्रांत. ५ जनकाचा. ६ बरा. ७ होमकुंड. ८ मांडव. ९ ओटा. १० दिशासाधन ( आया ) ११ अनुष्ठान. १२ पळी आदि यज्ञपात्रें. १३ स्थंडिला भोंवतीं पसरलेले दर्भ. १४ द्रव्याचा प्रवाह. १५ सोडग्याप्रमाणें लठ्ठ. १६ ऋषिमंडळी. १७ शेवटील आहुति. १८ लोपती. १९ बोलाविले. २० दक्षिण, गार्हपत्य, आहवनीय-नामक. २१ भगवद्भक्त. २२ सामोरा. २३ दधि, मधु, घृतानें अतिथि सत्कार.

*ना. स्रुक्स्रुवादि पात्रसाधनें. ×ना. दिठी. *मो. भगवद्भावें. +मो. त्यांतें. 1ना. देहेवीण आल्हाद.

॥ श्लोक ॥ तान् रोचमानान् स्वरुचा ब्रह्मपुत्रोपमान्नव ॥ पप्रच्छ परमप्रीतः प्रश्रयावनतो नृपः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ निजांगींच्या निजप्रभा ॥ अंगासि आणिली शोभा ॥ काय ब्रह्मविद्येचा गाभा ॥ शोभे नवप्रभा शोभायमान ॥ ९८ ॥ निजहृदयींचें ब्रह्मज्ञान ॥ परिपाकें प्रकाशलें पूर्ण ॥ तेंचि निजांगमंडण ॥ इतर भूषण त्यां नाहीं ॥ ९९ ॥ मुगुट कुंडलें कंकण ॥ मूर्खांअंगीं बाणलीं पूर्ण ॥ ते शोभा लोपोनि, मूर्खपण ॥ बाहेर संपूर्ण प्रकाशे ॥ २०० ॥ तैसे नव्हती हे ज्ञानघन ॥ ब्रह्म पूर्णत्वें विराजमान ॥ तेंचि निजांगा मंडण ॥ इतर भूषण त्यां नाहीं ॥ १ ॥ ब्रह्मानुभवें पूर्णत्वें पूर्ण ॥ इंद्रियद्वारा विराजमान ॥ तें त्यांसि निजशांतिभूषण ॥ मुगुट कंकण तें तुच्छ ॥ २ ॥ मागां वाखाणिले सनकादिक ॥ त्यांसमान कीं हे अधिक ॥ ऐसा विचारितां परिपाक ॥ त्यां यां वेगळिक दिसेना ॥ ३ ॥ त्यांची यांची एकगती ॥ त्यांची यांची एक स्थिती ॥ त्यांची यांची एक शांती ॥ भेद निश्चितीं असेना ॥ ४ ॥ त्यांच्या ऐसे हे सगे बोध ॥ त्यांच्या ऐसा समानबोध ॥ त्यांच्या ऐसा हा अनुवाद ॥ सर्वथा भेद असेना ॥ ५ ॥ ते चौघे हे नवजण ॥ अवघ्यां एकचि ब्रह्मज्ञान ॥ त्यांची यांची शांति समान ॥ हें विदेहा पूर्ण कळों सरलें ॥ ६ ॥ ऐसें परिपूर्णत्व जाणोनी ॥ राजा सुखावे स्थिति देखोनी ॥ मग अतिविनीत होऊनी ॥ मृदु मंजुळ वचनीं विनवित ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ विदेह उवाच ॥ मन्ये भगवतः साक्षात् पार्षदान्वो मधुद्विषः ॥ विष्णोर्भूतानि लोकानां पावनाय चरन्ति हि ॥ २८ ॥

॥ टीका ॥ सार्वभौम चक्रवर्ती ॥ देहीं असोनि विदेहस्थिती ॥ तो जनक आर्षभांप्रती ॥ अतिप्रीतीं विनवित ॥ ८ ॥ त्यांच्या भेटी सवें *उल्हासलें सुख ॥ तेणें विदेहा देहेंविण हरिख ॥ तेणें हरिखें करूनियां देख ॥ प्रीतिपूर्वक विनवित ॥ ९ ॥ तुमचें सामर्थ्य पाहतां येथ ॥ तुम्ही ईश्वररूप समस्त ॥ देहभावें तरी भगवद्भक्त ॥ जैसे पार्षद हरीचे ॥ २१० ॥ देव आपुला आपण भक्त ॥ ऐसा जो कां उपनिषदर्थ ॥ तो साच करूनी वेदार्थ ॥ निजपरमार्थ अनुभवा ॥ ११ ॥ ×शिवेंशि शिवुचि यजिजे ॥ हें लक्षण तुम्हांसीच साजे ॥ येरीं हे बोलचि बोलिजे ॥ परी बोलतें राजे अर्थ न लभे ॥ १२ ॥ विष्णूनें सृष्टी जें जें सृजणें ॥ तें तें तुम्ही पवित्र करणें ॥ सर्वही विचरणयाचीं कारणें ॥ कृपाळुपणें दीनोद्धारा ॥ १३ ॥ तुम्ही विचरा त्रिभुवना ॥ परी भेटी होय प्राप्ति तेव्हां ॥ आजि लाधलों तुमची सेवा ॥ उद्भट दैवा आथिला मी ॥ १४ ॥ आजि माझें धन्य दैव ॥ आजि माझें धन्य वैभव ॥ आजि धन्य मी सर्वांसवें ॥ हे चरण अपूर्व पावलों ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ दुर्लभो मानुषो देहो देहिनां क्षणभङ्गुरः ॥ तत्राऽपि दुर्लभं मन्ये वैकुण्ठप्रियदर्शनम् ॥ २९ ॥

१ पूर्णत्वानें. २ आपल्या अंगाचे ठायीं. ३ शोभायमान. ४ निर्णय. ५ फरक अंतर. ६ समान ज्ञान. ७ फारसा. ८ भेटीबरोबर. ९ उत्पन्न झालें. १० अनुचर. ११ गीतेनें प्रमाण. १२ उत्पन्न करणें. १३ दिनरक्षणीं. १४ विचारा दया करण्यासाठीं. १५ दांडगें, मोठें. १६ संपन्न झालों.

*पा. उधळलें मो. उमळलें. × शिवें.

॥ टीका ॥ सकळ देहांमाजीं पहाहो ॥ अति दुर्लभ मनुष्यदेहो ॥ त्याचिया प्राप्तीचा संभवो ॥ तो अभिप्रावो अति दुर्गम ॥ १६ ॥ सुकृतदुष्कृत समान समीं ॥ तें पाविजे कर्मभूमी ॥ तेंचि जें पडे विषमीं ॥ तें स्वर्गगामी कां नरक ॥ १७ ॥ समानकर्में नरदेह जोडे ॥ तरी समस्तां सम बुद्धि कां न घडे ॥ त्या समांमाजी विषम गाढे ॥ जेणें पडे तें ऐका ॥ १८ ॥ पापाचा एकु महाचिरा ॥ पुण्यें जोखुनी चारीचुरा ॥ समान आलिया तुळाभारा ॥ येणें जन्में नरा दृढ पापबुद्धी ॥ १९ ॥ वाल आणि सुवर्ण ॥ जोखतां जाहालिया समान ॥ सोनियांलागीं वेंचिती धन ॥ वाल तो जाण न घेती फुका ॥ २२० ॥ एकाचें पुण्य अत्यंत थोर ॥ पाप लहानसहान एकत्र ॥ करूनि जोखितां तुळाभार ॥ समान साचार जें होय ॥ २१ ॥ ऐसेंनि कर्में जे जन्मती ॥ त्यांसि पुण्यावरी अतिप्रीती ॥ पुण्यपापें दोन्ही झडती ॥ तें नित्यमुक्ती पाविजे ॥ २२ ॥ ऐशा अतिमक्षम सकदीं ॥ मनुष्यदेहीं होय भेटी ॥ तथेंही अभिमान उठी ॥ धन दारा दिठी विषयांच्या ॥ २३ ॥ मनुष्यदेहींचेनि आयुष्यें ॥ विषयसायास करिती कैसे ॥ ×अमृत देऊनि कैसें ॥ घ्यावा सावकाशें मृगजळ ॥ २४ ॥ गंधर्वनगरीचीं ठाणीं ॥ घेतलीं देऊनि चिंतामणी ॥ तैशी लटिकियालागीं अटणी ॥ विषयसाधनीं नरदेहा ॥ २५ ॥ तोडूनि कल्पतरूचें उद्यान ॥ सायासीं तें वाहोनि रान ॥ तेथें साक्षेपें पेरिली जाण ॥ आणूनि आपण +भांग जैशी ॥ २६ ॥ तैसें नरदेहा येऊनि नरा ॥ करिताति आयुष्याचा मातेरा ॥ पूर्ण व्यवसायें शिश्नोदरा ॥ उपहास, निद्रा, कां ❋निंदा ॥ २७ ॥ नित्य प्रपंचाची कटकट ॥ सदा विषयांची खटपट ॥ कदां आराइल्या चोखट ॥ स्वेच्छा सारीपाट खेळणें तेव्हां ॥ २८ ॥ नाना विनोद टवाळी ॥ नित्य विषयांची वाचाळी ॥ त्यासि जपतां रामनामावळी ॥ पडे दांतखिळी असंभाव्य ॥ २९ ॥ घरा आलिया कामधेनू ॥ दवडिती न पोसवे ह्मणून ॥ तेवीं श्रीरामनाम नुच्चारून ॥ नाडला जन नरदेहीं ॥ २३० ॥ करितां नरदेहीं अहंकार ॥ तंव तो देहचि क्षणभंगुर ॥ देहीं देहवंता भाग्य थोर ॥ जें भगवत्पर भेटती ॥ ३१ ॥ ज्यासि ⁎भगवद्भक्तांची अतिगोडी ॥ त्यावरी भगवंताची आवडी ॥ त्याची भेटी तें होय रोकडी ॥ जें पुण्याच्या कोडी तुटती ॥ ३२ ॥ ज्याचिया आवडीच्या लोभा ॥ भगवंत पालटें आला गर्भा ॥ दशावतारांची शोभा ॥ जाहली पद्मनाभा ज्याचेनी ॥ ३३ ॥ ऐसे श्रीकृष्णकृपासमारंभें ॥ जे भगवंताचे वोल्हभे ॥ त्यांची भेटी तेंचि लाभे ॥ जें भाग्यें सुलभें स्वर्ग होती ॥ ३४ ॥ निष्कामता निजदृष्टी ॥ अनंत पुण्यें कोट्यानकोटी ॥ रोकडी लाभे पाठोवाटीं ॥ तें होय भेटी हरिप्रियांची ॥ ३५ ॥ व्याघ्रसिंहांचें दूध जोडे ॥ चंद्रामृतही होता चढे ॥ परी हरिप्रियांची भेटी आतुडे ॥ हें दुर्लभ गाढें मनुष्या ॥ ३६ ॥ व्याघ्रसिंहदुधांमाजीं ॥ अनिमबळना जोडे पुष्टी ॥ परी जन्ममरणाची तुटी ॥ दुधामाजीं कदा नोहे ॥ ३७ ॥ ह्मणतां चंद्रामृत जो आरोगीं

१ पुण्य आणि पाप. २ किंवा. ३ कर्मा जास्त. ४ एकमस्त घडीव दगड. ५ गुगा. ६ नगारेच नीलात. ७ देतात. ८ श्रम. ९ तृषा भागविण्यासाठीं. १० आकाशांत संध्यासमयीं मेघांच्या आकृति दिसतात त्या [ मिथ्याभास. ] ११ यत्न श्रम. १२ बाग. १३ व्यापार. १४ किंवा. १५ सोगट्या. १६ अडविला गेला. १७ ईश्वरपरायण. १८ बद्दल.( अवतारांबद्दल ) १९ आवडते. २० मिळे, प्राप्त होय २१ हातीं येई. २२ भक्तांची. २३ मिळे. २४ कारणानें योगानें. २५ तूट. २६ सर्व.

×ना. मो. परिस. +ना. विजया. ❋मो. कलहो. ⁎ना. भगवद्भक्ताची.

तो होय नित्य निरोगी ॥ मुख्य चंद्रचि क्षयरोगी ॥ त्याचें अमृत निरोगी करी केवीं ॥ ३८ ॥ व्याघ्रसिंहदुग्धाचे शक्ती ॥ प्राणी जे अजरामर होती ॥ तें तेणें दुग्धें ज्यांची उत्पत्ती ॥ ते कां मरतां व्याघ्रसिंह ॥ ३९ ॥ जे हरिभक्तांची भेटी घडे ॥ तें नव्याधी संसारसांकडें ॥ जन्मरण समूळ उडे ॥ त्यांची भेटी आतुडे अतिभाग्यें ॥ २४० ॥ आजि मी भाग्येंसी सभाग्य पूर्ण ॥ लाधलों तुमचें दरुशन ॥ तरी आत्यंतिक क्षेम कोण ॥ हें कृपाकरून मज सांगा ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ अत आत्यंतिकं क्षेमं पृच्छामो भवतोऽनघाः ॥ संसारेऽस्मिन् क्षणार्धोऽपि सत्संगः शेवधिर्नृणाम् ॥ ३० ॥

॥ टीका ॥ ह्मणे तुम्ही *निष्पाप निर्मळ॥तेव तुमचेनि दर्शनें तत्काळ॥नासतां सकळ कळिमळ॥ ऐसे निजनिर्मळ तुम्ही सर्व ॥ ४२ ॥ स्नान केलिया गंगा॥ पवित्र करी सकळ जगा ॥ ते गंगाही निजपापभंगा ॥ तुमचे चरणसंगा वांछित ॥ ४३ ॥ तुमची दर्शन संगचिद्गंगा ॥ अत्यंत दातुगी माजी जगा ॥ दर्शनमात्रें ने भवभंगा ॥ जन्ममरण पैगा मज कैचें ॥ ४४ ॥ तेथें कायसा गंगेचा पडिपाड ॥ नाहीं तीर्थमहिमेसि पवाड ॥ तीर्थी भवदोष अवघड ॥ Xत्याचा करी निवाड दृष्टिसंग तुमचा ॥ ४५ ॥ ऐशी पवित्रता प्रबळ ॥ दृष्टिउत्संगीं वाढवा सकळ ॥ आजि जहालों मी अतिनिर्मळ ॥ तुह्मी दीनदयाळ मीनलेती ॥ ४६ ॥ ऐसे पवित्र आणि कृपामूर्ति ॥ भाग्यें लाधलां हे संगती ॥ सत्संगाची निजख्याती ॥ सांगतां श्रुती मौनावल्या ॥ ४७ ॥ ब्रह्म निर्धर्म, तेणे निजधर्मा ॥ साधुमुखें ब्रह्मत्व ब्रह्मा ॥ त्या सत्संगाचा महिमा ॥ अति गरिमा निरुपम ॥ ४८ ॥ सत्संग ह्मणों निधीसमान ॥ निधी जोडल्या हरपे जाण ॥ सत्संगाचें निज महिमान ॥ साधक संपूर्ण सद्रूप करी ॥ ४९ ॥ निधी सांपडलिया सांग ॥ अत्यंत वाढवी विषयभोग ॥ तैसा नव्हेजी सत्संग ॥ निर्विषय चांगें सुखदाता ॥२५०॥ इंद्रियांवीण स्वानंद ॥ विषयावीण परमानंद ॥ ऐसा करितां निजबोध ॥ अगाध साधू निज महिमा ॥ ५१ ॥ निमिषार्ध जो सत्संग ॥ तेणें संगें होय भवभंग ॥ यालागीं सत्संगाचें भाग्य॥ साधक सभाग्य जाणती ॥ ५२ ॥ संतचरणीं ज्यांचा भावो ॥ भावें तुष्टती संत स्वयमेवो ॥ संतसन्निधिमात्रें पाहाहो ॥ संसार वावो स्वयें होय ॥५३॥ नानाविकारी विषयविधी ॥ *संसार सबळत्वें बाधी ॥ त्या संसाराची पुरे अवधी ॥ जाण त्रिशुद्धी +सत्संग ॥ ५४ ॥ दीपाचिये संगप्राप्ती ॥निःशेष कापुरत्वाची शांती॥ तेवीं जाहालिया सत्संगती ॥ संसारनिवृत्ती क्षणार्धें ॥ ५५ ॥ ते तुमची सत्संगती ॥ भाग्यें पावलों अवचिती ॥ अत्यंत क्षेम कैशारीतीं ॥ प्राणी पावती ते सांगा ॥ ५६ ॥ अत्यंत क्षेमाचें वर्म ॥ जरी ह्मणाल भागवतधर्म ॥ त्या धर्माचा अनुक्रम ॥ सांग सुगम सांगाजी ॥ ५७ ॥

१ पापमळरहित. २ मिळते. ३ आपल्या पापाच्या नाशाकरितां. ४ मोठी समर्थ. ५ पहाण्यानेंच. ६ योग्यता. ७ प्रशंसा. ८ जन्ममरणाचा दोष. ९ उलगडा, झाडा. १० दृष्टिरूप मांडीवर. ११ उगाच बसल्या. १२ फार थोरवी. १३ उपमारहित. १४ पुरलेलें धन. १५ चांगला. १६ आपल्या आत्म्याचें ज्ञान. १७ व्यर्थ. १८ संसाराचा नाश. १९ रहस्य. २० अंगासहित, पूर्णपणें.

*मो. निजांगें. Xमो. त्यांचा काय निवाड दृष्टिमात्रें. *मो. संसार सबळ आधी. +मो. सत्संगें.

॥ श्लोक ॥ धर्मान्भागवतान्ब्रूत यदि नः श्रुतये क्षमम् ॥ यैः प्रसन्नः प्रपन्नाय दास्यत्यात्मानमप्यजः ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ परिसावया भागवतधर्मीं ॥ श्रवणाधिकारी असोनि आह्मी ॥ तरी कृपा करोनियां तुह्मीं ॥ सांगावे स्वामी समूळ धर्म ॥ ५८ ॥ नवल या धर्माची ख्याती ॥ सप्रेमें आदरितां प्रीती ॥ तेणें तुष्टोनियां श्रीपती ॥ दे सेवकांहातीं आपणियां ॥ ५९ ॥ ' अजन्मा ' या नामाची ख्याती ॥ वेदशास्त्रीं मिरवी श्रीपती ॥ तो भागवतधर्मांचिया प्रीतीं ॥ सोशी जन्मपंक्ती भक्तांचिया ॥२६०॥ एवं भागवताधर्मीं जाण ॥ जो कोणी अनन्य शरण ॥ त्यासि तुष्टोनियां नारायण ॥ निजात्मता संपूर्ण स्वयें देत ॥ ६१ ॥ भागवतधर्मश्रवणार्थ ॥ मज अधिकार नसेल येथ ॥ तरी मी अनन्य शरणागत ॥ आणि तुम्ही समस्त कृपाळ ॥ ६२ ॥ भूतदयेचें निडारलेपण ॥ तुमच्याठायीं वोसंडे पूर्ण ॥ तुम्ही दयानिधी संपूर्ण ॥ दीनोद्धारण तुमचेनी ॥ ६३ ॥ जेथें तुमची कृपा पूर्ण ॥ तेथें न राहे जन्ममरण ॥ सर्वाधिकार संपूर्ण ॥ सहजे आपण ओळंगों येती ॥ ६४ ॥ एवं तुमचे कृपेपरतें ॥ आन समर्थ नाहीं येथें ॥ ऐसें जाणोनि निश्चितें ॥ शरण तुह्मातें मी आलों ॥६५॥ कायसी ज्ञातेपणाची लाज ॥ येथें तुमचे कृपें माझें काज ॥ ऐसे विदेहें प्रार्थुनि द्विज ॥ चरणरज वंदिले ॥ ६६ ॥ ऐकोनि विदेहाचा नम्र प्रश्न ॥ संतोपले नवहीजण॥तेंचि श्रीमुखें नारद आपण ॥ करी निरूपण वसुदेवासि ॥६७॥

॥ श्लोक ॥ नारदउवाच ॥ एवं ते निमिना पृष्टा वसुदेव महत्तमाः ॥ प्रतिपूज्याब्रुवन्प्रीत्या ससदस्यर्त्विजं नृपम् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ जो जगाची स्थिति गती जाणता ॥ जो हरिहरांचा पढियंता ॥ जो निजात्मज्ञानें पुरता ॥ तो जाहला बोलता नारद ॥ ६८ ॥ नारद ह्मणे वसुदेवा ॥ विदेहें प्रश्न केला बरवा ॥ तेणें परमानंद तेव्हां ॥ त्या महानुभावा उलथला ॥ ६९ ॥ संतोषोनि नवही मूर्ती ॥ धन्य धन्य विदेहा ह्मणती ॥ ऋत्विजही सादर परमार्थी ॥ सदस्य श्रवणार्थी अति तत्पर ॥२७०॥ ऐसें देऊनि अनुमोदन ॥ बोलते जाहले नवहीजण ॥ तेंचि कथेचें निजलक्षण ॥ नव प्रश्न विदेहाचे ॥ ७१ ॥ भागवतधर्म भगवद्भक्त ॥ *माया कैसी असे नांदत ॥ तिचा तरणोपाय येथ ॥ केवीं पावत अज्ञानी ॥ ७२ ॥ येथें कैसें असे परब्रह्म ॥ कामया नाम ह्मणिजे कर्म ॥ अवतारचरित्रसंख्या परम ॥ अभक्तां अधम गति कैशी ॥ ७३ ॥ कोणे युगीं कैसा धर्म ॥ सांगावा जो उत्तमोत्तम ॥ ऐसे नव प्रश्न परम ॥ ×जनकें सुवर्म पुशिले ॥ ७४ ॥ ऐसे विदेहाचे नवप्रश्न ॥ अनुक्रमें नवहीजण ॥ उत्तर देती आपण ॥ त्यांत प्रथम प्रश्न कवि सांगे ॥७५॥

॥ श्लोक ॥ कविरुवाच ॥ मन्येऽकुतश्चिद्भयमच्युतस्य पादांबुजोपासनमत्र नित्यम् ॥ उद्विग्नबुद्धेरसदात्मभावाद्विश्वात्मना यत्र निवर्तते भीः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ रायें पुसिलें आत्यंतिकक्षेम ॥ तदर्थी कवि ज्ञाता परम ॥ तो आत्यंतिकक्षेमाचें

---

१ आपणास. २ जन्मरहित. ३ जन्ममाला दशावतार रूपानें. ४ पक्कपण. ५ भरून वाहे. ६ सेवावयास. ७ अन्य. ८ पायाची धूळ. ९ भक्त. १० पूर्ण. ११ प्राप्त झाला, उद्भवला. १२ मनुष्याचें परम कल्याण कशांत ह्मणून विचारिलें.

*मो. माया कैसी आहे हें आद्यंत. ×ना. जनक सुवर्म पुसेल.

धर्म ॥ भागवतधर्म उपपादी ॥ ७६ ॥ ऐक राया नवलपरी ॥ 'आपुला संकल्प आपण
वैरी ' ॥ देहबुद्धि वाढवूनि शरीरीं ॥ अनिरुद्ध करी भवभय ॥ ७७ ॥ जयापाशीं देहबुद्धि
त्यासि सुख नाहीं त्रिशुद्धी ॥ ते बुडाले द्वंद्वसंधीं ॥ आधिव्याधिमहार्णवीं ॥ ७८ ॥ जे देहबुद्धि
पाशीं ॥ सकळदुःखाचिया राशी ॥ महाभयाचीं भूतें चौपाशीं ॥ अहर्निशीं झोंबती ॥ ७९
देहबुद्धीचिया नरा ॥ थोर चिंतेचा अडदरा ॥ संकल्पविकल्पांचा ×मारा ॥ ममताद्वारा अनिवा
॥ ८० ॥ देहबुद्धीमाजी सुख ॥ अणुमात्र नाहीं देख ॥ सुख मानिती ते महामूर्ख ॥ दुःखजन
देहबुद्धी ॥ ८१ ॥ दीपाचे मिळणीपाशीं ॥ केवळ दुःख पतंगाशी ॥ तरी आलिंगूं धांवे त्याशी
तेवीं विषयांसी देहबुद्धी ॥ ८२ ॥ ऐशी असंत देहबुद्धी कुडी ॥ वाढवी विषयांची गोडी ॥ तेथें महाभ
जोडे जोडी ॥ जन्ममरणकोडी अनिवार ॥ ८३ ॥ एवढा अनिवार संताप ॥ देहबुद्धीपाशीं अ
पाप ॥ जाणोनि धरी जो अनुताप ॥ विषयीं अल्प गुंतेना ॥ ८४ ॥ धरितां विषयाची गोडी
भोगाव्या जन्ममरणकोडी ॥ येणें भयें विषय वोसंडी ॥ इंद्रियांतें कोंडी अतिनेमें ॥ ८५
इंद्रियें कोंडिलीं न कोंडती ॥ विषय सांडितां न सांडती ॥ पुढतपुढती बाधों येती ॥ याला
हरिभक्ती बोलिली *वेदें ॥ ८६ ॥ इंद्रियें कोंडावीं नलगती ॥ सहज राहे विषयस्थिती
एवढें सामर्थ्य हरिभक्ती ॥ जाण निश्चितीं नृपवर्या ॥ ८७ ॥ योगी इंद्रियें जे कोंडिती ॥
भक्त त्यागिती भगवद्भक्तीं ॥ योगी विषय जे त्यागिती ॥ ते भक्त अर्पिती भगवंतीं ॥ ८८
योगी विषय त्यागिती ॥ त्यागितां ते दुःखी होती ॥ भक्त विषयो भगवंतीं अर्पिती ॥ ते
ते होती नित्यमुक्त ॥ ८९ ॥ हें नव्हे म्हणती +विकल्पिक ॥ त्याचिलागीं येथें देख ॥ काये
वाचा हा श्लोक ॥ अर्पणद्योतक बोलिजेला ॥ १९० ॥ दारा सुत गृहप्राण ॥ करावे भगवंतां
अर्पण ॥ हे भागवतधर्म पूर्ण ॥ मुख्यत्वें भजन या नांव ॥ ९१ ॥ अकरांही इंद्रियवृत्ती
कैशा लागती भगवद्भक्तीं ॥ ऐक राया तुजप्रती ॥ ⁰संक्षेपस्थितीं सांगेन ॥ ९२ ॥ मनें कर
हरीचें ध्यान ॥ श्रवणें करावें कीर्तिश्रवण ॥ जिव्हेनें करावें नामस्मरण ॥ हरिकीर्तन अ
निशीं ॥ ९३ ॥ करीं करावें हरिपूजन ॥ चरणीं देवाळया गमन ॥ घ्राणीं तुळसी आमो
ग्रहण ॥ जिहीं हरिचरण पूजिले ॥ ९४ ॥ नित्य निर्माल्य मिरवे शिरीं ॥ चरणतीर्थ अं
तरीं ॥ हरिप्रसाद ज्याचे उदरीं ॥ त्यासि देखोनि दुरी भवभय पळे ॥ ९५ ॥ वाढतेनि सद्भावें जाण
चढतेनि प्रेमें संपूर्ण ॥ अखंड ज्यासी श्रीकृष्णभजन ॥ त्यासी भवबंधन असेना ॥ ९६ ॥ सकळभ
माजी थोर ॥ भवभय अतिदुर्धर ॥ तेंहि हरिभक्तांसमोर ॥ बापुडें किंकर, कैंचि राहे ॥ ९
करितां रामकृष्णनामस्मरण ॥ उठोनि पळे जन्ममरण ॥ तेथें भवभयाचें तोंड कोण
धैर्यपण धरावया ॥ ९८ ॥ जेथें हरिचरणीं भजनप्रीती ॥ तेथें भवभयाची निवृत्ती ॥ पर
निर्भय भगवद्भक्ती ॥ आमच्या मतीं निजनिश्चयो ॥ ९९ ॥ आमचा कृतनिश्चयो प्रमाण
येथें साक्षी वेद शास्त्र पुराण ॥ सर्वात्मना भगवद्भजन ॥ निर्भयस्थान सर्वांशीं ॥ ३००

१ महत्त. २ सुखदुःखादि द्वंद्वांनी सांधीत. ३ मार्ग चाळला. ४ भय. ५ मायेमुळे. ६ संगत
७ खोटी. ८ कोट्यनुकोटि. ९ वैराग्य. १० सुटत नाहीं. ११ टाकी. १२ पुनःपुनः. १३ प्रकाशि
१४ आत्मस्वरूपें सांगणारा. १५ स्त्री. १६ पुत्र. १७ दशेंद्रियांच्या दहा आणि मन मिळून अ
१८ देवळास. १९ सुवास घेणें. २० पोटांत. २१ चाकर. २२ सर्व रूपानें.

×ना. मातेरा. *ना. देवें. +मो. अविवेक. ⁰मो. सांख्ये उपास्ती.

असो वेद शास्त्र पुराण ॥ स्वमुखें बोलिला श्रीकृष्ण ॥ मी सर्वथा भक्तिआधीन ॥ भक्तिप्रधान भगवद्वाक्यें ॥ १ ॥ उभवूनियां चारी बाह्या ॥ निजात्मप्राप्तीच्या उपाया ॥ ' भक्त्याहमेकया ग्राह्यः ' ॥ बोलिला लवलाह्या श्रीकृष्णनाथ ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ ये वै भगवता प्रोक्ता उपाया ह्यात्मलब्धये ॥ अंजः पुंसामवि-
दुषां विद्धि भागवतान् हि तान् ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ न करितां वेदशास्त्रव्युत्पत्ती ॥ ऐशिया अज्ञाना निजात्मप्राप्ती ॥ सुगम जोडे *ब्रह्मस्थिती ॥ यालागीं हरिभक्ती प्रकाशिली देवें ॥ ३ ॥ न करितां वेदशास्त्रपठण ॥ जड मूढ भजनें तरले कोण ॥ उन्मत्तगजेंद्रउद्धरण ॥ गर्भसंरक्षण परीक्षितीचें ॥ ४ ॥ अंबरी-षगर्भनिवारण ॥ करावया भक्तीच कारण ॥ अहं भक्तपराधीन ॥ स्वमुखें नारायण बोलिला ॥ ५ ॥ वनचरें वानरें नेणों किती ॥ उद्धरले भगवद्भक्तीं ॥ अस्वलें तारावया निश्चितीं ॥ विवरीं जांबवती भक्तीस्तव वरिली ॥ ६ ॥ जाणपां अविवेकी केवळ ॥ गौळी गोधनें गोपाळ ॥ तेहीं उद्धरिले सकळ ॥ +कृष्णसख्यें प्रबळ अनन्यप्रीतीं ॥ ७ ॥ शास्त्रविरुद्ध वि-वेकास्थिती ॥ जारभावें श्रीकृष्णप्रीती ॥ गोपी उद्धरिल्या नेणों किती ॥ अनन्यभक्ती असं-ख्य ॥ ८ ॥ न करितां नानाव्युत्पत्ती ॥ सुगमोपायें ब्रह्मप्राप्ती ॥ अबळें तरावया निश्चितीं ॥ भगवंतें निजभक्ती प्रगट केली ॥ ९ ॥ तें हें गाया भागवत जाण ॥ मुख्यत्वें *भक्तिप्रधान ॥ भावें करितां भगवद्भजन ॥ अज्ञानजन उद्धरती ॥३१०॥ हें भागवत नव्हे नव्हे ॥ अज्ञानालागीं निजपव्हें ॥ भवाब्धि तरावया भजनभावें ॥ महा नाव देवें निर्माण केली ॥ ११ ॥ भागव-ताचे महा नावें ॥ जे रिघाले भजनभावें ॥ त्यांसि भवभयाचे हेलावे ॥ भजनस्वभावें लागती ॥ १२ ॥ स्त्रीशूद्रादि अधवे ॥ घालूनियां ये नावें ॥ एकेच खेपें स्वयें न्यावे ॥ भजनभावें पर-तीरा ॥ १३ ॥ जे आवलितां भावबळें ॥ तोडी कर्माकर्मकूरजळें ॥ स्वबोधाचेनि पैणीढाळें ॥ काढिती एकवेळें ×निजात्मतीरा ॥ १४ ॥ वैराग्याचे निर्जनिवाडे ॥ अढळ चमले चहूंकडे ॥ विषयाचे आदळ रोकडे ॥ चुकवूनि धडपुडे काढिती तीरा ॥ १५ ॥ संचितक्रियमाणांच्या लाटा ॥ मोडोनि लाविती नीटा वाटा ॥ वंचूनि प्रारब्धाचा सांठा ॥ निजात्मतटा काढिती ॥ १६ ॥ तेथें [1]गुरुवचनसांचारें ॥ सांभाळीत उणेंपुरें ॥ भूतदयेचेनि दोरें ॥ निजनिर्धारें वोढिती ॥ १७ ॥ तंव एकाएकी एकसरें ॥ काढिली [2]परात्परतीरें ॥ [3]तंव प्रत्यावृत्ती येर-झारें ॥ आत्मसाक्षात्कारें खुंटली ॥ १८ ॥ येथें धरिला पुरे भावो ॥ तें बुडणेंचि होय वावो ॥ मग टाकावा जो ठावो ॥ तो स्वयें स्वयमेवो आपण होय ॥ १९ ॥ येथें पोहणयावीण तरणें ॥

१ उभ्या करून. २ आपल्या आत्म्याच्या प्राप्तीचा उपाय. ३ गजेंद्रास नक्रानें धरिलें असतां श्रीवि-ष्णूनीं सोडविलें. ४ जांबुवंताची कन्या व कृष्णाची स्त्री. ५ उपपति या भावनेनें. ६ सोप्या उपायानें. ७ होनकुवली. ८ पाणपोई. ९ धक्के झोके. १० वल्हवितां. ११ ओघानें, कळानें. १२ निर्जनिधीरें. १३ धक्के. १४ सत्य. १५ संचित [ सांठलेलें ] व क्रियमाण [ चालू ] अशीं दोन प्रकारचीं कर्में. १६ सत्य-पणानें. १७ सूत्रानें, दोरानें. १८ परत जन्मास येणें. १९ व्यर्थ.

*ना. आत्मस्थिती. +ना. कृष्णमुखें. *मो. भक्तिप्राधान्य. ×मो. निजात्मरीती. [1]मो. आप्तवचन. [2]मो. परापर. [3]ना. मो. मग.

प्रयासेंवीण प्राप्ति येणें ॥ सुखोपायें ब्रह्म पावणें ॥ यालागीं नारायणें प्रकाशिली भक्ती॥३२०॥ भागवतधर्मांचिये स्थिती ॥ बाळींभोळीं भवाब्धि तरती ॥ सुखोपायें ब्रह्मप्राप्ती ॥ तेंचि श्लोकार्थीं विशदें सांगे ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ यानास्थाय नरो राजन्न प्रमाद्येत कर्हिचित् ॥ धावन्निमील्य वा नेत्रे न स्खलेन्न पतेदिह ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ जो श्रुतिस्मृतीनेणता ॥ भावें भजे भगवंतपथा ॥ त्यासि विधिनिषेधबाधकता ॥ स्वप्नींही सर्वथा प्रमाद न घडे ॥ २२ ॥ सद्भावेंसी सप्रेम ॥ आचरितां भागवतधर्म ॥ बाधूं न शके कर्माकर्म ॥ भावें पुरुषोत्तम संतुष्ट सदा ॥२३॥ श्रुतिस्मृति हे दोनी डोळे ॥ येणेंवीण जे आंधळे ॥ तेही हरिभजनीं धांवतां भावबळें ॥ पडे ना आडखुळे सप्रेमयोगें ॥ २४ ॥ प्रेमेंवीण श्रुतिशास्त्रज्ञान ॥ प्रेमेंवीण ध्यानपूजन ॥ प्रेमेंवीण श्रवण कीर्तन ॥ वृथा जाण नृपनाथ ॥ २५ ॥ माता देखोनि प्रेमभावें ॥ बाळक +डोळे झांकूनि धांवे ॥ ते धावेसवें झेलीत पावे ॥ अतिसद्भावें निजमाता ॥ २६ ॥ तैसा सप्रेम भजे जो भक्त ॥ त्या भजनासवें भगवंत ॥ ॥ भुल्ला चाले स्वानंदयुक्त ॥ स्वयें सांभाळित पदोपदीं ॥ २७ ॥ ऐसे आचरितां भागवतधर्म॥बाधूं न शके कर्माकर्म ॥ कर्मासि ज्याचा आज्ञानेम ॥ तो पुरुषोत्तम भजनामाजी ॥ ॥ २८ ॥ ऐसा भागवतधर्मी गोविंद ॥ तुष्टला स्वयें चाले स्वानंदकंद ॥ तेथें कोण रिघे विधिनिषेध ॥ भक्तां प्रमाद कदा न बाधी ॥ २९ ॥ जेवीं कां स्वामिचिया बाळा ॥ अवरोध न करवे द्वारपाळा ॥ तेवीं भागवतधर्मभजनशीळा ॥ कर्मांची अर्गळा बाधूं न शके ॥ ३३० ॥ ज्यास भगवद्भजनीं विश्वास ॥ विधिनिषेध त्याचा दास ॥ देखोनि निजभजनविलास ॥ स्वयें जगन्निवास सुखावे ॥ ३१ ॥ भागवत धर्में राहे कर्म ॥ तंव तंव सुखावे पुरुषोत्तम ॥ सप्रेमभक्तां बाधी कर्म ॥ हा वृथा भ्रम भ्रांतांसी ॥ ३२ ॥ कर्म करूं पावे प्रमाद ॥ तंव प्रमादीं प्रगटे गोविंद ॥ यालागीं विधिनिषेध ॥ न शकती बाधूं हरिभक्तां ॥ ३३ ॥ अजामिळा कर्मबाध ॥ यमपाशीं बांधितां सुबद्ध ॥ तेथें प्रकटोनि गोविंद ॥ केला अतिशुद्ध रामनामें ॥ ३४ ॥ स्वधर्मकर्म हेच दोन्ही ॥ निजसत्ता ×भोई करूनी ॥ जो पहुडे भजनसुखासनीं ॥ तो तें पडे देहणीं स्वधर्मकर्मा ॥ ३५ ॥ भजनप्रतापलक्षणें ॥ स्वधर्मकर्मा ऐसें दंडणें ॥ वर्णाश्रमांचा ठाव पुसणें ॥ होळी करणें कर्मांची ॥ ३६ ॥ एवं भागवधर्में जे सेवक ॥ स्वधर्मकर्म त्यांचें रंक ॥ तें राहों नशके त्यांसन्मुख ॥ मो केवीं बाधक हो शकेल ॥ ३७ ॥ कैसेकैसे भागवतधर्म ॥ केवीं भगवंतीं अर्पे कर्म ॥ हें अतिगुह्य उत्तमोत्तम ॥ निजभजन ※वर्म ऐक राया ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वाऽनुसृतस्वभावात् ॥ करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत् ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ हेतुकें अथवा अहेतुकें ॥ वैदिक, लौकिक, स्वाभाविक॥भगवंतीं अर्पे सकाळिक॥

१ स्पष्ट. २ परमेश्वराच्या भक्तिमार्गास. ३ वेद शास्त्रावाचून. ४ प्रमाण, नियामक. ५ अमुक करावें आणि अमुक करूं नये हा नियम. ६ चुका. ७ प्रतिबंध, अडथळा. ८ कर्मरूप अडसर. ९ निजे. १० मग. ११ सकाम. १२ निष्काम.

*मो. भजनें. +मो. उडी घालोनी. ×मो. कारण. ※ना. धर्म.

या नांव देख भागवतधर्म ॥३९॥ उदकीं तरंग अतिचपळ ॥ जिकडे जाय तिकडे जळ ॥ तैसें भक्ताचें कर्म सकळ ॥ अर्पे तत्काल भगवंतीं ॥ ३४०॥ येश्लोकींचें व्याख्यान ॥ पहिलें मानसिक अर्पण ॥ पाठीं इंद्रियें बुद्धि अभिमान ॥ कायिक जाण श्लोकान्ती ॥ ४१ ॥ भागवत धर्माची निजस्थिति ॥ मन बुद्धि चित्त अहंकृती ॥ आदिकरूनि इंद्रियवृत्ति ॥ भगवंतीं अर्पिती ते ऐका ॥ ४२ ॥ बाधूं नशके स्वधर्मकर्म ॥ ऐक राया त्याचें वर्म ॥ मनीं प्रकटला पुरुषोत्तम ॥ अतिनिःसीम निजबोधें ॥ ४३ ॥ ह्मणोनि संकल्पविकल्प ॥ अवघे जाहले भगवद्रूप ॥ यालागीं भक्त नित्य निष्पाप ॥ सत्यसंकल्प हरिदास ॥ ४४ ॥ जेवीं बुद्धिबळाचा खेळ ॥ राजा प्रधान गज दळ ॥ अवघे काष्ठचि केवळ ॥ तेवीं संकल्प सकळ भगवद्रूप ॥ ४५ ॥ जो जो कल्पना कामी काम ॥ तो तो होय *आत्माराम ॥ तेथें भजनाचा संभ्रमू ॥ अतिनिःसीमू स्वयें वाढे ॥ ४६ ॥ जागृति सुषुप्ती आणि स्वप्न ॥ तिहीं अवस्था होय भजन ॥ जेथें कां अखंड अनुसंधान ॥ निजबोधें पूर्ण ठसावलें अंगीं ॥ ४७ ॥ मना होतां समाधान ॥ समाधानें अधिक भजन ॥ पूर्ण वाणलें अनुसंधान ॥ ध्येय ध्याता ध्यान समरसें भजे ॥ ४८ ॥ ※तुर्या, साक्षी, उन्मनी ॥+याही लाविल्या भगवद्भजनीं ॥ जंवरी अवस्थापनी ॥ ×आपल्यापणा मुकल्या नाहीं ॥ ४९ ॥ ऐसा भावनेवीण उपजे भावो ॥ तों तों तत्काळ होय देवो ॥ मग अर्पणाचा लवलाहो ॥ न अर्पितां पाहा हो स्वयें होत ॥ ३५० ॥ स्वरूपें मिथ्या केलें स्वप्न ॥ जागृती 4सोडुनि काढिलें ज्ञान ॥ निवडोनि सुषुप्तिसुखसमाधान ॥ तिहींतें परिपूर्ण एकत्र केलें ॥५१॥ तये स्वरूपीं मगळे मन ॥ स्वयेंचि करी निजात्मअर्पण ॥ तेथिंचें सुखसमाधान ॥ भक्त सज्ञान जाणती स्वयें ॥ ५२ ॥ यापरी मानसिक जाण ॥ सहज स्वरूपीं होय अर्पण ॥ आतां इंद्रियसमर्पण ॥ होय तें लक्षण ऐक राया ॥ ५३ ॥ दीपू लाविजे गृहाभीतरीं ॥ तोचि प्रकाश गवाक्षद्वारीं ॥ तेवीं मनीं प्रकटल्या श्रीहरी ॥ तोचि इंद्रियांतरीं परमानंद ॥ ५४ ॥ तेचि इंद्रियव्यापार ॥ सांगिजेती सविस्तर ॥ स्वाभाविक इंद्रियव्यवहार ॥ भजनपर परब्रह्मीं ॥ ५५ ॥ जंव दृष्टि देखे दृश्यातें ॥ तंव देवोचि दिसे तेथें ॥ यापरी दर्शनातें ॥ अर्पी भजनमत्ते दृष्टीचा विषयो ॥ ५६ ॥ दृश्य द्रष्टा आणि दृष्टी ॥ देखतां तिन्ही एकवाटी ॥ सहजे ब्रह्मार्पण ते दृष्टी ॥ भक्त जगजेठी यापरी अर्पी ॥ ५७ ॥ दृश्य प्रकाशी दृश्यपणें ॥ तोचि दृष्टीमाजी होय देखणें ॥ ऐसेनि अभिन्नपणें ॥ दर्शनार्पणें भजती भक्त ॥ ५८ ॥ हे एकपणीं तीनही भाग ॥ तिनीमाजी एक अंग ॥ ऐसें जें देखणें चांग ॥ त्यांचें अर्पण सांग सहजें अर्पे ॥ ५९ ॥ नानापदपदार्थ प्रांजळे ॥ नित्य नवे देखती डोळे ॥ परी अर्पणाचे सोहळे ॥ निजात्मप्रेमेळें अर्पिती स्वयें ॥ ३६० ॥ यापरी दृष्टीचें दर्शन ॥ भक्त करिती ब्रह्मार्पण ॥ आतां श्रवणाचें अर्पण ॥ अर्पी तें लक्षण ऐक राया ॥ ६१ ॥ जो बोलातें बोलविता ॥ तोचि श्रवणीं जाहला श्रोता ॥ तोचि अर्थावबोध जाणता ॥ तेथें ब्रह्मार्पणता सहजेंची ॥ ६२ ॥ शब्दश-

१ नंतर. २ आढळे आहे संकल्प ज्यांचा. ३ हत्ति आणि पायदळ. ४ चिंतन. ५ स्वरूपाचे ज्ञानानें. ६ एकपणानें. ७ सुषुप्तीचे पुढली अवस्था. ८ तुर्येचे पलीकडील पांचवी. ९ आश्चर्य. १० घरांत. ११ खिडकीचे तोंडीं. १२ जगातें. १३ चांगले. १४ स्पष्ट. १५ अर्थाचें ज्ञान.

*ना. पुरुषोत्तम. ※ना. तुर्या अवस्था उन्मना. +ना. नाहीं लागल्या भगवद्भजना. ×मो. आपआपणा मुकला नाहीं. 4मो. सोडुनी.

ढल्वें जंव उठी ॥ तंव *शब्दविता प्रगटे पोटीं ॥ तेणें अकृत्रिम भजन उठी ॥ ब्रह्मार्पण मिठी श्रवणें पडे ॥ ६३ ॥ शब्दबोलामवें अर्थवादी ॥ तंव शब्दविता घे शब्दार्थगोडी ॥ तेणें हरिभजनीं आवडी ॥ स्वयें उठी गाढी श्रवणार्पणेंशी ॥६४॥ शब्द जंव कानीं पडे ॥ तंव +शब्दार्थें भजन वाढे ॥ बोलविल्याच्या अंगा घडे ॥ अर्पण उघडें *करितची ॥ ६५ ॥ बोलाशी जो बोलविता ॥ त्याशीं दृढ केल्या एकात्मता ॥ तें भजन चढे श्रवणाच्या हातां ॥ ब्रह्मार्पणता निजयोगें ॥ ६६ ॥ सद्गुरुवचन पडतां कानीं ॥ मनाचें मनपण विरे मनीं ॥ तेंचि श्रवण ×ब्रह्मार्पणीं ॥ भगवद्भजनीं सार्थकता ॥ ६७ ॥ श्रवणेंचि यापरी श्रवण ॥ करितां उठिलें ब्रह्मार्पण ॥ हेतुरहित भगवद्भजन ॥ स्वभावें जाण स्वयें होत ॥ ६८ ॥ भजनें तुटला अर्गानिवास ॥ होय वासाचा निज वास ॥ मग घ्राणद्वारा परेश ॥ भोगी सुवास ब्रह्मार्पणेंसीं ॥ ६९ ॥ जो सुमना सुमनपण जोडी ॥ तो घ्राणाचें घ्राण होय आवडी ॥ मग नानासुवासपरवडी ॥ ब्रह्मार्पण प्रौढी निजभोग अर्पी ॥ ३७० ॥ वासाचा अवकाश होय आपण ॥ घ्राणीं ग्राहकपणें जाण ॥ तो भोगीचि स्वयें संपूर्ण ॥ कृष्णार्पण सहज होत ॥७१॥ रसना रस सेवूं जाये ॥ तंव रसुस्वाद देव होये ॥ मग रसनेमाजी राहून राहे ॥ ब्रह्मार्पण पाहे सर्वांगसंगीं ॥ ७२ ॥ जे जे रसना सेवी गोडी ॥ ते ते हरिरूपें चोखडी ॥ स्वादा येऊनि सेवकडी ॥ ब्रह्मार्पण परवडी निजभोग अर्पी ॥ ७३ ॥ रस रसना रसस्वाद ॥ त्रिविधभेदें निजभेद ॥ रससेवनीं परमानंद ॥ स्वानंदकंद वोसंडे ॥ ७४ ॥ कटु मधुर नानारस ॥ रसना सेवी सावकाश ॥ परी तो अवघा ब्रह्मरस ॥ स्वादीं सुरस परमानंद ॥ ७५ ॥ यापरी रसीं रसना ॥ भोगें राहली कृष्णार्पणा ॥ आतां स्पर्शविषयरचना ॥ अर्पे ब्रह्मार्पणा एक राया ॥७६॥ स्पर्श घेईजे निजदेहीं ॥ तंव देहींच प्रकटे विदेही ॥ मग स्पर्शी जें जें कांहीं ॥ तो तो भोगूं पाही ब्रह्मार्पणें उठी ॥७७॥ स्पर्शास्पर्श जें स्पर्शिजे ॥ तंव स्पर्शाविया नावडे दुजें ॥ तेणें एकपणाचेनि व्याजें ॥ कृष्णार्पणें बोजे भजन प्रकटे ॥७८॥ तेथें जो जो घेईजे पदार्थ ॥ तो पदार्थ होय समर्थ ॥ तेणेंचि भजनें परमार्थ ॥ निजस्वार्थ निजभक्तां ॥ ७९ ॥ धावया कांहीं देतो जाये ॥ तंव देतां भजन कैसें पाहे ॥ देते घेते दान स्वयें ॥ देवोचि होये निजांगें ॥ ३८० ॥ जेउतें तेउतें चालवी पाये ॥ तो तो मार्ग देवोचि होये ॥ मग पावला पावला पाहे ॥ निजभजन होये ब्रह्मार्पणेंशी ॥ ८१ ॥ चरणा चरणें निगुती ॥ तोचि निजांगें क्षितीची क्षिती ॥ चालतां तैशिया युक्ती ॥ सहजें ब्रह्मस्थिती निजकर्म अर्पे ॥ ८२ ॥ बोला बोलविताया बोलि भेटी ॥ बोलणें लाजे त्याचिया दृष्टी ॥ ते लाज गिळून बोलणें उठी ॥ निजभजनपुष्टी ब्रह्मार्पणेंशी ॥ ८३ ॥ शब्द मौनें वळले निःशब्देंदीं ॥ निःशब्दचि बोलिजे शब्दीं ॥ तेचि अर्पणाचा विधी ॥ जाण त्रिशुद्धी समर्पितेनसी ॥ ८४ ॥ बोल बोलविता बोलों आंतू ॥

१ शब्दकल्पना. २ एकरूपता. ३ हानास लटणे प्राप्त होणें मिळणें. ४ फुल्लास. ५ प्रकार. ६ नाकांनली पोवळा. ७ नाही. ८ मियानें. ९ उत्तम रीतानें. १० आपला अर्थ [ ब्रह्मप्राप्ति. ] ११ जिकडे तिकडे. १२ पृथिवी. १३ लपणें. १४ मौनांत. १५ बोलाचें आंत किंवा पोटांत.

***ना. शब्दविता पाठीपोटीं. +मो. शब्दार्थें. *मो. करितांचि. ×ना. श्रवणार्पणी. 6मो. सुवासें. 4मो. गोडी. 3मो. निजभेद. 5मो. भोगुनि रातली. 7ना. विषयभावना. 1ना. स्पर्शास्पर्शें. 8ना. नावडे.**

तो बोल अर्पणेशीं येतू ॥ ऐसा शब्देंचि भजनार्थू ॥ प्रकटे परमार्थू ब्रह्मार्पणेंशी ॥ ८५ ॥ ऐसा मनें कर्में वचनें ॥ जो दृढवला भगवद्भजनें ॥ तेंचि भजन अभिमानें ॥ निज निर्वाणें दृढ धरिलें॥८६॥तरंग समुद्रा आतौता॥ह्मणे माझेनि मेघ तत्वतां॥जगातें निववितां जिवविता॥ तृषा हरिता चातकांची ॥ ८७ ॥ माझेनि सस्यें पिकती ॥ माझेनि सरिता उसळती ॥ मागुती माझ्या मजमाजी मिळती ॥ समरसती सिंधुत्वें ॥ ८८ ॥ तेवीं मुळींचें पूर्णपण ॥ पावोनि भजे अभिमान ॥ त्याचि भजनाचें लक्षण ॥ सावधान अवधारा ॥ ८९ ॥ ह्मणे मी सकळ-लोककर्ता ॥ कर्म करोनि मी अकर्ता ॥ +अकर्ता मी कर्मभोक्ता ॥ नित्य अभोक्ता मी एक ॥ ॥ ३९० ॥ सकल लोकीं माझी सत्ता ॥ सकळीं सकळ मी नियंता ॥ सकळां सकळत्वें मी प्रकाशिता ॥ काळादि मी शास्ता कळिकाळाचा ॥ ९१ ॥ सकळांभूतीं मी एकू ॥ मीच व्याप्य व्यापकू ॥ जनिता जनविता जनकू ॥ नंहोनि अनेकू जगद्रूप मी ॥ ९२ ॥ मी देवाचा आदि-देवो ॥ देवीं देवपणा माझाचि भावो ॥ व्ययामाजी मी अव्ययो ॥ *अक्षरीं अक्षरभावो माझेनि अंगें ॥ ९३ ॥ ईश्वरीं जे जे सत्ता ॥ ते ते माझी सामर्थ्यता ॥ भगवंतीं भगवंतता ॥ जाण तत्वतां माझेनी ॥ ९४ ॥ मी आपरूपी ※आपू ॥ मी प्रकृतिपुरुषांचा बापू ॥ सृष्टिरच-नेचा संकल्पू ॥ ×निर्विकल्प पैं माझा ॥ ९५ ॥ मी आदिची अनादिआदि ॥ मी समाधीची निजसमाधी ॥ निजशुद्धीसि माझेनि शुद्धी ॥ यापरी त्रिशुद्धी 0अभिमानार्पण ॥ ९६ ॥ मी अजन्मा नजन्मोनि जन्में ॥ मी 5अकर्मा नकरोनि करीं कर्में ॥ माझेनियोगें पुरुषोत्तमें ॥ पाविजे महिमे उत्तमत्वाचे ॥ ९७ ॥ सच्चिदें माझें अंग ॥ चिन्मच्चिदें मीच 7चांग ॥ नहोनियां तिन्ही भाग ॥ आनंद निर्व्यंग तोचि तो मी ॥ ९८ ॥ माझेनि सूर्य, दृष्टी, डोळस ॥ मजमाजी चिदाकाशा अवकाश ॥ माझेनिअंगें जगन्निवास ॥ सावकाश नांदत ॥ ९९ ॥ अजाअजपणें मी अज ॥ निःशेषनिर्बीजा मी बीज ॥ माझेनि निजांगें निज ॥ निज भोजें स्वयें नाचे ॥ ॥ ४०० ॥ अधिष्ठाना मजमाजी अधिवास ॥ जगदीशाचा मी पूर्ण ईश ॥ मी परमपुरुषाचाही पुरुष ॥ परेशा परेश मीच मी स्वयें ॥ १ ॥ असंत माझेनी संत होय ॥ अचिद् माझेनि चिद्रूप आहे ॥ निरानंदासिही पाहे ॥ आनंद निर्वाहे माझेनि ॥ २ ॥ मी सकळ सिद्धींची निज-सिद्धी ॥ मी सर्वांग देखणे बुद्धीची बुद्धी ॥ मोक्ष ह्मणणें तोही उपाधी ॥ जाण त्रिशुद्धी माझेनी ॥ ३ ॥ मी साचार निजनिर्धर्म ॥ मज माजी ब्रह्म विसरे कर्म ॥ ब्रह्मसमाधीचें परब्रह्म ॥ निज निःसीम मीच मी ॥४॥ हरिहर ब्रह्मा निजनिर्धारीं ॥ हेही माझे 2अंशांशधारी ॥मी दशावता-रांचा अवतारी ॥ माझी निजथोरी मीहि नेणें ॥ ५ ॥ ऐशिया नाना विवंचना ॥ अभि-मान भजे भगवद्भजना ॥ 'ब्रह्माहमस्मि दृढ भावना ॥ आपण आपणा पूर्णत्वें अर्पी' ॥ ६ ॥ जीवें घालूनि पूर्णत्वा आंतू ॥ जें जें अभिमान कल्पितू ॥ तें तें साचचि स्वयें होतू ॥ तेंही

१ मध्यें. २ नहान. ३ धान्यें. ४ नद्या. ५ एक होतात. ६ एका. ७ नियामक. ८ दंड करणारा. ९ न होऊन. १० नश्वरांमध्यें. ११ नाशरहितांत. १२ जडरूप. १३ जन्मरहित. १४ पूर्ण. १५ संतोष उत्साह. १६ वाहतो. १७ सत्य. १८ समजत नाहीं. १९ विचारणा. २० ब्रह्ममी. २१ पूर्ण जें ब्रह्म तद्रूप जीव करून, मग.

+मो. अकर्ता मी सर्व भोक्ता. *मो. क्षरीं अक्षर भावो. ※ना. अरूप. ×मो. मनातीण. 0मो. अभिन्नपणें. 5मो. अकर्ता. 7ना. सांग. 2मो. अंशधारी.

पूर्णत्वें अर्पित निजपूर्णत्वीं ॥ ७ ॥ ब्रह्माहमस्मि नुसतें वचन ॥ ये अहंते नाम भगवद्भजन ॥
महातत्त्वें तद्रूप होऊन ॥ भजे अभिमान ब्रह्मार्पणेंसी ॥ ८ ॥ सांडूनि देहबुद्धीचा करू ॥ भजनें
उठिला अहंकारु ॥ तो अपरोक्ष निजसाक्षात्कारु ॥ पावूनि पूर्ण निर्धारु पूर्णत्वें वर्ते ॥ ९ ॥
ब्रणोनि मनना मीच मनन ॥ स्मरणा मीच नित्यस्मरण॥ चित्तासि मी निजचिंतन ॥ चैतन्यघ-
नेंवीण सर्वदा ॥४१०॥ 'ज्याची सहसा प्राप्ती नव्हे ॥ तें तें निजचित्तेंचि चिंतावें ॥ तंव अप्रा-
प्तीमी अप्राप्ती पावे ॥ चित्तनिजानुभवें *सहजें भजतां ' ॥ ११ ॥ तेव्हां निश्चित जें जें चिं-
तित ॥ तें तें स्वयेंचि होय समस्त ॥ या प्रतीति चित्त भजत ॥ ब्रह्मार्पणयुक्त निजबोधें ॥१२॥
नाथिलें चिंती ते अतिचिंता ॥ आथिलें चिंती ते निश्चितता ॥ आथीनाथी सांडिली चिंता ॥
सहज, नभजतां भजन होय ॥ १३ ॥ चित्त चिंता आणि चिंतन ॥ यापरी तिहींस जाहलें
समाधान ॥ तें समाधानही कृष्णार्पण ॥ सहजीं संपूर्ण स्वयें होय ॥ १४ ॥ ऐसिया भगवद्भ-
जनविधी ॥ भजनशील जाहली बुद्धी ॥ तें सकळकर्मीं समाधी ॥ जाण त्रिशुद्धी स्वयें जाहली
॥ १५ ॥ कर्माचरणीं समाधी ॥ एक ह्मणतां नघडे कधीं ॥ ते पावले नाहीं निजात्मबोधीं ॥
जाण त्रिशुद्धी विदेहा ॥१६॥ ताटस्थ्या नांव समाधी ॥ ह्मणे त्याची ठकली बुद्धी ॥ ते समाधी
नव्हे त्रिशुद्धी ॥ जाणावी नुसधी मूर्छा आली ॥ १७ ॥ ताटस्थ्यापासूनि उठिला ॥ तें तो समा-
धीस मुकला ॥ तेव्हां एकदेशी भावो आला ॥ मंदही या बोला नमानिती सत्य ॥ १८ ॥
समाधी आणि एकदेशी ॥ बोलतां बोलणें ये लाजेशीं ॥ सत्य मानी ते ×शब्दपिशी ॥ शुद्ध-
स्वरूपासीं अनोळख ॥ १९ ॥ येथ प्राचीन अतिसमर्थ ॥ ते मूर्छा आणोनि करी तटस्थ ॥
यांसनि चालते बोलते समाधिस्थ ॥ जाणपां निश्चित वसिष्ठादिक ॥ ४२० ॥ पाहेपां देवर्षी
नारद ॥ विनोदें नमोडे समाधिबोधु ॥ याज्ञवल्क्याचा समाधिसंबंधु ॥ ऋषींप्रसिद्ध परिक्षा
केला ॥ २१ ॥ 'स्वरूप देखोनि मूर्छित जाहला ॥ तो आपणियां आपण तरला ' ॥ 'स्वयें
तरोनि जन उद्धरिला ॥ तो बोध प्रकाशिला शुकवामदेवां ' ॥ २२ ॥ यालागीं समाधि आणि
व्युत्थान ॥ या दोन्ही अवस्थांसहित जाण ॥ बुद्धी होय ब्रह्मार्पण ॥ अखंडत्वें पूर्णपरम
समाधी ' ॥ २३ ॥ अर्जुना देऊनि निजसमाधी ॥ सवेंचि घातला महायुद्धीं ॥ परी तो कृष्ण
कृपानिधी॥ताटस्थ्य त्रिशुद्धी नेदीच स्पर्शों ॥२४॥ 'सकळकर्मीं समाधी'॥ हेचि सद्गुरूची बोध
बुद्धी ॥ तरी गुद्धीही त्रिशुद्धी ॥ निजसमाधी नमोडे ॥ २५ ॥ 'बुद्धी आकळलें परब्रह्म ॥
न अहंतेनें चाले कर्म ' ॥ हेंचि बुद्धीचें अर्पण परम ॥ इतर तो भ्रम, अनुमानज्ञानें ॥ २६ ॥
' स्वरूपीं दृष्टी निरवधी ॥ अनवच्छिन्न समान बुद्धी॥कर्माकर्मीं अज्ञान न बाधी '॥ परमसमा-
धी तिये नाव ॥ २७ ॥ निःशेष देहींची गेली +देहबुद्धी ॥ स्वरूप स्वरूपपणें, फुंजे नबाधी ॥

१ केले. २ साक्षात आत्मानुभव. ३ ब्रह्मबोधानें. ४ नाहीं तें. ५ आहे तें. ६ आहे, नाहीं.
७ सुटैनें ताठ होणें. ८ के. १४. ९ ताठपणापासून, अक्रियतेंतून. १० समाधी गेली. ११ समाधि ह्मटली
असतां ती एकदेशी ह्मणजे ताटस्थ्यांतच शक्य आहे, असें मानणारे ते वेडे आहेत. ते समाधीचें खरें रूप
जाणत नाहींत. वसिष्ठ नारदादिकांची चालतां बोलतांहि समाधि मोडत नव्हती, हें लक्षांत घ्यावें.
१२ शब्दज्ञानानें सुटे झालेले. १३ उठणें. १४ लागलीच. १५ निकराचे लढाईत. १६ समजलें.
१७ निष्काम. १८ केवळ तर्कानें काढलेलें ज्ञान. १९ आत्मरूपाचे ठायीं. २० अखंड, सतत. २१ अहंकार.
*मो. स्वयें. ×मो. शब्दासी. +ना. शुद्धी.

कर्माकर्मीं अज्ञान न बाधी ।। ते परमसमाधी निर्दुष्ट ।।२८।।ते स्वरूपीं निरावधी।। भजनशीळ जाहली बुद्धी ।।ते सकळकर्मीं समाधी ॥ निजार्पणविधी स्वयें जाहली ॥ २९ ।। जेथं शमली मरणाची आधी ।। ते जाणावी परमसमाधी ॥ समाधी घेणें तें देहबुद्धी ।।काष्ठातें त्रिशुद्धी मूर्छितप्राय ।।४३०।। मनासि ठाउकें नसे ॥ इंद्रियीं व्यापारू तरी दिसे ॥ कर्म निपजे जें ऐसें।। तें जाणिजे आपैसें कायिक ।। ३१ ।। श्वासोच्छ्वासाचे परिचार ॥ कां निमेषोन्मेषांचे व्यापार ॥ तेही नारायणपर ॥ केले साचार निजस्वभावें ॥ ३२ ॥ तरी देह, गेह, वर्णाश्रमें ॥ स्वभागा आलीं जीं जीं कर्मे ।। तीं तीं आचरो निजधर्मे ॥ पूर्वानुक्रमें अनहंकृती ।। ३३ ।। साकरेचें कारलें प्रौढ ॥ तें देठकांटेनशीं सर्वही गोड ।। तेवीं इंद्रियकर्मरूढ गूढ ।। स्वादिष्ट सदृढ ब्रह्मार्पण ब्रह्मीं ।।३४।। कर्मकैलापू आघवा ॥ आचरोनि आणी विधीगौरवा ।। परी कर्तेपणाचिया गावा।।अहंभावा स्पर्शेना।।३५।। मजपासून जाहलें सत्कर्म ॥ माझा आचार अतिउत्तम ॥ स्यां निरसिलें मरणजन्म ॥ हा स्वभावें देहधर्म उठोंचि नेणे ॥ ३६ ॥ देहसंगें तरी वर्तणें ॥ परी देहधर्म धरूं नेणे ।। देहस्वभाव लक्षणें ॥ ब्रह्मार्पणें विचरती ।। ३७ ॥ देहधर्मांचा नुठे कांटा ॥ जीनगर्वाचा नचढेचि ताठा ।। यालागीं सहजभजनामाजीवटा ।। जाहला तो पैठा, अनहंकृती ॥ ३८ ॥ त्यापासूनि जें जें निफजे ॥ तें तें देव ह्मणे माझें खाजें ॥ यालागीं ब्रह्मार्पणंवोजें ।। त्याचे स्वभाव सहजें नार्पितां अर्पितीं ॥ ३९ ॥ परिसाचे कसवटीवऱ्हें ।। जें जें लागे तें तें सोंडेपंधरें ।। तेवीं निपजे जें जें शरीरें ।। तें तें खरें परब्रह्म ॥ ४४० ॥ त्याचा खेळ तोचि महापूजन ।। त्याची बडबड तेचि *प्रियस्तवन ॥ त्याचे स्वभावीं स्वानंदपूर्ण ॥ श्रीनारायण ×सुखावे ।। ४१ ।। तो जेउती वास पाहे ।। आवडीं देव तेउतां राहे ॥ मग पाहे अथवा न पाहे ।। तरी देवोचि स्वयें स्वभावें दिसे ॥ ४२ ॥ तयांसि चालतां मार्गे ।। तो मार्ग होईजे श्रीरंगें ॥ तो देवाचिया दोंदांवरी वेगें ॥ चाले सर्वांगें +डुलत ॥ ४३ ॥ जें जें कर्म स्वभाविक ।। तें तें ब्रह्मार्पण अहेतुक ।। यानांव भजन निर्दोखें ।। भागवतधर्म देख यानांव ॥ ॥ ४४ ॥ स्वभाविक जें वर्तन ।। तें सहजें होय ब्रह्मार्पण ।। यानांव शुद्ध आराधन ।। भागवतधर्म पूर्ण यानांव राया ॥ ४५ ।। यापरी भगवद्भजनपथीं ।। भय नाहीं गा सर्वथा ॥ अभय पुसिलें नृपनाथा ॥ तें जाण तत्त्वतां भजनें होय ॥ ४६ ।। येथ भयाचें कारण ।। राया तूं ह्मणसी कोण ।। तेंही सांगों साधारण ।। ऐक श्रवणसौभाग्यनिधी ।। ४७ ।।

।। श्लोक ।। भयं द्वितीयाभिनिवेशतः स्यादीशादपेतस्य विपर्ययोऽस्मृतिः ।।
तन्माययाऽतो बुध आभजेत्तं भक्त्यैकयेशं गुरुदेवतात्मा ।। ३६ ।।

---

१ शुद्ध. २ नाहींशी झाली. ३ मनाचें दुःख. ४ समाधि घ्यायची, ही भाषा देहबुद्धीची. ५ समली समाधि ह्मणजे नुसतें देहाचें लांकूड बनविणें, त्यांत हंशील नाहीं. ६ सहज. ७ शरीराचें कर्म. ८ आगें येणें. ९ पापण्यांची उघड झांप. १० ईश्वरार्पण. ११ शरीर, गृह, जाति, आणि ब्रह्मचर्यादि अवस्थांमुळें. १२ आपले वांटयास. १३ मागून चालत आल्याप्रमाणें. १४ अहंकाररहित. १५ देंठा, कांट्यांसह गोडच. १६ गोड. १७ क्रिया समुदाय. १८ सगळा. १९ अंकुर. २० मध्यें. २१ प्रविष्ट जाहला. २२ खाद्य. २३ रीतीनें. २४ कसोटीवर. २५ सोनें [ उत्तम. ] २६ वाट. २७ तेवढा. २८ पोटावर. २९ शुद्ध. ३० पूजन. ३१ मार्ग.

*मो. महास्तवन. ×मो. ठसावे. +ना. लुंठत.

॥ टीका ॥ आत्मा पूर्णत्वें सर्वत्र एक ॥ तेथें ह्मणे मी वेगळा देख ॥ तेंचि अज्ञान भयजनक ॥ दुःखदायक अतिद्वंद्वें ॥ ४८ ॥ 'भयाचें दृढ मूळ अज्ञान' ॥ 'त्याचें निवर्तक मुख्यज्ञान' ॥ तेथें कां लागलें भगवद्भजन ॥ ऐसा ज्ञानाभिमान पंडितां ॥ ४९ ॥ ऐक राया येचि अर्थी ॥ 'ज्ञानासि कारण कृष्णभक्ति' ॥ हा कृतनिश्चयो आमच्या मतीं ॥ तेही उपपत्ती अवधारीं ॥ ॥ ४५० ॥ अज्ञानाचें मूळ माया ॥ जे ब्रह्मादिकां नये आया ॥ गुणमयी लागली प्राणियां ॥ जाण ते राया अतिदुस्तर ॥ ५१ ॥ ते मायेचें मुख्य लक्षण ॥ 'स्वस्वरूपाचें आवरण ॥ द्वैताचें जें स्फुरे स्फुरण' ॥ मूळमाया जाण ती नांव ॥ ५२ ॥ 'ब्रह्म अद्वयत्वें परिपूर्ण ॥ तें स्वरूपीं स्फुरे जें मीपण' ॥ तेंचि मायेचें जन्मस्थान ॥ निश्चयें जाण नृपनाथा ॥ ५३ ॥ जे मायेच्या निजपोटीं ॥ भयशोकदुःखांचिया कोटी ॥ ब्रह्मादिशिवाचे लागे पाठीं ॥ इतरांची गोठी त्या कोण ॥ ५४ ॥ ते महामायेची निवृत्ती ॥ करावया दादुगी भगवद्भक्ती ॥ स्वयें श्रीकृष्ण येचि अर्थी ॥ बोलिला अर्जुनाप्रती श्रीगीतेमाजी ॥ ५५ ॥

॥ भगवद्गीताश्लोकार्ध ॥ मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥

॥ टीका ॥ माया ह्मणिजे भगवत्शक्ती ॥ ×भगवद्भजनें तिची निवृत्ती ॥ आन उपाय तेथें नचलती ॥ भक्त सुखें तरती हरिमाया ॥ ५६ ॥ हरीची माया हरिभजनें ॥ हरिभक्तीं सुखेंचि तरणें ॥ हें निजगुह्य अर्जुना कारणें ॥ स्वयें श्रीकृष्णें सांगीतलें ॥ ५७ ॥ 'मायेची हेचि निजपुष्टी ॥ स्वरूपीं विमुख करी दृष्टी ॥ द्वैतभावें अत्यंतेंलाठी ॥ भयाची त्रिपुटी वाढवी सदा' ॥ ५८ ॥ 'भयाचें +जनक द्वैतभान ॥ द्वैताची जनक माया जाण ॥ मायानिवर्तक ब्रह्मज्ञान' ॥ हें संत सज्ञान बोलती ॥ ५९ ॥ ऐसें श्रेष्ठ जें ब्रह्मज्ञान ॥ तें भक्तीचें पोसणें जाण ॥ नकरितां भगवद्भजन ॥ ब्रह्मज्ञान कदा नुपजे ॥ ४६० ॥ जरी जाहले शास्त्रसंपन्न ॥ तिहीं नकरितां भगवद्भजन ॥ मायानिवर्तक *ब्रह्मज्ञान ॥ तयांसिही जाण कदा नुपजे ॥ ६१ ॥ शब्दज्ञानाचिया व्युत्पत्ती ॥ दांडुगी होय लौकिकस्थिती ॥ मायानिवर्तक ज्ञानप्राप्ती ॥ नकरितां हरिभक्ती कदा नुपजे ॥ ६२ ॥ 'हरिगुणाची रसाळ कहाणी ॥ ते ब्रह्मज्ञानाची निजजननी ॥ हरिनामाचे निज गर्जनीं ॥ जीव घेउनी माया पळे' ॥ ६३ ॥ माया पळतां पळों न लाहे ॥ हरिनामधाकें विरोनि जाये ॥ यालागीं हरिमाया पाहे ॥ वाउं नलाहे हरिभक्तां ॥ ॥ ६४ ॥ नामाची परम दुर्धरगती ॥ माया साहों न शके निजशक्ती ॥ हरिभक्त माया सुखें तरती ॥ यालागीं श्रीपती बोलिला स्वयें ॥ ६५ ॥ सायुज्यादि चार मुक्ती ॥ अंकीं वाढवी भगवद्भक्ती ॥ ते नकरितां अनन्यगती ॥ शास्त्रज्ञां मुक्ती नघडे कदा ॥ ६६ ॥ हरिभजनीं जे विमुख ॥ त्यांसि सदा द्वैत सन्मुख ॥ महाभयेंसी दुःखदायक ॥ प्रपंच देख दृढ वाढे ॥ ६७ ॥ जैशी एकाकी दिग्भ्रमू पडे ॥ तो पूर्व ह्मणे पश्चिमेकडे ॥ तैसी वस्तुविमुखें वाढे ॥ अतिगाढें

१ मुक्ति. २ आटोक्यांत. ३ सत्त्व, रजस्तमोमय. ४ झांकणें. ५ ज्या [मायेच्या.] ६ गोष्ट. ७ निवारण. ८ समर्थ, बळकट. ९ ईश्वराची शक्ति. १० पाठमोरी. ११ मोठी, पुष्ट. १२ उत्पादक. १३ मोठी, दांडगी. १४ सलोकता, समीपता, सरूपता, सायुज्यता. १५ दिशाभूल. १६ आत्मरूपाकडे पाठ केल्यामुळें द्वैत जोरानें.

ऽमो. त्याचें निर्विकल्प मुख्यज्ञान. *मो. गुणसंबंधी लागली प्राणियां. ×मो. भगवद्भजनेंचि. +मो. भाजन. *ना. मो. गुह्यज्ञान. 1मो. नातुडे. 6मो. प्रपंच दुःखें दृढ वाढे.

मिथ्याद्वैत । ६८ ॥ द्वैताचिये भेदविहिरे ॥ फुटती संकल्पविकल्पांचे झरे ॥ तेथं जन्ममरणांचेनि पूरे ॥ बुडे एकसरें ब्रह्मांडगोळ ॥ ६९ ॥ जन्ममरणांचिया वोढी ॥ नानादुःखांचिया कोडी ॥ अभक्त सोशिती सांकडीं ॥ *हरिभक्तांतें वोढी स्वप्नीं नलगे ॥ ४७० ॥ भक्तीचें अगाध महिमान ॥ तेथं रिघेना भवबंधन ॥ तें करावया भगवद्भजन ॥ सद्गुरुचरण सेवावे ॥ ॥ ७१ ॥ ' निजशिष्याची मरणचिंता ॥ स्वयें निवारी जो वस्तुतां ॥ तोचि सद्गुरु तत्त्वतां ॥ येर ते गुरुता मंत्रतंत्रोपदेशें ॥ ७२ ॥ मंत्रतंत्र उपदेशिते ॥ घरोघरीं गुरु आहेत आइते ॥ ' जो शिष्यासि मेळवी सद्वस्तूतें '॥ सद्गुरु त्यातें श्रीकृष्ण मानी ॥ ७३ ॥ गुरु देवो गुरु माता पिता ॥ गुरु आत्मा ईश्वरु वस्तुता ॥ गुरु परमात्मा सर्वथा ॥ गुरु तत्वतां परब्रह्म ॥ ७४ ॥ गुरूचे उपमे समान ॥ पाहतां जगीं नदिसे आन ॥ अगाध गुरूचें महिमान ॥ तो भाग्येंविण भेटेना ॥ ७५ ॥ निष्कामपुण्याचिया कोडी ॥ अगाध ×वैराग्य जोडे जोडी ॥ नित्यानित्यविवेक आवडी॥ तें पाविजे रोकडी सद्गुरुकृपा॥ ७६॥ सद्गुरु कृपा होता चेंढे॥ तेथें भक्तीचें भांडार उघडे॥ तेव्हां कळिकाळ पळे पुढें ॥ कायसें बापुडें भवभय ॥७७॥ गुरूतें ह्मणो मातापिता ॥ तें एक जन्मीं सर्वथा ॥ हा सनातन तत्त्वतां ॥ जाणपां वस्तुतां मायबापू ॥ ७८ ॥ अधोद्वारें उपजवितां ॥ ते लौकिकीं मातापिता ॥ अधोद्वारा आतळों नेदितां ॥ तो सद्गुरु पिता सत्यत्वें शिष्या ॥ ७९ ॥ गुरूतें ह्मणों कुलदेवता ॥ तिची कुळकर्मींच पूज्यता ॥ हा सर्वकर्मीं अकर्ता ॥ पूज्य सर्वथा सर्वार्थी ॥ ४८० ॥ गुरु ह्मणों देवासमान ॥ तंव देवांसि येणेंचेनि देवपण ॥ मा त्या सद्गुरुसमान ॥ केवीं जाण तुकेना ॥ ८१ ॥ गुरु ब्रह्म समसमान ॥ हेंही उपमा किंचित् न्यून ॥ गुरुवाक्यें ब्रह्मा ब्रह्मपण ॥ तें सद्गुरुसमान अद्वयत्वें ॥ ८२ ॥ यालागीं अगाध गुरुगरिमा ॥ उपमा नाहीं निरुपमा ॥ ब्रह्मीं ब्रह्मत्वप्रमाणप्रमा ॥ हे वाक्यमहिमा गुरूची ॥८३॥ ब्रह्म सर्वांचें प्रकाशक ॥ सद्गुरु तयाचाही प्रकाशक ॥ एवं गुरुहूनी अधिक ॥ नाहीं आणिक पूज्यत्वें ॥ ८४ ॥ यालागीं गुरूतें +मनुष्यबुद्धी ॥ पाहों नये गा त्रिशुद्धी ॥ ऐशिये भावार्थाचिये बुद्धी॥ सहजें चित्तशुद्धी साधिल्यां ॥८५॥ ज्याचा गुरुचरणीं निःसीमभावो ॥ त्याचा मनोरथ पुरवी देवो ॥ गुरु आज्ञा देव पाळी पहाहो ॥ गुरुवाक्यें स्वयमेवो जडमूढ तारी ॥ ८६ ॥ ब्रह्मभावें जे गुरुसेवक ॥ देव त्यांचा आज्ञाधारक ॥ त्यांसि नित्य पुरवी निजात्मसुखें ॥ हे गुरुमर्यादा देख नुल्लंघी देवो ॥ ८७ ॥ देव गुरुआज्ञा स्वयें मानी ॥ तंव गुरु देवाची पूज्यता आणी ॥ एवं उभयतां अभिन्नपणीं ॥ भावार्थियांलागोनी तारक ॥ ८८ ॥ सद्भाव नाहीं अभ्यंतरीं ॥ बाह्य भक्ति करिती मावेंचि करीं ॥ ते भावानुसारें संसारी ॥ नानापरी स्वयें ठकती ॥८९॥ ठकले ते मनुष्यगती ॥ ठकले ते निजस्वार्थी ॥ ठकले ते ब्रह्मप्राप्ती ॥ दंभें हरिभक्ती कदा नुपजे ॥ ४९० ॥ येथें भावेंविण तत्वतां ॥ परमार्थ नये हाता ॥ सकळसाधनांचे

१ भेदरूप डोहऱ्यांत. २ एकदम. ३ खेंच. ४ सखोल. ५ शिरेना. ६ वास्तविक. ७ माहात्म्य. ८ शाश्वत कोणतें, अशाश्वत कोणतें यांचा निवाडा. ९ प्राप्त होय. १० खजिना. ११ आईबाप. १२ फार जुना, सदांचा. १३ योनिमार्गानें. १४ स्पर्श न देतां. १५ कुलधर्मांतच. १६ गुरु. १७ तोलवत नाहीं. १८ परब्रह्मास. १९ गुरूचा मोठेपणा. २० आत्मसुख. २१ एकरूपानें. २२ ढोंगानें.

*मो. हरिभक्ताचें. ×मो. वैराग्यें. +ना. मर्त्यबुद्धी.

माथां ॥ जाण सर्वथा सद्भावो ॥ ९१ ॥ कोरडिये खांबीं सद्भावो ॥ तेथोंचि प्रगटे देवाधिदेवो ॥ मा सद्गुरु तेथ तो पहाहो ॥ स्वयें स्वयमेवो परब्रह्म ॥ ९२ ॥ यालागीं गुरुभजनापरता ॥ भजावया मार्ग नाहीं आम्हां ॥ ज्ञानभक्ती जे तत्वतां ॥ ते जाण सर्वथा सद्गुरुभक्ती ॥ ९३ ॥ गुरूहूनि श्रेष्ठ ब्रह्म ॥ म्हणतां गुरुत्वा आला कनिष्ठधर्म ॥ ऐसा भाव स्वयें धरितां विषम ॥ ब्रह्म-समसाम्य शिष्यांसि नुपजे ॥९४॥ 'आम्हां सद्गुरु तोचि परब्रह्म' ॥ ऐसा नित्य निजभाव सप्रेम ॥ हेचि गुरुसेवा उत्तमोत्तम ॥ शिष्य परब्रह्म स्वयें होय ॥ ९५ ॥ ऐसिये गुरुसेवे आर्त ॥ प्रल्हाद जाहला द्वंद्वातीत ॥ नारद स्वानंदें गात नाचत ॥ ब्रह्मसाम्यें विचरत सुरासुरस्थानें ॥ ॥ ९६ ॥ ऐशीचि सद्गुरुसेवा करितां ॥ चुकली अंबरीषाची गर्भव्यथा ॥ ते गर्भ जाहला देवचि साहता ॥ भक्तां भवव्यथा लागोंनेदी ॥ ९७ ॥ ऐसिया अभिन्नभावना ॥ सुबुद्धी भजती गुरुचरणा ॥ ते पढियंते जनार्दना ॥ त्यांशी भवभावना शिवोंनेदि ॥९८॥ गुरु ब्रह्म दोनी एक ॥शिष्यही असे तदात्मक॥ *तो भेदें सत्य मानी वेगळिक ॥ तेही मायिक कवि सांगे ॥९९॥

॥ श्लोक ॥ अविद्यमानोऽप्यवभाति हि द्वयोर्ध्यातुर्धिया स्वप्नमनोरथौ यथा ॥
तत्कर्मसंकल्पविकल्पकं मनो बुधो निरुंध्यादभयं ततः स्यात् ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ पुरुषासि जो प्रपंच दिसे ॥ तो नसतांचि मिथ्या आभासे ॥ जेवीं कां एकला निद्रावशें ॥ स्वप्नीं निजमानसें जग कल्पी ॥ ५०० ॥ ऐसें निद्रावशें दिसे स्वप्न ॥ जो जागा होवोनि आपण ॥ करूं बैसे मनोरथ ध्यान ॥ तो नसतेंचि जन वन एक ×एकत्वीं देखे ॥ ॥ १ ॥ होकां घालोनि आसन ॥ जो करी मूर्तिचिंतन ॥ त्यासि ध्येय ध्याता उपचार ध्यान ॥ नसतेंच जाण कल्पित भासे ॥ २ ॥ जेवीं धनलोभ्याचें हारपे धन ॥ परी वासना नसांडी धनध्यान ॥ धनातें आठवितां मन ॥ धनलोभी पूर्ण पिसें होये ॥ ३ ॥ मन स्वयें जरी नव्हे धन ॥ तरी धनाक्रोश आठवी मन ॥ तंव स्मृती वेंळधे रान ॥ द्रव्यमोहें पूर्ण पिसें होय ॥४॥ तेवीं व्यामोहाचें पूर्णभरित ॥ मिथ्या भासे देहादिद्वैत ॥ तें अहंभावें मानितां आप्त ॥ भवभय निश्चित आदळे अंगीं ॥ ५ ॥ भवभयाचें कारण ॥ 'मनीं कल्पना मुख्य जाण' ॥ त्या मनाचें करावें निरोधन ॥ सद्गुरुवचनें निजनिष्ठा ॥ ६ ॥ हें जाणोनि शिष्य ज्ञाते ॥ गुरुवाक्यें विश्वा-सयुक्तें ॥ विवेकवैराग्याचेनि हातें ॥ निजमनातें आकळिती ॥७॥ तेचि आकळती हातवटी ॥ संक्षेपें राया सांगेन गोष्टी ॥ सद्गुरुवाक्यपरिपाटी ॥ जो मनातें थांपटी निजनिष्ठा ॥८॥ चंच-ळत्वें विषयध्यान ॥ करितां देखे जें जें मन ॥ तें तें होय ब्रह्मार्पण ॥ सद्गुरुवचनें निजबोधें ॥९॥ धरूनियां विषयस्वार्थ ॥ मनें जो जो घेइजे अर्थ ॥ तो तो होय पूर्ण परमार्थ ॥ +हा अनुभव समर्थ गुरुकृपा ॥ ५१० ॥ जो भुंईभेणें पळों जाये ॥ तो जेथें पळे तेथें भुंये ॥ मग येणें जाणें स्वयं राहे ॥ ठायींच्या ठायीं पांगुळला ॥ ११ ॥ तैसें मनासि लाविजे वर्म ॥ जें जें देखे तें तें

---

१ श्रेष्ठ. २ निर्मळ भाव. ३ खांबांतून नृसिंह. ४ गुरूपणास. ५ कमीपणा. ६ सेवेनें. ७ शीत उष्ण इत्यादि द्वैताहून वेगळा. ८ देवदैत्यांची ठिकाणें. ९ सोशिता. १० संसाराचें दुःख. ११ शिवूं देत नाहीं. १२ झोपेच्या योगानें. १३ हरवतें. १४ रानोमाळ फिरते. १५ भुलीनें. १६ भरतें. १७ प्रिय, आपलेंसें. १८ थडके. १९ संयमन. २० आकळण्याची खुबी, शैली. २१ पद्धति. २२ स्थिर-करी. २३ आत्मबोधानें. २४ भुईच्या पृथ्वीच्या भीतीनें. २५ भुई. २६ लटका पडला.

*मा. जो भेद सत्यमानी वेगळीक. ×मो. एकत्वें. +मो. हा अनुग्रहो समर्थ सद्गुरु कृपेचा.

ब्रह्म ॥ जें जें करूं बैसे कर्म ॥ तेथें पुरुषोत्तम स्वयें प्रगटे ॥ १२ ॥ एवं इंद्रियवृत्ति उल्हाळे ॥ मोडिले गुरुवाक्य प्रतीतिबळें ॥ निजाधिष्ठानमेळें ॥ कळासले एके वेळे अखंडकुलुपें ॥ १३ ॥ ऐसें +जिर्णतां बाह्यकर्म ॥ मनाचा मोडे द्वैतभ्रम ॥ तंव सबाह्यपरब्रह्म ॥ पूर्ण चिद्व्योमें कोंदाटे ॥ १४ ॥ ऐसें भजनें मन नेमितां स्वयें ॥ नरिघे *कल्पांतकाळभयें ॥ भक्त होऊनियां निर्भयें ॥ विचारती स्वयें निःशंकें ॥ १५ ॥ हे अगाध निष्ठा परिपूर्ण ॥ बाळ्याभोळ्या नटके जाण ॥ यालागीं सुगमसाधन ॥ सांगेन आन तें ऐक ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ शृण्वन् सुभद्राणि रथांगपाणेर्जन्मानि कर्माणि च यानि लोके ॥
गीतानि नामानि तदर्थकानि गायन्विलज्जो विचरेदसंगः ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ तरावया बाळेभोळे जन ॥ मुख्य चित्तशुद्धीचें कारण ॥ जन्म कर्म हरीचे गुण ॥ करावे श्रवण अत्यादरें ॥ १७ ॥ चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता ॥ जेणें सादरें ऐके माता ॥ तेणें आदरें हरिकथा ॥ सार्थकता परिसावी ॥ १८ ॥ हरीचीं जन्मकर्में अनंतगुण ॥ म्हणाल त्यांचें नव्हे श्रवण ॥ लोकप्रसिद्ध जें जें पुराण ॥ तें श्रद्धा संपूर्ण ऐकावीं ॥ १९ ॥ बहुदेव बोलिलें पुराणीं ॥ तेही लागती ज्याचे चरणीं ॥ तो चक्रधर चक्रपाणी ॥ जो वेदीं पुराणीं वंदिजे ॥ ५२० ॥ त्याचीं जीं जीं जन्में अतिअद्भुत ॥ जीं जीं कर्में परमार्थयुक्त ॥ जीं स्वमुखें बोलिला भगवंत ॥ तीं तीं ज्ञानार्थ परिसावीं ॥ २१ ॥ जें जें केलें पुराणश्रवण ॥ तें तें व्यर्थ होय मननेंविण ॥ यालागीं श्रवणाचें मनन ॥ सावधान करावें ॥ २२ ॥ मोलें जे गाय घेतली ॥*ते दोहवेना उपेक्षिली ॥ ते जैसीका सुनाट गेली ॥ तेवीं श्रवणें×झालीं मननेंविण ॥ २३ ॥ 7तेचि गाय दानासि दिधली ॥ तरी अक्षई दुभिन्नली ॥ तेवीं श्रवणें मननार्था आलीं ॥॥अक्षय फळीं फळोन्मुखें ॥२४॥ तेवीं केलें जें श्रवण॥ तें मननें परमपावन ॥ तेंचि उपेक्षितां जाण ॥ परिपाकीं पूर्ण वांझें होय ॥ २५ ॥ हरिनाम पडतां श्रवणीं ॥ एका गिळुनी जाय वदनीं ॥ एका कानींचे ते कानीं ॥ जाय निघोनी हरिनाम ॥ २६ ॥ हरिनाम पडतां श्रवणी ॥ जयाचे रिघे अंतःकरणीं ॥ सकळ पापा होय धुणी ॥ हरिचरणीं तो विनटे ॥ २७ ॥ यापरी श्रवणीं श्रद्धा ॥ मननयुक्त धरितां सदा ॥ तेणें बाधीना विकल्पबाधा ॥ चित्तवृत्ति शुद्धा स्वयें होये ॥२८॥ ऐसें मननयुक्त श्रवण ॥ करितां वोसंडे हर्ष पूर्ण॥ तेणें हर्षें हरिकीर्तन ॥ करी आपण स्वानंदें ॥ २९ ॥ हरिचरित्रें अगाध ॥ ज्ञानमुद्रापदबंध ॥ कीर्तनीं गातां विशद ॥ परमानंद वोसंडे ॥ ५३० ॥ वानिती अजन्मयाचीं जन्में ॥ वानिती अकर्मियाचीं कर्में ॥ स्मरती अनामियाचीं नामें ॥ अतिसप्रेमें डुल्लत ॥ ३१ ॥ साधावया निजकाज ॥ सांडूनि लौकिकाची लाज ॥ कीर्तनीं नाचती भोंजें ॥ अतिनिर्लज्ज निःशंक ॥

१ उमाळे, उर्मी. २ आपल्या अधिष्ठानामुळें. ३ बंद केले ( कुलूप घालून. ) ४ नियमितां, आवरितां. ५ चैतन्यरूप आकाश. ६ भेरे. ७ निर्भय. ८ मोधे. ९ सांपल्याची बातमी. १० अगत्यपूर्वक. ११ फलतः, अखेरीस. १२ निष्फळ, व्यर्थ. १३ कल्पना. १४ सांडूं लागे. १५ वर्णितां. १६ आत्महित. १७ उत्साहानें.

+मो. नेमिता. *मो. कल्पांतकाळीं. *मो. ते न दोहे ना दान केली. ×मो. उपेक्षिली. 7मोलें घेतली जे गाय, दुभतें खातां विषयीं होय, तेंचि दान देतां लवलाहे, दुभली होय परमामृतें.

॥ ३२ ॥ कीर्तनें निर्दाळिले दोष ॥ जप तप ठेले निरास ॥ यमलोक पाडिला वोस ॥ तीर्थांची आस निरास जाहली ॥ ३३ ॥ यमानियमा पडली उपवास ॥ मरों टेंकले योगाभ्यास ॥ कीर्तनगजरें हृषीकेश ॥ निर्दाळी दोष नाममात्रें ॥ ३४ ॥ कीर्तनाचा घडघडाट ॥ आनंद कोंदला उद्भट ॥ हरखें डोले वैकुंठपाठ ॥ तेणें सुखें नीलकंठ तांडवनाचे ॥ ३५ ॥ यापरी हरिकीर्तन ॥ देत परम समाधान ॥ हा भक्तिराजमार्ग पूर्ण ॥ ये मार्गीं संरक्षण चक्रपाणी कर्ता ॥ ॥३६॥ चक्र घेऊनी भक्ताचेठायीं ॥ म्हणसी तुझें कार्य कायी ॥ मज जगीं वैरीया नाहीं ॥ भक्तद्वेषी पाही निजशस्त्रें नाशीं ॥ ३७ ॥ चक्रें अभिमान करी चेंदा ॥ मोह ममता छेदी गदा ॥ शंख उद्बोधी निजबोधा ॥ निजकमळें सदा निजभक्त पूजी ॥ ३८ ॥ जेथें चक्रपाणी रक्षिता ॥ तेथें नरिघे भवभयाची कथा वार्ता ॥ यापरी कीर्तिमंता ॥ हरी सर्वथा संरक्षी ॥ ३९ ॥ ज्यांसी न करवे कथाश्रवण ॥ अथवा नटके हरिकीर्तन ॥ तिहीं करावें नामस्मरण ॥ रामकृष्ण गोविंद ॥ १४० ॥ अच्युतनामाची निजख्यातीं ॥ 'चेवल्या कल्पांतीं होनेदीं च्युती' ॥ त्या नामातें जे नित्य स्मरती ॥ ते जाण निश्चितीं अच्युतावतार ॥ ४१ ॥ श्रीरामकृष्णादिनाम×श्रेणी ॥ अखंड गर्जे ज्याची वाणी ॥ त्यासि तीर्थें येती लोटांगणीं ॥ सुरवर चरणीं लागती स्वयें ॥ ४२ ॥ बाप, नामाचें निजतेज ॥ यम वंदी चरणरज ॥ नामापाशीं अधोक्षज ॥ चतुर्भुज स्वयें तिष्ठे ॥ ४३ ॥ नामाचेनि पडिपाडें ॥ कायिसें भवभय बापुडें ॥ कळिकाळाचें तोंड कोणीकडे ॥ नामापुढें रिघावया ॥ ४४ ॥ जेवढी नामाची निजशक्ती ॥ तेवढें पाप नाहीं त्रिजगतीं ॥ नामापाशीं चारीमुक्ती ॥ जाण निश्चितीं विदेहा ॥ ४५ ॥ ऐक राया सावधान ॥ 'नामापरतें सुगम साधन ॥ सर्वथा नाहीं नाहीं' आन ॥ निश्चयें जाण नेमस्त ॥४६॥ जन्मनाम ⁰कर्में श्रीधर ॥ श्रवणें उद्धरती पामर ॥ यालागीं हरिलीलासुभद्र ॥ शास्त्रज्ञ नर वर्णिती ॥ ४७ ॥ ऐसा बाणल्या भक्तियोग ॥ नधरी जाणपणाची फुगे ॥ त्यजूनी 'अहंममता' पांगें ॥ विचरती निःसंग *हरिकीर्तनीं ॥४८॥ करितां श्रवण स्मरण कीर्ती ॥ तेणें वाढे सप्रेमभक्ती ॥ भक्त विसरे देहस्फूर्ती ॥ ऐक ते स्थिती सांगेन राया ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ एवं व्रतः स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्त उच्चैः ॥ हसत्यथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ हरिनामगुणकीर्तनकीर्तीं ॥ अखंड आवडे जागृतीं ॥ स्वप्नींही +तेचि स्थिती ॥ दृढ हरिभक्ती ठसावे ॥१५०॥ ऐशियापरी भक्तियुक्त ॥ दृढतर जाहलें ज्याचें व्रत ॥ तंवतंव होय आर्द्रचित्त ॥ प्रेमअद्भुत हरिनामकीर्तीं ॥ ५१ ॥ आत्मा परमप्रिय हरी ॥ त्याचे नामकीर्तीचा हर्ष भारी ॥ नित्यनवी आवडी वरी ॥ सबाह्याभ्यंतरीं हरि प्रगटे ॥५२॥ चुकल्या मायपुत्रा संकटीं ॥ एकाएकीं बहुकाळें जाहल्या भेटी ॥ तेणें ⁶वोरंडें घालोनि मिठी ॥ चाले जेवीं

१ नाहींसे केलें. २ निराश. ३ आशा. ४ भरला. ५ अतिशय. ६ शंकर. ७ भक्ताचा वैरी. ८ आत्मज्ञानास. ९ श्रेश. पट्टणें. १० पायाची धूळ. ११ तुलनेनें. १२ सुलक्षण. १३ अनुभवास आला असतां. १४ गर्व (ज्ञातेपणाचा) १५ बंधन पारतंत्र्य. १६ द्रवीभूत अंतःकरण. १७ गोडी. १८ मायलेकांस. १९ आक्रोश पूर्वक, सवेग.

×ना. स्मरणी. ⁰मो. कर्म. *मो. हरिकीर्तनें. +ना. त्याची. ⁶मो. वोरसे.

पोटीं अनिवार रुदन ॥ ५३ ॥ तेवीं जीवेशिवां अवचटी ॥ भक्तीचे पेठे जाहली भेटी ॥ आत्मसाक्षात्कारें पडे मिठी ॥ ते संधीमाजी उठी अनिवार रुदन ॥ ५४ ॥ परमात्मयासि आलिंगन ॥ तेणें अनिवार स्फुंदन ॥ रोमांचित रुदन ॥ सप्रेमें पूर्ण अंसोसें करी ॥ ५५ ॥ सर्वेंचि गदगदोनि हांसे ॥ माझा मी मजमाजींच असें ॥ चुकलों भेटलों हें ऐसें ॥ देखोनि आपुलें पिसें हांसोंचि लागे ॥ ५६ ॥ मी अखंडत्वें स्वयें संचलों ॥ अभेदपूर्णत्वें अनादि ग्चलों ॥ तो मी अव्ययो ह्मणे ' जाहलों मेलों ' ॥ येणें आठवें डोलडोलों हांसोंचि लागे ॥५७॥ ५ठतां दोराच्या सर्पाभेणें ॥ पडे अडखळे भयें पूर्ण ॥ तोचि दोरातें वोळखोन ॥ आपणिया आपण स्वयें हांसे ॥ ५८ ॥ तेवीं संसाराचा अभावो ॥ देहभाव समूळ वावो ॥ तेथें नाथिली ममता अहंभावो ॥ मज होता पहाहो ह्मणूनी हांसे ॥ ५९ ॥ बाप, गुरुवाक्य निजनिर्वाहो ॥ देहीं असतां विदेहभावो ॥ माझे चारी देह जाहले वावो ॥ येणें अनुभवें पाहाहो गर्जों लागे ॥ १६० ॥ ह्मणे धन्यधन्य भगवद्भक्ती ॥ जिणें मिथ्या केल्या चारी मुक्ती ॥ मी परमात्मा निजनिश्चितीं ॥ येणें उल्हासें त्रिजगतीं गर्जवी गजरें ॥ ६१ ॥ धन्य भगवंताचें नाम ॥ नामें *केलों नित्यनिष्काम ॥ समूळ मिथ्या भवभ्रम ॥ गर्जोनि निःसीम हाक फोडी ॥६२॥ आतां दुजेंचि नाहीं त्रिलोकीं ॥ दिसे तें तें मीच मी कीं ॥ मीच मी तो एकाकी ॥ येणें वाक्यें अलोलिकी हाक फोडी ॥ ६३ ॥ दुर्धर भवबंध ज्याचेनी ॥ निःशेष गेला हारपोनी ॥ त्या सद्गुरूच्या निजस्तवनीं ॥ गर्जवी वाणी अलोलिक ॥ ६४ ॥ ह्मणे संसार जाहला वावो ॥ जन्ममरणांचा असंभवो ॥ कळिकाळासि नाहीं ठावो ॥ ह्मणोनि पाहाहो हाक फोडी ॥६५॥ ऐशा हाकावरी हाका ॥ फोडूं लागे अलोकिका ॥ स्वयेंचि गोये निजात्मसुखा ॥ स्वानंदें देखा डुलत ॥ ६६ ॥ परमसख्याची गोड कथा ॥ तृप्ती नबाणे स्वयें सांगतां ॥ तेवीं निजानुभवें हरि गातां ॥ धणी सर्वथा पुरेना ॥ ६७ ॥ त्याचें गाणें ऐकतां ॥ सुखरूप होय सज्ञान श्रोता ॥ मुमुक्षां होय परमावस्था ॥ जरी तो अवचिता गावों लागे ॥ ६८ ॥ गातां पदोपदीं निजसुख ॥ कोंदाटे अधिकाधिक ॥ वोसंडतां परमहरिख ॥ स्वानंदें अलोलिक नाचोंचि लागे ॥ ६९ ॥ सारूनि दुजेपणाचें काज ॥ निरसोनि लौकिकाची लाज ॥ अहंभावेंविण सहज ॥ आनंदाचें भोज अलोलिक नाचे ॥ १७० ॥ जो मोलें मदिरा खाये ॥ तो *मदिरानंदें नाचे गाये ॥ जेणें ×ब्रह्मानंद सेविला आहे ॥ तो केवीं राहे आवरला ॥ ७१ ॥ यालागीं तो लोकबाह्यता ॥ स्वयें नाचे ब्रह्मउन्मादता ॥ लोक मानिती तया पिशाचता ॥ हा बोध पंडितां सहसा न कळे ॥ ७२ ॥ त्याचिया निजबोधाची कथा ॥ ऐक सांगेन नृपनाथा ॥ एक भगवंतावांचूनि सर्वथा ॥ त्यासि लौकिकता दिसेना ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ खं वायुमग्निं सलिलं महीं च ज्योतींषि सत्वानि दिशो द्रुमादीन् ॥
सरित्समुद्रांश्च हरेःशरीरं यत्किंचभूतं प्रणमेदनन्यः ॥ ४१ ॥

---

१ जीवात्मा आणि परमात्मा. २ अकस्मात्. ३ पेठेंत, बाजारांत. ४ श्वास टाकून फुंदत. ५ सर्प भयानें. ६ नसती. ७ स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण. ८ संसाराची भ्रांति. ९ गातो. १० अत्यंत प्रियमित्राची. ११ होत नाहीं. १२ इच्छा, तृप्ति. १३ पिसाटपण, खुळ.

*मो. केलें. *मो. मदिराछंदें. ×मो. ब्रह्ममद.

॥ टीका ॥ ब्रह्मउन्मादपरमानंदें ॥ जंव जंव पाहे स्वानंदबोधें ॥ तंवतंव चराचर ×पूर्णानंदें ॥ देखे *स्वानंदकंदें दुमदुमित ॥ ७४ ॥ पृथ्वी आप तेज वायु नभ ॥ देखे हरिरूप स्वयंभ ॥ भूतें महाभूतांचें +डिंब ॥ नदेखे भिन्नकोंभ *अभिन्नत्वें ॥ ७५ ॥ जेवीं नमेळवितां मेळा ॥ पाहतां जैसा केळीचा कळा ॥ स्वयें विकासे कळांदळा ॥ तेवीं वस्तु हे पांचाळा भूतभौतिकात्मक ॥ ७६ ॥ जेवीं कांतोनियां रंध्रमेळें ॥ स्फटीकदीपगृहअंगमेळें ॥ चितारिलीं अश्वगजदळें ॥ तीं भासती सोज्वळें आंतुलेनि दीपें ॥ ७७ ॥ तेवीं सोमसूर्यादितेजशक्ती ॥ कां वन्हिनक्षत्रें जीं लखलखिती ॥ जननयनादिनिजदीप्ती ॥ देखे आत्मज्योती सतेज ॥ ७८ ॥ युक्ती मेळवितां द्रव्यांतर ॥ अग्नि परी भासे पुष्पाकार ॥ तेवीं वस्तु स्वलीला साकार ॥ रविचंद्राकार नानात्वें भासे ॥ ७९ ॥ पृथ्वी गंधरूप स्वयें असे ॥ तो गंध कस्तूर्यादिकीं आभासे ॥ तेवीं भगवत्सत्ता सर्वत्र असे ॥ परी सात्विकीं दिसे अतिप्रगट ॥ ८० ॥ यालागीं सात्विकाचेठायीं सत्व ॥ तें तें दिसे भगवत्तत्व ॥ सत्वें सत्ववंतां महत्त्व ॥ अतिमान्यत्व हरिरूपें ॥ ८१ ॥ पृथ्वीस जळआवरण आहे ॥ तेंचि चतुःसमुद्रां नांव लाहे ॥ तैसे देवाचेंचि अंग पाहे ॥ दिशत्वें वाच्य होये जगदीशत्वें ॥ ८२ ॥ पूर्वपश्चिमादि नियोग ॥ दशदिशांचे दिग्विभाग ॥ तेही देवाचेंचि अंग ॥ तद्रूपें श्रीरंग स्वयें भासे ॥ ८३ ॥ तृण दूर्वा दर्भ द्रुम ॥ देखोनि म्हणे हें हरीचे रोम ॥ अनोळखों हें अनिश्चिम ॥ निजांगीं सर्वसम निजरूप पाहतां ॥ ८४ ॥ जैसा आपुल्या आंगोळिया ॥ गणितां दिसती वेगळालिया ॥ परी असतां लागलिया ॥ स्वयें सगळिया अखंड अंगीं ॥ ८५ ॥ तेवीं वन, वल्ली, दर्भदांग ॥ देखोनि म्हणे हें हरीचें अंग ॥ अन्यथाभावें खगवग ॥ भिन्नभाग देखेना ॥ ८६ ॥ म्हणे दूर्वा द्रुम वनवल्ली ॥ हेचि अनंतकोटी रोमावळी ॥ हरीचेनि अंगें असे वाढली ॥ त्या निजशोभा शोभली हरिरूपत्वें ॥ ८७ ॥ जेवीं वडाच्या पारंबिया ॥ लांबोनि वाढती वेगळालिया ॥ त्याही वडरूपेंचि संचलिया ॥ वडसों मुकलिया म्हणोंचि नये ॥ ८८ ॥ तेवीं चैतन्यापासोनि बोध ॥ निघाले सरितारूपें अनेग ॥ तेही चैतन्यघन चांग ॥ चिद्रूपें सांग सदा वाहती ॥ ८९ ॥ होकां चंद्रबिंबीं अमृत जैसें ॥ बिंबीं बिंबरूप होऊनि असे ॥ तेवीं भगवंतीं समग्र भासे ॥ भजनविश्वासें भगवद्रूप ॥ ९० ॥ ऐसे वेगळेवेगळे भाग ॥ पाहतां उल्हासे जंव चांग ॥ तंव अवघें उघडें अंग ॥ देवोचि सांग स्वयें जाहला ॥ ९१ ॥ यालागीं सर्वभूतांचे ठायीं ॥ अनन्यशरण कैसा पाहीं ॥ लवण जैसें सागरा पाहीं ॥ ठायींच्याठायीं जडोनि ठाके ॥ ९२ ॥ तेथें मुंगी देखोनि जाण ॥ हरिरूपीं वंदी आपण ॥ मशकासीही अनन्यशरण ॥ घाली लोटांगण भगवद्रूपें ॥

१ अपत्य. २ निराळा अंकुर. ३ कोंभ. ४ कोरून, उकरून. ५ भोंक पाडण्याच्या सर्ळईनें. ६ स्फटिकमयदीपगृहानें अंगावर. ७ घोडा हत्ती वगैरे सैन्यसमुदाय. ८ युक्तीनें. ९ मिसळिलीं असतां. १० नानाद्रव्यें. ११ दारुकामांतील बाण, फुलबाज्या, नळे इत्यादिकांतील फुलाच्या रूपानें. १२ वृक्ष. १३ केस. १४ ओळखीत नाहीं. १५ बेटें. १६ दर्भांचें अरण्य. १७ वडपणास. १८ अनेक. १९ समुद्र. २० मीठ.

**×ना. परमानंदे. *ना. स्वानंदे दुमदुमीत. +मो. बिंब. *ना. अभिन्नत्वाचा. ।ना. युक्त. ०मो. साधार. ६ना. स्वयंभ. ७भगवत्सत्व. २मो. नियोग. ३मो. लांबोनी. ८मो. समग्र. ०मो. हरिरूपें.**

॥ ९३ ॥ गो खेर चांडाळ, श्वानें ॥ अतिनिंद्य जे हीन जन ॥ ते भगवद्रूप देखोनि पूर्ण ॥ घाली लोटांगण अनन्यभावें ॥ ९४ ॥ हरिरूपें देखे तृण ॥ भगवद्रूपें वंदी पाषाण ॥ जंगमस्थावरादिकां शरण ॥ घाली लोटांगण चिदैक्यभावें ॥ ९५ ॥ करितां हरिनामस्मरणकीर्ती॥ एकाएकीं एवढी प्राप्ती ॥ झाली ह्मणशी कैशारीतीं ॥ ऐके नृपती तो भावो ॥ ९६ ॥ करितां पूजाविधिविधान ॥ कां श्रवण स्मरण कीर्तन ॥ सर्वदा चिदैक्यभावना पूर्ण ॥ पूर्ण प्राप्ति जाण त्यातेंचि वरी ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ भक्तिः परेशानुभवो विरक्तिरन्यत्र चैष त्रिक एककालः ॥ प्रपद्यमानस्य यथाऽश्नतः स्युस्तुष्टिः पुष्टिः क्षुदपायोऽनुघासम् ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ ऐक विदेहा चक्रवर्ती ॥ ऐशी जेथें भगवद्भक्ती ॥ तीपाशीं विषयविरक्ती ॥ ये धांवती गोवत्सन्यायें ॥ ९८ ॥ हें असो, जेवीं जोंवळीं फळें ॥ होनेणें येरयेरां वेगळें ॥ तेवीं भक्ति विरक्ती एकेकाळें ॥ भक्त तेणें बळें बलिष्ठ होती ॥ ९९ ॥ जेथे भक्ति आणि विरक्ती ॥ बांदां लागती सहजस्थितीं ॥ तेथेंचि पूर्णप्राप्ती ॥ दासीच्या स्थितीं सर्वदा राबे॥६००॥ यापरी भगवद्भक्ती॥ पूर्ण दाटुगी त्रिजगतीं ॥ यालागीं भक्तांवरी नांदे प्राप्ती ॥ भक्तिविरक्ती निजयोगें ॥ १ ॥ भक्ति, विरक्ती, अनुभवप्राप्ती ॥ तिन्ही एकेकाळें होती ॥ ऐक राया तेही स्थिती ॥ विशदोक्ती सांगेन ॥ २ ॥ जैशी कीजे भगवद्भक्ती ॥ तैसीच होय विषयविरक्ती ॥ तदनुसार अनुभवस्थिती ॥ ती भक्त पावती तेत्रि क्षणीं ॥ ३ ॥ जेवीं कां क्षुकेलियापाशीं ॥ ताट वाढिलें षड्रसीं ॥ तो तुष्टि पुष्टि क्षुधानाशी ॥ जेवीं ग्रासोग्रासीं स्वयेंचि पावे ॥ ॥४॥ जितुकाजितुका घेईजे ग्रास ॥ तितुकातितुका क्षुधेचा नाश ॥ तितुकाचि पुष्टिविन्यास ॥ सुखोल्हास तितुकाची ॥ ५ ॥ पुष्टि तुष्टि क्षुधानाशनी ॥ जेवीं एकेकाळें येती तिनी ॥ भोक्ता पावे स्वयें भोजनीं ॥ तेवीं भगवद्भजनीं भक्त्यादि त्रिक ॥ ६ ॥ सद्भावें करितां भगवद्भक्ती ॥ भक्ति विरक्ती भगवत्प्राप्ती ॥ तिनी येकेकाळें होती ॥ ऐशिया युक्तीं जाणिजे राया ॥ ॥ ७ ॥ भक्ती ह्मणिजे 'सर्वभूतीं ॥ *सप्रेमें भजे भजनयुक्ती' ॥ प्राप्ती ह्मणिजे 'अपरोक्षस्थिती'॥ भगवत्स्फूर्ती ×अनिवार ॥ ८ ॥ विरक्ती ह्मणिजे ऐसि पहाहो ॥ स्त्रीपुत्रदेहादि अहंभावो ॥ समूळ जेथें होय वांवो ॥ विरक्तीनिर्वाहो या नांव राया ॥ ९ ॥ यापरी भजनाचे पोटीं ॥ भक्ति विरक्ती प्राप्ति त्रिपुटी ॥ ऐक्यभावें +सद्भक्तां उठी ॥ हरिभजनदिठी एकेचि काळें ॥ १० ॥ यालागीं राया निजहितार्थी ॥ *आदरें करावी हरिभक्ती ॥ तेणें अवश्य भगवत्प्राप्ती ॥ उपसंहारार्थी कवी सांगे ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ इत्यच्युतांघ्रिं भजतोऽनुवृत्त्या भक्तिर्विरक्तिर्भगवत्प्रबोधः ॥ भवंति वै भागवतस्य राजंस्ततः परां शांतिमुपैति साक्षात् ॥ ४३ ॥

---

१ गाय. २ गाढव. ३ कुत्रे. ४ सार्वभौम, राजा. ५ जुळें, जोड. ६ दासीप्रमाणें. ७ रहाटे, वागे. ८ तीन लोकांत. ९ अनुभवज्ञान. १० स्पष्ट बोलण्यानें. ११ विषयावर वैराग्य. १२ भुकेचा नाश. १३ साक्षात्कार. १४ व्यर्थ.

*मो. सप्रेमभजन युक्ती. ×ना. अनावर मो. भगवंतस्थिती अनिवारक. +ना. सद्भावें. *मो. अवश्य.

॥ टीका ॥ यापरी अनन्यभक्ती ॥ जे सर्वदा सर्वभूतीं करिती ॥ ते भक्ति विरक्ति भगवत्प्राप्ती ॥ सहजें पावती अनायासें ॥ १२ ॥ राया हरिभक्ति दिव्यांजन ॥ तें लेऊनि भक्तसज्जन ॥ साधिती भगवन्निधान ॥ निजभजनमहायोगें ॥ १३ ॥ करितां ऐक्यभावें निजभक्ती ॥ उत्कृष्ट उपजे पूर्ण शांति ॥ तेणें होय असताची निवृत्ती ॥ भक्तां पूर्णप्राप्ती परमानंदत्वें ॥ १४ ॥ यालागीं धन्य भगवद्भक्त ॥ इंद्रियीं वर्ततां; विषयीं विरक्त ॥ देहीं असोनि देहातीत ॥ नित्यमुक्त हरिभजनें ॥ १५ ॥ भावें करितां भगवद्भक्ती ॥ भक्त मुक्तिही नवांछिती ॥ तरी त्यांपाशीं चारी मुक्ती ॥ दास्य करिती सर्वदा ॥ १६ ॥ हा भागवताचा निजमहिमा ॥ अनुपम्य, नाहीं उपमा ॥ भावें भजोनि पुरुषोत्तमा ॥ परमात्मगरिमा पावले ॥ १७ ॥ अगाधभगवंताची भक्तां ॥ भक्तांची *उत्कृष्टप्राप्ती ॥ ऐकतां विदेहचक्रवर्ती ॥ आश्चर्यचित्तीं चमत्कारिला ॥ १८ ॥ म्हणे धन्य धन्य +भगवद्भजन ॥ हरिखें कवीस लोटांगण ॥ घालितां चालिलें स्फुंदन ॥ रोमांचितनयन अश्रुपूर्ण जाहले ॥ १९ ॥ आनंदें स्वेदें कांपत ॥ नावेक राहिला तटस्थ ॥ सर्वांचि जाहला मावाचित ॥ म्हणे क्षणी हे महंत नपुसतां जाती ॥ २० ॥ ऐशिया अतिकाकुळतीं ॥ नेत्र उघडोनि पाहे नृपती ॥ बैसली देखोनि मुनिपंक्ती ॥ अतिशयें चित्तीं सुखावला ॥ २१ ॥ तेणें संतोषें डोलत ॥ म्हणे पूर्णप्राप्त भगवद्भक्त ॥ जगीं कैसेकैसे वर्तत ॥ तें चिन्हें समस्त पुसता होय ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ अथ भागवतं ब्रूत यद्धर्मो यादृशो नृणाम् ॥ यथा चरति यद्ब्रूते यैर्लिंगैर्भगवत्प्रियः ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ भक्तां पूर्णप्राप्ति सुगम ॥ ऐकतां राजा निवाला परम ॥ तो भागवतचिन्हानुक्रम ॥ समूळ सधर्म पुसत ॥ २३ ॥ विदेह म्हणे स्वामी मुनी ॥ पूर्णप्राप्तितें आकळोनी ॥ ते भक्त कैसे वर्तती जनीं ॥ तीं लक्षणें श्रवणीं लेववा मज ॥ २४ ॥ भक्तलक्षणभूषण ॥ तेणें मंडित करा श्रवण ॥ ×सावधान ऐकतां संपूर्ण ॥ होईजे आपण भगवत्प्रिय ॥ २५ ॥ त्यांचा कोण धर्म कोण कर्म ॥ कैसे वर्तती भक्तोत्तम ॥ हृदयीं धरोनि पुरुषोत्तम ॥ त्यांचें बोलणें वर्म तें कैसें ॥ २६ ॥ कोणेपरी कैशा ÷रीती ॥ हरिभक्त हरीस प्रिय होती ॥ ऐशिया लक्षणांचिया पंक्ती ॥ समूळ मजप्रती सांगिजे स्वामी ॥ २७ ॥ विदेहाच्या प्रभावरी ॥ संतोषिजे मुनीश्वरीं ॥ कविधाकुटा जो कां हरी ॥ तो बोलावया वरी ०सरसावला ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ हरिरुवाच ॥ सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ॥ भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ हरि म्हणे रायाप्रती ॥ अमित भक्तलक्षणस्थिती ॥ ऐक दिगंबरत्वें वर्तती ॥

१ ज्या अंजनानें ठेवा दिसतो तें. २ ईश्वररूप ठेवा. ३ शरीराहून वेगळे. ४ चाकरी. ५ ईश्वराप्रमाणें मोठेपणा. ६ आनंदानें घामानें. ७ क्षणभर. ८ श्रेष्ठ, साधु आर्षभ बंधु. ९ घाला. १० कान. ११ ईश्वरास आवडला. १२ कवीचा धाकटा बंधु हरि नांवाचा. १३ वाणीनें. १४ कोणी.

*मो. उत्कर्ष प्राप्ती. +ना. मो. भक्तजन. ×मो. सावध. ÷मो. स्थिती. ०मो. संतोषला.

एक स्वाश्रमस्थिती निजाचारें ॥ २९ ॥ एक सदा पडले असती ॥ एकाची ते उन्मत्तस्थिती ॥ एक सदा गाती नाचती ॥ एक ते होती अबोलणे ॥६३०॥ एक गर्जती हरिनामें ॥ एक निर्दाळिती निजकर्में ॥ एक भूतदयाळू दानधर्में ॥ एक भजननेमें *राहती ॥ ३१ ॥ ऐशा अनंत भक्तस्थिती ॥ +सांगतां सांगावया नाकळे वृत्ती ॥ त्यांमाजी मुख्य मुख्य संकेळिती ॥ राया तुजप्रती सांगेन ॥ ३२ ॥ ' पूर्णप्राप्तीचा मुख्य ठावो ॥ सर्वभूतीं भगवद्भावो '॥ हाचि भक्तीचा पूर्णगौरवो ॥ तोचि अभिप्रावो हरि सांगे ॥ ३३ ॥ सर्वभूतीं मी भगवंत ॥ सर्वभूतें तीं मज आंत ॥ भूतें भूतात्मा मीचि समस्त ॥ मीच मी येथ परमात्मा ॥ ३४ ॥ ऐसें जें पूर्णत्वाचें मीपण ॥ तेणें वाढे आत्माभिमान ॥ सहज ×निजनिराभिमान ॥ तें शुद्धलक्षण ऐक राया ॥ ३५ ॥ ०शुद्धभक्तांचें निजलक्षण ॥ चौथेही न धरिती मीपण ॥ तेंही माननियां गौण ॥ भावना पूर्ण त्यांची ऐसी ॥ ३६ ॥ सर्वभूतीं भगवंत ॥ भूतें भगवंतीं वर्तत ॥ भूतें भूतात्मा तोचि समस्त ॥ मी ह्मणतें तेथें ⁹मीपणा नये ॥ ३७ ॥ सर्वभूतीं भगवंत पाही ॥ भूतें भगवंताचें ठायीं ॥ हें अवघें जो स्वदेहीं ॥ स्वस्वरूपें पाही स्वयें होय ॥ ३८ ॥ तो भक्तांमाजी श्रेष्ठ ॥ तो भागवतांमाजी वरिष्ठ ॥ त्यासि उत्तमत्वाचा पट्ट ॥ अवतार श्रेष्ठ मानिती ॥ ३९ ॥ तो योगियांमाजी अग्रगणी ॥ तो सिद्धांमाजी मुगुटमणी ॥ तो ज्ञानियांचा शिरोमणी ॥ हें चक्रपाणि बोलिला ॥६४०॥ जैशा घृताचिया कणिका ॥ घृतेंशी नव्हती आणिका ॥ तेवीं भूतंभौतिकें व्यापका ॥ भिन्न देखा कदा नव्हती ॥४१॥ हे उत्तम भक्तांची निजस्थिती ॥ राया जाणावी सुनिश्चितीं ॥ आतां मध्यमभक्त कैसे भजती ॥ त्यांची भजनगती ऐक राया ॥ ४२ ॥

॥ श्लोक ॥ ईश्वरे तदधीनेषु बालिशेषु द्विषत्सु च ॥ प्रेममैत्रीकृपोपेक्षा यः करोति स मध्यमः ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ ईश्वर मानी उत्तमोत्तम ॥ तद्भक्त मानी मध्यम ॥ अज्ञान ते मानी अधम ॥ द्वेषी ते परम पापी मानी ॥ ४३ ॥ ईश्वरीं प्रेम पवित्र ॥ भक्तांसी मैत्री मात्र ॥ अज्ञानीं तो कृपापर ॥ उपेक्षा निरंतर द्वेषियांची ॥ ४४ ॥ हे मध्यमभक्तांची भक्ती ॥ राया जाण ऐशियारीतीं ॥ आतां प्राकृतभक्तांची स्थिती ॥ तेही तुजप्रती सांगेन ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ अर्चायामेव हरये पूजां यः श्रद्धयेहते ॥ न तद्भक्तेषु चान्येषु स भक्तः प्राकृतः स्मृतः ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ पाषाणप्रतिमा हाचि देवो ॥ तेथेंचि ज्याचा पूर्ण भावो ॥ भक्तसंतसज्जनांसि पहाहो ॥ अणुमात्र देहो लैवों नेदी ॥ ४६ ॥ ते ठायीं साधारण जन ॥ त्याची वार्ता पुसे कोण ॥ त्यासि स्वप्नींही नाहीं सन्मान ॥ यापरी भजन प्राकृताचें ॥ ४७ ॥ ऐशियास्थितीं जो जड-

---

१ पडून, निजून, असतात. २ मुके, मौनी. ३ संक्षेपानें ४ अन्न मिळण्याचा. ५ खरा महिमा. ६ त्वंपदवाच्य व्यक्तिगत आत्मा. ७ वस्त्रें, अधिकार, मान. ८ श्रीकृष्ण. ९ कण, कण्या. १० वेगळ्या. ११ दगडाची. १२ वांकवीत नाहीं.

*ना. नाराती मो. नाचती. +मो. संख्या सांगता नाकळे वृत्ती. ×मो. निजें. ०मी. शुद्ध भावाचें. ⁹ना. मीपण.

भक्त ॥ तो जाणावा मुख्य प्राकृत ॥ प्रतिमाभंगें अंत ॥ मानी निश्चित देवासी ॥ ४८ ॥ यापरी त्रिविध भक्त ॥ सांगीतले भजनयुक्त ॥ परी उत्तमांचीं लक्षणें अद्भुत ॥ ते सांगावया चित्त उदित झालें ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ गृहीत्वापीन्द्रियैरर्थान्यो न द्वेष्टि न हृष्यति॥ विष्णोर्मायामिदं पश्यन् स वै भागवतोत्तमः ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ इंद्रियें विषयांतें सेवितां ॥परी सुखदुःख नुमटे चित्तीं ॥ विषय मिथ्यात्वें देखती॥ ते जाण निश्चितीं उत्तम भक्त ॥ ६५० ॥ मृगजळीं जेणें केलें स्नान ॥ तो नाहतां कोरडाचि जाण ॥ तेवीं भोगीं ज्या अभोक्तेपण ॥ ते भक्त पूर्ण उत्तमोत्तम ॥ ५१ ॥ ' उत्तमभक्त विषय सेविती ' ॥ हा बोल ऐकोनि प्राकृतांप्रती ॥ त्यांसि विषयीं नाहीं विषयस्फूर्ती ॥ त्यागिती भोगिती दोन्ही मिथ्या ॥ ५२ ॥ स्वप्नींचें केलें राज्यभोगें ॥ जो जागा होऊनि खावों मागे ॥ तेणें हात माखे, ना तोंडीं लागे ॥ तेवीं विषयसंगें हरिभक्त ॥ ५३ ॥ येथवरी मिथ्या विषयभान ॥ तरी सेवावया त्यांसि काय कारण ॥ येथें प्रारब्ध बळी पूर्ण ॥ तें अवश्य जाण भोगवी ॥ ५४ ॥ परी मी एक विषयभोक्ता ॥ हे स्वप्नींही त्यास नुमटे कथा ॥ यालागीं उत्तम भागवतता ॥ त्यासीच तत्त्वतां बाणली ॥ ५५ ॥ यापरी विषयासक्ती ॥ वर्तिजे उत्तमभक्तीं ॥ याहून अगाधस्थिती ॥ सांगेन तुजप्रती ते ऐक ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ देहेन्द्रियप्राणमनोधियां यो जन्माप्ययक्षुद्भयतर्षकृच्छ्रैः ॥ संसारधर्मैरविमुह्यमानः स्मृत्या हरेर्भागवतप्रधानः ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ देह, इंद्रिय, मन, बुद्धि, प्राण ॥ हेंचि बाधेचें पंचायतन ॥ क्षुधा तृषा भय क्लेश पूर्ण ॥ जन्ममरण इत्यादि ॥ ५७ ॥ या पांचां स्थानीं अपार श्रम ॥ यानांव ह्मणिजे संसारधर्म ॥ निजभक्तां प्रसन्न आत्माराम ॥ त्यांसि हा भवश्रम स्वप्नींही नाहीं ॥ ५८ ॥ क्षुधा लागलिया दारुण ॥ अन्नआकांक्षीं पीडे प्राण ॥ भक्तां क्षुधेची नव्हे आठवण ॥ ऐसें अगाध स्मरण हरीचें ॥ ५९ ॥ भावें करितां भगवद्भक्ती ॥ क्षुधेतृषेची नव्हे स्फूर्ती ॥ एवढी पावले अगाधप्राप्ती ॥ ते भवभयें निश्चितीं डंडळितीना ॥६६०॥ मनामाजी भवभयभरणी ॥ तें मन रातलें हरिचरणीं॥ आतां भयातें तेथें कोण मानी॥मन मनपणीं असेना ॥६१॥मनीं स्फुरे द्वैताची स्फूर्ती॥तेथें भवभयाची दृढस्थिती॥ते मनीं जाहली हरीची वस्ती॥यालागीं भयनिवृत्ती द्वैतेंसीं॥६२॥ देहबुद्धीमाजी जाण॥नानापरी उठती तृष्णा॥ते बुद्धी निश्चयें हरीच्या स्मरणा॥ करितां परिपूर्णा विनटली स्वयें ॥६३॥ जेथें जें जें स्फुरे तृष्णास्फुरण॥ तेथें स्वयें प्रगटे नारायण ॥ तेव्हां तृष्णा होय वितृष्ण॥विरे संपूर्ण पूर्णामाजी ॥६४॥ यापरी या तृष्णारहित ॥ हरिस्मरणें भगवद्भक्त ॥ इंद्रियक्लेशां भक्त अलिप्त ॥ तोही वृत्तांत ऐक राया ॥ ६५ ॥ मुख्य कष्टाचें अधिष्ठान ॥ इंद्रियकर्मी राया जाण ॥ ते इंद्रियकर्मी ब्रह्मस्फुरण ॥ हरिभक्तां पूर्ण हरिभजनें ॥ ६६ ॥ दृष्टीनें घेऊं जातां दर्शन ॥ दृश्यमात्रीं प्रगटे नारायण ॥ श्रवणीं शब्द घेतां जाण ॥ शब्दार्थे पूर्ण विराजे वस्तु

१ कनिष्ठपत. २ मूर्ति फुटली की, त्याचा देव मेला. ३ तयार उद्युक्त. ४ उत्पन्न होत नाहीं ५ स्नान करून. ६ उत्तमभक्तांस. ७ पांच ठिकाणें. ८ हालतो ना. ९ रमलें, रतलें. १० जगतांतील सर्व पदार्थांत. ११ ब्रह्म.

॥ ६७ ॥ घ्राणीं घेतां नानावासु ॥ वासावबोधें प्रगटे परेशु ॥ रसना सेवी जो जो रसु ॥ रसीं ब्रह्मरसु 0निजस्वादें प्रकटे ॥ ६८ ॥ देहीं लागतां शीतोष्ण ॥ अथवा कां मृदु कठिण ॥ तेणें स्पर्शनज्ञानें जाण ॥ चिन्मात्र पूर्ण प्रगटे स्वयें ॥ ६९ ॥ आतां कर्मेंद्रियप्रवृत्ती ॥ तेथेंही स्फुरे ब्रह्मस्फूर्ती ॥ घेणें देणें गमनस्थिती ॥ इंद्रियां गती आत्मारामें॥७०॥ऐसें करितां इंद्रियें कष्ट॥ ते कष्टीं होय निजसुख प्रकट ॥ तेणें इंद्रियां विश्रांती चोखट ॥ पिकली स्वानंदपेंठ हरिभक्तां ॥ ७१॥ जेणें इंद्रियां कष्ट होती॥ तेणेंचि इंद्रियां सुखप्राप्ती ॥ हे भगवद्भजन निजयुक्ती ॥ भोगिजे हरिभक्तीं हरिचेनि स्मरणें ॥ ७२ ॥ जन्म आणि मरण ॥ हें देहाचे माथां जाण ॥ भक्त देहीं विदेही पूर्ण ॥ ध्यातां हरिचरण हरिरूप जाहले ॥ ७३ ॥ यालागीं देहाचा अहंता ॥ कदा नुपजे भगवद्भक्तां ॥ ते भक्तपूर्णतेची कथा ॥ ऐक नृपनाथा सांगेन ॥ ७४ ॥ देह धरिल्या पंचाननें ॥ भक्त नडंडळी जीवेंप्राणें ॥ वंध्यापुत्र सुळीं देणें ॥ देहाचें मरणें तेवीं देखे ॥ ७५ ॥ छाया 5पालखीं बैसावी ॥ ऐसें कोणी चिंतीना जीवीं ॥ तैशी देहाची पदवी यावी ॥ हा नुठी सद्भावीं लोभ भक्तां ॥ ७६ ॥ देहासि आलिया नानाविपत्ती ॥ भक्तां खेद नुमटे चित्तीं ॥ जेवीं आकाश शस्त्रघातीं ॥ नये काकुळती तैसे ते ॥ ७७ ॥ जननीजठरीं देहो जन्मला ॥ भक्त न ह्मणे मी जन्मा आला ॥ रवि थिल्लरीं प्रतिबिंबला ॥ थिल्लर मी जाहला कदा नह्मणे ॥ ७८ ॥ सायंप्रातः सूर्य प्रकाशे ॥ अथवा गंधर्वनगर आभासे ॥ देह प्रतिपाळे अदृष्ट तैसें ॥ म्यां केलें ऐसें स्फुरेहिना ॥ ७९ ॥ भक्तदेहासि येतां मरण ॥ भक्तां हेतुरहित हरीचें स्मरण ॥ यालागीं देह निमाल्या आपण ॥ नमरतां पूर्ण पूर्णत्वें उरे ॥ ८० ॥ थिल्लरा समूळ नाश जाहला ॥ तरी रवि नह्मणे मी निमाला ॥ तेवीं देह गेलिया भक्त उरला ॥ सद्रूपें संचला हरिस्मरणें ॥ ८१ ॥ आधीं काय सर्प मारावा ॥ मग दोरातें दोरु करावा ॥ तो न पालटतां निजगौरवा॥ दोराचि अथवा दोररूपें ॥ ८२ ॥ तेवीं हरिभक्तां देहाचा अभावो ॥ मो काळ कवण घालील घावो ॥ आतां आह्मी ते आह्मीच आहों ॥ तें आह्मीपणही वावो आमुचेनि आह्मा ॥ ८३ ॥ इत्यादिसंसार देहधर्म ॥ ज्यासी स्पर्शों नशके कर्माकर्म ॥ *मोहें नव्हेचि भवभ्रम ॥ तो भक्तोत्तम प्राधान्यत्वें ॥ ८४ ॥ राया आणिकही एक ह्मण ॥ तुज मी सांगेन संपूर्ण ॥ ज्याचा काम होय नारायण ॥ तें भक्तलक्षण अवधारी ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ न कामकर्मबीजानां यस्य चेतसि संभवः ॥ वासुदेवैकनिलयः स वै भागवतोत्तमः ॥ ५० ॥

॥ टीका ॥ हृदयीं चिंतितां आत्माराम ॥ तद्रूप जाहला हृदयींचा काम ॥ त्यासि सर्वकर्मीं पुरुषोत्तम ॥ देवदेवोत्तम तुष्टोनि प्रगटे ॥ ८६ ॥ तेथें ज्या ज्या वासना हृदयवासी ॥ त्याही पडल्या हरिसुखासी॥ एवं वासना जडल्या हरिरूपाशीं॥ हरि आश्रयो त्यांसी दृढ जाहला॥८७॥ तेथें जो जो भक्तांसि काम॥ तो तो होय आत्माराम॥ वासनेचा निजसंभ्रम ॥ पुरुषोत्तम स्वयें होय ॥८८॥ मगीं हरिभक्ति उत्तमोत्तम॥ भक्तकामचि करिती निष्काम॥ चाळितां वासना अनुक्रम॥ 8निर्वासन

---

१ सुवास ज्ञानानें. २ परमेश्वर. ३ सिंहानें. ४ डळमळत नाहीं. ५ वांझेचा मुलगा (मिथ्या वस्तु.) ६ आईच्या पोटांत. ७ डबक्यांत. ८ प्रारब्ध. ९ तर मग. १० ऐक. ११ विषयवासना.
0मो. निजस्वानंदें. 5ना. मो. पालखीसी. *ना. मोहक. 8ना. दुर्वासना.

ब्रह्म प्रकाशे स्वयें ॥ ८९ ॥ ग्रासोग्रासीं नामस्मरण ॥ तें अन्नचि होय ब्रह्म पूर्ण ॥ भक्त भोगीं मुक्तपण ॥ यासीनीं जाण विदेहा ॥ ६९० ॥ ऐसा जो निष्कामनिष्ठ ॥ तोचि भागवतांमाजी श्रेष्ठ ॥ त्यासीच प्राधान्यत्वें पाट ॥ जाण तो वरिष्ठ उत्तमत्वें ॥ ९१ ॥ उत्तम भक्त कैसे विचरती ॥ त्या भक्तांची +विचरतीस्थिती ॥ सांगितली रायाप्रती ॥ यथानिगुती तीं श्लोकीं ॥ ९२ ॥ उत्तमभक्त कोणें लिंगेसी ॥ आवडते जाहले भगवंतासी ॥ तीं लक्षणें सांगावयासी ॥ अतिउल्हासीं हरि बोले ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ न यस्य जन्मकर्मभ्यां न वर्णाश्रमजातिभिः ॥ सज्जतेऽस्मिन्नहंभावो देहे वै स हरेः प्रियः ॥ ५१ ॥

॥ टीका ॥ ०प्राकृतां देहीं देहाभिमान ॥ तेणें गुरुकृपा करितां भजन ॥ पालटे अभिमानाचें चिन्ह ॥ अहं नारायण भावनायुक्त ॥ ९४ ॥ अहं देह हें समूळ मिथ्या ॥ 'अहं नारायण' हें सत्य तत्त्वतां ॥ ऐसी भावना दृढ भावितां ॥ ते भावनाआंतौता अभिमान विरे ॥ ९५ ॥ अभिमान हरिचरणीं लीन ॥ तेव्हां भक्त होय निरभिमान ॥ तेंचि निरहंतेचें लक्षण ॥ हरि संपूर्ण सांगत ॥ ९६ ॥ निरहंकाराचें लक्षणं ॥ 'तो जन्मोनि मी जन्मलों न म्हणे' ॥ सुवर्णाचीं कर्ळी जेवें ॥ तरी सोनें श्वान होंनेणे, तदाकारें असतां ॥ ९७ ॥ तेवीं जन्मादि अहंभावो ॥ उत्तमभक्तां नाहीं पहाहो ॥ कर्मक्रियेचा निर्वाहो ॥ अहंकर्ता स्वयमेवो मानीना ॥९८॥ तो कर्म करी, परी न म्हणे 'मी कर्ता' ॥ जेवीं गगनीं असोनि सविता ॥ अग्नि उपजवी सूर्यकांता ॥ तेवीं करोनि अकर्ता ×निजात्मदृष्टीं ॥ ९९ ॥ सूर्यें सूर्यकांतीं अग्निसंग ॥ तेणें होतु योग कां दांग ॥ ते बाधूं नशके सूर्याचें अंग ॥ तेवीं हा चांग करूनि अकर्ता ॥ ७०० ॥ ✻अचेत लोहचुंबकें चळे ॥ लोहकर्में चुंबक नेमळे ॥ तेवीं हा कर्में करूनि सकळें ॥ अनहंकृतिबळें अकर्ता ॥१॥ देहींचीं कर्में अदृष्टें होतीं ॥ 'मी कर्ता म्हणतां तीं बाधतीं' ॥ भक्त सर्वे कर्मीं अनहंकृती ॥ परमात्मप्रतीती भजनयोगें ॥२॥ एवं देहींचीं कर्में निपजतां ॥ पूर्ण प्रतीती भक्त अकर्ता ॥ कर्माकर्मांची अवस्था ॥ नेघे तो माथां अनहंकृती ॥ ३ ॥ जरी जाहला उत्तमवर्ण ॥ तरी तो नम्हणे मी ब्राह्मण ॥ स्फटिक कुंकुमें दिसे रक्तवर्ण ॥ 'मी लोहितें पूर्ण,' स्फटिक न म्हणे ॥ ४ ॥ ज्यासि नाहीं देहाभिमान ॥ तो हातीं नधरी देहाचा वर्ण ॥ तैसाचि आश्रमाभिमान ॥ भक्त सज्ञान नधरी कदा ॥ ५ ॥ अंगीं बाणला संन्यासु ॥ परी तो न म्हणे मी हंसपरमहंसु ॥ जेवीं नटाअंगीं राजविलासु ॥ तो राजउल्हासु नट न मानी ॥ ६ ॥ तेवीं आश्रमादि अवस्था ॥ भक्त नधरिती सर्वथा ॥ तैशीच जातीचीही कथा ॥ नघे माथां भक्तोत्तम ॥ ७ ॥ जाति उंच नीच असंख्य ॥ परी तो नम्हणे हे माझी एक ॥ जेवीं गंगातीरीं गांव अनेक ॥ परी गंगा माझा एक गांव नम्हणे ॥ ८ ॥ तेवीं जन्म कर्म वर्णाश्रम जाती ॥

---

१ मुख्यत्वानी नसें, मान. २ यथार्थ, स्पष्ट. ३ चिन्हानें, कारणानें. ४ भावनेमध्यें. ५ कुत्री. ६ होऊं आगत नाहीं. ७ सूर्य. ८ पाषाणविशेष. ९ होवोत. १० यश. ११ दहन. १२ भक्त. १३ जड. १४ लिप्त होत नाहीं. १५ अहंकार नसल्यानें. १६ ईश्वराचा साक्षात्कार. १७ रक्तवर्ण, तांबडा.

+ना. निजस्थिती. ०ना. प्राकृतदेहीं. ×ना. निजदृष्टी. ✻मो. अचेतन.

पूर्णभक्त हातीं नधरिती ॥ चहूंदेहांची अहंकृती ॥ स्वप्नींही नधरिती हरिभक्त ॥९॥ आशंका॥ तरी काय वर्णाश्रमजाती ॥ भक्त निःशेष सांडिती ॥ त्यांत असोनि नाहीं अहंकृती ॥ ते हे उपपत्ती बोलिलों राया ॥ १० ॥ जो जेव्हां पावे जन्मप्राप्ती ॥ तेव्हां त्यासवें नाहीं वर्णाश्रम-जाती ॥ जन्माभिमानें माथां घेती ॥ हे कुळ गोत जाती पैं माझी ॥ ११ ॥ ऐशा नाथिल्या अहंकृती ॥ ब्रह्मादिक गुंतले ठांती ॥ वाढवितां वर्णाश्रमजाती ॥ सज्ञान गुंतती निजकर्मे ॥ १२ ॥ ऐशी अहंतेची दुर्धरगती ॥ ब्रह्मादिकां नव्हे निवृत्ती ॥ सोडूं नेणें गा कल्पांतीं ॥ सज्ञान ठंकिजेती निजाभिमानें ॥ १३ ॥ तेथें भक्तांच्या *विवेकस्थिती ॥ अभिमान तुटे भगवद्भक्ती ॥ ते निरभिमान भक्तस्थिती ॥ राया तुजप्रती दाविली स्वयें ॥ १४ ॥ समूळ देहाभिमान झडे ॥ तो देहोचि देवासि आवडे ॥ ते भक्त जाण वाडेंकोडें ॥ लडेवाळे हरीचे ॥ १५ ॥ ते जें जें मागती कौतुकें ॥ तो देवोचि होय तितुकें ॥ त्याचेनि परमसंतोषें ॥ देव सुखावला सुखें दांदिले होये ॥ १६ ॥ तो जिकडे तिकडे जाये ॥ देव निजांगें तेउता ठाये ॥ भक्त जेउतीं वासें पाये ॥ देव ते ते होय पदार्थ ॥ १७ ॥ त्यासि म्हणी कोणाची दृष्टी लागे ॥ यालागीं देवो त्या पुढें मागें ॥ त्या सभोंवता सर्वांगें ॥ भक्तीच्या पांगें भुलला चाले ॥ १८ ॥ निरभिमानाचेनि नांवें ॥ देव निजांगें करी आघवें ॥ जेवीं कां तान्हयाचेनि जीवें ॥ जिवेंभावें निजजननी ॥ १९ ॥ एवं राखतां निजभक्तांसी ॥ तरी देव धाके निजमानसीं ॥ जरी हा मजसी आला ऐक्यासी ॥ तरी हे प्रीति कोणापाशीं करावी ॥ ७२० ॥ कोणासी पाहों कृपादृष्टी ॥ कोणासि सांगों गोड गोष्टी ॥ कोणासि खेवें देऊं मिठी ॥ ऐशी आवडी मोठी प्रेमाची ॥ २१ ॥ या काकुळती श्रीअनंतु ॥ ऐक्यभावें करी निजभक्तु ॥ मग देवो भक्त दोहीं आंतु ॥ देवाचि नांदतु स्वानंदें ॥२२॥ ' एवं आपुली आपण भक्ती ॥ करीतसे अनन्यप्रीतीं ' ॥ हेंचि निरूपण वेदांतीं ॥ अद्वैतभक्ती यानांव ॥ २३ ॥ त्यासी चहों भुजीं आलिंगितां ॥ हांव नबोणेचि भगवंता ॥ मग रिघोनियां आंतौता ॥ ×परमार्थता आलिंगी ॥ २४ ॥ ऐसें खेवेंखेवें मीसें करी ॥ तेणें भक्त आणि आपणाभीतरीं ॥ मग आपण त्यां आंतबाहेरीं ॥ अतिप्रीति-वरी कोंदाटे ॥ २५॥ नवल आवडीचा निर्वाहो ॥ म्हणें यासि लागे काळाचा घावो ॥ यालागीं निजभक्तांचा देहो ॥ देवाधिदेवो स्वयें होये ॥ २६ ॥ ऐसा जो पढियंता परम ॥ तो भागवतां-माजी उत्तमोत्तम ॥ यापरी भागवतधर्म ॥ पुरुषोत्तम वश्य करी ॥२७॥ ऐशिया उत्तमभक्ता ॥ भेदाची समूळ नुरे वार्ता ॥ तेचि अभेदभक्तकथा ॥ ऐक नृपनाथा सांगेन ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ न यस्य स्वः पर इति वित्तेष्वात्मनि वा भिदा ॥ सर्वभूतसमः शांतः स वै भागवतोत्तमः ॥ ५२ ॥

---

१ स्थूल, सूक्ष्म, कारण महाकारण ( चार देहांची. ) २ युक्ति. ३ नसत्या. ४ राहतात. ५ अहं-काराची. ६ फसविलें जातात. ७ अतिप्रेमानें. ८ लाडके. ९ तुंदिल पुष्ट. १० वाट; वासना. ११ पाहे, पावे. १२ ओशाळ्यानीनें. १३ आपली आई. १४ क्षेमालिंगन. १५ दोघांत. १६ तृप्ति. १७ होत नाहीं. १८ आंत, मध्यें. १९ आलिंगनाचें. २० निमित्त. २१ भरे. २२ प्रेमाची. २३ वर्तणूक. २४ कदाचित्. २५ उरत नाहीं.

*मो. भाविकास्थिती. ×ना. परमामता.

॥ टीका ॥ अद्वैतभजनाचे वोजें[1] ॥ मी माझें तूं आणि तुझें ॥ ज्यासि नुरेचि सहजनिजें ॥ तो भक्त मानिजे उत्तमत्वें ॥ २९ ॥ यापरी ज्याचे चित्ताचे ठायीं ॥ भेद निःशेष उरला नाहीं ॥ तेथ माझें तुझें जें कांहीं ॥ तें निमालें[2] पाही जेथिंच्या तेथ ॥ ७३०॥ जेवीं जें जें अग्नीशीं टेंके[3] ॥ तें तें अग्नीचि होऊनि ठाके ॥ तेवीं अभेदभक्त जें जें देखे ॥ तें तें यथासुखें स्वस्वरूप होये ॥ ३१ ॥ निजवित्त[4] आणिकापाशीं देतां ॥ *आशंका[5] नुपजे त्याचिया चित्ता ॥ नदेखे +परकेपणाची वार्ता ॥ विकल्प घालितां तरी नुपजे ॥ ३२ ॥ डावेहातींचे पदार्था ॥ उजवेहातीं स्वयें देतां ॥ येथ कोण देता कोण घेता ॥ तेवीं एकात्मता सर्वभूतीं ॥ ३३ ॥ आपणा सकट सर्वदेहीं ॥ भक्तां भगवंतावांचूनि नाहीं ॥ ×यालागीं शांति त्याचेठायीं ॥ स्वानंदें पाही निःशंक नांदे ॥ ३४ ॥ ऐशिया निजसमशांती ॥ भगवद्भक्त क्रीडा करिती ॥ यालागीं उत्तमत्वाची[6] प्राप्ती ॥ सुनिश्चितीं पावले ॥ ३५ ॥ हरिभक्तांची निरपेक्षता ॥ ऐक सांगेन नृपनाथा ॥ उत्तम भक्तांची सांगतां कथा ॥ अतिउल्हासता हरीसी ॥ ३६ ॥ 'निरपेक्ष' तो मुख्यभक्त ॥ 'निरपेक्ष' तो अतिविरक्त ॥ 'निरपेक्ष' तो नित्यमुक्त ॥ सत्य भगवंत 'निरपेक्ष' ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ त्रिभुवनविभवहेतवेऽप्यकुंठस्मृतिरजितात्मसुरादिभिर्विमृग्यात् ॥
न चलति भगवत्पदारविंदाल्लवनिमिषार्धमपि यः स वैष्णवाग्र्यः ॥ ५३ ॥

॥ टीका ॥ सप्रेमभावें करितां भक्ती ॥ हरिचरणीं ठेविली वृत्ती ॥ ०निजस्वार्थाचिये स्थिती ॥ अतिप्रीति[8] निजनिष्ठा ॥ ३८ ॥ तेथें त्रिलोकींच्या सकलसंपत्ति ॥ कर जोडूनि *वर[9] प्रार्थिती ॥ तरी क्षणार्ध नकाढी चित्तवृत्ती ॥ भक्त परमार्थी 7अतिलोभी ॥ ३९ ॥ क्षणार्ध चित्तवृत्ती काढितां ॥ त्रिभुवनें 0विभव येतां हातां ॥ एवढिया सांडूनि स्वार्था ॥ क्षणाल हरिभक्तां लाभ कोण ॥ ७४० ॥ हरिचरण अपरोक्षें[11]स्थिती ॥ तेथील क्षणार्धाची जे प्राप्ती ॥ त्यापुढें त्रिभुवन[10] विभवसंपत्ती ॥ भक्त मानिती तृणप्राय ॥ ४१ ॥ सकल जगाचा सृजिता ॥ ब्रह्मा पितामहो तत्त्वतां ॥ त्रैलोक्यराज्यसमर्थता ॥ वोळंगे[13] वस्तुतां 5अंगण ज्याचें ॥ ४२ ॥ त्रिभुवनवैभवाचे माथा ॥ ब्रह्मपदाची समर्थता ॥ तो ब्रह्माही निजस्वार्था ॥ होय गिवसिता[16] हरिचरण ॥ ४३ ॥ त्यागोनि ब्रह्मवैभवसंपत्ती ॥ ब्रह्मा बैसोनि एकांतीं ॥ अहर्निशीं हरिचरण चिंती ॥ तरी त्या प्राप्ति सहसा नव्हे ॥ ४४ ॥ सहसा नेपवे हरिचरण ॥ यालागीं ब्रह्मा साभिमान ॥ तेणें अभिमानेंचि जाण ॥ नेलीं चोरून गोपाळ वत्सें ॥ ४५ ॥ तेथें नकष्टतां आपण ॥ न मोडतां कृष्णपण ॥ गोपाळ वत्सें जाहला संपूर्ण ॥ पूर्णत्वें पूर्ण स्वलीला ॥ ४६ ॥

१ वळानें, योगानें. २ नाहींसें झाले. ३ स्पर्शे. ४ आपलें द्रव्य. ५ शंका. ६ उत्तम भक्तांचें. ७ त्याचे मनांत कोणी अविश्वास शिरवील तरी शिरत नाहीं, कारण तो परकेपणा जाणत नाहीं. ८ फार संतोष. ९ वर माग म्हणतात. १० तीन लोकांचें ऐश्वर्य. ११ स्वरूप साक्षात्कार. १२ गवताप्रमाणें, १३ सेवा करणारा. १४ राहे. १५ थोरवी. १६ शोधिता. १७ लागलीच. १८ पावत नाहीं. १९ वासरें (प. प.)

*मो. आवांका. +ना. पारखेपणाची. मो. पारखपणाची. ×ना. यालागी त्याच्याठायीं स्वानंद पाही निःशंक नांदे. ०ना. निजात्म स्वार्थाचियास्थिती. *ना. वरुप्रार्थना करिती. 7मो. अतिस्वार्थ लोभें. 0मो. वैभव. 5मो. अंग.

अगाध हरिलीला परिपूर्ण ॥ पाहतां वेडावलें ब्रह्मपण ॥ तेव्हां सांडोनि पदाभिमान ॥ अनन्य शरण हरिचरणीं ॥४७॥ कैलासराणा शूलपाणी ॥ ब्रह्मा लागे ज्याचे चरणीं॥तोही निज राज्य सांडोनि ॥ महाश्मशानीं हरिचरण चिंती ॥ ४८ ॥ कौपीनभस्मजटाधारी ॥ चरणोदक धरोनि शिरीं ॥ हरिचरण हृदयामाझारी ॥ शिव निरंतरी चिंतित ॥ ४९ ॥ एवं ब्रह्मा आणि शंकर ॥ चरणाचा नपवती पार ॥ तेथें त्रैलोक्यवैभव थोर ॥ मानी तो पामर अतिमंदभाग्य ॥ ७५० ॥ हरिचरणक्षणार्धप्राप्ती ॥ त्रैलोक्यराज्यसंपत्ती ॥ भक्त ओंवाळूनि सांडिती ॥ जाण निश्चितीं निंबलोण ॥ ५१ ॥ हरिचरणसारामृतगोडी ॥ क्षणार्ध जैं जोडे जोडी ॥ तें त्रैलोक्यवैभवाच्या कोडी ॥ करी कुरवंडी निजभक्त भावें ॥ ५२ ॥ एवं हरिचरणा परतें ॥ सारामृत नाहीं येथें ॥ यालागीं चित्तें वित्तें जीवितें ॥ जडले सुनिश्चितें चरणारविंदीं ॥ ५३ ॥ निमिष, निमिषार्धे, त्रुटि, लव, क्षण, ॥ जे नसोडिती हरिचरण ॥ ते 4वैष्णवांमाजी अग्रगण ॥ राया जाण उत्तमभक्त ॥ ५४ ॥ जे त्रिभुवनविभवभोग भोगिती ॥ तेही तापले अनुतापस्थिती ॥ त्यांच्या 2तापाची +निजतापनिवृत्ती ॥ हरिचरणप्राप्ती तैं ऐक ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ भगवत उरुविक्रमांघ्रिशाखानखमणिचंद्रिकया निरस्ततापे ॥ हृदि कथमुपसीदतां पुनः स प्रभवति चंद्र इवोदितेऽर्कतापः ॥ ५४ ॥

॥ टीका ॥ थोर हरिचरणाचा पराक्रम ॥ पदें त्रैलोक्य आवरी त्रिविक्रम ॥ ब्रह्मांड भेदोनि पदद्रुम ॥ वाढला ※परमसामर्थ्ये ॥ ७५० ॥ ते पदद्रुमींचिया दशशाखा ॥ त्यांसि दशधा दशांगुलिका ॥ अग्रीं अग्रफळें चंद्रिका ॥ ×नखमणी देखा *लखलखिती ॥ ५७ ॥ ते नखचंद्रींचे चंद्रकांत ॥ चरणचंद्रामृतें नित्य स्रवत ॥ भक्तचकोर ते सेवित ॥ स्वानंदतृप्त सर्वदा ॥ ५८ ॥ त्यांसि कामादित्रिविधतापप्राप्ती ॥ सर्वथा बाधूं नशके पुढती ॥ जेवीं सूर्याची संतप्तदीप्ती ॥ चंद्रबिंबा ओंतौती कदा नरिघे ॥ ५९ ॥ जे हरिचरणचंद्रचकोर ॥ स्वप्नींही संताप नये त्यांसमोर ॥ ऐसी चरणमहिमा अपार ॥ हरिमुनीश्वर हर्षे वर्णी ॥ ७६० ॥ देहे वै स हरेः प्रियः ॥ येणें श्लोकें गा विदेहा ॥ दाविली भक्तलिंगक्रिया ॥ जाण ते तूं राया सुनिश्चित ॥६१॥ न यस्य स्वः पर इति ॥ येणें त्याची धर्मस्थिती ॥ राया सांगितली तुजप्रती ॥ यथानिगुतीं यथार्थ ॥ ६२ ॥ यादृश ह्मणिजे कैसे असती ॥ भगवद्भजनें स्वानंदतृप्ती ॥ त्रिविधतापांची निवृत्ती ॥ करोनि असती हरिभक्त ॥ ६३ ॥ आतां त्यांचा बोलती परी ॥ नामें गर्जती निरंतरीं ॥ तेचि ते संक्षेपाकारीं ॥ उपसंहारीं हरि सांगे ॥ ६४ ॥ सकळलक्षणांची सारस्थिती ॥ प्रेमळाची ०परमप्रीती ॥ उल्लंघूं नकशे श्रीपती ॥ तेही श्लोकार्थी हरि सांगे ॥ ६५ ॥

१ शिवाचे माथ्यावरील गंगाही विष्णूचें चरणजलच होय, २ ओंवाळणी. ३ लाभ. ४ मनानें ५ धनानें. ६ प्राणानें. ७ अत्यल्पकाल. ८ तीन लोकांतल्या ऐश्वर्याचे भोग. ९ पस्तावा. १० तीन पावलें टाकणारा वामन. ११ पद हाच वृक्ष. १२ दहा फांद्या. १३ ब्रह्मानंदानें संतुष्ट. १४ आध्यात्मिक, आधिदैव, आधिभौतिक अशीं तीन प्रकारचीं दुःखं. १५ आंत. १६ लक्षण. १७ थोडक्यांत. १८ शेवटीं. १९ सारांश, मुख्य मतलब.

4 ना. भागवतांमाजी. 2मो. तपाची. +मो. निजनिवृत्ती. ※ना. स्वसामर्थ्यें. ×ना. नखें नखमणी. *मो. लेखित. ०ना. प्राप्ती.

॥ श्लोक ॥ विसृजति हृदयं न यस्य साक्षाद्धरिरवशाभिहितोप्यघौघनाशः ॥ प्रणयरशनया धृतांघ्रिपद्मः स भवति भागवतप्रधान उक्तः ॥ ५५ ॥ इतिश्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे नारदवसुदेवसंवादे द्वितीयोध्यायः ॥ २ ॥

॥ टीका ॥ अवेचटें तोंडा आल्या हरी ॥ सकळ पातकें संहारी ॥ तें हरिनाम निरंतरी ॥ जे निजगजरीं गर्जती ॥ ६६ ॥ ऐसें ज्यांचे जिव्हेवरी ॥ नाम नाचे निरंतरी ॥ ते धन्यधन्य संसारीं ॥ स्वानंदें हरी गर्जतु ॥ ६७ ॥ सप्रेमसद्भावें संपूर्ण ॥ नित्य करितां नामस्मरण ॥ वृत्ती पालटसी आपण ॥ तेंही लक्षण ऐक राया ॥ ६८ ॥ नामासरिसाच हरी ॥ रिघे हृदयामाझारी ॥ तेणें धाकें अभ्यंतरीं ॥ होंलागे पुरी हृदयशुद्धी ॥ ६९ ॥ तेव्हां प्रपंच सांडोनि वासना ॥ जडोनि ठाके जनार्दना ॥ अहंकार सांडी अहंपणा ॥ सोहंसदनांमाजि रिघे ॥७७०॥ चित्त विसरोनि *चिंता ॥ जडोनि ठाके +भगवंता ॥ मनाची मोडली मनोगतता ॥ संकल्पविकल्पता कर्म विसरे ॥ ७१ ॥ कृतनिश्चयेंसी बुद्धी ॥ होऊनि ठाके समाधी ॥ ऐशी देखोनी हृदयशुद्धी ॥ तेथोनि त्रिशुद्धी ननिघे हरी ॥ ७२ ॥ हरिनामप्रेमप्रीतीवरी ॥ हृदयीं रिघाला जो हरी ॥ तो निघों विसरे बाहेरी ॥ भक्तप्रीति करी कृपाळु ॥ ७३ ॥ भक्तप्रणयप्रीतीची दोरी ॥ तेणें चरण धरोनि निजनिर्धारीं ॥ निजहृदयीं बांधिला हरी ॥ तो कैशापरी निघेल ॥ ७४ ॥ भगवंत महाअतुर्बळी ॥ अदेटदैत्यांतें निर्दळी ॥ तो कोंडिला हृदयकमळीं ॥ हे गोष्टी समूळीं मिथ्या *म्हणती ॥ ७५ ॥ जो शुष्ककाष्ठ स्वयें कोरी ॥ तो कांवळ्या कमळामाझारी ॥ भ्रमर गुंतला प्रीतीवरी ॥ केसरामाझारी कुचंबोनिदी ॥ ७६ ॥ तेवीं भक्तीचिया प्रेमप्रीती ॥ हृदयीं कोंडिला श्रीपती ॥ तेथ खुंटल्या सामर्थ्यशक्ती ॥ भावार्थाप्रती बळ नचले ॥ ७७ ॥ बाळ पोलवीं घाली पिळा ॥ तेणें बाप राहे थोंकला ॥ तरी काय तो निर्बळ जाहला ॥ ना तो ×स्नेहा भुलला ढळेना ॥७८॥ तेवीं निजभक्तललेवांड ॥ त्याचें प्रेम अत्यंत गोड ॥ निधावयाची विसरोनी चाड ॥ हृदयीं सुरवाड ०हरि मानी ॥ ७९ ॥ ॥ ऐसें ज्याचें अंतःकरण ॥ हरि नसांडी स्वयें आपण ॥ तैसेचि हरीचे श्रीचरण ॥ जो नसंडी पूर्ण प्रेमभावें ॥ ७८० ॥ हरीचेठायीं प्रीती ज्या जैशी ॥ हरीची प्रीती त्या तैसी ॥ जे अनन्य हरीपाशीं ॥ हरि त्यांपाशीं अनन्य सदा ॥ ८१ ॥ ऐसे जे हरिचरणीं अनन्य ॥ तेचि भक्तांमाजी प्राधान्य ॥ वैष्णवांमाजी ते अग्रगण ॥ राया ते जाण भागवतोत्तम ॥ ८२ ॥ गौणें करूनि चारी मुक्ती ॥ जगीं श्रेष्ठ भगवद्भक्ती ॥ त्या उत्तमभक्तांची स्थिती ॥ संक्षेपें तुजप्रती बोलिलों राया ॥ ८३ ॥ पूर्णभक्तीचें निरूपण ॥ सांगतां वेदां पडलें मौन ॥ सहस्रमुखाची जिव्हा पूर्ण ॥ थकोनि जाण थोंटावे ॥८४॥ ते हरि भक्तीची एकांशता ॥ तुज म्यां सांगितली हे कथा॥ यावरोनि परिपूर्णता ॥ राया स्वभावतां तूं जाणशी ॥ ८५ ॥ हरीसारखा रसाळ वक्ता ॥ सांगतां उत्तमभ-

१ अवचित. २ नामाबरोबर. ३ सोऽहं म्हणजे परमात्मा तो मी अशा भावनारूपी घरांत, देहोऽहं ही बुद्धि जाते. ४ बलाढ्य. ५ अजिंक्य. ६ वाळलेलें लांकूड. ७ पदरांत. ८ थबकून. ९ लाड. १० सुख, समाधान. ११ एकनिष्ठ. १२ श्रेष्ठ. १३ विष्णुभक्तांत. १४ कमी, ठेंगण्या. १५ शेषाची. १६ थोडी, अपुरी होई.

*मो. चित्ता. +ना. मो. भगवत्पंथा. *मो. म्हणसी. ×ना. स्नेहें. ०मो. हरिनामीं.

क्तकथा ॥ तटस्थ पहिले समस्ता ॥ भक्तभावार्थता ऐकोनी ॥ ८६ ॥ तंव रावो रोमांचित जाहला ॥ रोममूळीं स्वेद आला ॥ श्रवणसुखें लांचावला ॥ डोलों लागला स्वानंदें ॥ ८७ ॥ पूर्ण संतोषोनि मनीं ॥ ह्मणे भलें केलें मुनी ॥ थोर निवालों निरूपणीं ॥ श्रवणाची धणी तरी नपुरे ॥ ८८ ॥ ऐकोनि हरीचें वचन ॥ राजा ह्मणे हे अवघेजण ॥ अपरोक्षज्ञानें ज्ञान-संपन्न ॥ वक्ते पूर्ण अवघेही ॥ ८९ ॥ भिन्नभिन्न करोनि प्रश्न ॥ आर्कर्णू अवघ्यांचें वचन ॥ ऐशिया श्रद्धा राजा पूर्ण ॥ अनुपम्य प्रश्न पुसेल ॥ ७९० ॥ रायासि कथेची पूर्ण चोंड ॥ पुढां प्रश्न करील गोड ॥ जे ऐकतांचि पुरे कोड ॥ श्रोते *वोंड सुखावती ॥ ९१ ॥ त्या प्रश्नाचें गुह्य ज्ञान ॥ श्रवणीं पाववीन संपूर्ण ॥ वदनीं वक्ता श्रीजनार्दन ॥ यथार्थ पूर्ण अर्थवी ॥ ९२ ॥ पांवा नानामधुरध्वनीं वाजे ॥ परी तो वाजवित्याचेनि वाजे ॥ तेवीं एका जनार्दनें साजे ॥ ग्रंथार्थ वोजें कवि कर्ता ॥ ७९३ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादश-स्कंधे निमिजायंतसंवादे एकाकारटीकायां द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥ ओंव्या ॥ ७९३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

# अध्याय तिसरा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमोजी श्रीगुरुराया ॥ ह्मणोनि सद्भावें लागतां पायां ॥ तंव मीपण ।गेलें वायां ॥ घेऊनियां तूंपण ॥ १ ॥ नवल पायांचें कठिणपण ॥ वज्रें न तुटे लिंगदेह जाण ॥ त्याचेंही केलें चूर्ण ॥ अवलीळीं चरण लागतां ॥ २ ॥ पायीं लागतांचि बळी ॥ तो घातला पाताळीं ॥ पाय लवणासुरें रवंदळी ॥ अतुर्बळी +निर्दाळितां ॥ ३ ॥ पाय अतिशयेंसि तिखे ॥ काळियासि लागतां देख ॥ त्याचें शोषोनियां विख ॥ केला निर्विख निःशेष ॥ ४ ॥ पाय अतिशय दारुणें ॥ शकटासि लागतां जाण ॥ त्याचें तुटलें गुणें-बंधन ॥ गमनागमन खुंटलें ॥ ५ ॥ पायांचा धाक ×सकळां ॥ पायें *उद्धरिली अहल्या शिळा ॥ पाय नृगें देखतां डोळां ॥ ०थित्या मुकला संसारा ॥ ६ ॥ आवडीं पाय चिंतिती

---

१ कंसांच्या कुठारीं. २ लोभावला. ३ इच्छा. ४ आयकूं. ५ उच्छा, गरज. ६ अत्यंत. ७ प्रतीतीस आणी. ८ गर्जे, वाजवी. ९ वाजविणारा. १० सद्भक्तीनें. ११ अपूर्व, आश्चर्यकारक. १२ सूक्ष्मदेह. १३ नाश, पायीं लागतांच माझें मीपणच गेलें त्यांत लिंग देहही नष्ट झाला हा भाव. १४ अकस्मात्. १५ बळी राजा ( वामनरूपानें. ) १६ एक राक्षस. १७ चुरी, मारी. १८ पराक्रमी. १९ तिखट. २० सर्पविशेष. २१ विषरहित. २२ प्रखर, भयंकर. २३ एक कंसाचा अनुचर हा शकट ह्म० गाड्याचे रूपानें कृष्णास मारूं आला होता. २४ दोऱ्या, पक्षीं, गुणत्रय बंध. २५ जाणें, येणें, पक्षीं जन्ममरण ( कृष्णहस्तानें मेल्यामुळें, तो उद्धरिला. ) २६ गौतमभार्या दगड होऊन पडली होती ती. २७ श्रीकृष्णस्पर्शानें उद्धरलेल्या एका राजाचें नांव. २८ असार.

***ना. वाडेवाड सुखी होती. मो. वाडेकोडे सुखी होती. ।ना. नेले. +ना. निर्दाळिला. ×ना. सबळा. *ना. उतटली. ०ना. मिथ्या.**

दास ॥ त्यांच्या मनुष्यधर्मा केला नाश ॥पायें यमलोक पाडिला बोसे[1] ॥पायें जीवास जीवघात ॥ ७ ॥ पायवंणी[4] शिरीं धरिलें शिवें ॥ तो जगातें घेतु उठिला जीवें ॥ त्यासि राख लाविली जीवें भावें ॥ शेवीं नागवा भंवे[2] श्मशानीं ॥ ८ ॥ ऐसें पायाचें करणें ॥ शिवासि उरोंनेदी शिवपणें ॥ मा जीवासि तेथें जीवें जिणें ॥ हें मानीतें मानणें उरोंनेदी ॥ ९ ॥ ऐसा जाणोनियां भावो ॥ एका एकपणीं केला ठावो ॥ तेथेंही पायाचा नवलावो ॥ केलें एकपण वावो वेदनमात्रें॥१०॥ तेथं कवणं कवणाचि वानंणें॥कवणं कवणासि विनवणें॥कवणें कवणासी देणें घेणें ॥[5] मीतूंपणाचें जिणें[6] जिवें गेलें ॥११॥ तेव्हां देव आणि भक्तू ॥ जाहलासि मा तूचि तूं॥ तेथं मीपणाची मात ॥ कोणें कोणातू मिरवावीं॥१२॥ऐशिया पदीं वाऊनि तत्त्वतां ॥ करविसोसि ग्रंथकथा ॥ तेव्हां माझेनि नांवें कविकर्त्ता ॥ तूंचि तूं वस्तुतां सद्गुरुराया ॥ १३ ॥ माझें नामरूप आघवें एक ॥ तेंही जनार्दन झाला देख ॥ ऐसें एकपणाचें कौतुक ॥ आत्यंतिक श्रीजनार्दना ॥ १४ ॥ तेंचि कौतुकें आतां ॥ माझेंनि नांवें कविकर्त्ता ॥ होऊनि स्वयें रची ग्रंथा ॥ यथार्थता निजबोधें ॥ १५ ॥ तेथें द्वितीयाध्यायाचे अंतीं ॥ दुस्तर माया, उत्तमभक्तीं ॥ निरसोनियां भजनस्थितीं ॥ भगवत्प्राप्ती पावले ॥ १६ ॥ कैशी दुस्तर हरीची माया॥ पुसावया सादर झाला राया ॥ अत्यादरें [3]करोनियां ॥ ह्मणे मुनिवर्या अवधारीं ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ परस्य विष्णोरीशस्य मायिनामपि मोहिनीम् ॥ मायां वेदितुमिच्छामो भगवंतो ब्रुवंतु नः ॥ १ ॥

॥ टीका ॥ तृतीयाध्यायीं निरूपण ॥ राजा करील चारी प्रश्न॥माया, आणि तिचें तरणं ॥ ब्रह्म तें कोण, कर्म तें कैसें,॥१८॥तेथें प्रथम मायेचा प्रश्न॥रायें पुशिला आपण ॥ तेचि अर्थीचें निरूपण ॥ मायेचें लक्षण राजा बोले ॥ १९ ॥सुरांमाजी श्रेष्ठ हृषीकेशी ॥ ब्रह्मादि शिव वंदिती ज्यासी ॥ त्या श्रीविष्णूची माया कैशी ॥जे मायिकांशीं व्यामोही ॥२०॥ कैशी मायिकां माया मोही येथें ॥ ब्रह्मा शिव मानिती चित्तें ॥ आह्मी पूर्ण मायेचे नियंते[11] ॥ शेवीं माया तयांतें निजमोहें मोही ॥ २१ ॥ ब्रह्मा मोहिला शिवाचे लग्नीं ॥ वीर्य द्रवे पार्वती देखोनि ॥ महादेव महाज्ञानी ॥ देखतांचि मोहिनी निजवीर्य द्रवलें ॥ २२ ॥ जे सज्ञाना छळी लवलाह्या ॥ जीतें श्रुति *ह्मणती अजअजयां ॥ ते हरीची दुर्धर +माया ॥ विवंचूनियां मज सांगा ॥ २३ ॥ ह्मणाल दुर्धर मायेची बाधकता ॥ ते बाधूं न शके अनन्यभक्तां ॥ तुवांही भजावें भगवंता ॥ ×मिथ्या मायेची कथा कां पुसशी ॥ २४ ॥ तेचि अर्थींचें निरूपण ॥ राजा *संक्षेपेंसि आपण ॥ मुनींचें ऐकावया गुह्य ज्ञान ॥ [0]विदग्ध प्रश्न आदरें पुसत ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ नानुतृप्ये जुषन्युष्मद्वचोहरिकथामृतम् ॥ संसारतापनिस्तप्तो मर्त्यस्तत्तापभेषजम् ॥ २ ॥

---

१ ओसाड. २ पायाचें पाणी. ३ भटके. ४ स्तवणें. ५ मी तूं पणाचें अस्तित्व. ६ नाहींसी करून. ७ ऐक, ध्यानांत घे. ८ तरून जाणें. ९ विष्णु. १० भ्रांती करिते. ११ स्वाधीन ठेवणारे. १२ वेगानें. १३ अजिंक्य. १४ उत्कंठेनें. १५ चतुरांचा.

4ना. माथां. 3ना. विनवूनिया. *ना. ह्मणे. +ना. महामाया. ×ना. व्यर्थ. *ना. आपेक्षी. 0ना. विद्वद.

॥ टीका ॥ सेवितां तुमचें वचनामृत ॥ पुरे नह्मणे माझें चित्त ॥ आस्वादितां शब्दीं शब्दार्थ॥ श्रवण [5]क्षुधार्त अधिक जाहले ॥ २६ ॥ अद्‌भुत कथा अतिसुरस ॥ [3]श्रवणीं श्रवणां अधिक सोस ॥ रसनां ह्मणे हा अतिगोड रस ॥ डोळ्यां उल्हास हें अपूर्व रूप ॥ २७ ॥ घ्राणें ह्मणे हा निजगंधू ॥ सुमनीं सुमना अतिसुगंधू ॥ वाचा ह्मणे हा शब्दू ॥ परमानंदू अनुवादे ॥ २८ ॥ नवल निरूपणाचा [6]मावा ॥ भुजांस्फुरण ये यावया खेंवां ॥ आलिंगन जीवींच्या जीवा ॥ निजसद्भावा होतसे ॥ २९ ॥ तुमच्या कथा सुनिश्चितीं ॥ दिव्यौषधी भवरोगछेदिती ॥ त्रिविधतापांचा निवृत्ती ॥ जडमूढ प्राकृतीं ऐकतां भावें ॥ ३० ॥ राजा परमार्थें साकांक्ष ॥ देखोनि सार्थक कथेचें लक्ष ॥ हरिधाकुटा अंतरिक्ष ॥ निरूपणीं दक्ष बोलता झाला ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ अंतरिक्षउवाच ॥ एभिर्भूतानि भूतात्मा महाभूतैर्महाभुज ॥ ससर्जोच्चावचान्याद्यः स्वमात्रात्मप्रसिद्धये ॥ ३ ॥

॥ टीका ॥ अंतरिक्ष ह्मणे राया ॥ तुवां पुशिली हरीची माया ॥ तो प्रश्नचि गेला वायां ॥ बोलणें नये आया बोलकेयाचें ॥ ३२ ॥ वंध्यापुत्राचा जन्मकाल ॥ रायें आणविला तत्काळ ॥ राशि नक्षत्र जाति कुल ॥ सांगों जातां विकैल वाचा होय ॥ ३३ ॥ मृगजलाची पेंव्हे बरवीं॥ गंधर्वनगरीं घालावीं ॥ वारा वळूनि सूत्रस्त्रभावीं ॥ वाती लावावी खद्योततेजें ॥ ३४ ॥ निजछायेचें शिरें फोडा ॥ आकाशाची [7]त्वचा काढा ॥ शिंपी आंधार खरवडा ॥ बागुलाचा [८]रगडा निजशस्त्रें कीजे ॥ ३५ ॥ वांझेचे सुने पुत्र झाला ॥ तेथें भीष्मेस्त्रियेसी पान्हा आला ॥ तेणें पयपानें तो मातला ॥ घरभंगु केला दिगंबराचा ॥ ३६ ॥ जाती लहान दळावा वारा ॥ अश्वशृंगें आकाश चिरा ॥ नपुंसकाचीं नातोंडें घरा ॥ मार्तंडोदयीं अंधारा लपों आलीं ॥ ३७ ॥ गुंजेचें निजतेजें दिवीं ॥ हनुमंतलग्नीं लावावीं ॥ या सोहळियालागीं विकावीं ॥ वोसगांवीं निजछाया ॥ ३८ ॥ आकाशाचीं सुमनें ॥ सुवासें कीं वासहीनें ॥ हे विवंचिती जे देखणे ॥ ते मायेचें सांगणें सांगोत सुखें ॥ ३९ ॥ एवं मायेचें जें बोलणें ॥ तें सांगतांचि लाजिरवाणें ॥ नुपजेल्याचें श्राद्ध करणें ॥ तैशी सांगणें हरिमाया ॥ ४० ॥ माया ह्मणावी येणें भावें ॥ जे कदा विद्यमान नव्हे ॥ यालागीं अविद्या येणें नांवें ॥ वेदानुभवें गर्जती शास्त्रें ॥४१॥ 'भ्रम तो मायेचें निजमूळ ' ॥ *भ्रांति हेंचि फूल सोज्वळ ॥ भुली ते इचें सा[जु]क फळ ॥

१ चवी घेतां. २ भुकेलेल. ३ कानांस. ४ जीभ. ५ नाक. ६ सामर्थ्य. ७ आलिंगन. ८ हरीचा धाकटा भाऊ. ९ जमेल, आटोक्यांत. १० बोलणाराचें. ११ व्यर्थ. १२ पाणपोई. १३ काजव्याच्या तेजानें. १४ डोकें. १५ साल. १६ नाश. १७ भीष्मास स्त्रीच नव्हती. १८ दूध पिण्यानें. १९ माजला. २० घर फोडणें. २१ फटिंग, त्याला घर कशाचें. २२ घोड्याच्या शिंगानें. २३ मारुतीचे लग्नांत. २४ ओसाड अशा गांवांत. २५ फुलें. २६ ठरवितील. २७ ओंवी ३३-९ सर्व मिथ्या वस्तूंची उदाहरणें आहेत. २८ न जन्मल्याचें. २९ विद्यमान ह्म. अस्तिरूप नाहीं ह्मणून मायेला अविद्या ह्मणतात.

3ना. क्षुधार्थ. 5ना. श्रवणें. 6ना. यावा. 7ना. साली. ८ना. रांडवडा. *ना. भ्रांतीजळें हे शाद्वळ.

विषय रसाळ सदा फळित ॥ ४२ हे नसतेनि रूपें रूपा आली ॥ सत्यासत्यें गरोदर जाहली ॥ तेथें असत्याचीं पिलीं ॥ स्वयें व्याली असंख्य ॥ ४३ ॥ वासनाविषय गुंणीं ॥ गुंफिली मिरवे वेणी ॥ मीपणाच्या तरुणपणीं ॥ मदमोहिनी चमके ॥ ४४ ॥ मृगजळींच्या मुक्ताफळीं ॥ मस्तकीं बाणली जाळी ॥ गगनौलाच्या चांपेकळीं ॥ मिरवे वेल्हाळी अतिसौंदर्यें ॥ ४५ ॥ रज्जुंसर्प माळ्याच्या मणी ॥ काढूनि लेइली ते लेणीं ॥ शुक्तिकारजतपैंजणीं ॥ चाले रुणझुणी खळखळित ॥ ४६ ॥ शशविषाणपादुका ॥ लेऊनि ते चाले देखा ॥ तिसी तो अहंकार सखा ॥ अतिनेटका ज्येष्ठपुत्र ॥ ४७ ॥ कुळविस्तारालागीं पाही ॥ ममता व्याली ठायींच्याठायीं ॥ *मोह उपजवूनि देहीं ॥ घरजांवयी त्या केला ॥ ४८ ॥ अहंमोहममतायोगें ॥ जग विस्तारलें अंगें ॥ स्थूल सबळ प्रयोगें ॥ ममता निजअंगें वाढवी ॥ ४९ ॥ संकल्पविकल्पांचीं कांकणें ॥ बाणोनि मन दिधलें आंदुणें ॥ घालोनि त्रिगुणाचें ठाणें ॥ माया पूर्णपणें थोरावे ॥ ५० ॥ ऐशी मिथ्या मूळमाया ॥ वाढली दिसे राया ॥ ते कैसेनि ये आया ॥ सांगावया अनिरूप्य ॥ ५१ ॥ संते ह्मणों तरी तात्काळ नासे ॥ असंते ह्मणांतरी आभासे ॥ आदि असे पोठीं नसे ॥ ऐसीहि नसे निजांगें ॥ ५२ ॥ जैसें मृगजलांचें ज्ञान ॥ दिसे परी तें मिथ्या पूर्ण ॥ तैसें आभासे भवभान ॥ ते माया जाण नृपनाथा ॥ ५३ ॥ श्रुतिशास्त्रां मायामाग ॥ पुसतां आरेगिनी मूग ॥ मागेंसि साचाचें अंग ॥ पाहतां चांग, असेना ॥ ५४ ॥ मृगजलाची महानदी ॥ कोणें गिरिवेंग उद्बोधी ॥ हें सांगावया नाकळे बुद्धी ॥ तेवीं मायासिद्धी अनिर्वाच्य ॥ ५५ ॥ आरसा काय प्रतिबिंब असे ॥ जो पाहे तोचि आभासे ॥ तेवीं आपुलेनि संकल्पवशें ॥ माया उल्हासे नसतीची ॥ ५६ ॥ रज्जुसर्प जीत धरिला ॥ त्याचें कौतुक पाहों चला ॥ ऐसे बोलती जे बोला ॥ ते मायेचा सोहळा सांगोत सर्वे ॥ ५७ ॥ उडवोंजातां आपुली छाया ॥ सर्वथा न उडवे ज्याची तया ॥ तेवीं तरतां दुस्तर माया ॥ जाण रायानिश्चित ॥ ५८ ॥ ' अग्निसंकल्पू मर्यी नसे ॥ शर्वी सूर्यकांतींहि नदिसे ॥ तळीं धरिलेनि कापुसें ॥ अग्नि प्रकाशे तद्योगें ॥ ५९ ॥ तेवीं शुद्धब्रह्मीं +संकल्पु नाहीं ॥ शेवीं न दिसे केवळ देहीं ॥ माझारीं वासनेच्याठायीं ॥ देहाभिमानें पाहीं संसार भासे ' ॥ ६० ॥ जागृतिदेहाचा विसर पडे ॥ सवेंचि स्वप्नेंदेह दुजें जोडे ॥ तेणें मिथ्या प्रपंच वाढे ॥ स्वप्नीं स्वप्नें कुडें कदा नमेंनें ॥ ६१ ॥ सुषुप्ती देहाचा असंभवो ॥ तेथें नाहीं भेदभावो ॥ जन्म मरण तेंहीं वावो ॥ संसारसंभवो देहाभिमानें ॥ ६२ ॥ तेवीं आत्मतत्त्वाचा विसरू ॥ तेणें ' मी देह ' हा अहंकारू ॥ तेणें अहंकारें संसारू ॥ अतिदुस्तरू थोरावे ' ॥ ६३ ॥ जेवीं मिथ्या मृगजळ भासे ॥ तेवीं ब्रह्मीं प्रपंच नसे ॥ तो निरसावया कैसें ॥ ×साधनपिसें पिशाचा ॥ ६४ ॥ दोनी अक्षरें माया ॥ जंव गेलों सांगावया ॥ तंव

१ नसलेल्या. २ विषयवासनारूप रज्जूंनीं. ३ अहंभावाच्या ज्वानीनें. ४ घातली. ५ मिथ्या सर्प. ६ शिंपीवरील रुप्याचे पैंजण. ७ नाडें. ८ अस्तित्वांत जमेस. ९–१२ आहे ह्मणावी तर नाहीं. नाहीं ह्मणावी तर भासते. १३ प्रथम [ भासकाळीं. ] १४ पश्चात [ विचारकाळीं. ] १५ संसाराचा भास. १६ मायेची वाट, पत्ता. १७ खानी ( मौन धरितात. ) १८ चांगलें. १९ पर्वतांतून निघाली. २० नसूनही. २१ नाहींशी करूं जातां. २२ मध्येंच. २३ एकनाथानें ' देह ' शब्दनपुंसकीं वापरिला आहे. २४ खोटें. २५ मानीत नाहीं. २६ नाहींपणा. २७ जन्ममरणाचें अस्तित्व.

*ना. मोहो उपजली जीवदेही. +ना. कल्पना. ×ना. सावधान.

श्लोकार्थ दुरीं ठेलों राया ॥ वाढला वायां ग्रंथ सैरा ॥ ६५ ॥ माया पाहों जातां हर्षें ॥ मज्ञानही जाहले पिसे ॥ नांवारूपांचिये भडसें ॥ कल्पनावशें माया वाढे ॥ ६६ ॥ मायेचें मुख्य लक्षण ॥ राया तुज मी सांगेन खूण ॥ 'आपुली कल्पना संपूर्ण' ॥ ते माया जाण नृपवर्या ॥ ६७ ॥ 'निजहृदयींची जे आशा' ॥ तेचि माया गा मुख्य क्षितीशा ॥ जो सर्वथा नित्य निराशा ॥ तो पूज्य जगदीश। निज पूर्णत्वें ॥ ६८ ॥ आतां कांहीं एक तुझ्या प्रश्नीं ॥ माया सांगों उपलक्षणीं ॥ *सर्गस्थित्यंतकारिणी ॥ त्रिविधगुणीं विभागे ॥ ६९ ॥ जेवीं सूर्यासि संकल्प नसे ॥ तरी नसतां त्याच्याठायीं दिसे ॥ जेव्हां कां निजकिरणवशें ॥ अग्नि प्रकाशे सूर्यकांतीं ॥ ७० ॥ तेवीं शुद्धस्वरूपीं पाहीं ॥ संकल्पमात्र कांहीं नाहीं ॥ नसतांचि दिसे तेठायीं ॥ ते जाणावी देहीं मूळमाया ॥ ७१ ॥ स्वरूपें निर्विकल्प पूर्ण ॥ तेथें मी ह्मणावया ह्मणतें कोण ॥ 'ऐसेही ठायीं स्फुरे मीपण' ॥ ते मुख्यत्वें जाण मूळमाया ॥ ७२ ॥ तया मीपणाच्या पोटीं ॥ ह्मणे 'मजचि म्यां पहावें दिठीं' ॥ मजसी म्यां सांगाव्या गोठी ॥ अत्यादरें भेटी माझी मज व्हावी ॥ ॥ ७३ ॥ मज माझी अतिप्रीती ॥ माझी मज हो भावी-र्ती ॥ माझ्यानेचि म्यां घेऊनि युक्ति ॥ मज माझी प्राप्ती मैंद्वोधें व्हावी ॥ ७४ ॥ ह्मणे मज म्यां आलिंगावें ॥ मज म्यांचि संभोगावें ॥ मज म्यांचि संयोगावें ॥ मज म्यां नियोगावें स्वोमिसेवकत्वें ॥ ७५ ॥ ऐके आजानुबाहो नृपनाथा ॥ ऐसें आठवलें भगवंता ॥ तो आठवो झाला सृजितां ॥ महाभूतां, भौतिकां ॥ ७६ ॥ चारी वर्ण, चारी खाणी ॥ चारी युगें, चारी वाणी ॥ चारी पुरुषार्थ, चहुंलक्षणीं ॥ मुक्तींची मांडणी चतुर्धा ॥ ७७ ॥ उभारूनि तिन्ही गुण ॥ आठवो रचि त्रिभुवन ॥ तेणें मांडूनि त्रिपुटीविंदान ॥ कर्मही संपूर्ण त्रिधां केलें ॥ ७८ ॥ 'एवं एकपणीं बहुपण ॥ रूपा आणी 'मुळींची आठवण' ॥ परी बहुपणीं एकपण ॥ +अखंडत्वें पूर्ण तें कदा नभंगे' ॥ ७९ ॥ जीं जीं कुंभार भांडीं करी ॥ आकाश सहजेंचि त्यांभीतरीं ॥ ×तेवीं महाभूतें भौतिकाकारीं ॥ समन्वयें हरी सर्वदा सर्वीं ॥ ८० ॥ राया जाण येचि अर्थीं ॥ बोलिलें उपनिषदांप्रती ॥ 'एकाकी नरमत' या श्रुती ॥ द्वैताची *स्फूर्ती भगवंतीं स्फुरली ॥ ८१ ॥ किंबहुना एकपणें समस्तें ॥ रूपा आलीं जीं महाभूतें ॥ तेचि हरीची माया येथें ॥ जाण निश्चितें नृपनाथा ॥ ८२ ॥ भूतभौतिक स्फुरे जे स्फूर्ती ॥ ते प्रकाशूं नशके माया ०स्वशक्ती ॥ मायाप्रकाशक चिन्मूर्ती ॥ अखंडत्वें भूताकृतीं प्रवेशला भासे ॥ ८३ ॥

---

१ मध्येंच थांबल्या. २ उगाच. ३ उदय, लोट, महत्व. ४ उत्पत्ति, स्थिति, लय करणारी, ५ सत्व, रज, तम, तीन गुणांनीं भिन्न. ६ आपल्या कारणाच्या योगानें. ७ ब्रह्म. ८ कल्पनारहित. ९ अर्थानें. १० गोष्टी. ११ प्रीति. १२ माझ्या ज्ञानानें. १३ यजमान चाकरपणानें. १४ गुडघ्यापर्यंत लांब हात ज्याचे तो. १५ स्मृति, स्फूर्ति. १६ उत्पन्न करितां. १७ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र. १८ उद्भिज्ज, स्वेदज, जारज, अंडज. १९ कृत, त्रेत, द्वापर, कली. २० परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी. २१ धर्म, अर्थ, काम, मोक्ष. २२ सामीप्य, सालोक्य, सारूप्य, सायुज्य. २३ उभे करून, निर्मून. २४ ज्ञान, ज्ञाता, ज्ञेय, त्रिपुटीचें, कौशल्य. २५ कर्म, अकर्म, विकर्म. २६ संबंध. २७ 'एकट्या स्वास करमेना' ह्मणून बहुरूप झालें.

***ना. सर्व. +ना. अखंडपूर्ण. ×ना. तेवी महाभौतिकाकारी. *ना. निजस्फूर्ति. ०ना. निजशक्ती.**

मुख्य मायेचें निजलक्षण ॥ प्रकाशी परमात्मा चिद्घन ॥ तोचि भूतीं भूतात्मा आपण ॥ प्रवेशलेपण नसोनि दावी ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ एवं सृष्टानि भूतानि प्रविष्टः पंचधातुभिः॥ एकधा दशधाऽऽत्मानं विभजन् जुषते गुणान् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ ऐशीं सृजिलीं भूतें महाभूतें ॥ जीं जडमूढ अचेतें ॥ त्यांसि वर्तावया व्यापारार्थें ॥ विभागी आपणातें *तत्प्रवेशी ॥ ८५ ॥ पंचधा पंचमहाभूतें ॥ ते कार्यक्षम व्हावया येथें ॥ पंचधा विभागें श्रीअनंतें ॥ प्रवेशिजे तेथें तें ऐक राया ॥ ८६ ॥ गंधरूपें पैं ×पृथ्वीतें ॥ प्रवेशोनि श्रीअनंतें ॥ पूर्ण क्षमा आणोनि तीतें ॥ चराचरभूतें वाहवी स्वयें ॥ ८७ ॥ पृथ्वी प्रवेशला भगवंतु ॥ यालागीं आवरणजळांतु ॥ उरलीसे, न विरतु ॥ जाण निश्चितु मिथिलेशा ॥ ८८ ॥ धरा धरी भेंगाधर ॥ यालागीं विरवूं नशके समुद्र ॥ धराधरें पृथ्वी सधर ॥ भूतभार तेणें वाहे ॥ ८९ ॥ स्वादरूपें उदकातें ॥ प्रवेशोनि श्रीअनंतें ॥ +द्रवत्वें राहोनियां तेथें ॥ जीवनें भूतें जीववी सदा ॥ ९० ॥ जीवनीं प्रवेशे जगजीवन ॥ याकारणें आवरण तेंचि जाण ॥ नशोषितां उरे जीवन ॥ हें लाघव पूर्ण हरीचें ॥ ९१ ॥ तेजाचे ठायीं होऊनि रूप ॥ प्रवेशला हरि सद्रूप ॥ यालागीं नयनीं तेज अमूप ॥ जठरीं देदीप्य जठराग्नि जाहला ॥ ९२ ॥ रूपयोगें लवलाही ॥ हरि प्रवेशे तेजाच्या ठायीं ॥ तें आवरण वायुमाजी पाहीं ॥ *नमावळे कांहीं यालागीं राया ॥ ९३ ॥ वायुमाजी स्पर्शयोगें ॥ प्रवेशु कीजे श्रीरंगें ॥ यालागीं 1प्राणयोगें ॥ •वर्तती अंगें अनेक जीव ॥ ९४ ॥ वायूच्या ठायीं हृषीकेश ॥ स्पर्शरूपें करी प्रवेश ॥ यालागीं वायूचा ग्रास ॥ सर्वथा आकाश करूं नशके ॥ ९५ ॥ 2शब्दगुणें हृषीकेश ॥ आकाशीं करी प्रवेश ॥ यालागीं भूतांसि अवकाश ॥ सावकाश वर्तावया ॥ ९६ ॥ शब्दगुणें गगनीं ॥ प्रवेशला चक्रपाणी ॥ यालागीं 0तें 6निजकरणीं ॥ लीन होऊनी जाऊं नशके ॥ ९७ ॥ महाभूतीं निरंतर ॥ स्वाभाविक नित्य वैर ॥ येरांतें ग्रासावया येरें ॥ अति तत्पर सर्वदा ॥ ९८ ॥ जळ विरवूं पाहे पृथ्वीतें ॥ तेज शोषूं पाहे जळातें ॥ वायु प्रांशं धांवे तेजातें ॥ आकाश वायूतें गिळूं पाहे ॥ ९९ ॥ तेथें प्रवेशोनि श्रीधर ॥ त्यांतें करोनियां निर्वैर ॥ तेंचि वैरामाजी येर ॥ उल्हासें थोर नांदवी ॥ १०० ॥ एवं पंचभूतें साकारता ॥ आकारला भूताकारता ॥ तेथें जीवरूपें वर्तविता ॥ जाहला पैं तत्वता प्रकृतियोगें ॥ १ ॥ 'यासि ब्रह्मांडीं पुरुष हें नांव ॥ पिंडीं त्यातें म्हणती जीव' ॥ हा मायेचा निजस्वभाव ॥ प्रतिबिंबला देव जीवशिवरूपें ॥ २ ॥ 'शिवीं जे योगमाया विख्याती ॥ जीवीं तीतें अविद्या म्हणती' ॥

१ अचेतन. २ वेगळे करी. ३ व्यवहारसमर्थ. ४ पांच प्रकारीं. ५ 'तत्कृत्वा तदेवानुप्राविशत्.' ६ शांति, स्थिरता. ७ पाठीवर नेववी. ८ पृथ्वी जलावरणांत (समुद्रांत) विरघळत नाहीं. ९ जनक राजा. १० पृथ्वी. ११ शेष. १२ रुचि, गोडी. १३ द्रव-जल-रूपानें. १४ पाणि. १५ क्षार. १६ शब्द हा आकाशाचा गुण. १७ पंचमहाभूतांत. १८-१९ एकमेकांस. २० पिऊं. २१ निश्चांत. २२ देहांत.

*ना. तत्प्रकाशी. ×ना. पृथ्वी येथें. +ना. प्रयत्नें राखोनि त्यातें. *ना. न मालवे. 1ना. प्राणप्रयोगें. •ना. वर्तवी. 2ना. वायुशब्दगुणें. 0ना. तो. 6ना. कारणीं.

हाेच मायेची मुख्यत्वें भ्रांति ॥ स्वप्नस्थिती संसारु ॥ ३ ॥ ज्यातें ह्मणती दीर्घ स्वप्न ॥ तो हा मायेचा संसार संपूर्ण ॥ निद्रेमाजी दिसे जें भान ॥ तें जीवाचें स्वप्न अविद्यायोगें ॥ ॥ ४ ॥ येथें जागा जाहल्या मिथ्या स्वप्न ॥ बोध जाहलिया मिथ्या भवभान ॥ हें अवघें मायेचें विंदान ॥ राया तूं जाण निश्चित ॥ ५ ॥ आतां जीवाची विषयावस्था ॥ विषयरसीं +विषयभोक्ता ॥ एकधा, दशधा विभागता ॥ ऐक नृपनाथा सांगेन ॥६॥ एकधा भागें अंतःकरण ॥ स्वयें झाला जनार्दन ॥ मन, बुद्धि, चित्त, ✻अहंस्फुरण ॥ चतुर्धा जाण विभागें ॥ ७ ॥ ' जीव आपुल्या परिपूर्णता ॥ ' अहं ' ह्मणे निजात्मसत्ता ॥ तेथें मायेची अतिलाघवता ॥ ते देहात्मता दृढ केली ' ॥ ८ ॥ अहंकार वाढतां, देहात्मता ॥ विसरे आपुली चिद्रूपता ॥ तो ×विसरु वाढवी विषयचिंता ॥ तेचि तत्त्वतां महामाया ॥ ९ ॥ देहअहंता अतिचपळ ॥ तीतेंच ह्मणती मन चंचळ ' ॥ नाना संकल्पविकल्पजाळ ॥ वाढवी प्रबळ भय *शोक दुःख ॥ ११०॥ ' देहअहंतेचें शाहणपण ॥ तिये नांव गा बुद्धि जाण ' ॥ ते बुद्धीनें निश्चय केला पूर्ण॥ आह्मां जन्ममरण अनिवार ॥ ११ ॥ एवं देहाभिमानाचे माथां ॥ चित्तचतुष्टय अवस्था ॥ ' मुख्य संसाराचा कर्ता ॥ जाण तत्वता देहाभिमान ' ॥ १२ ॥ ' अहंकार धरी सोहंपण ॥ तें चित्तीं प्रगटे चैतन्यघन ॥ तेव्हां मनही होय उन्मन ॥ बुद्धीचा निश्चयो पूर्ण परब्रह्मीं ' ॥ ॥ १३ ॥ समूळ मावळल्या अभिमान ॥ कैंची बुद्धि कैंचें मन ॥ बुडे चित्ताचें चित्तपण ॥ ब्रह्म परिपूर्ण कोंदाटे ॥ १४ ॥ एकधा विभागें अंतःकरण ॥ त्याची ऊणखूण निजलक्षण ॥ राया सांगीतलें संपूर्ण ॥ आतां दशधा लक्षण तें ऐक ॥ १५ ॥ दशधा इंद्रियें अचेतन ॥ तयांतें चेतविता नारायण ॥ दशधारूपें प्रवेशोन ॥ इंद्रियवर्त्तन वर्त्तवी ॥ १६ ॥ ०दृष्टीमाजी झाला देखणें ॥ दृश्य प्रकाशी दृश्यपणें ॥ ऐसेंनि 1प्रकाशकपणें ॥ दृश्याभरणें दाखवी ॥ १७ ॥ श्रवणीं झाला तो ऐकणें ॥ शब्दप्रकाशी शब्दलक्षणें ॥ मग अर्थावबोधकपणें ॥ शब्दविंदानें ऐकवी ॥ १८ ॥ रसीं रसस्वाद नारायण ॥ रसनीं तोचि रसस्वादन ॥ यापरी नानारससेवन॥ करवी जनार्दन जनांमाजी ॥ १९ ॥ सुमनीं श्रीहरी सुगंध ॥ घ्राणीं तोचि जाणे गंधावबोध ॥ यापरी सुमनमकरंद ॥ भोगवी गोविंद निजांगयोगें ॥ १२० ॥ शीत उष्ण मृदु कठिण ॥ स्पर्शें प्रकाशिता नारायण ॥ त्वचेमाजी तोचि स्पर्शज्ञ ॥ यापरी जगजीवन भोगवी स्पर्श ॥ ॥ २१ ॥ वाचेचा वाचक कमळापती ॥ तोचि प्रकाशी शब्दपंक्ती ॥ नानाशब्दार्थव्युत्पत्ती ॥ वदवी निश्चितीं वाचाळपणें ॥ २२ ॥ कराच्या ठायीं देती घेती ॥ 7अकर्तेनि कर्तव्यशक्ती ॥ चरणाऽऽचरणें निगुती ॥ गमनस्थिती गोविंदें ॥ २३ ॥ उपस्थसुखाची सुखप्राप्ती ॥ तेणें सुखें सुखावे श्रीपती ॥ स्त्रीपुरुषमैथुनव्युत्पत्ती ॥ प्रकाशी अतिप्रीती पुरुषोत्तम ॥ २४ ॥ गुदाचें

१ कौतुक करणी. २ चित्तचतुष्टयरूप. ३ परिपूर्णत्वानें. ४ आपल्या आत्म्याचें अस्तित्वानें. ५ देहावर आत्मभावना. ६ अनिवार्य. ७ मन, बुद्धि, चित्त, अहंकार. ८ मनपणा सोडून मनहीं लीनहोणें. ९ नाहींसें होतें. १० भरे. ११ एक प्रकारें. १२ मनोगत, ओळखण. १३ दहा प्रकारानें. १४ जड. १५ सुगंधाचें ज्ञान. १६ फुलांचा मध. १७ विष्णु. १८ जननेंद्रिय, योनी. १९ मलद्वार.

+पा. रसभोक्ता. ✻पा. अहंकार स्फुरण. ×पा. विषय. *पा. सुखदुःखे. ०पा. दृष्टीसी. 1पा. प्रकाशक पूर्ण. 7 पा. अकर्तव्य.

ठायीं जे कां क्षरणें ॥ तें अक्षरेंही [illegible]य जाण ॥ यापरी निजात्मा परिपूर्ण ॥ दशधा आपण विभागला देहीं ॥ २५ ॥ यापरी या देहयोगें ॥ विलासे विषयसंभोगें ॥ भोग्य भोक्ता *उभयभागें ॥ प्रकाशूनि अंगें स्वयें भोगी ॥ २६ ॥ जेवीं साळईच्या रुखा ॥ साळईच बीज देखा ॥ साळईचि शाखोपशाखा ॥ नविकारतां असकों वृक्ष होये ॥ २७ ॥ जेवीं कां ऊंस बीजीं पडे ॥ तो बाहेर ऊंसपणेंचि वाढे ॥ जरी भिन्नभिन्न कांडें चढे ॥ तरी मागें पुढें रस एकू ॥ २८ ॥ तेवीं विषय आणि करणें ॥ प्रकाशूनि एकपणें ॥ मग विषयरस सेवणें ॥ जीवपणें स्वयें सर्वां ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ गुणैर्गुणान् स भुंजान आत्मप्रद्योतितैः प्रभुः ॥ मन्यमान इदं सृष्टमात्मानमिह सज्जते ॥ ५॥

॥ टीका ॥ +इंद्रियां आणि विषयांसी ॥ सहजें अंतर्यामी प्रकाशी॥जीवें सेवूनि त्या विषयांसी॥ पावे आसक्तीसी अहंभावें ॥ १३० ॥ ह्मणें 'हे विषय कैसे गोड ॥ माझ्या देहाचें पुरे कोड' ॥ तेव इंद्रियांची खवळे चाड ॥ विषयगोड भोगावया ॥ ३१ ॥ इंद्रियां विषयांची आसक्ती ॥ देहाभिमानें वाढे वृत्ती ॥ मावळोनि मुळींची स्फूर्ती ॥ मोहममतास्थिती दृढ वाढे॥ ॥ ३२ ॥ मग 'मी ह्मणे देहातें' ॥ देहसंबंधी जें तें आंमे ॥ विषयाचिये लोलुपते ॥ उसंत चित्तें असेना ॥ ३३ ॥ प्रकृतिस्वभावें कर्म जाहलें ॥ तें तें ह्मणे म्यांचि केलें ॥ देह अहंतेचेनि बांधिलें ॥ कांविरें चढलें अनिवार ॥ ३४ ॥ देह अहंता अतिउद्भटें ॥ तेथें मोह ममता अतिदुर्घट ॥ तेणें जन्ममरणांची वाट ॥ घडघडाट प्रवाहे ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ कर्माणि कर्मभिः कुर्वन् सनिमित्तानि देहभृत् ॥ तत्तत्कर्मफलं गृह्णन् भ्रमतीह सुखेतरम् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ मनीं धरोनि विषयकाम ॥ कर्मेंद्रियीं करितां कर्म ॥ तेथें निपजती धर्माधर्म ॥ बाधक परम पुरुषातें ॥ ३६ ॥ कर्मफळभोग घडे ॥ त्यासाठिं देहधरणें पडे ॥ देहें देहाची खाणी उघडे ॥ मरणही वाढे तसेंची ॥ ३७ ॥ फळाशा कर्म अतिदारुण ॥ अमरा आणि अमित मरण ॥ अजन्म्या अंगीं जन्म पूर्ण ॥ पुनःपुनः जाण आदळती ॥ ३८ ॥ एवं स्वर्ग आणि संसारा ॥ जन्ममरणांच्या येरझारा ॥ नानायोनी अपारा ॥ निजकर्मद्वारा स्वयें भोगी ॥ ३९ ॥ डोळे बांधोनि जुंपिला घाणा ॥ तेलियाचा ढोरू जाणा ॥ करकरीतु परिभ्रमणा ॥ अविश्रमें जाणा भोंवतसे ॥ १४० ॥ तेवीं बांधोनि ज्ञात्याचे डोळे ॥ भोगूं जातां निजकर्मफळें ॥ तेव जन्ममरणांचे सोहळे ॥ भोगी आंगळे अनिवार ॥ ४१ ॥ उदोअस्तांचेनि प्रमाणें ॥ जैसें सूर्यासि पडे भंवणें ॥ तैशीं हीं जन्ममरणें ॥ अतिदारुणें स्वयें सोशी ॥

१ मलादिक गळणें. २ साळवणींच्या. ३ वृक्षाला. ४ न बदलतां. ५ सगळा. ६ इंद्रियें. ७ हृदयस्थ. ८ इच्छा, गरज. ९ अधिक. १० इष्ट, प्रिय. ११ आसक्तीस. १२ विसावा. १३ संपन्नतेनें. १४ धुंधी, भ्रांति. १५ दांडगी, जोरदार. १६ चालू राहते. १७ विषयाची इच्छा. १८ परंपरा ( एक जन्मामुळें अनंतजन्म. ) १९ हेलांस. २० येतात. २१ खेपा. २२ आपल्या कर्मांच्या योगानें. २३ बैल. २४ न विसांवतां. २५ चक्राकार फिरतां. २६ आधीक. २७ उदयास्त.

*ना. विषयभोगें. +ना. इंद्रिय विषयाची.

॥४२॥ शिणशिणों जंव जन्म कंठी ॥ सवेंच मरण ये त्यापाठीं॥जैशीं जावळीं फळें एकदेठीं ॥ ×तैशा जन्ममरणकोटी भोगी स्वयें ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ इत्थं कर्मगतीर्गच्छन् बव्हभद्रवहाः पुमान् ॥ आभूतसंप्लवात्सर्ग-प्रलयावश्नुतेऽवशः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ 'होता पूर्णत्वें जो स्वतंत्र ॥ तो झाला *कर्मपरतंत्र ' ॥ नानाकर्मगति प्राप्त ॥ +दुःखसुख क्षेत्र सदा वाहे ॥ ४४ ॥ मानोनि विषयाचें सुख ॥ देखत देखत घेतलें विख ॥ त्याचें अगणित असुख ॥ जन्मकोटी दुःख सोशितां नसरे ॥ ४५ ॥ दुःखावरी दुःखांचे आवर्त ॥ मोहशोकांचे गर्तीं पडत ॥ अंतीं यातनेमाजी बुडत ॥ सदा उकडत काळाग्नी ॥ ॥ ४६ ॥ ऐसें सोशितां दुःखशोक । सदा अवचितां एकाएक ॥ महाप्रळयाचा भडका देख ॥ निकट सन्मुख अंगीं वाजे ॥ ४७ ॥ तेथें मागें काढिला नवेंचे पावो ॥ पुढें निघावया नाहीं ठावो ॥ निजकर्में बांधिला पहाहो ॥ प्रळयाचा घावो मस्तकीं वाजे ॥ ४८ ॥ उत्पत्तिस्थिति प्रकरण ॥ तुज सांगीतलें संपूर्ण ॥ आतां प्रळयाचें लक्षण ॥ सावधान अवधारीं ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ धातूपप्लव आसन्ने व्यक्तं द्रव्यगुणात्मकम् ॥ अनादिनिधनः कालो ह्यव्यक्तायापकर्षति ॥ ८ ॥

॥ टीका ॥ मर्यादेयेसि दिवसस्थिति ॥ लोटल्या अवश्य पावे राती ॥ तेवीं झालिया उत्पत्ति-स्थिती ॥ प्रळयाची प्राप्ती अवश्य पावे ॥ ५० ॥ ऐसें पावल्या प्रळयवेळ ॥ खवळे अनादि-निधन काळ ॥ तो महाभूतेंसि भूगोळ ॥ नाशार्थ प्रबळ प्रताप मांडी ॥ ५१ ॥ तेथें जें जें स्थूळाकारें व्यक्त ॥ तें तें करूंलागे अव्यक्त ॥ जेवीं पेरिलें पिकोनि शेत ॥ स्वयें वाळत उष्णकाळीं ॥ ५२ ॥ तृणादिनानाबीजें क्षितीं ॥ स्वभावें वर्षाकाळीं विरूढती ॥ तेचि शारदीयें नानाव्यक्ती ॥ सफळित होती सपुष्ट ॥ ५३ ॥ तेचि ग्रीष्माच्या अंतीं ॥ फळमूळ सोडोनि व्यक्ती ॥ बीजें लीन होती क्षितीं ॥ ०तैशी काळगती संसारा ॥ ५४ ॥ जेवीं वसंताऐलीकडी ॥ वृक्षासि होय पानझडी ॥ तेवीं 0ब्रह्मादिकांची परवडी ॥ काळ झाडी निजसत्ता ॥ ५५ ॥ जेवीं कां वाळलिया शेत ॥ कुंपविळ सळं लागे समस्त ॥ तेवीं व्यक्ताचें अव्यक्त ॥ काळ करित निजसत्ता ॥ ५६ ॥ तेच अव्यक्त करिती स्थिती ॥ राया सांगेन तुजप्रती ॥ काळाची क्षोभकस्थिती ॥ प्रळयाचे प्राप्तीपूर्वीं पावे ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ शतवर्षा ह्यनावृष्टिर्भविष्यत्युल्बणा भुवि ॥ तत्कालोपचितोष्णार्को लोकांस्त्रीन्प्रतपिष्यति ॥ ९ ॥

॥ टीका ॥ काळक्षोभाचिये दृष्टी ॥ शतवर्षें अनावृष्टी ॥ तेणें अत्युल्बणें आटे सृष्टी ॥

१ कर्माच्या स्वाधीन. २ अनेक प्रकारच्या कर्माच्या गति भोगणारा. ३ पाणभोंवरे. ४ खांचेंत. ५ निघत नाहीं. ६ अवकाश. ७ प्रळयाचा काल. ८ वाढतात. ९ शरदृतूंत. १० वसंतापूर्वी, प्रारंभीं. ११ पानांची गळती. १२ झेनकरी. १३ अवर्षण. १४ अत्यंत पापानें.

×ना. तैसे जन्मकोटी सोहळे सोगी. *ना. कर्मे. +ना, शोक. ०ना. तैसा काळगती संसार. 0ना. ब्रह्मादिकासी.

पृथ्वीच्या पोटीं कांहीं नुरे ॥ ५८ ॥ प्राणिमात्र निमाले देख ॥ वनें वाळूनि जाहली राख ॥ बिंदुमात्र न मिळे उदक ॥ यापरी लोक आटिले काळें ॥५९॥ तंव द्वादशादित्यमेळा ॥ मंडळीं आला एकवेळा ॥ तेथिच्या किरणीं प्रबळा ॥ त्रैलोक्या सकळा संतप्त केलें ॥ १६० ॥ येती उष्णाचिया आर्या ॥ होती पर्वताच्या लाह्या ॥ तेणें धरातळ लवलाह्या ॥ भस्म झालें गया महाउष्णें ॥ ६१ ॥

॥ श्लो ॥ पातालतलमारभ्य संकर्षणमुखानलः ॥ दहन्नूर्ध्वशिखो विष्वग्वर्धते वायुनेरितः ॥ १० ॥

॥ टीका ॥ उष्णें तापलें पृथ्वीतळ ॥ पोळलें शेषफणामंडळ ॥ तें सहस्रमुखें विषानळ ॥ अग्निकल्लोळ वमता झाला ॥ ६२ ॥ पाताळतळींहूनि देखा ॥ त्या ऊर्ध्वमुखी अग्निशिखा ॥ जाळीतचि निघे लोका ॥ उठिला भडका अनिवार ॥ ६३ ॥ क्रोधें दिधला फुत्कारा ॥ सहस्रमुखें सुटला वारा ॥ तो साह्य झाला त्या वैश्वानरा ॥ जाळीत दिगंतरा वाढला वणवा ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ सांवर्तको मेघगणो वर्षति स्म शतं समाः ॥ धाराभिर्हस्तिहस्ताभिर्लीयते सलिले विराट् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ स्वर्ग आणि पाताळतळा ॥ कवळूनि उठिल्या अग्निज्वाळा ॥ तंव प्रळयकर्ता मेघमेळा ॥ क्षोभला तात्काळ अतिदुर्धर ॥ ६५ ॥ झणाल तेथ मोठमोठे ॥ वर्षों लागले थेंबुटे ॥ तैसे नव्हे गा, कडकडाटे ॥ एकी धार सुटे अनिवार ॥ ६६ ॥ इतर पर्जन्याच्या धारा ॥ त्या तैशा नव्हती नृपवरा ॥ ऐक प्रमाणाच्या निर्धारा ॥ तो समयो महावीरा अतिदुस्तर ॥ ६७ ॥ जैसीका मदगजाची सोंड ॥ तैशा धारा अतिप्रचंड ॥ शतवर्षे अखंड ॥ पर्जन्य वितंडे पैं वर्षे ॥ ६८ ॥ विजु निजतेजें नभ जाळी ॥ कडकडाटें दे आरोळी ॥ काळाची जैसे दांतखिळी ॥ ऐसा प्रळयकाळीं मेघ खवळे ॥ ६९ ॥ तेणें उलथलें जल सैंघ ॥ जेथोनि वर्षत होते मेघ ॥ त्यांतेंही विरवूनि सांग ॥ जळमय चांग त्रैलोक्य झालें ॥ १७० ॥ अनिवार वर्षतां वेग ॥ तेथें मेघांचेंही विरे अंग ॥ या नांव 'सांवर्तक' मेघ ॥ अति अमोघ वर्षावो ॥ ७१ ॥ तीर्थ क्षेत्र पवित्रोदक ॥ सरिता समुद्र झाले एक ॥ हरपले चंद्रसूर्यादिक ॥ तिन्ही लोक बुडाले ॥ ७२ ॥ ऐसिया एकार्णवाचे ठायीं ॥ विराट विराला गा पाहीं ॥ आकार उरे ऐसें कांहीं ॥ उरलें नाहीं नृपनाथा ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ ततो विराजमुत्सृज्य वैराजः पुरुषो नृप ॥ अव्यक्तं विशते सूक्ष्मं निरिंधन इवानलः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ प्रळयकाळीं अतिगर्हिसें ॥ अगाध उथळे जळोल्हासें ॥ स्थूळाचा करितां नाश ॥ विरे निःशेष विराट ॥ ७४ ॥ विराटाचा विराज पुरुष ॥ तो अव्यक्तीं करी प्रवेश ॥

१ बारा सूर्यांचा समुदाय. २ ज्वाळा, झळा. ३ विषरूप अग्नि. ४ ओकता. ५ अग्नीचा जाळ. ६ अग्नीला. ७ भासत. ८ माजलेल्या हत्तींनी. ९ अत्यंत. उदंड. १० वीज, ११ संपूर्ण. १२ कार्यकारी. १३ पाऊस. १४ नाहींसें झाले, १५ जगद्रूप. १६ अतिप्रचंड १७ उंळ, उसळे. १८ उसळी. पर. १९ कारणात

जेवीं इंधनीं हुताशू ॥ करी रहिवासू निजकारणीं ॥ ७५ ॥ 'जे ब्रह्मलोकनिवासी होती ॥ त्यांसी महाप्रळयाचे अंतीं ॥ ब्रह्मयासवें सर्वां क्रमें मुक्ती ' ॥ ऐसें स्मृतिश्रुतींचें दृढ वाक्य ॥ ७६ ॥ वैराजपुरुष नामवंदेती ॥ हिरण्यगर्भातें ह्मणती ॥ त्यांसी प्रवेश प्रळयीं अव्यक्तीं ॥ तैं इतरांची गती स्मृतिवाक्यें कैसी ॥ ७७ ॥ विदेहें पुशिली मायेची स्थिती ॥ ते मायेची ऐशी दुर्धरगति ॥ जे न करितां भगवद्भक्ती ॥ ब्रह्मयासी मुक्ती घडेना ॥ ७८ ॥ झालिया ब्रह्मसदनप्राप्ती ॥ न करितां भगवद्भक्ती ॥ अतिशयें दुर्लभ मुक्ती ॥ भक्तीपाशीं मुक्ती दासी जैसी ॥ ७९॥ न करितां भगवद्भजन ॥ ब्रह्मयासीही मुक्ति नव्हे जाण ॥ मा इतरांचा *ज्ञानाभिमान ॥ पुसे कोण परमार्थी ॥१८०॥' ज्यासी जेथें पदाभिमान ॥ त्यासी तेंचि दृढ बंधन '॥ यालागीं दुर्लभपण ॥ मोक्षासी जाण तिहीं लोकीं ॥८१॥ सांडोनिया पदाभिमान॥ अंगें सदाशिवु आपण ॥ नित्य वसवी महाश्मशान ॥ भगवद्भजननिजनिष्ठा॥८२॥यालागीं ब्रह्मलोकपदप्राप्ती ॥ तेथेंही जे करिती भगवद्भक्ती॥त्यांसीच प्रळयाच्या अंतीं॥परममुक्ती नृपवर्या॥८३॥ ब्रह्मलोकीं ज्यां नाहीं हरिभक्ती ॥ तेही पावती पुनरावृत्ती ॥ ऐशी मायेची दुर्धर शक्ती ॥ न करितां भक्ती, मुक्ति कैंची ॥ ८४ ॥ येचिअर्थीं ब्रह्मयाचें वचन ॥ दोंश्लोकीं बोलिला आपण ॥ 'ज्ञानाभिमानिया पतन; ' ॥ ' भक्तां भवबंधन कदा नबाधी ' ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ गर्भस्तुतीचे ॥ येऽन्येरविंदाक्षविमुक्तमानिनस्त्वय्यस्तभावादविशुद्धबुद्धयः ॥ आरुह्य कृच्छ्रेण परं पदं ततः पतंत्यधोऽनादृतयुष्मदंघ्रयः ॥ १ ॥ तथा न ते माधव तावकाः क्वचिद्भ्रश्यंति मार्गात्त्वयि बद्धसौहृदाः ॥ त्वयाभिगुप्ता विचरंति निर्भया विनायकानीकपमूर्धसु प्रभो ॥ २ ॥

॥ टीका ॥ नकरितां भगवद्भक्ती ॥ सज्ञानांही नातुडे मुक्ती ॥ तेंचिअर्थींच्या दृष्टांतीं ब्रह्मयाची उक्ती दाविली येथें ॥ ८६ ॥ जन्मां माजी ब्राह्मणपण ॥ तेंही वेदशास्त्रसंपन्न ॥ नकरितां भगवद्भजन ॥ अरूढ पतन तयांसी ॥ ८७ ॥ भक्तां सर्वभूतीं भगवद्भावो ॥ तेथें विघ्नांसि नाहीं ठावो ॥ तयां अपावोंचि होय उपावो ॥ भावार्थीया देवा सदा साह्य ॥ ८८ ॥ भक्तीविण मुक्तीचा सोस ॥ करितां प्रयत्न पडे वोस ॥ असो हें, वैराजपुरुषु ॥ करी प्रवेश अव्यक्तीं ॥ ८९ ॥ अव्यक्तीं वैराजाचा प्रवेश ॥ होतांचि महाभूतविलास ॥ हों लागे भूतां न्हास ॥ तो अनुप्रवेशें एक राया ॥ १९० ॥

॥ श्लोक ॥ वायुना हृतगंधा भूः सलिलत्वाय कल्पते ॥ सलिलं तद्धृतरसं ज्योतिष्ट्वायोपकल्पते ॥ १३ ॥ हृतरूपं तु तमसा वायौ ज्योतिः प्रलीयते ॥ हृतस्पर्शोवकाशेन वायुर्नभसि लीयते ॥ १४ ॥

---

१ जळण नाहींसें झाल्यानें. २ अग्नि. ३ बोलो, भाषा. ४ ब्रह्मा, प्रथम पुरुष. ५ कठीण. ६ मग. ७ इंद्रादिपदांचा अभिमान. ८ पुनर्जन्म. ९ ज्ञानी पुरुषासही. १० मिळत नाहीं. ११ निखालस. १२ अपायच. १३ आशा. १४ व्यर्थ. १५ न्हास नाश. १६ एकामागें एकांत लीन होणें.

*ना. मानाभिमान.

॥ टीका ॥ प्रळयवायूचा क्षोभ कोपृ ॥ तेणें पृथ्वीचा हरिला गंधृ ॥ तंव तेही विरोनिया प्रसिद्धृ ॥ एकवट् जळ जाहलें ॥ ९१ ॥ क्षोभला वायू असमसोस ॥ तो हरी जळाचा जळरस ॥ तेव्हां जळाचा होय ऱ्हास ॥ सावकाश प्रळयतेजीं ॥ ९२ ॥ त्या तेजाचा निजसंभ्रम ॥ वायुबळें ग्रासी तम ॥ तेव्हां प्रळयवायु परम ॥ भरोनि व्योमें कोंदाटे ॥ ९३ ॥ त्या प्रळयवायूचा स्पर्श ॥ चपळतेसि सर्व ग्रास ॥ करूं ठाके सावकाश ॥ तेव्हां वायूतें आकाश निःशेष ग्रासी ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ कालात्मना हृतगुणं नभ आत्मनि लीयते ॥ इंद्रियाणि मनो बुद्धिः सह वैकारिकैर्नृप ॥ प्रविशंति ह्यहंकारं स्वगुणैरहमात्मनि ॥ १५ ॥

॥ टीका ॥ आकाशाचा जो शब्दगुण ॥ तो प्रळयकाळ गिळी संपूर्ण ॥ तंव क्षोभला तामसाभिमान ॥ तो करी प्राशन गगनातें ॥ ९५ ॥ दशइंद्रियांच्या गोंधळा ॥ राजसाभिमानी निघाला ॥ चित्तचतुष्टयाचा मेळा ॥ तोही प्रवेशला सात्विकाभिमानीं ॥ ९६ ॥ इंद्रियअधिष्ठात्रीदैवतें ॥ तींही मिळोनियां समस्तें ॥ प्रवेशलीं सात्विकातें ॥ जाण निश्चितें नृपनाथा ॥९७॥ ते तिन्ही अहंकार त्रिगुणेंसी ॥ प्रवेशती महत्तत्वासी ॥ महत्तत्व मिळे मायेसी ॥ जेवीं कन्यासंततीसी माहेरा ये ॥ ९८ ॥ जेवीं कुक्कुटीचीं पिलीं ॥ कुक्कुटी पांखातळीं घाली ॥ मग कुक्कुटी दिसे एकली ॥ तेवीं माया उरली कल्पांतीं ॥ ९९ ॥ एवं उत्पत्ति स्थितिप्रळयांतें ॥ त्रिविध भागें दाविली येथें ॥ ते गुणमयी माया निश्चितें ॥ मिथ्याभूतें आभासे ॥ २०० ॥ जेवीं लेंकुरें खेळतां खेळासी ॥ दिवसा ह्मणती जाहली निशी ॥ तेवींचि पूर्णस्वरूपापाशीं देखती मायेसी त्रिविध कल्पना ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ एषा माया भगवतः सर्गस्थित्यंतकारिणी ॥ त्रिवर्णा वर्णिताऽस्माभिः किं भूयः श्रोतुमिच्छसि ॥ १६ ॥

॥ टीका ॥ उत्तम मध्यम अधमजन ॥ तिन्ही अवस्था, त्रिभुवन॥त्रिविध कर्म, तीन गुण ॥ हें जाण विंदान मायेचें ॥ २ ॥ ध्येय ध्याता आणि ध्यान ॥ पूज्य पूजक पूजन ॥ ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान ॥ हेही त्रिपुटी पूर्ण मायेची ॥ ३ ॥ दृश्य द्रष्टा आणि दर्शन ॥ कर्म कर्ता क्रिया *करण ॥ भोग्य भोक्ता भोजन ॥ हे त्रिपुटी जाण मायेची ॥ ४ ॥ शब्द, श्रोता, आणि श्रवण ॥ घ्रेय घ्राता आणि घ्राण ॥ रस, रसना, रसस्वादन ॥ हे त्रिपुटी पूर्ण मायेची ॥ ५ ॥ कार्य क्रिया आणि कर्ता ॥ *चरण चाल चालता ॥ बोल बोलणें +बोलता ॥ हे त्रिविधावस्था मायेची ॥ ६ ॥ अहं सोहं जडमूढता ॥ ०साधक साधन साध्यता ॥ देवी देवो परिवारदेवता ॥ हेही त्रिविधता मायेची ॥ ७ ॥ देह देही देहाभिमान ॥ भवभय बंधन भवभान ॥ मुक्त मुमुक्षु अज्ञान ॥ हेंही विंदान मायेचें॥८॥ सुख, दुःख, जडत्व पूर्ण ॥ आधी समाधी व्युत्थान॥

१ अनिवार. २ नाहींसा करितो. ३ आकाश. ४ ग्रास. ५ सात्विक, राजस, तामस–अहंकार ६ कोंबडीचीं. ७ कल्पाच्या, प्रलयाच्या शेवटीं. ८ कार्य, कौशल्य. ९ मयी. १० हाल क्रिया करितात ते कर. ११ मनोव्यथा. १२ मनोलय. १३ समाधिभंग.

*ना. चरण. *ना. चरण चाली चालविता. +ना. बोलविता ०ना. साधक बाधक एकमधा.

उत्पत्ति स्थिति ×निधन ॥ इहीं लक्षणीं संपूर्ण माया विलसे ॥ ९ ॥ नभीं नीळिमा पूर्ण भासे ॥ शेखीं नीळिमेचा लेशही नसे ॥ तेवीं स्वरूपीं माया विलासे ॥ मिथ्यावेशें मायिक ॥ २१० ॥ जेवीं प्रत्यक्ष दिसे मृगजळ ॥ परी तें निदाघचि केवळ ॥तेवीं स्वरूपीं माया प्रबळ॥ मुळींचा निर्मूळ आभासे ॥ ११ ॥ हे मिथ्या माया, कल्पनावशें ॥ प्रबळ बळेंसी भासली असे ॥ नाम् जातां नाशिजे ऐसें ॥ सत्यत्वें नसे निजांगें ॥ १२ ॥ तरी नांवरूपांचिया भडसें ॥ ब्रह्मादिक झाले पिसे ॥ मिथ्या-त्रिपुटी-विन्यासें ॥ ज्या बांधिलें दिसे त्रैलोक्य ॥ १३ ॥ जेवीं रूपासवें दिसे छाया ॥ नाशितां नातुडे नाशावया ॥ तेवीं स्वरूपीं मिथ्या माया ॥ अतिदुर्जया देवांसी ॥ १४ ॥ ' जेवीं देहासवें मिथ्या छाया ॥ तेवीं स्वरूपीं मिथ्या दिसे माया ॥ कल्पनायोगें वाढली गया ॥ यालागीं अजया ' वेदशास्त्रें ह्मणती ॥ १५ ॥ राया ' कल्पना वाढे जे ठायीं ॥ तेंचि मायेचें दृढ मूळ पाहीं ॥ जो निर्विकल्प निजदेहीं ॥ त्यासि माया नाहीं तिहीं लोकीं ' ॥ १६ ॥ कल्पिती कल्पना जे राया ॥ तेचि जाण मुख्य मूळ माया ॥ आणीक रूपकें सांगावया ॥ नातुडे माया निरूपणीं ॥ १७ ॥ तेचि त्रिविध मुख्यलक्षणीं ॥ माया सांगितली विवेचोनी ॥ आतां कोण्या अर्थाचे श्रवणीं ॥ अत्यादरू मनीं वर्ते राया ॥ १८ ॥ माया दुस्तर दारुण ॥ ऐकूनि ऋत्विज ब्राह्मण ॥ थरारले सभाजन ॥ राजाही पूर्ण विस्मित जाहला ॥ १९ ॥ नवल मायेचें रूपक ॥ नाशूं नशकती ज्ञाते लोक॥ जया गांविलें ब्रह्मादिक ॥ इतरांचा देख कोण पडिपाड ॥ २२० ॥ माया आक्रमूनि शिवासी ॥ तोही आणिला *जीवत्वासी ॥ ते माया तरावया दीनांशी ॥ त्या उपायासी पुसोपा ॥ २१ ॥ सुखोपायें दीनजन ॥ दुस्तर माया तरती जाण ॥ तदर्थीं राजा आपण ॥ अत्यादरें प्रश्न श्रद्धेनें पुसे ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ यथैतामैश्वरीं मायां दुस्तरामकृतात्मभिः ॥ तरंत्यंजः स्थूलधियो महर्ष इदमुच्यातम् ॥ १७ ॥

॥ टीका ॥ अतिदुस्तर हरीची माया ॥ ऐकोनि हांसें आलें राया ॥ लटकीच, परी बाधावया ॥ देहाभिमानियां दृढ जाहली ॥ २३ ॥ माया दुस्तर शास्त्रप्रसिद्धी ॥ तेथें बाळेभोळे स्थूळेंबुद्धी ॥ सुखें तरती कोणें विधी ॥ तो सांग त्रिशुद्धी उपावो ॥ २४ ॥ ज्यासी वश्य नाहीं निजमन ॥ आणि भवाब्धि तरावया भाव पूर्ण ॥ ऐसे भोळे भाविक जन ॥ त्यांसि मायेचें तरणें अति सुगम सांगा ॥ २५ ॥ मागां कवी बोलिला संकेतितीं ॥ तन्मायेयातो बुध आभजेति॥ गुरु ब्रह्म अभेदस्थितीं ॥ करितां भक्ती, माया तरिजे ॥ २६ ॥ त भक्तीचें स्पष्ट लक्षण ॥ विशद व्हावया श्रवण ॥ पुढती मायेचें तरण ॥ पुसावया कारण मुख्य हेंचि ॥ २७ ॥ तो मायातरणोपायविधी ॥ सुगम सांगावया त्रिशुद्धी ॥ अंतरिक्षाधाकुटा सुबुद्धी ॥ प्रबुद्ध प्रज्ञानिधी बोलता जाहला ॥ २८ ॥

---

१ मरण. २ निळेपणा. ३ ब्रह्माचे ठायीं. ४ ऊन. ५ कल्पनेच्या योगानें. ६ उदयानें, लोटानें. ७ योजनेनें, रचनेनें. ८ मिळत नाहीं ९ दुर्जया. १० स्पष्ट करून. ११ त्या विषयीं. १२ जड बुद्धीचे. १३ संसारसमुद्र. १४ माया तरून जाणें. १५ संक्षेपानें. १६ ईश्वराच्या मायेनें. १७ एकरूपानें.

×ना. निदान. *ना. जीवित्वासी.

॥ श्लोक ॥ प्रबुद्ध उवाच ॥ कर्माण्यारभमाणानां दुःखहत्यै सुखाय च ॥ पश्येत्पाकविपर्यासं मिथुनीचारिणां नृणाम् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ मुख्य मायेचें तरण ॥ प्रबुद्धचि जाणे पूर्ण ॥ प्रबुद्ध जाहलिया आपण ॥ मायेचें विंदान न तरतां तरती ॥ २९ ॥ 'मनीं विषयाचा छंद ॥ तो केवळ 5महाबंधु ' ॥ विषयत्यागी तो प्रबुद्ध ॥ तोचि विशद भाव ऐका ॥ २३० ॥ विषयीं ✻लोभलें मन ॥ तेथें नव्हता वैराग्य पूर्ण ॥ कदा नव्हे मायेचें तरण ॥ वैराग्यार्थ जाण विषय निंदी ॥ ३१ ॥ केवळ नश्वर विषय देख ॥ तेंचि मानिती परमसुख ॥ तें सुखाचि दुःखदायक ॥ स्त्रीकामें मुख्य माया +बाधे ॥ ३२ ॥ बांधूनि धनाची गांठी ॥ सुखार्थी स्त्री बैसविली पाठीं ॥ तेचि भोगवी दुःखकोटी ॥ जगीं माया मोठी स्त्रीकामें ॥ ३३ ॥ स्त्रीकामें प्रपंच सबळ ॥ स्त्रीकामें दुःख प्रबळ ॥ स्त्रीकामें मायेसि बळ ॥ स्त्रीकामें सकळ मोहिलें जग ॥ ३४ ॥ आवडी स्त्री बैसवितां पाठीं ॥ ते प्रपंचाच्या वाढवी कोटी ॥ महामोहाच्या पाडूनि गांठी ॥ दुःखसागरीं लोटी स्त्रीकामें ॥ ३५ ॥ जे नवमास वाहे उदरांत ॥ ते माता करूनि अनाप्त ॥ स्त्रियेसि मानिती अति आप्त ॥ ऐशी माया समर्थ स्त्रीकामें ॥ ३६ ॥ जें तोंडींचें पोटींचें खोंवोसत ॥ जे सदा सोशी नरकमूत ॥ ते मातेहूनि, स्त्री आप्त ॥ जाहली जगांत मायामोहें ॥ ३७ ॥ स्त्रिया मेळवितां असंख्य मिळती ॥ परी माता न मिळे त्रिजगतीं ॥ ऐसें जे सज्ञान जाणती ॥ तेही माता उपेक्षिती स्त्रीकाममोहें ॥ ३८ ॥ 'मातेतें भजतां भुक्तिमुक्ती ॥ स्त्रियेतें भजतां नरकप्राप्ती ' ॥ ऐसें जे शास्त्रज्ञ जाणती ॥ तेही माता उपेक्षिती स्त्रीकामलोभें ॥ ३९ ॥ एवं स्त्रीकामाचिया व्याप्ती ॥ माया व्यापिली त्रिजगती ॥ सज्ञानाही पडली भ्रांती ॥ स्त्रीकामासक्ती महामाया ॥ २४० ॥ मानूनि विषयाचें सुख ॥ काम्य कर्म करितां देख ॥ तेणें अतिदुःखी होती लोक ॥ दुःखदायक काम्य कर्म ॥ ४१ ॥ कामिनीकामगृहासक्ती ॥ प्राणी प्राणातें स्वयें शिणविती ॥ त्या भ्रमाची निदानस्थिती ॥ सांगेन तुजप्रती राजाधिराजा ॥ ४२ ॥ निर्मलजळें भिंती धुतां ॥ जळाची नासे निर्मळता ॥ हात माखिले धुतले म्हणतां ॥ भिंतीही तत्त्वतां निर्दळ केली ॥ ४३ ॥ तेवीं विषयाचेनि सुखें सुख ॥ नपावतीच ब्रह्मादिक ॥ विषयाचा जे मानिती हरिख ॥ ते परममूर्ख पशुदेही ॥ ४४ ॥

॥ श्लोक ॥ नित्यार्तिदेन वित्तेन दुर्लभेनात्ममृत्युना ॥ गृहापत्याप्तपशुभिः का प्रीतिः साधितैश्चलैः ॥ १९ ॥

टीका ॥ रातिदिवस निजनेटें ॥ मरणेंसी घेतां झटें ॥ कवडीची प्राप्ती नभेटे ॥ प्राणांतकष्टें द्रव्य जोडे ॥ ४५ ॥ एवं कष्टें जें जोडलें धन ॥ तें महादुःखाचें जन्मस्थान ॥ 'अर्थ अनार्थाचें अभिधान ' ॥ निजात्ममरण धनमूळ ॥ ४६ ॥ द्रव्य नसतां, उपाय शिणवी ॥ जोडलिया, संरक्षणीं आधी लावी ॥ रात्रदिवस हृद्रोग जीवीं ॥ अविश्वासें नांदवी धनलोभु ॥ ४७ ॥

---

१ ज्ञानी. २ कार्य. ३ मोठी, प्रबळ. ४ परकी. ५ खाऊं घालते. ६ व्यापकपणानें. ७ गिळावा काढून साफ; उपर्हा. ८ आपल्या निकडीनें. ९ आपल्या आत्म्याचें मरण. १० संपादनाचे यत्नानें. ११ प्राप्त झाल्यास. १२ मनाचें दुःख.

5ना. महाबाध. ✻ना. लोधलें. +ना. गोंवी

मायबापाशीं चोरी करवी ॥ स्त्रीपुत्रासीं कलहो लावी॥सुहृदांतें दूरीं दुरावी ॥हे द्रव्याची पदवी स्वाभाविक ॥४६॥ द्रव्यापाशीं आधिव्याधी ॥ द्रव्यापाशीं दुष्टबुद्धी ॥ द्रव्यापाशीं लोभक्रोधी॥ असत्य निरवधी द्रव्यापाशीं ॥ ४९ ॥ द्रव्यापाशीं अतिविकल्प ॥ द्रव्यापाशीं असे पाप ॥ द्रव्यापाशीं अतिसंताप ॥ पूर्ण दुःखरूप तें द्रव्य ॥ २६० ॥ हें दानें त्यागितां फळ गोमटें॥ लोभिया नरका ने हटेंतटें ॥ द्रव्याऐसेंगा वोखटें ॥ आन नभेटे तिहीं लोकीं ॥ ५१ ॥ नळी चण्याचे आशा ॥ वानरें मुठी धरणें तोचि फांसा ॥ तेवीं द्रव्यदाराभिलाषा ॥ नरदेहदशा अधःपातीं ॥ ५२ ॥ द्रव्य सहसा नामिळे पाहीं ॥ मिळे तें अनित्य अपायीं ॥ यालागीं द्रव्याच्या ठायीं ॥ सुख नाहीं त्रिशुद्धी ॥ ५३॥ धन वेंचोनि फाडोवाडें ॥ घर करिती वाडेंकोडें॥ तें अध्रुवत्वें सवेंचि पडे ॥ थितें द्रव्य बुडे आयुष्येंसीं ॥ ५४ ॥ करूनि आयुष्याचा मातेरा ॥ मुद्दल सिंचनें जोडिलें पुत्रा ॥ त्या पुत्राच्या मरणद्वारा ॥ दुःखदुर्धरामाजी पडती ॥ ५५ ॥ ' प्रपंचींचे सुहृदें समस्त ॥ जंव स्वार्थ तंव होती आप्त ॥ स्वार्थविरोधें ते अनाप्त ॥ होऊनि घात सुहृदां करिती ॥ ५६ ॥ करोनियां अतिहव्यासें ॥ मेळविती नानापशू ॥ त्यांचा सवेंचि होय नाश ॥ तेणें दुःखें त्रास होय गृहस्थां ॥ ५७ ॥ निजदेहोचि नश्वर येथ ॥ त्यासि प्रपंच नव्हेगा शाश्वत ॥ अवघें जगचि काळग्रस्त ॥ इहलोकीं समस्त ठकिलें विषयीं ॥ ५८ ॥ मनुष्यदेहो कर्म भूमि प्राप्त ॥ तो लोक ह्मणती ' कर्मजित ' ॥ हा जैसा नश्वर येथ ॥ तैसाच निश्चित नश्वर स्वर्ग ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ एवं लोकं परं विद्यान्नश्वरं कर्मनिर्मितम् ॥ सतुल्यातिशयध्वंसं यथा मंडलवर्तिनाम् ॥ २० ॥

॥ टीका ॥ मनीं धरोनि विषयभोग ॥ इहलोकीं करिती यागे ॥ पुण्य जोडोनियां सांग ॥ पावती स्वर्ग निजपुण्ययोगें ॥ २६० ॥ स्वर्गसुखा इंद्र अधिपती ॥ तोही पतनार्थ धोके चित्तीं ॥ विघ्नमूचितापसांप्रतीं ॥ स्वर्गस्थिती अपायी ॥६१॥ यापरी निजपुण्यें स्वर्गप्राप्ती ॥ त्या लोकांतें ' पुण्यजित ' ह्मणती ॥ तेही पुण्यक्षयें क्षया जाती ॥ तेणें धाकें धाकती स्वर्गस्थ श्रेष्ठ ॥ ६२ ॥ गांठीं पुण्य असतां चोख ॥ स्वर्गभोगीं असेल सुख ॥ हेही वार्ता समूळ लटिक ॥ स्वर्गीचें सुख ऐक राया ॥ ६३ ॥ समानपुण्यें समपदप्राप्ती ॥ त्यासीं स्पर्धा, कलहो करिती ॥ आपणाहूनि ज्यां अधिक स्थिती ॥ त्यांचा द्वेष चित्तीं अहर्निशीं ॥ ६४ ॥ जैसे राजे मंडळवर्ती ॥ राज्यलोभें कलहो करिती ॥ तैसी स्वर्गस्थां कलहस्थिती ॥ द्वेषें होती अतिदुःखी ॥ ६५ ॥ पतनभयें, कलह, द्वेषाची वोढी ॥ क्षयानें पावे पुण्यजोडी ॥ अधोमुख पडती उंबडीं ॥ यज्ञिकें बापुडीं चरफडती ॥ ६६ ॥ एवं स्वर्गसुख उल्हास ॥ मानिती ते केवळ पशु ॥ प्रत्यक्ष तेथ द्वेषनाश ॥ असमसाहस नित्य कलहो ॥ ६७ ॥ सेविलाचि विषयो नित्य सेविती ॥परी कदा नव्हे मानसीं तृप्ती ॥तरी मिथ्या ह्मणोनि नेणती॥

१ अपार. २ द्रव्य. ३ चांगले. ४ आवर्जून, हटकून. ५ चण्यांचे आशेनें वानर नळकंडीत हात घालितो तोच फासांत पडतो. ६ पुष्कळ. ७ आवडीनें. ८ अशाश्वतपणामुळें. ९ असलेलें. १० स्वर्गी. ११ अतिसोस, हाव. १२ लागलीच. १३ नाशवंत. १४ कालानें गिळिलेले. १५ फसविले. १६ यज्ञ. १७ पडण्याला. १८ भितो. १९ वैर. २० खालीं. २१ यज्ञ करणारे. २२ अनावर.

हे मोहकशक्ती मायेची ॥ ६८ ॥ जैसें वेश्येचें सुख साजणें ॥ वित्त घेऊनि, वोसंडणें ॥ तेवीं विषयाचा संग धरणें ॥ तंव तंव होणं अतिदुःखी ॥ ६९ ॥ यालागीं उभयभोग उपाया ॥ जे जे प्रवर्तले गा राया ॥ ते ते जाण ठकिले माया ॥ थितें गेलें वायां उत्तम आयुष्य ॥२७०॥ 'कर्मभूमी नरदेह प्राप्त' ॥ हें पूर्ण भाग्याचें मथित ॥ देव नरदेह वांछित ॥ तेही केले व्यर्थ विषयस्वार्थे ॥ ७१ ॥ एवं विषयाची आसक्ती ॥ माया ठकिले नेणों किती ॥ यालागीं विषयाची विरक्ती ॥ करावी गुरुभक्ती तेंचि सांगे ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् ॥ शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ॥ २१ ॥

॥ टीका ॥ जाणोनि विषयाचें नश्वरपण ॥ पावावयालागीं ब्रह्म पूर्ण ॥ सद्गुरुसि अनन्यशरण ॥ रिघावें संपूर्ण श्रद्धायुक्त ॥ ७३ ॥ सद्गुरु वचनमात्रें माया ॥ तरोनि हा निश्चयो राया ॥ येणें सद्भावें लागतां पायां ॥ पावावया निजस्वार्थ ॥ ७४ ॥ गुरु ऐसें जें ह्मणणें ॥ तेंही आहे बहुसालपणें ॥ ऐक राया तीं लक्षणें ॥ तुजकारणें सांगेन ॥ ७५ ॥ एक वेदाध्ययन गुरु ॥ एक व्याख्यानदानें उदारु ॥ एक ज्योतिषदानें गंभीरु ॥ परी ते सद्गुरु नह्मणती ज्ञाते ॥ ॥ ७६ ॥ एक आगमोक्त मंत्र उपासिती ॥ जप करावा विधानयुक्ती ॥ मग कें होईल निजप्राप्ती ॥ हें नकळे निश्चितीं गुरुशिष्यां ॥ ७७ ॥ एक वायुधारणा लाविती ॥ एक नाना लक्ष्यें दाविती ॥ एक हठयोगें गांविती ॥ एक बैसविती महामुद्रा ॥ ७८ ॥ एक ब्रह्मानुवादें चोखट ॥ तत्त्वनिरूपणीं उद्भट ॥ वैराग्य बोलिको वरिष्ट ॥ उपजवी विट उभयभोगांचा ॥ ॥ ७९ ॥ कैसें निरूपिती शब्दब्रह्म ॥ ऐकोनि सात्विकां येतसे प्रेम ॥ परी निजहृदयींचा भ्रम ॥ निरसे तें वर्म नेणतीची ॥ २८० ॥ जेवीं गुळ उसाचा घाणा ॥ तोंडींचा रस भरे मांदणा ॥ शब्दसोपटें भरोनि वदना ॥ करी परिभ्रमणा करकरित ॥ ८१ ॥ ऐसा जो कां शब्दज्ञानी ॥ उत्तम व्याख्याता ज्ञानगुणी ॥ तो जन रंजवी निरूपणीं ॥ स्वयें कोरडेपणीं करकरित ॥८२॥ योगक्षेम चाले गोमटा ॥ लौकिकीं थोर ज्ञानप्रतिष्ठा ॥ तेथें निजप्राप्तीची उत्कंठा ॥ नवचे वरिष्ठा शिष्यांची ॥ ८३ ॥ जेवीं अमृत ह्मणतां ॥ चवी नलभे गा सर्वथा ॥ तेवीं शाब्दिकज्ञानयोग्यता ॥ अनुभववार्ता स्वप्नीं नेणे ॥ ८४ ॥ जेणें स्वयें चाखिली नाहीं चवी ॥ तो दुजयातें गोडी कैची लावी ॥ यालागीं जो पूर्ण अनुभवी ॥ तो तारी सद्भावें सच्छिष्यासी ॥ ८५ ॥ एवं गुरुपणाची वेदांतिं ॥ असे बहुपणें नांदती ॥ 'जो करी अपरोक्षप्राप्ती ॥ त्यातें ह्मणती सद्गुरुस्वामी' ॥ ८६ ॥ ज्याचेनि वाक्यें असतां ॥ निःशेष मावळे तत्त्वतां ॥ त्यासीचि गा सद्गुरुता ॥ वेदशास्त्रार्थी तत्त्वतां प्रतिपाद्य ॥ ८७ ॥ जे उपदेशिती मंत्रतंत्र ॥ तेही पूज्यत्वें अतिसधर ॥ जेथें नुरे पूज्यपूजकता विचार ॥ तोचि साचार सद्गुरुस्वामी ॥ ८८ ॥ एकाचें गुह्य ब्रह्मज्ञान ॥ वस्तु देखोनि विरालें मन ॥ मावळलें द्वैताचें भान ॥ पडिलें मौन

१ त्यागणें. २ सार. ३ नानाप्रकारांनीं. ४ शास्त्रोक्त. ५ योगमार्ग, वायु कोंडणें. ६ ब्रह्माच्या कथनानें. ७ ब्रह्मरूप सांगण्याविषयीं. ८ शूर. ९ बोलण्यांत. १० इह-परलोकींच्या, ११ नाहींसा होतो. १२ पात्रांस. १३ चोईं. १४ किरण. १५ शब्दमात्र जाणणारा. १६ चांगला. १७ बोली. १८ वार्ता. १८ नास्तिकपणा. १९ [illegible]

चहुंवाचा ॥ ८९ ॥ 'इंद्रियें टवकारिलीं समस्त ॥ प्राण पांगुळला जेथिंचा तेथ ॥ वस्तु देखोनियां परमाद्भुत ॥ पडले तटस्थ देहभावा ' ॥ २९० ॥ ऐसा जो आत्मानुभवी ॥ त्यातें सद्भावें शिष्य विनवी , ॥ तंव तो पुसे ना समजावी ॥ ताटस्थ स्वभावी अबोलणा ॥ ९१ ॥ एका अनुभवा आलें ब्रह्म ॥ फिटला बाध्यबाधकतेचा भ्रम ॥ मोडलें द्वैतभावाचें कर्म ॥ जगीं विषम असेना ॥ ९२ ॥ परी अनुचित वर्तणें ॥ अघटमान कर्म करणें ॥ अत्यंत उग्रता मिरवणें ॥ दुर्धरपणं भयानक ॥ ९३ ॥ आपण आपणियामाजी हंसत ॥ ध्वनितें बोले परमार्थ ॥ तेथें बोधेना शिष्याचें चित्त ॥ पडे दुश्चित्त ते ठायीं ॥ ९४ ॥ ऐसा जो वर्ते ब्रह्मज्ञानी ॥ त्याची ब्रह्मस्थिती नमने जनीं ॥ मा कोण जाईल भाव धरोनी ॥ बोधालागोनी त्यापाशीं ॥ ९५ ॥ आतां सद्गुरूचीं जीं निजलक्षणें ॥ राया सांगेन तुजकारणें ॥ जे ऐकतां अंतःकरणें ॥ सुखी होणें सद्भावें ॥९६॥ तरी जो कायावाचामनें ॥ अतिकृपाळु दीनाकारणें ॥ तोडी शिष्यांचीं भवबंधनें ॥ उठवी ठाणें अहंकाराचें ॥ ९७ ॥ 'जो शब्दज्ञानें पारंगत ॥ ब्रह्मानंदें सदा डुल्लत ॥ शिष्यप्रबोधनीं समर्थ ॥ यथोचित निजभावें' ॥ ९८ ॥ ज्याचा जैसा जैसा भावो ॥ तैसातैसा करी अनुभवो ॥ तरी गुरुत्वाचा अहंभावो ॥ अणुमात्र पहाहो धरीना ॥ ९९ ॥ शिष्यापासूनि सेवा घेणें ॥ हें स्वप्नींही नस्मरे मनें ॥ शिष्याची सेवा स्वयें करणें ॥ पूज्यत्वें पाहणें निज शिष्यां ' ॥ ३०० ॥ 'शिष्य देखावा पुत्रासमान ॥ हें श्रुतिवाक्य नमनी मन ॥ दृष्टी देखे नेणे गौण ॥ शिष्या देखे संपूर्ण परब्रह्मत्वें ' ॥ १ ॥ शिष्य सेवा करीतो निजभावार्थें ॥ परी तो सेवक न ह्मणे त्यातें ॥ ज्यासी भगवद्रूप सर्वभूतें ॥ शिष्य वेगळा तेथें सेवकत्वें नुरे ' ॥ २ ॥ ऐसा मी एक महायोगी ॥ हेंही न मिरवी तो जगीं ॥ गुरुत्वाचा ताठा अंगीं ॥ अंगसंगीं लागों नेदी ॥ ३ ॥ आपुल्या योगक्षेमाचें सांकडें ॥ स्वप्नींही न घाली शिष्याकडे ॥ शिष्यसंकट अतिगाढें ॥ निवारी रोकडें निजांगें ॥ ॥ ४ ॥ मी एक अकर्ता निजात्मयोगी ॥ ह्मणोनि विषयातें भोगी ॥ अथवा विषयो निःशेष त्यागी ॥ हाही आग्रहो अंगीं असेना ॥ ५ ॥ तो विषयभोगी ना ×स्वयें त्यागी ॥ ते अदृष्ट निजविभागीं ॥ लावूनियां देहाच्या अंगीं ॥ परब्रह्मयोगी विचरत ॥ ६ ॥ देह दैवें पालखीमाजी चढे ॥ अथवा विष्ठेमाजी पडे ॥ तें देहींचें सुखदुःख त्याकडे ॥ मी ह्मणोनि, पुढें कदा नरिघे ॥ ७ ॥ 'देहीं असोनि नाहीं अहंकृती ॥ गेहीं असोनि नाहीं गृहासक्ती ॥ लोकीं लोकांमाजी लौकिकस्थिती ॥ सुखें वर्तती लोकांमाजिवे ' ॥ ८ ॥ 'त्यासि स्त्री ह्मणे माझा भर्ता ॥ पुत्र ह्मणे माझा पिता ॥ शिष्य ह्मणती गुरु तत्त्वतां ॥ तो त्यांहूनि परता त्यांमाजी वर्ते ॥ ९ ॥ ऐशिया पूर्णप्रतीती ॥ आचरोनि दावी भक्ती ॥ 'हरि भजावा सर्वांभूतीं ' ॥ हेंच शिष्यांप्रती उपदेशी ॥ ३१० ॥ एवं गुरूचीं निजलक्षणें ॥ पंडितां नकळती ज्ञातेपणें ॥ पूर्णानुभवी जाणती खुणें ॥ इतरांचें जाणणें पांगुळे तेथें ॥ ११ ॥ 'त्याचें गुरुत्वाची ओळखण ॥ अंगीं निजशांति संपूर्ण ॥ हेंचि गुरुत्वाचें लक्षण ॥ मुख्य लक्षण हेंचि

---

१ राहिलीं. २ कुरु न पुसे न मागे. ( गुरोस्तु मौनं व्याख्यानं, शिष्यस्तुच्छिन्नसंशयः ) ३ मुका. ४ कमी जास्ती. ५ अतिनिःसंग. ६ न होणारें, अघटित. ७ अस्पष्ट, गूढ. ८ मग. ९ प्राणिमात्र. निर्वाहाचें १० वेगळा. ११ जाणतेपणाच्या अभिमानानें.

×ना. सवे.

राया ॥ १२ ॥ जगीं शांति जाहली परदेशी ॥ कोठेंही ठाव नमिळे तिशी ॥ ते आली सद्गुरुपाशीं ॥ सुखवासामी वसावया ॥ १३ ॥ यापरी सद्गुरुपाशीं शांती ॥ स्वयें आली सुखवासें वस्ती ॥ जेवीं कां माहेरा-आंतौती ॥ स्वानंदें क्रीडती कन्या जैशी ॥१४॥ जाणे वेदार्थशास्त्र निश्चितीं॥तरी जो नमिरवी व्युत्पत्ती॥' ज्यासि अपरोक्ष पूर्णशांती '॥ तो सद्गुरुमूर्ती निश्चयें राया ॥ १५ ॥ श्रंगी श्रोते कोपती येथ ॥ ह्मणती ग्रंथ वाढविला व्यर्थ ॥ निष्णातें या पदाचा अर्थ ॥ काढितां येथ स्फुरलें हें ॥१६॥ हे माझे गांठीची नव्हे युक्ती ॥ सद्गुरु आपण आपुली स्थिती ॥ बोलवीतसे ग्रंथार्थी॥ पदपदार्थी शोधूनी ॥१७॥ तरी सद्गुरूचीं लक्षणें ॥ न वर्णवती अगाधपणें ॥ वेद वेडावला मुकेपणें ॥ तेथें माझें बोलणें सरे केवीं ॥१८॥ येथ आश्चर्य कैसें देवा ॥ श्रीभागवत आणि देशभाखा॥परमार्थ साधिला नेटका ॥तुष्टला निजसखा जनार्दनस्वामी ॥ १९ ॥ एका जनार्दना शरण ॥ त्याची जे होय कृपा परिपूर्ण ॥ त्या देहीं असतां देहबंधन ॥ नातळे जाण गुरुभक्तां ॥ ३२० ॥ त्याचे सेवितां निजचरण ॥ देहीं नबाधी देहबंधन ॥ त्यासि जाहलिया अनन्यशरण ॥ हे अगाध कोण हें नकळे वेदा ॥ २१ ॥ नकरितां सद्गुरुभक्ती ॥ कदा नव्हे परमार्थप्राप्ती ॥ यालागीं सद्गुरुभक्ती ॥ बोलिली ग्रंथीं शिष्यहितार्थे ॥ २२ ॥ यालागीं सद्गुरुपाशीं ॥ अनन्यशरण होतां त्यासी ॥ तो सद्भावें निववी शिष्यासी ॥ निजबोधेंसी यथार्थ ॥ २३ ॥ सद्गुरुस्थितीचें निरूपण ॥ राया सांगितलें संपूर्ण ॥ आतां शिष्याचें लक्षण ॥ सावधान अवधारीं ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ तत्र भागवतान धर्मान् शिक्षेद्गुर्वात्मदैवतः ॥ अमाययाऽनुवृत्त्या यैस्तुष्येदात्मात्मदो हरिः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ वरीवरी दिसती सात्त्विक ॥ भीतरीं विकल्पी शिष्य एक ॥ एक ते केवळ दांभिक ॥ एक ज्ञानठक अतिधूर्त ॥ २५ ॥ एक ते केवळ प्रतिष्ठाकाम ॥ एकासि पूज्यतेचा संभ्रम ॥ एकासि जाणिवेचा आक्रम ॥ एकाचे पोटीं भ्रम महासिद्धीचा ॥२६॥ एक वाग्वादी वाजट ॥ एक अतिशयेंसी कर्मठ ॥ एक केवळ कर्मनष्ट ॥ आह्मी ब्रह्मनिष्ठ अभिमानें ॥ २७ ॥ एका आवडे वायुधारण ॥ एका आसनजयाभिमान ॥ एकाचें संशयी मन ॥ विश्वास पूर्ण दृढ नाहीं ॥ २८ ॥ एक आदरें उपदेश घेती ॥ मग होय नव्हे विकल्प चित्तीं ॥ ऐशा अनेक शिष्यपंक्ती ॥ ते जाण निश्चितीं मायिक ॥२९॥ आतां जे कां अमायिक॥ शोधितसत्त्वाचे सात्त्विक ॥ मुख्य परमार्थी साधक ॥ जे अवंचक सर्वस्वें ॥ ३३० ॥ ' जे गुरुचरणाचे अंकिले ' ॥ जे गुरुवाक्या जीवें विकले ॥ जे सद्गुरुलागीं वहिले ॥ सर्वस्व आपुलें वोवाळिती ' ॥ ३१ ॥ जो गुरूच्या बोलावरी ॥ जीविताची कुरवंडी करी ॥ जो गुरुआज्ञेबाहेरी ॥ तिळभरी होंनेणे ॥ ३२ ॥ सद्गुरूतें मनुष्यबुद्धी ॥ पाहोंचि नेणे त्रिशुद्धी ॥ सेवेलागीं निरवधी ॥ हर्षानंदीं तत्पर ॥ ३३ ॥ निजभावार्थे सादर ॥ सेवेलागीं अतितत्पर ॥ शरीर आठही प्रहर ॥ अणुमात्र वेंचीना ॥३४॥ उंच अथवा नीच काम ॥ ह्मणों नेणे मनोधर्म ॥ गौण करोनि नित्यकर्म॥

१ माहेरी. २ कदाचित्. ३ कुशल. ४ पदरची. ५ प्राकृत भाषा. ६ नस्पर्शे. ७ मोठेपणाची इच्छा करणारे. ८ वाचाळ. ९ योगांतील आसनें साधल्याचा गर्व. १० उपदेशानें कार्य होईल की नाहीं हा संशय. ११ खरें मायिक किंवा वंचक नव्हत. १२ आधीन. १३ वोवाळणी. १४ निःसीम.

मानी उत्तमोत्तम गुरुसेवा ॥ ३५ ॥ सेवेलागीं निष्कपट ॥ नित्य निजानुभवें चोखट ॥ जंवजंव सेवा पडे सदट ॥ तंवतंव उद्भट उल्हासु ॥ ३६ ॥ सच्छिष्य असच्छिष्य समुदावो ॥ सद्गुरूसि सारिखेचि पहाहो ॥ ज्याचे हृदयीं जैसा भावो ॥ तैसा पहाहो ×फळभोग ॥ ३७ ॥ ' भावेषु विद्यते देवो ' ॥ हा उपदेशी मुख्य निर्वाहो ॥ आपुला आपणिया भावो ॥ फळभोग पहाहो भोगवी ॥ ३८ ॥ चुकवावया मृत्यूचा ठावो ॥ जाणिवे आणितां निजभावो ॥ हिरण्यकशिपु पहाहो ॥ संधी साधोनि देवो निर्दाळी त्यासी ॥ ३९ ॥ ' तेथेंचि प्रऱ्हादाचा भावो ॥ मज रक्षिता देवाधिदेवो ॥ त्यासी सांक्षेपें मारितां रावो ॥ मरणचि वावो भावार्थें केलें ' ॥ ३४० ॥ ' परमार्थी जें जाणपण ॥ ते जाणावी नागवण ॥ यालागीं सद्भावें संपूर्ण ॥ तो जन्ममरणछेदकु ॥ ४१ ॥ मी शिष्यपरीक्षकु ज्ञाता ॥ हे सद्गुरूसि नाहीं अहंता ॥ तेथें जैशी त्याची भावार्थता ॥ तैशा अर्था तो पावे ॥ ४२ ॥ हें असो सच्छिष्याचा सद्भावो ॥ राया अभिनव कैसा पहाहो ॥ गुरु ब्रह्म वाक्यभावो ॥ निजनिर्वाहो निष्टंक ॥ ४३ ॥ माझ्या इंद्रियवृत्ती चाळिता ॥ सद्गुरु निजात्मा मज आंतौता ॥ यालागीं सेवेलागीं सर्वथा ॥ ब्रह्मरूप तत्त्वतां सद्गुरु मानी ॥४४॥ सद्गुरुचरणीं तो आपण ॥ चित्तवित्तजीवितेंसि संपूर्ण ॥ करून घाली आत्मार्पण ॥ सर्वस्वें संपूर्ण सद्भावेंसी ॥ ४५ ॥ तेथें संतुष्टला स्वामी संपूर्ण ॥ तोही सर्वस्वें भुलोन ॥ आवडी निजांग अर्पून ॥ सेवका आधीन स्वामी होय ॥४६॥ आत्मार्पण करितां बळी ॥ द्वारीं द्वारपाळ जाहला वनमाळी ॥ ऐसी भजनाची नव्हाळी ॥ सेवकाजवळी स्वामी तिष्ठे ॥४७॥ एवढी हे *अगाधप्रीती ॥ उत्तमभक्त स्वयें पावती ॥ वाळ्याभोळ्यां हेचि स्थिती॥ कैशा रीतीं आतुडे? ॥ ४८ ॥ याचिलागीं सद्गुरुपाशीं ॥ शरण रिघावें सर्वस्वेंशी ॥ तो संतोषोनियां शिष्यासी ॥ भजनधर्मासी उपदेशी ॥ ४९ ॥ जेणें भजनें भागवत ॥ भजोनि जाहले उत्तम भक्त ॥ ते भागवत धर्म समस्त ॥ शिकावे निश्चित सद्भावेंसी ॥ ३५० ॥ ' मुख्य भागवतधर्मास्थिती ॥ अवश्य करावी सत्संगती ' ॥ हेंचि सद्गुरु उपदेशिती ॥ असत्संगती त्यागार्थ ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ सर्वतो मनसोऽसंगमादौ संगं च साधुषु ॥ दयां मैत्रीं प्रश्रयं च भूतेष्वद्धा यथोचितम् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ सर्वांपासोनि निःसंग ॥ जरी मनीं होणें आहे चांग ॥ तें अवश्य धरावा सत्संग ॥ तो असत्संग त्यागवी ॥५२॥ ' मुख्य असत्संग देहसंगती ' ॥ त्याची समूळ करावया निवृत्ती ॥ जगीं दादुंगी सत्संगती ॥ जाण निश्चितीं नृपनाथा ॥ ५३ ॥ तेथें ' दया मैत्री प्रश्रयो ' पूर्ण ॥ मुख्यत्वें हें त्रिविध लक्षण ॥ अवश्य शिकावे आपण ॥ सच्छिष्यें जाण स्वहितासी ॥ ५४ ॥ सांडोनियां थोरपण ॥ साधूसि नम्र व्हावें संपूर्ण ॥ सांडोनियां देहाभिमान ॥ त्यासी लोटांगण घालावें ॥ ५५ ॥ साधूपरता पूज्य पहाहो ॥ जगीं नाहीं आन देवो ॥ संतपूजेनें देवाधिदेवो ॥ स्वयें स्वयमेवो संतुष्टे ॥ ५६ ॥ संतपदींचे रजःकण ॥ शिरीं वंदावे अहर्निशी

१ भारी अधिक. २ ' भाव तेथें देव आहे. ' ३ तात्पर्य. ४ यत्नपूर्वक. ५ राजा, हिरण्यकशिपु. ६ नाश. ७ निश्चित. ८ आंत आंत. ९ अपूर्वता. १० बलिष्ठ. ११ नम्रता.

×पा. फलभोगी. *पा. प्राप्ती.

पूर्ण ॥ संतांपुढें जाणपण ॥ सर्वथा आपण नमिरवावें ॥ ५७ ॥ देखोनि संतसमुदावो ॥ अनन्यगती भगवद्भावो ॥ भगवद्भावनें नम्रस्वभावो ॥ प्रभयो पहाहो यानांव ॥ ५८ ॥ नम्रतें सेवितां संतचरण ॥ तेथें भूतदया वाढे संपूर्ण ॥ तें दयेचें निजलक्षण ॥ सावधान अवधारी ॥ ५९ ॥ भूतांसि कठिणपण ॥ देखतांचि निघोंपाहे प्राण ॥ मा स्वयें करील आपण ॥ हें सर्वथा जाण स्वप्नीं नघडे ॥३६०॥ जेणें आपणासि होय दुःख ॥ तें भूतांसि न करी निःशेख ॥ जेणें आपणासि होय सुख ॥ तें आवश्यक करी दीना ॥ ६१ ॥ सर्वभूतीं दया समान ॥ कदा नबोले कठिण वचन ॥ भूतांची पीडा निवारण ॥ करोनि आपण सुखोपाय चिंती ॥ ६२ ॥ जीवमात्रीं दुरुक्ती बोलतां ॥ जिव्हेच्या घेवोंपाहे जीवितां ॥ भूतीं दुष्टपण चाळितां ॥ समूळ निजचित्ता निर्दाळूं पाहे ॥ ६३ ॥ भूतांसि जेथें पीडा पावे ॥ त्यातळीं जीव घालूनि धांवे ॥ जीवावरीस भूतें सर्वें ॥ दयागोरवें पदियेंतीं॥६४॥ऐसें जें कारुण्य पूर्ण॥त्यानांव दया संपूर्ण ॥ आतां मैत्रीचें लक्षण ॥ असाधारण तें ऐका ॥ ६५ ॥ सर्वभूतांच्या ठायीं ॥ सौहृदावांचोनि दुजें नाहीं ॥ तरी नकळितांचि मैत्री पाहीं ॥ ठायींचेठायीं अलौलिक ॥ ६६ ॥ जे विषयवियोगें नविटे ॥ नानाविकल्पीं न तुटे ॥ आलियाही परमसंकटें ॥ मैत्री नेटेंपाटें सदा साह्य ॥ ६७ ॥ यालागीं मित्रभावो ॥ प्राण गेलिया नतुटे पहाहो ॥ देखतां कल्पांतकाळघावो ॥ निजमित्रसमुदावो एकवटे एकीं ॥६८॥ ऐसी आचरतां निजस्थिती ॥ श्रद्धा उपजे सर्वांभूतीं ॥त्या श्रद्धेची व्युत्पत्ती ॥ यथानिगुती सांगेन ॥ ६९ ॥ नवल श्रद्धेचें लक्षण ॥ श्रद्धा सुगी समसमान ॥ तरी यथोचित विधान ॥ सर्वथा जाण चुकेना ॥ ३७० ॥ अर्घ्यपाद्यादिपूजन ॥ सकळदान आणि सन्मान ॥ हे श्रद्धा ब्राह्मणीं संपूर्ण ॥ एकासि तें जाण अन्नमात्रची ॥ ७१ ॥ एका अन्न आच्छादन ॥ एकासि ते कोरडे कण ॥ एका तृण आणि जीवन ॥ एका पयपान यथोचितें ॥ ७२ ॥ जेणें ज्यासी सुख संपूर्ण ॥ तें तें उचित श्रद्धे जाण ॥ अनुचितें श्रद्धेचें विंदान ॥ दुःख करी पूर्ण सर्वार्थीं ॥ ७३ ॥ जेवीं ब्राह्मणा वाढिलें तृण ॥ गाईस वाढिलें मिष्टान्न ॥ श्वानासि बैसका सिंहासन ॥ साधूसि आसन थारोळा ॥ ७४ ॥ व्याघ्रासि पडिल्या लंघन ॥ त्यासि अर्पूनये गोदान ॥ गाय गांदल्या संपूर्ण ॥ तैलाभ्यंगन करूं नये ॥ ७५ ॥ होकां देह इंद्रियें जरी एकें ॥ तरी जिव्हाकर्म नव्हे नाकें ॥ तेवीं एकात्मताभूत जे देखे ॥ उचितोन्मुखें यजावा ॥ ७६ ॥ करितां यथोचित अर्पण ॥ जरी क्रिया होय भिन्नभिन्न ॥ तरी अंतर श्रद्धा अभिन्न ॥ हें मुख्य लक्षण भागवतधर्मीं ॥ ७७ ॥ भूतीं भूतात्मा अभिन्नस्थिती ॥ दया मैत्री साधूंची भक्ती ॥ हेंच आतुडे कैसा रीतीं ॥ प्रबुद्ध तदर्थीं उपाव सांगें ॥ ७८ ॥ तेचि नव श्लोकीं श्लोकोक्ती ॥ समूळ भागवतधर्म स्थिती ॥ प्रबुद्ध सांगे रायाप्रती ॥ साधकीं निजप्राप्ती साधावया ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ शौचं तपस्तितिक्षां च मौनं स्वाध्यायमार्जवम् ॥ ब्रह्मचर्यमहिंसां च समत्वं द्वंद्वसंज्ञयोः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ मुख्यसाधावया परमार्था ॥ अवश्य पाहिजे गा शुचिता ॥ शुचित्वावांचोनि

१ ज्ञातेपणा. २ आचरितां. ३ स्नेहावेगळें. ४ निश्चयानें. ५ यथार्थ. ६ अयोग्य श्रद्धेनें. ७ मोठे खालची पाल. ८ एकरूपानें. ९ पवित्रता.

तत्वतां ॥ नलभे हातां निजस्वार्थे ॥ ३८० ॥ यालागीं गा नृपनाथा ॥ शुद्ध शौचाची ऐक कथा ॥ जे उभययोगें कर्तव्यता ॥ आंतोनि तत्त्वतां बाह्यशुद्धी॥८१॥ मन मळिण वासनामेळें॥ तें नकरितां सोंविळें ॥ बाह्य पवित्रता अहंबळें ॥ तें जाण आंधळें न्याहाळी जैसें ॥ ८२ ॥ मन मळिण वासनामेळें ॥ तें प्रक्षाळूनि सोंवळें ॥ करावें गा भावबळें ॥ गुरुशास्त्रमेळें निजनिष्ठा ॥ ८३ ॥ सोनें जेवीं पुटीं पडे ॥ मळ तुटे वाणीं चढे ॥ तेवीं गुरुसेवा *जडत्व मोडे ॥ चित्तशुद्धी जोडे निर्दुष्ट ॥ ८४ ॥ आरसा सहाणीं तोडिजे ॥ तेणें स्वमुखा शुद्धत्व जोडिजे ॥ तेवीं चित्तशुद्धी उघडिजे ॥ सहजीं सहज निजशुद्धी ॥ ८५ ॥ लोहें परीस झांकिजे ॥ तंव लोहत्वा मुकिजे ॥ +तेवीं आंतर शुद्धीनें कीजे ॥ महानिर्बुजे स्थूळबुद्धी ॥ ८६ ॥ सूर्यासन्मुख सूर्यकांत ॥ झालिया शुद्धत्वें होय दीप्त ॥ ते प्रभा बाह्य प्रकाशत ॥ अग्निहोत्रार्थ महायाग ॥ ८७ ॥ तेवीं गुरुवाक्यें अंतरशुद्धता ॥ सबाह्य आली शुचिता ॥ हे नकरूनि जे पवित्रता ॥ ते जाण तत्त्वतां अतिभंडिमा ॥ ८८ ॥ अल्पजळ शौचाप्रती ॥ तेणें हात खरकटले हाती ॥ शेवटीं गिरबडे बृहती ॥ तेवीं ०विकल्पीं होती अपवित्र ॥ ८९ ॥ भरलें काळकूट जीवीं ॥ वरी टवटवीत अतिबरवीं ॥ तें इंद्रावण कोणही नसेवी ॥ ×अंतरस्वभावीं अतिमाळिण ॥ ३९० ॥ ' तीर्थीं धुतला रजकराजु ॥ तो काय होईल शुद्ध द्विजु ॥ नटें घेतला राजध्वजु ॥ तो नव्हे पूज्य बाह्यक्रियावशें ' ॥ ९१ ॥ सुंदरी सुकुमार साजिरी ॥ वोठीं कुष्ठता तिळभरी ॥ झाल्या तीतें कोण वरी ॥ वरीवरी बरी दिसतांही ॥ ९२ ॥ नाकतीं माथां मोत्यांची जाळी ॥ सुंदरी सर्पांणी दाणा ल्याली ॥ तेवीं बाह्य पवित्रता दाविली ॥ ते ते केली निजभंडिमा ॥ ९३ ॥ दहीं माखला वायस ॥ तो काय होईल राजहंस ॥ दहीं म्हणोनि मंथितां कापुस ॥ तृप्ती नव्हे, उपहास जगीं होय ॥ ९४ ॥ ' तेवीं अंतरीं विकल्पु असतां ॥ बाह्य जे जे पवित्रता ॥ ते ते क्रिया नृपनाथा ॥ जाण तत्त्वतां अतिभंडिमा ॥ ९५ ॥ ' अंतर क्षाळिलें गुरुप्रतीतीं ॥ बाह्य क्षाळिलें शास्त्र युक्ती ' ॥ ऐसें शुचित्व निजनिश्चितीं ॥ अद्वैतस्थिती तेथ नांदे ॥ ९६ ॥ अंतरीं शुचित्व पूर्णवसे ॥ तें बाह्यकर्मीं स्वयें प्रकाशे ॥ तें शुचित्वचि अनायासें ॥ परमार्थदशे प्रकाशी ॥ ९७ ॥ ईश्वरभावाचें निजवर्म ॥ ज्याचे पोटीं रिघालें सप्रेम ॥ त्याचें कर्मचि होय ब्रह्म ॥ त्या देहभ्रम बाधीना ॥ ९८ ॥ या नाम शुद्ध शुचिष्मंतता ॥ सत्य जाणगा नृपनाथा ॥ तपाचीही स्थिति आतां ॥ ऐक तत्त्वतां सांगेन ॥९९॥ शरीर शोषणा नांव तप ॥ तें प्रारब्धभोगानुरूप ॥ ' हृदयीं वाहणें कृष्णस्वरूप ॥ तो शुद्ध संक्षेप तपाचा ' ॥ ४०० ॥ जेवीं धुरसोनि दिठी ॥ शर रेणामाजी उठी ॥ तेवीं ईश्वर धरोनि पोटीं ॥ वर्ते तो सृष्टीं तपियां शुद्ध ॥ १ ॥ हेंचि तपाचें निज स्वरूप ॥ याचि नांव शुद्ध तप ॥ यावरतें नचढे रूप ॥ व्यर्थ वाग्जल्प कां करावें ॥ २ ॥ द्वंद्वसहिष्णुता मुमुक्षा ॥ यानांव म्हणिजे तितिक्षा ॥ तेही जाणावया लक्षा ॥ नृपाध्यक्षा

१ अहंकाराच्या बळानें. २ भट्टींत मुशींत. ३ कमाला, तेजाला. ४ घांसावें. ५ दिपे, घाबरे. ६ फजीती, ढोंग. ७ मळकट. ८ लडबडे. ९ गुद. १० कडू इंद्रावन. ११ राजाचें निशाण. १२ नत्नहीन. १३ पाणीदार मोत्यांची नथ. १४ आत्मप्रतारणा. १५ घुसळितां. १६ थट्टा. १७ अतिफजीती. १८ पवित्रत्व. १९ पवित्रता. २० प्रयत्न. २१ अग्रभागीं देऊन. २२ तपस्वी. २३ बडबड.

*ना. अजडत्व. +ना. तेवीं अंतर शुद्धी जेवीं कीजे ॥ मग हा मुकिजे स्थूलबुद्धी. ०ना. विकल्पें. ×ना. अंतर अशुची.

अवधारीं ॥ ३ ॥ सुखदुःख *उभयभोग ॥ दोंमाजी अखंड आपुलें अंग ॥ जेवीं चित्रींची गाय आणि वाघ ॥ दोहींमाजी सांग निजत्वें भिंती ॥ ४ ॥ जेवीं का दावाग्नी उन्हाळें ॥ आकाश जेमें नपोळे ॥ असोनि त्याचेनि मेळें ॥ त्यावेगळें अलिप्त ॥ ५ ॥ शीतळ जळ कां हींव पडे ॥ पृथ्वी निजक्षमा नकांकडे ॥ तेवीं निजस्वरूप-सुखवाडें ॥ द्वंद्वा नातुडे निजसाधक ॥ ६ ॥ शरीर जरी हिंवें कांपे ॥ तेणें देह कांपे आपण नकांपे ॥ शरीर अतिउष्णें तापे ॥ परी साधक नताप देहतापामाजी ॥ ७ ॥ सुख देखोनि दिठी ॥ ज्या गोडिया घाली मिठी ॥ दुःखहीं त्याची आवडी मोठी ॥ द्वंद्वसहिष्णुता मोठी यानांव राया ॥ ८ ॥ गोफणगुंडा मनसुख ॥ लागतां अवश्य उठे दुःख ॥ तोच सुवर्णाचा जाहलिया देख ॥ दुःख लोपोनि सुख अनिवार वाढे ॥ ९ ॥ सुखदुःखप्रकाशक ॥ निजवस्तु असे एक ॥ त्यां एकात्मता जाहल्या देख ॥ द्वंद्वें साधक सुखें साहती ॥ ४१० ॥ तेवीं द्वंद्वाचें जाणपण ॥ जाणवीत असे जें ज्ञान ॥ तें जाणितल्या आपण ॥ द्वंद्व संपूर्ण निर्द्वंद्व होती ॥ ११ ॥ रस ऊंस कठिणपण ॥ त्यामाजी गोडी अखंड पूर्ण ॥ तेवीं द्वंद्वामाजीं वस्तु चिद्घन ॥ अखंडदंडायमान स्वयें देखे ॥ १२ ॥ ऐशी हे अखंडता ॥ जंव नये साधकांचे हाता ॥ तंव द्वंद्वाची सहनता ॥ नये नृपनाथा निश्चयेंशी ॥ १३ ॥ यानांव द्वंद्वसहन ॥ निश्चयेंसीं जाण संपूर्ण ॥ आतां मौनाचें लक्षण ॥ सावधान अवधारीं ॥ १४ ॥ वाग्वाद करावा जनीं ॥ तें दृढ व्हावें देहाभिमानीं ॥ मांडविला तो सद्गुरूंनीं ॥ निःशेष धोउनी शब्देंसीं ॥ १५ ॥ सद्गुरुवचन पडतां कानीं ॥ स्तुति निंदा गिळोनि दोन्हीं ॥ बोल बोलते निरसुनी ॥ हृदयभुवनीं परिपक्व बोले ॥ १६ ॥ ' तेव्हां ज्याचे बोलावे अवगुण ॥ तेथें तेथें हृदयस्थ आपण ॥ यालागीं न बोले पैशून्य ॥ पडे मौन गुरुवाक्यें ॥ १७ ॥ गुण देखोनियां स्तवन ॥ करितां पडे दृढ मौन ॥ मीचि स्तव्य स्तविता स्तवन ॥ मज म्यां वानितां पूर्ण मूर्खत्व माझें ॥ १८ ॥ निजात्मा निःशेष नसे ॥ ऐसा रितां ठाव न दिसे ॥ तेथें जें जें कांहीं दिसे ॥ तें आत्मप्रकाशें सदोदित ॥ १९ ॥ ऐशी सद्गुरूंनीं दाखविली युक्ती ॥ ती विश्वासें स्थिरावली चित्तीं ॥ यालागीं निंदा आणि स्तुति ॥ वाचेपर्ता बोलवेना ॥ ४२० ॥ संवाद करावया निजस्वार्थी ॥ तंव सद्गुरूच्या वचनोक्ती ॥ खुंटल्या वेदशास्त्रांच्या युक्ती ॥ त्याहीवरी स्थिती चढेना ॥ २१ ॥ एवं स्तुति निंदा वाग्वाद ॥ करणें खुंटला संवाद ॥ महामौन अतिशुद्ध ॥ परमानंद साधकां ॥ २२ ॥ ऐसें साधावया दृढ मौन ॥ सद्गुरु शिकवी वेदाध्ययन ॥ उपनिषदर्थ विवंचून ॥ पदवी संपूर्ण अर्थावबोधें ॥ २३ ॥ अथवा अतिशयेंसि मौन ॥ श्रीरामकृष्णनामस्मरण ॥ अखंड नामें गर्जतां जाण ॥ वेदार्थ पूर्ण तिष्ठती पुढें ॥ २४ ॥ नित्य रामनामें गर्जे वाणी ॥ त्यासि तीर्थें येती लोटांगणीं ॥ सुरवर लागती चरणीं ॥ यम पायवणी स्वयें वंदी ॥ २५ ॥ रामनामाचें जें स्मरण ॥ #यानांव गा स्वाध्याय जाण ॥ वेदें नाम स्तविलें पूर्ण ॥ +शुद्ध अध्ययन हरिनामें ॥ २६ ॥ ' वेद अथवा नामस्मरण ' ॥ यानांव गा स्वाध्यायो जाण ॥ आतां आर्जवाचें लक्षण ॥ ऐके संपूर्ण महाराजा ॥ २७ ॥ ' आतां आर्जव तें ऐसें ॥ सर्वां जीवीं जीवन जैसें ॥ कां तंतू जैसा निजविलासें ॥ अविरोधें असे

१ कांकडत नाहीं. २ मुखानें. ३ स्वाधीन होत नाहीं. ४ भोगी. ५ गोफणींतील दगड. ६ शीत व उष्ण यांचें सहन करणें. ७ आत्म्याच्या दर्शनानें. ८ स्पष्ट करून. ९ सरळपण.

*पा. उभय भाग. #पा. त्या स्मरणामाजी महामौन. +पा. महाध्ययन हरिनामें.

पटाआंत् ' ॥ २८ ॥ साखरेचें इंद्रावण ॥ केलिया नवेचे गोडपण ॥ तैसें विषमाही जीवा जाण् ॥ आर्जवें पूर्ण रंजवी स्वभावें ॥ २९ ॥ ' वक्र चंद्राची चंद्रिका ॥ परी अमृत वक्र नव्हे देखा ॥ तैसें देखोनि विषमलोकां ॥ मनोवृत्ती देखा पालटेना ' ॥ ४३० ॥ निपराध न देखे कोणासीं ॥ जिवलग सोयरा सर्वांशीं ॥ वोळखी जीवमात्रांशी ॥ जैसी तैसी जुनाट ॥ ३१ ॥ न्यहीं मंतप्ता आधार देत ॥ वरुनी घणघाय घेत ॥ सांडस घायातळीं सुत ॥ तें आघवेंचि आप्त लोहाचे लोहो ॥ ३२ ॥ यापरी जयास आप्त सर्वदा सर्व ॥ ऐसा जो कां निजस्वभाव ॥ तया नांव गा आर्जव ॥ अति अपूर्व गुरुदीक्षा ॥ ३३ ॥ सुर असुर नर ऋषीश्वर ॥ मदनें केले निजकिंकर ॥ कंदर्पाचा मार थोर ॥ अतिदुर्धर अनंग ॥ ३४ ॥ अंतरीं कामाचें दृढ ठाणें ॥ वरीवरी दांत चाऊनि साहणें ॥ त्याचें मनचि निष्काम नव्हणे ॥ चालविणें लौकिक् ॥ ३५ ॥ तैशी नव्हे सद्गुरुची युक्ती ॥ कामाची पालटे ०कामवृत्ती ॥ अभंग ब्रह्मचर्यस्थिती ॥ शिष्यांप्रती उपदेशी ॥ ३६ ॥ कंदर्पराणिवे स्त्रीपुरुष ॥ तेथें गुरुदीक्षा ×अलौकिक ॥ मिथ्या स्त्रीपुरुष मायिक ॥ विषयसुख भ्रममात्र ॥ ३७ ॥ ' आनंदाचें उपस्थ एकायतन ' ॥ हें काय मिथ्यावेदवचन ॥ ते अर्थी पूर्ण वेदज्ञ ॥ वेदविवंचन दाविती ऐसे ॥ ३८ ॥ पुसतां साखरेची गोडी कैशी ॥ तो स्वाद नये सांगावयासी ॥ तेथें चाखों देती अणुमात्रेशीं ॥ तेचि गोडपणराशी जाणती जाण ॥ ३९ ॥ तेवीं परमानंदसुखप्राप्ती ॥ उपस्थद्वारां नर चाखिती ॥ आनंद एकायतनस्थिती ॥ बोलिली या उपस्थीं हेतु वेदीं ॥४४०॥ ' त्या उपस्थसुखाची नित्यस्थिती ॥ संभोगेंवीण जे वादविती ॥ तेथें मिथ्या स्त्रीपुरुषव्यक्ती ॥ सहजें होती सज्ञान ' ॥४१॥ ' चाखिली तेचि गोड साखर ॥ परमानंद मैथुनमात्र ॥ माननियां मैथुनपर ॥ जाहले पामर विषयांध ' ॥ ४२ ॥ उपस्थीं परमानंदगोडी ॥ यालागीं स्त्रीकामाची अतिवोढी ॥ सदा सोशिजे महामृदीं ॥ तडातोडी जीविताच्या ॥ ४३ ॥ साखरेचें केलें नारिकेळ ॥ तेथें त्वचा गर्भ साखरचि केवळ ॥ तेवीं विषयद्वारा सुखकल्लोळ ॥ उठती सकळ परमानंद ॥ ४४ ॥ ' नाना पक्वान्नें परवडी ॥ गुळाच्या गोडीनें ते चवी गाढी ॥ तेवीं विषयाची जे जे आवडी ॥ ते ते *गोडी निजानंदें ' ॥ ४५ ॥ हे नेणोनि मुळींची निजगोडी ॥ सोशिती विषयांच्या अतिवोढी ॥ बाप सद्गुरुकृपा गाढी ॥ विषयाची आवडी एकत्वा आणी ॥ ४६ ॥ यालागीं विषयाची +आस्था ॥ नचढे मच्छिष्याचे माथां ॥ स्त्रीभोगाची आसक्तता ॥ मिथ्या तत्त्वतां गुरुवाक्यनिष्ठा ॥ ४७ ॥ हा आत्मा हें आत्मीं पाही ॥ ऐसें मिथुन मुळीं नाहीं ॥ तें निजमूळ पाहतां ठायीं ॥ ब्रह्मचर्य पाही अभंग ॥ ४८ ॥ यानांव निजनैष्ठिक्य ॥ ब्रह्मचर्य अतिसुटंक ॥ सद्गुरुनीं बोधिलें निष्टंक ॥ अलोलिक अभंग ॥ ४९ ॥ आतां अहिंसेची स्थिती ॥ ऐक राया चक्रवर्ती ॥ भंवई उचलणें नाहीं भूतीं ॥ स्वप्न सुषुप्ती जागतां ॥४५०॥ पावो आदळतां देख ॥ येणें पृथ्वी पावेल दुःख ॥ या काकुलती आवश्यक ॥ पाउलें अलौकिक हळुवार ठेवी ॥ ५१ ॥ आकाश दचकेल देख ॥ यालागीं नेदी सैरा हाक ॥ वाचा परिपक्व पीयूखें ॥

---

१ न जाई. २ पेरण. ३ मदनाचे राज्यांत. ४ गोडी. ५ ब्रह्मानंदाचें सुख मिळणें. ६ लिंगयोनिसंभोगद्वारा. ७ गाभा. ८ ब्रह्मानंदानें. ९ आशा. १० आत्मनिष्ठा. ११ पाय. १२ कदाचित. १३ अमृत.

०पा. कामबावृत्ती. ×ना. लौकिक. *ना. गाढी. +ना. अवस्था.

वचनें परमसुख सर्वांसि देत ॥ ५२ ॥ त्याचा शब्द जरी गगनीं भरे ॥ तेणें शब्दानंद चमत्कारें ॥ गगनचि निजसुखें भरे ॥ येणें सुखोद्गारें वचनोक्ती ॥ ५३ ॥ जळामाजी घालितां उडी ॥ म्हणीं उदक दडपेल बुडीं ॥ तरंगन्यायें देणें बुडी ॥ जीवनाची दुथडी नहेलावतां ॥ ५४ ॥ त्यासि जळीं होतां निमग्न ॥ जळाच्या ताप शमे संपूर्ण ॥ यापरी करी स्नान ॥ जीवना जीवन निववित ॥ ५५ ॥ म्हणीं दुःख पावेल वारा ॥ म्हणोनि श्वास नघाली सैरा ॥ नेमूनी प्राणसंचारा ॥ निजशरीरा वागवी ॥ ५६ ॥ 'निजदेहा करावया घातु ॥ सर्वथा जेवीं नुचले हातु ॥ तेवीं भूतांवरी निघातु ॥ ज्याच्या पोटांतु उपजेना' ॥ ५७ ॥ अत्यंत न्याहारें पाहतां ॥ चवकू पडेल प्राण्याच्या चित्ता ॥ यालागीं बाह्यदृष्टीं करता ॥ नपाहे भूतां ⁽¹⁾भूतभावें ॥ ५८ ॥ रोम रगडतील संपूर्ण ॥ यालागीं नकरी अंगमर्दन ॥ एवं स्वदेहाचें देहपण ॥ भूतहिंसाभेण अहंता नाणी ॥ ५९ ॥ 'भूतां देतां दुःखलेश ॥ भूतीं दुखवेल भूतेश ॥ ऐसा ज्याचा दृढ विश्वास ॥ तेथ रहिवास अहिंसेचा ॥ ४६० ॥ 'कायिक वाचिक मानसिक ॥ भूतां उपजे त्रिविध दुःख ॥ तें जेथ निमालें निःशेख ॥ अहिंसा देख ते ठायीं ॥ ६१ ॥ यानांव गा शुद्ध अहिंसा ॥ सत्य जाण नृपवरेशा ॥ आतां द्वंद्वसाम्याची दशा ॥ ऐक क्षितीशा सांगेन ॥ ६२ ॥ सुख दुःख अदृष्टाधीन ॥ तें अदृष्टाचे माथां पूर्ण ॥ ऐसें जाणोनि आपण ॥ निर्द्वंद्व संपूर्ण सद्गुरुवाक्यें ॥ ६३ ॥ अदृष्टें देह सुखदुःख भोगी ॥ मुर्ख तेथें रागी विरागी ॥ शिष्य लागोनेदी निजांगीं ॥ गुरुवाक्यरंगीं रंगला ॥ ६४ ॥ देहींच निजसुखें सुखावता ॥ सर्वेंचि दुःख चढे माथां ॥ हें गुरुनें जाणोनि तत्त्वतां ॥ देह अहंता सांडविली ॥ ६५ ॥ निरभिमान्याच्या अंगा ॥ दुःख नुरेचि दुःखनियोगा ॥ सुख नुरेचि सुखभोगा ॥ तो उभयभोगीं अलिप्त ॥ ६६ ॥ 'छाया उष्णामाजी तापली ॥ ते छाया ⁽²⁾छायेंचि निवाली ॥ तेवीं सुखदुःखें मिथ्या जाहलीं ॥ स्थिती सुखावली यथानुलाभें' ॥ ६७ ॥ अदृष्ट देहीं वर्ततां देख ॥ बाधूं न शके सुखदुःख ॥ हें गुरुगम्य अलौकिक ॥ शिष्य विश्वासिक पावती ॥ ६८ ॥ विश्वासेंवीण सर्वथा ॥ गुरुगम्य नये हाता ॥ गुरुगम्येंवीण तत्त्वतां ॥ द्वंद्वसमता कदा नये ॥ ६९ ॥ 'देहीं दृढता जंव मीपण ॥ तंव तंव ⁽³⁾द्वंद्वबाधा दारुण' ॥ जे गुरुवाक्यें निरभिमान ॥ त्यांसि द्वंद्व जाण अतिमिथ्या ॥ ४७० ॥ स्वप्नींचें दरिद्र समर्थता ॥ जेवीं मिथ्या दोन्ही जागृता ॥ तेवीं द्वंद्वबाधेची वार्ता ॥ नबाधे गुरुभक्तां अपरोक्षबोधें ॥ ७१ ॥ 'लेंकुराच्या खेळापाशीं ॥ पारणें तैशी एकादशी' ॥ द्वंद्वाची दशा तैशी ॥ गुरुवाक्यासरिसी समूळ मिथ्या ॥ ७२ ॥ जेवीं चंदनाचिया देठीं ॥ आरीबोरी चंदन होती ॥ तेवीं गुरुवाक्यप्रतीती ॥ सकळ द्वंद्वें येती निजसाम्या ॥ ७३ ॥ चंदनासभोंवतीं जीं झाडें ॥ तींही कोरडीं लाकडें ॥ देवाद्विजांचे मस्तकीं चढे ॥ भाग्य एवढें ⁽⁴⁾सत्संगीं ॥ ७४ ॥ सद्गुरु तोचि संत्संगती ॥ ⁽⁵⁾तत्संगें शिष्य पालटती ॥ स्वयें ब्रह्मरूप होती ॥ तेव्हां द्वंद्वें येती निर्द्वंद्वा ॥ ७५ ॥ एवं गुरुवाक्यीं विश्वासतां ॥ द्वंद्वसाम्य चढे हाता ॥ तें गुरुवाक्यही तत्त्वतां ॥ ऐक आतां सांगेन ॥ ७६ ॥

---

१ पाण्याची. २ मोकळा. ३ प्रहार. ४ न्याहाळून. ५ भीति. ६ जिवांस क्लेश होतील या भीतीनें. ७ दैवाच्या स्वाधीन. ८ विश्वास. ९ शीतउष्णादिकांवर समत्व. १० प्रत्यक्ष ज्ञानानें. ११ सुवासानें.

⁽¹⁾पा. भूतस्वभावो. ⁽²⁾पा. छायेसी. ⁽³⁾पा. द्वंद्व असाधारण. ⁽⁴⁾पा. सत्संगाचें. ⁽⁵⁾पा. सत्संगें.

|| श्लोक || सर्वत्रात्मेश्वरान्वीक्षांकैवल्यमनिकेतताम् || विविक्तचीरवसनं संतो
षो येन केनचित् || २५ ||

|| टीका || सद्गुरुवचनविश्वासें || मानी सर्वत्र परमात्मा ऐसें || तेचि निजबुद्धी +निश्चयो वसे || निजमानसें विरंची || ७७ || मजमाजी परमात्मा वसे || तेणें स्थूळदेह वर्ततसे || त्याचेनि पूर्ण चित्प्रकाशें || जग भासे जगद्रूपें || ७८ || तेणें निजात्मप्रकाशें || माझे दृष्टीस जें दृश्य दिसे || दृश्यद्रष्टृदर्शनविलासें || विलसतसे परमात्मा || ७९ || दृश्यदृश्यपणें जें जें उठी || तें तें निजात्मता पाठीपोटीं || तेणें अन्वयें देवो देखे दृष्टी || आहाळबाहाळ सृष्टि दुमदुमित || ४८० || तेव्हां जें जें देखे भूताकृती || तें तें परमात्मा ये प्रतीती || मी नियंता ईश्वर त्रिजगती || *हेही स्फूर्ती स्फुरोंलागे || ८१ || जग वर्ते माझिया सत्ता || मी कळिकाळाचा नियंता || मी उत्पत्तिस्थितिप्रलयकर्ता || हे मूळ अहंता स्वभावें स्फुरे || || ८२ || येणें पूर्णान्वयें जंव पाहे || तंव सर्वां सर्व मीचि आहें || ३तें पाहातें पाहणें पाहों ठाये || तेथें अहं जाये विरोनी || ८३ || तेथें परब्रह्मैक प्रसिद्ध || कोंदला ठाके सच्चिदानंद || ऐसा गुरुवाक्यें प्रबोध || शिष्य अतिशुद्ध पावली || ८४ || ' तेव्हां वैकुंठीं देवो आहे || हें बोलणें त्या आहाचि होये || क्षीरसागरीं देवो राहे || हें ऐकतांचि पाहे अनिवार हांसे ' || || ८५ || देवावांचोनि तत्त्वतां || तिळभरी ठाव नाहीं रिता || त्यातें एकदेशी नेमितां || नमने वस्तुता सच्छिल्पासी || ८६ || वैकुंठ आणि क्षीराब्धी || ज्याचेनि प्रकाशें ज्यामधीं || तो वैकुंठवासी अथवा क्षीराब्धी || हे बोल सोपाधी *शबलत्वाचे ||८७|| जेथ सर्व परमात्मा|| जेथें एकदेशी नसरे महिमा || तो पूर्णब्रह्म अनाश्रमा || वैकुंठादि आश्रमा वश नव्हे || ८८ || ' अखंडातें आवाहन || अधिष्ठानातें आसन || सर्वगता सिंहासन || कल्पिती स्थान निजकल्पना ' || ८९ || तेहीं कल्पिती निजवृत्तीं || जे ब्रह्मरूप नित्य पाहती || त्यांची परब्रह्मस्थिती || कदा कल्पांतीं भंगेना || ४९० || ऐसी परब्रह्म आवासी || साधकीं पावा-वया निश्चितीं || नित्य वसावें एकांतीं || द्वैताची स्फूर्ती त्यागोनी || ९१ || साधितां परमा-त्मनिधान || साधकां आडवी वस्त्रअन्न || निर्मोळीं वल्कलें परिधान || कां त्यागिलीं अतिजीर्ण वस्त्रें घ्यावीं || ९२ || शाकफलमूलकंदभोजन || येणें करावें जठरतर्पण || सांडूनि परमार्थसाधन || जोडावया अन्न धन नवेचावें कदा || ९३ || चौपालवी बांधोनि करीं || भीक मागावी दारोंदारीं || परी अन्नआच्छादनावरी || आयुष्य तिळभरी नवेचावें || || ९४ || मेळवावया अन्नआच्छादन || न शिणती साधक सज्ञान || देह अदृष्टाधीन || तें सहजें जाण प्रतिपाळी || ९५ || स्वयें शिणतां आहोरात्रीं || अदृष्टावेगळी अणुभरी प्राप्ती || कदा नचढे कोणाचे हातीं || हें साधक जाणती सज्ञान || ९६ || ' यालागीं अदृष्टें जें प्राप्त || तेणें निर्वाह सदा निश्चिंत || साधक परमार्थ साधित || संतोषयुक्त गुरुवाक्यें ' || ९७ ||

१ चैतन्य प्रकाशानें. २ विस्तीर्ण बहुत. ३ मांपण. ४ भरला. ५ वृथा. ६ उपाधियुक्त सगुण. ७ मायोपाधि युक्ताचें. ८ ज्यांला द्रव्य यावें लागत नाहीं अशी. ९ किंवा. १० उदरतृप्ति. ११ चारपदरी ( झोळी. ) १२ अन्नवस्त्राकरितां.

+पा. निश्चयें. *पा. देहीं. ३पा. ते पहाते पण पाहो ठाये. *पा. बालत्वाचे.

देहअदृष्टपरवडी ॥ होती सुखदुःखघडामोडी ॥ साधकां संतोष चढोवढी॥ गुरुवाक्य गोडी दृढ लागली ॥ ९८ ॥ जैसें देहाचें प्राक्तन ॥ तैसें होय अशनवसन ॥ परी गुरुवाक्यसुख सांडून ॥ देहावरी मन ममत्वें नये ॥ ९९ ॥ याऱ्चेविण यथाकाळें ॥ यदृच्छया जें जें मिळे॥ तें तें सेवी सकळ मंगळें ॥ गुरुवाक्यमेळें स्वानंदें ॥ १०० ॥ शरीरनिर्वाहाविखीं ॥ कोठें कांहीं नाभिलाखी ॥ जें जें मिळे तेणेंचि सुखी ॥ निजात्मतोखीं संतुष्ट ॥१॥ प्रारब्धें सुखदुःख भोगितां ॥ संतोष साधकांच्या चित्ता ॥ हें गुरुवाक्यविश्वासता ॥ चढे हातां शिष्याच्या ॥ २ ॥ त्याच्या दृढ विश्वासाशीं ॥ भागवतशास्त्र गुरुपाशीं ॥ अभ्यासावें आदरेंसी ॥ दृढविश्वासासी प्रबोधक ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ श्रद्धां भागवते शास्त्रेऽनिंदामन्यत्र चापिहि ॥ मनोवाक्कर्मदंडं च, सत्यं शमदमावपि ॥ २५ ॥

॥ टीका ॥ सगुण अथवा निर्गुण ॥ जेथ +भगवत्स्वरूप वर्णन ॥ कां भगवंत बोलिला आपण ॥ अथवा भगवद्गुणकीर्ति जेथें ॥ ४ ॥ तें तें राया शास्त्र जाण ॥ आवडे जैसें जीव्रप्राण ॥ विशेषेंसी ज्ञानकथन ॥ सप्रेमपूर्ण पढियंतें ॥ ५ ॥ गुरुमुखें *ज्ञानकथा गोड ॥ तेणें श्रीभागवतीं श्रद्धा दृढ ॥ श्रवणें पुरे जीवाचें कोड ॥ वोसरे चाड विषयाची ॥ ६ ॥ जिवीं नाहीं विषयकौतुक ॥ तरी विषय आवश्यक ॥ साधकां होती बाधक ॥ तेणें आत्यंतिक अनुतापू ॥ ७ ॥ अनिवार विषयावस्था ॥ ⁷यालागीं नवचे निजसत्ता ॥ तेणें मुमुक्षूच्या चित्ता ॥ अत्यंत व्यथा अनुतापें ॥ ८ ॥ नसतां विषयाची अतिप्रीति ॥ स्वतां नव्हे विषयनिवृत्ती ॥ ऐशिया साधकांप्रती ॥ निर्णीत शास्त्रार्थी नेमिला नेमु ॥ ९ ॥ नाहीं विषयाची आसक्ती ॥ ना नव्हे विषयनिवृत्ती ॥ ऐशी जेकां साधकस्थिती ॥ ³नेमु त्याप्रती शास्त्रें केला ॥ १० ॥ जोकां केवळ विषयासक्त ॥ तो कदा नमानी शास्त्रार्थ॥ कां जो जाहला जीवन्मुक्त ॥ तोही शास्त्रार्थ मानूनि नमानी ॥ ११ ॥ जैशी मृगजळाची भासे स्थिती ॥ तैसे विषय मुक्तांप्रती ॥ त्या विषयांचिये निवृत्ती ॥ कोणते शास्त्रार्थी मानावा नेमू ॥ १२ ॥ एवं अत्यासक्त अतिविरक्त ॥ त्यासी नेमू नचले येथ ॥ मुमुक्षूसींच शास्त्रार्थ ॥ नेमी निश्चित निजनेमें ' ॥ ॥ १३ ॥ तेथ गुरुशिष्यसंवाद ॥ करितां *ज्ञानार्थ प्रबोध ॥ ते बोधीं बाधी विषयबाध ॥ तद्यागीं प्रसिद्ध शास्त्रार्थनेम ॥ १४ ॥ मनसा वाचा कर्मानुरोध ॥ येणें विषयांचा त्रिविध बाध ॥ त्या तिहींसही त्रिविध ॥ शास्त्रें अतिशुद्ध नेमिला नेमू ॥ १५ ॥

॥ पूर्वश्लोकोत्तरार्धम् ॥ मनोवाक्कर्मदंडं च सत्यं शमदमावपि ॥

॥ टीका ॥ ' मनासी नियम उपशमाचा ॥ इंद्रियां नेम तो दमाचा ॥ सत्यें नेमिली वाचा ॥ तिहींसही तिहींचा निजनेमु ' ॥ १६ ॥ त्रिपुर कामगज दारुण ॥ अहंमदें उन्मत्त पूर्ण ॥ देहतारुण्यें अतिपूर्ण ॥ तोडी बंधन निर्धीचें ॥ १७ ॥ ×स्वंदी सुहृद राजा गुरु ॥ सोंईं

१ प्रकार, रीति. २ अन्न, वस्त्र. ३ नाहींशी होते. ४ शांतीचा. ५ नियमिली. ६ धुमन. ७ वेडाशेने ८ तुरुंग, मारी.

+ना. भागवत स्वरूप. *ना. जाण. ⁷ना. त्यागिली. ³ना. नियमें त्याप्रती शास्त्रें केली. *ना. ज्ञानप्रबोध. ×ना. स्वंदळीत राजागर.

कवळी स्वर्गशिखरू ॥ नरकनदीमाजी अपारू ॥ अतिदुस्तरू बुड्या देत ॥ १८ ॥ धर्मजळें
श्वाळे अवचिता ॥ सर्वेचि सलोभ धुळी घाली माथां ॥ घोळसी ब्रह्मादिकां समस्तां ॥
अहंममता गर्जतू ॥ १९ ॥ यासि विवेकमहावत जाण ॥ माथां ०चढोंजाणे आपण ॥
शास्त्रविधी अंकुशें पूर्ण ॥ धरिला आवरून करकरितू ॥ १२० ॥ त्यासि उपशमाचें
संरक्षण ॥ वैराग्ययुक्त ठेवूनि जाण ॥ दमाचे शृंखळीं आकळून ॥ सत्याचे स्तंभीं पूर्ण विवेकू
बांधे ॥ २१ ॥ मनसा वाचा कायिक कर्म ॥ येणें विषयबाधा बाधी पूर्ण ॥ त्या तिहींसी
केला त्रिविध नेम ॥ त्या नेमाचें वर्म ऐक राया ॥२२॥ आतां शमाची ऐशी स्थिती ॥ मन-
बुद्ध्यादिचित्तवृत्ती ॥ सांडवून विषयासक्ती ॥ लावी परमार्थीं प्रबोधूनी ॥ २३ ॥ पूर्वे उगवतां
गभस्ती ॥ आंधारू सांडी त्रिजगती ॥ तेवीं गुरुवाक्यें शमाची प्राप्ती ॥ विषयनिवृत्ती
मानसिक ॥ २४ ॥ बाह्य इंद्रियप्रवृत्ती ॥ दमें दमोनि गुरुवाक्यस्थिती ॥ मग शमाची संगती॥
आणी निवृत्ती इंद्रियकर्मे ॥ २५ ॥ कन्या प्रतिपाळूनि जैसी ॥ दान देतां जांवयासी ॥
त्यागी बापाचे कुळगोत्रासी ॥ दमें इंद्रियें तैशीं विषयार्थी ॥ २६ ॥ म्हणी *वाचा जाईल
विकळ ॥ तिसी सत्याचा महामोकळ ॥ देऊनि केली निखळ ॥ अति अढळ, सत्यधूत
वाणी ॥ २७ ॥ ×सत्यवादिया ब्रह्मादि वंदिती ॥ असत्या होय अधोगती ॥ ऐसें व्याख्यान
जे करिती ॥ तेही वदती असत्य ॥ २८ ॥ कां रामनामाच्या आवृत्ती ॥ वाचा धूतली स्मर-
णोक्तीं ॥ ते असत्या माजी पुढती ॥ कदा कल्पांतीं बुडेना ॥ २९ ॥ ' मंथोनि काढिलें नेव-
नीत ॥ तें पुढती नबुडे ताकांत ॥ तेवीं नामें वाचा निर्धूत ॥ असत्य तेथ स्पर्शेना ' ॥
॥ १३० ॥ जेवीं लागलेनि रविकरें ॥ घृतकणिका स्वयें विरे ॥ तेवीं सत्याचेनि निजनिर्धारें ॥
असत्य चमत्कारें समूळ उडे ॥ ३१ ॥ चंदनाचिया चौफेरी ॥ काष्ठत्वा मुकती खैर बोरी ॥
तेवीं नामाच्या निजगजरीं ॥ वाचेमाझारी निजसत्य प्रगटे ॥ ३२ ॥ झालेनि अर्कप्रकाशें ॥
खद्योत हारपती जैसे ॥ तेवीं रामनामसौरसें ॥ लोपे अनायासें असत्य ॥ ३३ ॥ अंवसेसि
प्रतिपदे कुहू ॥ गेलिया बिंब सांडी राहू ॥ तेव्हां प्रकाशाचा समूहू ॥ प्रगटे बहू जगामाजी
॥३४॥ तेवीं असत्याचेनि अतिक्रमें ॥ वाचा +प्रकाशें सत्य संभ्रमें ॥ जेवीं राजाज्ञा अनुक्रमें ॥
प्रजा स्वधर्मे वर्तती ॥ ३५ ॥ सत्यापरतें नाहीं तप ॥ सत्यापरता नाहीं जप ॥ सत्यें पाविजे
सद्रूप ॥ सत्यें निष्पाप साधक होती ॥ ३६ ॥ एवं काया वाचा मनें ॥ शमदमादि सत्य-
लक्षणें ॥ जो नियमील त्रिविधविंदानें ॥ त्याचें विषयाचें धरणें तत्काळ उठे ॥ ३७ ॥ ऐसा
स्वार्थालागीं जीवीं ॥ भागवच्छास्त्रीं आवडी *धरी ॥ परी आणिकां शास्त्रां नलावी ॥
[1]द्वेषभावीं निंदेचें बोट ॥ ३८ ॥ एवं एका स्तुती एका निंदा ॥ करितां आदळे अंगीं बाधा ॥
यालागीं निंदानुवादा ॥ साधक कदा नानळती ॥ ३९ ॥ अर्धांगींची लक्ष्मी वंदावी ॥ मा
चरणींची गंगा काय निंदावी ॥ निजजननी नमस्कारावी ॥ मा काय येरां शावी पोंवर ॥

१ धर्मरूप पाण्यानें. २ धुतला जातो. ३ विचार हा माहूत. ४ सांखळदंडानें. ५ सूर्य. ६ बंधन. ७ सर्व. लोणी. ९ सूर्याचें किरण. १० तुपाचे कण. ११ सूर्याच्या प्रकाशानें. १२ ज्या अमावास्येचे दिवशीं चंद्राच्या कला अगदीं नाहींशा होतात त्यास कुहू म्हणतात. १३ पराभवामुळें. १४ लाथ.

०पा. चढोजाय. *पा. वाचा. ×पा. सत्यवादें. +पा. प्रकटे. *पा. वरवी. [1]पा. द्वेषस्वभावी.

॥ ५४० ॥ 'तरी भज्य भजावें भजनीं ॥ परी निंदास्तुती सांडूनि दोनी ॥ जैं निजसत्यें होय मौनी ॥ तैं ब्रह्मज्ञानीं अधिकारी ' ॥ ४१ ॥ ऐशी नकरितां व्युत्पत्ती ॥ नसोशितां हे कष्टस्थिती ॥ भावें करितां भगवद्भक्ती ॥ फुकाची मुक्ती हरिभक्तां ॥ ४२ ॥ ते भक्तीची निजस्थिती ॥ राया सांगेन तुजप्रती ॥ सुगमत्वें परमात्मप्राप्ती ॥ हरिभक्त पावती तें ऐक ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ श्रवणं कीर्तनं ध्यानं हरेरद्भुतकर्मणः ॥ जन्मकर्मगुणानां च तदर्थेऽखिलचेष्टितम् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ मुख्यभक्तीचें कारण ॥ हरीचे जन्मकर्मगुण ॥ पूर्णश्रद्धा करावें श्रवण ॥ हरिकीर्तन स्वानंदें ॥ ४४ ॥ हरिकीर्तनाचिया जोडी ॥ सकळ साधनें केलीं बापुडीं ॥ अद्भुतकर्में हरिचीं गाढीं ॥ गातां अति आवडी उल्हासे ॥ ४५ ॥ शिळा तारिल्या सागरीं ॥ गोवर्धन धरिला करीं ॥ निद्रा न मोडितां सकळ नगरी ॥ द्वारके माझारीं आणिली मथुरा ॥ ४६ ॥ निमाला गुरुपुत्र दे आणूनि ॥ मुखें प्राशिला दावाग्नी ॥ गत-गर्भ आला घेऊनी ॥ निजजननी-तोषार्थ ॥ ४७ ॥ अजन्म्या जन्में तेणों किती ॥ अकर्म्याचीं कर्में गाती ॥ अगुणाचे गुण +वर्णिती ॥ तेणें श्रीपती सुखावे ॥ ४८ ॥ जो सुखैकमूर्ती निजस्वभावें ॥ तोही 7जन्मकर्मगुण-वैभवें ॥ गातां कीर्तनीं अतिसुखावे ॥ *स्वानंदगौरवें डुल्लत ॥ ४९ ॥ ऐशी कीर्तनीं गातां कीर्ती ॥ निर्मळ होय चित्तवृत्ती ॥ तेथें उसावे ध्यानस्थिती ॥ ऐक ते नृपती सांगेन ॥ ५५० ॥ मुगुटकुंडलें मेखळा ॥ कांसे कशिला सोनसळा ॥ आपाद रुळे वनमाळा ॥ घनसावळां घवघवित ॥ ५१ ॥ ऐशी मूर्ती सुरेख सगुण ॥ कां निरसूनि रूप नाम गुण ॥ ध्यानीं उसावे निज निर्गुण ॥ ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ५२ ॥ ऐसें उसावतां ध्यान ॥ भक्तांची सबाह्य क्रिया पूर्ण ॥ ते ते 4होय कृष्णार्पण ॥ स्त्रीपुत्रादि जाण सर्वस्वें ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ इष्टं दत्तं तपो जप्तं वृत्तं यच्चात्मनः प्रियम् ॥ दारान्सुतान् गृहान्प्राणान्यत्परस्मै निवेदनम् ॥ २८ ॥

॥ टीका ॥ अग्निहोत्रादि याग होम ॥ ग्रहणादिदान अनुत्तम ॥ तप म्हणिजे स्वधर्म ॥ जो वर्णाश्रम यथोचित ॥ ५४ ॥ आगमोक्त यथाशास्त्र ॥ आवरणविधि विधानतंत्र ॥ गुरुदीक्षा गुरुमंत्र ॥ अथवा नाममात्रें जो जप कीजे ॥ ५५ ॥ तें यज्ञ दान क्रिया तप ॥ दीक्षा मंत्र कां नामजप ॥ तेथें न घालितां संकल्प ॥ करी निर्विकल्प कृष्णार्पण ॥ ५६ ॥ हरिसी जाहले जे अनन्यशरण ॥ ते हरीचे लडिवाळ पूर्ण ॥ त्यांचें हरी करी प्रतिपाळण ॥ जेवीं जननी जाण तान्हुलेया ॥ ५७ ॥ यालागीं जें जें जीविकावर्तन ॥ तेंही करावें कृष्णार्पण ॥ हें माझें म्हणोनि अभिमान ॥ भक्त सज्ञान न धरिती ॥ ५८ ॥ ज्याची आवडी अतिशयें चित्तीं ॥ ज्याची आपणिया अतिप्रीती ॥ तें तें कृष्णार्पण करिती ॥ गुरुवाक्यस्थिती विश्वासें ॥ ५९ ॥

१ तुळनेने, प्रार्थीने. २ मेलेला, सांदीपिनीचा पुत्र. ३ सहा मृत पुत्र. ४ देवकीचे संतोषार्थ. ५ लहान मुलास. ६ निर्वाहाचें साधन. वृत्ति.

+ना. वानिती. 7ना. जन्म कर्में. *ना. स्वानंदें. 4ना. करी.

यालागीं आठही प्रहर ॥ सेवेसि वेंचिती निजशरीर ॥ निमेषार्धेही व्यापार ॥ विषयाकार करिती ना ॥ ५६० ॥ तो अन्नालागीं होऊनि वेडे ॥ सधनांच्या पायां नपडे ॥ आयुष्याचे तीन केवडे ॥ विषयाचे चाडे कदा नकरी ॥६१॥ आयुष्याची अर्धघडी ॥ वेंचितां नमिळे लक्ष कोडी ॥ तेणें आयुष्यें परमार्थजोडी ॥ विषयाच्या कोडी थुंकोनि सांडी ॥ ६२ ॥ त्यागोनियां राज्यसंपत्ती ॥ राजे जाऊनि वनाप्रती ॥ स्वयें परमार्थ साधिती ॥ विषयासक्ति थुंकोनि ॥ ॥ ६३ ॥ कैसी भक्तीची गोडी संपूर्ण ॥ रिता जावों नेदी अर्धक्षण ॥ +अवघें जीवितचि जाण ॥ करी कृष्णार्पण *सर्वस्वें ॥ ६४ ॥ आणि पुत्रदारादिक जे जे घरीं ॥ तें तें भगवत्से-वेवरी ॥ स्वयें कृष्णार्पण करी ॥ माझीं म्हणोनि नधरी ममता जीवीं ॥ ६५ ॥ दारा पुत्र देह गेह प्राण ॥ यांसि आत्मा सबाह्य पूर्ण ॥ तेथें संकल्पेंवीण जाण ॥ ब्रह्मार्पण सहजची ॥ ६६ ॥

॥श्लोक॥ एवं कृष्णात्मनाथेषु मनुष्येषु च सौहृदम ॥ परिचर्यां चोभयत्र महत्सु नृषु साधुषु ॥ २९ ॥

॥ टीका ॥ एवं दारा गेहें देह संपदा ॥ आत्मार्पण शुद्ध श्रद्धा ॥ भजले सर्वकाळीं सर्वदा ॥ ते भक्त गोविंदा पढियंते ॥ ६७ ॥ जो सर्वभूतीं हृदयस्थ ॥ परमात्मा श्रीकृष्णनाथ ॥ त्याच्या ठायीं जो भक्त ॥ साधावया निजस्वार्थ सर्वस्वें भजे ॥६८॥' त्या हृदयस्थाच्याठायीं ॥ दृढदृष्टी-जंव बैसली नाहीं ॥ तंव सगुण मूर्ती हृदयीं ॥ भजावी पाहीं सर्वात्मभावें ' ॥ ५७० ॥ ' सगु-णमूर्ती नातुडे ध्यानीं ॥ तरी भजावें प्रतिमेच्या स्थानीं ॥ तेथेंही चळाचळ दोनी ॥ भजाव्या गुरुवचनीं समसाम्य भावें ' ॥ ७० ॥ ' ज्यां उपासक पूजिती ॥ त्या जाणाव्या चळा मूर्ती ॥ ज्या पांडुरंगादिद्वारावती ॥ त्या स्थावरा मूर्ती पुराणोक्त ' ॥७१॥ त्यामूर्तिहोनि श्रेष्ठ स्थान॥ पूर्ण पूज्यत्वें ब्राह्मण ॥ तेथें करावें गा भजन ॥ सर्वस्वें जाण सर्वदा ॥७२॥ त्या ब्राह्मणांमाजी अतिश्रेष्ठ ॥ श्रोत्रियें सदाचारनिष्ठ ॥ त्यांतही वेदशास्त्रार्थी प्रविष्ठ ॥ ते अतिवरिष्ठ पूज्यत्वें ॥ ७३ ॥ त्यांहीमाजी जे भागवत ॥ भागवतधर्मी नित्यरत ॥ जे ×निष्कर्मेसी भगवद्भक्त ॥ ज्यांचा भावार्थ श्रीकृष्णीं ॥ ७४ ॥ ज्यांसीं आत्मा श्रीकृष्ण हृदयस्थ ॥ ज्यांचा अनन्य स्वामी श्रीकृष्णनाथ ॥ ऐसे जे भगवद्भक्त ॥ ते पूज्य निश्चित निजभक्तां ॥ ७५ ॥ अतिमहत्त्वें पूज्य गहन ॥ ज्याचें सुरवरवेद बंदिजन ॥ तो सद्‌गुरु श्रेष्ठ पूज्यस्थान ॥ शिष्यासि जाण सर्वस्वें ॥ ७६ ॥ गुरु ब्रह्म दोनी समान ॥ हेंही वचन दिसे गौण ॥ गुरुवाक्यें ब्रह्मा ब्रह्मपण ॥ 5तेथें म्हावया समान भिन्नत्व नुरे ॥ ७७ ॥ जैसा देवाचे ठायीं भावो ॥ तैसाचि गुरुचरणीं सद्भावो ॥ गुरुदेवांमाजी पहाहो ॥ भिन्नभावो असेना ॥ ७८ ॥ देवो पूजिल्या गुरु तोषे ॥ गुरु पूजिल्या देवो संतोषे ॥ दोनांवांचेनि हरखें ॥ स्वरूपें एकें वर्तती ॥ ७९ ॥ सुवर्ण आणि कांकण ॥ दों नांवीं एक सुवर्ण ॥ तेवीं गुरुब्रह्मामाजीं जाण ॥ भिन्नपण असेना ॥ ५८० ॥ त्या सद्‌गुरूचें निजभजन ॥ चित्तें वित्तें अवंचन ॥ गुरुचरणीं आत्मार्पण ॥ करावें आपण

१ तीन टके, खुर्दा नुगडा नाश. २ घर. ३ मूर्तीच्या. ४ हलणारी आणि स्थिर; स्थावर, जंगम. ५ वेदशास्त्र पढलेले. ६ स्तुति करणारे. ७ निष्कपट.

+ना. अघडेचि जीवित जाण. *ना. सेवेसीं. ×ना. निःक्षेपी. 5ना. भिन्नत्व जाण नुरेचि.

सर्वस्वेंसी ॥ ८१ ॥ तैसेचि साधु श्रोते सज्ञान ॥ तेही मानावे सद्‌गुरुसमान ॥ त्यांचेनि संवादें आपण ॥ श्रवण कथन करावें ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ परस्परानुकथनं पावनं भगवद्यशः ॥ मिथोरतिर्मिथस्तुष्टिर्निवृत्ति-र्मिथ आत्मनः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ तेथ करितां कथानुवादु ॥ परस्परें निजात्मबोधू ॥ करितां गुह्यज्ञान संवादु ॥ परमानंदु वोसंडे ॥ ८३ ॥ एवं हरिकथेच्या आवडी ॥ परस्परें श्रद्धा गाढी ॥ सुखसंवाद-परवडी ॥ निजसुखगोडी ×चाखिती ॥ ८४ ॥ चाखतां निजसुखगोडी ॥ हारपती दुःख-कोडी ॥ उभवूनि ¹भक्तिसाम्राज्यगुढी ॥ स्वानंदजोडी जोडावया ॥८५॥ भावें करितां अभेद-भजन ॥ भक्त पावती स्वानंद पूर्ण ॥ त्या स्वानंदाचें निजचिन्ह ॥ ऐक सांगेन नृपनाथा ॥८६॥

॥ श्लोक ॥ स्मरंतः स्मारयंतश्च मिथोऽघौघहरं हरिम् ॥ भक्त्या संजातया भक्त्या बिभ्रत्युत्पुलकां तनुम् ॥ ३१ ॥ क्वचिद्रुदंत्यच्युतचिंतयाक्वचिद्धसंति नंदंति वदंत्यलौकिकाः ॥ नृत्यंति गायंत्यनुशीलयंत्यजं भवंति तूष्णीं परमेत्य निर्वृताः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ हरिकथेची महिमा कैसी ॥ आदरें पुसल्या सांगल्यासी ॥ होती पुण्याचिया राशी॥ पाप वोखदासी मिळेना ॥ ८७ ॥ ज्याचें नामस्मरण करी ॥ सकळ पातकांतें हरि हरी ॥ तो स्वयें प्रगटला अंतरीं ॥ पातका उरी उरे कैंची ॥ ८८ ॥ साधनरूपभक्तीच्या युक्ती ॥ पूर्ण सप्रेमें उपजे भक्ती ॥ ते भक्ताची निजस्थिती ॥ ऐक चक्रवर्ती सज्ञाना ॥ ८९ ॥ सद्भावें +निजभजनकरीं ॥ हृदयीं प्रगटतां श्रीहरी ॥ तंव देहींचीं चिन्हें बाहेरी ॥ क्षणामाझारी पाल-टती ॥ ९० ॥ परस्परें निजसंवादु॥करितां जाहला स्वरूपावबोधू ॥ नेत्रीं जळ अंगीं स्वेदु ॥ प्राण स्पंदु *पांगुळे ॥ ९१ ॥ चित्तचैतन्यां होतां भेटी ॥ हर्षे बाष्प दाटे कंठीं ॥ पुल्कांकित रोमांच उठी ॥ उन्मीलितदृष्टी पुंजाळे ॥ ९२ ॥ करितां अच्युतचिंतन ॥ *सप्रेम गहिंवरे मन ॥ अट्टहासें करी रुदन ॥ अनिवार स्फुंदन ऊर्ध्वश्वासें ॥ ९३ ॥ त्या रुदनासवेंचि हर्ष प्रगटे ॥ त्या हर्षाचेनि नेटेंपाटें ॥ हांसों लागे कडकडाटें ॥ सुखोद्रेकें गदगदोनी ॥ ९४ ॥ मीपणाचेनि अनुरोधें ॥ गिळिलों होतों मोहमदें ॥ तो सुटलों गुरुकृपावबोधें ॥ तेणें परमानंदें कुंथत ॥ ९५ ॥ मी माझेनि भवभावनें ॥ मज मी चुकलों मीपणें ॥ मज मी भेटलों सद्‌गुरु-वचनें ॥ आनंदें तेणें उल्हासे ॥ ९६ ॥ कैसें सद्‌गुरुवचन अलोलिक ॥ ⁶मीच माझें भोगीं निजसुख ॥ येणें परम आश्चर्य देख ॥ स्वानंदोन्मुख उल्हासे ॥ ९७ ॥ संसारबागुलाचें ॥ भय लागलें नेणों कैंचें ॥ तें गुरुवाक्यें दवडिलें साचें ॥ म्हणोनि नाचे निर्लज्ज ॥ ९८ ॥ जेवीं माउली देखोनि डोळां ॥ बाळक नाचे नानाकळा ॥ तेवीं गुरुवाक्याचा सोहळा ॥ देखोनि स्वलीळा निजभक्ती नाचे ॥ ९९ ॥ तेणें निजनृत्यविनोदें ॥ फावलेनि निजबोधें

१ भरे. २ दाट. ३ अवशेष. ४ मनाची न आस्थाची. ५ तेजानें खुले. ६ अवष्टंभानें. ७प्राप्त झालेल्या.

×ना. चाखवी. ¹ना. भक्त. +ना. भजनें. *ना. पांगुळले. *ना. सप्रेमें. ⁶ना. म्याचि माझें भोगिजे निजसुख.

नानापरीचीं भगवत्पदें ॥ सुखानुवादें स्वयें गातू ॥ ६०० ॥ तेणें कीर्तन कीर्तिगजरें ॥ त्रैलोक्यसुखें सुख भरे ॥ परमानंदेंहि हुंबरे ॥ सुखोद्गारें तुष्टोनी ॥ १ ॥ तेंही सांडोनियां गाणें ॥ गर्जों लागे अतिसत्राणें॥दुजें नाहीं नाहीं ह्मणे ॥ गाणें ऐकणें म्यां माझें॥२॥ मीचि गाता मीचि श्रोता ॥ माझें गाणें मीचि तत्त्वतां ॥ जगीं मीचि एकुलता ॥ द्वैताची कथा असोनि नाहीं॥३॥ सद्भावें +भगवत्परिचर्या ॥ करितां पौरुषें कर्मक्रिया ॥ अहंसोहं निरसोनियां ॥ वृत्तीही लया जाय तेथें ॥ ४ ॥ एवं सप्रेमभक्तिसंभ्रमू ॥ तेणें निरसे साधनश्रमू ॥ फिटे निःशेष भवभ्रमू ॥ *वाचांसी उपरम् इंद्रियां होय ॥ ५ ॥ जेथें एक ना दुसरें ॥ मन्सुख ना पाठिमोरें ॥ जेथें सुखही निजसुखामाजी विरे ॥ तें स्वरूप निर्धारें निजशिष्य होती ॥ ६ ॥ जेवीं बाळाचे लळे पाळणें ॥ हे व्यालीची वेदना व्याली जाणे ॥ कां शिष्यांसी पूर्ण बोध ×करणें ॥ ⁷तेथील कळवळणें सद्गुरु जाणे ॥ ७ ॥ बाळका लेवविलें लेणें ॥ जेवीं माउली ⁰निवे तेणें ॥ कां शिष्यसुखें सुखावणें ॥ हें सद्गुरु जाणे परिपूर्णबोधें ॥८॥ 'इंद्रियें नेणती ज्याचें घर ॥ जें मना वचना अगोचर ॥ बुद्धीसि नकळे ज्याची मेर ॥ ऐशी निर्विकार निजवस्तु ॥ ९ ॥ दृष्टी दाखविजे साक्षात ॥ हातीं देइजे पदार्थ ॥ तैसा नव्हे गा परमार्थ ॥ तोही सद्गुरुनाथ प्रबोधी शिष्यां ॥ १० ॥ शिष्यासि करावया प्रबोध ॥ बोधिता सद्गुरु अगाध ॥ यालागीं शिष्यसुखें स्वानंद ॥ भोगी परमानंद गुरुरावो ॥ ११ ॥ शिष्यासि आकळे परब्रह्म ॥ तंव तंव निरसे त्याचा भ्रम ॥ तेणें सद्गुरूसि परम ॥ सुखसंभ्रम उल्हास् ॥ १२ ॥ सेवक ⁴परचक्र विभांडी ॥ तंव राजा उभारी यशाची गुढी ॥ शिष्य परमानंदीं दे बुडी ॥ तेणें गुरूसि गाढी सुखावस्था ॥ १३ ॥ ऐशी शिष्यकृपेची कळकळ ॥ उपा सद्गुरुमाजी प्रबळ ॥ तेथें भागवतधर्म हे सकळ ॥ शिकावे अविकळ अनन्यश्रद्धा ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ इति भागवतान् धर्मान् शिक्षन् भक्त्या तदुत्थया ॥ नारायणपरो मायामंजस्तरति दुस्तराम् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ ऐशी हे भागवतधर्मस्थिती ॥ शरण जाऊनि सद्गुरुप्रती ॥ अभ्यासावी भगवद्भक्ती ॥ तें मायेची शक्ती बाधूं नशके ॥ १५ ॥ माया वेदशास्त्रां अनावर ॥ ब्रह्मादिकां अतिदुस्तर ॥ ते सुखें तरती भगवत्पर ॥ हरिनाममात्र ⁵भावार्थी ॥१६॥ हरिनामाच्या गजरापुढें॥ माया पळे लवडसवडें ॥ यालागीं तरणोपावो घडे ॥ सुख सुरवाडे हरिभक्तां ॥१७॥ परात्पर नारायणाची माया ॥ भजतां नारायणाच्या पायां ॥ सुखेंचि तरिजे गा राया ॥ त्या भजनउपाया सांगीतलें ॥ १८ ॥ मायातरणोपायस्थिती ॥ राया तुवां पुसिली होती ॥ तदर्थीं मुख्य भगवद्भक्ती ॥ जाण निश्चितीं नृपनाथा ॥ १९ ॥ भक्तीपाशीं नित्य तृप्ती ॥ भक्तीपाशीं नित्यमुक्ती ॥ भक्तीपाशीं भगवत्प्राप्ती ॥मायानिवृत्ती हरिभजनें ॥६२०॥हरिनामभजनकल्लोळें॥ माया जीवित्व घेऊन पळे ॥ भक्त तरती भावबळें ॥ हरिभजनबळें महामाया ॥ २१ ॥ करितां

१ वळानें, जोगानें. २ ईश्वराची पूजा. ३ लोपे. ४ ब्रह्मसुखात. ५ मुलांची आई. ६ शेवट. ७ पराभवी, नाशी. ८ लगबगीनें. ९ मायेचा नाश.

**+ना. भागवत परिचर्या. *ना. वाचेसी उपरम विषयेंद्रिया होय. ×ना. देणें. ⁷ना. तेथील सकळ वळणे सद्गुरु ज्ञाता. ⁰ना. निवो जाणे. ⁴ना. अरिचक्र. ⁵ना. श्रवणार्थे.**

नारायणाची भक्ती ॥ भक्त सुखें माया तरती ॥ ते नारायणाची मुख्य स्थिती ॥ स्वयें चक्रवर्ती पुसत ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ नारायणाभिधानस्य ब्रह्मणः परमात्मनः ॥ निष्ठामर्हथ नो वक्तुं यूयंहि ब्रह्मवित्तमाः ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ सर्वांभूतीं भगवद्भावो ॥ हा मुख्य मायातरणोपावो ॥ ऐकोनि सुखावला रावो ॥ तेणें ×आनंदें पहावो परब्रह्म पुसे ॥ २३ ॥ करितां नारायणाची भक्ती ॥ उत्तम भक्त माया तरती ॥ ते नारायणाची निजस्थिती ॥ साक्षेपें नृपती पूसतु ॥ २४ ॥ ब्रह्म परमात्मा नारायण ॥ वस्तूसीच ह्मणिपे जाण ॥ ते वस्तुनिष्ठा परिपूर्ण ॥ राजा आपण पुसत ॥ २५ ॥ सकळांमाजीं अधिष्ठान ॥ सबाह्य ज्याचेनि परिपूर्ण ॥ त्या स्वरूपातें नारायण ॥ स्वयें सज्ञान बोलती ॥ २६ ॥ तुह्माऐसे ज्ञाननिधि ॥ भाग्यें जोडलेति त्रिशुद्धी ॥ तुमच्या *वचनामृतबोधीं ॥ ※अहंबुद्धी उपजेना ॥ २७ ॥ तुमचिया वचनोक्तीं ॥ वोसंडली स्वानंदस्फूर्ती ॥ लांचावली चित्तवृत्ती ॥ श्रवणें तृप्ती कदा नमनीं ॥ २८ ॥ ऐकोनियां रायाचा श्रेष्ठ प्रश्न ॥ प्रबुद्धाधाकुटा पिप्पलायन ॥ तो बोलावया आपण ॥ स्वानंदें पूर्ण सरसावला ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ पिप्पलायनउवाच ॥ स्थित्युद्भवप्रलयहेतुरहेतुरस्य यत्स्वप्नजागरसुषुप्तिषु सद्बहिश्च ॥ देहेंद्रियासुहृदयानि चरंति येन संजीवितानि तदवेहि परं नरेंद्र ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ अगा ज्याचेनि 7उपजे उत्पत्ती ॥ ज्याचेनि अंगें स्थितीसी स्थिती ॥ ज्याचेनि प्रळया प्रळयशक्ती ॥ ऐसा जो त्रिगतीं मुख्यहेतू ॥ ६३० ॥ यापरी जो जगाचा हेतू ॥ स्वयें स्वसत्ता हेतुरहितू ॥ 8सच्चिदानंद सदोदितू ॥ तो जाण निश्चित नारायण ॥ ३१ ॥ जेवीं सायंप्रातमध्यान्हें ॥ तिहीं काळां अलिप्त गगन ॥ तेवीं उत्पत्तिस्थितिप्रळयीं जाण ॥ अलिप्त नारायण परमात्मा ॥ ३२ ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयांत ॥ ह्मणसी कोण देखे येथ ॥ तेचि अर्थींचा दृष्टांत ॥ 3विशद अर्थ अवधारीं ॥ ३३ ॥ जागृती स्वप्न आणि सुषुप्ती ॥ तिन्ही व्यापूनि समाधीही परती ॥ ज्याची साक्षित्वें स्फुरे स्फूर्ती ॥ तो जाण निश्चितीं नारायण ॥ ३४ ॥ [1]जागृतीचें जाणपण ॥ स्वप्नाचें मिथ्याभान ॥ सुषुप्तीचा साक्षी पूर्ण ॥ तो नारायण निश्चित [1] ॥ ३५ ॥ एवं परमात्मा परंज्योति ॥ आत्मा हृदयस्थ त्रिजगतीं ॥ त्यातें नारायण ह्मणती ॥ जाण निश्चितीं नृपनाथा ॥ ३६ ॥ ऐशी सांगतां +ब्रह्मस्फूर्ती ॥ अगम्य वाटेल ०ब्रह्मप्रतीति ॥ सहजें ब्रह्म आतुडे हातीं ॥ ऐक ते उपपत्ती सांगेन ॥ ३७ ॥ तरी परमात्मा 2ब्रह्म पूर्ण ॥ तुझे हृदयीं नांदे आपण ॥ ज्याचेनि मन बुद्धि प्राण ॥ इंद्रियें जाण वर्तती ॥ ३८ ॥ नयन तेणें तेजें देखणें ॥ रसना तेणें स्वादें चाखों जाणे ॥ श्रवण तेणें अवधानें ॥ शब्दज्ञान प्रतिबोधती ॥ ३९ ॥ तेणें अहंकारें अहंभाव ॥ तेणेंचि कळे मनासि

---

१ पुढ झाला. २ युक्ति. 2· instinct

×ना. आनंदला. *ना. प्रबोधी. ※ना. आळसबुद्धी. 7ना. उत्पत्तीसी. 8ना सच्चिदानंदें. 3ना. स्फुरदर्थ अवधारी. +ना. ब्रह्मस्थिती. ०ना. आत्मप्रतीति. 2ना. परब्रह्म.

मंतव्य ॥ तेणेंचि चित्तासि चेतव्य ॥ बुद्धिसी बोद्धव्य तेणें बोधें ॥ ६४० ॥ तेणें जड देह सचेतन ॥ तेणेंचि कळे मृदु कठिण ॥ तेणेंचि चरणाच्या ठायीं गमन ॥ करीं कर ग्रहण त्याचिये सत्ता ॥ ४१ ॥ त्याचेनि प्राण परिचरती ॥ त्याचेनि निमेषोन्मेष स्फुरती ॥ त्याच्या आनंदलेशस्थिती ॥ आनंद उपस्थीं भोगिती प्राणी ॥ ४२ ॥ एवं चाळकू जो त्रिजगतीं ॥ जो स्वानंदें नांदे हृदयस्थिती ॥ त्यातें नारायण ह्मणती ॥ तोचि निश्चितीं परमात्मा ॥ ४३ ॥ ज्याचेनि मन बुद्धि प्राण ॥ इंद्रियें विचरती संपूर्ण ॥ तो तूं ह्मणसी त्यांआधीन ॥ हें कल्पांतीं जाण घडेना ॥ ४४ ॥ तेथ जाणपणें जाणों जासी ॥ तें जाणावें तेंचि नेणसी ॥ तेथ ज्ञातेपणें ज्ञानासी ॥ स्वरूपापाशीं रिगु नाहीं ॥ ४५ ॥ जाणीव आणि नेणीव ॥ हे सोडूनि सर्वभाव ॥ जें उपजे ब्रह्मसद्भाव ॥ तें ब्रह्म स्वयमेव पाविजे ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ नैतन्मनो विशति वागुत चक्षुरात्मा प्राणेंद्रियाणि च यथाऽनल मर्चिषःस्वाः ॥ शब्दोऽपि बोधकनिषेधतयात्ममूलमर्थोक्तमाह यद्दते न निषेधसिद्धिः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ वैकुंठ कैलास क्षीराब्धी ॥ ×मन कल्पी कल्पनाविधी ॥ परी आत्मा कल्पावया त्रिशुद्धी ॥ ।मनबुद्ध्यादी सरेना ॥ ४७ ॥ स्वयें कल्पी त्रिभुवन ॥ तें स्वरूपीं रिघूं नशके मन ॥ बुद्धि निश्चयात्मक पूर्ण ॥ तीसही जाण अगम्य वस्तू ॥ ४८ ॥ जें मनबुद्धि अगोचर ॥ तें वाचेसि अति दुस्तर ॥ वस्तु नव्हे शब्दगोचर ॥ परात्पर परब्रह्म ॥ ४९ ॥ 'मोटे बांधतां आकाशातें ॥ चारी पोलव पडती रितें ॥ तेवीं शब्दें बोलावें वस्तूतें ॥ तेव शब्द शब्दातें निर्भर्म ॥ ॥ ६५० ॥ प्राणाचेनि निजदाळें ॥ जे कां क्रियाशक्ती चळे ॥ ते क्रियेसि वस्तु नातळे ॥ मा इंद्रियां आकळे कैसेनी ॥ ५१ ॥ जेवीं थिल्लरा आंतौता ॥ बिंबोनि वोला नव्हे सविता ॥ 6तेवीं मनबुद्धि इंद्रियां परता ॥ जाण तत्त्वतां परमात्मा ॥ ५२ ॥ जो मनाचें अनादि मन ॥ जो बुद्धीची बुद्धि सज्ञान ॥ जो नयनाचें आदिनयन ॥ जो श्रवणाचें श्रवण सावधानत्वें ॥ ५३ ॥ जो घ्राणाचें निजघ्राण ॥ जो रसनेची रसना आपण ॥ जो त्वचेची निजत्वचा पूर्ण ॥ जीवाचा जो जाण जीव स्वयें ॥ ५४ ॥ जो इंद्रियांचा प्रकाशिता ॥ जो कर्म करोनि अकर्ता ॥ तो इंद्रियीं इंद्रियार्थां ॥ विषयीं सर्वथा होतेणे ॥ ५५ ॥ जेथें बुद्धीची दृष्टी न वेळेचे ॥ तेथें मन मनपणें केवीं रिघे ॥ मा श्रवणनयन 0घ्राणयोगें ॥ विषयसंयोगें केवीं भेटे ॥ ५६ ॥ जेथें प्राण-शक्ती नचढे पुढें ॥ तेथ वाचा स्वयें लाजिली मुरडे ॥ मा कर्मेंद्रियांसि कोणीकडे ॥ पैसारु पुढें जोडेल ॥ ५७ ॥ अग्नीपासूनि ज्वाळा अनेग ॥ क्षणक्षणां निवती चांग ॥ परी ज्वाळांमाजी अग्नीचें अंग ॥ सर्वथा सांग प्रगटेना ॥ ५८ ॥ कां सूर्यापासूनि सूर्यकांत ॥ प्रकाशती असंख्यात ॥ परी सूर्यकांता आंत ॥ कदा भास्वंत प्रगटेना ॥ ५९ ॥ जेवीं सिंधूपासूनि तरंग ॥

१ महाज्ञानानें. २ प्रजोत्पत्तीचें इंद्रिय. ३ दुधाचा समुद्र. ४ पुढें होईना, घडेना. ५ पदर. ६ गतीनें तेजानें. ७ ओला, भिजला. ८ मुळचा डोळा. ९ जाई. १० माघारी फिरे. ११ प्रसर अवकाश. १२ ज्वाळा. १३ सूर्य.

×पा. मनकल्पित. ।पा. मनोसिद्धि. 6पा. तेवीं मन बुद्धी इंद्रियां समस्ता ॥ असोनि परता परमात्मा. 0पा. घ्राणाजोगें.

प्रकाशती अतिअनेग ॥ परी तरंगीं सिंधूचें अंग ॥ सर्वथा सांग प्रगटेना ॥ ६० ॥ तेवीं ब्रह्मापासोनि करणें ॥ प्रकाशतीं अनेकपणें ॥ परी त्या इंद्रियां ब्रह्म जाणणें ॥ हें जीवें प्राणें घडेना॥ ॥ ६१ ॥ जरी केळापासूनि केळी निपजे ॥ कां साखरेपासूनि ऊंस उपजे ॥ तरी इंद्रियीं ब्रह्म जाणिजे ॥ हें नये निजबोजें ब्रह्मादिकां ॥६२॥ आशंका ॥ इंद्रियीं नव्हे ब्रह्मज्ञान ॥ तें जीवाचें भवबंधन ॥ कदाकाळीं नतुटे जाण ॥ जन्ममरण अनिवार ॥ ६३ ॥ शब्दादेवापरोक्षमिती ॥ ऐशी श्रुतिशास्त्र उपपत्ती ॥तेही मिथ्या वाटे वेदांती॥ऐसें तूं निश्चितीं मानिसी राया ॥६४॥ तेहि अर्थाचें निरूपण ॥ ऐक राया सावधान॥शब्द निर्मोनि आपण ॥ दे ब्रह्मज्ञान जीवासी ॥६५॥

॥ पूर्वील श्लोकार्थ ॥ शब्दोऽपिबोधकनिषेधतयात्ममूलमर्थोक्तमाह यदृते ननिषेधसिद्धिः ॥

॥ टीका ॥ जीव सोडवावया होडा ॥ शब्दें सवेग उचलिला विडा ॥ तेणें घेतां तत्त्वांचा झाडा ॥ आपणही पुढां निमाला ॥ ६६ ॥ श्रुति नेतिनेति येणें शब्दें ॥ अतद्व्यावृत्ती निषेधबोधें ॥ परी साक्षाद्वेदानुवादें ॥ निजवस्तु शब्दें नबोलवे ॥ ६७ ॥ शब्दासि जें वाच्य नोहे ॥ तेंचि परब्रह्म जाणावें ॥ तेथालिया जो खुणा पावे ॥ तो ब्रह्मसद्भावें स्वयें होय ॥ ॥६८॥ श्रुति नेतिनेति येणें वचनें ॥ शब्द निषेधूनि वस्तु दाखवणें ॥ शब्दीं निःशब्द जो लक्षूं जाणे ॥ तेणें पावणें परब्रह्म ॥ ६९ ॥ ×शब्द निजनिषेधें जें बोधी ॥ तेथें समरसे ज्याची बुद्धी ॥ तेंचि परब्रह्म गा त्रिशुद्धी ॥ निषेधावधी तो ठावो ॥ ६७० ॥ शब्द निर्मोनियां सर्वशक्ती ॥ जीवासि दे ब्रह्मप्राप्ती ॥ शब्दादेवापरोक्षमिती ॥ जाण निश्चितीं यानांव ॥ ७१ ॥ 'वाचा निःशेष निवर्त ॥ मन बुद्धि नपवे जेथें ॥ तेंचि अवधी निषेधातें ॥ परब्रह्म त्यातें बोलिजे ' ॥ ७२ ॥ ' जें वाचेतें वदवितें ॥ परी वाचा वदों नशके ज्यातें ॥ जें मनबुद्ध्यादिकां जाणतें ॥ परी मनबुद्धी ज्यातें नेणती॥७३॥जें नयनातें दाखवितें ॥ परी नयन न देखती ज्यातें ॥ जें श्रवण घ्राणांतें चेतवितें॥ परी श्रवण घ्राण ज्यातें नेणती ॥७४॥ ' एवं सर्वांतें जें जाणतें ॥ परी सर्व सर्वथा नेणती ज्यातें ॥ ज्यासि जाणावयालागीं येथें ॥ आणिक जाणतें असेना॥' ॥७५॥ ऐसें स्वसंवेद्य निजज्ञातें ॥ ज्यासि दुजें नाहीं जाणतें ॥शब्द रिघावया तेथें ॥ रिगमु त्यातें असेना ॥ ७६ ॥ जें कृश ना पुष्कळ ॥ जें *वक्र ना वर्तुळ ॥ जें सूक्ष्म ना नव्हे स्थूळ ॥ वस्तु केवळ निर्विकार ॥ ७७ ॥ ज्यासि नाहीं रूप गुण ॥ ज्यासि नाहीं आश्रम वर्ण ॥ ज्यासि नाहीं मीतूंपण ॥ ज्यासि जन्ममरण असेना ॥ ७८ ॥ जें हेळुवट ना गाहिंसे ॥ जें चिंवळ ना सेंपोश ॥ जें वसतें ना वोसें ॥ जेकां निःशेष निर्धर्म ॥७९॥ जें र्‍हस्व ना मोठें ॥ जें वडील ना धाकुटें ॥ जें विचारितां विवेकवाटें ॥ विवेकही आटे निःशेष ॥६८०॥ ज्यासि आदि ना अंतू ॥ जें मध्यस्थितिरहितू ॥ जें गुण ना गुणातीतू ॥ अच्युतानंतू अद्वयत्वें ॥ ॥ ८१ ॥ त्या स्वरूपाचा वचनपाठ ॥ करावया वेदें केली खटपट ॥ तेथ श्रुतीचाही बोभाट ॥ लाजिली करूनि कष्ट नेतिनेतिवादें ॥ ८२ ॥ वेदू काय नेणोनि परतला ॥ जाणोनि नबोलवेचि बोला ॥ याचलागीं तो मौनावला ॥ तटस्थ ठेला निःशब्दें ॥ ८३ ॥ वेदें धरितां [2]निज मौन॥

१ शब्दानेच साक्षात्कार. २ वाणी. ३ नाहींसा करून. ४ पैजेनें. ५ शब्दानें. ६ 'नतनू अतनू.' ७ शिरकाव, अवकाश. ८ हलकें. ९ जड. १० रोड. ११ पुष्ट. १२ ओसाड. १३ गुणाहून वेगळें.

×ना. शब्द निषेधी जो बोधी. *ना. व्यक्त. [2]ना. दृढ.

शास्त्रें भांबावलीं जाण ॥ तिहीं धरोनि मताभिमान ॥ करिती वल्गन अतिवादें ॥ ८४ ॥ शब्दांतीं ब्रह्मज्ञान ' ॥ हे वेदें पावोनि पूर्ण म्हणु ॥ शब्दें शब्द निषेधून ॥ दृढ मौन तेणें धरिलें ॥ ८५ ॥ वेदरायें धरितां मौन ॥ शास्त्रें भांबावलीं जाण ॥ शोधितां शब्दांचें रान ॥ निजसमाधान नपावती ॥ ८६ ॥ ज्यासि शब्दांतीं ब्रह्मप्राप्ती ॥ त्यासि दर्शनें ऐक्या येती ॥ शास्त्रें स्वयेंचि समजती ॥ ऐक्य त्रिजगतीं आभासे ॥ ८७ ॥ ब्रह्म एकाकी अद्वयस्थिती ॥ तुवांचि दाविली उपपत्ती ॥ तेथ ऐक्यरूपें त्रिजगती ॥ ह्मणसी कवणाप्रती आभासे ॥ ८८ ॥ ज्याची तुटली वासना फांसाटी ॥ विराली अहंकाराची गांठी ॥ प्रारब्ध उरलें देहाचे तटीं ॥ त्यासि *ऐक्यसृष्टी आभासे ॥८९॥ त्याच्या अनुभवाची गोड गोष्टी ॥ सांगावया उल्हास पोटीं ॥ पिप्पलायनु स्वानंदतुष्टी ॥ ब्रह्मैक्यें सृष्टि वाखाणी ॥६९०॥

॥ श्लोक ॥ सत्वं रजस्तम इति त्रिवृदेकमादौ सूत्रं महानहमिति प्रवदंति जीवम् ॥ ज्ञानक्रियार्थफलरूपतयोरुशक्ति ब्रह्मैव भाति सदसच्च तयोः परं यत् ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ ब्रह्म निजऐक्यें परिपाठीं॥ प्रपंच ब्रह्मत्वेंचि उठी ॥ संतासंत सकळसृष्टी ॥ देखती दृष्टी ब्रह्मरूप ॥६९१॥ ' जेवीं नभीं नीळिमेचें भान ॥ तेवीं ब्रह्मीं माया नांदे संपूर्ण ॥ नवल तियेचें विंदान ॥ नपुंसका जाण पुरुषत्व केलें' ॥ ९२॥ अगाध तिचा पतिव्रताधर्म ॥ नपुंसका उपजवी काम ॥ अनाम्या ठेवी नाम ॥ कीं निष्कर्मा कर्म तिचेनी ॥ ९३ ॥ ' ते निःसंगसंगा रातली ॥ स्पर्शेंवीण गुर्विणी झाली ॥ प्रधान महत्तत्वें गर्भा आली ॥ तेथ त्रिगुणांतें व्याली विकारयुक्त ' ॥ ९४ ॥ विद्या अविद्या निजस्वभावीं ॥ जीवशिवांची भेदपदवी ॥ प्रियापुरुषांतें भोगवी ॥ ज्ञानाज्ञानगांवीं वसोनियां ॥ ९५ ॥ जेवीं सुवर्णी अलंकार ॥ तंतुमाजी पटाकार ॥ भिंतीवरी भासे चित्र ॥ तेवीं माया साकार ब्रह्मीं भासे ॥ ९६ ॥ मृत्तिकेचीं गोकुळें केलीं ॥ नानानामाकारीं जरी पूजिलीं ॥ तरी मृत्तिकाचि संचली॥ ×तेवीं ब्रह्मीं संचली जगद्रूपें माया ॥ ॥ ९७ ॥ जैशा घृताच्या कणिका ॥ घृतेंसि नव्हती आणिका ॥ तेवीं ब्रह्मीं मायाशक्ती देखा ॥ दावी अनेका अर्थातें ॥ ९८ ॥ ब्रह्म पूर्वी एकाकी एक ॥ तेंचि केवीं झालें अनेक ॥ तो मायायोगपरिपाक ॥ विशदअर्थ देख पिप्पलायन सांगे ॥ ९९ ॥ मुळीं ब्रह्म ओंकार ॥ तें एकचि झालें त्रिप्रकार ॥ अकार उकार मकार ॥ सत्त्वादिविकार गुणत्रयात्मक ॥७००॥ गुणत्रय समसमान ॥ त्यानांव बोलिजे प्रधान ॥तेंचि क्रियाशक्तीसूत्र जाण॥तेथें प्रगटल्या ज्ञान महत्तत्त्व ह्मणती ॥ १ ॥ अहंब्रह्म हे पूर्णस्फुर्ती॥ तें अहं झालें देहाकृती॥देहाभिमानें निश्चितीं ॥ जीव ह्मणती वस्तूतें॥२॥क्रिया ह्मणिजे दशधा करणें ॥ ज्ञानशब्दें देवताधिष्ठानें ॥ अर्थ ऐसें विषयांसी ह्मणणें ॥ तेथें फळ जाणणें सुखदुःख ॥३॥ गुण भूतें विषय करणें ॥ जीव भोक्ता सुखदुःखपणें ॥ ज्ञानक्रिया कर्माचरणें ॥ हें सर्वही जाण पूर्ण ब्रह्म ॥ ४ ॥ साखरेचा फणस प्रबळ ॥ तेथें कांटे त्वचा बीज गोळ ॥ अवघी साखरचि केवळ ॥ तेवीं ब्रह्मचि सकळ जगदाकारें॥५॥

१ भ्रांत झाली. २ बडबड. ३ पाश. ४ कौशल्य. ५ निःसंगाचे संगास. ६ रत झाली. ७ गर्भार. ८ दहाप्रकारें-दशेंद्रिय द्वारा.

*पा. दर्शनें विघळलीं जाण ॥ *पा. ऐक्यदृष्टी. ×पा. तेवीं ब्रह्मीं भासली जगद्रूप माया

जेवीं पेटाऊं पुतळीकृत ॥ तेथें विषमावयवीं समान सूत ॥ तेवीं जगदाकारें विकारवंत ॥ दिसे अविकृत परब्रह्म ॥ ६ ॥ जग विश्वप्रपंच नाम ॥ परी तें निखळ परब्रह्म ॥ हा उपनिषदर्थ उत्तम ॥ वेदांतीं परम परमार्थ तो हा ॥ ७ ॥ जगदाकारें ब्रह्म निश्चित ॥ जग अवघें विकारवंत ॥ तें ब्रह्मासही विकार प्राप्त ॥ म्हणसी तो अर्थ नव्हे राया ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ नात्मा जजान न मरिष्यति नैधतेऽसौ नक्षीयते सवनविद्व्यभिचारिणां हि ॥ सर्वत्र शश्वदनपाय्युपलब्धिमात्रं प्राणो यथेंद्रियबलेन विकल्पितं सत् ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ ब्रह्मासि नाहीं माता पिता ॥ यालागीं नव्हे जन्मकथा ॥ आत्मा एकदेशी होता ॥ तरी जन्मा येता जननीजठरा ॥ ९ ॥ आत्म्या वेगळा कांहीं ॥ तिळभरी ठाव रिता नाहीं ॥ यापरी पूर्णत्वें पाहीं ॥ जन्म ते ठायीं स्पर्शेना ॥७१०॥ जन्मापूर्वीं बाळाचें नास्तिक्य ॥ जन्मापाठीं मानिती आस्तिक्य ॥ या अस्तिनास्तीची भाष॥ आत्म्यासि देख असेना ॥ ११ ॥ आतां आहे पूर्वीं नाहीं ॥ ऐसें आस्तिक्य आत्म्याचे ठायीं ॥ कदाकाळीं नरिघे कहीं ॥ तो नित्य पाहीं निरंतर ॥१२॥ देहीं जन्मल्या बाळकासी ॥ वाढी दिसे दिवसादिवसीं ॥ तो जन्म नाहीं आत्म्यासी॥यालागीं वृद्धी त्यासी घडेना ॥१३॥ ज्यासि वृद्धी नाहीं तत्त्वतां॥ त्यासि नये विपरिणमता ॥ बाल्य तारुण्य वृद्धावस्था॥ आत्म्यासि सर्वथा असेना ॥१४॥ जो मी बाळत्वें होतों धाकुटा॥तोचि मी तारुण्यें जाहलों मोठा॥तोचि मी वृद्ध जाहलों कटकटां ॥ ऐसा त्रिकाळद्रष्टा परमात्मा ॥ १५ ॥ द्रष्टा साक्षी जो अवस्थातीत ॥ तो कदा नव्हे अवस्थाभूत ॥ देहीं असोनि अवस्थारहित ॥ जाण तो निश्चित परमात्मा ॥ १६ ॥ निरवस्थ आत्मा अविकारी पूर्ण ॥ त्यासि कदा नये क्षीणपण ॥ ज्यासि जन्मचि नाहीं जाण ॥ त्यासि मरण असेना ॥ १७ ॥ जो अविकारी निरवस्थ पूर्ण ॥ ज्यासि नाहीं जन्ममरण ॥ ऐसा तूं आत्मा म्हणशील कोण ॥ तरी जाण सर्वज्ञ ज्ञानरूप ॥ १८ ॥ म्हणशी ज्ञानही क्षणिक असे ॥ घटज्ञानें पटज्ञान निरसे ॥ तेथें इंद्रियार्थवृत्तीचि नासे ॥ ज्ञान जैसें तैसें अविनाशी ॥ १९ ॥ तोचि अर्थाचा पूर्ण दृष्टांत ॥ जेवीं प्राण देहातें वाढवित ॥ तो देहोचि होय अवस्थाभूत ॥ प्राण निरवस्थ जैसा तैसा ॥७२०॥ प्राण देहातें चाळिता ॥ त्यासि न बाधी देहावस्था ॥ आत्मा प्राणातें चेतविता ॥ त्यासि देहावस्था असेना ॥ २१ ॥ येणेंचि प्राण दृष्टांतें ॥ साधूनि दावावया परब्रह्मातें ॥ देहेंद्रियां वेगळें आत्म्यातें ॥ पुढील श्लोकार्थें प्रबोधी ॥ २२ ॥

॥श्लोक॥ अंडेषु पेशिषु तरुष्वविनिश्चितेषु प्राणो हि जीवमुपधावति तत्र तत्र ॥ सन्ने यदिंद्रियगणेऽहमि च प्रसुप्ते कूटस्थ आशयमृते तदनुस्मृतिर्नः ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ अंडज स्वेदज जारज ॥ चौथें जाण गा उद्भिज ॥ त्याचेठायीं प्राण सहज ॥ *आत्मयोगें सदा वर्ते ॥ २३ ॥ प्राणयोगें आत्मा वर्ततां ॥ त्यासि जीव म्हणती तत्त्वतां ॥

१ वस्त्र. २ बाहुली केलेलें. ३ स्तन जघन मध्यादि निम्नोन्नत. ४ अविकारी. ५ परिणाम. ६ हायहाय! ७ जागृति, स्वप्न, सुषुप्ति. तीन अवस्थांहून वेगळा. ८ हालविणारा.

*पा. आत्मयोगज.

त्या प्राणासी नबाधिती देहावस्था ॥ मा जीवाचे माथां त्या कैंच्या ॥ २४ ॥ देहेंद्रियांमाजी वर्ततां ॥ आत्मा अलिप्त देहावस्था ॥ तो कैसा ह्मणसी आतां ॥ ऐक त्याही दृष्टांता सांगेन ॥ ॥ २५ ॥ आत्मा जागृतीं देहीं वर्ते ॥ तैं सविकार मानिती त्यातें ॥ तोचि सांडूनि देहेंद्रियांतें ॥ स्वप्नीं वर्ते पूर्वानुध्यासें ॥ २६ ॥ देहइंद्रियांविहीन ॥ केवळ लिंगदेह जाण ॥ निजात्मा देखे स्वप्न ॥ जागृत्यभिमानसंकल्पें ॥ २७ ॥ तें उपरमल्या स्वप्न ॥ देहाभिमानही झालिया लीन ॥ सर्वविकारविहीन ॥ सुषुप्तिकाळीं पूर्ण परमात्मा उरे ॥ २८ ॥ देहेंद्रियांसि अभिमान नाहीं ॥ कोणीही स्फुरेना स्फुरण ॥ तरी तें झालें *सर्व शून्य ॥ आत्मा चिद्घन नाहीं ह्मणसी ॥ २९ ॥ जरी सुषुप्तीसि आत्मा नाहीं ॥ तरी सुखें निजेलों होतों पाहीं ॥ हें उपजे ज्याच्या ठायीं ॥ तो सर्वथा नव्हे कहीं शून्य ॥७३०॥ जो मी जागृतीं जागता ॥ जो मी सुषुप्तीं सुखभोक्ता ॥ जो मी स्वप्नातें देखिता ॥ एवं तिहीं अवस्था साक्षी जो ॥३१॥ जो अवस्थात्रयीं साक्षी पूर्ण ॥ तो सर्वथा नव्हे शून्य ॥ तोचि परमात्मा परिपूर्ण॥ शुद्ध चिद्घन तो राया॥३२॥ सुषुप्तीं ब्रह्मानुभव आहे ॥ तरी कां पुढती संसार पाहे ॥ तेथें अविद्येसी अहं लीन राहे ॥ यालागीं होय भवभ्रमु ॥ ३३ ॥ ते अविद्या अहंकारेंसि नासे ॥ °तें जगद्रूपें परब्रह्म भासे ॥ जन्ममरणांचा ठावोचि पुसे ॥ जीव समरसे परब्रह्मीं ॥ ३४ ॥ तेथें हेतुमातदृष्टांत-॥ प्रमाण-प्रमेयविवर्जित ॥ परमात्मा सदोदित ॥ परब्रह्म निश्चित परमानंदें ॥ ३५ ॥ तेथें सुखावरी +सुखें नांदे ॥ आनंद भोगिजे आनंदें ॥ जग दुमदुमीत परमानंदें ॥ स्वानंदबोधें संपूर्ण ॥ ॥ ३६ ॥ निरसोनियां निजमाया ॥ ऐसा अनुभवो मुनिवर्या ॥ कें होईल ह्मणसी राया ॥ तैं भजावें यदुवर्या निष्कामभावें ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ यर्ह्यब्जनाभचरणैषणयोरुभक्त्या चेतोमलानि विधमेद्गुणकर्मजानि॥ तस्मिन् विशुद्ध उपलभ्यत आत्मतत्त्वं साक्षाद्यथाऽमलदृशोः सवितृ-प्रकाशः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ निर्विकार स्वरूपप्राप्ती ॥ अवश्य पावणें आहे चित्तीं ॥ तें करावी भगवद्भक्ती ॥ उत्कंठा प्रीती अविश्रम ॥ ३८ ॥ त्यजोनि पुत्रवित्तैषणेचें काज ॥ जिंणोनि लौकिकाची लाज ॥ *पद्मनाभभजनभोजें ॥ अतिनिर्लज्ज नाचावें ॥ ३९ ॥ पुत्रवित्तलोकैषणा ॥ त्यजूनि भजतां हरिचरणा ॥ तंवतंव चित्ताचे चैत्यमळ जाणा ॥ क्षणक्षणां नासती ॥ ७४० ॥ रजतमादि ×कर्ममळ ॥ चित्तीं बैसले जे सबळ ॥ ते प्रक्षाळती सकळ ॥ भक्तिप्रेमजळक्षाळणें ॥ ॥ ४१ ॥ जंवजंव थोरावे सप्रेमभक्ती ॥ तंवतंव पायां लागे विरक्ती ॥ स्वयें विरमे विषया-सक्ती ॥ होय चित्तवृत्ती निर्मळ ॥ ४२ ॥ निर्मळ जाहलिया चित्तवृत्ती ॥ परमात्मया सर्वभूतीं॥ भजों लागे अनन्यप्रीती ॥ हे चौथी भक्ती उदार ॥ ४३ ॥ हे भक्ती अतिशयें उदार ॥ निर्दाळी

---

१ विकारी. २ जागृतींतील संस्कारस्मरणानें. ३ नाहींसें झालें असतां. ४ चैतन्यरूप. ५ अहंकार. ६ एक होतो. ७ सत्यज्ञानसाधन. ८ जिंकून. ९ आवड. १० चित्तसंबंधी मळ. ११ मोठी होते.

***ना. पूर्वें. °ना. तेव्हां जगद्रूप ब्रह्मचि भासे. +ना. सुखानंदें. *ना. पद्मनाभीं. ×ना. कर्मजमळ.**

भक्तांचा अहंकार ॥ उद्धरी सुर नर स्त्रिया शूद्र ॥ आनंदनिर्भर करी जिवू ॥ ४४ ॥ हे भक्ती जैं लागे हातीं ॥ तैं भवभयाची निःशेष शांती ॥ पायां लागती चारी मुक्ती ॥ ऐशी उदारभक्ती हरीची ॥ ४५ ॥ जेवीं डोळां असतां पडळ ॥ सविता उगवे सर्वकाळ ॥ तो मुख्य नदेखे रविमंडळ ॥ मा पदार्थ सकळ त्यां कैंचे ॥ ४६ ॥ तेंचि फिटलिया पडळ ॥ दृष्टी होय अति-निर्मळ ॥ देखां लागे पदार्थ सकळ ॥ रविमंडळ समन्वयें ॥ ४७ ॥ तेवीं निजात्मा हृदयीं वसे॥ परी चित्तवृत्ती मलिन असे ॥ तंव परब्रह्म नप्रकाशे ॥ +चित्त वासनादोषें दूषित ॥४८॥ तेथें करितां भगवद्भक्ती ॥ निर्मळ होय चित्तवृत्ती ॥ तेव्हां निर्विकारस्वरूपप्राप्ती॥भक्त पावती निजभजनें ॥ ४९ ॥ पावावया परमप्राप्ती ॥ जगीं दादुगी भगवद्भक्ती ॥ ते म्यां सांगितली तुजप्रती ॥ यथानिगुतीं नृपनाथा ॥ ७५० ॥ जेवीं डोळ्याचें पडळ फिटे ॥ तेथ प्रकाशेंसि सविता भेटे ॥ तेवीं कल्पनालोपें प्रगटे ॥ नेटेंपाटें परब्रह्म ॥ ५१ ॥ जेथ निर्विकल्प समान ॥ निश्चयेंसि जाहलें मन ॥ त्यासि देहीं वर्ततांही जाण ॥ भवबंधन स्पर्शेना ॥ ५२ ॥ ऐसें गर्जोनियां जाण ॥ हर्षें बोले पिप्पलायन ॥ तंव राजा सुखावला संपूर्ण ॥ जीवींची खूण बाणली ॥ ५३ ॥ ऐकतां ब्रह्मनिरूपण ॥ राजा लांचावला पूर्ण ॥ पुढें वाढावया निरूपण ॥ अन्यत्र प्रश्न पुसत ॥ ५४ ॥ जेणें तुटे कर्मबंधन ॥ त्या/कर्मयोगाचें/लक्षण ॥ समूळ ऐकावया जाण ॥ राजा आपण सादर पुसत ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ कर्मयोगं वदत नः पुरुषो येन संस्कृतः ॥ विधूये-हाशु कर्माणि नैष्कर्म्यं विंदते परम् ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ राजा निजश्रद्धासंपन्न ॥ अतिविनीत करी प्रश्न ॥ जेणें तुटे कर्मबंधन ॥ तो कर्म-योग संपूर्ण सांगा स्वामी ॥ ५६ ॥ कोणें कर्में कर्म तुटे ॥ नैष्कर्म्यसिद्धी स्वयें प्रगटे ॥ पुरुषा पुरुषोत्तम भेटे ॥ हें मज गोमटें वर्म सांगा ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ एवं प्रश्नमृषीन्पूर्वमपृच्छं पितुरंतिके ॥ नाब्रुवन् ब्रह्मणः पुत्रास्तत्र कारणमुच्यताम् ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ पूर्वीं हाचि प्रश्न सनकादिकां ॥ पुत्रीं पित्यासि पुशिला देखा ॥ तो उत्तर नेदीच कां ॥ हेही आशंका फेडावी स्वामी ॥ ५८ ॥ रायाचे प्रश्न अतिपवित्र ॥ त्याचें द्यावया प्रति-उत्तर ॥ हरिखावला आविर्होत्र ॥ तो कर्मवैचित्र्य निरूपी ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ अविर्होत्रउवाच ॥ कर्माकर्मविकर्मेति वेदवादो न लौकिकः ॥ वेदस्य चेश्वरात्मत्वात्तत्र मुह्यंति सूरयः ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ कर्माकर्मविकर्म जाणा ॥ *सामान्य नव्हे नृपनंदना ॥ करितां विभागविवंचना ॥ ठेंगवे सज्ञानां स्मृतिकारांसी ॥ ७६० ॥ जे स्वयें प्रतिसृष्टिकारी ॥ तेही भुलले कर्मविभा-गावारीं ॥ जे समुद्र घोंटिती चुळें करीं ॥ तेही कर्मसागरीं बुडाले ॥ ६१ ॥ येथि कर्म-

---

१ आनंदानें भरलेला. २ अनुभवास आली. ठसली. ३ अति नम्र होऊन. ४ उलगडत नाहीं. स्पष्ट कळत नाहीं. ५ कर्मरूप समुद्रांत.

+पा. चित्तवासनावशें दुषित. *पा. समान.

विवंचनेसाठीं ॥ ऋषिमहर्षीचिया कोटी ॥ मताभिमानें झाले हिंपुटी ॥ त्यांसीही शेवटीं नुगवेची ॥ ६२ ॥ कर्माकर्मविभाग जाणा ॥ स्वयें नुगवेचि चतुराननेना ॥ इतरांची कोण गणना ॥ कर्मविवंचना करावया ॥ ६३ ॥ कर्म वेदमूळ जाण ॥ वेदु स्वयें नारायण ॥ वेदवादविवंचन ॥ करितां मौन श्रुतिशास्त्रां ॥६४॥ कर्म अकर्म विकर्म *जाण ॥ एकच परी त्रिविध ×भिन्न ॥ तेंही विभागविवंचन ॥ सावधान अवधारी ॥ ६५ ॥ श्वेतता मृदु मधुर ॥ त्रिविधभेदें एक साखर ॥ तेवीं एकचि त्रिप्रकार ॥ कर्मठ नर मानिती कर्म ॥ ६६ ॥ भिन्न करितां मधुरता ॥ श्वेतताचि भिन्न करितां ॥ तीमाजी ये मृदुश्वेतता ॥ मृदुमधुरता तीमाजी ॥ ६७ ॥ तेवीं भिन्न करितां कर्म ॥ कर्मा सर्वांगीं अकर्म ॥ कर्म अकर्मा माजी विकर्म ॥ मिरवे परमसौभाग्यें ॥ ॥६८॥' मुख्य मुळीं जेकां निपजे '॥ कर्म ऐसें त्यातें म्हणिजे ॥ ' विहिताविहितक्रिया जे जे'॥ विकर्म म्हणिजे तिये नांव ॥ ६९ ॥ कर्मअकर्मयोगें चळे ॥ ऐसें विकर्मी ज्यासि ०विवंळे ॥ त्यास निष्कर्मता आकळे ॥ गुरुकृपाबळें तत्काळ ॥ ७७० ॥ ' कर्मावरी कर्म विशेष वाढे ' ॥ विकर्म त्यातें म्हणणें घडे ॥ ' जेथें कर्म रिघों नशके पुढें ॥ अकर्म चोखडें यानांव ॥ ७१ ॥ ऐशी कर्मविवंचना अटक ॥ हा प्रश्न केला तें तूं बाळक ॥ त्याचिलागीं गा राया देख ॥ सनकादिक न सांगतीची ॥ ७२ ॥ कर्माकर्मविकर्मविवंचना ॥ अधिकारेंवीण कोणा ॥ सांगों नये नृपनंदना ॥ कर्म सज्ञाना अतिदुर्बोध ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ परोक्षवादो वेदोऽयं बालानामनुशासनम् ॥ कर्ममोक्षाय कर्माणि विधत्ते ह्यगदं यथा ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ जेवीं रोग जावया निश्चित ॥ बाळा पिता भेषज देत ॥ तेथें साखर घाली हातांत ॥ तत्सेवनार्थ प्रलोभें ॥ ७४ ॥ ' तेवीं वेदांचा +परोक्षवाद ॥ सत्य मानिती बुद्धिमंद ॥ कर्में छेदवी कर्मबाध ॥ हा वेदानुवाद मुख्यत्वें ' ॥ ७५ ॥ वेद बोले स्वर्गादिफळ ॥ तो प्रवृत्तिलोभें केवळ ॥ परी कर्में छेदी कर्ममूळ ॥ हें मुख्यत्वें फळ वेदोक्तीं ॥ ७६ ॥ लोहाची बेडी पडली पायीं ॥ ते तोडावया घणु आणिला पाहीं ॥ तो घणूचि विकून खादला जिहीं ॥ त्यांचें बंधन कांहीं तुटेना ॥७७॥ तेवीं कर्में छेदावें कर्मबंधन॥ तें कर्म वेंचिती विषयीं पूर्ण॥त्यांचें कदा नतुटे भवबंधन ॥ जन्ममरण सरेना ॥७८॥ आधीं स्वर्गफळा विरक्त ॥ म्हणोनि नाचरे जो वेदोक्त ॥ त्याचें ज्ञान झालें विपरीत ॥ अति अनर्थ पावती ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ नाचरेद्यस्तु वेदोक्तं स्वयमज्ञोऽजितेंद्रियः ॥ विकर्मणा ह्यधर्मेण मृत्योर्मृत्युमुपैति सः ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ आधीं जितेंद्रिय म्हणवित ॥ म्हणोनि नाचरे जो वेदोक्त ॥ त्यासि नातुडे गा परमार्थ ॥ परिसता अनर्थ भेगीं वाजे ॥ ७८० ॥ जरी शास्त्रज्ञ ज्ञाता झाला ॥ आणि वेदोक्त विमुख ठेला ॥ तरी तो जाणपणेंचि नागवला ॥ जाण बुडाला दुःखार्णवीं ॥ ८१ ॥ नाचरे जो वेदोक्त कर्म ॥ ⁰त्यक्तकर्में मानी निष्कर्म ॥ त्यासि थोर पडला भ्रम॥वाढला परम अधि-

---

१ कष्टी. २ ब्रह्मदेवांस- ३ उत्पन्न होतें. ४ समजे. ५ कर्माचा विचार. ६ औषध. ७ मोठा हातोडा. ८ खाल्ला. ९ उदासीन, अनासक्त.

*ना. भिन्न. ×ना. जाण. ०ना. विकळे. +ना. परोक्षफळानुवाद. ⁰ना. नित्यकर्में.

मार्ने ॥ ८२ ॥ जरी विषयो निग्रहिला ॥ आणि वेदोक्त जो दुरावला ॥ तो निजघाता प्रवर्तला ॥ स्वयें बुडाला नरकार्णवीं ॥ ८३ ॥ वेद निजमूळ परमार्था ॥ तें वेदोक्त नाचरतां ॥ जें जें करणें नृपनाथा ॥ तें तें तत्त्वतां अधःपाती ॥ ८४ ॥ डोळे. देखणे तत्त्वतां ॥ ते काढूनि. पाहों जातां ॥ नदेखे आपुली डोळसता ॥ मा इतर पदार्था कोण देखे ॥ ८५ ॥ तैसा नाचरोनि वेदार्थ ॥ जो जो मानिला परमार्थ ॥ तेणें आवंतूनिया अनर्थ ॥ जाण निश्चित आणिला घरा ॥ ८६ ॥ तेणें अनाचारें अनर्थपाटें ॥ वाहावले जन्ममरणवाटे ॥ तेथें नाना- योनीगर्भसंकटें ॥ सोसितां नसुटे कल्पांतीं ॥ ८७ ॥ तेथें जन्मजन्मीं जन्म नटके ॥ मरमरों मरण नचुके ॥ जें वेदविहित चुके ॥ तें अति दुःखें दुःखभोगी सर्वदा ॥ ८८ ॥ ' विकर्मणा ह्यधर्मेण ' ॥ हें मुळींचें पदनिरूपण ॥ तेणें विकर्मामाजीं अधर्म पूर्ण ॥ परी अकर्म तें जाण अधर्म नव्हे ॥ ८९ ॥ ज्यासी लाविता नलागे कर्म ॥ यानांव मुख्य निष्कर्म ॥ ×निष्कर्मलक्षण हाचि धर्म ॥ येणेंचि परम मुक्त साधू ॥ ९० ॥ ज्यासि शुद्ध आकळे अकर्म ॥ तो तत्काळ होय निष्कर्म ॥ अकर्माचें कळल्या वर्म ॥ मुक्तता परम पायां लागे ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ वेदोक्तमेव कुर्वाणो निःसंगोऽर्पितमीश्वरे ॥ नैष्कर्म्यां लभते सिद्धिं रोचनार्था फलश्रुतिः ॥ ४६ ॥

॥ टी ॥ दासी स्वामीची आज्ञाधारी ॥ कां राजमुद्रा प्रजांवरी ॥ तैसी वेदाज्ञा जो शिरीं धरी ॥ स्वधर्माचारी निष्काम ॥ ९२ ॥ मी एकु कर्मकर्ता ॥ ऐसा उठोंनेदी अहंता ॥ तें कर्मचि स्वभावतां ॥ अर्पी श्रीअनंता ईश्वरातें ॥ ९३ ॥ एवं ईश्वरीं जें अर्पी कर्म ॥ तें कर्म होय निर्धर्म ॥ याचि नांवें परम ॥ नैष्कर्म्य निजात्मसिद्धी ॥ ९४ ॥ वेदें बोलिलें कर्मफळ ॥ ज्याची वासना निष्काम निर्मळ ॥ त्यासि वेदोक्त फळ प्रबळ ॥ भोगावया केवळ स्वप्नीं न दिसे ॥ ९५ ॥ ऐसें असतां कर्मफळ ॥ वांछितां नाडिजे केवळ ॥ जेवीं परिस देऊनि सोज्वळ ॥ मागिजे पोफळ तांबूलासि ॥ ९६ ॥ कर्मीं निष्कामता नित्य फळ ॥ तेथें फळाशा नाडले सकळ ॥ चंदन सर्वांगीं सफळ ॥ तेथें मागतां फळ नाडिजे स्वयें ॥ ९७ ॥ हातीं आतुडावया मासा ॥ गळीं लाविजे अल्प +आमिषा॥तेवीं निष्काम करावया मानसा ॥ वेद फळाशा प्रलोभी॥९८॥आमिष घालूनि मासे पाळी॥ कीं तयोगें जळाबाहेर गाळी ॥ तेवीं *कर्म कर्मातें निर्दळी ॥ हें नेणिजे मुळीं फळकामी ॥९९॥ होकां फळाचिये चाडें ॥ स्वधर्म- कर्मी प्रवृत्ति घडे ॥ तेणें नैष्कर्म्यसिद्धी आतुडे ॥ हें वेदांचें कुडें निजगुज ॥८००॥ कर्म ब्रह्मत्वें सदा सफळ ॥ फळ वांछी त्यातें निष्फळ ॥हें जाणोनि कर्मकुशळ ॥ फळाशा समूळ छेदिती ॥ ॥ १ ॥ ऐसें आचरतां वैदिक कर्म ॥ तेणें कर्में पाविजे नैष्कर्म्य ॥ त्याहोनियां अतिसुगम ॥ सांगेन वर्म तें ऐक ॥ २ ॥

१ नाहींसा केला,विषयवासना टाकल्या. २ नरकरूप समुद्रांत. ३ डोळा हीच खरी दृष्टि, किंवा पहाणें ४ बोलावून. ५ अनर्थ प्रवाहांत. ६ वेदानें सांगितलेलें. ७ अडकले, बुडले. ८ मांसास. ९ आरंभ. १० खरें.

×पा. निष्कर्म लक्षणें हा स्वधर्म. +पा. आविसा. *पा. कर्में.

॥ श्लोक ॥ य आशु हृदयग्रंथिं निर्जिहीर्षुः परात्मनः ॥ विधिनोपचरेद्देवं तंत्रोक्तेन च केशवम् ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ जेणें वासनेचें जाळ तुटे ॥ अहंकाराची गांठी सुटे ॥ जीवीं परमात्मा स्वयें प्रगटे ॥ तें तांत्रिक विधान गोमटें ऐक राया ॥ ३ ॥ जया तांत्रिका महापूजा ॥ संतोष होय गरुडध्वजा ॥ तें तांत्रिक विधान वोजा ॥ महाराजा अवधारी ॥ ४ ॥ वैदिक मंत्र तांत्रिक-तंत्र ॥ हे मिश्रपूजा अतिपवित्र ॥ शीघ्र निष्काम करी नर ॥ तो पूजाप्रकार अति उत्तम ॥ ॥५ ॥ वैदिक अथवा तांत्रिक ॥ गुरुमार्गें सिद्धिदायक ॥ यालागीं गा आवश्यक ॥ सद्गुरूसि देख शरण जावें ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ लब्धानुग्रह आचार्यात्तेन संदर्शितागमः ॥ महापुरुषमभ्यर्चेन्मूर्त्याऽभिमतयाऽऽत्मनः ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ प्रवृत्तिनिवृत्ति कृत कार्या । अवश्य पाहिजे आचार्या ॥ आपमतीं भजतां राया ॥ अनेक अपायांमाजी पडे ॥७॥ भोयें पाय सिद्ध आहेती ॥ भोयाळेवीण वृथा भ्रमती ॥ तेवीं गुरुवीण जे जे करिती ॥ तेते अहंमती दृढ भ्रमले ॥ ८ ॥ गुरुब्रह्म दोनी एक ॥ ऐशिया भावना आवश्यक ॥ सेवा करून भावपूर्वक ॥ संतोषवूनि देव अनुग्रहो घ्यावा ॥ ९ ॥ तेथें निजाधिकारें प्राप्तें ॥ जे मूर्ति आवडेल आपणियातें ॥ तेचि मंत्रविधा तेथें ॥ *श्रद्धासंभरितें अंगीकारावी ॥८१०॥ तेव्हां गुरुमुखें मिश्र वोजा ॥ पुरुषोत्तममहापूजा ॥ शिकोनियां निजकाजा ॥ भजावें अधोक्षजा शिक्षिता मती ॥ ११ ॥ ×तेचि भजती हातवटी ॥ आगमोक्त निजपुष्टी ॥ राया सांगेन गोमटी ॥ सावधानदृष्टी अवधारी ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ शुचिः संमुखमासीनः प्राणसंयमनादिभिः॥ पिंडं विशोध्य संन्यासकृतरक्षोऽर्चयेद्धरिम ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ विधियुक्त करितां संध्या स्नान ॥ तेथेंचि आहे ब्रह्मज्ञान ॥ आचमनीं होय हरिरूप आपण ॥ हें नेणोनि अज्ञान आगमीं भरती ॥ १३ ॥ केशवादिनामीं जाण ॥ अंगप्रत्यंगीं न्यासितां पूर्ण ॥ तेव्हां हरिरूप होय आपण ॥ हें नेणोनि अज्ञान आगमीं भरती ॥ १४ ॥ करून आगमोक्त संध्या स्नान ॥ मूर्तिपाशीं येऊन आपण ॥ संमुख घालावें आसन ॥ चैलाजिनकुशयुक्त ॥ १५ ॥ रेचकपूरककुंभकें जाण ॥ प्राणायामें प्राणसंयमन ॥ भूतशुद्ध्यादिकीं जाण ॥ शरीरशोधन करावें ॥ १६ ॥ भूतविलयें भूतशुद्धी ॥ प्राणप्रतिष्ठा पिंडादि+शुद्धी ॥ मूळमंत्रें न्यास प्रबुद्धी ॥ गुरुदीक्षाविधी विधियुक्त कीजे ॥ १७ ॥ हृदय कवच शिखा शिर ॥ नेत्र अस्त्रादिकफट्कार ॥ एवंविधान अनुसार ॥ आगमोक्त प्रकार करावे न्यास ॥१८॥ यापरी मूळमंत्रदीक्षा ॥ करोनि दिग्बंधादि संरक्षा ॥ मग मूर्तिपूजनपक्षा ॥ नृपाध्यक्षा अवधारी ॥ १९ ॥

---

१ जाळें. २ आदरानें, आवडीनें. ३ आचार्य-गुरु. ४ आपल्या बुद्धीनें. ५ भ्रमांत. ६ भुईस. ७ वाटाड्यावांचून. ८ श्रद्धेसहित. ९ भजण्याची धाटी, क्रमस. १० विधीनें सांगितलेलें, विधीप्रमाणें. ११ तंत्र शास्त्रांत.

*ना. संभरितें. ×ना. तेथें. +ना. सिद्धी.

॥ श्लोक ॥ अर्चादौ हृदये चापि यथालब्धोपचारकैः ॥ द्रव्यक्षित्यात्मलिंगानि निष्पाद्य प्रोक्ष्य चासनम् ॥ ५० ॥

॥ टीका ॥ प्रयोग छंद संपूर्ण ॥ पूर्वान्वयें विपरीत जाण ॥ द्रव्यशुद्धि क्षितिमोर्जन ॥ हें मागील निरूपण पुढां आलें ॥ ८२० ॥ द्रव्यशुद्धि मुख्यशोधन ॥ भूमिशुद्धि संमार्जन ॥ आत्मशुद्धि सावधान ॥ +कादिल्या अनुलेपन मूर्तिशुद्धी ॥ २१ ॥ पूजासंभार ०सिद्ध करून ॥ समस्त शंखतोयें प्रोक्षून ॥ निजासनीं सावधान ॥ एकाग्र जाण बैसावें ॥ २२ ॥ ज्यासि ध्यानीं मूर्ति नये संपूर्ण ॥ तेणें प्रतिमामूर्ति अधिष्ठान ॥ तेथेंचि करावें पूजन ॥ लब्धोपचारें जाण आगमोक्त ॥ २३ ॥ ' ज्यासि ध्याना नये मूर्ति अतिसंकटीं ॥ तेणें बाह्योपचार आटाआटी ॥ सांडूनियां ध्यानदृष्टीं ॥ करावी गोमटी मानसपूजा ' ॥ २४ ॥ ज्याचे हृदयींचें न विकरे ध्यान ॥ *बाह्यमूर्तिपूजेसी सावधान ॥ तेणें उभय पूजन ॥ करावें संपूर्ण आगमोक्त ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ पाद्यादीनुपकल्प्याऽथ सन्निधाप्य समाहितः ॥ हृदादिभिःकृतन्यासो मूलमंत्रेण चार्चयेत् ॥ ५१ ॥

॥ टीका ॥ सकळ पूजासंभार ॥ निकटें ठेवूनि उपचार ॥ मग मूर्तीसि न्यासप्रकार ॥ ×उत्तशाळें करावा ॥ २६ ॥ जैसे न्यास आपणास ॥ तैसेचि करावे मूर्तीस ॥ हा आगमोक्त गुरुमौरस ॥ मूळमंत्रें न्यास मूर्तीसी ॥ २७ ॥ आगमोक्त करितां न्यास ॥ अंगप्रत्यंगीं विन्यास ॥ तेणें करितां होय हृषीकेश ॥ हा अर्थ मौरस दृढ करावा ॥ २८ ॥ दृढ करोनि अनुसंधान ॥ मूळमंत्रें मूर्तिपूजन ॥ हृदयीं आनि प्रतिमेसि जाण ॥ पूजाविधान दोहीं ठायीं ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ सांगोपांगां सपार्षदां तां तां मूर्तिं स्वमंत्रतः ॥ पाद्यार्घ्याचमनीयाद्यैःस्नानवासोविभूषणैः ॥ ५२ ॥

॥ टीका ॥ करचरणादि अभ्यंग ॥ मूर्ति चिंतावी सुंदर सांग ॥ श्याम मनोहर श्रीरंग ॥ उल्हासें चांग निजध्यानीं ॥ ८३० ॥ मूर्ति चतुर्भुज वेल्हाळ ॥ शंख चक्र गदा कमळ ॥ सुनंदादि पार्षदमेळ ॥ चिंतावे सकळ सायुधादिक ॥ ३१ ॥ यथोक्त मधुपर्कविधान ॥ अर्घ्य पाद्यादि आचमन ॥ पुरुषसूक्तमंत्रें जाण ॥ करावें स्नान निर्मळजळें ॥ ३२ ॥ मुकुट कुंडलें कटीं मेखळा ॥ कांसे मिरवे सोनसळा ॥ आपाद रुळे वनमाळा ॥ कौस्तुभ तेजाळा कंठीं झळके ॥ ३३ ॥ पाद पद्मांकित सुकुमार ॥ ऊर्ध्वरेखा ध्वज वज्र ॥ वांकी अंदुवांचा गजर ॥ चरणीं तोडर गर्जत ॥ ३४ ॥

१ जमिनीवर पाणी शिंपडणें. २ पूजेचें साहित्य. ३ मिळालेल्या साहित्यानें. ४ निकार पाडे, बिघडे. ५ जवळ. ६ उत्तम. ७ सुंदर. ८ सेवक. ९ कंबरेवर. १० पायापर्यंत. ११ तेजस्वी. १२ पायांतील सांखळ्या. १३ तोरड्या.

+ना. कादी. ०ना. शुद्ध. *ना. बाह्यस्फूर्ती. ×ना. युक्तशास्त्र.

॥ गंधमाल्याक्षतस्रग्भिर्धूपदीपोपहारकैः ॥ सांगं संपूज्य विधिवत् स्तवैः स्तुत्वा नमेद्धरिम् ॥ ५३ ॥

॥ टीका ॥ निढळीं शुद्ध श्याम काळा ॥ तिळकु रेखिला पिंवळा ॥ त्यावरी अक्षता सोज्वळा ॥ आरक्त तेजाळा कुंकुमांकित ॥ ३५ ॥ सुमनें गुंफिलीं वीरगुंठीं ॥ त्यावरी मधुकरांचीं घरटी ॥ तुळसी कमळमाळा कंठीं ॥ चंदनाची उटी श्यामांगीं शोभे ॥ ३६ ॥ धूप दीप उपहार ॥ तांबूल अर्पावा सकर्पूर ॥ निरंजनें जयजयकार ॥ [1]मंत्रस्वरें अर्पावा ॥ ३७ ॥ स्तुति करावी वेदोक्तमंत्रें ॥ कां पुराणोक्त नानास्तोत्रें ॥ अथवा प्राकृतनामोच्चारें ॥ *नानाप्रकारें गद्यपद्यें ॥ ॥ ३८ ॥ स्तवनें संतोष अधोक्षजा ॥ ऐसें भावेंवें महाराजा ॥ मग साष्टांगें अतिवोजा ॥ गरुडध्वजा नमस्कारावें ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ आत्मानं तन्मयं ध्यायन् मूर्तिं संपूजयेद्धरेः ॥ शेषामाधाय शिरसि स्वधाम्न्युद्वास्य सत्कृतम् ॥ ५४ ॥

॥ टीका ॥ 'द्वैतभावें भजनविधी ॥ ते जाणावी स्थूलबुद्धी ॥ भजनाची भजनसिद्धी ॥ जाण त्रिशुद्धी तन्मय **होणें ॥ ४० ॥ 'मूर्तिध्यानें तन्मयस्थिती ॥ ऐक्यत्वें राहे निश्चळवृत्ती ॥ याचि नांव मुख्यभक्ती' ॥ उठलिया पुढती नमावें हरी ॥ ४१ ॥ ऐशी पूजा करूनि हरी ॥ शेष प्रसाद धरोनि शिरीं ॥ मग देवो आपणिया भीतरीं ॥ हृदयमंदिरीं निजविजे ॥ ४२ ॥ ×एवं पूजेचें उद्वासन ॥ ध्यानमूर्ती हृदयीं शयन ॥ प्रतिमा पर्यंकीं निजवून ॥ विधिविधान समाप्ती ॥ ४३ ॥ जाहलिया पूजाविसर्जन ॥ विसरूं नये अनुसंधान ॥ अखंड हरीचें स्मरण ॥ सर्वस्वें आपण सदा कीजे ॥ ४४ ॥ या नांव गा आगमविधी ॥ राया जाण त्रिशुद्धी ॥ सदा पाळिती सद्बुद्धी ॥ [2]परमात्मसिद्धिप्रापक ॥ ४५ ॥ आगमोक्त विधिलक्षण ॥ प्रतिमाचि मुख्य नव्हे जाण ॥ ज्यासि जेथ श्रद्धा पूर्ण ॥ तेथ हें विधान सुखें कीजे ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ एवमग्न्यर्कतोयादावतिथौ हृदये च यः ॥ यजतीश्वरमात्मानमचिरान्मुच्यते हि सः ॥ ५५ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ हे पूजा नव्हे एकदेशी ॥ बहुत स्थानें ये पूजेसी ॥ त्यांत शीघ्रतरें जें प्रासीसी ॥ तें मी तुजपासीं सांगेन राया ॥ ४७ ॥ येणेंचि विधानें यथाकाळीं ॥ सांग पूजा कीजे जळीं ॥ अथवा सूर्यमंडळीं ॥ पूजा सोज्वळी हरिध्यानें कीजे ॥ ४८ ॥ अग्नीच्याठायीं वैदीसी ॥ पूजा कीजे कमळापती ॥ अवघ्यापरी शीघ्र प्राप्ती ॥ पूजावा अतिथी भगवद्भावें ॥ ४९ ॥ आलिया वैश्वदेवाचे अंतीं ॥ +तो भलता हो भलते याती ॥ त्यासि जे भगवद्भावें पूजिती त्याचे घरा पूर्णप्राप्ती वोसंरे ॥ ५० ॥ पूर्वी अनोळखु निश्चितीं ॥ आलिया वैश्वदेवाचे अंतीं ॥ त्यातें ब्रह्मभावें जे पूजिती ॥ त्यांसि भुक्तिमुक्ती आंदणी ॥ ५१ ॥ त्या वैश्वदेवाचे

१ कपाळीं. २ मस्तकावरील केशांत. ३भुंग्यांचीं. ४फळेंआदि खाण्याचे पदार्थ. ५भावना करावी. ६ अति आवडीनें. ७ ईश्वररूप. ८ विसर्जन. ९ चिंतन. १० फार लवकर. ११ ईश्वर या भावनेनें. १२ येते. १३ प्राप्त होतें, बक्षिस ठेविलेली.

[1]ना. मंत्रावसर. *ना. नामचरित्रें. **ना. होय. ×ना. जंव. [2]ना. परमार्थसिद्धि प्रापक. +ना. त्यातें ब्रह्मभावें जे पूजिती ॥ त्याचे घरा पूर्ण प्राप्ती ॥ भगवत्संपत्ति वोसरौनि ये ॥

अंतीं जाण ॥ निजभाग्यें आलिया शुद्धब्राह्मण ॥ तया श्रद्धेनें पूजितां आपण ॥ ते घरीं नारायण स्वानंदें वसे ॥ ५२ ॥ राया वैश्वदेवाचे अंतीं ॥ अतिथीसवें ये भक्तिमुक्ती ॥ विमुख जाहल्या त्या लाभा नाडेती ॥ पूजकां सुखप्राप्ती परमानंदें ॥ ५३ ॥ अतिथीच्या ठायीं मूर्तिध्यान ॥ सर्वथा करणें नलगे जाण ॥ तो स्वरूपें स्वयें नारायण ॥ पूजितां संपूर्ण सर्वार्थसिद्धी ॥ ५४ ॥ एवं अतिथीसि जें अर्पे ॥ तें भगवंतमुखीं समर्पे ॥ यालागीं अतिसाक्षेपें ॥ अतिथी ब्रह्मरूपें पूजिजे सदा ॥ ५५॥ जें जें बोलिलें *पूजास्थान ॥ तेथें निजश्रद्धाचि *पूर्ण॥ श्रद्धेवेगळें राया जाण ॥ प्राप्ति संपूर्ण कदा नलभे ॥ ५६ ॥ निजश्रद्धेचें हृदयस्थान ॥ तें हृदयीं विधियुक्त पूजन ॥ करितां श्रद्धेनें आपण ॥ प्राप्ति संपूर्ण उद्बोधे स्वयें ॥ ५७ ॥ येऱ्हवीं तरी आपुल्या देहीं ॥ चाळक ईश्वरू आहे हृदयीं ॥ श्रद्धेनें भजतां त्याचे ठायीं ॥ निजप्राप्ती पाहीं सहजें लाभे ॥ ५८॥ 'तेथें जें जें आपण सेविजे ॥ तें तें भगवन्मुखीं भाविजे॥ येणें निजभजनें पाविजे ॥ जाण सहजें परमात्मा ' ॥ ५९ ॥ ' सांडोनि देहींची अहंता ॥ सकळ ×भोग ईश्वरू भोक्ता ॥ ऐशी दृढभावना भावितां ॥ पाविजे परमार्था अपरोक्षसिद्धी ' ॥ ८६० ॥ देह जड मूढ अचेतन ॥ सकळ भोगभोक्ता ईश्वर पूर्ण ॥ तेथ वाढवूनि देहाभिमान॥ भोगिती अज्ञान अनेक दुःखें ॥ ६१ ॥ ते सांडूनि देहअहंता ॥ हृदयस्था शरण जातां ॥ पाविजे पूर्णपरमार्था ॥ जाण तत्त्वतां नृपवर्या ॥ ६२ ॥ ' निःशेष सांडिजे मीपण ॥ याचि नांव हृदयस्था शरण ॥ ' तें सहजें परब्रह्म परिपूर्ण ॥ मिथ्या देहाभिमान धरूं नको ॥ ६३ ॥ राया येणेंचि कर्में जाण ॥ तुटे कर्माचें कर्मबंधन ॥ पाविजे पूर्ण समाधान ॥ तें हें मुख्य लक्षण नृपनाथा ॥ ६४ ॥ आगमोक्त निजभजन ॥ कर्मयोगाचें मुख्य लक्षण ॥ ऐकतां राजा +समाधान ॥ परमानंदें पूर्ण निवाला ॥ ६५ ॥ जंवजंव रायाचें पुरे कोड ॥ तंवतंव कथा लागे गोड ॥ अतिशयें श्रवणाची चाड ॥ विशेषें वाढ थोरावली ॥ ६६ ॥ राजा निवालेनि परमानंदें ॥ सुखावलेनि निजबोधें ॥ लांचावलेनि स्वानंदें ॥ पुढां प्रश्न विनोदें पुसेल ॥ ६७ ॥ घरीं राहतां आपण ॥ उठून जाती मुनिगण ॥ यालागीं प्रश्नावरी प्रश्न ॥ विचित्र विंदान पुसत ॥ ६८ ॥ स्वानंदें लोधली चित्तवृत्ती ॥ इंद्रियें वेधलीं सुखस्थिती ॥ राजा निवाला निश्चितीं ॥ तरी प्रश्नोक्ती पुसत ॥ ६९ ॥ पुसेल हरीचे अवतार ॥ ते कथा सुंदर मनोहर ॥ निरूपण अति अरुवार ॥ निजजिव्हार निववील ॥ ८७० ॥ त्या प्रश्नांचें प्रत्युत्तर ॥ कथाकौतुक सेनागर ॥ एका जनार्दनाचा किंकर ॥ उपानहधर संतांचा ॥ ७१ ॥ संत सज्जन कृपास्थिती ॥ श्रीजनार्दन वरदमूर्ती ॥ पुढील कथेची व्युत्पत्ती ॥ सांगेन यथार्थी अर्थुनी ॥ ॥ ७२ ॥ श्रीभागवताचे राशीवरी ॥ एका जनार्दन केला मापारी ॥ तो निजबोधाचे कुडवावारीं ॥ भरील 0वखारी श्रवणाच्या ॥ ८७३ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे निमिजायंतसंवादे मायाकर्मब्रह्मनिरूपणंनाम तृतीयाध्यायः संपूर्णः ॥ मूळश्लोक ॥ ५५ ॥ ॥ ओंव्या ॥ ८७३ ॥ एवंसंख्या ॥ ९२८ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

१ लाभाआड येतात. २आपली भक्तीच. ३ईश्वराच्या तोंडांत. ४ साक्षात् प्रतीति. ५हृदयांत राहणाऱ्या परमात्म्यास. ६ अधिक. ७ कोमल,नाजुक. ८ अति चांगलें. ९ चाकर. १० जोडे उचलणारा. ११ एक प्रकारचें माप आहे. बारा पसे म्हणजे एक कुडव.

*ना. पूजास्थानें. *ना. प्रमाण. ×ना. भोगीं. +ना. सावधान. 0ना. वाखरी.

# अध्याय चौथा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णायनमः ॥ ॐनमो श्रीगुरु शिवशिवा ॥ नमनं जीवस्व जीवा ॥ नुरविसी, तेथ देहभावा ॥ कैसेनि रिघावा होईल ॥ १ ॥ जीवें घेऊनि जीवा ॥ देहत्व मोहूनि देहभावा ॥ याहीवरी करविसी सेवा ॥ हें लाघव देवा नवल तुझें ॥२॥ जीवें घेऊनि शंखासुरा ॥ त्याच्या वागविशी कलेवरा ॥ तो तूं रिघोनि मजभीतरा ॥ माझिया शरीरा वागविशी ॥ ३ ॥ शंख मधुर ध्वनी गाजे ॥ तो वाजविल्याचेनि वाजे ॥ तेवीं म्यां जें जें बोलिजे ॥ तें बोलणें साजे तुझेनी ॥ ४ ॥ आतां माझें शरीर जें चळे ॥ तें तुझेनि आंगिकें मेळें ॥ कर्में निपजती सकळें ॥ सत्ताबळें तुझेनि ॥ ५ ॥ माझे देहींचें जें मीपण ॥ तें तूंचि झालासि आपण ॥ तुझेनि *प्राणें प्राण ॥ माझाही जाण चळे देवा ॥ ६ ॥ दृष्टीं जें जें कांहीं देखे ॥ तें तें तुझेनि ज्ञान-उन्मेखें ॥ श्रवण जें जें कांहीं ऐके ॥ तें तें नेटकें अवधान तुझें ॥ ७ ॥ रसना जें जें कांहीं चाखे ॥ तें तें तुझेनि स्वादसुखें ॥ बुद्धि जाणपणें तोखे ॥ तेंही अतिनिकें वेदकत्व तुझें ॥ ८ ॥ मन मनपणें चपळ ॥ तेंही तुझेंचि आंगिक बळ ॥ विवेका विवेकु प्रबळ ॥ अतिसोज्वळ तुझेनी ॥ ९ ॥ वाचा जें जें कांहीं वदे ॥ तें वाचिक तुझेनि शब्दें ॥ बोधे जेणें उद्बोधे ॥ तो तुझेनि प्रबोधें प्रबोधु ॥१०॥ जागृती जागे तुझेनि हरिखें ॥ स्वप्न स्वप्ना तुझेनि देखे ॥ सुषुप्ती सुखावे जेणें सुखें ॥ पूर्ण संतोखें तुझेनी ॥ ११ ॥ मी जे जे विषय भोगीं ॥ तें भोक्तेपण तुझे अंगीं ॥ तुझेनि निजसंयोगीं ॥ मीपणें जगीं वर्तविशी मज ॥ १२ ॥ माझें करूनि खांबसूत्र ॥ तूं झालासि सूत्रधार ॥ हालवूनियां निजसूत्र ॥ कर्मे विचित्र करविशी ॥ १३ ॥ ऐशिया श्रीजनार्दना ॥ जग चेतविल्या चिद्घना ॥ कृपाळुवा जगजीवना ॥ नमन श्रीचरणा तुझेनि तुज ॥ १४ ॥ यापरी मजमाजी तूं चाळिता ॥ चाळकत्वें करविसी ग्रंथा ॥ तेथें मी एक कवि-कर्ता ॥ हे जाणावी तत्त्वतां स्थूलबुद्धी ॥ १५ ॥ एका एकु जनार्दनीं ॥ कीं जनार्दनु एकपणीं ॥ द्वये पृथक् नामाचीं लेणीं ॥ लेऊनि एकपणीं मिरवसी तूं ॥ १६ ॥ जेवीं कनकीचें भाषण ॥ ×कीं भूषणीं कनक संपूर्ण॥तेवीं एका आणि जनार्दन ॥ एकत्वें जाण जनार्दनची ॥१७॥ ऐसी ऐकोन विनवणी ॥ सद्गुरु तुष्टला संतोषोनी ॥ ग्रंथें भिन्न भिन्न सोसैणी ॥ नलगे निरूपणीं करणें तुज ॥ १८ ॥ जेव्हां कापूर आगीं प्रगटे ॥ तेव्हांचि कापुरत्व खुंटे ॥ सच्छिष्यासि सद्गुरु भेटे ॥ तेव्हांचि फिटे भिन्नभेदु ॥ १९ ॥ जेणें फिटे भिन्नभेदु ॥ तो श्रीभागवतीं निज-बोधु ॥ वसुदेवाप्रती नारदु ॥ सांगत संवादु इतिहासाचा ॥ २० ॥ ज्या इतिहासाचा अर्थ ॥ प्रगटे परिसतां परमार्थ ॥ स्वानंद +उद्बोधें हृदयांत ॥ श्रवणें सदोदित स्वयें होती ॥ २१ ॥ तंव ओते संतसमुदावो ॥ म्हणती कैसा नवलावो ॥ सद्गुरुस्तवनीं भावभावो ॥ साधिला

---

१ शरीरास; श्रीविष्णूचे हातांतील शंख हें शंखासुराचें कलेवर. २ माझ्या आंत. ३ वाजविणारामुळें. ४ तुझ्या स्पर्शामुळें. ५ हाले, चाले. ६ ज्ञानाच्या उदयानें. ७ संतोषते. ८ जाणतेपणा. ९ ज्ञान. १० कळसूत्री बाहुलें. ११ चालविल्या. १२ सोन्याचें. १३ द्वैतरूपणा.

*ना. प्राणयोगें. ×ना. कनकभूषणीं सुवर्ण. +ना. बोधें.

आत्रो अभेदत्वें ॥ २२ ॥ हे सद्गुरूची विनवणी ॥ कीं ब्रह्मसुखाची खाणी ॥ परिसतां सप्रेम बोल्णीं ॥ रिझली आयणी सज्जनांची ॥ २३ ॥ या देशभाषा वाणी ॥ उघडिली परमार्थाची खाणी ॥ बोल नव्हती हे स्पर्शमणी ॥ लागतां श्रवणीं पालटे जिव्ह ॥ २४ ॥ यापरी श्रीभागवतीं ॥ *अनुपम अगाध स्थिती ॥ ते कथेची संगती ॥ लावी सुनिश्चितीं अर्थाववोधें ॥२५॥ ऐकोनि संतांचें वचन ॥ शिरीं वंदोनि त्यांचे चरण ॥ पुढील कथानिरूपण ॥ श्रोतीं सावधान परिसावें ॥ २६ ॥ येथें तृतीय अध्यायाचे अंतीं ॥ निरूपितां तांत्रिकं भक्ती ॥ भजावें आवडे ते मूर्ती ॥ रायासि तदर्थी प्रश्न स्फुरला ॥ २७ ॥ देवो एकचि त्रिजगतीं ॥ त्याच्या किती अवतारमूर्ती ॥ जन्मकर्म अवेवव्यक्ती ॥ हेंचि मुनीप्रति पूसत ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ यानि यानीह कर्माणि यैर्यैःस्वच्छंदजन्मभिः ॥ चक्रे करोति कर्ता वा हरिस्तानि ब्रुवंतु नः ॥ १ ॥

॥ टीका ॥ मुनीश्वराचें अगाध ज्ञान ॥ त्याहीवरी रसाळ निरूपण ॥ तेणें रायाचें वेधलें मन ॥ प्रश्नावरी प्रश्न यालागीं पुसे ॥ २९ ॥ तो ह्मणे देवाधिदेव हरी ॥ स्वलीलां केसीं जन्में धरी ॥ स्वेच्छा जीं जीं कर्में करी ॥ ते अगाध थोरी मज सांगा ॥ ३० ॥ ह्मणती देवा नाहीं जन्म ॥ तेथें कैंचे पुससी कर्म ॥ देव अरूप अनाम ॥ त्यासी जन्मकर्म असेना ॥ ३१ ॥ तो अजन्मा परी जन्म धरी ॥ अकर्ता परी कर्में करी ॥ विदेही तो देहधारी ॥ होऊनि संसारीं स्वधर्म पाळी ॥ ३२ ॥ त्याच्या अवतारांची स्थिती ॥ कवण जन्म कवण व्यक्ती ॥किती अवतार किती मूर्ती ॥ कृपेनें मजप्रती सांगा स्वामी ॥ ३३ ॥ जेकां अतीत अनागत ॥ वर्तमानें जे प्रस्तुत ॥ ते अवतार समस्त ॥ इत्थंभूत सांगावे ॥ ३४ ॥ हरिचरित्र अवतारगुण ॥ प्रतिपादक रायाचा प्रश्न ॥ तो सांगावया जयंतीनंदनें ॥ स्वानंदें पूर्ण द्रुमिल सांगे ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ द्रुमिलउवाच ॥ योवा अनंतस्य गुणाननंताननुक्रमिष्यन् स तु बालबुद्धिः ॥ रजांसि भूमेर्गणयेत्कथंचित्कालेन नैवाखिलशक्तिधाम्नः ॥ २ ॥

॥ टीका ॥ ज्याची लीलाशक्ति अपरमित ॥ ऐशा अनंतशक्ती ज्याच्या नखांत ॥ यालागीं तो अनंत ह्मणत ॥ त्याचे गुण समस्त गणवती केवीं ॥ ३६ ॥ त्या अनंताची गुणसंमृद्धी ॥ गणूं ह्मणे तो बालबुद्धी ॥ जेवींकां आकाशाची रुंद्धी ॥ मुंगिये त्रिशुद्धी न करवे माप ॥ ३७ ॥ सागरींचें जळ संपूर्ण ॥ केवीं गणूं शके लेंवण ॥ तेवीं अनंताचे अनंत गुण ॥ आकळी कोण निजसत्ता ॥ ३८ ॥ पर्जन्याचिया धारा ॥ गणितां येतील, नृपवरा ॥ पृथ्वीचिया दुर्वांकुरा ॥ मुळें महावीरा गणितां येती ॥ ३९ ॥ वारा अफाट धांवे ॥ तोही गणितासें पावे ॥ निमेषोन्मेषांचे यौवें ॥ त्यांसिही संभवे गणित राया ॥ ४० ॥ पृथ्वीचिया परिमाणा ॥ काळें काळ होय गणना ॥ परी भगवंताचिया गुणां ॥ वेदांसही जाणा गणित नव्हे ॥ ४१ ॥ भगवंताचें नाम एक ॥ घेतां वेद झाले मूक ॥ त्याचे गुण गणितां सकळिक ॥ शेषाचें *मुख दुखंड

१ रंगली, दमली. २ बुद्धि: मन. ३ परिस. ४ तंत्रोक्त. ५ सुचला. ६ आपल्या लीलेनें. ७ कर्मरहित. ८ झालेले. ९ होणार. १० हली, चालू. ११ जयंतीचा पुत्र द्रुमिल. १२ अपार. १३ गुणसंपत्ती. १४ विस्तार. १५ मीठ. १६ आपल्या पराक्रमानें. १७ उदय, संचार. १८ दुभाग.

*ना. अनुत्तम. *मो. जिव्हा.

⁴झालें ॥ ४२ ॥ त्या अनंताचे अनंत गुण ॥ तेथें गणूं शके कवण ॥ कांहीं एक संक्षेपें जाण ॥ सांगेन लक्षण अवतारांचें ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ भूतैर्यदा पंचभिरात्मसृष्टैः पुरं विराजं विरचय्य तस्मिन् ॥ स्वांशेन विष्टः पुरुषाभिधानमवाप नारायण आदिदेवः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ अवतारांमाजी प्रथमतां ॥ पुरुषावताराची कथा ॥ दुमिल झाला सांगता ॥ ऐक तत्त्वतां महाराजा ॥ ४४ ॥ नारायणें आत्मशक्तीं ॥ पंचमहाभूतें भूताकृतीं ॥ सृजूनियां यथा निगुतीं ॥ ब्रह्मांडाची स्थिती निर्माण केली ॥ ४५ ॥ ' °विराजपुरुष ' ब्रह्मांड नाम ॥ तेथें लीला प्रवेशे देवोत्तम ॥ यालागीं पुरुष हें नाम ॥ पुरुषोत्तम ²स्वांशें पावे ॥ ४६ ॥ त्याचेनि अंशयोगें प्रकृती ॥ झाली प्रजांतें प्रसवती ॥ यालागीं पुरुष नामस्थिती ॥ जाण निश्चितीं पावला ॥ ४७ ॥ तो अकर्तात्मयोगयुक्तीं ॥ जग चेतविता चिच्छक्ती ॥ ज्याचेनि जगा जगत्वें स्फूर्ती ॥ त्याची गुणकीर्ती दोश्लोकीं सांगे ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ यत्काय एष भुवनत्रयसन्निवेशो यस्येंद्रियैस्तनुभृतामुभयेंद्रियाणि॥ ज्ञानं स्वतःश्वसनतो बलमोजईहासत्त्वादिभिः स्थितिलयोद्भवआदिकर्ता ॥ ४ ॥

॥ टीका ॥ त्रैलोक्य वसे जें कांहीं ॥ तेंचि शरीर त्याचें पाहीं ॥ ज्याचेनि योगें देही ॥ ठायींच्याठायीं वर्तती ॥ ४९ ॥ ब्रह्मादि जेकां तनुधारी ॥ ज्याच्या ज्ञानकर्मेंद्रियांची थोरी ॥ ज्याचेनि इंद्रियेंकरी ॥ निजव्यापारीं वर्तती ॥ ५० ॥ जो जगाचे नयनांचा नयन ॥ जो जगाच्या घ्राणांचें घ्राण ॥ जो जगाच्या श्रवणांचें श्रवण ॥ रसनेची जाण रसना जोकां ॥ ५१ ॥ जो जगाच्या हातांचे हात ॥ ज्याचे पाय जगाच्या पायांत ॥ जो वाचेची वाचा निश्चित ॥ एवं उभयइंद्रियां आंत इंद्रियें +ज्याचीं ॥ ५२ ॥ जीवाच्याठायीं जेकां ज्ञान ॥ तेंही त्याचेनि ज्ञानें जाण ॥ त्यासि ज्ञानदाता नाहीं आन ॥ स्वयें ज्ञानघन स्वभावतांची ॥ ५३ ॥ ज्याचेनि प्राणें जाण ॥ जगाचा चळे प्राण ॥ बळ, तेज, क्रियाचरण ॥ जगासि संपूर्ण याचेनी ॥ ५४ ॥ रजतमसत्वादिगुणयुक्त ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयांत ॥ मूळ आदिकर्ता भगवंत ॥ जाण तो निश्चित पुरुषावतार ॥ ५५ ॥ सत्वादि त्रिगुणावस्था ॥ उत्पत्तिस्थित्यादिकर्ता ॥ तेही गुणावतारकथा ॥ ऐक नृपनाथा सांगेन ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ आदावभूच्छतधृतीरजसाऽस्य सर्गे विष्णुः स्थितौ क्रतुपतिर्द्विजधर्मसेतुः ॥ रुद्रोऽप्ययाय तमसा पुरुषः स आद्य इत्युद्भवस्थितिलयाः सततं प्रजासु ॥ ५ ॥

॥ टीका ॥ तोचि ⁵आदिकल्पीं उत्पत्ती ॥ रजोगुणें राजसा शक्ती ॥ स्वयें झाला ⁶शतधृती ॥ ब्रह्मा म्हणती जयातें ॥ ५७ ॥ एवं ब्रह्मरूपें उत्पत्ती ॥ सृजिता झाला राजसा शक्ती ॥ तेथें प्रतिपाळात्रया स्वधर्मस्थिती ॥ सत्वगुणें निश्चितीं श्रीविष्णु जाहला ॥ ५८ ॥ तो द्विजधर्मप्रतिपाळक॥

१ उत्पन्न करून. २ चेतनयुक्त करी. ३ देहधारण करणारे. ४ डोळा. ५ पहिल्या कल्पांत. ६ ब्रह्मा.

⁴मो. झाली. °मो. विराजपूर. ²मो. स्वांगे. +ना. ज्योति.

यज्ञभोक्ता श्रीविष्णु ॥ दैवतां धर्माचा अवगुण ॥ अवतरे नारायणु नानावतारीं ॥ ५९ ॥ तोचि ये सृष्टीचे प्रांतीं ॥ तमोगुणें तामसा शक्ती ॥ स्वयें जाहला रुद्रमूर्ती ॥ सकळ कल्पांतीं निर्दाळितू ॥ ६० ॥ जो शेताची पेरणी करी ॥ तोचि राखे देखे सोंकरी ॥ तोचि वाळलिया वरी ॥ संवगणी करी सर्वांची ॥६१॥ तेवीं उत्पत्तिकाळीं तोचि ब्रह्मा ॥ स्थितिकाळीं तोचि विष्णुनामा ॥ प्रळयकाळींही रुद्रप्रमा ॥ इये पुरुषोत्तमाचिनामें ॥ ६२ ॥ यालागीं तो आदिकर्ता ॥ श्रुतिशास्त्रीं वृद्धवार्ता ॥ दक्षकश्यपादिकां कर्तव्यता ॥ त्यांसि सामर्थ्यता याचेनी ॥ ६३ ॥ यापरी विचारितां ॥ हाचि एक सकळकर्ता ॥ यावांचून कर्तव्यता ॥ अणुमात्र नव्हे आना ॥ ६४ ॥ जो सृष्टिपूर्वीं स्वयंभ असे ॥ जेणें उत्पत्तिस्थिति प्रळय भासे ॥ तोचि आदिकर्ता अनायासें ॥ तोचि निजांशें पुरुषावतारु ॥ ६५ ॥ ऐक राया अतिविचित्र ॥ जें पारिसतां पुण्य पवित्र ॥ तो नारायणाचा अवतार ॥ ज्याचें चरित्र अलोलिक ॥ ६६ ॥

॥ श्लोक ॥ धर्मस्य दक्षदुहितर्यजनिष्ट मूर्त्यां नारायणो नरऋषिप्रवरः प्रशांतः ॥

नैष्कर्म्यलक्षणमुवाच चचार कर्म योऽद्यापि चास्तऋषिवर्यनिषेविताङ्घ्रिः ॥ ६ ॥

॥टीका॥ जो अजन्मा नित्य त्रिभुवनीं॥जो न जन्मोनि जन्मला योनीं॥तेणें धर्माची धर्मपत्नी॥ केली जननी दक्षकन्या मूर्ती ॥ ६७ ॥ ते मूर्तीमातेच्या उदरीं ॥ नरनारायण अवतारी ॥ एकचि दोरूपें करीं ॥ धर्माच्या घरीं अवतरले ॥ ६८ ॥ तेणें नारदादिकांसि जाण ॥ निरूपिलें नैष्कर्म्यलक्षण ॥ स्वयें आचरला आपण ॥ *तें कथन ऐक राया ॥ ६९ ॥ नारायण ह्मणसी कोणे देशीं ॥ तो बदरिकाश्रमीं आश्रमवासी ॥ नारदसनकादिक ऋषी ॥ अद्यापि त्यापासीं सेवेसी असती ॥ ७० ॥ त्यासि स्वरूपाचें लक्ष ॥ सहजचि असे प्रत्यक्ष ॥ ते स्वरूपनिष्ठेचा पक्ष ॥ अलक्ष्याचें लक्ष प्रबोधी स्वयें ॥ ७१ ॥ तया स्वरूपाचा निजबोध ॥ स्वयें पावावया विशद ॥ अद्यापवरी ऋषिवृंद ॥ नित्य संवाद करिताति त्यासी ॥ ७२ ॥ जें स्वरूप लक्षेना जनीं ॥ तें विशद करूनि ×वेदवचनीं ॥ तेंचि अनुग्रहंकरूनी ॥ अनुभवा आणी तत्काळ ॥ ७३ ॥ ज्ञाते बहुसाल ऋषीश्वर ॥ त्यामाजी नारायण अवतार ॥ तेथं वर्तलें जें चरित्र ॥ अति +विचित्र ऐक राया ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ इंद्रो विशंक्य मम धाम जिघृक्षतीति कामं न्ययुंक्त सगणं स बदर्युपाख्यम् ॥ गत्वाऽप्सरोगणवसंतसुमंदवातैः स्त्रीप्रेक्षणेषुभिरविध्यदतन्महिज्ञः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ ऐसा नारायणाचा प्रताप ॥ देखोनि निष्ठा दृढ तप ॥ तेणें इंद्रासि अहाकंप ॥ ह्मणे स्वर्ग निष्पाप घेईल माझा ॥ ७५ ॥ त्याचें तप देखोनि परम ॥ ह्मणे गेलें गेलें स्वर्गधाम॥

१ सोंवटीं. २ मळून, गोळा करणें. ३ प्रजापति या नात्याचा. ४ अपूर्व. ५ धर्मऋषी नांवाचा ब्रह्मदेवाचा मानस पुत्र. ६ त्याची लग्नाची बायको. ७-८ याम 'दक्षानें' आपली 'मूर्ति' नांवाची मुलगी दिली, तिजपासुन त्यास 'नर' ऋषि आणि 'नारायण' ऋषि नांवाचे दोन पुत्र झाले. ९ आत्मस्वरूपाचें अनुसंधान १० उपदेशी. ११ ऋषींचा मेळा. १२ स्पष्ट. १३ 'पुण्यशील' हें 'नारायणाचें विशेषण करावें.

*मो. ना. ऐक त्याचें कथन सांगेन राया. ×ना. वेदवचनीं. +ना. पवित्र.

इंद्रे कोपें प्रेरिलें काम ॥ अप्सरासंभ्रम समवेत ॥ ७६ ॥ कामसमवेत अप्सरा ॥ सवें वसंतही दुसरा ॥ क्रोध अंतरियां पुढारा ॥ जो तापसांतें पुरा नागवी सदा ॥ ७७ ॥ तीर्थोतीर्थांच्या अनुष्ठाना ॥ क्षमा नुपजे अंतःकरणा ॥ कोप येतांच जाणा ॥ करी उंगाणा तपाचा ॥ ७८ ॥ क्रोध तापसांचा उघड वैरी ॥ तापसां नागवी नानापरी ॥ तोही नारायणावरी ॥ अवघ्यां अग्रीं चालिला ॥ ७९ ॥ ऐशीं मिळोनि बिरुदायितें ॥ आलीं बदरिकाश्रमा समस्तें ॥ नारायण तप करी जेथें ॥ उठावलीं तेथें अतिआक्रमेंसी ॥ ८० ॥ वसंतें शृंगारिलें वन ॥ कोकिळा कलरवें गायन ॥ सुगंध शीतळ झळके पवन ॥ पैराग संपूर्ण वर्षती सुमनें ॥ ॥ ८१ ॥ तेथें भ्रमरांचे झणत्कार ॥ कामिनीगायन कामाकार ॥ हावभाव कटाक्षविकार ॥ कामसंचार चेतविती ॥ ८२ ॥ नव्हेचि कामिनीकामबाधा ॥ पराक्रम नचलेचि क्रोधा ॥ तोही सांडोनियां बिरुदा ॥ परतला नुसधा म्लानवदनें ॥ ८३ ॥ मग मदनें मांडूनियां ठाण ॥ विंधी कामिनीकटाक्षबाण ॥ तेणें धायें नारायण ॥ अणुप्रमाण +नढळेची ॥ ८४ ॥ शस्त्रें तोडितां आकाशासी ॥ आकाश स्वयें सावकाशीं ॥ तेवीं कामें छळितां नारायणासी ॥ तो निजसंतोषी निर्द्वंद्व ॥ ८५ ॥ अग्या निजतेजसत्ता ॥ अग्नितेज प्रेरी जातां ॥ तोंड जळे चवी चाखितां ॥ तेवीं *कामिनी कामना नारायण दृष्टी ॥ ८६ ॥ *नेणतां नारायणमहिमे ॥ 6धांवोनि 3घाला घातला कामें ॥ तेव्हां अवघींच पराक्रमें ॥ स्वनिश्चयें लाजलीं ॥ ८७ ॥ तेथें अवघीं झालीं पराङ्मुखें ॥ पाठमोरीं निघालीं अधोमुखें ॥ तेव्हां त्याची गती निःशेखें ॥ नारायणें देख खुंटिली ॥ ८८ ॥ इंद्रियां नियंता नारायण ॥ नेणोनि छळूं गेलीं आपण ॥ त्यापुढोनी पुनरागमन ॥ सर्वथा जाण करवेना ॥ ८९ ॥ मागें नचिघवे निश्चितें ॥ ऐसें जाणोनि समस्तें ॥ थोर गजबजिलीं तेथें ॥ भयचकितें व्याकुळें ॥ ९० ॥ जाणोनि नारायणप्रताप ॥ आतां कोपून देईल शाप ॥ येणें धाकें म्लानरूप ॥ अतिसकंप भयभीतें ॥ ९१ ॥ ऐशी देखोनि त्यांची स्थिती ॥ कृपेनें तुष्टला कृपामूर्ती ॥ अणुमात्र कोप नये चित्तीं ॥ अभिनव शांती नारायणाची ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ विज्ञाय शक्रकृतमक्रममादिदेवःप्राह प्रहस्य गतविस्मय एजमानान्॥
माभैष्ट भो मदन मारुत देववध्वो गृह्णीत नो बलिमशून्यमिमं कुरुध्वम् ॥ ८॥

॥ टीका ॥ इंद्रें केला अपराध ॥ तरी नारायणासि नयेचि क्रोध ॥ बाप निजशांती अगाध ॥ नमानी विरुद्ध कामादिकांचें ॥ ९३ ॥ नयेचि कामादिकांवरी कोप ॥ इंद्रासही नेदीच शाप ॥ नारायणाच्या ठायीं अल्प ॥ कदा विकल्प नुपजेची ॥ ९४ ॥ 'अपकाऱ्यावरी जो कोपला ॥ तो तत्काळ कोपें नागविला ॥ अपकाऱ्या जेणें उपकार केला ॥ तोचि दादुला परमार्थी' ॥ ९५ ॥

१ धाडिला. २ मदन. ३ अप्सरांच्या समुदायासह ४ सहित. ५ सर्वांच्या. ६ आड्डा नाशी. ७ लुटी. ८ पुढें. ९ प्रतिज्ञा केलेली मंडळी, बाणेदार. १० मधुर शब्दानें. ११ पुष्पांतील रज. १२ फुलें. १३ प्रतिज्ञा, बाणा. १४ मारा. १५ स्त्रियांचे अपांगाची फेंक, हेच कोणी बाण, डोळे मारणें. १६ आत्मतुष्ट. १७ काजवा. १८ गिळूं. १९ इंद्रियें स्वाधीन ठेवणारा. २० श्रेष्ठ बहादर.

+मो. ना. नढंढळेचि. *ना. आकामता. *ना. तेणें. 6मो. धाके निघाला काम. 3ना. घावो.

' अपकाऱ्या उपकार करिती ॥ याचिनांव गा परम शांती ' ॥ ते शांतीची निजस्थिती ॥ दा लोकांप्रती परमार्थ दीक्षा ॥ ९६ ॥ परमार्थाची मुख्य स्थिती ॥ पाहिजे गा पूर्ण शांती ते शांतीची उत्कट गती ॥ दावी लोकांप्रती आचरोनी ॥ ९७ ॥ भयभीत कामादिक अप्सरागण साशंक ॥ त्यांतें अभयदानें सुख ॥ देऊनियां देख नारायण बोले ॥ ९८ अहो कामवसंतादिकस्वामी ॥ कृपाकरून आलेत तुह्मी ॥ तुमचेनि पदागमीं आश्रमभू पुनीत झाली ॥ ९९ ॥ तुमचें झालिया आगमन ॥ अवश्य करावें आह्मी पूजन ॥ हेंचि आ चें अनुष्ठान ॥ कांहीं बळिदान अंगीकारा माझें ॥ १०० ॥ अहो अप्सरा देवकांता तुह्मी भिऊं नका तत्वता ॥ येथें आलिया समस्ता ॥ पूज्य सर्वथा तुह्मी मज ॥ १ ' आश्रमा आलिया अतिथी ॥ जे कोणी पूजा न करिती ॥ त्यांची शू पुण्यसंपत्ती ॥ आश्रम स्थिती शून्य होय ' ॥ २ ॥*तुह्मीं नांगीकारितां पूजन ॥ कांहीं घेतां बळिदान ॥ तरी हा आश्रम होईल शून्य ॥ यालागीं कृपा करून पूजा घ्यावी ॥ ३ आश्रमा आलिया अतिथी ॥ तो पूज्य सर्वांस सर्वार्थीं ॥ अतिथी आश्रमीं जे पूजिती ॥ आश्रमकीर्ती शिव वानी ॥ ४ ॥ त्याही रुसलिया पायां पडती ॥ तेवीं विमुख जातां अतिथी जे वंदोनिया सुखी करिती ॥ ते सुख पावती स्वानंदें ॥ ५ ॥ त्याही रुसलिया कन्या धाडी ॥ अतिथी रुसलिया पुण्यकोडी ॥ पूर्वापर जें कां जोडी ॥ तेही रोकडी क्षय पावे ॥ ६ ॥ वैकुंठीं ज्याची निजस्थिती ॥ तो त्या आश्रमा ये नित्यवस्ती ॥ जे आश्रमीं अतिथी +पूजिती प्रीतीं ब्रह्मात्मभावें ॥ ७ ॥ ऐसें बोलिला तया प्रती ॥ परी माझी हे अगाध शांती हेंही नारायणाचे चित्तीं ॥ गर्वस्थिती असेना ॥ ८ ॥ ऐक राया अति अपूर्व ॥ असो निजशांती अनुभव ॥ ज्याच्याठायीं नाहीं गर्व ॥ तोचि देवाधिदेव निश्चयेंसी ॥ ९ ॥ ज नित्य नाचवी सुरनरांसी ॥ ज्याभेणें तप सांडिलें तापसीं ॥ त्या अभय देवोनि कामक्रोधांसी आपणापासीं राहविलीं ॥ ११० ॥

॥ श्लोक ॥ इत्थं ब्रुवत्यभयदे नरदेवदेवाः सव्रीडनम्रशिरसः सघृणंतमूचुः ॥
नैतद्विभो त्वयि परेऽविकृते विचित्रं स्वारामधीरनिकरानतपादपद्मे ॥ ९ ॥

टीका ॥ एवं अभय ×देत नारायण ॥ स्वमुखें बोलिला आपण ॥ तेणें कामादि अप्सरागण लाजा विरोन अधोमुख झालीं ॥ ११ ॥ देखोनि निर्विकारी पूर्णक्षमा ॥ श्रीनारायण हा परमात्मा ॥ केवीं सरलें वसंतादिकामा ॥ त्याचाचि महिमा वर्णिती स्वयें ॥ १२ ॥ ऐके नरदेव चक्रवर्ती ॥ विदेहा सार्वभौमा भूपती ॥ त्या नारायणाची निजस्तुती ॥ कामादि करिती सद्भावेंसी ॥ १३ ॥ जे * सदा सर्वांतें छळिती ॥ त्यांहीं देखिली पूर्ण शांती ॥ तेचि शांतीची स्तुति करिती ॥ नारायणाप्रती कामादिक्रोध ॥ १४ ॥ जेणें संतोषे श्रीनारायण ॥ त्यासि

१ पवित्र. २ पूजाअर्पण. ३ देवस्त्रिया. ४ वर्णी. ५ पुष्कळ पुण्य. ६ पुण्याचा संग्रह. ७ ज्याचे भयानें. ८ ऋषींनीं. ९ करून आलें. १० हे राजश्रेष्ठा.

*ना. तुझा लागी न करितां पूजन ॥ कांहीं नेदितां बळिदान ॥ +ना. पूजितां स्थिती. ×ना. देऊनी मो. हेतु. *ना. सर्वस्वें.

कृपा उपजे पूर्ण ॥ ऐशियापरीचें स्तवन ॥ मांडिलें संपूर्ण परमार्थबुद्धी ॥ १५ ॥ जयजय देवाधिदेवा ॥ तुझिया आविकार भावा ॥ पाहतां नदेखों स्वभा ॥ देवां मानवां माझारी ॥१६॥ मज कामाचेनि घायें ॥ ब्रह्मा कन्येसि धरूं जाये ॥ पराशरा केलें काये ॥*भोगिली पाहे दिवा दुर्गंधा ॥ १७ ॥ ज्यातें योगी वंदिती मुकुटीं ॥ जो तापसांमाजी धूर्जटी ॥ तो शिव लागे मोहिनीपाठी ॥ फिटोनि लंगोटी वीर्य द्रवलें ॥ १८ ॥ विष्णु वृंदेच्या श्मशानीं ॥ धरणें बैसे विषयग्लानी ॥ अहल्येची काहणी ॥ वेदीं पुराणीं वर्णिजे ॥ १९ ॥ नारद नायके माझी गोष्टी ॥ त्यासि +जन्मले पुत्र साठी॥ माझी साहों शके कोंठी ॥ ऐसा बळिया सृष्टीं असेना ॥ ॥ १२० ॥ जो ब्रह्मचाऱ्यांमाजी राजा ॥ हनुमंत मिरवी पैजा ॥ त्याहीस्तव मकरध्वजा ॥ संगेविण बीजा जन्मविलें म्यां ॥ २१ ॥ कलंकिया केला चंद्र ॥ भगांकित केला इंद्र ॥ कपाटीं घातला षण्मुखवीर ॥ जो लाडका कुमर महेशाचा ॥ २२ ॥ मज मन्मथाचा यावो ॥ न ०साहवे देवांदानवां ॥ मग तेथें इतरा मानवां ॥ कोण केवीं साहावयासी ॥ २३ ॥ मज जाळिलें महेशें ॥ त्यासि म्यां अनंगें केलें पिसें ॥ नवल धारिष्ट तुझ्या ऐसें ॥ पाहतां नदिसे तिहीं लोकीं ॥ २४ ॥ त्या मज कामातें न सरतें केलें ॥ शांतीचें कल्याण पाहलें ॥ ×हें तुवां-चि एकें यश मेलें ॥ स्वभावा जिंकिलें निजशांतियोगें ॥ २५ ॥ तो मी नसरता केला काम ॥ क्रोधा आणिला उपशम ॥ वासनेचा संभ्रम ॥ नित्य निर्भ्रम त्वां केला ॥ २६ ॥ हे नारायणा तुझी निष्ठा ॥ नये आणिका ◊तपोनिष्ठां ॥ केला अनुभवाचा चोहटा ॥ शांतीचा मोठा सुकाळ केला ॥ २७ ॥ मागें तपस्वी वाखाणिले ॥ म्हणती कामक्रोधां जिंकिलें ॥ त्यांसिही आम्हीं पूर्ण छळिलें ॥ ऐक तें भलें सांगेन ॥ २८ ॥ कपिलाऐसा ⁊तेजोराशी ॥ क्रोधें तत्काळ छळिलें त्यासी ॥ शाप देतांचि सगरासी ॥ तोही क्रोधासी वश्य झाला ॥ २९ ॥ कोप आला नारदासी ॥ वृक्ष केलें नळकूबरांसी ॥ गौतमें अहल्येसी ॥ कोपें वनवासी शिळा केली ॥ १३० ॥ जो सर्वदा विघ्नांतें आकळी ॥ त्या विघ्नेशातें क्रोध छळी ॥ तेणें अतिकोपें कोपानळीं ॥ चंद्रासि तत्काळीं दीधला शाप ॥ ३१ ॥ कोप आला दुर्वासासी ॥ शाप दीधला अंबरीषासी ॥ देव आणिला गर्भवासासी ॥ क्रोधें महाऋषी छळिले ऐसे ॥ ३२ ॥ जे दुजी सृष्टी करूं शकती ॥ तेही कामक्रोधें झडपिजेती ॥ सागरीं पडे स्वर्गसंपत्ती ॥ हे क्रोधाची ख्याती पुराणप्रसिद्ध ॥ ३३ ॥ इतरांची गोष्टी कायसी ॥ क्रोधें छळिलें ईश्वरासी ॥ तेणें दीक्षिता द्विजदक्षासी ॥ शिरच्छेदासी ०करविता झाला ॥३४॥जेथें मी का स्वयें वसें॥तेथें क्रोध

---

१ मत्स्यगंधा ( सत्यवती ) २ शंकर. ३ वृंदादासी ४ साठ संवत्सर हे नारदीचे ( नारदाचे ) पुत्र. ५ चाबुक, तडाका. ६ बढाई. ७ मारुतीचे धुंकीपासून 'मगरीला' झालेला पुत्र. ८ मधुनावांचून. ९ कलंक युक्त १० भगयुक्त ११ कार्तिक स्वामी १२ पाड बळ. १३ साह्य, मान्य. १४ शांति. १५ चवाटा, मुक्तद्वार. १६ कपिल महामुनी. १७ सगरपुत्र १८ कुबेर पुत्र यांनी नारदास नमस्कार न केल्यामुळें 'वृक्ष' व्हाल म्हणून त्यांस नारदानें शाप दिला. १९ अरण्यांत रहाणारी. २० तडाका, कचका.

*मो. दिवा भोगुं जाय दुर्गंधा ॥ +शा. जन्मविलें. ०मो. संवरे. ×मो. तें तुवांचि एकें केलें. ◊मो. ना. तपिष्ठा. ⁊मो. तपोराशी. ०मो. करिता

वसे मात्रकाशें ॥ काम क्रोध असतांचि नसे ॥ नारायणा ऐसें तुवां केलें ॥३५॥ हें परमाद्भुत तुझें वीर्य ॥ आणिका एवढें नाहीं धैर्य ॥ यालागीं तुझें परिचर्य ॥ सदा मुनिवर्य सेविती चरण ॥ ॥३६॥ शांतीच्या चाडें देवाधिदेवा ॥ जे नित्य करिती तुझी सेवा ॥ ते कामक्रोधादिस्वभावा ॥ स्मरतां नाम नांवा जिंकिती सुखें ॥ ३७ ॥ जेथें सन्मानें काम पुरत ॥ तेथें आदरें अनुग्रहो करित ॥ कामसन्मान जेथें अतृप्त ॥ तेथें शाप देत अतिक्रोधें ॥ ३८ ॥ यालागीं शापानुग्रह-समर्थ ॥ ते सर्वदा कामक्रोधयुक्त ॥ परी नवल तुझें सत्वोचित ॥ केले अंकित कामक्रोध ॥ ॥ ३९ ॥ 'मज गर्व नाहीं सर्वथा ॥ हेही तुज नाहीं अहंता' ॥ छळवायां यावी लघुता ॥ अथवा उपेक्षता न करिसी ॥ १४० ॥ 'पृथ्वी दुःखी करितां नांगरीं ॥ ते पिकोनि त्यांतें सुखी करी ॥ तेवीं अपकाऱ्या जो उपकार करी ॥ तो मोक्षाच्या शिरीं मुकुट' ॥ ४१ ॥ तुजमाजी निर्विकार शांती ॥ हें नवल नव्हे कृपामूर्ती ॥ तुझ्या स्वरूपाची स्थिती ॥ आजि निश्चितीं कळली आम्हां ॥ ४२ ॥ तूं निर्गुण निरुपम ॥ मायातीत पूर्णब्रह्म ॥ तुझें स्वभावें स्मरतां नाम ॥ संकामाही काम स्पर्शों नशके ॥ ४३ ॥ जो नित्य स्मरे तुझें नाम ॥ त्यासि मी कामचि करीं निष्काम ॥ क्रोधचि करी क्रोधा शम ॥ मोह तो परम प्रबोध होय ॥ ४४ ॥ जे धीर वीर निजशांती ॥ त्यांसि ×परमानंदें नित्य तृप्ति ॥ ऐशियांचिया अमितपंक्ती ॥ पायां लागती तुझिया ॥ ४५ ॥ तुज करावया नमस्कार ॥ पुढें ठेलें[१६] महासिद्धांचा संभार ॥ त्यांसही नलभे अवसर ॥ तूं परात्पर परमात्मा ॥ ४६ ॥ तुझिया सेवकांकडे ॥ चित्त रिघतां होय बापुडें ॥ तें रिघावया तुजपुढें ॥ कोण्या परिपाडें रिघेल ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ त्वां सेवतां सुरकृता बहवोऽन्तरायाः स्वौको विलंघ्य परमं व्रजतां पदं ते ॥ नान्यस्य बर्हिषि बलीन् ददतः स्वभागान् धत्ते पदं त्वमविता यदि विघ्नमूर्ध्नि ॥ १० ॥

॥टीका॥ ○तापसां बहुविघ्न अपावो ॥ आम्ही करावा अंतरावो ॥ हा आमुचा निजस्वभावो नव्हे नवलावो नारायणा ॥ ४८ ॥ 'हृदयींचा +मुक्त करोनि काम ॥ बाह्य जपतपभक्ति-संभ्रम ॥ ऐसे जे कां शठ परम ॥ विघ्नाचा आक्रम त्यांवरी चाले' ॥ ४९ ॥ ते आमची विघ्नस्थिती ॥ नचले तुझिया भक्तांप्रती ॥ तूं रक्षिता भक्तपती ॥ तेथं विघ्नांची गति पराङ्मुख सदा ॥ १५० ॥ Iमाझिया निजभक्तासी ॥ विघ्नें केवीं त्यासी ह्मणसी ॥ ऐक त्याही अभिप्रायासी ॥ सांगेन तुजपासीं देवाधिदेवा ॥ ५१ ॥ पावावया निजपदातें ॥ लाथा हाणून स्वर्गभोगातें ॥ जे नित्य निष्काम भजती तूतें ॥ नानाविघ्नें त्यांतें सुरवर रचिती ॥ ॥ ५२ ॥ उल्लंघूनियां आमुतें ॥ हे पावती अच्युतपदातें ॥ यालागीं सुरेवर त्यांतें ॥ अति-विघ्नांतें प्रेरिती ॥ ५३ ॥ बेंळी नेदूनि आह्मासी ॥ हे जाऊं पाहती पूर्णपदासी ॥ येणें 5क्षोभें

१ सेवा. २ अपेक्षेनें. ३ स्वाधीन. ४ शमस. ५ कामी पुरुषासही. ६ ज्ञान. ७ प्रकार. ८ निश्च. ९ मोकळा, स्वच्छंद सोडून. १० समारंभ, डौल. ११ लबाड. भोंद. १२ पराक्रम. पगडा. १३ तुझ्या लोकास, वैकुंठास. १४ देवश्रेष्ठ. १५ यज्ञादिकांनीं बलिदान, सत्कार. १६ गर्दी होते.

Iपा. मो. तुझिया. ×मो. परमानंदीं. ○मो. सात्विकां. +मो. गुप्त. Iमो. तुझिया. 5मो. लोभें.

इंद्रादिक त्यांपासीं ॥ नानाविघ्नांसी मोकोलिती ॥ ५४ ॥ यालागीं त्यांच्या भजनापासीं ॥ विघ्नें छळूं धांवती ओपैसीं ॥ विघ्नीं अभिभैव नव्हे त्यासी ॥ तूं हृषीकेशी रक्षिता ॥ ५५ ॥ 'सांडूनि सकाम कल्पना ॥ जे रतले तुझ्या चरणा ॥ त्यांस आठही प्रहर जाणा ॥ तूं नारायणा रक्षिसी ' ॥ ५६ ॥ भक्त विघ्नीं होतां कासाविसी ॥ धांवधांव ह्मणती हृषीकेशी ॥ तेव्हां तूं धांवण्या धांवसी ॥ +ऐसा निष्ठुर नव्हसी नारायणा ॥ ५७ ॥ ' विघ्नें नयेतां भक्तांपासीं ॥ ॥ आधींच भक्तसंरक्षणासी ॥ तूं भक्ताचें चौंपासीं ॥ अहर्निशीं संरक्षिता ' ॥ ५८ ॥ विघ्न छळूं धांवे सकोप ॥ तंव विघ्नीं प्रगटे तुझें स्वरूप ॥ यालागीं भक्तांसि अल्प ॥ विघ्नप्रताप बाधूं नशके ॥ ५९ ॥ कामें छळावें हरिभक्तांसी ॥ तंव हरी कामाचा हृदयवासी ॥ तेव्हां विघ्नाचि निर्विघ्न त्यासी ॥ भय भक्तांसी स्वप्नीं नाहीं ॥ १६० ॥ विघ्न उपजवी विरोधे ॥ तंव विरोधीं सबाह्य गोविंद ॥ मग विरोध तोचि महाबोध ॥ स्वानंदकंद निजभक्तां ॥ ६१ ॥ ज्यासि तुझ्या चरणीं भावार्थ ॥ त्यासि विघ्नीं प्रगटे परमार्थ ॥ ऐसा भावबळें तूं समर्थ ॥ 7साह्य सतत निजभक्तां ॥ ६२ ॥ यापरी 0समर्थ तूं संरक्षिता ॥ तें जिणोनि विघ्नां समस्तां ॥ पाय देऊनि इंद्रपदमाथां ॥ पावती परमार्था तुझिया कृपें ॥ ६३ ॥ देव संरक्षिता ज्यासी ॥ विघ्नें छळूं धांवती त्यासी ॥ मा सकामाची गती कायसी ॥ विदेहा ह्मणसी तें ऐक ॥ ६४ ॥ विषयकाम धरोनि मनीं ॥ इंद्रादिदेवां बळिपूजनीं ॥ जे भजले यागयजनीं ॥ देव त्यांलागोनी न करिती विघ्नें ॥ ६५ ॥ इंद्र याज्ञिकांचा राजा ॥ सकाम याज्ञिक देवांच्या प्रजा ॥ यज्ञभाग अर्पिती वोजा ॥ पावल्या बळिपूजा न करिती विघ्नें ॥ ६६ ॥ ह्मणसी ' कामादिक *विटंबिती ॥ ते निष्काम कदा नातळती ' ॥ ' सहजें कामासी वश्य होती ॥ सदा कर्मे करिती सकाम ॥ ६७ ॥ ' जे मज कामासी वश होती ॥ ते तप वेंचोनि भोग भोगिती ॥ जे आंतुडले क्रोधाच्या हातीं ॥ ते वृथा नागवती तपासी ' ६८ ॥

॥ श्लोक ॥ क्षुत्तृट्त्रिकालगुणमारुतजैह्व्यशैश्न्यानस्मानपारजलधीनतितीर्य केचित् ॥ क्रोधस्य यांति विफलस्य वशं पदे गोर्मज्जंति दुश्चरतपश्च वृथोत्सृजंति ॥ ११ ॥

॥ टीका प्राणायामें प्राणापानीं ॥ निजप्राणातें आकळोनी ॥ वातवर्षशीतउष्ण साहोनी ॥ जे अनुष्ठानीं विगुंतले ॥ ६९ ॥ क्षुधे तृषेतें नेमूनी ॥ जिव्हा शिश्न आकळोनी ॥ मज कामातें जिंकिलें मानूनी ॥ निष्कामाभिमानी उन्मत्त ॥ १७० ॥ जे अल्प 6अभिमानाहातीं ॥ जे क्रोधासि वश होती ॥ ते शाप देऊनि तपसंपत्ती ॥ व्यर्थ नागविती निजकष्टा ॥ ७१ ॥ सकामाच्या अनुष्ठाना ॥ मज कामासंगें स्रक्चंदना ॥ भोगभोगिती स्वर्गांगना ॥ अमृतपाना प्राशिती ॥ ७२॥ त्या मज कामातें उपेक्षिती ॥ आणि जे क्रोधासि वश होती ॥ ते निजतपा

---

१ सोडिती, पाठविती. २ आपोआप, तत्क्षणीं. ३ बाधा, पराभव. ४ चारी बाजूला. ५ वैर, ६ इंद्रपदाच्या डोकीवर. ७ मग, तर मग. ८ यज्ञकर्ते. ९ ताबेदार, अंकित. १० आदरानें. ११ कामादिक. १२ निष्कामाला. १३ स्पर्श करीत नाहींत. १४ सांपडले. १५ पाऊस. १६ नियमून. १७ मी जो काम त्या माझ्या संगतीनें. १८ मालाचंदन. १९ ' अप्सरा ', ' भोगिती ' या क्रियेचें कर्म.

+पा. तैसा. 7पा. सबाह्य. 0पा. परमार्थ. *पा. मो. विघंबिती. 6पा. अपमाना हातीं.

भागवतीं ॥ शोपोपदीप्ती-अनुवादें ॥ ७३ ॥ जे अपार सागर तरती ॥ ते गोखुरोदकीं बुडती जे मज कामातें जिणोनि जाती ॥ तेही नागविजेती निजक्रोधें ॥७४॥ मज कामाची अंपु कामवृत्ती ॥ तेचि क्रोधाची दृढ स्थिती ॥ काम क्रोध अभक्तां बाधिती ॥ हरिभक्तांप्रती नचले ॥ ७५ ॥ तुझ्या निज भक्तांप्रती जाण ॥ नचले कामक्रोधादिकबंधन ॥ तो तूं भक्तपा नारायण ॥ °तुज आमुचें कामबाण केवीं बाधी ॥ ७६ नेणतां तुझा महिमा ॥ आह्मी क आलों निजधर्मा ॥ तुजपाशीं नित्य निजक्षमा ॥ पुरुषोत्तमा कृपाळुवा ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ इति प्रगृणतां तेषां स्त्रियोऽत्यद्भुतदर्शनाः ॥ दर्शयामास शुश्रूषां स्वर्चिताः कुर्वतीर्विभुः ॥१२॥

॥ टीका ॥ अपकाऱ्यां उपकार करिती ॥ यानांव निर्विकार निजशांती ॥ तेचि शांतीचि परिपाकस्थिती ॥ विघ्नकर्त्यांप्रती हरि दावी ॥ ७८ ॥ सांगोनियां आपुली स्थिती ॥ कामादि स्तुति करिती ॥ तंव परमाश्चर्य देखती ॥ स्त्रिया अत्यद्भुतीं अकस्मात ॥ ७९ ॥ रूपवैभ अळंकार ॥ श्रियेहूनियां सुंदर ॥ सेवेलागीं अतितत्पर ॥ सदा सादर सावधान ॥ १८० नवल लाघव नारायणा ॥ कैसें यासि दाखविलें विंदांना ॥ त्या स्त्रियांखालीं स्वर्गांगना दिवा खद्योत जाणा तैशा दिसती ॥ ८१ ॥

॥ श्लोक॥ ते देवानुचरा दृष्ट्वा स्त्रियः श्रीरिव रूपिणीः ॥ गंधेन मुमुहुस्तासां रूपौदार्यहतश्रियः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ त्या स्त्रियां देखोनि दृष्टीं ॥ काम मूर्छित पडिला सृष्टीं ॥ वसंत घटघटां ला घोंटी ॥ क्रोधाची दृष्टी तटस्थ ठेली ॥ ८२ ॥ भ्रमर विसरले झणत्कार ॥ कोकिळा विसरल्य पंचमस्वर ॥ प्राण विसरला संचार ॥ देवानुचर भुलले ॥ ८३ ॥ देखोनि त्यांचिया स्वरूपासी॥ अप्सरा दिसती जैशा दासी ॥ अत्यंत लज्जा झाली त्यांसी ॥ ×काळिमेसी उतरल्या ॥ ॥ ८४ ॥ त्यांचे अंगींचा सुगंध वात ॥ तेणें भुलला वसंत ॥ मलयानिळ झाला भ्रांत ॥ त्यांच अंगवात लागतां ॥ ८५ ॥ नारायणाची स्त्रिया कैसी ॥ जे भुलवूं आल्या आपणासी ॥ भुलि पाडिली तयांसी ॥ योगमायेसी दाऊनी ॥ ८६ ॥ सुंदरत्वें रंभा, तिलोत्तमा ॥ त्या मंदरेंस थनीं जिंतल्या रमों ॥ रमेहूनियां उत्तमा ॥ उत्तमोत्तमा अतिरूपें ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ तानाह देवदेवेशः प्रणतान्प्रहसन्निव ॥ आसामेकतमां वृङ्ध्वं सवर्णां स्वर्गभूषणाम् ॥ १४ ॥

॥ टीका ॥ तें अति आश्चर्य देखोन ॥ झाले कामादिक मूर्छायमान ॥ तयांप्रति नारायण ॥ काय हांसोन बोलिला ॥ ८८ ॥ आह्मीं अवश्य पूजावें तुह्मांसी ॥ कांहीं अर्पावें बलिदानासी ॥

---

१ माझ्या प्रखर शापाच्या आघातानें. २ गाईच्या पावलांत सांचलेलें पाणी, अल्पोदक. ३ जिंकून. ४ अतृप्त, असंतुष्ट. ५ पक्व, पूर्ण. ६ लक्ष्मीहून. ७ कौशल्यास, कौतुक. ८ दिवसास. ९ काजवा. १० नारायणऋषि निर्मित. ११ देवांचे चाकर. १२ मलयपर्वतावरील-चंदनगंधयुक्त-वायु. १३ योगसिद्धीची करामत. १४ मंदरसाह्यानें समुद्र मंथन केलें त्यांतील. १५ लक्ष्मी.

°पा. तुज आमचे कामानें केंवि बाधवे. ×पा. भो. तिम्हीं मसी उतरल्या.

संतोषवावया अमरेंद्रासी ॥ यांतील एकादी दासी अंगीकारा तुह्मीं ॥ ८९ ॥ यांचें सौंदर्य अतिथोर ॥ ह्मणाल होईल अपमानकर ॥ *तुह्मासमान जे सुंदर ॥ तिचा अंगीकार करावा तुह्मीं ॥ १९० ॥ ह्मणाल यांत नाहीं ×हीनें ॥ अवघ्या +सौंदर्यें संपूर्ण ॥ कोणी नदिसे आह्मा-समान ॥ केवीं आपण अंगीकारावी ॥ ९१ ॥ जरी नाहीं तुह्मांसमान ॥ सकळसौंदर्यें अति-संपन्न ॥ तरी एकीचें करावें 4अंगीकरण ॥ होईल भूषण स्वर्गासी ॥ ९२ ॥ ऐसें नाराय-णाचें वचन ॥ ऐकोनि हरिखलीं संपूर्ण ॥ करूनिया साष्टांग नमन ॥ मस्तकीं वचन वंदिलें ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ ओमित्यादेशमादाय नत्वा तं सुरवंदिनः ॥ उर्वशीमप्सरःश्रेष्ठां पुरस्कृत्य दिवं ययुः ॥ १५ ॥ इंद्रायाऽऽनम्य सदसि शृण्वतां त्रिदिवौकसाम्॥ ऊचुर्नारायणबलं शक्रस्तत्रास विस्मितः ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ऐकोनि नारायणवचन ॥ मस्तकांजुळीं करूनियां नमन ॥ उर्वशी पुढारून ॥ कामादिगण निघती वेगीं ॥ ९४ ॥ 'नारायणाचे ऊरुस्पर्शी ॥ उभी होती नारायणापाशीं ॥ तेंचि नांव झालें तिसी ॥ ह्मणती उर्वशी स्वर्गांगना ॥ ९५ ॥ ते देवाचे देवदूत ॥ स्वर्गा पावले समस्त ॥ मग शक्राचे सभे आंत ॥ सांगती अद्भुत नारायणशक्ती ॥ ९६ ॥ तिहीं नारायणाचें चरित्र ॥ सांगितलें अतिपवित्र ॥ तेणें अवघेचि सुरवर ॥ झाले थोर विस्मितपें ॥ ९७ ॥ इंद्रें देखोनि उर्वशी ॥ तिसी भुलला अहर्निशीं ॥ बाहेर यावें सभेसी ॥ हें वर्षानुवर्षी ७नवाटे ॥९८॥ हे प्रथमावतार वार्ता ॥ जे कां नारायणाची कथा ॥ पुढील अवतार आतां ॥ नृपनाथा अवधारीं ॥ ९९ ॥ ऐक राया अतिअपूर्व ॥ छळवादियां पूजा सर्व ॥ करून दासवी स्वयमेव ॥ पूर्णानुभव यानांव ॥ २०० ॥ आशंका ॥ भावें करितां भगवद्भजन ॥ यापरी इंद्र करी विघ्न ॥ नारायण चैतन्यघन ॥ तेणें, विघ्नें संपूर्ण ३पराभविलीं ॥ १ ॥ मा बाळ्याभोळ्याकरितां भक्ती ॥ ऐशीं विघ्नें जें छळूं येती ॥ तें कदा नव्हे भगवत्प्राप्ती ॥ ऐसा विकल्प चित्तीं ह्मणी ८धरिसी ॥ २ ॥ ॥ 'ब्रह्मादि सर्वभूतां ॥ भृकुटीमात्रें जो नियंता ॥ त्या भगवंतातें भजतां ॥ विघ्नें सर्वथा न शकती बाधूं ॥ ३ ॥ ज्याचेनि इंद्रा इंद्रपण ॥ तो भावें भजतां श्रीनारायण ॥ भक्तांसि विघ्न करी कोण ॥ हरी रक्षण निजभक्तां ॥ ४ ॥ इंद्रमुख्य कामादिक ॥ विघ्नें छळती सकळ लोक ॥ त्यांचाही नारायण चाळक ॥ तो भक्तासि देख विघ्नें स्पर्शोंनेदी ॥ ५ ॥ विघ्नांसी भुलविलें जेणें संपूर्ण ॥ तो नित्य स्मरतां नारायण ॥ ओंपधार्के विघ्नें पळती जाण ॥ *भक्तसंरक्षण हरिनामें ॥ ६ ॥ करावया निजभक्त कैवार ॥ देव धरी नानावतार ॥ त्याच्या अवतारांचें चरित्र अतिविचित्र अवधारीं ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ हंसस्वरूप्यवददच्युत आत्मयोगं दत्तः कुमार ऋषभो भगवान् पिता नः ॥ विष्णुः शिवाय जगतां कलयाऽवतीर्णस्तेनाहृता मधुभिदाश्रुत-यो हयास्ये ॥१७॥

१ कमी प्रतीची. २ शिरःकमलांनीं. ३ पुढें घालून. ४ उरु ह्मणजे मांडी तदुत्पन्न ह्मणून 'उर्वशी. ५ झाले. ६ तर मग. ७ शंका. ८ मुंबईनेंच. ९आपणच भीऊन धाकानें. १० साहाय्य.

*पा. तुह्मासी माने जे सुंदर. ×पा. कोणी हीन. +पा. सुंदर. 4पा. मी वरण. 7पा. नाठवे. 3पा. पराभवी. 8पा. करिशी. *पा. भक्तांसि रक्षण हरिनामें.

॥ टीका ॥ सनकादिक ब्रह्मनंदन ॥ तिहीं पित्यासि केला प्रश्न ॥ प्रश्नखंडनमिसें जाण ॥ केलें ब्रह्मज्ञान हंसावतारें ॥ ८ ॥ नित्य स्मरतां हरीचें नाम ॥ महाविघ्नें होती भस्म ॥ त्याचा अवतारसंभ्रम ॥ उत्तमोत्तम अवधारीं ॥ ९ ॥ ज्याचेनि नामें पळे कृतांत ॥ नामें जन्ममरणा घात ॥ तो अवतार श्रीदत्त ॥ मूर्तिमंत परब्रह्म ॥ २१० ॥ 'नैष्ठिकब्रह्मचारी निश्चितीं ॥ ज्यासि स्वप्नीं नाहीं वीर्यच्युती ॥ यालागीं कुमार म्हणती ॥ अवतारमूर्ती सनकादिक' ॥ ११ ॥ आणि आमुचा जो कां पिता ॥ ऋषभ नारायण, ज्ञाता ॥ तोही अवतार नृपनाथा ॥ जाण तत्त्वतां भगवन्मूर्ती ॥ १२ ॥ इहीं नामींरूपीं संपूर्ण ॥ अवतारी अवतरे नारायण ॥ जो जगाचा प्रतिपाळण ॥ स्वांशें श्रीकृष्ण अवतरे ॥ १३ ॥ तोचि स्वयें श्रीकृष्ण ॥ मधुकैटभ निर्दाळन ॥ नामें जो कां मधुसूदन ॥ तोचि अवतरून हयग्रीव झाला ॥ ॥ १४ ॥ तेणें शंखें मर्दून पुढती ॥ उद्धारिल्या बुडाल्या श्रुती ॥ आणोनि दीधल्या ब्रह्म्या प्रती ॥ जाण निश्चितीं वेदरक्षण ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ गुप्तोऽप्यये मनुरिलौषधयश्च मात्स्ये क्रोडे हतो दितिज उद्धरताऽम्भः सः क्ष्माम् ॥ कौर्मे धृतोऽद्रिरमृतोन्मथने स्वपृष्ठे ग्राहात्प्रपन्नमिभराजममुंच दार्तम् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ तेणेंचि मत्स्यावतारें ॥ प्रलयकाळांबुमहाभरे ॥ 'मनुसहित रक्षिलें धैरें ॥ निजनिर्धारें औषधीसी ॥ १६ ॥ तेणेंचि कैमठावतारा ॥ स्वपृष्ठीं धरूनि गिरिवरा ॥ मंथोनियां क्षीरसागरा ॥ अमृत सुरवरा अर्पिलें जेणें ॥ १७ ॥ श्वेतवाराह महामूर्ती ॥ धरेनें केली पूर्ण भक्ती ॥ तिसी उद्धरोनि कृपामूर्ती ॥ अभिनव शांती अर्पिली ॥ १८ ॥ तेणें आर्तत्राणा तांतडीं ॥ वैकुंठींहून घालोनि उडी ॥ गजाचें ग्रैहबंधन तोडी ॥ उद्धरिलें आवडीं गजेंद्रातें ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ संस्तुन्वतोऽब्धिपतितान् श्रमणानृषींश्च शक्रं च वृत्रवधतस्तमसि प्रविष्टम् ॥ देवस्त्रियोऽसुरगृहे पिहिता अनाथा जघ्नेऽसुरेंद्रमभयाय सतां नृसिंहे ॥ १९ ॥

॥ टीका ॥ मार्कंडेयो एकेवेळीं ॥ बुडतां अकालप्रळयजळीं ॥ तेणें स्मरतां वनमाळी ॥ तारी तत्काळीं वटपत्रशायी ॥ २२० ॥ शाळग्राम पूजितां ऋषीश्वरीं ॥ नैळवानर ते अवसरीं ॥ देवपूजा टाकी सागरीं ॥ चेष्टा वानरी स्वभावें ॥ २१ ॥ तेथें कोपोनि ऋषीश्वरीं ॥ शिळा नबुडोत तुझ्या करीं ॥ ऐसा शाप ते अवसरीं ॥ क्षोभेंकरीं दीधला ॥ २२ ॥ तें शाळग्राम सागरोदरीं ॥ तरतां देखिले ऋषीश्वरीं ॥ काढावया रिघतां भीतरीं ॥ लेहरीकरीं निबुजेले ॥

१ महादेवाचे पुत्र. २ वैभव. ३ यम. ४ नाश. ५ अखंड ब्र० ६ आम्हा आर्षभ बंधूंचा. ७ हे जनका ८ दोघे असुर बंधु. ९ मधु दैत्याला मारणारा. १० शंखासुर. ११ वेद. १२ प्रलयकालच्या जलपूरांत. १३ पृथ्वीला. १४ कूर्मावतार. १५ दीनरक्षणाकरिता. १६ जलदीनें. १७ नक्राची पकड. १८ 'नळ' वानर. १९ काठारूप हातांनीं. २० घाबरले.

॥ २३ ॥ ते काळीं ऋषीश्वरीं ॥ आर्तिहरण स्तविला हरी ॥ तेथें अवतरोनि श्रीहरी ॥ ऋषींतें तारी देव पूजेसहित ॥ २४ ॥ वृत्र वधिला वज्रघातें ॥ ते ब्रह्महत्या इंद्रातें ॥ तेणें दोषें तो अंधतमातें ॥ जाण पां निश्चितें बुडत होता ॥ २५ ॥ तेथें अवतरोनि श्रीअनंतें ॥ चतुर्धा वांटूनि ते हत्येतें ॥ शुद्ध केलें इंद्रातें ॥ कृपावंतें कृपाळुत्वें ॥ २६ ॥ जिणोनियां अमरपुरें ॥ हिरोनियां देवांचीं [3]अंतौरें ॥ तें कोंडोनियां समग्रें ॥ मुरें महा असुरें एकंधरें केले ॥ २७ ॥ तो मुरमर्दन श्रीहरी ॥ यालागीं नांवें मुरारी ॥ देवस्त्रिया काढोनि बाहेरी ॥ देवांच्या करीं अर्पिता झाला ॥ २८ ॥ जो असुरांमाजी चूडामणी ॥ जो द्वेषियांमाजी अग्रणी ॥ तो हरिनाम ऐकतां कानीं ॥ अतिक्षोभें मनीं प्रज्वळों लागे ॥ २९ ॥ जो पूर्णक्रोधाचा उदधी ॥ जो अविवेकाचा महानिधि ॥ जो 'हरिस्मरत्यां पुत्रातें' बाधी ॥ गर्वमर्दी उन्मत्त ॥ २३० ॥ तो हिरण्यकशिपू नखधारीं ॥ स्वयें निवटी नरकेसरी ॥ जो निजभक्तांचा कैवारी ॥ अभयकारी साधूंचा ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ देवासुरे युधि च दैत्यपतीन् मुरार्थे हत्वांतऽरेपु भुवनान्यदधात्कलाभिः ॥ भूत्वाऽथ वामन इमामहरद्बलेः क्ष्मां याञ्चाच्छलेन समदाददितेः सुतेभ्यः ॥ २० ॥

॥ टीका ॥ समुद्रमंथनाच्या शेवटीं ॥ क्षीरसागराचे तटीं ॥ सुरांअसुरां कळी मोठी ॥ अमृतासाठीं मांडली ॥ ३२ ॥ तेव्हां अमृत *विटें जें देखोनी ॥ तो अवतार घेतला मोहिनी ॥ तेणें असुरां +सुरांपानीं ॥ अमृतदानीं देवांसी ॥ ३३ ॥ तेथें चोरूनि घेतां अमृत ग्रासा ॥ निवटिला राहूचा घसा ॥ त्याच्या कबंधावरी झाळसा ॥ वासनिवासा स्वयें केला ॥ ॥ ३४ ॥ सुरसाह्य नारायण ॥ द्वारके कुंश निर्दाळून ॥ कां लवणासुर मर्दन ॥ अवतरे आपण कुमाररूपें ॥ ३५ ॥ ऐसा मन्वंतरा मन्वंतरीं ॥ निजभक्तकाजकैवारी ॥ सुरकार्यार्थ श्रीहरी ॥ नाना अवतारीं अवतरे स्वयें ॥ ३६ ॥ तो सुरसाह्य जगजीवन ॥ स्वयें कुब्जें झाला वामन ॥ अंगें याचक होऊन ॥ देवांचा अपमान उतरला जेणें ॥ ३७ ॥ दानें दांडगा बळी ॥ त्यासि देवांचेनि नव्हे कळी ॥ मग त्रिविक्रम क्रमें आकळी ॥ यांचाछळें बळी छळिला जेणें ॥ ३८ ॥ तरी भावबळें बळी प्रबळ ॥ तेणें देव केला द्वारपाळ ॥ विष्णु सत्व पाहे छळछळें ॥ शेखीं दासाचा दयाळु दास्य करी स्वयें ॥ ३९ ॥ यापरी बळीचा छळ ॥ करूनि घेतलें दिङ्मंडळ ॥ तेणें अमरगण सकळ ॥ अर्पूनि तत्काळ सुखी केले ॥ २४० ॥

---

१ दुःखहर्ता. २ वृत्रासुर. ३ एक नरक. ४ चारप्रकारानें. ५ देवनगरें. ६ अंतःपुरें, स्त्रिया. ७ मुर नामक दैत्यानें. ८ 'मुर'स मारणारा. ९ शिरोरत्न, श्रेष्ठ. १० श्रेष्ठ. ११ जळूं लागला. १२ समुद्र. १३ पीडी. १४ (तीक्ष्ण) नखांच्या धारांनीं १५ मारी. १६ नरसिंह. १७ भयहरणकर्ता. १८ कलह. १९ फिकें पडे. २० जे रूप. २१ मद्यपानें २२ नाहींसा केला तोडिला. २३ मान. २४ धडावर. २५-२६ असुरविशेष. २७ देवांच्या कामाकरितां. २८ जासु. वामन. २९ दांडगा. ३० झगडा. ३१ भिक्षारूपी छळानें. ३२ छळछळून.

३पा. अंतःपुरें. *पा. वाटीजे. +पा. पाजुनी.

॥ श्लोक ॥ निःक्षत्रियामकृतगां च त्रिःसप्तकृत्वो रामस्तु हैहयकुलाप्ययभार्गवाग्निः ॥ सोऽब्धिं बबंध दशवक्त्रमहन्सलंकं सीतापतिर्जयति लोकमलघ्नकीर्तिः ॥ २१ ॥

॥टीका॥ तो देवाधिदेवोत्तम ॥ स्वयें झाला परशुराम ॥ तेणें क्षत्रियांचा पराक्रम ॥ केला निर्धर्मे निजप्रतापें ॥ ४१ ॥ तो गोब्राह्मणकैवारी ॥ सहस्रार्जुनातें संहारी ॥ सहस्रभुजांचीं कांडोरीं करी ॥ केली बोहरी दानवकुळा ॥४२॥ जमदग्नीचा कोपाग्नी ॥ +परशुराम तेजें प्रज्वळूनी ॥ हैहयकुळ जाळूनी ॥ ओहाळिली अवनी क्षत्रियांची ॥ ४३ ॥ तेणें तीन सप्तकें वीररसें ॥ देऊनि क्षत्रियमद बहुवस ॥ त्या रोगाचा केला नाश ॥ धरेचे ईश धरामर केले ॥ ४४ ॥ जो अवतारांचें मूळपीठ ॥ जो वीरवृत्ती अतिउद्भट ॥ तो अवतारांमाजी श्रेष्ठ ॥ अतिवरिष्ठ श्रीराम ॥ ४५॥ पापें पळती रामनामें ॥ *नामांकित वंदिजे यमें ॥ गणिकेचीं कर्माकर्में ॥ श्रीरामनामें निर्दळिलीं ॥ ४६ ॥ नामें कळिकाळासी धाक ॥ यमदूतां नमिळे भीक ॥ रामनामगजरें देख ॥ पळे निःशेष जन्ममरण ॥ ४७ ॥ जो देवांचें बंधन सोडी ॥ नवग्रहांची बेडी तोडी ॥ जेणें रामराज्याची रोकडी ॥ उभविली गुढी तिहीं लोकीं ॥ ४८ ॥ ज्याचेनि शिळा तरती सागरीं ॥ असुर मारिजेती वानरीं ॥ जेणें सुवर्णाची नगरी ॥ वोपिली पुरी शरणागतासी ॥ ४९ ॥ जो प्रतापाचा मेरुगिरी ॥ जेणें सेतु बांधिला *अवलीला ॥ चरणीं उद्धरिली शिळा ॥ जो निजजिव्हाळा निजभक्तां॥५०॥ तो अवतार मूर्तिमंत ॥ राया अद्यापि असे वर्तत॥ हा संवाद त्रेतायुगांत ॥ द्रुमिल सांगत विदेहासी ॥ ५१ ॥ यालागीं श्रीरामराम ॥ नित्य जपे जो हें नाम ॥ तो पुरुषामाजी पुरुषोत्तम ॥ कर्माकर्मा अतीत तो ॥ ५२ ॥ तें रामनाम अवचटें ॥ भीतरीं रिघे कर्णपुटें ॥ तें [1]कळिमळांचीं मेळकटें ॥ नामोद्धाटें नासती ॥ ॥ ५३ ॥ ऐसी रामनामाची ख्याती ॥ जगदुद्धारें केली कीर्ती ॥ धन्यधन्य जे परिसती ॥ धन्य जे गाती रामचरित ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ भूमेर्भरावतरणाय यदुष्वजन्मा जातः करिष्यति सुरैरपि दुष्कराणि ॥ वादैर्विमोहयति यज्ञकृतोऽतदर्हान् शूद्रान् कलौ क्षितिभुजो न्यहनिष्यदंते॥२२॥

॥ टीका ॥ आतां भावी अवतारवार्ता ॥ तुज मी सांगेन नृपनाथा ॥ श्रीकृष्णावतारकथा ॥ परमाद्भुता विचित्र ॥ ५५ ॥ 'जो परेहून परात्पर ॥ जो कां अजन्मा, अक्षर ॥ जो श्रुतिशास्त्रां अगोचर ॥ तो पूर्णावतार श्रीकृष्ण ' ॥ ५६ ॥ ' जेथें नाममात्र रिघों नलाहे ॥ तेथें रूपाची नलभे सोये ॥ ज्या ब्रह्मत्व अंगीं न साहे ॥ तो अवतार पाहे श्रीकृष्ण ' ॥ ॥ ५७ ॥ ' जो वर्णाश्रमांसि नातळे ॥ ज्यासि ईश्वरत्वही वोविळें ' ॥ जो अज अव्यय स्वानं-

१ कार्तवीर्याला. २ दांडकी, काष्टें. ३ निर्दळण. ४ दैत्यकुळास. ५ जाळिली. ६ शौर्यरूपी रसाचीं तीनसप्तकें औषधच पाजून त्यांचा ' मद ' रूप रोग घालविला. ७ भूसुर, ब्राह्मण. ८ श्रेष्ठ. ९ 'नाम'युक्त पुरुष. १० वेश्येचीं. ११ लंका. १२ दिली. १३ बिभीषणास. १४ मूर्तिपुतळा, १५ सहज, गमतीनें. १६ अहल्यारूप. १७ पलीकडे. १८ अवचित. १९ पुटें. २० नामाच्या घोषानें. २१ पुढील. २२ विनाशरहित. २३ अगम्य. २४ जो ईश्वरत्वाच्याही पलीकडचा असा साक्षात् परब्रह्म, त्याच्या मानानें ईश्वरत्व ओवळें होय.

+आ. परशुरामानें प्रज्वळूनी. *मो. नामांकिता. *आ. स्वलीला. [1]आ. कळिकाळाचे.

दमेळें ॥ तो अवतार स्वलीलें श्रीकृष्णनाथ ' ॥ ५८ ॥ ऐसा गुणधर्मकर्मातीत ॥ *तो अवतार श्रीकृष्णनाथ ॥ +प्रगटेल यदुवंशांत ॥ स्वयें जगन्नाथ स्वइच्छें ॥ ५९ ॥ जैसें खेळाळ कल्लोळ चंचळ ॥ भासे परी तें केवळजळ ॥ काळी मैळी, पांढरी चोळें ॥ परी ते केवळ वसुधाची ॥२६०॥ जे गोडी नावदरांसी ॥ तेचि वेगळी रवेयासी ॥ तैसा अवतार यदुवंशीं ॥ पूर्णांशेंसी श्रीकृष्ण ॥ ६१ ॥ जैसा दीप लावितां तत्क्षणीं ॥ सर्वेचि प्रगटे तेजाची खाणी ॥ तैसा उपजतांचि बाळपणीं ॥ अभिनवकरणी ×स्वयें केली ॥ ६२ ॥ जें ब्रह्मादिकदेवां नव्हे ॥ तें बाळलीला स्वभावें ॥ करूनि दाविलें आघवें ॥ देवादिदेवें श्रीकृष्णें ॥ ६३ ॥ वणवा गिळिला मुखें ॥ पर्वत उचलिला नखें ॥ पूतनेचें स्तनविखें ॥ प्याला निजमुखें जीवों सकट ॥ ६४ ॥ जेणें वत्साहरणामिसें ॥ स्रष्ट्यासही लाविलें पिसें ॥ जो वत्सवत्सपवेशें झाला ॥ सावकाशें एकाकी एक ॥ ६५ ॥ अघ चिरिला जैंभाडा ॥ काळियाच्या कुटिल्या फेडा ॥ यमलोकीं घेऊनि झाडा ॥ आणिला गोकडा गुरुपुत्र जेणें ॥ ६६ ॥ जे प्रजा पीडूनि कर घेती ॥ ज्यां नावडे धर्मनीती ॥ ऐसे राजे भारभूत क्षितीं ॥ नेणों किती निर्दाळिले ॥६७॥ एक सैन्यें; एक, स्वांगें; ॥ एका वधवी आनप्रयोगें; ॥ एक गोत्रकलहप्रसंगें; ॥ अग्रपूजायोगें एकासी; ॥ ६८ ॥ अधर्मा लाविल शीकें ॥ धर्माचें वाढवील बीकें ॥ हें अवतारकौतुक ॥ राया तूं आवश्यक देखशील पुढां ॥ ६९ ॥ जें जें लोटेल अहोरात्र ॥ तें तें करील नवें चरित्र ॥ तया कृष्ण-सुखासि पात्र ॥ भक्त पवित्र होतील ॥ २७० ॥ साधूंसि स्वानंदसोहळा ॥ नित्यनवा होईल आगळा ॥ ते श्रीकृष्णाची लीला ॥ देखसी डोळां नृपनाथा ॥ ७१ ॥ तोचि बौद्धरूपें जाण ॥ पुढा धरील दृढ मौन ॥ तेव्हां कर्माकर्मविवंचन ॥ सर्वथा जाण कळेना ॥ ७२ ॥ तो तटस्थ-पणें सदा ॥ प्रवर्तवील महावादा ॥ तेणें वादमिसें सदा ॥ वाढवील मदा महामोहातें ॥ ७३ ॥ मोह उपजवील दुर्घट ॥ एक कर्मी करील कर्मठ ॥ एक होतील कर्मभ्रष्ट ॥ नकळे चोखैट निजात्महित ॥ ७४ ॥ कैसें माजवील मत ॥ वेद मिथ्या मानित ॥ वेदविहितां नातळत ॥ तो जाण निश्चित महामोह ॥ ७५ ॥ मोहें केला सर्वांसि छळ ॥ एकां ज्ञानाभिमान प्रबळ ॥ ते कर्म निंदिती सकळ ॥ त्यागिती केवळ औख्य ह्मणोनि ॥ ७६ ॥ ऐशिये वर्ततां मोह-स्थिती ॥ पूर्ण कैलीची होय प्रवृत्ती ॥ तेव्हां नीच ते राजे होती ॥ प्रजा नागविती चोरप्रायें ॥ ७७ ॥ ' शूद्राहूनि अतिकनिष्ठ ॥ ते राजे ०होती *परमश्रेष्ठ ॥ वर्णावर्ण करिती भ्रष्ट ॥ अति पापिष्ठ अधर्मी ' ॥ ७८ ॥ ' अपराधेंविण वितंड ॥ ' भलेल्यांसि ' करिती दंड ॥

---

१ खळबळीमुळें. २ लाट. ३ माळजमीन. ४ भूप्रदेश.५ जर्मानन्त. ६ सासरेच्या दिगास. ७ गोवर्धन ८ स्तनांतलें विष, ९ प्राणासह ओढिले. १० ब्रह्मदेवास, ११ वासरें आणि गुराखी. १२ ' अघासुर' १३ जाभाडा, तोंड. १४ ठेचल्या. १५ फणा, एकलें. १६ सांदीपनीचा पुत्र. १७ केवळ भारच. १८-१९ कोणा राजाला सैन्यद्वारा, कोणाला स्वतःच वधिलें, २० अन्य उपायानें २१ आपसांत वैर ( यादवांचें ) २२ प्रथम पूजेचा मान धर्माच्या राजसूयांत कृष्णाला मिळाला. २३ शिशुपालास. २४ शिक्षा, २५ तेज, बळ, २६ जों जों. २७ निर्मळ. शुद्ध. २८ वेदानें सांगितलेलें, २९ एका पक्षाला. ३०मूर्खपणा ३१ कलियुगाची. ३२ सज्जनांस.

*ना. तो अवतार स्वलीळे श्रीकृष्णनाथ. +ना. मो. ॥ यदुवंशवंशा आत ॥ स्वयें जगन्नाथ प्रगटेल ॥ × मो. ना. जेणें. ०ना. होतील. *ना. श्रेष्ठ.

०मार्गस्थांचा करिती कोंडे ॥ करिती उदंड सर्वापहरण ॥ ७९ ॥ अबळांचें निजबळ राजा ॥ तो राजाचि स्वयें नागवी प्रजा ॥ ऐसा अधर्म उपजे क्षितिभुजां ॥ तें गरुडध्वजा न साहवे ॥ २८० ॥ ' जेव्हां स्वधर्माचें जिणें ॥ अधर्मेंनि लागे गांजणें ' ॥ यालागीं श्रीनारायणें ॥ अवतार धरणें कल्कीनामा ' ॥ ८१ ॥ तो शस्त्रधारी प्रबळ ॥ नष्ट राजे निर्दाळील सकळ ॥ महामोहाचें मूळ ॥ स्वयें समूळ उच्छेदील ॥ ८२ ॥ ' तेव्हां धर्माची पहाट फुटे ॥ सत्यासी सत्य चौपेटे ॥ तेव्हां वेदोक्त ×विधान प्रगटे ॥ स्वधर्मरहाटीं रहाटती सर्व ' ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ एवंविधानि कर्माणि जन्मानि च जगत्पतेः ॥ भूरीणि भूरियशसो वर्णितानि महाभुज ॥ २३ ॥

॥ टीका ॥ जयाचीं गा अनंतनामें ॥ अनंत अवतार अनंत जन्में ॥ अनंत चरित्रें अनंत कर्में ॥ अनंतोत्तमें हरिकीर्ती ॥ ८४ ॥ अगाध भगवंताचा महिमा ॥ त्याच्या पार नाहीं जन्मकर्मा ॥ त्याचा अनुष्टुप् हा महिमा ॥ तुज म्यां ⁸नरोत्तमा निरूपिला येथें ॥ ८५ ॥ ऐशीं अवतारचरित्रनामें ॥ परिसतां विचित्र कर्में ॥ राजा अत्यंत सप्रेमें ॥ मनोधर्में निवाला ॥ ८६ ॥ जे जे अवतारीं देवो सगुण ॥ जाहला परी ' निर्गुणाचे गुण ' ॥ प्रगट करीतचि आपण ॥ कर्माचरण स्वयें दावी ॥ ८७ ॥ धन्य धन्य ते हरिगण ॥ जे वर्णिती भगवद्गुण ॥ ज्यांचेनि वचनें संपूर्ण ॥ निवे अंतःकरण श्रोत्यांचें ॥ ८८ ॥ श्रोत्याचें अवधान निवे ॥ तेथ वक्ता स्वानंदसुख पावे ॥ ग्रंथ वोडवे स्वभावें ॥ साहित्यगौरवें रसाळ ॥ ८९ ॥ जेवीं चंद्रकरें साचा ॥ सुखबंधें सुटे चकोरांचा ॥ तेवीं एका जनार्दनाचा ॥ संतकृपा वाचा फुटली त्यासी ॥ २९० ॥ 0जेवीं सूर्यकिरणस्पर्शें ॥ कमळकळी स्वयें विकासे ॥ तेवीं संतकृपासौरसें ॥ ग्रंथु विकासे अर्थावबोधें ॥ ९१ ॥ तेंचि कृपेनें तत्त्वतां ॥ अर्थिलं श्रीभागवता ॥ आतां पंचमाध्यायीं कथा ॥ सावधान श्रोता अवधारिजे ॥ ९२ ॥ राजा प्रश्न करील गोड ॥ जो परिसतां पुरेल कोड ॥ साधकांची उपशमेल चाड ॥ होय निवाड धर्माधर्माचा ॥ ९३ ॥ जेथ भजनाभजन हातवटी ॥ प्रश्नोत्तरें कथा गोमटी ॥ अतिशयें रसाळ गोठी ॥ जेणें सुटे गांठी अधर्माची ॥ ९४ ॥ तें उत्तमोत्तम निरूपण ॥ भरीन संतांचे श्रवणें ॥ जनार्दनकृपा पूर्ण ॥ एका जनार्दन सांगेल ॥ ९५ ॥ अंगीं वारियाचेन संचरणें ॥ घुमारा घुमों लागे तेणें ॥ तेवीं एका जनार्दनें ॥ कविता करणें निजांगें ॥ ९६ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे निमिजायंतसंवादे एकाकारटीकायां चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ॥ २३ ॥ ओंव्या ॥ २९६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

१कोंडमारा. २ दुर्बलांचे. ३ राजांत, ४ श्रीविष्णुस. ५ स्वधर्माचें ' जीवित ' अधर्मानें पीडित होऊं लागलें म्हणजे. ६ तडाका, सपाटा. ७ खड्गधारी. ८प्रभात पडे. ९चतुर्गुणित होई. १० रहाटीनें, मार्गानें. ११ वागतील. १२ संक्षिप्त. १३ चित्त. १४ भरे १५ चंद्रकिरणांनीं. १६ तोंड उघडतें. १८ इच्छा' गरज. १८कान, १९ वाऱ्याचें. २० फुगा. २१ शब्द करूं लागे. २२जनार्दनस्वामींनीं.

०भा. मो. मार्गस्था लागती कोंडु. ×मो. निधान. ⁸ मा. निरुपमा. 0ना. मो. जाल्या.

# अध्याय पांचवा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐ नमो देवा उदारा ॥ ह्मणतां, कृपण तूं खरा । मागते आपलिया *घरा ॥ दुजेपणें ×दारा येऊं नेदेसी ॥ १ ॥ अवचटें मागतयासी ॥ जैं भेटी होय तुजसी ॥ तैं 'घोटं भरूं' धांवसी ॥ देखतांचि 'घेसी जिवें' त्यातें ॥ २ ॥ जे जे +मागों येती तुजपासी ॥ ते बोधोनि ऐक्यतेमाजी ठेसी ॥ शेखीं त्यांचे सोडवणेसी ॥ भेटी दुसऱ्यासी स्वप्नींही नव्हे ॥ ३ ॥ अणुमात्र तुझी प्राप्ती ॥ अवचटें चढे ज्याचे हातीं ॥ त्याचिये संसारसंपत्ती ॥ सर्वस्वें निश्चितीं नाडिसी तूं ॥ ४ ॥ भेदांचा विडा घेतां ॥ तो प्रवर्ते आपुले घाता ॥ तेवीं तुझी प्रसन्नता ॥ झालिया जीविता स्वयें नाशी ॥ ५ ॥ जे जे तुजपें +मागों आले ॥ ते ते सर्वस्वें नागवले ॥ शेवटीं नागवे तुवां केले ॥ निर्लज्ज झाले तिहीं लोकीं ॥ ६ ॥ ऐशी तुझी निर्वाणगती ॥ त्या तुझी उदार कीर्ती ॥ घडे ह्मणशी कैशा रीतीं ॥ ते अगाध स्थिती अवधारीं ॥ ७ ॥ मागें 'उदार वाखाणिले ॥ तही आपणिया वेगळे केले ॥ मग सर्वस्व आपुलें ॥ दान दीधलें दातृत्वें' ॥ ८ ॥ षड्गुणैश्वर्यैंभैंवेसी ॥ आपणियातें दाना देसी ॥ दीधलें तें घेवों नेणसी ॥ कदाकाळेंसी कल्पांतीं' ॥ ९ ॥ आपणियां दीधलें दान ॥ यालागीं तूं दासां आधीन ॥ मग त्याचेनि छंदें जाण ॥ सर्वस्वें आपण नाचसी ॥ १० ॥ बळीनें सर्वस्व केलें दान ॥ शेखीं तूं झालासि त्या आधीन ॥ त्याचें द्वारपाळपण ॥ अद्यापि आपण चालविसी ॥ ११ ॥ धर्मे अर्पिलें अग्रपूजेसी ॥ शेखीं तूं त्याची सेवा करिसी ॥ नानासंकटें स्वयें सोशिसी ॥ अंगें काढिसी उच्छिष्टें ॥ १२ ॥ तुझा निजभक्त अंबरूषी ॥ त्याचे गर्भवास तूं सोशिसी ॥ तुज गौळें राखिती हृषीकेशी ॥ शेखीं त्या गोकुळांसी रक्षिलें ॥ १३ ॥ एवं ०स्वस्वरूपता द्यावयासी ॥ उदारत्व तुजपासीं ॥ हें नयेगा आणिकासी ॥ हृषीकेशी कृपाळुवा ॥ १४ ॥ तो तूं परम उदार ऐसा ॥ राया रंका समभावें सरिसा ॥ भाव तेथें भरंवसा ॥ तूं आपैसा आतुडसी ॥ १५ ॥ त्या तुझिया प्राप्तीलागीं ॥ कपाटें सदा 2सेविती योगी ॥ एक ते झाले भोगविरागी ॥ एक ते त्यागी सर्वस्वें ॥ १६ ॥ एक हिंडती दशदिशे ॥ एक तुजलागीं झाले पिसे ॥ परी तुझी भेटी स्वप्नीं दिसे ॥ ऐसा नदिसे क्षण एक ॥ ॥ १७ ॥ ऐशियाही तुझी प्राप्ती ॥ सुलभ असे एके रीतीं ॥ जरी संतचरणीं रती ॥ अतिप्रीती सप्रेमें ॥ १८ ॥ संतचरणीं जो विनटला ॥ तो निजप्राप्तीसि पावला ॥ संतस्वरूपें अवतरला ॥ स्वयें संचला परमात्मा ॥ १९ ॥ यालागीं जीं जीं संतांचीं रूपें ॥ तीं तीं श्रीहरीचीं

---

१ मागणारे, याचक. २ भिन्नभावानें. ३ सहज, नकळत, एकाएकी. ४प्राण घेण्यास. ५ आत्मसात् करितोस. ६ ठकवितोस, निर्जवितोस. ७ नाहींशी करिशी. ८ फांसेगाराचा, घातक्याचा. ९ तुजपाशीं. १० सर्व प्रकारानें. ११सह. १२ स्वतःस. १३ धर्मराजानें. १४ राजसूयांत प्रथम श्रेष्ठपूजा. १५ उष्टया पत्रावळी. १६ अनायासें. १७ मिळसी. १८गुहा. १९भोगाविषयीं विरक्त. २० रंगून गेला. २१ स्वरूपास मिळाला.

*मो. द्वारा. ×मो. घरा. +मो. सांगों. ०ना. स्वस्वरूप मो. सुखरूप. 2ना, सोधिती.

स्वरूपें ॥ म्हणोनि संतांचिये कृपें ॥ अतिसाक्षेपें अर्जावें ॥ २० ॥ ते[3] ज्ञानार्थाचे परम पिसे ॥ यालागीं ग्रंथाचेनि मिसें ॥ त्यांचे चरण अनायासें ॥ सावकाशें वंदीन ॥ २१ ॥ त्यांचे चरणावलोकन ॥ तें *मज नेत्रींचें अंजन ॥ चरणकृपा पाहतां जन ॥ श्रीजनार्दन प्रकाशे ॥ २२ ॥ तया जनार्दनाचिये सेवें ॥ गुरुत्वाचेनि अडनांवें ॥ रिघालों निजस्वभावें ॥ जीवेंभावें भजनासी ॥ २३ ॥ भज्य भजक भजना ॥ एके अंगीं त्रिविध भावना ॥ दावूनियां जगजीवना ॥ जनीं जनार्दना निजभक्ती ॥ २४ ॥ हे अभेदभक्ती चोखडी ॥ परम ऐक्यें भजनगोडी ॥ अधिकाधिक चढोवढी ॥ चढे आवडी निजभक्तां ॥ २५ ॥ देव आपली सर्वस्व जोडी ॥ वेंची भक्तांचिये वोढी ॥ ऐशी अभेदभक्तीची गोडी ॥ पंढियें गाढी गोविंदा ॥ २६ ॥ यालागीं भक्तांचा शरीरभार ॥ स्वयें वागवी श्रीधर ॥ आपुलेनि अंगें परपार ॥ पाववी साचार निजभक्तां ॥ २७ ॥ निजभक्तांचा देहभावो ॥ निजांगें वागवी देवाधिदेवो ॥ तरी अभक्तांचा देहो ॥ वागवावया पहाहो काय आन आहे ॥ २८ ॥ भक्तां नाहीं देहअहंता ॥ यालागीं देवो वागविता ॥ पूर्ण देहाभिमान अभक्ता ॥ त्यासि अतिबद्धता या हेतू ॥ २९ ॥ 'यालागीं जो निरभिमान ॥ तोचि भगवद्भक्त संपूर्ण ॥ ज्यांच्या अंगीं देहाभिमान ॥ त्यांसि भक्तपण कदां नघडे' ॥ ३० ॥ निजभक्त तारितां कौतुकें ॥ त्याची रोमावळी केवीं दुखे ॥ निर्भय करूनि पूर्णपरिखें ॥ देवो निजसुखें निजभक्त तारी ॥ ३१ ॥ यालागीं निरभिमानता ॥ जे विनटले भक्तिपथा ॥ ते पाय देवोनि विप्रांचे माथां ॥ पावती तत्त्वतां भगवत्पद ॥ ३२ ॥ भक्तांची ऐशी स्थिती ॥ तरी अभक्तां कवण गती ॥ तेंचि पुसावया नृपती ॥ प्रश्नार्थीं प्रवर्ते ॥ ॥ ३३ ॥ पंचमामाजी निरूपण ॥ अभक्तांची गति लक्षण ॥ युगायुगीं पूजाविधान ॥ सांगेल भजन हरीचें ॥ ३४ ॥ अवतारचरित्र पुरुषार्थ ॥ सांगोन संपला चतुर्थ ॥ आतां अभक्तांचा वृत्तांत ॥ राजा पुसत मुनीसी ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ भगवंतं हरिं प्रायो न भजंत्यात्मवित्तमाः ॥ तेषाम-शांतकामानां का निष्ठाऽविजितात्मनाम् ॥ १ ॥

॥ टीका ॥ राजा म्हणे जी मुनिवरा ॥ जो ०भगवद्भजना पाठिमोरा ॥ ऐशिया अभक्ता नरा ॥ कोण दातारा गति त्यासी ॥ ३६ ॥ जे कामालागीं अतिउद्भट ॥ जे सक्रोध क्रोधें तेजिष्ठ ॥ जे अतिलोभें लोभिष्ठ ॥ जे परमश्रेष्ठ प्रपंचीं ॥ ३७ ॥ जे गर्वाचे-अग्रगेणी ॥ जे अहंकाराचे चूडामणी ॥ जे विकारांची प्रवाहश्रेणी ॥ जे उपडली खाणी विकल्पाची ॥ ३८ ॥ ज्यांचे सद्बुद्धी आड आभोळ ॥ महामोहाचें सदा सबळ ॥ जे छलनार्थीं अतिकुशल ॥ जे अति-प्रबळ प्रलोभें ॥ ३९ ॥ 'दिवसां न देखती निश्चितें ॥ ते अंधारीं देखणीं दिवांभीतें ॥ तेवीं नेणोनि परमार्थातें ॥ जे अतिज्ञाते प्रपंचीं' ॥ ४० ॥ जे नेणती आत्महित ॥ ज्ञान विकूनि कामें पोशित ॥ ऐसे जेकां अभक्त ॥ त्यांची गति निश्चित सांगा मज ॥ ४१ ॥ तुम्हा ऐसे

---

१ यत्नानें. २ संपादावें. ३ संत. ४ वेडे, शौकी. ५ चरणाचें पाहणें. ६ टोपणाखालीं. ७ अति-प्रिय. ८ भक्ताचे कैसाला तरी दुःख कोठून होईल. ९ महागर्वी. १० नदी. ११ ढगाळ. १२ छळण्याचें कामी. १३ घुबडें. १४ विषयप्रीतीस.

*ना. मो. नयनींचें. ०मो. भगवद्भक्ती पाठिमोरा.

सद्बुद्धी ॥ चालते बोधाचे उदधी ॥ भाग्यें लाधलों ज्ञाननिधी ॥ हा प्रश्न विशुद्धी सांगावा ॥ ॥ ४२ ॥ राजा साक्षेपें बहुवस ॥ पुसे अभक्तांची गतिविन्यास ॥ तो सांगावया चमस ॥ सावकाश सरसावला ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ चमस उवाच ॥ मुखबाहूरुपादेभ्यः पुरुषस्याश्रमैः सह ॥ चत्वारो जज्ञिरे वर्णा गुणैर्विप्रादयः पृथक् ॥ २ ॥

॥ टीका ॥ जोकां जगाचा जनक ॥ मुख्य गुरुत्वें तोचि एक ॥ त्यासि नभजे जो अविवेक ॥ तो नाडला लोक सर्वस्वें ॥ ४४ ॥ पुरुषापासूनि जन्मले जाण ॥ चाऱ्ही आश्रम चाऱ्ही वर्ण ॥ त्यांचे उत्पत्तीचें स्थान ॥ ऐक संपूर्ण नृपनाथा ॥ ४५ ॥ मुखीं वेदविद ब्राह्मण ॥ बाहू जन्मले राजन्य ॥ ऊरू जन्मले वैश्यवर्ण ॥ चरणीं जन्मस्थान शूद्रवर्णा ॥ ४६ ॥ ×मुळीं अवघे तिन्ही गुण ॥ गुणयोगें वर्ण जाण ॥ त्रिगुणीं चारी वर्ण ॥ जन्मलक्षण घडे कैसें ॥ ४७ ॥ 'सत्वगुणें शुद्ध ब्राह्मण ॥ सत्वरजमिश्रें राजे जाण ॥ रजतमें वैश्यवर्ण ॥ केवळ तमोगुण शूद्रवर्णे ' ॥ ४८ ॥ क्षत्रिय वैश्य आणि ब्राह्मण ॥ द्विजन्मे हे तिन्ही वर्ण ॥ त्यांसि गायत्री, वेदाध्ययन; ॥ शूद्र ते जाण संस्काररहित ॥ ४९ ॥ ब्रह्मचर्य आणि गार्हस्थ्य ॥ तिहीं वर्णां अवश्यप्राप्त ॥ चहूं आश्रमां आश्रयभूत ॥ जाण निश्चित ब्राह्मण ॥ ५० ॥ 'गार्हस्थ्य पुरुषाच्या चरणीं ॥ ब्रह्मचर्य, हृदयस्थानीं ॥ वक्षःस्थळीं 'वसती वनीं ' ॥ शिरोमणी संन्यास ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ य एषां पुरुषं साक्षादात्मप्रभवमीश्वरम् ॥ नभजंत्यवजानंति स्थानाद्भ्रष्टाः पतंत्यधः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ हे ब्राह्मणादि वर्ण पाहाहो ॥ ज्यापासोनि जन्मप्रभवो ॥ तो न भजतां देवाधिदेवो ॥ उत्तम देहो अधःपाती ॥ ५२ ॥ पूर्वोत्तर मीमांसा दोनी ॥ नानाशास्त्रार्थकंडमणी ॥ स्वरूप बोलती *निर्वाणीं ॥ एवं शब्दज्ञानी अतिचतुर ॥ ५३ ॥ यापरी जे पंडित ॥ ज्ञानाभिमानें अतिउन्मत्त ॥ तेणें अभिमानेंचि येथ ॥ भजनीं निश्चित विमुख केले ॥ ५४ ॥ एक अज्ञान सर्वथा ॥ स्वप्नीं नेणती परमार्था ॥ ते नेणपणेंचि तत्वतां ॥ श्रीजगन्नाथा न भजती ॥ ५५ ॥ 'शेळी उसांची चवी गाढी ॥ नेणोनि पाचोळा कुरंडी ॥ तेवीं नेणोनि हरिभक्तीची गोडी अज्ञानें बापुडीं विषयलुब्ध ' ॥ ५६ ॥ आलोडूनि वेदशास्त्रार्थ ॥ ज्ञातेपणें जे पंडित ॥ गर्वें हेळसिती भक्तिपंथ ॥ अति उन्मत्त ज्ञातृत्वें ॥ ५७ ॥ 'जेवीं ज्वरिताचें मुख ॥ दूध मानी कडूविख ॥ तेवीं ज्ञानगर्वें पंडित देख ॥ ठेले विमुख हरिभजनीं' ॥ ५८ ॥ यापरी ज्ञानाभिमानी ॥ विमुख झाले हरिभजनीं ॥ ते जरी वर्णांमाजीं अग्रगणी ॥ तरी अधःपतनीं पडतील ॥ ५९ ॥ होकां वर्णांमाजीं अग्रगणी ॥ जो विमुख हरिचरणीं ॥ त्याहूनि श्वपच श्रेष्ट मानी ॥ जो भगवद्भजनीं प्रेमळ ॥ ६० ॥ आम्ही मुक्त हें मानुनी ॥ जे विमुख भगवद्भ-

१ समुद्र. २ अविचारी. ३ फसला. ४ विराटपुरुषापासून. ५ वेद जाणणारे ६ क्षत्रिय, ७ मांडीपासून. ८ गृहस्थाश्रम. ९ आधार. १० वानप्रस्थ. ११ शिरोरत्न, श्रेष्ठ. १२ जन्माचा मोठेपणा. १३ वाटावाट, विचार. १४ चारी. १५ मनांत घोळून, मंथन करून, शोधून. १६ हेळणा करिती. १७ चांडाळ.

×मो. मुळीं अवघे निर्गुण. *ना. निर्वचुनी.

जनीं ॥ ते पचिजेती अधःपतनीं ॥ तिर्यक्‌योनी जन्ममरणें ॥६१॥ मनुष्यदेहीं जे भजननष्ट। ते होतीगा स्थानभ्रष्ट ॥ अधःपातें भोगिती कष्ट ॥ अतिउद्भट ×यातना ॥ ६२ ॥ ज्ञानाभिमानें जे न भजती ॥ ते प्रौढपतनीं पचिजेती ॥ अज्ञानांही तेचि गती ॥ सर्वथा नृपती ह्मणों नये ॥ ६३ ॥

|| श्लोक || दूरे हरिकथाः केचिद्दूरे चाच्युतकीर्तनाः || स्त्रियः शूद्रादयश्चैव तेऽनुकंप्या भवादृशाम् || ४ ||

॥ टीका ॥ एक पित्याचे दोघे अर्भक ॥ एक प्रबुद्ध, एक बाळक ॥ +पित्यासि अपमानित देख ॥ ताहीं जनक प्रबुद्धासीं ॥ ६४ ॥ बाळक पित्याचे माथां चढे ॥ जरी लाता हाणे तयाकडे ॥ तरी त्यासि दोष नघडे ॥ दोषाचें सांकडें सज्ञानासी ॥ ६५ ॥ ज्ञात्यापासोनि भजन ठाके ॥ ते कवळीजती महादोखें ॥ अज्ञानें तरती भाविकें ॥ साधुकृपामुखें अनुग्रहितां ॥ ॥ ६६ ॥ अज्ञाना नाहीं ०विशेष बाध ॥ तो साधुविश्वासें होय शुद्ध ॥ ज्ञानाभिमानियां भाव विरुद्ध ॥ यालागीं सुबद्ध दोष बाधी ॥ ६७ ॥ *अज्ञानी विश्वासें साधु वंदी ॥ ॥ ज्ञानाभिमानी दोहींतें निंदी ॥ यालागीं त्यातें त्रिशुद्धी ॥ अवश्य बाधी अतिदोष ॥ ६८ ॥ साधुविश्वासें अज्ञान फिटे ॥ ज्ञानाभिमानियां विकल्प मोठे ॥ त्यांसि विश्वास कदा न घटे ॥ अभिमानहटें अधःपात ॥ ६९ ॥ ' एवं विचारितां नेटेंपाटें ॥ अहंतेचें बंधन मोठें ॥ अभिमानाऐसें नाहीं खोटें ॥ दुजें वोखटें त्रिलोकीं ' ॥ ७० ॥ अभिमान ईश्वरा बाधी ॥ तोही सेवेळ कीजे सोपाधी ॥ अभिमानें देहबुद्धी ॥ बाधक त्रिशुद्धी सुरनरांसी ॥ ७१ ॥यालागीं जे अज्ञान जन ॥ ज्यांसि नाहीं ज्ञानाभिमान ॥ तेहीं विश्वासल्या संपूर्ण ॥ साधुसज्जन अनुग्रहो करिती ॥ ७२ ॥ ज्यांसि ह्मणती नीच वर्ण ॥ स्त्रीशूद्रादि हीन जन ॥ ज्यासि कां दूरी शास्त्रश्रवण ॥ ज्यासि दूरी स्मरण वेदोक्त ॥ ७३ ॥ ज्यासि झाल्या सद्भाव संपूर्ण ॥ ते होतकां हीन जन ॥ परी संतकृपेसि आयतन ॥ विश्वासें पूर्ण अधिकार झाला ॥ ७४ ॥ ऐसें पूर्ण भावार्थी ॥ त्यांसि तुझा ऐसा साधुसंती ॥ अनुग्रहोनि तारिती ॥ कृपामूर्ती कृपाळु ॥ ७५ ॥ अज्ञानी यापरी तरती ॥ परी ज्ञानाभिमान ज्यांच्या मतीं ॥ ते ब्रह्मादिकां न तरती ॥ त्यांचीही स्थिती मुनि सांगे ॥ ७६ ॥

|| श्लोक || विप्रो राजन्यवैश्यौ च हरेः प्राप्ताः पदांतिकम् || श्रौतेन जन्मनाऽथापि मुह्यंत्याम्नायवादिनः || ५ ||

॥ टीका ॥ अज्ञान जे नीचवर्ण ॥ ※भावें धरोनियां संतचरण ॥ निजविश्वासें संपूर्ण ॥ जन्ममरण निरसिती ॥ ७७ ॥ येरें द्विजेन्मे जेकां तिन्ही ॥ स्वभावें प्राप्त हरिचरणीं ॥ आह्मी 3अधिकारी वेदज्ञानी ॥ जन्माभिमानी अतिगर्वी ॥ ७८ ॥ जन्माभिमान कर्माभिमान ॥ अग्रपूज्यत्वें पूज्याभिमान ॥ अल्पमात्र वेदींचें ज्ञान ॥ तो वेदाभिमान वादविती ॥

---

१ पश्वादिजन्मांत. २ मोठ्या अधःपातातें. ३ अपत्य. ४ जाणता. ५ अज्ञान. ६ परिश्रमानें. ७ अहंकाराचें. ८ वाईट ९ ईश्वरही. १० बळेंच. ११ उपाधियुक्त. १२ स्थान. १३ दया करून. १४ दुसरे, १५ द्विज ( ब्रह्म, क्षत्र, वैश्य, )

×ना. वासना. +मो. पिता अवमानिता. ०ना. विषयबाध. *ना. मो. अज्ञान. ※मो. भावें करोनी संचरण. 3ना. अधिकारी या वेदज्ञानी.

॥ ७९ ॥ ज्यांसि प्राप्त उपनयन ॥ ज्यांसि प्राप्त गायत्री पूर्ण ॥ ज्यांचें हरीसी आवडे भजन ॥ त्यांचे धरितां चरण हरि भेटे ॥ ८० ॥ ऐसे उत्तम जे ब्राह्मण ॥ त्यांसि वेदवाद ज्ञानाभिमान॥ तेणें गर्वें पडे मोहन ॥ तेंचि निरूपण विशद सांगे ॥ ८१ ॥

॥ श्लोक ॥ कर्मण्यकोविदाः स्तब्धा मूर्खाः पंडितमानिनः ॥ वदंति चाटुकान्मूढा यया माध्व्या गिरोत्सुकाः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ नकळे विधिविधानमंत्र ॥ कोणे कर्मीं कैसें तंत्र ॥ नेणोनियां, गर्व थोर ॥ ताठा अपार ज्ञातृत्वाचा ॥ ८२ ॥ गागोडियासि विद्या थोडी ॥ परी सर्वांगीं बिरुदें गाढीं ॥×कां जाणीवपणें जोडी ॥ केडोविकडी आसनपूजा ॥ ८३ ॥ देखोनि पैतंगाचे ढाळ ॥ स्फटिका अंगीं माणिककिळ ॥ तैसे मूर्खही केवळ ॥ मिरविती प्रबळ ज्ञानाभिमानें ॥ ८४ ॥ आपण विधान नेणती ॥ शेर्वी मज्ञानाही न पुसती ॥ कर्म आपमतीं करिती ॥ लौकिकीं ॑स्फिती वादवावया ॥ ८५ ॥ मिथ्या मधुरशब्दें चौटुक ॥ जे भोगीं अणुमात्र नाहीं सुख ॥ तरी इहामुत्र भजविती लोक ॥ अप्सरादिक भोगलिप्सीं ॥ ८६ ॥ 'येथें भोग भोगावे चोखडे॥ आणि पुढें स्वर्गभोग जोडे ॥ येणें वचनें बापुडे ॥ यागाकडे धांवती' ॥ ८७ ॥ कर्ता सर्वस्वें नागवो ॥ परी आचार्यत्व आम्हां येवो ॥ ऐशियाचि बुद्धी पाहाहो ॥ यागप्ररोहो आरंभिती ॥ ८८ ॥ यावया अतिप्रतिष्ठा ॥ नानाकर्मांच्या कर्मचेष्टा ॥ करूनि दाविती खटपटा ॥ कर्मारंभ मोठा आरंभूनी ॥ ८९ ॥ नातरी जैसा मद्यपानी ॥ मद्यरसा अमृत मानी ॥ त्या वचनगोडिया +मद्यपानीं ॥ प्रवर्तिजे जनीं स्वादलिंप्सा ॥ ९० ॥ तें सेविलियां काय जोडे॥ थिती सावधानता बुडे ॥ मग दुर्भगत्व रोकडें ॥ पिशाचत्व गाढें अंगीं वाजे ॥ ९१ ॥ तैसें केवळ पतनात्मक ॥ त्या नाव म्हणती स्वर्गसुख ॥ जाणोनि प्रवर्तती मूर्ख ॥ फळकामुक अभिलाषी ॥ ९२ ॥ उंडणी लंघूं नशके भिंतीसी ॥ तरी ॥ चढोंरिघे ते मायासीं ॥ चढतां पडे आपैसी ॥ तेवीं स्वर्गसुखासी दृढपतन ॥ ९३ ॥ कर्माभिनिवेश-पांडिपाडें ॥ कामलोभ दृढ वाढे ॥ तेणें दांभिक करणें घडे ॥ क्रोधाचें चढे महाभरितें ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ रजसा घोरसंकल्पाः कामुका अहिमन्यवः ॥ दांभिका मानिनः पापा विहसंत्यच्युतप्रियान् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ ते काय करितील बापुडे ॥ शुद्धसत्वें मांडिलें कुडें ॥ मग रजोगुणें कामाकडे ॥ झाले धडफुडे अतिकामी ॥ ९५ ॥ तेव्हां उर्वशीच्या अतिआवडी ॥ स्वर्गभोगाची अतिगोडी॥

---

१ मौंजी. २ भूल. ३ ज्ञानेपणाचा. ४ तोर, तोडे, अजिंक्यपत्रें. ५ चढावोढीनें. ६ एक रंगाचें लाकूड. (तांबडे) ७ (त्याचे) रसाचीं पुटें. ८ प्रभा, तेज. ९ अनुष्ठान पद्धति. १०शेवटीं, गर्वानें. ११ आपल्या बुद्धीनें. १२ महात्म्यें, थोरवी. १३गुळचट बोलणारे चपळ. १४ भोगलाभाचे इच्छेनें. १५ यज्ञाकडे. १६ भिकारी होवो. १७ यज्ञांतील उपाध्यपण. १८ यज्ञप्रस्ताव. १९ रुची घेण्याचे इच्छेनें, लोभानें. २० मद्य. २१ असलेली. २२ शुद्धि. २३ दुर्भाग्य. २४ फळाची इच्छा करणारे. २५ चींड. २६ आपले आपण २७ कर्माभिमानाचे. २८ बरोबरीनें. २९ पुरते.

×मो. का जाणी जाणपणें जोडी. ॑ना. स्फुर्ती. +ना. मद्यालागोनि.

यालागीं यागपरवडी ॥ पुण्याची +जोडी जोडूं धांवे ॥ ९६ ॥ तेथें मंत्रतंत्रद्रव्यशुद्धी ॥ नाहीं यागयजनविधी ॥ तेणें स्वर्ग नव्हेचि त्रिशुद्धी ॥ *ठकले दुर्बुद्धी अविहिताचारें ॥ ९७ तया अलब्धकामासाठीं ॥ सर्वांगीं क्रोध उठी ॥ जेवीं परिपाकापाठीं ॥ धरी कडुवट ×आंबिलकांजी ॥ ९८ ॥ जंवजंव पिकिजे 5कोरिफडें ॥ तंवतंव कडूपण गाढें ॥ तैसा काम नाशापुढें ॥ क्रोध वाढे अत्युग्र ॥ ९९ ॥ क्रोध काळियानाग होय खरा ॥ ०द्वेत द्वेषांच *फुंफकारा ॥ पूज्यतेचा खरा ॥ घाली धुधुःकारा साधुनिंदेचा ॥ १०० ॥ ऐसा क्रोधाच वेसांटा ॥ होय तमाचा चोहटा ॥ मग दंभाचे नेनवटा ॥ हीन कसाचा खोटा विकरा मांडी ॥ १ ॥ मग जो जो भेटे प्राणिया ॥ त्यासि अभिचार यागक्रिया ॥ लावूनि बाहेर मुद्रियां ॥ पापाचारें पापिया प्रवृत्ति मांडी ॥ २ ॥ स्वधर्माचा फोडोंवाडें ॥ प्रतिपदीं पाडा पेंडे ॥ अधर्मांची खाणी उघडे ॥ समूळ कुडें कर्माचरण ॥ ३ ॥ तेणें पापाचार पिके ॥ गगनचुंबित जाहलीं टेंकीं ॥ मग अधमोत्तम ऐकैकें ॥ घालिती यथासुखें अधर्मघालणी ॥ ४ ॥ तेथें ठाणें देऊनि अभिमाना ॥ वाढविती ज्ञानाभिमाना ॥ मग निंदिती साधुजना ॥ विपुल्ता सज्जना उपहासयुक्त ॥ ५ ॥ जगीं सर्वत्र पाहती दोष ॥ तथापि देखिल्याहीं निर्दोष ॥ तरी करूनियां उपहास ॥ करिती आवश्यक असदारोप ॥ ६ ॥ यापरी 0अभिमानविदा ॥ पापवुद्धीची दृढबाधा ॥ सहजानुवादें सदा ॥ साधुनिंदा अनुवादती ॥ ७ ॥ जेका हरीतें आवडती ॥ जे सदा करिती हरिभक्ती ॥ त्यांतें सदा उपहासिती ॥ अनुवादती गुणदोष ॥ ८ ॥ द्विज- स्मरती हरिनाम ॥ त्यानांव म्हणती अधर्म ॥ ऐकोनि हरिकीर्तनसंभ्रम ॥ म्हणती हें परम महापाप ॥ ९ ॥ ऐसा जो हरिनामातें निंदी ॥ हरिकीर्तनीं दुष्टबुद्धी ॥ तो खळ जाणावा त्रिशुद्धी ॥ भजनापवादी दुर्जन ॥ ११० ॥

॥ श्लोक ॥ वदंति तेऽन्योन्यमुपासितस्त्रियो गृहेषु मैथुन्यसुखेषु चाशिषः ॥

यजंत्यसृष्टान्नविधानदक्षिणं वृत्त्यै परं घ्नंति पशूनतद्विदः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ स्त्रीकामें अतिकामुक ॥ मैथुनापरतें नाहीं सुख ॥ येणें भ्रमें 6का मूर्ख ॥ स्त्रिया आवश्यक उपासिती ॥ ११ ॥ यापरी मंदबुद्धी ॥ कैसे संवादती शब्दीं ॥ 'मनुष्यजन्में हेंचि सिद्धि ॥ नानाभोगविधी भोगाव्या स्त्रिया ' ॥ १२ ॥ जें स्त्रीभोगीं निसय सुख ॥ तें त्यागविती ते अतिमूर्ख ॥ वैराग्य 7मिसें लोक ॥ ठकिले देख महामूढीं ॥१३॥ सांडूनि गृह- भोग अंगना ॥ जयां वैराग्यें उद्भटभावना ॥ ते निजकर्में दंडिले जाणा ॥ नागवूनि वना दवडिले देवें ॥ १४ ॥ काय गृहाश्रमीं देव नसे ॥ मग वना धांवताती पिसे ॥ साचचि देव

---

१ उपचारानें, उपायानें. २ वेदबाह्य आचरणानें. ४ पक्की शिजल्यानंतर. ४ कडूपणा. ५ पेज. ६ कोरफड,कुंवरकांडें. ७अतिशय. ८ फूत्कार. ९तस्ती होते गादी स्थापित होते.१० नाणें विक्रीचे जागीं.११ जारणमारणादि. १२ मुद्रा, १३ मोठेपणानें.१४ पाडा पडतो, वाचतो. १५ खोटें. १६ टेंकडी.१७ सारखें. १८ पुष्कळपणें. १९ खोटे घाणेरे आरोप. २० उच्चारतात. २१ कामानें व्याप्त, २२ प्रार्थिती.

+मो. कोडी. *मो. ठकपडे. ×मो. ना. अंबलकांजी. 5ना मो. कारिफडे. ०ना. द्वैत *ना. फुत्कारा. मो. फुंफकारा. 0ना. अभिमानमैदा. 6ना. काममूर्ख. 5मो. सांग. 7ना. पिसें.

वनीं वसे ॥ तरी कां मृग, ससे, न तरती व्याघ्र ॥ १५ ॥ घालोनियां आसनें ॥ देव भेटता
जरी ध्यानें ॥ तरी बकाचीं पोळींगणें ॥ कांपां तत्क्षणें नुद्धरती ॥ १६ ॥ एकांतरहिवास
विवरीं ॥ तेथेंचि भेटता श्रीहरी ॥ तरी न तरोनियां उंदिरीं ॥ कां पां घरोघरीं चिंवैताती ॥
॥ १७ ॥ देव सर्वज्ञ चोखडा ॥ तेणें पशुपक्षियां केला जोडा ॥ तोही लोकीं मानानियां वेडा ॥
त्यागाचा गादा [1]पाडिला मोळों ॥१८॥ 'आनंदा उपस्थ एकायतन' ॥ हें देवाचें वेदवचन ॥
तेंही न मानानि अज्ञान ॥ त्यागाचें संपूर्ण मांडिती बंड ॥ १९ ॥ मैथुनीं परम सुख ॥ देवेंचि
रचिलें देख ॥ तेंही त्यागोनियां मूर्ख ॥ वीतरागें लोक संन्यासी होती ॥ १२० ॥ जे जगा-
माजी केवळ पिशी ॥ ते स्वयें होती संन्यासी॥ देवें दंड देऊनी त्यांसी ॥ लाविलें भिकेसी
दारोदारीं ॥ २१ ॥ त्यागोनियां निजस्त्रियेसी ॥ कर्मत्यागें होतीं संन्यासी ॥ तो स्त्रीशापें बाधी
त्यांसी ॥ मागता भिकेसी पोट न भरे ॥ २२ ॥ हातावरी पावले दंडू ॥ खेंडे मिशा केले
मुंडू ॥ हिंडती भगवीं गुंडगुंडु ॥ हा स्त्रीशापें विलेंडु विटंबु केला ॥ २३ ॥ घेऊनियां दोहीं
हातीं ॥ उदंड गांडीसि लाविती माती ॥ त्रिकाळ जळीं बुडविजती ॥ ऐशी स्त्रीशापें स्थिती
लाविली त्यांसी ॥ २४ ॥ लंगोटी लाविली गांडीसी ॥ झोळी लाविली हातासी ॥ त्याहीवरी
दंड देऊनि त्यांसी ॥ स्त्रीशापें संन्यासी लाविले भिके ॥ २५ ॥ स्त्रीसुखापरतें नाहीं सुख ॥
×स्त्रीत्यागापरता नाहीं दोष ॥ हेंचि नेणोनियां मूर्ख ॥ दंडिले अनेक वैराग्यत्यागें ॥ २६ ॥
स्त्रीसंगवीण विविधभोग ॥ ते जाणावे अतिउद्वेग ॥ निजभाग्यें जे सभाग्य सांग ॥ ते स्त्रीयोगें
भोग भोगिती नाना ॥ २७ ॥ हेंचि देवाचें प्रसन्न होणें ॥ जे सदा इष्टभोग भोगणें ॥ ते भोग
जेणें त्यागणें ॥ तेंचि क्षोभणें देवाचें ॥ २८ ॥ स्त्रियादिभोग त्यागिले रोकडे ॥ पुढें निजमोक्ष हें
वचन कुडें ॥ यापरी भोळे लोक बापुडे ॥ वैराग्यवादें +कुडें नाडिलें येथें ॥२९॥ ऐसि-
ऐसिया अनुवादा ॥ करिती परस्परें संवादा ॥ म्हणती त्यागाची बुद्धि कदा ॥ आम्हांसि
गोविंदा देऊं नको ॥ १३० ॥ त्याग करोनि भीक मागणें ॥ त्यापरीस भलें मरणें ॥ मुक्ति-
देखिली नाहीं कोणें ॥ आपदा भोगणें जग देखे ॥ ३१ ॥ कोणासि तरी मुक्ती ॥ कोठें तरी
देखिजेती ?॥ तरी ते साच मानें येती ॥ मिथ्या वदती वैराग्य त्यागा ॥ ३२ ॥ ऐशी
त्यागाची करूनि निंदा ॥ भोग भोगावे म्हणती सदा ॥ म्हणोनियां आशीर्वादा ॥ देती सदा
स्वाध्यायासी ॥ ३३ ॥ स्त्रीसुख परम मानून ॥ स्वयें सदा होती स्त्रैण ॥ मग जागृति सुषुप्ति
स्वप्न ॥ स्त्रियेचें ध्यान अहर्निशीं ॥ ३४ ॥ नाहीं सद्‌गुरूचें भजन ॥ नाहीं वृद्धांसि पूजन ॥
नाहीं अतिथींसि अन्न ॥ स्त्री आधीन सर्वस्वें ॥ ३५ ॥ स्त्रियेचें दुखवूंनेदी मन ॥ कदा नुल्लंघी
स्त्रियेचें वचन ॥ नित्य स्त्रियेचें अनुसंधान ॥ सद्भावें उपासन स्त्रियेचें सदा ॥ ३६ ॥ नाहीं
कुळदेवता *कुळवृत्ती ॥ नाहीं पितामातासद्‌गुरुभक्ती ॥ संपत्ती सोंपी स्त्रियेच्या हातीं ॥
आपण सवार्थी ती आधीन वर्ते ॥ ३७ ॥ ते स्त्रीभोग भोगावयांसी ॥ धनार्जन अतीव-
यासी ॥ याग आरंभी जीविकेसी ॥ केवळ दंभेसी उदरार्थ ॥ ३८ ॥

१ समुदाय. २ गुहेंत, बिळांत. ३ चिवचिव शब्द करितात. ४ स्त्रीपुरुषाचा जोडा. ५ रीती, मार्ग. ६ जननेंद्रिय ही एकच आनंदाची जागा आहे. ७ निर्मिलें. ८ वैराग्यानें. ९ यष्टि, शिक्षा. १० स्त्रीचा तळतळाट. ११ कापलेल्या, भादरलेल्या. १२ हाकें. १३ कोरडा, निरर्थक, उमाप. १४ अपकीर्ती. १५ अतित्रास, अपकीर्ति. १६ रात्रंदिवस. १७ अर्पी. १९ निर्वाहार्थ

[1]ना. पाळिला मोळा. मो. पाडिला भोळा. ×ना. स्त्रीत्यागापरतें नाहीं दुःख. +मो. फुडे.
*ना. कुळवृत्ती.

॥ पूर्वश्लोकार्ध ॥ यजंत्यसृष्टान्नविधानदक्षिणं वृत्त्यै परं घ्नंति पशूनतद्विदः ॥

॥ अर्थ ॥ यागें व्हावी सर्वसिद्धी ॥ हेही नाहीं दृढबुद्धी ॥ रोकडिये जीविकावधी ॥ उपाय बुद्धी हाचि केला ॥ ३९ ॥ यज्ञदिक्षेची प्रतिष्ठा ॥ तेणें पूज्य होईन वरिष्ठां ॥ अग्रपूजा माझा वांटा ॥ ऐशिया उत्कंठा आदरिती याग ॥ १४० ॥ ऐशिया नाना विवंचना ॥ आधीं संकल्पूनि मना ॥ मग प्रवर्ते यागयजना ॥ जोडावया धना कृतनिश्चय ॥ ४१ ॥ नपाहे विधिविधाना ॥ नाहीं आदरू मंत्रोच्चारणा ॥ नकरी अन्नसंपादना ॥ कोरडे कणा हवन मांडी ॥ ४२ ॥ मी यज्ञ करितों अंग ॥ ऐसें जगापासीं सांगे ॥ आणि तेणें यागयोगें ॥ चालवे प्रसंगें जीविकायोग ॥ ४३ ॥ स्वयें नेणती विधिविधाना ॥ आणि नपुसती सज्ञाना ॥ पर्वे पशूंचिया हनना ॥ प्रवर्तती जाणा शठ नष्ट दंभें ॥ ४४ ॥ मग तेथिंचा पुरोडाश ॥ सेविती यथासावकाश ॥ आम्ही पवित्र झालों निर्दोष ॥ ऐसाही उल्हास लागती करूं॥ ४५ ॥ गौणता आवाहनविसर्जना ॥ तेथें कैंची पूजा दक्षिणा ॥ सत्पात्रांची अवगणना ॥ करिती हेळना ज्ञानगर्वे ॥ ४६ ॥ केवळ जीविकेच्या आशा ॥ करूं लागती पशुहिंसा ॥ आम्ही याज्ञिक या आवेशा ॥ पिटिती ठसा तिहीं लोकीं ॥ ४७ ॥ केवळ जीविकेचिया दुराशा ॥ अविधी करितां पशुहिंसा ॥ मज दोष होईल ऐसा ॥ कंटाळा मानसा कदा नुपजे ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ श्रिया विभूत्याऽभिजनेन विद्यया त्यागेन रूपेण बलेन कर्मणा ॥
जातस्मयेनांधधियः सहेश्वरान् सतोऽवमन्यंति हरिप्रियान् खलाः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ यापरी वर्ततां स्थिती ॥ त्याहीवरी जाहलिया संपत्ती ॥ तैं गर्वाचा भद्रजाती ॥ तैशिया उन्मत्तीं डुलों लागे ॥ ४९ ॥ कां लेंडिये आला लांदा ॥ वाहवी वोलिया लेंडा ॥ कां मर्कटाचिया तोंडा ॥ मदिरेचा भांडा सांपडे जैसा ॥ १५० ॥ तैसा मी एकज्ञाता कुडा ॥ म्हणोनि नाचे तडतडां ॥ सज्ञान आम्हापुढां ॥ कवण बापुडा आन आहे ॥ ५१ ॥ ऐशियाहीवरी अद्भुता ॥ रत्नें, मोतिलगा, वस्तुजाता ॥ गज वाजी नृपयान प्राप्तता ॥ तेणें गर्वे इंद्रमाथां मोचे +फोडी ॥ ५२ ॥ यज्ञीं यागस्वाहाकारीं ॥ इंद्र आमुची आशा करी ॥ त्याची आम्हाहून थोरी ॥ कैशापरी मानावी ॥ ५३ ॥ मग शिष्यसुहृदसज्जनीं ॥ परिवारल्या सेवकजनीं ॥ मजसमान त्रिभुवनीं ॥ समर्थ कोणी असेना ॥५४॥ जैशी कां कांटीभोंवतीं हरळी ॥ तैशी शिष्यांची मांदियाळी ॥ ते महिमेच्या गर्वमेळीं ॥ मानी पायांतळीं ध्रुवमंडळ ॥ ५५ ॥ जैसें विंचवा विष थोडें ॥ परी प्रबळ वेदनेसि चढे ॥ तेवीं विद्या थोडी परी गाढें ॥ गर्वाचें कुडें अभिमानितें ॥ ५६ ॥ तो अज्ञानांमाजी सर्वज्ञता ॥ मिरवी आपुली योग्यता ॥ जेवीं अंधारी खद्योता ॥ सतेजता झगमगी ॥ ५७ ॥ अल्पज्ञाता विद्येसाठीं ॥ वाचस्पती नाणी दृष्टी ॥ जेवीं मुंगी पांखासाठीं ॥ गरुडाचे पृष्ठीं पाय देऊं पाहे ॥ ५८ ॥ निखळ तांबियाचें नाणें ॥ +देवों रिघे दामोळ्यायेसणे ॥ तेणें आपुलेंनि दातेपणें ॥ मानी ठेंगणें

१ धान्यकणांचें. २ निर्वाह. ३ मारण्यास. ४ यज्ञांतील पिठाचा रोट. ५कर्मी योग्यता. ६ सज्जनाची. ७ छाप. ८ हत्ती. ९ लेंडओहोळ. १० भांडें. ११ पालखी. १२ जोडे फेंकी. १३ समूह. १४ काजव्यास. १५ बृहस्पतीस. १६ पांखामुळें. १७ पाठीवर. १८ बाभळीचे शेंगांतील दाण्याएवढें.

×मो. फोडी. +ना. देवोनी घे.

वळीतें ॥ ५९ ॥ कर्ण दातृत्वें मानिजे फुडा ॥ तोही नर्मदे आज्ञापुढां ॥ प्रत्यहीं भारसुवर्ण कुडा ॥ उपजे तेणें गाढा दाता कर्ण ॥ १६० ॥ आम्ही निजार्जितें वित्तं ॥ दान देवों ×सत्पात्रें ॥ या दातृत्वें कर्णातें ॥ विशेष येथें तो कायी ॥६१॥ सदा अपकाराचि जोडे ॥ त्यासिही अल्प उपकार घडे ॥ इतुकियासाठीं तो *कल्प वाडे ॥ सर्वस्व रोकडें बुडवी +सदा ॥ ॥ ६२ ॥ एवं अल्पदानासाठीं ॥ दातृत्वाचे ०त्रिकुटीं ॥ मेघाच्या परी अतिउद्भटीं ॥ स्वमुखें उठी गर्जत ॥ ६३ ॥ बरवेपणाचेनि पांगें ॥ मदनासि विटवों लागे ॥ सौंदर्यें माझेनि अंगें ॥ दूजें मजजोगें असेना ॥ ६४ ॥ कीं *कावळा बरवेपणासाठीं ॥ राजहंसा नाणी दिठीं ॥ कां आस्वली मानी पोटीं ॥ मीही गोमटी सीं[10]परीस ॥ ६५ ॥ तेवीं बरवेपणाचा जाण ॥ थोर चढे देहाभिमान ॥ जेवीं देखोनि हिरवें रान ॥ [illegible] संपूर्ण उन्मादे ॥ ६६ ॥ यावरी कांहीं एक पराक्रम ॥ केलिया नमानि तीनैही राम ॥ जेवीं गोग्रहणीं संग्राम ॥ शौर्यधर्म उत्तराचा ॥ ६७ ॥ कां अंगींचेनि माजें ॥ रानसोर नमानी दुजें ॥ तैसा बळाचेनि फुंजें ॥ स्वयें गर्जे मुसमुसित ॥ ६८ ॥ ते आधींच म्हणविती सज्ञान ॥ त्याहीवरी याज्ञिक हें महिमान ॥ ते याज्ञिक कर्माचरण ॥ दाविती आपण लोकांप्रती ॥ ६९ ॥ आलिया धनिकजनांप्रती ॥ आपुली स्तविती कर्मस्थिती ॥ मग कर्ममुद्रा नानायुक्ती ॥ स्वयें दाविती लौकिका ॥ १७० ॥ ऐशियाही कर्माचारा ॥ ज्ञातृत्वाचा गर्व पुरा ॥ जेवीं दिवाभीत अंधारा ॥ निघे बाहेरा गुप्तोतु ॥ ७१ ॥ आंजचे लेंडारें[11] पेटे ॥ तेथें ज्योतिज्वाळा कदा नुमटे ॥ परी धुर्कटलें धूपधुपी मोठें ॥ धुंवें थिर्कटे दिग्मंडळ ॥ ७२ ॥ यापरी नाना दंभोपाधीं ॥ अतिगर्वाच्या उन्मादीं ॥ अंध जाहली मदबुद्धी ॥ तो साधूतें निंदी हरिहरांसहित ॥ ७३ ॥ जेवीं दाटलेनि काविळें ॥ दृष्टीस करी पिवळें ॥ मग देखों लागे सकळें ॥ [1]असतां निर्मळें पीतवर्णें ॥ ॥ ७४ ॥ तेवीं निंदोपाधी अतिगर्वी ॥ मंद जाहली प्रज्ञाछवी ॥ मग [3]निर्दुष्टीं दोष लावी ॥ गुह्यातें भावी अतिमलिन ॥ ७५ ॥ जो योगियांच्या मुगुटीं ॥ ज्यातें म्हणती धूर्जटी ॥ त्याची पाहतां राहाटी ॥ दिसे शेवटीं अतिमंद ॥ ७६ ॥ रागें जैसा धांवलें आगीं ॥ यालागीं याज्ञिकांचे शिर भंगी ॥ सकाम तरी मोहनीलागीं ॥ नग्न लागवेगीं पाठी लागे ॥ ७७ ॥ विष्णु सदाचा कपटी ॥ कदा न देखो गुह्यदृष्टीं ॥ वृंदा पतिव्रता गोमटी ॥ तेणें केली शेवटीं व्यभिचारिणी ॥ ७८ ॥ जेणें विष्णु व्यभिचारवाशी ॥ ते वृंदावनीं [2]वृंदेच्यापाशीं ॥ [8]जव्याळ गाव्याळ मिळतीराशी ॥ केवीं साधुत्व त्यासी मानूं आम्ही ॥ ७९ ॥ साधु मानूं सनत्कुमार ॥ त्यांसिही वैकुंठीं क्रोध थोर ॥ शब्दासाठीं हरिकिंकर ॥ जयविजय वीर शापिले ॥ १८० ॥ [1]श्रेष्ठ मानूं चतुराननें ॥ तोहि निर्लज्जाचि हीन ॥ उमा नोवरी [4]देखोन ॥ म्हणतां सावधान

१ नमिरवे. २ कुबेर. ३ शिवगानर. ४ हिरणलाग. ५ रेडा. ६ श्रीराम, बळराम, परशुराम. ७ विराट पुत्राचा. ८ गानतुकर. ९ गर्वाने. १० कुन्कागत. ११ शेळीच्या १२ लेंड्या. १३ भुगाने. १४ व्याप्त, १५ बुद्धितेज, १६ शंकर. १७ मर्मा. १८ आगींत उडी घाली. १९ यज्ञकर्त्या दक्षाचें डोकें वीरभद्रानें उडविलें. २० विष्णूचे द्वारपाळ. २१ ब्रह्मदेव. २२ निरुपयोगी.

×ना. सत्पात्रें. *मो. नोकळ पाडे. +ना. स्वयं. ०ना. त्रिपुटी. *मो. बक. [9]ना. मो. सघन. [1]ना. मो. भावुडमुळें पीतवर्ण. [3]ना. निर्दोषी. [2]मो. ते वृंदेच्या वृंदावनापाशीं ना. वृंदेच्या वनापाशी. [8]मो. जव्याळ गाव्याळ मळिनराशी. [1]मो. श्रेष्ठ. [4]ना. देखोनि नग्न.

वीर्य द्रवलें ॥ ८१ ॥ नारद ब्रह्मचारी निजांगें ॥ तोही कृष्णदारां स्वयें मागे ॥ तो कृष्णें ठकविला तत्प्रसंगें ॥ साठी पुत्र वेगें स्त्रीनीं व्याला तो ॥ ८२ ॥ ज्यातें ह्मणती सत्य धर्म ॥ तोही केवळ अधर्म ॥ गोत्रवधाचा संभ्रमें ॥ हा पूर्ण अधर्म धर्मासी ॥ ८३ ॥ व्यास तरी तो जारपुत्र ॥ तेणेंचि कर्में पराशर ॥ *द्वेषिये वशिष्ठ विश्वामित्र ॥ अतिमत्सर परस्परें ॥ ८४ ॥ साधु ह्मणों दुर्वासासी ॥ तो छळूं गेला अंबरीषासी ॥ पितृद्रोह प्रल्हादासी ॥ साधुत्व त्यासी केवीं मानें ॥ ८५ ॥ एवं वाखाणिले पुराणीं ॥ तेही साच न मानिती मनीं ॥ या आतांचे वर्तमानीं ॥ साधु कोणी असेना ॥ ८६ ॥ ऐकोनियां चट गोष्टी ॥ येर धांवती येरापाठी ॥ एक करिती तोंडपिटी ॥ अतिचावटी उद्गारें ॥ ८७ ॥ एक मुद्रा मत्त आसनीं ॥ एक बैसले बकध्यानीं ॥ परी सत्य माने मनीं ॥ ऐसा साधु कोणी असेना ॥ ८८ ॥ ऐशी आपुलियाचि मूर्खीं ॥ साक्षेपें साधूंतें निंदिती ॥ साधु असती, *हे गोष्टी ॥ अणुमात्र चित्तीं असेना ॥८९॥ जे जे हरीचे पदिंयंते ॥ ते ते नावडती तयांतें ॥ जेवीं दाखवितां दर्पणातें ॥ क्षोभे निजचित्तें निर्नासिक ॥ १९० ॥ ज्या ईश्वराचेनि वर्तती जीतीं ॥ तो ईश्वर आहे नमानिती ॥ तो ईश्वर आहे कोणे स्थिति ॥ एक तुजप्रती सांगेन राया ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ सर्वेषु शश्वत्तनुभृत्स्ववस्थितं यथा खमात्मानमभीष्टमीश्वरम् ॥
वेदोपगीतं च न शृण्वतेऽबुधा मनोरथानां प्रवदन्ति वार्त्तया ॥ १० ॥

॥ टीका ॥ जो सर्वभूतांच्या ठायीं ॥ निरंतर, अंतर नाहीं ॥ समसाम्यें सर्वदा पाही ॥ उणा पुरा कहीं कल्पांतीं नव्हे ॥ ९२ ॥ जो सर्वांमाजी असे सर्वदा ॥ परी सर्वपणा नातळे कदा ॥ जेवीं पद्मपत्र जलस्पंदों ॥ अलिप्त बुद्बुदां असोनि संगें ॥ ९३ ॥ तेवीं असोनि सकळजनीं ॥ मळवटेना जनघसणीं ॥ नभ जैसें अलिप्तपणीं ॥ नरचूडामणी सबाह्य ॥ ॥ ९४ ॥ तैसें अलिप्तपण न मोडे ॥ परी रची अनंत ब्रह्मांडें ॥ तें ब्रह्मांड अंडें प्रचंडें ॥ वागवी उदंड अकर्तात्मयोगें ॥ ९५ ॥ यालागीं तो अंतर्यामी ॥ अभिधान बोलिजे निजनिगमीं ॥ जो सर्वांच्या हृदयधामीं ॥ चेतनानुक्रमीं लक्षिजे ॥ ९६ ॥ 'त्या ईश्वरातें नित्य ध्यातां ॥ आवडी नाम गीतीं गातां ॥ तरी अभीष्टमनोरथा ॥ होय वर्षता अखंडधारीं ॥ ॥ ९७ ॥ त्या ईश्वराच्या गातां गोष्टी ॥ सर्व अनिष्टां होय तुटी ॥ जो देखतांचि दृष्टी ॥ स्वानंदसृष्टी तुष्टला वर्षे ॥ ९८ ॥ एवं सुखदाता तोचि शास्ता ॥ जो कां अंतर्कोचा नियंता ॥ आकळे काळासि सत्ता ॥ ज्या भेणें सर्वथा करूं नशके ॥ ९९ ॥ श्वासोच्छ्वासांचिया परिचारा ॥ ज्या भेणें नेमस्त वाजे वारा ॥ त्याचेनि धाकें धरा ॥ नविरवे सागरा जळीं असतां॥ ॥ २०० ॥ ज्याचे आज्ञेवरी जाण ॥ सूर्य चालवी दिनमान ॥ ज्याचे पुरातन आज्ञेभेण ॥ समुद्र आपण रेखा नुल्लंघी ॥ १ ॥ ज्यातें सदा गायिजे वेदीं ॥ जो वाखाणिजे उपनिषदीं ॥

१ कृष्णाच्या स्त्रिया. २ साठ संवत्सर. ३धर्मराजा. ४कौरवकुलनाशाचा खटाटोप. ५ आई अविवाहित होती. ६ वैरी. ७ बापाशी वैर. ८ आरसा. ९ नकटा. १० जिवानर. ११ सारखेपणानें. १२ कमलाचें पान. १३ पाण्याचें हालणें ( स्पर्श ). १४ बुडबुडा. १५ नांव, संज्ञा. १६ वेदांत. १७ दंड करणारा. १८ यमाचा. १९संचारास, व्यापारास. २० नेमका. २१ जुन्या. २२ मर्यादा.

*मो. द्वेष द्वेषिया. *भा. हे वस्ती.

ज्याची पवित्र कीर्ति, दुर्बुद्धी ॥ स्वयें त्रिशुद्धी नायकती कदा ॥ २ ॥ ज्याचें नाम स्मरतां जाण ॥ सकळ दोषां निर्दळपण ॥ ज्याचे कृतांत वंदी चरण ॥ जन्ममरण त्रिभांडी ॥ ३ ॥ ज्याची कथा कर्णपुटीं ॥ पडतां विकल्पांचिया कोटी ॥ निर्दळूनि उठाउठी ॥ पाडी मिठी परब्रह्मीं ॥ ४ ॥ यापरी जो पवित्रमूर्ती ॥ यालागीं वेद सदा वर्णिती ॥ अभाग्य नायकती त्याची कीर्ती ॥ वार्ता करिती मनोरथाच्या ॥ ५ ॥ अस्वल आपुलिया गुणगुणा ॥ नायके वाजतिया निशाणा ॥ तेवीं नायकोनि हरीच्या गुणा ॥ विषयसंभाषणा आदरें वदती ॥ ६ ॥ यालागीं ते अतिमंद ॥ अविनीत सदा स्तब्ध ॥ विषयालागीं विषयांध ॥ अतिलुब्ध लोलुप्यें ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ लोके व्यवायामिषमद्यसेवा नित्यास्तु जंतोर्न हि तत्र चोदना ॥
व्यवस्थितिस्तेषु विवाहयज्ञसुराग्रहैरासु निवृत्तिरिष्टा ॥ ११ ॥

॥ टीका ॥ वेदें नकरितां प्रेरणा ॥ विषयावरी सहज वासना ॥ स्वभावें सकळ जना ॥ सदा जाण सर्वांसी ॥ ८ ॥ मांससेवन मद्यपाना ॥ मिथुनीभूतमैथुना ॥ ये अर्थी सर्व जनां ॥ तीव्र वासना सर्वदा ॥ ९ ॥ तेथें सेव्यासेव्यपरवडी ॥ निर्वचना कोण निवडी ॥ लागली विषयाची गोडी ॥ ते अनर्थकोडी करितील ॥ २१० ॥ अग्नि लागलिया कापुसा ॥ विझवितां न विझे जैसा ॥ तेवीं विषयवंता माणुसा ॥ विवेक सहसा उपजेना ॥ ११ ॥ झाल्या लोलिंगेन बांडिशा ॥ निजमरण विसरे मासा ॥ कां मुठीचणियाच्या आशा ॥ नळीमाजी अैसा वानर आडके ॥ १२ ॥ दूध मिळालिया मांजर ॥ नद्याणे द्विजअंत्यजघर ॥ तेवीं विषयउन्मत्त नर ॥ नकरिती विचार सेव्यासेव्य ॥ १३ ॥ कां स्वकळल्या विपर्यचाडें ॥ योनिसंकर घडेल पुढें ॥ यालागीं वेदें चोखडें ॥ वर्णाश्रमपाडें विभाग केले ॥ १४ ॥ जैसें अफाट पृथ्वीचें अंग ॥ तेथें सप्तद्वीपें करूनि विभाग ॥ मग भिन्नाधिकारें चांग ॥ धरा सांग आक्रमिली ॥ १५ ॥ कां अनावृतमेघजळा ॥ धैर्यें धरूनि पाळिजे तळां ॥ मग नेमिचें दांडेदाळा ॥ पिकालागीं जळा काढिजे पाट ॥ १६ ॥ +अनियमाना नादाकारा ॥ साधूनि कीजे वेंजंतरा ॥ मग जेवीं नानाध्वनि मधुरा ॥ वाजविजे येथ सप्तस्वरें ॥ १७ ॥ 'तैसें उच्छृंखळा विषयांसी ॥ वेदें नेमिलें नेमेंसी' तेचि वेदाज्ञा गेसी ॥ तेक तुजपाशीं सांगेन ॥ १८ ॥ आवरावया योनिभ्रष्टा ॥ मैथुनीं विवाहप्रतिष्ठा ॥ त्यागूनियां निजनिष्ठा ॥ वर्ण वरिष्ठा नेमिले ॥ १९ ॥ ब्राह्मण जातां रजकीपाशीं ॥ ते नेम कडू नलगे त्यासी ॥ रजक जातां ब्राह्मणीपाशीं ॥ तिलट तिसी तो नलगे ॥ २२० ॥ 'भल्ती श्री भलता नर ॥ मैथुनीं होय योनिसंकर ॥ तो चुकवावया प्रकार ॥ विवाहनिर्धार नेमिला वेदें' ॥ २१ ॥ 'धर्मपत्नीपाणिग्रहण ॥ विवाह नेमिला सवर्ण ॥ तेथें सेवन पंचम न्यसन ॥ स्वगोत्रीं लग्न

१ नाही. २ तत्काळ. ३ रणभेरी. ४ जोडप्यानें होणारें. ५ लोभी. ६ गळास लावलेलें आमीष. ७ विषयेच्छेनें. ८ उत्तमाधम वर्णाचा मिलाफ. ९ खुल्या. १० बांधानें अडवून. ११ तळ्यांत. १२ नियमानें. १३ थोडथोडे. १४ ध्वनिरूपाला. १५ वाघ, सनई. १६ त्याच जातींत. १७ वधूवरांचा बापाकडून व आईकडून पांच पिढ्यांचे आंत पूर्वज एक असूं नये.

+मो. अचीयमांना नादाकारा.

करूं नये ' ॥ २२ ॥ ' तिन्ही वेद तिन्ही वर्ण ॥ वेदें सांडूनिया जाण ॥ सवेद आणि सवर्ण ॥ पाणिग्रहण नेमिलें ' ॥ २३ ॥ *कन्या सवेद सवर्ण ॥ जिसी नाहीं रजोदर्शन ॥ तेहि पित्या पासीं ×याचून ॥ करावें लग्न विधानोक्त ॥ २४ ॥ ' धर्मअर्थकामाचरण ॥ अन्यत्र न करावें आपण ॥ ऐसी वाहूनियां आण ॥ पाणिग्रहण वेदोक्त ' ॥ २५ ॥ करितां वधूवरां पाणिग्रहण ॥ साक्षी देत द्विज देव हुताशन ॥ इतर स्त्रिया माते समान ॥ स्वदारागमन नेमिलें वेदें ॥ २६ ॥ एवं नेमूनियां विवाहासी ॥ वेदरायें दिली आज्ञा ऐसी ॥ सांडूनि सकळ स्त्रियांसी ॥ स्वदारेसी *मैथुन ॥ २७ ॥ दिवसा मैथुन नाहीं स्त्रियेसी ॥ रात्रीं त्यजूनि पूर्वपर प्रहरांसीं ॥ मैथुन स्त्रियेपासीं ॥ मध्यरात्रीसी नेमस्त ॥ २८ ॥ ' नेमिलें स्वदारा मैथुन ॥ तेंही अहोरात्र नाहीं जाण ॥ प्रजार्थ स्त्रीसेवन ॥ ऋतुकाळीं गमन नेमस्त ' ॥ २९ ॥ ' ऋतुकाळीं ज्या स्त्रीगमन ॥ ते पुरुष ब्रह्मचारी पूर्ण ॥ वेद निवृत्तिपर आपण ॥ त्यागरूपें जाण भोगातें नेमी ' ॥ २३० ॥ ' आत्मा वै पुत्रनामासी ॥ पुत्रझालिया स्त्रियेसी ॥ शनैःशनैः विषयांसी ॥ निजाज्ञेसी त्यागवी वेद ' ॥ ३१ ॥ सेवावया आमिषा ॥ वेदें नेम केला कैसा ॥ नपडावया पशुहिंसा ॥ संकट आयासा स्वयें शोधी ' ॥ ३२ ॥ आवडी खावया मांसा ॥ अथवा स्वर्गाचिया आशा ॥ जे करिती पशुहिंसा ॥ तया पुरुषां अधःपतन ॥ ३३ ॥ निष्कामकर्मी पशुहिंसा ॥ करी तरी तो निष्काम कैसा ॥ तेथें निगमाचा नेम ऐसा ॥ ' मुख्य अहिंसा सर्व धर्मीं ' ॥ ३४ ॥ नित्य न करावया मांसभक्षण ॥ ¹यज्ञीं पुरोडाशसेवन ॥ तेंही परिमित जाण ॥ स्वेच्छामांसखादन वारिलें वेदें ' ॥ ३५ ॥ ' याग करूनि सौत्रामणी॥ प्रवर्तावें पेयपानीं ॥ हे वेदाज्ञा जो सत्य मानी ॥ तो स्वधर्माचरणीं नागवला ' ॥ ३६ ॥ जे कर्मीं मद्यपान घडे ॥ तो स्वधर्म म्हणतां जीभ अडे ॥ लोलुप्यें ते भुलले बापुडे ॥ वेद विषयाकडे वोढिती ॥ ३७ ॥ याग करितां सौत्रामणी ॥ स्वयें नव्हावें मद्यपानी ॥ तें यज्ञशेष अवघ्राणीं ॥ परी सर्वथा वदनीं घालूं नये ॥ ३८ ॥ ' हें विषयाचें त्रिविध विंदान ॥ मैथुन मांस, सुरापान ॥ यदर्थीं निवृत्तीचि प्रमाण ॥ हें मनोगत पूर्ण वेदाचें ' ॥ ३९ ॥ विषया-पासूनि निवृत्ती ॥ वेदविभागें हेंचि शोधी ॥ परी भगवी विषयासक्ती ॥ हे वेदोक्ती सर्वथा नघडे ॥ २४० ॥ वेंचोनियां निजधन ॥ करोनिया विवाह यज्ञ ॥ सेवावें मद्य मांस मैथुन ॥ हें वेदवचन कदा न घडे ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ धनं च धर्मैकफलं यतो वै ज्ञानं सविज्ञानमनुप्रशान्ति ॥ गृहेषु युंजंति कलेवरस्य मृत्युं न पश्यंति दुरंतवीर्यम् ॥ १२ ॥

॥ टीका ॥ नायकोनि भगवत्कथा ॥ ज्ञानाभिमानी नाडले तत्त्वतां ॥ धनें परमार्थ यावा हाता ॥ तोही स्वधर्मता नलाविती धर्मी ॥ ४२ ॥ विषयांचिया कामना ॥ सर्वस्वें वेंचिती धना ॥ तेंचि धर्मार्थ वेंचितां जाणा ॥ सांडिती प्राणा कैवल्यासाठीं ॥ ४३ ॥ ज्या धनाचेनि पांगें ॥ हा धर्मचि आलासे निजांगें ॥ जेवीं पायाळाचेनि योगें ॥ महानिधि वेगें आतुडे

१ लग्न. २ अग्नि. ३ आपले स्त्रीशीं गमन. ४ पहिला व शेवटचा. ५ हळुहळु. ६ मांसास. ७ मागें. ८ सम हविर्यज्ञां पैकीं एक, यांत सोमाऐवजी दूध व मद्य वापरतात. ⁹दाक्षिण्याविषयीं. १०केवळ हुंगावें. ११ लक्षण, निदान. १२ टाकणेंस. १३ द्रव्यासाठीं.

*मो. कन्या असे वेद सवर्ण. ×ना. निर्वचून *मो. गमन. २ मो. अग्नि.

हातीं ॥ ४४ ॥ बीज तेथें द्रुमफळ ॥ चंदन तेथें परिमळ ॥ जळाच्याठायीं केवळ ॥ नांदती सकळ रसस्वाद ॥ ४५ ॥ ' देह तेथें असे कर्म ॥ रूप तेथें वसे नाम ॥ धन तेथें उत्तमोत्तम ॥ सकळ धर्म सदा वसती ' ॥ ४६ ॥ तेवीं धनाचिया पाठोवाटीं ॥ परधर्मेंसी पडे गांठी ॥ धर्म तेथें उठाउठी ॥ ज्ञानाची भेटी विज्ञानेंसी ॥ ४७ ॥ चंद्रास्तव वाढती कळा ॥ जीवनास्तव जिव्हाळा ॥ तेवीं धनास्तव सोज्वळा ॥ धर्माचा सोहळा धार्मिकांघरीं ॥ ४८ ॥ जेवीं एकादशीव्रतयोगें ॥ जागरीं गीतनृत्य १पांगे ॥ तुष्टला देव लागवेगें ॥ आतुडे निजांगें निजभक्तां करीं ॥ ४९ ॥ धर्म तेथें शुद्धज्ञान ॥ ज्ञान तेथें विज्ञान ॥ विज्ञान तेथें समाधान ॥ शांति संपूर्ण नांदे तेथें॥२५०॥एवढें फळ ज्या धनापासीं॥ते मूर्ख वेंचिती विषयासीं॥ देहलोभें भुललीं पिसीं ॥ अंगींच्या मृत्यूसी विसरले ॥ ५१ ॥ जाळतें घरीं ठेवा ठेवणें ॥ मरत्या देहा सुखवाड करणें ॥ ' तो नागवला ' वेद म्हणे ॥ तें वेदाचें बोलणें नायके कोणी ॥ ५२ ॥ उपजलेनि दिवसदिवसें ॥ देहातें काळ ग्रासीतसे ॥ हें नित्य नवें मरण कैसें ॥ *देहलोभवशें विसरले ॥ ५३ ॥ त्याचें त्या देखतां कैसा ॥ काळ गिळी बाळवयसा ॥ मग तारुण्याची दशा ॥ सुरडूनि पैसा ग्रासी काळ ॥ ५४ ॥ गिळोनियां तारुण्यपण ॥ आणि तार्धक्य कंपायमान ॥ ऐसें काळाचें विंदान ॥ दुर्धर पूर्ण ब्रह्मादिकां ॥ ५५ ॥ जयाचेनि चपेटघातें ॥ मरण आणि अवरातें ॥ मा मूर्ख तेथें जीवितातें ॥ ○अक्षय चित्तें दृढ मानिती ॥ ५६ ॥ ' मुळीं देहाचि तंव अनित्य ॥ मा तेथींचे भोग काय शाश्वत ॥ परी धन वेंचूनि विषयार्थ ॥ भुलले भ्रांत +स्त्रीलोभें ' ॥ ५७ ॥ ऐसे नश्वर भोग जगीं ॥ ते भोगावया स्वर्गीं ॥ तदर्थ प्रवर्तती यागीं ॥ लागवेगीं भोगेच्छा ॥ ५८ ॥ ' सुख भोगावया वेगीं ॥ पतंग जेवीं उडी घाली आगीं ॥ तेवीं इहामुत्र भोगीं ॥ पतनालागीं पावती ' ॥ ५९ ॥ स्त्री आमिष मद्यपान ॥ हे वेदोक्त भोग जाण ॥ तेथें केवीं घडे ○पतन ॥ तें वेदविधान नेणती मूर्ख ॥२६०॥

॥ श्लोक ॥ यद्घ्राणभक्षो विहितः सुरायास्तथा पशोरालभनं न हिंसा ॥ एवं व्यवायः प्रजया न रत्या इमं विशुद्धं न विदुः स्वधर्मम् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ वेदविहित कर्माचरण ॥ तेथें सर्वथा नव्हे पतन ॥ जेथें चुके वेदविधान ॥ तेथें पावे पतन सज्ञान ॥ ६१ ॥ वेदींच्या अर्थवादासरिसा ॥ मनीं बांधोनि भोगाशा ॥ यज्ञमिषें पशुहिंसा ॥ भोगेलिप्सा करूं धांवती ॥ ६२ ॥ वेदें बोलिलें ×आलंभन ॥ त्या नांव म्हणती पशुहनन ॥ हें सकाम मानिती विधान ॥ निष्कामा हनन कदा नघडे ॥ ६३ ॥ निष्कामकामासि यागयजन ॥ स्वधर्मार्थ करावे यज्ञ ॥ तेथें पशूचें आलभन ॥ सर्वथा हनन करूं नये ॥ ॥ ६४ ॥ ' पशूचें नकरूनि हनन ॥ देवतोद्देशें अंगस्पर्शन ॥ यानांव बोलिजे आलंभन ॥ हें ⊃यज्ञाचरण निष्काम ' ॥ ६५ ॥ हरिश्चंद्राच्या यागीं ॥ ⊙शुनःशेपपशुप्रसंगीं ॥ तेणें घात लागां

---

१ झाड, फळ. २ पाठोपाठ. ३ अनुभवाशीं. ४ जागरणी. ५ सत्वर. ६ ठेव, दुर्बोलें. ७ जन्मल्यापासून. ८ज्या काळाच्या. ९ चपराकीनें. १०स्तुतिवादानें. ११भोग मिळण्याची इच्छा. १२वध. १३अंगास हात लावणें.

१उपांगे. *ना. देहलोभें पिसे विसरले. ○ना. अभय मो. अक्षर. +मी. स्त्रीलोभा. ○ना. मद्यपान. ×मो. आलोचन. ⊃मो. यज्ञपण. ⊙ना. शुनपशुप्रसंगीं.

नांदितां अंगीं ॥ वेदोक्तप्रयोगीं यज्ञसिद्धी केली ॥ ६६ ॥ वेदोक्तमंत्रभागार्थ ॥ देवमुखीं करोनि समस्त ॥ आपण झाला निर्मुक्त ॥ हा ऋग्वेदार्थ ब्राह्मणीं ॥ ६७ ॥ यापरी पशुघात ॥ यज्ञीं नलगे निश्चित ॥ तो हरिश्चंद्र यागार्थ ॥ पशुघात निवारी ॥ ६८ ॥ ' तेथें मीमांसकाचें मत ॥ देवतोद्देशें जो पशुघात ॥ यानांव आलभन म्हणत ॥ स्वर्गफलार्थ आवश्यक ' ॥ ६९ ॥ केवळ मांसभक्षणार्थ ॥ जे करिती पशुघात ॥ हिंसादोष तेथं प्राप्त ॥ ऐसें बोलती मीमांसक ॥ ॥ २७० ॥ देवतोद्देशें पशूचा घात ॥ तेणें स्वर्गभोग होय प्राप्त ॥ तोही भोगक्षयें क्षया जात ॥ तेणें हिंसा प्राप्त याज्ञिकां ॥ ७१ ॥ याग करितां सौत्रामणी ॥ पुरोडाश द्यावा अवघ्राणीं ॥ परी प्रवर्तावें सुरापानीं ॥ हें वेदविधानीं असेना ॥ ७२ ॥ एवं जेथें पशुहनन ॥ तें कर्म सदोष पूर्ण ॥ यालागीं तेथं अधःपतन ॥ बोलिलें जाण याज्ञिकांसी ॥ ७३ ॥ ' वेदें +विहिलें पाणिग्रहण ॥ तें प्रजार्थ स्वदारागमन ॥ परी इत्यर्थ नित्य मैथुन ॥ हे वेदाज्ञा जाण असेना॥ ॥ ७४ ॥ मद्यमांसमैथुनप्रसंग ॥ स्वइच्छा नकरावया भोग ॥ वेदें योतिला विवाह याग ॥ भोगत्यागानियमार्थ ॥ ७५ ॥ नेणोनियां ऐसा शुद्धधर्मा ॥ ×यागमिषें अधर्मा ॥ प्रवर्तोनि काम्यकर्मा ॥ भोगसंभ्रमा भोगिती मूर्ख ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ ये त्वनेवंविदोऽसंतः स्तब्धाः सदभिमानिनः ॥ पशून्द्रुह्यंति विस्रब्धाः प्रेत्य खादंति ते च तान् ॥ १४ ॥

॥ टीका ॥ नेणोनि शुद्ध वेदविधानातें ॥ अतिगर्वाचेनि उद्धतें ॥ आपणियां मानूनि ज्ञाते ॥ अविधी, पशूंतें घात करितां ॥ ७७ ॥ केवळ अभिचारमतें ॥ पावोनि सकळभोगांतें ॥ ऐशिया मानोनि विश्वासातें ॥ स्वेच्छा पशूनें घात करिती ॥ ७८ ॥ अविधी पशूंतें ∘वधिती ॥ त्या याज्ञिकांचे देहांतीं ॥ मारिले पशू मारूं येती ॥ झळकत कातीं घेऊनियां ॥ ७९ ॥ एवं निमालिया याज्ञिकांसीं ॥ भक्षिलें पशु भक्षिती त्यांसी ॥ जैसें सेविलें विष प्राणियांसी ॥ घासी प्राणांसी समूळ ॥ २८० ॥

॥ श्लोक ॥ द्विषंतः परकायेषु स्वात्मानं हरिमीश्वरम् ॥ मृतके सानुबंधेऽस्मिन्बद्धस्नेहाः पतंत्यधः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ परमात्मा जो श्रीहरी ॥ तो अंतर्यामी सर्व शरीरीं ॥ तेथें पराचा जो द्वेष करी ॥ तेणें द्वेषिला हरी निजात्मा ॥ ८१ ॥ परासि जो करी अपघात ॥ तेणें केला निजात्मघात ॥ त्यासि सहकुटुंब अधःपात ॥ रौरवांत ते बुडती ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ ये कैवल्यमसंप्राप्ता ये चातीताश्च मूढताम् ॥ त्रैवर्गिका ह्यक्षणिका आत्मानं घातयंति ते ॥ १६ ॥

॥ टीका ॥ सज्ञानी स्वतां तरती ॥ अज्ञानी सज्ञाना शरण येती ॥ तेणें त्यांसि कैवल्यप्राप्ती ॥

१ संततीकरितां प्रजोत्पादनाकरितां स्वदारागमन सांगितलें २ येवढ्यानरूनन. ३ जारणमारणादि. ४ मरण पावलेल्या.

+ना. विहितिलें. ×मो. यागमिसें सत्यधर्मा. प्रवर्ते निष्काम्यकर्मा. ∘ना. घात करिती. मो. घातिती.

त्यांच्या वचनोक्तिविश्वासें ॥८३॥ जे अज्ञान ना सज्ञान॥ज्यांसि केवळ ज्ञानाभिमान ॥ ज्यांचें विषयीं लोलुप मन ॥ ते पुरुष पूर्ण आत्मघाती ॥ ८४ ॥ साधावया अर्थकाम ॥ जे करिती अभिचारधर्म ॥ हें [1] त्रैवर्णिक घोर कर्म ॥ आत्मघाती परम ज्याचे त्यागी ॥ ८५ ॥ देहाचिया गोमटिया ॥ जे करिती अभिचारक्रिया ॥ तेणें कर्में आपआपणियां ॥ अर्जिला राया निजघात ॥८६॥ जो स्वयें बैसली खांदी तोडी ॥ तो खांदीसहित पडे बुडीं ॥ तेवीं काम्यकर्माच्या वोढी ॥ क्रियेसि रोकडी अधःपात ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ एत आत्महतोऽशान्ता अज्ञाने ज्ञानमानिनः ॥ सीदन्त्यकृतकृत्या वै कालध्वस्तमनोरथाः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ कामक्रोधी अतिअद्भुत ॥ क्रूरकर्मी जे अशांत ॥ तिहीं आपआपणा अनहित ॥ निजात्मघात जोडिला ॥ ८८ ॥ स्वयें कर्म करिती अविधी ॥ तेचि म्हणती शुद्धविधी ॥ अज्ञान तेंचि प्रतिपादी ॥ ज्ञान विशुद्धी म्हणोनियां ॥ ८९ ॥ जे काम्यकर्मी छळिले ॥ कां महामोहें आकळिले ॥ गर्वदंभादिमदें खिळिले ॥ काळसर्पें गिळिले सदबुद्धीसी ॥ २९० ॥ गर्वादिज्वरितमुखें ॥ गोडपणीं कडू ठाके ॥ विषप्राय विषयसुखें ॥ अतिहरिखें सेविती ॥९१॥ ऐशा विषयालागीं पहाहो ॥ [2]आप्त मानिती निजदेहो ॥ रचूनि नाना उपावो ॥ अर्थसंग्रहो स्वयें करिती ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ हित्वात्यायासरचिता गृहापत्यसुहृच्छ्रियः ॥ तमो विशन्त्यनिच्छन्तो वासुदेवपराङ्मुखाः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ मरणीसि झटे घेत ॥ श्री मेळविती श्रीमंत ॥ गृह दारा पुत्र वित्त ॥ नाना वस्तुजातसंग्रह ॥ ९३ ॥ ऐसे भोग आयासयुक्त ॥ सांडूनि ज्ञानगर्वी समस्त ॥ ज्ञानाभिमानें नेहटेत ॥ अंधतमांत अतिगर्वी ॥ ९४ ॥ जेथें अंधाराचे डोळे ॥ होऊन ठाकती आंधळे ॥ तेथ मोहरात्रीचें काळें ॥ अंधतमसें अधिक काटे ॥ ९५ ॥ जया अंधारातें प्रकाशूं येतां ॥ निस्तेज काळा होय सविता ॥ जेथें गाढ मूढ अवस्था ॥ अतिमौढ्यता स्वयें पावे ॥ ९६ ॥ जेथें सुषुप्तीसी झोंप लागे ॥ आळस आळसिजे सर्वांगें ॥ तेथ घर बांधोनि निजांगें ॥ निद्राक्रोध दोघे सदा वसती ॥ ९७ ॥ तेथ भजन विमुखनरा ॥ अधःपतन अभिमानद्वारा ॥ जेवीं अंधारीं पडिला चिरा ॥ तेवीं बाहेरा निघों नशके ॥ ९८ ॥ जे वासुदेवीं सदा विमुख ॥ ज्यांसि हरिभजनीं नाहीं हरिख ॥ त्यांची दशा हे अधोमुख ॥अति दुःखें दुःख भोगिती ॥९९॥ ऐशी अभक्तांची गती ॥ सांगितली [3]आढाचस्थिती ॥ वांचूनि त्यांची दुर्गती ॥ वाग्देवता भितो स्पष्ट वदतां ॥ ३०० ॥ अभक्तांची गति बोलणें ॥ यापरीस चांग मुकें होणें ॥ प्राण जावो कां सर्व प्राणें ॥ परी तें दुःख कोणें बोलावें ॥ १ ॥ राया तुझिया प्रश्नकाजीं ॥ हे दशा बोलणें पडे आजी ॥ येऱ्हवीं अभक्तवार्ता आम्हांमाजी ॥ याचेची पांजी विटाळली नाहीं ॥ २ ॥ यापरी आतां नृपनाथा ॥ वक्ता आणि समस्त श्रोता ॥ रामस्मरणें तत्त्वतां ॥

१ तारणमारणादिक. २नरकपतन. ३आपल्या हातानें आपला घात. ४लापाचें सोडानें. ५द्रव्यसंग्रह. ६ सूर्य.७ तुतीयावस्था,गाढ निद्रेची स्थिती,८खोलांत.९घडीव दगड.१०नरक, धीक्कार११जिव्हेचा अग्रभाग.

[1]ना. त्रिवार्गीक, [2]ना. सत्य. [3]ना. सहजस्थिती.

वाचेसि प्रायश्चित्ता सर्व कीजे ॥ ३ ॥ ऐकोनि अभक्तांची गती ॥ अतिशयेंसीं दुःखप्राप्ती ॥ राजा कंटाळला चित्तीं ॥ यालागीं निश्चितीं हरिनाम स्मरे ' ॥ ४ ॥ ज्या स्मरविलें हरीतें ॥ तोचि यासी पुसों तेथें ॥ युगायुगीं भक्त त्यातें ॥ कोणे विधीतें *भजन करिती ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ कस्मिन् काले स भगवान् किं वर्णः कीदृशो नृभिः ॥

नाम्ना वा केन विधिना पूज्यते तदिहोच्यताम् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ ज्याचेनि ×स्मरणें तत्वतां ॥ कर्माकर्में नुधवितीं माथा ॥ त्या भगवंताची कथा ॥ माझिया हितालागीं सांग ॥ ६ ॥ जो परमात्मा श्रीहरी ॥ तो सृष्ट्यादि युगयुगांतरीं ॥ कोणें नामें रूपें वर्णाकारीं ॥ भक्त कैशापरी पूजिती ॥७॥ आणि ते काळींच्या प्रजा ॥ कैसेनि यजिती अधोक्षजा ॥ कवणें विधि करिती पूजा ॥ तें योगिराजा सांगिजे ॥ ८ ॥ तुमचे मुखींचें कृपावचन ॥ त्यापुढें अमृतही गौण ॥ वचनें परमानंद पूर्ण ॥ जन्ममरण उच्छेदी ॥ ॥ ९ ॥ त्याही माजीं भगवद्गुण ॥ युगानुवर्ती नारायण ॥ त्याचें भजनपूजनविधान ॥ कृपा करून सांगिजे स्वामी ॥ ३१० ॥ ऐकोनि रायाचें वचन ॥ मनोधर्मे अवधेजण ॥ जाणोनि हरिगुणांचा प्रश्न ॥ कनिष्ठ करभाजन बोलता झाला ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ करभाजन उवाच ॥ कृतं त्रेता द्वापरं च कलिरित्येषु केशवः ॥

नानावर्णाभिधाकारो नानैव विधिनेज्यते ॥ २० ॥

॥ टीका ॥ नानावर्ण नानाकारें ॥ नानानाम नानोपचारें ॥ कृतत्रेताद्वापारें ॥ भक्त निर्धारें केशव यजिती ॥ १२ ॥ ककार ब्रह्मा वकार विष्णु ॥ शकार स्वयें त्रिनयनु ॥ केशव तो गुणविहीनु ॥ प्रकाशक पूर्ण तिहींचा ॥ १३ ॥ केशव केवळ अर्धमात्रा ॥ नये व्यक्ताव्यक्त +उच्चारा ॥ व्याप्येंवीण व्यापक खरा ॥ सबाह्याभ्यंतरा एकत्वें ॥ १४ ॥ तोचि युगपरत्वें रूपनाम ॥ भजनविधि क्रिया धर्म ॥ भक्त पूजिती पुरुषोत्तम ॥ तो अनुक्रम अवधारीं ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ कृते शुक्लश्चतुर्बाहुर्जटिलो वल्कलांबरः ॥ कृष्णाजिनोपवीताक्षान

बिभ्रद्दंडकमंडलू ॥ २१ ॥

॥ टीका ॥ कृतयुगीं श्वेतवर्णधर ॥ जटिल चतुर्भुज वल्कलांबर ॥ दंडकमंडल्वांकितकर ॥ अजिन ब्रह्मसूत्र अक्षमाला हातीं ॥ १६ ॥ ब्रह्मचर्य दृढव्रत ॥ ये चिन्हीं चिन्हांकित ॥ परमात्मा मूर्तिमंत ॥ कृतयुगीं भक्त यापरी येजिती ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ मनुष्यास्तु तदा शांता निर्वैराः सुहृदः समाः ॥ यजंति तपसा देवं

शमेन च दमेन च ॥ २२ ॥

॥ टीका ॥ तेकाळींचे सकळ ०नर ॥ सदा शांत निर्वैर ॥ समताबुद्धि निरंतर ॥ सुहृन्मित्र परस्परें ॥ १८ ॥ तें तपें करावें देवैयजन ॥ त्या तपाचें मुख्य लक्षण ॥ शम दम साधूनि

१ वर करीत नाहींत. २ श्रीविष्णूला. ३ कमी. ४ शंकर. ५ कारण व्याप्याला निराळी जागाच नाहीं. ६ ऐक. ७ पांढरा वर्ण धारण करणारा. ८ झाडाचे सालीचें आहे वस्त्र ज्यास. ९ युक्त. १० मृगचर्म. ११ पूजिती. १२ देवाचें पूजन.

*मो. यजन. ×ना. भजनें. +ना. उपचारा. ०मो. सुरवर.

संपूर्ण ॥ भगवद्भजन स्वयें करिती ॥ १९ ॥ तें देवाचें नामोच्चारण ॥ दशधा नामीं नामस्मरण ॥ तेंचि नामें कोण कोण ॥ ऐक सावधान नृपनाथा ॥ ३२० ॥

॥ श्लोक ॥ " हंसः सुपर्णो वैकुंठो धर्मो योगेश्वरोऽमलः ॥ ईश्वरः पुरुषोऽव्यक्तः परमात्मेति गीयते " ॥ २३ ॥

॥ टीका ॥ ' हंस, सुपर्ण, वैकुंठ, ॥ धर्म, योगेश्वर श्रेष्ठ ॥ अमल, ईश्वर, वरिष्ठ ॥ पुरुषोत्तम, नामपाठ परमात्मा, म्हणती ॥ २१ ॥ तेकाळींचे भक्त श्रेष्ठ ॥ या नामांचा नामपाठ ॥ गायन करिती घडघडाट ॥ भवसंकट निर्दाळिती ॥ २२ ॥ हें कृतयुगींचें यजन ॥ तुज सांगितलें संपूर्ण ॥ आतां त्रेतायुगींचें भजन ॥ मूर्तीचें ध्यान तें ऐक ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ त्रेतायां रक्तवर्णोऽसौ चतुर्बाहुस्त्रिमेखलः ॥ हिरण्यकेशस्त्रय्यात्मा स्रुक्स्रुवाद्युपलक्षणः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ त्रेतीं यज्ञमूर्ति पुरुषोत्तम ॥ रक्तवर्ण [१]ज्वलनोपम ॥ पिंगटकेश [२]निर्धूम ॥ देवदेवोत्तम चतुर्बाहु ॥ २४ ॥ तया यज्ञपुरुषा निर्मळा ॥ त्रिगुणांची त्रिमेखळा ॥ [३]वेदत्रयींचा पूर्ण मेळा ॥ मूर्तीचा सोहळा तदात्मकत्वीं ॥२५॥ स्रुक्स्रुवापाणिग्रहण ॥ हेंचि तयाचें उपलक्षण ॥ त्रेतायुगीं नारायण ॥ येणें रूपें जाण निजभक्त ध्याती ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ तं तदा मनुजा देवं सर्वदेवमयं हरिम् ॥ यजंति विद्यया त्रय्या धर्मिष्ठा ब्रह्मवादिनः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ तेंचे जे मनुष्य जाण ॥ ×त्रैवेदीं करिती भजन ॥ सर्वदेवस्वरूप हरि पूर्ण ॥ यापरी यजन त्रेतायुगीं ॥ २७ ॥ त्रेतायुगीं सर्वही नर ॥ वेदोक्तीं नित्य सादर ॥ सर्वही भजनतत्पर ॥ धर्मिष्ठ समग्र अतिधार्मिक ॥ २८ ॥ ते धार्मिष्ठ धार्मिकजन ॥ अष्टधा नामीं नामस्मरण ॥ गजरें करिती सदा पठण ॥ तें नामाभिधान ऐक राया ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ ' विष्णुर्यज्ञः पृश्निगर्भः सर्वदेव उरुक्रमः ॥ वृषाकपिर्जयंतश्च उरुगाय इतीर्यते ' ॥ २६ ॥

॥ टीका ॥ ' विष्णु यज्ञ पृश्निजन्म ॥ सर्वदेव उरुक्रम ॥ वृषाकपि जयंत नाम ॥ उरुगाय परमात्मा नामें स्मरती ॥३३०॥ द्वापरीं +भगवन्ध्यान ॥ ते युगींचें पूजाविधान ॥ भक्त केवीं करिती भजन ॥ नामस्मरण तें ऐक ॥ ३१ ॥

॥श्लोक॥ द्वापरे भगवान् श्यामः पीतवासा निजायुधः ॥ श्रीवत्सादिभिरंकैश्च लक्षणैरुपलक्षितः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ द्वापरीं घनशामवर्ण ॥ [५]अंतसीपुष्पप्रभासमान ॥ पीतांबरपरिधान ॥ श्रीवत्सचिन्ह अंकित ॥ ३२ ॥ शंख चक्र पद्म गदा ॥ चारी भुजा सायुधा ॥ इहीं लक्षणीं गोविंदा ॥ *[६]लक्षिती सदा निजभक्त भजनीं ॥३३॥

---

१ अग्निप्रमाणें. २ धूम्ररहित. यज्ञपात्र विशेष. ३ ' ऋग्यजुसाम ' या तीन वेदांचा. स्रुक्स्रुवादियज्ञपात्रें हातांत घेणें. ५ जवसाचें फुलाप्रमाणें. ६ ध्यान करितात.

×ना. त्रैवैदिक. +मो. भगवद्भजन. *ना. लक्षिजे सदा भक्तजनीं.

॥ श्लोक ॥ तं तदा पुरुषं मर्त्या महाराजोपलक्षणम् ॥ यजंति वेदतंत्राभ्यां परं जिज्ञासवो नृप ॥ २८ ॥

॥ टीका ॥ [१]शशांकछत्र आणि [२]चामर ॥ राजलक्षणीं राजोपचार ॥ यापरी द्वापरींचे नर ॥ अतिसादर पूजेमी ॥ ३४ ॥ शीघ्र पावावया परात्पर ॥ वैदिक तांत्रिक पूजा मिश्र ॥ [३]तत्त्वजिज्ञासु करिती नर ॥ भजनतत्पर या रीतीं ॥ ३५ ॥ ते काळींचें नामस्मरण ॥ जेणें होय कलिमलदहन ॥ त्या नामाचें अभिधान ॥ ऐक सांगेन नृपनाथा ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ 'नमस्ते वासुदेवाय नमः संकर्षणाय च ॥ प्रद्युम्नायानिरुद्धाय तुभ्यं भगवते नमः २९ ॥ नारायणाय ऋषये पुरुषाय महात्मने ॥ विश्वेश्वराय विश्वाय सर्वभूतात्मने नमः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ वासुदेवा तुज लोटांगण ॥ संकर्षणा तुज नमन ॥ प्रद्युम्ना *प्रणाम पूर्ण ॥ अभिवंदन अनिरुद्धा ॥ ३७ ॥ नारायणा ऋषिवरा ॥ महापुरुषा सुरेंद्रा ॥ विश्वरूपा विश्वेश्वरा ॥ महात्म्या श्रीवरा नमन तुज ॥ ३८ ॥ *सर्वभूतीं तूं भूतात्मा ॥ तुज ०नमो पुरुषोत्तमा ॥ द्वापरीं ऐशिया नामा ॥ नृपोत्तमा सदा स्मरती ॥ ३९ ॥ त्या नामाच्या पाठा ॥ तेणें दैवासी संतोष मोठा ॥ वेगीं सांडोनि वैकुंठा ॥ धांवे अवचटा कीर्तनामाजी ॥ ३४० ॥

॥ श्लोक ॥ इति द्वापर उर्वीश स्तुवंति जगदीश्वरम् ॥ नानातंत्रविधानेन कलावपि यथा शृणु ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ याहीं नामीं स्तुतिस्तवन ॥ द्वापरींचें करिती जन ॥ आतां कलियुगींचें भजन ॥ तंत्रोक्तविधान ऐक राया ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ कृष्णवर्णं त्विषा कृष्णं सांगोपांगास्त्रपार्षदम् ॥ यज्ञैः संकीर्तनप्रायैर्यजंति हि सुमेधसः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ कलियुगीं श्रीकृष्णदेवो ॥ ×वर्ण कृष्णचि प्रभावो ॥ प्रभा इंद्रनीळकीळ[४]समुदावो ॥ मूर्ति तैशी पहावो शोभायमान ॥ ४२ ॥ मूर्ति सर्वावयवीं सांग ॥ वेणु[५]विषाणादि उपांग ॥ चारी भूजा +पराक्रमी चांग ॥ आयुधें 7अव्यंग 6शंखचक्रादि ॥ ४३ ॥ पृष्ठभागीं निजपार्षद ॥ नंद, सुनंदादि सायुध ॥ कलियुगीं 2प्रज्ञाप्रबुद्ध ॥ यापरी गोविंदा चिंतिती [९]सदा ॥ ४४ ॥ मधुपर्कादिक विधान ॥ सांग केलें जें पूजन ॥ तेंही मानोनियां गौण ॥ आवडे कीर्तन कलियुगीं कृष्णा ॥ ४५ ॥ नवल कैसें राजाधिराजा ॥ कीर्तन तोचि महापूजा ॥ ऐशी आवडी अधोक्षजा ॥ कीर्तनें गरुडध्वजा उल्हास सदा ॥ ४६ ॥ कीर्तन पढियें गोविंदा ॥ यालागीं सन्मानी नारदा ॥ 3तो कृष्णकीर्ती पुढें सदा ॥ नामानुवादा गर्जत ॥

---

१ चंद्रयुक्त छत्र. २ चवऱ्या. ३ ब्रह्म जाणण्याची इच्छा करणारे. ४ पाचूंचे प्रभेचा समुदाय. ५ पांवा, शिंग वगैरे. ६ पूर्ण. ७ आपले सनंदनादिक चाकर. ८ ज्ञाते. ९ ध्याती.

*ना. मो. प्रणम्य. *ना. सर्वभूतें. ०ना. मो. नमन. ×ना, मो. वर्णं कृष्णवर्णाचि प्रभवो. +ना. पराक्रमे. मो. पराक्रम. 7ना. अनेग. 6मो, शंखचक्रगदादि. 2मो. प्रजाप्रबुद्ध. 3मो. तो कृष्णकीर्तन पढे सदा.

॥ ४७ ॥ कीर्तन करितां नामानुवाद ॥ संकटीं रक्षिला प्रल्हाद ॥ कीर्तनें *तुष्टे गोविंद ॥ छेदी भवबंध दासांचा ॥ ४८ ॥ गजेंद्रें नामस्मरण ॥ करितां पावला नारायण ॥ त्याचें तोडोनि भवबंधन ॥ निजधामा आपण स्वयें नेला ॥ ४९ ॥ अधमाधम अतिवोखटी ॥ तोंडा राम आला अवचटीं ॥ ते गणिका[१] ×कीं वैकुंठीं ॥ कृष्णनामासाठीं संरती केली ॥ ॥ ३५० ॥ महादोषांचा मेरुगळा ॥ अतिनष्ट अजामेळा ॥ तोही नामें निर्मळ केला ॥ प्रताप आगळा नामाचा ॥ ५१ ॥ +नामें विनटली गोविंदीं ॥ ते संकटीं राखिली द्रौपदी ॥ नाम तोडी आधिव्याधी ॥ जाण त्रिशुद्धी दासांची ॥ ५२ ॥ अंतरशुद्धीचें कारण ॥ मुख्यत्वें हरिकीर्तन ॥ नामापरतें साधन ॥ सर्वथा आन असेना ' ॥ ५३ ॥ कीर्तनीं हरीची आवडी कैशी ॥ वत्सालागीं धेनु जैशी ॥ कां न विसंबे जेवीं माशी ॥ मोहळाशी क्षणार्ध ॥ ५४ ॥ तेवीं नामस्मरतया भक्ता ॥ अतिशयें आवडी अच्युता ॥ दासांची अणुमात्र अवस्था ॥ निजांगें सर्वथा निवारी स्वयें ॥ ५५ ॥ यालागीं हरिकीर्तनीं गोडी ॥ जयासि लागली धडफुडी॥ त्यासि नानासाधनांच्या वोढी ॥ सोसावया सांकडीं कारण नाहीं ॥ ५६ ॥ ज्या कीर्तनीं कथाकथनीं ॥ चौगुणा आल्हाद उपजे मनी ॥ तो *उतरला सर्वसाधनीं ॥ पवित्र अवनी त्याचेनी ॥ ५७ ॥ 'एकचि जरी नाम वाचे ॥ सदा वसे श्रीरामाचें ॥ तरी पर्वत छेदोनि पापाचे ॥ परमानंदाचें निजसुख पावे ' ॥ ५८ ॥ आवडीं करितां हरिकीर्तन ॥ हृदयीं प्रकटे श्रीजनार्दन ॥ त्याहोनि श्रेष्ठ साधन ॥ सर्वथा आन असेना ॥ ५९ ॥ थोर कीर्तनाचें सुख ॥ निष्ठा तुष्टे यदुनायक ॥ कीर्तनें तरले असंख्य ॥ सांवडे लोक हरिनामें ॥ ६६० ॥ यालागीं कीर्तनाहूनि थोर ॥ आन साधन नाहीं सधर ॥ मा कवणा हेतु पामर ॥ कीर्तन नर निंदिती॥ ॥ ६१ ॥ एवं नामकीर्तनीं जे विमुख ॥ ते स्वप्नींही नदेखती सुख ॥ कीर्तनद्वेषें मूर्ख ॥ अति-दुःख भोगिती ॥ ६२ ॥ ज्याचे हृदयीं द्वेषसंचार ॥ जळोजळो त्याचा आचार ॥ सदा काळीं द्वेषी नर ॥ दुःख दुस्तर भोगिती ॥ ६३ ॥ कलियुगीं जे बुद्धिमंत ॥ ते नामकीर्तनीं सदा ०निरत ॥ गौरवूनि नाम स्मरत ॥ हर्षयुक्त सप्रेमें ॥ ६४ ॥ नाना अवतार अतिगहन ॥ त्यांत श्रीराम कां भगवान कृष्ण ॥ त्याचें चारित्र अतिपावन ॥ त्याचें चरणवंदन मांगत ॥ ६५ ॥

॥श्लोक॥ ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिंचिनुतं शरण्यम्॥
॥ भृत्यार्तिहन्प्रणतपाल भवाब्धिपोतं वंदे महापुरुष ते चरणारविंदम् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ लक्षा, लक्षें, ध्यानलक्षणें ॥ देव, देवी, ध्येय, ध्यानें ॥ तृणप्राय केली 7जाणे ॥ हरिचरणें तत्काळ ॥ ६६ ॥ यालागी *ध्यानासि ते वरिष्ठ ॥ ध्यातां छेदी कल्पनादि कष्ट ॥ भक्ताचे अति अभीष्ट ॥ मनोरथ इष्ट सदा पुरवी ॥६७॥ नित्य ध्यातां हरीचे चरण ॥ *करी भक्ताचें रोगदुःखहरण ॥ 0इतुकेंच राया नव्हे जाण ॥ करी निर्दळण भवरोगा ॥ ६८॥ भक्तांचे

१ वेश्या (पिंगला) २ मान्य. ३ पुतळा, मूर्ति. ४ उत्कंठा, ५ पृथिवी. ६ भावडे. ७ बळकट. ८ तुच्छ.

*ना, मो. तुष्टला. ×ना. एकाकी. +मो. नामी. *ना. तरला. ०ना. रत. 7ना. जेणें. *ना. ध्यानें. *मो. कुभुक्त रोग दुःख हरण. 0ना. मो. तैसे.

पुरवी मनोरथ ॥ ते तूं म्हणसी विषययुक्त ॥ परमानंदें नित्य तृप्त ॥ निववी निजभक्तचरणामृतें ॥ ६९ ॥ वानूं चरणाची पवित्रता ॥ शिव पायवणी वाहे माथा ॥ जे जन्मभूमी सकळतीर्थां ॥ पवित्रपण भक्तां चरणध्यानें ॥२७०॥ अवचटें लागल्या चरण ॥ पवित्र झाले पाषाण ॥ मा जे जाणोनि करिती ध्यान, ॥ त्यांचें पवित्रपण काय वानूं ॥ ७१ ॥ जो सदा शत्रुत्वें वर्ततां ॥ जेणें चोरून नेली निजकांता ॥ त्याचा *बंधू शरणागता ॥ दिधली आप्तता निज भावें ॥७२॥ कोरडी आप्ततेची थोरी ॥ तैशी नव्हेगा नृपकेसरी ॥ देऊनि सुवर्णांची नगरी ॥ अचळतेवरी स्थापिला ॥ ७३ ॥ यालागीं शरणागतां शरण्य ॥ सत्य जाण हरीचे चरण ॥ यापरतें निर्भय स्थान ॥ नाहीं आन निज भक्तां ॥ ७४ ॥ भक्तांची अणुमात्र व्यथा ॥ क्षणही नसाहवे भगवंता ॥ प्रल्हादाची अतिदुःखता ॥ होय निवारिता निजांगें ॥ ७५ ॥ दावाग्नि गिळूनि अंतरीं ॥ गोपाळ राखिले वनांतरीं ॥ पांडव जळतां जोहरीं ॥ काढिले बाहेरीं विवरद्वारें ॥ ७६ ॥ करूनि सर्वांगाचा वोढा ॥ नित्य निवारी भक्तांची पीडा ॥ जो कां भक्तांचिया भिडा ॥ रणरंगीं कुडा वागवी रथ ॥७७॥ ते चरण वंदितां साष्टांगीं ॥ भक्तां प्रतिपाळी उत्संगीं ॥ ऐसा प्रणतपाळ °कृपावोघीं ॥ दुसरा जगीं असेना ॥७८॥ +तरावया भवाब्धि प्रबळ ॥ चरणाची नावें अडंडळ ॥ अनन्यशरण सकळ ॥ तारी तत्काळ चरणानुरागें ॥ ७९ ॥ ते महापुरुषाचे श्रीचरण ॥ शरणागता निजशरण्य ॥ ज्यांचें सनकादिक ध्यान ॥ अभिवंदन सत्पात्रें ॥ ३८० ॥ अगाध चरणांचें महिमान ॥ वानितां वेदां पडिलें मौन ॥ ब्रह्मा सदाशिव आपण ॥ करितां स्तवन तटस्थ ठेले ॥८१॥ अगम्य अतर्क्य श्रीचरण ॥ जाणोनि ब्रह्मादिक ईशान ॥ साष्टांगें अभिवंदन ॥ करूनिया स्तवन करिती ऐसें ॥ ८२ ॥

॥श्लोक॥ त्यक्त्वा सुदुस्त्यजसुरेप्सितराज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम् ॥
मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वंदे महापुरुष ते चरणारविंदम् ॥ ३४ ॥

टीका ॥ जे राज्यश्रियेकारणें ॥ अमर लोलंगत मनें ॥ ते राज्य श्रीरामें त्यागणें ॥ वचना कारणें पित्याच्या ॥ ८३ ॥ श्रीराम धर्मिष्ठ चोख ॥ पितृवचनप्रतिपाळक ॥ उद्धटें राज्य सांडोनि देख ॥ निघे एकाएक वनवासा ॥ ८४ ॥ वनवासा चरणीं जातां ॥ सवें घेतली प्रियसीता ॥ येणें बोलें श्रीकामता ॥ श्रोतीं सर्वथा नमानावी ॥ ८५ ॥ तरी केवळ स्त्री नव्हे सीता ॥ ते निजभक्त जाण तत्त्वतां ॥ सांडूनि राज्यभोग समस्ता ॥ सेवेच्या निजस्वार्था वना आली ८६ राज्यीं असतां रघुवीरें ॥ दास्य दासां वाटिलें अधिकारें ॥ तें मी एकली एकसरें ॥ सेवा वनांतरीं अवघीची करीन ॥८७॥ ते सेवा यावया हाता ॥ सकळ सेवेच्या निजस्वार्था ॥ यालागीं चरणचाली सीता ॥ आली तत्त्वतां ×वनवासा ॥ ८८ ॥ कैसे श्रीरामसेवेचें सुख ॥ चरणीं चालतां नाठवे दुःख ॥ विसरली माया माहेर पक्ष ॥ अत्यंत हरिख सेवेचा ॥ ८९ ॥ ऐशिया मनोगतसद्भावा, ॥ वना आली करावया सेवा ॥ श्रीराम जाणें भक्तभावा ॥ येरा देवां दानवां कळेना ॥ ३९० ॥ निजभक्तांचें मनोगत ॥ जाणता एक रघुनाथ ॥ कां श्रीरामसेवेचा स्वार्थ ॥

---

१ पायापासून निघालेली गंगा. २सीता. ३बिभीषण. ४ स्वर्णनगरी ( लंका ) घर. ५आश्रयस्थान. ६ लाक्षागृहीं. ७ मांडीवर. ८ नम्रांचें पालन करणारा. ९ नौका. १० अढळ, बिनधोक. ११ लोभिष्ठ होतात. १२ मोठें. १२ बाईल वेडपणा.

*ना. बंधूसि. °मो. कृपावेधीं +ना. मो. तारावया. ×मो. वनवासासी.

जाणती निजभक्त भजनानंदें ॥ ९१ ॥ भगवद्भजनाचें सुख ॥ भक्त जाणती भाविक ॥ +भावेंविण भजनसुख ॥ अनोळख सर्वांसी ॥ ९२ ॥ पूर्ण भाविक भक्त सीता ॥ हें कळलेंसे रघुनाथा ॥ यालागीं तिचिया वचनार्था ॥ होय धांवतां मृगामागें ॥ ९४ ॥ मायिक मृगाचें सुवर्णभान ॥ जरी जाणे रघुनंदन ॥ तरी भक्तलळे पाळण ॥ करी धांवन मृगामागें ॥९३॥ बाळकाचेनि छंदें जाण ॥ जेवीं माउली नाचे आपण ॥ तेवीं मायामृगापाठीं धावन ॥ करी रघुनंदन निजभक्तवाक्यें ॥ ९५ ॥ जो राम वानरांच्या गोष्टी ॥ ऐकतां विकल्प नधरी पोटीं ॥ तो सीतेच्या वचनासाठीं ॥ धांवे मृगापाठीं ×नवल कायी ॥ ९६ ॥ भलतैसें भक्तवचन ॥ मिथ्या न म्हणे रघुनंदन ॥ यालागीं निजचरणीं धावन ॥ करी आपण मृगामागें ॥ ९७ ॥ एवं भक्तवाक्यें उठाउठी ॥ जो पायीं धांवे मृगापाठीं ॥ ज्याचे चरणरेणु अंणुकुटी ॥ वंदिती मुकुटीं शिवादि सर्व ॥ ९८ ॥ तो मृगामागें धांवतां जाण ॥ पावन केले पाषाण ॥ त्याच्या चरणा अनन्यशरण ॥ अभिवंदन सद्भावें ॥ ९९ ॥ एवं महापुरुषाचे चरण ॥ अभिवंदनें करिती स्तवन ॥ कलियुगीं *कीर्तनें जन ॥ परमपावन नित्यमुक्त ॥ ४०० ॥

॥ श्लोक ॥ एवं युगानुरूपाभ्यां भगवान् युगवर्तिभिः ॥ मनुजैरिज्यते राजन् श्रेयसामीश्वरो हरिः ॥ ३५ ॥

॥टीका॥ एवं त्रेतादी कलियुगवरी ॥ इहीं नामीं रूपीं अवतारी ॥ सद्भावें तेच्या नरीं ॥ भजिजे श्रीहरी श्रेयार्थ ॥ १ ॥ त्यांमाजीं कलियुगाची थोरी ॥ वानिजे सज्ञानी ऋषीश्वरीं ॥ येथें हरिकीर्तनावारी ॥ मुक्ती चारी वोळगल्या ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ कलिं सभाजयंत्यार्या गुणज्ञाः सारभागिनः ॥ यत्र संकीर्तनेनैव सर्वः स्वार्थोऽभिलभ्यते ॥ ३६ ॥

॥टीका ॥ अवधारीं राया सर्वज्ञा ॥ धन्यधन्य कलियुग जाणा ॥ जेथें सर्व स्वार्थ हरिकीर्तना॥ नामस्मरणासाठीं होती ॥ ३ ॥ कलियुगीं दोष बहुत ॥ केवीं ०कीर्तनें होय स्वार्थ ॥ तेथें दोषत्यागें जे गुण घेत ॥ ते नित्य *मुक्त हरिकीर्तनें ॥ ४ ॥ हरिकीर्तनें शुद्ध चित्त ॥ दोषत्यागें गुणसंगृहीत ॥ ऐसें सारभागी कलियुगांत ॥ ३परममुक्त हरिकीर्तनें॥५॥ हरीकिंकर कलीच्या गुणातें जाणते ॥ नामें मोक्ष जोडे येथें ॥ जाणोनि करिती कीर्तनातें ॥ ते जाण निश्चितें नित्यमुक्त ॥ ६ ॥ कलियुगीं हेंचि सार ॥ नाम स्मरावें निरंतर ॥ करिती नामाचा निजगजर ॥ ते मुक्त नर नृपनाथा ॥ ७ ॥

॥ श्लोक संमत ॥ ध्यायन्कृते यजन्यज्ञैस्त्रेतायां द्वापरेऽर्चयन् ॥ यदाप्नोति तदाप्नोति कलौ संकीर्त्य केशवम् ॥ १ ॥

॥टीका॥ कृतयुगीं शमदमसाधन ॥ त्रेतायुगीं वेदोक्त यज्ञ ॥ द्वापरीं आगमोक्त पूजन ॥ तंत्रविधान विधियुक्त ॥ ८ ॥ यापरी 8त्रियुगीं जनां ॥ परम संकट साधना ॥ करितांहि परी मना॥

---

१ खोट्या, मायावी. २ सूक्ष्म, परमाणु. ३ त्या त्यावेळच्या. ४ आल्या.

+मो. भावें निजभजन सुख. ×मो. हें नवल नव्हे *मो. कीर्तन जाण. ०ना. हरिकीर्तनी. *मो. तृप्त. ३ना. परमभक्त हरिकीर्तनीं. 8मो. त्रेतायुगीं

अणुमात्र जाणा उपरमु नव्हे ॥ ९ ॥ तीं अवघींच साधनें ॥ कलीं लाजविलीं कीर्तनें, ॥ जेथें गातां नाचतां आपणें ॥ वश्य करणें परमात्मा ॥ ४१० ॥ आखेरें हुंबळी गुणें ॥ ऐकतां गौंवेळांचे गाणें ॥ देव भुलला सर्वप्राणें ॥त्यासवें नाचणें स्वानंदें ॥११॥ कृष्णा कान्हों गोपाळा ॥ या आर्ष नामांचा चाळा ॥ घेऊन गर्जती वेळोवेळां॥+तेणें घनसांवळा सुखावे ॥१२॥ तेणें सुखाचेनि संतोषें ॥ देव परमानंदें उल्हासे ॥ एवं कलियुगीं कीर्तनवशें ॥ भक्त अनायासें उद्धरती ॥ १३ ॥ कीर्तन आवर्तनमेळीं ॥ जळती पापाच्या वडवाळी ॥ भक्त उद्धारती तात्काळीं ॥ हरिनामें कली दादुगा ॥ १४ ॥ कलियुगीं हेचि थोरी ॥ नामसंकीर्तनावारी ॥ चहूंवर्णां मुक्त करी ॥ तेथें नविचारी स्त्रीशूद्र ॥ १५ ॥ वेद अत्यंत कृपण झाला ॥ त्रिवर्णांचे कानीं लागला ॥ स्त्रीशूद्रादिकांशीं आबोला ॥ धरूनि ठेला अद्यापि ॥ १६ ॥ तें वेदाचें अतिन्यून ॥ उद्धरी हरिनाम कीर्तन ॥ स्त्रीशूद्रअंत्यजजन ॥ होय उद्धरण हरिनामें ॥ १७ ॥ कीर्तनें स्वधर्म वाढे ॥ कीर्तनें चित्तशुद्धि जोडे ॥ कीर्तनें परब्रह्म आतुडे ॥ मुक्ति कीर्तनापुढें लाजोनि जाय ॥ १८ ॥ कीर्तनानंदें चारी मुक्ती ॥ हरिभक्तांतें वरूं येती ॥ भक्त त्यांतें उपेक्षिती ॥ तरी पायां लागती दास्यत्वें ॥ १९ ॥ एवढी कलियुगाप्रती ॥ कीर्तनाची परम ख्याती ॥ राया जाणगा निश्चितीं ॥ विकल्प चित्तीं झणें धरिसी ॥ ४२० ॥ कृतत्रेताद्वापारासी ॥ निषेध नाहीं नामासी ॥ कलियुगीं नामापासीं ॥ चारी मुक्ती दासी स्वयें होती ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ नत्यतः परमो लाभो देहिनां भ्राम्यतामिह ॥ यतो विंदेत परमां शांतिं नश्यति संसृतिः ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ जे जन्ममरणांच्या आवर्तीं ॥ पडिले संसारीं सदा भ्रमती ॥ त्या प्राणियां कलियुगाप्रती ॥ कीर्तनें गती नृपनाथा ॥ २२ ॥ कलियुगीं कीर्तनासाठीं ॥ संसारा काढूनि कांठीं॥ परमशांति सुखसंपुष्टीं ॥ पडे मिठी परमानंदीं ॥ २३ ॥ ऐसा कीर्तनीं परम लाभ ॥ शिणतां सुरनरां दुर्लभ ॥ तो कलियुगीं झाला सुलभ ॥ *यालागीं सभाग्यां लोभ हरिकीर्तनाचा ॥ ॥ २४ ॥ कीर्तनास्तव चारी मुक्ती ॥ भक्तांपासीं वोळंगती ॥ हें न घडे कोणी म्हणती ॥ ऐक ते स्थिती नृपनाथा ॥ २५ ॥ कीर्तनीं हरिनामाचा पाठा ॥ तेणें देवासि संतोष मोठा ॥ वेगीं सांडोनि वैकुंठा ॥ धांवे अवचटा कीर्तनामाजीं ॥ २६ ॥ हरिकीर्तनीं ×लोभला देवो ॥ विसरला वैकुंठासी जावों ॥ तोचि आवडला ठावो ॥ भक्तभावो देखोनी ॥ २७ ॥ जेथें राहिला यदुनायक ॥ तेथेंचि ये वैकुंठलोक ॥ यापरी मुक्ती सलोकिक ॥ कीर्तनें देख पावती भक्त ॥ २८ ॥ नामकीर्तन निजगजरीं ॥ भक्तांनिकट धांवे श्रीहरी ॥ तेंचि समीपता मुक्ती खरी ॥ भक्तांच्या करीं हरिकीर्तनें ॥ २९ ॥ कीर्तनें तोषला अधोक्षज ॥ भक्तां प्रत्यक्ष गरुडध्वज ॥ ॥ शाम पीतवास चतुर्भुज ॥ तें ध्यान सहज ठसावे ॥ ४३० ॥ भक्त

---

१ गोठणीवर, तळ्यावर. २ हुंबरीचे रूपानें. ३ गोपाळ. ४ आर्ष. ५ श्रमावांचून. ६ आवृत्तीनें. ७ ग्रास, आहुती. ८ अभनुत. ९ संशय. १०भवऱ्यांत. ११ अडचण, दुःख. १२ यत्न करूनहि १३ येतात.

+मो. तेणें घननीळा सुख होय. *ना. यालागीं भाग्य लोभ हरिकीर्तनीं मो. यालागीं सभाग्य लोभ करी कीर्तनाचा. ×ना. लोधला.

कीर्तन करी जेणें ध्यानें ॥ तें ध्यान दृढ ठसावे मनें ॥ तेव्हां देवाचीं निजचिन्हें ॥ भक्तें प्रावर्णे संपूर्ण ॥ ३१ ॥ श्याम चतुर्भुज पीतांबरधारी ॥ शंखचक्रादि आयुधें करीं ॥ हे स्वरूपता भक्तांतें वरी ॥ कीर्तनगजरीं भौळोनी ॥ ३२ ॥ तेव्हां देवभक्त समसमान ॥ समान अवयव समचिन्ह ॥ भावें करितां हरिकीर्तन ॥ एवढें महिमान हरिभक्तां ॥ ३३ ॥ दोघां एकत्र रमा देखे ॥ देव कोण तेंही नोळखे ॥ ब्रह्मा नमस्कारीं चंवके ॥ देव तात्त्विकें नकळे स्वामी ॥ ३४ ॥ भावें करितां हरिकीर्तन ॥ तेणें संतोषे जनार्दन ॥ उभयतां पडे आलिंगन ॥ मिठी परतोन सुटेना ॥ ३५ ॥ तेव्हां ×सबाह्यांतरीं ॥ देव प्रगटे चराचरीं ॥ दुजें देखावया संसारीं ॥ सर्वथा उरी उरेना ॥ ३६ ॥ वृत्ति स्वानंदीं निमग्न ॥ परतोनि कदा नव्हे भिन्न ॥ सायुज्यमुक्ति यानांवें पूर्ण ॥ जेणें दुजेपणा असेना ॥ ३७ ॥ ऐशी लाहूनि पूर्ण सायुज्यता ॥ तो जें करी हरिकथा ॥ ते कथेची तल्लीनता ॥ जीवां समस्तां अतिप्रिय ॥ ३८ ॥ यापरी हरिकीर्तनापासीं ॥ चारी मुक्ती होती दासी ॥ भक्त ＊लोभले हरिभजनासी ॥ सर्वथा मुक्तीसी नघेती ॥ ३९ ॥ एवं +योगयागादितपसाधनें ॥ पोरटीं केलीं हरिकीर्तनें ॥ कलियुगीं नामस्मरणें ॥ जड उद्धरणें हरिकीर्तीं ॥ ४४० ॥

॥ श्लोक ॥ कृतादिषु प्रजा राजन् कलाविच्छंति संभवम्॥कलौ खलु भविष्यंति नारायणपरायणाः ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ कीर्तनासाठीं चारी मुक्ती ॥ हेचि कलियुगीं मुख्य भक्ती ॥ यालागीं इंद्रादिक देवपंक्ती ॥ जन्म इच्छिती कलियुगीं ॥ ४१ ॥ स्वर्ग नव्हे जन्मस्थान ॥ हें विषयाचें बंदिखान ॥ कलियुगीं सभाग्य जन ॥ जन्मोनि कीर्तन हरीचें करिती ॥४२॥ जेथींच्या जन्मा देव सकाम॥ तेथें कृतादियुगींचें उत्तमोत्तम ॥ प्रजा अवश्य वांछिती जन्म॥ कीर्तनधर्म निजभजना ॥४३॥ कृतयुगींचें सभाग्य जन ॥ यागीं पावले स्वर्गस्थान ॥ तेही कलियुगींचें जाण ॥ जन्म आपण वांछिती ॥ ४४ ॥ कृत त्रेत आणि द्वापार ॥ येथीलही मुमुक्षु नर ॥ कलियुगीं जन्म तत्पर ॥ निरंतर वांछिती ॥ ४५ ॥ तेंचे लोक करिती गोष्टी ॥ चारी पुरुषार्थ कीर्तनासाठीं ॥ कलियुगीं हे महिमा मोठी ॥ धन्यधन्य सृष्टी कलियुग ॥ ४६ ॥ जे असतील धन्यभागी ॥ ते जन्म पावती कलियुगीं ॥ ऐसे कलीच्या जन्मालागीं ॥ सुरनरउरगीं उत्कंठा ॥ ४७ ॥ तरावया दीन जन ॥ कलिमाजीं श्रीनारायण ॥ नामें छेदी भवबंधन ॥ तारी हरिकीर्तन सकळांसी ॥ ४८ ॥ यालागीं कलिमाजी पाहीं ॥ श्रद्धा हरिकीर्तनाच्या ठायीं ॥ जन तरती सुखोपायीं ॥ संदेह नाहीं नृपनाथा ॥ ४९ ॥ कलियुगीं बहुसाल नर ॥ होतील नारायणपर ॥ भक्तीचें भोजें विचित्र ॥ शूद्र माजविती ॥ ४५० ॥

---

१ भुलून. २ लक्ष्मी. ३ चकित होई. ४ वास्तविक. ५ वृत्तिगत आनंदांत. ६ वेगळेपणा. ७ पोरगळ, तुच्छ. ८ मूढ. ९ यज्ञांनीं. १० देव, मनुष्य, सर्प. ११ मोठेपण, गाज्य.

×मो. सबाह्यभ्यंतरी. ＊ना. लोधले. मो. भक्त लोभें घे हरिभजनासी, ते मुक्तीसी नेघेती. +मो. युगयुगादि.

॥ श्लोक ॥ क्वचित् क्वचिन्महाराज द्रविडेषु च भूरिशः ॥ ताम्रपर्णी नदी यत्र कृतमाला पयस्विनी ॥ ३९ ॥ कावेरी च महापुण्या प्रतीची च महानदी ॥ ये पिबंति जलं तासां मनुजा मनुजेश्वर ॥ प्रायो भक्ता भगवति वासुदेवेऽमलाशयाः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ विशेषें द्रविड देशाच्या ठायीं ॥ अतिशयें भक्ती वाढेल पाहीं॥ तेथंही तीर्थविशेषें पी ॥ ते ते ठायीं अतिउत्कट ॥५१॥ ताम्रपर्णीच्या तीरीं ॥ हरीभक्तीची अगाध थोरी॥ कृतमालेच्या परिसरीं ॥ उत्साहें करीं हरिभक्त नांदे ॥ ५२ ॥ निर्मळजळें पयस्विनी ॥ तिचिये पयप्राशनीं ॥द्यत्ति वाढे हरीचरणीं ॥ भगवद्भजनीं दृढबुद्धी ॥ ५३ ॥ देखतां कावेरीची थडी ॥ पळती पापांचिया कोडी ॥ जेथें श्रीरंग वसे आवडी ॥ तेथें भक्ति दुथडीं उद्भट नांदे ॥ ५४ ॥ प्रतीचीमाजीं देतां बुडी ॥ चित्तशुद्धी जोडे जोडी ॥ भजन वाढे चढोवढी ॥ भक्तीची गुढी वैकुंठीं X उभे ॥ ५५ ॥ ऐके नरवरचूडामणी ॥ या पंचनदींचिया तीर्थस्नानीं ॥ अथवा पयप्राशनीं ॥ भगवद्भजनीं दृढबुद्धी ॥ ५६ ॥ या तीर्थांचें केल्या दर्शन ॥ तेणें कलिमला क्षालन । केल्या स्नान पयप्राशन ॥ भगवद्भजन उल्हासे ॥ ५७ ॥ दर्शन स्पर्शन स्नान ॥ या तीर्थांचें करितां *जाण ॥ वासुदेवीं निर्मळ भजन ॥ नित्य नूतन दृढ वाढे ॥ ५८ ॥ यापरी जे जे भगवद्भक्त ॥ ते ऋणत्रयासि निर्मुक्त ॥ सुरनरपितरां पंगिस्त ॥ हरिभक्त कदा नव्हती ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ देवर्षिभूताप्तनृणां पितॄणां न किंकरो नायमृणी च राजन् ॥ सर्वात्मना यः शरणं शरण्यं गतो मुकुंदं परिहृत्य कर्तम् ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ शरणागता निज शरण्य ॥ मुकुंदाचे श्रीचरण ॥ सद्भावें रिघाल्या शरण॥जन्ममरण बाधीना ॥ ४६० ॥ जेथें बाधीना जन्ममरण ॥तेथें भूत ऋषी आप्त पितृगण ॥ यांच्या ऋणाचा पाड कोण ॥ ते झाले उत्तीर्ण भगवद्भजनें ॥ ६१॥ जो विनटला हरिचरणीं ॥ तो कोणाचा नव्हे ऋणी ॥ जेवीं परिसाचीये मिळणीं ॥ लोह काळेपणीं निर्मुक्त ॥ ६२ ॥ सकळपापांपासूनी ॥ सुटिजे जेवीं गंगास्नानीं ॥ तेवीं विनटल्या हरिचरणीं ॥ निर्मुक्त त्रैऋणीं भगवद्भक्त ॥ ६३ ॥ भावें करितां भगवद्भक्ती ॥सकळ पितर उद्धरती ॥ ऋषीश्वरां नित्य तृप्ती ॥ भगवद्भक्ती स्वानंदें ॥ ६४ ॥ स्वानंदें भगवद्भक्ती ॥ तेणें सर्व भूतें *सुखी होती ॥ पुत्रें केल्या भगवद्भक्ती ॥ आप्त उद्धरती मातापितरें ॥ ६५ ॥ सकळ देवांचा नियंता ॥ अति उल्हासें त्यातें भजतां ॥ देवऋणाची वार्ता ॥ भगवद्भक्तां बाधीना ॥ ६६ ॥ ज्यासी +अनन्य भगवद्भजन ॥ ते कदा नव्हती कर्माधीन ॥ कर्म ज्यांचे आज्ञेआधीन ॥ त्या हरिसी शरण जो झाला ॥ ६७॥ तो नव्हे कर्माचा सेवक ॥ नव्हे दैवाचा पाइक ॥ नव्हे प्राकृतांचा रंक ॥ अनन्य भाविक हरिभक्त ॥ ६८ ॥ जो हरीचा शरणागत ॥ तो कोणाचा नव्हे अंकित॥ कर्माकर्मीं तो अलिप्त॥

१ भूमि. २-३-४-५-६ या नांवाच्या नदीच्या. ७ उभारली ८ पाणी पिण्यानें ९ देव-ऋषी, पितृऋण. १० पराधीन, ओशाळे ११ मुक्त. १२ मिळाला. १३ नियामक. १४ आज्ञाधारक

Xमो. उभवी. *मो. उन्मन. *मो. पुनीत. +मो. अनन्यभावें.

॥ नित्यमुक्त ऋणत्रयासी ॥ ६९ ॥ वासुदेव सर्वांभूतीं ॥ हे दृढ ठसावे प्रतीती ॥ यालागीं ¹लिप्त कर्मगती ॥ सकळ ऋणां निर्मुक्ती *भगवद्भक्तां ॥ ४७० ॥

॥ श्लोक ॥ स्वपादमूलं भजतः प्रियस्य त्यक्तान्यभावस्य हरिः परेशः ॥ विकर्म यच्चोत्पतितं कथंचिद्धुनोति सर्वं हृदि सन्निविष्टः ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ सांडूनि देहींच्या अभिमाना ॥ त्यजूनि देवतांतर¹भजना ॥ जे अनन्यशरण हरिचरणा ॥ ते कर्मबंधना नातळती ॥ ७१ ॥ यापरी जे अनन्यशरण ॥ तेचि हरीसी पाढियंते पूर्ण ॥ हरिप्रियां कर्मबंधन ॥ स्वप्नींही जाण स्पर्शों न शके ॥ ७२ ॥ राया ह्मणसी भगवद्भक्त ॥ विहितकर्मीं +नित्यनिर्मुक्त ॥ ते जरी विकर्म आचरत ॥ तरी प्रायश्चित्त नबाधी भक्तां ॥ ७३॥ जेवीं पंचाननाचें पिलें ॥ नवचे मदगजा वेढिलें ॥ तेवीं हरिप्रिया विकर्म केलें ॥ त्यांसि नवचे बांधिलें यमाचेनि ॥ ७४ ॥ स्मरतां एक हरिचें नाम ॥ *महापातक्यां वंदी यम ॥ मा हरीचे पढियंते परम ॥ ×त्यांचें विकर्म यम केवीं दंडी ॥ ७५ ॥ आशंका ॥ वेदाज्ञा विष्णुचि परम ॥ वेदें विहिले धर्माधर्म ॥ भक्त आचरतां विकर्म ॥ केवीं वेदाज्ञा नेम न बाधी त्यांसी ॥ ७६ ॥ जेवीं रायाचा सेवक आप्त ॥ तो द्वारपाळां नव्हे अंकित ॥ तेथें रायाचा पढियंता सुत ॥ त्यांचा पंगिस्त तो केवीं होय ॥७७॥ हरिनामाचें ज्यासि स्मरण ॥ वेद त्याचे वंदी चरण ॥ मा जो हरीचा पढियंता पूर्ण ॥ त्यासी वेदेविधान कदा नबाधी॥७८॥भक्तापासूनि विकर्मस्थिति॥ कदा नघडेगा कल्पांतीं अवचटें घडल्या दैवगतीं ॥ त्या कर्मा निर्मुक्ति अच्युतस्मरणें ॥ ७९॥ बाधूं नशके कर्माकर्म ॥ ऐसा कोण भागवतधर्म ॥ तं भक्तीचे निजवर्म ॥ उत्तमोत्तम अवधारीं ॥ ४८० ॥ त्यजूनि देहाभिमानबोढी ॥ सर्वां भूतीं हरिभक्ति गाढी ॥ तो कर्माकर्म पायें रगडी ॥ मुक्ति पाय झाडी निजकेशीं ॥ ८१ ॥ तो ज्याकडे कृपा पाहे ॥ त्याचें निर्दळे भवभय ॥ तो जेथें म्हणे राहे ॥ ०तेथें लाहे मुक्तिसुख ॥८२॥ त्याचेनि अनुग्रहें करीं ॥ देव प्रगटे दीनाच्या अंतरीं ॥ त्याच्या कर्माकर्माची बोहरी ॥ स्वयें श्रीहरी करूंलागे ॥ ८३ ॥ जेवीं प्रगटल्या दिनमणी ॥ अंधार जाय पळोनी ॥ राम प्रगटल्या हृदयभुवनीं ॥ 6कर्माकर्मधुणी सहजेंचि ॥ ८४ ॥ भगवंताची नामकीर्ती ॥ याचिनामें परमभक्ती ॥ भक्तीपाशीं चारी मुक्ती ॥ दास्यत्वें वसती नृपनाथा ॥ ८५ ॥ ऐकोनि भक्तांची पूर्णस्थिती ॥ रोमांचित झाला नृपती ॥ आनंदाश्रु नयनीं येती ॥ सुखावलीया वृत्ती डुल्लत ॥ ८६ ॥ सांगतां विदेहाची स्थिती ॥ नारद सुखावे निजचित्तीं ॥ तो उल्हासे वसुदेवाप्रती ॥ सांगे समाप्ती इतिहासाची ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ नारद उवाच ॥ धर्मान्भागवतानित्थं श्रुत्वाऽथ मिथिलेश्वरः ॥ जायंतेयान् मुनीन् प्रीतः सोपाध्यायो ह्यपूजयत् ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ नारद इतिहास सांगतु ॥ तेवांच आनंदें डुल्लतु ॥ तेणें आनंदें बोलतु ॥ भक्तीचें मथितु वसुदेवाप्रती ॥ ८८ ॥ यापरी जयंतिसुतीं ॥ भगवंताची उद्भट भक्ती ॥ सांगितली

१ दुसऱ्या देवतेच्या भजनास. २स्वधर्मकर्माविषयीं, ३ सिंहाचें. ४ उन्मत्त हत्तीनें. ५ न जाय. ६ केले. सांगितले. ७ ओशाळ, अंकीत. ८ वेदाची आज्ञा. ९ भस्म. १० सूर्य.

*ना. भगवद्भजनें. +ना. मुक्त. *ना. महापातकां करी भस्म. ×ना. त्यांत. ०ना. केलें लवलाहे भुक्ती मुक्ती. मो. तेथें राहे लवलाहें भक्ति मुक्ती हरीची. 6मो. कर्माकर्माधुणी.

परमप्रीतीं ॥ मिथिलेशाप्रती निजेबोधें ॥ ८९ ॥ ऐकोनि त्यांचिया वचना ॥ सुख जाहलं विदेहाचिया मना ॥ मग अतिप्रीती पूजना ॥ जयंतिनंदनां पूजिता झाला ॥४९०॥ श्रवणें झाली अतिविश्रांति ॥ तेणें पूजेलागीं अतिप्रीति ॥ विदेहा उल्हासु चित्तीं ॥ स्वानंद स्थिती पूजिता झाला ॥ ९१ ॥ पूजेचा परम आदरू ॥ ×जयंतिनंदनां केला थोरू ॥ +उपाध्याय जो अहल्याकुमरु ॥ तेणेंही अत्यादरु पूजेसी केला ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ ततोऽन्तर्दधिरे सिद्धाः सर्वलोकस्य पश्यतः ॥ राजा धर्मानुपातिष्ठन्नवाप परमां गतिम् ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ यापरी ते भागवतश्रेष्ठ ॥ नवहीजण अतिवरिष्ठ ॥ समस्तां देखतांचि स्पष्ट ॥ झाले अदृष्ट ऊर्ध्वगमनें ॥ ९३ ॥ ते भागवतधर्मस्थिती ॥ अनुष्ठूनि भगवद्भक्ती ॥ राजा पावला परम गती ॥ पूर्णप्राप्ती निजबोधें ॥९४॥ भावें करितां भगवद्भक्ती ॥ देहीं प्रगटे विदेहस्थिती ॥ ते पावोनि जनक नृपती ॥ परमविश्रांती पावला॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ त्वमप्येतान्महाभाग धर्मान् भागवतान् श्रुतान् ॥ आस्थितः श्रद्धया युक्तो निःसंगो यास्यसे परम् ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ सकळभाग्यांचिया पंक्ती ॥ जेथें ठाकल्या येती विश्रांति ॥ ते वसुदेवा भाग्यस्थिती॥ तुझ्या घराप्रती क्रीडत ॥ ९६ ॥ वसुदेवा तुझेनि नांवें ॥ देवातें वासुदेव म्हणावें ॥ तेणें नामाचेनि गौरवें ॥ जनाचे आघवे निरसती दोष ॥ ९७ ॥ येवढ्या भाग्याचा भाग्यनिधी ॥ वसुदेवा तूंचि त्रिशुद्धी ॥ तुवां भागवतधर्माचा विधी ॥ आस्तिक्यबुद्धीं *अवधारिला ॥ ९८ ॥ श्रद्धेनें केलिया वस्तुश्रवणा ॥ मननयुक्त धरावी धारणा ॥ तैं निःसंग होऊनियां जाणा ॥ पावसी तत्क्षणा निजधामासी ॥ ९९ ॥ जया निजधामाच्या ठायीं ॥ कार्य कारण दोन्ही नाहीं ॥ त्या परमपदाच्या ठायीं ॥ निजसुखें पाहीं सुखरूप होसी ॥ ५०० ॥

॥ श्लोक ॥ युवयोः खलु दंपत्योर्यशसा पूरितं जगत् ॥ पुत्रतामगमद्यद्वां भगवानीश्वरो हरि: ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ तुह्मां दंपत्याचिये कीर्ती ॥ यशासी आली श्रीमंती ॥ तुमचें यश त्रिजगती ॥परमानंदें क्षिती परिपूर्ण झाली ॥ १ ॥ ज्यालागीं कीजे यजन ॥ ज्यालागीं कीजे दान ॥ ज्यालागीं तपाचरण ॥ योगसाधन ज्यालागीं ॥ २ ॥ जो नवर्णवे वेदां शेषां ॥ जो दुर्लभ सनकादिकां ॥ त्या पुत्रत्वें यदुनायका ॥ उत्संगीं देखा खेळविसी ॥३॥ जो कळिकाळाचा नित्यशास्ता ॥ जो ब्रह्मादिकांचा नियंता ॥ जो संहारकरां संहर्ता ॥ जो प्रतिपाळिता त्रिजगती ॥४ ॥ जो सकळ भाग्याचें भूषण ॥ जो सकळ मंडणां मंडण ॥ षड्गुणांचें अधिष्ठान ॥ तो पुत्रत्वें श्रीकृष्ण सर्वांगीं लोळे ॥ ५ ॥

---

१ आपल्या ज्ञानानें. २ गौतमपुत्र-शतानंद. ३ यज्ञ पूजन. ४ मांडीवर.

×मो. नंदने. +मो. निजकुळींचे कुळगुरु ॥ वसिष्ठ ऋषीश्वर पूजीता जाला ॥
*मो. विचारिला.

॥ श्लोक ॥ दर्शनालिंगनालापैः शयनासनभोजनैः ॥ आत्मा वां पावितः कृष्णे पुत्रस्नेहं प्रकुर्वतोः ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ परब्रह्ममूर्ती श्रीकृष्ण ॥ सादरें करितां अवलोकन ॥ तेणें दृष्टी होय पावन ॥ डोळ्यां संपूर्ण सुखावबोधू ॥ ६ ॥ कृष्णमुखींचीं उत्तरें ॥ प्रवेशतां कर्णद्वारें ॥ पवित्र झालीं कर्णकुहरें[1] ॥ कृष्णकुमरें अनुवादु ॥ ७ ॥ आळवितां श्रीकृष्णकृष्ण ॥ अथवा कृष्णेसी संभाषण ॥ तेणें वाचा झाली पावन ॥ जैसें गंगाजीवन[2] संतप्तां ॥ ८ ॥ नाना यागविधि यजिती ज्यातें ॥ तेथें न घे जो अवदानातें ॥ तो वारितांही दोही हातें ॥ जैसे सांगतें भोजनीं कृष्ण ॥ ॥ ९ ॥ जो दुर्लभ योगयागीं ॥ तो वेळ राखे भोजनालागीं ॥ मुखींचे शेष दे तुह्मांलागीं ॥ लागवेगीं बाललीला ॥ १० ॥ तेणें *संतृप्त संतोखी ॥ तोही ग्रास घाली तुह्मामुखीं ॥ तुह्मां ऐसें भाग्य त्रिलोकीं ॥ नाहीं आणिकीं अर्जिलें ॥ ११ ॥ तेणें कृष्णशेषामृतें ॥ रसना ×विटाये अमृतातें ॥ मा इतर रसा गोड तेथें ॥ कोण म्हणतें ह्मणावया ॥ १२ ॥ तेणें श्रीकृष्णरसशेषें ॥ अंतरशुद्धी अनायासें ॥ जे +नानातपसायासें ॥ अतिप्रयासें नलभे कदा ॥ १३ ॥ देतां कृष्णासी चुंबन ॥ तेणें अवघ्राणें घ्राण पावन ॥ चुंबितांचि निवे मन ॥ स्वानंद पूर्ण उल्हासे ॥ १४ ॥ तुह्मा बैसले देखे आसनीं ॥ कृष्ण सवेग ये धावोनी ॥ मग अंकावरी बैसोनी ॥ निजांगेमिळणीं[3] निववी कृष्ण ॥ १५ ॥ तेणें श्रीकृष्णाचेनि स्पर्शें ॥ सर्वेंद्रियीं काम नासे ॥ तेणें कर्मचि अनायासें ॥ होय आपैसें निष्कर्म ॥ १६ ॥ सप्रेमभावें संलग्न ॥ देतां श्रीकृष्णासि आलिंगन[4] ॥ तेणें देहाचें देहपण ॥ मातृपण हारपे ॥ १७ ॥ शयनाच्या समयरूपीं ॥ जगा गाढ मूढ अवस्था व्यापी ॥ ते काळीं तुह्मासमीपीं ॥ कृष्णसंद्रूपीं संलग्न ॥ १८ ॥ योगी भावना भावून ॥ कर्म कल्पिती कृष्णार्पण ॥ तुमचीं सकळ कर्में जाण ॥ स्वयें श्रीकृष्ण नित्यभोक्ता ॥ १९ ॥ पुत्रस्नेहाचेनि लालसें ॥ सकळ कर्में अनायासें ॥ स्वयें श्रीकृष्ण सावकाशें ॥ परमउल्हासें अंगीकारी ॥ २० ॥ तुमची पवित्रता सांगों कैसी ॥ पवित्र केलें यदुवंशासी ॥ पुत्रत्वें ⁰पाळूनि श्रीकृष्णासी ॥ जगदोद्धारासी कीर्ती केली ॥ २१ ॥ नाम घेतां वसुदेवसुनु ॥ स्मरतां देवकीनंदन ॥ होय *भवबंधनछेदन ॥ ऐसें पावन नाम तुमचें ॥ २२ ॥ तुम्ही तरा अनायासीं ॥ हें नवल नव्हे विशेषीं ॥ केवळ जे कां कृष्णद्वेषी[5] ॥ ते वैरी अनायासीं विरोधें तारी ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ वैरेण यं नृपतयः शिशुपालपौंड्रशाल्वादयो गतिविलासविलोकनाद्यैः ॥ ध्यायंत आकृतधियः शयनासनादौ तत्साम्यमापुरनुरक्तधियां पुनः किम् ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ शिशुपाल दंतवक्र ॥ पौंड्रकशाल्वादि महावीर ॥ कृष्णासीं चालविती वैर ॥ द्वेषें[6] °मत्सरें ध्यान करिती ॥ २४ ॥ घनश्याम पीतांबर पटें ॥ विचित्रालंकारीं कृष्ण नटे ॥ गदादि आयुधीं ऐसा वेठे[7] ॥ अतिबळें तँगटे रणभूमीसी[8] ॥ २५ ॥ ऐसें वैरवेशें उद्भट ॥ क्रोधें

१ कानांचीं भोंकें. २ गंगेचें पाणी. ३ मिळविलें. ४ आपल्या अंगस्पर्शानें, आलिंगनानें. ५ कृष्णाचे शत्रु. ६ द्वेषानें. ७ अंदाजकरी. ८ शत्रुत्वाच्या मिषानें.

*ना. संतोषे. ×ना. विटाशी. +ना. जनातप. ⁰ना. मानुनी. *मो. भवबंधच्छेदन °ना. मो. मत्सर.

कृष्ण ध्यान उत्कट ।। ते वैरभावें वरिष्ठ ।। तद्रूपता ×स्पष्ट पावले द्वेषें ।। २६ ।। कंसासि परम भयें जाण ।। अखंड लागलें श्रीकृष्णध्यान ।। अन्नपान शयनासन ।। धाकें संपूर्ण श्रीकृष्ण देखे ।।२७।। कंसासुर भयावेशें ।। शिशुपाळादिक महाद्वेषें ।। सायुज्य पावले अनायासें ।। मा श्रद्धाळ कैसे नपावती मोक्ष ।। २८ ।। तुह्मीतरी परमप्रीतीं ।। चित्तें वित्तें आत्मशक्तीं ।। जीवें वोवाळा श्रीपती ।। पायां ब्रह्मप्राप्ती तुमच्या लागे ।। २९ ।। पूर्ण प्राप्ती तुह्मापासीं ।। तें तुमचें न कळे तुह्मासीं ।। बाळक मानितां श्रीकृष्णासी ।। निजलाभासी नाडणें ।। ५३० ।।

।।श्लोक।। माऽपत्यबुद्धिमकृथाः कृष्णे सर्वात्मनीश्वरे ।। मायामनुष्यभावेन गूढैश्वर्ये परेऽव्यये ।। ४९ ।।

।। टीका ।। तुह्मी बाळक माना श्रीकृष्ण ।। हा भावो अतिकृपण ।। तो परमात्मा परिपूर्ण ।। अवतरला निर्गुण कृष्णावतारें ।। ३१ ।। यासि ह्मणें ह्मणा लेंकरूं ।। हा ईश्वराचा ईश्वरू ।। सर्वात्मा सर्वेश्वरू ।। योगियां योगींद्र श्रीकृष्ण स्वामी ।। ३२ ।। हा अविकार अविनाश ।। परात्पर परमहंस ।। इंद्रियनियंता हृषीकेश ।। जगन्निवास जगदात्मा ।। ३३ ।। माया मनुष्यवेशाकृती ।। हा भासताहे सकळांप्रती ।। गूढ ऐश्वर्य महामूर्ती ।। व्यापक त्रिजगतीं त्रिगुणातीत ।। ।। ३४ ।।

।। श्लोक ।। भूभारासुरराजन्यहंतवे गुप्तये सताम् ।। अवतीर्णस्य निर्वृत्यै यशो लोके वितन्यते ।। ५० ।।

।। टीका ।। काळयवनादि असुर ।। कां जरासंधादि महावीर ।। ०अथवा राजे अधर्मकर ।। अतिभूभार सेना ज्यांची ।।३५।। तो उतरावया धराभार ।। धर्म वाढवावया निर्विकार ।। संतसंरक्षणीं शारंगधर ।। पूर्णावतार श्रीकृष्ण ।। ३६ ।। प्रतिपाळावया निजभक्तांसी ।। सुख द्यावया साधूंसी ।। अवतरला यदुवंशीं ।। हृषीकेशी श्रीकृष्ण ।। ३७ ।। तो असुरगजपंचानन ।। सज्जनवन आनंदघन ।। तुमच्या उदरीं श्रीकृष्ण ।। अवतार पूर्ण पूर्णांशेंसीं ।।३८।। उद्धारावया त्रिजगती ।। थोर उदार केली कीर्ती ।। ज्याच्या अवताराची ख्याती ।। पवाडे पढती ब्रह्मादिक।।३९।।तरावया अतिदुस्तर ।। ज्याची कीर्ति गाती सुरनर ।। परमादरें ऋषीश्वर।। कृष्णचरित्र सदा गाती ।। ५४० ।। ज्याचें नाम स्मरतां भक्त ।। कळिकाळा नागवत ।। तो अवतार श्रीकृष्णनाथ ।। तुह्मा आंत प्रगटला ।। ४१ ।। श्रीकृष्णपरब्रह्मैकनिधी ।। यासि पाहूंनका बाळबुद्धी ।। इतुकेन तुह्मी भवाब्धी ।। जाणा त्रिशुद्धी तरलेती ।। ४२ ।। ऐशी श्रीकृष्ण अवतारकथा ।। नारद वसुदेवा सांगतां ।। शुक ह्मणे गा नृपनाथा ।। विस्मयो समस्तां थोर झाला ।। ४३ ।।

।। श्लोक ।। श्रीशुकउवाच ।। एतच्छ्रुत्वा महाभागो वसुदेवोऽतिविस्मितः ।। देवकी च महाभागा जहतुर्मोहमात्मनः ।। ५१ ।।

।। टीका ।। निमिजायंत मुनिगण ।। इतिहास पुरातन जीर्ण ।। श्रीकृष्ण परमात्मा *ब्रह्म पूर्ण ।। नारद आपण निरूपी हर्षें ।। ४४ ।। शुक ह्मणे परीक्षिती ।। ऐकोनि नारदवचनोक्ती ।

१ मुकणे. २ अतिहीन, दुर्बल. ३ दैत्यरूप हत्तीसिंह. ४ जुनां.

×ना. मो. पष्ट. ० ना. अथवा जे अधर्मकार. *ना. परब्रह्म.

देवकी वसुदेव चित्तीं ॥ अतिविस्मिती तटस्थ ॥४५॥ तया नारदाचेनि वचनें ॥कृष्ण परमात्मा बोलें येणें ॥ देवकी वसुदेव निजमनें ॥ दोघेजणें विस्मित ॥ ४६ ॥ तीं परम भाग्यवंत दोन्ही॥ जो पुत्रस्नेहो होता श्रीकृष्णीं ॥ तो सांडोनियां तत्क्षणीं ॥ कृष्णपरब्रह्मपणीं निश्चयो केला ॥ ॥ ४७ ॥ श्रीकृष्ण ब्रह्मभावो ॥ धरितां निःशेष मोह स्नेहो ॥ हृदयींचा निघोनि गेला पहाहो ॥ बाप, नवलावो भाग्याचा ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ इतिहासमिमं पुण्यं धारयेद्यः समाहितः ॥ सविधूयेह शमलं ब्रह्म भूयाय कल्पते ॥ ५२ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे पञ्च मोऽध्यायः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ जो निमिजायंत संवाद ॥ वसुदेवा सांगे नारद ॥ हा इतिहास अतिशुद्ध ॥ जीवभेदछेदक ॥ ४९ ॥ सावधानपणें श्रोता ॥ तल्लीन होऊनि नत्त्वतां ॥ हे इतिहासाची कथा ॥ सार्थकता जो परिसे ॥ ५५० ॥ तेणें सकळपुण्यांचिया राशी ॥ श्रवणें जोडिल्या अहर्निशीं ॥ तो या पुरुष अवश्यतेशीं ॥ ब्रह्मप्राप्तीसी सत्पात्र ॥ ५१ ॥ सार्थक एकएक पद ॥ परिसतां होय अंतर शुद्ध ॥ यालागीं पावे ब्रह्मपद ॥ परमानंद निजबोधें ॥ ५२ ॥ हें पंचाध्यायी ह्मणणें +घडे ॥ पंचवक्त्र चंद्रचूडें ॥ एकादशाचें ज्ञान गाढें ॥ वर्णावया कुडं ध्वज उभविला ॥ ५३॥ पंचाध्यायी नव्हे जाण ॥ एकादशाचे पंचप्राण ॥ उपदेशावया शुद्ध ज्ञान ॥ सामोरे आपण स्वभक्तां आले ॥ ५४ ॥ हे पंचाध्यायी नव्हे केवळ पंचम आलापें ×शुकं-कोकिळ ॥ एकादश*वसंतमूळ ॥ भक्त अळिउळ ०आलापवी स्वयें ॥ ५५ ॥ ०हाही नव्हे प्रकार ॥ हे शर्करा पंचधार ॥ चाखों धाडिली सत्वर ॥ ज्ञानगंभीर निजभक्तां ॥ ५६ ॥ हे पंचध्यायी नव्हे सिद्ध ॥ एकादशाचे पंचगंध ॥ भक्त ओंवतावया शुद्ध ॥ धाडिली प्रसिद्ध गंधाक्षता ॥ ५७ ॥ एकादश अति विवेकी ॥ यावया पंचाध्यायी पालखी ॥ पुढें धाडिली कवतुकीं ॥ निजभक्तांविखीं कृपाळु ॥ ५८ ॥ हे कृष्ण उद्धवअर्धमात्रा ॥ अर्धोदयी महायात्रा ॥ ते यात्रेलागीं हांकारा ॥ पंचाध्यायी खरा साधकां करी ॥ ५९॥ श्रीकृष्णउद्धवमेळा ॥ देखोनि ब्रह्मसुखाचा सोहळा ॥ तो सांगो आली कळवळा ॥ भक्ताजवळा पंचाध्यायी ॥ ५६० ॥ अहं-काराचें मेटें होतें ॥ तें उठवोनि श्रीकृष्णनाथें ॥ केलें आत्मतीर्थे मुक्त ॥ अभयहस्तें उद्धवासी॥ ॥ ६१ ॥ ते मुक्ततीर्थनवाई ॥ पुढें सांगों आली पंचाध्यायी ॥ संसारश्रांत जे जे कांहीं ॥ ते यांवा लवलाही विश्रांतीसी ॥ ६२ ॥ कृष्ण उद्धव गोडगोष्टी ॥ हे निर्विकल्प कपिलाषष्ठी ॥ ते पर्वकाळकसवटी ॥ सांगों उठाउठीं पंचाध्यायी आली ॥ ६३ ॥ उद्धवालागीं भवसागरीं ॥ उतरावया पायउतारीं ॥ भागवतामिषें श्रीहरी ॥ सुगम सोपारी पायवाट केली ॥ ६४ ॥ पोहणियाहुनी पायउतारा ॥ भागवतमार्ग अतिसोपारा ॥ तो मार्ग दाखवावया पुरा ॥

---

१ केवढा मोठा वापरे. २ जीवांचा भेदभाव(ईश्वरापासून वेगळेपणा) नाहिसा करणारा३ अधिकारी. ४अर्थासह. ५ पंचमुखशिवानें. ६ पंचमस्वर. ७ शुकमुनीरूप. कोकिळ. ८ बोलविण्यास. ९ आपल्या भक्तांनिर्पयां१० एक पुण्यपर्व. ११ बालाद्वेण.१२ ठाणें. १३संसारानें थकलेले१४कसोटी. १५ फार सोपा.

+नां. न घडे. ×मो. शुद्ध कोकिळ. *ना. वसंत काळ. ०ना. मो आफावी. ०मो. हा पंचाध्यायी नव्हे प्रकार.

हाकी श्रीशुद्रां पंचाध्यायी ॥ ६५ ॥ पुढील निरूपण आवडी ॥ अतिशयें वाढे चढोवढी ॥ ते कृष्णवाक्यरसगोडी ॥ पंचाध्यायी फुडी वांधावा सांगे ॥ ६६ ॥ कृष्णउद्धवसंवादीं ॥ होईल परब्रह्म गवंदी ॥ साधक मुमुक्षांची मांदी ॥ धांवे विशुद्धी निजसुखार्थ ॥ ६७ ॥ परब्रह्म आलें सोंवेव ॥ स्वरूपसुंदर ज्ञानगौरव ॥ मनोहर रूपवैभव ॥ स्वर्गींचे देव पाहों येती ॥६८॥ तो देवांचा स्तुतिवादु ॥ सर्वेंचि उद्धवाचा निर्वेदु[1] ॥ कृष्णउद्धव महाबोधु ॥ जेणें परमानंद वोसंडे ॥ ६९ ॥ ते पुढील अध्यायीं कथा ॥ रसाळ सांगेन आतां ॥ अवधान यावें श्रोतां ॥ ग्रंथार्थी निजबोधें ॥ ७० ॥ स्वयें वावडी करूनि संपूर्ण ॥ तिसी उडाविजे जेवीं आपण ॥ मग उडालपणें जाण ॥ आपल्या आपण संतोषे ॥ ७१ ॥ तेवीं भजनांवें कविता ॥ करूनि स्वयें सद्गुरु वक्ता ॥ एवं वदवूनियां ग्रंथार्थी ॥ श्रोतेरूपें सर्वथा संतोषे स्वयें ॥ ७२ ॥ ते एकपणेंवीण एकला एका ॥ दुर्जनवीण जनार्दनसखा ॥ तेणें पुढील ग्रंथ आवांका ॥ विशदार्थें देखा निर्वचिला ॥ ७३ ॥ नातळोनि दुर्जेपण ॥ एका जनार्दना शरण ॥ धरोनि श्रोत्यांचे चरण ॥ पुढील ग्रंथार्थ संपूर्ण त्याचे कृपेनें पावेल ॥ ७४ ॥ एका जनार्दननांवें देख ॥ दोनांवीं स्वरूप एक ॥ हें जाणे जो आवश्यक ॥ परमसुख स्वयें पावे ॥ ७५ ॥ एका जनार्दना शरण ॥ त्याची कृपा परिपूर्ण ॥ पंचाध्यायीं निरूपण ॥ झालें संपूर्ण जनार्दनकृपां ॥ ७६ ॥ इति श्रीभागवतें एकादशस्कंधे वसुदेवनारदसंवादे एकाकारटीकायां पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥

---

# अध्याय सहावा.

श्रीगणेशायनमः ॥ श्रीकृष्णायनमः ॥ ओंनमोजी जनार्दना ॥ भावार्थें नमितां चरणा *जनांसहित मीपण ॥ ÷गेलें तूंपणा घेऊनी ॥१॥ लिंगदेहाचें मर्दन ॥ तेंचि जनाचें अर्दन । यालागीं नामें जनार्दन ॥ प्रगट जाण प्रसिद्ध ॥ २ ॥ तुझी ऐशीच करणी ॥ कर्मकृत तुरवूनी ॥ सुखें नांदविसी जनीं ॥ समाधानीं जनार्दना ॥ ३ ॥ सुखेंचि तुझें नाम घेतां । घात करिसी जीविता ॥ जीव घेऊनि तत्त्वतां ॥ होसी सर्वथा कृपाळु ॥ ४ ॥ तुझें नामा प्रबळबळ ॥ माथां नुंथविती कळिकाळ ॥ चारि मुक्ति केवळ ॥ होती निश्चळ निजदासी ॥ ५ नामें एवढें ×धसाळ देणें ॥ त्या तुझें स्वरूप कोण जाणे ॥ सांडूनि जाणणें नेणणें ॥ निवांत रहाणें तत्त्वतां ॥ ६ ॥ तुझा स्तुतिवाद करणें ॥ तंव परतलीं श्रुतिपुराणें ॥ तेथ माझें आरुष बोलणें ॥ कोठें कोणें सांगावें ॥ ७ ' तुझा स्तुतिवाद तें, मौन ॥ तुझा कळवळा कीर्तन ॥ कांहीं नकरणें तें अनुसंधान ॥ साचार जाण +श्रीकृष्णा ' ॥ ८ ॥ ऐशियाही तुझ्या ठायीं ॥ अचाट होवें उठिली देहीं ॥ ते अर्थीं चित्त देई ॥ कृपा निर्वाही गुरुराया ॥९

१चढाओढीनें. २आगमनसूचक खूण. ३ अन्नसत्र. ४ समूह. ५ साकार (सावयव) ६ वीट, विषाद ७ सांगितला. ८ नस्पर्शून, नपावून. ९ जनम् अर्दयति पीडयति असौ जनार्दनः १० वर करिती. ११ पुढें करावें. १२ इच्छा, उत्कंठा.

*जेणें सहितमीपणा. ÷ना. नाहींच जाणा स्वयें केलें. मो. नाहींच केलें. ×ना. दिसाळ +मो. श्रीजनार्दना.

खद्योतप्रकाशें पाहे चांदा ॥ मशक गरुडासी घे खांदा ॥ तैसा मी एकादशस्कंधा ॥ मूर्ख तुमर्था ×टीकार्थी ॥ १० ॥ येचि विषयीं गुरुनाथा ॥ कृपा करावी सर्वथा ॥ ग्रंथरचना ग्रंथार्था ॥ सार्थकता करावी ॥ ११ ॥ ऐसी विनवणी ऐकतां ॥ कृपापद्मकर ठेविला माथां॥ तंव उद्योतकार जाहला ग्रंथा ॥ यथार्थता ○निजबोधें ॥ १२ ॥ नवल कृपेची करणी ॥ अर्थचिंतामणीची खाणी ॥ उघडली तत्क्षणीं ॥ पदार्थश्रेणीं कविमुद्रा ॥ १३ ॥ लेतां सिद्ध अलंकारा ॥ कवण सांकडें लेणारा ॥ ताल राखतां,खेंबसूत्रा ॥ लेपांच्या करा प्रयास काय ॥ ॥१४॥बापाचीं पक्वान्नें घेऊनी॥बाळ घाली बापाचे वदनीं ॥ तेणें साचाचि तो संतोषोनी ॥ होय मनीं सुखाचा ॥ १५ ॥ तैशीच हेही कथा ॥ तूंचि ग्रंथ तूंचि कविता ॥ तेथें कोणी घ्यावी अहंता ॥ मी *कर्ता ह्मणोनी ॥१६॥ गुरुनी सांडविली अहंता ॥ शेखीं राहों न देचि सोहंता ॥ तेथें मी एक कवि कर्ता ॥ हें न सर्वथाचि पै सरे ॥ १७ ॥ सूचितां अहंकाराचा झाडा ॥ सूचनाचि होय त्याचा जोडा ॥ जो आपणियातें ह्मणवी वेडा ॥ तोचि गाढा अतिचतुर ॥ १८ ॥ तैशीच हेही होईल वार्ता ॥ यालागीं श्रीगुरुनाथा ॥ चरणांवरी ठेविला माथा ॥ कर्ता +करविता तूंचि तूं ॥ १९ ॥ मागलि ○ग्रंथसंगती ॥ पंचमाध्यायाचे अंतीं ॥ नारद वसुदेवाप्रती ॥ बोलिला उत्पत्ति ते ऐशी ॥ २० ॥ हा परमात्मा श्रीहरी ॥ लीलाविग्रहें देहधारी ॥ अवतरला तुमच्या घरीं ॥ भाग्यें करी नट नाट्य ॥ २१ ॥ हा ईशाचाही निजईश ॥ वैकुंठींचा निवास ॥ परमात्मा परेश ॥ जगदीश श्रीकृष्ण ॥२२॥ तेंचि नारदवचनप्रमाण ॥ पाहावया श्रीकृष्ण॥ मिळवोनियां देवगण ॥ द्वारकेसि जाण स्वयें आले ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुक उवाच ॥ अथ ब्रह्मात्मजैर्देवैः प्रजेशैरावृतोऽभ्यगात् ॥
भवश्च भूतभव्येशो ययौ भूतगणैर्वृतः ॥१॥

॥ टीका ॥ शुक ह्मणे परीक्षिती ॥ पहावया श्रीकृष्णमूर्ती ॥ सुरवर द्वारकेसि येती ॥ विचित्रस्तुति तिहीं केली ॥ २४ ॥ श्रीकृष्णमूर्तीचें कौतुक ॥ पहावया देव सकळिक ॥ चतुर्मुख पंचमुख ॥ वेगें षण्मुख पातला ॥ २५ ॥ करावया प्रजाउत्पत्ती ॥ पूर्वी निर्मिले प्रजापती ॥ तेही आले द्वारकेप्रती ॥ कृष्णमूर्ती पहावया ॥२६॥ सनकादिक आत्माराम ॥ अवाप्तसकळकाम ॥ तेही होऊनि आले सकाम ॥ मेघश्याम पहावया ॥ २७ ॥ भूतनायक रुद्रगण ॥ आले अकराही जाण ॥ पहावया श्रीकृष्ण ॥ भूतगणस्वगणेंसी ॥ २८ ॥ पहावया श्रीकृष्णरावो ॥ घेऊनि गणांचा समुदावो ॥ द्वारके आला महादेवो ॥ भूतभविष्यांचा पहाहो त्रिकाळज्ञाता ॥ २९ ॥ श्रीकृष्णदर्शनाची उत्कंठा ॥ थोरलागली नीलकंठा ॥ धांवता मोकळ्या सुटल्या जटा ॥ कृष्णवदिशा पहावया ॥ ३० ॥

---

१ काजवा २ चंद्रास. ३ खांद्यावर. ४ केवळ. ५ उदय प्रकाश. ६ अर्थरूप चिंतामणीची ७ पदाचा अर्थ ती पदार्थ त्यांची परंपरा; वस्तुसमूह. ८ आयते नयार. ९ घालणारा. १० कळसूत्र (खेळ). ११ कळसूत्री बाहुल्यांचा हातांना, ताल ( गायनांतील ) धरण्यांत श्रम ते कोणते ? १२ सोबती १३ मूर्ख. १४ पूर्ण आहेत मनोरथ ज्यांचे १५ शंकराला.

×मो. टीकाकार. ○ना. निजकृपें मो. निजदीपें. *ना. कविकर्ता. +मो. अकर्ता ○मो. ग्रंथ संमती.

॥श्लोक॥ इंद्रोमरुद्भिर्भगवानादित्या वसवोऽश्विनौ ॥ ऋभवोऽङ्गिरसो रुद्रा विश्वे-साध्याश्च देवताः ॥ २ ॥ गंधर्वाप्सरसो नागाः सिद्धचारणगुह्यकाः ॥ ऋषयः पितरश्चैव सविद्याधरकिन्नराः ॥ द्वारकामुपसंजग्मुः सर्वे कृष्णदिदृक्षवः ॥ ३ ॥

**॥ टीका ॥ एकुणपन्नास मरुद्गण ॥ तेणेंसि इंद्र आला आपण ॥ पहावया श्रीकृष्ण ॥ स्वयें जाण सादर ॥ ३१ ॥ सांडोनियां रविमंडळा ॥ बारा आदित्यांचा मेळा ॥ पहावया कृष्णसोहळा ॥ तृषित डोळा होऊनि आले ॥ ३२ ॥ सूर्यें अधिष्ठिला डोळा ॥ देखे पदार्थां सकळां॥ कृष्ण न देखतां अंधळा ॥ सूर्या पावला अंधत्व ॥ ३३ ॥ पहातां श्रीकृष्णाचें मुखकमळ ॥ फिटलें सूर्याचें पडळ ॥ मग देखणा जहाला केवळ ॥ सर्वांगें सकळ स्वयें रवी ॥ ३४ ॥ तिन्ही अग्नी तेजाळे ॥ परी ते धूमें झांकोळिले ॥ कृष्ण देखतांच उजळले ॥ निर्धूम जाहले निजतेजें ॥३५॥ आठां वसूंचा मेळा ॥ पाहों आला कृष्णलीला ॥ *ह्मणो मदनाचा पुतळा ॥ तंव तो खेळे लीला कृष्णांकीं ॥ ३६ ॥ अश्विनीकुमार धन्वंतरी ॥ तेही भवरोगें पीडिले भारी ॥ कृष्णदर्शनामृतें करी ॥ निरुजें +क्षणावरी ते जाहले ॥ ३७ ॥ ऋषभदेव, आंगिरस॥ रुद्र मीनले ✱असमसहास ॥ विश्वेसाध्यदेव बहुवस ॥ देवीं आकाश दाटलें ॥३८॥ आमुची गायनकळा मोठी ॥ होतें गंधर्वांच्या पोटीं ॥ ते कृष्णवेणु गीतासाठीं ॥ जाहली शेवटीं नसरेती ॥ ३९ ॥ यालागीं दर्शनाची आस ॥ क्षणक्षणां पाहती वासें ॥ त्यांसि गायनकळा सावकाश ॥ दीधली सुरस कृपामात्रें ॥ ४० ॥ अप्सरा ह्मणती आह्मी नाचणी ॥ तंव काळियाच्या फणिरंगणीं ॥ एकेचि तालें लाजावूनी ॥ तत्क्षणीं सांडिल्या ॥ ४१ ॥ त्या दीनवदना कामिनी ॥ आल्या दर्शनालागोनी ॥ नाचों शिकविल्या नाचणी ॥ रासरंगणीं श्रीकृष्णें॥४२॥ पाहावया श्रीरंग ॥ आले पाताळींचे पन्नग ॥ सिद्ध चरण अनेगें ॥ विद्याधर सांग समुदायें ॥ ४३ ॥ कश्यपादि ऋषीश्वर ॥ अर्यमादि पितर ॥ गुह्यक आणि किन्नर ॥ आले अपार स्वगणेंसी ॥ ४४ ॥ एवं विमानांचिया पंक्ती ॥ दाटलिया द्वारकेप्रती ॥ पहावया कृष्णमूर्ती ॥ आले सुरपती स्वानंदें ॥ ४५ ॥**

॥ श्लोक ॥ वपुषा येन भगवान्नरलोकमनोरमः ॥ यशो वितेने लोकेषु सर्व-लोकमलापहम् ॥ ४ ॥

**॥ टीका ॥ जेणें शरीरें श्रीहरी ॥ नानाचरित्रांतें करी ॥ यश विस्तारिलें संसारीं ॥ दुराचारी तरावया ॥४६॥ ऐकतां श्रीकृष्णकीर्ती ॥ चतुर्विध प्रायश्चित्तांची गती ॥ खुंटली जी निश्चितीं॥ श्रवणार्थीं जहालिया ॥ ४७ ॥ भावें घेतलीया श्रीकृष्णनाम ॥ सकळ पातकां करी भस्म ॥ देवीं देखिला पुरुषोत्तम ॥ विश्रामधाम जगाचें ॥ ४८ ॥ ठाणठकारें अतिउत्तम ॥ सुरनरां-**

---

१ नेत्राची देवता सूर्य, तिच्या सामर्थ्यानें डोळ्यांनीं पदार्थ दिसतात, पण त्या सूर्यालाही कृष्णदर्शनावांचून आंधळेपणा (यदादित्य गतंतेजो तत्तेजोविद्धि मामकं गी०) २ पडदा दृष्टीचा अंतराय. ३ झांकले ४ रोगरहित. ५अग्राह्य ६आशा. ७ वाट. ८ नृत्यनिपुण. ९ नाग. १० अनेक.

***ना. ह्मणोन. +मो. क्षणाभीतरीं. ✱ना. असमसास.**

माजी मनोरम ॥ डोळयां जाहला विश्राम ॥ मेघश्याम देखोनी ॥ ४९ ॥ मुगुटकुंडलें मेखळा॥ कांसे कसिला सोनसळा ॥ कंठीं रुळे वनमाळा ॥ घनसांवळा शोभत ॥ ५० ॥ लावण्यगुण-निधान ॥ अवतारमाळे मुख्य रत्न ॥ देवीं देखिला श्रीकृष्ण ॥ निवासस्थान द्वारका ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ तस्यां विभ्राजमानायां समृद्धायां महर्द्धिभिः ॥ व्यचक्षतावितृप्ताक्षाः कृष्णमद्भूतदर्शनम् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ कृष्णें अधिष्ठिली पुरी ॥ कनककळसांचिया हारी ॥ रत्नें जडिलीं नानाकुसरीं ॥ तेज अंबरीं नसमाये ॥ ५२ ॥ जे द्वारकेभीतरीं ॥ कामधेनु घरोघरीं ॥ कल्पद्रुमांचिया हारी ॥ ०खेळणीं द्वारीं चिंतामणीचीं ॥ ५३ ॥द्वारकाजननिवासियांसी ॥ ×घरीं नवरत्नांच्या राशी ॥ ऋद्धिसिद्धि करूनि दासी ॥ हृषीकेशी नांदत ॥ ५४ ॥ कृष्णरूपाचिया लालसें ॥ डोळयां तेणें लाविलें पिसें ॥ आवडी जाहलें मोरविसें ॥ अतिडोळसें हरि अंगीं ॥ ५५ ॥ कैशी बरवेपणाची शोभा ॥ पाहतां नयनीं निघती जिभा ॥ रसाळपणें तो वालभा ॥ उपनिषद्गाभा साकारिला ॥ ५६ ॥ कृष्ण पहावया आवडी ॥ होतां देवासी वरपडी ॥ डोळयां थोर लागली गोडी ॥ अर्धघडी नविसंबती ॥५७॥कृष्णरूपाचें कौतुक ॥पहातां नयनां लागली भूक ॥ अंतरीं निबिड दाटलें सुख ॥ तरी अधिकाधिक भुकेले ॥ ५८ ॥ अवलोकितां श्रीकृ-ष्णासी ॥ दृष्टीसी दाटणी होतसे कैशी ॥ मुडपघसणी न्याहारीसी ॥ हृषीकेशी पहावया ॥५९॥ मागें पुढें श्रीकृष्णासी ॥ देखणेंनि वेढिलें चौपाशीं ॥ भाग्य उपजलें डोळयांसी ॥ पूर्णपुरुषासी देखती ॥ ६० ॥ श्रीकृष्ण घनसांवळा ॥ निजात्मभावें पाहतां डोळा ॥ सहजें श्यामता आली बुबुळा ॥ कृष्णकळा ठसावली ॥ ६१ ॥ जो नकळेचि वेदाववेंचना ॥ योगियांच्या नये ध्याना॥ त्या प्रत्यक्ष देखोनि कृष्णा ॥ भाग्यगणना अपूर्व ॥ ६२ ॥ ऐसा देखोनियां श्रीहरी ॥ देव सुमनांच्या *शतधारीं ॥ वर्षले पैं अंबरीं ॥ राहोनि वरी विमानीं ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ स्वर्गोद्यानोपगैर्माल्यैश्छादयन्तो यदूत्तमम् ॥ गीर्भिश्चित्रपदार्थाभिस्तुष्टुवुर्जगदीश्वरम् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ मांदार पारिजात संतान ॥ कल्पद्रुम हरिचंदन ॥ ऐशिया वृक्षांचीं सुमनें जाण ॥ कृष्णावरी संपूर्ण वर्षले ॥ ६४ ॥ श्रीकृष्णावरि चहूंकडा ॥ दिव्य सुमनांचा जाहला सडा ॥ समस्तदेवीं सन्मुख पुढां ॥ केला पैं गाढा जयजयकारु ॥ ६५ ॥ सार्थक पदबंधरचना ॥ नाना गद्यपद्यविवेचना ॥ स्तवें आदरिलें यदुनंदना ॥ अमरसेना मिळवूनि ॥६६ ॥

॥श्लोक॥ देवा ऊचुः॥ नताःस्म ते नाथ पदारविंदं बुद्धींद्रियप्राणमनोवचोभिः॥ यच्चिंत्यतेऽन्तर्हृदि भावयुक्तैर्मुमुक्षुभिः कर्ममयोरुपाशात् ॥ ७ ॥

---

१ पानांवर. २ गंगा. ३ आकाशांत. ४ मयूरपिच्छ. ( त्यावरील डोळे. ) ५ डोळयांतून जणू जिभा फुटतात कीं हें रूप खावें. ( पपौ निमिषालसपक्ष्म पंक्तिरुपोषिताभ्यामिव लोचनाभ्यां ) ६ प्रिय. ७ मिठी, मुरकुंडी. ८ दाटी, अडचणी. ९ मुगुट, पागोटें वगैरे १० दृष्टीला. ११ दृष्टीनें, नेत्रांनी. १२ वेदाच्या विचारास. १३ शेंकडों धारांनीं. १४ दाट वर्षाव.

०मो. चिंतामणी द्वारीं लोळती. ×मो. घरोघरीं. *ना. संभारीं.

॥ टीका ॥ विवेकयुक्त प्राणधारणा ॥ मनसा वाचा कर्मणा ॥ नमस्कारु तुझिया चरणां ॥ सच्चिद्घना श्रीकृष्णा ॥ ६७ ॥ इंद्रियउपरमालागीं जाणा ॥ सांडूनि विषयवासना ॥ दशइंद्रियीं लागलों चरणां ॥ नमन श्रीकृष्णा निजभावें ॥ ६८ ॥ विषयीं होऊनियां उदास ॥ सांडोनि संसाराची आस ॥ चरण चिंतिती तापस ॥ कर्मपाश छेदावया ॥ ६९ ॥ ऐसे मुक्तीचिया वासना ॥ मुमुक्षु चिंतिती तुझिया चरणा ॥ त्यांसि अर्धक्षण नयेसी ध्याना ॥ दृढभावना करितांही ॥ ७० ॥ ते प्रत्यक्ष तुझे चरण ॥ आह्मांसि जाइलें जी दर्शन ॥ देव आपुल्या भाग्याआपण ॥ अतिस्तवन करिताती ॥ ७१ ॥ देखूनि सगुणस्वरूपासी ॥ एवढी श्लाघ्यता कां ह्मणसी ॥ जें आलें आकारासी ॥ तें निश्चयेंसी मायिक ॥ ७२ ॥ जैसेचि तुह्मी शरीरधारी ॥ तैसाच मीही एक शरीरी ॥ त्या माझेनि दर्शनेंकरी ॥ तुह्मी कैशापरी तराल ॥ ॥७३॥ऐसें नह्मणावें जी अनंता ॥ जे तूं मायेचा नियंता ॥ हेंही कळलें असे तत्त्वतां ॥ समूळ कथा परियेसी ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ त्वं मायया त्रिगुणयात्मनि दुर्विभाव्यं व्यक्तं सृजस्यवसि लुंपसि तद्गुणस्थः ॥ नैतैर्भवानजितकर्मभिरज्यते वै यत्स्वे सुखेऽव्यवहितेऽभिरतोऽनवद्यः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ झोंप लागल्या झोंप न दिसे पाही ॥ जागें जाहल्या दिसतचि नाहीं ॥ तैसी माया अतर्क्य देहीं ॥ नपडे ठायीं सुरनरां ॥ ७५ ॥ मुळींची तुझी अतर्क्य माया ॥ तिसी गुणक्षोभ जाहला साह्या ॥ ते ब्रह्मादिकां नयेचि आया ॥ देवराया श्रीकृष्णा ॥ ७६ ॥ तूं धरोनि दैवीमायेसी ॥ ब्रह्मादिकीटांतातें सृजिसी ॥ प्रतिपाळोनि संहारिसी ॥ तूं त्या कर्मासी अलिप्त ॥ ७७ ॥ स्वप्नीं स्वयें सृष्टि सृजिली ॥ प्रतिपाळोनि संहारिली ॥ ते क्रिया कर्त्यासि नाहीं लागली ॥ तेवीं सृष्टि केली त्वां अलिप्तत्वें ॥ ७८ ॥ मृगजळाची भरणी ॥ सूर्य करी निजकिरणीं ॥ शोषूनि ने अस्तमानीं ॥ अलिप्तपणीं तैसा तूं ॥ ७९ ॥ समूळ धर्माची वाढी मोडे ॥ अधर्माची शीग चढे ॥ तैं तुज अवतार धरणें घडे ॥ आमुचें सांकडें फेडावया ॥ ८० ॥ करोनि अधर्माचा घात ॥ धर्म वाढविसी यथास्थित ॥ देवांसि निजपदीं स्थापित ॥ कर्मातीत तूं श्रीकृष्णा ॥ ८१ ॥ तुज अखंड देदीप्यमान ॥ आत्मसुखाचें अनुसंधान ॥ तें आह्मांसि नाहीं अर्धक्षण ॥ दीनवदन यालागीं ॥ ८२ ॥ ज्यासि ×आत्मसुख निरंतर ॥ तो देहधारी परी अवतार ॥ त्याचे °चरण पवित्रकर ॥ गंगा, सागरादितीर्थांसी ॥ ८३ ॥ तो जरी वर्ते गुणांआंत ॥ तरी तो *जाणावा गुणातीत ॥ त्याचा चरणरेणु करी घात ॥ त्रैलोक्यांत महापापा ॥ ८४ ॥ ऐसी तुझ्या दासाची कथा ॥ त्या तुझे चरण वंदूं माथां ॥ असो चरणांची हे कथा ॥ कीर्ति ऐकतां निजलाभ ॥ ८५ ॥ चरण देखती ते भाग्याचे ॥ +त्यांचें महिमान नवर्णवे वाचे ॥ पवित्रपण तुझिये कीर्तीचें ॥ परिस साचें स्वामिया ॥ ॥ ८६ ॥ अग्निशिखा समसमानीं ॥ इंधन घालितां वाढे अग्नी ॥ आशा वाढे देहाभिमानीं ॥ श्रवणकीर्तनीं ते त्यागावी ॥ ८७ ॥

१ इंद्रियांच्या शांतीकरितां. २ थोरवी. ३ त्रिगुणांचें वैषम्य. ४ हातीं येत नाहीं ५ उत्पन्न करितोस. ६ चिंतन. ७ पायाची धूळ. ८ अग्नीची ज्वाळा. ९ सर्पण, फेटण.

**×मो. आत्मसुखाचें अनुसंधान. °मो. चरणरेणु अतिपवित्र. *ना. गणावा. +मो. त्याची महिमा न.**

॥ श्लोक ॥ शुद्धिर्नृणां न तु तथेड्यदुराशयानां विद्याश्रुताध्ययनदानतपःक्रियाभिः ॥ सत्वात्मनामृषभ ते यशसि प्रवृद्धसच्छ्रद्धया श्रवणसंभृतया यथा स्यात् ॥ ९ ॥

॥ टीका ॥ कृष्णस्तवनें स्तवितां तरे ॥ श्रवणद्वारें ऐकतां उद्धरे ॥ याल्लागीं स्तव्य तूंचि निर्धारें ॥ ×स्तवनद्वारें तारकु ॥ ८८ ॥ एवं तुझें कीर्तीचें श्रवण ॥ तेंचि परमशुद्धीसी कारण ॥ यावेगळें जें साधन ॥ तें केवळ जाण प्रयास ॥ ८९ ॥ ऐकेंगा सुरवरिष्ठा ॥ तुझिया श्रवणाची उत्कंठा ॥ अंतरीं पापाचा मळकटा ॥ धुवोनि चोखटा करी वृत्ती ॥ ९० ॥ तुझ्या श्रवणीं होऊनि उदास ॥ तपें तपतां तापस ॥ नानासाधनीं कर्कश ॥ झाल्या निरस मती त्यांच्या ॥ ९१ ॥ मंत्रविद्याग्रहण ॥ विकळ उच्चारितां वर्ण ॥ शुद्धी नव्हे परी दारुण ॥ पातक जाण घडे त्यासी ॥ ९२ ॥ करितां शास्त्रश्रवण ॥ चौगुणा गर्व चढे जाण ॥ तो ज्ञातेपणाचा अभिमान ॥ ननिघे जाण चतुर्मुखा ॥ ९३ ॥ करितां वेदाध्ययन ॥ ⁂विस्वर झालिया उच्चारण ॥ शुद्धी नव्हेचि परी मरण ॥ अवश्य जाण वृत्रासुराऐसें ॥ ९४ ॥ दान देतां नहुष ॥ कूपीं जाहला कृकलास ॥ प्राप्ती दुरी, परी नाश ॥ असममाहस गोकडा ॥ ९५ ॥ तप करितां ऋष्यशृंगामी ॥ तो वश जाहला वेश्यांसी ॥ श्रद्धा श्रवणाचिया ऐशी ॥ शुद्धी आणिकांसी पैं नाहीं ॥ ९६ ॥ कर्म करावें यथानिगुती ॥ तेंव त्या कर्माची गहन गती ॥ प्राचीनबर्ह्योची कर्मस्थिती ॥ नारदोक्तीं सांडविली ॥ ९७ ॥ कर्मीं आचमन करावें ॥ तेथ माषमात्र जळ घ्यावें ॥ ✻न्यूनाधिकत्वामवें ॥ दोष पावे सुरापानसम ॥ ९८ ॥ एवं दुष्टहृदय ज्यासी ॥ तपादिकसाधनें त्यासी ॥ शुद्धि नव्हे हृषीकेशी ॥ श्रवणें कीर्तीसी नायकतां ॥ ९९ ॥ श्रवणें परिक्षिती तरला ॥ श्रवणें क्रौंच उद्धरिला ॥ मकरोदरीं श्रवण पावला ॥ सिद्ध जाहला मत्स्येंद्र ॥ १०० ॥ तुझें श्रवण दोपरी ॥ एक तें चित्तशुद्धी करी ॥ दुसरें जीवब्रह्म ऐक्य करी ॥ दोहींपरी उद्धारू ॥ १ ॥ प्रत्यक्ष पाहतां वाराणसी ॥ श्रवणीं तारकब्रह्म उपदेशी ॥ मुक्ती क्षेत्र जाहली ०काशी ॥ श्रवणें जीवासी उद्धारू ॥ २ ॥ तूं अवाप्तसकळकाम ॥ निष्कामाचें निजधाम ॥ ऐशिया तुज करणें कर्म ॥ भक्तश्रम छेदावया ॥ ३ ॥ नानाचरित्रांची करणी ॥ करितां जाहलासि चक्रपाणी ॥ मोक्षमार्गाची निशाणी ॥ दिधली रचूनी जनासी ॥ ४ ॥ चित्तशुद्धीसि कारण ॥ प्रेमयुक्त कीर्तिश्रवण ॥ येथ सच्छ्रद्धाचि प्रमाण ॥ +अकारण साधनें ॥ ५ ॥ अपेक्षा जें जें साधन साधिलें ॥ तें तें अपेक्षेनेंचि फोल केलें ॥ निरपेक्षाचें हृदय भलें ॥ वेलीं गेलें परमार्थीं ॥ ६ ॥ हृदयाचें सखोल आळा ॥ स्वधर्मबीजें अंकुरला ॥ श्रद्धेचा वेल उगवला ॥ कोंभ निघाला तरितरितु ॥ ७ ॥ सच्छ्रवणप्रबळजळें ॥ हतली वैराग्यदृढमूळें ॥ वेल गेली निजबळें ॥ श्रद्धामेळें चिदाकाशीं ॥ ८ ॥ ते चिदाकाशींचा चंद्रमा ॥ स्वप्रकाशें तूं पुरुषोत्तमा ॥ साधक

---

१ लेप. २–३ नहुप राजा अगस्त्याचे शापानें सर्प होऊन कुव्यांत पडला. ४ अतोनात. ५ एक राजा. ६ सोडविली. ७ उडिद बुडेसें. ८ हिमवान् मेनकापुत्र ९ माशाचे पोटांत. १० मच्छिंद्रनाथ. ११ आकाशक्षेत्र. १२ शिडी, निसण. १३ फुकट. १४ आळ्यांत,

×ना. श्रवणद्वारें. ⁂ना. विकळ. ✻ना. न्यून अधिक तें नसंभवे. ०मो. वाराणशी. +मो. वरकड अकारण.

शिणती मेघश्यामा ।। तुझी प्रतिमा पहावया ।। ९ ।। त्या तुझे श्रीचरण ।। प्रत्यक्ष जाहलें दर्शन ।। घालोनियां लोटांगण ।। चरणस्तवन करिताती ।। ११० ।।

।।श्लोक।। स्यान्नस्तवांघ्रिरशुभाशयधूमकेतुः क्षेमाययो मुनिभिरार्द्रहृदोह्यमानः ।।
यः सात्वतैः समविभूतय आत्मवद्भिर्व्यूहेऽर्चितः सवनशः स्वरतिक्रमाय ।।१०।।

।। टीका ।। आमुच्या अशुभाशयाचा घातु ।। करिता चरणधूमकेतु ।। तुझाचि जी विख्यातु ।। त्रैलोक्यांतु श्रीकृष्णा ।।११।।पापइंधनाचा मेळे ।। तेथ तुझा चरण वडवानळें।।लागतां तो अतितेजाळ ।। तिळें तिळ जाळित ।। १२ ।। ऐसा पापातें कांपविता ।। प्रेमळातें अभयदाता ।। तुझा चरण जी अनंता ।। हृदयीं सर्वथा वाहती ।। १३ ।। तेंचि हृदय जी कैसें ।। वोळलें भक्तिप्रेमरसें ।। तेथें तुझे चरण सावकाशें ।। अति उल्हासें वाहताती ।। १४ ।। करिता चरणाचें ध्यान ।। जे विसरले भूक तहान ।। त्यांसी द्यावया अभयदान ।। चरण ध्वज जाण पैं तुझा ।। १५ ।। तोचि चरण सात्वतीं ।। पावावया समविभूती ।। पूजिला जी श्रीपती ।। चतुर्मूर्ती व्यूहरूपें ।। १६ ।। वासुदेव संकर्षण ।। अनिरुद्ध आणि प्रद्युम्न।।हाचि चतुर्व्यूह जाण ।। पूजास्थान भक्तांचें ।। १७ ।। ०भिन्नभिन्न चारी व्यक्ती ।। चहूं रूपीं एकमूर्ती ।। ऐसें जाणोनि पूजिजे भक्तीं ।। व्यूहस्थिती त्यानांव ।। १८ ।। सात्वत ज्ञाणिपती ते भक्त ।। भगवत्पदैश्वर्यातें वांछित ।। चतुर्व्यूहरूपें पूजित ।। ऐश्वर्यी चित्त ठेऊनी ।। १९ ।। जन्ममरणप्रवाहस्थिती ।। ×नासावया एक भक्ती ।। पूजा कीजे चतुर्मूर्ती ।। आत्मवंतीं सज्ञानीं ।। १२० ।। *त्रिवर्ण त्रिकाळ ।। पूजा करितां अविकळ ।। भजोनि जिंतिला कळिकाळ ।। जन्ममूळ छेदावया ।। ।। २१ ।। आणिकही भक्तजन ।। तुझें करिताति भजन ।। यज्ञद्वारा हवुनी हवन ।। विधिविधान वेदोक्त ।। २२ ।।

।।श्लोक।। यश्चिन्त्यते प्रयतपाणिभिरध्वराग्नौ त्रय्या निरुक्तविधिनेश हविर्गृहीत्वा ।।
अध्यात्मयोग उतयोगिभिरात्ममायां जिज्ञासुभिः परमभागवतैः परीष्टः ।।११।।

।। टीका ।। दीक्षाग्रहणीं अतिसादर ।। यज्ञद्वारा भजनतत्पर ।। क्रियेपासोनि नेमिले कर ।। हस्तव्यापार न करिती ।। २३ ।। तेथ वेदत्रयीची विधानक[illegible] ।। बाहेर त्रिगुणांची त्रिमेखळा।। आंत यज्ञपुरुष ओव्हानिला ।। चैतन्य तेजाळा सर्वात्मा ।। २४ ।। तेथ ओंकार, वषट्कार ।। लक्षणोक्त मंत्रउच्चार ।। द्रव्यें अर्पिती अपार ।। अतिपवित्र अवदानीं ।। २५ ।। आणिक एक योगयुक्त ।। योगधारणा तुतें भजत ।। प्राणापानांची समता देत ।। आसनस्थ होऊनियां ।। ।। २६ ।। वज्रासनीं दृढ बंद ।। भेदोनि षट्चक्रांचे भेद ।। कुंडलिनीचा स्कंध ।। अतिसुबद्ध थापटिला ।। २७ ।। ते खवळली महाशक्ती ।। वेगें चालिली ऊर्ध्वगती ।। पवन प्राशनि

१ पापरूप सर्पणाचा. २ समुदाय, राशी. ३ वडवाग्नि. ४ नाहींसा होण्यास. ५ प्रातःकाल, माध्यान्ह, सायान्ह. ६ बोलाविला. ७ आहुतींनीं. ८ योगांतील एक आसन लक्षण: सव्यपायाचा घोटा । शिश्नावरी ठेवा नेटा ।। वामपादींही लोटा । तयावरी पैं ।। १ ।। ९ मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध, आज्ञा. १० नाडिविशेष. ११ पिऊनि.

[illegible]

ग्रासिती ॥ योगी स्थिती गगनातें ॥ २८ ॥ शोधूनि सहस्रदळाचे पाट ॥ औटपीठ आणि गोल्हाट ॥ क्रमोनियां श्रीहट ॥ आली उद्भट ब्रह्मस्थाना ॥ २९ ॥ तेथ परमानंदाचा भोग ॥ शिवशक्तींचा संयोग ॥ यापरी अभ्यासोनि योग ॥ हा भजनमार्ग योग्यांचा ॥ १३० ॥ तुझी ×जाणावया माया ॥ एक भजों लागले तुझिया पायां ॥ सर्वथा अतर्क्य तुझी माया ॥ देवराया श्रीकृष्णा ॥ ३१ ॥ माया नलक्षेचि लक्षितां ॥ तोचि मायामोह जाहला चित्ता ॥ मग ते *सिद्धीलागीं तत्त्वतां ॥ चरण भगवंता पूजिती ॥ ३२ ॥ आणिकही एक पक्ष ॥ तुज भजावया मुमुक्ष ॥ जाहले गा अतिदक्ष ॥ अध्यात्मपक्ष निजयोगें ॥ ३३ ॥ आत्ममायेचा नाश ॥ करावया जिज्ञास ॥ निजात्मबोधें सावकाश ॥ अति उल्हासू पूजेचा ॥ ३४ ॥ विवेकाचिया भावना ॥ नित्यानित्याची विवंचना ॥ करूनि आणितां अनुसंधाना ॥ सर्वत्र जाणा तूंचि तूं ॥ ३५ ॥ जें अनित्यपणीं +वोळिलें ॥ तें मायिकत्वें मिथ्या जाहलें ॥ मग चिन्मात्रेंकें उरलें ॥ निर्वाळिलें निजरूप ॥ ३६ ॥ एवं पाहतां चहूंकडे ॥ तुझेंचि स्वरूप जिकडे तिकडे ॥ मग पूजिती वाडेंकोडें ॥ *निजसुखवाडें सर्वत्र ॥ ३७ ॥ जें जें देखती जे जे ठायीं ॥ तें तुजवांचूनि आन नाहीं ॥ ऐसा सर्वत्र चरण पाही ॥ ठायींच्याठायीं पूजिला ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ पर्युष्टया तव विभो वनमालयेयं संस्पर्धिनी भगवती प्रतिपत्निवच्छ्रीः ॥ यः सुप्रणीतममुयाऽर्हणमाददन्नो भूयात्सदांऽघ्रिरशुभाशयधूमकेतु ॥ १२ ॥

॥ टीका ॥ ऐसे सर्वत्र तूतें पूजिती ॥ ते भक्त पढियंते होती ॥ त्यांची पूजा ते अतिप्रीतीं ॥ स्वयें श्रीपती मानिसी ॥ ३९ ॥ रानींची रानट वनमाळा ॥ भक्तीं आणूनि घातली गळां ॥ रमा सांडोनि उतावेळा ॥ स्वयें भाळला माळेसी ॥ १४० ॥ भक्तीं अर्पिली आवडीं ॥ म्हणोनि अधिक तियेची गोडी ॥ शिळी जाहली तरी न काढी ॥ अर्धघडी गळाची ॥ ४१ ॥ ²भक्तिभावार्थें अर्पिली ॥ देवें सर्वांगीं धरिली ॥ यालागीं सुकों विसरली ॥ ¹टवटवीत सर्वदा ॥ ॥ ४२ ॥ तिचा आस्वादितां गंध ॥ भावें भुलला मुकुंद ॥ श्रीयेसि उपजला क्रोध ॥ सवतीसंबंध मांडिला ॥ ४३ ॥ मज नयेतां आधीं ॥ भक्तीं अर्पिली नेणों कधीं ॥ मी तरुण सांडोनि त्रिशुद्धी ॥ ते वृद्ध खांदीं वाहातसे ॥ ४४ ॥ देव नेणे भोगाची खूण ॥ ते वृद्ध मी तरुण ॥ परी तिशींच भुलला निर्गुण ॥ गुणागुण हा नेणे ॥ ४५ ॥ मज चरणसेवा एकादे वेळा ॥ हे सर्वकाळ पडली गळां ॥ मजहूनि स्नेह आगळा ॥ नेला वनमाळा सर्वथा ॥ ४६ ॥ मातें डावलूनि वेगीं ॥ हे बैसली दोहींभागीं ॥ इसीं बोलतांचि श्रीरंगीं ॥ मजचिलागीं त्यागील ॥ ४७ ॥ मज दीधली चरणाची सेवा ॥ इचा मत्सरु किती साहवा ॥ आपाद आवरिलें या

१ अग्निचक्रावरील स्थान. २ औटपीठावरील स्थान. ३ ब्रह्मरंध्र. ४ टाकिलें. ५ चिद्रूप. ६ निवडक, निर्मल. ७ लक्ष्मी. ८ शिळी, निर्माल्य झालेला, ९ एकीकडे सारून. १० (कंठापासून) पायापर्यंत.

× मो. जिणावया. *ना. शुद्धी. +मो. बोलिले. *मो. निजनिवाडें. ²मो. भक्तीं भावार्थें. ¹ना. मो. टवटविली,

देवा ॥ माझी सेवा हरीतली ॥ ४८ ॥ मी कुलात्मजा क्षीरोब्धीची ॥ हे रानवट रानींची ॥ खांदीं बैसली देवाची ॥ भांड भक्तांची ह्मणवूनी ॥ ४९ ॥ हें भक्तिबळें बैसली खांदीं ॥ कहीं नुतरोच त्रिशुद्धी ॥ रमा वनमाळेतें वंदी ॥ द्वेषबुद्धी सांडोनी ॥ १५० ॥ ऐशी भक्तांची पूजा ॥ तुज आवडे गरुडध्वजा ॥ सुप्रणीतभावो वोजा ॥ चरणीं तुझ्या अर्पिला ॥ ॥ ५१ ॥ तो चरणधूमकेतु तुझा ॥ आमुच्या पापाते नाश वोजा ॥ पुनःपुनः गरुडध्वजा॥ +पापसमाजा निर्दाळी ॥ ५२ ॥ करितां चरणाचें वर्णन ॥ नधाये देवाचें मन ॥ पुढत पुढती चरणस्तवन ॥ ध्वजलक्षण वर्णिती ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ केतुस्त्रिविक्रमयुतस्त्रिपतत्पताको यस्ते भयाभयकरोऽसुरदेवचम्वोः॥ स्वर्गाय साधुषु खलेष्वितराय भूमन् पादः पुनातु भगवन् भजतामघं नः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ बलिबंधनीं अनंता ॥ त्रिविक्रमीं चरण वाढता ॥ सत्यलोकांही वरुता ॥ दिसे झळकता श्रीचरण ॥ ५४ ॥ चरण वाढला सर्वांवरी ॥ तो केतु बोलिजे कवीश्वरीं ॥ पताका झळकत कवणे परी ॥ सुरसरी निजगंगा ॥ ५५ ॥ बळिबंधनीं आवेश ॥ चरण उचलिला दुराश ॥ नखें भेदला आवरणकोश ॥ जळ बहुवस चालिलें ॥ ५६ ॥ चरणस्पर्शें भगवंता ॥ जाहली जीवनाशीं पवित्रता ॥ ब्रह्मा कमंडलीं धरितां ॥ शिवें माथां वाहिली ॥ ॥ ५७ ॥ चरणध्वजीं पताका ते गंगा ॥ त्रिवाहिनी त्रिपथगा ॥ चरणशोभा श्रीरंगा ॥ नयनभृंगां उल्हासु ॥ ५८ ॥ केतु झळकल्या पाठीं ॥ आसुरी सेनेसि भय उठी ॥ दैवी संपत्तीचे पोटीं ॥ अत्यंत उठी आल्हादु ॥ ५९ ॥ आणिक चरणाची कथा ॥ देवासि स्वर्गसुखदाता ॥ तोच चरण अधर्मवंता ॥ होय तत्वतां नरकहेतू ॥ १६० ॥ एक तरले चरण पूजितां ॥ एक तरले चरण ध्यातां ॥ चरण उपेक्षिती सर्वथा ॥ अधःपाता ते जाती ॥ ॥ ६१ ॥ चरण वंदिती कां निंदिती ॥ ते निजपदाप्रती जाती ॥ सर्वथा जे उपेक्षिती ॥ अधोगती तयांसी ॥ ६२ ॥ चरण वंदितां तरली शिळा ॥ निंदितां उद्धरिलें शिशुपाळा ॥ जे उपेक्षिती चरणकमळा ॥ तयां खळां रौरव ॥ ६३ ॥ ऐके स्वामिया व्यापका ॥ ऐसा तुझा चरण निका ॥ आमुच्या सकळपातकां ॥ क्षणार्धें देखा उद्धारु ॥ ६४ ॥ जेथ पापाचा जाहला उद्धारू ॥ तेथ सहजाचि खुंटला दुराचारू ॥ ऐसा तरातया संसारू ॥ चरण माचारूपें तुझा ॥ ६५ ॥

॥ श्लोक ॥ नस्योतगाव इव यस्य वशे भवंति ब्रह्मादयस्तनुभृतो मिथुरर्द्यमानाः॥ कालस्य ते प्रकृतिपूरुषयोः परस्य शंनस्तनोतु चरणः पुरुषोत्तमस्य ॥ १४ ॥

॥ टीका ॥ निजसुखातें विस्तारितां ॥ तुझा चरण जी अच्युता ॥ काळादिकर्माचा शास्ता ॥ आत्मनियंता देवाचा ॥ ६६ ॥ तूं काळाचा निजनियंता ॥ काळासि अकाळें नकरवे मता ॥

---

१ दुग्धसमुद्राची. २ नम्रभाव. ३ पाय हाच अग्नि. ४ ध्वज. ५ पाण्यास.

+पाप समस्त जाळुनि निर्दाळी.

१यासि अधिकारीं स्थापिता ॥ देवनियंता तूं कृष्णा ॥ ६७ ॥ सर्वस्वामी तूं कृष्णनाथा ॥ इंद्रियक्रिया समस्ता ॥ कोणा नकरवे अन्यथा ॥ कर्मनियंता श्रीकृष्ण ॥ ६८ ॥ ब्रह्मादिक शरीरधारी ॥ तुज आधीन गा श्रीहरी ॥ जैसे नाथिले बैल नांगरीं ॥ कृषीवळ धरी स्वामित्वें ॥ ६९ ॥ तेथ जो राहेगा मागें पुढें ॥ तो झोडिजे आमुडें ॥ तुझे आज्ञेवरी रोकडे॥ वर्तती गादे कळिकाळ दिक ॥ १७० ॥ संसारलक्षण शेतासी ॥ अधिकारी जुंकोनि सर्वांसी॥ निजकर्में क्षेत्रासी ॥ तूं वाहविसी *निजाज्ञा ॥ ७१ ॥ रोंवोनि अहंकाराची मेढी ॥ महत्तत्त्वांचें खळें झाडी ॥ त्रिगुणदोरें वापुडीं ॥ बांधिशी कडोविकडी जीवपशूतें ॥ ७२ ॥ उगी अस्तांचेनि झणत्कारें ॥ देतां निजकर्मांचि फेरे ॥ जो खांदा चुकवोनि वोसरे ॥ तोचि मारें मारिजे ॥ ७३ ॥ हा बोल जरी ह्मणसी वाया ॥ सृष्टि करिती धरिती ते माया ॥ मजसी संबंध नाहीं यया ॥ देवराया हें नह्मणे ॥ ७४ ॥ मायेसि तूंच अधिष्ठान ॥ यालागीं तूं परम-कारण ॥ तुझिये मांडोवरी जाण ॥ क्रीडास्थान प्रकृतिपुरुषां ॥ ७५ ॥ तूं मायेहूनि अपारु ॥ प्रकृतिपुरुषांहूनि परु ॥ काळाचा काळ तूं दुर्धरु ॥ सर्वसंहारु कर्ता तूं ॥ ७६ ॥ आमुच्या निजसुखा उत्तमा ॥ तुझा चरणविस्तार मेघश्यामा ॥ हेंचि मागों पुरुषोत्तमा ॥ कृपा आह्मावरी कीजे ॥ ७७ ॥

॥श्लोक॥ अस्यासि हेतुरुदयस्थितिसंयमानामव्यक्तजीवमहतामपि कालमाहुः ॥
सोऽयंत्रिणाभिरखिलापचये प्रवृत्तः कालो गभीररय उत्तमपूरुषस्त्वम् ॥ १५ ॥

॥ टीका ॥ जगाची उत्पत्ति स्थिती ॥ तुजचिपासोनि श्रीपति ॥ सकळसंहारिता अंतीं ॥ तूंचि निश्चितीं महाकाळ ॥ ७८ ॥ +क्षोभलिया तामसी शक्ती ॥ सृष्टीचा प्रळय करी अंतीं ॥ तेथें बीजरूपीं अव्यक्तीं ॥ जीव राहती सूक्ष्मत्वें ॥ ७९ ॥ मग उत्पत्तीचे काळवेळे ॥ तींच बीजें विरूढती सकळें ॥ पाल्हेजती स्थितिकाळें ॥ पुष्पफळें सफाळित ॥ १८० ॥ हे गुण-क्षोभाची अवस्था ॥ तेथ मी नव्हे प्रलयकर्ता ॥ ऐसें ह्मणसी जरी कृष्णनाथा ॥ तरी तेही कथा परियेसी ॥ ८१ ॥ तुझा साचार 7जाहलिया भावो ॥ माया महत्तत्त्व आणि जीवो ॥ नासोनियां दास पाहाहो ॥ निजरदीं निर्वाहो भोगिता ॥ ८२ ॥ त्या तुज सकळ संहारितां ॥ कोण दुर्घटता कृष्णनाथा ॥ कारणेंसी प्रळयकर्ता ॥ तूंचि सर्वथा महाकाळ ॥ ८३ ॥ कळोनेदिसी संहारस्थिती ॥ अतिसूक्ष्म काळगती ॥ नाश करिशी अंतीं ॥ निजप्रकृती विकारें ॥ ८४ ॥ प्रळयासि प्रमाण मूळ ॥ लव निमेष घटिका पळ ॥ अहोरात्र त्रिकाळ ॥ 7' त्रिनाभी ' केवळ जो ह्मणिपे ॥ ८५ ॥ ऐसिये गंभीरगतीसी ॥ माया ×महत्तत्व नाशिसी ॥ तो तूं महाकाळ होसी ॥ हृषीकेशी श्रीकृष्णा ॥ ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ त्वत्तः पुमान् समधिगम्य ययाऽस्य वीर्यं धत्ते महांतमिव गर्भममोघवीर्यः ॥ सोयं तयानुगत आत्मन आंडकोशं हैमं ससर्ज बहिरावरणै-रुपेतम् ॥ १६ ॥

१ खोटे. २ शेतकरी. ३ खांब. ४ नेटानें, ५ दूर जातो. ६ उगवतात. ७ पालवतात. ८ निवारिता असंभव. ९ ह्मटला जातो.

*मो. निजसत्ता. +मो. क्षोभकर्मी. 7मो. धरिलिया. 7मो. त्रिगुणाभी. ×ना. महत्तत्त्वें.

॥ टीका ॥ पुढती सृष्टीचा स्रजिता ॥ तूंचि होशी गा अनंता ॥ ते उत्पत्तीची अवस्था ॥ मूळकर्ता तूंचि तूं ॥ ८७ ॥ तुझी लेहोनि वीर्यशक्ती ॥ होय पुरुषत्वप्राप्ती ॥ तेणें अंगीकारूनि प्रकृती ॥ केलें उत्पत्ती गर्भाधान ॥ ८८ ॥ तेचि ते वेळीं प्रकृती ॥ महत्तत्त्वीं होय गर्भवती ॥ तेणें महत्तत्त्वेंसी गर्भ धरिती ॥ हिरण्यवर्ण अंडातें ॥ ८९ ॥ तें अमोघ वीर्य प्रबळ ॥ गर्भीं विश्वाकार बाळ ॥ धरिती जाहली वेल्हाळ ॥ ब्रह्मांड सकळ अंडामाजी ॥ ॥ १९० ॥ जैसें गर्भासि उल्ब जाण ॥ तैसें अंडासि बहिरावरण ॥ सप्तधा नेमस्त प्रमाण ॥ तूं निर्माण करविता ॥ ९१ ॥ पृथ्वी जल अनल अनिल ॥ नभ आणि अहंकार स्थूळ ॥ सातवें तें अतिसबळ ॥ जाण केवळ *क्रियासूत्र ॥ ९२ ॥ त्या गर्भासि ※जतनेवरी ॥ तूंचि आंतु आणि बाहेरी ॥ रिघालासि सूत्रधारी ॥ खांबसूत्रीं जैसा पैं ॥ ९३ ॥ ऐसें जग जाहलें दोघांपासूनि ॥ परी तिसरें नदिसे कोणी ॥ अवघी सृष्टी दोघीजणीं ॥ दुमदुमुनी भरली असे ॥ ९४ ॥ वाती लावूनि पाहतां ॥ तिसरें नलगेचि हातां ॥ दुसरी प्रकृती निर्धारितां ॥ तेही सर्वथा टवाळ ॥ ९५ ॥ ऐसा दुजेंविण एकला ॥ एकलाचि विश्व जाहला ॥ आकळतु तूं +कौसालमल्ला॥ मल्लमर्दना श्रीकृष्णा ॥ ९६॥ एवं एकलेपणें तूं कर्ता ॥ त्यालागीं लेप नलगे सर्वथा ॥ कर्म करूनि तूं अकर्ता ॥ तेचि कथा परियेसी ॥ ९७ ॥

॥श्लोक॥ तत्तस्थुषश्च जगतश्च भवानधीशो यन्माययोत्थगुणविक्रिययोपनीतान् ॥
अर्थान् जुषन्नपि हृषीकपते नलिप्तो येऽन्ये स्वतःपरिहृतादपि बिभ्यति स्म॥१७॥

॥ टीका ॥ चरें आणि अचरें ॥ जंगमें आणि स्थावरें ॥ या जगाचा स्वामी तूं निर्धारें ॥ केलें खरें गतश्लोकीं ॥ ९८ ॥ तेंचि स्वामित्व कैसें घडे ॥ हें जरी पुससी धडफुडें ॥ तरी तेंही विश्वीं रोकडें ॥ वचन गाढें अवधारीं ॥ ९९ ॥ निजमायेचेनि योगें ॥ नाना विषय भोगिसी अंगें ॥ तें भोगिलेपण अंगीं नलागे ॥ अकर्तात्मसंगें अलिप्त ॥ २०० ॥ तोचि अकर्तात्मबोधु कैसा ॥ जरी म्हणशी हृषीकेशा ॥ तें आगमनिगम अतर्क्यदशा ॥ परमपुरुषा परियेसीं ॥ १ ॥ भोग्य भोग भोक्ता ॥ या तिहींतें तूं प्रकाशिता ॥ जेवीं घटीं बिंबोनि सविता ॥ अलिप्तता स्वभावें ॥ २ ॥ 0घटजळप्रतिबिंबासी ॥ स्वयें सविता प्रकाशी ॥ प्रकाशूनि अलिप्त त्यासी ॥ तेवीं तूं भोगासी श्रीकृष्णा ॥ ३ ॥ अथवा कार्य कर्म कर्ता ॥ या तिहींमाजी निजात्मता ॥ देखे तो अभोक्ता ॥ भोगोनि तत्त्वतां निजभोग ॥ ४ ॥ दर्पणींच्या प्रतिबिंबाशीं ॥ जो प्रवर्तला भोगासी ॥ व्यभिचाराचा आळ त्यासी ॥ केवीं अंगासी लागेल ॥ ५ ॥ जगचि हें अवघें ॥ जो होऊनि ठाके अंगें ॥ त्यासि बाधावें कोणें भोगें ॥ निजात्मयोगें योगिया ॥ ६ ॥ ऐशिया बोधाचेनि बळें ॥ तो विषयावरी जरी लोळे ॥ तरी विषयाचेनि विटाळें ॥ बोध नमळे तयाचा ॥ ७ ॥ ते घेणें देणें करी ॥ पाहतां दिसे

१ मिळून. २ वेष्टण. ३ आग्र ४ कळसूत्री. ५ लटकी. ६ मल दैत्याचा नाश करणारा. ७निषयांसंबंधी. ८ अकर्तात्म्याच्या संगतीनें. ९ सूर्य.

*मो. महतत्त्व. ※मो, जतनकरीं. +मो. कौसालयमेला. 0ना. घट घटबिंब प्रतिबिंबासी.

व्यवहारी ॥ नांदतांही घरदारीं ॥ त्या माझारी तो नाहीं ॥ ८ ॥ *नेणोनियां बोधाची ×मागी ॥ भोगत्याग केला योगीं ॥ तरी कांपताति सर्वांगीं ॥ वासना +अंगीं उरलीसे ॥ ९ ॥ स्वप्नीं विषय देखती ॥ जागे जाहल्या प्रायश्चित्त करिती ॥ नाहीं मावळली अहंकृती ॥ यालागीं भीती सर्वदा ॥ २१० ॥ ऐसियाजी विषयभेडां ॥ नाहीं निजबोधू धडफुडा ॥ तैसा नव्हेसि तूं निधडा ॥ दिसे रोकडा निजबोधू ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ स्मायावलोकलवदर्शितभावहारिभ्रूमंडलप्रहितसौरतमंत्रशौंडैः ॥

पत्न्यस्तु षोडशसहस्रमनंगबाणैर्यस्येंद्रियं विमथितुं करणैर्न विभ्व्यः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ मी निधडा निजबोधें संपूर्ण ॥ ह्मणसी देखोंशके कवण ॥ ये अर्थीचें उपलक्षण ॥ ऐक ते खूण स्वामिया ॥ १२ ॥ सोळासहस्रपत्न्या घरीं ॥ आणि गोकुळिच्या परनारी ॥ कुब्जादि मथुरेमाझारी ॥ कर्णकुमारी भोगिल्या ॥ १३ ॥ मुंजी नव्हतां आधीं ॥ भोगिली त्वां गोंवळी पेंदी ॥ धरोनियां सांदीविदीं ॥ नदींनदीं असंख्य ॥ १४ ॥ अविधी भोगितां नारी ॥ बोध न मळेचि श्रीहरी ॥ अंगें रिघालासि क्षीरसागरीं ॥ अर्जुना करीं धरोनी ॥ ॥ १५ ॥ शेषशायी नारायणा ॥ उत्कंठा तुझिया दर्शना ॥ तेणें उपावो केला जाणा ॥ हरूनि ब्राह्मणाचीं बाळें ॥ १६ ॥ जेवीं आपुलें स्वरूप आपण ॥ पहावया किजे दर्पण ॥ तेवीं पहावया कृष्णार्जुन ॥ स्वयें नारायण अपत्यें आणी ॥ १७ ॥ तूं अवतार नरनारायण ॥ तुझें घ्यावया दर्शन ॥ ब्राह्मण अपत्यें जाण ॥ त्वां आपण आणिलीं ॥ १८ ॥ ऐसें नारायणाचे बोल ॥ सप्रेम अतिसखोल ॥ आह्मीं ऐकिले गा सकळ ॥ तुझा बोध अकळ श्रीकृष्णनाथा ॥१९॥ तीं ब्राह्मणाचीं अपत्यें॥जीं बहुकाळ जाहलीं होती मृतें ॥ तुवां आणोनि दिधलीं श्रीअनंतें ॥ तीं देखिलीं समस्तें चरित्रें ॥ २२० ॥ तुझी *नारायणासि अवस्था ॥ तेथ आमुची कवण कथा ॥ पार नकळे जी अच्युता ॥ गुणातीता श्रीकृष्णा ॥ २१ ॥ मागां अवतार जाहले ॥ परी ऐसें चरित्र नाहीं केलें ॥ विधिवेदां लाजविलें ॥ व्यभिचारियां दिधलें निजपद ॥ २२ ॥ जें त्वां भोगिलें स्त्रियांसी ॥ तें तूं 4उदासीनत्वें ह्मणसी ॥ तेणें 0बाध नपवे बोधासी ॥ हृषीकेशी तें न घडे ॥ २३ ॥ हावभाव विलासेंसी ॥ अंगें दाविती चपळतेसी ॥ तुज लक्षोनि पुरुषोत्तमासी ॥ कामबाणासी योजिती ॥ २४ ॥ वांकुनि भूमंडलाचे मेढे ॥ व्यंकटकटाक्ष बाण गाढे ॥ सुरतमंत्रीं रोकडे ॥ केले धडफुडे सतेज ॥ २५ ॥ ज्या बाणाचे घायीं ॥ इंद्र खोंचला सहस्रांठायीं ॥ शिव लोळविला पाहीं ॥ ०मोहिनी ब्योमोहीं महाबाणें ॥ २६ ॥ ज्या बाणाचा पिसारा ॥ लागतांचि पैं भेदरा ॥ तोंपर्सी घेतला पुरा ॥ सोडोनि घरदारा पळाले ॥२७॥ तैसे सोळासहस्र बाण ॥ अखंड तुजचिवरी संधान ॥ करितां नमैळे बोध जाण ॥ अतिविंदान हें तुझें ॥ २८ ॥ घरींच्या स्त्रिया सहस्र सोळा ॥

---

१ मार्ग, शुद्धि. २ शूर, छातीचाउत्तम. ३ गल्लींत कोपऱ्यांत. ४ दुधाचे समुद्रांत. ५ आरसा. ६ नकळणारा. ७ चढवून. ८ स्मरसचिव, कामोत्तेजक. ९ मोहानें. १० भीति. ११ तपस्व्यांनीं. १२ ज्ञान. १३ अति कौशल्य.

*मो. नेणुनिया. ×मो. मार्गी. +मो. रोगी. ना. रागी. *मो. नारायणा. 4 ना. उदासीन नव्हे ह्मणसी. 0मो. बाधु नवचेचि बोधासी. ना बाधा नव्हेचि बोधासी. ०मो. मोहिनीचि मोही.

गोकुळादि मथुरेच्या आबळा ॥ तुज विषयी करावया गोपाळा ॥ नव्हतीच सकळा समर्था ॥ २९ ॥ त्यांचेनि तुज नकरवेचि विषयी ॥ परी त्या त्वां केल्या निर्विषयी ॥ ऐसा तूं त्रैलोक्याच्याठायीं ॥ स्वामी पाहीं श्रीकृष्णा ॥२३०॥ ऐशी तुझी कीर्ति ऐकतां ॥ अथवा चरणतीर्थ घेतां ॥ याचि दोहींतीर्थांची समर्थता ॥ पवित्रता जगासी ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ विभ्व्यस्तवामृतकथोदवहास्त्रिलोक्याः पादावनेजसरितः शमलानि हंतुम् ॥ आनुश्रवं श्रुतिभिरंघ्रिजमंगसंगैस्तीर्थद्वयं शुचिषदस्त उपस्पृशंति॥१९॥

॥ टीका ॥ तुझिये कीर्तीचें श्रवण ॥ अंतरमलाचें क्षालन ॥ करूनियां तृप्ति जाण ॥ परमपावन कीर्तनें ॥ ३२ ॥ तुझियां चरणींची गंगा ॥ सकळ पातकें ने भंगा ॥ तें पायवणी श्रीरंगा ॥ पवित्र जगातें करी ॥ ३३ ॥ या दोहीं तीर्थांचें सेवन ॥ अखंड करिती साधुजन ॥ तेणें होऊनि परमपावन ॥ समाधान निजवृत्ती ॥ ३४ ॥ अवताराचे अंतीं ॥ इये दोनी तीर्थीं अतिविख्यातीं ॥ प्रगट केली तुवां क्षिती ॥ तरावया श्रीपती निजदासांसी ॥ ३५ ॥ एक श्रवणें एक स्नानें॥दोनी तीर्थें परमपावनें॥ प्रगट केली जगज्जीवनें॥ मलिनजनें तरावया॥३६॥

॥ श्लोक ॥ श्रीबादरायणीरुवाच ॥ इत्यभिष्टूय विबुधैः सेशः शतधृतिर्हरिम् ॥ अभ्यभाषत गोविंदं प्रणम्यांबरमाश्रितः ॥ २० ॥

॥ टीका ॥ शुक ह्मणे परीक्षिती ॥ वापरां देवीं समस्तीं ॥ स्तविला स्वानंदें श्रीपती ॥ परमभक्तीभावार्थें ॥३७॥ ऐसा करूनि स्तुतिवादू ॥ संतोषविला गोविंदु ॥ देवासि होत असे आल्हादु ॥ परम विनोदु सर्वांसी ॥ ३८ ॥ स्तुति करावया *अग्रणी ॥ ब्रह्मा ×शिव पुढें येऊनी ॥ तींहीं जयजयकार करूनी ॥ लोटांगणें घातलीं ॥ ३९ ॥ देव राहूनियां गगनीं ॥ हात जोडूनियां विमानीं ॥ विनंती करावयालागोनी ॥ ब्रह्मा पुढारा होनी बोलत ॥ २४० ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मोवाच ॥ भूमेर्भारावताराय पुरा विज्ञापितः प्रभो ॥ त्वमस्माभिरशेषात्मंस्तत्तथैवोपपादितम् ॥ २१ ॥

॥ टीका ॥ उतरावया धराभारा ॥ पूर्वीं प्रार्थिलासि यदुवीरा ॥ अभय द्यावया सुरवरां ॥ आह्मीं श्रीधरा विनविलें ॥ ४१ ॥ आह्मीं विनविलें जैसें ॥ तुवां कार्य केलें ह्मणों कैसें ॥ त्याहूनियां विशेषें ॥ केली निजविन्यासें धर्मवृद्धी ॥ ४२ ॥ तूं सर्वेश्वर सर्वात्मा ॥ जें कार्य नकळेचि आह्मां ॥ तेंही तुवां पुरुषोत्तमा ॥ घनश्यामा संपादिलें ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ धर्मश्च स्थापितः सत्सु सत्यसंधेषु वै त्वया ॥ कीर्तिश्चदिक्षु विक्षिप्ता सर्वलोकमलापहा ॥ २२ ॥

॥ टीका ॥ सत्यवादी साधु जे कांहीं ॥ ज्यांचा संकल्प तुझ्या पायीं ॥ धर्म स्थापिला त्यांच्याठायीं ॥ तुवां पाहीं यथास्थित ॥ ४४ ॥ आणिक दशदिशांप्रती ॥ विस्तारिली उदार कीर्ती ॥ तेणें पावन निजगतीं ॥ होय निश्चितीं श्रवणद्वारें ॥ ४५ ॥

---

१ मनांतलि पापाचे. २ नाशास. ३ पादोदक गंगा.

*मो. अग्रगणी. ×ना. शिवा.

॥ श्लोक ॥ अवतीर्य यदोर्वंशे बिभ्रद्रूपमनुत्तमम् ॥ कर्माण्युद्दामवृत्तानि हिताय जगतोऽकृथाः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ पूर्णपुरुषा हृषीकेशी ॥ तूं अवतरलासि यदुवंशीं ॥ सीमा तुझिया रूपाशीं ॥ बरवेपणासी नकरवे ॥ ४६ ॥ तूं सर्वांमाजी सर्वोत्तम ॥ देखतां ठतीसि उपरम ॥ लीलाविग्रही पुरुषोत्तम ॥ मनोरम सकाळिकां ॥ ४७ ॥ कर्में केलीं परमाद्भुतें ॥ गोवर्धन धरिला वामहस्तें ॥ मुखें प्राशनि वणव्यातें ॥ गोपाळांतें वांचविलें ॥४८ ॥ मृतां आणिलें गुरुपुत्रांशी॥ गतगर्भ भेटविले देवकीशी ॥ गोपाल वत्सें तूं जाहलासी ॥ विधात्यासी भुलविलें ॥ ४९ ॥ जगाचिया परमहिता ॥ लागीं नानाचरित्रकथा ॥ करिता जाहलासि श्रीअनंता ॥ कृष्णनाथा निजजनका ॥ २५० ॥

॥ श्लोक ॥ यानि ते चरितानीश मनुष्याःसाधवः कलौ ॥ शृण्वंतःकीर्तयंतश्च तरिष्यंत्यंजसा तमः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ कथाकौतुकें विचित्रें ॥ नानापरीचीं चरित्रें ॥ परमपावन पवित्रें ॥ येणें अवतारें त्वां केलीं ॥ ५१ ॥ कलियुगीं साधुजन ॥ या चरित्राचें श्रवण कीर्तन ॥ करितां तरले जाण॥ तमोगुण त्रिगुणेंसी ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ यदुवंशेऽवतीर्णस्य भवतः पुरुषोत्तम ॥ शरच्छतं व्यतीयाय पंचविंशाधिकं प्रभो ॥ २५ ॥

॥ टीका ॥ अवतरल्या यदुवंशीं ॥ पुरुषोत्तमा हृषीकेशी ॥ संख्या या अवतारासी ॥ जाहली ते तुजपाशीं सांगेन ॥ ५३ ॥ *मृत्युलोकीं मनुष्यमर्यादा ॥ शतवर्षें जी गोविंदा ॥ ते अतिक्रमोनि आंवदा ॥ अधिक मुकुंदा पंचवीस जाहलीं ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ नाऽधुना तेऽखिलाधार देवकार्यावशेषितम् ॥ कुलं च विप्रशापेन नष्टप्रायमभूदिदम् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ +आतां पुढें येथें कांहीं ॥ देवकार्य उरलें नाहीं ॥ यादवकुळ ह्मणसी तेंही ॥ नष्टप्राय पाहीं उरलेंसें ॥ ५५ ॥ उठवणी आलें हैतिरू ॥ कां पांख उपडिल्या पांखरूं ॥ तैसा यादवांचा दळभारू ॥ भूमिये भारू उरला असे ॥ ५६ ॥ निर्वंणाचा फुटका डेरा ॥ कां क्षयो लागल्या राजकुमरा ॥ वणवा ओहाळल्या अंजगरा ॥ यादववीरां ते दशा ॥ ५७ ॥ दारुण ब्राह्मणांचा शाप ॥ नाशला वीर्यशौर्यप्रताप ॥ गळाला वाटिवेचा दर्प ॥ केवळ प्रेतरूप दिसताती ॥ ५८ ॥

॥ श्लोक ॥ ततः स्वधाम परमं विशस्व यदि मन्यसे ॥ सलोकान् लोकपालान्नः पाहि वैकुंठकिंकरान् ॥ २७ ॥

---

१ मजेनें शरीर धारण करणारा. २ ब्रह्मदेवास. ३ मनुष्यमर्यादा, ४ हत्ती. ५ बुडाचा. ६ भाजल्या. पेटल्या ७ सर्पास. ८ पराक्रमाचा, वादाचा.

*मो. वेदीं मनुष्य मर्यादा. +ना.मो. या वरतें.पुढें.

॥ टीका ॥ यालागीं जी यादवराया ॥ आह्मी वांछू तुझ्या पायां ॥ वेग कीजे स्वधामा यावया ॥ सुरवर्या श्रीकृष्णा ॥ ५९ ॥ ऐके देवकीनंदना ॥ जरी मानेल तुझिया मना ॥ तरी निघिजेजी याचि क्षणा ॥ सुरसेना तिष्ठत ॥ २६० ॥ सलोक लोकपाळ जे जे ॥ त्यावरी तुवां कृपा कीजे ॥ आह्मी किंकर गा तुझे ॥ वचन मानिजे दासांचें ॥ ६१ ॥ ऐके जी वैकुंठनाथा ॥ तुझी थोर आह्मां अवस्था ॥ आदिकरूनि उमाकांता ॥ आणि समस्तां देवांसी ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ अवधारितमेतन्मे यदात्थ विबुधेश्वर ॥ कृतं वः कार्यमखिलं भूमेर्भारोवतारितः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ जो [४]योगज्ञानियां मुकुटमणी ॥ मेघगंभीरया वाणी ॥ ब्रह्मयाप्रती चक्रपाणी ॥ हास्यवदनीं बोलिला ॥ ६३ ॥ नादब्रह्म मुसावलें ॥ कीं ×निजानंदाचें फळ पिकलें ॥ तैसें श्रीमुखें बोलों आदरिलें ॥ भाग्य उदेलें श्रवणाचें ॥ ६४ ॥ गौरवें ह्मणे ब्रह्मदेवा ॥ संतोषलों तुझिया भावा ॥ पुत्रस्नेहेंकरूनि तेव्हां ॥ [१]उदितखेवा हरि जाहला ॥ ६५ ॥ आवडी ह्मणे त्रिबुधेंद्रा ॥ सत्य तुझी वाङ्मुद्रा ॥ तुझेनि वचनें +ब्राह्मणेंद्रा ॥ धराभारा उतरिलें ॥ ६६ ॥ सकळ कार्य निःशेख ॥ म्या संपादिलें देख ॥ तरी उरलें असे एक ॥ थोर अटक मजलागीं ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ तदिदं यादवकुलं वीर्यशौर्यश्रियोद्धतम् ॥ लोकं जिघृक्षद्रुद्धं मे वेलयेव महार्णवः ॥ २९ ॥ यद्यसंहृत्य दृप्तानां यदूनां विपुलं कुलम् ॥ गंता-स्म्यनेन लोकोऽयमुद्वेलेन विनंक्ष्यति ॥ ३० ॥

॥ टीका ॥ हें यादवकुळ येथ ॥ वीर्यशौर्यश्रियोद्धत ॥ धर्म नाशावया उद्यत ॥ अतिदृप्त निजबळें ॥ ६८ ॥ हे छेद्रं पाहताती धर्ममूळें ॥ म्यां आवरिले असती योगबळें ॥ जेवीं समुद्र निजमर्यादेवेगळें ॥ असे राखिले नेमूनि ॥ ६९ ॥ सांडोनि ऐशियांसी ॥ मज गेलिया निज-धामासी ॥ हे प्रवर्ततील अधर्मासी ॥ कोण यांसी वारील ॥ २७० ॥ जैसा निर्मर्याद सागरू ॥ खवळल्या सर्वसंहारकरू ॥ त्यासि कोण शकेल आवरूं ॥ तैसा विचारू होईल ॥ ७१ ॥ हे अधर्मपर होतील गाढे ॥ तुह्मांसि पडेल सांकडें ॥ सांगों धांवाल मजपुढें ॥ यांचें रोकडें गाऱ्हाणें ॥ ७२ ॥ हे नाटोपती देवां ॥ नाकळती दैत्यां दानवां ॥ हे अधर्म करितील जेव्हां ॥ तुह्मीच मज तेव्हां सांगों याल ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ इदानीं नाश आरब्धः कुलस्य द्विजशापजः ॥ यास्यामि भवनं ब्रह्मन्नेतदंते तवानघ ॥ ३१ ॥

॥ टीका॥ यालागीं कुळनाशासि त्वरित ॥ आजिपासोनि सुमुहूर्त ॥ केला असे गा निश्चित ॥ यथोचित यादवां ॥ ७४ ॥ ऐके सखया प्रजापती ॥ या कुळनाशाचिया अंतीं ॥ तुझिय

---

१ आपल्या घरास, वैकुंठास. २ आलिंगनोत्सुक. ३ देवश्रेष्ठा. ४ अति गर्विष्ठ.

[४]ना. योगज्ञानमुकुटमणी. ×मो. नित्यानंदाचे. +मो. ब्रह्मेंद्रा.

भुवनावरूनि निश्चितीं ॥ निजधामाप्रती येईन ॥ ७५ ॥ ऐसें बोलिला [1]प्रभू ॥ ऐकोनि शंभू स्वयंभू ॥ आनंदला देवकदंबु ॥ समारंभू मांडिला ॥ ७६ ॥ जयजयकारू केला सकळीं ॥ परमानंदें पिटिली टाळी ॥ चरण वंदूनि वनमाळी ॥ पुष्पांजळी अर्पिल्या ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुकउवाच ॥ इत्युक्तो लोकनाथेन स्वयंभूः प्रणिपत्य तम् ॥ सह देवगणैर्देवः स्वधाम समपद्यत ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ शुक ह्मणे परीक्षिती ॥ ऐकोनि कृष्णवदंती ॥ सुरवर आनंदले चित्तीं ॥ आल्हादें करिती अभिवंदना ॥ ७८ ॥ धाता, सविता, शूलपाणी ॥ मिळोनियां देवगणीं ॥ कृष्णासि *येऊनि लोटांगणीं ॥ चरण वंदूनी निघाले ॥ ७९ ॥ एवं वंदूनि श्रीपती ॥ आपुलालिया स्थानाप्रती ॥ निघालिया देवपंक्ति ॥ पवनगती [3]विमानें ॥ २८० ॥

॥ श्लोक ॥ अथ तस्यां महोत्पातान् द्वारवत्यां समुत्थितान् ॥ विलोक्य भगवानाह यदुवृद्धान् समागतान् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ कुळनाश करणें रोकडें ॥ ऐसें कृष्णें नेमिलें धडफुडें ॥ तंव द्वारकेसि येरीकडे ॥ महोत्पात गाढे उठिले ॥ ८१ ॥ गगनीं निघाले त्रिकेतु ॥ धूमकेतू, दंडकेतू ॥ शिखे सहित शिखाकेतु ॥ गगना आंत उगवले ॥ ८२ ॥ मध्यान्हीं वीजळा आवात ॥ दिवसा उल्कापात होत ॥ भूतें नागवीं नाचत ॥ गगना आंत रुदती ॥ ८३ ॥ वृक जंबुक नगरा आंत ॥ दिवसां चौबारां कुंकात ॥ नगरीं [+]भालुवा भुंकत ॥ जन कांपत देखोनी ॥ ८४ ॥ नगरा आंत बाहेरी ॥ श्वानांचीं रडणीं भारी ॥ मार्जारकलहो नगरीं ॥ घरोघरीं होतसे ॥ ॥ ८५ ॥ गाई आरडती मध्यरात्रीं ॥ लेंकुरें खेळती झुंझारी ॥ माणसांतें झडपिती घारी ॥ घुंघाती घरोघरीं दिवाभीतें ॥ ८६ ॥ वागीश्वरी क्षोभली गाढी ॥ बोलीं ह्मणती आली यमधाडी ॥ कांरे धावतां तांतडी ॥ आंगीं उडी घाली पद्याता ॥ ८७ ॥ भूस्फोट भूमिकंप ॥ अग्निकिरणीं तपे आतप ॥ वारेनी सोडिला आड्डा कंप ॥ लागे झडप खरस्पर्शें ॥ ८८ ॥ धुळोरा उधळत नगरीं ॥ रज भरले डोळयांमाझारीं ॥ डोळा न उघडे नरनारी ॥ दिशा चारी धुमधुमिती ॥ ८९ ॥ ऐसे नानापरीचे उत्पात ॥ नगरीं रुधिरवृष्टि होत ॥ देखोनि यादव समस्त ॥ भयचकित पैं जाहले ॥ २९० ॥ यादव मिळोनि थोरथोर ॥ वृद्धवृद्ध करिती विचार ॥ ये चिन्हें अरिष्टकर ॥ विघ्न थोर दिसतसे ॥ ९१ ॥ अवघे आले कृष्णापाशीं ॥ वृत्तांत सांगती तयासी ॥ उद्विग्न देखोनि यादवांसी ॥ हृषीकेशी बोलिला ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ एते वै सुमहोत्पाता व्युत्तिष्ठंतीह सर्वतः ॥ शापश्च नः कुलस्यासीद्ब्राह्मणेभ्यो दुरत्ययः ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ कृष्ण यादवांसी सांगत ॥ दिविभूअंतरिक्षगत ॥ उठिले जे महोत्पात ॥ सर्वगत सर्वदा ॥ ९३ ॥ देखोनियां चिन्हांसी ॥ मजही आठवलें मानसीं ॥ ब्राह्मणशाप यदुकुळासी ॥

---

१ देवांचा समूह. २ कृष्णाची वाणी. ३ ओरडत. ४अग्नींत. ५ रक्ताचा पाऊस.

1मो. विभु. ना. स्वभू. *ना. घातल्या. मो. घातली. 3मो. वेगेसी. +ना. भालुका.

चिन्हें त्यासी सूचकें ॥ ९४ ॥ ब्राह्मणाचा शाप खरा ॥ नुलंघवे हरिहरां ॥ तुह्मी आतांचि विचार करा ॥ नगराबाहिरा जन काढा ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ न वस्तव्यमिहास्माभिर्जिजीविषुभिरार्यकाः ॥ प्रभासं सुमहत्पुण्यं यास्यामोऽद्यैव माचिरम् ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ येथोनि द्वारकेची वस्ती ॥ आह्मीं सांडावी समस्तीं ॥ जिवे +जीवावयाची चाड चित्तीं ॥ तरी प्रभासेप्रती निघावें ॥ ९६ ॥ वेगीं करारे तांतडी ॥ आजचि निघावें लवडसवडी ॥ सांडा घरदारांची गोडी ॥ येथ अर्धघडी न रहावें ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ यत्र स्नात्वा दक्षशापाद्गृहीतो यक्ष्मणोडुराट् ॥ विमुक्तः किल्बिषात्सद्यो भेजे भूयः कलोदयम् ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ ऐका समस्त यादवश्रेष्ठ ॥ प्रभासतीर्थ वरिष्ठ ॥ जेथिचेनि स्नानें उडुराट[1] ॥ निस्तरला कष्ट क्षयाचे ॥ ९८ ॥ दक्षें निजकन्या चंद्रासी ॥ सत्तावीस दिधल्या त्यासी ॥ तो रतला रोहिणीसी ॥ येरा सर्वांसी उपेक्षुनी ॥ ९९ ॥ दक्षें शापिलें चंद्रासी ॥ क्षयरोग लागला त्यासी ॥ तेणें येऊनि प्रभासासी ॥ स्नानदानासी पैं केलें ॥३००॥ स्नानमात्रें केवळ॥ क्षयरोग गेला तत्काल ॥ कळा पावला सकळ ॥ शोभे निर्मळ निजतेजें ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ वयं च तस्मिन्नाप्लुत्य तर्पयित्वा पितॄन् सुरान् ॥ भोजयित्वोशिजो विप्रान्नानागुणवतांऽधसा ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ आह्मीही तेथें स्नान दान ॥ पितृतर्पण देवतार्चन ॥ करूं ब्राह्मण पूजन ॥ जे[2] संपन्न श्रुतिशास्त्रीं ॥ २ ॥ नानापरीचीं पक्वान्नें ॥ गुणाधिक्यें[3] मिष्टान्नें ॥ देवाब्राह्मणांरि भोजनें ॥ नानादानें विधानोक्त ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ तेषु दानानि पात्रेषु श्रद्धयोप्त्वा महांति वै ॥ वृजिनानि तरिष्यामो दानैर्नौभिरिवार्णवम् ॥३८॥

॥ टीका॥ श्रद्धेचेनि नेटेंपाटें ॥ पाहूनि दानपात्रें चोखटें ॥ दान द्यावें गोमटें ॥ भूमि वोलें[2] जेवीं बीज॥ ४॥ ब्राह्मणाचें मुख तें क्षेत्र ॥ पाल्यापेंदीवीण पवित्र ॥ ऐसें पाहूनि सुक्षेत्र दानें विचित्र पेरावीं ॥ ५ ॥ 7विनीततेची सेलेंवोल ॥ श्रद्धेचें चौडें[4] निर्मळ ॥ शमदमादि बैXसबळ ॥ ते तत्काळ जुंपोनी ॥ ६ ॥ ऐशिया वोजा परी ॥ बीज पेरिलिया क्षेत्रीं ॥ पी पिकेल घुंमरी[5] ॥ पुरुषार्थ[6] चौरी लगटोनी ॥ ७ ॥ त्या पिकांचेनि बळें ॥ पापें तरोनि सकळें ॥ जेवीं नावेचेनि बळें ॥ समुद्रजळें तरिजेती ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुकउवाच ॥ एवं भगवतादिष्टा यादवाः कुलनंदन ॥ गंतुं कृतधियस्तीर्थं स्यंदनान् समयूयुजन् ॥ ३९ ॥

---

१ चंद्र. २ ओल्या आर्द्र. ३ उत्तम. ४ धान्य पेरण्याचें चाडें. ५ भरपूर. ६ धर्म, अर्थ, काम, मोक्ष +न०. जियाची. 7मो. विनततेची सवोल. Xमो. बळ.

॥ टीका ॥ शुक ह्मणे कौरवनंदना ॥ ऐके परीक्षिती सज्ञाना ॥ कृष्णें दिधली अनुज्ञा ॥ तीर्थविधाना प्रभासा ॥ ९ ॥ यादव उठिले वेगाढे ॥ रथीं जुंपिले जी घोडे ॥ येर धांवती येरांपुढें ॥ चहूंकडे लगबग ॥ ३१० ॥

॥ श्लोक ॥ तन्निरिक्ष्योद्धवो राजन् श्रुत्वा भगवतोदितम् ॥ दृष्ट्वारिष्टानि घोराणि नित्यं कृष्णमनुव्रतः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ थोर *वीरांचे बोभाट ॥ गजरथांचे घडघडाट ॥ द्वारकेमाजी नफुटे वाट ॥ प्रयाण उद्भट प्रभासे ॥ ११ ॥ हडबडली देखोनि द्वारावती ॥ ऐक राया परीक्षिती ॥ उद्धवास आठवलें चित्तीं ॥ कृष्णवदंती देवांसी ॥१२॥ कुळनाशासि त्वरित ॥ आजिपासूनि सुमुहूर्त ॥ तोचि देवें प्रस्तुत ॥ कार्यार्थ निश्चित मांडिला ॥ १३ ॥ उद्धव कृष्णासवें सतत ॥ कृष्णानुमतें तो वर्तत ॥ सुरसंवाद निश्चित ॥ होता श्रुत तयासी ॥ १४ ॥ असतां येथ कृष्णनाथ ॥ द्वारकेमाजी उत्पात ॥ उठिले तें मनोगत ॥ जाण निश्चित कृष्णाचें ॥ १५ ॥ यादव नेऊनि प्रभासेसी ॥ अर्धक्षणें नाशील यासी ॥ जावया निजधामासी ॥ हृषीकेशी उद्यत ॥ १६ ॥ ह्मणाल कां नेले इतुके दुरी ॥ नाश न करीच द्वारकापुरीं ॥ तरी तो सर्वज्ञ श्रीहरी ॥ सूत्रधारी जाणता ॥ १७ ॥ यादव देवांश निश्चितीं ॥ सातवी पुरी द्वारावती ॥ येथ निमालिया सायुज्यमुक्ती ॥ हें जाणोनि श्रीपती न नाशीचि ॥ १८ ॥ यासि आहे पदाभिमान ॥ द्वारकेमाजी न घडे निर्धन ॥ हें जाणोनि जगजीवन ॥ करवी प्रयाण प्रभासे ॥ १९ ॥ ब्रह्मशापाचें मूळ देखा ॥ प्रभासे निघाली ते येरिका ॥ हें कळलेंसे यदुनायका ॥ तेथ सकळिकां धाडिलें ॥ ३२० ॥ स्वकुळ नासोनि श्रीपती ॥ निघेल निजधामाप्रती ॥ हें जाणोनि उद्धव चित्तीं ॥ बहुता रीतीं कळवळिला ॥ २१ ॥ बाष्पें कंठ निरोधला ॥ नेत्रीं अश्रूंचा पूर आला ॥ स्वेदु सर्वांगीं चालिला ॥ हृदयीं दाटला हुंदका ॥ २२ ॥ कृष्णवियोग अर्धक्षण ॥ तेणें रिघों पाहे प्राण ॥ विसरला कार्य आठवण ॥ कृष्णवदन निरीक्षी ॥ २३ ॥ वियोगप्राप्तीचे बाण प्रबळ ॥ हृदयीं रुतले अतिसबळ ॥ बुद्धिधैर्येंसी होती विकळ ॥ जीवीं तळमळ लागली ॥ २४ ॥ एकांत देखोनि श्रीकृष्णासी ॥ धांवोनि लागला पायांसी ॥ मिठी घालोनि चरणांसी ॥ उकसाबुकसीं स्फुंदत ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ विविक्त उपसंगम्य जगतामीश्वरेश्वरम् ॥ प्रणम्य शिरसा पादौ प्रांजलिस्तमभाषत ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ जो जगाचा नियंता ॥ त्या काळाचा कृष्ण आकळिता ॥ त्याचे चरणीं ठेऊनि माथा ॥ विनीतता बोलत ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ उद्धवउवाच ॥ देवदेवेश योगेश पुण्यश्रवणकीर्तन ॥ संहृत्यैतत्कुलं नूनं लोकं संत्यक्षते भवान् ॥ ४२ ॥ विप्रशापंसमर्थोपिप्रत्यहन्नयदीश्वरः ॥

---

१ तयार. २ मरण. ३ लडहाळा. ४ दाटला. ५ घाम.

*ना. विचाराचे.

॥ टीका ॥ उद्धव ह्मणे यादवेंद्रा ॥ देवेंद्राच्या आदिइंद्रा ॥ योगियांच्या प्रबोधचंद्रा ॥ अकळ मुद्रा पै तुझी ॥ २७ ॥ देवांमाजी इंद्र ईश ॥ त्या इंद्राचा तूं जगदीश ॥ योगियांमाजी श्रेष्ठ महेश ॥ त्याचाही ईश तूं श्रीकृष्णा ॥ २८ ॥ तुझें जें श्रवणकीर्तन ॥ तें पुण्यासि करी पावन ॥ छेदी संसारबंधन ॥ समाधान कीर्तनें ॥ २९ ॥ संहारूनि निजकुळासी ॥ सांडोनियां या लोकासी ॥ निजधामा जावों पाहसी ॥ हृषीकेशी निश्चित ॥ ३३० ॥

॥ श्लोक ॥ नाहं तवांघ्रिकमलं क्षणार्धमपि केशव ॥ त्यक्तुं समुत्सहे नाथ स्वधाम नय मामपि ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ अन्यथा विप्रशापाशी ॥ करावया समर्थ होसी ॥ तें नकरूनि कुळ संहारिसी ॥ निजधामासी जावया ॥ ३१ ॥ ऐसें बोलतां आलें रुदन ॥ नधरत चालिलें स्फुंदन ॥ आसुवें पूर्ण जाहले नयन ॥ धांवोनि चरण धरियेले ॥ ३२ ॥ माथा ठेविला चरणांवरी ॥ सखा स्वामी तूं श्रीहरी ॥ आह्मांसि सांडोनियां दुरी ॥ कैशापरी जाशील ॥ ३३ ॥ तुझ्या प्रयाणाची वार्ता ॥ ऐकतांचि गा अच्युता ॥ उभड सांठवेना चित्ता ॥ वियोग सर्वथा नव्हावा ॥ ॥ ३४ ॥ जळावेगळी मासोळी ॥ तैसा जीवु तळमळी ॥ निष्ठुर जाहालासि अंतकाळीं ॥ वनमाळी मजलागीं ॥ ३५ ॥ तुज गेलिया पाठीं ॥ मी दीनवदन ये सृष्टीं॥ कोणासि सांगों *गोड गोष्टी ॥ श्वास पोटीं नसमाये ॥ ३६ ॥ निघोनि गेलिया आत्मा ॥ प्रेतरूप उरे प्रतिमा ॥ तुवां गेलिया निजधामा ॥ तैसें आह्मां होईल ॥ ३७ ॥ तूंचि आह्मा जनक जननी ॥ हा दृढ विश्वास आमुचे मनीं ॥ केवीं जातोसि सांडोनि ॥ +ह्मणोनि लोळणी घातली ॥ ॥ ३८ ॥ तूं निघालासि निजधामा ॥ कोणासी निरविलें जी आह्मा ॥ कां रुसलासि पुरुषोत्तमा ॥ बोल ×निजकर्मा आमुच्या ॥ ३९ ॥ मुकें बाळ सांडोनि क्षितीं ॥ माता रिघोंपाहे सती ॥ तें जेवीं ये काकुळती ॥ तैसी गती उद्धवा ॥ ३४० ॥ गोड गिळी आमिषकवळ ॥ सवेंचि पारधी आंसुडी गळ ॥ त्या मीना ऐसा विव्हळ ॥ होय प्रेमळ उद्धव ॥ ४१ ॥ तुज गेलियावरी देवा ॥ म्यां कोणाची करावी सेवा ॥ कां रुसलासि यादवा ॥ आमच्या दैवा निश्चित ॥ ४२ ॥ कांटवण अटव्याक्षितीं ॥ आंधळें सांडोनि जाये सांगाती ॥ तें ग्लानी करी वनांतीं ॥ तैसी गती उद्धवा ॥ ४३ ॥ धांवधांवोनि पायां पडे ॥ धाय मोकलोनि रडे ॥ मज सांडोनि तूंचि पुढें ॥ कोणीकडे जातोसी ॥ ४४ ॥ मी नव्हे पायां वेगळा ॥ क्षण न सांडीं चरणकमळा ॥ तुझें प्रयाण जी गोपाळा ॥ अंतकाळा मज काळ ॥ ४५ ॥ तुझी थोर लागली सवे ॥ मज न्यावें आपणासवें ॥ हेंचि प्रार्थीतसें जीवेंभावें ॥ कृपा यादवें मज कीजे ॥ ४६ ॥ तूं गरुडारूढ होसी ॥ तेव्हां कृपेनें बैसवी पाठीसी ॥ सांडीं नको हृषीकेशी ॥ निजधामासी मज नेईं ॥ ४७ ॥ सलगी दिधली जन्मवरी ॥ अंतीं कां त्यागिसी दुरी ॥ कृपाळुवा श्रीहरी ॥ कृपा करी सर्वथा ॥ ४८ ॥ ह्मणसी मी निजकुळासि काळ ॥ तो तुज केवीं होईन कृपाळ ॥

---

१ न कळण्याजोगी. २ खोटा. ३ पृथ्वीवर. ४ मांसाचा घास. ५ ओढितो. ६ कंटकयुक्त आड रानांत. ७ सोबती.

*ना. गुह्य. +मो. भूमी लोळणी. ×ना. कर्मा.

हें नाम्हणें तूं दीनदयाळ ॥ अतिस्नेहाळ भक्तांसी ॥ ४९ ॥ तुझी कृपा भक्तांवरी ॥ यालागीं मी सलगी करीं ॥ मातें उद्धरी श्रीहरी ॥ झणें संसारीं सांडिसी ॥ ३५० ॥

॥ श्लोक ॥ तव विक्रीडितं कृष्ण नृणां परममंगलम् ॥ कर्णपीयूषमास्वाद्य त्यजत्यन्यस्पृहां जनः ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ तुझी क्रीडा नाना खेळ ॥ प्राणियांसि परम मंगळ ॥ कर्णद्वारें 4केवळ ॥ निजनिर्मळ सेविती ॥ ५१ ॥ तुझे कीर्तिश्रवणाची आवडी ॥ लागली कर्णपीयूषे गोडी ॥ तेथ अमृताची चवी थोडी ॥ होय अर्धघडी न लागतां ॥ ५२ ॥ ऐशी ऐकतां तुझी कीर्ती ॥ सवासना स्पृहा नासती ॥ ते भक्त तुज न विसंबती ॥ हृदयीं वाहती सर्वदा ॥ ५३ ॥ त्या तुज प्रत्यक्ष श्रीकृष्णासी ॥ मज नसाहवे वियोगासी ॥ सवे लाविली आम्हासी ॥ सौजन्येंसी स्वामिलें ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ शय्यासनाटनस्थानस्नानक्रीडाशनादिषु ॥ कथं त्वां प्रियमात्मानं वयं भक्तास्त्यजेमहि ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ तूं तंव आमुचा स्वामी होसी ॥ मज अर्धासनीं बैसविसी ॥ मजवेगळे हृषीकेशी ॥ निजगुज्यासी तुज नाहीं ॥ ५५ ॥ अचाट कार्य पडे थोर ॥ तेव्हां मज पुससी विचार ॥ मी सांगेन जो जो मंत्र ॥ तो तो साचार मानिसी ॥ ५६ ॥ जेव्हां भोजन करूं रिघसी ॥ माझें ताट ताटासी मांडिसी ॥ जेवितां नानाविनोद करिसी ॥ निजशेष देसी मजलागीं ॥ ॥ ५७ ॥ ब्रह्मादिकां नलभे पंक्ती ॥ तो मी बैसें तुझिया पांतीं ॥ शेषभागी जी श्रीपती ॥ केलें निश्चितीं त्वां मज ॥ ५८ ॥ मातें धरोनियां हातीं ॥ एकला बैससी एकांतीं ॥ ब्रह्मादिकांची विनंति ॥ तुजप्रती मी सांगे ॥ ५९ ॥ कळों नेदितां कोणासी ॥ तुवां केलें रासक्रीडेसी ॥ तें गुह्य सांगोनि मजपाशीं ॥ गोकुळासी धाडिलें ॥ ३६० ॥ सेजेची उठवूनि भीमकीसी ॥ मज आपणाजवळ निजविशी ॥ ते निद्रेचिया सुखाशीं ॥ समाधि कायसी बापुडी ॥ ६१ ॥ ऐसिया तुझे संगतीं ॥ रात्री भोगिल्या नेणों किती ॥ त्या मज सांडोनि श्रीपती ॥ जाणें निश्चितीं करितोसी ॥ ६२ ॥ वेळ नगमे चक्रपाणी ॥ मज बोलावूं धाडिसी रुक्मिणी ॥ सारीपाट आम्ही दोघीजणीं ॥ एकासनीं खेळिजे ॥ ६३ ॥ जेव्हां व्याहाळिये निघसी ॥ मज आपुले रथीं बैसविशी ॥ दोघां गमन एक्या रथेंसी ॥ आजि उद्धवासी सांगाता ॥ ६४ ॥ जळक्रीडा करितां जळीं ॥ करितां गोपिकांसीं रांडोळी ॥ तेव्हां मी तुजजवळी ॥ स्नानकाळीं सर्वदा ॥ ६५ ॥ ऐसें सांगों मी किती ॥ तुजवेगळा जी श्रीपती ॥ नाहीं जाहलों आहोरातीं ॥ केवीं म्यां अंतीं सांडावें ॥ ६६ ॥ तूं स्वामी सखा सर्वात्मा ॥ जीवाचा जीव तूं पुरुषोत्तमा ॥ तुझा वियोग मेघश्यामा ॥ केवीं आम्हा साहवेल ॥ ६७ ॥ आमुचा जीव आणि प्राण ॥ ते तुझे गा श्रीचरण ॥ तें वियोगदुःख साहावया जाण ॥ समर्थपण मज नाहीं ॥

१ कर्णामृतामध्यें. २ आशा. ३ संवय. ४ रुक्मिणीस. ५ जात नाहीं. ६ क्रीडेस. ७ कंटाळलास. ८ कुचाळी, थट्टा.

4ना. केवळ.

॥ ६८ ॥ आम्हुचा हाचि लाभ अव्यंग ॥ जे तुझिया चरणांचा संयोग ॥ त्याचा नसाहवे वियोग ॥ देहभंग जाहलिया ॥ ६९ ॥ देह राहिला तरी राहो ॥ अथवा जाईल तरी जावो ॥ तुझा चरणवियोग पहाहो ॥ नशके साहों सर्वथा ॥३७०॥ थोर दुस्तर तुझी माया ॥ ब्रह्मादिकां नये आया ॥ मज सुगम जाहली तरावया ॥ यादवराया निजशेषें ॥ ७१ ॥

॥श्लोक॥ त्वयोपभुक्तस्रग्गंधवासोलंकारचर्चिताः ॥ उच्छिष्टभोजिनो दासास्तव मायां जयेमहि ॥ ४६ ॥

॥टीका॥ तुझें गंधशेष आणि माळा ॥ धरितां कपाळीं आणि गळां ॥ मी नागवें कळिकाळा॥ दास गोपाळा पैं तुझा ॥ ७२ ॥ तुझे कांसेचा पिंवळा ॥ येऊनि माझे कांसे लागला॥ तैंचि काम म्यां जिंकिला ॥ दृढ जाहला +निजकांसे ॥ ७३ ॥ तुवां आपुले हृदयींचें पदक ॥ जेव्हां मज दीधलें देख ॥ तेव्हांचि माया जाहली विमुख ॥ दासां सन्मुख नराहे ॥ ७४ ॥ मागेंहि असतें मुख ॥ तरी हों लाहती सन्मुख ॥ ते मिथ्यागा निःशेख ॥ वृथा लोक भ्रमले पैं ॥ ॥ ७५ ॥ तुझें उच्छिष्ट सेवितां देख ॥ लाजोनि जाय समाधिसुख ॥ निडारला निजात्मतोख ॥ शेष प्रत्यक्ष निज लाभु ॥७६॥ ऐसा तुझेनि दास्यें सरता जाहलों ॥ तुझेनि निजशेषें चर्चिलों ॥ तुझी माया मी तरलों ॥ जिया धाक लाविला योगियां ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ वातरशना य ऋषयः श्रमणा ऊर्ध्वमंथिनः ॥ ब्रह्माख्यं धाम ते यांति शांताः संन्यासिनोऽमलाः ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ मिथ्यामायेच्या धाकासाठीं ॥ योगी रिघाले *कपाटीं ॥ जरी सांडिली लंगोटी॥ तरी पोटीं धाकती ॥ ७८ ॥ आसनस्थ होऊनि जाणा ॥ आकळावया प्राणापाना ॥ *मूळबंधा आकोचना ॥ दृढ धारणा ते करिती ॥ ७९ ॥ अंगुलें बाराबारा ॥ जिणावया जी त्रारा ॥ रात्रंदिवस शरीरा ॥ अभ्यासद्वारा आटिती ॥ ३८० ॥ क्षुधेनें खादली भूक ॥ तृषा तहानें प्याली देख ॥ जिणोनियां सुखदुःख ॥ ×अतिनेटक निर्धारें ॥ ८१ ॥ सुबुद्धि धरोनि हातीं ॥ आकळूनि इंद्रियवृत्ती ॥ वैराग्यें करित ख्याती ॥ ऊर्ध्वगती निघाले ॥ ८२ ॥ भेदोनि मणिकर्णिकावोवरी ॥ उसळले जी ब्रह्मरंध्रीं ॥ जिणोनियां ब्रह्मगिरी ॥ निशाण भेरी लाविल्या ॥ ८३ ॥ तेथ शांतीचेनि योगें ॥ विलसत सर्वांगें ॥ संकल्पत्यागवेगें ॥ जाहले अंगेंचि ब्रह्म ॥ ८४ ॥ ऐसे योगबळें योगी ॥ माया जिणती अंगोंगीं ॥ त्याहोनि अति सुगममार्गीं ॥ आम्हालागीं त्वां केली ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ वयं त्विह महायोगिन् भ्रमंतः कर्मवर्त्मसु ॥ त्वद्वार्तया तरिष्याम-स्तावकैर्दुस्तरं तमः ॥ ४८ ॥

---

१ पींताबर. २ थक्क झाला. ३ गुंहत. ४ ' सिद्धासन करून । वामपादाचे टांचेगें ॥ शिवणी प्रति दाबून । अपावउर्ध्व करावा ॥ १ ॥ ' यानांवमूलबंध जाण.५ पीडितात. शोषितात.

+मो. निजदास्यें. *ना. गिरीकपाटीं. *ना मूळबंधन. मो. मूळबंधनें ×मो. अति नैष्टंक.

॥ टीका ॥ भजावें तुझिया निजभक्तां ॥ ऐकावी तुझी कथावार्ता ॥ इतुकेन तरलों जी सर्वथा॥ कृष्णनाथा निजमाया ॥ ८६ ॥ आह्मां कर्ममार्गींचिया कर्मठां ॥ तुवां उपकार केला मोठा ॥ तुझ्या कथेचा श्रवणपाठा ॥ मुक्त दारवंटा मोक्षाचा ॥ ८७ ॥ असो मोक्षाची कथा ॥ चाड नाहींगा सर्वथा ॥ तुझ्या भक्तांसी तुझी कथा ॥ करितां भवव्यथा नबाधी ॥ ८८ ॥ तुझे अभेदभक्तीचें कोड ॥ आह्मा संसारचि गोड ॥ ठेंचूनियां त्रिगुणांचें तोंड ॥ भक्त प्रचंड भजताती ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ स्मरंतःकीर्तयंतस्ते कृतानि गदितानि च ॥ गत्युत्स्मितेक्षणक्ष्वेलि-यन्नलोकविडंबनम् ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ तुझ्या चरित्राचें श्रवण ॥ आवडीं करितां कीर्तन ॥ त्याचा भवबंधछेदन ॥ बळेंचि जाण तूं करिशी ॥ ३९० ॥ पुसोनियां +संसारभावो ॥ निजपदीं देसी ठावो ॥ हा श्रवणकीर्तनलाभ पहाहो ॥ आह्मीं सहज लाहों निजभक्त ॥ ९१ ॥ स्वभावें कीर्तन करितां ॥ एवढा लाभ होय तत्त्वतां ॥ मा तुझिये मुखींच्या कथा गातां ॥ आपणियां देता तूं होशी ॥ ९२ ॥ तुझीं गोकुळींचीं गमनपदें ॥ आवडीं *वर्णिती जे आनंदें ॥ त्यांसि वाहूनियां खांदीं निजबोधें ॥ कीर्तनछंदें नाचशी ॥ ९३ ॥ तुवां जे केली लीला ॥ ते आवडीं गातां जी गोपाळा ॥ नित्य त्या सेवकाजवळा ॥ अंगें अगंवळा तूं होशी ॥ ९४ ॥ तुझें वर्णिती जे हास्यवदन ॥ त्या भक्तांचें तूं करिशी ध्यान ॥ त्यांचेनि बोलें समाधान ॥ श्रीशूद्रांसी जाण तूं देशी ॥ ९५ ॥ तुझे दृष्टीचें दर्शन ॥ दृश्यातीत निरीक्षण ॥ ×सर्वत्र देखणेपण ॥ कीर्तनीं ⁰गान जे गाती ॥ ॥ ९६ ॥ त्यांच्या पाउलांपाउलांसी ॥ आपुलें सर्वांग तूं वोवाळिसी ॥ अंग सांडूनि तिष्ठसी ॥ त्यांपाशीं सर्वदा ॥ ९७ ॥ आपुली गुह्य ज्ञानमुद्रा ॥ त्यांसि अर्पिसी ज्ञानीनरेंद्रा ॥ निजबोधें प्रबोधचंद्रा ॥ त्यांच्या निजभद्रा तूं करिशी ॥ ९८ ॥ रासक्रीडादि नानाछंद ॥ अंगनामंगनादि प्रबंध ॥ ०कीर्ति अतिविशद ॥ भावार्थें शुद्ध जे गाती ॥ ९९ ॥ कां ठकचूनियां ब्रह्मयासी ॥ गोपाळ वत्सें तूं जाहलासी ॥ ऐसऐसिया विनोदासी ॥ हृषीकेशी जे गाती ॥ ॥ ४०० ॥ त्यांसि सर्वांभूतीं निजात्मता ॥ देशी तूं आपुलिया सत्ता ॥ त्यांच्या बोलामाजीं वर्तता ॥ कृष्णनाथा तूं होशी ॥ १ ॥ मनुष्यनाट्याचेनि योगें ॥ जें जें केलें तुवां अंगें ॥ तें गातां ऐकतां अनुरागें ॥ तरले वेगें निजभक्त ॥ २ ॥ म्यांचि केली जे जे आळी ॥ ते त्वां पुरविली सर्वकाळीं ॥ त्या मज उपेक्षूनि वनमाळी ॥ अंतकाळीं कां जाशी ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुकउवाच ॥ एवं विज्ञापितो राजन् भगवान्देवकीसुतः ॥ एकांतिनं प्रियं भृत्यमुद्धवं समभाषत ॥ ५० ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ एवं यापरी देवकीसुत ॥ पूर्ण पूर्णांशें भगवंत ॥ विनविला श्रीकृष्णनाथ ॥ निजभृत्यें उद्धवें ॥ ४ ॥ निजभृत्य ह्मणणें ॥ उद्धवासि याकारणें ॥ निजगुज श्रीकृष्णें ॥ त्यासि बोलणें सर्वदां ॥ ५ ॥ जेथ रिगमू नाहीं रुक्मिणीसी ॥ +यावा नाहीं वसुदेवदेवकीशीं ॥

१ अतिनिकट. २ अवलोकन. ३ स्वकल्याणास. ४ अंगना या पदानें आरंभ ज्यांचा असे कटाव. ५ प्रेमानें. ६ आटी. हट्ट

+मो. संसारभेवो. *मो. वंदिती. ×ना. सर्वस्वें. ⁰जाण. ०मो. कीर्तनीं. +मो. जावा.

बळिभद्रादि प्रद्युम्नाशीं ॥ अनवसरू *यांसि जे ठायीं ॥ ६ ॥ तेठायीं कृष्णाप्रती ॥ उद्धव असे आहोरातीं ॥ यालागीं पैं एकांती ॥ ज्ञाते म्हणती तयासी ॥ ७ ॥ श्रीकृष्णासि वाडेंकोडें ॥ जीवापरीस जें आवडे ॥ तें उद्धवासीच देणें घडे ॥ प्रेम गाढें भक्ताचें ॥ ८ ॥ देतां तो जरी नेघे ॥ तरी धांवोनि आलिंगी वेगें ॥ न घेतां देवो पायां लागे ॥ भक्तपांगें पांगिला ॥ ॥ ९ ॥ यालागीं कृष्णासि प्रियकर ॥ उद्धवचि साचार ॥ याहूनि प्रेम थोर ॥ नाहीं ×सधर आनाचें ॥ ४१० ॥ यालागीं प्रिय भृत्य एकांती ॥ इये बिरुदें उद्धवासीच साजती ॥ तेणें +निजस्वामीस विनंती ॥ निजप्रीतीं पैं केली ॥ ११ ॥ ऐकोनि उद्धवाचें वचन ॥ चातकांलागीं जेवीं घन ॥ तेवीं बोलिला जगज्जीवन ॥ स्वानंदघन निजबोधें ॥ १२ ॥ चातकाची ताहान किती ॥ तृप्त करूनि निववी क्षिती ॥ उद्धवउद्देशें श्रीपती ॥ त्रिजगती निववील ॥ ॥ १३ ॥ ऐकतां उद्धवाचे बोल ॥ येताति श्रीकृष्णासी डोल ॥ भक्तभाग्यजी सखोल ॥ जाहली वोल प्रेमाची ॥ १४ ॥ ते *वोलवले भक्तभूमीसी ॥ निजबीज पेरील हृषीकेशी ॥ तें पीक पुरेल जगासी ॥ मुक्तराशी मुमुक्षां ॥ १५ ॥ धेनु वत्साचेनि वोरसें ॥ घरां दुभतें पुरवी जैसें ॥ तेवीं उद्धवाचेनि उद्देशें ॥ जग हृषीकेशें निवविजे ॥ १६ ॥ घरीं पाहुण्यालागीं॥ कीजेति पैरवडी अनेगी ॥ तेथ बालकें जेवीं विभागी ॥ होती वेगीं न मागतां ॥ १७ ॥ पक्वान्नें सेवूं नेणती बाळें ॥ तरी माता मुखीं घाली बळें ॥ तैसें जनार्दनें आम्हां केलें ॥ स्वयें दीधलें निजशेष ॥ १८ ॥ नवल कृपा केली कैसी ॥ कृष्ण उद्धवातें उपदेशी ॥ तोचि अर्थ दिधला आम्हांसी ॥ २देशभाषां अर्थितां ॥ १९ ॥ एका जनार्दन म्हणे ॥ श्रोतां सावधान होणें ॥ हें बोलों मी तोंडें कोणें ॥ ४तिहीं मज करणें सावध ॥ ४२० ॥ निजभक्तें केली विनंती ॥ निजज्ञान बोलेल भक्तपती ॥ श्रवणाची सावध पंक्ती ॥ बैसवावी वृत्ती तद्‌बोधें॥ ॥ २१ येथ ०मुक्तांचें कोड ॥ पुरे मुमुक्षांचा चाड ॥ येचिविषयासी कथा गोड ॥ श्रवणकवाड उघडेल ॥ २२ ॥ उद्धवें श्रीकृष्ण विनविला ॥ ना तो श्रवणीं डांगोरा पिटिला ॥ मुमुक्षां म्हणे चला ॥ कृष्ण बोळला निजबोधें ॥ २३ ॥ मोक्षमार्गींचे कांपडी ॥ अर्थतृषें तृषित बापुडी ॥ प्रबोधबोधाची पव्हे गाढी ॥ उद्धवें रोकडी घालविली ॥ २४ ॥ भक्तिजननी माझी तेथ ॥ कडे घेऊनि होती नेत ॥ जनार्दन परमामृत ॥ जाहलें प्राप्त तिचेनि ॥ २५ ॥ ते तुझी भक्ति तत्त्वतां ॥ आम्हांसि असावी सर्वथा ॥ तुज मागावी मुक्तता ॥ तंव ते मूर्खता ५भक्तांची ॥ २६ ॥ साच असावी बद्धता ॥ तरी त्यां मागावी मुक्तता ॥ तेचि नाहींगा तत्त्वतां ॥ मिथ्या मागतां मूर्खत्व ॥ २७ ॥ मीतूंपणेंवीण सहजस्थिती ॥ तुझी असो अभेदभक्ती ॥ हेंचि ६मागणें पुढतपुढतीं ॥ संतांप्रती सर्वदा ॥ २८ ॥ उद्धवासि ज्ञान गुह्य ॥ उपदेशील कृष्णनाथ ॥ एका जनार्दना विनवित ॥ +दत्तचित्त तुम्हीं दीजे ॥ ४२९ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे एकाकारटीकायां देवस्तुत्युद्धवविज्ञापनं नाम षष्ठोऽध्यायः ॥६॥ ग्रंथसंख्या मूळश्लोक ॥ ५० ॥ ओव्या ॥ ४२९ ॥ मिळून संख्या ॥ ४७९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ शुभंभवतु ॥

१ पान्ह्यानें. स्नेहानें. २ अनेक प्रकार. ३ कान हेंच दार. ४ यात्रेकरून. ५ भक्ति हीच आई. ६ वारंवार.

*ना. अनिरुद्धासी. ×ना. साचार. +ना. निजधामासी. *ना. वोल. मो. वोलले. २ना. देशभाषीं. ४ना. मीही मजकारणे. ०भक्ताचे. ५ना. भक्तीची. ०ना. मागतो. मो. मागों. +मो. अवधान श्रोतीं मज दिजे.

# अध्याय सातवा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐनमो सद्गुरु चतुरक्षरा ॥ चतुरचित्तप्रबोधचंद्रा ॥ जनार्दना सुरेंद्रइंद्रा ॥ ज्ञाननरेंद्रा निजबोधा ॥ १ ॥ तुझी करितांचि गोष्टी ॥ प्रगटसी पाठीं पोटीं ॥ सन्मुख ठसावसी दृष्टीं ॥ हृदयगांठी छेदूनी ॥ २ ॥ छेदूनि विषयवासना ॥ स्वयें प्रगटसी जनार्दना ॥ भावअभावभावना ॥ नेदिसी मना आतळों ॥ ३ ॥ आतळतां तुझे चरण ॥ आकळलें राहे मन ॥ सहजें देशी समाधान ॥ आनंदघन अच्युता ॥ ४ ॥ ऐशिया जी गुरुनाथा ॥ समसाम्य चरणीं माथा ॥ पुढील परिसावी जी कथा ॥ जेथ वक्ता श्रीकृष्ण॥ ॥ ५ ॥ उद्धवें विनविलियावरी ॥ कृपा कळवळला श्रीहरी ॥ निजज्ञान अतिविस्तारीं ॥ बोधकुसरी सांगत ॥ ६ ॥ होतें कृष्णाचे मानसीं ॥ मज गेलिया निजधामासी ॥ माझें निजज्ञान कोणापासीं ॥ अतियत्नेंसी ठेवावें ॥ ७ ॥ तंव देखिली उद्धवाची अवस्था ॥ सुख झालें श्रीकृष्णनाथा ॥ वैराग्ययुक्त उपदेशिता ॥ होय सर्वथा निजज्ञान ॥ ८ ॥ एवं वांचवावया उद्धवासी ॥ कृष्ण ब्रह्मज्ञान उपदेशी ॥ शाप नबाधी ब्रह्मवेत्त्यासी ॥ हें हृषीकेशी जाणत ॥ ९ ॥ ब्रह्मउपदेशाची हातवटी ॥ उपदेशं जाणे जगजेठी ॥ वैराग्य उपजवी उठाउठी ॥ जेणें पडे मिठी निजतत्त्वीं ॥ १० ॥ 'नव्हतां वैराग्य दारुण ॥ उपदेशु केला तो वृथा जाण'॥ हे श्रीकृष्णाचि जाणे खुण ॥ वैराग्यविंदान बोलत ॥ ११ ॥ पहिलें उद्धवाच्या बोलासी ॥ अनुमोदन दे हृषीकेशी ॥ तेणें अन्वयें सावकाशीं ॥ ज्ञानवैराग्य त्यासी सांगतु ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ यदात्थ मां महाभाग तच्चिकीर्षितमेव मे ॥

ब्रह्मा भवो लोकपालाः स्वर्वासं मेऽभिकांक्षिणः ॥ १ ॥

॥ टीका ॥ जो वेदांचा वेदवक्ता ॥ जो ज्ञानियांचा ज्ञानदाता ॥ तो श्रीकृष्ण म्हणे भाग्यवंता ॥ ऐकें निजभक्ता उद्धवा ॥ १३ ॥ जें तूं बोलिलासि भावयुक्त ॥ तें वचन तुझें सत्यसत्य ॥ तेंचि माझें मनोगत ॥ *जाण निश्चित निर्धारें ॥ १४ ॥ माझी अवस्था ×जोंधनीळा ॥ ब्रह्मादिदेवां सकळां ॥ येथ आले होते मिळोनि मेळा ॥ लोकपाळांसमवेत ॥ १५ ॥ येऊनि माझी घेतली भेटी ॥ अपेक्षा जे होती पोटीं॥ पुशिली माझ्या प्रयाणाची गोठी॥ जेणें तुज मोठी अवस्था ॥ १६ ॥ म्यां वेगीं यावें वैकुंठा ॥ हे समस्तांसि उत्कंठा ॥ आदिकरून नीळकंठा ॥ सुरवरिष्ठां होतसे ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ मया निष्पादितं ह्यत्र देवकार्यमशेषतः ॥ यदर्थमवतीर्णोऽहमंशेन ब्रह्मणार्थितः ॥ २ ॥

---

१ 'ज-ना-र्द-न' हीं चार अक्षरें, २ "भिद्यते हृदयग्रंथिः" भागवत. ३ उत्कंठा. ४ लक्षण. ५ शंकरास. ६ इंद्रादि आठ लोकपालांसहित.

*ना. जाणें निश्चित निजधामा. ×मो. जाण स्वलीला.

॥ टीका ॥ ज्यालागीं ब्रह्मानें प्रार्थिलें ॥ तें देवकार्य म्यां संपादिलें ॥ अवतार नटनाट्य धरिलें ॥ ज्येष्ठत्व दिधलें बळिभद्रा ॥ १८ ॥ ज्येष्ठकनिष्ठभावना ॥ दोघांमाजी नाहीं जाणा ॥ कृष्णा आणि संकर्षणा ॥ एकात्मता निजांशें ॥ १९ ॥

॥ कुलं वै शापनिर्दग्धं नंक्ष्यत्यन्योन्यविग्रहात् ॥ समुद्रः सप्तमेन्ह्येतां पुरीं च प्लावयिष्यति ॥ ३ ॥

॥ टीका ॥ उरलें असे आमुचें कुळ ॥ शापनिर्दग्ध केवळ ॥ अन्योन्यविग्रहें सकळ ॥ ×कलहमूळ नासेल ॥ २० ॥ भूमि मागोनि समुद्रापासीं ॥ म्यां रचिलें द्वारकेसी ॥ मज गेलिया निजधामासी ॥ तो सातवे दिवशीं बुडवील ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ यर्ह्येवायं मया त्यक्तो लोकोऽयं नष्टमंगलः ॥ भविष्यत्यचिरात्साधो कलिनाऽपि निराकृतः ॥ ४ ॥

॥टीका॥ ऐकें उद्धवा हितगोष्टी ॥ म्यां सांडिलिया हे सृष्टी॥थोडियाचि काळापाठीं ॥०नष्टदृष्टी जन होती ॥ २२ ॥ अधर्म वाढेल प्रबळ ॥ लोक होतील नष्ट अमंगळ ॥ ते अमंगळतेचें मूळ ॥ ऐक समूळ सांगेन ॥ २३ ॥ मज नांदतां ये सृष्टीं ॥ कलि उघडं नशके दृष्टी ॥ मज गेलियापाठीं ॥ तो उठाउठी वाढेल ॥ २४ ॥ कलि वाढेल अतिविषम ॥ ब्राह्मण सांडितील स्वधर्म ॥ स्वभावें नावडे दानधर्म ॥ क्रियाकर्म दंभार्थ ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ न वस्तव्यं त्वयैवेह मया त्यक्ते महीतले ॥ जनोऽधर्मरुचिर्भद्र भविष्यति कलौ युगे ॥ ५ ॥

॥ टीका ॥ म्यां सांडिलिया महीतळीं ॥ प्रबळबळें वाढेल कळी ॥ *आजीच तुवां निघिजे तत्काळीं ॥ जंव तो कळी नातळे ॥ २६ ॥ कळी आतळेल जेव्हां ॥ जनीं अधर्म वाढेल तेव्हां ॥ कुविद्येच्या उठती हांवा ॥ सैंघ धांवा निंदेच्या ॥ २७ ॥ नलभे स्वार्थाची कवडी ॥ तरी करिती निंदेच्या कोडी ॥ ऐसी कलियुगीं वस्ती कुडी ॥ तुवां अर्धघडी नराहावें ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ त्वं तु सर्वं परित्यज्य स्नेहं स्वजनबंधुषु ॥ मय्यावेश्य मनः सम्यक् समदृग्विचरस्व गाम् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ उद्धवा तूं यालागीं ॥ येथोनि निघावें वेगवेगीं ॥ एकलाचि अंगोवांगीं ॥ हिता-लागी सर्वथा ॥ २९ ॥ धनधान्यसमृद्धीसी ॥ सांडावें स्वजनगोत्रजांसी ॥ भ्राता दुहिता निजबंधूसी ॥ स्त्रीपुत्रांसी त्यजावें ॥ ३० ॥ स्नेहो ठेवूनि घरदारीं ॥ तूं जरी निघालासि बाहेरी ॥ तरी तो त्यागचि कठिण भारी ॥ अनर्थकारी होईल ॥ ३१ ॥ आधीं समूळ स्नेह सांडावा ॥ पाठीं अभिमानही दंडावा ॥ वासना जटाजूट मुंडावा ॥ मग सांडावा आश्रम ॥ ३२ ॥ स्नेह कैसेनि सांडे ॥ अभिमान कैसेनि दंडे ॥ हें तुज वाटेल सांकडें ॥ तरी

---

१ शापानें जळालेलें. २ आपसांत भांडणानें. ३ काळानंतर, काळानें. ४ फार. ५ तत्काळ.

×मो. कलहमुळें. ०ना. नष्ट भ्रष्ट. *मो. आधींच.

सांकडें परियेसी ॥ ३३ ॥ ' माझें स्वरूप जें सर्वगत ॥ तेथें ठेवोनियां चित्त ॥ सावधानें सुनिश्चित ॥ राहावें सतत निजरूपीं ' ॥ ३४ ॥ तये स्वरूपीं चित्ता ॥ निर्धारेंसी धारणा धरितां ॥ ॐनिजभावें तन्मयता ॥ तद्रूपता पावेल ॥ ३५ ॥ भृंगी कीटक जडमूढ ॥ ध्यानें तद्रूप होय दृढ ॥ अभ्यासीं कांहीं नाहीं अवघड ॥ तो अभ्यास मूढ विषयीं केला ' ॥ ३६ ॥ माझें स्वरूप ज्ञानघन ॥ ज्ञाता जीव स्वयें सज्ञान ॥ या स्थितीकारितां ध्यान ॥ सहजें जाण तद्रूप॥३७॥ तेथें सममाम्यें समत्व ॥समत्व पावेल चित्त ॥ तेणें समभावें निश्चित ॥ जेथिचा तेथ राहावें ॥ ३८ ॥ आधीं गृहाश्रमातें त्यागावें ॥ मग म्यां ह्मणसी कोठें राहावें ॥ ऐसें मानेल स्वभावें ॥ ते विषयीं बरवें परियेसीं ॥ ३९ ॥ स्वरूपसाम्य समदृष्टी ॥ समभावें +विचरे सृष्टी ॥ निवासस्थानाची आटाटी ॥ सर्वथा पोटीं नधरावी ॥ ४० ॥ जेथ अल्पकाळ वस्ती घडे ॥ त्या ठायाचा अभिमान चढे ॥ वस्तिस्थान ऐसें कुडें ॥ वस्तीचें सांकडें सर्वथा नधरीं ॥ ४१ ॥ तूं सर्वीं सर्वगत होसी ॥ *सर्वाधार सर्वदेशी ॥ ऐसा मी होऊनि मज पावसी ॥ न हालतां येसी निजधामा ॥ ४२ ॥ मज निजधामा न्यावें ॥ होतें पुसिलें उद्धवें ॥ तें निजबोध स्वभावें ॥ स्वयें केशवें सांगीतलें ॥ ४३ ॥ नकरितां हे उपायस्थिती ॥ सर्वथा नघडे माझी प्राप्ती ॥ मग तूं निजधामाप्रती ॥ कैशा ×रीती येशील ॥४४॥ 6गरुडीं बैसोनि वेगेंसीं ॥ न्यावें निजधामा ह्मणसी ॥ गति तेथ नाहीं पाखांसी ॥ गम्य गरुडासी *तें नव्हे ॥ ४५ ॥ सांडूनि उभय पक्षांसी ॥ साधक पावती मद्रूपासी ॥ पक्षाभिमान असे गरुडासी ॥ 6गमन तेणें त्यासी नव्हे ॥ ४६ ॥ ह्मणसी न्यावें बैसोनि खांदीं ॥ मज खांदाचि नाहीं त्रिशुद्धी ॥ तुज न सांडितां अहंबुद्धी ॥ गमनसिद्धी तेथ नाहीं ॥ ४७ ॥ न त्यागितां अहंभावस्थिती ॥ केल्या नाना उपाय युक्ती ॥ तेणें निजधामाप्रती ॥ नव्हे गती सर्वथा ॥ ॥ ४८ ॥ जें जें देखसी साकार ॥ तें तें जाणपां नश्वर ॥ तेचि त्रिखींचा निर्धार ॥ करी साचार निजबोधें ॥ ४९ ॥

॥ यदिदं मनसा वाचा चक्षुर्भ्यां श्रवणादिभिः ॥ नश्वरं गृह्यमाणं च विद्धी मायामनोमयम् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ जें जें दृष्टीं देखिलें ॥ तें तें दृश्यत्वें 3बाळिलें ॥ जें जें श्रवणा गोचर झालें ॥ तेंही बाळिलें शब्दत्वें ॥ ५० ॥ जे जे वाचा वदे ॥ तें तें बाळिजे जल्पवादें ॥ वाचिक सांडविलें वेदें ॥ नेति शब्दें लाजिला ॥ ५१ ॥ जें जें संकल्पा 2आकळिलें ॥ तें तें कल्पित पैं झालें ॥ जें जें अहंकारा आलें ॥ तें तें बाळिलें विजातीय ॥ ५२ ॥ जें जें इंद्रियां गोचरें ॥ तें तें जाणपां नश्वरें ॥ हें नित्यानित्य विचारें ॥ केलें खरें निश्चित ॥ ५३ ॥ तोही नित्यानित्यविवेक ॥ जाणपां निश्चित मायिक ॥ एवं मायामय हा लोक ॥ करी संकल्प सृष्टीतें ॥ ॥ ५४ ॥ " जेवढा देखसी संसार ॥ तेवढा मायिक व्यवहार ॥ हा वोळख तूं साचार ॥

१ निश्चयानें. २ आत्मस्वरूपाचें समत्व. ३ श्रम. ४ वाहून. ५ नाहींसें होणारें. ६ टाकिलें. ७ बोलणें.

ॐमो. निजभावेंसी. +मो. विचरावे. *मो. सर्वाधारें. ×ना. गती. 6मो. गरुडा. *मो. तेथें. 6ना. गमन तयासी न घडे पैं. 3मो. बोलिले. 2मो. आलें.

धैर्य निर्धार धरोनी ॥ ५५ ॥ जैसी स्वप्नींची राणिव ॥ केवळ भ्रमाचि जाणिव ॥ तैसेंचि जाण हें सर्व ॥ भवंवैभव विलास ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ पुंसोयुक्तस्य नानार्थो भ्रमः स गुणदोषभाक् ॥ कर्माकर्मविकर्मेति गुणदोषधियो भिदा ॥ ८ ॥

॥ टीका ॥ ०परमात्मेंसि जो विभक्त ॥ तो पुरुष बोलिजे अयुक्त ॥ त्यासि नानात्वें भेदु भासत ॥ निजीं ⁰निजत्व विसरोनी ॥ ५७ ॥ त्या विसराचेनि उल्हासें ॥ मिथ्या भेदु सत्यत्वें भासे ॥ त्या भेदाचेनि आवेशें ॥ अवश्य दिसे गुणदोषु ॥ ५८ ॥ जरी भेदुचि नाहीं ॥ तरी गुणदोष कैचा पाहीं ॥ दिसावया ठावोचि नाहीं ॥ शुद्धाच्याठायीं सर्वथा ॥ ५९ ॥ यालागी भेदाच्या उद्भटीं ॥गुणदोषदृष्टी उठी ॥ तेथें कर्माकर्मत्रिपुटी ॥ भेददृष्टीं ठसावे ॥ ६० ॥ भेदें थोर केलें विषम ॥ कर्म अकर्म विकर्म ॥ जन्ममरणादिधर्म ॥ निजकर्म प्रकाशी ॥ ६१ ॥ अकर्में विकर्में नरकयातना ॥ काम्यकर्में स्वर्ग जाणा ॥ कर्मेंचि करुनि कर्ममोचना ॥ समाधाना पाविजे ॥ ६२ ॥ तेथ ह्मणसी कर्म कोण ॥ अकर्माचें काय लक्षण ॥ विकर्माचा कवण गुण ॥ तेंही संपूर्ण परीसें पां ॥ ६३ ॥ 'काया वाचा अथवा मन ॥ करिजे तितुकें कर्म जाण ॥ सूक्ष्म स्फूर्तीचें जें भान ॥ तें मूळ जाण कर्माचें ॥ ६४ ॥ मनसा वाचा देहीं ॥ सर्वथा कर्मबीज नाहीं ॥ अकर्म ह्मणिजे तें पाहीं ॥ नपडे ठायीं देहवंता ॥ ६५ ॥ जें कर्मा-वेगळें सर्वांगें ॥ जेथ कर्म लावितांही नलगे ॥ जें नव्हे कर्मठाजोगें ॥ तें जाण सवेगें अकर्म॥ ॥ ६६ ॥ विधिनिषेध जोडेपाडें ॥ जेथ विशेष कर्म वाढे ॥ विकर्म त्यातें ह्मणणें घडे ॥ थोर सांकडें पै याचें ॥ ६७ ॥ कर्म सर्वसाधारण ॥ तेंचि विकारातें पावलें जाण ॥ उठिले विधिनिषेध दारुण ॥ विकर्म जाण तें ह्मणिपे ॥ ६८ ॥ जें विधीसी नातुडे ॥ तें निषेधाचें अंग चढे ॥ करितां चुके ठाके विकळ पडे ॥ तेंही वोकडें निषिद्धचि ॥ ६९ ॥ ऐसें कर्म विकारलें ॥ तें विकर्मपदें वाखाणिलें ॥ एवं कर्माकर्म दाविलें ॥ विभाग केले तुजलागी ॥ ॥ ७० ॥ जिवासि आविद्यक उत्पत्ती ॥ त्याचीं कर्में आविद्यकें होती ॥ श्रीधर व्याख्यानाची युक्ती ॥ तेही उपपत्ती परियेसा ॥७१॥ अविद्यायुक्त जीव परम ॥ त्यासि नित्यक्रिया तेंचि कर्म॥ नित्य *न करणें तें अकर्म ॥विकर्म तें निषिद्ध ॥७२॥ ऐसी कर्माकर्मविकर्मत्रिपुटी ॥ +भेदानुरूपें वाढवी सृष्टी ॥ तेथ गुणदोषबुद्धीच्या पोटीं ॥ भेददृष्टी वाढती ॥७३॥ अभेदीं भेद कैसा उठी ॥ जेणें ÷गुणदोषीं नांदे दृष्टी ॥ विधिनिषेधीं पाडी गांठीं ॥ तेही गोठी परियेसीं ॥ ७४ ॥ पुरुष एकला एक असे ॥ तोचि मनोरथ पूजे बैसे ॥ ध्येयध्याताध्यानमिसें॥ वाढवी पिसें भेदाचें ॥ ७५ ॥ तेथें नानापरीचे उपचार ॥ पूजा सामग्री संभार ॥ ऐसा एकपणीं अपार ॥ भेद साचार वाढवी ॥ ७६ ॥ तेथ ध्येय उत्तम ह्मणे जाण ॥ ध्याता नीच होय आपण ॥ तद्रंगें केलें ध्यान गौण ॥ गुणदोष जाण वाढवी ॥ ७७ ॥ ध्यानीं गुणदोष विचित्र ॥ ध्येय ह्मणे परमपवित्र ॥ ध्याता आपण होय अपवित्र ॥ शौचाचार दोषत्वें ॥ ७८ ॥ एवं ध्यानाचिये

---

१ राज्य. २ संसारांतलें ऐश्वर्य. ३ उत्कर्षानें. ४ ऐक. ५ द्वंद्वानें. ६ अज्ञानापासून.

०ना. मो. परमात्मनेसी. ⁰ना. निजतत्व. *ना. कर्म. *मो. अकरणतें. +मो. भेदरूपें. ÷ना. गुणदोष नांदे दृष्टी. मो. गुणदोषें नांदे दृष्टी.

दृष्टीं ॥ आपणचि आपुल्या पोटीं ॥ गुणदोषांची त्रिपुटी भेददृष्टी वाढवी ॥ ७९ ॥ ध्येय ध्याता ध्यान ॥ अघवाचि आहे आपण ॥ तें सांडोनियां जाण ॥ गुणदोषलक्षण वाढवी ॥ ८० ॥ उद्धवा हे अवघी सृष्टी ॥ वाढली असे भेददृष्टीं ॥ तेणें भेदें उठाउठी ॥ कर्मत्रिपुटी वाढविली ॥ ॥ ८१ ॥ जंवजंव भेदाचा जिव्हाळा ॥ जंवजंव विषयाचा सोहळा ॥ पाळिजे इंद्रियांचा लळा ॥ तंवतंव आगळा संसारु' ॥ ८२ ॥ सापा पाजिजे पीयूख ॥ तेंचि परतोनि होय विख ॥ तैसें इंद्रियां दीजे जंवजंव सुख ॥ तंवतंव दुःख भोगिजे ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ तस्माद्युक्तेंद्रियग्रामो युक्तचित्त इदं जगत् ॥ आत्मनीक्षस्व वित-तमात्मानं मय्यधीश्वरे ॥ ९ ॥

॥ टीका ॥ यालागीं इंद्रियांच्या द्वारीं ॥ विषयो येऊंनेदावा चतुरीं ॥ जेवीं विषें रांधिली क्षीरधारी ॥ सांडिजे दुरी सज्ञानें ॥ ८४ ॥ मघमघित अमृतफळें ॥ वरी सर्पें घातलिया गरळें ॥ तें न सेविती कावळे ॥ सेवनीं फळे निजघातु ॥ ८५ ॥ तैसें सेवितां विषयांसी ॥ कोण गोडी मुमुक्षासी ॥ प्रतिपदीं आत्मघातासी ॥ अहर्निशीं ³देखतां ॥ ८६ ॥ आत्मघात न देखती ॥ ते विषयीं विषयो सेविती ॥ जैशी दिवाभीता मध्यरातीं ॥ असतां गभस्ती मध्यान्हीं ॥ ८७ ॥ तैसेंचि विषयसेवन ॥ मुमुक्षासी वधु जाण ॥ तरी नचुके जन्ममरण ॥ आत्मपतन तयाचें ॥ ८८ ॥ म्हणसी प्राणियांची स्थिती ॥ विषयावरी निश्चितीं ॥ विषयत्यागीं केवीं राहती ॥ ते सुगमस्थिती अवधारीं ॥८९॥ असतां इंद्रियांचा नेमु ॥ करी चित्ताचा उपरमु ॥ ऐसा दोहींपरी सुगमु ॥ उत्तमोत्तमु हा त्यागु ॥ ९० ॥ इंद्रियें असोत विषयांवरी ॥ मन रिघों नेदी त्यांभीतरीं ॥ हाही त्यागु सर्वांपरी ॥ योगेश्वरीं बोलिजे ॥ ९१ ॥ मनासि विषयाचें बळ ॥ विषयध्यासें तें चपळ ॥ नव्हे म्हणसी तें निश्चळ ॥ ऐक समूळ तो उपावो ॥९२॥ माझें स्वरूप सर्वगत ॥ मना बाहेर आणि आंत ॥ जेथजेथ जाईल चित्त ॥ तेथतेथ तें असे ॥ ॥ ९३ ॥ मज वेगळें जावयासी ॥ ठावो नाहीं पैं चित्तासी ॥ स्वदेशीं हो परदेशीं ॥ अहर्निशीं मज आंत ॥ ९४ ॥ ऐसें निजरूप सतत ॥ पाहतां *थोरावेल चित्त ॥ त्या चित्तामाजीं आथंत ॥ पाहे समस्त हें जग ॥ ९५ ॥ अथवा जीवस्वरूप तुझें चांग ॥ त्यामाजी पाहतां हें जग ॥ जगचि होईल तुझें अंग ॥ अति निर्व्यंग निश्चित ॥ ९६ ॥ चरें आणि अचरें ॥ लहान कां थोरें ॥ जीवरूपीं सविस्तारें ॥ पाहे निर्धारें हें जग ॥ ९७ ॥ म्हणसी जीव तो एकदेशी ॥ *त्यामाजी केवीं पहावें जगासी ॥ त्यासि ऐक्यता करी मजसी ॥ जेवीं कनकेंसी अलंकार ॥ ९८ ॥ 'चिंतितां कीटकी भिंगुरटी ॥ तेचि ते होऊनि उठी ॥ तैसा तूं उठाउठी ॥ होई निजदृष्टीं निजतत्त्व' ॥ ९९ ॥ हो कां सैंधवाचा खडा ॥ पडल्यां सिंधूमाजी-वडा ॥ तो होवोनि ठाके त्याएवढा ॥ तैसा तूं रोकडा मी होसी ॥१००॥ जेथ मीतूंपणाचा भेद ॥ फिटोनि जाईल विशद ॥×परमानंद शुद्ध बुद्ध ॥ मुक्त सिद्ध तूं होसी ॥ १ ॥

---

१ द्वैताची दृष्टि. २ अधिक. ३ अमृत. ४ क्षीर. ५ घुबडास. ६ सूर्य. ७ मोन्याशीं. ८ भिंगाचा. ९ समुद्रांत.

3मो. देखत ना. देखती. *ना. थोरावलें. *ना. त्या जीवें. ×मो. परमानंदें सुबद्ध.

॥ श्लोक ॥ ज्ञानविज्ञानसंयुक्त आत्मभूतः शरीरिणाम् ॥ आत्मानुभवतुष्टात्मा नांतरायैर्विहन्यसे ॥ १० ॥

॥ टीका ॥ शास्त्रश्रवणें दृढ ज्ञान ॥ मननाभ्यासें होय विज्ञान ॥ या दोहींची जाणोनि खुण ॥ ब्रह्मसंपन्न तूं होसी ॥२॥ ऐशिया स्वार्थाचेनि लवलाहें ॥ अविश्रम भजावे तुझे पाये ॥ म्हणसील वोडवती अंतरायें[१] ॥ त्यासि काये करावें ॥ ३ ॥ सांडोनि दांभिक लौकिक ॥ त्यजोनियां फळाभिलाख[२] ॥ जो मज भजे भाविक ॥ विघ्न देख त्या कैंचें ॥ ४ ॥ त्याच्या विघ्ननाशासि देख ॥ करीं चक्राची[३] लखलख ॥ घेऊनि पाठीसी अचुक ॥ उभा सन्मुख[४] मी असें ॥ ५ ॥ यापरी गा उद्धवा ॥ जो मज भजे निजभावा ॥ त्यासि विघ्न करावया देवा[५] ॥ नव्हे उठावा मंज असतां॥६॥ एवं ब्रह्मसंपन्न जाहलियावरी ॥ आत्मा तूंचि चराचरीं ॥ जंगमीं आणि स्थावरीं ॥ सुरासुरीं तूंचि तूं ॥ ७ ॥ तुजहूनि कांहीं ॥ अणुभरी वेगळें नाहीं ॥ तेथ विघ्न कैंचें कायी ॥ तुझ्याठायीं बाधील ॥८॥ ब्रह्मादिकांसि जो ग्रासी ॥ त्या काळाचा तूं आत्मा होसी ॥ पाठी थापटून हृषीकेशी ॥ उद्धवासी सांगतु ॥ ९ ॥ ऐशी बाध्यबाधकता फिटली ॥ संकल्पकल्पना तुटली ॥ ब्रह्मानंदें पाहांट फुटली ॥ +वाट मोडली कर्माची ॥ ११० ॥ ऐसा ब्रह्मानुभवी जो देख ॥ कर्म तेथ होय रंक ॥ वेद तयाचे सेवक ॥ विधिविवेक कामारी ॥ ११ ॥ हें कितीक सांगों कायी ॥ मी त्याचा आज्ञाधारक पाहीं ॥ प्रतिष्ठिती जे जे ठायीं ॥ तेथ पाहीं प्रगटतु॥ ॥ १२ ॥ वचनमात्रासाठीं ॥ प्रगटलों कोरडे काष्ठीं ॥ दुर्वासा वाहिला पाठी[६] ॥ त्यांही दिठी देखिलें ॥ १३ ॥ म्हणसी देव ज्याचा आज्ञाधारू ॥ कर्म त्याचें होय किंकरू ॥ तरी ज्ञाते यथेष्टाचारु ॥ विषयीं साचारु विचरती ॥ १४ ॥ ज्ञात्यासि स्वेच्छा विषयाचरण ॥ सर्वथा न घडे गा जाण ॥ तेंही विषयींचें लक्षण ॥ सावधान परियेसी ॥ १५ ॥ ज्यासि दग्धपट अभिमान ॥ मिथ्या प्रपंचाचें भान ॥ मृषा[७] विषयांचें दर्शन ॥ विषयाचरण त्या नाहीं ॥१६॥ जयासि प्रपंचाची आवडी ॥ विषयांची अति गोडी ॥ यथेष्टाचरणाची वोढी ॥ पडे सांकडी तयासी ॥ १७ ॥ ज्ञातयाच्या ठायीं ॥ सत्यत्वें विषयो नाहीं ॥ मा भोगावया कायी ॥ अभिलाषी पाहीं तो होईल ॥ १८ ॥ आतां ज्ञातयाचें कर्म ॥ ऐक सांगों त्याचें वर्म ॥ नातळतां मनोधर्म[८] ॥ क्रियाकर्म आचरती ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ दोषबुद्ध्योभयातीतो निषेधान्न निवर्तते ॥ गुणबुद्ध्या च विहितं न करोति यथाऽर्भकः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ गुणदोषातीत ज्ञाता ॥ तो निषेधीं नवर्ते तत्वतां ॥ परी भयालेपण चित्ता ॥ नाहीं सर्वथा तयांसी ॥ १२० ॥ तो विहितही कर्म करी ॥ तेथ गुणत्वें बुद्धि नधरी ॥ कुलालचक्राचिये[९] परी ॥ पूर्वसंस्कारीं वर्तत ॥ २१ ॥ संकल्प नाहीं वृत्ती ॥ हेतु स्फुरेना चित्तीं ॥ ऐसीं

---

१ विघ्नें. २ फलाची इच्छा. ३ सुदर्शनाची. ४ मजसमक्ष. ५ कामकरी सेवक. ६ कृष्ण रुक्मिणींनीं दुर्वासाचा रथ ओढिला होता. ७खोटें, मिथ्या ८ मनाप्रमाणें वागण्याची. ९ कुंभाराचे चाकाप्रमाणें.

+ना. वाट.

कर्मे ज्ञाते करिती ॥ शरीरस्थिती केवळ ॥ २२ ॥ तेथ सत्कर्म सिद्धी गेलें ॥ तेणें फुंगेना म्यां हें केलें ॥ अथवा माझारी विकळ पडिलें ॥ तेणें तगमगिलेपण नाहीं ॥ २३ ॥ निद्रिता-मार्गे बैसला वाघु ॥ अथवा पुढें आला स्वर्गभोगु ॥ त्यासि नाहीं रागविरागु ॥ तैसा लागु ज्ञात्याचा ॥ २४ ॥ गुणदोषीं चित्तवृत्ती ॥ सांडोनियां सहजस्थिती ॥ बाळकें जेवीं क्रीडती ॥ तैसी स्थिती ज्ञात्याची ॥ २५ ॥ अभिमानें कर्मप्राप्ती ॥ त्या अभिमानातें त्यागिती ॥ मग निरभिमानें केवीं वर्तती ॥ कर्मस्थिती त्यां नघडे ॥ २६ ॥ ऐसा विकल्प जरी करिसी ॥ ते स्थिती नकळे इतरांसी ॥ निरभिमानता स्वानुभवेंसी ॥ केवीं येरासी कळेल ॥ २७ ॥ देहप्रारब्धाचेनि मेळें ॥ स्वभावें सर्वकर्मी चळे ॥ तेथ अज्ञानाचेनि बळें ॥ *अभिमान खवळे मी कर्ता ॥ २८ ॥ तेथ गुरुवाक्य अनुवृत्ती ॥ अभ्यासूनि यथानिगुती ॥ अज्ञानेंसहित निरसिती ॥ अभिमानस्थिती निजबोधें ॥ २९ ॥ शेष प्रारब्धाचेनि मेळें ॥ निरभिमानें देह चळे ॥ ज्ञाते कर्मे करिती सकळें ॥ जाण केवळ शरीरें ॥ १३० ॥ केवळशरीरें कर्मे होती ॥ तींच अहेतुकें बोलिजेती ॥ अर्भकदृष्टांत उपपत्ती ॥ हेचि स्थिती सांगितली ॥ ३१ ॥ निर-भिमानांचीं लक्षणें ॥ कृष्ण उद्धवातें ऐक ह्मणे ॥ येरु आनंदला अंतःकरणें ॥ +सादरपणें परिसतू ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ सर्वभूतसुहृच्छांतो ज्ञानविज्ञाननिश्चयः ॥ पश्यन्मदात्मकं विश्वं न विपद्येत वै पुनः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ ' पहिलें शास्त्रश्रवणें ज्ञान ' ॥ तदनुभवें होय विज्ञान ॥ ऐसा ज्ञानविज्ञानसंपन्न ॥ निरभिमान तो होय ॥ ३३ ॥ साचचि निरभिमानता ॥ जरी आली होय हाता ॥ तरी शांती तेथ सर्वथा ॥ उल्हासता पैं पावे ॥ ३४ ॥ दाटूनि निश्चळ होणें ॥ कां दांत चाऊनि साहणें ॥ ते शांती ऐसें काण ह्मणे ॥ आक्रोशपणें साहतसे ॥ ३५ ॥ शांति ह्मणिजे ते ऐशी ॥ सागरीं अक्षोभता जैसी ॥ चढ वोहट नाहीं तिशी ॥ सर्वदेशीं सर्वथा ॥ ३६ ॥ नानासरितांचे ×खळाळ ॥ आणूनि घालिती समळ जळ ॥ तो तिळभरी नव्हे डहुळ ॥ अति निर्मळ निजांगें ॥ ॥३७॥ तैशी नानाभूतविषमता ॥ स्वार्थविरोधें अंगीं आदळतां ॥ पालटू नव्हे ज्याच्या चित्ता ॥ ते जाण *सर्वथा निजशांति ॥ ३८ ॥ ऐशी शांति ज्यासि देखा ॥ तोचि सर्वभूतांचा सखा ॥ आवडता सर्व लोकां ॥ सुहृद तो कां सर्वांचा ॥ ३९ ॥ नवल सख्यत्वाची परी ॥ सर्वस्वें दे निजमैत्री ॥ स्वार्थी वंचनार्थ नकरी ॥ कृपापात्रीं उपदेश ॥ १४० ॥ अतर्क्य त्याची पाहती दिठी ॥ मद्रूपें देखे ०सकळ सृष्टी ॥ जगासि मज अभिन्न गांठी ॥ ³निजदृष्टीं बांधली ॥ ॥ ४१ ॥ मग तो जेउतें पाहे ॥ तेउता मीचि तयातें आहें ॥ तो जरी मातें न पाहे ॥ तें नपाहणेंही मी त्याचें ॥ ४२ ॥ *त्याची पाहती जे दिठी ॥ ते मीचि होय जगजेठी ॥ ऐशी

१ अहंभाव ' धरीना. २ स्थिति. ३ प्रवृत्त होतो. ४ निष्काम. ५ बालकाचा दृष्टांत. ६-७ समुद्रांत. ८ अनेक नद्यांचे. ९ गढूळ. १० जेवढें.

*मो. अभिमानें. +ना. साक्षेपपणें परिसता. ×मो. कल्लोळ. *ना. तत्त्वता. *ना. ०ना. समसृष्टी. मो. सृष्टी. ³ना निजात्मदृष्टी. *ना त्यासी.

तया मज एक गांठी ॥ सकळ सृष्टीसमवेत ॥ ४३ ॥ अवघें जगचि मी होय ॥ तेव्हां तो मी हे भाप जाय ॥ ऐसा तो मजमाजी समाय ॥ समसाम्य समत्वें ॥ ४४ ॥ सांडोनियां मनोधर्म ॥ ऐसा जो मी झालों सुगम ॥ त्यासि पुढती कैंचें जन्म ॥ दुःख दुर्गम ज्याचेनी ॥ ॥ ४५ ॥ मातेच्या उदरकुहरीं ॥ रजस्वलेच्या रुधिरामाझारीं ॥ पित्याचेनि रेतद्वारीं ॥ गर्भसंचारीं संचरण ॥ ४६ ॥ जे मातेच्या उदरीं ॥ जंतु नाकीं तोंडीं उरीं शिरीं ॥ विष्ठामूत्राचे दाथरीं ॥ नवमासवरी उकडिजेति ॥ ४७ ॥ जठराग्नीच्या तोंडीं ॥ घालूनि गर्भाची उंडी ॥ उकडउकडूनि पिंडीं ॥ गर्भकांडीं घडिजेति ॥४८ ॥ ते गर्भींची वेदना ॥ नानापरीची यातना ॥ नकोनको रघुनंदना ॥ चिळसी मना येतसे ॥ ४९ ॥ अवघ्याच्या शेवटीं ॥ प्रसूतवात जो आंटी ॥ सर्वांगीं वेदना उठी ॥ योनिसंकटीं देह जन्मे ॥ १५० ॥ ऐसें अपवित्र *जें जन्म ॥ तें न पवतीच ते नरोत्तम ॥ जिहीं ठाकिलें निजधाम ॥ ते पुरुषोत्तम समसाम्य ॥ ५१ ॥ मी असतां पाठीपोटीं ॥ त्यासि काइशा जन्मगोठी ॥ कळिकाळातें नाणिती दिठी ॥ आले उठाउठी मद्रूपा ॥ ५२ ॥ जेथें जन्म नाहीं जाहलें ॥ तेथ मरण नलगतांचि गेलें ॥ ऐसे भजोनि मातें पावले ॥ भजनबळें मद्भक्त ॥ ५३ ॥ कृष्ण उद्धवातें थापटी ॥ ह्मणे वेगें उठी-उठी ॥ हेचि हातवशी हातवटी ॥ जन्मतुटी तेणें होय ॥ ५४ ॥ जैसें मेघमुखींचें उदक ॥ वरिच्यावरी झेलिती चातक ॥ तैसें कृष्णवचनासि देख ॥ उद्धवें मुख पसरिलें ॥ ५५ ॥ कां चंद्रकिरणीं चकोर ॥ जेवीं अत्यंत सादर ॥ तेवीं उद्धवाचा आदर ॥ दिसे थोर हरिवचनीं ॥ ॥ ५६ ॥ होकां पक्षिणी देखोनि पिलें ॥ जाणोनि चाऱ्याचे वेळे ॥ सांडोनियां आविसाळें ॥ मुख ×कोंवळें जेवीं पसरी ॥ ५७ ॥ तेवीं देखोनि कृष्णमुख ॥ उद्धवासि अत्यंत सुख ॥ श्रवणाचे मुखें देख ॥ +कृष्णपीयूख सेवित ॥ ५८ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुकउवाच ॥ इत्यादिष्टो भगवता महाभागवतो नृप ॥ उद्धवः प्रणिपत्याह तत्त्वजिज्ञासुरच्युतम् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ शुक ह्मणे कौरवनाथा ॥ कृपा उपजली भगवंता ॥ उपदेशिलें महाभागवता ॥ ज्ञानकथा निजबोधु ॥ ५९ ॥ तें ऐकोनि उद्धव ॥ श्रवणीं थोर उठी हाव ॥ कैसें बोलिला ज्ञानगौरव ॥ अति अपूर्व श्रीकृष्ण ॥ ६० ॥ श्रीकृष्ण श्रीमुखें सांगे कोड ॥ तें निरूपण अति गोड ॥ जीवीं उठली श्रवणचाड ॥ तुळंघी भीड देवाची ॥ ६१ ॥ आवडीं कळवळे चित्त ॥ घाली साष्टांग दंडवत ॥ हात जोडोनि पुसत ॥ प्रेमळ भक्त उद्धव ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ उद्धवउवाच ॥ योगेश योगविन्यास योगात्मन्योगसंभव ॥ निःश्रेयसाय मे प्रोक्तस्त्यागः संन्यासलक्षणः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ ऐके योगियांच्या योगपती ॥ योग्यांचा ठेवा तूं श्रीपती ॥ योगीं प्रगट तूं योग-मूर्ती ॥ योगउत्पत्ती तुजपासीं ॥ ६३ ॥ मज मोक्षासि कारण ॥ त्यागु संन्यासलक्षण ॥ बोलिलासि अतिकठिण ॥ परमदारुण हा त्यागू ॥ ६४ ॥

---

१ बोळी, २ पोटरूप दरींत. ३ उकाड्यांत. ४ कष्टदेई. ५ हस्तगत करून घे. ६ घरटें.
*ना. देहजन्मे +ना. केवळ. ×ना. कृपापीयूख.

॥ श्लोक ॥ त्यागोऽयं दुष्करो भूमन् कामानां विषयात्मभिः ॥ सुतरां त्वयि सर्वात्मन्नभक्तैरिति मे मतिः ॥ १५ ॥

॥टीका॥ पाहतां या त्यागाची रीती ॥ मज तंव दुर्धर गा श्रीपती ॥ मग इतरांची येथ गती॥ कवण्या स्थिती होईल ॥ ६५ ॥ कामु जयाच्या चित्तीं ॥ विषयीं आसक्त मती ॥ त्यासि या त्यागाची गती ॥ नव्हे श्रीपती सर्वथा ॥ ६६ ॥ तुझी कृपा जंव नव्हे ॥ तंव तो अभक्तां केवीं करवे ॥ त्यागु बोलिला जो देवें ॥ तो सर्वांसि नव्हे सर्वथा ॥ ६७ ॥ तूं सर्वात्मा असतां हृदयीं ॥ चित्त प्रवेशेना तुझ्याठायीं ॥ तें आवरिलें असे विषयीं ॥ नवल कायी सांगावें ॥ ॥ ६८ ॥ ऐसे प्रपंचीं आसक्त ॥ यालागीं विमुख झाले अभक्त ॥ त्यांसि त्यागु नव्हे निश्चित ॥ चित्त दुश्चित सर्वदा ॥ ६९ ॥ त्यागु कां नव्हे ह्मणसी ॥ तें परिस गा हृषीकेशी ॥ कठिणत्व जें त्यागासी ॥ तें तुजपाशीं सांगेन ॥ १७० ॥

॥श्लोक ॥ सोहं ममाहमिति मूढमतिर्विगाढस्त्वन्मायया विरचितात्मनि सानुबंधे ॥ तत्त्वंजसा निगदितं भवता यथाऽहं संसाधयामि भगवन्ननुशाधि भृत्यम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ तुझी माया विचित्र उपाधी ॥ शरीरीं केली आत्मबुद्धी ॥ *आत्मीये शरीरसंबंधी ॥ विपरीत सिद्धी +वाढली ॥ ७१ ॥ मी माझें वाढलें गाढ ॥ तेणें मती झाली मूढ ॥ गृहासक्ति लागली दृढ ॥ त्याग अवघड यालागीं ॥ ७२ ॥ ऐशीही बुद्धि ०विवळे ॥ अप्रयासें तत्त्व आकळे ॥ तैशी कृपा कीजे राउळें ॥ दास गोपाळें तारावे ॥ ७३ ॥ ऐके गा पुरुषोत्तमा ॥ निजदासां आपुल्या आत्मा ॥ सोडवी गा संसारश्रमा ॥ आत्मयारामा श्रीकृष्णा ॥ ७४ ॥ तुज सांडोनि हृषीकेशी ॥ पुसों जावों आणिका राशीं ॥ तें नये माझिया मनासी ॥ विषयीं सर्वांसी व्यापिलें ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ सत्यस्य ते स्वदृश आत्मन आत्मनोऽन्यं वक्तारमीश विबुधेष्वपि नानुचक्षे॥सर्वे विमोहितधियस्तव माययेमे ब्रह्मादयस्तनुभृतो बहिरर्थभावाः ॥१७॥

॥ टीका ॥ पुसों जावें ब्रह्मयासी ॥ तो गुंतला ⁵सृष्टिकर्मासी ॥ प्रजाउत्पत्ति मानसीं ॥ अहर्निशीं चिंतित ॥ ७६ ॥ जो आपुल्या निजस्वभावीं ॥ सदा संसारु वाढवी ॥ *तो केवीं संसारु तोडवी ॥ केलें नतुडवी सर्वथा ॥ ७७ ॥ वाढों नेदी संसारासी ॥ कोपु आला प्रजापतीसी ॥ शापु दीधला नारदासी ॥ ब्रह्म उपदेशी ह्मणोनि ॥७८॥ ऐसे संसारीं आसक्त॥ नित्य संसारयुक्त ॥ त्यांसि पुसों नमनी चित्त ॥ जाण निश्चित श्रीकृष्णा ॥ ७९ ॥ पुसों जावें ऋषींप्रती ॥ तंव ते सदा आपमती ॥ आपुलें मत प्रतिष्ठिती ॥ अन्यथा देती शापातें ॥ ॥ १८० ॥ जीवीं धरोनि अर्थासक्ती ॥ शिष्यांतें उपदेशिती ॥ विषयो धरोनियां चित्तीं ॥ जीविका वृत्ती ×उपदेशें ॥ ८१ ॥ गुरूसीच विषयासक्ती ॥ तेथ शिष्यासि कैंची विरक्ती ॥

१ त्याग. २ अतिशय. ३ समजे. ४ रायानें, देवानें.

*ना. आत्मीं. +ना. वाढवी. ⁵ना. विकळे. ०ना. सृष्टि क्रमासी. *मों. तो संसार

ऐसियांसि जे पुसती ॥ ते भ्रंशती स्वार्थातें ॥ ८२ ॥ सत्यस्वरूपप्रकाश ॥ आत्मा तूं अविनाश ॥ युक्तिप्रयुक्तीं उपदेश ॥ विकल्पनिरास जाणसी ॥ ८३ ॥ ब्रह्मज्ञानाचा वक्ता ॥ तुजवेगळा श्रीकृष्णनाथा ॥ नदिसे गा सर्वथा ॥ मज पाहतां त्रिलोकीं ॥ ८४ ॥ एवं आत्मा तूं तत्त्वतां ॥ तूंचि आत्मज्ञानदाता ॥ आत्मबोधीं संस्थापिता ॥ कृष्णनाथा तूं एक ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ तस्माद्भवंतमनवद्यमनंतपारं सर्वज्ञमीश्वरमकुंठविकुंठधिष्ण्यम् ॥
निर्विण्णधीरहमुह वृजिनाभितप्तोनारायणं नरसखं शरणं प्रपद्ये ॥ १८ ॥

॥ टीका ॥ यालागीं जी यादवपती ॥ नित्य शुद्ध पवित्रमूर्ती ॥ तुज मायामोहो नातळती ॥ पवित्र [1]ख्याती यालागीं ॥ ८६ ॥ गोवळांचे [2]उच्छिष्टकवळें ॥ ज्याची पवित्रता न [3]मैळे ॥ तेणेंचि उच्छिष्टकवळें ॥ गोवळे सकळ तारिले ॥ ८७ ॥ प्राणें शोषिलें पूतनेसी ॥ तरी पवित्रता अधिक कैसी ॥ तेणेंचि उद्धरिलें तिसी ॥ दोष दोषांसी तारकु ॥ ८८ ॥ करूनि कालीयमर्दन ॥ मर्दिला त्याचा अभिमान ॥ तरी मैळेना पवित्रपण ॥ निर्विषें जाण तारिला ॥८९॥ [4]रजक अपवित्र अत्यंत ॥ आतळे त्यासि अधःपात ॥ त्यासि मारूनियां निश्चित ॥ केला पुनीत सायुज्या ॥ १९० ॥ करूनि गोपिकांसी निंद्यकाम ॥ तेणें त्या केल्या नित्य निष्काम॥ तेचि पवित्रता अनुत्तम ॥ सायुज्यधाम पावल्या ॥ ९१ ॥ करितां सुकर्म कुकर्म ॥ ज्याची पवित्रता [5]अनुत्तम ॥ यालागीं नामें पुरुषोत्तम ॥ अकर्तात्मनिजबोधें ॥ ९२ ॥ जो आकळे गुणां आंतू ॥ त्यासि ते गुण करिती +[6]प्रांतू ॥ त्या गुणांसि तुजमाजी अंतू ॥ यालागीं अनंतू सर्वथा ॥ ९३ ॥ देशतः कालतः पार ॥ ×तुज नकरवेचि साचार ॥ यालागीं तूं अनंत अपार ॥ श्रुतींसि पार नकळेची ॥ ९४ ॥ तुज म्यां करावी विनंती ॥ किती यावें काकुळती॥ तूं हृदयस्थ ज्ञानमूर्ती ॥ जाणता त्रिजगतीं तूं एक ॥ ९५ ॥ ज्ञान अज्ञान माया शक्ती ॥ ईश्वरा आधीन गा असती ॥ त्या ईश्वराची तूं ईश्वरमूर्ती ॥ सत्यकीर्ती तूं श्रीकृष्णा ॥ ९६ ॥ तूं सर्वांचा नियंता ॥ सर्व करूनि अकर्ता ॥ ऐसा ईश्वर तूं गा कृष्णनाथा ॥ भोगूनि अभोक्ता तूं एक ॥ ९७ ॥ देशतः कालतः स्वभावेंशी ॥ नाशु नपावे ज्या स्थानासी ॥ तेथींचा तूं निवासवासी ॥ पूर्ण पूर्णांशीं अवतारु ॥ ९८ ॥ 'नराचें अविनाश स्थान ॥ यालागीं तूं नारायण' ॥ तुझेनि जीवासि चळणवळण ॥*चाळकपण तुजपाशीं ॥ ९९ ॥ ऐसा ईश्वर तूं आपण ॥ नरसखा नारायण ॥ युद्धसमयीं अर्जुनासि जाण ॥ ब्रह्मज्ञान त्वां दीधलें ॥ ॥२००॥ दारुण होतां संग्रामासी ॥ *[7]पाहुडा [8]पांवो युद्धासी ॥ तेव्हां ब्रह्मज्ञान सांगसी ॥ निजसख्यासी अर्जुना ॥ १ ॥ ऐसा कृपाळू तूं नारायण ॥ यालागीं तुज आलों शरण ॥ [9]त्रिविधेंतापें तापलों जाण ॥ दुःखदारुण संसारु ॥ २ ॥ संसार ह्मणजे अंधकूप ॥ माजी कामक्रोधादि दुष्ट सर्प ॥ निंदा स्पर्धा कांटे अमूप ॥ दुःखरूप मी पडिलों ॥ ३ ॥ तेथ ७पडलिया-पाठीं ॥ ०ब्रह्मद्वेषाचा शूळ पोटीं ॥ भरला जे उठाउठी ॥ तेणें [10]हिंपुटी होतसें ॥ ४ ॥ तेथून

---

१ कीर्ति. २ गोपाळांचे उष्टे घांस. ३ मळत नाहीं. ४ धोबी. ५ अत्युत्कृष्ट. ६ आपला टापू, हस्तगत. ७-८ लढाईंत पाऊल मागें घेतलें असतां. ९ आध्यात्मिक, अधिदैविक, आधिभौतिक. १० उत्साहरहित.

+मो. प्रांत. ×ना. तुम्हा. *ना. चाळणेपण. *ना. पावडा. मो. पाउडा. ७मो. पडलियाही. ०मो. ब्रह्मशापाचा.

निवावया त्रिशुद्धी ॥ उपाव नदिसेगा निजबुद्धी ॥ कृपाळुवा कृपानिधी ॥ आत्मबोधीं मज कादीं ॥ ९ ॥

|| श्लोक || श्रीभगवानुवाच || प्रायेण मनुजा लोके लोकतत्त्वविचक्षणाः ||

समुद्धरंति ह्यात्मानमात्मनैवाशुभाशयात् || १९ ||

॥ टीका ॥ भूत संचरल्या पाठीं ॥ सुटती जल्पवोदगोठी ॥ त्यातें गुणियें पाहोनि दिठीं ॥ अक्षता त्रौहाटी मंत्रोनी ॥ ६ ॥ पाहतां पांचभौतिक संचार ॥ सहजें झाला असे थोरु ॥ माजी झोंबलासे कृष्णवियोगखेचरु ॥ उद्धव लेंकरूं झडपिलें ॥ ७ ॥ मिसें उद्धवाची झडपणी ॥ अहंमहिषासुर लागला जनीं ॥ त्यासि करावया झाडणी ॥ कृष्ण गुणी चालिला ॥ ८ ॥ तेथ झाडणीलागीं आतां ॥ यदुअवधूतसंवादकथा ॥ त्याचि मंत्रनि मंत्राक्षता ॥ होय झाडिता श्रीकृष्ण॥९॥श्रीकृष्ण ह्मणे उद्धवासी ॥ सावध होई निजमानसीं ॥ येऊनियां मनुष्यलोकासी ॥ आपण आपणियासी उद्धरिती ॥ २१० ॥ ×पाहतां यया परमार्था ॥ साह्य नव्हे मातापिता ॥ पुत्र भ्राता दुहिता कांता ॥ साह्य सर्वथा हे नव्हेती ॥ ११ ॥ साह्य परमार्था नव्हे त्याही ॥ शेखीं साह्य नव्हे जांवयी ॥ आपणिया आपण साह्य पाही ॥ जो निजदेहीं विवेकी ॥ १२ ॥ मुमुक्षमार्गींचे सज्ञान ॥ लोक तत्त्वविचक्षण ॥ विचारूनि कार्याकारण ॥ स्वबुद्धी जाण उद्धरिलें ॥ १३ ॥ नित्यानित्यविवेकें ॥ अनित्य सांडिती त्यागमुखें ॥ नित्य तें यथासुखें ॥ हित संतोखें अंगीकारिती ॥ १४ ॥ नित्यत्वें जें उरलें जाण ॥ तें स्वरूप माझें चिद्घन ॥ तेंचि साधकाचें साधन जाण ॥ अनन्यपणें चिंतिती ॥ १५ ॥ भावितां माझी दृढभावना ॥ मीचि ते होती जाणा ॥ किटकी भृंगीचिया खुणा ॥ आप आपणा उद्धरिती ॥ १६ ॥

|| श्लोक || आत्मनो गुरुरात्मैव पुरुषस्य विशेषतः || यत्प्रत्यक्षानुमानाभ्यां

श्रेयोऽसावनुविंदते ||२० ||

॥ टीका॥ पश्वादियोनींच्याठायीं ॥ हिताहितज्ञान *असे पाहीं ॥ मा पुरुषाच्या पुरुषदेहीं ॥ ज्ञान पाहीं स्फुरद्रूप ॥ १७ ॥ जें कर्म मी कर्ता देहीं ॥ तेणें तरेन कीं नाहीं ॥ हें ज्याचें त्याचे ठायीं ॥ स्फुरद्रूप पाहीं कळतसे ॥१८॥ सांडूनि अशुभ वासना ॥ जो न करी विषयकल्पना ॥ तो आपुला गुरु आपण जाणा ॥ नरकयातना चुकविली ॥ १९ ॥ जो कंटाळला गर्भा-जन्मासी ॥ *मरमरों उबगला मरणासी ॥ आधि लागली मानसीं ॥ जन्ममरणांसी नासा-वया ॥२२०॥ आवडी नुपजे स्त्रीपुत्रांसी ॥ निद्रा नलगे अहर्निशीं ॥ काळें ग्रासिलें आयुष्यासी॥ निजहितासी न देखिजे ॥ २१ ॥ तुझी तुजाचि देखतां ॥ काळें गिळिली बाल्यावस्था ॥ तारुण्याचा ग्रासिला माथा ॥ वार्धक्याभंवता लागला असे ॥२२॥ केवळ वार्धक्याचा जरंगीं॥ त्यासिही काळ लागला पैंगा ॥ आयुष्य व्यर्थ जातसे वेगा ॥ हा +निजैनाडु जगा कळेना ॥ ॥ २३ ॥ क्षणाक्षणा काळ जातसे व्यर्थ ॥ कांहीं नसाधेचि परमार्थ ॥ जन्ममरणांचा

---

१ असंबद्ध बडबड. २ पंचाक्षरी. ३ टाकी, मारी. ४ खेस, पिशाच, ५ अहंकाररूप महिषदैत्य ६ पंचाक्षरी. ७ त्यागानें वैराग्यद्वारानें. ८ चैतन्यपूर्ण. ९ स्पष्ट. १०जाळें. ११आत्मनाश.

×ना. सहाय्य पहावें परमार्था. *मो. नसे. *मो. मरोनी. +ना. नित्यनाड.

आवर्तें ॥ पुढें अनर्थ रोकडा ॥ २४ ॥ स्वर्ग, नरक, कर्म, ब्रह्म ॥ चहूं प्राप्तीसि मनुष्यधर्म ॥ यालागीं त्यजूनि पापकर्म ॥ मोक्षधर्म धरावा ॥ २५ ॥ नरदेह मोक्षाचा वांटा ॥ वृथा जातसे कटकटा ॥ हृदयीं ऑधी लागला मोठा ॥ विषयचेष्टा विसरला ॥ २६ ॥ ०प्रत्यक्षलक्षणें अनित्य ॥ संसारु दिसे नाशवंत ॥ यालागीं तो नव्हे आसक्त ॥ होय विरक्त इहभोगीं ॥ ॥ २७ ॥ याचिपरी अनुमाना ॥ परलोकभोगभावना ॥ आतळों नेदी मना ॥ नश्वर पतन जाणोनी ॥ २८ ॥ कैं कृपा करील गोविंद ॥ कैं हा तुटेल भवबंध ॥ कैं देखेन तो निजबोध ॥ परमानंद जेणें होय ॥ २९ ॥ धांवें पावगा श्रीहरी ॥ कृपा करी दीनावरी ॥ मज उद्धरी भवसागरीं ॥ भक्तकैवारी श्रीकृष्णा ॥ २३० ॥ जैसी जीवनावेगळी मासोळी ॥ तैसा बोधा-लागीं तळमळी ॥ प्रेमपाडिभराच्यामेळीं ॥ देह न सांभाळी सर्वथा ॥ ३१ ॥ एक नेणोनि नरदेहा मुकले ॥ एकीं नव्हे ह्मणोनि उपेक्षिले ॥ एक ज्ञानगर्वें गिळिले ॥ एक भुलले विषयार्थीं ॥ ३२ ॥ एक साधनाभिमानें ठकिले ॥ एक करूं करूं ह्मणतां गेले ॥ एक करितां अव्हाटा भरले ॥ करणें +ठेलें तैसेंची ॥ ३३ ॥ परी विवेक कळला मना ॥ तरी नतुटती विषयवासना ॥ तेणें सतप्त होऊनि जाणा ॥ नारायणा चिंतित ॥३४॥ कृष्ण ह्मणे उद्धवासी ॥ सविवेक वैराग्य असे ज्यासी ॥ तोचि आपुला गुरु आपणासी ॥ विशेषेंसी जाणावा ॥३५॥ त्याचिये निजबुद्धीसी ॥ मीचि विवेकु प्रकाशीं ॥ तो स्वयें जाणे निजबोधासी ॥ निजमानसीं 5विवेकें ॥ ३६ ॥ 'ज्यासि जैसा भावो ॥ त्यासि मी तैसा देवो ॥ या अर्थी संदेहो ॥ उद्धवा पहाहो न धरावा' ॥ ३७ ॥ 'उद्धवा येथ केवळ ॥ पाहिजे निजबुद्धि निर्मळ ॥ तरी आत्मबोध तत्काळ ॥ होय सफळ सर्वथा' ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ पुरुषत्वे च मां धीराः सांख्ययोगविशारदाः ॥ अविस्तरां प्रपश्यंति सर्वशक्त्युपबृंहितम् ॥ २१ ॥

॥ टीका ॥ एवं वैराग्यपूर्णभरित ॥ धीर पुरुष विवेकयुक्त ॥ सांख्य योग विवंचित ॥ निजीं निजप्राप्त तत्काळ ॥ ३९ ॥ *नरदेहीं विवेक वसे ॥ निजरूप पावले कैसे ॥ जें सर्वशक्तियुक्त असे ॥ तें सावकाशें देखती ॥ २४० ॥ जें प्रसवे सर्वशक्तीतें ॥ तें सर्वशक्ति शक्तिदातें ॥ जें नातळे सर्वशक्तीतें ॥ त्या स्वरूपातें पाहती ॥ ४१ ॥ उद्धवा काय सांगों गोष्टी ॥ बहुत शरीरें सजिलीं सृष्टीं ॥ मज नरदेहीं आवड मोठी ॥ उठाउठी मी होती ॥४२॥

॥ श्लोक ॥ एकद्वित्रिचतुष्पादो बहुपादस्तथाऽपदः ॥ बह्व्यः संति पुरः सृष्टा-स्तासां मे पौरुषी प्रिया ॥ २२ ॥

॥ टीका ॥ केलीं एकचरणीं शरीरें ॥ दोंपायांचीं अपारें ॥ तीपायांचीं मनोहरें ॥ अति-सुंदरें चतुष्पदें ॥ ४३ ॥ सर्पादियोनीच्याठायीं ॥ ज्यां चरणचि केले नाहीं ॥ एकें चालती बहुपायीं ॥ केलीं पाहीं शरीरें ॥ ४४ ॥ ऐशीं शरीरें नेणों किती ॥ ज्यां निर्माण केलीं ये क्षितीं ॥ मज कर्त्यातें नेणती ॥ मूढमती यालागीं ॥ ४५ ॥ मज कर्त्याची प्राप्ती व्हाव-

१ भोंवरा. २ हाय ! ३ रोग. ४ प्रेमातिशयामुळें. ५ न राहे, अशाश्वत. ६ आडमार्गीं शिरले.

०ना. प्रत्यक्ष क्षणें. +ना. राहिलें. 5मो. विवेकेसीं. *ना. निजदेहीं.

यालागीं निश्चितीं ॥ स्वांशें प्रवेशोनि ज्ञानशक्ति ॥ पौरुषी प्रकृति म्यां केली ॥ ४६ ॥ जेणें देहें मज पावती ॥ त्या देहाची मज अतिप्रीती ॥ यालागीं श्रुति नरदेह वर्णिती ॥ देव वांछिती नरदेहा ॥ ४७ ॥ ऐशी नरदेहाची *प्रीती ॥ कृष्ण सांगे उद्धवाप्रती ॥ येणें शरीरें मज पावती ॥ नानायुक्तिविचारें ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ अत्र मां मार्गयंत्यद्धा युक्ता हेतुभिरीश्वरम् ॥ गृह्यमाणैर्गुणै-र्लिंगैरग्राह्यमनुमानतः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ येऊनि नरदेहाप्रती ॥ कर्त्याची गंवेषणा जे करिती ॥ 1जो मी ईश्वर त्रिजगतीं ॥ उत्पत्तिस्थितीसंहर्ता ॥ ४९ ॥ ×बुद्धियुक्तीं विवेक करणें ॥ तें जडें प्रकाशपणें ॥ त्याचाही मी प्रकाशकु ह्मणे ॥ येणें लक्षणें लक्षिती॥२५०॥ ऐसा नानापरीच्या अनुमाना ॥ मी तंव वश नव्हे जाणा ॥ जे लक्षिती सांडोनि अभिमाना ॥ साक्षात्पणा ते येती ॥ ५१ ॥ ज्याची आशा होय निराशै ॥ तोचि ब्रह्म पावे सावकाश ॥ तेणें कळिकाळावरी कांस ॥ जाण अवश्य घातली ॥ ५२ ॥ सुख तंव स्वतःसिद्ध असे ॥ तें निर्मळ आरसां दिसे ॥ तेवीं बुद्धीचेनि विवेकवशें ॥ आत्मा भासे नरदेहीं ॥ ५३ ॥ येचिविखींचा इतिहास जाण ॥ तुज मीं सांगेन पुरातन ॥ यदुअवधूतसंवादलक्षण ॥ ज्ञानसाधन साधकां ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ अत्राप्युदाहरंतीममितिहासं पुरातनम् ॥ अवधूतस्य संवादं यदोरमिततेजसः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ हरिखें ह्मणतसे गोविंदु ॥ उद्धवा आमुचा पूर्वज यदु ॥ तेणें ब्रह्मज्ञानासि संवादु ॥ केला विशद अवधूतेंसी ॥ ५५ ॥ राजा यदु ह्मणसी कैसा ॥ क्षात्रसृष्टीचा सूर्य जैसा ॥ राजा चंद्राच्या प्रकाशा ॥ निजतेजवशा लोपित ॥ ५६ ॥ तेणें गुरूचीं लक्षणें ऐकतां ॥ सायुज्यमुक्ति आली हाता ॥ ते हे पुरातन कथा ॥ तुज मी आतां सांगेन ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ अवधूतं द्विजं कंचिच्चरंतमकुतोभयम् ॥ कविं निरीक्ष्य तरुणं यदुः पप्रच्छ धर्मवित् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ कोणी एक अवधूतु ॥ निजतेजें प्रकाशवंतु ॥ ब्रह्मानंदें डुल्लतु ॥ यदुनें येतां देखिला ॥ ५८ ॥ त्या अवधूताचें लक्षण ॥ यदु निरीक्षी आपण ॥ देखिलें ब्रह्मसूत्रधारण ॥ होय ब्राह्मण ब्रह्मवेत्ता॥५९॥असो हे तो अवधूत ॥ निर्भय निःशंक वर्तत ॥यदु व्याहाळिये होता जात ॥ देखिला वनांत सन्मुख ॥२६०॥ आंतुला प्राण तत्त्वतां ॥ बाहेर रिघों नेदी सर्वथा ॥ स्वभावें प्राणापानसमता ॥ जाहली नधरितां धारणा ॥ ६१ ॥ नवल तयाचें पाहणें ॥ दृश्य दृशत्वें देखो नेणें ॥ झाला सर्वांग देखणें ॥ देखणेपणें पाहातसे ॥ ६२ ॥ मी एक वनीं वसता॥ हेंही नाठवे त्याचिया चित्ता ॥ झाली सर्वत्र सर्वगतता ॥ समसाम्यता समत्वें ॥ ६३ ॥ कर्म कार्य कर्ता जाण ॥ अवघा जाहला तो आपण ॥ क्रियेनें वाह्नियां आण ॥ निंबलोण जिवें

१ पुरुषाची, मनुष्याची. २ शोध. ३ जुना. ४ येतांना. ५ ब्रह्मजाणणारा. ६ शिकारीस.

*मो. प्राप्ती. 1ना. तो. ×ना. बुद्धियुक्त.

केलें ॥ ६४ ॥ देहाचिया माथा ॥ ठेविली होती अहंता ॥ तें देह ×मिथ्यात्व पाहतां ॥ समूळ अहंता पळाली ॥ ६५ ॥ नित्यानित्यहोमद्वारें ॥ ब्रह्माग्नि प्रज्वळला एकसरें ॥ जाळूनि आश्रमांचीं चारी घरें ॥ केलें खरें *निराश्रमी ॥ ६६ ॥ त्या आश्रमामाजी होती ॥ 4शास्त्र-श्रवण विधिवादपोथी ॥ ते 2जळाली जी निश्चितीं ॥ भस्म हातीं *नलगेची ॥ ६७ ॥ विधिनिषेधपैजा ॥ जळाली पंचायतनदेवपूजा ॥ होता संचितक्रियमाणपुंजा ॥ तोही वोजा जळाला ॥ ६८ ॥ यापरी तो अवधूत ॥ ब्रह्मानंदें जी डुल्लत ॥ निजसुखें वेल्हावत ॥ देखिला येत यदुरायें ॥ ६९ ॥ संकल्पविकल्परहित ॥ शुद्ध सर्वांगीं विधूत ॥ यालागीं बोलिजे अवधूत ॥ येन्हवीं विख्यात ब्राह्मणु ॥ २७० ॥ सभोंवता समस्तु ॥ प्रपंच निजबोधधूतू ॥ यालागीं बोलिजे अवधूत ॥ येन्हवीं विख्यातू ब्राह्मणू ॥ ७१ ॥ 'अहं धुई तो अवधूत' ॥ तोचि योगी तोचि पुनीत ॥ जो कां अहंकारें ग्रस्त ॥ तोचि पतित जन्मकर्मीं ॥ ७२ ॥ वार्धक्य ०पावे देहासी ॥ तंव देहपण नाहीं 0देहापासीं ॥ रिगमु नव्हेचि जरेसी ॥ तारुण्यासी तें मूळ ॥ ७३ ॥ आणिकही त्याचीं लक्षणें ॥ निच नवा बोधु मेळों नेणे ॥ भोगिजे नित्यनूतनपणें ॥ परमतारुण्यें टवटवला ॥ ७४ ॥ निजबोधाचिया सत्ता ॥ द्वैत जिंनिलें तत्त्वतां ॥ ऐसा निःशंकु 1विचरतां ॥ भय सर्वथा त्या नाहीं ॥ ७५ ॥ ऐशीं लक्षणें निर्धारितां ॥ अवधूत निजबोधें पुरता ॥ यदूसि उपजली विनीतता ॥ श्रद्धा सर्वथा अनिवार ॥ ७६ ॥ करूनि साष्टांगदंडवत ॥ अतिनम्र श्रद्धायुक्त ॥ हात जोडूनि पुसत ॥ प्रसन्नचित्त रायाचें ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ यदुरुवाच ॥ कुतो बुद्धिरियं ब्रह्मन्नकर्तुः सुविशारदा ॥ यामासाद्य भवाँल्लोकं विद्वांश्चरति बालवत् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ अपूर्व बुद्धि हे स्वामी ॥ तुमच्याठायीं देखों आम्ही ॥ जे न लभे यमनियमीं ॥ कर्मधर्मीं आचरतां ॥ ७८ ॥ दिसतोसि सर्वार्थीं कुशळ ॥ परी कांहीं नकरूनि निश्चळ ॥ अकर्तात्मबोधें तूं केवळ ॥ जैसें बाळ अहेतुक ॥ ७९ ॥ तूं बाळाऐसा वर्तसी ॥ परी बालबुद्धि नाहीं तुजपासीं ॥ सर्वज्ञ सर्वथा होसी ॥ ऐसें आम्हासी दिसतसे ॥ २८० ॥ येवोनियां मनुष्यदेहासी ॥ पावोनियां या लोकासी ॥ सार्थकता तुम्हाऐसी ॥ आणिकापाशीं नदेखों ॥ ८१ ॥

॥ श्लोक ॥ प्रायो धर्मार्थकामेषु विवित्सायां च मानवाः ॥ हेतुनैव समीहंते आयुषो यशसः श्रियः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ प्रायशा येलोकीं लोक ॥ धर्मअर्थकामकामुक ॥ येचिविखीं ज्ञान देख ॥ अवश्यक करिताती ॥ ८२ ॥ आम्ही 6स्वधर्म करितों म्हणती ॥ स्नानसंध्येची कीर्ती मिरविती ॥ 'शेवटीं गायत्रीचें 3अर्घ्य देती ॥ अर्थप्राप्तीलागोनी ॥ ८३ ॥ वेदोक्त आम्ही करितों याग ॥ संस्थापितों वेदमार्ग ॥ शेखीं तो करिती जीविकायोग ॥ स्वर्गभोगही वांछिती ॥ ८४ ॥ एक म्हणती आम्ही 7स्वकर्मक ॥ कुश मृत्तिका नाशिती उदक ॥ समयीं आलिया याचक ॥

---

१ आत्मानात्म विचाररूप होम. २ चारी आश्रम. ३ भोगित. ४ पवित्र. ५ वार्धक्यास. ६ बहुतकरून. पोट भरण्याचे साधन. ८ दर्भ.

×ना. मिथ्यत्वें. *ना. निराश्रम. 4मो. शास्त्रश्रवणाची पोथी. 2ना. जाळिली. *ना. न लभेची. ०ना. यावें. 0ना. त्यापाशीं. 1वर्ततां. 6ना. स्वधर्मकर्म. 3मो. श्रियें. 7ना. स्वर्गकामिक.

°इवली भीक नघालिती ॥ ८५ ॥ दांभिक वादवावया स्फीती[१] ॥ वैष्णवदीक्षा अवलंबिती ॥ देवपूजा झळफळीत दाविती ॥ शंख लाविती दोहीं हातीं ॥ ८६ ॥ आयुष्यदानी पुण्यपुरुष ॥ आह्मी चिकित्सक[२] अहिंस ॥ स्थावर जंगम जीव अशेष ॥ मारूनि यश मिरविती ॥ ८७ ॥ यश वाढवावया कारण ॥ तुळापुरुष[३] करिती दान ॥ देह मूत्रविष्ठें परिपूर्ण ॥ धन त्यासमान जोखिती ॥ ८८ ॥ परि परमार्थाचीया चाडा ॥ कोणी वेंचीना कवडा[४] ॥ भूल कैशी पडली मूढां ॥ स्वार्थ रोकडा विसरले ॥ ८९ ॥ पूर्वी अदृष्टीं नाहीं प्राप्ती ॥ ते +श्रीकामा उपास्ती[६] करिती ॥ श्रियेचा स्वामी श्रीपती ॥ त्यातें न भजती अभाग्य ॥ २९० ॥ 'लक्ष्मी विश्वगुरुहरीची पत्नी ॥ तीतें जो तो राखे अभिलाषूनी ॥ नेदिती हरीची हरिलागोनी ॥ त्यातें पतनीं हरि पचवी ॥ ९१ ॥ रोगत्यागें आयुष्य मागती ॥ यालागीं सविता उपासिती ॥ देह नश्वर हें नाठवे चित्तीं ॥ पडली भ्रांती निजपदा ॥ ९२ ॥ एवं आयुष्य-यश-श्रीकामीं ॥ समस्त भजतां देखों आह्मी ॥ परी नवल केलें तुवां स्वामी ॥ परब्रह्मीं निजबोधू ॥ ९३ ॥ विषयबळें अलोलिक ॥ मिथ्या भ्रमें भ्रमले लोक ॥ ज्ञानसाधनें 8साधोनि देख ॥ विषयसुख वांछिती ॥ ९४ ॥ वेदांत वार्तिक वाक्स्फूर्ती ॥ अद्वैत ब्रह्म प्रतिपादिती ॥ शेखीं पोटासाठीं विकिती ॥ नवल किती सांगावें ॥ ९५ ॥ एक ह्मणविती योगज्ञानी ॥ वायुधारणा[७] दाविती जनीं ॥ टाळी लाऊनि बैसती ध्यानीं ॥ जीविका मनीं विषयांची ॥ ९६ ॥ ऐसे ×विविधाशा[८] लोक ॥ साधणें साधूनि झाले मूर्ख[९] ॥ तुवां केलेंजी अलौकिक ॥ आत्मसुख साधिलें ॥९७॥ ऐके स्वामी अवधूता ॥ तुवां तृणप्राय केलें जीविता ॥ तुच्छ करोनि लोकां समस्तां ॥ निजात्महिता मीनलासी ॥ ९८ ॥ निजानंदें निवालासी ॥ अंतरीं शीतळ झालासी ॥ ऐसें दिसताहे आह्मासी ॥ उपलक्षणेंसी परियेसी ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ त्वंतु कल्पः कविर्दक्षः सुभगोऽमृतभाषणः ॥ न कर्ता नेहसे किंचिज्जडोन्मत्तपिशाचवत् ॥ २८ ॥

॥ टीका ॥ सर्वज्ञ ज्ञाता तूं होसी ॥ तें ज्ञातेपण दिसों नेदेसी ॥ कांहीं करिसी ना वांछिसी ॥ जडत्वें दाविसी निजशांती ॥ ३०० ॥ सर्वथा उगा असरसी ॥ परी तूं अंगें विकळ नव्हसी ॥ अंगीं अव्यंगीं दिसतोसी ॥ स्वरूपरूपेंसी शोभिवंत ॥१॥ ज्ञान एकलेपणें ठेलें ॥ दुर्जनित्रीण परदेशी झालें ॥ तें तुजमाजी सामावलें ॥ यालागीं आलें कविपद ॥ २ ॥ करूनि झालासि अकर्ता ॥ हेचि तुझी थोर दक्षता[१०] ॥ ब्रह्मरसें रसाळ बोलतां ॥ चवी अमृता ते कैंची ॥ ३ ॥ ब्रह्मरस तूं प्यालासी ॥ ब्रह्मानंदें मातलासी ॥ जगीं उन्मत्त[११] जाहलासी ॥ दृष्टीं नाणिसी कोणातें ॥ ४ ॥ सदा *सावध निजरूपेंसी ॥ यालागीं माझें तुझें नह्मणसी ॥ तेंचि पिसेपण तुजपासीं ॥ दिसे जगासी सर्वथा ॥ ५ ॥ निजबोधें तृप्त झालासी ॥ परमामृतें निवालासी ॥ तींही लक्षणें तुजपासीं ॥ निर्धारेंसी[१२] दिसताती ॥ ६ ॥

---

१ प्रशंसा. २ वैद्य. ३ आपले भारंभार सुवर्णाचा पुतळा दान हेतात. ४ दिडकी, छदाम. ५ द्रव्यासाठीं. ६ उपासना. ७ योग. ८ निरनिराळ्या आशेनें ९ मावले. १० चातुर्य. ११ वेडेपण. १२ निश्चयानें.

°मो. इष्ट. +मा.श्रीकामना. 8मो. साधनी. ×ना. विविदिशा. *ना. सावधान.

॥ श्लोक ॥ जनेषु दह्यमानेषु कामलोभदवाग्निना ॥ नतप्यसेऽग्निना मुक्तो गंगांभस्थ इव द्विपः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ कामलोभदावाग्नी ॥ माजी +जळतां लोक तिन्ही ॥ ※देखत असो जी नयनीं ॥ वेगळा कोणी ×दिसेना ॥ ७ ॥ ते दावाग्नीमाजी असतां ॥ तूं पोळसीना गा अवधूता ॥ नवल तुझी अक्षोभता ॥ नकळे सर्वथा आम्हांसी ॥ ८ ॥ वणवा जळे दोहीं थडी ॥ गजें गंगाजळीं दिधली बुडी ॥ त्यासि नलागती तापाच्या वोढी ॥ तैसे निर्वडीं तुज देखों ॥ ॥ ९ ॥ ऐसीं द्वंद्वें तुज नातळती ॥ दृढ राहिलासि ब्रह्मस्थिती ॥ कांहीं एक करीन विनंती ॥ कृपामूर्ती दयाळुवा ॥ ३१० ॥

॥ श्लोक ॥ त्वं हि नः पृच्छतां ब्रह्मन्नात्मन्यानंदकारणम् ॥ ब्रूहि स्पर्शविहीनस्य भवतः केवलात्मनः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ तूं ब्रह्मवेत्ता ब्राह्मण ॥ निजानंदें परिपूर्ण ॥ त्या आनंदाचें कारण ॥ विशद करून सांगावें ॥ ११ ॥ तूं देहीं वर्तसी विदेहस्थिती ॥ तुज विषय आतळूं नशकती ॥ हे अलिप्तपणाची प्राप्ती ॥ कवण्या रीतीं तुज *आली ॥१२॥ तुज नाहीं *रायाची भीड ॥ नकरिसी धनवंताची चाड ॥ दीनवचन मानिसी गोड ॥ पुरविसी कोड निजबोधें ॥ १३ ॥ ऐसा केवळ तूं कृपाळू ॥ आर्तबंधू दीनदयाळू ॥ निजात्मभावें तूं केवळू ॥ भक्तवत्सल भावार्थें ॥ ॥ १४ ॥ ऐसा यदूचा संवादू ॥ आवडीं सांगे गोविंदू ॥ उद्धवासि ह्मणे सावधू ॥ हृदयीं बोधू धरावा ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ यदुनैवं महाभागो ब्रह्मण्येन सुमेधसा ॥ पृष्टः सभाजितः प्राह प्रश्रयावनतं द्विजः ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ श्रीमुखें श्रीकांत ॥ यदूचें भाग्य वर्णित ॥ ब्राह्मणभक्त सत्वयुक्त ॥ बुद्धिमंत श्रद्धाळू ॥ १६ ॥ भगवद्भाग्यें भाग्यवंतू ॥ यदूसि भेटला तो अवधूतु ॥ त्यासि होऊनि अति विनीतू ॥ असे विनवितु निजहिता ॥ १७ ॥ मृदुमंजुळवचनें प्रार्थिला ॥ मधुपर्कविधानें पूजिला ॥ अवधूत अतिसंतोषला ॥ बोलता झाला निजमुखें ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ ब्राह्मणउवाच ॥ संति मे गुरवो राजन् बहवो बुद्ध्युपाश्रिताः ॥ यतो बुद्धिमुपादाय मुक्तोऽटामीह तान् शृणु ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ क्षीरसागर उचंबळला ॥ कीं कृपेचा मेघ गर्जला ॥ निजसुखाचा वोधावा आला ॥ तैसें बोलिला ब्राह्मणु ॥ १९ ॥ ऐक राजचूडामणी ॥ यदुकुळदीप दिनमणी ॥ धन्यधन्य तुझी वाणी ॥ निजगुणीं निववीलों ॥ ३२० ॥ राजा आणि सात्विक ॥ सिद्ध लक्षणें लक्षक ॥ पृथ्वीमाजी तूंचि एक ॥ नदिसे आणिक सर्वथा ॥ २१ ॥ सुंदर आणि सगुण ॥ उत्तमोत्तम केला प्रश्न ॥ पुशिलें निजानंदकारण ॥ तें यथार्थ जाण सांगेन ॥ २२ ॥ गुरुवीण आत्म-

---

१ सूचना, स्फूर्ती.

+मो. असतां. ※ना. देखतसे. जनींवनीं. ×ना. असेना. *मो. जाली. *ना राजयाची.

प्राप्ती ॥ सर्वथा नघडे गा नृपती ॥ ते गुरूही मी तुजप्रती ॥ यथानिगुतीं सांगेन ॥ २३ ॥ निजबुद्धीच्या विवेकस्थिती ॥ बहुत गुरू म्यां केले असती ॥ जो जो सद्गुण म्यां देखिजे भूतीं ॥ ते ते स्थितीं तो गुरू ॥ २४ ॥ बुद्धीनें अंगीकारिलें गुणा ॥ निजधैर्ये धरिली धारणा॥ तेणें मी मुक्त झालों जाणा ॥ स्वेच्छा अटणा करीतसें ॥ २५ ॥ संसारु तरावया ॥ मुख्य सद्बुद्धीगा राया ॥ रिगमू नाहीं आणिका उपाया ॥ व्यर्थ कासया शिणावें ॥२६॥ सद्बुद्धि नाहीं ज्यापासीं ॥ तो संसाराची आंदणी दासी ॥ उसंत नाहीं अहर्निशीं ॥ दुःख भोगासी अनंत ॥ २७ ॥ सद्बुद्धि नाहीं हृदयभुवनीं ॥ तेथें वैराग्य नुपजे मनीं ॥ मा तो तरेल कैसेनी ॥ विवेक स्वप्नीं नदेखे ॥ २८ ॥ वैराग्याचेनि पडिपाडें ॥ ज्यासि सद्बुद्धि सांपडे ॥ तेथ संसार कोण बापुडे ॥ घायें रोकडें विभांडी ॥ २९ ॥ आधीं संसारु एक असावा ॥ मग तो खटाटोपें नासावा ॥ जो रिघावा विवेकगांवा ॥ त्यासि तेव्हां तो नाहीं ॥ ३३० ॥ संसारनाशासि मूळ ॥ शिष्यप्रज्ञाचि केवळ ॥ तिचें झाल्या अढळ बळ ॥ होय मृगजळ संसारू ॥ ३१ ॥ जे मी गुरु सांगेन ह्मणें ॥ ते निजप्रज्ञेचेनि लक्षणें ॥ हेयादेयउपायपणें ॥ घेणें त्यजणें सविवेकें ॥ ३२ ॥ हेचि मराठिया भाखा ॥ सांगेन तें सावध ऐका ॥ जेणें शिष्यांचा आवांका ॥ पडे ठाउका प्रत्यक्ष ॥ ३३ ॥ ऐक प्रज्ञेचीं लक्षणें ॥ सांगेन दृष्टांतपणें ॥ सुप, चाळणी, रांधणें ॥ घेणें त्यजणें विवेकें ॥ ३४ ॥ चाळणीमाजीं जें जें पडे ॥ सूक्ष्म निजतत्त्व तळीं सांडे ॥ उरती गुणदोषांचे खडे ॥ करी बडबडे खडबडित ॥ ३५ ॥ ऐसी जे अवस्था ॥ ते त्यागावी सर्वथा ॥ भ्रंश होईल स्वार्था ॥ हे राखतां त्रिशुद्धी ॥ ॥ ३६ ॥ सुपाची दशा ते ऐशी ॥ त्यजी रजनिकण भुसासी ॥ निर्डारल्या निजबीजासी ॥ निजहृदयेंसी ०राखत ॥ ३७ ॥ स्वयें वैराग्यें तापणें ॥ ते दशा रांधणें ह्मणे ॥ ×अपक्कासि परिपक्क करणें ॥ निजगुणें निजांगें ॥ ३८ ॥ एवं या दोनी दशा ॥ दृढ धराव्या वीरेशा ॥ तेणें परमार्थ होय आपैसा ॥ जेवीं आरिसा हातींचा ॥ ३९ ॥ यदुसि ह्मणे ब्राह्मण ॥ जें म्यां सांगितलें लक्षण ॥ तेथें ठेऊनिया मन ॥ सावधान परियेसीं ॥ ३४० ॥ जो जो जयाचा घेतला गुण ॥ तो तो गुरु म्यां केला जाण ॥ गुरूंसि आलें अपारपण ॥ जग संपूर्ण गुरु दिसे ॥ ४१ ॥ ज्याचा गुण घेतला ॥ तो सहजें गुरुत्वा आला ॥ ज्याचा गुण त्यागरूपें घेतला ॥ तोही गुरु झाला अहितत्यागें ॥ ४२ ॥ एवं त्यागात्याग समतुकें ॥ दोहींसि गुरुत्व आलें निकें ॥ राया पाहेपां विवेकें ॥ जगचि औसकें गुरु दिसे ॥ ४३ ॥ ऐसें पाहतां सावकाशीं ॥ गुरुत्व आलें जगासी ॥ हेंचि साधन जयापाशीं ॥ तोचि परमार्थासी साधकु ॥ ॥ ४४ ॥ ऐसें सांगतां अचाट ॥ तुज वाटेल हें कैचाट ॥ तरी गुरु सांगों श्रेष्ठ श्रेष्ठ ॥ मानिले वरिष्ठ निजबुद्धीं ॥ ४५ ॥

---

१ भ्रमणा. २कशाकरितां. ३ आंकित. ४ विश्रांति. ५ जिंकी, पराभवी. ६त्याज्य व ग्राह्य या रीतीनें. भाषेनें. ८ पक्क. ९ परिपक्क करणें. १० आरसा. ११ तुलनेनें, महत्त्वसाम्यानें. १२ सगळें. ३ संकट.

०मो. राखतां. ×ना. अपक्क.

॥ श्लोक ॥ पृथिवीवायुराकाशमापोऽग्निश्चंद्रमा रविः ॥ कपोतोऽजगरःसिंधुः पतंगो मधुकृद्गजः ॥ ३३ ॥ मधुहा हरिणो मीनः पिंगला कुररोऽर्भकः ॥ कुमारी शरकृत्सर्प ऊर्णनाभिः सुपेशकृत् ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ गुरु सांगेन अशेष ॥ संख्याप्रमाण चोवीस ॥ त्यांचीं नांवें तूं परिस ॥ साव काश सांगेन ॥ ४६ ॥ पृथ्वि, वायु, आकाश, ॥ अग्नि, आप, शीतांश, ॥ सातवा तें चंडांश ॥ कपोता, परिस आठवा ॥४७॥ अजगर, सिंधु, पतंग, ॥ मधुमाक्षिका, गज भृंगे हरिण, मीन, वेश्या, सांग ॥ नांवें सुभग पिंगला ॥ ४८ ॥ टिटवी आणि लेंकरूं ॥ कुमारी आणि शरकार ॥ सर्प, कांतणी पेशस्करु ॥ इतुकेन गुरु चोवीस ॥ ४९ ॥ पावावया तरु पंचविसावें ॥ चोविसां गुरूंसि उपासावें ॥ विवेकयुक्तिस्वभावें ॥ गुरु भजावे निजबुद्धि ॥ ३५० ॥ ठाकावया निजबोधासी ॥ निजविवेकें अहर्निशीं ॥ गुरुत्व देऊनि अनेकांसि निजहितासी गुरु केले ॥ ५१ ॥ कोण युक्ती कोण विचारु ॥ कोण लक्षणें कोण गुरु केला तोही निजनिर्धारु ॥ सविस्तारु परियेसी ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ एते मे गुरवो राजंश्चतुर्विंशतिराश्रिताः ॥ शिक्षावृत्तिभिरेतेषामन्वशिक्षमिहात्मनः ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ ऐके राजवर्य नृपती ॥ विवेकधवल चतुरकीर्ती ॥ गुरुसंख्या तुजप्रती ॥ यथा[स्थि]तीं सांगितली ॥ ५३ ॥ यांचिया शिक्षितावृत्ती ॥ शिकलों आपुलिया युक्तीं ॥ मग पाव[लों] आत्मस्थिती ॥ विकल्प भ्रांती सांडूनी ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ यतो यदनुशिक्षामि यथा वा नाहुषात्मज ॥ तं तथा पुरुषव्याघ्र निबोध कथयामि ते ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ नहुषाचा पुत्र ययाती ॥ ययातीचा यदु निश्चितीं ॥ नहुषनंदन यदूसि ह्मणती मूळव्युत्पत्ती येणें योगें ॥ ५५ ॥ यालागीं ह्मणे नहुषनंदना ॥ पुरुषांमाजीं पंचानना ॥ सांगे गुरूच्या लक्षणा ॥ विचक्षणा परियेसे ॥ ५६ ॥ ज्या गुरुचें जें शिक्षित ॥ मी शिक[लों] सुनिश्चित ॥ तें तें सांगेन समस्त ॥ सावधानचित्त करी राया ॥ ५७ ॥ ऐकावया गुरुलक्षण यदुनें सर्वांग केलें श्रवण ॥ अर्थीं बुडवूनियां मन ॥ सावधान परिसतू ॥ ५८ ॥ श[ब्द] सांडोनिया मागें ॥ शब्दार्थामाजीं रिगे ॥ जें जें परिसतु तें तें होय अंगें ॥ विकल्पत्य[ाग] विनीत ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ भूतैराक्रम्यमाणोपि धीरो दैववशानुगैः ॥ तद्विद्वान्न चलेन्मार्गादन्वशिक्षं क्षितेर्व्रतम् ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ परमार्थीं मुख्य शांती ॥ साधकांसि पाहिजे निश्चितीं ॥ यालागीं प्रथम [गुरु] क्षिती ॥ निजशांती लागूनी ॥ ३६० ॥ पृथ्वी गुरु त्रिविध पाही ॥ ०पर्वत, वृक्ष, आणि मही

१ पाणी. २ चंद्र. ३ सूर्य. ४ सर्प. ५ भुंगा. ६ मासा. ७ तिरंदाज. ८ कोळी. ९ आपले भों[वतीं] कोश निर्माण करणारा किडा. १० चतुरा.

०मो. अग नग आणि मही.

याचीं लक्षणें धरितां देहीं ॥ गुरुत्व पाही पृथ्वीसी ॥ ६१ ॥ अंतर निग्रहो ते शांती ॥ बाह्येंद्रियनिग्रहो ते दांती ॥ उभयसहिष्णुता ते ०क्षांती ॥ शांतीसी क्षिती गुरु केली ॥ ६२ ॥ पृथ्वी ते नानाभूतीं ॥ माझी माझी ह्मणोनि झोंबती ॥ नानाभेदीं भिन्न करिती ॥ निजवृत्ती व्यवहारें ॥ ६३ ॥ +त्या भूतांचें भिन्न वर्त्तन ॥ पृथ्वी संपादी आपण ॥ मोडों नेदी अभिन्नपण ॥ अखंड जाण सर्वदा ॥ ६४ ॥ तैसें योगियाचें लक्षण ॥ करितां कर्म भिन्न भिन्न ॥ वृत्ति अखंडदंडायमान ॥ सर्वदा जाण असावी ॥ ६५ ॥ देहासि अदृष्टयोगें गती ॥ भूतें अदृष्टयोगें आक्रमिती ॥ भूतीं निजात्मता भाविती ॥ द्वंद्वें न बाधती साधकां ॥ ६६ ॥ येथ भूतीं पृथ्वी पूजिली ॥ पन्हा विष्ठामूत्रीं गांजिली ॥ हर्षविषादां नाहीं आली ॥ निश्चळ ठेली निजक्षांतीं ॥ ६७ ॥ भूतें पार्थिवेंचि तंव झालीं ॥ तिहीं पृथ्वी पूजिली कां गांजिली ॥ ऐक्यें द्वंद्वभावा मुकलीं ॥ निश्चळ झालीं निजरूपें ॥ ६८ ॥ तैसा योगियाही जाणा ॥ भूतवैषम्यें डंडळीना ॥ सर्वभूतीं निजात्मभावना ॥ विषमीं समाना भावितां ॥ ६९ ॥ आतां पृथ्वीची अभिन्नशांती ॥ ते सांगेन राया तुजप्रती ॥ जे शांति धरोनि संतीं ॥ भगवद्भक्ति पावले ॥३७०॥ पृथ्वी दादेकरूनि जाळिली ॥ नांगर वाहूनि×फाडिली ॥ लातवरीं तुडविली ॥ ✱तोडिली झोडिली पैं भूतीं ॥ ७१ ॥ तो अपराधु नमानूनि क्षिती ॥ सर्वांसि भूतांतें प्रसन्न होती ॥ तेथेंचि पिकवूनि नानासंपत्ती ॥ तृप्ति देती भूतांतें ॥ ७२ ॥ ऐसऐसिया निजशांती ॥ लागीं गुरु म्यां केली क्षिती ॥ ऐक सभाग्या भूपती ॥ शांतीची स्थिति 4अभिन्न ॥ ७३ ॥ एकें अपराध केला ॥ दुजेनि उगाचि साहिला ॥ इतुकेनि शांत केवीं झाला ॥ उपेक्षिला अपराधी ॥ ७४ ॥ ऊंस मोडी त्या गोड भारी ॥ छेदितें शस्त्र गोड करी ॥ पिळिलिया आळिलिया वरी ॥ स्वादाचीया थोरी अपकाऱ्यां देतु ॥ ७५ ॥ अपराध साहोनि अंगीं ॥ त्याच्या प्रवर्ते हितालागीं ॥ तेचि शांती पैं जगीं ॥ होय दादुगी निर्द्वंद्व ॥७६॥ अपराध साहोनि अंगावरी ॥ अपराध्या होईजे उपकारी ॥ हें शिकलों पृथ्वियेवरी ॥ परोपकारीं प्रवर्तता॥७७॥

॥ श्लोक ॥ शश्वत्परार्थसर्वेहः परार्थैकांतसंभवः ॥ साधुः शिक्षेत भूभृत्तो नगशिष्यः परात्मताम् ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ पृथ्वीपासोनि झाले ॥ ते पर्वतही म्यां गुरु केले ॥ त्यांपासोनि जें जें शिकलें ॥ तेंही वहि॑ परियेसीं ॥ ७८ ॥ रत्ननिकर समस्त ॥ पर्वत परार्थचि वाहत ॥ तृण, जळ नाना अर्थ ॥ तेही परार्थ धरीतसे ॥ ७९ ॥ कोणासि सेमी ना निवारी ॥ उबगोनि नघाली बाहेरी ॥ याचकाचे इच्छेवरी ॥ परोपकारीं देतसे ॥ ३८० ॥ ग्रीष्माअंतीं सर्व सरे ॥ परी तो देतां मागें नसरे ॥ सर्वांचि भगवंतें काजे पुरें ॥ वर्षोनि जळधरें समृद्धी ॥ ८१ ॥ जंव जंव उल्हासे दाता देतु ॥ तंव तंव पुरवी जगन्नाथु ॥ विकल्प न धरितां मनांतु ॥ देता अच्युतु अनिवार ॥ ८२ ॥ सत्य अच्युत दाता ॥ हें न मनेंचि तत्त्वतां ॥ यालागीं

---

१ पृथ्वि. २ एकत्व. ३ पृथ्वीपासून उत्पन्न, ४ डळमळेना, ५ एकसारखी ६ लातेनें. ७ दुःख देणारांस. ८ रत्नखाणी, समूह. ९ द्रव्यें, वस्तु. १० मेघानें. ११ संशय.

०ना. क्षांतीसी. +मो. त्या भूतांचेनि वर्तनें. ×मो. फोडिली. ✱ना. वोढिली. 4ना. अभिन्नत्व.

तेवीं भोग भोगितां गाढे ॥ भोगीं नातुडे योगिया ॥ २७ ॥ जातया वायूचे भेटी ॥ सुगंध कोटी घालिती मिठी ॥ त्याची आसक्ती नाहीं पोटीं ॥ उठाउठी सांडितु ॥ २८ ॥ तैसा आत्मत्वें योगिया पाही ॥ प्रवेशलासे सर्वदेहीं ॥ *देहगुणाश्रयो पाही ॥ ठायींच्याठायीं तोचि तो ॥ २९ ॥ निजात्मदृष्टीचेनि बळें ॥ तो देहगुणांसी नातळे ॥ जैसा गंधावरी वारा लोळे ॥ परी ✻नाकळे गंधासी ॥ ३० ॥ तेचि परिपूर्ण आत्मस्थिती ॥ राया मी सांगेन तुजप्रती ॥ जैसी आकाशाची प्रतीती ॥ सर्व पदार्थीं अलिप्त ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ अंतर्हितश्च स्थिरजंगमेषु ब्रह्मात्मभावेन समन्वयेन ॥ व्याप्त्याऽव्यवच्छेदमसंगमात्मनो मुनिर्नभस्त्वं विततस्य भावयेत् ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ सर्व पदार्थीं ⁵समत्व ॥ यालागीं आकाशासि गुरुत्व ॥ असंगत्व, अभेदत्व, ॥ निर्मळत्व, जाणोनी ॥ ३२ ॥ विषमीं असोनि समत्व ॥ संगीं असोनि असंगत्व ॥ भेदु करितां अभेदत्व ॥ यालागीं गुरुत्व आकाशासी ॥ ३३ ॥ वैर सर्पा मुंगुसांसी ॥ आकाश दोहींचे हृदयवासी ॥ वैर निर्वैरता आकाशासी ॥ ते स्थिती योगियासी पाहिजे ॥ ३४ ॥ तेणें आकाशदृष्टांतें ॥ ब्रह्मभावें आपणियातें ॥ योगी देखिजे पुरतें ॥ व्यापकत्व आपुलें॥३५॥ ब्रह्मसमन्वयें पाहतां पाहीं ॥ स्थावरजंगमांच्याठायीं ॥ तिळभरी वांढीरीती नाहीं ॥ आपण पैं पाहीं कोंदलों ॥ ३६ ॥ आकाश सर्व पदार्थीं असे ॥ परी असे हें सर्वांसि नदिसे ॥ +तेवीं दृश्यद्रष्टाअतीतदर्शे ॥ सर्वत्र असे योगिया ॥ ३७ ॥ नभ नखोंचे सांबळें ॥ जळेना वणव्याचेनि जाळें ॥ नव्हतां ज्वाळांवेगळें ॥ असे सगळें टवटवित ॥३८॥ तैसीं योगियासि द्वंद्वें सकळें ॥ बाधूं नशकती कवणे काळें ॥ नव्हतां द्वंद्वा वेगळें ॥ स्वरूप सगळें शोभत ॥ ॥ ३९ ॥ योगिया छेदावया लवलाहें ॥ सोडिले शस्त्राचे समुदाये ॥ तो शस्त्रामाजीं आपणियातें पाहे ॥ नरुपती घाये जेवीं गगना ॥ ४४० ॥ जें जें द्वंद्व बाधूं आलें ॥ तें तें स्वरूप देखे आपुलें ॥ सहजें द्वंद्वभावा मुकले ॥ अबाधित उरलें निजरूप ॥ ४१ ॥ गगन बुडालें दिसे डोहीं ॥ परी तें उदकें भिजलें नाहीं ॥ तैसा असोनिया सर्व देहीं ॥ अलिप्त पाहीं योगिया ॥ ४२ ॥ आकाशा चिखल माखूं जातां ॥ ³तें नमाखे माखे लाविता ॥ तैसा योगिय दोषी ह्मणतां ॥ दोष सर्वथा ह्मणत्यासी ॥४३॥ गगन असोनियां जनीं ॥ मैळेना जनवसणीं॥ तैसा योगिया सकळकर्में करूनी ॥ कर्मठपणीं नमैळे ॥ ४४ ॥ मोटे बांधितां आकाशातें । चारी पालव पडती रिते ॥ तेवीं कर्मीं बांधितां योगियातें ॥ कर्म तेथें निर्धर्म ॥ ४५ । घटामाजीं आकाश असे ॥ तें वाच्य ×होय घटाकाशें ॥ पाहतां घटा सबाह्य समरसें । आकाश असे परिपूर्ण ॥ ४६ ॥ तैसा आत्मा ह्मणती देहीं ॥ तंव तो देहा सबाह्य पाही । देह मिथ्यात्वें ठायींचे ठायीं ॥ चिन्मात्र पाही परिपूर्ण ॥ ४७ ॥

---

१ संसर्गी. २ ब्रह्माच्या ऐक्य दृष्टीनें. ३·४ वृद्धि-क्षय; न्यूनाधिक्य. ५ भरला. ६ भाल्यानें टोंचले जात नाहीं. ७ जनसंसर्गानें. ८ पदर.

*ना. देही. ✻मो. नातळे. ⁵ना. समस्त. +मो. तैसा द्रष्टादृश्य अहितदर्शे. ³मो. तें चिखले माखे माखिता. ×ना. केले-

॥ श्लोक ॥ तेजोऽबन्नमयैर्भावैर्मेघाद्यैर्वायुनेरितैः ॥ नस्पृश्यते नभस्तद्वत्काल-
सृष्टैर्गुणैः पुमान् ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ नभ पृथ्वीरजें न ×गंदळे ॥ उदकेंकरीं न पघळे ॥ अग्नीचेनि ज्वाळें नजळे ॥ वायुबळें उडेना ॥ ४८ ॥ कडकडीत अभाळें ॥ येऊनि आकाश झांकोळे ॥ त्या समस्तां नभ नातळे ॥ अलिप्त बळें संस्थित ॥ ४९ ॥ तैसेंचि योगियासी ॥ असतां निजात्मसमरसीं ॥ काळें सृजिल्या गुणांसी ॥ वश्य त्यांसी तो नव्हे ॥ ४५० ॥ काळाचें थोर सामर्थ्य जाण ॥ देहासि *आणी जरामरण ॥ योगी देहातीत आपण ॥ जन्मजरामरण नदेखे ॥ ५१ ॥ स्वप्नीं चिंतामणी जोडला ॥ सर्वोचि अंधकूपीं पडला ॥ जागा जाहल्या नाह्मणे नाडला ॥ तैसा घडला देहसंग ॥ ५२ ॥ जो +ब्रह्मादिदेवांसि खाये ॥ तो काळ वंदी योगियाचे पाये ॥ जो काळाचाही आत्मा होये ॥ निधडा पाहें महाकाळ ॥ ५३ ॥ विज कडकडूनि आकाशीं ॥ तेजें प्रकाशी गगनासी ॥ गगन नातळे ते विजेसी ॥ असोनि तिशीं सबाह्य ॥ ५४ ॥ *तैसा सत्त्वगुण प्रकाशी ज्ञान ॥ त्यासि योगिया नातळे जाण ॥ ज्ञानस्वरूप निखळ आपण ॥ वृत्तिज्ञान मग नेघे ॥ ५५ ॥ जाहलिया सूर्यउदयासी ॥ दीपप्रभा नये उपेगासी ॥ तेवीं सहजे आलिया हातासी ॥ वृत्तिज्ञानासी कोण पुसे ॥ ५६ ॥ सत्वें प्रकाशिलें ज्ञान ॥ तें आवडोनि नेघे जाण ॥ अथवा खवळल्या रजोगुण ॥ कर्मठपण त्या नये ॥ ५७ ॥ होकां तमोगुणाचेनि मेळें ॥ क्रोधमोहांसि नातळे ॥ गुणातीत झाला बळें ॥ बोधकल्लोळें स्वानंदें ॥ ५८ ॥ उदकासि गुरुपण ॥ आलें तें ऐक लक्षण ॥ अवधूत ह्मणे सावधान ॥ नृपनंदन यदुवीरा ॥ ५९ ॥

॥ श्लो ॥ स्वच्छः प्रकृतितः स्निग्धो माधुर्यस्तीर्थभूर्नृणाम् ॥ मुनिः पुनात्यपां मित्रमीक्षोपस्पर्शकीर्तनैः ॥४४ ॥

॥ टीका ॥ लक्षणें पहातां जळ ॥ स्वभावें अतिनिर्मळ ॥ प्रकृतीस्तव कोमळ ॥ मधुर केवळ सर्वांसी ॥ ४६० ॥ पवित्र व्हावया प्राणियांसी ॥ तीर्थीं तीर्थत्व उदकासी ॥ इतुकीं लक्षणें योगियासी ॥ अहर्निशीं असावीं ॥ ६१ ॥ उदकीं रिघाले जे समैळ ॥ ते स्वभावें करी निर्मळ ॥ परी नधरी अहंबळ ॥ जे म्यां हे मळ क्षाळिले ॥ ६२ ॥ तैसें योगियासि भजनशीळ ॥ भावें भाविक जे केवळ ॥ त्यांचे निरसूनि कलिमळ ॥ न धरी 6बळ गुरुत्वें ॥ ६३ ॥ प्राण गेलिया तरी प्राणियासि ॥ कठिणत्व नुपजे मानसीं ॥ जें जें भेटे तयासी ॥ मृदुता कैसी वर्तत ॥ ६४ ॥ जेवीं चंद्रकिरण चकोरांसी ॥ पांखोवा जेवीं पिलियांसी ॥ जीवेंन जैसें कां जीवांसी ॥ तेवीं सर्वांसी मृदुत्व ॥ ६५ ॥ जळ वरिवरी क्षाळी मळ ॥ योगिया सबाह्य करी निर्मळ ॥ उदक सुखी करी एकवेळ ॥ योगी सर्वकाळ सुखदाता ॥

१ धुळीनें. २ मळे. ३ उदकेंकरून, पाण्याचे योगानें. ४ ढग. ५ ह्या शरीराहून वेगळा. ६ नष्ट झाला फसला. ७ बलाढ्य. ८ उपयोगास, ९ सिद्धज्ञान, आत्मज्ञान. १० गुरुत्व. ११ मलीन. १२ धुतले. १३ पांख. १४ उदक.

×मो. गादळे. *ना. लावी. +मो. ब्रह्मादि देहासी. *मो. तैसे. सत्वगुणा. 6ना. अहंबळ.

॥ ६६ ॥ उदकाचें सुख तें किती ॥ सर्वेचि क्षणां तृषित होती ॥ योगिया दे स्वानंदतृप्ती ॥ सुखासि विकृती पैं नाहीं ॥ ६७ ॥ उदकाची जे मधुरता ॥ ते रसनेशींचि तत्त्वतां ॥ योगियांचें गोडपण पाहतां ॥ होय निववितां सर्वेंद्रियां ॥ ६८ ॥ लागलिया योगियांची गोडी ॥ अमृताची चवी थोडी ॥ ब्रह्मेंद्रादिपदें बापुडीं ॥ अर्धघडीमाजीं करीत ॥ ६९ ॥ तापलें आले उदकापाशीं ॥ अंगस्पर्शें निववी त्यांसी ॥ तैसीचि दशा योगियासी ॥*स्पर्शें त्रितापासी निवारी ॥ ४७० ॥ उदकें निवविलें ज्यासी ॥ परतोनि ताप होय त्यासी ॥ योगी कृपेनें स्पर्शे ज्यासी ॥ तो त्रिविधतापासी निर्मुक्त ॥ ७१ ॥ योगी ज्यासि निववी जीवें भावें ॥ त्यासि जीव गेलियाही तापू नव्हे ॥ निवालेपणें तो वोल्हावे ॥ स्वानुभवें डुल्लत ॥ ७२ ॥ मेघमुखें अधःपतन ॥ उदकाचें देखोनि जाण ॥ अधःपातें निवती जन ॥ अन्नदान सकळांसी ॥७३॥ तैसें योगियासी खालुतें येणें ॥ जें इहलोकीं जन्म पावणें ॥ जन निववी श्रवणकीर्तनें ॥ +निजज्ञानें उद्धरी ॥ ७४ ॥ पर्जन्योदक देखतां जाण ॥ जेवीं निवती सकळ जन ॥ कां गंगादिकांचें दर्शन ॥ करी मोचन पापांचें ॥ ७५ ॥ तैसें योगियाचें दर्शन ॥ भाग्येंवीण नव्हे जाण ॥ ज्यानें देखिले त्याचे चरण ॥ कर्ममोचन भवरोगां ॥ ७६ ॥ नवडे दर्शन स्पर्शन ॥ तरी करावें त्याचें नामस्मरण ॥ इतुकेनि भवमूळ जाण ॥ 0करी छेदन तें नाम ॥ ७७ ॥ सांडूनि भगवंताचें कीर्तन ॥ केल्या भक्ताचें नामस्मरण ॥ केवीं तुटे भवबंधन ॥ ऐसें नह्मणे सर्वथा ॥ ७८ ॥ देवासि पूर्वीं नामचि नाहीं ॥ त्यासि भक्तीं प्रतिष्ठूनि पाहीं ॥ नामरूपादि सर्वही ॥ नानाविलासही अर्पिले ॥ ७९ ॥ ऐसा देव भक्तीं थोर केला ॥ आणूनि वैकुंठीं बैसाविला ॥ भक्तउपकारें दाटला ॥ मग त्याच्या बोलामाजीं वर्ते ॥ ४८० ॥ देव भक्तवचनें करी ॥ झाला नर ना केसरी ॥ प्रगटला खांबामाझारीं ॥ शब्दें करीं भक्तांचा ॥ ८१ ॥ आतांही प्रत्यक्ष प्रमाण ॥ दासाचेनि वचनें जाण ॥ पाषाणप्रतिमे देवो आपण ॥ आनंदघन प्रगटे पैं ॥ ८२ ॥ भक्तभावें आभारला ॥ देवो उपकारें दाटला ॥ यालागीं नुलंघवे बोला ॥ योगें पांगला भक्तांच्या ॥ ८३ ॥ एवं भक्तांचें जेथें नाम घेणें ॥ तेथें अवश्य देवें धांवणें ॥ भक्तउपकारा उत्तीर्ण होणें ॥ वेगें पावणें त्यालागीं ॥ ८४ ॥ यालागीं भक्ताचें नाम घेतां ॥ तुटती भवबंधन व्यथा ॥ ऐसें सांगतां अवधूता ॥ प्रेम सर्वथा नसंटवे ॥ ८५ ॥ आतां अग्नि जो गुरु करणें ॥ त्याचीं सांगेन लक्षणें ॥ कानां मना एक करणें ॥ सावधपणें परियेसी ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ तेजस्वी तपसा दीप्तो दुर्धर्षोदरभाजनः ॥ सर्वभक्षोऽपि युक्तात्मा नादत्ते मलमग्निवत् ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ अग्नि निजतेजें देदीप्यमान ॥ साक्षात् हातीं नधरवे जाण ॥ उदरमात्रीं सांठवण ॥ सर्व भक्षण निजतेजें ॥ ८७ ॥ तैसाचि योगियाही जाण ॥ भगवद्भावें देदीप्यमान ॥ त्यासि ×धरावया आंगवण ॥ नव्हे जाण सुरनरां ॥८८॥ हातीं नधरवे खदिरांगारू ॥

---

१ सुटलेला. २ भिजे. ३ सिंह. ४ भक्तच्या श्रद्धेनें. ५ ऋणानें. ६ बांधला. ७ अवरेना. ८ बळ. ९ खैराचा निस्तव.

*मो. स्पर्शतां पापतापासी. +मो. निजात्मज्ञानें. 0ना. होय छेदन जन्ममरणा.

तसा योगिया अतिदुर्धरू ॥ तयासि नशके आवरूं ॥ मायाव्यवहारू गुणेंसी ॥ ८९ ॥ अग्नीसि जेवीं मुखचि पात्र ॥ तैसें योगियासि उदरमात्र ॥ ठेवा ठेवणें विचित्र ॥ नाहीं पात्र गांठीसी ॥ ४९० ॥ अग्नीनें जें जें *सेवणें ॥ तें तें जाळूनि आपुल्या ऐसें करणें ॥ यापरी सर्वभक्षणें ॥ नाहीं स्पर्शणें मळातें ॥ ९१ ॥ चंदन सुवासें दुर्गंधपुरे ॥ निंब कडू ऊंस गोडिरे ॥ ते जाळूनि आकारविकारें ॥ कीजे वैश्वानरें आपणाऐसें ॥ ९२ ॥ तैसा योगी 3जें दैवें अंगीकारी ॥ तें आत्मदृष्टीं निर्धारी ॥ दोष दवडूनियां दुरीं ॥ मग स्वीकारी निजबोधें ॥ ९३ ॥ 0भोग्य जें भोगूं जाये ॥ तेथें आत्मप्रतीति पाहे ॥ भोक्ता तद्रूपचि होये ॥ हा भोगू पाहे योगियां ॥९४॥ अग्नींत पडलें जें समळ ॥ तें अग्निमुखें होय निर्मळ ॥ योगिया जें सेवी अळुमाळ ॥ परममंगळ तें होय ॥ ९५ ॥ अग्निमुखीं यागू घडे ॥ तेणें अदृष्टें स्वर्गभोगू जोडे ॥ योगियाचे मुखीं जें पडे ॥ तेणें जोडे निजपद ॥ ९६ ॥ आणिक अग्नीचें चिन्ह ॥ ऐक राया सावधान ॥ तेंचि साधकांसि साधन ॥ सिद्ध लक्षण सिद्धाचें ॥९७॥

॥ श्लोक ॥ क्वचिच्छन्नः क्वचित्स्पष्ट उपास्यः श्रेय इच्छताम् ॥ भुंक्ते सर्वत्र दातॄणां दहन् प्रागुत्तराशुभम् ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ भीतरीं तेजस्वी वरी झांकिला ॥ होमकुंडीं अग्नि +पुरिला ॥ कां यज्ञशाळे प्रज्वळला ॥ याज्ञिकीं केला महायागू ॥ ९८ ॥ जों जों उपासका भावो जिवीं ॥ त्या त्या श्रेयातें उपजवी ॥ पूर्वोत्तर अशुभें आघवीं ॥ जाळूनि हवी सेवित ॥ ९९ ॥ तैशीचि योगियाची लीला ॥ भाविकां प्रगट दिसे डोळां ॥ एकां गुप्तचि होऊनि ठेला ॥ नदिसे पाहिला सर्वथा ॥ ५०० ॥ ऐशियांच्याही ठायीं ॥ भावबळें भाविक पाहीं ॥ अर्पिती जें जें कांहीं ॥ तेणें मोक्ष पाहीं मुमुक्षां ॥ १ ॥ तें पडतांचि योगियांच्या मुखीं ॥ संचितक्रियमाणें आसेकीं ॥ जाळोनियां एकाएकीं ॥ करी सुखी निजपदीं ॥ २ ॥ आणीकही 2ये अग्नीचें लक्षण ॥ राया तुज सांगेन जाण ॥ जेणें सगुण आणि निर्गुण ॥ दिसे समान समसाम्यें ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ स्वमायया सृष्टमिदं सदसल्लक्षणं विभुः ॥ प्रविष्ट ईयते तत्तत्स्वरूपोऽग्निरिवैधसि ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ अग्नि सहजें निराकार ॥ त्यासि काष्ठानुरूपें आकार ॥ दीर्घ, वक्र, वर्तुल, थोर,॥ नानाकार भासत ॥४॥ तैसीचि भगवंताची ×भगवंतगती ॥ स्वमाययाकल्पित कल्पनाकृती ॥ तेथें प्रवेशला सहजस्थितीं ॥ बहुता व्यक्ती तो भासे ॥ ५ ॥ जैसें गंगेचें एक जळ ॥ भासे भंवरे, लहरी, कल्लोळ, ॥ तैसा जगदाकारें अखिल ॥ भासे सकळ जगदात्मा ॥ ६ ॥ कां छायामंडपींच्या चित्रासी ॥ दीपप्रभा भासे जैसी ॥ राम रावण या नांवेंसी ॥ दावी जगासी नटनाट्य ॥ ७ ॥ तैशा नानाविधा व्यक्ती ॥ नानामतें 4नानाकृती ॥ तेथें प्रवेशोनि श्रीपती ॥ सहजस्थितीं नाचवी ॥ ८ ॥ तैशी योगियांची स्थिती ॥ पाहतां नानाकारें व्यक्ती ॥ आपणियातें देखे समवृत्ती ॥ भेदभ्रांती त्यां नाहीं ॥ ९ ॥ तेथें जें जें कांहीं वाहे ॥ तें तें आपणचि

---

१ पोट तेवढें. २ यज्ञ. ३ अपवित्रपणा पापें.४ आहुती. ५ सगळीं ६ वाटोळा.

*ना. जेवणें. 3मो. दैवयोगीं ज्यासी. 0मो. भोग्यभोक्ता. ना. भक्त. +मो. पूजिला. 2ना. येक. ×ना. भगवद्व्यक्ती. 4मो. नानावृत्ती.

आहे ॥ या उपपत्ती उभवूनि बाहे ॥ सांगताहे अवधूत ॥ ११० ॥ देहासि जन्मनाश ॥ आत्मा नित्य अविनाश ॥ हा दृढ केला विश्वास ॥ गुरु हिमांशु करूनि ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ विसर्गाद्याःश्मशानांता भावा देहस्य नात्मनः ॥ कलानामिव चंद्रस्य कालेनाव्यक्तवर्त्मना ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ शुक्लकृष्णपक्षपाडी ॥ चंद्रकळांची वाढीमोडी ॥ ते निजचंद्रीं नाहीं वोढी ॥ तैशी रोकडी योगियां ॥ १२ ॥ जन्मनाशादि षड्विकार ॥ हे देहासीच साचार ॥ आत्मा अविनाशी निर्विकार ॥ अनंत अपार स्वरूपत्वें ॥ १३ ॥ घट स्वभावें नाशवंत असे ॥ त्यामाजी चंद्रमा बिंबला भासे ॥ नश्वरीं अनश्वर दिसे ॥ विकारदोषें लिंपेना ॥ १४ ॥ घटासवें चंद्रासि उत्पत्ती ॥ नाहीं नाशासवें नाशप्राप्ती ॥ चंद्रमा आपुलें सहजस्थितीं ॥ नाशउत्पत्तीरहित ॥ १५ ॥ तैसा योगिया निजरूपपणें ॥ देहासवें नाहीं होणें ॥ देह निमाल्या नाहीं निमणें ॥ अखंडपणें परिपूर्ण ॥ १६ ॥ काळाची अलक्ष्य गती ॥ दाखवी नाश आणि उत्पत्ती ॥ ते कालसत्ता देहाप्रती ॥ आत्मस्थिती नातळे ॥१७॥ एवं काळाचें बळ गाढें ॥ ह्मणती तें देहाचिकडे ॥ पाहतां आत्मस्थितीपुढें ॥ काळ बापुडें तेथें नाहीं ॥ १८ ॥ सूक्ष्म काळगति सांगतां ॥ वेगें आठवलें अवधूता ॥ सिंहावलोकनें मागुता ॥ अग्निदृष्टांता सांगत ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ कालेन ह्योघवेगेन भूतानां प्रभवाप्ययौ ॥ नित्यावपि नदृश्येते आत्मनोऽग्नेर्यथाऽर्चिषाम् ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ काळनदीचा महावेग ॥ सूक्ष्मगती वाहतां वोघ ॥ तेथ भूततरंगा जन्मभंग ॥ देखतांचि जग नदेखे ॥ १२० ॥ जराजर्जरित ×जाण ॥ वाहतां नदीमाजीं वोसण ॥ षड्विकार तेचि परिपूर्ण ॥ भंवरे दारुण भंवताती ॥ २१ ॥ बाल्यतारुण्यांचे खळाळ ॥ वार्धक्याचे मंद जळ ॥ जन्ममरणांचें उसाळ ॥ अतिकल्लोळ उठती ॥ २२ ॥ वोघवेगाच्या कडाडी ॥ पडत आयुष्याची दरडी ॥ स्वर्गादि देउळें मोडी ॥ शिखरींचे पाडी सुरेंद्र ॥ २३ ॥ तळीं रिचवितां +वोघें ॥ पाताळादिविवरें वेगें ॥ नाशूनियां पन्नगें ॥ करी अंगेंभंगें आडिमोडी ॥ ॥ २४ ॥ ऐशिया जी काळवोघासी ॥ घेई मोडी भूततरंगांसी ॥ होतसे अहर्निशीं ॥ कोणासी लक्षेना ॥ २५ ॥ जैं महाप्रळयीं मेघ गडाडी ॥ तैं पूर चढे कडाडी ॥ ब्रह्मादिक तरुवर उपडी ॥ समूळ सशेंडी वाहविले ॥ २६ ॥ जैं आत्यंतिक पूर चढे ॥ तैं वैकुंठ कैलासही बुडे ॥ तेथें काळा रिघू न घडे ॥ हें अवचट घडे एखाद्या ॥ २७ ॥ अनिवार काळनदीची गती ॥ सूक्ष्म लक्षेना निश्चितीं ॥ ते सूक्ष्म गतीची स्थिती ॥ अतिनिगुर्त परियेसी ॥ २८ ॥ दीपू तोचि तो हा ह्मणती ॥ परी शिखा क्षणक्षणा जाती ॥ तें लक्षेना सूक्ष्मगती ॥ अंतीं ह्मणती विझाला ॥ २९ ॥ प्रत्यक्ष प्रवाहे गंगाजळ ॥ तें कालींचें ह्मणती वेरळ ॥ तैशी काळगती अकळ ॥ लोक सकळ नेणती ॥ १३० ॥ प्रत्यक्ष पाहतां देहासी

---

१ चंद्र. २ पक्षतारतम्यानें. ३ चढउतार. ४ जन्मनें, वांचणें, वाढणें, पक्व होणें, क्षीण होणें मरणें हे सहा विकार. ५ प्राणिरूप तरंगास, ६ वार्धक्यानें. ७ कचरा. ८ ओतितां वाहतां. ९ कर नाशी १० मोरीं झालें. ११ तोच एकच. १२ ज्योति. १३ परातन. पूर्वकाळचें १४ भ्रमिष्ट.

काळ वयसेतें ग्रासी ॥ बाल्यकौमारतारुण्यांसी ॥ निकट काळासी नदेखती ॥ ३१ ॥ अलक्ष्य काळाची काळगती ॥ यालागीं गुरु केला गभस्ती ॥ त्यापासोनि शिकलों स्थिती ॥ तेही नृपती परियेसी ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ गुणैर्गुणानुपादत्ते यथाकालं विमुंचति ॥ न तेषु युज्यते योगी गोभिर्गाइव गोपतिः ॥ ५० ॥

॥ टीका ॥ सूर्य काळें निजकिरणीं ॥ रसेंसहित शोषी पाणी ॥ तोचि वर्षाकाळीं वर्षोनी ॥ निववी अवनी सहस्रधा ॥ ३३ ॥ सूर्य शोषूनि घे किरणीं ॥ तें शोषितें लक्षण तेणें कोणी ॥ देतां मेघमुखें वर्षोनी ॥ निववी अवनी जनेंसीं ॥३४॥ तैसीचि योगियाची परी ॥ अल्प ज्याचें अंगीकारी ॥ त्याचे मनोरथ पूर्ण करी ॥ सहस्रप्रकारीं हितत्वें ॥ ३५ ॥ ज्यासि सेविती योगी आत्माराम ॥ त्याचे पुरविती सकळ काम ॥ अंतीं करोनियां निष्काम ॥ विश्रामधामा आणिती ॥३६॥ एवं योगिया आपुले योगबळें ॥ विषयो सेविती इंद्रियमेळें ॥ जे देती त्यांसी यथाकाळें ॥ कृपाबळें निवविती ॥ ३७ ॥ त्यांसि विषयो देतां कां घेतां ॥ आसक्ति नाहीं सर्वथा ॥ रस शोषूनि घेतां देतां ॥ अलिप्त सविता तैसे ते ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ बुद्ध्यते स्वे न भेदेन व्यक्तिस्थ इव तद्गतः ॥ लक्ष्यते स्थूलमतिभिरात्मा चावस्थितोऽर्कवत् ॥ ५१ ॥

॥ टीका ॥ सूर्यो थिल्लरामाजीं बिंबला ॥ मूढ ह्मणती थिल्लरीं बुडाला ॥ त्याचेनि कंपें कंपु मानिला ॥ डहुळें डहुळला ह्मणती तो ॥ ३९ ॥ त्या थिल्लरातें नातळतां ॥ गगनीं अलिप्त जेवीं सविता ॥ तैसीच योगियाची योग्यता ॥ देहातीतता देहकर्मीं ॥ ५४० ॥ त्यासि देहबुद्धीचेनि छंदें ॥ ह्मणती योगिया देहीं नांदे ॥ त्या देहाचेनि +नानाबोधें ॥ ×स्वबुद्धिभेदें बांधला ह्मणती ॥ ४१ ॥ त्यासि देहाचें अबाधित भान ॥ हें नकळे त्याचें गुह्यज्ञान ॥ दोराचेनि सापें जाण ॥ डसोनि कोण मारिला ॥ ४२ ॥ एवं आत्मा तो चिदाकाशीं ॥ मिथ्या देहीं मिथ्यात्वेंसी ॥ बिंबोनि दावी देहकर्मासी ॥ नव्हे तें त्यासी बाधक ॥ ४३ ॥ देखे आपणातें जळीं बिंबला ॥ परि नह्मणे मी जळीं बुडाला ॥ तैसा देहातीत बोध झाला ॥ नाहीं भ्याला देहकर्मा ॥ ४४ ॥ देखोनि मृगजळाचा पूरु ॥ मूर्ख करूं धांवती तारूं ॥ तैसा मिथ्या हा संसारू ॥ भयंकरू मूर्खांसी ॥ ४५ ॥ यालागीं दारागृहपुत्रप्राप्ती ॥ तेथें न करावी अतिप्रीती ॥ येचिविषयीं रायाप्रती ॥ कथा कपोती सांगत ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ नातिस्नेहः प्रसंगो वा कर्तव्यः क्वापि केनचित् ॥ कुर्वन्विंदेत संतापं कपोतइव दीनधीः ५२ ॥

॥ टीका ॥ संसार दुःखाचें मूळ ॥ स्त्री आसक्तीचि जाण केवळ ॥ स्त्रीलोभाचें जेथ प्रबळ बळ ॥ दुःख सकळ त्यापाशीं ॥ ४७ ॥ स्त्रीपासाव झाले पुत्र ॥ त्यांच्याठायीं स्नेह विचित्र ॥ करितां दुःखासि पात्र ॥ संसारी नर होताती ॥ ४८ ॥ आसक्ति आणि स्नेहसूत्र ॥ या

१ आयुष्यास. २ सूर्य. ३ पृथ्वी. ४ लोकांसह. ५ देहावेगळा हें ज्ञान. ६ पारव्याची. ७ स्त्रीपासून.

दोन्हीपासात दुःख विचित्र ॥ पदोपदीं भोगिती नर ॥ अस्वतंत्र होऊनी ॥ ४९ ॥ यालागीं भलतेन भलते ठायीं ॥ आसक्ति स्नेहो न करावा पाहीं ॥ अतिस्नेहो मांडिजे जिहीं ॥ दुःख तिहीं भोगिजे ॥ ५० ॥ स्नेहदुःखाची वार्ता ॥ कपोताकपोतीची कथा ॥ तुज सांगेन गा नृपनाथा ॥ स्वस्थचित्ता परियेसी ॥ ५१ ॥

॥श्लोक॥ कपोतः कश्चनारण्ये कृतनीडो वनस्पतौ ॥ कपोत्या भार्यया सार्धमुवास कतिचित्समाः ॥ ५३ ॥

॥ टीका ॥ कपोतीचें स्नेह गोड ॥ धरोनि स्त्रीसुखाची चाड ॥ वनीं वृक्ष पाहोनियां गूढ ॥ करी नीडें कपोता ॥ ५२ ॥ तेणें वैनचरें वनस्थळीं ॥ नीडामाजीं स्त्रीमेळीं ॥ वास केला बहुकाळीं ॥ भार्येजवळी भुलला ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ कपोतौ स्नेहगुणितहृदयौ गृहधर्मिणौ ॥ दृष्टिं दृष्ट्यांऽगमंगेन बुद्धिं बुद्ध्या बबंधतुः ॥ ५४ ॥

॥ टीका ॥ कपोता आणि कपोती ॥ परस्परें दोघां अतिप्रीती ॥ स्नेह वाढलासे चित्तीं ॥ हृदयीं आसक्ती नीचें नवी ॥ ५४ ॥ हावभावविलासस्थिती ॥ येरयेरांकडे पाहती ॥ परस्परें कुरवाळिती ॥ वोळंगिती येरयेरां ॥ ५५ ॥ येरयेरां वेगळें होणें ॥ नाहीं जीवें अथवा मनें ॥ दोघें वर्तती ×एके प्राणें ॥ खाणें जेवणें एकत्र ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ शय्यासनाटनस्थानवार्ताक्रीडाशनादिकं ॥ मिथुनीभूय विस्रब्धौ चेरतुर्वनराजिषु ॥ ५५ ॥

॥ टीका ॥ सेवितां ज्याची अतिगोडी ॥ तें घालिती येरयेरांच्या तोंडीं ॥ जीवें प्राणें शिणोनि ०जोडी ॥ तें दे आवडी स्त्रियेसि ॥ ५७ ॥ स्त्रियेसि सांडूनि दुरी ॥ पाउल नघाली बाहेरी ॥ हात धरोनि परस्परीं ॥ आंत बाहेरीं हिंडती ॥ ५८ ॥ सदा एकांतीं बसती ॥ एके स्थानीं दोघें असती ॥ दोघे क्रीडाविहार करिती ॥ खेळ खेळती विनोदें ॥ ५९ ॥ एकांतीं गोड बोली ॥ सासुसासऱ्यांचा विकल्पु घाली ॥ दिराभावांच्या मोडी चाली ॥ बोलाच्या भुलीं भुलवित ॥ ६० ॥ एके आसनीं बैसती ॥ येरयेरांतें टेंकती ॥ एके शय्ये निद्रा करिती ॥ अहोरात्रीं एकत्र ॥ ६१ ॥ मैथुनसुखाचेनि वैभवें ॥ विश्वासोनि जीवेंभावें ॥ हिताहित कांहीं नाठवे ॥ गृहिणीगौरवें नाचतू ॥ ६२ ॥ खेंडकुलियां आराम ॥ त्यामाजीं दोघां समागम ॥ नाममात्र गृहाश्रम ॥ विषयसंभ्रम वनराजी ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ यं यं वांच्छति सा राजंस्तर्पयंत्यनुकंपिता ॥ तं तं समनयत्कामं कृच्छ्रेणाप्यजितेंद्रियः ॥ ५६ ॥

॥ टीका ॥ जीवितापरीस समर्थ ॥ जे जे मागे ते ते अर्थ ॥ जीवें प्राणेंसि शिणोनि देत ॥ काममोहित होऊनि ॥ ६४ ॥ जाणोनि जीवींचे खुणे ॥ नमागतां अर्थ देणें ॥

१ परतंत्र. २ घरटें. ३ त्या अरण्यचरानें. ४ नित्य. ५ आश्रय देती. ६ मिळवी. ७ बायकोंच्या मोठेपणानें. ८ उपवन, ९ बाग. १० विषयाचा थाट.

×मो. जिवें प्राणें. ०मो. हिंडी.

त्याहीवरी जरी ×मागणें ॥ तरी विकूनि देणें आपणियातें ॥ ६५ ॥ धर्माची वेळ नाठवणें ॥ दीनावरी दया नेणे ॥ कृपा स्त्रियेवरी करणें ॥ जीवें प्राणें सर्वस्वें ॥ ६६ ॥ बैसली साखरेवर माशी ॥ मारितांही लुडे जैसी ॥ तैसा भोगितां विषयांसी ॥ जरामरणांसी नाठवी ॥६७॥ जैसी पूर्वजांची भाक ॥ पाळिती सत्यवादी लोक ॥ तैसा +स्त्रियेचेंचि सुख ॥ पाळी देख सर्वस्वें ॥ ६८ ॥ जैसी आत्मउपासकासी ॥ एकात्मता होय त्यासी ॥ तैसें स्त्रीवांचोनि दृष्टीसी ॥ जगीं आणिकासी नदेखे ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ कपोती प्रथमं गर्भं गण्हती काल आगते ॥ अंडानि सुषुवे नीडे स्वपत्युः सन्निधौ सती ॥ ५७ ॥

॥ टीका ॥ आधींचि प्रिया पढियंती ॥ तेही झाली गर्भवती ॥ जैसी लोभियाचे हातीं ॥ सांपडे अवचितीं धन लोहें ॥ १७० ॥ तैसें तिच्या गर्भाचें ०कोड ॥ अधिकाधिक वाढवी गोड ॥ जैसें मदिरा पिऊनि माकड ॥ नाचे तडतड डुल्लत ॥ ७१ ॥ 6तैसे गर्भाचे सोहळे ॥ सर्वस्वें पुरवी डोहळे ॥ तिचे लीळेमाजीं खेळे ॥ प्राप्तकाळें प्रसूती ॥७२॥ स्वनीडा अतौती ॥ जाहली अंडातें प्रसवती ॥ प्रसूतिवार्तावा सांगती ॥ ऐकोनि ∗पती [1]उल्हासे ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ तेषु काले व्यजायंत रचितावयवा हरेः ॥ शक्तिभिर्दुर्विभाव्याभिः कोमलांगतनूरुहाः ॥ ५८ ॥

॥ टीका ॥ 8अघटघटी हरीची माया ॥ अलक्ष लक्षेना ब्रह्मया ॥ ओंवेव अंडांमाजीं तया ॥ देवमाया रचियेले ॥ ७४ ॥ रसें भरलीं होतीं अंडें ॥ त्यांमाजीं नख, पक्ष, चांचुवडें, ॥ उघडिलीं डोळ्यांचीं कवाडें ॥ करी कोडें हरिमाया ॥ ७५ ॥ अंडें उलोनि आपण ॥ कोंवळीं पिलीं निघालीं जाण ॥ पितरें दृष्टीं देखोन ॥ जीवें प्राणें भुललीं ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ प्रजाः पुपुषतुः प्रीतौ दंपती पुत्रवत्सलौ ॥ शृण्वंतौ कूजितं तासां निर्वृतौ कलभाषितैः ॥ ५९ ॥

॥ टीका ॥ अत्यंत कोंवळीं बाळें ॥ दोघेंजणें पुत्रवत्सलें ॥ शांतविती मृदु मंजुळें ॥ अतिस्नेहाळें प्रजांसी ॥ ७७ ॥ जे समयीं जैसें लक्षण ॥ तैसें प्रजांचें पोषण ॥ अंगें करिताती आपण ॥ दोघेजण मिळोनि ॥ ७८ ॥ गोड गोजिरे बोल ॥ ऐकोनि दोघां येती डोल ॥ धांवोनियां वेळोवेळ ॥ निंबलोण उतरिती ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ तासां पतत्रैः सुस्पर्शैः कूजितैर्मुग्धचेष्टितैः ॥ प्रत्युद्गमैरदीनानां पितरौ मुदमापतुः ॥ ६० ॥

॥ टीका ॥ त्याचेनि आलिंगनचुंबनें ॥ मृदुमंजुळकलभाषणें ॥ दो पक्षांचेनि स्पर्शनें ॥ दोघेंजणें निवताती ॥ १८०॥ माता पिता दोघें बैसती ॥ सन्मुख अपत्यें धांवती ॥ लोलवक्त्र

---

१ स्वर्ण, मोहरा २ प्रसूति वार्ता. ३ नसतेंच घडविणारी. ४ हात पाय आदि. ५ चोंच. ६ पिलांचें.

×मो. तिया मागणें. +ना. स्त्रियेचेनि. ०ना. सांकडें. 6ना. ऐसे मो. तिच्या. ∗ना. प्रीति. 1मो. संतोषे. 8ना. अघटघटित.

×विलोकिती ॥ +वेगें दाविती येरयेरां ॥ ८१ ॥ मग देवोनियां खेवे ॥ दुरी जाती मुग्धभावें ॥ तेथूनि घेऊनियां धांवे ॥ वेगें पावे तयांपाशीं ॥ ८२ ॥ मायबापांच्या पांखोव्यापाशीं॥ हीनदीनता नाहीं बाळांसी ॥ जे जन्मोनि त्यांचे¹ कुशीं ॥ त्या दोघांसी सभाग्यता ॥ ८३ ॥ लाडकीं लडिवाळ बाळें ॥ दोघें धांवती एके वेळें ॥ उचलोनियां स्नेहबळें ॥ मुख कोंवळें चुंबिती ॥ ८४ ॥ लाडकीं लडिवाळें बाळें ॥ वाडेंकोडें पुरविती लळे ॥ देखोनी निवती डोळे ॥ स्नेह आगळें येरयेरां ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ स्नेहानुबद्धहृदयावन्योऽन्यं विष्णुमायया ॥ विमोहितौ दीनधियौ शिशून्पुपुषतुः प्रजाः ॥ ६१ ॥

॥ टीका ॥ अजाची जे अजा माया ॥ त्या कैसी भुलविलीं गा राया ॥ अन्योन्यस्नेह बांधोनि हृदया ॥ पिलीं पोषावया उचित ॥ ८६ ॥ स्त्रीपुत्रांचा मोह गहन ॥ त्यांचें करावया पोषण ॥ चिंतातुर अतिदीन ॥ करी भ्रमण अन्नार्थ ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ एकदा जग्मतुस्तासामन्नार्थौ तौ कुटुंबिनौ॥परितः कानने तस्मिन्नर्थिनौ चेरतुश्चिरम् ॥ ६२ ॥

॥टीका॥ एवं टणकीं जाहलीं बाळें ॥ कुटुंब थोर थोरावलें ॥ अन्न बहुसाल पाहिजे झालें॥दोघें विव्हळें गृहधर्में ॥ ८८ ॥ यापरी कुटुंबवत्सलें ॥ पुत्रस्नेहें स्नेहाळें ॥ दोघेंजणें एके वेळे ॥ अन्न बहुकाळें अर्थिती ॥ ८९ ॥ सहसा मिळेना अन्न ॥ यालागीं हिंडती वनोपवन ॥ बहुसाल श्रमतांही जाण ॥ पूर्णपोषण मिळेना ॥ १९० ॥ बहुसाल मेळवूनि चारा ॥ दोघेंजणें जाऊं घरा ॥ मग आपुल्या लेंकरां ॥ नाना उपचारां प्रतिपाळूं ॥९१ ॥ ऐसऐशिया वासना ॥ मेळवावया अन्ना ॥ दोघेंजणें नानास्थाना ॥ वना उपवना हिंडती ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ दृष्ट्वा तान् लुब्धकः कश्चिद्यदृच्छातो वनेचरः ॥ जगृहे जालमातत्य चरतः स्वालयांतिके ॥ ६३ ॥

॥ टीका ॥ माता पिता गेलीं दुरी ॥ उडतीं पिलें नीडांभीतरीं ॥ क्षुधेनें पीडिलीं भारी ॥ निघालीं बाहेरी अदृष्टें ॥ ९३ ॥ ते वनीं कोणी एक लुब्धक ॥ पक्षिबंधनीं अतिसाधक ॥ तेणें कपोतबाळक ॥ अदृष्टें देख देखिले ॥ ९४ ॥ तेणें पसरोनियां काळजाळें ॥ पाशीं बांधिली तीं बाळें ॥ कपोतकपोतीचे वेळे ॥ राखत केवळें राहिला ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ कपोतश्च कपोती च प्रजापोषे सदोत्सुकौ ॥ गतौ पोषणमादाय स्वनीडमुपजग्मतुः ॥ ६४ ॥

॥ टीका ॥ बाळकांच्या अतिप्रीती ॥ कपोता आणि कपोती ॥ चारा घेऊनियां येती ॥ नीडाप्रती लवलाहें ॥ ९६ ॥ स्त्रीसुखाची आसक्ती ॥ तोचि वाढत्या दुःखाची सुती ॥ स्त्रीसंगें दुःखप्राप्ती ॥ सांगों किती अनिवार ॥ ९७ ॥ पुरुषासि यावया दुःख ॥ स्त्रीसंगचि अवश्यक ॥ पुत्र पौत्र दारा देख ॥ नानादुःख भोगवी ॥ ९८ ॥

---

१ विष्णूची. २ जन्मरहित; ३शरीरानें सुदृढ. ४ पुष्कळ. ५ मागती. ६ फांसे पारधी. ७ फाशांत. ८ जननी. ९ स्त्री.

×ना. खेवी लगती. +ना. दोघे दाविती.

॥ श्लोक ॥ कपोती स्वात्मजान्वीक्ष्य बालकान् जालसंवृतान् ॥ तानभ्यधाव-
त्क्रोशंती क्रोशतो भृशदुःखिता ॥ ६५ ॥

॥ टीका ॥ तंव काळजाळीं एके वेळे ॥ कपोती बांधलीं देखे बाळें ॥ तोंड घेऊनि पिटी कपाळें ॥ आक्रोशें लोळे दुःखित ॥ ९९ ॥ बाळें चरफडतां देखे जाळीं ॥ आक्रंदोनि दे आरोळी ॥ बाळां सन्मुख धांवे वेळोवेळीं ॥ दुःखें तळमळी दुःखित ॥ ६०० ॥

॥ श्लोक ॥ साऽसकृत्स्नेहगुणिता दीनचित्ताऽजमायया ॥ स्वयं चाबध्यत शिचा बद्धान्पश्यंत्यपस्मृतिः ॥ ६६ ॥

॥ टीका ॥ दुःख गावया भ्रतारासी ॥ आक्रंदें कपोती चालिली कैसी ॥ शतगुणें स्नेहो वाढला तिसी ॥ मृतपुत्रांसी देखोनी ॥ १ ॥ पुत्रस्नेहें केलें वेडें ॥ गुण[1]आठआठवूनि रडे ॥ हिताहित नदेखे पुढें ॥ बळेंचि पडे जाळांतु ॥२॥ मायामोहें भुलली कैशी ॥ जेथें बांधलें देखे पुत्रांसी ॥ ते जाळीं घाली आपणासी ॥ मोहें पिशी ते केली ॥ ३ ॥

॥श्लोक॥ कपोतश्चात्मजान् बद्धानात्मनोऽप्यधिकान्प्रियान् ॥ भार्यां चात्मसमां दीनो विललापातिदुःखितः ॥ ६७ ॥

॥ टीका ॥ अंतरला स्त्रीबाळकीं ॥ कपोता तो एकाएकीं ॥ रुदन करी अधोमुखीं ॥ अतिदुःखी विलपत ॥ ४ ॥ जीवाहोनि प्रीति अधिकें ॥ तें निर्जीव देखिलीं बाळकें ॥ अनुकूल अनुरूपकें ॥ भार्या देखे ×अंतरली ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ अहो मे पश्यतापायमल्पपुण्यस्य दुर्मतेः ॥ अतृप्तस्याकृतार्थस्य गृहस्त्रैवर्गिको हतः ॥६८॥

॥ टीका ॥ धर्म अर्थ आणि काम ॥ या तिहींचा आश्रयो गृहाश्रम ॥ तो भंगला मी अनाश्रम ॥ अतृप्त काम सांडूनी ॥ ६ ॥ पूर्वपापाचा आंवर्तु ॥ मज सांडूनि ()अकृतार्थु ॥ माझा काम नव्हता तृप्तु ॥ धर्मकामार्थु भंगला ॥ ७ ॥ गृहीं त्रैवर्गु भंगला ॥ चौथा पुरुषार्थ असे उरला ॥ तो साधूनि घेवों वहिला ॥ आश्रम भंगल्या ०क्षितीं काय ॥ ८ ॥ ऐसे ह्मणसी जरी निगुतीं ॥ ※ये अर्थीं मी दुर्मती ॥ विषयवासना न सांडिती ॥ कैसेनि मुक्ती *साधेल ॥९॥ म्यां पूर्वीं अल्पपुण्य होतें केलें ॥ यालागीं अंतरायीं घर घेतलें ॥ माझें परलोक साधन ठेलें॥ विधुर केलें मजलागीं ॥ ६१० ॥ होकां गृहीं असतां गृहस्थां ॥ काय परलोक साधे समस्तां॥ इतरांची असो कथा ॥ मज साधनता तंव होती ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ अनुरूपानुकूला च यस्य मे पतिदेवता ॥ शून्ये गृहे मां संत्यज्य पुत्रैःस्वर्याति साधुभिः ॥ ६९ ॥

॥ टीका ॥ स्त्रीपुरुषांची चित्तवृत्ती ॥ अनुकूलें वर्ते धर्मप्रवृत्ती ॥ तरीच परलोक साधिती ॥ इतरां प्राप्ती ते नाहीं ॥ १२ ॥ एकाच्या भार्या त्या तोंडाळा ॥ एकाच्या त्या बहु वोढाळा ॥

---

१ समूह भोंवरा. २ धर्म, अर्थ, काम. ३ मोक्ष. ४ खातर. ५ विघ्नांनी.

×ना. अनुसरली. ()ना. कृतार्थ. ०ना. खंती. ※ना. यथार्थ मी. *मो. लाधेल.

एकाच्या त्या अतिचांडाळा ॥ एकी दुःशीला दुर्भगा ॥ १३ ॥ एकीचा तो क्रोध गाढा ॥ एकी अत्यंत खादाडा ॥ एकी सोलिती दांत दाढा ॥ आरसा पुढां मांडूनी ॥ १४ ॥ एकी ऑगळा आळसिणी ॥ एकी त्या महा डाकिनी ॥ एकी सुकुमारा विलासिनी ॥ बरवेपणीं गार्विता ॥ १५ ॥ तैशी नव्हे माझी पत्नी ॥ सदा अनुकूल मजलागूनी ॥ मजसी वर्त्ते अनुरूपपणीं ॥ धर्मपत्नी धार्मिक ॥ १६ ॥ मी जेव्हां धर्मीं तत्पर ॥ तेव्हां धर्मासि ते अतिसादर ॥ मज कामीं जेव्हां आदर ॥ तेव्हां ते कामचतुर कामिनी ॥ १७ ॥ मजवांचोनि तत्त्वतां ॥ न भजे आणिका देवा देवता ॥ मज सांडूनि नवचे तीर्था ॥ माझें वचन सर्वथा नुलंघी ॥ ॥ १८ ॥ एवं रूपगुणकुलशील ॥ मजसी सदा अनुकूल ॥ पतिव्रता[१] जे केवळ ॥ पत्नी निर्मळ पैं माझी ॥ १९ ॥ मज सांडूनि शून्यगृहीं ॥ पुत्रेंसहित साध्वी पाही ॥ जातसे स्वर्गाच्याठायीं ॥ मज अपायीं[२] घालूनि ॥ ६२० ॥

॥ श्लोक ॥ सोऽहं शून्ये गृहे दीनो मृतदारो मृतप्रजः ॥ जिजीविषे किमर्थं वा विधुरो दुःखजीवितः ॥ ७० ॥

॥ टीका ॥ नाशिली स्त्री, नाशिल्या प्रजा ॥ येथें म्यां ज्यावें कोण्या काजा ॥ दुःखें प्राण जाईल माझा ॥ लोकलाजा निंदित ॥ २१ ॥ एवढें अंगीं वाजलें दुःख ॥ काय लौकिकीं दाखवूं मुख ॥ भंगलें संसाराचें सुख ॥ जिता मूर्ख ह्मणतील ॥ २२ ॥ जळो विधुराचें[४] जिणें ॥ सदा निंद्य लाजिरवाणें ॥ नये श्राद्धींचें ऑवतणें[५] ॥ सदा वसणें एकाकी ॥ २३ ॥ ऐसेनि वसतां ये लोकीं ॥ शून्यगृहीं एकाकी ॥ घड गोड नमिळे मुखीं ॥ परमदुःखी मी होईन ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ तांस्तथैवावृतान् शिग्भिर्मृत्युग्रस्तान्विचेष्टतः ॥ स्वयं च कृपणः शिक्षु पश्यन्नप्यबुधोऽपतत् ॥ ७१ ॥

॥ टीका ॥ ऐसें बोलोनि केलें काये ॥ मृतस्त्रीपुत्रांकडे पाहे ॥ काळपाशीं बांधिलीं आहे ॥ चेष्टा राहे निःशेष ॥ २५ ॥ ऐसें देखतांही अबुद्धी ॥ विवेक नधरीचि बुद्धी ॥ आपणही जाऊनि त्रिशुद्धी ॥ जाळ्यामध्यें पडियेला ॥ २६ ॥ मेल्यामागें मरणें ॥ देखों हेंचि सर्वांसि करणें ॥ परी जन्ममृत्यु निवारणें ॥ हा स्वार्थु कवणें नधरिजे ॥ २७ ॥ पहापां स्त्रीपुत्रांकारणें ॥ आपुलाही जीवू देणें ॥ परी भगवत्पदवी साधणें ॥ हें न मने सर्वथा ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ तं लब्ध्वा लुब्धकः क्रूरः कपोतं गृहमेधिनम् ॥ कपोतकान्कपोतींच सिद्धार्थः प्रययौ गृहम् ॥ ७२ ॥

॥ टीका ॥ जाळीं पडला कपोता दुर्बुद्धी ॥ झाली लुब्धकाची कार्यसिद्धी ॥ सहकुटुंब घेऊनि खांदीं ॥ निघे पारधी निजस्थाना ॥ २९ ॥ ऐसा जो कोणी गृहमेधी[६] ॥ त्यासि सर्वथा काळ साधी ॥ जैसी कपोत्याची बुद्धी ॥ तैसी सिद्धी गृहमेध्या ॥ ६३० ॥ बाळकाच्या कळकुळती ॥ मरण पावली कपोती ॥ ऐसें देखतां देखतां दुर्मती ॥ तेथें निश्चितीं उडी घाली ॥ ३१ ॥ यापरी तो कपोता ॥ कुटुंबाची मेथाँ[७] वाहतां ॥ मरण पावला सर्वथा ॥ विवेक चित्ता नधरीची ॥ ३२ ॥

---

१ पतिव्रता. २ संकटांत. ३ जगावें. ४ स्त्रीरहित पुरुषाचें. ५ अमंत्रण. ६ गृहस्थ. ७ काळजी, चिंता.

॥ श्लोक॥ एवं कुटुंब्यशांतात्मा द्वंद्वारामः पतत्रिवत् ॥ पुष्णन्कुटुंबं कृपणः सानुबंधोऽवसीदति ॥ ७३ ॥

॥टीका॥ ऐसा कुटुंबी गृहस्थु ॥ कुटुंबपोषणीं आसक्तु ॥विषयवासना *अशांतु ॥ पावे घातु सकुटुंब ॥ ३३ ॥ गृहासक्ती गृहाश्रमु ॥ तो केवळ द्वंद्वांचा आरामु ॥ कपोत्या ऐसा पडे भ्रमु ॥ वृथा जन्मु दवडावा ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ यः प्राप्य मानुषं लोकं मुक्तिद्वारमपावृतम् ॥ गृहेषु खगवत्सक्तस्त- मारूढच्युतं विदुः ॥ ७४ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ येवोनियां कर्मभूमीसी ॥ जो पावला उत्तम देहासी ॥ त्याहीमाजीं उत्तमता कैशी॥ अग्रवर्णासी पैं जन्म ॥ ३५ ॥ आलिया मनुष्यदेहासी ॥ मुक्तीचा दारवंटा मुक्त त्यासी ॥ लव निमेष एकदिवशीं ॥ यावज्जन्मेंसीं मोकळ ॥ ३६ ॥ इतरां वर्णांची हे गती ॥ मा ब्राह्मण तरी पुण्यमूर्ती ॥ ते सदा मुक्तचि असती॥ वृथा आसक्ती गुंतले॥३७॥ विद्वांसे आणि वैराग्य॥ तें ब्रह्मादिकां नलभे भाग्य ॥ वृथा-आसक्ती केले अभाग्य ॥ शिश्नोदरा सांग वेंचले ॥ ३८ ॥ मनुष्यदेहीं गृहासक्तु ॥ तो बोलिजे आरूढच्युतु ॥ कपोत्याचेपरी दुःखितु ॥ सिद्ध स्वार्थु नाशिला ॥३९॥ विषयीं सर्वथा नाहीं तृप्ती ॥ ऐसें श्रुतिपुराणें बोलती ॥ करितां विषयाची आसक्ती ॥ थित्या मुकती नरदेहा ॥ ६४० ॥ नवल नरदेहाची ख्याती ॥ रामनामाच्या आवृत्ती ॥ चारी मुक्ती दासी होती ॥ तो देहो वेंचिती विषयांसी ॥ ४१ ॥ विषयसुखाची आसक्ती ॥ कोणा नाहीं झाली तृप्ती ॥ मृगजळाचिये प्राप्ती ॥ केवीं निवती तृषार्त ॥ ४२ ॥ यालागीं जाणतेनि मनुष्यें ॥ नरदेहाचेनि आयुष्यें ॥ विषयाचेनि सायासें ॥ व्यर्थ कां पिसे कष्टती ॥ ४३ ॥ नरदेहाऐसें निधान ॥ अनायासें लाधलें जाण ॥ तंव सांडी सांडी अभिमान॥ तेणें समाधान पावसी ॥ ४४ ॥ पुढती नरदेहाची प्राप्ती ॥ होईल येथें नाहीं युक्ती ॥ यालागीं सांडूनि विषयासक्ती ॥ भावें श्रीपती भजावा ॥ ४५ ॥ कलियुगीं सुगम साधन ॥ नलगे योग याग त्याग ⁶दान ॥ करितां निर्लज्ज हरिकीर्तन ॥ चारी मुक्ती चरण वंदिती ॥ ४६ ॥ इटेसाठीं परीस पोलटे ॥ येतां कां मानिती वोखटें ॥ तैसा कीर्तनाचेनि नेटेंपाटें ॥ देवो भेटे प्रत्यक्ष ॥ ४७ ॥ एका जनार्दनु ह्मणे ॥ नश्वर देहाचेनि साधनें ॥ जनीं जनार्दनु होणें ॥ हे मुद्रा तेणें लाविली ॥ ४८ ॥ एका जनार्दना शरण ॥ तंव जनार्दनु जाहला एकपण ॥ जैसें सुवर्ण आणि कंकण ॥ दों नांवीं जाण एकचि तें ॥ ४९ ॥ तेचि एक एकादशीं ॥ श्रीकृष्ण सांगे उद्धवासी ॥ अवधूत सांगे यदूसी ॥ गुरुपदेशीउपदेशु ॥६५०॥इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे यद्ववधूतोतिहास एकाकारटीकायां सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥ मूळश्लोक ॥ ७४ ॥ ओव्या ॥ ६५० ॥ एवंसंख्या ॥ ७२४ ॥ ॥ ॥ ॥

---

१ बाग. २ब्राह्मण३विद्वान्. ४ सर्वस्वी, विकले. ५ खर्ची पडले. ६चढून पडलेला. ७ लाज न धरितां. मातीचे विटे बदला जर परीस हातीं आला, तर कोणी वाईट मानितो काय ? नाहीं त्याप्रमाणेंच ह नश्वर देह खर्ची घालून शाश्वत परमेश्वर मिळवणें वाईट काय ? ९ बदला, ऐवजीं.

* ना. लोलुप. ⁶ना. आसन.

# अध्याय आठवा.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐनमो सद्गुरु, तूं ज्योतिषी ॥ एकात्मतेचें वैदित पाहसी ॥ चिद्ब्रह्मेंसि लग्न लाविशी ॥ ॐपुण्येंसी तत्त्वता ॥१॥ वधुवरां लग्न लाविती ॥ हें देखिलें असे बहुतीं ॥ आपुली आपणा लग्नप्राप्ती ॥ हे अलक्ष्यगती गुरुराया ॥ २ ॥ लग्न लाविती हातवटी ॥ पांचां पंचकांची आटाटी ॥ चुकवूनि काळाची काळदृष्टी ॥ घटिका प्रतिष्ठी निजबोधें ॥ ३ ॥ चहूं पुरुषार्थांचें तेलवण ॥ लाडु +वाइलें संपूर्ण ॥ अहंभावाचें निंबलोण ॥ केलें जाण सर्वस्वें ॥ ४ ॥ साधनचतुष्टयाचा सम्यक ॥ यथोक्त देऊनि मधुपर्क ॥ जीवभावाची मूद देख ॥ एकाएक सांडविली ॥ ५ ॥ विषयसुख मागें सांडे ॥ तेचि पायातळीं पाय मांडे ॥ सावधान ह्मणती दोहींकडे ॥ वचन धडफुडें तें तुझें ॥ ६ ॥ व्यवधानाचें विधान तुटे ॥ सहजभावें अंत्रपाट फिटे ॥ 2शब्द उपरमोनि खुंटे ॥ मुहूर्त गोमटे पैं तुझे ॥ ७ ॥ अर्धमात्रा समदृष्टी ॥ निजबिंबीं पडे गांठी ॥ ऐक्यभावाच्या मीनल्या मुष्टी ॥ लग्नकसवटी अनुपम ॥ ८ ॥ तेथ काळा ना धवळा ॥ गोरा नव्हे ना सांवळा ॥ नोवरा *लक्षेना डोळा ॥ लग्नसोहळा तेठायीं ॥ ९ ॥ परी नवल कैसें कवतुक ॥ दुजेनविण एकाएक ॥ एकपणीं लग्न देख ॥ लाविता तूं निःशेख गुरुराया ॥ १० ॥ तुज गुरुत्वें नमूं जातां ॥ तंव आत्मा तूंचि आंतौता ॥ आंत कीं बाहेर पाहों जातां ॥ सर्वीं सर्वथा तूंचि तूं ॥ ११॥ तुझें तूंपण पाहतां ॥ माझें मीपण गेलें तत्वता ॥ ऐसें करूनियां गुरुनाथा ॥ ग्रंथकथा करविसी ॥ १२ ॥ मागील कथासंगती ॥ सप्तमाध्यायाचे अंतीं ॥ अवधूतें यदुप्रती ॥ कथा कपोती सांगितली ॥ १३ ॥ पृथ्वी आदिअंतीं चोखट ॥ कपोतापर्यंत गुरु आठ ॥ सांगीतले अतिश्रेष्ठ ॥ गुरुवरिष्ठ निजबोधें ॥ १४ ॥ उरल्या गुरूंची स्थिती ॥ अवधूत सांगेल यदुप्रती ॥ तेथें सावधान ठेवा चित्तवृत्ती ॥ श्रवणें स्थिती तद्बोधें ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ ब्राह्मणउवाच ॥ सुखमैंद्रियकं राजन् स्वर्गे नरक एव च ॥ देहिनां यद्यथा दुःखं तस्मान्नेच्छेत तद्बुधः ॥१॥

॥ टीका ॥ श्रवणीं सादरता यदूसी ॥ देखोनि सुख झालें ब्राह्मणासी ॥ तेणें सुखें निरूपणासी उल्हासेंसी करीतसे ॥ १६ ॥ तो ह्मणे राया सावधान ॥ विषयसुखाचें जें सेवन ॥ तें स्वर्ग नरकीं गा समान ॥ नाहीं अनुमान ये अर्थीं ॥ १७ ॥ भोगितां उर्वशीशीं ॥ जें सुख स्वर्गं इंद्रासी ॥ तेंचि विष्ठेमाजीं सूकरासी ॥ सूकरीपासीं निश्चित ॥ १८ ॥ हें जाणोनि साधुजन उभयभोगीं नघालिती मन ॥ 0न देववे प्रेतासि आलिंगन ॥ तेवीं साधुजन विषयांसी ॥ १९ जीत सापू धरावा हातीं ॥ हें प्राणियांसि नुपजे चित्तीं ॥ तेवीं विषयाची आसक्ती ॥ स॰

१ वधूवरांची ग्रहमैत्री. २ पंचवीसतत्वें. ३ तेलफळ, ४ अंतराय प्रतिबंध. ५ अंतःपट ६ नाहि होऊन ७-८ वधूवरांच्या मुठी परस्परांचें शक्तीची कसोटी ह्मणून धरितात.

+ना. वळिले. 2मो. शब्दप्रमाण खुंटे. *मो. लक्षवेना. 0मो. नेदवे.

नधरिती सर्वथा ॥ २० ॥ जैसें नप्रार्थितां दुःख ॥ प्राणी पावताती देख॥ तैसें नइच्छितां इंद्रियसुख ॥ भोगवी अवश्यक अदृष्ट ॥ २१ ॥ मज दुःखभोगु व्हावा ॥ हें *नावडे कोणाच्या जीवा ॥ तें दुःख आणि अदृष्ट तेव्हां ॥ तेवीं सुखाचा यांवा अदृष्टें ॥ २२ ॥ ऐसें असून उद्योग करितां ॥ तेणें आयुष्य नाशिलें सर्वथा ॥ यालागीं सांडूनि विषयावस्था ॥ परमार्थी भजावें ॥ २३ ॥ केवळ झालिया 1परमार्थ पर ॥ ह्मणसी आहारेवीण नराहे शरीर ॥ येच निर्धारीं साचार ॥ गुरु अजगर म्यां केला ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ ग्रासं सुमृष्टं विरसं महांतं स्तोकमेववा ॥ यदृच्छयैवापतितं ग्रसेदाजगरोऽक्रियः ॥ २ ॥

॥ टीका ॥ उद्योगेंवीण आहारू ॥अयाचित सेवी अजगरू ॥ डंडळोनि नसांडी धीरू ॥ निधडा निर्धारू पैं त्याचा ॥ २५ ॥ स्वभावें तो मुख पसरी ॥ सहज पडे जें भीतरीं ॥ सरस निरस विचार नकरी ॥ आहार अंगीकारी संतोषें ॥ २६ ॥ऐशीचि योगियांची गती ॥ सदा भाविती आत्मस्थिती ॥ यदृच्छा आलें तें सेविती ॥ रस आसक्ती सांडूनी ॥ २७ ॥ योगियांचा आहारू घेणें ॥ काय सेविलें हें रसना नेणे ॥ रसनापंगिस्त नाहीं होणें ॥ आहारू सेवणें निजबोधें ॥ २८ ॥ आंबट तिखट तरी जाणे ॥ परी एक स्वादें अवघें खाणें ॥ सरस निरस कांहीं नह्मणे ॥ गोड करणें निजगोडियां ॥ २९ ॥ मुख पसरालिया निर्धारा ॥ स्वभावें रिघालिया वारा ॥ तोचि आहारू पैं अजगरा ॥ तेणेंचि शरीरा पोषण ॥ ३० ॥ तैशाचि योगियांची स्थिती ॥ वाताशनें सुखें वर्तती ॥ आहारालागुनी पुढिलांप्रती ॥ न येत काकुलती सर्वथा ॥ ३१ ॥ थोडेंबहु सरस निरसासी ॥ हें कांहीं 3ह्मणणें नाहीं त्यासी ॥ स्वभावें जें आलें मुखासी ॥ तें सावकाशी सेवितू ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ शयीताहानि भूरीणि निराहारोऽनुपक्रमः ॥ यदि नोपनमेद्ग्रासो महाहिरिव दिष्टभुक् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ अजगरासि बहुकाळें ॥ यदृच्छा आहारू नामिळे ॥ तरी धारणेसि नटळे ॥ पडिला लोळे निजस्थानीं ॥ ३३ ॥ तैसें योगियासि अन्न ॥ बहुकाळें नामिळे जाण ॥ तरी करूनियां लंघासन ॥ निद्रेवीण निजतू ॥ ३४ ॥ निद्रा नाहीं तयासी ॥ परी 7निजे निजीं अहर्निशीं ॥ बाह्य नकरी उपायासी ॥ भक्ष्य देहासी अदृष्टें ॥ ३५ ॥अदृष्टीं असेल जें जें वेळे ॥ तें तें मिळेल तेणें काळें ॥ यालागीं त्याचें ध्यान नमैळे ॥ धारणा न ढळे निजबोधें ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ ओजःसहोबलयुतं बिभ्रद्देहमकर्मकं ॥ शयानो वीतनिद्रश्च नेहेतेंद्रियवानपि ॥ ४ ॥

॥ टीका ॥ अजगरासि बळ उदंड ॥ 4देहपराक्रम प्रचंड ॥ परी नकरी उद्योगाचें बंड ॥ पसरोनि तोंड पडतसे ॥ ३७॥ तैसाचि योगियां केवळ ॥ शरीरीं असे शरीर बळ ॥ बुद्धिही

---

१ दैव. २ उदय, प्राप्ती. ३ धावरून. ४ सहजगती, ५ जिव्हेचा ताबेदार. ६ वारा खाण्यानें. ७ रसयुक्त.
*ना. नाठवे. 1ना. निजपरमार्थो. 3ना. न ह्मणे आहाराशी. 7मो. निजिजे. 4ना. देह पराक्रमे.

असे अतिकुशल ॥ इंद्रियबळ पटुतरें ॥ ३८ ॥ आहारालागीं सर्वथा ॥ हेतु स्फुरों नेदी चित्ता ॥ कायावाचा मनें तत्वतां ॥ नेदी स्वभावतां दंडळूं ॥ ३९ ॥ स्वप्नजाग्रती मुकला ॥ सुषुप्ती *सांडोनि निजेला ॥ शून्याचा पासोडा +झाडिला ॥ निजीं पहुडला निजत्वें ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ मुनिः प्रसन्न गंभीरो दुर्विगाह्यो दुरत्ययः ॥ अनंतपारो ह्यक्षोभ्य-स्तिमितोद इवार्णवः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ समुद्र जो गुरु करणें ॥ त्याचीं परिस पां लक्षणें ॥ गंभीरत्व पूर्णपणें ॥ निर्मळ असणें इत्यादि ॥ ४१ ॥ समुद्र सदा सुप्रसन्न ॥ योगी सदा प्रसन्नवदन ॥ केव्हांही धुसमुशि-लेपण ॥ नव्हे जाण निजबोधें ॥४२ ॥ मीनल्या सरितांचें समळ जळ ॥ समुद्र डहुळेना अति निर्मळ ॥ तैसीं नानाकर्मे करितां सकळ ॥ सदा अविकळ योगिया ॥ ४३ ॥ जळें गंभीर सागर ॥ योगिया स्वानुभवें गंभीर॥ वेळा नुलंघी सागर ॥ नुलंघी 7योगीश्वर गुरुआज्ञा ॥४४॥ समुद्रीं नरिघवे भलत्यासी ॥ तो बुडवी जळ कल्लोळेंसी ॥ योगिया बुडवी संसाराशी ॥ भावें त्यापासीं गेलिया ॥४५ ॥ 3रिघणें निघणें जाणे जळीं ॥ तो समुद्रीं करी आंघोळी ॥ येरांसि लाटांच्या कल्लोळीं ॥ 0कासाकुळी करीतसे ॥ ४६ ॥ तैसीचि योगियासीं ॥ सलगी नकरवे भलतियासी ॥ आपभयें भीती आपैसी ॥ तो भाविकांसी सुसेव्य ॥ ४७ ॥ जाहल्या धनवंत वेव्हारा ॥ उपायीं नुलंघवे सागरा ॥ तैसें नुलंघवे योगीश्वरा ॥ नृपां सुरां किन्नरां ॥ ४८ ॥ मळ न राहे सागरीं ॥ लाटांसरिसा टाकी दुरी॥ तैसाचि मळ योगिया भीतरीं॥ ध्यानें निर्धा-रीं नराहे ॥ ४९ ॥ समुद्रीं मीनली ताम्रपर्णी ॥ तेथ झाली मुक्ताफळाची खाणी ॥ योगिया मिनली श्रद्धा येऊनी ॥ तेथ मुक्त खाणी मुमुक्षा ॥ ५० ॥ जो समुद्रामाजी रिघोनि राहे ॥ तो नानापरीचीं रत्नें लाहे ॥ योगियामाजी जो समाये ॥ त्याचे वंदिती पाये चिद्रत्नें ॥ ५१ ॥ जैशी समुद्राची मर्यादा ॥ कोणासि नकरवे कदा ॥ तैशी योगियाची मर्यादा ॥ शास्त्रां वेदां नकरवे ॥ ५२ ॥ प्रवाहेंवीण 2जळ ॥ समुद्रीं जेवीं निश्चळ ॥ मृत्युभयेंवीण अचंचळ ॥ असे केवळ योगिया ॥ ५३ ॥ समुद्रीं प्रवाहो नव्हे कहीं ॥ सदा पूर्ण ठायींच्या ठायीं ॥ तैसें योगि-या जन्ममरण नाहीं ॥ परिपूर्ण पाही सर्वदा ॥ ५४ ॥ 5समुद्रलक्षणें साधितां ॥ अधिक दशा आली हातां ॥ ते योगियाची योग्यता ॥ परीस तत्त्वतां सांगेन ॥ ५५ ॥ समुद्रामाजी जळ ॥ लाटा खालीं अतिचंचळ ॥ योगिया अंतरीं अति निश्चळ ॥ नाहीं कळवळ कल्पना ॥ ५६ ॥ समुद्र क्षोभे वेळोवेळे ॥ योगिया क्षोभेना कवणे काळें ॥ सर्वथा योगी नुचंबळे ॥ योगबळें सावध ॥ ५७ ॥ समुद्रीं भरतें पर्वसंबंधें ॥ योगिया परिपूर्ण सदानंदें ॥ समुद्रीं चढे वाहेटे चांदें ॥ योगिया निजबोधें सदा सम ॥ ५८ ॥ समुद्र सर्वांप्रति क्षार ॥ तैसा नव्हे योगी-श्वर ॥ तो सर्वां जीवांसि मधुर ॥ बोधु साचार पैं त्याचा ॥५९॥ जयासि बोधु नाहीं पुरता ॥ अनुभवूं नेणें निजात्मता ॥ त्यासि कैंची मधुरता ॥ जेवीं अपक्वता सेंदेची ॥ ६० ॥ सागरीं

---

१चांगलें २ आत्मरूपीं. ३ जो (जळीं रिघणें, निघणें). जाणतो ४ व्याकुळ. ५ सावकार. ६ नदी विशेष. ७ पौर्णिमा-आमावास्येस. ८ चंद्रामुळें. ९ न पिकलेलें सेंदाड कडू असतें.

*मो. पासोनी. +ना. झांकिला, 7ना. मुनीवर. 3मो. रिघता मार्ग जाणे जळीं. ना. रिगती मागी जाणे जळीं. 0ना. कालाबुली. 2मो. बळ. 5मो. समूळ लक्षणें.

वरुषल्या घन ॥ वृथा जाय तें जीवन ॥ तैसा योगिया नव्हे जाण ॥ सेविल्या व्यर्थपण येवों नेदी ॥ ६१ ॥ अल्पही योगिया होय घेता ॥ तेणें निवारी भवव्यथा ॥ यालागीं मुमुक्षीं सर्वथा ॥ भगवद्भक्तां भजावें ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ समृद्धकामो हीनो वा नारायणपरो मुनिः ॥ नोत्सर्पेत नशुष्येत सरिद्भिरिव सागरः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ वर्षाकाळीं सरिता सकळ ॥ घेऊन आल्या अमूप जळ ॥ तेणें हर्षें हर्षिजेना प्रबळ ॥ नचढे जळ जळाब्धी ॥ ६३ ॥ ग्रीष्मकाळाचिये प्राप्ती ॥ सरितांचे यांवे राहती ॥ तें माननियां खंती ॥ अंपांपती वोहटेना ॥ ६४ ॥ तैसेंचि योगियाच्या ठायीं ॥ नाना समृद्धि आलिया पाही ॥ अहंता नभरी देहीं ॥ गर्व कांहीं चढेना ॥ ६५ ॥ समृद्धि वेंचलिया पाठीं ॥ खंती नाहीं योगिया पोटीं ॥ तो नारायणपरदृष्टी ॥ सुखसंतुष्टी वर्त्तत ॥ ६६ ॥ संपत्तीमाजी असतां ॥ मी संपन्न हें नाठवे चित्ता ॥ दरिद्र आलिया दरिद्रता ॥ नेणे सर्वथा योगिया ॥ ६७ ॥ दरिद्र आणि संपन्नता ॥ दोन्ही समान त्याचिया चित्ता ॥ नाहीं प्रपंचाची आसक्तता ॥ नारायणपर तत्त्वतां निजबोधें ॥६८॥ या प्रपंचाचा कठिण लाग ॥ नाशासि मूळ स्त्रीसंग ॥ येचिविषयीं गुरु पतंग ॥ केला चांग परियेसी ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ दृष्ट्वा स्त्रियं देवमायां तद्भावैरजितेंद्रियः ॥ प्रलोभितः पतत्यंधे तमस्यग्नौ पतंगवत् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ दैवी गुणमयी जे माया ॥ तिचें सगुण स्वरूप केलिया स्त्रिया ॥ तेथें प्रलोभ उपजला प्राणियां ॥ भोग भोगावया स्त्रीसुख ॥ ७० ॥ हावभाव विलासगुणीं ॥ वक्रकटाक्षांच्या बाणीं ॥ पुरुषधैर्यकवच भेदोनी ॥ हृदयभुवनीं संचरल्या ॥ ७१ ॥ दारुण कटाक्षांच्या घायीं ॥ पुरुष धैर्य पाडिलें ठायीं ॥ योषितांबंदीं पाडिले पाही ॥ भोगकारागृहीं घातले ॥ ७२ ॥ स्त्रीभोगाचें जें सुख ॥ तें जाण पां केवळ दुःख ॥ तोंडीं घालितां मधुर विख ॥ परिपाकीं देख प्राणांत ॥ ७३ ॥ दीपाचिया अंगसंगा ॥ कोण सुख आहे पतंगा ॥ बळें आलिंगू जातां पैं गा ॥ मरणमार्गा लागला ॥ ७४ ॥ पुढिला पतंग निमाला देखती ॥ तरी मागिल्या दीपीं अति आसक्ती ॥ तेवीं स्त्रीकामें एक ठकती ॥ एका अतिप्रीती पतंग न्यायें ॥ ७५ ॥ तेवीं विवेकहीन मूर्खा ॥ लोलुप्य उपजे स्त्रीसुखा ॥ 7 तत्संगें मरण लोकां ॥ नचुके देखा सर्वथा ॥ ७६ ॥ दीपरूपाचेनि कोडें ॥ पतंग जळोनि स्नेहीं बुडे ॥ तेवीं स्त्रीसंगें अवश्य घडे ॥ पतन रोकडें अंधतमीं ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ योषिद्धिरण्याभरणांबरादिद्रव्येषु मायारचितेषु मूढः ॥ प्रलोभितात्मा ह्युपभोगबुद्ध्या पतंगवन्नश्यति नष्टदृष्टिः ॥ ८ ॥

---

१ ओघ, प्रवाह. २ समुद्र. ३ फार लोभ. ४वक्र. ५ धैर्य हाच अंगरखा. ६जागच्याजागीं. ७ स्त्रियेच्या कैदेंत. ८ परिणामीं. ९ प्राणाचा नाश. १० तेलांत.

7 ना. तत्संसर्गें.

॥ टीका ॥ ⁵पाहा पां कांता आणि सोनें ॥ वस्त्रें आभरणें रत्नें ॥ मायेनें रचिलीं पडेणें ॥ पतनाकारणें जनाच्या ॥ ७८ ॥ एकली योषिता नरकीं घाली ॥ सुवर्णलोभें नरक बळी ॥ रत्नें भूषणें तत्काळीं ॥ नरकमेळीं घालिती ॥ ७९ ॥ ते अवघेचि अनर्थकारी ॥ मीनले योषिताशरीरीं ॥ ते देखतांचि पुरंध्री ॥ जनासि उरी मग कैसेनी ॥ ८० ॥ अंगीं वेताळाचा संचारा ॥ त्यावरी पाजिलिया मदिरा ॥ मग डुलतां नाचतां त्या नरा ॥ वोढावोरा +पैं नाहीं ॥ ८१ ॥ कां भांडाचे तोंडीं भंडपुराण ॥ त्यावरी आला शिमग्याचा सण ॥ मग करितां वाक्यविटंबन ॥ आवरी कोण तयासी ॥ ८२ ॥ हो कां मोहक मदिरा सर्वांसि ॥ त्यांत घातलें उन्मादद्रव्यासी ॥ सेवन करितां त्या रसासी ॥ पार भ्रमासी पैं नाहीं ॥ ८३ ॥ तैसें सोलिव मोहाचें रूप ॥ तें जाण योषिता स्वरूप ॥ त्याहीवरी खटाटोप ॥ वस्त्रें पडँप भूषणें ॥ ८४ ॥ काजळ कुंकू अलंकार ॥ लेऊनि विचित्र अंबर ॥ वनिता शोभत सुंदर ॥ मायेचे विकार विकारले ॥८५॥ माया अजितेंद्रिया बाधी ॥ दासांसंमुख नसे त्रिशुद्धी ॥ ज्याची अतिप्रीती गोविंदीं ॥ त्यासि कृपानिधी रक्षिता ॥ ८६ ॥ कैशारीतीं रक्षी भक्त ॥ मुळीं आत्मा आत्मीं नाहीं तेथ ॥ स्त्रीरूपें भासे भगवंत ॥ भक्त रक्षित निजबोधें ॥ ८७ ॥ वनितें देखोनि गोमटी॥ विवेकाची होय नष्ट दृष्टी ॥ प्रलोभें उपभोगा देती मिठी ॥ ते दुःख कोटी भोगिती ॥ ८८ ॥ देखोनि दीपरूपीं झगमगी ॥ उपभोगबुद्धी पतंगीं ॥ उडी घालितां वेगीं ॥ जळोनि आगीं नासती ॥ ८९ ॥ एवं योषितारूपें माया ॥ ⁸ उपभोगें भुलवी प्राणिया ॥ जे विमुख हरीच्या पायां ॥ त्यांसीच माया भुलवित ॥ ९० ॥ मधुकरीचेनि विंदाणें ॥ मधुकैर म्यां गुरु करणें ॥ दुःख नेदितां कार्य साधणें ॥ तेंही लक्षणें परीस पां ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ स्तोकं स्तोकं ग्रसेत् ग्रासं देहो वर्तेत यावता ॥ गृहानहिंसन्नातिष्ठेद्वृत्तिं माधुकरीं मुनिः ॥ ९ ॥

॥ टीका॥ भ्रमर रिघोनि पुष्पामधीं ॥ फूल तरी कुंचुंबों नेदी ॥ आपुली करी *अर्थसिद्धी ॥ चोखट बुद्धी भ्रमराची ॥ ९२ ॥ तैसीच योगियांची परी ॥ ग्रासमात्र घरोघरीं ॥ भिक्षा करोनि उदर भरी ॥ पीडा नकरी गृहस्थां ॥ ९३ ॥ प्राणधारणेपुरतें ॥ योगी मागे भिक्षेतें ॥ समर्थ-दुर्बळ-विभागातें ॥ न मानूनि चित्तें सर्वथा ॥९४॥ रिघोनि कमळणीपाशीं ॥ भ्रमर लोभला आमोदांसीं ॥ पद्मसंकोचें अस्तासी ॥ तेंचि भ्रमरासी बंधन ॥ ९५ ॥ जो कोरडें काष्ठ भेदोनि जाये ॥ तो कमळदळीं गुंतला ठाये ॥ प्रिया दुखवेल ह्मणोनि राहे ॥ निर्गमें न पाहे आपुला ॥ ९६ ॥ तैसाचि जाण संन्यासी ॥ एकेठायीं × राहिल्या लोलुप्यैसी ॥ तेंचि बंधन होय त्यासी ॥ विषयलोभासी गुंतला ॥ ९७ ॥

---

१ किल्ला, वाडा. २ मिळाले. ३ स्त्री. ४ स्थिति, बचाव. ५ प्रतिबंध, मर्यादा. ६ विचकट गाणीं गाणारी एक जात, तमासगीर. ७ अलंकार, शोभा. ८ इंद्रिय न जिंकणारास. ९ भक्तांसमोर. १० स्त्री. ११ चातुर्यास्तव. १२ भ्रमर. १३ चुरडूं. १४ श्रीमंत दरिद्री हा भेद. १५ सुगंधास. १६ सुटका.

⁵मो. दिव्यकांता आणि सोनें. +ना. त्यां. ⁸मो. उपभोगें बुद्धी भुलवी प्राणियां ना. उपभोगबुद्धी भुलवी प्राणिया. *ना. कार्यसिद्धी. ×ना राहिला.

॥ श्लोक ॥ अणुभ्यश्च महद्भ्यश्च शास्त्रेभ्यः कुशलो नरः ॥ सर्वतः सारमादद्यात्पुष्पेभ्यइव षट्पदः ॥१०॥

॥ टीका ॥ अतिलहान सुमनें कांहीं ॥ भ्रमरा तेथ उपेक्षा नाहीं ॥ रिघोनी त्याच्याही ठायीं ॥ आमोद पाही सेवितु ॥ ९८ ॥ थोरथोरा ज्या कमळणी ॥ विकासल्या 7सनर्थपर्णी ॥ त्यांच्याहीठायीं रिघोनी ॥ सारांश सेवुनी जातसे ॥ ९९ ॥ तैसाचि योगिया नेटकू ॥ शास्त्रदृष्टी अति विवेकू ॥ नकरी लहान थोर तर्कू ॥ सारग्राहकू होतसे ॥ १०० ॥ वेदांतीं ब्रह्मस्थिती ॥ बोलिली मानी यथानिगुतीं ॥ इतर स्तोत्रीं ब्रह्मव्युत्पत्ती ॥ तेही अतिप्रीतीं मानितू ॥ १ ॥ पंडितांचें वचन मानी ॥ साधारणु बोलिला हितवचनीं ॥ तेंही अतिआदरें माननी ॥ सार निवडोनी घेतसे ॥ २ ॥ प्रीति व्हावया पतीच्या मानसीं ॥ कुळवधू मानी सासूसासऱ्यांसी ॥ मान देतसे त्यांच्या दासासी ॥ तेचि प्रीतीसी लक्षूनी ॥ ३ ॥ भेसळल्या क्षीरनीरासी ॥ निवडूनि घेइजे राजहंसीं ॥ तैसा विवेकयुक्त मानसीं ॥ सारभागासी घेतसे ॥ ४ ॥ सर्वभूतीं भगवद्भावो ॥ हा सारभाग मुख्य पहा हो ॥ हे निष्ठा ज्यासि महाबाहो ॥ त्यासी अपावो स्वप्नीं नाहीं ॥ ५ ॥ भरल्या जगा आंतू ॥ सारभागी तो योगयुक्तू ॥ यदूसि अवधूतू सांगतू ॥ गुरुवृत्तांतू लक्षणें ॥ ६ ॥ गुरुत्वें म्यां मानिली माशी ॥ एक गाया दोंप्रकारेंसीं ॥ एक ते ' मोहळमासी ' ॥ ' ग्रामवासी ' दुसरी ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ सायंतनं श्वस्तनं वा न संगृह्णीत भिक्षितम् ॥ पाणिपात्रोदरामत्रो मक्षिकेव न संग्रही ॥ ११ ॥

॥ टीका ॥ पहा पां घरींची माशी ॥ बैसल्या साखरेच्या राशीं ॥ हातीं धरोनि घाली मुखाशी ॥ संग्रहो तिसी पैं नाहीं ॥ ८ ॥ हृ होईल सायंकाळां ॥ हे भक्षीन प्रातःकाळां ॥ ऐसा संग्रहो वेगळा ॥ नाहीं केला मक्षिका ॥ ९ ॥ ऐशी योगसंन्यासगती ॥ प्राप्त भिक्षा घेऊनि हातीं ॥ तिशीं निक्षेपु मुखाप्रती ॥ संग्रहस्थिती त्या नाहीं ॥ ११० ॥ भिक्षेलागीं पाणिपात्र ॥ सांठवण उदरमात्र ॥ यावेगळें स्वतंत्र ॥ नाहीं घर मात्र सांठवणें ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ सायंतनं श्वस्तनं वा न संगृह्णीत भिक्षुकः ॥ मक्षिकाइव संगृह्णन् सह तेन विनश्यति ॥ १२ ॥

॥ टीका ॥ सायंकाळप्रातःकाळासी ॥ भक्ष्यसंग्रहो नसावा भिक्षूसी ॥ संग्रहें पावती नाशासी ॥ येविषयीं मधुमासी गुरु केली ॥ १२ ॥ रिघोनि नानासंकटस्थानासी ॥ मधुसंग्रहो करी मधुमाशी ॥ तो संग्रहोचि करी घाताशी ॥ मधु न्यावयासी जे येती ॥ १३ ॥ संग्रहो यत्नाचिया चाडा ॥ मोहळ बांधिती अवघड कडां ॥ ते दुर्गमीं रिगमु करिती गाढा ॥ अर्थचाडा मधुहरें ॥ १४ ॥ कडा झाडितां मोहळासी ॥ नाश होतसे माशियांसी ॥ संग्रहाची जाती ऐशी ॥ +जीवघातासी ॥ करवितू ॥ १५ ॥ ऐसें देखोनियां जनीं ॥ भक्त भिक्षु योगी सज्जनीं ॥ संग्र-

१ पुष्प. २ आदरी. ३ तत्त्व. ४ पतिव्रता. ५ दूधपाण्यास. ६ हात हेंच भांडें. ७ मरण. ८ चढण्यास कठीण अशा कड्यावर. ९ मध नेणारे.

7मो. संपूर्णपर्णी. +ना. निजघातासी.

हो न करावा भरंवसेनी ॥ नाश निदानीं ×दिसतसे ॥ १६ ॥ आचरावें सत्कर्म ॥ संग्रहावा शुद्धधर्म ॥ हेंचि नेणोनियां वर्म ॥ *धनकामें नाशती ॥ १७ ॥ अर्थविनाशाचें फळ ॥ दुसरें एक नाशाचें मूळ ॥ विशेषनाशाचें आळवाळें ॥ स्त्री केवळ ओळख पां ॥ १८ ॥ मूळ नाशासी जीवितां ॥ कनक आणि योषितां ॥ जंवजंव यांची आसक्तता ॥ तंवतंव चढता भवरोग ॥ १९ ॥ कनक आणि कामिनी ॥ ज्यासि नावडे मनीहुनी ॥ तोचि जनार्दन जनीं ॥ भरंवसेनी ओळख पां ॥ १२० ॥ जो सुख इच्छील आपणाशी ॥ तेणें नातळावें स्त्रियेसी ॥ येचिविषयीं मदगजासी ॥ गुरु विशेषीं म्यां केला ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ पदाऽपि युवतीं भिक्षुर्न स्पृशेद्दारवीमपि ॥ स्पृशन्करीव बध्येत करिण्या अंगसंगतः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ पहा पां पाण्ड्यांयन भद्रजाती ॥ त्यापुढें मनुष्य तें किती ॥ ते हस्तिणीचे अंगसंगतीं ॥ बंधन पावतां मनुजांचें ॥ २२ ॥ जो दृष्टीं नाणी मनुष्यांसी ॥ तो स्त्रियां वश केला मानवांसी ॥ त्याचेनि बोलें उठी बैसी ॥ माथां अंकुशीं मारिजे ॥ २३ ॥ एवं जिणावेया संसारासी ॥ जे स्वधर्मनिष्ठ संन्यासी ॥ तिहीं देखोनियां योषितांसी ॥ लांगवेगेंसी पळावें ॥२४ नको स्त्रियांची भेटी ॥ नको स्त्रियांसि गोष्टी ॥ स्त्री देखतांचि दिठीं ॥ उठाउठीं पळावें ॥ २५ ॥ पळतपळत पायांतळीं ॥ आल्या काष्ठाची पुतळी ॥ तेही नातळावी कुशळीं ॥ निर्जीव स्त्री छळी पुरुषातें ॥ २६ ॥ अनिरुद्धें स्वप्नीं देखिली उखा ॥ तो धरूनि नेला चित्ररेखा ॥ बाणासुरें बांधिला देखा ॥ कृष्ण सखा जयाचा ॥ २७ ॥ त्यासि सोडवणेलागी हरी ॥ धांवतां आडवा आला कामारी ॥ युद्ध झालें परस्परीं ॥ शस्त्रास्त्रीं दारुण ॥ २८ ॥ एवं हरिहरां भिडतां ॥ जो बांधला स्वप्नींचिया कांतां ॥ तो सहसा न सुटेचि सोडवितां ॥ इतरांची कथा कायसी ॥ २९ ॥ पहापां स्वप्नींचिया कांता ॥ अनिरुद्धासी केली निरुद्धता ॥ 3मा साचाचि स्त्री हातीं धरितां ॥ निर्गमता त्या कैची ॥ १३० ॥ आपण्या पुरुष म्हणविती ॥ शेखी स्त्रियांचे पाय धरिती ॥ त्यांसि कैसेनि होईल मुक्ती ॥ स्त्रीसंगतीं अधःपात ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ नाऽधिगच्छेत्स्त्रियं प्राज्ञः कर्हिचिन्मृत्युमात्मनः ॥ बलाधिकैः स हन्येत गजैरन्यैर्गजो यथा ॥ १४ ॥

॥टीका॥ क्रीडतां गजीमाजी गजपती ॥ त्यावरी सबळ भद्रजाती ॥ येऊनियां युद्ध करिती ॥ निजबळें मारिती तयातें ॥३२ ॥ तो मारोनियां हस्ती ॥ त्या हस्तिणी समस्ती ॥ सबळ भोगी भद्रजाती ॥ नाशाप्रती स्त्री मूळ ॥३३ ॥ अहल्येचिया संगतीं ॥ गौतमें विटंबिला अमरपती ॥ भस्मासुरासि नाशप्राप्ती ॥ स्त्रीसंगेंतीस्तव जाहली ॥ ३४ ॥ देखोनि ०तिलोत्तमा उत्तम वधू ॥ सुंद उपसुंद सखे बंधू ॥ स्त्रीअभिलाषें चालिला क्रोधू ॥ सुहृदसंबंधु विसरले ॥ ३५ ॥ मग स्त्रीविरहें युद्धाच्या ठायीं ॥ दोघे ।निमाले येरयेरांचे घायीं ॥ शेखीं स्त्रीभोगही नाहीं ॥ मर-

---

१ अळें. २ जिवाच्या नाशास मूळ. ३ स्त्री. ४ साठ वर्षांचा. हत्ती. ५ जिंकावयास. ६ सत्वर. ७ बाणासुरकन्या. ८ तिची सखी. ९ कैद केला. १० अनिरुद्धास, कृष्णपुत्रास ११ रुद्र. १२ स्त्रीनें. १३ बंधन. १४ इंद्र. १५ मोहिनीचे नादानें.

×मो. होत असे. *मो. धनकाम. 3मो. मांसाची. ०मो. तिलोत्तमासंबंधु. ।मो. मिनले.

णमूळ पाही योषिता ॥ ३६ ॥ ऐशाची पूर्वकल्पींची कथा ॥ अवतारी श्रीकृष्ण नांदता ॥ तेणें शिशुपाळ गांजोनि सर्वथा ॥ हिरोनि कांता पैं नेली ॥ ३७ ॥ एवं सुरनरपशुप्रती ॥ नाशासि मूळ स्त्रीसंगती ॥ तिचेनि संगें गृहासक्ती ॥ कलहप्राप्ती स्त्रीमूळ ॥ ३८ ॥ ग्राम्यस्त्रियांचे संगतीं जाणें॥ तो बैसला मरणा धरणें ॥ मरण आल्याही नकरणें ॥ जीवें प्राणें स्त्रीसंग ॥ ३९ ॥ वेश्येचे संगतीं जातां॥ ०बळाधिक करी घाता॥'निरंतर *स्वपत्नी भोगितां ॥ नाहीं बाधकता हें नव्हणे' ॥ ॥ १४० ॥ ' अतिश्रम स्त्री सेवितां ॥ कामु पावे उन्मत्तता ॥ उन्मत्त कामें सर्वथा ॥ अधःपाता नेइजे ' ॥ ४१ ॥ एवं हा ठायोवरी ॥ स्त्रीसंग कठिण भारी ॥ क्वचित्संगू झाल्यावरी ॥ नरकद्वारीं घालील ॥ ४२ ॥ नरकीं घालील हे वार्ता ॥ ×उधाराची कायसी कथा ॥ नरकरूप ग्राम्ययोषिता ॥ पाहे सर्वथा निर्धारें ॥ ४३ ॥ स्त्री आणि दुसरा अर्थू ॥ हाचि ये लोकीं घोर अनर्थू ॥ येणें अंतरला निजस्वार्थू ॥ शेखीं करी घात प्राणियाचा ॥ ४४ ॥

॥श्लोक॥ न देयं नोपभोग्यं च लुब्धैर्यद्दुःखसंचितम् ॥ भुंक्ते तदपि तच्चान्यो मधुहेवार्थविन्मधु ॥ १५ ॥

॥ टीका ॥ स्वयें खाय ना धर्म न करी ॥ घरच्यांसि खाऊं नेदी दरिद्री ॥ मधुमक्षिकेच्या परी॥ संग्रहो करी कष्टेंनी ॥ ४५ ॥ माशा मोहळ बांधिती बळें ॥ माजी सांचले मधाचे गोळे ॥ ते देखोनि जगाचे डोळे ॥ उपायबळें घेवो पाहती ॥ ४६ ॥ मग झाडीं खोडीं अरडीं दरडीं ॥ तेथिच्या तेथ जग झोडी ॥ भरती मधाचिया कावडी ॥ ते सेविती गोडी श्रीमंत ॥ ४७ ॥ माशा मधु न खाती काकुळती ॥ झाडी त्याचे हात माखती ॥ स्वादु श्रीमंत सेविती ॥ ज्यांसि लक्ष्मीपती प्रसन्न ॥ ४८ ॥ तैसेंचि कृपणाचें यक्षधन ॥ नाहीं दान धर्म रक्षण ॥ त्यातें तस्कर नेती मारून ॥ त्यांसही दंडून राजा नेत ॥ ४९ ॥ जे शिणोनि संग्रह करिती ॥ त्यासि नव्हे भोगप्राप्ती ॥ ते द्रव्यें अपरिग्रही सेविती ॥ दैवगती विचित्र ॥ १५० ॥ प्रयासीं गृहस्थ करवी अन्न ॥ तें संन्यासी न शिणतां जाण ॥ करूनि जाय भोजन ॥ अदृष्ट प्रमाण ये अर्थीं ॥ ५१ ॥ यालागीं दैवाधीन जो राहे ॥ तो संग्रहाची चाड न 7वाहे ॥ तें अदृष्टचि साह्य आहे ॥ कृपणता वांयें करिताती ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ सुदुःखोपार्जितैर्वित्तैराशासानां गृहाशिषः ॥ मधुहेवाग्रतो भुंक्ते यतिर्वै गृहमेधिनाम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ दुःखें उपार्जूनि वित्त ॥ गृहसामग्री नानापदार्थ ॥ त्याचे पाक करवी गृहस्थ ॥ निजभोगार्थ आवडीं ॥ ५३ ॥ तेथें समयीं आला अतीत ॥ संन्यासी ब्रह्मचारी अनाथ ॥ गृहस्था आधीं तो सेवित ॥ तोंड पहात गृहमेधी ॥ ५४ ॥ जैसें दवडून मोहळमाशियांसी ॥ मधुहर्ता मधु प्राशी ॥ तैसें होय गृहस्थासी ॥ नेती संन्यासी सिद्धपाकू ॥ ५५ ॥ समयीं पराङ्मुख झालिया यती ॥ सकळ पुण्यें क्षया जाती ॥ यथाकाळीं आलिया अतिथी ॥ स्वधर्म रक्षिती सर्वस्वें ॥ ५६ ॥ अर्थसंग्रहाची बाधकता ॥ तुज म्यां सांगीतली तत्त्वतां ॥ भृंग गुरु केला सर्वथा ॥ तेही कथा परियेसी ॥ ५७ ॥

१ वेश्यांचे. २ स्त्री एक आणि द्रव्य दुसरें. ३ मध मिळवितो त्याचे. ४ ठेवा. ५ चोर. ६ संचय न करितां. ७ व्यर्थ, ८ मिळवून. ९ अतिथी. १० गृहस्थ, गृहपति. ११ आयते तयार अन्न. १२ हरिण.
०ना. बळाधिक्य. *मो. स्वप्नी. ×ना. उद्धाराची. 7मो. पाहे.

॥ श्लोक॥ ग्राम्यगीतं न शृणुयाद्यतिर्वनचरः क्वचित् ॥ शिक्षेत हरिणाद्बद्धान्मृगयोर्गीतमोहितात् ॥ १७ ॥

॥ टीका ॥ ग्राम्यजनवार्ता ॥ कां ग्राम्यस्त्रियांच्या गीता ॥ ऐके जो कां तत्त्वतां ॥ बंधन सर्वथा तो पावे ॥ ५८ ॥ अखंड पाहतां दीपाकडे ॥ घंटानादें झालें वेडें ॥ मृग, ×पाहों विसरला पुढें ॥ फांसा पडे सर्वथा ॥ ५९ ॥ ग्रामयोषितांचें गीत ॥ ऐकतां कोणाचें भुलेना चित्त ॥ मृगाच्या ऐसा मोहित ॥ होय निश्चित निजस्वार्था ॥ १६० ॥ जो बोलिजे तापसाचा मुकुटी॥ ज्यासि स्त्रियांसी नाहीं भेटगोष्टी ॥ तो ऋष्यशृंग उठाउठीं ॥ स्त्रीगीतासाठीं भुलला ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ नृत्यवादित्रगीतानि जुषन् ग्राम्याणि योषिताम् ॥ आसां क्रीडनको ॥ वश्य ऋष्यशृंगो मृगीसुतः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ ॥ मधुर +वीणा[३]गुणगुणित ॥ ग्राम्य[१]स्त्रियांचें गीत नृत्य ॥ देखतां पुरुष वश्य होत ॥ जैसें गळबंधस्थ वानर ॥ ६२ ॥ जो तापसांमाजीं जगजेठी ॥ जो जन्मला मृगीच्या पोटीं ॥ जो नेणे स्त्रियांचीं [२]भेटीगोठी ॥ नपाहे दृष्टीं योषिता ॥६३॥ तो ऋष्यशृंग-स्त्रीदृष्टीं ॥ वश्य झाहला उठाउठी ॥ यांचे योषितांचे [५]पाठोवाटी ॥ त्यांचे गोष्टीमाजी वर्ते ॥ ६४॥ [४]गारुड्याचें वानर जैसें ॥ स्त्रिया छंदें नाचे तैसें ॥ प्रमदादृष्टीं जाहला पिसें ॥ विवेकू मानसें विसरला ॥ ६५ ॥ विसरला तपाचा खटाटोप ॥ विसरला [६]विभांडक बाप ॥ विसरला ब्रह्मचर्यकृत संकल्प ॥ स्त्रियानुरूप नाचतू ॥ ६६ ॥ स्त्रीबाधे एवढा बाधू ॥ संसारीं आणिक नाहीं गा सुबद्धु ॥ [७]नकोनको स्त्रियांचा विनोदु ॥ दुःखसंबंधु सर्वांशीं ॥ ६७ ॥ वारिलें नाइकावें ग्राम्य गीता ॥ हें सत्य सत्य गा सर्वथा ॥ तेथ हरिकीर्तन हरिकथा ॥ झाल्या परमार्थता ऐकावें ॥ ६८ ॥ [८]रामनामें विवर्जित ॥ ग्रामणीं बोलिजे तें ग्राम्यगीत ॥ तें नाइकावें निश्चित ॥ कवतुकें तेथ नवजावें ॥ ६९ ॥ मीनें म्यां गुरू करणें ॥ तेंहीं अवधारा लक्षणें ॥ रसनेचेनि लोलुप्यपणें ॥ जीवें प्राणें जातसे ॥ १७० ॥

॥ श्लोक ॥ जिव्हयाऽतिप्रमाथिन्या जनो रसविमोहितः ॥ मृत्युमृच्छत्यसद्‌बुद्धिर्मीनस्तु बडिशैर्यथा ॥ १९ ॥

॥टीका॥ 'अर्थसंग्रहें' जीवघातू ॥ 'स्त्री आसक्तीं अधःपातू' ॥ 'रसनालोलुप्यें पावे मृत्यु ॥ त्रिविध घातू जीवासी ॥ ७१ ॥ ज्यासि *रसनालोलुप्यता गाढी ॥ त्यासि अनर्थाचि जोडे जोडी ॥ दुःखाच्या भोगवी कोडी ॥ °रसनागोडी बाधक ॥७२॥ रसना [9]आमिषाची गोडी॥ लोलुप्यें मीनु [3]गिळी उंडी ॥ सर्वेचि गळ टाळू फोडी ॥ मग चरफडी अडकलिया ॥ ७३॥ पाहतां रस उत्तम दिसत ॥ भीतरीं रोगांचे गळ गुप्त ॥ रसआसक्ती जे सेवित ॥ ते चरफडित भवरोगें ॥ ७४ ॥ *गळीं अडकला जो मासा ॥ तो जिता ना मरे चरफडी जैसा ॥ तेवीं रोगू लागल्या [7]माणसा ॥ दुःख दुर्दशा भोगित ॥ ७५ ॥ जो रसनालोलुप्यें-

१ वेश्यांचें. २ भेटीची वार्ता देखील. ३ वीण्याचे तारेचा मंजूळ ध्वनी. ४ गळपट्ट्यांतलें. ५ पाठोपाठ. ६ विभांडक आपला बाप आहे हेंही विसरला. ७ गांवकुटाळ. ८ मासा. ९ मांसाचा कवळ.

×मो. पाहोनि सरला. +मो. वीणागुणी ध्वनीत. *ना. रसना लोलुप्यतेची गोडी°मो. रसनागाढी. [9]मो. आंविसाची. ना. अविनासांची. [3] मो. घाली उडी. *मो. गळीं अडकलियां आंविसा. [7]मो. मानसा.

प्रमादी ॥ त्यासि कैंची सद्बुद्धी ॥ जन्ममरणें निरवधी ॥ भोगी त्रिशुद्धी रसदोषें ॥ ७६ ॥ रस सेविलियासाठीं ॥ भोगवी जन्माचिया कोटी ॥ हें नघडे ह्मणसी पोटीं ॥ राया ते गोठी परियेसि ॥ ७७ ॥ इंद्रियांची ⁴सजीवता ॥ ते रसने आधीन सर्वथा ॥ +रसनाद्वारें रस घेतां ॥ उन्मत्तता इंद्रियां ॥ ७८ ॥ मातली जे इंद्रियसत्ता ॥ ते नेऊन घाली अधःपाता ॥ रसना नजिणतां सर्वथा ॥ भवव्यथा चुकेना ॥ ७९ ॥ आहारेंवीण देह नचले ॥ सेविल्या इंद्रियवर्ग खवळे ॥ ※ रसनांजयाचें मूळ कळे ॥ तैं दुःखें सकळें मावळती ॥ १८० ॥

॥ श्लोक ॥ ॥ इंद्रियाणि जयंत्याशु निराहारा मनीषिणः ॥ वर्जयित्वातु रसनं तन्निरन्नस्य वर्धते ॥ २० ॥

॥ टीका ॥ ॥ °आहार वर्जूनि साधक ॥ इतर इंद्रियें जिंतिलीं देख ॥ तंव तंव रसना वाढे अधिक ॥ ते अजिंक न जिंकवे ॥ ८१ ॥ इंद्रियांसि आहाराचें बळ ॥ तीं निराहारें झालीं विकळ ॥ तंव तंव रसना वाढे प्रबळ ॥ *रसनेचें बळ निरन्नें ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ तावजितेंद्रियो न स्याद्विजितान्येंद्रियः पुमान् ॥ न जयेद्रसनं यावज्जितं सर्वं जिते रसे ॥ २१ ॥

॥ टीका ॥ ⁰निरन्नें इंद्रियें जिंतिलीं ॥ तीं जिंतिलीं हे मिथ्या बोली ॥ अन्न घेतांचि सरसावलीं ॥ सावध झालीं निजकर्मी ॥ ८३ ॥ जंव रसना नाहीं जिंकिली ॥ तंव जितेंद्रिय मिथ्या बोली ॥ जैं साचार रसना जिंकिली ॥ तैं वाट मोडिली विषयांची ॥ ८४ ॥ विषया आंतील गोडपण ॥ रसने आंतील जाणपण ॥ दोहींशी ऐक्य केल्या जाण ॥ रसना संपूर्ण जिंतिली ॥ ॥ ८५ ॥ ⁵सर्वां गोडियांचें गोड आहे ॥ ते गोडीस जो लागला राहे ॥ त्यासीचि रसना वश्य होये ॥ रस अपाय नबाधिती ॥ ८६ ॥ रसनाजैताचें वाधावणें ॥ तेणें ब्रह्मसायुज्यीं पडे ⁶ठाणें ॥ सोहळा परमानंदें भोगणें ॥ रसना जेणें जिंतिली ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ पिंगला नाम वेश्याऽऽसीद्विदेहनगरे पुरा ॥ तस्या मे शिक्षितं किंचिन्निबोध नृपनंदन ॥ २२ ॥

॥ टीका ॥ अवधूत ह्मणे नृपनंदना ॥ वेश्या गुरु म्यां केली जाणा ॥ तिच्या शिकलों ज्या लक्षणा ॥ ते राया विचक्षणा अवधारी ॥ ८८ ॥ पूर्वी विदेहाचे नगरीं ॥ पिंगला नामें वेश्या वास करी ॥ तिशीं आसेनिरासेवरी ॥ वैराग्य भारी उपजलें ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ सा स्वैरिण्येकदा कांतं संकेत उपनेष्यती ॥ अभूत्काले बहिर्द्वारि बिभ्रती रूपमुत्तमम् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ ते स्वैरिणी स्वेच्छाचारी ॥ सायंकाळीं उभी द्वारीं ॥ नाना अळंकार अंबरीं ॥ शृंगार कुसरी शोभत ॥ १९० ॥ आधींच रूप उत्तम ॥ वरी शृंगारिली मनोरम ॥ करावया ग्राम्यधर्म ॥ पुरुष उत्तम पहातसे ॥ ९१ ॥

---

१ जिव्हा. २ जिव्हा जिंकण्याचे. ३ अन्न नखाल्यानें. ४ जयाचे. ५ आशेची निराशा झाल्यानें. ६ वेश्या. ७ वस्त्रानें. ८ मैथून.

⁴मो. रसजीविता. ना. साजीवता. +मो. स्वप्नद्वारें. ※मो. रसनेचें जया मूळ कळलें. °ना. आहार वर्जेने साधकें. *मो. ना. जिव्हेचें बळ निरान्नें. ⁰मो. निराहारें. ⁵ना. सर्वां गोडिया. मो. सर्व गोडी. ⁶मो. पेणें.

॥ श्लोक ॥ मार्ग आगच्छतो वीक्ष्य पुरुषान्पुरुषर्षभ ॥ तान् शुल्कदान्वित्तवतः कांतान्मेनेऽर्थकामुका ॥ २४ ॥

**॥ टीका ॥ सगुण सुरूप धनवंत ॥ कामकौशल्यें पुरवीत आर्त ॥ अर्थ देऊनि करी समर्थ॥ ऐसा कांत पहातसे ॥ ९२ ॥ ऐकगा पुरुषश्रेष्ठा ॥ पुरुष येतां येतां देखे वाटा ॥ त्यासि खुणावी नेत्रवाटा ॥ कामचेष्टा दावूनि ॥ ९३ ॥**

॥ श्लोक ॥ आगतेष्वपयातेषु सा संकेतोपजीविनी ॥ अप्यन्यो वित्तवान्कोऽपि मामुपैष्यति भूरिदः ॥ २५ ॥

**॥ टीका ॥ येत्या पुरुषास हाणी खडा ॥ एकासा ह्मणे घ्याजी विडा ॥ डोळा घाली जात्याकडा ॥ एकापुढां भंवरी दे ॥ ९४ ॥ ठेऊनि संकेतीं जीवित ॥ ऐसे नानासंकेत दावित ॥ पुरुष तिकडे नपाहत ॥ येत जात कार्यार्थी ॥ ९५ ॥ गेल्या पुरुषातें निंदित ॥ द्रव्यहीन हे आसक्त ॥ रूपें विरूप अत्यंत ॥ उपेक्षित धिक्कारें ॥ ९६ ॥ आतां येईल वित्तवंत ॥ अर्थदानी अतिसमर्थ ॥ माझा धरोनियां हात ॥ कामआर्त पुरवील ॥ ९७ ॥**

॥ श्लोक ॥ ॥ एवं दुराशया ध्वस्तनिद्रा द्वार्यवलंबती ॥ निर्गच्छंती प्रविशती निशीथं समपद्यत ॥ २६ ॥

**॥ टीका ॥ ॥ ऐसें दुराशा भरलें चित्त ॥ निद्रा नलगे उद्वेगित ॥ द्वार धरोनि तिष्ठत ॥ काम वांछित पुरुर्वेसीं॥९८॥रिघों जाय घराभीतरीं ॥ सांचल ऐकोनि रिघे बाहेरी ॥ रिघतां निघतां येरझारीं ॥ मध्यरात्री पैं झाली ॥ ९९ ॥ सरली पुरुषाची वेळ ॥ रात्र झाली जी प्रबळ ॥ निद्रा व्यापिले लोकां सकळ ॥ पिंगला विव्हळ ते काळीं ॥ २०० ॥**

॥ श्लोक ॥ तस्या वित्ताशया शुष्यद्वक्त्राया दीनचेतसः ॥ निर्वेदः परमो जज्ञे चिंताहेतुः सुखावहः ॥ २७ ॥

**॥ टीका ॥ तुटला आशेचा जिव्हाळा ॥ सुकले वोंठ वाळला गळा ॥ काळा उतरली मुखकमळा ॥ खेदु आगळा चिंतेचा ॥ १ ॥ वित्त नयेचि हाता ॥ तेणें ते झाली दीनचित्ता ॥ वैराग्यें परम वाढली चिंता ॥ 5सुखस्वार्था ते हेतू ॥ २ ॥**

॥ श्लोक ॥ तस्या निर्विण्णचित्ताया गीतं शृणु यथा मम ॥ निर्वेद आशापाशानां पुरुषस्य यथा ह्यसिः ॥ नह्यंगाजातनिर्वेदो देहबंधं जिहासति ॥२८॥

**॥ टीका ॥ कैसें वैराग्य उपजलें तिसी ॥ जे चिंतीत होती विषयासी ॥ त्या विटली विषयसुखासी ॥ छेदक आशेसी वैराग्य ॥ ३ ॥ तेणें वैराग्यें विवेकयुक्त ॥ पिंगलेनें गाइलें गीत ॥ तें आइक राया समस्त ॥ चित्तीं सुचित्त होऊनि ॥ ४ ॥**

---

१ इच्छा. २ द्रव्य देऊन. ३ वांकड्या नजरेनें. ४ काम चेष्टासूचक. ५ जाणाऱ्याकडे. ६ गिरकी मारित्ये. ७ खुणांवर. ८ चालण्याचा आवाज. ९ ओलावा.

**5मो. सुखसर्वथा.**

॥ टीका ॥ ऐक राया विवेकनिधि ॥ वैराग्य नाहीं ज्याचे बुद्धी ॥ ज्यासि जन्ममरणाची आधि व्याधी ॥ प्रतिपदीं बाधक ॥ ५ ॥ अनुताप नाहीं ज्यासी ॥ विवेक नुपजे मानसीं ॥ तो संसाराची आंदणी दासी ॥ आशापाशीं बांधिजे ॥ ६ ॥ त्यासि मोहममतेची *गादी ॥ घालिजे देहबुद्धीची बेडी ॥ अहोरात्र विषय भरडी ॥ अर्धे घडी नराहे ॥ ७ ॥ जराजर्जरित वांकले ॥ माजी ×पडले अखंड लोळे ॥ फुटले विवेकाचे डोळे ॥ मार्ग नकळे ०विध्युक्त ॥८॥ त्यासि अव्हांसव्हा जातां ॥ अंधकूपीं पडे दुश्चित्ता ॥ तेथूनि निघावया मागुता ॥ उपावो सर्वथा नेणती ॥ ९ ॥ तेथ काया मनें वाचें ॥ निघणें नाहीं जी साचें ॥ तेथ फणकाविला लोभ विंचें ॥ चढणें त्याचें अनिवार ॥ २१० ॥ तेथ निंदेचिया तिडका ॥ आंत बाहेर निघती देखा ॥ वित्तहानीचा थोर भडका ॥ जळजळ देखा द्वेषाची ॥११॥ अभिमानाचे आळेपिळे ॥ महत्त्व उमासे येती बळें ॥ तरी *विषयदळणें आगळें ॥ दुःखें लोळे गेहसेजे ॥ १२ ॥ ऐशीं अवैराग्यें बापुडीं ॥ पडलीं देहाचे बांदवडीं ॥ भोगितां दुःखकोडी ॥ सबुडबुडीं बुडालीं ॥ १३ ॥ पहापां नीच सर्व वर्णासी ॥ 1निंद्य कर्में निंदिती कैशी ॥ वैराग्य उपजलें वेश्येसी ॥ देहबंधासी छेदिलें ॥ १४ ॥ देहबंध छेदित्या 7उक्ती ॥ वेश्या बोलिली नानायुक्ती ॥ झाली पिंगलेसि विरक्ती ॥ चक्रवर्ती परीस पां ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ पिंगलोवाच ॥ अहो मे मोहविततिं पश्यताविजितात्मनः ॥ या कांतादसतः कामं कामये येन बालिशा ॥ २९ ॥

॥ टीका ॥ मिथ्या मोहाचा विस्तार ॥ म्यां वाढविला साचार ॥ माझ्या मूर्खपणाचा पार ॥ पाहतां विचार पांगुळे ॥ १६ ॥ नाहीं अंतःकरणासि नेम ॥ अपार वाढविला भ्रम ॥ असंत पुरुषांचा काम ॥ मनोरम मानितां ॥ १७ ॥ जरी स्त्रीसि पुरुष पाहिजे ॥ तरी जवळील पुरुष नलाहिजे ॥ हेंचि मूर्खपण माझें ॥ सदा भजें असंतां ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ संतं समीपे रमणं रतिप्रदं वित्तप्रदं नित्यमिमं विहाय ॥ अकामदं दुःखभयादिशोकमोहप्रदं तुच्छमहं भजेऽज्ञा ॥ ३० ॥

॥ टीका ॥ सत्पुरुषाची प्राप्ती ॥ जवळी असतां नेणें असंती ॥ ज्यासी केलिया रती ॥ कामनिवृत्ति तत्काळ ॥ १९ ॥ काम निवर्तवूनि देख ॥ अनिवार +पुरवी नित्य सुख ॥ वित्तदाता तोचि एक ॥ अलोलिक पैं देणें ॥ २२० ॥ सकळ ऐश्वर्य निजपदेंसी ॥ संतोषोनि दे रतीसी ॥ रमवूं जाणे नरनारींसी ॥ रमणू सर्वांसी तो एकू ॥ २१ ॥ सांडोनि ऐशिया कांतासी ॥ माझी 2मूढमती पहा कैशी ॥ नित्य ०अकामदा पुरुषांसी ॥ कामप्राप्तीसी भजिन्नलें ॥ २२ ॥ आपुला पूर्ण नकरवे काम ॥ ते मज केवीं करिती निष्काम ॥ त्यांचेनि संगें मोहभ्रम ॥ दुःख परम पावलें ॥ २३ ॥ त्यांचेनि सुख नेदवेचें मातें ॥ परी झाले दुःखाचे दाते ॥ भयशोक आधिव्याधींतें ॥ त्याचेनि सांगातें पावलें ॥ २४ ॥

---

१ इकडे तिकडे. २ खोल अडांत. ३ लोभरूप धिंचवानें. ४ गृहशय्येवर. ५ बंधनांत. ६ दुष्टपुरुषांच्या. ७ हृदयस्थ. ८ वेश्या. ९ भोग. १० देववत नाहीं.

*मो. गोडी. ×ना. पडिला मो. पडली. ०ना. विधानोक्त. मो. विधिनोक्त. *मो. विषय दुःखें आरंबळणें. 1मो. निंद्यकर्य निसी निसी. 7ना. युक्ती. +मो. करवी. 2 ना. मूर्खता. मो. मूढता. ०ना. अमंदा. मो. अर्कदा.

॥ श्लोक ॥ अहो मयाऽऽत्मा परितापितो वृथा सांकेत्यवृत्त्याऽतिविगर्ह्यवार्त्तया ॥ स्त्रैणान्नराद्याऽर्थतृषोनुशोच्यात् क्रीतेन वित्तं रतिमात्मनेच्छती ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ जारपुरुषापासोनि सुख ॥ इच्छितें ते मी केवळ मूर्ख ॥ वृथा परितापू केला देख॥ मज असुख म्यां दीधलें ॥ २५ ॥ स्त्रैण पुरुष ते नराधम ॥ वेश्यागामी त्याहूनि अधम ॥ त्यांत कृपण तो अधमाधम ॥ त्याचा समागम वांछिती ॥ २६ ॥ जितुक्या अति निंदिता वृत्ती ॥ मज आतळतां त्या भीती ॥ योनिद्वारें जीविकास्थिती ॥ नीच याती व्यभिचारु ॥ २७ ॥ अल्प द्रव्य जेणें देणें ॥ त्याची जाती कोण हें नाहीं पाहणें ॥ याहोनि काय लाजिरवाणें ॥ निंदित जिणें पैं माझें ॥ २८ ॥ जया पुरुषासि देह विकणें ॥ तें अत्यंत हीनदीनपणें॥ काय सांगों त्याचीं लक्षणें ॥ सर्व गुणें अपूर्ण ॥ २९ ॥ वित्त नदेववे कृपणता ॥ काम नदेववे पुरता ॥ प्रीति नकरवे तत्त्वतां ॥ भेटी मागुता तो नेदी ॥ २३० ॥ ऐशिया पासाव [4]सुख ॥ वांछितां वाढे परम दुःख ॥ जळो त्याचें न पाहें मुख ॥ वोकारी देख येतसे ॥ ३१ ॥ एवं जारपुरुषाची स्थिती ॥ आठवितां चिळसी येती ॥ पुरे पुरे ते संगती ॥ चित्तवृत्ती वीटली ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ यदस्थिभिर्निर्मितवंशवंश्यस्थूणं त्वचारोमनखैः पिनद्धम् ॥क्षरन्नवद्वारमगारमेतद्विण्मूत्रपूर्णं मदुपैति काऽन्या ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ नरशरीर गृह सांकडें॥आदीं पाखाड्या तुलयीं हाडें ॥ अस्थींच्या मेढी दोहींकडे ॥ वोले कातडेनी मढियेलें ॥ ३३ ॥ त्यासि सर्वांगीं *सगळे ॥ दीधले रोमावळीचे खिळे ॥ वाळूनि नखाचे खोबळे ॥ अग्रीं [5]अग्रबळें बुजिले ॥ ३४ ॥ अस्थि मांस चर्म बांधा ॥ सर्वांगीं आवळूनि दिधला सांदा ॥ रंगीत चर्म रसनास्वादा ॥ पुढिले बांधा बाधिली ॥ ३५ ॥ वायुप्रसरण परिचारें ॥ केलीं प्राणापानरंध्रें ॥ वरिलें डळमळीत शिखरें ॥ वाळांकुरें [9]लाविलीं ॥ ३६ ॥ बुजूनि भीतरील सवेडी ॥ बांधाटिलें नवनाडी ॥ विष्ठामूत्रांची गादी ॥ नित्य परवडी सांठवण ॥ ३७ ॥ भीतरिले अवकाशीं ॥ दुर्गंधि उठली कैशी ॥ तेंचि प्रवाह अहर्निशीं ॥ नवद्वारांसी वाहताती ॥ ३८ ॥ अखंड परव्हे वाहती मळें ॥ देखोनी ज्याचें तें ×कंटाळे ॥ अहर्निशीं धुतां जळें ॥ कदा निर्मळे ते नव्हती ॥ ३९ ॥ सांगतांचि हे गोष्टी । ओकारी येतसे पोटीं ॥ ऐशियास मी भुललें करंटी ॥ विवेकदृष्टीं नपाहे ॥ २४० ॥ अस्थि मांसाचा कोथळा ॥ विष्ठामूत्रांचा गोळा ॥ म्यां आलिंगिला वेळोवेळां ॥ जळो कंटाळ नयेचि ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ विदेहानां पुरे ह्यस्मिन्नहमेकैव मूढधीः ॥ याऽन्यमिच्छंत्यसत्यस्मादात्मदात्काममच्युतात् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ या विदेहाचे नगरीं ॥ मूर्ख मीचि एक देहधारी ॥ हृदयस्थ सांडूनि श्रीहरी ।

१ क्लेश. २ दुःख. ३ स्त्रीलंपट. ४ उदरनिर्वाह. ५ पासून. ६ केसाचे. ७ बुजवण. ८ रोमांकुर. ९ फटी, अवकाश. १० विचारदृष्टीनें.

4 मो. कामसुख. * मो. सज्जिले. 5मो. आगळे. 9ना. बांधिली मो. लांबली. × मो. आंग

असंतां नरीं व्यभिचारु ॥ ४२ ॥ असंत पुरुष नेणों किती ॥ ज्यां भोगिले अहोरातीं ॥ सुख नपवेचि निश्चितीं ॥ रति भगवंतीं जंव नाहीं ॥ ४३ ॥ जो निकटवर्ती हृदयस्थ ॥ पुरुषीं पुरुषोत्तम अच्युत ॥ वीर्यच्युतीवीण रमत ॥ संतोषें देत निजात्मा ॥ ४४ ॥ अच्युतें ज्यासि निज सुख दीधलें ॥ तें सुख *च्यवेना कांहीं केलें ॥ ऐशिया हृदयस्था विसरलें ॥ आणिका भुललें +अकामदा ॥ ४५ ॥ अकामद ते नाशवंत ॥ त्यासी संग केलिया दुःखाचि देत ॥ कैसें माझें मूर्ख चित्त ॥ त्यासी आसक्त पैं होतें ॥ ४६ ॥ त्या आसक्तीची झाली तडातोडी ॥ लागली अच्युतसुखाची गोडी ॥ ज्याचें सुख भोगितां चढोवढी ॥ घडियाघडी वाढतें ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ सुहृत्प्रेष्ठतमो नाथ आत्मा चायं शरीरिणाम् ॥ तं विक्रीयात्मनैवाहं रमेऽनेन यथा रमा ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ जो सोयरा माझा हृदयस्थू ॥ सुख प्रीति प्रिय अच्युतू ॥ तोचि 8सर्वात्मा सर्वगतू ॥ नाथ कांतू तो माझा ॥ ४८ ॥ त्यासी आपुलें सर्वस्वसाटी ॥ विकत घेईन उठाउठी ॥ परमानंदें देईन मिठी ॥ गोठी चावटी सांडोनी ॥ ४९ ॥ रमा झाली पायांची दासी ॥ मी भोगीन अनोरिसी ॥ सर्वकाळीं सर्वदेशीं ॥ सर्वरूपेंसी सर्वस्वें ॥ २५० ॥

॥ श्लोक ॥ कियत्प्रियं ते व्यभजन् कामा ये कामदा नराः ॥ आद्यंतवंतो भार्याया देवा वा कालविद्रुताः ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ सांडूनि हृदयस्था अच्युतातें ॥ वरावें नरा ×निर्दैवातें ॥ तंव ते द्वैतभयें भयचकितें ॥ कालग्रस्तें सर्वदा ॥ ५१ ॥ जे निजभयें सर्वदा दुःखी ॥ ते भार्येसि काय करिती सुखी ॥ अवघीं पडलीं काळमुखीं ॥ न दिसे ये लोकीं सुखदाता ॥ ५२ ॥ असो नराची ऐसी गती ॥ त्रूं अमरांमाजीं अमरपती ॥ 9वेळेंत ते चौदा निमती ॥ पदच्युति अमरेंद्रा ॥ ५३ ॥ एवं सुर नर लोक लोकीं ॥ आत्ममरणें सदा दुःखी ॥ ते केवीं भार्येसि करिती सुखी ॥ भजावें मूर्खीं ते ठायीं ॥ ५४ ॥ धन्य माझी भाग्यप्राप्ती ॥ येचिक्षणीं येचिरातीं ॥ झाली विवेक वैराग्यव्युत्पत्ति ॥ रमापती तुष्टला ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ नूनं मे भगवान् प्रीतो विष्णुः केनापि कर्मणा॥ निर्वेदोऽयं दुराशाया यन्मे जातः सुखावहः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ ये जन्मींचें माझें कर्म ॥ पाहतां केवळ निंद्य धर्म ॥ मज तुष्टला पुरुषोत्तम ॥ पूर्वजन्मसामग्र्या ॥ ५६ ॥ मज कैचें पूर्वजन्मीं साधन ॥ ज्याचें नाम पतितपावन ॥ कृपाळु जो जनार्दन ॥ त्याचें कृपेनें हें 1घडलें ॥ ५७ ॥ दुष्ट दुराशा व्यभिचारु ॥ भगद्वारा चालवीं संसारु ॥ तिसि मज वैराग्ययुक्त विचारु ॥ विष्णु साचारु तुष्टला ॥ ५८ ॥ जरी असतें पूर्वसाधन ॥ तरी निंद्य नव्हतें मी आपण ॥ योनिद्वारा कर्माचरण ॥ पतित पूर्ण मी एक ॥ ५९ ॥

१ प्रीति. २ अंश पावेना. ३ इच्छा पुरविण्यास असमर्थ अशास. ४ आपला मीपणा देऊन. ५ वेगळी. ६ ब्रह्मदेवाच्याएका दिवसांत चौदा इंद्र होऊन जातात.

* मो. वेचवेना ना. चेवेना. + मो. कामदा. 8 ना. अंतरात्मा मो. अंतःकरणें. ×ना. नरदेवातें. 9 ना. ते विळोनि मो. ते विळनी. 1 ना. कळे.

यापरी मी पूर्ण पतित ॥ पतितपावन जगन्नाथ ॥ तेणें कृपा करून येथ ॥ केलें विवेकयुक्त वैरागी ॥२६०॥ तेणें वैराग्यविचारें देख ॥ दुष्टदुराशेचें फिटलें दुःख ॥ मज झालें परम सुख ॥ निजसंतोख पावलें ॥ ६१ ॥ दुःख आदळतां अंगासी ॥ वैराग्य नुपजे अभाग्यासी ॥ भगवंतें कृपा केली कैशी ॥ दुःखें निजसुखासी दीधलें ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ मैवं स्युर्मंदभाग्यायाः क्लेशा निर्वेदहेतवः ॥ येनानुबंधं निर्हृत्य पुरुषः शममृच्छति ॥ ३७ ॥

॥टीका॥ अंगीं आदळतां दुःखद्वंद्व ॥ अभाग्यासि ये सबळ क्रोध ॥ थितां विवेक होय अंध ॥ भाग्यमंद ते जाणा ॥ ६३॥ दुःख देखतांचि दृष्टीं ॥ ज्यासि वैराग्य विवेकेंसी उठी ॥ तेणें छेदूनियां स्नेहसुहृदगांठी ॥ पावे उठाउठी निजसुख ॥ ६४ ॥ पुरुषासि परमनिधान ॥ विवेकयुक्त वैराग्य जाण ॥ तेणें होऊनियां संपन्न ॥ समाधान पावती ॥ ६५ ॥ मी पूर्वीं परम अभाग्य ॥ *महापुरुषांचें जें निजभाग्य ॥ 5तें भगवंतें दीधलें वैराग्य ॥ जाहलें श्लाघ्य मी तिहीं लोकीं ॥ ६६ ॥

॥श्लोक॥ तेनोपकृतमादाय शिरसा ग्राम्यसंगताः॥त्यक्त्वा दुराशाः शरणं व्रजामि तमधीश्वरम् ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ कृपा करोनि भगवंतें ॥ निजवैराग्य दीधलें मातें ॥ तेणें सांडविलें दुराशेतें ॥ ग्राम्य विषयांतें छेदिलें ॥ ६७ ॥ तो उपकार मानोनि माथां ॥ त्यासि मी शरण जाईन आतां ॥ जो सर्वाधीश नियंता ॥ त्या कृष्णनाथा मी शरण ॥ ६८ ॥

॥ श्लोक ॥ संतुष्टा श्रद्दधत्येतद्यथालाभेन जीवती॥विहराम्यमुनैवाहमात्मना रमणेन वै ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ शरण गेलिया पाठीं ॥ सहज ×संतुष्ट मी ये सृष्टीं ॥ स्वभावें सत्‌श्रद्धा पोटीं ॥ जीविका गांठीं अदृष्टें ॥ ६९ ॥ मुनीश्वर भोगिती निजात्मा ॥ त्या मी भोगीन आत्मया रामा ॥ जो काम पुरवी निष्कामकामा ॥ तो परमात्मा वल्लभु ॥ २७० ॥ ब्रह्मादिक समर्थ असती ॥ ते सांडूनियां निश्चितीं ॥ भगवद्भजनाची स्थिती ॥ अतिप्रीतीं कां म्हणसी ॥ ७१ ॥ 0मजसारिखिया दुराचारी ॥ जडजीवातें उद्धरी ॥ तारकु तोचि भवसागरीं ॥ स्वामी श्रीहरी कृपाळु ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ संसारकूपे पतितं विषयैर्मुषितेक्षणम् ॥ ग्रस्तं कालाहिनाऽऽत्मानं कोऽन्यस्त्रातुमधीश्वरः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ संसारलक्षण कूप अंध ॥ तेथ विषयदृष्टीं विषयांध ॥ पडोनि गेले अंधांध ॥ बुद्धिमंद उपायीं ॥ ७३ ॥ ते कल्पनाजळीं बुडाले ॥ वासनाकल्लोळीं कवळले ॥ दंभमदादिजळचरीं तोडिले ॥ तृष्णेच्या पडले कर्दमीं ॥ ७४ ॥ दुःखाच्या खडकीं आदळले ॥ स्वर्गपायरीसी

---

१ असता. २ स्तुति करण्यास योग्य. ३ प्रियकर. ४ चिखलांत.

* मो. माझ्या पूर्वजांचें. 5 मो. तेणें. × मो. संतुष्टी. 0 मो. मजशरीरी.

अडकले ॥ तेथूनिही एक पडले ॥ निबुंजले भवजळीं ॥ ७५ ॥ नास्तिकें गेलीं सबुडबुडीं ॥ कर्मठीं धरिल्या कर्मदरडी ॥ वेदबाह्य तीं बापुडीं ॥ पडलीं देव्हडीतळवटीं ॥ ७६ ॥ निंदेचे +शूळ-कांटे ॥ फुटोनि निघाले उफराटे ॥ द्वेषाचे पाथर मोठे ॥ हृदय फुटे लागतां ॥ ७७ ॥ कामाची उकळी प्रबळ ॥ भीतरूनि बाहेरी ये सबळ ॥ तेणें डहुळलें तें जळ ॥ होय खळबळ *जीवासी ॥ ७८ ॥ सुटले क्रोधाचे चिरे ॥ वरी पडल्या उरी नुरे ॥ वनितामेंगरीं नेलें पुरें॥ 2विवरद्वारें आतौतें ॥ ७९ ॥ तेथ अवघियांसि एकसरें ॥ गिळिलें काळें काळ अजगरें ॥ त्रिखें 6धेरिलें थोर ×घोरें ॥ ज्ञान पाठिमोरें सर्वांसी॥२८०॥सर्प चढलिया माणुसा ॥ गूळ कडू लागे कैसा ॥ निंब खाय घसघसा ॥ गोड गूळसा ह्मणोनी ॥ ८१ ॥ केवळ विषप्राय विषय कडू ॥ *तो विषय झाला जैसा मधुर लाडू ॥ अमृतप्राय परमार्थ गोडू ॥ तो जाहला कडू विषयासी ' ॥ ८२ ॥ कूपाबाहेरी वास ज्यांसी ॥ 8ते नदेखती कूपाआंतिल्यासी ॥ कूपांतले बाहेरिल्यांसी ॥ कदाकाळेंसी न देखती ॥ ८३ ॥ ऐसिया पीडतयां जीवांसी ॥ काढावया धिवसा नव्हे कोणासी ॥ तुजवांचोनि हृषीकेशी ॥ पात्र वेगेंसी कृपाळुवा ॥८४॥ एवं 1दुःखरूप पतितां ॥ हृदयस्थु भगवंतुचि त्राता ॥ यांत्र पात्र कृष्णनाथा ॥ भवव्यथा निवारी ॥८५॥ ऐसें जाणोनि तत्त्वतां ॥ त्याच्या चरणां शरण आतां ॥ शरण गेलिया सर्वथा ॥ सहज भवव्यथा निवारे ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ आत्मैव ह्यात्मनो गोप्ता निर्विद्येत यदाऽखिलात् ॥ अप्रमत्त इदं पश्येत् ग्रस्तं कालाहिना जगत् ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ ऐसें कळलें जी तत्त्वतां ॥ येथ आपणाचि आपला 7त्राता ॥ सर्व पदार्थीं सर्वथा ॥ निर्वेदता दृढ झालें ॥ ८७ ॥ ' दृढ वैराग्यता ते ऐशी ॥ विषयो टेंकल्या अंगासी ॥ चेतना नव्हें इंद्रियांसी ॥ निद्रितापाशीं जेवीं रंभा ॥ ८८ ॥ ' अथवा वमिलिया अन्ना ॥ जेवीं वांछीना रसना ॥ तेवीं विषय देखोनि मना ॥ न धरी वासना आसक्ती ' ॥ ८९ ॥ तें वैराग्य कैसेनि जोडे ॥ तरी सावधान पाहतां रोकडें ॥ जग काळें गिळिलें चहूंकडे ॥ वेगळें पडे तें नाहीं ॥ २९० ॥ पिता पितामह काळें नेले ॥ पुत्र पौत्रां काळें गिळिलें ॥ वैराग्य नुपजे येणें बोलें ॥ तरी नागवले नरदेहा ॥ ९१ ॥ ०मृत्युलोक याचें नांव ॥ अनित्य स्वर्गाची काइसी 3हांव ॥ वैराग्येंवीण निदैवें ॥ झाले सर्व सर्वथा ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ ब्राह्मणउवाच ॥ एवं व्यवसितमतिर्दुराशां कांततर्षजाम् ॥ छित्त्वोपशममास्थाय शय्यामुपविवेश सा ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ अवधूत ह्मणे यदुसी ॥ धन्य भाग्य ते वेश्येसी ॥ वैराग्य उपजलें तिसी ॥ विवेकेंसी निजोत्तम ॥ ९३ ॥ एवं विवंचूनि निजबुद्धी ॥ परपुरुषदुराशा छेदी ॥ ज्याचेनि संगें

१ दीडतंगडीवर; सपशेल. २ तीक्ष्ण. ३ दगड. ४ स्त्रीरूप सुसरीनें. ५ व्यापिलें, लहरावलें. ६ धैर्य. ७ वैराग्य. ८ ओकलेल्या. ९ अभागी.

+ मो. स्थूळकांटे. *ना. जयाची. 2 मो. योनिद्वारें. 6 ना. धारिलें. × ना. धारे. *मो. तो प्रपंचु जाला गोडु. 8मो. ते जें देखतील कूपांतुलासी. 1मो. दृष्टरूप. 7मो. भाता. ०मो. मृत्युकाकुळतीचें नांव. 3 मो. धाव.

आधिव्याधी ॥ बहु उपाधी बाधक ॥ ९४ ॥ जे उपाधीचेनि कोडें ॥ जन्ममृत्यूंचा पूर चढे ॥ दुःखभोगाचें सांकडें ॥ पाडी रोकडें जीवासी ॥ ९५ ॥ येणें वैराग्यविवेकबळें ॥ छेदूनि दुराशेचीं मूळें ॥ उपरमु पावली एके वेळे ॥ निजात्मसोहळे ते भोगी ॥ ९६ ॥ नित्य सिद्ध सुखदाता ॥ तो हृदयस्थ कांत [3]आश्रिता ॥ विकल्प सांडूनि चित्ता ॥ वेगीं *हृदयस्थां मानली ॥ ९७ ॥ त्यासि देखतां अनुभवाचे दिठीं ॥ ऐक्यभावें घातली मिठी ॥ निजसुख पावली +गोरटी ॥ उठाउठी तात्काळ ॥ ९८ ॥ 'बोल घेऊनि गेला बोली ॥ लाज लाजोनियां गेली ॥ दृश्यद्रष्टादशा ठेली ॥ वाट मोडिली विषयाची' ॥ ९९ ॥ सुखें सुखावलें मानस ॥ तें सुखरूप झालें निःशेष ॥ संकल्प विकल्प पडले वोस ॥ दोघां सावकाश निजप्रीती ॥ २०० नोंवद पडलिया उदकांत ॥ विरोनि तया गोड करीत ॥ तेवीं निराशीं पावोनि भगवंत ॥ समरसत स्वानंदें ॥१॥ तेथ हेतूसि नाहीं ठावो ॥ निमाला भावाभावो ॥ वेडावला अनुभवो ॥ दोघां प्रीति पहाहो अनिवार ॥ २ ॥ सांडूनि मीतूंपणासी ॥ खेवं दीधलें समरसीं ॥ मग समाधीचिये शेजेशी ॥ निजकांतेसी पहुडली ॥ ३ ॥ ह्मणे [2]मायेची लागे दिठी ॥ यालागीं स्फूर्तीचिया कोटी ॥ निंबलोण +गोरटी ॥ उठाउठी ओवाळी ॥ ४ ॥ ऐशी समाधिशेजेसी ॥ पिंगला रिघे निजसुखासी ॥ अवधूत ह्मणे यदुसी ॥ वैराग्यें वेश्येसि उपरमु ॥ ५ ॥ वैराग्यें छेदिले आशापाश ॥ पिंगला झाली गा निराश ॥ निराशेसि असमसाहस ॥ सुख संतोष सर्वदा ॥ ६॥

॥ श्लोक ॥ आशा हि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम् ॥ यथा संछिद्य कांताशां सुखं सुष्वाप पिंगला ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ आशा तेथ लोलुपता ॥ आशेपाशीं असे दीनता ॥ आशा तेथ ममता ॥ असे सर्वथा नाचती ॥ ७ ॥ आशेपाशीं [6]मोहशोक ॥ आशा करवी महादोख ॥ आशेपाशीं पाप अशेख ॥ असे देख तिष्ठत ॥ ८ ॥ आशेपाशीं अधर्म सकळ ॥ आशा मानीना विटाळ ॥ आशा नेणे काळवेळ ॥ कर्म सकळ उच्छेदी ॥ ९ ॥ आशा अंत्यजातें उपासी ॥ नीचसेवन आशेपाशीं ॥ आशा न सांडी मेल्यासी ॥ प्रेतापाशीं नेतसे ॥ ३१० ॥ आशा उपजली अनंतासी ॥ नीच वामनत्व आलें त्यासी ॥ आशें दीन केलें देवांसी ॥ कथा कायसी इतरांची॥११ जगाचा जो नित्य दाता ॥ तो आशेनें केला भिकसवेता ॥ वैन्याचे द्वारीं झाला मागता ॥ द्वारपाळता तेणें त्यासी ॥ ११ ॥ 'आशा तेथ नाहीं सुख ॥ आशेपाशीं परम दुःख ॥ आशा सर्वांसी बाधक ॥ मुख्य दोष ते आशा' ॥ १३ ॥ ज्याची आशा निःशेष जाये ॥ तोचि परमसुख लाहे ॥ ब्रह्मादिक वंदिती पाये ॥ अष्टमहासिद्धी राहे दास्यत्वें ॥ १४ ॥ निराशेचा शुद्धभावो ॥ निराशेपाशीं तिष्ठे देवो ॥ निराशेचें वचन पहाहो॥रावो देवो नुलंघी॥१५॥ निराश तोचि सद्बुद्धि ॥ निराश तोचि विवेकनिधी॥चारी मुक्ती पदोपदीं ॥ नैराश्य आधीं वंदिती १६ निराशा तर्थांचें तीर्थ ॥ नैराश्य मुमुक्षूचा अर्थ ॥ निराशेपाशीं परमार्थ ॥ असे तिष्ठत निरंतर

१ एकाजातीची साखर. २ आलिंगन. ३ आत्मसुखास. ४ वामन अवतारीं-खुजेपण. ५ भिकारी. ६ बळीचेद्वारीं. ७ सहजानंद. ८ राहतो. ९ नैराश्ययुक्ताचें वचन राजा किंवा देवही उलंघित नाहीं. १० आशा सोडणें.

3 ना. असतां. * मो. हृत्कमळीं. + मो. चोखटी. 2 मो. माझी. 6 मो. महाशोक.

॥ १७ ॥ जाण नैराश्यतेपाशीं ॥ वैराग्य होऊनि असे दासी ॥ निराश पहावया अहर्निशीं ॥ हृषीकेशी चिंतितू ॥ १८ ॥ निराश देखोनि पळे दुःख ॥ निराशेमाजीं नित्यसुख ॥ निराशेपाशीं संतोख ॥ 0यथासुखें क्रीडतू ॥ १९ ॥ नैराश्येचे भेटीसि पाहीं ॥ धांवे वैकुंठींचा रावो ॥ नैराश्याचा सहज स्वभावो ॥ महादेवो उपासी ॥ ३२० ॥ निराशेपाशीं नये आधी ॥ निराशेपाशीं सकळ विधी ॥ सच्चिदानंदपदीं ॥ मिरवे त्रिशुद्धी निराशू ॥ २१ ॥ ऐकोनि निराशेच्या नांवा ॥ थोरला देवो घेत असे धांवा ॥ त्यासि देखोनियां खेंवा ॥ रूपनांवा विसरला ॥ २२ ॥ ते निराशेचा जिव्हाळा ॥ पावोनि वेश्या पिंगला ॥ जारपुरुषाशेच्या मूळा ॥ स्वयें समूळा छेदिती झाली ॥ २३ ॥ जें आशापाशाचें छेदन ॥ तेंचि समाधीचें निजस्थान ॥ ते निजसमाधी पावोन ॥ पिंगला जाण पहुडली ॥२४॥ सर्व वर्णांमाजीं वोखटी ॥ कर्म पाहतां निंद्य दृष्टीं ॥ ते वेश्या पावन झाली सृष्टीं ॥ माझे वाक्पुटीं कथा तिची ॥ २५ ॥ यालागीं वैराग्यापरतें ॥ आन साधन नाहीं येथें ॥ कृष्ण थापटी उद्धवातें ॥ आल्हादचित्तें प्रबोधी ॥ २६ ॥ अवधूत सांगे यदूसी ॥ प्रत्यक्ष वेदबाह्यता वेश्येसी ॥ ते निराश होतां मानसीं ॥ निजसुखासी पावली ॥ २७ ॥ यालागीं कायावाचाचित्तें ॥ उपासावें निराशेतें ॥ यापरतें परमार्थातें ॥ साधन येथें दिसेना ॥ २८ ॥ इतर जितकीं साधनें ॥ तितुकीं ×आशा ✻निराशे कारणें ॥ ते निराशा साधिली जेणें ॥ परमार्थ तेणें लुटिला ॥ २९ ॥ कृपा जाकळिलें अवधूतासी ॥ यदूसि धरोनि पोटासी ॥ निराशता हे जे ऐशी ॥ अवश्यतेसी साधावी ॥ ३३० ॥ एका जनार्दना शरण ॥ त्याची कृपा परिपूर्ण ॥ तोचि आशापाश छेदून ॥ समाधान पाववी ॥ ३३१ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे यद्ववधूतसंवादे एकाकारटीकायां अष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥ मूळश्लोक ॥ ४३ ॥ ओंव्या ॥ ३३१ ॥ एवं संख्या ॥ ३७४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

# अध्याय नववा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐ नमो सद्गुरु अमरपती[१] ॥ अनुभव तोचि ऐरावती ॥ स्वानंदमदें भद्रजाती ॥ उन्मत्तस्थितीं डुल्लत ॥ १ ॥ उपदेशाचें वज्र तीखें ॥ छेदी संकल्पविकल्पपांखें ॥ जडजीव ते पर्वत देख ॥ निजस्थानीं स्थापिसी ॥ २ ॥ विवेकाचे पारिजात ॥ वैराग्य सुमनीं रुणझुणित ॥ मुमुक्षुभ्रमर रिघोनि तेथ ॥ आमोदें सेवित चित्सुख ॥ ३ ॥ उपशमें तोचि बृहस्पती ॥ विश्वासें तुझा निकटवर्ती ॥ त्यासि मानिसी अतिप्रीतीं ॥ तो सभेप्रती सदस्यें ॥ ४ ॥ कृपाकामधेनूंचीं खिल्लारें ॥ श्रद्धावत्सांचेनि +हुंकारें ॥ वोळल्यीं वोरसाचेनि भरें ॥ तें दुभतें पुरे 6भाग्यवंता ॥ ५ ॥ सतेज चिंतामणीचे खडे ॥ सभोंवतीं लोळ-

---

१ आलिंगन. २ निजली. ३ चतुर्वर्णांत. ४ कृपेनें व्यापिलें. ५ इंद्र. ६ हत्ती. ७ तीक्ष्ण, धारलाविलेलें. ८ पंख. ९ सुगंध. १० शांति. ११ जवळ रहाणारा. १२ सभासद. १३ आलेल्या पान्ह्याचे भरानें.

0 मो. पावावया सुख. ×मो. आशे. ✻ ना. निराशा करणें. + ना. हुंबरे. 6मो. भागवंतां

ती चहूंकडे ॥ भक्त न पाहती तयांकडे ॥ चरणसुरवाडें सुखावले ॥ ६ ॥ स्वर्गांगना अष्टमहासिद्धी ॥ तुजपुढें नाचती नानाछंदीं ॥ त्यातें दास नपाहती त्रिशुद्धी ॥ मंदबुद्धी भाळले ॥७॥ समसाम्यें समान ॥ अढळ तुझें सिंहासन ॥ सच्चिदानंदाची गादी जाण॥ तेथें सुखासन पैं तुझें ॥ ८ ॥ पावावया तुझिया पदप्राप्ती ॥ साधनचतुष्टय संपत्ती ॥ जोडूनियां याजकें यजिती ॥ प्रत्यगावृत्तीचेनि योगें ॥ ९ ॥ जे मन *होमिती सावधानीं ॥ ऐसें भक्तभजन देखोनी ॥ तेणें भावार्थयोगें संतोषोनी ॥ निजपददानीं तूं होशी ॥ १० ॥ त्यासि निजात्मता देऊनी ॥ बैसविसी निजासनीं ॥ मरणेंवीण, अमर करूनी ॥ अमरपदीं स्थापिसी ॥ ११ ॥ इंद्रासि अहल्येशीं व्यभिचारु ॥ तुज वृंदेशीं दुराचारु ॥ इंद्र जाहला सहस्रनेत्रू ॥ तूं सर्वांगें सर्वत्र देखणा ॥ ॥१२॥ इंद्रासि दैत्य करिती दीन ॥ त्याचें पद ते घेती हिरोन ॥ तुज भक्त करिती हीन दीन ॥ पद चिद्धन ते घेती ॥ १३ ॥ ककुत्स्थ बैसला इंद्राचे स्कंधीं ॥ दुर्वास बैसला तुझ्या खांदीं ॥ इंद्र वर्ते विष्णूचे बुद्धी ॥ तूं भक्तछंदीं वर्तसी ॥ १४ ॥ रावणें बंदीं घातलें इंद्रासी ॥ तुज बळीनें राखिलें द्वारेसी ॥ इंद्र योज्ञी याग अवदानासी ॥ तूं भूमिदानासी यांचिता ॥ १५ ॥ इंद्रासि अग्निमुखें प्राप्ती ॥ तुज विश्वतोमुखेंतृप्ती ॥ ऐसा सद्गुरु तूं कृपामूर्ती ॥ अमरचक्रवर्ती गुरुराया ॥ १६ ॥ तुझी करावी विनवणी ॥ तंव तेथें नरिघे वाणी ॥ वाणी ×प्रकाशे तुझेनी ॥ वक्ता वदनीं तूं सत्य ॥ १७ ॥ एका एक जनार्दनीं ॥ तो जनार्दन वक्ता झाला वदनीं ॥ ऐसा वचनामाजीं प्रवेशोनी ॥ ग्रंथकरणी करविता ॥ १८ ॥ तेथें मुळीं निमाली अहंता ॥ अहं दवडूनि तूं कवि कर्ता ॥ एका जनार्दनु अभंगी सुता ॥ अभंगता गुरुचरणीं ॥ १९ ॥ त्यागुरुचरणाप्रसादें ॥ गुरूचीं लक्षणें विद्रदें ॥ वाखाणिलीं 2यथावबोधें ॥ यदुसंवादें अवधूतें ॥२०॥ मागें अष्टमाध्यायाच्या अंतीं ॥ असती पिंगलेसि एकांतीं ॥ विवेक *वैराग्यनिवृत्ती ॥ निजसुखप्राप्ती पावली ॥२१॥ जंवजंव अपरिग्रह होणें ॥ तंवतंव निजसुख पावणें ॥ हेंचि प्रस्तुत बोलणें ॥ तेणें ब्राह्मणें बोलिजे ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ ब्राह्मणउवाच ॥ परिग्रहो हि दुःखाय यद्यत्प्रियतमं नृणाम् ॥
अनंतं सुखमाप्नोति तद्विद्वान्यस्त्वकिंचनः ॥ १ ॥

॥ टीका ॥ ब्राह्मण म्हणे रायासी ॥ परिग्रहो जयापासीं ॥ वाढतें दुःख तयासी ॥ अहर्निशीं चढोवढी ॥ २३ ॥ कुटुंबपरिग्रहाचे आसक्ती ॥ कपोता निमाला दुर्मती ॥ आतां एकाकी परिग्रहो करिती ॥ तेही पावती दुःखातें ॥२४॥ गृहपरिग्रहें गृहस्था॥ पाषाणमृत्तिकेची ममता ॥ काडीकारणें कलहो करितां ॥ सुहृदता सांडुनी ॥ २५ ॥ निःसंगा परिग्रहो लागला कैसा ॥ शिष्यसंप्रदायें घाली फांसा ॥ शास्त्रपुस्तकसंग्रहवशा ॥ वाढवी आशा मठाची ॥ २६ ॥ त्या मठशिष्यांचें सांत्वन ॥ करितां अत्यंत होय दीन ॥ मग परिग्रहाचें उपसर्पण ॥ अपरिग्रही जाण करिताती ॥ २७ ॥ त्या मठाचिया आशा ॥ शिष्यसंप्रदायवशा ॥ कलहो लागे

१ सुखानें. २ अप्सरा. ३ याज्ञिक. ४ स्वस्वरूपाकार वृत्तीचे योगानें. ५ स्वस्थान देणारा. ६ मृत्युरहित. ७ इक्ष्वाकुच्यानात् , हा इंद्रास बैल करून त्यावर बसला होता. ८ उपेंद्रनात्यानें. ९ मागे. १० ' अग्निमुखावै देवाः ' ११ सर्व मुखांनीं. १२ अहंकार. १३निरुपाधि. १४जवळ जाणें.

* मो. होमितां. × ना. प्रवेशे. 2 ना. अर्थावबोधें. * मो. निवृत्तवृत्ती.

आपैसा ॥ विरोधू संन्यासा परिग्रहें ॥ २८ ॥ परिग्रहो जिणोनि गाढा ॥ लंगोटी त्यजूनि जाहला उवडा ॥ नागव्या माथां वेऊनि घडा ॥ लाविल्या झाडा शिंपित ॥ २९ ॥ त्या वृक्षाचें कोणी पान तोडी ॥ त्यासि आक्रोशें कलह मांडी ॥ थोर परिग्रहांची सांकडी ॥ दुःखें पीडी सर्वांतें ॥ ३० ॥ आवडीं केला जो परिग्रहो ॥ तो तो उपजवी दुःखकलहो ॥ हा होतांही अनुभवो ॥ वैराग्य पहाहो उपजेना ॥ ३१ ॥ ऐसी परिग्रहाची कथा ॥ देखोनि देखणा जो ज्ञाता ॥ आसक्ती सांडोनि सर्वथा ॥ अकिंचनपंथा लागला ॥ ३२ ॥ प्रपंच अनित्य नाशवंत॥ तेथील संग्रह काय शाश्वत ॥ ऐसें विवंचूनि समस्त ॥ अकिंचनचित्त जे जाहले ॥ ३३ ॥ परिग्रहामाजीं गाढा ॥ देह परिग्रहाचा खोडा ॥ तो मिथ्यात्वें फोडी रोकडा ॥ तो विवेकें गाढा ज्ञाता पैं ॥ ३४ ॥ जेथ देहपरिग्रह मिथ्या जाहला ॥ तो अनंतसुखाच्या घरा आला ॥ त्या सुखासी अंत नवचे केला ॥ त्या पावला निजसुखा ॥ ३५ ॥ परिग्रहो दुःखवंतू ॥ हा कुररीगुरुत्वें वृत्तांतू ॥ तुज सांगेन सार्यंतु ॥ उपहासें अवधूत बोलिला ॥ ३६ ॥ तंव राजा मनीं चमत्कारला ॥ ह्मणे मी राज्यपरिग्रहें गुंतला ॥ देहपरिग्रहें बंदीं पडला ॥ पाहिजे केला हा त्यागू ॥ ३७ ॥ ऐसा राजा सवैराग्यु ॥ करूं पाहे सर्वस्वत्यागु ॥ श्रवणें जाहला तो सभाग्यु ॥ होय योग्यु निजज्ञाना ॥ ३८ ॥ कुररीगुरुत्वें जाणा ॥ *परिग्रहत्यागविवेचना ॥ +आणावया जी मना ॥ सादर श्रवणा करीतसे ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ सामिषं कुररं जघ्नुर्बलिनो ये निरामिषाः ॥ तदामिषं परित्यज्य स सुखं समविंदत ॥ २ ॥

॥ टीका ॥ कुरर बोलिजे टिटवा ॥ पावला आमिषकवळ बरवा ॥ तेणें तेथेंचि भक्षावा ॥ तो लोभ स्वभावा ठेविला ॥ ४० ॥ तें आमिषें देखोनियां फार ॥ बळी जे निरामिष कुरर ॥ ते धांविन्नले अतिसत्वर ॥ लहान थोर मिळोनी ॥ ४१ ॥ हिरोनि वेऊं *पाहती बळें ॥ हें जाणोनि तो पुढें पळे ॥ पळतां देखोनि एकवेळे ॥ त्वरा तत्काळें वेढिला ॥ ४२ ॥ त्या आमिषाचिया चाडा ॥ थोर मांडला झगडा ॥ मारूं लागले फडफडां ॥ चहूंकडां निष्ठुर॥४३॥ एक झडपिती पांखीं ॥ एक चपेट हाणिती नखीं ॥ एक विदारिती मुखीं ॥ परमदुःखी होतसे ॥ ४४ ॥ आमिषकवळें गुंतलें मुख ॥ मारितां देऊं नशके हाक ॥ खस्तावस्त करितां देख ॥ बोलावया मुख त्या नाहीं ॥ ४५ ॥ हे माझे स्वजाती पहाहो ॥ सांडोनियां सुहृद्भावो ॥ मज कां करूं आले अपावो ॥ तो अभिप्रावो विवंची ॥ ४६ ॥ ह्मणे माझिया दुःखासि मूळ ॥ मजपाशील आमिषकवळ ॥ तो त्यजोनियां तत्काळ ॥ सुखी सुनिश्चळ बैसला ॥ ४७ ॥ जेथें आमिषकवळु पडे ॥ तेथें कलहाचा गोंधळ वाढे ॥ परस्परें फुटती मुंडें ॥ ठेंचिती तोंडें येरयेरां ॥ ४८ ॥ आमिष त्यजोनि बैसला देख ॥ तो पाहे कलहाचें कौतुक ॥ मूळ परिग्रहो तेथं दुःख ॥ परम सुख त्यागितां ॥ ४९ ॥ माड्या गोपुरें धवळारा ॥ धनधान्य नानाअंबरां ॥ रत्नें प्रवाल धनपुत्रदारा ॥ हा समुदायो खरा परिग्रहो ॥ ५० ॥ या समस्त परिग्रहाचें मूळ ॥

१ आपले आपण. २ संग्रह, स्वीकार. ३ दारिद्र्यास. ४ टिटवा. ५ मांस. ६ बलवान. ७ ज्यांच्या. जवळ मांस नव्हतें ते इतर टिटवे. ८ ओढाताण. ९ डोकीं. १० वस्त्र.

* ना. विचक्षणा. + ना. आणावाजी निजमना. * ना. ह्मणती.

देहबुद्धि गा केवळ ॥ तेही अभिमानें सबळ ॥ एवं सर्वांसी मूळ अभिमान् ' ॥ ५१ ॥ तो अभिमान जें सांडे ॥ तैं प्रपंचाचें मूळचि खंडे ॥ मूळ छेदिल्या जेवीं उलंडे ॥ अतिप्रचंडें तरुवर ॥ ५२ ॥ अभिमान देहबुद्धिजीवन ॥ देहबुद्धि संगास्तव *गहन ॥ उभयसंगू तो 0आयतन ॥ निवासस्थान परिग्रहा ॥ ५३ ॥ एवं अन्योन्य सापेक्षक ॥ येरयेरां आवश्यक ॥ याचे त्यागीं परमसुख ॥ अतिदुःख तो परिग्रहो ॥५४॥ परिग्रहत्यागाचें मूळ जाण ॥ आधीं त्यजावा अभिमान ॥ तेणेंवीण त्यागु तो विटंबन ॥ केल्या जाण होईल ॥ ५५ ॥ अभिमानें सहित सकळ सांडे ॥ तैं पडती सुखाचे ×पायेंमांडे ॥ तें सुख नबोलवे तोंडें ॥ शब्द मुरडे लाजोनी ॥ ५६ ॥ अभिमान जाऊन वर्तणें ॥ कैसें राया ह्मणसी जाण ॥ तें 4अर्भकगुरुत्व लक्षण ॥ तुज संपूर्ण सांगेन ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ न मे मानवमानौ स्तो न चिंता गेहपुत्रिणाम्॥आत्मक्रीड आत्मरतिर्विचरामीह बालवत् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ बाल माझें तुझें नह्मणे ॥ उंच नीच कांहीं नेणे ॥ यालागीं मानापमान तेणें ॥ सुखें साहणें सर्वथा ॥ ५८ ॥ तिमासांचेनि बाळकें ॥ मान् कोण हें न देखे ॥ अपमान् कैसा तें नोळखे ॥ आपुलेनि सुखें क्रीडत ॥५९॥ दुजेपणातें नातळे ॥ बालक आपुलियाचि लीलें ॥ आप आपणियाशींच खेळे ॥ आपुलेनि मेळें आपण ॥ ६० ॥ देहगेहांची चिंता ॥ बाळासि नातळे सर्वथा ॥ स्वभावेंचि निश्चिंतता ॥ चिंताकथा त्या नाहीं ॥६१॥ नदेखतां दुजी स्थिति। बाळका आपुली आपणिया प्रीती ॥ आपुली आपणिया अतिरती ॥ तैशी गती योगिय ॥ ६२ ॥ योगियासी प्रपंचाचें भान ॥ सत्यत्वें नाहीं जाण ॥ यालागीं मानापमान ॥ दोन्ही समान तयासी ॥ ६३ ॥ चित्रींचेनि सापें खादला ॥ तो चित्रींचेनि अमृतें वांचला ॥ तेवं जिण्या मरण्या मुकला ॥ निश्चळ ठेला निर्द्वंद्व ॥ ६४ ॥ गृहदारापुत्र चिंता ॥ हे समूळ मिथ्य वार्ता ॥ स्वदेहो सत्यत्वें असता ॥ तरी करूं 6लाहता चिंतेतें ॥ ६५ ॥ भवमूळ कल्पन जाण ॥ ते कल्पना मना आधीन ॥ तें मन स्वरूपीं जाहलें लीन ॥ तेव्हां वस्तु चिद्घन सर्व ॥ ६६ ॥ तेणें स्वरूपानुसंधानें ॥ सुखें क्रीडत् चिद्घनें ॥ क्रीडा दैवयोगें करणें ॥ देहाभिमा विरहित ॥६७॥ पावोनि निजसुखप्राप्ती ॥ मनादि इंद्रियें उपरमती ॥ अणुभरी स्फुरेना वृत्ती समाधि बोलती त्या नांव ॥ ६८ ॥ तेचि स्वरूपीं ठेवूनि मन ॥ बाह्यस्फूर्तीचें स्फुरे भान ॥ दशा गा व्युत्थान ' ॥ साधुजन बोलती ॥ ६९ ॥ उंबऱ्यावरी ठेविला दिवा ॥ तो जेवीं देखे दोहीं सवा ॥ तैसी व्युत्थानदशा जीवभावा ॥ ×उभयस्वभावा देखणी ॥ ७० ॥ लवण जळ समरसता ॥ तेवीं स्वरूपीं विरवूनि चित्ता ॥ समाधि व्युत्थाना हाणी लाथा ॥ निजीं निज स्वरूपता पावोनी ॥ ७१ ॥ त्यासि कोणाचा मानापमान ॥ गृहपुत्रचिंता करी कोण स्वरूपीं हारपलें मन ॥ निजसमाधान पावला ॥ ७२ ॥ मनेंवीण जें विहरणें ॥ तें बालकाचे ऐसें जाण ॥ दैवयोगें चलनवलन ॥ वृत्तिशून्य वर्तत ॥ ७३ ॥

---

१ मोठा वृक्ष. २ देह बुद्धीनें पोसलेला. ३ठिकाण. ४पायघड्या. ५बालक. ६तीन महिन्यांचें. ७खाल ८ बाजू, कांठ. ९ नाहींसें झालें. १० क्रीडा.

* मो. ग्रहण. 0 ना. अवःपतन. × मो. पायेमांडे. 4 मो. अर्भकगुरुत्वें. 6 ना. लागत × ना. स्वभावें स्वभावा.

॥ श्लोक ॥ द्वावेव चिंतया मुक्तौ परमानंद आप्लुतौ ॥ यो विमुग्धो जडो बालो यो गुणेभ्यः परंगतः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ थोर चिंतेचा आवर्त ॥ जेथ ब्रह्मादिक बुडत ॥ ते आवर्ती दोघे मुक्त ॥ परीस नेश्चित यदुवीरा ॥ ७४ ॥ दोघां नाहीं द्वैतभान ॥ दोघे नेणती मानापमान ॥ दोघे सुखें सुखसंपन्न ॥ दोघे मनेंवीण वर्तती ॥ ७५ ॥ एकासि पुढें भेटेल दुःख ॥ दुजेनि जिंतिलें सुखदुःख ॥ एकासि मुग्धतेचें सुख ॥ दुजासि देख निजज्ञानें ॥ ७६ ॥ पहापां बालकाचे ठायीं ॥ गुप्त वासना असे देहीं ॥ ते अंकुरेजोनि पाहीं ॥ अवश्य अपायीं घालील ॥ ७७ ॥ तसा नव्हे योगी गुणातीत ॥ जो पूर्णानंदें पूर्ण भरित ॥ त्यासि सुखदुःखांची मात ॥ नाहीं जगांत सर्वथा ॥ ७८ ॥ देहीं दिसे *जीव वर्तत ॥ तो कैसेनि जाहला गुणातीत ॥ ऐसें आगमी तो वृत्तांत ॥ ऐक साद्यंत सांगेन ॥ ७९ ॥ साधकें सेवूनि साधुजन ॥ वाढविला सत्वगुण ॥ वाढलेनि सत्वें जाण ॥ ज्ञानसाधन साधिलें ॥८०॥ साधिलेनि ज्ञानसाधनें ॥ छेदी रजतमांचीं विंदानें ॥ जें मोहममतेचीं दारुणें ॥ उभय भोगजन्यें +कर्मठां ॥ ८१ ॥ एवं वाढलेनि सत्वोत्तमें ॥ ※निर्दळलीं रजतमें ॥ सत्व एकलेपणें निमे ॥ स्वयें उपशमे तें जाणा ॥ ८२ ॥ जंवजंव काष्ठसंभार असे ॥ तंवतंव अग्नि [2]जाळी उल्हासें ॥ सरलेनि काष्ठलेशें ॥ अग्नि प्रवेशे निजतेजीं ॥ ८३ ॥ ऐसी जिणोनि गुणांची अवस्था ॥ योगी पावला गुणातीतता ॥ त्यासि नबाधी भवव्यथा ॥ प्रलयकल्पांता जाहलिया ॥ ८४ ॥ ज्या सुखासि नाहीं अंत ॥ तें *सुख स्वरूपें जाहलें प्राप्त ॥ ते देहीं वर्ततां देहातीत ॥ चिंता आवर्त त्यां नाहीं ॥ ८५ ॥ एकाकी जाहल्यावीण तत्वतां ॥ हे अवस्था नंचढे हाता ॥ येचिविशीं नृपनाथा ॥ कुमारी गुरुकथा सांगेन ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ क्वचित्कुमारी त्वात्मानं वृणानान्गृहमागतान् ॥ स्वयं तानर्हयामास क्वापि यातेषु बंधुषु ॥ ५ ॥

॥ टीका ॥ कोणी एक कुमारासी ॥ घरीं राखण ठेऊनि तिसी ॥ पितामाता स्वगोत्रेंसी ॥ गेलीं यात्रेसी कुलदेव्या ॥ ८७ ॥ ते कुमारीचें विवाहलग्न ॥ पूर्वी नेमलें होतें जाण ॥ त्या निश्चयालागीं ब्राह्मण ॥ घरा संपन्न पैं आले ॥ ८८ ॥ पुसती घरीं आहे कोण ॥ लाजें नोवरी धरी मौन ॥ त्यांसि नदेतां दर्शन ॥ पूजाविधान ते मांडी ॥ ८९ ॥ वातायनद्वारा आसनें ॥ दिधलीं समस्तांकारणें ॥ गंधाक्षता सुमनें पानें ॥ दिधले मानें उपचार ॥ ९० ॥ देखोनि पूजेचें विधान ॥ जाणोंसरले ते ब्राह्मण ॥ घरीं नोवरीचि आहे जाण ॥ हें चतुरलक्षण तियेचें ॥ ९१ ॥ त्यांच्या पाहुणेराची चिंता ॥ उशिरा येईल माझी माता ॥ तेकाळीं साळी [3]सडितां ॥ विलंब सर्वथा होईल ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ तेषामभ्यवहारार्थं शालीन् रहसि पार्थिव ॥ अवघ्नंत्याः प्रकोष्ठस्थाश्चक्रुः शंखाः स्वनं महत् ॥ ६ ॥

---

१ भवरा. २ संकटांत. ३ कार्य. ४ मिळत नाहीं. ५ खिडकीवाटे. ६ पाहुणचाराची. ७ ब्रीहि शाली.

*मो. जी वर्तत. +मो. कर्मठें ना. कर्मठ. ※मो. निर्दाळनि. [2]मो. जाळु. *ना. सुखस्वरूप मो. सुख सुखरूपें. [3]ना. कांडितां.

॥ टीका ॥ ऐसें विचारूनि जाण ॥ साळी कांडूनि घे आपण ॥ ते कंडणकाळींचें विंदानें ॥ चतुरलक्षण परियेसीं ॥ ९३ ॥ घावो घालितां कांडणा ॥ उठी झणत्कार करकंकणां ॥ तेणें नादें लाजोनि जाणा ॥ विचार मनामाजीं करी ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ सा तज्जुगुप्सितं मत्वा महती व्रीडिता ततः ॥ बभंजैकैकशःशंखान् द्वौद्वौ पाण्योरशेषयत् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ या शंखवलयांचा ध्वनी ॥ पडेल पाहुण्यांचे कानीं ॥ ते अत्यंत लाज मजलागूनि ॥ नववधू कांडणीं बैसली ॥९५॥ त्यांच्या कानीं ध्वनी न पडे ॥ कांडण तरी चाले पुढें ॥ ऐसें विचारोनि रोकडें ॥ कांकणांकडे पाहिलें ॥ ९६ ॥ पाहतां दिसे ते अबला ॥ विचार वृद्धाहोनि आगळा ॥ करींचा कंकणखळाळा ॥ युक्ती वेल्हाळा विभागी ॥ ९७ ॥ जरी कांकण फोडूं आतां ॥ तरी ते मुहूर्तींच अशुभता ॥ शतायु हो माझा भर्ता ॥ नफोडी सर्वथा या हेतू ॥ ९८ ॥ अतिबुद्धिमंत ते कुमारी ॥ हळूचि कंकणें उतरी ॥ ते ठेवी जतनेवरी ॥ राखे दोंकरीं दोनी दोनी ॥ ९९ ॥ दोनी कंकणें उरवूनी ॥ कांडूं बैसली कांडणीं ॥ दोहींमाजीं उठे ध्वनी ॥ ऐकोनि कानीं लाजिली ॥ १०० ॥

॥ श्लोक ॥ उभयोरप्यभूद्घोषो ह्यवघ्नंत्याः स्म शंखयोः ॥ तत्राप्येकं निराभिदद्देकस्मान्नाभवत् ध्वनिः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ ह्मणे दोघांचा संगु एके स्थानीं ॥ तेथें सर्वथा नराहे ध्वनी ॥ दोंतील एक वेगळें काढोनी ॥ बैसे कांडणीं कुमारी ॥ १ ॥ एकपणीं कांडितां ॥ ध्वनी तुटेचि तत्त्वतां ॥ तो उपदेश नृपनाथा ॥ जाहलों शिकता मी तेथ ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ अन्वशिक्षमिमं तस्या उपदेशमरिंदम ॥ लोकाननुचरन्नेताँल्लोकतत्त्वविवित्सया ॥ ९ ॥

॥ टीका ॥ जिणोनि प्रतिस्पर्धी भूपाळ ॥ किंकर केले राजे सकळ ॥ तूं अरिमर्दन सबळ ॥ मिथ्या केवळ तो गर्व ॥ ३ ॥ कामक्रोधादि अरिवर्ग ॥ न जिणतां समूळ सांग ॥ अरिमर्दन हा बोल व्यंग ॥ होईल चांग ये अर्थीं ॥ ४ ॥ कामादिक सहा वैरी ॥ येणें उपदेशशस्त्रधारीं ॥ जिणोनि घालितां तोडरीं ॥ मग संसारीं अरि नाहीं ॥ ५ ॥ लोकांवेगळा तूं अवधूत ॥ ह्मणसी कुमारी ते घरां आंत ॥ तो एकांतींचा वृत्तांत ॥ कैसेनि प्राप्त तुज जाहला ॥ ६ ॥ राहोनियां विजनस्थानीं ॥ विश्वासोनि गुरुवचनीं ॥ दृढ बैसोनि आसनीं ॥ निजतत्त्व ध्यानीं आकळिलें ॥ ७ ॥ त्याचि तत्त्वनिश्चयालागुनी ॥ मी विचरतसें मेदिनीं ॥ निजात्मभावें जनीं वनीं ॥ दृढ करोनि पाहतसें ॥ ८ ॥ होतां दृश्येंसी भेटी ॥ दृश्य दृश्यत्वें न पडे दिठी ॥ द्रष्टेपणही घालोनि पोटीं ॥ ऐशिया दृष्टीं विचरत ॥ ९ ॥ अंगीकारितां गुणत्वें गुण ॥ देखतां जगाचें दर्शन ॥ मज होतसे चैतन्यभान ॥ ऐसेन जाण मी विचरत ॥ ११० ॥ ऐशिया निजदृष्टीं वीरा ॥ मज विचरतां चराचरा ॥ अवचटें कुमारीमंदिरां ॥ त्याचि अवसरा मी

---

१ चातुर्य. २ शंखांच्या बांगड्या. ३ थांबत नाहीं. ध्वनी झाल्याशिवाय राहणार नाहीं. ४ शत्रूंचा नाश करणारा. ५ खोड्यांत. ६ एकांत ठिकाणीं.

आलों ॥ ११ ॥ करितां कंकणविवंचना ॥ निजस्वार्थाचिया खुणा ॥ पाहोनि घेतलें ज्या लक्षणा ॥ ते विचक्षणा परियेसीं ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ वासे बहूनां कलहो भवेद्वार्ता द्वयोरपि ॥ एक एव चरेत्तस्मात्कुमार्या इव कंकणः॥ १० ॥

॥ टीका ॥ जेथ होय बहुतांची वस्ती ॥ तेथ अनिवार कलहप्राप्ती ॥ दोघे बैसल्या एकांतीं ॥ वार्ता करिती बहुविधा ॥ १३ ॥ जेथें गोष्टीखालीं काळ जाये ॥ तेथें निजस्वार्थ हों नलाहे ॥ यालागीं मी पाहें ॥ विचरत आहें एकाकी ॥ १४ ॥ एकाकी एकाग्रता ॥ साधिल्या थोर लाभ ये हातां ॥ येचविषयीं शरकर्ता ॥ गुरु तत्त्वतां म्यां केला ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ मन एकत्र संयुज्याज्जितश्वासो जितासनः ॥ वैराग्याभ्यासयोगेन ध्रियमाणमतंद्रितः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ वैराग्येंवीण अभ्यासु घडे ॥ तेथ विषयचोर उठती गाढे ॥ कामाचा घाला पडे ॥ मुद्दल बुडे निजज्ञान ॥ १६ ॥ विवेकदीप करूनि पुरे ॥ निरसी अज्ञानाचें अंधारें ॥ वैराग्याचें बळ पुरें ॥ महामुद्रेचेनि योगें ॥ १७ ॥ प्राणापानांची चुकामुकी ॥ जाहली होती बहुकाळ कीं ॥ ते अभ्यासबळें एकाएकीं ॥ केली वोळखी दोघांसी ॥ १८ ॥ वोळखीसवेंचि जाण ॥ पावली जुनाट पहिली खूण ॥ दोघां पडिलें आलिंगन॥समाधान समसाम्यें ॥१९॥ दृढ बैसोनि आसनीं ॥ ऐशी प्राणापानमिळणी ॥ करूनि लाविली निशाणी ॥ ब्रह्मस्थानीं रिघावया॥२०॥ ब्रह्मगिरीचिया गडा ॥ शमदमें घालोनियां वेढा ॥ प्रत्याहाराचा झगडा ॥ पुढिलेकडा लाविला॥ ॥ २१ ॥ प्राणापानांच्या विवरीं ॥ पहिली वोळखी होती खरी ॥ माळ लाविली अभेदकरीं ॥ मन एकाग्रीं राखोनि ॥ २२ ॥ एकाग्रतेचेनि कल्लोळें ॥ पुढारें नवचे चालिले बळें ॥ उन्हाटयंत्राचेनि मेळें ॥ षट्चक्रपाळें भेदिलें ॥ २३ ॥ वैराग्याचीं वज्रकवचें ॥ निवडे वीर लेऊनि साचे ॥ एकाग्रताबळें बळाचें ॥ झळके +ध्यानाचें करीं खड्गें ॥ २४ ॥ नवल 4खड्गाचा वाहो ॥ लहान थोर निवटी पहाहो ॥ संमुख आलिया संदेहो ॥ न लगतां घावो छेदित ॥ २५ ॥ निर्दाळूनि आळसासी ॥ दासी केलें निद्रेसी ॥ ऐसें सावधान अहर्निशीं ॥ योगदुर्गासी झोंबती ॥ २६ ॥ रणरंगींचें वीर गाढे ॥ निजबळें चालिले पुढें ॥ सत्रावीचें पाणी वाढे ॥ जिंतिलें रोकडें महावीरीं ॥ २७ ॥ तेथ युद्ध जाहलें चांग ॥ कामादिक अरि षड्वर्ग॥ रणीं पाडिले अमोघ ॥ सतेज खड्ग झळकत ॥ २८ ॥ ऐसे वैरी पाडूनिया रणीं ॥ प्राशिलें सत्रावीचें पाणी ॥ तंव अनुहताची सुंडावणी ॥ दुर्गामधोनि उठली ॥ २९ ॥ तेथ सोहंवीराची एकाग्रता ॥ होता भीतरील भेद आला हातां ॥ दुर्ग राखती अहंममता ॥ मरों सर्वथा टेकली ॥ १३० ॥

॥ श्लोक ॥ यस्मिन्मनो लब्धपदं यदेतच्छनैः शनैर्मुंचति कर्मरेणून् ॥ सत्वेन वृद्धेन रजस्तमश्च विधूय निर्वाणमुपैत्यनिंधनम् ॥ १२ ॥

---

१ बाण तयार करणारा. २ पुढें. ३ इंद्रियें अंतर्मुख करणें. ४ शूर. ५ तलवार. ६ व्यापार. ७ नाहींसें करतें. ८ योगरूप किल्ला. ९जीवनकळा. १०योग्यांस ऐकूं येणारा एक दशनादांचा ध्वनि. ११ वीरघोषणा.

+ ना. ज्ञानाचें. 4 ना. खर्गाचा.

॥ टीका ॥ कामक्रोधादि महाशूर ॥ पुत्र रणीं पडले थोर ॥ तेणें दुःखें अतिजर्जर ॥ मरणतत्पर दिसताती ॥ ३१ ॥ ऐसी ऐकोनि दुर्गांची वार्ता ॥ उल्हासु वीरांचिया चित्तां ॥ उठावा दीधला मागुता ॥ दुर्ग सर्वथा घ्यावया ॥ ३२ ॥ निजधैर्यें वीर अदट ॥ निजसत्वें अति उद्भट ॥ पुढें निर्धारितां वाट ॥ थोर अचाट देखिलें ॥ ३३ ॥ कर्मरेणूंचा दुस्तर घाट ॥ विधिवादें अवघड वाट ॥ हळूहळू उल्लंघितां अचाट ॥ समूळ सपाट तो केला ॥ ३४ ॥ पुढां रजतमांचें आगड ॥ खोलपणें अत्यंत गूढ ॥ घालूनि निवृत्तीचे दगड ॥ सत्वें सुदृढ बुजिलें ॥ ३५ ॥ साचँढ नव्हतां बाहेरी ॥ जिणोनि मनकर्णिकावोवरी ॥ माळ चढली ब्रह्मगिरी ॥ ब्रह्मरंध्रीं उसळले ॥ ३६ ॥ तेथ जैताची एक घायी ॥ अनुहत निशाण लागलें पाहीं ॥ शोधितां पारखें कोणी नाहीं ॥ केलें ठायीं स्ववश ॥ ३७ ॥ तेथ रजतमांच्या वाटा ॥ सहजें जाहल्या होत्या सपाटा ॥ हरिखें रामराज्याचा चोहटा ॥ घेंडे दारवंटा पीटिले ॥ ३८ ॥ *पारिकें कोणी न दिसे दृष्टी ॥ ध्यानखड्गाची सोडिली मुष्टी ॥ वैराग्यकवचाचिया गांठी ॥ समदृष्टीं सोडिल्या ॥ ३९ ॥ ध्येय ध्यान ध्याता ॥ त्रिपुटी नदिसे पाहतां ॥ ध्यानखड्ग तत्त्वतां ॥ नधरी सर्वथा या हेतू ॥ १४० ॥ दारुण युद्धसामग्री ॥ सत्वें केली होती भारी ॥ ते सायनें सांडिलीं दुरी ॥ कोणी वैरी असेना ॥ ४१ ॥ तन्मयतेचें छत्र धरूनी ॥ ×समसाम्यसिंहासनीं ॥ बैसला सहज समाधानीं ॥ त्यागी वोवाळूनी जीवभावो ॥ ४२ ॥ शोधित वाढला सत्वगुण ॥ तेणें सर्वस्वें केलें निंबलोण ॥ पायां लागोनि आपण ॥ स्वयें जाण उपरमला ॥ ४३ ॥ जैसा अग्नि असे काष्ठाच्या मेळीं ॥ मंथिल्या काष्ठाची करी होळी ॥ काष्ठ नाशूनि तत्काळीं ॥ त्यजूनि इंगळीं उपशमे ॥ ४४ ॥ तैसें वाढोनि सत्व उत्तम ॥ नाशूनि सांडी रजतम ॥ पाठीं सत्वाचाही संभ्रम ॥ स्वयें उपरम पावला ॥ ४५ ॥ तेथें निमालें जीवाचें जीवपण ॥ ज्ञातृत्वेंसी निमालें ज्ञान ॥ निमालें प्रपंचाचें भान ॥ चिन्मात्र पूर्ण कोंदलें ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ तदैवमात्मन्यवरुद्धचित्तो न वेद किंचिद्बहिरंतरं वा ॥ यथेषुकारो नृपतिं व्रजंतमिषौ गतात्मा न ददर्श पार्श्वे ॥ १३ ॥

॥ टीका ॥ ऐशी चिन्मात्र परिपूर्णता ॥ तेथ निरोधूनि आणितां चित्तां ॥ चित्त पावे चैतन्यता ॥ जाण सर्वथा नरवीरा ॥ ४७ ॥ तेव्हां अंतरीं चैतन्यघन ॥ बाह्य चिन्मात्र परिपूर्ण ॥ आणिक न दिसे गा जाण ॥ वृत्तीनें आण वाहिली ॥ ४८ ॥ ' पाहतां ध्येय ध्याता ध्यान ॥ जेथ उल्हासें विगुंतलें मन ॥ ते संप्रज्ञातसमाधी जाण ॥ विचक्षण बोलती ॥ ४९ ॥ तेथ निःशेष समरसे मन ॥ जाहला सुखरूप चिद्घन ॥ ते समाधी परम कारण ॥ गुणेंवीण भोगिती ॥ १५० ॥ ' ब्रह्म इंद्रियां गोचर नसे ॥ गुण गेलिया डोळां *दिसे ॥ हें अनुभव्यासीचि भासे ॥ बोलावें ऐसें तें नव्हे ' ॥ ५१ ॥ येथ शास्त्रें विषम जाहलीं वादें ॥ नेतिनेति म्हणितलें वेदें ॥ थोंटावलीं योगिवृंदें ॥ अनुभवी निजबोधें जाणती ॥ ५२ ॥ तेथ हेतुमातु दृष्टांतू ॥ समूळ बुडाला समस्तू ॥ अद्वैतवादाची मातू ॥ त्या ठायांत लाजिली ॥ ५३ ॥ सबाह्य समदर्शन ॥ हे अ-

१ प्रोत्साहन, उत्तेजन. २ कर्मरूपरेणु. ३ खांचड ? ४ अस्पष्ट ध्वनि. ५ मनकर्णिकारूप ओवरी. ६ विजयाची. ७ दुसरें. ८ आपले स्वाधीन. ९ सत्वगुणानें. १० सविकल्प समाधि, किंवा ज्यांत प्रपंचाचें भान राहतें तो.

* मो. पारके ना. पारखे. × ना. भावसमसाम्य. * ना. न दिसे.

नुभवाची निर्वाण खुण ॥ शरकार गुरु केला जाण ॥ हेंचि लक्षण लक्षूनी ॥ ५४ ॥ तात्विनि +उज्जु करितां बाण ॥ दृढ लागलें अनुसंधान ॥ इतुकेन प्रपंचाचें भान ॥ खुंटलें जाण तयाचें ॥ ५५ ॥ निशाण भेरी वाजंतरें ॥ रथ गज सैन्यसंभारें ॥ राजा गेला अतिगजरें ॥ नेणिंजे शरकारें शरदृष्टीं ॥ ५६ ॥ मागूनि रायाचा हडपी आला ॥ त्यासी पुसे ये मार्गीं राया गेला ॥ समुदावो अथवा एकला ॥ नाहीं देखिला सर्वथा ॥५७॥ तो शरकारु देखिला दृष्टीं ॥ हे ऐकोनि तयाची गोष्टी ॥ जगीं एकाग्रता मोठी ॥ प्रपंच दृष्टीं येवों नेदी ॥ ५८ ॥ हेंचि साधावया साधन ॥ गृह[illegible]ण एकपण ॥ सर्प गुरु केला जाण ॥ हेंचि लक्षण देखोनि ॥ ५९ ॥

॥ श्लो[illegible] ॥ एकचार्यनिकेतः स्यादप्रमत्तो गुहाशयः ॥ अलक्ष्यमाण आचारैर्मुनिरेकोऽल्पभाषणः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ सर्प सांगात न साहे ॥ एकाकी सुखें विचरत जाये ॥ सदा सावधान राहे ॥ श्वास वांये जावों नेदी ॥ १६० ॥ तैसीच योगियाची गती ॥ न साहे द्वैताची संगती ॥ एकाकी वसे एकांतीं ॥ जनाप्रती अलक्ष्य ॥ ६१ ॥ विषमाचा संग न करी ॥ परी *समाचाही संग न धरी ॥ निघे देहसंगाबाहेरी ॥ त्वचेचेपरी सर्पाचे ॥ ६२ ॥ सदा सावधानबुद्धी ॥ लवनिमिष वायां जावों नेदी ॥ अनुसंधान त्रिशुद्धी ॥ तुटों नेदी सर्वथा ॥ ६३ ॥ सर्प बिळामाजीं रिघे बळें ॥ मार्गीं मार्ग देखती सकळें ॥ धाला भुकेला हें त्यां न कळे ॥ गेला कळे सर्वांशीं ॥ ६४ ॥ तैसाचि योगियाही योगबळें ॥ न राहे जनामाजी जनमेळें ॥ गुहेमाजीं पहिला लोळे ॥ एकला खेळे एकपणीं ॥ ६५ ॥ होकां योगियांचा आचार ॥ करितां देखती लहान थोर ॥ सविकल्पनिर्विकल्प विचार ॥ नकळे साचार कोणासी ॥ ६६ ॥ एक ह्मणती कर्मठ॥ एक ह्मणती कर्मभ्रष्ट ॥ एक ह्मणती आत्मनिष्ठ ॥ कळेना स्पष्ट कोणासी ॥ ६७ ॥ सर्पासि बोलणेंचि नाहीं ॥ बोले तरी §अल्प कांहीं ॥ तैसाच योगिया पाहीं ॥ वाग्वादीं नाहीं सादर ॥ ६८ ॥ आतुलें कृपेचेनि बळें ॥ बोले मृदु मंजुळ कोंवळें ॥ श्रवणासि दोंदें येती एकवेळे ॥ तेणें वचनमेळें निघालीं ॥ ६९ ॥ बोलणें तरी अति अल्प ॥ परी छेदी संकल्प विकल्प ॥ त्याच्या बोलाचें स्वरूप ॥ सत्यसंकल्प जाणती ॥ १७० ॥ जो एकाकी उदास ॥ ज्याचें परमार्थी मानस ॥ तेणें गृहारंभाची आस ॥ वृथा प्रयास न करावे ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ गृहारंभोऽतिदुःखाय विफलश्चाध्रुवात्मनः ॥ सर्पः परकृतं वेश्म प्रविश्य सुखमेधते ॥ १५ ॥

॥ टीका ॥ मुळीं गृहारंभ तें दुःख ॥ कष्टीं करितां दुःखकारक ॥ निपजविलें त्रिमाळिक ॥ तें अध्रुव देख सर्वथा ॥ ७२ ॥ येथें संसारचि नाशवंत ॥ देह प्रत्यक्षाकारें असंत ॥ तेथींचें गृह काय शाश्वत ॥ मूर्ख मानित मूर्खत्वें ॥७३॥ जें गर्भींच निमालें ॥ तें उपजल्या जातक केलें ॥ मृताचें जन्मनांव ठेविलें ॥ तैसें गृह केलें असंत ॥ ७४ ॥ तोही असंत आरंभ कुडा ॥ मृत्तिकेसाठीं लावी झगडा ॥ भांडवी दगडासाठीं कां लांकुडा ॥ सुहृदभिडा सांडोनी ॥ ७५ ॥

१ एक वाव. २ समजलें नाहीं. ३ विडे देणारा. ४ समूह. मंडळी. ५ व्यर्थ. ६ कातसारखें. ७ कानांस दोंदें फुटलीं. कान उत्सुकतेनें पुढें आले. ८ तिमजली घर. ९ क्षणिक. १० खोटा. ११ उद्यम. १२ खोटा. १३ स्नेह्यांची भीडभाड सोडून.

+ ना. रज्जु. *ना. परी शमाचा मो. परिश्रमाचा. § ना. स्वल्प.

वोळंबा घर करी सायासें ॥ त्यामाजीं सर्प राहे सावकाशें ॥ न शिणतां अप्रयासें ॥ परघरवासें संतुष्ट ॥ ७६ ॥ तैसाचि योगियाही जाण ॥ न धरी देहगेह अभिमान ॥ परगृहीं वसे निरभिमान ॥ सुखसंपन्न सर्वदा ॥ ७७ ॥ एकही गृह न करावें ॥ हें सत्य मानिलें जीवें भावें ॥ एवढी सृष्टि केली देवें ॥ बांधूं नपवे त्या केवीं ॥ ७८ ॥ सृष्टि रचिली कैसेनी ॥ निपजली कोणापासूनी ॥ येचि अर्थीं गुरु कांतिणी ॥ लक्षण लक्षूनि म्यां केली ॥ ७९ ॥

॥श्लोक॥ एको नारायणो देवः पूर्वसृष्टं स्वमायया ॥ संहृत्य कालकलया कल्पांत इदमीश्वरः ॥ १६ ॥

॥ टीका ॥ नराचें आश्रयस्थान ॥ यालागीं बोलिजे नारायण ॥ जीवाचें तोचि जीवन ॥ स्वामी नारायण सर्वांचा ॥ १८० ॥ ऐसा एक नारायण ॥ तेणें पूर्वीं जग सृजिलें जाण ॥ उपकरणसामग्रीवीण ॥ केलें निर्माण जगाचें ॥८१॥ एकलेनि सामग्रीवीण ॥ केवीं केलें जग संपूर्ण ॥ स्वमाया क्षोभवूनि जाण ॥ करवी निर्माण जगाचें ॥८२॥ तें निजमायेच्या पोटीं ॥ असंख्य जीवसामग्रीच्या कोटी ॥ ते माया अवलोकिली दृष्टीं ॥ तोचि उठाउठी निजकाळें ॥८३॥ ऐशी निजमाया अवलोकिली ॥ ते निजांगावरी नांदविली ॥ परी अंगीं लागों नाहीं दीधली ॥ हे अलिप्तता किली तो जाणे ॥ ८४ ॥ धुंई दाटली आकाशीं ॥ आकाश नातळे धुईशी ॥ तैसी निजांगें वाढवूनि मायेसी ॥ अलिप्त तियेसी वर्तत ॥ ८५ ॥ उदकें कमळणी वाढविली ॥ ते जळ ओंवरी निजदळीं ॥ तैसी माया आनंद आकळी ॥ चित्सत्ता मोकळी सर्वदेशीं ॥ ८६ ॥ स्वमायेसि तो अधिष्ठान ॥ मायेसि नांदावया तोचि भुवन ॥ एवं मायानियंता नारायण ॥ सत्य जाण सर्वथा ॥ ८७ ॥ रजोगुण सृजी सृष्टीशी ॥ सत्वगुण प्रतिपाळी तिसी ॥ कल्पांतीं क्षोभवूनि तमोगुणासी ॥ काळरूपेंसी संहारी ॥ ८८ ॥ हे मायेची क्षोभक शक्ती ॥ असे नारायणाचे हातीं ॥ 6यालागीं संहारिता अंतीं ॥ ईश्वरु ह्मणती या हेतू ॥ ८९ ॥

॥श्लोक॥ एक एवाद्वितीयोऽभूदात्माधारोऽखिलाश्रयः ॥ कालेनाऽत्मानुभावेन साम्यं नीतासु शक्तिषु ॥ सत्वादिष्वादिपुरुषः प्रधानपुरुषेश्वरः ॥ १७ ॥ परावराणां परम आस्ते कैवल्यसंज्ञितः ॥ केवलानुभवानंदसंदोहो निरुपाधिकः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ एवं संहारोनि कार्य कारण ॥ एक अद्वितीय नारायण ॥ एकपणें परिपूर्ण ॥ गुणागुण निरसोनि ॥ १९० ॥ एकला एकू नारायण ॥ हेंही तेथ ह्मणे कोण ॥ हें अद्वितीय लक्षण ॥ भेदशून्य अवस्था ॥ ९१ ॥ विजातीय भेद तेठायीं ॥ नसे सजातीय भेदु कांहीं ॥ स्वगतभेदु तोही नाहीं ॥ भेदशून्य पाहीं ये रीतीं ॥ ९२ ॥ ऐसा अभेदें जो साचारु ॥ तोचि

१ वाळवी, मुंगी. २ साधन, साहित्य. ३ धूर. ४ आच्छादी, झांकी. ५-६-७ भेद तीन आहेत, विजातीय, सजातीय आणि स्वगत १ वृक्ष हा दगडाशीं भिन्न आहे हा वि० भेद २ आम्रवृक्ष हा बकुलाशीं भिन्न आहे, हा स० भेद ३ व आम्राच्या पानांशीं मंजरी भिन्न आहे हा स्वगत भेद. ब्रह्माला हे तीनही भेद नाहींत.

6 ना. त्या माजी.

प्रकृतिपुरुषांचा ईश्वरू ।। नियंता तो परावरू ।। तोहि निर्धारू परियेसी ।। ९३ ।। प्रकृति पुरुष हे दोन्ही ।। कल्पिलीं जेणें अमनमनीं ।। तो ईश्वर होय भरंवसेनी ।। त्याचे सामर्थ्यें-करूनि वर्तती ।।९४।। प्रकृतीतें चेतविती सत्ता ।। तेचि याची पुरुषता ।। यालागीं प्रकृतीचा भर्ता ।। होय सर्वथा हाचि एकू ।। ९५ ।। पर जे अजप्रमुख ।। अवर मनुमुख्य स्थावरांतक ।। यांचा नियंता तो देख ।। सर्वचाळक सर्वांचा ।। ९६ ।। ज्याचे आज्ञेवरी पाहे ।। सैरा वायू जाऊं नलाहे ।। समुद्र वेळेमाजीं राहे ।। सूर्य वाहे दिनमान ।। ९७ ।। ज्याची आज्ञा करूनि प्रमाण ।। बारा अंगुळें विचरे प्राण ।। परता जाऊं नशके जाण ।। +आज्ञेभेणें सर्वथा ।।९८।। आज्ञा जाणोनि धडफुडी ।। मेरू बैसका नसोडी ।। चेतना आज्ञेकरीं गाढी ।। अचेतन कुडी चेतवी ।। ९९ ।। तो स्वयें तंव निराधार ।। परी जाहला विश्वासि आधार ।। जेवीं सर्पाभासा दोर ।। दिसे साचार आश्रयो ।। २०० ।। सत्वादिका ज्या गुणशक्ती ।। आवरूनि निज काळ-गती ।। समत्वा आणिल्या स्थिती ।। निजप्रकृती माझारी ।। १ ।। तेहि प्रकृती उपरमोनी ।। राहिली असे निर्गुणस्थानीं ।। जेवीं वट बीजीं सामावोनी ।। केवळपणीं राहिला ।। २ ।। तैसा उपाधि गिळूनि सकळ ।। निरुपाधिक केवळ ।। जेवीं काढिलिया मंदराचळ ।। असे निश्चळ क्षीराब्धी ।। ३ ।। नाना अलंकारठसे ।। घातलिया जेवीं मुसें ।। पूर्वरूप सोनें जैसें ।। होय तैसें केवळ ।। ४ ।। नाना *नक्षत्रालोकू ।। निजतेजें लोपी अर्कू ।। तैसा उपाधि गिळूनि एकू ।। निरुपाधिकू उरलासे ।। ५ ।। होकां ग्रीष्माच्या अंतीं ।। बीजें लीन होती क्षितीं ।। तैशी लीन होऊनि प्रकृती ।। केवळ सुखमूर्ती उरलासे ।। ६ ।। ऐसा निरुपाधिकू केवळ ।। सुखसमुद्रानंदकल्लोळ ।। चिन्मात्र तेजें बहळ ।। नित्य निर्मळ सर्वदेशीं ।। ७ ।। तेणें ज्ञानस्वरूपें अनंतें ।। सृजनकाळ अवस्थे ।। सृजिता जाहला सृष्टीतें ।। तेंही निरुतें अवधारी ।।८।।

।। श्लोक ।। केवलात्मानुभावेन स्वमायां त्रिगुणात्मिकाम् ।। संक्षोभयन् सृजत्यादौ तया सूत्रमरिंदम ।। १९ ।। तामाहुस्त्रिगुणव्यक्तिं सृजंतीं विश्वतो-मुखम् ।। यस्मिन्प्रोतमिदं विश्वं येन संसरते पुमान् ।। २० ।।

।। टीका ।। तेणें निजात्मकाळसत्तें ।। अवलोकिलें निजमायेतें ।। ते क्षोभोनियां तेथें ।। निज सूत्रातें उपजवी ।। ९ ।। तेचि बोलिली क्रियाशक्ती ।। करिती जाहली त्रिगुणव्यक्ती ।। अहंका-रद्वारा सृजिती ।। जगउत्पत्ती ते मूळ ।।२१०।। तेथें गुणागुणविभाग ।। सुर नर आणि पन्नग ।। अध ऊर्ध्व मध्यभाग ।। रचिलें जग तत्काळ ।। ११ ।। ब्रह्मांडीं सूत्र जाण ।। पिंडीं वर्तवी प्राण ।। पिंडब्रह्मांडविंदान ।। कर्त्री जाण क्रियाशक्ती ।। १२ ।। जीव करावया संसारी ।। षड्विकार वाढवी शरीरीं ।। षडूर्मी त्यामाझारीं ।। जीव संसारीं संचरवी ।।१३।। एवढी संसारउत्पत्ती ।। करावया इची व्युत्पत्ती ।। यालागीं नांवें क्रियाशक्ती ।। सांख्यसंमतीं बोलिजे ।। १४ ।। या क्रियाशक्तीसूत्राच्या ठायीं ।। जग वोविलें असे पाहीं ।। आडवेंतिडवें ठायींच्याठायीं ।। गोंवून ववलाहीं वाढत ।। १५ ।। दृढबंध देहाभिमाना ।। देऊनि संसारी करी ×जना ।। उपजवी अनिवार वासना ।। योनी नाना जन्मवी ।। १६ ।। पित्याचेनि रेतमेळें ।। रजस्वलेचेनि रुधि-रबळें ।। उकडतां जठराग्निज्वाळें ।। बहुकाळें गोठलें ।। १७ ।। तेथ निघाले अवयवांकुर ।।

१ ठिकाण. २ वड बियांत. ३ पुष्ट उपचित. ४ उत्पत्तिकाल. ५ रक्ताच्या बळानें.
+ मो. आज्ञेवीण. *ना. नक्षत्रें अनेक मो. नक्षत्र आलोक. ×ना. जाणा.

करचरणादिक लहान थोर ॥ देह जाहलाजी साकार ॥ तरी अपार यातना ॥ १८ ॥ जठरीं गर्भाची उकडतां उंडी ॥ नानादुःखांची होय पेंडी ॥ रिघे विष्ठा कृमी नाकीं तोंडीं ॥ तेणें मस्तक झाडी पुरेपुरे ह्मणोनी ॥ १९ ॥ थोर गर्भींची वेदना ॥ आठवितां थरकांपू मना ॥ भगद्वारें जन्म जाणा ॥ परम यातना जीवासी ॥ २२० ॥ ऐसें जन्मवूनि जनीं ॥ घाली स्वर्गाच्या बंदीखानीं ॥ कां पचवी अधःपतनीं ॥ देहाभिमानीं करूनियां ॥ २१ ॥ ऐसी सुखदुःखांची कडी ॥ घालोनि त्रिगुणीं दृढ बेडी ॥ भोगवी दुःखांच्या कोडी ॥ तरी न सोडी अविद्या ॥२२॥ हा थोर मायेचा खटाटोपू॥ राया तुज नाहीं भयकंपू ॥तुवां दृढ धरोनि अनुतापु॥ अभिमानदर्पू छेदिला ॥२३॥ तुझी पालटली दिसे स्थिती ॥ हृदयीं प्रगटली चिच्छक्ती ॥ मावळली अविद्येची राती ॥ बोधगभस्ती उगवला ॥ २४ ॥ जेथ छेदिला अभिमान ॥ तेथें कामादि वैरी निमाले जाण ॥ जेवीं शिर छेदिल्या करचरण ॥ सहजें जाण निमाले ॥ २५ ॥ यापरी तूं अग्निमर्दन ॥ बोलिलों तें सत्य जाण ॥ ऐकोनि अवधूतवचन ॥ सुखसंपन्न नृप जाहला ॥ २६ ॥ ह्मणे धन्य धन्य मी सनाथ ॥ मस्तकीं ठेविला हस्त ॥ प्रेमें वोसंडला अवधूत ॥ हृदयीं हृदयांत आलिंगी ॥ २७ ॥ दोघां निजात्मबोधें जाहली भेटी ॥ यालागीं खेवा पडली मिठी ॥ तेणें आनंदें वोसंडे सृष्टी ॥ सभाग्या भेटी सद्गुरूसी ॥ २८ ॥ बाळका कीजेति सोहळे ॥ तेणें निवती जननीचे डोळे ॥ शिष्यासि निजबोधू आकळे ॥ ते सुखसोहळे सद्गुरूसीं ॥२९ ॥ करितां दोघांसी संवादु ॥ वोसंडला परमानंदु ॥ पुढील कथेचा संमंधु ॥ अति विशद सांगत ॥ २३० ॥

॥ श्लोक ॥ यथोर्णनाभिर्हृदयादूर्णां संतत्य वक्त्रतः॥ तया विहृत्य भूयस्तां ग्रसत्येवं महेश्वरः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ ऊर्णनाभि ह्मणजे कांतिणी ॥ हृदयतंतु मुखेंकरूनि ॥ विस्तारी बाहेर काढूनी ॥ निजगुणीं स्वभावें ॥ ३१ ॥ त्या विस्तारिल्या तंतूंवरी ॥ तळीं आणि उंपरी ॥ आपणचि क्रीडा करी ॥ नानापरी स्वलीला ॥ ३२ ॥ तंतुविस्तारें खेळती लीला ॥ प्रत्यक्ष देखतांचि डोळां ॥ ग्रासूनि ने हृदयकमळा ॥ अद्वैतकळा दाखवी ॥ ३३ ॥ 'याचि रीतीं सर्वेश्वरू ॥ एकला रची संसारू ॥ अंतीं करूनि संहारू ॥ उरे निर्विकारू निजात्मा ॥ ३४ ॥ या लक्षणाचा निर्धारू ॥ धरूनि ऊर्णनाभी केला गुरू ॥ आतां सारूप्यतेचा विचारू ॥ पेशस्कारू गुरू म्यां केला ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ यत्र यत्र मनो देही धारयेत् सकलं धिया ॥ स्नेहात् द्वेषाद्भयाद्वाऽपि याति तत्तत्सरूपताम् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ काया वाचा आणि मन ॥ पुरुषें एकाग्र करून ॥ जे जे वस्तूचें करी ध्यान ॥ तद्रूप जाण तो होय ' ॥ ३६ ॥ स्नेहें द्वेषें अथवा भयें ॥ दृढ ध्यान जेणें होये ॥ तेणेंचि तद्रूपता लाहे ॥ उभवूनि बाहे सांगतु ॥ ३७ ॥ देह गेलिया तद्रूपता ॥ होईल हें वचन वृथा ॥ येणेंचि देहें येथ असतां ॥ तद्रूपता पाविजे ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ कीटः पेशस्कृतं ध्यायन् कुड्यां तेन प्रवेशितः॥ याति तत्सात्मतां राजन्पूर्वरूपमसंत्यजन् ॥ २३ ॥

---

१ परतावा, दुःख. २ ज्ञानसूर्य. ३-४ खालीं-वर. ५ कुंभारीण माशी.

॥ टीका ॥ भिंगुरटी कीटकीतें धरी ॥ कोंडी भिंतीमाजिले घरीं ॥ ते मरणभयें ध्यान करी ॥ निरंतरीं भ्रमरीचें ॥ ३९ ॥ तेणें तीव्रध्यानें ती कीटी ॥ होऊनि ठाके भिंगुरटी ॥ गगनौ चढे उठाउठी ॥ प्रत्यक्ष दृष्टीं देखिजे ॥ २४० ॥ भिंगुरटी जड असंत ॥ मूढ कीटी तिचें ध्यान करीत ॥ तेणें तद्रूपता प्राप्त ॥ तैसा भगवंत तंव नव्हे ॥ ४१ ॥ तो अजड चिद्रूप सुखदाता ॥ ज्ञाता अधिकारी ध्यान करिता ॥ तेथ तद्रूपता पावतां ॥ विलंब सर्वथा पैं नाहीं ॥ ४२ ॥ कीटकीस भ्रमरत्व जोडे ॥ हें तीव्रध्यानें, नघडतें घडे ॥ विचारितां, दोन्हीं मूढें ॥ जड जडें वेधिलें ॥ ४३ ॥ भगवद्ध्यान नव्हे तैसें ॥ ध्याता भगवद्रूपचि असे ॥ ध्यानें भ्रममात्र नासे ॥ अनायासें तद्रूप ॥ ४४॥ येणें देहें याचि वृत्तीं ॥ आपुली आपण न देखे मुक्ती ॥ नेघवे भगवत्पदप्राप्ती ॥ तें वृथा व्युत्पत्ति नरदेहीं ॥ ४५ ॥ वृथा त्याचें ज्ञान ध्यान ॥ वृथा त्याचें यजन याजन ॥ वृथा त्याचें धर्माचरण ॥ चैतन्यघन जंव नोहे ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ एवं गुरुभ्य एतेभ्य एषा मे शिक्षिता मतिः ॥ स्वात्मोपाशिक्षितां बुद्धिं शृणु मे वदतः प्रभो ॥ २४ ॥

॥ टीका ॥ अवधूत ह्मणे यदुर्शा ॥ इतुकिया गुरुपाशीं ॥ मी शिकलों जें जें मतीशीं ॥ तें तुजपाशीं सांगितलें ॥ ४७ ॥ निजबुद्धीचिया व्युत्पत्ती ॥ कांहीं एक शिकलों युक्ती ॥ तेंही सांगेन तुजप्रती ॥ अनन्यप्रीती स्वभावें ॥ ४८ ॥ चोविस गुरूंचाही गुरू ॥ विवेकवैराग्यविचारु ॥ हा नरदेहीं लाभे सधरू ॥ यालागीं मुख्यगुरू नरदेहो ॥ ४९ ॥

॥श्लोक॥ देहो गुरुर्मम विरक्तिविवेकहेतुर्बिभ्रत्स्म सत्वनिधनं सततार्त्युदर्कम् ॥ तत्वान्यनेन विमृशामि यथा तथापि पारक्यमित्यवसितो विचराम्यसंगः ॥२५॥

॥ टीका ॥ देहासी जें गुरुत्व जाणा ॥ तें दोंप्रकारीं विचक्षणा ॥ सांगेन त्याच्या लक्षणा ॥ संरक्षणा परमार्था ॥ २५० ॥ देहाऐसें वोखटें ॥ पृथ्वीमाजीं नाहीं कोठें ॥ देहाऐसें गोमटें ॥ पाहतां नभेटे त्रिलोकीं ॥ ५१ ॥ वोखटें ह्मणोनि त्यागावें ॥ त्यागितां निजस्वार्था नागवावें ॥ होकां गोमटें ह्मणोनि भोगावें ॥ तें अवश्य जावें नरकासी ॥५२॥ तरी हें त्यागावें ना भोगावें॥ मध्यभागें विभागावें ॥ आत्मसाधनें राखावें ॥ ×निजस्वभावें हितालागीं ॥ ५३ ॥ जैसें भाडियाचें घोडें ॥ आसक्ति सांडोनि पुढें ॥ पैणेवरी नेणें घडे ॥ स्वार्थचाडेलागूनी ॥ ५४ ॥ हेतू ठेवूनि परमार्थी॥ देहीं वस्तीकरू जेवीं उखिता ॥ देहआसक्तीची कथा ॥ बुद्धीच्या *पंथा येवोंनेदी ॥ ५५ ॥ देहाची नश्वर गती ॥ नश्वरत्वें उपजे विरक्ती ॥ नाशवंताची आसक्ती ॥ मुमुक्षु नकरिती सर्वथा ॥ ५६ ॥ जेणें उपजली विरक्ती ॥ तो विवेक जाणावा निश्चितीं ॥ एवं विवेकवैराग्यप्राप्ती ॥ ○निजयुक्तीं नरदेहीं ॥ ५७ ॥ इतरदेहाच्या ठायीं ॥ हा विचारुचि नाहीं ॥ केवळ शिश्नोदर पाही ॥ व्यवसावो देही करिताती ॥ ५८ ॥ यालागीं नरदेह निधान ॥ जेणें ब्रह्मसायुज्यीं घडे गमन ॥ देव वांछिती मनुष्यपण ॥ वेदांचें स्तवन नरदेहा

१ किडयास. २ कीड, भृंगाचा ध्यास करण्यानें स्वतः भृंगरूप होते. ३ उडून आकाशांत जावें. ४ न घडणारें. ५ कीड आणि भृंग. ६ चैतन्यरूप. ७ वाईट, ओंगळ. ८ चांगलें. ९ मुक्कामापर्यंत. १० वाटसरू. ११ देहधारी. पश्वादि.

×ना. निजहिता स्वभावें लागूनि. मो. निजहितालागूनि. *ना. माथा. ○ना. नित्यमुक्ती.

॥ ५९ ॥ ह्मणसी नरदेह पावन ॥ परी तें अत्यंत निंद्य जाण ॥ योनिद्वारें ज्याचें जनन ॥ पाठीच मरण लागलेंसे ॥२६०॥जैं जन्मलेंचि नाहीं ॥ तंव मरण लागलें पाहीं ॥ गर्भाच्याचि ठायीं ॥ मरणघायीं धाकती ॥ ६१॥ एवं या देहासरिसा ॥ नित्यमृत्यु लागला कैसा ॥ शोखूनियां बालवयसा ॥ तारुण्यासरिसा लागला ॥ ६२ ॥ विसरोनियां आत्ममरण ॥ तारुण्य चढलें जें दारुण ॥ चतुर शाहाणा सज्ञान ॥ बळें संपूर्ण मी एकू ॥ ६३ ॥ त्या तारुण्याची नवाळी[१]॥ देंठ न फोडितां काळ गिळी ॥ मग जराजर्जरित मेळी ॥ मरणकाळीं पातली ॥ ६४ ॥ जरा मृत्यूचें प्रस्थान ॥ धवलचामरेंसि[३] आलें जाण ॥ मागुनि यावया आपण ॥ वेळा निरीक्षण करीतसे ॥ ६५ ॥ सर्वांगीं कंपायमान ॥ तो आला मृत्यूचा[४] व्यजन ॥ मान कांपे तो जाण ॥ डोल्हारा पूर्ण मृत्यूचा ॥ ६६ ॥ दांत पाडूनि सपाट ॥ काळें मोकळी केली वाट ॥ मृत्यूसेनेचा घडघडाट ॥ वेगीं उद्भट रिघावया ॥ ६७ ॥ पाठी जाली दुणी ॥ तेचि मृत्यूची निशाणी ॥ दोनी कानीं खिळे देऊनी ॥ सुबद्ध करूनी बांधिली ॥ ६८ ॥ येतिया मृत्यूसि पुढारे ॥ नयनतेज[६] धांवे सामोरे ॥ ×मग न्याहळतीना अक्षरें ॥ अंजनोपचारें[७] शिणतांही ॥ ६९ ॥ उभळीचा[८] उजगरा ॥ *उबगुं[९] सेजारिल्या घरा ॥ ह्मणती नमरे हा ह्मातारा ॥ बाळाची निद्रा मोडितो ॥ २७० ॥ देखोनि मृत्यूची धाडी[१०] ॥ पायां वळतसे वेंगडी ॥ जिव्हेसि चालली बोबडी ॥ तुटल्या नाडी सर्वांगीं ॥ ७१ ॥ मरण नयेतां जाण ॥ थोर जरेचें विटंबन ॥ विमुख स्त्रीपुत्रजन ॥ अतिदीन ते करितीं ॥ ७२ ॥ जन्मवरीं सायासीं॥ प्रतिपाळिलें जयांसी ॥ तेचि उबगती त्यासी ॥ जरेनें देहासी कवळिल्या ॥ ७३ ॥ जरा लागलिया पाठीं ॥ कोणी नाइके त्याची गोष्टी ॥ विटावीं[१२] लागलीं धोकुटीं[१३] ॥ कुतरीं पाठी भुंकती ॥ ७४ ॥ शाहणी सांगती अबलांसी ॥ बागुल आला ह्मणती वृद्धासी ॥ निर्भर पडोनेदी दोसी[१४] ॥ कासाविसी होतसे ॥ ७५ ॥ ह्मातारा हो हा आशीर्वाद ॥ दीधला तेंही केलें द्वंद्व ॥ जरे एवढें विरुद्ध ॥ आणिक द्वंद्व तें नाहीं ॥ ७६ ॥ ऐसी जरेची जाचणी ॥ देखोनियां तरुणपणीं ॥ हेचि दशा मजलागूनी ॥ हात धरूनी येईल ॥ ७७ ॥ देहो तितुका षड्विकारी ॥ कोटि अनर्थ एकेके विकारीं ॥ षडूर्मी लागल्या त्या भीतरीं ॥ जेवीं अग्नीवरी घृतधारा ॥७८॥ या देहाचें जें मूळ ॥ तें दुःखाचें आळवाळ[१६] ॥ देहो वाढावितां दुःख प्रबळ ॥ उत्तरफळ महादुःख ॥७९॥ एवं देहाची जे संगती ॥ ते निरंतर दुःखप्राप्ती॥ यापरी सांडावी आसक्ती॥ या हेतु विरक्ती देहगुरु ॥ २८० ॥ या देहाचेनि साधनें ॥ अविनाश-[१७]पद पावणें ॥ याहीपरी येणें गुणें ॥ गुरुत्व ह्मणणें देहासी ॥ ८१ ॥ देह उपकारी अपकारी ॥ यासि गुरुत्व दोन्ही परी ॥ येथ विवंचूनि चतुरीं ॥ निजहित करी तो धन्य ॥ ८२ ॥ करितां तत्त्वविवंचन[१८] ॥ देहाचें मूळ तें अज्ञान ॥ निजरूपाचें अदर्शन ॥ तेंचि भान[१९] प्रकृतीचें ॥ ८३ ॥ प्रकृतिस्तव त्रिगुणमात्र ॥ त्रिगुणीं त्रिविध अहंकार ॥ येथूनि महद्भूतविकार ॥ इंद्रियव्यापार +देवेसीं[२०] ॥८४॥

---

१ जन्म. २ नवेपणा. ३ शुभ्र (केशरूप) चवरी. ४ मृत्यूचा पंखा. ५ पाठ वांकून कुबड निघालें. ६ डोळ्याची कांती. ७ अंजनादि औषधांनीं. ८ खोकल्याची ढास. ९ जागरण. १० त्रास. ११ हल्ला, परचक्र. १२ वेडावूं. १३ पोरें. १४ स्वस्थ, निश्चिंत. १५ खोकला. १६आळें. १७कैवल्य. १८ तत्वविचार. १९ भास, आविष्कार. २० इंद्रियांच्या देवतांसह. जसें डोळयाची देवता सूर्य.

×ना. मागे. मो. मागा. *ना. ऐकोनी मो. जाये. +ना देहेसी.

एवं पिंड ब्रह्मांड खटाटोप ॥ हा अवघाचि आरोप ॥ दोरू जाहला नाहीं साप ॥ भ्रमें सर्प तो ह्मणती ॥ ८५ ॥ पाहतां या देहाचें मूळ ॥ भासे जैसें मृगजळ ॥ भ्रमाची राणीव प्रबळ ॥ हा आरोपची केवळ वस्तूच्याठायीं ॥८६॥नसतें देह आभासे जेथें॥आरोपू ह्मणणें घडे त्यातें॥ आतां सांगेन अपवादातें॥सावधचित्तें परियेसी ॥८७॥ देह पांचभौतिक प्रसिद्ध॥तो मी ह्मणणें हें अबद्ध ॥ देहो मलिन मी शुद्ध॥अतिविरुद्ध या आज्ञा ॥८८॥ पृथ्वी मी नव्हें जडत्वें॥जळ मी नव्हें द्रवत्वें ॥ तेज मी नव्हें दाहकत्वें ॥ चंचलत्वें नव्हें वायू ॥ ८९ ॥ नभ मी नव्हें शून्यत्वें ॥ अहं मी नव्हें दृश्यत्वें ॥ जीव नव्हें मी परिच्छिन्नत्वें ॥ माया मिथ्यात्वें मी नव्हें ॥ २९० ॥ देह नव्हें मी नश्वरत्वें ॥ विषय नव्हें मी बाधकत्वें ॥ या तत्वां आणि मातें ॥ संबंधू येथें असेना ॥ ९१ ॥ ब्रह्माहमस्मि अभिमान ॥ हंसपरमहंसांसि मान्य ॥ तें सत्वावस्थेचें साधन ॥ तोही अभिमान मी नव्हें ॥ ९२ ॥ जितुका तत्त्वांचा अनुवाद ॥ तितुका मजवरी अपवाद ॥ हा माझा बुद्धीचा बोधू ॥ तुज म्यां यदु सांगीतला ॥ ९३ ॥ हें माझें गुप्त ज्ञान ॥ तुझें देखोनि अनन्यपण ॥ केलें गा निरूपण ॥ भावें संपूर्ण तूं भावार्थी ॥ ९४ ॥ येरवीं करावया हे कथा॥ मज चाड नाहीं सर्वथा ॥ परी बोलवीतसे तुझी आस्था ॥ नृपनाथा सभाग्या ॥ ९५ ॥ ऐशिया संवादाच्या मेळीं ॥ अद्वैतबोधें पिटिली टाळी ॥ दोघे आनंदकल्लोळीं ॥ ब्रह्मसुकाळीं मातले ॥ ९६ ॥ ऐसा उपकारी देखा ॥ या देहासारिखा नाहीं सखा ॥ ह्मणसी राखावा नेटका ॥ तंव तो पारका[1] मुळींची ॥ ९७ ॥ यासि अत्यंत करितां जतन ॥ दिसे विपरीत निदान ॥ श्वानशृगालांचें भोजन ॥ कां होय भक्षण अग्नीचें ॥ ९८ ॥ या दोहीं गतींवेगळें पडे ॥ तरी सुळबुळीत होती किडे ॥ चौथी अवस्था यासि न घडे ॥ हें तूंही रोकडें जाणशी ॥ ९९ ॥ यालागीं देहाची आसक्ती ॥ मी न धरींच गा नृपती ॥ निःसंगु विचरतसें क्षितीं ॥ आत्मस्थितीचेनि बोधें ॥ ३०० ॥ देहासि उपभोग साधनें ॥ तितुकीं जाण पा बंधनें ॥ दृढ वासना तेणें ॥ अनिवारपणें वाढते ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ जायात्मजार्थपशुभृत्यगृहाप्तवर्गान्पुष्णाति यत् प्रियचिकीर्षया वितन्वन् ॥ स्वांते सकृच्छ्मवरुद्धधनः स देहः सृष्ट्वाऽस्य बीजमवसीदति वृक्षधर्मा ॥ २६ ॥

॥ टीका ॥ देहभोगीं *मुख्य गोडी ॥ स्त्रीभोगाची अति आवडी ॥ सर्वस्व वेंचोनि जोडी ॥ आणी रोकडी योषिता ॥ २ ॥ स्त्री हातीं धरितां देख ॥ वाढे प्रपंचाचें थोर दुःख ॥ गृह पाहिजे आवश्यक ॥ भोगार्थ देख स्त्रियेच्या ॥ ३ ॥ त्या गृहाचे गृहसिद्धी ॥ पाहिजे धनधान्य समृद्धी ॥ जाहली प्रजांची वृद्धी ॥ तेणें अति ओढी अनिवार ॥ ४ ॥ त्या प्रजांचा अति लालसू ॥ दासदासी मेळवी पशू ॥ थोर कष्टांचा पडे सोसू ॥ सुखलेशू[5] पैं नाहीं ॥ ५ ॥ ज्याही जांवयांच्या वोढी ॥ आप्तवर्गांचिया कोडी ॥ पडे उचिताचिया सांकडीं ॥ सोसितां कोरडी देहाची ॥ ६ ॥ पोसावया पोष्यांसी[6] ॥ रची नाना +उपायराशी ॥ हिंडे स्वदेशीं परदेशीं ॥ अहर्निशीं व्याकुळ ॥ ७ ॥ देहासि द्यावया सुख ॥ शतधा वाढविलें दुःख ॥ देहाभिमानें जन

१ गैर. २ मी ब्रह्म आहें हा. ३ परका. ४ कुतऱ्यांचें व कोल्ह्यांचें खाणें. ५ मनोव्यथा. ६ पालन करण्यास योग्य अशांस.

*ना. सुख. +ना. मो. उपायांशी.

मूर्ख ॥ तृथा अभिलाष वाढविती ॥८॥ देहसुखाचिया चाडा ॥ पडे परिग्रहाचे खोडां ॥ दारा गृहलोभें केला वेडा ॥ न देखे पुढां निजस्वार्थू ॥ ९ ॥ देहें वाढविली प्रीती ॥ गृह दारा पुत्र संपत्ती ॥ तेंचि वासना होय देहांतीं ॥ देहांतराप्रती निजबीज ॥ ३१० ॥ जैसा जोंधळा कणिसा चढे ॥ कणसींचा क्षितीवरी झडे ॥ वाढी वाढलें झाड मोडे ॥ तें बीज गाढें उरलेंसे ॥ ११ ॥ तेंचि बीज जळभूमीसंगतीं ॥ सवेंचि झाड वाढे पुढती ॥ तैसी वासना उरे देहांतीं ॥ देहांतराप्रती न्यावया ॥ १२ ॥ त्या वृक्षाचिया परी ॥ वासना बीज शरीरीं ॥ उरवूनि स्वर्गं संसारीं ॥ योनिद्वारीं जन्मवी ॥ १३ ॥ देहीं वासना केवीं वाढे ॥ तेंही सांगेन तुजपुढें ॥ विषय सेवितां वाडेंकोडें ॥ वासना वाढे अनिवार ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ जिव्हैकतोऽमुमपकर्षति कर्हि तर्षा शिश्नोऽन्यतस्त्वगुदरं श्रवणं कुतश्चित् ॥ घ्राणोऽन्यतश्चपलदृक् क्व च कर्मशक्तिर्बह्व्यःसपत्न्य इव गेहपतिं लुनंति ॥ २७ ॥

॥ टीका ॥ जिव्हा रसांकडे वोढी ॥ तृषा प्राशनालागीं तोडी ॥ शिश्नासी रतिसुखाची गोडी ॥ तें चरफडी रमावया ॥ १५ ॥ त्वचा पाहे मृदुपण ॥ उदर वांछी पूर्ण अन्न ॥ श्रवण मागती गायन ॥ मधुरध्वनी आलाप ॥ १६ ॥ घ्राण उग्रत परिमळा ॥ रूप पहावया वोढी डोळा ॥ हस्त वांछिती खेळा ॥ नानालीळा स्वभावें ॥ १७ ॥ पाय वांछिती गती ॥ ऐशीं इंद्रियें वोढा वोढिती ॥ जेवीं एका गेहपती ॥ बहुता सवती *तोडिती ॥१८॥ एवं इंद्रियांसि विषयासक्ती॥ तेणें वासना दृढ होती ॥ त्या देहें देहांतराप्रती ॥ पुरुषासि नेती सर्वथा ॥ १९ ॥ यालागीं करावया विषयत्यागू ॥ अवश्य छेदावा देहसंगू ॥ इये अर्थीं मनुष्यदेह चांगू ॥ ज्ञानविभाग ते देहीं ॥ ३२० ॥

॥ श्लोक ॥ सृष्ट्वा पुराणि विविधान्यजयाऽऽत्मशक्त्या वृक्षान् सरीसृपपशून् खगदंशमत्स्यान् ॥ तैस्तैरतुष्टहृदयः पुरुषं विधाय ब्रह्मावलोकधिषणं मुदमाप देवः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ हेंचि जाणावया निजरूपातें ॥ पूर्वीं तेणें श्रीअनंतें ॥ निजमायेचेनि हातें ॥ केलीं बहुतें शरीरें ॥ २१ ॥ एकें केलीं जें भूचरें ॥ एकें तें केलीं खेचरें ॥ एकें केलीं जळचरें ॥ चरें अचरें तीं एकें ॥ २२ ॥ वृक्ष सर्प पशु दंश ॥ राक्षस पिशाच बक हंस ॥ मत्स्य कच्छपादि अशेष ॥ स्रजी बहुवस योनीतें ॥ २३ ॥ ऐशा चौऱ्यांशीं लक्ष योनी ॥ स्रजूनि पाहे परतोनी ॥ तेंव निजप्राप्तीलागोनी ॥ न देखे कोणी अधिकारी ॥ २४ ॥ ऐशिये देखोनि सृष्टीतें ॥ सुख न वाटेचि देवातें ॥ मग मानवी प्रकृतीतें ॥ आदरें बहुतें निर्मिलीं ॥२५॥ बाहल्यें मनुष्यदेहीं॥ निजज्ञान घातलें पाहीं ॥ जेणें ज्ञानें देहीं ॥ विदेह पाहीं पावती ॥ २६ ॥ आहार निद्रा भय मैथुन ॥ सर्वां योनींसि समसमान ॥ मनुष्य देहींचें ज्ञान ॥ अधिक जाण सर्वांशीं ॥ २७ ॥ देखोनि मनुष्य देहासी ॥ सुख झालें भगवंतासी ॥ अधिकार ब्रह्मज्ञानासी ॥ येणें देहेंसी

---

१ पत्नी चाकर वगैरे परिवार. २ पृथ्वीवर. ३ चरफडतें. ४ माशा, डांस. ५ बगळे. ६ अनेक.

* ना. वोढिती.

मत्प्राप्ती ॥२८॥ पावोनियां मनुष्यपणा ॥ जो नसाधी ब्रह्मज्ञाना ॥ तो दादीचा मेंढा जाणा॥ विषयाचरणा विचरत ॥ २९ ॥ मनुष्य देहींचेनि ज्ञानें ॥ सच्चिदानंदपदवी घेणें ॥ एवढा अधिकार नारायणें ॥ कृपावलोकनें दीधला ॥ ३३० ॥ मनुष्य देहीं ब्रह्मज्ञान ॥ पुढील जन्मीं मी करीन ॥ ह्मणे तो नागवला जाण ॥ सोलींव अज्ञान त्यापाशीं ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ लब्ध्वा सुदुर्लभमिदं बहुसंभवांते मानुष्यमर्थदमनित्यमपीह धीरः ॥
तूर्णं यतेत न पतेदनुमृत्यु यावन्निःश्रेयसाय विषयः खलु सर्वतः स्यात् ॥२९॥

॥ टीका ॥ चौऱ्याऐंशी लक्ष योनींप्रती ॥ जें कोटिकोटि फेरे होती ॥ तैं नरदेहाची प्राप्ती ॥ अवचटें [१]लाहती निजभाग्यें ॥ ३२ ॥ जो मनुष्यदेहीं जन्मला ॥ तो परमार्थासि लिगटला ॥ एवढा अलभ्य लाभ जाहला ॥ पितरीं मानिला उत्साहो ॥३३॥ +झालिया मनुष्यदेहप्राप्ती ॥ परमार्थ साधूं भोगाअंतीं ॥ एवढी येथ नाहीं निश्चिती ॥ मृत्युप्राप्ती अनिवार ॥ ३४ ॥ मृत्यु न विचारी गुणदोष ॥ न ह्मणे देश विदेश ॥ न पाहे रात्र दिवस॥करीत नाश तत्काळ ॥३५॥ देह जेंपासोनि जाहला ॥ तेंपासूनि मृत्यु लागला ॥ जेवीं सापें बेडूक धरिला ॥ गिळूं लागला लवनिमिषें ॥ ३६ ॥ साप बेडूकातें गिळी ॥ बेडूक मुखें माशा कवळी ॥ तैशी मृत्युमुखीं *पडलीं ॥ विषयमुलीं झोंबती॥३७॥येथ आळस जेणें केला ॥ तो सर्वस्वें नागावला ॥ थितां परमार्थ हातींचा गेला ॥ आवर्ती पडला भवचक्रीं ॥ ३८ ॥ ऐसें जाणोनि यदुराया ॥ देहाचिया लवलाह्या ॥ परमार्थ साधावया ॥ 6ब्रह्मोपाया उद्यत व्हावें ॥ ३९ ॥ छेदोनियां आळसासी ॥ दवडूनियां निद्रेसी ॥ आत्मचिंतन अहर्निशीं ॥ अविश्रमेंसीं साधावें ॥ ३४० ॥ रणीं रिघालिया शूरासी ॥ नाजिणतां परचक्रासी॥विसांवा नाहीं क्षत्रियासी ॥ तेणें वेगेंसीं साधावें॥ ॥ ४१ ॥ साधावया आत्मलग्न ॥ [९]सावधान विजवराचें मन ॥ तेणें साक्षेपें आपण ॥ सायुज्य लग्न साधावें ॥ ४२ ॥ रायाचें एकुलतें एक ॥ चुकल्या अवचटें बाळक ॥ तो जेवीं शोधी सकळ लोक ॥ तेवीं निजसुख साधावें ॥ ४३ ॥ काळाचा चपेटघात ॥ जंव वाजला नाहीं येथ ॥ तंव साधावा परमार्थ ॥ आयुष्य व्यर्थ न करावें ॥ ४४ ॥ नरदेहींचेनि आयुष्यें ॥ प्रपंचाचेनि आवेशें ॥ विषयाचेनि विलासें ॥ भोगपिसे नर जाहले ॥ ४५ ॥ पश्वादियोनींच्या ठायीं ॥ विषयांवांचोनि आन नाहीं ॥ तोचि विषयो नरदेहीं ॥ वाढविल्या कायी हित जाहलें ॥ ४६ ॥ विचारितां विवेकदृष्टीं ॥ विषयांसि प्रारब्धें भेटी ॥ वृथा करितां आटाआटी ॥ मुद्दलतुटी नरदेहा ॥ ४७ ॥ नरदेह परम पावन ॥ पावोनि न Xसाधी ब्रह्मज्ञान ॥ तो लांडा गर्दभ जाण ॥ पुच्छेवीण दुपायी ॥ ४८ ॥ अपरोक्षज्ञानेंवीण वांझट ॥ उदरार्थ दंभ खटपट ॥ जेवीं मंदिरापार्शी मर्कट ॥ उडे उद्भट तडतडां ॥ ४९ ॥ ब्रह्मज्ञानेंवीण शास्त्रज्ञ ॥ ते अंधारींचे खद्योत जाण ॥ अज्ञान–निशीमाजीं तेज गहन ॥ सूर्योदयीं कोण त्यां देखे ॥ ३५० ॥ ब्रह्मज्ञानेंवीण संन्यासी ॥ नटाच्यापरीसें मुंडण त्यासी ॥ सोकले मिष्टान्नभिक्षेसी ॥ वृथा गेरूशीं नाशिलें ॥ ५१ ॥ मनीं विषयाचें अभिलाषण ॥ धरूनि करिती वेदाध्ययन ॥ ते वर्षाकाळींचे

---

१ लागला. २ असलेला. ३तयार. ४विषयभोगाविषयीं वेडे. ५नाटक्याप्रमाणें. ६रंगाची काव. ७इच्छा

7ना. चढे हातीं. +ना. आलिया मनुष्य देहाप्रती. *मो. मूर्खे पडलीं. 6 मो. उद्यत लवलाह्या होआवें. 9मो. सधन. Xना. मो. न करी.

दर्दुर जाण ॥ कर्दमपानें जल्पती ॥ ५२ ॥ विषयप्राप्तीलागीं मौन ॥ तें बकाचें बकध्यान ॥ विषयबुद्धीं जें गायन ॥ ते खरी देखोनि खर भुंके ॥ ५३ ॥ विषयालागीं उपन्यास ॥ नानायुक्तीचे विलास ॥ जेवीं पिंड देखोनि वायसें ॥ करिती बहुवस अतिशब्द ॥ ५४ ॥ पोट भरावया भांड ॥ सैरा वाजविती तोंड ॥ तैसे विषयालागीं वितंड ॥ शास्त्रपाखांड बोलती ॥५५ विषयवासना धरूनि थोर ॥ बाह्य मिरविती आचार ॥ जेवीं कागाचा शौचाचार ॥ विष्ठा तत्पर मानसीं ॥५६॥ हृदयीं धरूनि जीविका चांग॥अग्निहोत्रें करिती याग॥जेवीं वेश्या विकोनि अंग ॥ चालवी सांग संसार ॥ ५७ ॥ नरदेहींचा हाचि स्वार्थ ॥ साधावा चौथा पुरुषार्थ॥ तो न करितां जो कां अर्थ ॥ तो अनर्थ जाणावा ॥ ५८ ॥ *साधीना देहीं ब्रह्मज्ञान ॥ तो श्वानसूकरांसमान ॥ अथवा त्याहोनि हीन ॥ ते विवंचना परियेसी ॥ ५९ ॥ पशूसि हाणितल्या लाथा ॥ द्वेष न धरी सर्वथा ॥ मनुष्यासि तूं ह्मणतां ॥ जीवघाता प्रवर्ते ॥३६०॥ पशूसी लोभ नाहीं संग्रहता ॥ एक आहार होय भक्षिता ॥ मग उरलिया अर्था ॥ त्यागी सर्वथा तात्काल ॥६१॥ मनुष्याचें लोभिष्ठपण ॥ गांठीं असल्या कोटि धन ॥ पोटा न खाय आपण ॥ मा त्यागितां प्राण त्यजील ॥ ६२ ॥ सायंप्रातश्चिंता ॥ पशूसि नाहीं सर्वथा ॥ मनुष्याची चिंता पाहतां ॥ जन्मां शतां +न राहे ॥६३॥ अमित धन असतां गांठीं ॥ तरी चिंता अनिवार मोठी ॥ नाथिलेंचि भय घे पोटीं ॥ अविश्वासी सृष्टीं नरदेही ॥ ६४ ॥ जरी मरों टेंकलें शरीर ॥ तरी व्यवहारी साधी वृत्ति क्षेत्र ॥ पाया शोधोनि बांधे घर ॥ पुत्रपौत्र नांदावया ॥ ६५ ॥ ऐसी दुस्तर चिंता ॥ पशूसि नाहीं सर्वथा ॥ आतां मैथुनाची कथा ॥ ऐक तत्त्वतां सांगेन ॥ ६६ ॥ पशूसि ऋतुकाळीं मैथुन ॥ मग स्त्रियेसी नातळे आपण ॥ पुरुषासि नित्य स्त्रीसेवन ॥ गरोदरही जाण न सोडी ॥ ६७ ॥ काम क्रोध सलोभता ॥ चिंता निंदा अतिगर्वता ॥ हे मनुष्याचेचि माथां ॥ पशूसि सर्वथा हें नाहीं ॥ ६८ ॥ न साधितां आत्मज्ञान ॥ केवळ जे विषयी जन ॥ ते श्वानसूकरांपरीस हीन ॥ माणुसपण त्यां नाहीं ॥ ६९ ॥ विषयाचें जें सुख जाण ॥ तें स्वर्गीं नरकीं समान ॥ जें इहलोकीं भोगी श्वान ॥ तें स्वर्गीं जाण इंद्रासी ॥ ३७० ॥ मनुष्यदेहावांचोनी ॥ सुरतिर्यगादि ज्या योनी ॥ त्या विषयभोगालागोनी ॥ विषयछेदनीं नरदेह ॥ ७१ ॥ तो नरदेह कैसेनी जोडे ॥ ते प्राप्तीचे कठिण गाढे ॥ तें सांगेन तुजपुढें॥ परिस निवाडे विभागु ॥ ७२ ॥ अत्यंतसुकृतें स्वर्गा चढे ॥ अत्यंत पापें अधोगती घडे ॥ पाप पुण्य निःशेष झडे ॥ तैं आतुडे निजमुक्ति ॥ ७३ ॥ जैं पापपुण्य समानसमीं ॥ तैं मनुष्यदेह आक्रमी ॥ जन्म पावे कर्मभूमी ॥ आश्रमधर्मीं सुमेधा ॥ ७४ ॥ संक्षेपें मनुष्यदेह जोडे ॥ ऐसें करितां तंव न घडे ॥ हें अवचट हाता चढे ॥ भाग्य चोखडें जयाचें ॥ ७५ ॥ मोलें अनर्घ्यरत्नें येती ॥ तैसा चिंतामणी नये हातीं ॥ तेवीं बहुत योनिये जन्म होती ॥ परी मनुष्यदेहप्राप्ती दुर्लभ ॥ ७६ ॥ ऐसा नरदेह पावोनि देख ॥ जो न साधीचि ब्रह्मसुख ॥ तो जनामाजीं परम मूर्ख ॥ विश्वासघातक देवाचा ॥ ७७ ॥ निजात्मप्राप्ती लागोनी ॥ देवें केली मनुष्य योनी ॥ तो देवाचा विश्वास बुडवूनि ॥ विषयसेवनीं निजपतन ॥ ७८ ॥ होतें पितराचें मनो-

१ बेडूक. २ चिखल खाऊन. ३ बोलण्याचा आरंभ. ४ कावळा. ५ सकाळ सायंकाळची. ६ नसलेलें. ७ सुबुद्धि. ८ मोठ्या खटपटीनें, दीर्घ प्रयत्नानें. ९ अमोल.

*मो. ना. न करी ये +मो. नाटोपे.

गत ॥ पुत्र होईल हरिभक्त ॥ कुळ उद्धरील समस्त ॥ विषयीं प्रतिहत तें केलें ॥ ७९ ॥ होका सकळ भाग्याचें फळ॥मनुष्यदेह गा केवळ ॥तें करावया सफळ ॥वैराग्य अढळ म्यां केलें८०

॥ श्लोक ॥ एवं संजातवैराग्यो विज्ञानालोक आत्मनि ॥ विचरामि महीमेतां मुक्तसंगोऽनहंकृतिः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ देहो निजात्मसाधनीं साधक ॥ तोचि विषयभोगीं [१]बाधक ॥ ऐसें हें देखोनियां देख ॥ केलें निष्टंक वैराग्य ॥ ८१ ॥ त्या वैराग्याचेनि मेळें ॥ गुरुकृपावचनबळें ॥ विषयइंद्रियांचे [२]पाळे ॥ एकेचि वेळे विभांडिले ॥ ८२ ॥ अविद्या जंव घ्यावी जीवें ॥ तंव अविद्या येणें नांवें ॥ *स्वांगें मी विद्यमान नोहे ॥ हेंही अनुभवें जाणीतलें ॥ ८३ ॥ ऐशी मिथ्यात्वें अविद्या जातां ॥ पूर्ण आला चित्प्रकाश हातां ॥ तेणें स्वदेहस्थ अहंता ॥ गेली सर्वथा निःशेष ॥ ८४ ॥ ज्ञानसाधन जो निजदेहो ॥ याच्याठायीं वैराग्य पहाहो ॥ मा देहसंबंधाचा स्नेहो ॥ कैसेनि राहों शकेल ॥ ८५ ॥ ऐसेनि अनुभवें पाहीं ॥ निःसंग मी विचरें महीं ॥ अहंता स्वदेहीं नाहीं॥ पुशिलें तें पाहीं सांगितलें राया ॥ ८६ ॥ जें पुरुषाची अहंता गळे ॥ तें देह अदृष्टयोगें चळे ॥ जेवीं सुकलें पान वायुबळें ॥ पडिलें लोळे सर्वत्र ॥ ८७ ॥ यालागीं ब्रह्मसाक्षात्कारा ॥ वृत्तिलय पावे जंव वीरा ॥ तंववरी जो वैराग्यें खरा ॥ अभंग पुरा पुरुषार्थी तो ॥ ८८ ॥ म्हणसी एका गुरुचेठायीं ॥ तुज सर्वथा विश्वास नाहीं ॥ ये अर्थीं सावध होई ॥ विशद पाहीं सांगेन ॥ ८९ ॥ गुरूनें सांगतांचि कानीं ॥ ज्याची वृत्ति जाय विरोनि ॥ जेवीं मिळतां लवणपाणी ॥ अभिन्नपणीं [३]समरसे ॥ ३९० ॥ त्यासि [3]साधकबाधकताबाध ॥ हें बोलणें अति अबद्ध ॥ जेवीं निर्माल्यिासि [४]वोखद ॥ न पाजवे दुग्ध गर्भस्था ॥ ९१ ॥ यापरी त्यासि कर्तव्यता ॥ नाहींनाहींगा सर्वथा ॥ परी ऐशी हे अवस्था ॥ ज्यासी ×तत्त्वतां नलभेची ॥ ९२ ॥ गुरूनें सांगितलें कानीं ॥ स्वरूपावबोध जाहला मनीं ॥ परी तें न राहेचि निश्चळपणीं ॥ बाह्यदर्शनीं विक्षेपू ॥ ९३ ॥ आसनीं बैसल्या स्वरूपस्थिती ॥ आसन सोडिल्या प्रपंचस्फूर्ती ॥ ऐशी एकदेशी स्थिती ॥ नातळती निजयोगी ॥ ९४ ॥ देह आसनीं निश्चळ ॥ अथवा कर्मीं हो चंचळ ॥ परी वृत्ति सर्वदा निश्चळ ॥ तेचि निर्मळ निजयोगी ॥ ९५ ॥ परशुरामेंसीं रणांगणीं ॥ भीष्म भिडला निर्वाणबाणीं ॥ तोडरीं घातिला जिणोनी ॥ वृत्ति समाधानीं अचंचळ ॥ ९६ ॥ करितां निर्वाणयुद्धीं ॥ ज्याची न मोडे समाधी ॥ हेंचि साधावया त्रिशुद्धी ॥ चोवीस गुरु विधीं वंदिले म्यां ॥ ९७ ॥ देह निश्चळत्वें वृत्ति निश्चळ ॥ देहचंचळत्वें वृत्ति चंचळ ॥ तरी ते देहबुद्धीचि सबळ ॥ नव्हे केवळ निजबोधू ॥ ९८ ॥ होतां प्रपंचदर्शन ॥ वृत्तीसि विक्षेप होय जाण ॥ तो विक्षेप करावया छेदन ॥ बहुगुरुसाधन म्यां केलें ॥ ९९ ॥ निजगुरूंनीं सांगीतल्या अर्था ॥ त्या साधावया परमार्था ॥नानाप्रपंचपदार्थां ॥ गुरुसंज्ञा म्यां केली ॥ ४०० ॥ देखोनि याची विक्षेपता ॥ तेंचि लाविली गुरुत्वपंथा ॥ ऐसेनि साधनें साधितां ॥ जग स्वभावतां परब्रह्म ॥ १ ॥ पूर्वीं गुरूनें बोलिलें नाहीं ॥ तरी पृथ्व्यादिकें बोधितील कायी ॥ तोचि निजार्थ साधावया पाहीं ॥ गुरुउपायीं प्रवर्तलों ॥ २ ॥

---

१ कुण्ठित. २ समूह. ३ एक होतें. ४ मेलेल्या मनुष्यास. ५ खोड्यांत.

*ना. सांगे. 3ना. साधकताबाध. ×ना. सर्वथा.

॥ श्लोक ॥ न ह्येकस्माद्गुरोर्ज्ञानं सुस्थिरं स्यात्सुपुष्कलम् ॥ ब्रह्मैतदद्वितीयं वै गीयते बहुधर्षिभिः ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ गुरूनें सांगितलें निज ज्ञान ॥ हृदयीं प्रकाशलें *चिद्घन ॥ तें विद्युत्प्राय चंचळ जाण ॥ स्थैर्यपण त्या नाहीं ॥ ३ ॥ जें मुळींचि चंचळ ॥ तें कदा नव्हे पुष्कळ ॥ क्षणां भासे क्षणां चपळ ॥ तेणें तळमळ साधकां ॥४॥ जैसें मुखींचें आमिष जाये ॥ तेणें सर्प इंत्रखाइला राहे ॥ तैसी वेधना साधकां होये ॥ वियोग न साहे सर्वथा ॥ ५ ॥ येरवीं ब्रह्म अद्वितीय नित्य ॥ हें सकळ ऋषींचें संमत ॥ त्यांसीही पुसों जातां बहुत ॥ विक्षेप तेथ उठती ॥ ६ ॥ एक ह्मणती ब्रह्म सगुण ॥ एक ह्मणती तें निर्गुण ॥ ऐसे वाद करिती दारुण ॥ युक्तिखंडण अभिमानें ॥ ७ ॥ एक ह्मणती ब्रह्म सप्रपंच ॥ एक ह्मणती निष्प्रपंच ॥ मिळोनियां पांचपांच॥ शब्दकचकच वादविती ॥ ८ ॥ प्रपंचदर्शनें विक्षेपता ॥ तेथ साधावया निज ऐक्यता ॥ स्वबुद्धीनें नानापदार्थां ॥ गुणग्राहकता गुरुरूपें ॥ ९ ॥ तेथ साधकाचे प्रश्न ॥ सहसा न पावती समाधान ॥ यालागीं पुसावया मन ॥ न रिघे जाण ते ठायीं ॥ ४१० ॥ जेथूनि विक्षेपता वाढे ॥ तेथेंचि ऐक्यता जोडे ॥ ते नानागुरुत्वें रोकडें ॥ साधन गाढें योजिलें ॥ ११ ॥ जीं जीं सांगितलीं गुरुलक्षणें ॥ तीं तीं निजबुद्धीचीं साधनें॥ समूळ विक्षेपू तेणें ॥ तीव्रधारणें छेदिला ॥ १२ ॥ तेणें चंचलत्वें निश्चल ॥ फावलें निजबोधाचें मूळ ॥ दृश्य देखतां केवळ ॥ भासे सकळ चिन्मात्र ॥ १३ ॥ जें माझ्या निजगुरूनीं ॥ पूर्वीं दिधलें होतें बोधूनी ॥ तेंचि नानागुरुत्वें साधूनी ॥ विक्षेपें छेदुनी पावलों ॥ १४ ॥ निजगुरु तो एकचि जाण ॥ इतर गुरु साधकत्वें साधन ॥ हें यथातथ्य लक्षण ॥ तुज निरूपण म्यां केलें ॥ १५ ॥ येथें प्रपंचाचें भानाभान ॥ कर्म करितां \$न कळे जाण ॥ लाधली निजबोधाची खूण ॥ समदर्शन सर्वदा ॥ १६ ॥ दृश्य देखतां दृष्टीं ॥ नव्हे दृश्येंसीं भेटी ॥ हारपली कर्मत्रिपुटी ॥ बोधकसवटी अभिनव ॥ १७ ॥ यथेष्ट करितां भोजन ॥ उठेना निराहारलक्षण ॥ जगेंसी वागतां जाण ॥ एकलेपण मोडेना ॥ १८ ॥ तरंग सागरामाजीं क्रीडतां ॥ न मोडे उदकाची एकात्मता ॥ तेवीं जगामाजीं वर्ततां ॥ दुजी वार्ता मज नाहीं ॥ १९ ॥ नवल सद्गुरूची नवायी ॥ सर्वीं सर्व तोचि पाहीं ॥ गुरुवेगळें रितें कांहीं ॥ उरलें नाहीं सर्वथा ॥ ४२० ॥ आतां माझें जें मीपण ॥ तें सद्गुरु जाहला आपण ॥ बोलतें तुझें जें तूंपण ॥ तेंही जाण सद्गुरूचि ॥ २१ ॥ याहीपरी पाहतां ॥ माझा गुरु एक एकुलता ॥ तेथें दुजेपणाची वार्ता ॥ नाहीं सर्वथा यदुवीरा ॥ २२ ॥ ऐशी सद्गुरुकथा ॥ तुज सांगितली परमार्था ॥ हर्षें आलिंगिलें नृपनाथा ॥ दोघां ऐक्यता निजबोधें ॥ २३ ॥ जीवीं जीवा पडली मिठी ॥ आनंदें वोसंडिली सृष्टी ॥ तेणें वाचेसि पडली +बेलवटी ॥ बोलों उफराटी विसरलों ॥ २४ ॥ हर्ष ०नमाय हृदयभुवनीं ॥ बाहेर ओसंडे स्वेदेंजोनी ॥ आनंदघन वोळला नयनीं ॥ स्वानंदजीवनीं वर्षत ॥ २५ ॥ तुटली अहंकाराची बेडी ॥ पावलों भवार्णवपरथडी ॥ ह्मणोनि रोमांचीं उभविली गुढी ॥ जिंतली

१ विजेप्रमाणें. २ ठाव धरून. ३ कधींही. ४ प्राप्त झालें. ५ विपरीत ज्ञान, मनाचें चंचलत्व. ६ खरें. ७ कुंपण, बंधन. ८ घर्म येऊन.

*ना. चिद्घन. \$मो. नलगे. +ना. बेंबळवटी मो. बोल्वटी. ०ना. न संटवे मो. न सांठवे.

गादी अविद्या ॥ २६ ॥ समूळ देहभाव पळाला ॥ यालागीं गात्रकंपू चळचळा ॥ संकल्पविकल्प निमाला ॥ मनेंसी बुडाला मनोरथू ॥ २७ ॥ जीवभावो उखिता ॥ यदूनें अर्पिला गुरुनाथा ॥ तें चिह्न बाहेरी तत्त्वतां ॥ दावी अवस्था निजांगीं ॥ २८ ॥ तो अवधूत जाण दत्तात्रेया ॥ तेणें आलिंगूनि यदुराया ॥ निजरूपाचा बोधू तया ॥ अनुभवात्रया दीधला ॥२९॥ दत्तात्रेयशिष्यपरंपरा ॥ सहस्रार्जुन यदु दुसरा ॥ तेणें जनार्दन तिसरा ॥ शिष्य केला खरा कलियुगीं ॥ ४३० ॥ गुरुप्राप्तीलागीं तत्त्वतां ॥ थोर जनार्दनासी चिंता ॥ विसरला तिन्ही अवस्था ॥ सद्गुरु चिंतितां चिंतनीं ॥ ३१ ॥ देवो भावाचा भोक्ता ॥ दृढ जाणोनि अवस्था ॥ येणें जाहलें श्रीदत्ता ॥ तेणें हात माथां ठेविला ॥ ३२ ॥ हात ठेवितांचि तात्काळ ॥ बोधू आकळिला सकळ ॥ मिथ्या प्रपंचाचें मूळ॥ स्वरूप केवळ स्वबोधें ॥ ३३ ॥ कर्म करूनि अकर्ता ॥ तोचि अकर्तात्मबोध जाहला देता ॥ देहीं असोनि विदेहता ॥ तेही तत्त्वता आकळिली ॥ ३४ ॥ गृहाश्रमू न सांडितां ॥ कर्मरेखा नोलांडितां ॥ निजव्यापारीं वर्ततां ॥ बोधू सर्वथा नमैळे ॥ ३५ ॥ तो बोधू आकळतां मना ॥ मन मुकलें मनपणा ॥ अवस्था नावरेचि जनार्दना ॥ मूर्छापन्न पडियेला ॥ ३६ ॥ त्यासी सावध करूनि तत्त्वतां ॥ ह्मणे प्रेमा हे सत्वावस्था ॥ तोही गिळोनि सर्वथा ॥ होयी वर्तता निजबोधें ॥ ३७ ॥ पूजाविधि करोनि तया ॥ जंव जनार्दन लागला पायां ॥ तंव अदृश्य जाहला दत्तात्रेया ॥ योगमायेचियेनि योगें ॥ ३८॥ कथेसी फांकलों सर्वथा ॥ तो कोपू न मानावा श्रोतां ॥ प्रसंगें गुरुविवंचना होतां ॥ मीही गुरुकथा बोलिलों ॥ ३९ ॥ मज तंव चुकी पडली मोठी ॥ चुकूनि सांगितली गुरुगोठी ॥ तेही संस्कृत नव्हें मराठी ॥ वृथा चावटी न ह्मणावी ॥ ४४० ॥ जो असेल गुरुभक्त ॥ तो हें जाणेल मनोगत ॥ जो गुरुस्मरणें सदोदित ॥ त्यासि हें हृदयस्थ कळेल ॥ ४१ ॥ ज्यासि गुरुचरणीं श्रद्धा गाढी ॥ ज्यासि गुरुभजनीं अति आवडी ॥ जिहीं गुरुप्रेम जोडिलें जोडी ॥ ते हे गोडी जाणती ॥ ४२ ॥ ज्या सद्गुरूचें नांव घेतां ॥ चारी मुक्ती वोडविती माथा ॥ मुक्ती नावडे गुरुभक्ता ॥ नित्यमुक्तता गुरुचरणीं ॥ ४३ ॥ ज्याचे घेतां चरणतीर्थ ॥ चारी मुक्ती पवित्र होत ॥ पायां लागती पुरुषार्थ ॥ धन्य गुरुभक्त त्रिलोकीं ॥ ४४ ॥ चैतन्य नित्य निराधार ॥ निर्धर्मक निर्विकार ॥ त्याचा केला जीर्णोद्धार ॥ सत्य साचार सद्गुरु ॥ ४५ ॥ सद्गुरुकृपा नव्हतां ॥ नव्हती देवाची कथावार्ता ॥ देवासि देवपणीं स्थापिता ॥ सत्य सर्वथा सद्गुरु ॥ ४६ ॥ सद्गुरुकृपेवीण पाहीं ॥ देवो असताचि जाहला होता नाहीं ॥ त्यासि देवपणें ठेवूनि ठायीं ॥ भजविता पाहीं गुरुरावो ॥ ४७ ॥ त्या सद्गुरूची कथा ॥ चुकोनि जाहलों बोलता ॥ थोर अपराध हा माझे माथां ॥ क्षमा श्रोतां करावी ॥ ४८ ॥ वृथा बोलिलों नाहीं जाण ॥ जाहलें बोलावया कारण ॥ दत्तात्रेयशिष्यकथन ॥ करितां जनार्दन आठवला ॥ ४९ ॥ मी जरी नाठवीं जनार्दनासी ॥ परी तो विसरों नेदीच आपणासी ॥ हट देतसे आठवणेसी ॥ अहर्निशीं सर्वदा ॥ ४५० ॥ जिकडे मी विसरोनि जाये ॥ तिकडेचि तो येऊनि राहे ॥ मी जरी त्याजकडे न पाहें ॥ तें न पहाणें होय तो माझें ॥ ५१ ॥ घट सांडूं पाहे आकाशासी ॥ तंव आकाश न सांडी घटासी ॥ तेवीं जनार्दन आह्मासी ॥ अहर्निशीं लागला ॥ ५२ ॥ मी न करीं त्याची कथा ॥ तंव तोचि होय मुखीं वक्ता ॥ ऐसेनि बळात्कारें बोलविता ॥ काय

१ सर्व. २ गृहस्थाश्रम. ३ कर्माची मर्यादा. ४ भजन करविणारा.

म्यां आतां करावें ॥ ५३ ॥ दृश्य मी देखावया बैसें ॥ तंव दृश्या सबाह्य जनार्दन दिसे ॥ श्रवणीं ऐकतां सोरसें ॥ शब्दीं *प्रवेशे जनार्दन ॥ ५४ ॥ आतां नाइकें न पाहें ॥ ह्मणोनि मी उगा राहें ॥ तंव उगेपणाचे अन्वयें ॥ जनार्दन पाहे लागला ॥ ५५ ॥ ऐसा आडकलों त्रिशुद्धी ॥ जनार्दन उगेंहि नेदी ॥ श्रोतां सांगावी जी बुद्धी ॥ मी अपराधी सर्वथा ॥ ५६ ॥ श्रोते ह्मणती नवलावो ॥ येथें न देखों अहंभावो ॥ पाहतां बोलाचा अभिप्रावो ॥ प्रेम पहाहो लोटत ॥ ५७ ॥ तेथील विचारितां बोल ॥ क्षीराब्धीहूनि सखोल ॥ नवल प्रेमाची वोल ॥ येताती डोल स्वानंदें ॥ ५८ ॥ जें त्वां केलें गुरुनिरूपण ॥ तें सप्रेम ब्रह्मज्ञान ॥ थोर निववीलें जाण ॥ नाहीं दूषण निरूपणा ॥ ५९ ॥ नित्य करावें गुरुस्मरण ॥ तें गुरुप्रेम केलें निजकथन ॥ करितां अमृताचें आरोगण ॥ पुरे कोण ह्मणेल ॥ ४६० ॥ जनार्दनीं दृढ भावो ॥ हाही कळला अभिप्रावो ॥ निरूपणाचा नवलावो ॥ रसाळ पहाहो वोडवला ॥ ६१ ॥ तूं मूळकथा निरूपिसी ॥ अथवा आडकथा सांगसी ॥ परी गोडी या निरूपणा ऐसी ॥ नदेखों आणिकासी सर्वथा ॥ ६२ ॥ शुद्धनिरूपणें गुरु वर्णिसी ॥ वर्णूनि अपराधी ह्मणसी ॥ ऐक्यें घोळिली बुद्धि कैसी ॥ मागू श्रोत्यांसी वादविला ॥ ६३ ॥ तुझी जे अपराधबुद्धी ॥ ते प्रवेशली भगवत्पदीं ॥ जाहली अपराधाची शुद्धी ॥ देखणा त्रिशुद्धी तूं होसी ॥ ६४ ॥ गुरुस्तवनीं रतसी ॥ तेव्हां मूळकथा विसरसी ॥ प्रेमाची जाती ऐसी ॥ कळलें आह्मांसी सर्वथा ॥ ६५ ॥ श्रोते ह्मणती आतां ॥ विस्मयो दाटला चित्तां ॥ वेगीं चालवावें ग्रंथा ॥ पूर्वकथा मुळींची ॥ ६६ ॥ हें संतवचन मानोनि माथां ॥ चरण वंदूनि तत्त्वतां ॥ +सावधान व्हावें जी चित्तां ॥ पुढील कथा सांगेन ॥ ६७ ॥ यापरी तो अवधूतू ॥ यदूसि सांगोनि परमार्थू ॥ संवादें निवाला परमाद्भुतू ॥ मग निवांतू राहिला ॥ ६८ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ इत्युक्त्वा स यदुं विप्रस्तमामंत्र्य गभीरधीः ॥
वंदितोऽभ्यर्थितो राज्ञा ययौ प्रीतो यथागतम् ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ उद्धवासि ह्मणे श्रीकृष्ण ॥ रायासि सांगोनि ब्रह्मज्ञान ॥ जाहलें देखोनि समाधान॥ मग पुसोन निघाला ॥ ६९ ॥ राजा धांवोनि लागला चरणां ॥ परमप्रेमें करी पूजना ॥ करोनियां प्रदक्षिणा ॥ मागुता चरणां लागला ॥ ४७० ॥ जाय ऐसें न बोलवे सर्वथा ॥ राहे ह्मणतां ह्मणे स्वामितां ॥ वियोग न साहवे तत्त्वतां ॥ बोलू सर्वथा खुंटला ॥ ७१ ॥ ते देखोनि अवस्था ॥ कृपा उपजली श्रीदत्ता ॥ हात ठेऊनि माथां ॥ प्रसन्नता उपजली ॥ ७२ ॥ येथूनि तुज मज आतां ॥ वियोग नाहीं सर्वथा ॥ ऐसें आश्वासोनि नृपनाथा ॥ होय निघता श्रीदत्त ॥७३॥ जेणें सुखें होता आला ॥ तेणेंचि सुखें निघता जाहला ॥ राजा अतिप्रीतीं निवाला ॥ सुखी जाहला निजबोधें ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ अवधूतवचः श्रुत्वा पूर्वेषां नः स पूर्वजः ॥ सर्वसंगविनिर्मुक्तः समचित्तो बभूवह ॥ ३३ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे नवमोऽध्यायः ॥

१ विसावा. २ भोजन. ३ वरचढपणा दिसतो.

*ना. प्रकाशे. +ना. पुढील कथा सांगेन आतां, जेथें वक्ता श्रीकृष्ण.

टीका ॥ पाहोनि उद्धवा उजू ॥ बोलतसे अधोक्षजू ॥ ह्मणे आमचे पूर्वजांचा पूर्वजू ॥ ध्वजू यदुवीरू ॥ ७५ ॥ ह्मणसी मी नेणें त्याचें नांव ॥ तूं सांगतोसि हें अपूर्व ॥ परी याचेनि नामें आह्मी सर्व ॥ वीर यादव ह्मणवितों ॥ ७६ ॥ हरिखें ह्मणे नंदनंद ॥ तो आमचा पूर्वज यदू ॥ ब्रह्मज्ञानाचा संवादू ॥ [4]दत्तात्रेयेंसी पैं केला ॥ ७७ ॥ श्रीदत्तात्रेयाच्या वचनार्थी ॥ विश्वासोनि जाहला घेता ॥ तेणें सर्वसंगविनिर्मुक्तता ॥ आली हातां यदूच्या ॥ ७८ ॥ जो संगु सोडूनि दूर गेला ॥ [7]तेणें संगू त्यागूचि केला ॥ संगीं असोनि स्नेह सांडिला ॥ संगमुक्त जाहला तो जाण ॥ ७९ ॥ आकाश सर्व पदार्थांसी ॥ मिळालें असे सर्वदेशीं ॥ परी नातळेचि सर्वसंगासी ॥ संगमुक्तता त्यासी बोलिजे ॥ ४८० ॥ याहूनि विशेष संगमुक्तता ॥ आली यदूचिया हातां ॥ तेही सांगेन कथा ॥ परिसे तत्त्वतां उद्धवा ॥ ८१ ॥ दत्तात्रेयबोधें तत्त्वतां ॥ सर्वसंगामाजीं असतां ॥ न देखे कथावार्ता ॥ विशेषमुक्तता या नांव ॥ ८२ ॥ मज पूर्वी द्वैतसंगू होता ॥ तो जाऊनि निःसंग जाहलों आतां ॥ या दोनी समूळ मिथ्या वार्ता ॥ विनिर्मुक्तता पावलों ॥ ८३ ॥ दोर साप नाहीं जाहला ॥ परी सापपणाचा आळ आला ॥ तोही दोरें नाहीं केला ॥ भ्रांतीं कल्पिला [5]निजभ्रमू ॥ ८४ ॥ दोरू दोरपणें असे ॥ सर्प तो बोलिजे भ्रांता मनीं वसे ॥ ऐसें सांडूनी द्वैतपिसें ॥ रायासि सावकाशें समाधी ॥ ८५ ॥ समसाम्य समानबुद्धी ॥ ते बोलिजे निजसमाधी ॥ ते समाधी पावोनि विशुद्धी ॥ राजा निजपदीं निवाला ॥ ८६ ॥ कृष्ण ह्मणे उद्धवासी ॥ तूं जन्मूनि ऐशिये वंशीं ॥ जरी ब्रह्मज्ञान न साधिशी ॥ तरी उणें पूर्वजांसी येईल ॥ ८७ ॥ यापरी हृषीकेशी ॥ तिरस्कारोनि उद्धवासी ॥ झोंबावया अद्वैतासीं ॥ पुट बुद्धीसी देतसे ॥ ८८ ॥ आधींचि विखार काळियाणा ॥ त्याचेंही पुच्छ रगडिल्या जाणा ॥ मग झोंबिन्नल्या सत्राणा ॥ नावरे कोणा सर्वथा ॥ ८९ ॥ आधींचि अनुताप उद्धवाशीं ॥ वरी तिरस्कारिला हृषीकेशीं ॥ तो गिळावयाचि ब्रह्मासी ॥ निजमानसीं खवळला ॥ ४९० ॥ पुढिले अध्यायीं निरूपण ॥ कृष्णउद्धव संवाद जाण ॥ सांगेल गुरुशिष्यलक्षण ॥ श्रोते विचक्षण परिसतू ॥ ९१ ॥ एका जनार्दन ह्मणे ॥ अगाध कृष्णमुखींचें बोलणें ॥ तें मी जरी निरोपूं नेणें ॥ तरी तें गोडपणें निववित ॥ ९२ ॥ साखरेचा [✻]बोळू केला ॥ परी तो कडूपणा नाहीं आला ॥ तैसा ग्रंथ प्राकृतभाषा जाहला ॥ असे संचला [X]स्वानंदू ॥ ९३ ॥ जरी सोन्याचें पेंडकें केलें ॥ परी तें दगडमोला नाहीं आलें ॥ तैसें भागवत प्राकृत जाहलें ॥ परी नाहीं चुकलें निजज्ञान ॥ ९४ ॥ मुक्ताफळालागीं सागरीं ॥ बुडया दीजेती नानापरी ॥ परी तें सांपडलिया घरींच्या विहिरीं ॥ जो अव्हेरी तो मूर्ख ॥ ९५ ॥ तैशी संस्कृत व्याख्या आटाटी ॥ अतिकष्टें परमार्थ भेटी ॥ तें जोडल्या मराठीसाठीं ॥ उपेक्षा दृष्टी न करावी ॥ ९६ ॥ धनवंत रत्नपारखी पुरा ॥ तेणें धुळीमाजीं देखिल्या हिरा ॥ गांठी बांधोनि आणिला घरां ॥ पारखी खरा निजज्ञानें ॥ ९७ ॥ तैसें ज्ञाते विद्वज्जन ॥ ग्रंथ मराठी देखोन ॥ उपेक्षा न करितां करावा [✻]जतन ॥ पारखोनि चिद्रत्न साधावया ॥ ९८ ॥ क्षुद्रदृष्टीं पाहणें पाहतां ॥ बोल लागेल व्यासाचे ग्रंथा ॥ मा हे तरी मराठी कविता ॥ सांडूनि कुटि-

१ कृष्ण. २ विशेष मुक्तता. ३ विषारी काळियासर्प. ४ आवेशानें. ५ सांगे. ६ लहानसें ओझें.

4 ना. केला निजबोध दत्तात्रेयें. 7 ना. तेणें तो संगाचि त्यागिला. 5 ना. निजभ्रमें. ✻मो. घोळ. Xना. स्वानंदें. ✻मो. यत्न.

ळतां पहावी ॥ ९९ ॥ ज्यासी निजसुखाची आवडी ॥ ते प्राकृतीं न काढिती खोडी ॥ घेतील ज्ञानगंभींची गोडी ॥ अवस्था गाढी परमार्थीं ॥ ६०० ॥ जे साचार परमार्थी ॥ ते अधिकारी या ग्रंथीं ॥ ज्यांची भागवतीं भक्ती ॥ते पावती निजसुख ॥१॥ ज्यांसी भागवतीं नाहीं भक्ती ॥ कोरडी व्युत्पत्ती मिरविती ॥ तेही जरी निंदा न करिती ॥ तरी पुढें पावती भक्तीतें ॥ २ ॥ निंदा वसे ज्यांचे चित्तां ॥ त्यांस गति नाहीं सर्वथा ॥ निंदा सकळ पापांचे माथां ॥ दोष ईपरतां असेना ॥ ३ ॥ निंदकाचें नांव घेतां ॥ दोष वाचेशी होय लागता ॥ तिशी यावया प्रायश्चित्ता ॥ रामराम सर्वथा ह्मणावें ॥ ४ ॥ निंदेमाजीं देखिलें स्वार्था ॥ निंदक प्रवर्तले भक्तहितां ॥ बुडवूनि आपुले स्वार्था ॥ परदोष सर्वथा क्षाळिले ॥ ५ ॥ सांडूनियां गुणदोष ॥ श्रोतीं व्हावें सावकाश ॥ जेथें वक्ता हृषीकेश ॥ अतिसुरस तें ज्ञान ॥ ६ ॥ १कृष्णउद्धवांचें ज्ञान ॥ तत्काळ निरसी अज्ञान ॥ एका विनवी जनार्दन ॥ सावधान परियेसा ॥ ६०७ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे कृष्णउद्धवसंवादे एकाकारटीकायां नवमोऽध्यायः॥९

---

# अध्याय दहावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओं नमो सद्गुरुधन्वंतरी ॥ ज्याची दृष्टीच निरुजा करी ॥ त्यावांचोनि संसारीं ॥ भवरोग दुरी नकरवे ॥ १ ॥ ज्या भवरोगाचेनि दर्पें ॥ फुंफात तापलीं त्रिविधतापें ॥ 'मी' माझें येणें संकल्पें ॥ वाग्जल्पें जल्पती ॥ २ ॥ पडिलीं द्वैताचिया दुखणा ॥ तोंडींची चवी गेली जाणा ॥ मुखा आलें कडुपण ॥ कटुवचना बोलती ॥३॥ जे व्याधीचेनि सन्निपातें ॥ विवेक हाणोनियां लातें ॥ उमरडूनियां *धैर्य हातें ॥ वासनावनातें हिंडती ॥ ४ ॥ मनोरथकर्दमीं चरफडित ॥ २संकल्पमृगजळीं बुडत ॥ वेगीं निसरोनियां पडत ॥ टेंकें चढतां स्वर्गाचें ॥५॥ बोरबडित स्नेहाची आरोटी ॥ गोंवीत लोभाची बोरांटी ॥ खिळिला प्रपंचाचिया कांटीं ॥ मागितां तुटी तेथूनि ॥ ६ ॥ ०भवरोगभ्रमें भ्रमले कैसे ॥ खावोंनये तें खावों बैसे ॥ करूंनये तें करितां दिसे ॥ योषितासरिसे धांवत ॥७॥ तेथ धनभयाचे शेंरे येत ॥ तेणें थरथरां कांपत ॥ धाकें धाकें घामेजत ॥ दडी देत गुप्तत्वें ॥ ८ ॥ रोगाभिमान चढे देहीं ॥ तेव्हां नराहे खाटे भुईं ॥ विषीचें वस्त्र टाकी पाही ॥ डोळां ठायीं लागेना ॥९॥ उभें नराहवे ऐक्यवृत्ती ॥ क्षीण झाली ज्ञानशक्ती॥पडलीं जडत्वें लोळती ॥पाणी मागती 4विषयाचें ॥ १० ॥ अल्प अल्प देतां तें जळ ॥ कडकडूनि झोंबती प्रबळ ॥ आह्मासि फार द्या गा जळ ॥ +तृषा केवळ बोलेना ॥११॥ कुपथ्य करितां निरंतर ॥ तंव तो झाला जीर्णज्वर ॥ क्षयो लागलाजी थोर ॥ क्षीण शरीर पडियेलें ॥ १२ ॥ क्षणक्षणां अतिक्षीणता ॥ विकार संचरले जीविता ॥ तेणें प्रबळ वाढली चिंता ॥ सुख सर्वथा बुडालें ॥ १३ ॥ नवल

१ वांकडेपणा. २ ब्रह्मसुखाची. ३ज्ञानरूप गाभ्याची. ४उत्कंठा. ५हिच्याहून. ६आरोग्य. ७ओलांडून. ८ डोंगर. ९ कांटी. १० स्त्रियांबरोबर. ११ रोमांच. १२ शमेना.

१ना. कृष्णउद्धवांचें संवादकथन. * मो. धैर्यातें. २ मो. संकल्पजळीं बुडिया देत. ०मो. रोगभ्रमें. 4मो. विषयत्वें. +ना. तृष्णा. मो. तृप्ती.

रोगाचा पडिपाडु ॥ गोड परमार्थ झाला कडु ॥ केवळ विषप्राय विषय कडु ॥ *तोचि गोड झाला ॥ १४ ॥ ते व्याधीचिया उफाडां ॥ देतां सत्कथाकाढा ॥ श्रवणमुखींच्या भावार्थ-दाढा ॥ पाडी कुडा दांतखिळी ॥१५॥ देतां तुळसी मकरंद 5नासु ॥ वरता जावोंनेदी श्वासु ॥ मस्तक झाडी मानी त्रासु ॥ रोगें बहुवसु व्यापिला ॥ १६ ॥ ऐसा रोग देखोनि गाढा ॥ वैद्य आचार्य धडफुडा ॥ कृपा पाहे जयाकडा ॥ तो रोकडा वांचवी ॥ १७ ॥ निर्धडा वैद्य तो सु-बुद्धी ॥ जीव गेलिया मगें नेदी ॥ जीवेंवीण वांचवी त्रिशुद्धी ॥ अगाध सिद्धी तयाची ॥१८॥ शुद्धभाग्यें करूनि जाण ॥ तो करी जें कृपाकूर्मावलोकन ॥ तेंचि रोगिया अमृतपान ॥ होय सावधान तत्काळ ॥ १९ ॥ एवं झालिया सावधान ॥ रोगी आपणिया आपण ॥ नित्यानि-त्याचें पाचन ॥ करी सेवन माझेनें ॥ २० ॥ तेणें न फिटेचि जीर्णज्वरू ॥ न तुटे क्षयाचा महामारू ॥ हें देखोनियां वैद्य सद्गुरू ॥ रसोपचारू मांडिला ॥ २१ ॥ तेणें अक्षररस अर्ध-मात्रा ॥ +देतां क्षयाचा थारा ॥ मोडोनियां शरीरा ॥ ×अक्षयत्वें खरा उपचार ॥ २२ ॥ दारुण चुकवावया कुपथ्य ॥ वैराग्य राखण ठेविलें 7नित्य ॥ लावूनि अनुसंधानाचें ०पथ्य ॥ निर्दाळिला तेथ भवरोग ॥ २३ ॥ रोगी उपचारिल्यावरी ॥ प्रबळ क्षुधा खवळे भारी ॥ चित्तचिंतेच्या लाह्या करी ॥ क्षणामाझारीं खादल्या ॥ २४ ॥ काळे गोरे चतुर्वर्ण चणे ॥ आश्रमेंसि भाजिले फुटाणे ॥ अहंसोहंगुळेंसि तेणें ॥ निःशेष खाणें तत्काळ ॥ २५ ॥ फळा-भिलाषेसि आशा ॥ वोडे भरली होतीं खसखसा ॥ तींही खादलीं वसवसां ॥ नलगतां घसा गिळिलीं ॥ २६ ॥ गुळसाकरेचा पडिपाडु ॥ खादले कर्माकर्मांचे लाडु ॥ खातां नखणे गोड-कडु ॥ लागला झोडू स्वइच्छा ॥ २७ ॥ ब्रह्माहमस्मीचीं गोमटीं ॥ पक्वान्नें देखिलीं दिठी ॥ तींहीं खाऊनि उठाउठी ॥ मायेपाठी लागला ॥ २८ ॥ ते थाकेंथाकेंचि (निमाली ॥ मिथ्यात्वें नासोनि गेली ॥ स्वानंदें तृप्त झाली ॥ 3झोडी केली भवरोगा ॥ २९ ॥ ऐसा सद्गुरु वैद्य गाढा ॥ जेणें उपचारोनि केलों निधडा ॥ शरण रिघावें तुजपुढां ॥ तंव चहूंकडा तूंचि तूं ॥३०॥ तुजवेगळें आपणियातें ॥ देखोनि शरण यावें तूतें ॥ तंव मीतूंपण हारपलें थितें ॥ कै-सेनि तूंतें भजावें ॥ ३१ ॥ ज्यांच्या सुटल्या जीवग्रंथी ॥ झाले आत्माराम निश्चितीं ॥ तेही अहेतुक भक्ति करिती ॥ प्राप्तीची स्थिती हे जाण ॥ ३२ ॥ गुरुभजनापरतें सुख ॥ मोक्ष मानिती तेही मूर्ख ॥ मोक्ष गुरुचरणींचा रंक ॥ विरळा लोक हें जाणती ॥ ३३ ॥ आम्ही स-द्गुरुदृष्टी परम योग्य ॥ आम्ही गुरुकृपा सदा श्लाघ्य ॥ गुरुसेवा आम्ही सभाग्य ॥ परमयोग्य गुरुस्तवनें ॥ ३४ ॥ सद्गुरूचें नाममात्र ॥ तेंचि आम्हां वेदशास्त्र ॥ सकळमंत्रावरिष्ठ मंत्र ॥ नाम (सर्वत्र गुरूचें ॥३५॥ सद्गुरूचें तीर्थमात्र ॥ सकळतीर्थां करी पवित्र ॥ गुरुचरण तें आमुचें क्षेत्र ॥ वृत्ति स्वतंत्र ते आम्हा ॥३६॥ तूं पुरेपुरे म्हणसी स्तवन ॥ परी वर्णितां तुझे उदार गुण ॥ अतृप्त सर्वथा तुझी मन ॥ तुझी आण वाहतसें ॥ ३७ ॥ तुझे गुण वर्णावया तत्त्वतां ॥ मीं प्रवर्तलों श्रीभागवता ॥ त्वां मज लाविलें भक्तिपंथा ॥ निजकथाकीर्तनीं ॥ ३८ ॥ जयजय

---

१ सामर्थ्य. २ जोराला. ३ निश्चयें. ४ नस्य. ५ सद्गुरु. ६ उत्तम, छातीचा. ७ रसायनाचा इलाज. ८ प्रणवाची अर्धमात्रा. ९ निकाल.

*ना. विषय सदृढ मानिती मो. विषयो झाला. 5ना. रसु. +ना. दाखवितां. × मो. अक्षयी केले. 7ना. तेथें. ०ना. पंथें. (ना. पळाली. 3मो. सांडी. (ना. स्वतंत्र.

सद्गुरु जनार्दना ॥ भवगजपंचानना ॥ एकाकी शरण आलों जाणा ॥ तुझ्या श्रीचरणां पावलों ॥३९॥ पावलों शास्त्र भागवत॥अवधारा तेथिंचा +मथितार्थ ॥ उद्धवासि श्रीकृष्णनाथ॥ परम परमार्थ सांगेल ॥ ४० ॥ यदु अवधूतसंवादेंसी ॥ लक्षणोक्त चोविसां गुरूंसी ॥ परिसोनियां उद्धवासी ॥ भावना ब्रह्मेंसी लिगटली ॥४१॥ ब्रह्म सर्वगत सत्य होये ॥ मजही सबाह्य कोंदलें आहे ॥ तेंचि मज ठाउकें नोहे ॥ कोण उपाय करावा ॥ ४२ ॥ ऐसी उद्धवाची चिंता॥ कळों सरली कृष्णनाथा ॥ तोचि *उपावो सर्वथा ॥ होय सांगता अविरोधें ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ मयोदितेष्ववहितः स्वधर्मेषु मदाश्रयः ॥

वर्णाश्रमकुलाचारमकामात्मा समाचरेत् ॥ १ ॥

॥ टीका ॥ ॥ पूर्वीं वेदरूपें वर्णाश्रम ॥ मीचि बोलिलों स्वधर्म ॥ पंचरात्रादिवैष्णवधर्म ॥ हें उपासनाधर्म गुह्य माझें ॥ ४४ ॥ जो वर्ण तो आश्रम ॥ तेणें तेंचि करावें स्वकर्म ॥ आचरतां परधर्म ॥ दुःख परम पाविजे ॥ ४५ ॥ उद्धवा येथें जाण ॥ कर्ता पाहिजे सावधान ॥ तें सावधानतेचें लक्षण ॥ अति विचक्षण जाणती ॥ ४६ ॥ कर्म चतुर्विध येथ ॥ नित्य आणि नैमित्य ॥ काम्य आणि प्रायश्चित्त ॥ जाण निश्चित विभाग ॥ ४७ ॥ येथ कर्म आचरती स्थिती ॥ सावधान राखावी वृत्ती ॥ आचरावयाची व्युत्पत्ती ॥ विचित्रस्थिती कर्माची ॥४८॥ नित्य आणि नैमित्तिक ॥ हें कर्म जाण आवश्यक ॥ सांडोनियां फलाभिलाख ॥ विधिप्रमुख आचरावें ॥ ४९ ॥ नित्यकर्म अधिक वाढे ॥ तें नैमित्तिकाचे अंगा चढे ॥ काम्य उचंबळे विषयाचे चाडें ॥ तेंचि पडे निषिद्धीं ॥ ५० ॥ फलाभिलाषेंविण ॥ नित्य नैमित्तिक जाण ॥ करावेंगा कृष्णार्पण ॥ आर्पिती खूण जाणोनी ॥ ५१ ॥ काम्य कर्म आवश्यक ॥ त्यजावें गा निःशेख ॥ जेवीं कां वमिलें वमक ॥ परतोनि लोक न पाहती ॥ ५२ ॥ समूळ कामनेतें दंडावें ॥ तेंचि काम्यकर्म सांडावें ॥ येऱ्हवीं काम्यत्याग नसंभवे ॥ कामना जीवें राखतां ॥५३॥ अंतरीं अनिवार कामना ॥ बाह्य विरक्ती दावी जना ॥ ते सांडी विटंबना ॥ त्याग विचक्षणा तो नव्हे ॥५४॥ कामाचेनि अधिक मदें ॥ कर्में निपजती निषिद्धें ॥ समूळ कामनेचेनि छेदें ॥ सर्व निषिद्धें मावळती ॥ ५५ ॥ अथवा देखतांचि निषिद्ध दिठीं ॥ जो हरिनामें गर्जत उठी ॥ निषिद्ध पळे बारा वाटीं ॥ प्रायश्चित्तकोटी हरिनामें ॥ ५६ ॥ जेथ हरिनामाचे उमाळे ॥ तेथ निषिद्ध तत्काळ जळे ॥ निषिद्ध अभक्तां आदळे ॥ भक्तां जवळें तें नये ॥ ५७ ॥ काम्यनिषिद्धांची कथा ॥ भक्तांसि नातळे सर्वथा ॥ भगवंत रक्षी निजभक्तां ॥ दोष तत्त्वतां त्यां नाहीं ॥५८॥ नामें प्रायश्चित्ताच्या कोटी ॥ हे म्यां सांगीतली गुह्य गोष्टी ॥ प्रकट न करावी सृष्टी ॥ गुप्त पोटीं राखावी ॥ ५९ ॥ काम्यनिषिद्धाचा त्याग ॥ तुज म्यां सांगीतला सांग ॥ नित्य नैमित्त्यविभाग ॥ तोही विनियोग परियेसी ॥ ६० ॥ मदर्पणें आवश्यक ॥ करावें नित्यनैमित्तिक ॥ तेंचि चित्ताचें शोधक ॥ साधन मुख्य परमार्था ॥ ६१ ॥ एक ह्मणती स्वधर्म निष्फळ ॥ धर्म नेणतीच ते बरळ ॥ स्वधर्में होय जन्म सफळ ॥ परमार्थ फळ स्वधर्मीं ॥ ६२ ॥ कीड झाडावया दृष्टीं ॥ रज देऊनि पाठीं पोटीं ॥ सुवर्ण घालितां पुटीं ॥ झळकत उठी निज-

१ संसाररूपी हत्ती नाहींसा करणारा सिंह. २ लागली. चिकटली. ३ नारद पंचरात्र वगैरे. ४ अनेक रीतींनें. ५ ओकलेलें. ६ ओक. ७ अमिष्ट. ८ मळ. ९ भट्टींत.

+ना. भावार्थ. *ना. मथितार्थ पाहोनि.

तेजें ॥ ६३ ॥ तैसा मज अर्पितां स्वधर्म ॥ त्याचें सफळ होय निजकर्म ॥ ऐसें नेणोनियां वर्म ॥ कर्मश्रम कर्मठां ॥ ६४ ॥ मज अर्पिती हातवटी ॥ अवघड वाटेल जगजेठी ॥ ज्यासि माझी आवड मोठी ॥ त्याचे दृष्टी मदर्पण ॥ ६५ ॥ कृष्णीं निश्चळ ज्याचें मन ॥ त्याचें कर्म तितुकें कृष्णार्पण ॥ त्यासि न अर्पितांही जाण ॥ सहजें मदर्पण होतसे ॥ ६६ ॥ जो रथीं निश्चळ होऊनियां बैसे ॥ तो नचालतांही चालत दिसे ॥ जाण स्वकर्म त्याचें तैसें ॥ अनायासें मज अर्पे ॥ ६७ ॥ यापरी होऊनि अकामात्मा ॥ सुखें आचरावें स्वधर्मा ॥ तेणें सांडूनि रजतमां ॥ सत्त्वें पुरुषोत्तमा पावती ॥ ६८ ॥ वर्णाश्रमसमुद्भवा ॥ मूळ आश्रयो मी वोळखावा ॥ कुळकर्म निजस्वभावा ॥ उपासावा मी एक ॥ ६९ ॥ वर्णांसि आश्रयो मी प्रसिद्ध ॥ जे जन्मले मुखबाहूरुपाद ॥ आश्रमा आश्रयो मी विशद ॥ गर्जती वेद ये अर्थीं ॥ ७० ॥ देवो देवी कुळाचार ॥ याचे वस्तीचें मी घर ॥ एवं मी सर्वाधार ॥ हा *कर्मीं विचार देखावा ॥ ७१ ॥ गुज परिसे उद्धवा ॥ कर्माध्यक्षू मी जाणावा ॥ कर्मीं मीचि अभिलाषावा ॥ क्रियेनें धरावा मी एकू ॥ ७२ ॥ एवं कर्मा आदि मध्यें अंतीं ॥ मी अविनाश धरितां चित्तीं ॥ तीं कर्मेंचि निष्कर्में होती ॥ जाण निश्चित्तीं उद्धवा ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ अन्वीक्षेत विशुद्धात्मा देहिनां विषयात्मनाम् ॥ गुणेषु तत्त्वध्याने न सर्वारंभविपर्ययम् ॥ २ ॥

॥ टीका ॥ यापरी स्वधर्में जाण ॥ ज्यांचें विशुद्ध अंतःकरण ॥ ते विषयीं उदासीन ॥ हें वोळखण तयांचें ॥ ७४ ॥ तयांसि विषयाची ×आस्था ॥ नाहींनाहीं गा सर्वथा ॥ परी ※सर्वार्थविपरीतता ॥ विषयासक्ता देखती ॥ ७५ ॥ भरलीं मृगजळाचीं तळीं ॥ तेणें नपिकती साळी केळी ॥ तैसी विषयबुद्धी जवळी ॥ स्वसुखफळीं फळेना ॥ ७६ ॥ पाहे पां विषयासक्त ॥ कर्मारंभीं संकल्प करीत ॥ आयुःकामार्थ *क्षेमार्थ ॥ धनधान्यार्थ समृद्धी ॥ ७७ ॥ या हेतू कर्म आरंभित ॥ तें स्वकर्म नव्हे निश्चित ॥ स्वधर्ममिषें मनोरथ ॥ उपासित सर्वदा ॥ ७८ ॥ बैलाची कांस दुहितां ॥ सिंपीभरी दूध नये हाता ॥ तेवीं मनोरथ उपासितां ॥ नलभे सर्वथा निजसुख ॥ ७९ ॥ एवं कर्मेचि तें कर्म नव्हे ॥ केल्याही सिद्धी नपवे ॥ तें विघ्नबाहुल्यें नाश पावे ॥ विघ्न संभवे देवाचें ॥ ८० ॥ विषयसेवनीं आहे सुख ॥ या बुद्धीं शिणशिणोनि मूर्ख ॥ पावले परमदुःखें दुःख ॥ मुख्य याज्ञिक घालूनी ॥ ८१ ॥ वेदत्रयी जाणूनि चपळ ॥ यज्ञकर्मीं अतिकुशळ ॥ वांछितां स्वर्गादिक फळ ॥ पतन केवळ अधोमुखें ॥ ८२ ॥ ऐसेनि विवेकें +निपुणदृष्टी ॥ जो स्वर्गु नेघे तृणासाटीं ॥ वैराग्य लागे त्यापाठीं ॥ उठाउठी घरें रिघे ॥ ८३ ॥ तो वैराग्याचें माहेर ॥ विश्रांतीचें विसांवतें घर ॥ तो नररूपें साचार ॥ विवेक साकार पैं झाला ॥ ८४ ॥ ऐसेनि विवेकें विवेकदृष्टी ॥ स्वर्गादि विषय मिथ्या सृष्टी ॥ ते मिथ्यात्वाची गोठी ॥ ऐक जगजेठी उद्धवा ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ सुप्तस्य विषयालोको ध्यायतो वा मनोरथः ॥ नानात्मकत्वाद्विफलस्तथा भेदात्मधीर्गुणैः ॥ ३ ॥

---

१ घरांत शिरतें.

* मो. कर्मविचार. × ना. अवस्था. ※ मो. सर्वार्थता विपरीतता. * ना. मोक्षार्थ. + मो. पूर्णदृष्टी.

॥ टीका ॥ *स्वप्नमाजीं मनोरथ ॥ मनोमात्रें[1]विलसित ॥ ते निद्रितासि सत्य पदार्थ ॥ मिथ्या होत जागृतीं ॥८६॥ तैसें कामनेचेनि उल्हासें ॥ इंद्रियांचेनि सौरसें ॥ उभयभोगपिसें ॥ नाथिलें त्रसे बुद्धीसी॥८७॥ शिंपीं शिंपपणें असे ॥ धनलोभ्या रुपें भासे ॥ तेवीं विषयाचेनि अभिलाषें ॥ भेदपिसें नसतेंची ॥८८॥ स्वप्नीं देखिलें आत्ममरण ॥ जागृतीं मिथ्या म्हणे आपण ॥ तैसा स्वरूपीं जागा जाहल्या जाण ॥ जन्ममरण त्या नाहीं ॥ ८९ ॥ जंववरी भेदाची भेदसिद्धी ॥ तंववरी जन्ममरण बाधी ॥ भेद मिथ्या झालिया मिथ्या त्रिशुद्धी ॥ अभेदीं बाधा ते नाहीं ॥ ९० ॥ तो भेद[2] केसेनि तुटे ॥ निजस्वरूप कैसेनि भेटे ॥ ते अर्थीं साधन गोमटें ॥ ऐक चोखटें विभागें ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ निवृत्तं कर्म सेवेत प्रवृत्तं मत्परस्त्यजेत् ॥ जिज्ञासायां संप्रवृत्तो नाद्रियेत्कर्मचोदनाम् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ चित्तीं वासनेचे मळ ॥ तेणें भेदु होय सबळ ॥ ते नाशावया चित्तमळ ॥ कर्म निर्मळ सेवावें ॥ ९२ ॥ मागें सांगीतलें निश्चित ॥ जें कां नित्यनैमित्य ॥ तेंचि कर्म गा निवृत्त ॥ साधकीं प्रस्तुत सेवावें ॥ ९३ ॥ जो प्रवर्तला माझ्या भजनीं ॥ तेणें काम्य सांडावें निपटूनी ॥ हें मागें सांगीतलें विवंचूनी ॥ कामना मनीं न धरावी ॥ ९४ ॥ धरोनि मदर्पणाचें बळ ॥ नित्य आचरतां निर्मळ ॥ चित्ताचे चैत्य मळ ॥ जाती तत्काळ नासोनी ॥ ९५ ॥ कृषीवळ[3] करी शेतासी ॥ यथार्थ द्रव्य दे रायासी ॥ तो नंभी[4] ग्रामकंटकासी[5] ॥ तेवीं कृष्णार्पणेंसी होतसे ॥९६॥ झाल्या चित्तमळक्षाळण॥नित्यानित्यविवेक उपजे जाण ॥ इहामुत्रां लाता हाणे ॥ अनित्य त्यजणें वैराग्यें ॥ ९७ ॥ एवं वैराग्य झालिया अढळ ॥ तेणें सत्व होय प्रबळ ॥ तेव्हां मज जाणावया केवळ ॥ वृत्ति निर्मळ ते काळीं ॥ ९८ ॥ करितां माझी चिंता ॥ कामक्रोध नाठवती चित्ता ॥ थोर लागली माझी अवस्था ॥ न राहे सर्वथा अणुभरी ॥ ९९ ॥ होकां ऐशिये अवस्थेसी ॥ कर्मक्रिया नावडे ज्यासी ॥ तेणें संन्यासूनि सर्वकर्मांसी ॥ ब्रह्मज्ञानासी रिघावें ॥ १०० ॥ श्रवण मनन करितां ॥ कर्मांसि झालिया ×विगुणता ॥ बाधक नव्हे माझ्या भक्ता ॥ कर्मकिंकरता[6] त्या नाहीं ॥ १ ॥ स्वधर्म केलिया फळ काये ॥ चित्ताचा मळमात्र जाये ॥ भक्तभजनें निर्मळ आहे ॥ बाधूं नलाहे स्वकर्म ॥ २ ॥ एवं कर्मांची चोदना[7] ॥ मद्भक्तांसि नाहीं जाणा ॥ करितां श्रवणकीर्तना ॥ कर्मबंधना नाकळती ॥ ३ ॥ ऐशिया जिज्ञासअवस्थेसी ॥ कर्मबाधा नाहीं त्यासी ॥ मुख्य तात्पर्य ब्रह्मज्ञानासी ॥ हेंचि उद्धवासी सांगत ॥४॥

॥ श्लोक ॥ यमानभीक्ष्णं सेवेत नियमान्मत्परः क्वचित् ॥ मदभिज्ञं गुरुं शांतमुपासीत मदात्मकम् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ ॥ व्हावया वृत्तीचा उपरम[8] ॥ अहिंसासत्यादि धर्म ॥ आचरावे अविश्रम ॥ बाह्य नेम अविरोधें ॥ ५ ॥ आचरतां अहिंसासत्यादिकेंसी ॥ तंव तंव दशा उजळे कैसी ॥ अतिप्रीती गुरुभक्तीसी ॥ अहर्निशीं गुरु चिंती ॥ ६ ॥ सद्गुरूवीण ब्रह्मज्ञान ॥ सर्वथा नव्हे नव्हे

१ मनानेंच केवल भासलेले. २ द्वैताचें वेड. ३ शेतकरी. ४ भीत नाहीं. ५ गांव कुटाळ. ६ कर्मांचा सेवकपणा. ७ आज्ञा, नियमन, प्रेरणा. ८ लय.

*मो. स्वप्न आणि मनोरथ. ×मो. वैगुण्यता.

जाण ॥ हें उपनिषदर्थ प्रमाण ॥ परमनिर्वाण साधिलें ॥ ७ ॥ डोळा देखणाचि आहे ॥ त्यासि सूर्य नव्हतां साह्ये ॥ सिद्ध पदार्थ देखों नलाहे ॥ स्तब्ध राहे अंधारीं ॥ ८ ॥ नाव तारी हें साचार ॥ माजीं बैसले थोरथोर ॥ परी तारकेंवीण परपार ॥ समर्थ नर न पावती ॥ ९ ॥ पर्जन्यें भूमी मार्दवा आली ॥ बीजें कणिंग असे भरली ॥ परी ज्ञातेनें पेरणी नाहीं केली ॥ तंव पिकाची बोली पोंचट ॥ ११० ॥ रत्न सांपडलें अवचितें ॥ परी खरेंखोटें संशय तेथें ॥ रत्नपारखी करी मोलातें ॥ अति यत्न त्यातें मग करिती ॥११॥ तैसें निजस्वरूप आइतें ॥ श्रद्धासद्गुरूचेनि हातें ॥ खरें करूनियां ज्ञाते ॥ निजसुखातें पावले ॥ १२ ॥ साधावया निजज्ञान ॥ करितां सद्गुरूचें सेवन ॥ निवाले संतसज्जन ॥ आनंदघन सद्गुरु ॥ १३ ॥ ह्मणसी साधनें केलीं अनेक ॥ तैसें सद्गुरूही साधन एक ॥ ह्मणतां मुमुक्षू झाले मूर्ख ॥ निजात्मसुख बुडालें ॥ १४ ॥ सद्गुरु केला तो साधन ॥ त्याहूनि परतें साध्य आन ॥ ह्मणतां आली नागवण ॥ नागवला जाण सर्वस्वें ॥ १५ ॥ जो चित्सुखें सदा संपन्न ॥ चिद्रूपीं ज्यासी समाधान ॥ तो चिन्मात्राहोनि भिन्न ॥ नव्हे जाण सर्वथा ॥ १६ ॥ लवण सागरीं रिघालें ॥ तव्हांचि तें समुद्र झालें ॥ दीपें वणव्या आलिंगिलें ॥ वणवाचि झालें तें तेज ॥ १७ ॥ एवं चिद्रूपाचें ज्यासि ज्ञान ॥ तो चिद्रूपचि सत्य संपूर्ण ॥ गुरु ब्रह्म अभिन्न जाण ॥ ये अर्थी प्रमाण उपनिषदें ॥ १८ ॥ होकां घृतांची पुतळी ॥ नव्हतां घृतपणा वेगळी ॥ घृतरूपें रूपा आली ॥ तैशी मूर्ती जाहली सद्गुरूची ॥ १९ ॥ तो चित्सुखाचा पुतळा ॥ कीं सच्चिदानंदाचा सोहळा ॥ प्रत्यक्ष देखावया डोळां ॥ धरी लीलाविग्रहो ॥ १२० ॥ त्याची व्हावया भेटी ॥ पाहिजेती भाग्याचिया कोटी ॥ Xहे बोलणेंवरी दिसे दिठी ॥ तैशी गोठी ते नाहीं ॥ २१ ॥ सद्गुरु जेउती वाम पाहे ॥ तेउती सुखाची दृष्टि होये ॥ तो ह्मणे तेथ 4राहे ॥ महाबोधु *स्वानंदें ॥ २२ ॥ त्या सद्गुरूचे देखिल्या पाये ॥ ताहानभूक तत्काळ जाये ॥ कल्पना उठोंचि नलाहे ॥ निजसुख आहे गुरुचरणीं ॥ २३ ॥ त्या सद्गुरूचें लक्षण ॥ सांगतां शब्द थोटावे जाण॥जो सनातन ब्रह्म पूर्ण ॥ ऊण स्तूण त्या नाहीं ॥२४॥ तरी स्फुरली एकी स्फूर्ती ॥ त्यासि सर्वार्थीं दिसे शांती॥शांतीवेगळी उपपत्ती॥प्रमाण निश्चितीं रिघेना ॥२५॥ शांति तेचि ब्रह्मज्ञान ॥ शांति तेचि समाधान ॥शांति तेचि ब्रह्म पूर्ण ॥ सत्य जाण उद्धवा ॥२६॥ ऐसी सद्गुरूची स्थिती ॥ ऐकोनि शिष्याच्या चित्तीं ॥ वाढली अतिप्रीती ॥ गुरुभक्तीलागोनी ॥ २७ ॥ यालागीं गुरुगवेषणा ॥ उसंत घेवोंनेदी अंतःकरणा ॥ अष्टौ प्रहर विचक्षणा ॥ गुरुलक्षणा लक्षिनू ॥२८॥ कें तो स्वामी देखेन ऐसा ॥ कें हा माझा फिटेल भवफांसा ॥ कें उपरमु होईल मानसा ॥ सद्गुरुपिसा तो झाला ॥२९॥ आयुष्य वेंचलें उठाउठी ॥ अझूनि नव्हे सद्गुरूची भेटी ॥ झाल्या मनुष्यदेहासि तुटी ॥ सर्वस्व शेवटीं बुडेल ॥ १३० ॥ ऐकतां गुरूचें नांव ॥ 6मनापुढें घेत धांव ॥ ते गोष्टीसीचें देत खेंव ॥ येवढी हांव जयाची ॥ ३१ ॥ सद्गुरु प्रत्यक्ष न भेटतां ॥ मनेंचि पूजी गुरुनाथा ॥ परमानंदें पूजा करितां ॥ प्रेम तत्त्वतां नसंटे ॥ ३२ ॥ सद्गुरु भेटावयाकारणें ॥ हिंडे तीर्थें तपोवनें ॥ गुरु न विसंबे मनें ॥ नित्य

१ मीठ. २ तुपाची. ३ लीलादेह. ४ जेवढी. ५ वाट. ६ लंगडा पडतो. ७ जुना. ८ युक्ति. ९ गुरूचा शोध. १० विसांवा. ११ त्या नांवालाच आलिंगन देतो. मूर्ति दूरच.

Xना. हेळणेवरी. 4ना. लवलाहें. *ना. राहे स्वानंदें. 6मो. नांवापुढें.

विधानें आचरतां ॥ ३३ ॥ सद्गुरुप्राप्तीचिया काजा ॥ लहानथोरांची करी पूजा ॥ अत्यादरें मानी द्विजा ॥ गुरु मज माझा भेटवा ॥ ३४ ॥ अस्वलीचिया परी ॥ गुरुनामाचा जप करी ॥ गुरुत्वांचोनि निरंतरीं ॥ *चिंता न करी आनौती ॥३५॥ आसनीं भोजनीं शयनीं ॥ गुरुतें न विसंबे मनीं ॥ जागृतीं आणि स्वप्नीं ॥ निदिध्यासनीं गुरु केला ॥ ३६ ॥ गुरु स्मरण करितां देख ॥ स्मरणें विसरे ताहानभूक ॥ विसरला देहगेहसुख ॥ सदा संमुख +परमार्थी ॥ ३७ ॥ ऐसी सद्गुरूची आवडी ॥ ज्याची अवस्था चढोवढी ॥ त्यासि गुरुरूपें तातडीं ॥ भेटी रोकडी मी देता ॥ ३८ ॥ जंवजंव अवस्था अधिक ॥ तंवतंव भेटीची जवळिक ॥ साधनांमाजीं हें साधन मुख्य ॥ अवस्थाचि एक विशेष ॥ ३९ ॥ करितां वरिष्ठसाधनकोडी ॥ बोधाची जोडेना कवडी ॥ सद्गुरुभजनाची अर्ध घडी ॥ जोडी कोडी बोधाच्या ॥ १४० ॥ सद्गुरु-भजनीं लागवेगें ॥ मोक्ष येऊनि पायां लागे ॥ गुरुभक्त तोही नेघे ॥ चरणरंगें रंगला ॥ ४१ ॥ श्रीगुरुचरणांची गोडी ॥ विसरवी मोक्षसुखाच्या कोडी ॥ गुरुभजनीं जयां अनावडी ॥ ते संसारबांदवडीं पडियेले ॥ ४२ ॥ छेदावया संसारबंधन ॥ करावें सद्गुरूचें सेवन ॥ सद्गुरु-सेवा तें माझें भजन ॥ गुरु आह्मां भिन्नभावो नाहीं ॥ ४३ ॥ गुरुभक्तांची श्रद्धा गाढी ॥ आणि गुरुभजनाची गोडी ॥ ते सांगीतली आवडी ॥ प्रत्यक्ष उघडी करूनी ॥ ४४ ॥ सहज प्रसंगें येणें ॥ शिष्यांचींही लक्षणें ॥ सांगेन तुजकारणें ॥ कृष्ण ह्मणे उद्धवा ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ अमान्यमत्सरो दक्षो निर्ममो दृढसौहृदः ॥ असत्वरोऽर्थजिज्ञासुरनसूयुरमोघवाक् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ मान देखोनि सहसा ॥ शिष्य सांकडों लागे कैसा ॥ जेवीं गळीं लागला मासा ॥ चरफडी तैसा सन्मानें ॥ ४६ ॥ नाम ऐकोनि वागुलातें ॥ बाळ सांडू पाहे प्राणातें ॥ तेवीं ऐकतांचि सन्मानातें ॥ भयें प्राणांतें सांकडे ॥ ४७ ॥ चंडवातें जेवीं केळी ॥ समूळ कांपे चळचळी ॥ कां लहरीच्या कल्लोळीं ॥ कांपे जळीं रविबिंब ॥ ४८ ॥ सन्मान तेणें पाडें ॥ दृष्टीं देखोनि नावडे ॥ महत्त्वें थोर सांकडें ॥ अंगाकडे येवोंनेदा ॥४९॥ आदरें घेतां सन्मान॥ दृढ *होईल देहाभिमान ॥ सांडोनि मानाभिमान ॥ हीनदीन होऊनि असे ॥ १५० ॥ ⁹समूळ नामरूप जाये ॥ मज कोणी देखों नलाहे ॥ ऐसी दशा जेणें होये॥ ते ते उपाये करीतसे॥५१॥ लौकिक देखोनि उद्वेगू ॥ देहगेहांचा उबगू ॥ एकलेपणीं अति चांगू ॥ न धरी संगू द्वैताचा ॥ ५२ ॥ मज कोणीं न देखावें ॥ मज कोणीं न वोळखावें ॥ मज कोणीं न लाजावें ॥ ऐसें जीवें वांछितू ॥ ५३ ॥ मान देखोनियां दिठीं ॥ लपे देहउपेक्षेच्या पोटीं ॥ जेवीं चोर लाग-लिया पाठीं ॥ लपे संकटीं धनवंतू ॥ ५४ ॥ मी एक लौकिकीं आहें ॥ ऐसें कोणा ठावें नोहे ॥ ऐशीऐशी दशा पाहे ॥ मान न साहे यालागीं ॥ ५५ ॥ सांडावया अहंममता ॥ मान नपाहे सर्वथा ॥ लौकिकीं सन्मानू घेतां ॥ दृढ अहंता होईल ॥ ५६ ॥ ज्यांचे पोटीं दृढ अभिमान ॥ ते सदा वांछिती सन्मान ॥ जो सांडूं निघे अभिमान ॥ तो मानापमान न पाहे ॥ ५७ ॥

१ अस्वलाची गुरगूर अखंड चालू असते एवढ्या दृष्टीनेंच ही उपमा आहे. २ सान्निध्य. ३ मोक्षही पत्करीत नाहीं. ४ पायाच्या प्रेमानें. ५ प्रीति नाहीं. ६ बंधनांत. ७ त्याचप्रमाणें. ८ त्रास. ९ उपेक्षेच्या पोटीं लपतो=उपेक्षेचा आश्रय करितो=( मानाची ) उपेक्षा करितो.

*ना. गुरू न करी आतौता. +मो. परमाल्हादी. *ना. येईल. 9ना. सकळ.

जेणें घेतला सन्मान ॥ त्या नेघवे अपमान ॥ तेथ सहजें आला देहाभिमान ॥ यालागीं सन्मान नावडे ॥ ५८ ॥ सन्मान घ्यावया तत्त्वतां ॥ ज्ञातेपण मिरवी ज्ञाता ॥ ते संधीं वसे ममता ॥ अर्थस्वार्थाचेनि लोभें ॥ ५९ ॥ एवं नापेक्षी सन्मान ॥ हें प्रथम शिष्याचें लक्षण ॥ आतां निर्मत्सरत्व संपूर्ण ॥ तें सुलक्षण परियेसीं ॥ १६० ॥ सज्ञानामाजीं वैर ॥ ज्ञातृत्वाचाचि मत्सर ॥ तेथें देहाभिमानें केलें घर ॥ अतिदुस्तर जीवासी ॥ ६१ ॥ ज्ञानाभिमानाची गोष्टी ॥ वेंचूनि तपाचिये कोटी ॥ दुंजी करीत होता सृष्टी ॥ अभिमान पोटीं ज्ञानाचा ॥ ६२ ॥ ज्ञानाभिमान दुर्वासासी ॥ व्यर्थ शापिलें अंबर्षी ॥ म्यां सोशिलें गर्भवासांसी ॥ ज्ञानाभिमानासी भिऊनी ॥ ६३ ॥ ज्ञानाभिमान ब्रह्मयासी ॥ नेलें गोपालवत्सांसी ॥ मज होणें पडिलें त्या वेषांसी ॥ ज्ञानाभिमानासी भेऊनी ॥ ६४ ॥ उद्धवा ज्ञानाभिमान ॥ सर्वांअभिमानांमाजीं कठिण ॥ वसिष्ठ विश्वामित्र जाण ॥ ज्ञानाभिमानें भांडती ॥ ६५ ॥ एवं ज्ञानाभिमानाभेण ॥ म्यां घेतलें गोवळेंपण ॥ मज मूर्ख ह्मणती याज्ञिक ब्राह्मण ॥ त्यांसि ज्ञानाभिमान कर्माचा ॥ ६६ ॥ मुख्य माझीच ऐशी दशा ॥ तेथें इतरांचा पाड कायसा ॥ ज्ञानाभिमानाचा दृढ फांसा ॥ नुगवे सहसा ज्ञात्यासी ॥ ६७ ॥ ज्ञानाभिमानाची जाती कैशी ॥ उभा न ठाके मूर्खांपाशीं ॥ वैर लावी सज्ञानासी ॥ समत्सरेंसी वर्तवी ॥ ६८ ॥ एवं निर्मत्सर होणें ज्यासी ॥ तेणें सांडावें ज्ञानाभिमानासी ॥ येरवीं तो ज्ञातयासी ॥ समत्सरेंसी नांदवी ॥ ६९ ॥ ऐक मत्सराची सामग्री ॥ देहीं देहाभिमान दृढ करी ॥ तोही ज्ञातेपणाचें बळ धरी ॥ लोभ माझारी अर्थस्वार्थें ॥ १७० ॥ इतुकी सामग्री जेथें होये ॥ तोचि मत्सरें द्वेषु वाहे ॥ शुद्ध शिष्य हें न साहे ॥ त्यागोनि जाये मत्सरू ॥ ७१ ॥ मत्सराची जाती कैशी ॥ अवश्य वसे ज्ञात्यापाशीं ॥ मत्सरू थोर पंडिताशी ॥ यावज्जन्मेंसी न सांडिती ॥ ७२ ॥ पंडित भेटती समत्सर ॥ लवण भंजन अतिनम्र ॥ बोल बोलती अतिमधुर ॥ समत्सर छळणोक्तीं ॥ ७३ ॥ मत्सरें पंडित येती क्रोधा ॥ असदारोपणें करिती निंदा ॥ एवढी मत्सराची बाधा ॥ नातळे कदा सच्छिष्या ॥ ७४ ॥ मत्सरू ज्ञात्यातें न सोडी ॥ मा इतर काइसीं बापुडीं ॥ शिष्य द्वेषाची गोष्टी सोडी ॥ मत्सरू तोडी सर्वस्वें ॥ ७५ ॥ मत्सर सांडूनि तत्त्वतां ॥ शिष्यें राहावें सर्वथा ॥ निर्मत्सरतेची कथा ॥ ऐक आतां सांगेन ॥ ७६ ॥ पुढूनि स्वार्थ नेतां ॥ द्वेष उपजों नेदी चित्ता ॥ भूतीं भगवंत भाविता ॥ द्वेषु सर्वथा येवों नेदी ॥ ७७ ॥ निंदेचिया वाग्बाणीं ॥ दारुण विंधिल्या दुर्जनीं ॥ द्वेष उपजों नेदी मनीं ॥ हित मानी निंदेचें ॥ ७८ ॥ जेणें जेणें निजनिंदा केली ॥ तो तो मानी हित माउली ॥ पापमळाची *क्षाळणा झाली ॥ शुद्ध केली माझी वृत्ती ॥ ७९ ॥ ऐसऐशिया विवंचना ॥ द्वेष आतळों नेदी मना ॥ निर्मत्सरता ते हे जाणा ॥ दुसरी लक्षणा शिष्याची ॥ १८० ॥ यावरी जे दक्षता ॥ तेही तुज सांगों आतां ॥ शिष्याची +प्रागल्भता ॥ निजस्वार्था लागोनी ॥ ८१ ॥ उगवल्या 7सावधानभास्करा ॥ नाशी निद्रेतंद्रेच्या अंधारा ॥ होय धारणेचा दिवस खरा ॥ धृतीच्या दुपारा वर्ततु ॥ ८२ ॥ त्या दिवसाचेनि लवलाहे ॥ शमदमादिसमुदायें ॥ भक्तिपंथीं चालताहे ॥ मार्गीं नराहे क्षणभरी ॥ ८३ ॥ तेथें उचलता पाउलीं ॥ निजबोधाची

१ फटींत. २ इच्छा करीत नाहीं. ३ द्वेष नसणें. ४ दुसरी. ५ भीतीनें. ६ गोपाळाचें. रूप ७ खोट्या आरोपानें. ८ हितकर्त्री आईच असें निंदकास समजती. ९ तत्परता. १० सावधानरूप सूर्य.

*ना. क्षाळणता मो. क्षाळता. +मो. प्रागल्भ्यता. 7मो. सावधान दिनकरा.

पव्हे टाकिली ॥ जेथ पांथिकांची निवाली ॥ ×निजआर्ते तृष्णेची ॥ ८४ ॥ तेथ निजग्रामीं-चे भेटले ॥ सोहंसांगाती एकवटले ॥ तेथूनि चुकणेया मुकले ॥ नीट लागले निजपंथीं ॥८५॥ ऐकें बापा विचक्षणा ॥ आळसू आतळों नेदी मना ॥ त्या नांव दक्षता जाणा ॥ तिसरी लक्षणा शिष्याची ॥ ८६ ॥ जुनाट संग्रहो सर्वे होता ॥ ते सर्व सांडिली ममता ॥ सांडिल्याची क्षिती मागुता ॥ नकरी सर्वथा निजबोधें ॥ ८७ ॥ देहीं दृढ धरावी अहंता ॥ तेणें देहसंबंधाची ममता ॥ देहाभिमान नातळे चित्ता ॥ गेली ममता नलगतां ॥ ८८ ॥ देह नश्वरत्वें देखिला ॥ विष्ठामूत्रांचा मोधळा ॥ यालागीं अहंकारू गेला ॥ सोहं लागला दृढभावो ॥ ८९ ॥ दृढ वाढवूनि सोहंता ॥ ❋तेणें सांडविली अहंममता ॥ हे चौथी गा अवस्था ॥ जाण तत्त्वता शिष्याची ॥ १९० ॥ गुरु माता गुरु पिता ॥ गुरु गणगोत तत्त्वतां ॥ गुरुबंधूशीं सुहृदता ॥ निजस्वार्था शिष्याच्या ॥ ९१ ॥ गुरुपरिचर्या नित्यकर्म ॥ गुरुसेवा हाचि स्वधर्म ॥ गुरु तोचि आत्माराम ॥ सुहृदसंभ्रम सद्गुरूसी ॥९२॥ ऐसें सद्गुरूसी सुहृदपण ॥ असावें शिष्यासी संपूर्ण ॥ हें पांचवें गा लक्षण ॥ सत्य जाण उद्धवा ॥ ९३ ॥ चंचळत्वें चंळु चित्ता ॥ येवोंनेदी सर्वथा ॥ निजीं 7निजरूपनिश्चळता ॥ साधी सर्वथा सर्वस्वें ॥ ९४ ॥ जरी चंचळ झालें अंग ॥ चित्त गुरुचरणीं निश्चळ चांग ॥ अंगीं वाजतां लगबग ॥ वृत्ति अभंग गुरुचरणीं ॥ ९५ ॥ शरीर वर्ततां व्यापारां ॥ ज्याचे हृदयीं नाहीं त्वरा ॥ गुरुचरणीं धरिला थारा ॥ +हा शिष्य खरा परमार्थी ॥ ९६ ॥ 8ज्यासि हृदयीं चंचळता ॥ तो शिष्य नव्हे निजस्वार्था ॥ ज्याचे अंतरीं निश्चळता ॥ तोचि परमार्था साधकू ॥९७॥ ऐसी साधूनि निश्चळता ॥ ज्यासि निजस्वार्थीं जिज्ञासता ॥ तोचि क्षणार्धें परमार्था ॥ पावे तत्त्वतां गुरुवाक्यें ॥ ९८ ॥ जैसा दीपें दीप लाविला ॥ लावितांचि तत्समान झाला ॥ तैसा निश्चळ गुरु भेटला ॥ तो तत्काळ झाला तद्रूप ॥ ९९ ॥ एवं अंतरीं जें निश्चळपण ॥ तें शिष्याचें श्रेष्ठ लक्षण ॥ तो साहवा गा गुण जाण ॥ तेणें निर्दळण षड्विकारां ॥ २०० ॥ षड्विकार देहावरी ॥ शिष्य देहबुद्धी हातीं न धरी ॥ यालागीं मावळली जे विकारीं ॥ गुरुवाक्यंकरीं वर्ततां ॥ १ ॥ ऐसी साध्य करूनि निश्चळता ॥ साधूं रिघे जो परमार्था ॥ धरोनियां अर्थजिज्ञासता ॥ होय भजता गुरुचरणीं ॥ २ ॥ ज्यासि अर्थजिज्ञासता नाहीं ॥ तो भजेना गुरूच्याठायीं ॥ जरी भजेल कांहींबाही ॥ तरी स्वार्थें पाही विषयाच्या ॥ ३ ॥ सांडोनियां विषयस्वार्था ॥ इत्थंभूत जाणावया अर्था ॥ जो भजे परमार्था ॥ जिज्ञासता त्या नांव ॥ ४ ॥ ऐशी धरोनि जिज्ञासता ॥ चढती आवडी परमार्था ॥ आरोंणूक नाहीं चित्ता ॥ निजस्वार्थाचेनि लोभें ॥ ५ ॥ अतिप्रीतीं परमार्था ॥ चढती वाढती अवस्था ॥ हे सातवी लक्षणता ॥ जाण तत्त्वतां शिष्याची ॥ ६ ॥ हें सातवें लक्षण ॥ परमार्थाचें अंगण ॥ पावलें असे जाण ॥ जिज्ञासुपणाचेनि नेटें ॥ ७ ॥ गुरु बहुतांची साउली ॥ शिष्यवर्गांची माउली ॥ तेथें असूया जेणें केली ॥ त्याची बुडाली निजप्राप्ती ॥ ८ ॥ यालागीं गुरूचा जो जो अंकितू ॥ तो तो गुरुत्वेंचि मानितू ॥ असूया नाठवे

---

१ वाटसरूंची. २ तृष्णेची पीडा. ३ चुकावयास. ४ दुःख, परवा. ५ गाठोडें. ६ स्नेहाचा गौरव. ७ चलन. ८ देह बुद्धि मावळली. ९ गुरुवाक्यैंकरून. १० आहेतसा. ११ प्रतिबंध. १२ द्वेषबुद्धि.

× ना. तृषा हरली तृष्णेची. ❋ मो. तेणें संबंधी यांची निर्ममता. 7 मो. निजनिश्चळता. + मो. होय. 8 मो. ज्याचे.

मनांत ॥ अतिविनीत सर्वांसी ॥ ९ ॥ गुरुबंधु कनिष्ठ दीन ॥ त्याच्याठायीं उत्तम गुण ॥ जाणोनि मनीं आपण ॥ असदारोपण तेथें *करी ॥ २१० ॥ पुढिलांचा उत्तम गुण ॥ त्यासि मिथ्या लावूनि दूषण ॥ लटिकें ह्मणे त्याचें [3]ज्ञान ॥ असूया जाण यानांव ॥ ११ ॥ प्रत्यक्ष भेटल्या वर्णी गुण ॥ नम्र होवोनि वंदी चरण ॥ सवेंचि मागें करी छळण ॥ असूया संपूर्ण यानांव ॥ १२ ॥ सच्छिष्य ये अर्थी निर्मळ ॥ होवों नेदी असूयेचा विटाळ ॥ उत्तम मध्यमप्राकृतमेळ ॥ वंदी परी छळ करूं नेणे ॥ १३ ॥ गुरूनें शिकविली वस्तुसमता ॥ तेथ निरंतर ठेवूनि चित्ता ॥ समभावें वंदी समस्तां ॥ छळूं सर्वथा तो नेणे ॥ १४ ॥ यापरी गा उद्धवा ॥ छळूं नेणे कोणा जीवा ॥ हा अनसूयु ह्मणावा ॥ गुण आठवा शिष्याचा ॥ १५ ॥ हे अष्टौ महामणिमोळीं ॥ अखंड ज्याच्या हृदयकमळीं ॥ तो पावे सद्गुरुजवळी ॥ नव्हाळी भेटीची ॥ १६ ॥ यावरी नववें लक्षण ॥ तें जाण नवविधान ॥ सत्यपूत संभाषण ॥ वाग्विलापन सांडूनी ॥ १७ ॥ सद्गुरुप्रति जाण ॥ [7]मृदु विनीत करी प्रश्न ॥ सत्याचें सत्य तें गुरुवचन ॥ मानी जाण निजभावें ॥ १८ ॥ युक्ति वाढवून उदंड ॥ नानामतें अकांडतांड ॥ +साद्य संचरोनि पाखांड ॥ गर्जत तोंड महावादें ॥ १९ ॥ साधका बाधका युक्ती ॥ माजीं संचरोनि छळणोक्ती ॥ आपुली मिरवावी युक्ती ॥ हें नाहीं चित्तीं शिष्याचे ॥ २२० ॥ सद्गुरुपुढें अतिजल्प ॥ करणें तेंचि महापाप ॥ हें जाणूनि सांडी वृथालाप ॥ मिथ्या अल्प बोलेना ॥ २१ ॥ शिष्याचें बोलणें कैसें ॥ वाचा परिपक्व अमृत जैसें ॥ बोल घोळले प्रेमरसें ॥ प्रश्न पुसे एकांतीं ॥ २२ ॥ मिथ्यावादाचीं अपक्वफळें ॥ तुरटें तिखटें तोंडाळें ॥ सेंदेंठीं झडलीं पूर्वकाळें ॥ बोले प्रांजळें परिपक्व ॥ २३ ॥ बोलों नेणे छळ छंद्र ॥ स्पर्शो नेणे परधर्म ॥ बोलीं नुपजवी अधर्म ॥ मनोधर्मक्षोभक ॥ २४ ॥ व्यर्थ न करी आशंका ॥ निंदेलागीं तो मुका ॥ झकवूं नेणे लोकां ॥ बाळां मूर्खां पंडितां ॥ २५ ॥ बोलों नेणे अतिकर्कश ॥ करूं नेणे उपहास ॥ बोलामाजीं न घाली आस ॥ बोले नैराश्य वैराग्य ॥ २६ ॥ बोलीं बोलूं नेणे आटु ॥ छळणोक्तीं नव्हे शेंठु ॥ बहु बोलतां मानी विटु ॥ मौननिष्ठ होऊनि राहे ॥ २७ ॥ वाद विवाद अतिवाद ॥ नावडे कोणाचा संवाद ॥ न करी बोलाचा विनोद ॥ लौकिक शब्द न बोले ॥ २८ ॥ वक्रोक्ति नाहीं जाण ॥ बोलीं न बोले विंदाण ॥ करूं नेणे प्रतारण ॥ मिथ्या वचन न बोले ॥ २९ ॥ पोटीं कार्य नाहीं करणें ॥ हो हो ह्मणोनि झकविणें ॥ हेंही नाहीं तया बोलणें ॥ सदा पढणें हरिनाम ॥ २३० ॥ पश्चिमद्वारींचें कवाड ॥ सदा वाऱ्यानें करी खडखड ॥ तैशी न करी बडबड ॥ वृथा तोंड पिटीना ॥ ३१ ॥ करितां शब्दब्रह्मसंवाद ॥ युक्तिबोधें विद्वांसांसी क्रोध ॥ अनिवार देखोनि बाधू ॥ न बोले शब्द शाब्दिक ॥ ३२ ॥ न मिरवी शब्दज्ञान ॥ न दाखवी आत्ममौन ॥ न धरी वचनाभिमान ॥ सदा स्मरण गुरूचें ॥ ३३ ॥ बोलें नुपजवी उद्वेग ॥ बोलाव्या न करी उद्योग ॥ बोली नुठवी महावेग ॥ अनुद्वेग बोलणें ॥ ३४ ॥ सत्य आणि अतिम-

१ खोटेपणाचा आरोप. २ दुसऱ्यांचा. ३ उ० म० कनिष्ठांचा समुदाय. ४ सर्व वस्तुसमानता. ५माळ. ६ सत्यानें पवित्र. ७ वडवड. ८ नास्तिक मत स्वीकारून. ९ फार वाचाळपण. १० कच्चीं फळें. ११मार्ग. १२ कपट. १३ दुसऱ्याची नाजूक गोष्ट. १४ कठोण, दुर्बोध. १५ ठक. १६ बोलणें. १७ तंडणें. १८वांकडें बोलणें. १९ कपट. २० ठकविणें. २१ पश्चिमचा वारा सदा वाहतो म्हणून. २२ विद्वानास.

*ना. न करी. [3]ना. वचन. [7]ना. मृदुमंजुळ. मो. मृदुमपित. +मो. वादऊनि पाखांड.

गुरु ॥ ऐकतां अत्यंत आल्हादकर ॥ सर्वांसि हितत्वें साचार ॥ बोले सनागर हरिकथा ॥ ३५ ॥ प्रार्थूनियां सद्गुरूसी ॥ बहु बोलणें नाहीं त्यासी ॥ पुसणें एकाक्षरासी ॥ निजसुखा-सी सेवावया ॥ ३६ ॥ एवं शिष्याचीं नव लक्षणें ॥ नवखंडपृथ्वीचीं आभरणें ॥ निजकृपेनें नारायणें ॥ भक्ताकारणें दीधलीं ॥ ३७ ॥ हे नवरत्नमाळा गोमटी ॥ जो घाली सद्गुरूच्या कंठीं ॥ तो बैसे सायुज्याच्या *पाठीं ॥ उठाउठीं तत्काळ ॥ ३८ ॥ या नवरत्नांचें पदक ॥ ज्या शिष्याचे हृदयीं देख ॥ तो सद्गुरूचा अवश्यक ॥ विश्वासिक सर्वार्थीं ॥ ३९ ॥ या नव-रत्नांची +अभिन्न गांठी ॥ जो सद्गुरूसि आणि भेटी ॥ तो स्वराज्याचे मुकुटीं ॥ झळकत उठी महामणी ॥ २४० ॥ उद्धवा येथें शंका धरिसी ॥ नांदतां स्त्रीपुत्रधनधान्येंसी ॥ निर्ममता शिष्यासी ॥ कैसेनि त्यासी उपजली ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ जायापत्यगृहक्षेत्रस्वजनद्रविणादिषु ॥ उदासीनः समं पश्यन् सर्वे-ष्वर्थमिवाऽऽत्मनः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ येविखीं सादर ऐक ॥ १शिष्य निरसावया निजदुःख ॥ पावावया आत्मसुख ॥ ०साधी विवेक साधनें ॥ ४२ ॥ विचारितां आत्मसुख ॥ सर्वदेहीं समान देख ॥ विजातीय स्त्रीपुरुषवेख ॥ सुखविशेख तेथ नाहीं ॥ ४३ ॥ पाहे पां स्त्रीपुरुषदेहीं ॥ आत्मा आत्मीं हें तंव नाहीं ॥ आत्मसुख आपुल्या ठायीं ॥ असे पाहीं स्वतःसिद्ध ॥ ४४ ॥ सुखाचिलागीं सर्वथा ॥ झोंबती ०प्रपंच पदार्थां ॥ ज्यासि गुरुवाक्य आलें हातां ॥ अद्वैतता निजसुख ॥ ४५ ॥ एकपणीं निजात्मसुख ॥ हातां आलें नित्य निर्दोख ॥ आतां द्वैत वांछी तो अतिमूर्ख ॥ थितें सुख नासावया ॥ ४६ ॥ प्रपंचामाजीं असतें सुख ॥ तरी कां त्यजिते सनकादिक ॥ द्वैत तितुकें केवळ दुःख ॥ परम सुख अद्वैतीं ॥ ४७ ॥ हेंचि साधकीं साधूनि ज्ञान ॥ स्त्री पुत्र स्वजन धन ॥ त्यांसि झाले उदासीन ॥ अद्वैतीं मन लागलें ॥ ४८ ॥ तेथ कोणाचें गृह क्षेत्र ॥ कोण पुसे कलत्र पुत्र ॥ धनधान्य समृद्धि विचित्र ॥ माझें स्वतंत्र देह न म्हणे ॥ ४९ ॥ ऐक उद्धवा यापरी ॥ माझे भक्त संसारीं ॥ उदास झाले घरदारीं ॥ तत्त्वविचारीं लिगटोनी ॥ २५० ॥ लिगटोनियां गुरु-चरणीं ॥ केली प्रपंचाची ×सांडणी ॥ मग अत्यादरें गुरुभजनीं ॥ निजसुखदानी गुरुरावो ॥ ५१ ॥ गुरुसेवेसि अत्यादर ॥ करितां *न राहे आठी प्रहर ॥ ठेविलें गुरुचरणीं अंतर ॥ निरंतर निजभावें ॥ ५२ ॥ उद्धवा येथें शंका धरिसी ॥ जे देहावेगळ कोणे वस्तूसी ॥ देखोनि पावला निजसुखासी ॥ विदेहत्वेंसी ॥ अनुभव ॥ ५३ ॥ देहीं असोनि विदेहता ॥ प्रपंचीं असोनि अद्वैतता ॥ आली शिष्याचिया हातां ॥ तेही कथा परियेसी ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ विलक्षणः स्थूलसूक्ष्माद्देहादात्मेक्षिता स्वदृक् ॥ यथाऽग्निर्दारुणो दाह्याद्दाहकोऽन्यः प्रकाशकः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ स्थूलसूक्ष्मदेहांहून ॥ आत्मा तो सर्वदा भिन्न ॥ तेणें वेगळेपणें जाण ॥ करी वर्तन

१ चांगल्या सुंदर. २ आत्मसत्ता. ३ याविषयीं. ४ नाहींसें करण्याकरितां. ५ भिन्न. ६ स्त्रीपुरुषत्व. ७ स्त्री. ८ उपेक्षा. ९ आत्मसुखदाता.

* मो. पाटीं. + मो. अभिनव. १ना. निःशेष. ० ना. अधि. ० ना. प्रपंच परमार्था. ×मो. झाडणी. * मो. न राय.

प्रपंचीं ॥ ५५ ॥ जीव [1]उभयदेहीं वर्ततां ॥ प्राणियासि देहातीतता ॥ स्फुरत असे सर्वथा ॥ तेचि तत्त्वतां नेणती ॥ ५६ ॥ ह्मणे माझा डोळा दुखों लागला ॥ परी न ह्मणे मीचि दुखों आला ॥ माझा [2]पावोचि मोडला ॥ परी मी मोडला हें न ह्मणे ॥ ५७ ॥ यापरीं देहीं वर्ततां ॥ प्रत्यक्ष सांगे देहातीतता ॥ हे आपुली आपणां अवस्था ॥ न कळे भ्रांतां देहभ्रमें ॥ ५८ ॥ द्रष्टा दृश्य नव्हे सर्वथा ॥ तो जडातें चेतविता ॥ एवं आत्म्यासी विलक्षणता ॥ जाण तत्त्वतां या हेतू ॥ ५९ ॥ विलक्षणता दोंप्रकारेंसी ॥ एक ते जाण द्रष्टेपणेंसी ॥ दुसरी ते स्वप्रकाशें-स्री ॥ देहद्वयासी विलक्षण ॥ २६० ॥ द्रष्टा दृश्याहूनि भिन्न ॥ तरी तो ह्मणसी झाला मन ॥ तें चार्वाकमत जाण ॥ मनपण त्या नाहीं ॥ ६१ ॥ अकरा इंद्रियांमाजीं जाण ॥ मन तेंही एक [3]करणें ॥ करणत्वें त्या जडपण ॥ आत्मा नव्हे जाण या हेतूं ॥ ६२ ॥ प्रपंचीं मनाची दक्षता ॥ तें मनपणेंचि नव्हे तत्त्वतां ॥ जेवीं प्राणेंवीण नृपनाथा ॥ न दिसे सर्वथा निजभाग्य ॥ ६३ ॥ श-स्त्राचेनि एकघायें ॥ छेदिले लोहार्गळसमुदाये ॥ तें शस्त्राचें सामर्थ्य नोहे ॥ बळ पाहे शूराचें ॥ ६४ ॥ लोहाचा लोहगोळ ॥ अग्निसंगें झाला इंगळ ॥ धडधडां निघती ज्वाळ ॥ तें नव्हें बळ लोहाचें ६५ त्या लोखंडा ऐसें जड मन ॥ त्यासीच प्रभा प्रकाशन ॥ प्रकृतीमाजीं प्रवर्तन ॥ करवी जाण श्रेष्ठत्वें ॥ ६६ ॥ पाव्यामाजीं रागज्ञान ॥ केल्या अति मधुर गायन ॥ तो पाव्याचा नव्हे गुण ॥ कळा जाण गात्याची ॥ ६७ ॥ तैसा मनाचा जो व्यापार ॥ तो जाण पा परतंत्र ॥ नव्हे त्याचा तो स्वतंत्र ॥ जड विचार मनाचा ॥ ६८ ॥ सूर्याचेनि किरणसंगें ॥ सूर्यकांतीं अग्नि निघे ॥ तैसें आत्म्याचेनि प्रकाशयोगें ॥ मन सवेगें वर्तत ॥ ६९ ॥ मन जडत्वें जड जाण ॥ आत्मा स्व-प्रकाशें प्रकाशघन ॥ मन तें आत्म्याआधीन ॥ आत्मा स्वाधीन आत्मत्वें ॥ २७० ॥ प्रत्यक्ष ह्मणे माझें मन ॥ परी मीचि मन न ह्मणे जाण ॥ यालागीं मनाहोनि आत्मा भिन्न ॥ वेगळे-पण साक्षित्वें ॥ ७१ ॥ देहद्वयाहोनि आत्मा भिन्न ॥ दृढ साधोनि आत्मज्ञान ॥ देहात्मबुद्धीचें छेदन ॥ केलें जाण शिष्याचें ॥ ७२ ॥ यालागीं देहात्मवादी ॥ जे सत्य मानिती उपाधी ॥ ते मिथ्या केली त्रिशुद्धी ॥ शुद्ध बुद्धी ते नव्हे ॥ ७३ ॥ मनावेगळा साधिला पहाहो ॥ तो तूं ह्मणसी पितामहो ॥ तो देवांमध्यें श्रेष्ठ देवो ॥ हाही संदेहो न धरावा ॥ ७४ ॥ होकां कल्पा-चिये आदी ॥ ब्रह्मयासि मौढ्य होतें आधीं ॥ करूं नशके [5]सृजनसिद्धी ॥ जड बुद्धी तयाची ॥ ७५ ॥ त्यासि करूनि सावधान ॥ म्यांचि प्रकाशिलें निजज्ञान ॥ तेव्हां तो झाला ज्ञानसंपन्न ॥ सृष्टिसृजन करावया ॥ ७६ ॥ नाभिकमळीं जन्मलें केवळ ॥ ब्रह्मा माझे पोटींचें बाळ ॥ माझ्या दोंदावरी खेळे खेळ ॥ आत्मा केवळ तो नव्हे ॥ ७७ ॥ जितका देवांचा समुदावो ॥ तितुका *प्रकाश्यचि पहाहो ॥ मी प्रकाशक अनादिदेवो ॥ स्वप्रकाशस्वभावो आत्मा तो मी ॥ ७८ ॥ देहद्वय आणि मन ॥ त्यांहोनि आत्मा विलक्षण ॥ हिरण्यगर्भाहोनि जाण ॥ विलक्षण-पण आत्म्याचें ॥ ७९ ॥ [6]हिरण्यगर्भचि परमात्मा ॥ हेंही न घडे गा भक्तोत्तमा ॥ मी हिरण्य-गर्भाचाही आत्मा ॥ माझी महिमा त्या कैंची ॥ २८० ॥ एवं हिरण्यगर्भउपासना ॥ ते साधन-रूपेंचि सेवना ॥ परी केवळ आत्मपणा ॥ नये जाणा मायिकत्वें ॥ ८१ ॥ तेचि विलक्षणता ॥

१ स्थूल व सूक्ष्म दोन शरीरांत. २ पाय. ३ इंद्रिय. ४ मनापरता, केवळ आत्मरूप ब्रह्मा असें ह्मण-शील. ५ सृष्टीची उत्पत्ति. ६ हिरण्यगर्भ व आत्मा यांतील भिन्नपणा, दृष्टांतानें सिद्ध करितों.

*ना. प्रकाशुनी.

आणोनियां दृष्टांता ॥ सांधीतसें तत्त्वतां ॥ भक्तांच्या हातां चढे जेणें ॥ ८२ ॥ जैसा अग्नि काष्ठामाजीं वसे ॥ परी तो काष्ठचि होऊनि नसे ॥ मंथिल्या काष्ठीं प्रकट दिसे ॥ जाळी उल्हासें काष्ठातें ॥ ८३ ॥ तैसा आत्मा देहीं असे ॥ तो देहचि होऊनि नसे ॥ ब्रह्मज्ञानें जेव्हां प्रकाशे ॥ जाळी अनायासें देहभाव ॥ ८४ ॥ असोनि एकेठायीं जाण ॥ दाह्याहोनि दाहक भिन्न ॥ तैसें प्रकाश्याहोनि जाण ॥ भिन्नपण स्वप्रकाशा ॥ ८५ ॥ अग्निदृष्टांतें निश्चित ॥ आत्मयाचें निजतत्त्व ॥ नित्यत्व आणि विभुत्व ॥ असे साधित निजबोधें ॥ ८६ ॥ काष्ठाचेनि योगें अग्नीसी ॥ जन्म निरोध नामरूपांसी ॥ पावे तेवीं आत्मयासी ॥ विकारिता तैसी देहयोगें ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ निरोधोत्पत्त्यणुबृहन्नानात्वं तत्कृतान्गुणान् ॥ अंतः प्रविष्ट आधत्त एवं देहगुणान्परः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ नाना काष्ठांच्या संयोगीं ॥ काष्ठगुण अग्नीच्या अंगीं ॥ आले असती प्रत्यक्ष जगीं ॥ अग्नि ते संगीं अलिप्त ॥८८॥ काष्ठमंथनें अग्नि प्रकटला ॥ त्या नांव ह्मणती उपजला ॥ काष्ठाकारें आकारेला ॥ लहान थोर झाला तद्योगें ॥ ८९ ॥ अग्नि काष्ठविकारवशें ॥ त्रिकोण वर्तुळ वक्र भासे ॥ काष्ठाचेनि निःशेष नाशें ॥ नाशला ऐसें मानिती ॥ २९० ॥ तैसा अज नित्य अव्ययो ॥ त्यासि आकार विकार जन्म लयो ॥ हा देहादिसंबंध स्वभावो ॥ मिथ्या पहाहो मानिती ॥ ९१ ॥ जें *सांगीतलें अग्निदृष्टांतें ॥ तें उद्धवासि नमनेल चित्तें ॥ यालागीं निरूपण मागुतें ॥ श्रीअनंतें मांडिलें ॥ ९२ ॥ उद्धवा तूं ऐसें ह्मणसी ॥ मुळीं सिद्धसंयोग अग्निकाष्ठांसी ॥ तो काष्ठधर्म लागला अग्नीसी ॥ हें आह्मांसी मानलें ॥ ९३ ॥ आत्मा नित्य ×शुद्ध अविकारी स्वांगें ॥ जो गगनासी नातळे अंगें ॥ त्यासि देहसंगु केवीं लागे ॥ मा तद्योगें ७विकारी ॥ ९४ ॥ आत्म्यासि देहसंगु घडे ॥ हें बोलणेंचि तंव कुडें ॥ ऐसें न घडे तेंही जरी घडे ॥ तरी तो सांपडे देहबुद्धी ॥ ९५ ॥ जो देहबुद्धीमाजीं आला ॥ तो केवळ देहधारी झाला ॥ पुढें केवीं जाय त्याग केला ॥ ऐसा उपजला संदेहो ॥ ९६ ॥ कृष्ण ह्मणे उद्धवासी ॥ ऐसी आशंका ह्मणों धरिसी ॥ मन घालोनि मनाचे मानसीं ॥ या अर्थासी परियेसीं ॥ ९७ ॥ हे शब्दचातुर्यासाठीं ॥ हातां नये गा जगजेठी ॥ हे माझ्या गुह्याचीही गुह्य गोष्टी ॥ तुजसाठीं बोलतों ॥ ९८ ॥

॥ श्लोक ॥ योऽसौ गुणैर्विरचितो देहोऽयं पुरुषस्य हि ॥ संसारस्तन्निबंधोऽयं पुंसोऽविद्याच्छिदात्मनः ॥ १० ॥

॥ टीका ॥ ऐके पुरुष जो पुरुषोत्तम ॥ ज्या आधीन मायागुणग्राम ॥ ज्यासी ईश्वर ऐसा नामधर्म ॥ शास्त्रानुक्रम बोलती ॥ ९९ ॥ त्या ईश्वराची जे माया ॥ २ज्यां उपजविलें नाना-

१ सिद्ध करून दाखवितो. २ ह्मणजे भक्ताला नीट समजेल (प्राप्त होईल.) ३ व्यापकत्व. ४ संहार. मरण. ५ अंकुरला, प्रकटला. ६ कबूल होणार नाहीं. ७ मुळीं आत्म्याला देहसंग संभवेल तेव्हां मग त्या योगानें आत्मा विकारी भासतो हें ह्मणणें शोभेल. काष्ठाग्निसंयोग सिद्ध आहे, तसला देहात्मसंग नव्हे. ही उद्धवाची शंका. ८ खोटें. ९ मग त्याग कसा केला जाईल? १० मायेचा गुण समूह. ११ ज्या मायेनें.
*ना. साधिलें. ×ना. सिद्ध. ७ना. विकारी बद्धता. २मो. जिया.

कार्या ॥ जीव संसारी करावया ॥ भ्रमू वायां वाढविला ॥ ३०० ॥ तेथें चैतन्य जें प्रतिबिंबलें ॥ तेंचि जीवपणें वाच्य झालें ॥ जेवीं थिल्लरीं चंद्रबिंब *बुडालें ॥ दिसे नाथिलें +मूर्खासी ॥ १ ॥ त्या थिल्लरासी नातळत ॥ चंद्रमा असे गगनीं अलिप्त ॥ तैसा आत्मा अविद्यातीत ॥ अविद्या नातळत प्रतिबिंबला ॥ २ ॥ अहमिति प्रथमाध्यासें ॥ सूक्ष्म लिंगदेह मायावशें ॥ नाना अनर्थकारी कैसें ॥ वासनासौरसें उपजलें ॥ ३ ॥ जरी लिंगदेह जाहलें सबळ ॥ विषयभोगा दृढ मूळ ॥ तरी भोगू नव्हे ⁂स्थूळ ॥ ×सूक्ष्म भूतगोळ स्थूळावला ॥ ४ ॥ स्थूळापासोनि स्थूळ देहो ॥ पांचभौतिक घडला पहाहो ॥ एवं उभय देह अभिप्रावो ॥ झाला निर्वाहो या रीतीं ॥ ५ ऐसा उभयदेहीं वर्ततां ॥ दृढ लागली देहात्मता ॥ तेणें वाढली अहंममता ॥ मी कोण हें तत्त्वतां विसरला ॥ ६ ॥ न कळे निजसुखाची गोडी ॥ पडला विषयाचिये वोढी ॥ पापपुण्याचिया कोडी ॥ पडली बेडी सुबद्धा ॥ ७ ॥ देहाध्यासें देहधर्म ॥ सत्य मानी वर्णाश्रम ॥ मग आचरों लागे कर्म ॥ फळसंभ्रम वांछूनी ॥ ८ ॥ राजा चक्रवर्ती निजमंदिरीं ॥ निजेला सुमनशेजेवरी ॥ तो स्वप्नीं होऊनि भिकारी ॥ अंत्यजाघरीं अन्न मागे ॥ ९ ॥ तेथ कुटका एक यावया हातां ॥ नीचासि ह्मणे तूं राजा तत्त्वतां ॥ परी मी राजा हें नाठवे चित्तां ॥ स्वप्नीं भिक्षुकता दृढ झाली ॥ ३१० ॥ तैसी विसरोनि निजात्मता ॥ फळें मागे देवां देवतां ॥ मी देवांचा देवो तत्त्वतां ॥ हें त्यासि सर्वथा नाठवे ॥ ११ ॥ त्या स्वप्नाचेनि अतिअध्यासें ॥ राजा वोसणाये मी भिकारी ऐसें ॥ ऐकोनि सेवकां येतसे हांसें ॥ राजा स्वप्नवशें जल्पतू ॥ १२ ॥ येथ गाढ मूढ अवस्थाघोरें ॥ सर्वांग गडबडी निदसुरें ॥ नागवें उघडें न स्मरे ॥ निद्राभरें ⁂घोरिला ॥ १३ ॥ त्यासि थापटी पुरोहितू ॥ जागा होतां होय विस्मितू ॥ मग नागवेपणा आच्छादितू ॥ मागों लाजतू भिक्षुकता ॥ १४ ॥ तेवीं अविद्या निद्रा उद्भटा ॥ जल्पे 'मी देही मी कर्ता ॥ मी संपन्न मी ज्ञाता मोठा ॥ देहात्मनिष्ठा बडबडी ॥ १५ ॥ तेणें निदसुरपणाचेनि मोहें ॥ कर्माकर्मांचे पसरी पाये ॥ हिताहित कोण पाहे ॥ देहमोहें मोहितू ॥ १६ ॥ ते गाढमूढ अवस्थे आंतू ॥ होता दीर्घसंकल्पें लोळतू ॥ ।लोभें अतिजल्पें जल्पतू ॥ वोसणतू मी माझें' ॥ १७ ॥ तेथ दैवयोगें गडबडितू ॥ अवचटें गुरुचरणीं आदळतू ॥ निकटतो देखोनि कृपावंतू ॥ थापटितू निजबोधें ॥ १८ ॥ ब्रह्माहमस्मि वचनीं ॥ वाणी एकवेळ पडली कानीं ॥ अविद्या निद्रा गेली पळोनी ॥ तो तत्क्षणीं जागिन्नला ॥ १९ ॥ जागतांचि होय विस्मित ॥ मी देह ह्मणतां लाजत ॥ देहकर्में देखे निंदित ॥ 'कर्मातीत ब्रह्म मी' ॥ ३२० ॥ व्हावया संसारबंधन ॥ त्यासि अविद्याचि गा कारण ॥ तिसी छेदावया जाण ॥ खड्ग तीक्ष्ण ब्रह्मविद्या ॥ २१ ॥ अविद्या निरसी ब्रह्मज्ञान ॥ तें अवश्य ब्रह्माहोनि भिन्न ॥ मोडलें ह्मणसी अद्वैतपण ॥ तें नव्हे जाण सिद्धांतीं ॥ २२ ॥ प्रपंच अज्ञानें लाठा ॥ ज्ञानअज्ञानाच्या सत्वबोटा ॥ फेडिजे कांटेनि कांटा ॥ मग खटापटा निमाल्या ॥ २३ ॥ अविद्या जीवबंधनी ॥ ब्रह्मविद्या बंधच्छेदनी । या समूळ तुजलागुनी ॥ सांगीतल्या दोनी सविस्तर

१ डबक्यांनें. २ नसतें. ३ जें नसून तें आहेच असें दृढ धरणें. ४ वासनेच्या गोडीनें. ५ मीपणा व माझेपणा. ६ आपण देह नसतां देहच आहोंसें मानून. ७ फुलांच्या बिछान्यावर. ८ बरळे. ९ बडबडतो. १० उपाध्याय. ११ निकड. १२ मी ब्रह्म आहें. १३ पूर्ण, पुष्ट. १४ सूक्ष्मवाटा. १५ काढावा.

*ना. डोळे. +ना. दृष्टीसी. ⁂मो. विनास्थूळ. ×मो. यालागी सूक्ष्म. ⁂मो. घोरत. ।मो भोगें.

॥ २४ ॥ तेचि ब्रह्मविद्या जाणा ॥ कैसेनि प्राप्त होय आपणा ॥ ते पूर्वपीठविवंचना ॥ सावधानमनां परियेसीं ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ तस्माज्जिज्ञासयाऽऽत्मानमात्मस्थं केवलं परम्॥ संगम्य निरसेदेतद्वस्तुबुद्धिं यथाक्रमम् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ ॥ उद्धवा याचिलागीं नित्य ॥ जिज्ञासें वैसवावें चित्त ॥ *त्यासि विवेक उपजवित ॥ सत्यासत्यविभागें ॥ २६ ॥ तेथ असत्य तितुकी अविद्या ॥ जिचेनि जीवासि परमबाधा ॥ तिच्या समूळ करावया छेदा ॥ सद्विद्या साधावी ॥ २७ ॥ सद्विद्या साधिलिया पाहीं ॥ केवळ वस्तु ते दूरी नाहीं ॥ असे आपुल्याचि ठायीं ॥ येचि देहीं 'कूटस्थ' ॥२८॥ कार्यकारणसंघात ॥ यामाजीं वस्तु असे व्याप्त ॥ व्यापूनियां अलिप्त ॥ नित्यमुक्त स्वभावें ॥ २९ ॥ करूनि सद्विद्यासाधन ॥ धरूनि आत्मानुसंधान ॥ देहद्वयाचें निरसन ॥ साधकें जाण साधावें ॥ ३३० ॥ स्थूळ नश्वरत्वें मिथ्या झालें ॥ सूक्ष्म वासनामय कल्पिलें ॥ ते कल्पनेसि मिथ्यात्व आलें ॥ ब्रह्म उरलें निर्विकल्प ॥३१॥ जैशा गगनीं नाना मेघपंक्ती ॥ निजबळें होती त्या वर्षती ॥ त्याचि शारदियेचे अंतीं ॥ हरपोनि जाती आकाशीं ॥ ३२ ॥ तैशी देहीं देहात्मबुद्धी ॥ दृढ केली होती त्रिशुद्धी ॥ तेचि विवेकाचिया प्रबोधीं ॥ 0नास्तिकासिद्धी पावली ॥ ३३ ॥ +देहसद्भावाची पदवी ॥ ब्रह्मविद्येच्या सद्भावीं ॥ खद्योततेजाची दिवी ॥ सूर्य देखावा कैसेनी ॥ ३४ ॥ दोर भासला होता विखार ॥ त्याचा करित निज निर्धार ॥ हारपोनियां सर्पाकार ॥ उरे दोर निजरूपें ॥ ३५ ॥ पाहतां विवेकाचेनि निवाडें ॥ दोराचें सर्पत्व जेवीं उडे ॥ तेवीं ब्रह्मसद्भावीं रोकडें ॥ देह नातुडे सत्यत्वें ॥ ३६ ॥ नरदेह आश्राऊन ॥ ब्रह्मविद्या वाढली जाण ॥ तें आपुलें जन्मस्थान ॥ देहनिर्दळण केवीं करी ॥ ३७ ॥ उद्धवा तूं ऐसऐसी ॥ आशंका झणी धरिसी ॥ ते अग्निउत्पत्तिदृष्टांतेंसी ॥ तुजपाशीं सांगेन ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ आचार्योऽरणिराद्यः स्यादन्तेवास्युत्तराऽरणिः ॥ तत्संधानं प्रवचनं विद्यासंधिः सुखावहः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ दोंकाष्ठांचिया घसणीं ॥ अग्नि काढिला मंथोनी ॥ तो काष्ठें काष्ठ जाळूनी ॥ अग्नि अग्निपणीं 2 प्रज्वळला ॥ ३९ ॥ तैसी ब्रह्मविद्या जाण ॥ गुरुशिष्यसंवादमथन ॥ त्या मथनाचें निरूपण ॥ सावधान परियेसी ॥३४०॥ येथ आचार्य आद्य अरणी ॥ शिष्य तो झाला उत्तरारणी ॥ उपदेश तो मंथास्थानीं ॥ संवादमंथनीं मंथावें ॥ ४१ ॥ ये मंथनीं जरी आळस केला ॥ तरी ज्ञानाग्नीचा आविर्भाव गेला ॥ आपणिया आपण वंचला ॥ थित्या मुकला साधना ॥ ४२ ॥ धरितां आळसाची मैंगी ॥ येव्हडा अनर्थ वाजे अंगीं ॥ आठही पाहार शिणताति योगी ॥ या योगालागीं साधावया ॥ ४३ ॥ निजस्वार्थालागीं सावधान ॥ गुरुवच-

१ सत्य-असत्याची निवड हाच विवेक. २ ब्रह्मविद्या. ३ कार्यकारणांचा समुदाय. ४ स्थूल-सूक्ष्माचें. ५ शरदृतूचे. ६ सर्प. ७ स्वरूप निर्णय. ८खालचें. ९वरचें अग्निमंथनाचें लांकूड. १० उत्पत्ति. ११ मार्ग.

* ना. तिसीं मो. तें. 0 ना. नास्तिक्य. + ना. देह असद्भावाची मो. देहसद्भावाची. 2 ना. प्रबळ झाला मो. प्रबळला.

ाचें अनुसंधान ।। अविश्रम करितां मंथन ।। ब्रह्मज्ञान तें प्रकटे ॥ ४४ ॥ प्रकटलें ब्रह्मज्ञान ।। रोनिदी देहाचें भान ॥ दृश्य द्रष्टा दर्शन ॥ करी प्राशन तत्काळ ।। ४५ ।। कार्य कर्म आणि र्ता ।। ज्ञान ज्ञेय आणि ज्ञाता ।। हें उरोनिदी सर्वथा ।। निजात्मता निजबोधें ।। ४६ ।। *नि-बोधें संसारदुःख ।। +निरसूनि दिधलें निजसुख ॥ निजात्मसुखीं निःशेख ॥ मायागुण देख ाशिले ।। ४७ ।।

।। श्लोक ।। वैशारदी साऽतिविशुद्धबुद्धिर्धुनोति मायां गुणसंप्रसूताम् ।। गुणांश्च संदह्य यदात्ममेतत्स्वयं च शाम्यत्यसमिद्यथाऽग्निः ।। १३ ।।

। टीका ॥ नाशावया निजमायागुण ॥ शिष्य विशारदबुद्धि निपुण ॥ दैवीसंपदेचें[1] अधिष्ठान ॥ द्गुणी संपन्न सर्वदा ।।४८।। ऐसा मुमुक्षु अधिकारवंत ।। त्यासि शब्दपरनिष्णात ।। गुरूनीं ाथां ठेविला हात ॥ निजबोध प्राप्त तत्काळें ॥४९॥ निजबोधीं बैसतां दृष्टी ।। गुणकार्य रिघे णांच्या पोटीं ॥ तेव्हां गुण गुणातें आटी[2] ।। तमातें घोंटी[3] मध्यम[4] ।। ३५० ।। तम खाऊनि जोगुण ।। अत्यंत उन्मत्त झाला जाण ॥ त्याचें देखोनि उन्मत्तपण।।सत्वगुण खवळला।।५१।। तेव्हां खवळला सत्वगुण ॥ त्यासि न साहे दुर्जेपण।। रजोगुणाचें प्राशन ॥ केलें जाण तत्काळ ।५२।।केवळसत्वाचा स्वभावो।।तेणें निजसुखाचा अनुभवो।।क्षणक्षणा नीचनवा पहाहो ।।अतिन-लावो अनुभवीं ।।५३।। तेणें सुखानुभवें देखा ।। रजतमांच्या बीजकणिका ।। ज्या सृष्टिसृजनीं न्मुखा ॥ त्याही निःशेखा ×जाळिल्या ॥ ५४ ॥ तेव्हां गुणप्रसवती माया ॥ शोधितसत्वें आणिली लया ।। ते सत्ववृत्ति एकलिया ।। अद्वैततया उरली असे ।। ५५ ।। तेव्हां ब्रह्माहम-स्मिलक्षण ।। तेंही हों लागलें क्षीण ॥ सोहंहंसाची वोळखण ॥ ते मंथीं जाण होतसे ।। ५६ ॥ थ देहींचें गेलें देहपण ।। जन्ममरणा आलें मरण ।। विश्वाचें न दिसे भान ।। आनंदघन कोंदला ।। ५७ ॥ तेणें सुखरूप जाहली दृष्टी ॥ आनंदमय झाली सृष्टी ॥ परमानंदें चढली पुष्टी ।। आनंदें मिठी घातली ॥ ५८ ।। त्या सुखाची मर्यादा ॥ काइसेनिही नव्हे कदा ।। येथ मौन प-डलें वेदा ॥ वृत्ति ०तत्पदा पावली ।। ५९ ॥ द्वैत सर्वथा नाहीं पुढें ॥ यालागीं वृत्तीची वाढी गोडे ॥ तेव्हां तेही सुखरूपीं बुडे ॥ पुढें वाढे तें नाहीं ।। ३६० ।। जैसा निरिंधन[10] अग्नी ॥ जाय नेजतेजीं मिळूनी ।। तैशी वृत्ति अद्वैतपणीं ।। मिळे मिळणी 5सुखरूपीं ॥ ६१ ॥ गंगा सागरा मिनली ॥ ते समुद्रचि होऊनि ठेली ॥ कां लवणजळा भेटी झाली ।। मिठी पडली जळत्वें ।। ६२ ॥ दीपीं दीपु एकवटला ॥ मिळणीं एकचि होउनि ठेला ॥ तैसा वृत्तीचा लयो झाला ।। नव्यंग पावला निजसुख ।। ६३ ॥ तेव्हां आत्मा एक अद्वैत ।। तेंही म्हणणें नाहीं तेथ ॥ एवं द्वै-ाद्वैतातीत ॥ नित्य निश्चित निजात्मा ॥६४॥ तो ज्ञानरूप स्वप्रकाश ॥ अविकारी अविनाश ॥ अकर्ता अभोक्ता उदास ।। निर्विशेष निजरूप ।। ६५ ॥ तो अदेही अगोत्र ।। अचक्षु अश्रोत्र ॥ अमनस्क अमंत्र ॥ *मंत्रीं मंत्रार्थ जो कां ।। ६६ ।। जो आद्य अज अप्रमेय ॥ अतर्क्य अ-लक्ष्य अव्यय ॥ नामरूपादिअभाव ।। 3भावनाशून्य ।। ६७ ॥ जो भोग्य भोग नव्हे भोक्ता ॥

१ दैवीसंपत् गीता. अ. १६ श्लो. १-३ पहा. २ गुणांचें कार्य गुणांत लीन होतें. ३ आकर्षी. ४ गिळी. ५ रजोगुण. ६ नित्य. ७ अवशिष्ट. ८ शुद्ध सत्वानें. ९ त्यावेळीं. १० लांकडावांचून.

*मो. निजबोधें निर्धारें देख. +मो. दुःख निरसूनि. ×मो. मावळल्या. ०ना. आपदा मो. सर्वदा. 5ना. सुखरूप मो. सस्वरूपीं. *ना. मंत्रीं मंत्र. 3ना. भावनाभाव ते शून्य.

जो कार्य कर्म नव्हे कर्ता ॥ कर्ता अकर्ता या वार्ता ॥ जेथ सर्वथा निमाल्या ॥ ६८ ॥ जो अविनाश अभंग ॥ जो शुद्ध बुद्ध असंग ॥ देहद्वयाचा संग ॥ ज्याचें अंग स्पर्शेना ॥ ६९ ॥ आत्म्यावेगळें तें अनित्य ॥ हा पूर्वी निश्चय होता सत्य ॥ आतां बुडाले नित्यानित्य ॥ सभरा भरीत निजात्मा ॥ ३७० ॥ नेणपण निमालें सर्वथा ॥ बुडाली जाणपणाची अवस्था ॥ गुण-गुणिगुणातीतता ॥ तेही तत्त्वतां तेथ नाहीं ॥ ७१ ॥ उद्धवा परमात्मा तो तत्त्वतां ॥ हा माझा निश्चयो सर्वथा ॥ तोचि उपनिषदर्थे अर्थितां ॥ निजात्मता प्रतिपाद्य ॥७२॥ तेथ *पावलिया वृत्ती ॥ होय संसारनिवृत्ती ॥ हेंचि वेदांतमहांतीं ॥ निश्चयो निश्चितीं केला असे ॥ ७३ ॥ येथूनि कार्यकर्मकर्तव्यता ॥ निःशेष खुंटली सर्वथा ॥ निजीं निजरूप निजात्मता ॥ जाण तत्त्वतां पावल्या ॥ ७४ ॥ हें अद्वैतश्रुती सुरवाडें ॥ सद्गुरुकृपा उजियेडें ॥ वृत्ति निजात्मपदीं चढे ॥ भाग्य केव्हडें पाहे पां ॥ ॥ ७५ ॥ मी वंद्य देवादिदेवां ॥ त्या माझा निजज्ञानठेवा ॥ परमकृपेनें उद्धवा ॥ तुज म्यां आघवा दाविला ॥ ७६ ॥ तुज व्हावया निवृत्ती ॥ हाचि अर्थ नानासंमतीं ॥ सांगीतला परमप्रीतीं ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७७ ॥ आतां देहादिक जे असंत ॥ अतिनिंद्यत्वें कुत्सित ॥ तेथ आतळोंनेदी चित्त ॥ होई अलिप्त परमार्थी ॥ ७८ ॥ हे तुज झाली अलभ्य प्राप्ती ॥ परी यत्न करावा अतिनिगुती ॥ येथ मतांतरें उठू येती ॥ तेही उपपत्ती परियेसीं ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ अथैषां कर्मकर्तॄणां भोक्तॄणां सुखदुःखयोः ॥ नानात्वमथ नित्यत्वं लोककालागमात्मनाम् ॥ १४ ॥

॥ टीका ॥ नानाफळें अभिलाषिते ॥ कर्मांचे जे कर्मकर्ते ॥ सुखदुःखांचे जे भोक्ते ॥ अनेकत्वें येथें अनंत ॥३८०॥ ह्मणती जे मानितां एकात्मता ॥ तरी एकाचेनि सुखें सुख समस्तां ॥ कां एकाचेनि पापें पापता ॥ न घडे सर्वथा सकळांसी ॥ ८१ ॥ ऐसें कर्मवादियांचें मत ॥ " जीव नित्य आणि अनंत ॥ मुख्य ईश्वरचि नाहीं ह्मणत ॥ कर्ते येथ निजकर्म " ॥ ८२ ॥ ' मीपणें जें स्फुरे स्फुरण ॥ ते प्रतिशरीरीं जीव भिन्न ॥ त्याच्या स्वरूपाचें प्रमाण ॥ कर्त्ता भोक्ता ×जाण ह्मणताती ॥८३॥ ऐकें विवंचना सावचित्त ॥ लोक काळ श्रुति जीवित ॥ अनेकत्वें अनित्य ॥ हें वेदांतमत पैं माझें ॥ ८४ ॥ उद्धवा कर्मवाद्यांचें ऐसें मत ॥ सत्य मानील तुझें चित्त ॥ तरी बुडविला निजस्वार्थ ॥ अति अनर्थ वाजेल ॥ ८५ ॥ तोचि अनर्थ ह्मणसी कैसा ॥ तरी कर्मवाद्यांचा भावो ऐसा ॥ हा पूर्वपक्षाचा ठसा ॥ अभिप्रावो ऐसा परियेसीं ॥ ८६ ॥ परमात्मा निर्विकाररूप ॥ एक न मानिती १सर्वस्वरूप ॥ संन्यासु ऐकतां ह्मणती पाप ॥ मतजल्प मतवाद्यां ॥ ८७ ॥ त्यागसंन्यास जे करिती ॥ त्यांतें अनधिकारी ह्मणती ॥ कर्म मुख्यत्वें मानिती ॥ वैराग्य निंदिती निजमतें ॥ ८८ ॥ कर्म करोनि भोगिजे सुख ॥ तें कर्म त्यजिती निःशेख ॥ निष्कर्मासी कैंचें सुख ॥ परम दुःख तो त्यागु ॥ ८९ ॥ वैराग्य न वडावया कारण ॥ चौंप्रकारें बोलती जाण ॥ तेंही सांगेन मी लक्षण ॥ सावधान परियेसीं ॥ ३९० ॥ ह्मणती अनित्य असतें कांहीं ॥ तरी वैराग्य घडतें ते ठायीं ॥ येथ अनित्यचि

१ अंतर्बाह्य व्यापक.

*मो. मावळलिया. ×मो. प्राण. १मो. सत्यस्वरूप.

नाहीं ॥ वैराग्यें कायी त्यजावें ॥ ९१ ॥ वैराग्य होय चौंप्रकारीं ॥ मीमांसक नित्य मानिती चारी ॥ निजमताचा गर्व भारी ॥ चाऱ्ही +करी नित्यत्वें ॥ ९२ ॥ कर्मप्रकाशक वेद मूळ ॥ तो आगम नित्य मानी अढळ ॥ जीव नित्यचि ह्मणे सकळ ॥ भोग *काळ तोही नित्य ॥ ९३ ॥ स्वर्गादिलोक भोगस्थान ॥ वेदु बोलिला आपण ॥ मिथ्या नव्हे वेदवचन ॥ चारी प्रमाण नित्यत्वें ॥ ९४ ॥ उद्धवा यारीरी पाही ॥ ह्मणती अनित्य येथ नाहीं ॥ वैराग्यें करावें कायी ॥ मिथ्या पाही वैरागी ॥ ९५ ॥ होकां भोग्य जरी नश्वर होतें ॥ अथवा मायिक कांहीं असतें ॥ तरी वैराग्य संभवतें ॥ तें तंव येथें असेना ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ मन्यसे सर्वभावानां संस्था ह्यौत्पत्तिकी यथा ॥ तत्तदाकृतिभेदेन जायते भिद्यते च धीः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ जीवाच्या भोग्यपदार्थां ॥ स्रक्चंदनादि वनिता ॥ त्यांसि प्रवाहरूपें नित्यता ॥ ह्मणती तत्त्वतां स्वमतें ॥ ९७ ॥ आत्मा आहे जग नाहीं ॥ हें घडलेंचि नाहीं कंहीं ॥ जळेंवीण समुद्र पाही ॥ उरला नाहीं सर्वथा ॥ ९८ ॥ सृष्टि प्रवाहरूपें नित्य ॥ [1]पितृपुत्रत्वें अखंड वाहत ॥ कर्मास्तव यातायात ॥ सृष्टि अनित्य हें नघडे ॥ ९९ ॥ [1]नित्यासि ईश्वरू कर्ता ॥ हेंही नघडे गा तत्त्वतां ॥ नित्याचा कोणी नव्हे कर्ता ॥ ईश्वरू सर्वथा येथ नाहीं ॥ ४०० ॥ वेदांतीं स्वरूपभूत ॥ 6आत्मा ज्ञानस्वरूप ह्मणत ॥ तेंही नघडे गा येथ ॥ ऐसें स्वमत बोलती ॥ १ ॥ घटपटाकार पाहतां ॥ ज्ञानासि ×त्रिक्षणावस्था ॥ ०आत्मा ज्ञानस्वरूप ह्मणतां ॥ लाज सर्वथा त्यां नये ॥ २ ॥ [2]एवं वेदांत्याच्या ठायीं ॥ [3]आत्मनिश्चयो दृढ नाहीं ॥ मोक्ष ह्मणती जो कांहीं ॥ तोही पाहीं मिथ्याची ॥ ३ ॥ इंद्रियसुखेंवीण सुख ॥ मोक्ष ह्मणती ते अविवेक ॥ इंद्रियद्वारा जीवांसि हरिख ॥ भोगितांही मूर्ख नमानिती ॥ ४ ॥ देहेंवीण विदेहीं ॥ सुख भोगिजे कोणें कहीं ॥ अद्वैतवादी जल्पती कांहीं ॥ तें सत्य नाहीं सर्वथा ॥ ५ ॥ जीवासि जेणें सुखप्राप्ती ॥ ते इंद्रियेंचि नाहीं ह्मणती ॥ डोळे फोडूनि देखणे होती ॥ तैसी वदंती वेदांत्यां ॥ ६ ॥ येथ ईश्वरूचि नाहीं फुडा ॥ मा तो फळ देईल हा बोल कुडा ॥ अद्वैतवादी मूर्ख गादा ॥ नागवीं फुडां वैराग्यें ॥ ७ ॥ गांव ठावो ना पदवी ॥ तो मिथ्या ईश्वर धरोनि जीवीं ॥ कर्मफळीं नैराश्य करवी ॥ अथवा सांडवी कर्मातें ॥ ८ ॥ नरदेहीं ज्ञान उपजलें ॥ तेणें देहचि नाशिलें ॥ फळें वृक्षमूळ छेदिलें ॥ हें कोणीं देखिलें कोठें नाहीं ॥ ९ ॥ ज्ञानाचे परिपाकदशें ॥ ह्मणती अवघा संसारूचि नाशे ॥ सृष्टि प्रवाहरूपें नित्य असे ॥ नित्य नासे कैसेनी ॥४१०॥ मनुष्याचे हृदयींचें ज्ञान ॥ तेणें संसाराचें निर्दळण ॥ तरी खद्योततेजें जाळिलें जाण ॥ ग्रहगण शशी सूर्य ॥ ११ ॥ एवं करूं जातां निवृत्ती ॥ केले कष्ट ते मिथ्या होती ॥ इंद्रियेंवीण सुखप्राप्ती ॥ नव्हे निश्चितीं जीवासी ॥ १२ ॥ यालागीं निवृत्ति ते वृथा कष्ट ॥ सर्वांसि प्रवृत्तीच अति श्रेष्ठ ॥ कर्में करोनियां उद्भट ॥ फळें वरिष्ठ भोगावीं ॥ १३ ॥ संसार

१ अखंड ओघरूपानें नित्यच, जसें पुत्ररूपानें पिताच नित्य आहे; एवंच सृष्टि नित्य आहे, व नित्याला कर्ता शक्य नाहीं, सबब ईश्वर ह्मणून कोणी नाहीं. काय आहे, तें कर्म आहे. हें कर्मवादी मीमांसकांचें मत. २ कधीं. ३ आत्म्याविषयीं निर्णय.

+मो. खरी. *ना. फळ. 1मो. नित्याचा. ना. 6मो. आत्मज्ञानस्वरूप. ×मो. त्रिक्षण ना. तीक्ष्ण. ०मो. ना. आत्म 2ना. सर्व वेदांताच्याठायीं.

ह्मणती मायिक ॥ ते जाणावे केवळ मूर्ख ॥ संसारावेगळें सुख ॥ नाहीं देख जीवासी ॥ १४ ॥ मनुष्याधिकारें सुखप्राप्ती ॥ यालागीं देव मनुष्यत्व वांछिती ॥ वेदांती मनुष्यत्व निंदिती ॥ केवीं ते युक्ती मानावी ॥ १५ ॥ वेदें अधिकारू बोलिला ॥ तो वेदृचि इहीं वेडा केला ॥ त्यांचे लागला जो बोला ॥ तो नागवला सर्वस्वें ॥ १६ ॥ वेदाचें वेदवचन ॥ सर्वार्थीं तें प्रमाण ॥ मिथ्या ह्मणती वेदवचन ॥ थोर सज्ञान हे झाले ॥ १७ ॥ ऐशी मीमांसकाची वदंती ॥ नाना परीच्या चाळिती युक्ती ॥ आपुलें मत स्थापिती ॥ तें मिथ्या निश्चितीं उद्धवा ॥ १८ ॥ लांप-निका ॥ ऐसें मिथ्या त्यांचें मत ॥ अंगीकारूनि प्रस्तुत ॥ प्रपंचीं अनर्थता दावित ॥ दृढ स्थापित वैराग्य ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ एवमप्यंग सर्वेषां देहिनां देहयोगतः ॥ कालावयवतः संति भावा जन्मदयोऽसकृत् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ह्मणे ऐक बापा उद्धवा ॥ हा मिथ्यामतवाद आघवा ॥ ह्मणसी कैसेनि जाणावा ॥ विवेक करावा मताचा ॥ ४२० ॥ निवृत्ति ते केवळ कष्ट ॥ ह्मणती प्रवृत्ति अतिश्रेष्ठ ॥ प्रवृत्ती-माजीं परम कष्ट ॥ मरण अरिष्ट अनिवार ॥ २१ ॥ धरोनियां जन्ममूळ ॥ अखंड लागलासे काळ ॥ लवनिमेषपळेंपळ ॥ काळ वेळ साधित ॥ २२ ॥ जैसें संवचोराचें साजणें ॥ तैसें काळाचें जोगावणें ॥ वेळ आल्या जीवें प्राणें ॥ नाहीं राखणें सर्वस्वें ॥ २३ ॥ काळ न ह्मणे हाटे घाट ॥ नह्मणे आवशी पहांट ॥ नह्मणे देश विदेश वाट ॥ नाशी उद्भट निजतेजें ॥ २४ ॥ करितां प्रवृत्तीचे कष्ट ॥ अवचितां मृत्यूचा चपेट ॥ अंगीं वाजे जी उद्भट ॥ अहा कटकट ते काळीं ॥ २५ ॥ जीवीं वासनेचा थोर हावा ॥ ह्मणे गेलों मेलों धांवा पावा ॥ कोण निवारी मृत्युप्रभावा ॥ उपावो तेव्हां चालेना ॥ २६ ॥ काळ मारोनि नसोडी ॥ यातना भोगावी गाढी ॥ सवेंचि गर्भवासीं पाडी ॥ जेथें दुःख कोडी अनिवार ॥ २७ ॥ मातेच्या जेठर-कुहरीं ॥ विष्ठामूत्रांच्या दाथरीं ॥ अधोमुख नवमासवरी ॥ उकडी भारी जठराग्नी ॥ २८ ॥ विष्ठालेप चहूंकडे ॥ नाकीं तोंडीं कृमी किडे ॥ गर्भवासाचे कष्ट गाढे ॥ कोणापुढें सांगेल ॥ २९ ॥ कट्वम्ललवण मेळे ॥ गर्भवतीचे पुरती डोहळे ॥ त्वचेवीण गर्भांग पोळे ॥ तेणें दुःखें लोळे अतिदुःखी ॥ ४३० ॥ ते गर्भोदरींची व्यथा ॥ नेणती माता आणि पिता ॥ तेथ नाहीं कोणी सोडविता ॥ जीवींची व्यथा जीव जाणे ॥ ३१ ॥ ज्या ठायाची करूंनये गोठी ॥ प्रकट दाऊंनये दिठीं ॥ ते योनिद्वारें अतिसंकटीं ॥ जन्म शेवटीं जीवासी ॥ ३२ ॥ जे नित्य मूत्राची नाहाणी ॥ कीं नविया नरकांची खाणी ॥ रजस्वलारुधिराची श्रेणी ॥ जन्म तेथोनी पावती ॥३३॥ अपवित्र विटाळशीचें रुधिर ॥ ते गोठोनि झालें जो साकार ॥ निंद्यद्वारें जन्मोनि नर ॥ आह्मी पवित्र ह्मणविती ॥३४॥ गर्भवासाहूनि गाढें ॥ दुःख कोण आहे पुढें ॥ मतवादी बोले तें कुडें ॥ सुख नातुडे प्रवृत्तीमाजीं ॥ ३५ ॥ एकें जन्में जन्म नसरे ॥ एकें मरणें मरण नोसरे ॥ कोटिकोटि जन्मांचे फेरे ॥ काळ योनिद्वारें करवित ॥ ३६ ॥ पुढती जन्म पुढती मरण ॥ अनिवार लागलें जाण ॥ प्रवृत्तीमाजीं सुख कोण ॥ दुःख दारुण भोगवी ॥ ३७ ॥

---

१ बोलणें २ शद्वपंडिता–ठका प्रमाणें ३ दिसायाला साव परंतु खरा चोर. ४ मैत्री. सौजन्य. ५ बा-जार. ६ नदीचा घाट ७ तडाका. ८ हांव ९ उदररूपगुहेंत. १० उकाड्यांत. ११ कर्मवादी.

जन्ममरणांमाजिले संधीं ॥ आणिकही थोर दुःख बाधी ॥ त्या दुःखाची दुःखसिद्धी ॥ ऐक त्रिशुद्धी सांगेन ॥ ३८ ॥ धाडीभेणें पळतां थोर ॥ आडवे नागवती चोर ॥ तैसें जन्ममरणांचें अंतर ॥ षड्विकार राखती ॥ ३९ ॥ षड्विकारांच्या पतिव्रता ॥ षडूर्मी लागल्या जीविता ॥ एवं प्रवृत्तीमाजी परम व्यथा ॥ सुख सर्वथा असेना ॥ ४४० ॥ कर्मवादियाच्या मतां ॥ जीव स्वतंत्र कर्मकर्ता ॥ ह्मणसी ते मिथ्या वार्ता ॥ परतंत्रता प्रत्यक्ष ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ अत्रापि कर्मणां कर्तुरस्वातंत्र्यं च लक्ष्यते ॥ भोक्तुश्च दुःखसुखयोः को न्वर्थो विवशं भजेत् ॥ १७ ॥

॥ टीका ॥ '*जीवासि असती स्वतंत्रता ॥ तरी तो दुःखभोग न भोगिता ॥ सदा सुखीचि असता ॥ पाप न करिता अक्षमाळ ॥ ४२ ॥ जीव बापुडें सदा दीन ॥ कर्में करूनि कर्माधीन ॥ कर्मफळदाता तो भिन्न ॥ सुखदुःख जाण तो भोगवी ॥ ४३ ॥ यालागीं ईश्वराची सत्ता ॥ तो कर्मफळाचा दाता ॥ जीव सुखदुःखांचा भोक्ता ॥ स्वतंत्रता त्या नाहीं ॥४४॥ ऐसें लक्षितां लक्षण ॥ जीव तितका पराधीन ॥ पराधीनपणें जाण ॥ भोगी दारुणें सुखदुःख ॥ ४५ ॥ मजलागीं दुःख व्हावें ॥ ऐसें कोणी भावीना जीवें ॥ न वांछितां दुःख पावे ॥ येणें न संभवे स्वतंत्रता ॥ ४६ ॥ श्रुतिस्मृतींतें विचारितां ॥ जीवासि नाहीं स्वतंत्रता ॥ पराधीनपणें वर्ततां ॥ भोगी +अप्रार्थितां सुखदुःख ॥ ४७ ॥ वादी परिहार करिती ॥ सांग कर्म जे नेणती ॥ ते ते जीव दुःखी होती ॥ सुख पावती ×कर्मज्ञ ॥ ४८ ॥ जे सदाचार श्रोत्री ॥ जे याज्ञिक *अग्निहोत्री ॥ जे उभयलोकव्यापारी ॥ सांग ०करिती कर्मातें ॥ ४९ ॥ जे अविकळ अव्यंग ॥ कर्में करूनियां सांग ॥ 8उभयलोकीं सुखभोग ॥ कर्मयोग भोगिती ॥ ४५० ॥ कर्मीं ज्याची योग्यता ॥ तो सुखभोगाचा भोक्ता ॥ हेंही नघडे गा सर्वथा ॥ ऐक आतां सांगेन ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ न देहिनां सुखं किंचिद्विद्यते विदुषामपि ॥ तथा च दुःखं मूढानां वृथाहंकरणं परम् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ कर्माचे जे तत्त्वज्ञाते ॥ तेही दुःखी देखा येथें ॥ सुखी 1देखिजे मूर्खांतें ॥ जे कर्मातें नातळती॥५२॥चुकोनि यज्ञपुरुषा अच्युतातें ॥ अग्निहोत्री करिती यागातें॥तें स्वकर्मचि त्यांचें त्यांतें ॥ विपरीतार्थें फळतसे ॥ ५३ ॥ अग्नि तो तंव स्वरूप माझें ॥ श्रुतिमंत्र ते तंव माझीं बीजें ॥ आणि होमद्रव्यही जें जें ॥ तेंही माझें स्वरूप ॥५४॥ ऐशिया मज सर्वगतातें ॥ नास्तिक्य देवोनि 7निजचित्तें ॥ अनीश्वरवादी करिती यागातें ॥ तोचि त्यांतें बाधक ॥ ५५ ॥ स्रुक्, स्रुवा, आणि प्रणितापात्र ॥ 5मांडूं शिकले कर्मतंत्र ॥ मज निजात्मयाचें चुकलें सूत्र ॥ तेणें चि अपवित्र तो याग ॥ ५६ ॥ सकळ हें सर्वमुखीं ॥ मज अर्पतसे यज्ञपुरुखीं ॥ हें नमनिजे

१ जन्म आणि मरण यांच्या मधल्या वेळांत, दयार्तीत. २ हलधाचे भीतीनें. ३ अरण्यांत. ४ सहचारिणी. ५ क्षुधा, तृषादि. ६ थोडेंही. ७ मोठें. ८ यथासांग. ९ सर्वव्यापकास. १० आपल्याच मनानें. ११ ईश्वर नाहीं असें ह्मणणारे कर्मठ. १२ यज्ञांतील पात्र विशेष.

*ना. जीवाशिव. +ना. न प्राथितां. × ना. कर्मसंगें. * ना. यज्ञहोत्री. ०ना. करी. 8 मो. स्वर्गलोकीं. 1मो. देखो ना. देखोनि. 7ना. सर्व चित्तें. 5ना. मांड्ानि केले.

याज्ञिकीं ॥ बुद्धी अल्प कीं सकाम ॥ ५७ ॥ मज न अर्पितां जें सुकृत ॥ तेंचि जाण दुःख दुरित ॥ विषा नांव अमृत ह्मणत ॥ तैसें तें सकृत सकामा ॥ ५८ ॥ मातें न पावतां जो स्वर्ग ॥ तो जाणावा उपसर्ग ॥ तेथिंचा भोग तो महारोग ॥ 3मूढ उद्योग याज्ञिकां ॥ ५९ ॥ कर्मीं कर्म विगुण होत ॥ तेथ स्मरावा मी अच्युत ॥ नामें न्यून तें संपूर्ण होत ॥ हें सामर्थ्य नामाचें ॥ ४६० ॥ तो मी अंगें आपण ॥ याज्ञिकां मागों गेलों अन्न ॥ मज नेदितीच ते ब्राह्मण ॥ कर्मठपण कर्माचें ॥ ६१ ॥ मज यज्ञपुरुषातें सांडून ॥ करिती इंद्रादिकांचें भजन ॥ ते इंद्रादिक मजआधीन ॥ कर्मवैगुण्य +हें त्यांसी ॥ ६२ ॥ जे कर्म न करिती कृष्णार्पण ॥ त्यांचें मलिनै प्राक्तन ॥ तेणें इहलोकीं दरिद्रता जाण ॥ पडे विघ्न परलोकां ॥ ६३ ॥ चुकवूनियां निजसुख ॥ सर्वांगीं क्षीरसाखरेचा देख ॥ लेपू देतां नवचे भूक ॥ अधिक दुःख तेणें होय ॥ ६४ ॥ तैसें मज चुकवूनि यज्ञपती ॥ जे यागातें आचरती ॥ बाळविधवे गर्भप्राप्ती ॥ तैशीं फळें येती त्या यागा , ॥ ६५ ॥ कर्मउद्देशें द्रव्य मागतां ॥ तें यज्ञफळ ने द्रव्यदाता ॥ याज्ञिक तो राहे रिता ॥ मी कर्ता हा अभिमान ॥ ६६ ॥ जैसा चाटू क्षीरीआंत ॥ चाटेंचि क्षीरी वाढित ॥ चाटू खरकटल्या सांडित ॥ भोक्ते भोगित परमान्न ॥ ६७ ॥ सरस ऊंस घालिजे घाणां ॥ रस पिळूनि भरे ×मांदणां ॥ रिता 6चोपटी करकरी घाणा ॥ *ते गती जाणा याज्ञिकां ॥ ६८ ॥ तैसे याज्ञिक यज्ञ आचरत ॥ द्रव्यदात्यासि तें फळ होत ॥ पशुहिंसा याज्ञिकां प्राप्त ॥ 7दोषी होत अभिमानें ॥६९॥ एवं कर्मकुशळ याज्ञिक ॥ यापरी ते भोगिती दुःख ॥ कर्म नेणती जे मूर्ख ॥ ते परमसुख भोगिती ॥ ४७० ॥ नेणती कर्माच्या वडामोडी ॥ परी माझी श्रद्धा पोटीं गाढी ॥ तेणें उल्लंघोनि दुःखकोडी ॥ निजात्मगोडी भोगिती ॥ ७१ ॥ कर्मीं कर्मादरू नेणत ॥ माझ्याठायीं श्रद्धायुक्त ॥ बाळे भोळे माझे भक्त ॥ सुख अनंत पावले ॥ ७२ ॥ काय कर्म केलें गोपाळीं ॥ जे अखंड मजसवें गोकुळीं ॥ भोगिली निजसुखनव्हाळी ॥ करोनि होळी कर्मांची ॥ ७३ ॥ पाहतां गोपिकांचें कर्म ॥ कर्ममार्गीं निंद्य धर्म ॥ पावल्या माझें परमधाम ॥ जीवीं पुरुषोत्तम आवडला ॥ ७४ ॥ खग मृग गो सर्पादि समस्त ॥ माझें निजपद झाले प्राप्त ॥ याज्ञिका कर्माभिमान बहुत ॥ दुःख भोगित निजकर्में ॥ ७५ ॥ केवळ कर्मठ कर्मजड ॥ आह्मी सर्वज्ञ ज्ञाते दृढ ॥ हा अभिमान धरिती मूढ ॥ दुःख दुर्वाड तयांसी ॥ ७६ ॥ दीपीं पतंगा मरण देख ॥ तो उडी घालितां मानी सुख ॥ तैसें कर्मठां कर्म केवळ दुःख ॥ मानिती सुख अभिमानें ॥ ७७ ॥ अभिमानेंचि सर्वथा ॥ नसती जीवासि ह्मणे स्वतंत्रता ॥ तेंही नघडे विचारितां ॥ ऐक आतां सांगेन ॥ ७८ ॥

॥ श्लोक ॥ यदि प्राप्तिं विघातं च जानंति सुखदुःखयोः ॥ तेऽप्यद्धा न विदुर्योगं मृत्युर्न प्रभवेद्यथा ॥ १९ ॥

॥ टीका ॥ दुःख निरसूनि सुखप्राप्ती ॥ यालागीं कर्में आचरती ॥ कर्मवादी ज्ञाते ह्मणविती ॥ तेही नेणती दुःखनाश ॥ ७९ ॥ कर्में करितां नाश नोहे ॥ ऐसें दुःख कोण आहे ॥ पुसशील

---

१ विघ्न. २ शास्त्राप्रमाणें यथासांग नाहीं तें पापरूप. ३ व्यंग. ४ पळी, डवली. ५ परपुरूषरति. ६ वैकुंठ. ७ पक्षी, पशु आदि.

3मो. दे उद्योग. +ना. पुण्य. ×मो. माना. 6मो. सोंपटी. *मो. तैसी गोडी. 7ना. द्वेषी.

तरी पाहे ॥ यथान्वयें सांगेन ॥ ४८० ॥ मरणावरतें दुःख चेदें ॥ 1ऐसें दुःख तव नाहीं पुढें ॥ तें निवारूं नेणती बापुडे ॥ अतिबळ गाढें मृत्यूचें ॥ ८१ ॥ आंतु घालितां हात पोळे ॥ तेणें उन्हवणेंन घर न जळे ॥ तैसा कर्में मृत्यू न टळे ॥ प्रबळबळें अनिवार ॥ ८२ ॥ मारिता मृत्यू जेणें मारिजे ॥ तो उपावो कर्मठीं नेणिजे ॥ कर्मामाजीं जेणें असिजे ॥ अचुक पाविजे तेणें मृत्यु ॥ ८३ ॥ अंतीं येईल मरणदुःख ॥ जंव जीजे तंव भोगिजेल सुख ॥ हें बोलणें बोलती मूर्ख ॥ जितां सुख त्यां कैचें ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ को न्वर्थः सुखयत्येनं कामो वा मृत्युरंतिके ॥ आघातं नीयमानस्य वध्यस्येव न तुष्टिदः ॥ २० ॥

॥ टीका ॥ जितांही सुखाची वार्ता ॥ कर्मठां नाहीं सर्वथा ॥ तेही सांगेन मी कथा ॥ ऐक आतां उद्धवा ॥ ८५ ॥ विखें रांधिलें मिष्टान्न ॥ तें गोड न ह्मणती सज्ञान ॥ पुढें देखोनियां मरण ॥ निःशेष ते अन्न सांडिती ॥ ८६ ॥ आगी लागलिये घरीं ॥ क्षण न राहिजे चतुरीं ॥ मरण नादळतां उरीं ॥ सांडूनि दुरी पळताती ॥ ८७ ॥ धाडी आल्या निजद्वारीं ॥ गोड न लागे साकरखिरी ॥ तैसा मृत्यू जाणितलियां शरीरीं ॥ विषयाकारीं सुख कैचें ॥ ८८ ॥ दाढी लागलिया आगी ॥ तो शृंगारू नमनी मुखालागीं ॥ तैसा नीचनवा मृत्यु अंगीं ॥ विषयसंगीं सुख कैचें ॥ ८९ ॥ उठिल्या मरणांत व्यथा ॥ जन, धन, अन्न, आणि कांता ॥ सुख नेदिती सर्वथा ॥ झालीं वृथा समूळ ॥ ४९० ॥ अंतकाळीं स्त्री धन ॥ झालीं दुःखासीच कारण ॥ त्यांसि सांडूनि न निघती प्राण ॥ तळमळी जाण +प्राणांतीं ॥ ९१ ॥ [1]जैसा सुळीं घावया जो नेइजे ॥ त्यासि नानासमारंभू कीजे ॥ मुखीं घालिती पंचखाजें ॥ तेणें नव्हिजे सुखी तो ॥ ९२ ॥ तैसें संमुख असतां मरण ॥ विषयसुखें सुखावे कोण ॥ विषय त्यागिती सज्ञान ॥ मूर्खांसि जाण आसक्ती ॥ ९३ ॥ देहदुःखाची अर्ध घडी ॥ नाशी विषयसुखाचिया कोडी ॥ विषयालागीं शिणतीं वेडीं ॥ अविनाश गोडी *नेणतां ॥ ९४ ॥ एवं या लोकाच्या ठायीं ॥ सुख सर्वथैव नाहीं ॥ लोकांतरीं ह्मणसी कांहीं ॥ नघडे तेंहीं उद्धवा ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ श्रुतं च दृष्टवद्दुष्टं स्पर्धाऽसूयाऽत्ययव्ययैः ॥ बह्वंतरायकामत्वात्कृषिवच्चापि निष्फलम् ॥ २१ ॥

॥टीका॥ जैसा देखिला हा लोक॥तैसाचि श्रुत स्वर्गादिक॥अनादिदोषयुक्त देख ॥ सदोष मूर्ख वांछिती ॥९६॥ स्वर्गीं ह्मणसी दोष कोण ॥ ऐक तयांचें लक्षण ॥ स्पर्धा, असूया, नाश, जाण॥ तपक्षीण दिविं भोगें ॥ ९७ ॥ तपसंपत्ति समान पाही ॥ स्पर्धा ×मोठी त्याच्याठायीं ॥ मजसमान 6भोगू पाही ॥ तें सुख नाहीं मानसीं ॥ ९८ ॥ आपणाहोनि अधिकपदीं ॥ त्यासि दोष आरोपोनि निंदी ॥ तेथेंही ऐसी 4विषमबुद्धी ॥ सुख त्रिशुद्धी तेथें कैचें ॥ ९९ ॥ यालागीं स्वर्गभोगें जें सुख ॥ सकळां सारिखें नाहीं देख ॥ तपानुसारें न्यूनाधिक ॥ भोगिती लोक निजकर्में ॥ ५०० ॥ एक उर्वशी भोगूं लागला ॥ एक काळीं विद्रूपता पावला ॥ भोगें तपक्ष-

---

१ वरचढ. २ ऊन्हपाण्यानें. ३ जीवंतपणीं. ४ ऐकलेला. ५ कमीजास्त.

1 मो. ऐसें दुःख तंव फुडें. + मो. देहांतीं. * ना. निर्विषयी. ×मो. मांडे. 6 मो. ना. भोग्य. 4 ना. विषयबुद्धी.

यो झाला ॥ नाश आला अनिवार ॥ १ ॥ जंवजंव स्वर्गभोग भोगिती ॥ तंवतंव तपाची क्षीणशक्ती ॥ तपक्षयें क्षया जाती ॥ नाश पावती स्वर्गस्थ ॥ २ ॥ स्वर्गप्राप्तीचिये विधी ॥ कर्मे करितां विघ्न बाधी ॥ तेणें नव्हे स्वर्गसिद्धी ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ३ ॥ जें गर्भींच सटवेलें ॥ त्याचें बारसें नवचे केलें ॥ तेवीं कर्मींचि विघ्न उद्भवलें ॥ पावणें ठेलें स्वर्गाचें ॥ ४ ॥ ह्मणसी विघ्न करी कोण ॥ कर्म करितां होय विगुण ॥ तें कर्माचि कर्मासि जाण ॥ विघ्न दारुण उपजवी ॥५॥ कर्मचि कर्मासि साधक ॥ कर्मचि कर्मासि बाधक ॥ कर्मचि कर्मासि मोचकें ॥ हें नेणोनि लोक गुंतले ॥ ६ ॥ काम्यकर्मीं विघ्न विचित्र ॥ देश काळ मंत्र तंत्र ॥ द्रव्य दक्षिणा विधिपात्र ॥ शुद्धि सर्वत्र पाहिजे ॥ ७ ॥ जैसें क्षयरोगाचे रोगियासि ॥ अल्प कुपथ्य बाधी त्यासी ॥ तैसें जाण काम्यकर्मासी ॥ अल्पदोषी +सविघ्न ॥ ८ ॥ प्रचंड दुधाचें भांडें ॥ माजीं थेंबु एक कांजी पडे ॥ तेणें दहीं दूध ना तूप जोडे ॥ करी खवडे दुधाचे ॥ ९ ॥ तैसें काम्यकर्म जाण ॥ अल्पही होतां विगुण ॥ फळ नव्हे परी दारुण ॥ तें कर्मचि विघ्न उपजवी॥११० कष्टोनियां बारा मासीं ॥ जैसा कृषीवळ करी कृषी ॥ त्याच्या फळाआड विघ्नें कैशीं ॥ केल्या कष्टासी नाशक ॥ ११ ॥ भूमी शुद्ध, शुद्ध बीज ॥ काळीं पर्जन्य, कर्ता निरुज ॥ उपकरणसामग्री समाज ॥ पहिलें हें वोज पाहिजे ॥ १२ ॥ पेरणी झालियाही पाठीं ॥ देखणें, राखणें, कृप कांटी ॥ सोंकरोंवें आवशीं पाहाटीं ॥ आळस पोटीं सांडूनी ॥ १३ ॥ पीक येत येतां कणशीं ॥ *आभाळें हिंसळा पडे त्यासी ॥ कां कान्हीं पडे पिकासी ॥ घाली शेतासी निंदेणें ॥ १४ ॥ गर्वाचा तांबोरा पडे ॥ कां अहंतेचा रोग पडे ॥ कीं अधर्माची आळी वाढे ॥ पीक बुडे तेणेंही ॥ १५ ॥ सबळ सोंकरणें ×नघेडी ॥ तरी आशेतृष्णेच्या भोरेंडी ॥ कीजे पिकाची ओरबडी ॥ दाणा बुडीं उरेना ॥ १६ ॥ दंभाची *गांठी पडिल्या ठायीं ॥ घांटीं दिसे परी दाणा नाहीं ॥ कामक्रोधांच्या उदरीं पाही ॥ मूळाच्या ठायीं करांडिलें ॥ १७ ॥ आल्या विकल्पाची धाडी ॥ शेतामाजीं नुरे काडी ॥ कुवासना टोळांची पडे उडी ॥ समूळ सशेंडीं खुरांट ॥ १८ ॥ एवं कृषीवळाचे परी ॥ सकामासि विघ्नें भारी ॥ फळ अंतरलें दूरी॥ विघ्नसागरीं बुडाले ॥ १९ ॥ स्वर्ग एक याज्ञिक बहुत ॥ यालागीं देव विघ्नें करित ॥ मुख्य इंद्रचि विघ्ना प्रवर्तत ॥ स्वर्ग राखत निजभोगा ॥ १२० ॥ एक वेश्या एकी राती ॥ तेथ सकाम बहुत येती ॥ ते जैसे कलहो करिती॥ तैशी गती याज्ञिकां ॥२१॥ कां शुंनी जैशी ऋतुस्नात॥ तिसी भोगूं येती श्वान बहुत ॥ परस्परें गुरगुरित ॥ तैसा स्वर्ग भोगित सकाम ॥ २२ ॥ तेथ ज्यासि भोग घडे ॥ भोगूं जातां अडकोनि पडे ॥ भंडिमा होय जगापुढें ॥ ✻सज्ञान तोंडें थुंकिती ॥ २३ ॥ जिचें भोगूं जाय सुख ॥ अडकल्या ते होय विमुख ॥ मैथुनद्वारें गुंतल्या देख ॥ थुंकिती लोक ᵟमुखामुखीं ॥ २४ ॥ तैशी याज्ञिकां स्वर्गप्राप्ती ॥ भोगें होय तपच्युती ॥ स्वर्गभोगीं गुंतली आसक्ती ॥ विमुख पडती इहलोकीं ॥ २५ ॥ एवं कृषीवळाचियापरी ॥

---

१ नासावलें. २ सोडविणारें. ३ रोग नसलेला. ४ बळ रीती. ५ राखावें. ६ अभ्रांमुळें. ७ कणसावर पडणारा रोग. ८ फलकट. ९ बेणणें. १० एक रोग. ११ कीड. १२ रक्षण. १३ नकरी. १४ पांखरें. १५ हरभऱ्याचा घांटा, बोंड. १६ कुत्री. १७ फजीती. १८ तपापासून भ्रष्टता.

+मो. विघ्न मोठें. *मो. अभावो हिंसाळा. × मो. न धाडी. *ना. धाडी. ✻मो. सकळजन ᵟ ना. मुखावलोकीं.

स्वर्गप्राप्तीसि विघ्नें भारी ॥ केले कष्ट वृथा करी ॥ भोगू कैशापरी घडेल ॥ २६ ॥ एक ह्मणती कर्मकुशळ ॥ आह्मी कर्म हों नेदूं विकळ ॥ अछिद्रें साधूनि सकळ ॥ स्वर्गसुख फळ भोगूनि ॥ ५२७ ॥ उद्धवा ऐसेंही न घडे ॥ तें मी सांगेन तुजपुढें ॥ पंचश्लोकीं फाडोवाडें ॥ विशद निवाडें परियेसी ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ अंतरायैरविहतो यदि धर्मः स्वनुष्ठितः ॥ तेनापि निर्जितं स्थानं यथा गच्छति तच्छृणु ॥ २२ ॥

॥ टीका ॥ जेणें अंतराय नपवती ॥ ऐशीं अछिद्र कर्में *नव्हती ॥ जरी झालीं दैवगतीं ॥ तरी स्थानप्राप्ती ते नश्वर ॥ २९ ॥ कर्में ज्या स्थानाप्रति जाये ॥ तेथ गेलिया जें जें लाहे ॥ तें तें सांगेन मी पाहे ॥ सावध होये उद्धवा ॥ ५३० ॥

॥ श्लोक ॥ इष्ट्वेह देवता यज्ञैः स्वर्लोकं याति याज्ञिकः ॥ भुंजीत देववत्तत्र भोगान् दिव्यान्निजार्जितान् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ पावोनि कर्मभूमी उत्तम ॥ वर्ण वरिष्ठ ब्राह्मणजन्म ॥ ज्योतिष्टोमादि करिती कर्म ॥ नित्य ×काम्य अग्निहोत्र ॥३१॥ त्रैविद्या जाणती सकळ ॥ कर्मकलापीं अति कुशळ ॥ ऐसे सज्ञान मूर्ख केवळ ॥ स्वर्गफळ वांछिती ॥ ३२ ॥ जेणें पुण्यें मी न जोडें ॥ तें पुण्य ह्मणतां वाचा रडे ॥ याज्ञिक विषयासक्त गाढे ॥ स्वर्गभोगाकडे धांविन्नले ॥ ३३ ॥ यज्ञानि इंद्रादिदेवांसी ॥ जेणें अंतर पडे मजसी ॥ त्या पावले स्वर्गलोकासी ॥ दिवि भोगासी भोगावया ॥ ३४ ॥ बहुतीं चघळिलें जुनें हाड ॥ तें श्वान स्वलाळा करी गोड ॥ तैसें याज्ञिकां स्वर्गकोड ॥ स्वपुण्यें गोड करिताती ॥ ३५ ॥ कां स्मशानबळीचें अन्न ॥ कलहें श्वानशेष खाय श्वान ॥ तैसाचि स्वर्गभोग जाण ॥ शेष भोजन बहुतांचें ॥ ३६ ॥ गांठींचें वेंचून शुद्ध सुकृत ॥ उच्छिष्ट भोग विकत घेत ॥ याज्ञिक पवित्र ह्मणवित ॥ मोलें सेवित बहुशेष ॥ ३७ ॥ केवळ वायसाचें मांस ॥ तेंही श्वानमुखींचें शेष ॥ मोलें न मिळेचि बहुवस ॥ तैसी रसकेंस याज्ञिकां ॥ ३८ ॥ स्वर्ग उच्छिष्ट बहुतांचें ॥ त्यासि मोल वेंचें अतिकष्टाचें ॥ तेंही नमिळेचि धैर्याचें ॥ भय पतनाचें अहर्निशीं ॥ ३९ ॥ स्वर्गभोग भोगिती देव ॥ तेही ह्मणताति आह्मी निर्दैव ॥ याज्ञिकां ठायीं हांव ॥ दिव्यवैभव भोगार्थ ॥५४०॥ एवं झालिया स्वर्गप्राप्ती ॥ तेथ जे जे भोग भोगिती ॥ ते मी सांगेन तुजप्रती ॥ ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ४१ ॥ स्वर्गीं समान भोगू समस्तां ॥ नाहीं जाण गा सर्वथा ॥ ज्याची जैसी पुण्यअवस्था ॥ तैशी प्राप्तता तयासी ॥४२॥

॥ श्लोक ॥ स्वपुण्योपचिते शुभ्रे विमान उपगीयते ॥ गंधर्वैर्विहरन्मध्ये देवीनां हृद्यवेषधृक् ॥ २४ ॥

॥ टीका ॥ आपुले पुण्याचेनि मोलें ॥ चंद्रप्रभाविमान आलें ॥ त्यामाजीं आरूढले ॥ भोगूं लागले दिविभोगू ॥ ४३ ॥ तेथें दिव्यदेहाची प्राप्ती ॥ मनोहरवेषातें धरिती ॥ अतिमधुर गं-

१ अपूर्ण. २ सांग, निर्दोष. ३ स्पष्ट. ४ विघ्न. ५ नाहींशी होणारी. ६ वेदविद्या. ७ विषयावर प्रेम करणारे. ८ कुत्र्यानें खाऊन उरलेलें. ९ पुण्य. १० आंगावर कांटा येतो तो. ११ पुरेसें. १२ चढले.

* मो. न होती. × ना. कर्म अग्निहोत्री.

थर्वे गाती ॥ स्वेच्छा क्रीडती स्त्रियांशीं ॥ ४४ ॥ त्या स्वर्गींच्या स्वर्गांगना ॥ देखतां भुली पडली मना ॥ मग त्यांचेनि छंदें जाणा ॥ नानास्थानां क्रीडतू ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ स्त्रीभिः कामगयानेन किंकिणीजालमालिना॥क्रीडन्न वेदाऽऽत्मपातं सुराक्रीडेषु निर्वृतः ॥२५॥

॥ टीका ॥ त्या स्त्रियांसमवेत आपण ॥ विमानीं करोनि आरोहण ॥ स्वेच्छागामीं गमन ॥ शोभे विमान तें कैसें ॥ ४६ ॥ घंटा घंटिकाजाळमाळा ॥ क्षुद्रघंटिका रत्नमेखळा ॥ किंकिणी लाविलिया सकळा ॥ विमानलीळा विचित्र ॥ ४७ ॥ इच्छिल्या ठायां ने विमाना ॥ चैत्रवना कां नंदनवनां ॥ भोगावया स्वर्गांगना ॥ आसक्त जाणा झालासे ॥ ४८ ॥ वनीं सुमनांचे संभार ॥ परांग उधळत सपुर ॥ कोकिळांचे मधुर स्वर ॥ झणत्कार भ्रमरांचे ॥ ४९ ॥ मंद सुगंध सुशीतळ ॥ झळकतसे मलयानिळ ॥ स्वर्गांगनांसी गेंदारोळ ॥ कामसुकाळ सकामा ॥ ॥ ५१० ॥ आगीकापुरां होतां भेटी ॥ एकवेळे भडका उठी ॥ तैसें पुण्य वेंचलें उठाउठी ॥ भोगासाठीं सकाम ॥ ५१ ॥ मज पतन येईल येथ ॥ भोग जातील समस्त ॥ हेंही नाठवी त्याचें चित्त ॥ कामासक्त झालेंसे ॥५२॥ दीपासि देतां आलिंगन ॥ पतंगा नाठवे निजमरण ॥ तैसें नाठवे आत्मपतन ॥ भोगीं मन विगुंतलें ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ तावत्प्रमोदते स्वर्गे यावत्पुण्यं समाप्यते ॥ क्षीणपुण्यः पतत्यर्वागनिच्छन्कालचालितः ॥ २६ ॥

॥ टीका ॥ जंव असे पुण्यसंपत्ती ॥ तंव स्वर्गभोग भोगिती ॥ क्षीण झाल्या पुण्यशक्ती ॥ पतन पावती तत्काळ ॥ ५४ ॥ जंववरी गांठीं असे धन ॥ तंववरी वेश्येचें सौजन्य ॥ निःशेष वेंचल्या धन ॥ मुख परतोन पाहेना ॥ ५५ ॥ तैशी स्वर्गींची वस्ती ॥ निजपुण्यें भोग भोगिती ॥ पुण्यक्षयें क्षया जाती ॥ पतन पावती अनिच्छा ॥ ५६ ॥ कष्ट करूनि याज्ञिकीं ॥ स्वर्ग साधिला व्हावया सुखी ॥ तेचि झाले परमदुःखी ॥ पतन अधोमुखीं पावले ॥ ५७ ॥ उडालें स्वर्गभोगाचें सुख ॥ आलें गर्भवासाचें दुःख ॥ जळो सकामाचें सुख ॥ ठकले याज्ञिक ×सुखलोभें ॥ ५८ ॥ उद्धवा जे म्हणती स्वर्गसुख ॥ ते यारीतीं 7पावले दुःख ॥ स्वर्गसुख मानिती मूर्ख ॥ नव्हे निर्दोख तो मार्ग ॥ ५९ ॥ विधियुक्त आचरतां याज्ञिक ॥ पुढती पावले थोर दुःख ॥ तरी अविधीनें होईल सुख ॥ म्हणी देख म्हणशील ॥ ५६० ॥ तेथ *प्रवृत्तिमार्गाची प्रवृत्ती ॥ दोंप्रकारें असे वर्तती ॥ एकी विधिरूपें आचरती ॥ दुजी स्थिती अविधीनें ॥ ६१ ॥ आतां सांगीतली तुजप्रती ॥ ते वेदोक्त विधानस्थिती ॥ जे विधीनें स्वर्गप्राप्ती ॥ हे प्रवृत्ति उत्कट ॥ ६२ ॥ पुण्यक्षयें स्वर्गपतन ॥ तेंही सांगीतलें कथन ॥ आतां अविधीचें जें आचरण ॥ तेंही लक्षण परियेसी ॥ ६३ ॥ वेदउल्लंघनें कुमती ॥ कुत्सित जनाचे संगतीं ॥ अप्रवृत्तीची प्रवृत्ती ॥ अधर्मस्थिती अवधारी ॥ ६४ ॥

---

१ अप्सरा. २ पुष्पांतील पिंवळे रजःकण. ३ मलयपर्वतावरील वायु. ४ कोलाहल. ५ यथाविधी. ६ विधिरहित. ७ वाईटाविषयीं.

× ना. सुखभोगें. 7 मो. पां देख. * ना. कर्मभार्गींची.

॥ श्लोक ॥ यद्यधर्मरतः संगादसतां वाऽजितेंद्रियः ॥ कामात्मा कृपणो लुब्धः स्त्रैणो भूतविहिंसकः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ सहजें प्राणी कामासक्त ॥ प्राप्तकामें अतिलुब्ध होत ॥ काम न पावतां दीनचित्त ॥ स्वभावो नित्य जीवाचा ॥ ६५ ॥ ऐशिया स्वभावनिष्ठासी ॥ जरी संग होय ✻[1]असंतपुरुषीं ॥ तरी रति वाढे अधर्मासी ॥ अकर्मासी प्रवर्ते ॥ ६६ ॥ चंचलत्वें कर्मठ मन ॥ त्यासी असत्संग मदिरापान ॥ कामवृश्चिकें[2] दंशिलें जाण ॥ तेव्हां वर्तन अद्वातिद्वा[3] ॥ ६७ ॥ *पिशाहातीं पेंडेंवाळी[4] ॥ दीधल्या तो सर्वत्र जाळी ॥ तेवीं असत्संगें करी होळी ॥ स्वधर्म समूळीं जाळित ॥ ६८ ॥ बाळकाहातीं दीधलें शस्त्र ॥ खोंचितां न ह्मणे आपपर ॥ छेदी अपुलेंचि शरीर ॥ हित विचार तें नेणे ॥ ६९ ॥ जेंवी जोगी अवतरे देव्हारां[5] ॥ तिच्या तोंडा नाहीं वोढावारा ॥ कां बहुरूप्याच्या दिगंबरा[6] ॥ नाहीं थारा वैराग्या ॥ ५७० ॥ तैसा असत्संगें खरा ॥ घाली दंभाचा पसारा ॥ नाहीं विवेकाचा थारा ॥ कामशास्त्रा प्रवर्ते ॥७१॥ कामशास्त्रें अतिसकाम ॥ कामास्तव योजी अधर्म ॥ अधर्मास्तव अकर्म ॥ निंद्य धर्म आचरे ॥ ७२ ॥ +निंद्यकर्माचा संयोग ॥ यासि मुद्दल लुब्धभोग ॥ लुब्धभोगा मानी चांग ॥ अधर्म सांग सविस्तर ॥७३॥ अधर्म वाढतां उभारा ॥ परद्रव्य आणि परदारा ॥ याचिलागीं शरीरा ॥ उपायद्वारा कष्टवी ॥ ७४ ॥ अंगनेलागीं अतिदीन ॥ स्त्रीध्यानें होय स्त्रैण ॥ स्त्री साधावया जाण ॥ भूतहननें आरंभी ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ पशूनविधिनाऽऽलभ्य प्रेतभूतगणान्यजन् ॥ नरकानवशो जंतुर्गत्वा यात्युल्बणं तमः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ विधि ह्मणे तें न करावें ॥ वेदु बोले तें नाइकावें ॥ स्मृतिशास्त्र नावडे जीवें ॥ कर्म करावें स्वेच्छा ॥ ७६ ॥ जारण मारण उच्चाटन ॥ स्तंभन मोहन वशीकरण ॥ असाध्य साधूनि अंजन ॥ करी 7लावगण[7] क्रियांसी ॥ ७७ ॥ लोण राई आणि बिबवे ॥ मधुरसें कालवी आघवे ॥ शाबरी मंत्राचेनि वैभवें ॥ होम करूं धांवे तामस ॥ ७८ ॥ कर्म करावया अभिचार[8] ॥ मेष जंबुक वानर ॥ सरड बेडूक मत्स्य मगर ॥ गीध घार होमिती ॥ ७९ ॥ ‡नग्नभैरव वेताळ ॥ झोटिंग पिशाच[9] कंकाळ ॥ मारको मेसको मेराळ ॥ भूतें प्रबळ उपासी[10] ॥ ५८० ॥ काळी चिडी कांकण घारी ॥ काग बक उलूक मारी ॥ आवंतूनि काळी मांजरी ॥ शाबरमंत्रीं होमिती ॥ ८१ ॥ वाहत्या पाण्याचें तेल चोरी ॥ प्रदोषसंधीं न्हाय शनिवारीं ॥ शाकिनी डाकिनी मध्यरात्रीं ॥ होमामाझारीं चेतवी ॥ ८२ ॥ मद्याचे घट पूर्ण भरी ॥ मातंगीची[11] पूजा करी ॥ रुधिरें[12] घाली प्रेतपात्रीं ॥ मोहनीमंत्रीं मंत्रोनी ॥ ८३ ॥ घेती हळदीची उटी ॥ सेंदूर लाविती मळवटीं ॥ काम साधावया हटीं ॥ अंजन कष्टीं साधिती ॥ ८४ ॥

---

१ दुष्ट पुरुषांशीं. २ मदनरूपी विंचवानें. ३ वेडेंवाकडें. ४ कोलती. ५ मुरळी. ६ देवाचें वारें अंगांत येतें ह्मणून लोकांत दंभ माजविणारी. ७ पशुमारण. ८ जारणमारणादि. ९ प्रेत. १० पूजी. ११ मांगिणीची. १२ रक्त.

✻ मो. असत्पुरुषीं. * ना. पिशाच्या हातीं. + ना. निंद्यधर्माचा. 7 ना. लावकपण. ‡ मो. यज्ञबहिरव.

होमपात्रें करावया तांतडी ॥ समूळ अश्वत्थातें तोडी ॥ फळित पुष्पित औषधी उपडी ॥ आसनाबुडीं घालावया ॥ ८५ ॥ बीज जपावया मंत्राचें ॥ वोलें कातडें प्रेताचें ॥ आणवी मृगअस्त्रलांचें ॥ भय पापाचें मानीना ॥ ८६ ॥ खेचर भूचर जळचर ॥ जीव पीडिती अपार ॥ घेऊनि ब्राह्मणाचें रुधिर ॥ अभिचार आचरती ॥ ८७ ॥ गायींब्राह्मणांसि जाण ॥ पीडा करिती दारुण ॥ क्षेत्रवित्तदाराहरण ॥ स्वार्थे प्राण घेताती ॥८८॥ देवालयींचें देवलश ॥ कां शिवालयींचें शिवशेष ॥ घेतां न करिती आळस ॥ वासना असोस अधर्मीं ॥ ८९ ॥ एवं कर्म करितां ऐसें ॥ तेणें अकर्म कर्मवशें ॥ अंधतमीं तो प्रवेशे ॥ जेवीं कां आंवसे चंद्रमा ॥ ५९० ॥ अकर्म जाण आतुर्बळी ॥ जीवाचें निज ज्ञान छळी ॥ अतिमूढ करूनि ते काळीं ॥ निरयकल्लोळीं घालित ॥ ९१ ॥ ते नरकींची नवलकथा ॥ कोटिवर्षें तळीं जातां ॥ ठाव नलगे गा सर्वथा ॥ केवीं वरुता येईल ॥ ९२ ॥ त्यातें अंधतम ह्मणती ॥ जे देखतां अंध होय वृत्ती ॥ निघतां निर्गमु विसरती ॥ नरकीं वसती मूढत्वें ॥ ९३ ॥ जंव होय कर्मभोगांत ॥ तंव नरक भोगी आकल्पांत ॥ मग स्थावरत्व पावत ॥ वृक्ष होते कां पाषाण ॥ ९४ ॥ ऐशी अवस्था गाढमूढ ॥ केवळ जाड्य झाले जड ॥ स्वप्नीं सुख नेणती गोड ॥ दुःख दुर्वाड भोगिती ॥९५॥ एवं अधर्मप्रवृत्तीं वर्ततां ॥ सुखलेश नलभे सर्वथा ॥ दुःख अनिवार भोगितां ॥ निर्गमता त्यां नाहीं ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ कर्माणि दुःखोदर्काणि कुर्वन्देहेन तैः पुनः ॥ देहमाभजते तत्र किं सुखं मर्त्यधर्मिणः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ ऐके बापा उद्धवा ॥ मरणधर्मात्मका जीवा ॥ सुख न भेटे त्याच्या भावा ॥ दुःखप्रवाहामाजीं वासू ॥ ९७ ॥ नरदेहा येवोनि केवळ ॥ क्रूर कर्मे करिती प्रबळ ॥ ज्यांसि उत्तरोत्तर दुःखफळ ॥ यातना सबळ भोगवी ॥ ९८ ॥ मरमरों दुःख *भोगी दारुण ॥ उपजोनि कर्मे करी हीन ॥ दुःखावर्तीं पडिले जाण ॥ आपणिया आपण घातक ॥ ९९ ॥ जे संतचरणीं विमुख ॥ त्यांसि स्वप्नीं नाहीं सुख ॥ क्रूर कर्मे करी कामुक ॥ चढतें दुःख सकामा ॥६००॥ एवं प्रवृत्तीमाजीं असतां ॥ सकाम कर्मे आचरतां ॥ सविधि अविधि कर्मे करितां ॥ दुःख सर्वथा अनिवार ॥ १ ॥ सविधिकाम्यें स्वर्गपतन ॥ अविधिकाम्यें नरक दारुण ॥ एवं प्रवृत्तीमाजीं जाण ॥ सुख कोण सकामा ॥ २ ॥ ह्मणशी लोकपाळांचेठायीं ॥ नित्य सुख असेल पाहीं ॥ त्यांसि जन्ममरण नाहीं ॥ अमरत्व आह्मींही साधावें ॥ ३ ॥ लोकपाळांचे नित्य लोक ॥ लोकपाळही नित्य देख ॥ तेथें असेल नित्य सुख ॥ ऐसें मूर्ख कल्पिती ॥४॥

॥ श्लोक ॥ लोकानां लोकपालानां मद्भयं कल्पजीविनाम् ॥ ब्रह्मणोऽपि भयं मत्तो द्विपरार्धपरायुषः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ लोकपाळांमाजीं अमरेंद्र ॥ मरुद्गणांचा राजा इंद्र ॥ ज्यासि मानिती सूर्यचंद्र ॥ वरुण कुबेर यमादी ॥ ५ ॥ ज्या अमरावती सिंहासन ॥ ऐरावताचें आरोहण ॥ उच्चैःश्रवा

१ अतृप्त. २ नरकांत. ३ बाहेर पडायची वाट. ४ दुर्घट. ५ सुटका. ६ स्वर्गांतून पडणें. ७ प्रदेश. राज्यें.

* ना. भोगवी.

अश्व जाण ॥ पुढें आपण बोलणिये ॥६॥ ज्यासि उर्वशी भोगपत्नी ॥ रंभामुख्य विलासिनी ॥ जेथ तिलोत्तमा नाचणी ॥ चिंतामणी लोळती ॥७॥ अष्टमहासिद्धींचीं भांडारें ॥ रत्नजडित धवळारें ॥ मरगजाचे डोल्हारें ॥ सुवर्णसूत्रें लाविलें ॥८॥ वैडूर्याचे शोहाडे ॥ कामधेनूचे वाडे ॥ कल्पद्रुमांचे मांदोडे ॥ चहूंकडे शोभती ॥ ९ ॥ लोकपाळ आज्ञेचे ॥ सुरसेना सैन्य ज्यांचें ॥ एवढें ऐश्वर्य जयाचें ॥ राज्य स्वर्गाचें भोगित ॥ ६१० ॥ त्यासि माझी काळशक्ती ॥ ब्रह्मयाचे दिनांतीं ॥ चौदा इंद्र क्षया जाती ॥ येराची गती कायशी ॥ ११ ॥ ब्रह्मायु ह्मणती समस्तां ॥ जो *द्विपरार्धआयुष्यवंता ॥ जंव नपवे माझी काळसत्ता ॥ तंव श्लाघ्यता आयुष्याची ॥१२॥ ज्यासि अग्रपूजेची मान्यता ॥ जो लोकलोकपाळांचा +कर्ता ॥ त्या ब्रह्मयासि माझी काळसत्ता॥ग्रासी सर्वथा ³सलोक॥१३॥ मी काळात्मा देहधरू॥शास्ता नियंता ईश्वरू ॥ अंतर्यामी सर्वेश्वरू ॥ ×अतिदुर्धर व्यापकू ॥ १४ ॥ माझा ⁴काळक्षोभ दारुण ॥ त्यातें आवरूं शकें कोण ॥ धर्म, अर्थ, कामें जाण ॥ निवारण त्या नव्हे ॥ १५ ॥ प्रळयकर्त्या महाकाळासी ॥ माझी काळसत्ता ग्रासी ॥ माझें महाभय सर्वांसी ॥ लोकपाळांसी सुख कैंचें ॥ १६ ॥ लव निमेष पळपळें ॥ माझेनि भयें सूर्य चाले ॥ माझेनि भयें प्राण ⁵चळे ॥ वायु खेळे माझेनि ⁶भेणें ॥१७॥ माझे आज्ञेंवरी अग्नि जाण ॥ वैसवीतसे जठरस्थान ॥ मनुष्यें नव्हे अधिक न्यून ॥ पचवी अन्न चतुर्विध ॥ १८ ॥ यथाकाळीं पर्जन्यधारीं ॥ इंद्र वर्षे मद्भयेंकरीं ॥ मृत्यु सकाळें प्रळय करी ॥ भय भारी त्या माझें ॥ १९ ॥ माझेनि भयेंकरीं देखा ॥ समुद्र नोलांडी रेखा ॥ माझिया भयाची थोर शंका ॥ तिहीं लोकां कांपवी ॥ ६२० ॥ तिहीं लोकांचा शास्ता ॥ ईश्वर तो मी नियंता ॥ येणें कर्मजडाची वार्ता॥अनीश्वरता छेदिली ॥२१॥ प्रवृत्तीसि अनर्थता ॥ मागां दाविली तत्त्वतां ॥ वैराग्य स्थापिलें सदृढता ॥ निवृत्ति सर्वथा अतिश्रेष्ठ ॥ २२ ॥ आपुल्या ऐश्वर्याचिया अधिकारें ॥ साधूनि ईश्वरत्व केलें खरें ॥ मीमांसकमत–निराकारें ॥ निरूपण पुढारें चालवी ॥ २३ ॥ मीमांसकमत–वार्ता ॥ बोलिले जीवासि अनेकता ॥ तोचि कर्ता आणि भोक्ता ॥ हेंचि सर्वथा निराकारी ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ गुणाः सृजंति कर्माणि गुणोऽनुसृजते गुणान् ॥ जीवस्तु गुणसंयुक्तो भुंक्ते कर्मफलान्यसौ ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ कृष्ण ह्मणे उद्धवातें ॥ एकादश इंद्रियें समस्तें ॥ करिती नानाविध कर्मातें ॥ आत्मा तो येथें ²नित्यसाक्षी ॥ २५ ॥ ' दीपु उजळलियां घरीं ॥ लोक वर्तती व्यापारीं । तो नेमी ना निवारी ॥ तैशापरी जीव येथें ॥२६॥ जीव प्रेरूनि इंद्रियांतें ॥ ह्मणाल करवितसे कर्मातें ॥ जेवीं कुऱ्हाडी घेऊनि हातें ॥ छेदी वृक्षातें कृषीवळ ॥ २७ ॥ ऐशी इंद्रियांची प्रेरणता ॥ जीवासि न घडे सर्वथा ॥ ते नवडायाची कथा ॥ ⁰तुज तत्त्वतां सांगेन ॥ २८ ॥

---

१ स्वर्गाला नेयार. २ नाचणारी. ३ घरें. ४ पाचूचे. ५ वृक्ष. ६कल्पवृक्षांचे. ७जेवाडे, मंडप. ८ ब्रह्मरूपता. ९ ब्रह्मलोकासहित. १० व्यापिनी. ११ खाद्य, चोष्य, लेह्य, पेय. १२ कर्मठांचे मतीं. १३ प्रकाशानें. १४ मीमांसक मत खंडन.

* मो. द्विपरार्धे ना. द्विपरार्धांचा. + ना. आदिकर्ता. ³ ना. सकाळें. ×ना. अतिदुस्तरू. ⁴ना. काळभोग. ⁵ना. चक्रे. ⁶ना. भयें.²मो. सर्वसाक्षी. ⁰मो. ऐक.

इंद्रियां कर्मी प्रेरण ॥ करिते, सत्वादिक गुण; ॥ जीव उभयसाक्षी जाण ॥ कर्मकारण त्यां नाहीं ॥ २९ ॥ अंगें नातळतां आपण ॥ चुंबक *संनिधिमात्रें करून ॥ अचेतन लोहा करी चळण ॥ तैसा जाण जीव येथें ॥ ६३० ॥ कां उगवल्या दिवाकर ॥ सुष्टु-दुष्टु लोकव्यापार ॥ तो सूर्यासि नातळे कर्मभार ॥ साक्षी साचार सर्वांचा ॥ ३१ ॥ तैसी जीवासि कर्तव्यता ॥ सत्य नाहीं गा सर्वथा ॥ दिसे जे कांहीं आपादितां ॥ ते आध्यासकर्ता मिथ्यात्वें ॥ ३२ ॥ कावळें अध्यासिला डोळा ॥ तो चंद्रमा देखे पिंवळा ॥ तेवीं आत्मा कर्ता भासे स्थूळा ॥ केवळ निश्चळा नेणती ॥ ३३ ॥ सवेग चालतां आभाळें ॥ बाळें ह्मणती चंद्रमा पळे ॥ तेवीं आत्मा कर्ता मानिती स्थूळें ॥ उपाधिमेळें अध्यास ॥ ३४ ॥ देह मी कर्म माझें ॥ हें आत्मेनि स्वप्नीं नेणिजे ॥ मृगजळीं बुडाले राजे ॥ सत्य मानिजे तैसें हें ॥ ३५ ॥ एवं आत्म्यासि कर्तव्यता ॥ सत्य नाहीं गा सर्वथा ॥ त्यासि ह्मणताति फळभोक्ता ॥ तेही वार्ता मिथ्यात्वें ॥ ३६ ॥ स्वप्नीं जोडिल्या सहस्र गायी ॥ जागृतीं त्यांचें दुभतें नाहीं ॥ आत्मा भोक्ता तैसा पाहीं ॥ उपाधीच्या ठायीं मिथ्यात्वें ॥ ३७ ॥ ×डबकीं प्रतिबिंबला रवी ॥ तो जें तेथील कर्दम सेवी ॥ तें भोक्ता आत्मा देहगांवीं ॥ सत्य मानवीं मानावा ॥ ३८ ॥ मृगजळामाजीलेनी मत्स्यें ॥ बिंबला चंद्र गिळिजे आवेशें ॥ तैसा आत्मा +देहाभिमानवशें ॥ भोगविशेषें भोगिता ॥३९॥ एवं आत्मा जो भोक्ता ॥ ते सोपाधिक वार्ता ॥ उपाधि मिथ्या गा तत्त्वतां ॥ आत्मा भोक्ता कैसेनी ॥ ६४० ॥ एवं आत्मा अकर्ता अभोक्ता ॥ हें सद्दृढ साधिलें तत्त्वतां ॥ जीवासि बोलिली अनेकता ॥ ते मिथ्या आतां साधिन ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ यावत्स्याद्गुणवैषम्यं तावन्नानात्वमात्मनः ॥ नानात्वमात्मनो यावत्पारतंत्र्यं तदैव हि ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ सत्त्व रज आणि तमाचा ॥ अंतरीं धुमाड गुणकर्मांचा ॥ तंव जीवासि अनेकत्वाचा ॥ आभास साचा मानला ॥ ४२ ॥ अहंकारादि देहपर्यंत ॥ जंव जीवासि मीपण भासत ॥ तंव नानात्व मानी सत्य ॥ तें मिथ्या निश्चित उद्धवा ॥ ४३ ॥ जैसें आपुलेंचि निजमुख ॥ आरिसा करी आपणासंमुख ॥ तैसें अविद्यायोगें मायिक ॥ द्वैत देख दाखवी ॥ ४४ ॥ आरिशामाजीं आपुला ॥ जो *द्वैतभावो स्वयें देखिला ॥ तेणें आपण नाहीं द्विधा झाला ॥ मिथ्या भासला आभास ॥ ४५ ॥ तो आभास झालिया समोर ॥ त्रिगुण गुणांचे विकार ॥ एकचि दावी नानाकार ॥ दिसे साचार गुणक्षोभें ॥ ४६ ॥ जैसें आपुलेंचि मुख केवळ ॥ शस्त्रीं आदर्शीं आणि जळ ॥ लांब निश्चळ चंचळ ॥ करी प्रबळ विकारी ॥ ४७ ॥ एवं त्रिप्रकार कार्यविशेखें ॥ मुखचि देखिजे निजमुखें ॥ तैसें तें नानात्व लटिकें ॥ गुणक्षोभकें भासत ॥ ४८ ॥ सूत्रचि विणिजे पटाकारीं ॥ पटावरी तंतूंच्या

---

१ करणारे. २ बरे-वाईट. ३ सकृद्दर्शनीं. ४ आरोप. ५ कावीळीनें. ६ देहाच्या अभिमानानें. ७ धामधूम, गडबड, आधिक्य. ८ दोनप्रकारचा. ९ शस्त्र (तरवार) लांबकरी: आदर्श (आरसा) निश्चळ (स्थिर) करी: जळ चंचळ करी [ आपुलें मुख. ] १० वस्त्राच्या आकारानें.

*मो. संनिधिमात्रकारण ×मो. थिल्लरीं. +मो. देहाभिमानिवेशें ना. देहाभिमानिवसे
*मो. द्वैतपभावो.

हारी ॥ दिसती तेवीं चराचरीं ॥ नानाकारीं एकची ॥ ४९ ॥ साकरेचा केला ऊंस ॥ वरी कठिण आंत बांकस ॥ मधील पिळून घ्यावा रस ॥ हा त्रिगुण दोष त्या नाहीं ॥ ६५० ॥ तैसा परमात्मा श्रीहरी ॥ अद्वितीय एक चराचरीं ॥ त्यासि अनेकत्वाची परी ॥ सत्वादि करीं गुणक्षोभ ॥ ५१ ॥ जैसा बहुरूपी आपुल्याठायीं ॥ नाना सोंगें धरी स्वदेहीं ॥ तितुकीं रूपें त्यासि नाहीं ॥ एकला पाहीं अद्वैत ॥ ५२ ॥ तैसा सच्चिदानंद श्रीहरी ॥ आत्मा एक चराचरीं ॥ नांदताहे नानाकारीं ॥ द्वैतामाझारीं अद्वैत ॥ ५३ ॥ अद्वैत साधिलें जीवासी ॥ सत्य मानलें आह्मांसी ॥ परी एक आशंका ऐसी ॥ निजमानसीं वर्तत ॥ ५४ ॥ तूंचि ह्मणसी जीव परतंत्र ॥ आतां अद्वैतपणें स्वतंत्र ॥ बोलासी बोलणें विचित्र ॥ केवीं साचार मानावें ॥ ५५ ॥ अद्वैतपण संपादिसी ॥ माझें भय लोकपाळां ह्मणसी ॥ हें नेमने गा आह्मांसी ॥ अद्वैतासी भय कैचें ॥ ५६ ॥ ऐशिया रीतीं उद्धवा ॥ झाल्या संदेहासी विचारावा ॥ तो तूं आतळोनेदी जीवा ॥ ऐक बरवा निर्धारू ॥ ५७ ॥ जीवासि उपाधीसी तादात्म्यता ॥ तंव तंव भासे नानात्मता ॥ नानात्वीं परतंत्रता ॥ ईश्वरसत्ता नियामक ॥ ५८ ॥ अमित मीनलिया दळ ॥ सेनापतीवीण विकळ ॥ आंबा पिकलिया रसाळ ॥ राखण सबळ त्या पाशीं ॥ ५९ ॥ तेवीं जीवासि जंव अनेकता ॥ तंव सृष्टीसि कर्ता हर्ता नियंता ॥ ×जाण ईश्वरूचि तत्त्वता ॥ परतंत्रता ते जीवासी ॥ ६६० ॥ अनेकत्वें परतंत्रता ॥ यालागीं ईश्वर नियंता ॥ ऐसी देखोनि ईश्वरसत्ता ॥ भय समस्ता जीवांसी ॥ ६१ ॥ माझें ईश्वरसत्तेचें भयं ॥ देखोनि अंतकही भीताहे ॥ इंद्रादिकांचा पाड काये ॥ भय वाहे विधाता ॥ ६२ ॥ माझी अत्यंत प्रळयींची सत्ता ॥ वाजे हरिहरांचे माथां ॥ अनेकत्वाचा संहर्ता ॥ मीचि सर्वथा निजकाळ ॥ ६३ ॥ यालागीं अनेकत्व जंव आहे ॥ तंववरी दुस्तर काळभये ॥ जेव्हां अने-कत्व नाहीं होये ॥ तेव्हां काळ काये नाशील ॥ ६४ ॥ एवं अनेकत्वाचे माथां ॥ ईश्वरभयाची काळसत्ता ॥ अनेकत्वें परतंत्रता ॥ जाण सर्वथा उद्धवा ॥ ६५ ॥ तें अनेकत्व जं जाये ॥ तैं काळ नाहीं मा कैचें भये ॥ *पर नसतां परतंत्र न होये ॥ एकत्वीं आहे स्वानंद ॥ ६६ ॥ जेथ द्वैताचा सद्द तुटी ॥ 0ऐक्य देखे सकळ सृष्टी ॥ तेव्हां स्वानंदाचिया कोटी ॥ भोगी उठी निजबोधें ॥ ६७ ॥ ज्या सुखाची मर्यादा ॥ देशें काळें न करवे कदा ॥ त्या सुखाची सुखसंपदा ॥ भोगिती सदा अद्वैतें ॥ ६८ ॥ निजात्मज्ञानें अलोलिक ॥ दुर्जनवीण अद्वैतसुख ॥ तें सांडूनि कर्मवादी कर्ममूर्ख ॥ नानालोक वांछिती ॥ ६९ ॥ मागां कर्मवादी कर्मठ ॥ बोलिले प्रवृत्ति अतिश्रेष्ठ ॥ कर्में करूनियां उद्भट ॥ ३लोकीं भोग वरिष्ठ भोगावे ॥ ६७० ॥ तेंचि निरसोनि आतां ॥ एदारीं चालविली कथा ॥ उद्धवासि अद्वैतता ॥ दृढ सर्वथा सांगत ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ यावदस्याऽस्वतंत्रत्वं तावदीश्वरतो भयम् ॥ य एतत्समुपासीरंस्ते मुह्यंति शुचार्पिताः ॥ ३३ ॥

**॥ टीका ॥ गुणवैषम्य ज्यांचे ठायीं ॥ ते नर भोगा रक्त पाहीं ॥ यागादिकर्में करूनि देहीं ॥ भोगस्थाना तिहीं ठाकिलें ॥ ७२ ॥ जे जे ठाकूनि गेले लोक ॥ तेथूनि याज्ञिका पतनधाक ॥**

१ आळी, रांग. २ चिपाड. ३ मान्य नाहीं. ४ अवकाश, प्रवेश. ५ यम. ६ दुसऱ्यावांचून.

×ना. आणि ईश्वरचि म्ह

तंव दुःखी देखे लोकनायक ॥ अनित्य लोक देखोनी ॥ ७३ ॥ पदच्युती लोकच्युती ॥ भोग कर्मेंसी भोगच्युती ॥ केले कष्ट वृथा जाती ॥ दुःखी होती निजपतनें ॥ ७४ ॥ घायाळा कीजे तरटमार ॥ तैसें ओतप्रोत दुःख फार ॥ भंवे जन्ममरणबाहेर ॥ भोगी अघोर गर्भवास ॥ ७५ ॥ राहाटमाळेचे करे ॥ पुढती रिता पुढती भरे ॥ तैसा अविश्रम फिरे ॥ गर्भद्वारें मरणांत ॥ ७६ ॥ विंचु खादिल्या दुःखितासी ॥ दाढीसि आग लागे त्यासी ॥ तेवीं भोगक्षयें पतितासी ॥ गर्भवासीं पीडा होय ॥७७॥ लोकांची अनित्यता नेणती ॥ यालागीं परमदुःखी होती ॥ कष्टाचें फळ दुःखप्राप्ती ॥ संसारावर्तीं अडकले ॥७८॥ केवळ भोग लोक अनित्य ॥ हेंही न घडे गा येथ ॥ भोगलोक होत सत्य ॥ तरी अनित्य कां ह्मणावे ॥ ७९ ॥ जेवीं दोरीं सर्पाभास ॥ तेवीं लोक चतुर्दश ॥ केवळ मायामय विलास ॥ सुखलेश तेथ कैंचा ॥ ६८० ॥ केवळ जें कां मायिक ॥ त्यामाजीं कैंचें भोगसुख ॥ कर्मठ ते केवळ मूर्ख ॥ विषय मायिक वांछिती ॥ ८१ ॥ भरलें मृगजळाचें तळें ॥ तेणें जे पिकती साळीकेळें ॥ तें विषयभोगीं सुख फळे ॥ हें न कळे भ्रांतासी ॥८२॥ जग दुमदुमित भरलें दिसे ॥ तें तूं मायिक ह्मणसी कैसें ॥ हेंचि कळे अनायासें ॥ तुज मी तैसें सांगेन ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ काल आत्माऽऽगमो लोकः स्वभावो धर्म एव च ॥ इति मां बहुधा प्राहुर्गुणव्यतिकरे सति ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ केवळ मायामय कल्पित ॥ संसार तो अज्ञानजनित ॥ एकातें अनेक ह्मणत ॥ चित्तें दुश्चित्त होउनी ॥ ८४ ॥ कनकबीजसेवनें जैसें ॥ शहाणें माणुस होय पिसें ॥ मग त्यासि नसतेंचि आभासे ॥ ससे मासे गोसर्प ॥ ८५ ॥ तैसें मायावशें अतिभ्रांता ॥ नसतें अनेकत्व भासे चित्ता ॥ नभीं गंधर्वनगर पाहतां ॥ दिसे शोभिता पुरदुर्ग ॥ ८६ ॥ कां अंधारीं दोर दिसे डोळां ॥ ह्मणे सर्प दंड कीं सुमनमाळा ॥ सोना एकावळी मुक्ताफळां ॥ कोणी अबळा विसरली ॥ ८७ ॥ तेवीं निजात्मा मी पुरुषोत्तम ॥ त्या मज नानारूपें नाना कर्म ॥ 'काळु, आत्मा, आगम, ॥ स्वभाव, धर्म, मज ह्मणती ॥ ८८ ॥ काळ ह्मणती प्रकृतिक्षोभक ॥ आत्मा ह्मणती प्रकृतिनियामक ॥ वेद ह्मणती कर्मबोधक ॥ अदृष्टद्योतक धर्म तो ॥८९॥ अदृष्ट दृष्ट करूनि भोगविजे ॥ यालागीं तो धर्म ह्मणिजे ॥ आतां स्वभावो *जेणें बोलिजे ॥ तेंही सहजें परियेसी ॥ ६९० ॥ आत्मा भोक्ता, हा स्वभावो ॥ जेणें परिणमे ४देहादिदेहभावो ॥ इत्यादिका हेतू पहाहो ॥ मजचि स्वभावो ह्मणताती ॥ ९१ ॥ अदृष्टाचें फळ नानालोक ॥ ह्मणावया हेतु हा देख ॥ एवं मज एकातें अनेक ॥ मिथ्या मूर्ख मानिती ॥ ९२ ॥ नानारंगांचिया वृत्ती ॥ चित्र लिहिलें यथानिगुतीं ॥ तेंही *नानाकारीं भासे भिंतीं ॥ सर्व व्यक्तिद्योतक ॥ ९३ ॥ तैसे नानाकार नानाधर्म ॥ 5नानानामें नानाकर्म ॥ तें मी अवघें आत्माराम ॥ सर्वोत्तम सर्वथा ॥ ९४ ॥ मजवेगळा रिता कांहीं ॥ अणुभरी ठाव उरला नाहीं ॥ मी सर्वात्म

१ घोड्याच्या आसुडाचा मार. २ आंतबाहेर. ३ पीडा, दुःख. ४ घडे. ५ संसाररूप भोंवऱ्यांत ६ अज्ञानापासून उत्पन्न झालेला. ७ धोतऱ्याचें बी खाण्यानें. ८ घोणस. ९ आकाशांतील सांध्य मेघ १० किंवा. ११ चालक. १२ नियामक.

* ना जे. ४ ना. देही देहवादीभावो. * ना. नानाकारें. 5 ना. नानानेमें.

सर्व देहीं ॥ सर्वगत पाही सर्वदा ॥९५॥ जैसे सागरामाजीं तरंग ॥ तैसें मजमाजीं दिसे जग ॥ जग नव्हे तें मीचि चांग ॥ सुख अव्यंग मजमाजीं ॥९६॥ मी शुद्ध बुद्ध *मुक्तस्वभाव ॥ त्या मज नानात्वें ठेविती नांव ॥ उद्धवा ज्यासि जैसा भाव ॥ तैसा मी देव तयासी ॥ ९७ ॥ नास्तिक्य वसे ज्याचे ठायीं ॥ त्यासि मी सर्वथा कोठें नाहीं ॥ आस्तिक्यवंतालागीं पाहीं ॥ मी सर्वां ठायीं तिष्ठत ॥ ९८ ॥ भावार्थें जो मज जेथें पाहे ॥ त्यासि मी तेव्हांचि तेथें आहें ॥ मज पावावया उपाये ॥ बहुत पाहे न लगती ॥ ९९ ॥ मी सर्वात्मा सर्वगत एक ॥ ऐसा जयाचा भाव निष्टंक ॥ तोचि पढियंता मज एक ॥ ज्ञानतिलक तो माझा ॥ ७०० ॥ तो आत्मा मी त्याचा देह ॥ मी ध्याता तो माझें ध्येय ॥ मी ज्ञाता तो शुद्ध ज्ञेय ॥ ऐसा पढियंता तो आम्हा ॥ १ ॥ उद्धवा हे एकात्मभक्ती ॥ सज्ञान ज्ञाते येणें भजती ॥ तयां मज अभेदप्रीती ॥ ×तुवांही यारीतीं भजावें ॥ २ ॥ परमात्मा एक नित्य [5]शुद्ध ॥ त्यासि मायामय संसारबंध ॥ मिथ्या जाण देहसंबंध ॥ हा निजात्मबोध पैं माझा ॥ ३ ॥ हा मिथ्याबंध पडे जीवासी ॥ आत्मज्ञानें मुक्ती त्यासी ॥ हें मागें बोलिलों तुजपाशीं ॥ तेंचि मतनिरासीं दृढ केलें ॥ ४ ॥ धरोनि श्लोक चौदावा ॥ अंतीं श्लोक चौतिसावा ॥ मीमांसकमताचा अवघा ॥ निरास बरवा येणें केला ॥ ५ ॥ एवं निरसोनि मतांतर ॥ अद्वैत स्थापिलें दृढतर ॥ हेंचि निजज्ञान साचार ॥ +वरांवर वरिष्ठ ॥ ६ ॥ अद्वैतज्ञान शुद्ध चोख ॥ ऐकोनि उद्धवा आलें सुख ॥ हृदयीं दाटला हरिख ॥ पाहे श्रीमुख कृष्णाचें ॥ ७ ॥ चालिलें सात्विकाचें भरितें ॥ चित्त विसरलें चिंतनातें ॥ अश्रु लोटले तेथें ॥ आप आपणियातें विसरला ॥ ८ ॥ उद्धवासि नावेक ॥ पडोनि ठेलें जी ठक ॥ सावध होऊनियां देख ॥ कृष्णसंमुख होता झाला ॥ ९ ॥ अद्वैतभजनें जे भजते ॥ ते भक्त श्रीकृष्णासि आवडते ॥ तें केवीं प्राप्त होय मातें ॥ यालागीं हरीतें पुसत ॥ ७१० ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ गुणेषु वर्तमानोऽपि देहजेष्वनपावृतः ॥ गुणैर्न बध्येत देही बध्यते वा कथं विभो ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ उद्धव ह्मणे कृष्णनाथा ॥ आत्मा देहामाजीं असतां ॥ बंधन पावेजी तत्त्वतां ॥ कीं सर्वथा पावेना ॥ ११ ॥ गुण असतां मुक्ति घडे ॥ कीं गुण गेलिया मुक्ति जोडे ॥ हेंचि मागावें मजपुढें ॥ अतिनिवाडें निश्चित ॥१२॥ गुण असतां मुक्ति घडे ॥ हें सर्वथा बोलणें कुडें ॥ ज्वर असतां आरोग्य न घडे ॥ वृक्ष न वाढे भिरुडेंसी ॥ १३ ॥ बाहीं बांधोनि पाषाण ॥ समुद्रामाजीं तरे कोण ॥ तैसे देहीं असतां त्रिगुण ॥ [1]मुक्तपण कैसेनी ॥ १४ ॥ गुण जे रजतमादिक ॥ त्यांचें कार्य देह देख ॥ गुणासारखीं आवश्यक ॥ कर्मे अनेक आचरे ॥१५॥ कर्माचें फळ सुखदुःख ॥ भोगणें पडेगा [7]अचूक ॥ गुणासी मुक्ति न घडे देख ॥ हें ज्ञाते लोक ह्मणताती ॥ १६ ॥ गुण गेलिया मुक्ती ॥ हेंही न घडे गा श्रीपती ॥ येहींविषयीं विनंती ॥ कृपामूर्ती अवधारीं ॥ १७ ॥ गुणांचें कार्य देहेंद्रियें ॥ ते गुण जाऊनि देह राहे ॥ भूमीविण वृक्ष होये ॥ हें अबद्ध पाहे बोलणें ॥ १८ ॥ कारण जाऊनि कार्य राहे ॥ हें बोलणें घडे काये ॥ गुण जातां देहोचि जाये ॥ मुक्त वर्तताहे कैसेनी ॥१९॥ एवं गुण असतां नसतां ॥

---

१ निश्चयात्मक. २ किडीनें.

*मो. युक्त. ×ना. तिहीं. 5ना. सिद्ध. +ना. वारंवार. 1 ना. भक्तपण. 7ना. अवश्यक.

मुक्ति न घडे गा सर्वथा ॥ येचिविषयीं कृष्णनाथा ॥ तुज मी तत्त्वतां पुसत ॥७२०॥ आणिक एक जगन्नाथा ॥ तुज मी विनंती करीन आतां ॥ गुणआत्म्यांसि एकत्रता ॥ न घडे सर्वथा निश्चित ॥ २१ ॥ भरलें मृगजळाचें तळें ॥ चंद्रमा [1]बिंबेना तेणें जळें ॥ तेवीं आत्मा गुणांसि नाकळे ॥ स्वभावें नातळे गुणांतें ॥ २२ ॥ गुण ते अज्ञानाची वार्ता ॥ आत्मा स्वप्रकाश गभस्ती ॥ त्यासमोर ते कैंचे येती ॥ मग बाधिती आत्म्यातें ॥२३॥ अंधार सूर्यातें गिळी ॥ काउळा कैलास आकळी ॥ वागुल हनुमंतातें सळी ॥ मशक गिळी गजातें ॥२४॥ माशी पांखें गगन उडे ॥ बगळा मेरु [2]थिल्लरीं बुडे ॥ मृगजळीं जें तारूं बुडे ॥ तें आत्मा सांपडे गुणांत ॥ २५ ॥ जेवीं आकाश नातुडे जाळीं ॥ तेवीं आत्मा नाकळे गुणमेळीं ॥ मा सुखदुःखांची नवाळी ॥ गुणकल्लोळीं कां भोगी ॥ २६ ॥ यापरी न घडे गा बद्धता ॥ मा मुक्ताची कायसी कथा ॥ कैसेनि बद्धमुक्तव्यवस्था ॥ घडे कृष्णनाथा तें सांग ॥ २७ ॥ येथ *बद्धासि काय कारण ॥ आणि मुक्ताची कोण खूण ॥ एवं बद्धमुक्तलक्षण ॥ मज संपूर्ण सांगावें ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ कथं वर्तेत विहरेत्कैर्वा ज्ञायेत लक्षणैः ॥ किं भुंजीतोत विसृजेच्छयीतासीत याति वा ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ आतां बद्धमुक्तांची स्थिती ॥ मज सांगावी श्रीपती ॥ कोणें लक्षणें जाणिजेती ॥ दोघे कळती कैसेनी ॥ २९ ॥ पावोनियां [3]विदेहावस्था ॥ देहीं कैसेनि वर्तता ॥ वश करूनि गुणातीतता ॥ गुणीं क्रीडता कैसेनी ॥७३०॥ पावोनियां मुक्तदशा ॥ देहीं भोग भोगी कैसा ॥ त्यासि त्यागाचा कोण ठसा ॥ हृषीकेशा सांगिजे ॥ ३१ ॥ त्याचे ×निद्रेचें कोण लक्षण ॥ कोण [2]बैसका कैसें आसन ॥ वस्तु जाणोनि संपूर्ण ॥ गमनागमन त्या कैसें ॥ ३२ ॥ ऐशीं मुक्तांचीं लक्षणें ॥ त्याहोनि बद्धांचीं विलक्षणें ॥ कृपा करोनि नारायणें ॥ मजकारणें सांगावीं ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ एतदच्युत मे ब्रूहि प्रश्नं प्रश्नविदांवर ॥ नित्यमुक्तो नित्यबद्ध एक एवेति मे भ्रमः ॥ ३७ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे दशमोऽध्यायः ॥ १० ॥

॥ टीका ॥ या प्रश्नोत्तरांची उत्कंठा ॥ थोर वर्ततसे वैकुंठा ॥ प्रश्नवेत्त्यांमाजीं श्रेष्ठा ॥ अतिवरिष्ठा गोविंदा ॥ ३४ ॥ अनादि असे गुणसंबंधू ॥ तेणें आत्मा झाला नित्यबद्ध ॥ नित्यमुक्त हा शब्द ॥ असंबद्ध सर्वथा ॥ ३५ ॥ जरी आत्म्यासि नित्यमुक्तता ॥ तरी बोलोंचि नये बद्धता ॥ एकाचि बद्धमुक्त म्हणतां ॥ भ्रम अच्युता वाटत ॥३६॥ आत्मा एकाचि तत्त्वतां ॥ त्यासि बद्धता आणि मुक्तता ॥ एकासीच दोन्ही अवस्था ॥ कृष्णनाथा कैसेनी ॥ ३७ ॥ जो चालता तोचि पांगुळला ॥ जागता तोचि निजेला ॥ जो जिता तोचि मेला ॥ सत्यत्व या बोला कैसेनी ॥ ३८ ॥ काळें तेंचि धवळें ॥ देखणें तेंचि आंधळें ॥ अर्धें तेंचि सगळें ॥ कुहिऱ्या, केळें केवीं होतीं ॥ ३९ ॥ लोण तेचि अळवणी ॥ कोरडेंचि परी हें पाणी ॥ अतिशीतळ तो दारु-

१ हलो. २ बैठक. ३ नम झाला. ४ खाजकुयली. ५ अळणी.

[1]ना. तिंबेना. *मो. बंधासी. [2]ना. देहावस्था. ×मो. इंद्रियांचें.

ण अग्नी ॥ मुकें पुराणीं बोलिजेतें ॥ ७४० ॥ लुगडें, नागवेपणें लाजाळ ॥ अन्न भुकेलेपणें भुकाळ ॥ मुक्तासि मुक्तीचा दुकाळ ॥ कापुरा परिमळ मिळेना ॥ ४१ ॥ तैसे संत तेंचि अ-संत ॥ अद्वैत तेंचि होय द्वैत ॥ तेव्हां हित तेंचि अनहित ॥ दिसे प्रस्तुत आह्मांसी ॥ ४२ ॥ आत्मा नित्यमुक्त शुद्ध बुद्ध ॥ ऐसा तुवांचि केला मज बोध ॥ तो गुणसंगें ह्मणसी बद्ध ॥ भ्रमू आगाध येणें मज ॥ ४३ ॥ एकासचि बद्धमुक्तता ॥ कैसेनि घडे कृष्णनाथा ॥ कृपाळुवा जगन्नाथा ॥ हें मज तत्वतां सांगावें ॥ ४४ ॥ ह्मणसी मुक्तीसी आगंतुकता ॥ तेणें मोक्षासि आली अनित्यता ॥ *बद्ध आगंतुक ह्मणतां ॥ त्यासि सादिता येऊं पाहे ॥ ४५ ॥ पूर्वी *बद्धाचि नव्हता ॥ तेथूनि उपजला आतां ॥ ऐशी सादिता बोलतां ॥ होईल शास्त्रार्था विरुद्ध ॥ ४६ ॥ श्रुतिस्मृतिशास्त्रसिद्ध ॥ अनादि मुक्त अनादि बद्ध ॥ आत्मा एक अवस्था द्विविध ॥ +त्याही विरुद्ध परस्परें ॥ ४७ ॥ उठिली बद्धता, मुक्तीतें छळी ॥ खवळली मुक्ती, बद्धता गिळी ॥ ऐशी विरुद्धता आत्म्याजवळी ॥ केवीं वनमाळी राहताती ॥ ४८ ॥ जें सांजवेळे ×भेटे पाहांट ॥ तें विद्या अविद्या होय एकवाट ॥ सूर्य अंधाराची बांधे मोट ॥ तें आत्म्या निकट अवस्था ॥ ४९ ॥ हिंगासि कापुराचा वासु जोडे ॥ तें अविद्या विद्येमाजीं घडे ॥ ससा सिंहावरी जें चढे ॥ तें आत्म्यापुढें अवस्था ॥ ७५० ॥ उद्धव ह्मणे कृष्णनाथा ॥ या जें कळ-ल्या दोनी अवस्था ॥ तेंचि मुक्ति आला हातां ॥ मज सर्वथा मानलें ॥ ५१ ॥ मग ह्मणे श्री-अनंता ॥ विशद सांगाव्या अवस्था ॥ ह्मणोनि चरणीं ठेविला माथा ॥ मोक्षदाता तूं मज ॥ ५२ ॥ सखोल उद्धवाचा प्रश्न ॥ ऐकोन सुखावला नारायण ॥ माझा उद्धव आला सज्ञान ॥ हरिखें जगज्जीवन डोलत ॥ ५३ ॥ परमार्थी अवस्था गाढी ॥ देखोनि प्रश्नाची अतिगोडी ॥ उद्धवासि ओंवाळावया आवडी ॥ जीवें कुरवंडी करूं पाहे ॥ ५४ ॥ तुलंबी भक्ताचें उत्तर ॥ फोडिलें गुह्यज्ञानभांडार ॥ भक्तकृपा जी अपार ॥ हरि साचार तुष्टला ॥ ५५ ॥ उद्धवाचा प्रश्न गहन ॥ कृपें द्रवला जगज्जीवन ॥ एका विनवी जनार्दन ॥ आनंदघन बोळला ॥ ५६ ॥ त्या आनंदाचा महापूर ॥ शिष्यलागींतेंसि येईल थोर ॥ तेणें चिद्रंगासागर ॥ शिष्य सत्वर ठा-कील ॥ ५७ ॥ ठाकोनियां संसारआस्थां ॥ जो लागला भक्तिपंथा ॥ तोचि अधिकारी भागव-ता ॥ परमार्था ग्राहक ॥ ५८ ॥ ज्याचे पोटीं संसारचिंता ॥ तो कथा ऐकतांचि दुश्चिता ॥ चित्त चिंती ज्या ज्या अर्था ॥ तो सर्वथा तेथें असे ॥ ५९ ॥ चित्त जंव नाहीं सुचित्त ॥ तंव न कळे श्रीभागवत ॥ गुरुवांचूनि श्रीभागवतार्थ ॥ नव्हे प्राप्त प्राप्तासी ॥ ७६० ॥ जो ☨संसा-रापासोनि विरक्त ॥ गुरुचरणीं अतिअनुरक्त ॥ त्यासीच फावला एक परमार्थ ॥ फळे भाग-वत तयासी ॥ ६१ ॥ देखतां कृष्णाचें श्रीमुख ॥ उद्धवा नीचनवें समाधिसुख ॥ तरी श्रव-णाची श्रद्धा अधिक ॥ आवडी देख अनिवार ॥ ६२ ॥ जो श्रुतिप्रतिपाद्य चिद्घन ॥ त्या श्री कृष्णाचें ²गुह्यज्ञान ॥ पुढतपुढती व्हावया श्रवण ॥ करी प्रश्न अतियोग्य ॥ ६३ ॥ विद्याअ-विद्येचा निरास ॥ श्रीकृष्ण सांगेल परेश ॥ पुढील अध्याय अतिसुरस ॥ श्रोतां अवकाश मज द्यावा ॥ ६४ ॥ तो कृष्णउद्धवसंवाद ॥ पुढिले कथेचा अतिविनोद ॥ एका जनार्दनीं महाबोध ॥ परमानंद प्रकटेल ॥ ६५ ॥ इति श्रीभागवते महापुराणे श्रीकृष्णोद्धवसंवादे परमहंससंहि-तायां एकाकारटीकायां दशमोऽध्यायः ॥ १० ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अ० १० ॥ ओं० ७६५ ॥

१ बोलकें. २ आग्नि. ३ नित्य.

*मो. बंध. +ना. त्यासी. ×ना. भरे. ☨ना. सकळकामांपासूनि. 2ना. निजज्ञान.

# अध्याय अकरावा.



श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐनमो सद्गुरु सच्चिद्घन ॥ वर्षताहे स्वानंदजीवन ॥ मुमुक्षुमयूरकुळें जाण ॥ हरिखें उड्डाण करिताती ॥ १ ॥ तो *सजल देखोनि मेहो ॥ सोहंभावें फोडिती टाहो ॥ रोमांचपिच्छें पसरूनि पहाहो ॥ सत्त्वें +लवलाहो नृत्याचा ॥ २ ॥ नाचे स्वानंदाचेनि मेळें ॥ तेणें सर्वांगीं निवाले डोळे ॥ पिसें देखणीं जाहलीं सकळें ॥ तें शिरीं गोपाळें वाहिलीं ॥ ३ ॥ तो मेघ देखोनि संमुख ॥ आर्त चातक पसरिती मुख ॥ बिंदुमात्रें पावती सुख ॥ नित्य निर्दोख ते जाहले ॥ ४ ॥ आर्ततृषा तत्काळ वोळे ॥ निवाले तेणें स्वानंदजळें ॥ मग हरिखाचेनि कल्लोळें ॥ सुखसोहळे भोगिती ॥ ५ ॥ सुभूमि देखोनि निर्मळ ॥ जाणोनि वर्षती काळवेळ ॥ वर्षों लागले जो प्रबळ ॥ जळकल्लोळ अनिवार ॥ ६ ॥ तेणें वोळलेनि कृपाभरें ॥ शिष्यसरितांसि पूर भरे ॥ विकल्पवांसणें एकसरें ॥ महापूरें वाहाविलीं ॥ ७ ॥ तेणें प्रवाहनिर्मळजळें ॥ चिदैक्यसागरीं सरिता मिळे ॥ मग समरसोनि तेणें जळें ॥ राहे निश्चळें निजरूपें ॥ ८ ॥ वैराग्य रवें शुद्ध केली ॥ पृथ्वी निजबोला वोळली ॥ कठिणत्वेंवीण मार्दवा आली ॥ नाहीं अंकुरली बहुबीजें ॥ ९ ॥ अखंड वर्षतां जळमेळीं ॥ वासनेचीं ढेंपें विरालीं ॥ सद्भावाची वोल जाहली ॥ वाफ लागली बोधाची ॥ १० ॥ तेथें न पेरितांचि जाण ॥ सहजें निजबीजें परिपूर्ण ॥ अंकुरली आपणिया आपण ॥ सिद्ध संपूर्ण स्वभावें ॥ ११ ॥ ते परमकृपेचिये पुष्टीं ॥ स्वानंदें पिकली समदृष्टी ॥ परमानंदें कोंदली सृष्टी ॥ ऐक्य संवसाटी जीवशिवा ॥ १२ ॥ फिटला दुःखदुष्काळ ॥ पाहला सुखाचा सुकाळ ॥ वोळला सद्गुरु कृपाळ ॥ आनंद कल्लोळ सच्छिष्यां ॥ १३ ॥ वर्षतां निजपर्जन्यधारा ॥ वर्षला नानावतार-गारा ॥ कार्यानुरूपें तदाकारा ॥ विरोनि निराकारा त्या होती ॥ १४ ॥ त्या पर्जन्याचा वोसाडा ॥ दैवें लागल्या जडमूढां ॥ तो सरता होय संतांपुढां ॥ अवचटें शिंतोडा जें लागे ॥ १५ ॥ तो महामेघ श्रीहरी ॥ सद्गुरुकृपा वोळे जयावरी ॥ तोचि धन्य चराचरीं ॥ पूज्य सुरनरीं तो कीजे ॥ १६ ॥ गुरुनामें अतिचवचट ॥ शिष्य तारूनि हट्टवट ॥ ज्याचा आदि मध्य शेवट ॥ नकळे स्पष्ट वेदांसी ॥ १७ ॥ तो सद्गुरु श्रीजनार्दन ॥ वोळलासे आनंदघन ॥ तेणें एका एकु केला पावन ॥ मांडवोनि एकपणा ॥ १८ ॥ एक तेंचि अनेक ॥ अनेक तेंचि एक ॥ हेंही केलें निश्चंक ॥ स्वबोधें देख बोधोनी ॥ १९ ॥ बोधोनियां निजऐक्यता ॥ ऐक्यें लाविलें भक्तिपंथा ॥ मज प्रवर्तविलें श्रीभागवता ॥ निजकथा गावया ॥ २० ॥ तेचि श्रीभागवतींची कथा ॥ दशमाध्याय संपतां ॥ बद्धमुक्तांची व्यवस्था ॥ उद्धवें कृष्णनाथा पुशिली ॥ २१ ॥ सखोल उद्धवाचा प्रश्न ॥ ऐकोनियां श्रीकृष्ण ॥ निजहृदयींचें गुह्यज्ञान ॥ उद्धवासि जाण सांगेल ॥ २२ ॥ येणें प्रश्नोत्तरश्रवणें ॥ उठी जन्ममरणाचें धरणें ॥ संसाराचें खत फाडणें ॥ फिटलें लाहणें विषयाचें ॥ २३ ॥ मोक्षमार्गींचे कांपडी ॥ साधनीं शिणती

१ मुक्त होण्याची इच्छा करणारे हेच मोर. २ मेघ. ३विकल्परूप कचरा, पुराट. ४मिसळून. ५ शेतांतील राब. ६ प्राप्त झाली. ७ बरोबरी. ८ शिंतोडा. ९ सावकाराचें धरणें, नगारा. १० कर्ज. ११ यात्रेकरू.

* ना. सकळ. +ना. नवलाहो.

ज्ञापुडा ॥ तिहीं शीघ्र यावें तांतडीं ॥ जिणावया कोडी बंधमोक्षांच्या ॥ २४ ॥ जे कष्टती जप- तप अध्ययनें ॥ शिणती ध्येयध्यानअनुष्ठानें ॥ ते ते शीघ्र या विंदानें ॥ ज्ञानाज्ञानें जिणावया ॥ २५ ॥ ऐसी कथा आहे गहन ॥ श्रोतीं *व्हावें सावधान ॥ एका विनवी जनार्दन ॥ स्वानंदघन तुष्टला ॥ २६ ॥ अकरावे अध्यायीं जाण ॥ इतुकें सांगेल श्रीकृष्ण ॥ बद्धमुक्तांचें वैलक्षण्य ॥ आणिक लक्षण साधूचें ॥ २७ ॥ तेणेंच प्रसंगें जाण ॥ सांगेल भक्तीचें लक्षण ॥ अकराही पूजेसि अधिष्ठान ॥ इतुकें निरूपण हरि बोले ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो मे न वस्तुतः ॥

गुणस्य मायामूलत्वान्न मे मोक्षो न बंधनम् ॥ १ ॥

॥ टीका ॥ उद्धवा बद्ध मुक्त अवस्था ॥ जरी सत्य म्हणसी वस्तुतां ॥ तरी न घडे गा सर्वथा ॥ एक आतां सांगेन ॥ २९ ॥ बद्ध मुक्त या अवस्था ॥ माझे स्वरूपीं नाहीं तत्त्वतां ॥ हे 6गुणकार्याची वार्ता ॥ संबंध सर्वथा मज नाहीं ॥ ३० ॥ माझ्या निजस्वरूपाच्या ठायीं ॥ बद्धमुक्तता दोनी नाहीं ॥ बद्धता मुक्तता गुणांच्याठायीं ॥ आभासे कांहीं गुणकार्यें ॥ ३१ ॥ गुण ते समूळ मायिक ॥ मी गुणातीत अमायिक ॥ सत्यासि जे बाधे लटिक ॥ तें मृगजळीं लोक बुडाले ॥ ३२ ॥ चित्रींचेनि हुताशनें ॥ जे जाळिजती पुरें पाटणें ॥ कां स्वप्नींचेनि महा- धनें ॥ वेव्हारा होणें जागृतीं ॥ ३३ ॥ सूर्यासि प्रतिबिंब गिळी ॥ छाया पुरुषातें आकळी ॥ 4समुद्र बुडे मृगजळीं ॥ तें मज गुणमेळीं बद्धता ॥ ३४ ॥ जे जिभेसि केंस निघे ॥ जे तळहातीं वृक्ष लागे ॥ डोळ्यांमाजीं पर्वत रिगे ॥ तें मी गुणसंगें अतिबद्ध ॥ ३५ ॥ आकाश खोंचे सांबळीं ॥ काजळ लागे वारया निडळीं ॥ कां विजूचे कपाळीं ॥ वाशिंग सबळीं बांधावें ॥ ३६ ॥ गगन तुटोनि समुद्रीं 2बुडे ॥ सपर्वत धरा वारेनि उडे ॥ सूर्य अडखळोनि अंधारीं पडे ॥ तरी मी सांपडें गुणांत ॥ ३७ ॥ अंतरिक्षगगनीं सरोवर ॥ त्यामाजीं कमळें मनोहर ॥ तो आमोद सेवितां भ्रमर ॥ ऐसें साचार जे घडे ॥ ३८ ॥ तें मी आत्मा गुणसंगें॥ नानाविषयभोगसंभोगें ॥ मग त्या विषयाचेनि पांगें ॥ होईन अंगें गुणबद्ध ॥ ३९ ॥ त्रिगुण अंगीकारें वर्ततां ॥ गुणकार्य तादात्म्यता ॥ तेणें बद्ध मुक्त अवस्था ॥ भासे वृथा भ्रांतासी ॥ ४० ॥ गुणा आत्म्यासि भिन्नता ॥ म्हणसी मानली तत्त्वतां ॥ परी गुणसंगें आत्मा असतां ॥ अवश्य विकारिता येईल ॥ ४१ ॥ अग्निसंगें पात्र तप्त ॥ पात्रतापें जळ संतप्त ॥ जळतापें धान्यपाक होत ॥ तेवीं विकारवंत नव्हे आत्मा ॥ ४२ ॥ +अग्नितापा आंत ॥ आकाश नव्हे संतप्त ॥ तेवीं गुणसंगा आंत ॥ विकारवंत नव्हे आत्मा ॥ ४३ ॥ नट अंधत्वें अवगलें ॥ परी तो आंधळा नाहीं जाहला ॥ तैसा आत्मा गुणसंगें क्रीडला ॥ तरी असे संचला निर्गुणत्वें॥४४॥नट अंधत्वें नव्हे अंध ॥ आत्मा गुणसंगें नव्हे बद्ध ॥ गुण मायिक आत्मा शुद्ध ॥ या 8त्यां संबंध असेना ॥ ४५ ॥ आत्मा व्यापक, गुण परिछिन्न ॥ यांहीं 12 हेतें

१ भेद. २ अग्नीनें. ३ व्यापार. ४ खोंचलें-टोंचलें जाईल.५ भाल्यानें.६कपाळीं. ७ पर्वतांसुद्धां पृथिवी. ८ सुवास. ९ पारतंत्र्यानें. १० भासला. ११ मर्यादित. १२ म्हणून.

*मो. यावें अवधान. 6मो. गुणकर्माची. 4मो. मेरु. 2 मो. पडे. +अग्निसंगें पात्र संतप्त ॥ पात्रजळतापें धान्यपाक होत ॥ तेथें आकाश नव्हे तप्त ॥ तेवीं विकारातीत निजात्मा ॥४३॥ 8 ना. माया संबंध.

न घडे बंधन ॥ सकळ समुद्राचें प्राशन ॥ केवीं रांजण करूं शके ॥ ४६ ॥ मोहरीमाजीं मेरु राहे ॥ पशामाजीं पृथ्वी समाये ॥ मुंगी गज गिळोनि जाये ॥ खद्योत खाये सूर्यातें ॥ ४७ ॥ मशक ब्रह्मयातें आकळी ॥ पतंग प्रळयानळा गिळी ॥ तरी आत्मा गुणाचे मेळीं ॥ गुणकल्लोळीं बांधवे ॥ ४८ ॥ यापरी नसंभवे बद्धता ॥ बद्धतेसवें गेली मुक्तता ॥ बद्धमुक्तअवस्थापरता ॥ जाण तत्त्वतां आत्मा मी ॥ ४९ ॥ स्वप्नींचा अत्यंत सुकृती ॥ अथवा महापापी दुष्कृती ॥ दोन्ही मिथ्या जेवीं जागृतीं ॥ तेवीं बद्धमुक्ती आत्मत्वीं ॥ ५० ॥ होकां जीवात्म्यासीचि बद्धता ॥ सत्य नाहीं गा तत्त्वतां ॥ मा मज परमात्म्यासि अवस्था॥बद्धमुक्तता ते कैंची ॥५१ बिंबीं प्रतिबिंबीं नाहीं ॥ मळ्येंच आरिशाचेठायीं ॥ मळ बैसले ते पाहीं ॥ प्रतिबिंबाचे देहीं लागले दिसती ॥ ५२ ॥ तो मळ जें लागे फेडावा ॥ तें आरिसाचि साहणें तोडावा ॥ परी प्रतिबिंब त्या साहणे धरावा ॥ हें [1]मद्भावा मिळेना ॥ ५३ ॥ जेवीं जीवीं शिवीं दोष नाहीं ॥ दोष अंतःकरणाच्या ठायीं ॥ तें चित्त शुद्ध केल्या पाहीं ॥ बंध मोक्ष दोहीं बोळवण ॥ ५४ ॥ तैसें हें अविद्यक सकळ ॥ गुणकार्य नाना मळ ॥ जीवा अंगीं प्रबळ ॥ मूढमती स्थूळ स्थापितीं ॥ ५५ ॥ जें सत्वगुण [2]निरसी सबळ ॥ तें अविद्यक फिटती मळ ॥ तेचि सांडूया होय निर्मळ ॥ जीवचि केवळ शिव होये ॥५६॥ तेव्हां जीव शिव हीं नावें दोनी ॥ जाती मजमाजीं समरसोनी ॥ तें मीच एकू [3]वांचूनी ॥ आन जनीं वनीं असेना ॥ ५७ ॥ जीवभावनें मीचि जीवू ॥ शिवभावनें मीचि शिवू ॥ मी एकला ना नव्हे बहू ॥ माझा अनुभवू मीचि जाणें॥५८॥ ह्मणसी आशंका धरिशी येथ ॥ जरी जीव शिव तूंचि समस्त॥ तरी ते शुकवामदेवचि कां मुक्त॥ येरां म्हणत जडजीव ॥५९॥ जरी तूंचि जीवरूपें तत्त्वतां ॥ तरी हे ऐशी कां विषमता ॥शुकवामदेवांची अवस्था॥वेदशास्त्रार्थीं संमत॥६०॥तिहीं लोकांमाजीं जाण॥ वेदवचन तंव प्रमाण॥ हें बोलणें विलक्षण ॥ अप्रमाण जें मानिशी ॥ ६१ ॥ होकां वेद बोले तें निश्चित ॥ तें बोलणें माझें सत्य ॥ तो मी स्वमुखें जें बोलत ॥ तें तं अयुक्त ह्मणतोसी ॥ ६२ ॥ जो मी वेदांचा वेदवक्ता ॥ सकळ शास्त्रांचा मूळकर्ता ॥ त्या माझें वचन ह्मणसी वृथा ॥ अतियोग्यता तुज आली ॥ ६३ ॥ वेदाचें जाण त्रिविध बंड ॥ त्रिकांडीं केला तो त्रिखंड ॥ वेदबळें वा पाखंड ॥ वाजवी तोंड अव्हासव्हा ॥ ६४ ॥ भासले बहुसाल मतभेद ॥ वेदबळें नानावाद ॥ तो वेद माझा परोक्षवाद ॥ तेणें [X]तत्त्वावबोध केवीं होय ॥६५॥ शब्दज्ञान ब्रह्मज्ञान ॥ बाह्यदृष्टी समसमान ॥ जेवीं वाल आणि सुवर्ण ॥ तुकितां पूर्ण समता आली ॥ ६६ ॥ परी वाला सुवर्णा समता ॥ मोलें कदा नव्हें तत्त्वतां ॥ तेवीं वेदवादयोग्यता ॥ ब्रह्मानुभविता सम नव्हे ॥ ६७ जो मी हरिहरां प्रमाण ॥ त्या माझें वचन अप्रमाण ॥ तूं ह्मणसी हा ज्ञानाभिमान ॥ हेंही जाणपण सांडावें ॥ ६८ ॥ माझें वचन सत्याचें सत्य ॥ सत्य मानूनि निश्चित ॥ येणें भावें साधे परमार्थ ॥ हें ब्रह्मलिखित महावाक्य ॥ ६९ ॥ उद्धवा मज पाहतां ॥ [+]वसिष्ठ वामदेवादि समस्तां ॥ न देखे बद्ध आणि मुक्तता ॥ हा माझा तत्त्वतां निजबोध ॥ ७० ॥ मुक्तांचिये दृष्टीं॥ मुक्तचि दिसे सकल सृष्टीं ॥ तेथें शुकवामदेवांची गोष्टी ॥ वेगळी पाठी केवीं राहे ॥७१॥ ब-

१ हाताचा पसा. २ पुण्यवान् ३ साहणेवर आरसा ( लोखंडी ) चौफेर घांसावा लागतो. ४ अज्ञानसबंधी. ५ कदाचित्. ६ भेद. ७ शब्दवाद, अप्रत्यक्षवाद. ८ वजन करितां.

[1] मो. स्थूळभावा. [2] मो. निरसे. [3] ना. मजवांचुनी. X ना. सत्त्वावबोध. + ना. शुक

द्मोक्षांहूनि भिन्न ॥ परमात्मा मी चिद्घन ॥ जरी ह्मणशी जीवासि बंधन ॥ तेंही सत्यत्वें जाण घडेना ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ ' शोकमोहौ सुखं दुःखं देहोत्पत्तिश्च मायया ॥ स्वप्ने यथाऽऽत्मनः ख्यातिः संसृतिर्नतु वास्तवी ' ॥ २ ॥

॥ टीका ॥ दोन मुहूर्त स्वप्नवृत्ती ॥ त्यामाजीं देखे जन्मपंक्ती ॥ तेथें पावला नाना याती ॥ तेवीं मिथ्या प्रतीति भवभाया ॥ ७३ ॥ नसतां आभास मानिले ठायीं ॥ त्यालागीं हाहाकारू उठे देहीं ॥ गेले गेले नाहीं नाहीं ॥ शोक पाहीं त्या नांव ॥ ७४ ॥ भग्नपात्रीं भरिलें जळ ॥ तेथें बिंबलें चंद्रमंडळ ॥ तें पात्र पोटेंशीं धरी बाळ ॥ रत्न प्रबळ हें माझें ॥ ७५ ॥ जळ गळोनि जाय सकळ ॥ चंद्रमा हारपे तत्काळ ॥ त्यालागीं तळमळी तें बाळ ॥ शोक केवळ त्या नांव ॥ ७६ ॥ अथवा घटचंद्र धरूं जातां ॥ तो नये बाळकाचे हातां ॥ यालागीं करी जे जे व्यथा ॥ शोक सर्वथा त्या नांव ॥ ७७ ॥ काढावया आरशांतील धन ॥ करी दर्पणामाजीं खनन ॥ कुडल्या नागवलों ह्मणे जाण ॥ शोक दारुण त्या नांव ॥ ७८ ॥ नसते वस्तूच्याठायीं जाण ॥ ' मी माझें ' हा अभिमान । तेंचि मोहाचें लक्षण ॥ ममता दारुण ते संधी ॥ ७९ ॥ देखोनि मृगजळाचें तळें ॥ येणें पिकती रायकेळें ॥ यालागीं मृगतृष्णेचीं जळें ॥ आठै काळें राखतु ॥ ८० ॥ मृगजळाकडे कोणी भंवे ॥ त्यासी सक्रोधें मारूं धांवे ॥ अतिमोहित मोहस्वभावें ॥ विवेकू नकरवे मन्याचा ॥ ८१ ॥ तेवीं पुत्रापासोन सुखप्राप्ती ॥ माता पिता होईल ह्मणती ॥ शेवीं पुत्र अंगोठा दाविती ॥ केवळ भ्रांती पुत्रमोहो ॥ ८२ ॥ गंधर्वनगरींची रचना ॥ देखोनि अभिलाष होय मना ॥ ते घ्यावया मेळवी सेना ॥ नानामृचनाउपायें ॥ ८३ ॥ तैसा मिथ्या देहीं अभिमान ॥ देहसंबंधाची ममता गहन ॥ हेंचि मोहाचें मूळ लक्षण ॥ ममताभिमान प्राणिया ॥ ८४ ॥ एवं अहं आणि ममता ॥ हेंचि मोहाची माता पिता ॥ त्यांचेनि उत्तरोत्तर वाढतां ॥ *जनमोहिता व्यामोह ॥ ८५ ॥ प्रियविषयीं आसक्ति देख ॥ त्याची नित्यप्राप्ती अनेक ॥ त्याचि नांव ह्मणती सुख ॥ जेवीं चाखितां विख अतिमधुर ॥ ८६ ॥ विषयप्राप्ती जो हरिख ॥ तया नांव ह्मणती सुख ॥ विषयविनाश तेंचि दुःख ॥ परम असुख त्या नांव ॥ ८७ ॥ शोक मोह सुख दुःख ॥ येणेंचि देहाची प्राप्ती देख ॥ देहाभिमानें देह अनेक ॥ 7दुःखदायक भोगवी ॥ ८८ ॥ जो जेणें तीव्रध्यानें मरे ॥ तो तेंचि होऊनि अवतरे ॥ कां जो निमे अतिद्वेषाकारें ॥ तो द्वेषानुसारें जन्मतु ॥ ८९ ॥ सर्प मुंगुस पूर्ववृत्ती ॥ वैराकारें जन्म पावती ॥ जे जे वासना उठे अंतीं ॥ ते ते गती प्राप्त्यासी ॥ ९० ॥ यालागीं हृदयामाजीं निश्चितीं ॥ जे सबळ वासना उठे अंतीं ॥ तो तो प्राणि पावे तये गतीं ॥ श्रुति बोलती पुराणें ॥ ९१ ॥ ' पुरुषासवें वृथा छाया ॥ तैशी ब्रह्मीं मिथ्या माया ॥ ते उपजवी गुणकार्या ॥ देह भासावया मूळ ते ' ॥ ९२ ॥ जेवीं कां स्वप्नीं एकलें मन ॥ नानाकार होय आपण ॥ तेवीं चैतन्याचें अन्यथा भान ॥ तें हें जाण चराचर ॥ ९३ ॥ एवं वस्तुतां संसार नाहीं ॥ तेथें सुख दुःख कैचें कायी ॥ देहेवीण छाया पाहीं ॥ कोणेठायीं उपजेल ॥ ९४ ॥ जें उपजलेंच नाहीं ॥ तें काळें गोरें सांगों कायी ॥ अव-

१ भ्रम. २ नाहींसा होतो. ३ भांड्यांत प्रतिबिंबित झालेला चंद्र. ४ गजाळें केळें. ५ नकार. ६ इच्छा. ७ आत्मरूपाहून अन्य.

* ना. जन्ममोहिता. 7 ना. दुःखदायक.

वें स्वप्नप्राय पाही ॥ वस्तुतां नाहीं संसारू ॥ ९५ ॥ इहीं दोहीं श्लोकीं अगाधू ॥ परिहरिला वस्तुविरोधू ॥ आतां प्रतीतीनें जो अनुरोधू ॥ तो सत्यासि बाधू करूं नशके ॥ ९६ ॥ डोळां अंगुळी लाविती ॥ तेणें दोन चंद्र आभासती ॥ गगनीं दोचंद्रां नाहीं वस्ती ॥ मिथ्या प्रतीती निराकारीं ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ विद्याऽविद्ये मम तनू विद्धि उद्धव शरीरिणाम् ॥ मोक्षबंधकरी आद्ये मायया मे विनिर्मिते ॥ ३ ॥

॥ टीका ॥ निजबोधें येत बोधा ॥ ब्रह्माहमस्मि स्फुरे सदा ॥ ते जाण शुद्ध विद्या ॥ जे अविद्याछेदक ॥९८॥ मी पापी मी सदा निर्दैवो ॥ ऐसा नित्य स्फुरे *भावो ॥ तेचि +सबळ अविद्या पहा हो ॥ जे नानासंदेह उपजवी ॥९९॥ एकी जीवातें घाली बंदीं ॥ एकी जीवाचें बंधन छेदी ॥ या दोनी माझ्या शक्ती अनादि ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ १०० ॥ तूं चिन्मात्र चैतन्यघन ॥ चित्स्वरूपें वृत्तिशून्य ॥ तुज शक्ती केंच्या जाण ॥ निर्धर्मपण सर्वदा ॥१०१॥ उद्धवा हे आशंका वायां ॥ कारण नाहीं करावया ॥ या शक्ती जन्मवी माझी माया ॥ जे नये आयां सुरनरां ॥२॥ सत् म्हणों तरी तत्काळ नासे ॥ असत् म्हणों तरी आभासे ॥ जिनें नामरूपांचें पिसें ॥ लाविलें असे जगासी ॥ ३ ॥ नातुडे संतासंतबोलीं ॥ माया अनिर्वचनीय झाली ॥ तिगें विद्या अविद्या इये पिलीं ॥ वाढविलीं निजपक्षीं ॥ ४ ॥ आजिकाळींच्या केल्या नव्हती ॥ विद्या अविद्या अनादि शक्ती ॥ बंधमोक्षांतें भासविती ॥ या दोनी वृत्ती मायेच्या ॥ ५ ॥ ते माया तूं म्हणसी कोण ॥ तुझी कल्पना ते माया पूर्ण ॥ बद्धमुक्ततास्फुरण ॥ तीमाजीं जाण स्फुरतातीं ॥ ६ ॥ बंधमोक्षांची राहती स्थिती ॥ ते मी सांगेन तुजप्रती ॥ ऐक उद्धवा निश्चितीं ॥ यथानिगुतीं निवाडें ॥७॥ जो स्वप्नीं नदेखे आराधन ॥ ज्यासि नाहीं माझें भजन ॥ अविद्या त्यामाजीं संपूर्ण ॥ प्रबळ जाण वाढत ॥ ८ ॥ जे माझ्याठायीं अतिसादर ॥ भजनशीळ आठे प्रहर ॥ तेचि ब्रह्मविद्येचें घर ॥ तेथ निरंतर ते वाढे ॥९॥ जेथ माझ्या भजनाचा उल्हास ॥ तेथ अविद्येचा निरास ॥ तोचि ब्रह्मविद्येचा ※प्रकाश ॥ हा अतिविश्वास भक्तांचा ॥ ११० ॥ येथ बंधाचें कारण ॥ आणि मोक्षाचें साधन ॥ भक्तीचें दृढ स्थापन ॥ अर्थास्तव जाण बोलिलों ॥ ११ ॥ ज्या बंधमोक्षां दोनी वृत्ती ॥ त्या तूं मायेच्या म्हणशी शक्ती ॥ तेव्हां माया झाली मोक्षदाती ॥ हें केवीं श्रीपती घडेल ॥ १२ ॥ जरी माया झाली मोक्षदाती ॥ तरी कां करावी तुझी भक्ती ॥ हेंचि सत्य काय श्रीपती ॥ सांग निश्चितीं ÷निवाडू ॥ १३ ॥ कृष्ण म्हणे उद्धवाशी ॥ स्वयें चलन नाहीं छायेशी ॥ तेवीं सामर्थ्य नाहीं मायेशी ॥ केवीं मोक्षासी ते देईल ॥ १४ ॥ जो मायेचा नियंता ॥ तो श्रीविष्णु मोक्षाचा दाता ॥ तोडूनि जीवाची बद्धता ॥ सायुज्यता देतसे ॥१५॥ म्हणशी अविद्या कामकर्माटें ॥ जिवासि बंधन लागलें मोठें ॥ ते ब्रह्मविद्या ×निष्कर्में तुटे ॥ हा बोध करी नेटें गुरु श्रुतिद्वारा ॥ १६ ॥ येथ विष्णु काय जाहला कर्ता ॥ मा तो होईल मोक्षदाता ॥ हे विकल्पाची वार्ता ॥ नघडे सर्वथा उद्धवा ॥१७॥ गुरुरूपें विष्णु जाण ॥ श्रुत्यर्थ

१ प्रत्यक्ष अवलोकनानें. २ संसार सत्यतेस अनुकूलता. ३ निर्गुणावर. ४ मी ब्रह्म आहे. ५ ' आहे ' ' नाहीं ' या वचनास. सदसद्विलक्षणअनिर्वचनीय. ६ वेदमार्गानें.

*ना. स्वभावो. +ना. सकळ. ※मो. प्रवेशू. ÷मो. निवाडें. ×ना. निष्कर्म.

विष्णूचि आपण ॥ शमदमादि साधन ॥ तेंही जाण विष्णुचि ॥ १८ ॥ शिष्यबुद्धीसि बोधकता ॥ विष्णूचि जाण तत्त्वतां ॥ यापरी गा निजभक्तां ॥ मोक्षदाता श्रीकृष्ण ॥ १९ ॥ त्या मोक्षाचा जो परिपाक ॥ ते समाधी श्री विष्णूचि देख ॥ समाधीचें समाधिसुख ॥ आवश्यक श्रीविष्णु ॥ १२० ॥ परमात्मा परिपूर्ण ॥ तो मी विष्णु ब्रह्मसनातन ॥ भक्तभवपाशमोचन ॥ कृपाळू जाण करीतसें ॥ २१ ॥ गतश्लोकींचेनि अनुवादें ॥ 'शरीरिणां' येणें पदें ॥ जीवासि बहुपण उद्बोधे ॥ δतेंही विनोदें ⁂निर्धारित ॥ २२ ॥ एकाशीच बद्धमुक्तता ॥ घडे नघडे तत्त्वतां ॥ या उद्धवाच्या प्रश्नार्था ॥ विशद आतां करीतसे ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ एकस्यैव ममांशस्य जीवस्यैव महामते ॥ बंधोऽस्याविद्ययाऽनादिर्विद्यया च तथेतरः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ ०रितीं वाटी असे अग्नीशी ॥ तेथ फुणगे उसळले आकाशीं ॥ रिती वाटी नाहीं स्वरूपाशीं ॥ असंभाव्यासी ठाव कैंचा ॥ २४ ॥ जेणें पाविजे निजबोधातें ॥ ते बुद्धी उद्धवापाशीं वर्ते ॥ यालागीं श्रीकृष्ण ह्मणे महामते ॥ उद्धवातें अतिप्रीतीं ॥ २५ ॥ अतिप्रीती पुरस्करून ॥ उद्धवासी ह्मणे सावधान ॥ ये श्लोकींचा अर्थ गहन ॥ ते धारणा जाण धरावी ॥ २६ ॥ यालागीं कृष्णजगजेठी ॥ उद्धवाची पाठी थापटी ॥ अतिगुह्याची गुह्य गोष्टी ॥ तुझे कृपेसाठीं मी बोलत ॥ २७ ॥ पाठी थापटावयाचेनि मिसें जाण ॥ करीत स्वशक्तिसंचरण ॥ तेणें अद्वयबोधलक्षण ॥ उद्धवाशी जाण प्रकाशी ॥ २८ ॥ जीव एकाचि त्रिजगतीं ॥ हें जाण उद्धवा निश्चितीं ॥ जेवीं नानादीपांचिया *दीप्ती ॥ तेजाची ×ज्योती अभिन्न ॥ २९ ॥ दोनी दीप एक होती ॥ तैशीं देवळीं ऐक्या नयेती ॥ जडत्वापाशीं भेदप्राप्ती ॥ ऐक्यव्यक्ती अजडत्वीं ॥ १३० ॥ चंदनकुटके बहुवस ॥ परी सर्वीं एकचि सुवास ॥ तेवीं जीवरूपें मी अविनाश ॥ परमपरेश आभासें ॥ ३१ ॥ जीवरूपें तूं श्रीकृष्ण ॥ हें सत्य मानावें वचन ॥ तें भवपाशादि बंधन ॥ तुजाचि जाण आदळलें ॥ ३२ ॥ ऐशी कल्पिशी जरी वार्ता ॥ ते मज न घडे गा सर्वथा ॥ जेवीं शरीराशी प्राण चाळिता ॥ शरीर अवस्था त्या नाहीं ॥ ३३ ॥ लिंगशरीरीं स्वयंभ ॥ जीव तो मदंशें प्रतिबिंब ॥ त्यासि देहादि बंधनभांब ॥ ⁕मिथ्या विटंब आभासे ॥ ३४ ॥ घटें ९आवरिलें आकाश ॥ त्या नांव ह्मणती घटाकाश ॥ घटभंगें त्या नव्हे नाश ॥ तेवीं मी अविनाश जीवत्वें ॥ ३५ ॥ थिल्लरीं प्रतिबिंबला सविता ॥ तो गगन सांडोनि थिल्लरा आंतौता ॥ नाहीं रिघाला तत्त्वतां ॥ तेवीं मी जीविता अलिप्त ॥ ३६ ॥ रवी थिल्लरीं बिंबला दिसे ॥ तेवीं मी लिंगदेहीं आभासें ॥ मिथ्या तथींचें भोगपिसें ॥ तें बंधन कैसें मज लागे ॥ ३७ ॥ येथें बोलणें नलगे बहू ॥ प्रतिबिंबा नांव जिवू ॥ मुख्य बिंब तो मी शिवू ॥ विशद उगवू हा जाण ॥ ३८ ॥ तलाव विहरी नाना थिल्लरीं ॥ सूर्य प्रतिबिंबे त्यांमाझारीं ॥ तितुकीं रूपें दिवाकरीं ॥ पाहतां अंबरीं तंव नाहीं ॥ ३९ ॥ तैसें एकासि जैं

१ भक्तांचे संसाररूप पाश सोडविणारा. २ क्षय-वृद्धि. ३ ठिणग्या. ४ दिव्यांचा परडा, चाडे ५ तुकडे. ६ प्राप्त झालें. ७ माझ्या अंशानें. ८ आभास ९ निवाडा.

δना. तेवीं. ⁂ना. निवारितसे. ०ना. रिती वाटी न दिसे अग्नीसी, तेथें फुणगे उसळती. आकाशीं, रितीवाटी नाहीं स्वरूपासी. अभ्यासाव्यासी ठाव कैंचा ॥ २४ ॥ *ना. व्यक्ति. ×ना. दीप्ती. ⁕मो. मिथ्याचि डंब. ९मो. आवरिला अवकाश.

अनेकत्व ॥ तें मिथ्या जाण जीवत्व ॥ हें भागवताचें निजतत्त्व ॥ शुद्ध सत्त्व ज्ञानाचें ॥ १४०॥ थिल्ल्रीं प्रतिबिंबला सविता ॥ चंचल निश्चल मलिनता ॥ हे थिल्लराचे गुण तत्त्वतां ॥ प्रतिबिंब-माथां मानिती ॥ ४१ ॥ तेवीं 7शिवासि बाधकता ॥ पाहतां नाहीं गा सर्वथा ॥ हें *अविद्या-कार्य तत्त्वतां ॥ जीवांचे माथां मानिती ॥ ४२ ॥ एवं मिथ्या जीवभेद सर्वथा ॥ त्यासि बद्धता आणि मुक्तता ॥ विद्या अविद्या +निजपक्षपाता ॥ दावी तत्त्वतां निजकर्मे ॥ ४३ ॥ त्या ×जीवआभासासि प्रस्तुत ॥ नित्यबद्ध नित्यमुक्त ॥ एकासि दोन अवस्था येथ ॥ असे दावित विद्या अविद्या ॥ ४४ ॥ जेवीं जळीं बिंबला सविता ॥ त्या जळाची चंचळनिश्चळता ॥ या प्रतिबिंबासीच अवस्था ॥ मुख्य सविता त्या नेणे ॥ ४५ ॥ तेवीं जीवाची बद्धमुक्तता ॥ परमात्म्यासि नलगे सर्वथा ॥ जेवींकां अंधारींच्या खद्योता ॥ 0न देखे सविता कल्पांतीं ॥४६॥ जळीं आकाश दिसे बुडालें ॥ परी तें कहीं नाहीं झालें वोलें ॥ तेवीं अविद्येसी अलिप्त ठेलें ॥ असे संचलें निजरूप ॥ ४७ ॥ एक बद्ध एक मुक्त ॥ हें जीवाचिमाजीं भासत ॥ तेंही मी सांगेन निश्चित ॥ सावधचित्त परियेसीं ॥ ४८ ॥ सहस्रघटीं जळ भरितां ॥ एकाचि सहस्रधा दिसे सविता ॥ तेथ ये घटींची जे अवस्था ॥ त्या घटस्था लागेना ॥ ४९ ॥ तेथ जो घट होय चंचळ ॥ तें प्रतिबिंब अंदोळ विंदोळ ॥ परी दुजे घटीं जें निश्चळ ॥ तें नव्हे चंचळ याचेनी ॥ १५० ॥ तेथें कोणी एक दैवबळें ॥ सूक्ष्मछिद्रें घटजळ गळे ॥ तें प्रतिबिंब निजबिंबीं मिळे ॥ येर सकळें तैसींची ॥ ५१ ॥ तेवीं गुरुकृपा उजियेडें ॥ ज्याचें लिंगदेह विघडे ॥ त्यासी परमात्म्यासी ऐक्य घडे ॥ येर तें बापुडें देहबंदीं ॥ ५२ ॥ हेंचि निरूपण पुढें ॥ श्लोक-संगती सुरवाडें ॥ तें मी सांगेन वाडेंकोडें ॥ अति निवाडें निश्चित ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ अथ बद्धस्य मुक्तस्य वैलक्षण्यं वदामि ते ॥ विरुद्धधर्मिणोस्तात स्थितयोरेकधर्मिणि ॥ ५ ॥

॥ टीका ॥ येणेंचि प्रसंगें जाण ॥ मागील तुझे जे प्रश्न ॥ बद्धमुक्तांचें लक्षण ॥ तेंही निरूपण सांगेन ॥ ५४ ॥ दोघांसीही देहीं असतां ॥ दिसे विरुद्धधर्म स्वभावतां ॥ एक तो सदा सुखी सर्वथा ॥ एक दुःखभोक्ता अहर्निशीं ॥ ५५ ॥ येथ विलक्षणता दोंप्रकारीं ॥ एक ते जीव ईश्वरामाझारीं ॥ एक ते *जीवांसि परस्परीं ॥ बद्धमुक्त निर्धारीं निश्चित ॥ ५६ ॥ पहिलें जीवेश्वराची कथा ॥ तुज मी सांगेन विलक्षणता ॥ मग जीवाची बद्धमुक्तता ॥ विशद व्यवस्था सांगेन ॥ ५७ ॥ जीवेश्वरांचें वैलक्षण्य ॥ अडीचश्लोकीं निरूपण ॥ स्वयें सांगताहे नारायण ॥ भाग्य पूर्ण उद्धवाचें ॥ ५८ ॥

॥ श्लोक ॥ सुपर्णावेतौ सदृशौ सखायौ यदृच्छयैतौ कृतनीडौ च वृक्षे ॥ एकस्तयोः खादति पिप्पलान्नमन्यो निरन्नोऽपि बलेन भूयान् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ सुपर्ण म्हणिजे पक्षी ॥ ये वृक्षींचा जाय ते वृक्षीं ॥ तैसा देहीं देहांतरातें लक्षी ॥ यालागीं पक्षी म्हणिजेत ॥५९॥ पक्ष्यांच्या ऐशी यांची गती ॥ हे देह सांडूनि त्या देहा जाती॥

१ हजारप्रकारानें. २ नाहींसें होतें.

7 मो. जिवाशिवासी. *ना. अविद्याकारण. + मो. पक्षपाता. × ना. जीवभावासी. 0 ना. नदेखवे. * ना. शिवासी.

पक्षी ह्मणातया हे उपपत्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १६० ॥ एवं आत्मा देहाहूनि भिन्न ॥ तें सांगितलें उपलक्षण ॥ देहात्मवादाचें खंडन ॥ प्रसंगें जाण दाखविलें ॥ ६१ ॥ आत्मा देह सर्वथा नघडे ॥ देहबुद्धि धरणें तें तंव कुडें ॥ हें उद्धवासि फाडोवाडें ॥ निजनिवाडें दावित ॥ ६२ ॥ देहबुद्धीचिया पोटीं ॥ जन्ममरणांचिया कोटी ॥ स्वर्गनरकाची आटाटी ॥ देहबुद्धि-साठीं जीवशिवपदें ॥ ६३ ॥ दोघेही चिद्रूपें सारिखे ॥ +कांहीं न होती आनासारिखे ॥ अनादि हे दोघे सखे॥अतिनेटके जिवलग॥६४॥काळें अकाळें सकाळें॥नव्हती येरयेरांवेगळे ॥ एकत्र वर्तती खेळमेळें ॥ निजप्रांजळें सख्यत्वें ॥ ६५ ॥ प्रभा दीप दवडिना वेगळा ॥ दीप प्रभेसी नव्हे निराळा ॥ तेवीं जीवशिवांचा मेळा ॥ एकत्र स्वलीळा नांदतो स्वयें ॥ ६६ ॥ जीव इच्छी जें जें कांहीं ॥ तें तें वासनेसारिखें पाहीं ॥ ईश्वर पुरवी सर्वही ॥ विमुख कांहीं होंनेणे ॥ ६७ ॥ अंतकाळीं जें जीव मागे ॥ तें अलोट ईश्वर देऊं लागे ॥ आणि ईश्वर आज्ञेचेनि योगें ॥ जीव सर्वांगें वर्तत ॥ ६८ ॥ ईश्वर आज्ञा त्रिशुद्धी ॥ जीव जीवें सर्वस्वें वंदी ॥ होय नव्हे न ह्मणे कदीं ॥ अभिनवसिद्धी सखेपणा ॥ ६९ ॥ नवल सख्यत्वाची परी ॥ ईश्वरू जैसें जैसें प्रेरी ॥ जीव तैसें तैसें करी ॥ निमिषभरी दळेना ॥१७०॥ निमेष आरंभोनि जन्मवरी ॥ जीव ईश्वराची आज्ञा करी ॥ ईश्वरू जीवाचा साहाकारी ॥ परस्परीं निजसखे ॥ ७१ ॥ जीव अत्यंत अडलेपणें ॥ ईश्वरासि धांव धांव ह्मणे ॥ तो तत्काळ पावोनि धांवणें ॥ करी सोडवणें जीवाचें ॥ ७२ ॥ एवं शिवाचे आज्ञें जीव राहे ॥ जीवपण गेलिया शिवीं समाये ॥ जीवालागीं हा शिवपण वाहे ॥ येरवीं राहे मांहूनी ॥ ७३ ॥ ऐसें सखेपण यांचें ॥ कैवीं अनुवादवे वाचें ॥ उद्धवा हें मीचि जाणें साचें ॥ या सखेपणाचें सौजन्य ॥ ७३ ॥ जीव ईश्वराआधीन ॥ हें दृढ केलें संस्थापन ॥ अनीश्वरवादाचें खंडण ॥ प्रसंगें जाण दाविलें ॥ ७४ ॥ अनीश्वरवाद खंडितां ॥ खंडिली कर्मपाखंडवार्ता ॥ कर्मपाखंडांच्या मता ॥ ईश्वरता नमानिती ॥ ७५ ॥ ह्मणती चित्तधर्म ईश्वरासी ॥ तंव चिद्रूपता स्थापूनि त्यासी ॥ निराकारिलें चित्तधर्मासी ॥ अनायासीं चिद्रूपें ॥ ७६ ॥ नानापदार्थीचें अतिचिंतन ॥ त्याचिनांव चित्त जाण ॥ चित्तत्रीण निश्चळपण ॥ तेंचि चैतन्य उद्धवा ॥७७॥ ×धर्माधर्म नविचारितां ॥ ह्मणती ईश्वर मोक्षदाता ॥ हे *भक्तपाखंडी कथा ॥ स्थापूनि चिद्रूपता निवारी ॥ ७८ ॥ टिळे माळा मुद्रा धरणें ॥ त्यांवूनि संतांसि निंदिलें जेणें ॥ पाप राहटे भक्तपणें ॥ त्यासि नारायणें नुद्धरिजे ॥ ७९ ॥ ' अंतरींचे सर्व जाणता मी ॥ यालागीं नांवें अंतर्यामी ' ॥ तो मी शाब्दिकवचनधर्मीं ॥ चाळविला धर्मी केवीं जाय ॥१८०॥ मी ज्ञानरूप तत्त्वतां ॥ सर्वद्रष्टा सर्वज्ञाता ॥ तो मी धर्माधर्म न ॥ विचारितां मोक्षदाता हें नघडे ॥८१॥ ' धरोनियां भक्तभावो ॥ पाप राहाटे जो स्वयमेवो ॥ त्याचिनांव दांभिक पहाहो ॥ त्यातें देवो नुद्धरी ॥ ८२ ॥ ' सदृशौ ' आणि ' सखायौ ' ॥ धरोनि या पदांचा अन्वयो ॥ पाखंड मतातें पहाहो ॥ स्वयें देवो उच्छेदी ॥ ८३ ॥ निरसोनि नानामतांतरें ॥ स्वमत करावया खरें॥

---

१ युक्ति; न्याय. २ दगदग. ३ विलक्षण. ४ स्पष्ट, अनुकूल. ५ वासनेप्रमाणें. ६ एकनटतो. ७ बोलवे, वर्णवे. ८ सारखे. ९ मित्र.

+ मो. कंहीं नव्हेती अनारिसे. ।ना. करी अनुवाद वेदवाचें. ×ना. न विचारितां कर्माकर्म निरपेक्षता. * ना. भक्तपापांड. मो. भक्तिपापांड.

श्लोकींचीं पदें अतिगंभीरें ॥ सारंगधरें वर्णिलीं ॥ ८४ ॥ ते दोनी मिळोनियां पक्षी ॥ नीड केलें देहवृक्षीं ॥ वृक्ष ह्मणिजे कोणे पक्षीं ॥ तेंही ×लक्षी लक्षणें ॥ ८५ ॥ जननीउदर तेंचि आळ ॥ पित्याचें रेत, बीज सबळ ॥ गर्भाधान, पेरणी केवळ ॥ संकल्प, जळ वृद्धीसी ॥८६ मोहंभावाचा गुप्त अंकुरू ॥ त्रिगुणभूमीं तिवणांडीरू ॥ कोहंभावें वाढला थोरू॥ वृक्ष साकारू तेणें जाहला , ॥ ८७ ॥ करचरणादि नानाशाखा ॥ प्रबळबळें वाढल्या देखा ॥ अधऊर्ध्व नखशिखा ॥ वृक्षाचा +निका विस्तारू ॥ ८८ ॥ त्या देहबुद्धीचीं दृढ मूळें ॥ विकल्पपारंब्या तेणें बळें ॥ भूमीं रुतल्या प्रबळबळें ॥ कामाचे कोंवळे फुटती कोंभ ॥ ८९ ॥ तेथ कर्माकर्मांचीं पानें ॥ निबिड दाटलीं अतिगहनें ॥ मोहममतेचे घोंस तेणें ॥ सलोभपणें दाटले ॥९० ज्या उंचावल्या थोर शाखा ॥ त्या फळीं फळोनि सुखदुःखां ॥ उतरल्या जी अधोमुखा ॥ अधःपतनें देखा लोळती ॥ ९१ ॥ ऐशिया वृक्षामाजीं जाण ॥ अतिगूढ गुप्त गहन ॥ नीड केलें हृदयस्थान ॥ जीवशिव आपण वसावया ॥ ९२ ॥ जेथ जीवपरमात्मा वसती ॥ तरी देहाची जाहली सत्यप्राप्ती ॥ ऐसें कोणी कोणी ह्मणती ॥ तें मत, श्रीपती निराकरी ॥ ९३ ॥ पुरुषासवें लटकी छाया ॥ तोडितां मोडितां ※नये घाया ॥ तैशी अनिर्वचनीय मार्झी माया॥ तेणें यदृच्छया नीड केलें ॥ ९४ ॥ जेवीं स्वप्नीं ※गृहाचार निद्रिता ॥ तेवीं जीवात्मा नीडीं वसतां, ॥ हें मायामय सर्वथा ॥ नव्हे वस्तुतां साचार ॥ ९५ ॥ येणें निरूपणें गोविंदु ॥ नैयायिकमताचा कंदु ॥ समूळ केला त्याचा उच्छेदु ॥ देहसंबंधु मिथ्यात्वें ॥ ९६ ॥ ऐशियाहि या वृक्षाशीं ॥ जन्मादि निमेषोन्मेषीं ॥ काळ छेदितसे अहर्निशीं ॥ बाळादिवयसासी छेदकु ॥ ९७ तया वृक्षाचीं फळें ॥ तुरटें तिखटें तोंडाळें ॥ पक्कें अपक्कें सकळें ॥ ज्यांसि 'पिप्पलें ' ह्मणताती ॥ ९८ ॥ त्या दोंपक्ष्यांमाजीं तत्त्वतां ॥ जो जीवपणें बोलिजेता ॥ तो या कर्मफळांचा भोक्ता ॥ जीं नानाव्यथादायकें ॥ ९९ ॥ जीं फळें खातां पोट नभरे ॥ खादल्या दारुण दुर्जरें॥ जेणें भ्रमचक्रीं पडोनि फिरे ॥ तरी अत्यादरें सेवितू ॥ २०० ॥ दुजा फळ खातां ग्वुणी वारी ॥ जावासि त्या फळाची गोडी भारी ॥ अखंड जाहला फळाहारी ॥ वोरिलें नकरी शिवाचें ॥ १ ॥ फळें सेवितां अहर्निशीं ॥ तिळभरी शक्ति नाहीं जीवासी ॥ अशक्त देखोनियां त्याशी॥ काळपाशीं बांधिती ॥ २ ॥ जो इयें सेवी कर्मफळें ॥ तो तत्काळ बांधिजे काळें ॥ दुजा कर्मफळा नातळे ॥ त्यातें देखोनि पळे काळिकाळु ॥ ३ ॥ जो कर्मफळातें नसेवितू ॥ तो ज्ञानशक्तीनें अधिक अनंतू ॥ सदा परमानंदें तृप्तु ॥ असे डुल्लतू स्वानंदें ॥ ४ ॥ उद्धवासि ※होय निजबोधू ॥ यालागीं जिवशिवांचा भेदु ॥ अत्यादरें सांगे गोविंदु ॥ निजात्मबोधु प्रांजळु ॥५॥

॥ श्लोक ॥ आत्मानमन्यं च स वेद विद्वानपिप्पलादो न तु पिप्पलादः ॥
योऽविद्यया युक् स तु नित्यबद्धो विद्यामयो यः स तु नित्यमुक्तः ॥ ७ ॥

**॥ टीका ॥ जो कर्मफळातें नसेविता ॥ तो स्वस्वरूपाचा जाणता ॥ द्रष्टा जिव प्रपंचाचा तत्त्वतां ॥ अलिप्तज्ञाता निजज्ञानें ॥६॥ जीव प्रपंचाचा ज्ञाता ॥ परी परमात्मा नेणे तत्त्वतां ॥**

१ कृष्णानें. २ घरटें. ३ देहरूपी झाडावर. ४ आळें. ५त्रिदळ, तिपानी पलव, अंकुर. ६ घरटें.७ खंडी. ८ बाल्य तारुण्यास. ९ पचावयास कठीण. १० त्यागीनें नको खाऊं ह्मणून सुचवी. ११ नको करूं ह्मणून सुचविलेलें.

× मो. परिसी लक्षण. + मो. देखा. ※ ना. नलगे. ※मो. ना. घराचार. ※ मो. व्हावया.

लागीं भोगी भवव्यथा ॥ कर्मफळें खातां अतिबद्धू ॥ ७ ॥ जो कर्मफळें सेवी बापुडा ॥ अंधपंगू जाहला वेडा ॥ मी कोण हें नेणे फुडा ॥ पडिला खोडां देहाचे ॥ ८ ॥ ज्या देहसंगा आंतू ॥ प्रतिपदीं होय आत्मघातू ॥ नाहीं जन्ममरणांसि अंतू ॥ दुःखी होतू अतिदुःखें ॥ ९ ॥ नश्वरविषयाचा छंदु ॥ तेणें जीव जाहला अतिबद्धू ॥ हा अविवेकाचा संबंधू ॥ लागला बद्धू देहवंता ॥ २१० ॥ जितुकी विषयाची अवस्था ॥ तितुकी जीवासि नित्यबद्धता ॥ जो विषयातीत सर्वथा ॥ नित्यमुक्तता ते ठायीं ॥ ११ ॥ जो विद्याप्राधान्यें नित्यमुक्त ॥ जो ज्ञानशक्तीनें शक्तिमंत ॥ सर्वव्यापकु सर्वीं अलिप्त ॥ तो नित्यमुक्त बोलिजे ॥ १२ ॥ सांगीतली जीवाची नित्यबद्धता ॥ प्रगट केली शिवाची नित्यमुक्तता ॥ जीवाची जे बद्धमुक्तता ॥ तेही आतां सांगतू ॥ १३ ॥ उद्धवाप्रती श्रीकृष्ण ॥ बद्धमुक्तांचें लक्षण ॥ दोघांचीही उणखुण ॥ विचित्र जाण सांगेल ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ देहस्थोऽपि न देहस्थो विद्वान् स्वप्नाद्यथोत्थितः ॥ अदेहस्थोऽपि देहस्थः कुमतिः स्वप्नदृग्यथा ॥ ८ ॥

॥ टीका ॥ बद्धमुक्तांचें मिश्र लक्षण ॥ तीं श्लोकीं सांगेल जाण ॥ केवळ मुक्ताचें सुलक्षण॥ गोड निरूपण सातश्लोकीं ॥ १५ ॥ देहीं असोनि देहबुद्धि नाहीं ॥ हें मुक्ताचें मुख्यलक्षण पाही ॥ यालागीं देहीं असोनि विदेही ॥ ह्मणिपे पाही याहेतु ॥ १६ ॥ स्वप्नींचें राज्य आणि शोक ॥ *जागृतीं जेवीं मिथ्या देख ॥ तैसें देहादि जें सुखदुःख ॥ तें मिथ्या देख मुक्तांसी ॥ १७ ॥ जो स्वप्नीं मरोनि जाळिला ॥ तो जागृतीं नाहीं राख जाहला ॥ तैसा प्रपंच मिथ्या जाणीतला ॥ मुक्त बोलिला त्या नांव ॥ १८ ॥ स्वप्नींचें साधकबाधक ॥ जागृतीं आठवे [१]लौकिक ॥ त्याचे बाधीना सुखदुःख ॥ तैसें संसारिक मुक्तासी ॥ १९ ॥ आतां ऐक बद्धाची स्थिती ॥ तो वस्तुतां असे देहातीतीं ॥ परी मी देह हें मानी कुमती ॥ दुःखप्राप्ती तेणें त्यासी ॥ २२० ॥ जळीं देखे प्रतिबिंबातें ॥ मी बुडालों ह्मणोनि कुंथे ॥ कोणी काढा काढा मातें ॥ पुण्य तुमतें लागेल ॥ २१ ॥ स्वप्नीं घाय लागले खड्गाचे ॥ तेणें जागृतीं ह्मणे मी नाचें ॥ ऐसें निबिड भरितें भ्रमाचें ॥ तें बद्धतेचें लक्षण ॥ २२ ॥ स्वप्नींचें सुखदुःख नसतें ॥ स्वप्नभ्रमें भोगितां कुंथे ॥ तेवीं देह मी ह्मणोनि येथें ॥ नानादुःखांतें भोगितू ॥ २३ ॥ स्वरूपाचें विस्मरण ॥ तेणें विषयासक्ति दृढ जाण ॥ संकल्प विकल्प अतिगहन ॥ तेंचि लक्षण बद्धाचें ॥ २४ ॥ आणिक लक्षणें त्याचीं आतां ॥ सांगत असें तत्त्वतां ॥ भोग भोगोनि [४]अभोक्ता ॥ ते मुक्तावस्था परियेसी ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ इंद्रियैरिंद्रियार्थेषु गुणैरपि गुणेषु च ॥ गृह्यमाणेष्वहं कुर्यान्न विद्वान्यस्त्वविक्रियः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ अवशेष प्रारब्धस्थिती ॥ मुक्ताची देहीं दिसे वस्ती ॥ परी जागृतीं स्वप्नसुषुप्तीं ॥ स्थिती नातळे ॥ २६ ॥ छाया पुरुषाचेनि चळे ॥ ते छायेसि पुरुष नातळे ॥ तेवीं मिथ्या

१ खोड्यांत. २ विषयापलीकडे. ३ ऊहापोह, लक्षण. ४ उरलेला.

* ना. जागृती मिथ्या देखती लोक.

देह मुक्ताजवळें ॥ कल्पांतकाळें येवों नशके ॥ २७ ॥ आपुले छायेसि जाण ॥ जेवीं बैसों नशके आपण ॥ तेवीं मायादि +तिन्ही गुण ॥ जवळी असोन स्पर्शेना ॥ २८ ॥ इंद्रियद्वारा यथानिगुतीं ॥ प्राप्तविषयांतें सेविती ॥ परी सेविलें ऐसेंही नेणती ॥ विषयस्फूर्ती स्फुरेना ॥ २९ ॥ गुण पोखिती गुणावस्था ॥ इंद्रियें घेती इंद्रियार्था ॥ मी उभयसाक्षी अकर्ता ॥ चिन्मात्रता अलिप्त ॥ २३० ॥ तो इंद्रियांचेनि खेळेमेळें ॥ सुखें विषयांमाजीं जरी लोळे ॥ तरी *विकाराचेनि विटाळें ॥ कदाकाळें मैळेना ॥ ३१ ॥ जेथ कामाची अतिप्रीती ॥ तेथ लोभाची दृढ वस्ती ॥ अथवा कामाची जेथ अप्राप्ती ॥ तेथ महाख्याती क्रोधाची ॥ ३२ ॥ मुक्त जाहला नित्य निष्काम ॥ क्रोधलोभेंसी निमाला काम ॥ तो स्वयें जाहला आत्माराम ॥ विश्रामधाम जगाचें ॥ ३३ ॥ एवं मुक्ताच्याठायीं जाण ॥ उपजों नशके पापपुण्य ॥ कामक्रोधादि त्रिगुणशून्य ॥ जाहला परिपूर्ण चिद्ब्रह्म ॥३४॥ मुक्ताची विषयस्थिती ॥ विषयीं स्फुरे ब्रह्मस्फूर्ती ॥ यालागीं पापपुण्यें नुपजती ॥ नित्यमुक्ती तेणें त्यासी ॥ ३५ ॥ ऐशी मुक्ताची हे कथा ॥ ऐक बद्धाची हे वार्ता ॥ अकर्ताचि ह्मणे मी कर्ता ॥ येणेंचि सर्वथा गुंतला ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ दैवाधीने शरीरेऽस्मिन् गुणभाव्येन कर्मणा ॥ वर्तमानोऽबुधस्तत्र कर्त्ताऽस्मीति निबध्यते ॥ १० ॥

॥ टीका ॥ अदृष्टाआधीन जें शरीर ॥ तेथें आलियाही हरिहर ॥ अन्यथा न करवे अणुमात्र हें वेदशास्त्र संमत ॥ ३७ ॥ देहीं ज्या गुणाचें प्राधान्य ॥ तेंसेंचि कर्म निपजे जाण ॥ इंद्रियें तीं गुणाआधीन ॥ तदनुसारें जाण वर्तती ॥ ३८ ॥ एवं दैवगुणें देहवर्तन ॥ तेथ मी कर्ता ह्मणवी आपण ॥ तेंचि त्यासी दृढ बंधन ॥ आपणा आपण घातक ॥ ३९ ॥ नळीमाजीं चण्यांच्या आशा ॥ वानरें मुठी धरणें तोचि फांसा ॥ तेवीं देहींच्या विषयविलासा ॥ अभिमानें तैसा गुंतला ॥ २४० ॥ जो देहातीत वस्तुतां ॥ जो गुणकर्मांचा अकर्ता ॥ तो ह्मणे मी देह मी कर्मकर्ता ॥ अहंममता भूलला ॥ ४१ ॥ जो न करितांचि चोरी ॥ मी चोर ह्मणे राजद्वारीं ॥ तो मारिजे लहानथोरीं ॥ तैशी परी जडजीवा ॥ ४२ ॥ प्रकृतीचें कर्म आपुले माथां ॥ घेऊनि नाचे अहंममता ॥ तेणें अभिमानें दृढ बद्धता ॥ आकल्पांता अनिवार ॥४३ तळीं मांडूनि काजळा ॥ वरी ठेविली स्फटिकशिळा ॥ चेतता लोपूनि दिसे काळा ॥ तेवीं आंधळा जीव झाला ॥ ४४ ॥ कां आंधळें मातलें हातिरू ॥ नेणे निजपतन निर्धारू ॥ तैसा जीव लागे कर्म करूं ॥ पतनविचारु तो न देखे ॥ ४५ ॥ मी देह मी कर्मकर्ता ॥ मी ज्ञाता मी विषयभोक्ता ॥ ऐशी जे कां देहात्मता ॥ दृढ बद्धता ती नांव ॥ ४६ ॥ एवं बद्धमुक्त ×वर्तन विशद केलें निरूपण ॥ आतां केवळ मुक्ताचें लक्षण ॥ आवडीं श्रीकृष्ण सांगत ॥ ४७ ज्ञानिया तो तंव आत्मा माझा ॥ हे अतिप्रीतीं गरुडध्वजा ॥ हें गुह्य सांगीतलें कपिध्वजा ऽरणसमाजा रणरंगीं ॥ ४८ ॥ तेंचि आतां उद्धवाप्रती ॥ अत्यादरें सांगे श्रीपती ॥ ज्ञानियाची मुक्तस्थिती ॥ यथानिगुतीं निजगुह्य ॥ ४९ ॥ ज्ञानलक्षणें सांगतां ॥ धणी न

१ मुक्तापाशीं. २ पोषितात. ३ इंद्रियांचे विषयांस ( इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तंते गी०). ४ विसाव्याची जागा. ५ प्रकृतेः क्रिय० गी० ३।२७ पहा. ६ हत्ती. ७ अर्जुनास. ८ आवड.

+ ना. तीं निर्गुण. * ना. विषयाचेनि. × ना. वर्तमान. ऽ मो. रणसमोजा.

णनाथा ॥ निरूपणामिषें ज्ञानकथा ॥ मागुतमागुतां सांगत ॥२५०॥ यालागीं ज्ञानभक्तांची डी ॥ श्रीकृष्णाचि जाणे फुडी ॥ कृष्णभजनाची आवडी ॥ भक्त ते गोडी जाणती ॥ ५१ ॥ र्थीच तंव हे मुक्तांची कथा ॥ वरी श्रीकृष्णासारिखा +वक्ता ॥ उद्धवाचें भाग्य वर्णितां ॥ वर्णवे सर्वथा शेषादिकां ॥ ५२ ॥ उद्धव अर्जुनासमान ॥ त्याहूनि हा दिसे गहन ॥ ते परपरें नरनारायण ॥ 3गुह्य ज्ञान बोलिले ॥ ५३ ॥ तेंचि उलथोनि ज्ञानकथा ॥ उद्धवासि होय ता ॥ उद्धवा ऐसें भाग्य तत्त्वतां ॥ न दिसे सर्वथा आनासी ॥ ५४ ॥ जाणें सांडूनि निजमा ॥ मागें ठेवूनि आपुल्या कामा ॥ उद्धव आवडला पुरुषोत्तमा ॥ त्याचिया प्रेमा त्रिगुंणा ॥ ५५ ॥ यालागीं उद्धवाचें शुद्ध पुण्य ॥ जगीं उद्धवाचि धन्य धन्य ॥ जयालागीं स्वयें रायण ॥ स्वानंदघन बोळला ॥ ५६ ॥ जो नातुडे योगयागसंकटीं ॥ तो उद्धवाच्या बोलाठीं ॥ जेवीं व्याली धेनु वत्सा चाटी ॥ तेवीं गुह्यगोष्टी सांगत ॥ ५७ ॥ जो निजकुळासि ळ ॥ तो उद्धवासि अति स्नेहाळ ॥ बाप भक्तकाजकृपाळ ॥ ॥ ज्ञानकल्लोळ तुटला ॥ ५८ ॥ लागीं उद्धवाचें नाम घेतां ॥ श्रीकृष्ण निवारी भवव्यथा ॥ ऐशी भक्तप्रीती भगवंता ॥ तें स्मरतां हरी तारी ॥ ५९ ॥ मुक्तांचीं लक्षणें निर्धारितां ॥ लाभे आपुली निजमुक्तता ॥ का जनार्दनु विनवी संतां ॥ मुक्तकथा हरि बोले ॥ २६० ॥ कृष्ण उद्धवासि म्हणे मी तुज ॥ गेन आपुलें निजगुज ॥ मुक्तलक्षणाचें भोज ॥ नवल चोज परियेसीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ एवं विरक्तःशयन आसनाटनमज्जने ॥ दर्शनस्पर्शनघ्राणभोजनश्रवणादिषु ॥ ११ ॥

॥ टीका ॥ ऐक मुक्ताचें लक्षण ॥ आसन, भोजन, शयन, ॥ दर्शन, स्पर्शन, घ्राण, ॥ अटनें, ज्जन, करी कैसें ॥ ६२ ॥ मागील श्लोकार्थ संपतां ॥ प्रकृति कर्म अभिमानता ॥ तेणें लागली ढ बद्धता ॥ तो अहंकारु ज्ञाता नातळे ॥ ६३ ॥ सर्वकर्मी स्वभावता ॥ ज्ञात्याची निरभिमानता ॥ ते मी समूळ सांगेन कथा ॥ सावधानता अवधारीं ॥ ६४ ॥ जेवीं छायेचा 6मानापमान ॥ पुरुषा न बाधी अणुप्रमाण ॥ तेवीं देहाचें कर्माचरण ॥ निरभिमान मुक्तासी ॥६५॥ धिष्ठान तेंचि आसन ॥ अखंड त्यावरी आरोहण ॥ तेथें येऊंचि नेणे अभिमान ॥ बैसलें न उठेना ॥ ६६ ॥ नवल आसनाचें महिमान ॥ हारपोनी गेलें विस्मरण ॥ कदा एकांत न डे जाण ॥ हें सहजासन मुक्ताचें ॥६७॥ जें आसनींचें समाधान ॥ समाधि आणि व्युत्थान ॥ री दोहींची बोळवण ॥ *हें चालतें आसन मुक्ताचें ॥६८॥ जें बैसल्या आसनीं समाधान ॥ चि स्थिती गमनागमन ॥ उठिलों बैसलों नाठवे जाण ॥ चालतेंपण स्फुरेना ॥६९॥ चालतांही पळपदीं ॥ मी चालतों नाठवे बुद्धी ॥ चालतां न मोडे समाधी ॥ हे चळणसिद्धी मुक्ताची ॥२७०॥ री त्रैलोक्य हिंडला ॥ तरी ठायींहूनि नाहीं हालला ॥ ऐसा नचलोनि मुक्त चालला ॥ वीं ×अभ्रें धांविन्नला दिसे चंद्र ॥ ७१ ॥ कुलालचक्रीं बैसली माशी ॥ ते न हालतां भंवे कासरसी ॥ मुक्ताची गमनसिद्धी तैशी ॥ देहगमनेंसी आभासे ॥ ७२ ॥ देह प्रारब्धास्तव

१ उलटून, पुन्हा. २ यादवकुलांतक. ३ हिंडणें. ४ मूलाधारावरील चक्र. ५ कुंभाराचे चाकावर.
+ ना. रसाळवक्ता. 3 ना. सत्यज्ञान. 6 ना. मानाभिमान. * ना. हें चौथें लक्षण मुक्ताचें.
× मा. अर्थ.

हिंडे ॥ बैसका +स्वरूपींची नसंडे ॥ जेवीं रथीं धांवतां सवेग घोडे ॥ निद्रा नमोडे रथस्था चीं ॥ ७३ ॥ ऐसें नचालतां जें चलन ॥ तें जाण मुक्ताचें गमन ॥ आतां ऐक त्याचें स्नान ॥ निमज्जन निजरूपीं ॥ ७४ ॥ स्नान करी गंगाजळें ॥ परी गंगाजळातें नातळे ॥ मन चित्स्व रूपीं केलें सोंवळें॥तें सोंवळें हां नेणे॥७५॥त्यासि निजस्वरूपीं ✻नाहतां॥जाहली परम पवित्र ता ॥ तीर्थे मागती चरणतीर्था ॥ ऐशी सुस्नातता मुक्ताची ॥ ७६ ॥ तो चिन्मात्र देखे जी वन ॥ अखंड चिद्रूपीं अवगाहन ॥ इतर ह्मणती केलें स्नान ॥ त्यासि निमज्जन निजरूपीं ७७ ज्याचे चरणींचे रजःकण ॥ लाहोनि धरा परम पावन ॥ त्याचेनि प्राणसंगें जाण ॥ पवित्र पण वायूसी ॥ ७८ ॥ ज्याचेनि चरणस्पर्शे तत्त्वतां ॥ पवित्र जाहल्या गंगादिसरिता ॥ त्याचे नि जठरसंगें सर्वथा ॥ अतिपवित्रता अग्नीसी ॥ ७९ ॥ ज्याच्या हृदयावकाशीं आकाश । सगळें राहिलें सावकाश ॥ तेणें पवित्र जाहलें आकाश ॥ अलिप्त उदास सर्वत्र ॥ २८० ॥ जे चढोनि बैसले वैकुंठीं ॥ ते सदा वांछिती त्याची भेटी ॥ वेद ऐकोंधांवे गोष्टी ॥ तो पहावया दिठीं देव येती ॥ ८१ ॥ एवं चित्स्वरूपीं करूनियां स्नान ॥ जाहला सर्ववंद्य अतिपावन ॥ हें मुक्ताचें स्नानलक्षण ॥ आतां निरीक्षण तें ऐक ॥ ८२ ॥ अवघें चराचर देखतां ॥ ×तो देखो निहीं न देखता ॥ ⁸दृष्टि दृश्यासी अलिप्तता ॥ दृश्य देखतां हरी दिसे ॥ ८३ ॥ ✻दृश्य दुमदुमित दिसे सृष्टी ॥ परी दृश्य न पडे त्याचे दृष्टीं ॥ होतांही दृश्येंसी भेटी ॥ पडे मिठी अदृश्यीं ॥ ८४ ॥ दृष्टि प्रकाशें देखणेपणीं ॥ तें देखणें देखे दृश्यस्थानीं ॥ जेवीं डोळ्यां डोळा दर्पणीं ॥ निजदर्शनीं देखत ॥ ८५ ॥ डोळेनि दर्पण प्रकाशे ॥ त्यामाजीं डोळेनि डोळा दिसे। मुक्ताचें देखणें तैसें ॥ आपणाऐसें जग देखे ॥ ८६ ॥ दृश्य द्रष्टा दर्शनीं ॥ त्रिपुटी गेली हार पोनी ॥ देखणें देखे देखणेनी ॥ देखणा होऊनी सर्वांगें ॥ ८७ ॥ होतां नानापदार्थेंसी भेटी॥ तें देखणेपणें दृश्य लोटी ॥ ¹दृश्यातीत निजदृष्टीं ॥ सुखें सृष्टी देखत ॥ ८८ ॥ मुक्तांची ✻देखती स्थिती ॥ देखणेपणें यथानिगुती ॥ उद्धवा ये दृष्टीची जयासी ²प्राप्ती ॥ तोचि त्रिजगतीं पावन ॥ ८९ ॥ यादृष्टीं जे नित्य वर्तत ॥ ते जाण पां परममुक्त ॥ यादृष्टीं जे मज पाहत ॥ ते परमभागवत प्रिय माझे ॥ २९० ॥ परादिवाचामाजीं वचन ॥ उपजे तेथें याचें श्रवण ॥ श्रो ता वक्ता कथाकथन ॥ अवघें आपण होऊनि ⁴ऐके ॥९१॥ शब्दजातेंसी कान ॥ अखंड जडले सावधान ॥ श्रवणामाजीं हारपे गगन ॥ परम समाधान श्रवणाचें ॥ ९२ ॥ ऐकतां लौकिक शब्द ॥ कां नारायण उपनिषद ॥ परिसतां नाम हरिगोविंद ॥ अर्थावबोध समलें ॥ ९३ ॥ बोलातें जो बोलविता ॥ तोचि श्रवणामाजीं श्रोता ॥ येणें अन्वयें श्रवण करितां ॥ शब्दीं निःशब्दता अतिगोड ॥९४॥ जो जो श्रवणीं पडे शब्द ॥ ⁷तो तो होतजाय निःशब्द ॥ याप रीं श्रवणीं परमानंद ॥ स्वानंदबोध मुक्ताचा ॥९५॥ अकारादिवर्णत्रिपुटी॥ प्रणव मूळ शब्द सृष्टी ॥ तो ओंकार ब्रह्मरूपें उठी ॥ हे श्रवणसंतुष्टी मुक्ताची ॥ ९६ ॥ श्रवणीं पडतां शब्दजा

---

१ बुडी मारणें. २ पृथ्वी. ३ आरशांत. ४ शब्दसमूहास.

+ना. स्वरूपीं. ✻ना. न हलतां. ×मो. तो देखे निजस्वरूप तत्वतां. ⁸ना. दृष्टीसी दृश्याचें अलिप्तता. ✻ ना. दृश्य. ¹ ना. दृश्यातीतता. ✻ ना. देखणी. ² ना. प्रीति. 4 ना. एक ⁷ मो. तो तो होय भजनबोधु.

॥ *सहजें शाब्दिक जाय उडोन ॥ श्रवणीं ठसावें ब्रह्म पूर्ण ॥ स्वानंदश्रवण मुक्ताचें ॥९७॥
रिसतां उपनिषद ॥ कां लौकिकादि नानाशब्द ॥ मुक्ताचा पालटेना बोध ॥ श्रवणीं स्वानंद
दला ॥९८॥ एक अद्वितीयं ब्रह्म ॥ हें वेदशास्त्रांचें गुह्य वर्म ॥ तें +मुक्तासि जाहलें सुगम ॥
र्दी परब्रह्म कोंदलें ॥ ९९ ॥ लौकिक वैदिक शब्द जाण ॥ शब्दमात्रीं ब्रह्म पूर्ण ॥ ऐसें मु-
ाचें हें श्रवण ॥ घ्राणलक्षण तें परियेसी ॥ २०० ॥ घ्राणासि येतां सुगंधू ॥ मुक्तासि नोहे वि-
बोध ॥ गंधमिषें स्वानंदकंद ॥ परमानंद उल्हासे ॥१॥ यापरी घ्राण, सुमन, चंदन ॥ अत्र-
सो होय आपण ॥ यापरी गंध भोगी जाण ॥ भोक्तेपण सांडोनी ॥ २ ॥ घ्राणा येतांचि सु-
॥ सुवासीं प्रकटे परेश ॥ तेव्हां सुवास आणि दुर्वास ॥ हा विपर्यविलास स्फुरेना ॥ ३ ॥
यानिळसंगें जाण ॥ जेथें जेथें गंधाचें गमन ॥ तेथें तेथें मुक्ताचें घ्राण ॥ अगम्यपण या
ोगा ॥ ४ ॥ जितका चळता वायु जाण ॥ तितुकाही मुक्ताचा प्राण ॥ यापरी गंधग्रहण ॥
भावें जाण होतसे ॥ ५ ॥ यापरी घ्राण तत्त्वतां ॥ होय तो गंधाचा भोक्ता ॥ हे घ्राणक्रिया
ण मुक्ता ॥ रसभोग्यता अवधारीं ॥ ६ ॥ रस रसना भोजन ॥ तो स्वयेंचि आहे आपण॥
न माखितां सर्वापोशन ॥ रसनेविण सेवित ॥ ७ ॥ षड्रसांचा स्वाद जाणे ॥ परी एकी-
चवी अवघें स्वाणें ॥ भोक्तेपणा आतळोंनेणे ॥ ऐसेनि भोजनें नित्यतृप्त ॥ ८ ॥ भूक उप-
ोंचि नेणे ॥ जेवूं बैसल्या पुरे न म्हणे ॥ सर्वभक्षी [2]नचाखतेपणें॥उच्छिष्ट होणें त्या नाहीं ॥९॥
अन्न आणि आपण ॥ तो न देखे भिन्नपण ॥ रसमिसें स्वानंद पूर्ण ॥ सर्वांगें जाण से-
ित ॥ २१० ॥ जंव रसना घेवों जाय रसस्वाद ॥ तंव तेथें प्रकटे परमानंद ॥ करूनि [6]रस-
नेचा उच्छेद ॥ निजानंद सेवित ॥ ११ ॥ ×सकळ गोडियांची मूळगोडी ॥ तेथ बैसली नि-
आवडी ॥ सेवितां नानापरवडी ॥ तेंचि गोडी गोडपणें ॥ १२ ॥ [0]सकळ गोडियां जें गोड
हे ॥ ते गोडीच तो जाहला स्वयें ॥ आतां जो जो [5]रसविषयो खाये ॥ तेथ तेथ आहे ते
ी ॥१३॥ कैसा मुक्ताचा निजबोधू ॥ घेवों जातां सर्वस्वादू ॥ रसत्व लोपूनि स्वानंदकंदू ॥
मानंद ओसंडे ॥ १४ ॥ यालागीं जो जो रस सेवूं जाये ॥ तो तो ब्रह्मरसचि होये ॥ मुक्ताची
ना यापरी पाहे ॥ घेत आहे रसातें ॥ १५ ॥ एवं मुक्ताचें जें भोजन ॥ ते करिती क्रिया
ी जाण ॥ आतां तयाचें जें स्पर्शन ॥ तेंही लक्षण परियेसीं ॥ १६ ॥ मुक्तासि लागतांचि
ण ॥ शीत सांडी शीतपण ॥ स्पर्शे उष्णत्व मुकलें उष्ण ॥ स्पर्शलक्षण हें त्याचें ॥ १७ ॥
ीं कां टेंकितां अग्नीशी ॥[1]घुरें आणि चंदनाशी॥जाळूनि त्याच्या विकारासी ॥ आपणापरीं
वन्ही ॥ १८ ॥ तेवीं मुक्तासि [3]द्वंद्वें आदळतां ॥ द्वंद्वाची बुडाली द्वंद्वता ॥ तो सर्वीं सर्व-
असतां ॥ सहजें द्वंद्वता निमाली ॥ १९ ॥ तेथ कैचें मृदु कैचें कठिण ॥ कैचें शीत कैचें
॥ सर्वीं सर्वात्मा तो जाण ॥ द्वंद्वाचें भान स्पर्शेना ॥ २२० ॥ आगीसि पोळीना उन्हा-
॥ हींव पीडीना हिमाचळा ॥ तैशी द्वंद्वाची हे माळा ॥ मुक्ताचे गळां पडेना ॥ २१ ॥
र्णाचे अलंकार भले ॥ सुवर्णपेटीमाजीं झांकिले ॥ झांकिले म्हणतां उघडे ठेले ॥ तेवीं
सकळें परब्रह्म ॥ २२ ॥ त्यासि अंगीं जें जें आदळे ॥ तें अंगचि होय तत्काळें ॥ कांहीं

१ एक दुर्गंधवृक्षाचें नांव. २ अग्नि. ३ सुखदुःखादि.

* मो. निःशब्देंसि शब्द जाय उडोन. + ना. मुक्तामाजीं. 2 ना. नचाखतेपणें. 6 मो. रस-
चा. × ना. सकळ गोडीमूळ निजगोडी. 0 ना. सकळ". 5 मो. विषय विषें लाभे

नुरे त्यावेगळें ॥ द्वंद्वें सकळें निमालीं ॥ २३ ॥ हातीं लीलाकमळ सांपडे ॥ तंव कमळीं कम ळत्वचि उडे ॥ कमळजन्मा तोही बुडे ॥ करी रोकडें निजरूप ॥२४॥ स्पर्शें स्पर्शातें स्पर्शावें हेंही त्रिपुटी न संभवे ॥ किंबहुना आपणचि आघवें ॥ *निजस्वभावें होऊनि ठेला ॥ २५ ॥ देवपूजा हातीं धरी ॥ तंव मीची देवपूजेभीतरीं ॥ अथवा खेळों रिघाल्या पाथरीं, ॥ त्याही माझारीं मी त्यासी॥२६॥भिंती नानावर्ण चित्राकृती॥तेथें जेंजें स्पर्शे तेंतें भिंती॥ तेवीं मुक्ता स्पर्शनस्थिती ॥ पूर्ण अद्वैतीं निजबोधू ॥२७॥ यापरी गा तत्त्वतां ॥ स्पर्शलक्षण वर्ते मुक्तां त्याचें बोलणें जें सर्वथा ॥ ऐक आतां सांगेन ॥ २८ ॥ सुरस कथा सांगे वाडेंकोडें ॥ अथ लौकिक बोलणें घडे ॥ परी त्याची समाधिमुद्रा न खंडे ॥ मौन न मोडे बोलतां ॥ २९ ॥ ब लतांही न मोडे मौन ॥ हेंचि अनुभवाची आंतुली खूण ॥ शब्दामाजीं निःशब्दगुण ॥ सज्ञा जाण जाणती ॥ ३३० ॥ स्त्रीपुरुषें अबोला चालती ॥ तो अबोला कीं अतिप्रीती ॥ तेवीं क्ताची बोलती स्थिती ॥ शब्द शब्दार्थीं निःशब्द ॥ ३१ ॥ जयाचीं बोलतीं अक्षरें ॥ अक्षर पेंचि साचारें ॥ त्याचीं ऐकतां उत्तरें ॥ चमत्कारें मन निवे ॥ ३२ ॥ मी एक चतुर बोलका हाही नाहीं आवांका ॥ अथवा रंजवावें लोकां ॥ हेंही देखा स्मरेना ॥ ३३ ॥ निःशब्दीं उठ शब्द ॥ शब्दामाजीं ते निःशब्द ॥ यापरी करितांही अनुवाद ॥ बोलोनि शुद्ध अबोलणा ॥३४ जळामाजीं उपजे तरंग ॥ जळ तरंगाचें निजांग ॥ तेवीं निःशब्दीं शब्द सांग ॥ शब्दाचें सव निःशब्द ॥ ३५ ॥ वाच्य वाचा वाचकता त्रिपुटी ॥ ×लोपूनि सांगे गोड गोठी ॥ करितां राट चावटी ॥ न सुटे मिठी मौनाची ॥३६॥ स्यां सत्यचि बोलावें ॥ हेंही त्यासी जीवें नाठवे +मिथ्या बोलों लोभस्वभावें ॥ हेंही न संभवे मुक्ताशी ॥ ३७ ॥ सत्य मिथ्या जीं बोलणीं निःशेष प्राशूनि नेलीं दोनी ॥ मुळींच्या मौनें जाहला मौनी ॥ नानावचनीं बोलतां ॥ ३८ तेथें सैराट हाक देतां ॥ कां सिंहनादें गर्जतां ॥ शब्दीं ठसावली निःशब्दता ॥ मौन सर्वथा डेना ॥ ३९ ॥ जरी तो माझें स्तवन करी ॥ तरी मी त्याच्या स्तवनामाझारीं ॥ तो जरी बडबड करी ॥ त्याहीमाझारीं मी त्यासी ॥ ३४० ॥ जरी त्यासी येऊनि भांडण पडे ॥ त भांडणही करणें घडे ॥ त्या कलहामाजीं मागें पुढें ॥ चहूंकडे मज देखे ॥ ४१ ॥ त्याचे वां तिकडे ※बोल ॥ तें जाण ब्रह्मचि केवळ ॥ तया आह्मा अभिन्न मेळ ॥ निजात्मस वस्तीशी ॥ ४२ ॥ अवचटें ये त्याच्या मुखाबाहेरी ॥ ज्यासी ह्मणे 'तुज देवो तारी' त्यासी वाउनि मी शिरीं ॥ ब्रह्मसाक्षात्कारीं पाववीं ॥ ४३ ॥ यालागीं त्याच्या वच आधीन ॥ मी सर्वथा असें जाण ॥ त्याचें वचन तें प्रमाण ॥ सर्वस्वें जाण मी मा ॥ ४४ ॥ आतां तो मी हे ऐसी बोली ॥ बाहेर सर्वेंडी वाढिन्नली ॥ ०मी तोचि तो हे किल्लीं मागीं चोजविली मद्भक्तां ॥ ४५ ॥ यालागीं तो माझा जीवप्राण ॥ मी त्याचें निजजीवन तयासी मज भिन्नपण ॥ कल्पांतीं जाण असेना ॥ ४६ ॥ एवं तो सगळा मजभीतरीं ॥ तया आंत बाहेरी ॥ ऐसेनि अभिन्नपणें करीं ॥ सुखें संसारीं नांदतू ॥ ४७ ॥ त्याचे मुखीं जेजे बोल ॥ ते मीचि बोलता सकळ ॥ मुक्ताचें बोलणें केवळ ॥ तुजप्रती विवळें स्यां ॥ ४८ ॥ हातीं कांहीं घेवों जाये ॥ तंव तो घेणें देवोचि होये ॥ देतां कांहीं देवो पाहे ॥ तें

१ ब्रह्मदेव. २ दृगडांनीं. ३ रमतावें. ४ वाहुन. ५ शेवट. ६ किल्ली. ७ आणविली. ८ स्पष्ट.

* ना. निजानुभवें. ×ना. लपोनि. +ना. मिथ्या बोलिलों स्वभावें. ※ना. व्यंगबोल. ० मी तोचि तो वल्लीं.

हाय तद्रूप ॥ ४९ ॥ तेव्हां दान आणि देते घेते ॥ भिन्नपणें न देखे तेथें ॥ यालागीं करोनियां अकर्ते ॥ या परी करितें बर्तवी ॥ ३५० ॥ निजस्वभावें ते कर ॥ जो कांहीं करिती व्यापार ॥ तेथें नकेलेपणाचें सूत्र ॥ सहजीं साचार ठसावे ॥ ५१ ॥ करीं पडलिया शस्त्र ॥ करूं जाणे तो व्यापार ॥ परी मी कर्ता हा अहंकार ॥ अणुमात्र असेना ॥५२॥ पुढें वोढवलें अवचितें ॥ सारी खेळों जाणे घृतकर्मातें ॥ हारी जैत नाठवे चित्तें ॥ निजस्वभावें तो खेळे ॥ ५३ ॥ वोढवल्या ब्राह्मणपूजा ॥ करूं जाणे अतिवोजा ॥ पूज्यपूज्यकत्वें भाव दुजा ॥ न मनूनि द्विजां पूजित ॥ ५४ ॥ धनुर्धरी काढूं जाणे वोढी ॥ अनुसंधानें बाण सोडी ॥ अलक्ष लक्षूनि भेदी निरवडी ॥ परी न धरी गोडी श्लाघ्यतेची ॥ ५५ ॥ कैसें कर्म निपजे करीं ॥ जैशा समुद्रामाजीं लहरी ॥ तैसा निजस्वरूपामाझारीं ॥ नानाव्यापारीं निश्चळ ॥ ५६ ॥ सूर्य मृगजळातें करी ॥ तैसा व्यापार निजनिर्विकारीं ॥ परी केलेपण शरीरीं ॥ तिळभरी असेना ॥ ५७ ॥ सूर्यकांतीं अग्नि खवळे ॥ तें कर्म ह्मणती सूर्यें केलें ॥ तैसें हस्तव्यापारें जें जें जाहलें नाहीं केलें त्याणें ॥ ५८ ॥ सूर्यकांतीं पडावा अग्नी ॥ हें नाहीं सूर्याचे मनीं ॥ तेवीं मुक्त निरभिमानी ॥ क्रियाकरणीं विचरत ॥ ५९ ॥ त्यासी चालूं जातां पायें ॥ तळीं पृथ्वी नाहीं होये ॥ आप आपणियावरी पाहे ॥ चालत जाये स्वानंदें ॥ ३६० ॥ जळींचा जळावरी तरंग ॥ अभिन्नपणें चाले चांग ॥ तैसा तो निजरूपीं सांग ॥ चालवी अंग चिद्रूपें ॥ ६१ ॥ तयासि असतांही चरण ॥ आवडीं चाले चरणेंविण ॥ करी सर्वांगें गमन ॥ सर्वत्र जाण आला असे ॥ ६२ ॥ जेवीं अखंडदंडायमान ॥ पायेंवीण चाले जीवन ॥ तेवीं चरणेंविण गमन ॥ नित्य सावधान मुक्ताचें ॥ ६३ ॥ सर्वथा पायेंवीण ॥ वायूचें सर्वत्र गमन ॥ तैसेंच मुक्ताचें लक्षण स्वरूपीं जाण सर्वत्र ॥ ६४ ॥ यापरी न हालतां जाण ॥ त्याचें सर्वत्र गमन ॥ नाठवे चालतेपण ॥ ऐसेंच चळण मुक्ताचें ॥६५॥ मुळीं आत्मा आत्मी नाहीं जाणा ॥ यालागीं स्त्रीपुरुषभावना ॥ त्यासि सर्वथा आठवेना ॥ दैवें अंगनां तो भोगी ॥६६॥ नट *नाटक अवगला ॥ पुरुष स्त्रीवेषें दिसे आला ॥ स्त्रीपुरुषभाव संपादिला ॥ तेवीं हा जाहला गृहस्थ ॥ ६७ ॥ कर्धनारीनटेश्वरीं ॥ जो पुरुष तोचि नारी ॥ मुक्तासी जाण तैशापरी ॥ स्त्रीपुरुषाकारीं निजबोधू ॥ ६८ ॥ जेवीं कां आपुली साउली ॥ आवडी आपण आलिंगिली ॥ तेवीं मुक्तें स्त्री भोगिली ॥ द्वैताची भुली सांडोनी ॥ ६९ ॥ छाया कोठें असे कोठें वसे ॥ सरशी असतां त्याची तो न पुसे ॥ मुक्तासि जाण तैसें ॥ लोलुप्य नसे स्त्रियेचें ॥ ३७० ॥ एवं स्त्रीपुरुषविकारप्राप्ती ॥ त्याची न मोडे आत्मस्थिती ॥ दैवें जाहलिया संतती ॥ आत्मप्रतीती तेथेंही ॥ ७१ ॥ आत्मा वै पुत्रनामासी ॥ सत्यत्व आलें ये श्रुतीशीं ॥ पुत्रत्वें देखे आपणासी ॥ निजरूपेंसी सर्वदा ॥ ७२ ॥ स्वयें जनक स्वयें जननी ॥ स्वयें क्रीडे पुत्रपणीं ॥ आपणावांचूनि जनीं वनीं ॥ आणिक कोणी देखेना ॥ ७३ ॥ एवं स्त्रीपुत्रसंतती ॥ जेवीं आकाशीं मेघपंक्ती ॥ काळें येती काळें जाती ॥ तैशी स्थिती मुक्ताची ॥ ७४ ॥ स्त्रीसंभोगीं जें होय सुख ॥ तें सुख मुक्तासि सर्वदा देख ॥ यालागीं स्त्रीकाम अभिलाख ॥ नाहीं निःशेख मुक्तासी ॥ ७५ ॥ जैसें राजहंसापाशीं शेण ॥ तैसें मुक्तांपाशीं जाण धन ॥ त्यावरी त्याचें नाहीं मन उदासीन

---

१ हातांस. २ प्राप्त झालें. ३ जुवा. ४ निश्चयेंकरून ५ पाणी. ६ स्त्री. ७ आसक्ति.

* मो. नाट्य.

सर्वदा ॥ ७६ ॥ व्याघ्रासि वाढिलें मिष्टान्न ॥ तें त्यासि जैसें नावडे जाण ॥ तैसें मुक्तासि नावडे धन ॥ धनलोभीपण त्या नाहीं ॥ ७७ ॥ *पाहतां कापूर पडला ॥ जेवीं नातळे काउळा ॥ तेवीं अनर्घ्य रत्नमाळा ॥ मुक्तें सांडिल्या थुंकोनी ॥ ७८ ॥ ज्यासि धनलोभाची आस्था ॥ त्यासि कल्पांतीं न घडे मुक्तता ॥ तैसें ×स्त्रीकामिया सर्वथा ॥ नव्हे परमार्थत निजबोधू ॥७९॥ मुक्ताचिये निद्रेपाशीं ॥ समाधि ये विश्रांतीशीं॥शिणली °धांवे माहेरां जैशी। तशी विसाव्यासी येतसे ॥ ३८० ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तींसी ॥ नातळोनि तीहीं अवस्थांसी। निजीं निजे निजत्वेंसी ॥ अहर्निशीं निजरूपें ॥ ८१ ॥ निजीं निजों जातां निर्धारा ॥ तळ हरपली धरा ॥ वरी ठावो नाहीं अंबरा ॥ ऐशिया सेजारामाजीं निजे ॥ ८२ ॥ नव ×निजत्याची वोज ॥ चालतां बोलतां न मोडे निज ॥ खातां जेवितां अखंडनिज ॥ सहज सहज निजरूप ॥ ८३ ॥ निजविते ना उठविते ॥ दोनी तोचि आहे तेथें ॥ कोण कोण जागवितें ॥ +निजे सुचित्तें निजरूपीं ॥ ८४ ॥ जागल्या निजेशीं वागे ॥ वागतांही नी लागे ॥ एवं निजरूप जाहला अंगें ॥ निद्रेचेनि पांगें पांगेना ॥ ८५ ॥ शय्या शयन सेजार। अवघें तोचि आहे साचार ॥ आपुल्या निजाचें आपण घर ॥ नित्य निरंतर निजीं नि ॥ ८६ ॥ ऐसें जें जें करूं जाय कर्म ॥ तेथ तेथ प्रकटे परब्रह्म ॥ मुक्तासि एकही नाहीं नेम। हें मुख्य वर्म मुक्ताचें ॥ ८७ ॥ मुक्तासि नेमबंधन ॥ तें अंगीं लागलें साधन ॥ साधन असत मुक्तपण ॥ न घडे जाण सर्वथा ॥ ८८ ॥ मुक्तासि तंव आसक्ती ॥ सर्वथा नाहीं सर्वार्थीं ॥ शे प्रारब्धाचे स्थितीं ॥ कर्में निपजती निरपेक्ष ॥ ८९ ॥ ज्याचा निमाला अहंकारू ॥ तो मा स्वरूप साचारू ॥ ये अर्थी नलगे विचारू ॥ वेदशास्त्रसंमत ॥ ३९० ॥ जो नित्ययुक्त निर्वि कारी ॥ तो वर्ततां वर्ते मजमाझारीं ॥ मी तया आंत बाहेरीं ॥ जेवीं सागरीं कल्लोळ ॥ ९१॥ यापरी झाला जो परब्रह्म ॥ त्यासि स्वप्नप्राय धर्माधर्म ॥ बाधूं न शके इंद्रियकर्म ॥ हें त्याचें वर्म तो जाणे ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ ॥ न तथा बध्यते विद्वांस्तत्र तत्रादयन् गुणान् ॥ प्रकृतिस्थोऽप्यसंसक्तो यथा खं सवितानिलः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ 3जिहीं इंद्रियीं कर्में करितां ॥ मूर्खासि जाहली दृढबद्धता॥तिहीं इंद्रियीं वर्ततां ज्ञाता। नित्यमुक्तता अनिवार ॥ ९३ ॥ मूर्खासि कर्मी अभिमान ॥ ज्ञाता सर्वकर्मी निरभिमान। बंधमोक्षाचें कारण ॥ अहंकार जाण जीवासी ॥ ९४ ॥ 'अहं कर्ता अहं भोक्ता ॥ हेचि मूर्खाची दृढबद्धता ॥ तें प्रकृतिकर्म आपुले माथां ॥ नेघे ज्ञाता अभिमानें ' ॥ ९५ ॥ तेचि ज्ञात्याची निरभिमानता ॥ तुज म्यां सांगीतली आतां ॥ 7इंद्रियां विषयो भोगितां ॥ आपुली 6अभोक्तृता तो जाणे ॥ ९६ ॥ आपुली छाया विष्ठेवरी पडे ॥ अथवा पालखीमाजीं चढे ॥ तो भोग आपणियां न घडे ॥ तैसेंचि देह रोकडें मुक्तासी ॥९७॥ मज व्हावी विषयप्राप्ती।

---

१ दमलेली मुलगी. २ आपल्या ठिकाणीं. ३ शय्यागृहांत. ४ स्वस्थमनानें. ५ परतंत्र होत नाहीं ६ अलिप्तता.

*ना. पोतास कापुराचा खडा मो. पोतासु कापुराचा डला. ×मो. स्त्रीकाम्यासीही ना स्त्रीकामासी. °ना. कन्या. × ना. निजती त्याची मो. निजण्याची. + मो. निजसुखें निजरूपीं 3 मो जेहीं इंद्रिय कर्माकरितां. 7 मो. इंद्रियीं. 6 ना. भोक्तृत्वता मो. अभोक्तता.

हेंही ज्ञाते न वांछिती ॥ विषय मिथ्यात्वें देखती ॥ जेवीं कां संपत्ती चित्रींची ॥९८॥ यालागीं असोनियां देहीं ॥ *तो नित्यमुक्त विदेही ॥ त्यासी प्रकृतिगुणाच्या ठायीं ॥ अभिमान नाहीं सर्वथा ॥ ९९ ॥ म्हणसी असोनिया देहीं ॥ कवण्या हेतु तो विदेही ॥ उद्धवा ऐसें कल्पिशी कांहीं ॥ +तो दृष्टांत पाही सांगेन ॥ ४०० ॥ आकाश सर्वांभाजीं असे ॥ सर्वपदार्थीं लागलें दिसे ॥ परी एकेही पदार्थदोषें ॥ [4]मलिन कैसें हो नेणे ॥१॥ त्या गगनाचे परी पाहीं ॥ ज्ञाता असोनियां देहीं ॥ देहकर्मांच्याठायीं ॥ अलिप्त पाहीं सर्वदा ॥ २ ॥ प्रचंड आणोनि पाषाणीं ॥ आकाश नचेंपे चेंपणीं ॥ तेवीं क्षोभलियाही प्रकृतिगुणीं ॥ ज्ञाता जडपणीं न *बांधवे ॥ ३ ॥ आकाश असोनि या जनीं ॥ कदा रुळेना जनघसणीं ॥ तैसा प्रकृतिकर्मीं वर्तोनी ॥ प्रकृतिगुणीं अलिप्त ॥ ४ ॥ गगन जळीं बुडालें दिसे ॥ परी तें जळामाजीं कोरडें असे ॥ तेवीं पुत्रकलत्रीं ज्ञाता वसे ॥ तेणें दोषें अलिप्त ॥ ५ ॥ आकाशा मसी लावूं जातां ॥ मसीं माखे तो लाविता ॥ तेवीं मुक्तासि दोषी म्हणतां ॥ दोष सर्वथा म्हणत्यासी ॥६॥ शीत उष्ण पर्जन्यधारा ॥ अंगीं न लागती अंबरा ॥ तेवीं नानाद्वंद्वसंभारा ॥ मुक्ताचा उभारा निर्द्वंद्व ॥ ७ ॥ येऊनि नाना ×मेघपडळें ॥ गडगर्जना गगन झांकोळे ॥ त्यामाजीं असोनिया वेगळें ॥ गगन नातळे मेघातें ॥ ८ ॥ तेवीं मोहममतेच्या कडाडी ॥ मुक्तासि करिती ताडातोडी ॥ ते तेथ त्यास नलगे वोढी ॥ ०परापरथडी अलिप्त ॥ ९ ॥ गगनासि आगी लावूं जातां ॥ अग्नि विझोनि जाय सर्वथा ॥ तेवीं त्रिगुणीं मुक्तासि [3]बद्धता ॥ [0]गुणीं सगुणता निमाली ॥४१०॥ प्रळयवायूचेनि झडाडें ॥ आकाश निजस्वभावें नुडे ॥ सगळा वायू गगनीं बुडे ॥ पाहतां नातुडे [5]गगनाही ॥ ११ ॥ तेवीं अविद्या निजस्वभावतां ॥ मुक्तासि न करवे बद्धता ॥ अविद्या नांवें मिथ्या वार्ता ॥ [6]मुक्त तत्त्वतां देखेना ॥१२ ॥ गगनाच्या ऐशी अलिप्तता ॥ सर्वकर्मीं वर्ते ज्ञाता ॥ जनीं अलिप्त वर्ते सविता ॥ तेवीं मुक्तता अवधारीं ॥ १३ ॥ घृत, मद्य, जळां आंतौता ॥ बिंबोनि अलिप्त सविता ॥ तेवीं बाल्य तारुण्य वृद्धता ॥ [7]वयसा चाळिता अलिप्त ॥ १४ ॥ नातरी सूर्याचेनि प्रकाशें ॥ शुभाशुभ कर्म [2]वाढलें असे ॥ [3]सविता अलिप्त तेणें दोषें ॥ निजप्रकाशें प्रकाशक ॥ १५ ॥ तेवीं आश्रमधर्मीं असतां ॥ [8]नित्यादिकर्में आचरितां ॥ मुक्तासि नाहीं कर्मबद्धता ॥ अकर्तात्मता निजबोधें ॥१६॥ सूर्यकांतीं सविता ॥ अग्नि उपजवूनि अकर्ता ॥ तैसा [9]निजतत्त्वाचा ज्ञाता ॥ करूनि अकर्ता कर्मांचा ॥ १७ ॥ जळीं सविता प्रतिबिंबला ॥ परी तो नाहीं वोला झाला ॥ तैसा स्त्रीसंगें प्रजा व्याला ॥ नाहीं मुकला ब्रह्मचर्या ॥१८॥ सवित्याचें अलिप्तपण ॥ तें निरूपिलें निरूपण ॥ आतां देहीं असोनि [7]अलिप्तपण ॥ तेंही लक्षण अवधारीं ॥ १९ ॥ जेवीं देहामाजीं असे प्राण ॥ प्राणास्तव देहचलन ॥ परी देहदोषा नातळे प्राण ॥ अलिप्त जाण सुखदुःखा ॥४२०॥ तैसा मुक्त असोनि संसारीं ॥ [1]संसारव्यवहार सर्व करी ॥ परी संसारदोष अंगावरी ॥

१ मळेना. २ जनस्पर्शानें. ३ काजळ. ४ स्थिती, स्थिरता. ५ धडाक्यानें. ६ उडत नाहीं. ७ वयोवस्था बदलताही.

*मो. कर्म करितांही पाही. +मो. तें दृष्टांतें पाही सांगेन. 4ना. मिळणी. *मो. नबंधे. ×मो. मेघपटलें. ०ना. परात्पर. 3मो. वर्तता. 0मो. गुण. 5मो. गगनही. 6ना. मुख. 2मो. होतसे. 3मो. परी सविता. 8मो. नित्यनैमित्यादि. 9ना. निजात्मता. 7 ना. आलिप्तप्राण. 1मो. संसारकर्म.

तिळभरी लागेना ॥२१॥ वायू सर्वांतें स्पर्शत ॥ परी स्पर्शदोषासि अलिप्त ॥ तेवीं अहंममता नातळत ॥ मुक्त वर्तत देहगेहीं ॥ २२ ॥ वायूसि जेवीं सर्वत्र गमन ॥ परी कोठें आसक्त नव्हे जाण ॥ तेवीं विषयीं नहोनि आपण ॥ विषयसेवन मुक्तांचें ॥२३॥ 'वायूसि एकेठायीं नाहीं वस्ती ॥ मुक्तासि देहगेहीं नाहीं आसक्ती ॥ वायूसि नभामाजी विश्रांती ॥मुक्तांसि गुणातीतीं विश्राम ॥ २४ ॥ एवढें जें अगाधपण ॥ तें मुक्ताचें मुक्तिकारण ॥ उद्धवासि ह्मणे श्रीकृष्ण ॥ प्रथम जाण विवेकू ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ वैशारद्येक्षयाऽसंगशितया छिन्नसंशयः ॥ प्रतिबुद्ध इव स्वप्नान्नाना-त्वाद्विनिवर्तते ॥ १३ ॥

॥ टीका ॥ विवेकें बुद्धि अतिसंपन्न ॥ तिसी उपजे नित्यानित्यज्ञान ॥ परी तें खिरगटलें असे जाण ॥ वैराग्येंवीण वाढेना ॥ २६ ॥ विवेकेंवीण वैराग्य गहन ॥ तें केवळ आंधळें जाण ॥ नेणे आपुलें निजात्मपतन ॥ अंधकूपीं जाण तें पडे ॥ २७ ॥ मातलें हतिरें अंध ॥ सैरा धांवे सुबद्ध ॥ नेणे निजात्मपतनबाध ॥ तेवीं वैराग्य मंद विवेकेंवीण ॥ २८ ॥ जेथें विवेकवैराग्य संयोग ॥ तेथें नित्य संग्रह *अनित्यत्याग ॥ तेंचि सद्विद्यालक्षण खड्ग ॥ झळकत चांग नेराश्यें ॥ २९ ॥ तेंचि गुरुवचन साहाणेसी ॥ लावूनि अतितीक्ष्ण केलें त्यासी ॥ घायें छेदिलें संशयासी ॥ संकल्पविकल्पेंसी समूळ ॥५३०॥ असंभावना विपरीतभावना ॥ ×निःशेष तुटलिया वासना ॥ निजस्वरूपीं तेव्हां आपणा ॥ जागेपणा तो आला ॥ ३१ ॥ जो अविद्यालक्षण दीर्घ स्वप्न ॥ नानात्वें भोगितां आपण ॥ तो अद्वैतीं जागा झाला जाण ॥ कृपा थापटून गुरुवचनें ॥३२॥ तेव्हां नानात्वासी नाहीं ठावो ॥ 'मी माझें झालें वावो ॥ फिटला अविद्याभेदसंदेहो ॥ आत्मानुभवो तो भोगी ॥३३॥ जागा झाल्या स्वप्न भासे ॥ परी तें मिथ्या झालें अनायासें ॥ मुक्तासि +जग तैसें दिसे ॥ यालागीं तेणें दोषें अलिप्त ॥३४॥ एवं मुक्ताचें जें वर्तन ॥ तें अलिप्तपणें ऐसें जाण ॥ कथं वर्तेत हा प्रश्न ॥ प्रसंगें लक्षण सांगीतलें ॥ ३५ ॥ कथं विहरेत् या प्रश्नाचें ॥ उत्तर ऐकावया साचें ॥ उदित मन उद्धवाचें ॥ जाणोनि जीवींचें हरि बोले ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ यस्य स्युर्वीतसंकल्पाः प्राणेंद्रियमनोधियाम् ॥ वृत्तयः स विनिर्मुक्तो देहस्थोऽपि हि तद्गुणैः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ विद्यमानदेहीं असतां ॥ देहस्थ गुण नातळती मुक्ता ॥ पापपुण्यादि हे कथा ॥ सुख-दुःखवार्ता तो नेणे ॥ ३७ ॥ [2]सांडिल्या संकल्पविकल्पांसी ॥ कल्पांतींही नातळे त्यांसी ॥ जेवीं कां ओकिल्या ओकासी ॥ परतोनि कोणासी न घेववे ॥ ३८ ॥ यालागीं मन बुद्धि इंद्रियें प्राण ॥ मुक्ताचीं झालीं संकल्पशून्य ॥ यालागीं पापपुण्य ॥ नलगे जाण मुक्तासी ॥३९॥ इंद्रियें विषयक्रीडन ॥ करितां [3]संकल्पशून्य ॥ मुक्तासि मनपणें नाहीं मन ॥ वृत्तिशून्य

१ आकाशांत. २ निर्गुणब्रह्मांत. ३ खुरटलें. ४ हत्ती. ५ सत्याविषयीं संशय. ६ देहात्मबुद्धि. ७उन्मुक्त. ८ असलेल्या शरीरांत.

* ना. नित्य त्याग. × मो. या निःशेष. + ना. जन. [2] ना. मो. सोडिल्या. [3] मो. संकल्पशून्य मन.

यालागीं ॥४४०॥ बाळक लेणयां प्रमाण नेणे ॥ तरी अंगीं शोभे लेइलें लेणें ॥ तेवीं कर्मे विगुंतलीं करणें ॥ मुक्त अकर्तेपणें अलिप्त ॥ ४१ ॥ संकल्पविरहित विहार ॥ तोचि मुक्त जाण पां साचार ॥ कथं विरहति हें उत्तर ॥ थोडेनिर्फकार सांगीतलें ॥ ४२ ॥ स्यां सांगीतलीं जीं जीं लक्षणें ॥ तीं तीं मुक्ताचीं मुक्तच जाणे ॥ आणिकासी व्युत्पत्तिपणें ॥ मुक्त जाणणें हें न घडे ॥ ४३ ॥ सकळ वेदशास्त्रसंपन्न ॥ त्यासिही मुक्त नकळे जाण ॥ देहीं असे ज्यासि देहाभिमान ॥ त्यासि मुक्तलक्षण कळेना ॥ ४४ ॥ स्यां बोलिले लक्षणांची पोथी ॥ साक्षेपें घेऊनि हातीं ॥ जरी हिंडिनला त्रिजगतीं ॥ तरी मुक्ताची स्थिती कळेना ॥ ४५ ॥ जेणें साचार मुक्त जाणीतला ॥ तोही सत्य जाण मुक्त झाला ॥ अनुमानयोग्यतेच्या बोला ॥ मुक्त जाणवला हें मिथ्या ॥ ४६ ॥ जेणें सूर्य देखिला यथार्थता ॥ तो जग देखे तत्प्रकाशता॥ जेणें मुक्त जाणीतला तत्त्वतां ॥ तो नित्यमुक्तता जग देखे ॥ ४७ ॥ तेथ हा मुक्त हा बद्ध ॥ देखणें हें अतिअबद्ध ॥ ऐसें देखती ते महामंद ॥ ज्ञानांध अज्ञानी ॥ ४८ ॥ मुक्त नकळे सर्वथा ॥ ऐसें बोलणें ऐकतां ॥ उद्धवासि हों लागली चिंता ॥ तें कृष्णनाथा कळों सरलें ॥ ४९ ॥ मागां सांगितलीं मुक्तलक्षणें ॥ तें मुक्ताचीं मुक्तचि जाणे ॥ लौकिकीं मुक्त कळे जेणें ॥ तींही लक्षणें परियेसीं ॥ ४५० ॥ आश्वासावया उद्धवाचें मन ॥ मुक्ताचें *जाणतें लक्षण ॥ सांगेन ह्मणे श्रीकृष्ण ॥ येरू सावधान सर्वस्वें ॥ ५१ ॥ कळतीं मुक्तांचीं लक्षणें ॥ उद्धव ऐकावया उदित मनें ॥ तें जाणोनियां श्रीकृष्णें ॥ विचित्रनिरूपण निरूपी ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ यस्याऽऽत्मा हिंस्यते हिंस्रैर्येन किंचिद्यदृच्छया ॥ अर्च्यते वा क्वचित्तत्र न व्यतिक्रियते बुधः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ ज्याचिया देहासि जाण ॥ +हिंसा करिती हिंसक जन ॥ छेद भेद दंडण मुंडणें ॥ गर्जन तर्जन जरी केलें ॥ ५३ ॥ तरी ते देहाची व्यथा ॥ मुक्तासि नाहीं सर्वथा ॥ नानाउपचारीं पूजितां ॥ नेघे श्लाघ्यता सन्मानें ॥५४॥ देहीं वर्तमान असतां ॥ देहबुद्धि नाहीं सर्वथा॥ त्यासीच बोलिजे जीवन्मुक्तता ॥ यालागीं देहव्यथा त्या नाहीं ॥ ५५ ॥ जैशी पुरुषासवें छाया असे ॥ पुरुषयोगें चळतां दिसे ॥ ते छायेची अहंममता नसे ॥ निजमानसें पुरुषासी ॥ ५६ ॥ तैसाचि मुक्ताचा देहो ॥ मुक्तासवें वर्ते पहाहो ॥ परी त्यासि नाहीं अहंभावो ॥ हा नित्यस्वभावो मुक्ताचा ॥ ५७ ॥ त्यासि चोरू हेरू कैतरू ॥ ह्मणोनि दंड केला थोरू ॥ कां पूजिला ईश्वरू॥×पुरुषावतारू ह्मणोनी ॥५८॥ परी पूजितां कां गांजितां॥त्याची दंडळीना समता ॥ जेवीं छायेची मानापमानता ॥ न करी व्यथा पुरुषासी ॥ ५९ ॥ देह व्याघ्रमुखीं सांपडला ॥ 2दैवें पालखीमाजीं चढला ॥ तो हर्षविषादा नाहीं आला ॥ समत्वें झाल निर्द्वंद्व ॥४६०॥ देहो खावया नेतां सुखीं ॥ मी मरतों ऐसें न कळवळी ॥ कां गजस्कंधीं पूजिला सकळीं ॥ तेणें सुखावली वृत्ती नव्हे ॥ ६१ ॥ सुखदुःखादि नानाव्यथा ॥ आगमापायी

१ अलंकारास. २ इंद्रियें. ३ विहार करितो. ४ थोडक्यांत. ५ विद्वत्तेच्या बळावर. ६ धीर यावयास ७ सुबोध. ८ प्रकट, उघड, समजावयाजोगीं. ९ केश काडणें. १० निर्भर्त्सना. ११ हेर. १२ भितरा. १३ डळेना. १४ आनंद व खेदाला. १५ येणार जाणार ( अशाश्वत. )

*ना. जाणावें तें. +ना. मो. हिंसा करितेही सकळजन. ×ना. पुरुषपर. 2मो. अथवा दैवें.

अविश्वकता ॥ देहाचें मिथ्यात्व जाणता ।। यालागीं व्यथा पावेना ।। ६२ ।। अतिसन्मान जेथें देखे ।। तेथं न राहे तेणें सुखें ॥ अपमानाचिये आडकें ॥ देखोनि न फडके भयभीतू ॥ ६३ ॥ देहासि नानाविपत्ती होये ।। तोही त्या देहाचें कौतुक पाहे ॥ देह माझें मज व्यथा आहे ॥ हें ठावें नोहे मुक्तासी ।। ६४ ।। येथवरु देहातीतता ॥ दृढ बाणली जीवन्मुक्तता ।। यालागीं देह-दुःखाची कथा ।। त्यासी सर्वथा बाधीना ।। ६५ ॥ नानाजनपदवार्ता ॥ अतिस्तवनें स्तुति करितां ॥ कां वर्म *स्पर्शवचनीं निंदितां ।। मुक्तांसी व्यथा उपजेना ॥ ६६ ॥

॥ श्लोक ॥ न स्तुवीत न निंदेत कुर्वतः साध्वसाधु वा ॥ वदतो गुणदोषाभ्यां वर्जितः समदृङ्मुनिः ॥ १६ ॥

॥ टीका ॥ निंदेच्या [१]तिखटबाणीं ॥ दृढ विंधिल्या दुर्जनीं ॥ हे असाधू हें नुपजे मनीं ॥ न बोले वचनीं ते दोष ॥ ६७ ॥ भाविक सात्विक साधू ॥ मिळोनि करिती स्तुतिवादु ॥ तूं ईश्वरपुरुष शुद्ध ॥ हा गुणानुवादु ऐकोनी ॥ ६८ ॥ मी +मुक्त हें नुपजे मनीं ॥ उंच नीच न देखे जनीं ॥ हे साधु लोक भले गुणी ॥ हे मुक्ताची वाणी वदेना ॥ ६९ ॥ साधु असाधु पाहतां जनीं ॥ तो ब्रह्मरूप देखे दोनी ॥ देखणें 6देखतें दर्शनीं ॥ *निजात्मपणीं निजबोध ॥४७०॥ तेथ कोणाची करावी निंदा ॥ कोणाच्या करावें ०गुणानुवादा ॥ मीचि विश्व हें आलें बोधा ॥ स्तुति निंदा निमाली ॥ ७१ ॥ त्यासि आत्मसाक्षात्कारीं विश्राम ॥ नित्य निजात्म-पदीं आराम ॥ ऽसाधु असाधू हा फिटला भ्रम ॥ स्वयें आत्माराम तो झाला ॥ ७२ ॥ असाधुत्वें निदावें ज्यासी ॥ तंव आत्मस्वरूपें देखे त्यासीं ॥ साधु म्हणोनि वर्णितां गुणासीं ॥ देखे त्यासी निजरूपें ॥ ७३ ॥ उजव्या वेंचत्वें शुद्धभावो ॥ डाव्या निंद्यत्वें निजनिर्वाहो ॥ पुरुषासि देहींचा समभावो ॥ वंद्य निंद्य पाहाहो समत्वें तैसे ॥ ७४ ॥ तेथें साधु असाधु अनुवादा ॥ वर्जिली स्तुती आणि निंदा ॥ समत्वें पावला समपदा ॥ सुखस्वानंदाचेनि बोधें ॥ ७५ ॥ मुक्ताची हे ओळखण ॥ यापरी उद्धवा तूं जाण ॥ आतां आणिकही लक्षण ॥ तुज ×मी खूण सांगेन ॥ ७६ ॥ प्रकट मुक्ताचें लक्षण ॥ म्यां तुज सांगीतलें जाण ॥ तें लौकिकीं मानी कोण ॥ विकल्प गहन जनाचे ॥ ७७ ॥ प्रा[२]रब्धवशास्तव जाण ॥ एकादें अवचट दिसे चिन्ह ॥ इतुक्यासाठीं मुक्तपण ॥ मानी कोण जगामाजीं ॥ ७८ ॥ मुक्त मुक्तपदाची पदवी ॥ सर्वथा जगामाजीं लपवी ॥ जो आपुली मुक्तता मिरवी ॥ तो लोभस्वभावी दांभिक ॥ ७९ ॥ शुक वामदेव मुक्त म्हणतां ॥ सर्वांसि न म्हणवे सर्वथा ॥ मा इतराची कायसी कथा ॥ माझीही मुक्तता न मानिती ॥ ४८० ॥ म्यां गोवर्धन उचलिला ॥ दावाग्नी प्राशिला ॥ अघ, बक, विदारिला ॥ प्रत्यक्ष नाथिला काळया ॥ ८१ ॥ जों जों हा देहाडा ॥ तों तों नीत नवा पवाडा ॥ निज-सुखाचा उघडा ॥ केला रोकडा सुकाळ ॥ ८२ ॥ त्या माझें मुक्तपण ॥ न मानिती याज्ञिक ब्राह्मण ॥ इतरांची कथा कोण ॥ विकल्प दारुण लौकिकीं ॥ ८३ ॥ यालागीं मुक्ताचें मुक्तपण ॥

---

१ लगेशा दुष्टभाषणांनीं. २ दैवानें. ३ अघासुर. ४ बकासुर. ५ देह. ६ निंद्य. ७ निस्तार, स्तुति.

*ना. पारुष्यवचनें. 1 मो. तीक्ष्ण. + ना. उत्तम मो. उन्नत. 6 ना. देखते देखे तद्रूपपणीं. *ना. निजात्मदर्शनीं. ० मो. स्तुतिवादा. ऽ ना. साधु असाधुता फिटला भ्रम. ×ना. निजखूण.

मुक्तचि जाणे आपण ॥ इतरांसि नकळे तें लक्षण ॥ अतिविचक्षण जरी झाला ॥ ८४ ॥ मुक्त लौकिकीं वर्तत ॥ जड मूढ पिशाचवत ॥ तींही चिन्हें समस्त ॥ ऐक निश्चित सांगेन ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ न कुर्यान्न वदेत्किंचिन्न ध्यायेत्साध्वसाधु वा ॥ आत्मारामोऽनया वृत्त्या विचरेज्जडवन्मुनिः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ कायिक वाचिक मानसिक ॥ उद्देशें कर्म नकरी एक ॥ जें निपजे तें स्वाभाविक ॥ अहेतुक त्या नांव ॥ ८६ ॥ हेतु ठेवूनि गुणागुणीं ॥ स्तुतिनिंदेचीं बोलणीं ॥ सांडोनियां झाला मौनी ॥ परी मौनाभिमानीं हेतु नाहीं ॥ ८७ ॥ जरी तो झाला मौनाभिमानी ॥ तरी °मुक्त पडला बंधनीं ॥ यालागीं बोलणें न बोलणें दोन्ही ॥ सांडूनि मौनी तो झाला ॥८८॥ *असद्व्यावृत्तीनें जाण ॥ करावें असंतनिरसन ॥ मग सद्वस्तूचें ध्यान ॥ अखंड जाण करावें ॥ ८९ ॥ तंव पावलों सद्गुरूची खूण ॥ उडालें ध्येय ध्याता ध्यान ॥ बुडालें भेदाचें भेदभान ॥ चैतन्यघन कोंदलें ॥ ९० ॥ मेळवूनि शास्त्रसंभारा ॥ बांधला संतासंत बांधारा ॥ तो चैतन्याच्या महापूरा ॥ माजीं खरा विराला ॥९१॥ तेव्हां बुडालें संतासंतभान ॥ निबिड दाटलें चैतन्यघन ॥ मोडलें मनाचें मनपण ॥ वृत्तिशून्य अवस्था ॥ ९२ ॥ मनें ध्यावें चैतन्यघन ॥ तंव चैतन्याचि झालें मन ॥ सहजचि खुंटलें ध्यान ॥ हें +मुख्य लक्षण मुक्ताचें ॥९३॥ चैतन्यीं हरपलें चित्त ॥ यालागीं जड *मूक पिशाचवत ॥ लौकिकीं वर्ततां दिसे मुक्त ॥ जाण निश्चित उद्धवा ॥९४॥ नैष्कर्म्य ब्रह्म पावला दृढ ॥ 6अंतरीं निजबोध अतिदृढ ॥बाह्य लौकिकीं दिसे जड ॥ ×अचेतन दगड होऊनि असे ॥ ९५ ॥ उठी बैसी करी मन ॥ तें स्वरूपीं झालें लीन ॥ पडले ठायींहूनि तुटी जाण ॥ यालागीं जडपण आभासे ॥ ९५ ॥ शब्दब्रह्म गिळोनि वेगें ॥ निःशब्दवस्तु झाला अंगें ॥ निंदास्तुतीचें नांव नेघे ॥ 8मुका सर्वांगें सर्वदा ॥ ९६ ॥ ब्रह्म सर्वथा न बोलवे कोणा ॥ जरी सांगे तरी दाववी खुणा ॥ यालागीं मुका ह्मणती जाणा ॥ अबोलणा स्तुतिनिंदा ॥ ९७ ॥ द्रव्यलोभ नाहीं चित्तीं ॥ कदा द्रव्यातें नातळती ॥ यालागीं लोक पिशाच ह्मणती ॥ जाण निश्चित्तीं उद्धवा ॥ ९८ ॥ नवल त्याचें पिसेपण ॥ जगास नकरवे जें प्राशन ॥ ते वस्तूचें करी 9अपेयपान ॥ अभक्ष्य जाण भक्षितू ॥ ९९ ॥ जेथ जगासी गम्य नव्हे जाण ॥ तेथें हा करी अगम्यागमन ॥ जगाचें जेथ नरिघे मन ॥ तेथ सर्वांगें जाण हा वेंघे ॥ १०० ॥ नधरी विधिनिषेधविभाग ॥ नकरी कर्माकर्मांचा पांग॥ स्वानंदें नाचवी सर्वांग ॥ यालागीं जग पिसें ह्मणे ॥ १ ॥ एवं जड, 5मूक, पिशाच ॥ समूळ लक्षणीं तोचि साच ॥ मिथ्या ०नव्हे अहाचवहाच ॥ वृथा कचकच तो नेणे ॥ २ ॥ आणपां मुक्ताच्या ठायीं ॥ कोणेविषयीं आग्रह नाहीं ॥ जो अतिशयेंसि आग्रही ॥ तो बद्ध पाहीं निश्चित ॥ ३ ॥ जीं बोलिलीं मुक्ताचीं लक्षणें ॥ तींचि 7साधकाचीं साधनें ॥ सिद्धासि असती सहजगुणें ॥ साधकें करणें दृढनिष्ठा ॥ ४ ॥ बोलिलीया लक्षणा ॥

१ ज्ञाता. २ फलेच्छेनें. ३ मिथ्यापदार्थांचें दूरीकरण. ४पिण्यास अयोग्य त्याचें पान. ५ वेडे. ६ क्षीण. ७ बरबर.

°ना. भक्त. *मो. अतद्व्यावृत्तीनें. +ना. मुक्त. *ना. मूढ. 6ना. अंतरीं निजबोधें अतिगूढ. ×मो. चेतन दगड. 8मो. मुक्त. 9मो. आप्यायन. 5ना. मूढ. ०ना. नहोनि. 7ना. साधकीं.

सिद्धाचि भोक्ता जाणा ॥ *साधकूहि येथ लहाणा ॥ जो या साधनां साधूं जाणे ॥ ५ ॥ इतर जे पंडिताभिमानी ॥ आह्मी शास्त्रज्ञ ज्ञाते ह्मणूनि ॥ ते वाळिले येथूनी ॥ जेवीं सज्जनीं दुर्बुद्धी ॥ ६ ॥ जो न साधी येथिच्या साधनां ॥ कोरडा शास्त्राभिमानी जाणा ॥ सदा वांछी धनमाना ॥ तो येथिच्या ज्ञाना अलिप्त ॥ ७ ॥ आह्मी कर्मकुशळ याज्ञिक ॥ शास्त्रसंपन्न वेदपाठक ॥ सदा +अर्थकामकामुक ॥ त्यांसी हें सुख अप्राप्त ॥ ८ ॥ तिहीं जे कष्ट केले सर्वथा ॥ ते समस्त जाण झाले वृथा ॥ उद्धवा तेही त्रिपयीं तत्त्वतां ॥ ऐक आतां सांगेन ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ शब्दब्रह्मणि निष्णातो न निष्णायात्परे यदि ॥ श्रमस्तस्य श्रमफलो ह्यधेनुमिव रक्षतः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ शब्दब्रह्म वेदशास्त्रार्थ ॥ पढोनि वाचोनि अतिपंडित ॥ चारी वेद मूर्तिमंत ॥ सदा तिष्ठत वाचेसी ॥ ५१० ॥ संहिता, पद, क्रम स्वरयुक्त ॥ अरण, ब्राह्मण, सूत्र, निरुक्त ॥ जटा-वळी, ध्वज,रथ, ॥ पढों जाणत वर्णपूर्वक ॥ ११॥ आयुर्वेद, धनुर्वेद॥गांधर्ववेदींचा जाणे भेद ॥ काव्यनाटकीं, अतिशुद्ध ॥ वेद उपवेद तो जाणे॥१२॥व्याकरणीं अतिनेटक ॥ सांख्य,पातंजळ जाणे तर्क ॥ शास्त्र जाणे वैशेषिकें ॥ कर्ममीमांसक यज्ञांत ॥ १३ ॥ विवरण वाचस्पति वेदांत ॥ शास्त्र जाणे वार्तिकांत ॥ तिन्ही प्रस्थानें मूर्तिमंत ॥ पुढां तिष्ठत योग्यत्वें ॥ १४ ॥ शिल्पशास्त्रीं अतिनिपुण ॥ सूपशास्त्रामाजीं प्रवीण ॥ रत्नपरीक्षालक्षण ॥ जाणे आपण वाजिवाह ॥१५॥ आगमीं नेटका ०मंत्रतंत्रीं ॥ शैव वैष्णवीदीक्षेची परी ॥ सौरें शाक्त अभिचारी ॥ नानामंत्रीं प्रवीण ॥ १६ ॥ कोकशास्त्रींची अधिष्ठात्री ॥ अतिप्रवीण संगीतशास्त्रीं ॥ प्रबंध करूं जाणे कुसरी ॥ राजमंत्रीं राजस ॥१७॥ निघंटु वसे प्रज्ञेपुढां ॥ चमत्कार जाणे गारुडा ॥ पंचाक्षरी अतिगाढा ॥ वैद्य धडफुडा ×रसज्ञ ॥ १८ ॥ रसौषधी साधावी तेणें ॥ भूत भविष्य ज्योतिष जाणे ॥ अमरकोश अभिधानें ॥ अठरा पुराणें मुखोद्गत ॥ १९ ॥ प्रश्नावली पाहों जाणे ॥ स्वप्नाध्याय सांगावे तेणें ॥ इतिहासादि प्रकरणें ॥ जाणे लक्षणें गर्भाचीं ॥ ५२० ॥ शब्दज्ञानाची व्युत्पत्ती ॥ जाणे साधक बाधक युक्ती ॥ समयाची समयीं स्फूर्ती ॥ अपर बृहस्पती बोलावया ॥ २१ ॥ जेवीं तळहातींचा आंवळा ॥ तेवीं ब्रह्मज्ञान बोले प्रांजळा ॥ परी अपरोक्षसाक्षात्कारीं आंधळा ॥ नेणे जिव्हाळा तेथींचा ॥ २२ ॥ 'मोरा अंगीं अतिडोळसें॥ अंगभरी भरलीं पिसें ॥ एके दृष्टीवीण आंधळे जैसे ॥ जाहलें तैसें विद्वांसा ' ॥ २३ ॥ जेथूनि क्षीर स्रवती सड ॥ तेथेंचि लागोनि गोचिड ॥ अशुद्ध सेविताती मूढ ॥ तेवीं विद्वांस दृढ विषयांसी ॥ २४ ॥ गोचिडाचे मुखीं क्षीर *रिघे ॥ तो अशुद्धावांचोनि नेघे ॥ तेवीं ज्ञान विकूनि अंगें ॥ विद्वांस मागे विषयातें ॥ २५ ॥ सांडूनि सुगंधचंदनासी ॥ आवडीं दुर्गंधीं धांवे माशी ॥ तेवीं सांडूनि 0निजात्मज्ञानासी ॥ विद्वांस विषयांसी झोंबत ॥ २६ ॥ असोनि

१ दूर टाकिले. २ संहितेच्या विकृति आहेत. ३ योगशास्त्र. ४ न्यायशास्त्र. ५ न्यायातील भेद. ६ वार्तिक अखर. ७ प्रस्थानत्रय ( गीता, दशोपनिषद, शारीरसूत्रें. ) ८ पाकशास्त्रांत. ९ अश्वशास्त्र. १० सूर्यसंबंधी. ११ शक्ति ( देवी ) संबंधी. १२ जारणादिकीं निपुण. १३ कामशास्त्र. १४ नाटकादि-काव्य रचना. १५ शब्दकोश. १६ गारूडतंत्र ( गारोडी विद्या. ) १७ रक्त.

*** मो. साधू येथें लाहाणा. + मो. अर्थकामीकामुक. ०मो. मंत्रशास्त्री. × मो. राजस.**

[illegible]

कमळ आमोदापाशीं ॥ दर्दुर सेविती कर्दमासी ॥ तेवीं सांडूनि निजात्मज्ञानासी ॥ पंडित विषयांसी लोलुप ॥ २७ ॥ करूनि अद्वैतव्युत्पत्ती ॥ तें ज्ञान विकूं [1]देशांतरा जाती ॥ मूर्ख ज्ञात्यातें उपहासिती ॥ तरी वांछिती सन्मान ॥ २८ ॥ सांगतां ब्रह्मनिरूपण ॥ सात्विकाचें परमार्थी मन ॥ व्याख्याता तो वांछी धन ॥ विपरीत ज्ञान विद्वांसा ॥ २९ ॥ सांगे आन, करी आन ॥ तेथें कैचें ब्रह्मज्ञान ॥ जेथ वसे धनमान ॥ तेथ आत्मज्ञान असेना ॥ १३० ॥ दृढ धनमान धरोनि पोटीं ॥ सांगतां ब्रह्मज्ञानगोठी ॥ त्यासि आत्मसाक्षात्कार भेटी ॥ नव्हे कल्पकोटी गेलिया ॥३१॥ नानापदव्युत्पत्तिविंदान ॥ एके श्लोकीं दशधा व्याख्यान ॥ पोटीं असतां [3]मानाभिमान ॥ ब्रह्मज्ञान त्यां कैचें ॥ ३२ ॥ मी पंडित अतिज्ञाता ॥ ऐशिया नागवले अहंता ॥ जेवीं आंधळें [*]नोळखे पिता ॥ नित्य असतां एकत्र ॥३३॥तैशी गति विद्वांसासी ॥ नित्य असती आत्मसमरसीं ॥ तेंचि वाखाणिती अहर्निशीं ॥ परी त्या स्वरूपासी नेणती ॥ ३४ ॥ करावया विषयभरण ॥ केलें शास्त्रव्युत्पत्तिव्याख्यान ॥ ते वृथा कष्ट गेले जाण ॥ जेवीं वंध्याधेनु पोशिली ॥ ३५ ॥ जे कधीं वोळेना फळे ॥ सुटली तरी सैरा पळे ॥ नित्य वोढाळी [+]राजमळें ॥ तें दुःख आदळे स्वामीसी ॥३६॥ तैशी गति पंडितमान्याची ॥ व्युत्पत्ती पोशिलें वाचेसी ॥ ते वोढाळ झाली विषयासी ॥ ज्याचि त्यासी नावरे ॥ ३७ ॥ जेवीं कां निदैवाहातीं ॥ कनक पडलें होय माती ॥तेवीं पंडितंमन्याची व्युत्पत्ती॥विषयासक्ती नाशिली ३८ द्विजा दीधला भद्रजाती ॥ त्यासि न पोसवे तो निश्चितीं ॥ मग कुकासाठीं विकिती ॥ तेवीं व्युत्पत्ती विद्वांसा ॥ ३९ ॥ अद्वैतशास्त्राचा व्युत्पत्ती ॥ हे त्यासि झाली अलभ्यप्राप्ती ॥ जे विषयालागीं विकिती ॥ ते मूर्ख निश्चितीं विद्वांस ॥ १४० ॥ [7]ऊंस गाळूं घालिजे घाणा ॥ तो रस पिळूनि भरे [X]मांदणा ॥ फिका चोपटी करकरी घाणा ॥ ते गति जाणा पंडिता ॥ ४१ ॥ विद्वांस करिती ज्ञानकथन ॥ सारांश सात्विकीं नेला जाण ॥ शब्दसोपटी करकरी वदन ॥ गोडपण तेथें कैचें ॥ ४२ ॥ जेवीं कां नपुंसकाच्या करीं ॥ [6]दिधली पद्मिनी सुंदरी ॥ ते अखंड रडे जयापरी ॥ तेवीं विद्वांसाघरीं व्युत्पत्ती ॥ ४३ ॥ पाहें पां ब्रह्मज्ञानेंवीण ॥ शब्दज्ञानें संन्यासग्रहण ॥ केलें तेंही वृथा जाण ॥ जरी धारणाध्यान करीना ॥ ४४ ॥ जैसी जैसी शब्दज्ञानव्युत्पत्ती ॥ तैशी न करितां स्थिती ॥ वर्तणें जें विषयासक्ती ॥ तेणें निजमुखीं माती घातली ॥ ४५ ॥ वेदशास्त्रसंपन्न झाला ॥ त्यावरी पोट भरूं लागला ॥ तरी तो उदिमी थोर झाला ॥ परी थित्या मुकला ८मुदलासी ॥ ४६ ॥ रत्न देऊनि कवडा घेतला ॥ कां अमृत देऊनि कांजी प्याला ॥ तैसा परिपाकू [5]पंडितां झाला ॥ थित्या नागवला निजज्ञाना ॥ ४७ ॥ शब्दज्ञान जोडिलें कष्टें ॥ तेणेंचि साधनें परब्रह्म भेटे ॥ इटेसाठीं परीस पालटे ॥ मूर्ख वोखटें मानिती ॥ ४८ ॥ पोटभरावयाची या युक्ती ॥ आपुली मिरवावया व्युत्पत्ती ॥ पत्रावलंबन करिती ॥ द्वाराप्रती सधनांच्या ॥ ४९ ॥ जेवीं पोट भरावया भांड ॥ नानापरी वाजवी तोंड ॥ तेवीं नानाव्युत्पत्ती वाद वितंड ॥ करिती अखंड उदरार्थ ॥ १५० ॥ करूनि

१ चिखलास. २ वेगळें. ३ कौशल्य. ४ वांझ गाय. ५ वृथापंडिताची. ६ उत्तमलक्षणी गज. ७नांदींत. ८ व्यापार करणारा. ९ मोबदला करितो. १० पुस्तकग्रहण. ११ श्रीमंताच्या. १२ भिकारी वाचाळ.

[1]ना. देशावरा मो. देशाउरा. [3]मो. धनाभिमान. [*]मो. नदेखे. [+]ना. राजमेळे. [7]ना. मुखीं गुळऊस घालिजे घाणा. [X]मो. माना. [6]ना. वोपिली. [illegible]

व्युत्पत्ती शब्दब्रह्म ॥ जरी न साधिती परब्रह्म ॥ तरी त्या श्रमाचें फळही श्रम ॥ जेवीं रत्न उत्तम घाणा गाळी ॥ ५१ ॥ तेथें तेल ना पेंडी ॥ झाली रत्नाची राखोंडी ॥ तैशीं *विद्वांसें झालीं वेडीं ॥ श्रमें श्रमकोडी भोगिती ॥५२॥ श्रमें श्रमचि पावती ॥ दुःखें दुःखचि भोगिती ॥ हेंचि कथन बहु दृष्टांतीं ॥ उद्धवाप्रती हरि बोले ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ गां दुग्धदोहामसतीं च भार्यां देहं पराधीनमसत्प्रजां च ॥ वित्तं

त्वतीर्थीकृतमंग वाचं हीनां मया रक्षति दुःखदुःखी ॥ १९ ॥

॥ टीका ॥ दुग्धाचिया लोलुप्यता ॥ भाकड गाय दोहूं जातां ॥ शिंपीभरी दूध नये हातां ॥ हाणे लाता तत्काळ ॥५४॥ जे कुंडी कुचरंडीवरी॥ विषयमेळवणा अतिखाइरी ॥ अधर्मशीळ लातरी ॥सर्वांपरी +अनाड ॥५५॥ सुटली तरी राजागरीं भरे॥धर्मदंडें मार्गें न सरे॥सद्‍बुद्धि धरितां न धरे॥सैरा चरे सुनाट ॥५६॥ जिचें कधीं नव्हे दुभतें॥जे धरूं नेणें गर्भातें ॥ पोषितां ऐशा गायींतें॥पावे दुःखातें पोषक॥५७॥ गृहिणी लागला 3गृहाचार ॥ ते स्त्री अनुकूळ नसतां नर ॥ अतिदुःखी दुःखी थोर ॥ सदा करकर कपाळीं॥५८॥निंदा, अवज्ञा, हेळण ॥ भ्रताराचें करी जाण॥स्वयें भक्षी मिष्टान्न ॥ हें असंतलक्षण स्त्रियांचें ॥५९॥ खातां, जेवितां, द्रव्य देतां ॥ गोड गुळमी बोले सर्वथा ॥ धर्म देखोनि फोडी माथा ॥ तेही सर्वथा असंतची ॥ ६०॥ जे न विचारी पाप पुण्य ॥ कामाचारी धर्मशून्य ॥ हें असतीचें लक्षण ॥ उद्धवा जाण निश्चित ॥६१ ॥ असतीचे संगतीं ॥ कैंची होईल सुखप्राप्ती ॥ अतिदुःखें दुःखी होती ॥ जाण निश्चितीं ते नर ॥६२॥ ज्याचें देह पराधीन ॥ तो जीवें जितां सदा दीन ॥ पराधीना समाधान ॥ नव्हे जाण कल्पांतीं ॥ ६३ ॥ सांडोनि आपली 0निजसत्ता ॥ ज्यासी लागली पराधीनता ॥ तो स्वप्नींही सुखाची वार्ता ॥ न देखे सर्वथा निश्चित ॥६४॥ 'पर म्हणिजे माया जाण' ॥ जो झाला तिचे आधीन ॥ त्यासि सुखाचें न दिसे स्वप्न ॥ दुःख संपूर्ण सर्वदा ॥ ६५ ॥ 'पराधीनासि सुख ॥ आहे म्हणे तो केवळ मूर्ख ॥ सोलींव दुःखाचें दुःख ॥ अवश्य देख पराधीना' ॥ ६६ ॥ ऐक प्रजांचा विवेक ॥ एक पुत्र, एक लेंक, ॥ एक ते केवळ मूर्ख ॥ दुःखदायक पितरांसी ॥६७॥ जो नरकापासोनि तारी ॥ जो पूर्वजांतें उद्धरी ॥ जो मातापित्यांची भक्ति करी ॥ अव्यभिचारी हरिरूपें ॥ ६८॥ जो सांडोनियां मातापिता ॥ जाऊं नेणे आणिका तीर्था ॥ त्यांचेनि चरणतीर्थें पवित्रता ॥ मानी सर्वथा अनिवार ॥ ६९ ॥ जैशी रमा आणि नारायण ॥ तैशीं मातापिता मानी जाण ॥ चढत्या आवडीं करी भजन ॥ उबगे मन सेवेशी ॥ ७० ॥ जो अतिसत्वें सात्विकू ॥ जो पितृवचनपाळकू ॥ जाणे धर्माधर्मविवेकू ॥ हा नैसर्गिकू स्वभावो ॥ ७१ ॥ जो मातापित्यांचे सेवेवरी ॥ आपआपणियातें तारी ॥ सकळ पूर्वजांतें उद्धरी ॥ तो संसारीं सुपुत्र ॥ ७२ ॥ ऐशिया पुत्रासि प्रतिपाळितां ॥ सुख पावे मातापिता ॥ पूर्वजांतें उद्धरिता ॥ ×स्वयें तरता पितृभक्ती ॥ ७३ ॥ झालिया सुपुत्रसंतती ॥ एवढी

१ लोभानें. २ न व्यालेली. ३ वांईट. ४ कुचर. ५ खादाड. ६ उनाड. ७ संततीचा. ८ लक्ष्मी. ९ सहज.

* ना. विद्वांसता. + मो. सुनाट. 3 मो. गृहसंसार. 0 मो. स्वतंत्रता. × मो. स्वयें तारिता पितृभक्त.

होय सुखप्राप्ती ॥ आतां असत्प्रजांची स्थिती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ७४ ॥ मूळींचें पद 'असत्प्रज' ॥ त्याचे वर्तणुकेची वोज ॥ सांगतां अत्यंत निर्लज्ज ॥ तेंही मी तुज सांगेन ॥ ७५ ॥ पोटीं उपजले जे लेंक ॥ त्यांची वर्तणूक ऐशी देख ॥ आवडे कांता आणि कनक ॥ उपेक्षिती निःशेख मातापिता ॥ ७६ ॥ जे कुडे, कुचर, कुलट ॥ जे कां अत्यंत शठ नष्ट ॥ जे अनाचारी कर्मभ्रष्ट ॥ अतिदुष्ट दुर्जन ॥ ७७ ॥ त्यांसि भांडवल *लटिक ॥ लटकी यावी आणभाक ॥ मातापिता +ठकिती देख ॥ सात्विक लोक नाडावे ॥ ७८ ॥ आपण नरका जावें ते जाती ॥ परी पूर्वज ×नेले अधोगती ॥ ऐशिया प्रजांतें प्रतिपाळिती ॥ ते दुःखी होती अतिदुःखें ॥ ७९ ॥ पोटामाजीं उठिला फोड ॥ त्यासि करितां नये फाड ॥ तैसा असत्प्रजीं संसार कड ॥ दुःख दुर्वाड भोगवी ॥ ८० ॥ ऐशिया पुत्रांचें जितां दुःख ॥ मेल्यापाठीं देती नरक ॥ असत्प्रजांचें कौतुक ॥ दुःखें दुःख आनिवार ॥ ८१ ॥ गांठीं असोनियां धन ॥ जो सत्पात्रीं न करी दान ॥ तें सर्वदुःखांचें मूळ जाण ॥ दुःख दारुण धनलोभ्या ॥ ८२ ॥ धन अर्जावया अनेक ॥ 7उपाय अपाय करिती लोक ॥ नाना क्लेश भोगोनि दुःख ॥ द्रव्य देख सांचिती ॥ ८३ ॥ प्रथम दुःख द्रव्य संचितां ॥ दुसरें दुःख द्रव्य रक्षितां ॥ स्त्री पुत्र *प्रवर्ते घाता ॥ इतरकथा 3ते भिन्न ॥ ८४ ॥ सत्पात्रीं न करितां दान ॥ जेणें राखिलें यक्षधन ॥ 1तेथें दुःखबाहुल्यें उठे विघ्न ॥ धर्मरक्षण तेथ नाहीं ॥ ८५ ॥ ऐसेंही धन गेलियापाठीं ॥ अतिदुःखें भडका उठी ॥ अनंता जन्मसाठीं ॥ दुःख कोटी भोगिती ॥ ८६ ॥ येवोनियां नरदेहासी ॥ अविकळ वाचा असे ज्यासी ॥ जो नुचारी हरिनामासी ॥ पाप त्यापाशीं खतेलें ॥ ८७ ॥ पुरिले लोहा माती खाये ॥ तें उपेगा नये, वायां जाये ॥ तैशी नामेंवीण वाचा पाहे ॥ वृथा जाये सर्वथा ॥ ८८ ॥ आसनध्यान परिश्रम ॥ न करूनि ह्मणे जो रामराम ॥ तेणें कोटिजन्मांचा हरे श्रम ॥ उत्तमोत्तम ते वाणी ॥ ८९ ॥ जो नित्य जपे रामनाम ॥ तो जाणावा मजचिसम ॥ तेणेंचि केले सकळही नेम ॥ पुरुषीं पुरुषोत्तम तो जाण ॥ ९० ॥ चतुर्वर्णांमाजीं जो कोणी ॥ अविश्रम राम जपे वाणीं ॥ तोचि पदियंता मजलागुनी ॥ आन त्रिभुवनीं नावडे ॥ ९१ ॥ ऐसें रामनाम नावडे ज्यासी ॥ तें पापमुखरोग आला मुखासी ॥ 5तो स्वयें मुकला निजसुखासी ॥ आप आपणासी घातक ॥ ९२ ॥ 'रामनामेंवीण जें तोंड ॥ तें जाणावें चर्मकुंड ॥ भीतरीं जिव्हा तें चामखंड ॥ असत्य कांटें कांटली' ॥ ९३ ॥ होकां हरिनामेंवीण जे वाणी ॥ ते गलितकुष्ठें गळली कोढिणी ॥ असत्यकुष्ठाचें गळे पाणी ॥ उठी पोहाणी निंदेची ॥ ९४ ॥ ऐशिया वाचेसि [illegible]कडे ॥ पडती अधर्माचे किडे ॥ चुळबुळती चहूंकडे ॥ मागें पुढें वळवळती ॥ ९५ ॥ ते [illegible]वा होय ज्यासमोर ॥ देखे तो पाठीमोरा ठाके नर ॥ नाक झांकूनि ह्मणे हरहर ॥ लहान [illegible] थुंकिती ॥ ९६ ॥ ते वाचेची जे दुर्गंधी ॥ मजही न साहवे त्रिशुद्धी ॥ हे वाचा वाहे तो [illegible]ी ॥ अनर्थसिद्धी अतिदुःख ॥ ९७ ॥ सोलींव दुःखाचें दुःख ॥ त्या 8नराची वाचा देख ॥ [illegible]ळ निरय तें त्याचें मुख ॥ नामीं विमुख जे वाणी ॥ ९८ ॥ होकां वेदशास्त्रसंपन्न वाणी ॥

१ वाईट संततीचा. २ रीत. ३ शिंदळ. ४ कुबेराचें द्रव्य. ५ फारदुःखानें. ६ निरंतर. ७ दुर्गंधि.

* मो. तितकें लटिकें. + ना. ठकूनि. × ना. गेले. 7 मो. उपाई अनेक शिणती लोक. [illegible] प्रवर्तती. 3 मो. कायसी. 1. मो. तेथें बहुत उठती विघ्नें. 5 मो. तो मुकला निजसुखासी. 8 ना. नावचि.

करूनि निंदक नामकीर्तनीं ॥ तो पापी महापापयाहूनी ॥ ×त्याचेन अवनी अतिदुःखी ॥ ९९ ॥ नामकीर्तनें धन्य वाणी ॥ येचिअर्थी सारंगपाणी ॥ प्रवर्तला निरूपणीं ॥ विशद करूनी सांगावया ॥ ६०० ॥

॥ श्लोक ॥ यस्यां न मे पावनमंग कर्म स्थित्युद्भवप्राणनिरोधमस्य ॥ लीलाऽ-

वतारेप्सितजन्म वा स्याद्वंध्यां गिरं तां बिभृयान्न धीरः ॥ २० ॥

॥ टीका ॥ जगातें पवित्र करिती ॥ महादोषांतें हरिती ॥ ✱माझी जन्मकर्म गुणनामकीर्ती ॥ जड उद्धरती हरिनामें ॥ १ ॥ म्हणसी तूं बोलिलासि निजधर्म ॥ मी विद्याअविद्यातीत ब्रह्म ॥ त्या तुज कैंचें गुणनामकर्म ॥ कीर्तनधर्म केवीं घडे ॥ २ ॥ उद्धवा हें मनीं न धरीं ॥ मी स्वलीला स्वमायेंकरीं ॥ नानाअवतारातें धरीं ॥ न करूनि करीं स्थित्यंत ॥ ३ ॥ ⁻त्रिगुण गुणीं गुणावतार ॥ 7ब्रह्मा आणि हरि हर ॥ तिहीं रूपीं मीच साचार ॥ ०चराचर करीं हरी ॥ ४ ॥ ब्रह्मरूपें मी सृजिता ॥ विष्णुरूपें मी प्रतिपाळिता ॥ रुद्ररूपें मी संहर्ता ॥ जाण तत्त्वतां मी एक ॥ ५ ॥ बाल्यतारुण्यवयसासीं ॥ एक पुरुष तिहीं अवस्थांसी ॥ तेवीं उत्पत्तिस्थितिप्रळयांसी ॥ गुणकर्मांसी मी कर्ता ॥ ६ ॥ मी कर्ताचि अकर्ता ॥ अकर्तेपणें मी कर्ता ॥ हें माझें मीचि जाणें तत्त्वतां ॥ आणिकांसी सर्वथा कळेना ॥ ७ ॥ हींचि माझीं नामकर्में गातां ॥ माझी पदवी लाभे भक्तां ॥ माझी लीलावतारकीर्ति गातां ॥ कीर्तनवंता निजलाभ ॥ ८ ॥ अवतारांमाजीं उत्तमोत्तम ॥ +श्रीरामकृष्णादिजन्मकर्म ॥ नानाचरित्रें संभ्रम ॥ अविश्रम जे गाती ॥ ९ ॥ सेतु बांधिला अवलीळा ॥ सागरीं तारिल्या शिळा ॥ गोवर्धन उचलिला हळा ॥ दावानळा प्राशिलें ॥ ६१० ॥ ताटिका ⁰वधिली एकेबाणीं ॥ पूतना शोषिली तानेपणीं ॥ अहल्या तारिली चरणीं ॥ यमलार्जुन दोन्ही उद्धरिले ॥ ११ ॥ रावण आदळला धनुष्य वाहतां ॥ तें भंगोनि परणिली सीता ॥ ✱नर्दूनि चैद्यादिसमस्तां ॥ भीमकदुहिता आणिली ॥ १२ ॥ मारिला सुबाहु ऽखर दूषण ॥ अघ बक केशिया मारी श्रीकृष्ण ॥ सुग्रीव स्थापिला राज्य देऊन ॥ येरें उग्रसेन स्थापिला ॥ १३ ॥ मेळवूनि वानरांचा ³पाळा ॥ वधूं केला राक्षसकुळा ॥ मेळवून वाळां गोपाळां ॥ मल्लां सकळां मर्दिलें ॥ १४ ॥ रावणकुंभकर्णां केला मारु ॥ मारिला कंसचाणूरु ॥ रामें ठकिला वाळी वानरु ॥ ⁰ठकिला महावीरु काळयवन ॥ १५ ॥ रामें बिभीषण स्थापिला ॥ ⁵कृष्णें धर्म संस्थापिला ॥ एकें मातृवचनें वना गेला ॥ एक घेऊनि आला गतपुत्रें ॥ १६ ॥ हीं अवतारचरित्रें वर्णिता ॥ चोरटा वाल्मीकि झाला सरता ॥ व्यास जारपुत्र सर्वथा ॥ केला सरतां तिहीं लोकीं ॥ १७ ॥ या दोहीं अवतारांची पदवी ॥ वर्णितां दोघे झाले महाकवी ॥ व्यास वाल्मीकि वंदिजे देवीं ॥ कीर्तिगौरवीं गौरविलें ॥ १८ ॥ त्या महाकवींची कवित्वकथा ॥ शेष नेत्रद्वारें श्रवण करितां ॥

---

१ उद्धार करितो, संहार करितो. २ सहज. ३ लहानपणीं. ४वांगली. ५ नाश करून. ६ चेदिपुत्र-शिशुपाल. ७ रुक्मिणी. ८ समुदाय. ९ नाश. १० गम. ११ कृष्ण मृतगुरुपुत्र घेऊन आला. १२ वंद्य.

×ना. त्याचेनि वचनें. ✱मो. माझिया नामाची गुणकर्मकीर्ती. ⁻मो. त्रिगुणी गुणावतार. 7मो. ब्रह्मा विष्णु आणि हर. ०मो. चराचर हरिरूप. +मो. रामकृष्णांचीं. ⁰ना. विंधिली. ✱मो. वधूनि. ऽना. त्रिशिराखर. ³ना. मेळा. ⁰मो. कृष्णें. ⁵मो. कृष्णे निजधर्म स्थापिला.

दोनसहस्रनयनीं आइकतां ॥ धणी सर्वथा ‡बाणेना ॥ १९ ॥ हेचि कथा स्वर्गाच्याठायीं ॥ श्रवण करावया पाहीं ॥ इंद्र लागे बृहस्पतीचे पायीं ॥ कीर्ति तिहीं लोकीं वर्णिती ॥ ६२० ॥ ×असो कथेचें महिमान ॥ माझेनि नाममात्रें जाण ॥ तारिला अजामिळ ब्राह्मण ॥ गजेंद्र-उद्धरण हरिनामें ॥ २१ ॥ पक्ष्याचे मिषें करूनी ॥ राम या दोंअक्षरस्मरणीं ॥ महादोषांची श्रेणी ॥ तत्काळ कुंटिणी तारिली ॥२२॥ माझिया नामासमान ॥ *नव्हे वेदशास्त्रशब्दज्ञान ॥ वेदशास्त्रांचा बोध कठिण ॥ तैसें जाण नाम नव्हे ॥ २३ ॥ पठणमात्रें वेदशास्त्रवक्ता ॥ नव्हे मजमाजीं येणें सरता ॥ स्वभावें माझें नाम घेतां ॥ अतिपढियंता मज होय ॥ २४ ॥ वेद-शास्त्रीं अधिकारी ब्राह्मण ॥ नामासि अधिकारी चारी वर्ण ॥ जग उद्धरावया कारण ॥ नाम जाण पैं माझें ॥ २५ ॥ जेथ नित्य नामाचा उच्चार ॥ तेथें मी असें साचार ॥ येथ करणें नलगे विचार ॥ नाम सधरें तारावया ॥ २६ ॥ तें माझे जन्मनामकीर्तिगुण ॥ जे वाचेसि नाहीं पठण ॥ ते वाचा पिशाचिका जाण ॥ वृथालापनें वटवटी ॥ २७ ॥ माझे कीर्तिवीण जें वदन ॥ तें केवळ मशाचें भाजन ॥ त्या उन्मादविटाळा भेण ॥ नाम जाण तेथें नये ॥ २८ ॥ जेथ उच्चारु नाहीं नामाचा ॥ ते जाणावी वांझ वाचा ॥ गर्भ न धरी हरिकथेचा ॥ निष्फळ तिचा उद्योग ॥ २९ ॥ उद्धवासि ह्मणे श्रीरंग ॥ ऐकें बापा उपाय चांग ॥ माझा नाममार्ग सुगम सांग ॥ न पडे पांग आणिकांचा ॥ ६३० ॥ हरिनामेंवीण वाणी ॥ कदा न राखावी सज्जनीं ॥ हाचि अभिप्रावो +चक्रपाणी ॥ प्रीति करोनि सांगीतला ॥ ३१ ॥ कर्मनिष्ठा शब्द-ज्ञान ॥ अतियोग्यता पंडितपण ॥ तेणें माझी प्राप्ति नव्हे जाण ॥ वैराग्येंवीण सर्वथा ॥ ३२ ॥ अथवा वैराग्यही झालें ॥ परी तें ¶विवेकहीन उपजलें ॥ जैसें धृतराष्ट्रा ज्येष्ठत्व आलें ॥ नेत्रेंवीण गेलें स्वराज्य ॥ ३३ ॥ तैसें वैराग्यविवेकेंवीण ब्रह्मज्ञान ॥ केवळ आंधळे अनधिकारी जाण ॥ नाहीं सन्मार्गदेखणेपण ॥ वृथा परिभ्रमण तयाचें ॥ ३४ ॥ जो विवेकें पूर्ण भरित ॥ §त्यावरी वैराग्य वोसंडत ॥ माझी जिज्ञासा अद्भुत ॥ तें ऽनिश्चित सांगत ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ एवं जिज्ञासयाऽपोह्य नानात्वभ्रममात्मनि ॥ उपारमेत विरजं मनो मय्यर्प्य सर्वगे ॥ २१ ॥

॥ टीका ॥ नित्यमुक्त अव्ययो ॥ ०स्वरूप जाणावया पहाहो ॥ ज्याचा लागला दृढ भावो ॥ आन ३उठावो नाठवे ॥३६॥ ऐशी मज जाणावयाची आस्था ॥ त्या नांव बोलिजे जिज्ञासता ॥ माझे प्राप्तीलागीं सर्वथा ॥ पंडितमान्यता तो नेघे ॥ ३७ ॥ ७देहादिअभ्यास आपुल्याठायीं ॥ श्रवणें मननें मिथ्या केला पाहीं ॥ दृढ विश्वास गुरूच्या पायीं ॥ पूर्णब्रह्माच्याठायीं निजनि-र्धार ॥३८॥ तेथ पुढारी चालावया वाट ॥ भगवद्भजनीं अतिउद्भट ॥ कां सांडोनि कर्मकचाट ॥ ध्याननिष्ठ तो होय ॥ ३९ ॥ तेथ ध्येय ध्याता ध्यान ॥ न दिसे त्रिपुटीचें भान ॥ कोंदलें चैतन्यघन ॥ वस्तु सनातन तो पावे ॥ ६४० ॥ तेथ कैंचा कर्ता क्रियाकर्म ॥ फिटला नाना-

---

१ तृप्ति होईना. २ समर्थ. ३ हडळ. ४ भांड. ५ वेगळेपणाचा.

‡ना. पुरेना. ×मो. ऐसें. *मो. नव्हे वेदशास्त्र जाण. +ना. शार्ङ्गपाणी. ¶ना. विवेकें न उपजलें. §मो. वरि वैराग्यें वोसंडत. ऽना. निश्चितार्थ. ०मो. नें स्वरूप. ३मो. आठवो. ७ना. देहादि अभ्यासु.

त्याचा भ्रम ॥ सबाह्य कोंदलें परब्रह्म ॥ झाला उपरम गुरुकृपा ॥ ४१ ॥ सर्वगत सर्वकाळ ॥ सर्वदेशीं सर्वां सकळ ॥ वस्तु असे जे केवळ ॥ तेथ निश्चळ निजबोधू ॥ ४२ ॥ *ऐसिये व-स्तूची धारणा ॥ ज्याचेनि न करवे जाणा ॥ तरी सुगम उपाया ओनां ॥ ऐक विचक्षणा सांगेन ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ यद्यनीशो धारयितुं मनो ब्रह्मणि निश्चलम् ॥ मयि सर्वाणि कर्मा-णि निरपेक्षः समाचर ॥ २२ ॥

॥ टीका ॥ स्वभावतां मन चंचळ ॥ विषयवासना अतिचपळ ॥ निर्गुणब्रह्मीं केवळ ॥ नाहीं बळ प्रवेशावया ॥ ४४ ॥ ×तरी सांख्य, योग, संन्यास ॥ हा न +करावा आयास ॥ माझिया भक्तीचा विलास ॥ अतिउल्हास करावा ॥ ४५ ॥ 6मार्गे बद्धमुक्तांचें निरूपण ॥ सांगीतलें मुक्तांचें लक्षण ॥ तथा शाब्दिकांचें शब्दज्ञान ॥ तेंही व्याख्यान दाविलें ॥ ४६ ॥ आतां आपुली निजभक्ती ॥ सांगावया उद्धवाप्रती ॥ अतिआदरें श्रीपती ॥ भक्तीची स्थिती सुचितु ॥ ४७॥ उद्धवा चढत्या आवडीं ÷मत्कर्म ॥ *जिहीं भक्तीसी विकिला मनोधर्म ॥ माझें स्मरावें गुण-कीर्तिनाम ॥ नानासंभ्रम विनोदें ॥ ४८ ॥ माझेनि भजनें कृतकृत्यता ॥ दृढविश्वास धरोनि चित्तां ॥ भजनीं प्रवर्तावें सर्वथा ॥ अविश्रमता अहर्निशीं ॥ ४९ ॥ माझ्या भजनाच्या आव-डीं ॥ ०तुरेचि आराणुकेची वोढी ॥ वायां जावोंनेदी अर्धघडी॥भजनपरवडी या नांव ॥५०॥ माझ्या भजनीं प्रेम अधिकू ॥ न सांडावें नित्यनैमित्तिकू ॥ वैदिक लौकिक ˢदैहिकू ॥ भक्तासि बाधकू नव्हे कर्म ॥ ५१ ॥ आचरतां सकळ कर्म ॥ न कल्पावा फळसंभ्रम ॥ हेंचि भक्तीचें गुह्य वर्म ॥ उत्तमोत्तम अधिकारू ॥ ५२ ॥ उबग न मानिनि अंतरीं ॥ माझ्या प्रीतीं सर्व क-र्मांतें करी ॥ जो फळाशेतें कहीं न धरी ॥ भक्तीचा अधिकारी तो जाण ॥ ५३ ॥ पिंपरें खा-वयाचे चाडें ॥ न लाविती पिंपळाचीं झाडें ॥ तेवीं कर्म करितां वाडेंकोडें ॥ फळाशा पुढें उठेना ॥ ५४ ॥ माझें भजन करितां ॥ नाडे ज्ञानाची पंगिस्तता ॥ माझेनि भजनें नित्यमुक्त-ता ॥ जाण मद्भक्तां मद्भावें ॥ ५५ ॥ ज्ञानेंवीण ²मुक्ति न घडे॥ ह्मणती तें ³शब्दज्ञान धडफु-डें ॥ भक्तीस्तव जाण रोकडें ॥ ज्ञान जोडे अपरोक्ष ॥ ५६ ॥ यालागीं माझें भजन करितां॥ ज्ञानाचा पांग न पडे भक्तां ॥ देहगेहांमाजीं वर्ततां ॥ बंधन मद्भक्तां लागेना ॥५७॥ ज्याच्या मुखीं माझें नाम ॥ ज्यासि माझा भजनसंभ्रम ॥ ज्याच्या मनीं मी आत्माराम ॥ त्याचें दासी काम मुक्ति करी ॥ ५८॥ मुक्तीमाजीं विशेष कायी ॥ वृत्ति ⁵निर्विषय असे पाहीं ॥ भक्तां-सि सर्वकर्मांच्याठायीं ॥ स्फुरण नाहीं विषयाचें ॥५९॥ भक्तांचें विषयीं नाहीं चित्त ॥ त्यांचा विषय मी भगवंत ॥ ते सदा मजमाजीं लोलुप्त ॥ नित्यमुक्त यालागीं ॥ ६६० ॥ भक्त विष-यो सेविती ॥ ते ग्रासोग्रासीं मज अर्पिती ॥ तेणेंचि त्यांसि Sवंदी मुक्ती ॥ सर्वभूतीं मद्भावो ॥ ६१ ॥ यालागीं कर्मबंधन ॥ मद्भक्तांसि नलगे जाण ॥ 4करितां माझें स्मरणकीर्तन ॥ ज-

---

१ शब्द जाणणारांचें. २ कर्मणुकेस. ३ घर, जागा. ४ कमतरता.

*मो. ऐसी. ×मो. जरी. +मो. करवे. 6मो. मार्गे बद्धमोक्षाचें लक्षण ना. मागां बंधमोक्षाचें निरोपण. ÷मो. सत्कर्म. * ना. जे भक्तीसी विकावा मनोधर्म. ० ना. तुरेचि अराणुकेसि सवडी. ˢ मो. स्वाभाविक. 2 मो. भक्ती. 3 मो. शब्दज्ञानी. 5 ना. निवृत्तिये. S ना. वांदिती. 4 ना. करिती.

गाचें बंधन छेदिती ॥ ६२ ॥ माझ्या भक्ताचें वसतें घर ॥ तें जाण माझें निजमंदिर ॥ मुक्ति तेथें आठै प्रहर ॥ वोळंगे द्वार तयांचें ॥ ६३ ॥ माझें भजन करितां ॥ *कोण्या अर्थाची नाहीं दुर्लभता ॥ चहूं पुरुषार्थांचे माथां ॥ भक्ति सर्वथा मज पढिये ॥ ६४ ॥ +ज्ञान नित्यानित्यविवेक ॥ भक्तीमाजीं माझें प्रेम अधिक ॥ प्रेमळाचें मजलागीं सुख ॥ चढतें देख अहर्निशीं ॥ ६५ ॥ जेवीं एकुलतें बाळक ॥ जननीसि आवडे अधिक ॥ तैसें प्रेमळाचें कौतुक ॥ चढतें सुख मजलागीं ॥६६॥ यालागीं आपुलिये संत्रसाटीं ॥ मी प्रेमळ घें उठाउठीं ॥ ×वरी निजसुख दें संदेठीं ॥ ०नेघे तें शेवटीं सेवक होय ॥६७॥प्रेमाचिया परमप्रीतीं ॥ जेणें मज अर्पिली चित्तवृत्ती ॥ तेव्हांचि त्याचे सेवेची सुती ॥ जाण निश्चितीं म्यां घेतली ॥६८॥ प्रेमळांचें शेष खातां ॥ मज लाज नाहीं घोडीं धुतां ॥ शेवीं उच्छिष्टेंही काढितां ॥ लाज सर्वथा मज नाहीं ॥ ६९ ॥ मज 6सप्रेमाची अवस्था ॥ त्याचे मोचे मी वाहें माथां ॥ ऐशी प्रेमळाची सांगतां कथा ॥ प्रेम कृष्णनाथा चालिलें ॥ ६७० ॥ कंठ झाला सद्गदित ॥ अंग झालें रोमांचित ॥ धांवोनि उद्धवासि ⁰खेंव देत ॥ प्रेम अद्भुत हरीचें ॥ ७१ ॥ सजल जाहले लोचन ॥ वर्षताती स्वानंदजीवन ॥भक्तिसाम्राज्यपट्टाभिषेचन ॥उद्धवासी जाण हरि करी ॥७२॥ सहजें प्रेमळाची करितां गोठी ॥ संमुख उद्धव देखिला दृष्टीं॥धांवोनियां घातली मिठी ॥ आवडी मोठी भक्तांची ॥ ७३ ॥ आवडीं पडलें आलिंगन ॥ विसरला कार्यकारण ॥ विसरला Sस्वधामागमन॥मीतूंपण नाठवे॥७४॥नाठवे देवभक्तपण॥नाठवे कथानिरूपण ॥ नाठवे उद्धवा उद्धवपण ॥ कृष्णा कृष्णपण नाठवे ॥७५॥ प्रेमळाचे गोठीसाठीं ॥ *परात्पर परतटीं ॥ दोघ ऐक्यें पडली मिठी ॥ आवडी मोठी 7प्रेमाची ॥ ७६ ॥ आजि भक्तीचें निजसुख ॥ उद्धवासीचि फावलें देख ॥ भक्तीचें प्रेम अलौकिक ॥ उद्धवें सम्यक विस्तारिलें ॥ ७७ ॥ श्रीकृष्ण निजधामासि जातां ॥ उद्धव जरी हें न पुसता ॥ तरी ज्ञानवैराग्यभक्तिकथा ॥ कां सांगता श्रीकृष्ण ॥७८॥ विशेष भक्तिप्रेम अचुंबित ॥ उद्धवें काढिलें निश्चित ॥ उद्धवप्रश्नें श्रीभागवत ॥ झालें सनाथ तिहीं लोकीं ॥ ७९ ॥ यालागीं तनुमनप्राणें ॥ उद्धव जीवें ओंवाळणें ॥ याहून अधिक वानणें ॥ तें बोलणें न साहे ॥ ६८० ॥ जे बोला बुद्धी नये सहज ॥ तें भक्तिप्रेम निजगुज ॥ उद्धवा यावया गरुडध्वज ॥ केलें व्याज खेंवाचें ॥ ८१ ॥ भक्तीचें शोधितें प्रेम ॥ उद्धवासि अतिउत्तम ॥ तो देता झाला पुरुषोत्तम ॥ मेघश्याम तुष्टला ॥ ८२ ॥ प्रेमळाची गोठी सांगतां ॥ विसरलोंजी श्लोकार्था ॥ कृष्णासि आवडली प्रेमकथा॥ ते आवरितां नावरे ॥८३॥ प्रेमाची तंव जाती ऐशी ॥ 1आठव येऊंनेदी आठवणेंशीं ॥ हा भाव जाणवे सज्जनांसी ॥ जे भक्तिप्रेमासी जाणती ॥ ८४ ॥ होकां ऐसेंही असतां ॥ माझा अपराध जी सर्वथा ॥ चुकोनि फांकेलों श्लोकार्था ॥ क्षमा श्रोतां करावी ॥ ८५ ॥ तंव श्रोते म्हणती राहें ॥ जेथें निरूपणीं सुख आहे ॥ त्यावरी बोलणें न साहे ॥ ऐसें रहस्य आहे अतिगोड ॥ ८६ ॥ आधींच भागवत

---

१ समूळ. २ पत्करणें, घालणें. ३ भक्ताचें उच्छिष्ट. ४ नाद, छंद, वेड. ५ जोडे. ६ वैकुंठास जाणें. ७ सहज. ८ निमित्त. ९ आलिंगनाचें. १० शुद्ध, सोलीव, साजूक. ११ दूर गेलों.

* ना. कोणा अर्थाची दुर्लभता. + मो. ज्ञानें. × मो. वरीव निजसुख दें सेवटीं. ० मो. नये तें. 6 ना. प्रेमळाची. 0 मो. क्षेम. S मो. स्वधामगमन. * मो. दोघे परापरतटीं. 7 मो. भोगिती. 1 मो. आठऊं नेदी आठवणेसी.

हें उत्तम ॥ तेथें वाखाणिलें भक्तिप्रेम ॥ तेथेंही उल्हासलें परब्रह्म ॥ आमुचे मनोधर्म निवाले ॥ ८७ ॥ *लोकसंगतीची भंगी ॥ दूर ठेली कथेची मांगी ॥ हे प्रार्थना न लगे आह्मांलागीं॥ आह्मी हरिरंगीं रंगलों ॥ ८८ ॥ ऐकतां भक्तिप्रेमाचा जिव्हाळा ॥ श्रवणसुखाचा पूर आला ॥ झाडा न सरतां उगला ॥ निरूपण वहिल्या चालवी ॥ ८९ ॥ सांगतां प्रेमळाची गोठी ॥ कृष्ण उद्धवां पडली गांठी ॥ प्रेमें पडली द्वांतीं मिठी ॥ ते कृष्ण जगजेठी सोडवी ॥ ६९० ॥ ह्मणे हें अनुचित सर्वथा ॥ आतांचि उद्धव जरी ऐक्या येता ॥ तरी ये कथेचा निजभोक्ता ॥ ऐसा श्रोता कैंचा मज ॥ ९१ ॥ माझिया भक्तिज्ञानविस्तारा ॥ उद्धवचि निजांचा सोयरा ॥ यालागीं ब्रह्मशापाबाहिरा ॥ ×काढिला त्वरा निजबोधें ॥ ९२ ॥ जिनुकी गुह्यज्ञानगोडी ॥ भक्तिप्रेमाची आवडी ॥ ते उद्धवाचिकडे गोकडी ॥ दिसतसे गाढी कृष्णाची ॥ ९३ ॥ भक्तिप्रेमाचा कृष्णचि भोक्ता ॥ कृष्णकृपा फळलीसे भक्ता ॥ हे अनिर्वचनीय कथा ॥ नये बोलतां बोलासी ॥ ९४ ॥ कृष्ण उद्धवासि ह्मणे आतां ॥ सावध होईं गा सर्वथा ॥ पुढारी परियेसीं कथा ॥ जे भक्तिपथा उपयोगी ॥ ९५ ॥ सर्वकर्मे सद्रंग ॥ +फळत्यागें नकरवे जाण ॥ तरी अतिसोपें निरूपण ॥ प्रेमलक्षण सांगेन ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ श्रद्धालुर्मे कथाः शृण्वन्सुभद्रा लोकपावनीः ॥ गायन्ननुस्मरन्कर्म जन्म चाभिनयन्मुहुः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ करितां माझी कथाश्रवण ॥ काळासि रिगमु नाहीं जाण ॥ इतरांचा पाड कोण ॥ कर्मबंधन तेथें कैंचें ॥ ९७ ॥ जो हरिकथेसी सेवी जाण ॥ तो काळासि करी प्राशन ॥ काळसार्थक त्या नांव जाण ॥ जे श्रद्धा श्रवण हरिकथा ॥ ९८ ॥ परिस कथेचें महिमान ॥ श्रद्धायुक्त करितां श्रवण ॥ तिहीं लोकींचें दोषदहन ॥ अक्षरें जाण होतसे ॥ ९९ ॥ ऐक श्रद्धेचें लक्षण ॥ करितां हरिकथाश्रवण ॥ ज्याचें अर्थारूढ मन ॥ श्रद्धाश्रवण त्या नांव ॥ ७०० ॥ श्रवण एकोनि नास्तिक ॥ देवोचि नाहीं ह्मणती देख ॥ आहे ह्मणतां ते पोटपाइक ॥ आह्मांसि निःशेष ठाकेना ॥ १ ॥ नास्तिका देखोनि तिळोदक ॥ ज्याची अस्तिक्यता वाढली देख ॥ श्रद्धा त्या नांव अलौकिक ॥ अगाध सुख तीमाजीं ॥ २ ॥ श्रवणीं ध्यानीं अंतराय ॥ लय विक्षेप कषाय ॥ कां रसस्वादुही होय ॥ हे चारी अपाय चुकवावे ॥ ३ ॥ ऐकतांही हरिकथा ॥ विषयचिंतनीं गोडी चित्ता ॥ ते श्रद्धा नव्हेगा सर्वथा ॥ कुत्सित विशेषता तीनांव ॥ ४ ॥ हावभाव कटाक्षगुण ॥ सुरतकाम निरूपण ॥ तेथ ज्याचें श्रद्धाश्रवण ॥ रसस्वादन त्या नांव ॥ ५ ॥ हरिकथेमाजीं बैसला दिसे ॥ परी कथेपाशीं मन नसे ॥ चित्त भंवे पिसें जसें ॥ मर्कटवेशें विक्षेपु ॥ ६ ॥ नातरी नानाउद्वेगें ॥ ऐकतां कथा मनीं नलगे ॥ कां कथेमाजीं झोंप लागे ॥ तो जाणावा वेगें लयविक्षेपु ॥ ७ ॥ श्रवणीं ध्यानीं बैसल्यापाठीं ॥ सगुण निर्गुण काहीं नुठी ॥ निळें पिंवळें पडे दिठी ॥ गुणक्षोभ त्रिपुटीं कषाय ॥ ८ ॥ श्रवणीं ध्यानीं हे अवगुण ॥ तैसाचि त्रिविध प्रेमा जाण ॥ तो ओळखती विचक्षण ॥ ऐक लक्षण सांगेन ॥ ९ ॥

---

१ बोध, संबंध. २ भक्तांना. ३ मला देणें. ४-५-६-७ समाधीस होणारीं विघ्नें.

* मो. सांगता भक्तीची मागीं. × मो. काढीन. +ना. फळयोगें. ना. अधिकता. मो. तेचि ध्यान सर्वथा. ना. कटाक्ष बाण.

महावीरांचें शौर्यपण ॥ ऐकोनि युद्ध दारुण ॥ अत्यंत हर्षे उल्हासे मन ॥ तो प्रेमा जाण राजस ॥ ७१० ॥ दुःखशोकांची अवस्था ॥ कां गेल्याभेल्यांची वार्ता ॥ अत्यंत विलापाची कथा ॥ ज्यासी ऐकतां न संटे ॥ ११ ॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा ॥ स्फुंदनें कांपे थरथरां ॥ प्रेमविलाप अवसरां ॥ तो जाण खरा तामस ॥ १२ ॥ सगुणमूर्तीची संपदा ॥ शंख चक्र पद्म गदा ॥ पीतांबरधारी गोविंदा ॥ ऐकोनि आनंदा जो भरे ॥ १३ ॥ नेत्रीं आनंदजीवन ॥ हृदयीं न संटे स्फुंदन ॥ कृष्णमय झालें मन ॥ तो प्रेमा जाण सात्विक ॥ १४ ॥ यावरी जो प्रेमा चौथा ॥ अतर्क्य तर्केना सर्वथा ॥ उद्धवा तूं मजलागीं पढियंता ॥ तोही आतां सांगेन ॥ १५ ॥ तुझ्या भावार्थाची अवस्था +मोटी ॥ ते बोलविते गुह्यगोष्टी ॥ तुजवेगळा पाहतां दृष्टीं ॥ अधिकारी सृष्टीं दिसेना ॥ १६ ॥ श्रीकृष्ण म्हणे सावधान ॥ ऐकोनि *निर्गुणश्रवण ॥ ज्याचें चिन्मात्रीं बुडे मन ॥ उन्मज्जनें होऊं नेणे ॥ १७ ॥ जैसी कां सैंधवाचा खडा ॥ पडला सिंधूमाजी बुडा ॥ तो झाला सिंधूचि बिंदुकडा ॥ तैसा तो अवघाचि ब्रह्म होय ॥ १८ ॥ चित्तचैतन्या पडतां मिठी ॥ सुटतां लिंगदेहाची गांठी ॥ नेत्रीं अश्रूंचा पूर दाटी ॥ रोमांच उठी सर्वांगीं ॥ १९ ॥ जीवभावाची दशा आटे ॥ अनिवार बाष्प कंठीं दाटे ॥ कांहीं केल्या शब्द न फुटे ॥ पूर लोटे स्वेदाचा ॥ ७२० ॥ नेत्र झाले उन्मीलित ॥ पुंजाळिले जेथिंचे तेथ ॥ विस्मयाचें भरतें येत ॥ बोसंडत स्वानंदें ॥ २१ ॥ हा जाण पां प्रेमा चौथा ॥ उत्तम भागवत अवस्था ॥ तुज म्यां सांगीतली तत्वतां ॥ इचा जाणता मी एक ॥ २२ ॥ निर्गुणीं जो प्रेमा जाण ॥ तें शोधितसत्वाचें लक्षण ॥ हें मी जाणें उणखूण ॥ कां ब्रह्मसंपन्न जाणती ॥ २३ ॥ उद्धवा श्रद्धायुक्तश्रवण ॥ तेणें येवढी प्राप्ति आहे जाण ॥ श्रद्धाश्रवणाचें महिमान ॥ अतिगहन तिहीं लोकीं ॥ २४ ॥ सविवेकनेणत्य वक्ता ॥ ×जोडल्या श्रद्धेनें ऐकावी कथा ॥ कां सज्ञान मौनलिया श्रोता ॥ स्वयें कथा सांगावी ॥ २५ ॥ जै श्रोता वक्ता दोन्ही नाहीं ॥ तैं सिघावें मननाच्याठायीं ॥ कां माझीं जन्मकर्में जीं कांहीं ॥ एकल्याही विचारी ॥ २६ ॥ सांडूनि विषयाची आस ॥ वार्योनि कळिकाळावरी कास ॥ माझ्या कीर्तनीं ॥ अति उल्हास करावा ॥ २७ ॥ त्यजूनियां कामाचें बीज ॥ सांडूनि लौकिकाची लाज ॥ कीर्तनीं नाचावें भोज ॥ गरुडध्वज स्मरोनी ॥ २८ ॥ रामकृष्ण हरि गोविंद ॥ ऐसिया नामाचे प्रबंध ॥ गातां नानापदें छंदबंद ॥ करावा विनोद कीर्तनीं ॥ २९ ॥ जेणें आत्मतत्व जोडे जोडी ॥ ऐशिया पदांची बडमोडी ॥ कीर्तनीं गावी आवडीं ॥ संतपरवडी बैसवूनी ॥ ३० ॥ श्रुति मृदंग टाळ घोळ ॥ मेळवूनि वैष्णवांचा मेळ ॥ कीर्तनीं करावा गदारोळ ॥ काळवेळ न म्हणावी ॥ ३१ ॥ दशमी दिंडी जागरणें ॥ आळस सांडूनि गावें गाणें ॥ हावभाव दाखवणें ॥ कर्म स्मरणें माझेनि ॥ ३२ ॥ बोढूनि धनुष्याची ओढी ॥ त्र्यंबक मोडिलें कडाडी ॥ मी राम म्हणोनि हांक फोडी ॥ जैताची गुढी कीर्तनीं ॥ ३३ ॥ गोवर्धन उचलिला ॥ दावाग्नि प्राशिला ॥ तो तो विन्यास दाखविला ॥ सेतु बांधिला अनुकारु ॥ ३४ ॥ आळस दवडूनि दुरी ॥ अभिमान

१ वर येणें. २ रहस्य. ३ विचारी आणि आशा नसलेला. ४ निरूपण. ५ प्रत्यंचा. ६ शिवधनुष्य. ७ जयाची. ८ रचना. ९ अनुकरणरूपानें.

+ ना. पोटीं. * ना. निर्गुणसगुण. × ना. जोडल्या श्रद्धेनें ऐकता ॥ कां सज्ञान मौनलियां श्रोता. * ना. होऊनि उदास. ५ मो. आत्मत्व. ० ना. करणें.

घालोनियां बाहेरीं ॥ अहर्निशीं कीर्तन करी ॥ गर्व न धरी *जाणिवेचा ॥ ३५ ॥ गाणेंवि जाणीव शहाणीव ॥ ओंवाळूनि सांडावी सर्व ॥ सप्रेम सावेडी कथा गौरव ॥ सुख अभिनव तेणें मज ॥ ३६ ॥ गर्जत नामाच्या कल्लोळीं ॥ नामासरिसी वाजे टाळी ॥ महापातकां झाली होळी ॥ ते वैष्णवमेळीं मी उभा ॥ ३७ ॥ जें सुख क्षीरसागरीं नसे ॥ पहातां वैकुंठींही नसे ॥ तें सुख मज कीर्तनीं असे ॥ कीर्तनवशें तुष्टत ॥ ३८ ॥ मज सप्रेमाची आवडी भारी ॥ भक्तिभावाचिया कुसरीं ॥ मीही कीर्तनीं नृत्य करीं ॥ छंदतालावरी विनोदें ॥ ३९ ॥ ऐशिया कीर्तनपरिपाठीं ॥ बुडाल्या प्रायश्चित्तांच्या कोटी ॥ खुंटली यमदूतराहाटी ॥ कादिली कांटी पापाची ॥ ७४० ॥ नामस्मरणाच्या आवडीं ॥ लाजल्या मंत्रबीजांच्या कोडी ॥ तपादिसाधनें बापुडीं ॥ झालीं वेडीं हरिनामें ॥४१॥ ऐकोनि हरिनामाचा घोष ॥ योगयागीं लपविलें मुख ॥ धाकें पळालें विषयसुख ॥ विराले देख अधर्म ॥४२॥ हरिनामाच्या कडकडाटीं ॥ दोष रिघाले दिक्पटीं ॥ तीर्थांची उतरली उटी ॥ कीर्तन कसवटी हरिप्रिय ॥ ४३ ॥ माझेनि प्रेमें उन्मत्त होऊनी ॥ आवडीं कीर्तन अनुदिनीं ॥ मनसा वाचा कर्मं करूनी ॥ मजवांचूनी नेणती ॥४४॥

॥ श्लोक ॥ मदर्थे धर्मकामार्थानाचरन्मदपाश्रयः ॥ लभते निश्चलां भक्तिं मय्युद्धव सनातने ॥ २४ ॥

॥ टीका ॥ माझे भक्त जे उत्तम ॥ त्यांचा धर्म अर्थ मीचि काम ॥ मजवेगळा मनोधर्म ॥ अन्यथा कर्म करूं नेणे ॥४५॥ माझें भजन उत्तम कर्म ॥मज अर्पे तो शुद्ध धर्म ॥ मज कामणें हा शुद्धकाम ॥ ज्याचा आराम मजमाजीं ॥ ४६ ॥ वेंचूनियां नाना अर्थ ॥ संग्रह करिती परमार्थ ॥ नश्वर अर्थ जें वित्त ॥ तें माझे भक्त न संचिती ॥ ४७ ॥ ज्यांचें धनावरी चित्त ॥ ते केवळ जाण अभक्त ॥ ते जें जें कांहीं भजन करित ॥ तें द्रव्यार्थ नटनाट्य ॥ ४८ ॥ मनसा वाचा कर्में जाण ॥ जेथें नाहीं मदर्पण॥ तें तें दांभिक भजन ॥ केवळ जाण उदरार्थ ॥४९ भक्तीमाजीं विरुद्धपण ॥ विरुद्धधर्माचें लक्षण ॥ तेंही करीन निरूपण ॥ सावधान अवधारीं ॥ ७५० ॥ माझें भजन करूनि गौण ॥ जो करूं निघे धनार्जन ॥ हें भजनाविरुद्ध लक्षण ॥ मुख्य जाण भक्तांचें ॥ ५१ ॥ 'गांठींचें न वेंचूनि धन ॥ कोरडें करी माझें भजन ॥ मजसीं जेणें केलें वंचन ॥ विरुद्धलक्षण मुख्यत्वें ॥५२ ॥ या नांव अर्थविरुद्धता ॥ आतां ×दुष्टकामीं जो विचरता ॥ मी भजतसें भगवंता ॥ दोष सर्वथा मज न लागे ॥ ५३ ॥ ऐसऐशिया भावना ॥ जो +दुष्टकामीं विचरे जाणा ॥ हे भजनीं विरुद्धलक्षणा ॥ भक्ता अभक्तपणा आणित ॥ ५४॥ मज नार्पितां जें जें श्राद्ध ॥ ते त्याची कल्पना विरुद्ध ॥ श्राद्धसंकल्प अविरुद्ध ॥ मदर्पणें वेद गर्जती ॥ ५५ ॥ श्राद्धीं मुख्य संकल्प जाण ॥ 'पितरस्वरूप जनार्दन' ॥ ऐसें असोनियां जाण ॥ नैवेद्य मदर्पण न करिती ॥ ५६ ॥ 'अन्न ब्रह्म अहं ब्रह्म' ॥ हें श्राद्धींचें गुह्य वर्म ॥ ऐसें नेणोनि शुद्ध धर्म ॥ वृथा भ्रम वाढविती ॥ ५७ ॥ 'मी *सकळजनांचा जनिता ॥ मुख्य पितरांचाही मी पिता ॥ त्या मज कर्म नार्पितां ॥ विरुद्ध सर्वथा तें श्राद्ध '॥५८॥ मज नार्पितां जें जें करणें ॥ तें तें उपजे अभक्तपणें ॥ विरुद्धधर्माचीं लक्षणें ॥ दुःखदारुणें

१ गायन कौशल्य. २ मोळी. ३ दिशेकडे. ४ माहात्म्य. ५ माझी इच्छा करणें. ६ वर्तन करणारा.
* मो. गाणिवेचा. × मो. दृष्टकामी जो वर्तता. + मो. दृष्टकामी. * मो. सकळांचा.

अनिवार ॥ ५९ ॥ ' उत्तमभक्तांचें लक्षण ॥ संकल्पेंवीण जाण ॥ अन्नपानादि मदर्पण ॥ करिती ह्मण जाणती' ॥७६०॥ ध्रुवाच्यापरी अढळ ॥ जे माझ्याठायीं भजनशीळ ॥ ते माझी भक्ति अचंचळ ॥ अतिनिश्चळ पावती ॥ ६१ ॥ ' आर्तो[1]जिज्ञासु[2]रर्थार्थी[3]' ॥ या तिघांसीं जी नव्हे प्राप्ती ॥ ते माझी चौथी भक्ती ॥ *प्रेमें पावती उद्धवा ॥ ६२ ॥ आर्त आर्तिहरण काजें ॥ जिज्ञासु ×जाणपणालागीं भजे ॥ तिजेनि वांछिजे ॥ अति वोजें अर्थसिद्धी ॥ ६३ ॥ यावरी चौथियाचेठायीं ॥ या कल्पनेचा ✻सोसु नाहीं ॥ यालागीं चौथी भक्ति पाही ॥ त्याच्याठायीं घर रिघे ॥ ६४ ॥ जे भक्तीमाजीं वाडेंकोडें ॥ मीच मी चहूंकडे ॥ जेथिंच्या तेथें सांपडे ॥ हें भजन जोडे तयांसी ॥ ६५ ॥ संकल्प केलियावीण ॥ सहजें होतसे मदर्पण ॥ हें चवथे भक्तीचें लक्षण ॥ अतर्क्यभजन पैं माझें ॥ ६६ ॥ तेथ जें करणें तेचि पूजा ॥ जें बोलणें तो जपू माझा ॥ जें देखणें तें अधोक्षजा ॥ दर्शन वोजा होतसे ॥ ६७ ॥ तेथ चालणें ते यात्रा माझी ॥ +जें भक्षी तें मजचि यजी ॥ त्याची निद्रा ते समाधि माझी॥ऐसा मजमाजीं भजतसे ॥६८॥ यापरी अनायासें जाण ॥ सहजें होतसे मदर्पण ॥ हे चौथी भक्ती सनातन ॥ उद्धवा संपूर्ण तो लाभे ॥ ६९ ॥ उद्धवा ऐसें मानिसी चित्तीं ॥ जे मुळींहूनि चारी भक्ती ॥ पहिली दुजी तिजी चौथी ॥ मिथ्या वदंती कल्पना ॥ ७७० ॥ सहज माझी जे प्रकाशस्थिती ॥ ते ' भक्ति' बोलिजे ' भागवतीं' ॥ संवित्ती बोलिजे ' वेदांतीं ' ॥ ' शैवीं ' ' शक्ती ' हे बोलिजे ॥ ७१॥ बौद्ध, जीनेश, नेमीनाथा, ॥ जोगी ह्मणती आदिनाथा ॥ भैरव, खंडेराव, गाणपत्यां ॥ अव्यक्त ह्मणतां एक पैं ॥ ७२ ॥ एक ह्मणती हे आदिमाता ॥ सौर, ह्मणती हा सविता ॥ असो नांवाची बहु कथा ॥ उपासकता विभागें ॥ ७३ ॥ ऐशी जे कां प्रकाशस्थिती ॥ त्या नांव बोलिजे भक्ती ॥ तेणें प्रकाशें त्रिजगतीं ॥ उत्पत्तिस्थितिलय भासे ॥७४॥ माझ्या नाना अवतार माळा ॥ येणें प्रकाशें प्रकाशती सोज्ज्वळा ॥ देवो देवी सकळा ॥ येणें प्रकाशमेळा भासती ॥ ७५ ॥ माझ्या नाना अवतारांची उत्पत्ती ॥ तेणें प्रकाशें ✳असती होती ॥ नानाचरित्रें करूनि अंतीं ॥ प्रवेशती ते प्रकाशीं ॥ ७६ ॥ ऐशिया प्रकाशाची जे प्राप्ती ॥ ते जाण सनातन माझी भक्ती ॥ उद्धवा 1ग्यां हे तुजप्रती ॥ यथानिगुतीं सांगीतली ॥ ७७ ॥ निश्चळ भक्ती सनातन ॥ हें मूळींचें पदव्याख्यान ॥ यालागीं भक्ति सनातन ॥ समूळ जाण बोलिलें ॥ ७८ ॥ सांडूनि पदपदार्था ॥ नाहीं बोलिलों जी वृथा ॥ सावधान व्हावें श्रोतां ॥ पुढील कथा अनुपम्य ॥ ७९ ॥ उद्धवा हे ऐशी माझी भक्ती ॥ कैसेनि होय ह्मणसी प्राप्ती ॥ भावें धरिलिया सत्संगती ॥ माझी भक्ती उव्दोघे ॥ ७८० ॥

॥ श्लोक ॥ ॥ सत्संगलब्धया भक्त्या मयि मां स उपासिता ॥ स वै मे दर्शितं सद्भिरंजसा विंदते पदम् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ मुख्यत्वें संतांची सेवा ॥ हेंचि साधन आवडे देवा ॥ संतवचनें निजभावा ॥ देतसे तेव्हां निजभक्ती ॥ ८१ ॥ ज्यासि आवडे संतसंगाचा मेळू ॥ जो साधुवचनीं अतिभुकाळू ॥

१ रोगी. २ मुमुक्षु. ३ धनेच्छु. ४ खोटी वाणी. ५ ज्ञान. ६ जुनी. ७ मूळ शद्बाचा अर्थ.

* मो. प्रेमळ. × ना. जाणावयालागीं. ✻ ना. मोस ( मागमोस. ) + ना. जें भक्षिलें तेणेंचि मज यजी. ✳ ना. ऐशी. 1 ना. हें तुझिया प्रीती.

जो पाहिले वचन नेणें उगळूं ॥ तोचि +पायाळू निजभक्ती ॥ ८२ ॥ साधुभजनीं श्रद्धा भारी ॥ देखोनियां निजनिर्धारीं ॥ त्यावरी सद्गुरु कृपा करी ॥ साधु चराचरीं गुरुरावो ॥ ८३ ॥ गुरु- वांचोनि तत्त्वतां ॥ नाहीं संसारीं तारिता ॥ गुरुवचनें निजभक्तिदाता ॥ मीचि सर्वथा भक्तांसी ॥ ८४ ॥ सद्गुरु जो संसारीं ॥ त्याची आज्ञा मी वाहें शिरीं ॥ तो ज्यावरी कृपा करी ॥ तो मी उद्धरीं तात्काळ ॥ ८५ ॥ त्या सद्गुरूचें भजन ॥ जो मद्रूपें करी जाण ॥ त्याचें मज पांडियेंते- पण ॥ माझेनिही जाण न बोलवे ॥ ८६ ॥ त्याचा इहलोक परलोक ॥ दोन्हीं चालविता मीचि देव ॥ त्याचेनि मज अत्यंत सुख ॥ हरिखें हरिख वोसंडे ॥ ८७ ॥ त्यासि गुरूनें जो दाविला मार्ग । चालतां न पडे प्रयासपांग ॥ मी मासोरा धांवें श्रीरंग ॥ आपुलें सर्वांग मी वोडवीं ॥ ८८ ॥ तेणें जावें ज्या पदासी ॥ तें पदचि मी आणी त्यापासीं ॥ संतभजनीं प्रीति ऐशी ॥ हृषीकेशी सांगतु ॥ ८९ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ उद्धवाचें कळवळलें मन ॥ कोण कोण ते साधुजन ॥ त्यांचें निजचिन्ह पुसोंपां ॥ ९० ॥ कोण तें भक्तीचें लक्षण ॥ भजती स्वगुण ते कोण ॥ हें समूळ जाणावया आपण ॥ उद्धवें प्रश्न मांडिला ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ उद्धव उवाच ॥ साधुस्तवोत्तमश्लोक मतः कीदृग्विधः प्रभो ॥
भक्तिस्त्वय्युपयुज्येत कीदृशी सद्भिरादृता ॥ २६ ॥

॥ टीका ॥ ज्ञाते वक्ते आहेत बहुत ॥ परी ते रजतमगुणयुक्त ॥ गुणानुसारें निरूपित ॥ त्यांसी पुसों चित्त मानेना ॥ ९२ ॥ अथवा सात्त्विक केवळ ॥ तो सत्त्वगुणें विव्हळ ॥ ※बो- लणें बोलतां जाय वरळ ॥ नव्हे केवळ निजबोध ॥ ९३ ॥ तैसा तूं नव्हेसि कृष्णनाथा ॥ तुजआधीन गुण तत्त्वतां ॥ लीलाविग्रही देहधरिता ॥ निजज्ञानवक्ता तूं एक ॥ ९४ ॥ यालागीं जो उत्तमश्लोक ॥ तुज म्हणती तिन्ही लोक ॥ तुज वेगळा आणीक ॥ आम्हांसी देव मानेना ॥ ९५ ॥ माझिया प्रश्नाचा वक्ता ॥ तूंचि एक कृष्णनाथा ॥ तरी साधु कोण तत्त्वतां ॥ तुज सर्वथा मा- नला ॥ ९६ ॥ तुज मानले जे साधुजन ॥ त्यांचें संपूर्ण सांग लक्षण ॥ तुज पढियंती भक्ती कोण ॥ तेंही लक्षण सांगावें ॥ ९७ ॥ भक्तीमाजीं भक्ती सधर ॥ जे कां तुझी प्रीतिकर ॥ अति- उत्तम ³परात्पर ॥ संतीं निरंतर आदरिली ॥ ९८ ॥ संतीं आदरिलें जे भक्तीसी ॥ संतांसि ×पुसं जा म्हणसी ॥ मज विश्वास तुझिया वचनासीं ॥ पुसों आणिकांसी मानेना ॥ ९९ ॥ जे ज्या ⁵दैवतांतरा भजती ॥ ते ती उत्तमभक्ति म्हणती ॥ तुज मानली जे श्रीपती ॥ ते मजप्रती सांगावी ॥ ८०० ॥ समान कुळशीळसंवाद ॥ तैसियासीच म्हणती साधु ॥ तूं निजसुखें जो म्ह- णसी शुद्ध ॥ तो मज बंधू सर्वथा ॥ १ ॥ तीं संबोधनीं सारंगधरु ॥ उद्धव प्रार्थूनि सादरु ॥ तीं विशेषणीं विचारु ॥ श्रवणाधिकारु सांगत ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ ॥ एतन्मे पुरुषाध्यक्ष लोकाध्यक्ष जगत्प्रभो ॥ प्रणतायाऽनुरक्ताय
प्रपन्नाय च कथ्यताम् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ पुरुषीं पुरुषोत्तम तूंचि कीं ॥ धर्माधर्मांचा विवेकी ॥ यालागीं बोलिजे पुरुषाध्यक्षीं ॥

१ आर्ते. २ देई, पुढें करी. ३ तत्काळ, सामर्थ्यवान. ४ दुसऱ्या दैवतेंस.

+ ना. दयाळू. ※ मो. बोलत बोलतां. ³ मो. अपार. × ना. पुसं जाय मो. पुस जगीं.
⁵ ना. दैवतां त.

सर्वसाक्षी गोविंदा ॥ ३ ॥ जैसें कर्म तैसा फळदाता ॥ यालागीं बोलिजे लोकाध्यक्षता ॥ तूंचि ब्रह्मादिकांचा नियंता ॥ प्रतिपाळिता जगाचा ॥ ४ ॥ होकां मी जगाचा प्रतिपाळिता ॥ त्या जगामाजीं तूंही असतां ॥ तुजचि सांगावी ज्ञानकथा ॥ हे अधिकता कां म्हणसी ॥ ५ ॥ जरी तूं सर्वज्ञ सर्वेश्वरु ॥ अंतर्यामी नियंता ईश्वरु ॥ जरी देखसी माझा अधिकारु ॥ तरी ज्ञाननिर्धारु सांगावा ॥ ६ ॥ होकां मज अधिकारु नाहीं ॥ तरी शरण आलों तुज पाहीं ॥ शरणागताची तुझ्या ठायीं ॥ उपेक्षा नाहीं सर्वथा ॥ ७ ॥ विषयीं देखोनि थोर दुःख ॥ झालों तुझिया चरणांसंमुख ॥ अतिदीन मी तुझा रंक ॥ कृपा आवश्यक तुवां कीजे ॥ ८ ॥ माझ्या दुर्जयवासना ॥ अनिवार मज *निवारती ना ॥ त्या तूं निवारीं श्रीकृष्णा ॥ शरण चरणां यालागीं ॥ ९ ॥ मी एक भक्त अनुरक्त ॥ ऐसें बोलतां बहु गर्व दिसत ॥ तूं सर्वज्ञ श्रीअनंत ॥ कृपावंत दीनाचा ॥ ८१० ॥ मी एक श्रवणाधिकारी ॥ हेंही न म्हणावें श्रीहरी ॥ ऐसें बोलोनियां पाय धरी ॥ कृपा करीं कृपानिधी ॥ ११ ॥ आम्हीं स्वर्गांतस्थ सहज ॥ पाय धरणें न घडे तुज ॥ या म्हणणियाचें निजबीज ॥ कळलें मज गोविंदा ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ त्वं ब्रह्म परमं व्योम पुरुषः प्रकृतेः परः ॥ अवतीर्णोऽसि भगवन् स्वेच्छोपात्तपृथग्वपुः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ तूं निर्गुण निर्विशेष ॥ चिन्मात्रैक चिदाकाश ॥ पुरुषांमाजीं उत्तम पुरुष ॥ तेंही सर्वांस तूं एक ॥ १३ ॥ तूं ब्रह्म गा निर्विकार ॥ प्रकृतिपुरुषांहूनि पर ॥ तुझा वेदशास्त्रां न कळे पार ॥ अगोचर इंद्रियां ॥ १४ ॥ धन्य आमुचे भाग्याची कळा ॥ त्या तुज प्रत्यक्ष देखतों डोळां ॥ मुकुटकुंडलें वनमाळा ॥ घनसांवळा शोभत ॥ १५ ॥ सुंदर राजीवलोचन ॥ पीतांबरपरिधान ॥ देखोनि निवताहे तनुमन ॥ तूं जगज्जीवन जगाचा ॥ १६ ॥ त्या तुझें दर्शन अतिगोड ॥ देखतां पुरे जगाचें कोड ॥ त्याही देहाची तुज नाहीं चाड ॥ ऐसा निचाड तूं देवा ॥ १७ ॥ तरी भक्तकृपेचा कळवळा ॥ धरिसी +नानावतारमाळा ॥ भक्तइच्छा तूं स्वलीळा ॥ देहाचा सोहळा दाविसी ॥ १८ ॥ भक्तकृपेनें तत्त्वतां ॥ तूं अवतरलासि कृष्णनाथा ॥ तरी माझिया प्रश्नाचा वक्ता ॥ न प्रार्थितां जाहलासी ॥ १९ ॥ जेवीं वत्स हुंबरतां गाय ॥ वोरसोनी धांवताहे ॥ तेवीं उद्धवप्रश्नें देव पाहें ॥ वोळला आहे निजबोधें ॥ ८२० ॥ धन्यासी दुभतें दोनी सांजें ॥ तेंही वत्सयोगें ०पाविजे ॥ वत्सासि वोळली सदा सहजें ॥ तेवीं अधोक्षजें उद्धवासी ॥ २१ ॥ उद्धव आवडल्या आवडीं ॥ त्याच्या प्रश्नाची अति गोडी ॥ बाप भाग्याची परवडी ॥ जोडल्या जोडी श्रीकृष्ण ॥ २२ ॥ जें जें कांहीं उद्धव पुसत ॥ त्यासि अंजुळी जोडवी श्रीकृष्णनाथ ॥ आवडी त्यातें चारूं पहात ॥ भावार्थें अनंत भुलला ॥ २३ ॥ जैशीं ×अजातपक्ष पिलीं ॥ त्यांसि पक्षिणी मुखीं चारा घाली ॥ तैसी निजज्ञानगुह्यबोली ॥ कृष्ण हृदयीं घाली उद्धवाचे ॥ २४ ॥ उद्धवप्रश्नाचें उत्तर ॥ पांच श्लोकीं शार्ङ्गधर ॥ साधु-

१ कुळीनत्व. २ स्वाभाविक, सहोत्पन्न. ३ कमलनेत्र. ४ निस्पृह. ५ पान्हावली. ६ अनुकूल. ७ पुढें करी. ८ पंख न आलेला.

* ना. निवारिना मो. आवरेना. + मो. नानावतार लीळा. ० ना. योगज. × ना. अजातपक्षी. मो. अजात पक्षिणीचीं.

लक्षणें विचित्र ॥ अतिपवित्र सांगेल ॥ २५ ॥ साधुलक्षणें अपार जाण ॥ त्यांत उत्तमोत्तम तीसें गुण ॥ निवडोनियां श्रीकृष्ण ॥ उद्धवासी आपण सांगत ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ कृपालुरकृतद्रोहस्तितिक्षुः सर्वदेहिनाम् ॥ सत्यसारोऽनवद्यात्मा समः सर्वोपकारकः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ कृपेसी स्वतंत्र जन्म नाहीं ॥ जेथ उपजे तो साधु पाहीं ॥ कृपा वसे संतांच्या देहीं ॥ त्यांचेनि ते पाहीं दाटुगी जगीं ॥ २७ ॥ कृपा त्यांचेनि महिमें आली ॥ दया त्यांचेनि जीवें ज्याली ॥ कठिणत्वाची कांटी काढिली ॥ मुळीं उपटिली निष्ठुरत्वाची ॥२८॥ कृपा भूतमात्राच्याठायीं ॥ सारिखीच सर्वदेहीं ॥ येथें तेथें हें त्या नाहीं ॥ अवकृपा ठायीं निमाली ॥ २९ ॥ नवल कृपाळु त्याचें चित्त ॥ जीवाचा जीव जीवीं सुत ॥ दुःख हरोनि सुख देत ॥ कृपा अद्‌भुत यापरी ॥ ८३० ॥ जेणें आपणासी होय दुःख ॥ तें परासि न करी निःशेख ॥ जेणें आपणिया होय सुख ॥ तें करी आवश्यक प्राणिमात्रां ॥ ३१ ॥ या नांव कृपाळुता ॥ हें पहिलें लक्षण संतां ॥ दुसरें तें अद्रोहता ॥ ऐक आतां सांगेन ॥ ३२ ॥ लौकिकीं हिंडतां अद्रोहता ॥ ठावो न लभेचि सर्वथा ॥ मग शरण आली +साधुसंतां ॥ सावकाशता वस्तीसी ॥ ३३ ॥ ते दयाळु शरणागता ॥ तिहीं प्रतिपाळिली अद्रोहता ॥ भूतीं भगवंत देखतां ॥ द्रोहाची वार्ता निमाली ॥ ३४ ॥ व्याघ्रसर्पादि देहांसी ॥ कदा द्वेष नुपजे त्यांसी ॥ जरी देऊं आले उपद्रवासी ॥ तरी द्वेषासी करीना ॥ ३५ ॥ देहास जालिया आपदा ॥ *ते झडकरी लावी प्रारब्धा ॥ द्वेष येऊं नेदी कदा ॥ नातळे ×क्रोधा निजबोधें ॥ ३६ ॥ हे जाण पां अद्रोहता ॥ दुसरें लक्षण तत्त्वतां ॥ तितिक्षा ते ऐक आतां ॥ सहनशीलता साधूंची ॥ ३७ ॥ शांति परदेशी झाली होती ॥ जेथें जाये तो दवडी परती ॥ मग अतिदीन येतां काकुलती ॥ निजधामा संतीं आणिली ॥ ३८ ॥ संतीं वाढविली अतिप्रीतीं ॥ ते भगवंतासि झाली पढियंती ॥ तेणें आपुली निजसंपत्ती ॥ शांतीच्या हातीं दीधली ॥ ३९ ॥ शांती सकळ वैभवेंसी ॥ अखंड असे संतांपाशीं ॥ या मार्गीं सहनशीलता तयांसी ॥ अहर्निशीं अनिवार ॥८४०॥ लागला सकळ भूतांच्या झटा ॥ न म्हणे हा भला वोखटा ॥ नाचत निजशांतीचे चोहटां ॥ संत गोमटा त्या नांव ॥ ४१ ॥ ऐशी जे सहनशीलता ॥ ते तितिक्षा जाण तत्वतां ॥ हे तिसरी लक्षणता ॥ सत्याची सत्यता अवधारीं ॥ ४२ ॥ सत्य अल्पायुषी झालें येथें ॥ मरे उपजे जेथिंच्या तेथें ॥ कोठेंही नव्हेचि वाढतें ॥ तेणें संतातें ठाकिलें ॥ ४३ ॥ सत्यासी संतांसी होतां भेटी ॥ तंव सत्यस्वरूपीं पडली गांठी ॥ सत्य ⁊सदसत्यें उठी ॥ झालें सृष्टीं चिरायु ॥ ४४ ॥ यापरी सत्य संतदृष्टीं ॥ सत्य सारें आलें पुष्टी ॥ संतबळें वाढलें सृष्टीं ॥ सत्यें भेटी परब्रह्मीं ॥ ४५ ॥ संतांसि व्हावया उतरायी ॥ सत्य लागलें त्यांचे पायीं ॥ संतचरणांवेगळा पाही ॥ थारा नाहीं सत्यासी ॥४६॥ ऐसे सत्यास आधारभूत ॥ ज्यांचे पाखीवा सत्य जीत ॥ ज्यांचेनि बळें सत्य समर्थ ॥ ते शुद्ध संत जाणावे ॥ ४७ ॥ ज्यांसि सबाह्य सत्यत्वें तुष्टी ॥ जे

१ ३०. २ मोठेपणास. ३ जगली. ४ सहिष्णुता, शांति. ५ चवाठा. ६ खरेखोटेपणानें. ७ आश्रयें, कृपेनें. ८ जिवंत.

+ ना. साधुचित्ता. * ना. तेणें झाडीकरी. × ना. वादा. ⁊ ना. सत्संगत्वें.

*सत्यस्वरूपें आले पुष्टी ॥ ⁰सत्यें घाली देत टेंकर दृष्टी ॥ ज्यांची वाचा उठी सत्यत्वें ॥४८॥ या नांव जाण +सत्याचें सार ॥ हें संतांचें वसतें घर ॥ हे मज मान्य संत साचार ॥ मी निरंतर त्यांपाशीं ॥ ४९ ॥ जीहीं असत्याची वाहूनि आण ॥ ज्यांमाजीं सत्य 6सत्प्रमाण ॥ जे सदा सत्यत्वें संपन्न ॥ हें मुख्य लक्षण साधूंचें ॥ ८५० ॥ या नांव सत्यसार ॥ संतलक्षण साचार ॥ हा चौथा गुण सधरे ॥ ×अनवद्य अपार तें ऐका ॥ ५१ ॥ निंदा असूयादि दोष समस्त ॥ निजात्मबोधें प्रक्षाळित ॥ अत्यंत पवित्र केलें चित्त ॥ *अनिंदित निजबोधें ॥५२॥ गुरुआज्ञातीर्थीं न्हाला ॥ न्हावोनि सर्वांगीं निवाला ॥ त्रिविधतापें सांडवला ॥ पवित्र झाला मद्रूपें ॥ ५३ ॥ काय सांगूं त्याची पवित्रता ॥ तीर्थें मागती चरणतीर्था ॥ मीही पदरज वांछिता ॥ इतरांची कथा कायसी ॥ ५४ ॥ कृष्ण ह्मणे उद्धवा ॥ हा ०अनवद्य गुण पांचवा ॥ ऐक आतां सहावा ॥ सम सर्वां समभावें ॥ ५५ ॥ निजरूपें सर्वसमता ॥ समचि देखे सर्व भूतां ॥ निःशेष निमाली विषमता ॥ जेवीं स्थिरता सागरीं ॥ ५६ ॥ नाना अलंकार पदार्थां ॥ सोनेपणें विकत घेतां ॥ ते ते पदार्थ न मोडितां ॥ स्वभावतां सम सोनें ॥५७॥ तैसें नानाकार नाना नाम ॥ अवघें जग दिसे विषम ॥ साधू चिद्रूपें सर्व सम ॥ न देखे विषम निजबोधें ॥ ५८ ॥ ऐशिया सर्वसाम्यावस्थेसी ॥ दैवें आलिया सुखदुःखांसी ॥ तेही मुकली द्वंद्वभावासी ॥ सहजें समरसीं ²निजसाम्य ॥ ५९ ॥ सव्यें मिनल्या महानदीसी ॥ अपसव्यें आल्या गांवरसांसी ॥ गंगा दोहींतेंही समरसी ॥ गुणदोषांसी उद्धरूनी ॥ ६० ॥ तेथ पवित्र अपवित्रता ॥ बोलेंचि नये सर्वथा ॥ गोडकडूपणांची वार्ता ॥ निजांगें समता करी गंगा ॥६१॥ तैसें सुखदुःखांचें भान ॥ साधूंसि समत्वें समान ॥ सदा निजबोधें संपन्न ॥ हें अगाध लक्षण संतांचें ॥ ६२ ॥ नदियो एकाचि एकला ॥ गायव्याघ्रांचें सोंग अवगला ॥ भीतरील खेळया 4जेणें वोळखिला ॥ ⁹तयाचा किटला वृथा 5भ्रमू ॥६३॥ तैशी 1भयाभयवार्ता ॥ द्वैतभावें उठी सर्वथा ॥ साधु उभयसाम्यें पुरता ॥ भयनिर्भयता तो नेणे ॥ ६४ ॥ द्वंद्वसाम्यें परिपूर्ण ॥ साधूचा हा सहावा गुण ॥ ऐक ³सातवें लक्षण ॥ परोपकारीपण तयाचें ॥ ६५ ॥ पत्र पुष्प छाया फळ ॥ ⁸त्वचा काष्ठ आणि मूळ ॥ वृक्ष सर्वांगें सफळ ॥ सर्वांगीं केवळ उपकारी ॥६६ जो वृक्ष प्रतिपाळी ॥ कां जो घाव घाली मुळीं ॥ दोनीतें वृक्ष पुष्पीं फळीं ॥ समानमेळीं 7तुष्टला ॥ ६७ ॥ मोडूनि फळें आलिया वृक्षें ॥ तो एकही स्वयें न चाखे ॥ तेवीं कर्मफळा जो न टेंके¹² ॥ तो यथासुखें परब्रह्म ॥६८॥ तैसा कायावाचामनें प्राणें ॥ साधु वाढला 5उपकाराकारणें ॥ आपुलें पारिखें ह्मणों नेणे ॥ उपकारू करणें सर्वांसी ॥ ६९ ॥ होकां चंद्र उगवेनि अंबरीं ॥ जेवीं जगाचे आंधारें निवारी ॥ विश्वाचा ताप दूर करी ॥ निववी निजकरीं सर्वांतें ॥ ८७० ॥ तेथ चंद्रामृत चकोरीं सेवावें ॥ येरांसी चंद्र न म्हणे न घ्यावें ॥ जो जो भजे

१ वळकट. २ शुद्ध. ३ गुणांवर दोषाचा आरोप करणें. ४ सोडिला. ५ डावेकडून. ६ उजवेकडून. ७ लेंड ओहोळ्यास. ८ टाकून. ९ सोंग घेणारा. १० नटला. ११ लवेतां. १२ आश्रय धरी.

*ना. सत्यस्वरूप. ⁰ना. सत्यघाली टेंकर देत दृष्टी. +ना. सत्य साचार. 6ना. प्रमाण. ×ना. अनिंद्य अपार तो ऐका. *ना. अनुदिनी. ०ना. अनिंद्य मो. अनवद्य. 2ना. समसाम्य. 4ना. जैं. ⁹ना. तैं. 5ना. भयसंभ्रम. 1ना. भवभयाची. ³ना. संताचें. ⁸ना. त्वचा काष्ठें समूळ मूळ. 7ना. संतुष्ट. 5ना. परोपकाराकारणें.

जेणें भावें ॥ तो तो पावे तें सुख ॥ ७१ ॥ तैसेंचि जाण साधूपाशीं ॥ जो जो श्रद्धा धरी जैशी ॥ त्या त्या देतसे सुखासी ॥ होत जगासी उपकारी ॥ ७२ ॥ ‘ काउळे चंद्रासि हेळसिती ॥ चकोर चंद्रामृत सेविती ॥ तेवीं *दुष्ट साधूतें धिक्कारिती ॥ भावार्थी पावती निजलाभू ॥ ७३॥ सातव्या लक्षणाचा उभारा ॥ सांगीतलें परोपकारा ॥ पुढील श्लोकीं लक्षणें अकरा ॥ साधुनिर्धारा सांगत ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ कामैरहतधीर्दांतो मृदुः शुचिरकिंचनः ॥ अनीहो मितभुक् शांतः स्थिरो मच्छरणो मुनिः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ उर्वशी आलिया सेजेसी ॥ कामक्षोभ नुपजे ज्यासी ॥ स्वानंद भोगितां अहर्निशीं॥ विषयकामासी विसरला ॥ ७५ ॥ ‘ रंकू पालखिये बैसला ॥ तो पूर्ववाहणां विसरला ॥ तेवीं हा निजानंदें तृप्त झाला ॥ काम विसरला तुच्छत्वें ’ ॥ ७६ ॥ कांहीं अप्राप्य पावावया [३]कामावें ॥ साधूसि अप्राप्तता न संभवे ॥ प्राप्तपदीं यथागौरवें ॥ निजानुभवें विराजत ॥७७॥ खद्योता सूर्य भेटों जातां ॥ खद्योत न देखे सविता ॥ सूर्यासी न भेटवे खद्योता ॥ तेवीं अप्राप्तता साधूसी ॥ ७८ ॥ एवं उभयपरीं पाहतां ॥ कामू निमाला सर्वथा ॥ हें आठवें लक्षण तत्त्वतां ॥ अकामता साधूची ॥ ७९ ॥ ‘ सावधानें अंतर नेमितां ॥ तेचि बाह्येंद्रियां नियामकता ॥ जेवीं कां ×लेंकीसी शिकवण देतां ॥ सून सर्वथा चळीं कांपे ’ ॥ ८० ॥ [४]कुंभ्य पूर रणीं *लागल्या हातां ॥ येर कटक जितिलें न झुंजतां॥जेवीं कां मूळ छेदिलें असतां ॥ शाखा समस्ता छेदिल्या ॥ ८१ ॥ एवं अंतरवृत्तीचा जो नेम ॥ तोचि बाह्येंद्रियां उपरम ॥ ऐसेनीही जें निपजे कर्म ॥ तें निर्भ्रम अहेतुक ॥ ८२ ॥ अंतर जडलें आत्मस्थितीं ॥ बाह्य रंगलें मद्भक्तीं ॥ तेथें जीं जीं कर्में निपजती ॥ तीं तीं होती ब्रह्मरूप ॥ ८३ ॥ बाह्येंद्रियीं करितां कर्म ॥ अंतरींचें [८]कर्मीं प्रकटे ब्रह्म ॥ हा ⓒबाह्येंद्रियांचा नेम ॥ [७]आत्माराम +जाणती ॥८४ ॥ ऐसी बाह्येंद्रियनियामकता ॥ हे जाणावी साधूची दांतता ॥ हा नववा गुण तत्त्वतां ॥ ऐक आतां दशमातें ॥ ८५ ॥ आकाश सर्वांसीही लागे ॥ परी कठिण नव्हे कोणी ०भागें ॥ तेवीं साधु ⓒजाण सर्वांगें ॥ मृदु लागे सर्वांसी ॥ ८६ ॥ पिंजल्या कापुसाचा गोळा ॥ फोडूं नेणे कोणाच्या कपाळा ॥ तैसाचि साधूचा जिव्हाळा ॥ अतिकोंवळा सर्वांसी ॥ ८७ ॥ पाहें पां जैसें गंगाजळ ॥ गायीव्याघ्रांसी करी शीतळ ॥ तैसाचि साधूही केवळ ॥ मृदु मंजुळ सर्वांसी ॥ ८८ ॥ साधूची अतिमृदुता ॥ या नांव जाण सर्वथा ॥ हें दशम लक्षण योग्यता ॥ ऐक आतां अकरावें ॥८९॥ साधूंची जे शुचि[९]ष्मंतता ॥ ते भगवद्भजनेंचि तत्त्वतां ॥ व्रततपदानादितीर्थां ॥ Sशुचिष्मंतता त्यांचेनी ॥ ९० ॥ परदारा आणि परधन ॥ सर्वथा नातळे ज्यांचें मन ॥ गंगादि तीर्थें त्यांचें जाण ॥ चरणस्पर्शन वांछिती ॥ ९१ ॥ स्वदारा स्वधन सलोभता॥ अवश्य जाणें अधःपाता ॥ द्रव्यदारा निरपेक्षता ॥ शुचिष्मंतता साधूचा ॥ ९२ ॥ ऐसी असो-

---

१ उपहासिती. २ पूर्वीचे जोडे. ३ इच्छा करणें. ४ काजवा. ५ पुढारी धुरीण. ६ सैन्य. ७ आत्म्याच्याच ठिकाणीं रममाण होणारे. ८ अंतःकरण. ९ पवित्रपणा.

*मो. दृष्ट. ×मो. लेंकीस शिकवितां. *ना. लाहाल्या मो. लागलियां. ‡ना. कर्में. ⓒमो. बाह्येंद्रियनेम. +मो. जाणतो. ०मो. आंगें. ⓒना. जाणती. Sना. शुचित्व तत्त्वतां.

नि शुचिष्मंतता ॥ तो निंदीना व्रततपादि तीर्थां ॥ तेते त्रिधीतें आचरितां ॥ सदाचारता अतिश्रोत्रीं ॥ ९३ ॥ पडिलिया मगरमिठी ॥ ते न सोडी प्राणसंकटीं ॥ सांपडे तें सगळें घोटी ॥ तैशी पडली मिठी जीवब्रह्मां ॥९४॥ तें पुढें सूनि *परब्रह्म ॥ आश्रमधर्मादि स्वकर्म ॥ आचरोनि दावी उत्तमोत्तम ॥ कर्मी ब्रह्मप्रतीती ॥ ९५ ॥ कर्म करितो लोक ह्मणती ॥ तो वर्तताहे ब्रह्मस्थितीं ॥ हें ज्याचें तो जाणे निश्चितीं ॥ +लोकाप्रती कळेना ॥ ९६ ॥ 'कुलाल भांडें करूनि उतरी ॥ चक्र भोंवे ०पूर्वील भंवरीं ॥ तैसा साधु पूर्वसंस्कारीं ॥ स्वकर्में करी वृत्तिशून्य' ॥ ९७ ॥ हें साधुलक्षण अत्यंत थोर ॥ ऐकतां सुगम करितां दुर्धर ॥ हें अकरावें अतिपवित्र ॥ ऐक विचित्र तें बारावें ॥ ९८ ॥ साधूची अपरिग्रहता ॥ परिग्रहो नातळे चित्ता ॥ देहगेहेंसि निःसंगता ॥ अकिंचनता त्या नांव ॥ ९९ ॥ स्फटिक काजळीं दिसे काळा ॥ आरक्तीं आरक्त किळा ॥ नीळवर्णी भासे निळा ॥ तरी तो वेगळा शुद्धत्वें ॥ १०० ॥ स्फटिक जपाकुसुमीं ठेविला ॥ पाहतां दिसे तांबडा झाला ॥ परी तो अलिप्तपणें संचला ॥ नाहीं माखला तेणें रंगें ॥ १ ॥ तैसा साधु परिग्रहामाजीं असे ॥ परिग्रही झाला दिसे ॥ परी जागृतिस्वप्नसुषुप्तिवशें ॥ परिग्रहो न स्पर्शे निजदोषें ॥ २ ॥ 'परीस सर्वधातूंसी खेंव देतां ॥ मिळणी सोनें करी तत्त्वतां ॥ तो सुवर्णावांचूनि सर्वथा ॥ आणिका पदार्था नातळे' ॥ ३ ॥ तैसा साधु ह्मणे जें जें माझें ॥ तें तें त्यासी नावडे दुजें ॥ ऐक्यभावाचेनि नाचत भोजें ॥ ⚹अधोक्षजें अंकितु ॥ ४ ॥ चिन्मात्रीं जडलें मन ॥ विश्व जाहलें चैतन्यघन ॥ बुडालें परिग्रहाचें भान ॥ अकिंचन या नांव ॥ ५ ॥ '×सकळ सांडूनि वना गेला ॥ वनीं वनिता चिंतूं लागला ॥ तो त्यागचि बाधकत्वा आला ॥ उलथोनि पडिला परिग्रहीं' ॥ ६ ॥ उंडणी भिंती चढों लाहे ॥ चढतें कष्ट व्यर्थ पाहे ॥ ते पूर्वील्यापरीस तळीं जाये ॥ उलंडूनि ठाये अतिदुःखी ॥ ७ ॥ तैशी भुंगी नव्हे पाहे ॥ उंडणी घेऊनि वृक्षावरी जाये ॥ सत्संगतीं मूर्ख उद्धरों लाहे ॥ तरी ते उपाये न करिती ॥ ८ ॥ भुंगी लहान उंडणी थोर ॥ ते तिचा करूं शके उद्धार ॥ तैसे अकिंचन जे नर ॥ ते करिती उद्धार इतरांचा ॥ ९ ॥ असो मूर्खांची जे त्यागिती गती ॥ ते अत्यंतबाधें बाधक होती ॥ जंव धरिली नाहीं सत्संगती ॥ तंव त्यागस्थिती कळेना ॥११०॥ प्रपंच सांडूनि वना गेला ॥ तो देहप्रपंचें दृढ अडकला ॥ देहीं देहो जेणें मिथ्या केला ॥ तो सत्य झाला अकिंचन ॥ ११ ॥ मूर्खासि त्याग तो झाला बाधु ॥ परिग्रहीं असोनि मुक्त साधु ॥ सबाह्य त्यागें अतिशुद्ध ॥ शुकनारद तिहीं लोकीं ॥ १२ ॥ ते दोघे लागती जनकाच्या पायीं ॥ तो राज्य करितांही विदेही ॥ त्यासि मीही मानितसें पाहीं ॥ नवल नवाई साधूची ॥ १३ ॥ या नांव मुख्य अकिंचनता ॥ तुज म्यां सांगितली तत्त्वतां ॥ हे बारावी लक्षणता ॥ ऐक आतां अनीहा ॥ १४ ॥ अनीहा झाली बापुडी ॥ जेथ जाय तो दूर दवडी ॥

१ गिळी. २ कुंभार. ३ गिरकीनें. ४ कोणत्याही वस्तूचा स्वीकार न करणें. ५ जास्वंदाच्या फुलावर. ६ उलटून, परत. ७ किडा. ८ ज्याजवळ कांहीं नाहीं तो. ९ देहाभिमान ज्यास नाहीं असा. १० मुळींच इच्छा नसणें.

*ना. जीव परब्रह्म. +ना. लोकप्रतीति. ०मो. पूर्विला. ⚹ना. अधोक्षज अंकित. ×ना. सकळकुळा सांडोनि. ना. पाहे. ना. बाधकता. मो. त्यागितीस्थिती. मो. परिग्रहो. ना. सबाह्य योगें अतिशुद्ध. ना. नवलाइ.

कोणी राहोंनेदी अर्धवटा ॥ अतिचरफडी निराश्रयें ॥ १६ ॥ अनीहा हिंडतां लोकीं तिहीं ॥ तिळभरी ठावो *वसावया नाहीं ॥ ईहा वैरिणी लागली पाहा ॥ठायींच्या ठायीं ०दंडवी॥१६॥ कोणी येवों नेदी दाराकडे ॥ अतिदीन झाले बापुडे ॥ धाय मोकलोनि रडे ॥ गान्हाणें संतांपुढें देवों आली ॥ १७ ॥ ते कृपाळु दयामेळें ॥ निजकरें पुसोनि डोळे ॥ प्रतिपाळिली स्वहितकाळें ॥ संतबळें वाढली ॥ १८ ॥ त्यापूर्वील वैर स्मरोनियां ॥ ईहा वैरिणी साधावया ॥ संतांसि +पुसोनि उपाया ॥ तिच्या अपाया प्रवर्तली ॥ १९ ॥ ईहेसि नानाचेष्टें चेष्टवितां ॥ अहं आणि ममता ॥ कामें अंगीं घातली तत्त्वतां ॥ कामाची कांता ते झाली ॥ १२० ॥ ईहा कामबळें वाढली थोर ॥ व्यापूनि राहिली घरोघर ॥ तिसी साधावया वैर ॥ अनीहा सत्वर चालिली ॥ २१ ॥ अनीहा पाठीं लागल्या जाण ॥ अहंममतेसी ज्ञातारपण ॥ थरथरां कांपोनि प्राण ॥ घायेंवीण सोडिले ॥२२॥ असंगशस्त्र मागोनि संतां ॥ ईहेच्या करावया घाता ॥ आधीं मारूं धांवे अहंममता ॥ दोघें थाकतां निमालीं ॥ २३ ॥ अनीहा देखोनि दिठीं ॥ काम पळे बागवाटीं ॥ ※संकल्पाची छेदूनि घाटी ॥ उठाउठी पाडिला ॥२४॥ काम ×पडला रणांगणीं ॥ क्रोधादि शूर पडले रणीं ॥ ईहेचा कैवारी 5नुरेच कोणी ॥ एकेक शोधूनी मारिले ॥ २५ ॥ एवं अनीहेसमोर ॥ राहे ऐसा नाहीं वीर ॥ मारूनि अवघ्यांचा केला चूर ॥ क्रिया करणार कोणी नाहीं ॥ २६ ॥ ' काम निमाल्या सर्वथा ॥ ईहा ⁂रांडवली वस्तुतां ॥ मुख न दावीच संतां ॥ अधोगमनता 4पळाली' ॥ २७ ॥ यालागीं ईहेसवें जो लागला ॥ तो जाणावा अधोगतीं गेला ॥ अनीहेचा जो अंकित झाला ॥ तो आवडला गोविंदा ॥ २८ ॥ म्हणसी अनीहा ते कोण ॥ काय 2तियेचें लक्षण ॥ ऐक सांगेन संपूर्ण ॥ जेणें बाणे खूण जिव्हारीं ॥ २९ ॥ कामकर्मादि क्रियाजाळ ॥ तेचि ईहा जाणावी अतिचपळ ॥ अंतरीं जो सुनिश्चळ ॥ तेचि केवळ अनीहा ॥ १३० ॥ अंतरीं कामाची वार्ता ॥ नुपजे कर्माची कर्मावस्था ॥ अणुभरी न रिघे उद्वेगता ॥ अनीहा तत्त्वतां ते जाणा ॥ ३१ ॥ ऐशी अनीहा असे ज्यासी ॥ देव आज्ञाधारकू त्यापाशीं ॥ ते अनीहा संतांची दासी ॥ अहर्निशीं जीवेंभावें ॥ ३२ ॥ हे अनीहा 5अतिगौरवें ॥ साधुलक्षण तेरावें ॥ मितभोजनें तें चौदावें ॥ लक्षणवैभवें अवधारी ॥ ३३ ॥ न कोंडे रसनेचिया चाडा ॥ न पडे क्षुधेचा पांगडा ॥ आवडी नावडीचा उपाडा ॥ करूनि निधडा भोजनीं ॥ ३४ ॥ प्राणु आकांक्षी अन्नातें ॥ जठराग्नि भक्षी त्यातें ॥ उभयसाक्षी मी येथें ॥ जाणोनि निरुतें रस सेवी ॥ ३५ ॥ जें जें आलें भोजनासी ॥ दृष्टीनें त्याचे दोष निरसी ॥ अतिपवित्र करूनि त्यासी ॥ निजसमरसीं सेवितू ॥ ३६ ॥ न देखे भोग्यपदार्था ॥ नाठवे मी एक भोक्ता ॥ 7ग्रासी समरसी अच्युता ॥ भोगूनि अभोक्ता 3मितभोजी ॥ ३७ ॥ अग्नि आधीं आपणा ऐसें करी ॥ मग त्या आहारातें अंगीकारी ॥

१ इच्छा. २ नाश करण्यासाठीं, मारण्यासाठीं. ३ कामाची स्त्री झाली. ४ पतिरहित झाली. ५हृदयांत. ६ उदासीनपणा. ७ प्रमाणानें आहार करणें. ८ कौतुकपावे, गुंते. ९ पारतंत्र्य. १० उच्छेद. ११ अग्निरूप करितो.

*ना. बैसावया. ०मो. हिंडवी. +ना. पुसी निज उपाया. ※ना. संकल्पाचे शेवटिले गोठी. ×ना. पडता. मो. पाडिला. 5ना. नव्हेचि. ⁂मो. रांडली. 4मो. पावली. 2मो. ईहेचें. 5मो. अतिबरवें. 7मो. ग्रासोग्रासीं स्मरे अच्युता. 3ना. मितभोजनी.

साधु आर्थी *द्वैतातें निवारी ॥ मग स्वीकारी आहारातें ॥ ३८ ॥ याचि नांव मितभोजन ॥ साधूचें आहाराचें लक्षण ॥ युक्तीविण अन्न भोजन ॥ तें पथ्य जाण रोगियाचें ॥ ३९ ॥ ग्रासोग्रासीं ब्रह्मार्पण ॥ त्या नांव परिमित भोजन ॥ हें चौदावें लक्षण ॥ साधूचें जाण उद्धवा ॥ १४० ॥ समकाळ जळसंभारीं ॥ सरितामेळ मिळे सागरीं ॥ तो हेलुळेना तिळभरी ॥ निर्विकारी निर्मळ ॥४१॥ तैसा आलिया नाना उर्मी ॥ ज्यांसि गजबज नाहीं मनोधर्मीं ॥ +शांति संताचा पराक्रमी ॥ उपक्रमी निजशक्ती ॥ ४२ ॥ ' जेवीं कां नागवल्लीची वेली ॥ आधारेंवीण नवचे गेली ॥ तैसी संतवळें शांती वाढली ॥ मंडपा चढली चिन्मात्रीं ॥४३॥ झांकळोनि दशदिशांसी ॥ आभाळ दाटल्या आकाशीं ॥ गगन अविकारी त्या दोषासी ॥ आभाळासी नातळे ॥४४॥ शीत उष्ण पर्जन्यधारा ॥ अंगीं नलगती अंबरा ॥ तेवीं साधूचा उभारा ॥ द्वंद्वसंभारा निर्द्वंद्व ॥ ४५ ॥ तैसा उंच निंच नाना अवस्था ॥ निबिड दाटल्या मोहममता ॥ क्षोभु नुपजे ज्याच्या चित्ता ॥ त्या नांव तत्त्वतां निजशांती ॥४६॥ संताचेनि शांति गहन ॥ शांतीचेनि संत पावन ॥ हें अन्योन्य निजलक्षण ॥ पंधरावा गुण संतांचा ॥ ४७ ॥ ⁰जें मीपणें नव्हतें जन्मनाम ॥ तेंच पूर्वजाचें निजधाम ॥ आपुली मिरासी जे उत्तम ॥ तेथ मनोधर्म ×स्थिरू ज्याचा ॥४८॥ ' मज ÷जन्मचि नाहीं झालें ॥ मरण म्यां नाहीं देखिलें ॥ऐसें मन मूळीं स्थिरावलें ॥ स्थिरता बोलिलें या नांव ' ॥ ४९ ॥ चहूं आश्रमांहूनि उत्तम ॥ आपुला जो निजाश्रम ॥ तेथें स्थिरावोनि मनोधर्म ॥ वर्णाश्रम चालवी ॥ १५० ॥ चहूंवर्णांमाजीं पवित्रता ॥ जेणें ब्राह्मणांची ब्राह्मणता ॥ तेथें स्थिरावलें जेणें चित्ता ॥ जाण स्थिरता ती नांव ॥ ५१ ॥ तिहीं लोकीं स्थिरता ॥ मरो टेंकली सर्वथा ॥ कोणी नाहीं प्रतिपाळिता ॥ हातीं धरिता नदेखे ॥ ५२ ॥ दारीं राहोनेदी कोणी ॥ कोण देईल पथ्यपाणी ॥ अवचीं टाकली निरंजनीं ॥ ते सज्जनीं प्रतिपाळिली ॥ ५३ ॥ स्थिरता वाढली संतवळें ॥ ²जिणोनि वर्णाश्रमादि टेंबाळें ॥ भेदोनि अकारादिवर्णपटळें ॥ एके वेळे वाढली ॥ ५४ ॥ स्वस्वरूपीं सायुज्यता ॥ पावोनि स्थिरावली स्थिरता ॥ तेथ वाट मोकळी संता ॥ स्वभावतां त्यां केली ॥ ५५ ॥ तेथ स्वस्वरूपें स्वकर्म ॥ स्वस्वरूपें वर्णाश्रम ॥ स्वस्वरूपें स्वधर्म ॥ स्थिरतासंभ्रम या नांव ॥ ५६ ॥ ऐसी स्वधर्मकर्मीं अवस्था ॥ ती नांव उत्तम स्थिरता ॥ हे सोळावी लक्षणता ॥ मच्छरणता ते ऐक ॥ ५७ ॥ सरिता सागरा शरण आली ॥ ते समरसोनि सिंधू झाली ॥ तैशी मज शरण जे वृत्ती आली ॥ ते पावली दशा माझी ॥ ५८ ॥ लवण जीवना आलें शरण ॥ तें तत्काळ जाहलें जीवन ॥ तैसा अनन्य मज जो शरण ॥ तोचि मी जाण होऊनि ठाके ॥ ५९ ॥ ' मज रिघोनियां शरण ॥ जे वांछिती महिमा सन्मान ॥ ते गुळांतील पाषाण ॥ केवळ जाण गुळदगड ॥ १६० ॥ जो कां गुळें माखिला दगड ॥ तो पाहतां दिसे वरिवरी गोड ॥ शेवटीं परिपाकीं निवाड ॥ अतिजड कठिणत्वें ॥६१॥ तैसें वरिवरी दावी माझें भजन ॥ हृदयीं *विषय अभिलाषण ॥ तो नव्हे माझा अनन्यशरण ॥ अतिदूषण लोभाचें ॥ ६२ ॥ ' सर्वांगीं

१ क्षोभ पावत नाहीं. २ विडयाची पानवेल. ३ देह मांडणी. ४ जहागीर. ५ लटकी झाडं. ६ पक्वदशेत, परिणामीं. ७ इच्छा.

*मो. अद्वैतातें. +मो. शांतिशक्तीचा पराक्रमी. ⁰मो. जें मीपण नव्हे तें जन्मनाम, तेंचि पूर्वजांचें निजधाम. ×ना. नित्य. ÷ना. मरणाचि. ²ना. जाणोनि. *मो. विषयाभिलाष जाण.

सुंदर सुरेख ॥ जिच्या नाकावरी पांढरें टीक ॥ तिसी वरीना साधु लोक ॥ तैसा विषयलोभ देख मद्भजनीं ॥ ६३ ॥ 'रांडवा केलें काजळकुंकूं ॥ देखोनि जग लागे थुंकूं ॥ तैसा विषयाचा अभिलाखू ॥ जेवीं वोकिला वोकू अतिनिंद्य' ॥ ६४ ॥ त्रैलोक्यसाम्राज्यवैभव जाण ॥ जो थुंकोनि रिघाला मज शरण ॥ तो संमरसें मीचि झाला जाण ॥ मानाभिमान त्या कैंचा ॥ ६५ ॥ या नांव मच्छरण ॥ हें सतरावें लक्षण॥ उद्धवा जाण संपूर्ण॥मननगुण तो ऐक ॥६६॥ *श्रुतिगुरुवाक्यें निरूपण ॥ ऐकतां अद्वैतश्रवण ॥ युक्तिप्रयुक्तीं पर्यालोचन ॥ मनन गुण या नांव ॥ ६७ ॥ अग्निकापुरा भेटी होतां ॥ तो अग्नीचि होय वस्तुतां ॥ तेवीं माझे स्वरूपीं मन ठेवितां ॥ मनाचि स्वरूपता पावलें ॥ ६८ ॥ मन चिदंश असे जाण ॥ तें चिन्मात्र जाहलें करितां मनन ॥ जेवीं जीवनीं जन्मलें लवण ॥ तें होय जीवन निजमिळणीं ॥ ६९ ॥ ऐसें मनाचेनि खवळाहें ॥ मन जेथवरी जावों पाहे ॥ तेथवरी तया मीचि आहें ॥ नवचतां राहें तेथें मीही ॥ १७० ॥ दीप जेउता जाऊं बैसे ॥ तेउता प्रकाशचि तया असे ॥ कोठेंही नवचोनि ठायीं बसे ॥ तेथेंही असे प्रकाश ॥ ७१ ॥ तैसें माझें करितां मनन ॥ मद्रूपचि जाहलें मन ॥ मग करितां गमनागमन ॥ मद्रूपता जाण मोडेना ॥ ७२ ॥ एवं माझें स्वरूप जें केवळ ॥ तेथें +मद्रूपें मन निश्चळ ॥ ध्रुवाचेपरी अचंचळ ॥ मननशीळ त्या नांव ॥ ७३ ॥ 'मुनि' या पदाचें व्याख्यान ॥ मननशीलता जाण ॥ हें अठरावें लक्षण ॥ तेंही निरूपण सांगितलें ॥ ७४ ॥ अत्यंत गोड निरूपण ॥ पुढिले श्लोकीं दशलक्षण ॥ तें ऐकावया उद्धव सावधान ॥ सर्वांगें कान होऊनि ठेला ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ अप्रमत्तो गभीरात्मा धृतिमान् जितषड्गुणः ॥ अमानी मानदः कल्पो मैत्रः कारुणिकः कविः ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ जंववरी वृत्तिशून्य नव्हे मन ॥ तंववरी विश्वासेना विचक्षण ॥ वृत्तिरूपें सिंतरील मन॥यालागीं सावधान निजबोधें॥७६॥ हा हो दुर्वासा ऐसा सज्ञान ॥त्यासी क्षणक्षणा क्षोभवी मन ॥ न विचारितां गुणागुण ॥ शाप दारुण देवों धांवे ॥ ७७ ॥ दुर्गंधा जन्मली मत्स्याचे पोटीं ॥ पराशर नाडला तीसाठीं ॥ नारद कौतुक पाहतां दिठीं॥ केला गंगातटीं नारदी ॥७८॥ आपुली कन्या देखोनी गोमटी ॥ मनक्षोभें भोगावया उठी ॥ ब्रह्मा धांवे सरस्वतीपाठीं ॥ जो कां सृष्टीं पितामहो ॥ ७९ ॥ 'या मनाऐसें नाटक ॥ जगामाजीं नाहीं आणिक ॥ ×छळछळोनि नाडी ज्ञाते लोक ॥ साधु घातक मनाचें' ॥१८०॥ ह्मणाल मनेंवीण भोग घडे ॥ तरी वृत्तीसि क्षोभू कां पां चढे ॥ २हें बोलती ते सज्ञानवेडे ॥ साधूंसि नावडे हे गोष्टी ॥ ८१ ॥ अधिष्ठानि सत्वगुण ॥ सूक्ष्मरूपें वृत्ति जाण ॥ ते क्षोभवूनियां मन ॥ मी मुक्त ह्मणोन ०विषयीं करी ॥ ८२ ॥ मुक्ताभिमानें विषयासक्ती ॥ हेचि मनक्षोभाची प्राप्ती ॥ वृत्ति असोनियां मुक्ती। साधु न मानिती सर्वथा ॥ ८३ ॥ अतिनाटकी नाटक मन ॥ *मुक्तत्वें धरी अभिमान ॥

१ पांढरा कोडाचा चट्टा. २ विधवेनें. ३ ओकलेलें अन्न. ४ समानधर्मानें. ५ विचार करणें. ६ फसवील. ७ हिचें मत्स्यगंधा असेही नांव होतें. हिला कौमार्यदशेंत पराशरापासून कृष्ण द्वैपायन पुत्र झाला. पुढें हिचें शंतनुशीं लग्न झाल्यावर हिला सत्यवती हें नांव प्राप्त झालें. ८ नाशकर्ते. ९ पढतमूर्ख.

*मो. श्रीगुरुवाक्य. +मो. मद्रूपमन. ×मो. छळोपद्रवें नाडी लोक. २ना. हें बोलणें बोलती सज्ञान वेडे. ०ना. विषय. *मो. मर्कटत्वेंही.

त्याचें करावया निर्दळण ॥ साधू सावधान निजबोधें ॥ ८४ ॥ 'मुखीं धरिल्या कृष्णसर्पासी ॥ ढील *धरिल्या तो तात्काळ ग्रासी ॥ मरे तंववरी आवळावें त्यासी॥तेवीं मनासी निर्दळती' ॥ ८५ ॥ मन निर्दळणें सावधानता ॥बोलिलें तें 4साधुलक्षणता॥हा एकुणिसावा गुण सर्वथा॥ ऐक आतां विसावा ॥८६॥ वर्षाकाळीं जळबळें सरिता ॥ आल्या समुद्र तुचंबळे १धाघयता ॥ उष्णकाळीं त्या न येतां ॥ क्षोभोनि सर्वथा आटेना ॥ ८७ ॥ तैसें जाहलिया समृद्धी धन ॥ साधूचें उल्हासेना मन ॥ सकळ जाऊनि जाहला निर्धन ॥ दीनवदन हो नेणे ॥ ८८ ॥ दिवस राती येतां जातां ॥ प्रकाशें पालटेना सविता ॥ तेवीं आल्यागेल्या नाना अवस्था ॥ गंभीरता अक्षोभ ॥ ८९ ॥ कडकडीत विजेचे कल्लोळ ॥ तेणें गगनासि नव्हे खळबळ ॥ तैसा नाना-उर्मींमाजीं निश्चळ ॥ गांभीर्य केवळ या नांव ॥ ९९० ॥ हे संताची गंभीरता ॥ +विसावा जीवशिवांसी तत्त्वतां ॥ हे विसावी संतांची अवस्था ॥ धृतीची व्यवस्था अवधारीं ॥ ९१ ॥ मन बुध्यादि इंद्रियें प्राण ॥ निजधैर्यें धरोनि आपण ॥ नित्य केलिया (आत्मार्पण ॥ परतोनी जाण येवों नेदी ॥ ९२ ॥ स्वयंवरीं जिणोनि 6अरिरायासी ॥ बळें आणिलें नोवरीशी ॥ तो जाऊं ×नेदी आणिकापाशीं ॥ तेवीं वृत्तीसी निजधैर्यें ॥ ९३ ॥ वागुरें बांधिल्या मृगासी ॥ पारधी जाऊं नेदी त्या वनासी ॥ तेवीं धैर्यें आकळूनि मनासी ॥ देहापाशीं येऊं नेदी ॥ ९४ ॥ 5वाऊनियां गजस्कंधीं ॥ देहासि 7नानाभोग समृद्धी॥ऐसें ०सुख होतां त्रिशुद्धी ॥ मनासी देह बुद्धी धरूं नेदी ॥९५॥ प्रळयकाळाच्या कडकडाटीं॥महाभूतां होतां आटाआटी ॥तरी मनासि देहाची भेटी ॥ धैर्यें जगजेठी होंनेदी ॥९६॥ तेथें काळाचेनि हटतटें ॥ वृत्ति परब्रह्माचिये वाटें॥ लावूनियां नेटेंपाटें ॥ चिन्मात्रपेठे विकिली ॥ ९७ ॥ तेथ स्वानंदाचा ग्राहकु ॥ तात्काळ भेटला नेटकु ॥ त्यासि जीवेंसहित विवेकु ॥ घालूनि अशेख संवसाटी केली ॥ ९८ ॥ या नांव धृतीचें लक्षण ॥ हा एकविसावा साधूचा गुण ॥ आतां जिंतिले जे षड्गुण ॥ तेहीं लक्षण अवधारीं ॥ ९९ ॥ स्वानंदें तृप्त जाहला ॥ यालागीं क्षुधेसि मुकला ॥ जगाचें जीवनीं निवाला ॥ तृषा विसरला निःशेष ॥ १००० ॥ भोगितां निजात्मसुख ॥ विसरला शोकदुःख ॥ चिन्मात्रज्ञानें निष्टंक ॥ त्यासंमुख मोहो नये ॥ १ ॥ तिहीं अवस्थांबाहिरा ॥ वसिन्नला निजवोधवोवरा ॥ तेथें जरा जाली अतिजर्जरा ॥ कांपत थरथरां पळाली ॥ २ ॥ मिथ्या &जाहलें कार्य-कारण ॥ देहाचें देहपणें न देखे भान ॥ तंव मरणासचि आलें मरण ॥ काळाचें प्राशन तेणें केलें ॥ ३ ॥ यापरी गा हे षड्गुण ॥ अनायासें जिंतोन ॥ सुखें वर्तती साधुजन ॥ हें लक्षण बाविसावें ॥ ४ ॥ आपुला स्वामी देखे सर्वांभूतीं ॥ तेथें मान इच्छावा कवणाप्रती ॥ माना-भिमान सांडिले निश्चितीं ॥ अतिनम्रवृत्तीं वर्तणें ॥ ५ ॥ आधीं देहीं धरावा अभिमान ॥ मग इच्छावा अति सन्मान ॥ तंव देहाचें खुंटलें भान ॥ मानाभिमान बुडाले ॥ ६ ॥ या नांव गा अमानिता ॥ हे तेविसावी लक्षणता ॥ साधु 8सन्मानाचा दाता ॥ तेही कथा अवधारीं

१ सैल सोडल्यास. २ स्थिर, शांत, न हलणारा. ३ धैर्याची. ४ शत्रुराजास. ५ जाळें. ६ वाहूनिया. ७ प्रयत्नें. ८ अपल्याबद्दल, घेवदेव. ९ पूर्ण.

*ना. धरितां. 4मो. साधुसत्ता. +मो. विसावा गुण सर्वथा. (ना. आत्मप्रविण. 6ना अरियासी. ×ना. देईना. 5ना. देही वाहोनियां. 7मो. नानासमृद्धी. ०मो. सुखभोग. &ना केलें. 8ना. सन्मार्गाचा.

॥ ७ ॥ ब्रह्मादि मशकवरी ॥ सर्वांतें वंदी शिरीं ॥ एकनिष्ठता चराचरीं ॥ बुद्धि दुसरें जाणेना ॥ ८ ॥ सर्वभूतीं स्वामी देखे ॥ लोटांगण घाली हरिखें ॥ सुरनरखर हे नोळखे ॥ अतिसंतोखें वंदिन ॥ ९ ॥ नाना अलंकार घाडिले गुणें ॥ सोनें सोनेपणा नव्हेच उणें ॥ तेवीं नामरूपांचेनि विंदाणें ॥ पालटु मनें घेऊं *नेणे ॥ १०१० ॥ साखरेची निंबोळी केली ॥ परी १कडूपणा नाहीं आली ॥ तेवीं सूकरादि योनी जरी जाहली ॥ तरी नाहीं भंगली चित्सत्ता॥११॥ सागरीं नानापरींचे विकाळ ॥जरी उठिले अनंत कल्लोळ॥+ते जेवीं केवळ जळ ॥ तेवीं वस्तु सकळ भूतमात्रीं ॥ १२ ॥ यापरी सकळ भूतां ॥ साधु Sसन्मानातें देता ॥ हे चोविसावें लक्षणता ॥ परबोधकता ते ऐक ॥ १३ ॥ जैसा भाव जैशी श्रद्धा ॥ तैशातैशा करूं जाणे बोधा ॥ ज्ञान पावोनि नव्हे 0मोंधा ॥ स्वरूपशुद्धा प्रबोधी ॥ १४ ॥ एक ज्ञान पावोनि जाहले पिसा ॥ पडिला ×अव्यवस्थ ठसा ॥ नोळखेचि सच्छिष्याची दशा ॥ योग्य उपदेशा तो नव्हे ॥ १५ ॥ एक ज्ञान आश्चर्यें कोंदला ॥ विस्मयें तटस्थ होऊनि ठेला ॥ काष्ठलोष्ठांचेपरी पडला। नाहीं उरला उपदेशा ॥ १६ ॥ एक ज्ञान पावोनि अतिकृपण ॥ जीव गेलिया न बोले जाण । 3भेणंभेणें धरोनि मौन ॥ ०न बोले वचन सर्वथा ॥ १७ ॥ ज्यासी धनकोडी जोडी जाहली ॥ तो पुरूनि वरी दगड घाली ॥ दान न देतां वृथा गेली ॥ संपत्ती केली भूमिसवर्ती ॥ १८ ॥ तैसें कष्टीं 5जोडूनि ज्ञान ॥ सत्पात्रीं न करीच दान ॥ हें ज्ञात्याचें कृपणलक्षण । वंचकपण स्वभावें ॥ १९ ॥ एक ज्ञान पावोनि सांगों जाये ॥ उपदेशीं शिष्यासि बोधू नव्हे । तें ज्ञान 8अबीज जाहलें पाहे ॥ अंकुरां न लाहे सत्क्षेत्रीं ॥ १०२० ॥ सधन शिष्य करावया जाण ॥ स्वयें प्रयत्न करी पूर्ण ॥ आमुची दीक्षा अनुभव गहन ॥ यापरी ज्ञानविकरा घाली ॥ २१ ॥ जेणें प्रलोभे त्याचें मन ॥ तैसें निरूपी निरूपण ॥ अर्थ स्वार्थ उपदेशी पूर्ण ॥ धनलोभें ज्ञान निर्वीर्य होय ॥२२ ॥ पेवीं रिघालिया पाणी ॥ त्या धान्याची नव्हे पेरणी ॥ तेवीं धनलोभ रिघालिया ज्ञानीं ॥ उपदेशें कोणी सुखी नव्हे ॥ २३ ॥ शिष्य बोधेंवीण झुरे अंतरीं । गुरु गुरुपणें गुरगुरी ॥ ते बोधकता नव्हे खरी ॥ घरच्याघरीं चुकामुकी ॥ २४ ॥ शब्दज्ञानी पारंगत ॥ जो ब्रह्मानंदें सदा डुल्लत ॥ शिष्यप्रबोधनीं समर्थ ॥ तो मूर्तिमंत स्वरूप माझें ॥२५॥ होकां मी जैसा अवतारधारी ॥ तैसाचि तोही अवतारी ॥ चिद्रत्नाचा अलंकारी ॥ अलंकारी कुसरी सच्छिष्या ॥ २६ ॥ तो मी या शब्दकुसरीं ॥ नांवाचीं अंतरें बाहेरीं ॥ आंतुवटें निज निर्धारीं ॥ एके घरीं नांदत ॥ २७ ॥ एकाचि बहुतांतें उपदेशी ॥ 7एकाची प्राप्ती सुटंच कैशी ॥ एकें अज्ञानें जैशी तैशीं ॥ हा बोलू कोणासी म्हणाल ॥ २८ ॥ कृपीवल पेरणी करी ॥ भूमिपाडें पिकती धुमरी ॥ 6अंकुरेना क्षितितळ उखरीं ॥ तें बीज निर्धारीं अतिशुद्ध ॥ २९ ॥ भूमीचि सखरें निकैर ॥ बीज पावन गा साचार ॥ भाविकें

---

१ भाव, कौशल्य. २ लोकांस सांगणें. ३ स्तब्ध, मुग्ध. ४ पृथ्वींत पुरली. ५ विक्रय मांडितो. ६फरक भेद. ७ आंत. ८ भूमीच्या मगदुराप्रमाणें. ९ भरपूर, घोंसांत. १० नापीक जमिनींत.११चांगली.१२वाईट

*मो. नेदी. +ना. तेवीं जळ कां कल्लोळ जळ. Sना. सन्मार्गाचा दाता. 0ना. मेधा. ×ना. अस्ताव्यस्त. 3ना. तेणें भेणें करूनि मौन. ०ना. न बोलवे. मो. नोबले.5मो. जोडिलें जें ज्ञान. ना. जोडोनि निजज्ञान. 8मो. आंधळें.7मो. एकासी प्राप्तता. 6मो. अंकुरेजना क्षिती उखरें

उपदेशाचा विस्तार ॥ विकल्पी नरें सुनाट ॥ १०३० ॥ जो जैसा देखे अर्थ ॥ तोचि बोधूनि करी परमार्थ ॥ ऐसा परबोधनीं समर्थ ॥ हा गुण विख्यात पंचविसावा ॥ ३१ ॥ साधूची मैत्री चोखट ॥ वोळखी सर्वांसी जुनाट ॥ सर्वांचा सखा श्रेष्ठ ॥ सर्वांसी सकट सारिखा ॥ ३२ ॥ सुहृद सर्वांचा सोयरा ॥ सर्वांचा जिवलग खरा ॥ होऊनि सर्वांही बाहिरा ॥ मित्राचारा चालवी ॥ ३३ ॥ सांगतां आपुली गुह्यगोष्टी ॥ अंतो-चावया वेगळा नुठी ॥ आत्मभावें देखे सृष्टी ॥ अवंचक पोटीं सर्वांसी ॥ ३४ ॥ 'क्षीरनीरांची मैत्री जैशी ॥ भेद नाहीं मिळणीपाशीं ॥ साधु सर्वजीवसमरसी ॥ अभेद भावेंसी +मित्रत्वें ' ॥ ३५ ॥ परममैत्रीचा भावो देख ॥ दुःख हिरोनि घाले सुख ॥ साधु जीवांचें निरसोनि दुःख ॥ परमसुख देतसे ॥ ३६ ॥ नवल मैत्रीचें महिमान ॥ सखा सर्वांचा पुरातन ॥ सर्वांसि नीच नवें सौजन्य ॥ अवंचकपणा सर्वदा ॥ ३७ ॥ बंधूहूनि मित्र अधिक ॥ पुत्राहूनि मित्र विश्वासुक ॥ तो मित्र जं जाहला वंचक ॥ तें केवळ ठक तो जाणावा ॥ ३८ ॥ मनें धनें कर्तव्यता ॥ ज्याची अनन्य ✻अवंचकता ॥ त्या नांव परममित्रता ॥ हे गुण तत्त्वतां जाणावी ॥ ३९ ॥ समूळ मैत्रीचें निरूपण ॥ विशद सांगितलें जाण ॥ हें सव्विसावें साधुलक्षण ॥ कारुण्यपण तें ऐका ॥ १०४० ॥ प्रत्युपकार न वांछितां ॥ मी कारुणिक हे नाहीं अहंता ॥ ऐसेनि दीन-दुःखनिवारिता ॥ कारुण्य सर्वथा त्या नांव ॥४१॥ रसपूजा घरोनि पोटीं ॥ वैद्य औषधांच्या सोडी गांठी ॥ कां संभावनें सूनि दिठी ॥ सांगे गोष्टी पुराणिक ॥ ४२ ॥ ऐसी वर्तणूक सर्वथा ॥ ते लागली विषयस्वार्था ॥ साधूची नव्हे तैसी कथा ॥ नैराश्यता दयाळू ॥ ४३ ॥ दयार्णवत्वें द्रवली दृष्टी ॥ तनु मन धन वेंचूनि गांठी ॥ अनाथावरी करुणा मोठी ॥ उद्धरी संकटीं दीनातें ॥ ४४ ॥ 'जैसाचि कळवळा ×निजस्वार्थी ॥ त्याहून अधिक अनाथभूतीं ॥ ती नांव परम ०कारुण्यता ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ' ॥ ४५ ॥ हें सत्ताविसावें लक्षण ॥ साधूचें जाण संपूर्ण ॥ कविपदाचें व्याख्यान ॥ सावधान अवधारीं ॥ ४६ ॥ वेदशास्त्राचा मथितार्थ ॥ झाला करतलामलकवत ॥ तैसाच ब्रह्मानंदें डुल्लत ॥ कवि निश्चित या नांव ॥ ४७ ॥ उपनिषदांचा मथितार्थ ॥ ज्याच्या मुखाचा वास पदांत ॥ परोक्षापरोक्ष ज्याचेनि सत्य ॥ कवि विख्यात त्या नांव ॥ ४८ ॥ कवि या पदाचेनि व्याख्यानें ॥ झालीं अठ्ठावीस लक्षणें ॥ उरलीं 1जें अतिगहनें ॥ तें दों श्लोकीं कृष्णें आदरिलीं सांगों ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ आज्ञायैवं गुणान् दोषान् मयाऽऽदिष्टानपि स्वकान् ॥ धर्मान् संत्यज्य यः सर्वान् मां भजेत स सत्तमः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ प्रपंचनगरासभोंवतीं ॥ कर्मनदीची महाख्याती ॥ तिचेनि जळें जीव वर्तती ॥ उत्पत्ति स्थिती ओरतिरीं ॥१०५० ॥ ते नदीचेनि जीवनमेळें ॥ कर्मांसि येती कर्मफळें ॥ स्वर्ग नरकादि सोहळे ॥ ऽतेणें जळबळें भोगिती ॥ ५१ ॥ प्रपंचनगरींहूनि निघतां ॥ वेगीं पर-

१ विकल्पयुक्त श्रोता शून्यच म्हातो. २ हळूच सांगण्यासाठीं. ३ निष्कपट. ४दूध व पाण्याची. ५परत उपकार करणें. ६ पारदपूजा औषधाबद्दल संभावना. ७ संभावनेकडे दृष्टी देऊन. ८ सुखांत वसति वांछितात. ९ अलिकडील तीरीं.

+ मो. मित्रत्व. ✻ मो. वंचकता. × ना. निजअर्थी. ० मो. कारुणिता. 1 मो. जे दोनी. ऽ मो. कल्पनेचे बळें भोगिती.

माथांसि येतां ॥ जों तों कर्मनदी आंतौता ॥ बुडे सर्वथा निर्बुजलों ॥ ५२ ॥ एक *तरूनि ऐसें ज्ञाते म्हणती ॥ ते ×कर्मनदीतें गुचकिया खाती ॥ स्वयें बुडोनि आणिकां बुडविती ॥ तरलों म्हणती +तोंडाळ ॥ ५३ ॥ ऐसे बुडाले नेणों किती ॥ बुडतां शिकवणें तेचि देती ॥ ऽकर्मेंचि तरणोपायप्राप्ती ॥ म्हणोनि बुडविती सर्वांतें ॥ ५४ ॥ न कर्मणा हें वेदवचन ॥ कर्में नव्हे ब्रह्मज्ञान ॥ तें न मानिती कर्मठ जन ॥ त्यांसि कर्माभिमान कर्माचा ॥ ५५ ॥ कर्म देहाचे माथां पूर्ण ॥ तो न सांडितां देहाभिमान ॥ कर्माचा त्याग नव्हे जाण ॥ कर्मबंधन देहबुद्धी ॥ ५६ ॥ एक आरातिरीं अति नष्ट ॥ तरलों म्हणती ऽअकर्मनिष्ठ ॥ स्वकर्मत्यागी कर्मभ्रष्ट ॥ जाण पापिष्ठ पाखंडी ॥ ५७ ॥ या कर्मनदीतें तरला ॥ ऐसा नदेखों दादुला ॥ बुडाल्या धुरांचि मुदला ॥ तेथ पाड केतुला इतरांचा ॥ ५८ ॥ ॰या कर्मनदीची उत्पत्ती ॥ मजचि पासोनि निश्चितीं ॥ तेही सांगेन तुजप्रती ॥ यथानिगुतीं निजबोधें ॥ ५९ ॥ आज्ञायेवं हें मूळींचें मूळ ॥ श्लोकींचें प्रथम पद केवळ ॥ येणेंचि कर्मनदी झाली स्थूळ ॥ करूनि विवळ सांगत ॥ १०६० ॥ मदाज्ञा मेघ गंभीरा ॥ निःश्वासितपवनद्वारा ॥ चतुर्वेदविधीच्या धारा ॥ अति अनिवारा वर्षलों ॥ ६१ ॥ तेणें कर्मनदी आंतौतें ॥ अनिवार उलथलें भरितें ॥ पूर दाटला जेथिचा तेथें ॥ उतार कोणातें कळेना ॥ ६२ ॥ तेथ गुणदोषांचा वळसा ॥ विधिनिषेधांचा धारसा ॥ कर्माकर्माचा आवर्त कैसा ॥ सबाह्य सरिसा भंवतसे ॥ ६३ ॥ संकल्पविकल्पांचे ॰उभेडें ॥ नदी दाटली चहूंकडे ॥ तरों जाय तो गुंतोनि पडे ॥ पाऊल पुढें न घालवे ॥ ६४ ॥ प्रत्यवायांची मगरमिठी ॥ पडल्या सगळें घाली पोटीं ॥ नुगळी ॰न सांडी संकटीं ॥ ने उठाउठीं अधोगती ॥ ६५ ॥ अंगविकळतेचे मासे ॥ तळपतीति घ्यावया आंविसें ॥ कर्मठतेचे *कमठ कैसे ॥ खडक तैसे निबर ॥ ६६ ॥ काळविक्षेप सर्पासी ॥ एक सांपडले विलासआळशीं ॥ ॰एक अविचार चोंदियेसि ॥ व्यथतेसी बुडाले ॥ ६७ ॥ एक तरावयाच्या आशा ॥ पडिले कर्माच्या धारसा ॥ ते विधिनिषेधाचे वळसां ॥ पडिले सहसा नुगंडती ॥ ६८ ॥ एक ॰स्वकर्मधारीं ॥ पडोनि वाहावले ०पुरीं ॥ ते सत्यलोक मगरीं ॥ आपल्या विवरीं मूंदले ॥ ६९ ॥ एका नवचवेचि परतटीं ॥ माझारींचि फळ गोमटीं ॥ देखोनि थांबिनलें अव्हाटीं ॥ ते स्वर्गसंकटीं गुंतले ॥ १०७० ॥ आम्ही तरोनि गुतिवळें ॥ म्हणोनि रिघाले एकेवेळें ॥ ते ॰अहंकारखळाळें ॥ महातिमिंगिळें गिळिले ॥ ७१ ॥ एकीं वेदत्रयीची पेटी ॥ दीक्षेचा दोरी बांधली पोटीं ॥ ते स्वर्गांगनाकुचकपाटीं ॥ गुंतोनि शेवटीं बुडाले ॥ ७२ ॥ मंत्रतंत्रादि दीक्षितें ॥ गुंतोनि ॰बुडालीं जेथिच्या तेथें ॥ कर्मनदीच्या परपारातें ॥ कोणी पावतें दिसेना ॥ ७३ ॥ विरळा कोणीएक सभाग्य येथें ॥ हे सकळ उपाय सारोनि परते ॥ जो अनन्यप्रीतीं

---

१ चावरला. २ लोकांस उपदेश. ३ समर्थ पुरुष. ४ धुरीण, पुढारी. ५काय. ६स्पष्ट. ७ वेढा. ८प्रवाह. ९ भोंवरा. १० बळानें. ११अकरणीं दोष. १२ ओकून. १३ हिंडतात. १४मांस. १५ कांसव. १६नुद्धरती न सुटती. १७ घातले. १८ अप्सरांच्या स्तनप्रांतीं.

*ना. तारूनि. ×ना. कर्माकर्मगुचक्या. +मो. तोंडाळपणें. ऽना. हाचि उपावो तरणो प्राप्ती. ॰मो. कर्मनिष्ठ ना. कर्मनिष्ठ. ॰ना. ऐक. ॰ना. निहाडें. ॰मो. न सोडी ना. नोसंडी. *ना. कर्म. ॰ना. विकळ उच्चार वोढियेसि. ॰ना. स्वधर्म. ०ना. दुरी. ॰ना. अहंकार कल्लोळें. ॰मो. बुडिजे.

भजे मातें ॥ कर्मनदी त्यातें कोरडी ॥७४॥ माझे भक्तीचें तारूं नौतुडे ॥ जंव सप्रेमाचें शीड न चढे ॥ तंव *तरणोपायीं बापुडे॥वृथा कां वेडे शिणताती॥७५॥करूनि अनन्यभक्तीचा मार्ग ॥ करूनि ✣सर्वधर्मकर्मत्याग ॥ हा तरणोपाय चांग ॥ येरू तो व्यंग +अधःपाती ॥ ७६ ॥ शरीरक्लेशाभेणें ॥ किंवा सर्वथा उबगोन ॥ कां धरोनि ज्ञानाभिमान ॥ स्वकर्म जाण 5सांडी- ना ॥ ७७ ॥ माझी वेदरूप आज्ञा 2शुद्ध ॥ ते वेदविवंचना विशद ॥ 7स्वधर्मकर्माचे कर्मवाद॥ अति अविरुद्ध जाणता ॥७८॥ नेणोनि स्वधर्मकर्मातें ॥ कां नास्तिक्य मानूनि चित्तें ॥ किंवा धरोनियां आळसातें ॥ त्यागी कर्मातें Xतैसा नव्हे ॥ ७९ ॥ स्वधर्मांचा उत्तम गुण ॥ प्रत्य- वायें अधःपतन ॥ या दोहींतें जाणोन ॥ मद्भक्तीसीं प्राण विकिला ॥ १०८०॥ विसरोनि 0अन्य आठवण ॥ अखंडता हरिस्मरण ॥त्या नांव भक्तासि विकिला प्राण ॥ इतर भजन अनुमानि- क ॥ ८१ ॥ माझेनि 6भजनप्रेमें जाण ॥ विसरला कर्माची आठवण ॥ कर्म बापुडें रंक कोण॥ बाधक जाण नव्हे भक्तां ॥ ८२ ॥ सप्रेम करितां भजनविधी ॥ सर्वकर्मातें विसरली बुद्धी ॥ ते जाणावी भजनसमाधी ॥ तेथ कर्म त्रिशुद्धी बाधीना ॥ ८३ ॥ ज्याची श्रद्धा कर्मा- वरी ॥ तोचि कर्माचा अधिकारी ॥ ज्याची श्रद्धा श्रीधरीं ॥ तो नव्हे अधिकारी कर्माचा ॥ ८४ ॥ जो जीवें प्राणें भक्तीसि विकिला ॥ तो तेव्हांचि कर्मावेगळा झाला ॥ ज्याचिया भा- वार्था मी ०भेला ॥ तो कर्मी बांधला केवीं जाये ॥ ८५ ॥ गुणदोषांची जननी ॥ ते निःशेष अ- विद्या निरसूनी ॥ जो प्रवर्तला माझे भजनीं ॥ तो साधु मी मानीं मस्तकीं ॥ ८६ ॥ निज- कल्पना जे देहीं ॥ तेचि मुख्यत्वें अविद्या पाहीं ॥ ते कल्पना निमालिया ठायीं॥जगीं अविद्या नाहीं निश्चित ॥ ८७ ॥ अविद्येच्या त्यागासवें ॥ धर्माधर्मादि आघवें ॥ 4न त्यजितांचि स्व- भावें ॥ त्याग फावे अनायासें ॥ ८८ ॥ शिर तुटलिया पाठीं ॥ शरीर निजकर्मासि तुटी ॥ तेवीं अविद्या त्यागितां शेवटीं ॥ त्यजिले उठाउठीं 1सर्वधर्म ॥ ८९ ॥ दिवसां चंद्रउदयो पाहे॥ तो झाला तैसा नाहीं होये ॥ तेवीं अविद्येचेनि विलयें ॥ सर्वधर्म लाहे ते दशा ॥ १०९० ॥ खद्योत सूर्योदयापाठीं ॥ शोधूनि पाहतां न दिसे दिठीं ॥ तेवीं अविद्येच्या शेवटीं ॥ धर्माधर्म कोटी मावळल्या ॥ ९१ ॥ जेवीं ग्रहगण नक्षत्रमाळा ॥ कां खद्योततेज उमाळा ॥ रात्रीसवें बोळवण सकळा ॥ तेवीं धर्माधर्म सकळा अविद्येसवें ॥ ९२ ॥ सर्वधर्मत्यागाची खूण ॥ उद्ध- वा मुख्यत्वें हेचि जाण ॥ याहीवरी माझें भजन ॥ मुख्य भागवतपण त्या नांव ॥ ९३ ॥ म्ह- णसी अविद्याचि केवीं नासे ॥ मा *सर्वधर्म नासती तीसरिसे ॥ तरी अविद्यानाशें अनायासें॥ भक्तिउल्हासें माझेनि ॥ ९४ ॥ सूर्योदय देखतां दृष्टीं ॥ चंद्रनक्षत्रांची मावळे सृष्टी ॥ तेवीं माझ्या 3भक्तिउल्हासापाठीं ॥ अविद्या उठाउठीं निमाली ॥ ९५॥ अविद्येच्या नाशासवें ॥ ना- सती धर्माधर्म आघवे ॥ जेवीं गरोदर मारितां 8जीवें ॥ गर्भही तीसवें निमाला ॥ ९६ ॥ जेव्हां माझे भक्तीचा उल्हास ॥ तेव्हांचि अविद्येचा निरास ॥ अविद्येसवें होय नाश ॥ अना- यासें सर्वधर्मां ॥ ९७ ॥ ते तं भक्ति म्हणसी कोण ॥ जीचें मागां केलें निरूपण ॥ ते माझी

---

१ प्राप्त झालें नाहीं. २ व्यर्थ. ३ भयानें. ४ दोष. ५ नाश झाल्यानंतर. ६ गर्भिणी.

*तरणोपाव. ✣मो. सर्व कर्मांचा त्याग. +मो. मध्यपाती. 5मो. सांडिती. 2ना. सिद्ध. 7ना. स्वकर्मकर्माचे कर्मवाद. Xना. कैसा. 0ना. अनन्य. 6ना. भजनें. ०ना. भुलला. 4ना. नित्य जिताची. 1मो. स्वधर्म. *ना. अधर्म. 3ना. पोटीं. 8ना. सर्वे.

चौथी भक्ति जाण ॥ अविद्यानिरसन तिचेनी ॥ ९८ ॥ येर आर्त जिज्ञासु अर्थार्थी ॥ जे जे भक्तीतें आदरिती ॥ ते अविद्यायुक्त निश्चितीं ॥ मुख्य चौथी भक्ति ते माझी ॥ ९९ ॥ जे भक्तीमाजीं कांहीं ॥ अविद्येचा विटाळ नाहीं ॥ भजन तरी ठायींच्या ठायीं ॥ अनायासें पाही होतसे ॥ ११०० ॥ ते माझी आवडती भक्ती ॥ उद्धवा जाण निश्चितीं ॥ जीसि अविद्या असे धाकती ॥ *सर्वधर्म +कांपती सर्वदा ॥ १ ॥ ते भक्तीची देखोनि गुढी ॥ अविद्या धाकेंचि प्राण सांडी ॥ सर्वधर्मांची आडाडी ॥ घायेंवीण बापुडीं निमाली ॥ २ ॥ हा भक्तीचा पर्यावो ॥ आवडीच्या गोडिया मागे देवो ॥ एक ×भक्ताचा भजनभावो ॥ जेणें निर्वाहो भक्तीचा ॥ ३ ॥ माझेनि अनुसंधानेंवीण ॥ स्नानसंध्या जप होम ०दान ॥ ते अवघेचि अधर्म जाण ॥ मद्भजन तें नव्हे ॥ ४ ॥ गोडी आवडी ते ꣶपरपुरुषीं ॥ मिथ्या लुडबुडी निजपतीपाशीं ॥ ते पतिव्रता नव्हे जैशी ॥ जाण भक्ति तैशी व्यभिचारी ॥ ५ ॥ ʻनानाविषयीं ठेऊनि मन ॥ जो करी ध्यान अनुष्ठान ॥ तो जारस्त्रियेच्या ऐसा जाण ॥ नव्हे पावन ते भक्ती ॥ ६ ॥ काया वाचा मनसा ॥ माझे भक्तीचा पडला ठसा ॥ भजतां नाठवे दिवसनिशा ॥ भक्तीची दशा या नांव ॥ ७ ॥ जपेंवीण नाम वदनीं ॥ धारणेवीण ध्यान मनीं ॥ संकल्पेंवीण मदर्पणीं ॥ ²सर्वकर्मी सर्वदा ॥ ८ ॥ निरोधेंवीण वायुरोधू ॥ मर्यादेवीण स्वरूपबोधू ॥ विषयेंवीण सदा स्वानंदू ॥ मद्भक्त शुद्ध या नांव ॥ ९ ॥ भक्त ह्मणवितां गोड वाटे ॥ परी मजलागीं जें हृदय फुटे ॥ अकृत्रिमभक्ति जें उमटे ॥ तें मी भेटें उद्धवा ॥ १११० ॥ ⁷ऐसेनि भजनें जो भजत ॥ तो मजमाजीं मी त्या आंत ॥ भक्तांमाजीं जो उत्तम भक्त ॥ साधू निश्चित त्या नांव ॥ ११ ॥ तो पुरुषांमाजीं पुरुषोत्तम ॥ साधूंमाजीं अति उत्तम ॥ तो माझें विश्रामधाम ॥ अकृत्रिम उद्धवा ॥ १२ ॥ तयालागीं मी आपण ॥ करीं सर्वांगाचें आंथरुण ॥ जीवें सर्वस्वें निंबलोण ॥ प्रतिपदीं जाण मी करीं ॥ १३ ॥ तो मज आवडे ह्मणसी कैसा ॥ जीवासि पढिये प्राण जैसा ॥ सांगतां उत्तम भक्तदशा ॥ प्रेमें पिसा देवो झाला ॥ १४ ॥ मग न धरत सावरत ॥ उद्धवासि कडिये घेत ॥ भुलला स्वानंदें नाचत ॥ विस्मयें स्फुंदत उद्धव ॥ १५ ॥ मी एक देव हा एक भक्त ॥ हें विसरला श्रीकृष्णनाथ ॥ हा देवो मी एक भक्त ॥ तें उद्धवा आंत नुरेची ॥ १६ ॥ ऐशा भक्ति साम्राज्यपाटीं ॥ दोघां पडली ⁰एकी मिठी ॥ तंव देवोचि कळवळिला पोटीं ॥ ⁵निजभक्तगोठी सांगावया ॥ १७ ॥ ऐशी उत्तम भक्तांची कथा ॥ अतिशयें आवडे कृष्णनाथा ॥ रुचलेपणें तत्त्वतां ॥ मागुतां मागुतां सांगतू ॥ १८ ॥ श्लोकीं प्रमेय दिसतां ⁶अनेगे ॥ तें श्रीकृष्णें सांडूनि मागें ॥ हा ग्रंथार्थू श्रीरंगें ॥ साक्षेपें स्वांगें लिहविला ॥ १९ ॥ हे माझे युक्तीची कथा ॥ नव्हेनव्हेजी सर्वथा ॥ सत्य मानावें श्रोता ॥ ये अर्थाचा वक्ता श्रीकृष्ण ॥ ११२० ॥ श्रोतीं व्हावें सावधान ॥ मागील कथा अनुसंधान ॥ दोघां पडिलें होतें आलिंगन ॥ विस्मयें पूर्ण उद्धव ॥ २१ ॥ *चढतां प्रेमाचें भरितें ॥ तें अवरोनि कृष्णनाथें ॥ थापटूनि उद्धवातें ॥ ꣵसावध त्यातें करी हरी ॥ २२ ॥ उद्धवातें ह्मणे तत्त्वतां ॥ तुज ⁸आवडली भक्तिकथा ॥ तेचि मी सांगेन आतां ॥

*मो. सर्वकर्में. +मो. संपत्ती. ×मो. भक्तीचा. ०ना. ध्यान. ꣶना. परपुरुषासी. ²मो. सर्वकर्में. ⁷ना. ऐसेनि भजे जो भक्तु. ⁰ना. एकी गांठी. ⁵ना. निजभक्ती गोठी. ⁶मो. अव्यंग. *ना. चाढिलें. ꣵना. सावधान. ⁸मो. आवडे.

सावधानता अवधारी ॥ २३ ॥ एक जाणोनि भजती मातें ॥ एक ते केवळ भावार्थें ॥ मी दोहींच्या भुललों भावातें ॥ दोघे मातें पढियंते ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञात्वाऽज्ञात्वाऽथ ये वै मां यावान् यश्चाऽस्मि यादृशः ॥ भजंत्यनन्यभावेन ते मे भक्ततमा मताः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ मी सस्वरूप सच्चिदानंद ॥ जगदादि आनंदकंद॥नित्य सिद्ध परमशुद्ध ॥ माझें स्वरूप *शुद्ध जाणती ॥ २५ ॥ देश काळ वर्तमान ॥ सर्वीं सर्वदा अनवच्छिन्न ॥ सर्वात्मा सच्चिदानंदघन ॥ भेदशून्य मी एक ॥ २६ ॥ सत्यज्ञानमनंत ॥ परब्रह्म मी निश्चित ॥ ऐसें जाणूनि मज भजत ॥ उत्तम भागवत तो जाण ॥ २७ ॥ शुद्ध झालिया स्वरूपप्राप्ती ॥ ह्मणशी भजन केशा रीतीं ॥ ' देवभक्त तेचि ते होती ॥ मी होऊन भजती मजमाजीं ' ॥ २८ ॥ वाम सव्य दोनी भाग ॥ दों नांवीं एकचि अंग ॥ तेवीं देवभक्तविभाग ॥ मद्रूपीं सांग भासती ॥ २९ ॥ ' पाहापां लोखंडाचा आरिसा ॥ लोखंडेंचि घडिजे जैसा ॥ लोखंडेंचि उजळे कैसा ॥ स्वप्रकाशा निजतेजें ॥ ११३० ॥ दर्पण उजळलिया पाहीं ॥ शशी सूर्य गगन मही ॥ बिंबली धरी आपुल्याठायीं ॥ अप्रयासें पाहीं स्वलीला ॥ ३१ ॥ तैसे मी होऊनि माझे भक्त ॥ अनन्यभावें मजचि भजत ॥ तें माझें ऐश्वर्य समस्त ॥ प्रतिबिंबत तयांमाजीं ' ॥ ३२ ॥ होकां तरंग जैसा सागरीं ॥ त्यासी जळचि तळीं वरी ॥ तैसा माझा भक्त मजमाझारीं ॥ सबाह्याभ्यंतरीं मद्रूप ॥ ३३ ॥ जैसा सुवर्णाचा नरहरी ॥ सुवर्णहिरण्यकशिपातें मारी ॥ सुवर्णप्रल्हाद पोटेंसि धरी ॥ तैशी परी मद्भजना ॥ ३४ ॥ तेथें सगुण आणि निर्गुण ॥ उभयरूपें मीचि जाण ॥ जैसें सुवर्ण आणि कंकण ॥ तैसे +अभिन्न जाण मद्रूप ॥ ३५ ॥ तेथ जें जें दृश्य देखे दृष्टीं ॥ तें तें मद्रूपें पडे मिठी ॥ दृश्य द्रष्टा लोपूनि त्रिपुटी ॥ उठाउठी मज मिळे ॥ ३६ ॥ ऐसें जाणोनियां मज भजत ॥ ते जाणपां उत्तम भक्त ॥ ऐसें नेणोनियां मज भजत ॥ भोळे भक्त ते माझे ॥३७॥ नाहीं श्रुतींचें पठण ॥ नाहीं वेदांतशास्त्रश्रवण ॥ नाहीं ×व्युत्पत्तिलक्षण ॥ अनन्य जाण भावार्थी ॥ ३८ ॥ सगुण निर्गुण नेणे कांहीं ॥ परी देवो आहे ह्मणे हृदयीं ॥ जडत्व असे देहाच्या ठायीं ॥ तें देवो पाही वागवी ॥ ३९ ॥ यालागीं देहाचें जें चळण ॥ तें हृदयस्थ करी नारायण ॥ दृष्टीचें जें देखणेंपण ॥ त्याचेनि जाण होतसे ॥ ११४० ॥ काढूनि आपुला डोळा ॥ दूरी ठेविला वेगळा ॥ तो हृदयस्थेंवीण आंधळा ॥देखणी कळा देवाची ॥४१॥ रसना केवळ चामडी ॥ ते काय जाणे रसगोडी ॥ कापूनि मांडिल्या वापुडी ॥ गोडी अगोडी ते नेणे ॥ ४२ ॥ रसनाद्वारें रसस्वाद ॥ घेतां हृदयस्थ परमानंद ॥ वुद्धीसि करिता उद्बोध ॥ सत्य गोविंद हृदयींचा ॥ ४३ ॥ मनाचें गमनागमन ॥ दिसे हृदयस्था अधीन ॥ यालागीं दूरि जावोनि ꣸परते मन ॥ हृदयासि जाण येतसे ॥ ४४ ॥ 'इंद्रियां प्रेरितां वारिता ॥ हे सत्ता आधीन हृदयस्था ॥ यालागीं नांवें हृषीकेशता ॥ त्यासीच तत्त्वतां ह्मणताती ' ॥ ४५ ॥ एवं विचाराचा निर्वाहो ॥ करितां निजहृदयीं असे देवो ॥ तो पहावया बाहेरी धांवो ॥ तें मूर्ख

१ ज्ञाते. २ देशकालादि मर्यादारहित. ३ खालीं, वर. ४ कातडी. ५ हृदयस्थ परमात्म्याच्या स्वाधीन. ६ इंद्रियांचा स्वामीपणा.

*ना. विशद. +ना. अभिन्नपण मद्रूपें. ×ना. संकल्प विकल्पलक्षण. ꣸मो. परतोन.

पहाहो मी झालों ॥ ४६ ॥ ' तीर्थीं क्षेत्रीं *भेटेल देवो ॥ हा आपले हृदयींचा भावो ॥ निज भावेंवीण पहाहो ॥ तीर्थींही देवो दिसेना ॥ ४७ ॥ एवं देवो तो मजमाजीं आहे ॥ त्याचेनि ×टवटविती इंद्रियें ॥ क्रियाकर्म जें जें होये ॥ तें त्याचेनि पाहे तत्त्वतां ॥ ४८ ॥ ०देह तंव बापुडें ॥ केवळ अचेतन मढें ॥ त्याचेनि कर्म निपजे फुडें ॥ हें तंव कुडें सर्वथा ॥ ४९ ॥ इंद्रियांतें चेतविता ॥ कर्म क्रिया कर्तव्यता ॥ देहाचेनि नोहे तत्त्वतां ॥ मुख्यत्वें कर्ता हृदयस्थ ॥ ११५० ॥ यापरी Sजें कांहीं कर्तव्यता ॥ ते भोळेपणें +नेघे माथां ॥ सर्व कर्मांचा आत्मा कर्ता ॥ विश्वासें सर्वथा ÷दृढ मानी ॥ ५१ ॥ मग अन्नपानादि सेवितां ॥ मानी आत्माराम भोक्ता ॥ सर्वकर्मीं कर्तव्यता ॥ अहं कर्ता हें म्हणों नेणे ॥ ५२ ॥ ऐसे भोळिवेचेनि समजें माझे भजन निपजे वोजें ॥ तें म्यां आवडीं सेविजे ॥ जाण तें माझें खाजुकें ॥ ५३ ॥ सर्वभावें सर्वथा ॥ बाळकांसि जेवीं माता ॥तेवीं माझिया भोळ्या भक्तां ॥ मी सर्वथा सर्वस्वें ॥५४ धांवोनि मिठी घालावयासी ॥ हित गुज 1आलोचांसी ॥ खाणें जेवणें विश्रांतीसी ॥ जेवीं बाळकासी निजजननी ॥५५॥ तेवीं माझिया भोळ्या भक्तां ॥ मीचि जाण जिवलग माता अर्थ स्वार्थ परमार्था ॥ जाण तत्त्वतां मी त्यांसी ॥ ५६ ॥ तोंडींचें पोटींचें गांठींचें ॥ माता बाळकालागीं वेंचे ॥ तेवीं भाविकालागीं आमुचें ॥ *सर्वस्वें माचें मी वेंचीं ॥५७॥ बाळक न मागतां धांवोनी ॥ कळकळोनि माता लावी स्तनीं ॥ तेवीं भोळ्या भक्तांलागुनी ॥ मी अनुसंधानीं लाविता ' ॥ ५८ ॥ ज्येष्ठ कनिष्ठ पुत्रातें पिता ॥ एकाचि जाण प्रतिपाळिता । ज्येष्ठातें निग्रहो करिता ॥ लळे पुरविता बाळाकाचे ॥ ५९ ॥ ' 2ज्येष्ठासि वांकुडें बोलतां ॥ तोंडावरी हाणे पिता ॥ बाळक बोबडें बोलतां ॥ संतोषे सर्वथा सर्वस्वें' ॥ ११६० 'सज्ञानासि अबद्ध पढतां ॥ दोष वाजती त्याचे माथां ॥ भोळ्यां भक्तांची अबद्ध कथा ॥ तें देव तत्त्वतां संतोषे ॥ ६१ ॥ कर्माकर्म प्रत्यवायता ॥ हे सज्ञानासीच सर्वथा ॥ भोळ्या भक्तांसि कर्मबाधकता ॥ मी सर्वथा येऊं नेदीं ॥ ६२ ॥ भोजनीं बैसतां बापासी ॥ दूरी बैसवी ज्येष्ठपुत्रासी ॥ अंकीं 7वाऊनि बाळकासी ॥ तृप्ति निजग्रासीं देतसे ॥ ६३ ॥ तेथें जें जें गोड आपणासी ॥ तें तें दे बाळकासी ॥ न घेतां प्रार्थूनि त्यासी ॥ तृप्ति ग्रासोग्रासीं जेववी ॥ ६४ ॥ तेवीं साधनीं शिणतां सज्ञानासी ॥ प्राप्ति होय अतिप्रयासीं ॥ माझिया भोळ्या भक्तांसी ॥ मी अनायासें उद्धरीं ॥ ६५ ॥ वाट चुकल्या मुयाळांसी ॥ फेरा पडे चालों जाणे त्यासी ॥ बाळक बापाचे कडियेसी ॥ श्रम त्यापासीं येवों न शके ॥ ६६ ॥ तेवीं साधनें अंगविकळता ॥ ते वाजे सज्ञानाचे माथां ॥ भोळ्या भक्तांतें मी उद्धरिता ॥ प्रयास सर्वथा त्या नाहीं ॥ ६७ ॥ त्यासि वाऊनि आपुल्या खांदीं ॥ मी पाववीं 3सायुज्यसिद्धी ॥ नवल त्याची भोळी बुद्धी ॥ तेथही भजनविधी नसांडी ॥ ६८ ॥ हृदयीं कपटाचा थारा ॥ तोंडीं भजनाशी आडवारा ॥ करितां युक्तिप्रयुक्ति विचारा ॥ 5विचारबाहिरा मी त्यासी ॥ ६९

१ हालविणारा. २ खाणें. ३ हळूच कानांत सांगावयास. ४ देई. ५ येती, आदळती. ६ वाटाड्यास. ७ अडथळा.

*ना. पावेल. ×मो. टवटवी. ०मो. देह तें किती बापुडें. Sना. जेणें कर्तव्यता. +ना. नेघे. ÷मो. हृदयीं. 1ना. आलोचाव्यासी. *मो. सर्वस्वें जाण आम्ही वेचूं. 2ना. जेथें बोलतां बोलतां. 7मो. घेऊनी. 3मो. सायुज्यपदीं. 5मो. विचारा बाहिरा.

नेणे आचाराविचारा ॥ केवळ भावार्थी भोळा खरा ॥ नधरत नसांवरत एकसरां ॥ मजभीतरा तो पावे ॥ ११७० ॥ देखोन भोळया भक्तासी ॥ मीची सामोरा धांवें त्यासी ॥ त्यापाशीं मी अहर्निशीं ॥ भुललों *भावार्थासी सर्वथा ॥ ७१ ॥ केवळ जे भोळे भक्त ॥ ते भगवंतासी आवडत ॥ सांगतां कृष्ण मिटक्या देत ॥ लाळ घोटीत उद्धव ॥ ७२ ॥ मज भोळया भक्तांची आवडी ॥ काय सांगों त्यांची गोडी ॥ त्यावेगळी अर्धघडी ॥ कोडी परवडी नावडती ॥७३॥ यापरीचे जे भोळे भक्त ॥ ते मी मानीं उत्तम भागवत ॥ त्यांच्या पायां मी लागें भगवंत ॥ उत्तम निश्चित ते जाणा ॥ ७४ ॥ त्यांलागीं मी आर्तभूत ॥ त्यांलागीं मी सदा सावचित्त ॥ त्यांलागीं मी दशादिशा धांवत ॥ भोळा भक्त दुर्लभ ॥ ७५ ॥ उद्धवा काय सांगों गोठी ॥ भोळा भक्त देखोनि दिठीं ॥ मी आपुलिये सवसाठीं ॥ उठाउठी घेतसें ॥ ७६ ॥ येन्हवीं मोल करितां जाण ॥ मजहूनि माझे भक्त गहन ॥ यालागीं मी त्या अधीन ॥ भक्तवचन तुळेवीं ॥ ७७ ॥ भोळया भक्तांचें वचन ॥ माझेनि तुळेववे जाण ॥ देवकीवसुदेवांची आण ॥ भाव प्रमाण भजनासी ॥ ७८ ॥ वृथा वृत्तेंवीण भोजन ॥ वृथा वंध्येचें मैथुन ॥ वृथा भावेंवीण भजन ॥ सत्य जाण उद्धवा ॥ ७९ ॥ भावो तेथ भाग्य पहाहो ॥ भावो तेथ निःसंदेहो ॥ भावो तेथें प्रकटे देवो ॥ निजस्वभावो स्वानंदें ॥११८०॥ भावो तेथ विरक्ती ॥ भावो तेथ प्रकटे शांती ॥ भावो तेथें माझी भक्ती ॥ उल्हासती निजबोधें ॥ ८१ ॥ एवं भाविकांमाजीं माझी भक्ती ॥ मजसहित स्वानंदें नांदती ॥ यालागीं भोळे जे भावार्थी ॥ ते उत्तम होती भागवत ॥ ८२ ॥ नेणते भक्त जे मातें भजती ॥ ते मज पावले या रीतीं ॥ +सांगीतली ते म्यां व्युत्पत्ती ॥ आतां उत्तम भक्ती अवधारीं ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ मल्लिंगमद्भक्तजनदर्शनस्पर्शनार्चनम् ॥ परिचर्या स्तुतिः प्रह्वगुणकर्मानुकीर्तनम् ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ नाना अवतार अनुक्रमा ॥ शैवी वैष्णवी अतिउत्तमा ॥ शास्त्रोक्त माझ्या प्रतिमा ॥ तीर्थी क्षेत्रीं महिमा विशेष ज्यांचा ॥ ८४ ॥ ज्या प्रतिमा देवीं प्रतिष्ठिलिया ॥ ज्या नरकिन्नरीं संस्थापिलिया ॥ ज्या स्वयें स्वयंभ प्रकटलिया ॥ शास्त्रीं बोलिलिया गंडकी ॥ ८५ ॥ एकीं भक्त अनुग्रहें आल्या ॥ असुरीं निशाचरीं ज्या केल्या ॥ आपुल्या घरीं पूजिल्या ॥ भक्तीं करविल्या त्रैवर्णिकीं ॥ ८६ ॥ ऐशा माझ्या प्रतिमांचिये भेटी ॥ पाहीं धांवे उठाउठी ॥ पूजा करावया पोटीं ॥ आवडी मोठी उल्हासे ॥ ८७ ॥ माझें स्वरूप ते माझे भक्त ॥ मी तोचि ते माझे संत ॥ त्यांचे भेटीलागीं मी ×आर्तभूत ॥ जेमें कृपणाचें चित्त धनालागीं ॥ ८८ ॥ माझ्या प्रतिमांहूनि अधिक ॥ संतभजनीं अत्यंत हरिख ॥ साधुसंगतीचें अतिसुख ॥ सांडूनि देख गृहदारां ॥ ८९ ॥ चिंतामणीसि कीजे जतन ॥ तैसी मर्यादा राखे सज्जन ॥ नीचें नवें अधिक भजन ॥ न धाय मन पूजितां ॥ ११९० ॥ सिद्ध करूनि पूजासंभार ॥ माझे पूजेचा अत्यादर ॥ पूजा करितां एकाग्र ॥ जें साधुनर घरां येती ॥ ९१ ॥ त्या साधूंची पूजा न करितां ॥ जो माझी पूजा करी सर्वथा ॥ तेणें मज हाणितलें लाता ॥ कीं तो माझ्या घाता

---

१ सावध. २ वगीवरात्र; वद्दल. ३ राक्षसांनी. ४ स्वर्ण, रौप्य ताम्र. ५ उत्सुक. ६ नित्य.

* मो. भावकेसी. + मो. तें म्यां सांगीतलें तुजप्रती. × मो. आर्तवंत.

प्रवर्तला ॥ ९२ ॥ बालक एक एकुलता ॥ त्यासि माथां हाणितली लाता ॥ मग पोटोळाही नेसवितां ॥ क्षोभली माता समजेना ॥ ९३ ॥ तेवीं अवगुणूनि माझिया संतां ॥ मीचि क्षोभें मज पूजितां ॥ ते सेवा नव्हे सर्वथा ॥ अतिक्षोभकता मज केली ॥ ९४ ॥ संत माझे लळे-वाड ॥ त्यांची पूजा मज लागे गोड ॥ संतसेवकांचें मी पुरवीं कोड ॥ मज निचाडा चाड संतांची ॥ ९५ ॥ सांडूनि माझें पूजा ध्यान ॥ जो संतांसि घाली लोटांगण ॥ कोटियज्ञांचें फळ जाण ॥ मदर्पण तेणें केलें ॥ ९६ ॥ प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ती ॥ संत माझ्या सचे-तन मूर्ती ॥ दृढ भावें केल्या त्यांची भक्ती ॥ ते मज निश्चितीं पावली ॥ ९७ ॥ सकळतीर्थीं तोचि न्हाला ॥ जपतपांचें फळ तोचि लाधला ॥ सर्वपूजांचें सार पावला ॥ जेणें साधू वंदिला सन्मानें ॥ ९८ ॥ प्रतिमा निजकल्पना उत्तम ॥ संत प्रत्यक्ष पुरुषोत्तम ॥ चालतें बोलतें परब्रह्म ॥ अतिउत्तम साधुसेवा ॥ ९९ ॥ माझ्या प्रतिमा आणि साधुनर ॥ तेथें धारीतीं भज-नपर ॥ हा तंव सांगीतला निर्धार ॥ भजनप्रकार तो ऐक ॥ १२०० ॥ प्रतिमा आणि साधु सोज्वळे ॥ आवडीं न पाहती ज्याचे डोळे ॥ दृष्टि असोनि ते आंधळे ॥ जाण केवळें मोर-पिसें ॥ १ ॥ जेवीं कां प्रिया पुत्र धन ॥ देखोनियां सुखावती नयन ॥ तेसें संतप्रतिमांचें दर्शन ॥ आवडीं जाण जो करी ॥ २ ॥ अतिउल्हासें जें दर्शन ॥ त्या नांव गा देखणेपण ॥ नयन सार्थक ते जाण ॥ दृष्टीचें भजन यारीतीं ॥ ३ ॥ देखोनि संत माझीं रूपडीं ॥ जो धांवोनियां लवडसव-डी ॥ खेंव देऊनियां आवडीं ॥ मिठी न सोडी विस्मयें ॥ ४ ॥ ऐसें संतांचें आलिंगन ॥ तेणें सर्वांग होय पावन ॥ कां मूर्तिस्पर्शनें जाण ॥ शरीर पावन होतसे ॥ ५ ॥ तीर्थयात्रे न चाल-तां ॥ संतांसमीप नवचतां ॥ हरिरंगणीं न नाचतां ॥ चरण सर्वथा निरर्थक ॥ ६ ॥ जोकां नानाविषयस्वार्था ॥ *नलाजे नीचापुढें पिलंगता ॥ +तो हरिरंगणीं नाचतां ॥ आला सर्वथा उठवण्या ॥ ७ ॥ तीर्थयात्रा क्षेत्रगमनता ॥ हरिकीर्तना जागरणा जातां ॥ संतसमागमें चाल-तां ॥ कां नृत्य करितां हरिरंगीं ॥ ८ ॥ या नांव सार्थक चरण ॥ इतर संचार तें अधोगमन ॥ चरणाचें पावनपण ॥ या नांव जाण उद्धवा ॥ ९ ॥ सर्वभावें अवंचन ॥ कवडा धरूनि कोटि धन ॥ जेणें केलें मदर्पण ॥ माझें अर्चन त्या नांव ॥ १२१० ॥ धन धान्य वेंचूनि गांठीं ॥ माझी पूजा आहाच दृष्टीं ॥ ते नव्हे अर्चनहातवटी ॥ तो जाण कपटी मजसी ही ॥ ११ ॥ लोभें खावया आपण ॥ ठेवी प्रतिमेपुढें पक्वान्न ॥ अंतीत आलिया न घाली अन्न ॥ मदर्चन तें नव्हे ॥ १२ ॥ कर पवित्र करितां पूजा ॥ ते आवडती अधोक्षजा ॥ जे न पूजिती गरुडध्वजा ॥ त्या जाण भुजा प्रेताच्या ॥ १३ ॥ न करितां हरिपूजन ॥ नेदितां सत्पात्रीं दान ॥ जडित मुद्रा बाहुभूषण ॥ ×तें प्रेतासि लेणें लेवविलें ॥ १४ ॥ वाचा सार्थक हरिकीर्तनें ॥ कां अनिवार नामस्मरणें ॥ जयजयकाराचेनि गर्जनें ॥ केलीं त्रिभुवनें पावन ॥ १५ ॥ रामनामाच्या गज रीं ॥ सदा गर्जे ज्याची वैखरी ॥ तेथ कळिकाळाची नुरे उरी ॥ दुरितें दूरी पळालीं ॥ १६ ॥ हरिनाम सांडूनि करटीं ॥ मिथ्या करिताति चावटी ॥ जेवीं हागवणीची पिटपिटी ॥ तैशा

---

१ पाटाव वगैरे महावस्त्र. २ लाडके. ३ मोरपिसाच्या डोळ्याप्रमाणें. ४ मोठ्या घाईनें. ५ पुढेंपु ढांनणें. ६ उठवणीस. ७ अथवा. ८ कपटावांचून. ९ कवडीपासून. १० दररच्या. ११ अतिथि. १२अति शव. १३ वाचा. १४ ठाव. १५ पापें.

* ना. निर्लज्ज. + ना. तोही हरिरंगीं नाच ह्मणतां. × जेवीं.

गोठी जल्पती ॥ १७ ॥ हरिनामाचा सुखसुरवाडे ॥ ज्याचे मुखीं लागला गोड ॥ त्याचे मज- पांशीं सरतें तोंड ॥ मी अखंड त्याजवळीं ॥ १८ ॥ गद्यें पद्यें स्तवनमाळा ॥ नानापदबंधाची कळा ॥ छंदकुसरीं विचित्र लीळा ॥ स्तुति गोपाळा अर्पावी ॥ १९ ॥ धैर्य स्थैर्य औदार्य ॥ घनश्याम अतिसौंदर्य ॥ शौर्य वीर्य माधुर्य ॥ गुणगांभीर्य गोविंद ॥ १२२० ॥ त्रिविक्रम उभा बळीच्या द्वारीं ॥ द्वार न सांडुनि द्वारकरी ॥ तेणें द्वारें द्वारकेभीतरीं ॥ येऊनि उद्धरी कुशातें ॥ २१ ॥ तो अद्यापि श्रीहरी ॥ स्वयें उभा समुद्रतीरीं ॥ शोभा विराजमान साजिरी ॥ असु- रसुरनरीं वंदिजे ॥ २२ ॥ मत्स्य झाला तो सागरीं ॥ वराह झाला नासिकेंद्वारीं ॥ उपजला खांबामाझारीं ॥ यशोदेघरीं पोसणा ॥ २३ ॥ जरठपाठीं झाला कमठ ॥ बळिछळणीं तो खुज- टृ ॥ वेदवादें अतिवांजट ॥ कुरकुराट निःश्वासें ॥ २४ ॥ वाईल *चोरीं नेली परदेशीं ॥ ती- लागीं रडे पडे वनवासी ॥ एकही गुण नाहीं त्यापाशीं ॥ शेवीं दासी कुब्जेसी रतला ॥ २५॥ स्तुतिगुणकर्मानुकीर्तन ॥ तें या नांव गा तूं जाण ॥ ' प्रह्व ' म्हणिजे तें नमन ॥ तेंही व्या- ख्यान अवधारी ॥ २६ ॥ माझे प्रतिमांचें दर्शन ॥ कां देखोनि संतजन ॥ जो भावें घाली लोटांगण ॥ देहाभिमान सांडुनि ॥ २७ ॥ साधुजनांसी वंदितां ॥ धणी न बाणे चित्ता ॥ पुनः पुन्हां चरणीं माथा ॥ विनीतता अतिनम्र ॥ २८ ॥ भागवतांचे रजःकण ॥ जो मस्तकीं वं- दीना आपण ॥ तो जीतें जीतां प्रेत जाण ॥ अपवित्रपण तैसें तया ॥ २९ ॥ सांडुनि लौकि- काच्या लाजा ॥ जो वैष्णवांच्या चरणरजा ॥ गडबडां लोळे वोजा ॥हा भक्तीचा माझा उल्हा- स ॥ १२३० ॥ या आवडीं करितां नमन ॥ सहजें जाती मानाभिमान ॥ हें मुख्य भक्तीचें लक्षण ॥ जे मानाभिमान सांडावे ॥ ३१ ॥ त्यजावया मानाभिमान ॥ करावें मत्कथा श्रवण॥ श्रवणादि भक्तीचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण उद्धवा ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ मत्कथाश्रवणे श्रद्धा मदनुध्यानमुद्धव ॥ सर्वलाभोपहरणं दास्येना-

ऽऽत्मनिवेदनम् ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ दृढ +आस्तिक्य समाधान ॥ शुद्ध श्रद्धा त्या नांव जाण ॥ भावार्थें नदेहळे मन ॥ कथाश्रवण सादरें ॥ ३३ ॥ वक्त्याच्या वचनापाशीं ॥ जडूनि घाली कानामनांसी ॥ ×श्रव- णार्थं वाढवी बुद्धीसी ॥ विकला कथेसी भावार्थें ॥ ३४ ॥ ' जेवीं दुधालागीं मांजर ॥ संधी पाहे सादर ॥ तेवीं सेवावया कथासार ॥ निरंतर उल्हास ' ॥ ३५ ॥ जडित कुंडलें मंडित कान ॥ तें श्रवणासि नोहे मंडण ॥ श्रवणासि श्रवणें भूषण ॥ श्रवणें श्रवण सार्थक ॥ ३६ ॥ जरी 3स्वयें झाला व्याख्याता ॥ पुराणपठणें पुरता ॥ तरी साधुमुखें हरिकथा ॥ ऐके साद- रता अतिप्रीतीं ॥ ३७ ॥ श्रवणें श्रवणार्थी सावधान ॥ तोचि 7अर्थ करी मनन ॥ संपल्या कथाव्याख्यान ॥ मनीं मनन संपेना ॥ ३८ ॥ ऐसें उसावल्या मनन ॥ सहजचि लागे माझें

१ सुकाळ, सुख. २ मला प्रिय. ३ मान्य, पावन. ४ द्वारपाळ. ५ कुशस्थलीचा अधिप? ६ वराह हा ब्रह्मदेवाच्या नासिकेंतून उपजला. ७ नृसिंह. ८ कृष्ण. ९ कठीण पाठीचा कूर्म. १० कूर्म, कांसव. ११ वामन. १२ अति वाचाळ. १३ रामाची सीता. १४ तृप्ति न होय. १५ भगवद्भक्तांचे. १६ जीवंत असून. १७ डळमळणें, भयानें कापणें, घाबरे होणें. १८ हरिकथा ऐकणें. १९ निपुण.

* मो. चोरुनि. + मो. आस्तिक्यें. × ना. श्रवण. 3 ना. सर्व. 7 ना. सार्थकें.

ध्यान ॥ सगुण अथवा निर्गुण ॥ आवडी प्रमाण ध्यानासी ॥ ३९ ॥ तेथ ध्येय ध्यान ध्याता ॥ तिहींसि एकी गांठी न होतां ॥ तंवचिवरी ध्यानावस्था ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ १२४० ॥ ज्याच्या जीवीं ध्यानाची आवडी ॥ ज्याच्या मनासि माझी गोडी ॥ उद्धवा हे तेंचि जोडे जोडी ॥ जें जन्मकोडी *निजभाग्य ॥ ४१ ॥ निष्काम करोनियां ×मन ॥ जन्मजन्मांतरीं साधन ॥ केलें असेल तें माझें ध्यान ॥ विश्वासें जाण दृढ लागे ॥ ४२ ॥ दृढ लागल्या माझें ध्यान ॥ अनन्यभावें माझें भजन ॥ सर्वपदार्थांसि जाण ॥ आत्मसमर्पण मज करी ॥ ४३ ॥ वैदिक लौकिक दैहिक ॥ या क्रियांचे लाभ देख ॥ जरी झाल्या अलौलिक ॥ भक्त भाविक तें नेघे ॥४४॥ वैदिक लाभ दिव्य सामग्री ॥ स्वर्गादि सत्यलोकवरी ॥ भक्त तेंही हातीं न धरी ॥ भजनसुखें करी संतुष्ट ॥ ४५ ॥ लौकिकलाभाची श्रेणी ॥ कल्पतरु कामधेनु चिंतामणी ॥ भक्त अर्पी कृष्णार्पणीं ॥ हरिभजनीं संतुष्ट ॥ ४६ ॥ दैहिकलाभाची थोरी ॥ जगांत लक्ष्मी आल्या घरीं ॥ भक्त कृष्णार्पण करी ॥ भजनसुखें करी संतुष्ट ॥ ४७ ॥ आविरिंच्यादि लाभ जाण ॥ सर्व मानोनियां गौण ॥ माझे भक्तीसि विकिला प्राण ॥ सर्व समर्पण मज करी ॥४८ जेणें सेवेसि विकिला प्राण ॥ तो वृथा जावोंनेदी अर्धक्षण ॥ माझी कथा माझें ध्यान ॥ महोत्साहो जाण माझाचि करी ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ मज्जन्मकर्मकथनं मम पर्वानुमोदनम् ॥ गीततांडववादित्रगोष्ठीभिर्मद्गृहोत्सवः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ ध्यानावस्थे करी ध्यान ॥ नातरी कथा निरूपण ॥ अनुसंधानीं सावधान ॥ रितें मन राहोंनेदी ॥ १२५० ॥ माझीं जन्मकर्में निरूपितां ॥ आवडी उल्हास थोर चित्ता ॥ स्वेदें रोमांच द्रवतां ॥ सप्रेम कथाउल्हास ॥ ५१ ॥ ऐकूनि रहस्य हरिकथा ॥ द्रव नुपजे ज्याचिया चित्ता ॥ तो पाषाण जाण सर्वथा ॥ जळीं असतां कोरडा ॥५२॥ ऐक माझे भक्तीचें चिन्ह ॥ माझ्या पर्वांचें अनुमोदन ॥ करी करवी आपण ॥ दीनोद्धरण उपावो ॥ ५३ ॥ +पर्वविशेष भागवतधर्मीं ॥ नृसिंहजयंती रामनवमी ॥ वामनजयंती जन्माष्टमी ॥ उत्तमोत्तमीं शिवरात्र ॥ ५४ ॥ वैष्णवां शिवरात्री विरुद्ध ॥ हें बोलणें अति अबद्ध ॥ सकळपुराणीं अविरुद्ध ॥ व्यास विशुद्ध बोलिला ॥ ५५ ॥ शिव श्याम तमोगुणी ॥ तो शुद्ध झाला विष्णूच्या ध्यानीं ॥ विष्णु श्याम शिवचिंतनीं ॥ त्रिनटले गुणीं येरयेरां ॥ ५६ ॥ शिव धवळधाम गोक्षीर ॥ विष्णु घनश्याम अतिसुंदर ॥ बाप ध्यानाचा बडिवार ॥ येरें येर व्यापिला ॥ ५७ ॥ 5मुदलीं दोहींसी ऐक्य शुद्ध ॥ मा उपासकांसि कां विरुद्ध ॥ शिवरात्री वैष्णवांसि अविरुद्ध ॥ व्रत विशुद्ध सर्वांसी ॥ ५८ ॥ जें पर्व प्रिय चक्रपाणी ॥ जे सकळ कल्याणांची श्रेणी ॥ उभयपक्षतारिणी ॥ वैष्णवजननी एकादशी ॥ ५९ ॥ जे शुक्लकृष्णपक्षविधी ॥ भक्त वाऊनियां खांदीं ॥ नेऊनियां सायुज्यसिद्धी ॥ मोक्षपदीं बैसवी ॥ १२६० ॥ करावी शुक्ल एकादशी ॥ त्यजावी कृष्णपक्षासी ॥ उपडलिया एका पांखासी ॥ सायुज्यासी 7केवीं पावे ॥ ६१ ॥ दोपाखीं

१ पंक्ति. २ ब्रह्मपदादिकांचा. ३ कर्मी. ४ धाम. ५ अतिशयपणा.

*ना. निजभाग्या. ×ना. भजन. +मो. पर्वविशेषें. 5मो. मुदलां ना. मुदल. 7ना. ते न बे.

उड्डाण पक्ष्यासी ॥ एक उपडिल्या बुडवे त्यासी ॥ तेवीं त्यजितां कृष्णपक्षासी ॥ सायुज्यासी नपाविजे ॥ ६२ ॥ ते एकादशीस पाहीं ॥ जोजो उत्सवो जेजे समयीं ॥ तोतो उपतिष्ठे माझ्याठायीं ॥ संदेह नाहीं सर्वथा ॥ ६३ ॥ जो एकादशीचा व्रतधारी ॥ मी नित्य नांदें त्याच्या घरीं ॥ सर्व पर्वकाळांच्या शिरीं ॥ एकादशी खरी पैं माझी ॥ ६४ ॥ जो एकादशीचा व्रती माझा ॥ तो व्रततपतीर्थांचा राजा ॥ मज आवडे तो गरुडध्वजा ॥ परिग्रहो माझा तो एकु ॥ ६५ ॥ जें माझे भक्त आले घरा ॥ तें सर्व पर्वकाळ येती दारा ॥ वैष्णवां तो दिवाळी दसरा ॥ तीर्थें घरां तें येतां ॥ ६६ ॥ चंद्रसूर्यग्रहणांसी ॥ वोंवाळूनि सांडी ते दिवशीं ॥ कपिला पष्ठी *तिची दासी ॥ मा अर्धोदयासी कोण पुसे ॥ ६७ ॥ ऐसें मद्भक्तांचें आगमन ॥ तेणें उल्हासें न संठे मन ॥ सर्वस्व वेंचितां धनधान्य ॥ हरिखें जाण नाचत ॥ ६८ ॥ ऐशी माझ्या भक्तांची आवडी ॥ त्यांचे संगतीची अतिगोडी ॥ त्या नांव भक्तांची कुळवाडी ॥ पर्वकोडी ते दिवशीं ॥ ६९ ॥ पर्वविशेष आदरें ॥ संत आलेनि अवसरें ॥ शृंगारी हरिमंदिरें ॥ गुढिया मखरें महोत्साह ॥ १२७० ॥ संत बैसवूनि पर्वडी ॥ कीर्तन मांडिती निरवडी ॥ हर्षें नाचती आवडीं ॥ धरिती बागडी विन्यासें ॥ ७१ ॥ टाळ घोळ मृदंग कुसरीं ॥ नानाचरित्रें गाती गजरीं ॥ गर्जती स्वानंदअवसरीं ॥ जयजयकारीं हरिनामें ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ यात्रा बलिविधानं च सर्ववार्षिकपर्वसु ॥ वैदिकी तांत्रिकी दीक्षा मदीयव्रतधारणम् ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ ऐक दीक्षेचें लक्षण ॥ वैदिकी तांत्रिकी दोन्ही जाण ॥ वैदिकी वेदोक्त ग्रहण ॥ तांत्रिकी जाण आगमोक्त ॥ ७३ ॥ वैष्णवी दीक्षा व्रतग्रहण ॥ पांचरात्रिक मंत्रानुष्ठान ॥ हें आगमोक्त शुद्धलक्षण ॥ व्रतधारण तें माझें ॥ ७४ ॥ वैष्णवव्रतधर्मासि ॥ पर्वें करावीं ×वारुषी ॥ जीं बोलिलीं चातुर्मासीं ॥ एकादशी जयंत्या ॥ ७५ ॥ शयनी कटिनी प्रबोधिनी ॥ पवित्रारोपणी नीराजनी ॥ वसंतदमनकारोपणी ॥ जन्मदिनी जयंत्या ॥ ७६ ॥ इत्यादि नाना पर्वकाळीं ॥ महामहोत्साहो पूजावळी ॥ नीराजनें दीपावळी ॥ मृदंगटाळीं गर्जत ॥ ७७ ॥ उचंबळोनि अतिसुखें ॥ यात्रे निघावें येणें हारिखें ॥ दिंडी पताका गरुडटके ॥ नामघोषें गर्जत ॥ ७८ ॥ यात्रे जावें ज्या देवासी ॥ तो देवो आणी निजगृहासी ॥ आपली आवडी जे मूर्तीसी ॥ ते प्रतिमेसी प्रतिष्ठी ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ मदर्चास्थापने श्रद्धा स्वतः संहत्य चोद्यमः ॥ उद्यानोपवनाक्रीड-पुरमंदिरकर्मणि ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ मूर्ति निपजवावी वारष्ठ ॥ नेटुगी देटुगी चोखट ॥ सायुधुखें अतिनिर्दुष्ट ॥ घवघवाट साजिरी ॥ १२८० ॥ मूर्ति करावी अतिसुरेख ॥ कृश न करावी अधोमुख ॥ स्थूळ न करावी ऊर्ध्वमुख ॥ रडकी दुर्मुख न करावी ॥ ८१ ॥ अंग स्थूळ वदन हीन ॥ मूर्ति न करावी अतिदीन ॥ खेंचरी भूचरी जिचे नयन ॥ विकाळ वदन न करावी ॥ ८२ ॥ अंग साजिरें नाक

१ प्राप्त होतो. २ कुटुंबांतील. ३ शेतकी, उद्दाम. ४ प्रीतीनें. ५ कौशल्यानें मोठेपणानें. ६ आनंदाना उडया मारणें. चेष्टा. ७ परिवर्तिनी.

* ना. तयेचि दिवशीं. × ना. कारुपि.

हीन ॥ वरदळ चांग चरण क्षीण ॥ मोदळी बुदगुली *ठेंगणें ठाण ॥ अतिदीर्घ जाण न करावी ॥ ८३ ॥ मूर्ति साजिरी सुनयन ॥ सम सपोष सुप्रसन्न ॥ अंगीं प्रत्यंगीं नव्हे न्यून ॥ सुचिन्ह सुलक्षण सायुध ॥ ८४ ॥ पाहतां निवे तनमन ॥ देखतां जाय भूक तहान ॥ घवघवीत प्रसन्नवदन ॥ कृपाळक्षण सुकुमार ॥ ८५ ॥ जे देखतांचि जीवीं जडे ॥ अतिशयें सर्वांसि आवडे ॥ पाहों जातां जी निवाडे ॥ पूरू चढे प्रेमाचा ॥ ८६ ॥ ईषत् दिसे हास्यवदन ॥ अतिशयेंसि सुप्रसन्न ॥ जिचेनि घवघवाटें निवे मन ॥ प्रतिमा संपूर्ण ती नांव ॥ ८७ ॥ तेथें मेळवूनि साधुश्रेष्ठां ॥ अग्युत्तारण करावें निष्ठा ॥ चक्षून्मीलन प्राणप्रतिष्ठा ॥ करावी वरिष्ठाचेनि हातें ॥ ८८ ॥ देवालय करावें गहन ॥ वन उद्यान उपवन ॥ खेडँकुलिया विश्रामस्थान ॥ आराम जाण करावे ॥ ८९ ॥ नानाजातीचे वृक्ष तें वन ॥ फळभक्षी वृक्ष तें उपवन ॥ पुष्पवाटिका तें उद्यान ॥ कृष्णार्पण पूजेसी ॥ १२९० ॥ हाट हाटवटिया चौपासी ॥ नगर वसवावें देवापाशीं ॥ वेदाध्ययन शास्त्रश्रवणेंसी ॥ अहर्निशीं कीर्तनें ॥ ९१ ॥ इतुकें ×करावया नाहीं सामर्थ्य ॥ श्रद्धा आहे परी नसे चित्त ॥ तरी साह्य मेळवून समर्थ ॥ सद्भावयुक्त करावें ॥ ९२ ॥ कां मेळवूनि भगवद्भक्त ॥ त्यांत श्रद्धाळु जे वित्तवंत ॥ भावपूर्वक दिधल्या वित्त ॥ तेणें हें समस्त करावें ॥ ९३ ॥ देउळीं करूनि मूर्तिप्रतिष्ठा ॥ परतोनि नवचे जो त्या वाटा ॥ तो आळशी जाण करंटा ॥ नव्हे चोखटा भावाचा ॥ ९४ ॥ जो करूं जाणे मूर्तिप्रतिष्ठा ॥ धन वेंचून भावार्थी मोठा ॥ नीचें सेवा तो माझा वांटा ॥ झाडितां खराटीं न सांडी ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ संमार्जनोपलेपाभ्यां सेकमंडलवर्तनैः ॥ गृहशुश्रूषणं मह्यं दासवद्यदमायया ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ ॥ असतां शिष्य सेवकजन ॥ ते प्रतिष्ठा सांडूनि सन्मान ॥ स्वयें करी सडासंमार्जन ॥ देवालयीं जाण निर्दंभ ॥ ९६ ॥ रंगमाळा घाली कुसरीं ॥ नानायंत्रें नानाकारीं ॥ नानापरीचे रंग भरी ॥ आवडी भारी सद्भजनीं ॥ ९७ ॥ जैसे कां नीचें रंक ॥ तैसी सेवा करी देख ॥ नीच सेवेसि अतिसुख ॥ निर्मायिक सद्भजनीं ॥ ९८ ॥

॥ श्लोक ॥ अमानित्वमदांभित्वं कृतस्यापरिकीर्तनम् ॥ अपि दीपावलोकं मे नोपयुंज्यान्निवेदितम् ॥ ४० ॥

॥ टीका ॥ ॥ अपार वेंचूनि नाना अर्थ ॥ प्रसाद प्रतिष्ठा म्यां केली येथ ॥ मी एक देवाचा मोठा भक्त ॥ न धरी पोटांत अभिमान ॥ ९९ ॥ शुद्ध भावो नाहीं चित्तीं ॥ खटाटोपें अहाच भक्ती ॥ ऐशी जे दांभिक स्थिती ॥ भक्त नातळती भाविक ॥ १३०० ॥ भक्तें न धरावा अभिमान ॥ नापेक्षावा मानसन्मान ॥ न करावें दांभिक भजन ॥ अभिलाष जाण न धरावा ॥ १ ॥ अनुभव झाला तो आपण ॥ कां देवालयीं वेंचिलें धन ॥ अथवा जें दिधलें दान ॥ तें वाच्य जाण न करावें ॥ २ ॥ यजमान जें केलें बोले ॥ तें केलें तें निर्वीर्य झालें ॥ प्राणेंवीण प्रेत

१ शरीराचा वरील भाग. २ सर्वांग पुष्ट. ३ बोटें इत्यादिकांनीं. ४ भरे. ५किंचित्. ६ संस्कार विशेष. ७ उपवन. ८ बाजार. ९ नित्य सेवा. १० केरसुणी. ११ नित्य. १२ वरवर दिसणारी. १३ उच्चारण.

* मो. वेगणें. × मो. करावया समर्थ.

उरलें ॥ तैसे झाले ते धर्म ॥ ३ ॥ ' कृषीवळ पेरूनियां धान्य ॥ सर्वेचि ओच्छादी आपण ॥ तैं पीक लगडोनि ये जाण ॥ तैसें सफळ दान न बोलतां ' ॥ ४ ॥ देवासि समर्पिलें आपण ॥ कां आणिकीं केलें निवेदन ॥ तें घेऊंनये आपण ॥ देवलेकपण तो दोष ॥ ५ ॥ देवाचा प्रसाद घेतां ॥ लोभें *न घ्यावा सर्वथा ॥ आर्थी वांटावा समस्तां ॥ अल्पमात्रता स्वयें घ्यावा ॥६॥ ' दीपु समर्पिला श्रीहरी ॥ तेणें न वर्तावें गृहव्यापारीं ॥ हें बोलिलें आगमशास्त्रीं ॥ स्मृतिकारीं सज्ञानीं ॥ ७ ॥ हे तंत्र अवघी साधारण बाल्यपूजा ॥ परी दृढविश्वासें भावो माझा ॥ ते भक्ति आवडे अधोक्षजा ॥ भाविकांची पूजा भावार्थें ॥ ८ ॥ ऐक पा भक्तीचा इत्यर्थ ॥ ⁂जेणें भजणें म्हणे भक्त ॥ तरी जें जें उत्तम या लोकांत ॥ आवडता पदार्थ मज अर्पी ॥९॥

॥ श्लोक ॥ ' यद्यदिष्टतमं लोके यच्चातिप्रियमात्मनः ॥ तत्तन्निवेदयेन्मत्वं तदानंत्याय कल्पते ' ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ हो कां चंद्रामृत तत्त्वतां ॥ अवचटें +आलें भक्ताचे हातां ॥ तें अवघेंचि अर्पी भगवंता ॥ देहलोभता न सेवी ॥ १३१० ॥ देहासि यावया अमरता ॥ येणें लोभें सेवावें अमृता ॥ अमर अमृतपान करितां ॥ मरताती सर्वथा सकाळें ॥ ११ ॥ नश्वर देहाचिया ममता ॥ भक्त सेवींना अमृता ॥ तेंचि भगवंतासि अर्पितां ॥ अक्षयता अनश्वर ॥ १२ ॥ परिस चिंतामणि न प्रार्थितां ॥ दैवें आलिया भक्ताच्या हातां ॥ तो लोभें न ठेवी सर्वथा ॥ अर्पी भगवंता तत्काळ ॥१३॥ लोभें कल्पतरु राखतां ॥ कल्पना °वाढे अकल्पिता ॥ तोचि भगवंतीं अर्पितां ॥ निर्विकल्पता स्वयें लाभे ॥ १४ ॥ स्वार्थें चिंतामणी राखितां ॥ अत्यंत हृदयीं °वाढे चिंता ॥ तोचि भगवंतीं अर्पितां ॥ निश्चिंतता चित्तासी ॥ १५ ॥ कां कामधेनु राखतां आपण ॥ अनिवार कामना °वाढे जाण ॥ तेचि करितां कृष्णार्पण ॥ निरपेक्षता पूर्ण अंगीं बाणे ॥ १६ ॥ लोभें स्पर्शमणी राखतां ॥ तो वाढवी धनलोभता ॥ तोचि भगवंतीं अर्पितां ॥ अर्थस्वार्था निर्मुक्त ॥ १७ ॥ हो कां देशकाळऋतुमेळें ॥ उत्तमपदार्थ अथवा फळें ॥ नव धान्यादिकें सकळें ॥ अर्पी भावबळें मजलागीं ॥१८॥ पोटांतूनि आवडता ॥ प्राप्त झालिया पदार्था ॥ मजचि अर्पिती सर्वथा ॥ लोलिंगता सांडूनी ॥ १९ ॥ आपुले हृदयींची आवडी ॥ हरिचरणीं लाविली फुडी ॥ आतां ×नानापदार्थांची जे गोडी ॥ ते मजचि रोकडी अर्पिती ॥ १३२० ॥ मज अनंताच्या हातीं ॥ आवडीं अर्पिलें मद्भक्तीं ॥ त्याचें फळ सांगतां श्रुती ॥ मुक्या होती सर्वथा ॥ २१ ॥ मी वेदांचा वेदवक्ता ॥ मजही न बोलवे सर्वथा ॥ त्याचें फळ तें मीचि आतां ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ २२ ॥ जीवाहीहोनि 4परौती ॥ माझ्याठायीं अत्यंत प्रीती ॥ तिये नांव गा माझी भक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ' ॥ २३ ॥ तत्काळ मज पाविजे जेणें ॥ ते माझे पूजेचीं पूजा स्थानें ॥ अतिपवित्रें जें कल्याणें ॥ तुजकारणें सांगेन ॥ २४ ॥

---

१ झांकी. २ बहारीचें पीक येतें. ३ अर्पण. ४ पुजारीपणा. ५ अवचित, सहज. ६ देव. ७ नित्य. ८ लुब्धपणा.

* मो. नेघावा. ⁂ ना. जे भजनें म्हणिजे भक्त. + ना. आलिया. ° ना. वाढवी. × मो. नाना पदार्थ जे जे गोडी ना. नाना पदार्थें जे जे गोडी. 4 ना. वरौती.

॥ श्लोक ॥ ॥ 'सूर्योऽग्निर्ब्राह्मणो गावो वैष्णवः खं मरुज्जलम् ॥ भूरात्मा सर्वभूतानि भद्रपूजापदानि मे ' ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ ॥ एकादशी एकादशाध्यायीं ॥ एकादश पूजास्थानें पाहीं ॥ एका जनार्दनु तेंही ॥ एकरूप *पाहीं वार्णिलीं ॥ २५ ॥सूर्य, अग्नि, आणि ब्राह्मण, ॥ गाय वैष्णव, आणि गगन, ॥ अनिळ[1], जळ, मही, जाण ॥ पूज्य आपण आपणासी ॥ २६ ॥ अकरावें पूजास्थान ॥ सर्वभूतें, पूज्य जाण ॥ ऐक पूजेचें विधान ॥ यथायोग्य लक्षण अवधारीं ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ सूर्ये तु विद्यया त्रय्या हविषाऽग्नौ यजेत माम् ॥ आतिथ्येन तु विप्राग्र्ये गोष्वंग यवसादिना ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ ॥ सविता माझें अधिष्ठान ॥ माझेनि तेजें विराजमान ॥ जेणें तेजें जगाचे नयन ॥ देखणे जाण होताती ॥ २८ ॥ 'दीप लाविल्या गृहाभीतरीं ॥ तो प्रकाश दिसे गवाक्षद्वारीं ॥ ×तैसें माझें निजतेज अंतरीं ॥ सूर्यद्वारीं प्रकाशे '॥ २९ ॥ तो सविता मंडळ मध्यवर्ती ॥ जाण नारायण मी निश्चितीं ॥ त्या मज सूर्याची उपास्ती ॥ ÷सौर सूक्तीं त्रैविद्या ॥ १३३० ॥ ऋग्वेदादी वेद तिनी ॥ सांग सौरमंत्र जाणोनी ॥ सूर्यसूक्तें संमुख पठणीं ॥ पूजा सज्ञानीं करावी ॥३१॥ हे वैदिकी उपासकता ॥ +वेदज्ञांसीचि तत्त्वतां ॥ येणे त्या योग्य नव्हे सविता ॥ ऐसें सर्वथा न ह्मणावें ॥ ३२ ॥ तत्काळ प्रसन्न होय सविता ॥ ऐशी सुगम उपासकता ॥ तुज सांगेन आतां ॥ सावधानता अवधारीं ॥ ३३ ॥ सकळवेदांची जननी ॥ सकळमंत्रांचा मुकुटमणी ॥ ते गायत्री उत्तमवर्णीं ॥ सकळ ब्राह्मणीं जाणिजे ॥ ३४ ॥ ' तिचा अर्थ विचारितां ॥ ती अधीन असे सविता ॥ त्रिपदा, त्रिकाळीं अर्घ्य देतां ॥ त्रैविद्या तत्त्वतां त्या नांव ॥३५॥ अर्धमात्रा ()अर्धबिंबीं[2]ध्यान ॥ त्रिपदा, त्रिकाळीं अर्घ्यदान ॥ तेणें मी संतोषें 7चिद्घन ॥ आपणासमान भक्त करीं ॥ ३६ ॥ हें प्रथम माझें अधिष्ठान ॥ सूर्यपूजा ०याचि नांव जाण ॥ आतां अग्निपूजेचें लक्षण ॥ सांग संपूर्ण तें ऐक ॥ ३७ ॥ सर्वांगां मुख प्रधान ॥ तें माझें मुख अग्नि जाण ॥ ये अर्थीं वेदशास्त्र पुराण ॥ साक्ष जाण गर्जताती ॥ ३८ ॥ ब्राह्मण माझे आवडते ॥ माझे मुखीं व्हावया सरते ॥ त्यां लाविले अग्निसेवेतें ॥ तेही तेथें चूकले ॥ ३९ ॥ घालूनि मजमुखीं अवदान ॥ इंद्राय स्वाहा *ह्मणती जाण ॥ कर्मकांडें ठकिले ब्राह्मण ॥ शुद्ध मदर्पण चूकले ॥ १३४० ॥ ' केवळ मजमुखीं अर्पितां ॥ आड आली त्यांची योग्यता ॥ इंद्र यम वरुण सविता ॥ नानाविकल्पता अवदानीं[5] ॥ ४१ ॥ देवो देवी मीचि आहें ॥ हेंही सत्य न मानिती पाहे ॥ मजवेगळा विनियोग होये ॥ नवल काये सांगावें ॥ ४२ ॥ जें जें 8सेविजे तिहीं लोकीं ॥ तें तें अर्पे माझ्या मुखीं ॥ हें नमानिजे याज्ञिकीं ॥ 6कर्माविखीं विकल्प ॥४३॥ विकल्पबुद्धि ब्राह्मण ॥ अद्यापि संशयीं पडिले जाण ॥ करूनि वेदशास्त्रपठण ॥ शुद्ध मदर्पण

---

१ वायु. २ धान्यानाटें. ३ ऐक. ४ प्रथमवर्णानीं. ५ आहुतीविषयीं.

*ना. सर्वांही वार्णिल. ×ना. तैसा माझेनि तेजें अंतरीं. ÷ना. सौरशक्ती. +ना. वेदाज्ञा मीचि ते तत्त्वतां. ()ना. अर्धबिंब. 7ना. मो. चिद्भान. ०ना. इ. *ना. मज ह्मणती. 8ना. जोविजे. 6ना. कर्मपक्षिकीं विकल्प.

न बोलती ॥ ४४ ॥ माझें मुख वैश्वानर ॥ येणें भावें *विनटे नर ॥ सांडूनि भेद देवतांतर ॥ मजचि साचार अर्पिती ॥ ४५ ॥ त्यांचे समिधेनीं 5मन तृप्त झालें ॥ तेथही जरी हविर्द्रव्य आलें ॥ तरी माझें निजमुख सुखावलें ॥ सर्वस्व आपुलें त्यासि +दें ॥ ४६ ॥ मज नैराश्याची आस ॥ त्याच्या हाताची त्या पाहे वास ॥ त्यालागीं सदा सावकाश ॥ अल्पही ग्रास जैं देती ॥ ४७ ॥ त्याचेनि हातें निर्विकल्पें ॥ मद्भावें जें अग्नीस अर्पे ॥ 2तृण, काष्ठ, तिळ, तुपें॥ तें चिद्रूपें सेविजे ॥४८॥ यापरी अग्नीची उपास्ती ॥ दुजे स्थानींची पूजास्थिती ॥ सांगीतली म्यां तुजप्रती ॥ ब्राह्मणभक्ती अवधारी ॥४९॥ ×पूजेमाजीं अतिश्रेष्ठ जाण ॥ शीघ्र मत्प्राप्तीचें कारण ॥ ब्राह्मण माझें *पूजास्थान ॥ अतिगहन उद्धवा ॥ १३५० ॥ त्यांचिया भजनाची नवलपरी ॥ आड पडावें देखोनि दुरीं ॥ मस्तक ठेवावा चरणांवरी ॥ चरणरज शिरीं वंदावे ॥ ५१ ॥ अवाहनविसर्जनेंवीण ॥ शालिग्रामीं माझें अधिष्ठान ॥ परी तें केवळ अचेतन ॥ ब्राह्मण सचेतन मद्रूपें ॥ ५२ ॥ मी अव्यक्तरूप जनार्दन ॥ तो मी व्यक्त ब्राह्मणरूपें जाण ॥ धरातळीं मी असे नारायण ॥ धरामर ब्राह्मण यालागीं ॥ ५३ ॥ ब्राह्मणमुखें वेदासि महिमा ॥ ब्राह्मणयज्ञदानतपतीर्थं गरिमा ॥ ब्राह्मण देवासि परम प्रेमा ॥ ब्रह्मत्व ब्रह्मा ब्राह्मणमुखें ॥ ५४॥ त्या ब्राह्मणांसि अपमानितां ॥ अपमानिल्या यज्ञदेवता ॥ वेदादि तपदानतीर्थां ॥परब्रह्म तत्त्वतां अपमानिलें ॥ ५५॥ मज त्रिलोकीं नाहीं सांठवण ॥ मजहूनि अधिक माझे ब्राह्मण ॥ त्यांमाजीं मी वेदरूप नारायण ॥ सगळा जाण सांठवलों ॥ ५६ ॥ ब्राह्मणपद हृदयीं धरितां ॥ मज आली परमपवित्रता ॥ लक्ष्मी पायां लागे उपेक्षितां ॥ चरणतीर्थ माथां शिरीं 7वंदी ॥ ५७ ॥ यालागीं 8ब्राह्मण पूज्य जाण ॥ अंगें मी करीं चरणक्षालन ॥ त्यांचें उच्छिष्ट मी काढीं आपण ॥ पाड कोण इतरांचा ॥५८॥ 0मुख्य माझें अधिष्ठान ॥ सर्वोपचारपूजास्थान ॥ दान मान मिष्टान्न ॥ विधिपूजन विप्रांचें ॥ ५९ ॥ एका नेमू शालग्रामाचा ॥ एका स्थावर लिंगाचा ॥ एका नेमू गणेशाचा ॥ एका सूर्याचा दर्शननेमू ॥ १३६० ॥ एका नेमू तुळशीचा ॥ एका बांधल्या अनंताचा ॥ नित्य नेमें नेमस्त 3ब्राह्मणाचा ॥ 1सभाग्य भाग्याचा दुर्लभ ॥ ६१ ॥ नित्यनेमस्त द्विजपूजा ॥ षोडशोपचारें करी वोजा ॥ माझे भक्तीचा तो राजा ॥ आत्मा माझा तो एकू ॥ ६२ ॥ जो देवतांतरा उपासित ॥ जीवें भावें ब्राह्मणभक्त ॥ त्याचा चुकवूनियां अनर्थ ॥ निजस्वार्थ मी कर्ता ॥ ६३ ॥ ऐसे जे ब्राह्मणभक्त ॥ त्यांच्या पायीं पृथ्वी पुनीत ॥ गंगा चरणतीर्थ वांछित ॥ शिरीं वंदीत मी त्यांसी ॥ ६४ ॥ त्यांचे सेवेचा सेवक ॥ मोलेंवीण मी झालों देख ॥ ब्राह्मणसेवेचें मज सुख ॥ अलौकिक अनिवार ॥ ६५ ॥ नित्यनेमस्त द्विजपूजा ॥ करी तो आवडे अधोक्षजा ॥ यालागीं पसरूनि चारी भुजा ॥ आलिंगनीं माझा जीव निवे ॥ ६६॥ ब्राह्मणस्नानप्रवाहा 9तळीं ॥ जेणें भावार्थे केली आंघोळी ॥ कोटि अवभृथांतें पायांतळीं ॥

१ अग्नि. २ अन्यदेवांविषयीं. ३ वाट. ४ ज्ञानस्वरूप अज्ञानें. ५ उपासना. ६ आडवे. ७ गहण्याचें स्थान. ८ गुरुत्व, मोठेपणा. ९ भृगूची लाथ. १० शंकर. ११ योग्यता, कथा. १२ हातांत 'अनंत' बांधितात तो. १३ संकटें. १४ पवित्र. १५ यज्ञाच्या शेवटचें स्नान.

*मो. विनटले. 5मो. मज. +ना. मी दें. 2मो. तृणकाष्ठ होतील तुपें. ×मो. पूज्यामाजीं. *ना. पूज्यस्थान. 7मो. धरी. 8ना. ब्राह्मणपूजा जाण. 0ना. मुख्यत्वें. 3मो. जो ब्राह्मणाचा. 1मो. तो सभाग्य. 9ना. जळीं.

तेणें तत्काळीं घातलीं ॥ ६७ ॥ ब्राह्मणचरणतीर्थ देखतां ॥ पळ सुटे दोषदुरितां ॥ तें भावार्थें तीर्थ घेतां ॥ दोष सर्वथा निमाले ॥ ६८ ॥ जो कोणी नित्य नेमस्त ॥ सेवी ब्राह्मणाचें चरणतीर्थ ॥ तो स्वयें झाला तीर्थभूत[1] ॥ त्याचेनि पुनीत जड जीव ॥ ६९ ॥ त्या ब्राह्मणाचे ठायीं जाण ॥ अभ्यंगादि[2] सुमन चंदन ॥ आसन भोजन धन धान्य ॥ शक्तिप्रमाण पूजेसी ॥ १३७० ब्राह्मणासि प्रिय भोजन ॥ दानीं श्रेष्ठ अन्नदान ॥ निपजवूनियां मिष्टान्न ॥ घावें भोजन *सद्भावें ॥ ७१ ॥ एक हेळसूनि देती अन्न ॥ एक उबगल्यासाठीं जाण ॥ एक देती निर्भर्त्सून ॥ एक वसवसोन घालिती ॥ ७२ ॥ तैसें न करावें आपण ॥ ब्राह्मण माझें स्वरूप जाण ॥ त्यांसि देऊनियां सन्मान ॥ घावें भोजन यथाशक्ति ॥ ७३ ॥ अज्ञात अतीत आल्याासमयीं ॥ खोडी काढूं नये त्याच्याठायीं ॥ तोही माझें स्वरूप पाहीं ॥ अन्न तेसमयीं अर्पावें ॥ ७४ ॥ अतीत जातां पराङ्मुख ॥ त्यासवें जाय पुण्य निःशेख ॥ अन्न घावें समयीं आवश्यक ॥ नातरी उदक तरी घावें ॥ ७५ ॥ ब्राह्मण बैसवूनि पंक्तीं ॥ जे कोणी पंक्तिभेद करिती ॥ ते मोलें पाप विकत घेती ॥ त्यांसि अधोगती निश्चित ॥ ७६ ॥ ब्राह्मण सेवेलागीं जाण ॥ कायावाचा मन धन ॥ यथासामर्थ्यें अवंचन ॥ अतिथिपूजन त्या नांव ॥ ७७ ॥ त्रिपदाजपे[3] पवित्र +पूर्ण ॥ यालागीं वेदांचें निवासस्थान ॥ ब्राह्मण माझें स्वरूप जाण ॥ श्रेष्ठ अधिष्ठान पूजेचें ॥७८ ॥ ब्राह्मण आज्ञेलागीं जाण ॥ अतिसादर ज्याचें मन ॥ देणें देववणें दान ॥ श्रद्धा संपूर्ण या नांव ॥७९॥ ब्राह्मणसेवा धनेंवीण ॥ सर्वथा नव्हे ऐसें न म्हण ॥ सेवेसि श्रद्धा गा प्रमाण ॥ उल्हास संपूर्ण भजनाचा ॥ १३८० ॥ एकाची शरीरसेवा जाण ॥ एकाचें वाचिक पूजन ॥ एकाचें मानसिक भजन ॥ दया पूर्ण द्विजांची ॥ ८१ ॥ ब्राह्मणभक्तिलागीं जाण ॥ हर्षे निर्भर अंतःकरण ॥ श्रद्धायुक्त उल्हास पूर्ण॥ आतिथ्य जाण या नांव ॥ ८२ ॥ यापरी ब्राह्मणभजन ॥ तिसरें पूजेचें अधिष्ठान ॥ तें सांगीतलें हें जाण ॥ गोशुश्रूषण[4] तें ऐक ॥ ८३ ॥ जे गायीच्या कैवारा ॥ घायें सहस्रबाहो[5] केला पुरा ॥ तीनसप्तकें वसुंधरा ॥ मुख्य धुरा[6] म्यां मारिल्या ॥ ८४ ॥ रामावतारीं अतिमहिमान ॥ तें न घडेचि गोशुश्रूषण ॥ यालागीं गोकुळीं जाण ॥ गायीचें सेवन[9] म्यां केलें ॥ ८५ ॥ गायीच्या सेवा झाली पुष्टी ॥ बाळपणीं मारिले जेठी[10] ॥ कंस चाणूर मारिले हटीं ॥ बैसविला राज्यपैटीं[11] उग्रसेना ॥ ८६ ॥ गायीचे सेवेची अतिगोडी ॥ तेणें माझी कीर्ति झाली चोखडी ॥ फोडिली कंसाची बांदवेंडी[12] ॥ तोडिली बेडी पितरांची[13] ॥८७॥ यालागीं गायी आणि ब्राह्मण ॥ माझा जाण जीवप्राण ॥ माझे पूजेचें अधिष्ठान ॥ सुलभ जाण इयें दोन्ही ॥ ८८ ॥ आपत्काळीं गोरक्षण ॥ करी तो पढियंता मज जाण ॥ त्यासवें मी आपण ॥ गोरक्षण करीतसें ॥ ८९ ॥ गायीचे सेवेचें विधान ॥ गोग्रास घावा तृण ॥ करावें अंगकुरवाळण ॥ इतुकेनि प्रसन्न मी होये ॥ १३९० ॥ निर्लोभ गायीची सेवा ॥ करितां माझी प्राप्ति उद्धवा ॥ एक वैष्णवांची सेवा ॥ पूजा ×सद्भावा विभागू ॥ ९१ ॥

---

१ तीर्थरूपी. २ सुवासिक तैल लावून ऊनपाण्यानें स्नान करणें इत्यादि. ३ गायत्री. ४ गाईंची सेवा. ५ कार्तवीर्यार्जुन. ६ ठार. ७ एकवीसवेळां. ८ म्होरक्या. ९ सेवा. १० मल्ल. ११ राजासनावर. १२ बंदिखाना. १३ वसुदेव-देवकीची.

* ना. सद्भावें. + ना. जाण. × ना. सद्भावा विभागू.

॥ श्लोक ॥ वैष्णवे बंधुसत्कृत्या हृदि खे ध्याननिष्ठया ॥ वायौ मुख्यधिया तोये द्रव्यैस्तोयपुरस्कृतैः ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ वैष्णवसेवा अत्यंतकठिण ॥ तेथें जाती नाहीं गा प्रमाण ॥ न म्हणावा शूद्र ब्राह्मण ॥ भक्तिप्राधान्य भावार्थें ॥९२॥ विदुर दासीपुत्र प्रसिद्ध ॥ त्यासि आवडला गोविंद ॥ झाला वैष्णवांमाजीं अतिशुद्ध ॥ कैसेनि निंद्य म्हणावा ॥ ९३ ॥ योनि जन्मला मर्कट ॥ तो वैष्णवांमाजीं अतिश्रेष्ठ ॥ हनुमंत म्हणावा कनिष्ठ ॥ ऐसा पापिष्ठ कोण आहे ॥ ९४ ॥ राक्षसांमाजीं बिभीषण ॥ दैत्यांमाजीं प्रल्हाद जाण ॥ भगवंतासी अनन्यशरण ॥ वैष्णवपण तेणें त्यासी ॥ ९५ ॥ जाती उत्तम भक्तिहीन ॥ तो वैष्णव नव्हे जाण ॥ अथवा करी दांभिक भजन ॥ वैष्णवपण त्या नाहीं ॥९६॥ वैष्णवामाजीं जाति प्रमाण ॥ शाळग्राम मानी पाषाण ॥ गुरूसि मानी माणुसपण ॥ तो पापिष्ट जाण सर्वथा ॥ ९७ ॥ जाणीव शाहणीव ज्ञातेपण ॥ सांडूनि जातीचा अभिमान ॥ जो मज होय अनन्यशरण ॥ वैष्णव जाण तो माझा ॥ ९८ ॥ त्या वैष्णवाचें पूजन ॥ बाह्यउपचारें नव्हे जाण ॥ बंधुस्नेहें कळवळी मन ॥ साचार पूजन त्या नांव ॥ ९९ ॥ ऐक सख्यावंधूंचा स्नेहो ॥ बंधूसि रणीं लागतां घावो ॥ वाचाआड स्वयें रिघोनि पहाहो ॥ शत्रुसमुदावो विभांडी ॥ १४०० ॥ तैसा पोटांआंतील कळवळा ॥ तोचि वैष्णवपूजेचा सोहळा ॥ त्यावीण टिळे माळा ॥ मुख्य गोपाळा तेणें नव्हे ॥ १ ॥ एका पितयाचे पुत्र साधू ॥ अकृत्रिम होती बंधू ॥ *माजीं सापत्नविरोधू ॥ स्नेह शुद्ध तो नव्हे ॥ २ ॥ भक्ता अभक्तांची उत्पत्ती ॥ मजपासूनि निश्चितीं ॥ भावाभाव सापत्नप्राप्ती ॥ विरुद्ध स्थिती परस्परें ॥ ३ ॥ वैष्णव विष्णूचे उदरीं जाण ॥ ते उदरीं उदरस्थ व्हावें आपण ॥ ×तें सहजें झालें सखेपण ॥ अकृत्रिम जाण कळवळा ॥ ४ ॥ ऐसा *बंधुस्नेह जो कळवळा ॥ तेचि पूजा वैष्णवकुळा ॥ वैष्णवपूजकाजवळा ॥ भावें भुलला मी तिष्ठें ॥ ५ ॥ वैष्णवपूजेचें लक्षण ॥ तें पांचवें माझें +अधिष्ठान ॥ ऐक आकाशाचें पूजन ॥ केवळ माझें ध्यान तेठायीं ॥ ६ ॥ आकाश निर्लेप निर्विकार ॥ अति सूक्ष्म निराकार ॥ तैसें माझें ध्यान निरंतर ॥ हृदयीं साचार करावें ॥ ७ ॥ ध्यानीं ०बैसोनि सावकाश ॥ सगळें सर्व महदाकाश ॥ जो आपुलें करी ८हृदयाकाश ॥ तेणें मी परेश पूजिलों ॥ ८ ॥ अतिसूक्ष्म निर्विकार ॥ हृदयीं माझें ध्यान सधर ॥ तेचि पूजा गा साचार ॥ अपरांपर मी पूजिलों ॥ ९ ॥ आकाशा लेप लावूं जातां ॥ लावितां न लागे सर्वथा ॥ तेवीं सर्वकर्मीं वर्ततां ॥ आपुल्या मुक्तता जो देखे ॥१४१०॥ आकाश सर्वपदार्थीं व्याप्त ॥ व्याप्त असोनि अति अलिप्त ॥ तेवीं सर्वकर्मीं वर्तत ॥ कर्मातीत नभनिष्ठ ॥ ११ ॥ आकाश माझें पूजास्थान ॥ तेथील पूजेचें हें विधान ॥ हें सहावें पूजाअधिष्ठान ॥ वायूचें अर्चन तें ऐक ॥ १२ ॥ वायूच्या ठायीं भगवद्बुद्धी ॥ ज्याची चळं नेणे कधीं ॥ ७वायूचेनि भूतां चेतनसिद्धी ॥ ९जगातें त्रिशुद्धी धरिता 1तो ॥ १३ ॥ वायुरूपें

१ पराभव करी, जिंकी. २ रंग.

*ना. मानी. ×मो. तैसें हें जाले सखेपण. *ना. साधुस्नेह. +ना. मो. पूजास्थान. ०ना. बैसवूनि. ८ना. हृदयावकाश. ७ना. ढळों नेदी. ३ना. वायूनें भूतचेतना शुद्धि. ९ना. जाण. 1 ना. मी.

मीचि जाण ।। झालों सर्वभूतांचा प्राण ।। प्राणाचा मुख्य मी प्राण ।। मद्रूप पवन याहेतू ।।१४।। वायू व्योमीं जन्म पावे ।। जन्मोनि व्योमावेगळा नव्हे ।। सर्वकर्मीं तेथोंचि भोवे ।। अंतीं स्थिरावे निजव्योमीं ।। १५ ।। तेवीं जन्मकर्मनिधान ।। पावोनि नसांडी अधिष्ठान ।। प्राणाचा जो होय प्राण ।। हें निजपूजन वायूचें ।। १६ ।। प्राणाचें गमनागमन ।। तेथ सोहंहंसाचें नित्य ध्यान ।। तेंचि करितां नित्य सावधान ।। हेंचि पूजन वायूचें ।। १७ ।। मद्रूपें दृढभावन ।। वायूचें जो करी आपण ।। तें पवनाचें पूजन ।। पूजास्थान सातवें ।। १८ ।। जीवा जीववी जीवन ।। त्या जीवना मी निजजीवन ।। जीवनें पूजिजे जीवन ।। जेवीं समुद्रपूजन तरंगीं ।। १९ ।। नद्यस्तुप्यंतु समुद्रास्तृप्यंतु ।। हें जळेंचि जळ पूजिजेतु ।। *पूज्यपूजकां एकत्व येथ ।। हेचि वेदोक्त +विधिपूजा ।। १४२०।। जीवनें जीवनाची पूजा ।। जीवनेंचि निपजे वोजा ।। ते पूजा पावे अधोक्षजा ।। तो भक्त माझा पढियंता ।। २१ ।। 'आपो नारायणः साक्षात' ।। या मंत्राचा जो मंत्रार्थ ।। देवें देवोचि पूजिजेत ।। जाण निश्चित उद्धवा ।। २२ ।। क्षीरें पूजिला क्षीरसागरू ।। तेवीं ×द्रव्यें द्रव्योपचारू ।। हा जीवनपूजाप्रकारू ।। जाण निर्धारू उद्धवा ।। २३ ।। जीवनें पूजिजे जीवन ।। हें आठवें पूजास्थान ।। ऐक पृथ्वीचें पूजन ।। श्लोकार्धीं संपूर्ण सांगेन ।। २४ ।।

।। श्लोक ।। ।। स्थंडिले मंत्रहृदयैर्भोगैरात्मानमात्मनि ।। क्षेत्रज्ञं सर्वभूतेषु समत्वेन यजेत माम् ।। ४५ ।।

।। टीका ।। जळामाजीं धराधरें ।। विरोनि हो पाहे ते नीरें ।। तीमाजीं मी प्रवेशलों धराधर ।। अधर ते सधर तेणें झाली ।। २५ ।। यालागीं पृथ्वी माझें पूजास्थान ।। ऐक पूजेचें विधिविधान ।। गोसदृश स्थंडिलीं जाण ।। आवाहन पैं माझें ।। २६ ।। गोसदृश स्थंडिलीं कां म्हणसी ।। पृथ्वी आहे गायीच्या ऐशी ।। जे पूजा करावी पडे तिसी ।। ते तदाकारेंसि स्थंडिल ।। २७ ।। ते स्थंडिलीं पूजावया धरा ।। आवाहन करावें धराधरा ।। ऽतार्लिंग सुहृद्मंत्रा ।। मंत्रद्वारा पूजावी ।। २८ ।। हृदय, कवच, शिखा, नेत्र ।। शक्तिबीज, मंत्र, अस्त्र, ।। स्थंडिलीं रेखूनियां यंत्र ।। धराधर महापूजा ।। २९ ।। यापरी पृथ्वीपूजन ।। सांग सांगीतलें जाण ।। आपुलें आपण पूजास्थान ।। दहावें लक्षण तें ऐक ।। १४३० ।। 'आधीं एक पुढें पूर्ण ।। त्या नांव दहावें लक्षण ।। आपलें आपण पूजास्थान ।। विचित्र विंदान पूजेचें ।। ३१ ।। *पूज्यापुढें पूज्यकोटी ।। केल्या गणितासी पडे तुटी ।। पहिल्या पूज्यासी जें फांटा उठी ।। तें गणितसृष्टी असंख्य ।। ३२ ।। पूर्णासि फांटा काढिजे ।। त्या नांव एक म्हणिजे ।। एकपणेंही पूर्ण असिजे ।। सहज निजे परिपूर्ण ।। ३३ ।। पूर्णापुढें पूर्ण पडे ।। तें निजात्मपूजा कायि गणितां आतुडे ।। जें निचाडा चाड वाढे ।। तें निजनिवाडें पाविजे ।। ३४ ।। एकासि एक मेळविजे ।। तें दोनीपणें होय दुजें ।। जें एकें एक भागिजे ।। तें देखिजे निजपूज्यत्व ।। ३५ ।। आपणचि आपला देवो ।। आपुला पूजक आपण पहाहो ।। आपुला आपणचि भावो ।। नव-

१ आकाशांत. २ वांचविते. ३ पाणी. ४ पाणी. ५ आधारावांचून. ६ उदक. ७ बळकट. ८ पृथ्वीधारक. ९ शून्य (१०). १० [ (० स रेघ दिल्यानें १ निपजतो ].

* ना. पूज्य पूजकत्वें तेथे. + ना. निजपूजा. × ना. द्रव्या मो. द्रव्य द्रव्यें द्रव्योपचार. ऽ मो. तार्लिंग हृदय यंत्र मंत्रद्वारा ।। मंत्रेद्वारा पूजावी. * ना. त्यापुढें.

लनवलावो पूजेचा ॥ ३६ ॥ हृदयीं भावूनि चैतन्यघन ॥ स्वयें *तद्रूप होऊनि जाण ॥ मग जे भोग भोगी आपण ॥ ब्रह्मार्पण सहजेंची ॥ ३७ ॥ तो ग्रास घाली स्वमुखीं ॥ तेणें मुखें मी होय सुखी ॥ तृप्ति उपजे परमपुरुखीं ॥ पूजा नेटकी हे माझी ॥ ३८ ॥ तो जे जे कांहीं भोग भोगी ॥ ते अर्पती मजचिलागीं ॥ मी रंगलों त्याचे रंगीं ॥ पावे श्रीरंगीं ते पूजा ॥ ३९ ॥ मुख्यपूजेमाजीं हे माझी पूजा ॥ तेणें पूजिलें मज अति वोजा ॥ पूजामिसें गरुडध्वजा ॥ मज अधोक्षजा वश तेणें केलें ॥ १४४० ॥ हे आवडती माझी पूजा ॥ अत्यंत प्रिय अधोक्षजा ॥ हे भक्ति पढिये गरुडध्वजा ॥ जाण तो माझा प्रियभक्त ॥ ४१ ॥ होकां सगुण अथवा निर्गुण ॥ दोहीं +रूपें मीचि जाण ॥ तेथ जो करी निजभोग अर्पण ॥ शुद्धपूजा जाण ते माझी ॥ ४२ ॥ निजात्मभोगीं अधोक्षजा ॥ पूजिजे ते हे जाण पूजा ॥ सर्वभूतांतें पूजिजे वोजा ॥ समसाम्य समजा समभावें ॥ ४३ ॥ अकरावे पूजेचा विवेक ॥ मागां पुढां एकएक ॥ अकरा इंद्रियीं पडे ओंख ॥ तोचि पूजक सर्वभूतां ॥ ४४ ॥ मागां पुढां एकएक कीजे ॥ त्या नांव एकादश म्हणिजे ॥ हाचि विवेक जेणें म्हणिजे ॥ तेणें पूजिजे सर्वभूतें ॥ ४५ ॥ आत्मभोग समर्पण पाहीं ॥ वस्तु जाणितली स्वदेहीं ॥तोचि सर्वभूतांच्या ठायीं ॥ देहींविदेहीं समसाम्य ॥ ४६॥ सर्वक्षेत्रांतें वागविता ॥ मी 'क्षेत्रज्ञ' जाण तत्त्वतां ॥ देखतांही विषमभूतां ॥ ÷ज्याची ममता मोडेना ॥ ४७ ॥ उंचनीच विषम भूतां ॥ वस्तुत्वि न देखे विषमता ॥ ०समसाम्य समान समता ॥ सर्वभूतां समत्वें ॥ ४८ ॥ माझिया साम्यें सर्वसमता ॥ तेचि पूजा सर्वभूतां ॥ तोचि पूजक तत्त्वतां ॥ ज्यासि विषमता बाधीना ॥ ४९ ॥ जो *भावार्थी मजमाजीं आला ॥ तें सर्वभूतें तोचि झाला ॥ सहजें समत्व पावला ॥ पूजूं लागला ×आत्मत्वें ॥ १४५० ॥ पूजूं जाणे रंकरावो ॥ परि पालटेना समभावो ॥ ‡न खंडितां समतेचा ठावो ॥ यथायोग्य पहाहो पूजित ॥ ५१ ॥ ऐक यदुवंशध्वजा ॥ सर्वभूतीं माझी पूजा ॥ माझेनि समत्वें निपजे वोजा ॥ या अकराही पूजा समत्वें ॥ ५२ ॥ ऐसें अकराही अधिष्ठानें ॥ मत्प्राप्तिकर अतिपावनें ॥ म्यां सांगीतलीं अनुसंधानें ॥ पूजा करणें यथाविधी ॥ ५३ ॥ म्यां सांगीतल्या ज्या निगुती ॥ पूजा करावी त्याचि स्थिती ॥ सर्वाधिष्ठानीं माझी मूर्ती ॥ सुचित्तचित्तीं चिंतावी ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ धिष्ण्येष्वेष्विति मद्रूपं शंखचक्रगदांबुजैः ॥ युक्तं चतुर्भुजं शांतं ध्यायन्नर्चेत्समाहितः ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ ॥ निर्गुणाहूनि सगुण न्यून ॥ म्हणे तो केवळ मूर्ख जाण ॥ सगुण निर्गुण दोन्ही समान ॥ न्यून पूर्ण असेना ॥ ५५ ॥ 'विघरलें तें तूप होये ॥ थिजलें त्यापरीस गोड ‡आहे ॥ निर्गुणापरिस सगुणीं पाहे ॥ अतिलवलाहें स्वानंद' ॥ ५६ ॥ निर्गुणाचा बोध कठिण ॥ मनबुद्धिवाचे अगम्य जाण ॥ शास्त्रांसि न कळे ऊणखूण ॥ वेदीं मौन धरियेलें ॥ ५७ ॥ वारा उमाणावा वावें ॥ आकाश आंकळावें खेवें ॥ भावना भांबावली धांवे ॥ काय धरावें स्फुरेना ॥ ५८ ॥ तैशी सगु-

१ परमेश्वरी. २ विचार. ३ शरीरांस. ४ उद्धवा. ५ हीं. ६ माझी प्राप्ति करून देणारीं. ७ युक्ती. ८ मोजमा. ९ कवळीन.

*मो. सद्रूप. +मो. रूपीं. ÷ना. ज्यासी माझी समता मोडेना, मो. माझी सत्ता मोडेना. ०ना. समसाम्य समानता. *ना. सर्वार्थी. ×मो. समत्वें. ‡ना. खंडेना समत्वाचा ठावो. ‡मो. पाहे.

णमूर्ती नव्हे जाण ॥ सुलभ आणि सुलक्षण ॥ देखतां जाय भूक तहान ॥ *निवताहे मन सप्रेमें ॥५९॥ जो नित्य सिद्ध सच्चिदानंद॥ प्रकृतिपर परमानंद ॥ सगुण झाला गोविंद ॥ स्वानंदकंद स्वलीला ॥१४६०॥ साखरेची गोडी वाखाणिली॥ तिची नाबदेची भेली केली ॥ गोडिये अधिक शोभली॥तैशी मूर्ति झाली साकार ॥६१॥लाऊनियां कसवटी॥उत्तम सुवर्णाची खोटी॥बांधल्या नववधूच्या कंठीं ॥ तेणें ते गोमटी दिसे काय ? ॥ ६२ ॥ त्याचींच करूनियां भूषणें ॥ अंगीं प्रत्यंगीं बाणितां लेणें ॥ नववधू अत्यंत शोभली तेणें ॥ निंबलोणें उतरिती ॥ ६३ ॥ तैसें जें निर्गुण निर्विकार ॥ त्याची सगुणमूर्ती साकार ॥ चिन्मात्रैक अतिसुंदर ॥ मनोहर स्वलीला ॥ ६४ ॥ घवघवित घनसांवळा ॥ मुकुट कुंडलें मेखळा ॥ कंठीं कौस्तुभ वनमाळा ॥ सोनसळा झळकत ॥ ६५ ॥ आधींच तो अतिसांवळा ॥ वरी टिळक रेखिला पिंवळा ॥ आरक्त प्रांत दोहीं डोळां ॥ कमळदळां लाजवी ॥ ६६ ॥ चिन्मात्रींचें देखणेपण ॥ त्यां डोळ्यां आलें शरण ॥ सैराट हिंडतां शिणला ×पवन ॥ हरीचें घ्राण ठाकिलें ॥ ६७ ॥ ‘ जैशा ॐकारामाजीं श्रुती ॥ तैशा मुखामाजीं दंतपंक्ती ॥ चौकीचे चारी झळकती ॥ सच्चिदीप्तीं सोलींव ’ ॥ ॥६८॥ जेवीं जीव शिव भिन्नपणीं॥तेवीं अध ऊर्ध्व अधर दोन्ही ॥हरिअंगीं मिनले मिळणीं ॥ समानपणीं समत्वें ॥ ६९ ॥ देखोनियां कृष्णवदन ॥ चंद्रमा कृष्णपक्षीं क्षीण ॥ तो तंव पूर्णिमेसि संपूर्ण ॥ हा सदा संपूर्ण वदनेंदु ॥ १४७० ॥ दिवसां चंद्राची क्षीण प्रभा ॥ वदनेंदूची नवल शोभा ॥ लोपोनि चंद्रसूर्यप्रभा ॥ स्वयें स्वयंभा प्रकाशे ॥ ७१ ॥ तो आर्तचकोरा अमृतपान ॥ मुमुक्षुचातका स्वानंदघन ॥ सगुणपणें नारायण ॥ भूषणां भूषण तो झाला ॥ ७२ ॥ चहूं खाणी क्रिया विविधा ॥ तैशा चहूं भुजीं उदावादा ॥ सगुण देखोनि गोविंदा ॥ वेद निजबोधा आयुधें झाले ॥ ७३ ॥ +देवो नकळे श्रुतीसी ॥ लाज आली होती वेदांसी ॥ जगीं मिरवावया प्रतापासी ॥ आयुधें हरीपाशीं ते झाले ॥ ७४ ॥ ‘ सामवेद झाला शंख ॥ यजुर्वेद चक्र देख ॥ अथर्वण गदा तीख ॥ कमळ साजेक ऋग्वेद ॥ ७५ ॥ साकारपणें सच्चिदानंदा ॥ शंख चक्र पद्म गदा ॥ चहूं करीं चहूं वेदां ॥ निववी सदा निजांगें ॥ ७६ ॥ जगीं मिरवावया उपनिषदें ॥ झालीं बाहुभूषणें अंगदें ॥ करीं कंकणें अतिशुद्धें ॥ सोहंशब्दें रुणझुणती ॥ ७७॥ नख केश अंगुलिका ॥ करात्रीं जडितमुद्रिका ॥ त्रिकोण षट्कोणिया देखा ॥ उपासकां त्रिपीठ ॥ ७८ ॥ अगम्य तेज हृदयींच्या पदका ॥ त्रैगुण त्रिवळी उदरीं देखा ॥ मध्य कळस नेटका ॥ क्षुद्रघंटिका मेखळे ॥ ७९ ॥ कांतींव मर्गजस्तंभ जाण ॥ तैसे शोभती दोन्ही चरण ॥ ते केवळ अचेतन ॥ हे सचेतन हरिअंगीं ॥ १४८० ॥ ध्वज वज्र अंकुश ऊर्ध्वरेखा ॥ दोन्ही पायीं पद्में देखा ॥ यवांकित सामुद्रिका ॥ अतिनेटका पदबंधू ॥ ८१ ॥ आरक्त रंग चरणतळां ॥ वरील घनसांवळी कळा ॥ नभीं इंद्रधनुष्यमेळा ॥ तैसी लीळा हरिचरणीं ॥ ८२ ॥ सगुण देखोनियां जगन्नायका ॥ दशदिशांसीं चरणीं आवांका ॥ पावावया निजसुखा ॥ दशांगुलिका होऊनि ठेल्या ॥ ८३ ॥ चंद्र कृष्णपक्षीं क्षीण ॥ तेणें ठाकिले हरिचरण ॥ नखीं चंद्र जडोनियां जाण ॥ परम पावन तो झाला ॥ ८४ ॥ हें जाणोनि त्रिनयनें ॥ चंद्रमा मस्तकीं

---

१ खडीसाखर. २ ढेप. ३ लगड. ४ केवळ ज्ञानमात्र. ५ ओष्ठ. ६ मुखरूप चंद्र. ७ दुःखित हेच चकोरपक्षी यांस. ८ पूर्णत्व. ९ ताजें. १० बारिक धुंगुरू. ११ पाचूचे खांब. १२ पदरचना. १३ शंकरानें.

*ना. निववितांहे. ×मो. आपण. +ना. ते म्हणून नकळे.

धरणें ॥ पायवणी माथां वाहणें ॥ जग उद्धारणें तेणें जळें ॥८५॥ सगुण देवो देखोनि पाहीं॥ चारी मुक्ती लागल्या पायीं ॥ यालागीं संतचरणांच्या ठायीं ॥ तत्पर पाहीं सर्वदा ॥ ८६ ॥ सलोकता समीपता ॥ दोहीं पायीं वांकी गर्जतां ॥ अंदू झाली स्वरूपता ॥ सायुज्यता तोडरू ॥ ८७ ॥ ज्या तोडराचा धाक पाहीं ॥ अहंगर्वित असुर वाहती देहीं ॥ सर्वसुख तें हरीच्या ठायीं ॥ त्याच्यापायीं समाधी ॥ ८८ ॥ धैर्य वीर्य उदार कीर्ती ॥ गुणगांभीर्य शौर्य ख्याती ॥ यांसि कारण माझी सगुण मूर्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८९ ॥ माझे ये मूर्तीचेनि दर्शनें ॥ होत डोळ्यां पारणें ॥ उठी जन्ममरणांचें धरणें ॥ खत फाडणें विषयांचें ॥ १४९० ॥ माझी मूर्ती देखिल्या पाठीं ॥ नलगे योगयाग आटाआटी ॥ नलगे रिघावें गिरिकपाटीं ॥ नानासंकटीं न पडावें ॥ ९१ ॥ नलगे आसन भाजन ॥ नलगे समाधिसाधन ॥ माझिये प्राप्तीसि कारण ॥ माझी भक्ती जाण उद्धवा ॥९२॥ एकादश पूजा अधिष्ठान ॥ येथें माझें करोनि आव्हानें ॥ म्यां सांगीतलें मूर्तीचें ध्यान ॥ सावधान करावें ॥ ९३ ॥ माझें अर्चन माझें भजन ॥ माझें करावें कीर्तन ॥ माझ्या नामाचें नामस्मरण ॥ माझे गुण वर्णावे ॥ ९४ ॥ अहर्निशीं माझी कथा ॥ अहर्निशीं माझी वार्ता ॥अहर्निशीं मातें ध्यातां ॥ भक्ति तत्त्वतां ती नांव ॥९५॥ दीपकळिका हातीं चढे॥तें घरभर प्रकाश सांपडे ॥ माझी मूर्ती जें ध्यानीं जडे॥तें चैतन्य आतुडे अवघेंही ॥ ९६ ॥ या *उपपत्ति उद्धवा देख ॥ सगुण निर्गुण दोन्ही एक ॥ जाण पां निश्चयो निष्टंक ॥ सच्चित्सुख समलें ॥ ९७ ॥ जो कस सुवर्णाचिये खोटीं ॥ तोचि वाला एका कसवटीं ॥ सगुणनिर्गुणपरिपाटीं ॥ नाहीं तुटी चित्सुखा ॥९८॥ तेवीं सगुण निर्गुण निःशेष ॥ जाण निश्चयें दोन्ही एक ॥ सगळें साखरेचें टेंक ॥ नां नवटांक सम गोडी ॥ ९९ ॥ हें अंतरंग माझें ध्यान ॥ तेथें मन करोनि सावधान ॥ अनिर्हर्षें मदर्चन ॥ मद्भक्तीं जाण करावें॥१५०० उद्धवा ऐसें ह्मणसी मनीं ॥ हे भक्ति पाविजे कैसेनी ॥ हें साध्य होय जिहीं साधनीं ॥ तें तुजलागोनी सांगेन ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ इष्टापूर्तेन मामेवं यो यजेत समाहितः ॥ लभते मयि सद्भक्तिं मत्स्मृतिः साधुसेवया ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ ॥ करितां नाना योगयाग ॥ वापी कूप वन तडाग ॥ श्रौत स्मार्त कर्म चांग ॥ मदर्पण सांग जिहीं केलें ॥२॥ श्रौत अग्निहोत्र सोमयाग ॥ स्मार्त वापी कूप तडाग॥ +मज नार्पितां दोन्ही व्यंग ॥ सत्कर्म सांग मदर्पणें ॥ ३ ॥ कर्म करितां मदर्पण ॥ अवचटें फळ वांछी मन ॥ इतुकियासाठीं भक्तासि विघ्न ॥ सर्वथा मी जाण येवों नेदीं ॥ ४ ॥ सकामकर्मकर्त्यासी ॥ जे प्राप्ति नव्हे अतिप्रयासीं ॥ त्या उत्तमलोकभोगांसी ॥ मद्भक्तांसी मी देता ॥ ५ ॥ पोटांतूनि माझा भक्त ॥ दिव्य भोगांसि होय विरक्त ॥ ते भोग भोगितां मातें स्मरत ॥ भोगासक्त तो नव्हे ॥ ६ ॥ साधु देवालया जातां ॥ पर्जन्य पडिला धारावर्ता ॥ तो वेश्या गृहासी नेणतां ॥ आला अवचितां वोसरियां ॥ ७ ॥ तो वसोनि वेश्येसी नैतळे ॥

१ खटपट. २ गिरिगुहांत. ३ पात्र. ४ नामाचा उच्चार बोलाविणें. ५ निश्चयेंकरून, पक्कें. ६ लगड. ७ अनुक्रमांत. ८ पर्वत. ९ किंवा. १० मुख्य. ११ चोहींकडून धारांनीं. १२ पाऊस ओसरेपर्यंत उभा राहण्यास. १३ संबंध करित नाहीं.

*ना. यापरी उद्धवा. + मो. मज अर्पितां दोन्ही अव्यंग.

तेवीं भक्त दिवि भोगासी कांटाळे ॥ ठकलों म्हणे अनुतापबळें ॥ पिटूनि कपाळें हरि स्मरे ॥ ८ ॥ ऐशिया अनुतापस्थितीं ॥ तत्काळ भोग क्षया जाती ॥ तो जन्म पावे महामती ॥ माझी भक्ती जिये गृहीं ॥ ९ ॥ त्यासि पूर्वसंस्कारस्थितीं ॥ सकळविषयांची विरक्ती ॥ उपजतचि लागे भक्तिपंथीं ॥ भक्त आवडती जीवें प्राणें ॥ १५१० ॥ तो मुक्तींतें हाणोनि लातें ॥ निजसर्वस्वें भजे मातें ॥ यापरी मी निजभक्तातें ॥ नेदीं विघ्नातें आतळों ॥ ११ ॥ यापरी ज्यास विषयविरक्ती ॥ तेही इष्टापूर्तें जें करिती ॥ योगयाग त्याग साधिती ॥ माझी भक्ति तें उपजे ॥ १२ ॥ समाहित करोनि मन ॥ श्रौतस्मार्तकर्मानुष्ठान ॥ योगयाग *तप साधन ॥ निष्ठेनें जाण ते करिती ॥ १३ ॥ तेणें +शुद्ध होय चित्तवृत्ती ॥ झाली चित्तशुद्धीची प्राप्ती ॥ तें उपजे माझी सद्भक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १४ ॥ इतुकी नकरितां आटाटी ॥ माझे ×भक्तीची होय भेटी ॥ हें अति गुह्य आहे माझे पोटीं ॥ ते तुज मी गोठी सांगेन ॥ १५ ॥ सांडोनि सकळ साधन ॥ जो करी साधुभजन ॥ तेव्हांचि त्याचें शुद्ध मन ॥ सत्य जाण उद्धवा ॥ १६ ॥ ह्मणसी साधु तो कैसा कोण ॥ मागां सांगीतलें लक्षण ॥ बहु बोलावया नाहीं कारण ॥ साधु तो जाण सद्गुरु ॥१७॥ त्या सद्गुरूचें भजन ॥ जो भावार्थें करी आपण॥ सर्वशुद्धीचें कारण ॥ सद्गुरु जाण सर्वांशीं ॥ १८ ॥ ज्याचे मुखींचें वचन ॥ ब्रह्मसाक्षात्कारा पाववी जाण ॥ त्याचे सेवितां श्रीचरण ॥ शुद्धि कोण होईना? ॥ १९ ॥ गुरुनाम घेतां मुखें ॥ कळिकाळ पाहूं नशके ॥ त्याची सेवा करितां हरिखें ॥ पायां मोक्षसुखें लागती ॥ १५२० ॥ ज्यासि सद्गुरूची आवडी चित्तीं ॥ ज्यासि गुरुभजनीं प्रीती ॥ त्यासि भाळली माझी सद्भक्ती ॥ पाठी लागे निश्चितीं वरावया ॥२१॥ जो गुरुभजनीं भावार्थी ॥ जगामाजीं तोचि स्वार्थी ॥ त्यापाशीं माझी सद्भक्ती ॥ असे तिष्ठती आंखिली ॥ २२ ॥ सद्भक्ति बापुडी कायसी ॥ अंगें मीही अहर्निशीं ॥ तिष्ठतसें स्वानंदेंसीं ॥ गुरुप्रेमासी भूललों ॥ २३ ॥ मज माझ्या भक्तांची थोडी गोडी ॥ परी गुरुभक्तांची अतिआवडी ॥ सत्संगेंवीण रोकडी ॥ सद्भक्ति चोखडी न पाविजे ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ प्रायेण भक्तियोगेन सत्संगेन विनोद्धव ॥ नोपायो विद्यते सध्र्यङ् प्रायणं हि सतामहम् ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ ॥ माझिये प्राप्तीलागुनी ॥ भक्तिज्ञानमार्ग दोन्ही ॥ ज्ञान अत्यंत कठिणपणीं ॥ भक्ति निर्विघ्नीं पाववी मज ॥ २५ ॥ संसार तरावयालागीं ॥ अनेक साधनें अनेगीं ॥ बोलिलीं तें जाण वाउगीं ॥ उत्तम प्रयोगीं मद्भक्ती ॥ २६ ॥ उपायांमाजीं अतिप्रांजळ ॥ निर्विघ्न आणि नित्य निर्मळ ॥ माझा भक्तिमार्ग केवळ ॥ ज्ञान तें विकळें मध्यपाती ॥ २७ ॥ मळा शिंपावयालागुनी ॥ मोट पाट उपाय दोन्ही ॥ मोटां काढिजे विहीरवणी ॥ बहुत कष्टोनी अतिअल्प ॥ २८ ॥ मोट नाडा बैलजोडी ॥ अखंड झोडितां आसुडीं ॥ येतां जातां वोढावोढी ॥ भोयं भिजे थोडी भाग एक ॥ २९ ॥ तेथही मोट फाटे कां नाडा तुटे ॥॥

१ महाज्ञानी. २ इष्ट ह्मणजे यज्ञ वगैरे वैदिक कर्मे. पूर्त ह्मणजे विहिर, तळें, देवालय इत्यादि बांधण्याचें धर्मकृत्य. ३ एकाग्र. ४ भुलली. ५ अवश्य साधणें नसल्यामुळें हीन. ६ मध्येंच पाडणारें. ७ विहिरींचें पाणी. ८ जमीन.

*मो. त्याग. +मो. शोधित. ×मो. सद्भक्तीची ना. भक्तीसी.

वोडंव पडे बैल अवचटे ॥ तरी हातां येतां पीक आटे ॥ बोल तुटे तत्काळ ॥ १५३० ॥
'तैसा नव्हे सरितेचा पाट ॥ एक वेळ केल्या वाट ॥ अहर्निशीं घडघडाट ॥ चालती लोट
जीवनाचे ' ॥ ३१ ॥ मोटेचें पाणी तैसें ज्ञान ॥ करूनि वेदशास्त्रपठण ॥ नित्यानित्यविवे-
कासी जाण ॥ पंडित विचक्षण बैसती ॥ ३२ ॥ एक कर्माकडे वोढी ॥ एक संन्यासाकडे
वोडी ॥ एक ह्मणती हे गोष्टी कुडी ॥ देहो वोढावोढीं न घालावा ॥ ३३ ॥ एक ह्मणती प्रारब्ध
प्रमाण ॥ एक ह्मणती सत्य शब्दज्ञान ॥ एक ह्मणती धरावें मौन ॥ अतिजल्प न
करावें ॥ ३४ ॥ एक ह्मणती मांडावी व्युत्पत्ती ॥ ज्याची चढे अधिक युक्ती ॥ तोचि ज्ञाता
निश्चितीं ॥ मांगों किती मूर्खांसी ॥३५॥ एक ह्मणती तप प्रमाण ॥ एक ह्मणती पुरश्चरण ॥
एक ह्मणती वेदाध्ययन ॥ द्यावें दान एक ह्मणती ॥ ३६ ॥ एक तो हें अवघेंचि मोडी ॥
घाली योगाचिये कडाडीं ॥ त्यावी आसनमुद्रेची वोढी ॥ वैसवी रोकडी वारयावरी ॥ ३७ ॥
ऐसे नानावाद करितां ॥ एक निश्चयो नव्हे सर्वथा ॥ ज्ञानाभिमान अति पंडितां ॥ ज्ञान
तत्त्वतां कळेना ॥ ३८ ॥ ऐसी ज्ञानमार्गींची गती ॥ नानापरींचीं विघ्नें येती ॥ विकल्पें
नासल्या व्युत्पत्ती ॥ माझी निजप्राप्ती तेथें नाहीं ॥ ३९ ॥ तैसी नव्हे माझी भक्ती ॥ नाम-
मात्रें मज पावती ॥ नामें उद्धरले नेणों किती ॥ हेंचि भागवतीं बोलिलें ॥ १५४० ॥ माझें
करितां गुणवर्णन ॥ कां हरिकथा नामसंकीर्तन ॥ तेथें रिघों नशके विघ्न ॥ गडगर्जन हरि-
नामें ॥ ४१ ॥ जेथें हरिनामाचे पवाडे ॥ तेथें विघ्न कैचें बापुडें ॥ विघ्न पळे मद्भक्तांपुढें ॥
उघडती कवाडें मोक्षाचीं ॥ ४२ ॥ माझे भक्त अतिनिराश ॥ न धरिती मोक्षाची आस ॥
यालागीं मी हृषीकेश ॥ त्यांच्या भावार्थास भुललों ॥ ४३ ॥ एवं निर्विघ्न मजमाजीं सरता ॥
मार्ग नाहीं भक्तिपरता ॥ त्रिसत्य सत्य गा सर्वथा ॥ भक्ति तत्त्वता मज पढिये ॥ ४४ ॥ ऐशी
निजभक्ति सुलभ फुडी ॥ देवो सांगे अतिआवडीं ॥ उद्धवासि हरिभक्तीची गोडी ॥ हर्षाची
गुढी उभविली तेणें ॥ ४५ ॥ जें उद्धवाच्या जीवीं होतें ॥ तेंचि निरूपिलें श्री अनंतें ॥ हर्षें
नाचों लागला तेथें ॥ जीवें श्रीकृष्णातें वोवाळी ॥ ४६ ॥ ऐसी तुझी सुलभ भक्ती ॥ तरी
अवघे भक्ति कां न करिती ॥ देवो ह्मणे भाग्येंवीण प्राप्ती ॥ नघडे निश्चितीं उद्धवा ॥ ४७ ॥
कोटिजन्मांची पुण्यसंपत्ती ॥ जरी गांठीं असेल आइती ॥ तें जोडे माझ्या संतांची संगती ॥
सत्संगें भक्ती उल्हासे ॥ ४८ ॥ सत्संगें भक्तीची प्राप्ती ॥ उद्धवा जाण निश्चितीं ॥ संतांपाशीं
माझी भक्ती ॥ वास पाहती उभी असे ॥ ४९ ॥ हो कां तूं संत माझे ह्मणसी ॥ येर लोक
मांडिले कोणापाशीं ॥ तुझी भक्ति अहर्निशीं ॥ संतांपाशींच कां असे ॥ १५५० ॥ उद्धवा ऐसा
विकल्पभावो ॥ येथें धरावया नाहीं ठावो ॥ संतभजनीं माझा सद्भावो ॥ केवीं कोण पहाहो
भक्तीचा ॥५१॥ संतसेवा करावयासी ॥ कोण कारण तूं मज पुससी ॥ अनावरा मज अनं-
तासी ॥ तिहीं निजभावेंसीं आकळिलें ॥ ५२॥ मज आकळिलें ज्या हेतू ॥ तेही सांगेन तुज
मी मातू ॥ मजवांचूनि जगाआंतू ॥ दुजा अर्थू नेणती ॥ ५३ ॥ आपुलें जें *स्वकर्म ॥ मज
अर्पिलें सर्व धर्म ॥ देह गेह रूप नाम ॥ आश्रयधर्म मदर्पण ॥५४॥ कल्पांतींचेनि कडकडाटें ॥
जें धाकें धाकें विराट आटे ॥ ऐसीं वोढवल्या अचाटें ॥ मजवेगळे नेटें नढळती ॥५५॥तुटोनि

१ मोटेचें पाणी. २ नदीचा. ३ फार बडबड. ४ उच्चैर्घोष. ५ पाड, गणना. ६ गोष्ट.

*मो. स्वधर्म.

पहतां आकाश ॥ आणिकाची न पाहती वास ॥ यालागीं मी हृषीकेश ॥ त्यांचा दास झालों असें ॥ ५६ ॥ नवल भावार्थाचा महिमा ॥ मज विश्वात्म्याचा झाला आत्मा ॥ ऐसें लाहाणें तयां आम्हा ॥ मज पुरुषोत्तमा वश केलें ॥ ५७ ॥ संतांसि मज भिन्नपण ॥ कल्पांतींही नाहीं जाण ॥ हे जिव्हारींची ऊणखूण ॥ तुज संपूर्ण सांगीतली ॥ ५८ ॥ संत माझे झाले माझ्या भक्तीं ॥ येर लोक मज न भजती ॥ ते म्यां दीधले काळाच्या हातीं ॥ अदृष्टगतीं बांधोनी ॥ ५९ ॥ माझिया संतांपाशीं ॥ यावया प्राप्ती नाहीं काळासी ॥ मी सदा संरक्षिता त्यांसी ॥ ते कळिकाळासी नागवती ॥१५६०॥ यापरी संतांचें सर्व काज ॥ करितां मज नाहीं लाज ॥ उद्धवा माझें अत्यंत निजगुज ॥ तें मी तुज सांगेन ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ अथैतत्परमं गुह्यं शृण्वतो यदुनंदन ॥ सुगोप्यमपि वक्ष्यामि त्वं मे भृत्यः सुहृत्सखा ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ ऐक यदुवंशकुळटिळका ॥ तूं स्वगोत्रसुहृद भृत्य सखा ॥ तुज न सांगिजे हा आवांका ॥ सर्वथा देखा नघरवे ॥ ६२ ॥ मज गुह्याचें गुह्य सार ॥ साराचें गुह्य भांडार ॥ तें भांडारींचें निजसार ॥ तुज मी साचार सांगेन ॥ ६३ ॥ ऐसें गुह्याचें गुह्य निश्चितीं ॥ नाहीं सांगीतलें कोणाप्रती ॥ तूं सखा जिवलग सांगाती ॥ अनन्यप्रीती मजलागीं ॥ ६४ ॥ केवळ कोरडी नव्हे प्रीती ॥ तैसीच माझी अनन्यभक्ती ॥ भक्तीसारिखी विरक्ती ॥ अवंचकस्थिती तुजपाशीं ॥ ६५ ॥ यादववंशीं पाहतां देख ॥ मजसमान तूंचि एक ॥ समान स्वगोत्र आणि सेवक ॥ हें अलौलिक उद्धवा ॥ ६६ ॥ नव्हेसि कार्यार्थी सेवक ॥ सर्वभावें विश्वासुक ॥ किती वाणूं गुण एकएक ॥ परम संतोष मज झाला ॥ ६७ ॥ यालागीं गुह्य तेंही तुझ्याठायीं ॥ वंचावयां मज धीरु नाहीं ॥ हृदयें आलिंगिलें हृदयीं ॥ चिदानंद पाहीं तुष्टला ॥ ६८ ॥ मग ह्मणे सावधान ॥ सादर आइक माझें वचन ॥ तुज फावल्या माझें गुह्यज्ञान ॥ वंशउद्धरण तुझेनी ॥ ६९ ॥ जे वंशीं होय ब्रह्मज्ञानी ॥ तो वंश पवित्र त्याचेनी ॥ हे सत्य जाण माझी वाणी ॥ विकल्प मनीं न धरावा ॥ १५७० ॥ ह्मणसी स्वयें तूं ब्रह्म पूर्ण ॥ वंशीं अवतरलासि श्रीकृष्ण ॥ तेणें वंश उद्धरला जाण ॥माझें ज्ञान तें किती ॥७१॥ तरी नाम रूप जाति गोत ॥ या अवघ्यांसी मी अलिप्त ॥ सकळकुळांसि मी कुळवंत ॥ गोत समस्त जग माझें ॥ ७२ ॥ ऐसें जाणोनि निजगुह्यसार ॥ तुज मी सांगेन साचार ॥ होईल जगाचा उद्धार ॥ ऐसें सारंगधर बोलिला ॥ ७३ ॥ तें ऐकावया गुह्यज्ञान ॥ उद्धवें मनाचे उघडिले कान ॥ सावध पाहतां हरीचें वदन ॥ नयनीं नयन वेधले ॥७४॥ यापरी उद्धव सावधान ॥ त्यासि कृष्ण सांगेल गुह्य ज्ञान॥ पुढिले अध्यायीं अतिगहन॥रसाळ निरूपण हरीचें ॥७५॥ एका विनवी जनार्दन ॥ श्रोतीं व्हावें सावधान ॥ संतीं यावें अवधान ॥ मस्तकीं चरण वंदिले ॥ ७६ ॥ तुमचेनि पादप्रसादें ॥ श्रीभागवतींचीं श्लोकपदें ॥ वाखाणीन अर्थावबोधें ॥ संत स्वानंदें तुष्टलिया ॥७७॥ यालागीं एका शरण जनार्दनीं ॥ तंव जनार्दनचि एकपणीं ॥ जेवीं कां सागरींचें पाणी ॥ तरंगपणीं विराजे ॥ १५७८ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे एकाकारटीकायां श्रीकृष्णोद्धवसंवादे एकादशपूजाविधानयोगो नाम एकादशोऽध्यायः ॥ ११ ॥ अध्याय ॥ ११ ॥ संख्या ॥ ॥ श्लोक ४९ ॥ ओंव्या १५७८ ॥ मिळून ॥ १६२७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

१ निष्कपट. २ तुला न सांगतां मनांत ठेवण्यास. ३ अर्थज्ञानानें.

# अध्याय बारावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमो सद्गुरु वसंतू ॥ ऐक्य ऋतुकाळें तुझा ऋतू ॥ ते ऋतुकाळींचा मारुतू ॥ ज्ञानवनांतू जैं रिघे ॥ १ ॥ तैं अविद्येचीं जुनीं पानें ॥ गळूनि जाती तत्क्षणें ॥ नवपल्लवीं विराजमानें ॥ विरक्तपणें *आरक्त ॥ २ ॥ अत्यंत वैराग्याची हांव ॥ खांकर झाले वृक्ष सर्व ॥ त्यांसि निघाले नवपल्लव ॥ अतिलवलव कोंवळिक ॥ ३ ॥ जाहल्या वसंताचें रिगवणें ॥ वृक्ष आडवे फुटले तेणें ॥ सोहंभावाचीं सुमनें ॥ तेणें गुणें विकासलीं ॥ ४ ॥ +कृष्णसारूप्य कृष्णभ्रमर ॥ तेथें झेंपावले अतिसत्वर ॥ आमोद सेविती अरुवार ॥ कैसेनि केसर कुचंबे ॥ ५ ॥ सद्भावाच्या आमोदधारा ॥ सेवितां सुख झालें भमरा ॥ ×हृदयकमळीं केला थारा ॥ मध्यमाद्वारां चालिले ॥ ६ ॥ भेदोनियां साही कमळें ॥ द्विदळादिषोडशदळें ॥ झेंपावले मलयानिळें ॥ सहस्रदळीं मिसळले ॥ ७ ॥ तेथ सेवूनि पराग धवळ ॥ उन्मत्त मातले अळिउळ ॥ करिती आनंदाचा गोंधळ ॥ सुखकल्लोळ स्वानंदें ॥ ८ ॥ लागल्या अनुहतांची ध्वनी ॥ रुणझुणिनी दशलक्षणीं ॥ त्याही नादातें प्राशुनी ॥ निःशब्दपणीं निवांत ॥ ९ ॥ तेथें मोक्षसुखाचे घड ॥ डोलतां दिसती अतिगोड ॥ तेणें जीवाचें पुरत कोड ॥ करिती धुंमाड सोहंहंसें ॥ १० ॥ मुमुक्षुमयूर अतिप्रीतीं ॥ पिच्छें पसरूनि नाचती ॥ येऊन वसंतवनाप्रती ॥ टाहो फोडिती गुरुनामें ॥ ११ ॥ नेमस्त कोकिळां होतें मौन ॥ वसंतऋतुराज देखोन ॥ तिहीं करोनि विसर्जन ॥ मधुरस्वरनें गर्जती ॥ १२ ॥ भक्तिसरोवरीं निर्मळ पाणी ॥ विकासल्या नवविध कमळणी ॥ भक्त सुस्नात तिये स्थानीं ॥ ÷निमज्जनीं निश्चळ ॥ १३ ॥ ते सरोवरींचें सेवितां पाणी ॥ जीवशिव चक्रवाकें दोनी ॥ सद्गुरु चिद्भानु वसंतवनीं ॥ देखोनि मिळणीं मिळालीं ॥ १४ ॥ वसंत उल्हास तरुवरां ॥ उलोनि लागल्या स्वानंदधारा ॥ पारंब्या भेदूनियां धरा ॥ धराधरा विगुंतल्या ॥ १५ ॥ बोधमलयानिळ झळकत ॥ तेणें वनश्री मघमघित ॥ मोक्षमार्गींचे पांथिक तेथ ॥ निजीं निजत निजरूपें ॥ १६ ॥ ऐसा सद्गुरु वसंतरावो ॥ निजभक्तवनां दे उत्सावो ॥ तो भागवतभजन अध्यावो ॥ उद्धवासी देवो सांगत ॥ १७ ॥ बारावे अध्यायीं निरूपण ॥ सत्संगाचा महिमा गहन ॥ कर्माचा कर्ता तेथ कोण ॥ त्यागितें लक्षण कर्माचें ॥ १८ ॥ संपतां अकरावा अध्यावो ॥ गुह्य सांगेन म्हणे देवो ॥ तें परिसावया उद्धवो ॥ न्याहाळी पहाहो हरिवदन ॥ १९ ॥ काय सांगेल गुह्य गोष्टी ॥ कोण अक्षरें निघती ओंठीं ॥ त्या वचनार्था घालावया मिठी ॥ उल्हास पोटीं उद्धवा ॥ २० ॥ जैसें मेघमुखींचें उदक ॥ वरच्यावरी झेली चातक ॥ तैसें कृष्णवचनालागीं देख ॥ पसरिलें मुख उद्धवें ॥ २१ ॥ स्नान संध्या भोजन ॥ करावया एके काळें जाण ॥ तैसें ज्ञेय ज्ञाता ज्ञान ॥ घ्यावया सावधान

---

१ वायु. २ पर्णरहित, खराटे. ३ आरंभ. ४ मृदु-हळु. ५ पुष्पकेसर. ६ संकोचे, चुरडे. ७ सुषुम्नानाडीनें. ८ षट्चक्रें. ९ मस्तकांतील हजार पांकळ्यांचें कमळ. १० भुंग्यांचे समुदाय. ११ दशनादात्मकध्वनी. १२ गजर. १३ नियम स्थितांस. १४ नवविधभक्तिरूप. १५ पवित्रपणें स्नान केलेले.

*ना. अनुरक्त. +ना. सारूप्य. ×ना. हृदय कमळिके धरिला थारा. ÷ना. निजमज्जनीं.

उद्धव ॥ २२ ॥ ऐसा उद्धवाचा आदरू ॥ देखोनि हरि झाला सादरू ॥ भक्तकृपाळू अतिउदारू निजगुह्यसारू सांगत ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ न रोधयति मां योगो न साख्यं धर्म एव च॥ न स्वाध्यायस्तपस्त्यागो नेष्टापूर्त्तं न दक्षिणा ॥१॥ व्रतानि यज्ञश्छंदांसि तीर्थानि नियमा यमाः ॥ यथाऽवरुंधे सत्संगः सर्वसंगापहो हि माम् ॥ २ ॥

॥ टीका ॥ मज वश करावयालागीं ॥ सामर्थ्य नाहीं अष्टांगयोगीं ॥नित्यानित्यविवेक जगीं॥ आंगोवांगीं मज न पवे ॥ २४ ॥ प्रकृतिपुरुषाविंचना ॥ अखंड आलोडितां मनां ॥ पावावया माझिया स्थानां ॥ सामर्थ्य जाणा त्या नाहीं ॥ २५ ॥ धर्म अहिंसादि समस्त ॥ सत्य त्यांचेनि मी नव्हें प्राप्त ॥ मुख्य वेदाध्ययनें मी अप्राप्त ॥ सांग समस्त जरी पढिले ॥ २६ ॥ तेथ तपें कायसीं बापुडीं ॥ पंचाग्नि असार परवडी ॥ कृच्छ्रचांद्रायणें झालीं वेडीं ॥ त्यांचे जोडी मी न जोडें ॥ २७ ॥ देहगेह त्यागूनि उदास ॥ विरजाहोमीं हवी सर्वस्व ॥ साधनीं अतिश्रेष्ठ संन्यास ॥ त्यासि मी परेश नातुडें ॥ २८ ॥ करितां श्रौतस्मार्तकर्मासी ॥ कर्मठें झालीं पाणिपिसीं ॥ तरी मी नाकळें त्यांसी ॥ कुशहोमेंसी कष्टतां ॥ २९ ॥ गोदान, भूदान, तिलदान॥ दान देतां धन धान्य॥ त्यासि मी नाटोपें जाण ॥ *दानाभिमान नवचतां ॥ ३० ॥ संकटचतुर्थी, ऋषिपंचमी, विष्णुपंचक, बुधाष्टमी॥अनंत व्रतें करितां नेमीं॥मी ते कर्मी नातुडें ॥३१॥ अश्वमेध राजसूययाग ॥ सर्वस्व वेंचूनि करितां सांग ॥ माझी प्राप्तिसि नव्हतीचि चांग ॥ तेणें मी श्रीरंग नाटोपें ॥ ३२ ॥ हो कां वापी कूप आराम ॥ वृक्षारोपण वनविश्राम ॥ आचरतां स्मार्तकर्म ॥ मी आत्माराम न भेटें ॥ ३३ ॥ नानाछंदें रहस्यमंत्र ॥ विधिविधानें अतिविचित्र ॥ सामर्थ्यें अति पवित्र ॥ नव्हती स्वतंत्र मत्प्राप्तीं ॥३४॥ पुष्करादि नानातीर्थें ॥ पापनिर्दळणीं समर्थें ॥ शीघ्र पावावया मातें ॥ सामर्थ्य त्यांतें असेना ॥ ३५ ॥ यमनियम अहर्निशीं ॥ जे सदा शिणविती साधकासी ॥ ते यावया माझ्या द्वारापाशीं ॥ सामर्थ्य त्यांसी असेना ॥ ३६ ॥ उद्धवा यमनियम निर्धार ॥ एकुणिसावे अध्यायीं सविस्तर ॥ तुज मी सांगेन साचार ॥ संक्षेपाकार बारबारा ॥ ३७ ॥ ते यमनियम बाराबारा ॥ आणि सकळ साधनसंभारा ॥ यावया माझिया नगरा ॥ मार्ग पुढारा चालेना ॥३८॥ ते गेलीं संतांच्या दारा ॥ धरूनि साधूच्या आधारा ॥ अवघीं आलीं माझ्या घरा ॥ एवं परंपरा मत्प्राप्ती ॥ ३९॥ तैशी नव्हे सत्संगती ॥संगें सकळ संगांतें छेदिती ॥ठाकठोक माझी प्राप्ती ॥ +पांगिस्त न होती आणिकाचे ॥ ४० ॥ कीटकीं भिंगुरटीच्या संगतीं ॥ पालटली स्वदेहस्थिती ॥ तेवीं धरिलिया संतांची संगती ॥भक्त पालटती मद्रूपें ॥ ४१ ॥ केवळ पाहे पां जडमूढें ॥ चंदनासभोंवतीं जीं झाडें ॥ तीं सुगंध होऊनि लांकडें ॥ मोल गाढें पावलीं॥४२॥तीं अचेतन काष्ठें सर्वथा ॥चढलीं देवब्राह्मणांचे माथां ॥ त्याचा पांग पडे श्रीमंतां ॥ राजे तत्त्वतां वंदिती ॥४३॥ तैशी धरिल्या

१ विवेक. २ धुंडितां. ३ अंगासहित-पूर्ण. ४ चहूंकडे अग्नि व वर सूर्य. हें एक तप आहे. ५ प्रकार. ६चंद्रकलांप्रमाणें चढउतर घांस खाणें हें एक प्रायश्चित्त आहे. ७संन्यास घेतांना एक होम त्यांत.८अग्निष्ट. ९ न जातां. १० कार्तिक शुद्ध एकादशीपासून कार्तिक शुद्ध पौर्णिमेपर्यंत. ११ बुधवारीं येणारी अष्टमी.

*ना. ज्ञानाभिमान. +ना. पांगिस्त नव्हती आणिकाची.

सत्संगती ॥ भक्त माझी पदवी पावती ॥ शेखीं मजही पूज्य होती ॥ सांगों किती माहिमान ॥ ४४ ॥ संतसंगतीवेगळें जाण ॥ तत्काळ पावावया माझें स्थान॥ आणिक नाहींगा साधन ॥ सत्य जाण उद्धवा॥४५॥ मागां बोलला जीं साधनें ॥ तीं अवघींहि मलिन अभिमानें ॥ ऐक तयांचीं लक्षणें ॥ तुजकारणें सांगेन ॥४६॥ अष्टांगयोगीं दुर्जयो पवन॥सर्वथा साधेना जाण ॥ साधला तरी नागवण ॥अनिवार जाण सिद्धींची ॥४७॥ नित्यानित्यविवेक ज्ञान ॥ तेथें बाधी पांडित्यअभिमान ॥ प्रबळ वांछी धन मान ॥ ज्ञानाचि विघ्न ज्ञानासी ॥ ४८ ॥ अहिंसाधर्म करितां जनीं ॥ धर्मिष्ठपणें गाळिती पाणी ॥ गाळितां निमाल्या जीवश्रेणी ॥ अधर्मपणीं तो धर्म ॥ ४९ ॥ करितां वेदाध्ययन ॥ मुख्य वेदें धरिलें मौन ॥ पठणमात्रें मी नातुडें जाण ॥ याजन दान वांछित ॥ ५० ॥ तप करूं जातां देहीं ॥ क्रोध तापसांच्या ठायीं ॥ परता जावों नेदी कहीं ॥ वाढता पाही नीच नवा ॥ ५१ ॥ सर्वस्वत्यागें संन्यासग्रहण ॥ तेथही न जळे देहाभिमान ॥ व्यर्थ विरजाहोम गेला जाण ॥ मानाभिमान बाधिती ॥ ५२ ॥ श्रौत, स्मार्त कर्म सांग ॥ इष्टापूर्त जे का याग ॥ तेथ आडवा ठाके स्वर्गभोग ॥ कर्म क्षयरोग साधकां ॥ ५३ ॥ नानादानें करितां सकळ ॥ वासना वांछी दानफळ ॥ का दातेपणें गर्व प्रबळ ॥ लागला अढळ ढळेना ॥५४॥ अनंत व्रतें व्रती झाला ॥ चौदा गांठीं देवो बांधला ॥ शेखीं अनंतातें विसरला ॥ देवो हरविला हातींचा ॥५५॥ नानायज्ञ करितां विधी ॥ मंत्र तंत्र पात्रशुद्धी॥ सहसा पावों न शके सिद्धी ॥ पावल्या बाधी फळभोग ॥५६॥ नानाछंदें रहस्यमंत्र ॥ विकळ होां नये उच्चार ॥ *मंत्रीं मंत्र चळले साचार ॥ चळले अपार मंत्रवादी ॥५७॥ भगवीं करूनि तांबडीं ॥ तीर्थाभिमानें कापडी ॥ भिके लागलीं बापुडीं ॥ नाहीं अर्धघडी विश्रांती ॥ ५८ ॥ यमनियम बारावारा ॥ करितां अखंड वोरवारा ॥ चोविसांमाजीं यांचा उभारा ॥ नेणती सोयरा पंचविसांवा ॥५९॥ एवं सांगितल्या साधनासी ॥ आपमतीं करितां त्यांसी ॥ बाधकता आहे सर्वांसी ॥ ते म्यां तुजपाशीं सांगीतली ॥ ६० ॥ करितां साधनें आपमतीसी ॥ तेथें विघ्नें उपजती ऐशीं ॥ तींच साधनें साधु उपदेशीं ॥ सर्वही सिद्धीसी पावती ॥ ६१ ॥ साधु न सांगतां निर्धारीं ॥ नानासाधनें हा काय करी ॥ कोण विधान कैशी परी ॥ निजनिर्धारीं कळेना ॥ ६२ ॥ न करितां साधनव्युत्पत्ती ॥ केवळ जाण सत्संगती ॥ मज पावले नेणों किती ॥ तें मी तुजप्रती सांगेन ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ सत्संगेन हि दैतेया यातुधाना मृगाः खगाः ॥ गंधर्वाप्सरसो नागाः सिद्धाश्चारणगुह्यकाः ॥ ३ ॥ विद्याधरा मनुष्येषु वैश्याः शूद्राः स्त्रियोऽन्त्यजाः ॥ रजस्तमःप्रकृतयस्तस्मिंस्तस्मिन्युगेऽनघ ॥ ४ ॥

॥ टीका ॥ ॥ पाहतां केवळ जडमूढ ॥ रजतमयोनीं जन्मले गूढ ॥ सत्संगतीं लागोनि दृढ ॥ मातें सदृढ पावले ॥ ६४ ॥ दैत्य दानव निशाचर ॥ खग, मृग, गंधर्व, अप्सर ॥ सिद्ध,

१ जिंकण्यास कठिण. २ वायु. ३ लुटणें. ४ जंतूंचे समुदाय. ५ यज्ञ याग करणें व कूप, तळीं, विहिरी इत्यादिक बांधणें. ६ खटपट. ७ चोवीस तत्त्वें. ८ आत्मा ९ आपल्या मतीनें, गुरूपदेशाशिवाय.

*मो. मंत्री मंत्रतंत्र चळ साचार.

चारण, विद्याधर, ॥ नाग, किन्नर, गुह्यक ॥ ६५ ॥ खग मृग सर्प पावले मातें ॥ मानव तंव सहजें सरते ॥ वैश्य शूद्र स्त्रियादि समस्ते ॥ पावले मातें सत्संगें ॥ ६६ ॥ जे सकळ वर्ण-धर्मांवेगळे ॥ ज्यांच्या नामासि कोणी नातळे ॥ छाया देखूनि जग पळे ॥ अत्यंत मैळे अंत्यज ॥ ६७ ॥ तिहीं धरोनि सत्संगती ॥ आले माझिया पदाप्रती ॥ देवद्विज तयांतें वंदिती ॥ अभिनव कीर्ती संतांची ॥ ६८ ॥ धरिलिया सत्संगती ॥ निंद्य जे तेही वंद्य होती ॥ उद्धवा तूं निष्पाप निश्चितीं ॥ तरी सत्संगती करावी ॥ ६९ ॥ सोनें साडेपंधरें चोखडें ॥ त्यासि रत्नाची संगती जोडे ॥ तें अधिकाधिक मोल चढे ॥ मुकुटीं चढे महेशा ॥ ७० ॥ *तैशी पुण्यपुरुषा सत्संगती ॥ जाहल्या अनंत सुख पावती ॥ सुरवर त्यांतें वंदिती ॥ शिवादि येती भेटीसी ॥ ७१ ॥ यमधर्म पायां लागती ॥ तीर्थें पायवणी मागती ॥ भावें धरिल्या सत्संगती ॥ एवढी प्राप्ती पुरुषासी ॥ ७२ ॥ दैत्य, राक्षस, स्त्री, शूद्र पाहीं ॥ अंत्यज, तरले ह्मणसी कायी ॥ त्या त्या युगाच्या ते ते ठायीं ॥ बहुसाल पाहीं उद्धरिले ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ बहवो मत्पदं प्राप्तास्त्वाष्ट्रकायाधवादयः ॥ वृषपर्वा बलिर्बाणो मयश्चाऽथ विभीषणः ॥ ५ ॥ सुग्रीवो हनुमानृक्षो गजो गृध्रो वणिक्पथः ॥ व्याधः कुब्जा व्रजे गोप्यो यज्ञपत्न्यस्तथाऽपरे ॥ ६ ॥

॥ टीका ॥ वृत्रासुर गाइजे वेदीं ॥ जो इंद्रासि मिसळला युद्धीं ॥ ×युद्धींही अविरुद्ध बुद्धी ॥ माझे निजपदीं पावला ॥ ७४ ॥ ऐकतां नारदाच्या गोठी ॥ गर्भींच मजसी घातली मिठी ॥ जो जन्मला कयाधूच्या पोटीं ॥ भक्त जगजेठी प्रल्हाद ॥ ७५ ॥ वृषपर्वा दैत्य अदट ॥ माझे पदीं झाला प्रविष्ट ॥ बळीच्या द्वारीं मी स्पुजट ॥ झालों भट भिकेसी ॥ ७६ ॥ छळें करितां बळिबंधन ॥ छळें मीचि छळिलों जाण ॥ अंगा आलें द्वारपाळपण ॥ बळिअधीन मी झालों ॥ ७७ ॥ त्या बळीचा पुत्र बाणासुर ॥ शिववरें मातला थोर ॥ माझे पुत्राचा चोरिला पुत्र ॥ दोहींचा हेर नारद ॥ ७८ ॥ तो म्यां साधूनि धरिला चोरू ॥ बाणीं केला अतिजर्जरू ॥ छेदिला सहस्रभुजांचा भारू ॥ शिव जीवें मारूं नेदीच ॥ ७९ ॥ तो ह्मणे हा भक्तपुत्र ह्मणें मारी ॥ मजही बळीची भीड भारी ॥ अखंड मी असें त्याच्या द्वारीं ॥ यालागीं उद्धरीं बाणातें ॥ ८० ॥ मग म्यां संबोखावया शिवातें ॥ बाण आपुलेनि निजहस्तें ॥ +ऐक्य शिवपदीं स्थापिलें त्यातें ॥ कल्याणातें पावला ॥ ८१ ॥ खांडववन अग्नीसी ॥ अर्जुनें दीधलें खावयासी ॥ तेथें जळतां मयासुरासी ॥ म्यांचि तयासी उद्धरिलें ॥८२॥ राक्षसकुळीं जन्मला जाण ॥ शत्रूचा बंधु बिभीषण ॥ माझ्याठायीं अनन्यशरण ॥ जीवप्राण तो माझा ॥ ८३ ॥ सुग्रीव हनुमंत जांबवंत ॥ यांचा पवाडा विख्यात ॥ जटायु उद्धरिला वनांत ॥ जो रावणें खस्त केला होता ॥ ८४ ॥ गज सरोवरीं ग्रहेंग्रस्त ॥ स्त्रियां पुत्रीं सांडिला जीत ॥ तो अंतकाळीं

१ सर्प. २ यक्ष. ३ साडे पंधरारूपये तोळा. ४ चंडाळ, नीच जातीचे. ५ अनेक प्रकारचे. ६ 'इंद्रोवृत्र-हत्वा असुरान् पराभाव्य' ७ प्रल्हादाची आई. ८ कृष्णाचा नातु व प्रद्युम्नाचा पुत्र अनिरुद्ध. ९ आमव बाणासुराचा बातमीदार नारदच होता. १० बाणासुराचे. ११ मयासुर खांडव वनांत सांपडला होता. १२ कीर्ती. १३ छिन्नभिन्न. १४ मगरानें गिळिलेला.

* तैशी पुण्यपुरुषसत्संगति. ×ना. युद्धींही विरोध बुद्धी. +मो. ऐके.

मातें स्मरत॥आर्तभूत अतिस्वरें॥८५॥सांडूनि समस्तांची आस॥पाहोनि वैकुंठाची वास॥राजीव उचलूनि राजस ॥पाव परेश ह्मणे वेगीं ॥ ८६ ॥त्या गजेंद्राचे तांतडीं ॥ वैकुंठींहूनि लवडसवडी ॥ म्यां गरुडापुढें घालोनि उडी ॥ बंधन तोडीं गजाचें ॥ ८७ ॥ त्यासि पशुयोनीं जन्म होतें ॥ परी तो अंतीं स्मरला मातें ॥ पावला माझ्या निजधामातें ॥ गाइजे त्यातें पुराणीं ॥ ८८ ॥ वैश्य तुळांधार वाणी ॥ सत्य वाचा सत्य जोखणी ॥ सत्यें पावला मजलागुनी ॥ सत्यतोलणी त्याचें नांव ॥ ८९ ॥ अंत्यजांमाजीं धर्मव्याध ॥ माझें पावला निजपद ॥ जराव्याध गा प्रसिद्ध ॥ करोनि अपराध उद्धारिला ॥९०॥ चरणीं विंधोनियां बाण ॥ घायें घेतला कृष्णाचा प्राण ॥ तो परीक्षिती जराव्याध जाण ॥ कृष्णें आपण तारिला ॥ ९१ ॥ कौलिकांमाजीं गुहक देख ॥ आला श्रीरामासि संमुख ॥ कर्म निरसलें निःशेख ॥ निजधाम देख पावला ॥ ९२ ॥ कुब्जा तीठायीं वांकुडी ॥ नीट निजभावें चोखडी ॥ तिच्या चंदनाची शुद्ध गोडी ॥ अति आवडी मजलागीं ॥९३॥ तिणें चर्चूनियां चंदन ॥ मन केलें मदर्पण ॥ मी झालों तिच्या आधीन ॥ निजधाम ते जाण पावली ॥ ९४ ॥ गोकुळींचिया गोपिका ॥ संसारासि होऊनि विमुखा ॥ तनमनप्राणें मजलागीं देखा ॥ भावें निजसुखा पावल्या ॥ ९५ ॥ माझी गोपिकांसी परम आवडी ॥ कीं मज गोपिकांची गोडी ॥ पाहतां याचे समान पाडी ॥ जाहलीं बापुडीं साधनें ॥ ९६ ॥ सांडूनि संसाराची चाड ॥ न धरूनि पतिपुत्रांची भीड ॥ यज्ञपत्न्यांसि माझें कोड ॥ भावार्थें दृढ भाविकां ॥ ९७ ॥ तिहीं मज अर्पोनियां अन्न ॥ माझें निजधाम पावल्या जाण ॥ मज न पावतीच ते ब्राह्मण ॥ जयांसि कर्माभिमान कर्माचा ॥ ९८ ॥ एक ब्राह्मण अतिशास्त्रबळें ॥ पत्नीसि येवूं नेदी मजजवळें ॥ तुम्ही वेदशास्त्रांही वेगळे ॥ गुराखी गोंवळे केवीं पूजा ॥ ९९ ॥ येरी समस्तां जातां देखोन ॥ तिचें मजलागीं तळमळी मन ॥ अतिकर्मठ तो ब्राह्मण कठिण ॥ अवरोधून राखिली ॥ १०० ॥ पित्यानें लाविलीस माझ्या हातीं ॥ तेव्हांच मी तुझ्या देहाचा पती ॥ मज सांडूनि कउंती ॥ गोवळाप्रती जातेसी ॥ १ ॥ येरी ह्मणे तूं या देहाचा पती ॥ तो देह ठेऊनियां तयाप्रती ॥ जीवें मीनली मजप्रती ॥ सायुज्य मुक्ती पावली ॥ २ ॥ ज्या माझिया प्राप्तीसी ॥ साधक शिणती नानासायासीं ॥ तीं साधनें न करितां त्यांसी ॥ अनायासीं मज पावल्या ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ ते नाधीतश्रुतिगणा नोपासीतमहत्तमाः ॥ अव्रता तमतपसः सत्संगान्मामुपागताः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ तिहीं नाहीं केलें वेदपठण ॥ नाहीं गुरु केले केवळ शास्त्रज्ञ ॥ व्रततपादि नाना साधन ॥ नाहीं जाण तिहीं केलें ॥ ४ ॥ केवळ गा सत्संगतीं ॥ मज पावल्या नेणों किती ॥ एकभावें जे भावार्थी ॥ त्यांसि मी श्रीपती तुलभ ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ केवलेन हि भावेन गोप्यो गावो नगा मृगाः ॥ येऽन्ये मूढधियो नागाः सिद्धा मामीयुरंजसा ॥ ८ ॥

---

१ कमळ. २ तराजू धरणारा. ३ ९१-९२ या दोन ओव्यांतील मजकूर शुकानी परीक्षितीस सांगितला आहे. ४ हे परिक्षिती राजा! ५ होडीवाल्याचें नांव. ६ कशी.

॥ टीका ॥ केवळस्वरूप जें संत ॥ त्यां माझी संगती झाली प्राप्त ॥ काय करिसी तप व्रत ॥ भावार्थें प्राप्त मज जाहलिया ॥६॥ व्हावया माझें पद प्राप्त ॥ त्यांसि भांडवल गा भावार्थ ॥ भावबळें गा समस्त ॥ पद निश्चित पावल्या ॥ ७ ॥ ऐकोनि माझें वेणुगीत ॥ गोपिका सांडूनि समस्त ॥ निजदेहातें न सांभाळित ॥ मज गिवसीत पावल्या ॥ ८ ॥ सांडूनि पति पित्यांची चाड ॥ *न धरोनि वेदशास्त्रांची भीड ॥ माझे ठायीं निजभाव दृढ ॥ प्रेम अतिगोड गोपिका ॥ ९ ॥ पुत्रस्नेह तोडूनि घायें ॥ विधीतें रगडूनि पायें ॥ माझे आवडीचेनि लवलाहें ॥ गोपिका मज पाहें पावल्या ॥ १० ॥ त्याचपरी जाण गायी ॥ वेणुध्वनीं वेधल्या पाही ॥ व्याघ्रभय विसरल्या देहीं ॥ माझ्याठायीं विनटल्या ॥ ११ ॥ माझ्या वेणुध्वनीं वेधलें मन ॥ वत्सें विसरलीं स्तनपान ॥ मुखींचा कवळ मुखीं जाण ॥ माझें ध्यान लागलें ॥ १२ ॥ माझ्या वेणुश्रवणास्तव जिहीं ॥ निजवैर सांडूनि देहीं ॥ येरयेरांवरी माना पाही ॥ व्याघ्रहरिणें तेंही विनटलीं ॥१३॥ ज्यां उपडिले यमलार्जुन ॥ ते तरले हें नवल कोण ॥ वृंदावनींचे वृक्ष तृण ॥ माझ्या सन्निधि जाण उद्धरिले ॥ १४ ॥ मयूर तरले मोरविसीं ॥ गुल्मलता भृंगपाषाणांसी ॥ जड मूढ वृंदावनवासी ॥ मत्संनिध्यें त्यांसी उद्धारू ॥१५॥ माझे संगतीची अनन्य प्रीती ॥ तेची त्यांची शुद्धभक्ती ॥ तेणें कृतकृत्य होऊनि निश्चितीं ॥ माझी निजप्राप्ती पावले ॥ १६ ॥ माझेनि चरणघातें साचार ॥ कालिया तरला दुराचार ॥ नागनागिणी सपरिवार ॥ माझेनि विखार उद्धरले ॥ १७ ॥ आपुली जे निजपदप्राप्ती ॥ ते सत्संगेंवीण निश्चितीं ॥ दुर्लभ हें उद्धवाप्रती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ यं न योगेन सांख्येन दानव्रततपोऽध्वरैः ॥ व्याख्यास्वाध्यायसंन्यासैः प्राप्नुयाद्यत्नवानपि ॥ ९ ॥

॥ टीका ॥ योग याग व्रत दान ॥ वेदाध्ययन व्याख्यान ॥ तप तीर्थ ज्ञान ध्यान ॥ संन्यासग्रहण सादरें ॥ १९ ॥ इत्यादि नाना साधनें ॥ निष्ठा करितां निर्बंधनें ॥ माझी प्राप्ती दुरासतेनें ॥ जीवें प्राणें नपविजे ॥ १२० ॥ यापरी शिणतां साधनेंसी ॥ माझी प्राप्ति नव्हे अतिप्रयासीं ॥ ते गोपी पावल्या अप्रयासीं ॥ सत्संगासी लाहोनी ॥ २१ ॥ त्या गोपिकांसि माझी प्रीती ॥ मीचि त्यांची सत्संगती ॥ सत्संगें निजपदप्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ २२ ॥ गोपिकांची सप्रेम स्थिती ॥ ते तुज गोकुळीं झाली प्रतीती ॥ तुजही नतर्केच त्यांची प्रीति ॥ तें मी तुजप्रती सांगेन ॥ २३ ॥ गोपिकांचें अत्यंत प्रेम ॥ स्वमुखें सांगे पुरुषोत्तम ॥ उद्धवाचें भाग्य उत्तम ॥ आवडीचें वर्म देवो सांगे ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ रामेण सार्द्धं मथुरां प्रणीते श्वाफल्किना मय्यनुरक्तचित्ताः ॥ विगाढभावेन न मे वियोगतीव्राधयोऽन्यं ददृशुः सुखाय ॥ १० ॥

॥ टीका ॥ बळिभद्रासमवेत तत्वतां ॥ अक्रूरें मज मथुरेसि नेतां ॥ तैं गोपिकांसि जे झाली व्यथा ॥ ते सांगतां मज नये ॥ २५ ॥ तैंचि त्यांची अवस्था सांगतां ॥ मज अद्यापि धीर

---

१ शोधित.

*ना. न धरोनि शास्त्रविधीचीही भीड.

नयरवे चित्तां ॥ ऐसें देवो सांगतसांगतां ॥[1]कंठीं बाष्पेंता दाटली ॥२६॥ सांगतां भक्तांचें निजप्रेम ॥ प्रेमें द्रवला पुरुषोत्तम ॥ जो भक्तकामकल्पद्रुम ॥ कृपा निरुपम भक्तांची ॥ २७ ॥ मज मथुरें जातां देखोनी ॥ आंसुवांचा पूर नयनीं ॥ हृदय फुटे मजलागुनी ॥ प्रेमें लोळणी घालिती ॥ २८ ॥ पोटांतल्या परम प्रीती ॥ सारितां मागें न सरती ॥ धरिले चरण न सोडिती ॥ येती काकुलती मजलागीं ॥ २९ ॥ *नवल भावार्थ त्यांच्या पोटीं ॥ माझ्या स्वरूपीं घातली मिठी ॥ सोडवितां न सुटे गांठी ॥ श्वास पोटीं परतेना ॥३०॥ लाज विसरल्या सर्वथा ॥ सासुसासरां पतिपित्यां देखतां ॥ माझे चरणीं ठेऊनि माथा ॥ रडती दीर्घता आक्रंदें ॥ ३१ ॥ मजवीण अवघे देखती ओस ॥ माझीच पुनःपुन्हां पाहती वास ॥ थोर घालोनि निःश्वास ॥ उकसाबुकसीं स्फुंदती ॥ ३२ ॥ आमुचा जिवलग मांगानी ॥ घेऊनि जातो हा दुष्टमनीं ॥ अक्रूरासंमुख शिव्या देती ॥ येती काकुळती मजलागीं ॥ ३३ ॥ उभ्या ठाकोनि संमुख ॥ माझें पाहती श्रीमुख ॥ आठवे वियोगाचें दुःख ॥ तेणें अधोमुख विलपती ॥ ३४ ॥ ऐशिया मजलागीं आसक्त ॥ माझ्यासाठीं अनन्यचित्त ॥ +विसरल्या देहसुखें समस्त ॥ अति अनुरक्त मजलागीं ॥ ३५ ॥ माझेनि वियोगें तत्त्वतां ॥ त्यांसि माझी तीव्र व्यथा ॥ ते व्यथेची अवस्था ॥ बोलीं सांगतां मज नये ॥ ३६ ॥ मजवेगळें जें सुख ॥ तें गोपिकांसि केवळ दुःख ॥ कैशी आवडी अलोलिक ॥ मज हृदयीं देख न विसंबती ॥ ३७ ॥ मज गोकुळीं असतां ॥ माझे ठायीं आसक्तचित्ता ॥ ते आसक्तीची समूळ कथा ॥ ऐक आतां सांगेन ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ तास्ताःक्षपाः प्रेष्ठतमेन नीता मयैव वृंदावनगोचरेण ॥ क्षणार्धवत्ताः पुनरंग तासां हीना मया कल्पसमा बभूवुः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ नवल गोपिकांचा हरिख ॥ मज वृंदावना जातां देख ॥ माझें पाहोनि श्रीमुख ॥ प्रातःकाळीं सुख भोगिती ॥३९॥ गायी पाजोनियां पाणी ॥ गोठणीं बैसवीं मध्यान्हीं ॥ तेथें उदकमिषें गौळणी ॥ पाहावयालागनी मज येती ॥ ४० ॥ तेथें नानाकौतुकें नानालीला ॥ नानापरीच्या खेळतां खेळा ॥ तो तो देखोनि सोहळा ॥ सुखें वेल्हाळा सुखावती ॥ ४१ ॥ मज सायंकाळीं येतां देखोनी ॥ आरत्या निंबलोण घेऊनी ॥ सामोऱ्या येती धांवोनी ॥ लागती चरणीं स्वानंदें ॥ ४२ ॥ ऐशीं त्रिकाळ दर्शनें घेतां ॥ धणी न पुरे त्यांचे चित्ता ॥ [star]त्याहीवरी वर्तली कथा ॥ एकांतता अतिगुह्य ॥ ४३ ॥ त्या गुह्याचें निजगुह्य उद्धवा मी सांगेन तुज ॥ महासुखाचें सुखभोज ॥ मी अधोक्षज [2]नाचिनलों ॥ ४४ ॥ ते सुख गोपिका जाणती ॥ कीं माझें मी जाणें श्रीपती ॥ जे रास क्रीडेच्या रातीं ॥ झाली सुखप्राप्ती सकळांसी ॥ ४५ ॥ त्या सुखाची सुखगोडी ॥ रमा काय जाणे बापुडी ॥ ब्रह्मादिक केवळ वेडीं ॥ त्या सुखाची गोडी नेणती ॥ ४६ ॥ पावावया त्या सुखासी ॥ सदाशिव झाला योगाभ्यासी ॥ तरी प्राप्ति नव्हेचि तयासी ॥ भुलला मोहिनीसी देखतां ॥ ४७ ॥ उमा टाकूनि भिल्टी ॥ तिणें भुलविला [3]धूर्जटी ॥ त्या सुखाची सुखगोष्टी ॥ नेणती हटी तापसी ॥

१ कंठ दाटून आला. २ नाचलों. ३ शंकर.

*मो. सैल भावार्थ त्यांच्या पोटीं. +ना. विसरल्या देहगेह समस्त. [star]ना. त्याहीवरी वर्ते जे कथा । एक तत्त्वतां अतिगुह्य ॥

॥ ४८ ॥ जवळी असोनि निश्चितीं ॥ संकर्षण महामूर्ती ॥ त्यासिही त्या सुखाची प्राप्ती ॥ नव्हे निश्चितीं उद्धवा ॥ ४९ ॥ रासक्रीडा गोपिकांप्रती ॥ कोणी ह्मणेल कामासक्ती ॥ तेथ कामासी कैंची प्राप्ती ॥ ऐक निश्चितीं उद्धवा ॥ १५० ॥ शिवातें जिणोनि फुडा ॥ काम म्हणे मी सबळ गाढा ॥ माझी भेदावया रासक्रीडा ॥ वाऊनि मेढा चालिला ॥ ५१ ॥ जेथ माझ्या स्मरणाचें वोडण ॥ तेथ नचले कामाचें कामपण ॥ मोडले मदनाचे बाण ॥ दृढ वोडण स्मरणाचें ॥ ५२ ॥ काम कामिकां चपळदृष्टी ॥ निजक्षोभाची तिखट बाणाटी ॥ संधि साधूनि विंधे हटीं ॥ ते नव्हेचि पैठी[3] हरिरंगीं ॥ ५३ ॥ जेथ मी क्रीडें आत्मारामू ॥ तेथ केवीं रिघे बापुडा कामू ॥ माझेनि कामें गोपिका निष्कामू ॥ कामसंभ्रमू त्यां नाहीं ॥ ५४ ॥ जो कोणी स्मरे माझें नामू ॥ तिकडे पाहूं न शके कामू ॥ जेथ मी रमें पुरुषोत्तमू ॥ तेथ कामू कर्म रिघेना ॥ ५५ ॥ कामू ह्मणे कटकटा ॥ भाग्यें अभाग्यें झालों मोठा ॥ रासक्रीडेचिया शेवटील गोटा ॥ आज मी करंटा नपवेंची ॥ ५६ ॥ देखोनि रासक्रीडा गोमटी ॥ काम घटघटां लाळ घोंटी ॥ लाज सांडूनि जन्मला पोटीं ॥त्या सुखाचे भेटी लागोनि ॥५७॥ तो काम म्यां आपुलें अंकीं ॥ केला निजभावें निजसुखी ॥ तें माझें निजसुख गोपिकीं ॥ रासामिषें कीं भोगिलें ॥ ५८ ॥ ते रासक्रीडेची राती ॥म्यां ब्रह्मषण्मास केली होती ॥ गोपिका अर्धक्षण मानिती ॥ लवकरी कां गभस्ती उगवला ॥ ५९ ॥ जेथ माझी क्रीडासुखकल्लोळ ॥ तेथ कोण स्मरे काळवेळ ॥ गोपिकांचें भाग्य प्रबळ ॥ माझें सुख केवळ पावल्या ॥१६० ॥ ऐशा माझिया संगतीं॥ भोगिल्या राती नेणो किती ॥ तरी त्यांसि नव्हे तृप्ती ॥ चढती प्रीती मजलागीं ॥ ६१ ॥ गोपिकीं करूनि माझी भक्ती ॥ मी प्रसन्न केलों श्रीपती ॥ *रास मागीतला एकांतीं ॥ उतराई या रीती मी झालों ॥ ६२ ॥ त्या जाण वेदगर्भींच्या श्रुती ॥ श्रुतिरूपें नव्हेचि मत्प्राप्ती ॥ तें परतल्या ह्मणोनि नेति नेति ॥ माझी सुखसंगती ×नफवेची ॥६३॥ विषयबुद्धी तें मुख्य अज्ञान ॥ तें असतां मी न भेटें जाण ॥ असतां वेदोक्त जाणपण ॥ तेणेंही संपूर्ण न भेटें मी ॥ ६४ ॥ जाणीव नेणीव गेलिया निःशेष॥ माझें पाविजे निजात्मसुख ॥ श्रुति जाणोनि हें निष्टंकें ॥ गोकुळीं त्या देख सुखार्थ आल्या ॥ ६५ ॥ 'त्याचि जाण समस्त श्रुती ॥ गोपिकारूपें गोकुळा येती ॥ रासक्रीडामिसें एकांतीं ॥ माझी सुखप्राप्ती पावल्या ' ॥ ६६ ॥ हाही असो अभिप्रावो ॥ उद्धवा ज्यांसि जैसा भावो ॥ त्यांलागीं मी तैसा देवो ॥ यदर्थीं संदेहो असेना ॥ ६७ ॥ उद्धवा मी भक्तांसि देख ॥ कोणे काळीं नव्हे विमुख ॥ जैसे जैसे +भावी भाविक ॥ तैसा मी देख तयासी ॥ ६८ ॥ मी जनांसि सदा संमुख ॥ जनचि मजसी होती विमुख ॥ त्यासि कांहीं नचले देख ॥ दारुणें दुःख भोगिती ॥ ६९ ॥ मी सकाम सकामाच्या ठायीं ॥ निष्कामासि मी निष्काम पाहीं ॥ नास्तिका मी लोकीं तिहीं ॥ असतांचि नाहीं नास्तिक्यें ॥ १७० ॥ असो हे किती उपपत्ती ॥ एक गोपिकांची माझी प्रीती ॥ माझ्या सुखसंगें ज्या राती ॥ त्या मानिती निमेषार्ध ॥ ७१ ॥ माझ्या वियोगें त्या त्या राती ॥ ज्या ज्या आलिया यथास्थिती ॥ त्या

१ प्रति शा. २ ढाल. ३ स्थिर. ४ ब्रह्मदेवाच्या सहामहिन्यांची. ५ पक्कें, निश्चयेंकरून.

*ना. काम मागितला एकांतीं. ×ना. पवेचि. +ना. भवभाविक.

गोपिका कल्पप्राय मानिती ॥ सन्निध स्वपती असतांही ॥ ७२ ॥ त्यांच्या दुःखाची अवस्था ॥ बोलें न बोलवे सर्वथा ॥ माझेनि वियोगें मातें स्मरतां समाधि अवस्था पावल्या ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ ता नाविदन्मय्यनुषंगबद्धधियः स्वमात्मानमदस्तथेदम् ॥ यथा समाधौ मुनयोऽब्धितोये नद्यः प्रविष्टा इव नामरूपे ॥ १२ ॥

॥ टीका ॥ मज गोकुळीं असतां ॥ माझे ठायीं आसक्तचित्ता ॥ हे अवघी समूळ कथा ॥ तुज म्यां तत्त्वतां सांगीतली ॥ ७४ ॥ ऐशियांसि म्यां अतिनिचाडतां ॥ कृतघ्नाचेपरी सांडूनि जातां ॥ माझ्या वियोगकाळींची व्यथा ॥ पाषाण पाहतां उतटती ॥ ७५ ॥ यापरी मज गेले असतां ॥ मागें माझी कथा वार्ता ॥ सदा माझें स्मरण करितां ॥ मदाकारता पावल्या ॥७६॥ करितां दळण कांडण ॥ माझे दीर्घस्वरें गाती गुण ॥ कां आदरिल्या दधिमंथन ॥ माझें चरित्रगायन त्या करिती ॥ ७७ ॥ करितां सडा संमार्जन ॥ गोपिकांसि माझें ध्यान ॥ माझेनि स्मरणें जाण ॥ पेरिये देणें बाळकां ॥ ७८ ॥ गायींचें दोहन करितां ॥ माझे स्मरणीं आसक्तता ॥ एवं सर्वकर्मीं वर्ततां ॥ माझ्या विसराची वार्ता विसरल्या ॥ ७९ ॥ करितांही गमनागमन ॥ अखंड माझ्या ठायीं मन ॥ आसन भोजन प्राशन ॥ करितां मद्ध्यान तयांसी ॥ १८० ॥ एवं मज गेलियाही पाठीं ॥ ऐशी माझी आवडी मोठी ॥ अखंड माझ्याठायीं दृष्टी ॥ माझ्याचि गोष्टी सर्वदा ॥ ८१ ॥ ऐशी अनन्य ठायींच्या ठायीं ॥ गोपिकांसि माझी प्रीति पाहीं ॥ त्या वर्ततांही देहगेहीं ॥ माझ्या ठायीं विनटल्या ॥ ८२ ॥ यापरी बुद्धि मदाकार ॥ होतां विसरल्या घरदार ॥ विसरल्या पुत्र भ्रतार ॥ निजव्यापार विसरल्या ॥ ८३ ॥ विसरल्या त्या विषयसुख ॥ विसरल्या त्या द्वंद्वदुःख ॥ विसरल्या त्या तहान भूक ॥ माझेनि एकें-निजध्यानें ॥ ८४ ॥ जेणें देहें पतिपुत्रांतें ॥ *आप्त मानिलें होतें चित्तें ॥ तें चित्त रातलें मातें ॥ त्या देहातें विसरोनी ॥ ८५ ॥ विसरल्या इहलोक परलोक ॥ विसरल्या कार्य कारण निःशेख ॥ विसरल्या नामरूप देख ॥ ×माझें ध्यानसुख भोगितां ॥ ८६ ॥ निरसोनि तत्त्वांचे विकार ॥ समाधि पावे मुनीश्वर ॥ तो विसरे जेवीं संसार ॥ तेवीं मदाकार गोपिका ॥८७॥ जेवीं कां नाना सरिता ॥ +आलिया सिंधूतें ठाकितां ॥ तेथें पावोनि समरसता ॥ नामरूपता विसरल्या ॥ ८८ ॥ तेवीं गोपिका अनन्यप्रीतीं ॥ माझी लाहोनियां प्राप्ती ॥ नामरूपाची व्युत्पत्ती ॥ विसरल्या स्फूर्ती स्फुरेना ॥८९॥ सच्चिदानंदस्वरूपप्रभावो ॥ नेणतां माझा निजस्वभावो ॥ गोपिकांचा अनन्यभावो ॥ परब्रह्म पदाहो पावल्या ॥ १९० ॥

॥ श्लोक ॥ मत्कामा रमणं जारमस्वरूपविदोऽबलाः ॥ ब्रह्म मां परमं प्रापुः संगाच्छतसहस्रशः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ त्या केवळ अबळा निश्चितीं ॥ सत्संगाच्या अतिप्रीतीं ॥ तेही संगती कामसक्ती ॥ शास्त्रमर्यादेविरुद्ध ॥ ९१ ॥ मी भ्रतारु नव्हें शास्त्रविधी ॥ रूपें मदनमोहन त्रिशुद्धी ॥ मज रातल्या त्या अविरुद्धीं ॥ जारबुद्धी व्यभिचारें ॥ ९२ ॥ चौप्रकारींच्या कामिनी ॥ हस्तिनी

१ पाळण्यांत झोके देणें. २ शरीररूप घरांत. ३ शीत उष्ण इत्यादिक. ४ सामुद्रिकांत व कामशास्त्रांत स्त्रियांचे पद्मिनी, चित्रिणी, शंखिनी व हस्तिनी असे चार भेद केले आहेत.

*ना. असे. ×ना. माझें निजध्यान सुख भोगिती. +ना. जाहल्या.

इत्यादि पद्मिनी ॥ चौर्‍यांसि चां मुक्तिस्थानीं ॥ काममोहनीं मी रमवीं ॥ १३ ॥ इतरपुरुषाचे संगतीं ॥ क्षणभंगुर सुख भोगिती ॥ अविनाश नित्य निज सुखप्राप्ती ॥ कामासक्ती माझेनी ॥१४॥ स्वपतिसंगें क्षणिक आनंद ॥ माझ्या सुखाचा निजबोध ॥ नित्य भोगिती परमानंद ॥ स्वानंदकंद सर्वदा ॥ १५ ॥ यालागीं गा अबळा चपळा ॥ सांडूनि स्वपतीचा सोहळा ॥ मजचि रातल्या सकळा ॥ माझी कामकळा अभिनव ॥ १६ ॥ नवरसांचा रसिक ॥ नवरंगडा मीच एक ॥ यालागीं माझ्या कामीं कामुक ॥ भाव निष्टंक गोपिकांचा ॥ १७ ॥ जीवा आंतुलिये खुणें ॥ मीचि एक निवऊं जाणें ॥ ऐसें जाणोनि मजकारणें ॥ जीवें प्राणें विनटल्या ॥ १८ ॥ अंगीं प्रत्यंगीं मीचि भोक्ता ॥ सबाह्यसर्वांगें मीचि विनविता ॥ ऐसें जाणोनि तत्त्वतां ॥ कामासक्तता मजलागीं ॥ १९ ॥ हावभावकटाक्षगुण ॥ मीचि जाणें उणखुण ॥ कोण वेळ कोण लक्षण ॥ कोण स्थान मिळणीचें ॥ २०० ॥ जे निजोनियां निजशेजारीं ॥ जे काळीं माझी इच्छा करी ॥ तेंचि काळीं तेचि अवसरीं ॥ सुखशेजारीं मी निववीं ॥ १ ॥ मज कुडकुडें नाहीं येणें ॥ नित्य निजसेजें निववणें ॥ नाहीं कवाड टणत्कारणें ॥ जे जीवें प्राणें अनुसरली ॥ २ ॥ ज्यासि भाळले निष्काम तापसी ॥ ज्यासि भाळले योगी संन्यासी ॥ गोप गोपी भाळल्या त्यासी ॥ देहगेहांसी विसरोनी ॥ ३ ॥ ऐसा सर्व कामदायक ॥ पुरुषांमाजीं मीचि एक ॥ हा गोपिकीं जाणोनि विवेक ॥ भावें निष्टंक धरियेला ॥ ४ ॥ म्यां गोपिकांसि काम केला ॥ कीं त्यांचा सर्व काम हरिला ॥ विचारितां अर्थ *इतुला ॥ मोक्ष फावला मत्कामें ॥ ५ ॥ ' अंधारीं गुळ खातां ॥ कडू नलगे तो सर्वथा ॥ तेवीं नेणोनि माझी सच्चिदानंदता ॥ मातें सेवितां मी जाहल्या ' ॥ ६ ॥ परीस माणोनि पाषाण ॥ फोडूं जातां लोहाचा घण ॥ लागतांचि होय सुवर्ण ॥ तैशा जाण गोपिका ॥ ७ ॥ ज्यांसि झाली माझी संगती ॥ त्या एक दोन सांगों किती ॥ शत सहस्र अमिती ॥ निजपद प्राप्ती पावल्या ॥ ८ ॥ ' विष म्हणोनि अमृत घेतां ॥ मरण जाऊनि ये अमरता ॥ तेवीं जारबुद्धीं मातें भजतां ॥ माझी सायुज्यता पावल्या ॥ ९ ॥ ×वैरागराच्या मणीप्रती ॥ खडे लागतां हिरे होती ॥ तैशा गोपिका माझ्या संगतीं ॥ नेणों किती उद्धरल्या ॥२१०॥ मी परब्रह्ममूर्ती चोखडी ॥ माझिया व्यभिचारपरवडी ॥ +धुतल्या अविद्यापापकोडी ॥ मुक्ति रोकडी पावल्या ॥११॥ मी अथवा माझे [4]भक्त ॥ [7]संगती होईल ज्यांसि प्राप्त ॥ ते मज पावले निश्चित ॥ संदेह येथ न धरावा ॥ १२ ॥ माझे स्वरूपावरी लोक ॥ विकल्पें लाविती नानादोख ॥ संत माझे नित्य निर्दोख ॥ सत्संगें सुख निर्दुष्ट ॥१३॥ उद्धवा तुवां येचि अर्थीं ॥ बहुत न करावी निगुती ॥ धरोनियां सत्संगती ॥ साधन व्युत्पत्ती सांडावी ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ तस्मात्त्वमुद्धवोत्सृज्य चोदनां प्रतिचोदनाम् ॥ प्रवृत्तं च निवृत्तं च श्रोतव्यं श्रुतमेव च ॥ १४ ॥

---

१ नित्यनवारंग करणारा. २ भेटीचें, संगमाचें. ३ स्वशय्येवर. ४ कष्टाचें. ५ स्पर्शमणी आपल्या स्पर्शानें दगडास हिरा करणारा मणी. ६ काळजी.

*ना. येथिला. ×ना. मो. वैरागरींच्या खाणी प्रती. +ना. धुतल्या अविद्येच्या कोडी. [4]ना. मो. संत. [7]ना. सत्संगती ज्यासी होय प्राप्त.

॥ टीका ॥ माझें स्वरूप शुद्ध निर्गुण ॥ वेद तितुका त्रिगुण ॥ त्या वेदाचें जें प्रेरण ॥ तें गौण जाण मत्प्राप्ती ॥ १५ ॥ त्या वेदार्थे श्रुतिस्मृती ॥ नाना कर्में करविती ॥ त्या कर्मांची कर्मगती ॥ न कळे निश्चितीं कोणासी ॥१६ ॥ कर्मस्वरूप *परमगूढ ॥ विधिनिषेध अतिअवघड ॥ सज्ञानासि नव्हे निवाड ॥ शास्त्रें दृढ विचारितां ॥ १७ ॥ केवळ कर्मचि कर्मा आंत ॥ एक प्रवृत्त, एक निवृत्त, ॥ सकाम, निष्काम अद्भुत ॥ अंगीं आदळत साधकां ॥ १८ ॥ कर्म तितुकें अविद्यक ॥ वेद तो तंव त्रिगुणात्मक ॥ Xसत्संबंधीं श्रवण देख ॥ ०साधनरूपें वेदांत ॥ १९ ॥ तमोगुणें कर्मकांड ॥ रजोगुणें उपासनाकांड ॥ सत्वगुणें ज्ञानकांड ॥ वेद त्रिकांड त्रिगुणात्मक ॥२२०॥ वेद शास्त्र विधान विधी ॥ यांचें मुख्य मूळ अविद्या आधीं ॥ ते अविद्येस्तव देहबुद्धी ॥ विधिनिषेधीं गोंवित ॥ २१ ॥ यालागीं उद्धवा तूं आधीं ॥ सांडी अविद्या पां त्रिशुद्धी ॥ अविद्या सांडिल्यासंबंधीं ॥ सहजें वेदविधी ✠सांडिला ॥ २२ ॥ आधीं अविद्या ते कोण ॥ हेंच आह्मां न कळे जाण ॥ मग तिचें निराकरण ॥ केवीं आपण करावें ॥ २३ ॥ ' निजकल्पनेचा जो बोध ॥ तोचि अविद्या स्वतःसिद्ध ॥ तेणेंचि बोधें विधिनिषेध ॥ ते त्यागिल्या शुद्ध ब्रह्मचि तो ' ॥ २४ ॥ धूर पडिलिया रणीं ॥ सहज कटक जाय पळोनि ॥ तेवीं अविद्या सांडितां सांडणीं ॥ विधिविधानीं दोनी सहजेंची ॥२५॥ आसु छेदिलिया पडिपाडें ॥ रथ नचाले असतांही घोडे ॥ तेवीं अविद्या छेदिलिया निवाडें ॥ विधिनिषेध पुढें नचलती ॥ २६ ॥ मूळ छेदिलिया एके घायीं ॥ शाखा पल्लव छेदिले पाहीं ॥ तेवीं अविद्या छेदिलिया लवलाहीं ॥ विधिनिषेध 6राही सहजेंची ॥२७॥ऐकें वेदींचा तात्पर्यार्थ ॥मुख्य भजावा मी भगवंत ॥ तोचि शास्त्रीं विशदार्थ ॥ करी वेदांतश्रवणार्थें ॥ २८ ॥ श्रवण केलियाचें फळ जाण ॥ करावें अविद्यानिरसन ॥ अविद्या निरसिलिया श्रवण ॥ पुढारें जाण लागेनां ॥२९॥ जेवीं ठाकिलिया स्वस्थान ॥ पुढारें नलगे गमनागमन ॥ तेवीं झालिया अविद्यानिरसन ॥ श्रवण मनन लागेना ॥ २३० ॥ क्षणमा अविद्या केवीं सांडे ॥ हेंचि अवघड थोर मांडे॥ जे अवघें उगवे सांकडें ॥ तें मी तुजपुढें सांगेन ॥ ३१ ॥ वेद शास्त्र कर्मविधान ॥ हे अविद्यायुक्त साधन ॥ ते अविद्या जावया जाण ॥ मजलागीं शरण रिघावें ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ मामेकमेव शरणमात्मानं सर्वदेहिनाम्॥ याहि सर्वात्मभावेन मया स्या ह्यकुतोभयः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ सांडूनि स्त्रीपुत्रविषयध्यान ॥ सांडूनि योग्यता, शहाणपण ॥ सांडूनि कर्मठता, कर्माभिमान ॥ मजलागीं शरण रिघावें ॥ ३३ ॥ सांडूनी धनमानचेष्टा ॥ सांडुनी सज्ञान प्रतिष्ठा ॥ सांडुनी नाना निष्ठा ॥ शरण वरिष्ठा मज यावें ॥ ३४ ॥ सांडूनिया वेदाध्ययन ॥ सांडूनियां शास्त्रश्रवण ॥ सांडूनि प्रवृत्ति निवृत्ति जाण ॥ मजलागीं शरण रिघावें ॥ ३५ ॥ सांडूनियां वैदिक लौकिक ॥ सांडूनि आगमिक तांत्रिकें ॥ मज शरण रिघालिया देख ॥ माझें निजसुख पावसी ॥ ३६ ॥ सांडूनि कुळाचें उंचपण ॥ सांडूनि जातीचा अभिमान ॥ सांडूनि

---

१ कर्म, उपासना व ज्ञान या तीनप्रकारचा. २ सांडिल्यानें. ३ पुढारी, मुख्य. ४ सेना. ५ त्याग. ६ आंस. ७ थांबे. ८ पुढें मग. ९ जरूर लागत नाहीं. १० स्वगृह. ११ पंचरात्रागमांत सांगितलेलें कर्म.

*ना. मूढ. Xना. तत्संबंधी. ०ना. साधनरूप. ✠ना. मो. सांडिली. 6ना. नराहे.

आश्रमाचें श्रेष्ठपण ॥ मजलागीं शरण रिघावें ॥ ३७ ॥ सांडूनिया ज्ञानध्यान ॥ सांडूनिया विधिविधान ॥ सांडूनिया देहाभिमान ॥ मजलागीं शरण रिघावें ॥ ३८ ॥ माझें नाम अंतर्यामी ॥ हृदयींचें जाणता मुख्यत्वें मी ॥ तो मी चावळेना शब्दधर्मी ॥ श्रद्धा परब्रह्मीं निर्ममत्व ॥ ३९ ॥ सर्व त्यागाचें त्यागितेपण ॥ उद्धवा तुज मी सांगेन खुण ॥ सर्व सांडावा अभिमान॥ हें मुख्य लक्षण त्यागाचें ' ॥ २४० ॥ सर्वेही सांडोनि अभिमान ॥ मज रिघालिया शरण ॥ तुज कैचें जन्ममरण ॥ माझे प्रतापें जाण तरशील ॥ ४१ ॥ शरण रिघावयासाठीं ॥ काई रिघावें गिरिकपाटीं ॥ किंवा सेवावी दरकुटी ॥ अथवा दिक्पटीं रिघावें ॥४२ ॥ तुज वस्तीसि नाहीं गांवो ॥ नित्यनेमस्त कोण ठावो ॥ शरण रिघावया कोठें धांवो ॥ ऐसा भावो कल्पिसी ॥ ४३ ॥ ' ह्मणसी शरण रिघों कवणे ठायीं ॥ तरी मी असें तुझ्या हृदयीं ॥ त्या हृदयस्थासि लवलाहीं ॥ शरण पाहीं रिघावें ' ॥ ४४ ॥ सर्वभावें सर्वस्वेंसीं ॥ मज हृदयस्था शरण येसी ॥ तैं माझी सर्वगतता पावसी ॥ सर्वभूतनिवासी हृदयस्थ ॥ ४५ ॥ तिळभरी राखोनि अभिमान ॥ जरी मज रिघशी शरण ॥ तरी माझी प्राप्ती नव्हे जाण ॥ अभिमान विघ्न मत्प्राप्तीसी ॥ ४६ ॥ श्वानें स्पर्शिलें पक्वान्न ॥ तें जेवीं नातळती ब्राह्मण ॥ तेवीं जीवीं असतां अभिमान ॥ साधकासि मी जाण नातळें ॥ ४७ ॥ रजस्वलेची ऐकोनि वाणी ॥ दूर पळे पुरश्चरणी ॥ तेवीं अहंकाराच्या साधनीं ॥ थिता जवळुनी मी जायें ॥ ४८ ॥ रजक विटाळाचें जीवन ॥ जेवीं नातळती सज्जन ॥ तेवीं हृदयीं असतां अभिमान ॥ उद्धवा मी जाण न भेटें ॥ ४९ ॥ डोळां हेरळ नविरे ॥ घायींचा कीत नजिरे ॥ टांकी मुक्ताफळीं नशिरे ॥ खिरीमाजीं नसरे सरांटा ॥ २५० ॥ तेवीं मजमाजीं अभिमान ॥ उद्धवा न रिघे गा जाण ॥ हे त्यागतात्पर्याची खुण ॥ तुज म्यां संपूर्ण सांगीतली ॥ ५१ ॥ ' पत्नी विचरतां परपुरुषीं ॥ देखोनि निजपती त्यागी तिसी ॥ तेवीं अभिमानरत भक्तांसी ॥ मी हृषीकेशी नातळें ' ॥५२॥ ' यालागीं सांडूनि अभिमान ॥ मज हृदयस्था रिघालिया शरण ॥ तुज मी उद्धरीन जाण ॥ देवकीची आण उद्धवा ' ॥ ५३ ॥ ह्मणसी तुज दोघी माता ॥ कोणतीची आण मानूं आतां ॥ मज तुझीचि आण तत्त्वतां ॥ तुज निर्भयता माझेनी ॥ ५४ ॥ तूं बोलीं नातुडसी कहीं ॥ तुज सर्वथा क्रिया नाहीं ॥ तुझी आण भाक मानावी कायी ॥ ऐसें जरी कांहीं कल्पिसी ॥५५॥ पातेजूनि तुझिया बोलासी ॥ थित्या सांडावें स्वधर्मासी ॥ लटकें जाहलिया आणभाकेसी ॥ कोणें समर्थासी भांडावें ॥ ५६ ॥ उद्धवा ऐसें न ह्मण ॥ म्यां जे वाहिली तुझी आण ॥ ते परमात्म्यावरील प्रमाण ॥ सत्य जाण सर्वथा ॥ ५७ ॥ उद्धवा तूं आत्मत्वें परिपूर्ण ॥ मज तुज नाहीं मीतूंपण ॥ त्या तुझी म्यां वाहिली आण ॥ परमप्रमाण परमात्मता ॥ ५८ ॥ असतां प्रत्यक्ष प्रमाण ॥ कां लागली भाक आण ॥ सर्वभावें मज आलिया शरण ॥ आतांचि जाण तरशील ॥ ५९ ॥ मज शरण रिघाल्या वाडेंकोडें ॥ कळिकाळ तुझिया पायां पडे ॥ कायसें भवभय बापुडें ॥ कोण तुजकडे पाहील ॥ २६० ॥ शरण रिघतांचि तत्काळ ॥ तूं लाहासी माझें बळ ॥ तेव्हां भवभय पळे सकळ ॥ तुज कळिकाळ कांपती ॥ ६१ ॥ तृणीं पेटलिया अग्निस्फुलिंग ॥तो जाळी नानावनांचे दांगें ॥ तैसें माझें बळ लाहोनि सांग ॥ संसा-

---

१ ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ, व संन्यास यांचें. २ सर्वव्यापकता. ३ मंत्रपुरश्चरणें करणारा. ४ परटाचें पाणी. ५ कण. ६ भाल्याचें मोडलेलें टोंक. ७ न चाले. ८ विश्वासून. ९ प्राप्त होशील. १० ठिणगी. ११ झाडांचीं बेटें.

रदार्थें तूं करिसी ॥ ६२ ॥ शरण यावें हृदयस्थासी ॥ तो हृदयस्थ न कळे आह्मांसी ॥ उद्धवा तूं ऐसें ह्मणसी ॥ तरी ऐक त्या स्वरूपासी सांगेन ॥ ६३ ॥ 'सांडूनि नामरूप अभिमान ॥ स्फुरे जें कां उद्धवपण ॥ तें मज हृदयस्थाचें रूप जाण ॥ त्यासि तुवां शरण रिघावें ' ॥ ६४ ॥ 'नामरूप गुणवार्ता ॥ हे माया जाण तत्त्वतां ॥ते सांडूनि जे स्फुरे सत्ता ॥ तें मज हृदयस्थाचें रूप ' ॥ ६५ ॥ ऐसा निजहृदयीं जोडल्या देवो ॥ तेव्हां सर्वभूतीं तोचि पहाहो ॥ तेथ वेगळा उरावया उद्धवो ॥ रिता ठावो मग कैचा ॥ ६६ ॥ तेव्हां सर्वभूतीं मी एकू ॥ *निश्चयें जाणसी निष्टंकू ॥ देखतांही अनेक लोकू ॥ त्यांसि मी एकू एकला ॥ ६७ ॥ ऐसा तूं मिळोनि हृदयस्थासी ॥ मी होऊनि मज पावसी ॥ माझी प्राप्ती उद्धवा ऐशी ॥ ×निर्भयसी निश्चित ॥६८॥ ऐशी सांगोनि गुह्य गोष्टी ॥ देवो उद्धवाची पाठी थापटी ॥ येरें चरणीं घातली मिठी ॥ उठवितां नुठी सर्वथा ॥ ६९ ॥ तुवां जें सांगितलें निजगुज ॥ तें मज मानलें गा सहज ॥ बोला एकाचा संशय मज ॥ तो मी तुज पुसेन ॥ २७० ॥

॥ श्लोक ॥ ॥ उद्धव उवाच ॥ ॥ संशयः शृण्वतो वाचं तव योगेश्वरेश्वर ॥
न निवर्तत आत्मस्थो येन भ्राम्यति मे मनः ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ॥ तूं वेदशास्त्रांचें मथित सार ॥ योगदुर्गांचें भांडार ॥ पिकल्या सुखाचा सागर ॥ मज साचार उपदेशिला ॥ ७१ ॥ ' स्वे स्वेकर्मण्यभिरत ' ॥येणेंचि ह्मणशी वस्तु प्राप्त ॥ तेंही सांडवूनिया समस्त ॥ शरण निश्चित रिघावें ह्मणसी ॥ ७२ ॥ तूं योगियांचा योगीश्वर ॥ सकळ +जगाचा ईश्वर ॥ तुझें सत्य गा उत्तर ॥ संशयकर मज वाटे ॥ ७३ ॥ तुवांच सांगितलें साक्षेपें जाण ॥ करावें गा स्वधर्माचरण ॥ तें सत्य मानूनि वचन ॥ सर्वस्व जाण विश्वासलों ॥ ७४ ॥ करावें स्वधर्माचरण ॥ तेंच ह्मणशी माझें भजन ॥ शेखीं तेंही आतां सांडवून ॥ रिघावें शरण ह्मणतोसी ॥ ७५ ॥ तरी आत्मा कर्ता कीं अकर्ता ॥ हेंचि नकळे तत्त्वतां ॥ कर्म करावें कीं सर्वथा ॥ आह्मीं आतां सांडावें ॥ ७६ ॥ तुझी विषम उपदेशव्युत्पत्ती ॥ सांगतां आह्मां अबळांप्रती ॥ थोर संदेह वाटे चित्तीं ॥ काय श्रीपती करावें ॥ ७७ ॥ जरी आत्मा ह्मण्य अकर्ता ॥ तरी कर्माचा येथें कोण कर्ता ॥ जें आत्म्यासी आली कर्तव्यता ॥ तें त्याग सर्वथा घडेना ॥ ७८ ॥ ऐकोनि उद्धवाचा प्रश्न ॥ सांवळा राजीवलोचन ॥ काय बोलिला हांसोन ॥ सावधान परिसावें ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ स एष जीवो विवरप्रसूतिः प्राणेन घोषेण गुहां प्रविष्टः ॥ मनोमयं सूक्ष्ममुपेत्य रूपं मात्रा स्वरो वर्ण इति स्थविष्ठः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ ऐक बापा उद्धवा ॥ मी निजमायेच्या स्वभावा ॥ अनुसरोनि जीवाभावा ॥ कर्तृत्व जीवां जीवत्वें ॥ २८० ॥ जळीं प्रतिबिंबला सविता ॥ तो ॐजळकंपें दिसे कांपता ॥ तेवीं अकर्ताचि मी दिसें कर्ता ॥ जीवअहंतास्वभावें ॥ ८१ ॥ राजा झालिया निद्रेआधीन ॥

१ जाळणें. २ मत्स्वरूप. ३ परिपक्व, पूर्ण. ४ आपापल्या कर्मांत तत्पर. ५ भिन्नभिन्न बोधाची युक्ति. ६ दुर्बलांस.

*ना. निश्चयें झालों निष्टंक. ×ना. निजवाक्यासी निश्चळ. +ना. जीवांचा. ॐना. जळरूपें.

तो स्वप्नीं रंक होय आपण ॥ तेवीं प्रकृतीस्तव मज जाण ॥ जीवपण आभासे ॥ ८२ ॥ स्वयें राजा आहे आपण ॥ तो स्वप्नीं रंकत्वें करी कोरान्न ॥ तेथें जो दे पसाभर कण ॥ त्यासि वानी आपण 'राजा रे तूं' ॥ ८३ ॥ आपणचि राजा आहे ॥ हें त्याचें त्यास ठाउकें नव्हे ॥ तैसेंच जीवासही होये ॥ पूर्णत्व स्वयें स्मरेना ॥ ८४ ॥ जेवीं स्वप्नाचिया स्वप्नावस्था ॥ राजा रंकक्रिया करी समस्ता ॥ तेवीं अविद्येस्तव तत्त्वतां ॥ कर्मकर्ता मी झालों ॥ ८५ ॥ तेथें वेदोक्त विधिविधान ॥ जीवाअंगीं आदळे जाण ॥ जंव नव्हे ब्रह्मज्ञान ॥ तंव स्वधर्माचरण करावें ॥ ८६ ॥ राजा राजपदीं जागा नव्हे ॥ तंव रंकक्रिया त्यासि संभवे ॥ तेवीं जंव ब्रह्मज्ञान नव्हे ॥ तंव सर्व करावे स्वधर्म ॥ ८७ ॥ राजा राज्यपदीं जागा झाला ॥ तो भीक ह्मणतांचि लाजला ॥ तेवीं ब्रह्मज्ञान जो पावला ॥ तो मी कर्ता या बोला न बोले कदां ॥ ८८ ॥ जैसें रायास मिथ्या रंकपण ॥ तेवीं परमात्म्यासि जीवत्व जाण ॥ त्या जीवास शरीरीं संचरण ॥ तें उपलक्षण अवधारीं ॥ ८९ ॥ 'स एष जीव जडातें जीवविता ॥ यालागीं जीव ऐशी वार्ता' ॥ सहजें तरी स्वभावतां ॥ चैतन्यरूपता जीवाची ॥ २९० ॥ 'घटामाजीं दीप घातला ॥ तैं घटभरींच प्रकाश झाला ॥ तोचि घरामाजीं ठेविला ॥ घरभरीं झाला प्रकाश ॥ ९१ ॥ तेवीं शरीरामाजीं तरी जीव ॥ सहजें तरी हा सदाशिव ॥ येथ बोलणें नलगे बहु ॥ जीवशिवअनुभव तो ऐसा ॥ ९२ ॥ आरिशाचा सूर्य दिसे हातीं ॥ तेवीं शरीरीं जीवाची प्रसूती ॥ प्रकर्षेसी राहती स्थिती ॥ यालागीं प्रसूती बोलिजे ॥ ९३ ॥ आरसा अत्यंत लहान ॥ तेथें सूर्य बिंबे संपूर्ण ॥ तेवीं विदेहीं देहधारण ॥ विवरप्रवेशन त्या नांव ॥ ९४ ॥ थिल्लरीं चंद्राची अभिव्यक्ती ॥ तो गगनींचा दिसे अधोगती ॥ तेवीं शरीरीं जीवाची प्रसूती ॥ अव्यक्त व्यक्तीं प्रवेशे ॥ ९५ ॥ जळीं सविता प्रतिबिंबला ॥ परी तो जळें नाहीं ओला झाला ॥ तेवीं कर्में करोनि संचला ॥ अलिप्त ठेला निजआत्मा ॥ ९६ ॥ जळीं प्रतिबिंब आंदोलायमान ॥ तेवीं जीवासि जन्ममरण ॥ थिल्लरीं चंद्र अडकला संपूर्ण ॥ तेवीं कर्मबंधन जीवासी ॥ ९७ ॥ थिल्लरजळ आटलें ॥ तेथें काय चंद्रबिंब निमालें ॥ ना तें चंद्रचि होऊनि ठेलें ॥ जाहलें निमालें दोनी मिथ्या ॥ ९८ ॥ थिल्लरींचा चंद्र काढूं जातां ॥ तो मिथ्यात्वें नये हातां ॥ तेवीं देहीं मिथ्या जीवता ॥ ते सत्य मानितां अतिदुःखी ॥ ९९ ॥ आरसा थोर अथवा लहान ॥ तेथें सूर्य बिंबे संपूर्ण ॥ तेवीं मी अंतर्यामी जाण ॥ सर्वांभूतीं समान समग्र असें ॥ ३०० ॥ सूर्य थिल्लाराआंतौता ॥ अडकला दिसे समस्तां ॥ तेवीं जीवासि कर्मबंधनता ॥ मूर्ख तत्त्वतां मानिती ॥ १ ॥ गगनींचा सूर्य न देखती ॥ ते थिल्लरीं अडकला मानिती ॥ तेवीं निर्गुणीं जयां नाहीं प्रतीती ॥ ते बद्ध ह्मणती जीवातें ॥ २ ॥ अग्नि ज्वाळाजाळीं आकळितां ॥ जाळें जळे आकळूं जातां ॥ तेवीं आत्मया कर्मीं बद्धकता ॥ कर्मीं अकर्मता *निष्कर्म ॥ ३ ॥ नाद उत्पत्तीसि ठावो ॥ मुख्य वावो कां दुसरा घावो ॥ या दोहीं वेगळा निज निर्वाहो ॥ तो नाद पहाहो अनुहत ॥ ४ ॥ अनुहताचा सोलींव शब्द ॥ परापरतीरीं पराख्य नाद ॥ ज्याचा योगियां सदा छंद ॥ बोलीं अनुवाद नव्हे त्याचा ॥ ५ ॥ ज्या नादाची सुखगोडी ॥ सदाशिवूच जाणे फुडी ॥ कां सनकादिकीं चोखडी ॥ चाखिली

---

१ भिक्षामागे. २ अव्यक्तास. ३ इकडे तिकडे संचार करणारें हलणारे. ४ वायु. ५ आघात.

*ना. निर्धर्म.

गोडी ते चवी ॥ ६ ॥ वायूचें शोधित सत्व ॥ त्यासी एकवटलें तें शब्दतत्त्व ॥ उभय
चेतनत्व जीवित्व ॥ मनोमयत्व धरूं पाहे ॥ ७ ॥ जें चेतनेचें चेतनत्व ॥ तें वायूचें शोधि-
तसत्व ॥ तेंचि शब्दाचें निजतत्त्व ॥ तेणें जीवित्व मनोरूप होय ॥ ८ ॥ जीवाचा
शरीरसंयोग ॥ स्वयें सांगे तो श्रीरंग ॥ आधारादिचक्रप्रयोग ॥ क्रमेंचि सांगे सांगत
॥ ९ ॥ अहंमिति प्रथमाध्यासें ॥ जीवासि जीवत्व आभासे ॥ तो जेजे तत्त्वीं *प्रवेशे ॥
+तो मीं ऐसें ह्मणतची ॥ ३१० ॥ तेथ मी देहो ह्मणतां ॥ तत्काळ जाय पूर्णता ॥ तेव्हां
एकदेशीय परिच्छिन्नता ॥ देहात्मता लागली ॥ ११ ॥ निर्विशेष नाद अति सूक्ष्म प्राण ॥
त्यासहित आधारीं प्रवेशोन ॥ अतिसूक्ष्म प्रथम स्फुरण ॥ पावोनि जाण ‡परा झाला ॥ १२ ॥
आधारचक्रीं सूक्ष्म प्राण ॥ परा वाचा तेथिंची जाण ॥ मनाचें कोंवळें स्फुरण ॥ अति
सपुरपणें सूक्ष्मत्वें ॥ १३ ॥ स्वाधिष्ठानचक्राच्या ठायीं ॥ मनाचें वाढतें बाळसें पाही ॥
पश्यंती वाचा तयेठायीं ॥ बोलूं देखे परी कांहीं बोलेना ॥ १४ ॥ तिये चक्रीं एकवटला प्राण ॥
पुढारां नचलेचि गा जाण ॥ प्राणापानां झालें भांडण ॥ दोघेजण रूसले ॥ १५ ॥ घरकलहो
लागला भारी ॥ मग निघाले वेगळे चारी ॥ पांचेही राहिले पांचांपरी ॥ ऐक निर्धारीं
विचारु ॥ १६ ॥ मागें रूसोनि गेला जाण ॥ त्या नांव ह्मणती अपान ॥ रागें पुढारां आला
पवन ॥ त्या नांव प्राण ह्मणताती ॥ १७ ॥ दोहींमाजीं समत्वें जाण ॥ नाभी राहिला तो
समान ॥ कंठीं राहिला उदान ॥ व्यानासि रहावया स्थान असेना ॥ १८ ॥ अद्यापि शरीरीं
जाण ॥ व्यानासि नाहीं एक स्थान ॥ तो सर्वांगीं सर्वदा जाण ॥ परिभ्रमण करीतसे ॥ १९ ॥
याहून धाकटे पांच प्राण ॥ तेही वेगळे राहिले जाण ॥ तिहीं वेगळालें आपण ॥ वस्तीसि
स्थान योजिलें ॥ ३२० ॥ नाग कूर्म कृकल देवदत्त ॥ पांचवा धनंजय जाण तेथ ॥ यांची वस्ती
शरीरांत ॥ ऐक निश्चित सांगेन ॥ २१ ॥ शिंक जांभई आणि ढेंकर ॥ नागें कूर्म कृकलांचें
घर ॥ उच्चकी देवदत्ताचें बिढार ॥ धनंजयासि थार मिळेचिना ॥ २२ ॥ जीव देहाचे अप-
वादापाशीं ॥ धनंजयो रिघाला वस्तीसी ॥ जीवें सांडिल्या शरीरासी ॥ मुहूर्तार्ध देहासी तो
वांचवी ॥ २३ ॥ स्वाधिष्ठानाहोनि जाण ॥ अनुक्रमें दशधा होती प्राण ॥ त्यांचें स्थान मान
उपलक्षण ॥ तुज म्यां जाण सांगीतलें ॥ २४ ॥ मागें म्यां सांगितली गोष्टी ॥ प्राणापान
रुसल्यापाठीं ॥ दोघां अद्यापि नाहीं भेटी ॥ महाहटी छांदसें ॥ २५ ॥ त्या दोघांसि करी सुसौं-
वण ॥ तो माझा पढियंता जाण ॥ त्या सर्वस्व दें मी आपण ॥ योगसाधन यानांव ॥ २६ ॥
उद्धवा प्राणलक्षणें सांगतां ॥ अवचटें प्राणापानसमता ॥ प्रसंगीं आली कथा ॥ त्वांही स्व-
भावतां ऐकावी ॥ २७ ॥ स्वाधिष्ठानाहूनि मणिपूरां येतां ॥ जीवामनासीं एकात्मता ॥ मुख्य
प्राण तेथ वसतां ॥ परेच्या ऐक्यता पश्यंतीं ॥ २८ ॥ तेथ मनाचें खेळुरेपण ॥ कुमार अवस्था
बाणली जाण ॥ तंव डोलत पुढें चाले प्राण ॥ अनुहतस्थान ठाकिलें ॥ २९ ॥ धरोनि पश्यंतीचें

---

१ संपूर्ण, २ अहं हा जो मूढ मिथ्याग्रह. ३ समर्यादता. ४ सामान्य. ५ आधारचक्रीं. ६ ' परा ' वाणी. ७ पुष्टपणा. ८ गुदस्थ व हृदयस्थ वायूंचें. ९ घरांत तंटा. १० प्राण, अपान, व्यान, उदान, व समान असे पांच. ११ शिंक नागाचें, जांभई कूर्माचें, ढेंकर कृकलाचें, याप्रमाणें. १२ स्थान. १३ नाडी. १४ समजुत. १५ तिसरें चक्र. १६ चौथेंचक्र-हृदयस्थान.

*ना. प्रकाशे. +ना. तें मीं. ‡परादि झाल्या.

अनुसंधान ॥ मध्यमा वाचा उपजे जाण ॥ मौनाची मिठी न सोडून ॥ करी गुणगुण आपण्यांत ॥३३०॥ तेथ मनाची पौगंड अवस्था॥मागें पुढें सांभाळितां॥वांछी नाना भोग अवस्था॥ लाजा सर्वथा बोलेना ॥३१॥मग वेगें ठाकिलें विशुद्धस्थान ॥ तेथ उसळत उदान झाला प्राण ॥ तंव मनासि तारुण्यपण ॥ पुरतें जाण बाणलें ॥ ३२ ॥ त्या विशुद्धचक्राप्रती ॥ परा मेळवूनि आंतौती ॥ पश्यंती मध्यमा एक होती ॥वाचा दुमदुमती झणत्कारें ॥ ३३ ॥ त्या झणत्कारापरिपाठीं ॥ वक्त्रीं वाचा तत्काळ उठी ॥ तारुण्यें उन्मत्ता झाली मोठी ॥ त्या स्वरवर्ण चावटी मांडिली ॥ ३४ ॥ *अग्निचक्र +भ्रूस्थान ॥ तें याहूनि वेगळें जाण ॥ तेथें वाचेसि नाहीं गमन ॥ हंसलक्षण योगाचें ॥ ३५ ॥ हीं साही चक्रें अनुक्रमें जाण ॥ चार मातृका, अठ्ठावीस वर्ण ॥ सोळाही स्वर संपूर्ण ॥ हंस लक्षण प्राप्तीचें ॥ ३६ ॥ कोण चक्रीं कोण वर्ण ॥ मातृकांचें कोणतें स्थान ॥ कोठें उठती स्वर संपूर्ण ॥ तेंही लक्षण अवधारीं ॥ ३७ ॥ आधारचक्रीं चतुर्दळ उभारा ॥ तेथ न्यासिल्या चारी मात्रा ॥ वंशंषंसं ' या अक्षरां ॥ बोलिजे मात्रा ' शास्त्रज्ञीं ॥ ३८॥ स्वाधिष्ठान तें षड्दळ जेथ ॥ साही वर्ण स्थापिले तेथ ॥ बंकारादि लकारांत ॥ जाण निश्चित ते स्थानीं ॥ ३९ ॥ मणिपूर दशदळ निश्चित ॥ दहा वर्ण स्थापिले तेथ ॥ डकारादि फकारांत ॥ वर्ण नांदत ते चक्रीं ॥ ३४०॥ अनाहतचक्र द्वादशयुक्त ॥ बारा वर्ण न्यासिले तेथ ॥ ककारादि ठकारांत ॥ वर्ण विराजत ते चक्रीं ॥ ४१ ॥ 'विशुद्धीचक्रींच्या सोळादळा ॥ अ इ उ ऋ लृ हे वर्ण सोळा ॥ कंठस्थानीं मीनला मेळा ॥ यांचा वेदीं आगळा प्रताप' ॥ ४२ ॥ अज्ञाचक्र अतिअवघड ॥ नुघडे एकाकीं मुखाचें कवाड ॥ नचले प्राणाची चडफड ॥ मार्ग अतिगूढ लक्षेना ॥ ४३ ॥ तें ×अज्ञातचक्र गा द्विदळ ॥ केवळ हंसाचें राऊळ ॥ तेथ पावावया योगबळ ॥ अतिप्रबळ पाहिजे ॥ ४४ ॥ हें स्थान पावावयासाठीं ॥ योगी झाले महाहटी ॥ अभ्यास करितां अतिसंकटीं ॥ तेही शेवटीं न पावती ॥ ४५ ॥ हें पावावया माझें स्थान ॥ अति गुह्य आहे अनुष्ठान ॥ सोहंहंसाचें साधन ॥ सावधान जो साधी ॥४६॥ ' प्राणाचेनि गमनागमनें ॥ सोहंहंसाचेनि स्मरणें ॥ सावधानें जो साधूं जाणे ॥ तेणें पावणें हें स्थान ' ॥ ४७ ॥ त्यासीचि पवनजयो घडे ॥ तोचि अज्ञाचक्रामाजीं चढे ॥ तेथूनिही मार्ग काढी पुढें ॥ अतिनिवाडें अचुक ॥ ४८ ॥ तेथ नानाभोग समृद्धिफळें ॥ आणिती ऋद्धिसिद्धींचे पोळे ॥ ते डावलूनियां सकळें ॥ निघे निर्मळें निजपंथें ॥ ४९ ॥ जो कां सिद्धींसी भुलला॥ मी सिद्ध ये श्लाघे आला ॥ तो अज्ञाचक्रावरोनि चेवला ॥ केल्या मुकला कष्टासी ॥ ३५० ॥ ज्यासि वैराग्य असे पुरतें ॥ तो कदा भुलेना सिद्धींतें ॥ लाथा हाणोनि भोगमान्यतेतें ॥ निघे निजपंथें मजलागीं ॥ ५१ ॥ ' तें औट पीठ गोल्हाट ॥ सांडूनि भ्रमरगुंफा कपाट ॥ शोधूनि सहस्रदळाचे पेंट ॥ मजमाजीं सुभट मिसळले ' ॥ ५२ ॥ सांगतां अज्ञाचक्राची संस्था ॥ पुढें गोडी लागली योगपंथा ॥ मागील विसरलों जी कथा ॥ क्षमा श्रोतां करावी ॥ ५३ ॥ झणाल वोहवटीं पडला मासा ॥ तो परतेना जेवीं सहसा ॥ ग्रंथनिरूपणीं तूं तैसा ॥ जल्पू

---

१ सोळावर्षांच्या आंतची. २ पांचवें चक्र. ३ वैखरी. ४ सहावें चक्र. ५आकृति. ६ स्थापिल्या. ७सहा पाकळ्यांचें. ८ ब, भ, म, य, र, ल. ९ प्राणायाम साध्य. १० समुदाय. ११समाधिभ्रष्ट झाला. १२ गोल्हाटावरील स्थान. १३ स्राव. १४ प्रवाहांत.

*ना. अज्ञाचक्र. +मो. अग्निचक्र भ्रुकुटीस्थान. ×ना. अग्निचक्री.

वायसा कां करिसी ॥ ५४ ॥ जेवीं चुकलिया बाळकातें ॥ माता शिकवण दे त्यातें ॥ तेवीं तुमचें वचन तें मातें ॥ निजहितातें द्योतक ॥ ५५ ॥ करितां चक्रांचें निरूपण ॥ योगारूढ झालें मन ॥ विसरोनि मागील आठवण ॥ गेलों निघून शेवटां ॥ ५६ ॥ हें ऐकोनि हांसिले श्रोते ॥ तूं ग्रंथकर्ता नव्हसी येथें ॥ हें कळोनि गेलें आम्हुतें ॥ नको परिहारातें उपपादूं ॥ ५७ ॥ आलोडितां ग्रंथकोडी ॥ न कळे योगज्ञानाची हे गोडी ॥ ते तुवां विशद केली फुडी ॥ निजपरवडी विभागें ॥ ५८॥ तुझेनि मुखें कृष्णनाथें ॥ श्रीभागवत जें कठिण होतें ॥ तें अर्थविलें यथार्थें ॥ सत्य आम्हुतें मानलें ॥ ५९॥ हा बारावा अध्यावो ॥ अतिगूढ बोलिला देवाधिदेवो ॥ तेथिंचाही त्वां अभिप्रावो ॥ विशद पहाहो विवरिला ॥ ३६० ॥ ऐसा संतीं करोनि आदरू ॥ निर्भय दीधला नाभिकारू[3] ॥ एका जनार्दनीं हर्षनिर्भरू ॥ केला नमस्कारू संतांसी ॥ ६१ ॥ वैखरी, मात्रा, स्वर, वर्ण ॥ या पदांचें झालें व्याख्यान ॥ तेंचि दृष्टांतें श्रीकृष्ण ॥ उद्धवासि जाण सांगत ॥ ६२ ॥ सूक्ष्म जीवशिवांचें मूळ ॥ *तेंचि वाग्द्वारां झाला स्थूळ ॥ येचि अर्थीं अतिविवळ ॥ करूनि प्रांजळ सांगत, ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ यथाऽनलः खेऽनिलबंधुरूष्मा बलेन दारुण्यधिमथ्यमानः ॥ अणुः प्रजातो हविषा समिध्यते तथैव मे व्यक्तिरियं हि वाणी ॥ १८ ॥

॥ टीका ॥ अव्यक्तरूपें ऊष्मा गगनीं ॥ व्यापकपणें असे वह्नी ॥ तो अरणीमाजीं मथितां मंथनीं ॥ अतिसूक्ष्मपणीं प्रगटला ॥ ६४ ॥ अनळा अनिळ[5] निजसखा ॥ ×कोमळतुकें फुंकितां देखा ॥ दिसे लवलवीत नेटका ॥ ज्वाळा साजुका कोंवळिया ॥ ६५ ॥ तेथ पावला दशा मध्यम ॥ मग हवनद्रव्यें करितां होम ॥ तेणें थोरावला निरुपम ॥ वाढला व्योमचुंबित ॥ ६६॥ तैसा सूक्ष्मनाद शिवसंयोगें ॥ प्राणसंगम लागवेगें ॥ षट्चक्रादिप्रयोगें ॥ वैखरीयोगें अभिव्यक्त ॥ ६७ ॥ 'मरा' हे ऐकतां गोठी ॥ ते वाचा सर्वांसि वाटे खोटी ॥ तेंचि अक्षरें केल्या उफराटीं ॥ 'रामनामें गोमटी निववी वाचा ॥ ६८ ॥ करितां सुष्टु दुष्टु उच्चार ॥ वर्ण नव्हती क्षर, अक्षर ॥ यालागीं नांवें अक्षर ॥ यापरी पवित्र पावन वाणी ॥ ६९ ॥ जैशी वाचेची अभिव्यक्ती ॥ तैशीच इतर इंद्रिय प्रवृत्ती ॥ संक्षेपें तेही स्थिती ॥ उद्धवाप्रती सांगत ॥ ३७० ॥

॥ श्लोक ॥ एवं गतिः कर्मगतिर्विसर्गो घ्राणो रसो दृक् स्पर्शः श्रुतिश्च ॥ संकल्पविज्ञानमथाऽभिमानः सूत्रं रजःसत्त्वतमोविकारः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ (जैसी वाचेची व्युत्पत्ती ॥ तैशीच कर्मेंद्रियांची प्रवृत्ती ॥ चरणाच्या ठायीं गती ॥ ग्रहणशक्ती हस्ताची ॥ ७१॥ विसर्ग जाण +पायूचा ॥ सुखोद्रेक तो लिंगाचा ॥ कर्मेंद्रियीं पांचवी वाचा ॥ विस्तारू तिचा सांगीतला ॥ ७२ ॥ तैसींच जाण ज्ञानकरणें ॥ दृष्टी उठी देखणेपणें ॥ रसना रसातें चाखों जाणे ॥ श्रवणा श्रवणें अधिकारू ॥ ७३ ॥ शीत उष्ण मृदु कठिण ॥ हें त्वगिंद्रियांचें लक्षण ॥ सुगंध दुर्गंध जाणतेपण ॥ घ्राण विचक्षण ते कर्मीं ॥ ७४ ॥

---

१ सबब सांगूं नको. २ व्याख्यारूपानें सांगितला. ३ अभयवचन. ४ स्पष्ट. ५ अग्नीचा. ६ वायु. ७ नाशशील नव्हत म्हणून 'अक्षर'. ८ मलोत्सर्ग. ९ गुदाचा. १० ज्ञानेंद्रियें. ११ त्वचेचें. १२ निपुण.

*ना. तेंचि वाग्द्वारा झालें स्थूळ. ×ना. तुलें मो. तुल्य. (ना. जैसी वाचेची पावन व्युत्पत्ती. +ना. पा वायूचा.

संकल्प विकल्प मनाचे ।। निश्चयो कर्म बुद्धीचें ॥ चिंतन जाण चित्ताचें ।। अहंकाराचें मीपण ॥ ७५ ॥ सूत्र तंत्र प्रधानाचें ॥ विकार रजतमसत्वांचे ।। संक्षेपें विवरण तिहींचें ।। ऐक साचें सांगेन ।। ७६ ॥ आधिदैव आधिभौत ॥ ज्यासि आध्यात्म ह्मणत ॥ वाढला जो प्रपंच येथ ।। ईश्वराचें अभिव्यक्त स्वरूप जाण ।। ७७ ।। 'जगाचें मूळकारण ॥ अंगें ईश्वरचि आपण ॥ त्या कारणाहूनि कार्य भिन्न ॥ नव्हे जाण सर्वथा' ।। ७८ ।। होकां घृताची एकेकाळीं ।। थिजोनि झालिया पुतळी ॥ ते घृताहोनि वेगळी ॥ नाहीं देखिली प्रत्यक्ष ।। ७९ ॥ 'काष्ठाचा घोडा केला ॥ अंगें ठाणें अतिमिरविला ॥ तो काष्ठपणा नाहीं मुकला ।। सर्वांगें शोभला काष्ठत्वें' ।। ३८० ।। त्याचे पाहतां वेगळाले अवयव ।। खूर, खांद, काष्ठचि सर्व ।। तेवीं महाभूतें *गुणप्रभाव ॥ स्वरूप सावेव शिवाचें ॥ ८१ ।। सुवर्णाचें झालें लेणें ॥ तें जेवीं मिरवे सोनेपणें ।। तेवीं महाभूतें विषय करणें ।। अभिन्नपणें शिवरूप ।।८२ ॥ फडा पुच्छ वांकुडा बाग ।। येणें आकारें ह्मणती नाग ।। तो नाग नव्हे सोनेंचि सांग ॥ तेवीं हें जग मद्रूप ।। ८३ ।। प्रपंच ईश्वरासि अभिन्न ।। येचि अर्थी श्रीनारायण ।। उद्धवासि सांगे आपण ।। अभिन्नपण जीवशिवां ॥ ८४ ।।

|| श्लोक || || अयं हि जीवस्त्रिवृदब्जयोनिरव्यक्त एको वयसा स आद्यः ||
विश्लिष्टशक्तिर्बहुधेव भाति बीजानि योनिं प्रतिपद्य यद्वत् || २० ||

।। टीका ॥ ।। जीवाचा जीव हा आपण ।। यालागीं बोलिजे जीवपण ।। जीवशिवरूपें हा अभिन्न ।। जीवत्व जाण याहेतू ॥ ८५ ॥ सागर आपुल्या अंगावरी ।। वर्तुळ आवर्त्त करीं धरी ॥ तेवीं लोकपद्मातें श्रीहरी ।। करीं धरी निजनाभीं ॥ ८६ ॥ त्रिवृदें अब्ज ह्मणिजे यापरी ।। त्या नाभिकमळामाझारीं ॥ स्वलीलें त्रैलोक्यातें धरी ।। पद्मनाभ हरी याहेतू ॥८७॥ सुवर्णाच्या सिंहासनीं ॥ सुवर्णमूर्ती बैसवूनी ।। पूजिजे सुवर्णसुमनीं ।। एकपणें तिन्ही भासती ।। ८८ ॥ तेवीं नाभिपद्मीं त्रैलोक्य धरितां ।। तिहींतें भासवी अभिन्नता ॥ यालागीं पद्मनाभ तत्त्वतां ।। आलें वाक्पंथां श्रुतीचिया ॥ ८९ ॥ दृति मार्दव पिंवळी ।। एकली भासे चांपेकळी ॥ विकासे जेवीं नानादळीं ।। तेवीं मी वनमाळी लोकत्वें ।।३९० ।। हें नसतां कार्य कारण ॥ यापूर्वी मी अव्यक्त जाण ।। ×जो मी प्रमाणांचाही प्रमाण।।भेदें जेथ आण वाहिली ॥ ९१ ॥ हेतु मातु दृष्टांत ।। रिघों नशके ज्याच्या गांवांत ।। अपार अनादि अनंत ॥ आद्य अव्यक्त मी ऐसा ।। ९२ ।। एवं केवळ जें अभेद ।। तेथें कैंचे त्रिविध भेद ॥ जेथ लाजोनि परतले वेद ।। स्वरूप शुद्ध तें माझें ।। ९३ ॥ तो मी न मेळवितां साम्यमेळू ॥ स्वलीलाक्षोभें क्षोभक काळू ॥ स्वशक्तीनें झालों सबळू ।। शक्तिबळू चेतविला ।। ९४ ॥ ते निजशक्तीचे विभाग ।। त्यांचि विभागिले चांग ॥ त्या विभागांचे भाग ।। ऐक सांग सांगेन ॥ ९५ ।। गुणशक्ति देवताशक्ती ॥ मनोशक्ति इंद्रियशक्ती ।। महाभूतांची भूतशक्ती ॥ एथ क्रियाशक्ती मुख्यत्वें ।। ९६ ॥ जियेपासावें अदृष्टशक्ती ।। झाली अनावर त्रिजगतीं ॥ हरिहरां नावरे

१ लिंगदेह. २ अवयवांसुद्धां. ३ फणा. ४ भोंवरा. ५ तिप्पट. ६ सोन्याच्या फुलांनीं. ७ वाणीरूप-मार्गाला. ८ प्रेरक. ९ जिच्यापासून.

*ना. भूतप्रभव. ×ना. जो मी प्राणाचाही प्राण.

निश्चितीं ॥ अदृष्टशक्ती अनिवार ॥ ९७ ॥ जें अदृष्टशक्तीनें जीवातें ॥ बांधोनि केलें आपैतें ॥ तिशी आवरावया मातें ॥ सामर्थ्य येथें आथीना ॥ ९८ ॥ 'जेवीं कां राजाज्ञा जाण ॥ राजा प्रतिपाळी आपण ॥ तेवीं अदृष्टशक्तिउल्लंघन ॥ मी सर्वथा जाण करीना' ॥ ९९ ॥ जीभ कापूनि देवासि वाहती ॥ तैसें नासिक न छेदिती ॥ तेवीं मी छेदीं कर्मस्थिती ॥ परी अदृष्टगती छेदीना ॥ ४०० ॥ अथवा विशेषेंसि निश्चितीं ॥ मीं माया आलिंगिली निजशक्ती ॥ तो मी एकुची त्रिजगतीं ॥ बहुधाव्यक्तीं आभासें ॥ १ ॥ माझिया साक्षात्कारा आला ॥ जो जीवन्मुक्तत्व पावला ॥ तोही अदृष्टें बांधला ॥वर्ते उगला देहगेहीं ॥२॥ जनक राजपदीं नांद ॥ शुक नागवा प्रारब्धें ॥ कळी लाविजे नारदें ॥ अदृष्टछंदें विनोदी ॥ ३ ॥ वसिष्ठ पुरोहितत्व करी ॥ भीष्म पहुडे शरपंजरीं ॥ याज्ञवल्क्या दोनी नारी ॥ अदृष्टकरीं वर्तत ॥ ४ ॥ यापरी गा अदृष्टशक्ती ॥ अनिवार वाढली त्रिजगतीं ॥ *त्या जीव बांधले अदृष्टगतीं ॥ जेवीं गारोडियाहातीं वानर ॥ ५ ॥ त्या जीवादृष्टें बहुधा व्यक्ती ॥ मी एक भासें त्रिजगतीं ॥ 'विश्वतश्चक्षु' या श्रुतीं ॥ बहुधा मूर्ती मी एक ॥ ६ ॥ मृत्तिकेचीं गोकुळें केलीं ॥ नानानामाकारें पूजिलीं ॥ परी ते मृत्तिकाचि संचली ॥ तेवीं सृष्टि झाली मद्रूपें ॥ ७ ॥ जेवीं एकुला एक आपण ॥ निद्रेसि देतां आलिंगन ॥ स्वप्नीं देखे बहुविध आपण ॥ तेवीं मी जाण विश्वात्मा ॥ ८ ॥ जेवीं सूक्ष्म वटबीज केवळ ॥ त्यासि मीनल्या भूमिजळ ॥ वाढोनियां अतिप्रबळ ॥ वृक्ष विशाळ आभासे ॥ ९ ॥ तेथ नाम रूप पुष्पफळ ॥ तें बीजचि आभासे समूळ ॥ तेवीं जगदाकारें सकळ ॥ भासे केवळ चिदात्मा ॥४१०॥ जेवीं मूळबीजाची गोडी ॥ तेचि स्वाद वाढला वाढी ॥ कांडोकांडीं स्वादुपरवडी ॥ अविकार गोडी उंसाची ॥ ११ ॥ तेवीं मूळीं चिदात्माचि कारण ॥ तेथूनि जें जें तत्त्व झालें जाण ॥ तें तें निखळ चैतन्यघन ॥ जग संपूर्ण चिद्रूपें ॥ १२ ॥ ऊंस सर्वांगें बीज सकळ ॥ बीजरूपें ऊंस सफळ ॥ तेवीं जगाचें चिन्मात्र मूळ ॥ जग सकळ तें चिद्रूप ॥ १३ ॥ बीज ऊंस दोन्ही एकरूप ॥ तैसा प्रपंच जाण चित्स्वरूप ॥ येचि अर्थीं अतिसाक्षेप ॥ कृपापूर्वक सांगत ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ यस्मिन्निदं प्रोतमशेषमोतं पटो यथा तंतुवितानसंस्थः ॥

॥ टीका ॥ ॥ यालागीं संसार जो समस्त ॥ माझ्याठायीं असे ओतप्रोत ॥ मजवेगळें कांहीं येथ ॥ नाहीं निश्चित अणुमात्र ॥ १५ ॥ येचि अर्थींचा दृष्टांतु ॥ देवो उद्धवासि सांगतु ॥ जेवीं कापुसाचे सूक्ष्मतंतू ॥ कांतोनि निश्चितू पट केला ॥ १६ ॥ आडवे तिडवे वाणले तंतू ॥ त्यांसि वस्त्रनाम हें मृषा मातू ॥ तेवीं संसार शब्द हा व्यर्थु ॥ स्फुरे भगवंतु मी तद्रूपें ॥ १७ ॥ 'पाहतां सुताचि दिसे उघडें ॥ त्याचें नाम म्हणती लुगडें ॥ प्रत्यक् चैतन्य स्फुरतां पुढें ॥ त्यासि संसार वेडे म्हणताती ॥ १८ ॥ सुतावेगळें वस्त्र न दिसे ॥ तैसा मज वेगळा प्रपंच न भासे ॥ उद्धवा अप्राप्ताचें भाग्य कैसें ॥ मीचि नसें म्हणताती ॥ १९ ॥ यापरी मी सर्वगत ॥ विश्वात्मा विश्वभरित ॥ वस्त्रदृष्टांतें प्रस्तुत ॥ तुज म्यां येथ सांगितलें ॥ ४२० ॥ मज देखणा

---

१ आपल्या स्वाधीन. २ असेना. ३ अनेकरूपांत. ४ कात्यायनी आणि मैत्रेयी. ५ मंत्रांत. ६ आहे. ७ बदल न पडतां. ८ व्यर्थ, खोटी गोष्ट. ९ मला पाहण्याचा.

*ना. रघां.

ज्याचा निर्धारू ॥ त्यासि मी केवळ सर्वेश्वरू ॥ मज अप्राप्त जो नरू ॥ त्यासि संसारू आभासे ॥ २१ ॥ जो सर्वात्मा सर्वेश्वरू ॥ भ्रांतासि भासे भवतरुवरू ॥ त्या भवतरूचा विस्तारू ॥ स्वयें श्रीधरू सांगत ॥ २२ ॥

॥ श्लोकार्ध ॥ य एष संसारतरुः पुराणः कर्मात्मकः पुष्पफले प्रसूते ॥२१॥

॥ टीका ॥ भ्रांतीस्तव भवतरुवरू ॥ कर्माकर्मजळें वाढला थोरू ॥ जीर्ण जुनाट अपरंपारू ॥ वोतंबरू फळपुष्पीं ॥ २३ ॥ त्याचें कोण बीज कोण मूळ ॥ कोण रस कोण फळ ॥ जेणें भ्रमले जीव सकळ ॥ तें मी समूळ सांगेन ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ द्वे अस्य बीजे शतमूलस्त्रिनालः पंचस्कंधः पंचरसप्रसूतिः ॥ दशैकशाखो द्विसुपर्णनीडस्त्रिवल्कलो द्विफलोऽर्कं प्रविष्टः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ भ्रमभूमीमाजीवडे ॥ पापपुण्यजोडपाडें ॥ बीज पडतांचि वृक्ष विरूढे ॥ अग्रीं वाढे कल्पना ॥ २५ ॥ पान फुल न दिसे फळ ॥ वेलाअंगीं दोरवा सकळ ॥ तेणेंचि वेल वाढे प्रबळ ॥ तेवीं संसार सबळ कल्पनाग्रें ॥ २६ ॥ कर्माकर्म प्रवाह जळें ॥ भरिलें अविद्येचें आळें ॥ अनंतवासना तेचि मूळें ॥ वृक्ष तेणें बळें ढळेना ॥२७ ॥ सूक्ष्म वासना कल्पकोडी ॥ अधोगती रुतल्या बुडीं ॥ संकल्पविकल्पें चहूंकडीं ॥ पसरल्या बुडीं बुचबुचित ॥ २८ ॥ संचितक्रियमाण वाफे भारी ॥ सुबद्ध भरले जळेंकरीं ॥ भरिलेच मागुते भरी ॥ प्रवाह त्यावरी पडलासे ॥ २९ ॥ तेणें वृक्ष सबळ भारी ॥ नित्य नूतन वाढी धरी ॥ सगुण गुणाचे वाढीवरी ॥ त्रिगुणअहंकारीं त्रिनाळें ॥ ४३० ॥ त्रिगुणगुणांची परवडी ॥ येरांची येरांमाजीं मुरडी ॥ येरयेरांवरी बुडीं ॥ मिसळे वाढीं वाढती ॥ ३१ ॥ पंचभूतांच्या खांदा थोरी ॥ प्रचंड वाढल्या बाहेरी ॥ पसरल्या येरयेरांवरी ॥ मीनल्या परस्परीं वाढती ॥ ३२ ॥ समूळ गर्भ साधूनि रुखा ॥ मनोमय वाढलिया शाखा ॥ अग्रीं दशेंद्रियफाटे देखा ॥ तिच्या झुळका डोलती ॥ ३३ ॥ त्या त्या शाखांमाजीं देखा ॥ दैवतें आलीं वस्ती सुखा ॥ करूनि कर्माचा आवांका ॥ आपुलाली शाखा ते धरिती ॥ ३४ ॥ दशधा वायूची झडाड ॥ तेणें तें डोलत दिसे झाड ॥ त्यामाजीं दोंपक्ष्यांचें नीडे ॥ अतिगूढ अतर्क्य ॥ ३५ ॥ जेथूनि उपजे निजज्ञान ॥ तेंचि नीड हृदयभुवन ॥ जीवू परमात्मा दोघेजण ॥ अतर्क्य पूर्ण वसताती ॥ ३६ ॥ जीवू जो देहाभिमानी ॥ परमात्मा तो निरभिमानी ॥ इहीं दोघीजणीं मिळोनी ॥ हृदयभुवनीं नीड केलें ॥ ३७ ॥ जीव संकल्पविकल्पप्राप्ती ॥ परमात्मा निर्विकल्पस्थिती ॥ दोहींची हृदयामाजीं वस्ती ॥ नीड निश्चितीं या हेतू ॥ ३८ ॥ पाहे पां वात पित्त श्लेष्मा ॥ आंतरत्वचा भवद्रुमा ॥ वल्कलें म्हणावया महिमा ॥ भक्तोत्तमा या हेतू ॥३९॥ गगनाहूनि वाढला वरुता ॥ शून्यासहित लांबला आरुता ॥ सैंघ पसरला सभोंवता ॥ दिशांच्या प्रांतां सांडुनी ॥ ४४० ॥ एवं विस्तारलेनि विस्तारा ॥ वृक्ष उन्मळोनि मदभारा ॥ पंचविषयरसधारा ॥ अतिमधुरा

१ अज्ञानाचे योगानें,–हेतूनें. २ संसार हाच मोठा वृक्ष. ३ भूमींत. ४ पूर्वी केलेलें व करीत आहे तें. ५ तीन देंठांचा. ६ आश्रय. ७ पंचप्राण, पंच उपप्राण. ८ जीव, शिव. ९ घरटें. १० माझा देह किंवा मी देह असे मानणारा. ११ कफ. १२ प्रौढी.

वर्पत् ॥ ४१ ॥ श्रुति स्मृति याचीं पानें ॥ त्यामाजीं उगवलीं स्वर्गसुमनें ॥ दीक्षितभ्रमर ज्यांकारणें ॥ अतिमत्राणें उडताती ॥ ४२ ॥ त्या वृक्षाचीं जावळीं फळें ॥ सुखदुःखें दोनी एकेमेळें ॥ शेंडा धरोनि समूळें ॥ दोनी फळें पैं त्यासी ॥ ४३ ॥ जितुकीं सूर्यमंडळें भासती ॥ तितुकी जाण याची स्थिति ॥ सुखदुःखफळें तितुक्यांप्रती ॥ कर्मप्राप्ती देतसे ॥ ४४ ॥ सूर्यमंडळा आंतें ॥ सांगीतलें भववृक्षातें ॥ चंद्रमंडळादि समस्तें ॥ भवभय तेथें नाहीं न ह्मणे ॥ ४५ ॥ मी सूर्यमंडळमध्यवर्ती ॥ त्या मज वेगळी जे स्फुरे स्फूर्ती ॥ तेथवरी भवभयाची प्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४६ ॥ सूर्याचें जें सूर्यमंडळ ॥ तेंही संसारामाजीं केवळ ॥ जो न खाय या वृक्षाचें फळ ॥ तोचि रविमंडळभेदक ॥ ४७ ॥ वृक्षाचीं दोनीं फळें येथें ॥ दोहीं फळांचे दोघे भोक्ते ॥ दोघे संसारा आंतौते ॥ ऐक तूतें सांगेन ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ अदन्ति चैकं फलमस्य गृध्रा ग्रामेचरा एकमरण्यवासाः ॥ हंसा य एकं बहुरूपमिज्यैर्मायामयं वेद स वेद वेदम् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ दुःखफळाचे भोक्ते ॥ अत्यंत विषयासक्त चित्तें ॥ गीधें गृहस्थ कां जे येथें ॥ अविधीं विषयातें सेविती ॥ ४९ ॥ ग्राम्यविषयीं अतितत्पर ॥ यालागीं बोलिजे ग्रामचर ॥ धाम गीध जैसे घार ॥ तैसे सादर विषयांसी ॥ ४५० ॥ जेवीं कां घार गगना चढे ॥ तेथूनि आमिषीं उडी पडे ॥ तेवीं नरदेह पावोनि चोखडे ॥ विषया अडपडे ओंवती ॥ ५१ ॥ एवं विषयासक्त चित्तें ॥ जे अधोगतीतें पावते ॥ ते दुःखफळाचे भोक्ते ॥ जाण येथें निश्चित ॥ ५२ ॥ सांडोनियां गार्हस्थ्य ॥ वनवासी वानप्रस्थ ॥ त्यांसीचि सुखफळ प्राप्त ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ५३ ॥ त्या सुखफळाचे विभाग ॥ ब्रह्मसदनांत इतर स्वर्ग ॥ कर्में करूनियां सांग ॥ जेथिंचा मार्ग चालिजे ॥ ५४ ॥ ब्रह्मचर्यें वेदाध्ययन ॥ गार्हस्थ्यें पूजिजे अग्निब्राह्मण ॥ वानप्रस्थाश्रमीं जाण ॥ वन्यभोजन वनवासी ॥ ५५ ॥ येणें कर्मेंचि क्रममुक्तिस्थान ॥ जिहीं ठाकिलें ब्रह्मसदन ॥ सुखफळाचे भोक्ते जाण ॥ ब्रह्मभुवननिवासी ॥ ५६ ॥ इतर स्वर्गीं सुखप्राप्ती ॥ तेथें आहे पुनरावृत्ती ॥ ब्रह्मसदनीं पावल्या वस्ती ॥ त्यासि क्रमें मुक्ती होईल ॥ ५७ ॥ मुक्तीचें पद अरण्यवासी ॥ तेणें घेतिलें वानप्रस्थाश्रमीं ॥ तेथ नाहीं घेतला संन्यासी ॥ त्यासि वनवासी ह्मणों नये ॥ ५८ ॥ संन्यासासि निवासस्थान ॥ येथें बोलिलें नाहीं जाण ॥ तिहीं स्वदेहाचें केलें *दहन ॥ नेमलें स्थान त्यां नाहीं ॥ ५९ ॥ जे अविद्यादिकर्मप्रवृत्ती ॥ विरजाहोमीं स्वयें जाळिती ॥ ते भववृक्षाचीं फळें खाती ॥ हेही युक्ती घडेना ॥ ४६० ॥ जागृतीच्या पाहुण्यासी ॥ जेवूं घाडावें स्वप्नगृहासी ॥ तेवीं निरस्तसंकल्प संन्यासी ॥ संसारसुखासी केवीं भोक्ते ॥ ६१ ॥ स्वकर्म जाळोनि विरजाहोमीं ॥ जिहीं साध्य केलें ' ब्रह्माहमस्मि ' ॥ त्यांसि निवासस्थान कोण नेमी ॥ वनीं धामीं नेमस्त ॥ ६२ ॥ विन्हाड यावया आकाशासी ॥ कोण घर नेमावें त्यासी ॥ तेवीं निरस्तसंकल्प संन्यासी ॥ त्यांच्या निवासासी कोण नेमी ॥ ६३ ॥ ×जे न्यस्तसंकल्प संन्यासी ॥ त्यांसि कोण ह्मणे अ-

---

१ यज्ञ करणारे हेच भुंगे. २ गिधाड. ३ विधीचें उल्लंघन करून. ४ मांसावर. ५ टाकिले आहेत संकल्प ज्यानें.

*ना. हवन. ×ना. जे समस्तसंकल्प संन्यासी. मो. जे नेमस्त संकल्प संन्यासी.

रण्यवासी ।। मायिक भवत्रक्षींच्या फळासी ।। भोक्तेपणें त्यांसि म्हणों नये ॥ ६४ ॥ मूळींचें पद अरण्यवासी ॥ तें आंगा आलें वानप्रस्थासी ॥ वानप्रस्थ सदा वनवासी ॥ दुसऱ्या फळासी तो भोक्ता ॥ ६५ ॥ एक संन्यासाची सुखप्राप्ती ॥ हीं दोनी फळें मिथ्या जाणती ॥ मीचि एक त्रिजगतीं ॥ हे प्रतीति निश्चितीं त्यां झाली॥६६॥जा हा बहुरूपें विस्तारू ।। तो मी चिदात्मा साचारू ॥ जाणोनि गुरुमुखें निर्धारू ॥ माझें सुख सार पावले ॥ ६७ ॥ ते मद्रूपें मज पावले ॥ माझेनि सुखें सुखरूप झाले ॥ सुखदुःखफळांतें मुकले ॥ येवीं चुकले संसारा ॥ ६८ ॥ संसारमायामय मिथ्याभास ॥ जाणे तोचि वेदज्ञ विद्वांस ॥ त्यासीच बोलिजे परमहंस ॥ विश्वनिवासनिवासी ॥ ६९ ॥ ऐशी व्हावया पदप्राप्ती ॥ सुदृढ करावी गुरुभक्ती ॥ जेणें होय संसारनिवृत्ती ॥ तोचि श्रीपती सांगत ॥ ४७० ॥ पहिली सांगितली सत्संगती ॥ तेणें जाहली मत्पदप्राप्ती ॥ तेचि अध्यायाच्या अंतीं ॥ करावी गुरुभक्ती सांगत ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ एवं गुरूपासनयैकभक्त्या विद्याकुठारेण शितेन धीरः ॥ विवृश्च्य जीवाशयमप्रमत्तः संपद्य चाऽऽत्मानमथ त्यजाऽस्त्रम् ॥ २४ ॥ इतिश्री० द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ न करितां सद्गुरुभजन ॥ नव्हे भवत्रक्षाचें छेदन ॥जरी कोटिकोटी साधन ॥ आनेआन केलिया ॥ ७२ ॥ भवत्रक्षातें छेदिती ॥ केवळ जाण गुरुभक्ती ॥ अरिनिर्दळणीं निश्चितीं ॥ जेवीं निजशक्ती शूरांची ॥ ७३ ॥ दूरी करावया दुरितें ॥ जेवीं गंगाजळीं सामर्थ्य ॥ तेवीं भवभया भस्म करीत ॥ जाण निश्चित गुरुभक्ती ॥ ७४ ॥ करितां सत्यव्रतग्रहण ॥ पाप स्वयें जाय पळोन ॥ तेवीं करितां गुरुभजन ॥ भवनिर्दळण स्वयें होय ॥ ७५ ॥ [१]हनुमंत देखतांचि दिठीं ॥ भूतें पळती बागबाटीं ॥ तेवीं गुरुभजनपरिपाटीं ॥ पळे उठाउठी भवभय ॥७६॥ मरत्या घड अमृतपान ॥ तें मरणासचि आलें मरण ॥ तेवीं करितां गुरुभजन ॥ जन्ममरण निमालें ॥७७॥ [२]अंतीं अवचटें हरि म्हणतां॥पापरा हाणे यमदूतां ॥तेवीं सद्गुरूतें भजतां॥हाणे [३]लाता भवभया ॥ ७८ ॥ करावया भवनिर्दळण ॥ मुख्य करावें गुरुभजन ॥ हेंचि श्रेष्ठ गा साधन ॥ सभाग्य जाण गुरुभक्ति ॥ ७९ ॥ कोण सद्गुरु कैशी भक्ती ॥ ऐसें कांहीं कल्पिसी चित्तीं ॥ तेंही मी यथानिगुतीं ॥ मागें तुजप्रती सांगीतली ॥ ४८० ॥ जो शब्दपरनिष्णात ॥ शिष्यप्रबोधनीं समर्थ ॥ तोचि सद्गुरु येथ ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ८१ ॥ जो स्वरूपीं करी *समाधान ॥ तोचि सद्गुरु सत्य जाण ॥ यावेगळें सद्गुरुपण ॥ व्हावया कारण असेना ॥ ८२ ॥ त्या सद्गुरुभजनाची परी ॥ तुज मी सांगेन निर्धारीं ॥ सर्वकर्मधर्मांचिया शिरीं जो कां करी गुरुभजन ॥ ८३ ॥ गुरु म्हणों पित्यासमान ॥ तंव तो एकजन्मींचा जाण ॥ हा मायबापू सनातन ॥ जनक पूर्ण जगाचा ॥ ८४ ॥ गुरु मातेसमान पाहों ॥ तंव गर्भजनितिचा स्नेहो ॥ गर्भवास निवारी गुरुरावो ॥ अधिक स्नेहो पुत्रापरिस ॥ ८५ ॥ उदराबाहेर घाल्यापाठीं ॥ पुत्रस्नेहें माता उठी ॥तें बाहेरील घालूनि पोटीं ॥ स्नेहाळ गोमटी गुरुमाता॥८६

१ पाप. २ मरणकाळीं. ३ लाथा.

*ना. सावधान.

गुरु मानं स्वामीसमान ॥ तरी स्वामी निवारूं न शके मरण ॥ सद्गुरु चुकवी जन्ममरण ॥ स्वामी संपूर्ण गुरुरावो ॥ ८७ ॥ गुरु मानं कुलदेवता ॥ तंव तिसी कुळधर्मी पूज्यता ॥ हा कुलदेवतेची देवता ॥ नित्य पूज्यता निजकर्मी ॥ ८८ ॥ गुरु मानं कल्पतरुसमान ॥ तंव कल्पतरु दे कल्पिलें दान ॥ सद्गुरु दे निर्विकल्पता पूर्ण ॥ अगाध दान निर्लोभें ॥ ८९ ॥ चिंतामणी दे चिंतिल्या अर्था ॥ सद्गुरु करी चिंतेच्या घाता ॥ चिंता मारूनि, दे चैतन्यता ॥ अक्षयता निजज्ञान ॥ ४९०॥ कामधेनूचें दुभतें ॥ तें कामनेचपुरतें ॥ सद्गुरु देत स्वानंदातें ॥ कामनेतें निर्दळी ॥ ९१ ॥ गुरुसमान ह्मणों सागरु ॥ तो गंभीर परी सदा क्षारु ॥ हा स्वानंदें नित्य निर्भरु ॥ अतिमधुरु निजबोधें ॥ ९२ ॥ *' गुरु परब्रह्मसमान ॥ हेंही बोलणें किंचित् न्यून ॥ गुरुवाक्यें ब्रह्म प्रमाण ॥ येरवीं ब्रह्मपण शब्दमात्रें ॥ ९३ ॥ शब्दीं लोपूनि शब्दार्था ॥ +गुरु प्रबोधी संविदर्था ॥ त्याहूनि पूज्य परता ॥ नाहीं सर्वथा त्रिलोकीं ॥ ९४ ॥ गुरु माता गुरु पिता ॥ गुरु स्वामी गुरु कुळदेवता ॥ गुरुवांचोनि सर्वथा ॥ आणिक देवता स्मरेना ॥ ९५ ॥ थोर सांडलिया सांकडें ॥ जें गगन गडगडूनि पडे ॥ तरी न पाहे आणिकाकडे ॥ नाम पढे गुरूचें ॥ ९६ ॥ काया वाचा मन ॥ जो गुरुवांचोनि आन नेणे ॥ तसाचि भजे अनन्यपणें ॥ गुरुभक्ति ह्मणणे त्या नांव ॥ ९७ ॥ पक्षिणीचीं अपक्ष पिलें ॥ तीं तिसीच स्मरती सर्वकाळें ॥ तेवीं जागृती स्वप्नसुषुप्तिमेळें ॥ जो गुरुवेगळें स्मरेना ॥ ९८ ॥ मागां सांगितलें भगवद्भजन ॥ आतां सांगसी गुरुसेवन ॥ नाहीं एकविध निरूपण ॥ ऐसा विकल्प जाण न धरावा ॥ ९९ ॥ सद्गुरु तोचि माझी मूर्ती ॥ निश्चयेंसि जाण निश्चितीं ॥ विकल्प न धरावा ये अर्थी ॥ अनन्यभक्ती या नांव ॥ ५०० ॥ एकाग्रता जें गुरुभजन ॥ तेंचि माझें परम पूजन ॥ गुरुसि मज वेगळेपण ॥ कल्पांतीं जाण असेना ॥ १ ॥ गुरु भगवंत दोन्ही एक ॥ येणें भावें निजनिष्टंक ॥ भजे तोचि गुरुसेवक ॥ येरु तो देव अनुमानी ॥ २ ॥ माझिया ऐक्यता अतिप्रीतीं ॥ जेणें आदरिली गुरुभक्ती ॥ तोचि धन्य धन्य त्रिजगतीं ॥ भजती स्थिती ते ऐक ॥ ३ ॥ करावया गुरुसेवे ॥ मनापुढें देह धांवे ॥ एकला करीन सर्वसेवे ॥ येवढें होवें उत्पन्न ॥ ४ ॥ सेवेच्या दाटणी जाण ॥ अधिकचि होय ठाणमाण ॥ ×अंग अंगऊनि अंगवण ॥ सेवेमाजीं जाण विसांवा त्यासी ॥ ५ ॥ सेवेचिया आवडीं ॥ आगयेना अर्ध घडी ॥ आवडीचे चढोवढीं ॥ चढती गोडी गुरुभजनीं ॥ ६ ॥ नित्य करितां गुरुसेवा ॥ प्रेमपाडिभरु नीचनवा ॥ सद्भावाचिया हांवा ॥ गुरुचरणीं जीवा विकिलें ॥ ७ ॥ आळस येवोंचि विसरला ॥ आरोणुकेचा ठावो गेला ॥ गुरुसेवासंभ्रमें भुलला ॥ येवों विसरला विषयांतें ॥ ८ ॥ तहान विसरली जीवन ॥ क्षुधा विसरली मिष्टान्न ॥ करितां गुरुचरणसंवाहन ॥ निद्रा जाण विसरला ॥ ९ ॥ जांभयी यावयापुरती ॥ सवडी ✲उरेना रिती ॥ तेथें निद्रेलागीं केउती ॥ राहावया वस्ती मिळेल ॥ ५१० ॥ मुखीं सद्गुरूचें नाम ॥ हृदयीं सद्गुरूचें प्रेम ॥ देहीं सद्गुरूचें कर्म ॥ अविश्रम अहर्निशीं ॥ ११ ॥ गुरुसेवेसि गुंतलें मन ॥ विसरला स्त्री पुत्र

---

१ जेवढी इच्छा करावी तेवढेंच. २ स्वागत. ३ ज्ञानरूपसत्स्नेह. ४ पंख न फुटलेली. ५ प्रेमाधिक्य. ६ विसाव्याचा. ७ गुरुसेवेच्या गर्दीत. ८ रगडणें.

*ना. गुरु ब्रह्म समसमान. +ना. गुरु बोधी संवादार्था. ×ना. अंगें. ✲ना. नुरेचि

धन ॥ विसरला मनाची आठवण ॥ मी कोण हें *स्फुरेना ॥१२॥ नवल भजनाचा उत्साहो ॥ भजतां नाठवे निजदेहो ॥ थोर सेवेचा लवलाहो ॥ निजात्मभावो गुरुचरणीं ॥ १३ ॥ ऐसाही प्रारब्धमेळा ॥ अवचटें झालिया वेगळा ॥ न ×तुटे प्रेमाचा जिव्हाळा ॥ भजनीं आगळा सद्भावो ॥ १४ ॥ गुरूचा असता जो ग्राम ॥ तेथेंचि वसे मनोधर्म ॥ गुरुध्यान तें +स्वधर्म कर्म ॥ सेवासंभ्रम सांडीना ॥ १५ ॥ गुरुमूर्तीची सेवे त्यासी ॥ ते मूर्ति बैसली हृदयावकाशीं ॥ मग नानाभजनविलासीं ॥ आवडी कैशी ÷भजनाची ॥ १६ ॥ चिन्मात्र पूर्णिमा गुरु पूर्णचंद्र ॥ तळीं आपण होय आर्त्त चकोर ॥ मग स्वानंदबोधाचे चंद्रकर ॥ निरंतर स्वयें सेवी ॥ १७ ॥ सद्गुरु सूर्य करी चिद्गगनीं ॥ आपण होय सूर्यकांतमणी ॥ त्याचेनि *तेजें प्रज्वाळोनी ॥ स्वभावें मायावनीं होळी करी ॥ १८ ॥ सद्गुरुकृपामृताच्या डोहीं ॥ स्वयें तरंग होय तयेठायीं ॥ सबाह्य तद्रूपें पाही ॥ भावना हृदयीं भावित ॥ १९ ॥ आपुला निजस्वामी जो सद्गुरू ॥ भावी निर्विकल्प कल्पतरू ॥ त्याचे छाये बैसोनि साचारू ॥ मागे वरू गुरुभक्ती ॥ १२० ॥ सद्गुरु कामधेनु करी जाणा ॥ वत्सरूपें भावी आपणा ॥ आवडीं चाटवी बोधरसना ॥ स्वानंदपान्हा सेवित ॥ २१ ॥ तुझ्या सकळभक्तींची सेवा ॥ त्यांचि करावी 2गा देवा ॥ ऐसें प्रार्थूनि सद्भावा ॥ हा वरू मज द्यावा कृपानिधी ॥ २२ ॥ तेथ संतोषोनि गुरुनाथें ॥ वरू दीधला वरदहस्तें ॥ हर्षें वोसंडत चित्तें ॥ धन्य मी वरातें लाधलों ॥ २३ ॥ ऐशी लाहोनि वरदस्थिती ॥ तेचि सेवा आदरी प्रीतीं ॥ अतिधन्य भावार्थ गुरुभक्ती ॥ नाना उपपत्ती गुरुभजना ॥ २४॥ सद्गुरूचीं दहाही करणें ॥ मनबुध्यादि अंतःकरणें ॥ क्रियामात्र मीचि होणें ॥ ऐसें जीवें प्राणें भावित ॥ २५ ॥ सद्गुरु जो जो भोग भोगिती ॥ तो तो मीचि होईन निश्चितीं॥एवं मीचि एक गुरुभक्ती॥दुजी स्थिती हों नेदी ॥२६॥ सद्गुरु जेथें उभे ठाती ॥ ते पांयातळीं मीचि क्षिती ॥ सद्गुरु जेथें जेथें चालती ॥ ते मार्गींची माती मी होईन ॥ २७ ॥ चरणक्षालनासि समस्त ॥ मीचि उदक मीचि तस्त ॥ मीचि चरण क्षालित ॥ चरणतीर्थ मी सेवीं ॥ २८ ॥ सद्गुरुचरणींचे रजःकरण ॥ मीचि होईन आपण ॥ सद्गुरु करिती आरोहण ॥ तें सिंहासन होईन मी ॥ २९ ॥ सद्गुरूचें सिंहासन ॥ तें मीचि होईन आपण ॥ त्यावरी बैसतें आसन ॥ तेंही जाण होईन मी ॥ १३० ॥ सद्गुरूसि स्नेह लागे ॥ तें मी होईन सर्वांगें ॥ गुरूसि वोटंगोवया पुढें मागें ॥ मृदुळी सर्वांगें मी होईन ॥ ३१ ॥ मनींचा ऐसा आवांका ॥ सद्गुरूच्या सिद्ध पादुका ॥ त्या मी होईन देखा ॥ नेदीं आणिकां आतळों ॥ ३२ ॥ मी होईन गुरूच्या श्वासोच्छ्वासा ॥ वेगीं बाहेर निघेन नासा ॥ गुरु घेतील ज्या सुवासा ॥ त्या त्या विलासा मी होईन ॥ ३३ ॥ गुरु अवलोकिती कृपादृष्टीं ॥ त्या दृश्यांची मी होईन सृष्टी ॥ गुरूची 1देखती देखणीं पुष्टी ॥ ते मी उठाउठीं होईन ॥ ३४ ॥ गुरूसि आवडतें निरूपण ॥ तें मी श्रवणीं होईन श्रवण ॥ अथवा रुचेल जें कीर्त्तन ॥ तें

१ अभ्यास. २ चंद्राचे किरण. ३ ज्ञानरूप जीभ. ४ भुई. ५ टेंकण्यास. ६ गादी. ७ उत्कट इच्छा ८ नाकाबाहेर.

*ना. विसरला. ×ना. सुटे. +ना. कर्म धर्म. मो. स्वधर्म धर्म. ÷ना. गुरुभजनीं. *ना. निजतेजें. 2ना. गुरुदेवा. 1ना. देखतां.

गाता, गायन मी होईन ॥ ३५ ॥ सद्गुरुमुखींची जे जे कथा ॥ ते अक्षरें मी होईन तत्त्वतां ॥ अक्षरीं अक्षर अक्षरार्था ॥ मीचि सर्वथा होईन ॥ ३६॥ सद्गुरु जेथ करिती स्नान ॥ तें मी अंगस्पर्शनाचें जीवन ॥ गुरु करिती जें आचमन ॥ तेंही जाण होईन मी ॥ ३७ ॥ गुरु परिधान करिती वास ॥ तें मी होईन सुवास ॥ गुरुचरण पुसावयास ॥ तेंही *धौतवास मी होईन ॥ ३८ ॥ गुरुसि करिती विलेपन ॥ तें मी होईन शुद्ध चंदन ॥ चरणीं अर्पितें सुमन ॥ मीचि जाण होईन ॥ ३९ ॥ सद्गुरु करिती भोजन ॥ तेथ मीचि ताट मीचि अन्न ॥ रसस्वाद पक्वान्न ॥ पंक्तिकारु जाण मी होईन ॥ ४० ॥ मथोनियां +दहीं मथित ॥ सारांश तें नवनीत ॥ वैराग्य अग्निसंतप्त ॥ भोजनीं मुख्य घृत मी होईन ॥ ४१ ॥ परिपाकीं स्वादिष्टपण ॥ सर्वां चवींचें कारण ॥ मी होईन वरी लवण ॥ न्यून तें पूर्ण गुरु करिती ॥ ४२ ॥ गुरु करिती प्राशन ॥ तें मी होईन जीवन ॥ सद्गुरुचें धालेपण ॥ ते उद्गार जाण मी होईन ॥ ४३ ॥ गुरुसि जें जें गोड लागे ॥ ते ते पदार्थ मी होईन अंगें ॥ सद्गुरु ज्याची रुचि सांगे ॥ तें मी सर्वांगें होईन ॥ ४४ ॥ सद्गुरु आंचवती जेथ ॥ मी उष्णोदक, मी तप्त ॥ शितोडे लागती जेथ जेथ ॥ तेंही समस्त होईन मी ॥ ४५ ॥ गुरुसि अर्पिती जें फळ ॥ तें मी होईन तत्काळ ॥ गुरु अर्पणें सफळ फळ ॥ फळांचें फळ मी होईन ॥ ४६ ॥ सद्गुरुचें घ्यावया उच्छिष्ट ॥ मजाचि मोठा लवलवाट ॥ मांजर होऊनियां ताट ॥ चरचराट चाटीन मी ॥ ४७ ॥ गुरु करिती करोद्वर्तन ॥ तो मी होईन शुद्धचंदन ॥ मुखवासीं सुवासपण ॥ मीचि जाण होईन ॥ ४८ ॥ फळाशा फोडीनि फोडी ॥ वासनाशिरा काढूनियां विडी ॥ रिचोनियां सद्गुरुच्या तोंडीं ॥ तांबूलगोडी मी होईन ॥ ४९ ॥ जाळूनियां अहंकाठिणपणा ॥ मी होईन ❋शुद्ध चुना ॥ शांतिपरिपक्क लागोनि पाना ॥ सद्गुरुवदना पावेन ॥ ५० ॥ सर्वसारांचें ×शुद्धसार ॥ तो मी होईन खदिरसार ॥ सद्गुरुमुखीं रंगाकार ॥ मीचि साचार शोभेन ॥ ५१॥ सद्गुरुमुखींचें पवित्र पीक ॥ वरच्यावरी मी घेईन देख ॥ पिकदाणीचें मुख ॥ आवश्यक मी होईन ॥ ५२ ॥ गुरुचा उगाळ मी होईन ॥ पीक पिकदाणी घरोनि जाण ॥ चवरी जी मक्षिका निवारण ॥ तो मी होईन निजांगें ॥ ५३ ॥ गुरुचा उगाळ घ्यावया देख ॥ मी होईन आंगवला सेवक ॥ नानरीं लडिवाळ बाळक ॥ गुरुअंकीं देख मी होईन ॥ ५४ ॥ माझिया गुणांचीं सुमनमाळा ॥ आवडीं घालीन गुरुच्या गळां ॥ गुरु झेलिती लीलाकमळा ॥ त्या करकमळा मी होईन ॥ ५५ ॥ गुरुसी नीरांजन करिती ॥ तें मी निजतेजें उजळीन ज्योती ॥ गुरु जेणें प्रकाशें चालती ॥ ते दीपिका दीप्ति मी होईन ॥५६॥ जीवभावाचें निंबलोण ॥ गुरुसी मी करीन आपण ॥ इडापीडा मी घेईन जाण ॥ तें लोणलक्षण मज लागो ॥ ५७ ॥ मी छत्र मी छत्राकारु ॥ मी चवर, मीचि चवरधरु ॥ मीचि विंजणा, मी विंझणवारु ॥ गुरुचा परिवारु मी होईन ॥ ५८ ॥ गुरु करिती आरोहण ॥ तो मी होईन श्यामकर्ण ॥ गुरुचा भरभार साहावया जाण ॥ वाजीवाहन होईन मी ॥ ५९ ॥ गुरुपुढें मी वाट सुभट ॥ गुण वर्णनीं मी गर्जता भाट ॥ गुरुगृहीं शांतिपाठ ॥ पढता भट मी होईन ॥ ६० ॥ मीचि वेत्री

---

१ नेसतात. २ वस्त्र. ३ ढेंकर. ४ धार. ५ करशुद्धि सुवास. ६ अहंकाराचा कठिणपणा. ७ कात. ८ चावलेल्या विडा. ९ आरती. १० पंखा वारणारा. ११ नारा. १२ सुलक्षण घोडा. १३ छत्र धरणारा.

*ना. शुद्धवास. +ना. इदमित्थ्य मो. दधिमिथ्य. ❋ना. गाळीव. ×ना. सुसार.

मी केन्हेरीं ॥ मी हडपी मी फुलारी ॥ मी झाडणा मी खिल्लारी ॥ मी द्वारपाळ द्वारीं होईन ॥ ६१ ॥ गुरु जेथें देती अवधान ॥ ते ते कळा मी होईन जाण ॥ गुरुवेगळा अर्धक्षण ॥ गेला प्राण तरी नवचें ॥ ६२ ॥ गुरु सांगती जे जे कथा ॥ तेथ मी होईन सादर श्रोता ॥ गुरुकृपा मी होईन वक्ता ॥ निजात्मता बोलका ॥ ६३ ॥ गुरु गंभीर दान देत ॥ दीन मागतें मी होईन तेथ ॥ गुरूचें निजगुज समस्त ॥ करितां एकांत मी होईन ॥ ६४ ॥ गुरु बैसती सावकाश ॥ तो मी होईन अवकाश ॥ गुरुहृदयींचें चिदाकाश ॥ निरवकाश मी होईन ॥ ६५ ॥ गुरु बैसती आपण ॥ तें मी होईन सुखासन ॥ तें मीचि वाहेन आपण ॥ भोई होईन चालणा ॥ ६६ ॥ स्वामी सुनिया दिठी ॥ चपळ पाउलांच्या नेटीं ॥ चालेन मी उठाउठी ॥ धुरोंसि गोष्टी सांगत ॥ ६७ ॥ आंतुला दृष्टीं पुढिले चालीं ॥ गोंवींचें पाऊल उगवोनि चाली ॥ उंच नीच भूमीची खोली ॥ चुकवूनि चाली चालेन ॥ ६८ ॥ संकल्प विकल्पांचे झोंक ॥ ज्यांत वाम सव्य अनेक ॥ ते आंवरूनियां देख ॥ पाहात श्रीमुख चालेन मी ॥ ६९ ॥ न चुकतां निजमार्ग ॥ न हालतां धुरेचें अंग ॥ न करितां आणिकांचा पांग ॥ भोई चांग मी होईन ॥ १७० ॥ सुखासनाचेनि पडिपाडें ॥ चालतां सुख अधिक वाढे ॥ *मागील मृड काढूनि पुढें ॥ सुखसुरवाडें चालेन ॥ ७१ ॥ चढणें पडणें अडखळणें ॥ दडकणें फडकणें अडकणें ॥ सांभाळूनियां +निष्ठेनें ॥ टणकपणें चालेन ॥ ७२ ॥ उरीं, शिरीं, खांदीं, कोंपरीं ॥ 8मागील मृड पुढें करीं ॥ दृष्टी ठेऊनि पायांवरी ॥ निर्विकारीं चालेन ॥ ७३ ॥ आटी, मुरडी, 5उलट, लोट ॥ धांपकांप, पडे मेटें ॥ आधार न धरूनि सुभट ॥ चढती वाट चालेन ॥ ७४ ॥ उल्लंघूनि कामाचा पाट ॥ आंवरूनि क्रोधाचा लोट ॥ चुकवूनि लोभाच्याची वाट ॥ धुरेसकट मी चालेन ॥ ७५ ॥ ममतेची ओल प्रबळ ॥ तेठायीं रुती गुंती सबळ ॥ तेथ न माखतां पाऊल ॥ लंघूनि तत्काळ जाईन ॥ ७६ ॥ मोहनदीची थोर कैंडाडी ॥ माजीं समळ जळ प्रबळ वोढी ॥ शिंतोडा न लगतां धूर मी काढीं ॥ *परापरथडी तत्काळ ॥ ७७ ॥ दृष्टी ठेवूनि स्वामीकडे ॥ सवेग मी चालतां पुढें ॥ भोई होईन दोहींकडे ॥ मृड 3सुडें काढीन ॥ ७८ ॥ एवं मीचि मार्गें पुढें ॥ सुखासनाचेनि सुरवाडें ॥ स्वामीची निजनिद्रा न मोडे ॥ तेणें पडिपाडें वाहेन ॥७९॥ उच्छिष्टअन्नाचा पोसणा ॥ आठांप्रहरांचा जागणा ॥ सदा ‘ गुरु गुरु ’ ×करीत जाणा ॥ गुरुद्वारीं सुणा मी होईन ॥१८०॥ विजाती देखोनि नयना ॥ सोहंभावें भुंकेन जाणा ॥ 7भजनथोंळोरां बैसणा ॥ गुरुदारीं सुणा मी होईन ॥ ८१ ॥ ऐसऐशिया भावना ॥ गुरुसेवेलागीं जाणा ॥ अतिशयें आवडी मना ॥ नानाविवंचना विवंची ॥ ८२ ॥ जरी दैववशें दूर गेला ॥ परी तो भावबळें जवळी आला ॥ गुरुसेवेसी जो जीवें विकला ॥ तो शत्र पावला सद्विद्या ॥ ८३ ॥ असो जवळी अथवा दूरी ॥ परी गुरुभक्तीची आवडी भारी ॥ जीवित्व ठेविलें सेवेवरी ॥ गुरूच्या द्वारीं भजनासी ॥ ८४ ॥ ऐसा गुरुभक्तीसि सादर ॥ चढत्या आवडीं एकाग्र ॥ तोचि

---

१ चवरी धरणार. २ विडे देणारा. ३ गुरें राखणारा. ४ चांगला चालणारा. ५ गुंतीचें. ६ गुरूचें तोंड. ७ अपेक्षा. ८ उमेदीनें. ९ उशी. १० मेट बसणें. ११ धार, दरड. १२ थारलें, खांच. १३ कुत्रा.

*ना. मागील झाडा काढूनी पुढें. +ना. निष्टपणें. मो. निष्टणें. 8ना. मागा चट पुढा धरी. मो. मागील पाऊल पुढें धरी. 5ना. अलोट. *ना. परात्पर. 3ना. पुढें. ×ना. करितां. 7ना. थारोळा.

सद्विद्यालक्षण शस्त्र ॥ गुरुकृपाकुठार पैं पावे ॥ ८५ ॥ लावोनि वैराग्याचें साहाणें ॥ प्रत्यावृत्ती शोधसोहंपणें ॥ शस्त्र केलें जी सणाणें ॥ तीक्ष्णपणें अतिसज्ज ॥ ८६ ॥ शस्त्र सज्जिलें निजदृष्टीं ॥ दृढ धरिलें ऐक्याचे मुष्टीं ॥ शस्त्र आणि शस्त्रधरा एकी गांठी ॥ करूनि उठी भवच्छेदा ॥ ८७ ॥ दृढ साधोनियां आवो ॥ निजबळें घालितां घावो ॥ झाला भववृक्षाचा अभावो ॥ घायेंवीण पहाहो छेदिला ॥ ८८ ॥ जिवाशयाची वासना ॥ ते छेदावी निजकल्पना ॥ तोचि भववृक्षाचा छेद जाणा ॥ सावधाना चिद्वृत्ती ॥ ८९ ॥ झालिया चैतन्यपदप्राप्ती ॥ सकळ साधनें सहजें जाती ॥ भोजनीं झालिया पूर्ण तृप्ती ॥ ठायींच राहती पक्वान्नें ॥ ९० ॥ परमतृप्ती उल्लंघल्या पोटीं ॥ अमृतही न लावी ओंठीं ॥ तेवीं ब्रह्मपद पावल्यापाठीं ॥ साधन आटाटी सांडाव्या ॥ ९१ ॥ हाचि भावो धरोनि चित्तीं ॥ मागां सांगितलें तुजप्रती ॥ सांडी साधनव्युत्पत्ती ॥ प्रवृत्तिनिवृत्तीसमवेत ॥ ९२ ॥ पावलिया परब्रह्म ॥ मिथ्या वेदोक्त सकळ कर्म ॥ मिथ्या आश्रमादि वर्णधर्म ॥ हें त्यागितें वर्म कर्माचें ॥ ९३ ॥ स्वप्नीं चालतां खवंदसवदीं ॥ जो अडखळूनि पडला आडीं ॥ तो जागा होऊनि आपणातें काढी ॥ तैशी वृथा वोढी साधना ॥ ९४ ॥ पीक आलिया घुमरी ॥ ते शेतीं कोणी नांगर न धरी ॥ गजांतलक्ष्मी आलिया घरीं ॥ भीक दारोदारीं कोण मागे ॥ ९५ ॥ हातीं लागलिया निधान ॥ नयनीं कोण घाली अंजन ॥ साधलिया निजात्मज्ञान ॥ वृथा साधन कोण सोशी ॥ ९६ ॥ अंगीकारोनि ज्ञानशक्ती ॥ केलीया संसारनिवृत्ती ॥ तेही त्यागावी निजवृत्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९७ ॥ अग्निस्तव निपजे अन्न ॥ तें वाफ न जिरतां परमान्न ॥ पोळी अवशेष तापलेपण ॥ रांधिलेंही जाण चवी नेणे ॥ ९८ ॥ आंबया पाड लागला जाण ॥ तरी अंगीं असे आम्लपण ॥ सेजेसि मुगालिया मवमवीन ॥ न चाखतां घ्राण चवी मागे ॥ ९९ ॥ सेजे मुरल्याची गोठी ॥ तेथ न व्हावी द्वैताची दिठी ॥ येरयेरां जाहलिया भेटी ॥ दोनी शेवटीं ठिगळती ॥ १०० ॥ ठिगाळलीं सेजे घालिती ॥ तत्संगें आणिकें नासती ॥ निश्चळ राहिल्या एकांतीं ॥ परिपाकपूर्ती घ्राण मागे ॥ १ ॥ शत्रु जिणोनियां कडाडी ॥ रणांगणीं उभवितां गुढी ॥ शस्त्रेंसि कवच जंव न फेडी ॥ तंव विश्रांति गाढी न पाविजे ॥ २ ॥ गरोदरेसि प्रसूति होये ॥ पुत्रजन्में सुखावली ठाये ॥ तेही बारांबिळी जें पाहे ॥ तें भोगू लाहे पुत्रसुख ॥ ३ ॥ पुरुष निमोनियां जाये ॥ त्या देहांचें दहन होये ॥ तरी अवशेष सूतक राहे ॥ तें गेलिया होये निजशुद्धी ॥ ४ ॥ तेवीं जावोनियां अज्ञान ॥ उरला जो ज्ञानाभिमान ॥ तोही त्यागिलिया जाण ॥ चित्समाधान स्वानंदें ॥ ५ ॥ खैराचा शूळ तरवतां मारी ॥ मा चंदनाचा काय आन करी ॥ तेवीं अभिमान दोहींपरी ॥ बाधकता धरी ज्ञानाज्ञानें ॥ ६ ॥ लोखंडाची बेडी तोडी ॥ मा आवडी सोनियाची *जोडी ॥ चालतां तेही तैशीच आडी ॥ बाधा रोकडी जैशी तैशी ॥ ७ ॥ ब्रह्माहमस्मि हा अभिमान ॥ शुद्ध ब्रह्म नव्हे जाण ॥ अहंपणें तोही कठिण ॥ तेंही लक्षण अवधारीं ॥ ८ ॥ जळापासोनि लवण होये ॥ तें जळींचें जळीं विरोनि जाये ॥ मोतीं झालें तें कठिण पाहे ॥ उदकीं न जाये विरोनी ॥ ९ ॥

---

१ कुऱ्हाड. २ चांगलें धार लावलेलें. ३ संसारनाशाकरितां. ४ उपजल्यावर. ५ आपोआप, जोराचें. ६ भाजतें. ७ अढीत. ८ डागळतात. ९ डागळलेलीं अढीत घातलीं तर. १० बाराव्या दिवसाचा एक विधि.

*ना. जडी.

मुक्तपणें मोला चढलें ॥ तें वनितेअधरीं फांसा पडिलें ॥ मुक्ताचि परी नासा आलें ॥ कठिण केलें अभिमानें ॥६१०॥ तेवीं अज्ञान अभिमान आहे ॥ तो सर्वथा तत्काळ जाये ॥ ज्ञानाभिमान कठिण पाहे ॥ गोंविताहे मुक्तत्वें ॥११॥ अपक्क घट तत्काळ गळे ॥तो पृथ्वीचा पृथ्वीस मिळे ॥ भाजिलें खापर तें अतिकाळें ॥ पृथ्वीस न मिळे कठिणत्वें ॥ १२ ॥ प्रपंच अज्ञानें झाला काटा ॥ ज्ञान अज्ञानाचा सत्ववाटा ॥ फेडूनि कांटेन कांटा ॥ दोनी आव्हाटा सांडावे ॥ १३ ॥ जरी सांडिले वाटेवरी ॥ तरी अवचटें आपणासीचि बाधु करी ॥ यालागीं सांडावे दुरी ॥ निजनिर्धारीं हा त्याग ॥१४॥ जेथवरी अहंपण ॥ तितुकेंही बाधक जाण ॥ शुद्धाशुद्ध अभिमान ॥ निःशेष सज्ञान सांडिती ॥ १५ ॥ उद्धवा तुज करितां माझी भक्ती ॥ झाली माझ्या निज पदाची प्राप्ती ॥ आतां नानासाधन उत्पत्ती ॥ शास्त्रव्युत्पत्ती कां करिसी ॥१६॥ सद्भावें करितां माझें भजन ॥ तूं झालासि ब्रह्मसंपन्न ॥ आतां सद्विद्यादि सर्वसाधन ॥ शास्त्रश्रवणेंसी सांडीपां ॥ १७ ॥ तस्मादुद्धव उत्सृज्य ॥ ये श्लोकींचें हें त्यागबीज ॥ विशद सांगीतलें म्यां तुज ॥ निजगुज हृदयस्था ॥ १८ ॥ सकळां साधनां श्रेष्ठ साधन ॥ शिष्यासि सद्गुरूचें भजन ॥ तेणें पाविजे ब्रह्मसमाधान ॥ सत्य जाण उद्धवा ॥ १९ ॥ जो भावें भजे गुरुभजनीं ॥ तो नांदे सच्चिदानंद भुवनीं ॥ हे सत्यसत्य माझी वाणी ॥ विकल्प कोणीं न धरावा ॥६२०॥ ऐसें बोलोनि श्रीहरी ॥ आवडीं चारी बाह्या पसरी ॥ उद्धवातें प्रीति करीं ॥ हृदयीं धरी स्वानंदें ॥२१॥ देवें सद्भक्ता *क्षेम दीधलें ॥ निजहृदयीं हृदय एक झालें ॥ मागणें पुसणें सहज ठेलें ॥ बोलणें बोलें प्राशिलें ॥२२॥ चहूं वाचां पडलें मौन ॥ जीव विसरला जीवपण ॥ एका तुष्टला जनार्दन ॥ स्वानंदघन सद्भक्तां ॥ २३ ॥ तोचि **सद्भक्तीचा भावार्थ ॥ विशद बोलिला बाराव्यांत ॥ निजभावें श्रीकृष्णनाथ ॥ नित्य प्राप्त भाविकां ॥ २४ ॥ निजात्मप्राप्तीचें कारण ॥ केवळ भावार्थचि जाण ॥ भावार्थावेगळें साधन ॥ वृथा जाण परिश्रम ॥ २५ ॥ जप तप यज्ञ दानें ॥ भावार्था लागीं करणें ॥ तो भावार्थ लाहिजे जेणें ॥ धन्य जिणें तयाचें ॥ २६ ॥ धन्य नरदेहाची प्राप्ती ॥ धन्य साधूची संगती ॥ धन्यधन्य ते भावार्थी ॥ जे भगवद्भक्तीं रंगले ॥ २७ ॥ जे रंगले भगवत्पथा ॥ त्यांचें चित्त विसरलें विषयावस्था ॥ ते हंसगीताची कथा ॥ उद्धव कृष्णनाथा पुसेल ॥ २८ ॥ तें अतिरसाळ निरूपण ॥ केवळ शुद्ध ब्रह्मज्ञान ॥ ×श्रोतां व्हावें सावधान ॥ एका जनार्दन विनवितू ॥६२९॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ मूळश्लोक ॥ २४ ॥ ओंव्या ॥ ६२९ ॥ मिळून एकंदर संख्या ॥ ६५३ ॥ ॥ ॥

---

# अध्याय तेरावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐनमो जी अनादि हंसा ॥ हंसरूपा जी जगदीशा ॥ तूं सद्गुरु परमहंसा ॥ परमपरेशा परिपूर्णा ॥ १ ॥ उभयपक्षेंवीण देव ॥ तुझे शोभती दोनी

१ स्त्रियाच्या ओठांवर. २ नाकात, नाशास. ३ कच्चें मडकें. ४ फार दिवसांनीही. ५ हात. ६ उद्धवास. ७ क्षेमालिंगन.

*ना. खेव. **ना. भक्ताचा भावार्थ. ×श्रोतां यावें अवधान.

पांख ॥ *शुद्ध सत्व होऊनि चोख ॥ स्वरूप सुरेख सोज्ज्वळ ॥२॥ हंस +बोलिजे शुभ्रवर्ण ॥ तुझी हंसता विलक्षण ॥ सांडोनियां सकळ वर्ण ॥ हंसपण तुज शोभे ॥ ३ ॥ विकासल्या सुवर्णपंकजें ॥ इतर हंसीं तेथें क्रीडिजे ॥प्रेमें उत्फुल्लित कमळ जें ॥ तुवां क्रीडिजे तेठायीं ॥४॥ मानससरोवरीं वस्ती हंसासी ॥ तूं मानसातीत राहिवासी ॥ हंसा ²उत्पतनें आकाशीं ॥ तुझें चिदाकाशीं उड्डाण ॥ ५ ॥ ‡विवेकचुंचीचिया महा मुद्रा ॥ स्वभावें निवडिसी क्षीरनीरां ॥ ³मग सांडोनियां असारा ॥ शुद्ध सारा सेविसी ॥ ६ ॥ ऐशिया हंसा जी सकुमरा ॥ मुक्त-मोतियांचा तुज चारा ॥ जीकां वैराग्यशुक्तिद्वारा ॥ चित्सागरामाजीं झालीं ॥ ७ ॥ सर्वथा नातळोनि क्षितीं ॥ निरालंब मार्गाप्रती ॥ चालणें चालसी हंसगती ॥ हे गमनशक्ती अभि-नव ॥ ८ ॥ ×अभिनवस्वभावतां निज अंशीं ॥ चिन्मात्रवागीश्वरी तूं वाहसी ॥ हंसवाहिनी आख्या ऐशी ॥ तुझेनि अंशेंसी तीस झाली ॥ ९ ॥ तुझेनि चालविल्या सरस्वती चाले ॥ तुवां बोलविल्या वेद बोले ॥ तुवां चेतविल्या प्राण हाले ॥ तुझेनि वाचाळें वाग्देवी वदे ॥१०॥ झाली वागीश्वरी वाग्देवता ॥ तियेसी तुझेनि वाचाळता ॥ जैसी कां वेणु वाजे मधुरता ॥ परी वाजविता तो भिन्न ॥ ११ ॥ एवं वाच्य वचन वक्ता ॥ तूंचि वागीश्वरी तूंचि वदता ॥ आपु-ल्या हंसरूपाची कथा ॥ स्वभावतां बोलसी ॥ १२ ॥ ⁷बोलावया महाकवीच्याठायीं ॥ तुवां वागीश्वरी घोलिली पाहीं ॥ ते हंसरूपाची नवाई ॥ अभिनव कांहीं बोलवी ॥ १३ ॥ तो तूं सर्वभूतीं समान ॥ हंसस्वरूपी जनार्दन॥त्याचे वंदितां ⁰निजचरण ॥जन्ममरण पळालें ॥१४॥ आपभयें पळतां त्यांसी ॥ रूपणी मिळाली श्रमापाशीं ॥जन्मामागें मरणासी ॥ठाव वसतीसी दीधला ॥ १५ ॥ यालागीं श्रमामाजीं जो पडला ॥ तो जन्ममरणांसि आतुडला ॥ मग न सुटे कांहीं केल्या ॥ यंत्रीं पडला भवचक्रीं ॥ १६ ॥ तेथ राहाटमाळेच्यापरी ॥ जन्ममरणांचे पडे यंत्रीं ॥ एकाची सोंडी भरोवरी ॥ तंव दुसरें शिरीं आदळे ॥ १७ ॥ तें निस्तरावया जन्ममरण ॥ तुज सोऽहंहंसाचें स्मरण ॥ जो कां करी सावधान ॥ श्रममोचन तें होय ॥ १८ ॥ तो तूं परमात्मा परमहंस ॥ ¹परब्रह्मैक पूर्ण परेश ॥ ब्रह्मपुत्रांसि उपदेश ॥ करावया हंस झालासी ॥ १९ ॥ तें हंसमुखींचें निरूपण ॥ बोलावया बोलका श्रीशुक जाण ॥ त्या *वच-नार्था सेवून ॥ परमपावन परीक्षिती ॥ २० ॥ त्या हंसाचें हंसगीत ॥ कृष्ण उद्धवासि सांगत ॥ श्रोतां ⁹ध्यावें दत्तचित्त ॥ अचुंबित निजबोध ॥ २१ ॥ तो हा तेरावा अध्यावो ॥ अत्यादरें ⁰सांगे देवो ॥ तें ऐकतां उद्धवो ॥ विषयविलयो देखेल ॥ २२ ॥ तेराव्या अध्यायीं निरूपण ॥ सत्ववृद्धीचें कारण ॥ विद्या उद्धवकस्तू जाण ॥ अतिसुलक्षण सोपारा ॥ २३ ॥ हंसइतिहासा-चा योग ॥ स्वयें सांगेल श्रीरंग ॥ तेणें चित्तासि विषयवियोग ॥ सुगम सांगें सांगेल ॥ २४ ॥ द्वादशाध्यायाचे अंतीं ॥ करूनि सद्गुरूची भक्ती ॥ पावोनि विद्याकुठारप्राप्ती ॥ छेदावया

---

१ मनरूपमानसापलीकडे रहाणारा. २ उड्डाण. ३ चैतन्यरूप आकाशांत. ४ वैराग्यरूपशिंपल्याद्वारा. ५ प्रकाशित केली. ६ जन्ममरणास. ७ आश्रय. ८ श्रम. ९ सनत्कुमारांस. १० विषयाचा नाश. ११ संपूर्ण. १२ विद्यारूपी कुऱ्हाड.

*ना. शुद्ध सत्वाचा होउनी चोख. +ना. म्हणिजे. ²ना. मो. उत्पवन. ‡मो. चंचूचिया. ³ना. मागें सारोनिया. ×ना. अभिनव स्वभावता निजहंसीं. ⁷ना. बोलल्या. ⁰ना. श्रीचरण. ¹ना. परब्रह्मैक्य. *ना. वचार्था. ⁹ना. व्हावें. ⁰ना. सांगेल.

निश्चितीं जीवाश्रयो ॥ २५ ॥ छेदिल्या जीवाचें जीवपण ॥ सकळ सांडावें साधन ॥ हें उद्धवें ऐकूनि जाण ॥ प्रतिवचन नेदीच ॥ २६॥ उद्धवाचे जीवींचा भावो ॥ सखोल हृदयींचा अभिप्रावो ॥ सकळ आकळोनियां सद्भावो ॥ स्वयें श्रीकृष्णदेवो बोलत ॥ २७ ॥ ह्मणसी लागोनि सत्र त्रिगुण ॥ जीवासि आलें जीवपण ॥ ते अंगीं असतां तिनी गुण ॥ सद्विद्या जाण उपजेना ॥ २८ ॥ तोंडींचा खिळ नव्हतां दुरी ॥ नारेळजळ न चढे करीं ॥ तेवीं गुण नवचतां निर्धारीं ॥ विद्या केशापरी उपजेल ॥ २९ ॥ ऐसा आशंकेचा भावो ॥ जाणोनियां श्रीवासुदेवो ॥ तिहीं श्लोकीं तो पहाहो ॥ गूढाभिप्रावो निरसितू ॥ ३० ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ सत्वं रजस्तम इति गुणा बुद्धेर्न चाऽऽत्मनः ॥
सत्वेनान्यतमौ हन्यात्सत्वं सत्वेन चैव हि ॥ १ ॥

॥ टीका ॥ ॥ सत्वरजतमादि गुण ॥ निश्चयेंसि मायेचे जाण ॥ हें द्वादशाध्यायीं निरूपण ॥ तुज म्यां संपूर्ण सांगीतलें ॥ ३१ ॥ सद, चिद, आनंद, जो येथ ॥ आत्मेनसि अभिन्न नित्य ॥ तैसे गुण नव्हती समस्त ॥ ते प्राकृत प्रकृतिकार्य ॥ ३२ ॥ जें सद तेंचि चिद ॥ जें चिद तोचि आनंद ॥ स्वरूपीं नाहीं त्रिविध भेद ॥ ते एकवंद सच्चिदानंद ॥ ३३ ॥ जेवीं श्वेतता, मृदु, मधुर, ॥ त्रिविध भेदें एक साखर ॥ तेवीं सच्चिदानंद अविकार ॥ वस्तु साचार *एकविध ॥ ३४ ॥ प्रकृती गुणांतें उपजविती ॥ गुणास्तव सबळ प्रकृती ॥ गुणासि आत्म्यासि संगती ॥ न घडे कल्पांतीं उद्धवा ॥ ३५ ॥ येथ विद्याउत्पत्तिलक्षण ॥ स्वयें सांगे नारायण ॥ करूनि गुणें +गुणांचें मर्दन ॥ सद्विद्या जाण साधावी ॥ ३६ ॥ सत्व वाढवून घुरवाडें ॥ जें रज तम निःशेष ×झडे ॥ तें सद्विद्या हातां चढे ॥ सत्वाची वाढी मोडे निजसत्वें करूनी॥३७॥ ‘ सर्पु लागला होय ज्यासी ॥ विष खादल्या उतार त्यासी ॥तें विष खातां येरे दिवशीं ॥ आत्मघातासी वाढवी ’ ॥ ३८ ॥ तैसें रजतमलोपें सत्व वाढे ॥ वाढलें सत्व बाधकत्वें कुडें ॥ तेही बाधा मी तुजपुढें ॥ अतिनिवाडें सांगेन ॥ ३९ ॥ मी अलिप्त कर्मकार्या ॥ मी ज्ञाता मी महासुखिया ॥ ऐशा वाढवूनि अभिप्राया ॥ गुणें गुणकार्या गोंविजे सत्वें ॥ ४० ॥ ऐसा वाढला जो सत्वगुण ॥ त्यासि उपशमात्मक सत्वें जाण ॥ समूळ करावें निर्दळण ॥ तें समाधान पाविजे ॥ ४१ ॥ उद्धवा तूं ऐसें ह्मणसी ॥ समानता तिहीं गुणांसी ॥ केवीं वाढी होईल सत्वासी ॥ गुण गुणांसी राखण ॥ ४२ ॥ वाढल्या तमोगुण ॥ नावडे तेव्हां ज्ञान ध्यान ॥ नावडे त्याग भोग चंदन ॥ निद्रा दारुण कां कलहो ॥ ४३ ॥ वाढल्या रजोगुण ॥ ऐकतां ज्ञाननिरूपण ॥ त्याचें भोगासक्त मन ॥ सदा ध्यान विषयाचें ॥ ४४ ॥ धनलोभ सुटल्या दिठी ॥ पापरा घेतल्या क्रोध उठी ॥ हे रजोगुणाची कोटी ॥ लोभिष्ठ पोटीं स्त्रीपुत्रां ॥४५॥ वाढलिया सत्वगुण ॥ क्रियादिभोगीं उदासीन ॥ सदा करी भगवच्चिंतन ॥ कां करी कीर्तन हरिभक्ती ॥ ४६ ॥ क्रोधलोभमोहलक्षण ॥ सत्वकाळीं नुठती जाण ॥ परी एकला केवीं वाढे सत्वगुण ॥ गुणांसि राखण गुण होती ॥ ४७ ॥ मागें तम पुढें रज पूर्ण ॥ मध्यें अडकला सत्वगुण ॥ तो

१ ब्रह्मरूपीं. २ एकवट. ३ पांढरेपणा. ४ शांतिरूप. ५ लाथा.

*ना. एकवद. +ना. गुणागुणाचें उपमर्दन. ×ना. तळीं पडे.

कैसेनि वाढेल जाण ॥ अडकलेपण *सुटेना ॥४८॥ ऐसी आशंका धरूनि जाण ॥ ह्मणसी वाढेना सत्वगुण ॥ तें सत्व +वृद्धीचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण सांगेन ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ सत्त्वाद्धर्मो भवेद्वृद्धात्पुंसो मद्भक्तिलक्षणः ॥ सात्त्विकोपासया सत्त्वं ततो धर्मः प्रवर्तते ॥ २ ॥

॥ टीका ॥ ये श्लोकींचें निरूपण ॥ पहिलें उत्तरार्धव्याख्यान ॥ तेथें सत्ववृद्धीचें कारण ॥ सात्विक सेवन करावें ॥ ५० ॥ सात्विक पदार्थ सेवितां ॥ सत्ववृद्धि होय सर्वथा ॥ सत्वविजयें वर्ततां ॥ पवित्रता जीवासी ॥ ५१ ॥ सत्वउत्कर्षाचें लक्षण ॥ धर्मनिष्ठ स्वधर्माचरण ॥ तेंसें तेथील वासनाबंधन ॥ इहामुत्र जाण बांधीना ॥ ५२ ॥ झालिया शुद्ध अंतःकरण ॥ तेव्हां निःसीम वाढे सत्वगुण ॥ पुरुषासि मद्भक्तिलक्षण ॥ धर्म जाण उपतिष्ठे ॥ ५३ ॥ सत्व वाढल्या धर्मप्रवृत्ती ॥ तें गुरुभजनीं अतिप्रीती ॥ कां सत्वविग्रहीं माझी मूर्ती ॥ तेठायीं भक्ती उल्हासे ॥ ५४ ॥ कायिक वाचिक मानसिक ॥ मदर्पण करी स्वाभाविक ॥ मजवेगळा आणिक ॥ भावार्थ देव स्फुरेना ॥ ५५ ॥ गुरु भगवंत अभिन्न ॥ हें तेकाळीं प्रकटे चिन्ह ॥ ते अतिसत्वाची वोळखण ॥ हा धर्म पूर्ण सात्विक ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ धर्मो रजस्तमो हन्यात् सत्ववृद्धिरनुत्तमः ॥ आशु नश्यति तन्मूलो ह्यधर्म उभये हते ॥ ३ ॥

॥ टीका ॥ ऐसा वाढलिया सात्विक धर्म ॥ तें सत्ववृत्ति सर्वोत्तम ॥ जे सत्वीं प्रकटे पुरुषोत्तम ॥ विश्रामधाम मुमुक्षां ॥ ५७ ॥ एवं सत्ववृत्तीं वाढल्या धर्म ॥ तो तत्काळ नाशी अधर्म ॥ अधर्माचें मूळ रजतम ॥ त्यांचें रूपनाम उरोंनेदी ॥ ५८ ॥ सात्विकसेवनें सत्ववृद्धी ॥ तेणें सद्विद्येची उपलब्धी ॥ हे उपायाची विधानविधी ॥ कृष्ण कृपानिधी बोलिला ॥ ५९ ॥ करावें सात्विकसेवन॥ते सात्विक पदार्थ कोण कोण॥ऐक त्यांचेंही निरूपण॥दशलक्षण सांगेन॥६०॥

॥ श्लोक ॥ आगमोऽपः प्रजा देशः कालः कर्म च जन्म च ॥ ध्यानं मंत्रोऽथ संस्कारो दशैते गुणहेतवः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ गुणवृद्धीचें कारण ॥ आगम ह्मणिजे शास्त्र जाण ॥ आप ह्मणिजे तें जीवन ॥ आवडे स्थान तो देश ॥६१॥ ऐक प्रजांचें विंदान ॥ प्रजा ह्मणिजे [१]त्रिविधजन ॥ जैशी ज्याची संगती जाण ॥ तैसें लक्षण तो पावे ॥ ६२ ॥ काळ ह्मणिजे दिवसभाग ॥ कर्म ह्मणिजे जें जें [२]करी अंग ॥ जन्म ह्मणिजे दीक्षा ‡मांग ॥ मंत्राचें लिंग यथारूची ॥ ६३ ॥ ⁑कर्त्याचा जेथ अत्यादरु ॥ त्या नांव बोलिजे संस्कारु ॥ हा दशलक्षण प्रकारु ॥ गुणवृद्धि विचारु तो ऐक ॥ ६४ ॥ येथ सत्ववृद्धीसी प्रस्तुत ॥ साधकांसि शास्त्र [४]निवृत्त ॥ उपनिषद्भागेंसि वेदांत ॥ त्याचा मथितार्थ सेवावा ॥ ६५ ॥ आप ह्मणिजे जळपवित्रता ॥ गौतमीभागीरथ्यादि पुण्यसरिता ॥ ज्यांचा अवचटें शितोडा लागतां ॥ पाप सर्वथा उरेना ॥ ६६ ॥ कां माझ्या प्रति-

१ सत्वगुणाच्या वाढण्यानें. २ या आणि परलोकांत. ३ अंग ( जें ) करी=देहापासून जें घडतें तें. ४ निवृत्तिशास्त्र वेदांत.

*ना. सबंध. +ना. सत्ववृद्धीचें. ‡ना. चांग. ⁑ना. कर्माचा.

मांचें चरणामृत ॥ ज्यालागीं ब्रह्मादिक आर्तभूत ॥ किंवा शालग्रामशिळेचें तीर्थ ॥ सकळ दुरित निवारी ॥ ६७ ॥ जेणें सकळ तीर्थें होती पावन ॥ तें ब्राह्मणाचें चरणतीर्थ जाण ॥ स्वयें वंदी श्रीनारायण ॥ निजहृदयीं चरण वाहतसे ॥ ६८ ॥ भलतैसें होकां पाणी ॥ जें लागलें सद्गुरुचरणीं ॥ तें सकळतीर्थां शिरोमणी ॥ सेवितां तत्क्षणीं उद्धरी ॥ ६९ ॥ सत्त्ववृद्धीचें कारण आप॥ *तें इये तीर्थें जाण पुण्यरूप ॥सेवितां सत्त्ववृद्धीचें स्वरूप ॥ आपेआप प्रकाशे ॥ ७० ॥ प्रजा ह्मणिजे महाजन ॥ सेवावे +साधुसज्जन ॥ ज्यांचे संगतीस्तव जाण ॥ उद्धरण जडजीवां ॥ ७१ ॥ सत्त्ववृद्धीसी कारण ॥ मुख्यत्वें सत्संगतीचि जाण ॥ त्या सत्संगाचें महिमान ॥ केलें निरूपण द्वादशीं ॥ ७२ ॥ देश पुण्यभूमिका सिद्धिस्थळ ॥ विजनवास एकांतशीळ ॥ जेथ बैसतांचि तत्काळ ॥ सत्त्वासि बळ चढोवढीं ॥ ७३ ॥ एकांतीं स्थिरावल्या आसन ॥ सहजें वाढे सत्त्वगुण ॥ मनीं हव्यास चढतां जाण ॥वस्तु चिद्घन साधावया ॥७४॥ साधकांसि काळ यथोचित ॥ अवश्य ब्राह्ममुहूर्त ॥ कां जे काळीं उद्वेगरहित ॥ हर्षयुक्त मन ×होय ॥ ७५ ॥ प्रेमयुक्तअंतःकरणें ॥ जो काळ जाय कथाश्रवणें ॥ कां जयंत्यादिमहापूजा करणें ॥ जागरणें हरिदिनीं ॥ ७६ ॥ थोर काळाची सार्थकता ॥ हरिकीर्तनीं गातां नाचतां ॥ त्या काळाचा महिमा तत्त्वतां ॥ माझेन सर्वथा न बोलवे ॥ ७७ ॥ निरभिमान कीर्तन करणें ॥ निर्लोभ गाणें नाचणें ॥ तो काळ वंदिजे म्यां श्रीकृष्णें ॥ महिमा कोणें बोलावा ॥ ७८ ॥ कर्म ह्मणिजे तें निवृत्त ॥ जें आशापाशफळरहित ॥ कां क्रिया जे उपकारार्थ ॥ सात्त्विकनिश्चित तें कर्म ॥ ७९ ॥ गुरूपासोनि दीक्षाग्रहण ॥ २तो पुरुपासि नवा जन्म जाण ॥ गुरु मायबाप संपूर्ण ॥ तें ऐक लक्षण उद्धवा ॥ ८० ॥ उपजलिया बाळकासि तत्त्वतां ॥ पंचविध जाण पिता ॥ जनिता आणि उपनिता ॥ तिजा प्रतिपाळिता अन्नदानें ॥ ८१ ॥ जो भयापासूनि सोडविता ॥ जो बंदिविमोचन करविता ॥ जो देहाचें मरण चुकविता ॥ तोही पिता शास्त्रार्थें ॥ ८२ ॥ या वेगळा पांचवा पिता ॥ जो झाडणी करी पंचभूतां ॥ मृत्यूपासून सोडविता ॥ जो गर्भव्यथा निवारी ॥८३॥ ज्याचे देखिलिया चरण ॥ बाधूं न शके ३भवबंधन ॥ ४तो सद्गुरु पिता जाण ॥ भाग्येंवीण न पाविजे ॥८४॥उपजल्या बाळासि सर्वथा ॥ वेगळाली माता पिता ॥ एक वीर्यातें निक्षेपिता ॥धारणा पोषणता जननीची ॥८५॥ तैसा सद्गुरु नव्हे पिता॥ निजवीर्य न वेंचितां॥योनिद्वारें नुपजवितां॥जननी जनिता स्वयें झाला ॥८६॥उदराबाहेर निघाल्यासाठीं ॥ माता पुत्रस्नेहें कळवळा उठी ॥बाहेरिले सूनि आपुल्या पोटीं ॥ निजस्नेहें गोमटी गुरुमाता ॥ ८७ ॥ यालागीं शिष्यासि तत्त्वतां ॥ सद्गुरूचि माता पिता ॥ निजस्नेहें वाढविता ॥ तदात्मता अभेदें ॥८८॥ मागील पिते जे चौघेजण ॥ ते याचे सावत्र बाप जाण ॥ माता पिता भिन्न भिन्न ॥ सखेपण त्यां कैचें ॥ ८९ ॥ यालागीं सद्गुरु जो सकृपू ॥ तो सच्छिष्यासि सखा बापू ॥ पित्यापुत्रांमाजीं अल्पू ॥ कांहीं विकल्पू उपजेना ॥ ९० ॥ त्या सद्गुरूपासून जाण ॥ शैवीवैष्णवीदीक्षाग्रहण ॥ अथवा उपदेशी निर्गुण ॥ चैतन्यघन निजबो-

१ पवित्र स्थळें. २ निर्जन प्रदेशांत राहणें. ३ पंचपंच उषः काल. ४ उपदेश घेणें. ५ जनक पिता. ६ उपनयन करणारा. ७ गर्भास धारण करणें व पोसणें. ८ घालून, ठेवून. ९ उपनेता प्रभृति.

*ना. तेथें तीर्थें जाण पुण्यरूप. +ना. निवृत्तजन. ×ना. राहे. २ना. ते पुरुषासी नवे जन्ममरण. ३ना. जन्ममरण. ४ना. ऐशी सद्गुरुकृपा जाण.

र्थे ॥ ९१ ॥ ' ऐक दीक्षानामाची युक्ती ॥ हे चारी पुरुषार्थ चारी मुक्ती ॥ निःशेष अविद्येची नाशी स्थिती ॥ दीक्षा व्युत्पत्ती त्या नांव ' ॥ ९२ ॥ *एवं दीक्षाजन्माची जे कथा ॥ उद्धवा सांगीतली म्यां तत्त्वतां ॥ ध्याननिष्ठा जे सात्त्विकता ॥ ऐक आतां सांगेन ॥ ९३ ॥ ' सत्वोपाधि शरीर माचें ॥ चैतन्यघन स्वरूप ज्याचें ॥ तो श्रीविष्णु ध्येय सात्त्विकांचें ॥ ध्यान त्याचें करावें ' ॥ ९४ ॥ ' अथवा १धवळधाम २गोक्षीर ॥ कर्पूरगौर ३पंचवक्त्र ॥ ध्यानीं आणावा शंकर ॥ संसारपार तरावया ॥ ९५ ॥ या मूर्तीचें ध्यान करितां ॥ हारपे ध्येय ध्यान ध्याता ॥ उमाजे चैतन्यघनता ॥ सात्त्विकता हें ध्यान ॥ ९६ ॥ जैशी दीक्षा तैसें ध्यान ॥ हें आगमशास्त्रींचें प्रमाण ॥ त्या ध्यानाचें परम ४अवसान ॥ चैतन्यघन पावावें ॥ ९७ ॥ केवळ जें चैतन्यघन ॥ तें सद्गुरुस्वरूप जाण ॥ त्याचें करावें ×चिंतनध्यान ॥ अनुसंधान निजनिष्ठा ॥ ९८ ॥ पंचभूत देहाची मूस ॥ तेथ ओतिला ब्रह्मरस ॥ गुरुस्वरूप ⁴तें सविलास ॥ ध्यान रात्रंदिवस करावें त्याचें ॥ ९९ ॥ सात्त्विकांचें जें कां ध्यान ॥ तें हें तूं उद्धवा जाण ॥ आतां मंत्राचें मंत्रग्रहण ॥ तेंही निरूपण अवधारीं ॥ १०० ॥ सकळ मंत्रांची जननी ॥ द्विजन्मा करी तत्क्षणीं ॥ गायत्रीच्या मंत्रग्रहणीं ॥ +ब्राह्मणपणीं अधिकारु ॥ १ ॥ जे सकळ मंत्रांचा राजा ॥ जे यांच्या आलीसे द्विजा ॥ जिचेनि याकें द्विजपूजा ॥ मज अधोक्षजा करणें पडे ॥ २ ॥ ' ते गायित्री स्वभावतां ॥ आली असे ब्राह्मणांच्या हातां ॥ तिची उपेक्षा करितां ॥ ꣸लौल्यें दरिद्रता पावले ' ॥ ३ ॥ गायत्रीनिष्ठ जो ब्राह्मण ॥ त्याचे मस्तकीं मी वंदीं चरण ॥ ɓमंत्रीं गायत्री श्रेष्ठ जाण ॥ वेद प्रमाण ये अर्थी ॥ ४ ॥ गायत्री रिघाल्यावीण कांहीं ॥ इतरमंत्रांसी २रिगम नाहीं ॥ ८मुख्यत्वें गायत्रीच्या ठायीं ॥ ते लागले पाही सकळ मंत्र ॥ ५ ॥ नव्हतां ७गायत्रीसंबंध ॥ ३मुखीं रिघों न शके वेद ॥ इतरमंत्रां कैसे ०संवाद ॥ वेदां बंध गायत्री ॥ ६ ॥ गायत्रीचें गुह्य परम ॥ चिन्मात्रैक परब्रह्म ॥ तो मंत्र ब्राह्मणांसी सुगम ॥ परी तेही वर्म चूकले ॥ ७ ॥ एवं गायत्रीमंत्र ब्रह्मपूर्ण ॥ सकळसिद्धींचें कारण ॥ शैववैष्णवमंत्र ग्रहण ॥ तेणें त्वरित जाण सत्वशुद्धी ॥ ८ ॥ सत्वशुद्धीचे परिपाटीं ॥ शैववैष्णवमंत्रकोटी ॥ तेणें सत्वशुद्धी उठाउठीं ॥ होय निजात्मदृष्टी साधकां ॥ ९ ॥ मंत्रग्रहणविचार ॥ उद्धवा जाण हा साचार ॥ आतां बोलिला जो संस्कार ॥ तोही प्रकार परियेसीं ॥ १० ॥ मनाचे संकल्पविकल्प ॥ तोडावया अतिसाक्षेप ॥ येचि अर्थीचा खटाटोप ॥ महामोटोप जो मांडी ॥ ११ ॥ संकल्प उठूंचि नलाहे ॥ जेथें उठी तेथें ठेंचित जाये ॥ विवेकाचेनि बळें पाहे ॥ मोकळु होय मनाचा ॥ १२ ॥ परमात्मनिष्ठा परवडी ॥ अखंड मनाची मोडी पाडी ॥ उसंत घेवों नेदी अर्धघडी ॥ ९स्मरणेंनिरवेडी मन रोव ॥ १३ ॥ वैराग्यबळें दमी मन ॥ तेणें भेणें करी हरिचिंतन ॥ दासी नुलंघी स्वामीचें वचन ॥ तैसें स्मरणाधीन मन करी ॥ १४ ॥ इंद्रियें पाहती नानापदार्थां ॥ मन न पाहे आणिका अर्था ॥ जागृतीं स्वप्नीं स्वभावतां ॥ अखंडता हरि स्मरे ॥ १५ ॥ ऐसा संस्कारें

१ शुभ्रकांति. २ गाईचे दुधाप्रमाणें. ३ पांच तोंडांचा. ४ शेवट. ५ चंचलपणानें. ६ अतिनेटानें. ७ आकार, उभारा. ( मनोविकारास उठूं देत नाहीं ). ८ विसावा. ९ स्मरणनिष्ठ. १० बळ, कौशल्य.

*ना. एवं दीक्षाचि जन्मकथा. ×ना. नित्यध्यान. ⁴ना. तैसा विलास. +ना. ब्रह्मपणीं. ꣸ना. लोल्य. ɓना. मंत्र. २ना. रिग. ८ना. मुख्यत्वें ते गायत्रीच्या ठायीं ॥ तेथें लागले पाही सकळ मंत्र. ७ना. गायत्रीचा बंध. ३ना. मुख्य. ०ना. वाद.

संस्कारिलें मन ॥ निमेषोन्मेषीं हरिचिंतन॥श्वासोछ्वासांचें गमनागमन॥'सोहं' ध्यान त्याठायीं ॥ १६ ॥ *स्वभावें स्मरणादर ॥ या नांव आत्मसंस्कार ॥ हा सत्ववृद्धीचा प्रकार ॥ सारंगधर बोलिला ॥ १७ ॥ आत्मशुद्धीचें महाकारण ॥ बोलिलों तें हें दशलक्षण ॥ साधकीं सेवावया जाण ॥ विशद निरूपण म्यां केलें ॥ १८ ॥ जेणें खवळला वाढे तमोगुण ॥ तें तमोवृद्धीचें दशलक्षण ॥केवळ त्यागावया जाण॥तेंही निरूपण सांगेन॥१९॥तेथिंचा आगम अभिचारिक॥ वेदविरुद्ध मार्ग देख ॥ वारुणी माध्वी, मद्योदक ॥ आवश्यक सेविती ॥ १२० ॥ जे उभयभ्रष्ट पाखंडी ॥ वेषधारी वृथा मुंडी ॥ त्यांचे संगतीची अतिगोडी ॥ जेथ अपरवेंडी विधिवेदां ॥ २१ ॥ देश चोहटा कां परद्वार ॥ तेथेंचि बैसका निरंतर ॥ काळ तो त्यांसि मध्यरात्र ॥ तें व्यापार कर्माचा ॥ २२ ॥ क्रियारंभु जारणमारण ॥ मोहन स्तंभन उच्चाटण ॥ कां करावें वशीकरण ॥ हें कर्म जाण तामस ॥ २३ ॥ जन्म ह्मणिजे दीक्षाग्रहण ॥ प्रेतभूतपिशाचविद्या जाण ॥ करितां प्रेतभूतआराधन ॥ प्रेतजन्म जाण तामसां ॥ २४ ॥ जेथ तमोगुण प्रधान ॥ तो क्रोधयुक्त पुरुष जाण ॥ सदा शत्रूचें करी ध्यान ॥ करावया हनन उद्यत ॥ २५ ॥ तामसी मंत्र मुकी मेळी, ॥ अथवा उच्छिष्टचांडाळी, ॥ कां प्रेतदेवता कंकाळी ॥ मंत्रशैली हे तेथें ॥ २६ ॥ संस्कार ' दगड माती ॥ माझें घर हें माझी क्षिती ॥ स्वप्नीं निजेला घाली भिंती ॥ एवढी आसक्ती गृहाची' ॥२७॥ घर करावया आसक्त ॥ ×तरी त्या खिंडोरा आंत ॥ सदा दगडमाती राखत ॥ नांदतें तेथ येवों नेदी ॥ २८ ॥ देहालागीं गेह करणें घडे ॥ तेंही देह कष्टवी अतिदुर्वाडें ॥ तामससंस्कारें रोकडें ॥केवळ वेडें गृहासक्तीं॥२९॥गृहासक्तीचा व्यापारु॥ जो मरणांत न सोडी नरु ॥ तो जाण तामससंस्कारु ॥ त्याचा संसारु ते माती ॥ १३० ॥जेणें थोरावे तमोगुण ॥ तें हें जाणदशलक्षण ॥ ऐक राजसाचें चिन्ह ॥ त्याचें भिन्न स्वरूप ॥३१ ॥ करावया सत्वाच्या अंगीकारा ॥ त्यागावा तमोगुण दुसरा ॥ पुढें चाविरीं मागें लोंतिरा ॥ ऐक तिसरा रजोगुण ॥ ३२ ॥ होकां शहाणी शिनळी नारी ॥ तें पुरुषाचें मन बरवें धरी ॥ मग ठकोनि जाय व्यभिचारीं ॥ तैशी परी रजोगुणा ॥३३॥ जैसें कां कुचर घोडें ॥ बरें दिसे परी आडेवीं अडे ॥ कांहीं केल्या न चले पुढें ॥ मागिलीकडे सरों लागे ॥ ३४ ॥ तैसी रजोगुणाची स्थिती ॥ त्यागुन संभवे कल्पांतीं ॥ धर्म करितो केवळ स्फीती ॥ मनीं आसक्ती कामाची ॥ ३५ ॥ सर्वस्व ध्यावया संत्र चोरू ॥ सर्वे धांवे होऊनि नैफरू ॥ तैसा रजोगुणाचा विचारू ॥ कामना संसारू वाढवी ॥३६॥ धर्म करी कामासक्ती॥केलें भोगवी निश्चितीं ॥ पाडी जन्ममरण आवर्तीं ॥ कदा कल्पांतीं सुटेना ॥ ३७ ॥ सात्विक तरले माझेनि भजनें ॥ तामस तरले मद्विरोधध्यानें ॥ राजसाचें जन्ममरण धरणें॥रजोगुणें उठीना ॥३८॥ जेणें प्रबळ वाढी रजोगुणा ॥ त्या सांगेन मी दशलक्षणां ॥ केवळ त्यागावया +काम्यकल्पना ॥ त्या निरूपणा अवधारी ॥३९॥ राजसाचें प्रवृत्तिशास्त्र ॥ ※जें केवळ कामनापर ॥ जेणें होय इहामुत्र ॥ तेथें

---

१ जारणादि. २ मोहाची दारू. ३ मधाची दारू. ४ संन्यासी. ५ गैररीती. ६ तमोगुणी. ७ नाश. ८ देवतांचीं नांवें. ९ तें घर. १० तमोगुणाचा अभ्यास. ११ डसणारा. १२ लाथा मारणारा. १३शहाणी शिंदळ, नवऱ्याचे मन राखून व्यभिचार करिते. १४ रानांत. १५ दंभ. १६ चाकर.

***ना. स्वाभाविक. ×मो. तरि ते खिंडोरा अतिलोलुप्त. +ना. काम. ※मो. जेका केवळ प्रकृतिपर.**

अत्यादर राजसा ॥१४०॥ आप ह्मणिजे तें तंव जळ ॥ येळा, वाळा, सुपरिमळ ॥ कर्पूरयुक्त अतिशीतळ ॥ प्रिय प्रबळ तें राजसा ॥४१॥ प्रजासंगती त्याची ऐक ॥ राजवर्गीं सभानायक ॥ व्यवहारीं चतुर अतिरंजक ॥ प्रवृत्ति लोक प्रिय त्यासी ॥४२॥ राजद्वारीं कां सभेमाझारीं ॥ बैसावें पारीं अथवा वेव्हारीं ॥ कां मंडपतोरणाभीतरीं ॥ सन्मानें करी उपविष्ट ॥ ४३ ॥ वेर्‍हू न गमे, जे घरिच्या घरीं ॥ तें कमी चोहाटा नगरीं ॥ कां बैसे बुद्धिबळांवरी ॥ अत्यादरीं सादर ॥ ४४ ॥ ऐक रजोगुणाची वेळ ॥ मर्यादेयाउपरि जो काळ ॥ राजस जे कां सांजवेळ ॥ ते ते काळ प्रिय त्यांसी ॥ ४५ ॥ राजसाचें सकाम कर्म ॥ धनधान्यार्थ करी धर्म ॥ वासना ते पशुपुत्रकाम ॥ स्वप्नीं निष्काम नेणती ॥ ४६ ॥ *राजसांसि काम गहन ॥ कामासक्ती दीक्षाग्रहण ॥ +तेंचि त्यांचें जन्म जाण ॥ सदा ध्यान क्रियेचें ॥४७॥ मंत्र घ्यावा अभिलाखें ॥ जेणें सन्मान होय लौकिकें ॥ ज्याचा सुगरावा थोर देखे ॥ तो मंत्र आवश्यकें आदरी ॥ ४८ ॥ संस्कार अतिराजस ॥ शरीरभोगाचे विलास ॥ नानापरिमळ बहुवस ॥ उत्तमवास सुधौता ॥ ४९ ॥ संस्काराची अंतरनिष्ठा ॥ 'लौकिकीं व्हावी देहप्रतिष्ठा ॥ माझी आज्ञा वंद्य वरिष्ठां ॥ सभेचे चोहाटा मी पूज्य ' ॥ १५० ॥ रजोगुणाचें दशलक्षण ॥ उद्धवा त्याची हीं वोळखण ॥ राजसासि जन्ममरण ॥ सर्वदा जाण सोडीना ॥ ५१ ॥ सात्विक त्याग करी विवेकनिष्ठे ॥ तामस त्याग करी कडकडाटें ॥ राजसासि त्याग न घटे ॥ द्रव्यदाराळोभिष्ठें लोभाळू ॥ ५२ ॥ तिहीं गुणांचें लक्षण ॥ म्यां सांगीतलें भिन्न भिन्न ॥ तिहींचें सर्वसाधारण ॥ सांगेन चिह्न तें ऐक ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ तत्तत्सात्विकमेवैषां यद्यद्वृद्धाः प्रचक्षते ॥ निंदंति तामसं यत्तद्राजसं तदुपेक्षितम् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ ॥ 'विवेकवृद्ध वृद्धाचारें ॥ ज्यातें स्तविती अत्यादरें ॥ तें तें सात्विक जाण खरें ॥ निजनिर्धारें निश्चित ॥ ५४ ॥ विवेकियाचे अनुवादा ॥ ज्या पदार्थाची करिती निंदा ॥ ते ते जाण तामस बाधा ॥ माझ्या निजबोधा मानलें ॥ ५५ ॥ ज्यातें स्तविना निंदित ॥ जीवें भावें उपेक्षित ॥ तें राजस जाण निश्चित ॥ बाधा अद्भुत तयाची ॥ ५६ ॥ जैसें कां विखें रांधिलें अन्न ॥ वरिवरी गोड, अंतरीं मरण ॥ तैसा जाण राजस गुण ॥ अतर्क्य बंधन तयाचें ॥ ५७ ॥ राजसासि ज्ञानबोध ॥ करितां थोंटावला वेद ॥ त्याचे उपदेशीं ब्रह्मा मंद ॥ माझेनिही बोध्र न करवे ॥ ५८ ॥ याचिलागीं रजोगुण ॥ विवेकीं सांडिला उपेक्षून ॥ उपेक्षेचें हेंच कारण ॥ तुज म्यां जाण सांगितलें ॥ ५९ ॥ यालागीं सात्विक सेवन ॥ साधकीं अवश्य करावें जाण ॥ सात्विकसेवनाचा गुण ॥ तुज मी संपूर्ण सांगेन ॥ १६० ॥

॥ श्लोक ॥ ॥ सात्विकान्येव सेवेत पुमान् सत्वविवृद्धये ॥ ततो धर्मस्ततो ज्ञानं यावत्स्मृतिरपोहनम् ॥ ६ ॥

---

१ वेळची. २ पाऱ्यांत घालण्याचा, खस. ३ घरीं करमत नाहीं. ४ सुगरणपणा, चातुर्य, कुशलपणा. ५ पोटांतला हेतु. ६ फार विचारी. ७ आपणांत.

*ना. राजसाची कामना गहन. +ना. तेंचि त्याचें जन्ममरण.

॥ टीका ॥ सात्विक द्रव्य सेवितां ॥ सत्वशुद्धि होय तत्वतां ॥ सत्वशुद्धी *पुरुषीं होतां ॥ धर्म स्वभावतां प्रवर्ते ॥६१॥ ×धर्मप्रवृत्ति माझें भजन ॥ माझ्या भक्तिउल्हासें जाण ॥ भक्तांसि मी होये प्रसन्न ॥तें स्वभावें ज्ञान +प्रकाशे॥६२॥'तत्त्वमस्यादि वाक्यव्युत्पत्ती॥ते गुरुद्वारा ज्ञानाची प्राप्ती॥तरी 8सत्वशुद्धितें धर्म भक्ती॥कोणे अर्थी सेवावी॥६३॥ऐसा विकल्प जरी तूं धरिसी ॥ उद्धवा ऐक त्याही विचाराशी ॥ यथार्थ सांगेन तुजपाशीं ॥ सत्वशुद्धीसी उपयोगु ॥ ६४ ॥ केवळ सत्वशुद्धीविण ॥ जाहल्या गुरुवाक्याचें श्रवण ॥ तें ꙮहाटगाण्याऐसें जाण ॥ अनोळखपण स्वस्वरूपा ॥ ६५ ॥ ' आंधळें उपजलें जे कुशीं ॥ स्तनपान करी अहर्निशीं ॥ परी तें न देखे माउलीसी ॥ दशा तैशी उपदेशा ॥ ६६ ॥ इंद्रिय सचेतनमेळीं ॥ भगवंत सर्वांतें प्रतिपाळी ॥ त्यातें न देखती विषयांधळीं ॥ अतिअंध झालीं चित्तशुद्धीविण ॥ ६७ ॥ ' अजागळां लोंबते जाण ॥ मिथ्याभाषणें ह्मणती ते स्तन ॥ त्यापरी सत्वशुद्धीविण ॥ वृथा जाण उपदेश ' ॥ ६८ ॥ वाहते उदकीं लिहिले लेख ॥ तळीं अक्षर नुमटे एक ॥ तेवीं सत्वशुद्धीविण देख ॥ निजज्ञान सुटंक प्रकटेना ॥ ६९ ॥ झाल्या 1आंपैती सत्वशुद्धी ॥ जंव प्रकटेना 3धर्मबुद्धी ॥ तंव निजज्ञानाची नव्हे 0सिद्धी ॥ जेवीं ग्रहणामधीं चंद्रमा ॥१७०॥ ऐकतां हरिकथाश्रवण ॥ बाष्प रोमांच स्वेद रुदन॥रुका वेंचितां जाईल प्राण॥तेथेंही ब्रह्मज्ञान प्रकटेना॥७१॥ हृदयींचा लोभ जंव न तुटे॥तंव निश्चयज्ञान कैंचें भेटे ॥ सत्वशुद्धि धर्मु जें प्रकटे ॥तें निजज्ञान वाटे सुपंथीं लागे॥७२॥ते चालतां धर्मपंथीं ॥ जे माझी भक्ति होय सांगाती ॥तें चोरांहेरांची न पडे गुंती ॥ शीघ्रगती मज पावे ॥ ७३ ॥ ते भक्तीचा सांडितां सांगातु ॥ पुढील अनोळख महापंथु ॥ तेथ कामक्रोध करिती घातु ॥ विकल्प आवर्तु बुडविती ॥ ७४ ॥ भाग्येंवीण माझी भक्ती ॥ प्राण्यासि नव्हे गा सांगाती ॥ जिचे संगें चालतां पंथीं ॥ अल्पही गुंती पडेना ॥७५॥ माझे भक्तिसवें महाशूर ॥ नांवाणिगे नवविध वीर ॥ सन्नद्ध बद्ध सदा समोर ॥ महाझुंझार निजबोधें ॥ ७६ ॥ यालागीं माझे भक्तिविण ॥ सहस्रधा केल्या श्रवण मनन ॥ माझी प्राप्ति नव्हे जाण ॥ भजनें पूर्ण मत्प्राप्ती ॥ ७७ ॥ सर्वभूतीं भगवद्भावो ॥ या नांव मुख्यभक्ति पहा हो ॥ ते सांगाती आलिया स्वयमेवो ॥ कामक्रोधमोहो न शकती बाधूं ॥ ७८ ॥ साक्षेपें नेऊनि घागरी ॥ पालथी घातल्या गंगासागरीं ॥ जळबिंदु रिघेना भीतरीं ॥ तैशी परी महावाक्या ॥ ७९ ॥ यालागीं अत्यादरांसि जाण ॥ धर्मयुक्त माझें भजन ॥ करितां मी होय प्रसन्न ॥ मत्प्रसादें ज्ञान प्रकाशे ॥ १८० ॥ लोभ ठेऊनि अर्थस्वार्थी ॥ कोरडी करितां माझी भक्ती ॥ मी प्रसन्न नव्हें श्रीपती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८१ ॥ जो धनें मनें काया वचनें ॥ वेंचूनि भजे मजकारणें ॥ त्यासीच म्यां प्रसन्न होणें ॥ जेवीं चंद्रकिरणें चकोरा ॥ ८२ ॥ व्याली धेनु वत्सा वोरसे ॥ तेवीं मी तुष्टें अतिसंतोषें ॥ तेणें माझेनि प्रसादवशें ॥ माझें ज्ञान प्रकाशे मद्भक्तां ॥ ८३ ॥ ' सगुण सुंदर आणि पतिव्रता ॥ अतिशयें पढियंती होय कांता ॥ तिसी सर्वस्व दे न मागतां भर्ता ॥ तेवीं मी मद्भक्तां प्रसन्न ' ॥ ८४ ॥ माझेनि प्रसादें प्रकाशे ज्ञान ॥

१ बाजारांतील गाणें. २ शेळीच्या गळ्यांत. ३ स्वाधीन. ४ पैसा. ५ प्रतिबंध होत नाहीं. ६ युद्धास सज्ज. ७ लढाऊ. ८ हजारप्रकारानें. ९ पान्हा सोडते.

*ना. पुरती. ×ना. धर्मप्रवृद्धि. +ना. प्रवेशे. 8ना. सत्वशुद्धितें. ꙮना. भाटगाण्या. 1ना. अपादता. 3ना. कर्मबुद्धि. 0ना. शुद्धी.

श्रुति *स्मृति नांव ह्मणती जाण ॥ सविलास अविद्यानिरसन ॥ अपोहन या नांव ॥८५॥ गुणोत्थित देह जाण ॥ देहोत्थित उपजे ज्ञान ॥ तेणें ज्ञानें गुणनिर्दळण ॥ देहनिरसन न घडे ह्मणसी ॥ ८६ ॥ हे गोष्टी तूं ह्मणसी कुडी ॥ कीं पक्षी आपुले पांख +मोडी ॥ नारळ नारळीतें तोडी ॥ स्वमांसाची गोडी व्याघ्र चाखे ? ॥ ८७ ॥ हें न घडे तें जे घडों बैसे ॥ तें देहींचेनि ज्ञानें गुणदेह नासे ॥ हा विकल्प धरिसी मानसें ॥ ऐक अनायासें तो ×निरास ॥ ८८ ॥

॥ श्लोक ॥ वेणुसंघर्षजो वह्निर्दग्ध्वा शाम्यति तद्वनम् ॥ एवं गुणव्यत्ययजो देहः शाम्यति तत्क्रियः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ दैवें वायूच्या कल्लोळीं ॥ परस्परें वेळू जाळी ॥ स्वजातिकांचणीं इंगळी ॥ पेटली ते होळी वनाची करी ॥ ८९ ॥ अग्नि उपजला जे कांडीं ॥ तेही कांडें जाळूनि मांडी ॥ वनीं तुरळनियां काडी ॥ स्वयें गत्योर्डी होऊनि विझे ॥ ९० ॥ तेवीं वैराग्याभ्यासवायूंनीं ॥ होतां त्रिगुणाची कांचणी ॥ तेथें प्रकटला ज्ञानाग्नी ॥ अविद्यावनीं दह्क ॥ ९१ ॥ तोही ²गुरुकृपा खवळला ॥ वृत्तिरूपें प्रज्वळला ॥ देहद्वयांसि लागला ॥ प्रवर्तला गुणांतें जाळूं ॥ ९२ ॥ जळाल्या आशातृष्णेच्या पोळी ॥ जळाल्या कामलोभाचीं कोल्हीं ॥ क्रोधव्याघ्राची होळी झाली ॥ आगी लागली मदगजा ॥ ९३ ॥ जाळिली स्नेहाची आरांटी ॥ जाळिली ममत्याची बोरांटी ॥ जाळिला मोहआळ उठाउठी ॥ जाळिला शेवटीं कळविटें काळ ॥ ९४ ॥ उठिला अहंकाराचा सोकें ॥ धरितां नधरे अनिवार ॥ तोहि जाळिला दुर्धर ॥ वणवा चौफेर कोंडल्या ॥ ९५ ॥ पळूनि जावया पुरता ॥ अणुभरी ठावो नसेनि रिता ॥ एवं जळाला तो पळतपळतां ॥ अहंसोर सर्वथा निमाला ॥ ९६ ॥ नवल अग्नीचें विंदाण ॥ आपणिया जाळी आपण ॥ दाहकशक्तीतें जाळून ॥ स्वस्वरूपीं जाण उपरमे ॥ ९७ ॥ ऐसें ऐकोनि निरूपण ॥ उद्धवासि विस्मयो गहन ॥ जनास केवढी नागवण ॥ आपणियां आपण बोडवली ॥ ९८ ॥ नश्वरदेहाचिये साठीं ॥ पाविजे परब्रह्माची पुष्टी ॥ ते सांडूनियां करंटीं ॥ विषयनिष्ठीं मरो मरती ॥ ९९ ॥ सात्त्विकसेवनें सत्त्ववृद्धी ॥ तेणें अलभ्य लाभे सिद्धी ॥ ते सांडोनियां दुर्बुद्धी ॥ विषयविधी गुंतले ॥१००॥ केवढा नवल मांडला लोकां ॥ ऐशी जीवांची आशंका ॥ यालागीं यदुनायका ॥ आदरें देखा पुसत ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ विदंति मर्त्याः प्रायेण विषयान्पदमापदाम् ॥ तथाऽपि भुंजते कृष्ण तत्कथं श्वखराजवत् ॥ ८ ॥

॥ टीका ॥ उद्धव ह्मणे श्रीमुकुंदा ॥ एक सर्वज्ञा गोविंदा ॥ विषयांची पदोपदीं आपदा ॥ सर्वीं सर्वदा कळलीसे ॥ २ ॥ जो झाला विषयाधीन ॥ तो सर्वत्र सदा दीन ॥ ऐसें जाणत जाणतां जन ॥ आसक्ति गहन विषयांची ॥३॥ जैसे कां श्वान, आणि खर अज ॥ तैसे विषयांसि लोक

१ गुणापासून. २ वांबु. ३ स्वजातीचेच ( वेळूचे ) घर्षणानें पेटलेली इंगळी ( अग्नि ). ४ वैराग्य व अभ्यास हेच कोणी, वायु त्यांनीं. ५ घर्षण. ६ अविद्यारूप रान. ७ समूह. ८ का० लो० रूपी कोल्हीं. ९ मदरूप हत्तीस. १० अजगर. ११ काळवीट हरण. १२ सुवर, डुकर. १३ शांत होतो. १४ रमले १५ अडचणुक, संकट.

*ना. श्रुतिनियंते ह्मणणें जाण. +ना. झोडी. ×ना. नाश. ²ना. हरिगुरुकृपा खवळला

निर्लज्ज ॥ सांडूनि स्वहिताचें काज ॥ कां विषयांचे भोज नाचती ॥ ४ ॥ शुनी वसवसोनि पाठीं लागे ॥ श्वान सवेंच लागे मागें ॥ पुच्छ हालवूनि हुंगे ॥ लाज नेघे जनाची ॥ ५ ॥ काणा कुंटा, व्याधिव्याप्त ॥ चिंता, *काठफरा गळां वाहत ॥ तोही शुनीमागें धांवत ॥ कामासक्त अविचारी ॥ ६ ॥ शुनी सक्रोधें वसवसी ॥ ते गोड लागे श्वानासी ॥ जीवित्व बांधलें तिच्या पुच्छीं ॥ ती मागमागेंसी हिंडत ॥ ७ ॥ अंगीं अंगा होतां भेटी ॥ सक्रोध शुनी लागे पाठीं ॥ तरी न सोडी पुसाटी ॥ कुंकात उठी कामासी ॥ ८ ॥ ऐशा संकटीं जें भोगें चढे ॥ तें भोगासवेंचि आडकोनि पडे ॥ हडहड करिती चहूंकडे ॥ जगापुढें फजीती ॥ ९ ॥ निंदेचे सैंघ वाजती धोंडे ॥ मूर्ख तेही थुंकिती तोंडें ॥ ऐसेंचि पुरुषासही घडे ॥ तरीही आवडे अतिकामू ॥२१०॥ श्वानाचें हेंडें तत्काळ सुटे ॥ मनुष्याचें आँकल्प न सुटे ॥ स्त्रीलोभाळू अतिलोभिष्टें ॥ तीलागीं संकटें नाना सोशी ॥ ११ ॥ नातरी गाढवाच्यापरी ॥ दूरीं देखोनियां खरी ॥ भुंकत धांवे तीवरी ॥ लाज न धरी सर्वथा ॥१२॥ खरी पळे पुढेंपुढें ॥ खरू धांवे वाडेंकोडें ॥ लाता हाणोनि फोडी जाभाडें ॥ तरी पुढेंपुढें धसों लागे ॥ १३ ॥ ×लाता हाणे उरावरी ॥ तरी तिची प्रीति धरी ॥ ऐशिया स्त्रियांचे घराचारीं ॥ खराच्यापरी नांदती ॥ १४ ॥ नातरी बोकडाची गति जैशी ॥ तैशी दशा दिसे पुरुषासी ॥ मारूं आणिल्या पशुहत्यापाशीं ॥ तरी शेळ्यांसी सेवित ॥१५॥ स्वयाती मारितां देखे ॥ अनुतापें नेघे तेणें दुःखें ॥ मृत्युसमीपही अभिलाखें ॥ कामसुखें वांछिती ॥ १६ ॥ पूर्ण मृत्यूची पायरी ॥ तें वार्धक्य वाजेलें शिरीं ॥ तरी धांवे विषयावरी ॥ आठवू न धरी मरणाचा ॥ १७ ॥ मेषें मारूं आणिला घेंतकें ॥ निजसख्यातें मारितां देखे ॥ तें नेंमननियां यथासुखें ॥ अजीसि हारिखें रमों धांवे ॥१८॥ मेष श्वान आणि खर ॥ हे ऋतुकाळींचि विषयतत्पर ॥ त्यांहूनि विशेषेंसी नर निरंतर ॥ कामीं दुर्धर सर्वदा ॥१९॥ गर्भ संभवल्यापाठीं ॥ श्वानही स्त्रीभोगासि उठी ॥ पुरुषाची अभिनव गोठी ॥ गरोदर गोरेंटी भोगिती ॥ २२० ॥ गाढव गाढवीसि बुंथडें ॥ न करी अलंकार मोथेंड ॥ मनुष्यासि स्त्रियेचें कोड ॥ तिचें वालभ वाडें वाढवी ॥ २१ ॥ दांडा गोंडा मूद वेणी ॥ टिकुलीवरी रत्नखेंवेंणी ॥ नाकींचें हालेंदे सुपाणी ॥ हें मनुष्यपणीं वालभ ॥२२॥ जरी प्रसूति काळ निकट ॥ गाड्याएवढें वाढलें पोट ॥ तरी कामाचारी विवेकनष्ट ॥ रमताती दुष्ट स्त्रियांसी ॥ २३ ॥ अस्थि मांस विष्ठा मूत ॥ तेणें कामिनी पूर्ण भरित ॥ ते कुंश्चळीं जन कामासक्त ॥ जाणोनि होत कां देवा ॥२४॥ या प्रश्नाचें प्रश्नोत्तर ॥ तींश्लोकीं सांगे सारंगधर ॥ कामासक्तीचा विचार ॥ ऐक सादर उद्धवा ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ अहमित्यन्यथाबुद्धिः प्रमत्तस्य यथा हृदि ॥
उत्सर्पति रजो घोरं ततो वैकारिकं मनः ॥ ९ ॥

---

१ लंगडा. २ कुत्रीमागें. ३ पुच्छ, पिछाडी. ४ केंकाटत. ५ मैथुन घडे. ६ झोंबट. ७ कल्पांतापर्यंत ८ गाढवी. ९ जोरानें येतो. १० दादले. ११ खाटकापाशीं. १२ वैराग्य. १३ आलें. १४ मेंढा. १५ खाटकानें. १६ आपले मित्रास. १७ न जुमानितां. १८ मेंढीशीं. १९ ऋतुनसतांहि. २० प्रवृत्त होत नाहीं २१ सुंदरी स्त्री. २२ पोषाख, घुंगट. २३ मोत्याचे. २४ वहात. २५ जडाव. २६ पाणीदार मोती, नथ २७ घोणेरे.

*पाठभेद-काष्ठ. ×ना. चरण मो. बदला.

॥ टीका ॥ मोहप्रमत्त विवेकशून्य ॥ त्या पुरुषांच्याठायीं जाण ॥ देहात्मवादें अभिमान ॥ रजोगुण खवळला ॥ २६ ॥ जैसा मदिरापानें उन्मत्त ॥ विसरूनि आपुला निजस्वार्थ ॥ मग अन्योन्य अनर्थ ॥ आत्मघात करूं धांवे ॥ २७ ॥ तेवीं शुद्ध बुद्ध नित्यमुक्त ॥ हा विसरोनि निजस्वार्थ ॥ रजोगुणें लोलंगत ॥ कामासक्त नरू कीजे ॥ २८ ॥ रजीं रंगल्या अभिमान ॥ दुःखरूप तो दारुण ॥ दुर्धर वाढे रजोगुण ॥ विकारी मन तेणें होय ॥ २९ ॥

॥श्लोक॥ रजोयुक्तस्य मनसः संकल्पः सविकल्पकः॥ ततः कामो गुणध्यानाद्दुःसहः स्याद्धि दुर्मतेः ॥ १० ॥

॥ टीका ॥ जें रजोयुक्त झालें मन ॥ तें संकल्पविकल्प गहन ॥ एकांतीं घातल्या आसन ॥ ध्यानीं चिंतन *स्त्रियेचें ॥ २३० ॥ रजोगुणें कामासक्ती ॥ झाली दुष्टवासना दुर्मती ॥ कामावांचूनि ×चित्तीं ॥ आणिक स्फूर्ती स्फुरेना ॥ ३१ ॥ जनीं वनीं आणि विजनीं ॥ जागृतीं सुषुप्तीं स्वप्नीं ॥ ध्यानीं मनीं चिंतनीं ॥ स्त्रियांवांचूनि स्मरेना ॥ ३२ ॥ कामिनी कामाचा अभ्यास ॥ हावभाव अतिविलास ॥ गुणलावण्य सुरतरस ॥ आसक्त मानस तेठायीं ॥ ३३ ॥ रतिसुखाचा आराम ॥ कामिनी क्रीडेचा संभ्रम ॥ तेणें दुर्धर झाला जो काम ॥ तयासि नियम चालेना ॥ ३४ ॥ धनधान्यपुत्रसुख ॥ वांछी इहलोक परलोक ॥ हा रजोगुणाचा देख ॥ अलौकिक अतिकाम ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ करोति कामवशगः कर्माण्यविजितेंद्रियः ॥ दुःखोदर्काणि संपश्यन् रजोवेगविमोहितः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ जेथ रजाचा[१] वेग उद्धत ॥ तेथ कामग्रहो खवळे अद्भुत ॥ जो पुरुष झाला कामग्रस्त ॥ तो सदा अंकित कामाचा ॥ ३६ ॥ ज्यासि विवेक नाहीं मानसीं ॥ तो जाण पां कामाची आंदणी[२] दासी ॥ काम नाचवी जैसें त्यासी ॥ तेणें विकारेंसी नाचत ॥ ३७॥ कामांकित झालिया पुढें ॥ सकाम कर्म करणें पडे ॥ ज्याचें उत्तरोत्तर दुःख वाढे ॥ अतिदुर्वाडें[३] गार्विंतें ॥३८॥ रजोगुणें अतिमोहित ॥ यालागीं अजितेंद्रिय अयुक्त ॥ जन्ममरणांचा अंकित ॥ कर्मे करीत तद्रूपें ॥ ३९ ॥ रजोगुणाचा अतिबाध ॥ तेणें जन केले विषयांध ॥ रजरागी महामंद ॥ जाण प्रसिद्ध उद्धवा ॥ २४० ॥ रजें बांधल्यापाठीं जाण ॥ होय महामोहाचें सेवरण ॥ तेव्हां भ्रमाचें +वाडधान ॥ सैरा तमोगुण उन्हासे ॥ ४१ ॥ ऐशी प्राणियांची गती ॥ उद्धवा जाण निश्चितीं ॥ यालागीं कामातें सेविती ॥ नव्हे विरक्ती विषयाची ॥ ४२ ॥ तुज ऐसें वाटेल चित्तीं ॥ बुडाली तरणोपायस्थिती ॥ खुंटली प्राण्यांची परमगती[४] ॥ विषयासक्ती अनिवार ॥४३॥ जीव ॐअविद्याविषयसंबंध ॥ याचा बाध अतिसबद्ध ॥ अविद्यायोगें अनादिसिद्ध ॥ तेणें दृढभेद जीवासी ॥ ४४ ॥ अंतःकरणही अनादि ॥ प्रवाहरूपें त्याची सिद्धी ॥ तेणें दृढ झाली विषयबुद्धी ॥ त्याग त्रिशुद्धी घडेना ॥ ४५ ॥ सत्त्वीं उत्पन्न अंतःकरण ॥ परी तें प्रकृतिकार्य[५] जाण ॥ तेथें भोगध्यासें रजोगुण ॥ खवळला कोण आवरी ॥ ४६ ॥ विषयीं

---

१ रजोगुणाचा. २ बक्षीस दिलेली. ३ वादळ. ४ मोक्षमार्ग. ५ मायेचें कार्य.

*ना. तयाचे. ×ना. निश्चितीं. +ना. उधवण मो. वावधान. ॐना. अविद्या उभयसंबंध.

बांधिले विवेकी ॥ तो विषयत्याग नव्हे ये लोकां ॥ उद्धवा तुझी आशंका हेच कां ॥ एक ते विखीं उपावो ॥ ४७ ॥ विवेकियांच्याठायीं ॥ विषयबुद्धि नुपजे पाहीं ॥ विक्षेपू झाल्या कांहि बही ॥ अभ्यास तिहीं करावा ॥ ४८ ॥

|| श्लोक || रजस्तमोभ्यां यदपि विद्वान्विक्षिप्तधीः पुनः || अतंद्रितो मनो युंजन् दोषदृष्टिर्न सज्जते || १२ ||

॥ टीका ॥ होकां रजतमाचेनि गुणें ॥ जरी बुद्धि विक्षिप्त केली तेणें ॥ तरी आळस सांडि सज्ञानें ॥ आवरणें मनातें ॥ ४९ ॥ अस्थिमांसाचा घडिला ॥ विष्ठामूत्रांचा कोथळा ✱स्त्री विचारितां कंटाळा ॥ नरक जिव्हाळा तो भोग ॥ २५० ॥ भोगीं दावूनि दोषदृष्टी मनासि विषयांची तुटी ॥ करावी या उठाउठी ॥ +नेमूनि नेहटीं मनातें ॥ ५१ ॥ ऐसेंनि मन अतिदुर्धर ॥ नियमासि नावरे अनावर ॥ साधकांसि अतिदुर्धर ॥ आसक्त नर ये॥ ५२ ॥ तरी एक बापा ✳सावधान ॥ मनोनिग्रहाचें लक्षण ॥ तेंही सांगेन साधन ॥ जे प्रकारें मन आकळे ॥ ५३ ॥

|| श्लोक || || अप्रमत्तोऽनुयुंजीत मनो मय्यर्पयन् शनैः || अनिर्विण्णो यथाकालं जितश्वासो जितासनः || १३ ||

॥ टीका ॥ ॥ आळसनिद्रेसि दवडूनि दूरी ॥ जो सावधान निजवृत्ति धरी ॥ माझें चि निर्धारी ॥ शनैःशनैः करी अभ्यास ॥ ५४ ॥ अभ्यासीं प्रथम भूमिका ॥ शिकावी आसन ढिका ॥ मूळबंध अतिनेटका ॥ आसनजयो देखा शिकावा ॥ ५५ ॥ आसनजयो आ हातां ॥ सहजें चढे योगपंथा ॥ तेथें प्राणापानसमता ॥ अभ्यासितां होंलागे ॥ ५६ ॥ वि ते मना आधीन ॥ मन, पवनासि वश्य जाण ॥ अभ्यासें वश केल्या पवन ॥ सहजें स्थिरावे ॥ ५७ ॥ यापरी जो हळुहळू ॥ अभ्यासें साधक करी काळू ॥अविरक्तही परी प्रब होय अभुकाळ परमार्थी ॥ ५८ ॥ हरिचिंतनीं एकाग्र मन ॥ तें एक होतो प्राणापान ॥ हा पवनजयो पूर्ण ॥ योगसाधन सहजेंची ॥ ५९ ॥ तंव प्राणापान सम जोडी ॥ षट्चक्राचे प फोडी ॥ तें विषयांतें चित्त सांडी॥विषयो वोसंडी चित्तातें ॥६०॥ 'यापरी या अभ्यासवा ✱सकाम कामाचा तटका तुटे ॥ सनकादिक येणें परिपाठें ॥ म्यां आत्मनिष्ठे लाविले '॥२६

|| श्लोक || || एतावान्योग आदिष्टो मच्छिष्यैः सनकादिभिः || सर्वतो मन आकृष्य मय्यद्धाऽऽवेश्यते यथा || १४ ||

॥ टीका ॥ ॥ येणेंचि उपदेशें देख ॥ माझे शिष्य सनकादिक ॥ अभ्यासबळें अलोलि निजात्मसुख पावले ॥ ६२ ॥ तो उपदेश कोण ह्मणसी ॥ जो वियोग चित्तविषयांसी ।

१ कधींमधीं. २ दाबी, संयमी. ३ मन स्वाधीन करण्याचें. ४ पायरी, मजला. ५ शिवणीवरी देऊन । बंद करावा वायु अपान । तो चढवावा ऊर्ध्व पूर्ण । या नांव ' मूलबंध ' ॥ ६ काळाचा स योग करितो. ७ संबंध.

✱ना. स्त्री विचारितां ये कांटाळा. +ना. नियमूनि हटीं मनातें. ✳ना. साधन. ·
...त. ✱ना. सकाम कामना तटका तुटे.

स्यां सांगोनियां त्यांसी ॥ आत्माभ्यासीं लाविलें ॥ ६३ ॥ मन जेथें जेथें जाये ॥ तेथें तेथें ब्रह्मचि आहे ॥ येणें अभ्यासें लवलाहें ॥ सनकादिक पाहे सिद्ध झाले ॥ ६४ ॥ चित्तासी विषयांचा वियोग ॥ हा सनकादिकीं साधिला योग ॥ त्यांसि उपदेशावया सांग ॥ मीं स्वयें श्रीरंग उपदेष्टा ॥ ६५ ॥ तें ऐकोनि उद्धव पाहीं ॥ विचारी आपुलियाठायीं ॥ मी श्रीकृष्णावेगळा कहीं नाहीं ॥ सनकादिक कहीं उपदेशिले ॥ ६६ ॥ सनकादिक ब्रह्मशीळ ॥ पूर्वीं जाहले बहुकाळ ॥ कृष्ण काळींचं देवकीबाळ ॥ गुरुत्व केवळ घडे कैसें ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ उद्धव उवाच ॥ यदा त्वं सनकादिभ्यो येन रूपेण केशव ॥
योगमादिष्टवानेतद्रूपमिच्छामि वेदितुम् ॥ १५ ॥

॥ टीका ॥ ॥ उद्धव ह्मणे गा केशवा ॥ सनकादिकांसि केव्हां ॥ उपदेश केला गा तुवां ॥ जवळी तेव्हां मी कां नव्हतों ॥ ६८ ॥ येणेंचि रूपें हृषीकेशी ॥ योग सांगितला तयांसी ॥ किंवा रूपांतरें ह्मणसी ॥ तें जाणावयासी मज इच्छा ॥ ६९ ॥ कोण काळ समयो कोण ॥ कोण योग कैसा प्रश्न ॥ तें कृपा करोनि आपण ॥ मज संपूर्ण सांगावें ॥ २७० ॥ ऐकोनि उद्धवाचा प्रश्न ॥ कृपें कळवळला नारायण ॥ हंसइतिहास निरूपण ॥ आपुलें आपण सांगत ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ पुत्रा हिरण्यगर्भस्य मानसाः सनकादयः ॥
प्रपच्छुः पितरं सूक्ष्मां योगस्यैकान्तिकीं गतिम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ॥ ब्रह्मयाचे मानस पुत्र ॥ महाप्रसिद्ध सनत्कुमार ॥ तिहीं सत्यलोकीं प्रश्न थोर ॥ अतिदुस्तर पुशिला ॥ ७२ ॥ अतिसूक्ष्म योगगती ॥ दुर्ज्ञेय स्वस्वरूपस्थिती ॥ परम कठिण प्रश्नोक्ति ॥ पित्याप्रती पुशिली ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ सनकादय ऊचुः ॥ ॥ गुणेष्वाविशते चेतो गुणाश्चेतसि च प्रभो
॥ कथमन्योन्यसंत्यागो मुमुक्षोरतितितीर्षोः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ ॥ सनकादिक पुसत ॥ विषयांच्याठायीं चित्त ॥ स्वभावें असे विषयासक्त ॥ *तें विषयीं सतत आवेशलें ॥ ७४ ॥ 'तसेचि विषय पाहीं ॥ प्रवेशले चित्ताच्या ठायीं ॥ वासनारूपें जडले तेही ॥ निघों कहीं नेणती ' ॥ ७५ ॥ फळ, काळ, दोनी नाहीं ॥ तरी तेचे आंबे मोह पाहीं ॥ ऐसे विषय चित्ताचेठायीं ॥ रिघाले कहीं न निघती ॥ ७६ ॥ 'परणिली कांता माहेरा जाये, ॥ +चित्तीं रिघाली दुरी न राहे ॥ यापरी विषयो पाहे ॥ जडला ठायें चित्तासी ॥ ७७ ॥ चित्त, विषय अन्योन्यत्याग ॥ मुमुक्षां करवा घडे चांग ॥ ये उपायीं उपाययोग ॥ स्वामीनें सांग सांगावा ॥ ७८ ॥

॥ श्लोक ४ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ एवं पृष्टो महादेवः स्वयंभूर्भूतभावनः ॥
ध्यायमानः प्रश्नबीजं नाभ्यपद्यत कर्मधीः ॥ १८ ॥

---

१ सनक आदि चार बंधूंनीं. २ कोठें केव्हां. ३ ब्रह्मनिष्ठ. ४ हंसावतारांची कथा. ५ गेतलेले.

*ना. तें ठायीं सतत प्रवेशलें. +ना. चित्तीं रिगालिया उभी राहे.

॥ टीका ॥ ॥ ज्यासि अग्रपूजेचा सन्मान ॥ श्रेष्ठ देवांमाजीं महिमान ॥ महादेव ह्मणावया कारण ॥ ब्रह्मयासि जाण या हेतू ॥ ७९ ॥ जो अंगीं सजी चराचर ॥ जो वेदांचें निज मंदिर ॥ त्या ब्रह्मयाप्रति अतिगंभीर ॥ प्रश्न महाथोर पुत्रीं केला ॥ २८० ॥ त्या प्रश्नाची *प्रश्नोत्तरविधी ॥ ब्रह्मयासि नकळे त्रिशुद्धी ॥ कर्मजड झाली बुद्धी ॥ बोधकसिद्धी स्फुरेना ॥ ८१ ॥ प्रश्न अत्यंत सखोल पडिला ॥ तेणें ब्रह्मा वेडावला ठेला ॥ कांहीं न बोलवेचि बोला ॥ तो चिंतूं लागला मज तेव्हां ॥ ८२ ॥ सनकादिकांची प्रश्नावस्था ॥ सत्यलोकीं समस्ता देखतां ॥ नकळे नह्मणवे सर्वथा ॥ सांगों जातां नव्हे बोध ॥ ८३ ॥ ऐसें ब्रह्मयासि दुर्घट ॥ कांहीं नबोलवे स्पष्ट ॥ परम देखोनि संकट ॥ मी ज्ञानवरिष्ठ चिंतिलों ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ स मामचिंतयद्देवः प्रश्नपारतितीर्षया ॥ तस्याहं हंसरूपेण सकाशमगमं तदा ॥ १९ ॥

॥ टीका ॥ ॥ निरसावया पुत्राचें अज्ञान ॥ आणि तरावया त्यांचा प्रश्न ॥ ब्रह्मा करी माझें चिंतन ॥ तेव्हां माझेंही मन कळवळलें ॥ ८५ ॥ ब्रह्मा माझें पोटींचें बाळ ॥ त्यासि कर्मजाड्यें आलें पडळ ॥ तें निरसावया तत्काळ ॥ 'हंस' ×केवळ मी जाहलों ॥ ८६ ॥ प्रश्न केला अपरंपार ॥ जो परमहंसाचें परम सार ॥ त्याचा पावावया परपार ॥ हंसरूपधर मी जाहलों ॥ ८७ ॥ नातळे वर्णव्यक्तिविलास ॥ तो मी श्वेतवर्ण, स्वप्रकाश ॥ स्वयें झालों राजहंस ॥ ब्रह्मपुत्रांस उपदेशा ॥ ८८ ॥ सृष्टि सृजावयाचे विधी ॥ विधाता लागला त्रिशुद्धी ॥ तेणें कर्मजड झाली बुद्धी ॥ निजज्ञानसिद्धी विसरला ॥ ८९ ॥ जो ह्मणे मी कर्माधिकारी ॥ तेव्हांचि तो देहधारी ॥ तो परमार्थाचे नगरीं ॥ [1]नसरे निर्धारीं बाहेर मुद्रा ॥ २९० ॥ [2]नकर्मणा [3]नप्रजया ऐशी वेदोक्ती ॥ कर्मनिषेधें त्यागवी श्रुती ॥ तेणें, कर्में ब्रह्मप्राप्ती ॥ जे ह्मणती ते अज्ञान ज्ञाते ॥ ९१ ॥ म्यां उपदेशिलें ब्रह्मयाशीं ॥ शेखीं कर्मजाड्य आलें त्यासी ॥ केवळ कर्म कर्मठासी ॥ मुक्ति तयासी कैसेनी ॥ ९२ ॥ ब्रह्मा अदृष्टद्रष्टा लोकीं तिहीं ॥ तो कर्मजाड्यें झाला विपर्यी ॥ इतरांचा तो पाड कायी ॥ ठकले येठायीं सज्ञान ॥ ९३ ॥ सांगतां पुत्राचा प्रश्न ॥ उजळेल ब्रह्मयाचें निजज्ञान ॥ ऐसें साधोनियां विंदान ॥ सत्यलोकीं जाण उतरलों ॥ ९४ ॥ प्रश्नकर्ते सनकादिक ॥ वक्ता सत्यलोकनायक ॥ दोहींसिही पडली अटक ॥ ते काळीं देख मी आलों ॥ ९५ ॥ नासोनेदितां साचार ॥ हंस निवडी क्षीर नीर ॥ तैसें निवडावया सारासार ॥ ज्ञानचतुर मी राजहंस ॥ ९६ ॥ पूर्वपुण्यसंचयेंवीण ॥ विमानेंवीण स्वयें गमन ॥ सत्यलोकीं आगमन ॥ +कोणाचेनी जाण कदा नव्हे ॥ ९७ ॥ मी पापपुण्यातीत पाहीं ॥ यालागीं मज पाप पुण्य नाहीं ॥ पावीं कां चालोनि यावें पायीं ॥ तो मी सर्वांठायीं सर्वगतू ॥ ९८ ॥ त्या सत्यलोकां मी अवचिता ॥ हंसस्वरूपें झालों येता ॥ त्या मज देखोनियां समस्तां ॥ परमाश्चर्यता वाटली ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ दृष्ट्वा मां त उपव्रज्य कृत्वा पादाभिवंदनम् ॥ ब्रह्माणमग्रतः कृत्वा पप्रच्छुः को भवानिति ॥ २० ॥

---

१ न सरसावे. २ कर्मानें नाहीं. ३ प्रजेनें नाहीं.

*ना. प्रत्योत्तर. ×ना. ते वेळीं. +ना. कोणाचेंही.

॥ टीका ॥ परब्रह्मैक परममूर्ती ॥ मज येतां देखोनि हंसस्थितीं ॥ उभे ठाकोनि सामोरे येती॥ चरण वंदिती साष्टांग ॥ ३०० ॥ ब्रह्मसदनीं वेद मूर्तिमंत ॥ पुण्यही मूर्तिमंत तेथ ॥ सत्यलोकीं मूर्तिमंत सत्य ॥ तपादि समस्त मूर्तिमंतें ॥ १ ॥ त्या समस्तांदेखतां जाण ॥ ब्रह्म्यानें पुसावें तूं कोण ॥ पुसतां येईल नेणपण ॥ यालागीं मौन धरोनि ठेला ॥ २ ॥ ब्रह्मा पुढें करूनि जाण ॥ सनकादिकीं आपण ॥ मज केला गा तिहीं प्रश्न ॥ तुम्ही कोण कोठील ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ इत्यहं मुनिभिः पृष्टस्तत्त्वजिज्ञासुभिस्तदा ॥ यदवोचमहं तेभ्यस्तदुद्धव निबोध मे ॥ २१ ॥

॥ टीका ॥ ब्रह्म्यासि पुशिला जो प्रश्न ॥ त्याचा तत्त्वार्थ जाणावया जाण ॥ मज पुशिलें तिहीं तूं कोण ॥ अतिविचक्षण जिज्ञासु ॥४॥ त्यासि स्थूल लिंग कारण ॥ यावेगळी वस्तु चिद्घन ॥ सांगावया प्रश्नखंडन ॥ तीं श्लोकीं जाण म्यां केलें ॥ ५ ॥ करोनियां प्रश्नखंडण ॥ नित्यानित्य विवेकज्ञान ॥ त्यांसि म्यां सांगीतलें जाण ॥ तेंचि निरूपण तूं ऐक ॥ ६ ॥ सनकादिकांसमान ॥ उद्धवा तुज मी मानीं जाण ॥ यालागीं त्यांचें ज्ञान कथन ॥ ऐक सांगेन ह्मणतसे ॥ ७ ॥ तें अतिश्रेष्ठ जुनाट ज्ञान ॥ उद्धवा परिसे सावधान ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ येरें मनाचे कान पसरले ॥ ८ ॥ देहद्वये सांडोनि मागें ॥ उद्धव श्रवण झाला सर्वांगें ॥ यालागीं स्वयें श्रीरंगें॥ गुह्यज्ञान *स्वांगें सांगिजे ॥९॥ देवालयीं लागे रत्नखाणी ॥ त्यामाजीं सांपडला स्पर्शमणी ॥ अमृत स्रवे त्यापासोनि ॥ तैसा सभाग्यपणीं उद्धव ॥ ३१० ॥ सांगता श्रीमहाभागवता ॥ श्रीकृष्णासारिखा वक्ता ॥ त्याहीमाजीं हंसगीतकथा ॥ आदरें सांगता हरि झाला ॥ ११ ॥ सनकादिकांची जे प्राप्ती ॥ ते दाटूनि उद्धवाचे हातीं ॥ स्वयें देतसे श्रीपती ॥ त्याचें भाग्य किती वर्णावें ॥ १२ ॥ ब्रह्मरूप स्वयें वक्ता ॥ तोही उपदेशी ब्रह्मकथा ॥ गुरु ब्रह्मचि स्वभावतां ॥ हे सभाग्यता उद्धवीं ॥ १३ ॥ यालागीं निजभाग्यें भाग्यवंत ॥ जगीं उद्धव अतिविख्यात ॥ ज्यालागीं स्वयें जगन्नाथ ॥ ज्ञानसमर्थ तुष्टला ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ हंस उवाच ॥ वस्तुनो यद्यनानात्वमात्मनः प्रश्न ईदृशः ॥ कथं घटेत वो विप्रा वक्तुर्वा मे क आश्रयः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ ॥ परमात्मा अवघा एक ॥ तेथ मी तूं हें न रिघे देख ॥ 'तूं कोण' हें वाचिक॥ वृथा शाब्दिक वाचाळ ॥ १५ ॥ तुह्मीं केला जो प्रश्न ॥ त्यासि द्यावया प्रतिवचन ॥ वक्त्यासि आश्रयो नाहीं जाण ॥ मीतूंपण दिसेना ॥ १६ ॥ तुह्मी पुशिलें नेणोन ॥ म्यां काय सांगावें जाणोन ॥ मुळीं नाहीं मीतूंपण ॥ पुशिला प्रश्न तो मिथ्या ॥ १७ ॥ नामरूपवर्णव्यक्ती ॥ नाहीं स्वजातिविजाती ॥ विप्रहो तुमची प्रश्नोक्ती ॥ नघडे निश्चितीं सत्यत्वें ॥ १८ ॥ चारी पुरुषार्थ पूर्ण करिती ॥ हे विप्रनामाची परम ख्याती ॥ ×त्या तुम्हां ब्रह्मज्ञानाची प्रश्नोक्ति ॥ न घडे निश्चितीं विप्रहो ॥ १९ ॥ असावें जरी बहुपण ॥ तरीं पुसणें घडे 'तूं कोण' ॥

---

१ ब्रह्मलोकांत. २ फार विद्वान्. ३ जाणण्याची इच्छा करणारे. ४ स्थूल, सूक्ष्म, कारण-तीन देह ५ स्थूल, न सूक्ष्म. ६ परिस. ७ ब्राह्मण या नांवाची.

*ना. चांगें. ×ना. त्या तूं ह्मणसी ज्ञानाची प्रश्नोक्ति.

आत्म्याचेठायीं ऐसा प्रश्न ॥ न घडे जाण सर्वथा ॥ ३२० ॥ प्रश्न न घडे आत्म्याच्याठायीं ॥ जरी ह्मणाल देहविषयीं ॥ तेंही न घडे गा पाहीं ॥ तो देहाचेठायीं योजेना ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ पंचात्मकेषु भूतेषु समानेषु च वस्तुतः ॥ को भवानिति वः प्रश्नो वाचारंभो ह्यनर्थकः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ आदि ब्रह्मा, अंतीं मशक ॥ देह तितुका पांचभौतिक ॥ तेथ 'तूं कोण' ह्मणावया देख ॥ वेगळीक दिसेना ॥२२॥ कंटक कुंडलें मुकुट माळा ॥ करमुद्रिका कटिमेखळा ॥ ॥ अलंकार पाहतां डोळा ॥ सुवर्णावेगळा अंशु नाहीं ॥२३ ॥ कां घडे, गाडगे, वेळणी, ॥ परेळ, रांजण, माथणी, ॥ हें मृत्तिकावांचूनी ॥ आन कोणी असेना ॥ २४ ॥ तेवीं सर्वदेहीं देहत्व जाण ॥ पांचभौतिक समसमान ॥ तेथ ह्मणावया तूं कोण ॥ वेगळेपण असेना ॥ २५ ॥ वस्तु वस्तुत्वें समसमान ॥ *भूतें भूतत्वें समान जाण ॥ तेथ प्रश्नोक्ति वाचारंभण ॥ तूं कोण हें ×अनर्थी ॥ २६ ॥ होका आपणियां आपण ॥ +जो कोणी पुसेल तूं कोण ॥ ³तो अतिभ्रमें भुलला जाण ॥ निजात्मज्ञान विसरला ॥ २७ ॥ विचारितां प्रश्नाचा अर्थ ॥ एवढा दिसतसे अनर्थ ॥ काहीं भासेना परमार्थ ॥ तूं कोण हा व्यर्थ प्रश्न तुमचा ॥ २८ ॥ देहासि तूं कोण ऐसें ॥ आत्मा जें स्वयें पुसे ॥ तें ⁜आत्मत्वा लागलें पिसें ॥ अतिभ्रंशें भुलला ॥ २९ ॥ दोरा अंगीं सर्प नसे ॥ त्यावरी तो भ्रमें भासे ॥ त्या सर्पातें दोरू पुसे ॥ तूं कोण ऐसें तें मिथ्या ॥ ३३० ॥ या परी त्याचें प्रश्नखंडन ॥ उद्धवा तें म्यां केलें जाण ॥ तेणें भेदाचें निरसन ॥ वक्रोक्ती जाण दाविलें ॥ ३१ ॥ प्रश्नखंडनाचे ⁶अर्थें ॥ कैचीं करणें कैचीं भूतें ॥ भेद नाहीं जीवशिवांतें ॥ हेंही त्यांतें मा चिलें ॥ ३२ ॥ याही वरी जे कथा गहन ॥ परम कारणोंसि अभिन्न ॥ त्यासि म्यां सांगितलें निजज्ञान ॥ ऐक सावधान उद्धवा ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ मनसा वचसा दृष्ट्या गृह्यतेऽन्यैरपींद्रियैः ॥ अहमेव न मत्तोऽन्यदिति बुध्यध्वमंजसा ॥ २४ ॥

॥ टीका ॥ ⁸मजवेगळा तिळाइतुका ॥ रिता ठावो नाहीं देखा ॥ तेथ व्याप्य आणि व्यापका ॥ अभिन्नत्व देखा सहजची ॥३४॥ मनाच्या संकल्पा आलें जें जाण ॥ त्यासि शाब्दिक ह्मणती भिन्न ॥ माझ्या स्वरूपाचा विवर्त तें मन ॥ हे अभिन्न ह्मणून कळेना ॥ ३५ ॥ मन लक्षितां सावधान ॥ सर्वथा लक्षेना तें जाण ॥ ⁴परब्रह्मही अलक्ष्य पूर्ण ॥ दोनी समान चिद्रूपें ॥ ३६ ॥ शिंपीच्या अंगीं रुपें आभासे ॥ तेंचि तेथें साचें नसे ॥ माझ्या स्वरूपीं मन तैसें ॥ मिथ्या भासे कल्पनामात्र ॥ ३७ ॥ विचारितां शब्दमहिमान ॥ शब्द स्वरूपें ज्ञानघन ॥ ज्ञानार्थेंवीण वचन ॥ अल्पही जाण असेना ॥ ३८ ॥ वक्ता वाच्य वचन ॥ तिनी मीचि आहें जाण ॥ बोलु बोलका मजवीण ॥ दुसरा जगीं कोण असे ॥३९॥ मी वेद जाण पां वेदांचा ॥

---

१ लागत नाहीं. २ ब्रह्मयापासून मुर्कुटापर्यंत. ३ पंचभूतांचा. ४ कडीं. ५ आंगठी. ६ कटिदोरा. ७ वाणीचा उद्गार. ८ इंद्रियें. ९ शब्दज्ञानी. १० मिथ्याभास. ११ शब्दाचें सामर्थ्य.

*ना. भूतें भूतत्वें जाण. ×ना. आनर्थी. +ना. जो पुसेल कोणी तूंपण. ³ना. तो अतिशयें भ्रमला जाण मो. तो अति भ्रमला जाण. ⁜आत्मया. ⁶ना. आर्ते. ⁸ना. मजवेगळा तिळा एका, वेगळा ठावो नाहीं देखा. ⁴ना. परब्रह्मींही.

प्रणवरूपें मीचि साचा ॥ मुख्य वाचेची मीचि वाचा ॥ वेगळा शब्दाचा ठाव नाहीं ॥ ३४० ॥ दृष्टीचें जें देखणेंपण ॥ देखणें तेंचि मुख्य ज्ञान ॥ तेंचि जाण ब्रह्म पूर्ण ॥ चैतन्यघन निजदृष्टीं ॥ ४१ ॥ मीचि डोळा मीचि देखता ॥ दृश्य द्रष्टा मीचि तत्त्वतां ॥ मजवेगळी देखणी अवस्था ॥ नाहीं सर्वथा तिहीं लोकीं ॥ ४२ ॥ मीच डोळियांचा निजडोळा ॥ मी सर्वांगदेखणा सोज्वळा ॥ मजवेगळी देखणी कळा ॥ नाहीं जिव्हाळा आणिकांचा ॥ ४३ ॥ मीचि शब्दांतें शब्देंविना ॥ मीचि श्रवणामाजीं श्रोता ॥ ऐशिया एकात्मता पाहतां ॥ शब्दें निःशब्दता परब्रह्मीं ॥ ४४ ॥ कान वचन मीचि श्रोता ॥ मीचि जाण *शब्दार्थता ॥ ऐकणाही सजपरता ॥ नाहीं तत्त्वतां श्रवणाचा ॥ ४५ ॥ मीचि घ्राण मीचि वास ॥ मीचि जाण सुवास ॥ मजवेगळा रहिवास ॥ परिमळास असेना ॥ ४६ ॥ रसना रसनें चोखडी ॥ परी ते केवळ चामडी ॥ कापून सांडिल्या बापुडी ॥ गोडी अगोडी ते तेणें ॥ ४७ ॥ मीचि रस मीचि रसना ॥ स्वाद सेविता मीचि जाणा ॥ मजवेगळा चवीचाखणा ॥ रसज्ञपणा आन नाहीं ॥ ४८ ॥ इतरइंद्रियप्रवृत्ती ॥ त्याही मद्रूप जाण निश्चितीं ॥ मी सर्वात्मा आत्ममूर्ती ॥ क्रियाशक्ती तेही मीचि ॥ ४९ ॥ पांचभौतिकदेहाचा गोळा ॥ आन म्हणती मजवेगळा ॥ चुकोनि व्यापका सकळा ॥ ×तो कोठें निराळा पाहेंपाहें ॥ ३५० ॥ जैसे जळींचे जळतरंग ॥ जळरूपें जळीं क्रीडती चांग ॥ तेंसें माझ्या स्वरूपीं सांग ॥ देह अनेग मद्रूपें ॥ ५१ ॥ हो कां घृताची पुतळी ॥ थिजोनि आली एकेकाळीं ॥ परी ते नव्हे घृतपणावेगळी ॥ तेवीं भूतें झालीं मजमाजीं ॥ ५२ ॥ जळीं जळाची जळगार ॥ जळामाजीं भासली साकार ॥ तैसें मजमाजीं चराचर ॥ अभिन्न साचार मद्रूपीं ॥ ५३ ॥ जैसा एकल्या एक तंत ॥ सुतेंचि विणिला सुत आंत ॥ त्यांसी वेगळाले म्हणती तांत ॥ तैसें मज आंत जग भासे ॥ ५४ ॥ तंतु पाहतां वस्त्र न दिसे ॥ आत्मा लक्षितां जगचि नसे ॥ येणें अद्वैततत्त्वसौरसें ॥ पाहे अनायासें परब्रह्म ॥ ५५ ॥ ऐसा अद्वैतबोधें मी एक ॥ सर्वात्मा सर्वात्मक ॥ हा निश्चयेंसि विवेक ॥ बुद्धिबोधें निष्टंक जाणावा ॥ ५६ ॥ मीचि एक सर्वांठायीं ॥ धरिल्या हेंचि दृढ पाहीं ॥ मग साधनाचें कार्य नाहीं ॥ ठायींचेचि पाहीं नित्यमुक्त ॥ ५७ ॥ सर्वात्मा चैतन्यघन ॥ अतिसुलभ हें निजज्ञान ॥ उद्धवा त्यां हें सांगोन जाण ॥ भेदखंडन केलें त्यांचें ॥ ५८ ॥ सनकादिकांचा पूर्वील प्रश्न ॥ जो ब्रह्मादिकां अटक जाण ॥ त्याचेंही त्यां प्रतिवचन ॥ विवंचूनि ज्ञान सांगितलें ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ गुणेष्वाविशते चेतो गुणाश्चेतसि च प्रजाः ॥ जीवस्य देह उभयं गुणाश्चेतो मदात्मनः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ तुम्हीं ब्रह्मयासि पुसिलें पाहीं ॥ विषय रिघाले चित्ताच्याठायीं ॥ चित्त जें रिघालें विषयीं ॥ तें वेगळें कांहीं निवडेना ॥ ३६० ॥ विषयत्यागेंविण ॥ कदा नव्हे ब्रह्मज्ञान ॥ त्याही त्यागाची त्यागिती खूण ॥ ऐक संपूर्ण सांगेन ॥ ६१ ॥ चित्त विषय दोन्ही पाहें ॥ तें जीवाचें निजस्वरूप नव्हे ॥ यें उपाधिवशें दोन्ही देहें ॥ +लागलीं पाहे प्रवाहरूपें ॥ ६२ ॥ कर्तृत्वभोक्तृत्वरूपें जाण ॥ विषयी जाहलें अंतःकरण ॥ तेणें उभयदेहांचें कारण ॥ अहंकार जाण

१ ओंकारस्वरूप. २ बोलविना. ३ स्थान. ४ वासाला. ५ स्थूल, सूक्ष्म.

*ना. शब्दार्थविना. ×ना. तो केवीं निराळा होऊं शके. +ना. यालागीं पाहे प्रवाहरूपें.

खवळला ॥ ६३ ॥ तेणें भुलविलें चित्त विषयासी ॥ विसरला निजात्मरूपासी ॥ तेणें तदात्मता जीवामनांसी ॥ अतिशयेंसी दृढ झाली ॥ ६४ ॥ चित्त जीवाचें स्वरूप होतें ॥ तरी विषयां लोलुप्त नव्हतें ॥ हे उभयउपाधी जीवातें ॥ *अभिमान येथें वाढविला ॥ ६५ ॥ जेवीं कां विसरोनि आपणासी ॥ स्वप्नींचिया स्वप्नदेहासी ॥ अतिप्रीति वाढे पुरुषासी ॥ तैशी दशा जीवासी येथ झाली ॥ ६६ ॥ नित्य शुद्ध मुक्त जाण ॥ जीवाचें स्वरूप चैतन्यघन ॥ त्यासि अभिमानें हें जाण ॥ मिथ्याबंधन लाविलें ॥ ६७ ॥ यालागीं सांडावा अभिमान ॥ तैं तुटे सकळ बंधन ॥ अभिमान निरसावया जाण ॥ माझें भजन करावें ॥ ६८ ॥ परी वैराग्येंवीण माझी भक्ती ॥ पोंचट जाण पां निश्चितीं ॥ जे वैराग्ययुक्त उपजे भक्ती ॥ तैं मद्रूपप्राप्ती जीवासी ॥ ६९ ॥ हृदयीं विषयांचा अभावो ॥ आणि सर्वांभूतीं भगवद्भावो ॥ हे वैराग्ययुक्त भक्ती पहाहो ॥ तें जीवासि निर्वाहो मद्रूपीं ॥ ३७० ॥ जीव मद्रूपचि तत्त्वतां ॥ त्यासि देहाभिमानें जीविता ॥ +सदा भूतीं मद्भावो पाहतां ॥ सिद्ध मद्रूपता उद्बोधे ॥ ७१ ॥ जीवासि जाहल्या मद्रूपता ॥ सहज त्यागू विषयचित्ता ॥ देखे ‡उभयांसि मिथ्यात्वता ॥ न त्यागितां हा त्यागू ॥ ७२ ॥ चित्तविषयांचा त्यागू ॥ पुत्रहो तुह्मीं पुशिला चांगू ॥ तो म्यां सांगीतला अव्यंगू ॥ हा ज्ञानमार्गू अतिशुद्ध ॥ ७३ ॥ ह्मणाल मिथ्या उभयांचें भान ॥ तरी एवढें जीवासि बंधन ॥ लागावया काय कारण ॥ ऐसें कांहीं मन कल्पील जरी ॥७४॥ गगनसुमनांची माळा ॥ कधीं कोणी लेइली गळां ॥ तारूं बुडे मृगजळां ॥ हें कोणी तरी डोळां देखतें कां ॥ ७५ ॥ सत्यासि बाधक ॥ कदा बाधूं न शके लटिक ॥ ×ऐसें कल्पाल तुह्मी कल्पक ॥ तो परिपाक अवधारा ॥ ७६ ॥ तरी परिसा सावधान ॥ तें मी सांगेन निरूपण ॥ जेणें जीवासि बंधन ॥ लटिकेंचि जाण दृढ झालें ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ गुणेषु चाविशच्चित्तमभीक्ष्णं गुणसेवया ॥ गुणाश्च चित्तप्रभवा मद्रूप उभयं त्यजेत् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ ॥ ‘ अनादिसंसारमाळेच्याठायीं ॥ नित्य विषय भोगिले पाहीं ॥ ते ठसावले चित्ताच्याठायीं ॥ वारंवार पाहा सेवितां ’ ॥ ७८ ॥ चित्तासि विषयांची अतिप्रीती ॥ तेणें वाढली विषयासक्ती ॥ तें प्रवेशलें विषयांप्रती ॥ न निघे मागुतीं सर्वथा ॥ ७९ ॥ बुद्धीसि विषयांचें ध्यान ॥ चित्तीं विषयांचें चिंतन ॥ विषयांलागीं तळमळी मन ॥ विषयाभिमान तेणें झाला ॥ ३८० ॥ विषयीं खवळल्या अभिमान ॥ देहद्वयाचें दृढ बंधन ॥ जीवासि लागलें अतिकाठिण ॥ परम दारुण दुस्तर ॥ ८१ ॥ मग 0त्या देहाचे विकार ॥ ते आपुले मानी साचार ॥ अंध, पंगू, मी कुष्ठी नर ॥ स्वरूपें सुंदर, मी ज्ञाता, ८२ ॥ ‘ मी देह ’ हें मानोनि चित्तें ॥ निजरूप विसरला भावार्थें ॥ हें मिथ्याबंधन जीवातें ॥ सत्यत्वें त्यातें अभिमान ॥ ८३ ॥ “ मिथ्या बुद्धिबळाचा खेळ ॥ हारी, जैती निष्फळ ॥ तरी खेळत्या अभिमान प्रबळ ॥ तैसें देहबळ जीवासी ॥ ८४ ॥ त्या खेळाचे घोडे हस्ती ॥ पहिलीं काय जिवें जितीं ॥ मा मारिले ह्मणोनि भांडती ॥ तेवीं जन्मपंक्ती जीवासी ॥ ८५ ॥ हें निरसावया जीवबंधन ॥ निःशेष सांडावा

१ सांग. २ आकाश फुलांची. ३ जय.

*ना. अभिमानें येथें वाढविल्या. +ना. सर्वभूतीं मद्भावो पाहतां. ‡ना. विषयासी मिथ्या तत्वतां. ×ना. ऐसा कल्पाल तुह्मी संकल्प. 0ना. तयाचे विकार.

देहाभिमान ॥ अभिमान सांडितांचि जाण ॥ मद्रूपपण सहजेंची " ॥ ८६ ॥ जीवें साधिल्या मद्रूपता ॥ सहजेंचि त्याग विषयचित्ता ॥ माझे स्वरूपीं अहंता ॥ नाहीं वार्त्ता विषयांची ॥८७॥ जेव्हां बुद्धिबळाचा खेळ मोडे ॥ तेव्हां राजा प्रधानादि लांकुडें ॥ तेवीं अहंकारु निमाल्या पुढें ॥ प्रपंच उडे *मिथ्यात्वें ॥ ८८ ॥ जेवीं स्वप्नींचा स्वप्नाभिमान ॥ दारा पुत्र स्वजन धन ॥ स्वदेहेंसि मिथ्या जाण ॥ जागेपण झालिया ॥ ८९ ॥ तेवीं पावलिया माझी स्वरूपता ॥ कैंचा देह कैंची अहंता ॥ विषय चित्ताची वार्त्ता ॥ नाहीं अवस्था गुणत्रय ॥३९०॥ +तिहीं अवस्थीं अवस्थाभूत ॥ [१]जागृतिस्वप्नसुषुप्तिआंत ॥ तो होऊनि जीव निरवस्थ ॥ परमात्म्यांत मिळे कैसा ॥ ९१ ॥ ऐसा कांहीं कल्पाल भावो ॥ त्या जीवासि अवस्थांचा अभावो ॥ ×त्रिगुण" गुणांचा गुणस्वभावो ॥ या वृत्ति पहाहो बुद्धीच्या ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ जाग्रत्स्वप्नःसुषुप्तं च गुणतो बुद्धिवृत्तयः ॥ तासां विलक्षणो जीवः साक्षित्वेन विनिश्चितः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ तिन्ही गुणांच्या तिन्ही वृत्ती ॥ सत्वगुणाची जागृती ॥ रजोगुणें स्वप्नप्राप्ती ॥ केवळ सुषुप्ती तमाची ॥ ९३ ॥ या तिनी अवस्था पाहीं ॥ दृढ *जडल्या बुद्धीच्याठायीं ॥ जीवासि यांचा संबंध नाहीं ॥ तो वेगळा पाहीं साक्षित्वें ॥ ९४ ॥ [५]जें जीवाभंगीं अवस्था जडे ॥ तें तो अवस्थेमाजीं बुडे ॥ तिहींचें साक्षित्व त्यासि न घडे ॥ ऐक निवाडें अवस्था ॥९५॥ ' जागृतीमाजीं नाहीं स्वप्न ॥ स्वप्न जागृतीसि नेणे जाण ॥ सुषुप्ती नेणें जागृतिस्वप्न ॥ सुषुप्तीचें भान त्या नेणती ॥ ९६ ॥ जीव अवस्थांचा अभिमानी ॥ हेंही न घडे जीवालागुनी ॥ विश्व, तैजस, प्राज्ञ, तिन्ही ॥ अवस्थाभिमानी हे तिहींचे ॥ ९७ ॥ जो जे अवस्थेचा अभिमानी ॥ तो अवस्थेसवें जाय निघोनी ॥ [३]जीव वेगळा साक्षिपणीं ॥ अवस्थाभिमानी तो नव्हे ॥ ९८ ॥ देहातीत गुणातीत ॥ तिहीं अवस्थाअतीत ॥ द्रष्टा साक्षी निश्चित ॥ जाणता येथ तो जीव ॥ ९९ ॥ अवस्थाभिमान नाहीं जीविता ॥ तरी कवण भंगी तिनी अवस्था ॥ मी निजलों मीचि जागता ॥ म्यां स्वप्नावस्था देखिली ॥ ४०० ॥ ऐसा प्रत्यक्ष अनुभव ॥ स्वयें बोलताहे जीव ॥ हा ह्मणाल जीवाचा स्वभाव ॥ ऐक अभिप्राव सांगेन ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ ॥ यर्हि संसृतिबंधोऽयमात्मनो गुणवृत्तिदः ॥ मयि तुर्ये स्थितो जह्यात्त्यागस्तद्गुणचेतसाम् ॥ २८ ॥

॥ टीका ॥ ॥ जो डोल्हारां बैसे यथासुखें ॥ तो न हालतां हाले तेणें हरिखें ॥ उंचनीच खाय झोंके ॥ निजकौतुकें हिंदोळे ॥ २ ॥ हिंदोळतांही प्रबळ ॥ डोल्हाराचि अतिचंचळ ॥ बैसला तो निश्चळ ॥ मानी केवळ मी हालतों ॥ ३ ॥ जीवासि झाली तैशी वानी ॥ अहंममतेच्या अभिमानीं ॥ तिनी अवस्था स्वयें मानी ॥ जेवीं कां स्वप्नीं गृहदारा ॥ ४ ॥ होकां लोखंड-काम घडतां ॥ लोहाचे घाय अग्नीचे माथां ॥ प्रत्यक्ष दिसती वाजतां ॥ लोहतदात्मतासं-

---

१ अवस्थारहित. २ यथाक्रमें जाग्रत्स्वप्नसुषुप्तीचे. ३ मलाही अवस्था असा अभिमान बाळगणारा. ४ देहावेगळा. ५ प्रकार. ६ लोखंडाशीं अग्नीचा एक जीव झाल्यानें.

*ना. निमिष्यार्धें. +ना. तरी. [१]ना. जागृतिस्वप्नसुषुप्तीवंत. ×मो. त्रिगुणाचा स्वभावो, यापरि पाहो बुद्धीच्या. *ना झाल्या. [५]ना. जया. [३]ना. जेव.

योगें ॥ ५ ॥ तेणें अग्निसंगें वांकेंकोडें ॥ लोहकामचि घडे मोडे ॥ परी अग्नीसी घडमोड न घडे ॥ तेणें पडिपाडें जीवु येथें ॥६॥ जेवीं अग्निवीण लोह न घडे ॥ तेवीं आत्मसंगेंवीण पुढें ॥ बुद्धि केवळ जड वेडें ॥ कर्मक्रिया नातुडे सर्वथा ॥७॥ 'लोह घडवूनि अग्नि न घडता ॥ कर्म करूनि जीव अकर्त्ता ॥ तरी वृत्तिसंगें तदात्मता ॥ अहंकर्ता हें मानी' ॥ ८ ॥ जीव *आपुल्या प्रकाशता ॥ झाला वृत्तीतें प्रकाशिता ॥ वृत्ति जीवासि नानावस्था ॥ निजस्वभावतां देतसे ॥ ९ ॥ सूर्यें प्रकाशिलें जळ ॥ जळें केलें प्रतिमंडळ ॥ खळाळ चंचळ निश्चळ ॥ कांपे चळचळ जळकंपें ॥४१०॥ सूर्याची गगनीं नित्य वस्ती ॥ तो जळें आणिला अधोगती ॥ तेवीं वृत्तीचिया निजख्याती ॥ मुक्तत्व दाविती बद्ध करूनी ॥ ११ ॥ आत्म्यानें प्रकाशिली वृत्ती ॥ वृत्तीनें आत्म्यासि जीवप्राप्ती ॥ जीवा जीवत्वें देहासक्ती ॥ सुखदुःखप्राप्ती तेणें भोगी ॥ १२ ॥ एवं वृत्तीचिया संगतीं ॥ वाढली विषयाची आसक्ती ॥ तेणें संसारबंधप्राप्ती ॥ झाली निश्चितीं जीवासी ॥ १३ ॥ होकां गुणचित्तविषयासक्तीं ॥ जरी झाली जीवासि बंधप्राप्ती ॥ तरी आवरावी विषयवृत्ती ॥ वैराग्ययुक्तीं गुरुकृपा ॥ १४ ॥ एक गुरुकृपेची मातु ॥ तिहीं अवस्थांमाजीं सततु ॥ जो मी तुरीय गुणातीतु ॥ ते अभ्यासीं लाविलु निजबोधें ॥ १५॥ नवल अभ्यासाची गोठी ॥ विषयवृत्तीच्या पाठींपोटीं ॥ मज 'तुरीयातें' दावी दिठी ॥ बोधपरिपाटी निजबोधें ॥ १६ ॥ मी 'तुरीय' तंव सतत ॥ सर्वीं असें सर्वगत ॥ शिष्यवृत्तीसी मज आंत ॥ गुरु निजस्वार्थे दाखवी ॥ १७॥ सुतावेगळें लुगडें ॥ करूं जातां गा उघडें ॥ तेथ क्रियाचि लाजोनि बुडे ॥ मागें पुढें सूतची ॥ १८ ॥ तेवीं साधकासि जाण ॥ विषयाचें विषयभान ॥ माझे स्वरूपीं नव्हेचि भिन्न ॥ चैतन्यघन मीचि मी ॥ १९ ॥ तेथ नामरूपवर्णभेद ॥ नाहीं कर्म कर्त्ता विधिवाद ॥ बुडाले प्रणवेंसि वेद ॥ 'केवळ शुद्ध मी एक' ॥ ४२० ॥ तेथें भ्रमेंसहित पळाली भ्रांती ॥ क्रियेसहित गळाली प्रवृत्ती ॥ +लाजा निवाली निवृत्ती ॥ स्वस्वरूपीं वृत्ती निवटली ॥ २१ ॥ सूर्योदयो जाहल्या पाठीं ॥ समूळ अंधारातें घोंटी ॥ खद्योताची नळी निमटी ॥ नक्षत्रकोटी तत्काळ गिळी ॥२२॥ तेवीं माझी स्वरूपप्राप्ती ॥ मायेची मावळे स्फूर्ती ॥ लाजा विसरे प्रवृत्तिनिवृत्ती ॥ नित्य तृप्ती स्वानंदें ॥ २३ ॥ 'ऐशी माझ्या स्वरूपाची गोडी ॥ जें साधकां लागे धडफुडी ॥ तें चित्त विषयातें सांडी ॥ विषयो वोसंडी चित्तातें ॥ २४ ॥ जीं देंठीं वाढलीं फळें ॥ तींचि परिपाकाचे वेळें ॥ फळ होय देंठावेगळें ॥ देंठु तो फळें धरीना ॥ २५ ॥ कां मंथूनि काढिलें नवनीत ॥ तें परतोनि घातल्या ताकाआंत ॥ तें ताकेंसि होय अलिप्त ॥ तैसें चित्त विषयांसी' ॥ २६॥ पावल्या माझी स्वरूपता ॥ दैवबळें विषयो देतां ॥ चित्तासि नुपजे विषयावस्था ॥ स्वभावतां अलिप्त ॥ २७ ॥ एवं साधिल्या माझा योगु ॥ चित्तविषयांचा वियोगु ॥ सहजेंचि होय चांगु ॥ हा सुगम सांगु उपावो ॥ २८ ॥ येथें म्हणे आशंका धराल देख ॥ स्वरूप शुद्ध अवघें एक ॥ तेथें कैचें बाध्यबाधक ॥ काय साधक साधिती ॥ २९ ॥ ऐशाही संधीमाजीं जाण ॥ अहंता बंधाचें कारण ॥ त्याचें सांगेन मी लक्षण ॥ सावधान परियेसा ॥ ४३० ॥

॥ श्लोक ॥ अहंकारकृतं बंधमात्मनोऽर्थविपर्ययम् ॥ विद्वान्निर्विद्य संसारचिंतां तुर्ये स्थितस्त्यजेत् ॥ २९ ॥

---

१ त्याच उपमेनें. २ प्रतिबिंब. ३ चतुर्थ. ४ कर्ममार्ग. ५ प्राण घेई.

*ना. आपुलेपणें. +ना. लाजा निमाली निजवृत्ती मो. लाजा विसरली निवृत्ती.

॥ टीका ॥ *जेथ मुहूर्त मात्र वसती घडे ॥ त्या ठायाचा अभिमान चढे ॥ ऐसें अभिमानाचें सांकडें ॥ पाहें पां रोकडें कौतुक त्याचें ॥ ३१ ॥ शुद्धीं अहंकार, अळुमाळ ॥ उठतां शुद्धासि करी समळ ॥ तेणें देहयोगें धरिल्या बळ ॥ करी तत्काळ विपरीत ॥ ३२ ॥ अहंकार खवळल्या जाण ॥ करी आनंदाचें आवरण ॥ बुडे परमात्मस्फूर्तीचें स्फुरण ॥ देहाचें मीपण वाढवी ॥ ३३ ॥ जेवीं कूर्मीच्या पिलियां ॥ चक्षुरमृतें तृप्ती तयां ॥ तेंचि मातेसि चुकलिया ॥ मग बुडालिया कर्दमें सेवी ॥ ३४ ॥ तेवीं खुंटलिया आनंद अभिव्यक्ती ॥ जीवासि वाढे विषयासक्ती ॥ कामिनीकामा पंगिस्त होती ॥ चिंता चित्तीं विषयांची ॥ ३५ ॥ विसरला आपुलें पूर्णपण ॥ धनालागीं अतिहीन दीन ॥ मी देहवंत परिच्छिन्न ॥ ऐसा देहाभिमान दृढ झाला ॥ ३६ ॥ तेणें कर्माकर्माचे आघात ॥ नाना नरकयातना होत ॥ जन्ममरणादि आवर्त ॥ तेणें दुःखी होत अतिदुःखें ॥ ३७ ॥ भोगितां दुःखयातना ॥ त्रास उपजे ज्याच्या मना ॥ न साहवे भववेदना ॥ तेणें देहाभिमाना सांडावें ॥ ३८ ॥ अभिमान सांडितां नसांडे ॥ हेंचि दुर्घट थोर सांकडें ॥ यालागीं साधनाचें सांकडें ॥ सोसणें पडे साधकां ॥ ३९ ॥ ' जें जें करावें साधन ॥ साधनीं रिघे साधनाभिमान ॥ धांवणें नागवी संपूर्ण ॥ साधनीं विघ्न होय तैसें ॥ ४४० ॥ एक साधनाचें साधन ॥ वेदोक्त ÷स्वधर्माचरण ॥ साधावें वैराग्य पूर्ण ॥ माझें भजन अतिप्रीतीं ॥ ४१ ॥ तत्काळ जावया देहाभिमान ॥ अखंड माझें नामस्मरण ॥ गीत नृत्य हरिकीर्तन ॥ सर्वाभूतीं समान मद्भावो ॥ ४२ ॥ मद्भावें भूतें समस्त ॥ सर्वदा पाहतां सतत ॥ मी तुरीय जो सर्वगत ॥ ते ठायीं चित्त प्रवेशे ॥ ४३ ॥ तिहीं अवस्थांमाजीं मी सतत ॥ तिहीं अवस्थांतें प्रकाशित ॥ तिहीं अवस्थांहूनि अतीत ॥ तो जाण निश्चित तुरीय ' ॥ ४४ ॥ तिहीं गुणांहूनि परता ॥ चौथेपणेंवीण चौथा ॥ तो मी तुरीय जाण तत्त्वतां ॥ तेठायीं चित्ता जो ठेवी ॥ ४५ ॥ तेथें ठेवितां चित्ता ॥ जीव पावे मद्रूपता ॥ निमाली सांसारिकचिंता ॥ विषयावस्था बुडाली ॥ ४६ ॥ तेव्हां चित्त ×चिंता चिंतन ॥ विषयवासना अभिमान ॥ अवघियांचें होय शून्य ॥ मी स्वानंदघन स्वयें प्रकटें ॥ ४७ ॥ न तुटतां भेदाचें भेदभान ॥ जो म्हणवी मी सज्ञान ॥ वृथा धरी ज्ञानाभिमान ॥ तोही अज्ञान तें ऐका ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ यावन्नानार्थधीः पुंसो न निवर्तेत युक्तिभिः॥ जागर्त्यपि स्वपन्नज्ञः स्वप्ने जागरणं यथा ॥ ३० ॥

॥ टीका ॥ नाना वर्ण नाना व्यक्ती ॥ नाना गोत्रें, नाना जाती ॥ अधमोत्तमविधानस्थिती ॥ भेदु चित्तीं दृढ भासे ॥ ४९ ॥ मी काळा, गोरा, सांवळा ॥ मी सज्ञानत्वें आगळा ॥ माझी उत्तम पवित्र लीळा ॥ मी कुळें आगळा सकुलीन ॥ ४५० ॥ ऐशी आल्या भेदप्राप्ती ॥ पाहतां अभेदपरा श्रुती ॥ साधकां शास्त्रार्थयुक्तीं ॥ भेदनिवृत्ती ज्यां नव्हेची ॥ ५१ ॥ त्यांचा व्यर्थ ज्ञानाभिमान ॥ त्यांचें व्यर्थ कर्माचरण ॥ तो जागाचि निजेला जाण ॥ जागेपण त्या नाहीं

१ दोन घटका. २ शुद्ध ब्रह्माचे ठायीं. ३ थोडासा, किंचित. ४ मायिक, मिश्र. ५ नेत्ररूपअमृतानें. ६ चिखल. ७ लब्धहीन करी; लुटी. ८ ऐक्य सांगणाऱ्या.

*मो. जेथें दोनी मुहूर्तें मान वाढे ॥ त्या मानाचा अभिमान वाढे ॥ ऐसें अभिमानाचें सांकडें ॥ पहा पा रोकडें कदा न ढळे. ॥ ÷ना. कर्माचरण. ×ना. चैत्य.

॥ ५२ ॥ दृढ जो कां देहाभिमान ॥ तेंचि कनककबीजसेवन ॥ करूनि थोर भ्रमला जाण ॥ अविद्या दीर्घस्वप्नभेदु देखे ॥ ५३ ॥ वोसणतां बोली नलभे अर्थू ॥ तेवीं पठणमात्रें परमार्थू ॥ श्रुतिशास्त्रांचा निजशास्त्रार्थू ॥ नव्हे प्राप्तू तयांसी ॥ ५४ ॥ वेदाध्ययन नित्य करिती ॥ अरॅण, ब्राह्मण; सूत्र, निरुक्ती, ॥ नव्हेच कामक्रोधनिवृत्ती ॥ पठणें *परप्राप्ती कदा न घडे ॥५५॥ +देहाभिमानें भेददृष्टी ॥ पढतां श्रुतिशास्त्रांच्या कोटी ॥ परमार्थेंसि नव्हे भेटी ॥ भेददृष्टी नवचतां ॥ ५६ ॥ जोकां स्वप्नींचे स्वप्नीं जागा जाहला ॥ स्वप्नीं वेदशास्त्र पढिंनला ॥ जागा ह्मणतां असे निजेला ॥ तैसा व्यवहारू झाला शास्त्रज्ञांसी ॥ ५७ ॥ ⁂देहाभिमानेंसी भेदभान ॥ निःशेष जंव नवचे जाण ॥ तंववरी नव्हे निजज्ञान ॥ अत्यंत बंधन तो भेद ॥५८॥ सनकादिकांची आशंका ॥ घेऊनि देव बोले देखा ॥ वेदविभाग नेटका ॥ सकळलोकां कळे तैसा ॥ ५९ ॥ स्वयें प्रकाशोनि सकळभेद ॥ गर्जत उठी तुझा वेद ॥ भेद वेदेंचि प्रतिपाद्य ॥ वेदवाद नव्हे मिथ्या ॥ ४६० ॥ वेदवचन तें तात्त्विक ॥ मानावें पैं आवश्यक ॥ हे तुझीच शिकवण देख ॥ तो वेदु लटिक ह्मणावा कैसा ॥ ४६१ ॥ वेदाज्ञेचा परम नेम ॥ वेदें प्रतिपाद्य क्रियाकर्म ॥ वेदबळें वर्णाश्रम ॥ निज स्वधर्म चालविती ॥ ६२ ॥ वेद ह्मणे जो लटिक ॥ तो वेदबाह्य आवश्यक ॥ हें तूंचि बोलविसी देख ॥ तो वेद लटिक केवीं मानं ॥ ६३ ॥ ऐशी मानाल आशंका ॥ तेही ×विषयीं मीचि देखा ॥ वेदवादाच्या विवेका ॥ विभाग नेटका सांगेन ॥ ६४ ॥ अविद्याभेद सबळ ज्यासी ॥ वेद नियामक म्यां केला त्यासी ॥ मद्रूपीं अभेदता ज्या भक्तासी ॥ मिणंध्या त्यापाशीं वेदवादु ॥ ६५ ॥ वेद तितुकाही त्रिगुण ॥ अभेदभजनें भक्त, निर्गुण ॥ त्योंसि वेदाचें नियामकर्पण ॥ नचले जाण ममाज्ञा ॥ ६६ ॥ रायाचा जिवलग सेवकू ॥ त्यासि द्वारपाळ नव्हे नियामकू ॥ कां दासीस लागल्या राजांकू ॥ तीस मानी लोकू प्रधानादी ॥ ६७ ॥ ‘ निजकन्येसि शिकवी माता ॥ लाज धरावी लोकांदेखतां ॥ एकांतीं मीनल्या कांता ॥ लाज सर्वथा सांडावी ’ ॥ ६८ ॥ सबळ भेदाचें भेदभान ॥ तंव वरी दुर्लंघ्य वेदवचन ॥ अभेदभक्त माझे जाण ॥ वेदविधान त्यां न बाधी ॥ ६९ ॥ आशा तेचि अविद्याबाधू, ॥ छेदिल्या, बाधीना वेदवाद ॥ जेवीं सूर्योदयापुढें चांद ॥ होय मंद निजतेजें ॥ ४७० ॥

॥ श्लोक ॥ ॥ असत्वादात्मनोऽन्येषां भावानां तत्कृता भिदा ॥ गतयो हेतवश्चास्य मृषा स्वप्नदृशो यथा ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ गुरुकृपें जो सज्ञान ॥ त्यासि देहाचें 7अबाधित भान ॥ मिथ्या प्रपंचाचें दर्शन ॥ कर्में कर्तेपण त्या नाहीं ॥ ७१ ॥ अविद्या योतिले वर्णाश्रम ॥ तेथीचें आविश्यक क्रियाकर्म ॥ तेथील जो वेदोक्त धर्म ॥ तो अविद्याभ्रम अज्ञाना ॥ ७२ ॥ सज्ञान भक्तांच्याठायीं ॥ ते अविद्या निःशेष नाहीं ॥ मा वेदविधान तेथें पाही ॥ रिघावया कायी कारण? ॥ ७३ ॥ आंवा

१ धोत्र्याचें बीज खाणें. २ बरळतां. ३ आरण्यक. ४ ओशाळा. ५ भक्तास. ६ प्रतिबंधकपणा. ७ राजाची मांडी. ८ पतीस.

*ना. परम. +ना. देहाभिमानाचे. ⁂ना. देहाभिमानाचें भेदभान॥ निःशेष नवचेचि जाण॥ तंववरी निजज्ञान ॥ अत्यंतबंधन तो भेद. ×ना. विषयींचा मो. विषयींचे. 7बाधीना.

सफळींत जंव असे ॥ तंव नेटेंपाटें राखण बैसे॥फळ हातां आल्या आपैसें ॥ *राखण वायसें राहवेना ॥ ७४ ॥ तेवीं अविद्येचें जंव बंधन ॥ तंव वेदाचें वेदविधान ॥ अविद्या नाशिलीया जाण ॥ विधीनें तें स्नान सोडिलें ॥ ७५ ॥ अविद्या जाऊनि वर्ततां देहीं ॥ देहाचा देहत्वें हेतु नाहीं ॥ हें ह्मणाल नघडेच कांहीं ॥ ऐक तेंहीं सांगेन ॥ ७६ ॥ स्वप्नींचें देहादिप्रपंचभान ॥ स्वप्नाचमाजीं सत्य जाण ॥ जागें होतां तें अकारण ॥ संस्कारें स्वप्न दिसतांही ॥ ७७ ॥ स्वप्नीं राज्यपद पावला ॥ कां व्याघ्रमुखीं सांपडला ॥ अथवा धनादिलाभ झाला ॥ रत्नें पावला अनर्घ्य ॥ ७८ ॥ तेथींचें सुख दुःख दारिद्र ॥ जागत्यासी नाहीं देख ॥ तेंवीं सज्ञानासि अविद्यक ॥ नोहे बाधक निजबोधें ॥ ७९ ॥ देहीं असोनि विदेहस्थिती ॥ ×ऐशा ज्या बोध साधका युक्ती ॥ स्वयें सांगेन ह्मणे श्रीपती ॥ भेदाची उत्पत्ती छेदावया ॥ ४८० ॥

॥ श्लोक ॥ यो जागरे बहिरनुक्षणधर्मिणोऽर्थान् भुंक्ते समस्तकरणैर्हृदि तत्सदृक्षान् ॥ स्वप्ने सुषुप्त उपसंहरते स एकः स्मृत्यन्वयात्त्रिगुणवृत्तिदृगिंद्रियेशः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ तिहीं अवस्थांच्या ठायीं ॥ आत्मा एकचि असे देहीं॥तोचि देहाच्याठायीं विदेही ॥ साक्षी पाहीं सर्वांचा ८१ ॥ मी बाळ तोचि झालों तरुणा ॥ आतां आलों म्हातारपणा ॥ ऐशा वयसांचे साक्षीपणा ॥ आपण आपणा देखत ॥ ८२ ॥ जागृतीमि नानाभोग ॥ सविस्तर भोगी अनेग ॥ तेचि स्वप्नामाजीं चांग ॥ निजहृदयीं सांग विस्तारी ॥ ८३ ॥ जागृतिभोगाचा संस्कारु ॥ तोचि स्वप्नामाजीं विस्तारु ॥ मनोमय विश्वाकारु ॥ निजहृदयीं वेव्हारु वाढवी ॥ ८४ ॥ गज, तुरंग, खर, नर, ॥ गिरि, दुर्ग, पुर, नगर, ॥ विशाळ सरिता, समुद्र ॥ वासनेचें वैचित्र्य स्वप्न देखे ॥ ८५ ॥ नाहीं जागृती, नाहीं स्वप्न ॥ अंतःकरणाही करोनि लीन ॥ सुषुप्तिकाळीं तोचि जाण ॥ अहंकारेंवीण उरलासे ॥ ८६ ॥ "विश्वाभिमानी इंद्रियवृत्ती ॥ तेणें तो देखतसे जागृतीं ॥ तैजस अभिमानी अविद्यावृत्ती ॥ स्वप्नस्थिती तो देखे ॥ ८७ ॥ प्राज्ञ अभिमानी मूढवृत्ती ॥ तो देखतसे सुषुप्तीं" ॥ एक आत्मा तिहींप्रती ॥ न घडे निश्चितीं ह्मणाल ॥ ८८ ॥ तिहीं अवस्थांचे अभिमानी ॥ ह्मणाल देखणे भिन्न तिन्ही ॥ तरी एक आत्मा द्रष्टेपणीं ॥ उरला निदानीं तो ऐका ॥ ८९ ॥ पहिला जो कां मी जागता ॥ तेणें स्यां देखिली स्वप्नावस्था ॥ तोचि 'मी सुखें निजेला होता' ॥ या तिन्ही अवस्था स्वयें मी जाणें ॥ ४९० ॥ जेणें जे देखिली नाहीं ॥ तो ते अवस्था सांगेल कायी ॥ यालागीं तिहीं अवस्थांचे ठायीं ॥ आत्मा पाहीं अनुस्यूत ॥ ९१ ॥ 'जागृतीं इंद्रियां देखणेपण ॥ स्वप्नीं देखणें तें तंव मन ॥ सुषुप्ति गाढ मूढ जाण ॥ कैचें देखणेपण आत्म्यासी' ॥ ९२ ॥ इही आशंकेचें वचन ॥ ऐका द्विजहो सावधान ॥ मनइंद्रियें जडें जाण ॥ देखणेपण त्यां कैचें ॥ ९३ ॥ जो मनाचा चाळकु ॥ जो इंद्रियांचा प्रकाशकु ॥ जो सुषुप्तीचा द्योतकु ॥ साक्षित्वें एकु तो आत्मा ॥ ९४ ॥ ह्मणाल सुषुप्तीं आत्मा नाहीं ॥ हें बोलणें नघडे कांहीं ॥ मी सुखें निजेलों होतों पाहीं ॥ हें कोणाचे ठायीं जाणवे ॥ ९५ ॥ +प्रकृति-

१ वृथा. २ अमूल्य. ३ ज्ञान देणाऱ्या. ४ व्यापक.

*मो. राखण वोसे बैसेना.ना. राखण वाया वसे राहेना. ×ना. ऐशा ज्या बाधका साधका अतियुक्ती. +मो. प्रकृतीहूनि परता.

कार्यें्ठनि परता ॥ देहादिअवस्थांतें प्रकाशिता ।। गुणइंद्रियांचा नियंता ।। जाण तत्त्वतां तो आत्मा ।। ९६ ॥ इंद्रियें आत्मा नव्हती हा नेम ।। त्यांचें सदा एकदेशी कर्म ।। आत्मा सर्व-कर्त्ता सर्वोत्तम ।। करोनि निष्कर्म सर्वदा ॥ ९७ ॥ मन आत्मा नव्हे तें ऐक वर्म ॥ संकल्प-विकल्प त्याचें कर्म ।। आत्मा निर्विकल्प निरुपम ॥ विश्रामधाम जगाचें ।। ९८ ॥ जो सुषुप्ति सुखभोगसाक्षी ॥ जो देखणेपणें तिहीं लोकीं ॥ तो मी आत्मा गा एकाकी ।। जाण निश्चिंतीं निश्चित ॥ ९९॥ एवं युक्तीचिया विभागलीला ।। परमात्मा जो एक साधिला ॥ तो साधकांसि उपयोगा आला ।। योग सिद्धी नेला तेणें बळें ॥ १०० ॥

|| श्लोक || एवं विमृश्य गुणतो मनसस्त्र्यवस्था मन्मायया मयि कृता इति निश्चितार्थाः॥ संछिद्य हार्दमनुमानसदुक्तितीक्ष्णज्ञाना।सिनाभजत माऽखिलसंशया-धिम् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ म्यां सांगीतल्या ज्या युक्ती ॥ ज्या कां श्रुतिशास्त्रार्थसंमती ॥ त्या विचारूनि पर-मार्थगतीं ।। संसारगुंती उगवावी ॥ १ ॥ संसारगुंतीसि कारण गुण ॥ गुणावस्थीं व्यापिलें मन ॥ त्यासि माझी माया मूळ जाण ॥ जिया केलें आवरण माझेंची ॥ २ ॥ माझी माया माझेनि सबळ ॥ त्या मजचि आवरिलें तत्काळ ।। जैसें डोळ्याचें डोळां जळ ॥ गोठूनि पडळ होऊनि ठाके ।। ३ ॥ कां पूर्णचंद्र अति निर्मळ ॥ तेथ पृथ्वी बिंबली सकळ ॥ तेणें सलांछन[1] चंद्रमंडळ ।। लोक सकळ देखती ॥ ४ ॥ पृथ्वीचंद्रांसि अंतर ॥ विचारितां दुरंतर ।। मिथ्या बांधिला रजनीकर[2] ।। ते लोक साचार मानिती ॥ ५ ॥ यापरी माया माझ्याठायीं ॥ आतळली नाहीं कहीं ॥ *मिथ्याभासें लोक पाही ।। तिच्याठायीं भुलले ॥६॥ तेणें नाथिली गुणावस्था ॥ +अहंकर्तृत्वें घेतली माथां ॥ तेणें विषयभोग अवस्था ।। वासनायुक्त वाढल्या ॥ ७ ॥ एवं उभयदेहबंधन ॥ मिथ्या जीवत्वें लागलें जाण ।। त्याचें करावया छेदन ।। माझ्या युक्ती जाण विवराव्या[3] ।। ८ ॥ करितां युक्तीचें अनुमान ॥ तेणें अनुमानिक होय ज्ञान ॥ न तुटे अविद्याबंधन ॥ यालागीं साधुजन सेवावे ॥ ९ ॥ साधूंमाजीं साधुत्व पूर्ण ॥ सेवावे सद्गुरुचरण ।। तेणें निरसे भवबंधन ।। साधुसज्जन तो सद्गुरु ॥ ११० ॥ त्या साधूंचिया सदुक्ती ।। श्रुत्यर्थ उपदेश करिती ॥ तेणें होय ज्ञानखड्गाची प्राप्ती ।। जो बुद्धीच्या हातीं हातवशी ॥११॥ तेंही नैराश्य वैराग्य साहाणें ।। लावूनि सतेज शस्त्र करणें ॥ धृतीच्या धारणा दृढ धरणें ॥ सावधपणें निःशंक ॥ १२ ॥ शस्त्रासि आणि आपणा ॥ एकपणाची धारणा ॥ दृढ साधूनि साधना ।। देहाभिमाना छेदावें ॥१३॥ जो सकळसंशयांचा कंदू ॥ जेणें देहदुःखाचा उद्बोधू ॥ ज्याचेनि सदा विषयछंदू ॥ जो कामक्रोधपोषकू ॥१४॥ जो वाढवी तिनी गुण ॥ जो शुद्धासी[4] आणी जीवपण ।। ज्याचेनि जन्ममरण ॥ दुर्निवार जाण लागलें ॥ १५ ॥ जो सकळ अनर्थांचा दाता ।। ज्याची लडेवाळ कन्या ममता ॥ यासि वाढवी माया माता ॥ तिच्या सत्ता हा दाटुगा ॥ १६ ॥ तेथें शस्त्राचेनि लखलखाटें ।। राहोनिया नेटेंपाटें ॥ समरां

१ सकलंक. २ चंद्र. ३ स्पष्ट कराव्या. ४ शुद्धब्रह्माला.

*ना. मिथ्या आभास लोका पाही मो. मिथ्या आभासे लोक पाही. +ना. अहंकर्तृत्वें घेतलें माथा.

गणीं सुभटें ।। घाय येणें नेटें हाणावा ।। १७ ।। एकेचि घायें जाण ।। माया ममता अभिमान ।। त्रिपुटीचें होय छेदन ।। येणें बळें जाण छेदावा ।। १८ ।। भोग्य भोग भोक्ता ।। कर्म कार्य कर्ता ।। ध्येय ध्यान ध्याता ।। त्रिपुटी तरवतां छेदावी ।।१९।। अहं कोहं सोहं स्वभावो ।। हाही छेदूनि अहंभावो ।। साधकां निजपदीं ठावो ।। ब्रह्म स्वयमेवो होऊनि ठेले ।। ५२० ।। हाणाल सांगतां जो प्रकारू ।। तो शब्दज्ञानवेव्हारू ।। बोलाचा कडकडाट थोरू ।। कैसेन अहंकारू मारवे ।। २१ ।। शब्दमात्रें अभिमान ।। जरी पावता निर्दळण ।। तरी कां पां विद्वज्जन ।। अभिमानमत्त होताती ।। २२ ।। अभिमान संमुख दिसता ।। तरी धांवोनि करूं ये घाता ।। तो अतर्क्य जी सर्वथा ।। शब्दें अहंता मरेना ।। २३ ।। घडे अपरोक्षसाक्षात्कारू ।। तो शब्दमात्रें नव्हे प्रकारू ।। ऐसा आशंकेचा विचारू ।। ऐक निर्धारू सांगेन ।। २४ ।। जो अनन्यभावें माझें भजन ।। सर्वदा करी सावधान ।।कां सद्गुरूचे श्रीचरण ।। सद्भावें जाण जो सेवी ।।२५।। मज आणि सद्गुरुमूर्त्ती ।। भेद नाहीं गा कल्पांतीं ।। येणें अभेदभावें जे भजती ।। ते ज्ञान पावती सहजचि ।। २६ ।। त्यांसि स्वभावें भजनस्थिती ।। ज्ञानखड्गाची होय प्राप्ती ।। सहजें सांपडे हातीं ।। ज्या शस्त्रदीप्ती काळ कांपे ।। २७ ।। ज्या शस्त्राच्या धाकाभेण ।। माया ममता अभिमान ।। सांडूनियां जीवपण ।। समूळ जाण पळाल्ीं ।। २८ ।। हाणावया पुरता घावो ।। अहंममतेसि नाहीं ठावो ।। अविद्येचाही अभावो ।। अपभयें पडाहो आपणची ।।२९।। सद्भावें जें माझें भजन ।। करितां एवढें होय ज्ञान ।। तेथें आशंका करील मन ।। कोठें भजन करावें ।। ५३० ।। तुझें स्वरूप अतर्क्य जाण ।। अतिसूक्ष्म आणि निर्गुण ।। तुज भजावया कवण स्थान ।। आह्मांसि जाण कळेना ।। ३१ ।। ऐसें कल्पील जरी मन ।। तरी ऐक सावधान ।। अतिसूक्ष्म भजनस्थान ।। मी सांगेन तें ऐक ।। ३२ ।। नुलंघितां पर्वतकोटी ।। न रिघतां गिरिकपाटीं ।। दुरी न करितां आटाटी ।। जें स्थानीं भेटी सदा माझी ।। ३३ ।। भजनस्थान निरुपम ।। जेथ मी वसे पुरुषोत्तम ।। प्राप्तीलागीं अतिसुगम ।। विश्रामधाम भक्तांचें ।। ३४ ।। सर्वसुखांचा आराम ।। निजहृदयीं आत्माराम ।। सर्वदा असे मम ।। भजावें सप्रेम तेठायीं ।। ३५ ।। आदि ब्रह्मा अंतीं मशक ।। सर्वांचे हृदयीं मीचि एक ।। ऐसें पाहे तो सभाग्य देख ।। हें भजन चोख मत्प्राप्ती ।। ३६ ।। ज्या मज हृदयस्थाचे दीप्ती ।। मनबुद्ध्यादिकें वर्तती ।। ज्या माझिया स्फुरणस्फूर्ती ।। ज्ञानव्युत्पत्ती पायां लागे ।। ३७ ।। त्या मज हृदयस्थाच्याठायीं ।। भजनशीळ कोणीच नाहीं ।। शिणतां बाह्यउपायीं ।। जन अपायीं पडताती ।। ३८ ।। देशांत सदैव कोणी एक ।। निजभाग्यें अत्यंत चोख ।। मज हृदयस्थाचा विवेक ।। करूनि निष्टंक मद्भजनीं ।। ३९ ।। करितां हृदयस्थाचें भजन ।। माझें पावे तो निजज्ञान ।। वैराग्ययुक्त संपूर्ण ।। जे ज्ञानीं पतन रिघेना ।। ५४० ।। ज्या ज्ञानाभेणें जाण ।। धाकेंचि पळे अभिमान ।। तें मी आपुलें त्यांसि दें ज्ञान ।। जे हृदयस्थाचें भजन करिती सदा ।। ४१ ।। ज्या ज्ञानाचिये ज्ञानसिद्धी ।। अखिल जाती आधिव्याधी ।। संशय पळती त्रिशुद्धी ।। भक्त निजपदीं पावती ।। ४२ ।। सबळबळें सुभटें ।। शस्त्राचेनि लखलखाटें ।। संशय छेदावा कडकडाटें ।। हें स्यां नेटेंपाटें सांगीतलें ।। ४३ ।। यावरी असें गमलें चित्तीं ।। संसाराची सत्य-

१ स्वरूपप्रतीति. २ शस्त्राचे तेजानें. ३ धाकानें. ४ दुःखांत. ५ दैवशाली. ६ मनोव्याधी व शरीरव्याधी.

प्राप्ती ॥ त्यासि शस्त्र घेऊनि हातीं ॥ कोणे युक्तीं छेदावा ॥ ४४॥ तरी संसार तितुकी भ्रांती ॥ हेंचि सांगावया दृष्टांतीं ॥ पुढील श्लोकाची श्लोकोक्ती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ ईक्षेत विभ्रममिदं मनसो विलासं दृष्टं विनष्टमतिलोलमलातचक्रम् ॥ विज्ञानमेकमुरुधेव विभाति माया स्वप्नस्त्रिधा गुणविसर्गकृतो विकल्पः ॥३४

॥ टीका ॥ देहादि अहंकारपर्यंत ॥ पिंड ब्रह्मांड जें भासत ॥ तें मनोमात्र विलसत ॥ मिथ्याभूत संसार ॥ ४६ ॥ जैसें स्वप्नीं निद्रेमाजीं मन ॥ स्वयें होय त्रिभुवन ॥ तैसेंचि हें दीर्घस्वप्न॥ अविद्या जाण विकाशी ॥ ४७ ॥ आन असूनि आन देखती ॥ त्यानांव आभास ह्मणती ॥ [1]शुक्तिकेमाजीं [2]रजतभ्रांती ॥ दोरातें ह्मणती महासर्पू ॥ ४८ ॥ सूर्याचे किरण निखळ ॥ ते-ठायीं देखती मृगजळ ॥ तैशी शुद्ध वस्तू जे केवळ ॥ तो संसार बरळ ह्मणताती ॥ ४९ ॥ तया आरोपासि [3]अधिष्ठान ॥ मीचि साचार असें आपण ॥ जेवीं कां कोलिताचें [4]कांकण ॥ अग्नि तेजें जाण आभासे ॥ ५५० ॥ अलातचक्रींचा निर्धार ॥ अग्नि सत्य मिथ्या चक्र ॥ तेवीं निर्धारितां संसार ॥ ब्रह्म साचार भव मिथ्या ॥ ५१ ॥ तेथ आधिदैव आधिभौतिक ॥ आध्यात्मिकादि सकळिक ॥ अलातचक्राच्या ऐसे देख ॥ त्रिगुणमायिक परिणाम ॥ ५२ ॥ कोलिताचेनि भ्रमें भासे ॥ भ्रमणबळें तें चक्र दिसे ॥ क्षणां दिसे क्षणां नासे ॥ तैसा असे हा संसारु ॥ ५३ ॥ जंव भ्रमणाचें दृढपण ॥ तंव कोलिताचें कांकण ॥ भ्रम गेलिया जाण ॥ कांकणपण असेना ॥ ५४ ॥ तेवीं जंव जंव भ्रम असे ॥ तंव तंव दृढ संसार भासे ॥ भ्रम गेलिया अनायासें ॥ संसार नसे पाहतांही ॥ ५५ ॥ मी देहो, हे माझे कलत्र पुत्र ॥ हें भ्रमाचें मुख्य सूत्र ॥ तें न छेदितां पामर ॥ [5]मुक्त अहंकार मिरविती ॥ ५६ ॥ एवं मायामय संसार ॥ ऐसा जाणोनि निर्धार ॥ तेथील सांडूनि अत्यादर ॥ उपरम प्रकार सांगत ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ दृष्टिं ततः प्रतिनिवर्त्य निवृत्ततृष्णस्तूष्णीं भवेन्निजसुखानुभवो निरीहः ॥ संदृश्यते क्व च यदीदमवस्तुबुद्ध्या त्यक्तं भ्रमाय न भवेत्स्मृतिरानिपातात् ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ पूर्वील भजनपरिपाठीं ॥ सहजें निर्मळ झाली दृष्टी ॥ मिथ्या सांसारिक त्रिपुटी ॥ हा निर्धार पोटीं दृढ झाला ॥ ५८ ॥ तेथें सांसारिक त्रिपुटी ॥ सांडूनि *उपरमवितां दृष्टी ॥ मज हृदयस्थासि होय भेटी ॥ जेवीं सुवर्णदृष्टीं अळंकारू ॥ ५९ ॥ तेथ दृश्य द्रष्टा दर्शन ॥ मोडूनि त्रिपुटीचें भान ॥ तेंचि धारणा तेंचि ध्यान ॥ ×तेथ समाधान धरावें ॥ ५६० ॥ +तेंचि अंगें व्हावया आपणा ॥ सांडावी सकळ तृष्णा ॥ वाचेसि धरावें महामौना ॥ देहचेष्टा जाणा आवराव्या ॥६१॥ सांडावी ।वेदशास्त्रव्युत्पत्ति वाड ॥ सांडावी वाग्वादबडबड ॥ भगवद्भावो धरावा दृढ॥जेणें आशेचें बुड समूळ छेदे॥६२॥काया वाचा आणि मन॥दृढ आवरावें आपण॥ तुटों नेदावें [6]अनुसंधान ॥ सदा सावधान निजरूपीं ॥६३॥ते स्वरूपसुखीं लोधल्या जाण ॥ देहा-

१ शिंपेंत. २ रुप्याची भ्रांती. ३ भ्रमिष्ट. ४ वर्तुळ, अलातचक्र. ५ मुक्ततेचा अभिमान. ६ चिंतन.
*ना. परतवितां. ×ना. तें सावधान धरावें. +ना. तें अंगें होआवयालागीं आपणा, सांडूनी सकळ तृष्णा. ।ना. व्युत्पत्तीची चाड.

चें स्फुरेना देहपण ॥ अहंकारेंसि मावळे मन ॥ स्वानंद पूर्ण वोसंडे ॥ ६४ ॥ तेथ संमुख ना पाठिमोरें ॥ एकपण ना दुसरें ॥ देव भक्त हेंही नुरे ॥ सुखें सुखभरें सुखरूप ॥ ६५ ॥ मी एक सुखरूप आहें ॥ हें वेगळेपण ठावें नोहे ॥ येणें आत्मानुभवें राहे ॥ एवढी प्राप्ती होये मद्भक्तां ॥ ६६ ॥ ह्मणाल काष्ठाच्या परी त्यासी ॥ पडला असेल अहर्निशीं ॥ हेंही नघडे गा तयासी ॥ सांडूनि *देहूसी देहीं वर्ते ॥ ६७ ॥ तोही प्रारब्धाचेनि बळें ॥ आहारनिद्रादि खेळेंमेळें ॥ देहींचीं कर्में करितां सकळें ॥ सर्वथा नातळे देहबुद्धी ॥ ६८ ॥ दंड काढोनि नेलिया कुंभारें ॥ पहिल्या भवंडीं चक्र फिरे ॥ तेवीं प्रारब्धाचेनि संस्कारें ॥ कर्मानुसारें देह वर्ते ॥ ६९ ॥ कुलालचक्रीं बैसली माशी ॥ नहालतां भोंवे चक्रासरसी ॥ कोटी फेरे ह्मणती तिसी ॥ तेवीं ×मुक्तासी देहकर्में ॥ ७० ॥ यापरी देहकर्मी वर्ततां ॥ ज्ञाता न ह्मणे 'अहं कर्ता' ॥ जेवीं वाऱ्याचिया स्वभावतां ॥ दिसे चपळता गळितपत्रीं ॥ ७१ ॥ जेवीं कां पुरुषासवें छाया असे ॥ परी ते छायेसि पुरुष न बैसे ॥ तेवीं ज्ञात्यासवेंही देह दिसे ॥ परी तो देहदोषें मैळेना ॥ ७२ ॥ निजछायेसि वैसों जातां ॥ छायाचि पळे तत्त्वतां ॥ तेवीं मद्भक्तीं माया पाहतां ॥ माया स्वभावतां देह मिथ्यात्वें पळे' ॥ ७३ ॥ हो कां मुक्ताफळांची माळा ॥ भ्रमें सर्परूप भासली डोळां ॥ तेचि भ्रमांतीं घालितां गळां ॥ नुपजे कंटाळा सर्पभयाचा ॥ ७४ ॥ तेवीं अधमोत्तम योनी ॥ कां वंशनिंद्य जे जनीं ॥ ते मी ह्मणतां ज्ञानी ॥ शंका नमनी देहमिथ्यात्वें ॥ ७५ ॥ यापरी ते अतिसज्ञान ॥ जाणोनि देहाचें मिथ्याभान ॥ देहकर्मी वर्ततां जाण ॥ देहाचें देहपण स्फुरेना ॥ ७६ ॥ तो देहो सर्वांगीं तोडितां ॥ कां वृकव्याघ्रादिकीं फाडितां ॥ कां अग्निमाजीं पडाडितां ॥ त्यासि देहअहंता स्फुरेना ॥ ७७ ॥ आपुली छाया देखिली सुळीं ॥ तीलागीं पुरुष न तळमळी ॥ तेवीं देहाची होतां होळी ॥ ज्ञाता न हळहळी निजबोधें ॥ ७८ ॥ ह्मणाल देहसंगें वर्ततां ॥ केवीं बाधीना देह अहंता ॥ सांडूनि अंगींची क्षारता ॥ लवण ‡तत्त्वतां उरे कैसें ॥ ७९ ॥ हिंग सांडूनि आपुली घाणी ॥ केवीं राहे सुगंधपणीं ॥ निःशेष सांडोनि अंगींचें पाणी ॥ केळी केळीपणें उरे कैंची ॥ ८० ॥ नझुंज ह्मणोनि रणीं रिघतां ॥ जेवीं कां घाय वाजती माथां ॥ तेवीं देहसंगें वर्ततां ॥ देहअहंता सोडीना ॥ ८१ ॥ येविषयीं ऐका सावधान ॥ ज्ञात्यासि देहाचें +बाधीना भान ॥ तेथें स्फुरे जो अभिमान ॥ तो भाजिलें जाण बीज जैसें ॥ ८२ ॥ भाजितबीजें जाण ॥ हों शके क्षुधाहरणें ॥ परी करितां बीजारोपण ॥ अंकुर जाण त्या नाहीं ॥ ८३ ॥ चित्रामाजीं व्याघ्र दिसे ॥ परी बाधकत्व त्यासि नसे ॥ तेवीं भाजितअभिमानशेषें ॥ बाधा नसे ज्ञात्यासी ॥ ८४ ॥ चित्रींच्या वाघासि जाण ॥ निःशेष नाहीं व्याघ्रपण ॥ तेवीं मुक्तांच्या देहासि जाण ॥ देहपण असेना ॥ ८५ ॥ दृढ ठसावल्या चैतन्यघन ॥ स्वरूपीं वृत्ति होय निमग्न ॥ तेव्हां दिसे तेंही भाजित ≀भान ॥ तेंही स्फुरण निमालें ॥ ८६ ॥ ऐशी मावळल्या स्मृति ॥ ज्ञात्याची वर्तती स्थिती ॥ स्वयें सांगत श्रीपती ॥ यथानिगुतीं निजबोधें ॥ ८७ ॥ सर्वकर्मी वर्ततां जाण ॥ देहाचें स्फुरेना देहपण ॥ तें मुख्य समाधिलक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ८८ ॥

---

१ मित्रभावानें, विनोदानें २ मोत्यांची. ३ भ्रम गेल्यावर. ४लांडगे वाघ इत्यादिकांनीं. ५ भाजलेलें बीं. ६ भूक नाहींशी करणें.

*ना. देहासी. ×ना. भक्तासी. ‡मो. सर्वथा. +ना. अबाधित. ≀ना. ज्ञान. मो. भजन.

॥ श्लोक ॥ देहं च नश्वरमवस्थितमुत्थितं वा सिद्धो न पश्यति यतोऽध्यगमत्स्वरूपम् ॥ दैवादुपेतमुत दैववशादपेतं वासो यथा परिकृतं मदिरामदांधः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ जया देहाचेनि सद्भजनें ॥ माझें शुद्धस्वरूप पावणें ॥ त्या देहासि *विसरिजे तेणें । मी माझेपणें देखेना ॥ ८९ ॥ जेवीं कां भाडियाचें घोडें ॥ जेणें आणिलें निजधामा रोकडें । तें आहे कीं गेलें कोणीकडे ॥ हें स्मरेना पुढें तो जैसा ॥ ५९० ॥ होकां भेटावया भतारासीं ॥ सवें मजुर आणी विश्वासी ॥ ते पतीसि पहुडल्या राणिवेसीं ॥ त्या मजुरासी विसरली ॥ ९१ ॥ कां जो दैवयोगें पालखीं चढे ॥ तो पूर्वील तुटके मोचडे ॥ आहेत कीं गेले कोणीकडे ॥ हें स्मरेना पुढें तेणें हरिखें ॥ ९२ ॥ होकां बहुकाळें पती जैसी ॥ भर्तारू मीनल्या निजसेजेसी ॥ निःशेष विसरे लाजेसी ॥ देहाची तैशी दशा जाहली ॥ ९३ ॥ त्या दांपत्याचे सुखभेटी ॥ पारिखें देखतां लाज उठी ॥ तेवीं देहाचें भान द्वैतदृष्टीं ॥ मदैक्यपुष्टीं देह कैचें ॥ ९४ ॥ एवं पावोनि ×माझ्या स्वरूपासी ॥ स्वानंदपूर्ण साधकासी ॥ सुखें सुखरूपता जाहली त्यासी ॥ निजदेहासी विसरोनि ॥ ९५ ॥ मग उठलें कीं बैसलें ॥ चालतें कीं राहिलें ॥ जागतें कीं निजलें ॥ हें स्मरण ठेलें देहाचें ॥ ९६ ॥ हें धालें कीं भुकेलें ॥ हिंवसें कीं तापलें ॥ प्यालें कीं तान्हेलें ॥ हें +स्मरेना तो ॥ ९७ ॥ हें येथें कीं तेथें ॥ मुकें कीं बोलतें ॥ होतें कीं नव्हतें ॥ हें ॐस्मरेना तो ॥ ९८ ॥ हें ओंवळें कीं सोंवळें ॥ चोखट कीं मैळें ॥ डोळस कीं आंधळें ॥ हें ३स्मरेना तो ॥ ९९ ॥ हें आलें कीं गेलें ॥ होतें कीं केलें ॥ जाहलें कीं मेलें ॥ हें स्मरेना तो ॥ ६०० ॥ हें बाळ कीं प्रौढ ॥ मोठें कीं रोड ॥ हळू कीं जड ॥ हें ०स्मरेना तो ॥ १ ॥ हें खाटें कीं भुयीं ॥ ठायीं कीं कुठायीं ॥ आहे कीं नाहीं ॥ हें कांहीं स्मरेना तो ॥ २ ॥ हें मंत्रीं कीं तंत्रीं ॥ तीर्थीं कीं क्षेत्रीं ॥ विष्ठीं कीं मूत्रीं ॥ कांहीं चित्तीं स्मरेना तो ॥ ३ ॥ हें जनीं कीं वनीं ॥ अथवा निरंजनीं ॥ जपीं कीं ध्यानीं ॥ हें कांहीं मनीं स्मरेना तो ॥ ४ ॥ हें सुजनीं कीं दुर्जनीं ॥ वंदीं कीं विमानीं ॥ मंदिरीं कीं मसणीं ॥ हें कांहीं स्मरेना तो ॥ ५ ॥ हें गजीं कीं तुरगीं ॥ कीं अंगनासंभोगीं ॥ खरीं कीं उरगीं ॥ हेंही अंगीं स्मरेना तो ॥ ६ ॥ हें काशीं कीं कैकटीं ॥ नरकीं कीं वैकुंठीं ॥ दरीं कीं कपाटीं ॥ हेंही पोटीं स्मरेना तो ॥ ७ ॥ हें पूजिलें कीं गांजिलें ॥ धरिलें कीं मारिलें ॥ देहाचें येकही केलें ॥ कांहीं झालें स्मरेना तो ॥ ८ ॥ मी शेषशयनावरी ॥ कीं मातंगाच्यां घरीं ॥ कीं बैसलों शूळावरी ॥ हें निर्धारीं स्मरेना तो ॥ ९ ॥ ऐशी ज्ञात्याची निरभिमानता ॥ माझेनि न सांगवे तत्त्वतां ॥ जे पावले माझी सायुज्यता ॥ त्यांची कथा न बोलवे ॥ ६१० ॥ जेथ वेदां मौन पडे ॥ स्वरवर्णेंसि वाचा बुडे ॥ त्या संतांचे पवाडे ॥ माझेनिही निवाडें न सांगवती ॥ ११ ॥ ऐकोन सज्ञानाची स्थिती ॥ तुह्मासि गमेल ऐसें चित्तीं ॥ केवळ जड मूढ झाली प्राप्ती ॥ एकही स्फूर्ती स्फुरेना ॥ १२ ॥ जेवीं कां केवळ पाषाण ॥ तैसें झालें अंतःकरण ॥ एकही स्फुरेना स्फुरण ॥ ज्ञातेपण घडे

---

१ पतिसह. २ अंतःपुरांत. ३ जोडे. ४ परकें. ५ थांबलें. ६ स्मशानांत. ७स्त्रीच्या भोगांत. ८ सर्पावर. ९ कैकाड देशांत. १० गिरिगुहेंत. ११ मांगाच्या.

*ना. विसर्जी तेणें मो. विसरिजे जेणें. ×ना. भिज. +हें जाण वहिलें स्मरेना तो. ॐना. हें निरुतें स्मरेना तो. ३ना. कांहीं केलें स्मरेना तो. ०ना. कांहीं सदृढ स्मरेना तो.

से ॥ १३ ॥ ऐशी धरिल्या आशंका ॥ तेविषयीं सावध ऐका ॥ ज्ञानअज्ञानभूमिका ॥ अत-
थें लोकां निश्चित ॥ १४ ॥ केवळ जें शुद्ध ज्ञान ॥ आणि जडमूढ अज्ञान ॥ दोहींची दशा
मान ॥ तेथीलही म्हण मी जाणें ॥ १५ ॥ निबिड दाटला अंधकारू ॥ त्यामाजीं काजळाचा
गिरू ॥ तेथ आंधळा आला विभाग करूं ॥ तैसा व्यवहारू अज्ञाना ॥ १६ ॥ शोधावया
ध्यात्मग्रंथ भले ॥ अंधमूकांहातीं दीधले ॥ ते पेकें ना देखे ना बोले ॥ *तैसें जडत्वें झालें
ज्ञान ॥१७॥ ऐशी अज्ञानाची गती ॥ ऐका सज्ञानाची स्थिती॥ अपरोक्षसाक्षात्कारप्रतीती॥
ीं वर्त्तती विदेहत्वें ॥ १८ ॥ जैशीं कां रत्नें आणि गारा ॥ दोहींचा मांडिला उभारा ॥ मोल
चूनि नेती हिरा ॥ फुकट गारा नघेती ॥ १९ ॥ जैसें कण आणि फोलकट ॥ दोहींसि वाढी
कवाट ॥ तैसें ज्ञानाज्ञान निकट ॥ दिसे सम सकट सारिखें ॥ ६२० ॥ जैसीं कां खरें कुडें
णें ॥ पाहतां दिस सारिखेपणें ॥खरें पारखोनि घेती +दिव्यणे ॥ मुखीं नाहणें तेठायीं ॥२१॥
वीं ज्ञानाज्ञानाची पेंठ ॥ भेसळली दिसे एकवट ॥ तेथ अनुभवीं चुकल्या वाट ॥ पाखंड उ-
द अंगीं वाजे ॥ २२ ॥ यालागीं मद्भक्तापाशीं आलें ॥ जे माझ्या विश्वासा टेंकले ॥ त्यांसि
पां निजरूप आपुलें ॥ खरें दीधलें अतिगुह्य ॥ २३ ॥ माझ्या नामविश्वासासाठीं ॥ प्रह्लाद
हे पायें ×पिटी ॥ न घेतां भक्ती त्यागे पाठी ॥ विश्वासें भेटी माझ्या रूपी ॥ २४ ॥ पावोनि
ाझ्या निजस्वरूपासी ॥ ‡तेंचि ते झाले मद्रूपेंसी ॥ जेवीं लवण मीनल्या जळासी ॥ लव-
णपणासीं मुकलें ॥ २५ ॥ तेथ मी एक लवण ॥ हेंही विराली आठवण ॥ स्वयें *समुद्र
ालें जाण ॥ तेवीं सज्ञान मद्रूपें ॥२६॥ ऐसें पावोनि माझ्या स्वरूपासी ॥ विसरले देहअभि-
ानासी ॥ झाले चैतन्यघन सर्वांशीं ॥ आनंदसमरसीं निमग्न ॥ २७ ॥ ' जेवीं दोरीं सर्पू उप-
ला ॥ नांदोनि स्वयें निमाला ॥ तो दोरें नाहीं देखिला ॥ तैसा झाला देहभाव मुक्तां ' ॥२८॥
व्हां मी न हे आठवण ॥ आठविते आहे कोण ॥ विसरोन गेलें अंतःकरण ॥ आपण्या
ापण विसरला ॥ २९ ॥ तेथ कैचा स्वर्ग कैचा नरक ॥ कैचें योग्य कैचें योग्य ॥ कैचे
तुर्दश लोक ॥ ब्रह्म एक एकलें ॥ ६३० ॥ कैचें पवित्र कैचें अपवित्र ॥ कैचें तीर्थ कैचें क्षेत्र ॥
चे वेद कैचें शास्त्र ॥ ब्रह्म स्वतंत्र अद्वय ॥ ३१ ॥ तेथ कैचा उत्पत्तिविनाश ॥ कैचा वैकुंठ
ास ॥ कैचा ब्रह्मा विष्णु महेश ॥ एक अविनाश उल्लासे ॥ ३२ ॥ तेथ कैचा बोधू
ची बुद्धी ॥ देवपण बुडालें त्रिशुद्धी ॥ लाजा निमाली मोक्षसिद्धी ॥ कैचा क्षीराब्धिशेष-
ायी ॥ ३३ ॥ तेथ माझीही भगवंतता ॥ हारपोनि जाय तत्त्वतां ॥ प्रणवाच्या बुडाला माथा ॥
शी सायुज्यता पावले ॥ ३४ ॥ यालागीं देहाचें केलें, ठेलें ॥ अथवा आलें कां गेलें ॥ हें
कुरेना जें बोलिलें ॥ तें विशद केलें यारीतीं ॥ ३५ ॥ अविद्या कारण देह कार्य ॥ ते अविद्या
ासोनि जाये ॥ कारण नासल्या कार्य राहे॥ हें नवडे पाहे म्हणाल॥३६॥ वृक्ष समूळीं उपडिला
ाये ॥ सार्द्रत्व तत्काळ नजाये ॥ पत्र पुष्प फळ सार्द्र राहे ॥ शुष्क होये अतिकाळें ॥ ३७ ॥
वीं अविद्या नासोनि जाये ॥ भोगानुरूप दैव जें राहे ॥ तेणें ज्ञाता वर्त्तताहे ॥ निजदेहीं पाहे
देहत्वें ' ॥ ३८ ॥ म्हणाल वादवितां वाडेंकोडें ॥ प्रतिपाळितां सुरवाडें ॥ राखतराखतां देह

१ आकृति. २ फोल. ३ खोटें. ४ फसगे. ५ डंडांस पायाखालीं तुडवी. ६ भगदिसात व अतलादिसात.
*ना. तैसें जडत्व आलें अज्ञाना. +ना. शहाणे. ×ना. लोटी. ‡ना. तें चित्त झालें.
ना. समुद्र.

पडे ॥ प्रत्यक्ष रोकडें दिसताहे ॥ ३९ ॥ ज्याचें देह त्यासि दृढ नव्हे ॥ तरी तें तत्काळचि पडावें ॥ वांचलें असे कोणेभावें ॥ ऐसें कांहीं जीवें कल्पाल ॥ ६४० ॥ ज्याचें देह तो नपुसे त्यातें ॥ तरी तें देह केवीं कर्मीं वर्ते ॥ ऐशी आशंका तुह्मांतें ॥ तरी ऐका सावचित्तें सांगेन ॥ ४१ ॥ 'देहाचें उत्पत्ति स्थिति निधन ॥ पुरुषासि वश्य नव्हे जाण ॥ त्यासि अदृष्टचि प्रमाण ॥ दैवयोगें चळण देहाचें' ॥ ४२ ॥ उठणें कां बैसणें ॥ तें देहासि दैवगुणें ॥ अदृष्टगतीं देणें घेणें ॥ खाणें जेवणें अदृष्टें ॥ ४३ ॥ स्वदेशीं कां परदेशीं ॥ अदृष्ट नेतसे देहासी ॥ स्वर्ग नरक भोगासी ॥ अदृष्ट देहासी उपजवी ॥ ४४ ॥ यश लाभ हानि मृत्यु ॥ देहासि अदृष्टें असे होतू ॥ ज्ञाता देहासि अलिप्तू ॥ जैसा घटांतू चंद्रमा ॥ ४५ ॥ जैशी छाया पुरुषासरसी ॥ तैशी काया सज्ञानासी ॥ ते राहिली अदृष्टापाशीं ॥ निज कर्मासी भोगावया ॥४६॥ जन्मोनि छाया सरसी वाढे ॥ माझी ऐशी अहंता नचढे ॥ तैसेंच देह ज्ञात्याकडे ॥ मी ह्मणोनि पुढें येवों नशके ॥ ४७ ॥ 'सदा छाया सरिसी असे ॥ परी कोठें असे कोठें वसे ॥ हें ज्याची तोचि नपुसे ॥ देहाचें तैसें वर्तन झालें' ॥ ४८ ॥ छाया विष्ठेवरी पडे ॥ कां पालखीमाजीं चढे ॥ पुरुषासि सुखदुःख नजोडे ॥ ज्ञात्यासि तेणें पाडें देहभोग ॥ ४९ ॥ येथवरी निजदेहासी ॥ कैसेन विसर पडिला त्यासी ॥ ऐक त्याही अभिप्रायासी ॥ दृष्टांतेंसी सांगेन ॥६५०॥ जो मोलें मदिरा पिवोनि ठाये ॥ तो तेणें मदें नाचे गाये ॥ देहवंत देह विसरोनि जाये ॥ वस्त्र नाहीं आहे स्मरेना ॥ ५१ ॥ हा तंव ब्रह्मरस प्याला ॥ परमानंदें तृप्त झाला ॥ देहो झाला कीं मेला ॥ आठवू ठेला तेणें मदें ॥ ५२ ॥ एवं देहाचें भरण पोषण ॥ जन्म अथवा मरण ॥ तें दैवयोगें जाण ॥ तेंचि निरूपण हंस बोले ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ देहोऽपि दैववशगः खलु कर्म यावत्स्वारंभकं प्रतिसमीक्षत एव सासुः ॥ तं सप्रपंचम[४]धिरूढसमाधियोगः ॥ स्वाप्नं पुनर्न भजते प्रतिबुद्धवस्तुः ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ जितुकें देहाचें वर्तन ॥ तितुकें अदृष्टास्तव जाण ॥ अज्ञानासि देहाभिमान ॥ त्यातें सज्ञान नधरिती ॥५४॥ जैसें अदृष्ट पूर्वस्थित॥तैसा देह उपजे येथ ॥सावेव प्राणेंसहित ॥ असे वर्तत जंव दैवें ॥५५॥ ह्मणाल दैवयोगें देहीं असतां ॥ अवश्य वाढेल देह अहंता ॥ जेवीं एकत्र गमन मार्गस्थां ॥[१]येरयेरांच्या व्यथा भोगिती ॥५६॥ लवणाच्या मिळणीं पाणी ॥ होऊनि ठाके [२]खारवेणी ॥ तेवीं ज्ञाताही देहाचे मिळणीं ॥ देहाभिमानी होईल ॥ ५७ ॥ जेवीं लोहसंगाचिये प्राप्ती॥ दुर्धर अग्नि *घण वरी घेती॥ तेवीं देहाचिया संगतीं ॥ ज्ञाते भोगिती सुखदुःख ॥५८॥ ऐसा कल्पाल अभिप्रावो ॥ तो सज्ञानासि नघडे भावो ॥ तिहीं [३]निर्वंदूनियां अहंभावो ॥ चिदानंदें पहाहो समाधिस्थ ॥ ५९ ॥ 'अधिरूढ समाधियोग' ॥ हें मूळींचें पद अभंग ॥ येणें समाधि अतिनिर्व्यंग ॥ साधिली चांग निजबोधें ॥ ६६० ॥ तरी समाधी ते कैशी असे ॥ तटस्थ काष्ठाचेपरी दिसे ॥ कीं +समाधी ते केवळ पिसें ॥ अथवा असे सज्ञान ॥ ६१ ॥ ते समाधीचीं लक्षणें ॥ ऐक सांगेन संपूर्णें ॥ देहीं असोनि देहबंधनें ॥ नाहीं अडकणें सज्ञाना

---

१ परस्परांच्या. २ खारट पाणी. ३ नाहींसा करून. ४ मूळच्या संस्कृत श्लोकांतील.

*ना. घणवार मो. घणावरी. +मो. समाधिस्थ.

॥ ६२ ॥ 'केवळ ताटस्थ्या नांव समाधी ॥ ह्मणतां ज्ञात्याची ठकली बुद्धी ॥ ते समाधि नव्हे त्रिशुद्धी ॥ मूर्च्छित ते संधी असे वृत्ती' ॥ ६३ ॥ निरभिमान निरवधी ॥ त्या नांव अखंड-समाधी ॥ परी काष्ठातें त्रिशुद्धी ॥ नव्हे समाधी सर्वथा ॥६४॥ ताटस्थ्याचे समाधि साचें ॥ जे मानिती *त्यांस स्वरूपाचें ॥ज्ञान नाहीं निश्चयाचें॥अनुमानाचें बोलणें ॥६५॥प्रचंड [1]आघाताच्या भुलीं ॥ तत्काळ तटस्थता बाणली ॥ तरी काय तेणें झाली ॥ सत्याची भुली समाधि त्यासी ॥ ६६ ॥ [2]ओंवाळणीचिया ×आस्था ॥ बहुरूपी सोंग संपादितां ॥ वायु स्तंभविला अव-चितां ॥ तेणें तटस्थता +बहुकाळ ॥ ६७ ॥ परी वासना जंव उरली आहे ॥ तंव समाधि कैसेनि ⁂राहे ॥ सावध होतांचि ह्मणे काये ॥ ये [3]घातेचें रायें उचित द्यावें ॥ ६८ ॥ सर्वसंक-ल्पांची [4]अवधी ॥ त्या नांव निर्विकल्प समाधी ॥ सकळ शास्त्र हेंचि प्रतिपादी ॥ समाधि त्रिशुद्धी त्या नांव ॥ ६९ ॥ [5]सोपु आल्या शेळीप्रती ॥ तटस्थ होय सकळवृत्ती ॥ तैशी झालिया ताटस्थ्यस्थिती ॥ नव्हे निश्चितीं ते समाधी ॥६७०॥ अकस्मात् अवचितां ॥ 2घवकरि स्वस्व-रूप देखतां ॥ आश्चर्यें झाली तटस्थता ॥ तेथ जाणावी तत्त्वतां वृत्ति आहे ॥ ७१ ॥ स्वरूप देखतां प्रथमदृष्टीं ॥ नखंवरत विस्मयो उठी ॥ तोही [6]जिरवूनियां पोटीं ॥ दशा जे उठी ते समाधी ॥ ७२ ॥ निःशेष कल्पना जेथ [7]विरे ॥ तेथ विस्मयो कोठें स्फुरे ॥ सूक्ष्म कल्पना थावरे ॥ तेणें वोथंरे विस्मयो ॥ ७३ ॥ जेथ साचार ब्रह्मप्राप्ती होये ॥ तेथें देहचि स्फुरों न लाहे ॥ तेव्हां तटस्थ कीं चालताहे ॥ हें देखणें होये पुढिलाचें ॥ ७४ ॥ एवं देहचि जेथ मि-थ्यापणें ॥ त्याचीं कवण लक्षी लक्षणें ॥ हो कां मृळजळींचेनि नाहाणें ॥ जेवीं कां निवणें सज्ञानीं ॥ ७५ ॥ मिथ्या देहासि तटस्थता ॥ झाल्या मानावी [8]समाध्यवस्था ॥ ऐशीं लक्षणें सत्य मानितां ॥ ठकले तत्त्वतां परीक्षक ॥ ७६ ॥ होकां स्वप्नींच्या सज्ञानासी ॥ ताटस्थ्य मुद्रा लागल्या त्यासी ॥ तरी मान्य झाल्या स्वप्नींच्यासी ॥ परी जागृतीसी नाहीं आला ॥ ७७ ॥ होकां स्वप्नींच्या लोकांप्रती ॥ थोर झाली समाधीची [9]ख्याती ॥ तरी नाहीं आला तो जा-गृती ॥ जाणावा निश्चितीं निद्रिस्त ॥ ७८ ॥ तेवीं ताटस्थ्या नांव समाधी ॥ ते अविद्या स्वप्न मूर्छितसिद्धी ॥ परी [10]स्वस्वरूपप्रबोधीं ॥ जागा त्रिशुद्धी नाहीं झाला ॥ ७९ ॥ जो जागा हो-ऊनि स्वप्न पाहे ॥ तें मिथ्यात्वें देखताहे ॥ त्यांतु आपुला देहो सत्य काये ॥ मा तटस्थ राहे तेठायीं ॥ ६८० ॥ जो जागा होऊनि तत्त्वतां ॥ स्वप्नदेहासि तटस्थता ॥ साक्षेपपूर्वक लावूं जातां ॥ लाजे परी अधिकता दशा नमनीं ॥ ८१॥ तो जागा होऊनि स्वप्न सांगे ॥ तें मिथ्या-पणेंचि अवघें ॥ परी सत्यत्वाचेनि पांगें ॥ कदा निजांगें नातळे ॥ ८२ ॥ तैशी साचार वस्तु-प्राप्ती ॥ 8तो नातळे देहस्थिती ॥ तरी देह वर्ते कोणे रीतीं ॥ तो प्रारब्धगतीचेनि शेषें ॥८३॥

---

१ देहास एकदम मोठा आघात झाल्यास वृत्तितत्काळ 'तटस्थ' किंवा निस्तब्ध होते, ह्मणून तिला 'समाधी' ह्मणावें काय? २ बक्षिसाच्या आशेनें. ३ वायु निरोधनरूप जें मी 'घातेचें ह्मणजे जिवावरलें काम केलें त्याबद्दल रायें ह्म. महाराजांनीं उचित ह्म. योग्य बक्षीस द्यावें' असें बहुरूपी समाधीच्या सोंगांतून सावध झाल्यावर ह्मणतो. ४ अंत. ५ सापाला पाहून शेळी तटस्थ होते. ६ स्थिरावे, निमे. ७ दूर जाई, नष्ट होई. ८ समाधीची स्थिति. ९ प्रसिद्धि. १० आपलें स्वरूप जाणण्याविषयीं.

*मो. त्या. ×मो. अवस्था. +मो. बहुकाळ झाली. ⁂ना. होय. 2मो. घवकरि समाधि स्वरूप देखतां. 8ना. ते.

स्थंडिलीं अग्नि विझोनि जाये ॥ तरी भूमीसि उष्णता राहे ॥ कर्पूर सरल्याहि पाहे ॥ सुवास आहे ते देशीं ॥ ८४॥ पाळणा [1]हालवितो वोसरे ॥ तरी तो हाले पूर्वसंस्कारें ॥ तेवीं अविद्या-नाशें प्रारब्ध उरे ॥ तेणें देहा वावरे मुक्तांचा ॥ ८५ ॥ शरीराचेनि छाया चळे ॥ परी शरीर छायेवेगळें ॥ तेवीं मिथ्या देह मुक्ताजवळें ॥ चळे वळे प्रारब्धें ॥ ८६ ॥ हेतुवीण अनायासें ॥ पुरुषासवें छाया असे ॥ तेवीं सज्ञानासरिसें ॥ देह दिसे मिथ्यात्वें ॥ ८७ ॥ लक्ष्य[2] भेदोनियां तीरें[3] ॥ बळें चालिजे पुढारें ॥ तेवीं अविद्यानाशें दैव उरे ॥ तेणें देहो वावरे मुक्ताचा ॥ ८८ ॥ जैसें गलितपत्र वारेंनि चळे ॥ तैसें देह वर्ते *प्राचीनमेळें ॥ परी देहकर्माचेनि विटाळें ॥ ज्ञाता न मैळे निजबोधें ॥ ८९ ॥ त्या प्रारब्धाच्या पोटीं ॥ सांगो सकळ जगेंसि गोठी ॥ कां धरोनि मौनाची मिठी ॥ गिरिकपाटीं[4] पडो सुखें ॥ ६९० ॥ तो आचरो सकळ कर्में ॥ अथवा पिसा होको निजभ्रमें ॥ तेणें तेणें[5] अनुक्रमें ॥ ×जाण परिणामे प्रारब्धें ॥ ९१ ॥ तो चढो पालखीं गजस्कंधीं ॥ कां पडो विष्ठामूत्रसंधीं ॥ +तेते प्रारब्धाची सिद्धी ॥ जाण त्रिशुद्धी ज्ञात्यासी ॥ ९२ ॥ जेथ बाध्यबाधकता फिटली ॥ समूळ अविद्या तुटली ॥ सहज समाधी त्यानांव झाली ॥ हे संख्यीं केला सिद्धांतीं[6] ॥ ९३ ॥ ऐशी सैरं[7] समाधिअवस्था ॥ तोचि भोग भोगोनि अभोक्ता ॥ कर्म करोनि अकर्ता ॥ जाण तत्त्वतां तो एक ॥ ९४ ॥ तो क्रियाकरण-संयोगें ॥ डुल्लत देखिजे विषयभोगें ॥ परी समाधिमुद्रा न भंगे ॥ ॐभोगसंयोगें अलिप्त ॥९५॥ त्यांसि स्त्री ह्मणे माझा भर्ता ॥ पुत्र ह्मणे माझा पिता ॥ शिष्य ह्मणे स्वामी तत्त्वतां ॥ त्याहूनि परता त्यामाजीं वर्ते ॥ ९६ ॥ होको काष्ठास्तव[8] उत्पत्ती ॥ काष्ठावरी ज्याची स्थिती ॥ तो आकळितां काष्ठीं बहुतीं ॥ नावरे निश्चितीं अग्नि जैसा ॥ ९७ ॥ फुंकिला लल्लखिला ॥ जो फुंकास्तव प्रकटला ॥ तो फुंक न साहतां ठेला ॥ निर्वातींचा संचला दीप जैसा ॥९८॥ तेवीं कर्मास्तव उत्पत्ती ॥ कर्मेंचि झाली परमप्राप्ती ॥ त्या कर्मामाजीं वर्तती ॥ निष्कर्मस्थिती महायोगी ॥ ९९ ॥ तो व्यवहारी दिसो जनीं ॥ कीं पिसेपणीं नाचो वनीं ॥ अथवा तटस्थ राहो विजनीं ॥ दशा अधिक उणी बोलूं नये ॥ ७०० ॥ जें सिंहासनीं राजत्व जोडे ॥ तें वसंत[9] खेळतां नमोडे ॥ कीं धांवतां व्याहाळीपुढें[10] ॥ राजपद चोखडें ढळूं नेणे ॥ १ ॥ रावो रानीं वसिन्नला[11] ॥ त्या रानासि राजभोग आला ॥ रानीं रावो राजत्वा मुकला ॥ मूर्खही या बोला नबोलती ॥ २ ॥ तेवीं पावोनि स्वरूपप्राप्ती ॥ योगी प्रारब्धाच्या स्थितीं ॥ नानाकर्में करितां दिसती ॥ परी निजात्मस्थिती भंगेना ॥ ३ ॥ यालागीं समाधि आणि व्युत्थानें[12] ॥ या दोहीं अवस्थांचें लक्षण ॥ अपक्कासींचि *घडे जाण ॥ पूर्णासि लक्षण तें कैंचें ॥४॥ स्वरूपा-वेगळें कांहीं एक ॥ पूर्णासि उरलें नाहीं देख ॥ समाधिव्युत्थानाचें 1मुख ॥ त्यासंमुख येवों लाजे ॥ ५ ॥ अर्जुना देवोनि समाधी ॥ सवेंचि घातला महायुद्धीं ॥ परी तो कृष्णकृपानिधी ॥ तटस्थ त्रिशुद्धी 4नकरीचि ॥ ६ ॥ यालागीं समाधिव्युत्थानविधी ॥ ताटस्थ्येंसहित निरे[13]-

१ पाळणा हलविणारी बाई झोका देऊन गेल्यावर. २ तीरानें ज्याचा वेध करावयाचा तें वस्तु. ३ बाणानें. ४ रहाटे. ५ त्या त्या दशेस येतो. ६ निर्णय. ७ सहज-स्वच्छंद. ८ काष्ठापासून. ९ रासरंग. १० पारधीपुढें. ११ राहिला. १२ समाधिविसर्जन. १३ कायमचे.

*ना. प्रारब्धाचेनि मेळें, मो. प्राचीनवळें. ×ना. जाणे परिणामें प्रारब्धा. +मो. तेणें. ॐना. अंगसंगें. *ना. नघडे. 1ना. सुख. 4मो. नेदीच येऊं.

वधी ॥ गिळूनि झाली सैरसमाधी ॥ पूर्णनिजपदीं *विलसत ॥ ७ ॥ एवं प्रारब्ध जंव असे ॥ तंव मुक्ताचे देह वर्ते ऐसें ॥ परी अहंममतेचें पिसें ॥ पूर्वील्या ऐसें बाधीना ॥ ८ ॥ जेवीं स्वप्नदेहाच्या नाना अवस्था ॥ जागृतीं आलिया तत्त्वतां ॥ पुरुष नेघे आपुले माथां ॥ तेवीं समाधिस्था देहकर्मे ॥ ९ ॥ हेचि परमार्थता ब्रह्मस्थिती ॥ नानापरीच्या उपपत्ती ॥ म्यां सांगीतल्या तुह्मांप्रती ॥ ज्ञानसंपत्ती निजगुह्य ॥ ७१० ॥ तूं कोण हें पुसिलें होतें ॥ सांगावया तें सनकादिकांतें ॥ सांगतसे निजरूपातें ॥ विश्वास त्यातें दृढ व्हावया ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ ॥ मयैतदुक्तं वो विप्रा गुह्यं यत्सांख्ययोगयोः ॥ जानीतमागतं यज्ञं युष्मद्धर्मविवक्षया ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ अतिगुह्य ज्ञान परात्पर ॥ जें उपनिषदांचें भांडार ॥ म्यां सांगीतलें साचार ॥ योगसार योग्यांचें ॥ १२ ॥ ज्या ज्ञानालागीं साधनकोटी ॥ मुमुक्षु करिती हटतटीं ॥ योगी रिघोनि गिरिकपाटीं ॥ महामुद्रा नेहटीं साधिती ॥ १३ ॥ वेदशास्त्रांचिया युक्ती ॥ थोंटावल्या जिये अर्थी ॥ तें निजज्ञान म्यां तुह्मांप्रती ॥ यथानिगुतीं सांगीतलें ॥ १४ ॥ एवढिया ज्ञानाचा ज्ञानवक्ता ॥ मी कोण हें न कळेल सर्वथा ॥ तरी यज्ञाचा यज्ञभोक्ता ॥ जाण तत्त्वतां मी विष्णू ॥ १५ ॥ मज यावया हेंचि कारण ॥ तुह्मीं ब्रह्मयाप्रति केला प्रश्न ॥ ते उपदेशावया ब्रह्मज्ञान ॥ स्वयें मी आपण येथें आलों ॥१६॥ ज्या उपदेशाच्या पोटीं ॥ वर्णाश्रमपरिपाठी ॥ न सांडितां होय माझी भेटी ॥ तेही गोष्टी ध्वनिलीसे ॥ १७ ॥ सांडावें ब्राह्मणपण ॥ मग मांडावें संन्यासग्रहण ॥ हे दोनी धर्म देहींचे जाण ॥ उपदेशीं देहपण मुख्यत्वें मिथ्या ॥ १८॥ ‘ उपदेश करूनि प्रमाण ॥ सनकादिकीं ब्राह्मणपण ॥ अद्यापि सांडिलें नाहीं जाण ॥ माझें गुह्यज्ञान पावले ’ ॥ १९ ॥ तेणेंचि उपदेशें निश्चित ॥ नारद ब्राह्मणपणें वर्तत ॥ ब्रह्मानंदें डुल्लत ॥ गात नाचत निजबोधें ॥ ७२० ॥ ऐसें जें चैतन्यघन ॥ आपुलें स्वरूप आपण ॥ स्वयें करिताहे स्तवन ॥ निजमहिमान द्योतावया ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ अहं योगस्य सांख्यस्य सत्यस्यर्तस्य तेजसः ॥ परायणं द्विजश्रेष्ठाः श्रियः कीर्त्तेर्दमस्य च ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ सांख्य जें परम ज्ञान ॥ योगअष्टांगादिसाधन ॥ सत्याचें सत्यपण ॥ सत्यस्वरूप जाण मी एक ॥ २२ ॥ पहा पां ज्या सत्याच्या ठायीं ॥ संत सद्धर्मे राहिले पाहीं ॥ सूनृत जे वाचा तेही ॥ मजवेगळी कांहीं हों नेणे ॥ २३ ॥ तेजाची जे प्रगल्भता ॥ ते माझेनि तेजें सतेजता ॥ श्रियेची जे ऐश्वर्यता ॥ जाण तत्त्वतां माझेनी ॥ २४ ॥ कीर्ति माझेनि कीर्तनें ॥ सदा वंदिजे साधुजनें ॥ मजवेगळे कीर्तीचें जिणें ॥ कोणी पोसणें न घेती ॥ २५ ॥ माझेनि तेजें निग्रहता ॥ निग्रहो करी ‡समस्ता ॥ अदम्या दमू दमिता ॥ जाण तत्त्वतां माझेनी॥२६ येथ ध्येय आणि ध्यान ॥ कां साध्य आणि साधन ॥ या अवघियां मी अधिष्ठान ॥ मजवेगळें भान यां कैचें ॥ २७ ॥ तुह्मी ब्राह्मण अतिश्रेष्ठ ॥ मजही पूज्यपणें वरिष्ठ ॥ यालागीं निजज्ञान चोखट ॥ तुह्मांसि म्यां प्रकट सांगीतलें ॥ २८ ॥

---

१ रीति-संप्रदाय. २ दर्शविली. ३ चांगली. ४ आधिक्य. ५ नियामकता.

*मो. विलास. ‡ना. सर्वथा.

॥ श्लोक ॥ मां भजंति गुणाः सर्वे निर्गुणं निरपेक्षकम् ॥ सुहृदं प्रियमात्मानं साम्यासंगादयोऽगुणाः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ वस्तुतां निरपेक्ष, निर्गुण ॥ त्या माझ्याठायीं भजोनि गुण ॥ सुहृद, आत्मा, प्रिय, जाण ॥ ऐसें लक्षण मज करिती ॥२९॥ संयता आणि असंगता ॥ याही गुणांच्या अवस्था ॥ आणूनि ठेविती माझ्या माथां ॥ गुणस्वभावतां लक्षणें ॥ ७३० ॥ होकां सत्राळ बळें अंधकार॥ कैं युद्धा आला सूर्यासमोर ॥ तरी तमारी हा बडिवार ॥ *सूर्या आंधार जेवीं देती ॥ ३१ ॥ ' कोणें धरोनियां आकाश ॥ घटीं घातलें अवकाश ॥ तरी घटयोगें घटाकाश ॥ मिथ्या गगनास नांव आलें ॥ ३२ ॥ नाहीं घटासि आतळला ॥ गगनींचा गगनींच संचला ॥ तो घटें घटचंद्रमा केला ॥ मूर्खांसि मानला सत्यत्वें ' ॥ ३३ ॥ तेवीं मी केवळ निर्गुण ॥ त्या माझ्याठायीं भजोनि गुण ॥ सुहृद आत्मा इत्यादि जाण ॥ असंगादिलक्षण मज देती ॥ ३४ ॥ गुणासि मी नातळें जरी ॥ तरी मज ह्मणती लीलाधारी ॥ एवं गुणचि गुणामाझारी ॥ ×मिथ्या मजवरी आळ हा ॥ ३५ ॥ तेथ मी घेता ना देता ॥ कर्ता ना करविता ॥ हे माझी निजस्वभावता ॥ येर ते अवस्था गुणांची ॥ ३६ ॥ एवं पूर्वापर अतिविचित्र ॥ सांगोनि ज्ञानविज्ञाननिर्धार ॥ त्या इतिहासाचा उपसंहार ॥ स्वयें सारंगधर करीतसे ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ इति मे छिन्नसंदेहा मुनयः सनकादयः ॥ सभाजयित्वा परया भक्त्याऽगृणत संस्तवैः ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ आत्मज्ञानी, परम दक्ष ॥ मुमुक्षूंमाजीं अतिनेटक ॥ संदेहापन्न सनकादिक ॥ त्यां यापरी देख निःसंदेह केले ॥ ३८ ॥ सदा सावधानें निर्मळ ॥ माझ्या भजनीं अतिप्रेमळ ॥ सदा मद्रूपें मननशीळ ॥ अव्याकुळ श्रवणार्थी ॥ ३९ ॥ उद्धवा तिहीं ऐकतां माझी गोष्टी ॥ माझ्या स्वरूपीं घातली गिठी ॥ मद्रूप झाले उठाउठी ॥ बाप जगजेठी ब्रह्मपुत्र ॥ ७४० ॥ तिहीं दृश्य द्रष्टा दर्शन ॥ त्रिपुटीचें केलें शून्य ॥ परब्रह्मचि झाले पूर्ण ॥ माझेनि जाण उपदेशें ॥ ४१ परम पावले समाधान ॥ गद्यपद्यादि सुलक्षण ॥ माझें करोनियां स्तवन ॥ पूजाविधान मांडिलें ॥ ४२ ॥

॥ श्लोक ॥ तैरहं पूजितः सम्यक् संस्तुतः परमर्षिभिः ॥ प्रत्येयाय स्वकं धाम पश्यतः परमेष्ठिनः ॥ ४२ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ ' जरी पूज्यपूजकता गेली ॥ तरी तिहीं गुरूची पूजा केली ॥ सांडूनि द्वैताची भुली ॥ पूजा मांडिली अतिप्रीतीं' ॥ ४३ ॥ शिष्य झालियाही ब्रह्मसंपन्न ॥ त्याहीवरी त्यासि गुरु पूज्य जाण ॥ सद्गुरु तोचि ब्रह्म पूर्ण ॥ हे पावली खूण सनकादिकां ॥ ४४ ॥ ज्याच्या बोलासरिसेंचि पाहे ॥ अवघें ब्रह्मचि होऊनि ठाये ॥ त्या सद्गुरूचे पूज्य पाये ॥ सांगूं काये बोलेंवरी ॥ ४५ ॥ ज्यासि परब्रह्म आलें हातां ॥ तोचि जाणे सद्गुरूची पूज्यता ॥

१ अंधाराचा नाश करणारा. २ प्रौढी, कीर्ति. ३ शेवट. ४ संशय पावलेले. ५ शब्दांनीं.

*ना. सूर्यासि अंधार देखतसे. ×ना. मिथ्या मजवरी आवला हो. मो. मिथ्या मजवरी अपवाद.

इतरांसि हे नकळे कथा ॥ अनुमानता बोलवरी ॥ ४६ ॥ ते सनकादिक समस्त ॥ माझी पूजा करोनि यथोक्त ॥ वारंवार स्तवन करित ॥ चरणां लागत पुनःपुनः ॥ ४७ ॥ माझ्या भजनीं एकमुख[१] ॥ माझिया निजभावें अतिभाविक ॥ मज अवाप्तकामासि[२] सुख ॥ त्याचे पूजनीं देख उथळलें ॥ ४८ ॥ मग करूनि प्रदक्षिणा ॥ ते लागले माझिया चरणां ॥ परम सुख झालें ब्राह्मणां[३] ॥ वचनार्थें जाणा माझेनी ॥ ४९ ॥ पहात असतां प्रजापती ॥ सनकादिक उभे असती ॥ त्यां देखतां, निजधामाप्रती[४] ॥ शीघ्रगतीं मी आलों ॥७५०॥ माझे शिष्य सनकादिक ॥ उद्धवा या रीतीं झाले देख ॥ तो इतिहास अलोलिक ॥ तुज म्यां सम्यक सांगीतला ॥ ५१ ॥ ते योगियांमाजीं अतिउद्भट ॥ भक्तांमाजीं अतिश्रेष्ठ ॥ ज्ञानियांमाजीं अतिवरिष्ठ ॥ शिष्य चोखट सनकादिक ॥ ५२ ॥ हंसगीतनिरूपण ॥ पुरातन जें ब्रह्मज्ञान ॥ तें उद्धवासि श्रीकृष्णें ॥ प्रसन्न होऊन दीधलें ॥ ५३ ॥ भागवतपंथें चालतां ॥ हे पुरातन ब्रह्मकथा ॥ एका[५] एकादश पाहतां ॥ स्वभावें हातां पैं आली ॥ ५४ ॥ जीं हंसमुखींचीं चिद्रत्नें ॥ तीं सनकादिकां झालीं भूषणें ॥ उद्धव अळंकारिला श्रीकृष्णें ॥ तें शेष जनार्दनें मज दीधलें ॥५५॥ सनकादिक उद्धवाचें शेष ॥ हातां आलें हा बोल ओस[६] ॥ ते गोष्टीसि जाहले बहुदिवस ॥ ह्मणाल वायसं हा जल्प ॥ ५६ ॥ कृतयुगीं शंखासुरासी ॥ देवें मर्दिलें होतें त्यासी ॥ तठायीं अद्यापि सभाग्यासी ॥ अँव्हा[७] *शंखासी पावती ॥ ५७ ॥ रामें पूर्वीं अयोध्येसी ॥ केलें होतें महायागासी ॥ तेथें हविःशेष लोकांसी ॥ अद्याप हातांसी येतसे ॥ ५८ ॥ तैसेंचि ये भागवतीं ॥ जनार्दन कृपापद्धतीं ॥ सनकादिकांची शेषप्राप्ती ॥ एकादशार्थीं आह्मां झाली ॥५९॥ 'मागें पुढें ×अवघा एक ॥ हा एकादशाचा[८] विवेक' ॥ तेणें सनकादिक उद्धवशेष ॥ आह्मांही देख प्राप्त झालें ॥ ७६० ॥ करूं नेदितां गयावर्जनीं ॥ न +रिगवे समर्थजनीं ॥ ते पदीं माशी लागुनी ॥ निवारण कोणी करीना[९] ॥ ६१ ॥ तेवीं नानाशास्त्रयुक्तींसी ॥ शिणतां समर्थ साधकांसी ॥ ※प्राप्ति नव्हे ज्या ज्ञानशेषासी ॥ ते झाली आह्मांसी एकादशें ॥ ६२ ॥ हंस कृष्ण जनार्दन ॥ स्वरूप एक, नामें भिन्न ॥ तेणें घालून *बोधांजन ॥ जुना ठेवा जाण[१०] दाखविला ॥ ६३ ॥ तेथ मी एका एक देखतां ॥ आणि तो एक मातें दाखविता ॥ हेही तुरेचि 3बोध्यबोधकता ॥ पाहता पाहविता तोचि तो ॥ ६४ ॥ आरसा 7आलिया मुख दिसे ॥ तो गेलिया तें न दिसे ॥ परी येणें जाणें मुखासि नसे ॥ तें सहजेंचि असे संचलें ॥ ६५ ॥ आरिशाचें मुख आरिसेनि नेलें ॥ परी पाहातयां[११] ऐसें नाहीं झालें ॥ जें, कटकटा, माझें मुख गेलें ॥ तें असे संचलें तो जाणे ॥६६॥ तेवीं अज्ञानें न्यावें ॥ कां ज्ञान झालिया यावें ॥ तैसें वस्तूसि नसंभवे ॥ तें असे स्वभावें संचलें ॥ ६७ ॥ तैसें देखणें आणि दाखवितें ॥ दोनी जाऊनियां तेथें ॥ 'माझें मीपण जें जुनें होतें ॥ तें दाविलें मातें जनार्दनें' ॥ ६८ ॥ 'जेवीं सूर्याचेनि प्रकाशें ॥ सूर्योचि कीं सूर्यो दिसे ॥

१ संमुख, तत्पर. २ पूर्णकामास. ३ ब्रह्मा. ४ वैकुंठास. ५ जनार्दन स्वामींनीं. ६ वृथा. ७ उजवा, दक्षिणावर्ति. ८ (१-१=११). ९ समर्थ झाला तरी गयावर्जनास जाऊन परवानगीवांचून त्याचा ज्या विष्णुपदाशीं रिघाव होत नाहीं, त्या पदाशीं माशी जाते तिला कोणीहि निवारण करित नाहीं. १० आहे तसें आहे. ११ पहाणारास.

*ना. शंखत्यासी. ×ना. एकाएक. +मो. रिघिजे. ※मो. प्राप्त. *ना. शुद्धांजन. 3ना. बोध. 7ना. आपुलें.

तेवीं माझेनि प्रकाशें ॥ मज मीचि असें देखत ' ॥ ६९ ॥ ऐशियाही ठायीं जाण ॥ कैंचें नवें जुनें ज्ञान ॥ बहुकाळ ठेविलें सुवर्ण ॥ त्यासि ह्मणे कोण कुहजेंकु ॥७७० ॥ कालचाचि आजीं उगवला ॥ तो सूर्य काय ह्मणावा शिळा ॥ कीं आजींचा अग्नि सोंवळा ॥ कालींचा काय वोंवळा ह्मणों येईल ' ॥ ७१ ॥ तेवीं सनकादिकांचें जें ज्ञान ॥ तेंचि मराठीभाषेमाजीं जाण ॥ तेथ ठेवूं जातां दूषण ॥ दोषी आपण होइजे ॥ ७२ ॥ हो कां सुवर्णाचें केलें सुणें ॥ परी तें मोलें नव्हेचि उणें ॥ तेवीं सनकादिकांचीं ज्ञानें ॥ देशभाषा हीनें नव्हतीच ॥ ७३ ॥ जेवीं कां गुळाचें कारलें केलें ॥ परी तें कडूपणा नाहीं आलें ॥ तेवीं हंसगीत मराठें झालें ॥ नाहीं पालटलें चिन्मात्र ॥ ७४ ॥ जें मोल मुकुटींच्या हेमासी ॥ तेंचि मोल सुवर्णश्वानासी ॥ जो कां ग्राहिक सुवर्णासी ॥ तो घे दोघांसि समत्वें ॥ ७५ ॥ तैसें आत्मानुभवी जे येथें ॥ ते मानितील या ग्रंथातें ॥ येर ते हेळसितील यातें ॥ निजभावार्थें न घेती ॥ ७६ ॥ जे वंदिती कां निंदिती ॥ ते दोघे आह्मां ब्रह्ममूर्ती ॥ हे निजात्मभावाची प्रतीती ॥ केली निश्चितीं जनार्दनें ॥ ७७ ॥ एका, जनार्दना शरण ॥ रिघतां विरालें एकपण ॥ जेवीं कां समरसोनि लवण ॥ स्वयें जाण समुद्र झालें ॥ ७८ ॥ तेथें एका आणि जनार्दन ॥ एक झालें हें ह्मणे कोण ॥ जेवीं डोळयांचें देखणेपण ॥ डोळाचि आपण स्वयें जाणे ॥७९॥ डोळयांनीं आरिसा प्रकाशिजे ॥ तेथें डोळेनि डोळा पाहिजे ॥ तेवीं हें ज्ञान जाणिजे ॥ देखणें देखिजे देखणेनी ॥७८० ॥ सांडूनिया एकपण ॥ एका जनार्दना शरण ॥ हेंचि हंसगीतनिरूपण ॥ झालें परिपूर्ण पूर्णत्वें ॥८१॥ इति श्रीभागवते एकादशस्कंधे एकाकारटीकायां श्रीकृष्णोद्धवसंवादे हंसगीतनिरूपणं नाम त्रयोदशोऽध्यायः ॥ १३ ॥ मूळ श्लोक ॥ ४२ ॥ ओंव्या ॥ ७८१ ॥ एकंदरसंख्या ॥ ८२३ ॥

---

# अध्याय चवदावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमो स्वामी सद्गुरू ॥ तूं निजांगें क्षीरसागरू ॥ तुझा उगवल्या प्रबोधचंद्रू ॥ आल्हादकरू जीवासी ॥ १ ॥ ज्या चंद्राचे चंद्रकरीं ॥ निर्बिड अज्ञानअंधारी ॥ त्रिविध तापेंसी दूर करी ॥ हृदयचिदंबरीं उगवोनी ॥ २ ॥ ज्या चंद्राचे चंद्रकिरण ॥ आर्तचकोरांलागीं जाण ॥ स्वानंदचंद्रामृतें सवोन ॥ स्वभावें पूर्ण करितात ॥ ३ ॥ अविद्याअंधारीं अंधबंधें ॥ संकोचलीं *जीवकुमुदें ॥ तीं ज्याचेनि किरणप्रबोधें ॥ अतिस्वानंदें विकासलीं ॥ ४ ॥ जो चंद्र देखतांचि दिठीं ॥ सुख होय जीवाच्या पोटीं ॥ अहंसोमकांतखोटी ॥ उठाउठीं विरवितू ॥ ५ ॥ पूर्णिमा पूर्णत्वें चंद्र वाढे ॥ देखोनि क्षीराब्धी भरतें चढे ॥ गुरुआज्ञामर्यादा न मोडे ॥ स्वानंद चढे अद्वयें ॥ ६ ॥ सद्गुरु क्षीराब्धी अतिगहन ॥ सादरें करितां निरीक्षण ॥ वेदांतलहरीमाजीं जाण ॥ शब्दचिद्रत्नें भासती ॥ ७ ॥

१ कुजलेलें. २ कुत्रें. ३ सोन्यास. ४ सोन्याच्या कुत्र्यास. ५ अवमानितील. ६ ज्ञानरूप चंद्र. ७ आनंद देणारा. ८ गाढ, दाट. ९ हृदयाकाशांत. १० अंधार पटलानें. ११ जीवरूप कमळें. १२ अहंकाररूप चंद्रकांतमणी.

*ना. जीव बुद्धी कुमुदें मो. जीव देह कुमुदें.

तेथ विश्वासाचा गिरिवर ॥ वैराग्यवासुकीरविदोरें ॥ निजधैर्याचे सुरासुर ॥ मंथनतत्पर समसाम्यें ॥ ८ ॥ मथनीं प्रथम खळखळाटीं ॥ लयविक्षेप हालाहळ उठी ॥ तें विवेकनीळकंठें कंठीं ॥ निजात्मदृष्टीं गिळिलें ॥ ९ ॥ मग अभ्यासप्रत्यगावृत्ती ॥ क्रियेसि झाली विश्रांती ॥ प्रकटली रमा निजशांती ॥ जीस श्रीपती वश्य झाला ॥ १० ॥ 'तेथ ब्रह्मरस आणि भ्रमरस' ॥ इहीं युक्त अमृतकलश ॥ मथनीं निघाला सावकाश ॥ ज्याचा अभिलाष सुरासुरां ॥ ११ ॥ ते विभागावयालागुनी ॥ माधवाचि झाला मोहिनी ॥ अहंराहूचें शिर छेदूनी ॥ अमृतपानीं निववले ॥ १२ ॥ ते वृत्तिरूप मोहिनी ॥ पालटली तत्क्षणीं ॥ ठेली नारायण होऊनी ॥ पहिलेपणीं उठेना ॥ १३ ॥ ते क्षीरसागरीं नारायण ॥ समाधि शेषशयनीं आपण ॥ सुखें सुखावला जाण ॥ अद्यापि शयन केलें असे ॥ १४ ॥ ऐसा सद्गुरु चित्सागरू ॥ ज्याचा वेदांसि न कळे पारू ॥ नारायणादि नानावतारू ॥ ज्याचेन साचारू उपजती ॥ १५ ॥ ज्याचीं चिद्रत्नें गोमटीं ॥ हरिहरांचे कंठीं मुकुटीं ॥ बाणलीं शोभती *वेदपाठीं ॥ कविवरिष्ठीं वानिलीं ॥ १६ ॥ ऐशिया जी अतिगंभिरा ॥ जनार्दना सुखसागरा ॥ अनंतरूपा अपारा ॥ तुझ्या परपारा कोण जाणे ॥ १७ ॥ विवेकें न देखे दिठी ॥ वेदां न बोलवे गोठी ॥ तेथ हे माझी मराठी ॥ कोणे परिपाटीं सरेल ॥ १८ ॥ हो कां राजचक्रवर्तीचे माथां ॥ कोणासि न बैसवे सर्वथा ॥ तेथ माशी जाऊनि बैसतां ॥ दुर्गमता तंव नाहीं ॥ १९ ॥ 'कां राजपत्नीचे स्तन ॥ देखावया शके कोण ॥ परी निजपुत्र बळें तेथें जाण ॥ स्वेच्छा स्तनपान करीतसे' ॥ २० ॥ तेवीं माझी हे मराठी ॥ जनार्दन कृपापरिपाटीं ॥ निःशब्दाच्या सांगे गोठी ॥ चिन्मात्रें मिठी घालूनी ॥ २१ ॥ असो आकाश घटां बाह्य आंतु ॥ तेवीं शब्दामाजीं निःशब्दवस्तु ॥ रिता बोल रिघावया प्रांतु ॥ उरला प्रस्तुतु दिसेना ॥ २२ ॥ बाळक बोलों नेणे तत्त्वतां ॥ +त्यासि बोलिकें बोलवी पिता ॥ तैसीच हेंही जाणावी कथा ॥ वाचेचा वक्ता जनार्दन ॥ २३ ॥ त्या जनार्दनाचे कृपादृष्टीं ॥ भागवत सांगों मराठिये गोष्टी ॥ जें कां आलोडितां ग्रंथकोटी ॥ अर्थीं दृष्टी पडेना ॥ २४ ॥ तेंचि श्रीमहाभागवत ॥ जनार्दनकृपें येथ ॥ देशभाषां हंसगीत ॥ ज्ञान सुनिश्चित सांगितलें ॥ २५ ॥ सद्भावें करितां माझी भक्ती ॥ तेणें ज्ञानखड्गाची होय प्राप्ती ॥ छेदोनि संसारआसक्ती ॥ सायुज्यमुक्ती मद्भक्तां ॥ २६ ॥ माझेनि भजनें मोक्ष पावे ॥ ऐसें बोलिलें जें देवें ॥ तें आइकोनियां उद्धवें ॥ विचारू जीवें आदरिला ॥ २७ ॥ देवो सांगे ×भजनेंचि मुक्ती ॥ ⁂आणि ज्ञात्यांची व्युत्पत्ती ॥ अनेकसाधनें मोक्षाप्रती ॥ सांगताती आनआनें ॥ २८ ॥ एवं या दोहींपक्षीं जाण ॥ मोक्षीं श्रेष्ठ साधन कोण ॥ तेचि आशंकेचा प्रश्न ॥ उद्धवें आपण मांडिला ॥ २९ ॥

---

१ रवीला बांधलेला दोर, अंसणी. २ समाधीचीं विघ्नें. ३ हालाहल विष. ४ विवेकरूप शंकरानें. ५ अभ्यासानें बनलेली जी स्वरूपाकार वृत्ति. ६ कर्मास. ७ निजशांति हीच लक्ष्मी. ८ 'ब्रह्मरस' देवांस, भ्रमरस, (मोह) दैत्यांस. ९ देवांस व दैत्यांस. १० रीतीनें. ११ पुढें येईल, खपेल. १२ ब्रह्माच्या. १३ सांप्रत. १४ बोलानें. १५ धुंडितां. १६ वेगवेगळीं.

***ना. वेदपीठीं मो. वेदपटीं. +मो. त्यासी बोलिके बोल शिकवी माता. ×मो. भजनयुक्ती. ⁂मो. आणिकांचीये ज्ञान व्युत्पत्ति.**

॥ श्लोक ॥ ॥ उद्धव उवाच ॥ वदंति कृष्ण श्रेयांसि बहूनि ब्रह्मवादिनः ॥
तेषां विकल्पप्राधान्यमुताहो एकमुख्यता ॥ १ ॥

॥ टीका ॥ उद्धव ह्मणे गा श्रीपती ॥ मोक्षमार्गीं साधनें किती ॥ वेदवादियांची व्युत्पत्ती ॥ बहुत सांगती साधनें ॥ ३० ॥ तीं अवघींच समान ॥ कीं एक गौण एक प्रधान ॥ देवें सांगीतलें आपण ॥ 'भक्तीचि कारण मुक्तीसी' ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ भवतोदाहृतः स्वामिन् भक्तियोगोऽनपेक्षितः ॥ निरस्य सर्वतः संगं येन त्वय्याविशेन्मनः ॥ २ ॥

॥ टीका ॥ ॥ आणिका साधना नापेक्षिती ॥ सर्वसंगांतें निरसिती ॥ मोक्षमार्गीं मुख्य भक्ती ॥ जेणें स्वरूपप्राप्ती तत्काळ ॥ ३२ ॥ माझ्या स्वरूपीं ठेवूनि मन ॥ फळाशेवीण माझें भजन ॥ हेंचि मोक्षाचें मुख्य साधन ॥ देवें आपण बोलिलें ॥ ३३ ॥ स्वामी बोलिले मुख्य भक्ती ॥ इतर जे साधनें सांगती ॥ त्यांसि प्राप्तीची अस्तिनास्ती ॥ देवें मजप्रती सांगावी ॥ ३४ ॥ याचि प्रश्नाची प्रश्नस्थिती ॥ विवंचीतसे श्रीपती ॥ *त्रिगुण ज्ञात्याची प्रकृती ॥ साधनें मानिती यथारुचि ॥ ३५ ॥ ज्याची आसक्ती जिये गुणीं ॥ तो तींचि साधनें सत्य मानी ॥ यापरी ज्ञानाभिमानी ॥ नानासाधनीं जल्पती ॥ ३६ ॥ परंपरा बहुकाळें ॥ ज्ञात्याचें ज्ञान झालें मळें ॥ तें सत्य मानिती तुच्छफळें ॥ ऐक प्रांजळें उद्धवा ॥ ३७ ॥ चौदाव्यामाजीं निरूपणस्थिती ॥ इतुकें सांगेल श्रीपती ॥ साधनांमाजीं मुख्य 'भक्ती ॥ ध्यानयोगस्थिती समाधियुक्त ॥ ३८ ॥ इतर साधनांचें निराकरण ॥ तुच्छफलत्वें तेंही जाण ॥ सात श्लोकीं श्रीकृष्ण ॥ स्वमुखें आपण सांगतू ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ कालेन नष्टा प्रलये वाणीयं वेदसंज्ञिता ॥
मयाऽऽदौ ब्रह्मणे प्रोक्ता धर्मो यस्यां मदात्मकः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ माझी वेदवाणी प्रांजळी ॥ ज्ञानप्रकाशें अतिसोज्वळी ॥ ते नाशिली प्रळयकाळीं ॥ सत्यलोकैदहोळी जेव्हां झाली ॥७४० ॥ ब्रह्मयाचा प्रळय होतां ॥ वेदवाणीचा वक्ता ॥ कोणी नुरेचि तत्त्वतां ॥ यालागीं सर्वथा बुडाली ॥ ४१ ॥ तेचि वेदवाणी कल्पादीसी ॥ म्यांचि प्रकाशिली ब्रह्मयासी ॥ जिच्याठायीं मद्भक्तीसी ॥ यथार्थेंसी बोलिलों ॥ ४२ ॥ जे वाचेचें अनुसंधान ॥ माझे स्वरूपीं समाधान ॥ ऐसें माझें निजज्ञान ॥ ब्रह्मयासि म्यां जाण सांगीतलें ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ तेन प्रोक्ताच पुत्राय मनवे पूर्वजाय सा ॥ ततो भृग्वादयो गृण्हन् सप्त ब्रह्ममहर्षयः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ तो सकळ वेद विवंचून ॥ ब्रह्मेनि उपदेशिला मनू ॥ सप्तमहर्षी त्यापासून ॥ वेद संपूर्ण पावले ॥ ४४ ॥ ब्रह्मेनि दक्षादि प्रजापती ॥ उपदेशिले याचि स्थिती ॥ यापासून नेणों

---

१ हो; ना. २ निवारण. ३ ब्रह्मलोकाचें दहन—नाश. ४ सृष्टीच्या आरंभीं. ५ ब्रह्मदेवानें.

*मो. त्रिगुण ज्ञानाचिये व्युत्पत्ती.

किती ।। ज्ञानसंपत्ती पावले ।। ४५ ॥ सप्तऋषींची जे मातू ॥ भृगु मरीचि अत्रि विख्यातू ॥ अंगिरा पुलस्त्य पुलह क्रतू ॥ हा जाण निश्चितू ऋषिभागू ॥ ४६ ॥

|| श्लोक || तेभ्यः पितृभ्यस्तत्पुत्रा देवदानवगुह्यकाः || मनुष्याः सिद्धगंधर्वाः सविद्याधरचारणाः ||५|| किंदेवाःकिन्नरा नागा रक्षः किंपुरुषादयः || बह्व्यस्तेषां प्रकृतयो रजःसत्त्वतमोभुवः || ६ ||

।। टीका ।। तिहीं ऋषीश्वरीं पुत्रपौत्र ।। उपदेशिले नर किन्नर ।। देव दानव अपार ॥ सिद्ध विद्याधर चारण ॥४७॥ गुह्यक गंधर्व राक्षस ।। किंदेव आणि किंपुरुष ॥ नागसर्पादि तामस ॥ परंपरा उपदेश पावले ।। ४८ ।। मुखाकृती दिसती नर ।। शरीरें केवळ वनचर ।। ऐसे जे कां रीसं थोर ॥ त्यांसि किन्नर बोलिजे ।। ४९ ।। मुखाभासें दिसती पुरुष ।। शरीर पाहतां श्वापद वेष ।। ऐसे जे वानर रामदास ।। त्यांसि किंपुरुष बोलिजे ।।५०।। स्वेददुर्गंधि कश्मल रहित ॥ शरीरें अतिभव्य भासत ।। मनुष्यदेवां ऐसें दिसत ।। ते बोलिजेत किंदेव ।। ५१ ।। यापरीच्या बहुधा व्यक्ती ।। रजतमादिसत्वप्रकृती ।। उपदेश परंपरा प्राप्ती ।। ज्ञान बोलती यथारुचि ।। ५२ ।।

|| श्लोक || याभिर्भूतानि भिद्यंते भूतानां मतयस्तथा || यथाप्रकृति सर्वेषां चित्रा वाचः स्रवंति हि || ७ ||

।। टीका ।। जैशी प्रकृति तैशी भावना ॥ जैसा गुण तैशी वासना ।। जे वासनेस्तव जाणा ।। भूतीं विषयपणा आणी भेदु ।। ५३ ।। देवमनुष्यतिर्यगता ॥ हे वासनेची विषमता ॥ येवढा भेद करी भूतां ॥ अनेकता यथारुचि ।। ५४ ।। ज्याची जैशी प्रकृती ।। ते तैसाचि वेदार्थ मानिती ।। तेंचि शिष्यांसि सांगती ।। परंपरास्थिती उपदेश ।। ५५ ।। विचित्र वेदार्थ मानणें ।। विचित्र सांगाती साधनें ॥ विचित्र उपदेश करणें ।। प्रकृतिगुणें मतवाद ।। ५६ ॥

|| श्लोक || एवं प्रकृतिवैचित्र्याद्भिद्यंते मतयो नृणाम् || पारंपर्येण केषांचित्पाखंडमतयोऽपरे || ८ ||

॥ टीका ॥ यापरी गा निजप्रकृती ।। वाढली जाण नानामतीं ।। तो मतवाद ठसावला चित्तीं ॥ यथानिगुतीं सत्यत्वें ।। ५७ ।। मिथ्या स्वप्न जेवीं निद्रिस्ता ॥ सत्य मानलें सर्वथा ॥ तेवीं नाना मतवादकथा ।। सत्य तत्त्वतां मानिती ।। ५८ ।। हे *वेदपदत्यांची कथा ।। ज्यांसि वेदीं नाहीं अधिकारता ॥ ज्यांसी उपदेशपरंपरता ।। नानामतता सत्य माने ।। ५९ ।। एकाची वेदबाह्य व्युत्पत्ती ॥ ते आपुलालिये स्वमतीं ॥ पाषांडातें प्रतिष्ठिती ।। तेंच उपदेशिती शिष्यांतें ।।६० ॥

|| श्लोक || मन्मायामोहितधियः पुरुषाः पुरुषर्षभ || श्रेयो वदंत्यनेकांतं यथाकर्म यथारुचि || ९ ||

---

१ तमोगुणप्रधान. २ अस्वलें. ३ पशूच्या आकाराचें. ४ रामचंद्राचे चाकर. ५ पश्वादि. ६ नास्तिकमतास.

*ना. पाठकांची.

॥ टीका ॥ नानावासनागुणानुवृत्ती ॥ नानापरीच्या पुरुष प्रकृती ॥ *यांसि माझी माय मूळकर्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६१ ॥ माझिया मायें मोहिले वरिष्ठ ॥ जन केले विवेक नष्ट ॥ भुलवूनियां मोक्षाची वाट ॥ विषयनिष्ठ ×विवेकू ॥ ६२ ॥ ऐक उद्धवा पुरुषश्रेष्ठा यापरी भ्रंशली जनांची निष्ठा ॥ चुकोनि मोक्षाचा दारवंटा ॥ साधनकचाटा जल्पती ॥ ६३ त्या नानासाधनांच्या युक्ती ॥ ज्या मतवादें प्रतिपादिती ॥ त्याही दीडश्लोकीं श्रीपती ॥ उद्धवाप्रती सांगत ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ धर्ममेके यशश्चान्ये कामं सत्यं दमं शमम् ॥ अन्ये वदंति स्वार्थं वा ऐश्वर्यं त्यागभोजनम् ॥ केचिद्यज्ञतपोदानं व्रतानि नियमान् यमान् ॥१०॥

॥ टीका ॥ मीमांसकाचें मत येथ ॥ 'काम्य, निषिद्धरहित ॥ कर्मचि साधन मानित ॥ मोक्ष येणेंचि प्राप्त ह्मणताती' ॥ ६५ ॥ काव्य नाटक अळंकार करिती ॥ ते कवित्वचि साधन मानिती ॥ कवितापदबंधव्युत्पत्ती ॥ मोक्ष मानिती तेणें यशें ॥ ६६ ॥ कवीश्वराचें मत ऐसें आपुलें कवित्वाचेनि यशें ॥ मोक्ष लाहोनि अनायासें ॥ हें +कवित्वपिसें कवीश्वरां ॥ ६७ वात्स्यायॆन, कोकेशास्त्र ॥ त्यांचा अभिप्रावो विपरीत ॥ 'कामसुखें मोक्ष मानित ॥ काम सतत सेवावा' ॥ ६८ ॥ सांख्ययोगांची वदंती ॥ सत्य शमदमादिसंपत्ती ॥ हेंचि साधन मोक्षाप्रती ॥ नेम निश्चितीं तिहीं केला ॥ ६९ ॥ नीतिशास्त्रकाराचें मत ॥ सार्वभौम राज्यप्राप्त ॥ त्यातेंचि मोक्ष मानित ॥ सामदानादि तेथ साधन ॥ ७० ॥ एकाचा मतविभाग शिखासूत्रमात्रत्याग ॥ याचि नांव मोक्षमार्ग ॥ परम श्लाघ्य मानिती ॥ ७१ ॥ देहात्मवाद्यांचा योग ॥ स्वेच्छा भोगावे यथेष्ट भोग ॥ कैंचा नरक कैंचा स्वर्ग ॥ मेल्या मग कोण जन ॥ ७२ ॥ अश्वमेध राजसूययाग ॥ हाचि एकाचा मोक्षमार्ग ॥ एका मूर्तिउपासना सांग पूजाविभाग तें साधन ॥ ७३ ॥ एकाचें मत साक्षेप ॥ कडकडाटेंसि खटाटोप ॥ शरीर शोषणादि जें तप ॥ तो मार्ग समीप मोक्षाचा ॥ ७४ ॥ एक ह्मणती श्रेष्ठ साधन ॥ मोक्षमार्ग केवळ दान ॥ दीक्षित ह्मणती व्रतग्रहण ॥ हेंचि साधन मोक्षाचें ॥ ७५ ॥ एकाच्या मताचा अनुक्रम ॥ अवश्य करावे यम नियम ॥ एवं मतानुसारें अनुक्रम ॥ नानासाधन संभ्रमें बोलती ॥ ७६ ॥ या साधनांची पाहतां स्थिती ॥ आद्यंतवंत निश्चितीं ॥ तेंचि पें उद्धवाप्रती कृष्ण कृपामूर्ती सांगत ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ आद्यंतवंत एवैषां लोकाः कर्मविनिर्मिताः ॥ दुःखोदर्कास्तमोनिष्ठाः क्षुद्रानंदाः शुचाऽर्पिताः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ सांडूनि फळाशा देहाभिमान ॥ मज नार्पिती जे साधन ॥ त्यांचें फळ दुःखरूप जाण ॥ जन्ममरणदायक ॥ ७८ ॥ तिहीं साधनीं साधिले लोकें ॥ ते अंतवंत नश्वर देख ॥ लोकींचें जें सुख ॥ साखरेंसि विख रांधिलें जैसें ॥७९॥ त्याचे जिह्वाग्रीं गोडपण ॥ ३परिपाक

१ विचारशून्य. २ कामसूत्र प्रणेता. ३ कामशास्त्र. ४ भाषा. ५ राजनीतिकार. ६ शेंडी जानवें. ७चार्वाकादि. ८ यज्ञकरणारे. ९ दीक्षाघेणें. १० अनित्य. ११ स्वर्गादि. १२ परिणामीं.

*ना. यासी माझी मूळमाया प्रवृत्ति. ×ना. अविवेकी. +मो. व्युत्पत्तिसें. ३मो. परिणामें

अचूक मरण ॥ तैसा तो क्षुद्रानंद जाण ॥ शोकासि कारण समूळ ॥ ८० ॥ निजकर्में ¹*मालिन लोक ॥ त्यांच्याठायीं कैचें सुख ॥ उत्तरोत्तर वाढतें दुःख ॥ अंधतमदायक परिपाकू ॥ ८१ ॥ भोगासक्त जें झालें मन ॥ त्यासि अखंड विषयांचें ध्यान ॥ विषयाध्यासें तमोगुण ॥ अधःपतनदायक ॥ ८२ ॥ इहींच साधनीं माझी भक्ती ॥ जो कोणी करील परमप्रीतीं ॥ ते भक्तीची मुख्यतत्त्वें स्थिती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ मय्यर्पितात्मनः सभ्य निरपेक्षस्य सर्वतः ॥ मयात्मना सुखं यत्तत्कुतः स्याद्विषयात्मनाम् ॥ १२ ॥

॥ टीका ॥ भक्ती निजसुखाची मातू ॥ सांगावया उद्धवासि संबोधितू ॥ भक्तिसुखालागीं भाग्यवंतू ॥ तूंचि निश्चितू उद्धवा ॥ ८४ ॥ भक्तिसुखाचें भाग्य यासी ॥ म्हणोनि ²+सभ्य म्हणणें त्यासी ॥ ऐसें पुरस्करोनि उद्धवासी ॥ भक्तिसुखासी देवो सांगे ॥ ८५ ॥ पावावया माझी स्वरूपप्राप्ती ॥ इहलोकींची भोगासक्ती ॥ निःशेष नातळे चित्तवृत्ती ॥ जेवीं निजपती रजस्वला ॥ ८६ ॥ साधूनि माझिया अनुसंधानां ॥ परलोक नातळे वासना ॥ धिकारी पैं ब्रह्मसदना ॥ इतर गणना कोण पुसे ॥ ८७ ॥ ऐशिया गा निरपेक्षिता ॥ माझेनि भजनें सप्रेमता ॥ तेथ मी जाण स्वभावतां ॥ प्रकटे तत्त्वतां निजरूपें ॥ ८८ ॥ 'मी प्रकटलों हें ऐसें ॥ बोलणें तें आहाच दिसे ॥ सदा मी हृदयींचि वसें ॥ प्रकटलों दिसे निर्विकल्पें ॥८९॥ आभाळ गेलिया सविता ॥ सहजेंचि दिसे आइता ॥ तेवीं गेलिया विषयावस्था ॥ मी स्वभावतां प्रकटची' ॥ ९० ॥ एवं भक्ताचिया भावार्था ॥ भावबळें मज प्रकटतां ॥ तेव्हां भक्ताचिया चित्ता ॥ विषयवार्ता स्फुरेना ॥ ९१ ॥ सांडूनि विषयावस्था ॥ मद्रूपीं लागल्या चित्ता ॥ भक्तासि होय मद्रूपता ॥ स्वभावतां निजबोधें ॥ ९२ ॥ लोह एकांगें स्पर्शमणी ॥ लागतां सर्वांग होय सुवर्णी ॥ तेवीं मद्भक्त माझ्या ध्यानीं ॥ चिद्रूपपणीं सर्वांग ॥ ९३ ॥ तेकाळीं सहजसुख ॥ भक्तांसि जें होय देख ॥ त्यासि तुकावया तुक ॥ कैंचें आणिक कार्टाळें ॥ ९४ ॥ ज्या निजसुखाकारणें ॥ सदाशिव वसवी श्मशानें ॥ ब्रह्मा तें सुख काय जाणे ॥ त्याकारणें म्यां उपदेशिला ॥ ९५ ॥ भक्तीं भोगितां माझें सुख ॥ विसरले देहादिजन्म दुःख ॥ विसरले ते तहान भूक ॥ निजात्मसुख कोंदलें ॥ ९६ ॥ ऐशिया निजसुखाची गोडी ॥ विषयी काय जाणतीं बापुडीं ॥ वेंचितां लक्षालक्षकोडी ॥ त्या सुखाची घडी लाभेना ॥ ९७ ॥ धन धान्य पुत्र स्वजन ॥ सर्वस्व वेंचितांही जाण ॥ त्या सुखाचा रजःकण ॥ विषयी जन न लभती ॥ ९८ ॥ होकां सत्यलोकनिवासी ॥ तेही न पावती त्या सुखासी ॥ इतरांची कथा कायसी ॥ मुख्य प्रजापतीसी हें सुख कैंचें ॥ ९९ ॥ मज निजात्म्याचे सुखप्राप्ती ॥ सकळ इंद्रियें सुखरूप होती ॥ त्या सुखाची सुखस्थिती ॥ लोकांतरप्राप्ती कोट्यंशें न तुके ॥ १०० ॥ निष्काम निर्लोभ निर्दंभ भजन ॥ निर्मत्सर

१ नरक प्राप्त करविणारें. २ 'सभ्य' असें गौरवून. ३ विटाळशी जशी स्वपतीला स्पर्शही करीत नाहीं, त्याप्रमाणें माझी स्वरूपप्राप्ति पाहिजे असल्यास, चित्तवृत्तीनें इहलोकींचे भोगासक्तीस निखालस स्पर्शसुद्धां करितां कामा नये. ४ ध्यानास. ५ व्यर्थ. ६ तुलना करण्यास. ७ तोल. ८ उपमा. ९ थोडाही, अंश. १० ब्रह्मदेवास. ११ कोटी अंशानें.

*मो. निर्मिले. +मो. सभाग्य.

निराभिमान ॥ ऐशिया मद्भक्तांसि जाण ॥ माझें सुख संपूर्ण मी देतों ॥ १ ॥ जे कां देशतः काळता ॥ अनवच्छिन्न गा वस्तुतां ॥ ऐशिया निजसुखाचे माथां ॥ माझेया निजभक्तां राहिवाम् ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ 'अकिंचनस्य' दांतस्य शांतस्य समचेतसः ॥ मया संतुष्टमनसः सर्वाः सुखमया दिशः' ॥ १३ ॥

॥ टीका ॥ ऐक आकिंचनाची गोठी ॥ नाहीं मठ, मठिका, पर्णकुटी ॥ पांचापालवी मोकळ्या गांठी ॥ त्यांसि ये भेटी निजसुख माझें ॥ ३ ॥ जो दमनशीळ जगजेठी ॥ अंकुरांचीही नळी निमटी ॥ तो निजसुखाचे साम्राज्यपाटीं ॥ बैसे उठाउठीं तत्काळ ॥ ४ ॥ देखतां नानाभूतविषमता ॥ ज्यासि साचार दिसे समता ॥ तो माझिया निजसुखाचे माथां ॥ *क्रीडे सर्वार्थता समसाम्यें ॥५॥ सर्पत्वचा जेवीं पापरीं ॥ माथा हाणितल्या फडा न करी ॥ तेवीं धनदारागृहपुत्रीं ॥ छळितां ज्याभीतरीं क्रोध ×नुमटे ॥ ६ ॥ कामक्रोध मावळले देहीं ॥ साचार शांति ज्याच्याठायीं ॥ माझें निजसुख त्याच्या पायीं ॥ लोळत पाही सर्वदा ॥ ७ ॥ तो जरी तें सुख नेघे ॥ तरी तें सुख तया पुढें मागें ॥ जडोनि ठेलें सर्वांगें ॥ सांडितां वेगें सांडेना ॥ ८ ॥ तो जेउती वास पाहे ॥ तें दिग्मंडळ सुखाचें होये ॥ तो जेथ कां उभा ठाये ॥ तेथ सुमावेलें राहे महासुख ॥ ९ ॥ त्याचें पाऊल जेथें पडे ॥ तेथें निजसुखाची खाणी उघडे ॥ तो प्रसंगें पाहे जयाकडे ॥ तेथें स्वानंदें वाढे परमानंद ॥ ११० ॥ तो ज्यासि भेटे अदृष्टें ॥ त्यास सुखाची पहाट फुटे ॥ त्यासि पावो लागलिया अवचटें ॥ सुखाचें गोमटें निजसुख लाभे ॥ ११ ॥ त्याचे श्वासोच्छ्वासांचा परिचार ॥ कीं निमिषोन्मेषांचे व्यापार ॥ माझेनि निजसुखें साचार ॥ तेथेंचि घर बांधलें ॥ १२ ॥ तो सकळसुखांचा मंडपू ॥ कीं निजसुखाचा कंदपू ॥ तो सर्वांगें सुखरूपू ॥ सबाह्य सुखरूपू समसुखत्वें ॥ १३ ॥ त्याचे सुखाची परिपूर्णता ॥ पुढिलेनी श्लोकें तत्त्वतां ॥ स्वयें देवोचि झाला सांगता ॥ सुखसंपन्नता भक्ताची ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ न पारमेष्ठ्यं न महेंद्रधिष्ण्यं न सार्वभौमं न रसाधिपत्यम् ॥ न योगसिद्धीरपुनर्भवं वा मय्यर्पितात्मेच्छति मद्विनाऽन्यत् ॥ १४ ॥

॥ टीका ॥ माझे ठायीं अर्पितचित्त ॥ ऐसे जे कां माझे निजभक्त ॥ माझेनि सुखें सुखी सतत ॥ ते अनासक्त सर्वार्थीं ॥ १५ ॥ माझ्याठायीं निजभक्ती ॥ आणि लोक लोकांतर आसक्ती ॥ ते भक्ति नव्हे, कामासक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १६ ॥ सकळद्वीपांसमवेत ॥ सार्वभौम वलयांकित ॥ येऊनियां होतां प्राप्त ॥ माझे निजभक्त थुंकिती ॥ १७ ॥ विष्ठेमाजील सगळे चणे ॥ ते सूकरासि गोडपणें ॥ त्यातें कंटाळती शहाणे ॥ तेवीं मद्भक्तीं सांडणें सार्वभौमपद ॥ १८ ॥ रसातळादि समस्त ॥ पाताळीं भोग +अत्यद्भुत ॥ ते प्राप्त होतां माझे भक्त ॥ लाता हाणत अनिच्छा ॥ १९ ॥ खात्या सांडूनि अमृतफळा ॥ शाहणा नवे

---

१ अपरिमेय. २ खोपटें. ३ गांठीं-पदरीं बांधण्यास दमडी नसल्यानें. ४ एकादश-इंद्रियें दमी. ५ मूर्तिमंत होऊन. ६ अलिप्त. ७ सप्तद्वीप पृथ्वी.

*ना. क्रीडा करी आनंदें. ×ना. नुमसे मो. नुपजे. +ना. सुख अद्भुत.

पेंडीचा गोळा ।। तेवीं सांडूनि माझा सुखसोहळा ॥ भक्त रसातळा न वचती ॥ १२० ॥ सुर, नर, पन्नग, वंदिती ॥ येणें महत्त्वें आलिया अमरावती ।। जेवीं कां कस्तूरीपुढें माती ॥ तेवीं उपेक्षिती मद्भक्त ।। २१ ॥ जें इंद्रादिकां वंद्य स्थान ॥ उत्तमोत्तम ब्रह्मसदन ॥ तें तुच्छ करिती भक्तजन ॥ जे सुखसंपन्न मद्भावें ।। २२ ।। ताक दूध पाहतां दिठीं ॥ सारिखेपणें होतसे भेटी॥ सज्ञान दूध लाविती ओठीं ॥त्यजिती वाटी ताकाची ॥२३॥ तेवीं सत्यलोक आणि *भक्तिसुख ॥ समान मानिती केवळ मूर्ख ॥ मद्भावें माझे भक्त जे चोख ।। ते सत्यलोक धिक्कारिती ॥ ।। २४ ।। इंद्रपद ब्रह्मसदन ॥ पाताळभोग अमृतपान ॥ एके काळें यावया जाण ॥ सर्वसिद्धि आपण आलिया ॥ २५ ॥ ज्या साधावया महासिद्धी ।। योगी शिणताती नानाविधीं ॥ त्या प्रकटल्या त्रिशुद्धी ।। भक्त ×सद्‌बुद्धी नातळती ॥ २६ ॥ त्या अणिमादिसिद्धींच्या माथां ।। मद्भक्तीं हाणोनि लाता ।। लागले माझ्या भक्तिपंथा ।। जाण तत्त्वतां उद्धवा ॥ २७ ॥ त्या सिद्धींची कायसी कथा ॥ सलोकता समीपता ॥ माझी देतां स्वरूपता ॥ भक्त सर्वथा न घेती२८ जेथ न रिघे काळाची सत्ता ॥ नाहीं जन्ममरणवार्ता ॥ऐशी देतां माझी सायुज्यता ॥ भक्त सर्वथा न घेती ॥ २९ ।। आधीं असावें वेगळेपणें ॥ मग सायुज्यें एक होणें ॥ हें मुळींचि अबद्ध बोलणें ॥ सायुज्य न घेणें मद्भक्तीं ॥ १३० ॥ भक्तिसुखें +सुखावली स्थिती ॥ यालागीं आवडे माझी भक्ती ।। पायां लागती चारी मुक्ती ।। भक्त न घेती मजवीण ।। ३१ ।। एक मीवांचूनि कांहीं ॥ भक्तांसि आणिक प्रिय नाहीं ।। माझेनि भजनसुखें पाहीं ॥ लोकीं तिहीं नसमाती ।। ३२ ॥ आदिकरूनि चारी मुक्ती ॥ मजवेगळी जे सुखप्राप्ती ॥ भक्त सर्वथा न घेती ॥ माझ्या अभेदभक्ती लोधले ॥३३॥ मजवेगळें जें जें सुख ।। तें तुच्छ करूनि सांडिती देख ।। माझ्या भजनाचा परम हरिख ।। अलौकिक मद्भक्तां ।। ३४ ।। 'ह्मणाल भक्त केवळ वेडीं ।। तुझ्या भजनीं धरिती गोडी ।। परी तुज तयांची आवडी ।। नसेल गाढी अतिप्रीती ।। ३५ ।। जेवीं गोचिडां आवडे म्हैसी ।। परी गोंचिड नावडे म्हैसीसी ॥ तेवीं भक्तांची प्रीती तुजसी ॥ तुज त्यांची प्रीति नसेल ।।३६।। भज्य, भजन, भजता ॥ हे त्रिपुटी अविद्याकर्ता ॥ अविद्यायुक्त भजनपंथा ॥ नसेल सर्वथा तुज प्रीती ॥ ३७ ॥ जेवीं कां स्वप्नींचें आंवतणें ।। जागत्यासि नाहीं जेवूं जाणें ।। तेवीं अविद्यायुक्त मिथ्या भजनें ॥ तुवां प्रीति करणें हें न घडे ।। ३८ ।। ऐसा आशंकेचा अभिप्रावो ॥ तोचि अर्थीं सांगताहे देवो ।। भजनीं भक्तांचा शुद्ध भावो ।। तेथ मजही पहाहो अतिप्रीती ।। ३९ ॥ जो जैसा मजकारणें ॥ मीही तैसाचि त्याकारणें ।। भक्त अनन्य मजकारणें ।। मीही त्या कारणें अनन्य ।। १४० ॥

।। श्लोक ।। न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शंकरः ।। न च संकर्षणो न श्रीर्नैवाऽऽत्मा च यथा भवान् ।। १५ ।।

।।टीका।। माझ्या भक्तांची मज प्रीती ।। ते मीचि जाणें श्रीपती ।। ते उपमेलागीं त्रिजगतीं ।। नाहीं निश्चितीं कादाळें ॥ ४१ ॥ जो अनन्य झाला माझे भक्तीं ।। तेव्हांचि त्याची अविद्यानिवृत्ती ।। ऐशिया भक्तांची जे मज प्रीती ।। ते सांगूं मी किती उद्धवा ।। ४२ ॥ ब्रह्मा माझें

१ इंद्रपुरी. २ मावत नाहींत. ३ भजनकरणारा. ४ मायेची ५ आमंत्रण. ६ तुलना.
*ना. मुक्तिसुख. ×ना. सुबुद्धी मो. सुबुद्ध. +मो. सुखावले निश्चितीं.

पोटींचें बाळ ।। त्याचे लळे मी पुरवीं सकळ ।। परी भक्तांच्या ऐसी प्रबळ ।। प्रीति *कल्लोळ तेथ नाहीं ।। ४३ ।। म्यां ब्रह्मा लाविला कर्मपंथा ।। भक्तांसि दिधली नैष्कर्मता ।। यालागीं नवचें मीं ब्रह्मा प्रार्थितां ।। होय भातखाता गोंवळ्यांचा ।। ४४ ।। उणें आणून ब्रह्मयासी ।। मी तों झालों वत्सें वत्सपांसी ।। एवं निजभक्तांच्या ऐशी ।। प्रीती ब्रह्मयासी मज नाहीं ।।४५।। असो ब्रह्मयाची ऐशी कथा ।। संकर्षण माझा श्रेष्ठ भ्राता ।। परी भक्तांच्या ऐशी सर्वथा ।। नसे प्रीति तत्त्वतां तयासी ।। ४६ ।। कौरवांच्या पक्षपातासी ।। उणें आणोनि बळिभद्रासी ।। म्यां वांचविलें निजभक्तांसी ।। पांडवांसी निजांगें ।। ४७ ।। तुज देखतां भीष्माच्या पणीं ।। म्यां हातीं घेऊनि रणांगणीं ।। वांचविला कोदंडपाणी ।। भक्तचूडामणी अर्जुन ।। ४८ ।। रमा माझी पट्टाची राणी ।। ते म्यां सेवेसि लाविली चरणीं ।। खांदीं वाहिल्या गौळणी ।। भक्तशिरोमणी गोपिका ।। ४९ ।। ⁂जे लक्ष्मी निःशेष उपेक्षिती ।। ते मज पूज्य परमप्रीतीं ।। जे मज लक्ष्मी मागती ।। त्यांसि श्री ना श्रीपती ऐसें होय ।। १५० ।। लक्ष्मी उपेक्षूनि निश्चितीं ।। मज निजभक्त आवडती ।। मज पढियंता उमापती ।। याहून अतिप्रीती भक्तांची ।। ५१ ।। ज्या महादेवाचेनि गुणें ।। म्यांही श्यामवर्ण धरणें ।। ज्या महादेवाचेनि वचनें ।। म्यां मोहिनी होणें दुसरेनी ।।५२।। तेचि मोहिनीच्या दर्शनीं ।। म्यां शिव भुलविला तत्क्षणीं ।। रुक्मांगद मोहिनीपासूनी ।। अर्ध क्षणीं तारिला ।। ५३ ।। यापरी माझ्या भक्तांहुनी ।। मज प्रिय नव्हे शूलपाणी ।। मज पढियंते त्रिभुवनीं ।। भक्तांवांचुनी आन नाहीं ।। ५४ ।। आगमनिगमीं प्रतिपाद्य ।। माझी चतुर्भुजमूर्ति शुद्ध ।। +ते निजहृदयीं परमानंद ।। भक्तनिजपद वाहतसें ।। ५५ ।। मज निजदेहाची नाहीं गोडी ।। गोंवळ झालों अति आवडीं ।। गायी राखें अरडीदरडी ।। कीं थापटीं घोडीं भक्तांची ।। ५६ ।। मी अवाप्तसकळकाम ।। परी प्रेमळांलागीं सदा सकाम ।। देखतां प्रेमळांचा भाव परम ।। मी आत्माराम उडी घालीं ।। ५७ ।। प्रेमळ देखतांचि दिठीं ।। मी घें आपुलिये सर्वसाठीं ।। ×नलाहतां वरि दे सुखकोटी ।। नये तरी उठाउठी सेवक होय ।। ५८ ।। सांडूनि महत्त्वपरवडी ।। मी निजभक्तांचीं उच्छिष्टें काढीं ।। भक्तकाजाचे सांकडीं ।। करी कुरवंडी देहाची ।। ५९ ।। उपेक्षूनि निजदेहासी ।। उद्धवा तुजसारिखिया भक्तांसी ।। मज आवडती ते अहर्निशीं ।। जीवें सर्वस्वेंसी पढियंते ।।१६०।। आवडीं करितां माझें भजन ।। मज पूज्य झाले भक्तजन ।। त्या भक्तांचें निजलक्षण ।। स्वयें श्रीकृष्ण सांगत ।। ६१ ।।

।। श्लोक ।। ।। निरपेक्षं मुनिं शांतं निर्वैरं समदर्शनम् ।। अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंघ्रिरेणुभिः ।। १६ ।।

।। टीका ।। अनन्यें करितां माझें भजन ।। माझ्या स्वरूपीं झगटलें मन ।। सकळ वासना गेल्या विरोन ।। वृत्तिशून्य अवस्था ।। ६२ ।। आटाटीवीण, न प्रार्थितां ।। अयाचित अ

१ कर्मीपणा. २ गवळी, गुरें राखणारे. ३ बलराम. ४ कौरवपक्ष स्वीकारानें ( बलरामानें दुर्योधनास साह्य केलें. ) ५ भीष्मप्रतिज्ञेचे वेळीं. ६ धनुर्धारी.७ पट्टराणी. ८ दोन्ही नाहींत. ९ एक भगवद्भक्त राजा १० शंकर. ११ वेदशास्त्रांत. १२भृगुपद. १३सोबतीस. १४ एकनिष्ठपणें. १५ श्रमावांचून. १६न मागतां

*मो. कळवळा. ⁂मो. लक्ष्मी उपेक्षूनि निश्चितीं. +मो. ते निजहृदयीं परमानंदें. ×मो. वरी सुख दे शेवटीं, ने घे तरी उठाउठी सेवक होय.

प्राप्त होतां ॥ तोही हातीं घेवों जातां ॥ निरपेक्षता बुडाली ॥६३॥ अर्थ देखोनि जो लविन्नला ॥ तो जाण लोभें वोणवा केला ॥ तोही उपेक्षूनि जो निघाला ॥ तो म्यां वंदिला सर्वस्वें ॥ ६४ ॥ मार्गीं अर्थ पडला असतां ॥ कोणी नाहीं माझा ह्मणतां ॥ तोही स्वयें हातीं घेतां ॥ निरपेक्षता बुडाली ॥ ६५ ॥ वृत्तिशून्य जे अवस्था ॥ ती नांव जाण निरपेक्षता ॥ ते काळींची जे मननता ॥ ऐक तत्त्वतां सांगेन ॥ ६६ ॥ *वेदशास्त्रां परम प्रमाण ॥ जें माझें शुद्ध स्वरूप जाण ॥ ते स्वरूपीं निज निर्धारण ॥ त्या नांव मनन बोलिजे ॥ ६७॥ करितां स्वरूपविवंचन ॥ स्वरूपरूप झालें मन ॥ तेथें धारणेवीण मनन ॥ न करितां स्मरण होतसे ॥ ६८ ॥ या नांव मननावस्था ॥ सत्य जाण पां सर्वथा ॥ यावरी शांतीची जे कथा ॥ ऐक तत्त्वतां सांगेन ॥६९॥ कामक्रोध सलोभता ॥ समूळ मूळेंसि नवचतां ॥ देहीं आली जे निश्चळता ॥ ते नसरे सर्वथा येथें शांती ॥ १७० ॥ मत्स्य धरूनियां मनीं ॥ बक निश्चळ राहिला ध्यानीं ॥ ते शांति कोण मानी ॥ अंतःकरणीं सकाम ॥७१॥देहीं स्फुरेना देह अहंता ॥ +विराली कामक्रोधसलोभता ॥ हे शांति बाणे सभाग्यवंता ॥ मुख्य शांतता या नांव ॥ ७२ ॥ उद्धवा जाण पां निश्चितीं ॥ मजही मानली हे शांती ॥ याहीवरी समतेची स्थिती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ७३ ॥ विचित्र भूतें, विचित्र नाम,॥विचित्राकारें जग विषम॥तेथें देखे सर्वीं सर्व सम ॥ परब्रह्म समत्वें ॥७४॥ फाडाफाडीं न शिणतां ॥ ताडातोडी न करितां ॥ माझेनि भजनें मद्भक्तां ॥ सर्वसमता मद्भावें ॥७५॥ सद्भावें समता आल्या हातां ॥ खुंटली ×भेदाची वार्ता ॥ भेदशून्य स्वभावतां ॥ भूतीं निर्वैरता सहजेंची ॥७६॥ जंववरी द्वैताचें भान ॥ तंवचि ※विरोधाचें कारण ॥ अवघा एकचि आपण ॥तेथ वैरी कोण कोणाचा॥७७॥गगन गगनासि कैं भांडे॥ कीं चंद्रा चंद्रेंसि झुंझ मांडे ॥ अग्नि अगीतें जाळणें घडे ॥ कीं जिव्हेचीं दुखंडें जिह्वाचि करी ॥ ७८ ॥ जें भेदाचें निराकरण ॥ तेंचि निर्वैरतेचें लक्षण ॥ उद्धवा हें सत्य जाण ॥ निर्वैरपण या नांव ॥ ७९ ॥ निरपेक्षता आणि माझें मनन ॥ शांति आणि समदर्शन ॥ पांचवें तें निर्वैर जाण ॥ पंच लक्षण हें मुख्यत्वें ॥ १८० ॥ असो पंचलक्षणकथा ॥ एक 'निरपेक्षता' आल्या हातां ॥ पायां लागे सायुज्यता ॥ पूर्णब्रह्मता ठसावे ॥ ८१ ॥ निरपेक्षाचें निश्चळ मन ॥ निरपेक्ष तो निर्वैर जाण ॥ निरपेक्ष तो शांत संपूर्ण ॥ निरपेक्षाची जाण सेवा मी करीं ॥ ८२ ॥ कडेकपाटीं न रिघतां जाण ॥ न सोशितां अतिसाधन ॥ हें हातां आल्या पंचलक्षण ॥ विश्वउद्धरण त्याचेनी ॥ ८३ ॥ ऐशिया भक्तांचें दर्शन ॥ झाल्या तरती हें नवल कोण ॥त्याचें करितां नामस्मरण ॥ उद्धरण जडजीवां ॥ ८४ ॥ हें पंचलक्षण आल्या हातां॥ मजहोनि अधिक पवित्रता ॥ जोडली माझ्या निजभक्तां ॥ मीही वंदीं माथां चरणरेणु ॥ ८५ ॥ समुद्रोदक मेघीं चढे ॥ त्यासि मधुरता अधिक वाढे ॥ जग निववी वाडेंकोडें ॥ फेडी सांकडें दुकाळींचें ॥ ८६ ॥ तेंचि उदक समुद्रीं असतां ॥ उपयोगा नये गा सर्वथा ॥ तेवीं माझेनि भजनें मद्भक्तां ॥ झाली पवित्रता मजहुनी" ॥ ८७ ॥ 'केळी चाखतां चवी नातुडे ॥ तिचींच केळें अतिगोडें ॥ तेवीं मजहूनि माझ्या भक्तांकडे ॥ पवित्रता वाढे अनिवार' ॥ ८८ ॥ माझ्याठायीं जें पवित्रपण ॥

---

१ घेण्याकरितां वांकला. २ मत्स्यरूपाकार. ३ डोंगराच्या गुहेंत. ४ दुष्काळाचें.

*ना. वेदशास्त्र परम प्रवीण, तो माझें शुद्ध स्वरूप जाण. +ना. जाळिली. ×ना. भूतभेदाची. ※मो. क्रोधाचें.

तें भक्तांचेनि मज जाण ॥ यालागीं भक्तामागें मी आपण ॥ धांवें चरणरेणू वंदावया ॥८९॥ भक्तचरणरेणु वंदितां ॥ मज केवढी आली पवित्रता ॥ माझें पायवणी वाहे माथां ॥ जाण तत्त्वतां सदाशिव ॥ १९० ॥ एवं माझ्या भक्तांचें जें सुख ॥ सुखपणें अलौलिक ॥ तें सुख नेणती आणिक ॥ तें बोलावया मुख सरेना ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ निष्किंचना मय्यनुरक्तचेतसः शांता महांतोऽखिलजीववत्सलाः ॥
कामैरनालब्धधियो जुषंति यत्तन्नैरपेक्ष्यं न विदुः सुखं मम ॥ १७ ॥

॥ टीका ॥ मीवांचूनि ज्यांचे गांठीं ॥ नाहीं फुटकी कांचवटी ॥ मजवांचोनि सगळे सृष्टीं ॥ आणिका दृष्टीं न देखती ॥ ९२ ॥ ऐसें करितां माझें भजन ॥ जाति कुळदेहाभिमान ॥ सहजें जाय निरसोन ॥ अकिंचन या नांव ॥ ९३ ॥ याहीवरी सप्रेमयुक्त ॥ माझ्या स्वरूपीं रंगलें चित्त ॥ अतएव निजशांति तेथ ॥ असे नांदत निजरूपें ॥ ९४ ॥ ऐशिया गा निजशांती ॥ परिपाकातें पावली भक्ती ॥ तें मीवांचूनी सर्वभूतीं ॥ दुजी स्थिती जाणेना ॥ ९५ ॥ तेथें जो जो जीव जेथें देखे ॥ तो तो मद्रूपें वोळखे ॥ ते वोळखीचेनि हरिखें ॥ *प्रीति यथासुखें अनन्य करी ॥ ९६ ॥ ऐशिया मद्रूपस्थिती ॥ जीवमात्रीं अनन्यप्रीती ॥ एवं मद्भावें माझी भक्ती ॥ महंतस्थिती या नांव ॥ ९७ ॥ ऐसा मद्भावनायुक्त ॥ सर्वीं सर्वत्र माझा भक्त ॥ तेथ कामादि दोष समस्त ॥ अस्तमाना जात तेकाळीं ॥ ९८ ॥ सविता येतां प्राचीजवळीं ॥ मावळे नक्षत्रमंडळी ॥ तेवीं भक्तीच्या प्रबोधकाळीं ॥ झाली होळी कामादिकां ॥ ९९ ॥ झालिया कामाची निवृत्ती ॥ सहजेंचि निर्विषयस्थिती ॥ तेथें माझ्या सुखाची सुखप्राप्ती ॥ सुखें सुख भोगिती सुखरूप ॥ २०० ॥ देशें काळें वेदानुवादा ॥ ज्या सुखाची न करवे मर्यादा ॥ त्या सुखाची सुखसंपदा ॥ मद्भक्त सदा भोगिती ॥ १ ॥ ज्या सुखाचे सुखप्राप्ती ॥ विरोनि जाय चित्तवृत्ती ॥ सुखें सुखरूप सर्वांगें होती ॥ एवढी सुखप्राप्ती मद्भक्तां ॥ २ ॥ इतर मी सांगों कायी ॥ मोक्षसुखाच्याही ठायीं ॥ त्या सुखाची गोडी नाहीं ॥ धन्य पाही हरिभक्त ॥ ३ ॥ ऐशिया सुखाकारणें ॥ साधक शिणती जीवें प्राणें ॥ तपादि शरीरशोषणें ॥ व्रत धरणें विषयांचें ॥ ४ ॥ एक करिती योगयाग ॥ एक करिती शास्त्रसंग ॥ एक करिती सर्वस्वत्याग ॥ एकीं सांडिला संग गृह दारा ॥ ५ ॥ एक फळाहारी निराहारी ॥ एक ते नग्न ब्रह्मचारी ॥ एक कडाकपाटीं शिखरीं ॥ गिरिकंदरीं रिघाले ॥ ६ ॥ एक ते जटाळ गांत्याळ ॥ एक नखधारी ढिसाळ ॥ एक महाहटी विशाळ ॥ एक पिसाळ मत्तमुद्रा ॥ ७ ॥ एक तांबडें बोडके ॥ एक ते केवळ मुंडके ॥ एक तीर्थाटणें रोडके ॥ एक ते मुके मौननिष्ठ ॥ ८ ॥ एक राखे, एक संखे ॥ एक ते अत्यंत बोलके ॥ एक पाणीपिसीं झालीं उंदकें ॥ कुशमृत्तिकें विगुंतलीं ॥ ९ ॥ ऐशा नानापरीच्या व्युत्पत्ती ॥ साधक शिणती नेणों किती ॥ माझ्या भजनसुखाची प्राप्ती ॥ नव्हे निश्चितीं कोणासी ॥ २१० ॥ जें माझ्या भक्तांचें निजसुख ॥ तें कोणासि न पावे देख ॥ स्वप्नींही त्या सुखाचें मुख ॥ अनोळख पैं

१ विष्णुचरणापासून निघालेली गंगा. २ माझ्यावांचून. ३ फुटकी कांच, कवडी. ४ लयास. ५ पूर्वदिशेस. ६ प्रकाशसमर्थी. ७ जटा वाढविलेले. ८ जुने फाटके वस्त्रवाले. ९ भ्रमिष्ट. १० वारंवार स्नानप्रक्षालनादिक करण्यानें.

*मो. प्रत्यक्ष या सुखें अन्य न करी.

झालें ॥ ११ ॥ चंद्रकिरणींचें अमृत ॥ जेवीं वायसां अप्राप्त ॥ तेवीं माझें निजसुख निश्चित ॥ नव्हेचि प्राप्त अभक्तां ॥१२॥ थानीं लागल्या गोंचिडा ॥ अशुद्धचि आवडे मूढा ॥ जवळिल्या क्षीरा वरपडा ॥ नव्हेचि रोकडा अभागी ॥ १३ ॥ तेवीं सांडोनि माझी भक्ती ॥ *नाना साधनीं व्यर्थ शिणती ॥ त्यांसि माझ्या निजसुखाची सुखप्राप्ती ॥ नव्हे निश्चितीं उद्धवा ॥ १४ ॥ जीहीं माझ्या भजनपखडी ॥ केली भक्तीची कुळवाडी ॥ ते माझ्या निजसुखाची गोडी ॥ पावले रोकडी अत्यंतिक ॥ १५ ॥ ज्या निजसुखाच्या ठायीं ॥ शिळेपणाची भाषा नाहीं ॥ विटों नेणे कल्पांतींही ॥ इंद्रियांचा कांहीं न पडे पांगू ॥ १६ ॥ जें जें विषयांचें सुख ॥ तें तें इंद्रियां पंगिस्त देख ॥ अपंगिस्त भक्तिसुख ॥ सभाग्य लोक पावती ॥ १७ ॥ जें सुख भोगितां पाहीं ॥ देहींचि होय विदेही ॥ तें सुख माझ्या भक्तांच्याठायीं ॥ प्रकटलें कहीं लोपेना ॥ १८ ॥ हे उत्तमोत्तम भक्त पाहीं ॥ सुख पावले नवल कायी ॥ परी केवळ जे विषयी ॥ भजनें त्यांही सुखप्राप्ती ॥ १९ ॥ भाग्यवशें सत्संगती ॥ आस्तिक्यभावें अनन्यस्थिती ॥ अल्पही घडल्या माझी भक्ती ॥ विषयनिवृत्ती तेणें होय ॥ २२० ॥

॥ श्लोक ॥ बाध्यमानोऽपि मद्भक्तो विषयैरजितेंद्रियः ॥ प्रायः प्रगल्भया भक्त्या विषयैर्नाभिभूयते ॥ १८ ॥

टीका ॥ ॥ माझ्याठायीं अनन्य प्रीती ॥ प्रेमयुक्त भजनस्थिती ॥ ऐशिया भक्तां विषय बाधिती ॥ हे व्याख्यानस्थिती केवीं घडे ॥ २१ ॥ आवडीं करितां माझी भक्ती ॥ विषयवासना जळून जाती ॥ तेथ उपजे विषयासक्ती ॥ हे कोणे युक्तीं मानावी ॥ २२ ॥ आरिसा उटितां उजळे ॥ तेवीं भक्तीनें विषयो ×क्षाळे ॥ ‡तेथ विषयासक्ती खवळे ॥ हें निरूपण कोंवळें साधारण ॥ २३ ॥ केवळ जो विषयासक्त ॥ संसारीं प्रपंचयुक्त ॥ तोही प्रसंगें शालिया भक्त ॥ होय विरक्त तें ऐक ॥ २४ ॥ जीवीं भक्ति लागली गोड ॥ नाहीं मावळली विषयचाड ॥ ऐसें उभयता अवघड ॥ अतिसांकडें जयासी ॥ २५ ॥ तेणें मुख्यत्वें +घ्यावी भक्ती ॥ गौण धरावी विषयासक्ती ॥ तिचीही होय विरक्ती ॥ ऐक ते युक्ती सांगेन ॥ २६ ॥ लवणासि मिळतां जळ ॥ निरवूनि सांडी तत्काळ ॥ तेवीं भक्ति वाढविल्या प्रबळ ॥ विषयमंडळ विभांडी ॥ २७ ॥ यापरी भजनपरिपाठीं ॥ विषयांसि पडे तुटी ॥ निजसुखाची लाभे भेटी ॥ पडे मिठी स्वानंदें ॥ २८ ॥ मज पाहिजे विषयनिवृत्ती ॥ या हेतू केली नाहीं भक्ती ॥ ह्मणाल विषयाची विरक्ती ॥ कोणे युक्ती घडे त्यासी ॥२९॥ येचिविषयीं उत्तर ॥ सांगताहे शारंगधर ॥ दीपाचा पेटल्या वैश्वानर ॥ तो जाळी *घर नगर तैसें हें ॥ २३० ॥

॥ श्लोक ॥ यथाऽग्निः सुसमृद्धार्चिः करोत्येधांसि भस्मसात् ॥ तथा मद्विषया भक्तिरुद्धवैनांसि कृत्स्नशः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ दीप लावावयालागुनी ॥ सोज्ज्वळ केला जो वन्ही ॥ 2तो अवचटें पडला उडोनि ॥

---

१ कावळ्यास. २ रक्तच. ३ प्राप्त. ४उर्दाम. ५ गोष्ट. ६घासला असतां. ७ पोरकटपणाचें. ८मोठा अग्नि.

*मो. नाना साधन व्युत्पत्तीं. ×मो. जळे. ‡मो. तेथें मागुती विषयासक्ती मन वळे । हे निरूपण केवळ साधारण. +मो. साधावी. *मो. सर्व. 2ना. तो अवचटें पेटल्या अग्नी ॥ तिडकी उठोनि तृणांकुरीं ॥

तिडंकी तृणांकुरीं ॥ ३१ ॥ तो अनिच्छितूचि एकसरें ॥ कोपटें आणि धवळारें ॥ नगरें पुरें मंदिरें ॥ गिरिकंदरें भस्म करी ॥ ३२ ॥ तैशी अल्पही माझी भक्ती ॥ श्रद्धायुक्त प्रवेशल्या चित्तीं ॥ संचित क्रियमाण पापपंक्ती ॥ होय जाळिती निःशेष ॥ ३३ ॥ पूर्वपापाचे समळ मळ ॥ चित्तीं जडले होते प्रबळ ॥ तें चित्त अतिचंचळ ॥ विषयीं व्याकुळ सर्वदा ॥ ३४ ॥ त्यासि माझिया भक्तिलेशें ॥ पूर्वपापाचा समूह नासे ॥ जेवीं कां कर्पूर दीपस्पर्शें ॥ निःशेष नासे तत्काळ ॥ ३५ ॥ ऐसें निर्मळ झालिया चित्त ॥ ब्रह्म प्रकाशे सदोदित ॥ मग तें नव्हे विषयासक्त ॥ होय विरक्त अनिच्छितां ॥ ३६ ॥ भक्तिलेशाची एवढी गैरिमा ॥ तो संपूर्ण भक्तीचा महिमा ॥ कोण जाणे भक्तोत्तमा ॥ आगमनिगमा अतर्क्य ॥ ३७ ॥ अलक्ष्य लक्षेना माझी भक्ती ॥ अतर्क्य तर्केना शास्त्रयुक्ती ॥ अगाध नाकळे निश्चितीं ॥ साधनव्युत्पत्ती शिणतांही ॥ ३८ ॥ पूर्ण माझे भक्तीचा पार ॥ मजही न कळे साचार ॥ यालागीं मी भक्तांचा आज्ञाधार ॥ नुलंघी उत्तर सर्वथा ॥ ३९ ॥ अगाध भक्ताची थोरी ॥ यालागीं मीही सेवा करी ॥ त्याचें पद धरिलेंसे उरीं ॥ वंदीं शिरीं अंघ्रिरेणू ॥ ४० ॥ भक्त ह्मणवितां वाटे गोड ॥ भजनमुद्रा अति अवघड ॥ भक्तीचें अंतर अतिगूढ ॥ नकळे उघड श्रुतिशास्त्रां ॥ ४१ ॥ ज्ञान सांगतां अतिसुगम ॥ भक्तिरहस्य गुह्य परम ॥ अकृत्रिम उपजे प्रेम ॥ ऐसें हें वर्म लाविल्या नलगे ॥ ४२ ॥ कृपण जरी दूरि जाये ॥ तो घरींचें ठेवणें जीवीं वाहे ॥ तैसें माझें प्रेम पाहे ॥ जो हृदयीं वाहे सर्वदा ॥ ४३ ॥ कां वंध्या गर्भ संभवल्यापाठीं ॥ उल्हासें वाढवी गोरटी ॥ तैशी माझ्या प्रेमाची पोटीं ॥ आवडी मोठी जैं होय ॥ ४४ ॥ जैसे गर्भाचे डोहळे ॥ तैसे माझ्या प्रेमाचे सोहळे ॥ पोटांतले कळवळे ॥ उल्हासबळें चढोवढी ॥ ४५ ॥ सदैव जांवयी आल्या घरां ॥ जेवीं सर्वस्व वेंची सुंदरा ॥ तेवीं माझा कळवळा पुरा ॥ ज्याच्या जिव्हारा वोसंडे ॥ ४६ ॥ बीज अधिकाधिक पेरितां ॥ उल्हास कृषीवळाचे चित्तां ॥ तेवीं सर्वस्व मज अर्पितां ॥ तैशी उल्हासता जैं होये ॥ ४७ ॥ सगुण सुरूप समर्थ भर्ता ॥ निघोन गेलिया तत्त्वतां ॥ त्यालागीं तळमळी जेवीं कांता ॥ तैशी कळवळता जैं उठी ॥ ४८ ॥ त्यानांव गा माझी भक्ती ॥ उद्धवा जाण निश्चितीं ॥ जे भक्तीसि मी भुलोनि श्रीपती ॥ भक्तांहातीं आतुडलों ॥ ४९ ॥ चढत्या आवडीं माझी प्रीती ॥ तेचि जाण पां माझी भक्ती ॥ ऐसा भक्तीचा महिमा श्रीपती ॥ स्वयें उद्धवाप्रती सांगत ॥ २५० ॥ आवडी धरोनि पोटेंसी ॥ देवो सांगे उद्धवासी ॥ माझी भक्ती ते जाण ऐशी ॥ *अखंड जीपाशीं मी असें ॥ ५१ ॥ संसारतरणोपायीं ॥ हेचि एक मुख्य पाहीं ॥ मोक्ष लागे इच्या पायीं ॥ इतर साधनें कायी बापुडीं ॥ ५२ ॥ मी तंव अजित लोकीं तिहीं ॥ त्या मज भक्तिप्रतापें पाहीं ॥ जिंतोनियां ठायींच्याठायीं ॥ भावबळें पाहीं स्ववश केलों ॥ ५३ ॥ +यावरी सर्व विजयांचे माथां ॥ माझी भक्तीचि गा सर्वथा ॥ ऐक पां तेही कथा ॥ तुज मी तत्त्वतां सांगेन ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव ॥ न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता ॥ २० ॥

---

१ ठिणगी. २ गवतांवर. ३ खोपटें आणि वाडे. ४ मोठेपणा. ५ स्त्री.

*मो. अंकित जियेसी मी असें. +मो. या लागीं सर्व साधनांचे माथा.

॥ टीका ॥ सांख्य जें नित्यानित्य ॥ कर्म जें नित्यनैमित्य ॥ अष्टांगयोग समस्त ॥ नव्हती समर्थ मत्प्राप्तीं ॥ ५५ ॥ स्वाध्याय जें वेदाध्ययन ॥ तप जें वातांबुपर्णाशन ॥ त्याग जो संन्यासग्रहण ॥ माझे भक्तीविण बापुडीं ॥ ५६ ॥ जैशी नाकेविण बरवं ॥ कां शिरेंवीण अवयव ॥ भर्त्तारेंवीण अहेवं ॥ जाण पां तो सर्व विटंबू ॥ ५७ ॥ तैसें माझें भक्तीविण ॥ सकळ साधनें बापुडीं जाण ॥ मज पावावया समर्थपण ॥ नाहीं आंगवण समस्तां ॥ ५८ ॥ तैशी नव्हे माझी भक्ती ॥ चढती वाढवून माझी प्रीती ॥ तत्काळ करी माझी प्राप्ती ॥ नव्हे पंगिस्ती आणिकाची ॥ ५९ ॥ जेव्हां उपजली माझी भक्ती ॥ तेव्हांच झाली माझी प्राप्ती ॥ पुनःपुन्हा उद्धवाप्रती ॥ हरिखें श्रीपती सांगत ॥ ६० ॥ रत्नासवें जैशी दीप्ती ॥ अरुणासवें जेवीं गभस्ती ॥ तेवीं भक्तीपाशीं मी श्रीपती ॥ असें निश्चितीं उद्धवा ॥ ६१ ॥ ते भक्ति लागे ज्याच्या चित्तीं ॥ तैं मीं सांपडे त्याच्या हातीं ॥ आणिका साधनाचे प्राप्ती ॥ विनाभक्ती मी नातुडें ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ भक्त्याऽहमेकया ग्राह्यः श्रद्धयाऽऽत्मा प्रियः सताम् ॥ भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि संभवात् ॥ २१ ॥

॥ टीका ॥ इतर साधन व्युत्पत्ती ॥ दूरी सांडूनि परती ॥ श्रद्धायुक्त माझी भक्ती ॥ धरिल्या हातीं मी लाभें ॥ ६३ ॥ निर्विकल्प निःसंदेहो ॥ सर्वभूतीं भगवद्भावो ॥ हा भक्तीचा निजनिर्वाहो ॥ भजनभावो या नांव ॥ ६४ ॥ होऊनि सर्वार्थी उदासू ॥ माझ्या भजनाचा उल्हासू ॥ न धरी मोक्षाचा अभिलाषू ॥ एवढा विश्वासू मद्भजनीं ॥ ६५ ॥ तेथें तरे कीं नतरे ॥ हा विकल्पू कोठें उरे ॥ माझेनि भजनें निर्धारें ॥ केलें पाठिमोरें विधिवादा ॥ ६६ ॥ एवढा विश्वासीं ज्याचा भावो ॥ न धरी भक्तीवेगळा उपावो ॥ आह्मा त्याचेनि जीवें जीवो ॥ तो आत्मा पाहाहो पैं माझा ॥ ६७ ॥ जो मी ज्ञानियांचा *आत्मा ॥ भक्तांचा प्रिय परमात्मा ॥ शास्त्रीं प्रतिपादिती पुरुषोत्तमा ॥ तो मी सोउमा त्यां धांवें ॥ ६८ ॥ मज आवडे अनन्य भक्ती ॥ मी त्यांचा अंकित निश्चितीं ॥ त्यांचेनि माझी त्रैलोकीं ख्याती ॥ मज महंती त्यांचेनी ॥ ६९ ॥ त्यांचेनि मज खाणें जेवणें ॥ त्यांचेनि मज लेणें नेसणें ॥ त्यांचेनि जीवें प्राणें ॥ म्यां वर्तणें सर्वत्र ॥२७०॥ माझे गांठीं कांहीं नाहीं ॥ भक्तीं सर्वस्वें वेंचूनि पाही ॥ नाना उपचारउपायीं ॥ महत्त्व तिहीं मज दिधलें ॥ ७१ ॥ मज अचक्षूसि दिधले डोळे ॥ अश्रोत्रां श्रवण दिधले ॥ मज अमुखा तिहीं मुख केलें ॥ त्यांचेनि बोलें मी बोलका ॥ ७२ ॥ मज त्यांचेनि गमनागमन ॥ त्यांचेनि अवयव अळंकरण ॥ त्यांचेनि मज नेमस्त स्थान ॥ मज समर्थपण त्यांचेनी ॥ ७३ ॥ मज नामरूप तिहीं करणें ॥ मज पवित्रता त्यांचेनि गुणें ॥ मज वैकुंठींचें ठाणें ॥ भक्तीं अचळपणें दीधलें ॥ ७४ ॥ येथवरी निजभक्तांसी ॥ मी वश्य झालों भक्तीपाशीं ॥ यालागीं अहर्निशीं ॥ मी भक्तांपाशीं तिष्ठतू ॥७५ ॥ मी अजन्मा त्यांचेनि जन्म धरीं ॥ मी अकर्मा त्यांचेनि कर्म करीं ॥ त्यांचेनि बोलें उद्धरीं ॥ नाममात्रें महापापिया ॥ ७६ ॥ नारदवचनासाठीं ॥ वाल्मीकि परम पापिष्ठी ॥ म्यां वंद्य केला वैकुंठीं ॥ नामपरिपाठीं पवित्रत्वें ॥ ७७ ॥ येथवरी भक्तीची सत्ता ॥ मजवरी चाले तत्त्वतां ॥ भक्तिवेगळा सर्वथा ॥ मी नये हातां कोणाचे ॥७८॥

१ वायु, उदक व पिकलेलीं पानें भक्षणकरणें. २ सौंदर्य, शोभा. ३ सौभाग्यवती. ४ भक्तिशिवाय मी प्राप्त होत नाहीं. ५ सामोरा. ६ मोठेपणा. ७ कर्णरहितास.

*ना. अभेद आत्मा.

भक्तांच्या उपकारता ।। मी थोर दाटलों तत्त्वतां ॥ नव्होचि प्रत्युपकारता ।। आधीन सर्वथा यालागीं ।। ७९ ।। त्यासी व्हावया उतरायी ॥ माझे गांठीं कांहींच नाहीं ॥ लटकुफटकु दीधलें कांहीं ॥ तें हळूंचि पाहीं सांगेन ॥२८०॥ भक्त माझेनि सनाथ ॥ माझेनि झाले ते कृतकृत्य ॥ माझेनि आनंदें सदा तृप्त ॥ वोसंडत निजबोधें ॥ ८१ ॥ माझेनि बळें जगजेठी ॥ घायेंवीण छेदिती सृष्टी ॥ माझेनि बळें त्यांचे दृष्टीं ।। संमुख नुठी कळिकाळ ॥ ८२ ॥ माझेनि न मानिती लोकीं तिहीं ॥ माझेनि ते देहीं विदेही ॥ माझेनि बळें तिहीं ।। प्रळयकाळ पाहें ग्रासिला ।। ८३ ॥ माझेनि बळें जाण ॥ विभांडिलें जन्ममरण ॥ माझें करोनियां भजन ।। ब्रह्म सनातन ते झाले ॥ ८४ ॥ हेंही नाहीं म्यां दीधलें ॥ निजबळें तिहीं नेलें ॥ त्यांसि माझें कांहीं नचले ॥ सर्वस्व लुटिलें निजभक्तीं ॥ ८५ ॥ भक्तीं भजनभावबळें ॥ अजिता मातें तिहीं जिंकिलें ।। जिंकोनि आपण्या-वश्य केलें ॥ माझें निजपद नेलें निजभक्तीं ।। ८६ ॥ एवं निजपदाची माझ्या सत्ता ।। जरी आली भक्तांच्या हातां॥ तरी स्वामित्व ठेवूनि माझे माथां ॥ माझे भक्तिपंथा विनटले ।। ८७ ।। ते माझे भक्तीची पवित्रता ।। आश्चर्य वाटेल तुज ऐकतां ।। संदेहो नाहीं मज सांगतां ॥ ऐक तत्त्वतां तो महिमा ॥ ८८ ॥ सांडोनि दांभिक लौकिक ।। माझ्या भजनीं भावार्थें चोख ।। तो *ज्ञाती जरी झाला श्वपाक[3] ॥ तरी आवश्यक मज पूज्य ॥ ८९ ॥ केवळ जीं अपवित्रें ॥ रिसें आणि वानरें ॥ म्यां पूजिलीं गौळ्यांचीं पोरें ॥ ताकपिरें[4] रानटें ॥ २९० ॥ जो जातीनें नीचत्वा नेला ॥ परी भक्तिभावें उंचावला ॥ तो मद्रूपता पावला ॥ पूज्य झाला तिहीं लोकीं ॥९१॥ विप्रात् द्विषड्गुणयुता ।। ये श्लोकींची हेचि कथा ॥ जळो त्या द्विजाची पवित्रता ।। जो माझ्या भजनपथा विमुख ॥ ९२ ॥ त्याहूनि श्वपच गावरिष्ठ ॥ जो माझ्या भजनीं भजननिष्ठ ।। त्यातें वंदिती पुराणश्रेष्ठ ।। कविवरिष्ठ महाकवी ।। ९३ ।। विदुर दासीपुत्र तत्त्वतां ॥ भावें पढिया भगवंता ।। भावो परमार्थी परमार्थी ।। जात्यभिमानता सरेना ॥ ९४ ॥ मज पावावया साचोकारें ॥ भावो सरे जाती नसरे ।। यालागीं अवघ्यांचे धुरे ॥ म्यां वनचरें उद्धरिलीं ॥ ९५ ॥ पक्ष्यांमाजीं केवळ निंद्य ॥ जटायु उद्धरिला म्यां गीध[5] ॥ अंत्यज उद्धरिला धर्मव्याध ।। भाव शुद्ध मदर्थी ॥ ९६ ॥ भलता हो भलते जाती ।। ज्यासि माझी भावार्थें भक्ती ।। तोचि जाणपां पवित्र मूर्ती ।। माझी प्राप्ती मद्भजनें ।। ९७ ।। सांडोनियां माझी भक्ती ।। नानासाधनें व्युत्पत्ती ।। करितां नव्हे माझी प्राप्ती ॥ तेंचि श्रीपती सांगत ।। ९८ ।।

।। श्लोक ।। धर्मः सत्यदयोपेतो विद्या वा तपसाऽन्विता ।। मद्भक्त्याऽपेतमात्मानं न सम्यक् प्रपुनाति हि ।। २२ ।।

।। टीका ।। माझे भक्तिवीण कर्म धर्म ॥ जाण पां तो केवळ भ्रम ॥ चुकलें मत्प्राप्तीचें वर्म ॥ तो धर्म अधर्म परिणमे ।। ९९ ।। माझे भक्तिवीण सत्यवाद ॥ तो जाण पां जैसा गर्भांध ।। प्रतिपदीं घडे प्रमाद ।। अधःपतनबाध देखेना ।। ३०० ।। भक्तिवीण दयेची थोरी ।। जेवीं पुरुषेंवीण सुंदरी ॥ ते विधवा सर्वधर्माबाहेरी ।। तैसी परी दयेची ॥ १ ॥ माझे भक्तिवीण जे

---

१ दूर केलें. २ आपलें स्वाधीन. ३ चंडाल. ४ ताकपिणारे. ५ गृध्र, गिधाड.

*ना. जातीचा मो. ज्याती.

विद्या ॥ ते केवळ जाण पां अविद्या ॥ जेवीं वायसं नेणती चांदां ॥ तेवीं माझ्या निजबोधा नोळखती ॥ २ ॥ चंदनभार वाहे खर ॥ परी तो नेणे सुवासाचें सार ॥ माझे भक्तिविण विद्या शास्त्र ॥ केवळ भारवाहक ॥ ३ ॥ माझे भक्तिविण जें तप ॥ शरीरशोषणादि अमूप ॥ तें पूर्व-अदृष्टें भोगिती पाप ॥ नव्हे सद्रूप तपःक्रिया ॥ ४ ॥ माझे भक्तिवीण जें साधन ॥ तें कोश-कीटाच्या ऐसें जाण ॥ आपण्या आपण बंधन ॥ भक्तिहीन क्रिया ते ॥ ५ ॥ एवं माझे भक्तिवीण ॥ जें केलें तें अप्रमाण ॥ तें भक्तीचें शुद्ध लक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ कथं विना रोमहर्षं द्रवता चेतसा विना ॥ विनाऽऽनंदाश्रुकलया शुध्येद्भक्त्या विनाऽऽशयः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ आवडीं हरिकथा ऐकतां ॥ नानाचरित्रें श्रवण करितां ॥ माझी आत्मचर्चा हृदयीं धरितां ॥ पालटू चित्ता तेणें होये ॥ ७ ॥ तेणेंचि उपजे माझी भक्ती ॥ माझ्या भजनाच्या अतिप्रीतीं ॥ आवडीं माझीं नामें गाती ॥ रंगीं नाचती सद्भावें ॥ ८ ॥ पोटांतूनिया उल्हा-सता ॥ रंगीं गातां पैं नाचतां ॥ अंतरीं द्रवो झाला चित्ता ॥ ते अवस्था बाह्य दिसे ॥ ९ ॥ अंतरीं सुखाची झाली जोडी ॥ बाह्यरोमांचीं उभिली गुढी ॥ त्या स्वानुभवसुखाची गोडी ॥ नयनीं रोकडी प्रवाहे ॥ ३१० ॥ माझे भक्तीचिया आवडीं ॥ अहंसोहं दोनी कडी ॥ तुटली अभिमानाची बेडी ॥ विषयगोडी निमाली ॥ ११ ॥ ते काळींचें हेंचि चिन्ह ॥ पुलकांकित देहो जाण ॥ नयनीं आनंदजीवन ॥ हृदयीं परिपूर्ण स्वानंद ॥ १२ ॥ पुंजाळले दोनी नयन ॥ सदा सर्वदा सुप्रसन्न ॥ स्फुरेना देहाचें भान ॥ भगवंतीं मन रंगलें ॥ १३ ॥ ऐसी उपजतां माझी भक्ती ॥ कैंची होय विषयविरक्ती ॥ विरक्तीविण माझी प्राप्ती ॥ नव्हे निश्चितीं उद्धवा ॥१४॥ माझी शुद्धभक्ती तत्त्वतां ॥ साचार आली जयाचे हातां ॥ ऐक त्या चिन्हांची कथा ॥ आणि पवित्रता तयाची ॥१५॥ माझे भक्तीसि जो लागला ॥ तोचि तूं म्हणसी पवित्र झाला ॥ त्याणें त्रिलोक पवित्र केला ॥ हें गर्जोनि बोलिला श्रीकृष्ण ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च ॥ वि-लज्ज उद्गायति नृत्यते च मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति ॥ २४ ॥

॥ टीका ॥ अंगीं रोमांच रवरवित ॥ स्वेदबिंदू डळमळित ॥ चित्त चैतन्यं द्रवत ॥ तेणें सद्गदित पैं वाचा ॥ १७ ॥ हर्षे वोसंडतां पोटीं ॥ अर्धोन्मीलित होय दृष्टी ॥ जीवशिवां पडली मिठी ॥ ध्यानत्रिपुटी मावळली ॥१८॥ नयनीं अश्रूंचा पूर लोटी ॥ उभडे ×नसंटे पोटीं ॥ होत जीवशिवांची तुटी ॥ पडे सृष्टीं मूर्छित ॥१९॥ आक्रंदे थोर आक्रोशें ॥ वारंवार रडता दिसे ॥ रडण्यामाजीं गद्गदां हांसे ॥ जेवीं लागलें पिसें ब्रह्मग्रहो ॥ ३२० ॥ रडणें हांसणें न सांडी ॥ त्याहीमाजीं नवल आवडी ॥ अर्थावबोधें गाणें मांडी ॥ निजात्मगोडीचेनि योगें ॥ २१ ॥ विसरोनि माझें तुझें ॥ सांडोनिया लोकलाजे ॥ हरिखें प्रेमाचेनि भोजें ॥ तेणें नाचिजे निःशंक ॥ २२ ॥ गाणें नाचणें हांसणें ॥ तो रडे कासयाकारणें ॥ ऐक तींही लक्षणें ॥ तुजकारणें सांगेन ॥ २३ ॥ माउलीवेगळें बाळक पडे ॥ जननी पाहतां कोठें नातुडे ॥ भेटतां तेंचि ओर-

१ कावळे. २ चंद्रास. ३ आनंदाश्रु. ४ अर्धी उघडणारी. ५ उमाळा पोटांत मावत नाहीं. ६ ब्रह्मसमंध.
×मो. न सांठवे.

हूनि रडे ॥ मिठी पडे सप्रेमें ॥ २४ ॥ जीव परमात्मा दोनी ॥ चुकामुकी झाली भ्रमपट्टनीं ॥ त्यांसि एकाकीं होतां मिळणी ॥ रडे दीर्घस्वरें स्फुंदत ॥ २५ ॥ बहुकाळें झाली भेटी ॥ ऐक्यभावें पडली मिठी ॥ तेणें उंभंड न संटे पोटीं ॥ रुदन उठी सप्रेमें ॥ २६ ॥ देवो लाघवी नानापरी ॥ मायावी नातुंड निर्धारीं ॥ तो सांपडला घरींच्या घरीं ॥ तेणें विस्मयें करी टवकारें ॥ २७ ॥ देव सदा जवळीच असे ॥ त्यालागीं जन कैसे पिसे ॥ पाहों जाताती देशोदेशें ॥ तें देखोनि हांसे गदागदां ॥ २८ ॥ देव सर्वांसि अजितू ॥ तो म्यां जिंकिला भगवंतू ॥ धरोनि राखिला हृदयांतू ॥ यालागीं नाचतू उल्हासें ॥ २९ ॥ निवंटूनि दुजयाची मातू ॥ अंगें जिंतिला भगवंतू ॥ जगीं झाला यशवंतू ॥ यालागीं गातनाचतू उल्हासें ॥ ३० ॥ पाहतां दुसरें नदिसे मज ॥ यालागीं धरूं विसरला लाज ॥ जगीं झाला तो निर्लज्ज ॥ निर्लज्जतेचि वोज हे त्याची ॥ ३१ ॥ यापरी भक्तियुक्त ॥ होऊनियां माझे भक्त ॥ निजानंदें गातनाचत ॥ तेणें केलें पुनीत लोकत्रय ॥ ३२ ॥ जयाचे देखतां चरण ॥ जडजीवां उद्धरण ॥ ज्याचे लागचरणरेणें ॥ पशुपापाण उद्धरती ॥ ३३ ॥ कीर्तनाचेनि महाघोषें ॥ नाशिलीं जगाचीं सर्व दुःखें ॥ अवघें विश्वचि हरिखें ॥ भरिलें महासुखें उचंबळत ॥३४॥ दर्शन स्पर्शन वचनें ॥ एक तारिले कीर्तनें ॥ एक तारिले नामस्मरणें ॥ यापरी जग उद्धरणें उद्धवा ॥ ३५ ॥ अविद्यायुक्त जीव मलिन ॥ त्यासि शुद्ध व्हावया जाण ॥ माझी भक्तीचि प्रमाण ॥ हेंचि श्रीकृष्ण स्वयें सांगे ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ यथाऽग्निना हेममलं जहाति ध्मातं पुनः स्वं भजते च रूपम् ॥ आत्मा च कर्मानुशयं विधूय मद्भक्तियोगेन भजत्यथो माम् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ डांकमिळणीं सुवर्ण ॥ हीनकसें झालें मलिन ॥ उदकें धुतांही जाण ॥ निर्मळपण नये त्या ॥ ३७ ॥ त्याच सुवर्णाचें तेंगट ॥ अग्निमुखें देतां पुट ॥ मळत्यागें होय चोखट ॥ दिसे प्रकट पूर्वरूपें ॥ ३८ ॥ तेवीं अविद्याकामकर्मीं मलिन ॥ त्याचे चित्तशुद्धिलागीं जाण ॥ माझी भक्तीचि परम प्रमाण ॥ मलक्षालन जीवाचें ॥ ३९ ॥ जंव जंव भक्तीचें पुट चढे ॥ तंव तंव अविद्याबंध विघडे ॥ मायेचें मूळचि खुडे ॥ जीवू चढे निजपदा ॥४०॥ तुटोनियां अविद्याबंधू ॥ चिन्मात्रैक अतिविशुद्धू ॥ जीव पावे अगाधबोधू ॥ परमानंदू निजबोधें ॥ ४१ ॥ जीवासि अविद्येची प्राप्ती ॥ ते ज्ञानास्तव होय निवृत्ती ॥ तेथ कां पा लागली भक्ती ॥ ऐशी आशंका चित्तीं जरी धरिसी ॥ ४२ ॥ तरी माझे भक्तिवीण ज्ञान ॥ सर्वथा नुपजे जाण ॥ तेचि अर्थींचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ यथायथाऽऽत्मा परिमृज्यतेऽसौ मत्पुण्यगाथाश्रवणाभिधानैः॥ तथातथा पश्यति वस्तु सूक्ष्मं चक्षुर्यथैवांजनसंप्रयुक्तम् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ माझी प्रतिपाद्य स्वरूपता ॥ नानाचरित्रें पवित्र कथा ॥ तेथें श्रवणें मननें चित्ता॥ प्रक्षाळितां कीर्तनें ॥ ४४ ॥ जंवजंव करी माझी भक्ती ॥ तंवतंव अविद्यानिवृत्ती ॥ तेणें माझे स्वरूपाची होय प्राप्ती ॥ जे श्रुतिवेदांतीं अतर्क्य ॥ ४५ ॥ जे कां अतिसूक्ष्म निर्गुण ॥ अल-

---

१ भ्रांतिरूपनगरांत. २ उमाळा. ३ नाटकी. ४ डोळे ताठून पाहे. ५ न ऐकून, नाहींशी करून. ६ दुसरेपणाची, भेदाची. ७ गोष्ट. ८ रीत, प्रकार. ९ पायाची धूळ. १० पत्रा.

क्ष्य लक्षेना गहन ॥ तेणें स्वरूपें होय संपन्न ॥ जवासि समाधान मद्भजनें ॥ ४६ ॥ नयनीं सू-दल्या अंजन ॥ देखे पृथ्वीगर्भींचें निधान ॥ तेवीं मद्भजनें लाहोनि ज्ञान ॥ चैतन्यघन जीव होय ॥ ४७ ॥ उद्धवा ऐक पां निश्चितीं ॥ बहुत नलगे व्युत्पत्ती ॥ जैसा भाव जो ज्याचे चित्तीं ॥ तैशी प्राप्ती तो पावे ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ विषयान्ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्यते ॥ मामनुस्मरतश्चित्तं मय्ये-व प्रविलीयते ॥ २७ ॥

॥ टीका ॥ जो करी विषयाचें ध्यान ॥ तो होय विषयीं निमग्न ॥जो करि सदा माझें चिंतन॥ तो चैतन्यघन मी होय ॥ ४९ ॥ स्त्री गेली असतां माहेरीं ॥ ध्यातांचि प्रकटे जिव्हारीं ॥ हाव भावकटाक्षेंवरी ॥ सकाम करी पुरुषातें ॥ ३५० ॥ 'नसते स्त्रियेचें ध्यान करितां ॥ प्रकट दिसे यथार्थता ॥ मी स्वतःसिद्ध हृदयीं असतां ॥ सहजें मद्रूपता चिंतितां मज' ॥ ५१ ॥ आवडीं माझें जें चिंतन ॥ चित्त चिंता चिंतितेंपण ॥ विरोनि होय चैतन्यघन ॥ मद्रूपपण या नांव ॥ ५२ ॥ माझे प्राप्तीलागीं जाण ॥ हेंचि गा मुख्य लक्षण ॥ माझें ध्यान माझें भजन ॥ मद्रूपपण तेणें होय ॥ ५३ ॥ मजवेगळें जेंजें ध्यान ॥ तेंचि जीवासि दृढबंधन ॥ यालागीं सांडूनि विषयाचें ध्यान ॥ माझें चिंतन करावें ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ तस्मादसदभिध्यानं यथा स्वप्नमनोरथम् ॥ हित्वा मयि समाधत्स्व मनो मद्भावभावितम् ॥ २८ ॥

॥ टीका ॥ साचाचियेपरी दिसत ॥ परिणामीं नाशवंत ॥ त्यासीच बोलिजे असंत ॥ जें मिथ्याभूत आभासे ॥ ५५ ॥ तेवीं इहामुत्र कामनाये ॥ जे *अविचारित रमणीय ॥ त्याला-गीं प्राणी पाहे ॥ नानाउपायें शिणताती ॥ ५६ ॥ कष्टीं सेवूनि साधन ॥ साधिलें स्वर्गभोग-स्थान ॥ तेंही नश्वरगा जाण ॥ जेवीं कां स्वप्नमनोरथ ॥ ५७ ॥ यालागीं विषयाचें ध्यान ॥ सांडूनि करावें माझें भजन ॥ माझिया भावना मन ॥ सावधान राखावें ॥ ५८ ॥ सावधान करितां भजन ॥ ×एकाग्र धरितां माझें ध्यान ॥ तेथ अत्यंत जें बाधकपण ॥ तें त्यागलक्षण हरि बोले ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ स्त्रीणां स्त्रीसंगिनां संगं त्यक्त्वा दूरत आत्मवान् ॥ क्षेमे विविक्त आसीनश्चिंतयेन्मामतंद्रितः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ जो मजलागीं आर्तभूत ॥ तेणें सांडावी स्त्रीसंगाची मात ॥ मी चिंतावा भगवंत॥ तेणें एकांत सेवावा ॥ ३६० ॥ स्त्रियेच्याही परीस वोखटी ॥ संगति स्त्रैणांची अतिखोटी ॥ त्यांसि नव्हावी भेटीगोठी ॥ न पहावी दिठीं दुरोनी ॥ ६१ ॥ साधकें कायावाचाचित्तीं ॥ ✻सांडूनि दोहींची संगती ॥ परतोनि स्फुरेना स्फूर्ती ॥ ऐशी दृढस्थिती धरावी ॥ ६२ ॥ के-

१ वातल्यास. २ भूमींत ठेविलेलें. ३ ठेवा. ४ ज्ञानस्वरूप. ५ खऱ्याप्रमाणें. ६ ह्या लोकीं व परलोकीं. ७ इच्छा करण्यास योग्य. ८ अविचारानें बरें वाटणारें.

*मो. अविचार तर रमणीय. ×ना. एकाग्र करितां माझें ध्यान मो. एकाग्र चित्तें माझें ध्यान. ✻ना. सांडूनि देहींची आसक्ती.

वळ एकांत जें विजन ॥ प्रशस्त आणि पवित्रस्थान ॥ तेथें घालोनिया आसन ॥ माझें चिंतन करावें ॥ ६३ ॥ करोनि आळसाची बोळवण ॥ धरूनि निजवृत्ति सावधान ॥ त्यावरी करावें माझें ध्यान ॥ एकाग्र मन राखूनी ॥ ६४ ॥ माझें विध्वंसोनि ध्यान ॥ माझे प्राप्ती आड विघ्न ॥ साधकांसि अतिबंधन ॥ स्त्री आणि स्त्रैणसंगती ॥ ६५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ न तथाऽस्य भवेत्क्लेशो बंधश्चान्यप्रसंगतः ॥ योषित्संगाद्यथा पुंसो यथा तत्संगिसंगतः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ अविवेकाच्या अनंत कोटी ॥ जाण पां स्त्रीसंगाचे पोटीं ॥ अधर्माचा भडका उठी ॥ योषितां दृष्टीं देखतां ॥६६॥ जें महामोहाचें मेळवण ॥ जें खवळल्या कामाचें इंधन ॥ जें जीवाचें परममोहन ॥ अधःपतन ते योषिता ॥ ६७ ॥ जे मदनाचे तिखट बाण ॥ जें मायेचें चक्र जाण ॥जें अंधतमाचें पूर्ण॥भरितें तें जाण योषिता॥६८॥होकां जियेचे संगती ॥ आंधळी होय ज्ञानशक्ती ॥ जे वाढवी नाना आसक्ती ॥ जिचेनि विस्मृती निजस्वार्थी ॥ ६९ ॥ जिचेनि संसार बहुवस ॥ जिचेनि असोस गर्भवास ॥ जिचेनि विषयविलास ॥ जे वज्रपाश जीवांचा ॥ ३७० ॥ 'जे अखंड सोशी दुःखशोक ॥ जे सदा सोशी नरकवोक ॥ ते माता अनाप्त करूनि देख ॥ स्त्री आवश्यक आप्त होय ॥ ७१ ॥ जे मातृस्नेहातें तोडवी ॥ जे बंधुस्नेहातें विघडवी ॥ जे सदा गोंवीं हावभावीं ॥ अधर्म अडवीं जे पाडी ॥ ७२ ॥ जिचे कटाक्ष बाण अतितिख ॥ जिव्हारीं रुतले देख ॥ जे जीवाची व्यामोहक ॥ जिचें चढलें विख उतरेना ॥ ७३ ॥ एवढी बाधा जाण स्त्रीसंगती ॥ जो वांछूं पाहे माझी प्राप्ती ॥ तेणें सांडावी स्त्रियेची आसक्ती ॥ हृदयीं प्रीती न धरावी ॥ ७४ ॥ स्त्री आठवतांचि चित्तां ॥ उच्छेदी ज्ञानध्यान अवस्था ॥ एवढी स्त्रीसंगाची बाधकता ॥ त्याहूनि अधिकता स्त्रैणसंगें ॥ ७५ ॥ स्त्रीसंगाच्या मोहमदा ॥ सुटका आहे कदाकदा ॥ परी स्त्रैणसंगतीची बाधा ॥ ते आपदा अनिवार ॥७६॥ चुडालास्त्रियेचे संगतीं ॥ तरला शिखिध्वज भूपती ॥ नातरी मदालसेचे संगतीं ॥ तरला नृपती कुवलयाश्व ॥ ७७ ॥ होकां लीलेनें करोनि भक्ती ॥ प्रसन्न केली सरस्वती ॥ तिया उद्धरिला निजपती ॥ हें बोलिलें ग्रंथीं वासिष्ठीं ॥ ७८ ॥ यापरी स्त्रीसंगतीं ॥ उद्धरले एकिजेती ॥ परी स्त्रैणाचे संगतीं ॥ उद्धारा गती असेना ॥ ७९ ॥ जोकां स्त्रियेचा अंकिला ॥ जो स्त्रियेसि जीवें विकिला ॥ जो स्त्रियेचा पोसणा झाला ॥ तिचे बोलामाजीं वर्त्ते ॥ ३८० ॥ जैशी कुळदेवता, खेंचरी ॥ तैसें स्त्रियेसि पूज्य करी ॥ मग तिचेचि सेवेवरी ॥ नानाउपचारीं नाचत ॥ ८१ ॥ पाळिल्या श्वानाचे परिपाठीं ॥ लाविल्या लागे सुहृदापाठीं ॥ त्या हेंडकिलिया शेवटीं ॥ कामथोंळोरां पुसोटीं घालूनि पडे ॥ ८२ ॥ धड गोड उत्तम पदार्था ॥ आपण भोगीना सर्वथा ॥ तें देऊन स्त्रियेच्या हातां ॥ आपुली सत्ता निवर्त्तवी ॥ ८३ ॥ इसि जैं विरुद्ध वाटेल ॥ तैं हें ब्रह्मांड पालथेल ॥ इचा उल्लंघितां बोल ॥ क्षीराब्धि सुकेल सुखाचा ॥८४॥ नाहीं कुळदेवी देवो पूजणें ॥ मायबापांतें वंचणें ॥ शेखीं गुरूतेंही ठकवणें ॥ परी सर्व-

---

१ स्त्रीस लुब्ध झालेल्या पुरुषाची संगत. २ प्रकार, शंभरलाख. ३ जळण. ४ सहन न होणारा. ५ पोराचे हाग ओक. ६ परकी. ७ लीला नामक स्त्रीनें. ८ देवतेचें नांव. ९ 'हडिहडि' केल्यास. १० अंडकुलीवर. ११ शेंपूट. १२ कपट करणें.

स्व देणें स्त्रियेसी ॥ ८५ ॥ एवं माकड जैसें गारुड्याचें ॥ तैसा स्त्रियेचेनि छंदें नाचे ॥ ऐशिया स्त्रैणाचे संगतीचें ॥ तेथ सुख कैंचें साधका ॥ ८६ ॥ ज्याच्या ऐकतां स्त्रियेच्या गोठी ॥ सज्ञानासही काम उठी ॥ जो लावी योषितापाठीं ॥ उठाउठी सकामत्वें ॥ ८७ ॥ ऐशिया स्त्रैणाचे संगतीं ॥ कैंची साधका सुखप्राप्ती ॥ तो घालील अधोगतीं ॥ अंधतमाप्रती नेईल ॥८८॥ यालागीं स्त्रैणाची कथा ॥ कानीं नायकावी वार्त्ता ॥ त्याचा वाराही लागतां ॥ तेथूनि सर्वथा पळावें ॥ ८९ ॥ त्याची न घ्यावी भेटी ॥ त्यासी न करावी गोठी ॥ तो न पहावा दिठीं ॥ न लागावें पाठीं स्त्रैणाचिये ॥ ३९० ॥ स्त्रैण पुढें वाटे जाय ॥ त्याच्यामार्गीं मागू उरला राहे ॥ तेही आपण चुकवावी भोये ॥ येथवरी पाहे त्यागावा ॥ ९१ ॥ स्त्री आणि स्त्रैणाचे संगतीं ॥ जैशी होय दुःखप्राप्ती ॥ तैसें दुःख त्रिजगती ॥ माझीं निश्चितीं असेना ॥ ९२ ॥ अत्यंत स्त्रीकामीं वशता ॥ ती नांव मुख्य स्त्रैणता ॥ केवळ स्त्रियेसी अधीनता ॥ तो बाधू परमार्थी अतिनिंद्यत्वें ॥ ९३ ॥ आपुले हृदयींची कामासक्ती ॥ तेचि स्त्रीसंगाची दृढप्राप्ती ॥ तेथ उपजलिया विरक्ती ॥ मग स्त्रियेची प्राप्ती कोण पुसे ॥ ९४ ॥ ऐसें हृदयींचे, कणवें ॥ उद्धवासि सांगीतलें देवें ॥ हें ऐकोनियां उद्धवें ॥ विचारु जीवें आदरिला ॥ ९५ ॥ अनिवार उपजे विरक्ती ॥ जेणें बाधीना विषयासक्ती ॥ ऐशी जे ध्यानस्थिती ॥ तेचि देवाप्रती पुसत ॥ ९६ ॥ जें लागलिया ध्यान ॥ न दिसे स्त्रीपुरुषभान ॥ जीवीं उपजे चित्तसमाधान ॥ तैसें विधान पुसत ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ उद्धव उवाच ॥ ॥ यथा त्वामरविंदाक्ष यादृशं वा यदात्मकम् ॥ ध्यायेन्मुमुक्षुरेतन्मे ध्यानं त्वं वक्तुमर्हसि ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ उद्धव ह्मणे कमळनयना ॥ मुमुक्षु करिती तुझिया ध्याना ॥ त्या ध्यानाची ध्यानलक्षणा ॥ जगज्जीवना मज सांगे ॥ ९८ ॥ तें सगुण कीं निर्गुण ॥ कोण रूप कैसा वर्ण ॥ तें अवघेंही संपूर्ण ॥ कृपा करून मज सांगा ॥ ९९ ॥ जेथ रिघतां त्रुबगे मन ॥ ज्याचें अत्यंत गोडपण ॥ जें तुजही आवडे जाण ॥ तें मज ध्यान सांगावें ॥ ४०० ॥ ऐकोनि उद्धवाचा प्रश्न ॥ सांगावया उत्तम ध्यान ॥ पूर्वपीठिका आसन ॥ प्राणायामलक्षण सांगत ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ सम आसन आसीनः समकायो यथासुखम् ॥ हस्तावुत्संग आधाय स्वनासाऽग्रकृतेक्षणः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ ऐक आसनाचें लक्षण ॥ पाषाणीं, व्याधि संभवे जाण; ॥ केवळ धरणीचें आसन ॥ तें अतिकाठिण दुःखरूप; ॥ २ ॥ दारुकासनें निर्दय मन ॥ कोरड्या काष्ठा ऐसें होय जाण, ॥ तृणासनीं विकल्प गहन ॥ जैसें कां तृण विचित्रांकुरें, ॥ ३ ॥ वृक्षपल्लवावरी आसन ॥ तेणें चित्त सदा आंदोलायमान ॥ जारण मरण स्तंभन ॥ तेथ, काळें आसन साधकां ॥ ४ ॥ ज्ञानोपलब्धि मृगाजिनीं; ॥ मोक्षसिद्धी व्याघ्राजिनीं; ॥ मोक्षादि सर्वसिद्धींची श्रेणी ॥ श्वेतकंबलासनीं साधकां ॥ ५ ॥ भूमिका शुद्ध आणि समान ॥ पाहोनि निरुपद्रवस्थान ॥ तेथ र-

---

१ पदाचिन्ह, २ भुई. ३ कळवळ्यानें. ४ लांकडाच्या आसनानें. ५ विपरीत कल्पना. ६ हेलकावणारें. ७ कृष्णवर्ण. ८ पांढऱ्या धाबळीचें आसन. ९ सपाट.

चावें आसन ॥ *सुलक्षण अनुक्रमें ॥६॥ कुश, वस्त्र, कंबलाजिन ॥ इहींयुक्त घालावें आसन ॥ उंच नीच न व्हावें जाण ॥ समसमान समभागें ॥ ७ ॥ उंच झालिया आसन डोले ॥ नीच भूमीदोष आदळे ॥ यालागीं समत्वें प्रांजळें ॥ रचावें कोंवळें मृदु आसन ॥ ८ ॥ तेथ शुद्ध मुद्रा वज्रासन ॥ कां अंबुजासनही जाण ॥ अथवा घालावें ' सहजासन ॥ जे आसनीं मन सुखावें ' ॥ ९ ॥ तेणें मेरुदंडें अवक्र शुद्ध ॥ समकाया राखोनि प्रसिद्ध ॥ मूळादि तिनीबंधे ॥ अतिसुबद्ध पैं द्यावे ॥ ४१० ॥ ऐसें आसन लागतां ॥ आसनावरी स्वभावतां ॥ करांबुजाची विकासता ॥ उत्संगता शोभती ॥ ११ ॥ नाकाचें अग्र सांडूनि दुरी ॥ दृष्टि ठेवावी नासाग्रीं ॥ तेठायीं बैसे आज्ञाचक्रीं ॥ ×योगगंभीरीं योग्यता ॥ १२ ॥ ते अभ्यासीं निजनिश्चळें ॥ योगाभ्यासें योगबळें ॥ अर्धोन्मीलित होती डोळे ॥ धारणामेळें ते काळीं ॥ १३ ॥ भेदापासुनी उठाउठी ॥ उपरमतां अभेददृष्टी ॥ तिची नासाग्रीं +दिसे मिठी ॥ ❀इतरदृष्टी न लक्षितां ॥ १४ ॥ *आसनजयो त्रिबंधप्राप्ती ॥ दृष्टीची उपरमस्थिती ॥ हे अकस्मात कोणे रीतीं ॥ साधकाहातीं आतुडली ॥ १५ ॥ ऐसी आशंका धरिसी चित्तीं ॥ त्याही अभ्यासाची स्थिती ॥ उद्धवा मी तुजप्रती ॥ यथा निगुतीं सांगेन ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ प्राणस्य शोधयेन्मार्गं पूरकुंभकरेचकैः ॥ विपर्ययेणापि शनैरभ्यसेन्निर्जितेंद्रियः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ त्या अभ्यासाचें लक्षण ॥ प्रथम प्राणमार्गशोधन ॥ पूरकें कुंभक रेचक जाण ॥ प्राणापानशोधक ॥ १७ ॥ जिह्वा, उपस्थ, उपमर्दावे ॥ ऐसा इंद्रियनेम जैं संभवे ॥ त्यासीच हा प्राणजयो फावे ॥ येरां नव्हे श्रमतांही ॥ १८ ॥ प्राणशोधन तें तूं ऐक ॥ पूरक कुंभक रेचक ॥ सर्वोचि रेचक पूरक कुंभक ॥ हा उभय देख अभ्यासू ॥ १९ ॥ ' इडेनीं करावा प्राण पूर्ण ॥ 3तो कुंभूनि राखावा जाण ॥ मग तिनेंचि करावा रेचन ॥ हें एक लक्षण अभ्यासीं ॥ ४२० ॥ कां पिंगलेनें करावा पूर्ण ॥ तो तिनेंचि करावा रेचन ॥ हें एक अपरलक्षण ॥ 2विचक्षण बोलती ॥ २१ ॥ सर्वसंमत योगलक्षण ॥ 'इडेनें प्राण करावा पूर्ण ॥ तो कुंभकें राखावा स्तंभून ॥ करावें रेचन पिंगलयां ' ॥ २२ ॥ होकां ' पिंगलेनें पुरावा प्राण ॥ तोही कुंभकें राखावा कुंभून ॥ मग इडेनें सांडावा रेचून ' ॥ हें विपरीत लक्षण अभ्यासीं ॥ २३ ॥ 8येथ न करावी फाडाफोडी ॥ न मांडावी ताडातोडी ॥ सांडोनियां लवडसवडी ॥ अभ्यासपरवडी शनैःशनैः ॥ २४ ॥ येथ मांडलिया तांतडी ॥ तैं प्राण 7पडेल अनाडीं ॥ मग हे थडी ना ते

१ सिद्धासन. २ पद्मासन. ३ पाठीचा कणा. ४ सरळ, ताठ. ५ मूल, उडियाना, जालंदर हे तीन बंद. ६ हस्तकमलाची. ७ मांडीवर. ८ नाकाचा शेंडा. ९ नाकाचा आरंभ, भ्रुकुटी मध्य. १० ध्यानाच्या योगानें. ११ बाहेरचा वायु आंत घेणें. १२ तो कांहीं नियमितकाळपर्यंत कोंडून ठेवणें. १३ बाहेर सोडून देणें. १४ लिंग. १५ जिंकावे. १६ पिंगलेनें. १७ लगबग, वाई. १८ संकटांत.

*ना. कुशलक्षण. ×मो. योगगर्भी. +मो. पडे. ❀मो. इतरदृष्टी लक्षेना. *मो. आसन जयाची बंदप्राप्ति. 3ना. तो कुंभकें राखावा स्तंभून. 2ना. करावें रेचन पिंगळे. 8ना. येथें न करावी तडातोडी, न मांडावी कोंडाकोंडी, उपाधि सांडूनी लवडसवडी, मो. येथें न करावी कडाफोडी, न मांडावी तातडी, सांडूनिया लवडसवडी. 7ना. भरेल.

थडी ॥ ऐशी परवडी साधकां ॥२५॥ जेवीं मुंगी वळंघे पर्वता॥ ते चढे परी पडेना सर्वथा ॥ तेथ आत्यश्व चालों जातां ॥ नचढे तत्त्वतां अतिकष्टीं ॥ २६ ॥ तैसें ये योगाभ्यासीं जाण ॥ नचले जाणीव शहाणपण ॥ जाणिवा तेथ होय पतन ॥ सर्वथा गमन घडेना ॥ २७ ॥ 'ते मुंगीच्यापरी योगपंथा ॥ जो शनैःशनैः अभ्यासतां ॥ प्रणवाच्या चढे माथां ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ २८ ॥ दृढ अभ्यास आल्या हातां ॥ जैशी साधकाची मनोगतता ॥ तैसा पवन चाले तत्त्वतां ॥ जेवीं रणाआंतौता महाशूर ॥ २९ ॥ अभ्यासाच्या गडाडीं ॥ *प्राण खवळल्या कडाडी ॥ तो प्राणापानांचे भेद मोडी ॥ पदर फोडी चक्रांचे ॥ ४३० ॥ येथ द्विविध मार्गें भजन ॥ ' एक तें योगयुक्त निर्गुण ॥ एक तें प्रणवाभ्यासें भक्त सगुण ॥ तेंही लक्षण अवधारीं ॥३१॥ ऐक प्राणायामाचे भेद ॥ सगर्भ, अगर्भ, द्विविध ॥ सगर्भ आगमोक्तें शुद्ध ॥ सगुण संबंध ध्यानादि ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ हृद्यविच्छिन्नमोंकारं घंटानादं बिसोर्णवत् ॥ प्राणेनोदीर्य तत्राथ पुनः संवेशयेत्स्वरम् ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ वाचेसि नव्हतां गोचरू ॥ दीर्घ प्रणवाचा उच्चारू ॥ हृदयीं अनवच्छिन्न ओंकारू॥ अखंडाकारू उल्हासे ॥ ३३ ॥ घंटानादसदृशस्थितू ॥ जैसा कमळमृणाल सूक्ष्मतंतू ॥ तैसा मूळादारभ्य ब्रह्मरंध्रांतू ॥ प्राणायामयुक्तू प्रणवू भासे ॥३४॥ तेथ दीर्घस्वरें उच्चारू ॥ तेणें प्रणवू भासे अतिसुपुरू ॥ तो प्राणायामें करावा स्थिरू ॥ अखंडाकारू स्वरयुक्त ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ एवं प्रणवसंयुक्तं प्राणमेव समभ्यसेत् ॥ दशकृत्वस्त्रिषवणं मासादर्वाग् जितानिलः ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ स्वर, वर्ण, मात्रातीत पर ॥ प्रणव जो कां अगोचर ॥ तो अभ्यासबळें नर ॥ दृष्टिगोचर स्वयें करिती ॥ ३६ ॥ नवल उच्चाराचा चमत्कार ॥ ऊर्ध्वमुख अखंडाकार ॥ अभ्यासें प्रणवू करुनि स्थिर ॥ झणत्कार स्वरयुक्त ॥ ३७ ॥ ऐसा प्राणायाम युक्त प्रणवाभ्यास ॥ त्रिकाळ करितां सांडूनि आळस ॥ +काळीं आवर्त्तनें दशदश ॥ सावकाश करितां पैं ॥ ३८ ॥ ' तरी एक मास न लागतां ॥ हा प्राणजयो आतुडे हातां ॥ जेवीं कां सती पतिव्रता ॥ नुल्लंघी सर्वथा पतिवचन ॥ ३९ ॥ ये अभ्यासीं अतितत्पर ॥ झालिया गा निरंतर ॥ योगाभ्यासाचें सार ॥ सहजेंचि नर पावती ॥ ४४० ॥ ऐसा प्राणजयो आलिया हातां ॥ दों प्रकारीं भजनावस्था ॥ एकी सगुण आगमोक्तता ॥ दुजी योगाभ्यासता निर्गुणत्वें ॥ ४१ ॥ परी देहींचें समाधान ॥ निर्गुणींच पावे जाण ॥ त्या दोहींचें उपलक्षण ॥ संक्षेपें श्रीकृष्ण सांगत ॥ ४२ ॥ अगा ओं हें स्मरोंसरे ॥ स्मरतां स्वरेंसि प्राणू प्रणवीं भरे ॥ मग प्रणवाचि तेव्हां स्फुरे ॥ अखंडारें उल्हासतू ॥ ४३ ॥ जेथूनि अक्षरें उपजती ॥ शब्द वदोनि जेथ समावती ॥ मग जे उरे जाण स्फूर्ती ॥ प्रणवू निश्चितीं त्या

१ जातिवंत घोडा. २ दोनप्रकारचें. ३पंचरात्रागमांत. सांगितलेलें. ४ मर्यादारहित. ५ कमळाचा देंठ. ६ मूळाधारापासून. ७ आवृत्या. ८ ओंकारांत.

*मो. प्राणखळला कोंडाकोंडी. +ना. एकेकाळे.

नांव ॥ ४४ ॥ त्या प्रणवाचेनि आधारें ॥ जिणोनियां साही चक्रें ॥ तो प्रणत्र सूनि धुरे ॥ निजनिर्धारें चालिजे ॥ ४५ ॥ तेथ उल्लाट शक्तीचा लोट ॥ वैराग्याचा नेटपाट ॥ जिणोनि काकीमुखाची वाट ॥ सवेगें त्रिकूट घेतलें ॥ ४६ ॥ तेव्हां अनुहताच्या घायीं ॥ निशाण लागलें पाही ॥ तंव पुढील जे योगभुयी ॥ ते आपैती पाही हौसरली ॥ ४७ ॥ तेथें हरिखें अतिउद्भट ॥ औट पीठ आणि गोलाट ॥ तेहि जिणोनियां वाट ॥ घडघडाट चालिला ॥ ४८ ॥ मागील ठेली आठवण ॥ झाली विकल्पाची बोळवण ॥ सत्रावी वोळली जाण ॥ स्वानंद-जीवन जीवाचें ॥ ४९ ॥ ते सहस्रदळाचे पाटें ॥ वरूनि उतरले घडघडाट ॥ ते स्वानंदजीवना-निकट ॥ नीट वाटे पैं आले ॥ ४५० ॥ तें सेवितां संतोषें पाणी ॥ निवाली संतप्त अवनी ॥ इंद्रियांची पुरली धणी ॥ गुणांची त्रिवेणी बुडाली ॥ ५१ ॥ तंव भ्रमरगुंफे आंत ॥ जीव-शिवांचा एकांत ॥ तेणें जीवपणाचा प्रांत ॥ वृत्तीसी घात हौसरला ॥ ५२ ॥ तेथ शिवशक्ति-संयोग ॥ निजऐक्यें झाला चांग ॥ परमानंदें कोंदलें अंग ॥ सुखाचा सुखभोग सुखरूप झाला ॥ ५३ ॥ तेव्हां हेतु मातु दृष्टांतू ॥ खुंटली वेदवादाची मातू ॥ झाला मीतूंपणाचा प्रांतू ॥ एकला एकांतू एकपणें ॥ ५४ ॥ तेथ एकलेपणाचें एक ॥ ह्मणावया ह्मणतें नाहीं देख ॥ ऐसे योगबळें जे नेटक ॥ माझें निजसुख पावले ॥ ५५ ॥ हे योगमार्गींची वाट ॥ अति अवघड परमकष्ट ॥ थोर विघ्नांचा कडकडाट ॥ प्राप्ति अवचट एखाद्या ॥ ५६ ॥ तैसा नव्हे माझा भक्तिपंथ ॥ तेथ नाहीं विघ्नाची मातू ॥ भक्तासिही हाचि ठावो प्राप्तू ॥ ऐक तेही मातू मी सांगेन ॥ ५७ ॥ *मूळीं योग हा नाहीं स्पष्ट ॥ ह्मणाल कैंचें काढिलें कचाट ॥ पदबंधाची चुकली वाट ॥ वटवट न ह्मणावी ॥ ५८ ॥ येच श्लोकीं देवो बोलिला ॥ मासादर्वाक् प्राणजयो जाहला ॥ यांतू ध्वनितू योग बोलिला ॥ तो म्यां केला प्रकटार्थ ॥ ५९ ॥ जेथ प्राणापानजयो झाला ॥ तेथ महायोग हा भागा आला ॥ हा योगू शास्त्रार्थ बोलिला ॥ विशद केला अकुलागमीं ॥ ४६० ॥ प्राणापानजयो झाला पहाहो ॥ जैसा साधकाचा भावो ॥ सगुण निर्गुण उपावो ॥ प्राप्ती ठावो सहजेंची ॥ ६१ ॥ प्राणापानजयोप्राप्ती ॥ सगुण उपासनास्थिती ॥ तद्द्वारां निर्गुणप्राप्ती ॥ उद्धवाप्रती हरि बोले ॥ ६२ ॥ कशासारिखें तुझें ध्यान ॥ ऐसा उद्धवें केला प्रश्न ॥ यालागीं सांगोनियां सगुण ॥ सर्वे निर्गुण संस्थापी ॥ ६३ ॥ मत्स्य साधावया बडिश जाण ॥ चित्त साधावया मूर्ति सगुण ॥ तेचि मूर्तीचें सगुण ध्यान ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ हृत्पुंडरीकमंतस्थमूर्ध्वनालमधोमुखम् ॥ ध्यात्वोर्ध्वमुखमुन्निद्रमष्टपत्रं सकर्णिकम् ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ जैसें केळीचें कमळ ॥ तैसें हृदय अष्टदळ ॥ अधोमुख ऊर्ध्वनाळ ॥ अतिकोमळ लसलसित ॥ ६५ ॥ धरोनि प्राणायामाचें बळ ॥ ऊर्ध्वमुख हृदयकमळ ॥ विकासित करावें अष्टदळ ॥ ध्यानें प्रबळ ध्यातां पैं ॥ ६६ ॥ तेथ ऊर्ध्वमुख अधोनाळ ॥ ध्याना आलिया हृदय-कमळ ॥ अति उन्निद्र अष्टदळ ॥ ध्यानीं अचंचळ स्थिरावल्या ॥ ६७ ॥

१ सुषुम्नारंध्र. २ इडा, पिंगला, सुषुम्ना यांचें मेलन. ३ जीवनकला. ४ पाझर. ५ गोल्हाटावरील स्थान. ६ अडचण. ७ एक महिन्याचे पूर्वी. ८ नाशावया, पकडावया. ९ आमिष. १० केळफूल. ११ विकसित.
*मो. मुळीं योगचि स्पष्ट.

॥ श्लोक ॥ कर्णिकायां न्यसेत्सूर्यसोमाग्नीनुत्तरोत्तरम् ॥ वन्हिमध्ये स्मरेद्रूपं ममैतद्ध्यानमंगलम् ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ कर्णिकेमाजीं चंद्रमंडळ ॥ ध्यावें सोळाकळीं अविकळ ॥ त्याही माजीं सूर्यमंडळ ॥ अतिसोज्वळ बाराकळीं ॥ ६८ ॥ त्याही माजीं वन्हिमंडळ ॥ दाहीं कळीं अतिजाज्वल्य ॥ ते अग्निमंडळीं सुमंगल ॥ ध्यावी सोज्ज्वळ मूर्ति माझी ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ समं प्रशांतं सुमुखं दीर्घचारुचतुर्भुजम् ॥ सुचारुसुंदरग्रीवं सुकपोलं शुचिस्मितम् ॥ ३८ ॥ समानकर्णविन्यस्तस्फुरन्मकरकुंडलम् ॥ हेमांबरं घनश्यामं श्रीवत्सश्रीनिकेतनम् ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ तेंचि माझे मूर्तीचें ध्यान ॥ उद्धवा ऐक सावधान ॥ आपुले मूर्तीचें आपण ध्यान ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४७० ॥ अतिदीर्घ ना ठेंगणेपण ॥ सम अवयव समान ठाण ॥ समपोष अतिसंपूर्ण ॥ मूर्ति सुलक्षण चिंतावी ॥ ७१ ॥ मूर्ति चिंतावी संमुख ॥ प्रसन्नवदन आणि सुरेख ॥ जिचें देखतांचि सुख ॥ हृदयीं हरिख कोंदाटे ॥ ७२ ॥ जैशीं विशाळ कमळदळें ॥ तैसे आकर्णांत दोनी डोळे ॥ भंवया रेखिल्या काजळें ॥ जैशी सुरेखा धनुष्याकृती ॥ ७३ ॥ कपाळ मिरवत सांवळें ॥ त्याहीवरी चंदन पिंवळें ॥ माजीं कस्तूरीचीं दोनी अंगुळें ॥ कुंकुममेळें अक्षता ॥ ७४ ॥ दीर्घ नासिक आणियाळें ॥ लखलखित गंडस्थळें ॥ मुख सुकुमार कोंवळें ॥ अधरप्रवाळें आरक्त ॥ ७५ ॥ श्यामचंद्राची सपोष कोर ॥ तैशी चुबुका अतिसुंदर ॥ मुख निमासुरें मनोहर ॥ भक्तचकोरचंद्रमा ॥ ७६ ॥ जैशा हिरियाच्या ज्योती ॥ कीं दाळिंबबीजांची दीप्ती ॥ तैशी मुखामाजीं दंतपंक्ती ॥ दशनें झळकती बोलतां ॥ ७७ ॥ समानकर्ण दोनी सधर ॥ स्फुरत कुंडलें मकराकार ॥ ईक्षित हास्य मनोहर ॥ ग्रीवा सुंदर कंबु जैशी ॥ ७८ ॥ कंठींची त्रिवळी उभवणी ॥ माजीं मिरवे कौस्तुभमणी ॥ ते प्रकाशलीं दीप्ती कवणगुणीं ॥ तेजें दिनमणी लोपला ॥ ७९ ॥ भुजंगाकार स्वभावो ॥ चतुर्भुज आजानुबाहो ॥ विशाळ वक्षस्थळनिर्वाहो ॥ श्रीवत्स पहाहो चिन्हित ॥ ४८० ॥ श्रीवत्स श्रीनिकेतन ॥ हृदयीं दोहीं भागीं जाण ॥ त्रिवळीयुक्त उदर गहन ॥ दामोदरचिन्ह ज्या आलें ॥ ८१ ॥ विजू तळपे तैसा पिंवळा ॥ लखलखित दिसे डोळां ॥ तेवीं कसिला सोनसळा ॥ तेणें घनसांवळा शोभत ॥ ८२ ॥ जैसें चांदिणें गगनामाझारीं ॥ शुभ्रता तैसे श्यामतेवरी ॥ तेवीं श्यामांगीं चंदनाची भुरी ॥ तेणें श्रीहरी शोभत ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ शंखचक्रगदापद्मवनमालाविभूषितम् ॥ नूपुरैर्विलसत्पादं कौस्तुभप्रभया युतम् ॥ ४० ॥ द्युमत्किरीटकटककटिसूत्रांगदायुतम् ॥ सर्वांगसुंदरं हृद्यं प्रसादसुमुखेक्षणम् ॥ ४१ ॥

---

१ कमलाचा मध्यभाग. २ षोडशकलात्मक. ३ पुष्ट. ४ ओंठ हेंच पोंवळें. ५ शुक्लपक्षांतील द्वितीयेच्या चंद्राची. ६ ओंठाव हनुवटीच्या मधील भाग. ७ सुरेख नितळ. ८ दांत. ९ शंख. १० गुडघ्यांपर्यंत हात ज्याचे तो. ११ यशोदेनें दाव्यांनीं बांधल्याचें चिन्ह. १२ उटी.

॥ टीका ॥ कौस्तुभेंसि सँलग्न गळा ॥ आपाद रुळे वनमाळा ॥ कटीं बाणली रत्नमेखळा ॥ किंकिणीज्वाळमाळा समयुक्त ॥ ८४ ॥ करकंकणें; बाहुअंगदें ॥ शंखचक्रगदादि आयुधें ॥ जडित मुद्रिका नानाछंदें ॥ करायीं विनोदें बाणल्या ॥ ८५ ॥ नाभी सखोल अतिवर्तुळ ॥ जेथ ब्रह्मा झाला पोटींचें बाळ ॥ जें लोकपद्माचें समूळमूळ ॥ तें नाभिकमळ हरीचें ॥ ८६ ॥ जैसे सचेतन मर्गजस्तंभ ॥ तैसे घोंटीव साजिरे स्वयंभ ॥ उभयचरणांची अभिनवशोभ ॥ हरीअंगीं स्वयंभ शोभती ॥ ८७ ॥ ध्वज वज्र अंकुश रेखा ॥ यवांकित ऊर्ध्वरेखा॥ पद्मचक्रादि सामुद्रिका ॥ चरण नेटका हरीचा ॥ ८८ ॥ त्रिकोण कांतीव इंद्रनीळीं ॥ *तैशीं साजिरीं घोंटी सांवळीं ॥ पाउलें सुकुमारें कोंवळीं ॥ आरक्त तळीं ×पादप्रभा ॥ ८९ ॥ पाउलावरी सांवळी प्रभा ॥ तळवातळीं आरक्त शोभा ॥ जेवीं संध्याराग मीनला नभा ॥ तैशी शोभा हरिचरणीं ॥ ४९० ॥ नभमंडळीं चंद्ररेखा ॥ +तैशी पादाग्रीं मांडणी नखा ॥ पोटऱ्या सुकुमार नेटक्या ॥ जंघा सुरेखा जानुद्वय ॥ ९१ ॥ अतिशयें माजु साना ॥ होता अभिमान पंचाननों ॥ मध्य देखोनि जगज्जीवना ॥ लाजोनि रानां तो गेला ॥ ९२ ॥ अद्यापि तो झाला अरण्यवासी ॥ लाजा मुख न दाखवी कोणासी ॥ पहावया हरिमध्यासी ॥ लेणें मेखलेसी तें झालें ॥ ९३ ॥ चरणीं नूपुरांचा गजर ॥ वांकी अंदुवांचा झणत्कार ॥ मस्तकीं कुटिलालकभार ॥ सुमनीं कबर शोभतो ॥ ९४ ॥ नानारत्नीं अतिगहन ॥ मस्तकीं मुकुट देदीप्यमान॥ सर्वांगीं सुलक्षण ॥ मूर्ति संपूर्ण हरीची ॥ ९५ ॥ जे मूर्तीची धरिल्या सोये ॥ तहान भूक विसरोनि जाये ॥ जे ध्यानीं आतुडल्या पाहे ॥ सुखाचा होय सुदिन ॥ ९६ ॥ सर्वांगसुंदर श्यामवर्ण ॥ ज्येष्ठ वरिष्ठ गंभीर गहन ॥ सुमुख आणि सुप्रसन्न ॥ मूर्तीचें ध्यान करावें ॥९७॥

॥ श्लोक ॥ सुकुमारमभिध्यायेत्सर्वांगेषु मनो दधत् ॥ इंद्रियाणींद्रियार्थेभ्यो मनसाऽऽकृष्य तन्मनः ॥ बुद्ध्या सारथिना धीरः प्रणयेन्मयि सर्वतः ॥ ४२ ॥ तत्सर्वव्यापकं चित्तमाकृष्यैकत्र धारयेत् ॥ नान्यानि चिंतयेद्भूयः सुस्मितं भावयेन्मुखम् ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ झणी दृष्टीचा रुपेल न्याहारू ॥ लागतां खुपेल चंद्रकरू ॥ तैशी मूर्ति ध्यावी सुकुमारू ॥ अति अरवारू ध्याननिष्ठा ॥ ९८ ॥ इंद्रियार्थीं अतिलोलुप्त ॥ तें वैराग्यें आवरोनि चित्त ॥ माझे ध्यानीं सुनिश्चित ॥ बुद्धिमंत लाविती ॥ ९९ ॥ विषयीं आवरोनि मन ॥ अखंड करितां माझें ध्यान ॥ मद्रूपचि होय जाण ॥ ऐसें चिंतन करावें ॥ ५०० ॥ चिंतनीं विचकतां मन ॥ सविवेक बुद्धिबळें जाण ॥ निःशेष करितां माझें स्मरण ॥ धारणेवीण ध्यान ठसावें ॥ १ ॥ धारणा जरी तुटोनि जाये ॥ ध्यानठसा नतुटत राहे ॥ मन मूर्तीच्याठायीं पाहे ॥ जडलें ॥ ठांयें सर्वांगीं ॥ २ ॥ अंगप्रत्यंगीं ध्यानयुक्त ॥ जडोनि ठेलें जें चित्त ॥ तें आवरूनि समस्त ॥ चिंतावें निश्चित हास्यवदन ॥ ३ ॥ सर्वही सांडोनियां जाण ॥ सांगो-

१ पाउलापर्यंत. २ संध्याकाळीं. ३ पुढील पाउलाचे शेवटीं. ४ कंबर. ५ सिंहास. ६ गर्व. ७ कुरुळ केशांचें ओझें. ८ केशबंधविशेष. ९ टोंचेल. १० न्याहाळणी. ११ मृदु व सुंदर. १२ राहे.

*मो. तैसी घोंटी सुनीळ सांवळी. ×मो. पादप्रभा. +मो. तैसी पदवी शोभे नखा.

ांग मूर्तिध्यान ॥ चिंतावें गा हास्यवदन ॥ स्वानंदघन हरीचें ॥४॥ अंग प्रत्यंग मूर्तिध्यान ॥ ुढती न करावेंचि गा जाण ॥ ध्यातां माझें हास्यवदन ॥ तल्लीन मन करावें ॥ ५ ॥ उद्धवें केला होता प्रश्न ॥ कशासारिखें तुझें ध्यान ॥ तें सांगोनियां जाण ॥ *यदात्मकलक्षण हरि बोले ॥ ६ ॥ ध्यानां आलें जें हास्यवदन ॥ त्यांतीलही सांडोनि वदन ॥ केवळ हास्याचें करावें ध्यान ॥ हास्यामाजीं मन घालूनी ॥ ७ ॥ त्याही हास्याचें सांडूनि ध्यान ॥ हास्यामाजीं जो आनंदघन ॥ तेथ प्रवेशवावें मन ॥ अतिसावधान निजनिष्ठा ॥ ८ ॥ ते आनंदीं आनंदयुक्त ॥ जाहलिया आपुलें चित्त ॥ आनंदाची उपलब्धि तेथ ॥ होय सुनिश्चित साधकां ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ तत्र लब्धपदं चित्तमाकृष्य व्योम्नि धारयेत् ॥ तच्च त्यक्त्वा मदारोहो न किंचिदपि चिंतयेत् ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ जाहलिया आनंदपद प्राप्त ॥ चिदाकाशचि दिसे समस्त ॥ ते चिदाकाशीं चित्त ॥ अतिसावचित्त ठेवावें ॥ ६१० ॥ तेव्हां चिदाकाश चित्त चिंतन ॥ हेंही सांडूनि त्रिविध भेद ध्यान ॥ जो मी परमानंद परिपूर्ण ॥ भेदशून्य चिदात्मा ॥ ११ ॥ तेथें वृत्ति करूनि निमग्न ॥ सांडावें चिदाकाशाचेंही ज्ञान ॥ ×तेव्हां ज्ञेय ज्ञाता ज्ञान ॥ हेंही स्फुरण स्फुरेना ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ एवं समाहितमतिर्मामेवाऽऽत्मानमात्मनि ॥ विचष्टे मयि सर्वात्मन् ज्योतिर्ज्योतिषि संयुतम् ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ यापरी साधकांची निजवृत्ती ॥ माझ्या स्वरूपीं मीनल्या स्वरूपस्थिती ॥ तेव्हां मीपणाची स्फुरे जे स्फूर्ती ॥ तेही अद्वैतीं विराली ॥ १३ ॥ तेथें मीतूंपणाची भाष ॥ यापरी निमाली निःशेष ॥ माझें परमानंद निजसुख ॥ अद्वैत देख कोंदलें ॥ १४ ॥ जेवीं ज्योतीशी मीनल्या ज्योती ॥ दोहींची होय एकचि दीप्ती ॥ तेवीं जीवचैतन्याची स्फूर्ती ॥ अद्वैतसुखप्राप्ती समरसें ॥ १५ ॥ कोटि स्नेहसूत्रें मांडिती ॥ तेणें कोटिदीप नामाभिव्यक्ती ॥ ते कोटि दीपीं एकचि दीप्ती ॥ तेवीं जीव अद्वैतीं चिन्मात्र ॥ १६ ॥ देहेंद्रिय उपाधिवशें ॥ जीवासि भिन्नत्व भासे ॥ तो अद्वैतबोधसौरसें ॥ जीव प्रवेशे सुखस्वरूपीं ॥ १७ ॥ तेव्हां हें एक परमसुख ॥ हेंही ह्मणतें नाहीं देख ॥ एकाकी एकलें एक ॥ सुखेंसि निजसुख कोंदलें ॥ १८ ॥ जेवीं साखरें साखर चाखित ॥ कीं उदकीं उदक स्नान करित ॥ होकां घृत रिघालें घृता आंत ॥ सुनिश्चित सुवासा ॥ १९ ॥ यापरी माझी ध्यानस्थिती ॥ साधकां जाहली परमप्राप्ती ॥ तेचि उपसंहारे श्रीपती ॥ उद्धवाप्रती सांगत ॥ ६२० ॥

॥ श्लोक ॥ ॥ ध्यानेनेत्थं सुतीव्रेण युंजतो योगिनो मनः ॥ संयास्यत्याशु निर्वाणं द्रव्यज्ञानक्रियाभ्रमः ॥ ४६ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ ॥ यापरी तीव्र ध्यानस्थिती ॥ समाधिपर्यंत माझी प्राप्ती ॥ साधकासी होय शीघ्रगती ॥ यथानिगुतीं ध्यान करितां ॥ २१ ॥ हें माझें ध्यान उत्तमोत्तम ॥ ठसावलें जें निःसीम ॥

१ तेल, वाती.

*मो. वेदांतलक्षण. ×ना. तेचि.

तें अधिभूत, अधिदैव, अध्यात्म ॥ हा त्रिविध भ्रम उरोंनेदी ॥ २२ ॥ विषयी, विषयो, विषय, संभ्रम ॥ ज्ञेय, ज्ञाता, ज्ञानोपक्रम ॥ कर्म, कर्ता, क्रियाभ्रम ॥ याचें रूपनाम उरोंनेदी ॥ २३ ॥ तेथ ध्येय, ध्याता, ध्यान ॥ दृश्य, द्रष्टा, आणि दर्शन ॥ मन, *मंतां, आणि मनन ॥ याचें समूळ भान उच्छेदी ॥ २४ ॥ देवो, देवी, देवता ॥ भज्य, भजन, भजता ॥ लक्ष्य, लक्षण-लक्षिता ॥ हेही कथा तुरेची ॥ २५ ॥ तेथ योग्यतेशीं महायोगू ॥ समाधिसुखाचा सुखभोगू ॥ जीवशिवांचा निजसंयोगू ॥ हाही उपयोगू उडाला ॥ २६ ॥ तेथें कैंचा बोध बोधकता ॥ कैंची बद्धता आणि मुक्तता ॥ ब्रह्मनाम हेही वार्ता ॥ जाण सर्वथा बुडाली ॥ २७ ॥ सच्चिद आणि आनंद ॥ या नांवाचा जो प्रवाद ॥ तो ॐमज मायावी संबंध ॥ ऐक तोही विशद विभाग ॥ २८ ॥ असंताचे व्यावृत्तीं ॥ संत मातें ह्मणती श्रुती ॥ करितां जडाची समाप्ती ॥ चिन्मात्र ह्मणती मजलागीं ॥ २९ ॥ तोडितां दुःखाचा संबंधू ॥ मातें ह्मणती परमानंदू ॥ एवं सच्चिदानंदप्रवादू ॥ हा विपरीत बोधू वियेचा ॥ ३० ॥ जेथ असंताचि नाहीं ॥ तेथ संत ह्मणणें घडे कायी ॥ समूळ अज्ञानाचि जेव्हां नाहीं ॥ तेव्हां चिन्मात्र हेंही ह्मणे कोण ॥ ३१ ॥ जेव्हां दुःखाचा लेशू नाहीं ॥ तेव्हां सुख ह्मणावें कोणे ठायीं ॥ यालागीं नामरूप मज ×पाही ॥ ठेवितां ठायीं +तुकेना ॥ ३२ ॥ समूळ उडे त्रिपुटीचें भान ॥ या नांव गा तीव्रध्यान ॥ माझें करूनियां भजन ॥ निजसमाधान पावले ॥ ३३ ॥ एवं माझेनि ध्यानप्रकारें ॥ संसार उडे चमत्कारें ॥ माझें केवळ स्वरूपचि उरे ॥ निजनिर्धारें उद्धवा ॥ ३४ ॥ ते स्वरूपीं सुख ना दुःख ॥ नाहीं संतासंताचे लेख ॥ ज्ञानाज्ञानाची अटक ॥ ते ठायीं देख असेना ॥ ३५ ॥ तेथ नाम रूप गुण ॥ नाहीं मीतूंपणाची खुण ॥ †अविद्या अविद्यमान ॥ आनंदघन निजरूप ॥ ३६ ॥ भक्तिसुखाचे हेलावे ॥ नानाउपायगौरवें ॥ उद्धवालागीं देवें ॥ निजानुभवें दीधले ॥ ३७ ॥ ठसावल्या माझी भक्ती ॥ सकळसिद्धींची होय प्राप्ती ॥ संदेह नाहीं यदर्थीं ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३८ ॥ भजनपंथें निरंतर ॥ दोहोनि भक्तिसुख क्षीर ॥ त्याचेंही मंथोनियां सार ॥ उद्धवासि श्रीधर वदता जाहला ॥ ३९ ॥ तो हा चौदावा अध्यावो ॥ स्वमुखें बोलिला देवो ॥ भक्तीसि मी वश्य पहाहो ॥ येर उपावो तो गौण ॥ ४० ॥ सकळयोगांचें योगगव्हर ॥ वेदांताचें निज भांडार ॥ सकळसिद्धींचें परमसार ॥ भक्ति साचार हरीची ॥ ४१ ॥ निज-भाग्याची परम जोडी ॥ महासुखाची आवडी गाढी ॥ सकळगोडियांची गोडी ॥ भक्ति रोकडी हरीची ॥ ४२ ॥ भावें करितां भगवद्भजन ॥ श्वपच जाहले पावन ॥ जेवीं भक्तीशीं +विकिलें मन ॥ त्या अधीन सदा देवो ॥ ४३ ॥ उपेक्षूनियां निजमुक्ती ॥ एका जनार्दनीं पढिये भक्ती ॥ त्याचेनि प्रसादें भगवत्प्राप्ती ॥ जाहली अहोराती खेळणें ॥ ४४ ॥ तो जरी भगवत्प्राप्ती नेघे ॥ तरी ते दाटूनि घर रिघे ॥ ऐसा गुरुभक्तीचेनि योगें ॥ देवो सर्वांगें भूलला ॥ ४५ ॥ भगवत्प्राप्ती पाहिजे ज्यासी ॥ तेणें न विसंबावें मद्भक्तीशीं ॥ अखंड स्मरे जो हरिनामासी ॥ देवो त्यापाशीं तिष्ठत ॥ ४६ ॥ सकळभजनाचे शिरीं ॥ रामनाम दों अक्षरीं ॥ सदा गर्जे ज्याची वैखरी ॥ धन्य चराचरीं तो एक ॥ ४७ ॥ एका जनार्दना शरण ॥ इतुकें करितां नामस्मरण ॥ पाठिमोरें होय जन्ममरण ॥ महासिद्धी आंगण वोळगंती ॥ ४८ ॥ इति श्रीभागवते महापु-

१ मानणारा. २ असताचा निरास करण्याकरितां ( अमृतानुभव प्र. ५ ओवी १० पहा. )

*ना. मो. ममता. ॐना. जाण. ×ना. नाहीं. +ना. ठकिला. †ना. विद्या अविद्यमान.

राणे एकादशस्कंधे एकाकारटीकायां श्रीकृष्णोद्धवसंवादे भक्तिरहस्यावधारणयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ श्लोक ॥ ॥ ४६ ॥ ओंव्या ॥ ९४८ ॥ एकुणसंख्या ॥ ९९४ ॥

---

# अध्याय पंधरावा.

श्रीगणेशायन नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओं नमो श्रीजनार्दन ॥ सकळसिद्धींचें सिद्धिस्थान ॥ सकळसिद्धींचें परम निधान ॥ तुझे श्रीचरण सवार्थी ॥ १ ॥ निधान साधावया अंजन ॥ नयनीं काळिमा घालिती जन ॥ तेणें काळवंडले नयन ॥ थितें निधान न देखती ॥ २ ॥ तैसे नव्हती तुझे चरण ॥ करितां चरणरजवंदन ॥ निःशेष काळिमा निरसे जाण ॥ परिपूर्णनिधान दाविसी ॥ ३ ॥ अंजनें साधितां निधान ॥ *तेथ छळावया पावे विघ्न ॥ बळी देऊनि साधिल्या जाण ॥ नश्वरपण तयासी ॥ ४ ॥ हें साधूनियां निधान ॥ झाले सनकादिक संपन्न ॥ नारदाचें +उदारपण ॥ येणेंचि जाण वाखाणे ॥ ५ ॥ तैसे नव्हती तुझे चरण ॥ ×अवलीलाही करितां स्मरण ॥ नित्य सिद्ध ⁂अव्यय जाण ॥ निजनिधान ठसावे ॥ ६ ॥ वज्रकवच प्रह्लादासी ॥ हेंचि भांडवल गांठी त्यासी ॥ शुकादिवामदेवांसी ॥ महिमा येणेंसि पावले ॥ ७ ॥ व्यास वाल्मीकिमहांवेव्हारे ॥ येणेंचि भांडवलें झाले खरे ॥ त्यांचेनि भांडवलें लहान थोरें ॥ छेदूनि दरिद्रें नांदती ॥ ८ ॥ त्या सद्गुरूचे श्रीचरण ॥ परम निधींचें निधान ॥ एका जनार्दन शरण ॥ हें आह्मा परिपूर्ण भांडवल ॥ ९ ॥ येणेंचि भांडवलें प्रस्तुत ॥ प्राप्त झालें श्रीभागवत ॥ तेथ उद्धवासि श्रीअनंत ॥ ज्ञानमथितार्थ सांगत ॥ १० ॥ त्या दोघांची एकांतमातु ॥ प्रकट जाहली जगाआंतू ॥ हा परीक्षितीचा विख्यातू ॥ उपकार लोकांतू थोर झाला ॥ ११ ॥ ज्याचे श्रद्धेच्या आवडीं ॥ शुक पावला लवडसवडी ॥ तेणें गुह्यज्ञानाची गोडी ॥ प्रकट उघडी दाखविली ॥ १२ ॥ त्या शुकाचें नवल महिमान ॥ कानीं न सांगतां गुह्य ज्ञान ॥ श्रवणें तोडोनि बंधन ॥ परीक्षिती जाण उद्धरिला ॥१३॥ एथवरी श्रवणाची गोडी ॥ प्रसिद्ध दाविली उघडी ॥ तरी अभाग्य दांताखिळी पाडी ॥ कानाची तुघडी निमटली मिठी ॥ १४ ॥ श्रवणीं घालितां वाडेंकोडें ॥ कथासारामृत बाहेरी सांडे ॥ श्रोत्या आतौता थेंब नपडे ॥ यालागीं रडे विषयासी ॥१५॥ असो हे श्रोत्याची कथा ॥ कथा सांगे जो कां वक्ता ॥ तोहि तैसाचि पै रिता ॥ घोट आंतौता जावोंनेदी ॥१६ ॥ जैसा गुळ उंसाचा घाणा ॥ रस जाये बाहेरी मांदणा ॥ फिकेपणें करकरी घाणा ॥ते गती वदना वक्त्याचे ॥१७॥ जें कथामृताचें गोडपण ॥ तें सद्गुरूवीण चोखवी कोण ॥ यालागीं जनार्दना शरण ॥ जेणें गोडपण चाखविलें ॥ १८ ॥ परी चाखविती उणखुण ॥ तेही 7अभिनव आहे जाण ॥ स्वाद

---

१ मूलस्थान. २ ठेवा हस्तगत करण्याकरितां. ३ मांसादि उपायन. ४ मोठे सावकार. ५ सारांश. ६ ज्याच्या परीक्षितीच्या श्रद्धेनें शुक लगबगीनें आले. ७ मिटून घेतली.

*मो. तेथें अकस्मात व्यापे विघ्न. +ना. उदासपण. ×मो. आवडी. ⁂मो. अद्वैत 7ना. अभिन्न.

स्वादितां आपण ॥ होऊनि गोडपण चाखवी ॥ १९ ॥ बाळकाहातीं दिधल्या फळा ॥ खावें हें न कळे त्या अबळा ॥ त्याचे मुखीं घालूनि गळाळा ॥ गोडीचा जिव्हाळा जनक दावी ॥ २० ॥ गोडी लागल्या बाळकासी ॥ तेंचि *फळें खाय अहर्निशीं ॥ तेवीं जनार्दनें आम्हा-सी ॥ गोडी श्रीभागवतासी लाविली ॥ २१ ॥ ऐशी लाविली गोडी चढोवढी ॥ तेणें झाली नवलपरवडी ॥ मज सांडितांही ते गोडी ॥ गोडी न सोडी मजलागीं ॥ २२ ॥ ते गोडीनें गिळिलें मातें ॥ मीपण गेलें गोडी आंतौतें ॥ ते गोडीचें उथळलें भरितें ॥ सबाह्य रितें उरों नेदी ॥२३॥ हें शुकमुखींचें श्रेष्ठ फळ ॥ गोडपणें अति रसाळ ॥ त्वचाआंठोळीविण केवळ ॥ गोडीचि सकळ फळरूपें ॥ २४ ॥ ते श्रीभागवतींची गोडी ॥ श्रीकृष्णें निजआवडीं ॥ उद्धवासि कडोविकडी ॥ भक्ति चोखडी चाखविली ॥ २५ ॥ करितां माझें भजन ॥ धरितां माझे मूर्तीचें ध्यान ॥ समाधिपर्यंत समाधान ॥ उद्धवासि संपूर्ण सांगीतलें ॥ २६ ॥ हे कृष्ण-मुखींची मातू ॥ ऐकोनि चौदाव्या अध्यायांतू ॥ उद्धव हरिखला अद्भुतू ॥ माझा निजस्वार्थू फावला ॥ २७ ॥ मज श्रीकृष्णमूर्तीचें ध्यान ॥ सहजचि सदा असे जाण ॥ तेणेंच होय समाधान ॥ तरी कां प्रश्न करूं आतां ॥ २८ ॥ ऐकोनि चौदावा अध्यावो ॥ झाला उद्धवासि हा दृढभावो ॥ हें देखोनि स्वयें देवो ॥ पुढील अभिप्रावो सूचितू ॥२९॥ दृढ विश्वासेंसि जाण ॥ करितां माझें भजन ध्यान ॥ पुढां उपजे सिद्धीचें विघ्न ॥ ते अर्थीं श्रीकृष्ण उपदेशी ॥ ३० ॥ पंधरावे अध्यायीं निरूपण ॥ भक्तीं माझें करितां भजन ॥ अवश्य सिद्धि उपजती जाण ॥ त्या त्यागाव्या विघ्न म्हणोनी ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ जितेंद्रियस्य युक्तस्य जितश्वासस्य योगिनः ॥
मयि धारयतश्चेत उपतिष्ठंति सिद्धयः ॥ १ ॥

॥ टीका ॥ प्राणापानजयो ज्यापासीं ॥ इंद्रियजयो असे ज्यासी ॥ याहीवरी उल्हास मद्भक्ती-सी ॥ +चित्त अहर्निशीं मद्युक्त ॥३२॥ उद्धवा गा त्याच्या ठायीं ॥ अनिवार सिद्धी उपजती पाहीं ॥ ये अर्थीं संदेह नाहीं ॥ जेजे समयीं जें इच्छी ॥ ३३ ॥ ऐसें उद्धवें ऐकतां ॥ चमत्कारू झाला चित्ता ॥ समूळ सिद्धींची कथा ॥ श्रीकृष्णनाथा पुसों पां ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ कया धारणया कास्वित् कथं स्वित् सिद्धिरच्युत ॥
कति वा सिद्धयो ब्रूहि योगिनां सिद्धिदो भवान् ॥ २ ॥

॥ टीका ॥ कोण्या धारणा कोण सिद्धी ॥ ते सांगावी विधानविधी ॥ संख्या किती सकळ-सिद्धी ॥ तेंही कृपानिधी सांगिजे ॥३५॥ या सकळसिद्धींची कथा ॥ तूं एक जाणता तत्त्वतां ॥ ते मज सांगिजे जी अच्युता ॥ तूं सिद्धिदाता योगियां ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ सिद्धयोऽष्टादश प्रोक्ता धारणा योगपारगैः ॥
तासामष्टौ मत्प्रधाना दशैव गुणहेतवः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ सिद्धि अष्टादश जाण ॥ त्यांची धारणा भिन्नभिन्न ॥ ऐसें बोलिलें योगज्ञ ॥ योग-

---

१ अज्ञास. २ ग्रास. ३ उद्भवले. ४ साधला. ५ अठरा.

*ना. बळें. +ना. चिंती अहर्निशीं मजयुक्त.

संपन्न महासिद्ध ॥ ३७ ॥ या नांव गा सिद्धि समस्ता ॥ यांत अष्ट महासिद्धि विख्याता ॥ त्या माझे स्वरूपीं स्वरूपस्थिता ॥ आणिकासि तत्त्वतां त्या नाहीं ॥ ३८ ॥ मनसा वाचा कर्मणा जाण ॥ विसरोनि देहाचें देहपण ॥ माझेनि स्वरूपें अतिसंपन्न ॥ चैतन्यघन जो झाला ॥ ३९ ॥ त्यापाशीं या सिद्धि जाण ॥ उभ्या असती हात जोडून ॥ परी तो न पाहे शुंकोन ॥ निचोड जाण यापरी ॥ ४० ॥ इतर दहा सिद्धींची कथा ॥ *ज्या सत्वगुणी गुणभूता, ॥ साधक शुद्धसत्वात्मा होतां॥त्यापाशीं सर्वथा प्रकटती॥४१॥अष्टमहासिद्धींची कथा ॥ तुज मी सांगेन तत्त्वतां ॥ ज्या माझे स्वरूपीं स्वभावतां ॥ असती वर्त्ततां अहर्निशीं ॥ ४२ ॥

॥ श्लोक ॥ अणिमा महिमा मूर्त्तेर्लघिमा प्राप्तिरिंद्रियैः ॥ प्राकाश्यं श्रुतदृष्टेषु शक्तिप्रेरणमीशिता ॥ ४ ॥ गुणेष्वसंगो वशिता यत्कामस्तदवस्यति ॥ एता मे सिद्धयः सौम्य अष्टावौत्पत्तिका मताः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ अणिमा महिमा लघिमास्थिती ॥ या तिन्ही देहसिद्धींची प्राप्ती ॥ ※प्राप्तिरिंद्रिय जे वदंती ॥ ते जाण चौथी महासिद्धी ॥ ४३ ॥ प्राकाश्यश्रुतदृष्टता ॥ ते पांचवी सिद्धी गा सर्वथा ॥ शक्तिप्रेरण, असंगईशिता ॥ हे जाण तत्त्वतां सहावी सिद्धी ॥ ४४ ॥ माझे धर्म जेथ वश होती ॥ ते वशिता बोलिजे सिद्धांतीं ॥ ते सातवी सिद्धीची वदंती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥४५॥ त्रिलोकीं भोग जो निरुपम ॥ तो न करितां परिश्रम ॥ इच्छामात्रें उत्तमोत्तम ॥ भोग सुगम होंलागे ॥ ४६ ॥ यत्कामस्तदवस्यति ॥ इच्छिल्या कामसुखाची प्राप्ती ॥ त्रिभुवनींची भोगसंपत्ती ॥ एकेच काळें अवचितीं ॥ ते जाण पां ख्याती आठवी सिद्धी ॥४७ या अष्ट महासिद्धींची राशी ॥ स्वभावें असे मजपाशीं ॥ साधक शिणतां प्रयासीं ॥ एखादी कोणासी उपतिष्ठे ॥ ४८ ॥ हे महासिद्धींची व्युत्पत्ती ॥ इतर दहा ज्या बोलिजेती ॥ त्याही सांगेन तुजप्रती ॥ यथानिगुतीं उद्धवा ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ अनूर्मिमत्त्वं देहेऽस्मिन्दूरश्रवणदर्शनम् ॥ मनोजवः कामरूपं परकायप्रवेशनम् ॥ ६ ॥ स्वच्छंदमृत्युर्देवानां सहक्रीडानुदर्शनम् ॥ यथासंकल्पसंसिद्धिराज्ञा प्रतिहता गतिः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ ×देहीं बाधिती ना ऊर्मि साही ॥ ते अनूर्मिसिद्धी पहिली पाहीं ॥ दूरली वाचा एकेठायीं ॥ दूरश्रवण नवाई दुसरी सिद्धी ॥ ५० ॥ त्रिलोकींचा सोहळा ॥ बैसले ठायीं देखे डोळां ॥ हे तिसरे सिद्धीची लीला ॥ दूरदर्शन कळा तीं नांव ॥ ५१ ॥ मनोजवसिद्धि ऐशी आहे ॥ कल्पिल्या ठायासी पाहे ॥ मनोवेगें शरीर जाये ॥ चौथी होये हे सिद्धी ॥५२॥ कामरूपसिद्धीची परी ॥ जैशिया रूपाची कामना करी ॥ तैसें रूप तत्काळ धरी ॥ हे पांचवी खरी कामनासिद्धी ॥ ५३ ॥ आपुलें शरीर ठेवूनि दुरी ॥ परशरीरीं प्रवेश करी ॥ हे परकायप्रवेशपरी ॥ सहावी साजिरी अतिसिद्धी ॥ ५४ ॥ काळासि वश्य नाहीं होणें ॥ आपुलिये

१ बेपर्वा. २ केवळ सत्वरूप. ३ इंद्रियांसह त्याल्या विषयाची प्राप्ति. ४ ऐकिलें व पाहिलें त्याबद्दल प्रकाश. ५ प्राप्त होते. ६ क्षुत् पिपासा इत्यादि. ७ लांबचें ऐकूं येणें.

*ना. सत्यगुणें. ※ना. प्राप्तीरिद्धी जेथें वदंती. ×मो. देहबुद्धी नाहीं उर्मी साही.

इच्छेनें मरणें ॥ हे सातवी सिद्धि जाणणें ॥ स्वच्छंदमरणें ती नांव ॥ ५५ ॥ स्वर्गीं देवांचें जें क्रीडन ॥ त्याचें हा देखे दर्शन ॥ स्वयें क्रीडावया अंगवण ॥ ते सिद्धि जाण आठवी ॥ ५६ ॥ जैसा संकल्प तैशी सिद्धी ॥ ते नववी जाण पां त्रिशुद्धी ॥ राजाही आज्ञा शिरीं वंदी ॥ ज्याची गमनसिद्धी सर्वत्र ॥ ५७ ॥ ज्याची आज्ञा आणि गमन ॥ कोठेंही अवरोधेना जाण ॥ हें दहावे सिद्धीचें लक्षण ॥ ज्ञानविचक्षण जाणती ॥ ५८ ॥ या गुणहेतुसिद्धींची विधी ॥ म्यां सांगीतली हे त्रिशुद्धी ॥ यांहीहोनि क्षुद्रसिद्धी ॥ त्याही निजबुद्धीं अवधारी ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ त्रिकालज्ञत्वमद्वंद्वं परचित्ताद्यभिज्ञता ॥ अग्न्यर्काम्बुविषादीनां प्रतिष्टंभोऽपराजयः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ क्षुद्रसिद्धि पंचलक्षण ॥ भूत भविष्य वर्तमान ॥ या त्रिकाळांचें जें ज्ञान॥ तें पहिलें जाण ये ठायीं ॥ ६० ॥ सुख दुःख शीत उष्ण ॥ मृदु आणि अति कठिण ॥ या द्वंद्वांसि वश नव्हे जाण ॥ तें दुसरें लक्षण सिद्धीचें ॥ ६१ ॥ पराचें स्वप्न स्वयें सांगणें ॥ पुढिलांचे चित्तींचें जाणणें ॥ हे तिसरी सिद्धि म्हणणें ॥ ऐक लक्षणें चौथीचीं ॥ ६२ ॥ अग्नि वायु आणि उदक ॥ शस्त्र विष आणि अर्क ॥ यांचें प्रतिस्तंभन देख ॥ ते सिद्धि निष्टंक हे चौथी ॥ ६३ ॥ कोणासि जिंकिला नवचे पाहे ॥ जेथिंचा तेथ विजयी होये ॥ एकला सर्वत्र विजयो लाहे ॥ हे पांचवी आहे विजयसिद्धी ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ एताश्चोद्देशतः प्रोक्ता योगधारणसिद्धयः ॥ यया धारणया या स्याद्यथा वा स्यान्निबोध मे ॥ ९ ॥

॥ टीका ॥ ॥ उद्देशमात्रें सिद्धींची गती ॥ म्यां सांगीतली तुजप्रती ॥ आतां कोणे धारणें कोणे स्थिती ॥ सिद्धीची प्राप्ती होय ते ऐक ॥ ६५ ॥ अष्टमहासिद्धींची धारणा ॥ गुणहेतु दहा सिद्धि जाणा ॥ क्षुद्रसिद्धि पंचलक्षणा ॥ त्यांचे साधित्या साधना हरि बोले ॥ ६६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ भूतसूक्ष्मात्मनि मयि तन्मात्रं धारयेन्मनः ॥ अणिमानमवाप्नोति तन्मात्रोपासको मम ॥ १० ॥

॥ टीका ॥ अष्टमहासिद्धि स्वाभाविका ॥ माझ्याठायीं असती देखा ॥ या असाध्य साधावया आवांका ॥ करित्या साधका साधन सांगे॥६७॥मी अणुरेणूचाही अणुरेणु ॥ जीवाचाही हृदयस्थ जाण ॥ तेथ *अणुतन्मात्र करूनि मन ॥ माझ्याठायीं जाण जो राखे ॥ ६८ ॥ अणुतन्मात्र ध्यान सदा राहे ॥ त्याचा अणुमात्रचि देह होये ॥ कीटकी भृंगींच्या ऐसें पाहे ॥ अणिमेची लाहे तो सिद्धी ॥ ६९ ॥ तो अच्छिद्रीं निघोनि जाये ॥ जगाच्या डोळयांमाजीं समाये ॥ कोठेंही खुपेना पाहे ॥ हे अणिमेची लाहे महासिद्धी ॥ ७० ॥

॥ श्लोक ॥ ॥ महत्यात्मन्मयि परे यथासंस्थं मनो दधत् ॥ महिमानमवाप्नोति भूतानां च पृथक् पृथक् ॥ ११ ॥

---

१ सामर्थ्य. २ ज्ञाते. ३ दुसऱ्याच्या. ४ संक्षेपतः ५ अवसान.

*ना. अणुमात्र.

॥ टीका ॥ माझें स्वरूप अनंत अपार ॥ महत्तत्त्वाहोनि अतिथोर ॥ आणि महत्तत्त्वाचाही साचार ॥ नियंता ईश्वर जो कां मी ॥ ७१ ॥ ते सिद्धी साधावया जो नर ॥ माझी धारणा धरी अपरंपार ॥ तेवढेंच होय त्याचें शरीर ॥ हे सिद्धि महाथोर महिमानें ॥ ७२ ॥ सूक्ष्म कापुसाचे तंतू पाहे ॥ तो कल्पने ऐसा पट्ट होये ॥ माझी *महंती धारणा वाहे ॥ तो माझी सिद्धि लाहे महिमत्वें ॥७३॥ तुकितां त्याच्या समान भारा ॥ नपुरे सपर्वत सगळी धरा ॥ एवढ्या महत्तत्त्वाचा उभारा ॥ सिद्धिद्वारा तो पावे ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ परमाणुमये चित्तं भूतानां मयि रंजयन् ॥ कालसूक्ष्मार्थतां योगी लघिमानमवाप्नुयात् ॥ १२ ॥

॥ टीका ॥ वायवादिप्राणपरिमाण ॥ जेणें काळसूत्राचें गणन ॥ तो परमाणुरूप भगवंत जाण ॥ त्याचें दृढ ध्यान सदा जो करी ॥ ७५ ॥ परमाणुधारणेचा महिमा ॥ त्याच्या देहासि ये अति लघिमा ॥ तो मशकीं चढोनिया हा मा ॥ उडे व्योमामाजीं सुखें ॥ ७६ ॥ अणिमादि तिनी धारणा ॥ या देहींच्या सिद्धी जाणा ॥ लहान थोर हलुपणा ॥ देह लक्षणा उपजवी ॥ ७७ ॥ उरल्या ज्या पंचमहासिद्धी ॥ त्यांच्या धारणेचा विधी ॥ तोही सांगेन त्रिशुद्धी ॥ ऐक सुबुद्धी उद्धवा ॥ ७८ ॥

॥ श्लोक ॥ धारयन्मय्यहंतत्वे मनो वैकारिकेऽखिलम् ॥ सर्वेंद्रियाणामात्मत्वं प्राप्तिं प्राप्नोति मन्मनाः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ मुळींचा शुद्ध अहंकारू ॥ ज्यापासूनि इंद्रियविकारू ॥ इंद्रियअधिष्ठात्रीं सुरवरू ॥ चेतविता ईश्वरू जो कां मी ॥ ७९ ॥ त्या माझ्याठायीं धारणा धरितां ॥ इंद्रिय अधिष्ठात्री देवता ॥ त्यासि पावोनि एकात्मता ॥ इंद्रियप्रकाशकता स्वयें लाहे ॥ ८० ॥ तेव्हां इंद्रियव्यापार जगाचे ॥ प्रकाशूनि हा देखे साचे ॥ एवढिये इंद्रियप्राप्तीचें ॥ साधी सिद्धीचें वैभव तो ॥ ८१ ॥ तेव्हां ज्याचा जो जेथ पाहे ॥ इंद्रियांचा व्यापारू होये ॥ तो येणेंचि केला आहे ॥ ऐशी प्रतीति होये इंद्रियप्राप्ती ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ महत्यात्मनि यः सूत्रे धारयन्मयि मानसम् ॥ प्राकाम्यं पारमेष्ठ्यं मे विंदतेऽव्यक्तजन्मनः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ जें महत्तत्त्व गा जाण ॥ तें मायेचें प्रथम स्फुरण ॥ ज्यासि क्रिया सूत्र प्रधान ॥ नामाभिधान बोलती ॥ ८३ ॥ तेथ अजन्मा मी आपण ॥ जाहलों सूत्राचा सूत्रात्मा जाण ॥ त्या माझ्या स्वरूपाचें ध्यान ॥ सावधान जो करी ॥ ८४ ॥ ज्या सूत्राचेनि प्रकाशप्रवाहें ॥ ब्रह्मांड हिरण्य प्रकाशला राहे ॥ ते प्रकाशता त्यासि वश्य होये ॥ येणें सूत्रात्मा पाहे ×निजध्यासनें ॥ ८५ ॥ त्या +निजध्यासनापोटीं ॥ करूं शके ब्रह्मांडकोटी ॥ एवढी प्रकाशसिद्धि गोमटी ॥ हे भजत्राण तुठी साधकां ॥ ८६ ॥

१ महान् यापेक्षां. २ तुळितां. ३ अत्यंत सूक्ष्मरूपता. ४ आकाशांत. ५ प्रेरक. ६ ध्यानयोगानें.

*[illegible]. [illegible]. ×ना. नित्यध्यासनें. +ना. नित्यध्यास मो. सिद्धध्यास.

॥ श्लोक ॥ विष्णौ त्र्यधीश्वरे चित्तं धारयेत्कालविग्रहे ॥ स ईशित्वमवाप्नोति क्षेत्रक्षेत्रज्ञचोदनाम् ॥ १५ ॥

॥ टीका ॥ मायादित्रिगुणनियंता ॥ जो कळिकाळातें आकळिता ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयकर्ता ॥ जाण तत्त्वतां अंतर्यामी ॥ ८७ ॥ त्या मज विष्णूचें ध्यान ॥ निरंतर जो करी जाण ॥ त्यासि अदृष्टद्रष्टेपण ॥ शक्तिप्रेरण ईशत्वें ये ॥८८॥ मिथ्या बुद्धिबळाच्या खेळाप्रती ॥ सारीचि जाणे गति निगुती ॥ तेवीं मिथ्या संसार प्रतीती ॥ भूतांची आगती निर्गती स्वयें जाणे ॥८९॥ तो जीवादिशरीरप्रेरण ॥ स्वयें करूं शके आपण ॥ करितां अंतर्यामीचें ध्यान ॥ एवढी सिद्धि जाण उपतिष्ठे ॥ ९० ॥ तो आपुलेनि प्रतापस्वभावीं ॥ मशकाहातीं मेरु विभांडवी ॥ कां इंद्रातें मारवी ॥ क्षुल्लका करवी उंदराहातीं ॥ ९१ ॥ यापरी एकातें मारवी ॥ जीवें गेलिया जीववी ॥ अचेतनातें पोलेजवी ॥ ये सिद्धीची पदवी ईशत्व ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ नारायणे तुरीयाख्ये भगवच्छब्दशब्दिते ॥ मनो मय्यादधद्योगी मद्धर्मा वशितामियात् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ जीव शिव आणि प्रकृती ॥ यांहूनि पर चौथी स्थिती ॥ ज्यातें नारायण ह्मणती ॥ यथा निगुती सज्ञान ॥ ९३ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ती ॥ यावेगळी तुरीया स्थिती ॥ त्यातें नारायण ह्मणती ॥ यथानिगुती सज्ञान ॥ ९४ ॥ दृश्य द्रष्टा दर्शन ॥ यां अतीत चौथा जाण ॥ त्यातें ह्मणती नारायण ॥ ज्ञानविचक्षण निजबोधें ॥ ९५ ॥ त्रिपुटीवेगळी जे मातू ॥ असोनियां त्रिपुटी आंतू ॥ जो कां त्रिपुटीसि अलिप्त ॥ तो मी विख्यातू नारायण ॥ ९६ ॥ यश श्री वैराग्य ज्ञान ॥ ऐश्वर्य औदार्य हे षड्गुण ॥ नित्य वसती परिपूर्ण ॥ तो मी नारायण भगवंत ॥ ९७ ॥ त्या मज नारायणातें ध्यातां ॥ माझी वशिता सिद्धि ये हातां ॥ सर्वकर्मीं अलिप्तता ॥ भोगूनि अभोक्ता भोगातें ॥ ९८ ॥

॥ श्लोक ॥ निर्गुणे ब्रह्मणि मयि धारयन् विशदं मनः ॥ परमानंदमाप्नोति यत्र कामोऽवसीयते ॥ १७ ॥

॥ टीका ॥ चित्तदेवता सत्त्वगुण ॥ इंद्रियें तो रजोगुण ॥ विषय केवळ तमोगुण ॥ हेंचि आवरण परमानंदा ॥ ९९ ॥ परमानंदासी आवरण ॥ आडवे असती तिन्ही गुण ॥ त्यातें सांडूनि निर्गुण ॥ ब्रह्म परिपूर्ण मज जो ध्याये ॥ १०० ॥ त्यासि माझिये ध्यानस्थितीं ॥ होय परमानंदअवाप्ती ॥ ज्या आनंदामाजीं उपशांती ॥ होय निश्चितीं सकळकामां ॥ १ ॥ झालिया परमानंदप्राप्ती ॥ सकळ काम निमग्न होती ॥ जेवीं सूर्योदयाप्रती ॥ तारा हारपती सचंद्र ॥२॥ तेवीं परमानंदाच्या पोटीं ॥ हारपती कामकोटी ॥ तेथ इंद्रियसुखाच्या गोठी ॥ लाजोनि उठाउठी विराल्या ॥ ३ ॥ उद्धवा ऐक पां निश्चितीं ॥ नव्हतां परमानंदप्राप्ती ॥ कदा नव्हे कामनिवृत्ती ॥ नानायुक्ती करितांही ॥ ४ ॥ या अष्टमहासिद्धीच्या धारणा ॥ तुज म्यां सांगीतल्या जाणा ॥ यांसि साधावया आंगवणा ॥ सुरनरगणां पैं नाहीं ॥ ५ ॥ यापरी अष्टमहासिद्धी ॥ तुज म्यां सांगीतली धारणाविधी ॥ आतां गुणहेतुकाचे प्रबोधीं ॥ सावधबुद्धी अवधारी ॥ ६ ॥

१ न दिसणारी वस्तु पाहतां येणें. २ येणें. ३ जाणें. ४ जिंकवी. ५ चेतवी. ६ सामर्थ्य.

॥ श्लोक ॥ श्वेतद्वीपपतौ चित्तं शुद्धे धर्ममये मयि ॥ धारयन् श्वेततां याति षडूर्मिरहितो नरः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ सांडूनि कार्यासि रजतमें दरी ॥ जो मी सत्वाधिष्ठाता श्रीहरी ॥ त्यामाजीं जो धारणा धरी ॥ अखंडाकारी सर्वदा ॥ ७ ॥ तो माझेनि सत्वें सत्ववंतु ॥ होय षडूर्मीरहितु ॥ शोक मोह जरा मृत्यु ॥ क्षुधा तृषा हातू लावूं न शके ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ ॥ मय्याकाशात्मनि प्राणे मनसा घोषमुद्वहन् ॥ तत्रोपलब्धा भूतानां हंसो वाचः शृणोत्यसौ ॥ १९ ॥

॥ टीका ॥ सघोषप्राणेंसि शब्दमहिमा ॥ अवश्य विश्रांतीस ये व्योमा ॥ त्या आकाशाचाही मी आत्मा ॥ मजमाजीं व्योमा रहिवास् ॥ ९ ॥ तो मी सघोषप्राणाचाही प्राण ॥ सकळ वाचांची वाचा जाण ॥ वागीश्वरीचें जीवन ॥ सत्य मी जाण उद्धवा ॥ ११० ॥ ऐसें माझें दृढ ध्यान ॥ निजहृदयीं जो करी जाण ॥ तो विचित्रा वाचांचें श्रवण ॥ *जीवस्वरूपें जाण स्वयें ऐके ॥ ११ ॥ सनाद +माझी धारणा पोटीं ॥ धरितां जगाच्या गुह्य गोष्टी ॥ त्याचे पडती कर्णपुटीं ॥ तेकाळीं उठी दूरश्रवणसिद्धी ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ ॥ चक्षुस्त्वष्टरि संयोज्य त्वष्टारमपि चक्षुषि ॥ मां तत्र मनसा ध्यायन् विश्वं पश्यति सूक्ष्मदृक् ॥ २० ॥

॥ टीका ॥ सविता तो मी नारायण ॥ ऐसें डोळ्यांमाजीं करी ध्यान ॥ तेव्हां डोळाचि मद्रूपें जाण ॥ सविता आपण स्वयें होय ॥ १३ ॥ एवं डोळा सविता हें माझें ध्यान ॥ तिहींसि एकात्मता झाल्या जाण ॥ तेव्हां सूक्ष्मद्रष्टा होय आपण ॥ जग संपूर्ण तो देखे ॥ १४ ॥ बैसलेचि ठायीं जाण ॥ चतुर्दश भुवनांचें दर्शन ॥ एके काळें देखे आपण ॥ दूरदर्शन हे सिद्धी १५

॥ श्लोक ॥ मनो मयि सुसंयोज्य देहं तदनु वायुना ॥ मद्धारणाऽनुभावेन तत्राऽऽत्मा यत्र वै मनः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ अत्यंत सवेग तें मन ॥ त्या मनाचेंही मी मन जाण ॥ त्या मनासि मजसी अभिन्न ॥ प्राणधारणयुक्त राखे ॥ १६ ॥ ऐसें प्राणधारणयुक्त मन ॥ मजसी राखतां अभिन्न ॥ त्या धारणाप्रभवें जाण ॥ मनोवेगें गमन देहासि होय ॥ १७ ॥ जेथें संकल्पें जाय मन ॥ तेथें होय देहाचेंही गमन ॥ हे मनोजवसिद्धि जाण ॥ धारणालक्षण या हेतू ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ यदा मन उपादाय यद्यद्रूपं बुभूषति ॥ तत्तद्भवेन्मनोरूपं मद्योगबलमाश्रयः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ पहिली मनोजवधारणा ॥ त्याही वरी माझी भावना ॥ अचिंत्य सामर्थ्य माझें जाणा ॥ अनुसंधाना जो आणी ॥१९॥ मी नानारूपांतें धरिता ॥ सर्वेचि रूपांतरें विसृजिता ॥ ऐशी माझी संपूर्ण सत्ता ॥ ते त्याच्या हातां पैं लाभे ॥ १२० ॥ एवं माझिया दृढधारणा॥

१ सत्वगुणाभिमानी देवता. २ सरस्वतीचें. ३ ध्यान करण्यांत. ४ टाकणारा.

*ना. जीवमात्रांचें जाण तो स्वयें ऐके. +मो. मासी.

माझें सामर्थ्य ये त्याच्या मना ।। मग ज्या रूपाची करी भावना ॥ तद्रूप जाणा स्वयें होय ।। २१ ॥ सुरनरपन्नगांमाजीं जें रूप ॥ धरावया करी जो संकल्प ।। तो तात्काळ गा तद्रूप ॥ हे कामरूप सिद्धीमाजीं ॥ २२ ॥

|| श्लोक || परकायं विशन् सिद्ध आत्मानं तत्र भावयेत् || पिंडं हित्वाऽऽविशेत्प्राणो वायुभूतः षडंघ्रिवत् || २३ ||

।। टीका ॥ परकायप्रवेश करितां जाणा ॥ आवरूनि देहींच्या सर्वप्राणां ॥ जेथ प्रवेश करितां आपणा ।। तेथ आपुली भावना करावी ॥ २३ ॥ तेव्हां लिंगदेहाचे माथां ॥ जीवप्राणांची एकात्मता ।। धरोनि देहांतर अहंता ।। बाह्यवायूच्या पंथां मिळोनि जाय ।। २४ ॥ तेथ मिळतांचि मिळणी ।। या देहाचा अभिमान सांडूनी ।। देहांतरीं प्रवेशोनी ॥ मी ह्मणोनि उठी तेथें ॥ २५ ॥ जैसें कमळींहूनि कमळांतरा ॥ वायुबळें प्रवेशणें भ्रमरा ॥ तैसं सांडोनियां स्वशरीरा ॥ देहांतरा जीव जाये ।। २६ ॥ हें परकायप्रवेशन ॥ म्यां सांगीतलें संपूर्ण ॥ माझिया स्वरूपाचें धारण ॥ तें निजलक्षण अवधारी ।। २७ ॥ दृढ ध्यातां माझे स्वरूपासी ॥ तें सर्वदेहीं तूंचि आहेसी ।। न सांडितां निजदेहासी ॥ हा परकायेंसी प्रवेशू ।। २८ ॥ स्वसत्ता स्वदेह सांडणें ॥ तेंचि अर्थीचीं लक्षणें॥पुढिले श्लोकीं नारायणें ॥ विशद निरूपणें निरूपिलीं२९

|| श्लोक || पाष्र्ण्याऽऽपीड्य गुदं प्राणं हृदुरःकंठमूर्द्धसु || आरोप्य ब्रह्मरंध्रेण ब्रह्म नीत्वोत्सृजेत्तनुम् || २४ ||

।। टीका ।। देहत्यागाचें प्राणधारण ।। तेंच स्वच्छंदमृत्यूचें लक्षण ।। तदर्थी जें प्राणोत्क्रमण ।। तें योगधारण अवधारा ।। १३० ॥ मूळाधारीं वामचरण ।। टांचेचेनि नेटें जाण ।। अपानाचें अधोगमन ।। गुद पीडून राखावें ॥ ३१ ॥ हृदयीं विचरता जो प्राण ।। त्याचें सदा ऊर्ध्वगमन ॥ *तो प्राणायामें आवरून ।। अधोमुख जाण करावा ॥ ३२ ॥ अपानाचें ऊर्ध्वगमन ।। स्वाधिष्ठानपर्यंत जाण ।। +प्राणाचें अधःसंचरण ॥ तेचि ×चक्रीं जाण जें घडे ॥ ३३॥ तेथ प्राणापानांची बुझावण ।। त्या चक्रामाजीं करी समान ॥ ऐक्यें पडिलें आलिंगन ॥ एकात्मता जाण चालिले ।। ३४ ॥ सांडोनि अपानाची अधोवाट ।। प्राणें त्यजिला हृदय कंठ ।। फोडूनि सुषुम्नेचें कपाट ।। ऊर्ध्वमुखें नीट चालिले ॥ ३५ ॥ जीर्णतां सुषुम्नेचें घर ।। भेदिले साही चक्रांचें पदर ॥ उघडूनि काकिमुखाचें द्वार ।। ब्रह्मरंध्र ठाकिलें ॥ ३६ ॥ तेथ पावल्या यथानिगुतीं ॥ या देहाची सांडूनि स्थिती ॥ जो कामभोग वाहे चित्तीं ।। त्या देहाची प्राप्ती तो पावे ॥ ३७ ॥ वैकुंठ कैलास अमरावती ।। सार्वभौम चक्रवर्ती ॥ जे कामना कामी चित्तीं॥ ते पावे गती तत्काळ ।। ३८ ।। जरी तो ब्रह्मसायुज्यता वाहे ।। तरी सांडूनि देहाची सोये ॥ शुद्धब्रह्मधारणा पाहे ॥ तो ब्रह्मचि होये स्वतःसिद्ध ॥ ३९ ॥ यापरी प्राणधारण ।। करूनि वर्त्ते जो जाण ।। तें स्वच्छंदमृत्यूचें लक्षण ॥ त्या अधीन कळिकाळ ॥ १४० ॥

१ दुसऱ्याच्या शरीरांत प्रवेश करणें. २ प्राण बाहेर येणें. ३ द्वार. ४ जिंकल्यावर. ५ इच्छितो.

*ना. प्राणाचें अधःसंचरण, तेचि चक्रीं जाण जें घडे. +ना. तो प्राणायामें आवरून, अधोमुख जाण करावा. ×मो. क्रिया.

॥ श्लोक ॥ विहरिष्यन्सुराक्रीडे मत्स्थं सत्त्वं विभावयेत् ॥ विमानेनोपतिष्ठंति सत्त्ववृत्तीः सुरस्त्रियः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ देवाचे दिव्यभोगीं आसक्त ॥ योगियांचें झाल्या चित्त ॥ ते प्राप्तिलागीं येथ ॥ माझें सत्त्व निश्चित चिंतावें ॥ ४१ ॥ जेणें सत्तें म्यां जाण ॥ स्वर्गीं स्थापिले सुरगण ॥ त्या सत्वगुणाचें धारण ॥ निजहृदयीं जाण जो राखे ॥ ४२ ॥ ध्यातां सुरस्त्रियांची कामनिष्ठा ॥ तो पावे सुरस्वर्गींची प्रतिष्ठा ॥ विमानीं चढोनि वरिष्ठा ॥ करी कामचेष्टा अप्सरांसी ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ यथा संकल्पयेद्बुद्ध्या यदा वा मत्परः पुमान् ॥ मयि सत्ये मनो युंजंस्तथा तत्समुपाश्नुते ॥ २६ ॥

॥ टीका ॥ संकल्पमात्रें करी समस्त ॥ जो मी सत्यसंकल्प भगवंत ॥ त्या माझे ठायीं चित्त ॥ विश्वासयुक्त जो राखे ॥ ४४ ॥ तो जे जे काळीं जे जे देशीं ॥ जे जे कर्मीं जे जे अवस्थेसी ॥ जें जें कांहीं वांछी मानसीं ॥ ते संकल्प त्यापाशीं सदा सफळ ॥ ४५ ॥ मी सत्यसंकल्प भगवंत ॥ हृदयीं धरिल्या ध्यानयुक्त ॥ त्याचें जे जे काम कामी चित्त ॥ ते संकल्प प्राप्त होती त्यासी ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ यो वै मद्भावमापन्न ईशितुर्वशितुः पुमान् ॥ कुतश्चिन्न विहन्येत तस्य चाऽऽज्ञा यथा मम ॥ २७ ॥

॥ टीका ॥ जो का मी एक सर्वांचा नियंता ॥ स्वयें स्वतंत्र तत्त्वतां ॥ त्या माझें ध्यान करितां ॥ *मद्भावेंता उपतिष्ठे ॥ ४७ ॥ मीचि भगवंत सुनिश्चित ॥ ऐसें बोधा आलें यथास्थित ॥ त्याची आज्ञा सुरवर वंदित ॥ पशुपक्षी नुल्लंघित ते आज्ञा ॥ ४८ ॥ जैशी माझी आज्ञा सर्वांधरी ॥ तैशी त्याची आज्ञा चराचरीं ॥ कोणी नुल्लंघिती तिळभरी ॥ हे आज्ञासिद्धि खरी तो लाहे ॥ ४९ ॥ एवं या गुणहेतुसिद्धि दहाही ॥ धारणायुक्त सांगितल्या पाही ॥ आतां क्षुद्र पंच सिद्धि ज्याही ॥ तुज मी त्याही सांगेन ॥ १५० ॥

॥ श्लोक ॥ ॥ मद्भक्त्या शुद्धसत्वस्य योगिनो धारणाविदः ॥ तस्य त्रैकालिकी बुद्धिर्जन्ममृत्यूपबृंहिता ॥ २८ ॥

॥ टीका ॥ ॥ जगाचें उत्पत्तिस्थितिनिदान ॥ सत्य असे मजआधीन ॥ त्या माझ्या ठायीं करितां भजन ॥ अंतःकरण अतिशुद्ध ॥ ५१ ॥ ते शुद्ध अंतःकरणीं जाण ॥ भूतभविष्य वर्तमान ॥ जयाचें जन्म भोग मरण ॥ हें त्रिकाळज्ञानसिद्धि प्रकटे ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ ॥ अग्न्यादिभिर्न हन्येत मुनेर्योगमयं वपुः ॥ मद्योगश्रांतचित्तस्य यादसामुदकं यथा ॥ २९ ॥

॥ टीका ॥ अतिप्रयास करितां चित्त ॥ मजसी योगातें झालें प्राप्त ॥ +तेणें योगेंशरीरें योगयुक्त ॥ अबाधित ※महाद्वंद्वी ॥ ५३ ॥ त्यासि बाधीना शीत उष्ण ॥ मृदु आणिक कठिण ॥

१ मत्स्वरूपता.

*ना. सिद्धी सर्वथा उपतिष्ठती. +मो. तेणें योगें शरीरयुक्त. ※ना. महासिद्धी.

अग्नि लागलियाही जाण ॥ देहदहन नव्हे त्यासी ॥ ५४ ॥ ते अग्निमाजी विश्रांत त्यासी ॥ जेवीं कां जळीं जळचरांसी ॥ अद्वंद्वतासिद्धि ऐसी ॥ साधकासी उपतिष्ठे ॥ ५५ ॥ येचि सिद्धीच्या धारणा ॥ प्रतिष्टंभेंसिद्धि प्रकटे जाणा ॥ ऐक तिच्याही लक्षणा ॥ जिचे तोंडरीं जाणा सकळ बाधा ॥ ५६ ॥ त्यासि वात्यवायूचेनि झडाडें ॥ बाधकता कदा न घडे ॥ प्राण जिंतोनि आंतुलीकडे ॥ करी रोकडें दासी त्यासी ॥ ५७ ॥ देंठ फेडूनि सुमनसेजे ॥ जेवीं कां सुखें निद्रा कीजे ॥ तेवीं इंगळावरी हा निजे ॥ बाधा नुपजे अग्नीची ॥ ५८ ॥ शीतळजळीं शीतळकाळीं ॥ सिद्ध बुडविल्या कौतुकें जळीं ॥ तो बाहेरी निघावया न तळमळी ॥ जळीं मासोळी तेवीं क्रीडे ॥ ५९ ॥ ग्रीष्मकाळींचें निदाघ उष्ण ॥ त्यामाजीं सिद्ध घातल्या जाण ॥ रविकरीं पद्म उल्हासे गहन ॥ तैसें लागतां उष्ण टवटवी ॥ १६० ॥ यापरी अर्कबाधकता ॥ त्यासि बाधीना सर्वथा ॥ तैशींच सिद्धासि शस्त्रें लागतां ॥ शस्त्रघाता नातुडे तो ॥ ६१ ॥ आकाशा खोंचूं जातां पाहे ॥ शस्त्रेंसि घावो वायां जाये ॥ तेवीं सिद्धासि न लागती घाये ॥ शस्त्रउपायें सुनाटें ॥ ६२ ॥ सिद्धासि दिधलिया विख ॥ विखही नव्हे त्या बाधक ॥ जेवीं विख-किडे विखीं देख ॥ यथासुख क्रीडती ॥ ६३ ॥ छाया पर्वतातळीं दडपितां ॥ ते दाटेना जेवीं पर्वता ॥ तेवीं अग्नि, अर्क, विष, अंबु, वांता, ॥ सिद्धासि सर्वथा बाधेना ॥ ६४ ॥ ऐकोनि सिद्धींची कथा ॥ उल्हासू जरी माने चित्तां ॥ तरी माझे प्राप्तीसि तत्त्वतां ॥ सिद्धि सर्वथा बाधक ॥ ६५ ॥ माझें स्वरूप शुद्ध अद्वैत ॥ तेथ सिद्धीचे जे मनोरथ ॥ ते लोकरंजन समस्त ॥ नाहीं परमार्थ सिद्धींमाजीं ॥ ६६ ॥ मागिलेचि श्लोकसंधीं ॥ परिचित्ताभिज्ञतेची सिद्धी ॥ ध्वनितें सुचविली त्रिशुद्धी ॥ तिचाही विधी अवधारीं ॥ ६७ ॥ तेच श्लोकीं व्याख्यान ॥ करितां भगवंताचें ध्यान ॥ प्रकृतिनियंता आपण ॥ साक्षी जाण सर्वांचा ॥ ६८ ॥ ऐसें ईश्वरत्व दृढ ध्यातां ॥ चित्त चालकता ये त्याच्या हातां ॥ तेव्हां चित्ताची चित्ताभिज्ञता ॥ स्वभावतां उपतिष्ठे ॥ ६९ ॥ तेव्हां *जीवाची स्वप्नावस्था ॥ हा साक्षित्वें देखता ॥ जो जो संकल्प ज्याच्या चित्तां ॥ तो स्वभावतां हा जाणे ॥ १७० ॥ जिव्हारींची जे आवडी मोठी ॥ तो हा अवलीला सांगे गोष्टी ॥ एवढी ये सिद्धीची कसवटी ॥ उठाउठी तो लाभे ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ मद्विभूतीरभिध्यायन् श्रीवत्सास्त्रविभूषिता ॥ ध्वजातपत्रव्यजनैः स भवेदपराजितः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ अपराजयसिद्धीची प्राप्ती ॥ ध्यानां आणावी माझी मूर्ती ॥ जिचेनि नांवें जयो पावती ॥ जाण निश्चितीं सुरवर ॥ ७२ ॥ चतुर्भुज घनश्याम ॥ शंखचक्रगदापद्म ॥ छत्रातपत्र चामरयुग्म ॥ ध्वजीं उत्तम गरुडलांछन ॥७३॥ +रत्नदंडें झणत्कार ॥ व्यजन वीजिती सनागर ॥ चरणीं गर्जती ×तोडर ॥ तोडरीं अपार अरिवर्ग ॥ ७४ ॥ ऐशिये माझें मूर्तीचें ध्यान ॥ जो सर्वदा करी सावधान ॥ तो सर्वत्र विजयी जाण ॥ अभंगपण माझेनी ॥ ७५ ॥ तो माझेनि ध्यानें पाहे ॥ कोणी न मेळवितां साह्ये ॥ एकला सर्वत्र विजयी होये ॥ ऐशी

१ निरोधशक्ति. २ अटकेंत. ३ डेंखें तोडून. ४ ऊन्ह. ५ व्यर्थ. ६ सूर्य. ७ उदक. ८ वारा. ९ दुसऱ्याचें मन जाणण्याची. १० मनांतील. ११ दोन चामरें.

*ना. जिवा शिवाची. +मो. रत्नदंडीं उठती झणत्कार. ×ना. नेपुर.

सिद्धि काहे या निष्ठा ॥ ७६ ॥ जो मी हृदयीं धरिल्या अजितू ॥ तो सर्वत्र होय अपराजितू ॥ ऐसें सांगोनि भगवंतू ॥ उपसंहारितू सिद्धींतें ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ उपासकस्य मामेवं योगधारणया मुनेः ॥ सिद्धयः पूर्वकथिता उपतिष्ठंत्यशेषतः ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ म्यां सांगीतल्या ज्या योगधारणा ॥ मज भजतां त्या भावना ॥ त्या त्या सिद्धि त्यासि जाणा ॥ पूर्वोक्तलक्षणा उपजती ॥ ७८ ॥ अनेकभावना धरितां चित्तीं ॥ त्या त्या धारणेच्या व्युत्पत्ती ॥ अनेकसिद्धींची होय प्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७९ ॥ नानायोगधारणाव्युत्पत्ती ॥ न करितां सकळसिद्धींची प्राप्ती ॥ एके धारणेनें होय निश्चितीं ॥ ते मी तुजप्रती सांगेन ॥ १८० ॥

॥ श्लोक ॥ जितेंद्रियस्य दांतस्य जितश्वासात्मनो मुनेः ॥ मद्धारणां धारयतः का सा सिद्धिः सुदुर्लभा ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ पांचपांच इंद्रियांची जोडी ॥ जाणोनि शमदमपरवडी ॥ उभवूनि वैराग्याची गुढी ॥ प्राणापानवोढी जिंकिल्या ॥ ८१ ॥ *विवेकाचेनि बळें जाण ॥ वृत्ति राखोनि सावधान ॥ सदा करितां माझें +मनन ॥ मननें ×मन जिंकिलें ॥ ८२ ॥ यापरी गा साधकासी ॥ धारणा धरोनि मानसीं ॥ मी एक ध्यातां अहर्निशीं ॥ सकळसिद्धि दासी त्यासि होती ॥ ८३ ॥ सांडूनि सकळ उपाये ॥ मी एक ध्यानीं धरिल्या पाहे ॥ साधकासि काय उणें आहे ॥ दुर्लभ काये सिद्धींचें ॥ ८४ ॥ माझे भजनें ※सावकाशीं ॥ सिद्धि प्रकटती 7साधकासी ॥ त्या सेव्य नव्हती [2]त्यासी ॥ तेंचि हृषीकेशी सांगतू ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ अंतरायान्वदंत्येता युंजतो योगमुत्तमम् ॥ मया संपद्यमानस्य कालक्षपणहेतवः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ अहेतुक करितां माझें भजन ॥ तेणें शीघ्र माझी प्राप्ती जाण ॥ तेथें सिद्धींवरी घालितां मन ॥ आली [1]नागवणें मत्प्राप्तीसी ॥ ८६ ॥ ज्यासि विषयभोग लागे गोड ॥ तोचि विषयसिद्धींची वाहे चाड ॥ ज्यासि माझे प्राप्तीचें कोड ॥ तो वांछीना [2]बंड ऋद्धिसिद्धींचें॥८७॥ ज्यासि लौकिकीं अतिप्रतिष्ठा ॥ तो सिद्धींच्या सोशी खटपटा ॥ ज्यासि मत्प्राप्तीची निष्ठा ॥ तो नवचे वाटा सिद्धींच्या ॥ ८८ ॥ पावतपावतां वाराणसी ॥ जो वस्तीसि गेला वेश्यागृहासी ॥ तेथें भुलोनि तिच्या भोगासी ॥ सर्वस्व तियेसी समर्पी ॥ ८९ ॥ इयेपासूनि जीवें प्राणें ॥ सर्वथा वेगळें नाहीं जाणें ॥ ऐसा संकल्प करोनि तेणें ॥ वश्य होणें वेश्येसी ॥१९०॥ जंव असे गांठी गांठोडी ॥ तंव ते त्यापाशीं लुडबुडी ॥ निःशेष वेंचलिया कवडी ॥ बाहेरी दवडी तत्काळ ॥ ९१ ॥ तो दवडितांही न जाये ॥ निर्लज्ज निःसंग होऊनि राहे ॥ तरी आपणचि सांडोनि जाये ॥ तैशाचि पाहे महासिद्धी ॥ ९२ ॥ सकळ पापांतें निर्दळणें ॥ सकळ

---

१ हानि. २ थोतांड.

*मो. विवेचनाबळें. +मो. ध्यान. ×मो. मज. ※ना. सावकासी. 7ना. सावकाशीं मो. अनायासीं. 2मो. साधकासी.

कुळांतें उद्धरणें ॥ तें काशीचें खुंटलें पावणें ॥ वेश्यानागवणें भोगलिप्सा ॥ ९३ ॥ तैसीच सिद्धींचीही कथा ॥ माझे प्राप्तीसि प्रतिबद्धता ॥ माझें ध्यान ज्ञान वैराग्यावस्था ॥ नागवूनि रिता सांडिती ॥ ९४ ॥ माझे प्राप्तीनिकट जाण ॥ उठे सिद्धींची नागवण ॥ भोगें छळे व्यामोहकपण ॥ विलंब कारण मत्प्राप्ती ॥९५॥ माझें स्वरूप अद्वैतता ॥ तेथें सिद्धींच्या नानावस्था ॥ ते मायेची व्यामोहकता ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ९६ ॥ माझे प्राप्तीआड सिद्धींचें विघ्न ॥ हेंचि तुज कळावया जाण ॥ म्यां सर्वसिद्धींचें निरूपण ॥ समूळ संपूर्ण सांगीतलें ॥ ९७ ॥ माझ्याठायीं धरितां ध्यान ॥ एकाग्रता होतां मन ॥ तेथ भोगलिप्सा सिद्धी जाण ॥ करिती नागवण साधका ॥ ९८ ॥ सिद्धीचे प्राप्तीचें कारण ॥ जन्मौषधि मंत्र तप जाण ॥ कां साधल्या प्राणापान ॥ सकळसिद्धी जाण योगाभ्यासीं ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ जन्मौषधितपोमंत्रैर्यावतीरिह सिद्धयः ॥ योगेनाप्नोति ताः सर्वा नान्यैर्योगगतिं व्रजेत् ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ एकी जन्मास्तव सहज सिद्धी ॥ एकी त्या साधिती औषधी ॥ एकी त्या तपादि महाविधी ॥ एकी त्या त्रिशुद्धी मंत्रद्वारा ॥२००॥ सर्पासि वायुधारण ॥ मीनासि जळतरण ॥ पक्ष्यासि नभोगमन[३] ॥ हे जन्मसिद्धी जाण स्वाभाविक ॥ १ ॥ हंस निवडी क्षीरनीर ॥ कोकिळेसि मधुर स्वर ॥चंद्रामृत सेवी चकोर ॥ हे सिद्धी साचार जन्मास्तव ॥२॥ या जन्मास्तव सहज सिद्धी ॥ त्या म्यां सांगीतल्या सुबुद्धी ॥ आतां साधिलिया औषधी ॥ लाभती सिद्धी त्या ऐक ॥ ३ ॥ श्वेतमांदारीं[४] गजानन ॥ अंगारकेंचतुर्थी[५] साधिल्या जाण ॥ सकळ विद्यांचें होय ज्ञान ॥ धनधान्यसमृद्धी ॥ ४ ॥ अजानवृक्षाची वोळखण ॥ त्याचीं फळें श्वानमुखें जाण ॥ त्याचें घडल्या *क्षीरपान ॥ होय आपण अजरामर ॥ ५ ॥ +पिचुमंद[६] नित्य सेविल्या देख ॥ त्यासि बाधीना कोणी विख ॥ पाताळगरुडीचें[७] प्राशिल्या मुख ॥ त्यासि देहदुःख बाधीना ॥ ६ ॥ पूतिकाष्ठ[८]वृक्षांचे मुळीं ॥ असे महाशक्तीची पुतळी ॥ ते साधल्या अप्सरांचे मेळीं ॥ क्रीडे तत्काळीं साधक ॥ ७ ॥ अनंत औषधी अनंत सिद्धी ॥ त्यांची साधना कठिण त्रिशुद्धी ॥ तपादिसिद्धीची विधी ॥ ऐक सुबुद्धी उद्धवा ॥ ८ ॥ कृच्छ्र पराक चांद्रायण ॥ ×आसार[९] जलाशयन धूम्रपानें[१०] ॥ तप करी जें जें भावून ॥ ते ते सिद्धि जाण तो पावे ॥ ९ ॥ ऐक मंत्रसिद्धीचें लक्षण ॥ प्रेतावरी बैसोनि आपण ॥ एकरात्र केल्या अनुष्ठान ॥ प्रेतदेवता संपूर्ण प्रसन्न होय ॥२१०॥ तेणें भूत भविष्य वर्तमान ॥ ते सिद्धि प्राप्त होय जाण॥ करितां सूर्यमंत्र विधान ॥ दूरदर्शनसिद्धि उपजे ॥ ११ ॥ जैसा मंत्र जैसी बुद्धी ॥ तैसी त्यास प्रकटे सिद्धी ॥ या सकळसिद्धिंची समृद्धी ॥ योगधारणा ※विधिमार्जी असती ॥ १२ ॥ नेहटूनियां आसना ॥ ऐक्य करोनि प्राणापानां॥ जो धरी योगधारणा॥ सकळसिद्धी जाणा तेठायीं ॥ १३ ॥ म्यां सांगीतलीं सिद्धींची कथा ॥ झालिया प्राणापानसमता ॥ आलिया

१ भोगप्राप्तीची इच्छा. २ आडकाठी. ३ आकाशांत जाणें. ४ पांढऱ्या मंदाराखालीं. ५ कोणत्याही महिन्यांत वद्य पक्षांत मंगळवारीं येणारी चतुर्थी. ६ निंब. ७ पाताळगरूडीची वेल. ८ थोरमधाळ. ९ पावसाच्या धारा. १० धूर पिणें.

*ना. रसपान. +ना. पिचुबंद मो. पिचुमंदिनी. ×मो. असार. ※ना. सिद्धी.

योगधारणा होतां ॥ तैं सिद्धि समस्ता प्रकटती ॥ १४ ॥ प्राणापान समान करितां ॥ योगधारणाही न धरितां ॥ मज एकांतीं हृदयीं धरितां ॥ सिद्धी समस्ता दासी होती ॥ १५ ॥ मज पावावया तत्त्वतां ॥ मज एकांतें स्मरतां ध्यातां ॥ पावो देऊन सिद्धींचे माथां ॥ चारी मुक्ति स्वभावतां दासी होती ॥१६॥नानासिद्धींची धारणा धरितां॥ माझी सलोकता समीपता॥ हातां नये गा सरूपता ॥ मग सायुज्यता ते कैंची ॥ १७ ॥ माझे अतिशयें शुद्धभक्त ॥ ते मुक्तीसि दूर दवडित ॥ माझेनि भावार्थें नित्यतृप्त ॥ ते पूज्य होत मजलागीं ॥१८॥ जो सकळसिद्धींचा ईश्वरू ॥ तो मी लागें त्याची पूजा करूं ॥ तेथें लाजोनि सिद्धींचा संभारू ॥ घेऊनि निजवेव्हारू पळताती ॥ १९ ॥ सकळसिद्धींच्या स्वामित्वेंसी ॥ मी भगवंत तिष्ठें भक्तांपाशीं ॥ तेंचि श्लोकार्थें हृषीकेशी ॥ उद्धवासी सांगत ॥ २२० ॥

॥ श्लोक ॥ सर्वासामपि सिद्धीनां हेतुः पतिरहं प्रभुः ॥ अहं योगस्य सांख्यस्य धर्मस्य ब्रह्मवादिनाम् ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ सकळसिद्धींचें मी जन्मस्थान ॥ माझेनि सिद्धींचें थोर महिमान ॥ सिद्धींसि मजमाजीं निदान ॥ यापरी मी जाण स्वामी त्यांचा ॥ २१ ॥ जे जीवात्म्याची ऐक्यता ॥ त्या योगाचा स्वामी मी तत्त्वतां ॥ जेथ जीवत्वाची मिथ्या वार्ता ॥ त्या ज्ञानाचाही सर्वथा स्वामी मीचि ॥ २२ ॥ ज्ञानोपदेष्टे जे साधू ॥ त्यांचाही स्वामी मी प्रसिद्ध ॥ माझेनि प्रसादें ज्ञानप्रबोधू ॥ होतसे विशद सज्ञाना ॥ २३॥ उपदेशी उपनिषद्भाग वेद ॥ त्या वेदाचाही स्वामी मी *गोविंद ॥ मज वेगळा वेदवाद ॥ +उच्चारी शब्द नुचारे ॥ २४ ॥ धर्म म्हणिजे ज्ञानसाधन ॥ त्याचाही स्वामी मीचि जाण ॥ मी सबाह्य परिपूर्ण ॥ चैतन्यघन सर्वात्मा ॥ २५ ॥ मी सर्वात्मा सर्वव्याप्त ॥ सबाह्य परिपूर्ण समस्त ॥ हे माझ्याठायीं सहज स्थित ॥ ऐक सुनिश्चित उद्धवा ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ अहमात्मांऽऽतरो बाह्योऽनावृतः सर्वदेहिनाम् ॥ यथा भूतानि भूतेषु बहिरंतः स्वयं तथा ॥ ३६ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ जीवाच्या जीवामाजीं माझा वास ॥ जीव मजमाजीं सावकाश ॥ माझें स्वरूप गा ×असमसहस ॥ गुणमायेस अनावृत ॥ २७ ॥ जेवीं घटाची वस्ती आकाशीं ॥ आकाश सबाह्य घटासी ॥ तेवीं मी जीवमात्रांसी ॥ सबाह्य ⁸हृषीकेशी परिपूर्ण ॥ २८ ॥ जैशीं महाभूतें भौतिकांसी ॥ सबाह्य असती सर्वांसी ॥ तेवीं मी सकळ जगासी ॥ सबाह्य हृषीकेशी परिपूर्ण ॥ २९ ॥ जीवन जैसें तरंगासी ॥ कां गोडी जैसी गुळासी ॥ तेवीं अनंतकोटी ब्रह्मांडांसी ॥ मी पूर्णत्वेंसी परिपूर्ण ॥ २३० ॥ मज पूर्णाची पूर्ण प्राप्ती ॥ निकट येतयेतां हातीं ॥ ते संधीं सिद्धी नागविती ॥ भोगसंपत्ती उपचारें ॥३१॥ ज्याचें ❀रायापाशीं चलनें ॥ त्याचे

---

१ आपला व्यापार. २ समाप्ति. ३ आंत बाहेर. ४ अमर्याद. ५ अतीत, वेगळें. ६ गमन.

*मो. प्रसिद्ध. +मो. उच्चारितां. ×ना. असमसास. ⁸ना. हृषीकेशी पूर्णत्वें परिपूर्ण. ❀ना. रायापाशीं पूर्णचरण.

हाता ये लाच संपूर्ण ॥ तेणेंचि तो पावे मरण ॥ तैशा सिद्धी जाण घातका ॥३२॥ ये अध्यायींचें निरूपण ॥ सांगावया हेंचि गा कारण ॥ माझे प्राप्तीस सिद्धी विघ्न ॥ उद्धवा जाण निश्चित्तीं ॥ ३३ ॥ एकाग्रभजनें माझी प्राप्ती ॥ होतां ते संधीसि सिद्धी येती ॥ त्या भुलवोनियां भोगासक्तीं ॥ नागविती साधकां ॥ ३४ ॥ जे नेणती माझें निजसुख ॥ ऐसे जे कां केवळ मूर्ख ॥ त्यांसीच सिद्धींचें कौतुक ॥ अलौलिक भोगलिप्सा ॥ ३५ ॥ जैसे वेश्येचे हावभाव ॥ तैसें सिद्धींचें वैभव ॥ हें त्यागावया गा सर्व ॥ देवें हा अध्यावो निरूपिला ॥३६॥ ज्यासि प्राप्त माझें निजसुख ॥ त्यासि सिद्धी तुच्छ तृणप्राय देख ॥ न देखती जन्ममरणांचें *सुख ॥ माझा पूर्ण हरिख कोंदाटे ॥ ३७॥ सेवितां सद्गुरुचरण ॥ कोंदाटें ब्रह्म परिपूर्ण ॥ तेथ सिद्धींसि पुसे कोण ॥ हे जाणती खुण हरिभक्त ॥ ३८ ॥ हरिभक्तीसि विकिला भावो ॥ भजनें फिटला अहंभावो ॥ तेथ सिद्धींचा +भोगसंदेहो ॥ नुपजे पहाहो सर्वथा ॥ ३९ ॥ ×भुक्तिमुक्ती ऋद्धिसिद्धी ॥ सत्‌गुरुचरणीं गा त्रिशुद्धी ॥ हें नेणती जे मंदबुद्धी ॥ ते नानासिद्धी वांछिती ॥ २४० ॥ सकळसिद्धींचें साधन ॥ निरपेक्षता सत्य जाण ॥ निरपेक्षाचें अंगण ॥ सिद्धी संपूर्ण ओळंगती ॥४१॥ सिद्धींची अपेक्षता ज्यांचे चित्तीं ॥ सिद्धी त्यांकडे न थुंकिती ॥ निरपेक्षाचे पायींची माती ॥ सिद्धी वंदिती सर्वदा ॥ ४२ ॥ ज्ञानवैराग्य भक्तीचे माथां ॥ सत्य जाण पां निरपेक्षता ॥ ते निरपेक्षता आलिया हातां ॥ मुक्तिसायुज्यता पायां लागे ॥४३॥ निरपेक्षतेपाशीं सिद्धी ॥ निरपेक्षतेपाशीं विधी निरपेक्षतापाशीं सुबुद्धी ॥ चरण-वंदिती अहर्निशीं ॥ ४४ ॥ निरपेक्षता तेथ निर्वाहो ॥ निरपेक्षता तेथ सद्भावो ॥ निरपेक्षते पाशीं ³भगवद्भावो ॥ यथार्थ पहाहो तिष्ठत् ॥ ४५ ॥ निरपेक्षतेपाशीं उपनिषद्भाग् ॥ निरपेक्षतेपाशीं साचार योग् ॥ निरपेक्षता स्वानंदभोग् ॥ सांपडे श्रीरंग् निरपेक्षा ॥ ४६ ॥ एका जनार्दना शरण ॥ त्याचें वंदितां श्रीचरण ॥ ¹चढती निरपेक्षता जाण ॥ सदा संपूर्ण स्वानंदें ॥ ४७ ॥ आह्मा स्वानंदाचा निजबोध् ॥ हा सद्गुरुचरणींचा प्रसाद् ॥ महासुखाचा विनोद् ॥ आनंदकंद् गुरुचरणीं ॥ ४८ ॥ गुरुचरणीं करितां भक्ती ॥ अनायासें प्राप्त चारी मुक्ती ॥ निजशांतीसी विरक्ती ॥ ⁴सेवों लागती गुरुभक्तां ॥ ४९ ॥ एका जनार्दना शरण ॥ त्याचे कृपेस्तव जाण ॥ श्रीभागवताचें निरूपण ॥ झाला संपूर्ण पंधरावा ॥ २५० ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां सिद्धिनिरूपणयोगो नाम पंचदशोऽध्यायः ॥ १५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय श्लोकसंख्या ॥३६॥ ओंव्या ॥२५०॥ मिळून संख्या ॥ २८६ ॥

---

# अध्याय सोळावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमो सद्गुरु श्रीमूर्ती ॥ चराचर तुझी विभूती ॥ विश्वात्मा विश्वस्फूर्ती ॥ अमूर्तमूर्ती गुरुराया ॥१॥ तुझे मूर्तीचें महिमान॥ सकळशास्त्रां अतर्क्य

---

*ना. दुःख. +मो. संभवो. ×ना. भक्ति. ³ना. देवो. ¹ना. वाढती निरपेक्षा. ⁴ना. सेवा मागती गुरुचरणीं.

जाण ॥ श्रुतीनें घेतलें मौन ॥ शब्दें आण वाहिली ॥ २ ॥ आण वाहिली दृष्टांतीं ॥ तुजसमान नाहीं दुजी स्थिती ॥ जे जे योजावी उपपत्ती ॥ ते ते विभूती पैं तुझी ॥ ३ ॥ तुझिया प्रभावाची ऐसी खोडी ॥ जे दुजेपणाचें मूळ तोडी ॥ मग एकपणाचे परवडी ॥ दृष्टांत काढी कोण *कोठें ॥ ४ ॥ कोठें तुझें स्थानमान ॥ हेंच सर्वथा न कळे जाण ॥ अगाध तुझें महिमान ॥ कैसेनि ध्यान करावें ॥ ५ ॥ हेतु, मातु, दृष्टांतू ॥ न रिघे ज्याचें शिंवेआंतू ॥ तो भागवतींच्या +भावार्थू ॥ओंवियांतू बोलविशी ॥६॥ते माझे मऱ्हाटे आरेष बोल॥ सद्गुरूंनीं केले 7सखोल ॥ तेथींच्या ✻प्रेमाचे जे बोले ॥ जाणती केवळ गुरुभक्त ॥ ७ ॥ ज्यासि नाहीं गुरुचरणीं भक्ती ॥ त्यासि कैसेन होईल विरक्ती ॥ जरी पढले श्रुतिस्मृती ॥ शास्त्रव्युत्पत्ती ×केल्याही ॥ ८ ॥ करितां साधनांच्या कोटी॥साधनीं समाधान 6तुटी ॥ झालिया सद्गुरुकृपादृष्टी ॥ ब्रह्मत्वें पुष्टी गुरुभक्तां ॥ ९ ॥ तो तूं सद्गुरु श्रीजनार्दन ॥ *सकळजगाचें अधिष्ठान ॥ भूतीं भूतात्मा तूं आपण ॥ सहजें जाण समसाम्य ॥ १० ॥ समसाम्य सर्वभूतीं ॥ ज्यांसि घडे सद्गुरुभक्ती ॥ तेचि 2ये श्रीभागवतीं ॥ अर्थप्राप्ती 3प्रतिष्ठे ॥ ११ ॥ झालिया सद्गुरुकृपा वरिष्ठ ॥ न करितां व्युत्पत्तीचे कष्ट ॥ भागवतार्थीं होय प्रविष्ट ॥ भक्तसुभट भावार्थी ॥ १२ ॥ हृदयीं झालिया सद्भावो ॥ भावें प्रकटे देवाधिदेवो ॥ तेथें भागवताचा अभिप्रावो ॥ सहजेंचि पहाहो ठसावे ॥ १३ ॥ यालागीं करितां गुरुभक्ती ॥ प्राप्त होइजे भागवतार्थीं ॥ तेथ काव्यादिव्युत्पत्ती ॥ नानायुक्ती किमर्थ ॥ १४ ॥ किमर्थ करावें शास्त्रज्ञान ॥ किमर्थ करावें वृथा ध्यान ॥ चालतें बोलतें ब्रह्म पूर्ण ॥ सद्गुरुचरण साधकां ॥ १५ ॥ वांचूनियां सद्गुरुभजन ॥ शिष्यासि नोहे समाधान ॥ याहूनियां श्रेष्ठ साधन ॥ नाहीं जाण सर्वथा ॥ १६ ॥ त्या सद्गुरुकृपापरिपाटीं ॥ एकादशा पूर्वार्ध कोटी ॥ वाखाणिली जी मऱ्हाटी ॥ यथार्थदृष्टीं निजबोधें ॥ १७ ॥ ऊंस गाळिलिया रस होये ॥ तो ठेवितां न राहे ॥ त्याचा आळूनियां पाहे ॥ गूळ होये सपिंड ॥ १८ ॥ तोही ठेवितां लिगाडें धरी ॥ मग साखर कीजे रायपुरी ॥ तेही घोटूनियां चतुरीं ॥ नाबेंद करिजे कोरडी ॥१९॥ तैसें हें श्रीभागवत जाण ॥ मुळीं बोलिला श्रीनारायण ॥ तेंचि श्रीव्यासें आपण ॥ दशलक्षण वर्णिलें ॥ २० ॥ ते दशलक्षणपरवडीं ॥ श्रीशुकमुखें चढली गोडी ॥ तेथील कठिण पदबंधमोडी ॥ टीका चोखडी श्रीधरी ॥ २१ ॥ तें श्रीधरीचें व्याख्यान ॥ भावार्थदीपिका जाण ॥ त्या भावार्थाची ये सद्भाव खूण ॥ केली निरूपण देशभाषा ॥ २२ ॥ मूळीं वक्ता श्रीनारायण ॥ व्यास शुक श्रीधरव्याख्यान ॥ त्यांत मुळींचें लक्षूनि गोडपण ॥ एक जनार्दन कविकर्ता ॥२३॥ मुळीं बीज श्रीनारायण ॥ ब्रह्मयाचे ठायीं प्रेरिलें जाण ॥ तें नारद-क्षेत्रीं[१२] संपूर्ण ॥ पीक परिपूर्ण निडारलें ॥ २४ ॥ त्याचीं व्यासें दशलक्षण ॥ संपूर्ण केलें संवगणें ॥ शुकें परीक्षितीच्या खळां जाण ॥ मळूनि निजकण काढिले ॥ २५ ॥ तेंचि शास्त्रार्थे जाण ॥ श्रीधरें निजबुद्धीं पाखडून ॥ काढिलें निडारांचे कण ॥

---

१ उपमा, सादृश्यांनी. २ संवय. ३ सीमेंत. ४ आर्ष. ५ पाझर. ६ आश्रय. ७ कशाकरितां. ८ आटवून. ९ खडा, ढेंप. १० चिकटा. ११ खडीसाखर. १२ नारदरूपभूमींत. १३ कणसास आलें. १४एकत्र गोळा. १५ परीक्षितिरूपीं खळ्यांत. १६ निवडलेले.

*मो. तेथें. +ना. अर्थ. 7मो. सफळ. ✻मो. प्रमेयाची. ×मो. सकळही. 6ना. तुटी. *ना. भक्ताचें. 2ना. स्वरें. 3ना. वरिष्ठ.

अतिसघन सुटंक ॥ २६ ॥ त्याचींच पक्वान्नें चोखडीं ॥ मऱ्हाटियापदमोडीं ॥ एका जनार्दनें केलीं परवडीं ॥ ते जाणती गोडी निजात्मभोक्ते ॥ २७ ॥ त्या श्रोत्यांचेनि अवधानें ॥ जनार्दनकृपा सावधानें ॥ पूर्वार्धे एका जनार्दनें ॥ संपूर्ण करणें देशभाषा ॥ २८ ॥ तेथें प्रथमाध्यायीं अनुक्रम ॥ वैराग्यउत्पत्तीचा संभ्रम ॥ कुलक्षयाशी पुरुषोत्तम ॥ करी उपक्रम ब्रह्मशापें ॥ २९ ॥ दुसऱ्यापासूनि चतुर्थवरी ॥ नारदें वसुदेवाच्या घरीं ॥ निमिजायंतप्रश्नोत्तरीं ॥ पंचाध्यायी खरी संपविली ॥ ३० ॥ षष्ठाध्यायीं श्रीकृष्णमूर्ती ॥ पाहों आलिया सुरवरपंक्ती ॥ तिहीं प्रार्थिला श्रीपती ॥ निजधामाप्रती यावया ॥ ३१ ॥ ऐकोनि सुरवरांची विनंती ॥ देखोनि अरिष्टभूत द्वारावती ॥ उद्धवें प्रार्थिला श्रीपती ॥ निजधामाप्रती मज नेईं ॥३२॥ त्याचे प्रश्नांचें प्रश्नोत्तर ॥ त्यागयुक्त ज्ञान गंभीर ॥ सप्तमाध्यायीं शार्ङ्गधर ॥ थोडेनि फार बोलिला ॥ ॥ ३३ ॥ तेथ त्यागसंग्रहलक्षण ॥ यदुअवधूतसंवादें जाण ॥ चोविसां गुरूंचें प्रकरण ॥ केलें संपूर्ण अष्टमीं नवमीं ॥ ३४ ॥ *श्रद्धासंग्रह ज्ञानविश्वास ॥ तेथ नानामतांचा मतनिरास ॥ दशमाध्यायीं हृषीकेश ॥ ज्ञानविलास बोलिला ॥ ३५ ॥ अकरावे अध्यायीं जाण ॥ बद्धमुक्तांचें ×वैलक्षण्य ॥ सांगोनि साधूंचें चिन्ह ॥ भक्तांचें संपूर्ण दाविलें रूप ॥ ३६ ॥ भागवतीं बारावा अध्यावो ॥ अतिगुह्य बोलिला देवो ॥ तेथील लावितां अभिप्रावो ॥ पडे संदेहो सज्ञाना ॥ ३७ ॥ बारावे अध्यायाची किल्ली ॥ युक्तिप्रयुक्तीं नातुडे बोली ॥ जनार्दनकृपा माउली ॥ तेणें मांगी दाविली ग्रंथाची ॥ ३८ ॥ ते द्वादशाध्यायीं निरूपण ॥ सत्संगाचा महिमा गहन ॥ कर्माचा कर्ता कोण ॥ त्यागितें लक्षण कर्मांचें ॥ ३९ ॥ तो द्वादशाध्यावो ऐकतां ॥ ज्ञानसंलग्न होय चित्ता ॥ आड ठाके विषयावस्था ॥ तेणें बाधकता साधकां ॥४०॥ गुणवैषम्याचें लक्षण ॥ तेणें विषयावस्था गहन ॥ तेथ सत्त्वशुद्धीचें कारण ॥ केलें निरूपण त्रयोदशीं ॥४१॥ तेंचि प्रसंगें यथोचित ॥ +चित्तविषयांचें जें ग्रंथित ॥ उगवावया हंसगीत ॥ सुनिश्चित सांगीतलें ॥ ४२ ॥ हंसगीतीं जें निरूपिलें ज्ञान ॥ समाधिपर्यंत समाधान ॥ तेंचि साधावया साधन ॥ चवदावा आपण बोलिला देवो ॥४३॥ साधनांमाजीं मुख्य भक्ती ॥ सगुण तेचि माझी निर्गुण मूर्ती ॥ योगयुक्त ध्यानस्थिती ॥ बोलिला श्रीपती चतुर्दशीं ॥४४॥ विविधा सिद्धींची धारणास्थिती ॥ देवें सांगीतली उद्धवाप्रती ॥ सिद्धी बाधका माझे प्राप्ती ॥ हें पंधराव्याअंतीं निरूपिलें ॥ ४५ ॥ एवं पंधराध्यायीं पूर्वार्ध ॥ निरूपण झालें अतिशुद्ध ॥ आतां उरलें उत्तरार्ध ॥ तो कथासंबंध अवधारा ॥ ४६ ॥ षोडशीं भगवद्विभूती ॥ सतरा अठरा अध्यायांप्रती ॥ वर्णाश्रमकर्मगती ॥ विधानस्थिती निरूपण ॥ ४७ ॥ एकुणिसावे अध्यायीं गहन ॥ ज्ञाननिर्णयाचें महिमान ॥ उद्धवाचे यमादि प्रश्न॥सांगीतले ज्ञानपरिपाकें ॥४८॥ त्या ज्ञानाधिकाराचा योग ॥ आदिमध्यअंतभाग ॥ विसावे अध्यायीं श्रीरंग ॥ त्रिविध विभाग बोलिला ॥ ४९ ॥ तेथ गुणदोषांची अवस्था ॥ उद्धवें ठेविली वेदाचे माथां ॥ ते वेदवादसंस्था ॥ केली तत्त्वतां एकविसांत ॥ ५० ॥ तेचि वेदवादव्युत्पत्ती ॥ तत्त्वांची संख्या किती ॥ ते तत्त्वसंख्याउपपत्ती॥ केली श्रीपती यथान्वयें ॥ ५१ ॥ सकळतत्त्वांचें विवेचन ॥ प्रकृतिपुरुषांचें लक्षण ॥ जन्ममरणांचें प्रकरण ॥ केलें निरूपण बाविसावा ॥ ५२ ॥ साहोनियां परापराध ॥ स्वयें राहावें नि-

---

१ फार दाट. २ संकटांनीं व्याप्त. ३ भेद. ४ मार्ग. ५ ज्ञानाचा संबंध. ६ गुंती. ७ अनेक प्रकारच्या.

*ना. ग्रहण. ×ना. लक्षण. +मो. चित्तीं विषयाची ग्रंथीश्लथ.

द्वंद्व ॥हा भिक्षुगीतसंवाद॥केला विशद तेविसावा ॥५३॥ अद्वैतीं राहावया स्थिती॥ चोविसावा सांख्यव्युत्पत्ती ॥ निर्गुणापासोनि गुणोत्पत्ती ॥ गुणक्षयाअंतीं निर्गुण उरे ॥ ५४ ॥ आदीं निर्गुण अंतीं निर्गुण ॥ मध्यें भासले मिथ्या *गुण ॥ ये अद्वैत प्राप्तीलागीं जाण ॥केलें निरूपण सांख्याचें ॥ ५५ ॥ ते मिथ्यागुणप्रकृतियुक्त ॥ त्रिगुणगुणांचा सन्निपात ॥ बोलिला पंचविसाव्यांत ॥ ×निर्गुणोक्त निजनिष्ठा ॥ ५६ ॥ सव्विसावे अध्यायाप्रती ॥ अनिवार अनुतापाची शक्ती ॥ भोगितां उर्वशी कामप्राप्ती ॥ पावला विरक्ती पुरूरवा ॥ ५७ ॥ भजनक्रिया +मूर्तिलक्षण ॥ वैदिक; तांत्रिक, मिश्र भजन ॥ या उद्धवप्रश्नाचें निरूपण ॥ केलें संपूर्ण सत्ताविसावा ॥ ५८ ॥ महायोगाचें योगभांडार ॥ परमज्ञानें ज्ञानगंभीर ॥ निजसुखाचें सुखसार ॥ केवळ चिन्मात्र अठ्ठाविसावा ॥ ५९ ॥ त्याचि अध्यायामाजीं जाण ॥ संसारअसंभवाचा प्रश्न ॥ उद्धवें केला अतिगहन ॥ त्याचेंही प्रतिवचन दीधलें देवें ॥ ६० ॥ एकादशाचा निजकळस् ॥ भक्तिप्रेमाचे अतिविलास् ॥ एकुणतिसावा सुरस् ॥ ज्ञानोपदेश भक्तियुक्त ॥ ६१ ॥ पुढिले दों अध्यायांआंत ॥ स्त्रीपुत्रादिकुळाचा घात ॥ होतां ॅंडळींना ✻ज्ञानसमर्थ ॥ तें प्रत्यक्षभूत हरि दावी ॥ ६२ ॥ ब्राह्मणांचा शाप कठिण ॥ शापें बांधिला श्रीकृष्ण ॥ इतरांची कथा कोण ॥ कुळनिर्दळण ब्रह्मशापें ॥ ६३ ॥ ब्राह्मणाचा कोप समर्थ ॥ सगळा समुद्र केला मृत ॥ शिवाचा झाला लिंगपात ॥ ब्रह्मक्षोभांत निमेषार्धें ॥ ६४ ॥ यालागीं सज्ञान अथवा मुग्ध ॥ तिहीं न करावा ब्रह्मविरोध ॥हेंचि वाटावया मुकुंद॥ कुलक्षयो प्रसिद्ध दाखवी ॥६५॥ निजदेहासी जो करी घात ॥ तो जराव्याध केला मुक्त ॥ येथवरी ज्ञाता देहातीत ॥ क्षमायुक्त तो सज्ञान ॥ ६६ ॥ एकुणतीस अध्यायपर्यंत ॥ कृष्णें उपदेशिला ज्ञानार्थ ॥ पुढील दोन अध्यायांत ॥ स्वयें दावीत विदेहत्व ॥ ६७ ॥ श्रीराम अयोध्या घेऊन गेला ॥ श्रीकृष्णें निजदेहही सांडिला ॥ येणें देहाभिमान मिथ्या केला ॥ तारावया मुमुक्षु ॥ ६८ ॥ पंधरा अध्याय पूर्वार्ध ॥ व्याख्यान झालें सिद्ध ॥ सूत्रप्राय उत्तरार्ध ॥ दाखविला विशद अध्यायार्थीं ॥ ६९ ॥ साह्य सद्गुरु जनार्दन ॥ श्रोतीं द्यावें अवधान ॥ पुढील उत्तरार्धव्याख्यान ॥ एका जनार्दन बोलवी ॥ ७० ॥ एका जनार्दन कृपागुणें ॥ कठिण तें अति सुगम होणें ॥ गुह्यश्लोकार्थ पदें गहनें ॥ सार्थक वचनें केलीं त्याचीं ॥ ७१ ॥ झालिया वसंताचें रिघणें ॥ वृक्ष सपुष्प सफळ तेणें ॥ तेवीं जनार्दनकृपागुणें ॥ सार्थकवचनें कवीचीं ॥ ७२ ॥ गगनीं उगवल्या अंशुमाळी ॥ जेवीं विकासिजे वनकमळीं ॥ तेवीं जनार्दनकृपामेळीं ॥ कविता नव्हाळी विकासे ॥ ७३ ॥ वेणु घेऊनियां हातें ॥ विश्व मोहिलें कृष्णनाथें ॥ तेवीं कवीश्वर करोनि मातें ॥ वक्ता तेथें जनार्दन ॥ ७३ ॥ तो जनार्दनकृपाक्षीराब्धी ॥ ज्याचे कृपेशीं नाहीं अवधी ॥ तेणें उत्तरार्धीं प्रवेशे बुद्धी ॥ अर्थसिद्धीसमवेत ॥ ७४ ॥ मागील कथासंगती ॥ पंधरावे अध्यायाअंतीं ॥ सिद्धि बाधका माझे प्राप्तीं ॥ ऐसें श्रीपती बोलिला ॥ ७५ ॥ एवं सांडूनि सिद्धींचें ध्यान ॥ माझे स्वरूपीं राखावें मन ॥ हें ऐकोनि श्रीकृष्णवचन ॥ उद्धवें प्रश्न मांडिला ॥ ७६ ॥ उद्धव ह्मणे श्रीकृष्णनाथा ॥ विनंति अवधारी समर्था ॥ तुझ्या विभूति समस्ता ॥ मज तत्त्वतां सांगाव्या ॥ ७७ ॥

---

१ मिलाफ. २ बुधापासून इलेच्या ठिकाणीं झालेला. ३ ब्राह्मणांचा द्वेष. ४ संक्षेपांत. ५ टवटवीतपणा.

*ना. सगुण. ×मो. निर्गुणोत्पत्ती. +ना. पूजा. ✻मो. समत्व.

॥ श्लोक ॥ ॥ उद्धव उवाच ॥ ॥ त्वं ब्रह्म परमं साक्षादनाद्यंतमपावृतम् ॥
सर्वेषामपि भावानां त्राणस्थित्यप्ययोद्भवः ॥ १ ॥

॥ टीका ॥ ॥ भूतभौतिकांचें तूं कारण ॥ तुझेनि जन्मस्थितिनिदान ॥ इतुकें करोनि अकर्ता तूं जाण ॥ ब्रह्म परिपूर्ण तूं यालागीं ॥ ७८ ॥ ह्मणशी उत्पत्ति स्थिति मरण ॥ भूतांची प्रकृति करी जाण ॥ ते प्रकृति तुझे आधीन ॥ तुझेनि चलन प्रकृतीशी ॥ ७९ ॥ यालागीं प्रकृति ते परतंत्र ॥ तूं परमात्मा स्वतंत्र ॥ अनादि अव्ययो अपार ॥ श्रुतीशी पार नकळेची ॥ ८० ॥ प्रकृतीशी तुझें आवरण ॥ तूं अनंत गा निरावरण ॥ जीवांचें स्वरूप गा तूं आपण ॥ परी जीवपण तुज नाहीं ॥ ८१ ॥ जीव तितुका अज्ञानयुक्त ॥ तूं ज्ञानाज्ञानातीत निश्चित ॥ यालागीं ब्रह्म तूं साक्षात ॥ अविनाशवंत अपरोक्ष ॥ ८२ ॥ तो तूं अपरोक्ष कैसा ह्मणशी ॥ सर्वीं सर्व सबाह्य असशी ॥ ऐसा असोनि अतर्क्य होशी ॥ हृषीकेशी तें ऐक ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ उच्चावचेषु भूतेषु दुर्ज्ञेयमकृतात्मभिः ॥ उपासते त्वां भगवन्याथातथ्येन ब्राह्मणाः ॥ २ ॥

॥ टीका ॥ मशकादि हिरण्यगर्भपर्यंत ॥ तूं सबाह्य सर्वभूतीं सतत ॥ ऐशिया तूतें निश्चित ॥ ब्राह्मण जाणत वेदार्थें ॥ ८४ ॥ आकळूनि उपनिषदर्थ ॥ तुझ्याठायीं भजनयुक्त ॥ ते तुज सर्वगतातें जाणत ॥ तूं सुनिश्चित सर्वात्मा ॥ ८५ ॥ त्या सर्वात्म्याचा पाहतां पार ॥ अचिंत्यानंतऐश्वर्यधर ॥ त्या तुज नेणती प्राकृत नर ॥ ऐक विचार तयांचा ॥ ८६ ॥ जे मनाचे विकले ॥ उपस्थाचे अंकिले ॥ जे रसनेचे पोसणे झाले ॥ निद्रेनें केले घरजांवयी ॥ ८७ ॥ त्यांसि स्वतःसिद्ध स्वरूप पाहीं ॥ सर्वगत नपडेचि ठायीं ॥ निजात्मता नकळे पाहीं ॥ सदा विषयीं भूलले ॥ ८८ ॥ विषयीं चंचळ अंतःकरण ॥ त्यासि नव्हे ध्यान सगुण ॥ निर्गुणीं प्रवेशेना मन ॥ अज्ञानजन केवीं तरती ॥ ८९ ॥ न करितां नानाव्युत्पत्ती ॥ न धरितां ध्यानस्थिती ॥ तुझ्या उत्तमा ज्या विभूती ॥ त्या सांग निश्चितीं भजनासी ॥ ९० ॥

॥ श्लोक ॥ येषु येषु च भावेषु भक्त्या त्वां परमर्षयः ॥ उपासीनाः प्रपद्यंते संसिद्धिं तद्वदस्व मे ॥ ३ ॥

॥ टीका ॥ ज्या ज्या तुझ्या विभूती ॥ पूर्वीं उपासिल्या संतीं ॥ दृढभावें करोनियां भक्ती ॥ तुझी स्वरूपप्राप्ती पावले ॥ ९१ ॥ त्या सकळ तुझ्या विभूती ॥ कवणस्थिती कवणव्यक्ती ॥ कवणभाव कवणगती ॥ हें निश्चितीं मज सांग ॥ ९२ ॥ ह्मणशी सकळभूतांप्रती ॥ तूंचि वोळख माझ्या विभूती ॥ तरी ते तुझी अतर्क्य स्थिती ॥ न कळे श्रीपती आह्मांचेनी ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ गूढश्चरसि भूतात्मा भूतानां भूतभावन ॥ न त्वां पश्यंति भूतानि पश्यंतं मोहितानि ते ॥ ४ ॥

॥ टीका ॥ सर्वभूतांचा हृदयस्थ ॥ हृदयीं असोनि अतिगुप्त ॥ त्या तूतें भूतें समस्त ॥ न देखत देहभ्रमें ॥ ९४ ॥ त्या देहभ्रमासि देवराया ॥ मूळकारण तुझी माया ॥ *तेथें तुझी

१ उत्पत्ति, रक्षण व नाश. २ कामाचे दास.
*ना. ते तुझी.

कृपा झालिया ॥ माया जाय त्या गुणेंसीं ॥ ९५ ॥ मग सर्वत्र सर्वांठायीं ॥ सवभूतीं सबाह्य देहीं ॥ तुझें स्वरूप ठायींच्या ठायीं ॥ प्रकटे पाहीं सदोदित ॥ ९६ ॥ एवढें तुझे कृपेचें करणें ॥ ते कृपा लाहिजे कवणे गुणें ॥ यालागीं तुझ्या विभूति उपासणें ॥ तुझे कृपेकारणें गोविंदा ॥९७॥ याचिलागीं विभूतींची स्थिती ॥ समूळ सांगावी मजप्रती ॥ तेचि अर्थींची विनंती ॥ पुढतपुढती करीतसें ॥ ९८ ॥

॥ श्लोक ॥ याः काश्च भूमौ दिवि वै रसायां विभूतयो दिक्षु महाविभूते ॥
तामह्यमाख्याह्यनुभावितास्ते नमामि ते तीर्थपदांघ्रिपद्मम् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ स्वर्गमृत्युपाताळ *स्थिती ॥ विस्तारल्या दशदिशांप्रती ॥ त्या समस्तही तुझ्या विभूती ॥ सांग श्रीपती मजलागीं ॥ ९९ ॥ ऐसा करोनियां प्रश्न ॥ उद्धवें घातलें लोटांगण ॥ सकळतीर्थांचें जन्मस्थान ॥ ते मस्तकीं श्रीचरण वंदिले ॥ १०० ॥ ऐकोनि उद्धवाच्या प्रश्नासी ॥ परम संतोषे हृषीकेशी ॥ पुरस्करोनि उद्धवासी ॥ काय त्यासी बोलिला ॥ १ ॥ वैरिगजयूथ पंचानन ॥ कोदंडदीक्षा प्रताप गहन ॥ सखा जिवलग पढियंता जाण ॥ जीवप्राण जो माझा ॥ २ ॥ ज्याचे रथींचे मी धुरेवरी ॥ ज्याच्या अश्वांचे वागोरे धरीं ॥ जो उपदेशिला कुरुक्षेत्रीं ॥ उभयसेनेमाझारीं रणांगणीं ॥ ३ ॥ तो नरावतार वीर अर्जुन ॥ त्याच्या ऐसा तुझा प्रश्न ॥ ऐसें उद्धवासि संतोषेन ॥ काय श्रीकृष्ण बोलिला ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ एवमेतदहं पृष्टः प्रश्नं प्रश्नविदां वर ॥ युयुत्सुना विनशने सपत्नैरर्जुनेन वै ॥ ६ ॥

॥ टीका ॥ हाचि प्रश्न मजकारणें ॥ पूर्वीं पुशिला अर्जुनें ॥ जेव्हां तिरस्कारूनि दुर्योधनें ॥ युद्ध सत्राणें मांडिलें ॥ ५ ॥ अरिनिर्दळणीं प्रताप पूर्ण ॥ धीर वीर आणि सज्ञान ॥ प्रश्न कर्त्यांमाजीं विचक्षण ॥ माझा आत्मा जाण अर्जुन ॥ ६ ॥ तेणें अर्जुनें कुरुक्षेत्रीं ॥ युद्धसमयीं महामारीं ॥ स्वजनवधाचें भय भारी ॥ हाचि प्रश्न करी मज तेव्हां ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञात्वा ज्ञातिवधं गर्ह्यमधर्मं राज्यहेतुकम् ॥ ततो निवृत्तो हंताऽहं हतोऽयमिति लौकिकः ॥ ७ ॥ स तदा पुरुषव्याघ्रो युक्त्या मे प्रतिबोधितः ॥ अभ्यभाषत मामेवं यथा त्वं रणमूर्धनि ॥८॥

॥ टीका ॥ केवळ राज्यलोभाकारणें ॥ गुरुगोत्र पितृव्य वधणें ॥ हें अतिनिंद्य मजकारणें ॥ नाहीं झुंझणें प्राणांतें ॥ ८ ॥ लौकिक धर्मप्रवृत्ती ॥ मी मारिता हे मरती ॥ महामोहाची भ्रांती ॥ उपजली चित्तीं अर्जुना ॥ ९ ॥ राजभोगाचें ×धरोनि वर्म ॥ ज्ञातिवधाचें निंद्य कर्म ॥ हा केवळ मज अधर्म ॥ धर्माचा स्वधर्म बुडेल ॥ ११० ॥ ज्याचें तीर्थ घ्यावें प्रतिदिनीं ॥ जे पूजावे वरासनीं ॥ ते खोंचूनि तिखटबाणीं ॥ भोगावी अवनी स्वगोत्ररुधिरें ॥ ११ ॥ स्वगोत्ररुधिराचा पूर ॥ पृथ्वीवरी वाहेल दुस्तर ॥ तेणें आह्मी होऊं राज्यधर ॥ हें कर्म घोर न करवे मज ॥ १२ ॥ कुळीं सुपुत्र वांछिजे जिहीं ॥ बाण खोंचावे त्यांचे हृदयीं ॥

१ उद्देशून गौरवून. २ शत्रुरूप हत्तींच्या कळपाशीं लढणारा सिंहच जो (अर्जुन.)३ पंडित. ४ पृथ्वी.
*ना. क्षिती. ×ना. करोनि धर्में.

यापरी पूर्वजांसि पाहीं ।। झालों उतरायी मानावें ॥ १३ ।। ज्याचें करावें श्राद्ध तर्पण ॥ त्यांचे बाणवरी घ्यावे प्राण ।। भले पूर्वजां झालों उत्तीर्ण ॥ आली नागवण निजधर्मा ॥ १४ ॥

श्लोक ।। गीता संमत ।। हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।।

॥ टीका ॥ युद्धीं निमालियां स्वर्गगती ॥ जयो आलिया राज्यप्राप्ती ॥ दोन्ही नश्वरें गा श्रीपती ॥ कोणे हितार्थी झुंझावें ॥ १५ ॥ ऐसेनि अनुतापें जाण ।। सांडूनियां धनुष्यबाण ॥ शोकाकुलित अर्जुन ॥ म्लानवदन रणरंगीं ॥ १६ ।। ते काळीं म्यांचि जाण ॥ तो महावीरपंचानन ॥ नानायुक्तीं केलें समाधान ॥ तेंही लक्षण अवधारी ।। १७ ॥ अर्जुना देह तितुका नश्वर ।। मळमूत्रांचें कोठार ॥ करितां नाना उपचार ॥ मरणतत्पर क्षणिक ।। १८ ।। जीव निज नित्य निर्मळ ॥ अज अव्यय अचळ ॥ अच्छेद्य अभेद्य अमळ ॥ अचंचळ निज नित्य ॥ १९॥ अर्जुना ऐक साचें ।। देहो तुझेनि प्रयत्नें न वांचे ॥ ॥ जीव तुझेनि मारिला नवचे ॥ पातक हत्येचें अहंभावें ॥ १२० ॥ हो कां त्वां हें सैन्य असतें केलें ॥ तरी तुझेनि जातें मारिलें ॥ मी मारिता येणें बोलें ॥ तुजासि गोंविलें अभिमानें ।। २१ ॥ ‘ जो देहाचा निर्माणकर्ता ॥ तोचि देहाचा संहर्ता ॥ तूं करण्या मारण्या परता ॥ व्यर्थ अहंता कां घेसी ’ ॥ २२ ॥ जरी हे अहंता न सांडिशी ।। तरी सकळ हत्येचिया राशी ।। साचचि आल्या तुजपाशीं ।। दोषी झालासी अर्जुना ॥ २३ ॥ ऐक पां बापा पार्था ॥ देहादिकर्मांची अहंता ।। जो घे आपुले माथां ।। तो दोषी सर्वथा तिहीं लोकीं ।। २४ ॥ होकां स्वधर्म जरी तूं पुसशी ॥ तरी ऐक क्षत्रियाच्या क्षात्रधर्मासी ॥ समरांगणीं पित्यापुत्रांसी ।। वधितां क्षत्रियासी दोष नाहीं ।। २५॥ युद्ध ह्मणिजे स्वधर्मतीर्थ ।। समरांगणीं निमे तो नित्यमुक्त ।। जें तुज निजभाग्यें प्राप्त ।। तें तूं अहित मानिसी ।। २६ ॥ दोष देहअहंतेच्या माथां ॥ ते जो नातळे देहअहंता ॥ तोचि कर्में करूनि अकर्ता ।। भोगूनि अभोक्ता तो एक ।। २७ ॥ तोचि संगामाजीं निःसंग ।। *अवघें जग तो एकला सांग ।। जो निरभिमानी अव्यंग ॥ तो +सैरा 3चांग 0समरंगीं ।। २८ ॥ अर्जुना अभिमान सांडितां ।। तूं माझी पावशी समसाम्यता ।। तेव्हां सकळपापाची वार्ता ।। तुज सर्वथा स्पर्शेना ॥ २९ ॥ ह्मणशी केवीं जाय अहंता ।। तरी मज लक्षूनि तत्त्वतां ॥ स्वधर्म कर्मातें आचरितां ॥ चित्त *शोधकता तेणें होय ।। १३० ॥ निर्मळत्व आलिया चित्तां ॥ तो लागे माझिया भक्तिपंथा ॥ भजनें माझी समरसता ।। माझ्या निजभक्तां तत्काळ ॥३१ ॥ 1अर्जुना न सांडूनिया अभिमान ॥ तूं नाइकसी माझें वचन ॥ तरी जन्ममरणांचें भूषण ।। सकळ दोष जाण भोगिसी ॥ ३२ ।। तूं नित्यमुक्त अज अव्ययो ।। हा बुडेल तुझा 2सद्भावो ॥ मग जन्ममरणांचा निर्वाहो ॥ ×अवश्य पहाहो भोगिसी ॥३३॥ यालागीं करणें न करणें दोन्ही ॥ प्रकृतीचे माथां ठेवूनी ।। तूं कायावाचा मनींहूनी ॥ मजलागुनी शरण रिघे ।।३४॥ यापरी गा तत्त्वतां ॥ मज 8सद्भावें शरण येतां ॥तुज सकळकर्मांची वार्ता ।।मी सर्वथा शिवों नेदीं ।।३५॥ यालागीं गा कोदंडपाणी ।।मरतें मारतें सांडूनि दोन्ही।।सैरा होयी रणांगणीं ।। मी तुजलागोनि उद्धरीन ॥३६॥ तूं एक येथें कर्म करिता ।। 5मी एक तूंतें उद्धरिता ॥ ऐसें भिन्नत्व गा पार्था ॥

---

१ धनुष्य आहे हातांत ज्याच्या अशा हे अर्जुना. २ निर्भय.

*ना. अवघिया जगें. +मो. सौरा. 3ना. सांग. 0मो. समरंगणीं. *मो. शुद्धता. 1ना. अर्जुना सांडावा अभिमान. 2मो. सत्यभावो. ×ना. परिश्रम. 8ना. सद्भावें. 5मो. मी एक धरिता.

माझ्या शरणागता असेना ॥ ३७ ॥ मज अनंता शरण येणें ॥ आणि जीवत्वें वेगळें उरणें ॥ तें गुळदगडाऐसें जिणें ॥ अनन्यपणें नव्हे शरण ॥ ३८ ॥ सरिता सागरा शरण गेली ॥ ते समुद्राचि होऊनि ठेली ॥ पुढती परतावया मुकली ॥ समरसिली सिंधुत्वें ॥ ३९ ॥ गंगा पावोनि सिंधुत्वासी ॥ मागील यावा वंचीना तिसीं ॥ तेवीं सबाह्य आत्मसमरसीं ॥ शरण अहर्निशीं अखंडत्वें ॥ १४० ॥ दीप दावाग्नी भेटों गेला ॥ तो तेव्हडाचि होऊनि ठेला ॥ तेवीं मजलागीं शरण आला ॥ तो मीचि झाला अर्जुना ॥ ४१ ॥ पार्था परीस पां चिह्न प्राप्तीचें ॥ हें भूताकार मज अच्युताचें ॥ ऐसें सद्भावें जो देखे साचें ॥ त्यासि ब्रह्मसायुज्याचें साम्राज्य लाभे ॥ ४२ ॥ *मज अनन्याचे निजस्थितीं ॥ संसार मुळीं मुख्य भ्रांती ॥ तेथ मी मारिता हे मरती ॥ कोणें हे युक्ती मानावी ॥ ४३ ॥ मृगजळ जेथें नसे ॥ तेथें तंव कोरडेंचि असे ॥ मध्यें जेथें विलसे ॥ तेथें तरी असे बोल्हांशु कायी ॥ ४४ ॥ तेवीं संसाराचें रूप नाम ॥ ठेवितां तेथें निखळ ब्रह्म ॥ हाचि ज्याचा स्वभाव परम ॥ तें चालतें ब्रह्म वर्ततां देहीं ॥ ४५ ॥ देहे जडत्वें न बाधी कर्म ॥ आत्मा नातळे धर्माधर्म ॥ हें साचें ज्यासि कळे वर्म ॥ तो चालतें ब्रह्म वर्ततां देहीं ॥ ४६ ॥ देहीं वर्ततां तो विदेह ॥ विदेह तोच त्याचा देह ॥ हें माझें परम गुह्य ॥ अर्जुनासि पाहें सांगितलें ॥ ४७ ॥ यापरी म्यां नानायुक्तीं ॥ युद्धीं प्रबोधिला सुभद्रापती ॥ तेणेंही मज करोनि विनंती ॥ पुशिल्या विभूती तुझ्या ऐशा ॥ ४८ ॥ ज्या सांगीतल्या अर्जुनासी ॥ त्याचि मी सांगेन तुजपाशीं ॥ ऐसें पुरस्करूनि उद्धवासी ॥ निजविभूति त्यासी सांगत ॥ ४९ ॥ उद्धवा ज्या पुशिल्या विभूती ॥ त्या माझ्या मज न गणवती ॥ मी जगदात्मा त्रिजगतीं ॥ संख्यासंस्थिती गणी कोण ॥ १५० ॥

॥ श्लोक ॥ अहमात्मोद्धवामीषां भूतानां सुहृदीश्वरः ॥ अहं सर्वाणि भूतानि तेषां स्थित्युद्भवाप्ययः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ मी हृदयस्थ ×समर्थ हृदयीं ॥ त्या मज जीव मागे जें कांहीं ॥ त्यासि विमुख मी नव्हें कहीं ॥ पुरवीं सर्वेही ईश्वरत्वें ॥ ५१ ॥ जीव अति अडलेपणें ॥ जें मागे मजकारणें ॥ तें मीं त्यासि अलोट देणें ॥ यालागीं ह्मणणें ईश्वर मज ॥ ५२ ॥ मी आत्माराम असें हृदयीं ॥ हा विश्वास जयासि नाहीं ॥ ते मृगजळाचे डोहीं ॥ नावेसकट पाहीं बुडोनि गेले ॥ ५३ ॥ तेथ नाव करावयाचे कष्ट ॥ वृथा गेले फुकट ॥ तेवीं सोसूनि साधनें कचाट ॥ साधनासकट बुडोनि गेले ॥ ५४ ॥ माझे प्राप्तीचें मुख्य वर्म ॥ मी हृदयीं असें परब्रह्म ॥ हेंचि ज्याचें नित्य कर्म ॥ ते विभूति परम पैं माझी ॥ ५५ ॥ मी सर्वभूतहृदयवासी ॥ सुहृद सोयरा मी सर्वांसी ॥ मी नियंता ईश्वर सत्तेसी ॥ नियामक भूतांसी मी एक ॥ ५६ ॥ एवं सर्वभूतांचा मी स्वामी ॥ इयें सर्वभूतें तेंही मी ॥ भूतांचे जन्मभूमीची मी भूमी ॥ उत्पत्त्यादिकर्मीं मीचि कर्ता ॥ ५७ ॥ कृषीवळाचियेपरी ॥ मी सृजीं पाळीं संहारीं ॥ ब्रह्मा विष्णु त्रिपुरारी ॥ गुणावतारी मी एक ॥ ५८ ॥ कर्मांची जे क्रियाशक्ती ॥ तेही मी ह्मणे श्रीपती ॥ हे सामान्यें बोलिली स्थिती ॥ +विशेषविभूती त्या ऐक ॥ ५९ ॥

१ हट्टानें.

॥ श्लोक ॥ अहं गतिर्गतिमतां कालः कलयतामहम् ॥ गुणानां चाप्यहं साम्यं गुणिन्यौत्पत्तिको गुणः ॥ १० ॥

॥ टीका ॥ गतिमंतांमाजीं जे गती ॥ ते मी ह्मणे लक्ष्मीपती ॥ गतीसि माझेनि गती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १६० ॥ चेतनेनें सर्वांही गती ॥ ते चेतना चैतन्याची शक्ती ॥ चेतनेस्तव इंद्रियप्रवृत्ती ॥ एवं गतीची गती मी एक ॥ ६१ ॥ सकळगतींचीं परम गती ॥ प्राण्यासि मुख्यत्वें मुक्ती ॥ ते मुक्तीसि मजमाजीं मुक्ती ॥एवं गतीची गती मी एक ॥६२॥ सुरनरां आकळितां ॥ ते जाण काळाची सत्ता ॥ त्या काळाचा मी आकळिता ॥ जाण तत्त्वतां महाकाळ ॥ ६३ ॥ तिहीं गुणांची *साम्यावस्था ॥ ते मी जाण गा निजभक्ता ॥ अकृत्रिम गुण जो धर्मता ॥ तो मी तत्त्वतां ह्मणे हरी ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ गुणिनामप्यहं सूत्रं महतां च महानहम् ॥ सूक्ष्माणामप्यहं जीवो दुर्जयानामहं मनः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ ॥ गुणी ह्मणावया हेंचि कारण ॥ ज्या मजमाजीं सूत्रक्रियाप्रधान ॥ मायेचें प्रथमकार्य जाण ॥ तो गुणी मी संपूर्ण उद्धवा ॥ ६५ ॥ जगीं आकाश थोर पाहीं ॥ तें मजमाजीं खेळे लपंडायी ॥ माझ्या महत्त्वाची नवायी ॥ मजही निश्चयीं नेमेना ॥ ६६ ॥ महतत्त्व जें ज्ञानप्रधान ॥ तें मी ह्मणे नारायण ॥ सूक्ष्मांमाजीं जीव मी आपण ॥ ब्रह्मादिकां जाण अतर्क्य ॥ ६७ ॥ दुर्जयांमाजीं मी मन ॥ त्यासि जिंकावया जाण ॥ मजवेगळी आंगवण ॥ नाहीं संपूर्ण आणिकासी ॥ ६८ ॥ मज लक्षितां मन आकळे ॥ मज विसरतां तें चौताळे ॥ मग न धरवे शास्त्रबळें ॥ मन नाकळे मजवीण ॥ ६९ ॥ मन तेंचि मी आहें ॥ मज चिंतितां तें विरोनि जाये ॥ मज विसरतां तें पाहे ॥ सैरा जाये सुनाट ॥ १७० ॥

॥ श्लोक ॥ हिरण्यगर्भो वेदानां मंत्राणां प्रणवस्त्रिवृत् ॥ अक्षराणामकारोऽस्मि पदानि च्छंदसामहम् ॥ १२ ॥

॥ टीका ॥ ॥ वेदाध्यापक प्रसिद्ध ॥ तो हिरण्यगर्भ मी ह्मणे गोविंद ॥ माझेनि +जगीं अनुल्लंघ्य वेद ॥ वेदवाद तोही मी ॥७१॥ ओंकारेवीण मंत्रश्रेणी ॥ जाण ते बाळकाची काहणी ॥ मंत्रीं ओंकार मी चक्रपाणी ॥ सकळ मंत्र त्याचेनि पावन ॥ ७२ ॥ अकार उकार मकार ॥ अर्धमात्रेसि उच्चार ॥ या नांव ×त्रिविध ओंकार ॥ पावन मंत्र ✻येणेंची ॥ ७३ ॥ अक्षरांच्या उच्चारासी ॥ अकार लागला सर्वांसी ॥ तो अकार मी हृषीकेशी ॥ जाण निश्चयेंसी उद्धवा ॥ ७४ ॥ छंदांमाजीं गायत्री छंद ॥ सकळ द्वंद्वांमाजीं निर्द्वंद्व ॥ तो मी ह्मणे गोविंद ॥ पूज्य द्विजवृंद येणेंचि मज ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ इंद्रोऽहं सर्वदेवानां वसूनामस्मि हव्यवाट् ॥ आदित्यानामहं विष्णू रुद्राणां नीललोहितः ॥ १३ ॥

---

१ स्वतःसिद्ध. २ लिंगशरीर, गुण. ३ सामर्थ्य. ४ ब्रह्मा. ५ मंत्रसमूह.

*ना. मो. समान अवस्था. +ना. आंगीं. ×ना. त्रिवृत. ✻ना. वेदेसी.

॥ टीका ॥ देवांमाजीं मी इंद्र जाण ॥ वसूंमाजीं मी हुताशन ॥ आदित्यांमाजीं मी वामन ॥ रुद्रांमाजीं जाण नीललोहितू ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ ब्रह्मर्षीणां भृगुरहं राजर्षीणामहं मनुः ॥ देवर्षीणां नारदोऽहं हविर्धान्यास्मि धेनुषु ॥ १४ ॥

॥ टीका ॥ शापूनि ब्रह्मा अपूज्य केला ॥ शिवाचा नैवेद्य त्यागविला ॥ विष्णूचे हृदयीं लाता हाणितला ॥ भृगु वाखाणिला श्रीवत्सें ॥ ७७ ॥ ऐसा ऋषींमाजीं संपन्न ॥ भृगु तो मी ह्मणे श्रीकृष्ण ॥ मनुरूपें मी आपण ॥ राजर्षि जाण मुख्यत्वें ॥ ७८ ॥ देवर्षींमाजीं मुनि नारद ॥ तोही मी ह्मणे गोविंद ॥ कामधेनु अतिशुद्ध ॥ स्वरूप प्रसिद्ध तें माझें ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ सिद्धेश्वराणां कपिलः सुपर्णोऽहं पतत्रिणाम् ॥ प्रजापतीनां दक्षोऽहं पितृणामहमर्यमा ॥ १५ ॥

॥ टीका ॥ ॥ सिद्धांमाजीं कपिल मुनीश्वर ॥ तो मी ह्मणे सारंगधर ॥ पक्ष्यांमाजीं खगेश्वर ॥ तो मी श्रीधर गरुडरूपें ॥ १८० ॥ प्रजापतींमाजीं मुख्य ॥ कृष्ण ह्मणे तो मी दक्ष ॥ पितृगणांमाजीं अध्यक्ष ॥ अर्यमा प्रत्यक्ष स्वरूप माझें ॥ ८१ ॥

॥ श्लोक ॥ मां विद्ध्युद्धव दैत्यानां प्रह्लादमसुरेश्वरम् ॥ सोमं नक्षत्रौषधीनां धनेशं यक्षरक्षसाम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ॥ भक्तिप्रतापें अगाध ॥ तो दैत्यांमाजीं मी प्रह्लाद ॥ नक्षत्रऔषधींचा जो स्वामी चंद्र ॥ तें ह्मणे गोविंद स्वरूप माझें ॥ ८२ ॥ यक्षराक्षसांमाजीं थोर ॥ माझें स्वरूप तो कुबेर ॥ ज्याचे विश्वासें निरंतर ॥ असे भांडार हरीचें ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ ऐरावतं गजेंद्राणां यादसां वरुणं प्रभुम् ॥ तपतां द्युमतां सूर्यं मनुष्याणां च भूपतिम् ॥ १७ ॥

॥ टीका ॥ ॥ ऐरावत जो गजेंद्र ॥ तो मी ह्मणे यादवेंद्र ॥ वरुण जो जळचरेंद्र ॥ तें ह्मणे उपेंद्र स्वरूप माझें ॥ ८४ ॥ स्वप्रभा प्रकाशनिष्ठ ॥ जग प्रकाशनि उद्भट ॥ तो सूर्य मी ह्मणे वैकुंठ ॥ अतितिखट निजतेजें ॥ ८५ ॥ मनुष्यांमाजीं जो भोगी क्षिती ॥ सार्वभौमपद ज्याच्या हातीं ॥ त्यातेंचि बोलती भूपती ॥ तो माझी विभूती हरि ह्मणे ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ उच्चैःश्रवास्तुरंगाणां धातूनामस्मि कांचनम् ॥ यमः संयमतां चाहं सर्पाणामस्मि वासुकिः ॥ १८ ॥ नागेंद्राणामनंतोऽहं मृगेंद्रः शृंगिदंष्ट्रिणाम् ॥ आश्रमाणामहं तुर्यो वर्णानां प्रथमोऽनघ ॥ १९ ॥

॥ टीका ॥ ॥ उच्चैःश्रवा तुरंगजाती ॥ तो मी ह्मणे कमळापती ॥ सुवर्णधातु माझी विभूती ॥ जीलागीं झुलती तिन्ही लोक ॥ ८७ ॥ दंडधर्त्यांमाजीं गहन ॥ यमधर्म मी आपण ॥ सर्पां-

---

१ अग्नि. २ शंकर. ३ मुख्य. ४ जळांत राहणाऱ्या जीवांचा स्वामी. ५ राजा. ६ भुलती. ७ शासन करणाऱ्यांमध्यें.

माजीं जाण ॥ मी नारायण वासुकी ॥ ८८ ॥ अनंत या नामातें जो धरी ॥ तो नाग मी ह्मणे श्रीहरी ॥ नखदंष्ट्राश्रृंगधारी ॥ त्यांमाजीं केसरी मी ह्मणे देवो ॥ ८९ ॥ चतुर्थाश्रम संन्यास जाण ॥ तो मी ह्मणे नारायण ॥ वर्णाग्रज जे ब्राह्मण ॥ ते मी जाण ब्रह्म बोलतें ॥ १९० ॥

॥ श्लोक ॥ ॥ तीर्थानां स्रोतसां गंगा समुद्रः सरसामहम् ॥ आयुधानां धनुरहं त्रिपुरघ्नो धनुष्मताम् ॥ २० ॥

॥ टीका ॥ ॥ तीर्थसरितांमाजीं गांगं ॥ ते मी ह्मणे श्रीरंग ॥ तडागीं श्रेष्ठ तडाग ॥ समुद्र सांग मी ह्मणे हरी ॥ ९१ ॥ आयुधीं धनुष्य हतियेर ॥ तें मी ह्मणे सारंगधर ॥ त्रिपुरारि मी धनुर्धर ॥ जेणें केला संहार त्रिपुराचा ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ धिष्ण्यानामस्म्यहं मेरुर्गहनानां हिमालयः ॥ वनस्पतीनामश्वत्थ ओषधीनामहं यवः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ त्रिभुवननिवासस्थान मेरू ॥ तो मी ह्मणे धराधरू ॥ दुर्गमत्वें अतिदुर्धरू ॥ तो मी हिमगिरिवरू ह्मणे श्रीकृष्ण ॥ ९३ ॥ वृक्षांमाजीं जो अश्वत्थ ॥ तो मी कृष्णनाथ ॥ औषधीं-माजीं अतिविख्यात ॥ यव मी अच्युत ह्मणे वेगें ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ पुरोधसां वसिष्ठोऽहं ब्रह्मिष्ठानां बृहस्पतिः ॥ स्कंदोऽहं सर्वसेनान्यामग्रण्यां भगवानजः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ श्रीरामपुरोहित श्रेष्ठ ॥ देवो ह्मणे तो मी वसिष्ठ ॥ वेदवेत्त्यांमाजीं उद्भट ॥ सुरगुरु वरिष्ठ मी उद्धवा ॥ ९५ ॥ स्कंद सेनापतिशिरोमणी ॥ तो मी ह्मणे चक्रपाणी ॥ स्वधर्मप्रवर्तक ॥ *अग्रगणी ॥ वंद्य ब्राह्मणीं तो ब्रह्मा मी ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ यज्ञानां ब्रह्मयज्ञोऽहं व्रतानामविहिंसनम् ॥ वाय्वग्न्यर्काम्बुवागात्मा शुचीनामप्यहं शुचिः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ यज्ञांमाजीं ब्रह्मयज्ञ ॥ तो मी ह्मणे सर्वज्ञ ॥ देवर्षिपितृभूतगण ॥ आब्रह्म भुवन जेणें तृप्त ॥ ९७ ॥ जीवमात्रासि पैं जाण ॥ नेदावें दुःखवचन ॥ व्रतांमाजीं जें अहिंसन ॥ तें मी श्रीकृष्ण स्वयें ह्मणे ॥ ९८ ॥ एका वायूचेनि पवित्रपण ॥ एक अग्नीस्तव पवित्र जाण ॥ एकातें पवित्र करी जीवन ॥ एके पावन वचनमात्रें ॥ ९९ ॥ एके बुद्धीस्तव पवित्र जाण ॥ यां समस्तांमाजीं पवित्रपण ॥ तें माझें स्वरूप ह्मणे श्रीकृष्ण ॥ पावनांपावन मी एक ॥ ॥ २०० ॥ जग माझेनि नामें पुनीत ॥ +हें सर्वांचें सर्वसंमत ॥ त्या माझें स्वरूप जें येथ ॥ परम पुनीत पुनीतां ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ योगानामात्मसंरोधो मंत्रोऽस्मि विजिगीषताम् ॥ आन्वीक्षिकी कौशलानां विकल्पः ख्यातिवादिनाम् ॥ २४ ॥

---

१ चार वर्णांत. श्रेष्ठ. २ गंगोदक. ३ अगम्यपणानें. ४ पिंपळ. ५ श्रेष्ठ. ६ कार्तिकेय. ७ ब्रह्मासुद्धां. ८ पवित्रांमध्यें पवित्र.

[illegible] तें सर्वांचें सर्व समस्त, मो. ऐसें जें सर्व संमत.

॥ टीका ॥ विविधयोगांमाजीं आत्मरोधू ॥ तो योग मी ह्मणे गोविंदू ॥ जेणें *प्रकटे परमानंदू ॥ समाधिबोधू साधकां ॥ २ ॥ मुख्यत्वें विवेक धरोनि हातीं ॥ जो न्यायें तां विजयो वांछी चित्तीं ॥ ते नीतींची नीति मी श्रीपती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३ ॥ आत्मानात्मविवेक केवळ ॥ ते आन्वीक्षिकी विद्या कुशळ ॥ ते विद्या ह्मणे मी गोपाळ ॥ ×विवेक प्रबळ माझेनी ॥४॥ विद्यांमाजीं वाद अनंत ॥ जेथ विकल्पा नाहीं अंत ॥ तो वादू मी ह्मणे अच्युत ॥ एेक निश्चित +विकल्प ॥ ५ ॥ आख्याति अन्यथाख्याती ॥ अन्यख्याति 5सत्ख्याती ॥ अनिर्वचनीय जे ख्याती ॥ तो वादू निश्चितीं मी उद्धवा ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ स्त्रीणां तु शतरूपाऽहं पुंसां स्वायंभुवो मनुः ॥ नारायणो मुनीनां च कुमारो ब्रह्मचारिणाम् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ शतरूपा आणि मनु ॥ इयें दोनी मी ह्मणे जनार्दनु ॥ मुनींमाजीं मी नारायणू ॥ बदरी सेवुनू सदा असे ॥ ७ ॥ नैष्ठिकब्रह्मचर्यव्रतधर ॥ माझें स्वरूप सनत्कुमार ॥ स्वयें सांगताहे श्रीधर ॥ जाण साचार उद्धवा ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ धर्माणामस्मि संन्यासः क्षेमाणामबहिर्मतिः ॥ गुह्यानां सूनृतं मौनं मिथुनानामजस्त्वहम् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ ※भूतां अभयदानउपक्रमू ॥ सर्वांभूतीं मी आत्मारामू ॥ हा संन्यासाचा मुख्य धर्मू ॥ तो धर्म पुरुषोत्तमू स्वयें मी ह्मणे ॥ ९ ॥ भूतांसि कायावाचामनें ॥ दुःख नेदूनि सुख देणें ॥ या नांव संन्यासधर्म ह्मणणें ॥ तो धर्म मी ह्मणे गोविंद ॥ २१० ॥ अंतरीं शुद्ध नाहीं बोध ॥ दांत चावूनि साहतां द्वंद्व ॥ ते क्षमा नोहे शुद्ध ॥ एेक विनोद क्षमेचा ॥ ११ ॥ अंतरीं उसावलें परब्रह्म ॥ बाह्य सर्वांभूतीं जाहला सम ॥ ते क्षमा मी ह्मणे पुरुषोत्तम ॥ द्वंद्वआराम बाधीना ॥ १२ ॥ असत्य पापी सकळ सृष्टीं ॥ असत्यामाजीं पापकोटी ॥ असत्याची खोटी गोठी ॥ जो तो पोटीं सोडीना ॥ १३ ॥ उभयलोकीं खोटेपणें ॥ असत्य बाहेर मुद्रा नाणें ॥ तें मनींहूनि जेणें सांडणें ॥ तो म्यां श्रीकृष्णें वंदिजे ॥ १४ ॥ तें गुह्यांमाजीं अतिगुह्य 6जाण ॥ सत्यवाचा कां मनींहूनि मौन ॥ तें मी ह्मणे मधुसूदन ॥ सत्यप्रिय आणि निजगुह्य ॥ १५ ॥ 0श्रेष्ठ याचे देहीं द्विविध जाण ॥ मनुशतरूपा मूळमिथुनें ॥ तें मी ह्मणे नारायण ॥ मनुष्यसृजन सद्भावें ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ संवत्सरोऽस्म्यनिमिषामृतूनां मधुमाधवौ ॥ मासानां मार्गशीर्षोऽहं नक्षत्राणां तथाभिजित् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ सावधान अविकळ ॥ न चुकतां पळें पळ ॥ संवत्सरात्मक जो काळ ॥ तो मी गोपाळ स्वयें ह्मणे ॥१७॥ ²त्रिसरेणूंपासोनि जाण ॥ लवनिमिषदिनमान ॥ संवत्सरवरी सा-

१ नीतीनें. २ तर्कविद्या. ३–६ हे वेदांतांतील निरनिराळे "वाद" किंवा मतें आहेत. ७ स्वायंभुवमनूची भार्या. ८ अखंड ब्र. ९पहिलें स्त्रीपुरुषांचें जोडपें. १०तीन परमाणू मिळून एक त्रसरेणू त्यापासून.

*ना. प्रकट केला. ×ना. विकल्प. +मो. विशदार्थ. 5मो. सर्वेख्याती. ※मो. भूमी. 6मो. ज्ञान. 0मो. श्रेष्ठ याचें द्विधा जाण. [illegible]

वधान ॥ गणी मी संकर्षण काळगणना ॥ १८ ॥ मधुमाधववसंतयुक्त ॥ कृष्ण ह्मणे तो मी ऋतु ॥ मार्गशीर्ष मी मासांआंतू ॥ जो धान्यपाकयुक्तू आल्हादी ॥ १९ ॥ गणितां नये पंचांगांत ॥ नक्षत्रीं असोनि सदा गुप्त ॥ अव्यक्त परी सज्ञाना प्राप्त ॥ तो मी अभिजित् ह्मणे हरी ॥ २२० ॥

॥ श्लोक ॥ ॥ अहं युगानां च कृतं धीराणां देवलोऽसितः ॥ द्वैपायनोऽस्मि व्यासानां कवीनां काव्य आत्मवान् ॥ २८ ॥

॥ टीका ॥ युगांमाजीं कृतयुग ॥ तें मी ह्मणे श्रीरंग ॥ जेथ संपूर्ण धर्म सांग ॥ अधर्मभाग असेना ॥२१॥ *निज धैर्य अतिअद्‌भुत ॥ असित, देवल, धैर्यवंत ॥ तो मी ह्मणे अच्युत ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ २२ ॥ वेदविभागी राजहंस ॥ जो कां द्वैपायन व्यास ॥ तो मी ह्मणे हृषीकेश ॥ निवडूनि द्विजांस दीधले वेद ॥ २३ ॥ कवित्यांमाजीं परमार्थज्ञाता ॥ उशना कवी जाण तत्त्वतां ॥ तो मी ह्मणे रमाभर्त्ता ॥ ※निजात्मता मी शुक्र ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ वासुदेवो भगवतां त्वं तु भागवतेष्वहम् ॥ किंपुरुषाणां हनुमान्विद्याध्राणां सुदर्शनः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ ॥ षड्गुणभाग्यें भाग्यवंत ॥ पूर्णांशें जो भगवंत ॥ वासुदेवनामें विख्यात ॥ जाण तो मी येथ श्रीकृष्ण ॥ २५ ॥ भागवतांमाजीं अतिगहन ॥ उद्धवा तूं तोचि मी जाण ॥ ऐसें बोलतां श्रीकृष्ण ॥ उद्धवें श्रीचरण वंदिले ॥ २६ ॥ उद्धवें करितां नमन ॥ श्रीकृष्णें दीधलें आलिंगन ॥ आनंदें कोंदलें त्रिभुवन ॥ स्वानंदघन तुष्टला ॥ २७ ॥ उद्धव आणि श्रीकृष्ण ॥ दोनी एक जाहले जाण ॥ मी तोचि तूं जें बोलिला श्रीकृष्ण ॥ तें उद्धवासि आपण सत्यत्वें दावी ॥ २८ ॥ दोघांचें मोडलें दोनीपण ॥ उद्धव जाहला श्रीकृष्ण ॥ कृष्णाअंगीं उद्धवपण ॥ संपूर्ण जाण बाणलें ॥ २९ ॥ तेणें उद्धव झाला विस्मित ॥ नवल श्लाघलों आपणांत ॥ मीच कृष्णाचा ×प्रिय भक्त ॥ हें जाणोनि अनंत बोलिला ॥ २३० ॥ वानरांमाजीं जो हनुमंत ॥ तो मी ह्मणे श्रीकृष्णनाथ ॥ तंव उद्धव जाहला गर्वहत ॥ लाजला पोटांत तेकाळीं ॥ ३१ ॥ जेथ वानर आणि वनचर ॥ मजहूनि कृष्णाचे प्रियकर ॥ न कळे हरिभक्तांचा पार ॥ मी कोण किंकर तेठायीं ॥ ३२ ॥ ऐसें विचारूनि चित्तां ॥ सर्वेचि नमिलें कृष्णनाथा ॥ तुझ्या विभूति अचुंबिता ॥ कृपेनें +तत्त्वतां मज सांग ॥ ३३ ॥ तंव हांसोनियां श्रीधर ॥ काय बोलिला उत्तर ॥ सुदर्शन जो विद्याधर ॥ तो विभूति साचार पैं माझी ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ रत्नानां पद्मरागोऽस्मि पद्मकोशः सुपेशसाम् ॥ कुशोऽस्मि दर्भजातीनां गव्यमाज्यं हविःष्वहम् ॥ ३० ॥

---

१ चैत्रवैशाखयुक्त. २ धान्यें पिकतात ज्यांत. ३ अठ्ठाविसावें नक्षत्र. ४ व्यासानें वेदाचे विभाग केले. ५ कवींमध्यें. ६ शुक्र. ७ मोठेपणानें चढला. ८ सर्व.

*मो. निजधैर्यें धैर्यवंत ॥ तो मी ह्मणे अच्युत ॥ माझ्या भजनीं आसक्त ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ※मो. निजात्मकविता. ×ना. परम. +ना. आतां.

॥ टीका ॥ रत्नांमाजीं जो पद्मराग ॥ तो मी ह्मणे श्रीरंग ॥ मनोहरांमाजीं अव्यंग ॥ हरि ह्मणे *सांग पद्मकळा तो मी ॥ ३५ ॥ दशदर्भामाझारीं ॥ कुश तो मी ह्मणे श्रीहरी ॥ सकळ हविषांच्या शिरीं ॥ गोघृत श्रीहरी स्वयें मी ह्मणे ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ व्यवसायिनामहं लक्ष्मीः कितवानां छलग्रहः ॥ तितिक्षाऽस्मि तितिक्षूणां सत्वं सत्ववतामहम् ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ व्यवसायांचे व्यवस्थिती ॥ दान देतां न सरे संपत्ती ॥ ते लक्ष्मी मी ह्मणे श्रीपती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३७ ॥ कपटाचिये कपटगती ॥ अगम्य जे छळणस्थिती ॥ तो मी कृष्ण मायिकमूर्ती ॥ अतर्क्य युक्ती छळणाची ॥ ३८ ॥ +ब्रह्माचे अंगीं जीविता ॥ जीवासि ब्रह्मसायुज्यता ॥ त्या कपटाचा मीचि कर्ता ॥ देतां देवतां अतर्क्य ॥ ३९ ॥ आह्मी मायानियंते ह्मणविती ॥ तो शिव ठकिला मोहिनीप्रती ॥ ब्रह्मा ठकिला वत्सहरणार्थीं ॥ ठकडा निश्चितीं मी एक ॥ २४० ॥ सहनशीळीं सहनशक्ती ॥ ते मी ह्मणे कमळापती ॥ सात्विकांची निज सत्ववृत्ती ॥ ते मी श्रीपती स्वयें ह्मणे ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ ओजःसहोबलवतां कर्माहं विद्धि सात्वताम् ॥ सात्वतां नवमूर्तीनामादिमूर्तिरहं परः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ बळवंतांच्या ठायीं बळ ॥ मनोबळ शरीरबळ ॥ धैर्यबळ तें मी गोपाळ ॥ जेणें आळमाळ डंडळिना ॥ ४२ ॥ भक्तांच्याठायीं ※भजन कर्म ॥ जेणें माझें अनिवार ×प्रेम ॥ तें कर्म ह्मणे मी पुरुषोत्तम ॥ भक्तकामनिर्दळणू ॥ ४३ ॥ नवव्यूह अर्चनस्थितीं ॥ सात्वता ज्या नवमूर्ती ॥ त्यांत वासुदेव प्रथमास्थिती ॥ ऐक व्युत्पत्ती 7नवांची ॥ ४४ ॥ वासुदेव, संकर्षण, ॥ अनिरुद्ध आणि प्रद्युम्न ॥ हयग्रीव, नारायण ॥ वराह, वामन, नरसिंह ॥ ४५ ॥ हे नवव्यूहाची व्युत्पत्ती ॥ यांमाजीं मी प्रथम मूर्ती ॥ येर आठही माझ्या विभूती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४६ ॥ हयग्रीव वेदमूर्ती ॥ तेथें श्रीव्यासें करूनि भक्ती ॥ वेदव्यासपद प्राप्ती ॥ हे केली ख्याती तिहीं लोकीं ॥ ४७ ॥ नारायण निजमूर्ती ॥ 3श्रद्धेनें करूनि त्याची भक्ती ॥ 6चतुःश्लोकींची ज्ञानस्थिती ॥ पावोन निश्चितीं ब्रह्मत्वा आला ॥ ४८ ॥ श्वेतवराह महामूर्ती ॥ धरेनें केली पूर्ण भक्ती ॥ तीस उद्धरूनि कृपामूर्ती ॥ अभिनव शांती अर्पिली ॥ ४९ ॥ माझी निजमूर्ति वामन ॥ देवीं करूनि पूर्ण भजन ॥ त्यांच्या छळें बळी बांधोन ॥ देवांचा सन्मान स्वाधिकारी केला ॥ २५० ॥ नरहरी दिव्यमूर्ती ॥ प्रह्लादाचे अनन्यभक्ती ॥ मी सर्वात्मा सर्वांभूतीं ॥ हे लोकप्रतीती विश्वासिली जेणें ॥ ५१ ॥ संकर्षण श्रेष्ठ मूर्ती ॥ 2ब्रह्माज्ञा रेवतें करूनी भक्ती ॥ अर्पूनियां रेवती ॥ स्वानंदस्थितीं निवाला ॥ ५२ ॥ प्रद्युम्न काममूर्ती ॥ सकाम कामुकीं करूनियां भक्ती ॥ जे जे काम वांछिती ॥ ते ते निश्चितीं तो पुरवी ॥ ५३ ॥ अनिरुद्ध माझा निजसखा ॥ शिवाज्ञा भक्ती केली उखा ॥ बाणासुर तारिला देखा ॥ सात्य चित्ररेखा नारदाज्ञा ॥ ५४ ॥ पूर्णांशें ब्रह्मस्थिती ॥ वासुदेव मी आदिमूर्ती ॥ लीलेनें तारिले नेणों

१ व्यापाऱ्यांची. २ फसविणारा. ३ भागवतांच्या. ४ पृथ्वीनें. ५ निमित्तानें.

*मो. चांग. +ना. ब्रह्मया. ※ना. निजधर्म. ×ना. कर्म. 7ना. नांवांची 3ना. मो. श्रद्धेनें. 6मो. चतुःश्लोकी विज्ञानप्राप्ती. 2मो. ब्रह्मज्ञानें केली भक्ती.

किती ॥ तेथील निजभक्ती उद्धवार्जुनीं नांदे ॥ ५५ ॥ नव भक्त नव मूर्ती ॥ तेथील भक्तीची निज स्थिती ॥ उद्धवा म्यां तुजप्रती ॥ यथानिगुती सांगीतली ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ विश्वावसुः पूर्वचित्तिर्गंधर्वाप्सरसामहम् ॥ भूधराणामहं स्थैर्यं गंधमात्रमहं भुवः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ ज्याचें गायन अतिअपूर्व ॥ जो विश्वावसु गंधर्व ॥ तो मी ह्मणे माधव ॥ ऐक उद्धवा सावध ॥ ५७ ॥ नृत्य करूनि मनोहरा ॥ सवाल्य सद्भावें सुंदरा ॥ *पूर्वचित्ती जे अप्सरा ॥ ते मी ह्मणे नोवरा भीमकीचा ॥ ५८ ॥ पर्वतांमाजीं जें स्थैर्यपण ॥ तें मी ह्मणे नारायण ॥ पृथ्वीमाजीं जो गंध जाण ॥ तो मी श्रीकृष्ण स्वयें ह्मणे ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ अपां रसश्च परमस्तेजिष्ठानां विभावसुः ॥ प्रभा सुर्येंदुताराणां शब्दोऽहं नभसः परः ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ उदकाच्याठायीं रस सुरस ॥ तो मी ह्मणे श्रीनिवास ॥ तेजिष्ठांमाजीं जो प्रकाश ॥ तो मी निजतेजस्स उद्धवा ॥२६०॥ चंद्रसूर्यतारांच्याठायीं ॥ जें तेज तें माझें पाहीं ॥ अनाहत शब्द तो मीही ॥ जो गगनासि कहीं नातळे ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मण्यानां बलिरहं वीराणामहमर्जुनः ॥ भूतानां स्थितिरुत्पत्तिरहं वै प्रतिसंक्रमः ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ ब्राह्मणभजनीं बळीची थोरी ॥ तो मी कृष्ण ह्मणे निर्धारीं ॥ ब्राह्मणभजन प्रतापें करी ॥ मी बळीच्या द्वारी द्वारपाळ ॥ ६२ ॥ नरावतार अतिसंपन्न ॥ पांडवांमाजीं वीर अर्जुन ॥ तो मी ह्मणे नारायण ॥ जीवप्राण तो माझा ॥ ६३ ॥ भूतांची उत्पत्तिस्थिती ॥ ते मी ह्मणे श्रीपती ॥ भूतांसि जे प्रळयगती ॥ तेही मी निश्चितीं उद्धवा ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ गत्युक्त्युत्सर्गोपादानमानंदस्पर्शलक्षणम् ॥ आस्वादश्रुत्यवघ्राणमहं सर्वेंद्रियेंद्रियम् ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ ज्ञानकर्म उभय इंद्रियें ॥ त्या इंद्रियांचें मी इंद्रिय पाहे ॥ त्यांची क्रिया जे जे आहे ॥ ते माझेनि होये अभिव्यक्त ॥ ६५ ॥ गति, ग्रहण, गमन, ॥ उत्सर्ग, आणि मोहन, ॥ दर्शन; स्पर्शन, घ्राण, ॥ श्रवण, स्वादन, माझेनी ॥ ६६ तें इंद्रियक्रियेचें ‡चलन ॥ तिळभरी नव्हे मजवीण ॥ ऐक त्याचेंही लक्षण ॥ तुज मी संपूर्ण सांगेन ॥ ६७॥ मी मनाचेंही महामन ॥ नयनाचेंही नयन ॥ स्पर्शाचेंही स्पर्शन ॥ जिह्वेची जाण निजजिह्वा ॥ ६८ ॥ मी घ्राणाचेंही निजघ्राण ॥ श्रवणाचें आदिश्रवण ॥ ग्रहणाचें निजग्रहण ॥ गतीची जाण मी गती ॥ ६९ ॥ मी आनंदाचा आनंद ॥ मी बुद्धीचाही प्रबोध ॥ सकळइंद्रियांचा +स्वाद ॥ तो मी मुकुंद उद्धवा ॥ २७० ॥ मी वाचेची वाचा सावकाश ॥ मी परेचाही परेश ॥ सकळ इंद्रियांचा मी ईश ॥ यालागीं हृषीकेश नांव माझें ॥ ७१ ॥

---

१ अप्सरेचें नांव. २ स्वाद. ३ कृष्ण. ४ तेजस्वी प्राण्यांत. ५ प्रकाश. ६ परावाचेचा.
*मो. ऊर्वशी. ‡ना. लक्षण. +ना. विषयस्वाद.

॥ श्लोक ॥ पृथिवी वायुराकाश आपो ज्योतिरहं महान् ॥ विकारः पुरुषोऽव्यक्तं रजः सत्वं तमः परम् ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ तत्त्वसंख्या पंचवीस ॥ त्रिगुण घालितां अठ्ठावीस ॥ ऐक त्यांचाही विलास ॥ सावकाश सांगेन ॥ ७२ ॥ अहं महत्तत्त्व पंचतन्मात्रा ॥ हा स्थूळ प्रकृतीचा उभारा ॥ महाभूतेंद्रियें अकरा ॥ हे षोडशविकारांची संख्या ॥ ७३ ॥ यांत मिळाल्या प्रकृतिपुरुष ॥ तत्त्वसंख्या पंचवीस ॥ प्रकृतीमाजीं गुणांचा वास ॥ हा तत्त्वविलास तत्त्वांचा ॥ ७४ ॥ प्रकृति गुणविकार ॥ तत्त्वसंख्या निर्धार ॥ हा म्यां सांगीतला जो *विचार ॥ +तें परात्पर स्वरूप माझें ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ अहमेतत्प्रसंख्यानं ज्ञानं तत्त्वविनिश्चयः ॥ मयेश्वरेण जीवेन गुणेन गुणिना विना ॥ सर्वात्मनाऽपि सर्वेण न भावो विद्यते क्वचित् ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ एवं पंचवीसतत्त्वसंख्यान ॥ तें अवघें मीचि जाण ॥ या गणण्याचें ×गणितज्ञान ॥ तेंही मी आपण ह्मणे देवो ॥ ७६ ॥ हेंही जाणतें जें लक्षण ॥ तेंही देवो ह्मणे मी आपण ॥ मजवेगळा अणुप्रमाण ॥ सर्वथा जाण असेना ॥ ७७ ॥ जीव आणि ईश्वर ॥ गुणी आणि गुणावतार ॥ क्षेत्रक्षेत्रज्ञ निर्धार ॥ सर्वही साचार मीचि मी ॥ ७८ ॥ मजवेगळें अणुमात्र ॥ ³उरलें नाहीं गा स्वतंत्र ॥ ⁴मी सर्वात्मा सर्वत्र ॥ केवळ चिन्मात्र तेंही मी ॥ ७९ ॥ मजवेगळें येथ कांहीं ॥ उद्धवा गा उरलें नाहीं ॥ सर्वसाधारण पाहीं ॥ सर्वदेहीं असें मी ॥ २८० ॥ उद्धवा ऐसें ह्मणसी कांहीं ॥ संक्षेपू न करावा पाहीं ॥ विस्तारु न चले येठायीं ॥ ऐक तेंही सांगेन ॥ ८१ ॥

॥ श्लोक ॥ संख्यानं परमाणूनां कालेन क्रियते मया ॥ न तथा मे विभूतीनां सृजतोऽडानि कोटिशः ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ पृथ्वीचिया परमाणुकणां ॥ मी काळरूपें करीं गणना ॥ परी विभूति संख्या प्रमाणा ॥ माझेनिही जाणा न गणवती ॥ ८२ ॥ म्यां सजिले अनंत ब्रह्मगोळ ॥ ते मज गणवतीना सकळ ॥ मा विभूति माझ्या केवळ ॥ कोण तोंडाळ गणूं शके ॥ ८३ ॥ मी सर्वज्ञ श्रीनारायण ॥ माझ्या विभूति मज जाण ॥ गणावया नाहीं आंगवण ॥ मा निरूपण केवीं सांगें ॥ ८४ ॥ मनुष्यांमाजीं माझी विभूति ॥ नांदतसे कोणे स्थितीं ॥ ते ऱ्हण सांगेन तुजप्रती ॥ ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ तेजःश्रीःकीर्तिरैश्वर्यं ह्रीस्त्यागः सौभगः भगः ॥ वीर्यं तितिक्षा विज्ञानं यत्र यत्र स मेंऽशकः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ ज्याची प्रबळ प्रतापशक्ती ॥ जेथ निरंतर लक्ष्मीची वस्ती ॥ ज्यासि मर्यादा नाहीं संपत्ती ॥ ज्याची उदारकीर्ती स्वधर्में ॥ ८६ ॥ ज्याच्या ऐश्वर्याची परमगती ॥ आज्ञेवरी नेमी त्रिजगती ॥ ज्याची ⁵अनुप्रवर्ते दानस्थिती ॥ जेथ भाग्याची उत्पत्ती नीच नवी

१ विस्तार. २ शरीर व आत्मा. ३ वाचाळ. ४ सामर्थ्य.

*मो. विस्तार. +ना. तें अपरांपर स्वरूप माझें. ×ना. अगणित. ³ना. आलें. ⁴ना परमात्मा सर्वीं सर्वत्र. ⁵ना. अन्नवस्त्र.

दिसे ॥ ८७ ॥ ज्याचें सामर्थ्य अतिदुर्धर ॥ कोणी बोलों शकेना उत्तर ॥ ज्याचें सौभाग्य मनोहर ॥ आल्हादकर जननयनां ॥ ८८ ॥ ज्यासि सहनशीळतेची वोज ॥ ज्यासि निंद्यकर्माची लाज ॥ जो विज्ञानाचें भोज ॥ सहजेंचि निज नाचत ॥ ८९ ॥ इयें लक्षणें जेथ वर्तती ॥ तो जाण माझी विभूती ॥ यांत एका लक्षणाची जेथ प्राप्ती ॥ तेही विभूती पैं माझी ॥ २९० ॥

॥ श्लोक ॥ एतास्ते कीर्तिताः सर्वाः संक्षेपेण विभूतयः ॥ मनोविकारा एवैते यथा वाचाऽभिधीयते ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ केवळ संकोच संक्षेपस्थितीं ॥ म्यां सांगीतल्या ज्या विभूती ॥ त्या मनोविकार प्रतीती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९१ ॥ साधकाची साधनस्थितीं ॥ सत्य जाणाव्या माझ्या विभूती ॥ विचारितां परमार्थगती ॥ तरी कल्पिती या मनोजन्या ॥ ९२ ॥ माझें स्वरूप अद्वैत जाण ॥ नाहीं नाम रूप गुण वर्ण ॥ तेथें नाना विभूतिलक्षण ॥ मिथ्या जाण वाचिक ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ वाचं यच्छ मनो यच्छ प्राणान् यच्छेंद्रियाणि च ॥ आत्मानमात्मना यच्छ न भूयः कल्पसेऽध्वने ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ माझें स्वरूप नित्य निर्विकार ॥ मनबुद्धिवाचा न कळे पार ॥ तेथ बापुडीं इंद्रियें किंकर ॥ प्राणनिर्धार तें नेणे ॥ ९४ ॥ यालागीं शमदमांच्या अनुक्रमीं ॥ मनबुद्धियें वाचा नेमी ॥ प्राण नेमूनि प्राणधर्मीं ॥ आत्मारामीं पावशी ॥ ९५ ॥ मनबुद्ध्यादिइंद्रियनेम ॥ करावयाचें न कळे वर्म ॥ ह्मणशी तरी तो अनुक्रम ॥ ऐक सुगम सांगेन ॥ ९६ ॥ वाचा नेमावी माझेनि नामें ॥ मन नेमावें ध्यानसंभ्रमें ॥ प्राण नेमावा प्राणायामें ॥ इंद्रियें दमें नेमावीं ॥९७॥ बुद्धि नेमावी आत्मविवेकें ॥ जीव नेमावा परमात्मसुखें ॥ इतकेन तूं आवश्यकें ॥ होशी कौतुकें मद्रूप ॥९८॥ मद्रूप झालियापाठीं ॥ मग संसार न पडे दिठीं ॥ खुंटल्या जन्ममरणांचिया गोठी ॥ गमनागमन आटाआटी निमाली ॥ ९९ ॥ म्यां सांगीतल्या नेमपरिपाठीं ॥ हा नेम करणें नाहीं ज्याच्या पोटीं ॥ तो भोगी दुःखांचिया कोटी ॥ ऐक ते गोठी सांगेन ॥ ३०० ॥

॥ श्लोक ॥ यो वै वाङ्मनसी सम्यगसंयच्छन् धिया यतिः ॥ तस्य व्रतं तपो दानं स्रवत्यामघटांबुवत् ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ म्यां सांगीतल्या नेमाचे निगुतीं ॥ मनबुद्धिइंद्रियपंक्ती ॥ जो नेमीना साक्षेपस्थिती ॥ त्याचीं साधनें होती नश्वर ॥ १ ॥ त्याचें व्रत तप दान ॥ योग याग शब्दज्ञान ॥ *कांचेचे भांड्यांतील जीवन ॥ तैशीं जाण नासती ॥ २ ॥ जेवीं राखेमाजीं केला होम ॥ कां अशौचें आचरला कर्म ॥ कुपात्रीं दानधर्म ॥ तैसा संभ्रम साधनाचा ॥ ३ ॥ ऊंदरीं पेरिलें

१ सौंदर्य. २ ही. ३ मनःकल्पित. ४ जीवात्मा व परमात्मा यांच्या विचारानें. ५ कच्च्या भांड्यांतलें. ६ अपवित्र असतां. ७ खंडकोळ भूमीवर.

*मो. काचभांडां जेवीं जीवन.

बीज ॥ कां गोळेकें आवंतिलें द्विज ॥ डोहळ्याचे सोहळे भोगी वांझ ॥ तैशी वोज साधना ॥ ४ ॥ यापरी गा निश्चितीं ॥ विधियुक्त नेम नाहीं चित्तीं ॥ त्याचीं साधनें वृथा जाती ॥ हातोहातीं उद्धवा ॥ ५ ॥ यालागीं मनादि इंद्रियवृत्ती ॥ नेमाव्या यथानिगुतीं ॥ हेंचि उद्धवाप्रती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ तस्मान्मनोवचःप्राणान् नियच्छेन्मत्परायणः ॥ मद्भक्तियुक्तया बुद्ध्या ततः परिसमाप्यते ॥ ४४ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥

॥ टीका ॥ मन बुद्धि इंद्रिय प्राण ॥ अवश्य नेमावीं गा जाण ॥ वृत्ति करोनि सावधान ॥ माझें भजन जो करी ॥७॥ भावें करितां माझी भक्ती ॥ विषयवासना जळोनि जाती ॥ निर्विकल्प उपजे शांती ॥ माझे भक्तिपंथीं चालतां ॥८॥ चालतां माझे भक्तिपंथीं॥सकळ साधनें लाजोनि जाती ॥ भावें प्रकटे मी श्रीपती ॥ करीं संसारनिवृत्ती निजभक्तां ॥९॥ होका माझिया निजभक्तां॥ संसारबाधेची व्यथा॥ते लाज मज भगवंता॥गांजूं निजभक्तां मी नेदीं ॥३१०॥ प्रह्लाद गांजितां जगजेठी ॥ मी प्रकटलों कोरडे काष्ठीं॥ वैकुंठ सांडूनि उठाउठीं ॥ गजेंद्रासाठीं पावलों ॥११॥द्रौपदी गांजितां तत्काळीं॥त्यां कौरवांचीं तोंडें केलीं काळीं॥अग्नीनें गांजितां गोवळीं॥ त्यां प्राशिला तेकाळीं दावाग्नी ॥ १२ ॥ गोकुळ गांजितां सुरपतीं ॥ त्यां गोवर्धन धरिला हातीं ॥ कीं गोपिकांची पुरवावया आर्ती ॥ मी झालों श्रीपती कामारा ॥ १३ ॥ अर्जुनप्रतिज्ञेचे प्राप्ती ॥ त्या दिवसां लपविला गभस्ती॥लावूनि जयद्रथासि ख्याती ॥ सुभद्रापति वांचविला ॥ १४ ॥ अंबरूषीचे गर्भवास ॥ त्यांचि सोसिले सावकाश ॥ उणें आपुल्या निजभक्तांस ॥ मी हृषीकेश येवोंनेदीं ॥ १५ ॥ भक्तांचे पायींची माती ॥ मी हृदयीं वाहें श्रीपती ॥ वानरें वनचरें भावार्थी ॥ ×त्यां आपुले पंक्ती बैसविलीं ॥ १६ ॥ यालागीं उद्धवा पुढतपुढती ॥ मी सांगें करावी माझी भक्ती ॥ माझे भक्त माझी प्राप्ती ॥ अवलीला पावती मद्भावें ॥ १७ ॥ मद्भावें करितां माझी भक्ती॥मी अनंत आतुडें त्यांच्याहातीं॥शेवीं कामारा होय भक्तांप्रती ॥ भक्तीची प्रीती मज ऐशी ॥ १८ ॥ माझिये भक्तीपरतें ॥ सुगम साधन नाहीं येथें ॥ हेंचि जाणोनि त्यां तूतें ॥ भजनपंथें लाविलें ॥ १९ ॥ लागलिया माझी सद्भक्ती ॥ तें संसार बापुडें तें तें किती ॥ हेळसून चारी मुक्ती ॥ निजसुख भोगिती मद्भक्त ॥ ३२० ॥ मद्भक्तांचें महिमान ॥ अतिशयें अगम्य गहन ॥ ऐसें बोलूनियां श्रीकृष्ण ॥ उद्धवासि जाण कुरवाळी ॥ २१ ॥ तेणें कृष्णकराग्रस्पर्शें ॥ उद्धवासि झालें कैसें ॥ व्यालें धेनूचेनि वोरसें ॥ वत्स जैसें उल्हासे ॥ २२ ॥ जेवीं कां लागतां चंद्रकर ॥ सबाह्य निवों लागे चकोर ॥ मेघ देखोनि मयूर ॥ नृत्यतत्पर स्वानंदें ॥२३॥ यापरी उद्धव जाण ॥ स्वानंदें झाला परिपूर्ण ॥ विसरला देवभक्तपण ॥ कृष्णही कृष्णपण विसरला ॥ २४ ॥ यापरी भक्तिसुखाआंत ॥ दोघेही ऐक्यें झाले उन्मत्त ॥ परमानंदाचा तेथ॥ धेंडा नाचत स्वानंदें ॥ २५ ॥ यापरी सुखाची गोडी ॥ भाग्येंवीण नक-

१ रंडापुत्र. २ भोजनास सांगितला. ३ गोपाळ. ४ इंद्रानें. ५ इच्छा. ६ कामकरी, दास. ७ नियम. ८ पश्चात. ९ अव्हेरून. १० व्यालेल्या गाईच्या पान्हा सोडण्यानें.

ळें फुडी ॥ उद्धवभजनाचे कुळवाडी ॥जोडला जोडी श्रीकृष्ण ॥२६॥ एका जनार्दना शरण ॥ भजनसुखाची उणखुण ॥ तो एक जाणे संपूर्ण ॥ भक्तिजीवन जिव्हाळा ॥ २७ ॥ जो निज-भक्तांचा जिव्हाळा ॥ तो गोकुळीं होऊनि गोंवळा ॥ क्रीडोनि त्यांचिया खेळमेळा ॥ गोपी गोपाळां उद्धरिलें ॥ २८ ॥ स्वयें खेळोनि त्यांसी खेळा ॥ उद्धरिलें गोपाळां ॥ हें नवल नव्हे त्याची कळा ॥ उदार लीला ते ऐका ॥ २९ ॥ पर्वत पाषाण तृण तरुवर ॥ भृंग मत्स्य मृग मगर ॥ व्याघ्र वनचर विखार ॥ पारापैते मयूर आदिकरून ॥३३०॥ येणेंसी समवेत ॥ गोकुळींचे जीव समस्त ॥ स्वयें उद्धरी श्रीकृष्णनाथ ॥ कृपाळू समर्थ स्वलीला ॥ ३१ ॥ कां पितृवचन पुढारां ॥ सीतेचिया वियोगद्वारां ॥ रीसां आणि वानरां ॥ उद्धरी निशाचरां रघुनाथ ॥ ३२ ॥ सेवेनें तरले रीसवानर ॥ युद्धें तारिले निशाचर ॥ हें नवल कांहीं नव्हें थोर ॥ ऐक उदार लीला त्याची ॥ ३३ ॥ अयोध्येपासून लंकेपर्यंत ॥ मार्गीं वृक्षवल्ली पाषाण पर्वत ॥ तृणादि जीव समस्त॥उद्धरी रघुनाथ स्वलीला॥३४॥ एवं नानावतारीं जनार्दन॥ यापरीं उद्धरी सकळ जन ॥ तेणें एका एक केला पावन ॥ हें नवल कोण मानावें ॥ ३५ ॥ परी नवल एक केलें मोठें ॥ मज मूर्खाचेही मुखावाटें ॥ श्रीभागवत बोलविलें मराठें ॥ हें आश्चर्य वाटे माझें-चि मज ॥ ३६ ॥ यालागीं एका जनार्दना शरण ॥ ज्याची कृपा ऐशी परिपूर्ण ॥ त्याचे स्मरोनि श्रीचरण ॥ केला संपूर्ण सोळावा ॥ ३३७ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां विभूतियोगो नाम षोडशोऽध्यायः ॥१६॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीविठ्ठलार्पणमस्तु ॥ श्लोकसंख्या ॥ ४४ ॥ ओंव्या ॥३३७॥ एकूणसंख्या ॥३८१॥

---

# अध्याय सतरावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐनमो श्रीसद्गुरु महामेरू ॥ सूक्ष्मरूपें तूं गिरिवरू ॥ चैतन्यस्वभावें अतिथोरू ॥ तूं आधारू सर्वांचा ॥१॥ तुझ्या निजबोधाचीं शिखरें ॥ वैकुंठकैलासादि अतिथोरें ॥ तेथें ब्रह्माविष्णुमहारुद्रें ॥ तुझेनि आधारें नांदिजे ॥ २ ॥ तुझिया आधारस्थितीं ॥ नांदती त्रैलोक्यं लोकपंक्ती ॥ सकळभूतांची उत्पत्ति स्थिती ॥ निदान अंतीं तुजमाजीं ॥३॥ सुरासुर लहान थोर ॥ एक सौम्य एक क्रूर ॥ इयें भूतें धरूनि निर्विकार ॥ स्वरूप साचार पैं तुझें ॥४॥ तेथ विवेकाचें आगर॥ सच्चिदानंदाचे रत्नाकर ॥ जेथील लायल्या कंकर ॥ नीच ते थोर वेव्हारे होती ॥ ५ ॥ ज्याच्या औषधीचा चमत्कार ॥ सेवितां करीत अजरामर ॥ जेथ चिद्‌गंगेचे निर्झर ॥ निरंतर प्रवाहती ॥ ६ ॥ जो सुरनरांचा विश्राम ॥ जो सकळआश्रमांचा आश्रम॥जो क्रियाकर्माचें नैष्कर्म्य॥जो निजधाम जीवांचें॥७॥जो *भजनाची कुळवाडी ॥ जो भक्तजीवनाची वाडी ॥ जो आवडीची निजआवडी ॥ जो गोडियेची गोडी +निजात्मता ॥ ८ ॥ ऐसा सद्‌गुरु महामेरू ॥ जो कठिणत्वेंवीण आधारू ॥ ज्याचेनि अंग

१ उद्यमानें. २ खेळानें. ३ पारवे. ४ निमित्तानें. ५ जांबवान् इत्यादि अस्वलांस. ६ राक्षसांस. ७ आत्मज्ञानाचीं. ८ दगड. ९ व्यापारी, सावकार. १० झरे.

*ना. भाविकजनाची. +मो. निजात्मा.

संसारू ॥ होय सुखकरू साधकां ॥ ९ ॥ त्या साधकांचें समाधान ॥ शिष्याचा स्वानंदघन ॥ आर्त चातका निजजीवन ॥ स्वामी जनार्दन तुष्टला ॥ १० ॥ तयाचा जो चरणप्रसाद ॥ श्रीभागवतीं एकादशस्कंध ॥ पूर्वार्धाचा विनोद ॥ भाषाप्रबंधू वाखाणिला ॥ ११ ॥ तेथें उद्धवें पुशिल्या विभूती ॥त्या षोडशाध्यायीं श्रीपती ॥सांगीतल्या यथानिगुतीं ॥ भजनास्थितीलागोनी ॥ १२ ॥ त्या विभूतींमाजीं निजवर्म ॥ भक्तांचें जें भजनकर्म ॥ तें मी केवळ आत्माराम ॥ ऐसें पुरुषोत्तम बोलिला ॥ १३ ॥ तेथ आशंकेची व्युत्पत्ती ॥ करितां कर्माची कर्मगती ॥ कर्मठ जाहले नेणों किती ॥ तरी 'कर्में मुक्ती घडे केवीं' ॥ १४ ॥ कर्में करितां वाडेंकोडें ॥ कर्मीं कर्मठता न चढे ॥ कर्मामाजीं मोक्ष आतुडे ॥ हेंचि रोकडें पुसों पां ॥ १५ ॥ स्वयें बोलिला श्रीपती ॥ [१]सात्वतांची जे कर्मस्थिती ॥ तें कर्मचि माझी विभूती ॥ हें सोळाव्याअंतीं निरूपिलें ॥ १६ ॥ स्वयें आचरितां स्वकर्म ॥ तें कर्मचि होय ब्रह्म ॥ हेंचि कर्मक्रियेचें वर्म ॥ देवासि सुगम पुसों पां ॥१७॥ ऐसा पोटींचा [२]आवांका ॥ तेचि पुसावया [१]आशंका ॥ वर्णाश्रमधर्मपीठिका ॥ देवासि देखा पुसत ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ यस्त्वयाऽभिहितः पूर्वं धर्मस्त्वद्भक्तिलक्षणः ॥ वर्णाश्रमाचारवतां सर्वेषां द्विपदामपि ॥ १ ॥

॥ टीका ॥ उद्धव ह्मणे गा भक्तपती ॥ ऐकतां तुझ्या निजविभूती ॥ मज ऐसें गमलें चित्तीं ॥ स्वधर्मेंसी भक्ती घडे केवीं ॥ १९ ॥ तुवां कल्पादि वाडेंकोडें ॥ स्वधर्मकर्में भक्ति जोडे ॥ हें वर्णाश्रम निजनिवाडें ॥ निरूपण चोखडें निरूपिलें ॥ २० ॥ सर्वां मानवां परम गती ॥ स्वधर्में घडे भगवद्भक्ती ॥ या निरूपणाची निगुती ॥ तुवां निश्चितीं निरूपिली ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ यथाऽनुष्ठीयमानेन त्वयि भक्तिर्नृणां भवेत् ॥ स्वधर्मेणाऽरविंदाक्ष तत्समाख्यातुमर्हसि ॥ २ ॥

॥ टीका ॥ ऐकें कमलनयना अच्युता ॥ जो कां स्वधर्म अनुष्ठितां ॥ तुझी भक्ति स्वभावतां ॥ प्राण्याच्या हातां [४]जेणें लाभे ॥ २२ ॥ ते कर्मकुशलतेची स्थिती ॥ मज सांगावी सुनिश्चितीं ॥ कमलनयना कमलापती ॥ कृपामूर्ती माधवा ॥ २३ ॥ तूं ऐसें ह्मणशील श्रीपती ॥ म्यां कल्पाचे आदीं कवणाप्रती ॥ सांगीतली स्वधर्मस्थिती ॥ तरी ते विनंती अवधारीं ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ पुरा किल महाबाहो धर्मं परमकं प्रभो ॥ यत्तेन हंसरूपेण ब्रह्मणेऽभ्यात्थ माधव ॥ ३ ॥

॥ टीका ॥ ज्याच्या बाहूचा प्रताप अद्भुत ॥ विश्वमर्यादा, धर्मसेतु ॥ राखोंजाणे यथास्थित ॥ यालागीं ह्मणिजेत महाबाहो ॥ २५ ॥ स्वधर्मकर्माचा द्योतकू ॥ अनादि वक्ता तूं एकू ॥ वर्णाश्रमादिविवेकू ॥ उपदेशकू तूं स्रष्ट्यांचा ॥ २६ ॥ पूर्वीं हंसरूपें सविस्तर ॥ बोलिलासि स्वध-

१ हेतु. २ परंपरा, हकीकत. ३ धर्मास पुलाप्रमाणें पार पडण्यास आश्रय. ४प्रकाशक. ५ ब्रह्मदेवाचा.

र्मांचा निर्धार ॥ त्यांतील तुवां अध्यात्मसार ॥ निवडूनि साचार मज सांगितलें ॥ २७॥ तेथील स्वधर्मांचें लक्षण ॥ मज नकळोचि निरूपण ॥ जें तूं हंसरूपें आपण ॥ स्वधर्म जाण बोलिलासी ॥ २८ ॥ तुझेनि मुखें यथोचितें ॥ भक्तियुक्त आश्रमधर्मातें ॥ सनत्कुमार जाहले श्रोते ॥ तेंचि मातें सांगावें ॥ २९ ॥ ह्मणशी सनत्कुमारद्वारा ॥ धर्म विस्तारला परंपरा ॥ *तेचि विस्तारूनि करी निर्धारा ॥ हें सारंगधरा घडेना ॥ ३० ॥

॥ श्लोक ॥ स इदानीं सुमहता कालेनामित्रकर्शन ॥ न प्रायो भविता मर्त्यलोके प्रागनुशासितः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ ॥ काम क्रोध लोभ अभिमान ॥ +हे भक्तांचे वैरी साहीजण ॥ त्यांचें तूं करिशी निर्दळण ॥ अरिमर्दन या हेतू ॥ ३१ ॥ भक्तांचें अरिनिर्दळण ॥ तुजवांचोनि कर्ता आन ॥ तिहीं लोकीं नाहीं जाण ॥ अनन्यशरण यालागीं ॥ ३२ ॥ तुवां कल्पाचिये आदीसी ॥ उपदेशिलें सनकादिकांसी ॥ बहुकाळ जाहले त्या बोलासी ॥ ते धर्म कोणापाशीं प्रायशां नाहीं ॥ ३३ ॥ प्रायशां ये काळीं नर ॥ नाहीं स्वधर्मी तत्पर ॥ शिश्नोदरीं अत्यादर ॥ स्वधर्मविचार विसरोनी ॥ ३४ ॥ यथातथ्यें धर्मप्रतिष्ठा ॥ करी ऐसा नाहीं उपदेष्टा ॥ यालागीं जी ×वैकुंठा ॥ स्वधर्म निजनिष्ठा मज सांग ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ वक्ता कर्ताऽविता नान्यो धर्मस्याच्युत ते भुवि ॥ सभायामपि वैरिंच्यां यत्र मूर्तिधराः कलाः ॥ ५ ॥ कर्त्राऽवित्रा प्रवक्त्रा च भवता मधुसूदन ॥ त्यक्ते महीतले देव विनष्टं कः प्रवक्ष्यति ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ॥ अलिप्तज्ञानें ⁰स्वधर्मवक्ता ॥ ये भूलोकीं गा तत्त्वतां ॥ तुजवांचोनि अच्युता ॥ आणिक सर्वथा असेना ॥३६॥ एक शास्त्रमर्यादाव्युत्पत्ती ॥ कर्मकलाप बोलों जाणती ॥ परी कर्माची आचरती गती ॥ तेही नेणती तत्त्वतां ॥ ३७ ॥ यालागीं गा भगवंता ॥ धर्माचा कर्ता वक्ता॥ धर्म विस्तारूनि रक्षिता ॥ आणिक सर्वथा असेना ॥३८॥ पहातां या लोकांच्याठायीं ॥ तुज ऐसा सर्वज्ञ नाहीं ॥ ऐसें विचारितां लोकीं तिहीं ॥ तुजसमान नाहीं सांगतां ॥ ३९ ॥ जरी सत्यलोक पाहणें ॥ तेथें चारी वेद षड्दर्शनें ॥ इतिहास स्मृति पुराणें ॥ मूर्तिमंतपणें उभीं असती ॥ ४० ॥ तेथें सनकादिकांचा प्रश्न ॥ ब्रह्मयासि न सांगवे जाण॥ तुवां हंसरूपें येऊन ॥ समाधान दीधलें ॥ ४१ ॥ ते ब्रह्मसभेच्या ठायीं ॥ *तुजऐसा वक्ता नाहीं ॥ तो तूं भक्तानुग्रहें पाहीं ॥ या लोकाच्याठायीं मूर्तिमंत ब्रह्म ॥ ४२ ॥ तेणें तुवां सर्व कर्मधर्मसंस्था ॥ करूनि दाविली तत्त्वतां ॥ तो तूं निजधामा गेलिया आतां ॥ स्वधर्मवक्ता मग कैंचा ॥ ४३ ॥ भक्तियुक्त स्वधर्म गती ॥ सांगावया यथास्थिती ॥ तुजवांचोनियां श्रीपती ॥ आणिकासि शक्ती असेना ॥४४॥ तूं भक्त साह्य जगज्जीवन ॥ भक्तमदगजभंजन ॥ यालागीं नांवें मधुसूदन ॥ ऐसें प्रार्थून बोलत ॥ ४५ ॥

---

१ आत्मज्ञानाचा सारांश. २ मैथून व भोजन यांविषयीं. ३ यथास्थित. ४ हे विष्णो. ५ स्पष्टज्ञानी. ६ सहा शास्त्रें. ७ स्थापना. ८ भक्तांचे अहंकाररूप हत्तीला मारणारा.

*मो. तो विचार करावा परंपरा. +मो. हेचि भक्तीसी वैरी साहीजण. ×मो. वैकुंठपीठा. ⁰मो. कर्ता. *मो. तुज ऐसा आन वक्ता नाहीं, तो या लोकाच्या ठायीं, मूर्तिमंत पाहीं तूं ब्रह्म.

॥ श्लोक ॥ तत्त्वं नः सर्वधर्मज्ञ धर्मस्त्वद्भक्तिलक्षणः ॥ यथा यस्य विधीयेत तथा वर्णय मे प्रभो ॥ ७ ॥

॥ टीका ॥ तूं सर्वज्ञ ज्ञानमूर्ती ॥ तरी मनुष्यांची कर्मगती ॥ वर्णाश्रमांची धर्मस्थिती ॥ यथानिगुतीं मज सांग ॥ ४६ ॥ वर्णबाह्याचें निजकर्म ॥ तोही सांगावा विहित धर्म ॥ उद्धवें प्रार्थिला पुरुषोत्तम ॥ तेणें मेघश्याम तुष्टला ॥ ४७ ॥ सकळ जनाचा हितकर ॥ उद्धवें प्रश्न केला सधर ॥ तो ऐकोनि शुकयोगींद्र ॥ आनंदनिर्भर तेणें प्रश्नें ॥ ४८ ॥ शुक ह्मणे परीक्षितीसी ॥ धन्य बुद्धी ते उद्धवासी ॥ जेणें प्रार्थूनि हृषीकेशी ॥ जाहला जगासी उपकारी ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ श्रीबादरायणिरुवाच ॥ इत्थं स्वभृत्यमुख्येन पृष्टः स भगवान्हरिः ॥ प्रीतः क्षेमाय मर्त्यानां धर्मानाह सनातनान् ॥ ८ ॥

॥ टीका ॥ शुक ह्मणे गा परीक्षिती ॥ सावधान होईं चित्तीं ॥ धन्य उद्धवाची प्रश्नोक्ती ॥ *स्वकर्में मुक्ती पुशिली ॥५०॥ जो भृत्यांमाजीं पढियंता ॥ अत्यंत आवडे कृष्णनाथा ॥ त्याविगळें श्रीअनंता ॥ क्षणही सर्वथा करमेना ॥ ५१ ॥ ज्यापाशीं गा निजगुज ॥ सदा सांगे गरुडध्वज ॥ ज्याविगळें +आप्तकाज ॥ अधोक्षज बोलेना ॥ ५२ ॥ ज्याच्या वचनासि विलंब ॥ क्षण न करीच रमावल्लभ ॥ जो ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ तो झाला सुलभ उद्धवा ॥ ५३ ॥ या जगीं भृत्यमुख्यता ॥ आली उद्धवाचे हातां ॥ तेणें प्रार्थूनियां भगवंता ॥ स्वकर्मे मुक्तता पुशिली ॥ ५४ ॥ होकां ज्याचेनि प्रश्नधर्में ॥ जग उद्धरे यथानुक्रमें ॥ यालागीं गा पुरुषोत्तमें ॥ मोक्षधर्म प्रकटिजे ॥ ५५ ॥ स्वधर्म करितां स्वभावतां ॥ निजमोक्ष लाभे आयिता ॥ एवढ्या उपकाराची कथा ॥ उद्धवें तत्त्वतां पुशिली ॥ ५६ ॥ ऐकोनि चातकाचें वचन ॥ गर्जोनि वर्षे जेवीं घन ॥ कां वत्सहुंकारें जाण ॥ ये हुंबरोन धेनु जैशी ॥ ५७ ॥ तेवीं ऐकोनि उद्धवाच्या बोला ॥ श्रीकृष्ण निजबोधें गर्जिन्नला ॥ अतिस्वानंदें संतोषला ॥ काय बोलिला गोविंद ॥ ५८ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ धर्म्य एष तव प्रश्नो नैःश्रेयसकरो नृणाम् ॥ वर्णाश्रमाचारवतां तमुद्धव निबोध मे ॥ ९ ॥

॥ टीका ॥ जेवीं कां पुत्र एकुलता ॥ त्यासी कांहीं वंचीना ×माता ॥ तेवीं उद्धव श्रीकृष्णनाथा ॥ त्याचें वचन वृथा होंनेदी ॥५९॥ हरिखें ह्मणे सारंगपाणी ॥ धन्य उद्धवा तुझी वाणी ॥ मोक्षमार्गांची निशाणी ॥ हे जनांलागोनी त्वां केली ॥ ६० ॥ तुझ्या प्रश्नाचें प्रश्नोत्तर ॥ वर्णाश्रमीं जे कोणी नर ॥ त्यांसि स्वधर्मचि मोक्षकर ॥ ऐक साचार सांगेन ॥ ६१ ॥ कल्पादिपासोनि स्वधर्मसंस्था ॥ पुरातनयुगवर्ती कथा ॥ तुज मी सांगेन तत्त्वतां ॥ ऐक आतां उद्धवा ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ आदौ कृतयुगे वर्णो नृणां हंस इति श्रुतः ॥ कृतकृत्याः प्रजा जात्या तस्मात्कृतयुगं विदुः ॥ १० ॥ वेदः प्रणव एवाग्रे धर्मोऽहं वृषरूपधृक् ॥ उपासते तपोनिष्ठा हंसं मां मुक्तकिल्बिषाः ॥ ११ ॥

---

१ सेवकांत, भक्तांत. २ भक्तांत मुख्यपणा. ३ श्रमावांचून. ४ गुप्त ठेवीत नाहीं. ५ मागील युगांतील.

*ना. स्वकर्मयुक्ती. +ना. आत्मकाज. ×मो. पिता.

॥ टीका ॥ पूर्वील कृतयुगींचें लक्षण ॥ तें नव्हते गा चारी वर्ण ॥ बहुशाखा वेदपठण ॥ कर्माचरण तें नाहीं ॥ ६३ ॥ तें सकळमनुष्यांसी जाण ॥ ' सोहंहंसाचें अखंड ध्यान ॥ यालागीं हंस हा एकचि वर्ण ॥ सर्वांसही जाण ते काळीं ॥ ६४ ॥ तें प्रणवमात्रें वेदपठण ॥ वृषरूपें मी आपण ॥ धर्म चतुष्पाद संपूर्ण ॥ अधर्माचें जाण नांवही नाहीं ॥६५॥ ते काळीं श्रेष्ठ सत्त्वगुण ॥ यालागीं सत्यवादी जन॥अवघे धर्मपरायण ॥ कपट तें जाण जन्मलें नाहीं ॥६६॥ परद्रव्य आणि परदारा ॥ यांच्या अभिलाषाचा थारा ॥ स्पर्शला नाहीं जिव्हारा ॥ ते काळींच्या नरां धर्मिष्ठां ॥६७॥ ते काळींच्या जनां धर्मिष्ठा ॥ सोहंहंसाची आत्मनिष्ठा ॥ हेंचि भजन मज वरिष्ठा ॥ तपोनिष्ठा तया नांव ॥ ६८ ॥ तें स्वर्गा जावें हे नाहीं कथा ॥ नेणती नरकाची वार्ता ॥ अधर्माची अवस्था ॥ स्वप्नींही चित्ता स्पर्शेना ॥ ६९ ॥ यापरी प्रजा समस्त ॥ *स्वधर्मस्वभावें कृतकृत्य ॥ यालागीं जाण निश्चित ॥ त्यातें बोलिजेत कृतयुग ॥ ७० ॥

॥ श्लोक ॥ त्रेतामुखे महाभाग प्राणान्मे हृदयात्त्रयी ॥ विद्या प्रादुरभूत्तस्या अहमासं त्रिवृन्मखः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ ॥ उद्धवा या कलियुगाच्याठायीं ॥ तुझ्या भाग्याची परम नवायी ॥ कृतयुगींच्या प्रजांपरीस पाहीं ॥ तुज माझ्याठायीं विश्वास ॥ ७१ ॥ त्रेतायुगीं प्रकटलें कर्म ॥ जो वैराज मी पुरुषोत्तम ॥ त्या माझेनि श्वासें त्रयीधर्म ॥ वेदसंभ्रम वाढला ॥ ७२ ॥ तेथ त्रैविद्या विविध भेद ॥ नाना मंत्र नाना छंद ॥ ऋग्वेदादि तिन्ही वेद ॥ प्रकटले प्रसिद्ध निजशाखीं ॥ ७३ ॥ त्या वेदांपासावो त्रिविध मख ॥ त्रिमेखलायुक्त मीचि देख ॥ जेथ होत आध्वर्योद्गात्रिकें ॥ ×कर्मविशेख जेठायीं ॥ ७४ ॥ ऐसें मद्रूपें यज्ञकर्म ॥ तेथिल्या अधिकाराचें वर्म ॥ दों श्लोकीं पुरुषोत्तम ॥ वर्णाश्रम सांगत ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ विप्रक्षत्रियविट्शूद्रा मुखबाहूरुपादजाः ॥ वैराजात्पुरुषाज्जाता य आत्माचारलक्षणाः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ वैराजपुरुषापासाव जाण ॥ मुखीं उपजले ब्राह्मण ॥ बाहुपासूनि राजन्य ॥ ऊरू जन्मस्थान वैश्याचें ॥ ७६ ॥ शूद्र चरणीं जन्मले जाण ॥ यापरी जाहले चारी वर्ण ॥ यांचें एक मुख्यलक्षण ॥ स्वधर्माचरण सर्वांशीं ॥ ७७ ॥ चतुर्वर्णांची उत्पत्ती ॥ वैराज पुरुषापासूनि यारीतीं ॥ आतां आश्रमांची स्थिती ॥ ऐक निश्चितीं सांगेन ॥ ७८ ॥

॥ श्लोक ॥ गृहाश्रमो जघनतो ब्रह्मचर्यं हृदो मम ॥ वक्षःस्थलाद्वने वासो न्यासः शीर्षणि संस्थितः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ गृहस्थाश्रमासी जघनस्थान ॥ ब्रह्मचर्य माझ्या हृदयीं जाण ॥ वानप्रस्थासी मी

---

१ अशा मंत्राचें. २ बैलरूपानें धर्म. ३ हृदयास. ४नवल, अपूर्वता. ५ विराड्रूपी. ६ श्वासोच्छ्वासानें. ७ वेदोक्त धर्म. ८ यज्ञ. ९ अध्वर्यूचें. १० होत्याचें कर्म. ११ क्षत्रिय. १२ मांड्या. १३ कमरेखालचा भाग. १४ स्त्रीबरोबर वनांत वास करणें.

*मो. स्वधर्मी स्वभावकृत. ×ना. निःशेख.

आपण ।। वाढवी महिमान वक्षःस्थळीं ॥७९॥ चतुर्थाश्रम जो संन्यास ॥ त्याचा माझे शिरीं राहिवास ॥ एवं वर्णाश्रमविलास ।। तुज सावकाश सांगीतला ॥ ८० ॥

|| श्लोक || वर्णानामाश्रमाणां च जन्मभूम्यनुसारिणीः || आसन्प्रकृतयो नृणां नीचैर्नीचोत्तमोत्तमैः || १५ ||

|| टीका || जैसें जन्म जैसें स्थान ॥ त्या वर्णाश्रमांमाजीं तैसे गुण ।। उत्तमीं उत्तमत्व जाण ॥ नीचीं नीचपण सहजची ॥ ८१ ॥ सत्वं[1]प्राधान्यें ब्राह्मण ॥ सत्वरजें क्षत्रिय जाण ॥ रजतमें वैश्यवर्ण ॥ शूद्र ते जाण तमोनिष्ठ ॥ ८२ ॥ तेचि ब्राह्मणादि चारी वर्ण ॥ त्यांचे प्रकृतींचें लक्षण ॥ वेगळें वेगळेंचि पैं जाण ॥ स्वयें नारायण सांगत ॥ ८३ ॥

|| श्लोक || शमो दमस्तपः शौचं संतोषः क्षांतिरार्जवम् || मद्भक्तिश्च दया सत्यं ब्रह्मप्रकृतयस्त्विमाः || १६ ||

।। टीका ॥ उद्धवासि ह्मणे श्रीकृष्ण ।। ब्राह्मणप्रकृति दशलक्षण ॥ तुज मी सांगेन निरूपण ॥ तें सावधान अवधारीं ॥ ८४ ॥ मनादिज्ञानेंद्रियवृत्ती ।। बाह्यदृष्टीं परिचारस्थिती ।। ते आवरूनि विवेकयुक्तीं ॥ आत्मप्रतीतीं [2]धरावी ॥ ८५ ॥ तेचि वृत्तीचें धरणें ऐसें ॥ कृष्णसर्पाचें मस्त धरणें जैसें ।। तो वेढे उकली जंव आपैसें ॥ तंव धारणासौरसें नेहटावा ॥ ८६ ॥ तेवीं वैराग्यप्रतापवशें ॥ गुरुवचनाचेनि विश्वासें ।। अंतरवृत्तीतें [3]नेहटावें ऐसें ॥ जंव ये आत्मसमरसें निजात्मता ॥ ८७ ॥ मुख्य करूनि गुरुवचन ॥ तदर्थी बुद्धि निमग्न ॥ तत्प्रवीण होय मन ।। शम तो जाण या नांव ॥ ८८ ॥ ब्राह्मणप्रकृतीमाजीं जाण ।। हें स्वाभाविक निजलक्षण ।। या नांव गा शमगुण ॥ ऐक निरूपण दमाचें ॥ ८९ ॥ *विषयवृत्ति प्रचंड ॥ कर्मेंद्रियांचें +बाह्य बंड ॥ विधीनें त्यांचें ठेंचूनि तोंड ॥ सैरा वितंड विचरोंनेदी ॥ ९० ॥ वेदविधीचेनि हातें ॥ देहनिर्वाहापुरतें ॥ खाणें जेवणें इंद्रियांतें ॥ तो जाण येथें दमगुण ॥९१॥ तेथ शम तो जाण मुख्य राजा ॥ दमादि इतर त्याच्या प्रजा ॥ ते दोनी सांगीतले वोजा ॥ ऐक [5]तिजा तपोनेम ॥ ९२ ॥ शमें ज्ञानेंद्रिय ×उपशम ॥ तेचि कर्मेंद्रियां मुख्य [6]दम ॥ याहीवरी वेदोक्त [8]कर्म ॥ तें ज्ञान परम गौरवाचें ॥ ९३ ॥ शरीरशोषणा नांव तप ॥ तें प्रारब्धभोगानुरूप ।। हृदयीं हरि चिंतणें सद्रूप ॥ हें मुख्य तप तपांमाजीं ॥ ९४ ॥ जो वर्ततां स्वधर्मस्थितीं ॥ हरीतें विसंबेना निजवृत्ती ।। जो निजात्मनिश्चयो चित्तीं ॥ अहोरात्रीं [7]विवंचित ॥ ९५ ॥ जेवीं लोभिया वाहे धन ॥ कां तरुणालागीं तरुणी जाण ॥ तैसें निजात्मविवंचन ॥ जयाचें मन सदा करी ॥ ९६ ॥ या नांव गा तपोनिष्ठ ।। हें तपांमाजीं तप वरिष्ठ ।। [3]ब्राह्मणप्रकृतीमाजीं श्रेष्ठ ।। तप तें [8]उद्भट या नांव ॥ ९७ ॥ ऐक शौचाचा विचार ।। तो आहे [9]द्विप्रकार ॥ अंतरीं ज्ञाननिर्धार ॥ बाह्य [2]आचार वेदोक्त ।। ९८ ॥ बाह्यमळाचें क्षाळण ॥ मृज-

१ सत्वगुणाच्या आधिक्यानें. २ हृदयकमलामध्यें, नासिकाग्रावर अथवा ग्राह्य मूर्ति आदिकांचे ठायीं चित्ताचें वृत्तिमात्रेंकरून जें बंधन, त्यास धारणा ह्मणतात. ३ यत्नानें, बलानें. ४ आवरावें. ५ तिसरा. ६ शरीरास कष्ट देणें यास. ७ आत्मविचार. ८ उत्कृष्ट. ९ दोन प्रकारचा. १० माती, पाणी इत्यादिकानें.

*ना. विविधप्रकृती प्रचंड. +ना. बळ. ×मो. उपशमन. 6मो. दमन. 8मो. कर्माचरण. 3मो. ब्राह्मणप्रतिमेसी श्रेष्ठ. 2ना. साचार.

लादि वेदविधान ॥ अंतरमळाचें निर्दळण ॥ आत्मज्ञानें निजनिष्ठा ॥ ९९ ॥ शुद्ध शौचाचें निर्मळपण ॥ मुख्यत्वें उद्धवा हेंचि जाण ॥ आतां संतोषाचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण सांगेन ॥१००॥ पुत्र जन्मल्या होय सुख ॥ तो गेलिया सवेंचि दुःख ॥ धन जोडलिया होय हरिख ॥ सवेंचि शोक तन्नाशीं ॥ १ ॥ ज्या सुखाची होतां भेटी ॥ निःशेष मावळे दुःखकोटी ॥ या नांव सत्य सुखसृष्टी ॥ इतर चावटी ते मिथ्या ॥ २ ॥ निरुपचार अंतरगती ॥ सद्भावें जे सुखप्राप्ती ॥ जाहलिया संपत्ती विपत्ती ॥ जे संतोषप्राप्ती समसाम्यें ॥ ३ ॥ येचि पदीं पाठां-तर ॥ तितिक्षा ह्मणती थोरथोर ॥ ऐक त्याचेंही अर्थांतर ॥ पदार्थविचार तो ऐक ॥ ४ ॥ शीत उष्ण मृदु कठिण ॥ अंगीं आदळतांही जाण ॥ ज्याचें डळमळीना मन ॥ भावना पूर्ण सद्भावें ॥५॥ संतोषतितिक्षाव्याख्यान ॥ हें पांचव्या पदाचें लक्षण ॥ उद्धवासि ह्मणे श्रीकृष्ण ॥ ऐक निरूपण शांतीचें ॥ ६ ॥ माझा निर्धारितां निजबोध ॥ अंतरीं निमाले काम क्रोध ॥ त्यांसी केलिया अपराध ॥ नमनी विरुद्ध पुढिलांचें ॥ ७ ॥ परी येथींची नवलपरी ॥ अप-कान्या होय उपकारी ॥ विकार नाहीं ज्याचे अंतरीं ॥ जाण ते खरी निजशांती ॥ ८ ॥ ऐशी सदा शांति संपूर्ण ॥ तें ब्राह्मणाचें षष्ठ लक्षण ॥ ऐक आर्जवाचें निरूपण ॥ जीवींची खूण सांगेन ॥ ९ ॥ कुरूप जरी जाहली माता ॥ परी स्नेहाशीं नाहीं कुरूपता ॥ कां सुवर्णाचे नाग करितां ॥ सोनें सर्वथा नव्हे सर्पू ॥११०॥ तेवीं कुटिलांसी कुटिलता ॥ करावी ह्मणोनि शिकवितां ॥ कुटिलत्व नुपजे चित्तां ॥ जाण तें तत्त्वतां आर्जव ॥ ११ ॥ गायीसी गोड व्याघ्रासी कडू ॥ हा गंगाजळीं नाहीं पवाडू ॥ तेवीं आर्जवाचा पडिपाडू ॥ विषमाही गोड समसाम्यें ॥ १२ ॥ या नांव जाण आर्जव ॥ सातवें लक्षण अपूर्व ॥ आजि निजभक्ती स्वभाव ॥ देवाधिदेव सांगत ॥ १३ ॥ वन उद्यानें गंगादि जीवन ॥ यांस पृथ्वी जेवीं अधिष्ठान ॥ तेवीं सकळलक्षणांचें जन्मस्थान ॥ माझी भक्ति जाण उद्धवा ॥ १४ ॥ सकळ पिकांचिये प्राप्ती ॥ आधारभूत जेवीं क्षिती ॥ तेवीं सकळलक्षणांची उत्पत्ती ॥ माझिये भक्तीमाझारीं ॥ १५ ॥ ऐक ते भक्तीचा इत्यर्थ ॥ 'सांडोनिया विषयस्वार्थ ॥ जीवेंहू-नि मजलागीं भावार्थ ॥ तो निजभक्त पैं माझा ' ॥ १६ ॥ भक्त आणी करी धनार्जन ॥ हेंचि भक्तीसि मुख्य विघ्न ॥ धनलोभी तो अभक्त पूर्ण ॥ सत्य जाण उद्धवा ॥ १७ ॥ माझा भाव नाहीं जिव्हारीं ॥ अँहाच वाहाच माझी भक्ति करी ॥ तो आंधळ्या गरुडाचे परी ॥ उडे परी निर्धारीं स्थान नेणे ॥१८॥ माझा भावार्थ जेथ होये ॥ तेथ मी जाती कुळ न पाहें ॥ मी भा-वाचेनि लवलाहें ॥ वश्य होयें निजभक्तां ॥ १९ ॥ जेथ भावार्थें माझी आवडी ॥ तेथ अवश्य माझी पडे उडी ॥ जेणें भावार्थाची उभविली गुढी ॥ तो जाणे गोडी मद्भजनाची ॥ १२० ॥ जें जें भेटे तोचि देवो ॥ *ऐसा भावार्थी ज्याचा भावो ॥ तो एक पढियंता मज पहाहो ॥ त्याचे भावें आह्मी जीवों उद्धवा ॥२१॥ तोचि माझा जीवप्राण ॥ त्यासि मी सर्वस्वें करीं निंब-लोण ॥ मी सर्वदा त्याआधीन ॥ जेवीं व्याली धेनु जाण वत्सासी ॥ २२ ॥ एवं ×निःसीम-भावार्थाची स्थिती ॥ त्या नांव उद्धवा माझी भक्ती ॥ यापरी भक्तीची व्युत्पत्ती ॥ ऐक पां

---

१ धनाच्यानाशानें. २ पाठभेद. ३ नाहींसे झाले. ४ अपराध करणाऱ्यावर. ५ विषमबुद्धि. ६ विरुद्धा-सही. ७ वाग. ८ सारांश. ९ असून. १० बाह्यात्कारी. ११ वेगानें, वलानें.

*मो. ऐसा भावार्थाचा सद्भावो. ×मो. एवं भावार्थाची निःसीम स्थिती.

ख्याती दयेची ॥ २३ ॥ बाळक देखोनि संकटीं ॥ जेवीं न सांवरत माय उठी ॥ तेवीं दीन देखोनि दृष्टीं ॥ ज्याचे पोटीं दया द्रवे ॥ २४ ॥ ऐशिया दयेच्याठायीं जाण ॥ आपुलें पारकें पुसे कोण ॥ स्वजातिविजातिलक्षण ॥ पुसावयाही पण धीर नाहीं ॥ २५ ॥ महापूरीं बुडत-यातें ॥ कृपाळु, ' जाती न पुसे ' तेथें ॥ उडी घालूनि वांचवी त्यातें ॥ दया निश्चित त्या नांव ॥ २६ ॥ दीनाचिये दयेलागीं ॥ जो रिघे जळत्या आगीं ॥ त्याचे चरण मी वंदीं वेगीं ॥ धन्य जगीं दयाळू ॥ २७ ॥ ऐशिये दयेचेनि गुणें ॥ मज अनंतालागीं तेणें ॥ विकत घेतलें जीवें प्राणें ॥ कीं जाहलों पोसणें मी त्याचें ॥ २८ ॥ यालागीं दयाळुवाचे घरीं ॥ मी सदा *नाटिकार कामारी ॥ दयावंतासी जे अवसरीं ॥ ते माझे शिरीं सर्वदा ॥ २९ ॥ जो जाणे दीनांचा विचार ॥ तो दीनदयाळु साचार ॥ उद्धवा तें माझें निजभांडार ॥ सुखाचें सुखसार तो माझें ॥ १३० ॥ या नांव गा दया जाण ॥ तें हें नववें लक्षण ॥ आतां सत्याची उणखुण ॥ तुज मी संपूर्ण सांगेन ॥ ३१ ॥ सत्याचें सत्यत्व हें ऐसें ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तिवशें ॥ ज्यासी असत्यता न स्पर्शे ॥ निज सत्य ऐसें निर्धारिलें ॥ ३२ ॥ +ऐसें सत्य परिपक्व झाल्यापोटीं ॥ सत्य वाचा, सत्य दृष्टी ॥ निजसत्यत्वें सत्य सृष्टी ॥ पडिली तुटी असत्याची ॥ ३३ ॥ यापरी गा सत्यत्व जाण ॥ त्या नांव दहावें लक्षण ॥ हें ब्राह्मणाचें संपूर्ण ॥ कर्माचरण स्वभावें ॥३४॥ ब्राह्मणप्रकृतीचे ×स्थिती ॥ या दक्षलक्षणांची 4उत्पत्ती ॥ स्वाभाविक सहजगती ॥ अक्रमित्र स्थिती उद्धवा ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ तेजो बलं धृतिः शौर्यं तितिक्षौदार्यमुद्यमः ॥ स्थैर्यं ब्रह्मण्यतैश्वर्यं क्षत्रप्रकृतयस्त्विमा ॥ १७ ॥

॥ टीका ॥ ॥ ब्राह्मणप्रकृति दशलक्षण ॥ तुज म्यां सांगीतली सुलक्षण ॥ आतां क्षात्रवृत्तीचे दशगुण ॥ ऐक संपूर्ण उद्धवा ॥३६॥ तेज म्हणजे प्रतापशक्ती ॥ जैसा क्षितितळींचा गभस्ती ॥ ज्याचिया प्रतापदीप्तीं ॥ लोपले जाती महींद्र ॥ ३७ ॥ क्षात्रधर्मी प्रथम काज ॥ तया नांव जाण तेज ॥ आतां क्षात्रबळाची वोज ॥ ऐक चोज सांगेन ॥ ३८ ॥ त्याच्या शरीरबळाचें कोडें ॥ एकला लक्षांवरी दे झडें ॥ जरी तुटला दुखडे ॥ तरी वैरियांचें तोंड त्रिभांडी ॥ ३९ ॥ रिघतां रणामाझारीं ॥ दुजयाचें सात्य न विचारी ॥ जेवीं वनगजीं केसरी ॥ तेवीं रिघोनि दळभारीं विभांडी वीर ॥ १४० ॥ आकाश दाटल्या निशाचरीं ॥ भूमंडळीं कोंदल्या असुरीं ॥ ऐसे प्रबळबळें आल्या वैरी ॥ ज्याचे धृतीमाझारीं विस्मयो तुटी ॥ ४१ ॥ आकाश पडावया गडाडी ॥ पृथ्वी उलथावया हडबडी ॥ तरी ज्याचे धृतीची रोकडी ॥ नव्हे वांकुडी रोमा-वेंळी ॥ ४२ ॥ वोडवलियाही कल्पांता ॥ धाक रिघों नेणे ज्याच्या चित्तां ॥ ऐसें निजधैर्य स्वभावतां ॥ धृति तत्त्वतां ती नांव ॥ ४३ ॥ चौऱ्याशी दंडायुधें धरूं जाणती ॥ शस्त्रास्त्र-धारणाशक्ती ॥ स्वधर्में अवश्यकें करिती ॥ या नांव धृती क्षत्रियांची ॥ ४४ ॥ शरांचें शौर्य तें

१ मोठेपणा. २ मूल. ३ लक्षण. ४ परिपक्व झालें. ५ पृथ्वीवरचा. ६ आश्चर्य. ७ आश्चर्य, नवल. ८ लक्ष माणसावर एकटाच हल्ला करितो. ९ दुभंग झाला, दोन तुकडे झाले. १० जिंकणें. ११ धैर्यांत. १२ केशही. १३ प्रलय.

*मो. नाटी कामकरी. +मो. ऐसें सत्यत्व परिपाठीं. ×मो. ख्याती. 4मो. व्युत्पत्ती.

कैसें ॥ शत्रूंचें निःशेष नांवचि पुसे ॥ वैरी कोणी कोठेंचि नसे ॥ करणें ऐसें तें शौर्य ॥ ४५ ॥ धर्मयुद्धाची शौर्यवृत्ती ॥ जेणें विजयश्री चढे हातीं ॥ दुश्चित्तें निःशस्त्रीं न हाणिती ॥ पळतया न मारिती महाशूर ॥ ४६ ॥ संमुख आलिया रणांगणीं ॥ मागें पावो न ठेवी रणीं ॥ एकला विभांडी वीरश्रेणी ॥ हे स्वधर्मकरणी निज शौर्य ॥ ४७ ॥ मृत्यूएवढा महावैरी ॥ जो निःशेष नाहीं करी ॥ त्याच्या शौर्याची थोरी ॥ सुरासुरीं वानिजे ॥ ४८ ॥ एवं निजशौर्य निर्धारा ॥ निर्वैर करणें धरा ॥ हा चौथा गुण खरा ॥ जाण क्षात्रद्वारा क्षत्रियांचा ॥ ४९ ॥ शस्त्रांचे घाय वाजतां माथां ॥ कां सपिच्छ बाण खडतरतां ॥ रणांगणीं नसरे मागुता ॥ हे सहिष्णुता क्षत्रियांची ॥ १५० ॥ आलिया गजदळाचे थाट ॥ महावीरांचा घडघडाट ॥ तो यावा साहे सुभट ॥ सहिष्णुता चोखट ती नांव ॥ ५१ ॥ समुद्रलहरींच्या संपाता ॥ कुलाचल सरेना परता ॥ तेवीं परसैन्याच्या आघाता ॥ न सरे मागुता रणांगणीं ॥ ५२ ॥ तेथ यशअपयशांची व्यथा ॥ हर्षशोकविषमता ॥ बाधीना क्षत्रियांच्या चित्तां ॥ सर्वसहिष्णुता या नांव ॥ ५३ ॥ या नांव तितिक्षा जाण ॥ हें क्षत्रियांचें पांचवें लक्षण ॥ ऐक औदार्याचा गुण ॥ दातेपण क्षत्रियांचें ॥ ५४ ॥ क्षत्रियांचे प्रकृतीस जाण ॥ द्रव्य तें तृणासमान ॥ याचकाचें निवे मन ॥ तंव देणें दान सर्वस्वें ॥ ५५ ॥ देश काल सत्पात्र स्थान ॥ तेथेंही देऊनि सन्मान ॥ निर्विकल्पभावें *गहन ॥ देणें दान विध्युक्त ॥ ५६ ॥ चंद्र चकोरातें पाही ॥ सदा देतां नुबगे कहीं ॥ तेवीं हा याचकाचेठायीं ॥ पराङ्मुखता नाहीं क्षत्रिया ॥ ५७ ॥ ऐसें स्वाभाविक जें दान ॥ हा क्षत्रियांचा प्रकृतिगुण ॥ या नांव गा उदारपण ॥ सहावें लक्षण क्षत्रियांचें ॥५८॥ परमार्थप्राप्तिउपायीं ॥ स्वधर्मनिष्ठा क्षत्रियांच्याठायीं ॥ जो जो व्यवसावो करणें कांहीं ॥ तो उद्यम पाहीं बोलिजे ॥ ५९ ॥ वेंचूनियां निजप्राण ॥ गोब्राह्मणांचें संरक्षण ॥ स्वधर्में प्रजाप्रतिपालन ॥ पृथ्वीरक्षण निरुपद्रव ॥ १६० ॥ या नांव गा उद्यम जाण ॥ क्षत्रियांचें सातवें लक्षण ॥ आतां स्वधर्मस्थैर्यगुण ॥ तेंही निरूपण अवधारीं ॥ ६१ ॥ गोब्राह्मण संरक्षणता ॥ स्वधर्में प्रजाप्रतिपाळिता ॥ येठायीं उबगू नये चित्ता ॥ या नांव स्थिरता क्षत्रियांची ॥ ६२ ॥ स्वधर्मीं जे स्थिरता ॥ तें आठवें लक्षण तत्त्वतां ॥ ब्राह्मणभक्तीची जे कथा ॥ ऐक आतां सांगेन ॥ ६३ ॥ परमार्थप्राप्तीचें कारण ॥ क्षत्रियासि मुख्यत्वें गुरु ब्राह्मण ॥ त्या ब्राह्मणाचें ब्रह्मभावें भजन ॥ सर्वस्वें जाण करावें ॥ ६४ ॥ ब्रह्मभावें ब्राह्मणभजन ॥ विधियुक्त देवोनि सन्मान ॥ अनुदिनीं ब्राह्मणपूजन ॥ सद्भावें जाण जो करी ॥६५॥ जो सद्भावें ब्राह्मणपूजा ॥ सन्मानें सुखी करी द्विजा ॥ उद्धवा तो आत्मा माझा ॥ तेणें मज अधोक्षजा पूजिलें ॥ ६६ ॥ क्षत्रिय सन्मानें द्विज पूजिती ॥ तेणें त्यासि ऐश्वर्यप्राप्ती ॥ ब्राह्मण ब्राह्मणां द्वेषिती ॥ तेणें तें पावती दरिद्रदुःख ॥ ६७ ॥ +ऐसें करितां ब्राह्मणभजन ॥ मी परब्रह्म होय त्याआधीन ॥ त्याच्या ऐश्वर्याचें चिन्ह ॥ दहावें लक्षण तें एक ॥ ६८ ॥ न करितां ब्राह्मणभजन ॥ अंगीं ऐश्वर्य नव्हे जाण ॥ मी जाहलों षड्गुणैश्वर्यसंपन्न ॥ सदा द्विजचरण हृदयीं दृढ वाहतां ॥ ६९ ॥ ब्राह्मणभजनमार्गें ॥ ब्रह्मसुख पायां लागे ॥ ब्रह्मसायुज्य घर

१ नाहींसें करी. २ शरीरास लागला असतां. ३ सहनशीलपणा. ४ तडाख्यानें. ५ एकपर्वत, ६ न कंटाळे. ७ स्वाभाविक गुण. ८ व्यवहार. ९ दररोज.

*मो. पूर्ण. +ना. एक.

रिघे ॥ तरी भक्त नेघे द्विजभजनें ॥१७०॥ ब्राह्मणभजनें स्वभावतां ॥ माझी सत्ता ये त्याच्या हातां ॥ तेव्हां त्याची आज्ञा वंदिती माथां ॥ जाण तत्त्वतां सुरासुर ॥७१॥ त्याचे आज्ञेभेण ॥ पडों नशके अवर्षण ॥ न्यायतां प्रजापालन ॥ धर्मसंरक्षण त्याचेनी ॥ ७२ ॥ येणेंच स्वधर्में अतिचोख ॥ भरत पुरूरवा जनकादिक ॥ महाऐश्वर्य पावले देख ॥ अलोकिक द्विजभजनें ॥ ७३ ॥ एवं क्षत्रियांचें दशलक्षण ॥ तुज म्यां केलें निरूपण ॥ यांत मुख्यत्वें ब्राह्मणभजन ॥ श्रेयस्कर जाण सर्वांसी ॥ ७४ ॥ वैश्याचे प्रकृतीस जाण ॥ स्वाभाविक पंचलक्षण ॥ ऐक त्याचेंही निरूपण ॥ आचरण *यथार्थ ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ आस्तिक्यं दाननिष्ठा च अदंभो ब्रह्मसेवनम् ॥ अतुष्टिरर्थोपचयै-
वैश्यप्रकृतयस्त्विमाः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ वैश्याचे प्रकृतीशी जाण ॥ अर्थतृष्णा अतिगहन ॥ जाहलिया कोट्यानुकोटी धन ॥ तृष्णा परिपूर्ण होनेणे ॥ ७६ ॥ आस्तिक्य अर्थसंचयासी ॥ द्वीपींहूनि द्वीपांतरांसी ॥ नानावस्तु नेती विश्वासेंसी ॥ साचात्या अर्थासी भावार्थी ॥ ७७ ॥ कां वेदशास्त्रीं अतिविश्वासी ॥ हें मुख्यत्वें आस्तिक्य वैश्यासी ॥ वेदें विहितल्या स्वधर्मासी ॥ नव्हे उदासी अणुमात्र ॥ ७८ ॥ वैश्याचें स्वधर्माचरण ॥ नेमेंसी द्यावें नित्यदान ॥ प्राणांत मांडल्या जाण ॥ दानखंडण होनेदी ॥ ७९ ॥ परलोकप्राप्तीचें कारण ॥ ब्राह्मणाची सेवा जाण ॥ ब्राह्मणआज्ञा परम प्रमाण ॥ विशेष जाण गुरुसेवा ॥ १८० ॥ वेदशास्त्र प्रमाण ॥ सद्गुरु परब्रह्म जाण ॥ तद्रूपें देखावे ब्राह्मण ॥ सेवेसि प्राण समर्पी ॥८१॥ मी मान्य होईन अति श्रेष्ठां ॥ कां लौकिकीं जोडावी प्रतिष्ठा ॥ ऐशापरीची दांभिक निष्ठा ॥ वैश्यवरिष्ठा स्पर्शेना ॥ ८२ ॥ सांडूनियां धूर्तपण ॥ निर्लोभ निर्दंभ जाण ॥ विप्रसेवेसि वेंचिती प्राण ॥ हें मुख्य लक्षण वैश्याचें ॥ ८३ ॥ येणेंचि परमार्थप्राप्ती ॥ सत्य जाण वैश्ययाती ॥ हे स्वाभाविक गा प्रकृती ॥ जाण निश्चितीं वैश्याची ॥ ८४ ॥ आतां शूद्राचिया प्रकृती ॥ त्रिविधकर्मांची पैं प्राप्ती ॥ तेही सांगेन तुजप्रती ॥ ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ शुश्रूषणं द्विजगवां देवानां चाप्यमायया ॥ तत्र लब्धेन संतोषः
शूद्रप्रकृतयस्त्विमाः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ स्वधर्म शूद्राचिये जाती ॥ द्विजसेवा यथानिगुती ॥ त्याचेनि प्रसादें जीविकावृत्ती ॥ निष्कपट स्थिती सेवेची ॥ ८६ ॥ करावें गृहस्थांचें गोरक्षण ॥ चाराव्या जेथें तृण जीवन ॥ श्वापदभय आलिया जाण ॥ वेंचूनि प्राण रक्षाव्या ॥ ८७ ॥ गोरक्षणीं वेंचिल्या प्राण ॥ त्यासि उत्तमगति जाहली जाण ॥ ज्यासि गायीचा कळवळा गहन ॥ त्यासि मी श्रीकृष्ण सदा साह्य ॥ ८८ ॥ द्विजसेवा गोरक्षण ॥ दोनही वृत्ति न मिळतां जाण ॥ तरी देवालयीं संमार्जन ॥ जीविकार्थ जाण करावें ॥ ८९ ॥ निष्कपटभावें आपण ॥ निर्मळ करावें हरिरंगण ॥ तेथील प्राप्तीनें जाण ॥ करावी पूर्ण जीविका ॥१९०॥ तेथ जेजे काळीं जेजे प्राप्ती ॥

१ दुष्काळ. २ न्यायानें, यथान्याय. ३ ब्राह्मणांच्या सेवेनें. ४ कल्याणकारक. ५ द्रव्याची इच्छा. ६ पाणी. ७ हिंसकप्राण्याचें भय. ८ पोटभरणें.

*ना. यथातथ्य.

तेणें सुखें असावें निजवृत्तीं ॥ स्वधर्मकर्मस्थितीं ॥ शूद्रप्रकृती स्वभावें । ९१॥ विप्राचें आग्नि होत्रादिक कर्म ॥ शूद्र नमी द्विजोत्तम ॥ तेथ दोहींचा स्वधर्म ॥ सहजें सम होतसे ॥ ९२ गृहस्थाश्रमाचें वर्तन ॥ तिन्ही आश्रमां आश्रयो आपण ॥ अन्नवस्त्र देऊनि जाण ॥ संरक्षण करावें ॥ ९३ ॥ ब्रह्मचर्याश्रमवर्तन ॥ गुरुसेवा वेदाध्ययन ॥ त्यासि यावया दान ॥ अधिकार जाण असेना ॥ ९४ ॥ ब्रह्मचाऱ्यासि जें जें योजिलें ॥ तें पाहिजे गुरुसि समर्पिलें ॥ गुरूसि वंचूनि दान घेतलें ॥ तें तेणें केलें अधर्म ॥ ९५ ॥ वानप्रस्थाश्रमीं जाण ॥ मुख्यत्वें तप प्रधान ॥ करावें अग्निशुश्रूषण ॥ वेदोक्तलक्षणप्रकारें ॥ ९६ ॥ संन्यासी ब्रह्मचारी दीन ॥ समयीं आश्रमा आल्या जाण ॥ यथाशक्त्या यावें अन्न ॥ हें आश्रमरक्षण वानप्रस्था ॥९७॥ संन्यासासी अहिंसा प्रधान ॥ ज्ञानपरिपाकें शांति संपूर्ण ॥ अनोळखी भिक्षाटन ॥ हा मुख्य धर्म जाण चतुर्थाश्रमीं ॥ ९८ ॥ वर्णाश्रमांहूनि बाह्य जाण ॥ केवळ अंत्याजादि जे जन ॥ त्यांचे प्रकृतीचें जें लक्षण ॥ स्वयें नारायण सांगत ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ अशौचमनृतं स्तेयं नास्तिक्यं शुष्कविग्रहः ॥ कामः क्रोधश्च तर्षश्च स्वभावोऽन्तेवसायिनाम् ॥ २० ॥

॥ टीका ॥ ये श्लोकींचे अष्टगुण ॥ त्यागावया नमनी ज्याचें मन ॥ तोही अंत्यजासमान ॥ हें प्रकृतिलक्षण अतिनिंद्य ॥२००॥ज्यासि स्नान संध्या शौचाचार॥स्वकर्म नावडे साचार॥ अंतरीं विकल्प अपार ॥ जैसा विखार काळिया ॥ १ ॥ कनककेळ हें नाम गोमटें ॥ आंत माजिरें बाहेर कांटे ॥ तैसें सबाह्य वोखटें॥ अशौच मोठें त्या नांव ॥२॥ शरीरीं श्वेत कुष्ठ निर्नासिकें ॥ तोंडाळ वोढाळ पतिनिंदक॥ते स्त्रियेच्या ऐसें देख॥अशौचक सबाह्य ॥३॥ यापरी गा अशौचता ॥ ज्याचे अंगीं स्वभावतां ॥ तो जाण पां तत्त्वतां ॥ गुण प्रथमतां अंत्यजाचा ॥ ४ ॥ *असत्यता जे प्रकृतीपाशीं ॥ अखंड वसे अहर्निशीं ॥मातापितादि गुरूंसी ॥ प्रकवणें त्यासी मिथ्यात्वें ॥ ५ ॥ जेवीं कां शिमग्याच्या सणीं ॥ रामकृष्ण न ह्मणे कोणी ॥ उपस्थनामें गर्जे वाणी ॥ संतोषोनी स्वानंदें ॥६॥ तेवीं जागृतिस्वप्नसुषुप्तीं ॥ असत्य आवडे ज्याच्या चित्तीं ॥ तो जाण पां निश्चितीं ॥ अंत्यजप्रकृती स्वभावो ॥ ७ ॥ पडिलिया दृष्टी-बुंडीं ॥ मायबापांचें ठेवणें काढी ॥ नानाविश्वासपरवडी ॥ बुडवी गांठोडी गुरूची ॥ ८ ॥ सधन सांपडल्या हाता॥ नानायुक्ति अतिक्षुद्रता ॥ नातरी बलात्कारें तत्त्वतां ॥ घ्यावें सर्वथा सर्वस्व ॥ ९ ॥ यापरी गा अधर्मता ॥ परद्रव्य यावया हाता ॥ आसक्ति ज्याचिया चित्ता ॥ जाण तत्त्वतां ते चोरी ॥ २१० ॥ स्वधर्मकर्मीं स्वभावतां ॥ विश्वास नाहीं ज्याच्या चित्ता ॥ वेदशास्त्र पुराणार्थां ॥ मिथ्या सर्वथा जो मानी ॥ ११ ॥ उद्धवा जाण तत्त्वतां ॥ या नांव गा नास्तिकता ॥ आस्तिक्यभावो स्वभावतां ॥ अणुमात्रता जेथ नाहीं ॥ १२ ॥ गांठीं असतां लक्षकोडी ॥ सदा नास्तिकता ज्याचे तोंडीं ॥ घरींच्या आपदा लावी ×गाढी ॥ ते प्रकृति +रोकडी

१ नमस्कार करितो. २ मिळालें. ३ फसवून. ४ अग्नीची सेवा. ५ सामर्थ्य असेल तेवढेंच. ६ परिचय नाहीं अशा ठिकाणीं.७ मानीत नाहीं.८ सर्प. ९ घोतऱ्याचें फळ. १० पांढरें कोड.११नकटें. १२ अपवित्र. १३ दृष्टितळीं, दृष्टींस.

*मो. असत्य ज्याचे प्रकृतीपाशीं. ×मो. रोकडी. +मो. गाढी.

अंत्यजाची ॥ १३ ॥ कार्यैवीण कोरडी कळी ॥ संबंधेंवीण वृथा सळी ॥ अखंड करी दांतकसाळी ॥ ते अंत्यजाची वळी निजवृत्ती ॥ १४ ॥ जया सदा विरोध पोटीं ॥ *वरीवरी गोड मैंद गोठी ॥ भीतरीं द्वेषाचा भडका उठी ॥ जो क्रूरदृष्टी सर्वदा ॥ १५ ॥ जन्मवरी केल्या उपकारकोटी ॥ त्यांसि एकाचि उत्तरासाठीं ॥ अपकारू करावया पोटीं ॥ +छिद्रीं दृष्टी सदा ठेवी ॥ १६ ॥ उपकाऱ्या अपकारस्थिती ॥ अंत्यजही न करी प्राणांतीं ॥ ऐशिया विरोधातें जे वाहती ॥ शुष्कविग्रहगती त्या नांव ॥ १७ ॥ जो सुहृदांमाजीं पाडी वैर ॥ अपायीं[6] घाली थोरथोर ॥ ज्यापाशीं त्रिअक्षरी मंत्र ॥ तो जाणावा नर अतिविग्रही ॥ १८ ॥ स्वार्थैवीण परकार्य नाशी ॥ शुष्कविग्रही ह्मणिजे त्यासी ॥ उद्धवा ऐशी प्रकृति ज्यापाशीं ॥ अंत्यज त्यासी पैं भीती ॥ १९ ॥ ऐक कामाची कथा ॥ कनकं[7] आणि कांता ॥ येविषयीं अतिलोभता ॥ उपरमु चित्तां असेना ॥ २२० ॥ स्त्रीकामाचेनि नांवें ॥ लिंगमात्रचि असावें ॥ मग सेव्यासेव्यभावें ॥ विचारू जीवें स्मरेना ॥ २१ ॥ तैसाच नाद द्रव्यार्था ॥ भलतैसें पावो हाता ॥ न विचारी विहिता अविहिता ॥ अतिकामता अर्थाअर्थीं ॥ २२ ॥ अविहित कामस्थिती ॥ हा स्वभाव ज्याचे वृत्ती ॥ ते अंत्यजादिप्रकृती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ २३ ॥ पाहे पां कामिकांच्या पोटीं ॥ सदा क्रोधाची आँगटी ॥ कामअप्राप्त ऐकतां गोष्टी ॥ भडका उठी प्रळयक्रोध ॥ २४ ॥ ज्याचिये शरीरस्थिती ॥ उसंतू[11] नाहीं क्रोधाहातीं ॥ सदा धुपधुपीत वृत्ती ॥ ते जाण प्रकृती अतिनीच ॥ २५ ॥ प्राप्तभोगें तृष्णा न बाणे ॥ ऐकिल्याही भोगाकारणें ॥ अखंड मनाचें वैसे धरणें ॥ ते प्रकृती जाणे अतिनीच ॥ २६ ॥ म्यां सांगीतले आठही ×गुण ॥ हें ज्याचे प्रकृतीस लक्षण ॥ तो होका भलतां[12] वर्ण ॥ परी अंत्यजपण त्यामाजीं ॥ २७ ॥ अवगुण सांगीतले समस्त ॥ एक एक नरकदानीं विख्यात ॥ मैं[13] आठही मिळाले जेथ ॥ उगंड तेथ मग कैंचा ॥ २८ ॥ त्यागावया निजस्थिती ॥ या अवगुणांची व्युत्पत्ती ॥ म्यां सांगीतली तुजप्रती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ २९ ॥ या गुणांतें अंगीकारिती ॥ ते नरकं[14]गामी गा निश्चितीं ॥ या गुणांतें जे त्यागिती ॥ ते पावती पद माझें ॥ २३० ॥ जेणें माझ्या पदाची प्राप्ती ॥ सर्वां वर्णां उत्तम गती ॥ ऐशिया गुणांची व्युत्पत्ती ॥ सांगेन तुजप्रती उद्धवा ॥ ३१ ॥ सकळ लक्षणांचें निजसार ॥ जें 2गुह्यगुह्याचें भांडार ॥ जेणें पाविजे संसारपार ॥ ऐक साचार उद्धवा ॥ ३२ ॥ जो सर्वत्रवर्णांचा सहज धर्म ॥ जेणें पाविजे परब्रह्म ॥ जेणें नासती चित्तभ्रम ॥ ते गुण उत्तम अवधारी ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ अहिंसा सत्यमस्तेयमकामक्रोधलोभता ॥ भूतप्रियहितेहा च धर्मो-

ऽयं सार्ववर्णिकः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ होकां उपायो जेणें तेणें ॥ पुढिलासी जें सुख देणें ॥ तें उपेंतिधें मजकारणें ॥ तो म्यां श्रीकृष्णें वंदिजे ॥ ३४ ॥ तैसेंच परपीडा असुख ॥ पुढिलिया न देणें दुःख ॥ तेंही क-

---

१ कलह. २ वैरकरी. ३ वटवट. ४ धूर्तपणाच्या ५ स्नेह्यांमध्यें. ६ संकटांत. ७ सोनें. ८ स्त्री. ९ अमुक स्त्री गम्य किंवा अगम्य. १० धुणी. ११ विश्रांती. १२ ब्राह्मणादि. १३ मग. १४ नरकास जाणारे. १५ प्राप्त होतें.

*वरिवरी मैंदाच्या ऐशा गोष्टी. +ना. क्षुद्र. ×ना. अवगुण. 2मो. गुह्यज्ञानाचें.

रूनि मज होय सुख ॥ जाण निष्टंक उद्धवा ॥ ३५ ॥ दुःख नेदूनि सुख देणें ॥ या नांव अहिंसा ह्मणणें ॥ हा पहिला गुण जाणणें ॥ ऐक लक्षणें सत्याचीं ॥ ३६ ॥ सत्य तें जाण पां ऐसें ॥ ज्याचें मन वाचा असत्यदोषें ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तिवशें ॥ स्पर्शलें नसे अणुमात्र ॥ ३७ ॥ निंदा आणि नरस्तवन ॥ कदा मिथ्या न बोले वचन ॥ वाचा अनसुट धरणें जाण ॥ सत्यसंपूर्ण या नांव ॥३८॥ होकां अधर्माचिये जोडी ॥ *कोडी धरोनियां कवडी ॥ जो रिघोनेदी दृष्टीबुडीं ॥ फुटकी कवडी स्पर्शेना ॥ ३९ ॥ तेथेंही चोरी करणें ॥ कां दृष्टि चुकवूनि वस्तु घेणें ॥ अथवा न पुसतां नेणें ॥ हें जीवें प्राणें नसंभवे ॥ २४० ॥ अन्यायोपार्जित धन ॥ स्वप्नींही नातळे मन ॥ हें अचौर्याचें लक्षण ॥ तिसरा गुण उद्धवा ॥ ४१ ॥ स्वधर्मे धन यावें हातां ॥ हेंही नसे धनकामता ॥ कामिनीकामाची नेणे वार्ता ॥ परस्त्रीतें माता नेमस्ता ॥ ४२ ॥ होकां स्वदाराभिगमन ॥ तेथेंही आसक्त नसे मन ॥ आश्रमधर्मार्थ जाण ॥ प्रतिपालन स्त्रियेचें ॥ ४३ ॥ या नांव गा अकामता ॥ उद्धवा जाण तत्त्वतां ॥ हे चौथी लक्षणता ॥ ऐक आतां अक्रोधू ॥ ४४ ॥ जेथ कामाचा आदरू नाहीं ॥ तेथ क्रोधाचें नचले कांहीं ॥ जेवीं आकाशाचे ठायीं ॥ न रुपती पाहीं निजशस्त्रें ॥ ४५ ॥ जरी बीज जाहलें गोमटें ॥ तरी भूमीवीण अंकुर न फुटे ॥ तैसें कामावांचूनि कोठें ॥ +क्रोध उद्भट वाढेना ॥ ४६ ॥ एवं कामाची जे बोळवण ॥ तेचि क्रोधाचीही जाण ॥ जैसें गरोदरीचें मरण ॥ करी निर्दळण गर्भाचें ॥ ४७ ॥ शिर तुटलिया पाठीं ॥ हस्तादिक्रिया तुटी ॥ काम निमालियापरिपाठीं ॥ निमाली गोष्टी क्रोधाची ॥ ४८ ॥ जेथ कामक्रोध नाहीं ॥ तेथ लोभ उठी कोणे ठायीं ॥ तळवटीं नसतां भुयी ॥ वृक्ष कहा वाढेना ॥ ४९ ॥ शिर बोडिलें सकेशीं ॥ तेथ राहूं नशके ऊ जैसी ॥ तेवीं गेलिया कामक्रोधांसी ॥ वस्ती लोभासी असेना ॥ २५० ॥ या नांव निर्लोभता ॥ सत्य जाण सर्वथा ॥ क्रोधलोभांतें वाढविता ॥ जाण तत्त्वतां कामची ॥ ५१ ॥ जेवीं कां भ्रताराचें मरण ॥ घेऊनि जाय अहेवपण ॥ तेवीं कामक्रोधवीण ॥ लोभलक्षण असेना ॥ ५२ ॥ जेथ कामाचें अपूर्ण काज ॥ तेथ क्रोधाचें खवळे तेज ॥ तेव्हां कामाचें पूर्णनिज ॥ तेव्हां ×नाचे भोज लोभाचें ॥ ५३ ॥ जेवीं दीपाची दीपकळा ॥ सवें ※वागवी तेजकाजळा ॥ तेवीं क्रोधलोभांचा सोहळा ॥ कामाजवळ संतत ॥ ५४ ॥ जेवीं कां शीरियाचें शीतें ॥ घामज्वरासमवेत ॥ तेवीं क्रोधलोभयुक्त ॥ जाण निश्चित कामची ॥ ५५ ॥ जेथ कामाचा नाहीं पांगू ॥ तोचि क्रोधलोभांचा त्यागू ॥ हा समूळ उपावो चांगू ॥ स्वयें श्रीरंगू बोलिला ॥ ५६ ॥ एवं कामत्यागें सर्वथा ॥ त्यागू पावे क्रोधलोभता ॥ भूतांसी जे प्रियत्वें हितता ॥ ऐक तत्त्वतां सांगेन ॥ ५७ ॥ जैशी शक्ति आपणासी ॥ तैसें प्रिय करावें भूतांसी ॥ अगत्य विचंबू ज्याचा ज्याशी ॥ तें तें त्यासी अर्पावें ॥ ५८ ॥ अन्न वस्त्र *दान मान ॥ पोटींच्या कळवळ्यानें जाण ॥ करावें भूतांसी प्रियाचरण ॥ हा स्वधर्म जाण सर्वांचा ॥ ५९ ॥ ऐसें प्रिय करावें भूतां ॥ जें परिपाकीं ये त्यांच्या हिता ॥ जेणें

---

१ अमंगल न बोलणें, अखंड. २ एक कोटी पासून तों कवडीपर्यंत. ३ दृष्टीसमोर. ४ अनीतीनें मिळविलेलें. ५ स्त्रीविषयाची. ६ चांगलें. ७ गर्भिणीस्त्रीचें. ८ चांगली जमीन. ९ सौभाग्य. १० आपल्याबरोबर. ११ शहाण्यांनीं. १२ हींव. १३ वसति. १४ प्राण्याविषयीं.

*मो. कोटी. +मो. क्रोध उद्भट उठेल? ×मो. वाढे. ※मो. वाढवी. *मो. धनधान्य.

प्रयें उपजे बाधकता ॥ तें सर्वथा न करावें ॥ २६० ॥ जो *भूतप्रिय हितकारी ॥ ऐसा जो पुरुष संसारीं ॥ मी भगवंत त्याच्या घरीं ॥ सर्व हित करीं सर्वदा ॥ ६१ ॥ त्याच्या अशुभाची होळी ॥ भूतहितप्रियमेळीं ॥ मी स्वयें करीं वनमाळी ॥ तेचि काळीं तत्त्वतां ॥ ६२ ॥ जो उद्धवें सत्य साचार ॥ भूतांसि हितत्वें प्रियकर ॥ त्यासि मी भूतात्मा श्रीधर ॥ करीं संसार सुखरूप ॥ ६३ ॥ अहिंसादि सप्त लक्षण ॥ हा सर्वांचा स्वधर्म जाण ॥ सर्वाश्रम सर्व वर्ण ॥ यांसि मुख्यत्वें जाण हा धर्म ॥ ६४ ॥ चतुर्वर्णस्वभावप्रकृती ॥ वर्णबाह्यांची लक्षणस्थिती ॥ सर्व वर्णांची स्वधर्मगती ॥ ते म्यां तुजप्रती सांगीतली ॥ ६५ ॥ यावरी आश्रम स्वधर्मता ॥ तुज मी सांगेन आतां ॥ उद्धवा ऐक गा तत्त्वतां ॥ प्रथमतां ब्रह्मचर्य ॥ ६६ ॥ ब्रह्मचर्य द्विविध जाण ॥ एकाचें नैष्ठिक्य संपूर्ण ॥ एक तो उपकुर्वाण ॥ ऐक लक्षण दोहींचें ॥ ६७ ॥ व्रतबंध वेदाध्ययन जाहल्यापाठीं ॥ जो परमार्थीं ठेवूनि दृष्टी ॥ गृहस्थाश्रमाची नकरी गोठी ॥ नैष्ठिक्यपरिपाठी त्या नांव ॥ ६८ ॥ वेदशास्त्र संपूर्ण पठन ॥ गुरुदक्षिणा व्रतविसर्जन ॥ करूनि करी पाणिग्रहण ॥ उपकुर्वाण या नांव ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ द्वितीयं प्राप्यानुपूर्व्याज्जन्मोपनयनं द्विजः ॥ वसन्गुरुकुले दांतो ब्रह्माऽधीयीत चाहुतः ॥ २२ ॥ मेखलाजिनदंडाक्षब्रह्मसूत्रकमंडलून् ॥ जटिलो धौतदद्वासो रक्तपीठः कुशान् दधत् ॥ २३ ॥ स्नानभोजनहोमेषु जपोच्चारे च वाग्यतः ॥ न च्छिंद्यान्नखरोमाणि कक्षोपस्थगतान्यपि ॥२४॥

टीका ॥ गर्भाधान पुंसवन ॥ जातकर्म अन्नप्राशन ॥ हीं समस्त कर्में पूर्वीं जाण ॥ केलीं संपूर्ण चौलांतें ॥२७०॥ याउपरी उपनयन॥ गुरुद्वारां गायत्रीग्रहण ॥ सावित्र जन्म हे संपूर्ण ॥ व्रतबंध जाण या नांव ॥७१॥ एवं गायत्री मंत्रें जाण॥द्विजन्मे होती तिन्ही वर्ण॥हा ब्रह्मचर्याश्रम संपूर्ण ॥ व्रतधारण वेदार्थ ॥ ७२ ॥ तेथ वेदाध्ययननिर्धारीं ॥ गुरुगृहीं असे ब्रह्मचारी ॥ त्याच्या व्रतनेमांची कुसरी ॥ ऐक ते परी सांगेन ॥७३॥ मुंजी जानवें कृष्णाजिन ॥ पळसाचा दंडग्रहण ॥ कमंडलु वागवावा जाण ॥ जळाचरण करावया ॥ ७४ ॥ न करावें मस्तकवपन ॥ न करावें तैलाभ्यंजन ॥ न करावें दंतधावन ॥ केशविंचरण न करावें ॥ ७५ ॥ न करावें नखनिकृंतन ॥ न करावें रोमच्छेदन ॥ बाहुमूलादिक जे जाण ॥ गुह्यस्थान अतिव्याप्त ॥ ७६ ॥ अर्केक्षाळितवस्त्रें जाण ॥ त्याचें न करावें परिधान ॥ प्रवाहीं करावें स्नान ॥ प्रातर्मध्याह्न दोहीं काळीं ॥ ७७ ॥ आसनीं श्वेतपीठासन ॥ श्वेतवस्त्राचें धारण ॥ रुद्राक्ष अथवा पद्माक्ष जाण ॥ मालाग्रहण जपार्थ ॥ ७८ ॥ कुशादिदर्भपवित्र ॥ तिहीं युक्त असावें करें ॥ ऐक मौनाचा विचार ॥ तुज मी साचार सांगेन ॥ ७९ ॥ मळमूत्र करितां स्नान ॥ जप होम आणि भोजन ॥ उभयसंध्याकाळीं जाण ॥ निश्चित मौन धरावें ॥ २८० ॥ नाहीं अभ्यंग केशविंचरण ॥ तेणें जटा वळल्या आपण ॥ हें ब्रह्मचारियासि जाण ॥ व्रतधारण नेमस्त ॥८१॥ इतुके-

१ चारवर्णांहून इतराची. २ दोनप्रकारचें. ३ जटाधारणादिव्रतसमाप्ति. ४ ज्या योगानें पुरुष होतो असा संस्कार. ५ चूडाकर्मापर्यंत. ६ मौंजीबंधन. ७ मोळाचें कटिसूत्र. ८ केशकर्तन. ९ नखच्छेदन. १० परिटानें धुतलेल्या वस्त्रानें. ११ कमलाक्ष. १२ हात.

*ना. जो भूतीं प्रिय हितकरी.

नि व्रतेंसि जाण ॥ सदा गुरुसेवेसि सावधान ॥ गुरु कृपेनें सांगे अध्ययन ॥ तेव्हां वेदपठ करावें ॥ ८२ ॥ मज पढों सांगावें आतां ॥ हा आग्रह न करावा गुरुनाथा ॥ त्याची आ वंदूनि माथां ॥ निष्कपटता गुरुसेवा ॥ ८३ ॥ अध्ययन सांगेना लवलाह्या ॥ तरी सांडूनि लाचार्या ॥ पढों गेलिया आणिका ठायां ॥ गुरु त्यागिलिया महादोष ॥ ८४ ॥ सेवा करा अहर्निशीं ॥ जेणें कृपा उपजे स्वामीसी ॥ तें कृपेस्तव अध्ययनासी ॥ अहर्निशीं सांगेल ॥८५ ठेवूनि गुरुचरणीं भावार्था ॥ पढावें गा वेदशास्त्रार्था ॥ आकळावें वेदतत्त्वार्था ॥ परमार्थ निजबुद्धी ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ रेतो नावकिरेज्जातु ब्रह्मव्रतधरः स्वयम् ॥ अवकीर्णेऽवगात्याऽप्सु यतामुस्त्रिपदीं जपेत् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ ॥ या रीतीं ब्रह्मचारी देख ॥ वीर्यत्याग बुद्धिपूर्वक ॥ करूं नये आवश्यक ॥ व्र निःशेष ब्रह्मचर्य ॥ ८७ ॥ स्वप्नीं जाहल्या वीर्यपतन ॥ शास्त्रोक्तविधीं करावें स्नान ॥ म प्रायश्चित्तार्थ जाण ॥ गायत्रीस्मरण करावें ॥ ८८ ॥ ब्रह्मचारी वानप्रस्थ संन्यासी ॥ प्रय वीर्यत्याग नाहीं त्यांसी ॥ जो करी तो अतिदोषी ॥ आश्रमधर्मासी बुडविलें ॥ ८९ ॥ स्व जाहलिया वीर्यपतन ॥ करावें मृत्तिका सचैल स्नान ॥ प्रायश्चित्तार्थ जाण ॥ विहिताचर जप कीजे ॥ ९० ॥

॥ श्लोक ॥ अग्न्यर्काचार्यगोविप्रगुरुवृद्धसुरान् शुचिः ॥ समाहित उपासीत संध्ये च यतवाग्जपन् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ ॥ गायत्रीदात्यां[3] आचार्यपण ॥ माता पिता तें गुरुस्थान ॥ अग्निसूर्यादि सुरगण गोब्राह्मण आणि ज्येष्ठ ॥ ९१ ॥ यांचें करावया उपासन ॥ बाह्य शुचि अंतरीं समाधान गुरुचरणीं अनन्यशरण ॥ आज्ञापालन पितरांचें[4] ॥ ९२ ॥ अग्नीचे ठायीं हवन ॥ इंद्रादि वांचें स्तवन ॥ ब्राह्मण तें पूज्यस्थान ॥ अर्घ्यदान सूर्यासी ॥ ९३ ॥ ज्येष्ठांसि साष्टांगनमन गायीसि अंगकुरवाळण ॥ सायंप्रातःसंध्येसि मौन ॥ मध्याह्नीं जाण मौन नाहीं ॥ ९४ सद्गुरूचा समर्थवाद ॥ सर्वांवरिष्ठ सर्वज्ञ ॥ ज्याचा प्रताप *प्रसिद्ध ॥ स्वयें गो सांगत ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ आचार्यं मां विजानीयान्नावमन्येत कर्हिचित् ॥ न मर्त्यबुद्ध्याऽसूयेत सर्वदेवमयो गुरुः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ ॥ जो अंतर्यामी ईश्वरू ॥ जो विश्वात्मा विश्वंभरू ॥ जो अनंत अपरंपारू ॥ मी श्रीगुरू शिष्याचा ॥ ९६ ॥ गुरुनामाची जे मातू ॥ तो मी साचार भगवंतू ॥ देखों भजनभावार्थू ॥ पुरवीं मनोरथू शिष्याचा ॥९७॥ ज्या सद्गुरूच्या अंगुष्ठीं ॥ ब्रह्मादिदेवांचि कोटी ॥ ज्याच्या नांवाची गोठी ॥ वंद्य वैकुंठीं कैलासीं ॥ ९८ ॥ ज्याचें नांव ऐकतां कानीं

१ लवकर. २ भक्ती. ३ गायत्रीउपदेश करणारास. ४ आईबापाचें.

*मो. विशद.

यम काळ कांपती दोनी ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र तिन्ही ॥ हात जोडूनी तिष्ठती ॥ ९९ ॥ सकळ वेदांचें निजसार ॥ तें सद्‌गुरुस्वरूप साचार ॥ ऐसा शिष्याचा निर्धार ॥ निरंतर असावा ॥ ३०० ॥ त्यांसि मनुष्यबुद्धीं आपण ॥ कदा न करावें हेळण ॥ गुरुनिंदा बोलतां जाण ॥ आली नागवण सर्वथा ॥ १ ॥ सद्‌गुरुनिंदेचा एकांतू ॥ करूं आला परम आप्तू ॥ तो त्यागावा जेवीं पतितू ॥ हा नव्हे अर्थू तें पळावें ॥ २ ॥ सद्‌गुरुनिंदेची वाणी ॥ ऐकतां बोटें घावीं कानीं ॥ सद्‌गुरूसि भावें स्मरोनी ॥ तें स्थानही त्यजोनी पळावें ॥ ३ ॥ त्या सद्‌गुरुनिंदेची स्वयें मातू ॥ करितां बुडाला निजस्वार्थू ॥ धुळीस मिळाला परमार्थू ॥ आला अपघातू अंगासी ॥ ४ ॥ ऐशिया गुरूच्या ठायीं जाण ॥ पत्र पुष्प अन्न धन ॥ शिष्यें करूं नये वंचन ॥ तें स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ सायं प्रातरुपानीय भैक्ष्यं तस्मै निवेदयेत् ॥ यच्चान्यदप्यनुज्ञातमुपयुंजीत संयतः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ ॥ अन्नधन पुष्पी फळीं ॥ सायंप्रातर्मध्याह्नकाळीं ॥ भिक्षा मिळे ते गुरुजवळी ॥ अर्पूनि कृतांजळी रहावें ॥ ६ ॥ तेथ गुरु आज्ञा जाहल्याही जाण ॥ उदरापुरतें घ्यावें अन्न ॥ अन्नावेगळे पदार्थ भरण ॥ घेऊं नये जाण ब्रह्मचारिया ॥ ७ ॥ सायंप्रातःकाळीं जाण ॥ ब्रह्मचाऱ्या विहित भोजन ॥ गुरुआज्ञा जें दीधलें अन्न ॥ तेणें प्राणतर्पण करावें ॥ ८ ॥ तेथ न म्हणावें थड गोड ॥ न करावें रसनाकोड ॥ न वाढवावी विषयचाड ॥ देहनिर्वाहचाड शिष्यासी ॥ ९ ॥ भोजनीं कांहीं न मागावें जाण ॥ यालागीं दृढ धरावें मौन ॥ अधिक वाढलिया अन्न ॥ तें प्रतिबंधन गुरुसेवे ॥३१०॥ आहारीं अधिक घेतलिया अन्न ॥ निद्रा आलस्य दाटी गहन ॥ अत्यंत अल्प जें भोजन ॥ तेणें विकळचळण देहाचें ॥ ११ ॥ गुरुसेवेलागीं जाण ॥ वृत्ति राखावी सावधान ॥ तें गुरुसेवेचें लक्षण ॥ स्वयें जनार्दन सांगत ॥ १२ ॥ गुरुसेवेलागीं जाण ॥ शरीर राखावें सावधान ॥ यालागीं शिष्यासि भोजन ॥ युक्ताहारपण सर्वदा ॥ १३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ शुश्रूषमाण आचार्यं सदोपासीत नीचवत् ॥ यानशय्यासनस्थानैर्नातिदूरे कृतांजलिः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ ॥ सर्वदा अतिसादर ॥ न पडतांही अंतर ॥ गुरुसेवेसि निरंतर ॥ अतितत्पर रहासे ॥ १४ ॥ गुरु वाहनारूढ असतां ॥ पुढें चालावें सैंटोपतां ॥ पाठीसी यावें, *चरणीं चालतां ॥ उपचारेंसी समवेत ॥ १५ ॥ समयोचित जाणोन ॥ द्यावें तांबूल जीवन ॥ करावें चरणसंवाहन ॥ घालावें आसन बैसती तेथें ॥ १६ ॥ सद्‌गुरु बैसल्या आसनीं ॥ शिष्यें न बैसावें नेहटूनी ॥ दूरी नवजावें तेथूनी ॥ नयनोन्मीलनीं रहावें ॥ १७ ॥ अंजळिसंपुट जोडूनी ॥

१ उभे असतात. २ निश्चय. ३ अनादर. ४ फसविणें. ५ हात जोडून. ६ भुकेची शांति. ७ खाल्यास. ८ नकून गेलेला, अधु. ९ वाहनावर बसले असतां. १० जपून, काळजीनें. ११ सेवेच्या वस्तु व सामानासह. १२ पाणी. १३ पाय रगडणें. १४ शेजारीं. १५ नेत्रसंकेतांत.

*मो. निश्चळता.

संमुख रहावें सावधानीं ॥ गुरूची संज्ञा ज्या लागूनी ॥ तें अविलंबनीं करावें ॥ १८ ॥ गु शेजेवरी निजले असतां ॥ जवळी नसावें तत्त्वता ॥ जेथूनि ऐकूं ये वचनार्था ॥ तेथें निशीं ३ व्यस्था क्रमावी ॥ १९ ॥ मी एक सेवेनें संपन्न ॥ ऐसा धरिलिया अभिमान ॥ *केलें सेवों अवंचन ॥ सर्वेचि जाण होईल ॥ ३२० ॥ सेवकांमाजीं मी एक ॥ केवळ रंकाचाही रंक ऐसा भावो निष्टंक ॥ सेवेसि देख धरावा ॥ २१ ॥ तैसेंचि नीचें काम करितां ॥ ला न धरावी सर्वथा ॥ उबग न मानावी चित्तां ॥ उल्हासता गुरुभजनीं ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ एवंवृत्तो गुरुकुले वसेद्भोगविवर्जितः॥ विद्या समाप्यते यावद्बिभ्रद्व्रतमखंडितम् ॥ ३० ॥

॥ टीका ॥ सांडोनि सकळभोगांतें ॥ गुरुकुळीं राहोनि तेथें ॥ गुरुसेवेचेनि व्रतें ॥ प्रिय सर्व जो जाहला ॥ २३ ॥ एवं गुरुसेवायुक्त ॥ धरोनियां अखंड व्रत ॥ पावला वेदशास्त्र समस्त +पढणें ×समाप्त पैं जाहलें ॥ २४ ॥ एवं विद्या जाहलिया समाप्त ॥ उपकुर्वाण नैष्ठिकव्रत स्वयें सांगावयास अनंत ॥ पुढील श्लोकार्थ सांगत ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ यद्यसौ छंदसां लोकमारोक्ष्यन् ब्रह्मविष्टपम् ॥ गुरवे विन्यसेद्देहं स्वाध्यायार्थं बृहद्व्रतः ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ जरी ब्रह्मचारी व्रतस्थ ॥ येणेंचि आश्रमें निश्चित ॥ सत्यलोकवैकुंठपर्यंत वांछी वेदोक्त मत्प्राप्ती ॥ २६ ॥ तेणें यावज्जन्म आपण ॥ दृढ करावें गुरुभजन ॥ निजदेहा ही जाण ॥ करी समर्पण गुरुचरणीं ॥ २७ ॥ सद्गुरुभजनाची परवडी ॥ नित्य नूतन आवडी निजात्मभावें चोखडी ॥ लागली गोडी गुरुचरणीं ॥ २८ ॥ पूर्वील व्रतें व्रतधारी ॥ तेंचि दृढ करी ॥ होय नैष्ठिक ब्रह्मचारी ॥ गुरुभजनावरी निर्धारू ॥२९॥ न मनी सन्मानाचें कोड न ह्मणे विषय गोड ॥ न धरी संसाराची चाड ॥ व्रतीं दृढ व्रतस्थ ॥ ३३० ॥ ऐसा थोर व्रतधर ॥ तैसाचि गुरुभजनीं सादर ॥ करी सद्गुरूशीं विचार ॥ वेदांतसार स्वाध्यायें ॥ ३१ स्व ह्मणिजे आत्मा जाण ॥ तेठायीं नित्य अनुसंधान ॥ तो स्वाध्याय ह्मणती सज्ञान ॥ ज्ञ विचक्षण ॐनिजदृष्टे ॥ ३२ ॥ ऐशिया साधकांसी जाण ॥ सर्वत्र ब्रह्मभावन ॥ हेंचि स्व मधुसूदन ॥ स्वयें आपण सांगत ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ अग्नौ गुरावात्मनि च सर्वभूतेषु मां परम् ॥ अपृथग्धीरुपासीत ब्रह्मवर्चस्व्यकल्मषः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ ब्रह्मचर्यव्रत धारणें ॥ ब्रह्मवर्चस्तेज चढे तेणें ॥ आणि सद्गुरूचेनि भजनें ॥ नि होणें निजवृत्तीं ॥ ३४ ॥ तेथें अग्नि गुरु आपण ॥ सर्वभूतांच्या ठायीं जाण ॥ अभिन्न भावन ॥ अनुसंधान सर्वदा ॥ ३५ ॥ तेव्हां जेंजें देखे दृश्यजात ॥ तेथें ब्रह्मभावो अचुंबि

१ संकेत. २ लवकर. ३ रात्रीस. ४ हलके. ५ कंटाळा. ६ गुरूच्या घरीं. ७ ज्यास पुढें गृहस्था ध्यावयाचा असतो, असा ब्रह्मचारी. ८ ज्यास जन्मभर ब्रह्मचारी रहावयाचें असतें. ९ माझ्या प्रा करितां. १० प्रकार. ११ तत्पर. १२ ईश्वरबुद्धि. १३ ब्रह्मतेज. १४ वस्तुसमूह.

यापरी मातें उपासित ॥ ब्रह्मयुक्त सद्भावें ॥ ३६ ॥ नैष्ठिक ब्रह्मचारियाचा नेम ॥ वानप्रस्थ संन्यासीयाम ॥ तेथील आवश्यक जो धर्म ॥ मुख्य वर्म त्यागाचें ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ स्त्रीणां निरीक्षणस्पर्शसंलापक्ष्वेलनादिकम् ॥ प्राणिनो मिथुनीभूता न गृहस्थोऽग्रतस्त्यजेत् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ नैष्ठिक ब्रह्मचारी संन्यासी ॥ वानप्रस्थ वनवासी ॥ तिहीं न पहावें स्त्रियांसी ॥ हा मुख्यत्वें त्यांसी स्वधर्म ॥ ३८ ॥ स्त्री देखतांचि दिठीं ॥ सांडूनियां पर्णकुटी ॥ पळावें गा उठाउठी ॥ मा कराव्या गोठी घडे केवीं ॥ ३९ ॥ स्वप्नींही स्त्रियेच्या स्पर्शासी ॥ करूं नये या तिघांशीं ॥ करितांचि मदनें त्यांसी ॥ वीर्यपातासी उपजवी ॥ ३४० ॥ त्या स्त्रियांसीं क्रीडाविनोद ॥ करितां विध्वंसे *स्वधर्मकंद ॥ यालागीं स्त्रीगुणानुवाद ॥ न करी शुद्ध सज्ञान ॥४१॥ स्त्रियांचें हावभावदर्शन ॥ एकांत गुह्यसंभाषण ॥ नानाविनोद अंगस्पर्शन ॥ परिहासन भेदनोक्ती ॥ ४२ ॥ इतुकेंही जेथ घडे ॥ तेथ कामाचा घाला पडे ॥ स्वधर्म समूळ बुडे ॥ धैर्याचें उडे निजसत्त्व ॥ ४३ ॥ गृहस्थाचिये प्रवृत्ती ॥ परस्त्रियेसी ऐसी गती ॥ जाहलिया जाण निश्चितीं ॥ अपावो अंतीं पावेल ॥ ४४ ॥ स्त्री ते अग्निकुंडासमान ॥ पुरुष तो घृतकुंभ जाण ॥ तेथ द्रवतां अंतःकरण ॥ अर्धक्षण लागेना ॥ ४५ ॥ घृत वेंचलियापाठीं ॥ घटासि झाली वर्षें साठी ॥ तरी अग्नीशीं जाहल्या भेटी ॥ द्रवतो पोटीं तोही घरी ॥ ४६ ॥ तेवीं वार्धक्यवयसेंसी ॥ एकांत जाहलिया स्त्रियेशीं ॥ गोष्टीमातविनोदेंसी ॥ कामाचा त्यासी घाला पडे ॥४७॥ त्यागावी कामिनीसंगती ॥ हा मुख्य त्याग परमार्थीं ॥ हेंचि स्वमुखें श्रीपती ॥ उद्धवाप्रती बोलिजेला ॥ ४८ ॥ पराशराऐसा महंत ॥ मत्स्योदरीशीं जाहला रत ॥ यालागीं स्त्रियेचा एकांत ॥ अनर्थभूत पुरुषासी ॥४९॥ मैथुनभूत जे प्राणी ॥ पशुपक्षिआदिकरूनी ॥ सादरें न पहावे नयनीं ॥ पाहतां कडकडूनि काम खवळे ॥ ३५० ॥ मत्स्यमैथुन देखिल्यासाठीं ॥ खवळल्या कामाच्या परिपाठी ॥ सौभरऋषीश्वरें तपकोटी ॥ मैथुनासाठीं नाशिल्या ॥ ५१ ॥ यालागीं कामाचें दर्शन ॥ कां कामाची आठवण ॥ पुरुषासि बाधक जाण ॥ कामस्मरण न करावें ॥ ५२ ॥ हृदयीं नव्हे कामसंचार ॥ तैसा करावा सदाचार ॥ भूतें पहावीं मदाकार ॥ हा मुख्य प्रकार हरि बोले ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ शौचमाचमनं स्नानं संध्योपासनमार्जवम् ॥ तीर्थसेवा जपोऽस्पृश्याभक्ष्यासंभाष्यवर्जनम् ॥ ३४ ॥

टीका ॥ ॥ शौच आचमन स्नान ॥ संध्या तर्पण उपासनें ॥ जपादिक अनुष्ठान ॥ तीर्थसेवन विश्वासें ॥५४॥ +अधर्म कर्मांचा विटाळु ॥ हों न द्यावा अळुमाळु ॥ आलियाही संकटकाळु ॥ ×अभक्षणशीळु नव्हे भावो ॥ ५५ ॥ ज्यासि असे व्रतधारण ॥ तेणें रजस्वलादि निंद्यजन ॥ त्यांसी न करावें संभाषण ॥ धरावें मौन निंदास्तवनीं ॥ ५६ ॥ सर्वांही आश्रमांसि जाण ॥ स्वधर्म नियमाचें लक्षण ॥ सांगेन ह्मणे श्रीकृष्ण ॥ ऐक सावधान उद्धवा ॥ ५७ ॥

१ नित्य. २ राहण्याची जागा. ३ या तिघांनीं. ४ काम. ५ रेतस्खलनास. ६ धर्माचें मूळ. ७ विषयाच्या गोष्टी. ८ तुपाची घागर. ९ स्निग्धपणा. १० ह्मातारपणीं. ११ सत्यवतीशीं. १२ बुद्ध्या. १३ चांगलें आचरण. १४ पूजा. १५ थोडाही.

*ना. कर्म. +मो. अकर्मठाचा विटाळ. ×मो. अभक्षण भुकाळ नव्हे भाव.

॥ श्लोक ॥ सर्वाश्रमप्रयुक्तोऽयं नियमः कुलनंदन ॥ मद्भावः सर्वभूतेषु मनोवाक्कायसंयमः ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ ॥ यदुवंशकुलनंदना ॥ ऐक उद्धवा सज्ञाना ॥ वर्णाश्रमस्वधर्मलक्षणा ॥ सर्वांस जाणा हे एक निष्ठा ॥ ५८ ॥ मनसा वाचा कर्मणा ॥ नेमूनि आपआपणा ॥ सर्वांभूतीं ब्रह्मभावना ॥ अखंडभावना राखावी ॥ ५९ ॥ ऐसा मद्भाव सर्वांभूतीं ॥ दृढ ठसावल्या चित्तवृत्ती ॥ ऐशा नैष्ठिकब्रह्मचाऱ्याप्रती ॥ मोक्षफलप्राप्ती हरि बोले ॥ ३६० ॥

॥ श्लोक ॥ एवं बृहद्व्रतधरो ब्राह्मणोऽग्निरिव ज्वलन् ॥ मद्भक्तस्तीव्रतपसा दग्धकर्माशयोऽमलः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ यापरी जो ब्रह्मचारी ॥ *मद्व्रतें व्रत धरी ॥ मद्भावना भूताकारी ॥ धारणा धरी अविश्रम ॥ ६१ ॥ यापरी करितां मद्भजना ॥ जळाल्या कर्मबीजेंसी वासना ॥ तेव्हां पूर्णभक्ति माझी जाणा ॥ वरी[1] अंतःकरणा भक्तांच्या ॥ ६२ ॥ तेव्हां निरुपचार[2] निजस्थिती ॥ सहजचि घडे माझी भक्ती ॥ तेथ ज्या ज्या देखे दृश्य व्यक्ती ॥ मद्भावप्रतीतीं चिद्रूपें ॥ ६३ ॥ ऐशी घडतां माझी भक्ती ॥ आर्त[3] जिज्ञासु[4] अर्थार्थी[5] ॥ यांची उठवूनियां पंक्ती ॥ चिन्मात्रैक्[6] चौथी भक्ती तो लाभे ॥ ६४ ॥ साचचि जे भक्तीच्याठायीं ॥ चारी मुक्ती लोळती पायीं ॥ तो स्वानंद ×मद्भक्तांच्या देहीं ॥ संपूर्ण पाही उल्हासे ॥ ६५ ॥ तेव्हां मज व्हावी मुक्तता ॥ हेंही नाठवे त्याच्या चित्ता ॥ हो कां गेली माझी बद्धता ॥ हेंही सर्वथा स्मरेना ॥ ६६ ॥ एवं माझेनि भजनसुखें ॥ विसरला सकळ सुखदुःखें ॥ माझे भक्तीचेनि हरिखें ॥ स्वानंदतोखें संतुष्ट ॥ ६७ ॥ ऐसा नैष्ठिकब्रह्मचारी ॥ मज पावला स्वधर्मैकेंरीं[7] ॥ आतां उपकुर्वाणाची[8] परी ॥ ऐक दुसरी अवस्था ॥ ६८ ॥

॥ श्लोक ॥ अथानंतरमावेक्षन्यथा जिज्ञासितागमः ॥ गुरवे दक्षिणां दत्त्वा स्नायाद्गुर्वनुमोदितः ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ संपूर्ण केलिया अध्ययन ॥ जाहालिया वेदशास्त्रसंपन्न ॥ तेणें गुरूसि आज्ञा पुसोन ॥ व्रतविसर्जन +सकामा ॥ ६९ ॥ सकामनिष्कामतेचा भरू ॥ देखोनि विवेकविचारू ॥ तेंशीच आज्ञा देती गुरू ॥ जैसा अधिकारू शिष्याचा ॥ ३७० ॥ ज्यासि गृहस्थाश्रमाची आसक्ती ॥ तेणें आपुल्या यथाशक्ती ॥ दक्षिणा देऊनि गुरुप्रती ॥ व्रतसमाप्ती करावी ॥ ७१ ॥ करावया समावर्तनें ॥ घेऊनि गुरूचें अनुमोदन ॥ करावें मंगळस्नान ॥ विसर्जन व्रतबंधा ॥ ७२ ॥ येथ अधिकाराचा भेदू ॥ स्वयें सांगतो गोविंदू ॥ तोचि श्लोकार्थीं विशदू[10] ॥ वैराग्यसंबंधू अवधारी ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ गृहं वनं वोपविशेत्प्रव्रजेद्वा द्विजोत्तमः ॥ आश्रमादाश्रमं गच्छेन्नान्यथा मत्परश्चरेत् ॥ ३८ ॥

---

१ मनानें, वाणीनें व कर्मानें. २ स्वीकारते. ३ कांहीं साधन न करितां. ४ पीडित. ५ जाणण्यास इच्छिणारा. ६ ज्ञानमात्र. ७ आपल्या धर्माचरणानें. ८ कामी पुरुषास. ९ सोडमुंज. १० स्पष्ट.

*मो. महाधर्मता व्रतधारी. ×ना. मुक्तांच्या. +मो. करावें.

॥ टीका ॥ ज्यासि वैराग्य नाहीं सर्वथा ॥ हृदयीं स्त्री कामाची *आस्था ॥ तेणें द्वितीयाश्रमसंस्था ॥ गार्हस्थ्या करावें ॥ ७४ ॥ स्त्रीकामू तरी नावडे ॥ विवेक वैराग्य ज्यासि थोडें ॥ तेणें वानप्रस्थाश्रमाकडे ॥ निघावें रोकडें तत्काल ॥ ७५ ॥ जो विवेकतेजें दीप्तिमंत ॥ ज्यासि सदा वैराग्य धडधडीत ॥ जो सर्वार्थीं दिसे विरक्त ॥ त्यासीच निश्चित चतुर्थाश्रमं ॥ ७६ ॥ मुख्यत्वें ज्यासि ब्राह्मणधर्म ॥ तोचि बोलिजे द्विजोत्तम ॥ त्यासीच बोलिला चतुर्थाश्रम ॥ वैश्यक्षत्रियां नेम संन्यास नाहीं ॥ ७७ ॥ क्षत्रिय संन्यास अंगीकारिती ॥ तिहीं रिघावें महापंथीं ॥ दंडकमंडलुआदिप्रवृत्ती ॥ व्यवहारस्थिती त्यां नाहीं ॥ ७८ ॥ ब्राह्मणासि ब्रह्मचर्याच्या पोटीं ॥ धडधडीत जें वैराग्य उठी ॥ तें संन्यासपरिपाठीं ॥ उठाउठी अंगीकारू ॥ ७९ ॥ बैसतां भार्येच्या पाटीं ॥ बहुल्यांवरी वैराग्य उठी ॥ त्यासि संन्यासग्रहणीं गांठी ॥ अधिकारू येथें बोलिला ॥३८०॥ संन्यासग्रहणीं ज्याचें ॥ वैराग्य दिसे अर्धकाचें ॥ त्यासि संन्यासग्रहणाचें ॥ अधिकार साचें असेना ॥ ८१ ॥ जैसा कां कोकिला कोक ॥ ज्याचा त्यास नावडे देख ॥ तैसें विषयभोगसुख ॥ ज्यासि निःशेष नावडे ॥८२॥ त्यासि संन्यासीं अधिकारू ॥ तोचि संन्यासी साचारू ॥ ज्यासि विषयांचा विकारू ॥ अणुमात्र बाधेना ॥ ८३ ॥ प्रथम ब्रह्मचर्ययुक्तता ॥ वैराग्यानें चढेचि हाता ॥ तरी होऊनि गृहस्थता ॥ स्वधर्मयुक्ता वर्तावें ॥८४॥ तेथें स्वधर्में विषय सेवितां ॥ दृढ साधावी विरक्तता ॥ तेथेंही वैराग्य नये हातां ॥ तरी वानप्रस्थाश्रमी व्हावें ॥ ८५ ॥ यापरी आश्रमादाश्रमा जातां ॥ वैराग्यें संन्यासग्रहणता ॥ परी अनाश्रमीं तत्त्वतां ॥ नाहीं सर्वथा अधिकारू ॥ ८६ ॥ सांडूनि पूर्वाश्रमासी ॥ जो गेला आश्रमांतरासी ॥ तेथूनि पुढारा मार्ग त्याशी ॥ परी मागें यावयासी विधि नाहीं ॥ ८७ ॥ कां मत्पर जो माझा भक्त ॥ त्यासि आश्रमनेम नाहीं येथ ॥ तो माझेनि भजनें कृतकृत्य ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ८८ ॥ सद्भावें माझी भक्ति करितां ॥ विवेकवैराग्ययोग्यता ॥ पावोनि माझी पूर्ण सत्ता ॥ सायुज्यता न घेती ॥८९॥ ऐसे जे माझे भक्तोत्तम ॥ त्यांसि नलगे आश्रमनेम ॥ त्यांचा सर्वही मी स्वधर्म ॥ ऐसें पुरुषोत्तम बोलिला ॥ ३९० ॥ उद्धवा ऐक पां निश्चितीं ॥ गृहस्थाची आश्रमस्थिती ॥ समूळ सांगेन तुजप्रती ॥ ऐसें श्रीपती बोलिला ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ गृहार्थी सदृशीं भार्यामुद्वहेदजुगुप्सिताम् ॥ यवीयसीं तु वयसा यां सवर्णामनुक्रमात् ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ करोनियां समावर्तन ॥ व्रतबंधाचें विसर्जन ॥ गुरुआज्ञा घेऊनि जाण ॥ पाणिग्रहण करावें ॥ ९२ ॥ भार्या पर्णावी सवर्ण ॥ इतर वर्जिले तिन्ही वर्ण ॥ स्ववेदस्वशाखेचे वर्ण ॥ स्वगोत्रपण चुकवूनी ॥ ९३ ॥ जे उभयकुळीं विशुद्ध ॥ जे दशलक्षणीं अनिंद्य ॥ देतां मातापित्यांसी आल्हाद ॥ तो श्लाघ्यसंबंध पर्णावा ॥ ९४ ॥ जिची जन्मपत्रिका पाहतां ॥ वय वरापरीस अधिकता ॥ कां समानवयें समता ॥ या दोनी सर्वथा त्यागाव्या ॥ ९५ ॥ जन्म-

१ संन्यास. २ लग्नांतील वेदीवर. ३ अर्धवट. ४ या आश्रमांतून त्या आश्रमीं जातां. ५ भगवंत. ६ सोडमुंज. ७ लग्न. ८ आपल्याच वर्णाची, ब्राह्मणास ब्राह्मण याप्रमाणें. ९ पवित्र. १० योग्य. ११ जन्मपत्रिका.

*ना. अवस्था.

पत्र पाहतां दिठीं ॥ वरुषें सातें पांचें धाकुटी ॥ ते पर्णावी स्वधर्मदृष्टीं ॥ भार्या गोमटी ती जांव ॥ ९६ ॥ नोवरी पाणिग्रहणयुक्त ॥ आठांपासूनि दशवर्षांत ॥ अधिक ते वृषली निश्चित ॥ शास्त्रार्थ प्रयोगें ॥ ९७ ॥ गर्भाष्टमीहूनि खालती ॥ जिची वयसा असे निश्चितीं ॥ ते नोवरी वराधिकारीं अप्राप्तीं ॥ ऐसें शास्त्रार्थीं बोलिलें ॥ ९८ ॥ ऐशा लक्षणाचा नाहीं बाधू ॥ तैशी पर्णावी शुद्ध वधू ॥ मग आश्रमधर्म अतिशुद्धू ॥ शास्त्र अविरुद्धू तो ऐक ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ इज्याध्ययनदानानि सर्वेषां च द्विजन्मनाम् ॥ प्रतिग्रहोऽध्यापनं च ब्राह्मणस्यैव याजनम् ॥ ४० ॥

॥ टीका ॥ ब्राह्मणाचें षट्कर्म जाण ॥ यजन आणि याजन ॥ अध्ययन आणि अध्यापन ॥ प्रतिग्रह दान हे साही ॥ ४०० ॥ हो कां द्विजन्मे तिन्ही वर्ण ॥ त्यांत क्षत्रिय वैश्य दोघेजण ॥ त्यांस तींकर्मीं अधिकार पूर्ण ॥ यजन दान अध्ययन ॥१॥ जे *उत्तमजन्मे ब्राह्मण ॥ त्यांसि षट्कर्मीं अधिकार जाण ॥ तिनी परमार्थाशी पूर्ण ॥ जीविकावर्तन ×तींकर्मीं ॥ २ ॥ कोण कर्म जीविकेसी ॥ कोणें पाविजे परमार्थासी ॥ त्या ब्राह्मणकर्मविभागासी ॥ ऐक तुजपाशीं सांगेन ॥ ३ ॥ यजन तें यज्ञाचरण ॥ अध्ययन तें वेदपठण ॥ दान जें देणें आपण ॥ हें त्रिकर्म जाण परमार्था ॥ ४ ॥ गुरुत्व घेऊनि आपणें ॥ याजन तें याग +करवणें ॥ अध्यापन वेद पढवणें ॥ स्वयें दान घेणें तो प्रतिग्रहो ॥ ५ ॥ जाहलिया ※सच्छिष्यसंपत्ती ॥ ³इयें तिहींकर्मे जीविकावृत्ती ॥ गुरुत्वें गुरुपूजाप्राप्ती ॥ तेणें जीविकास्थिती ब्राह्मणा ॥ ६ ॥ क्षत्रियवैश्यद्विजन्म्यांसी ॥ गुरुत्व बोलिलें नाहीं त्यांसी ॥ हीं तिन्ही कर्में त्यांसी ॥ ²निषेधतेसी यालागीं ॥ ७ ॥ आतां ब्राह्मणाचें लक्षण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ ⁷मुख्यमुख्योत्तम साधारण ॥ त्रिविध जाण उद्धवा ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ प्रतिग्रहं मन्यमानस्तपस्तेजोयशोनुदम् ॥ अन्याभ्यामेव जीवेत शिलैर्वा दोषदृक् तयोः ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ स्वधर्मनिष्ठब्राह्मणापाशीं ॥ तपतेजधैर्ययशोराशी ॥ प्रतिग्रहो इतुकियांसी ॥ मूळनाशासी कारण ॥९॥ जो स्वधर्मनिष्ठ ब्राह्मण ॥ ⁴करी प्रतिग्रहो अंगीकारण ॥ तो जाण पां साधारण ॥ हें ¹एक लक्षण द्विजाचें ॥४१०॥ जो प्रतिग्रहा पराङ्मुख ब्राह्मण ॥ तेणें याजन अध्यापन जाण ॥ स्वधर्में करूनि द्रव्यार्जन ॥ जीविकावर्तन करावें ॥११॥ न धरोनि द्रव्याशा मानसीं ॥ करावें यागांत कर्मासी ॥ कां सांगोनि वेदाक्षरासी ॥ द्रव्य त्यापाशीं इच्छूं नये ॥१२ करूनि वेदाक्षरदान ॥ जो शिष्याचेंही न घे धन ॥ ऐसा वैराग्यें परिपूर्ण ॥ तो शुद्ध ब्राह्मण सर्वथा ॥१३॥ ऐक त्याचें जीविकावर्तन॥शिल कां उंछवृत्ती जाण॥ऐक त्याचेंही लक्षण ॥ सकारण सांगेन ॥ १४ ॥ शेत सर्वगूनि नेल्या जाण ॥ ते शेतीं प्राप्त कणसें कांकण ॥ ते शिलवृत्ति संपूर्ण ॥ ऐक लक्षण उंछवृत्तीचें ॥ १५ ॥ स्वामी नसतां सांडलें जाण ॥ ऐसे हाटेंवाटें पडिले

१ गर्भधारणासून आठवें वर्षाच्या आंत. २ स्त्री. ३ शिकविणें. ४ दान घेणें. ५ उदरनिर्वाह. ६ निषेधिलीं. ७ द्रव्याची इच्छा. ८ काढून. ९ मालक. १० बाजारांत व रस्त्यांत.

*मो. उत्पन्न जन्म. ×ना. तिहीं कर्मीं. +मो. करणें. ※मो. शिष्यसंपत्ती. ³मो. हें कर्म जीविकावृत्ती. ²मो. निषिद्ध जाण सर्वथा. ⁷मो. मुख्या मुख्योत्तम साधन, त्रिधा जाण उद्धवा. ⁴ना. परप्रतिग्रहो. ¹ना. ऐक.

कण ॥ ते वेंचूनि घेणें आपण ॥ जीविकावर्तन यावरी ॥ १६ ॥ त्या नांव उंछवृत्ती ॥ ब्राह्मणाची अतिशुद्ध स्थिती ॥ तोचि प्रकार उद्धवाप्रती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ ब्राह्मणस्य हि देहोऽयं क्षुद्रकामाय नेष्यते ॥ कृच्छ्राय तपसे चेह प्रेत्याऽनंतसुखाय च ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ वर्णांमाजीं उत्तमवर्ण ॥ त्या ब्राह्मणाचा देहो जाण ॥ क्षुद्रकामार्थ निर्माण ॥ देव आपण नाहीं केला ॥ १८ ॥ पशुपक्ष्यादियोनींच्याठायीं ॥ कामावांचूनि आन नाहीं ॥ तैं जरी ब्राह्मणाचे देहीं ॥ तैं विशेष कायी उत्तमत्वें ॥ १९ ॥ ब्राह्मणाचे देहीं जाण ॥ करावें स्वधर्मानुष्ठान ॥ माझेनि उद्देशें संपूर्ण ॥ तपसाधन कृच्छ्रादिकें ॥ ४२० ॥ मी हृदयीं धरोनि अनंत ॥ जो पूर्णवैराग्यें वैराग्ययुक्त ॥ तपादिसाधनीं *सतत ॥ सदा शिणत ब्राह्मण जे ॥ २१ त्यांसि देहपातांच्या अंतीं ॥ माझ्या अनंतसुखाची प्राप्ती ॥ +तेथ स्वर्गसुखादिसंपत्ती ॥ म वळती तत्काळ ॥ २२ ॥ ज्या सुखाचे सुखस्थितीं ॥ स्फुरेना संसारस्फूर्ती ॥ जेथूनि नाहं पुनरावृत्ती ॥ ते सुखप्राप्ती त्या ब्राह्मणां ॥ २३ ॥ कृच्छ्रादिसाधनयुक्ती ॥ ब्राह्मणा ब्रह्मसुखप्राप्ती ॥ त्याचि सुखाची सुखसंपत्ती ॥ शिलोंछवृत्ती साधकां ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ शिलोंछवृत्त्या परितुष्टचित्तो धर्मं महांतं विरजं जुषाणः ॥ मय्यर्पितात्मा गृह एव तिष्ठन्नातिप्रसक्तः समुपैति शांतिम् ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ शिळ अथवा उंछवृत्ती ॥ करूनि संतुष्ट सदा चित्तीं ॥ विषयवैराग्यें मत्प्राप्ती पूजिती अतिथी मद्भावें ॥ २५ ॥ अतिथि आलिया देख ॥ प्राणांतींही नव्हे पराङ्मुख ॥ न ठवे निज तहान भूक ॥ समयीं आवश्यक दे अन्न ॥ २६ ॥ तेथ अत्यादरेंसी जाण ॥ देऊ अत्यंत ×सन्मान ॥ यथाशक्त्या देतां अन्न ॥ मी जनार्दन संतुष्टें ॥ २७ ॥ सांडूनियां अभिमान ॥ सर्वजीवांसी सदा लीन ॥ या नांव ॐमहद्धर्म जाण ॥ शुद्ध लक्षण हें धर्माचें ॥ २८ ऐसें जें स्वधर्माचरण ॥ तें करत्यांसि अति भूषण ॥ ये धर्मीं न रिघे दूषण ॥ अतिशुद्ध जा या नांव ॥ २९ ॥ भजनमाजीं रंगली चित्तवृत्ती ॥ यालागीं विसरला गृहासक्ती ॥ त्यासि गृहाश्रमीं माझी प्राप्ती ॥ सुखसंपत्ती निजबोधें ॥ ४३० ॥ निर्धनासि ऐशिया रीतीं ॥ गृहाश्रमीं माझी प्राप्ती ॥ आतां सधनाचे प्राप्तीची स्थिती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ३१ ॥ सधन हे जें सज्ञान ॥ तें न करितां अतिसाधन॥माझी प्राप्ती अति सुगम जाण॥ऐक लक्षण तयाचें॥

॥ श्लोक ॥ समुद्धरंति ये विप्रं सीदंतं मत्परायणम् ॥ तानुद्धरिष्ये नचिरादापद्भ्यो नौरिवार्णवात् ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ आधींच पूज्य ब्राह्मण ॥ त्याहीवरी माझा भक्त जाण॥माझेनि भजनें अतिसंपन्न मद्भावें पूर्ण परिपक्क ॥ ३३ ॥ मागणें नाहीं सर्वथा ॥ हा नेम माझिया निजभक्ता ॥ त्यासि प डिजे क्षुधादिव्यथा ॥ ते निवारिता जो होय ॥ ३४ ॥ देऊनि अन्न धन जीवन ॥ वस्त्र आदि

१ क्षुल्लक काम सुखासाठीं. २ मरणकाळीं. ३ जन्ममरणाचे फेरे. ४ निरिच्छबुद्धीनें. ५ आपल सामर्थ्याप्रमाणें. ६ आसक्त झाली. ७ द्रव्यवान्.

*मो. संतप्त. +मो. आतां साधनाचे प्राप्तीची रीती । ऐक तुजप्रती सांगेन ॥ ×: [illegible]. ॐमो. महंतधर्म.

रूनि लवण ॥ ऐसें वेंचूनियां निजधन ॥ भक्तसंरक्षण जो करी ॥ ३५ ॥ नाहीं देणें निर्भेत्सि-नां ॥ देऊनि आभार न ठेवी माथां ॥ सन्मानें अतिनम्रता ॥ जो मद्भक्तां संरक्षी ॥ ३६ ॥ जेवीं पोटांतले कळवळेनसी ॥ माता गोड तें दे बाळकासी ॥ तेवीं सांडोनि निजस्वार्थासी ॥ माझ्या भक्तासी जो रक्षी ॥ ३७ ॥ तें मागें सांडूनि निजभक्ता ॥ त्यासि मी वाहीं आपुले माथां ॥ *मग वैकुंठाही परता ॥ त्याही परता पाववीं ॥ ३८॥ ज्यासि म्यां वाहिलें निजमाथां ॥ त्यासि कोण्या अर्थाची दुर्लभता ॥ जो संरक्षी माझ्या निजभक्तां ॥ त्यासि उद्धरिता मी उद्धवा ॥ ३९ ॥ माझे भक्तांचीं सांकडीं ॥ जो कोणी निजांगें दवडी ॥ त्यासि भवार्णव परथडी ॥ तत्काळ रोकडी मी पाववीं ॥ ४४० ॥ जेवीं कां जळसागरीं ॥ नाव धनवंतातें तारी ॥ तेवीं भक्तरक्षका संसारीं ॥ मी उद्धरीं उद्धवा ॥ ४१ ॥ यापरी धनवंत जाण ॥ जो करी भक्तसंरक्षण ॥ देवकीवसुदेवांची आण ॥ त्याचें उद्धरण मी करीं ॥ ४२ ॥ सर्वांचें आपत्तीचें निवारण ॥ राजेनें करावें आपण ॥ त्या राजधर्माचें लक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ सर्वाः समुद्धरेद्राजा पितेव व्यसनात्प्रजाः ॥ आत्मानमात्मना धीरो यथा गजपतिर्गजान् ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ ॥ सर्वांचें आपत्तींत रक्षण ॥ रायें करावें आपण ॥ दीन दुर्बळ ब्राह्मण ॥ अयाचित ×जन शोधूनी ॥ ४४ ॥ व्यसनप्राप्ति निजात्मजा ॥ पिता संरक्षणीं निघे पैजा ॥ तेवीं आपत्तीपासोनि प्रजा ॥ संरक्षणीं राजा सादर ॥ ४५ ॥ करूनि प्रजांचें संरक्षण ॥ आपुल्या आपत्तीसि आपण ॥ स्वयें करावें निवारण ॥ हा स्वधर्म जाण रायाचा ॥ ४६ ॥ चिखलीं रुतल्या भद्रजाती ॥ स्वयें +निघे आत्मशक्तीं ॥ गजी गजशौर्यें नेणों किती ॥ ⁕काढी रुती बाहेरी ॥ ४७ ॥ तेवीं राजा जो भूपती ॥ तेणें प्रजा रक्षाव्या आपत्तीं ॥ आपुलेही आपत्तीची निवृत्ती ॥ निजात्मशक्तीं जो करी ॥ ४८ ॥ ऐशिया स्वधर्मस्थिती ॥ सादरें वर्ते जो भूपती ॥ त्या स्वधर्माची फळप्राप्ती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ एवंविधो नरपतिर्विमानेनार्कवर्चसा ॥ विधूयेहाशुभं कृत्स्नमिंद्रेण सह मोदते ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ ॥ या परी जो कां नृपती ॥ इहलोकींच्या †राज्यप्राप्तीं ॥ अधर्म नाशोनि स्वधर्मस्थितीं ॥ स्वर्गप्राप्ती तो पावे ॥ ४५० ॥ राज्याचे अंतीं नरक ॥ ऐसें बोलती ज्ञाते लोक ॥ ते निरयगती नाशोनि देख ॥ स्वधर्में परलोक पावले ॥ ५१ ॥ ते स्वर्गलोकीं गा जाण ॥ अर्कप्रकाशसम विमान ॥ तेथ आरूढोनि आपण ॥ इंद्रासमान सुख भोगी ॥ ५२ ॥ गृहस्थाश्रम अतिविषम ॥ तेथें आचरतां स्वधर्म ॥ बोडवे जैं कां दुर्गमें ॥ ते ‡आपद्धर्म अवधारीं ॥ ५३ ॥

१ उपकार. २ ममतेनें. ३ पलीकडे. ४ संकटें. ५ संसाररूपसमुद्रांतून पार. ६ गजानें. ७ संकट, दुःख. ८ आपल्या पुत्रास. ९ हत्ती. १० गजाचीं बालकें. ११ वर्तन करितो. १२ नरकप्राप्ति. १३ सूर्यप्रकाशाप्रमाणें तेजस्वी. १४ फार कठीण. १५ संकट.

*मो. त्यासी कोण अर्थाची दुर्लभता ॥ वैकुंठापरता तो पाववी. ×मो. जाण. +ना. न निघे. ⁕ना. काढिती. †मो. राज्याप्रति. ‡मो. अपारधर्म.

॥ श्लोक ॥ सीदन् विप्रो वणिग्वृत्त्या पण्यैरेवापदं तरेत् ॥ खड्गेन वापदाक्रांतो न श्ववृत्त्या कथंचन ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ स्वधर्मे पीडितां ब्राह्मणासी ॥ तेणें करावें वणिग्वृत्तीसी ॥ कां दुराविलें क्षात्रधर्मासी ॥ तो *हिंसादोषी अतिदुष्ट ॥ ५४ ॥ ब्राह्मणासि हिंसाकर्म ॥ तो जाण पां परम अधर्म ॥ लागल्या अनुपत्ती दुर्गम ॥ तें क्षात्रधर्म करावा ॥ ५५ ॥ करितां वाणिज्य कर्मास ॥ तिळ ×सर्षप कार्पास ॥ कां लवणादि रस तैजस ॥ यांच्या महादोष विकर्यी ॥ ५६ ॥ या सांडोनि सदोषां समस्तां ॥ लागावें वाणिज्यपंथा ॥ तांबूलपर्णें श्वेतवस्त्रता ॥ हें विकितां निर्दुष्ट ॥ ५७ ॥ ऐशिया वाणिज्यस्थितीं ॥ ज्याची ढळेना अनुपत्ती ॥ तेणें खड्ग घेऊनि हातीं ॥ क्षात्रवृत्ती करावी ॥ ५८ ॥ तेथें चोरावीं ना अंगें ॥ रणीं न सरावें मागें ॥ स्वामिकार्याचेनि योगें ॥ देहत्यागें उठावें ॥ ५९ ॥ ऐशिया शुद्धक्षात्रवृत्तीं ॥ ब्राह्मणें कंठावी अनुपत्ती ॥ परी नीचसेवा प्राणांतीं ॥ श्ववृत्ती न करावी ॥ ४६० ॥ क्षत्रियांसि स्वधर्मे अनुपत्ती ॥ लागल्या वर्तावें कोणे स्थितीं ॥ तें विशद करूनि श्रीपती ॥ उद्धवाप्रती सांगत ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ वैश्यवृत्त्या तु राजन्यो जीवेन्मृगययाऽऽपदि ॥ चरेद्वा विप्ररूपेण न श्ववृत्त्या कथंचन ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ क्षत्रियासि लागल्या अनुपत्ती ॥ पूर्वोक्त करावी वणिग्वृत्ती ॥ कां पारधी करावी वनांतीं ॥ तेणें अनुपत्ती कंठावी ॥ ६२ ॥ येणेंही न कंठे अनुपत्ती ॥ तरी भीक मागावी विप्रगतीं ॥ परी नीचसेवा प्राणांतीं ॥ श्ववृत्ती न करावी ॥ ६३ ॥ स्वधर्मे वैश्यासि अनुपत्ती॥ लागल्या वर्तावें कोणे स्थितीं ॥ ते विवंचना उद्धवाप्रती ॥ कृष्ण कृपामूर्ती सांगत ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ शूद्रवृत्तिं भजेद्वैश्यः शूद्रः कारुकटक्रियाम् ॥ कृच्छ्रान्मुक्तो न गर्ह्येण वृत्तिं लिप्सेत कर्मणा ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ वैश्यासि लागल्या अनुपत्ती ॥ तेणें धरावी शूद्रवृत्ती ॥ निष्कपट सेवा यथास्थितीं ॥ तींवर्णांप्रती करावी ॥ ६५ ॥ वैश्य पीडिल्याही अनुपत्ती ॥ ब्राह्मण क्षत्रियांची वृत्ती ॥ सर्वथा धरूं नये हातीं ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६६ ॥ वैश्यासि अति अनुपत्ती ॥ मांडल्याही प्राणांतगती ॥ तरी नीचसेवेची +प्रवृत्ती ॥ ※कोणेही अर्थीं न करावी ॥ ६७ ॥ शूद्रासि लागलिया अनुपत्ती ॥ तेणेंही न करावी श्ववृत्ती ॥ धरूनि बुरुडक्रिया हातीं ॥ जीविकावृत्ती करावी ॥ ६८ ॥ विकावीं दोर दांवीं शिंकीं ॥ पाटे वरवंटे टवोळीं निकीं ॥ कां काष्ठें वहावीं मस्तकीं ॥ जीविकेविखीं उदरार्थ ॥ ६९ ॥ आपत्काळाचिये गती ॥ चतुर्वर्णांची जीविकास्थिती ॥ म्यां सांगीतली तुजप्रती ॥ परी सर्वथा श्ववृत्ती सांडावी ॥४७०॥ एवं क्रमिलिया अनुपत्ती ॥ म्यां सांगीतल्या ज्या जीविकावृत्ती ॥ तेथें देखिलियाही लाभप्राप्ती ॥ सर्वथा

१ व्यापार. २ मोहरी. ३ कापूस. ४ तूप, तेल वगैरे. ५ पार पाडावी. ६ आपत्काल. ७ कुत्र्याची वृत्ती, नीचाची सेवा. ८ प्राप्त झाल्यास. ९ व्यापार. १० मृगया. ११ ब्राह्मणाप्रमाणें. १२ विचार. १३ दास्य. १४ चटया पाट्या विणणें वगैरे. १५ चाटू.

***ना. तेही सदोषी अतिदुष्ट. ×मो. सिरस. +ना. स्थिती. ※ना. श्ववृत्ती न करावी.**

ार्ती न धराव्या ॥७१॥ आपत्काळींच्या आपत्वृत्ती ॥ अनुपत्ति क्रमिल्याअंतीं ॥ सांडूनियां स्वधर्मेस्थिती ॥ यथानिगुती रहावें ॥७२॥ गृहस्थाचें विहित कर्म॥ त्यांतीलही अवश्यक धर्म ॥ तेथील ब्रह्मार्पणवर्म ॥ स्वयें पुरुषोत्तम सांगत ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ वेदाध्यायस्वधास्वाहाबल्यन्नाद्यैर्यथोदयम् ॥ देवर्षिपितृभूतानि मद्रूपाण्यन्वहं यजेत् ॥ ५० ॥

॥ टीका ॥ स्वाध्याय वेदाध्ययन ॥ वेदप्रोक्त ब्रह्मयज्ञ ॥ स्वधा ह्मणिजे पितृतर्पण ॥ स्वाहा जाण देवतादिकां ॥ ७४ ॥ बळिदानादिकीं जाण ॥ तृप्त होय भूतगण ॥ मनुष्यासि अन्नोदक दान ॥ हे पंचयज्ञ जाण नित्यकर्म ॥ ७५ ॥ *हेंचि ब्रह्मकर्म जाण ॥ जेणें होय ब्रह्मार्पण ॥ त्या अर्पणाची निजखूण ॥ तुज मी संपूर्ण सांगेन ॥ ७६ ॥ मी एकं कर्मकर्ता येथें ॥ हें सांडोनियां निजचित्तें ॥ भगवद्रूप भावितां भूतें ॥ ब्रह्मार्पण तेथें होय कर्म ॥ ७७ ॥ सांडितां कर्माभिमान ॥ कर्म होय ब्रह्मार्पण ॥ हें संकल्पेंवीण जाण ॥ अर्पिती खूण उद्धवा ॥ ७८ ॥ माझेनि हें कर्म जाहलें ॥ तें म्यां कृष्णार्पण केलें ॥ येणें संकल्पाचेनि बोलें ॥ अंगा आलें कर्तृत्व ॥ ७९ ॥ जो ह्मणे मी कर्मकर्ता ॥ तो होय कर्मफलभोक्ता ॥ मुख्य बाधक ते अहंता[३] ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ४८० ॥ ज्याच्याठायीं अहंममता ॥ त्याचे अंगीं नित्यबद्धता ॥ जो निरभिमानी निर्ममता ॥ नित्यमुक्तता त्यापाशीं ॥ ८१ ॥ यालागीं सांडूनि अभिमान ॥ पंचमहायज्ञाचरण ॥ गृहस्थें प्रत्यहीं करितां जाण ॥ कर्म ब्रह्मार्पण सहजेंचि ॥ ८२ ॥ जैसेनि अर्पे भगवंता ॥ ते गृहस्थाची नित्यकर्मता ॥ तुज म्यां सांगीतली तत्त्वतां ॥ यज्ञादिकथा ते ऐक ॥ ८३ ॥ यज्ञ करावया अधिकारवंत ॥ गांठीं शुद्ध बारासहस्रअर्थ ॥ ज्यासि वेदीं ज्ञान यज्ञांत ॥ तोचि येथ अधिकारी ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ यदृच्छयोपपन्नेन शुक्लेनोपार्जितेन वा ॥ धनेनाऽपीडयन् भृत्यान्न्यायेनैवाऽऽहरेत् क्रतून् ॥ ५१ ॥

॥ टीका ॥ ॥ उदीमव्यापारें जोडिलें ॥ कां +जें असत्[४] प्रतिग्रहें आलें ॥ नातरी परपीडा[५] प्राप्त जाहलें ॥ कां आडवूनि घेतलें जें द्रव्य ॥ ८५ ॥ द्रव्य देतां चरफडी ॥ ते शिष्या घालून सांकडीं ॥ ऐसा अर्थ जोडिला जोडी ॥ ते अपरवडी द्रव्याची ॥ ८६ ॥ जें यदृच्छा[६] सहज आलें ॥ कां जें शुक्लवृत्तीं[७] जोडिलें ॥ जें सुखोपायें हातां आलें ॥ तें द्रव्य विहिलें[८] यज्ञार्थ ॥ ८७ ॥ पाडूनि कुटुंबासी लंघनें[९] ॥ सर्व द्रव्य वेंचूनि जाण ॥ करूं नये यज्ञाचरण ॥ अधर्मपण तेणेंही ॥ ८८ ॥ कां जीविका जीवनवृत्ती ॥ याग करूं नये निश्चितीं ॥ लौकिकीं मिरवावया कीर्ति[१०] ॥ याग करिती ते मंद ॥ ८९ ॥ न धरितां कर्माभिमान ॥ शुद्ध द्रव्य जोडिल्या जाण ॥ करावें यज्ञाचरण ॥ हें स्वधर्मलक्षण गृहस्थाचें ॥ ४९० ॥ सांडूनियां

१ वेदानें सांगितलेलें. २ सर्वांत एक. ३ अभिमान. ४ अन्यायानें. ५ दुसऱ्यास दुःख देऊन. ६ अनायासें. ७ ब्राह्मणानें ब्राह्मणाची चाकरी करून अथवा ब्राह्मणापाशीं भिक्षा मागून, शुद्धाचरण. ८ सांगितलें. ९ उपवास. १० मोठेपणा.

*ना. जें स्वधर्मोत्तम जाण. +मो. जें असत्य निग्रहें आलें.

षयांलिप्सा चित्तीं ॥ त्यजूनि गृहाची गृहासक्ती ॥ गृहस्थें धरावी निवृत्ती ॥ हें स्वयें पती सांगत ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ कुटुंबेषु न सज्जेत न प्रमाद्येत्कुटुंब्यपि ॥ विपश्चिन्नश्वरं पश्येददृष्टमपि दृष्टवत् ॥ ५२ ॥

टीका ॥ जरी जाहली स्त्रीपुत्रगृहस्थिती ॥ परी न धरावी त्यांची आसक्ती ॥ सावध खावी चित्तवृत्ती ॥ परमात्मयुक्ती साधनें ॥ ९२ ॥ सांडूनि कल्पना प्रमदासंग ॥ चुकवूनि मर्दांचें अंग ॥ ईश्वरनिष्ठा अतिचांग ॥ वृत्ति अभंग राखावी ॥ ९३ ॥ गृहकुटुंबविषयाक्ती ॥ पाहतां विवेकाचिये स्थितीं ॥ परिपाकें नश्वरप्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९४ ॥ सा इहलोकींचा परिपाकू ॥ तैसेंचि जाण स्वर्गसुख ॥ उभयतां नश्वर देखू ॥ केवळ मायिकू ध्यार्थें ॥ ९५ ॥ स्त्री पुत्र आणि धन ॥ हें नश्वर जैसें कां स्वप्न ॥ येचिविषयीं निरूपण ॥ यें नारायण सांगत ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ पुत्रदाराप्तबंधूनां संगमः पांथसंगमः ॥ अनुदेहं वियंत्येते स्वप्नो निद्रानुगो यथा ॥ ५३ ॥

। टीका ॥ ॥ जैसे वृक्षातळीं पांथिकें ॥ एकत्र मीनले क्षण एक ॥ तैसे पुत्रदाराप्तलोक ॥ र्वेही क्षणिकसंगम ॥ ९७ ॥ जैसा नदीप्रवाहेंसी ॥ काष्ठें मीनलीं संगमीं जैशीं ॥ सोयरीं सर्वें जाण तैसीं ॥ हेलाव्यासरसीं फुटती ॥ ९८ ॥ जे योनीं जो जीव देहधारी ॥ तेथें तेचि योनीचीं सोयरीं ॥ ऐशीं अनंतजन्में संसारीं ॥ तें अमित सोयरीं जीवाचीं ॥ ९९ ॥ परी ये योनीचीं ते योन्यंतरीं ॥ येरयेरां नोळखती सोयरीं ॥ जैसी ये स्वप्नींची *पदार्थपरी ॥ या स्वप्नांतरीं रिघेना ॥ १०० ॥ यापरी +हे समस्त ॥ स्त्रीपुत्रबंधुआप्त ॥ मायामय कल्पित ॥ जाणे निश्चित तो धन्य ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ ॥ इत्थं परिमृशन्मुक्तो गृहेष्वतिथिवद्वसन् ॥ न गृहैरनुबध्येत निर्ममो निरहंकृतः॥ ५४ ॥

॥ टीका ॥ ॥ ऐसोनि विवेकें विवेकवंता ॥ कदा बाधीना मोहममता ॥ अतिथीच्यापरी सर्वथा ॥ अनासक्तता गृहवासीं ॥ २ ॥ एवं ×निर्मानमोहममता ॥ जो उदासीन गृहावस्था ॥ ज्यासि निष्कामनिर्लोभता ॥ त्यासि ⁂अहंता बाधीना ॥ ३ ॥ निर्ममता निरभिमान ॥ व्हावया मुख्य गुरुभजन ॥ तेणें वैराग्यविवेकज्ञान ॥ सहजाचि जाण गुरुभक्तां ॥ ४ ॥ ऐशिया वैराग्यविवेकस्थिती ॥ गृहीं वसतां गृहस्थाप्रती ॥ प्राप्त होय निजमुक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ५ ॥ आतां आश्रमांतराची गती ॥ स्वयें सांगताहे लक्ष्मीपती ॥ भक्ति विरक्ति निजशांती ॥ आश्रमास्थितिविभाग ॥ ६ ॥

---

१ विषय प्राप्त होण्याची इच्छा. २ वैराग्य. ३ तरुण स्त्रियांची संगति. ४ स्त्रियांचें. ५ निश्चल. ६ परिणामीं. ७ परिणाम. ८ व्यर्थ. ९ क्षणिक. १० मार्गे चालणारे. ११ अन्य जन्मांत. १२ आसक्ति नसणें. १३ मोक्ष.

*मो. थोरी. +ना. देहगेह. ×ना. निराभिमान. ⁂मो. अहंममता.

॥ श्लोक ॥ ॥ कर्मभिर्गृहमेधीयैरिष्ट्वा मामेव भक्तिमान् ॥ तिष्ठेद्वनं वोपविशेत्प्रजावान् वा परिव्रजेत् ॥ ५५ ॥

॥ टीका ॥ ॥ गृहीं असोनि आश्रमस्थितीं ॥ ज्यासि मुख्यत्वें भगवद्भक्ती ॥ त्यासि आश्रमांतरप्राप्ती ॥ नलगे निश्चितीं मद्भक्तां ॥ ७ ॥ तोंचि माझें कैसें भजन ॥ स्वाहा स्वधा यज्ञदान ॥ *जें जें जेथें अर्पे जाण ॥ तें तें मदर्पण निश्चित ॥ ८ ॥ काळीं अकाळीं सर्वथा ॥ भजनीं पालट नाहीं चित्तां ॥ ऐशी ज्या गृहस्थाची अवस्था ॥ तेणें असावें सर्वथा ×गृहाश्रमीं ॥९॥ जया कर्माची अति आसक्ती ॥ +आणि विषयांची अनासक्ती ॥ नाहीं ज्ञानयुक्त निजशांती ॥ त्यासि वानप्रस्थीं अधिकारु ॥ ५१० ॥ ज्यासि विरक्ति शांति ज्ञानस्थिती ॥ करतळामळ हस्तप्राप्ती ॥ त्यासि संन्यासग्रहणास्थिती ॥ जाण निश्चितीं अधिकार ॥ ११ ॥ जाहलिया पुत्रसंतती ॥ भार्या देऊनि पुत्राच्या हातीं ॥ संन्यास करावा निश्चितीं ॥ श्रुती ये अर्थीं संमत ॥ १२ ॥ ज्यासि गृहस्थाश्रमीं नावडे भक्ती ॥ अपार पोरांची संतती ॥ जाहल्याही न ※धरी विरक्ती ॥ जो वानप्रस्थीं रिघेना ॥ १३ ॥ ज्याचा न फिटे १विषयभ्रम ॥ जो संन्यासी नव्हे निष्कर्म ॥ त्याचें जाण निंद्य जन्म ॥ स्वयें पुरुषोत्तमा सांगत ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ यस्त्वासक्तमतिर्गेहे पुत्रवित्तैषणातुरः ॥ स्त्रैणः कृपणधीर्मूढो ममाहमिति बध्यते ॥ ५६ ॥

॥ टीका ॥ जो गृहासक्तीं सुभट्ट ॥ तो एषणात्रयीं वरिष्ठ ॥ विषयालागीं लंपट ॥ अतिलोभिष्ठ धनेच्छा ॥ १५ ॥ ५जो विकारां आकळला ॥ जो अहंममतेचा पोसणा जाहला ॥ जो स्त्रियेसि जीवें विकला ॥ २मोहाच्या पडिला महादुर्गीं ॥१६॥ जो आशेचिया *चेवणा ॥ सर्वांगाचा वोळगणा ॥ यालागीं बद्धतेचा जाणा ॥ जाहला आंदणा जीवेंभावें ॥ १७ ॥ तेचि बद्धतेची गती ॥ ८त्या मूर्खांची वदंती ॥ स्वयें सांगताहे श्रीपती ॥ उद्धवाप्रती उद्देशें॥१८

॥ श्लोक ॥ अहो मे पितरौ वृद्धौ भार्या बालात्मजात्मजाः ॥ अनाथा मामृते दीनाः कथं जीवंति दुःखिताः ॥ ५७ ॥

॥ टीका ॥ माता पिता वृद्धें केवळें ॥ भार्या धाकुटी तान्हीं बाळें ॥ मज होतां यांवेगळें ॥ तेणोंचि काळें मरतील ॥ १९ ॥ ऐसिया नानावस्था ॥ आपुल्याही मरणा परता ॥ वाहे कुटुंबाची चिंता ॥ ऐक आतां सांगेन ॥ ५२० ॥ एखादेनि अकाळकाळें ॥ मजचि जैं मरण आलें ॥ तें काय करितील स्त्रिया बाळें ॥ आंसुवें डोळां लोटती ॥ २१ ॥ मातापित्यांची पडो वाट ॥ स्त्रियेसि होईल हृदयस्फोट ॥ बाळांचा शोषेल कंठ ॥ पिटी ललाट तेणें दुःखें ॥ २२ ॥ मज निमोलिया अंतीं ॥ हीं अतिदुःखी कैशीं जीती ॥ ऐशी जीतांची करी खंती ॥ मूढमती

१ इतर आश्रम घेणें. २ सोपी, ३ वेद. ४ याविषयीं. ५ निपुण. ६ अर्थेषणा, दारैषणा, पुत्रैषणा यांविषयीं. ७ बोलणीं. ८ भलत्या वेळीं. ९ अश्रु. १० मी. ११ मेल्यावर. १२ वांचतील.

*मो. जें जें लक्षे जेथें अर्पण. ×मो. गृहस्थाश्रमीं. +मो. आणि विषयांची प्रीति. ※मो. रिघे. १मो. विषयाश्रम. ५मो. जो कामाचा अंकिला. २मो. जो मूढतेच्या पडिला महादुर्गीं. *मो. वणवणा. ८ना. त्याच्या मूर्खत्वाची वदंती.

लागीं ॥ २३ ॥ गाढ मूढतेचें भरितें ॥ अपार उथळलें जेथें ॥ विवेकाचें तारूं तेथें ॥ त्रि- तार्थें बुडालें ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ एवं गृहाशयाक्षिप्तहृदयो मूढधीरयम् ॥ अतृप्तस्ताननुध्यायन् मृतोऽधं विशते तमः ॥ ५८ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे सप्तदशोऽध्यायः ॥ १७ ॥

टीका ॥ यापरी गृहासक्ती आसक्त ॥ सदा विषयीं अतृप्तचित्त ॥ अखंड स्त्रीपुत्रांतें ध्यात ॥ दयाआंत मोहित ॥ २५ ॥ त्या मोहाचे *मोहविधी ॥ मूढ जाहली हृदय बुद्धी ॥ ऐसा नि- ला जो त्रिशुद्धी ॥ तो प्रवेशे आधीं महातमीं ॥ २६ ॥ ज्या तमाचेनि महाबळें ॥ ज्ञान हो- नि ठाके आंधळें ॥ तेथ सूर्याचे फुटती डोळे ॥ ते तमीं लोळे तो तामसू ॥ २७ ॥ ज्या त- पासूनि उपरतीं ॥ हीनेणेगा कल्पांतीं ॥ त्या अंधतमातें पावती ॥ मूढमती अतिमंद ॥२८॥ हामोहाचे परिपाठीं ॥ नश्वर विषयासाठीं ॥ चुकोनि अनंतसुखाची पुष्टी ॥ दुःखकोटी भो- गेती ॥ २९ ॥ यालागीं मनुष्यदेहीं जाण ॥ करोनियां भगवद्भजन ॥ चुकवावें जन्ममरण ॥ आपणा आपण उद्धरावें ॥५३०॥ जीवासी जेजे योनीं जन्मगती ॥ तेथें तेथें विषयासक्ती ॥ चि मनुष्यदेहीं विषयस्थिती ॥ तें परमार्थप्राप्ती कोणे देहीं ॥ ३१ ॥ विशेषें उत्तमोत्तम ॥ प्राप्त जाहल्या ब्राह्मणजन्म ॥ ज्याचे नित्यकर्मीं परब्रह्म ॥ अतिसुगम सहजची ॥ ३२ ॥ ※ज्यासि र्ततां अहोरातां ॥ संध्यावंदनविधानस्थितीं ॥ त्रिकाळ पापाची निष्कृती ॥ जाण निश्चितीं ब्राह्मणा ॥ ३३ ॥ सकळ साराची सारमूर्ती ॥ तो गायत्रीमंत्र ज्याचे हातीं ॥ +वेद मुखाची ास पाहती ॥ एवढी प्राप्ती ब्राह्मणा ॥ ३४ ॥ ब्राह्मणाचे हृदयीं जाण ॥ वेदरूपें नारायण ॥ स्वयें राहिला आपण ॥ धन्य ब्राह्मण त्रिलोकीं ॥ ३५ ॥ ज्या ब्राह्मणांसि सदा जाण ॥ शिरीं वंदिती सुरगण ॥ ज्या ब्राह्मणाचा श्रीचरण ॥ स्वयें नारायण हृदयीं वाहे ॥ ३६ ॥ जयाअंगीं एकी ×रती ॥ पाप नराहे संधेहातीं ॥ यालागीं ब्राह्मण 3पूज्यमूर्ती ॥ स्वयें 2रमापती बोलि- ला ॥ ३७ ॥ ज्याची भगवंत करी वर्णना ॥ किंपुनर्ब्राह्मणाः पुण्याः ॥ त्या भगवद्गीतावचना॥ सत्यत्व जाणा या हेतू ॥ ३८ ॥ ब्राह्मण आणि भगवद्भक्त ॥ तें सकळ भाग्य ०आलें तेथ ॥ 8त्यासि कोण अर्थ अप्राप्त ॥ त्याचे बोलांत हरि तिष्ठे ॥३९॥ ते काष्ठपाषाणप्रतिमें पहाहो ॥ प्रतिष्ठिती तेथ प्रकटे देवो ॥ एवढा ब्राह्मणीं सद्भावो ॥ सहजान्वयो सामर्थ्यें ॥ ५४० ॥ तो पावोनियां ब्राह्मणजन्म ॥ जो करी क्षुद्र विषयकर्म॥त्याचे हातींचा गेला पुरुषोत्तम ॥ अंधतम तो पावे ॥४१॥ एकाजनार्दनाची विनंती ॥ येऊनि मनुष्यदेहाप्रती ॥ करोनियां भगवद्भक्ती ॥ निजात्मप्राप्ती साधावी ॥ ५४२ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे ब्रह्मचर्यगृहस्थकर्मधर्मनिरूपणे एकाकारटीकायां सप्तदशोऽध्याय ॥ १७ ॥ श्लोक ॥ ५८ ॥ ओव्या ॥ ५४२ ॥ एकुणसंख्या ॥ ६०० ॥

---

१ जातें. २ पापी. ३ वैराग्य. ४ अनित्य. ५ श्रीवत्स. ६ लेशाही. ७ ब्राह्मण पवित्र आहेत हें काय विचारावें. ८ पदार्थ. ९ प्राप्त नाहीं. १० नीच. ११ नरक. १२ आत्मरूपाची प्राप्ती.

***मो. मोहवेधीं. ※मो. ज्याचें वर्तन अहोरात्रीं. +मो. देव. ×ना. राती. 3ना. पुण्य. 2मो. श्रीपती. ०मो. असे. 8मो. त्यासी कोण अप्राप्त.**

# अध्याय अठरावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐनमो कर्मप्रकाशका ॥ सद्विद्याविधिविवेका ॥ कर्मधर्मप्रतिपाळका ॥ जगन्नायका गुरुवर्या ॥१॥ वर्णाश्रमादि मर्यादा ॥ त्याचा सेतु तूं गोविंदा ॥ तूं कारण वेदानुवादा ॥ *वेदवादसंवादा तूं मूळ ॥ २ ॥ तूं शब्दसृष्टीचा अंकू ॥ तूं वेदगुह्यप्रकाशकू ॥ तूंचि एकला अनेकू ॥ व्याप्यव्यापकू तूंचि तूं ॥३॥ तूंचि तूं +विधि विधान ॥ तूं बोलिका तूंचि मौन ॥ एका आणि जनार्दन ॥ ×दोनी संपूर्ण तूं गुरुराया ॥ ४ ॥ यालागीं श्रीभागवता ॥ तूंचि अर्थ तूं कविता ॥ तूंचि अर्थावबोध करिता ॥ ०हेंही बोलविता तूं आम्हां ॥ ५ ॥ जैशीं आपुलींचि उत्तरें ॥ पडिसादा होती प्रत्युत्तरें ॥ तेवीं माझेनि मुखांतरें ॥ 7तूं कविताद्वारें बोलका ॥६॥ बोलका श्रीभागवतीं ॥ श्रीकृष्ण कृपामूर्ती ॥ तेणें 2वर्णाश्रमउत्पत्ती ॥ यथास्थिती सांगीतली ॥ ७ ॥ सप्तदशाध्यायीं सुगम ॥ सांगीतले ब्रह्मचर्यधर्म ॥ गृहस्थाचे स्वधर्मकर्म ॥ नित्यनेम निरूपिले ॥ ८ ॥ आतां अष्टादशाध्यायीं जाण ॥ वानप्रस्थाश्रमलक्षण ॥ संन्यासधर्माचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ वनं विविक्षुः पुत्रेषु भार्यां न्यस्य सहैव वा ॥
वन एव वसेच्छांतस्तृतीयं भागमायुषः ॥ १ ॥

॥ टीका ॥ आतां क्रमेंचि निरूपण ॥ वानप्रस्थाचें आलें जाण ॥ त्यासि वनास निघावया काय कारण ॥ आयुष्यलक्षण विभाग ॥ १० ॥ 'शतायुः' पुरुषमर्यादा श्रुती ॥ त्याच्या तृतीयभागाची स्थिती ॥ *सासष्टी क्रमिल्या अंतीं ॥ वनाप्रती निघावें ॥११॥ निघावया वनाप्रती ॥ भार्या देऊनि पुत्राचे हातीं ॥ आपण निघावें शीघ्रगतीं ॥ वानप्रस्थीं वनवासा ॥ १२ ॥ भार्या साध्वी पतिव्रता सती ॥ ईश्वरस्वरूप मानी पती ॥ भ्रतार निघतां वनाप्रती ॥ जे 9पुत्राप्रती राहेना ॥१३॥ सांडितां भ्रतारसेवेसी ॥ कल्पांत होपाहे जिसी ॥ जे भ्रतारचरणांची दासी ॥ ते सवें ❋वनासी आणावी ॥ १४ ॥ जो पुरुष स्त्रीसमवेत ॥ वनीं झाला वानप्रस्थ ॥ तेणें स्त्रीकामासि अलिप्त ॥ व्हावें दृढव्रत ते आश्रमीं ॥१५॥ जो वानप्रस्थ वनवासी ॥ तेणें धरावी दृढ शांति मानसीं ॥ नातळावें कामक्रोधांसी ॥ हेंही व्रत त्यासी आवश्यक ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ कंदमूलफलैर्वन्यैर्मेध्यैर्वृत्तिं प्रकल्पयेत् ॥ वसीत वल्कलं वासस्तृणपर्णाजिनानि च ॥ २ ॥

॥ टीका ॥ वनींचीं कंदमूलफळें ॥ 1जीं निपजलीं ऋतुकाळें ॥ तींही अतिपवित्रें निर्मळें ॥ आहार तेणें मेळें करावा ॥ १७ ॥ वनवासीं वस्त्रें जाण ॥ वल्कलें व्याघ्रमृगाजिन ॥ अथवा

---

१ पूल. २ सूर्य. ३ अर्थाचा बोध करणारा. ४ प्रतिध्वनीनें. ५ शंभरच वर्षें. ६ स्पर्शूं नये.

*ना. वेद सवादा. +मो. वेदविधान. ×मो. तूंचि. ०मो. देहीं. 7मो. तूं कवित्वद्वारें बोलविता. 2मो. उपपत्ती. *मो. सासष्ठी वर्षें. 9मो. पुत्रापाशीं. ❋ना. वनवासीं. 1मो. जे निपजती ज्या ऋतुकाळें.

ावीं केवळ तृण ॥ कां पर्णाभरणें वृक्षांचे ॥ १८ ॥ वानप्रस्थीं नेमग्रहण ॥ ऐक त्याचेंही ुण ॥ त्या नेमाचें निरूपण ॥ स्वयें नारायण सांगत ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ केशरोमनखश्मश्रुमलानि बिभृयाद्दतः ॥ न धावेदप्सु मज्जेत त्रिकालं स्थंडिलेशयः ॥ ३ ॥

टीका ॥ केश म्हणिजे मस्तकींचे ॥ श्मश्रु बोलिजे मुखींचे ॥ रोम ते कक्षोपस्थींचे ॥ छेदन चें न करावें ॥ २० ॥ मस्तकीं न करावें वपन ॥ न करावें श्मश्रुकर्म जाण ॥ न करावें मनखछेदन ॥ दंतधावन न करावें ॥२१॥ स्नान मुसलवैत् केवळ ॥ अवश्य करावें त्रिकाळ॥ ाळावे ना शरीरमळ ॥ *व्रत प्रबळ वनस्था ॥२२॥ केवळ भूमीवरी शयन ॥ सदा सर्वदा रावें जाण ॥ तळीं घालावें ना तृण ॥ मग आस्तरण तें कैंचें ॥ २३ ॥ यापरी वानप्रस्थें ाण ॥ दृढ 3करूनि व्रतधारण ॥ करावें ०तपाचरण ॥ तें तपलक्षण अवधारीं ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ ग्रीष्मे तप्येत पंचाग्नीन् वर्षास्वासारषाड्जले ॥ आकंठमग्नः शिशिर एवंवृत्तस्तपश्चरेत् ॥ ४ ॥

टीका ॥ उष्णकाळींचा पंचाग्नी ॥ अग्निकुंडें चहूंकोनी ॥ पांचवा रवि माध्यान्हीं ॥ ऐसा ंचाग्नी साधावा ॥ २५ ॥ माळा करोनि उंचप्रदेशीं ॥ घन वर्षतां धारावर्त्तैसी ॥ तेथ व्हावें आकाशवासी ॥ वर्षाकाळीं ऐसी तपप्राप्ती ॥ २६ ॥ आलिया हेमंतऋतूसी ॥ आकंठमग्न जळवासी ॥ जळवास करावा निशीं ॥ हे वानप्रस्थासी तपक्रिया ॥ २७ ॥ हे तपक्रिया प्रतिरुषीं ॥ विहित वानप्रस्थासी ॥ वयसापरत्वें भक्षणासी ॥ हृषीकेशी सांगत ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ अग्निपक्वं समश्नीयात्कालपक्वमथाऽपि वा ॥ उलूखलाश्मकुट्टो वा दंतोलूखल एव वा ॥ ५ ॥

॥ टीका ॥ अग्नीस्तव पाका आलीं ॥ कां काळें जीं परिपक्व झालीं ॥ तीं तापसालागीं भलीं ॥ +आहार 7विहिलीं उदरार्थ ॥ २९ ॥ दांत असलिया बळी ॥ फळें खावीं सगळीं ॥ कां गेलिया दांत समूळीं ॥ कांडूनि उखळीं सुखें खावीं ॥ ३० ॥ जरी उखळ न मिळे वनीं ॥ तरी खावीं दगडें ठेंचुनी ॥ नाहीं चाड गोडपणीं ॥ ×क्षुधानिवारणीं आहारार्थ ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ स्वयं संचिनुयात्सर्वमात्मनो वृत्तिकारणम् ॥ देशकालबलाभिज्ञो नाददीतान्यदाहृतम् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ऋतुकाळीं 8फळें संपूर्णें ॥ तीं कालांतराकारणें ॥ संग्रहो सर्वथा न करणें ॥ व्रतधारण वनस्था ॥ ३२ ॥ पूर्वदिवसीं फळें आणिलीं ॥ अपरदिवसीं जरी उरलीं ॥ तीं अवश्य पाहिजे त्यागिलीं ॥ नाहीं बोलिलीं आहारार्थ ॥ ३३ ॥ प्रत्यहीं आहारार्थ जाण ॥ फळें

---

१ पानांचे अलंकार. २ कांख व शिस्नावरील. ३ सार्धे. ४वस्त्र आंथरणें.५ वरला माचा. ६गळ्यापर्यंत. ७ शास्त्रानें सांगीतलीं. ८ बळकट. ९ दुसऱ्या कालाकरितां. १० दुसऱ्या दिवशीं.

*ना. मो. व्रती. 3मो. धरोनि. ०मो. तपपुरश्चरण. +मो. आहारीं. 7ना. विहितलीं. ×मो. क्षुधा निवारण उदरार्थ. 8मो. व्रतें.

आणावीं नूतन ॥ जीर्णफळांचें भक्षण ॥ निषिद्ध जाण *वनस्था ॥ ३४ ॥ आणिकें फळें जीं आणिलीं ॥ तीं अंगीकारीं निषिद्ध झालीं ॥ जीं स्वकष्टें आर्जिलीं ॥ तींचि विहिलीं आहारार्थ ॥३५॥ देश काळ वर्तमान ॥ इत्थंभूत कळलें ज्ञान ॥ तरी संग्रह न करावा जाण ॥ अदृष्टधारण निर्धारें ॥ ३६ ॥ पराचा प्रतिग्रहो जाण ॥ सर्वथा न करावा आपण ॥ प्रतिग्रह घेतां जाण ॥ व्रतखंडन वानप्रस्था ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ वन्यैश्चरुपुरोडाशैर्निर्वपेत्कालचोदितान् ॥ न तु श्रौतेन पशुना मां यजेत वनाश्रमी ॥ ७ ॥

॥ टीका ॥ जो वानप्रस्थ स्त्रीसमवेत ॥ त्यासि अग्निहोत्र झालें प्राप्त ॥ तेव्हां कर्म जें वेदोक्त ॥ तें करावें समस्त वनवासीं ॥ ३८ ॥ वनीं जीं फळें ज्या ऋतूस ॥ तो कल्पावा चरुपुरोडाश ॥ तेणें यजावा मी यज्ञपुरुष ॥ सावकाश मंत्रोक्त ॥ ३९ ॥ परी श्रौतकर्मविधान ॥ यागार्थ पशुहनन ॥ तें वानप्रस्थासि नाहीं जाण ॥ वनफळीं यजन यागाचें ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ अग्निहोत्रं च दर्शश्च पूर्णमासश्च पूर्ववत् ॥ चातुर्मास्यानि च मुनेराम्नातानि च नैगमैः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ पूर्वीं अग्निहोत्रकर्में जैशीं ॥ गृहीं होतीं गृहस्थासी ॥ तींचि चालवावीं वनवासीं ॥ वेदाज्ञेसीं वनस्थें ॥ ४१ ॥ आम्नायें आगमनिगमांसी ॥ जाणोनि करावें यागासी ॥ दर्शपौर्णमासचातुर्मास्यांसी ॥ निष्कामतेसी वेदाज्ञा ॥४२॥ ऐसा मुनीश्वर वनवासी ॥ तपस्वी तेजोराशी ॥ त्याचिये फळप्राप्तीसी ॥ स्वयें हृषीकेशी सांगत ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ एवं चीर्णेन तपसा मुनिर्धमनिसंततः ॥ मां तपोमयमाराध्य ऋषिलोकादुपैति माम् ॥ ९ ॥

॥ टीका ॥ ॥ ऐसें वेदोक्त +तप साचार ॥ ×आस्तिक्यभावें अत्यादर ॥ साक्षेपें करितां निरंतर ॥ अस्थिमात्र देह उरे ॥ ४४ ॥ शुष्कशरीर पांजरें ॥ त्वचेनें झांकिलिया शिरा ॥ परी सामर्थ्यें अतिखरा ॥ नसरे माघारा तपोनिष्ठ ॥४५॥ ऐसें यावज्जन्म करितां तप ॥ तो सबाह्य झाला निष्पाप ॥ लाहोनि ज्ञान सद्रूप ॥ माझें स्वरूप तो पावे ॥ ४६ ॥ अवशेष वासना असतां ॥ सूक्ष्मरूपें प्रतिबंधकता ॥ तपाभिमानें तत्त्वतां ॥ देहअहंता ※अणुमात्र ॥ ४७ ॥ परी फळाशा पोटीं नाहीं ॥ ऐसेनि निमाला जो देही ॥ तो पावोनि ऋषिलोकाच्याठायीं ॥ तेथोनि पाहीं मज पावे ॥ ४८ ॥ जो ऋषिलोकातें पावला ॥ तो क्रमें मुक्तीच्या मार्गा आला ॥ तेथूनि क्रमेंचि मज पावला ॥ यापरी उद्धरला ²वनस्थ ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ यस्त्वेतत् कृच्छ्रतश्चीर्णं तपो निःश्रेयसं महत् ॥ कामायाल्पीयसे युंज्याद्बालिशः कोऽपरस्ततः ॥ १० ॥

---

१ जुन्या शिळया फळांचें. २ दुसऱ्यांनीं. ३ ग्रहण करण्यास. ४ मिळविलीं. ५ शास्त्रानें सांगितलीं. ६ दान घेणें. ७ वेदांत सांगितलेल्या विधानें. ८ वेदानें. ९ श्रद्धेनें. १० हाडांचा सांपळा.

*मो. सर्वथा. +ना. तपसार. ×ना. आवश्यभावें. ※मो. अणुमात्र नाहीं. ²ना. वानप्रस्थ.

टीका ॥ ॥ एवं वानप्रस्थ अतिकष्टीं ॥ तपादिसाधनसंकटीं ॥ भोगफळाशेच्या तुटीं ॥ क्षपरिपाठीं पावेल ॥ ५० ॥ जें हाता आलें मोक्षफळ ॥ *आविरिंच्यादि अमंगळ ॥ तें पादिसाधनें निर्मळ ॥ कामार्थ केवळ कल्पिती ॥ ५१ ॥ जेवीं कां चिंतामणीचियेसाठीं ॥ गगे चोतीलागी खापरखुंटी ॥ कां परीस देवोनि पोलटी ॥ काळी गोमटी वीट मागे ५२ ॥ तेवीं मनुष्यपणाचिये स्थितीं ॥ उत्तमजन्में तपप्राप्ती ॥ ते तपक्रिया व्यर्थ करिती ॥ म वांछिती ते मूर्ख ॥ ५३ ॥ त्या मूर्खांचें मूर्खपण ॥ किती सांगावें गा गहन ॥ मोक्षप्राचें साधन ॥ कामलिप्सां जाण नाशिलें ॥ ५४ ॥ असो हें मूर्खांचें कथन ॥ वानप्रस्थाचेंचि क्षण ॥ पुढील सांगेन संपूर्ण ॥ शास्त्रार्थ जाण सुनिश्चित ॥ ५५ ॥ जो वानप्रस्थ आपण ॥ पादिसाधनें अति तीक्ष्ण ॥ झाला तरी वैराग्य ज्ञान ॥ त्यासि जाण नुपजेची ॥ ५६ ॥ ास वर्षें गार्हस्थ्य ॥ दोनी द्वादशें वानप्रस्थ ॥ ×झाला तरी जो अप्राप्त ॥ ०वैराग्ययुक्त जज्ञाना ॥ ५७ ॥ आयुष्याचे तीन भागवरी ॥ वेंचलें गा ऐशापरी ॥ आतां चतुर्थ भाग ला उरी ॥ क्षीण शरीरीं जर्जर ॥ ५८ ॥ ऐसें शरीर झालिया क्षीण ॥ ❋अल्पही वैराग्य ालिया जाण ॥ करावें संन्यासग्रहण ॥ कर्माचरण यथाशक्ती ॥ ५९ ॥ वानप्रस्थाश्रमी झााही ॥ 7विशेष वैराग्य आल्याही ॥ सर्वथा नुपजे ज्याच्याठायीं ॥ त्याचा अधिकार पाही रि बोले ॥ ६० ॥

॥ श्लोक ॥ यदाऽसौ नियमेऽकल्पो जरया जातवेपथुः ॥ आत्मन्यग्नीन् समारोप्य मच्चित्तोऽग्निं समाविशेत् ॥ ११ ॥

टीका ॥ सर्वथा वैराग्य नुठी देहीं ॥ जरा आदळली ठायींचेठायीं ॥ स्वधर्माचरणीं शक्ति ाहीं ॥ कंप पाही सर्वांगीं ॥ ६१ ॥ ऐसा वानप्रस्थवनवासी ॥ आत्मसमारोप करूनि अग्नीो ॥ मातें दृढ ध्याऊनि मानसीं ॥ अग्निप्रवेशीं रिघावें ॥ ६२ ॥ वानप्रस्थाश्रमीं वनस्थ ॥ ातिशयें झाला विरक्त ॥ त्याची उत्तरविधी समस्त ॥ स्वयें भगवंत सांगतसे ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ यदा कर्मविपाकेषु लोकेषु निरयात्मसु ॥ विरागो जायते सम्यङ्न्यस्ताग्निः प्रव्रजेत्ततः ॥ १२ ॥

टीका ॥ वानप्रस्थीं अनुष्ठान ॥ तेणें वैराग्य अतिगहन ॥ इंद्रचंद्रादिब्रह्मसदन ॥ निरयासान जो मानी ॥ ६४ ॥ ऐसा दृढ वैराग्यउठावा ॥ 5तेणें विहिताग्नि बोळवावा ॥ त्याग करूनि ाघवा ॥ अंगीकारावा संन्यास ॥६५॥ ते संन्यासग्रहण स्थिती ॥ यथाशास्त्र यथापद्धती ॥ वयें सांगताहे श्रीपती ॥ यथानिगुतीं विहितार्थ ॥ ६६ ॥

---

१ अभावानें. २ मोक्षपरंपरा. ३ब्रह्मलोकादि. ४जानव्याचें सूत काढण्याची. ५ मोबदला. ६ कामेच्छेनें. ७ गृहस्थपणा. ८ आपले ठिकाणीं स्थापन. ९ पुढचा प्रकार. १० स्वर्ग, चंद्रलोक, सत्यलोक वगैरे. ११ नरकासमान.

*मो. अविद्यादि अमंगळ. +मो. मागों लागे खापरखुंटी. ×मो. जालीं जरी प्राप्त. ०मो. परी वैराग्य जाण नव्हेचि. ❋ना. जाल्याही वैराग्य जाण. 7मो. विशेष वैराग्य अल्पही. 5मो. तेणें विहिता बोले बरवा.

॥ श्लोक ॥ इष्ट्वा यथोपदेशं मां दत्त्वा सर्वस्वमृत्विजे ॥ अग्नीन्स्वप्राण आवेश्य निरपेक्षः परिव्रजेत् ॥ १३ ॥

**॥ टीका ॥ अष्टश्राद्धादिविधान ॥ *प्रजापत्यनामा इष्टन ॥ मज भगवंतातें यजून ॥ सर्वस्वदान ऋत्विजां ॥ ६७ ॥ मुख्यत्वें मूर्त जो अग्नी ॥ तो निज हृदयीं संस्थापूनी ॥ आशा निःशेष छेदूनी ॥ संन्यास करूनी निरपेक्षा ॥ ६८ ॥ संन्यास करितेठायीं ॥ विघ्नें अपार उठती पाहीं ॥ तीं रगडूनिया पायीं ॥ संन्यास जाण करावा ॥ ६९ ॥**

॥ श्लोक ॥ विप्रस्य वै संन्यसतो देवा दारादिरूपिणः ॥ विघ्नान्कुर्वन्त्ययं ह्यस्मानाक्रम्यसमियात्परम् ॥ १४ ॥

**॥ टीका ॥ संन्यास करिता जो ब्राह्मण ॥ त्यासि समस्त देव मिळोन ॥ नानास्त्रियादिरूपें जाण ॥ अनंत विघ्नें करूं येती ॥ ७० ॥ विघ्न करावयासी कारण ॥ मनुष्य देवांचा पशु जाण ॥ सदा अर्पी बळिदान ॥ देवाअधीन हा सर्वदा ॥ ७१ ॥ तो बळी +नेदी येथूनि आतां ॥ पाय देऊनि आमुचे माथां ॥ वेऊं पाहे ब्रह्मसायुज्यता ॥ यालागीं सर्वथा विघ्नें करिती ॥ ७२ ॥ तेथ वैराग्यबळें तत्त्वतां ॥ विघ्नें हाणूनियां लाता ॥ अवगणूनि देवां समस्तां ॥ संन्यास सर्वथा करावा ॥ ७३ ॥ ऐसा वैराग्यें उद्भट ॥ विवेकज्ञानें अतिश्रेष्ठ ॥ संन्यासग्रहण वरिष्ठ ॥ विधिनिषिद्ध विभागें ॥ ७४ ॥ एवं झाल्या संन्यासग्रहण ॥ त्याचें विधीचें विधिविधान ॥ स्वयें सांगताहे नारायण ॥ स्वधर्मलक्षण संन्यासिया ॥ ७५ ॥**

॥ श्लोक ॥ बिभृयाचेन्मुनिर्वासः कौपीनाच्छादनं परम् ॥ त्यक्तं न दंडपात्राभ्यामन्यत्किंचिदनापदि ॥ १५ ॥

**॥ टीका ॥ भूतां अभयदानपुरस्कर ॥ संकल्पपूर्वक ×प्रेषोच्चार ॥ तें उरलें ⁂दिसे देहमात्र ॥ सर्वस्व येर त्यागिलें ॥ ७६ ॥ 'जो गुरुवाक्यश्रवणासरिसा ॥ वस्तूचि होऊनि ठेला आपैसा ॥ उडाला देहबुद्धीचा वळसा ॥ तुटला फांसा कर्माचा ॥ ७७ ॥ त्यासि विधिविधान कर्तव्यता ॥ बोलोंचि नयेगा सर्वथा ॥ नवनीत आलिया हातां ॥ रितें ताक आतां कोण घुसळी ॥ ७८ ॥ कापूर मिळालिया वह्नीं ॥ तो परतेना कापूरपणीं ॥ तेवीं वस्तु झाला जो गुरुश्रवणीं ॥ तो विधिकिंकरपणीं वर्तेना ॥ ७९ ॥ परी गुरुवाक्यें तत्त्वतां ॥ ज्यासि ऐशी हे अवस्था ॥ सत्य नबाणेचि सर्वथा ॥ त्याची विधानता अवधारी ॥ ८० ॥ गुरुवाक्याचें करितां मनन ॥ नागवेपणीं लाजे मन ॥ तरी लिंगमात्र आच्छादन ॥ कौपीन जाण धरावी ॥ ८१ ॥ इतुकेन निर्वाह न सरे ॥ ऐसें जाणवलें जें पुरें ॥ तें वस्त्रखंड दुसरें ॥ स्वाधिकारें धरावें ॥ ८२ ॥ दंड कमंडलु जेथ आहे ॥ तेथ कौपीन बहिर्वास राहे ॥ दंड त्यागासवें पाहे ॥ त्याग होये वस्त्राचा ॥ ८३ ॥ आपत्तिकाळीं संन्यासासी ॥ कां रोग लागला होय ज्यासी ॥ कां जरेनें व्यापिलें देहासी ॥ तें जें लागेल त्यासी तें घ्यावें ॥ ८४ ॥ गुरुवाक्यश्रवण मनन ॥ ऐसें साधी जो साधन ॥ त्या साधकाचें लक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ८५ ॥**

१ अंकित. २ न मानून. ३ सर्व भूतांना मजपासून अभय अशा अर्थाच्या वाक्यानें. ४ केवळ आत्मामात्र. ५ विधिनिषेध-दास्यत्वानें ६ शिश्नास पुरेल एवढेंच. ७ लंगोटी. ८ छाटी. ९ उत्तरीय वस्त्र.

*मो. प्रजायेपती नाइष्टिन. +मो. नेदील. ×मो. परिचार. ⁂मो. असे.

॥ श्लोक ॥ दृष्टिपूतं न्यसेत्पादं वस्त्रपूतं पिबेज्जलम् ॥ सत्यपूतां वदेद्वाचं मनःपूतं समाचरेत् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ दृष्टि ठायीं ठेऊनि जाण ॥ पृथ्वी पाहूनि पावन ॥ हंसगतीं करी गमन ॥ अनुसंधान निजवृत्तीं ॥ ८६ ॥ जेथ जीवसंपदा[१] दृष्टीं पडे ॥ तैं प्राण गेल्या नचले पुढें ॥ जीवांतें पाहूनि *कडे[२] ॥ पाऊल पडे +अतिशुद्ध ॥ ८७ ॥ आधींच पवित्र गंगाजळ ॥ त्याचा निर्मळ वस्त्रें निरसोनि मळ ॥ यापरी करोनियां निर्मळ ॥ गंगाजळ ×सेविती ॥ ८८ ॥ ज्याचे वाचेचा आळां[३] ॥ असत्याच्या तृणशाळा[४] ॥ जाळूनि वैराग्यज्वाळा ॥ सत्याचा उगवला कल्पद्रुम ॥ ८९ ॥ ज्या कल्पद्रुमाचीं वचनफळें ॥ परिपक्वें आणि सोज्वळें ॥ मधुररसें रसाळें ॥ अति निर्मळें मगमगीतें ॥ ९० ॥ जें श्रवणें अतिगोड ॥ पुरवी श्रोतयांचें कोड ॥ निरवी जीवाची चाड ॥ सत्य सुरवाड वाचेचा ॥ ९१ ॥ सहज संन्याशाचें ध्यान ॥ अहमेव नारायण ॥ तें दृढ धरोनि अनुसंधान ॥ पवित्र मन करावें ॥ ९२ ॥ मन करोनि पावन ॥ पृथ्वी विचरावी जाण ॥ त्या मनाचें पवित्रपण ॥ सर्वत्र आपण लक्षावें ॥ ९३ ॥ संन्याशाचे धर्मीं जाण ॥ मुख्यत्वें हेंचि लक्षण ॥ पवित्र करोनि अंतःकरण ॥ सर्वत्र नारायण लक्षावा ॥ ९४ ॥ मनाचें पवित्रपण ॥ उद्धवा या नांव जाण ॥ आतां त्रिदंडाचें लक्षण ॥ संन्यास ⚹चिह्न तें ऐक ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ मौनानीहानिलायामा दंडा वाग्देहचेतसाम् ॥ न ह्येते यस्य सत्यंग वेणुभिर्न भवेद्यतिः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ ॥ 'मौन अथवा सत्यभाषण ॥ कां श्रीरामनामाचें स्मरण ॥ होकां[५] ओंकाराचें उच्चारण ॥ वाग्दंड जाण या नांव' ॥ ९६ ॥ शरीरींचें जितुकें चळण ॥ तें प्राणाचेनि बळें जाण ॥ त्या प्राणाचें प्राणरोधन ॥ करावें आपण प्राणायामें ॥ ९७ ॥ प्राणायामें निजप्राण ॥ जिणोनि करावा स्वाधीन ॥ या नांव ²देहदंड[६] जाण ॥ ऐक लक्षण मनोदंडाचें ॥ ९८ ॥ मनाचें चपळपण ॥ संकल्पविकल्पें जाण ॥ त्याचें करावया छेदन ॥ ब्रह्मानुसंधान[७] करावें ॥ ९९ ॥ माझें स्वरूप सर्वगत ॥ तेथ निश्चयें ठेवितां चित्त ॥ ⁶मन संकल्पविकल्पें जाय जेथ ॥ तेथ तेथ ¹स्वरूप ॥ १०० ॥ ऐसें सावध राखतां मन ॥ दृढ लागल्या अनुसंधान ॥ तंव संकल्पविकल्प क्षीण ॥ सहजचि जाण स्वयें होती ॥ १ ॥ देह वाचा आणि मन ॥ या त्रिदंडांचें लक्षण ॥ तुज म्यां सांगीतलें संपूर्ण ॥ संन्यासत्व जाण येणें सत्य ॥ २ ॥ हे तिन्ही दंड नसतां जाण ॥ केवळ वेणुदंडग्रहण[८] ॥ तेणें संन्यासत्व न घडे जाण ॥ देहविटंबन दंभार्थ ॥ ३ ॥ संन्याशाचा आहारविहार ॥ आचार संचार विचार ॥ स्वधर्मयुक्त साचार ॥ स्वयें सारंगधर सांगत ॥ ४ ॥

---

१ प्राणिपुंज. २ बाजूस. ३ आळ्यांत. ४ गवत वाढलेली जागा. ५ अथवा. ६ वाचेचें नियमन. ७ ब्रह्माचें ध्यान. ८ वेळूची, सात पर्वांची काठी.

*मो. येकीकडे. +मो. अतिशुद्धि. ×मो. पें सेवी. ⚹मो. निरूपण. ²मो. देहदंडन. ⁶मो. मनसंकल्प. ¹ना. तें रूप.

॥ श्लोक ॥ भिक्षां चतुर्षु वर्णेषु विगर्ह्यान्वर्जयंश्चरेत् ॥ सप्तागारानसंक्लृप्तांस्तुष्येल्लब्धेन तावता ॥ १८ ॥

॥ टीका ॥ ॥ पूर्वीं जाण संन्यासासी ॥ चतुर्वर्णीं भिक्षा होती त्यासी ॥ कलियुगीं गोष्टी झाली कैसी ॥ ब्राह्मणापाशीं चतुर्वर्ण ॥ ५ ॥ ज्याची जीविका *जेणें जाण ॥ त्या ब्राह्मणाचा तोचि वर्ण ॥ ऐका तेंहि प्रकरण ॥ जीविकालक्षण सांगेन ॥ ६ ॥ मुख्य ब्राह्मणाची वृत्ति जाण ॥ शिळ उंछ कां कोरान्न ॥ अयाचित कां ×अध्यापन ॥ अथवा +याजन जीविकेसी ॥ ७ ॥ जो जीविकेलागीं निर्धारीं ॥ शस्त्र घेऊनियां करीं ॥ शस्त्रवृत्ति जीविका करी ॥ जाणावा क्षत्री ब्राह्मणांमाजीं तो ॥ ८ ॥ जो वाणिज्यवृत्तीवरी ॥ नित्य जीविका आपुली करी ॥ तो ब्राह्मणांमाझारीं ॥ वैश्य निर्धारीं निश्चित ॥९॥ जो शूद्राचे शूद्रक्रियेवरी ॥ सदा सर्वदा जीविका करी ॥ तो ब्राह्मण ०शूद्र कर्मे करी ॥ शूद्रत्व धरी क्रियायोगें ॥ ११० ॥ जैं ※उत्तमोत्तम भिक्षा नलभे॥3तैं क्षात्रब्राह्मण भिक्षा लाभे॥6क्षात्रब्राह्मणांचेनि अलाभें॥*वैश्यब्राह्मणीं लाभे भिक्षाग्रहण ॥ ११ ॥ 2ब्राह्मणक्षत्रियवैश्यब्राह्मणीं ॥ भिक्षेस अप्राप्त हे तिन्ही ॥ तैं शूद्रजीविकाब्राह्मणीं ॥ भिक्षाग्रहणीं अधिकारू ॥ १२ ॥ यांत निंद्य जे ब्राह्मणाआंतू ॥ केवळ दोषी अथवा अभिशप्तू ॥ ते भिक्षेसि न लवावा हातू ॥ हा स्वधर्मार्थ भिक्षेचा ॥ १३ ॥ तेही भिक्षा अतिनेमस्त ॥ भिक्षेसि येतों हें कळों नेदित ॥ मागावीं 7नेमंविलीं घरें सात ॥ जें झालें प्राप्त तेणें सुखी ॥ १४ ॥ जे सातांवरीं भिक्षा प्राप्त ॥ ते भिक्षेचा धर्म विहित ॥ स्वयें सांगे कृष्णनाथ ॥ स्मृतिशास्त्रार्थप्रयोगें ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ बहिर्जलाशयं गत्वा तत्रोपस्पृश्य वाग्यतः ॥ विभज्य पावितं शेषं भुंजीताऽशेषमाहृतम् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ ग्रामाबाहेर गंगातीरीं ॥ अथवा तडागाचे परिसरीं ॥ भिक्षा धरोनिया करीं ॥ आचमन तीरीं करावें ॥ १६ ॥ अयाचित जें भिक्षेचें अन्न ॥ तें 8द्वादशप्रणवें अभिमंत्रून ॥ तेणें 9मंत्रोदकें प्रोक्षितां जाण ॥ होय पावन पवित्र ॥१७॥ चतुर्धा करावें त्या अन्नातें ॥ चार अधिकारी त्या भागातें ॥ ब्रह्मा, विष्णु, अर्क आणि भूतें ॥ 5अर्पण तेथें अवधारी ॥ १८ ॥ विष्णुकल्पित जो भाग ॥ तो जळीं घालावा सांग ॥ भूतकल्पित जो विभाग ॥ तो पृथ्वीवरी चांग ठेवावा ॥ १९ ॥ उरले जे विभाग दोनी ॥ 0यतीसि अधिकार सेवनीं ॥ 1दीन मार्गों आलिया ते क्षणीं ॥ भूतदयागुणीं अन्न द्यावें ॥ १२० ॥ परी मी एक अन्नदाता ॥ हा आठ-

---

१ शेतांत अथवा बाजारांत पडलेल्या कणसें दाणें वगैरेवर उपजीविका करणें. २क्षत्रियवृत्तीनें वर्तणाऱ्या ब्राह्मणाचे घरीं. ३ ज्यांच्यावर कांहीं अपवाद आहे असे. ४ मोजकीं. ५ तलावाचे. ६ कांठीं. ७ बारावेळ प्रणवमंत्रानें. ८ चार भाग. ९ सूर्य.

*मो. ज्या वर्णे. ×ना. अध्ययन.+ना. यजन. ०मो. शूद्रनिर्धारीं.※मो. उत्तम ब्राह्मणाची. 3मो. तैं ब्राह्मणासी क्षत्रियाची भिक्षा लाभे. 6मो. क्षेत्री. *मो. वैश्यादिकांची भिक्षाग्रहणीं अधिकार. 2मो. क्षेत्री वैश्याची भिक्षाब्राह्मणीं, हेही भिक्षा देहपोषणी, भिक्षाग्रहणीं अधिकार. 7ना. मवित. 8मो. द्वादशवार प्रणवें. 9मो. उदकें. 5मो. आपण तेथें अधिकारी. 0मो. त्यासी. 1मो. तेथें मार्गों आले तत्क्षणीं.

गो नये चित्तां ॥ *आलिया दातेपणाची अहंता ॥ अधर्मता संन्यासीं ॥ २१ ॥ मधुकरीचें ×अवघड चिह्न ॥समयीं मागों येती दीन ॥ येणें उद्देशें अधिक अन्न ॥सर्वथा जाण मागोंनये ॥ २२ ॥ करितां मधुकरीभोजन ॥ ठायीं अधिक उरलिया अन्न ॥ तें सांडितां अतिपतन ॥ अवघेंच जाण भक्षावें ॥ २३ ॥ संन्यासधर्मीं लघु आहार ॥ नित्य करावा निरंतर ॥ अधिक आहारीं विकार ॥ निद्रा आळस फार बाधिती ॥ २४ ॥ ज्यालागीं कीजे चतुर्थाश्रम ॥ तो संन्यासाचा मुख्य धर्म ॥ स्वयें सांगे पुरुषोत्तम ॥ जेणें +आत्माराम पाविजे ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ एकश्चरेन्महीमेतां निःसंगः संयतेंद्रियः ॥ आत्मक्रीड आत्मरत आत्मवान् समदर्शनः ॥ २० ॥

॥ टीका ॥ सदा वैराग्य ※अंगीं पुरतें ॥ जो अपेक्षीना संगातें १॥ निःसंग होत्सातां चित्तें ॥ सुखें पृथ्वीतें विचरतू ॥ २६ ॥ *इंद्रियें बांधोनि चित्ताच्या पायीं ॥ चित्त ⁶लावी चैतन्याच्याठायीं ॥ तेणें चिन्मात्र उसावें २पाही ॥ देहत्व देहीं स्मरेना ॥ २७ ॥ ऐसा आत्मस्थितीचा उद्यम ॥ तेणें आत्मक्रीडेचा आराम ॥ आत्मसुखाचा संभ्रम ॥ अनुभव परम तो ऐक ॥ २८॥ आत्मस्थिती निजात्मयुक्त ॥ तेणें ⁹आत्मसुखें उल्हासत ॥ सदा समदर्शनें डुलत ॥ वोसंडत समसाम्यें ॥ २९ ॥ ऐशियासम सुखाची संपत्ती ॥ भोगावया सुनिश्चितीं ॥ सदा एकाकी वसे एकांतीं ॥ तेंचि श्रीपती सांगत ॥ १३० ॥

॥ श्लोक ॥ विविक्तक्षेमशरणो मद्भाव विमलाशयः ॥ आत्मानं चिंतयेदेकमभेदेन मया मुनिः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ पवित्र आणि विजन ॥ प्रशस्त आणि एकांतस्थान ॥ तेथें माझें अनुसंधान ॥ सद्भावें जाण सर्वदा ॥ ३१ ॥ तेणें सांडून जनपदां दुश्चित ॥ सदा एकांतीं ⁰होतां रत ॥ मद्भावें सुनिश्चित ॥ आत्मसुख प्राप्त साधकां ॥ ३२ ॥ ज्यासि निजात्मसुख झालें प्राप्त ॥ तो होय अनन्यशरणागत ॥ मीवांचूनि जगाआंत ॥ आणिक अर्थ देखेना ॥ ३३ ॥ ऐसें अनन्य करितां माझें ध्यान ॥ साधक विसरे मीतूंपण ॥ तेव्हां ⁸अभेदें चैतन्यघन ॥ मद्रूप जाण तो होय ॥ ३४ ॥ त्या मद्रूपाची स्वरूपस्थिती ॥ पाहों जातां निजात्मवृत्ती ॥ 'मी ना तो' ऐशी होय गती ॥ अभेदप्राप्ती या नांव ॥ ३५ ॥ जंव असे द्वैतवार्त्ता ॥ तंव ०भयाची बाधकता ॥ अभेदत्व आल्या हातां ॥ निर्भयता साधकां ॥ ३६ ॥ अभेदप्राप्तीच्या ठायीं ॥ बंधमोक्षांची वार्ता नाहीं ॥ 4गडगर्जें बंध मोक्ष पाही ॥ नांदती नवायी हरि बोले ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ अन्वीक्षेतात्मनो बंधं मोक्षं च ज्ञाननिष्ठया ॥ बंध इंद्रियविक्षेपो मोक्ष एषां च संयमः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ ऐक्यें पावोनि एकात्मता ॥ तेथूनि बंधमोक्ष पाहतां ॥ दोहींची मिथ्या वार्ता ॥

---

१ या निमित्तानें. २ सोबतीला. ३ आरंभ उद्योग. ४ लोक, देश. ५ माझ्यावांचून. ६ वस्तु. ७प्रसिद्ध.
*मो. अल्पही. ×मो. अवघेंचि अन्न. +मो. आत्मपद. ※मो. अतिपुरतें. *ना. बांधोनि चिंता चित्ताचे पायीं. ⁶मो. लावोनि. २ना. कांहीं. ⁹मो. आत्मस्थितीं. ⁰मो. होय. ⁸मो. अभेद. ०मो. भवाची. 4ना. गडगर्जनें.

मायिकता निश्चित ॥ ३८ ॥ प्रवृत्तीमाजीं बंधमोक्षता ॥ त्या दोहींची विभागता ॥ ‘ इंद्रियांची जे विषयासक्तता ॥ दृढबद्धता ’ ती नांव ॥ ३९ ॥ ‘ कायावाचा चित्तवृत्ती ॥ निःशेष विषयांची विरक्ती ॥ या नांव साचार मुक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १४० ॥ ज्यासि साचार पाहिजे मुक्ती ॥ तेणें करावी विषयनिवृत्ती ॥ हेचि मुख्यत्वें उपायस्थिती ॥ कृष्ण कृपामूर्ती सांगत ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ तस्मान्नियम्य षड्वर्गं मद्भावेन चरेन्मुनिः ॥ विरक्तः क्षुल्लकामेभ्यो लब्ध्वात्मनि सुखं महत् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ येणें विचारें विचारितां ॥ विषयासक्तीं दृढबद्धता ॥ त्या विषयांचा त्याग करितां ॥ निजमुक्तता सहजेंची ॥ ४२ ॥ तोचि विषयांची विरक्ती ॥ केवीं आतुडे आपुल्या हातीं ॥ यालागीं वैराग्याची उत्पत्ती ॥ साधकें निश्चितीं साधावी ॥४३॥ अंतरीं *वासना दृढमूळ ॥ विषयशाखा तेणें प्रबळ ॥ ते वासना छेदावया समूळ ॥ वैराग्य सबळ साधावें ॥ ४४ ॥ वैराग्यप्राप्तीचें कारण ॥ ‘ स्वधर्मकर्म मदर्पण ॥ सांडावें कर्माचें कर्तेपण ॥ मदर्पण या नांव ’ ॥ ४५ ॥ मदर्पण कर्मस्थिती ॥ तेणें माझ्याठायीं उपजे प्रीती ॥ माझें नाम माझी कीर्ती ॥ चिंतन चित्तीं पैं माझें ॥ ४६ ॥ ऐशिया माझ्या परमप्रीतीं ॥ होय वैराग्याची उत्पत्ती ॥ तेणें विषयांची विरक्ती ॥ माझी सुखप्राप्ती शनैःशनैः ॥ ४७ ॥ माझेनि सुखें माझें भजन ॥ अत्यंत थोरावे पैं जाण ॥ तेव्हां सर्वत्र मद्भावन ॥ ×ब्रह्मत्व जाण ठसावें ॥४८॥ सर्वत्र ब्रह्मभावन ॥ ब्रह्मसुखाचें अनुसंधान ॥ धरूनि करावें +पर्यटन ॥ जंव निर्वासन मन होय ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ पुरग्रामव्रजान्, सार्थान्, भिक्षार्थं प्रविशंश्चरेत् ॥ पुण्यदेशसरिच्छैलवनाश्रमवतीं महीम् ॥ २४ ॥

॥ टीका ॥ ॥ पृथ्वी विचरणें विचित्र ॥ पुण्यदेश कुरुक्षेत्र ॥ संत पुऱ्या परम पवित्र ॥ पुष्करादि थोर महातीर्थें ॥ १५० ॥ कृतमाला पयस्विनी, ॥ पुण्यरूप ताम्रपर्णी, ॥ गौतमी, रेवा, त्रिवेणी, ॥ परमपावनी ०गोमती ॥ ५१ ॥ कृष्णा वेण्या तुंगभद्रा ॥ तपती पयोष्णी *भिवरा ॥ यमुना, भागीरथी, ⁂निरा, ॥ 6गंगासागरा संगमीं ॥५२॥ ऋष्यमूक, श्रीशैल, त्र्यंबकाद्री ॥ मूळपीठींचा सह्याद्री ॥ गौतमीतीरींचा ब्रह्मगिरी ॥ जो पापें संहारी यात्रामात्रें ॥ ५३ ॥ 7होकां चढतां हिमगिरी ॥ पदीं दुरितांतें दूर करी ॥ निःशेषपापातें निवारी ॥ ते यात्रा मुनीश्वरीं अवश्य कीजे ॥ ५४ ॥ दंडकारण्य बृहद्वन ॥ नैमिषारण्य आनंदवन ॥ इत्यादिवनांचें गमन ॥ 1संन्यासीं जाण करावें ॥ ५५ ॥ च्यवनकपिलव्यासाश्रम ॥ गौतमवामन आश्रमोत्तम ॥ यात्रा श्रेष्ठ बदरिकाश्रम ॥ जो 3सकळकर्मदाहक ॥ ५६ ॥ ऐशीं स्थळें जीं पावन ॥ तेथें संन्यासियें करावें गमन ॥ मार्गीं भिक्षार्थ जें अटन ॥ तेंही निरूपण अवधारी ॥ ५७ ॥

---

१ प्राचीनकर्मसंस्कार. २ हळुहळु. ३ ईश्वरबुद्धि. ४ वासनारहित. ५ अयोध्या मथुरा इत्यादि, ६ गोदावरी. ७ नर्मदा. ८ तापी. ९ चंद्रभागा. १० पातकास. ११ काशी.

*मो. दृढवासनेचें मूळ. ×मो. ब्रह्म पूर्ण ठसावें. +मो. ध्यान. ०मो. पवित्र. *मो. निरा. ⁂मो. थोरा. 6मो. गंगासागरसंगम. 7मो. प्रदक्षणा करिता ब्रह्मगिरी. 1मो. संन्यासियें. 3मो. कर्मीं कर्मदाहक.

हाट, हाटवटिया अति उत्तम ॥ त्यातें पुर ' ह्मणती नरोत्तम ॥ ' हाटवटियाहीन, तो ग्राम ' ॥ भिक्षेचा नेम सारावा तेथें ॥ ५८ ॥ ' गायीगौळियांचें निवासस्थान ॥ व्रज ' त्यातें *ह्मणणें जाण ॥ ' सार्थ ह्मणिजे ×पऱ्हा संपूर्ण ' ॥ भिक्षार्थ अटन करावें तेथें ॥ ५९ ॥ पवित्रभिक्षेचे प्राप्तीकारणें ॥ संन्यासीं अवश्य जाणें ॥ तेचि अर्थीचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्णें सांगिजे ॥ १६० ॥

॥ श्लोक ॥ वानप्रस्थाश्रमपदेष्वभीक्ष्णं भैक्ष्यमाचरेत् ॥ संसिध्यत्याश्वसंमोहः शुद्धसत्त्वशिलांधसा ॥ २५ ॥

॥ टीका ॥ ॥ शुद्ध व्हावया अंतर ॥ वानप्रस्थाश्रमी जो नर ॥ जाऊन ठाकावें त्याचें द्वार ॥ अतिसादर भिक्षार्थ ॥ ६१ ॥ सेवितां सात्विकाचे अन्नासी ॥ +शुद्धसत्वता साधकांसी ॥ तत्काळ होय ग्रासोग्रासीं ॥ शुद्ध अन्नासी हा महिमा ॥ ६२ ॥ यालागीं वानप्रस्थाचें द्वार ॥ ठाकोनि जावें वारंवार ॥ तेणें सत्वशुद्धि अनिवार ॥ होय साचार साधकां ॥ ६३ ॥ शुद्ध-भिक्षेचिये प्राप्ती ॥ सत्वशुद्ध होय वृत्ती ॥ तेणें वासना निःशेष नासती ॥ निजशांती उल्हासे ॥ ६४ ॥ वासना नसल्या निर्लाग ॥ ०तो सत्यत्वें न देखे जग ॥ विषयासक्ति कैंची मग ॥ सहजें विराग उद्भट ॥ ६५ ॥

॥ श्लोक ॥ नैतद्वस्तुतया पश्येत्दृश्यमानं विनश्यति ॥ असक्तचित्तो विरमेदिहामुत्रचिकीर्षितात् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ ॥ येथ जें जें दिसे तें तें नासे ॥ हें सर्वांसि प्रत्यक्ष आभासे ॥ परी अज्ञानें भुलले कैसे ॥ꣷविषयवशें गुंतोनी ॥ ६६ ॥ यालागीं शुद्धभिक्षेचिये प्राप्ती ॥ ज्याची शुद्धसत्व झाली वृत्ती ॥ त्यासि विषय सत्यत्वें न दिसती ॥ मा विषयासक्ती तेथें कैंची ॥ ६७ ॥ ऐसें मिथ्या विषयांचें भान ॥ त्याचें विषयासक्त नव्हे मन ॥ यालागीं भवस्वर्गसाधन ॥ दोन्ही तो जाण स्पर्शेना ॥ ६८ ॥ ऐसा जो विषयविरक्त ॥ त्याचें परमार्थीं लागे चित्त ॥ तो जगीं विचरे अनासक्त ॥ परमार्थयुक्त निजबोधें ॥ ६९ ॥ त्याच्या निजबोधाचें लक्षण ॥ स्वयें सांगताहे नारायण ॥ प्रपंचाचें मिथ्यापण ॥ समाधान निजात्मता ॥ १७० ॥

॥ श्लोक ॥ ॥ यदेतदात्मनि जगन्मनोवाक्प्राणसंहतम् ॥ सर्वं मायेति तर्केण स्वस्थस्त्यक्त्वा न तत्स्मरेत् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ ॥ मनसा वाचा प्राणप्रवाहीं ॥ ०अहंकारकृत उभयदेहीं ॥ जग आत्मयाच्या ठायीं ॥ मिथ्या मायिक पाहीं आभासे ॥ ७१ ॥ दोराअंगीं सर्पाभास ॥ शुक्तिकेमाजीं रजत-प्रकाश ॥ उखरीं मृगजळाचा विलास ॥ तैसा जगदाभास चिन्मात्रीं ॥ ७२ ॥ जैसा स्वप्नींचा व्यवहार ॥ तैसें भासे चराचर ॥ ऐसें मिथ्या जाणोनि *साचार ॥ पुढती स्मरणादर स्फुरेना

१ बाजारच्या पेंठा. २ ह्मशाणे. ३ पाणपोई. ४ बरोबर, पूर्णपणें. ५ स्थूल, सूक्ष्म. ६ शिंपेवर. ७त्याचें भान. ८ उखरभूमीवर.

*मो. ह्मणती. ×मो. पोहा. +मो. शुद्धता. ०मो. तो सत्य तेणें देखे जग. ꣷमो. विषय विलासें. ०मो. अहंकारत्वें उभय देहीं. *मो. विचार.

॥ ७३ ॥ जो जागा झाला इत्थंभूत ॥ तैं स्वप्नभोग *न वांछी चित्त ॥ तेवीं स्वरूपीं सुनिश्चित ॥ तो प्रपंचजात स्मरेना ॥ ७४ ॥ त्रिदंडी बहूदकाचें कर्म ॥ तुज म्यां सांगीतलें सुगम ॥ आतां हंसपरमहंसांचे धर्म ॥ यथानुक्रम अवधारी ॥ ७५ ॥ संन्यास चतुर्विध देख ॥ हंस परमहंस एक ॥ एक तो बहूदक, ॥ कुटीचक तो भिन्न ॥ ७६ ॥ 'कर्म त्यागोनि झाला संन्यासी ॥ ज्ञान ध्यान नाहीं मानसीं ॥ अन्नालागीं स्वग्रामवासी ॥ कुटीचक तयासी बोलिजे' ॥ ७७ ॥ 'वार्धकीं कुटीचकाची परी ॥ अग्निहोत्र, क्रियेचा त्याग करी ॥ परी शिखासूत्र न अव्हेरी ॥ गायत्रीमंत्रीं अधिकारू ॥ ७८ ॥ नित्य भिक्षा पुत्राचे घरीं ॥ पर्णकुटी बांधे त्याचे द्वारीं ॥ मठिका सांडोनि नवचे दुरी ॥ कुटीचक निर्धारीं या नांव' ॥ ७९ ॥ 'शिखासूत्र त्यागोनि जाण ॥ करूनि त्रिदंडाचें ग्रहण ॥ केवळ करी कर्माचरण ॥ ज्ञानाचें लक्षण जाणेना ॥ १८० ॥ नाहीं वैराग्य [१]वरिष्ठ ॥ न दिसे ज्ञाननिष्ठा श्रेष्ठ ॥ अतिशयेंसि जो कर्मिष्ठ ॥ बहूदक ज्येष्ठ त्यासि ह्मणती' ॥ ८१ ॥ 'जो कां वैराग्याच्या निर्धारीं ॥ +ज्ञानसाधनार्थ विचारी ॥ ×शिखासूत्रकर्मत्याग करी ॥ आत्मचिंतनावरी निजनिष्ठा ॥ ८२ ॥ ऐसा जो त्यागविलास ॥ या नांव ※[२]विविदिषासंन्यास ॥ ऐशिया निष्ठा वर्ते तो हंस' ॥ ऐक परमहंस ज्या [३]ह्मणती ॥ ८३ ॥ ऐक परमहंसाचें लक्षण ॥ ज्ञानपरिपाकें परिपूर्ण ॥ अतएव शांति वोळंगे आंगण ॥ देखे तिन्ही गुण मिथ्यात्वें ॥ ८४ ॥ मिथ्या जाणे कर्माची वार्ता ॥ आपुली देखे नित्य ©निष्कर्मता ॥ कर्मक्रिया जे कर्तव्यता ॥ ते प्रकृतीचे माथां प्रारब्धें ॥ ८५ ॥ ऐशिया स्थितीं सावकाश ॥ त्या नांव जाण परमहंस ॥ नाहीं मठ, मठिका-विलास ॥ नित्य उदास निराश्रयी ॥ ८६ ॥ आतां हंसपरमहंसांचे धर्म ॥ स्वयें सांगताहे पुरुषोत्तम ॥ त्या धर्मांचें विशद ०वर्म ॥ ऐक सुगम उद्धवा ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञाननिष्ठो विरक्तो वा मद्भक्तो वाऽनपेक्षकः ॥ सलिंगानाश्रमांस्त्यक्त्वा चरेदविधिगोचरः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ विषयांची नावडे मातू ॥ ज्ञानप्राप्तीलागीं उद्यतू ॥ यापरी जो अतिविरक्तू ॥ तो संन्यास बोलिजेतू मुख्यत्वें ॥ ८८ ॥ जो ज्ञाननिष्ठा अतिसंपन्न ॥ सदा स्वरूपीं रंगलें मन ॥ कदा न मोडे अनुसंधान ॥ परमहंससमान हा हंस ॥ ८९ ॥ ज्यासि करितां भगवद्भक्ती ॥ [४]अपेक्षामात्राची झाली शांती ॥ मोक्षापेक्षा नुपजे चित्तीं ॥ हे संन्यासपद्धती अतिश्रेष्ठ ॥ १९० ॥ ज्ञाननिष्ठा कां मद्भक्त ॥ *इहीं आश्रमधर्मीं दंडादियुक्त ॥ त्याग करावा हृदयीं समस्त ॥ बाह्य ©लोकरक्षणार्थ राखावे ॥ ९१ ॥ येचि अर्थीचें निरूपण ॥ पुढें सांगेल श्रीकृष्ण ॥ प्रस्तुत त्यागाचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण हरि बोले ॥ ९२ ॥ आश्रमधर्म समस्त करी ॥ परी विधिकिंकरत्व न धरी ॥ प्रतिबिंब कांपतां [६]जळांतरीं ॥ आपण बाहेरीं कांपेना ॥ ९३ ॥ तेवीं स्वधर्मकर्म कर्तव्यता ॥ करी परी नाहीं कर्मठता ॥ आपुली कर्मातीतता ॥ जाणे तत्त्वतां निजकर्मीं ॥ ९४ ॥ यापरी स्वधर्मकर्म करी ॥ परी विधीचें भय तो न धरी ॥ विधिनिषेध पाळून

१ श्रेष्ठ. २ ईश्वरतत्त्व जाणण्याच्या इच्छेनें सर्वत्याग. ३ ह्मणून. ४ लिंगदेहापासून मुक्त होण्याची इच्छा. ५ आचारदास्य. ६ पाण्यांत.

*मो. न वांछित. +मो. ज्ञानार्थाचे विचारी. ×मो. शिखासूत्र त्याग करी. ※मो. विवेक संन्यास. ©मो. निर्मळता. ०मो. कर्म. *ना. इहीआश्रमधर्मादि दंडयुक्त. ©मो. लोकार्थ राखावा.

ोडरीं ॥ कर्में करी अहेतुक ॥ ९५ ॥ जो नातळे स्वाश्रमकर्मगती ॥ दंडादिलिंग न धरी ातीं ॥ ऐशिया सर्वत्यागाची स्थिती ॥ पुढें श्रीपती सांगेल ॥ ९६ ॥ प्रस्तुत हेंचि निरूप- ग ॥ *लोकरक्षणार्थ लिंगधारणें ॥अंतरीं जो निष्कर्म जाण ॥ त्याचें लक्षण हरी बोले ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ बुधो बालकवत् क्रीडेत्कुशलो जडवच्चरेत् ॥ वदेदुन्मत्तवद्विद्वान् गोचर्यां नैगमश्चरेत् ॥ २९ ॥

॥ टीका ॥ विवेकज्ञान शुद्ध आहे ॥ परी बाळकाच्यापरी पाहे ॥ मानापमान सुखें साहे ॥ ांडोनि सोय ※देहाभिमान ॥ ९८ ॥ निजनिष्कर्म अतिकुशळ ॥ परी कर्मजडा ऐसा के- वळ ॥ +कर्में आचरे तो सकळ ॥ कोठेंही विकळ दिसोंनेदी ॥ ९९ ॥ जाणे धर्माधर्मलक्षण ॥ सर्वार्थीं अतिसज्ञान ॥ परी न करी प्रश्नसमाधान ॥ अप्रमाणिक जाण स्वयें बोले ॥ २०० ॥ करितां प्रश्नसमाधान ॥ लौकिकीं वाढेल सन्मान ॥ यालागीं साक्षेपें जाण ॥ उन्मत्तवचन स्वयें बोले ॥ १ ॥ वेदतत्त्वार्थ विहित जाणे ॥ तें लौकिकीं नाहीं मिरवणें ॥ सकळिकीं मूर्खचि म्हणणें ॥ तैशीं पशुलक्षणें स्वयें दावी ॥ २ ॥ यालागीं ×वेदवादसंवाद ॥ न करी ०वादअति- वाद ॥ येचि अर्थीं अतिविशद ॥ स्वयें गोविंद सांगत ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ वेदवादरतो न स्यान्न पाषंडी न हैतुकः ॥ शुष्कवादविवादेन कं- चित्पक्षं समाश्रयेत् ॥ ३० ॥

॥ टीका ॥ धरोनियां मीमांसकमत ॥ कर्मकांडींचे शास्त्रार्थ ॥ नानावाद कर्मार्थ ॥ न करी निश्चित निजबोधें ॥ ४ ॥ तार्किकाचे अतितर्क ॥ तर्क वितर्क कुतर्क ॥ हेही वाद करीना देख ॥ निजात्मसुख जो जाणे ॥ ५ ॥ बाहेरी ब्रह्मज्ञानें गर्जे तोंड ॥ भीतरीं विषयवासना 9उदंड ॥ ऐसे महावादी प्रचंड॥अतर्क्य पाखांड त्या नांव ॥६॥ नसोनि ब्रह्मानुभव साचार ॥ जो उच्छेदी निजाचार ॥ तो केवळ पाखांडी नर ॥ 8उदरंभर दुःशील ॥ ७ ॥ ऐशिया वादाचा विटाळ ॥ ज्याचे वाचेसि नाहीं अळुमाळ ॥ नलगे असत्याचा समूळ मळ ॥ नित्यनिर्मळ निजबोधें ॥ ८ ॥ शुष्कवाद वृथा गोष्टी ॥ त्यांतही वाग्वाद उठी ॥ होय नव्हे कपाळपिटी ॥ मिथ्या चावटी करीना ॥ ९ ॥ ऐशिया विवादाची कथा ॥ दृष्टीं न पाहे निजज्ञाता ॥ मा स्वयें करील ऐशा वार्ता ॥ हें सर्वथा घडेना ॥ २१० ॥ होतां 7शास्त्रार्थ महावाद ॥ देतां युक्तीचे प्रतिबाध ॥ तेथ न करी 5पक्षपात शुद्ध ॥ जाणे परी शब्द बोलेना ॥ ११ ॥ श्रुतिस्मृतींसि विरुद्ध ॥ होतां देखे अतिवाद ॥ स्वयें जाणे शास्त्रार्थ शुद्ध ॥ परी पक्षपात करीना ॥ १२ ॥ वाग्वादीं बोलतां जाण ॥ दुखवेल पुढिलांचें मन ॥ कां क्षोभेल स्वांतःकरण ॥ यालागीं वचन बोलेना ॥ १३ ॥

---

१ पायाखालीं. २ आश्रमाचिन्ह. ३ कर्मठ. ४ प्रमाणरहित. ५ थोडाकाहीं, किंचित्. ६ एकामताचा स्वीकार करून बोलणें पक्षपात.

*मो. लौकिक रक्षणार्थ. ※मो. देहाभिमानाची ना. देहाभिमाना. +मो. कर्म आचरतां सकळ. ×मो. वेदसंवाद. ०मो. वाद प्रतिवाद. 9मो. वितंड. 8मो. जाण दुर्धर दुःशील. 7मो. शास्त्र. 5ना. पक्षवाद.

॥ श्लोक ॥ नोद्विजेत जनाद्धीरो जनं चोद्वेजयेन्न तु ॥ अतिवादांस्तितिक्षेत नावमन्येत कंचन ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ जनापासोनि उद्वेगगती ॥ ज्ञान नपवे सर्वथा चित्तीं ॥ निंदा अवगणना अपमानिती ॥ तें आत्मस्थिती स्वयें साहे ॥ १४ ॥ जन जेजे उपद्रव देती ॥ ज्ञाता साहे ऐशिया रीतीं ॥ मीचि आत्मा एक सर्वभूतीं ॥ यालागीं खंती मानीना ॥ १५ ॥ आपुलिया अवयवविकारता ॥ उद्वेग नुपजे जेवीं चित्ता ॥ तेवीं सर्वांभूतीं एकात्मता ॥ जाणून तत्त्वतां उबग न मानी ॥१६॥ तैसीच ज्याचिया स्थिती ॥भूतें *उद्वेग मानिती ॥ ज्याचिया निजाचारगतीं ॥ सुखी होती जीवमात्र ॥ १७ ॥ सर्वभूतीं भगवंत आहे ॥ ह्मणें त्यासि उपद्रव होये ॥ यालागीं वागवितां हातपाये ॥ सावध राहे निजदृष्टीं ॥ १८ ॥ थोर देतां आरोळी ॥ ह्मणें दचकेल वनमाळी ॥ कां नेटें भवंडितां जपमाळी ॥ देवाचे कपाळीं ह्मणें लागे ॥ १९ ॥ यालागीं करचरणांच्या चेष्टा ॥ आवरोनियां निजात्मनिष्ठा ॥ भूतीं लागों नेदी झटा ॥ ह्मणें वैकुंठा उपद्रव मानें ॥ २२० ॥ ऐसिऐशिया निजात्मगती ॥ उद्वेग उपजोंनेदी +भूतीं ॥ तेथ वाग्वादाची गती ॥ कैशा रीतीं संभवे ॥ २१ ॥ सर्वभूतीं भूतात्मा ईश्वर ॥ यालागीं उंचें न बोले उत्तर ॥ तेथ ३अतिवादांसि समोर ॥सर्वथा अधरें उचलीना ॥२२॥ पडल्या जीवसंकट प्राणांतीं॥अपमान न करवे कोणे व्यक्ती ॥ अपमानीना भूताकृती ॥ सर्वांभूतीं हरि देखे ॥ २३ ॥ जनास्तव उद्वेगता ॥ कदाकाळीं नपवे ज्ञाता ॥ ज्ञात्यापासोनि उद्वेगता ॥ नव्हे सर्वथा जनांसी ॥ २४ ॥ ऐशी निजात्मस्थिती साचार ॥ तो कोणासि न करी वैर ॥ येचि अर्थीं सारंगधर ॥ विशद उत्तर सांगत ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ देहमुद्दिश्य पशुवद्वैरं कुर्यान्न केनचित् ॥ एक एव परो ह्यात्मा भूतेष्वात्मन्यवस्थितः ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ केवळ पशूचिया परी ॥ होऊनियां देहअहंकारी ॥ कोणासीं वैर न करी ॥ तेहं परी परियसें ॥ २६ ॥ प्रकृति पुरुष चिदात्मा आहे ॥ तोचि सर्व भूतीं भूतात्मा पाहे ॥ मज माजींही तोचि राहे ॥ ऐशी सर्वभूतीं पाहे एकात्मता जो ॥ २७ ॥ त्यासि कोण आप्त कोण इतर ॥ कोणासी करावें वैर ॥ सर्वभूतीं मीचि साचार ॥ निरंतर निजात्मा ॥ २८ ॥ एक आत्मा सर्वभूतांत ॥ येचि अर्थींचा दृष्टांत ॥ स्वयें सांगे श्रीकृष्णनाथ ॥ श्रोता सावाचित्त उद्धव ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ यथेंदुरुदपात्रेषु भूतान्येकात्मकानि च ॥ अलब्ध्वा न विषीदेत कालेकालेऽशनं क्वचित् ॥ लब्ध्वा न हृष्येद्धृतिमानुभयं दैवतंत्रितम् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ सहस्रघटीं भरल्या जळ ॥ बिंबे एकाचि चंद्रमंडळ ॥ तेवीं निजात्मा एक केवळ ॥ भूतीं सकळ भूतात्मा ॥ २३० ॥ देखे भूताकृति ज्या भिन्न ॥ त्याही परमकारणीं अभिन्न जेवीं अळंकार आणि सुवर्ण ॥ आकारीं जाण भिन्नत्व नाहीं ॥ ३१ ॥ जेवीं मृत्तिकेचीं ग

१ अंगविकारानें. २ उपद्रव. ३ निंदेसाठीं. ४ ओंठ. ५ प्रकार.

*मो. उबग. +मो. चित्तीं. ३मो. अतिविद्यासी.

कुळें केलीं ॥ *नानाकारीं पूज्य झालीं ॥ परी मृत्तिकाचि संचली ॥ तेवीं भूतें भासलीं भगवंतीं ॥ ३२ ॥ कां विणोनियां सुतें सुत ॥ शेला, परकळा, पातळ, ह्मणत ॥ तैशी वस्तूचि वस्तुत्वें येथ ॥ साकार भासत ×भंवरूपें ॥ ३३ ॥ एवं साकार निराकार ॥ उभयतां ब्रह्माचिव्याचार ॥ ऐसा ज्याचा +ज्ञाननिर्धार ॥ त्याचा आहार तूं ऐक ॥ ३४ ॥ आहार न मिळे जेयेकाळीं ॥ दुःखी नव्हे तये वेळीं ॥ अन्नालागीं न तळमळी ॥ धारणा बळी धारिष्ट ॥३५॥ आहार मिळाल्या उत्तम ॥ हरिखेजेना मनोधर्म ॥ दैवाधीन जाणे वर्म ॥ निजकर्मप्राप्तीसी ॥ ३६ ॥ एवं *प्राप्ताप्राप्ताची कथा ॥ जाणे दैवाधीन तत्त्वतां ॥ यालागीं हर्षविषादता ॥ याचे चित्ता स्पर्शेना ॥ ३७ ॥ दैवाधीन प्राप्ती प्राणियांसी ॥ ऐसें सत्य कळलें ज्यासी ॥ तो भिक्षेसि कां हिंडे ह्मणसी ॥ तेंचि हृषीकेशी सांगत ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ आहारार्थं समीहेत युक्तं तत्प्राणधारणम् ॥ तत्त्वं विमृश्यते तेन तद्विज्ञाय विमुच्यते ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ पाळावया आश्रमधर्मासी ॥ अवश्य हिंडावें भिक्षेसी ॥ मधुकरी संन्याशासी ॥ स्वधर्मासी अतिविहित ॥ ३९ ॥ साधकीं तरी आहारार्थ ॥ अवश्य हिंडावें लागे येथ ॥ आहारेंवीण त्याचें चित्त ॥ विक्षेपभूत होंपाहे ॥ २४० ॥ तिहीं रसासक्ति सांडून ॥ भिक्षेसि करावा प्रयत्न ॥ आहारेंवीण त्याचें मन ॥ अतिक्षीण सर्वार्थीं ॥ ४१ ॥ साधकांसि आहारेंवीण ॥ न संभवे श्रवण मनन ॥ न करवे ध्यान चिंतन ॥ अनुसंधान राहेना ॥ ४२ ॥ संन्याशासि ध्यान न घडे ॥ तें आश्रमधर्माचें तारूं बुडे ॥ यालागीं भिक्षेसि रोकडें ॥ हिंडणें घडे हितार्थ ॥ ४३ ॥ मिळावें मिष्टान्न गोड ॥ हें सांडोनि रसनाचाड ॥ करावें भिक्षेचें कोड ॥ परमार्थ दृढ ✻साधावया ॥ ४४ ॥ आहार घेतलिया जाण ॥ साधकांसि घडे साधन ॥ साधनें करी प्रगटे ज्ञान ॥ ज्ञानास्तव जाण निजमोक्ष लाभे ॥ ४५ ॥ सर्वथा न वांछावें मिष्टान्न ॥ तरी भिक्षा मागावी कोण ॥ ऐसें कांहीं कल्पील मन ॥ तेंचि श्रीकृष्ण सांगत ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ यदृच्छयोपपन्नान्नमद्याच्छ्रेष्ठमुताऽपरम् ॥ तथा वासस्तथा शय्यां प्राप्तं प्राप्तं भजेन्मुनिः ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ सहज भिक्षेसि आलें जाण ॥ शुष्क अथवा मिष्टान्न ॥ तेणें करावें प्राणधारण ॥ रसनालालन सांडोनी ॥ ४७ ॥ निद्रालस्याचें नये प्रस्थान ॥ तैसें करावें प्राणधारण ॥ दृढ ठसावें आसन ध्यान ॥ युक्ताहार जाण या नांव ॥ ४८ ॥ वल्कलें अथवा अजिन ॥ नवें अथवा वस्त्र जीर्ण ॥ सहजें प्राप्त झाल्या जाण ॥ करी प्रावरण यथासुखें ॥ ४९ ॥ कंथा ०हो कां मृदु आस्तरण ॥ तृणशय्या कां भूमिशयन ॥ स्वभावें प्राप्त झाल्या जाण ॥ तेथेंही शयन करी मुनी ॥ २५० ॥ मी एक भोक्ता, शयनकर्ता ॥ हेही नाहीं त्यासि 4अहंता ॥ स्नानादिकीं वर्ततां ॥ त्याची निरभिमानता हरि सांगे ॥ ५१ ॥

---

१ प्रपंचरूपानें. २ चित्तवृत्ति. ३ आनंद व खेद. ४ अनेक स्थानांतून आणिलेलें भक्ष्य. ५ मृगचर्म. ६ आच्छादन.

*मो. नानाकारीं पूजिलीं ना. नानाकारीं पूज्य पूजिलीं. ×मो. भगवद्रूप. +ना. जाण निर्धार. *ना. प्राप्ताप्राप्तीची. ✻मो. धरावा. ०मो. अथवा मृदु आस्तरण. 4मो. देहाहंता.

॥ श्लोक ॥ शौचमाचमनं स्नानं न तु चोदनया चरेत् ॥ अन्यांश्च नियमान् ज्ञानी यथाऽहं लीलयेश्वरः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ आचमन स्नान शौचाचार ॥ *करितां नव्हे विधिकिंकर ॥ कर्माभिमानाची मोडली थोर ॥ जैसा मी अवतार तैसा तो ॥ ५२ ॥ जैसा मी लीलावतार घरीं ॥ अलिप्तपणें कर्में करीं ॥ तैसीचि जाण योग्याची परी ॥ सर्व कर्माचारीं अलिप्त ॥ ५३ ॥ ज्यासि ×विधीचें भय नाहीं पोटीं ॥ तो कर्म करावया कदा नुठी ॥ तेचि त्रिखींची विशद गोठी ॥ कृष्ण जगजेठी सांगत ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ न हि तस्य विकल्पाख्या या च मद्वीक्षया हता ॥ आदेहांतात्क्वचित्ख्यातिस्ततः संपद्यते मया ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ कर्म करणें न करणें ॥ ऐशिया संदेहाचें ठाणें ॥ पळालें माझेनि दर्शनें ॥ संकल्पाचें जिणें निमालें ॥ ५५ ॥ संकल्पू निमतांचि पोटीं ॥ विराली लिंगदेहाची गांठी ॥ भेदाची हारपली त्रिपुटी ॥ मी परमात्मा दृष्टीं देखतां ॥ ५६ ॥ ज्यासि नाहीं भेदाचें भान ॥ त्या देहाचें भरणपोषण ॥ स्नान भोजन शयन ॥ गमनागमन केवीं घडे ॥ ५७ ॥ जो जिणोनि विकल्पभ्रांती ॥ त्रिशुद्धी मिळाला अद्वैतीं ॥ त्याचे देहाची स्थितिगती ॥ प्रारब्धाहातीं निश्चित ॥५८॥ वृक्ष समूळीं उपडिला पाहे ॥ परी सांद्रता वृक्षीं राहे ॥ तांबूल खाऊनियां जाये तरी अधरीं राहे +सुरंगता ॥ ५९ ॥ होकां कन्यादान केल्या पाहे ॥ वरू कन्याही घेऊनि जाये ॥ 2तरी उगा मान उरला राहे ॥ रुसणें फुगणें आहे देहांत ॥ २६० ॥ तैसा अभिमान चेनि सळें ॥ मी कर्मकर्ता ह्मणवी बळें ॥ ते अहंता निमे ज्ञानबळें ॥ तरी शरीर चळे प्रारब्धें ॥ ६१ ॥ कुलाल दंड भांडें घेऊनि जाये ॥ पूर्वभंवंडीं चक्र भंवत राहे ॥ तेवीं अभिमान गेलिया पाहे ॥ देह वर्तताहे प्रारब्धें ॥ ६२ ॥ त्या देहाचें भरण पोषण 0प्रारब्धाचि करितें जाण ॥ ज्ञात्यासि प्रपंचाचें भान ॥ सत्यत्वें जाण असेना ॥ ६३ ॥ जैसी मिथ्या छाया देहापाशीं ॥ तैसें देह दिसे सज्ञानासी ॥ यालागीं देहबुद्धि त्यासी ॥ सत्यत्वें उपजेना ॥ ६४ ॥ छाया सुखासनामाजीं बैसे ॥ कां विष्ठेवरी पडली दिसे ॥ त्या छायेचें अभिमानवशें ॥ सुखदुःख नसे पुरुषासी ॥ ६५ ॥ तेवीं देहाची ख्याति विपत्ती ॥ बाधीना सज्ञानाचे स्थितीं ॥ प्रारब्धक्षयाचे अंतीं ॥ 7विदेह पावती कैवल्य ॥ ६६ ॥ जैशी जळाची लहरी ॥ निश्चळ होय सागरीं ॥ तैसा ज्ञाता मजमाझारीं ॥ ०विदेहकरी समरसे ॥ ६७ ॥ उगमसंगम प्रवाहगतीं ॥ सरिताची नामरूपख्याती ॥ जेवीं प्रळयोदकीं हरपती ॥ तेवीं समरस मजमाजीं ज्ञाते ॥ ६८ ॥ अपरोक्ष-साक्षात्कार-संन्यासी ॥ त्याची स्थितिगती स्वधर्मेंसी उद्धवा सांगीतली तुजपाशीं ॥ आतां मुमुक्षु संन्यासी ते ऐक ॥ ६९ ॥

१ आश्रम. २ जिरतांच. ३ सूक्ष्मदेह. ४ ओलेपणा. ५ लालपणा. ६ भरानें. ७ पहिल्या भ्रमणा ८ मोक्षाची इच्छा करणारे.

*मो. करी परी नव्हे. ×मो. विधिनिषेधाचें. +मो. सुरंग 2मो. तरी वोगमान उरला आहे, रुसणें फुगणें पाहे देहाहंता ना. तरी वोगमान उरला राहे, रुसणें फुगणें होय देहीं 0मो. प्रारब्धेंचि होत जाण. 7ना. विदेहें. ०मो. विदेहें करीं.

॥ श्लोक ॥ दुःखोदर्केषु कामेषु जातनिर्वेद आत्मवान् ॥ अजिज्ञासितमद्धर्मो गुरुं मुनिमुपाव्रजेत् ॥ ३८ ॥

टीका ॥ शेंडा धरूनि समूळ ॥ ज्याचें उत्तरोत्तर दुःखफळ ॥ अतिबाधक विषयजाळ ॥ त्यासि केवळ जो अनासक्त ॥ २७० ॥ माझे प्राप्तीलागीं चित्त ॥ सदा ज्याचें आर्तभूत ॥ स्वधर्मकर्मी वर्तत ॥ जो वेदशास्त्रार्थ विवंची ॥ ७१ ॥ इहामुत्रभोगीं निश्चित ॥ त्रासलें असे ज्याचें चित्त ॥ ऐसा जो कां नित्य विरक्त ॥ आतिविख्यात मुमुक्षू ॥ ७२ ॥ तेणें साधावया ब्रह्मज्ञान ॥ तेंचि साधनीं लावितां मन ॥ स्वकर्म झालिया विलक्षण ॥ आली नागवण *प्रत्येयें ॥ ७३ ॥ तेणें कर्म संन्यासूनि जाण ॥ करावें संन्यासग्रहण ॥ सद्गुरूसि रिघावें शरण ॥ तेणें ब्रह्मज्ञानपदप्राप्ती ॥ ७४ ॥ एक केवळ भावार्थी ॥ नेणे +स्वधर्मकर्मगती ॥ नेणे शास्त्रश्रवणव्युत्पत्ती ॥ परी माझी ×प्रीती अनिवार ॥७५॥ तेणेंही संन्यासूनि जाण ॥ गुरूसि रिघावें शरण ॥ ०त्यासिही गुरुकृपा जाण ॥ ब्रह्मज्ञान आवाप्ती ॥ ७६ ॥ गुरु करावा अतिशांत ॥ शास्त्रार्थपरमार्थपारंगत ॥ त्याचे सेवेचा भावार्थ ॥ स्वयें श्रीकृष्णनाथ सांगत ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ तावत्परिचरेत् भक्तः श्रद्धावान् अनसूयकः ॥ यावत् ब्रह्म विजानीयात् मामेव गुरुमादृतः ॥ ३९ ॥

टीका ॥ अचळ, अमळ, अविनाश ॥ परात्पर परेश ॥ ⁵गुरु तो परब्रह्म ईश ॥ हा दृढ विश्वास धरावा ॥ ७८ ॥ त्या विश्वासाच्या पाडिपाडीं ॥ नवल गुरुचरणीं आवडी ॥ नित्य नूतन नवी गोडी ॥ चढीवढी भजनार्थ ॥७९॥ ऐशिया भजनपरवडीं ॥ हृदयीं श्रद्धा ⁹उसळे गाढी ॥ गुरुआज्ञेची नुलंघी काडी ॥ आळस तोडी समूळीं ॥ २८० ॥ गुरुवाक्याचेनि श्रवणें ॥ विकल्पाचें ⁷खात खणणें ॥ संकल्पासि मूळीं देणें ॥ जीवें घेणें अभिमाना ॥ ८१ ॥ तेथ असूया कैंची उठी ॥ धाकेंचि निमाली उठाउठी ॥ ऐशी गुरुचरणीं श्रद्धा मोठी ॥ परब्रह्मदृष्टीं गुरु पाहे ॥ ८२ ॥ निर्गुण जो ⁴निर्विकारू ॥ तोचि मूर्तिमंत ⁸माझा गुरू ॥ करूनि अकर्ता ईश्वरू ॥ तोचि हा साचारु गुरु माझा ॥ ८३ ॥ नित्य निर्विकल्प देख ॥ ज्यासि ह्मणती समाधिसुख ॥ तें माझ्या गुरूचें चरणोदक ॥ ³ऐसा भाव नेटक भावार्थी ॥ ८४ ॥ गुरूतें पाहतां ब्रह्मदृष्टीं ॥ शिष्य ब्रह्मत्वें आला पुष्टीं ॥ ब्रह्मरूप देखे सृष्टी ॥ निजऐक्यमिठी गुरुचरणीं ॥ ८५ ॥ ऐसें ब्रह्मरूपीं ऐक्य घडे ॥ तंव गुरुसेवा करणें पडे ॥ ऐक्य झाल्याही पुढें ॥ सेवा न मोडे अखंडत्वें ॥ ८६ ॥ ' कापूर घातलिया जळीं ॥ स्वयें ⁶विरोनि जळपरमळीं ॥ तेवीं अहं जाऊनि सेवा ¹सकळीं ॥ सर्वां सर्व काळीं गुरुचरणीं ' ॥ ८७ ॥ ऐसी अवस्था न येतां हातां ॥ केवळ

---

१ शेंड्यापासून मुळापर्यंत. २ तत्पर. ३ ह्या लोकच्या आणि परलोकच्या सुखाविषयीं. ४ विपरीत. ५ दोषानें. ६ विधिपूर्वक टाकून. ७प्रकृतीहून श्रेष्ठ. ८घाण.९गुणावर दोषारोप करणें.१०सुवासिक करितो.

*मो. प्रत्यक्ष. +ना. स्वधर्माची कर्मगती. ×मो. भक्ती. ०मो. गुरुकृपा जालिया जाण, ब्रह्मज्ञान होय प्राप्ती. ⁵मो. गुरु तोचि ब्रह्मा विष्णु महेश. ⁹मो. उपजे. ⁷ना. खत खांडणें. ⁴मो. निराकारू. ⁸ना. मूर्तिमंत साकारू. ³मो. ऐसा भावें नेटका भावार्थी. ⁶मो. वुरोनि. ¹मो. सुकाळीं.

मुंडूनियां माथा ॥ संन्यासी ह्मणवी पूज्यतां ॥ त्याची अनुचितता हरि बोले ॥ ८८ ॥ स्वयें संन्यास अंगीकारी ॥ ब्रह्मसाक्षात्कार जो न करी ॥ त्यालागीं स्वयें श्रीहरी ॥ अतिधिकारें निंदित ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ यस्त्वसंयतषड्वर्गः प्रचंडेंद्रियसारथिः॥ ज्ञानवैराग्यरहितस्त्रिदंडमुपजीवति ॥ ४० ॥ सुरानात्मानमात्मस्थं निन्हुते मां च धर्महा ॥ अविपक्वकषायोऽस्मादमुष्माच्च विहीयते ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ नाहीं वैराग्याची स्थिती ॥ नसतां विषयविरक्ती ॥ देखोवेखीं संन्यास घेती ॥ केवळ वृत्ती अन्नार्थ ॥२९० ॥ संन्यास *घेतल्या पूर्वदृष्टी ॥ जें वैराग्य होतें पोटीं ॥ तें संन्यास घेतल्यापाठीं ॥ उठाउठी पळालें ॥ ९१ ॥ ज्ञानेंद्रियें पांच सहावें मन ॥ हेचि अरिषड्वर्ग जाण ॥ यांचें न करितां निर्दळण ॥ संन्यासपण तो विटंबू ॥ ९२ ॥ अवैराग्यें सकाम मन ॥ तेणें विषयाकुळित बुद्धि जाण ॥ नाहीं ज्ञान ध्यान साधन ॥ दंडग्रहण उदारार्थ ॥ ९३ ॥ नुपजे अनुताप पूर्ण ॥ न करी श्रवण मनन ॥ आदरें न साधी साधन ॥ ज्यासि ब्रह्मज्ञान नव्हेची ॥ ९४ ॥ त्याचा व्यर्थ संन्यास जाण ॥ व्यर्थ त्याचें दंड मुंडण ॥ व्यर्थ काषायवस्त्रग्रहण जेवीं वेषधारण नटाचें ॥ ९५ ॥ संन्यास घेतलियापाठीं ॥ काम उचंबळत उठी ॥ क्रोधलोभाची धुपे आगिटी ॥ चौगुणा पोटीं अभिमान ॥ ९६ ॥ आसक्ति अधिकाधिक उठी ॥ सदा ग्रामणीची चावटी ॥ करणें पैशुन्यांच्या गोष्टी ॥ दंड कासोटी दंभार्थ ॥ ९७ ॥ अनधिकारी दंडग्रहण ॥ तेणें संन्यासरूपें जाण ॥ केवळ आली नागवण ॥ आपल्या आपण नाडिलें ॥ ९८ ॥ नाडिले यज्ञाधिकारी सुरगण ॥ नाडिले स्वधाकाराचे पितृगण ॥ नाडिले ऋषिभूतगण ॥ ×बळितर्पण ठकवूनि ॥ ९९ ॥ जीवरूपें मी परमात्मा आपण ॥ त्या मज हृदयस्था ठकिलें जाण ॥ जीवोद्धारीं जें संन्यासग्रहण ॥ तेंचि दृढबंधन +मज झालें ॥ ३०० ॥ 7संन्यासग्रहणीं दृढबंधन ॥ व्हावया कोण कारण ॥ तेचिविपर्यींचें निरूपण ॥ स्वयें नारायण बोलिला ॥ १ ॥ पूर्व श्लोकींचे तीन चरण ॥ तेथील हें निरूपण ॥ श्रोतां यावें अवधान 6ज्ञणें विलक्षण कोणी ह्मणे ॥ २ ॥

॥ पू० श्लोक च० ३ ॥ निन्हुते मां च धर्महा ॥ अविपक्वकषायोऽस्मादमुष्माच्च विहीयते ॥

॥ टीका ॥ करोनियां संन्यासग्रहण ॥ न करी ज्ञानध्यानसाधन ॥ न करी प्रणवउच्चारण अविरक्त जाण विषयार्थी ॥ ३ ॥ तेणें दारादिअभिलाषण ॥ करिती द्रव्याचें संरक्षण ॥ आगोदानादिग्रहण ॥ 0पचन पाचन करविती ॥ ४ ॥ मठाधिपत्याचिये बुद्धी ॥ धनधान्यलोह

---

१ पूज्यतेकरितां. २ दुसऱ्या संन्याशास पाहून. ३ घेण्याच्यापूर्वी. ४ फजिती. ५ विषयासक्त. ६ वैरा परतावा. ७ भगवीं वस्त्रें पांघरणें. ८ आगटी, धुनी. ९ गांवांतली. १० दुष्टपणाच्या पराच्छिद्राच्या. ११ पुत्रादिकांची इच्छा. १२ गाई वगैरे दान घेणें. १३ मठाधिपतित्वरूप उपाधिनें.

*ना. न घेतां. ×मो. बळी अर्पण टाकेना. +मो. त्यासि. 7ना. संन्यासग्रहणें. 6 ज्ञान. 0मो. अर्चनपाचन.

द्धी ॥ नाना वादविती उपाधी ॥ जीवात्मा त्रिशुद्धी नाडिला ॥ ५ ॥ ऐसें करितां अधर्मपण ॥
वासि लागलें दृढबंधन ॥ जेणें इहलोकपरलोकसाधन ॥ त्या नरदेहासी जाण नाडिले ॥६॥
ऱ्याशीलक्षयोनींप्रती ॥ जें असंख्य फेर होती ॥ तैं नरदेहाची प्राप्ती ॥ अवचटें पावती
भाग्य ॥ ७ ॥ त्या नरदेहासि येऊनि जाण ॥ स्वयें नागवला आपण ॥ करितां अधर्मा-
रण ॥ नरक दारुण संन्याशा ॥ ८ ॥ ज्या नांव गा आश्रम चौथा ॥ *जो देव ह्मणे माझे
था ॥ तेथेंही अधर्म करितां ॥ नरकपाता पावले ॥ ९ ॥ ज्या नरकाचे ठायीं ॥ कोटिवर्षें
इतां पाही ॥ ठावाचि नलगे कहीं ॥ तैसेठायीं बुडाले ॥ ३१० ॥ मुख्यचतुर्थाश्रमीं हे
थती ॥ तैं +इतरआश्रमां कैंची गती ॥ यालागीं आश्रमधर्म ❀युक्ती ॥ स्वयें श्रीपती
ांगत ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ भिक्षोर्धर्मः शमोऽहिंसा तप ईक्षा वनौकसः ॥ गृहिणो भूतरक्षेज्या द्विजस्याऽऽचार्यसेवनम् ॥ ४२ ॥

टीका ॥ संन्याशासी मुख्य शैम ॥ सबाह्य इंद्रियनेम ॥ ०अहिंसा त्याचा धर्म ॥ हा परम-
र्म संन्याशासी ॥ १२ ॥ वानप्रस्थाचा स्वधर्म ॥ तपप्राधान्यें मंत्र होम ॥ आतां गृहस्थाचा
म ॥ तिहीं आश्रमां विश्रामदाता ॥ १३ ॥ ×गृहस्था मुख्य अग्निहोत्र जाण ॥ संन्यासिब्रह्म-
ार्‍यांसि द्यावें अन्न ॥ करावें भूतसंरक्षण ॥ तेंही लक्षण अवधारीं ॥ १४ ॥ असिलेनि
ामर्थ्यें जाण ॥ अन्न धन वस्त्र जीवेंन ॥ तृण पर्ण निवासस्थान ॥ देऊनि दीन रक्षावे ॥१५॥
ह्मचाऱ्याचे स्वधर्मीं जाण ॥ श्रद्धायुक्त गुरुसेवन ॥ एवं आश्रमधर्मलक्षण ॥ मुख्यत्वें हें जाण
द्धवा ॥ १६ ॥ गृहस्थाश्रमीं जो धर्म आहे ॥ तो इतरआश्रमीं करूं नये ॥ इतराश्रमींचा
र्म पाहे ॥ गृहस्थाश्रमीं होये *करणीय ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मचर्यं तपः शौचं संतोषो भूतसौहृदम् ॥ गृहस्थस्याप्यृतौ गंतुः सर्वेषां मदुपासनम् ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ गृहस्थें व्हावया निष्पाप ॥ ठाके तो करावा जप तप ॥ उभयशौचांचें स्वरूप ॥
अति साटोप करावें ॥ १८ ॥ पोटींची सांडूनि कुसमुंस ॥ यथालाभें अतिसंतोष ॥ परोप-
कारीं अतिहव्यास ॥ सुहृद सर्वांसी स्वात्मत्वें ॥ १९ ॥ गृहस्थीं ब्रह्मचर्यलक्षण ॥ ऋतुकाळीं
दारागमन ॥ मुख्यत्वें करावें माझें भजन ॥ हा स्वधर्म जाण सर्वांचा ॥ ३२० ॥ सर्व आश्रम
सर्व वर्ण ॥ त्यांसि हाचि स्वधर्म जाण ॥ 4सांडूनि विषयाचें भान ॥ माझें भजन करावें
॥ २१ ॥ करितां स्वधर्में माझी भक्ती ॥ भक्तासि होय जे प्राप्ती ॥ तेचि सांगताहे श्रीपती ॥
उद्धवाप्रती स्वानंदें ॥ २२ ॥

---

१ शांति. २ मुख्य करून तप. ३ प्राणिमात्राचें संरक्षण. ४ असलेल्या. ५ पाणी. ६ राहण्यास जागा. ७ करण्यास योग्य. ८ होईल तितका. ९ मनशुद्धी व शरीरशुद्धी. १० काळजीनें. ११ रुखरुख, असंतोष. १२ मोठी खटपट दीर्घप्रयत्न. १३ स्त्रीगमन.

*मो. ज्यासी देवो वेदी माथा ना. जो वेद ह्मणे माझा माथा. +मो. इतराश्रमीं. ❀मो. स्थिती. ०मो अहिंसा स्वधर्म ना. अहिंसा त्याचा संभ्रम. ×ना. गृहस्थी मो. गृहस्थाश्रमीं. *ना. अकरणीय. 4मो. सांडोनिया कल्पना आपण ना. सांडूनि विकल्प मन.

॥ श्लोक ॥ इति मां यः स्वधर्मेण भजन्नित्यमनन्यभाक् ॥ सर्वभूतेषु मद्भावो मद्भक्तिं विंदतेऽचिरात् ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ सर्व भावें अनन्यगतीं ॥ करितां स्वधर्में माझी भक्ती ॥ माझा भावो सर्वाभूतीं । शीघ्रगती उल्हासे ॥ २३ ॥ मद्भावो *जोडल्या सर्वभूतीं ॥ तेणें प्रकटे ×माझी चौथी भक्ती । जिच्या +पायीं चारी मुक्ती ॥ *सदा लागती स्वानंदें ॥ २४ ॥ अनिवार अनन्यगती ॥ सर्वस्वें ज्यासि माझी प्रीती ॥ तो लाहे माझी ꙮपरमभक्ती ॥ तेथोनि कल्पांतीं च्यवेना ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ भक्त्योद्धवाऽनपायिन्या सर्वलोकमहेश्वरम् ॥ सर्वोत्पत्त्यप्ययं ब्रह्म कारणं मोपयाति सः ॥ ४५ ॥

। टीका ॥ सकळ सच्चिदानंदस्थिती ॥ जीमाजीं 7सांपडें मी सहजगती ॥ ती नांव माझी परमभक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ २६ ॥ विपरीत संसाराचें भान ॥ दिसे ०दृश्य विलक्षण ॥ तेथ सदा स्वानंदपूर्ण ॥ ते चौथी जाण भक्ति माझी ॥ २७ ॥ तेथ देव भक्त एक होती एकपणें भजनस्थिती ॥ ऐसी साधकांसि माझी प्राप्ती ॥ ते परम भक्ती उद्धवा ॥ २८ ॥ माझी प्रगटल्या परमभक्ती ॥ पतन नाहीं प्रळयांतीं ॥ साधक मद्रूपा येती ॥ स्वरूपस्थिती समसाम्य ॥ २९ ॥ त्या स्वरूपाचें लक्षण ॥ सांगताहे श्रीनारायण ॥ उत्पत्तिस्थितिनिदान ॥ कारणाकारण जो चिदात्मा ॥ ३३० ॥ जो सकळनियंता ईश्वरू ॥ जो विश्वात्मा विश्वंभरू ॥ जो उपनिषदांचें सारू ॥ जो महेश्वरू जगाचा ॥ ३१ ॥ त्या पदाची पदप्राप्ती ॥ भक्त पावले परमभक्तीं ॥ तेंचि पुढती उद्धवाप्रती ॥ स्वानंदें श्रीपती सांगत ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ इति स्वधर्मनिर्णिक्तसत्त्वो निर्ज्ञातमद्गतिः ॥ ज्ञानविज्ञानसंपन्नो नचिरात्समुपैति माम् ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ ऐशिया पदाची पदप्राप्ती ॥ साधक पावले स्वधर्मस्थितीं ॥ ते स्वधर्म प्रयोजगती ॥ यथानिगुतीं सांगत ॥ ३३ ॥ करितां स्वधर्मानुष्ठान ॥ रज तम नाशती जाण ॥ शुद्ध सत्त्व होय अंतःकरण ॥ तेथ माझें ज्ञान प्रकाशे ॥ ३४ ॥ प्रकाशल्या माझें ज्ञान ॥ तेणें उल्हासे माझें भजन ॥ भजनास्तव मन ॥ विकल्पपण पैं त्यागी ॥ ३५ ॥ विकल्पत्यागाचिये गतीं वैराग्य उचंबळे विरक्ती ॥ भासे परमात्मा सर्वभूतीं ॥ तेणें परमभक्ती उल्हासे ॥ ३६ ॥ उल्हासल्या परमभक्ती ॥ भक्तांसि माझी 2स्वरूपप्राप्ती ॥ तेचि स्वरूपाची स्वरूपस्थिती ॥ यथानिगुतीं सांगत ॥ ३७ ॥ परमात्मा परंज्योती ॥ परब्रह्म परमेष्ठी ॥ परात्परतर प्रकृती 8परावर जो ॥ ३८ ॥ अज अव्यय अक्षर ॥ अरूप अनाम 6अगोत्र ॥ अलक्ष्य अनंत अपार ॥ अपरांपरस्वरूप ॥ ३९ ॥ ऐशी निजरूपीं निजप्राप्ती ॥ भक्त पावले स्वधर्मं स्थिती जेथूनि परतलिया श्रुती ॥ नेतिनेति निजनिष्ठा ॥ ३४० ॥ ऐसें मद्रूप पावल्यापाठीं ॥ संसाराची काढिली कांटी ॥ नांवरूपांची बुडाली गोठी ॥ पडली तुटी जन्ममरणां ॥ ४१ ॥

१ सत्ता. २ सुटत नाहीं. ३ स्वधर्माचरणानें. ४ महातेजस्वी. ५ केवळज्ञानस्वरूप. ६ जन्मरहित.

*मो. जडल्या. ×मो. माझी भक्ती. +मो. ठायीं. *मो. पायां. ꙮमो. प्राप्ती. 7मो. सांसहजगती. ०मो. दृश्य पदार्थें विलक्षण. 2मो. परमप्राप्ती. 8ना. परावर्तीपर जो. 6मो. अगो

धर्माचेनि धर्मवशें ॥ मीतूंपणाचें नांवाचि पुसे ॥ मद्रूपाचेनि समरसें ॥ अनायासें मी जाहले
४२ ॥ पूर्वीं होतों मी जीव ॥ आतां झालों सदाशिव ॥ हाही बुडाला आठव ॥ ऐसा अनु-
[illegible] मद्भक्तां ॥४३॥ शून्य पडिलें संसारस्थिती ॥ तेथ कैंची पुनरावृत्ती ॥ ऐशी मद्भक्तां माझी
[illegible]ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥४४॥ एवं स्वधर्में मत्प्राप्ति जाण ॥ तया स्वधर्माचें महिमान ॥
[illegible]यें सांगताहे श्रीकृष्ण ॥ सावधान परियेसा ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ वर्णाश्रमवतां धर्म एष आचारलक्षणः ॥ स एव मद्भक्तियुतो निःश्रेयसकरः परः ॥ ४७ ॥

टीका ॥ ॥ अनादि जो स्वधर्माचार ॥ जो कां मोक्षकर साचार ॥ तेणें स्वधर्में सकाम
[illegible]र ॥ लोकांतरें वांछिती ॥ ४६ ॥ झालिया लोकांतरप्राप्ती ॥ तेथूनि होय पुनरावृत्ती ॥ न
[illegible]रूनियां माझी भक्ती ॥ स्वधर्म नाशिती सकामें ॥ ४७ ॥ ब्राह्मणा आला भद्रजाती ॥ आह्मां
पोसवे हा निश्चितीं ॥ मग तो देऊनियां घेती ॥ वाढावया पोतीं वृद्ध टारें ॥ ४८ ॥ यापरी
[illegible]धर्म जाण ॥ उपेक्षिती गा ब्राह्मण ॥ मग लोकांतरीं कोरान्न ॥ मागावयाकारणें धांवती
४९ ॥ घरीं आणोनि दीधली कामधेनू ॥ आह्मां न पोसवे ह्मणून ॥ ताकासाठीं देती हेळसून ॥
[illegible]ली नागवणू तें नेणे ॥ ३५० ॥ 'तेवीं म्यां जाण गायत्रीमंत्र ॥ दीधला ब्राह्मणांसि स्वतंत्र ॥
[illegible]ो उपेक्षूनियां मंत्रतंत्र ॥ क्षुद्राचार आचरती ॥ ५१ ॥ सौरें, शाक्त गाणपत्यादि जाण ॥
[illegible]नामंत्रदीक्षा घेती ब्राह्मण ॥ परी गायत्रीचें अनुष्ठान ॥ एकही जाण न करिती' ॥ ५२ ॥
[illegible]हीं गायत्रीचें अनुष्ठान ॥ परी विपरीत झालें आन ॥ गायत्रीचें श्रेय जाण ॥ देती ब्राह्मण
[illegible]र्थार्थ ॥ ५३ ॥ गायत्रीमंत्र असोनि घरीं ॥ तिचा भावार्थ कोणी न धरी ॥ *दीक्षेलागीं
[illegible]खांचे द्वारीं ॥ लोळिजे द्विजवरीं ऐसें झालें ॥ ५४ ॥ शस्त्रास्त्रीं रथ सन्नद्ध ॥ त्यावरी बैसविला
[illegible]ई ॥ सांडूनि पळे मानी सुरवाई ॥ न शके विभांडूं रणांगणीं ॥५५॥ तेवीं वेदरूप मी नारा-
[illegible]ण ॥ ब्राह्मणहृदयीं असें जाण ॥ त्याचें नेणोनि महिमान ॥ वेदपारायण विकती ॥ ५६ ॥
[illegible]छूनियां स्वर्गफळ ॥ नाना याग करिती प्रबळ ॥ कामकल्पना केवळ ॥ स्वधर्म विकळ
[illegible]डिती ॥ ५७ ॥ वेदीं प्रतिपाद्य कर्मफळ ॥ तो वेद मिथ्या नव्हे केवळ ॥ तो वेदवाद समूळ ॥
[illegible]णोनि बरळ हा मानिती ॥ ५८ ॥ घावया बोखेंदाची वाटी ॥ माता साखर दे चिमुटी ॥
[illegible]तें मुख्य फळ नव्हे दृष्टी ॥ जाय पोटीं महारोग ॥ ५९ ॥ तेवीं वेद बोले जें फळ ॥ तें
[illegible]प्रवृत्तिरोचक केवळ ॥ स्वधर्म विचारितां समूळ ॥ चित्तमळक्षाळक ॥ ३६० ॥ स्वधर्म
[illegible]ांडूनि सर्वथा ॥ सकाम कर्में करूं जातां ॥ तेंही शिणल्याविगळें तत्त्वतां ॥ क्षुद्रकामता
[illegible]ळेना ॥ ६१ ॥ जेणें द्रव्यें अमृत ये हातां ॥ तें वेंचूनि मद्य घेतां ॥ अधर्म आणि
[illegible]न्मत्तता ॥ पिशाचकता जग थुंकी ॥ ६२ ॥ 'स्वपतीसि काम भोगितां ॥ परलोक
[illegible]वे पतिव्रता ॥ तोचि काम परपुरुषीं करितां ॥ अधःपाता नेतसे' ॥ ६३ ॥ जिह्वा

१ नष्टहोई. २ अन्यस्वर्गादिलोकांप्रत. ३ उत्तमलक्षणी गज. ४ रोडकें मोडकें तट्टू. ५ कोरडी भिक्षा. [illegible] सूर्याची उपासना करणारे. ७ देवीचे उपासक. ८ भित्रा, रड्या. ९ सुख. १० लढूं. ११ सांगितलेले. [illegible]२ वडवड. १३ औषधाची. १४ चित्तशुद्धिकारक. १५ टाकून.

* मो. भिक्षे लागीं. ×मो. तेवीं मुख्य फळीं नव्हे दृष्टी, ज्याच्या पोटीं महारोग. ※मो. [illegible]. प्रकती रुचेना.

दुरुक्ती बोलता ॥ यम प्रहार वाजती माथां ॥ तिणेंचि रामराम ह्मणतां ॥ हरिभक्तां यम कांपे ॥ ६४ ॥ तेवीं पावोनि उत्तम जन्म ॥ कर्मे करूनि सकाम ॥ भोगावें दुःख परम ॥ मरण जन्म अनिवार ॥ ६५ ॥ तेणेंचि देहें स्वधर्म ॥ करितां निरसे सकळ कर्म ॥ निवारे मरण जन्म ॥ बहुतां हें वर्म कळेना ॥ ६६ ॥ स्वधर्मे घडे भगवद्भक्ती ॥ ऐशी अतिगुह्य आहे व्युत्पत्ती ॥ ते मी सांगेन तुजप्रती ॥ यथानिगुतीं उद्धवा ॥ ६७ ॥ स्वधर्म करणें अवश्यक ॥ तेथें सांडणें फळाभिलाख ॥ तेंचि मदर्पण चोख ॥ न करितां देख संकल्प ॥ ६८ ॥ होकां घरींच्याचि रांजणीं ॥ निवती मुक्ताफळांच्या श्रेणी ॥तरी कां पां ताम्रपर्णी ॥ *समुद्रमिळणीं शोधावी ॥ ६९ ॥ आपुलेच घरींचीं झाडें ॥ फळती कल्पतरूचेनि पाडें ॥ तरी अमरावतींचे चाडें ॥ वृथा वेडे कां शिणती ॥ ३७० ॥ होकां सद्गुरूचें तीर्थ घेतां ॥ पाविजे परमपवित्रता ॥ तरी धांवावया नानातीर्थां ॥ विशेषता ते कायी ॥ ७१ ॥ कां ईश्वरत्वें पिता पूजितां ॥ निज मोक्ष लाभे आइता ॥ तरी भजावें देवां देवतां ॥ कोण्या अर्था सज्ञानीं ॥ ७२ ॥ तेवीं +स्वकर्मांचि करितां ॥ लाभे आपली निष्कर्मता ॥ ते स्वधर्मी काम कल्पितां ॥ जीव निजस्वार्था नाडले ॥ ७३ ॥ निर्विकल्पें स्वधर्माचरण ॥ त्या नांव माझें शुद्ध भजन ॥ तेणें भजनें होऊनि प्रसन्न ॥ मी विवेक वैराग्यज्ञान भक्तांसि दें ॥ ७४ ॥ ×तेणेंचि ज्ञानें होय शुद्ध मती ॥ चित्तशुद्धीचि माझी परमभक्ती ॥ ते भक्तीनें माझी परम ※प्राप्ती ॥ भक्त पावती उद्धवा ॥ ७५ ॥ यालागीं नैराश्यें जें स्वधर्मकर्म ॥ तेंचि माझें भजन परम ॥ तेणें भजनें भक्तोत्तम ॥ स्वयें पुरुषोत्तम होऊनि ठाकती ॥ ७६ ॥ यापरी स्वधर्मस्थितीं ॥ लाभे आपुली निजमुक्ती ॥ तेंचि म्यां तुजप्रती ॥ यथानिगुतीं सांगीतली ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ एतत्तेऽभिहितं साधो भवान्पृच्छति यच्च माम् ॥ यथा स्वधर्मसंयुक्तो भक्तो मां समियात्परम् ॥ ४८ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ ॥ उद्धवा पुसिलें त्वां मजप्रती ॥ स्वधर्मे केवीं घडे भक्ती ॥ भक्तीनें पाविजे निजमुक्ती ॥ तें म्यां तुजप्रती सांगीतलें ॥ ७८ ॥ हातां आलिया स्वधर्म ॥ तत्काळ निरसे सकळ कर्म ॥ उडोनि जाय भवभ्रम ॥ प्राप्ति परम स्वधर्मे ॥ ७९ ॥ 'माझिया प्राप्तिलागीं स्वकर्म ॥ नैराश्यें आचरावा स्वधर्म ॥ हें ज्यासि कळे वर्म ॥ तया पुरुषोत्तम सदा वश्य' ॥ ३८० ॥ स्वधर्म ऐसा स्पर्शमणी॥ सांपडला निर्विकल्पपणीं ॥ तो लावितां दृश्यस्थानीं॥चिन्मात्र सुवर्णी तेज उठी ॥ ८१ ॥ स्वधर्म ऐसा दिनमणी ॥ नैराश्यें उगवलिया स्वभुवनीं ॥ तो अज्ञाननिशा निरसुनी ॥ स्वप्रकाशपणीं सदा वर्ते ॥ ८२ ॥ स्वधर्म ऐसें निजअमृत ॥ जे निर्विकल्पें सेवूं जाणत ॥ त्यांसि जन्ममरणांचा आवर्त ॥ मी श्रीअनंत लागोंनेदीं ॥ ८३ ॥ जेकां स्वधर्मी विमुख ॥ त्यांसि माझी प्राप्ति नाहीं देख ॥जन्मकोटी परम दुःख॥ सकामें मूर्ख भोगिती ॥८४॥ त्या स्वधर्माची अतर्क्य गोष्टी ॥ नकळे नैष्कर्म निजदृष्टीं ॥ यालागीं जन्मकोटी ॥ अतिसं-

---

१ समुद्रास मिळते तेथें. २ इंद्रपुरीच्या. ३ विज्ञान. ४ परीस. ५ फेरा.

*मो. समूळ शोधावी. +मो. स्वधर्मचि. ×मो. तेणें ज्ञानें चित्तशुद्धी होय चित्तीं. ना. तेणें ज्ञानेंचि शुद्धचित्तीं. ※मो. प्रीती.

कटीं जीव भोगी ॥ ८५ ॥ स्वधर्में करितां स्वकर्म ॥ जें *नैष्कर्मतेचें कळे वर्म ॥ तें विभांडूनि मरणजन्म ॥ परब्रह्म पावती ॥ ८६ ॥ एवं स्वधर्म यापरी ॥ तारक होय संसारीं ॥ स्वधर्माचे नावेवरी ॥ तरले भवसागरीं निजभक्त ॥ ८७ ॥ संसार तरले हा बोल कुडा ॥ स्वधर्म करितां माझिया चाडा ॥ होय भवसागर कोरडा ॥ मी सांपडें ×पुढां निजात्मा ॥ ८८ ॥ ऐशी स्वधर्माची थोरी ॥ निष्कामतेच्या निजकुसरीं ॥ देवो सांगे +आवडीभारीं ॥ नानापरी ०प्रबोधें ॥ ८९ ॥ भक्तिप्राधान्य ❀भागवत ॥ मुख्य भक्ति ते स्वधर्मयुक्त ॥ येणें स्वधर्में भजनें समस्त ॥ परम भागवत उद्धरले ॥ ३९० ॥ त्या स्वधर्मकर्माचा एकांत ॥ निजभजनभक्तीचा भावार्थ ॥ उद्धवासि श्रीकृष्णनाथ ॥ स्वयें सांगत एकादशीं ॥ ९१ ॥ त्या एकादशाच्या गोष्टी ॥ स्वधर्मकर्माची कसवटी ॥ एका जनार्दनकृपादृष्टीं ॥ टीका मराठी हे केली ॥ ९२ ॥ हे करणी केली जनार्दनें ॥ मज अभंगीं घातलें तेणें ॥ शेखीं मीतूंपणाचें ठाणें ॥ येणें निरूपणें उडविलें ॥ ९३ ॥ उडविलें विपर्यी विषयपण ॥ उडविलें भेदाचें ²भान ॥ उडविलें जीवशिवपण ॥ जनार्दन तुष्टोनी ॥९४॥ *जनार्दनें जनकें तेणें ॥ आह्मां केलें परब्रह्म खेळणें ॥ यालागीं सकळ क्रिया तेणें होणें ॥ स्वधर्मपणें सहजेंची ॥ ९५ ॥ सहजीं लागल्या स्वधर्म ॥ कर्मचि होय निष्कर्म ॥ संसार होय परब्रह्म ॥ हे कृपा परम जनार्दनीं ॥ ९६ ॥ यालागीं सांडूनिया एकपण ॥ एका जनार्दना शरण ॥ स्वधर्मकर्माचें निरूपण ॥ झालें संपूर्ण तया कृपां ॥ ९७ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां वानप्रस्थसंन्यासधर्मनिरूपणं नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ मूळश्लोक ॥४८॥ ओंव्या ॥ ३९७ ॥ एकुणसंख्या ॥ ४४५ ॥

---

# अध्याय एकोणिसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः॥ ओंनमो सद्गुरु त्र्यंबका ॥ ब्रह्मगिरिनिवासनायका ॥ ⁶त्रिगुणत्रिपुरभेदका ॥ कामांतका ⁰गिरीशा ॥ १ ॥ तुझा अनुहताचा डमरू ॥ सर्वशब्दें करी गजरू ॥ वेदानुवादें निरंतरू ॥ त्रिकांडीं थोरू गर्जत ॥ २ ॥ तुझे हातींचें खट्वांग ॥ करी जीवाचा जीवभंग ॥ अनंगेंसी जाळूनि अंग ॥ अंगसंग तें देशी ॥ ३ ॥ त्रिनयना त्र्यंबक लिंगा ॥ तुजपासोनि प्रवाहे चिद्गंगा ॥ ते पवित्रपणें उद्धरी जगा ॥ प्रकाशगर्भा शंकरा ॥ ४ ॥ प्रत्यक्ष दिसती दोन्ही लोचन ॥ तिसरा गुप्त ज्ञाननयन ॥ यालागीं तूं त्रिलोचन ॥ नयनेंवीण

---

१ जिंकून. २ प्रेमानें. ३ भक्तिच मुख्य साधन ज्यांत असें. ४ नित्यस्वरूपाप्रत कवित्वांत? ५ सुलभ, क्रीडनक. ६ तीन गुण हेच त्रिपुर, त्याचें भेदन करणारा. ७ मदनाचा नाश करणारा. ८ शरीरांतील चक्रांपैकीं चवथें जें अनाहत चक्र, त्यांत. एकसारखा होणारा नाद. या अनाहत चक्रास हृदय कमलही ह्मणतात. ९ ज्ञान कर्म व भक्ति या तीनप्रकरणांत. १० खाटेच्या एका अवयवाप्रमाणें आयुधविशेष. ११ जीवस्वरूपाचा नाश. १२ कोमल शरीर. १३ ज्ञानरूपी गंगा. १४ त्र्यंबक, त्रिनेत्र.

*ना. निष्कामतेचें. ×मो. रोकडा. +ना. आवडीनें भारी. ०ना. स्वबोधें. ❀मो. भगवंत. ²ना. भेदलक्षण. *मो. जनार्दनें नवल केलें तेणें, साह्य केलें परब्रह्म खेळणें. ⁰मो. गिरिजेशा.

*दीसशी ॥ ५ ॥ निजांगें वाहसी बोधचंद्र ॥ यालागीं तूं चंद्रशेखर ॥ चंद्रसूर्यादि चराचर ॥ तुझेनि साचार प्रकाशे ॥ ६ ॥ भवया नांवाची ख्याती ॥ भवप्रकाशक तुझी चिच्छक्ती ॥ तूंचि विष्णु प्रजापती ॥ रुद्र तूं अंतीं संहर्ता ॥ ७ ॥ मोडूनियां नामरूपमुद्रा ॥ जीव आणिशी एकाकारा ॥ अत्यंत प्रळयींच्या प्रळयरुद्रा ॥ चित्समुद्रा शिवरूपा ॥ ८ ॥ शिवशिव जी गुरुराया ॥ निजभावें लागतां पायां ॥ तंव गुरुशिष्यत्व ×गेलें लया ॥ दावूनियां निजरूप ॥ ९ ॥ तें निजरूप देखतां दृष्टीं ॥ कैंचा जीव कैंची सृष्टी ॥ निमाली त्रिगुणेंसी त्रिपुटी ॥ पडली मिठी स्वानंदीं ॥१०॥ त्या स्वानंदाचे उद्गार ॥ सांवरतां नावरती थोर ॥ त्या स्वानंदाचें निजसार ॥ सत्य साचार एकादश ॥ ११ ॥ त्याही माजीं अतिगहन ॥ सुखस्वानंद निरूपण ॥ तो हा एकुणिसावा अध्याय जाण ॥ परम कारण +शास्त्रार्थी ॥ १२ ॥ जें ऐकतां निरूपण ॥ परमानंद उसळे जाण ॥ एका विनवी जनार्दन ॥ श्रोतां अवधान मज द्यावें ॥ १३ ॥ सतरा अठरा अध्यायांप्रती ॥ स्वधर्मकर्में ब्रह्मप्राप्ती ॥ वर्णाश्रम स्थितीगती ॥ उद्धवाप्रती सांगीतली ॥ १४ ॥ एकुणिसावे अध्यायीं जाण ॥ जेणें ज्ञानें साधिलें निजज्ञान ॥ त्या ज्ञानाचें त्यागलक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ १५ ॥ कर्म कर्तव्यता कारण ॥ जीवन्मुक्तासि नाहीं जाण ॥ उद्धवाचे यमादिप्रश्न ॥ हेही श्रीकृष्ण सांगेल ॥ १६ ॥ शास्त्रयुक्ति पांडित्यज्ञान ॥ प्रपंचाचें मिथ्या निरूपण ॥ तें आनुमानिक पुस्तकज्ञान ॥ सत्यपण त्या नाहीं ॥ १७ ॥ पूर्वे आहे माझें गमन ॥ हे पूर्वील शुद्ध स्मरण ॥ परी दिग्भ्रम पडिल्या जाण ॥ पश्चिमे आपण पूर्व मानी ॥ १८ ॥ तैसें शाब्दिक शास्त्रज्ञान ॥ बोले आन करी आन ॥ तेणें नव्हे समाधान ॥ सर्वथा जाण साधकां ॥ १९ ॥ जेवीं कां दिग्भ्रम मोडे ॥ तें पूर्वेचा चाले पूर्वेकडे ॥ तेवीं अपरोक्षज्ञान जें जोडे ॥ तें साधक पडे स्वानंदीं ॥ २० ॥ जेंजें ऐके वेदांतश्रवण ॥ तें अंगें होत जाण आपण ॥ हें अपरोक्षाचें लक्षण ॥ सत्यत्वें जाण अतिशुद्ध ॥ २१ ॥ ऐसें नव्हतां अपरोक्ष ज्ञान ॥ सांडूनये श्रवणमनन ॥ अवश्य करावें साधन ॥ प्रत्यावृत्ती जाण अत्यादरें ॥ २२ ॥ झालिया अपरोक्ष ज्ञान ॥ प्रपंचाचें मिथ्याभान ॥ विपर्यासि पडलें शून्य ॥ कल्पना जाण निमाली ॥ २३ ॥ तेणेंचि पुरुषें आपण ॥ त्यागावें गा ज्ञानसाधन ॥ हेंचि निरूपणीं निरूपण ॥ देव संपूर्ण सांगत ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ यो विद्याश्रुतसंपन्न आत्मवान्नानुमानिकः ॥
मायामात्रमिदं ज्ञात्वा ज्ञानं च मयि संन्यसेत् ॥ १ ॥

॥ टीका ॥ ॥ वेदशास्त्रपरिनिष्ठ ॥ श्रवणमननअभ्यासयुक्त ॥ ज्यासि ब्रह्मविद्या प्राप्त ॥ सुनिश्चित स्वानुभावें ॥ २५ ॥ तोचि अनुभव ऐसा ॥ दोराअंगीं सर्प जैसा ॥ न मारितां नाशे आपैसा ॥ भवभ्रम तैसा त्या नाहीं ॥ २६ ॥ जेवीं कां नटाची रावोराणी ॥ दोघें खेळती लटिकेपणीं ॥ तेवीं ⁂प्रकृतिपुरुषउभवणी ॥ मिथ्यापणीं जो जाणे ॥ २७ ॥ जैशीं भिंतीमाजीं नानाकार ॥ चित्रें लिहिलींसें विचित्र ॥ ०ते भिंतीचि एक साचार ॥ तेवीं ऐक्यें चराचर जो

१ ऐक्याप्रत. २ उंचबळे. ३ दिशाभूल. ४ साक्षात्कारपूर्वक ज्ञान. ५ वरचेवर. ६ प्रपंच सत्य असा भ्रम. ७ रचना.

*मो. देखसी. ×ना. नेलें. +मो. शास्त्रेंसीं. ⁂मो. प्रकृतीपुरुषांची उभवणी. ०ना. परी ते भिंती एकचि साचार.

देखे ॥ २८ ॥ स्वप्नींचीं नाना कर्मै जाण ॥ त्यांचें जागृतीं नलगे बंधन ॥ तेवीं मिथ्या निजकर्माचरण ॥ जीवित्वेंसी *जाण जो देखे ॥ २९ ॥ ऐशी साचार ज्याची स्थिती ॥ त्या नांव शुद्ध आत्मप्राप्ती ॥ निजानुभव त्यातें ह्मणती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३० ॥ आणिक एक तेथींची खुण ॥ ' विषयांवीण स्वानंद पूर्ण ' ॥ हें अनुभवाचें मुख्य लक्षण ॥ सत्य जाण ×सात्वेता ॥३१॥ ऐसा अनुभव नसतां देख ॥ केवळ ज्ञान जें शाब्दिक ॥ त्यातें ह्मणिजे आनुमानिक ॥ जाण निष्टंक निजभक्ता ॥ ३२ ॥ ज्याच्या अनुभवाभीतरीं ॥ नाहीं अनुमानासी उरी ॥ जो अपरोक्षसाक्षात्कारी ॥ निरंतरीं नांदत ॥ ३३ ॥ ऐसा जो पुरुष जाण ॥ तेणें ज्ञानाचें ज्ञान साधन ॥ आणि वृत्तिरूपें जें ज्ञान ॥ तेंही आपण त्यागावें ॥ ३४ ॥ तें न त्यागितां लवलाहें ॥ सहजचि त्याग होये ॥ जेवीं सूर्योदयीं पाहे ॥ सचंद्र तेज जाये तारागणाचें ॥ ३५ ॥ जेवीं हनुमंत देखोनि येतां ॥ नवचंडी पळे तत्वतां ॥ मा राहावया येरा भूतां ॥ उरी सर्वथा उरेना ॥ ३६ ॥ तेवीं माझे साक्षात्कारीं ॥ साच बद्धता नाहीं खरी ॥ ०मा ज्ञान तीचे वृत्तीवरी ॥ कैशापरी राहेल ॥ ३७ ॥ माझिया अनुभवाच्याठायीं ॥ बंधमोक्ष मिथ्या पाहीं ॥ तेथ साधनज्ञानाचा कांहीं ॥ उपेग नाहीं उद्धवा ॥ ३८ ॥ परमात्मस्वरूपाच्याठायीं ॥ हें अवघेंचि +मायिक पाहीं ॥ तेथें ज्ञानध्यान जें कांहीं ॥ न त्यागितां पाहीं त्यागिलें ॥ ३९ ॥ त्यागोनियां ज्ञानध्यान ॥ ज्ञानियांसि माझी प्रीति गहन ॥ तेंचि प्रीतीचें लक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ ॥ ज्ञानिनस्त्वहमेवेष्टः स्वार्थो हेतुश्च संमतः ॥ स्वर्गश्चैवापवर्गश्च नान्योऽर्थो मदृते प्रियः ॥ २ ॥

॥ टीका ॥ जो मी अद्वयानंदस्थिती ॥ त्या माझी ज्ञानियांसी प्रीती ॥ ते प्रीतीची उपपत्ती ॥ ऐक निश्चितीं उद्धवा ॥४१॥ ज्ञानियांसि ⁂अतिवल्लभ ॥जो मी परमात्मा स्वयंभ॥ ज्ञानियांचा परमलाभ ॥ मी पद्मनाभ निजधन ॥ ४२ ॥ ज्ञानियांसी जो स्वर्ग चांग ॥ तो मजवेगळा नाहीं मार्ग ॥ ज्ञानियांचा जो मोक्ष सांग ॥ तो मी श्रीरंग निजात्मा ॥ ४३ ॥ ज्ञानियांचें स्वधर्मसाधन ॥ तो मी परमात्मा नारायण ॥ मजवेगळें कांहीं आन ॥ ज्ञात्यांसि जाण असेना ॥४४॥ ज्ञात्यांसि स्वर्गमोक्षसुख ॥ मजवेगळें उरलें नाहीं देख ॥ मी चिदात्मा निजव्यापक ॥ भावें निष्टंक पावले ॥ ४५ ॥ ज्ञात्यांचा अर्थ स्वार्थ परमार्थ ॥ मी पुरुषोत्तम गा समस्त ॥ आद्य अव्यय अनंत ॥ 7माझें निजसुख प्राप्त त्यां जाहलें ॥ ४६ ॥ ऐशी ज्ञानियांसी माझी प्रीती ॥ तेही तैसेचि मज प्रिय होती ॥ तेंचि स्वयें श्रीपती ॥ उद्धवाप्रती सांगत ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानविज्ञानसंसिद्धाः पदं श्रेष्ठं विदुर्मम ॥ ज्ञानी प्रियतमोऽतो मे ज्ञानेनासौ बिभर्ति माम् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ ज्ञानविज्ञान निजसंपत्ती ॥ जाहलियावीण माझी प्राप्ती॥ कोणासि नव्हे स्वरूपस्थि-

---

१ उद्धवा. २ केवळ तर्काचें कल्पनेचें ३ ठिकाणा. ४ अहिरावणाची देवी. ५ बद्धतेचे. ६ उपयोग. ७ अतिप्रिय. ८ पूर्ण.

*ना. प्राण. ×मो. शाश्वत. ०ना. मा ज्ञान तियेचे निवृत्तिवरी. +मो. मिथ्या. ⁂मो. अतिवाल्लभ. 7मो. माझेनि निजसुखें प्राप्त ते झाले.

ती ॥ मत्पदीं गती ज्ञानविज्ञानें ॥ ४८ ॥ करितां *गुरुशास्त्रशुद्धश्रवण ॥ तेणें जाहलें तें ह्मणि-जे ज्ञान ॥ त्याचा अनुभव तें विज्ञान ' ॥ ऐक लक्षण त्याचेंही ॥ ४९ ॥ स्वयें स्वयंपाक केला जाण ॥ जाणे कटु, मधुर, लवण ॥ जंव चाखिला नाहीं आपण ॥ ते दशा संज्ञान ' ×ज्ञान ' ह्मणती ॥ ५० ॥ केलिया रसाचें रसास्वादन ॥ स्वयें गोडी सेवी आपण ॥ ऐशी जे दशा तें विज्ञान ॥ उद्धवा जाण निश्चितीं ॥ ५१ ॥ एवं +विज्ञानज्ञाननिजसंपत्ती ॥ माझ्या उत्तमपदाची 5पदप्राप्ती ॥ माझें वास्तव स्वरूप जे जाणती ॥ त्यांची मज प्रीति अनन्यत्वें ॥ ५२ ॥ वेदशास्त्रयुक्तिबळें ॥ माझें स्वरूप ०काइसेनि तें न कळे ॥ तें ज्यासि वस्तुतां आकळे ॥ मज त्यावेगळें प्रिय नाहीं ॥५३॥ तेंचि अतिप्रीतीचें लक्षण ॥ त्याच्या पाउलापाउलीं जाण ॥ सर्वांग वोडवीं मी आपण ॥ करीं निंबलोण सर्वस्वें ॥ ५४ ॥ त्यासि जे वेळे जें लागे ॥ तें मी न मागतां पुरवीं वेगें ॥ त्यासि विरुद्ध ये जेणें मार्गें ॥ तें मी निजांगें निवारीं ॥ ५५ ॥ त्यासि ह्मणी 3संसारवारा लागे ॥ यालागीं मीच मी पुढें मागें ॥ सभंवता राहें सर्वांगें ॥ अतिप्रीतिपांगें पांगलों ॥ ५६ ॥ जेणें ज्ञानें ॐज्ञानी प्रिय होती ॥ त्या ज्ञानाची पवित्र कीर्ती ॥ देवो सांगे उद्धवाप्रती ॥ यथार्थस्थिती निजबोधें ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ तपस्तीर्थं जपो दानं पवित्राणीतराणि च ॥ नालं कुर्वंति तां सिद्धिं या ज्ञानकलया कृता ॥ ४ ॥

॥ टीका ॥ सकळसाधनां नव्हे जे शुद्धी ॥ ते ज्ञानलेशें होय त्रिशुद्धी ॥ ऐक उद्धवा सुबुद्धी ॥ ते 9ज्ञानसिद्धीचा महिमा ॥ ५८ ॥ 1तप जें करितां पंचाग्नी ॥ तीर्थ गंगादिसरिता त्रिवेणी ॥ जप जे नाना मंत्रश्रेणी ॥ गोभूतिलदानीं सुवर्णादि ॥ ५९ ॥ आणिकही इतर पवित्रें ॥ जें स्वधर्मकर्मादि साचारें ॥ नाना याग अग्निहोत्रें ॥ पवित्रकरें अतिशुद्ध ॥ ६० ॥ एवं तपादिक जें साधन ॥ या सकळांची शुद्धि गहन ॥ ते ज्ञानलेशासमान ॥ पवित्रपणें तुळेना ॥ ६१ ॥ ज्ञाननिष्ठा अर्धक्षणें ॥ जे पवित्रता स्वयें लाहणें ॥ ते तपादि नाना साधनें ॥ नाहीं पावणें कल्पांतीं ॥ ६२ ॥ ऐसें जें पवित्र ज्ञान ॥ तें मुख्यत्वें धरोनि जाण ॥ माझें करावें भजन ॥ तेंचि निरूपण हरि बोले ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ तस्माज्ज्ञानेन सहितं ज्ञात्वा स्वात्मानमुद्धव ॥ ज्ञानविज्ञानसंपन्नो भज मां भक्तिभावतः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ या कारणें गा उद्धवा ॥ ऐसा पवित्र ज्ञानाचा यांवा ॥ तेथ प्रक्षाळुनी निजभावा ॥ जीव तो वोळखावा परमात्मत्वें ॥ ६४ ॥ जीव परमात्मा दोनी एक ॥ ऐसें जाणणें तें ज्ञान *देख ॥ ऐक्य भोगणें तें परमात्मसुख ॥ विज्ञान सम्यक त्या नांव ॥ ६५ ॥ ऐसा ज्ञानविज्ञानसंपन्न ॥ होऊनि करावें माझें भजन ॥ त्या निजभजनाची खूण ॥ ऐक संपूर्ण उद्धवा ॥ ६६॥

१ खारट. २ ज्ञाते. ३ एकनिष्ठेनें. ४ कदाचित्. ५ वश झालों. ६ गायी, भूमि व तीळ यांच्या दानांनीं ७ प्रभाव.

*ना. गुरुमुखें शास्त्रशुद्धश्रवण. ×ना. ज्ञाते. +मो. ज्ञानविज्ञानसंपत्ती. 5मो. प्राप्ती. ०मो. कासेन नकळे. 3मो. वारा. ॐमो. ज्ञान. 9मो. ज्ञानशुद्धीचा. 1मो. तपतें पारांक पंचाग्नी ना. तप जें परार्क पंचाग्नी. *ना. चोख.

तेव्हां जेथ देखे जें कांहीं ॥ तें मीवांचुनी आन नाहीं ॥मग अनन्यभावें तियेठायीं ॥ भजे पाहीं भावार्थे ॥ ६७ ॥ ऐशिया माझ्या भजनाहातीं ॥ उसंतू नाहीं अहोरातीं ॥ जागृतिस्वप्नसुषुप्ती॥ माझी निजभक्ती न मोडे ॥ ६८ ॥ विसरोनि जावें जेथें ॥ तेथेंचि देखे मातें ॥ मरण आलें विस्मरणातें ॥ स्मरणही तेथें हारपलें ॥ ६९ ॥ यापरी ज्ञानविज्ञानसंपन्न ॥ मजवेगळें न देखती आन ॥ तैसेंचि माझें अनन्यभजन ॥ शुद्धभक्ति जाण या नांव ॥ ७० ॥ मागां ऋषीश्वरीं याचि *गतीं ॥ माझी करोनि अनन्यभक्ती॥मज पावले जैशा रीतीं ॥ऐक तुजप्रती सांगेन७१

॥ श्लोक ॥ ज्ञानविज्ञानयज्ञेन मामिष्ट्वाऽऽत्मानमात्मनि ॥ सर्वयज्ञपतिं मां वै संसिद्धिं मुनयोऽगमन् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ॥ जे ज्ञानधनें अतिसंपन्न ॥ परमपवित्र विज्ञानें जाण ॥ ऐसे ब्रह्मभूत जे ब्राह्मण॥ यज्ञद्वारां भजन करिती माझें ॥ ७२ ॥ हृदयाच्या निजकुवरीं ॥ विकल्पाची भूमी खाणोनि ॥ शमदमविरक्ती कुंडें तिन्ही ॥ केलीं आवो साधुनी श्रद्धेच्या ॥ ७३ ॥ तेथ क्षराक्षर अरणी दोन्ही ॥ गुरुमंत्रें दृढ मंथुनी ॥ काढिला सूक्ष्म निर्धूमाग्नी ॥ कुंडीं स्थापूनी पेटविला ॥ ७४ ॥ शुद्ध सत्वाचें घृत तेथ ॥ रजतमद्रव्येंसि मिश्रित ॥ वैराग्यस्रुवेनें आहुती देत ॥ मंत्र तेथ युक्तीचे ॥ ७५ ॥ घेऊनि विद्याशस्त्र लखलखित ॥ संकल्पपशूंचा करूनि घात ॥ तेणें यज्ञपती मी श्रीअनंत ॥ केला तृप्त निजबोधें ॥ ७६ ॥ तेथ पूर्णाहुतीस कारण ॥ घालितां जीवभावाचें अवदान ॥ यज्ञभोक्ता मी श्रीनारायण ॥ परमात्मा जाण सुखी केलों ॥ ७७ ॥ यापरी माझें ×यजन ॥ करूनियां मुनिगण ॥ निवारूनि जन्ममरण ॥ माझी सिद्धि जाण पावले ॥ ७८ ॥ मुनीश्वरीं साधिली सिद्धी ॥ तेचि उद्धवालागीं त्रिशुद्धी ॥व्हावया कृष्ण कृपानिधी ॥ प्रपंचनिषेधी वस्तु सांगे ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ त्वय्युद्धवाश्रयति यस्त्रिविधो विकारो मायांऽतरा पतति नाद्यपवर्गयोर्यत् ॥ जन्मादयोऽस्य यदमी तव तस्य किं स्युराद्यंतयोर्यदसतोऽस्ति तदेव मध्ये७

॥ टीका ॥ ॥ मी उद्धव ऐसें ह्मणता ॥ तूं कोण आहेसि तत्वतां ॥ ऐक त्या स्वरूपाची कथा ॥ तुज मी आतां सांगेन ॥ ८० ॥ जन्म, स्थिती, आणि निधन ॥ +त्रिविधविकारेंसि त्रिगुण ॥ याची अधिष्ठात्री माया जाण ॥ तिसी चळण तुझेनी ॥ ८१ ॥ मायादिगुणकार्यां समस्तां ॥ तूं आश्रयो पैं ०सत्रात्यंता ॥ तुझेनि अंगें यासि ❀चपळता ॥ तूं यापरता चिदात्मा ॥ ८२ ॥ माझेनि गुणकर्मां चळणता ॥ तें प्रपंचासि आली सत्यता ॥ हें मायामय गा तत्त्वतां ॥ मृगजळता आभास ॥ ८३ ॥ सकळप्रपंचाचें जें भान ॥ तें तंव मृगजळासमान ॥ दिसे तेंही मिथ्या दर्शन ॥ वस्तुत्वें जाण सत्य नव्हे ॥ ८४ ॥ तूं जन्ममरणापरता ॥ त्रिगुणातें नातळता॥ प्रपंचासि अलिप्तता ॥ ¹तूंचि तत्त्वतां तूं ऐक ॥ ८५ ॥ तेचि प्रपंचाची अलिप्त युक्ती ॥ ऐशी आहे परमप्रतीती ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयांतीं ॥ प्रपंचाची वस्ती सत्यत्वें नाहीं ॥८६॥ 'उत्पत्ति-

१ विसावा. २ आकार. ३ सर्व भूतें व कूटस्थ हे. ४ धुरावांचून अग्नि. ५ वैराग्यरूपपात्रानें. ६ आहुति. ७ ब्रह्म. ८ नाश. ९ आंत बाहेर. १० मृगजळाप्रमाणें.

*ना. रीती. ×मो. भजन. +मो. त्रिविधाकारेंसी. ०ना. स्वभावता. ❀ना. चळणता. ¹मो. तुझा ना. तुझी.

आदीं प्रपंच नसे ॥ अंतीं कांहीं उरला न दिसे ॥ मध्यें जो कांहीं आभासे ॥ तो मायावशें मिथ्याभूत ' ॥ ८७ ॥ ' प्रपंचाआदीं परब्रह्म ॥ अंतीं तेंचि उरे निरुपम ॥ मध्यें स्थितिकाळीं तेंचि ब्रह्म ॥ मिथ्या भवभ्रम भ्रांतासी ॥ ८८ ॥ सूर्याआदीं मृगजळ नसे ॥ अस्तमानीं उरलें न दिसे ॥ मध्यें जें कांहीं आभासे ॥ तेथही नसे जळलेश ॥ ८९ ॥ सर्पाआदीं दोरत्वें दोरू ॥ मध्यें भ्रमें भासे सर्पाकारू ॥ अंतीं दोर उरे साचारू ॥ तोही दोरू दोररूपें ॥ ९० ॥ यापरी आद्यंतीं विचारितां ॥ ' वस्तु सत्य, प्रपंच मिथ्या ' ॥ हें उद्धवा जाण तत्त्वतां ॥ वेदशास्त्रार्थां संमत ॥ ९१ ॥ ऐशी या प्रपंचाची घडमोडी ॥ होतां जन्ममरणकोडी ॥ उद्धवा तुज न लागे वोढी ॥ तूं *परात्परथडीं नित्यमुक्त ॥ ९२ ॥ निर्गुण, निःसंग, निर्विकार, ॥ अज, अव्यय, अक्षर, ॥ ब्रह्म, अनंत, अपरांपर ॥ तें तूं साचार उद्धवा ॥ ९३ ॥ हे ऐकोनि देवाची गोष्टी ॥ उद्धवें बांधिली शकुनगांठी॥हरिखें आनंद नजिरे पोटीं एकला ॥सृष्टीं न समाये ॥९४॥ 'तूं ब्रह्म' ह्मणिजे यदुराजें ॥ तेणें हरिखाचेनि फुंजें ॥ उद्धव नाचे स्वानंदभोजें ॥ वैकुंठराजे तुष्टले॥९५॥ स्वमुखें तुष्टोनि श्रीकृष्ण ॥ मज ह्मणे तूं ब्रह्म पूर्ण ॥ आजि मी सभाग्य धन्यधन्य ॥ धांवोनि श्रीचरण वंदिले ॥ ९६ ॥ तूंचि अंगें परब्रह्म ॥ ऐसें बोलिला मेघश्याम ॥ तेचि अर्थींचें निजवर्म ॥ उद्धव सप्रेम पूसत ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ उद्धव उवाच ॥ ॥ ज्ञानं विशुद्धं विपुलं यथैतद्वैराग्यविज्ञानयुतं पुराणम् ॥ आख्याहि विश्वेश्वर विश्वमूर्ते त्वद्भक्तियोगं च महद्विमृग्यम् ॥८॥

॥ टीका ॥ विष्वक्सेना विश्वेश्वरा ॥ विश्वमूर्ती विश्वंभरा ॥ जेणें पाविजे ब्रह्मसाक्षात्कारा ॥ त्या ज्ञाननिर्धारा मज सांग ॥ ९८ ॥ तुवां जें सांगसी ज्ञान ॥ ते केवळ मूढ जाण ॥ सांग ×वैराग्ययुक्ति तीक्ष्ण ॥ जें छेदी भवबंधन जीवाचें॥९९॥ज्ञानेंवीण वैराग्य आंधळें॥तें अरडी-दरडी आदळे ॥ वैराग्येंवीण ज्ञान पांगळें ॥ युक्ति देखे परी नचले पुरुषार्थ ॥ १०० ॥ विवेक वैराग्य दोनी ॥ प्रवेशल्या हृदयभुवनीं ॥ तों विषयावस्था निरसूनी॥ सोऽहंपणीं जीव वर्ते ॥१॥ जंव ज्ञानासि न भेटे विज्ञान ॥ तंव न निरसे जीवपण ॥ यालागीं सांगावें विज्ञान ॥ जें जीव शिवपण निवारी ॥२॥ असंभावना दोषशून्य॥ तें बोलिजे ब्रह्मज्ञान॥जें विपरीत भावनेवीण ॥ +त्यातें सज्ञान विपुल ह्मणती ॥३॥ ऐसें विपुल विशुद्ध ज्ञान ॥ तद्युक्त वैराग्य विज्ञान ॥ त्या-माजीं श्रेष्ठ तुझें भजन ॥ कृपा करून सांगिजे ॥ ४ ॥ ज्ञानविज्ञान वैराग्य स्थिती ॥ जुनाट तुझी भगवद्भक्ती ॥ मज सांगावी सुनिश्चितीं ॥ कृपामूर्ती श्रीकृष्णा ॥ ५ ॥ तुझे उत्तम भक्तिकारणें ॥ साधु पडले गवेषणें ॥ धरणें बैसलें जीवेंप्राणें ॥ ते भक्ति सांगणें मजलागीं ॥ ६ ॥ तुझी करितां उत्तम भक्ती ॥ त्रिविध ताप क्षया जाती ॥ आपुली लाभे निजमुक्ती ॥ उद्धव ते अर्थीं विनवित ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ तापत्रयेणाभिहतस्य घोरे संतप्यमानस्य भवाध्वनीश ॥ पश्यामि नान्यच्छरणं तवांघ्रिद्वंद्वातपत्रादमृताभिवर्षात् ॥ ९ ॥

॥ टीका ॥ जे त्रिविधतापें तापले ॥ जे कामक्रोधीं जर्जर केले ॥ आशातृष्णा त्रिसिंचिले ॥ जे

---

१ प्रवृत्तींत व निवृत्तींत. २ विष्णो. ३ शोधांत. ४ विकार पावले.

*ना. परात्परथडीं. ×मो. वैराग्ययुक्ततीक्ष्ण. +ना. ज्ञाते.

निर्बुजले जन्ममरणें ॥ ८ ॥ संसारमार्ग अतिघोर ॥ दुःख दुर्लंघवे दुस्तर ॥ ऐसे श्रमले जे नर ॥ त्यांसि निजछत्र हरिपादपद्म ॥ ९ ॥ तुझ्या चरणारविंदापरतें ॥ शरण न देखों आणिकांतें ॥ यालागीं कायावाचाचित्तें ॥ शरण भावार्थें तुज आलों ॥ ११० ॥ छत्र निवारी केवळ ताप ॥ चरणछत्राचें भिन्न रूप ॥ त्रिविधतापेंसि संताप ॥ निरसोनि निष्पाप करी जना ॥ ११ ॥ एकें शरण निजचित्तें ॥ *एक वैरें मिसळले तूतें ॥ एक ते भजनभावार्थें ॥ एक ते +भयातें स्मरले तूतें ॥ १२ ॥ एक ते सुहृदत्वें सगोत्र ॥ एकाचें केवळ स्नेहसूत्र ॥ एका अंगसंगें कामतंत्र ॥ एक आज्ञाधार नेमस्त ॥१३॥ एवं नानापरी विचित्र ॥ जिहीं ठाकिलें चरणछत्र ॥ भवभय जें महाघोर ॥ तें त्यांसमोर हों न शके ॥ १४ ॥ भक्त वैरी आणि सुहृद ॥ अवघ्या देणें निज ऐक्यपद ॥ बाप उदारता अगाध ॥ तूं स्वानंदबोध सर्वांचा ॥ १५ ॥ ×होम दीजे अग्नीवरी ॥ तें अग्नी आपणा ऐसें करी ॥ मा अवचटें पडिल्यावरी ॥ तेंही करी तैसेंची ॥ १६ ॥ एवं नानायोगें गोविंदा ॥ जे ०मानिले तुझिया संबंधा ॥ त्यांची निरसोनि संसारबाधा ॥ समत्वें निजपदा तूं नेसी ॥ १७ ॥ त्या तुझें चरणछत्र येथें ॥ निवारी त्रिविध तापांतें ॥ सदा वर्षे परमामृतें ॥ शरण चरणांतें यालागीं ॥ १८ ॥ ज्या संसारभयाभेण ॥ तुझ्या चरणा आलों शरण ॥ त्या भवभयाचें निरूपण ॥ उद्धव आपण सांगत ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ दष्टं जनं संपतितं बिलेऽस्मिन् कालाहिना क्षुद्रमुखोरुतर्षम् ॥ समुद्धरैनं कृपयापवर्ग्यैर्वचोभिरासिंच महानुभाव ॥ १० ॥

॥ टीका ॥ ॥ संसारकुहरामाजीं [१]जन ॥ गृहदाराकूपीं पडले जाण॥त्याहीमाजीं दुःख गहन ॥ काळसर्पे दारुण डंखिले ॥ १२० ॥ त्या काळसर्पाचें विख ॥ क्षणक्षणा चढे देख ॥ अभिमानें भुलले लोक ॥ विषयसुख वांछिती ॥ २१ ॥ नवल काळसर्पाचा पडिपाडु ॥ विषप्राय विषय केला गोडू ॥ गोडाचा गोड परमार्थ दृढू ॥ तो केला कडू जीवभावें ॥ २२ ॥ विखाहूनि विषय अधिक ॥ विख एकवेळा मारक ॥ विषयो पुनःपुनः घातक ॥ काळसर्पें लोक भुलविले ॥ २३ ॥ विषय तो केवळ विख ॥ त्यालागीं भुलले मूर्ख ॥ विषयाची तृष्णा देख ॥ अधिकाधिक वाढविती ॥ २४ ॥ ऐसे दुःखनिमग्न जे जन ॥ त्यांचें करावें उद्धरण ॥ ह्मणशील हें करितील साधन ॥ तें उद्धरण करीन मी ॥ २५ ॥ स्वामी तुझी कृपा नव्हतां ॥ कोटीकोटी साधनें तीं वृथा ॥ तुझी कृपा जाहलिया अच्युता ॥ भवव्यथा स्पर्शेना ॥ २६ ॥ ऐके कृपाळुवा श्रीअनंता ॥ तुझ्या ※मोक्षफळरूप ज्या कथा ॥ तेणें अमृतें शिंपोनि कृष्णनाथा ॥ जनां समस्तां उद्धरी ॥ २७ ॥ तुझे मुखींचें कथापीयूख ॥ बिंदुमात्र लागतां देख ॥ भवसर्पाचें उतरे विख ॥ उपजवी सुख स्वानंदें ॥ २८ ॥ सकळजनांचियाविषयीं ॥ ह्मणसी आग्रह कां तुझ्याठायीं ॥ जन मातें प्रार्थित नाहीं ॥ देवा ऐसें कांहीं कल्पिशी ॥ २९ ॥ आंधळें अंधकूपीं पडतां ॥ देखणेंनी लावावें सत्पथा ॥ [९]तेवीं ज्ञानांध दुःखीं बुडतां ॥ उद्धरावया तत्त्वतां मी

१ घाबरले. २ आश्रय. ३ रावणादि. ४ गोपिकादि. ५ स्वीकारिलें. ६ प्रताप. ७ कथामृत. ८डोळसानें. ९ चांगल्या वाटेस.

*मो. केवळ वैराग्यें मिसळले तूतें. +मो. भयार्थें ना. भयातें. ×होमीं जें जें अग्नीवरी ०मो. मिसळले. [१]ना. जीवन. ※मो. मोक्षरूप. [९]ना. तेवीं ज्ञानांधजन दुःखी होतां.

प्रार्थितसें ॥ १३० ॥ जन अंध कां जाहले ह्मणसी ॥ संसारसर्पें ग्रासिलें त्यांसी ॥ यालागीं विसरोनि निजसुखासी ॥ *विषयदुःखासी लोधले ॥ ३१ ॥ ऐशिया दीनांतें श्रीअनंता ॥ कृपेनें उद्धरावें तत्त्वतां ॥ ह्मणोनि चरणीं ठेविला माथा ॥ श्रीकृष्णनाथा प्रार्थिलें ॥ ३२ ॥ ऐकोनि भक्ताची विनंती ॥ संतोषला भक्तपती ॥ उत्तम सभेची ज्ञानस्थिती ॥ उद्धवाप्रती सांगेल॥३३॥ जे सभेसि मुख्यत्वें हृषीकेशी ॥ देवर्षि आणि ब्रह्मर्षी ॥ तेथ मीनले राजर्षी ॥ तपोराशी ज्ञाननिधी ॥ ३४ ॥ ते सभेचा ज्ञानमथितार्थ ॥ उद्धवासि सांगेल श्रीकृष्णनाथ ॥ श्रोतीं अवधान द्यावें तेथ ॥ एका विनवीत जनार्दना ॥ ३५ ॥ ज्ञान आणि पुरातन ॥ वक्ता भगवंत आपण ॥ श्रोता उद्धव सावधान ॥ काय श्रीकृष्ण बोलिला ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ इत्थमेतत्पुरा राजा भीष्मं धर्मभृतां वरम् ॥
अजातशत्रुः पप्रच्छ सर्वेषां नोऽनुशृण्वताम् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ ॥ तुवां पुशिलें जैशा रीतीं ॥ तैसियाची या उपपत्ती ॥ धर्में पुशिलें भीष्माप्रती ॥ देहांतीं शरपंजरीं ॥ ३७ ॥ ऐक त्या धर्माची थोरी ॥ ज्यासि शत्रु नाहीं संसारीं ॥ सत्यवादी निजनिर्धारीं ॥ जो [१]ऋषिमंत्रीं जन्मला ॥ ३८ ॥ करावया पांडवनिर्दळण ॥ वज्रदेही व्हावया आपण ॥ [२]वर्म पुसतां दुर्योधन ॥ धर्म असत्यवचन न बोले ॥ ३९ ॥ ऐसा राजा युधिष्ठिर ॥ निर्मत्सर परम पवित्र ॥ तेणें करूनि अत्यादर ॥ भीष्म महावीर विनविला ॥ १४० ॥ जो धरमधार्मिक निजनिर्धारीं ॥ जो स्वधर्मनियमें व्रतधारी ॥ जो यावज्जन्म ब्रह्मचारी ॥ जो महासुरीं वंदिजे ॥ ४१ ॥ न मोडतां गुरुत्वाची पायरी ॥ जो परशुरामेंसी युद्ध करी ॥ परी काशीश्वराची कुमरी ॥ जो न करीच नोवरी ब्रह्मचर्यें ॥ ४२ ॥ धनुर्विद्येसि गुरु परशुराम ॥ तो रणीं जिंतिला करूनि नेमें ॥ तेणें संतोषोनि परम ॥ आपुलें नाम आंकणा घाली ॥४३॥ अधिकें संतुष्टे परशुराम ॥ माझ्या ब्रह्मचर्याचा नेम ॥ भीष्मा तुज बाधीना काम ॥ वर परम दीधला ॥ ४४ ॥ जनकें संतोषाकारणें ॥ आपुलें तारुण्य दीधलें जेणें ॥ वार्धक्य घेऊनि आपणें ॥ सुखी करणें शंतनू ॥ ४५ ॥ पितयें दीधले आशीर्वादा ॥ ऐक भीष्मा अतिप्रबुद्धा ॥ वार्धिकीं क्षीणशक्तीची आपदा ॥ ते तुज कदा बाधेना ॥४६॥ यालागीं जंवजंव ह्मातारपण ॥ तंवतंव त्यासी प्रताप गहन ॥ काळाची शक्ति खुंटली जाण ॥ न करवे क्षीण भीष्मासी ॥४७॥ यालागीं तोडरीं काळ काम ॥ आंकणां लिहाका परशुराम ॥ ह्मचि ×वरिष्ठीं वरिष्ठ धर्म ॥ हें साजे नाम भीष्मासी ॥ ४८ ॥ ज्याचिये प्रतिज्ञेच्या निर्धारीं ॥ देवाशीं लावूनियां हारीं ॥ निःशस्त्री करी शस्त्रधारी ॥ एवढी थोरी प्रतिज्ञेची ॥ ४९ ॥ न मोडतां जनमर्यादा ॥ युद्धीं मिसळला गोविंदा ॥ हारीं लावूनियां मुकुंदा ॥ चरणारविंदा लागला ॥ १५० ॥ आण वाहूनि निर्धारीं ॥ शस्त्रास्त्रें सांडिलीं दूरी ॥ पुढती बाण भेदितां जिव्हारीं ॥ शस्त्र करीं न धरीच ॥५१॥ बाणीं खंडतरलें जिव्हार ॥ विकळता देखोनि थोर ॥ भीष्में करूनि निजनिर्धार ॥ जाहला

---

१ दुर्वासाच्या मंत्रानें. २ गुह्यगोष्ट. ३ धर्म. ४ पण. ५ पायांतील विरूद (पराक्रम सूचक भूषण) अंकित झाला. ६ शंतनू भीष्मपिता. ७ अंकित झाला. ८ देवास हार खावयास लाविलें व निःशस्त्र श्रीकृष्णास शस्त्र धरावयास लाविलें. ९ मर्मी. १० भेदले.

*मो. विषयसुखासी. ×ना. धर्मिष्ठा.

तत्पर देहत्यागा ॥ ५२ ॥ हें दक्षिणायन अतिघोर ॥ भीष्में ऐकतां उत्तर ॥ काळासि करूनियां दूर ॥ स्वशरीर राखिलें ॥ ५३ ॥ मग निजात्मनिर्धारीं ॥ भीष्म पहुडे शरपंजरीं ॥ त्यातें युधिष्ठिर प्रश्न करी ॥ महाऋषीश्वरीं परिवारिला ॥ ५४ ॥ आह्मां सकळां देखतां ॥ जाहला युधिष्ठिर पुसता ॥ तेचि पुरातन कथा ॥ तुज मी आतां सांगेन ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ निवृत्ते भारते युद्धे सुहृन्निधनविव्हलः ॥ श्रुत्वा धर्मान् बहून्पश्चान्मोक्षधर्मानपृच्छत ॥ १२ ॥

॥ टीका ॥ ॥ मी संधि[1] करितां श्रीकृष्ण ॥ तें नमनीच दुर्योधन ॥ व्यासें वर्जितां आपण ॥ तरी *दृढपण युद्धासी ॥ ५६ ॥ एवं दैवबळें कुरुक्षेत्रीं ॥ कौरवपांडवां झुंजारीं ॥ सापत्न दुर्योधनादि वैरी ॥ सपरिवारीं निमाले ॥५७॥ युद्ध निवर्तल्यापाठीं ॥ धर्म बैसल्या राज्यपटीं[4]॥ तेणें अभिमान घेतला पोटीं ॥ महादोषी सृष्टीं मी एक ॥ ५८ ॥ मी राज्यीं बैसतां आपण ॥ ह्मणे म्यां मारिला गुरुब्राह्मण ॥ म्यां मारिला कर्ण दुःशासन ॥ राजा दुर्योधन म्यां मारिला ॥ ५९ ॥ उत्पत्तिस्थितिप्रलयकर्ता ॥ येथ ईश्वरू जाण तत्त्वतां ॥ तें सांडोनियां सर्वथा ॥ अहं कर्ता ह्मणे धर्म ॥ १६० ॥ देहाभिमानाचे खटाटोपीं ॥ थोर होऊनियां अनुतापी ॥ गोत्रहंता[5] मी महापापी ॥ ऐसें आरोपी निजमाथां ॥ ६१ ॥ त्यासि द्यावया समाधान ॥ समयो भीष्माचें निर्याण[6] ॥ तेथें म्यां नेऊनियां जाण ॥ धर्में केले प्रश्न ते ऐका ॥ ६२ ॥ राजधर्म, दानधर्म ॥ पुशिला तेणें आपद्धर्म ॥ मुख्यत्वें पुशिला ×मोक्षधर्म ॥ उत्तमोत्तम परियेसीं ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ तानहं तेऽभिधास्यामि देवव्रतमुखाच्छ्रुतान् ॥ ज्ञानवैराग्यविज्ञानश्रद्धाभक्त्युपबृंहितान् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ ते भीष्ममुखींचे मोक्षधर्म ॥ म्यां परिशिले अतिउत्तम ॥ जे निरसिती भवभ्रम ॥ सकळ कर्मदाहक ॥ ६४ ॥ ज्ञान विज्ञान श्रद्धा भक्ती ॥ अनित्य नासे वैराग्य स्थिती ॥ भीष्में सांगीतली धर्माप्रती ॥ ते मी निश्चितीं सांगेन ॥ ६५ ॥ ह्मणणें भीष्मासि देवव्रत ॥ तेणें देवावरी ठेवूनि चित्त ॥ शरपंजरीं सुनिश्चित ॥ निजात्मयुक्त पहुडला ॥ ६६ ॥ तेणें सांगीतला मोक्षधर्म ॥ त्यांत मुख्यत्वें ज्ञान प्रथम ॥ तें ज्ञान सांगे पुरुषोत्तम ॥ अतिउत्तम अवधारी ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ नवैकादश पंच त्रीन् भावान् भूतेषु येन वै ॥ ईक्षेताथैकमप्येषु तज्ज्ञानं मम निश्चितम्॥ १४ ॥

॥ टीका ॥ प्रकृति पुरुष महत्तत्त्व ॥ पंचतन्मात्रा[7] सूक्ष्मस्वभाव ॥ अहंकारासकट नव ॥ तत्त्ववैभव हे संख्या ॥६८॥ एकादश बोलिजे तें ॥ तें अकराही इंद्रियें येथें ॥ पंच ते पंचमहाभूतें ॥ तिनी ते निश्चित तीन गुण ॥ ६९ ॥ हे तत्त्वसंख्या उणखूण ॥ गणितां अठ्ठावीस जाण ॥ इयें सर्वभूतीं समसमान ॥ तत्त्वें जाण वर्तती ॥ १७० ॥ हिरण्यगर्भादिस्थावरांत[8] ॥ तत्त्वें समान गा

---

१ वेष्टित असा. २ मैत्री. ३ युद्धामध्यें. ४ राज्यपदावर. ५ गोत्रजांस मारणारा. ६ प्राणोत्क्रमण. ७ गंधत्व, रसत्व, रूपत्व, स्पर्शत्व, व शब्दत्व. ८ ब्रह्मापासून ते वृक्षादिकापर्यंत.

*मो. दृश्यपण ना. दृष्टपण. ×मो. क्षेत्रधर्म.

समस्त ॥ अधिक उणें नाहीं येथ ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ७१ ॥ तैसेंचि गा जीवचैतन्य ॥ प्रतिबिंबलें समसमान ॥ *जो नामरूप अभिमान ॥ सर्वांशी जाण प्रकाशक ॥७२ ॥ थिल्लरीं विहिरीं सागरीं ॥ ×चंद्रमा बिंब समचि धरी ॥तेवीं ब्रह्मादिमशकवरीं ॥ जीवत्व शरीरीं समसाम्यें ॥ ७३ ॥ भूतें समसमान चैतन्य ॥ एकात्मता देखणें जाण ॥ या नांव गा शुद्ध ज्ञान ॥ माझाही जाण हा निश्चय ॥ ७४ ॥ आतां विज्ञानाचें लक्षण ॥ तुज मी सांगेन संपूर्ण ॥ तें श्लोकार्धें निरूपण ॥ स्वयें नारायण सांगत ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ एतदेव हि विज्ञानं न तथैकेन येन यत् ॥

॥ टीका ॥ पूर्वी देखतेनी स्वभावें ॥ +व्यापकवस्तूनि ये सर्वें ॥व्यापिलीं आहेती देहादितत्वें॥ हें मानी जीवें भावें निश्चित ॥ ७६ ॥ जेवीं कां घटमात्रास ॥ सबाह्य व्यापक आकाश ॥ तेवीं सकळप्रपंचास ॥ चिदाभास व्यापक ॥ ७७ ॥ ऐसें जें कां शुद्ध ज्ञान ॥ तें ज्ञेयप्राप्तीचें कारण॥ ज्ञेय पावलिया ज्ञान ॥ हारपे जाण वृत्तीसीं ॥ ७८ ॥ ज्ञानें गम्य वस्तु जें ॥ यालागीं त्या ज्ञेय म्हणिजे ॥ ज्ञेय पावलिया ज्ञान लाजे ॥ जेवीं कां सूर्यतेजें खद्योत ॥ ७९ ॥ जळीं रिघाल्या लवण ॥ लवणपणा मुके जाण ॥ तेवीं ज्ञेय पावलिया ज्ञान ॥ ज्ञातेपण हारवी ॥ १८० ॥ ज्ञेय पावलिया सम्यक ॥ स्वरूप चिन्मात्रैक एक ॥ तेथ मिथ्या व्याप्यव्यापक ॥ साधक बाधक असेना ॥ ८१ ॥ जेवीं उदेलिया गभस्ती ॥ सतारा लोपे रोहिणीपती ॥ तेवीं जगेंसी ज्ञानसंपत्ती ॥ ज्ञेयाचे प्राप्तीपुढें लोपे ॥ ८२ ॥ ऐसें अपरोक्ष नव्हतां सांग ॥ देहादिप्रपंचाचें लिंग ॥ आत्मावेगळें [1]देखे जग ॥ शब्दें लगबग ब्रह्मज्ञाना ॥ ८३ ॥ शुद्ध शाब्दिक जें ब्रह्मज्ञान ॥ तेंही गुणात्मक जाण ॥ वस्तु निराकार निर्गुण ॥ जन्ममरण तिसी नाहीं ॥ ८४ ॥ त्रिगुण तितुकें नाशवंत ॥ येचिविखीं प्रस्तुत ॥ सांगताहे श्रीकृष्णनाथ ॥ अंतवंत साकार ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ स्थित्युत्पत्त्यप्ययान्पश्येद्भावानां त्रिगुणात्मनाम् ॥ १५ ॥

॥ टीका ॥ जरी नसतें नाशवंत ॥ [2]तरी सगुण म्हणों ये संत ॥ उत्पत्तिस्थितिनिदानवंत ॥ जाण येथ त्रिगुणची ॥ ८६ ॥ रजोगुणें होय उत्पत्ति ॥ सत्वगुणें कीजे स्थिती ॥ तमोगुणें नाशी अंतीं ॥ हा [3]प्रकृतिस्वभावो ॥ ८७ ॥ या गुणांमाजीं वस्तु असे ॥ जिचेनि गुणकर्म प्रकाशे ॥ परी जन्ममरणादिदोषें ॥ अलिप्त वसे अविनाशी ॥ ८८ ॥ जे तिनी गुणां आश्रयभूत ॥ जिचेनि गुणकर्में वर्तत ॥ ती वस्तु त्रिगुणातीत ॥ तेचि सांगत श्रीकृष्ण ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ आदावन्ते च मध्ये च सृज्यात्सृज्यं यदन्वियात् ॥ पुनस्तत्प्रतिसंक्रामे यच्छिष्येत तदेव सत् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ गुणा आदिमध्यअवसानीं ॥ सृष्टि उत्पत्ति स्थिति निधनीं ॥ जें असे अविनाशपणीं ॥ तें मी मानीं संतत्वें ॥ ९० ॥ तेंचि संतत्व गा ऐसें ॥ ज्याचेनि आधारें जग वसे ॥ जें जगा सबाह्य भरलें असे ॥ जग प्रकाशे ज्याचेनी ॥ ९१ ॥ हें जगचि होय जाये ॥ परी तें संचलेंचि राहे ॥ ऐशी जे नित्यवस्तु आहे ॥ ते तूं पाहे संतत्वें ॥ ९२ ॥ जैसे घट मठ होती

१ चैतन्यस्वरूप. २ जाणण्यास योग्य. ३ तारकांसहित. ४ चंद्र. ५ चिन्ह. ६ सत्तारूपानें.

*मो. जें नानारूप अभिधान ×मो. चंद्रप्रतिमाबिंब समचि धरी. +ना. व्यापकवस्तु कैसेनि सर्वे. [1]ना. न देखे. [2]ना. तरी सगुण मानं नये संत. [3]ना. प्रकृतिस्वभाव.

ाती ॥ आकाश राहे *सहजगती ॥ तेवीं ब्रह्मांडा लयोत्पत्ती ॥ वस्तुची स्थिती संचली ॥ ९३ ॥ जेवीं अलंकारापूर्वी सोनें ॥ अलंकारीं सोनें सोनेंपणें ॥ ×अलंकारनाशीं नासों ोणे ॥ जेवीं कां सोनें निजस्थिती ॥ ९४ ॥ तेवीं आकळोनि चराचर ॥ वस्तु असे अखंडाकार ॥ होतां जातां आकार विकार ॥ वस्तु अणुमात्र विकारेना ॥ ९५ ॥ ऐशी जे वस्तु अखंडपणें ॥ तिच्याठायीं चारी प्रमाणें॥इहीं प्रमाणीं वस्तु जाणणें॥प्रपंच देखणें मिथ्यात्वें॥९६॥

॥ श्लोक ॥ श्रुतिः प्रत्यक्षमैतिह्यमनुमानं चतुष्टयम् ॥ प्रमाणेष्वनवस्थानाद्विकल्पात्स विरज्यते ॥ १७ ॥

॥ टीका ॥ एक अद्वैत ब्रह्म पाहीं ॥ दुसरें आणिक कांहीं नाहीं ॥ प्रपंच मिथ्या वस्तूसही ॥ हें प्रमाण पाहीं वेदवाक्य ॥ ९७ ॥ प्रत्यक्ष देखिजे आपण ॥ देहादिकांचें नश्वरपण ॥ हें दुसरें परम प्रमाण ॥ क्षणिकत्व जाण प्रपंचा ॥ ९८ ॥ मार्कंडेयो आणि भृशुंडी ॥ इहीं प्रपंचाची राखोंडी ॥ देखिली गा रोकडी ॥ वेळा कोटि कोटी कल्पांतीं ॥ ९९ ॥ महाजनप्रसिद्ध हें श्रवण ॥ प्रपंचासि +क्षणिकपण ॥ हें तिसरें गा प्रमाण ॥ उद्धवा जाण अतिगुह्य ॥ २०० ॥ शास्त्र प्रसिद्ध अनुमान ॥ मिथ्या प्रपंचाचें भान ॥ दिसे मृगजळासमान ॥ वस्तुतां जाण असेना ॥ १ ॥ दोर दोरपणें साचार ॥ भ्रमें भासे नानाकार ॥ काष्ठ सर्प कीं मोत्याचा हार ॥ ना हे जळधार जळाची ॥ २ ॥ तेवीं वस्तु एक चिद्घन ॥ तेथ भ्रमें मतवाद गहन ॥ हें शून्य किंवा सगुण ॥ कर्मधर्माचरण तें मिथ्या ॥ ३ ॥ यापरी करितां अनुमान ॥ मिथ्या प्रकृतिप्रपंचज्ञान ॥ हें वेदांतमत प्रमाण ॥ सत्य जाण उद्धवा ॥४॥ तंतूवेगळा पट कांहीं ॥ योजेना आणिके ठायीं ॥ तेवीं ब्रह्मावेगळा पाहीं ॥ प्रपंच नाहीं सत्यत्वें ॥ ५ ॥ चहूं प्रमाणीं प्रपंचस्थिती ॥ मिथ्या साधिली निश्चितीं ॥ तें प्रपंचीं विषयासक्ती ॥ सांडूनि विरक्ति धरावी ॥ ६ ॥ ये विविर्धाचें निरूपण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ उभयलोकीं विषयध्यान ॥ तें मिथ्या जाण अमंगळ ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ कर्मणां परिणामित्वादाविरिंच्यादमंगलम् ॥ विपश्चिन्नश्वरं पश्येददृष्टमपि दृष्टवत् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ करूनि कर्माचें साधन ॥ पाविजे लोक तो नश्वर जाण ॥ आदिकरूनि ब्रह्मसदन ॥ नश्वरत्वें जाण अमंगळ ॥ ८ ॥ ते लोकींचें सुख गहन ॥ तें विखें रांधिलें जैसें अन्न ॥ खातां गोड परिपाकीं मरण ॥ तेवीं अधःपतन स्वर्गस्था ॥ ९ ॥ जैसा देखिला हा लोक येथ ॥ तैसाचि स्वर्गभोग तेथ ॥ दोन्ही जाण अंतवंत ॥ नाश प्राप्त दोहींसी ॥ २१० ॥ ' काळें पांढरें दोनी सुणीं ॥ जेवीं समान अपवित्रपणीं ॥ तेवीं इहपरलोक दोन्ही ॥ नश्वरपणीं समान' ॥११ इहामुत्रभोगासक्तीं ॥ यापरी धरावी विरक्ती ॥ या नांव वैराग्यस्थिती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १२ ॥ मागील तुझी प्रश्नस्थिती ॥ पुशिली होती माझी भक्ती ॥ तें मी सांगेन तुजप्रती॥ यथानिगुती निजबोधें ॥ १३ ॥

---

१ नाशवंत. २ कुत्रीं.

*ना. सहजस्थिती. ×मो. अलंकारीं नासो नेणें, जैंका सोनें निजस्थिती. +मो. क्षणिकत्व जाण.

दुरुक्ती बोलता ॥ यम प्रहार वाजती माथां ॥ तिणेंचि रामराम ह्मणता ॥ हरिभक्ता यम कांपे ॥ ६४ ॥ तेवीं पावोनि उत्तम जन्म ॥ कर्में करूनि सकाम ॥ भोगावें दुःख परम ॥ मरण जन्म अनिवार ॥ ६५ ॥ तेणेंचि देहें स्वधर्म ॥ करितां निरसे सकळ कर्म ॥ निवारे मरण जन्म ॥ बहुतां हें वर्म कळेना ॥ ६६ ॥ स्वधर्में घडे भगवद्भक्ती ॥ ऐशी अतिगुह्य आहे व्युत्पत्ती ॥ ते मी सांगेन तुजप्रती ॥ यथानिगुतीं उद्धवा ॥ ६७ ॥ स्वधर्म करणें अवश्यक ॥ तेथ सांडणें फळाभिलाख ॥ तेंचि मदर्पण चोख ॥ न करितां देख संकल्प ॥ ६८ ॥ होकां घरींच्याचि रांजणीं ॥ निघती मुक्ताफळांच्या श्रेणी ॥ तरी कां पां ताम्रपर्णी ॥ *समुद्रमिळणीं शोधावी ॥ ६९ ॥ आपुलेच घरींचीं झाडें ॥ फळती कल्पतरूचेनि पाडें ॥ तरी अमरावतीचे चाडें ॥ वृथा वेडे कां शिणती ॥ ३७० ॥ होकां सद्गुरूचें तीर्थ घेतां ॥ पाविजे परमपवित्रता ॥ तरी धांवावया नानातीर्थां ॥ विशेषता ते कायी ॥ ७१ ॥ कां ईश्वरत्वें पिता पूजितां ॥ निज मोक्ष लाभे आइता ॥ तरी भजावें देवां देवतां ॥ कोण्या अर्था सज्ञानीं ॥ ७२ ॥ तेवीं +स्वकर्माचि करितां ॥ लाभे आपली निष्कर्मता ॥ ते स्वधर्मी काम कल्पितां ॥ जीव निजस्वार्था नाडले ॥ ७३ ॥ निर्विकल्पें स्वधर्माचरण ॥ त्या नांव माझें शुद्ध भजन ॥ तेणें भजनें होऊनि प्रसन्न ॥ मी विवेक वैराग्यज्ञान भक्तांसि दें ॥ ७४ ॥ ×तेणेंचि ज्ञानें होय शुद्ध मती ॥ चित्तशुद्धीचि माझी परमभक्ती ॥ ते भक्तीनें माझी परम ※प्राप्ती ॥ भक्त पावती उद्धवा ॥ ७५ ॥ यालागीं नैराश्यें जें स्वधर्मकर्म ॥ तेंचि माझें भजन परम ॥ तेणें भजनें भक्तोत्तम ॥ स्वयें पुरुषोत्तम होऊनि ठाकती ॥ ७६ ॥ यापरी स्वधर्मस्थितीं ॥ लाभे आपुली निजमुक्ती ॥ तेचि म्यां तुजप्रती ॥ यथानिगुतीं सांगीतली ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ एतत्तेऽभिहितं साधो भवान्पृच्छति यच्च माम् ॥ यथा स्वधर्मसंयुक्तो भक्तो मां समियात्परम् ॥ ४८ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ ॥ उद्धवा पुसिलें त्वां मजप्रती ॥ स्वधर्में केवीं घडे भक्ती ॥ भक्तीनें पाविजे निजमुक्ती ॥ तें म्यां तुजप्रती सांगीतलें ॥ ७८ ॥ हातां आलिया स्वधर्म ॥ तत्काळ निरसे सकळ कर्म ॥ उडोनि जाय भवभ्रम ॥ प्राप्ति परम स्वधर्में ॥ ७९ ॥ 'माझिया प्राप्तिलागीं स्वकर्म ॥ नैराश्यें आचरावा स्वधर्म ॥ हें ज्यासि कळे वर्म ॥ तया पुरुषोत्तम सदा वश्य' ॥ ३८० ॥ स्वधर्म ऐसा स्पर्शमणी॥ सांपडला निर्विकल्पपणीं ॥ तो लावितां दृश्यस्थानीं॥चिन्मात्र सुवर्णी तेज उठी ॥ ८१ ॥ स्वधर्म ऐसा दिनमणी ॥ नैराश्यें उगवलिया स्वभुवनीं ॥ तो अज्ञाननिशा निरसुनी ॥ स्वप्रकाशपणीं सदा वर्ते ॥ ८२ ॥ स्वधर्म ऐसें निजअमृत ॥ जे निर्विकल्पें सेवूं जाणत ॥ त्यांसि जन्ममरणांचा आवर्त ॥ मी श्रीअनंत लागोंनेदीं ॥ ८३ ॥ जेकां स्वधर्मी विमुख ॥ त्यांसि माझी प्राप्ति नाहीं देख ॥जन्मकोटी परम दुःख॥ सकामें मूर्ख भोगिती ॥८४॥ त्या स्वधर्माची अतर्क्य गोष्टी ॥ नकळे नैष्कर्म निजदृष्टीं ॥ यालागीं जन्मकोटी ॥ अतिसं-

---

१ समुद्रास मिळते तेथें. २ इंद्रपुरीच्या. ३ विज्ञान. ४ परीस. ५ फेरा.

*मो. समूळ शोधावी. +मो. स्वधर्मचि. ×मो. तेणें ज्ञानें चित्तशुद्धी होय चित्तीं. ना. तेणें ज्ञानेंचि शुद्धचित्तीं. ※मो. प्रीती.

टीं जीव भोगी ॥ ८५ ॥ स्वधर्में करितां स्वकर्म ॥ जें *नैष्कर्मतेचें कळे वर्म ॥ तें विभांडूनि रणजन्म ॥ परब्रह्म पावती ॥ ८६ ॥ एवं स्वधर्म यापरी ॥ तारक होय संसारीं ॥ स्वधर्माचे विवरी ॥ तरले भवसागरीं निजभक्त ॥ ८७ ॥ संसार तरले हा बोल कुडा ॥ स्वधर्म करितां झिया चाडा ॥ होय भवसागर कोरडा ॥ मी सांपडें ×पुढां निजात्मा ॥ ८८ ॥ ऐशी धर्माची थोरी ॥ निष्कामतेच्या निजकुसरीं ॥ देवो सांगे +आवडीभारीं ॥ नानापरी प्रबोधें ॥ ८९ ॥ भक्तिप्राधान्य ※भागवत ॥ मुख्य भक्ति ते स्वधर्मयुक्त ॥ येणें स्वधर्में भजनें मस्त ॥ परम भागवत उद्धरले ॥ ३९० ॥ त्या स्वधर्मकर्माचा एकांत ॥ निजभजनभक्तीचा वार्थ ॥ उद्धवासि श्रीकृष्णनाथ ॥ स्वयें सांगत एकादशीं ॥ ९१ ॥ त्या एकादशाच्या गोष्टी ॥ धर्मकर्माची कसवटी ॥ एका जनार्दनकृपादृष्टीं ॥ टीका मराठी हे केली ॥ ९२ ॥ हे करणी केली जनार्दनें ॥ मज अभंगीं घातलें तेणें ॥ शेखीं मीतूंपणाचें ठाणें ॥ येणें निरूपणें उडविलें ॥ ९३ ॥ उडविलें विपर्यी विषयपण ॥ उडविलें भेदाचें ²भान ॥ उडविलें जीवशिवपण ॥ जनार्दन तुष्टोनी ॥९४॥ *जनार्दनें जनकें तेणें ॥ आह्मां केलें परब्रह्म खेळणें ॥ यालागीं सकळ क्रिया तेणें होणें ॥ स्वधर्मपणें सहजेंची ॥ ९५ ॥ सहजीं लागल्या स्वधर्म ॥ कर्मचि होय निष्कर्म ॥ संसार होय परब्रह्म ॥ हे कृपा परम जनार्दनीं ॥ ९६ ॥ यालागीं सांडूनिया एकपण ॥ एका जनार्दना शरण ॥ स्वधर्मकर्माचें निरूपण ॥ झालें संपूर्ण तया कृपां ॥ ९७ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां वानप्रस्थसंन्यासधर्मनिरूपणं नाम अष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ मूळश्लोक ॥४८॥ ओंव्या ॥ ३९७ ॥ एकुणसंख्या ॥ ४४५ ॥

---

# अध्याय एकोणिसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः॥ ओंनमो सद्गुरु त्र्यंबका ॥ ब्रह्मगिरिनिवासनायका ॥ ⁶त्रिगुणत्रिपुरभेदका ॥ ⁷कामांतका ⁰गिरीशा ॥ १ ॥ तुझा अनुहताचा डमरू ॥ सर्वशब्दें करी गजरू ॥ वेदानुवादें निरंतरू ॥ ⁹त्रिकांडीं थोरू गर्जत ॥ २ ॥ तुझे हातींचें ¹⁰खट्वांग ॥ करी जीवाचा ¹¹जीवभंग ॥ अनंगेंसी जाळूनि ¹²आंग ॥ अंगसंग तें देशी ॥ ३ ॥ त्रिनयना त्र्यंबक लिंगा ॥ तुजपासोनि प्रवाहे ¹³चिद्गंगा ॥ ते पवित्रपणें उद्धरी जगा ॥ प्रकाशगर्भा शंकरा ॥ ४ ॥ प्रत्यक्ष दिसती दोन्ही लोचन ॥ तिसरा गुप्त ज्ञाननयन ॥ यालागीं तूं ¹⁴त्रिलोचन ॥ नयनेंवीण

---

१ जिंकून. २ प्रेमानें. ३ भक्तिच मुख्य साधन ज्यांत असे. ४ नित्यस्वरूपाप्रत कवित्वांत? ५ सुलभ, क्रीडनक. ६ तीन गुण हेच त्रिपुर, त्यांचें भेदन करणारा. ७ मदनाचा नाश करणारा. ८ शरीरांतील चक्रांपैकीं चवथें जें अनाहत चक्र, त्यांत एकसारखा होणारा नाद. या अनाहत चक्रास हृदय कमलही ह्मणतात. ९ ज्ञान कर्म व भक्ति या तीनप्रकरणांत. १० खाटेच्या एका अवयवाप्रमाणें आयुधविशेष. ११ जीवस्वरूपाचा नाश. १२ कोमल शरीर. १३ ज्ञानरूपी गंगा. १४ त्र्यंबक, त्रिनेत्र.

*ना. निष्कामतेचें. ×मो. रोकडा. +ना. आवडीनें भारी. ०ना. स्वबोधें. ※मो. भगवंत. ²ना. भेदलक्षण. *मो. जनार्दनें नवल केलें तेणें, साह्य केलें परब्रह्म खेळणें. ⁰मो. गिरिजेशा.

*दीसशी ॥ ५ ॥ निजांगें वाहसी बोधचंद्र ॥ यालागीं तूं चंद्रशेखर ॥ चंद्रसूर्यादि चराचर ॥ तुझेनि साचार प्रकाशे ॥ ६ ॥ भवया नांवाची ख्याती ॥ भवप्रकाशक तुझी चिच्छक्ती ॥ तूंचि विष्णु प्रजापती ॥ रुद्र तूं अंतीं संहर्ता ॥ ७ ॥ मोडूनियां नामरूपमुद्रा ॥ जीव आणिशी एकाकारा ॥ अत्यंत प्रळयींच्या प्रळयरुद्रा ॥ चित्समुद्रा शिवरूपा ॥ ८ ॥ शिवशिव जी गुरुराया ॥ निजभावें लागतां पायां ॥ तंव गुरुशिष्यत्व ×गेलें लया ॥ दावूनियां निजरूप ॥ ९ ॥ तें निजरूप देखतां दृष्टीं ॥ कैंचा जीव कैंची सृष्टी ॥ निमाली त्रिगुणेंसी त्रिपुटी ॥ पडली मिठी स्वानंदीं ॥१०॥ त्या स्वानंदाचे उद्गार ॥ सांवरतां नावरती थोर ॥ त्या स्वानंदाचें निजसार ॥ सत्य साचार एकादश ॥ ११ ॥ त्याही माजीं अतिगहन ॥ सुखस्वानंद निरूपण ॥ तो हा एकुणिसावा अध्याय जाण ॥ परम कारण +शास्त्रार्थीं ॥ १२ ॥ जें ऐकतां निरूपण ॥ परमानंद उसळे जाण ॥ एका विनवी जनार्दन ॥ श्रोतां अवधान मज द्यावें ॥ १३ ॥ सतरा अठरा अध्यायांप्रती ॥ स्वधर्मकर्में ब्रह्मप्राप्ती ॥ वर्णाश्रम स्थितीगती ॥ उद्धवाप्रती सांगीतली ॥ १४ ॥ एकुणिसावे अध्यायीं जाण ॥ जेणें ज्ञानें साधिलें निजज्ञान ॥ त्या ज्ञानाचें त्यागलक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ १५ ॥ कर्म कर्तव्यता कारण ॥ जीवन्मुक्तासि नाहीं जाण ॥ उद्धवाचे यमादिप्रश्न ॥ हेही श्रीकृष्ण सांगेल ॥ १६ ॥ शास्त्रयुक्ति पांडित्यज्ञान ॥ प्रपंचाचें मिथ्या निरूपण ॥ तें आनुमानिक पुस्तकज्ञान ॥ सत्यपण त्या नाहीं ॥ १७ ॥ पूर्वे आहे माझें गमन ॥ हे पूर्वील शुद्ध स्मरण ॥ परी दिग्भ्रम पडिल्या जाण ॥ पश्चिमे आपण पूर्व मानी ॥ १८ ॥ तैसें शाब्दिक शास्त्रज्ञान ॥ बोले आन करी आन ॥ तेणें नव्हे समाधान ॥ सर्वथा जाण साधकां ॥ १९ ॥ जेवीं कां दिग्भ्रम मोडे ॥ तें पूर्वेचा चाले पूर्वेकडे ॥ तेवीं अपरोक्षज्ञान जें जोडे ॥ तें साधक पडे स्वानंदीं ॥ २० ॥ जें जें ऐके वेदांतश्रवण ॥ तें अंगें होत जाण आपण ॥ हें अपरोक्षाचें लक्षण ॥ सत्यत्वें जाण अतिशुद्ध ॥ २१ ॥ ऐसें नव्हतां अपरोक्ष ज्ञान ॥ सांडूनये श्रवणमनन ॥ अवश्य करावें साधन ॥ प्रत्यावृत्ती जाण अत्यादरें ॥ २२ ॥ झालिया अपरोक्ष ज्ञान ॥ प्रपंचाचें मिथ्याभान ॥ विपर्यासि पडलें शून्य ॥ कल्पना जाण निमाली ॥ २३ ॥ तेणेंचि पुरुषें आपण ॥ त्यागावें गा ज्ञानसाधन ॥ हेंचि निरूपणीं निरूपण ॥ देव संपूर्ण सांगत ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ यो विद्याश्रुतसंपन्न आत्मवान्नानुमानिकः ॥
मायामात्रमिदं ज्ञात्वा ज्ञानं च मयि संन्यसेत् ॥ १ ॥

॥ टीका ॥ ॥ वेदशास्त्रपरिनिष्ठ ॥ श्रवणमननअभ्यासयुक्त ॥ ज्यासि ब्रह्मविद्या प्राप्त ॥ सुनिश्चित स्वानुभावें ॥ २५ ॥ तोचि अनुभव ऐसा ॥ दोराअंगीं सर्प जैसा ॥ न मारितां नाशे आपैसा ॥ भवभ्रम तैसा त्या नाहीं ॥ २६ ॥ जेवीं कां नटाची रावोराणी ॥ दोघें खेळती लटिकेपणीं ॥ तेवीं ⁂प्रकृतिपुरुषउभवणी ॥ मिथ्यापणीं जो जाणे ॥ २७ ॥ जैशीं भिंतीमाजीं नानाकार ॥ चित्रें लिहिलीसें विचित्र ॥ ०ते भिंतीचि एक साचार ॥ तेवीं ऐक्यें चराचर जो

१ ऐक्याप्रत. २ उंचबळे. ३ दिशाभूल. ४ साक्षात्कारपूर्वक ज्ञान. ५ वरचेवर. ६ प्रपंच सत्य असा भ्रम. ७ रचना.

*मो. देखसी. ×ना. नेलें. +मो. शास्त्रेंसीं. ⁂मो. प्रकृतीपुरुषांची उभवणी. ०ना. परी ते भिंती एकचि साचार.

खे ॥ २८ ॥ स्वप्नींचीं नाना कर्में जाण ॥ त्यांचें जागृतीं नलगे बंधन ॥ तेवीं मिथ्या निजकर्माचरण ॥ जीवित्वेंसी *जाण जो देखे ॥ २९ ॥ ऐशी साचार ज्याची स्थिती ॥ त्या नांव शुद्ध आत्मप्राप्ती ॥ निजानुभव त्यातें ह्मणती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ३० ॥ आणिक एक अर्थीची खूण ॥ 'विषयांवीण स्वानंद पूर्ण' ॥ हें अनुभवाचें मुख्य लक्षण ॥ सत्य जाण ×सात्वता ॥३१॥ ऐसा अनुभव नसतां देख ॥ केवळ ज्ञान जें शाब्दिक ॥ त्यातें ह्मणिजे आनुमानिक ॥ जाण निष्टंक निजभक्ता ॥ ३२ ॥ ज्याच्या अनुभवाभीतरीं ॥ नाहीं अनुमानाची उरी ॥ जो अपरोक्षसाक्षात्कारी ॥ निरंतरीं नांदत ॥ ३३ ॥ ऐसा जो पुरुष जाण ॥ तेणें ज्ञानाचें ज्ञान साधन ॥ आणि वृत्तिरूपें जें ज्ञान ॥ तेंही आपण त्यागावें ॥ ३४ ॥ तें न त्यागितां लवलाहें ॥ सहजचि त्याग होये ॥ जेवीं सूर्योदयीं पाहे ॥ सचंद्र तेज जाये तारागणाचें ॥ ३५ ॥ जेवीं हनुमंत देखोनि येतां ॥ नवेंचंडी पळे तत्वतां ॥ मा राहावया येरा भूतां ॥ उरी सर्वथा उरेना ॥ ३६ ॥ तेवीं माझे साक्षात्कारीं ॥ साच बद्धता नाहीं खरी ॥ ०मा ज्ञान तीचे वृत्तीवरी ॥ कैशापरी राहेल ॥ ३७ ॥ माझिया अनुभवाच्याठायीं ॥ बंधमोक्ष मिथ्या पाहीं ॥ तेथ साधनज्ञानाचा कांहीं ॥ उपेग नाहीं उद्धवा ॥ ३८ ॥ परमात्मस्वरूपाच्याठायीं ॥ हें अवघेंचि +मायिक पाहीं ॥ तेथें ज्ञानध्यान जें कांहीं ॥ न त्यागितां पाहीं त्यागिलें ॥ ३९ ॥ त्यागोनियां ज्ञानध्यान ॥ ज्ञानियांसि माझी प्रीति गहन ॥ तेचि प्रीतीचें लक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४० ॥

॥ श्लोक ॥ ॥ ज्ञानिनस्त्वहमेवेष्टः स्वार्थो हेतुश्च संमतः ॥ स्वर्गश्चैवापवर्गश्च नान्योऽर्थो मदृते प्रियः ॥ २ ॥

॥ टीका ॥ जो मी अद्वयानंदस्थिती ॥ त्या माझी ज्ञानियांसी प्रीती ॥ ते प्रीतीची उपपत्ती ॥ ऐक निश्चितीं उद्धवा ॥४१॥ ज्ञानियांसि ꣵअतिवल्लभ ॥जो मी परमात्मा स्वयंभ ॥ ज्ञानियांचा परमलाभ ॥ मी पद्मनाभ निजधन ॥ ४२ ॥ ज्ञानियांसी जो स्वर्ग चांग ॥ तो मजवेगळा नाहीं मार्ग ॥ ज्ञानियांचा जो मोक्ष सांग ॥ तो मी श्रीरंग निजात्मा ॥ ४३ ॥ ज्ञानियांचें स्वधर्मसाधन ॥ तो मी परमात्मा नारायण ॥ मजवेगळें कांहीं आन ॥ ज्ञात्यांसि जाण असेना ॥४४॥ ज्ञात्यांसि स्वर्गमोक्षसुख ॥ मजवेगळें उरलें नाहीं देख ॥ मी चिदात्मा निजव्यापक ॥ भावें निष्टंक पावले ॥ ४५ ॥ ज्ञात्यांचा अर्थ स्वार्थ परमार्थ ॥ मी पुरुषोत्तम गा समस्त ॥ आद्य अव्यय अनंत ॥ 7माझें निजसुख प्राप्त त्यां जाहलें ॥ ४६ ॥ ऐशी ज्ञानियांसी माझी प्रीती ॥ तेही तैसेचि मज प्रिय होती ॥ तेंचि स्वयें श्रीपती ॥ उद्धवाप्रती सांगत ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानविज्ञानसंसिद्धाः पदं श्रेष्ठं विदुर्मम ॥ ज्ञानी प्रियतमोऽतो मे ज्ञानेनासौ बिभर्ति माम् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ ज्ञानविज्ञान निजसंपत्ती ॥ जाहलियावीण माझी प्राप्ती॥ कोणासि नव्हे स्वरूपस्थि-

---

१ उद्धवा. २ केवळ तर्काचें कल्पनेचें ३ ठिकाणा. ४ अहिरावणाची देवी. ५ बद्धतेचे. ६ उपयोग. ७ अतिप्रिय. ८ पूर्ण.

*ना. प्राण. ×मो. शाश्वत. ०ना. मा ज्ञान तियेचे निवृत्तिवरी. +मो. मिथ्या. ꣵमो. अतिवाल्लभ. 7मो. माझेनि निजसुखें प्राप्त ते झाले.

ती ॥ मत्पदीं गती ज्ञानविज्ञानें ॥ ४८ ॥ करितां *गुरुशास्त्रशुद्धश्रवण ॥ तेणें जाहलें तें ह्मणि-जे ज्ञान ॥ त्याचा अनुभव तें विज्ञान ' ॥ ऐक लक्षण त्याचेंही ॥ ४९ ॥ स्वयें स्वयंपाक केला जाण ॥ जाणे कटु, मधुर, लवण ॥ जंव चाखिला नाहीं आपण ॥ ते दशा संज्ञान ' ×ज्ञान ' ह्मणती ॥ ५० ॥ केलिया रसाचें रसास्वादन ॥ स्वयें गोडी सेवी आपण ॥ ऐशी जे दशा तें विज्ञान ॥ उद्धवा जाण निश्चितीं ॥ ५१ ॥ एवं +विज्ञानज्ञाननिजसंपत्ती ॥ माझ्या उत्तमपदाची 5पदप्राप्ती ॥ माझें वास्तव स्वरूप जे जाणती ॥ त्यांची मज प्रीति अनन्यत्वें ॥ ५२ ॥ वेदशास्त्रयुक्तिबळें ॥ माझें स्वरूप ०काइसेनि तें न कळे ॥ तें ज्यासि वस्तुतां आकळे ॥ मज त्यावेगळें प्रिय नाहीं ॥५३॥ तेंचि अतिप्रीतीचें लक्षण ॥ त्याच्या पाउलापाउलीं जाण ॥ सर्वांग वोडवीं मी आपण ॥ करीं निंबलोण सर्वस्वें ॥ ५४ ॥ त्यासि जे वेळे जें लागे ॥ तें मी न मागतां पुरवीं वेगें ॥ त्यासि विरुद्ध ये जेणें मार्गे ॥ तें मी निजांगें निवारीं ॥ ५५ ॥ त्यासि ह्मणी 3संसारवारा लागे ॥ यालागीं मीच मी पुढें मागें ॥ सभंवता राहें सर्वांगें ॥ अतिप्रीतिपांगें पांगलों ॥ ५६ ॥ जेणें ज्ञानें ꣸ज्ञानी प्रिय होती ॥ त्या ज्ञानाची पवित्र कीर्ती ॥ देवो सांगे उद्धवाप्रती ॥ यथार्थस्थिती निजबोधें ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ तपस्तीर्थं जपो दानं पवित्राणीतराणि च ॥ नालं कुर्वंति तां सिद्धिं या ज्ञानकलया कृता ॥ ४ ॥

॥ टीका ॥ सकळसाधनां नव्हे जे शुद्धी ॥ ते ज्ञानलेशें होय त्रिशुद्धी ॥ ऐक उद्धवा सुबुद्धी ॥ ते 9ज्ञानसिद्धीचा महिमा ॥ ५८ ॥ 1तप जें करितां पंचाग्नी ॥ तीर्थ गंगादिसरिता त्रिवेणी ॥ जप जे नाना मंत्रश्रेणी ॥ गोभूतिळदानीं सुवर्णादि ॥ ५९ ॥ आणिकही इतर पवित्रें ॥ जें स्वधर्मकर्मादि साचारें ॥ नाना याग अग्निहोत्रें ॥ पवित्रकरें अतिशुद्ध ॥ ६० ॥ एवं तपादिक जें साधन ॥ या सकळांची शुद्धि गहन ॥ ते ज्ञानलेशासमान ॥ पवित्रपणें तुळेना ॥ ६१ ॥ ज्ञाननिष्ठा अर्धक्षणें ॥ जे पवित्रता स्वयें लाहणें ॥ ते तपादि नाना साधनें ॥ नाहीं पावणें कल्पांतीं ॥ ६२ ॥ ऐसें जें पवित्र ज्ञान ॥ तें मुख्यत्वें धरोनि जाण ॥ माझें करावें भजन ॥ तेंचि निरूपण हरि बोले ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ तस्माज्ज्ञानेन सहितं ज्ञात्वा स्वात्मानमुद्धव ॥ ज्ञानविज्ञानसंपन्नो भज मां भक्तिभावतः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ या कारणें गा उद्धवा ॥ ऐसा पवित्र ज्ञानाचा यावा ॥ तेथ प्रक्षाळुनी निजभावा ॥ जीव तो वोळखावा परमात्मत्वें ॥ ६४ ॥ जीव परमात्मा दोनी एक ॥ ऐसें जाणणें तें ज्ञान *देख ॥ ऐक्य भोगणें तें परमात्मसुख ॥ विज्ञान सम्यक त्या नांव ॥ ६५ ॥ ऐसा ज्ञानविज्ञानसंपन्न ॥ होऊनि करावें माझें भजन ॥ त्या निजभजनाची खूण ॥ ऐक संपूर्ण उद्धवा ॥ ६६॥

---

१ खारट. २ ज्ञाते. ३ एकनिष्ठेनें. ४ कदाचित्. ५ वश झालों. ६ गायी, भूमि व तीळ यांच्या दानांनीं ७ प्रभाव.

*ना. गुरुमुखें शास्त्रशुद्धश्रवण. ×ना. ज्ञाते. +मो. ज्ञानविज्ञानसंपत्ती. 5मो. प्राप्ती. ०मो. कासेन नकळे. 3मो. वारा. ꣸मो. ज्ञान. 9मो. ज्ञानशुद्धीचा. 1मो. तपतें पारांक पंचाग्नी ना. तप जें परार्के पंचाग्नी. *ना. चोख.

तव्हां जेथें देखे जें कांहीं ॥ तें मीवांचुनी आन नाहीं ॥मग अनन्यभावें तियेठायीं ॥ भजे पाहीं भावार्थें ॥ ६७ ॥ ऐशिया माझ्या भजनाहातीं ॥ उसंतू नाहीं अहोरातीं ॥ जागृतिस्वप्नसुषुप्ती॥ माझी निजभक्ती न मोडे ॥ ६८ ॥ विसरोनि जावें जेथें ॥ तेथेंचि देखे मातें ॥ मरण आलें विस्मरणातें ॥ स्मरणही तेथें हारपलें ॥ ६९ ॥ यापरी ज्ञानविज्ञानसंपन्न ॥ मजवेगळें न देखती आन ॥ तैसेंचि माझें अनन्यभजन ॥ शुद्धभक्ति जाण या नांव ॥ ७० ॥ मागां ऋषीश्वरीं याचि *गतीं ॥ माझी करोनि अनन्यभक्ती॥मज पावले जैशा रीतीं ॥ऐक तुजप्रती सांगेन७१

॥ श्लोक ॥ ज्ञानविज्ञानयज्ञेन मामिष्ट्वाऽऽत्मानमात्मनि ॥ सर्वयज्ञपतिं मां वै संसिद्धिं मुनयोऽगमन् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ॥ जे ज्ञानधनें अतिसंपन्न ॥ परमपवित्र विज्ञानें जाण ॥ ऐसे ब्रह्मभूत जे ब्राह्मण॥ यज्ञद्वारां भजन करिती माझें ॥ ७२ ॥ हृदयाच्या निजभुवनीं ॥ विकल्पाची भूमी खाणोनि ॥ शमदमविरक्ती कुंडें तिन्ही ॥ केलीं आंबो साधुनी श्रद्धेचा ॥ ७३ ॥ तेथ क्षराक्षर अरणी दोन्ही ॥ गुरुमंत्रें दृढ मंथुनी ॥ काढिला सूक्ष्म निर्धूमाग्नी ॥ कुंडीं स्थापूनी पेटविला ॥ ७४ ॥ शुद्ध सत्वाचें घृत तेथ ॥ रजतमद्रव्येंसि मिश्रित ॥ वैराग्यस्रुवेनें आहुती देत ॥ मंत्र तेथ युक्तीचे ॥ ७५ ॥ घेऊनि विद्याशस्त्र लखलखित ॥ संकल्पपशूंचा करूनि घात ॥ तेणें यज्ञपती मी श्रीअनंत ॥ केला तृप्त निजबोधें ॥ ७६ ॥ तेथ पूर्णाहुतीस कारण ॥ घालितां जीवभावाचें अवदान ॥ यज्ञभोक्ता मी श्रीनारायण ॥ परमात्मा जाण सुखी केलों ॥ ७७ ॥ यापरी माझें ×यजन ॥ करूनियां मुनिगण ॥ निवारूनि जन्ममरण ॥ माझी सिद्धि जाण पावले ॥ ७८ ॥ मुनीश्वरीं साधिली सिद्धी ॥ तेचि उद्धवालागीं त्रिशुद्धी ॥व्हावया कृष्ण कृपानिधी ॥ प्रपंचनिषेधी वस्तु सांगे ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ त्वय्युद्धवाश्रयति यस्त्रिविधो विकारो मायांऽतरा पतति नाद्यपवर्गयोर्यत् ॥ जन्मादयोऽस्य यदमी तव तस्य किं स्युराद्यंतयोर्यदसतोऽस्ति तदेव मध्ये ७

॥ टीका ॥ ॥ मी उद्धव ऐसें ह्मणता ॥ तूं कोण आहेसि तत्वतां ॥ ऐक त्या स्वरूपाची कथा ॥ तुज मी आतां सांगेन ॥ ८० ॥ जन्म, स्थिती, आणि निधन ॥ +त्रिविधविकारेंसि त्रिगुण ॥ याची अधिष्ठात्री माया जाण ॥ तिसी चळण तुझेनी ॥ ८१ ॥ मायादिगुणकार्यां समस्तां ॥ तूं आश्रयो पैं ०सत्वात्यंता ॥ तुझेनि अंगें यासि ⁂चपळता ॥ तूं यापरता चिदात्मा ॥ ८२ ॥ माझेनि गुणकर्मा चळणता ॥ तें प्रपंचासि आली सत्यता ॥ हें मायामय गा तत्वतां ॥ मृगजळता आभास ॥ ८३ ॥ सकळप्रपंचाचें जें भान ॥ तें तंव मृगजळासमान ॥ दिसे तेंही मिथ्या दर्शन ॥ वस्तुत्वें जाण सत्य नव्हे ॥ ८४ ॥ तूं जन्ममरणापरता ॥ त्रिगुणांतें नातळता॥ प्रपंचासि अलिप्तता ॥ ⁸तूंचि तत्वतां तूं ऐक ॥ ८५ ॥ तेचि प्रपंचाची अलिप्त युक्ती ॥ ऐशी आहे परमप्रतीती ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयांतीं ॥ प्रपंचाची वस्ती सत्यत्वें नाहीं ॥८६॥ 'उत्पत्ति-

१ विसावा. २ आकार. ३ सर्व भूतें व कूटस्थ हे. ४ धुरावांचून अग्नि. ५ वैराग्यरूपपात्रानें. ६ आहुति. ७ ब्रह्म. ८ नाश. ९ आंत बाहेर. १० मृगजळाप्रमाणें.

*ना. रीती. ×मो. भजन. +मो. त्रिविधाकारेंसी. ०ना. स्वभावता. ⁂ना. चळणता. ⁸मो. तुझा ना. तुझी.

आदीं प्रपंच नसे ॥ अंतीं कांहीं उरला न दिसे ॥ मध्यें जो कांहीं आभासे ॥ तो मायावशें मिथ्याभूत ' ॥ ८७ ॥ ' प्रपंचाआदीं परब्रह्म ॥ अंतीं तेंचि उरे निरुपम ॥ मध्यें स्थितिकाळीं तेंचि ब्रह्म ॥ मिथ्या भवभ्रम भ्रांतासी ॥ ८८ ॥ सूर्याआदीं मृगजळ नसे ॥ अस्तमानीं उरलें न दिसे ॥ मध्यें जें कांहीं आभासे ॥ तेथही नसे जळलेश ॥ ८९ ॥ सर्पाआदीं दोरत्वें दोरू ॥ मध्यें भ्रमें भासे सर्पाकारू ॥ अंतीं दोर उरे साचारू ॥ तोही दोरू दोररूपें ॥ ९० ॥ यापरी आद्यंतीं विचारितां ॥ ' वस्तु सत्य, प्रपंच मिथ्या ' ॥ हें उद्धवा जाण तत्त्वतां ॥ वेदशास्त्रार्थी संमत ॥ ९१ ॥ ऐशी या प्रपंचाची घडमोडी ॥ होतां जन्ममरणकोडी ॥ उद्धवा तुज न लागे वोढी ॥ तूं *परात्परथडीं नित्यमुक्त ॥ ९२ ॥ निर्गुण, निःसंग, निर्विकार, ॥ अज, अव्यय, अक्षर, ॥ ब्रह्म, अनंत, अपरांपर ॥ तें तूं साचार उद्धवा ॥ ९३ ॥ हे ऐकोनि देवाची गोष्टी ॥ उद्धवें बांधिली शकुनगांठी॥हरिखें आनंदू नजिरे पोटीं एकला ॥सृष्टीं न समाये ॥९४॥ 'तूं ब्रह्म' म्हणिजे यदुराजें ॥ तेणें हरिखाचेनि फुंजें ॥ उद्धव नाचे स्वानंदभोजें ॥ वैकुंठराजे तुष्टले ॥९५॥ स्वमुखें तुष्टोनि श्रीकृष्ण ॥ मज म्हणे तूं ब्रह्म पूर्ण ॥ आजि मी सभाग्य धन्यधन्य ॥ धांवोनि श्रीचरण वंदिले ॥ ९६ ॥ तूंचि अंगें परब्रह्म ॥ ऐसें बोलिला मेघश्याम ॥ तेचि अर्थींचें निजवर्म ॥ उद्धव सप्रेम पूसत ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ उद्धव उवाच ॥ ॥ ज्ञानं विशुद्धं विपुलं यथैतद्वैराग्यविज्ञानयुतं पुराणम् ॥ आख्याहि विश्वेश्वर विश्वमूर्ते त्वद्भक्तियोगं च महद्विमृग्यम् ॥८॥

॥ टीका ॥ विष्वक्सेना विश्वेश्वरा ॥ विश्वमूर्ती विश्वंभरा ॥ जेणें पाविजे ब्रह्मसाक्षात्कारा ॥ त्या ज्ञाननिर्धारा मज सांग ॥ ९८ ॥ तुसतें सांगसी ज्ञान ॥ ते केवळ मूढ जाण ॥ सांग ×वैराग्ययुक्ति तीक्ष्ण ॥ जें छेदी भवबंधन जीवाचें॥९९॥ज्ञानेंवीण वैराग्य आंधळें ॥तें अरडीदरडी आदळे ॥ वैराग्येंवीण ज्ञान पांगळें ॥ युक्ति देखे परी नचले पुरुषार्थ ॥ १०० ॥ विवेक वैराग्य दोनी ॥ प्रवेशल्या हृदयभुवनीं ॥ तों विषयावस्था निरसनी ॥ सोहंपणीं जीव वर्ते ॥१॥ जंव ज्ञानासि न भेटे विज्ञान ॥ तंव न निरसे जीवपण ॥ यालागीं सांगावें विज्ञान ॥ जें जीवशिवपण निवारी ॥२॥ असंभावना दोषशून्य॥ तें बोलिजे ब्रह्मज्ञान॥जें विपरीत भावनेवीण ॥ +त्यातें सज्ञान विपुल म्हणती ॥३॥ ऐसें विपुल विशुद्ध ज्ञान ॥ तद्युक्त वैराग्य विज्ञान ॥ त्यामाजीं श्रेष्ठ तुझें भजन ॥ कृपा करून सांगिजे ॥ ४ ॥ ज्ञानविज्ञान वैराग्य स्थिती ॥ जुनाट तुझी भगवद्भक्ती ॥ मज सांगावी सुनिश्चितीं ॥ कृपामूर्ती श्रीकृष्णा ॥ ५ ॥ तुझे उत्तम भक्तिकारणें ॥ साधु पडले गवेषणें ॥ धरणें बैसलें जीवेंप्राणें ॥ ते भक्ति सांगणें मजलागीं ॥ ६ ॥ तुझी करितां उत्तम भक्ती ॥ त्रिविध ताप क्षया जाती ॥ आपुली लाभे निजमुक्ती ॥ उद्धव ते अर्थीं विनवित ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ तापत्रयेणाभिहतस्य घोरे संतप्यमानस्य भवाध्वनीश ॥ पश्यामि नान्यच्छरणं तवांघ्रिद्वंद्वातपत्रादमृताभिवर्षात् ॥ ९ ॥

॥ टीका ॥ जे त्रिविधतापें तापले ॥ जे कामक्रोधीं जर्जर केले ॥ आशातृष्णा विसंचिले ॥ जे

---

१ प्रवृत्तींत व निवृत्तींत. २ विष्णो. ३ शोधांत. ४ विकार पावले.

*ना. परात्परथडीं. ×मो. वैराग्ययुक्ततीक्ष्ण. +ना. ज्ञाते.

नेबुंजले जन्ममरणें ॥ ८ ॥ संसारमार्ग अतिघोर ॥ दुःख दुर्लंघत्वें दुस्तर ॥ ऐसे श्रमले जे ार ॥ त्यांसि निजछत्र हरिपादपद्म ॥ ९ ॥ तुझ्या चरणारविंदापरतें ॥ शरण न देखों आणि- ांतें ॥ यालागीं कायावाचाचित्तें ॥ शरण भावार्थें तुज आलों ॥ ११० ॥ छत्र निवारी केवळ ाप ॥ चरणछत्राचें भिन्न रूप ॥ त्रिविधतापेंसि संताप ॥ निरसोनि निष्पाप करी जना । ११ ॥ एकें शरण निजचित्तें ॥ *एक वैरें मिसळले तूतें ॥ एक ते भजनभावार्थें ॥ एक ते +भयातें स्मरले तूतें ॥ १२ ॥ एक ते सुहृदत्वें सगोत्र ॥ एकाचें केवळ स्नेहसूत्र ॥ एका अंग- संगें कामतंत्र ॥ एक आज्ञाधार नेमस्त ॥१३॥ एवं नानापरी विचित्र ॥ जिहीं ठाकिलें चरण- छत्र ॥ भवभय जें महाघोर ॥ तें त्यांसमोर हों न शके ॥ १४ ॥ भक्त वैरी आणि सुहृद ॥ अवघ्या देणें निज ऐक्यपद ॥ बाप उदारता अगाध ॥ तूं स्वानंदबोध सर्वांचा ॥ १५ ॥ ×होम दीजे अग्नीवरी ॥ तें अग्नी आपणा ऐसें करी ॥ मा अवचटें पडिल्यावरी ॥ तेंही करी तैसेंची ॥ १६ ॥ एवं नानायोगें गोविंदा ॥ जे ०मिनले तुझिया संबंधा ॥ त्यांची निरसोनि संसार- बाधा ॥ समत्वें निजपदा तूं नेसी ॥ १७ ॥ त्या तुझें चरणछत्र येथें ॥ निवारी त्रिविध तापांतें ॥ सदा वर्षे परमामृतें ॥ शरण चरणांतें यालागीं ॥ १८ ॥ ज्या संसारभयाभेण ॥ तुझ्या चरणा आलों शरण ॥ त्या भवभयाचें निरूपण ॥ उद्धव आपण सांगत ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ दष्टं जनं संपतितं बिलेऽस्मिन् कालाहिना क्षुद्रसुखोरुतर्षम् ॥ समु- द्धरैनं कृपयापवर्ग्यैर्वचोभिरासिंच महानुभाव ॥ १० ॥

॥ टीका ॥ ॥ संसारकुहरामाजीं [६]जन ॥ गृहदाराकूपीं पडले जाण॥त्याहीमाजीं दुःख गहन॥ काळसर्पें दारुण डंखिले ॥ १२० ॥ त्या काळसर्पाचें विख ॥ क्षणक्षणा चढे देख ॥ अभि- मानें भुलले लोक ॥ विषयसुख वांछिती ॥ २१ ॥ नवल काळसर्पाचा पडिपाड ॥ विषप्राय विषय केला गोड ॥ गोडाचा गोड परमार्थ दृढ ॥ तो केला कडू जीवभावें ॥ २२ ॥ विखा- हूनि विषय अधिक ॥ विख एकवेळा मारक ॥ विषयो पुनःपुनः घातक ॥ काळसर्पें लोक भुलविले ॥ २३ ॥ विषय तो केवळ विख ॥ त्यालागीं भुलले मूर्ख ॥ विषयाची तृष्णा देख ॥ अधिकाधिक वाढविती ॥ २४ ॥ ऐसे दुःखनिमग्न जे जन ॥ त्यांचें करावें उद्धरण ॥ ह्मणशील हें करितील साधन ॥ तें उद्धरण करीन मी ॥ २५ ॥ स्वामी तुझी कृपा नव्हतां ॥ कोटीकोटी साधनें तीं वृथा ॥ तुझी कृपा जाहलिया अच्युता ॥ भवव्यथा स्पर्शेना ॥ २६ ॥ ऐके कृपाळुवा श्रीअनंता ॥ तुझ्या ❀मोक्षफळरूप ज्या कथा ॥ तेणें अमृतें शिंपोनि कृष्णनाशा ॥ जनां समस्तां उद्धरी ॥ २७ ॥ तुझे मुखींचें कथापीयूख ॥ बिंदुमात्र लागतां देख ॥ भवसर्पाचें उतरे विख ॥ उपजवी सुख स्वानंदें ॥ २८ ॥ सकळजनांच्याविषयीं ॥ ह्मणसी आग्रह कां तुझ्या- ठायीं ॥ जन मातें प्रार्थित नाहीं ॥ देवा ऐसें कांहीं कल्पिशी ॥ २९ ॥ आंधळें अंधकूपीं पड- तां ॥ देखणेंनी लावावें सत्पथा ॥ [९]तेवीं ज्ञानांध दुःखीं बुडतां ॥ उद्धरावया तत्त्वतां मी

१ घाबरले. २ आश्रय. ३ रावणादि. ४ गोपिकादि. ५ स्वीकारिलें. ६ प्रताप. ७ कथामृत. ८डोळसानें. ९ चांगल्या वाटेस.

*मो. केवळ वैराग्यें मिसळले तूतें. +मो. भयार्थें ना. भयातें. ×होमीं जें जें अग्नीवरी ०मो. मिसळले, [६]ना. जीवन. ❀मो. मोक्षरूप. [९]ना. तेवीं ज्ञानांधजन दुःखी होतां.

प्रार्थितस्सं ॥ १३० ॥ जन अंध कां जाहले ह्मणसी ॥ संसारसर्पें ग्रासिलें त्यांसी ॥ यालागीं विसरोनि निजसुखासी ॥ *विषयदुःखासी लोधले ॥ ३१ ॥ ऐशिया दीनांतें श्रीअनंता ॥ कृपेनें उद्धरावें तत्त्वतां ॥ ह्मणोनि चरणीं ठेविला माथा ॥ श्रीकृष्णनाथा प्रार्थिलें ॥ ३२ ॥ ऐकोनि भक्ताची विनंती ॥ संतोषला भक्तपती ॥ उत्तम सभेची ज्ञानस्थिती ॥ उद्धवाप्रती सांगेल॥३३॥ जे सभेसि मुख्यत्वें हृषीकेशी ॥ देवर्षि आणि ब्रह्मर्षी ॥ तेथ मीनले राजर्षी ॥ तपोराशी ज्ञाननिधी ॥ ३४ ॥ ते सभेचा ज्ञानमथितार्थ ॥ उद्धवासि सांगेल श्रीकृष्णनाथ ॥ श्रोतीं अवधान द्यावें तेथ ॥ एका विनवीत जनार्दना ॥ ३५ ॥ ज्ञान आणि पुरातन ॥ वक्ता भगवंत आपण ॥ श्रोता उद्धव सावधान ॥ काय श्रीकृष्ण बोलिला ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ इत्थमेतत्पुरा राजा भीष्मं धर्मभृतां वरम् ॥

अजातशत्रुः पप्रच्छ सर्वेषां नोऽनुशृण्वताम् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ ॥ तुवां पुशिलें जैशा रीतीं ॥ तैसियाची गा उपपत्ती ॥ धर्में पुशिलें भीष्माप्रती ॥ देहांतीं शरपंजरीं ॥ ३७ ॥ ऐक त्या धर्माची थोरी ॥ ज्यासि शत्रु नाहीं संसारीं ॥ सत्यवादी निजनिर्धारीं ॥ जो [१]ऋषिमंत्रीं जन्मला ॥ ३८ ॥ करावया पांडवनिर्दळण ॥ वज्रदेही व्हावया आपण ॥ [२]वर्म पुसतां दुर्योधन ॥ धर्म असत्यवचन न बोले ॥ ३९ ॥ ऐसा राजा युधिष्ठिर ॥ निर्मत्सर परम पवित्र ॥ तेणें करूनि अत्यादर ॥ भीष्म महावीर विनविला ॥ १४० ॥ जो परमधार्मिक निजनिर्धारीं ॥ जो स्वधर्मनियमें व्रतधारी ॥ जो यावज्जन्म ब्रह्मचारी ॥ जो महासुरीं वंदिजे ॥ ४१ ॥ न मोडतां गुरुत्वाची पायरी ॥ जो परशुरामेंसी युद्ध करी ॥ परी काशीश्वराची कुमरी ॥ जो न करीच नोवरी ब्रह्मचर्यें ॥ ४२ ॥ धनुर्विद्येसि गुरु परशुराम ॥ तो रणीं जिंतिला करूनि [४]नेम ॥ तेणें संतोषोनि परम ॥ आपुलें नाम [५]आंकणा घाली ॥४३॥ अधिकें संतुष्टे परशुराम ॥ माझ्या ब्रह्मचर्याचा नेम ॥ भीष्मा तुज बाधीना काम ॥ वर परम दीधला ॥ ४४ ॥ जनकसंतोषाकारणें ॥ आपुलें तारुण्य दीधलें जेणें ॥ वार्धक्य घेऊनि आपणें ॥ सुखी करणें [६]शंतनू ॥ ४५ ॥ पितयें दीधले आशीर्वादा ॥ ऐक भीष्मा अतिप्रबुद्धा ॥ वार्धकीं क्षीणशक्तीची आपदा ॥ ते तुज कदा बाधेना ॥४६॥ यालागीं जंवजंव ह्मातारपण ॥ तंवतंव त्यासी प्रताप गहन ॥ काळाची शक्ति खुंटली जाण ॥ न करवे क्षीण भीष्मासी ॥४७॥ यालागीं तोडरीं काळ काम ॥ [७]आंकणा रिघाला परशुराम ॥ हाचि ×वरिष्ठीं वरिष्ठ धर्म ॥ हें साजे नाम भीष्मासी ॥ ४८ ॥ ज्याचिये प्रतिज्ञेच्या निर्धारीं ॥ [८]देवाशीं लावूनियां हारीं ॥ निःशस्त्री करी शस्त्रधारी ॥ एवढी थोरी प्रतिज्ञेची ॥ ४९ ॥ न मोडतां जनमर्यादा ॥ युद्धीं मिसळला गोविंदा ॥ हारीं लावूनियां मुकुंदा ॥ चरणारविंदा लागला ॥ १५० ॥ आण वाहूनि निर्धारीं ॥ शस्त्रास्त्रें सांडिलीं दूरी ॥ पुढती बाण भेदितां [९]जिव्हारीं ॥ शस्त्र करीं न धरीच ॥५१॥ बाणीं [१०]खेंडतरलें जिव्हार ॥ विकळता देखोनि थोर ॥ भीष्में करूनि निजनिर्धार ॥ जाहला

१ दुर्वासाच्या मंत्रानें. २ गुह्यगोष्ट. ३ धर्म. ४ पण. ५ पायांतील विरूद ( पराक्रम सूचक भूषण ) अंकित झाला. ६ शंतनू भीष्मपिता. ७ अंकित झाला. ८ देवास हार खावयास लाविलें व निःशस्त्र श्रीकृष्णास शस्त्र धरावयास लाविलें. ९ मर्मी. १० भेदले.

*मो. विषयसुखासी. ×ना. धर्मिष्ठा.

तत्पर देहत्यागा ।। ५२ ॥ हें दक्षिणायन अतिघोर ॥ भीष्में ऐकतां उत्तर ।। काळासि करूनियां दूर ।। स्वशरीर राखिलें ।। ५३ ।। मग निजात्मनिर्धारीं ॥ भीष्म पहुडे शरपंजरीं ॥ त्यातें युधिष्ठिर प्रश्न करी ।। महाऋषीश्वरीं परिवारिला ॥ ५४ ।। आह्मां सकळां देखतां ।। जाहला युधिष्ठिर पुसता ॥ तेचि पुरातन कथा ।। तुज मी आतां सांगेन ।। ५५ ॥

|| श्लोक || || निवृत्ते भारते युद्धे सुहृन्निधनविव्हलः || श्रुत्वा धर्मान् बहून्पश्चान्मोक्षधर्मानपृच्छत || १२ ||

।। टीका ॥ ॥ मी संधि[1] करितां श्रीकृष्ण ॥ तें नमनीच दुर्योधन ॥ व्यासें वर्जितां आपण ॥ तरी *दृढपण युद्धासी ॥ ५६ ।। एवं दैवबळें कुरुक्षेत्रीं ॥ कौरवपांडवां झुंजारीं ।। सापत्न दुर्योधनादि वैरी ॥ सपरिवारीं निमाले ॥५७॥ युद्ध निवर्तल्यापाठीं ॥ धर्म बैसल्या राज्यपटीं॥ तेणें अभिमान घेतला पोटीं ॥ महादोषी सृष्टीं मी एक ।। ५८ ॥ मी राज्यीं बैसतां आपण ॥ ह्मणे म्यां मारिला गुरुब्राह्मण ।। म्यां मारिला कर्ण दुःशासन ।। राजा दुर्योधन म्यां मारिला ॥ ५९ ॥ उत्पत्तिस्थितिप्रलयकर्ता ।। येथ ईश्वरू जाण तत्त्वतां ॥ तें सांडोनियां सर्वथा ।। अहं कर्ता ह्मणे धर्म ॥ १६० ।। देहाभिमानाचे खटाटोपीं ॥ थोर होऊनियां अनुतापी ॥ गोत्रहंता मी महापापी ।। ऐसें आरोपी निजमाथां ।। ६१ ।। त्यासि यावया समाधान ।। समयो भीष्माचें निर्याण ॥ तेथें म्यां नेऊनियां जाण ।। धर्में केले प्रश्न ते ऐका ।। ६२ ।। राजधर्म, दानधर्म ॥ पुशिला तेणें आपद्धर्म ।। मुख्यत्वें पुशिला ×मोक्षधर्म ॥ उत्तमोत्तम परियेसीं ॥ ६३ ॥

|| श्लोक || तानहं तेऽभिधास्यामि देवव्रतमुखाच्छ्रुतान् || ज्ञानवैराग्यविज्ञानश्रद्धाभक्त्युपबृंहितान् || १३ ||

॥ टीका ॥ ते भीष्ममुखींचे मोक्षधर्म ॥ म्यां परिशिले अतिउत्तम ॥ जे निरसिती भवभ्रम ॥ सकळ कर्मदाहक ॥ ६४ ॥ ज्ञान विज्ञान श्रद्धा भक्ती ।। अनित्य नासे वैराग्य स्थिती ॥ भीष्में सांगीतली धर्माप्रती ॥ ते मी निश्चितीं सांगेन ॥ ६५ ।। ह्मणणें भीष्मासि देवव्रत ।। तेणें देवावरी ठेवूनि चित्त ।। शरपंजरीं सुनिश्चित ॥ निजात्मयुक्त पहुडला ।। ६६ ।। तेणें सांगीतला मोक्षधर्म ॥ त्यांत मुख्यत्वें ज्ञान प्रथम ।। तें ज्ञान सांगे पुरुषोत्तम ।। अतिउत्तम अवधारीं ॥ ६७ ॥

|| श्लोक || नवैकादश पंच त्रीन् भावान् भूतेषु येन वै || ईक्षेताथैकमप्येषु तज्ज्ञानं मम निश्चितम्|| १४ ||

॥ टीका ॥ प्रकृति पुरुष महत्तत्त्व ।। पंचतन्मात्रा सूक्ष्मस्वभाव ॥ अहंकारासकट नव ॥ तत्त्ववैभव हे संख्या ॥६८॥ एकादश बोलिजे तें ॥ तें अकराही इंद्रियें येथें ॥ पंच ते पंचमहाभूतें॥ तिनी ते निश्चित तीन गुण ॥ ६९ ॥ हे तत्त्वसंख्या उणखूण ।। गणितां अठ्ठावीस जाण ॥ इयें सर्वभूतीं समसमान ॥ तत्त्वें जाण वर्तती ॥ १७० ॥ हिरण्यगर्भादिस्थावरांत ॥ तत्त्वें समान गा

---

१ वेष्टित असा. २ मैत्री. ३ युद्धामध्यें. ४ राज्यपदावर. ५ गोत्रजांस मारणारा. ६ प्राणोत्क्रमण. ७ गंधत्व, रसत्व, रूपत्व, स्पर्शत्व, व शब्दत्व. ८ ब्रह्मापासून ते वृक्षादिकापर्यंत.

*मो. दृश्यपण ना. दृष्टपण. ×मो. क्षेत्रधर्म.

समस्त ॥ अधिक उणें नाहीं येथ ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ७१ ॥ तैसेंचि गा जीवचैतन्य ॥ प्रतिबिंबलें समसमान ॥ *जो नामरूप अभिमान ॥ सर्वांशी जाण प्रकाशक ॥७२॥ थिल्लरीं विहिरीं सागरीं ॥ ×चंद्रमा बिंब समाचि धरी ॥तेवीं ब्रह्मादिमशकवरीं ॥ जीवतत्व शरीरीं सम-साम्यें ॥ ७३ ॥ भूतें समसमान चैतन्य ॥ एकात्मता देखणें जाण ॥ या नांव गा शुद्ध ज्ञान ॥ माझाही जाण हा निश्चय ॥ ७४ ॥ आतां विज्ञानाचें लक्षण ॥ तुज मी सांगेन संपूर्ण ॥ तें श्लोकार्धे निरूपण ॥ स्वयें नारायण सांगत ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ एतदेव हि विज्ञानं न तथैकेन येन यत् ॥

॥ टीका ॥ पूर्वी देखतेनी स्वभावें ॥ +व्यापकवस्तूनि ये सर्वें ॥व्यापिलीं आहेती देहादितत्वें॥ हें मानी जीवें भावें निश्चित ॥ ७६ ॥ जेवीं कां घटमात्रास ॥ सबाह्य व्यापक आकाश ॥ तेवीं सकळप्रपंचास ॥ चिदाभास व्यापक ॥ ७७ ॥ ऐसें जेंकां शुद्ध ज्ञान ॥ तें ज्ञेयप्राप्तीचें कारण॥ ज्ञेय पावलिया ज्ञान ॥ हारपे जाण त्रतीसीं ॥ ७८ ॥ ज्ञानें गम्य वस्तु जें ॥ यालागीं त्या ज्ञेय ह्मणिजे ॥ ज्ञेय पावलिया ज्ञान लाजे ॥ जेवीं कां सूर्यतेजें खद्योत ॥ ७९ ॥ जळीं रिघाल्या लवण ॥ लवणपणा मुके जाण ॥ तेवीं ज्ञेय पावलिया ज्ञान ॥ ज्ञातेपण हारवी ॥ १८० ॥ ज्ञेय पावलिया सम्यक ॥ स्वरूप चिन्मात्रैक एक ॥ तेथ मिथ्या व्याप्यव्यापक ॥ साधक बाधक असेना ॥ ८१ ॥ जेवीं उदेलिया गभस्ती ॥ सतारा लोपे रोहिणीपती ॥ तेवीं जगेंसी ज्ञानसं-पत्ती ॥ ज्ञेयाचे प्राप्तीपुढें लोपे ॥ ८२ ॥ ऐसें अपरोक्ष नव्हतां सांग ॥ देहादिप्रपंचाचें लिंग ॥ आत्मावेगळें ⁸देखे जग ॥ शब्दें लगबग ब्रह्मज्ञाना ॥ ८३ ॥ शुद्ध शाब्दिक जें ब्रह्मज्ञान ॥ तेंही गुणात्मक जाण ॥ वस्तु निराकार निर्गुण ॥ जन्ममरण तिसी नाहीं ॥ ८४ ॥ त्रिगुण तितुकें नाशवंत ॥ येचिविखीं प्रस्तुत ॥ सांगताहे श्रीकृष्णनाथ ॥ अंतवंत साकार ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ स्थित्युत्पत्त्यप्ययान्पश्येद्भावानां त्रिगुणात्मनाम् ॥ १५ ॥

॥ टीका ॥ जरी नसतें नाशवंत ॥ ²तरी सगुण ह्मणों ये संत ॥ उत्पत्तिस्थितिनिदानवंत ॥ जाण येथ त्रिगुणची ॥ ८६ ॥ रजोगुणें होय उत्पत्ति ॥ सत्वगुणें कीजे स्थिती ॥ तमोगुणें नाशी अंतीं ॥ हा ³प्रवृत्तिस्वभावो ॥ ८७ ॥ या गुणांमाजीं वस्तु असे ॥ जिचेनि गुणकर्म प्रकाशे ॥ परी जन्ममरणादिदोषें ॥ अलिप्त वसे अविनाशी ॥ ८८ ॥ जे तिनी गुणां आश्रय-भूत ॥ जिचेनि गुणकर्में वर्तत ॥ ती वस्तु त्रिगुणातीत ॥ तेचि सांगत श्रीकृष्ण ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ आदावंते च मध्ये च सृज्यात्सृज्यं यदन्वियात् ॥ पुनस्तत्प्रतिसंक्रामे यच्छिष्येत तदेव सत् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ गुणा आदिमध्यअवसानीं ॥ सृष्टि उत्पत्ति स्थिति निधनीं ॥ जें असे अविनाश-पणीं ॥ तें मी मानीं संततत्वें ॥ ९० ॥ तेंचि संततत्व गा ऐसें ॥ ज्याचेनि आधारें जग वसे ॥ जें जगा सबाह्य भरलें असे ॥ जग प्रकाशे ज्याचेनी ॥ ९१ ॥ हें जगचि होय जाये ॥ परी तें संचलेंचि राहे ॥ ऐशी जे नित्यवस्तु आहे ॥ ते तूं पाहे संततत्वें ॥ ९२ ॥ जैसे घट मठ होती

१ चैतन्यस्वरूप. २ जाणण्यास योग्य. ३ तारकांसहित. ४ चंद्र. ५ चिन्ह. ६ सत्तारूपानें.

*मो. जें नानारूप अभिधान ×मो. चंद्रप्रतिमाबिंब समचि धरी. +ना. व्यापकवस्तु कैसेनि सर्वे. ⁸ना. न देखे. ²ना. तरी सगुण मानं नये संत. ³ना. प्रकृतिस्वभाव.

जाती ॥ आकाश राहे *सहजगती ॥ तेवीं ब्रह्मांडा लयोत्पत्ती ॥ वस्तुची स्थिती संचली ॥ ९३ ॥ जेवीं अलंकारापूर्वीं सोनें ॥ अलंकारीं सोनें सोनेंपणें ॥ ×अलंकारनाशीं नासों नेणे ॥ जेवीं कां सोनें निजस्थिती ॥ ९४ ॥ तेवीं आकळोनि चराचर ॥ वस्तु असे अखंडाकार ॥ होतां जातां आकार विकार ॥ वस्तु अणुमात्र विकारेना ॥ ९५ ॥ ऐसी जे वस्तु अखंडपणें ॥ तिच्याठायीं चारी प्रमाणें॥इहीं प्रमाणीं वस्तु जाणणें॥प्रपंच देखणें मिथ्यात्वें॥९६॥

॥ श्लोक ॥ श्रुतिः प्रत्यक्षमैतिह्यमनुमानं चतुष्टयम् ॥ प्रमाणेष्वनवस्थानाद्विकल्पात्स विरज्यते ॥ १७ ॥

॥ टीका ॥ एक अद्वैत ब्रह्म पाहीं ॥ दुसरें आणिक कांहीं नाहीं ॥ प्रपंच मिथ्या वस्तूसही ॥ हें प्रमाण पाहीं वेदवाक्य ॥ ९७ ॥ प्रत्यक्ष देखिजे आपण ॥ देहादिकांचें नश्वरपण ॥ हें दुसरें परम प्रमाण ॥ क्षणिकत्व जाण प्रपंचा ॥ ९८ ॥ मार्कंडेयो आणि भृशुंडी ॥ इहीं प्रपंचाची राखोडी ॥ देखिली गा रोकडी ॥ वेळा कोटि कोटी कल्पांतीं ॥ ९९ ॥ महाजनप्रसिद्ध हें श्रवण ॥ प्रपंचासि +क्षणिकपण ॥ हें तिसरें गा प्रमाण ॥ उद्धवा जाण अतिगुह्य ॥ २०० ॥ शास्त्र प्रसिद्ध अनुमान ॥ मिथ्या प्रपंचाचें भान ॥ दिसे मृगजळासमान ॥ वस्तुतां जाण असेना ॥ १ ॥ दोर दोरपणें साचार ॥ भ्रमें भासे नानाकार ॥ काष्ठ सर्प कीं मोत्याचा हार ॥ ना हे जळधार जळाची ॥ २ ॥ तेवीं वस्तु एक चिद्घन ॥ तेथ भ्रमें मतवाद गहन ॥ हें शून्य किंवा सगुण ॥ कर्मधर्माचरण तें मिथ्या ॥ ३ ॥ यापरी करितां अनुमान ॥ मिथ्या प्रवृत्तिप्रपंचज्ञान ॥ हें वेदांतमत प्रमाण ॥ सत्य जाण उद्धवा ॥४॥ तंतूवेगळा पट कांहीं ॥ योजिना आणिके ठायीं ॥ तेवीं ब्रह्मावेगळा पाहीं ॥ प्रपंच नाहीं सत्यत्वें ॥ ५ ॥ चहूं प्रमाणीं प्रपंचस्थिती ॥ मिथ्या साधिली निश्चितीं ॥ ते प्रपंचीं विषयासक्ती ॥ सांडूनि विरक्ति धरावी ॥ ६ ॥ येचिविर्षीचें निरूपण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ उभयलोकीं विषयध्यान ॥ तें मिथ्या जाण अमंगळ ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ कर्मणां परिणामित्वादाविरिंच्यादमंगलम् ॥ विपश्चिन्नश्वरं पश्येददृष्टमपि दृष्टवत् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ करूनि कर्माचें साधन ॥ पाविजे लोक तो नश्वर जाण ॥ आदिकरूनि ब्रह्मसदन ॥ नश्वरत्वें जाण अमंगळ ॥ ८ ॥ ते लोकींचें सुख गहन ॥ तें विखें रांधिलें जैसें अन्न ॥ खातां गोड परिपाकीं मरण ॥ तेवीं अधःपतन स्वर्गस्था ॥ ९ ॥ जैसा देखिला हा लोक येथ ॥ तैसाचि स्वर्गभोग तेथ ॥ दोन्ही जाण अंतवंत ॥ नाश प्राप्त दोहींसी ॥ २१० ॥ ' काळें पांढरें दोनी सुंणीं ॥ जेवीं समान अपवित्रपणीं ॥ तेवीं इहपरलोक दोन्ही ॥ नश्वरपणीं समान' ॥११ इहामुत्रभोगासक्तीं ॥ यापरी धरावी विरक्ती ॥ या नांव वैराग्यस्थिती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १२ ॥ मागील तुझी प्रश्नस्थिती ॥ पुशिली होती माझी भक्ती ॥ तें मी सांगेन तुजप्रती॥ यथानिगुती निजबोधें ॥ १३ ॥

---

१ नाशवंत. २ कुत्रीं.

*ना. सहजस्थिती. ×मो. अलंकारीं नासो नेणें, जैंका सोनें निजस्थिती. +मो. क्षणिकत्व जाण.

॥ श्लोक ॥ भक्तियोगः पुरैवोक्तः प्रीयमाणाय तेऽनघ ॥ पुनश्च कथयिष्यामि मद्भक्तेः कारणं परम् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ पूर्वीं भक्तीची महत्त्वख्याती ॥ तुज सांगितली निजस्थिती ॥ ते भक्तीची तुज अतिप्रीती ॥ तरी मी मागुतीं सांगेन ॥ १४ ॥ ऐक उद्धवा पुण्यमूर्ती ॥ ज्यासि आवडे माझी भक्ती ॥ तो मज पढिये त्रिजगतीं ॥ *भजनें परमप्राप्ती मद्भक्तां ॥ १५ ॥ ते भक्तीचें निजलक्षण ॥ प्रथमभूमिका आरंभून ॥ देवो सांगे आपण ॥ ×येथें सावधान व्हावें श्रोता ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ श्रद्धाऽमृतकथायां मे शश्वन्मदनुकीर्तनम् ॥ परिनिष्ठा च पूजायां स्तुतिभिस्तवनं मम ॥ २० ॥

॥ टीका ॥ अमृतरूप ज्या माझ्या कथा ॥ श्रद्धायुक्त श्रवण करितां ॥ फिकें करूनि अमृता ॥ गोडी भक्तिपंथा तत्काळ लागे ॥ १७ ॥ अमर अमृतपान करिती॥तेही शेखीं मरोनि जाती ॥ माझें कथामृत जे सेविती ॥ ते नागवती कळिकाळा ॥१८॥ सेवितां +कथासारामृत ॥ अतिशयें जाहले उन्मत्त ॥ 5मातले मरणातें मारित ॥ धाके पळे समस्त संसारू ॥ १९ ॥ सेवितां कथामृतसार ॥ मद्भावीं रंगलें अंतर ॥ ते माझे गुण माझें चरित्र ॥ गाती सादर उल्हासें ॥ २२० ॥ माझें नाम माझीं पदें ॥ नानाछंदें अद्वैतबोधें ॥ कीर्तनीं गाती स्वानंदें ॥ परमानंदें डुल्लत ॥ २१ ॥ सप्रेम संभ्रमाचे मेळीं ॥ गर्जती नामाच्या कल्लोळीं ॥ नामासरिसी वाजे टाळी ॥ जाहली होळी महापापां ॥ २२ ॥ ऐशिया कीर्तनाचे आवडीं ॥ जाहलीं प्रायश्चित्तें देशधडी ॥ तीर्थें होऊनि ठेलीं बापुडीं ॥ फिटली सांकडीं जपतपाची ॥ २३ ॥ ऐकोनि कीर्तनाचा गजर॥ ठेला यमलोकींचा व्यापार ॥ रिकामे यमकिंकर ॥ यमें पाशभार लपविले ॥२४॥ देखोनि कीर्तनाची गोडी ॥ देव धांवले लवडसवडी ॥ वैकुंठींहूनि घाली उडी ॥ अतितांतडी स्वानंदें ॥ २५॥ ऐसा कीर्तनाचा गजर ॥ करितां नित्य निरंतर ॥ त्या आधीन मी श्रीधर ॥ भुललों साचार कीर्तनें ॥ २६ ॥ जैसें कीर्तन तैशीच पूजा ॥ आदरें पूजी गरुडध्वजा ॥ पुष्पादिसंभार 3समाजा ॥ अतिवोजा धवधवीत ॥ २७ ॥ अतिनिष्ठा सावधान ॥ यापरी करी माझें पूजन ॥ माझी स्तुति माझें स्तवन ॥ रिकामा क्षण जावों नेदी ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ आदरः परिचर्यायां सर्वांगैरभिवंदनम् ॥ मद्भक्तपूजाऽभ्यधिका सर्वभूतेषु मन्मतिः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ इंद्रियें वेंचिलीं पूजाविधानें ॥ वाचा वेंचिली हरिकीर्तनें ॥ हृदय वेंचिलें माझेनि ध्यानें ॥ अष्टांग नमनें वेंचिलें ॥ २९ ॥ ऐसा अत्यादरें वाडें-कोडें ॥ सबाह्य वेंचला मजकडे॥ माझे भक्त देखिल्या पुढें ॥ हरिखें मजकडे येवोंचि विसरे ॥ २३० ॥ माझे भक्त भाग्यें येती घरा ॥ तें पर्वकाळ दिवाळी दसरा ॥ तेथें तीर्थें धांवती माहेरा ॥ जेवीं सासराहूनि कुमारी ३१ पहावया भक्तपूजेची आवडी ॥ सनकादिकांची पडे उडी ॥ नारदप्रल्हादादि भक्तकोडी ॥

---

१ देव. २ मुकतात. ३ उन्मत्त मृत्यूला. ४ दूर. ५ राहिला. ६योजिली. ७ वेंचली असाही पाठ आहे.
*मो. भजनपरप्राप्ती मद्भक्ता. ×मो. तेथें सावधान यावें श्रोतां ना. येथें अवधान यावें श्रोतीं. +मो. कथामृत. 5मो. पातले. 3मो. समोजा.

िवढी धांवती ॥ ३२ ॥ तेथ सिद्ध येती गा आलोटें ॥ सुरवरांचें टेंके फुटे ॥ महानुभावांचा
दाटे ॥ पितर नेटेंपाटें धांवती ॥ ३३ ॥ वेदांसि रिघावा न घडे ॥ विधि निबुजला मार्गे
डे ॥ माझ्या भक्तपूजेचेनि कोडें ॥ दारापुढें थाट दाटे ॥३४॥ मद्भक्तपूजेचिया उल्हासा॥मज
पडे हृषीकेशा ॥ इतरांचा पाड काइसा ॥ भक्तपूजनीं ऐसा महिमा आहे ॥ ३५ ॥ मागां
ढूनि माझी पूजा ॥ जेणें मद्भक्त पूजिले वोजा ॥ तेणें मज पूजिलें अधोक्षजा ॥ परिवार
ाजासमवेत ॥ ३६ ॥ प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ती ॥ भक्त माझ्या सचेतन मूर्ती ॥ त्यासि
जिल्या मी श्रीपती ॥ यथानिगुतीं संतोषें ॥ ३७ ॥ जैसा मद्भाव मद्भक्तीं ॥ तोचि भावो
भूतीं ॥ नानाकार भूताकृती ॥ परी आत्मस्थिती अविकार ॥ ३८ ॥ दिसे देहाकृती
डली ॥ तीतें ह्मणती हे रांडली ॥ परी आत्म्याची रांड नाहीं जाहली ॥ असे
चली *आत्मस्थिती ॥ ३९ ॥ दीर्घ वक्र, आणि वर्तुळ ॥ दिसती भिन्नभिन्न इंगळ ॥ परी
ग्नि एकचि केवळ ॥ तेवीं भूतें सकळ मद्रूपें ॥२४०॥ चित्रांमाजीं नानाकृती ॥पाहतां अवघी
कचि भिंती ॥ तेवीं मी चिदात्मा सर्वभूतीं ॥ निजभावें निश्चितीं जाणावा ॥ ४१ ॥ सांडूनि
हंकार दुजा ॥ सर्वभूतीं भावो माझा ॥ हे उत्तमोत्तम माझी पूजा ॥ मज अधोक्षजा पढि-
ती ॥ ४२ ॥ ऐशी जो माझी पूजा करी ॥ तो मज पढियंता गा भारी ॥ मी सर्वांगें राबें
याच्या घरीं ॥ तो मजवरी मिराशी ॥ ४३ ॥ त्याच्या चेष्टांची जे गती ॥ तेचि माझी भज-
स्थिती ॥ हेंचि स्वमुखें श्रीपती ॥ उद्धवाप्रती सांगत ॥ ४४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ मदर्थेष्वंगचेष्टा च वचसा मद्गुणेरणम् ॥ मय्यर्पणं च मनसा सर्वकामविवर्जनम् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ ॥ लौकिक शारीर कर्मगती ॥ तत्द्वारां निपजे माझी भक्ती ॥ अभिनव माझी
जनस्थिती ॥ सांगों किती उद्धवा ॥ ४५ ॥ बैसोनियां हाटवटीं ॥ सांगतां लौकिकीही गोष्टी॥
यांमाजीं माझें कीर्तन उठी ॥ मद्गुणें गोमटी गर्जे वाचा ॥ ४६ ॥ स्वधर्मक्रिया करणें ॥ तेंही
र्पे मजकारणें ॥ मजवेगळें कांहीं ×तेणें॥करूं नेणे अणुमात्र ॥४७॥ सर्वेंद्रियांचिये स्थितीं ॥
हजें निपजे माझी भक्ती ॥ माझें नाम माझी कीर्ती ॥ वाचा रितीं राहों नेणे ॥ ४८ ॥ मनासि
आवडे जें जें कांहीं ॥ तें तें अर्पी मजचि पाहीं ॥ शेखीं आपुलें मन तेंही ॥ माझ्याठायीं
समर्पी ॥ ४९ ॥ माझे स्वरूपाचे ठायीं जाण ॥ केवीं घडे मनाचें अर्पण ॥ तेचिविषयीं निरू-
पण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ २५० ॥

॥ श्लोक ॥ ॥ मदर्थेऽर्थपरित्यागो भोगस्य च सुखस्य च ॥ इष्टं दत्तं हुतं जप्तं मदर्थं यद्व्रतं तपः ॥ २३ ॥

॥टीका॥ ॥ मी परमात्मा परम स्वार्थ॥ऐसा करूनि निश्चितार्थ॥ वेंचिती धनधान्यसर्वार्थ॥
निज परमार्थ साधावा ॥ ५१ ॥ परमार्थ साधावया अव्यंग ॥ साचार पोटींचा विराग ॥
मी भेटावया श्रीरंग ॥ सकळ भोग सांडिती ॥ ५२ ॥ छत्र चामर हस्ती घोडे ॥ त्यागूनि होती

---

१ अमर्याद. २ समूह, पुंज. ३ दीपून गेला. ४ मोह. ५ विधवा झाली. ६ निखारे. ७ रिकामी.
*मो. आत्मत्वें. ×मो. करणें.

॥ श्लोक ॥ भक्तियोगः पुरैवोक्तः प्रीयमाणाय तेऽनघ ॥ पुनश्च कथयिष्यामि मद्भक्तेः कारणं परम् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ पूर्वी भक्तीची महत्त्वख्याती ॥ तुज सांगितली निजस्थिती ॥ ते भक्तीची तुज अतिप्रीती ॥ तरी मी मागुतीं सांगेन ॥ १४ ॥ ऐक उद्धवा पुण्यमूर्ती ॥ ज्यासि आवडे माझी भक्ती ॥ तो मज पढिये त्रिजगतीं ॥ *भजनें परमप्राप्ती मद्भक्तां ॥ १५ ॥ ते भक्तीचें निजलक्षण ॥ प्रथमभूमिका आरंभून ॥ देवो सांगे आपण ॥ ×येथें सावधान व्हावें श्रोता ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ श्रद्धाऽमृतकथायां मे शश्वन्मदनुकीर्तनम् ॥ परिनिष्ठा च पूजायां स्तुतिभिस्तवनं मम ॥ २० ॥

॥ टीका ॥ अमृतरूप ज्या माझ्या कथा ॥ श्रद्धायुक्त श्रवण करितां ॥ फिकें करूनि अमृता ॥ गोडी भक्तिपंथा तत्काळ लागे ॥ १७ ॥ अमर अमृतपान करिती॥तेही शेखीं मरोनि जाती ॥ माझें कथामृत जे सेविती ॥ ते नागवती[१] कळिकाळा ॥१८॥ सेवितां +कथासारामृत ॥ अतिशयें जाहले उन्मत्त ॥ 5मातले मरणातें मारित ॥ धाके पळे समस्त संसारू ॥ १९ ॥ सेवितां कथामृतसार ॥ मद्भावीं रंगलें अंतर ॥ ते माझे गुण माझें चरित्र ॥ गाती सादर उल्हासें ॥ २२० ॥ माझें नाम माझीं पदें ॥ नानाछंदें अद्वैतबोधें ॥ कीर्तनीं गाती स्वानंदें ॥ परमानंदें डुल्लत ॥ २१ ॥ सप्रेम संभ्रमाचे मेळीं ॥ गर्जती नामाच्या कल्लोळीं ॥ नामासरिसी वाजे टाळी ॥ जाहली होळी महापापां ॥ २२ ॥ ऐशिया कीर्तनाचे आवडीं ॥ जाहलीं प्रायश्चित्तें देशधडी ॥ तीर्थें होऊनि ठेलीं बापुडीं ॥ फिटली सांकडीं जपतपाची ॥ २३ ॥ ऐकोनि कीर्तनाचा गजर॥ ठेला यमलोकींचा व्यापार ॥ रिकामे यमकिंकर ॥ यमें पाशभार लपविले ॥२४॥ देखोनि कीर्तनाची गोडी ॥ देव धांवले लवडसवडी ॥ वैकुंठींहूनि घाली उडी ॥ अतितांतडी स्वानंदें ॥ २५ ॥ ऐसा कीर्तनाचा गजर ॥ करितां नित्य निरंतर ॥ त्या आधीन मी श्रीधर ॥ भुललों साचार कीर्तनें ॥ २६ ॥ जैसें कीर्तन तैशीच पूजा ॥ आदरें पूजी गरुडध्वजा ॥ पुष्पादिसंभार 3समाजा ॥ अतिवोजा धवघवीत ॥ २७ ॥ अतिनिष्ठा सावधान ॥ यापरी करी माझें पूजन ॥ माझी स्तुति माझें स्तवन ॥ रिकामा क्षण जावों नेदी ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ आदरः परिचर्यायां सर्वांगैरभिवंदनम् ॥ मद्भक्तपूजाऽभ्यधिका सर्वभूतेषु मन्मतिः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ इंद्रियें वेंचिलीं पूजाविधानें ॥ वाचा वेंचिली हरिकीर्तनें ॥ हृदय वेंचिलें माझेनि ध्यानें ॥ अष्टांग नमनें वेंचिलें ॥ २९ ॥ ऐसा अत्यादरें वाडें-कोडें ॥ सबाह्य वेंचला मजकडे॥ माझे भक्त देखिल्या पुढें ॥ हरिखें मजकडे येवोंचि विसरे ॥ २३० ॥ माझे भक्त भाग्यें येती घरा ॥ तैं पर्वकाळ दिवाळी दसरा ॥ तेथें तीर्थें धांवती माहेरा ॥ जेवीं सासराहूनि कुमारी३१ पहावया भक्तपूजेची आवडी ॥ सनकादिकांची पडे उडी ॥ नारदप्रल्हादादि भक्तकोडी ॥

---

१ देव. २ मुकतात. ३ उन्मत्त मृत्यूला. ४ दूर. ५ राहिला. ६योजिली. ७ वेंचली असाही पाठ आहे.

*मो. भजनपरप्राप्ती मद्भक्ता. ×मो. तेथें सावधान यावें श्रोतां ना. येथें अवधान यावें श्रोतीं. +मो. कथामृत. 5मो. पातले. 3मो. समोजा.

चद्दोवदी धांवती ॥ ३२ ॥ तेथ सिद्ध येती गा ओलोटें ॥ सुरवरांचें टेंके फुटे ॥ महानुभावांचा दाग दाटे ॥ पितर नेटेंपाटें धांवती ॥ ३३ ॥ वेदांसि रिघावा न घडे ॥ विधि निर्बुजला मागें मुरडे ॥ माझ्या भक्तपूजेचेनि कोडें ॥ दारापुढें थाट दाटे ॥३४॥ मद्भक्तपूजेचिया उल्हासा॥मज ठकें पडे हृषीकेशा ॥ इतरांचा पाड काइसा ॥ भक्तपूजनीं ऐसा महिमा आहे ॥ ३५ ॥ मागां सांडूनि माझी पूजा ॥ जेणें मद्भक्त पूजिले वोजा ॥ तेणें मज पूजिलें अधोक्षजा ॥ परिवार समाजासमवेत ॥ ३६ ॥ प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ती ॥ भक्त माझ्या सचेतन मूर्ती ॥ त्यासि पूजिल्या मी श्रीपती ॥ यथानिगुतीं संतोषें ॥ ३७ ॥ जैसा मद्भाव मद्भक्तीं ॥ तोचि भावो सर्वभूतीं ॥ नानाकार भूताकृती ॥ परी आत्मस्थिती अविकार ॥ ३८ ॥ दिसे देहाकृती मुंडली ॥ तीतें ह्मणती हे रांडली ॥ परी आत्म्याची रांड नाहीं जाहली ॥ असे संचली *आत्मस्थिती ॥ ३९ ॥ दीर्घ वक्र, आणि वर्तुळ ॥ दिसती भिन्नभिन्न इंगळ ॥ परी अग्नि एकचि केवळ ॥ तेवीं भूतें सकळ मद्रूपें ॥२४०॥ चित्रांमाजीं नानाकृती ॥ पाहतां अवघी एकचि भिंती ॥ तेवीं मी चिदात्मा सर्वभूतीं ॥ निजभावें निश्चितीं जाणावा ॥ ४१ ॥ सांडूनि अहंकार दुजा ॥ सर्वभूतीं भावो माझा ॥ हे उत्तमोत्तम माझी पूजा ॥ मज अधोक्षजा पढि-यंती ॥ ४२ ॥ ऐशी जो माझी पूजा करी ॥ तो मज पढियंता गा भारी ॥ मी सर्वांगें राबें त्याच्या घरीं ॥ तो मजवरी मिराशी ॥ ४३ ॥ त्याच्या चेष्टांची जे गती ॥ तेचि माझी भज-नस्थिती ॥ हेंचि स्वमुखें श्रीपती ॥ उद्धवाप्रती सांगत ॥ ४४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ मदर्थेष्वंगचेष्टा च वचसा मद्गुणेरणम् ॥ मय्यर्पणं च मनसा सर्वकामविवर्जनम् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ ॥ लौकिक शारीर कर्मगती ॥ तद्द्वारां निपजे माझी भक्ती ॥ अभिनव माझी भजनस्थिती ॥ सांगों किती उद्धवा ॥ ४५ ॥ बैसोनियां हाटवटीं ॥ सांगतां लौकिकीही गोष्टी ॥ त्यांमाजीं माझें कीर्तन उठी ॥ मद्गुणें गोमटी गर्जे वाचा ॥ ४६ ॥ स्वधर्मक्रिया करणें ॥ तेंही अर्पे मजकारणें ॥ मजवेगळें कांहीं ×तेणें॥करूं नेणे अणुमात्र ॥४७॥ सर्वेंद्रियांचिये स्थितीं ॥ सहजें निपजे माझी भक्ती ॥ माझें नाम माझी कीर्ती ॥ वाचा रितीं राहों नेणे ॥ ४८ ॥ मनासि आवडे जें जें कांहीं ॥ तें तें अर्पी मजचि पाहीं ॥ शेखीं आपुलें मन तेंही ॥ माझ्याठायीं समर्पी ॥ ४९ ॥ माझे स्वरूपाचे ठायीं जाण ॥ केवीं घडे मनाचें अर्पण ॥ तेचिविषयीं निरू-पण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ २५० ॥

॥ श्लोक ॥ ॥ मदर्थेऽर्थपरित्यागो भोगस्य च सुखस्य च ॥ इष्टं दत्तं हुतं जप्तं मदर्थं यद्व्रतं तपः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ ॥ मी परमात्मा परम स्वार्थ ॥ ऐसा करूनि निश्चितार्थ ॥ वेंचिती धनधान्यसर्वार्थ ॥ निज परमार्थ साधावा ॥ ५१ ॥ परमार्थ साधावया अव्यंग ॥ साचार पोटींचा विराग ॥ मी भेटावया श्रीरंग ॥ सकळ भोग सांडिती ॥ ५२ ॥ छत्र चामर हस्ती घोडे ॥ त्यागूनि होती

---

१ अमर्याद. २ समूह, पुंज. ३ दीपून गेला. ४ मोह. ५ विधवा झाली. ६ निखारे. ७ रिकामी.
*मो. आत्मत्वें. ×मो. करणें.

गा उघडे ॥ ऐसें वैराग्य धडफुडें ॥ मज रोकडें पावावया ॥ ५३ ॥ माझें पावावया निजसुख । द्रव्य, दारा, पुत्र *देख ॥ त्यागूनि सांडिती निःशेख ॥ यापरी देख अनुतापी ॥५४॥ आवडीं करितां माझें भजन ॥ विसरे भोगांची आठवण ॥ माझे प्राप्तीलागीं जाण ॥ रिता क्षण जावों नेदी ॥ ५५ ॥ माझेनि उद्देशें परम ॥ करी श्रौतस्मार्त स्वकर्म ॥ अग्निहोत्रादि याग होम ॥ व्रत नेम मजलागीं ॥ ५६ ॥ माझें ठाकावया चिद्रूप ॥ गायत्र्यादिमंत्रजप ॥ माझें पावावया निजस्वरूप ॥ ×दुष्कर तप आचरती ॥५७॥ मी विश्वात्मा, विश्वमुखीं ॥ विश्वंभर होतसें सुखी ॥ यालागीं तो दीनमुखीं ॥ करी अवश्यकीं अन्नदान ॥ ५८ ॥ हृदयीं मी स्वतः-सिद्ध जाण ॥ त्या माझें करूनि आवाहन ॥ आपण करी जें भोजन ॥ तेंही मदर्पण तो करी ॥ ५९ ॥ कवळेंकवळीं हरिस्मरण ॥ तें अन्नचि होय ब्रह्म पूर्ण ॥ यापरी माझे भक्त जन ॥ कर्म मदर्पण स्वयें करिती ॥ २६० ॥ ऐशीं सर्व कर्में कृष्णार्पण ॥ सर्वदा जो करी जाण ॥ याचें मन होय मदर्पण ॥ तेंचि निरूपण देवो सांगे ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ एवं धर्मैर्मनुष्याणामुद्धवात्मनिवेदिनाम् ॥ मयि संजायते भक्तिः कोऽन्योऽर्थोऽस्याऽवशिष्यते ॥ २४ ॥

॥ टीका ॥ सर्व कर्म मदर्पण ॥ करितां शुद्ध होय मन ॥ जेवीं लोह कामोंवितां जाण ॥ होय दर्पण सोज्ज्वळ ॥ ६२ ॥ पुटीं घालितां सुवर्ण ॥ अधिक तेज चढे जाण ॥ करितां वस्त्राचें क्षाळण ॥ स्वच्छपण धोवटीं ॥ ६३ ॥ तैसीं सर्वकर्में मदर्पण ॥ करितां निर्मळ होय मन ॥ तेकाळीं मनाचें अर्पण ॥ मद्रूपीं जाण होंलागे ॥ ६४ ॥ 'पूर दाटलिया सरितांसी ॥ सवेग ठाकती सिंधूसी ॥ तेवीं ✻निर्मळत्वें मनासी ॥ माझ्या स्वरूपासी +पावणें' ॥ ६५ ॥ माझे स्वरूपीं मनाची स्थिती ॥ तें आर्त जिज्ञासु अर्थार्थी ॥ हे तीनही तेकाळीं हारपती ॥ माझी भक्ति चौथी उल्हासे ॥ ६६ ॥ माझे भांडवलीं ०मज एक भक्ती ॥ तेथ दुजी तिजी आणि चौथी ॥ हे साधकांची साधनभ्रांती ॥ बहुता भक्ती मज नाहीं ॥ ६७ ॥ तेचि माझी मुख्य भक्ती ॥ येणें साधनें होय प्राप्ती ॥ भक्तीस्तव भक्त म्हणविती ॥ ब्रह्मा उमापती सनकादिक ॥ ६८ ॥ निःशेष मावळल्या अहंकृती ॥ भूतें निजात्मरूपें दिसती ॥ माझ्या स्वरूपाची सह-जस्थिती ॥ ते माझी मुख्यभक्ती उद्धवा ॥ ६९ ॥ ये भक्तीच्या लेशस्थितीं ॥ आर्त जिज्ञासु अर्थार्थी ॥ प्रकाशले गा वर्तती ॥ निजस्वार्थीं साधक ॥ ७० ॥ होंचि आर्तांच्या विपयीं ॥ आर्तीतें प्रकाशी पाहीं ॥ मग आर्त ऐसे त्याच्याठायीं ॥ नांवाची नवायी उपतिष्ठे ॥ ७१ ॥ रोगिया नांव आर्तता ॥ हें व्याख्यान नव्हे परमार्था ॥ भगवत्प्राप्तीची 2तीव्र व्यथा ॥ ते आर्तता परमार्थीं ॥ ७२ ॥ जो भगवंताचे प्राप्तीलागीं ॥ कडां घालूं धांवे वेगीं ॥ कां रिघों पाहे जळते आगीं ॥ ते आर्त सवेगीं बोलिजे ॥ ७३ ॥ आर्ताची स्थिति ऐसी ॥ जिज्ञासु नि-वारी त्यासी ॥ मनुष्यदेह ब्रह्मप्राप्तीसी ॥ तो आत्महत्येसी नको योजूं ॥ ७४ ॥ मागील भक्त कोणे रीतीं ॥ जाणोनि पावले भगवद्भक्ती ॥ जीवें भावें त्यांची वरी युक्ती ॥ जिज्ञासु निश्चि-

१ रिकामा. २ प्रत्यक्ष होण्याकरितां. ३ सर्वत्र ज्यांचीं तोंडें आहेत तो. ४ प्रत्येक घासास. ५ तयार केलें असतां. ६ शंकर. ७ निवारण करितो.

*ना. सुख. ×मो. दुस्तर. ✻मो. निर्मळत्व. +मो. पावन. ०ना. माझी. 2मो. चित्तीं.

तीं या नांव ॥७५॥ मज जाणावयाची ऐशी आशा ॥ तीतें ह्मणती शुद्ध जिज्ञासा ॥ तेही प्रकाशे माझ्या प्रकाशा ॥ मी जिज्ञासु ऐसा तेणें जाणे ॥ ७६ ॥ *ब्रह्मप्रापक युक्तीचा ठसा ॥ त्या नांव शुद्ध जिज्ञासा ॥ वेदशास्त्रजाणीवत्रळसा ॥ लौकिकजिज्ञासा त्या नांव ॥ ७७ ॥ सर्वा-अर्थीं मीचि अर्थना ॥ शुद्ध अर्थाअर्थी या नांव जाणा ॥ ह्मणती अर्थार्थी या द्रव्यकामना ॥ तें मंद व्याख्यान प्राकृतीं ॥ ७८ ॥ दृष्टी पडे नानाअर्थीं ॥ जो विवंचोनि लावी परमार्थीं ॥ त्या नांव बोलिजे अर्थार्थी ॥ त्यातेंही निजभक्ती प्रकाशे माझी ॥ ७९ ॥ एवं आर्त जिज्ञासु अर्थार्थी ॥ यांतें प्रकाशी माझी सहजभक्ती ॥ तीतें भक्त चतुर्धा मानिती ॥ अधिकार-स्थिती विभागें ॥२८०॥ भक्त कल्पनेचिया भ्रांतीं ॥ माझी भक्ति चतुर्धा मानिती ॥ ते मिथ्या गा वदंती ॥ माझी निजभक्ती एकली ॥ ८१ ॥ ऐशिये निजभक्तीचीये प्राप्ती ॥ आत्मनिवेदनाचीये स्थिती ॥ उद्धवा म्यां तुजप्रती ॥ यथानिगुती निरूपिली ॥ ८२ ॥ माझिये निजभक्तीचें सार ॥ भक्त पावले जे साचार ॥ त्यांचे सर्वही व्यापार ॥ मदाकार होऊनि ठाकती ॥ ८३ ॥ तो जेउती वास पाहे ॥ ते दिशाचि मी होऊनि ठाये ॥ तो जेउतें चालती पायें ॥ ते धरा मी होयें धराधर ॥ ८४ ॥ तो करूं बैसल्या भोजन ॥ षड्स होय मी आपण ॥ त्यासि करावया प्राशन ॥ निजजीवन मी होयें ॥ ८५ ॥ त्यासी चालतां निजपदीं ॥ +बोधें दृश्याची निवारी मांदी ॥ शांति पायघड्या घाली आधीं ॥ करी पदोपदीं निंबलोण ॥ ८६ ॥ शमदम आज्ञाधारी ॥ हात जोडूनि उभे द्वारीं ॥ ऋद्धिसिद्धी दासी घरीं ॥ विवेक कामारी घरींचा सदा ॥८७॥ त्याचा बैसतां अवकाश ॥ अंगें मी होय हृषीकेश ॥ तो निजावया सावकाश ॥ समाधि मी त्यास आंथुरी ॥ ८८ ॥ तो जे कांहीं बोल बोले ॥ तें निःशब्द ब्रह्म शब्दा आलें ॥ यालागीं श्रोत्यांसि वहिलें ॥ होय भलें समाधान ॥ ८९ ॥ तो अवलीला बोले बोलीं ॥ शब्दासवें माझी गोठी उठी ॥ श्रोत्यासि तेथ पडे मिठी ॥ स्वभावें गोठी ऐकतां ॥ २९० ॥ चढतां परेची उपरी ॥ वैकुंठ कैलास पायरी ॥ उन्मनी घालोनि बाहेरी ॥ सुखशेजारीं तो ⁷पहुडे ॥ ९१ ॥ मिळोनियां मुक्ती चारी ॥ पाणी वाहती त्याच्या घरीं ॥ श्रीसहित राबें मी श्रीहरी ॥ येरांची थोरी कोण पुसे ॥ ९२ ॥ अवचटें ये त्याच्या मुखासी ॥ ह्मणे ज्यासी तूं उद्धरिलासी ॥ तो माथां वाहें मी हृषीकेशी ॥ शब्दें निजधामासी पाववीं वेगीं ॥ ९३ ॥ जे पावले माझी सहज-भक्ती ॥ त्यांचे लळे पाळीं मी या रीती ॥ त्यांची मज अनन्य प्रीती ॥ सांगों किती उद्धवा ॥ ९४ ॥ बहुतबोलीं काय कारण ॥ मी देहो तो आत्मा जाण ॥ तो माझा जीवप्राण ॥ हे जाणती खूण निजभक्त ॥ ९५ ॥ नांदतां सहजभक्ति आंत ॥ मी देवो तो माझा भक्त ॥ येरवीं मी सगळा त्या आंत ॥ तो समस्त मजमाजीं ॥ ९६ ॥ निजभक्त मजभीतरीं ॥ मी तया आंतबाहेरीं ॥ ऐसें सामरस्यें नांदों भारी ॥ वेगळें बाहेरीं नाममात्र ॥ ९७ ॥ माझिया सायुज्या जे आले ॥ ते मीचि होऊनियां ठेले ॥ परी मी होऊनि मज भजले ॥ ते भक्त मानिले म्यां ऐसे ॥ ९८ ॥ सायुज्यापरीस भक्ति गोड ॥ याचि निरूपणाचें कोड ॥ उद्धवा तुझी जाणोनि चाड ॥ विशद निवाड सांगीतला ॥ ९९ ॥ ऐशिया माझ्या निजभक्तांसी ॥ अवशेष अर्थ तुरेचि त्यांसी ॥ मी तुष्टलों गा हृषीकेशी ॥ निजभावासी सर्वस्वें ॥३००॥ भक्तिप्राधान्य

१ मागें. २ चारप्रकारची. ३ समूह. ४ चाकर.

*मो. ब्रह्मप्राप्त मुक्तीचा ठसा ना. ब्रह्मप्राप्तिक युक्तीचा ठसा. +ना. बोध मो. बोधा. ⁷मो. निजे.

भागवत शास्त्र ॥ तें निजभक्ती भक्तीचें सार ॥ तुज मी सांगीतलें साचार ॥ अत्यादरपूर्वक ॥१॥ उद्धवा तुझे *प्रीतीचेनि [1]व्याजें ॥ मज गुह्याचें निज गुह्य जें ॥ तें भक्तीचें करूनि खाजें । तुज म्यां वोजें दीधलें ॥ २ ॥ म्यां सांगीतलें जैशा रीतीं ॥ तैशी सेवावी माझी निजभक्ती ॥ ऐसें बोलत बोलतां श्रीपती ॥ उद्धव प्रीतीं उचलिला ॥ ३ ॥ मागां टाकूनि पीतांबरें ॥ सांडोनियां शंखचक्रें ॥ उद्धव उचलिला श्रीधरें ॥ तरी प्रेम न सरे देवाचें ॥ ४ ॥ हांव न बाणेचि दोंकरीं ॥ मग चारी भुजा पसरी ॥ उद्धवातें हृदयावरी ॥ प्रीती थोरी आलिंगी ॥ ५ ॥ हृदया हृदय एक जाहलें ॥ ये हृदयींचें ते हृदयीं घातिलें ॥ कृष्णें सर्वस्व आपुलें ॥ तें हृदयीं सूदलें उद्धवाचे ॥ ६ ॥ देव अवाप्तकाम निचाड ॥ त्यासीही भक्ताची ऐसी चाड ॥ अतिशयें उद्धव लागला गोड ॥ स्वानंदें कोड पुरवी त्याचें ॥ ७ ॥ उद्धवें[5]प्रेमाचा लवलाहो ॥ आलिंगन सोडूं ×विसरे देवो ॥ कृष्णहृदया हृदय जडल्या पहा हो ॥ उद्धवा उद्धवो विसरला ॥ ८ ॥ ऐसें स्वानंदीं वाडेंकोडें ॥ दोघे मिसळले निचाडचाडें ॥ भक्तिसुखाच्या सुरवाडें ॥ उद्धव गाढे मीनला ॥ ९ ॥ कृष्णें सर्वस्व आपुलें ॥ उद्धवाचे हृदयीं सूदलें ॥ हें उद्धवा कळों नाहीं दीधलें ॥ लाघव केलें गोविंदें ॥ ३१० ॥ हा अर्थ कळल्या उद्धवासी ॥ येईल मजसी ऐक्यासी ॥ पुढील कथा सुरस ऐसी ॥ मग कोणापाशीं सांगावी ॥ ११ ॥ उद्धवा मज वाडेंकोडें ॥ अखंड हेंचि बोलों आवडे ॥ परी तैसा श्रोता न जोडे ॥ हें थोर सांकडें मज असे ॥ १२ ॥ भक्तिसुखाचा सुरवाड ॥ सांगतां माझें पुरे कोड ॥ ऐसा श्रोता कैंचा गोड ॥ यालागीं उद्धवा आड प्रेम सुये ॥ १३ ॥ सूर्यापासूनि फांकती किरण ॥ तैसें सुटलें आलिंगन ॥ कृष्ण उद्धव जाहले भिन्न ॥ परी अभिन्नपण मोडेना ॥ १४ ॥ पुढील कथेची संगती ॥ दूर ठेली श्लोकसंमती ॥ श्रोतां विरुद्ध न घ्यावें चित्तीं ॥ मूळार्थ निश्चितीं विचारावा ॥ १५ ॥ मुळींचें पद संकोचित्त ॥ तेथ उत्तम भक्तीचा भावार्थ ॥ स्वयें बोलिला श्रीकृष्णनाथ ॥ तोचि म्यां अर्थ विस्तारिला ॥ १६ ॥ नारळांतल्या वस्त्राची घडी ॥ उकलितां थोर वाढे वाढी ॥ तेवीं मूळपदाची घडमोडी ॥ कथा एवढी विस्तारली ॥ १७ ॥ मूळपदाचा पदार्थ ॥ श्रोतां पहावा सावचित्त ॥ श्लोकउत्तरार्धीं भगवंत ॥ +ध्वनितें अर्थ बोलोनि गेला ॥ १८ ॥ त्याचि ध्वनिताचे पोटीं ॥ होती भक्तिसाररहस्यपेटी ॥ ते म्यां उघडूनि दाविली दिठीं ॥ वृथा चावटी ह्मणे ह्मणा ॥ १९ ॥ तंव श्रोते ह्मणती नवल येथ ॥ मुळींचें ॥पद होतें गुप्त ॥ तें काढिलें भक्तिसारामृत ॥ सुहृदयस्थ हरीचें ॥ ३२० ॥ तुझे श्रीकृष्णनाथ ॥ प्रकटोनि आपुलें हृद्गत ॥ ग्रंथीं असे बोलवित ॥ हें सुनिश्चित कळलें आह्मां ॥ २१ ॥ आह्मां ऐकतां भक्तिसारामृत ॥ चित्तीं चैतन्य उथळत ॥ होशी देखणा सुनिश्चित ॥ ग्रंथ यथार्थ ६आर्थिला ॥ २२ ॥ हें ऐकोनि संतांचें वचन ॥ हरिखेला एका जनार्दन ॥ मस्तकीं वंदिले श्रीचरण ॥ पुढील निरूपण अवधारा ॥ २३ ॥ निजभक्तीचें दृढकारण ॥ आदरें करिताहे श्रीकृष्ण ॥ सांगीतलें तेंचि निरूपण ॥ पुढती जाण सांगत ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ यदात्मन्यर्पितं चित्तं शांतं सत्वोपबृंहितम् ॥ धर्मं ज्ञानं सवैराग्यमैश्वर्यं चाभिपद्यते ॥ २५ ॥

---

१ निमित्तानें. २ पक्वान्न, खाऊ. ३ इच्छा न पुरे. ४ घातलें. ५ उद्धवाविषयीं प्रेमाचा भर. ६मोठेपणा.
*मो. भक्तीचेनि. ×मो. न विसरे. +ना. ध्वनितें हा अर्थ बोलिला निघे. ॥ना. पदीं.
६मो. अर्थविला.

॥ टीका ॥ आपुलें जें कां अंतःकरण ॥ तें करितां गा मदर्पण ॥ माझी निजभक्ति उल्हासे जाण ॥ जिचें निरूपण म्यां केलें ॥ २५ ॥ मदर्पी अर्पावया मन ॥ सुगम वर्म सांगेन जाण ॥ माझें करितां नामस्मरण ॥ पापनिर्दळण तेणें होय ॥ २६ ॥ सकाम स्मरतां नाम ॥ नाम पुरवी *सकामकाम ॥ निर्विकल्पें स्मरतां राम ॥ करी भस्म पापाचें ॥ २७ ॥ होतां पापाचें क्षाळण ॥ रज तम जिणोनि जाण ॥ सहजें वाढे सत्वगुण ॥ धर्मपरायण धार्मिक ॥ २८ ॥ स्वधर्मनिष्ठ सत्वगुणें ॥ अढळ पडे वैराग्याचें ठाणें ॥ वैराग्यें विषय निर्दळणें ॥ निजज्ञान तेणें प्रकाशे ॥ २९ ॥ वाढल्या सविवेक ज्ञान ॥ लागे स्वरूपाचें अनुसंधान ॥ चढे शांतीचें समाधान ॥ तें मदर्पण मन होय ॥ ३३० ॥ मन जाहल्या मदर्पण ॥ निजभक्ति उल्हासे जाण ॥ जिचें गत श्लोकीं निरूपण ॥ म्यां संपूर्ण सांगीतलें ॥ ३१ ॥ निजभक्ति पावल्या संपूर्ण ॥ भक्तें न मागतां जाण ॥ अष्ट महासिद्धी आपण ॥ त्याचें आंगण वोळंगती ॥ ३२ ॥ जो सिद्धींकडे कदा न पाहे ॥ त्यासि अवशेष कोण अर्थ राहे ॥ माझी संपूर्ण पदवी लाहे ॥ मदैक्य होये मद्भक्त ॥ ३३ ॥ ऐशी न जोडितां माझी भक्ती ॥ न लाभतां आत्मस्थिती ॥ वर्तणें जें विषयासक्तीं ॥ तें अनर्थप्राप्ती अनिवार ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ यदर्पितं तद्विकल्पे इंद्रियैः परिधावति ॥ रजस्वलं चासन्निष्ठं चित्तं विद्धि विपर्ययम् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ जो सत्य न मानी वेदशास्त्रार्थ ॥ साच न ह्मणे जो परमार्थ ॥ जो ×गृहदाराद्रव्यासक्त ॥ लोलंगत विषयासी ॥ ३५ ॥ तेणें अत्यंत समळमळें ॥ दारुण रजोगुण खवळे ॥ तेणें चित्त होय ज्ञानांधळें ॥ विपरीत ※कळे ज्ञानार्थ ॥ ३६ ॥ ज्यासि विषयांच्या युक्ति गहन ॥ त्यासि ह्मणती सज्ञान ॥ जो करी युक्तीचें छळण ॥ तो होय मान्य पंडितपणें ॥ ३७ ॥ ज्यासि प्रपंचाचा अतिविस्तार ॥ त्यास ह्मणती भाग्य थोर ॥ जो नानाभोगीं पाळी शरीर ॥ सुकृती नर तो ह्मणती ॥ ३८ ॥ जो अनुतापी परमार्थविखीं ॥ त्यासि ह्मणती परमदुःखी ॥ जो नानाविषयांतें पोखी ॥ त्यातें महासुखी मानिती ॥ ३९ ॥ ज्याचेनि बोलें मनुष्य मरे ॥ त्याचें सिद्धत्व मानिती खरें ॥ जो उदास राहाटे अनाचारें ॥ मुक्त निर्धारें तो ह्मणती ३४० ॥ ज्याचा दांभिक साचार ॥ त्यातें ह्मणती पवित्र नर ॥ जे स्त्रियादिशूद्रां देती मंत्र ॥ ते ज्ञाते थोर मानिती ॥ ४१ ॥ जो कां अनुतापी वैरागी ॥ त्यांतें ह्मणती अतिअभागी ॥ जो उघड विषयांतें भोगी ॥ तो राजयोगी मानिती ॥ ४२ ॥ स्वयें द्रव्याचा अभिलाखी ॥ द्रव्य वेंची त्यातें मूर्ख लेखीं ॥ न वेची 7त्यातें ह्मणती विवेकी ॥ धर्मज्ञ लोकीं हा एक ॥ ४३ ॥ ज्याचे गांठीं बहुसाल धन ॥ तो सर्वांसि ०अवश्य मान्य ॥ तोचि पवित्र तो सज्ञान ॥ ऐसें विपरीत ज्ञान होंलागे ॥ ४४ ॥ आपण सर्वात्मा सर्वेश ॥ हें विसरोनियां निःशेष ॥ +अधर्मी अकर्मी अनीशे ॥ मी अज्ञान पुरुष हें मानी ॥ ४५ ॥ तेथ कें उपजे माझी भक्ती ॥ कैसेनि होईल माझी प्राप्ती ॥ ऐसे भ्रमले नेणों किती ॥ संसार आवर्तीं वर्ततां ॥ ४६ ॥ *परमात्मप्राप्तीचे

१ पुण्यवान्. २ वैदिक मंत्रोपदेश. ३ असमर्थ.

*मो. सकळकाम. ×ना. द्रव्यदारा इहासक्त. ※ना. फळे. 7ना. त्यातें ह्मणती अतिअविवेकी. ०ना. अति. +ना. मी अधर्मी अकर्मी अनीश मो. अधर्मकर्मी अवश्य. *ना परमार्थप्राप्तीचे ह्मुणे.

कारणें ॥ अतिगुह्य चारी लक्षणें ॥ पोटांतील कृपागुणें ॥ उद्धवाकारणें हरि सांगे ॥ ४७ ॥ धर्माची *भजनभोय ॥ ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ॥ माझी प्राप्ति अवश्य होय ॥ ते चारी उपाय अवधारीं ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ धर्मो मद्भक्तिकृत्प्रोक्तो ज्ञानं चैकात्म्यदर्शनम् ॥ गुणेष्वसंगो वैराग्यमैश्वर्यं चाणिमादयः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ ऐक उद्धवा निजधर्म ॥ गुह्य सांगेन मी परम ॥ माझी भक्ति जे सप्रेम ॥ उत्तम धर्म तो जाण ॥ ४९ ॥ ऐके एकात्मता निजबोध ॥ परतोनि कदा नुपजे भेद ॥ या नांव गा ज्ञान शुद्ध ॥ कृष्ण परमानंद सांगत ॥ ३५० ॥ धनधान्य रत्नांच्या राशी ॥ उर्वशी आल्या शेजारासीं ॥ तें अवघें तृणप्राय ज्यासी ॥ वैराग्य त्यासी आम्ही ह्मणों ॥ ५१ ॥ ऐक उद्धवा सुबुद्धी ॥ माझ्या ज्या अष्ट महासिद्धी ॥ त्या मज वेगळ्या दूरी कधीं ॥ जाण त्रिशुद्धीं न ढळती कदा ॥ ५२ ॥ माझे निजभक्तींच्या निर्धारीं ॥ जो माझी पदवी घे ऐक्यें करीं ॥ माझ्या सिद्धी त्याच्या घरीं ॥ होती किंकरी निजदासी ॥ ५३ ॥ सिद्धी सेवा करिती ॥ हेंचि नवल सांगों किती ॥ श्रीयेसहित मी श्रीपती ॥ भक्तांची भक्ती सर्वस्वें करीं ॥५४॥ ऐश्वर्याचें मुख्य लक्षण ॥ अतिशयेंसी संपूर्ण ॥ भगवत्पदवी येणें आपण ॥ अतिसंपन्न ऐश्वर्य ॥ ५५ ॥ म्यां हे सांगीतली जे बोली ॥ ते निजगुह्यभांडाराची किल्ली ॥ येणें उघडूनि स्वानंदाची खोली ॥ भोगी आपुली सुखसिद्धी ॥ ५६ ॥ चहूं पदांचीं उत्तरें ॥ वाखाणिलीं अतिगंभीरें ॥ ऐकोनि उद्धव चमत्कारें ॥ अत्यादरें विस्मित ॥ ५७ ॥ धर्मादि चहूं पदांचा अर्थ ॥ अलौकिक सांगे कृष्णनाथ ॥ तरी यमादिकांचा[1] उत्तमार्थ ॥ देवासि प्रस्तुत पुसों पां ॥ ५८ ॥ गुह्यार्थ सांगेल श्रीकृष्ण ॥ यालागीं यमादिकांचे प्रश्न ॥ उद्धव पुसताहे आपण ॥ परमार्थ पूर्ण आकळावया ॥ ५९ ॥ पांच श्लोक पंचतीस[2] प्रश्न ॥ उद्धवें केले ज्ञानगहन ॥ ज्यांचें ऐकतां प्रतिवचन ॥ समाधान जीवशिवां ॥ ३६० ॥ पहिल्या श्लोकींचे सहा प्रश्न ॥ दुसऱ्यामाजीं नव जाण ॥ तिसरा चौथा आठ आठ पूर्ण ॥ चारी प्रश्न पंचमीं ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ यमः कतिविधः प्रोक्तो नियमो वारिकर्शन ॥ कः शमः को दमः कृष्ण का तितिक्षा धृतिः प्रभो ॥ २८ ॥

॥ टीका ॥ अहंरिपुनिर्दळणा श्रीपती ॥ यमनियमप्रकार किती ॥ शम दम कोण ह्मणिजेती ॥ तितिक्षा धृती ते कैशी ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ किं दानं किं तपः शौर्यं किं सत्यमृतमुच्यते ॥ कस्त्यागः किं धनं चेष्टं को यज्ञः का च दक्षिणा ॥ २९ ॥

॥ टीका ॥ ॥ कोण दान कोण तप येथ ॥ शौर्य कोण कैसें तें सत्य ॥ ऋत जेंकां ह्मणिजेत ॥ तेंही निश्चित सांगावें ॥ ६३ ॥ कोणता जी त्याग येथें ॥ इष्ट धन कोण पुरुषातें ॥ यज्ञ कशातें ह्मणिजे तें ॥ दक्षिणा तेथें ते कायी ॥ ६४ ॥

---

१ यम, नियम इत्यादिकांचा. २ पस्तीस.

*ना. भिजे भोय.

॥ श्लोक ॥ ॥ पुंसः किंस्विद्बलं श्रीमन् भगो लाभश्च केशव ॥ का विद्या न्हीः परा का श्रीः किं सुखं दुःखमेव च ॥ ३० ॥

॥ टीका ॥ ॥ पुरुषासि बळाची कोण शक्ती ॥ दया बोलिजे कोणे स्थितीं ॥ लाभ तो कोण गा श्रीपती ॥ सांग कृपामूर्ती केशवा ॥ ६५ ॥ विद्या काशातें ह्मणिजे तें ॥ लज्जा कोणे ठायीं वर्ते ॥ उत्कृष्ट लक्ष्मी कोण येथें ॥ तेही अनंतें सांगावी ॥ ६६ ॥ येथील कोण पां कैसें सुख ॥ मज सांगावें कृपापूर्वक ॥ सुखाचे सांगाती जें दुःख ॥ त्याचेंही रूप सांगावें ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ ॥ कः पंडितः कश्च मूर्खः कः पंथा उत्पथश्च कः ॥ कः स्वर्गो नरकः कः स्वित् को बंधुरुत किं गृहम् ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ ॥ पंडिताचें काय लक्षण ॥ मूर्ख ह्मणावया कोण गुण ॥ सुमार्ग ह्मणावा तो कोण ॥ सांगे निरूपण उन्मार्गाचें ॥६८ ॥ स्वर्ग काशातें बोलिजे ॥ नरक कैसा वोळखिजे ॥ सखा बंधु कोण ह्मणिजे ॥ गृह माझें तें कोण ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ क आढ्यः को दरिद्रो वा कृपणः कः क ईश्वरः ॥ एतान् प्रश्नान्मम ब्रूहि विपरीतांश्च सत्पते ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ ॥ आढ्य कायसेनि ह्मणिजे ॥ दरिद्री कैसेनि जाणिजे ॥ कृपण कोणातें बोलिजे ॥ ईश्वर वोळखिजे तो कैसा ॥ ३७० ॥ हे माझे प्रश्न जी समस्त ॥ यांचा सांगावा विशदार्थ ॥ *जो लौकिकीं होऊनि विपरीत ॥ तपयुक्त परमार्थी ॥७१॥ लौकिका होऊनि विपरीतार्थ ॥ त्यातें बोलती गा ※-विपरीत ॥ या अवघियांचा मथितार्थ ॥ परमार्थयुक्त प्रश्न सांगा ॥ ७२ ॥ ज्ञाते सज्ञान संतमूर्ती ॥ त्यांचा स्वामी तूं निश्चितीं ॥ यालागीं तूतें गा सत्पती ॥ सज्ञान ह्मणती +शास्त्रार्थें ॥ ७३ ॥ माझ्या प्रश्नांची प्रश्नोक्ती ॥ परमार्थप्राप्तीलागीं श्रीपती ॥ मज सांगावें यथार्थस्थिती ॥ देवासि विनंती उद्धवें केली ॥ ७४ ॥ ऐकोनि भक्तांची विनवण ॥ कृपां द्रवला नारायण ॥ परमार्थरूप त्याचे प्रश्न ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगेल ॥ ७५ ॥ प्रथम तीं श्लोकीं यमनियम ॥ विशद सांगे पुरुषोत्तम ॥ इतर प्रश्न अतिउत्तम ॥ सांगे मेघश्याम अध्यायांत ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ अहिंसा सत्यमस्तेयमसंगो न्हीरसंचयः ॥ आस्तिक्यं ब्रह्मचर्यं च मौनं स्थैर्यं क्षमाऽभयम् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ ॥ प्रथमश्लोकींचा उभारा ॥ यमांचीं लक्षणें बारा ॥ पुशिल्या प्रश्नानुसारा ॥ प्रतिउत्तरा हरि बोले ॥ ७७ ॥ पुढां प्रश्न आहेत फार ॥ यालागीं यमनियमांचें उत्तर ॥ आवरूनि संक्षेपाकार ॥ स्वयें श्रीधर सांगत ॥ ७८ ॥ अहिंसा [1]कायावाचामनें ॥ परपीडा त्याग करणें ॥ सत्य तें यथार्थ बोलणें ॥ अचौर्य लक्षणें तें ऐक ॥ ७९ ॥ हातें चोरी नाहीं करणें ॥ परी ×परद्रव्याकारणें ॥ मनें अभिलाष नाहीं धरणें ॥ अस्तेयलक्षण या नांव ॥३८०॥ असतां

---

१ वाईट मार्गाचें. २ असेल तसें. ३ अचौर्याचें लक्षण.

*ना. त्यातें लौकिकीं बोलिजे विपरीतार्थ, उपदेशयुक्त परमार्थी. ※मो. वित्त. +मो. शास्त्रें. ×मो. द्रव्याकारणें.

देहगेहसंगती ॥ ज्याचे पोटीं नाहीं आसक्ती ॥ जेवीं यात्रेमाजीं लोक येती ॥ परी संगासक्ती त्या नाहीं ॥ ८१ ॥ स्फटिक ठेविजे ज्या रंगावरी ॥ त्यासारिखा दिसे बाहेरी ॥ आपण निर्विकार अंतरीं ॥ तेवीं जो शरीरीं *असंगता ते॥८२॥ नित्यकर्माकारणें ॥ पोटांतूनि कंटाळणें ॥ लौकिकीं नित्यकर्मा लाजणें ॥ ऱ्ही ह्मणणें या नांव ॥८३॥ इहलोकीं संग्रहो करूं नेणे ॥ जाणे दैवाधीन देहाचें जिणें ॥ सर्व सुखभोगाकारणें ॥ नाहीं संग्रहणें पुण्यातें ॥ ८४ ॥ पुण्यें स्वर्गभोगप्राप्ती ॥ पुण्यक्षयें होय पुनरावृत्ती ॥ जेणें क्षयो पावे पुण्यसंपत्ती ॥ ते न संचिती मद्भक्त ॥ ८५ ॥ या नांव गा असंचयो ॥ ऐक आस्तिक्याचा निर्वाहो ॥ सर्वत्र माझा ब्रह्मभावो ॥ कोठेंही अभावो घेवों नेणे ॥ ८६ ॥ ब्रह्मचर्य ऐसें येथ ॥ जैसें आश्रमप्रयुक्त ॥ बोलिलें शास्त्रीं यथोचित ॥ तें निश्चित करावें ॥ ८७ ॥ मौनी न बोलावें इतुकें जाण ॥ मिथ्यालापनीं असंभाषण ॥ नित्य करावें वेदपठण ॥ गायत्रीस्मरण कां हरिनाम ॥ ८८ ॥ स्थिर वृत्ति आत्मारामीं ॥ कां असावी निजस्वधर्मीं ॥ भावार्थें संतसमागमीं ॥ स्थिरता उपक्रमीं या नांव ॥ ८९ ॥ स्वदेह दंडिलें कां वंदिलें ॥ परी क्षमा सम दोहींकाळें ॥ देहाचा भोग तो दैवेंमेळें ॥ येणें विवेकमेळें क्षमावंत ॥ ३९० ॥ या नांव क्षमा ह्मणिजे ॥ अभय तें ऐसें जाणिजे ॥ 'जें जें पारिखें देखिजे ॥ तें तें होइजे आपणची' ॥ ९१ ॥ आत्मा एक पंच भूतें एक ॥ दुजें पाहतां नाहीं देख ॥ निमालें भयाचें महादुःख ॥ अभय निःशेख या नांव ॥९२॥ निमाल्या दुजयाच्या गोठी ॥ वोखदासि भय नमिळे सृष्टीं ॥ अभयाची स्वानंदपुष्टी ॥ निजदृष्टीं ठसावे ॥ ९३ ॥ या नांव गा बाराही यम ॥ उद्धवा सांगीतले सवर्म ॥ आतां जयाचें नाम नेम ॥ तेंही सुगम अवधारीं ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ शौचं, जपस्तपो, होमः, श्रद्धातिथ्यं, मदर्चनम् ॥ तीर्थाटनं, परार्थेहा, तुष्टिराचार्यसेवनम् ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ ॥ शौचाची ऐक ऐशी परी ॥ अंतरीं शुचि विवेकें करी ॥ बाह्य तें वेदाज्ञेवरी ॥ शौच करी मृज्जळें[4] ॥ ९५ ॥ परिसें जपाचा विचार ॥ ज्यासी जैसा अधिकार ॥ तैसा जपावा नाममंत्र ॥ कां स्वतंत्र गुरुनाम ॥ ९६ ॥ ब्राह्मणाचा मंत्र 'वेदोच्चार' ॥ संन्यासी जपे 'ओंकार' ॥ द्विजन्म्यासि 'आगममंत्र' ॥ नाम सर्वत्र सर्वांसीं ॥ ९७ ॥ तपाचा जो मुख्य प्रकार ॥ जेणें शुद्ध होय अभ्यंतर ॥ ते स्वधर्मीं गा सादर ॥ अत्यादर करावा ॥ ९८ ॥ शरीरशोषणा नांव तप ॥ हा मूर्खांचा खटाटोप ॥ 'हृदयीं श्रीहरिचिंतनें सद्रूप' ॥ परम तप त्या नांव ॥९९॥ ऐक होमाचा विचार ॥ देवाचें मुख वैश्वानर ॥ 'पंचमहायज्ञ अग्निहोत्र' ॥ होम साचार या नांव ॥४००॥'माझ्या भजनाची अति आवडी ॥ कां [2]धर्माची अधिक गोडी' ॥ या नांव श्रद्धा रोकडी ॥ जाण धडफुडी उद्धवा ॥१॥ नसतांही अन्न धन ॥ आतिथ्यें दे [3]समाधानें ॥ मस्तकीं वंदूनियां दिनें ॥ निववी वचनें सुखरूपें ॥ २ ॥ दीन देखोनि तत्त्वतां ॥ अतिनम्र विनीतता ॥ यथाशक्ति अर्पणें अर्था॥आतिथ्य तत्त्वतां या नांव॥३॥पोटींच्या कळवळेंनि वोजा॥अत्यादरें गरुडध्वजा॥ सांग साजिरी करणें पूजा ॥ श्रद्धा समाजा संभारीं॥४॥मेळवूनि ब्राह्मणभार॥श्रद्धायुक्त षोड-

---

१ पुनः जन्म. २ प्रारब्धानें. ३ भिन्न. ४ मातीनें व पाण्यानें. ५ द्रव्य.

*ना. असंगातें. [2]ना. स्वधर्माची.[3]ना. आतिथ्या दे समाधान ॥ मस्तकीं वंदूनिया दीन ॥

शोपचार ॥ पूजितां संतोषें मी श्रीधर ॥ पूजा पवित्र ब्राह्मणाची ॥ ५ ॥ शुद्ध व्हावया अंतःकरण ॥ करावें गा तीर्थीं गमन ॥ तीर्थयात्रीं श्रद्धा गहन ॥ तीर्थाटन या नांव ॥६॥ पदोपदीं माझें नाम ॥ गर्जतां स्मरती माझें कर्म ॥ यात्रा करणें निजनिष्काम ॥ तीर्थयात्रा उत्तम या नांव ॥ ७ ॥ परोपकारार्थ पर्वत ॥ जेवीं कां सामग्री वाहत ॥ तेवीं क्रियामात्रें उपकारार्थ ॥ सदा व्रत उपकारीं ॥ ८ ॥ जेवीं कां चंद्राचे किरण ॥ लागतांचि निववितीं जाण ॥ तेवीं जयाचें आचरण ॥ उपकारें जन सुखी करी ॥ ९ ॥ जें प्राप्त जाहलें अदृष्टीं ॥ तेणें काळ यथासुखें लोटी ॥ कदा समसम नाहीं पोटीं ॥ यथालाभसंतुष्टी या नांव ॥ ४१० ॥ काया वाचा मनें धनें ॥ जो विनटला गुरुकारणें ॥ त्याचें उठी संसारधरणें ॥ गुरुसेवा ह्मणणें या नांव ॥ ११ ॥ उभयशौचांचे दोनी गुण ॥ जपादि येर दशलक्षण ॥ हे बारा नेम जाण ॥ देवो आपण बोलिला ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ एते यमाः सनियमा उभयोर्द्वादश स्मृताः ॥ पुंसामुपासितास्तात यथाकामं दुहंति हि ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ दोहीं श्लोकीं यमनियम ॥ निरूपिले उत्तमोत्तम ॥ बारा बारा यांचें वर्म ॥ गुह्य परम शास्त्रार्थ ॥ १३ ॥ पुरुष याचें उपासन ॥ जरी करी *सकाममन ॥ तें कामधेनूच्या ऐसे जाण ॥ करिती पूर्ण ×सकळ काम ॥ १४ ॥ हेचि पैं गा यमनेम ॥ पुरुष उपासी निष्काम ॥ तयासि माझें निजधाम ॥ अतिसुगम निजप्राप्ती ॥ १५ ॥ आतां शमदमादिक तुझे प्रश्न ॥ जेणें हातां पावे ब्रह्मज्ञान ॥ तें सांगेन गुह्य निरूपण ॥ सावधान उद्धवा ॥१६॥ प्रश्नोत्तर सांगेल श्रीकृष्ण ॥ तें अवधारितां सावधान ॥ तत्काळ होय ब्रह्मज्ञान ॥ हें परम प्रमाण अतिगुह्य ॥ १७ ॥ तृप्त व्हावया बाळकासी ॥ निजकरें माता ग्रास दे त्यासी ॥ तेवीं श्रीकृष्ण उद्धवासी ॥ ब्रह्मरसासि देतसे ॥ १८ ॥ जो रस गोड लागे पित्यासी ॥ तो बळेंचि पाजी बाळकासी ॥ तेवीं श्रीकृष्ण उद्धवासी ॥ ब्रह्मज्ञानासी देतसे ॥ १९ ॥ आधींच तानयाचें प्रेम मोठें ॥ वरी लागतां त्याचें मुखवेंटें ॥ मग स्वानंदाचेनि नेटें ॥ पान्हा लोटे अनिवार ॥ ४२० ॥ तेवीं स्वयें श्रीकृष्ण ॥ दाटूनि देतसे ब्रह्मज्ञान ॥ तेथें उद्धवें पुशिले प्रश्न ॥ तेणें अधिक जाण तुटला ॥ २१ ॥ आधींच पर्जन्य खरा ॥ वरी मीनला 7सवीज वारा ॥ मग अनिवार वर्षे धारा ॥ खाणोनि धरा वाहतसे ॥ २२ ॥ तेवीं यावया ब्रह्मज्ञान ॥ मिष उद्धवाचे प्रश्न ॥ स्वानंदें तुटला श्रीकृष्ण ॥ ब्रह्म पूर्ण देतसे ॥ २३ ॥ निमोल देतां मिठाचे खडे ॥ चिंतामणी हातीं चढे ॥ कां विटेसाठीं परीस जोडे ॥ न घे तो नाडे निजस्वार्थी ॥२४॥ तेवीं उद्धवाचे थोडे प्रश्न ॥ तेणें आतुडे ब्रह्म पूर्ण ॥ एका विनवी जनार्दन ॥ श्रोतां अवधान मज द्यावें ॥ २५ ॥ उद्धवाचे चौतीस प्रश्न ॥ त्यांत यम नियम जाहले जाण ॥ उरले बत्तीस 5गुण ॥ तेंही विवेचन अवधारा ॥ २६ ॥ प्रश्नीं दयेचें प्रति उत्तर ॥ न सांगेचि सारंगधर ॥ ते अर्थीं भावगर्भ सार ॥ षड्गुणैश्वर्य सांगीतलें ॥२७॥ एहीविखींचें आख्यान ॥ पुढें सांगेल श्रीकृष्ण ॥ दयेच्याठायीं भाग्य पूर्ण ॥ कोण कारण सांगावया ॥ २८ ॥ एवं उरले एकतीस प्रश्न ॥ अधिक एक सांगेल श्रीकृष्ण ॥ 6कर्मस्वसंगम

१ रंगला. २ इच्छा धरून. ३ वैकुंठ. ४ प्रश्नाचें उत्तर. ५ तोंड. ६ विचार.

* मो. सकामना. × ना. सकामकाम. 7 मो. मीनलासे जेवीं वारा. 5 मो. संपूर्ण. 6 ना. कर्मस्वसंग.

शौच जाण ॥ कार्याकारण संबंध ॥२९॥ ऐसे हे तेहतीस *गुण ॥व्याख्यान सांगेल श्रीकृष्ण॥ तें करतळीं ब्रह्मज्ञान ॥ उद्धवासि जाण देतसे ॥ ४३० ॥

॥ श्लोक ॥ शमो मन्निष्ठता बुद्धेर्दम इंद्रियसंयमः ॥ तितिक्षा दुःखसंमर्षो जि-

ह्वोपस्थजयो धृतिः ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ बुद्धी जे कां विवेकवंती ॥ ×असार सांडूनि सार धरिती ॥ तिणें मनाच्या सकळ वृत्ती ॥ विवेकस्थिती आवरोनी ॥ ३१ ॥ त्या वृत्तीसमवेत आपण ॥ बुद्धि परमात्मीं मिळे जाण ॥ जेवीं सागरासी लवण ॥ दे आलिंगन भावार्थें ॥ ३२ ॥ समुद्रीं मिळतां लवण ॥ समुद्रचि होय आपण ॥ तेवीं आत्मनिश्चयें बुद्धि पूर्ण ॥ चैतन्यघन स्वयें होय ॥ ३३ ॥ ऐसा बुद्धीचा उपरम ॥ त्यातें म्हणिजे गा शम ॥ यापूर्वीं करावया दम ॥ तोही अनुक्रम अवधारीं ॥ ३४ ॥ शत्रूचें जें दुर्दमन ॥ तो दम् येथें नव्हे जाण ॥ करावें इंद्रियदमन ॥ तेंही लक्षण अवधारीं ॥ ३५ ॥ जेणें सहाय होती शमासी ॥ त्या युक्ती राखणें इंद्रियांसी ॥ विधीवेगळें नेदी भोगासी ॥ आवरी अहर्निशीं अनुसंधानें ॥ ३६ ॥ ऐसें इंद्रियांचें निग्रहण ॥ त्या नांव गा दमगुण ॥ आतां तितिक्षेचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण सांगेन ॥ ३७ ॥ महासुख आलें होये ॥ तें जेणें उल्हासें अंगीं वाहे ॥ तेणेंचि उल्हासें पाहे ॥ दुःखही साहे निजांगीं ॥ ३८ ॥ तेज आणि महाआंधारी ॥ नभ समत्वें +अंगीं धरी ॥ परी नभ नव्हे विकारी ॥ तेवीं जो अवि-कारी सुखदुःखसाहता ॥ ३९ ॥ गोफणेचा [१]सुवर्णपाषाण ॥ लागे तो दुःखी होय पूर्ण ॥ तोचि वोळखिलिया सुवर्ण ॥ दुःख जाऊनि सुख वाटे ॥ ४४० ॥ तैसें द्वंद्वांचें निजस्वरूप ॥ वोळ-खिलिया निजसद्रूप ॥ तेव्हां द्वंद्व होती चिद्रूप ॥ हें मुख्य स्वरूप तितिक्षेचें ॥४१॥ सांडूनियां देहअहंते ॥ सुखदुःखांही परतें ॥ देखणें जें आपणातें ॥ तेंचि येथें तितिक्षा ॥ ४२ ॥ स्वप्नींचें दरिद्र आणि सधनता ॥ जागृतीसि दोन्ही मिथ्या ॥ तेवीं सुखदुःखा परता ॥ देखणें तत्त्वतां ते तितिक्षा ॥ ४३ ॥ जिव्हा आणि दुसरें शिश्न ॥ यांचा जयो करावा आपण ॥ या नांव धृति संपूर्ण ॥ विद्याधारण धृती नव्हे ॥४४॥ जेवीं कृष्णसर्प धरिजे हातीं ॥ हे दोनी धरिजे तैशिया रीतीं ॥ [२]अळूमाळ ढिलावतां धृती ॥ परतोनि खाती धरित्यासी ॥ ४५ ॥ ज्यासि द्रव्यदारा-सक्ती ॥ तेथ कदा न रिगे हे धृती ॥ द्रव्यदाराअनासक्ती ॥ त्याचे घरीं धृती पोषणी सदा ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ दंडन्यासः परं दानं कामत्यागस्तपः स्मृतम् ॥ स्वभावविजयः

शौर्यं सत्यं च समदर्शनम् ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ सर्वभूतांसि नेदावें दुःख ॥ ४त्याचे पोटीं आलें द्यावें सुख ॥ महादान तें हेंचि देख ॥ द्यावें सुख सर्वांसी ॥ ४७ ॥ दुःख निरसूनि भूतांसी ॥ सुख *देणें सर्वांसी ॥ हेंचि उ-त्तम दान पृथ्वीसी ॥ ३अनायासीं तुकेना ॥ ४८ ॥ जन्ममरणांचें दुःख ॥ निरसूनि द्यावें नि-जसुख ॥ याचि नांवें दान देख ॥ अलोलिक उद्धवा ॥ ४९ ॥ या नांव गा परम दान ॥ उद्धवा

---

१ शास्त्रांत ग्राह्य सांगितल्यावांचून. २ सोन्याचा गोळा.

*मो. प्रश्न. ×मो. आशा सांडूनी. +मो. अंगीकारी. ४मो. याचक आलेयां द्यावें सुख. *मो. द्यावें. ३ना. आन यासी.

निश्चयेंसी जाण ॥ ऐक तपाचें लक्षण ॥ तुज मी संपूर्ण सांगेन ॥ ४५० ॥ करूनियां कामाचा त्याग ॥ तप करणें अतिचांग ॥ हृदयीं असतां [1]कामदाव ॥ तपाचें लिंग शोभेना ॥ ५१ ॥ सकाम वना जाय तपासी ॥ तो वनींही चिंती वनितेसी ॥ तें तपचि बाधक होय त्यासी ॥ काम अंगेसीं वर्ततां ॥ ५२ ॥ त्यागोनि कामाची कामस्थिती ॥ तें तपाची उत्तम गती ॥ अखंड लागे माझी स्मृती ॥ शुद्ध तपप्राप्ती या नांव ॥ ५३ ॥ माझ्याठायीं अनुताप ॥ त्या नांव गा शुद्ध तप ॥ कां हृदयीं चिंतणें चित्स्वरूप ॥ हें परम तप तपांमाजीं ॥ ५४ ॥ ऐक शौर्याचा विचार ॥ रणीं मर्दूनि अरिवीर ॥ जिंतिला शत्रूंचा संभार ॥ तो शूर मानेना ॥ ५५ ॥ प्रवाहरूपें अनिवार ॥ येथें लागले जे जीवभाव थोर ॥ त्यातें जिंके जो महावीर ॥ तो परमशूर बोलिजे ॥ ५६ ॥ माझा साचार निर्वाहो ॥ मी सज्ञान निःसंदेहो ॥ माझा पवित्र ब्राह्मणदेहो ॥ हा जीवभावो जीवाचा ॥ ५७ ॥ देहाचे माथां वर्णाश्रम ॥ आश्रमाचे माथां कर्म ॥ तो कर्माभिमान ज्यां परम ॥ त्यांसि देहभ्रम अनिवार ॥ ५८ ॥ जिणोनि जीवाचे स्वभाव ॥ चिदानंदाची राणीव ॥ भोगी स्वराज्यवैभव ॥ हें परम गौरव शौर्याचें ॥ ५९ ॥ ज्या नांव बोलिजे निजसत्य ॥ तें मी सांगेन निश्चित ॥ सम ब्रह्म देखणें संतत ॥ तें परमसत्य उद्धवा ॥ ४६० ॥ वस्तु न देखतां सर्व सम ॥ जें जें देखणें गा विषम ॥ तेंचि असत्य अतिदुर्गम ॥ सत्यत्वें तें ब्रह्म समसाम्य ॥ ६१ ॥ केवळ जें सत्यभाषण ॥ तें निजसत्य नव्हे जाण ॥ तेचिविखींचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ ऋतं च सूनृता वाणी कविभिः परिकीर्तिता ॥ कर्मस्वसंगमः शौचं त्यागः संन्यास उच्यते ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ इतरकवींची वदंती ॥ ऋत या नांव सत्य ह्मणती ॥ हें सत्य मानावें प्रवृत्तीं ॥ 'सम ब्रह्म' *निवृत्तीमाजीं सत्य ॥ ६३ ॥ ऋत ह्मणिजे तें ऐसें येथ ॥ सत्य [2]वाचा आणि श्रोत्यांचें हित ॥ तेंही ×दुःखसंबंधरहित ॥ 8ऋत यानांव बोलिजे ॥६४॥ +चित्र पाहतां दिसे विषम ॥ त्यामाजीं ꣸भिंती सदा सम ॥ तेवीं जग 2पाहतां विषम ॥ ब्रह्म सम निजबोधें ॥ ६५ ॥ या नांव गा सत्य जाण ॥ उद्धवें केला नाहीं जो प्रश्न ॥ त्या [4]शौचाचें निरूपण ॥ देवो आपण सांगत ॥ ६६ ॥ नव्हतां शुद्ध अंतःकरण ॥ त्याग संन्यास न घडे जाण ॥ अंतरशुद्ध्यर्थ शौच पूर्ण ॥ स्वधर्माचरण हरी सांगे ॥ ६७ ॥ अंतरीं कर्ममळाचें बंधन ॥ त्याचें 7स्वधर्में करावें क्षालन ॥ कर्मे कर्माचें निर्दळण ॥ करूनि आपण निष्कर्म व्हावें ॥ ६८ ॥ ते स्वधर्मी फळाशा सुटतां ॥ कर्मबंधनें तुटती सर्वथा ॥ यालागीं फळनिराशता ॥ अंतरशौचता अतिशीघ्र ॥ ६९ ॥ 'नैराश्यें स्वधर्माचरण ॥ तेणें अंतरमळाचें क्षालन ॥ या नांव गा शौच जाण ॥ शौचें पूर्ण नैराश्य' ॥ ४७० ॥ ऐसें शौच शुद्ध अंतःकरणीं ॥ ते भूमिका संन्यासग्रहणीं ॥ यालागीं शौच अप्रश्नीं॥सारंगपाणी बोलिला ॥७१॥सकळ संकल्पांचा त्याग ॥ हाचि

---

१ कामरूप अग्नि अरण्य. २ स्त्रीस. ३ वाणी. ४ पवित्रता.

*मो. प्रवृत्तीमाजी. ×ना. सुखदुःखबंधरहित. 8ना. ऋत निश्चित या नांवें. +ना. चित्रीं. ꣸मो. असे भिंती सम. 2ना. देखतां. 7ना. स्वधर्मकर्मे.

पैं संन्यास सांग ॥ ऐसें बोलिला तो श्रीरंग ॥ त्याग तो चांग या नांव ॥७२॥ मी देह हे दृढता जीवीं ॥ संकल्पें तगमग नित्य नवी॥बाह्य दंड कमंडलु भगवीं॥हें संन्यासपदवी लौकिक७३

॥ श्लोक ॥ धर्म इष्टं धनं नृणां यज्ञोऽहं भगवत्तमः ॥ दक्षिणा ज्ञानसंदेशः प्राणायामः परं बलम् ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ धन, धान्य, पशु, रत्न, ॥ हें प्राण्यासि नव्हे इष्टधन ॥ मोक्षमार्गीं सबळ जाण ॥ इष्टधन तो धर्म ॥७४॥ घरीं जें पुरिलें धन॥तें घरींच राहे जाण॥धर्म तो *सवें चालतें धन॥ अंगा बंधन येवों नेदी ॥७५॥ धर्मिष्ठायेवढा कृपण ॥ न देखें लो आणिक जाण ॥ मरतांही स्त्रीपुत्रां वंचून ॥ ×अवघेंचि धन स्वयें ने ॥ ७६ ॥ धार्मिकीं धर्मार्थ वेंचूनि धन ॥ मी भांडारी केलों नारायण ॥ जे समयीं जें लागे जाण ॥ तें मी आपण स्वयें पुरवीं ॥ ७७ ॥ यालागीं धर्म तो इष्टधन ॥ हें सत्यसत्य माझें वचन ॥ ऐक यज्ञाचें व्याख्यान ॥ यथार्थ जाण सांगेन ॥ ७८ ॥ अग्नी तो माझें मुख जाण ॥ यज्ञभोक्ता मी नारायण ॥ अवघा यज्ञचि मी श्रीकृष्ण॥ परम प्रमाण वेदोक्त ॥ ७९ ॥ तेथं माझें स्वरूप ब्राह्मण ॥ मद्दीक्षादीक्षित जाण ॥ मद्भावें करूनि यजन ॥ माझें सुख संपन्न पावले ॥ ४८० ॥ तेथ अधर्मद्रव्याचेनि कोडें ॥ अविधीं दांभिक याग घडे ॥ तोही मज मुखींच पडे ॥ परी ते कोरडे +खडखडित ॥ ८१ ॥ अविधीं जाहले पशुघातकी ॥ तेणें अवदानें मी नव्हें सुखी ॥ दंभें पडले कुंभपाकीं[१] ॥ महानरकीं रौरवीं ॥ ८२ ॥ सर्व भूतांच्या भूतमुखीं ॥ अर्पें तें पावे यज्ञपुरुखीं ॥ हे दीक्षा नेणोनि याज्ञिकीं ॥ जाहले नरकी हिंसादोषें ॥ ८३ ॥ जो मद्भावें दीक्षित जाण ॥ विश्वतोमुखीं ज्याचें यजन ॥ तयाचा यज्ञ तो मी नारायण ॥ दक्षिणा कोण ते ऐक ॥ ८४ ॥ यज्ञासि मोल नाहीं देख ॥ त्यासि ज्ञानदक्षिणा अमोलिक ॥ हातां येतांचि याज्ञिक ॥ महासुख पावले ॥ ८५ ॥ दक्षिणा आल्या ज्ञानघन ॥ याज्ञिक होती अतिसंपन्न ॥ कल्पांतीं वेंचेनां[२] तें धन ॥ निजीं समाधान जीवशिवां ॥ ८६ ॥ सर्वांमाजीं प्राण सबळ ॥ प्राणबळें बळी सकळ ॥ प्राणयोगें मन चपळ ॥ अतिचंचळ प्राणस्पंदें ॥ ८७ ॥ यापरी बळिष्ठ प्राण ॥ प्राणाअधीन सदा मन ॥ तो प्राण जिंकावा आपण ॥ बळवंतपण या नांव ॥ ८८ ॥ गज[३] उपडिजे पायीं धरून ॥ घायीं चूर कीजे पंचानन[४] ॥ प्राण न जिंकतां जाण ॥ शूरांचें प्रमाण नव्हे बळा ॥ ८९ ॥ प्राणाअधीन जीव मन ॥ त्या प्राणाचें करूनि दमन ॥ तो स्वयें कीजे गा स्वाधीन ॥ अतिबळ जाण नांव ॥ ४९० ॥ दृढ प्राणायाम साधिल्या पाठीं ॥ थोरला देवो धांवे भेटी ॥ भेटलिया न सुटे मिठी ॥ ऐसा बळी सृष्टीं प्राणायामी ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ भगो म ऐश्वरो भावो लाभो मद्भक्तिरुत्तमः ॥ विद्यात्मनि भिदाबाधो जुगुप्सा ह्रीरकर्मसु ॥ ४० ॥

॥ टीका ॥ ॥ उद्धवें पुशिला दयेचा प्रश्न ॥ तें न सांगोनियां श्रीकृष्ण ॥ परमभाग्याचें निरू-

---

१ या नांवाच्या नरकांत. २ सरेना. ३ हत्ती. ४ सिंह.

*ना. स्वयें. ×मो. धनसेवन अवघेंचि ना. अवघेंचि धन सवेंने. +मो. खडे खडखडीत.

पण ॥ स्वयें आपण सांगत ॥ ९२ ॥ केवळ भाग्येंवीण ॥ दया तितुकी वांझ जाण ॥ यालागीं भाग्यनिरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ९३ ॥ ह्मणसी कृपणाचें धनभाग्य ॥ तो असतेंनि धनें अभाग्य ॥ परमभाग्य त्याचें चांग ॥ जो दयेतें सांग प्रतिपाळी ॥ ९४ ॥ त्या परमभाग्याचें लक्षण ॥ तुज मी सांगेन संपूर्ण ॥ ऐक तेथिची उण खूण ॥ उदारपण भाग्याचें ॥९५॥ ज्ञान आणि वैराग्य पूर्ण ॥ लक्ष्मी आणि औदार्यगुण ॥ ऐश्वर्य आणि यश गहन ॥ हे षड्गुण जाण महाभाग्य ॥ ९६ ॥ हे षड्गुण माझें भाग्य ॥ भाग्यें पावे जो सभाग्य ॥ तोचि दयेतें पाळी सांग ॥ अतिअव्यंग पूर्णत्वें ॥ ९७ ॥ जो षड्गुणेंशीं संपन्न ॥ तोचि दीनदयाळू जाण ॥ *देवों जाणे दान सन्मान ॥ दरिद्र विच्छिन्न करूं शके ॥ ९८ ॥ ऐशिया सभाग्याची भेटी ॥ होय तें भाग्य पाहिजे ललाटीं ॥ माझ्या भाग्यासम सृष्टीं ॥ आणिक दृष्टीं दिसेना ॥ ९९ ॥ ऐसेनि ऐश्वर्यें संपन्न ॥ तें दयेचें माहेर जाण ॥ तिसी सोहळे ※करिती आपण ॥ दयासंपन्न त्याचेनी ॥ ५०० ॥ यालागीं दयेचे पोटीं ॥ म्यां सांगीतली भाग्याची गोठी ॥ भूतदया जयाच्या पोटीं ॥ तो अभाग्य सृष्टीं कदा नोहे ॥ १ ॥ तुवां पुशिला लाभ तो कोण ॥ ऐक त्याचेंही लक्षण ॥ माझी उत्तम भक्ति जाण ॥ लाभ संपूर्ण त्या नांव ॥ २ ॥ माझी करितां उत्तमभक्ती ॥ चारी मुक्ती पायां लागती ॥ सुरवर लोटांगणीं येती ॥ लाभ श्रीपती मी लाभें ॥३॥ हा लाभ नयेतां हातीं ॥ धनादिकांची जे प्राप्ती ॥ तो +नाडु जाण निश्चितीं ॥ नरकगतिदायक ॥४॥ यालागीं परमलाभ माझी भक्ती ॥ तेणें मी लाभें श्रीपती ॥ ऐक विद्येची व्युत्पत्ती ॥ यथानिगुतीं सांगेन ॥ ५ ॥ 'दृढवासनेचिया संबंधा ॥ शुद्धांस आणी जीवपदा ॥ अभेदीं उपजवी भेदा ॥ अविद्याबाधा या नांव ॥ ६ ॥ देहाचे माथां वर्णाश्रम ॥ आश्रमांचे माथां कर्म ॥ कर्माचा अभिमान परम ॥ तो ×जीवभ्रम देहबुद्धी ॥७॥ ते छेदोनि जीवाची बाधा॥ तो मेळविजे ०चिदानंदा ॥ ती नांव शुद्ध आत्मविद्या ॥ येर ते अविद्या सर्वही ॥ ८ ॥ जे निरसी गा अविद्या ॥ ते बोलिजे शुद्ध विद्या ॥ येरी शास्त्रादि चौदा विद्या ॥ ते जाण अविद्या 7पाल्हेटेली ॥९॥ जे निरसी जीवाची बाधा ॥ ते बोलिजे शुद्ध आत्मविद्या ॥ ऐक ऱ्हीच्या संबंधा ॥ लाजावें सदा निंद्यकर्मीं ॥ ५१० ॥ केवळ अवयव झांकणें ॥ ते लज्जा येथ कोण ह्मणे ॥ गेलियाही जीवें प्राणें ॥ *अकर्म न करणें ते लज्जा ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीर्गुणा नैरपेक्ष्याद्याः सुखं दुःखसुखात्ययः ॥ दुःखं कामसुखापेक्षा पंडितो बंधमोक्षवित् ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ ॥ सकळसाम्राज्यवैभवेंसीं ॥ चतुर्दशभुवनविलासेंसीं ॥ अंगीं लक्ष्मी आलिया जयापाशीं ॥ परी थुंकोनि तिसी 6पुसेना ॥ १२ ॥ ऐसी ज्याची निरपेक्षता ॥ ते उत्कृष्ट श्रीतत्त्वतां॥त्यासी मी श्रीकृष्ण वंदीं माथां॥इतरांची कथा कायसी ॥१३॥ ज्यासी लक्ष्मीची निरपेक्षता ॥ त्याची नित्यवस्ती माझे माथां ॥ त्याहीहोनि पढियंता ॥ आणिक सर्वथा मज नाहीं ॥१४॥ सुख आणि महादुःख ॥ दोहींतें ग्रासोनियां देख ॥ प्रकटे स्वानंद स्वाभाविक ॥ या नांव

---

१ व्यर्थ. २ नाहींसें. ३ विघ्न. ४ शुद्ध चैतन्यास जीवदशेस आणितो. ५ विस्तारली.

*ना. देऊं. ※ना. मी करिता. +ना. नाडला. ×ना. जीवधर्म. ०मो. जीवपदा. 7मो. पालेली ना. पाल्हेजली. *मा. निंद्यकर्म. 6मो. न पुसे.

सुख उद्धवा ॥१५॥ जेथ दुजयाची चाड नाहीं ॥ इंद्रियांचा पांग नपडे कांहीं ॥ विषयावीण आनंद हृदयीं ॥ निजसुख पाही या नांव ॥ १६ ॥ विसरोनि हें निजसुख ॥ कामापेक्षा करणें देख ॥ याचि नांव परम दुःख ॥ केवळ ते मूर्ख सेविती ॥ १७ ॥ नित्य होतां कामप्राप्ती ॥ कदा नव्हे कामतृप्ती ॥ कामापेक्षा पाडी दुःखावर्तीं ॥ दुःख निश्चितीं कामापेक्षा ॥ १८ ॥ हा बंध हा मोक्ष चोख ॥ जाणणें जें आलोकिक ॥ कदा नव्हे अनुमानिक ॥ पंडित देख या नांव ॥१९॥ ऐशी न जोडतां अवस्था ॥ आह्मी सज्ञान *वेदशास्त्रता ॥ ऐशी अभिमान पंडितता ॥ ते नये सर्वथा उपेगा ॥ ५२० ॥ ज्याशी शांति आणि समाधान ॥ साचार बंधमोक्षांचें ज्ञान ॥ तो महापंडित जाण ॥ ऐसें श्रीकृष्ण बोलिला ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ मूर्खो देहाद्यहंबुद्धिः पंथा मन्निगमः स्मृतः ॥ उत्पथश्चित्तविक्षेपः स्वर्गः सत्त्वगुणोदयः ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ वेदशास्त्र नेणता एकें ॥ त्यासि मूर्ख ह्मणती लोक॥ते मूर्खता येथें नमने देख॥ केवळ मूर्ख देहाभिमानी ॥२२॥ केवळ नश्वरदेह देख ॥ तो मी ह्मणोनि मानी हरिख ॥ +देहाभिमानें भोगी नरक ॥ यापरता मूर्ख कोण आहे ॥ २३ ॥ विटाळें देहाचा संभवो ॥ विटाळें देहाचा उद्भवो ॥ विटाळेंचि ✠निधन पहाहो ॥ विटाळासी ठावो देहापाशीं ॥ २४ ॥ देहाचें निजरूप येथ ॥ अस्थि चर्म, विष्ठा, मूत्र ॥ तो मी ह्मणवूनि जो श्लाघत ॥ मूर्ख निश्चित तो जाण ॥२५॥ ऐशी जेकां देहअहंता ॥ ती नांव परममूर्खता ॥ चालणें माझ्या वेदपंथा ॥ सन्मार्गता ती नांव ॥ २६ ॥ ज्याशी जाहली चित्तविक्षेपता ॥ तो ×निंदी गुरुदेवता ॥ जो न मानी वेदशास्त्रार्थां॥तो उत्पथांमाजीं पडे॥२७॥जो गुरुदोषदर्शी समत्सरता॥जो क्रोध करी सुहृद आप्तां॥जो धिक्कारी मातापितां ॥ चित्तविक्षेपता ती नांव ॥ २८ ॥ जो सन्मानालागीं पाही ॥ जो साधुसज्जनांतें करी द्रोही ॥ जो दोष देखे ठायींच्या ठायीं ॥ चित्तविक्षेप पाही त्या नांव ॥२९॥ जो 4वेदापरापवादा ॥ जो करूं निघे परनिंदा ॥ जो विश्वासे स्त्रियेचे शब्दां ॥ चित्तविक्षेपबाधा ती नांव॥५३०॥जो सन्मार्गापासूनि 8चेवेता ॥पडे 2अधर्म अकर्मउत्पथा॥ते हे चित्तविक्षेपता॥ जाण तत्वतां उद्धवा ॥ ३१ ॥ आत्म तत्त्वतां परब्रह्म ॥ जाणणें हा वेदमार्ग उत्तम ॥ हें नेणोनि वर्तणें सकाम ॥ तोचि परम उन्मार्ग ॥ ३२ ॥ स्वर्गशब्दाची व्युत्पत्ती ॥ ते सत्वगुणाची उत्पत्ती ॥ जेणें निजसुखाची होय प्राप्ती ॥ परी इंद्रलोकगती तो स्वर्ग नोहे ॥ ३३ ॥ 'अमरभुवना जे जे गेले ॥ ते परतोनि पतना आले ॥ शुद्धसत्वीं जे मिसळले ॥ ते पावले निजसुख' ॥ ३४ ॥ ऐसा जो कां सत्वगुण ॥ तोचि येथें स्वर्ग जाण ॥ आतां नरकाचें लक्षण ॥ तुज मी संपूर्ण सांगेन ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ नरकस्तम उन्नाहो बंधुर्गुरुरहं सखे ॥ गृहं शरीरं मानुष्यं गुणाढ्यो ह्याढ्य उच्यते ॥ ४३ ॥

---

१ जो कोणी. २ मानित नाहीं. ३ स्त्रीच्या अमंगळ रक्तापासून. ४वाईटमार्गांत. ५ द्वेष. ६ दूर होणारा. ७ देवलोकास.

*ना. वेदशास्त्रार्था. +ना. देहाभिमानें मानी देख. ✠मो. ना. निदान. ×ना. वंद्य ते निंदी. 4मो. वदे परापवादा. 8मो. चवता. 2मो. अधर्मकर्म उत्पथा.

टीका ॥ कामक्रोधलोभउद्रेकें ॥ तेणें खवळे महामोह देख ॥ तो बुडवी सज्ञान विवेक ॥ ए-
ळें एक तमं वाढे ॥ ३६ ॥ अरुणोदयीं *दाटे कुहर ॥ निबिड पडे अंधकार ॥ न कळे दि-
सनिशाव्यवहार ॥ सूर्य चंद्र दिसेना ॥ ३७ ॥ यापरी गा निजचित्तीं ॥ अंधतमें वाढे वृत्ती ॥
र्तव्याकर्तव्यस्थिती ॥ एकही स्फूर्ती स्फुरेना ॥ ३८ ॥ ऐसा तमाचा उन्नाह उद्रेक ॥ त्या नांव
ाण महानरक ॥ परी यमयातना जें दुःख ॥ तो नरक ह्मणोंनये ॥ ३९ ॥ यमयातनां पाप
डे ॥ महामोहें पाप वाढे ॥ ×याम्य नरक ते बापुडे ॥ अतिनरक गाढे महामोहीं ॥ १४० ॥
ाम क्रोध लोभ देख ॥ हेचि तिनी नरकदायक ॥ तेथ महामोहो आवश्यक ॥ जैं होय एक
ंधतमी ॥ ४१ ॥ इतुका मेळ जेथ 'समुदावो' ॥ त्यातें बोलिजे तम 'उन्नाहो' ॥ ऐसा
थ वडे भावो ॥ तो पुरुष पहाहो नरकरूप ॥ ४२ ॥ जो घोरनरकाप्रती जाये ॥ त्याचा ते-
नि उद्धार होये ॥ तमउन्नाहो ज्या प्राप्त होये ॥ त्याचा निर्गम नोहे महाकल्पीं ॥ ४३ ॥
शी उन्नाहतमाची ख्याती ॥ ऐकोनि उद्धव कंटाळे चित्तीं ॥ ऐसे बुडते जीव तमोवृत्ती ॥
ांची उद्धरागती कोण करी ॥ ४४ ॥ ऐसा उद्धवाचा भावो ॥ जाणोनि बोलिला देवाधिदेवो॥
डतया उद्धरी पहाहो ॥ गुरुरावो निजसखा ॥ ४५ ॥ ऐसा गुरु तूं कोण ह्मणशी ॥ मी नित्य
ागें त्याच्या पायांशीं ॥ +तो चिन्मात्र ब्रह्मराशी ॥ गुरुनाम तयासी बोलिजे ॥ ४६ ॥ त्या
ह्मापरीस अधिकता ॥ गुरूसि आली तत्त्वतां ॥ ब्रह्म ब्रह्मत्वें हा प्रतिपादिता ॥ येऱ्हवीं ब्र-
ाची वार्ता कोण पुसे ॥ ४७ ॥ अज, अव्यय, अनंत, ॥ अच्छेद्य, अभेद्य, अपरिमित ॥ हे
ह्ममहिमा समस्त ॥ सद्गुरूंनीं येथ विस्तारिली ॥ ४८ ॥ ऐशीं ऐकतां सद्गुरुकीर्ती ॥ जड-
ीव उद्धरती ॥ गुरुनामाची महाख्याती ॥ ऐकोनि कांपती यमकाळ ॥ ४९ ॥ त्या सद्गुरूचें
हिमान ॥ करी बुडत्याचें उद्धरण ॥ निवारी जन्ममरण ॥ शिष्यसमाधान निजदाता ॥१५०॥
हृद आप्त सखा बंधू ॥ शिष्याचा मी सद्गुरु प्रसिद्धू ॥ निवारूनि नरकसंबंधू ॥ परमानंदू
खदाता ॥ ५१ ॥ आतां गृहाचें लक्षण ॥ तुज मी सांगेन संपूर्ण ॥ माझ्या गोपुरें धवलारें
ाण ॥ गृहप्रमाण तें नव्हे ॥५२॥ मनुष्यदेह तो गृहाश्रम ॥ जेथें नित्य वसें मी पुरुषोत्तम ॥
थील करितां स्वधर्मकर्म ॥ आत्माराम उल्हासे ॥ ५३ ॥ ज्या नरदेहाचिये प्राप्ती ॥ इंद्रादिक
ा वांछिती ॥ वेद वानी ज्या देहाची कीर्ती ॥ निजमोक्षप्राप्ती नरदेहीं ॥ ५४ ॥ 9निजगृह
साचार ॥ तें जाणावें निजशरीर ॥ आतां आढ्यपणाचा विचार ॥ तोही प्रकार अव-
ारी ॥ ५५ ॥ जो ज्ञानगुणीं अतिसंपन्न ॥ जें कल्पांतींही न वेंचे धन ॥ तोचि आढ्योत्तम
ाण ॥ येर तें धन नश्वर ॥ ५६ ॥ नश्वरधनाची आढ्यता ॥ अवश्य ने अधःपाता ॥ ज्ञान-
ें जे आढ्यता ॥ तेणें ये हाता परब्रह्म ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ दरिद्रो यस्त्वसंतुष्टः कृपणो योऽजितेंद्रियः ॥ गुणेष्वसक्तधीरीशो
गुणसंगो विपर्ययः ॥ ४४ ॥

---

१ आधिक्य. २ अज्ञान. ३ धुकें. ४ अतिशय, उद्रेक. ५ यमलोकचे. ६ निवर्ण, सुटका. ७ पुरद्वारें.
प्रासाद. ९ ज्ञानधन.

*मो. वाढे. ×मो. यामि ना. यम. +ना. जो दे चिन्मात्र पूर्ण ब्रह्माशी. 9मो. निजगृहें
ाचार ॥ तें जाणावें नरशरीर.

॥ टीका ॥ ऐक दरिद्राचें लक्षण ॥ गांठीं असतां कोटीधन ॥ ज्याचें संतुष्ट नाहीं मन ॥ परम दरिद्र जाण या नांव ॥ ५८ ॥ ज्याचे गांठीं नाहीं कांचवटी ॥ परी संतुष्टता नित्य पोटीं ॥ तोचि संपन्न सकळसृष्टीं ॥ सत्यगोष्टी हे उद्धवा ॥५९॥ गांठीं असोनियां धन ॥ जो पोटा न खाय आपण ॥ सदा लोलिंगत मन ॥ दरिद्रलक्षण या नांव ॥ ६० ॥ यापरी जें कृपणपण ॥ ऐक त्याचेंही लक्षण ॥ जेवीं राजा बांधी सेवकजन ॥ तेवीं इंद्रियांआधीन जो होय ॥ ६१ ॥ निर्धारितां निजरूप जाण ॥ सर्वांचा राजा तो आपण ॥ तें विसरोनि होय दीन ॥ इंद्रियां अधीन होऊनि ठाके ॥ ६२ ॥ मन तयाचें आज्ञाधार ॥ मनाचीं इंद्रियें किंकर ॥ त्याचाही हा होय डिंगरें ॥ *अजितेंद्रियें होय थोर कृपणत्व ऐसें ॥ ६३ ॥ निजकिंकराचीं किंकरें ॥ त्या इंद्रियांचीं हा वोळगे द्वारें ॥ अजितेंद्रिय अतिखरें ॥ निजांगीं सुभरे कृपणत्व ॥ ६४ ॥ या नांव गा कृपणपण ॥ तुज म्यां सांगितलें जाण ॥ आतां ईश्वराचें सुलक्षण ॥ ऐक संपूर्ण उद्धवा ॥ ६५ ॥ कनकें आणि कामिनी ॥ ज्यासि नावडे मनींहूनी ॥ तोचि ईश्वर त्रिभुवनीं ॥ सत्यसत्य हे वाणी उद्धवा ॥ ६६ ॥ तुवां जितुके केले प्रश्न ॥ तितुके ज्यासी वोळंगती गुण ॥ त्यासही ज्याचें अलिप्तपण ॥ ईश्वर संपूर्ण त्या नांव ॥ ६७ ॥ कनक आणि कामिनी ॥ त्यांचा पांगिस्तें मनींहूनी ॥ तोचि अनीश्वरू जनीं ॥ हें सत्य मानी उद्धवा ॥ ६८ ॥ शमादि सांगितले प्रश्न ॥ त्यांचें जें विपरीत लक्षण ॥ तेंचि अनीश्वरत्व जाण ॥ अशमादिगुण ते ठायीं ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ एत उद्धव ते प्रश्नाः सर्वे साधु निरूपिताः ॥ किं वर्णितेन बहुना लक्षणं गुणदोषयोः ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ उद्धवा तुझे सकळ प्रश्न ॥ म्यां निरूपिले सुलक्षण ॥ जेणें होइजे ब्रह्मसंपन्न ॥ तैसें व्याख्यान सांगीतलें ॥ ५७० ॥ संसारीं गुणदोषलक्षण ॥ सांगतां अपरिमित जाण ॥ यालागीं धरावें गा मौन ॥ परम कठिण गुणदोष ॥ ७१ ॥ गुणदोष नायकावे कानीं ॥ गुणदोष न देखावे नयनीं ॥ गुणदोष न बोलावे वदनीं ॥ गुणदोष मनीं न धरावे ॥ ७२ ॥ ब्रह्मज्ञानाचें मुख्य लक्षण ॥ तेंही बहुत नाहीं निरूपण ॥ श्लोकार्धें श्रीकृष्ण ॥ स्वमुखें आपण सांगत ॥७३॥

॥ श्लोक ॥ गुणदोषदृशिर्दोषो गुणस्तूभयवर्जितः ॥ ४६ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ ब्रह्म एक परिपूर्ण ॥ तेथें कैंचे दोष कैंचे गुण ॥ अविद्या क्षोभली ते जाण ॥ गुणदोषलक्षण वाढवी ॥ ७४ ॥ जो देखों लागे दोषगुण ॥ त्यासि अविद्या क्षोभली जाण ॥ जो न देखे गुणदोषभाव ॥ तो ब्रह्मसंपन्न उद्धवा ॥ ७५ ॥ पराचा देखावा दोषगुण ॥ हाचि दोषांमाजीं महादोष जाण ॥ गुणदोष न देखावा आपण ॥ हा उत्तम गुण सर्वार्थीं ॥ ७६ ॥ ब्रह्मीं नाहींत दोषगुण ॥ हें सर्वार्थीं सत्य जाण ॥ जो देखे दोषगुण ॥ ब्रह्मत्व जाण तेथं नाहीं ॥७७॥ जे गुणदोष देखों लागले ॥ त्यांचें ब्रह्मत्व कैसेनि गेलें ॥ त्यांपासीं तें वोस जाहलें ॥ कीं रुसूनि

---

१ लोभी. २ मूल, मुलगा. ३ सुवर्ण. ४ स्त्री. ५ बांधलेला.

*ना. अजितेंद्रिया मो. अजितेंद्रिय.

गेलें तेथूनी ॥ ७८ ॥ जेवीं रविबिंब राहो ग्रासी ॥ तें *दिवसा देखिजे नक्षत्रांसी ॥ तेवीं अविद्या ब्रह्मत्व जें प्राशी ॥ तें गुणदोषांसी देखिजे ॥ ७९ ॥ आदरें सांगे श्रीकृष्ण ॥ उद्धवा न देखावे दोषगुण ॥ हे माझे जिवींची निजखूण ॥ तुज म्यां संपूर्ण सांगीतली ॥ ५८० ॥ जनीं चौऱ्याशीं लक्षयोनीं ॥ त्यांत गुणदोष एकेस्थानीं ॥ न देखावे मनुष्ययोनीं ॥ इतुकेनी नित्यमुक्त ॥ ८१ ॥ ह्मणसी साचार परिपाठीं ॥ गुणदोष देखावे चित्तीं ॥ उद्धवा हे गोष्टी खोटी ॥ स्वधर्म राहाटी ते भिन्न ॥ ८२ ॥ निजदोष निरसावयाकारणें ॥ स्वधर्मकर्म आचरणें ॥ तेणें जें गुणदोष देखणें ॥ तें नागवी धावणें तैसें जाहलें ॥ ८३ ॥ साळी पिकावया शेतीं ॥ तृण जाळूनि दाढ करिती ॥ तेथ पिक जें आळिती ॥ तें तोंडीं माती पडली कीं ॥ ८४ ॥ व्हावया दोष निवृत्ती ॥ वेदें योजिलीं धर्म प्रवृत्ती ॥ तेणें स्वधर्मे जे दोष देखती ॥ ते निजप्राप्ती नागवले ॥ ८५ ॥ जेवीं कां सोंगें नटनटी ॥ दाविती हावभाव नाना गोठी ॥ परी तो भाव नाहीं पोटीं ॥ स्वधर्म त्यादृष्टीं करावा ॥ ८६ ॥ न देखोनि दोषगुण ॥ स्वधर्ममर्यादा न मोडून ॥ करावें गा स्वधर्माचरण ॥ हें मुख्य लक्षण कर्माचें ॥ ८७ ॥ ऐशिया स्वधर्मगती ॥ कर्ममळ निःशेष जाती ॥ साधकां निजपदप्राप्ती ॥ गुणदोषस्थिती सांडितां ॥ ८८ ॥ गुणदोष देहाचेठायीं ॥ आत्मा नित्य देही विदेही ॥ गुणदोष ज्याच्याठायीं ॥ सर्वथा नाहीं उद्धवा ॥ ८९ ॥ साधकें न देखावे दोषगुण ॥ सिद्धासी सहजचि नाहीं जाण ॥ जरी दिसों लागले दोषगुण ॥ तरी आली नागवण दोघांसी ॥ ५९० ॥ साधकाची प्राप्ति बुडे ॥ सिद्धाची सिद्धि तत्काळ उडे ॥ एवं गुणदोषांचें सांकडें ॥ दोहींकडे उद्धवा ॥ ९१ ॥ गुणदोषीं भरली सृष्टी ॥ तेथ न ठेवावी निजदृष्टी ॥ हे कळवळोनियां पोटीं ॥ श्रीकृष्णें गोष्टी सांगीतली ॥ ९२ ॥ गुणदोष ×विविधभेद ॥ ऐसे आहेत निषिद्ध ॥ तरी कां पां स्वमुखें श्रीगोविंद ॥ बोलिला प्रसिद्ध वेदानुवादें ॥ ९३ ॥ येचि अर्थीचा प्रश्न ॥ पुढें उद्धव करील जाण ॥ तें विसाव्याचें निरूपण ॥ विसांवा जाण जीवशिवां ॥९४॥ तेथ सकाम आणि निष्काम भक्त ॥ यांचे अधिकार अभिव्यक्त ॥ स्वयें सांगेल भगवंत ॥ कथा अद्भुत ते आहे ॥ ९५ ॥ संतीं यावें अवधान ॥ श्रोतां व्हावें सावधान ॥ एका विनवी जनार्दन ॥ रसाळ निरूपण पुढें आहे ॥ ९६ ॥ इतिश्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे एकाकारटीकायां भगवदुद्धवसंवादे एकोनविंशोऽध्यायः ॥ १९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ अध्याय ॥ १९ ॥ श्लोक ॥४६॥ ओंव्या ॥ ५९६ ॥ एकूण ॥ ६४२ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

# अध्याय विसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐ नमो सद्गुरु चित्समुद्रा ॥ मुक्तमोतियांचा तुजमाजीं थारा ॥ ज्ञानवैराग्यशुक्तिद्वारा ॥ सभाग्यनरा तूं देशी ॥ १ ॥ तुझी खोली अमर्याद ॥

१ नाशकरी. २ पळून जाणें ( बचाव न करितां. ) ३ गवत. ४ तसा, त्याप्रमाणें. ५न मोडितां. ६ स्पष्ट. ७ नित्य मुक्त आत्मभावरूपमोति अथवा मुक्तपुरुष हेच मोती. ८ शिंपला.

*मो. तें दिवस. ×मो. विधिभेद.

माजी चिरत्नें अतिविविध ॥ देखोनि निजप्रबोधचांद ॥ भरतें अगाध तुज दाटे ॥ २ ॥ उसळल्या स्वानंदभरत्यासी ॥ गुरुआज्ञामर्यादा नुल्लंघिसी ॥ स्वानंदलहरी चढोवढीसी ॥ तुजमाजीं अहर्निशीं उसळती ॥ ३ ॥ ब्रह्मविद्या महाबंदर ॥ तेथ निजभक्ती हें तारूं थोर ॥ त्यासि वागविता तूं *धोर ॥ प्रेमाचें साचार चढविशी शिड ॥४॥ तेथ भक्त संत सज्ञान नर ॥ स्वयें पावविशी परपार ॥ त्यांची मागुती येरझार ॥ सत्य साचार खुंटली ॥ ५ ॥ एक लावूनि कासेसी ॥ भवसागरीं वागविशी ॥ बुडण्याचें भय त्यासी ॥ महाकल्पेंसी बाधीना ॥ ६ ॥ एक बुडाले भक्तिसमरसीं ॥ ते घातले शेषशयनापाशीं ॥ एक बैसविले अढळतेसी ॥ ते ब्रह्मादिकांसी न ढळती ॥ ७ ॥ तुझ्या सागरत्वाची परी ॥ विजातीय तिळभरी ॥ राहोंनेदिसी भीतरीं ॥ हे अगाध थोरी पैं तुझी ॥ ८ ॥ अत्यंतप्रळयीं जैं हा चढे ॥ तैं संसार हे नांव बुडे ॥ वैकुंठकैलासावरता चढे ॥ मागें पुढें हाचि हा ॥ ९ ॥ ऐशिया सद्गुरुसमुद्रोदकीं ॥ एका एकपणें हरितकी ॥ भीतरीं पडतां आवश्यकीं ॥ अंगीकारी कीं जनार्दन ॥ १० ॥ तो जनार्दन स्वयें देखा ॥ एकादशाची करी टीका ॥ तेणें अभंगीं घालूनि एका ॥ कवित्व लोकां ऐकवी ॥ ११ ॥ जनार्दना आवडे एक ॥ ×तो मी एका भेटतां देख ॥ निजात्मभावें पडिलें ऐक्य ॥ आपुलें निजसुख +बोलवी ॥ १२ ॥ बोलवी निजसुखाची कथा ॥ त्यासि आपणचि होय श्रोता ॥ मग अर्थाच्या यथार्थता ॥ समाधानता देतसे ॥१३॥ यापरी गा जनार्दनें ॥ एकादश मऱ्हाटा करणें ॥ नव्हे माझे युक्तीचें बोलणें ॥ हें स्वयें सज्ञानें जाणिजेल ॥१४॥ त्या एकादशाची गतकथा ॥ एकुणिसावा संपतां ॥ गुणदोषांची जे कांहीं वार्ता ॥ उद्धवासि तत्त्वतां सांगीतली ॥१५॥ गुणदोष जे देखणें ॥ तोचि महादोष जाणणें ॥ गुणदोष स्वयें न देखणें ॥ तो गुण म्यां श्रीकृष्णें मानिजे ॥१६॥ हें ऐकोनि देवाचें उत्तर ॥ उद्धव चमत्कारला थोर ॥ काय गुणदोषांचा विचार ॥ घरोघरीं लोकीं केला ॥ १७ ॥ तुम्हींच वेदमुखें आपण ॥ प्रकटिलें गुणदोषलक्षण ॥ तें तुमचें वेदवचन ॥ केवीं अमान्य करावें ॥ १८ ॥ ऐसें विधिनिषेधलक्षण ॥ विचारितां वेदवचन ॥ कां पां निषेधी तो श्रीकृष्ण ॥ उद्धव तो प्रश्न स्वयें पुसे ॥ १९ ॥ विसावे अध्यायीं निरूपण ॥ सांगावया गुणदोषलक्षण ॥ भक्ति ज्ञान कर्म जाण ॥ तिन्ही अधिकार भिन्न सांगेल ॥ २० ॥ उद्धव ह्मणे हे श्रीकृष्ण ॥ तूं वेदरूपें आपण ॥ बोलिलासि दोषगुण ॥ तें परम प्रमाण आह्मीं मानें ॥ २१ ॥ हा विधि हा निषेध ॥ हें दाविताहे तुझा वेद ॥ तो वेदानुवाद विशद ॥ ऐक प्रसिद्ध सांगेन ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ विधिश्च प्रतिषेधश्च निगमो हीश्वरस्य ते ॥ अवेक्षतेऽरविंदाक्ष गुणं दोषं च कर्मणाम् ॥ १ ॥

॥ टीका ॥ कमलनयना श्रीकृष्णा ॥ विधिनिषेधलक्षणा ॥ दाखवीतसे दोषगुणां ॥ तुझी वेदाज्ञा प्रसिद्ध ॥ २३ ॥ तुझिया वेदाचे वेदविधि ॥ गुणदोषीं जडली बुद्धी ॥ ते मी सांगेन प्रसिद्धी कृपानिधी अवधारी ॥ २४ ॥

---

१ चैतन्यरूप रत्नें. २ स्वात्मज्ञानरूपी चंद्र. ३ नावाडी. ४ हिरवें गवत.

*मो. ना. सूत्रधार. ×मो. तो एका एकींचि भेटतां. +ना. भोगवी.

॥ श्लोक ॥ वर्णाश्रमविकल्पं च प्रतिलोमानुलोमजम् ॥ द्रव्यदेशवयःकालान् स्वर्गं नरकमेव च ॥ २ ॥

॥ टीका ॥ तुझी जे का वेदवाणी ॥ उघडी गुणदोषांची खाणी ॥ अधममध्यमोत्तम मांडणी ॥ वर्णाश्रमपणीं भेद दावी ॥ २५ ॥ द्रव्य विहित अविहित ॥ हेंही वेद असे दावित ॥ देश पुनीत[1] अपुनीत ॥ काळही दावी सुष्टदुष्टत्वें ॥ २६ ॥ पूर्ववयीं चित्त निश्चित ॥ तारुण्यीं तेंचि कामासक्त ॥ वार्द्धक्यीं तें *अतिकुश्चित ॥ तेवीं शुद्धि उपजवित गुणदोष ×वेद ॥ २७ ॥ तुझाचि गा वेद देख ॥ सूचिताहे स्वर्ग नरक ॥ तेणें कर्माचें आवश्यक ॥ साधक बाधक तो +दावी ॥ २८ ॥ वर्णाश्रमांमाजीं गुज ॥ प्रतिलोमानुलोमज ॥ ऐसा नाना भेदभोज ॥ वेदेंचि सहज नाचविजे ॥ २९ ॥ ' उत्तमवर्णाची जे नारी ॥ हीनवर्णाचा गर्भ धरी ॥ तिची संतती ※संसारीं ॥ अभिधान धरी प्रतिलोमज ' ॥ ३० ॥ तेंचि संतती प्रसिद्ध ॥ सूत[2], वैदेह, मागध[3] ॥ ऐशिया नामाचें जें ०पद ॥ तें जाण ३शुद्ध प्रातिलोमज ॥ ३१ ॥ ' हीनवर्णाची जे नारी ॥ उत्तमपुरुषाचा गर्भ धरी ॥ ते अनुलोमज संसारीं ॥ शास्त्रकारीं बोलिजे ॥ ३२ ॥ 7अंबष्ट आणि मूर्धाभिषिक्त[5] ॥ प्रवृत्ति आणि ⁴सारस्वत[4] ॥ इत्यादिनांवें जे वर्तत ॥ ते जाण समस्त अनुलोमज ॥ ३३ ॥ ऐसे नाना भेदप्रकार ॥ अविधिविधींचा विचार ॥ वेद प्रकाशितो साचार ॥ गुणदोषमाहेर वेद तुझा ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ गुणदोषभिदादृष्टिमंतरेण वचस्तव ॥ निःश्रेयसं कथं नृणां निषेधविधिलक्षणम् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ हे गुण आणि हे दोष ॥ उभयतां वैर लावी देख ॥ तुझा वेद गा आवश्यक ॥ होय प्रकाशक गुणदोषां ॥ ३५ ॥ वैर लावूनि वेदवाणी ॥ वाढवी गुणदोषमांडणी ॥ तेथ मोक्ष पाविजे प्राणी ॥ वेदवचनीं घडे केवीं ॥ ३६ ॥ राउळें[7] बोलिले आपण ॥ जें न देखावे दोष गुण ॥ तूंचि ह्मणसी वेद प्रमाण ॥ तें दोषगुण ⁸देखावे ॥ ३७ ॥ एवं ऐकतां तुझें वचन ॥ उभयतां आली नागवण ॥ वेद प्रमाण कीं[8] अप्रमाण ॥ हें समूळ जाण कळेना ॥ ३८ ॥ तुझ्या वचना विश्वासावें ॥ तें गुणदोषां न देखावें ॥ तुझें वेदवचन ²मानावें ॥ तें देखावे गुणदोष ॥ ३९ ॥ ऐसे तुझेनि बोलें जाण ॥ संशयीं पडले सज्ञान ॥ मा इतर साधारण जन ॥ कथा कोण येठायीं ॥ ४० ॥ आशंका ॥ 5माझें वचन वेदवचन ॥ दोन्ही 6एकरूपें ह्मणशी प्रमाण ॥ तरी गुणदोषदर्शन ॥ कां पां विलक्षणें[9] परस्परें ॥ ४१ ॥ माझे वेदाचें विधिविधान ॥ नव्हतां वेदार्थाचें ज्ञान ॥ ह्मणशी मोक्ष नघडे जाण ॥ वेदप्रमाण

१ पवित्र. २ ब्राह्मण स्त्रीस क्षत्रियापासून झालेला मुलगा अथवा वैश्यापासून क्षत्रियस्त्रीस झालेला मुलगा. ३ ब्राह्मणस्त्रीस वैश्यापासून झालेला मुलगा. ४ क्षत्रिय स्त्रीस वैश्यापासून झालेला मुलगा. ५ ब्राह्मणापासून वैश्यस्त्रीचे ठायीं झालेला. ६ ब्राह्मणापासून क्षत्रियाणीचे ठिकाणीं झालेला. ७ देव, परमात्मा, देऊळ. ८ कीं. ९ विरुद्ध.

*ना. अति दुश्चित. ×ना. भेदु. +मो. दाची. ※मो. अव्यवारी. ०मो. भेद. ३मो. प्रसिद्ध. 7मो. आभष्ट ना. अम्बष्ट. 4मो. शाश्वत. 8मो. अवश्य देखावे. 2मो. जरी मानावें. 5मो. माझे वेद माझें वचन. 6मो. एकरूपेंचि प्रमाण.

या हेतू ॥ ४२ ॥ त्या मोक्षामाजीं काय कठिण ॥ सकळ कर्में सांडितां जाण ॥ घरा मोक्ष ये आपण ॥ सहजचि जाण न प्रार्थितां ॥ ४३ ॥ ह्मणसी वेदार्थ न कळतां ॥ कर्म करितां कां त्यागितां ॥ कदा मोक्ष नये हातां ॥ जाण तत्त्वतां निश्चित ॥ ४४ ॥ 'भासला दोराचा सर्प थोर ॥ तेथ जपतां नाना मंत्रभार ॥ करितां वाजंत्र्यांचा गजर ॥ मारितां तीर ढळेना ॥ ४५ ॥ तो सादरें निरीक्षितां जाण ॥ होय त्या *सर्पाचें निरसन ॥ तेवीं निर्धारितां वेदवचन ॥ भवभय जाण निरसे' ॥ ४६ ॥ भवभयाची निर्मुक्तता ॥ त्या नांव जाण मोक्ष तत्त्वतां ॥ तो वेदार्थावीण हातां ॥ नये सर्वथा आणिकें ॥ ४७ ॥ वेदविधान न करितां ॥ कर्म त्यागिलें उद्धततां ॥ तेणें निजमोक्ष नये हातां ॥ परी पाखंडता अंगीं वाजे ॥ ४८ ॥ विधियुक्त जो कर्मत्यागु ॥ करूनि संन्यास घेतल्या सांगु ॥ तें ह्मणसी न पडे वेदपांगु ॥ हाही व्यंग विचारू ॥४९॥ श्रवणांग संन्यासग्रहण ॥ तेथही असे विधिविधान ॥ गुरुमुखें जें महावाक्य श्रवण ॥ तेंही जाण वेदार्थ ॥ ५० ॥ आशंका ॥ करितां देवांपितरांचें भजन ॥ ते होऊनियां प्रसन्न ॥ मोक्ष देतील आपण ॥ हेंही वेदेंविण घडेना ॥ ५१ ॥ स्वाहाकारें तृप्त सुर ॥ स्वधाकारें तृप्त पितर ॥ +वेदविनियोगेंविण देवपितर ॥ प्रसन्नाकार कदा नव्हती ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ ॥ पितृदेवमनुष्याणां वेदश्चक्षुस्तवेश्वर ॥ श्रेयस्त्वनुपलब्धेऽर्थे साध्यसाधनयोरपि ॥ ४ ॥

॥ टीका ॥ ॥ नांथिलेंचि चराचर ॥ देव मनुष्य आणि पितर ॥ वेदें प्रकाशूनि साचार ॥ पूज्यत्वें थोर प्रतिपादी ॥ ५३ ॥ त्याहीमाजीं अतिविषम ॥ उत्तम मध्यम अधम ॥ हा त्रिविधभेदसंभ्रम ॥ वेद उपक्रम करूनि दावी ॥ ५४ ॥ यापरी गुणदोषलक्षण ॥ तुवांचि वाढविलें आपण ॥ या नांव ह्मणसी मोक्षसाधन ॥ तरी कां गुणदोष निवारिसी ॥ ५५ ॥ ×ऐशिया निरूपणाची घडमोडी ॥ तुझेनि बोलें पडे आडी ॥ तेणें गुणदोषांची परवडी ॥ बाधा रोकडी अंगीं वाजे ॥ ५६ ॥ अवघा संसार काल्पनिक ॥ ╬तेथ एक स्वर्ग एक नरक ॥ हा मोक्ष हा अतिबंधक ॥ येणें वेदवादें लोक भ्रमविले तुवां ॥ ५७ ॥ पूर्वी पुरुषाचे पोटीं ॥ नव्हती गुणदोषांची गोठी ॥ तुझ्या †वेदानुवादपरिपाटीं ॥ गुणदोषीं दृष्टी दृढ झाली ॥ ५८ ॥ एवं तुझेनि बोलें जाण ॥ लोकांसि आली नागवण ॥ भोगावया नरक दारुण ॥ भ्रामक जाण वेदोक्ति तुझी ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ गुणदोषभिदादृष्टिर्निगमात्ते न हि स्वतः ॥ निगमेनापवादश्च भिदाया इति ह भ्रमः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ ॥ एवं नानागुणदोषदृष्टीं ॥ तुझेनि वेदें वाढविली सृष्टी ॥ स्वतां पुरुषाचे पोटीं ॥ *गुणदोषदृष्टी असेना ॥ ६० ॥ तुझ्या वेदानुवादविस्तारें ॥ गुणदोष झाले खरे ॥ ते तुझेनिही बलात्कारें ॥ चित्ताबाहेरें न निघती ॥ ६१ ॥ अनादि वेद प्रमाण ॥ हें तुझें मुख्य वेदवचन ॥ आतां न देखावे दोषगुण ॥ हें नवें वचन मानेना ॥ ६२ ॥ पहिले प्रकाशिले दोषगुण ॥ आत

---

१ विचारानें, २ पहातां, ३ उन्मत्तपणानें, ४ सदोष, ५ देव, ६ अज्ञात असें, ७ गुंती.

*मो. सर्पभयाचें. +मो. वेदयोगेंवीण. ×मो. ऐसी याची घडमोडी. ╬ना. एका स्वर्ग एका नरक. †मो. वेदानुवादाचे परिपाटीं. *मो. गुणदोष गोष्टी.

निराकारावया काय कारण ॥ हें न कळतां संपूर्ण ॥ भ्रमित मन होतसे ॥ ६३ ॥ या भ्रमाची भ्रमनिवृत्ती ॥ कृपेनें करावी कृपामूर्ती ॥ ऐकोनि उद्धवाची वचनोक्ती ॥ काय श्रीपती बोलिला ॥ ६४ ॥ ऐकोनि उद्धवाची विनंती ॥ *योगत्रयाची उपपत्ती ॥ अधिकारभेदें वेदार्थप्राप्ती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ६५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ श्रीभगवानुवाच ॥ ॥ योगास्त्रयो मया प्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया ॥ ज्ञानं कर्म च भक्तिश्च नोपायोऽन्योऽस्ति कुत्रचित् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ॥ तेथ मेघगंभीरा वाणी ॥ गर्जोनि बोले सारंगपाणी ॥ माझे परमकृपेवांचूनी ॥ माझी वेदवाणी कळेना ॥ ६६ ॥ वेदशास्त्रार्थें अतिसंपन्न ॥ जरी झाले +अतिसज्ञान ॥ परी माझ्या अनुग्रहेंवीण ॥ माझा वेदार्थ जाण कळेना ॥ ६७ ॥ ब्रह्मा चहूंमुखीं वेद पढे ॥ त्यासीही वेदार्थाचें चोखडें ॥ ×वर्म नातुडेचि धडफुडें ॥ मा इतर बापुडे ते काई ॥ ६८ ॥ ब्रह्मा वेदार्थ आकळिता ॥ तंं शंखासुर वेद कां नेता ॥ ब्रह्मा वेदार्थीं लीन होता ॥ तंं नाभिलाषिता सरस्वती ॥६९॥ माझा वेदाचा वेद्य निर्धार ॥ तुज मी सांगेन साचार ॥ ऐक उद्धवा ※सादर ॥ वेदविचार तो ऐसा ॥ ७० ॥ माझ्या वेदासि नाहीं ⁰बहुबंड ॥ वृथा न बोले उदंड ॥ ज्ञानभक्तिकर्मकांड ॥ वेद त्रिकांड नेमस्त ॥ ७१ ॥ माझिया वेदाची वेदोक्ती ॥ या तिहींयोगांतें प्रतिपादिती ॥ यांवेगळी उपायस्थिती ॥ नाहीं निश्चितीं उद्धवा ॥ ७२ ॥ कोण ते तिनी योग ॥ कैसे अधिकाराचे भाग ॥ हेंही पुसशी जरी चांग ॥ तें ऐक सांग सांगेन ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ 'निर्विण्णानां ज्ञानयोगो न्यासिनामिह कर्मसु ॥ तेष्वनिर्विण्णचित्तानां कर्मयोगस्तु कामिनाम्' ॥ ७ ॥

॥ टीका ॥ जे कां ब्रह्मभुवनपर्यंत ॥ साचार जीवींहूनि विरक्त ॥ जे विधिपूर्वक संकल्पयुक्त॥ कर्म त्यागित संन्यासी ॥ ७४ ॥ ऐशिया अधिकाऱ्यांकारणें ॥ म्यां ज्ञानयोग प्रकट करणें ३जे कां निजज्ञान साधनें ॥ ७मज पावणें सायुज्यता ॥ ७५ ॥ जे कां केवळ अविरक्त ॥ विषयालागीं कामासक्त ॥ त्यांलागीं म्यां प्रस्तुत ॥ कर्मयोग येथ प्रकाशिला ॥ ७६ ॥ उंच नीच अधिकारी देख ॥ दोनी सांगीतले सविशेख ॥ आतां तिसरा अधिकारी अतिचोख ॥ अलौकिक अवधारी ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ यदृच्छया मत्कथादौ जातश्रद्धस्तु यः पुमान् ॥ न निर्विण्णो नातिसक्तो भक्तियोगोऽस्य सिद्धिदः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ हरिकथा अवचेचि ऐकती ॥ परी माझी श्रद्धा नुपजे चित्तीं ॥ कोणी एकाचिये अभिनवगती ॥ श्रद्धा उत्पत्ती श्रवणीं होय ॥ ७८ ॥ ऐक श्रद्धेचें लक्षण ॥ जें जें करी कथाश्रवण ॥ तें हृदयीं वाढे अनुसंधान ॥ सप्रेम मन उल्हासे ॥ ७९ ॥ नवल कथेची आवडी ॥ दाटती हरिखाचिया कोडी ॥ हृदयीं स्वानंदाची उभवी गुढी ॥ एवढी गोडी ९श्रवणार्थी

---

१ कृपेशिवाय. २ बरोबर समजता. ३ विषयलंपट. ४ मनन.

*मो. योगचर्येची. +मो. सर्वज्ञ. ×ना. कर्म. ※मो. सविस्तार. ⁰मो. बहु बडबड. 3मो. जेणें निजज्ञान. 7मो. माझी पावणें. 9मो. श्रवणाची.

॥ ८० ॥ विषयांचें दोषदर्शन ॥ मुख्यत्वें बाधक स्त्री आणि धन ॥ आवरावीं रसना शिश्न ॥ हे आठवण अहर्निशीं ॥ ८१ ॥ *घायीं आडकलें फळें ॥ तें पानपेनां उपचारबळें ॥ तेवीं +विषयदोष भोगमेळें ॥ कदाकाळें ×शमेना ॥ ८२ ॥ येतां देखोनियां मरण ॥ स्वयें होय कंपायमान ॥ तेवीं विषयभोग दर्शन ॥ देखोनि आपण चळीं कांपे ॥ ८३ ॥ ऐसे विषयीं 1दोषदर्शन ॥ सर्वदा देखे आपण ॥ परी त्यागावयालागीं जाण ॥सामर्थ्य पूर्ण ऑथीना॥८४॥ सेवकीं राजा बंदीं ०धरिला ॥ *स्त्रीचंदनादि भोग दीधला ॥ परी तो त्यासि विषप्राय जाहला ॥ भोगीं 0उबगला 4अगत्यता ॥ ८५ ॥ एवं 2भोगितां त्या भोगासी ॥ नित्य पाहे निजनिर्गमासी ॥ तेवीं भोगितां विषयांसी ॥ अहर्निशीं अनुतापी ॥ ८६ ॥ यापरी जो नव्हे विषयासक्त ॥ ना निघडा नव्हे विरक्त ॥ त्यालागीं माझा भक्तिपंथ ॥ मी बोलिलों निश्चित वेदवाक्यें ॥ ८७ ॥ येहीं करितां माझी भक्ती ॥ माझ्या स्वरूपीं लागे प्रीती ॥ सहजें होय विषयविरक्ती ॥ 8एवं सिद्धिदाती भक्ति हे माझी ॥ ८८ ॥ मी वेदोक्त बोलिलों आपण ॥ ते हे त्रिविध योग संपूर्ण ॥ ज्ञान कर्म उपासन ॥ वेदोक्त लक्षण विभागे ॥ ८९ ॥ तेथ कोण देखे दोषगुण ॥ कोणांसि देहींचें अंदर्शन ॥ मध्यम भागें वर्ते कोण ॥ तेंही लक्षण अवधारीं ॥९०॥ जो आसक्त विषयांवरी ॥ तो कर्ममार्गींचा अधिकारी ॥ त्यासि गुणदोषांहातीं नाहीं उरी ॥ हें सांगेल श्रीहरी पुढिले अध्यायीं ॥ ९१ ॥ जोकां विरक्त ज्ञानाधिकारी ॥ तो गुणदोषांहूनि बाहेरी ॥ तो पाहतां अवघे संसारीं ॥ न देखे तिळभरी गुणदोष ॥ ९२ ॥ जग अवघें ब्रह्मपूर्ण ॥ तेथ कैंचे दोषगुण ॥ ऐसे जे कां ज्ञानसंपन्न ॥ त्यां दोषदर्शन असेना ॥ ९३ ॥ अति 6आसक्त ना विरक्त ॥ ऐसे कां जे माझे भक्त ॥ते पूर्वी गुणदोष देखत ॥ परी 5सांडित त्रिवेकें ॥ ९४ ॥ भूतीं भूतात्मा मी परेश ॥ तेथ देखांनये गुणदोष ॥ ऐसे भजननिष्ठ राजहंस ॥ ते गुणदोष सांडिती ॥ ९५ ॥ मी वेदार्थी बोलिलों दोषगुण ॥ ते दोष त्यागालागीं जाण ॥ परि पराचे देखावे दोषगुण ॥ हें वेदवचन असेना ॥ ९६ ॥ ऐसें करावें वेदार्थश्रवण ॥ दोष त्यजूनि घ्यावा गुण ॥ परी पुढिलांचे दोषगुण ॥ सर्वथा आपण न देखावे ॥ ९७ ॥ जो ज्याचा गुणदोष पाहे ॥ तो त्याच्या पापाचा विभागी होये॥ जो पुढिलांचे गुणदोष 3गाये ॥ तो निरया जाय तेणें दोषें ॥ ९८ ॥ 7आतां कर्मांचा अधिकारू ॥ सांगताहे शारंगधरू ॥ तो जाणोनियां विचारू ॥ कर्मादरू करावा ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ तावत्कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता ॥ मत्कथाश्रवणादौ वा श्रद्धा यावन्न जायते ॥ ९ ॥

॥ टीका ॥ तंवचि करावा कर्मादर ॥ जंव विरक्ति नुपजे साचार ॥ ठाकल्या विरक्तीचें घर ॥ स्वर्गसंसार मळप्राय ॥ १०० ॥ होकां वमिलिया मिष्टान्ना ॥ परतोनि श्रद्धी नधरी रसना ॥

१ शस्त्रांग. २ तें उपटून काढल्या खेरीज नुस्त्या उपचारांनीं ती जखम बरी होत नाहीं. ३ असेना. ४ आग्रहामुळें, जबरीमुळें खरोखर. ५ सुटकेस. ६न पाहणें. ७बाकी, शेवट फुरसत. ८ नरकास. ९ पुन्हां. १० गोड ह्मणून खावयाची इच्छा.

*मो. घांई. +मो. विषयभोगमेळें. ×मो. शमेतिना. 1मो. दोषदारुण. ०मो. पूजिला. *मो. स्रक्चंदनादि. 0ना. मो. उगला. 4मो. अत्यंत. 2मो. त्यागुनी त्या. 8मो. ऐसी. 6ना. सक्त. 5मो. शेखीं सांडित. 3मो. पाहे. 7मो. आतां कर्मांचा आदर, कां कर्म करिता अधिकार.

तेवीं विषयभोगीं जाणा ॥ साचार मना चिळशी उपजे ॥१॥ तेथ कर्माची परिपाटी ॥ समूळ खुंटली गा गोठी ॥ कां दैवयोगें उल्हास पोटीं ॥ माझ्या कथेचा उठी श्रवणादरू ॥ २ ॥ करितां माझी कथाश्रवण ॥ प्रेमें वोसंडे अंतःकरण ॥ विसरे देहगेहांची आठवण ॥ तेथें प्रत्यवाय जाण बाधीना ॥ ३ ॥ जैसें माझे कथेचें श्रवण ॥ तैसेंचि माझें हृदयीं स्मरण ॥ तेथें प्रत्यवाय *धरी चरण ॥ येथून बोळवण +माझी झाली ॥४॥ करितां मत्कथाश्रवण ॥ ×लोपल्या कोटिकर्माचरण ॥ प्रत्यवाय न बाधी जाण ॥ हा प्रताप पूर्ण मत्कथेचा ॥ ५ ॥

॥ संमति ॥ श्लोक ॥ मत्कर्म कुर्वतां पुंसां कर्मलोपो भवेद्यदि ॥ तत्कर्म तेषां कुर्वंति तिस्रः कोट्यो महर्षयः ॥ १ ॥

॥ अर्थ ॥ माझी करितां सप्रेम भक्ती ॥ भक्तांचीं नित्यकर्में जें राहती ॥ तेतीसकोटी ऋषि महंती ॥ संपूर्ण करिती कर्में त्यांचीं ॥ ६ ॥ एवढें मत्कथेचें महिमान ॥ माझें करितां कीर्तन पूजन ॥ तेथें प्रत्यवायाचें तोंड कोण ॥ जें सन्मुख वदन दाऊं शके ॥ ७ ॥ हो कां पूर्ण विरक्त नरें ॥ कां माझे सेवेसि जो तत्पर ॥ तेथ कर्म बापुडें किंकर ॥ हें स्वयें श्रीधर बोलिला ॥ ८ ॥ कर्में करितां स्वधर्मस्थितीं ॥ उद्धवा आहे माझी प्राप्ती ॥ ते मी सांगेन तुजप्रती ॥ यथानिगुतीं अवधारीं ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ स्वधर्मस्थो यजन्यज्ञैरनाशीः काम उद्धव ॥ न याति स्वर्गनरकौ यद्यन्यन्न समाचरेत् ॥ १० ॥

॥ टीका ॥ गृहस्थाश्रमीं स्वधर्मस्थिती ॥ जरी विचरेना अन्यगती ॥ तरी येथेंचि लाहे विरक्ती ॥ सुनिश्चितीं उद्धवा ॥ ११० ॥ अन्यगतीचें विचरण ॥ तें तूं म्हणशील कोण ॥ ऐक त्याचेंही लक्षण ॥ समूळ खूण सांगेन ॥ ११ ॥ परद्रव्य परदारारती ॥ परवादाची वदंती ॥ ई नांव गा नरकी गती ॥ जाण निश्चितीं ✿निर्धारू ॥१२॥ दिविभोगांचेनि श्रवणें ॥ ज्याच्या मनाचें बैसे धरणें ॥ कर्में तदनुकूल करणें ॥ तें स्वर्ग भोगणें अलोट ॥ १३ ॥ या जाण दोन्ही अन्यगती ॥ यांतूनि काढूनिया वृत्ती ॥ यज्ञादिकीं ।मज यजिती ॥ तें नैराश्यस्थिती नित्यनैमित्यें ॥१४॥ *तें नपडे स्वर्गांचे पेणें[१२] ॥ न घडे नरकासि जाणें ॥ येचि लोकीं विरक्त होणें ॥ तेंचि बोलणें हरि बोले ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ अस्मिँल्लोके वर्तमानः स्वधर्मस्थोऽनघः शुचिः ॥ ज्ञानं विशुद्धमाप्नोति मद्भक्तिं वा यदृच्छया ॥ ११ ॥

॥ टीका ॥ असतां येलोकीं वर्तमानें ॥ ऐसें करितां स्वधर्माचरण ॥ होय पुण्यपापांचें निर्दळण ॥ निर्मळत्वें जाण तो अतिपवित्र ॥ १६ ॥ तेथ निरसोनि भवभान ॥ प्रकाशे माझें शुद्ध-

१ तिरस्कार. २ रीति. ३ विधिनिषेधाची पीडा कर्तव्य न केल्यानें अथवा अकर्तव्य केल्यानें जो दोष येतो तो. ४ज्ञानी, या अध्यायांतील ७४ ओवी पहा. ५भक्त, या अध्यायांतील ८७ ओवी पहा, तसा अधिकारी व भक्तींत तल्लीन झालेला. ६ एकनिष्ठतेनें. ७ दुसऱ्याशीं तैटा करण्याची.८गोष्ट. ९नरकसंबंधी. १० स्वर्गांतील भोग. ११ अति उत्कट इच्छा, तगादा. १२ मुक्काम. १३ राहत असतां.

*मो. न रिघे जाण. +मो. त्याची. ×ना. मो. लोटिल्या.✿मो. उद्धवा. ।मो भक्त यजिती. *मो. त्यासी न घडे.

ज्ञान ॥ कां सप्रेम माझें भजन ॥ पराभक्ति जाण तो लाहे ॥ १७ ॥ जे भक्ती[१]माजीं मी आपण सदा होय भक्ताधीन ॥ तेथ मोक्षासहित ज्ञान ॥ येऊनि आपण पायां लागे ॥ १८ ॥ ऐक ज्ञानाचा परिपाक ॥ संसारा नांव महादुःख ॥ मोक्ष तो ह्मणे परमसुख ॥ मद्भक्त देख दोनी नेमनी ॥ १९ ॥ सप्रेम करितां माझें भजन ॥ नाठवे भवभयबंधन ॥ तेथ मोक्षासि पुसे कोण ॥ मद्भक्तीचा पूर्ण उल्हास ॥ १२० ॥ ज्यातें ह्मणती महादुःख ॥ तें भक्तांसि भगवद्रूप देख ॥ ज्यातें ह्मणती परमसुख ॥ तेंही आवश्यक भगवंत ॥ २१ ॥ यापरी भक्त माझ्या भजनीं ॥ विसरला सुखदुःखें दोनी ॥ मी एक भगवंत वांचूनी ॥ आन त्रिभुवनीं देखेना ॥ २२ ॥ ऐशी माझी भक्ति पूर्ण ॥ *साधूनि आणिलां नये जाण ॥ जें मी भगवंत होय प्रसन्न ॥ तैं यदृच्छा जाण हे भक्ति लाभे ॥ २३ ॥ मी कैसेनि होय प्रसन्न ॥ ऐसें कल्पील तुझें मन ॥ ×तेथ नरदेह गा कारण ॥ माझें प्रसन्नपण व्हावया ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ स्वर्गिणोऽप्येतमिच्छंति लोकं निरयिणस्तथा ॥ साधकं ज्ञानभक्तिभ्यामुभयं तदसाधकम् ॥ १२ ॥

॥टीका ॥ ज्यासि स्वर्गभोगाची +थोर जोडी ॥ जीहीं [l]अमरत्वाची उभविली गुढी ॥ जे पडले [0]स्वर्गाचे बांदवडीं ॥ ते वांछिती आवडीं नरदेहातें ॥ २५ ॥ नरक यातना महाघोर ॥ जीहीं भोगिला भोग थोर ॥ ते मनुष्यदेहातें नर ॥ अतिसादर वांछिती ॥ २६ ॥ नरदेह परम पावन ॥ जें [5]भक्तिज्ञानाचें आयतन ॥ जेणें साधे ब्रह्मज्ञान ॥ तो धन्य धन्य नरदेह ॥ २७ ॥ जेणें नरदेहें जाण ॥ निःशेष खुंटे जन्ममरण ॥ ※जेणें जीव पावोनि समाधान ॥ स्वानंदघन स्वयें होय ॥ २८ ॥ ज्या नरदेहाचे संगतीं ॥ होय अविद्येची निवृत्ती ॥ लाभे भगवत्पदप्राप्ती ॥ हे विख्यात ख्याती नरदेहीं ॥ २९ ॥ ज्या नरदेहाची प्राप्ती ॥ प्राणिमात्र वांछिती ॥ प्राणी बापुडे ते किती ॥ स्वयें प्रजापती नरदेह वांछी ॥ १३० ॥ ऐसें नरदेहाचें श्रेष्ठपण ॥ *येथ साधे भक्तिज्ञान ॥ परी भक्तिज्ञानास्तव जाण ॥ मनुष्यपण साधेना ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ न नरः स्वर्गतिं कांक्षेन्नारकीं वा विचक्षणः ॥ नेमं लोकं च कांक्षेत देहावेशात्प्रमाद्यति ॥ १३ ॥

॥ टीका ॥ झालिया नरदेहाची प्राप्ती ॥ अधर्में होय नरकगती ॥ [2]कां संचितां पुण्यसंपत्ती ॥ तेणें स्वर्गप्राप्ती अनिवार ॥ ३२ ॥ स्वर्गें होय पुनरावृत्ती ॥ नरकीं घोर दुःखप्राप्ती ॥ ह्मणोनि सांडोनि दोहींचीही प्रीती ॥ नरदेहीं आसक्ती धरूं ह्मणती ॥३३॥ मनुष्यदेहाची आवडी ॥ तेचि देहबुद्धि रोकडी ॥ जेथ कामक्रोधांची जोडी ॥ प्रमाद कोडी क्षणक्षणां ॥ ३४ ॥ स्वर्ग नरक इहलोक ॥ यांची प्रीती सांडूनि देख ॥ साधावें गा आवश्यक ॥ ज्ञान चोख कां निजभक्ती ॥ ३५ ॥ ज्ञान साधावयालागीं जाण ॥ कष्टावें नलगे गा आपण ॥ सप्रेम करितां माझें भजन ॥ दवडितां ज्ञान घरांरिघे ॥ ३६ ॥ गव्हांची राशी जोडल्या हातीं ॥ सकळ पक्वान्नें

---

१ मानीत नाहीं. २ स्वाभाविकपणानें. ३ प्राप्ति. ४ बंदींत. ५ स्थान. ६ असावधपणा, चुका ७ घरीं प्राप्त होतें.

*मो. साधनीं. ×मो. तरी नरदेह यासी कारण. +मो. अतिगोडी. [l]मो. परतत्त्वाची. [0]मो. स्वर्गसुखाचे. [5]मो. भक्तिधनाचें. ※ना. जेणें पावावें समाधान. *मो. जेणें साधे ब्रह्मज्ञान. [2]मो. कदाचित् जोडल्या पुण्यसंपत्ती.

त्याचीं होती ॥ तेवीं आतुडल्या माझी भक्ती ॥ ज्ञानसंपत्ती घरासि ये ॥ ३७ ॥ द्रव्य झालिया आपुले हातीं ॥ सकळ पदार्थ घरास येती ॥ तेवीं जोडल्या माझी भक्ती ॥ भुक्तिमुक्ती होती दासी ॥ ३८ ॥ ह्मणसी करितां भगवद्भक्ती ॥ विघ्नें छळावया आड येती ॥ तेथें मी सुदर्शन घेऊन हातीं ॥ राखें अहोरातीं निजभक्तां ॥ ३९ ॥ पक्ष्याचेनि नामोच्चारें ॥ म्यां वेश्या[1] तारिली चमत्कारें ॥ पाडूनि विप्राचे दांतेरें[2] ॥ *म्यां व्यभिचारें उद्धरिली ॥१४०॥ यालागीं नरदेह पावोन ॥ जो करी माझें भजन ॥ तोचि संसारीं धन्यधन्य ॥ उद्धवा जाण त्रिशुद्धी[3] ॥ ४१ ॥ ×भावें करितां माझे भक्तीसी ॥ भाविकां उद्धरीं मी हृषीकेशी ॥ जे चढले ज्ञानाभिमानासी ॥ ते म्यां यमासी निरूपिले[4] ॥ ४२ ॥ साधितां माझी भक्ति कां ज्ञान ॥ ज्यासि चढे ज्ञानाभिमान ॥ तो म्यां आपुलेनि हातें जाण ॥ दीधला आंदण महादोषां ॥ ४३ ॥ उद्धवा तूं ऐसें ह्मणशी ॥ ते कां दीधले यमाशीं ॥ तो जाचूनियां महादोषियांसी ॥ ज्ञानाभिमानासी सांडवी ॥ ४४ ॥ यालागीं सांडूनि देहाभिमान ॥ भावें करितां माझें भजन ॥ पूर्वील साधु सज्ञान ॥ नरदेहें जाण मज पावले ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ एतद्विद्वान्पुरा मृत्योरभवाय घटेत सः ॥ अप्रमत्त इदं ज्ञात्वा मर्त्यमप्यर्थसिद्धिदम् ॥ १४ ॥

॥ टीका ॥ केवळ अस्थि, चर्म, मूत्र, मळ, ॥ पाहतां देहो अतिकश्मळ[5] ॥ परि ब्रह्म परिपूर्ण +निश्चळ ॥ हें निर्मळ फळ येणें साधे ॥ ४६ ॥ ऐसें नरदेहाचें कारण ॥ जाणोनि पूर्वील सज्ञान ॥ सांडोनिया देहाभिमान ॥ ०ब्रह्मसमाधान पावले ॥४७॥ देह नित्य ह्मणोनि सांडावा ॥ तरी स्वद्वा लाभ हारवावा ॥ ⁂वैद्य ह्मणोनि प्रतिपाळावा ॥ तें नेईल रौरवा निश्चित ॥४८॥ देह सांडावा ना मांडावा[8] ॥ येणें परमार्थचि साधावा[9] ॥ *तें सावधान ऐक उद्धवा ॥ गुप्त निजठेवा[10] सांगेन ॥ ४९ ॥ जेणें देहें वाढे भवभावो ॥ तेणेंचि देहेंकरीं पहाहो ॥ होय संसाराचा अभावो ॥ अहंभावो सांडितां ॥ ॥ १५० ॥ सांडावया देहाभिमान ॥ पूर्वील साधु सज्ञान ॥ होऊनि नित्य सावधान ॥ ब्रह्मसंपन्न ⁶मद्रूपें ॥५१॥ नरदेहें ब्रह्मप्राप्ती ॥ ऐसी मानूनि निश्चिती ॥ ह्मणसी विषयभोगाचे अंतीं ॥ ब्रह्मस्थिती साधीन ॥ ५२ ॥ ऐसें विश्वासतां आपण ॥ रोकडी आली नागवण ॥ देहासवें लागलें मरण ॥ तें हरिहरां जाण टळेना ॥ ५३ ॥ ³एवं देहाचें अनिवार्य मरण ॥ तें केव्हां येईल न कळे जाण ॥ यालागीं पूर्वींच आपण ॥ निजस्वार्थ जाण साधावा ॥ ५४ ॥ धरितां निजदेहाची गोडी ॥ अवचितीं आदळे यमधाडी ॥ बुडे निजस्वार्थाची जोडी ॥ तें निजनिवाडीं हरि सांगे ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ छिद्यमानं यमैरेतैः कृतनीडं वनस्पतिम् ॥ खगः स्वकेतमुत्सृज्य क्षेमं याति ह्यलंपटः ॥ १५ ॥

१ पिंगला नामक वेश्या. २ दांत. ३ निश्चयानें. ४ स्वाधीन केले. ५ छद्मनिया. ६ अमंगल, दुर्गंधि. ७ वर सांगितल्याप्रमाणें भजनानें. ८ घालवावा. ९ पाळावा. १० रहस्य. ११ देहानें.

*मो. म्यां गोपी व्यभिचारें उद्धरिल्या. ×मो. भावें करितां माझी भक्ती, भाविक उद्धरी मी श्रीपती, जे ज्ञानाभिमानीं चढती, ते यमाचे हातीं दिधले. +मो. निष्कळ. ०मो. ब्रह्म सनातन. ⁂मो. येणें परमार्थ नाडावा. 1मो. तेणेंही पावेल रौरवा. *मो. येणें प्राप्त गुप्त निजठेवा, ऐक उद्धवा सांगेन. ⁶मो. तद्रूपें. ³मो. एवं देहासवें अचुक मरण.

॥ टीका ॥ ॥ जेवीं कां वृक्षाचे अग्रीं नीड ॥ पक्षी करूनि वसे अतिगूढ ॥ तळीं त्याचि वृक्षाचें बूड ॥ छेदिती सदृढ निर्दय नर ॥ ५६ ॥ तें देखोनि वृक्षच्छेदन ॥ *पक्षें सांडोनि गृहाभिमान ॥ पळाल्या पाविजे कल्याण ॥ राहतां मरण अचुक ॥ ५७ ॥ त्या वृक्षाचिया ऐसें जाण ॥ देहासवें लागलें मरण ॥ तेथें जीवासि राहतां जाण ॥ दुःख दारुण अनिवार ॥ ५८ ॥

॥ श्लोक ॥ अहोरात्रैश्छिद्यमानं बुध्वायुर्भयवेपथुः ॥ मुक्तसंगः परं बुध्वा निरीह उपशाम्यति ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ॥ अहोरात्र आयुष्यभंग ॥ कळिकाळाचा सवेग वेग ॥ हा जाण नीच नवा रोग ॥ अंगीं सांग[1] लागला ॥ ५९ ॥ काळें काळवयसा[2] खातू ॥ हा देखोनि आयुष्याचा घातू ॥ जाणोनि नरदेहाचा ×प्रांतू ॥ होय अनासक्तु देहगेहां ॥ १६० ॥ जाणोनि देहाचें क्षणिकपण ॥ त्यागावया देहाभिमान ॥ साधावया भक्तिज्ञान ॥ अति सावधान जो होय ॥ ६१ ॥ न सांडितां देहाभिमान ॥ अंगीं आदळे मरण ॥ तेणें भयें कंपायमान ॥ वैराग्य पूर्ण स्वयें धरी ॥ ६२ ॥ वैराग्ययुक्त करितां भक्ती ॥ होय देहाभिमानाची निवृत्ती ॥ तें घर रिघे ज्ञान संपत्ती ॥ पायां लागती +मुक्ती चारी ॥ ६३ ॥ ऐशी झालिया निजात्मप्राप्ती ॥ सहजेंचि राहे 7प्रवृत्ती ॥ निवृत्तीसी होय निवृत्ती ॥ संसाराची शांती स्वयें होय ॥ ६४ ॥ ऐसे नरदेहा येऊनि देख ॥ पुरुष पावले परम सुख ॥ हें न साधिती जे मूर्ख ॥ त्यांसि देवो देख निंदित ॥ ६५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारम् ॥ मयानुकूलेन नभस्वतेरितं पुमान् भवाब्धिं न तरेत्स आत्महा ॥ १७ ॥

॥ टीका ॥ ॥ चौऱ्याशी लक्ष जीवयोनी ॥ त्यांत मनुष्यदेहावांचूनी ॥ अधिकारी ब्रह्मज्ञानीं ॥ आन कोणी असेना ॥ ६६ ॥ जेणें देहें होय माझी प्राप्ती ॥ यालागीं आद्य[3] देहो यातें ह्मणती ॥ याची दुर्लभ गा ०अवाप्ती[4] ॥ भाग्यें पावती नरदेह ॥ ६७ ॥ सदृढ ह्मणजे अव्यंग[5] ॥ अविकळ ह्मणजे सकळ भोग ॥ नव्हे बहिरे मुके अंध पंग ॥ सर्वांगें सांग संपूर्ण ॥ ६८ ॥ भरतखंडीं नरदेहप्राप्ती ॥ हे परमभाग्याची संपत्ती ॥ तेथही विवेकू परमार्थी ॥ त्याचा वशवर्ती[6] मी परमात्मा ॥ ६९ ॥ मी परमात्मा ज्याचा वशवर्ती ॥ तेथ सुरवरांचा केवा[7] किती ॥ परी नरदेह नलभे पुढती ॥ दुर्लभ प्राप्ती नरदेहाची ॥ १७० ॥ जोखितां[8] पुण्यपाप समान ॥ तें नरदेहाची प्राप्ती जाण ॥ तें पुढती पावावया आपण ॥ जोखूनि कर्माचरण कोणी न करी ॥ ७१ ॥ पुण्य झालिया अधिक ॥ स्वर्ग भोगणें आवश्यक ॥ पापाचें वाढल्या तुक ॥ 4भोगावे नरक अनिवार ॥ ७२ ॥ ऐसी कर्माची गति गहन ॥ एथ काकतालीयन्यायें[9] जाण ॥ अवचटें लाभे ※माणुसपण ॥ भवाब्धितारण महातारूं ॥ ७३ ॥ सुलभ ह्मणिजे अविकळ ॥ सुकल्प

१ गुप्त. २ काळरूप आयुष्यातें. ३ श्रेष्ठ. ४ प्राप्ति. ५अवयव, सर्व अवयव आहेत, एकही कमी नाहीं. ६ आज्ञेंत वागणारा. ७ पाड. ८ वजन, प्रमाण, माप. ९ कावळा बसण्यास व फांदी मोडण्यास जसी एक वेळ यावी त्याप्रमाणें.

*मो. पक्षी सांडूनी देहाभिमान. ×ना. पातू. +ना. चारी मोक्ष. 7मो. पूर्ववृत्ती. ०मो. प्राप्ती. 4मो. भोगवी. ※मो. मनुष्यपण.

ह्मणिजे विवेकशीळ ॥ यासि वागवितां केवळ ॥ नावाडा कुशळ गुरु कर्णधार ॥७४॥ कानीं निजगुह्य उपदेशितां ॥ यालागीं गुरु कर्णधार तत्त्वतां ॥ कानीं धरितांचि उद्धरी भक्तां ॥ यालागीं सर्वथा गुरु कर्णधार ॥ ७५ ॥ भवाब्धीमाजीं नरदेह तारूं ॥ तेथ सद्गुरु तोचि कर्णधारू ॥ त्यासि अनुकूल वायू मी श्रीधरू ॥ भवाब्धि परपारू पाववया ॥ ७६ ॥ कैसा गुरु कर्णधार कुशळ ॥ आवर्त, खळाळ, [१]आंदळ ॥ चुकवूनि विकल्पाचे कल्लोळ ॥ साम्य पाणिढाळें सवेग काढी ॥ ७७ ॥ लावूनि विवेकाचें आंवलें ॥ तोडिती कर्माकर्माचीं *जळें ॥ भजनशिडाचेनि [२]वळें ॥ नाव चाले सवेग ॥ ७८ ॥ कामक्रोधादि महामासे ॥ तळपती ध्यावया [३]आमिषें ॥ त्या घालूनि शांतिचेनि पाशें ॥ तारूं उल्हासें चालवी ॥ ७९ ॥ ×ठाकतां सारूप्यादि बंदरें ॥ तारुवामाजीं अतिगजरें ॥ लागलीं अनुहतांचीं [४]तुरें ॥ जयजयकारें गर्जती ॥ १८० ॥ नेतां सलोकतेचे पेंठे ॥ तारूं उलथेल अवचटें ॥ लावितां समीपतेचे वाटे ॥ तारूं दाटे दोहींसवां ॥ ८१ ॥ करावें स्वरूपतेमाजीं स्थिरू ॥ तंव तो टांचणीचा उतारू ॥ ऐसा जाणोनियां निर्धारू ॥ लोटिलें तारूं सायुज्यामाजीं ॥ ८२ ॥ ते धार्मिकाची धर्मपेंठ ॥ नाहीं सुखसारा खटपट ॥ वस्तु अवघीच चोखट ॥ घ्यावी एकवट संवसाटीं ॥ ८३ ॥ ऐसें दुर्लभ नरदेहाचें तारूं ॥ +जेथ श्रीगुरुकृपें कर्णधारू ॥ येणें नतरेच जो संसारू ॥ तो जाणावा नरू आत्महंता ॥ ८४ ॥ नरदेह वेंचिलें विषयासाठीं ॥ पुढें नरक भोगावया कल्पकोटी ॥ तरी आपुलेनि हातें निजपोटीं ॥ शस्त्र दाटी स्वयें जेवीं ॥ ८५ ॥ ०परपारा अवश्य आहे जाणें ॥ तेणें नाव फोडूनि भाजिजे चणे ॥ कां पांघरुणें जाळूनि तापणें ॥ हिंवाभेणें ४सज्ञानीं ॥८६॥ तैसें येथ झालें गा साचार ॥ थितिया नरदेहा नागवले नर ॥ पुढां दुःखाचे डोंगर ॥ अति दुस्तर वोढवले ॥ ८७ ॥ सकळ योनी विषयासक्ती ॥ सर्वांसि आहे निश्चितीं ॥ नरदेहीं तैशीच ✤विषयस्थिती ॥ तें तोंडीं माती पडली कीं ॥ ८८ ॥ पावोनि श्रेष्ठ नरशरीर ॥ जो नुतरेचि संसारपार ॥ तो आत्महत्यारा नर ॥ सत्य साचार [६]उद्धवा ॥ ८९ ॥ कोटि ब्रह्महत्या गोहत्यांसी ॥ प्रायश्चित्त आहे शास्त्रार्थेंसीं ॥ परी आत्महत्या घडे ज्यासीं ॥ प्रायश्चित्त त्यासी असेना ॥ १९० ॥ जो आत्महत्या करूनि निमाला ॥ तो मरतांचि नरकासि गेला ॥ प्रायश्चित्तासि कोण आहे उरला ॥ मा शास्त्रार्थ बोला बोलवे ॥ ९१ ॥ अमृत विकूनि कांजी प्याला ॥ तैसा नरदेहीं भोग भोगिला ॥ हा थोर नाड जीवासि झाला ॥ विसरोनि आपुला निजस्वार्थ ॥ ९२ ॥ लाहोनि उत्तम शरीर ॥ व्यर्थ 7विषयासक्त नर ॥ नरकीं नुडाले अपार ॥ हें सारंगधर बोलिला ॥ ९३ ॥ असोत या मूर्खांचिया गोठी ॥ ऐक उत्तमाची हातवटी ॥ जे वेदार्थपरिपाठीं ॥ ०निजहितदृष्टी सावध ॥ ९४ ॥ अतिविरक्त जे स्वभावें ॥ तिहीं काय कर्तव्य करावें ॥ कोणा अर्थातें त्यजावें ॥ तेंचि देवें सांगिजे ॥ ९५ ॥

---

१ हेलकावे. २ वल्हें. ३ मांस. ४ तुर्यें, वाद्यें. ५ त्रेधा, दुर्दशा. ६ आपला घात करणारा. ७ खुपशी. ८ आयता प्राप्त झालेला.

*ना. कूर जळें. ×ना. सरिता सारुप्यादि. +मो. जेथें मी सद्गुरु कर्णधारू. ०मो. परपारा अवश्य पाविजे जेणें, ते नाव फोडूनि भाजिले चणे. ४ना. अज्ञानी. ✤मो. विषयासक्ति 7ना. मो. विषयासक्ति. ०ना. निजहिता दृष्टी साधक.

॥ श्लोक ॥ ॥ यदारंभेषु निर्विण्णो विरक्तः संयतेंद्रियः ॥ अभ्यासेनात्मनो योगी धारयेदचलं मनः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ जो कर्मारंभींच विरक्त ॥ फळाशा नातळे ज्याचें चित्त ॥ मज निजमोक्ष व्हावा येथ ॥ हेंही पोटांत स्मरेना ॥ ९६ ॥ खडतर वैराग्याची दृष्टी ॥ इंद्रियांसि विषयाची गोष्टी ॥ करूंचि नेदी महाहटी ॥ धारणा नेहटीं दृढ राखे ॥ ९७ ॥ करूनियां श्रवण मनन ॥ माझ्या स्वरूपाचें अनुसंधान ॥ अखंड निजध्यासन ॥ तिळभरी मन *ढळों नेदी ॥ ९८ ॥ धरोनि धारणेचें बळ ॥ स्वरूपीं मन अचंचळ ॥ ×अणुभरी होऊंनेदी विकळ ॥ राखे निश्चळ निजबोधें ॥ ९९ ॥ एकाकी मन पाहे ॥ स्वरूपीं ꕥकैसें निश्चळ होये ॥ त्या अभ्यासाचे उपाये ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ २०० ॥

॥ श्लोक ॥ धार्यमाणं मनो यर्हि भ्राम्यदाश्वनवस्थितम् ॥ अतंद्रितोऽनुरोधेन मार्गेणात्मवशं नयेत् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ स्वरूपीं लावितां अनुसंधान ॥ जरी निश्चळ नव्हे मन ॥ न सांडी आपुला गुण ॥ चंचळपण स्वभावें ॥ १ ॥ साधक आळसें विकळे ॥ कां आठवी +विषयसोहळे ॥ तें स्वरूपींहूनि मन पळे ॥ निजचंचळ स्वभावें ॥ २ ॥ तेथ नेहटूनि आसन ॥ स्वयें होऊनियां सावधान ॥ स्मरोनि सद्गुरुचरण ॥ स्वरूपीं मन राखावें ॥ ३ ॥ नेदितां विषयदान ॥ हेंटावलें क्षोभे मन ॥ तरी न सांडोनि अनुसंधान ॥ द्यावें अन्नपान विधानोक्त ॥४॥ आशंका॥ सर्पा पाजिलें पीयूष ॥ तेंचि परतोनि होय विष ॥ तेवीं मनासि देतां विषयसुख ॥ अधिक देखा तें खवळे ॥ ५ ॥ तरी ऐसें द्यावें विषयदान ॥ जेणें आकळलें राहे मन ॥ तेंचि अर्थीचें निरूपण ॥ स्वयें नारायण सांगत ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ मनोगतिं न विसृजेज्जितप्राणो जितेंद्रियः ॥ सत्वसंपन्नया बुद्ध्या मन आत्मवशं नयेत् ॥ २० ॥

॥ टीका ॥ मोकळें न सोडूनि मन ॥ न सोडूनि अनुसंधान ॥ करावें अन्नपानशयन ॥ हें विषयदान निजहिता ॥ ७ ॥ साधकें साधूनि आपण॥जरी जिंकिलीं इंद्रियप्राण ॥ तरी मोकळें सोडूनये मन ॥ स्वरूपीं नेहटून राखावें ॥ ८ ॥ जो मनासि विश्वासला ॥ तो कामक्रोधीं नागवला ॥ संकल्पविकल्पीं लुटिला ॥ विसंचिलो महामोहें ॥ ९ ॥ जाणोनि मनाचें महाबळ ॥ त्यासि विवेक द्यावा मोकळ ॥ तो हालोंनेदी केवळ ॥ करी निश्चळ निजांगें ॥ २१० ॥ मनाविवेकाचे उभयसंधीं ॥ सत्वसंपन्न होय बुद्धी ॥ ते विषयांचे कंद छेदी ॥ तोडी उपाधी सविकार ॥ ११ ॥ 'मन जेथ जेथ पळोनि जाये ॥ तेथ तेथ विवेक उभा राहे ॥ मग ✓सत्वबुद्धीचेनि सांटें ॥ *मोडी पाये मनाचे' ॥ १२ ॥ ऐसें मनाचें खुंटलिया बळ ॥ ¹मन स्वरूपीं

---

१ निरोधलें. २ अमृत. ३ भोजन, पाणी पिणें व निद्रा. ४नाडला. ५ नासला. ६ पहारेकरी. ७ मूळ.

*मो. ढळेना. ×मो. अनुभव होऊं नेदी. ꕥमो. कैसेनि. +ना. विषयडोहळे. ✓ना. सत्वशुद्धीचेनि. *मो. मारी. ¹मो. मग.

..य निश्चळ ॥ जेवीं जळगार केवळ ॥ ठाके गंगाजळवस्तीसी ॥ १३ ॥ यापरी स्वरूपीं मन॥ स्वयें पावे समाधान ॥ तोचि योग परम *पावन ॥ समाधान जीवशिवां ॥ १४ ॥ जीवपरमात्म्याची एकात्मता ॥ तोच परमयोग तत्त्वतां ॥ येचिविखींची कथा ॥ अश्वदृष्टांता हरि सांगे ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ एष वै परमो योगो मनसः संग्रहः स्मृतः ॥ हृदयज्ञत्वमन्विच्छन् दम्यस्येवार्वतो मुहुः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ जैसा वारु उपलाणीं ॥ वश्य करी अश्वसोहणी ॥ मागें ×तरटांचा कर झणाणी॥ पुढें राखे नेहटूनि रागवाग ॥ १६ ॥ तेथ जेंजें पाऊल वोजा करी ॥ तेथ मान दे जीजीकारीं ॥ जेथ ※फुटोनि पडे बाहेरी ॥ तेथ तरट मारी सवर्म ॥१७ ॥ जेथ हटावला ⁶न सांडी खोडी॥ तेठायीं दे मोकळी +वाडी ॥ परी निःशेष पीडी ना सोडी ॥ ऐसे पडिपाडीं राखत ॥ १८ ॥ दमनीं *देखोनि अत्यादरू ॥ स्वामीचें हृदय जाणे वारू ॥ आणि वारूचें अभ्यंतरू ॥ कळे साचारू स्वामीसी ॥ १९ ॥ ऐसें उभयहृदय ऐक्ययोगें ॥ वारू न धरितां रागवागें ॥ ⁷अडणें उडणें सांडी वेगें ॥ मग नाचों लागे मोकळा ॥ २२० ॥ ऐसें वश्य केलिया अश्वातें ॥ मग कर्त्याचेनि मनोगतें ॥ ¹वारू नाचे कांचेनि सुतें ॥ यापरी मनातें दमावें ॥ २१ ॥ मनोजयो कीजे आपण ॥ तोचि योग परम कारण ॥ हेंचि मागिले श्लोकीं निरूपण ॥ तुज म्यां संपूर्ण सांगीतलें ॥ २२ ॥ नृदेहमाय्यं या श्लोकाचे अंतीं ॥ कर्मवैराग्यद्वारा मुक्ती ॥ आतां सांगीतली हे स्थिती ॥ उत्तमगतीं अभ्यासें ॥ २३ ॥ मुख्यतः सांख्ययोगें माझी प्राप्ती ॥ तें मी सांगेन तुजप्रती ॥ मिथ्या संसाराची स्फूर्ती ॥ ब्रह्मसंवित्तीं साचार ॥ २४ ॥ हें ज्ञानगहन निरूपण ॥ तुज मी सांगेन गुह्यज्ञान ॥ जें असोनि त्रिगुणीं वर्तमान ॥ अलिप्त जाण गुणकार्या ॥ २५ ॥ तुज मी सांगेन गुह्यज्ञान ॥ हें ऐकोनि देवाचें वचन ॥ उद्धव स्वयेंचि झाला कान ॥ अतिसावधान श्रवणार्थी ॥ २६ ॥ देखोनि उद्धवाचा अत्यादरू ॥ आर्तचित्तचकोरचंद्रू ॥ निजज्ञानगुणसमुद्रू ॥ काय यादवेंद्र बोलिला ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ सांख्येन सर्वभावानां प्रतिलोमानुलोमतः ॥ भवाप्ययावनुध्यायेन्मनो यावत्प्रसीदति ॥ २२ ॥

॥ टीका ॥ जें सृष्टिपूर्वी अलिप्त ॥ तेंचि सृष्टिउदयीं सृष्टी आंत ॥ महत्तत्त्वादि देहपर्यंत ॥ ⁶तत्त्वीं अनुगत तेंचि वस्तु॥२८॥ आणि सृष्टीच्या स्थितिविशेषीं ॥ गुणकार्यातें तेंचि प्रकाशी॥ शेखीं ⁸गुणकार्यातें तेंचि ग्रासी ॥ उरे अवशेषीं ²तें वस्तु ॥ २९ ॥ नाग न घडतां सोनेंचि साचें ॥ नाग घडतां सोनेपण नवचे ॥ नाग मोडितां सोनेंचि साचें ॥ घडमोडीचें भय नाहीं

१ पाण्याची गार. २ घोड्याच्या उपमेनें. ३ज्याच्या पाठीवर जीन नाहीं असा घोडा. ४ चाबूक स्वार. ५ चाबुकाचा आंसुडांचा ६ घोड्यास शिकवण्याचा प्रकार. एक प्रकारची चाल. ७ मोठ्या युक्तीनें. ८ कच्च्या दोरीनें. ९ क्रमनिविष्ट. १० एक सोन्याचा दागिना.

*ना. कारण. ×ना. तरट खांकर झणाणी मो. तरट खाका झणाणी. ※ना. फुटोनि. 6ना. नेदी खोडी. +ना. वाढी. *मो. देखे. 7मो. आडवें. ¹मो. वारु नाचों लागे निरुतें. ⁶मो. तत्त्वानुगत तेंचि वस्तु. 8मो. गुणकार्यातें नाशी. ²ना. तेंचि.

॥ २३० ॥ मेघापूर्वीं शुद्ध गगन ॥ मेघासबाह्य गगन जाण ॥ मेघ विराल्या गगनीं गगन ॥ अलिप्त जाण संचलें ॥ ३१ ॥ तेवीं उत्पत्तिस्थितिप्रळयांतीं ॥ वस्तु संचली अलिप्तस्थिती ॥ तेही विशींची उपपत्ती ॥ उद्धवा तुजप्रती सांगेन ॥ ३२ ॥ कुलाल जेंजें भांडें घडित ॥ त्यासि मृत्तिका नित्य व्याप्त ॥ तेवीं जेंजें तत्त्व उपजत ॥ तेंतें व्यापिजेत चैतन्यें ॥ ३३ ॥ सागरीं जेजे उपजे लहरी ॥ तीसि जळाचि सबाह्यांतरीं ॥ तेवीं महत्तत्त्वादिदेहवरी ॥ सबाह्याभ्यंतरीं चिन्मात्र ॥ ३४ ॥ हो कां जोजो पदार्थ निपजे ॥ तो आकाशें व्यापिजे सहजें ॥ तेवीं जेंजें तत्त्व उपजे ॥ तेंतें व्यापिजे चैतन्यें ॥ ३५ ॥ [१]अनुलोमें पाहतां यापरी ॥ वस्तु वेगळें तिळभरी ॥ कांहीं न दिसे गा बाहेरी ॥ निजनिर्धारीं विचारितां ॥ ३६ ॥ पृथ्वीपासूनि प्रकृतीवरी ॥ लयो पाहतां [२]प्रतिलोमकरीं ॥ जेवीं जळगार जळाभीतरीं ॥ तेवीं लयो चिन्मात्रीं तत्त्वाचा ॥ ३७ ॥ प्रकृत्यादितत्त्वें प्रबळ झालीं ॥ विकारोनि लया गेलीं ॥ वस्तू अलिप्तपणें संचली ॥ नाहीं मारवली अणुमात्र ॥ ३८ ॥ एवं उत्पत्तिस्थितिप्रळयांत ॥ वस्तू अविनाशी अलिप्त ॥ नित्य शुद्ध बुद्ध मुक्त ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ३९ ॥ ऐशा वस्तूच्याठायीं [३]*भवजल्प ॥ तो जाण पां मिथ्या आरोप ॥ जेवीं दोराअंगीं सर्प ॥ वृथा भयकंप भ्रांतासी ॥ २४० ॥ सर्प दवडोनि ×दोर शुद्ध ॥ करावा ऐसा नाहीं बोध ॥ एकला एक परमानंद ॥ ऐसें गोविंद बोलिला ॥४१॥ ऐशिये वस्तूच्याठायीं जाण ॥ मन विसरे मनपण ॥ येणें साधनें पैं जाण ॥ होय ब्रह्म पूर्ण साधकू ॥ ४२ ॥ हें परम अगाध साधन ॥ ज्यासि नाटोपे गा जाण ॥ त्याचें निश्चळ व्हावया मन ॥ सुगम ꙮसाधन देवो सांगे ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ निर्विण्णस्य विरक्तस्य पुरुषस्योक्तवेदिनः ॥ मनस्त्यजति दौरात्म्यं चिंतितस्यानुचिंतया ॥ २३ ॥

॥ टीका ॥ जन्ममरणांचे महा आवर्त ॥ भोगितां वैराग्यें अतिसंतप्त ॥ +अतएव विषयीं विरक्त ॥ जैसें विषयुक्त परमान्न ॥४४॥ मघमघीत अमृतफळ ॥ त्यावरी सर्पें घातली [४]गरळ ॥ तेवीं विषयमात्रीं 2सकळ ॥ देखे केवळ महाबाधा ॥ ४५ ॥ ऐसेनि विवेकें विवेकवंत ॥ श्रद्धापूर्वक गुरुभक्त ॥ गुरूनें सांगितला जो अर्थ ॥ तो हृदयांत विसरेना ॥ ४६ ॥ गुरूनें 6बोधिला जो अर्थ ॥ तो सदा हृदयीं असे ध्यात ॥ चिंतिलाचि जो अर्थ ॥ तोचि असे चिंतित पुनः पुनः ॥ ४७ ॥ करितां [५]प्रत्यग्वृत्तीं चिंतन ॥ संकल्पविकल्प सांडी मन ॥ त्यजोनियां देहाभिमान ॥ ब्रह्मसंपन्न स्वयें होय ॥ ४८ ॥ झालिया ब्रह्मसंपन्न ॥ स्वरूपीं लीन होय मन ॥ हाही एक उपावो जाण ॥ न ठाके तरी आन अवधारी ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ यमादिभिर्योगपथैरान्वीक्षिक्याच विद्यया ॥ ममार्चोपासनाभिर्वा नान्यैर्योग्यं स्मरेन्मनः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ त्यजोनियां सकळ भोग ॥ यमनियमेंसी योगमार्ग ॥ आसनस्थ होऊनि चांग ॥

१ अन्वयरूप दृष्टीनें. २ उलट क्रमानें व्यतिरेक दृष्टीनें. ३ संसाराची वार्ता. ४ विष. ५ अंतर्वृत्तीनें.
*मो. भजनसाक्षेप. ×मो. रज्जु. ꙮना. आराधन. +मो. अति विषयांवरी विरक्त. 2मो. कवळ. 6ना. बोलिला.

हे मुद्रा सांग अवधारी ॥ २५० ॥ तेव्हां अपान ऊर्ध्वमुखें वाढे ॥ तो वरता स्वाधिष्ठाना चढे ॥
प्राण प्राणायामें अडे ॥ तो मागुता मुरडे नाभिस्थाना ॥ ५१ ॥ सम होतां प्राणापान ॥ पिंड-
ब्रह्मांडाचें शोधन ॥ स्वयें वायु करी गा आपण ॥ *मलक्षालन शरीरीं ॥ ५२ ॥ कफ पित्त
दोहीं खाये ॥ नाडींतें शोधीत जाये ॥ ×जुने संचित मळ पाहे ॥ तेही लवलाहें निर्दळी ॥ ५३ ॥
नवल 7वायूचें प्रबळबळ ॥ पिंडब्रह्मांडींचे सकळ मळ ॥ धोऊनि करी गा निर्मळ ॥ +पवित्रता
केवळ महायोगें ॥ ५४ ॥ जेथें प्रकटे रोगांची परवडी ॥ महाविघ्नांची पडे उडी ॥ धांवती
विकल्पाच्या कोडी ॥ सिद्धीची रोकडी नागवण पावे ॥ ५५ ॥ इतुकीं अंगीं आदळतां जाण ॥
साधक न सांडी जें आंगवण ॥ तैं सम होती प्राणापान ॥ सत्य जाण उद्धवा ॥ ५६ ॥ प्राणा-
पानांच्या मिळणीं ॥ शक्ति चेतवे कुंडलिनी ॥ ते प्राणापानांतें घेऊनी ॥ सुषुम्नास्थानीं प्रवेशे
॥ ५७ ॥ ते 8आद्यशक्ति अचाट ॥ चढे पश्चिमेचा महाघाट ॥ तेथें षट्चक्रांचा कडकडाट ॥ पूर्वींच
सपाट पवनें केला ॥ ५८ ॥ 9कुंडलिनी चालतां वाटा ॥ चुकल्या आधिव्याधींच्या लाटा ॥
3बुजाल्या विकल्पाच्या वाटा ॥ महाविघ्नाच्या झटा बाधूं न शकती ॥ ५९ ॥ साधितां उल्लाट
शक्तीचे उलट ॥ उघडे ब्रह्मरंध्रींचें कपाट ॥ तंव लोटले सहस्रदळाचे पाट ॥ अतिचोखट चंद्रा-
मृत ॥ २६० ॥ तें प्राशूनि कुंडलिनी बाळा ॥ संतोषें सांडी गरळा ॥ ते शरीरीं वोतली कळा ॥
तेणें पालटला देहभाव ॥ ६१ ॥ शरीराकारें वोतिली कळा ॥ तेणें देहो दिसे अतिसोज्वळा ॥
ना तो ब्रह्मरसाचा पुतळा ॥ कीं उमलली कळा शांतिसुखाचा ॥ ६२ ॥ जीवाचें ०जीवन मुसा-
वलें ॥ कीं ब्रह्मविद्येसी फळ आलें ॥ ना ते चैतन्या कोंब निघाले ॥ तैसे शोभले अवयव
॥ ६३ ॥ 5त्या देहाचेनि लाघवें ॥ 6जगाच्या डोळां सामावे ॥ 2जीवामाजीं वावरोनि पावे ॥
निजस्वभावें सबाह्य ॥ ६४ ॥ तो पवनाची करोनि पायरी ॥ सुखें चाले गगनावरी ॥ या नांव
परमखेचरी ॥ सिद्धेश्वरीं बोलिजे ॥ ६५ ॥ त्याचिया अंगींचिया दीप्ती ॥ खद्योतप्राय होय
गभस्ती ॥ त्याचें चरणामृत वांछिती ॥ अमरपती इंद्र चंद्र ॥ ६६ ॥ क्रमूनि औटपीठ गो-
ल्हाट ॥ भ्रमरगुंफादि शेवट ॥ भेदूनि सोहंहंसाचें पीठ ॥ परमात्मा प्रकट होऊनि ठाके
॥ ६७ ॥ हा योगाभ्यासें योग गहन ॥ अवचटें 0कोणा साधे जाण ॥ हा मार्ग गा अतिक-
ठिण ॥ स्वयें श्रीकृष्ण बोलिला ॥ ६८ ॥ हेंचि मानतें श्रीकृष्णनाथा ॥ तरी आन साधन न
सांगता ॥ हा मूळश्लोकार्थ पाहतां ॥ कळेल तत्त्वतां साधूंसी ॥ ६९ ॥ ❀हा ऐकतां अतिगोड
वाटे ॥ परी करितां काळीज फुटे ॥ परी न साधेचि महाहटें ॥ येथ ठकले लाठ सुरनर ॥ २७० ॥
असो हें अत्यंत कठिण ॥ तुज मी सांगेन गा आन ॥ आन्वीक्षिकी विद्या जाण ॥ Sत्वंपद-
शोधन विवेकू ॥ ७१ ॥ 1तत्पदाहूनि वेगळा ॥ पांचभौतिक *त्वंपदाचा गोळा ॥ चुकोनि

---

१ या नांवाच्या चक्रीं. २ स्नान. ३ विकसला. ४ एकमुद्रा, आकाशगमन. ५ तर्कशास्त्र.

*मो. रिचोनि सर्व शरीरीं. ×ना. गुणसंचित. 7मो. तयाचें. +ना. पवित्र केवळ महा.
योग. 8मो. आदिशक्ती. ना. आद्याशक्ती. 9ना. कुंडलिनीचिया वळघतां वाटा. 3ना. उडाल्या
विकल्पाच्या खटपटा. ०मो. जीवपण. 5मो. त्या देहाचें नवल लाघवें. 6ना. जनाच्या डोळा
समाये. 2मो. जिवालागी विवरीं पावे. 0मो. कोणा साध्य जाण. ❀मो. हा योग ऐकतां गोड
वाटे. Sना. त्वंतपदशोधन. मो. तत्वंपदशोधन. 1ना. त्वत्पदाहोनी. *ना. तत्वाचा गोळा.

व्यापका सकळा ॥ कोठें *निपजला एकदेशीं ॥ ७२ ॥ अनादिमायाप्रवाहयोगें ॥ तन्मात्राविषयसंगें ॥ मनाचेनि संकल्प +पांगें ॥ वेगळें सवेगें मानलें ॥ ७३ ॥ ×मनें मानिला जो भेद ॥ त्यासि ०करावा अभेदबोध ॥ येचि अर्थीं स्वयें गोविंद ॥ विवेक विशद दाखवी ॥ ७४ ॥ पांचभौतिक शरीर खरें ॥ तेथ पृथ्वी प्रत्यक्ष जळीं विरे ॥ पृथ्वीचा गंध जळीं भरे ॥ तैं पृथ्वी सरे निःशेष ॥ ७५ ॥ त्या जळाचा जळरस ॥ शोषूनि जैं घे हुताश ॥ तैं जळाचा होय न्हास ॥ विरे निजनिःशेष तेजत्वीं ॥७६॥ त्या तेजाचें कारण रूप ॥ गिळी वायूचा पूर्ण प्रताप ॥ तेव्हां निजतेजाचें मावळे रूप ॥ वायूची झडप लागतां ॥ ७७ ॥ त्या वायूचा स्पर्शगुण ॥ नेतां गगनें हिरून ॥ तेव्हां वायूचें नुरे भान ॥ राहे 8मुसावोन गगनींची ॥ ७८ ॥ ※केवळ गगना नुरे उरी ॥ तें गुणकार्येंसीं रिघे अहंकारीं ॥ अहंकारू 4रिघे मायेमाझारीं ॥ माया परमेश्वरीं मिथ्या होय ॥ ७९ ॥ रात्री आपुलिया प्रौढीं ॥ अंधारातें वाढवी वाढी ॥ तेथ नक्षत्रखद्योतकोडी ॥ मिरवती गाढीं निजतेजें ॥ २८० ॥ ते रात्री येतां सूर्यापुढें ॥ स्वकार्येंसीं सगळी उडे ॥ पाहों जातां मागेंपुढें ॥ कोणीकडे असेना ॥ ८१ ॥ तेवीं परमेश्वरीं माया ॥ कार्यकारणेंसीं गेली 5वायां ॥ नये मिथ्यात्वेंचि आया ॥ नुरेचि दिसावया मागमोस ॥ ८२ ॥ मायाप्रतिबिंबित 6चैतन्या ॥ 7आणि जीव या अभिधाना ॥ ते माया गेलिया जाणा ॥ होय जीवपणा न्हास ॥८३॥ बुडालें जीवशिवांचें भान ॥ उडालें मनाचें मनपण ॥ कोंदलें चैतन्यघन ॥ 2परम समाधान साधकां ॥ ८४ ॥ करितां 1त्वंपदाचें शोधन ॥ होय 3तत्पदीं समाधान ॥ हे आन्वीक्षिकी विद्या जाण ॥ विवेकसंपन्न पावती ॥ ८५ ॥ न करितां योगसाधन ॥ *न शिणतां कष्ट जाण ॥ सुगम जोडे समाधान ॥ तुज मी आन सांगेन ॥ ८६ ॥ जेथ कष्ट करितां थोडे ॥ परी योगाचें फळ जोडे ॥ त्वंपदशोधन त्यापुढें ॥ होय बापुडें लाजोनी ॥ ८७ ॥ ते माझी गा निजभक्ती ॥ माझ्या रामकृष्णादि मूर्तीं ॥ पूजितां त्या अतिप्रीतीं ॥ मी श्रीपती संतोषें ॥ ८८ ॥ तेथें माझें श्रवण माझें कीर्तन ॥ माझें नाम माझें स्मरण ॥ माझें ध्यान माझें मनन ॥ माझें चिंतन सर्वदा ॥ ८९ ॥ हृदयीं माझें सदा ध्यान ॥ मुखीं माझें नाम माझें स्तवन ॥ श्रवणीं माझी कथा माझें कीर्तन ॥ करीं माझें पूजन सर्वदा ॥२९०॥ चरणीं प्रदक्षिणा यात्रागमन ॥ 2अष्टांगीं सर्वदा माझें नमन ॥ ऐसें अनन्य माझें भजन ॥ त्रिनटलेपण मद्भक्तीं ॥९१॥ ऐसे त्रिनटले जे माझे भजनीं ॥ त्यांसि मी त्रिकाळीं चक्रपाणी ॥ त्यावेगळें पढियंतें कोणी ॥ आन त्रिभुवनीं मज नाहीं ॥ ९२ ॥ यापरी करितां माझें भजन ॥ नलगे 0योगादिकांचें स्मरण ॥ मी भक्तिवेगळा श्रीकृष्ण ॥ नातुडें जाण उद्धवा ॥ ९३ ॥ अवचटें दैवगतीं येथ ॥ योग्यासि 5जैं घडे 3दुरितें ॥ तैं 9त्यासि नलगे कर्मप्रायश्चित्त ॥ तेंचि सांगत श्रीकृष्ण ॥ ९४ ॥

---

१ रात्र आपल्या कार्यासह नाहिशी होते. २ हात, पाय, गुडघे, वक्षस्थळ, मस्तक दृष्टि, मन व वाणी या आठ अंगांनीं. ३ पातक.

*मो. निराळा. +ना. चांगें. ×मो. मनें. ०मो. करावया अभेद. 8ना. सामावोन. ※मो. केवळ गगन उरे उरी. 4मो. निमे. 5मो. लया. 6मो. चैतन्य. 7मो. त्यासी जीव हें अभिधान. 2ना. परम पावन साधका. 1मो. तत्पदाचें. 3मो. त्वंपदीं. *ना. नलगे त्वंपदाचें शोधन, त्याहुनी सुलभ साधन, मो. न करितां त्वंपदाचें शोधन, याहुनी सुलभ साधन. 0मो. योगयागादिकांचें. 5मो. जरी. 9मो. तेणें त्या नलगे प्रायश्चित्त.

॥ श्लोक ॥ यदि कुर्यात् प्रमादेन योगी कर्म विगर्हितम् ॥ योगेनैव दहेदंहो नान्यत्तत्र कदाचन ॥ २५ ॥

॥ टीका ॥ भक्तासि *निंद्य कर्म न घडे ॥ त्यासि मी राखता मागें पुढें ॥ हें आलें या योग्यांकडे ॥ तेथही घडे ×प्रमादें ॥ ९५ ॥ प्रमादें घडलें जें पाप ॥ त्याचा तीव्र अनुताप ॥ जेवीं वाग्नीं पोळला सर्प ॥ +तैसा सकंप पापासी ॥ ९६ ॥ गोमाशी लागतां सिंहासी ॥ तो जेवीं झाडी सर्वांगासी ॥ तेवीं योगी देखोनि पापासी ॥ जो अहर्निशीं अनुतापी ॥ ९७ ॥ तेणें होऊनि सावचित्त ॥ योगबळें निजयोगयुक्त ॥ पाप निर्दाळावें समस्त ॥ हेंचि प्रायश्चित्त योग्यांसी ॥ ९८ ॥ हे सांडोनियां योगस्थिती ॥ जें लावूं धांवे शेणमाती ॥ तें नागवला गा निश्चितीं ॥ नव्हेचि निष्कृती पापाची ॥ ९९ ॥ हृदयीं नाहीं अनुतापवृत्ती ॥ वरिवरी गा शास्त्रोक्तीं॥ लावूं जातां शेणमाती ॥ नव्हे निष्कृती पापाची ॥ ३०० ॥ माझें क्षणार्ध अनुसंधान ॥ कोटिकल्मषां करी दहन ॥ तेथ इतरांचा केवा कोण ॥ हें स्वयें श्रीकृष्ण बोलिला ॥ १ ॥ ज्याचें अधिकारीं माझें ध्यान ॥ तें सांडोनियां जाण ॥ प्रायश्चित्त सांगतां आन ॥ लागे दूषण सांगत्यासी ॥ २ ॥ यालागीं मुख्यत्वें जाण ॥ येथ अधिकारचि प्रमाण ॥ येचिविखींचें निरूपण॥ श्रीनारायण सांगत ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ स्वेस्वेऽधिकारे या निष्ठा सगुणः परिकीर्तितः ॥ कर्मणां जात्यशुद्धानामनेन नियमः कृतः ॥ गुणदोषविधानेन संगानां त्याजनेच्छया ॥ २६ ॥

॥ टीका ॥ न प्रेरितां शास्त्र श्रुती ॥ विषयीं स्वाभाविक प्रवृत्ती ॥ तिची करावया निवृत्ती ॥ माझी वेदोक्ती प्रवर्तली ॥४॥ एकाएकीं विषयत्यजन॥करावया अशक्त जन॥ त्यासि वेद दावी दोषगुण ॥ त्यागावया जाण विषयांसी ॥ ५ ॥ हे माता हे सहोदर ॥ येथें करूंनये व्यभिचार॥ हे वेद न बोलता अधिकार ॥ तें यथेष्टाचार विषयांचा ॥ ६ ॥ जेथवरी स्त्रीपुरुषव्यक्ती ॥ तेथवरी कामसक्ती ॥ मी नेमितों ना वेदोक्ती ॥ तें व्यभिचारप्राप्ती अनिवार ॥ ७ ॥ सकळ स्त्रिया सांडून ॥ त्यजोनियां इतर वर्ण ॥ 7सवर्ण स्त्री वरावी आपण ॥ अष्टवर्षा जाण नेमस्त ॥ ८ ॥ तिचें वेदोक्त पाणिग्रहण ॥ तेथ साक्षी अग्नि आणि ब्राह्मण ॥ इतरस्त्रियांची वाहूनि आण ॥ स्वदारागमन विध्युक्त ॥ ९ ॥ यापरी म्यां सकळ लोक ॥ स्त्रीकामें ०अतिकामुक ॥ 2स्वदारागमनें देख ॥ केले एकमुख वेदोक्ती ॥ ३१० ॥ याचिपरी म्यां अन्नसंपर्क ॥ वेदवादें नेमिले लोक ॥ येरवीं वर्णसंकर देख ॥ होता आवश्यक वेदेंविण ॥ ११ ॥ तो चुकवावया वर्णसंकर ॥ वर्णाश्रमांचा प्रकार ॥ 5वेद बोलिला साचार ॥ विषयसंचार 4त्यागावा ॥ १२ ॥ विषयांची जे प्रवृत्ती ॥ तेचि अविद्याबाधा निश्चितीं ॥ ※जे विषयांची अतिनिवृत्ती ॥ ती नांव मुक्ती उद्धवा ॥ १३ ॥ करावया विषयनिवृत्ती ॥ वेदें योतिली कर्मप्रवृत्ती ॥ वर्णाश्रमाचार स्थि-

१ असावधपणानें. २ वणव्यांत. ३ नाश. ४ अनंत पातकांस. ५ ब्राह्मणानें ब्राह्मणाची याप्रमाणें. ६ विषयी.

*मो. तंव निंद्यकर्म. ×ना. प्रमाद. +मो. तैसा कांपे पापासी. 7मो. स्ववर्णी स्त्रियेचा विवाह करावा आपण, ना. सवर्ण स्त्रियाचा विवाह जाण. ०मो. जे अतिकामुक. 2मो. ते स्वदारागमनें. 5मो. वेदें. 4मो. त्यागावया. ※मो. त्या विषयांची निवृत्ती.

ती ॥ विषयासक्ती छेदक ॥ १४ ॥ नित्य, नैमित्य, कर्मतंत्र ॥ नाना गुणदोषप्रकार ॥ वेदें द्यो-
तिले स्वाधिकार ॥ विरक्त नर व्हावया ॥ १५ ॥ *स्वकर्में होय चित्तशुद्धी ॥ तेणें वैराग्य उप-
जे त्रिशुद्धी ॥ वैराग्य विषयावस्था छेदी ॥ गुणकार्य उपाधी रजतम ॥ १६ ॥ तेव्हां उरे
शुद्धसत्वगुण ॥ तेथें प्रकटे गुरुभजन ॥ गुरुभजनास्तव जाण ॥ ज्ञानविज्ञान घर रिघे ॥ १७ ॥
पूर्ण करितां भगवद्भक्ती ॥ तें गुरुभजनीं अधिकारप्राप्ती ॥ सद्गुरुमहिमा सांगों किती ॥ मी
आज्ञावर्ती गुरूचा ॥ १८ ॥ गुरु ज्यावरी अनुग्रहो करी ॥ त्यासि मी भगवंत उद्धरीं ॥
आदरें वाऊनियां शिरीं ॥ निजऐश्वर्यावरी बैसवीं ॥ १९ ॥ गुरु परमात्मा परेशु ॥ ऐसा जया-
चा विश्वासू ॥ त्याचा अंकिला मी हृषीकेशू ॥ जो जगदीशू ॥ जगाचा ॥ ३२० ॥ जेथें मी
अंकित झालों आपण ॥ तेथें समाधीसी ज्ञानविज्ञान ॥ वोळगे गुरुभक्ताचें अंगण ॥ तेथ
कैंवा कोण सिद्धीचा ॥ २१ ॥ त्या गुरूचें करूनि हेळण ॥ जो करी माझें भजन ॥ तेणें
×विखेंसी मिष्टान्न ॥ मज भोजन घातलें ॥ २२ ॥ तोंडीं घांस डोईं टोला ॥ ऐसा भजनार्थ
तो झाला ॥ तो जाण सर्वस्वें नागवला ॥ वैरी आपला आपणची ॥ २३ ॥ येथवरी गुरूचें
महिमान ॥ माझेनि वेदें द्योतिलें जाण ॥ करूनि विषयनिर्दळण ॥ स्वाधिकारें +जन तरावया
॥ २४ ॥ यालागीं ज्यासि जो अधिकार ॥ तो तेणें नुलंघावा अणुमात्र ॥ हा वेदें केला निज
निर्धार ॥ स्वकर्में नर तरावया ॥ २५ ॥ तरी ह्मणशी कर्मचि पावन ॥ हेंही सर्वथा न घडे
जाण ॥ स्वाधिकारेंवीण कर्माचरण ॥ तें अतिदारुण बाधक ॥ २६ ॥ संन्यासी करी ❁गृह-
स्थधर्म ॥ तें त्यासि वोडवलें अकर्म ॥ गृहस्थ करी ०करपात्रकर्म ॥ तोचि अधर्म तयासी
॥ २७ ॥ हितासि वोखद वेतां जाण ॥ त्याचें चुकलिया अनुपान ॥ तेंचि अन्यथा होय
आपण ॥ पीडी दारुण मरणांत ॥ २८ ॥ तैसें अनधिकारें करितां कर्म ॥ तेंचि बाधक होय
परम ॥ हें वेदें जाणोनियां वर्म ॥ स्वधर्म सुगम नेमिला ॥ २९ ॥ 'स्वाधिकारें स्वधर्मनिष्ठा'॥
हाचि पुरुषाचा गुण मोठा ॥ तेणें फिटे गुणकर्ममळकटा ॥ प्रिय वैकुंठा तों होय ॥ ३३० ॥
4वेदें बोलिला जो गुण ॥ तो अंगीकारावा आपण ॥ वेदें ठेविलें ज्यासि दूषण ॥ तें सर्वथा
जाण त्यजावें ॥ ३१ ॥ हेंचि गुणदोषलक्षण ॥ करितां वेदविवंचन ॥ गुंतले गा अतिसज्ञान ॥
माझे कृपेवीण वेदार्थ न कळे ॥ ३२ ॥ निषेधमुखें करितां त्यागू ॥ वेद त्यागवी विषयसंगू ॥
हें वर्म जाणोनि जो चांगू ॥ तो होय निःसंगू महायोगी ॥ ३३ ॥ उद्धवा हें वेदतत्त्वसार ॥
तुज म्यां सांगीतलें साचार ॥ ज्यालागीं शिणताति सुरनर ॥ ऋषीश्वर तपस्वी ॥ ३४ ॥ परी
माझे कृपेवीण सर्वथा ॥ हें नये कोणाचिये हातां ॥ तें तुज म्यां सांगीतलें आतां ॥ तुझे
हितार्था निजगुह्य ॥ ३५ ॥ मागें म्यां केलें निरूपण ॥ गुणदोष देखणें तो दोष जाण ॥
त्याचेंही विशद 0विवेचन ॥ तुज मी संपूर्ण सांगीतलें ॥ ३६ ॥ पराचा देखावा दोषगुण ॥ हें
नाहीं माझें वेदवचन ॥ दोष त्यजोनियां आपण ॥ घ्यावा गुण हा वेदार्थ ॥ ३७ ॥ त्यजोनि
पराचे दोषगुण ॥ स्वयें गुण घ्यावा आपण ॥ हेंही माझे कृपेवीण ॥ नव्हे जाण उद्धवा ॥ ३८ ॥

---

१ पाड, गणना. २ डोक्यावर टोला, मार. ३आलें. ४हातांत भिक्षान्न खाणें. ५विष्णूस. ६वेदार्थविचार.

*ना. स्वधर्में. ×मो. विषययुक्त ना. विषें. +ना. जाण. ❁मो. गृहस्थकर्म. ०मो. संन्यास-
कर्म. 4मो वेदु. 0ना. मो. विवंचन.

। देखोनि पराचे दोषगुण ॥ स्वयें होईजे ब्रह्मसंपन्न ॥ ह्मणसी ऐशी कृपा परिपूर्ण ॥ केवीं आपण लाहिजे ॥ ३९ ॥ तेचिविखींचें निरूपण ॥ कृपेनें सांगताहे श्रीकृष्ण ॥ माझे कृपेचें आयतन ॥ उद्धवा जाण मद्भक्ती ॥ ३४० ॥

॥ श्लोक ॥ ॥ जातश्रद्धो मत्कथासु निर्विण्णः सर्वकर्मसु ॥ वेद दुःखात्मकान् कामान् परित्यागेऽप्यनीश्वरः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ ॥ माझे कथेचेनि श्रवणें ॥ उठी संसाराचें धरणें ॥ ऐसा विश्वासु धरिला ज्याणें ॥ जीवें प्राणें निश्चितीं ॥ ४१ ॥ ह्मणे अंधेंदकीं प्राणांतीं ॥ जें हरिकथा आठवे चित्तीं ॥ तें उठे जन्ममरणपंक्ती ॥ येथवरी भक्ती मत्कथेची ॥ ४२ ॥ ऐशिया भावार्थाचे स्थिती ॥ अनिवार उपजे विरक्ती ॥ नावडे *कर्मांची प्रवृत्ती ॥ विषयासक्ती नावडे ॥ ४३ ॥ नावडे इतरकथावदंती ॥ नावडे लौकिकाची ×प्रीती ॥ परी निःशेष त्यागाप्रती ॥ सामर्थ्यशक्ती ज्या नाहीं ॥ ४४ ॥ तेणें अनन्यभावें जाण ॥ अत्यादरें करावें भजन ॥ येचिविखींचें निरूपण ॥ स्वमुखें श्रीकृष्ण सांगत ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ ततो भजेत मां प्रीतः श्रद्धालुर्दृढनिश्चयः ॥ जुषमाणश्च तान्कामान्दुःखोदर्कांश्च गर्हयन् ॥ २८ ॥

॥ टीका ॥ ॥ त्यागावया नाहीं सामर्थ्यशक्ती ॥ त्यासि विषयभोग जेव्हां येती ॥ ते भोगी ऐशिया रीतीं ॥ जेवीं शृंगारिती सुळीं घालावया ॥ ४६ ॥ त्यासि केळेंसीं साखरेच्या +खोटीं ॥ दूध तूप लावितां ओंठीं ॥ शूळ भरेलया भोगापाठीं ॥ तो ०धाक पोटीं धुकधुकी ॥ ४७ ॥ तेवीं विषय भोगितां जाण ॥ पुढें निरय अतिदारुण ॥ मज कां विसरला नारायण ॥ मधुसूदन माधव ॥ ४८ ॥ मी पडिलों विषयबंदिखानीं ॥ वेगीं पावें गरुडा वळघोनी ॥ कृपाळुवा चक्रपाणी ॥ मजलागोनी सोडवी ॥ ४९ ॥ विषयमहाग्रहाचे तोंडीं ॥ मी सांपडलों १बुडिशेंपिंडीं ॥ गजेंद्राचेपरी तांतडीं ॥ घाली उडी मजलागीं ॥ ३५० ॥ धांवपांव गा गोविंदा ॥ निवारीं माझी विषयबाधा ॥ उपेक्षूं नको मुकुंदा ॥ घेऊनि गदा धांव वेगीं ॥ ५१ ॥ तूं अडलियाचा सहाकारी ॥ ❋भक्तकाजकैवारी ॥ मज बुडतां विषयसागरीं ॥ वेगें उद्धरीं गोविंदा ॥ ५२ ॥ मी पडिलों विषयसागरीं ॥ ७बुडालों कामक्रोधलहरीं ॥ ९क्रोधें विसंचिलों भारी ॥ अभिमानसुसरीं गिळियेलों ॥ ५३ ॥ तूं दीनदयाळ श्रीहरी ॥ हें आपुलें बिरुद साच करीं ॥ मज दीनातें उद्धरीं ॥ निजबोधें करीं ३धरोनियां ॥ ५४ ॥ हे विषयबाधा अतिगहन ॥ कांपां न पवे जनार्दन ॥ येणें अट्टहासें जाण ॥ करीं स्मरण हरीचें ॥ ५५ ॥ नसुटे विषयवज्रमिठी ॥ पडिलों कामदंष्ट्रांचिये पोटीं ॥ कांहीं केलिया नसुटे मिठी ॥ आतां जगजेठी धांव वेगीं ॥ ५६ ॥ ऐसा निजभक्तांचा धांवा ॥ क्षणही मज न साहवे उद्धवा ॥ माझी कृपा होय तेव्हां ॥ पूर्ण स्वभावा अनुतापें ॥ ५७ ॥ 'उद्धवा जेथ अनुताप नाहीं ॥ तेथ माझी कृपा नव्हे कांहीं ॥ कृपेचें

१ पाण्यांत अर्धे बुडत असतां. २ नरक. ३ गळांत ४ भक्तवत्सल अशी प्रतिज्ञा. ५ कामरूपदाढांच्या.
*ना. कामाची. ×मो. प्राप्ती. +ना. कोटी. ०मो. धाकें. ८मो. सपिंडीं. ❋मो. भक्तगजभंजनकेसरी. ७मो. बुडविलों काम लोभ लहरीं. ९मो. क्रोधें मीनें. ३मो. गोविंदा.

वर्म हेंच पाहीं ॥ जें अनुताप देहीं अनिवार' ॥ ५८ ॥ माझे कृपेवीण निश्चितीं ॥ कदा नुपजे माझी भक्ती ॥ *माझी झालिया कृपा प्राप्ती ॥ अनन्यभक्ती तो करी ॥ ५९ ॥ 'माझें कृपेचें लक्षण ॥ प्राप्तविषय भोगितां जाण ॥ न तुटे ×माझें अनन्यभजन ॥ पूर्ण कृपा जाण या नांव ॥ ३६० ॥ मग चढत्या वाढत्या प्रीतीं ॥ नीच नवी करी भक्ती ॥ देह, गेह, स्त्री, पुत्र, संपत्ती॥ वेंची माझे प्रीतीं धनधान्य ॥ ६१ ॥ माझे भक्तीलागीं आपण ॥ सर्वस्व वेंची हें नवल कोण॥ स्वयें वंचीना जीवप्राण ॥ ऐसें अनन्यभजन सर्वदा ॥ ६२ ॥ माझ्या भजनाची अतिप्रीती ॥ स्मरण न सांडी अहोरातीं ॥ माझा विसर नपडे चित्तीं ॥ त्याची फळप्राप्ती हरि सांगे ॥६३॥

॥ श्लोक ॥ प्रोक्तेन भक्तियोगेन भजतो माऽसकृन्मुनेः ॥ कामा हृदय्या नश्यंति सर्वे मयि हृदि स्थिते ॥ २९ ॥

॥ टीका ॥ माझी जे कां निजभक्ती ॥ मागां सांगीतली तुजप्रती ॥ त्या हातवटिया मी श्रीपती ॥ यजिलों अतिप्रीतीं वारंवार ॥ ६४ ॥ दिवसदिवसां चढोवढी ॥ अनिवार प्रीति वाढे गाढी ॥ लागतां नीचें नवी गोडी ॥ भजे आवडीं पुनःपुनः ॥ ६६ ॥ केलीचि भक्ती करितां ॥ उबगूं नये सर्वथा ॥ अधिक हर्ष वाटे चित्तां ॥ उल्हासता मद्भजनीं ॥ ६७ ॥ मज आकळूनि आपले मनीं ॥ मनींहोनि प्रीति भजनीं ॥ तेथ सकळ काम जाती नासोनी ॥ जेवीं कां तरणीं खद्योत ॥ ६८ ॥ जेवीं कां केसरी देखोनी ॥ मदगजा होय भंगणी ॥ तेवीं काम जाती हृदयींहूनी ॥ मी चक्रपाणी प्रकटल्या ॥ ६९ ॥ मी प्रकटलों ऐसें ह्मणतां ॥ लाज लागे या वचनार्था ॥ मजवीण ठावो नाहीं रिता ॥ प्रकटलों आतां ह्मणे कोण ॥ ३७० ॥ उद्धवा जाण तत्त्वतां ॥ मी सदा हृदयीं ७असता ॥ भक्तांची भ्रांती जातां ॥ मी स्वभावतां प्रकटची ॥ ७१ ॥ भक्तीं करूनि माझी भक्ती ॥ नाशिली गा निजभ्रांती ॥ तेथ स्वयंभ मी श्रीपती ॥ सहजस्थितीं प्रकटचि ॥ ७२ ॥ मी हृदयीं प्रकटल्या पुढें ॥ भक्तांसि अलभ्य लाभ जोडे ॥ फिटे संसाराचें सांकडें ॥ ऐक फाडोवाडें सांगेन ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ॥ क्षीयंते चास्य कर्माणि मयि दृष्टेऽखिलात्मनि ॥ ३० ॥

॥ टीका ॥ ॥ उद्धवा मी ज्यासि हृदयीं भेटे ॥ तो मी हृदयामाजीं नसंठें ॥ सर्वात्मा सर्वरूपें प्रकटें ॥ नव्हे धाकुटें स्वरूप माझें ॥ ७४ ॥ ऐसा मी प्रकटलिया पाठीं ॥ संसारुचि न पडे दिठीं ॥ +मावळे गुणेंसि भेदत्रिपुटी ॥ पळे उठाउठी भवभय ॥ ७५ ॥ लागतां सूर्याचे किरण ॥ घृताचें नासे कठिणपण ॥ तेवीं मी प्रकटल्या नारायण ॥ न फोडितां जाण लिंगदेह नासे ॥ ७६ ॥ धुई दाटली चहूंकडे ॥ ते चंडवातें तत्काळ उडे ॥ तेवीं माझ्या प्रकाशापुढें ॥ वासनेचें उपुडे समूळ जाळ ॥ ७७ ॥ समूळ उपडतां वासनेसी ॥ संशय ※निभे जीवभावेंसी ॥ तेथ क्षयो झाला कर्मासी ॥ जेवीं रवीपाशीं आंधार ॥ ७८ ॥ ते गुण नासती स्वकार्येंसी ॥

१ हातोटीनें. २ नित्य. ३ एकच व्यवहार करण्याचा कंटाळा. ४ धरून, समजून. ५ धैर्यहानी. ६ स्पष्ट करून. ७ नाहीं. ८ ध्येय, विसरत ध्याता व ध्यान असे तीन. ९ सूक्ष्मदेह, वासनाशरीर.

*मो. माझिये कृपेचिये प्राप्ती. ×मो. माझें अनुसंधान. ०मो. असता. +मो. सकळ गुणेंसी. ※मो. निवटती.

अविद्या नासे अज्ञानेंसी ॥ जीव नाशे *शिवपणेंसी ॥ चिदचिद्ग्रंथीसी[1] अहंकारू ॥७९॥ तेथ सोहंहंसाची बोळवण ॥ न करितांचि जाहली जाण ॥ भेणें पळालें जन्ममरण ॥ पडलें शून्य संसारा ॥ ३८० ॥ यापरी भक्तियोगें गहन ॥ माझें करूनिया भजन ॥ भक्त पावले समाधान ॥ ऐसेनि जाण निजभजनें ॥ ८१ ॥ एवं भक्तिज्ञानकर्मयोग ॥ या तिहीं योगांचा विभाग ॥ तुज म्यां सांगीतला सांग ॥ हें वर्म चांग मत्प्राप्ती ॥ ८२ ॥ येथ विशेषें माझी भक्ती ॥ न पाहे साह्य[2] सांगाती ॥ नव्हे आणिकांची पंगिस्ती ॥ साधी मत्प्राप्ती ×अंगोवांगीं ॥८३॥न करितां माझें भजन॥ सर्वथा नुपजे माझें ज्ञान॥ कर्म न करितां मदर्पण ॥ तेंचि जाण अकर्म ॥ ८४ ॥ यालागीं मुख्य जें निजज्ञान ॥ तें अपेक्षी[4] माझें भजन ॥ तेथ कर्म बापुडें रंक जाण ॥ भजणेंवीण सरेना ॥ ८५ ॥ एवं ज्ञानकर्म परमार्थी ॥ माझे भक्तीस्तव होती सरती[5] ॥ ते भक्तीची निजख्याती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ तस्मान्मद्भक्तियुक्तस्य योगिनो वै मदात्मनः ॥ न ज्ञानं नच वैराग्यं प्रायः श्रेयो भवेदिह ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ ॥ करूं नेणें कर्माचरण ॥ न साधितां वैराग्यज्ञान ॥ भावें करितां माझें भजन ॥ माझ्या स्वरूपीं मन ठेवूनी ॥ ८७ ॥ तेथ ज्ञानकर्मादिकें जाण ॥ मुख्य वैराग्यही आपण ॥ मद्भक्तीसी येती लोटांगण ॥ चरणां शरण पैं होती ॥ ८८ ॥ शरण होणें हें कायशी गोठी ॥ केवळ जन्मती भक्तीच्या पोटीं ॥ मग लडेवाळें वाळूनि मिठी ॥ स्वानंदाची गोमटी मागती गोडी ॥ ८९ ॥ एवं भक्ति आपुले अंकीं जाण ॥ करी ज्ञानादिकांचें लालन ॥ परमानंद पाजूनि पूर्ण ॥ करी पालन निजांगें ॥ ३९० ॥ ते आतुडल्या माझी भक्ती ॥ ज्ञानादिकें कामारी होती ॥ तेचिविखींची उपपत्ती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ यत्कर्मभिर्यत्तपसा ज्ञानवैराग्यतश्च यत् ॥ योगेन दानधर्मेण श्रेयोभिरितरैरपि ॥ ३२ ॥ सर्वं मद्भक्तियोगेन मद्भक्तो लभतेऽजसा ॥ स्वर्गापवर्गं मद्धाम कथंचिद्यदि वांछति ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ जें पाविजे स्वधर्मकर्मादरें ॥ जें पाविजे निर्बंध तपाचारें ॥ जें सांख्यज्ञानविचारें[6]॥ पाविजे निर्धारें जें वस्तु ॥ ९२ ॥ जें पाविजे विषयत्यागें ॥ जें पाविजे अष्टांगयोगें ॥ जें वातांबुपर्णाशनभोगें[7] ॥ जें ज्ञानप्रसंगें पाविजे ॥ ९३ ॥ जें साधे वेदाध्ययनें ॥ जें साधे सत्यवचनें ॥ जें साधे अनेकीं साधनें ॥ तें +मद्भजनें पाविजे ॥ ९४ ॥ हें न सोशितां साधन सांकडें ॥ नुलंघितां गिरिकपाटकडे ॥ हीं सकळ फळें येती दारापुढें॥जें माझी आतुडे निजभक्ती ॥९५॥ उद्धवा तूं ह्मणसी जाण ॥ ऐशी ते तुझी भक्ति कोण ॥ ब्रह्मभावें जें गुरुभजन ॥ ते भक्तीचा पूर्ण हा प्रतापू ॥ ९६ ॥ सद्गुरुभजनापरती ॥ साधकांसि नाहीं प्राप्ती ॥ मी भगवंत करीं गुरुभक्ती ॥ इतरांचा किती पडिपाड[8] ॥ ९७ ॥ मीही सद्गुरुचेनि धर्मे ॥ पावलों ऐवढिये

---

१ चैतन्य व देह यांच्या ग्रंथी. २ गरज. ३ आपण स्वतः ४ जरूर असते. ५ सरस, ग्राह्य. ६ प्रकृति पुरुषाच्या विवेकानें. ७ वायु, पाणी व पानें यांच्या सेवनानें. ८ पाड.

*ना. जीवपणेंसी. ×मो. अंगों आंगीं. +मो. मद्भजनीं.

महिमे ।। त्या सद्‌गुरूचे गुरुगौरिमें ।। कोणें उपमें उपमावें ।। ९८ ।। जे गुरुब्रह्मअभेदभक्त ।। *अवचटें अणुमात्र वांछित ।। तें वैकुंठादि समस्त ।। मी त्यांसि देत ×स्वर्गापवर्ग ।।९९।। हेंही बोलतां अत्यंत थोडें ।। मी त्यांच्या भजनसुखवाडें ।। भुललों गा वाडेंकोडें ।। त्यां मागेंपुढें सदा तिष्ठें ।।४००।। मद्भक्त नैराश्यें अतिगाढे ।। ते मागतील हें कदा न घडे ।। तेंही लक्षण तुजपुढें ।। अतिनिवाडें सांगेन ।। १ ।।

।। श्लोक ।। न किंचित्साधवो धीरा भक्ता ह्येकांतिनो मम ।। वांछंत्यपि मया दत्तं कैवल्यमपुनर्भवम् ।। ३४ ।।

।। टीका ।। ज्यासि नवेणेपणाचा[१] प्रबोधू ।। साचार झाला अतिविशदू ।। ऐसा +निरपेक्ष जो शुद्ध ।। तो सत्य साधू मज मान्य ।। २ ।। ज्याच्या ठायीं निरपेक्षता ।। धैर्य त्याचे चरण वंदी माथां ।। ज्याच्याठायीं अधीरता ।। तेथ निरपेक्षता असेना ।। ३ ।। कोटिजन्में बोधू जोडे ।। तें ⁂देहे निरपेक्षता आतुडे ।। निरपेक्षतेवरुतें चढे ।। ऐसें नाहीं पुढें साधन ।।४।। ऐशिये ०निरपेक्षते चिये प्राप्तीं ।। माझ्या भजनीं अतिप्रीती ।।तो लाहे माझी चौथी भक्ती ।। जीसि एकांती ह्मणे वेदू ।। ५ ।। ऐक *एकांतभक्तीची मातू ।। देवाभक्तांचिये होय एकांतू ।। भक्त रिघे देवा आंतू ।। देव भक्तांतू सबाह्य ।। ६ ।। ऐसें अभेद माझें भजन ।। या नांव एकांत भक्ति जाण ।। मजवेगळें कांहीं भिन्न ।। न देखे आन जगामाजीं ।। ७ ।। त्यासि चहूं पुरुषार्थांसि मुक्ती ।। मी स्वयें 1देताहें श्रीपती ।। ते 8दुरोनि दृष्टीं न पाहती ।। मा धरिती हातीं हें कदा न घडे ।। ८ ।। ते स्वमुखें कांहीं मागती ।। हें कदा न घडे कल्पांतीं ।। सांडूनि माझी एकांतभक्ती ।। कैवल्य न घेती ते 5निजभक्त ।। ९ ।। मोक्षही न घ्यावया 9कोण भावो ।। त्याचाही मथित अभिप्रावो ।। स्वयें सांगताहे 7देवाधिदेवो ।। जो अगम्य पहाहो श्रुतिशास्त्रां ।। ४१० ।।

।। श्लोक ।। नैरपेक्ष्यं परं प्राहुर्निःश्रेयसमनल्पकम् ।। तस्मान्निराशिषो भक्तिर्निरपेक्षस्य मे भवेत् ।। ३५ ।।

।। टीका ।। जो निरपेक्ष निर्विशेष ।। तो मज पूज्य महापुरुष ।। मोक्ष त्याचे दृष्टीं भूस ।। धन्य नैराश्य तिहीं लोकीं ।। ११ ।। 4ऐक निरपेक्षतेचा उत्कृष्ट ।। तेथ चारी पुरुषार्थ फलकट ।। वैकुंठ कैलासादि श्रेष्ठ ।। ते पायवाट निरपेक्षा ।। १२ ।। निरपेक्षापाशीं जाण ।। वोळंगे येती सुरगण ।। तेथ सिद्धींचा पाड कोण ।। वोळगे अंगण कळिकाळ ।। १३ ।। स्वयें महादेव आपण ।। सर्वस्वें करी निंबलोण ।। श्रियेसहित मी 6आपण ।। अंकित जाण तयाचा ।। १४ ।। निरपेक्ष जो माझा भक्त ।। तो मजसमान समर्थ ।। हेंही बोलणें अहाच येथ ।। तो मीचि निश्चित 3चिद्रूपें ।।१५।। मी परमात्मा परमानंद ।। भक्त 2मद्भजनें शुद्ध स्वानंद ।। दोघे अभेद स्वानंद-

१ मोठेपणास. २ स्वर्ग व मोक्ष. ३ निरपेक्षतेचा. ४ लीन होतो. ५ उत्कर्ष. ६ तुच्छ. ७ स्वतःपायांनीं. ८ वृथा.

*मो. आवडतें. ×मो. स्वग्राम. +मो. निरपेक्षित जो साधु. ⁂मो. देहीं निरपेक्षता. ०ना निरपेक्ष प्राप्ती. *मो. एकांततेची मातु. 1मो. देता. 8मो. दुरूनिही. 5ना. मद्भक्त. 9ना. कोण कारण भावो. 7मो. देवादिदेवो. 4मो. ऐसी निरपेक्षा उत्कृट ना. ऐक निरपेक्षाचा उत्कृष्ट. 6मो. जाण. 3मो. चिद्रूप. 2मो. मद्भक्ति.

कंद ॥ सच्चिदानंद निजरूपें ॥ १६ ॥ ऐसें मद्भावें भक्त संपन्न ॥ ते न देखती दोषगुण ॥ तेंचि-विखींचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ न मय्येकांतभक्तानां गुणदोषोद्भवा गुणाः ॥ साधूनां समचित्तानां बुद्धेः परमुपेयुषाम् ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ जो न देखे *विषयभेदू ॥ ज्यासि समत्वाचा निजबोधू ॥ तोचि बोलिजे शुद्ध साधू ॥ परमानंदू मद्भजनें ॥ १८ ॥ मी एक परमात्मा सर्वभूतीं ॥ न देखे द्वैताची प्रतीती ॥ ऐशी ×ज्यासी भजनस्थिती ॥ एकांतभक्ति त्या नांव ॥१९॥ सदा समभावें एकाग्र ॥ माझ्या भजनीं अतितत्पर ॥ ते प्रकृतीचे परपार ॥ पावले साचार मद्रूपें ॥ ४२० ॥ ऐसे मद्भावें भक्त परिपूर्ण ॥ ते न देखती दोषगुण ॥ उद्धवा म्यां हे निजखूण ॥ पूर्वीं तुज जाण सांगीतली ॥२१॥ साकरेची साली फेडणें ॥ कीं कापुरांचा कोंडा काढणें ॥ रत्नदीपाची काजळी फेडणें ॥ +तेवीं गुणदोष देखणें नाहीं मद्भक्तां ॥ २२ ॥ ज्याचा घ्यावा अवगुण ॥ मुख्य अवगुणी मी आपण ॥ ज्याचा घ्यावा उत्तम गुण ॥ तोही जाण मद्रूप ॥ २३ ॥ यापरी भक्त जगजेठी ॥ मद्रूपें ०देखणें सकळ सृष्टी ॥ त्यांसि गुणदोषांची गोष्टी ॥ न पडे दृष्टीं सर्वथा ॥ २४ ॥ गुण-दोष न देखावे जाण ॥ हेंचि साधनीं मुख्य साधन ॥ येचि अर्थीचें निरूपण ॥ आदरें श्रीकृष्ण सांगत ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ एवमेतान्मयादिष्टाननुतिष्ठंति मे पथः ॥ क्षेमं विंदंति मत्स्थानं यद्ब्रह्म परमं विदुः ॥३७॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे विंशतितमोऽध्यायः ॥ २० ॥

॥ टीका ॥ उद्धवा यापरी जाण ॥ म्यां वेदवादें आपण ॥ उपदेशिले गा ⁂जन ॥ भक्तिज्ञान-कर्मयोगें ॥२६॥ कर्मीचि कर्म छेदिजेती ॥ ऐशी कर्मयोगाची गती ॥ स्वधर्मकर्म माझी प्राप्ती ॥ ते म्यां तुजप्रती सांगीतली ॥ २७ ॥ नित्यानित्यविवेचन ॥ करूनि अनित्यनिर्दळण ॥ या ज्ञानयोगाचें लक्षण ॥ तुज म्यां संपूर्ण सांगीतलें ॥२८॥ तैशीच करितां माझी भक्ती ॥ सकळ फळें पायां लागती ॥ 6भक्तांसि अनायासें माझी प्राप्ती ॥ हेंही तुजप्रती सांगीतलें ॥ २९ ॥ अधिकारभेदेंसी सांग ॥ त्रिकांड त्रिविध वेदमार्ग ॥ माझे प्राप्तीलागीं चांग ॥ विशद विभाग म्यां केले ॥ ४३० ॥ म्यां सांगीतल्या ऐसें जाण ॥ जो वेदमार्गें करी अनुष्ठान ॥ तो माझी प्राप्ती पावे संपूर्ण ॥ सगुण निर्गुण यथारुचि ॥ ३१ ॥ सगुणसाक्षात्कार जो येथ ॥ तें पंचरात्रागममत ॥ वैकुंठचि मुख्य ह्मणत ॥ हें मत निश्चित तयांचें ॥ ३२ ॥ सप्तावरणांबाहेरीं ॥ मायावरणाभीतरीं ॥ वैकुंठ रचिलें श्रीहरीं ॥ हें बोलिजे निर्धारीं वेदांतीं ॥ ३३ ॥ तेथ आगमाचें मनोगत ॥ माया ते भवलीला ह्मणत ॥ स्वलीला वैकुंठ रची भगवंत ॥ क्षयो तेथ असेना ॥ ३४ ॥ जेथ लीलाविग्रही मेघश्याम ॥ स्वयें वसे पुरुषोत्तम ॥ तेथ नाहीं गुणकाळ कर्म ॥ *मायादिभ्रम रिघेना ॥ ३५ ॥ एवं जन्मक्षयातीत ॥ वैकुंठ अक्षयी निजनित्य ॥ तेथ पावले ते

१ कापुराची साल. २ लीलेनें शरीर धारण करणारा.

*मो. विषमभेदु. ×मो. ज्याची. +मो. तेवीं गुणदोष देखणें सृष्टीमाजीं. ०मो. देखे सष्टी. ⁂मो. जाण. 6मो. स्वधर्मकर्में माझी प्राप्ती. *मो. मायादिभ्रम.

नित्यमुक्त ।। हें आगममत उद्धवा ।।३६।। मंत्रें आराध्य दैवतें प्रसन्नें ॥ हें वेदार्थियांचें बोलणें ॥ तें म्यां तुजप्रती अनुसंधानें ॥ बोलिलों जाणे उद्धवा ।। ३७ ।। भावार्थभक्तीचें लक्षण ॥ ते प्रसन्नतेची खूण ॥ हें पूर्वी केलें निरूपण ।। निरुतें जाण उद्धवा ।। ३८ ।। ये अर्थीं वेदांती ह्मणत ।। अत्यंत प्रळयींचा आघात ।। तो वैकुंठकैलासादि समस्त ॥ साकारवंत निर्दाळी ॥ ३९ ॥ ते काळींचे उर्वरित ॥ केवळ जें गुणातीत ॥ तें पूर्ण ब्रह्म सदोदित ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ४४० ।। जेथ काळ ना कर्म ॥ जेथ गुण ना धर्म ।। जेथ माया पावे उपरम ॥ तें परब्रह्म उद्धवा ।। ४१ ॥ माझें स्थान वैकुंठ जाण ।। तेथील प्राप्ति सायुज्य सगुण ॥ पूर्ण सायुज्यता संपूर्ण ॥ ब्रह्म परिपूर्ण सदोदित ॥ ४२ ॥ पावावया पूर्ण परब्रह्म ।। साधकांसि कोणे मार्गीं क्षेम ॥ वेदोक्त मद्भक्ति सुगम ।। उत्तमोत्तम हा मार्ग ।। ४३ ।। आणिके मार्गीं जातां जाण ।। कामलोभादि उठे विघ्न ॥ कां बुडवी ज्ञानाभिमान ॥ ये नागवण प्रत्यवायींची ।।४४।। तैसें नाहीं भक्तिपंथीं ।। सवें नवविध सांगाती ॥ चढतां पाउलीं अतिविश्रांती ॥ भजनयुक्ति मद्भावें ।। ४५ ॥ तेथील मुख्यत्वें साधन ॥ गेलियाही जीव प्राण ॥ कदा न देखावे दोषगुण ॥ तें ब्रह्म परिपूर्ण पाविजे ।। ४६ ।। जेथ नाहीं भयभ्रांती ॥ जेथ नाहीं दिवसराती ॥ जेथ नाहीं जीवस्थिती ।। तें ब्रह्म पावती मद्भक्त ।। ४७ ।। जेथ नाहीं रूपनाम ॥ जेथ नाहीं काळ कर्म ।। जेथ नाहीं मरण जन्म ॥ तें *परब्रह्म पावती ।। ४८ ॥ जेथ नाहीं ध्येय ध्यान ॥ जेथ नाहीं ज्ञेय ज्ञान ॥ जेथ नाहीं मीतूंपण ॥ तें ब्रह्म परिपूर्ण पावती ।। ४९ ।। ज्यासि नाहीं मातापिता ॥ जें नव्हे देव ना देवता ॥ जें बहु ना एकुलता ।। तें ब्रह्म तत्त्वतां पावती ॥ ४५० ।। जेथ नाहीं ×वर्णाश्रम ।। जेथ नाहीं क्रियाकर्म ।। जेथ नाहीं मायाभ्रम ॥ तें परब्रह्म पावती ॥ ५१ ।। जें ※गुणागुणीं अतीतें ॥ जें लक्ष्यलक्षणारहित ॥ जें स्वानंदें सदोदित ।। तें ब्रह्म प्राप्त मद्भक्तां ॥ ५२ ।। पूर्णकृपेचा हेलावा ॥ न संडेचि देवाधिदेवा ॥ तो हा एकादशीं विसावा ।। तुज म्यां उद्धवा दीधला ॥ ५३ ॥ जेथ ठावो नाहीं देहभावा ॥ जेथ सामरस्य जीवशिवां ।। तो हा एकादशींचा विसावा ।। तुज म्यां उद्धवा दीधला ॥ ५४ ॥ जेथ उगाणा होय अहंभावा ।। जेथ शून्य पडे मायेच्या नांवा ।। तो हा एकादशीं विसावा ॥ तुज म्यां उद्धवा दीधला ।। ५५ ।। कधीं +स्वानंदें स्वयें जोडावा ।। त्या स्वानंदाचा आइता ठेवा ॥ तो हा एकादशीं विसावा ॥ तुज म्यां उद्धवा दीधला ।। ५६ ॥ जेथ देवभक्तांचा कोलोवा ।। एकत्र होय आघवा ॥ तो हा एकादशींचा विसावा ॥ तुज म्यां उद्धवा दीधला ।। ५७ ।। करोनि भेदाचा नागोवा ॥ होय अभेदाचा रिघावा ।। तो हा एकादशींचा विसावा ॥ तुज म्यां उद्धवा दीधला ॥ ५८ ॥ काढोनि भावार्थाचा भावो ॥ सोलींव सोलिवांचा सोलावो ॥ गाळुनी गाळिवांचा भक्तिभावो ॥ उद्धवासी देवो देतसे ।। ५९ ॥ यापरी श्रीकृष्णनाथ ।। होऊनियां स्वानंदभरित ।। विसाव्या अध्यायींची मात।। हरिखें सांगत उद्धवा ।। ४६० ॥ आतां विसाव्याचा विसावा ॥ स्वानंदसुखाचा हेलावा ॥ ०तो मी सांगेन एकविसावा ॥ ऐक उद्धवा सादर ।। ६१ ॥ वेदीं शुद्धाशुद्धल-

१ खरें. २ शेप. ३ कल्याण. ४ प्रायश्चित्ताची ५ रहित. ६ भरतें. ७ ऐक्यता. ८ नागवण. ९ मेळ काला. १० नाश. ११ कथा. १२ भरतें.

*मो. ब्रह्म परिपूर्ण पावती. ×ना. वर्णाश्रमधर्म. ※मो. गुणागुणातीत. +ना. स्वानंद होय जोडावा. ०मो. तो म्यां सांगीतला उद्धवा, तुझे कणवे कारणें.

क्षण ॥ हें पुढिले अध्यायीं निरूपण ॥ एका विनवी जनार्दन ॥ श्रोतां अवधान मज द्यावें ॥ ६२ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे एकाकारटीकायां वेदत्रयीत्रिभागयोगो नाम विंशतितमोऽध्यायः ॥ २० ॥ अध्याय ॥ २० ॥ ॥ श्लोक ॥ ३७ ॥ ओंव्या ॥ ४६२ ॥ एकूण ॥ ४९९ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

# अध्याय एकविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमो सद्गुरु वैकुंठनाथा॥स्वानंदवैकुंठीं सदा वसता ॥ तुझें ऐश्वर्य स्वभावता ॥ न कळे अनंता अव्यया ॥ १ ॥ तुझ्या निजबोधाचा गरुड ॥ कर जोडूनि उभा दृढ ॥ ज्याच्या पंखाडांचा झडाड ॥ उन्मळी *सुदृढ भववृक्षा ॥ २ ॥ तुझें स्वानुभवैकचक्र ॥ लखलखित तेजाकार ॥ द्वैतदळणीं सतेजधार ॥ अतिदुर्धर महामारी ॥३॥ कैसा पांचजन्य अगाध ॥ निःशब्दीं उठवी महाशब्द ॥ वेदानुवादें गर्जे शुद्ध ॥ तोचि प्रसिद्ध शंख तुझा ॥ ४ ॥ झळफळित सर्वदा ॥ निजतेजें ×मिरवे गदा ॥ करित मानाभिमानांचा चेंदा ॥ ते तुझी गदा गंभीर ॥ ५ ॥ अतिमनोहर केवळ ॥ देखतां उपजे सुखकल्लोळ ॥ +परमानंदें आमोद बहळ ॥ तें लीलाकमळ झेलिसी ॥ ६ ॥ जीवशिव समसमानी ॥ जयविजय नांवें ※देऊनी ॥ तेचि द्वारपाळ दोनी ॥ आज्ञापूनी स्थापिले ॥७॥ तुझी निजशक्ति साजिरी॥ रमा रूपें अतिसुंदरी ॥ अखंड चरणसेवा करी ॥ अत्यादरीं सादर ॥८ तुझे लोकींचे निवासी जाण ॥ अवघे तुजचि समान ॥ तेथ नाहीं मानापमान ॥ देहाभिमान असेना ॥ ९ ॥ जेथ काळाचा रिगमु नाहीं ॥ कर्माचें नचले कांहीं ॥जन्ममरणाचें भय नाहीं ॥ ऐशिया ठायीं °तूं स्वामी ॥ १० ॥ जेथ कामक्रोधाचा घात ॥ क्षुधेतृषेचा प्रांत ॥ निजानंदें नित्यतृप्त ॥ निजभक्त तुझेनि ॥ ११ ॥ तुझेनि कृपाकटाक्षें ॥ *अलक्ष न लक्षितां लक्षे ॥ तुझ्या चरणसेवापेक्षें ॥ नित्य [1]निरपेक्षं नांदविसी ॥ १२ ॥ साम्यतेचें सिंहासन ॥ ऐक्यतेची गादी जाण ॥ त्यावरी तुझें सहजासन ॥ परिपूर्ण स्वभावें ॥ १३ ॥ तन्मयतेचें निजच्छत्र ॥ संतोषाचें आतपत्र ॥ ज्ञान-विज्ञानयुग्म चामर ॥ सहजें निरंतर ढळताती ॥ १४ ॥ तेथ चारी वेद तुझे भाट ॥ कीर्ति वर्णिती उद्भट ॥ अठरा मागध अतिश्रेष्ठ ॥ वर्णिती चोखट वंशावळी ॥ १५ ॥ तेथ साहीजणा वेवाद ॥ नानाकुसरीं बोलती शब्द ॥ युक्तिप्रयुक्तीं देती बाध ॥ दाविती विनोद [6]जाणिव ॥ १६ ॥ एक भावार्थी तुजलागुनी ॥ स्तुति करिती [7]न बोलूनी ॥ तेणें स्तवनें संतोषोनी ॥ निजासनीं बैसविशी ॥ १७ ॥ ऐसा सद्गुरु महाविष्णू ॥ जो चिद्रूपें समसहिष्णू ॥ जो [8]भ्राजमानें भ्राजिष्णू ॥ जनीं जनार्दन तो एक ॥१८॥ जगीं जनार्दनुचि एकला ॥ तेथ ए-

१ राहणारा. २ संसाररूपवृक्षास. ३ आत्मानुभवरूप. ४ महामारक. ५ पुष्कळ. ६ छत्री. ७ स्तुतिपाठकविशेष. ८ अठरापुराणें. ९ शास्त्रांचे. १० तेजस्वी.

*मो. समूळ भववृक्षा. ×ना. मिरविसी सदां. +ना. परमानंद मोद बहळ. ※मो. ठेउनी. °मो. रहिवासु तुझा. *ना. अलक्ष लक्षितां लक्षे. 1ना. निरपेक्ष. 6मो. जाणिवेचा. 7ना. निंबलोणी. 8मो. भ्राजमान.

कपणें एका मीनला ॥ तेणें एकपणाचाही ग्रास केला ॥ ऐसा झाला महाबोध ॥ १९ ॥ त्या महाबोधाचें बोधांजन ॥ हातेंवीण लेववी जनार्दन ॥तेणें सर्वांगीं निवाले नयनें ॥ *देखणेंपण सर्वत्र ॥ २० ॥ परी सर्वत्र देखतां जन ॥ देखणेंनि दिसे जनार्दन ॥ ऐशी पूर्ण कृपा करून ॥ एकपण सांडविलें ॥ २१ ॥ ऐसा तुष्टोनि भगवंत ॥ माझेनि ×हातें श्रीभागवत ॥अर्थविलें जी यथार्थ॥ +शेखीं प्राकृत देशभाषा ॥ २२ ॥ श्रीभागवतीं संस्कृत ॥ उपाय असतांही बहुत ॥ काय नेणों आवडलें येथ ॥ करवी प्राकृत प्रबोधें ॥ २३ ॥ म्यां करणें कां न करणें ॥ हें हिरूनि नेलें जनार्दनें ॥ आतां ग्रंथार्थनिरूपणें ॥ माझें बोलणें तो बोले ॥ २४ ॥ ❀तेणें बोलोनि निजगौरवा ॥ वेदविभागसद्भावा ॥ तो एकादशीं विसावा ॥ उद्धवासि बरवा निरूपिला ॥ २५ ॥ थ भक्त आणि सज्ञान ॥ त्यांसि 0पावली वेदार्थाची खूण ॥ कर्मठीं देखतां दोषगुण ॥ संशयीं जाण ते पडिले ॥ २६ ॥ त्या संशयाचें निरसन ॥ करावया श्रीकृष्ण ॥ एकविसावा निरूपण ॥ गुणदोषलक्षण स्वयें सांगे ॥२७॥ गुणदोषांचा विभाग ॥ सांगोनियां विषयत्याग॥ करावया श्रीरंग ॥ निरूपण सांग सांगत ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच॥ य एतान्मत्पथो हित्वा भक्तिज्ञानक्रियात्मकान्॥

क्षुद्रान्कामांश्चलैः प्राणैर्जुषंतः संसरंति ते ॥१॥

॥ टीका ॥ म्यां सांगीतले विभाग ॥ भक्तिज्ञानक्रियायोग ॥ हा सांडूनि शुद्ध वेदमार्ग ॥ सकाम भोग जे वांछिती ॥ २९ ॥ क्षणभंगुर देहाचा 1योग ॥ हें विसरोनियां चांग ॥ सकामकर्माची लगबग॥भवस्वर्गभोग भोगावया॥३०॥चळतेनि प्राणसंगें॥देहातें *काळ ग्रासूं लागे ॥ तेथ नानाकामसंभोगें ॥ मूर्ख तद्योगें मानिती सुख ॥ ३१ ॥ भोगितां 2कामभोगसोहळे ॥ तेणें आयुष्य ग्रासिलें काळें ॥ मग जन्ममरणमाळे ॥ दुःखउमाळे भोगिती ॥ ३२ ॥ काम्य आणि नित्यकर्म ॥ आचरतां दिसे सम ॥ तरी फळीं कां पां विषम ॥ सुगमदुर्गम परिपाकू ॥ ३३ ॥ तें कर्म विचित्रविंदान ॥ संकल्पास्तव घडे जाण ॥ तेंचि अर्थाचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ स्वेस्वेऽधिकारे या निष्ठा स गुणः परिकीर्तितः ॥ विपर्ययस्तु दोषः स्यादुभयोरेष निश्चयः ॥ २ ॥

॥ टीका ॥ कर्म विचारितां अवघें एक ॥ परी ०अधिकार भिन्नभिन्न देख ॥ ते मी सांगेन आवश्यक ॥ जेणें सुखदुःख भोगणें घडे ॥ ३५ ॥ मुखाचा व्यापार भोजन ॥ 9तो नाकें करूं जातां जाण ॥ सुख बुडवूनि दारुण ॥ दुःख आपण स्वयें भोगी ॥ ३६ ॥ कां पायांचें चालणं ॥ पडे जें 8डोई करणें ॥ तें मार्ग नकंठे तेणें ॥ परी कष्टणें अनिवार ॥ ३७ ॥ तेवीं जें कर्म स्वाधिकारें ॥सुखातें दे अत्यादरें ॥ तेंचि कर्म अनधिकारें ॥ दुःख 3दुर्धरें भोगवी ॥३८॥

---

१ डोळे. २ हरणकरून. ३ पहिला श्वास सुरू होतांच. ४ दुःखाचे लोट. ५ सुलभ, व अवघड परिणाम. ६ नसरे.

*ना. एकपण सांडविलें. ×मो. मुखें. +मो. तेंही प्राकृत. ❀मो. तेणें बोलें गौरवा. 0ना. फावली. 1ना. भोग. *ना. प्राण ग्रासूं. 2ना. कामसोहळे ०ना. अधिकारी. 9मो. तो करूं जातां कानें. 8मो. डोयांकारणें. 3ना. दुर्भरें.

गजाचें आभरण ॥ गाढवासि नव्हे भूषण ॥ परी भारें आणी मरण ॥तेवीं कर्म जाण *अनधिकारीं॥३९॥'मेघ वर्षे निर्मळ जळ ॥ परी जैसें बीज तैसें फळ ॥ एका भांगीं पिके सकळ॥ एका प्रबळ साळी केळी ॥ ४० ॥ पाहे पां जैसें दूध चोख ॥ ज्वरितामुखीं कडू विख ॥ तेंचि ×निर्ज्वरां गोड देख ॥ पुष्टिदायक सेवनीं ॥ ४१ ॥ तेवीं सकामीं कर्म पडे ॥ तें बाधक होय गाढें ॥ +तेंचि कर्म निष्कामाकडे ॥ मोक्षसुखाडें सुखावी ॥४२॥ स्वाधिकारें *स्वधर्माचरण ॥ तोचि येथें मुख्यत्वें गुण ॥ अनधिकारीं कर्म जाण ॥ तोचि अवगुण महादोष ॥ ४३ ॥ या रीतीं या कर्माचरण ॥ उपजवी दोष आणि गुण ॥ हेंचि गुणदोषलक्षण ॥ शास्त्रज्ञ जाण बोलती ॥ ४४ ॥ तेंचि गुणदोषलक्षण ॥ शुद्धयशुद्धीचें कारण ॥ तेचि अर्थींचें विवंचन ॥ देव आपण सांगत ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ ॥ शुद्धयशुद्धी विधीयेते समानेष्वपि वस्तुषु ॥ द्रव्यस्य विचिकित्सार्थं गुणदोषौ शुभाशुभौ ॥ ३ ॥

॥ टीका ॥ ॥ पंचभूतें समान जाण ॥ वस्तु सर्वत्र समसमान ॥ ०तेथ गुणदोष अप्रमाण ॥ परी केलें प्रमाण या हेतू ॥ ४६ ॥ न प्रेरितां श्रुतिस्मृती ॥ आविर्भक विषयप्रवृत्ती ॥ अनिवार सकळभूतीं ॥ सहजस्थितीं स्वभावें ॥४७॥ ऐसी स्वाभाविक विषयस्थिती ॥ तिची करावया उपरती ॥ नानागुणदोष बोले श्रुती ॥ विषयनिवृत्तीलागुनी ॥ ४८ ॥ हें एक शुद्ध, एक अशुद्ध॥ पैलें शुभ, हें विरुद्ध ॥ मीचि बोलिलों वेदानुवाद ॥ विषयबाध छेदावया ॥ ४९ ॥ विषयाची जे निवृत्ती ॥ तीचि वेदरूपें म्यां केली स्तुती ॥ निंदिली विषयप्रवृत्ती ॥ चिळसी चित्तीं उपजावया ॥ ५० ॥ चालतां कर्मप्रवृत्ती ॥ हो विषयांची निवृत्ती ॥ ऐशी वेदद्वारें केली युक्ती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ धर्मार्थं व्यवहारार्थं यात्रार्थमिति चानघ ॥ दर्शितोऽयं मयाचारो धर्ममुद्वहतां धुरम् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ उद्धवा तूं निष्पाप त्रिशुद्धी ॥ यालागीं तुझी शुद्ध बुद्धी ॥ धर्मादिव्यवहारसिद्धी ॥ ऐक तो विधी सांगेन ॥ ५२ ॥ करितांही धर्माचरण ॥ प्रवृत्तिधर्म तो अप्रमाण ॥ निवृत्ति तो अतिशुद्ध जाण ॥ हे दोषगुण स्वधर्मीं ॥ ५३ ॥ जो व्यवहार विषयासक्तीं ॥ ते अशुद्ध व्यवहारस्थिती ॥ जे परोपकारप्रवृत्तीं ॥ तो व्यवहार वंदिती सुरनर॥५४॥अदृष्टता दाता ईश्वर ॥ 2हें विसरोनि उत्तम नर ॥ द्रव्यलोभें नीचांचे दारोदार ॥ हिंडणें अपवित्र ते यात्रा ॥ ५५ ॥ आळस सांडोनि आपण ॥ करूं जातां श्रवण कीर्तन ॥ कां तीर्थयात्रा ꙮसाधुदर्शन ॥ पूजार्थ गमन देवालयीं ॥ ५६ ॥ 'कां अनाथप्रेतसंस्कार ॥ करितां पुण्य जोडे अपार ॥ पैदीं

---

१ वस्त्रालंकार. २ वजनानें. ३ भांग=एक मादक पाला. भांगा=शेताचा भाग. ४ निरोग्यास. ५ परमात्मा. ६ अज्ञानजन्य. ७ पलीकडचें तें. ८ कर्ममार्ग. ९ ज्ञानमार्ग. १० ज्यास कोणी संबंधी नाहींत अशा प्रेतास अग्नि देणें वगैरे. ११ पावलोंपावलीं.

*ना. अनाधिकारिया. ×मो निज्वरा. +ना. तेंचि निष्कर्माकडे. *मो. स्वकर्माचरण. ०मो. तेणें. 2मो. हा विसरोनी उत्तम प्रकार. ꙮमो. सिद्ध दर्शन.

कोटियज्ञफळसंभार ॥ जेणें साचार उपजती १ ॥ ५७ ॥ जेणें पाविजे परपार ॥ तिये नांव यात्रा पवित्र ॥ हा यात्रार्थसंचार ॥ गुणदोषविचार वेदोक्त ॥ ५८ ॥ राजा निजपादुका हटेसीं२॥ वाहवी ब्राह्मणाचे शिसीं३ ॥ तो दोष नपवे द्विजासी ॥ स्वयें सदोषी होय राजा ॥ ५९ ॥ जेव्हीं४ आपत्काळबळें५ जाण ॥ पडतां लंघनीं६लंघन ॥ तें घेऊनि नीचाचें७धान्य ॥ वांचवितां प्राण दोष नाहीं ॥ ६० ॥ तेंचि नीचाचें *दान ॥ अनापदीं८ घेतां आपण ॥ जनीं महादोष दारुण ॥ ×हेंही जाण वेदोक्त ॥ ६१ ॥ जें कर्म धर्मप्रवर्तक शुद्ध ॥ मनुपराशरादि प्रसिद्ध ॥ तिहीं हे गुणदोष विविध ॥ शुद्धाशुद्ध बोलिले ॥ ६२ ॥ तेंचि शुद्धाशुद्धनिरूपण ॥ +तीं श्लोकीं नारायण ॥ स्वयें सांगताहे आपण ॥ गुणदोषलक्षणविभाग ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ ॥ भूम्यम्ब्वग्न्यनिलाकाशा भूतानां पंच धातवः ॥ आब्रह्मस्थावरादीनां शारीरा आत्मसंयुताः ॥ ५ ॥ वेदेन नामरूपाणि विषमाणि समेष्वपि ॥ धातुषूद्धव कल्प्यंत एतेषां स्वार्थसिद्धये ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ॥ पृथ्वी आप तेज वायु गगन ॥ ब्रह्मादि स्थावरांत जाण ॥ भूतीं पंचभूतें समान ॥ वस्तूहि आपण सम सर्वां ॥ ६४ ॥ नाहीं नामरूप गुण कर्म ॥ ऐसें जें केवळ सम ॥ तेथ माझेनि वेदें विषम ॥ केलें रूप नाम हितार्थ ॥ ६५॥ तळीं पृथ्वी, वरी गगन ॥ पाहतां दोनीही समान ॥ तेथ दशदिशा कल्पिल्या जाण ॥ देशांतरगमनसिद्ध्यर्थ ॥ ६६ ॥ तेवीं नामरूपवर्णाश्रम ॥ समाच्याठायीं विषम ॥ हा माझेनि वेदें केला नेम ॥ स्वधर्मकर्मसिद्ध्यर्थ ॥ ६७ ॥ येणेंचि द्वारें सुलक्षण ॥ धर्मार्थकाममोक्षसाधन ॥ पुरुषांच्या हितालागीं जाण ॥ म्यां केलें नियमन वेदाज्ञें ॥ ६८ ॥ रूप, नाम, आश्रम, वर्ण, ॥ वेद नेमिता ना आपण ॥ तें व्यवहारू न घडतां जाण ॥ मोक्षसाधन तें कैंचें ॥ ६९ ॥ एवं वेदें चालवूनि व्यवहारू ॥ तेथेंचि परमार्थविचारू ॥ ०दाविला असे चमत्कारू ॥ सभाग्य नरू तो जाणे ॥ ७० ॥ अत्यंत करितां कर्मादर१०॥ तेणें कर्मठचि होय नर ॥ तेथ परमार्थ नाहीं साचार ॥ विधिनिषेधीं थोर पीडिजे ॥ ७१ ॥ केवळ स्वधर्मकर्म सांडितां ॥ अंगीं आदळे पाषांडता११ ॥ तेणेंही मोक्ष नये हातां ॥ निजस्वार्था नागवले१२ ॥ ७२ ॥ यालागीं स्वधर्म आचरतां ॥ निजमोक्ष लाभे आइता ॥ हे वेदार्थांची योग्यता ॥ जाणे तो ज्ञाता सज्ञान ॥७३॥ हे वेदार्थनिजयोग्यता ॥ सहसा नये कवणाचे हातां ॥ याचिलागीं परमार्था ॥ गुरु सर्वथा करावा ॥ ७४ ॥ त्या सद्गुरूची पूर्ण कृपा होय ॥ तरीच आतुडे१३ वेद गुह्य ॥ गुरुकृपेवीण जे उपाय ॥ ते अपाय साधकां ॥ ७५ ॥ यालागीं माझा वेद जगद्गुरू ॥ दावी आपादतां१४ व्यवहारू ॥ नेमी स्वधर्मकर्मादरू ॥ जनाचा उद्धारू करावया ॥ ७६ ॥ ऐसा माझा वेद हितकारी ॥ दावूनि गुणदोष नानापरी ॥ जन काढी विषयाबाहेरीं ॥ वेद उपकारी जगाचा ॥ ७७ ॥

---

१ उद्धार, भवपार. २ जुलुमानें. ३ डोक्यावर. ४ जेव्हां. ५ संकटसमयीं. ६ उपासामागें उपास. ७ शूद्रादिकांचें. ८ संकट नसतां. ९ जडापर्यंत. १० कर्माच्याठिकाणीं आसक्ति. ११नास्तिकपणा. १२साधनावांचून. १३ प्राप्त होय. १४ आपाततः=पहिल्यानें.

*मो. धान्य. ×मो. देहीं जाण आदळती. +मो. स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ गुणदोष विभाग लक्षण ॥ सांग संपूर्ण विभाग. ०ना. लाविला.

॥ श्लोक ॥ ॥ देशकालादिभावानां वस्तूनां मम सत्तम ॥ गुणदोषौ विधीयेते नियमार्थं हि कर्मणाम् ॥ ७ ॥

**॥ टीका ॥ ॥ भक्तांमाजीं भक्तोत्तम ॥ साधुलक्षणीं साधु सम ॥ यालागीं उद्धवासि 'सत्तम' ॥ ह्मणे पुरुषोत्तम अतिप्रीतीं ॥ ७८ ॥ उद्धवा येथ भलता नर ॥ भलता करील कर्मादर ॥ यालागीं वर्णाश्रमविचार ॥ नेमिला साचार वेदाज्ञे ॥ ७९ ॥ जेथ करूं नये कर्मतंत्र ॥ ऐसा देश जो अपवित्र ॥ आणि काळादि द्रव्य विचित्र ॥ पवित्रापवित्र सांगेन ॥ ८० ॥**

॥ श्लोक ॥ ॥ अकृष्णसारो देशानामब्रह्मण्योऽशुचिर्भवेत् ॥ कृष्णसारोऽप्यसौवीरकीकटासंस्कृतेरिणम् ॥ ८ ॥

**॥ टीका ॥ कोणे एके पृथ्वीतळीं ॥ मेघ न वर्षतां जळीं ॥ पेरिलीं धान्यें सदा निळीं ॥ *वसुधा जिव्हाळीं तेणें ह्मणती ॥८१॥ तेंचि ×पाहतां पृथ्वीवरी ॥ +एके भागीं गा उखरीं ॥ मेघ ※वर्षतां जळ शरधारीं ॥ ०अंकुरेना डिरीं उखरत्वें ॥ ८२ ॥ तेवीं देशाची शुद्धयशुद्धी ॥ तुज मी सांगेन यथाविधी ॥ जेथ कर्मी नव्हे कार्यसिद्धी ॥ तेथ कर्म त्रिशुद्धी न करावें ॥८३॥ कृष्णमृग जेथें नाहीं ॥ ते जाण पां अपवित्र भुयी ॥ कर्मादरू तियेठायीं ॥ न करावा पाहीं सर्वथा ॥ ८४ ॥ जेथ ब्राह्मणाचि नाहीं ॥ तो देश अपवित्र पाहीं ॥ 2ब्राह्मण अकर्मी जेठायीं ॥ तेही भुयी अपवित्र ॥ ८५ ॥ जेथें ब्राह्मणाची अभक्ती ॥ शेवीं हेळेंमनि निंदिती ॥ तो देशगा कर्माप्रती ॥ जाण निश्चितीं अपवित्र ॥ ८६ ॥ जे देशीं कृष्णमृग असती ॥ परी नाहीं भगवद्भक्ती ॥ तो देशु कर्माप्रती ॥ जाण निश्चितीं अपवित्र ॥ ८७ ॥ भक्तिहीन देश प्रसिद्ध ॥ 7कीकट कलिंग मागध ॥ तेथ 6स्वधर्म नव्हती शुद्ध ॥ जाण अशुद्ध तो देश ॥ ८८ ॥ नाहीं 3उपलेपें संमार्जन ॥ ते स्वगृहीं भूमी अशुद्ध जाण ॥ कां जेथ वेदबाह्य 0असज्जन ॥ तेंही स्थान अपवित्र ॥ ८९ ॥ जे भूमी केवळ उखर ॥ ते जाण सदा अपवित्र ॥ आतां काळाचें काळतंत्र ॥ पवित्रापवित्र सांगेन ॥ ९० ॥**

॥ श्लोक ॥ कर्मण्यो गुणवान्कालो द्रव्यतः स्वत एव वा ॥ यतो निवर्त्तते कर्म स दोषोऽकर्मकः स्मृतः ॥ ९ ॥

**॥ टीका ॥ देश काळ द्रव्य पात्र ॥ हे सामग्री होय स्वतंत्र ॥ तोचि काळ अतिपवित्र ॥ वेदशास्त्रसंमत ॥ ९१ ॥ ग्रहणकपिलाषष्ठयादिद्वारा ॥ तो काळ परम पवित्र खरा ॥ कां संतसज्जन आलिया घरा ॥ काळाचा उभारा अतिपवित्र ॥९२॥ हो कां संपत्ति आलिया हातां ॥ कां धर्मी उल्हास जेव्हां चित्तां ॥ तो पुण्यकाळ तत्वतां ॥ वेदशास्त्रार्थी अनुकूल ॥ ९३ ॥ पुरुषासि *पर्वकाळ ॥ जन्मांत जोडे एकवेळ ॥ मातापित्यांचा अंतकाळ ॥ ते धर्माची वेळ अति-**

---

१ टवटवित. २ पृथ्वी. ३ ओलाव्याची. ४ शेताचा भाग. ५ खडकाळ. ६ मुसळधार पाऊस. ७ डिक्षी. ८ काळवीट. ९ विहितकर्म न करणारे व निषिद्ध कर्म करणारे. १० अनादर करून. ११ लिंपणें सारवणें. १२ वेदाला असंमत. १३ वरड. १४ मृत्युसमय.

***मो. वसुंधरा. ×मो. पाहे. +ना. एक भोय गा. ※मो. वर्षतांही शिळाधारीं. ०मो. अंकुरेना उखरत्वें. 2मो. ब्राह्मणकर्म जे ठायीं नाहीं ॥ ते भूमी पाहीं अपवित्र. 7मो. कट ना. कैकट. 6मो. स्वकर्मे. 3मो. उपलेपन. 0मो. असे जन. *मो. सर्व सार्थककाळ.**

पवित्र ॥ ९४ ॥ हा पर्वकाळ मागुता ॥ पुरुषासि नातुडे सर्वथा ॥तेथ *श्रद्धेनें धर्म करितां ॥ पवित्रता अक्षयी ॥ ९५ ॥ स्वभावें काळाची पवित्रता ॥ तुज मी सांगेन आतां ॥ जो उपकारी सर्वथा ॥ निजस्वार्था साधक ॥ ९६ ॥ ब्राह्ममुहूर्त स्वसत्ता ॥ पवित्र जाण स्वभावतां ॥ जो साधकांच्या निजस्वार्था ॥ होय वाढविता अनुदिनीं ॥ ९७ ॥ काळाची अकर्मकता ॥ ऐक सांगेन मी आतां ॥ कर्म करूं नये स्वभावतां ॥ निषिद्धता महादोषू ॥ ९८ ॥ जेथ जळ स्थळादि सर्वथा ॥ विहित द्रव्य नये हातां ॥ तो काळ अकर्मकता ॥ जाण तत्त्वतां +निश्चित ॥ ९९ ॥ जो काळ सूतकें व्यापिला ॥ कां राष्ट्रा उपद्रवें जो आला ॥ जे काळीं देह परतंत्र झाला ॥ तो काळ बोलिला अकर्मक ॥ १०० ॥ जो काळ दुर्भिक्षेसि आला ॥ जो कां ज्वरादि दोषीं दूषिला ॥ जो काळ चोराकुलित झाला ॥ तो काळ बोलिला अकर्मक ॥ १ ॥ जे काळीं क्रोध संचारला ॥ जेथ तमोगुण क्षोभला ॥ निद्रालस्यें व्यापिला ॥ तो काळ बोलिला अकर्मक ॥ २ ॥ अकस्मात सुखसंपदा ॥ कां अभिनव वार्ता एकदा ॥ कां लंघिजे भल्याची मर्यादा ॥ तो काळ सर्वदा अकर्मक ॥ ३ ॥ कां मार्गीं विषमतां ॥ पंथ क्रमिजे चालतां ॥ तेथ पडे दुर्धरता ॥ तो काळ तत्त्वतां अकर्मक ॥ ४ ॥ जे काळीं द्रव्यलोभ दारुण ॥ जे काळीं चिंता गहन ॥ जेव्हां विकल्पें ※भरे मन ॥ तो काळ जाण अकर्मक ॥ ५ ॥ ऐशी काळाची अकर्मकता ॥ तुज म्यां सांगीतली तत्वतां ॥ आतां द्रव्याची शुद्धाशुद्धता ॥ ऐक सर्वथा सांगेन ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥ द्रव्यस्य शुद्ध्यशुद्धी च द्रव्येण वचनेनच ॥ संस्कारेणाऽथ कालेन महत्त्वाल्पतयाऽथवा ॥ १० ॥

॥ टीका ॥ 6पुरुषें गोमूत्र सेवितां ॥ तात्काळ पात्रें पवित्रता ॥ तेंचि ताम्रपात्रीं घेतां ॥ ते अपवित्रता तत्काळ ॥ ७ ॥ पुरुषें जळ प्रोक्षितां ॥ ०पुष्पांसि पवित्रता ॥ तेंचि 1पुरुषें अंग घ्राणितां ॥ अपवित्रता ×पुष्पासी ॥ ८ ॥ अग्नीची सेवा करितां ॥ द्विजासि परमपवित्रता ॥ तो द्विज *अग्निहोत्र जाळितां ॥ ये अपवित्रता अग्नीसी ॥ ९ ॥ दर्भी पिंड ठेवितां पवित्र ॥ पिंडस्पर्शें दर्भ अपवित्र ॥ ऐशीं शुद्ध्यशुद्धि विचित्र ॥ बोलिले शास्त्रश्रुत्यर्थ ॥ ११० ॥ जे वस्तु संशयापन्न ॥ त्याच्या शुद्धीसि ब्राह्मणवचन ॥ ज्याचें वचन प्रमाण ॥ हरिहर जाण मानिती ॥११॥ घृतसंस्कारें शुद्ध अन्न ॥ होमसंस्कारें नवधान्य ॥अग्निसंस्कारें लवण ॥ अपवित्र जाण शास्त्रार्थें ॥ १२ ॥ रकारापुढें मकार ॥ मांडूनि करितां उच्चार ॥ जिणोनि पापांचा संभार ॥ होय तो नर शुद्धात्मा ॥ १३ ॥ त्याचि मकारापुढें 8यकार ॥ ठेवूनि करितां उच्चार ॥ अंगीं आदळे पाप घोर ॥ तेणें होय नर अतिबद्ध ॥ १४ ॥ रजस्वला शुद्ध चतुर्थाहनीं ॥ मेघोदक शुद्ध तिसरे दिनीं ॥ वृद्धिसूतक दहावे दिनीं ॥ काळ शुद्धपणीं या हेतू ॥ १५ ॥ पूर्व दिवशींचें जे

१ पहांट. २ कर्माविषयीं अयोग्यता. ३ उपद्रव. ४ कधीं न ऐकिलेली. ५ संकट. ६ जिंकण्यास किंवा सहन करण्यास अशक्यता. ७ तांब्याच्या भांड्यांत. ८ शिंपडलें असतां. ९ फुलास. १० वास घेतला असतां. ११ नृप घातलें असतां. १२ राम नामाचा उच्चार. १३ मद्य या शब्दांत. १४ चवथे दिवशीं.

*मो. धनधर्म करितां. +मो. निषिद्ध. ※मो. भरलें. 6ना. पुष्पें. ०मो. पुरुषासी. 1ना. पुष्पें. ×मो. पुरुषासी. *मो. अग्निहोत्रें. 8ना. रकार.

अन्न ॥ तें *काळेंचि पावे गा दूषण ॥ ज्यासि आलें शिळेपण ॥ तें अन्न जाण अशुद्ध ॥१६॥ तैसें नव्हे घृतपाचित ॥ तें बहुतकाळें तरी पुनीत ॥ जें विटोनि विकारी होत ॥ तें अपुनीत काळेंचि ॥ १७ ॥ जें सांचवणी अल्पजळ ॥ त्यासि स्पर्शल्या चांडाळ ॥ तें अपवित्र गा सकळ ॥ नये अळुमाळ स्पर्श करूं ॥ १८ ॥ तेंचि निर्झर कां अक्षोभ जळ ॥ तेथ स्पर्शल्याही चांडाळ ॥ त्यासि लागेना तो विटाळ ॥ तें नित्य निर्मळ पवित्र ॥ १९ ॥ अल्प केलिया स्वयंपाक ॥ त्यासि जैं आतळे श्वान काक ॥ तैं तें सांडावें निःशेख ॥ अपवित्र देख तें अन्न ॥ १२० ॥ तोचि सहस्रभोजनाचा पाक ॥ त्यासि आतळल्या श्वान काक ॥ सांडावें जेथ लागलें मुखं ॥ येर अन्न निर्दोष भोजनीं ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ ॥ शक्त्याऽशक्त्याऽथवा बुद्ध्या समृद्ध्या च यदात्मने ॥ अघं कुर्वंति हि यथा देशावस्थानुसारतः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ ॥ झालिया चंद्रसूर्यग्रहण ॥ शक्तें स्नान न करितां दूषण ॥ बाळक, वृद्ध, आतुर जन ॥ न करितां स्नान दोष नाहीं ॥ २२ ॥ पुत्र जन्मलिया देख ॥ स्वगोत्रज जे सकाळिक ॥ त्यांसि जाण आवश्यक ॥ ×बाधी सूतक दहा दिवस ॥२३॥ तेंचि स्थळांतरीं पुत्रश्रवण ॥ सूतकाअंतीं झाल्या जाण ॥ त्या सूतकाचें बंधन ॥ न बाधी आपणा सर्वथा ॥ २४ ॥ पूर्वदिनीं गोत्रज अंतरे ॥ तैं स्वगोत्रीं सूतक भरे ॥ येरे दिवशीं दुसरा जें मरे ॥ तैं सूतकें +उतरे दोहींचें ॥ २५ ॥ जेणें घेतलें होय विख ॥ त्यासि सर्पु 7लावितिलिया देख ॥ तेणें विखें उतरे 4विख ॥ तेवीं सूतकें सूतक निवारे ॥ २६ ॥ जें बुद्धिपूर्वक केलें आपण ॥ तें अवश्य भोगावें पाप पुण्य ॥ जें बुद्धीसि नाहीं विद्यमान ॥ तें अहेतुक जाण बाधीना ॥ २७ ॥ आपुलें जें अंतःकरण ॥ त्यासि पवित्र करी निजज्ञान ॥ हे बुद्धीची शुद्धता जाण ॥ विवेकसंपन्न वैराग्यें ॥ २८ ॥ जो धनवंत अतिसंपन्न ॥ त्यासि जुनें वस्त्र अपावन ॥ शिविलें दंडिलें तेंही जाण ॥ नव्हे पावन समर्था ॥ २९ ॥ तेंचि दुर्बळाप्रति जाण ॥ अतिशयें परमपावन ॥ हा ०वेदवाद अतिगहन ॥ ※स्मृतिकारीं जाण प्रकाशिलें ॥१३०॥ समर्थासि असाक्षि भोजन ॥ तें जाणावें अशुद्धान्न ॥ दुर्बळासि एकल्या अशन ॥ परम पावन अत्यर्थें ॥ ३१ ॥ स्वयें न करितां पंचयज्ञ ॥ भोजन तें पापभक्षण ॥ सकळसुकृतासि नागवण ॥ जें पराङ्मुखपण अतिथीसी ॥ ३२ ॥ स्वग्रामीं सर्वही स्वाचार ॥ ग्रामांतरीं 6अर्ध आचार ॥ पुरीं पैंट्टणीं *पादमात्र ॥ मार्गीं, 3कर्मांदर संगानुसार ॥ ३३ ॥ विचारोनि देशावस्था ॥ हे धर्ममर्यादा तत्त्वतां ॥ याहूनि अन्यथा करितां ॥ दोष सर्वथा कर्त्यासी ॥ ३४ ॥ पौंटव्य असतां स्वदेहासी ॥ कर्म न करितां

१ तुपांत तळलेलें. २ तत्काळ. ३ थोडेंही. ४ प्रवाहाचें. ५ डोहाचें अचळ. ६ शिवे. ७ तोंड लागलें तितकेंच. ८ नीरोग्यानें. ९ दुखणेकरी. १० सुवेर, जाताशौच. ११ भाऊबंध. १२ मरे. १३ जातें. १४ अपवित्र. १५ दंड घातलेलें. १६ कोणी पंक्तीस नसतां. १७ खाणें, भोजन. १८ देव, ऋषि, पितर, भूत व मनुष्य यज्ञ. १९ राजधानींत. २० चवथ्या अंशानें २१ तरतरी, शक्ती.

***मो. काळींच. ×मो. वृद्धी. +ना. उडे. 7मो. झोंबिविलियां. 4मो. सविख. ०मो. वेदवाक्य. ※मो. श्रुति प्रकारीं. 6मो. अर्धमाचार. *मो. पादमाचार. 3ना. कर्मांदर संगानुसंगें.**

महादोषी ॥ रोगें व्यापिल्या शरीरासी ॥ कर्मकर्त्यासी अतिदोष ॥३५॥ पूर्वी द्रव्याद्रव्यशुद्धी । सांगीतलीया यथाविधी ॥ तोचि मागुतेंनि प्रतिपादी ॥ *धर्मशास्त्रसिद्धी वेदोक्त ॥ ३६ ॥

॥ श्लोक ॥ धान्यदार्वस्थितंतूनां रसतैजसचर्मणाम् ॥ कालवाय्वग्निमृत्तोयैः पार्थिवानां युतायुतैः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ शूद्रप्रतिग्रहाचें धान्य ॥ एकरात्रीं शुद्ध जाण ॥ स्रुक् स्रुवादि काष्ठभाजन ॥ जलप्रक्षालन शुद्धत्व ॥ ३७ ॥ व्याघ्रनख, गंजदंत ॥ अपवित्र जंव स्नेहयुक्त ॥ जेव्हां होती स्नेहातीत। अतिपुनीत ते काळीं ॥३८॥ पटतंतु स्वयें पुनीत ॥ वायूनें शुद्ध ऊर्णातंतू ॥ वस्त्रतंतु जळाआंत ॥ होय पुनीत प्रक्षाळिल्या ॥३९॥ गोक्षीरें पवित्र ✻कांस्यमृत्पात्रीं ॥ तेंचि अपवित्र ताम्रपात्रीं ॥ ताम्रपवित्र आम्लेंकरी ॥ आम्ल ×लवणांतरीं पवित्र ॥१४०॥ घृत पवित्र अग्निसंस्कारीं ॥ अग्नि पवित्र ब्राह्मणमंत्रीं ॥ ब्राह्मण पवित्र स्वाचारीं ॥ पवित्रता आचारीं वेदोक्तविधी ॥ ४१ ॥ वेद पवित्र गुरुमुखें ॥ गुरु पवित्र ०निजात्मसुखें ॥ आत्मा पवित्र गुरुचरणोदकें ॥ उदकें 7पवित्र द्विजचरणीं ॥ ४२ ॥ पृथ्वी पवित्र जळसंस्कारीं ॥ जळ पवित्र पृथ्वीवरी ॥ चर्म पवित्र तैलेंकरी ॥ तैल चर्मपात्रीं पवित्र ॥ ४३ ॥ व्याघ्रादि जें मृगाजिन ॥ ईयें स्वभावें पवित्र जाण ॥ अग्निसंस्कारें 4सुवर्ण ॥ पवित्रपण स्वभावें ॥ ४४ ॥ एवं इत्यादि परस्परीं ॥ शुचित्व बोलिलें स्मृति 0शास्त्रीं ॥ आतां मैळलिप्त झालियावरी ॥ त्याचेंही अवधारी शुचित्व ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ अमेध्यलिप्तं यद्येन गंधं लेपं व्यपोहति ॥ भजते प्रकृतिं तस्य तच्छौचं तावदिष्यते ॥ १३ ॥

॥ टीका ॥ पात्र, पीठ कां आसन॥अमेध्यलिप्त झाल्या जाण ॥ 8त्या गंधाचें निःशेषक्षालन॥ तेणें पवित्रपण तयांसी ॥४६॥ नाभीखालता ज्याच्या शरीरा ॥ अमेध्यलेप लागल्या खरा ॥ ते ठायींचा गंध जाय पुरा ॥ ऐसें धूतल्या त्या नरा शुचित्व लाभे ॥ ४७ ॥ नाभीवरतें अमेध्यलेपन ॥ अवचटें झालिया जाण ॥ तें करावें मृत्तिकास्नान ॥ तेणें पावन तो पुरुष ॥ ४८ ॥ मळ धूतल्या तत्काळ जाती ॥ परी त्या गंधाची 9होय निवृत्ती ॥ प्रकृती पावे जें 5निजस्थिती ॥ *मैळनिष्कृती त्या नांव ॥ ४९ ॥ बाह्यपदार्थ निवृत्तिनिष्ठें ॥ वेद बोलिला या खटपटें ॥ आतां कर्त्याचें शुचित्व प्रकटे ॥ ते ऐक गोमटे उपाय ॥ १५० ॥

॥ श्लोक ॥ स्नानदानतपोवस्थावीर्यसंस्कारकर्मभिः ॥ मत्स्मृत्या चात्मनः शौचं शुद्धः कर्माचरेत् द्विजः ॥ १४ ॥

---

१ सांगतो. २ लांकडांचीं पात्रें. ३ पाण्यानें धुतल्यानें. ४ वाघनख. ५ हस्तिदंत. ६ ओखट, चरबीनें युक्त. ७ दुकूल, रेशीम. ८ मेंढरें इत्यादिकांची लोंकर. ९ कापूस. १० गायीचें दूध. ११ आंबटानें. १२ गुरूच्या पायाच्या तीर्थानें. १३ बुधला. १४ हीं. १५ मलिन. १६ अपवित्र पदार्थ. १७ वासाचें, १८ मलाचें दूरीकरण.

*मो. धर्मशास्त्रविधि. ✻मो. मृण्मयपात्रीं. ×मो. लवणेंकरीं. ०मो. नित्य निजात्मसुखें. 7ना. पवित्र उदकें गुरुचरणीं. 4ना. संपूर्ण. 0ना. श्रुतिशास्त्रीं. 8मो. त्याचें. 9मो. न होय. 5मो. निजात्मस्थिती. *मो. मळनिवृत्ती.

॥ टीका ॥ गर्भाधानादि अन्नप्राशन ॥ ते *बाल्यावस्था संपूर्ण ॥ चौलें तें कुमारावस्था जाण॥ ब्राह्मणपण उपनयनें ॥५१॥ ×कर्मभूमिकेलागीं स्नान ॥ द्रव्यशुद्धीलागीं कीजे दान ॥ वैराग्यालागीं तप जाण ॥ कर्माचरण जडत्वैत्यागा ॥ ५२ ॥ माझिया भजनीं दृढ बुद्धी ॥ त्या नांव जाण वीर्यसिद्धी ॥ माझेनि स्मरणें चित्तशुद्धी ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ५३ ॥ ऐसऐसिया विधीं ॥ ब्राह्मण जे कां सुबुद्धी ॥ सबाह्य पात्रावया शुद्धी ॥ वेद उपपादी स्वकर्मे ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ मंत्रस्य च परिज्ञानं कर्मशुद्धिर्मदर्पणम् ॥ धर्मः संपद्यते षड्भिरधर्मस्तु विपर्ययः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ मंत्रशुद्धि मंत्रार्थज्ञानें ॥ कर्मशुद्धि ब्रह्मार्पणें ॥ इयें कर्त्याचे शुद्धीकारणें ॥ साही लक्षणें वेद बोले ॥ ५५ ॥ देशकाळद्रव्यसंपन्नता ॥ मंत्रकर्म निरुज कर्ता ॥ या साहींच्या शुद्धावस्था ॥ स्वधर्मता फलोन्मुख ॥ ५६ ॥ जें द्रव्य पात्रे दीनार्ता ॥ कां माझिया निजभक्तां ॥ त्या नांव द्रव्यपवित्रता ॥ जाण तत्त्वतां निश्चित ॥ ५७ ॥ +धर्मशास्त्रार्थें शुद्ध धन ॥ कष्टें मिळवूनियां आपण ॥ धनलोभीं ❀टेविल्या प्राण ॥ अवर्वेचि जाण अशुद्ध ॥ ५८ ॥ या नांव द्रव्यशुद्धता ॥ ऐक मंत्राची पवित्रता ॥ जेणें मंत्रें पाविजे मंत्रार्था ॥ शुद्ध सर्वथा तो मंत्र ॥ ५९ ॥ जेथ केलिया मंत्रग्रहण ॥ अंगीं चढता वाढे अभिमान ॥ कां जेथ जारण-मारण ॥ ते मंत्र जाण अपवित्र ॥ १६० ॥ या नांव मंत्रशुद्धी जाण ॥ ऐक कर्माचें लक्षण ॥ जेणें कर्मे तुटे कर्मबंधनें ॥ तें कर्माचरण अतिशुद्ध ॥ ६१ ॥ स्वयें करितां कर्माचरण ॥ जेणें खवळे देहाभिमान ॥ कर्त्यासि लागे दृढबंधन ॥ तें कर्म जाण अपवित्र ॥ ६२ ॥ जेणें कर्में होय कर्माचा निरास ॥ तें शुद्ध कर्म सावकाश ॥ जेथ समबुद्धि सदा अविनाश ॥ तो पुण्यदेश उद्धवा ॥ ६३ ॥ जरी सुक्षेत्रीं केला वास ॥ आणि परांचे देखे गुणदोष ॥ तो देश जाणावा तामस ॥ अचुक नाश कर्त्यासी ॥ ६४ ॥ अन्यक्षेत्रीं देखिल्या ०दोष ॥ 8त्याचा सुक्षेत्रीं होय नाश ॥ 3सुक्षेत्रीं देखिल्या दोष ॥ तो न सोडी जीवास कल्पांतीं ॥६५॥ ' जेथ उपजे 6साम्यशील ॥ तो देश जाणावा निर्मळ ॥ चित्त सुप्रसन्न जे वेळ ॥ तो पुण्यकाळ साधकां ' ॥ ६६ ॥ स्वभावें शुद्ध ब्राह्ममुहूर्त ॥ तेथही क्षोभल्या चित्त ॥ तोही काळ अपुनीत ॥ जाण निश्चित वेदार्थ ॥ ६७ ॥ येथ जो कां कर्मकर्ता ॥ त्याची गेलिया कर्मअहंता ॥ पुढें कर्म चाले स्वभावतां ॥ हे पवित्रता कर्त्याची ॥ ६८ ॥ येथ जो ह्मणे अहंकर्ता ॥ तो पावे अतिबद्धता ॥ हे 2कर्त्याची अपवित्रता ॥ देहअहंताअभिमानें ॥ ६९ ॥ 5धर्माधर्मांचे साही प्रकार ॥ हें वेदार्थाचें तत्त्वसार ॥ येही धर्मीं मुक्त होय नर ॥ अधर्मी अपवित्र अति-

---

१ शेंडी. २ मुंजीनें. ३ आलस्य दूर होण्याकरितां. ४ सांगतो. ५ ईश्वरार्पण केल्यानें. ६ आवडीनें भक्तीनें दिलेलें. ७ संसारसंबंध. ८ दुसऱ्याचे. ९ कर्मास अपवित्र. १० ऐक्यबुद्धि. ११ पहांट. १२ मी कर्ता. १३ गुह्य.

*मो. बालवयसा. ×मो. कर्मशुद्धीलागीं. +मो. धर्मशास्त्रें.' ❀मो. वेंचिल्या प्राण. ०मो. गुणदोष. 8मो. पुण्यक्षेत्रीं होय निरास. 3मो. पुण्यक्षेत्रीं. 6मो. सौम्यतासहित. 2मो. कर्माची. 5धर्माधर्मांचे.

बद्ध ॥ १७० ॥ गुणदोषांचें लक्षण ॥ सांगतां अतिगहन ॥ येथ गुंतले सज्ञान ॥ अतिविचक्षण पंडित ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ क्वचिद्गुणोऽपि दोषः स्याद्दोषोऽपि विधिना गुणः ॥ गुणदोषार्थ-नियमस्तद्भिदामेव बाधते ॥ १६ ॥

॥ टीका ॥ ॥ ज्याचा मानिजे उत्तम गुण ॥ दोष होय परतोन ॥ एवं कर्मचि कर्मासि जाण ॥ होय दूषण निजक्रिया ॥ ७२ ॥ कर्मीं मुख्यत्वें गा आचमन ॥ हें कर्मशुद्धीचें निजकारण ॥ तेंचि दक्षिणामुखें केल्या जाण ॥ दोष दारुण उपजवी ॥७३॥ कानींची जेणें जाय तिडीक ॥ तेंचि मुखीं घालितां देख ॥ होय अत्यंत बाधक ॥ *प्राणांतिक अतिबाधा ॥ ७४ ॥ आचमनीं मापैमात्र जीवन ॥ घेतल्या होईजे पावन ॥ तेंचि अधिक घेतां जाण ॥ सुरापानेसम दोष ॥ ७५ ॥ फणस खातां लागे गोड ॥ तें जैं अधिक खाय तोंड ॥ तैं शूळ उठे प्रचंड ॥ फुटे ब्रह्मांड आंतव्यथा ॥ ७६ ॥ सूर्य पूजितां पुण्य घडे ॥ तेथ जैं बेलपत्र चढे ॥ तैं पुण्य राहे मागिलीकडे ॥ दोष रोकडे पूजकां ॥७७॥ ऐसा कर्मीं कर्मविन्यासें ॥ गुण तोचि करी दोष ॥ कोठें दोषांचाही विलास ॥ पुण्य बहुवस उपजवी ॥ ७८ ॥ चोराकुलितमार्गीं जाण ॥ ब्राह्मण करितां ❀प्रातःस्नान ॥ तो नेतां कर्म त्यागून ॥ दोषचि, परी गुण गंभीर होय ॥ ७९ ॥ सर्प-गरळेचें जीवन ॥ ब्राह्मणें करितां प्राशन ॥ तें पात्र घेतां हिरोनें ॥ दोष परी तो गुण गंभीर होय ॥१८०॥ गृहस्थासि अग्निहोत्र गुण ॥ तोचि संन्याशासि अवगुण ॥ ब्राह्मणा विहितमंत्र-पठण ॥ शूद्रासि जाण तो दोष ॥ ८१ ॥ विषयनिवृत्तीलागीं ०सुगम ॥ गुणदोषांचा केला नेम ॥ हें नेणोनि वेदाचें वर्म ॥ विषयभ्रम भ्रांतासी ॥ ८२॥ 'जंव भ्रांति तंव कर्मप्रवृत्ती' ॥ तेथ गुणदोषांचीं थोर ख्याती ॥ जेवीं कां खद्योत लखलखिती ॥ आंधारे रातीं सतेज ॥ ८३ ॥ तेवीं गुणदोषांमाजीं जाण ॥ अवश्य अंगीं आदळे पतन ॥ तेंचि अर्थीचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ समानकर्माचरणं पतितानां न पातकम् ॥ औत्पत्तिको गुणः संगो न शयानः पतत्यधः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ ॥ स्वकर्में पतित जाहले जाण ॥ डोंब, भिल्ल कैवर्तक जन ॥ यांसि मद्यपानादि-दोषीं जाण ॥ नाहीं पतनें पतितासी ॥ ८५ ॥ जें नीळीमाजीं काळें केलें ॥ त्यासि काय बांधावें +काजळें ॥ कां अंधारासि मसीं माखिलें ॥ तेणें काय मळलें ×तयाचें ॥ ८६ ॥ जो स्वभावें जन्मला चांडाळ ॥ त्यासि कोणाचा बाधी विटाळ ॥ हो कां काळें करवें काजळ ॥ ऐसें नाहीं बळ 1कृतणासी ॥ ८७ ॥ निर्जीवा दीधलें विख ॥ तेणें कोणासि द्यावें दुःख ॥ तेवीं पतितासी पातक ॥ नव्हे बाधक सर्वथा ॥ ८८ ॥ जो केवळ खाले

१ दक्षिण दिशेस तोंड करून. २ ज्या औषधानें तिडीक नाहींशी होते. ३ उडीद बुडेल इतकेंच. ४ पाणी. ५ दारू प्याल्याप्रमाणें. ६ एकीकडे. ७ कर्मव्यवस्था. ८ त्या ब्राह्मणाला स्नान न करूं दिल्यास. ९ हिसकावून. १० धीवर. ११ पातक.

*मो. प्राणांत प्राणियांसी. ❀मो. संध्यास्नान. ०मो. परम. +मो. काळें. ×मो. मसीचें. 1ना. मो. काटासी.

निजेला ॥ त्यासी पडण्याचा भैंवो गेला ॥ तेवीं देहाभिमानीं जो आला ॥ तो नीचांचा झाला अतिनीच ॥ ८९ ॥ रजतमादिगुणसंगीं ॥ जो लोलंगत विषयालागीं ॥ त्यासी तिळगुळांदि कामभोगीं ॥ नव्हे नवी आंगीं देहबुद्धी ॥ १९० ॥ जो कनकबीजें भुलविला ॥ तो गाये नाचे हरिखेला ॥ परी संचितार्थ चोरीं नेला ॥ हा नेणेचि आपुला निजस्वार्थ ॥ ९१ ॥ तेवीं देहाभिमानें उन्मत्त ॥ अतिकामें कामासक्त ॥ तो नेणे बुडाला निजस्वार्थ ॥ आपुला अपघात देखेना ॥ ९२ ॥ ज्यासि चढला विखाचा बासेटा ॥ त्यासि पाजावी सूकरविष्ठा ॥ तेवीं अतिकामी पापिष्ठा ॥ स्यां स्वदारानिष्ठा नेमिली ॥ ९३ ॥ ज्यासि विख चढलें गहन ॥ त्यासि सूकरविष्ठेचें अनुपान ॥ हें ते काळींचें विधान ॥ स्वयें सज्ञान बोलती ॥ ९४ ॥ तेवीं जेथवरी स्त्रीपुरुषव्यक्ती ॥ तेथवरी स्वेच्छा कामासक्ती ॥ त्याची करावया निवृत्ती ॥ स्वदारास्थिती नेमिली वेदें ॥९५॥ वेदें निरोप दिधला आपण ॥ तें दिवा रातीं दारागमन ॥ हें वेदें नियमिलें नाहीं *जाण ॥ ×स्वदारागमन ऋतुकाळीं ॥ ९६ ॥ तेथ जन्मलिया पुत्रासी ॥ "आत्मा वै पुत्रनामासी" ॥ येणें वेदवचनें पुरुषासी ॥ स्त्रीकामासी निवर्तवी ॥ ९७ ॥ निःशेष विष उतरल्यावरी ॥ तो सूकरविष्ठा हातीं न धरी ॥ तेवीं विरक्ति उपजल्या अंतरीं ॥ स्वदाराही दूरी त्यागिती ॥ ९८ ॥ यापरी विषयनिवृत्ती ॥ माझ्या वेदाची वेदोक्ती ॥ दावूनि गुणदोषांची युक्ती ॥ विषयासक्ती सांडवी ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ यतो यतो निवर्त्तेत विमुच्येत ततस्ततः ॥ एष धर्मो नृणां क्षेमः शोकमोहभयापहः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ माझिया वेदाचें मनोगत ॥ विषयीं व्हावें विरक्त ॥ यालागीं गुणदोष दावित ॥ विषयत्यागार्थ उपावो ॥२००॥ एकाकीं सकळ विषयांसी ॥ त्याग न करवे प्राण्यासी ॥ यालागीं ‡निषेधोनें त्यासी ॥ शनैःशनैः विषयांसी त्यागवी ॥१॥ जों जों विषयाची निवृत्ती ॥ तों तों निजसुखाची प्राप्ती ॥ पूर्ण बाणल्यां विरक्ती ॥ साधक होती मद्रूप ॥२॥ मद्रूपतेचिये प्राप्ती ॥ आडवी असे विषयासक्ती ॥ ते झालिया विषयनिवृत्ती ॥ साधक होती मद्रूप ॥ ३ ॥ जेथ माझिया स्वरूपाची प्राप्ती ॥ तेथ निःशेष निमे अहंकृती ॥ +शोकमोहाची होय शांती ॥ जाय निश्चितीं अविद्या ॥ ४ ॥ अविद्यानाशास्तवें जाण ॥ नाशती जन्मभाव दारुण ॥ तेव्हां मरणासीच ये मरण ॥ हारपे जीवपण जीवाचें ॥ ५ ॥ अविद्या निमाल्या जीवेंसी ॥ ठावो नाहीं भवभयासी ॥ जेवीं सबळबळें अंधारेंसीं ॥ नुरे निशी दिनोदयीं ॥६॥ जेवीं कां मृगजळाचा पूर ॥ न साहे दृष्टीचा निर्धार ॥ तेवीं भवभयेंसि संसार ॥ झाला साचार वाउगा ॥ ७ ॥ प्राणी पावावया कल्याण ॥ हें वेदोक्त स्वधर्माचरण ॥ विषयत्यागालागीं जाण ॥ केलें निरूपण गुणदोषां ॥८॥ जे साच वेदार्थातें नेणती ॥ ते वेद प्रवृत्तिपर म्हणती ॥ परी वेदें योतिली विर-

१ भीति गेली. २ त्रिगुणाचे प्रीतीस्तव. ३ धोतऱ्याच्या बींनें. ४ जवळचा ठेवा. ५ वेग. ६ रात्रंदिवस एकसारखें, अनियमित. ७ अभिप्राय. ८ एकदम. ९ निषेध करून. १० हलकें हलकें. ११ ठसल्या. १२ माझ्या स्वरूपाच्या. १३ मध्यें हरकत करणारी. १४ अहंकार. १५ रात्री. १६ दिवस उगवल्यावर. १७ कर्ममार्ग सांगणारे.

*मो. हेही वेदें नेमिलें जाण. ×मो. स्वदारागमनही. ‡ना. निषेधें निंदोनि त्यासी. +ना. शोक मोह होय निवृत्ती.

क्ती ॥ विषयासक्ति छेदक ॥ ९ ॥ वेदोक्त स्वधर्मस्थितीं ॥ होय विषयांची विरक्ती ॥ प्राणी निजमोक्ष पावती ॥ हे वेदोक्ती पैं माझी ॥२१०॥ हे सांडोनियां वेदस्थिती ॥केवळ विषयांचि-या आसक्ती ॥ प्राणी अतिदुःख पावती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ११ ॥ प्रवृत्ति तितुकी अनर्थहेतू ॥ येचि अर्थीचा वृत्तांतू ॥ चौं श्लोकीं श्रीभगवंतू ॥ असे सांगतू उद्धवा ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ विषयेषु गुणाध्यासात्पुंसः संगस्ततो भवेत् ॥ संगात्तत्र भवेत्कामः कामादेव कलिर्नृणाम् ॥ १९ ॥ कलेर्दुर्विषहः क्रोधस्तमस्तमनुवर्त्तते ॥ तमसा ग्रस्यते पुंसश्चेतना व्यापिनी द्रुतम् ॥ २० ॥

॥ टीका ॥ विषयांचें गोडपण ॥ सदा ध्याय ज्याचें मन ॥ त्यासि विषयासक्ति जाण ॥ अति गहन उल्हासें ॥१३॥ विषयासक्तीचा संभ्रम ॥ तेथ *निर्लज्ज खवळे काम ॥ कामास्तव अति विषम ॥ सोशी दुर्गम उपाय ॥ १४ ॥ विषयकामार्थ जे उपाय ॥ त्यांसि प्रतिपदीं अपाय ॥ जेव्हां विषयकामासिद्धि न होय ॥ तेव्हां महाकलह विवादू ॥ १५ ॥ जेथ अतिजल्पाचा विवाद ॥ तेथ खटाटोपेंसि सन्नद्ध ॥ खवळला उठी क्रोध ॥ अति विरुद्ध दुर्धर ॥ १६ ॥ क्रोध खवळल्या दारुण ॥ बुद्धीचें तत्काळ नासे ज्ञान ॥ तेव्हां विवेकाचें प्राशन ॥ करी जाण महामोह ॥ १७ ॥ विवेकाचें लोपल्या भान ॥ स्तब्ध चेतना होय जाण ॥ तेव्हां ×कार्याकार्य आठवण ॥ तेंही स्मरण बुडालें ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ तया विरहितः साधो जंतुः शून्याय कल्पते ॥ ततोऽस्य स्वार्थविभ्रंशो मूर्च्छितस्य मृतस्य च ॥ २१ ॥

॥ टीका ॥ विवेकशून्य स्तब्धवत ॥ तेथ विषयो ना परमार्थ ॥ केवळ जड मूढ होत ॥ जे वीं कां मूर्च्छित मृतप्राय ॥ १९ ॥ यापरी जीत ना मेला ॥ जड मूढ होऊनि ठेला ॥ थित्या निजस्वार्था मुकला ॥ अंगीं वाजला महा अनर्थू ॥ २२० ॥

॥ श्लोक ॥ विषयाभिनिवेशेन नात्मानं वेद नापरम् ॥ वृक्षजीविकया जीवन् व्यर्थं भस्त्रेव यः श्वसन् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ एवं विषयाचे आसक्तीं ॥ तमोगुणें ग्रासिली वृत्ती ॥ तेव्हां +एकीहि स्फुरेना स्फूर्ती ॥मी कोण हें चित्तीं स्मरेना ॥२१॥ ꣸ऐसा भ्रमें भुलला प्राणी ॥ जैसा उन्मत्त मदिरापानी ॥ त्यासि स्मरणांची विस्मरणी ॥ भ्रमिष्ट मनीं पडिला ॥ २२ ॥ कां विषमसंधीचा ज्वरू ॥ तेणें ज्वरें हुंबरे थोरू ॥ त्यासि नाठवे आपपरू ॥ वृथा विकारू बडबड करी ॥ २३ ॥ फांटाफुटालियावरी ॥ भलतेंचि स्मरण करी ॥ तया नाठवे कांहीं ते परी ॥ प्राणी अघोरीं पडले जाण ॥ २४ ॥ कां झालिया भूतसंचार ॥ प्राणी हुंबरे हुंहुंकार ॥ पडिला चित्तासि विसर ॥ ह्मणे मी कुकरें ह्मणोनि भुंके ॥ २५ ॥ ऐसे जीविके नेणोनि प्राणी ॥ घात्रे

---

१ पावलोंपावलीं. २ एकही. ३ भ्रम. ४ चित्तास भ्रम झाल्यामुळें. ५ कुत्रें.

*मो. निर्मळ खवळे. ×ना. कार्यकारण. +ना. ऐसी स्फुरेना.

꣸२२ पासून ३३ पर्यंत ओव्या पंढरपूर व पैठण या दोन्ही ठिकाणच्या हस्तलिखित पोथ्यांत नाहींत.

जैसा स्वप्नीं ॥ ह्मणे मी पडलों रणीं ॥ ऐसे प्राणी स्वप्नीं भुलले ॥ २६ ॥ तैशी भुली लटकी भुलवणी ॥ काममोहें व्यापिले प्राणी ॥ जडमूढपण टाकूनी ॥ अंतःकरणीं वेडावले ॥ २७ ॥ मुक्यानाकीं भरे मुरकुट ॥ तें फेंफें बेंबें करी निकृष्ट ॥ न कळे रडे करी हाहाट ॥ ते खटपट वाउगी ॥ २८ ॥ तैसें दुःखबळें प्राणी ॥ परी न कळे उंच करणी ॥ पडिले मोहमदें भुलोनी ॥ मुकेपणीं बेंबात ॥ २९ ॥ अहंकृतीचा उभारा ॥ शरीरीं भरलासे वारा ॥ तो होऊनि बाधक नरा ॥ पडले आडद्वारा अंधकूपीं ॥३३०॥ कां तेलियाचा ढोर पाही ॥ डोळां झांपडी स्वदेहीं ॥ अवघा वेळ चाले परी पाही ॥ पंथ कांहीं नेठकेची ॥ ३१ ॥ भंवता फिरे लागवेगीं ॥ परी पाहतां नलगे आगी ॥ घाणियाचि भोंवतें वेगीं ॥ भोंवंडी अंगीं जिराली ॥ ३२ ॥ तैसे विषय भवंडित भव ॥ परी नकळेचि विविध माव ॥ जैसा सर्प भ्रमला लागे धांव ॥ तैसे विषय अवेव धांवती ॥ ३३ ॥ अंवसेचें काळें गडद ॥ तैसा जडमूढ झाला स्तब्ध ॥ स्मरेना आपपर हा बोध ॥ जगदांध्य वोडवलें ॥३४॥ जेवीं लोहकारांची भाती ॥ तेवीं वृथा श्वासोच्छ्वास होती ॥ वृक्षाची जैशी तटस्थ स्थिती ॥ यापरी जीती जीत ना मेला ॥ ३५ ॥ सकामासि स्वर्गप्राप्ति॥ह्मणशी बोलिली वेदोक्तीं ॥ तेही *प्रलोभाची वेदंती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥३६॥

॥ श्लोक ॥ फलश्रुतिरियं नृणां न श्रेयो रोचनं परम् ॥ श्रेयोविवक्षया प्रोक्तं यथा भैषज्यरोचनम् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ निष्काम जे कां कर्मस्थिती ॥ ते मूर्ख सर्वथा न करिती ॥ त्यांसि दावूनियां फलश्रुती ॥ स्वकर्मप्रवृत्ती लाविले ॥ ३७ ॥ सकाम अथवा निष्काम ॥ कर्मक्रिया दोहींची सम ॥ येथ वासनाचि विषम ॥ सकामनिष्काम फलहेतु ॥ ३८ ॥ जेवीं कां स्वातीचें जळ ॥ शिंपीमाजीं होय मुक्ताफळ ॥ तेंचि सेवी जे महाव्याळ ॥ तें हळाहळ होऊनि ठाके ॥ ३९ ॥ '×तेवीं आपुली जे कां कल्पना ॥ निष्कामें आणी मुक्तपणा ॥ तेचि सकामत्वें जाणा ॥ दृढबंधना उपजवी ' ॥३४०॥ वेद बोलिला जें +स्वर्गफळ ॥ 2तें मुख्यत्वें नव्हे केवळ ॥ जेवीं भेषज खावया बाळ ॥ देऊनि गूळ चाळविजे ॥ ४१ ॥ ओखद घेतलियापाठीं ॥ क्षयरोगाची होय तुटी ॥ परी बाळ हातींचा गूळ चाटी ॥ ⁂ते नव्हे फळदृष्टी भेषजीं ॥ ४२ ॥ तेवीं वेदाचे मनोगती ॥ स्वर्गफळाची अभिव्यक्ती ॥ मूर्खासि खावया मुक्ती ॥ स्वधर्मस्थिती लावित॥ ४३ ॥ ह्मणसी कर्मवादी जे नर ॥ 0वेद सांगती प्रवृत्तिपर ॥ तो वेदार्थ निवृत्तितत्पर ॥ केवीं साचार मानावा ॥ ४४ ॥ श्रुत्यर्थ जें प्रवृत्ती धरी ॥ तें वेद झाला अनर्थकरी ॥ ते प्रवृत्ति दूषूनि श्रीहरी ॥ दावी निवृत्तिवरी वेदार्थ ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ उत्पत्त्यैव हि कामेषु प्राणेषु स्वजनेषु च ॥ आसक्तमनसो मर्त्या आत्मनोऽनर्थहेतुषु ॥ २४ ॥ न तानविदुषः स्वार्थं भ्राम्यतो वृजिनाध्वनि ॥ कथं युंज्यात्पुनस्तेषु तांस्तमो विशतो बुधः ॥ २५ ॥

---

१ मुक्याच्या नाकांत. २ अत्यंत. ३ बैल. ४ सरत नाहीं. ५ त्वरेनें. ६ शेवट. ७ नानारूप माया. ८ लोहारांचीं. ९ स्तब्ध. १० भाषण. ११ मोठा सर्प. १२ जाज्वल्य विष. १३ आणते, देते. १४ औषध. १५ सांगणें.

*मो. तेही विषींची वंदती. ×मो. तेवीं काम्याकाम्य कल्पना. +मो. कर्मफळ. 2मो. तो मुख्यार्थ नव्हे. ⁂मो. नाहीं फळदृष्टी. 0मो. ते वेदार्थ सांगती.

॥ टीका ॥ उपजतांचि प्राणिमात्रांसी ॥ देह आवडे सर्वस्वेंसी ॥ देहात्मवादें विषयासी ॥ जीवें-प्राणेंसी लोलुप ॥४६॥ विषयकामाच्या आसक्तीं ॥ स्त्रीपुत्रांची गोडी चित्तीं ॥ *स्वजनधनाची अतिप्रीति ॥ स्वभावस्थिती अनिवार ॥ ४७ ॥ जेणें जाइजे अधोगती ॥ तैशी जे कां कामासक्ती ॥ ते प्राण्यासि सहजगती ॥ विषयासक्ती स्वभावें ॥ ४८ ॥ तेचि विषयांची प्रवृत्ती ॥ वेद बोले जैं विध्युक्ती ॥ +तैं सर्व स्वार्थघाती ॥ झाला ×अनर्थी वेदवादू ॥४९॥ मरतया तरटमारू केला ॥ बुडत्याचे डोयीं दगड दीधला ॥ आंधळा अंधकूपीं घातला ॥ तैसा वेदू झाला अनर्थी ॥ २५० ॥ वेदु जैं विषयीं गोंवी ॥ तैं प्राण्यातें कोण ०उगवी ॥ राजा सर्वस्व नागवी ॥ तैं कोण सोडवी दीनातें ॥ ५१ ॥ नेणोनि वेदींचा मथितार्थु ॥ स्वयें जो कां विषयासक्तु ॥ तो मानी प्रवृत्तिपर श्रुत्यर्थु ॥ अनर्थहेतू ⁹बालिशां ॥ ५२ ॥ ' पुत्र पित्यास पुसे जाण ॥ ग्रहणीं ¹जेऊं परैमान्न ॥ येरू ह्मणे सुटल्या ग्रहण ॥ *उष्णभोजन स्वगृहीं करूं ॥५३॥ तैशी माझ्या वेदाची वेदोक्ती ॥ निषेधमुखें दावी प्रवृत्ती ॥ येणें वेदांच्या मनोगती ॥ विषयनिवृत्ती मुख्यत्वें ' ॥ ५४ ॥ विषयीं बुडते जे जन ॥ त्यांचें करावया उद्धरण ॥ माझा वेदवा[illegible] जाण ॥ सकामपण त्या नाहीं ॥ ५५ ॥ कोणी एक मंदबुद्धी ॥ केवळ विषयांध त्रिशुद्धी ॥ ते सकाम जल्पती वेदविधी ॥ त्यांची कुबुद्धी हरि सांगे ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ एवं व्यवसितं केचिदविज्ञाय कुबुद्धयः ॥ फलश्रुतिं कुसुमितां न वेदज्ञा वदंति हि ॥ २६ ॥

॥ टीका ॥ ⁵फलत्यागें स्वधर्मस्थिती ॥ सर्वथा सकाम न करिती ॥ यालागीं वेद बोले फळश्रुती ॥ स्वधर्मप्रवृत्तीलागूनी ॥ ५७ ॥ सैंधव सागरा भेटूं जातां ॥ जेवीं कां हारपे सैंधवता ॥ तेवीं स्वधर्मीं प्रवर्ततां ॥ सकामता हारपेना ॥५८॥ ※जैशी दों दिव्यांची वाती ॥ एकवट केलिया ज्योती ॥ तेथ न दिसे भेदगती ॥ पाहतां ज्योती एकची ॥ ५९ ॥ जेवीं अग्नीं कापुर मिळतां ॥ तो अग्नीचि होय तत्त्वतां ॥ तेवीं स्वधर्मीकर्मीं प्रवर्ततां ॥ कर्मीं निष्कर्मता स्वयें प्रकटे ॥ २६० ॥ कर्माकर्मांची वेळुं जाळीं ॥ तेथ स्वधर्माची कौंचणी मेळी ॥ पडे चित्तशुद्धीची इंगळी ॥ ते करी होळी कर्माकर्मांची ॥ ६१ ॥ सकामता करितां कर्म ॥ स्वधर्म नाशी फळकाम ॥ ⁸तेव्हां सकाम आणि निष्काम ॥ दोहींचें भस्म स्वधर्म करी ॥ ६२ ॥ जेवीं दों काष्ठांच्या घेंसणी ॥ माजीं प्रकटे जो कां वन्ही ॥ तो दोहींतेंही जाळूनी ॥ स्वतेजपणीं प्रका

---

१ लुब्ध. २ तरटाच्या फोंकाचा मार. ३ गुंतवी. ४ सोडवी. ५ तत्व. ६ अज्ञांस. ७ खीर. ८ वड बडतात. ९ मीठ. १० स्वकर्म हेंच कोणी वेळूचें बेट, त्यांत स्वधर्माचरण हेंच त्या वेळूंचें संघर्षण, त्या योगानें चित्तशुद्धी हेच निखारे पडतात, व ते कर्माकर्मांची होळी करितात. ११ स्वधर्माचरणरूपी संघर्षणानें. १२ निखारा. १३ घर्षणापासून.

*मो. स्वजनजनाची. +ना. तैं सर्वांच्या स्वार्थाघाति. ×मो. निश्चितीं वेदवाद. ०मे सोडवी. ⁹मो. यालागीं. ¹मो. जेऊं ये परमान्न. *मो. जाऊनि भोजन. ⁵मो. फल योगेंवी स्वधर्म स्थिती. ⁸मो. आणि निःकामें दोहींचें भस्म ॥ स्वधर्म जाण स्वयें करी.

※५९ ही ओवी पंढरपूर व पैठण या दोन्ही ठिकाणच्या हस्तलिखित पोथ्यां नाहीं.

गे ॥ ६३ ॥ तेवीं माझा वेदवाद ॥ स्वकर्मे छेदी कर्मबाध ॥ हें नेणोनि जो विषयांध ॥ जडला सुबद्ध फळाशे ॥ ६४ ॥ वेदें प्रवृत्तिरोचनाकारणें ॥ स्वर्गादि नानाफळें बोलणें ॥ त्यांलागीं ज्याचें बैसे धरणें ॥ तेणें नागवणें निजस्वार्था ॥ ६५ ॥ ‘कष्टोनि शेतीं पेरिले चणे ॥ त्यांची उपडोनि भाजी करणें ॥ तो लाभ कीं तेणें नाडणें ॥ तैसें फळ भोगणें सकामीं’ ॥ ॥ ६६ ॥ वोलीं जोंधळियाचीं करबाडें ॥ खातां अत्यंत लागती गोडें ॥ त्यालागीं शेत जें उपडे ॥ तें लाभू कीं नाडे निजस्वार्था ॥ ६७ ॥ तैशी सकामकामना *उन्मत्तें ॥ जे फळीं ×फळाशालोलिंगतें ॥ ते नाडली स्वधर्मलाभातें ॥ ऐक तूंतें सांगेन ॥ ६८ ॥ ‘शेतीं पेरावया आणिले चणे ॥ त्याचे आदरें करी जो फुटाणे ॥ तो शहाणा, कीं मूर्ख ह्मणणें ॥ तैसें फळ-भोगणें सकामीं ॥ ६९ ॥ घोडा विकोनि पलाण घेणें ॥ लोणी देऊनि ताक मागणें ॥ भात सांडूनि वेळेण पिणें ॥ तैसें फळ भोगणें सकामीं ॥२७०॥ ऐसे सकाम अति दुर्बुद्धी ॥ जे नाडले स्वधर्मसिद्धी ॥ यालागीं देवो ह्मणे कुबुद्धी ॥ ते कुबुद्धीची विधी हरि सांगे ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ कामिनः कृपणा लुब्धाः पुष्पेषु फलबुद्धयः ॥ अग्निमुग्धा धूमतांताः स्वं लोकं न विदंति ते ॥ २७ ॥

॥ टीका ॥ सकामाची तृष्णा पूर्ण ॥ कदाकाळीं नव्हे जाण ॥ कामेच्छा तो सदा दीन ॥ कृपणपण या हेतू ॥ ७२ ॥ जळीं बक धरोनि ध्यान ॥ जेवीं कां टपत राहे मीन ॥ तेवीं सकाम अनुष्ठान ॥ लुब्धोनि जाण कामासी ॥७३॥ जावया परपुरुषापाशीं ॥ लेंवोटवो +लावी निजपतीसी ॥ तेवीं काम धरोनि मानसीं ॥ स्वधर्मकर्मासी आचरे ॥७४॥ जेवीं कां अज्ञान बाळ ॥ फुलातेंचि ह्मणे फळ ॥ तेवीं स्वर्गभोग केवळ ॥ मानी अढळ ०मूर्खत्वें ॥ ७५ ॥ त्याही स्वर्गभोगासि पाहे ॥ ❀कर्मवैकल्यें होय कीं नोहे ॥ हाही संदेह वर्तताहे ॥ तेणेंही होये अतिदीन ॥ ७६ ॥ सकाम तो सदा दीन ॥ दीनत्वें अतिकृपण ॥ कृपणत्वें सलोभपण ॥ लोभास्तव ¹ज्ञान महामोह ग्रासी ॥ ७७ ॥ मोहाचें खवळल्या भान ॥ सविवेक ग्रासी ज्ञान ॥ तेव्हां बुद्धीमाजीं तमोगुण ॥ सबाह्य परिपूर्ण उल्हासे ॥ ७८ ॥ तमें कोंदटल्या वृत्ती ॥ धूमांकित होय स्थिती ॥ जेवींकां आंधळयाच्या सांगातीं ॥ आंधारे राती आडवीं चुके ॥ ७९ ॥ त्यां आंधळयाची जैशी स्थिती ॥ तैशी ²कामासक्ताची होय गती ॥ चुकला विवेक सांगाती ॥ आंधारें वृत्ती अतिमुग्ध ॥ २८० ॥ जैसें कां अज्ञान बाळ ॥ तैसा मुग्ध होय केवळ ॥ कोण कर्म काय फळ ॥ हें नेणे विवळें मुग्धत्वें ॥ ८१ ॥ माझी कोणे लोकीं स्थिती ॥ पुढें कोण आपुली गती ॥ हें कांहींच न स्मरे चित्तीं ॥ धूम्रवृत्ती देहांतू ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ ॥ न ते मामवजानंति हृदिस्थं य इदं यतः ॥ उक्थशस्त्रा ह्यसुतृपो यथा नीहारचक्षुषः ॥ २८ ॥

---

१ अत्यंत इच्छा, हट्ट. २ तांटें. ३ कापी. ४ खोगीर. ५ पेज. ६ वरवरचें प्रेम. ७ कर्माच्या अपूर्णतेनें. ८ अरण्यांत. ९ मोहयुक्त. १० स्पष्ट.

*मो. उन्नतें. ×मो. फळलोल्यंगतें. +ना. दावी. ०मो. मुख्यत्वें. ❀ना. कर्मविकल्पें मो. कर्मविकर्म. ¹ना. जाण मोहो ग्रासी. ²ना. सकामाची गती.

॥ टीका ॥ ॥ वेदतात्पर्याचे निजखुणे ॥ तुवां पुसिलें मजकारणें ॥ तें वेदगुह्यनिरूपणें ॥ तुजकारणें म्यां निरूपिलें ॥ ८३ ॥ परिसोनि वेदाचे विभाग ॥ उद्धव सुखावला चांग ॥ तेणें संतोषें श्रीरंग ॥ संबोखोनि अंगें उद्धवासि ह्मणे ॥ ८४ ॥ जो मी हृदयामाजिलें वस्ती ॥ परमात्मा निकटवर्ती ॥ त्या मातें सकाम नेणती ॥ कामासक्तीं नाडले ॥ ८५ ॥ तो मी हृदयामाजीं असें ॥ हेंही एकदेशित्व मज नसे ॥ जगदाकारें मीचि भासें ॥ जेवीं कल्लोळें विलासे सागरू ॥ ८६ ॥ अलंकार झालेपणें ॥ जेवीं असे निखळ सोनें ॥ तेवीं जगदाकारें म्यां श्रीकृष्णें ॥ परिपूर्ण असणें पूर्णत्वें ॥८७॥ नाम, रूप, वर्ण, विविध ॥ माझेन प्रकाशें *जगदुद्बोध ॥ परी नामरूपजातिभेद ॥ मजसी संबंध असेना ॥ ८८ ॥ आकाश जळीं बुडालें दिसे ॥ परी तें न माखे जळरसें ॥ तेवीं मी जगदाकारें असें ॥ परी जगदादिदोषें अलिप्त ॥ ८९ ॥ ऐसा मी विश्वात्मा विश्वंभरू ॥ विश्वमूर्ति विश्वेश्वरू ॥ त्या मज नेणती अज्ञाननरू ॥ जेकां शिश्नोदरपोषक ॥२९०॥ ज्यासि आंधारें दाटे गाढें ॥ कामकुहरीं जो सांपडे ॥ तो कांहींच न देखे पुढें ॥ अवचितां पडे महागर्तीं ॥ ९१ ॥ तेवीं अतिमोहममताभ्रांतें ॥ अज्ञानल्या सबाह्य व्यापिलें ॥ जवळीलिया न देखोनि मातें ॥ पाडिले महागर्तें तमामाजीं ॥ ९२ ॥ न कळोनि माझ्या वेदार्थातें ॥ केवळ जीं कां कामासक्तें ॥ तीं पावलीं अधःपातातें ॥ ×मज हृदयस्थातें नेणोनी ॥ ९३ ॥ तो मी जवळी कैसा ह्मणसी ॥ तरी सर्वांच्या हृदयदेशीं ॥ वसतसें अहर्निशीं ॥ चेतनेसी चेतविता ॥ ९४ ॥ त्या माझें वेदार्थमत ॥ नेणतीचि कामासक्त ॥ तेंचिविखीं श्रीकृष्णनाथ॥ विशदार्थ स्वयें सांगे ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ ते मे मतमविज्ञाय परोक्षं विषयात्मकाः ॥ हिंसायां यदि रागः स्याद्यज्ञ एव न चोदना ॥ २९ ॥

॥ टीका ॥ माझ्या वेदाचा अगम्य भावो ॥ नकळोनि गूढ अभिप्रावो ॥ तेणें सकामासि उत्साहो ॥ स्वर्गातें +पहाहो मानिती सत्य ॥ ९६ ॥ रोचनार्थें स्वर्ग बोले वेद ॥ तो प्रगटार्थें मानूनि शुद्ध ॥ मग स्वर्गसाधनें विविध ॥ कामलुब्ध आचरती ॥ ९७ ॥ तेथ ※यज्ञ हें मिषमात्र जाण ॥ स्वयें करावया मांसभक्षण ॥ अविधीं करिती पशुहनन ॥ अतितृप्त जाण कामार्थी ॥ ९८ ॥ त्यांसि पैं गा देहांतीं ॥ मारिले पशु मारावया येती ॥ हातीं घेवूनिया कोंती ॥ मूड घेती यमद्वारीं ॥ ९९ ॥ तेथ कैंचें स्वर्गसुख ॥ अविधीं साधनें महामूर्ख ॥ पावले गा अघोर नरक ॥ सकामें देख नाडले ॥३००॥ यथेष्ट करावया मांसभक्षण ॥ स्वेच्छा जें कां पशुहनन ॥ त्यांसि वेदें केलें निर्बंधन ॥ पशुहनन यज्ञार्थें ॥ १ ॥ तेथही अर्गळा घातली जाण ॥ देश काळ आणि वर्तमान ॥ मंत्र तंत्र विधिविधान ॥ धन संपूर्ण अतिशुद्ध ॥ २ ॥ शक्त सज्ञान धनवंत ॥ ऐसा कर्ता पाहिजे येथ ॥ छुटिघातें करावया पशुघात ॥ पडे प्रायश्चित्त "मे" ह्मणतां ॥ ३ ॥ ऐशी ०वेदाज्ञा नाना अवघड ॥ घातलीं प्रायश्चित्तें अतिगूढ ॥

---

१ हा संबोधनाचा पर्याय. २ परिच्छिन्नपणा. ३ जगद्भास. ४ गोडी लागण्याकारितां. ५ कोयता. ६ अडसर. ७ बोकड "मे" असें ओरडला तर.

*मो. जगद्बोध. ×मो. जवळिला मातें न देखोनि ना. जवळिल्या मातें नेणती. +मो. पाहो. ※मो. यज्ञ होम मीस. ०मो. वेदाज्ञा अगड.

तरी सकाम जे महामूढ ॥ ते धांवती दृढ पशुहनना ॥ ४ ॥ ऐसें झाल्या पशुहनन ॥ विभागा येईल कवळप्रमाण ॥ तेंचि करावें भक्षण ॥ दांतासि जाण न लागतां ॥ ५ ॥ विभाग भक्षितां आपण ॥ जो करी रसस्वादन ॥ त्यासिही प्रायश्चित्त जाण ॥ हेंही निर्बंधन वेदें केलें ॥ ६ ॥ *करावें मांसभक्षण ॥ हे वेदाज्ञा नाहीं जाण ॥ त्याचें करावया निराकरण ॥ लाविलें विधान यज्ञाचें ॥ ७ ॥ स्वेच्छा पशु न मारावया जाण ॥ यज्ञीं नेमिलें पशुहनन ॥ ×करावया मांसभक्षण ॥ नेमिला ०प्रमाण यज्ञभाग ॥ ८ ॥ हेंही वेदाचें बोलणें ॥ मूर्खप्रलोभाकारणें ॥ येऱ्हवीं 'पशुहिंसा न करणें' ॥ 'मांस न भक्षणें' हें वेदगुह्य ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ ॥ हिंसाविहाराह्यालब्धैः पशुभिः स्वसुखेच्छया ॥ यजंते देवता यज्ञैः पितृभूतपतीन् खलाः ३० ॥

॥ टीका ॥ न मानूनि वेदविधानासी ॥ +पशुहननीं क्रीडा ज्यासी ॥ अविधि मारूनि पशूंसी॥ मिरविती ॐश्लाघेसी याज्ञिकत्व ॥३१०॥ अविधीं करूनि जीवहनन॥ *ते पशूनें करिती यज्ञ॥ पितृदेवभूतगण ॥ करिती यजन सुखेच्छा ॥ ११ ॥ बोवडें बीज पेरिल्या शेतीं ॥ पिकास 3नाडले निश्चितीं ॥ शेखीं निजबीजा नागवती ॥ राजे दंडूनि घेती करभार ॥ १२ ॥ तैशी 7अविधीं याज्ञिकांची गती ॥ स्वर्ग स्वप्नींही न देखती॥ थित्या नरदेहा नागवती ॥ शेखीं दुःख भोगिती यमदंडें ॥ १३ ॥ वृथा पशूंस दुःख देती ॥ तेणें दुःखें स्वयें दुःखी होती ॥ ऐशी याज्ञिकांची गती ॥ आश्चर्यें श्रीपती सांगत ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ स्वप्नोपममम़ुं लोकमसंतं श्रवणप्रियम् ॥ आशिषो हृदि संकल्प्य त्यजंत्यर्थान्यथा वणिक् ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ स्वप्नीं दिसे सर्वांचि नासे ॥ तेवीं 0कल्पनिक जग भासे ॥ येथ 4सकाम कामनापिसें ॥ स्वर्ग विश्वासें मानिती सत्य ॥ १५ ॥ मुळींच मिथ्या मृगजळ ॥ 1त्यामाजीं शीतळ जळ ॥ थायां घेऊनि मागे बाळ ॥ तैसे सकाम केवळ स्वर्गालागीं ॥१६॥ पिंपळावरून मार्ग आहे ॥ ऐकोनि रुखावरी वेंघों जाये ॥ तो जेवीं भ्रमें गुंतोनि राहे ॥ तेवीं स्वर्गश्रवणें होय सकाम ॥ १७ ॥ 8स्वधर्ममार्गीं चालावया नर ॥ वेद स्वर्ग बोले अवांतर ॥ ते 2कांटां भरले अपार ॥ स्वर्गतत्पर सकाम ॥१८॥ वाट पिंपळावरी ऐकोनी ॥ शाहणा चाले मार्ग लक्षोनी॥ अश्वत्थ सांडी डावलोनी ॥ तो पावे स्वस्थानीं संतोषें ॥ १९ ॥ तेवीं स्वधर्माच्या अनुष्ठानीं ॥ जो सांडी स्वर्गफळें उपेक्षूनी ॥ तो चित्तशुद्धीतें पावोनी ॥ ब्रह्मसमाधानीं स्वयें पावे ॥ ३२० ॥ या सांडूनि स्वधर्ममार्गासी ॥ श्रवणें प्रिय स्वर्गसुखासी ॥ सकाम भुलले त्यासी ॥ जेवीं घंटानादासी मृग लोधे ॥२१॥ तेवीं जन्मोनि कर्मभूमीसी ॥ वेंचूनि धनधान्यसमृद्धीसी ॥ थित्या

१ रुची, चव घेतो. २ मूर्खांची प्रवृत्ति होण्याकरितां. ३ भाजलेलें. ४ इच्छेच्या नादानें. ५ हट्ट. ६ चढों. ७ भ्रमांत. ८ पिंपळ एकीकडे टाकतो. ९ ऐकण्यानें. १० लुब्ध होई.

*मो. करावया. ×मो. न करावया. ०मो. जाण यज्ञभाग. +मो. पशुहनन क्रिया ज्यांसी. ॐना. श्लाघ्यतेसी. *ना. तेणें अविधी करितां यज्ञ. 3ना. नाडिजे. 7मो. सविधी. 0ना. विकल्पेंनि जग भासे. 4मो. सकामा कामपिसें. 1मो. त्याही माजीं शीतळ केवळ. 8ना. स्वधर्मकर्मीं. 2ना. वाटा.

*नाडले नर देहासी ॥ स्वर्गसुखासी भुलोनी ॥ २२ ॥ जैसा कोणी एक वाणी ॥ जुनी नाव आश्रउनी ॥ द्वीपांतरींचा लाभ ऐकोनी ॥ न विचारितां मनीं समुद्रीं रिघे ॥ २३ ॥ उन्मत्त कर्णधारांचे संगतीं ॥ फुटकी नाव धरोनि हातीं ॥ घेऊनियां सकळ संपत्ती ॥ निघे कुमती महार्णवीं ॥ २४ ॥ तो जेवीं समुद्रीं बुडे ॥ तैसेंचि सकामासि घडे ॥ स्वर्ग वांछितां बापुडे ॥ बुडाले रोकडे महार्णवीं ॥२५॥ वांछितां स्वर्गसुखफळ ॥ बुडाले स्वधर्मवित्त सकळ ॥ बुडालें ×चित्तशुद्धीचें मूळ ॥ बुडालें मुद्दल नरदेह ॥ २६ ॥ येव्हडे हानीचें कारण ॥ देवो सांगताहे आपण ॥ सकामतेसि मूळ +गुण ॥ तेंही लक्षण स्वयें सांगे ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ रजःसत्त्वतमोनिष्ठा रजःसत्त्वतमोजुषः ॥ उपासत इंद्रमुख्यान् देवादीन्न तथैव माम् ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ रजतमाचेनि [1]उन्नतें ॥ सत्व [8]संकीर्ण होय तेथें ॥ तेव्हां रजतमाचेनि संमतें ॥ काम चित्तातें व्यापूनि खवळे ॥ २८ ॥ अतिकाम खवळल्या चित्तीं ॥ गुणानुसारें विषयीं प्रीती ॥ तेव्हां सकामाची संगती ॥ धरी निश्चितीं भावार्थें ॥२९॥ सकाम संगती साचार ॥ काम्यकर्मीं ०अत्यादर ॥ स्वर्गभोगीं महातत्पर ॥ यजी देवपितर प्रमथादिकें ॥ ३३० ॥ मी सर्वात्मा सर्वेश्वर ॥ त्या माझ्याठायीं अनादर ॥ कामलंपटत्वें नर ॥ देवतांतरें उपासिती ॥ ३१ ॥ ह्मणसी देवतांतर जें कांहीं ॥ तें तूंचि पैं गा सर्वही ॥ हाही ऐक्यभावो नाहीं ॥ भेदबुद्धीं पाही विनियोग ॥ ३२ ॥ इंद्रादिदेवद्वारां जाण ॥ मीचि होय गा प्रसन्न ॥ त्या माझ्या ठायीं नाहीं भजन ॥ ※सकाम मन स्वर्गार्थीं ॥ ३३ ॥ दृढ कामना जडली चित्तीं ॥ सांगतां [2]स्वर्गीं पुनरावृत्ती ॥ [0]तेंही हितत्वेंचि मानिती ॥ ऐक निश्चितीं अभिप्रावो ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ इष्ट्वेह देवता यज्ञैर्गत्वा रंस्यामहे दिवि ॥ तस्यांत इह भूयास्म महाशाला महाकुलाः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ जे कर्मभूमीसि मनुष्य झाले ॥ ते सहजें *मोक्षाधिकारा आले ॥ तेथही कामना नागविले ॥ स्वर्गार्थ भजले देवतांतरा ॥ ३५ ॥ स्वर्गभोगीं ठेवूनि मन ॥ नानायागीं करिती यजन ॥ [9]येणें दिविभोगा पावोन ॥ हा निश्चय जाण याज्ञिकांचा ॥ ३६ ॥ काळें भोगक्षयाच्या पतनीं ॥ तेही वेती हितत्वें मानोनी ॥ सवेंचि इहलोकीं जन्मोनी ॥ ब्राह्मणपणीं सुशील ॥३७॥ वेदवेदांगअध्ययन ॥ धनधान्यें अतिसंपन्न ॥ आह्मी विख्यात गृहस्थ होऊन ॥ क्षीण पुण्य [7]स्वर्गस्थ ॥ ३८ ॥ नेणोनि वेदार्थ निजस्थिती ॥ ऐसऐशिया उपपत्ती ॥ सकामीं मानिली निश्चिती ॥ ऊंस सांडूनि मागती कणीस त्याचें ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ एवं पुष्पितया वाचा व्याक्षिप्तमनसां नृणाम् ॥ मानिनां चातिस्तब्धानां मद्वार्ताऽपि न रोचते ॥ ३४ ॥

---

१ नावाड्याच्या. २ मोठ्या समुद्रांत. ३ मिश्रित. ४प्रमथगण. ५दुसऱ्या देवास. ६ स्वर्गांतील उपभोग.

*ना. नागवले. ×मो. चित्तवृत्तीचें. +ना. जाण. [1]ना. उन्मत्तें. [8]ना. संकीर्णें. ०ना. अतिसादर. ※ना. सकामें मन स्वर्गासी मो. सकाम मन सर्वार्थीं. [2]ना. स्वर्गें. [0]मो. तें हितत्वेंचि मानिती. *मो. मोक्षागारा. [9]मो. तेणें दिव्यभोग. [7]ना. स्वर्गस्था मो. स्वर्गस्थें.

॥ टीका ॥ फल सांडूनि फूल खाये ॥ तैसा परिपाक[1] *याज्ञिका होये ॥ तेवीं स्वर्गकामाचेनि उपायें ॥ अपायीं स्वयें पडताती ॥३४०॥ अवघा संसार काल्पनिक ॥ तेथ सत्य कैंचें स्वर्गसुख ॥ परी श्रवणमात्रें देख ॥ भुलले मूर्ख स्वर्गसुखा ॥४१॥ ※जैसा नपुंसक वांछी स्त्रीसुख ॥ परी संग तया कैंचा देख ॥ मुळींच नाहीं बीजारोप[2] ॥ मा कैंचा काम साटोप तयासी ॥४२॥ परी लटिकाचि तडतडां उडे ॥ कष्टोनि व्यर्थचि पहुडे ॥ परी तया नसे भगभोग[3] रोकडे ॥ तैसें स्वर्ग कुडे प्राणिया ॥ ४३ ॥ गव्हाचा जो प्रथम मोड ॥ तोंडीं घालितां लागे गोड ॥ परी जो जाणे पिकाचा निवाड ॥ तो मोड जाण उपडीना ॥४४॥ पालेयाची चवी घेतां ॥ गव्हांची गोडी नलगे तत्त्वतां ॥ मग पाला पाळूनि स्वभावतां ॥ शेवटीं रडता गव्हाचि कारणें ॥ ४५ ॥ तेवीं वेद बोलिला स्वर्गफळ ॥ तें स्वधर्माचें +कोंवळें मूळ ॥ तें उपडूनि खातां तत्काळ ॥ मोक्षफळ अंतरे ॥४६॥ हें जाणती जे सज्ञान ॥ ते स्वर्गासि नातळती आपण ॥ परी मूर्खांचें सकामपण ॥ अनिवार जाण अतिशयें ॥ ४७ ॥ कामाचिया लोलंगतीं ॥ सदा सकाम कर्में करिती ॥ तेणें जन्ममरणांचे आवर्तीं ॥ पडले बुडती आकल्प ॥४८॥ त्यांसि हित सांगती ×साधुजन ॥ ते न मानिती 6संतवचन ॥ आह्मी वेदार्थी सज्ञान ॥ हा ज्ञानाभिमान अतिगर्वें ॥ ४९ ॥ मी भगवंत नियंता सृष्टी ॥ हें *दुःख दाविल्या नावडे गोष्टी ॥ ०निष्कामता कपाळ उठी ॥ सकाम पोटीं सुबद्ध ॥३५०॥ एवं वेदा मानूनि प्रवृत्तिपर ॥ ठकले सकळ सकाम नर ॥ तोचि वेदार्थ ब्रह्मपर ॥ स्वयें श्रीधर सांगत ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ वेदा ब्रह्मात्मविषयास्त्रिकांडविषया इमे ॥ परोक्षवादा ऋषयः परोक्षं मम च प्रियम् ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ कर्मकांड उपासना ज्ञान ॥ इहीं त्रिकांडीं वेद 8आपण ॥ चित्तशुद्धिद्वारा जाण ॥ ब्रह्मसंपन्न जीव करी ॥ ५२ ॥ परोक्ष वाद वेदव्युत्पत्ती ॥ 0त्यागमुखें गा अन्योक्ती ॥ 1सांडवी विषयासक्ती ॥ ब्रह्मप्राप्तीलागूनी ॥ ५३ ॥ पारधी लावून बांडिशरिंडी ॥ मीनासि जळाहेर काढी ॥ तेवीं दावूनि स्वर्गसुखगोडी ॥ वेद जीवास वोढी परमार्थी ॥५४॥ हें जाणोनि 7वेदार्थगुह्य ज्ञान ॥ जो जीव झाला ब्रह्मसंपन्न ॥ तेथ कर्मकर्ता मिथ्या जाण ॥ आश्रम वर्ण मग कैंचा ॥५५॥ तेथ कैंचें ध्येत ध्याता ध्यान ॥ कैंचें ज्ञेय ज्ञाता ज्ञान ॥ नाहीं भज्य भजक भजन ॥ ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ५६ ॥ तेथ कैंचें कर्म कर्माचरण ॥ कैंचा वेद वेदाध्ययन ॥ कैंचें साध्य आणि साधन ॥ ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ५७ ॥ तेथ कैंचे दोष कैंचे गुण ॥ कैंचें पाप कैंचें पुण्य ॥ कैंचें जन्म कैंचें मरण ॥ ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ५८ ॥ तेथ कैंचा भेद कैंचा बोध ॥ कैंचा मोक्ष

१ परिणाम. २ बीजाची उत्पत्ति. ३ योनिसुख. ४ परिणाम. ५ आसक्तीनें. ६ बाहेर निघत नाहींत. ७ गळास मांस.

*मो. त्यासीकां होय. +मो. केवळ. ×ना. साधुसज्जन. 6मो. साधूंचें वचन. *ना. हे दृढ दाविल्या न वाटे गोठी. ०ना. निष्काम ह्मणतां. 8ना. प्रमाण. 0मो. त्याग मुख्य. 1ना. सांडविली. 7ना. वेदार्थाचें गुह्यज्ञान.

※४२ ४३ व ४५ ह्या ओंव्या पंढरपूर व पैठण ह्या ठिकाणच्या हस्तलिखित पोथ्यांत नाहींत.

केंचा *बंध ।। सदोदित परमानंद ।। हा वेदार्थ शुद्ध उद्धवा ।। ५९ ॥ या वेदार्थाचें निरूपण ॥ प्रकट करितां आपण ।। निजस्वार्था नाडती जन ।। यालागीं जाण म्यां गुप्त केलें ॥ ३६० ।। हें वेदार्थाचें गुह्य सार ।। मज गुप्ताचें गुप्त भांडार ।। तुझा देखोनि अधिकार ।। म्यां साचार सांगीतलें ॥ ६१ ।। हा गुह्यार्थ करितां प्रकट ।। सांडोनि कर्माकर्माची वाट ।। कर्मब्रह्मउभय भ्रष्ट ॥ होतील नष्ट अनधिकारी ।।६२॥ हें जाणोनि ज्ञाते ऋषीश्वरीं ॥ वेदार्थनिरूपणकुसरी ।। हा मुख्यार्थ ×झांकोनि निर्धारीं ॥परोक्षवादावरी व्याख्यान केलें ॥६३।। सकळलोकहितार्थ ।। माझेंही हेंचि मनोगत ॥ परोक्षवाद गोड लागत ।। लोकसंग्रहार्थ उद्धवा ॥ ६४ ॥ मीही लोकसंग्रहार्थ ॥ अकर्त्ता कर्में आचरत ॥ वेदाचें जें परोक्ष मत ।। मी स्वयें राखत जनहिता ॥६५॥ त्या वेदाचें स्वरूप गहन ॥ अतर्क्य अलक्ष्य अगम्य जाण ।। तेंचि अर्थीचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ।। ६६ ॥

॥ श्लोक ॥ शब्दब्रह्म सुदुर्बोधं प्राणेंद्रियमनोमयम् ॥ अनंतपारं गंभीरं दुर्विगाह्यं समुद्रवत् ॥ ३६ ॥

॥ टीका ।। माझी वेदरूप जे बोली ॥ शब्दतः अर्थतः अगाध खोली ॥ ब्रह्मादिकां भुली पडली ॥ मर्यादा केली नवचेची ।। ६७ ।। बाहीं न तरवे समुद्र ।। तेवीं स्वमतीं न कळे वेदपार ।। येचि अर्थीं नानाऋषीश्वर ।। +युक्तीचे संभार वेंचिले ॥ ६८ ।। परी एवंविध तत्त्वतां ॥ हे वेद वादाची कथा ।। न ये कोणाचेही हाता ।। अर्थतः शब्दतः दुर्ज्ञेय॥६९।। ज्याची शब्दवाचकता॥ स्वरवर्ण शुद्ध न ये हाता ॥ त्याची अर्थावबोधकता ।। अगम्य सर्वथा सुरनरां ॥ ३७० ।। पूर्वीं हाचि वेद अनुच्छिष्ट ।। म्यां ब्रह्मयाहातीं करविला पाठ ।। तेणेंही नेणोनिया स्पष्ट ।। कर्मीं कमेंठ होवूनि ठेला ॥ ७१ ॥ ते कर्मक्रिया अतिगोमटी ।। शंखें हरिली उठाउठी ॥ ब्रह्मा विसरला वेदगोठी ॥ पडलें सृष्टी कर्मांध्य ।। ७२ ।। तो करावया वेदोद्धार ॥ म्यां मर्दिला शंखासुर ॥ सकळश्रुतींचा संभार ।। ब्रह्मयासि साचार दीधला ।। ७३ ॥ म्यां वेद ठेविले ब्रह्मयापुढें ।। तो पूर्व स्मरेना घडफुडें ॥ तेव्हां चाकाटलें बापुडें ॥ केवळ वेडें होऊन ठेलें ॥ ७४ ॥ त्यां वेदभागालागीं जाण ॥ ऋषीं वेंचिलें निजज्ञान ॥ शाखोपशाखीं रावण ।। वेदविभागन करूं आला ॥ ७५ ॥ परी इत्थंभूत तत्त्वतां ॥ *माझ्या वेदविभागाची वार्ता ।। न येचि कोणाचिया हाता॥ जाण तत्त्वता उद्धवा ।। ७६ ।। तो मी वेदस्थापक श्रीहरी ।। लोक राखावया मर्यादेवरी ॥ स्वयें सत्यवतीच्या उदरीं ।। झालों अवतारधारी श्रीव्यास ॥ ७७ ।। वेदविभागीं राजहंसू ॥ यालागीं नामें वेदव्यासू ।। तेणें म्यां केला 8श्रुतिविलासू ।। वेदविशेषू चेंतुर्धा ।। ७८ ।। वेद अर्थत्वें अतिदुर्घट ॥ परी 1वाचकत्वें झाला प्रकट ॥ त्या चारी वाचा अतिश्रेष्ठ ॥ ऐक स्पष्ट सांगेन ।।७९॥ ❀नादाचें प्रथम स्फुरण ॥ 3घोषमात्र सूक्ष्म प्राण ॥ ती नांव परा वाचा जाण ।। प्रथम लक्षण ॐकारीं ।।३८०॥ तोचि नादयुक्त प्राण ।। अंतःकरणीं होय स्फुरण ।। ते पश्यं-

---

१ प्रपंचपर. २ शब्दानें. ३ अर्थानें. ४हातांनीं बाहूंनीं. ५जाणण्यास कठीण. ६शंखासुरानें. ७ चपापून गेला. ८ याप्रमाणें. ९ वेदार्थाचा प्रकाश. १० चार प्रकारचा.

*ना. मो. बद्ध. ×ना. सांडुनी. +ना. युक्तिसाचार वेंचिल्या. *ना. मजविण वेदविभागाची. 8मो. वेदविन्यास. 1मो. वाचिकत्वें. ❀मो. प्रणवाचें. 3ना. घोषवर.

ती वाचा जाण ॥ विवेकलक्षण तीमाजीं ॥ ८१ ॥ नाभीपासोनी नाभिस्वरीं ॥ जे घुमघुमी कंठवरी ॥ ते मध्यमा वाचा खरी ॥ स्वयें श्रीहरी सांगत ॥ ८२ ॥ अकार उकार मकार ॥ स्वरवर्णयुक्त उच्चार ॥ जेथ प्रकट होय ओंकार ॥ ते वाचा साचार वैखरी ॥ ८३ ॥ ते वैखरीच्याठायीं ॥ शाखोपशाखीं जो कांहीं ॥ वेद अनंतरूप पाहीं ॥ त्यासही नाहीं मर्यादा ॥८४॥ यापरी वेद अमर्याद ॥ *जरी चतुर्धा केला विशद ॥ तरी +जनासि अतिदुर्बोध ॥ यालागीं उपवेद विभागिले ॥ ८५ ॥ ऐसेनीहि जनासि न कळे ×वेद ॥ ※यालागीं वेदावरी उपवेद ॥ श्रीव्यासें केलें ०विशद ॥ तरी वेदार्थ *शुद्ध कळेना ॥ ८६ ॥ येचि अर्थीं ऋषीश्वर बहुत ॥ सुमंत, जैमिनी, भाष्य, भारत, ॥ 6पैलसूत्रादि, जे समस्त ॥ शिणतां वेदार्थ न कळेची ॥८७॥ एवं वाच्यता आणि लक्ष्यता ॥ स्थूलसूक्ष्मत्वें वेदार्थज्ञाता ॥ मजवांचूनि तत्त्वतां ॥ आणिक सर्वथा असेना ॥ ८८ ॥

॥ श्लोक ॥ मयोपबृंहितं भूम्ना ब्रह्मणाऽनंतशक्तिना ॥ भूतेषु घोषरूपेण बिसेषूर्णेव लक्ष्यते ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ जो मी अंतर्यामी आपण ॥ 8'भूमा' ह्मणिजे अपरिच्छिन्न ॥ सबाह्य व्यापकत्वें संपूर्ण ॥ ब्रह्म परिपूर्ण जोकां मी ॥ ८९ ॥ तेणें म्यां वेद अधिष्ठितां ॥ यालागीं बोलिजे उपबृंहिता ॥ 4अधिष्ठिता विकारी होता ॥ जेवीं अभ्रांता चंद्रमा ॥३९०॥ कां अग्निकाष्ठीं आधिष्ठितां ॥ त्यासि तत्काळ ये साकारता ॥ मग ³प्रबळ आणि शांतता ॥ या विकारावस्था अग्नीसी ॥ ९१ ॥ यापरी विकारी नव्हे जाण ॥ मी अंतर्यामी नारायण ॥ ब्रह्मरूपें परिपूर्ण ॥ विकारनिर्दळण स्वयें कर्त्ता ॥ ९२ ॥ करूनि मीचि अकर्ता ॥ त्या मज नये विकारता ॥ ब्रह्मस्वरूपता स्वभावें ॥ ९३ ॥ ब्रह्म केवळ निर्धर्म ॥ तें केवीं 0करी विकारी कर्म ॥ ऐसा कांहीं कल्पिसी भ्रम ॥ तेंही सुगम सांगेन ॥ ९४ ॥ माझी योगमाया अनंतशक्ती ॥ जे शंभुस्वयंभू नये व्यक्ती ॥ तिचेनि योगें मी चिन्मूर्ती ॥ उत्पत्तिस्थितिसंहर्त्ता ह्मणवीं ॥९५॥ एवं योगमाया स्वभावता॥मी सकळ करूनि अकर्त्ता॥त्या मज देशता काळता॥ विकारता स्पर्शेना ॥९६॥ जरी सत्य असती भेदता ॥ तरी मज येती विकारता ॥ माझे निजरूपीं पाहतां ॥ भेदाची वार्त्ता असेना ॥ ९७ ॥ जेवीं भ्रमें सर्पत्व दोरावरी ॥ परी दोर सर्पत्व कदा न धरी ॥ तेवीं मी परमात्मा श्रीहरी ॥ करूनि अविकारी निजरूपें ॥ ९८ ॥ 'घोषरूपें अतिसूक्ष्म नाद ॥ तो मी प्रणवरूपें निजवेद ॥ प्राणिमात्रीं असे स्वतःसिद्ध ॥ परी नेणती बोध सकामत्वें' ॥ ९९ ॥ जेवीं कां विष्ठा भक्षी सूकर ॥ उपेक्षी कस्तूरी कापूर ॥ तेवीं 9सूक्ष्मवेदाचें निजसार ॥ सकाम नर उपेक्षिती ॥४००॥ 7मी निजानंद हृदया आंत ॥ त्या मज उपेक्षूनि भ्रांत ॥ कामासक्ती लोलंगत ॥ द्वारें वोळगत नीचांचीं ॥ १ ॥ त्या हृदयस्थवेदाचें ध्यान ॥ नित्य योग्यासि निजध्यासन ॥ सम करोनि प्राणापान ॥ सदा अनुसंधान नादाचें ॥ २ ॥ "माझें

१ मर्यादारहित. २ वाढलेला, मोठा. ३ शंकरास व ब्रह्मदेवास. ४ स्पष्टपणास.

*मो. चान्ही चतुर्धा. +ना. ज्ञानासी. ×मो. विशद. ※ना. पालवि वेदावरि पद. ०मो. शुद्ध. *मो. प्रसिद्ध. 6मो. पौलस्त्यादि जे समस्त. 8मो. ब्रह्म ह्मणिजे परिछिन्न. 4ना. अधिकारी. 3ना. प्रळय. 0मो. करवी. 9मो माझ्या वेदाचें. 7मो. मी नित्य निजानंद.

वेदतत्त्व जें गुप्त ।। प्रणवरूपें हृदयाआंत ।। योगी सदा अनुभवित ।। त्याचें स्वरूप निश्चित *अवधारी ॥ ३ ।। ×जैसा कमळमृनाळ बिसतंत ।। तैसा सूक्ष्म नाद अत्यंत ॥ नाभीपासूनि ब्रह्मरंध्रांत ॥ ओंकार स्वरांत लक्षिती ।। ४ ॥ ऐसा ओंकाराच्या स्वराआंत ।। नाभीपासोनि ब्रह्मरंध्रांत ।। सूक्ष्म नादाचा निजतंत ॥ +योगधारणा राखत महायोगी ।। ५ ।। हाचि नाद प्रस्तुत ।। लौकिकींही असे भासत ।। दोहीं कर्णी देतां हात ॥ तोचि घुमघुमित निजनाद ॥६॥ योगी ह्मणती अनाहत शब्द ॥ वेदांती ह्मणती सूक्ष्म नाद ॥ आह्मी ह्मणों हा शुद्धवेद ॥ असे अनुवाद या नांवाचा " ॥ ७ ॥ ऐशिया [1]स्वतःसिद्ध वेदापाशीं ।। श्रद्धा नुपजेचि प्राणियांसी । यालागीं सूक्ष्म वेद स्थूलतेसी ॥ म्यां निजहितासी आणिला ॥ ८ ॥ तोचि स्थूलत्वें [6]झाला प्रकट ॥ ते प्रकट होती [०]वेदवाट ।। दृष्टांतें करूनि *स्पष्ट ।। तुज मी चोखट सांगेन ॥ ९ ॥ ※ऐसें बोलला श्रीनिवास ।। तेणें उल्हासला हृदयहंस ।। ह्मणे मजकारणें हृषीकेश ॥ अत्यंत सौरस निरूपणीं ॥४१०॥ मजवरी बहुत स्नेहाळ ।।मज उद्धरावया गोपाळ ॥निरूपणीं सुकाळ । अतिरसाळ अमृतरस ॥ ११ ॥ ऐसें उद्धवाचें बोलणें ऐकोनी ।। काय बोलिला सारंगपाणी । ह्मणे मी तोचि निरूपणीं ।। सांगेन तुजलागोनी उद्धवा ॥ १२ ॥

|| श्लोक || यथोर्णनाभिर्हृदयादूर्णामुद्वमते मुखात् ।। आकाशाद्घोषवान्प्राणो मनसा स्पर्शरूपिणा ॥ छंदोमयोऽमृतमयः सहस्रपदवीं प्रभुः || ३८ ||

॥ टीका ॥ ॥ ऊर्णनाभी ह्मणिजे कांतिणी ।। ते जेवीं निजमुखापासूनी ॥ तंतु काढी अतिसूक्ष्मपणीं ।। तेवीं निर्गुणीं ओंकार ॥ १३ ॥ तो ओंकार होतां सप्राण ।। सहजस्वभावें गजाण ॥ झाला हिरण्यगर्भ अभिधान ॥ आपणिया आपण वेदाज्ञा ।। १४ ।। प्रभु ह्मणजे ऐश्वर्य ख्याती ॥ [3]अचिंत्यानंत त्याची शक्ति ॥ तो छंदोमय वेदमूर्ती ।। जाण निश्चितीं उद्धव ॥ १५ ।। तो अविनाशी वास्तव्यस्थिती ॥ नित्य सुखमय [4]सुखमूर्ती ॥ तेणें [5]सप्राण नादाभिव्यक्ती ।। मनःशक्ती [2]चेतवी ॥१६॥ चेतविली जे मनःशक्ती ।। होय स्पर्शस्वरवर्णकल्पिती ॥ वेदज्ञ 'बृहती' ह्मणती ।। जिचा अपरिमिती [0]विस्तार ।। १७ ॥ ते स्वरवर्णसंकलित [8]मंत्र । हृदयाकाशीं [9]विचित्र ॥ सहस्रशाखीं विस्तार ।। [7]वाढली अपार वैखरी ॥ १८ ॥ स्वरवर्णी दिङ्चारीं ॥ वेदाधिष्ठान वैखरी ॥ ते उपजली जेणें करी ॥ तेही परी सांगेन ॥ १९ ॥

|| श्लोक || || ओंकाराद्व्यंजितस्पर्शस्वरोष्मांतस्थभूषिताम् ॥ ३९ ॥ विचित्रभाषाविततां छंदोभिश्चतुरुत्तरैः ॥ अनंतपारां बृहतीं सृजत्याक्षिपते स्वयम् || ४० ||

---

१ सूक्ष्मकमलतंतु. २ मस्तकापर्यंत. ३ लक्ष्मीपति कृष्ण. ४ कोळी. ५ ध्वनीचा प्रकाश.

*मो. कळेना. ×मो. जैसा कां कमळमृनाळ तंतु. +ना. योगी धारणा राखित महायोगें [1]मो. स्वतः सिद्धा. [6]मो. केला [०]मो. स्पष्ट वेदवाट. *मो. प्रगट. [3]मो. आचिंत्यानंताची शक्ती [4]मो. सुखस्फूर्ति. [5]मो. प्राण नादाचिये व्यक्ती. [2]मो. चेतविली. [0]मो. विचार. [8]मो. मात्र [9]ना. भासे विचित्र. [7]मो. वाढवी.

※१० ११ ह्या ओंव्या पंढरपूर व पैठण ह्या ठिकाणच्या हस्तलिखित पोथ्यांत नाहींत.

॥ टीका ॥ *मात्रात्रयमिळणीं लोक ॥ ओंकार बोलती अवश्यक ॥ हा ओंकार अलौलिक ॥ अतिसूक्ष्म देख +देहस्थ ॥४२०॥ ×त्याचि ❀ओंकारासि प्राणसंगती ॥ आधारादिचक्रीं ऊर्ध्वगती ॥ तेथ वाचांची होय अभिव्यक्ती ॥ परा पश्यंती मध्यमा ॥ २१ ॥ परावाचेच्या अभ्यंतरीं ॥ जन्मे पश्यंती ज्येष्ठत्वाकारी ॥ मध्यमा जन्मे तिच्या उदरीं ॥ एवं परस्परीं जन्मती ॥ २२ ॥ तैशाचि येरीतें येरी ॥ नसोडूनि क्षणभरी ॥ चालती उपराउपरी ॥ चक्रीच्या चक्रांतरीं समवेत ॥ २३ ॥ आधारचक्रीं परा वाचा ॥ स्वाधिष्ठानीं जन्म पश्यंतीचा ॥ मणिपूरींहूनि विशुद्धीचा ॥ ठायीं मध्यमेचा ०रिगुनिगु ॥ २४ ॥ तेथोनियां मुखद्वारीं ॥ वाचा *प्रकाशे वैखरी ॥ तें स्वरवर्णउच्चारीं ॥ नानामंत्रीं गर्जत ॥ २५॥ तेचि स्वर आणि वर्ण ॥ सांगेन स्पर्शव्यक्तिलक्षण ॥ अंतस्थ, ≶ऊष्म, कोण कोण ॥ विभागलक्षण अवधारी ॥ २६ ॥ केवळ ' अकचटतप ' देख ॥ हे ककारादि पंचपंचक ॥ स्पर्शवर्णांचें रूपक ॥ अक्षरें निष्टंक पंचवीस ॥ २७ ॥ 6स्वर्णें गर्जतां उच्चार ॥ ते अकरादि सोळा स्वर ॥ ' यरलव ' याचा विचार ॥ जाण साचार अंतस्थ ॥ २८ ॥ ' शषसह ' हे वर्ण चारी ॥ ऊष्म बोलिजे शास्त्रकारीं ॥ विसर्गादिअनुस्वारीं ॥ अंअःवरी विभाग ॥ २९ ॥ येथ 5बावन्नात्री मातृका देख ॥ केवळ 0क्षकारू गा देख ॥ यांतु सानुनासिक 3निनासिक ॥ जाणती लोक शास्त्रज्ञ ॥ ४३० ॥ एवं स्वरवर्णविधिउच्चारीं ॥लौकिकी Sवैदिकी भाषावरी ॥ 7वेदशास्त्रार्थप्रकारीं ॥ =वाढली वैखरी शब्दचातुर्यें ॥ ३१ ॥ बोलेंचि गा बोलाप्रती ॥ चाळूनि नाना उपपत्ती ॥ बोलें बोल निगूहिती ॥ युक्तिप्रयुक्ती साधुनी ॥ ३२ ॥ ऐशिया 1नानाशब्दकुसरीं ॥ अत्यंत विस्तारिली वैखरी ॥ तेचि चौंचौं अक्षरीं ॥ वाढवूनि 4धरित नानाछंदें ॥ ३३ ॥ वाढतां 2चतुरक्षर भेदें ॥ उत्तरोत्तर अनेक छंदें ॥ वाढविलीं स्वयें वेदें ॥ 9निजाज्ञाबोधें नेमूनी ॥ ३४ ॥ अतएव अनंत अपार ॥ अर्थता शब्दता अतिदुस्तर ॥ माझ्या शब्दज्ञानाचा पार ॥ सुरनर नेणती ॥ ३५ ॥ ऐशी वैखरीची अनंतशक्ती ॥ यालागीं ह्मणिजे ते बृहती ॥ इच्छाविस्ताराची गती ॥ स्वयें नेणती शिव स्रष्टा ॥ ३६ ॥ हिरण्यगर्भत्वें स्वयें जाण ॥ जीव शिव अंतर्यामिलक्षण ॥ वेदाज्ञा माझी प्रकाशी आपण ॥ जिचें नामाभिधान वैखरी ॥ ३७ ॥ जो मी वेदात्मा श्रीहरी ॥ तो वेद या रीतीं विस्तारी ॥ स्वयें विस्तारोनि संहारी ॥ मर्यादेवरी सकाळें ॥ ३८ ॥ मागां बोलिलीं छंदें जाण ॥ त्या छंदांचें निजलक्षण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ जो वेदाचें कारण निजस्वरूप ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ गायत्र्युष्णिगनुष्टुप्च बृहती पंक्तिरेव च ॥ त्रिष्टुब्जगत्यतिच्छंदाह्य- त्यष्ट्यतिजगद्विराट् ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ सकळ छंदांचें अधिष्ठान ॥ मुख्य गायत्री छंद जाण ॥ त्या गायत्रीछंदाचें लक्षण ॥

१ न सोडतां. २ पांच वर्ग. ३ अक्षरें. ४ ब्रह्मा.

*ना. मंत्रत्रयी मिळणी. +ना. देहस्था. ×ना. त्यासी. ❀मो. ओंकाराचे. ०ना. रिगम निघे. *ना. प्रकटे. ≶मो. उपशम. 6मो. साक्षात गर्जतां. 5ना. बावन्नावरी मातृका एक. 0मो. क्षराक्षर गा एक. 3ना. अनुनासिक. Sमो. भाषेवरी. 7मो. वेदशास्त्र प्रकारीं. =मो. वाढवी. 1मो. नाना कुसरी. 4ना. निर्धारी. 2मो. चतर्थाक्षर भेदें. 9मो. निजज्ञान बोधें बोलोनी.

ऐक संपूर्ण सांगेन ॥ ४४० ॥ आठआठां अक्षरीं त्रिपद ॥ गणितां जेथ येती शुद्ध ॥ त्यानांव गायत्री छंद ॥ हें *वेदानुवाद निजबीज ॥ ४१ ॥ हें वेदाचें निज जिव्हार ॥ ब्रह्मज्ञानाचें परपार ॥ परमानंदाचें सोलींव सार ॥ जाण साचार गायत्री ॥ ४२ ॥ हें चैतन्याचें जीवन ॥ मज गोप्याचें गुप्तधन ॥ जेथ जीवशिवां समाधान ॥ तें हें छंद जाण गायत्री ॥ ४३ ॥ ये छंदींचें +एक अक्षर ॥अक्षराचें निजसार॥ सच्चिदानंदाचें भांडार ॥ जाण साचार गायत्री॥४४ करितां गायत्रीचें अनुष्ठान ॥ विश्वामित्र झाला ब्राह्मण ॥ मी कृष्ण वंदीं त्याचे चरण॥माझाही तो गुरु जाण रामावतारीं ॥४५॥ यालागीं सकळछंदीं प्राधान्य ॥ मुख्यत्वें गायत्रीछंद जाण॥ इतर छंद होती पावन ॥ कासे लागोन इयेच्या ॥ ४६ ॥ गायत्रीछंदाचे अंगीकारीं ॥ त्यासि मिळाल्या अक्षरें चारी ॥ ×उष्णिक्छंदाची थोरी ॥ त्याचिवरी ठसावे ॥ ४७ ॥ उष्णिक्छंदाचे अंगीकारीं ॥ त्यासि मिळाल्या अक्षरें चारी ॥ अनुष्टुप्छंदाची थोरी ॥ त्याचिवरी ठसावे ॥ ४८ ॥ अनुष्टुप्छंदाचे अंगीकारीं ॥ आणिक मिळाल्या अक्षरें चारी ॥ बृहतीछंदाची थोरी॥ त्याचिवरी ठसावे ॥ ४९ ॥ ०एवं पंक्ति त्रिष्टुप् जगती ॥ अंत्यष्टि, इष्टि, जगती ॥ चोंचौं अक्षराचे अधिकप्राप्ती ॥ ऽछंद वेदोक्तीं विभाग ॥ ४५० ॥ ऐशिया चतुरक्षरमिळणीं ॥ नाना छंदांचिया श्रेणी ॥ वेदरायाची राजधानी ॥ मंत्रध्वनी गर्जती ॥ ५१ ॥ तेथ अक्षरमर्यादा न करवे॥ शाखांची मर्यादा न धरवे ॥ अर्थता वाच्यता नेणवे ॥ वेद वैभवें दुर्ज्ञेय ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ ॥ किं विधत्ते किमाचष्टे किमनूद्य विकल्पयेत् ॥ इत्यस्या हृदयं लोके नान्यो मद्वेदकश्चन ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ कर्मकांडविधिनिषेधीं ॥ कोण अर्थ त्यागार्थ निंदी ॥ कोण तो अर्थ प्रतिपादी ॥ स्वहितबुद्धी साधकां ॥ ५३ ॥ मंत्रकांडें मंत्रमूर्ती ॥ सांगोपांग सायुधस्थिती ॥ उपासना उपास्ययुक्ती ॥ किमर्थ भक्ती करविली ॥ ५४ ॥ ज्ञानकांड त्रिशुद्धी ॥ कोण पदार्थ निषेधी ॥ कोण्या अर्थातें प्रतिपादी ॥ निजबुद्धी बोधुनी ॥ ५५ ॥ एवं वेदाचें अचळ मूळ ॥ विधिविधानासि मुख्य फळ ॥ जाणावया गा केवळ ॥ नाहीं ज्ञानबळ सुरनरां ॥ ५६ ॥ या वेदार्थातें तत्त्वतां ॥ मीचि एक सर्वज्ञ ज्ञाता ॥ माझे कृपेवीण सर्वथा ॥ हें नयेचि हाता ब्रह्मादिकां॥५७॥ तेथ उद्धवाचें मनोगत ॥ देवो जाणे वेदींचा इत्यर्थ ॥ तरी भक्तकृपाळु श्रीकृष्णनाथ ॥ मजही तो अर्थ दयेनें सांगे ॥ ५८ ॥ हा उद्धवाचा निजभावो ॥ जाणों सरला देवादिदेवो ॥ तो वेदार्थाचा अभिप्रावो ॥ श्लोकान्वयो पहाहो सांगत ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ मां विधत्तेऽभिधत्ते मां विकल्प्यापोह्यते त्वहम् ॥ ⁂संमत श्लोक ॥ तत्त्वमस्यादिवाक्यं च तदात्मा प्रतिपादने ॥ लक्षतत्त्वे पदार्थौ द्वौ उपादाय प्रवर्तते ॥ १ ॥ नित्यमुक्तः स्वतः सर्ववेदकृत् सर्ववेदवित् ॥ स्वपरज्ञानदाता च तं वंदे गुरुमीश्वरम् ॥ २ ॥

---

१ तीन चरण. २ रक्षण करणाराचें.

*मो. वेदानुवादा. +मो. एक एक. ×ना. अनुष्टुप्छंदाची थोरी. ०मो. येर. ऽमो. छंदोंि विभाग.

⁂ हे दोन श्लोक पैठणचे पोथींत आहेत. पंढरपूरचे पोथींत नाहींत.

॥ टीका ॥ माझी पावावया स्वरूपसिद्धी ॥ मलिनाचिये चित्तशुद्धी ॥ वेद स्वधर्म प्रतिपादी ॥ त्यागवी निषेधीं विषयांतें ॥४६०॥ तेथ अग्निहोत्रादि विधान ॥ यज्ञांत कर्माचरण ॥ तें चित्त-शुद्धीचें कारण ॥ वैराग्य दारुण उपजवी ॥ ६१ ॥ दारुण वैराग्यउत्पत्ती ॥ इहामुत्र१विषय-निवृत्ती ॥ तेव्हां साधकासि माझी प्राप्ती ॥ सहजस्थिती स्वभावें ॥ ६२ ॥ एवं कर्मकांडा-चिये स्थिती ॥ विधिनिषेध वेदोक्ती ॥ साधकांसि माझी प्राप्ती ॥ जाण निश्चितीं याहेतू ॥६३॥ विषयीं परम बाधा देखती ॥ परी त्यागीं नाहीं सामर्थ्यशक्ती ॥ ऐशिया साधकांप्रती ॥ वेदें मद्भक्ती द्योतिली ॥ ६४ ॥ येथ मंत्रमूर्ती उपासन ॥ माझें सगुण *अनुष्ठान ॥ तेथ करितां अनन्यभजन ॥ रज तम जाण नासती ॥ ६५ ॥ मग केवळ सत्ववृत्ती ॥ श्रवणकीर्तनीं अति-प्रीती ॥ तेणें मद्भावो सर्वभूतीं ॥ माझी चौथी भक्ती तेणें होय ॥ ६६ ॥ आतुडल्या माझी चौथी भक्ती ॥ मद्भक्तां नावडे मुक्ती ॥ अद्वैतभजनाचिया प्रीती ॥ धिक्कारिती कैवल्य ॥६७॥ अद्वैतबोधें करितां भजन ॥ मी अनंत अपार चिद्घन ॥ भक्तीमाजीं आकळलों जाण ॥ जेणें मद्रूपपण मद्भक्तां ॥ ६८ ॥ तेव्हां भज्य भजक भजन ॥ पूज्य पूजक पूजन ॥ साध्य साधक साधन ॥ अवघें आपण स्वयें होय ॥ ६९ ॥ माझी ऐश्वर्य सामर्थ्यशक्ती ॥ तेही ये निजभक्तांच्या हातीं ॥ अद्वैतभजनाचिया प्रीती ॥ मत्पदप्राप्ती२ मद्भक्तां ॥४७०॥ मी देव तो भक्त शुद्ध ॥ हा बाहेरी नांवाचाचि भेद ॥ आंतुवट पाहतां बोध ॥ सच्चिदानंद निजऐक्यें ॥ ७१ ॥ हे उपासनाकांडस्थिती ॥ साधकीं करूनि माझी भक्ती ॥ यापरी पावले माझी प्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७२ ॥ मायाप्रतिबिंब चैतन्य ॥ त्वंपदार्थें वाच्य जाण ॥ ज्याच्या अंगीं ×जीवाभिधान ॥ अविद्या जाण उपजवी ॥ ७३ ॥ जेवीं स्वप्नामाजीं आपण ॥ आन असोनि देखे आन ॥ तेवीं +अविद्यकत्वें जाण॥ जीवपण 6एकदेशीं॥७४॥ जो मायाशबलित चैतन्य॥ जो ०योगशब्द जगत्कारण ॥ जो सर्वद्रष्टा सर्वज्ञ ॥ सदासंपन्न ऐश्वर्यें ॥ ७५ ॥ जो सकळ कर्मांचा कर्ता ॥ जो कर्ताचि परी अकर्ता ॥ ज्याचे अंगीं स्वभावतां ॥ नित्यमुक्तता स्वयंभ ॥७६॥ ज्याची अकुंठित सहज सत्ता ॥ जो परमानंदें सदा पुरता ॥ ज्यासि ईश्वरत्वें समर्थता॥ हे जाण वाच्यकता तत्पदार्थांची ॥ ७७ ॥ जीवाचें सांडोनि अज्ञानत्व ॥ शिवाचें सांडूनि सर्वज्ञत्व ॥ दोहींचें शोधित जें लक्षत्व ॥ ऐक्यें निजतत्त्व साधिती ॥७८॥ लग्नीं नोवरा निमा-सुरा ॥ तोचि गेलिया 4देशावरां ॥ विदेशीं देखिला एकसरा ॥ ताच्ण्यमदभरा संपन्न ॥७९॥ तेकाळींची त्यजूनि बाल्यावस्था ॥ आजींची नेघूनि तारुण्यता ॥ पत्नी अनुसरे निजकांता ॥ निजस्वरूपता स्वभावें ॥ ४८० ॥ तेवीं त्वंपदतत्पदवाच्यार्थ ॥ दोहींचा सांडावा ✻निश्चित ॥ *ऐक्यें अंगीकारावा लक्ष्यार्थ ॥ हा ज्ञानकांडार्थ उद्धवा' ॥ ८१ ॥ (जीवशिवांचेनि ऐक्यें जाण ॥ माझे 7चित्स्वरूपीं समाधान ॥ स्वयें पाविजे आपण ॥ हें ज्ञानकांड संपूर्ण बोलिलें

---

१ या लोकच्या व परलोकींच्या विषयोपभोगाची निवृत्ती. २ मोक्ष. ३ ज्ञानमय. ४ अंतरीं. ५ माया-युक्त, मायेनें शबल झालेला. ६ लहान वयांतला. ७ देशांतरास, प्रवासास. ८न घेऊन. ९ ग्रहण करिते.

*मो. अधिष्ठान. ×ना. जीवाभिमान. +मो. अविद्यक. 6मो. एकत्वीं दिसे. ०ना. योग्य 4मो. देशांतरा. ✻ना. निश्चितार्थ. *ना. एक अंगीकारावां. 0ना. जीवशिवाचे निजऐक्यें. 7मो. विश्वरूपीं.

वेदें ॥ ४९० ॥ वेदा आदिमध्यअवसानीं ॥ मातें लक्षिती कांडें तिनी ॥ तोचि अर्थ उपसंहारूनी ॥ ग्रंथावसानीं हरि बोले ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ ॥ एतावान् सर्ववेदार्थः शब्द आस्थाय मां भिदाम् ॥ मायामात्रमनूद्यांते प्रतिषिद्ध्य प्रसीदति ॥ ४३ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे एकविंशोऽध्यायः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ ॥ उद्धवा वेदाचें वेदवचन ॥ अर्थगंभीर अतिगहन ॥ तेथ शिणतांही ऋषिजन अर्थावसान अलक्ष्य ॥ ८३ ॥ तें वेदार्थाचें निजसार ॥ माझें गुह्यज्ञानभांडार ॥ तुज म्य सांगीतलें साचार ॥ पूर्वापर अविरोधें ॥ ८४ ॥ तें ऐकोनि देवाचें उत्तर ॥ उद्धव चमत्कारल थोर ॥ तेंचि वेदाचें निजसार ॥ पुढती श्रीधर सांगोका ॥ ८५ ॥ पान्हा लागतांचि तोंडीं दोहकें वांसरूं आंखुडी ॥ त्यापरी अति आवडीं ॥ स्वयें चरफडी उद्धव ॥ ८६ ॥ जेंवीं क पक्षिणीपुढें ॥ चारा घ्यावयाचे चाडें ॥ पिलें पसरी चांचुवंडें ॥ तेवीं कृष्णाकडे उद्धवू ॥ ८७ तें उद्धवाचें मनोगत ॥ जाणोनियां श्रीअनंत ॥ सकळ वेदार्थ संकळित ॥ *ग्रंथांतीं सांग निजसारांश ॥ ८८ ॥ नानाशाखीं अतिप्रसिद्ध ॥ त्रिकांडीं वाढला जो वेद ॥ तेथील नान शब्दीं हाचि बोध ॥ जो मी अभेद परमात्मा ॥ ८९ ॥ त्या मातें धरोनि हातीं ॥ त्रिकांड चालिल्या श्रुती ॥ त्या श्रुत्यर्थाची उपपत्ती ॥ यथानिगुती सांगेन ॥ ४९० ॥

꙳॥ श्लोक ॥ संमत ॥ वासुदेवपरा वेदा वासुदेवपराःमखाः ॥ वासुदेवपरा योगा वासुदेवपरा क्रियाः॥ १ ॥ वासुदेवपरं ज्ञानं वासुदेवपरं तपः ॥ वासुदेवपरा धर्मा वासुदेवपरा गतिः ॥ २ ॥

॥ टीका ॥ मी कर्मादिमध्यअंतीं ॥ मी कर्मकर्त्ता क्रियाशक्ती ॥ कर्मफळदाता मी प्रांतीं ॥ ह इत्यर्थ निश्चितीं कर्मकांडींचा ॥ ९१ ॥ मंत्र मूर्ति आणि मंत्रार्थ ॥ तेही मीचि गा निश्चित पूज्य पूजक पूजा समस्त ॥ मजव्यतिरिक्त आन नाहीं ॥९२॥ शिवो भूत्वा शिवं यजेत् श्रुती ॥ देवें देवोचि पूजिजे॥देव होऊनि देवा भजिजे ॥हें वेदींचें निजबीज माझें॥हेंचि आगम बोलिजे ×मुख्यत्वें ॥ ९३ ॥ मीच देवो मीचि भक्तू ॥ पूजोपचार मीचि समस्तू ॥ मीचि मा पूजितू ॥ हे इत्थंभूतू उपासना ॥ ९४ ॥ हें उपासनाकांडींचें निजसार ॥ आगम शास्त्रीं गुह्यभांडार ॥ माझ्या निजभक्तीचें वस्तीचें घर ॥ ते हे साचार उपासना ॥ ९५ ॥ ज्ञानकां तें अलोलिक ॥ वेद आपला आपण +द्योतक ॥ अवघा संसार काल्पनिक ॥ तेथ वेद नियामक कोणातें ॥ ९६ ॥ वोसघरासि वस्तीसि पहाहो ॥ निर्जीव पाहुणा आला राहो ॥ त्याच कोण करील ०वोथंवो ॥ तैसा भावो वेदाचे ॥ ९७ ॥ ॥ श्रुति ॥ एकमेवाद्वितीयं ब्रह्म नेह नानास्ति किंचन॥खांबसूत्रावारिले पुतळीसी ॥ 2तीतें बोडिलें जेवीं शिसीं ॥ तेथें नाहीं निघ

१ धार काढणारा. २ चोंच. ३ थोड्यांत. ४ आदर. ५ डोकें.

*ना. ग्रंथार्थ. ×ना. सत्यत्वें. +ना. मो. घातक. ०ना. वोंठवो. 2ना. तिचेही बोडिले शिसी

꙳ हे दोन श्लोक पैठणचे पोथींत आहेत. पंढरपूरचे पोथींत नाहींत.

*पांढरे केशीं ॥ तेवीं शुद्धीं वेदासी ठावो नाहीं ॥ ९८ ॥ मूळ संसाराचि मायिक ॥ तेथ वेद तोही तद्रूप देख ॥ मृगजळीं नाहीं उदक ॥ परी ×वोलिही देख असेना ॥ ९९ ॥ जेथ मुळींच अद्वैतता ॥ तेथ कैंचा वक्ता कैंचा श्रोता ॥ कैंचें कर्म कैंचा कर्त्ता ॥ वेदवार्त्ता ते कैंची ॥ ५०० ॥ नाहीं दृश्य द्रष्टा दर्शन ॥ नाहीं ध्येय ध्याता ध्यान ॥ नाहीं ज्ञेय ज्ञाता ज्ञान ॥ वेदवचन तेथें कैंचें ॥ १ ॥ जेथ भ्रमाची राणीव ॥ जेथें भेदाची शाहाणीव ॥ तेथें वेदाची जाणीव ॥ गोड गाणीव उपनिषदांची ॥ २ ॥ जंव +भेदाची सबळ स्थिती ॥ तंव वेदांची थोर ख्याती ॥ ※भेद आलिया अद्वैतीं ॥ वेद विरला 'नेति' ह्मणोनी ॥ ३ ॥ जळगार जळीं विरे ॥ तेवीं वेद अद्वैतीं मुरे ॥ हें ज्ञानकांड साचोकारें ॥ तुज म्यां खरें सांगीतलें ॥ ४ ॥ जेथ उपजला स्वयें अग्नी । त्या अरणीं[1] ०जाळूनि शमे वन्ही ॥ तेवीं ज्ञानकांड 6निरूपणीं ॥ वेद निजनिर्दळणीं प्रवर्त्तला ॥ ५ ॥ एक ब्रह्म जें अद्वैत ॥ येणें श्रुतिवाक्यें मिथ्या द्वैत ॥ हें बोलूनि वेद हारपे तेथ ॥ ब्रह्म सदोदित संपूर्ण॥६॥ मी "ब्रह्म" 3शुद्धीं हे स्फुरे स्फुर्त्ती॥तेथेंचि ओंकाराची उत्पत्ती ॥ तोही ब्रह्मरूप निश्चितीं ॥ ज्यासि ब्रह्म ह्मणती एकाक्षर ॥ ७ ॥ त्या ओंकारापासोनि गहन ॥ श्रुति शाखा स्वर वर्ण ॥ झाले तें ब्रह्मरूप जाण ॥ एवं वेद संपूर्ण परब्रह्म ॥ ८ ॥ जेवीं सोन्याचे अळंकार ॥ पाहतां सोनेंचि साचार ॥ तेवीं श्रुतिशाखावेदविस्तार ॥ तो अवघा ओंकार मद्रूपें ॥९॥ जो वेदीं प्रतिपाद्य पुरुषोत्तम ॥जो भक्तकामकल्पद्रुम॥ तो हें बोलिला मेघश्याम ॥ आत्माराम श्रीकृष्ण ॥ ५१० ॥ तिहीं कांडीं निजसंबंध ॥ पूर्वापर अविरुद्ध ॥ हा वेदार्थ परमशुद्ध ॥ तुज म्यां विशद सांगीतला ॥ ११ ॥ याहोनियां परता ॥ वेदार्थ नाहीं गा सर्वथा ॥ तुज म्यां सांगितला आतां ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ १२ ॥ या वेदार्थाची निजखूण ॥ हृदयीं भोगितां आपण ॥ होय जीवशिवां समाधान ॥ ऐसें श्रीकृष्ण बोलिला ॥ १३ ॥ हें ऐकोनि उद्धव जाण ॥ झाला वेदार्थीं निमग्न ॥ दोन्ही टवकारले नयन ॥ स्वानंदीं मन बुडालें ॥ १४ ॥ चित्तचैतन्यां मिळणी पाडी ॥ कंठीं बाष्प दृढ अडी ॥ लागतां स्वानंदाची गोडी ॥ उभिली गुढी रोमांचीं ॥ १५ ॥ शरीरीं स्वेद सकंपता ॥ नयनीं स्वानंदजळ येतां ॥ बोल बुडाला सर्वथा ॥ मूर्च्छा येतयेतां सांवरी ॥ १६ ॥ तंव हृदया आली आठवण ॥ हें भलें नव्हे दुश्चित्तपण ॥ ह्मणें निजधामा जाईल श्रीकृष्ण ॥ येणें धाकें नयन उघडिले ॥१७॥ तंव घवघवीत घनसांवळा ॥ मुकुट कुंडलें मेखळा ॥ कांसे झळके सोनसळा ॥ आपाद वनमाळ शोभत ॥१८॥ अंतरीं भोगी चैतन्यघन ॥ बाहेरी उघडितां नयन ॥ आनंदविग्रही[2] श्रीकृष्ण ॥ मूर्ति संपूर्ण संमुख ॥ १९ ॥ ह्मणे श्रीकृष्ण चैतन्यघन ॥ चैतन्यविग्रही श्रीकृष्ण ॥ सगुणनिर्गुणरूपें जाण ॥ ब्रह्म परिपूर्ण श्रीकृष्ण ॥५२०॥ बाप भाग्य उद्धवाचें ॥ सगुणनिर्गुण दोहींचें ॥ सुख भोगीतसे साचें ॥ हें श्रीकृष्णकृपेचें महिमान ॥ २१ ॥ जेथ सद्गुरुकृपा संपूर्ण ॥ तेथ शिष्याची आवडी प्रमाण ॥तो जैं मागे 5मूर्ति सगुण ॥ तैं तेचि जाण गुरु देती ॥२२॥ पाहिजे निर्गुण निजप्राप्ती ॥ ऐशी आवडी ज्याचे चित्तीं ॥ तैं निर्गुणाचिये निजस्थितीं ॥ गुरुकृपा नि-

---

१ जीं लांकडें एकमेकांवर घासून यज्ञाकरितां अग्नि उत्पन्न करितात, तीं लांकडें. २पायांपर्यंत. ३भक्तांस आनंद देणारे शरीर अथवा ब्रह्मानंदमूर्ति.

*ना. पुढारे. ×मो. वोहळही. +मो. वेदाची. ※मो. भेद आटलिया अंतीं. ०मो. शमवी वन्ही. 6मो. निरूपोनि. 3ना. शुद्ध. 5मो. मुक्ती.

क्षितीं नांदवी ॥ २३ ॥ सगुणनिर्गुण स्वरूपें दोनी ॥ भोगात्रया आवडी ज्याचे मनीं ॥ तेही स्थितीच्या गुरु दानीं ॥ कृपाळुपणीं समर्थ ॥ २४ ॥ सद्‌गुरूचें अगाध माहिमान ॥ जें वेदा न बोलवे जाण ॥ त्याची कृपा झालिया पूर्ण ॥ दुर्लभ कोण पदार्थ ॥ २५ ॥ ते कृष्णकृपेस्तव जाण ॥ फिटलें उद्धवाचें दुर्लभपण ॥ सगुणनिर्गुण एक कृष्ण ॥ हे खूण संपूर्ण बाणली ॥२६॥ जाणोनि कृष्णाचें पूर्णपण ॥ त्याचें लक्षोनि श्रीचरण ॥ धांवोनि उद्धव आपण ॥ घाली लोटांगण हरिचरणीं ॥ २७ ॥ तेव्हां सांवळा सकंकण ॥ चारी बाह्या पसरूनि श्रीकृष्ण ॥ उद्धवासि प्रेमें उचलून ॥ दीधलें आलिंगन स्वानंदें ॥ २८ ॥ त्या आलिंगनाचें सुख ॥ अनुभवी जाणती देख ॥ जो उद्धवासि झाला हरिख ॥ त्याचा जाणता एक श्रीकृष्ण ॥ २९ ॥ तो कृष्ण ह्मणे उद्धवा ॥ हा विसाव्याचा विसावा ॥ माझ्या वेदाचा निजगुह्यठेवा ॥ तो हा एकविसावा सांगीतला ॥५३०॥ जेणें मोडे लिंगदेहाचा यावा ॥ जेणें जीवत्व *नाठवे जीवा ॥ तो हा विसाव्याचा विसावा ॥ तुज एकविसावा निरूपिला ॥ ३१ ॥ जेणें मिथ्यात्व ये ×देहभावा ॥ जेणें शून्य पडे ※रूपनांवा ॥ तो हा विसाव्याचा विसावा ॥ एकविसावा निरूपिला ॥ ३२ ॥ जेथ अज्ञाना होय नागोवा ॥ ०जेथ ज्ञानही ये अभावा ॥ तो विसाव्याचा विसावा ॥ एकविसावा निरूपिला ॥ ३३ ॥ जेथ वेदही वेडावला ॥ बोध लाजोनि बुडाला ॥ अनुभवो स्वयें थोंटावला ॥ तो हा निरूपिला वेदार्थ ॥ ३४ ॥ हें वेदार्थसार निरूपण ॥ मज विश्वात्म्याचें +निजनिधान ॥ तुज म्यां सांगीतलें संपूर्ण ॥ हे जीवींची खूण उद्धवा ॥ ३५ ॥ कोटिकोटिसाधनें करितां ॥ गुरुकृपेवीण सर्वथा ॥ हे नये कोणाचे हाता ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ३६ ॥ ते गुरुकृपेलागीं जाण ॥ आचरावे स्वधर्म पूर्ण ॥ करावें गा २शास्त्रश्रवण ॥ वेदपठण तदर्थ ॥ ३७ ॥ ते कृपेलागीं आपण ॥ व्हावें दीनाचेंही दीन ॥ धरितां संतांचे चरण ॥ स्वामी जनार्दन संतुष्टे ॥ ३८ ॥ ६गुरु संतुष्टोनि आपण ॥ करवी भागवतनिरूपण ॥ एका विनवी जनार्दन ॥ ९कृपा नित्य नूतन करावी ॥ ३९ ॥ पुढील अध्यायीं गोड प्रश्न ॥ उद्धव पुसेल आपण ॥ प्रकृतिपुरुषांचें लक्षण ॥ तत्त्वसंख्या पूर्णविभाग ॥ ५४० ॥ त्याचें सांगतां उत्तर ॥ जन्ममरणाचा प्रकार ॥ स्वयें सांगेल शार्ङ्गधर ॥ कथा गंभीर परमार्थी ॥ ४१ ॥ जे कथेचें करितां श्रवण ॥ वैराग्य उठे कडकडून ॥ येणें विन्यासें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगेल ॥ ४२ ॥ घटाकाशें टाकिजे गगन ॥ तेवीं एका जनार्दना शरण ॥ त्याचे वंदितां श्रीचरण ॥ रसाळ निरूपण स्वयें स्मरे ॥ ५४३ ॥ इति श्रीभागवते महापुराणे भगवदुद्धवसंवादे एकादशस्कंधे एकाकारटीकायां वेदत्रयविभागनिरूपणं नाम एकविंशतितमोऽध्यायः ॥ २१ ॥ अध्याय ॥ २१ ॥ श्लोक ॥ ४३ ॥ ओंव्या ॥ ५४३ ॥ एवंसंख्या ॥ ५८६ ॥

---

१ देण्यास. २ ठिकाणा प्राप्त. ३ श्रीकृष्ण. ४ विस्तार, भाषण.

*मो. मोडे जीवा. ×ना. जीवभावा. ※ना. स्वरूपभावा. ०ना. जेथ ज्ञान होय अभावा. +मो. निजधाम जाण. २मो. सशास्त्र श्रवण. ६मो. जनार्दन तुष्टोनि आपण. ९मो. कृपा श्रोतीं करावी.

# अध्याय बाविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः॥ ॐनमो सद्गुरु खांबसूत्री॥चौऱ्यांशी लक्ष पुतळ्या यंत्रीं॥ नाचविशी *निजतंत्रीं ॥ प्राचीनदोरी स्वभावें ॥ १ ॥ दोरी धरिली दिसों नेदेशी ॥ परी पुतळ्या स्वयें नाचविशी ॥ नवल लाघवी कैसा होशी ॥ अलिप्ततेशीं सर्वदा ॥ २ ॥ तेथ जैशी ज्याची पूर्वगती ॥ तें भूतें नाचती तैशा रीतीं ॥ ते नाचती चेतनाशक्ती ॥ ×तुझ्या हातीं वीण हस्तें ॥ ३ ॥ जेवीं कां अचेतनां लोहातें ॥ चुंबक खेळवी निजसामर्थ्यें ॥ तेवीं तूं सकळभूतांतें ॥ +निजसत्तें नाचविसी ॥ ४ ॥ ऐशीं सदा नाचती परतंत्रें ॥ तरी अभिमानाचें बळ थोर ॥ सत्य मानोनि देहाकार ॥ ✻आह्मी स्वतंत्र ह्मणविती ॥५॥ आह्मी सज्ञान अतिज्ञाते॥ आह्मी कुशल कर्मकर्त्ते ॥ इतरें मूर्खें समस्तें ॥ ऐशा अभिमानातें वादविती ॥ ६ ॥ एवं देहाभिमानाचेनि हातें ॥ विसरोनि आपुल्या ०अकर्तृत्वातें ॥ स्वयें पावले कर्मबंधातें ॥ जेवीं स्वप्रावस्थे 2विषबाधा ॥ ७ ॥ स्वप्नीं अतिशय चढलें विख ॥ आतां उतरलें निःशेख ॥ तेवीं बंधमोक्ष देख ॥ सत्यत्वें मूर्ख मानिती ॥८॥ हे तुझे खांबसूत्रींची कळा ॥ मिथ्या सत्यत्वें दाविशी डोळां ॥ हा अतिशयें अगाध सोहळा ॥ तुझी अतर्क्य लीळा तर्केना ॥ ९ ॥ अचेतनीं चेतनधर्म ॥ प्रत्यक्ष दाविशी सुगम ॥ हेंचि तुझें नकळे वर्म ॥ करोनि कर्म अकर्ता ॥ १० ॥ अकर्तोचि तूं होशी कर्ता ॥ 7कर्ता होत्सातां अकर्ता ॥ हे तुझी खांबसूत्रता ॥ न कळे सर्वथा कोणासी ॥ ११ ॥ तुझी माया पाहों जातां ॥ तोचि मायेनें 5ग्रासिला तत्त्वतां ॥ असो तुजचि पाहों ह्मणतां ॥ तेही सत्वावस्था मायेची ॥ १२ ॥ ऐसें तुझें खांबसूत्र ॥ अकळ न कळे गा तुझें चरित्र ॥ देखोंनेदिसी निजसूत्र ॥ भूतें विचित्र नाचविशी ॥१३॥ तुझेनि जग होये जाये॥ परी 1म्यां केलें हें ठावें नोहे ॥ ऐसा तुझा खेळ पाहे ॥ कोणें काये लक्षावा ॥ १४ ॥ यापरी खेळ वादविशी ॥ सर्वेंचि विकल्पोनि मोडिशी ॥ 0विकार महत्त्वीं सांठविशी ॥ हेंही कर्तृत्व अंगासी नलगत गेलें ॥ १५ ॥ याचें *मुख्यत्वें मूळ लक्षण ॥ तुझें कृपेवीण न कळे जाण ॥ तुझी कृपा झालिया पूर्ण ॥ जनीं जनार्दन प्रकटे पैं ॥ १६ ॥ जनीं प्रकटल्या जनार्दन ॥ तद्रूप होइजे आपण ॥ हे मूळींची निजखूण ॥ तेथ मीतूंपण रिगेना ॥१७॥ 6मीतूंपणेंवीण प्रसिद्ध ॥ जनीं जनार्दन निजानंद ॥ त्याचे कृपेस्तव विशद ॥ श्रीभागवत शुद्ध वाखाणिलें ॥ १८ ॥ तेथ एकविसाव्याचे अंतीं ॥ वेद त्रिकांड 5लक्ष्यार्थस्थिती ॥ ब्रह्म एकचि निश्चितीं ॥ अद्वयस्थितीं अविनाशी ॥ १९ ॥ हें वेदार्थसार निरूपण ॥ ऐकतां उद्धवा बाणली खूण ॥ ब्रह्म एकाकी परिपूर्ण ॥ दुजेनवीण संचलें ॥ २० ॥ वेदवादें ब्रह्म एक ॥ स्वानुभवें तैसेंचि देख ॥ तरी ज्ञाते ऋषिजन लोक ॥ 3केवीं तत्त्वें अनेक बोलती ॥ २१ ॥ येचि आशंकेलागीं जाण ॥ उद्धवें स्वयें

१ प्राचीन कर्मरूपसूत्रानें. २ जड ३ योगानें. ४ अगम्य.

*मो. निजसूत्रीं. ×मो. तुझ्याहातीं निश्चित. +मो. निजहस्तें. ✻मो. आपणा स्वतंत्र. ०मो. स्वरूपातें. 2मो. विषयबाधा. 7मो. कर्ताचि तूं होसी अकर्ता. 5मो. ग्रासिजे. 4ना. नेदुनी. 1मो. त्वां. 0मो. आकार महत्तत्वादि मांडिसी, कर्तृत्व अंगासी न लगतां. *ना. सूक्ष्मत्वें मुख्य लक्षण. 6मो. मीतूंपणें प्रसिद्ध. 5ना. लक्षणार्थ. 3मो. केवीं ते अनेक.

मांडिला प्रश्न ॥ परी पोटांतील भिन्न खूण ॥ उगा श्रीकृष्ण *न रहावा ॥२२॥ मी झालों जी ब्रह्मसंपन्न ॥ हें ऐकतां माझें वचन ॥ निजधामासि निघेल श्रीकृष्ण ॥ मग हें दर्शन मज कैंचें ॥ २३ ॥ ऐशिया काकुळतीं जाण ॥ संशयेंवीण करी प्रश्न ॥ तें +ऐकोनि कृष्णवचन ॥ सुख समाधान भोगित ॥ २४ ॥ तंव श्रीकृष्णाचे मनीं आणिक ॥ उद्धव मी दोन्ही एक ॥ मिथ्या वियोगाचें दुःख ॥ ×हें कळे तंव देख प्रश्न सांगो ॥ २५ ॥ बाविसावे अध्यायीं देख ॥ तत्व-संख्या सांगेल आवश्यक ॥ प्रकृतिपुरुषविवेक ॥ जन्ममरण[1]द्योतक प्रकारू ॥ २६ ॥ आत्मा एक कीं अनेक ॥ आणि तत्वसंख्याविवेक ॥ हें कळावया निष्टंक ॥ उद्धव देख पुसत ॥२७॥

॥ श्लोक ॥ उद्धवउवाच ॥ कति तत्त्वानि विश्वेश संख्यातान्यृषिभिः प्रभो ॥

॥ नवैकादश पंचत्रीण्यात्थ त्वमिह शुश्रुम ॥ १ ॥

॥ टीका ॥ विश्वात्मका विश्वेश्वरा ॥ विश्वधारका विश्वंभरा ॥ विश्वसाक्षी विश्वाकारा ॥ विश्वैक-सुंदरा श्रीकृष्णा ॥ २८ ॥ तुज विश्वात्मक ह्मणतां ॥ जड मलिन एकदेशिता ॥ आली ह्मणशी अज्ञानता ॥ ०यालागीं प्रभुता उपपादी[2] ॥ २९ ॥ जड मलिन अज्ञानता ॥ हे मायेस्तव होती तत्त्वतां ॥ ते मायेचा तूं नियंता ॥ हे अगाध प्रभुता पैं तुझी ॥३०॥ ❋ऐशिया संबोधनद्वारा ॥ 0विनवूनि स्वामी सारंगधरा ॥ तत्वसंख्येच्या विचारा ॥ निजनिर्धारा पुसत ॥ ३१ ॥ जे तपसामर्थ्यें समर्थ थोर ॥ अनागतद्रष्टे[3] ऋषीश्वर ॥ ते तत्वसंख्या विचार ॥ पृथक्पृथकाकारें बोलती ॥ ३२ ॥ तत्वसंख्या इत्थंभूत ॥ एकुणिसाव्या अध्यायांत ॥ तुह्मींच निरूपिला तत्वार्थ ॥ तोचि वृत्तांत सांगत ॥ ३३ ॥ पूर्वश्लोकार्थ ॥ नवैकादशपंचत्रीन् ॥ चौदावे श्लोकीं-च्या निरूपणीं ॥ हे अठ्ठावीस 7तत्वगणनी ॥ सांगतली शार्ङ्गपाणी ॥ मजलागोनी निश्चित ॥ ३४ ॥ ये तत्वसंख्येचा विचार ॥ प्रकृति पुरुष महदहंकारें[4] ॥ पंच महाभूतें थोर ॥ हा संख्या प्रकार नवांचा ॥ ३५ ॥ दाही इंद्रियें अकरावें मन ॥ पंच विषय तिन्ही गुण ॥ हे अठ्ठावीस संख्यागणन ॥ स्वमुखें आपण निरूपिलें ॥ ३६ ॥ यापरी गा लक्ष्मीपती ॥ हे मुख्यत्वें तुझी तत्त्वोक्ती ॥ आतां ऋषीश्वरांच्या 6युक्ती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ३७ ॥ ते तूं ऐक गा निश्चित ॥ तुज सांगेन तयाचा अर्थ ॥ ह्मणोनियां निरूपित ॥ स्वयें मनोगत उद्धव ॥ ३८ ॥ ह्मणे तत्वतां अवधारी ॥ मी सांगेन एक कुसरीं ॥ प्रकृतिपुरुषांमाझारीं ॥ विचित्र परी सांगत ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ केचित्षड्विंशतिं प्राहुरपरे पंचविंशतिम् ॥ सप्तैके नव षट् केचिच्च-त्वार्येकादशापरे ॥ २ ॥ केचित्सप्तदश प्राहुः षोडशैके त्रयोदश ॥ एतावत्त्वं हि संख्यानामृषयो यद्विवक्षया ॥ ३ ॥

---

१ जन्म मरण दाखविणारा. २ प्रतिपादी, स्पष्ट करी. ३ भविष्य जाणणारे, पुढील गोष्टी हलीं पाहणारे. ४ महत् आणि अहंकार.

*मो. नसावा. +मो. तें आयकोनी श्रीकृष्ण. ×मो. केवळ देख प्रश्नसंगें. ०मो. तरी ते मायेचा नियंता तूं प्रभु. ❋मो. ऐशिया जी जगदाधारा. 0मो. विनवणी. 7ना. तत्त्वें गणोनी. 6मो. उक्ती.

॥ टीका ॥ *येथ तत्त्वसंख्यामतवाद ॥ ऋषीश्वरांमाजीं विवाद॥ +त्या विवादाचे शब्द ॥ ऐक विशद सांगेन ॥४०॥ एक ह्मणे तत्त्वें सव्वीस ॥ दुजा ह्मणे उगा बैस ॥ बहु बोलावया नाहीं पैस तत्त्वें पंचवीस नेमस्त ॥ ४१ ॥ तिजा ह्मणे तुह्मी येथ ॥ कैसेनि वादविलें स्वमत ॥ तत्त्वें ०नेमेंसी सात ॥ कैंचीं बहुत बोलतां ॥ ४२ ॥ एक ह्मणे हें अभिनव ॥ बोलतां न लाजती मानव ॥ वृथा बोलाची लवलव ॥ तत्त्वें नव नेमस्त ॥ ४३ ॥ तंव हांसोनि बोले एक ॥ सांपे सज्ञान झाले लोक ॥ ×मिथ्या बहु तत्त्वजल्पक ॥ तत्त्वषट्क नेमस्त ॥ ४४ ॥ एक ह्मणती परते सरा ॥ नेणा तत्वसंख्याविचारा ॥ तत्त्वें नेमिलींच अकरा ॥ बडबड सैरा न करावी ॥ ४५ ॥ दुजा ह्मणे तत्त्वविचारा ॥ नेणोनि धरिती अहंकारा ॥ पुसोनियां थोरथोरां ॥ तत्त्वें *सतरा नेमस्त ॥ ४६ ॥ एक ह्मणे ※व्युत्पत्तिबळा ॥ कां व्यर्थ पिटाल कपाळा ॥ न कळे भगवंताची लीळा ॥ तत्त्वें सोळा नेमस्त ॥ ४७ ॥ एक ह्मणे या गर्विता पोरां ॥ कोण पुसे तत्त्वविचारा ॥ तत्त्वें नेमस्तचि 8तेरा ॥ निजनिर्धारा म्यां केलें ॥ ४८ ॥ एक ह्मणे सांडा चातुरी ॥ तत्त्वें नेमस्तचि चारी ॥ दुजा ह्मणे या कायशा कुसरी ॥ तत्त्वें निर्धारीं दोनची ॥ ४९ ॥ तिजा ह्मणे वाजट लोक ॥ कोणें धरावें यांचें मुख ॥ निजनिर्धारीं तत्त्व एक ॥ एकाचा अनेक विस्तार ॥ ५० ॥ एवं 1मतपरंपरा नानामतीं ॥ ऋषीश्वरीं वचितां युक्ती ॥ माझ्या तत्त्ववादाची निश्चिंती ॥ कोणे इत्थंभूतीं मानावी ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ गायंति पृथगायुष्मन्निदन्नो वक्तुमर्हसि ॥ ३ ॥

॥ टीका ॥ तूं निजात्मा परमेश्वर ॥ तुज जाणावया ऋषीश्वर ॥ वेंचूनि युक्तीचे संभार ॥ तत्त्वविचार बोलती॥५२॥स्वामीनें सांगीतलें तत्त्व एक॥ऋषीश्वर बोलती अनेक॥येचिविषयींचें निष्टंक ॥ मज आवश्यक सांगावें ॥ ५३ ॥ एवं या तत्त्वनिश्चयासी ॥ मज सांगावया योग्य होसी ॥ ऐसा विनविला हृषीकेशी ॥ तो उद्धवासी तुष्टला ॥ ५४ ॥ जींजीं ऋषीश्वर बोलती ॥ तींतीं तत्त्वें सत्य होती ॥ हें सर्वज्ञ ज्ञाते जाणती ॥ तेचि अर्थीं हरि बोले ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ युक्तंच संति सर्वत्र भाषंते ब्राह्मणा यथा ॥
मायां मदीयामुद्गृह्य वदतां किंनु दुर्घटम् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ ॥ ज्याचेनि मतें जैसें ज्ञान ॥ तो तैसें करी तत्त्वव्याख्यान ॥ या हेतू बोलती ब्राह्मण ॥ 2सत्य जाण उद्धवा ॥ ५६ ॥ जरी अवघीं मतें प्रमाण ॥ तरी कां करावें मतखंडण ॥ उद्धवा तूं ऐसें न ह्मण ॥ ते मी निजखूण सांगेन ॥ ५७ ॥ 7अवटघटी माझी माया ॥ जे हरिहरां नये आया ॥ जे नाथिलें वाढवूनियां ॥ लोकत्रया भुलवित ॥५८॥ ते माया धरोनि हातें ॥ ऋषीश्वर निजमतें॥जो जें बोलेल जेथें ॥तें तें तेथें घडे सत्य॥५९॥ केवळ दोराचा सर्पाकार ॥ हा श्वेत हा कृष्ण कीं 0रक्ताकार ॥ ज्यासि 9जैसा भ्रमाकार ॥ त्यासि साचार तो

---

१ अवकाश. २ सांप्रत, अलीकडे. ३ सहातत्वें. ४ बडबडे. ५ खर्चे करून. ६ न घडणाऱ्या गोष्टी घडविणारी. ७ वास्तविक नसणारें, मिथ्या.

*मो. तेथें संख्यासंवाद. +मो. त्याचे वादाचे शब्द. ०मो. नेमिलींच. ×मो. मिथ्या जल्पती देख. *मो. तेरा. ※मो. व्युत्पन्न भला. 8मो. बारा. 1मो. संतपरंपरा. 2मो. ऐसें जाण. 7ना. अघटघटित. 0ना. रक्तांबर. 9मो. भासे जैसा प्रकार.

तैसा ॥ ६० ॥ *तत्वीं आत्मतत्त्व एकचि जाण ॥ अविकारी निजनिर्गुण ॥ तेथ नानातत्त्वांचें व्याख्यान ॥ बोलती ब्राह्मण मायायोगें ॥ ६१ ॥ त्या मायेच्या मायिका व्युत्पत्ती ॥ ×नाना वाग्वाद स्वमतीं ॥ त्याच वादाची वादस्थिती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ६२ ॥ ऐसें बोलोनि श्रीकृष्णनाथ ॥ उद्धवाप्रति सांगे निरूपित ॥ तत्त्वविचारणा यथार्थ ॥ स्वयें सांगत आपण ॥ ६३ ॥ हें पांचवे श्लोकींचें निरूपण ॥ श्रीकृष्ण उद्धव विवरण ॥ सांगीतलें तत्त्वव्याख्यान ॥ उद्धवा जाण यथार्थ ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ ॥ नैतदेवं यथात्थ त्वं यदहं वच्मि तत्तथा ॥ एवं विवदतां हेतुं शक्तयो मे दुरत्ययाः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ ॥ माझे मायेचें प्रबळ बळ ॥ तेणें अभिमान अतिसबळ ॥ वाढवूनि युक्तीचें वाग्जाळ ॥ करिती +कोल्हाळ वाग्वादी ॥ ६५ ॥ प्रबळ शास्त्रश्रवणाभिमान ॥ तुझें वचन तें अप्रमाण ॥ मी बोलतों हेंचि प्रमाण ॥ पत्रावलंबनें केलें असे ॥ ६६ ॥ सत्वरजादिगुणोत्पत्ती ॥ माझे मायेच्या अनंतशक्ती ॥ तेणें क्षोभें विवादती ॥ ०स्वमतव्याप्ती अभिमानें ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ यासां व्यतिकरादासीद्विकल्पो वदतां पदम् ॥ प्राप्ते शमदमेऽप्येति वादस्तमनुशाम्यति ॥ ६ ॥

॥ टीका ॥ कां गुणक्षोभें अभिमान ॥ विकल्प उपजवी गहन ॥ विकल्पें युक्तीचें छळण ॥ करी आपण अतिवादें ॥ ६८ ॥ सांडितां ※गुणक्षोभविलास ॥ रजतमांचा होय ऱ्हास ॥ सत्ववृत्तीचा निजप्रकाश ॥ अति उल्हास शमदमाचा ॥ ६९ ॥ शमदमाचे निजवृत्ती ॥ संकल्प विकल्पेंसी जाती ॥ वाद अतिवाद उपरमती ॥ जेवीं *सूर्याप्रती आंधारें ॥ ७० ॥ सर्वज्ञ ज्ञाते जे गा होती ॥ ते नानातत्त्वांच्या तत्त्वोक्ती ॥ स्वयें विवंचूं जाणती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ परस्परानुप्रवेशात्तत्त्वानां पुरुषर्षभ ॥ पौर्वापर्यप्रसंख्यानं यथा वक्तुर्विवक्षितम् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ [8]गुरुपाशीं शास्त्रपाठा ॥ करूनि साधिली निजनिष्ठा ॥ ऐक उद्धवा पुरुषश्रेष्ठा ॥ प्रियवरिष्ठा प्रियोत्तमा ॥ ७२ ॥ तत्त्वगणनेचे जे लेख ॥ एकाचे थोडे एकाचे अधिक ॥ हा अनुप्रवेश वोळख ॥ एकामाजीं एक उपजती ॥ ७३ ॥ तत्त्वांपासूनि तत्त्वें होती ॥ करणरूपें कार्यांची स्थिती ॥ अंतीं जेथील तेथें प्रवेशती ॥ हे तत्त्वोपपत्ती उद्धवा ॥ ७४ ॥ पूर्वस्थित जें तें कारण ॥ त्यापासोनि उपजे तें कार्य जाण ॥ हें कार्यकारणांचें लक्षण ॥ [3]तत्त्वविचक्षण बोलती ॥ ७५ ॥ येथ वक्तयाचें जैसें मनोगत ॥ तैशी तत्त्वसंख्या होत ॥ [1]कार्य कारण एकत्व गणित ॥ तत्त्वसंख्या तेथ थोडीचि ॥ ७६ ॥ एक तें कार्य आणि कारण ॥ गणितां आणिती भिन्नभिन्न ॥ तेथ [5]तत्त्वसंख्या अधिक जाण ॥ होय [6]गणन उद्धवा ॥ ७७ ॥ [4]एवं कार्य

---

१ अंगासहित, पूर्णपणें. २ ग्रंथाचा आश्रय ३ निंदेनें. ४ एका पाठीमागून एक शिरणें.

*मो. तेंवीं आत्मत्वें येथेंचि जाण. ×मो. या नाना वाग्वादां संमति. +मो. विचार प्रबळ. ०मो. स्वमताचारी अभिमानें. ※मो. गुणदोषक्षोभ विलास. *मो. सूर्यापुढें जाती आंधारें. [8]ना. देवगुरूपाशीं पाठ. [3]मो. ते ज्ञाते जन जाणती. [1]मो. कार्य कारण एकत्व. [5]ना. तत्वसंख्या थोडीशी जाण. [6]मो. गहन. [4]मो. एक कार्याकारण भिन्न भिन्नें.

कारण भिन्नभिन्नें ॥ तत्त्वसंख्या थोडी बहुत होणें ॥ हीं तत्त्ववक्त्यांचीं लक्षणें ॥ तुज सुलक्षणें सांगीतलीं ॥ ७८ ॥ येचिविषयींची उपपत्ती ॥ स्वयें सांगताहे श्रीपती ॥ कार्यकारण निजयुक्ती ॥ उद्धवाप्रती निवाडें ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ एकस्मिन्नपि दृश्यंते प्रविष्टानीतराणि च ॥ पूर्वस्मिन्वापरस्मिन्वा तत्त्वे तत्त्वानि सर्वशः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ ॥ आकाशापासूनि वायु झाला ॥ तो गगना वेगळा नाहीं गेला ॥ वायूपासूनि अग्नि झाला ॥ तेथ प्रवेशु आला दोहींचा ॥८०॥ अग्नीपासूनि झाला *जळरसू ॥ त्यामाजीं तिहींचा निवासू ॥ जळापासूनि पृथ्वीचा प्रकाशू ॥ तीमाजीं प्रवेशू चहूंचा ॥ ८१ ॥ तैसें कार्य आणि कारण ॥ परस्परें अभिन्न जाण ॥ जेवीं लेणें आणि सुवर्ण ॥ वेगळेपणें एकत्वें ॥ ८२ ॥ जेवीं तंतू[1] आणि पट[2] ॥ दोनी दिसती एकवट ॥ तेवीं कार्यकारणसकट ॥ दिसे स्पष्ट अभिन्नत्वें ॥ ८३ ॥ साखरेचीं नारळें केळीं ॥ परी तीं साखरत्वा नाहीं मुकलीं ॥ तेवीं कारणांचीं कार्यें झालीं ॥ +असतां संचलीं कारणत्वें ॥ ८४ ॥ जेवीं कां पृथ्वीचा मृत्पिंड ॥ मृत्पिंडीं अनेक भांडें[3] ॥ होतां गाडगीं उदंड ॥ मृत्तिका अखंड सर्वांमाजीं ॥ ८५ ॥ 'तेवीं कारणीं कार्यविशेष ॥ कार्यासि कारणत्वें प्रकाश ॥ हा परस्परानुप्रवेश[4]' ॥ अनन्यविलास अखंडत्वें ॥८६॥ एवं कार्य आणि कारण ॥ होय भिन्न आणि अभिन्न ॥ तेणें ×तत्त्वसंख्यालक्षण ॥ घडे जाण न्यूनाधिक ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ पौर्वापर्यमतोऽमीषां प्रसंख्यानमभीप्सताम् ॥ यथा विविक्तं यद्वक्त्रं गृह्णीमो युक्तिसंभवात् ॥ ९ ॥

॥ टीका ॥ म्यां सांगीतली तैशी जाण ॥ तत्त्वसंख्या अधिक न्यून ॥ व्हावया हेंचि कारण ॥ वक्त्याची ज्ञानविवक्षा[5] ॥ ८८ ॥ जैसें ज्यासि असे ज्ञान ॥ ※जैसा ईप्सितमताभिमान[6] ॥ तैसतैसें तत्त्वव्याख्यान ॥ ऋषीश्वर जाण बोलती ॥ ८९ ॥ जो बोले ज्या मतयुक्ती ॥ तें तें घडे त्या ०मतसंमतीं ॥ हें मी जाणें सर्वज्ञ श्रीपती ॥ यालागीं त्या युक्ती मीही मानीं ॥ ९० ॥ जे बोलिजे *ऋषिजन ॥ सव्वीस तत्त्वें ४विवंचून ॥ उद्धवा तुज मी सांगेन ॥ सावधान अवधारी ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ अनाद्यविद्यायुक्तस्य पुरुषस्यात्मवेदनम् ॥ स्वतो न संभवादन्यस्तत्त्वज्ञो ज्ञानदो भवेत् ॥ १० ॥

॥ टीका ॥ प्रकृतिपुरुषमहत्तत्त्व येथें ॥ अहंकार आणि महाभूतें ॥ इंद्रियें विषयसमवेतें ॥ यें तत्त्वें निश्चितें पंचवीस ॥ ९२ ॥ येथ पुरुषाहोनिया भिन्न ॥ जीव वेगळा गणूनि जाण ॥ तत्त्वसंख्यालक्षण ॥ केलीं संपूर्ण सव्वीस ॥ ९३ ॥ जीवाच्या भिन्नत्वाचें कारण ॥ अनादी अविद्येस्तव जाण ॥ घेऊनि ठेला देहाभिमान ॥ कर्मबंधन दृढ झालें ॥ ९४ ॥ अहंकर्तेपणाचा-

[1] सूत. [2] वस्त्र. [3] भांडीं. [4] कार्यांत कारण आणि कारणांत कार्य. [5] ज्ञान सांगण्याची इच्छा [6] इच्छित.

*मो. रसु. +मो. नाहीं मुकलीं कारणत्वें. ×मो. तत्वसंख्या उपलक्षण. ※मो. जैसा कीं ईप्सित अभिमान. ०मो. मतसंगति. *मो. ऋषिगण. ४मो. विचक्षण.

खटाटोप ।। तेणें अंगीं आदळे पुण्यपाप ।। विसरला निजरूप ।। विषयलौल्य वाढवितां ।। ९५ ।। लागलें बद्धतेचें बंधन ।। नकरवे कर्मपाशच्छेदन ।। त्याच्या उद्धारालागीं जाण ।। ज्ञानदाता सर्वज्ञ ईश्वर ।। ९६ ।। गुरुद्वारा पाविजे ज्ञान ।। तेथें ईश्वराचा आभार कोण ? ।। तरी ईश्वरकृपेवीण ।। सद्गुरु जाण भेटेना ।। ९७ ।। झालिया सद्गुरुप्राप्ती ।। परि ईश्वरकृपेवीण न घडे भक्ती ।। सद्गुरु तोचि ईश्वरमूर्ती ।। वेदशास्त्रार्थीं संमत ।। ९८ ।। गुरुईश्वरां भिन्नपण ।। देखे तो नागवला आपण ।। एवं ईश्वरानुग्रहें जाण ।। ज्ञानसंपन्न होय जीवू ।। ९९ ।। गुरूनीं सांगीतली ज्ञानस्थिती ।। ते ईश्वरकृपेवीण *चित्तीं ।। ठसावेना साधकांप्रती ।। जाण निश्चितीं उद्धवा ।। १०० ।। जीव नियम्य[२] ईश्वर नियंता[३] ।। जीव अज्ञान ईश्वर ज्ञानदाता ।। जीव परिच्छिन्नें एकदेशिता[४] ।। ईश्वर सर्वथा +सर्वज्ञ ।। १ ।। जीव हीन दीन अज्ञान ।। ईश्वर समर्थ ×सर्वज्ञ ।। जीवास दृढ कर्मबंधन ।। ईश्वर तो जाण ०निष्कर्म[५] ।।२।। एवं ईश्वरकृपेंवीण ।। जीवासि प्राप्त न होय ज्ञान ।। यालागीं ईश्वराहून ।। जीव भिन्न या हेतू ।। ३ ।। ह्मणशी करितां कर्माचरण ।। जीवासि प्राप्त होईल ज्ञान ।। हें सर्वथा न घडे जाण ।। जडत्वपण कर्मासी ।।४।। कर्मा जडत्व जाण ।। त्यासि बहुत अज्ञान ।। त्या कर्मासि अत्यंत बद्धपण ।। हें सज्ञान[६] जाणती ।। ५ ।। कर्म स्वरूपें जड अचेतन ।। त्यासि चेतविता ईश्वर जाण ।। तें नकरितां ईश्वरार्पण ।। ज्ञानदाता कोण कर्मासी ।। ६ ।। कर्मासि जडत्वें नाहीं सत्ता ।। कर्मक्रियेचा ईश्वर ज्ञाता ।। ईश्वराचि कर्मफळदाता ।। कर्मचेतविता ईश्वरू ।। ७ ।। ज्ञान तोचि ईश्वर ।। तेणें रचिला हा विस्तार ।। संहारिता तोचि निर्धार ।। सत्ता मात्र ईश्वर जाणावा ।। ८ ।। जीवासि ज्ञानें सायुज्यता ।। कां स्वर्ग भोगफळदाता ।। अथवा इहलोकीं वर्तविता ।। जीवासि तत्त्वतां ईश्वरू ।। ९ ।। यापरी अवश्य जाण ।। जीव ईश्वर करितां भिन्न ।। तत्त्वें सर्वांस संपूर्ण ।। बोलिले ब्राह्मण या हेतू ।। ११० ।। पंचवीस तत्त्वांची कथा ।। जे जीवेश्वरांची ऐक्यता ।। तेही सांगेन मी आतां ।। त्याच्या मता संमत ।। १११ ।।

|| श्लोक || पुरुषेश्वरयोरत्र न वैलक्षण्यमण्वपि || तदन्यकल्पनाऽपार्था ज्ञानं च प्रकृतेर्गुणः || ११ ||

।। टीका ।। जीवेश्वरांची ऐक्यता ।। सहजाचि असे स्वभावता ।। तेथ अणुमात्र भेदवार्ता ।। न रिघे सर्वथा निश्चित ।। १२ ।। स्वभावें पाहतां दर्पणें[७] ।। एकाचें देखिजे दोनीपण ।। परी द्विधा नव्हेचि आपण ।। यापरी जाण जीवशिव ।। १३ ।। अज्ञानप्रतिबिंब तें जीव ।। त्याचा द्रष्टा तो सदाशिव ।। तरी ✲ऐक्यतेचें वैभव ।। तो निजस्वभाव मोडेना ।। १४ ।। जेवीं दर्पणामाजीं आपण ।। तेवीं जीवरूपें शिवूचि जाण ।। *दोनी चेतनत्वें समान ।। तेंही लक्षण अवधारीं ।।१५।। जैशी चेष्टा कीजे आपण ।। तेचि प्रतिबिंबीं दिसे जाण ।। 1तेवीं ईश्वरसत्ताचेतनें ।। गमनागमन जीवासी ।।१६।। जेणें स्वरूपें असे आपण ।। तद्रूप प्रतिबिंबीं 7दिसे जाण ।। 9तेवीं ईश्वरत्व

१ विषयाचा लोभ. २ नेमला जाणारा. ३ नियमन करणारा. ४एकदेशी. ५कर्मरहित. ६ज्ञाते. ७ आरसा.

*मो. निश्चितीं. +मो. सर्वगत. ×मो. सज्ञान. ०मो. निष्कर्मी. ✲मो. ऐक तेथींचें वैभव. *मो. दोन्ही चैतन्यें तत्समान. 1मो. तेवीं ईश्वरत्व संपूर्ण, असें अविच्छिन्न जीवामाजीं. 7मो. असे. 9मो. तेवीं ईश्वरत्वें संपूर्ण, असे अभिन्न जीवासी.

संपूर्ण॥असे अविच्छिन्न जीवामाजीं॥१७॥जैसा अग्नि राखां झांकोळिलो॥तरी अग्नी अग्निपणें असे संचला॥ *तेवीं शिवासि जीवभावो आला॥परी नाहीं मुकला ×निजत्वा॥१८॥आशंका॥ ॥ +होकां जीव शिव दोनी एक ॥तरी एक मळिन एक चोख ॥ तैसे सदोख आणि निर्दोख॥ हे विशेख कां दिसती ॥ १९ ॥ थिल्लरीं प्रतिबिंबला सविता ॥ त्या प्रतिबिंबाअंगीं सर्वथा ॥ थिल्लरींचे मळ पाहतां ॥ दिसती तत्त्वतां लागले ॥१२०॥ तेचि निर्वाळूनि पाहतां वेगीं ॥ बिंब-❀प्रतिबिंबनियोगीं॥सर्वथा मळ नलगे अंगीं ॥ ०उभयभागीं विशुद्ध॥२१॥आरशाअंगीं टिकले मळ ॥ सुबद्ध बैसले बहुकाळ ॥ ते प्रतिबिंबा केवळ ॥ दिसती प्रबळ जडलेसे ॥ २२ ॥ तो मळ जें पडे फेडावा ॥ तें आरिसा साहणे तोडावा ॥ तरी बिंब प्रतिबिंब केव्हां ॥ साहणे धरावा हें बोलूंनये ॥ २३ ॥ तेवीं सदोष आणि निर्दोष ॥ केवळ अविद्याचि देख ॥ जीव शिव उभयतां चोख ॥ नित्य निर्दोख निजरूपें ॥ २४ ॥ पाहतां शुद्धत्वें स्फटिक ³जैसा ॥ जे रंगीं ठेविला दिसे *तैसा ॥ स्वयें अलिप्त जैसा तैसा ॥ जीव ⁰स्वभावता तैसाची ॥ २५ ॥ जीव स्वयें चित्स्वरूप ॥ जे गुणीं मिळे दिसे तद्रूप ॥ परी गुणदोष पुण्यपाप ॥ जीवासि अल्प लागेना ॥ २६ ॥ प्रत्यक्ष ⁴प्रतिबिंबीं मिथ्यता ॥ दिसे निजबिंबाचिया सत्ता ॥ तेवीं ⁷जीवशिवांसि अभिन्नता ॥ जाण तत्त्वतां निश्चित ॥२७॥ जीवशिवांचें एकपण ॥ तेणें सव्विसांमाजीं जाण ॥ एक तत्त्व होतां न्यून ॥ शेष तेंचि पूर्ण पंचविस ॥ २८ ॥ आशंका ॥ जीवशिवांचें एकपण ॥ ऐसें जें जाणणें तें ज्ञान ॥ तें ⁹एक तत्त्व येथें आन ॥ त्यांमाजीं जाण उपजलें ॥ २९ ॥ तें ज्ञानतत्त्व अंगीकारिता ॥ ²पंचवीस सव्वीस तत्त्वकथा ॥ दोनी मतें होती वृथा ॥ ऐसें सर्वथा न ह्मणावें ॥ १३० ॥ ¹येथ मूळींचें निरूपण ॥ श्लोकाचे अंतींचा चरण ॥ ज्ञान तें ⁵प्रकृतीचा गुण ॥ त्यासि वेगळेपण असेना ॥ ३१ ॥ गुणकर्मांच्या खटपटा ॥ प्रपंच अज्ञानें अतिलाठा ॥ ज्ञान अज्ञानाचा सत्त्ववाटा ॥ जेवीं कांटा कांटें फेडिजे ॥३२॥ शोधित जो सत्वगुण ॥ त्या नांव बोलिजे शुद्ध ज्ञान ॥ तेंही गुणांमाजीं पडे जाण ॥ वेगळेपणें नव्हे तत्त्व ॥ ३३ ॥ ⁶ज्ञान स्वतंत्र तत्त्व होतें ॥ तरी नासती दोनी मतें ॥ ⁸तें पडे गुणा आंतौतें ॥ यालागीं दोनी मतें निर्दुष्ट ॥ ३४ ॥ तेचि त्रिगुणांची =व्यवस्था ॥ तुज मी सांगेन आतां ॥ ऐक उद्धवा तत्त्वतां ॥ गुण सर्वथा अविवेक ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ प्रकृतिर्गुणसाम्यं वै प्रकृतेर्नात्मनो गुणाः॥ सत्त्वं रजस्तमइति स्थित्युत्पत्त्यंतहेतवः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ उत्पत्तिस्थितिनिर्दळण ॥ हे त्रिगुणांचें कार्य पूर्ण ॥ ⁵गुणसाम्य ते प्रकृति जाण ॥ आत्मा निर्गुण गुणातीत ॥ ३६ ॥ ह्मणशी परमात्मा गुणातीत ॥ परी जीवात्मा गुणग्रस्त ॥

१ झांकला २ राहिला. ३ स्वरूपाला. ४ भेद. ५ मायेचा. ६ अतिदुष्ट. ७ मायेपासून झालेलें. ८ सारखेगुण होणें.

*मो. तेवीं जीवशिवभाव आला. ×मो. निजतत्त्वा. +मो. होती कां. ❀ना. संयोगीं. ०ना. उभयभोगीं. ³ना. केला. *ना. त्या ऐसा. ⁰ना. स्वभावें उसा तैसाची. ⁴मो. प्रतिबिंब. ⁷मो. जिवा शिवासी. ⁹ना. पृथक् तत्व. ²मो. पंचविसा तत्वांची कथा. ¹मो. पैशून्य मुळींचें. ⁵ना. प्रकृतीच्या गुणें. ⁶मो. अज्ञान. ⁸मो. न पडे. =मो. अवस्था. ⁵मो. गुणसाम्या तेचि प्रकृति.

हेंही गा मिथ्या मात ॥ ऐक दृत्तांत सांगेन ॥ ३७ ॥ चंद्र निश्चळ निजस्वभावें ॥ तो चालत्या अभ्रासवें ॥ दिसे जेवीं सवेग धांवे ॥ तेवीं गुणस्वभावें जीवात्मा ॥३८॥ घटामाजीं उदक भरितां ॥ घटाकाश भिजेना सर्वथा ॥तेवीं जीवात्मा गुणीं वर्त्ततां ॥ अलिप्तता गुणकर्मीं ॥३९॥ जीव ॰अहंकर्त्तेपणीं विख्यात ॥तो केवीं ह्मणावा कर्मातीत ॥ येचि अर्थीं कृष्णनाथ॥ विशदार्थ सांगत ॥ १४० ॥

॥ श्लोक ॥ सत्त्वं ज्ञानं रजः कर्म तमोऽज्ञानमिहोच्यते ॥ गुणव्यतिकरः कालः स्वभावः सूत्रमेव च ॥ १३ ॥

॥ टीका ॥ सत्वगुणास्तव ज्ञान ॥ रजोगुणें कर्म जाण ॥ मोह आलस्ययुक्त गहन ॥ तमीं अज्ञान नांदत ॥४१॥ सत्वादि जे तिन्ही गुण॥ केवळ प्रकृतीचे हे जाण ॥ यांसि स्वतंत्रपण ॥ नव्हेचि जाण ×याहेतू ॥ ४२ ॥ गुणक्षोभक काळ देख ॥ तो पुरुषाचा अवलोक ॥ पुरुष काळ +हा नामविशेख ॥ स्वरूपें एक हे दोन्ही ॥ ४३ ॥ स्वाभाविक मायेचें स्फुरण ॥ प्रथम कार्य जें निर्माण ॥ त्या नांव महतत्त्व जाण ॥ सूत्र, प्रधान, ज्यासि ह्मणती ॥ ४४ ॥ यालागीं प्रकृतीहूनि भिन्न ॥ यासि नये वेगळेपण ॥ हे प्रकृति कार्यकारणीं अभिन्न ॥ तत्त्वविचक्षण मानिती ॥ ४५ ॥ अठ्ठावीस तत्त्वें पूर्वोक्त ॥ हें भगवंताचें निज मत ॥ तेंचि अडीचा श्लोकीं सांगत ॥ ०संख्या तत्त्वार्थ निजबोधें ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ पुरुषः प्रकृतिर्व्यक्तमहंकारो नभोऽनिलः ॥ ज्योतिरापः क्षितिरिति तत्त्वान्युक्तानि मे नव ॥ १४ ॥

॥ टीका ॥ प्रकृति पुरुष महत्तत्त्व ॥ महाभूतें अहंभाव ॥ अठ्ठाविसांत हीं तत्त्वें नव ॥ इतर वैभव तें ऐक ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ श्रोत्रं त्वग्दर्शनं घ्राणो जिव्हेति ज्ञानशक्तयः॥ वाक्पाण्युपस्थपाय्वंघ्रिः कर्माण्यंगोभयं मनः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ मुख्य ज्ञानेंद्रियें पांच जाण ॥ पांच कर्मेंद्रियें आन ॥ कर्मेंद्रियें ज्ञानेंद्रियां आधीन॥ स्वतां गमन त्यां नाहीं ॥ ४८ ॥ आंधळें पायीं चालों जाणे ॥ पांगुळ केवळ देखणें ॥ अंधें पंगु खांदीं घेणें ॥ परी बोले वर्तणें देखण्याचेनी ॥ ४९ ॥ तेवीं ज्ञानेंद्रियां कर्मेंद्रियांसी ॥ संगती घडली असे तैशी ॥ यालागीं मुख्यत्व ज्ञानेंद्रियांसी ॥ हृषीकेशी बोलिला ॥ १५० ॥ उभय इंद्रियांचें चाळक ॥ तेणें मनचि गा एकलें एक ॥ येणेंसि अकरा इंद्रियें देख ॥ यदुनायक सांगत ॥ ५१ ॥ इंद्रियविषयनिरूपण ॥ स्वयें सांगताहे नारायण ॥ मुख्यत्वें विषय पांच जाण ॥ तयांचें साधन ॐगत्यादिक ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ शब्दः स्पर्शो रसो गंधो रूपं चेत्यर्थजातयः ॥ गत्युक्त्युत्सर्गशिल्पानि कर्मायतनसिद्धयः ॥ १६ ॥

---

१ ' महत् ' याचींच नांवें. २ तत्त्वज्ञ. ३ अहंकार.

॰मो. अहंकर्मपणें. ×ना. सर्वथा. +मो. ह्मणावा विशेख, परी स्वयें एक ते दोन्ही. ०ना. सांख्य तत्व निजबोधें. ॐना. त्यागादिकें.

॥ टीका ॥ रसस्पर्शादिलक्षण ॥ पांचही विषय हे जाण ॥ *गत्यादिक्रियाचरण ॥ तें जाण साधन या विषयांचें ॥ ५३ ॥ दृष्टि रूपातें प्रकाशी ॥ चरण धांवती तयापाशीं ॥ हस्त उद्यत घ्यावयाशी ॥ रस स्पर्श सिद्धीसी विषयांचे ॥ ५४ ॥ एवं उभय +इंद्रियीं जाण ॥ विषय पांचचि प्रमाण ॥ नव्हे अधिक तत्त्वतां गहन ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५५ ॥ नव एकादश तत्त्वलक्षण ॥ मागां दोंश्लोकीं केलें निरूपण ॥ येणें श्लोकें परम प्रमाण ॥ विषय जाण पांचचि ॥ ५६ ॥ केवळ ज्ञानेंद्रियीं भोगू नव्हे ॥ कर्मेंद्रियींही भोग न फावे ॥ उभयसंयोगें भोग फावे ॥ परी विषय आघवे पांचची ॥ ५७ ॥ इहीं पांच विषयीं आपण ॥ व्यापिलें चतुर्दश भुवन ॥ सुरासुर भुलविले जाण ॥ यांचें गोडपण मारक ॥ ५८ ॥ जेवीं कां मैंद गोडपणें ॥ संगती लागोनि जीव घेणें ॥ तेवीं विषयसंगाचें साजणें ॥ बांधोनि नेणें नरकासी ॥ ५९ ॥ नरकीं निरय भोगिती ॥ तेथही ×नसोडी विषयासक्ती ॥ यां विषयां ऐसा विश्वासघाती ॥ आन त्रिजगतीं असेना ॥ १६० ॥ ते हे पांच विषय प्रमाण ॥ पांचचि परी अतिदारुण ॥ ⁂ब्रह्मादिक नाडले जाण ॥ इतरांचा कोण पडिपाड ॥ ६१ ॥ विषयाचें जें गोडपण ॥ तें विखाहूनि दारुण जाण ॥ विष एकदा आणी रमण ॥ पुनःपुनः ०मारणें विषयांचें ॥ ६२ ॥ पुढती जन्म पुढती मरण ॥ हें विषयांस्तव घडे जाण ॥ संसाराचें सबळपण ॥ विषयाधीन उद्धवा ॥ ६३ ॥ जेथ विषयांचा विषयत्यागू ॥ तेथें उन्मळे भवस्वर्गू ॥ त्याचा आंदणा[1] मी श्रीरंगू ॥ ज्यासि विषयभोगू नावडे ॥ ६४ ॥ ते हे पंच विषय जाण ॥ तुज म्यां केलें निरूपण ॥ आतां त्रिगुणांचें लक्षण ॥ ऐक ३सावधान सांगेन ॥ ६५ ॥ उत्पत्ति स्थिती निर्दळण ॥ त्रिगुणांस्तव घडे जाण ॥ यालागीं स्वयें श्रीकृष्ण ॥ तिन्ही गुण अंगीकारी ॥ ६६ ॥ अंगीकारूनि तिन्ही गुण ॥ अठ्ठावीस तत्त्वें केलीं पूर्ण ॥ हें कृष्णसंमत लक्षण ॥ उद्धवा जाण निश्चित ॥ ६७ ॥ त्रिगुणगुणेंवीण प्रकृती ॥ सृष्टि[2]सर्जनीं नाहीं शक्ती ॥ गुणद्वारा उत्पत्ति स्थिती ॥ संहारी अंतीं स्वकार्यें ॥ ६८ ॥ तेचि अर्थांचें निरूपण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ कार्यकारण लक्षण ॥ ४यथार्थ जाण विभाग ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ सर्गादौ प्रकृतिर्ह्यस्य कार्यकारणरूपिणी ॥ सत्वादिभिर्गुणैर्धत्ते पुरुषोऽव्यक्त ईक्षते ॥ १७ ॥

॥ टीका ॥ प्रकृतिपासावें ५विकारमेळा ॥ त्रिगुणांचिया गुणलीळा ॥ सात कारणें कार्यें सोळा ॥ ऐक वेगळा विभाग ॥ १७० ॥ महदहंकार महाभूतें ॥ सातही कारणें हे निश्चितें ॥ अकरा इंद्रियें विषययुक्तें ॥ यें जाणावीं येथें कार्यें सोळा ॥ ७१ ॥ यापरी निजप्रकृती ॥ रजोगुणातें धरोनि हातीं ॥ कार्यकारणांचिया युक्ती ॥ करी उत्पत्ती सृष्टीची ॥ ७२ ॥ सर्जिलिये सृष्टीसि जाण ॥ सत्त्वगुणें करी पालन ॥ तमोगुणें निर्दळण ॥ प्रकृति आपण स्वयें करी ॥ ७३ ॥ पुरुषें नकरितां ईक्षण[6] ॥ उत्पत्ति स्थिति निर्दळण ॥ प्रकृतीचेनि नव्हे जाण ॥ तेंही उपलक्षण अवधारी ॥ ७४ ॥ हात पाय नलावितां जाण ॥ केवळ कूर्मीचें अवलोकन ॥ करी

---

१ नाहींसा होई. २ बंदा. ३ प्रकृतीला. ४ जग उत्पन्न करण्याविषयीं. ५ पासून. ६ अवलोकन.

* ना. इत्यादि क्रियाचरण. +मो. इंद्रियें. ×मो. न संडी. ⁂ना. ब्रह्मादिकां. ०ना. मरण. ३ना. साधारण. ४ना. ग्रंथार्थ. ५ना. विकारमळा.

पिलियांचें पालन ॥ तैसें ईक्षण पुरुषाचें ॥ ७५ ॥ कां सूर्याचिया निजकिरणीं ॥ जेवीं अग्नीतें स्रवे मणी ॥ तेणें स्वधर्मकर्में ब्राह्मणीं ॥ कीजे यज्ञाचरणीं महायागू ॥ ७६ ॥ ꠳तैसें हें जाण चिन्ह ॥ येणें होय कार्यकारण ॥ चाले स्वधर्म आचरण ॥ यापरी जाण उद्धवा ॥ ७७ ॥ ऐसें चालतां प्रकृतिपर ॥ ब्राह्मण करिती स्वाचार ॥ तेणें वृद्धि कर्माचार ॥ परापर उद्धवा ॥७८॥ तेवीं पुरुषाचें ईक्षण ॥ प्रकृति लाहोनि आपण ॥ उत्पत्ति स्थिति निर्दळण ॥ करावया पूर्ण सामर्थ्य पावे ॥ ७९ ॥ छायामंडपींचें विचित्र सैन्य ॥ दिसावया दीपचि कारण ॥ तेवीं प्रकृतिकार्यासि जाण ॥ केवळ ईक्षण पुरुषाचें ॥ १८० ॥ जगाचें आदिकारण ॥ प्रकृति होय गा आपण ॥ प्रकृति प्रकाशी पुरुष जाण ॥ तो महाकारण या हेतू ॥८१॥ *प्रकृति व्यक्त पुरुष अव्यक्त ॥ हे[1] विकारी तो विकाररहित ॥ हे गुणमयी गुणभरित ॥ तो गुणातीत निजांगें ॥ ८२ ॥ प्रकृति स्वभावें चंचळ ॥ पुरुष अव्ययत्वें अचंचळ ॥ प्रकृति बद्धत्वें[2] सबळ ॥ पुरुष केवळ बद्धातीत[3] ॥ ८३ ॥ प्रकृति स्वभावें सदा शून्य ॥ पुरुष केवळ चैतन्यघन ॥ प्रकृतीस होय अवसान[4] ॥ पुरुष तो जाण अनंत ॥ ८४ ॥ प्रकृति केवळ निरानंद ॥ यालागीं तेथ विषयछंद ॥ पुरुष पूर्ण परमानंद ॥ विषयकंदच्छेदक ॥ ८५ ॥ प्रकृतिपुरुषांचें वेगळेपण ॥ तुज म्यां सांगीतलें संपूर्ण ॥ हेंचि परमार्थाची निज खूण ॥ पुरुष तो भिन्न प्रकृतीसी ॥ ८६ ॥ हेंचि जाणावया विशद ॥ नानामतांचे मतवाद ॥ त्या मतांचा +मतप्रबोध ॥ तुज मी शुद्ध सांगेन ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ व्यक्तादयो विकुर्वाणा धातवः पुरुषेक्षया ॥ लब्धवीर्याः सृजंत्यंडं संहताः प्रकृतेर्बलात् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ पुरुषेक्षण[5] झालिया प्राप्त ॥ महदहंकारादि पदार्थ ॥ प्रकृतिबळें समस्त ॥ एकत्र होत ब्रह्मांड ॥ ८८ ॥ पुरुषावलोकें वीर्यप्राप्ती ॥ लाहोनि ब्रह्मांडातें धरिती ॥ यालागीं यातें धातु म्हणती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८९ ॥ हें सामान्यतां निरूपण ॥ तुज म्यां सांगीतलें आपण ॥ जे नानामतवादी जाण ॥ विशेष लक्षण बोलती ॥ १९० ॥

॥ श्लोक ॥ सप्तैव धातव इति तत्रार्थाः पंच खादयः ॥ ज्ञानमात्मोभयाधारस्ततो देहेंद्रियासवः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ ×पंचवीस सव्वीस तत्त्वगणन ॥ मागां सांगीतलें निरूपण ॥ आतां सात तत्त्वांचें लक्षण ॥ ऐक ०सुलक्षण सांगेन ॥ ९१ ॥ महाभूतें जीव शिव ॥ हा सातां तत्त्वांचा भाव ॥ प्राणेंद्रियसमुदाव ॥ त्या पासोनि पहाहो 6उपजत ॥ ९२ ॥ महाभूतें अचेतन ॥ त्यांसि 7चेतविता जीव 2जाण ॥ त्याचा द्रष्टा परिपूर्ण ॥ ईश्वर जाण सातवा ॥ ९३ ॥ माया महत्तत्त्व अहं जें येथ ॥ हें सूक्ष्मकारणें निश्चित ॥ यांपासोनि स्थूळभूतें होत ॥ 8कारणें कार्यातें सबाह्य ॥ ९४ ॥ *मनइंद्रियादि जेकां येथें ॥ तेही यांत अंतर्भूतें ॥ एवं जाण येणें मतें ॥ पांच

---

१ प्रकृति. २ बंधत्वें. ३ बंधातीत. ४ शेवट. ५ पुरुषाची दृष्टि.

*ना. प्रकृतिपुरुष अव्यक्त. +मो. मतबोध. ×मो. पंचवीस तत्वगणन. ०मो. संपूर्ण. 6मो. उपजलीं. 7ना. चेवविता. 2ना. आपण. 8मो. कार्यकारण संबंधें. *मो. मन इंद्रियादिकें येथें.

꠳ ७७ ७८ ह्या ओंव्या पंढरपूर व पैठण ह्या ठिकाणच्या हस्तलिखित पोथ्यांत नाहींत.

महाभूतें नेमिलीं ॥ ९५ ॥ यांसि चेतविता जीव ॥ सर्वनियंता सदाशिव ॥ एवं *सप्ततत्त्वसमुदाव ॥ तो हा उगव उद्धवा ॥ ९६ ॥ आतां सहा तत्त्वें ये पक्षीं जाण ॥ तुज मी सांगेन निरूपण ॥ जें बोलिले ऋषिजन ॥ तें विवंचन अवधारी ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ षडित्यत्रापि भूतानि पंच षष्ठः परः पुमान् ॥ तैर्युक्त आत्मसंभूतैः सृष्ट्वेदं समुपाविशत् ॥ २० ॥

॥ टीका ॥ पाहे पां पंच महाभूतें ॥ पुरुषें सर्जिलिया येथें ॥ स्वयें प्रवेशला तेथें ॥ यालागीं त्यातें षट् ह्मणती ॥ ९८ ॥ ज्यांचेनि मतें तत्त्वें चारी ॥ तयांची ऐक नवलपरी ॥ जें देखे प्रत्यक्षाकारीं ॥ तोचि धरी तत्त्वार्थ ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ चत्वार्येवेति तत्रापि तेज आपोऽन्नमात्मनः ॥ जातानि तैरिदं जातं जन्मावयविनः खलु ॥ २१ ॥

॥ टीका ॥ प्रत्यक्ष +देखिजेति नयनीं ॥ अग्नि आप आणि अवनी ॥ तींचि मत्यत्वें ×मानी॥ मतज्ञानी ✻मतवादी ॥२००॥ या स्थूळांतें चेतविता ॥ तो आत्मा घेतला चौथा ॥ यां तिहीं-वीण साकारता ॥ न घडे सर्वथा सृष्टीसी ॥ १ ॥ नाम रूप क्रिया कारण ॥ सृष्टीसी मुख्यत्वें यांचेनि जाण ॥ यालागीं भूतें तीनचि प्रमाण ॥ बोलतें लक्षण तें ऐसें ॥ २ ॥ एवं भूतें तीन आत्मा चौथा ॥ हे चौं तत्त्वांची व्यवस्था ॥ आतां सतरा तत्त्वांची कथा ॥ ऐक तत्त्वतां सांगेन ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ संख्याने सप्तदशके भूतमात्रेंद्रियाणि च ॥ पंचपंचैकमनसा आत्मा सप्तदशः स्मृतः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ पंच विषय पंच भूतें ॥ पांच इंद्रियें घेतलीं येथें ॥ मन आत्मा मेळवूनि तेथें ॥ केलीं निश्चितें सतरा हीं ॥ ४ ॥ याचिपरी तूं गा जाण ॥ सोळा तत्त्वांचें निरूपण ॥ तेथेंचि त्रयोदशलक्षण ॥ स्वयें नारायण सांगत ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ तद्वत् षोडशसंख्याने आत्मैव मन उच्यते ॥ भूतेंद्रियाणि पंचैव मन आत्मा त्रयोदश ॥ २३ ॥

॥ टीका ॥ सतरातत्त्वाचें निरूपण ॥ तुज सांगितलें संपूर्ण ॥ त्यांत मन आत्मा एक जाण ॥ तेंही लक्षण अवधारी ॥ ६ ॥ जेवीं कां कथा सांगतां आपण ॥ स्वभावें हात हाले जाण ॥ तेवीं मनाचें चंचळपण ॥ आत्मस्वभावें जाण होतसे ॥ ७ ॥ राजा सिंहासनीं बैसला ॥ तो राजत्वें पूज्य झाला ॥ वसंत खेळतां धाविन्नला ॥ तरी काय मुकला राज्यपदा ॥८॥ जें काळें ०क्षोभला अतिथोर ॥ तरी तो बोलिजे सागर ॥ कां निश्चळ राहिलिया नीरें ॥ तरी समुद्र समुद्रत्वें ॥ ९ ॥ तेवीं मनपणें अतिचंचळ ॥ कां आत्मत्वें निज निश्चळ ॥ दोहींपरी आवके

१ चार. २ तेरातत्त्वांचें लक्षण. ३ क्रीडा. ४ ज्यावेळीं. ५ पाणी. ६ पूर्ण, निर्लेप.

*ना. मो. समूह. +मो. दिसती. ×मो. मानुनी. ✻मो. मतवादें. ०मो. जे काळीं क्षोभला अतिथोर, तरी तोचि बोलिजे साचार.

ळ ॥ जाण केवळ परमात्मा ॥२१०॥ यालागीं मनाचें जें मनपण ॥ आत्मसाक्षात्कारेंवीण ॥ कोणासि नकळेचि गा जाण ॥ हें मुख्य लक्षण मनाचें ॥११॥ मनआत्म्याचें उभय ऐक्य ॥ तेंचि सतरांमाजीं उणें एक ॥ उरलीं तीं आवश्यक ॥ सोळाही देख निजतत्त्वें ॥ १२ ॥ पांच इंद्रियें पंचमहाभूतें ॥ अकरावें मन ठेवूनि तेथें ॥ जीव शिव दोनी *घेऊनि येथें ॥ केलीं निश्चितें तेरा तत्त्वें ॥ १२ ॥ आणिकही नानातत्त्वमतें ॥ मागां पुशिलीं तुवां मातें ॥ तींही सांगेन गी तूतें ॥ सुनिश्चितें उद्धवा ॥ १३ ॥

॥ श्लोक ॥ एकादशत्वमात्माऽसौ महाभूतेंद्रियाणि च ॥ अष्टौ प्रकृतयश्चैव पुरुषश्च नवेत्यथ ॥ २४ ॥

॥ टीका ॥ अकरा तत्त्वें बोलिलीं येथें ॥ पांच इंद्रियें पंच महाभूतें ॥ जीव शिव आणि मनातें ॥ एकत्व येथें गणिलें देख ॥१४॥ [1]वृत्ति, मृदु, आणि पिंवळा ॥ एकत्वें जेवीं चांपेकळा ॥ सुवास सुस्वाद, सुनीळा, ॥ एकत्र मेळा आम्रफळीं ॥ १५ ॥ तेवीं जीव शिव आणि मन ॥ तिन्ही एकरूपचि जाण ॥ जेवीं हेममणी आणि सुवर्ण ॥ हेमसूत्रीं सज्ञान वोंविती ॥ १६ ॥ पंच इंद्रियें पंच महाभूतें ॥ जीव शिव मन एकात्मतें ॥ एकादश तत्त्वें येथें ॥ जाण निश्चितें याहेतू ॥ १७ ॥ प्रकृति पुरुष महदहंकार ॥ पंच महाभूतें +अविकार ॥ सकळ विकारसंभार ॥ यामाजीं साचार अंतर्भूत ॥ १८ ॥ एवं ऋषीश्वरांच्या व्युत्पत्ती ॥ [2]तत्त्वविवक्षा उपपत्ती ॥ नव तत्त्वसंख्यायुक्ती ॥ जाण यारीतीं उद्धवा ॥ १९ ॥ एक बोलती निजज्ञानी ॥ प्रकृति पुरुष तत्त्वें दोनी ॥ आन पाहतां जनीं वनीं ॥ तिसरें नयनीं दिसेना ॥ २२० ॥ जे [3]निश्चयें अतिनिष्टंक ॥ ते म्हणती तत्त्व एक ॥ एक तेंचि अनेक ॥ अनेकीं एक निश्चित ॥ २१ ॥ जेवीं सुवर्णाचें भूषण ॥ भूषणीं स्वयें सुवर्ण ॥ तेवीं अनेकीं एकपण ॥ एकत्वें जाण निश्चित ॥ २२ ॥ जेवीं उसाची निजगोडी ॥ गूळसाखरेच्या मोडी ॥ तेचि दिसे चढोवढी ॥ तेवीं [4]तत्त्वपरवडी निजतत्त्वें ॥ २३ ॥ त्या जाणावया निजतत्त्वांतें ॥ ऋषीश्वरांचीं बहुत मतें ॥ मी स्वल्पेंचि बोलिलों येथें ॥ येरवीं अगणितें ग्रंथांतरीं ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ इति नाना प्रसंख्यानं तत्त्वानामृषिभिः कृतम् ॥ सर्वं न्याय्यं युक्तिमत्त्वाद्विदुषां किमशोभनम् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ येथ सर्वज्ञ ज्ञाते जे होती ॥ ते नानामततत्त्वयुक्ती ॥[5]विवंचोनियां उपपत्ती ॥ विभागूं जाणती यथार्थ ॥ २५ ॥ निजतत्त्व जाणावया जाण ॥ करितां तत्त्वविवेचन ॥ सर्वथा नलगे दूषण ॥ तत्त्वें अधिकन्यून बोलतां ॥ २६ ॥ वस्तुतां ईश्वराच्या ठायीं ॥ ज्ञात्यासि बोलावया विशेष नाहीं ॥ विकार ते प्रकृतीच्या ठायीं ॥ आत्मा शुद्ध पाहीं अविकारी ॥२७॥ प्रकृतीहूनि आत्मा भिन्न ॥ यालागीं तो अविकारी जाण ॥ विकार प्रकृतीमाजीं जाण ॥ हें मुख्य लक्षण तत्त्वांचें ॥ २८ ॥ प्रकृतीहूनि वेगळेपण ॥ ×पुरुषाचें जाणावया आपण ॥ यालागीं उद्धवा जाण ॥ तत्त्वविवेचन साधावें ॥ २९ ॥ हें ऐकोनि कृष्णवचन ॥ उद्धव चमत्कारला जाण ॥ प्रकृतिपुरुषांचें भिन्नपण ॥ देवासि आपण पुसों पां ॥ २३० ॥

---

१ सुवास, मध आणि पिंवळेपणा मिळून एक चांपेकळीच. २ तत्त्वें प्रतिपादन करण्याची इच्छा ३ अतिनिश्चयी. ४ तत्त्वांचे प्रकार. ५ विचार करून.

*मो. घेऊनी ऐक्यातें. +मो. विकार. ×ना. पुरुषातें.

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ प्रकृतिः पुरुषश्चोभौ यद्यप्यात्मविलक्षणौ ॥ अन्योऽन्यापाश्रयात्कृष्ण दृश्यते न भिदा तयोः ॥ प्रकृतौ लक्ष्यते ह्यात्मा प्रकृतिश्च तथात्मनि ॥ २६ ॥

॥ टीका ॥ प्रकृति पुरुष भिन्नभिन्न ॥ येचि अर्थी उद्धवें जाण ॥ साडेतीन श्लोकीं अगाध प्रश्न ॥ देवासि आपण पुसत ॥ ३१ ॥ प्रकृतीहूनि पुरुष भिन्न ॥ हें ऐकोनि देवाचें वचन ॥ प्रकृतिपुरुषांवेगळा श्रीकृष्ण ॥ हा द्रष्टा संपूर्ण दोहींचा ॥ ३२ ॥ ह्मणे ऐक श्रीकृष्णा श्रेष्ठा ॥ हे प्रकृतिपुरुषांची चेष्टा ॥ तूं वेगळेपणें देखणा द्रष्टा ॥ सुरवरिष्ठा श्रीपती ॥ ३३ ॥ प्रकृति पुरुष दोनी भिन्न ॥ एक जड एक चेतन ॥ हें मजही कळतसे जाण ॥ परी वेगळेपण लक्षेना ॥ ३४ ॥ जैसा तप्तलोहाचा गोळ ॥ दिसे अग्नीचि केवळ ॥ तेवीं प्रकृतिपुरुषांचा मेळ ॥ दिसे [1]सबळ एकत्वें ॥ ३५ ॥ जेवीं बीज धरोनियां पोटेंसी ॥ *निकण कोंडा वाढे कणेंसी ॥ तेवीं प्रकृति जाण पुरुषेंसी ॥ अभिन्नतेंसी जडलीसे ॥ ३६ ॥ कां नारळ ×चोख धरोनि पोटीं ॥ निरस कठिण वाढे नरोटी ॥ तेवीं पुरुषयोगें प्रकृति [2]दाटी ॥ झाली सृष्टी अनिवार ॥ ३७ ॥ कणावेगळा कोंडा न वाढे ॥ तेवीं पुरुषावेगळी प्रकृति नातुडे ॥ हें प्रकृतिपुरुषांचें [3]विरडें ॥ तुजवेगळें निवाडें निवडेना ॥ ३८ ॥ जेवीं कां शिंपीचे अंगीं ॥ जडली रुपेपणाची +झगी ॥ तेवीं पुरुषाच्या संयोगीं ॥ प्रकृति जगीं भासत ॥ ३९ ॥ तीक्ष्ण रविकरसंबंधीं ॥ भासे मृगजळाची महानदी ॥ तेवीं पुरुषाच्यासंबंधीं ॥ प्रकृति त्रिशुद्धी आभासे ॥ १४० ॥ जेवीं कां नभीं [4]नीळिमा ॥ वेगळी न दिसे सांडूनि [5]व्योमा ॥ तेवीं प्रकृति पुरुषोत्तमा ॥ वेगळी आह्मां दिसेना ॥ ४१ ॥ मुख्य देहाचें जें देहपण ॥ तेंचि प्रकृतीचें बाधकत्व जाण ॥ ❊त्या देहाहोनियां भिन्न ॥ पुरुषाचें भान दिसेना ॥ ४२ ॥ अहंप्रत्यय आत्मा ह्मणती ॥ हेही देहाकार स्फुरे स्फूर्ती ॥ [2]देहावेगळी आत्मप्रतीती ॥ न दिसे निश्चितीं गोविंदा ॥ ४३ ॥ डोळा सांडूनि दृष्टि उरे ॥ वातीवेगळा दीप थारे ॥ तैं देहावेगळा आत्मा स्फुरे ॥ साचोकारें गोविंदा ॥ ४४ ॥ जिव्हेंवीण रसस्वादु ॥ श्रोत्रेंवीण [6]ऐकवे शब्दु ॥ [4]तैं देहावेगळा आत्मबोधु ॥ [0]होय विशद गोविंदा ॥ ४५ ॥ कांटेंवीण फणस आतुडे ॥ कां [5]सोपटेंवीण ऊंस वाढे ॥ तैं देहावेगळा आत्मा जोडे ॥ वाडेंकोडें गोविंदा ॥ ४६ ॥ तुह्मींच सांगीतली निजात्मखूण ॥ नरदेह ब्रह्मप्राप्तीचें कारण ॥ शेखीं देहावेगळें आत्मदर्शन ॥ केवीं आपण प्रतिपादा ॥ ४७ ॥ आणि आत्म्यावेगळी प्रकृति ॥ सर्वप्रकारें नये व्यक्ती ॥ रूपावेगळी छाया केउती ॥ कैशा रीतीं आभासे ॥ ४८ ॥ गोडीवेगळी साखर होये ॥ परिमळावेगळा कापूर राहे ॥ तैं आत्म्यावेगळी पाहे ॥ प्रकृति लाहे अभिव्यक्ती ॥ ४९ ॥ गगना वेगळा घट राहे ॥ तंतू वेगळा पट होय ॥ तैं आत्म्यावेगळी पाहे ॥ प्रकृति लाहे अभिव्यक्ती ॥ १५० ॥ गोडीवेगळा वाढे ऊंस ॥ कणेंवीण जैं वाढे भूस ॥ तैं आत्म्यावेगळी रूपस ॥ माया सावकाश [3]व्यक्तीसि ये ॥ ५१ ॥ प्रकृतिलक्षणीं

१ लठ्ठ, सबळ. २ घोटाळा, कोयाडें. ३ तुजवांचून. ४ चकाकी, तेज. ५ आकाशाला. ६ पृथक्त्वास.
*मो. निरस कोंडा. ×मो. चोखट. +ना. झगमगी. ❊ना. या दोही होऊनियां भिन्न.
[2]ना. देह गेलिया आत्मप्रतीती. [6]मो. न ऐकवे. [4]मो. तैसा. [0]मो. न होय. [7]मो. पाचुरलेवीण. [3]मो. व्यक्त होय.

आत्मा लक्षिजे ॥ आत्मेनि प्रकृती प्रकाशिजे ॥ अनादि दोनी इयें योग जें ॥ वेगळा लाहिजे बोध केवीं ॥ ५२ ॥ प्रकृतीहूनि आत्मा भिन्न ॥ सर्वथा आह्मां न दिसे जाण ॥ येचि अर्थीची विनवण ॥ उद्धव आपण करितसे ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ एवं मे पुंडरीकाक्ष महांतं संशयं हृदि ॥ छेत्तुमर्हसि सर्वज्ञ वचोभिर्नयनैपुणैः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ कमलनाभा कमलनयना ॥ कमलालया कमलधारणा ॥ कमलाकमलीं निवासस्थाना ॥ कमलानयना श्रीकृष्णा ॥ ५४ ॥ प्रकृतिपुरुषयोग अवघड ॥ योग्यां नकळे भिन्न निवाड ॥ या संशयाचें अतिजाड॥हृदयीं झाड वाढलें॥५५॥ हृदयीं संदेहाचीं मुळें ॥प्रकृतिभूमीं विकल्पजळें ॥ संशयवृक्ष तेणें बळें ॥ वाढला *अहंफळें सदा फळित ॥ ५६ ॥ ज्या वृक्षाचीं सदा फळें खातां ॥ जीव न राहे सर्वथा ॥तेणें संशयाची अधिकता॥ उसंतु चित्ता पैं नाहीं ॥५७॥ ऐशिया वृक्षाचें छेदन ॥ कृपेनें करावें आपण ॥ सोडूनि +ज्ञान तीक्ष्णवाग्बाण ॥ करी निर्दळण निजांगें ॥५८॥ योग यागशास्त्रपाठें ॥ करितां धर्मकर्मकचाटें ॥ ०या वृक्षाचें मूळ न तुटे ॥ हें कठिन मोठें गोविंदा ॥ ५९ ॥ या वृक्षाचें करितां छेदन ॥ ब्रह्मा झाला संदेहापन्न ॥ तुवांचि हंसगीत सांगोन॥उद्धरिला जाण सुपुत्र ॥२६०॥ मुख्य ब्रह्मयाची ऐशी अवस्था ॥ तेथ इतरांची कोण कथा ॥ या वृक्षाचा निज छेदिता ॥ तुजवीण सर्वथा आन नाहीं ॥ ६१ ॥ छेद करितां वरिवरी ॥ वासना मुळया उरल्या ×उरी ॥ फापावल्या चौगुण्यापरी ॥ अतिशयें भारी बोंबळे ॥ ६२ ॥ वासना समूळ मूळेंसी कंद ॥ छेदितां छेदक तूं गोविंद ॥ तुजवेगळा संशयछेद ॥ भलता प्रबुद्ध करूं न शके ॥ ६३ ॥ ह्मणशी संशय हृदयाच्याठायीं ॥ तेथ शास्त्रांचा रिगम नाहीं ॥ त्यां छेदावा कैसा कायी ॥ ते अर्थीचें मी पाहीं सांगेन ॥ ६४ ॥ तुझें ज्ञानचक्र अलौकिक ॥ ❋तुझेनि शब्दें अतितिख ॥ समूळ संशयाचें छेदक ॥ तुझें वचन एक गोविंदा ॥ ६५ ॥ असे तुझें *ज्ञानवचन ॥ तुवां केलिया कृपावलोकन ॥ समूळ संशयाचें निर्दळण ॥ सहजेंचि जाण होताहे ॥६६॥ तरी तुवां श्रीमुकुंदा ॥ फेडावी माझी संशयबाधा॥ तया उद्धवाचिया शब्दा ॥ गोपीराजा सांगेन ह्मणे ॥ ६७ ॥ असतां बहुसाल सज्ञान ॥ सकळ संशयांचें निर्दळण ॥ मीचि कर्ता हें कार्य कारण ॥ तेंही लक्षण अवधारीं ॥ ६८ ॥

॥ श्लोक ॥ त्वत्तो ज्ञानं हि जीवानां प्रमोषस्तेऽत्र शक्तितः॥ त्वमेव ह्यात्ममायाया गतिं वेत्थ न चापरः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ अतर्क्य तुझी मायाशक्ती ॥ त्यां आवरूनि आनंदस्फूर्ती ॥ दृढ लावूनि विषयासक्ती ॥ तेणें जीव होती अज्ञान ॥ ६९ ॥ करितां विषयांचें ध्यान॥ जीव होय मनाअधीन ॥ त्यास मन करी हीनदीन ॥ अतिकृपण जडमूढ ॥ २७० ॥ ऐसे केवळ जीव जे अज्ञान ॥ ते तुझ्या कृपाकटाक्षें जाण ॥ झाले गा ज्ञानसंपन्न ॥ हे कृपा पूर्ण पैं तुझी ॥ ७१ ॥ तुझी कृपा

१ संशयाची. २ विसांवा, दम. ३ फोंफावल्या. ४ विस्तारे. ५ प्रवेश. ६ फार तीक्ष्ण. ७ तिनें.
*मो. अहंबळें सदा फळ. +मो. ज्ञानतीक्ष्णबाण. ०शीणता भजन परिपाठें, याचें मूळ न तुटे सर्वथा. ×मो. अंतरीं. ❋ना. तुझेनि शब्दतेजें अतितिख. *ना. ज्ञानकथन.

ालिया परिपूर्ण ॥ करूनि मायेचें निर्दळण ॥ जीव होती ब्रह्मपूर्ण ॥ तुझेनि जाण श्रीकृष्णा ॥ ७२ ॥ ह्मणशी माझे गांठीं जाण ॥ नाहीं ज्ञान ना अज्ञान ॥ तरी तूं ज्ञानदाता आपण ॥ ालासि पूर्ण तें ऐक ॥ ७३ ॥ धाता सविता सनत्कुमारांसी ॥ नारदप्रल्हादअंबरीषांसी ॥ ालीं उपदेशिलें अर्जुनासी ॥ ऐसा तूं होशी ज्ञानदाता ॥७४॥ ह्मणशी बहुत आहेति सज्ञान ॥ यांसि पुसोनि साधावें ज्ञान ॥ *तुजवेगळें मायेचें नियमन॥त्यांचेनि जाण कदा नोहे ॥२७५॥ ायेची उत्पत्ति स्थिती ॥ माया निर्दळिती गती ॥ तूंचि एक जाणता त्रिजगतीं ॥ यालागीं ीपती कृपा करी ॥७६॥ यापरी उद्धवें विनंती ॥ करूनि प्रार्थिला श्रीपती ॥ तो ×प्रकृति-ुरुषविभागयुक्तीं ॥ उद्धवाप्रती सांगेल ॥ ७७ ॥ जेवीं सूर्यापाशीं मृगजळ ॥ कां गगनीं उपजे ीळ ॥ कां [१]भूमिके दिसे जळ ॥ तैशी प्रकृति सबळ पुरुषापाशीं ॥ ७८ ॥ यापरी स्वयें ीकृष्ण ॥ प्रकृतिपुरुष निरूपण॥समूळ सांगताहे आपण ॥ तो ह्मणे सावधान उद्धवा ॥७९॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ प्रकृतिः पुरुषश्चेति विकल्पः पुरुषर्षभ ॥ एष वैकारिकः सर्गो गुणव्यतिकरात्मकः ॥ २९ ॥

। टीका ॥ प्रकृति पुरुष यें दोनी ॥ सदा अत्यंत वेगळेपणीं ॥ जैसा दिवस आणि [२]रजनी॥एक ोपोनी एक प्रबळे ॥ २८० ॥ दिवस लोपतांचि जाण ॥ अंधकारेंसि परिपूर्ण ॥ घेऊनि ताराग्रहगण ॥ रात्री आपण उल्हासे ॥ ८१ ॥ तेवीं लोपतां पुरुषाचें भान ॥ घेऊनि कार्येंसि ारणें गुण ॥ ज्ञानाज्ञानेंसि परिपूर्ण ॥ प्रकृति +जाण थोरावे ॥ ८२ ॥ येथ मुख्यत्वें जो ाकार ॥ तेंचि प्रकृतीचें दुर्ग थोर ॥ तेथें ठेविला [४]ठाणेंधर ॥ देहअहंकार महायोद्धा ॥ ८३ ॥ ोचि जिवलग विश्वासाचा ॥ प्रकृतीस विश्वास त्याचा ॥ तो [५]नेटका झुंजार दुर्गाचा ॥ ॐभरभारू तेथींचा तो वाहे ॥ ८४ ॥ तेथ अभिमान आपण ॥ प्रकृतीस निर्भय देऊनि ाण ॥ घालूनि सामग्रीविकारभरण ॥ दुर्ग दारुण बळकाविलें॥८५॥ ऐक उद्धवा पुरुषश्रेष्ठा ॥ ेजप्रकृतीचिया निष्ठा ॥ देहदुर्गाचा अभिमान लाठा ॥ जाहला वरिष्ठा याहेतू ॥ ८६ ॥ ेहदुर्ग गुण अहंकार ॥ दुर्गसामग्री विकार ॥ अवघी प्रकृतीच साचार ॥ ते तदाकार भासत ८७॥ गगनीं गंधर्वनगर जाण ॥ माड्या गोपुरें वन उपवन ॥ दिसे तैशी ०प्रकृति आपण ॥ ानाकारें जाण भासत ॥ ८८ ॥ जैशी मृगजळाची सरिता ॥ दुरोनि दिसे प्रवाहता ॥ ेवीं प्रकृतीची सर्वथा ॥ नानाकारता आभासे ॥ ८९ ॥ ऐसें प्रकृतिदुर्ग महाथोर ॥ तेथें ाना सामग्रीविकार ॥ जे जे घाली अहंकार ॥ ते ऐक साचार सांगेन ॥ २९० ॥

॥ श्लोक ॥ ममांग माया गुणमय्यनेकधा विकल्पबुद्धीश्च गुणैर्विधत्ते ॥ वैकारिकस्त्रिविधोऽध्यात्ममेकमथाधिदेवमधिभूतमन्यत् ॥ ३० ॥

। टीका ॥ माझी माया गा आपण ॥ सर्वांगें जाहली तिनी गुण ॥ तेही अभिमानें आपण ॥ ेजसत्ता जाण 8आवरिले ॥ ९१ ॥ तेंचि देहदुर्गाभंवतें जाण ॥ त्रिगुणाचें आगेड पूर्ण ॥

---

१ ढग. २ रात्रि. ३ गुणकार्यांसह कारण जी प्रकृति ४ ठाणेदार. ५ खंदक.

*मो. तरी तुजवांचोनि मायेचें निर्दळण. ×मो. प्रकृतिपुरुष विभागस्थिती. +ना. आपण ोरावे. ॐमो. भार दुर्गींचा तो वाहे. ०मो. कृत्रिम आपण. 8ना. आवरिली.

तेथें मांडूनि त्रिपुटीविंदाण ॥ मारा दारुण अभिमान करी ॥ ९२ ॥ त्या दुर्गाचें दृढ रक्षण ॥ मुख्यत्वें त्रिपुटीचि जाण ॥ ते त्रिपुटीचें मुख्य लक्षण ॥ तुज मी आपण सांगेन ॥ ९३ ॥ ✻अगा उद्धवा बुद्धिमंता ॥ तुज मी सांगेन ऐक आतां ॥ तेथ असती तिनी वाटा ॥ दोनी अव्हाटा, एकी नीट ॥ ९४ ॥ त्या मार्गांची उभारणी ॥ सैन्य रचिलें दोही आरणी ॥ युद्धाकार जो निर्वाणी ॥ तो तेथूनी निरीक्षी ॥ ९५ ॥ तेही मार्ग धरिले चौपाशीं ॥ राखण बैसले तिनी वाटेशीं ॥ तेथ रिघावया सायासीं ॥ ज्ञानियासी काय काज ॥ ९६ ॥ आतां असो इतुली परी ॥ देहदुर्गाची थोर भरोभरी ॥ह्मणे ऐकें गा यया थोरी ॥ उद्धवातें हरी सांगत ॥ ९७ ॥ कार्य कारण कर्तव्यता ॥ कर्म क्रिया अहंकर्ता ॥ ध्येय ध्यान विषय ध्याता ॥ दुर्ग सर्वथा दृढ केलें ॥ ९८ ॥ तेथ भोग्य भोग भोक्ता ॥ *हें दुर्ग मुख्य तत्त्वता ॥ अभिमान जाहला वसता ॥ ×प्रकृतिसंमतासंयोग ॥ ९९ ॥ तेथ चोरद्वाराचिया लक्षीं ॥ उघडूनि कामक्रोधाची खिडकी ॥ घाला घालितां एकाएकीं ॥ सकळलोकीं कांपिजे ॥ ३०० ॥ त्याचा घेऊनिया +भेदरा ॥ तापस पळाले सैरा ॥ लंगोटी सांडिल्याही दिगंबरा ॥ क्रोध थरथरां कांपवी ॥ १ ॥ लोभयंत्राचे कडाडे ॥ तमधूम दाटे चहूंकडे ॥ महामोहाचें गडद पडे ॥ मागें पुढें दिसेना ॥[1]२॥ दुर्गा सभोंवतीं नवद्वारें ॥ नवद्वारीं नवही यंत्रें ॥ तेणें तेणें यंत्रद्वारें ॥ विषय महामारें मारिती ॥ ३ ॥ देहाभिमानाचें चाळक ॥ मुख्यत्वें मनचि एक ॥ तें दुर्धर महामारक ॥ दुर्गअटक तेणें केले ॥ ४ ॥ माल *चढोनि अवचट ॥ पारखे रिघती घडघडाट ॥ ⁵ते दशमद्वाराची वाट ॥ देऊनि कपाट दृढ ०बुजिलें ॥ ५ ॥ यापरी स्वयें मन ॥ दुर्ग पंचासी आपण ॥ त्यासि सबाह्य राखण ॥ घरटी जाण स्वयें करी ॥ ६ ॥ धरोनि कामाचा हात ॥ मन रिघे पारक्यांत ॥ मुख्य धुराचि लोळवीत ॥ इतरांचा तेथ कोण पाड ॥ ७ ॥ ऐसें मनाचें मारकपण ॥ अनिवार अति कठिण ॥ त्रिविधतापें खोंचूनि जन ॥ बहुत जाण पाडिले ॥ ८ ॥ देवापासूनि तो आधिदैविक ॥ मानस ताप तो अध्यात्मिक ॥ भूतापासाव तो भौतिक ॥ यानांव देख त्रिविधताप ॥ ९ ॥ सत्त्वगुणें देख अंतःकरण ॥ रजोगुणें इंद्रियें जाण ॥ महाभूतें विषयभान ॥ तमोगुण जाण प्रसवत ॥ ३१० ॥ ¹त्रिविध विकार बहुसाल ॥ ते हे प्रकृतीच येथें केवळ ॥ होचि दुर्गसामग्री प्रबळ ॥ प्रपंच सबळ येणें ⁷केला ॥ ११ ॥ संकल्पमहापर्जन्योदकीं ॥ वासनाजीवनें भरलीं टांकीं ॥ तेणें जीवनें दुर्गाच्या लोकीं ॥ संसार सुखदुःखीं विचरिजे ॥ १२ ॥ दुर्ग नवद्वारीं समस्तें ॥ ²आधिदैव आणि आधिभूतें ॥ आध्यात्म ते कोण येथें ॥ ऐक निश्चितें सांगेन ॥ १३ ॥ कोणे द्वारीं कोण यंत्र ॥ कोण चेतविता कैसें सूत्र ॥ कैसा होतसे विषयमार ॥तोही निर्धार तूं ऐक ॥ १४ ॥

१ वांकड्या. २ रूपांनी. ३ पाहतो. ४ भीती, धाक. ५ सुशोभित करी. ६ पाहरा, गस्त. ७ पुढारी, ह्मोरके. ८ मनापासून होणारा संताप.

*ना. यिये हुलसुखी जाण तत्वता. ×मो. प्रकृति समता संयोगें. +मो. भेदारा. *मो. चढऊनि. ⁵मो. ते द्रव्यद्वाराची. ०मो. बुजिली. ¹ना. त्रिविध विकारबहळ. ⁷ना. जाहला. ²मो. अधिदैवत.

✻ ९४ ९५ ह्या ओंव्या पंढरपूर व पैठण ह्या ठिकाणच्या हस्तलिखित पोथ्यांत नाहींत.

॥ श्लोक ॥ दृग्रूपमार्क वपुरत्र रंध्रे परस्परं सिद्ध्यति यः स्वतः खे ॥ आत्मा यदेषामपरोय आद्यः स्वयाऽनुभूत्याऽखिलासिद्धसिद्धिः ॥ ॥

॥ टीका ॥ चक्षु इंद्रिय यंत्र थोर ॥ तेथ कामिनीरूपाचा महामार ॥ *घायें भेदिती जिव्हार ॥ पडले ×सुरनर कोट्यानुकोटी ॥ १५ ॥ चक्षुगोल इंद्रिय शरीरीं ॥ तेथ अधिदैव सूर्य अधिष्ठात्री ॥ देखिल्या रूपाची धारणा धरी ॥ तांचि निजनिर्धारीं अध्यात्म ॥१६॥ नीलपीतरूपाभरण ॥ दृष्टीं देखिजे दर्शन ॥ तेंचि अधिभूत सत्य जाण ॥ दृश्याचें भान दृष्टीशी ॥ १७ ॥ सूर्य अधिदैव सिद्ध आहे ॥ अधिभूत +दृष्टी ❀भरलें पाहे ॥ शरीरीं चक्षुगोलही होये ॥ परी अध्यात्मतेजेंवीण राहे अंधत्व दृष्टी ॥ १८ ॥ अधिदैवत अधिभूत असतां पाही ॥ अध्यात्म तेज जंव दृष्टीसि नाहीं ॥ तंव देखणें न घडे कांहीं ॥ अंधत्व ते ठायीं [2]थांटावलें ठाके ॥ १९ ॥ अध्यात्म अधिभूत दोनी आहे ॥ जें अधिदैव सूर्य अस्ता जाय ॥ तें दृष्टीचें देखणें [0]ठायें ॥ स्तब्धत्वें राहे तमामाजीं ॥ ३२० ॥ ते काळीं दृष्टीसि पाहे ॥ स्नेहसूत्र मेळवूनि [6]लाहे ॥ अग्नि जरी केला साह्य ॥ तरी प्रकाश नोहे रवी ऐसा ॥ २१ ॥ तेथ चंद्रोदयो जरी जाहला ॥ तो सूर्यसमान नाहीं आला ॥ निशा निरसूनि दृष्टीं साह्य जाहला ॥ यालागीं सूर्य बोलिला अधिदैव ॥ २२ ॥ अध्यात्म अधिभूत असतां पाही ॥ अधिदैवत सूर्य जेथ नाहीं ॥ तेथ दृष्टीचें नचले कांहीं ॥ तुज म्यां तेंही सांगीतलें ॥ २३ ॥ अध्यात्म अधिदैव दोनी आहे ॥ अधिभूत [4]दृश्यदर्शन राहे ॥ तें सत्य ब्रह्मज्ञान होये ॥ जें गुरुकृपा पाहे पूर्णांशें ॥ २४ ॥ येथ जें दृश्याचें दर्शन ॥ तेणें देहबुद्धि दृढ जाण ॥ तें दृश्याचें पुशिल्या भान ॥ [8]होय देहेंशीं शून्य संसार ॥ २५ ॥ अधिदैव अध्यात्म अधिभूत ॥ त्रिपुटी बोलिजे ते हे येथ ॥ तुज म्यां सांगीतली साद्यंत ॥ जाण निश्चित विभाग ॥२६॥ येणूनि त्रिपुटीचें विंदान ॥ दृश्य द्रष्टा आणि दर्शन ॥ कर्म कर्ता क्रियाचरण ॥ [9]ध्येय ध्यान ध्यातृत्वें ॥ २७ ॥ त्रिपुटी लागावयाचें कारण ॥ परस्परें सापेक्षपण ॥ तें अपेक्षेचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण सांगेन ॥ २८ ॥ नानाकारें अतिविलास ॥ येथ देखणी दृष्टी डोळस ॥ तेंही सूर्येंवीण वोस ॥ हा अनुप्रवेश परस्परें ॥ २९ ॥ सूर्य आहे डोळा नाहीं ॥ तेथ पाहणें [3]न चले पाही ॥ हो कां डोळा आहे सूर्य नाहीं ॥ तेथ दृष्टीचें कांहीं चालेना ॥ ३३० ॥ सूर्य आणि दृष्टी दोनी आहे ॥ परी दृश्य जें नाहीं होये ॥ तें दोहींचें सामर्थ्य राहे ॥ देखावें काये दृष्टीनें ॥३१॥ सूर्य प्रकाशी रूपासी ॥ [1]दृष्टी साह्य होय त्यासी ॥ दाखवी नाना आकारांसीं ॥ [7]परस्परानुप्रवेशीं बोलिजे सिद्धि ॥ ३२ ॥ इतुकें करोनियां सविता ॥ नभोमंडळीं अलिप्तता ॥ तेवीं [5]जगदाकारें चेतविता ॥ अलिप्त तत्त्वतां चिदात्मा ॥ ३३ ॥ जो जगामाजीं भरला राहे ॥ जगाचा हृदयस्थही होये ॥ हें जग जरी होय जाये ॥ परी तो आहे जैसा तैसा ॥ ३४ ॥ जेवीं आकाशा अभ्यंतरीं ॥ होतां घटाकार सहस्रवरी ॥ आकाश त्या घटाभीतरीं ॥ प्रत्यक्षाकारीं

---

*मो. घाई. ×मो. सुरासुर. +ना. दृश्य. ❀मो. थोरलें. [2]वा. विसावलें. [0]मो. पाहे. [6]मो. हे. [4]मो. दृश्यदर्शनीं. [8]मो. होय देहाभिमान शून्य संसारेंसी. [9]मो. परस्परें जाण सापेक्ष. [3]मो. न घडे. [1]मो. दृष्टीचिया स्त्रांशेंसी. ना. दृष्टीसि रिगोनी स्त्रांशेंसि. [7]मो. परस्परानुयासी ना. परस्परानु ऐसा. [5]मो. जगदाकार.

भरलें दिसे ॥ ३५ ॥ ते घटचि होती जाती ॥ परी आकाश सहजस्थिती ॥ तेवीं उत्पत्तिस्थितिअंतीं ॥ अलिप्त श्रीपती चिदात्मा ॥ ३६ ॥ तो आदीची अनादि आदी ॥ तो बुद्धीची अनादि बुद्धी ॥ तो सिद्धीची अनादि सिद्धी ॥ जाण त्रिशुद्धि परमात्मा ॥ ३७ ॥ हा प्रकाशां प्रकाशक ॥ अर्काचाही आदि अर्क ॥ स्वयें त्रिपुटीचा प्रकाशक ॥ अलिप्त एक परमात्मा ॥ ३८ ॥ ❋हा विवेकाचा विवेक ॥ हा सुखाचा सुखदायक ॥ बुद्धीचा जो बोधक ॥ प्रकाशां प्रकाशक परमात्मा ॥ ३९ ॥ त्यासि जाणोंजातां जाणपणें ॥ वेदांसि जाहलें लाजिरवाणें ॥ वेडावलीं स्मृति पुराणें ॥ न कळे शास्त्रपठणें भांडतां ॥ ३४० ॥ देवो देवी आणि देवता ॥ भोग्य भोग आणि भोक्ता ॥ नाना त्रिपुटींची त्रिगुणता ॥ जाण तत्त्वतां प्रकृतीचि हे ॥ ४१ ॥ हा आद्य अव्यय अतर्क्य ॥ प्रकृति परमात्मा एक ॥ यासि जाणावयासि विवेक ॥ *नचले देख आणिकांचा ॥ ४२ ॥ याचेनि हा हृदयीं देखिजे ॥ याचेनि हा इत्थंभूत जाणिजे ॥ यातें धरोनि हा पाविजे ॥ ×हेंही लाहिजे कृपा याच्या ॥४३॥ हा स्वप्रकाश सहज निजें ॥ यासी प्रकाशी ऐसें नाहीं दुजें ॥ याचेनि प्रकाशें हा देखिजे ॥ याचेनि होइजे या ऐसें ॥४४॥ अधिदैव अध्यात्म अधिभूत ॥ नेत्रद्वारां सांगीतलें तेथ ॥ तैसेंच अन्यइंद्रियीं व्याप्त ॥ देव सांगत संकलितें[1] ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ एवं त्वगादि श्रवणादि चक्षुर्जिव्हादि नासादि च चित्तयुक्तम् ॥३१॥
योऽसौ गुणक्षोभकृतो विकारः प्रधानमूलान्महतः प्रसूतः ॥

॥ टीका ॥ प्रधानापासाव महदादिद्वारा ॥ +नाना विकारांचा पसारा ॥ गुणक्षोभें क्षोभूनि पुरा ॥ उठी उभारा ०त्रिपुटीरूपें ॥ ४६ ॥ जेवीं सूर्यें चक्षुरादि विंदान ॥ तैसेंचि श्रोत्र त्वचा रसना घ्राण ॥ हें ज्ञानेंद्रियपंचक जाण ॥ याचें ⁵कर्म समान त्रिपुटीरूपें ॥ ४७ ॥ येथ कर्मेंद्रियें पांच आन ॥ तीं ज्ञानेंद्रियां आधीन ॥ हस्त पाद गुद शिश्न ॥ वाचा जाण पांचवी ॥४८॥ त्यांसि ज्ञानेंद्रियें प्रेरिती ॥ तें कर्मेंद्रियें कर्मीं वर्तती ॥ एवं उभयपंचक स्थिती ॥ जाण निश्चितीं *दशेंद्रियें ॥ ४९ ॥ चित्तचतुष्टयचमत्कार ॥ मन बुद्धि चित्त अहंकार ॥ हीं एकाचि परी भिन्नप्रकार ॥ जैसा व्यापार तैसें नांव[2] ॥ ३५० ॥ केवळ देहाकारें मीपण ॥ तो सबळ अहंकार जाण ॥ संकल्प विकल्प जे गहन ॥ तेंचि मन जाण उद्धवा ॥ ५१ ॥ गतभोगाचें जें चिंतन ॥ तें चित्ताचें लक्षण ॥ केवळ निश्चयात्मक जाण ॥ बुद्धि संपूर्ण ती नांव ॥ ५२ ॥ हें गुणक्षोभाचें लक्षण ॥ भोगसाधन भोग्य जाण ॥ त्याहूनि भोक्ता तो भिन्न ॥ तेंही ⁸लक्षण अवधारीं ॥ ५३ ॥ त्वगिंद्रियीं विषयस्पर्शन ॥ तेथें अधिदैव वायू जाण ॥ त्याहूनि परमात्मा भिन्न ॥ चित्स्वरूपें जाण अविकारी ॥५४॥ रसनेंद्रिय अतिगहन ॥ रसविषयो तेथील जाण ॥ वरुण अधिदैवत आपण ॥ आत्मा स्वानंदपूर्ण रसातीत ॥ ५५ ॥ गंधविषयो घ्राणेंद्रियें ॥ तेथ अधिदैवत अश्विनीदेव होये ॥ आत्मा त्याहूनि वेगळा पाहे ॥ चित्स्वरूपें राहे अविकारी

---

१ संक्षेपानें २ मन, बुद्धि, चित्त, अहंकार.

*मो. न चले निश्चंक आणिक पै. ×मो. हा पाविजे कृपा याच्या. +ना. मना विकाराचा. ०मो. त्रिपुटीचा. ⁵ना वर्म. *मो. ज्ञानेंद्रियें. ⁸मो. उपलक्षण.

❋ ३९ ही ओंवी पंढरपूर व पैठण ह्या ठिकाणच्या हस्तलिखित पोथींत नाहीं.

॥५६॥ श्रवणेंद्रियीं विषयो शब्द ॥तेथ दिशा अधिदैवत प्रसिद्ध ॥ शब्दीं निजात्मा निःशब्द ॥ चिदत्वें शुद्ध अविकारी ॥ ५७ ॥ चक्षुरिंद्रिय लक्षण ॥ पूर्वीं निरूपिलें जाण ॥ हें ज्ञानेंद्रियविंदान ॥ त्रिपुटी संपूर्ण ऐशा रीतीं ॥ ५८ ॥ चित्त इंद्रिय जें कां येथ ॥ चिंतन विषयो त्यासि प्राप्त ॥ तेथ वासुदेव अधिदैवत ॥ आत्मा अलिप्त चित्तेंसी ॥ ५९ ॥ मनेंद्रिय अतिचपळ ॥ संकल्प विषयो त्याचा प्रबळ ॥ तेथ अधिदैवत चंद्र निर्मळ ॥ आत्मा केवळ मनातीत ॥३६०॥ अहंकार इंद्रिय कठिण ॥ तेथील विषयो 'मीपण' ॥ रुद्र अधिदैवत जाण ॥ परमात्मा भिन्न अहंकारेंसी ॥६१ ॥ बुद्धींद्रिय अतिसज्ञान ॥ बोद्धव्य तेथींचा विषयो जाण ॥ ब्रह्मा अधिदैवत आपण ॥ आत्मा चिद्घन बुद्ध्यातीत ॥६२॥ चित्तचतुष्टय *सकारण ॥ त्रिपुटी सांगीतली हे संपूर्ण जाण ॥ आतां कर्मेंद्रियांचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण सांगेन ॥६३॥ वागिंद्रियीं वाच्य विषयो ॥ अधिदैवत तेथील पहा हो ॥ सरस्वतीशक्तीचा तेथें निर्वाहो ॥ यासि अलिप्त देवो महामौनें ॥ ६४ ॥ पाणींद्रियीं ग्रहण विषयो ॥ इंद्र अधिदैवत तेथील पहा हो ॥ तेथ क्रियाशक्तीचा निर्वाहो ॥ यासि अलिप्त देवो अक्रियत्वें ॥ ६५ ॥ पादेंद्रियीं गति विषयो ॥ तेथें उपेंद्र अग्नि अधिदैवो ॥ तेथें गमनशक्तीचा निर्वाहो ॥ त्यासि अलिप्त देवो निश्चलत्वें ॥ ६६ ॥ गुदेंद्रियीं विसर्ग विषयो ॥ निर्ऋति अधिदैवत तेथील पहाहो ॥ क्षरशक्तीचा तेथ निर्वाहो ॥ त्यासि अलिप्त देवो अक्षरत्वें ॥ ६७ ॥ शिश्नेंद्रियीं रति विषयो ॥ प्रजापति तेथें अधिदेवो ॥ ×आनंदशक्तीचा तेथें निर्वाहो ॥ त्यासि अलिप्त देवो परमानंदें ॥ ६८ ॥ ज्ञानकर्मेंद्रिय कर्माचरण ॥ चित्तचतुष्टयाचें लक्षण ॥ हें गुणक्षोभाचें कारण ॥ समूळ जाण मायिक ॥ ६९ ॥ तेंचि +गुणक्षोभाचें प्रधान मूळ ॥ ०प्रकृतिविकारें होय स्थूळ ॥ आत्मा अविकारी निर्मळ ॥ अलिप्त केवळ प्रकृतीसी ॥३७०॥ जेवीं वृत्तिभूमीसमवेत ॥ गृहीं गृहसामग्री समस्त ॥ अभिमानें ※उपार्जी गृहस्थ ॥ परी त्या अतीत तो जैसा ॥७१॥ तेवीं 7त्रिगुणक्षोभें अभिमान ॥ वाढवी 0नानाविकारवन ॥ आत्मा वन वसंत तो भिन्न ॥ तेंचि निरूपण हरि बोले ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ अहं त्रिवृन्मोहविकल्पहेतुर्वैकारिकस्तामस ऐंद्रियश्च ॥३२॥ आत्मा परिज्ञानमयो विवादो ह्यस्तीति नास्तीति भिदाऽर्थनिष्ठः ॥

॥ टीका ॥ अहंअध्यासें संसारप्राप्ती ॥ जीवासि लागली निश्चितीं ॥ त्या अहंकाराचे निवृत्तीं ॥ भवनिर्मुक्ती जीवासी ॥ ७३ ॥ ऐसा बाधकत्वें अति दुर्धर ॥ 4कैंचा उठिला अहंकार ॥ हाही पुसों पाहसी विचार ॥ ऐक साचार सांगेन ॥ ७४ ॥ स्वस्वरूपातें विसरून ॥ दृढ जें स्फुरे मीपण ॥ तोचि अहंकार जाण ॥ विकारें त्रिगुणक्षोभक ॥ ७५ ॥ जागृतीचा जो विसरू ॥ तोचि 8स्वप्नसृष्टीचा विस्तारू ॥ वस्तुविमुख जो अहंकारू ॥ तोचि संसारू त्रिगुणात्मक ॥७६॥ 1विकारें क्षोभवी तिन्ही गुण ॥ हें *विस्मरणाचें लक्षण ॥ तेणें विकारले तिन्ही गुण ॥ तेचि भाग भिन्न अवधारीं ॥ ७७ ॥ मुळीं बोलिला वैकारिकू ॥ तो अहंकार जाण सात्विकू ॥ तो चित्तचतुष्टयद्योतकू ॥ होय प्रकाशकू 9अधिदैवो ॥ ७८ ॥

१ तमोगुणाची देवता. २ जाणणें ज्ञेय. ३ मिळवितो. ४ हें माझें, हा मी, अशा चिंतनानें.

*ना. लक्षण. ×मो. स्त्यानंदशक्तीचा. +मो गुणक्षोभें प्रधान मूळ. ०मो. प्रकृति योगें. ※मो. आपार्जी 7ना. त्रिगुणभेदें. 0नानाकारवन गहन. 4मो. कैसा. 8ना. स्वप्नीं सृष्टीचा. 1ना. विकार. *ना. विस्मरण मोहाचें. 9ना. अधिदैवा.

सत्वापासोनि उपजे मन ॥ मनापासाव विकार गहन ॥ यालागीं वैकारिक जाण ॥ सत्वगुण बोलिजे ॥ ७९ ॥ ज्ञान कर्म उभय पंचक ॥ हा इंद्रियांचा दशक ॥ जाहला रजोगुणद्योतक ॥ यालागीं *ऐंद्रियक ह्मणीपें त्यासी ॥ ८० ॥ तामस गुण जो कां येथें ॥ आकाशादि +अपंचीकृतें ॥ आवरणरूपें महाभूतें ॥ विषयसमवेत उपजवी ॥ ८१ ॥ महाभूतें विषयपंचक ॥ झाला तमोगुण प्रकाशक ॥ यालागीं भूतादि देख ॥ यासि आवश्यक बोलिजे ॥ ८२ ॥ एवं त्रिगुणगुणविकारें ॥ काम्यकर्मसंस्कारें ॥ सबळ होऊनि अहंकारें ॥ संसारीं संचरे नानाहेतु ॥ ८३ ॥ या प्रकृतिविकारांपासून ॥ आत्मा अतिशयें भिन्न ॥ जेवीं मृगजळातें भरून ॥ अलिप्त भानु नभामाजीं ॥ ८४ ॥ जैसा प्रकाशोनि सर्पाकार ॥ सर्पासि नातळे स्वयें दोर ॥ तेवीं प्रकाशोनि संसार ॥ निःसंग निर्विकार निजात्मा ॥ ८५ ॥ जेवीं कृष्ण पीत रक्त श्वेत ॥ स्फटिक ठेवितां तेथ तेथ ॥ जरी तो तदाकार भासत ॥ तरी तो अलिप्त शुद्धत्वें ॥ ८६ ॥ तैसा गुणसंगें जीवात्मा बद्ध ॥ दिसे तरी तो अतिशुद्ध ॥ हा नेणोनियां निजबोध ॥ करिती विवाद मतवादी ॥ ८७ ॥ एक ह्मणती आत्मा देही ॥ एक ह्मणती तो विदेही ॥ एक ह्मणती आत्म्याच्याठायीं ॥ हे दोन्ही नाहीं सर्वथा ॥ ८८ ॥ एक ह्मणती आत्मा सगुण ॥ एक ह्मणती तो ×गुणविहीन ॥ एक ह्मणती ते वेगळी खूण ॥ सगुण निर्गुण परमात्मा ॥ ८९ ॥ एक प्रतिपादिती भेद ॥ एक प्रतिपादिती अभेद ॥ एक ह्मणती दोनी अबद्ध ॥ आमुचें मत शुद्ध देहात्मवाद ॥ ३९० ॥ एक ह्मणती हें मिथ्याभूत ॥ प्रत्यक्ष दिसताहे जो येथ ॥ तो प्रपंचचि मानिती सत्य ॥ हेंचि मत एकाचें ॥ ९१ ॥ ऐसे ❀भेदवाद सकळ ॥ विचारितां तें अज्ञानमूळ ॥आत्मा ०चिन्मात्र केवळ ॥ 7भेदातें 1समूळ छेदक ॥ ९२ ॥ आत्मा परिज्ञानमैय 2शुद्ध ॥ हें श्लोकींचें मूळ पद ॥ तेणें अज्ञानेंसी निरसे भेद ॥ आत्मा शुद्ध बुद्ध चिदात्मा ॥ ९३ ॥ जेवीं सनक्षत्र रजनी ॥ निवटीत प्रकटे तरणी ॥ तेवीं सभेदकार्य निरसूनी ॥ प्रकटे चित्किरणीं चिदाभास ॥ ९४ ॥ जेथ गुणेंसि माया उडे ॥ भेदासहित वाद बुडे ॥ मुळेंसी अज्ञान खुडे ॥ चहूंकडे सच्चिदानंद ॥ ९५ ॥ आत्मा सच्चिदानंद पूर्ण ॥ तेथ समूळ मिथ्या अज्ञान ॥ *तें अज्ञाननिरासीं साधन ॥ विवेक सांख्य ज्ञान व्यर्थ दिसे ॥ ९६ ॥ तेचि विपर्यींचें निरूपण ॥ श्लोकार्धें सुलक्षण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ साध्यसाधनविभागें ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ व्यर्थोऽपि नैवोपरमेत पुंसां मत्तः परावृत्तधियां स्वलोकात् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ मूळीं समूळ मिथ्या अज्ञान ॥ अज्ञानजन्य विषयभान ॥ तें देखोनि भुलले जन ॥ पडिलें विस्मरण 5स्वस्वरूपीं ॥ ९८ ॥ मी परमात्मा हृदयस्थ सन्निधी ॥ त्या मजपासोनि उपरमे बुद्धी ॥ मग विषयासक्ति त्रिशुद्धी ॥ आवडे उपाधी देह, गेह, दारा ॥ ९९ ॥ जें 8स्वस्वरूपाचें विस्मरण ॥ तें वाढवी तीव्र विषयध्यान ॥ तेणें जीवासि जन्ममरण ॥ अनिवार

१ भूतांच्या अगोदर. २ देहरहित. ३ पूर्ण ज्ञानमय. ४ नाशीत. ५ सूर्य. ६ मूळासह. ७ नाहींसें होई. ८ फिरते, परतते, निवृत्त होते, विन्मुख होते.

*मो. ऐंद्रिक. +ना. पंचीकृत. मो. पंचीकृतें. ×मो. निर्गुण. ❀मो. मतवाद. ०ना. चिन्मात्रक. 7मो. भेदाचें मूळ छेदक. 1ना. सकळ. 2ना. विवाद. 0मो. परमार्थी. *ना. तें अज्ञान निरसी साधन. 5मो. सस्वरूपीं. 8मो. स्वरूपाचें.

जाण देहाभिमानें ॥ ४०० ॥ तो नासावया देहाभिमान ॥ वैराग्ययुक्त ज्ञान ध्यान ॥ मीचि बोलिलों साधन ॥ समूळ अज्ञान छेदक ॥१॥ जंववरीं अंगीं देहाभिमान ॥ तंव अवश्य पाहिजे साधन ॥ निःशेष निरसल्या अज्ञान ॥ वृथा साधन मीही मानीं ॥ २ ॥ ह्मणशी कोण तें पां अज्ञान ॥ जें शुद्धासि लावी जीवपण ॥ त्या जीवा अंगीं जन्ममरण ॥ अनिवार जाण वाढवी ॥ ३ ॥ स्वस्वरूप विसरोनि जाण ॥ देहीं स्फुरे जें मीपण ॥ अत्यंत दृढतर अज्ञान ॥ तो देहाभिमान उद्धवा ॥ ४ ॥ गौण नांव त्याचें अज्ञान ॥ येऱ्हवीं मुख्यत्वें देहाभिमान ॥ हें ऐकोनि देवाचें वचन ॥ दचकलें मन उद्धवाचें ॥५॥ तेचि अर्थीचा प्रश्न ॥ देवासि पुसे आपण ॥ कोण्या युक्तीं देहाभिमान ॥ जन्ममरण भोगवी ॥ ६ ॥

॥ श्लोक ॥उद्धवउवाच॥ त्वत्तः परावृत्तधियः स्वकृतैः कर्मभिः प्रभो ॥ उच्चावचान् यथा देहान् गृण्हंति विसृजंति च ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ सर्वत्र सदा संमुख गगन ॥ त्यासि कदा न घडे विमुखपण ॥ तेवीं सबाह्य आत्मा परिपूर्ण ॥ वृत्ति विमुख जाण होय कैशी ॥ ७ ॥ जें जाळीं बांधवे गगन ॥ तैं अक्रिया लागे कर्मबंधन ॥ वंध्या गर्भ संटवे संपूर्ण ॥ तें जन्ममरण मुक्तांसी ॥ ८ ॥ आत्म्यावेगळें कांहीं ॥ रितें तंव उरलें नाहीं ॥ तरी ये देहींचा ॥ त देहीं ॥ गमनसिद्धी पाही कैसेनी ॥ ९ ॥ पृथ्वी रुसोनि ओसरां राहे ॥ आकाश पळोनि पैल्हां जाये ॥ तैं देहींचा देहांतरा पाहे ॥ आत्मा लाहे संसरण ॥४१०॥ सात समुद्र गिळी मुंगी ॥ तैं आत्मा उंचनीच योनी भोगी ॥ हें अतर्क्य तर्कैना मार्गीं ॥ भुलले योगी ये अर्थीं ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ तन्ममाख्याहि गोविंद दुर्विभाव्यमनात्मभिः ॥ नह्येतत्प्रायशो लोके विद्वांसः संति वंचिताः ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ अभिनव हे तुझी गती ॥ सर्वथा नकळे श्रीपती ॥ मायामोहित जे चित्तीं त्यां तुझी स्थिती नेणवे ॥ १२ ॥ तूं आत्मा अद्वितीय अविनाश ॥ तेथ उत्पत्ति स्थिती विनाश नांथिला दाविशी ×भवभास ॥ हा अतर्क्य विलास तर्केना ॥१३॥ येथ वेदाची युक्ती +ठेली ॥ उपनिषदें वेडावलीं ॥ पुराणें मुकीं झालीं ॥ अतियत्नें लैक्षिलीं नवचेचि मार्गीं ॥ १४ ॥ तुझें केवळ कृपेवीण ॥ तुझें इत्थंभूत नव्हे ज्ञान॥ ऐसे जड मूढ ❀हरिकृपाहीन ॥ त्यांसि ०भवबंधन तुटेना ॥ १५ ॥ तुझे योगमायेची अतर्क्यता ॥ ब्रह्मा *भुलविला वत्सें नेतां ॥ शिव *भुलविला मोहनी देखतां ॥ इतरांची कथा ते कोण ॥ १६ ॥ प्रपंचीं अथवा परमार्थीं ॥ तुझेनि चालती इंद्रियवृत्ती ॥ यालागीं गोविंदनामाची ख्याती ॥ त्रिजगतीं ४वाखाणिली ॥ १७ ॥ ०सादर कृपापूर्वक आपण ॥ माझा सांगावा अतर्क्य प्रश्न ॥ देहीं 6देहांतरीं संचरण ॥ जीवासि जन्ममरण तें कैसें ॥ १८ ॥ ऐकोनि उद्धवाचा प्रश्न ॥ हांसिन्नला मधुसूदन ॥ हें अवघें मायिक जाण ॥ कल्पनाविंदान मनोमय ॥ १९ ॥

१ पराङ्मुखत्व. २ जाळ्यामध्यें. ३ पतन पावे. ४ दूर, ओटीवर. ५ पलीकडे. ६ मिथ्या, खोटा, असद्. ७ पाहिली. ८ न जाई. ९ मार्ग, पत्ता, मागमूस. १० मधु दैत्याला मारणारा, भगवान्.

*मो. अन्यदेहीं. ×मो. भवपाश. +मो. खुंटली. ❀मो. अज्ञान. ०मो. हरि तुझे कृपेवीण भवबंधन. *मो. भुलला. ४मो. वाखाणिती. ०मो. दासकृपापूर्वक. 6मो. देहांतर.

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ मनः कर्ममयं नृणामिंद्रियैः पंचभिर्युतम् ॥ लोकाल्लोकं प्रयात्यन्य आत्मा तदनुवर्त्तते ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ अकरा इंद्रियें पंच महाभूतें ॥ हें सोळा कळांचें लिंगदेह येथें ॥ मुख्य प्राधान्य मनाचें तेथें ॥ *नानाविषयांतें कल्पक ॥ ४२० ॥ येथ लिंगदेह तेंचि मन ॥ मनाअधीन इंद्रियें जाण ॥ मनाचेनि देहासि गमन ॥ तेथ देहाभिमान मनासवें ॥ २१ ॥ मन ज्यातें +सांडूनि जाये ॥ तेथ ×अभिमान उभा न राहे ॥ ※मनायोगें अभिमान पाहे ॥ देहाचा वाहे खटाटोप ॥२२॥ तेथ विषयासक्त मन ॥ करी शुभाशुभ कर्माचरण ॥ तेव्हां होऊनि कर्माधीन ॥ ०देहीं करी गमन देहांतरा ॥ २३ ॥ आत्मा यासि अलिप्त भिन्न ॥ परी देहासवें दावी गमन ॥ हें अति अतर्क्य विंदान ॥ ऐक लक्षण तयाचें ॥ २४ ॥ ' घट जेथ जेथ हिंडों बैसे ॥ आकाश त्यासवें जात दिसे ॥ परी ढळणें नाहीं आकाशें ॥ 9आत्म्याचें तैसें गमन येथें ' ॥ २५ ॥ घटामाजीं भरिजे अमृत ॥ अथवा घालिजे खातमूत ॥ आकाश दोहींशी अलिप्त ॥ तेवीं सुखदुःखातीत देहस्थ आत्मा ॥ २६ ॥ घट घायें कीजे शतचूर ॥ परी आकाशामी न निघे चीर ॥ तेवीं नश्वरीं अनश्वर॥जाण साचार निजात्मा ॥२७॥ घट फुटोनि जेथ नाशे॥तेथ आकाश आकाशीं सहज असे ॥ नवा घट जेथ उपजों बैसे ॥ तों तेथ आकाशें व्यापिजे ॥ २८ ॥ तेवीं देहाचें नश्वरपण ॥ आत्मा अखंडत्वें परिपूर्ण ॥ आत्म्यासि देहांतरगमन ॥ जन्ममरण असेना ॥ २९ ॥ 7देहींचें देहांतरगमन ॥ वासनायोगें करी मन ॥ तें मनोगमनाचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण सांगेन ॥ ४३० ॥

॥ श्लोक ॥ ध्यायन्मनोऽनुविषयान् दृष्टान्वाऽनुश्रुतानथ ॥ उद्यत्सीदत्कर्मतंत्रं स्मृतिस्तदनुशाम्यति ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ श्रुतदृष्टविषयांचें ध्यान ॥ निरंतर वाढवी मन॥ 0वृत्ती धारणा दारुण॥अन्य स्फुरण स्फुरेना ॥ ३१ ॥ आवडल्या विषयाचें ध्यान ॥ अंतकाळीं ठसावे जाण ॥ तेव्हां तदाकार होय मन ॥ सर्वभावें आपण तन्निष्ठा ॥३२॥ तेव्हां भोगक्षयें जाण ॥ मागल्या देहाचा अभिमान ॥ सहजेंचि विसरे मन ॥ पुढील ध्यान एकाग्रता ॥ ३३ ॥ विषयवासनारूढ मन ॥ निजकर्मतंत्रें जाण ॥ देहांतरा करी गमन ॥ तेथें प्रमाणें संचरे ॥ ३४ ॥ मागील्या सांडिल्या देहातें ॥ सर्वथा स्मरेना चित्तें ॥ पुढें धरिलें आणिकातें ॥ हेंही मनातें 3स्मरेना ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ विषयाभिनिवेशेन नात्मानं यत्स्मरेत्पुनः ॥ जंतोर्वै कस्यचिद्धेतोर्मृत्युरत्यंतविस्मृतिः ॥ ३८ ॥ जन्म त्वात्मतया पुंसः सर्वभावेन भूरिद ॥ विषयस्वीकृतिं प्राहुर्यथा स्वप्नमनोरथः ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ विषयाभिनिवेशें मन ॥ ज्या स्वरूपाचें करी ध्यान ॥ तद्रूप होय आपण ॥ पूर्वदेहाचें स्मरण विसरोनि ॥ ३६ ॥ तेंचि विस्मरण कैसें ॥ निजबालत्व प्रौढवयसें ॥ निःशेष ना-

---

१ शंभर तुकडे.

*मो. नाना विषयांचें. +मो. जेथें सांडुनी. ×मो. देहाभिमान. ※मो. मनयोगें. ०ना. देह. 9ना. आत्म्यासी तैसें. 7मो. देहाचें. 0मो. तीव्रतेची धारणा धरून. 3मो. स्फुरेना.

ठवे मानसें ॥ पूर्वदेह तैसें विसरोनि जाय ॥ ३७ ॥ ऐसें अत्यंत विस्मरण ॥ त्या नांव देहाचें मरण ॥ त्या विस्मरणमवें जाण ॥ चेतना सप्राण निघोनि जाये ॥ ३८ ॥ जेव्हां चेतना जाय सप्राण ॥ तेव्हां देहासि ये प्रेतपण ॥ त्या नांव उद्धवा मरण ॥ जन्मकथन तें ऐक ॥ ३९ ॥ स्नेहें द्वेषें अथवा भयें ॥ अंतकाळीं जें ध्यान राहे ॥ पुरुष तद्रूपचि होये ॥ जन्मही लाहे तैसें-ची' ॥ ४४० ॥ भरत करितां अनुष्ठान ॥ अंतीं लागलें मृगाचें ध्यान ॥ तो मृगचि जाहला आपण ॥ ध्यानानुरूप *मन जन्म पावे ॥ ४१ ॥ भयास्तव भृंगीचें ध्यान ॥ कीटकीसी करितां जाण॥ते तद्रूपचि होय आपण॥ध्यानानुरूपें मन जन्म पावे॥४२॥ द्वेषें ध्यातां श्रीकृष्णासी॥ तद्रूपता झाली पौंड्रकासी ॥ जैसें दृढ ध्यान मानसीं॥ते गति पुरुषासी त्रिशुद्धी ॥४३॥ यादवृत्तियां संभ्रम ॥ अंतकाळीं आवडे सप्रेम ॥ जें ध्यान ठसावे मनोरम ॥ तेंचि जन्म पुरुषासी ॥ ४४ ॥ ×मग तेणें ध्यानानुभावें ॥ जैसा कांहीं आकारू संभवे ॥ तेथ देहाभिमान पावे ॥ हें मी आथवें ह्मणोनि ॥ ४५ ॥ येथ मन आणि अभिमान ॥ स्वरूप एक कार्य भिन्न ॥ हें चित्तचतुष्टय लक्षण ॥ जाणती सज्ञान एकात्मता ॥ ४६ ॥ दैवयोगें त्या देहाचें ॥ बरवें वोखटें घडे साचें ॥ तें अभिमान घेऊनि नाचे ॥ जन्म पुरुषाचें या नांव ॥ ४७ ॥ परी हें देह नव्हे आन ॥ हेंही स्मरेना तें मन ॥ पूर्वील जो देहाभिमान ॥ तोचि येथ जाण आरोपी ॥ ४८ ॥ येचि अर्थीचा दृष्टांत ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्णनाथ ॥ जेवीं +स्वप्न आणि मनोरथ ॥ विसरवित निजदेहा ॥ ४९ ॥ स्वगृहीं दरिद्री निद्रित ॥ तो स्वप्नीं होय अमरेनाथ ॥ मग उर्वशीप्रमुख अप्सरांत ॥ असे मिरवत ऐरावतीं ॥ ४५० ॥ तें दरिद्रदेह माझें गेलें ॥ हें अमरदेह प्राप्त झालें ॥ ऐसें स्वप्नीं नाहीं आठवलें ॥ तैसें जन्म झालें जनासी ॥ ५१ ॥ मजूर राऊळींचें घृत नेतां ॥ तो तुरंगीं चढे मनोरथा ॥ मन ❀नाचऊं लागे उल्हासता ॥ स्वकल्पिता कल्पना ॥ ५२ ॥ चंचळ वारुवाचें उड्डाण ॥ ह्मणूनि उडुं जातां आपण ॥ पडोनि घृतकुंभ होय भग्न ॥ पुसती जन काय झालें ॥ ५३ ॥ ह्मणे बळें उडाला माझा घोडा ॥ परी स्मरेना तो फुटला घडा ॥ बंदीं पाडिला रोकडा ॥ तेणे बापुडा मनोरथें ॥५४॥ येथवरी तीव्र जें विस्मरण ॥ त्या नांव देहाचें मरण ॥ अतिउग्रत जें मनाचें ध्यान ॥ तेंचि जन्म प्राण्यासी ॥ ५५ ॥ एवं आत्म्यासि जें जन्ममरण ॥ तें केवळ भ्रमाचें लक्षण ॥ तेचि अर्थीचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ स्वप्नं मनोरथं चेत्थं प्राक्तनं न स्मरत्यसौ ॥ तत्र पूर्वमिवात्मानम-पूर्वं चानुपश्यति ॥ ४० ॥

॥ टीका ॥ स्वप्न °देखत्या पुरुषासी ॥ विसरोनि निजदेहासी ॥ स्वप्नींच्या देहगेहांसी ॥ साभिमानेंसी वाढवी ॥ ५७ ॥ जागृतिदेहो राहिला ⁶तेथें ॥ स्वप्नदेहो ⁵पावलों येथें ॥ एवं पूर्व अपर दोहींतें ॥ नस्मरे चित्तें पुरुष जैसा ॥ ५८ ॥ जागृति आणि ⁷देखिलें स्वप्न ॥ या

१ हाच पुढील जन्मीं 'जडभरत' झाला. २ भ्रमराचें. ३ किड्यानें. ४ पुंड्रदेशाचा राजा, पौंड्रक वासुदेव. ५ इंद्र. ६ राजवाड्यांतील. ७ घोड्याचें.

*मो. मरणं जन्म पावे. ×ना. मन तेणें. +मो. स्वप्नीं आन मनोरथ. ❀ना. चालऊं लागे. °मो. देखतां. ⁵मो. येथें. ⁶मो. राहिला तेथें. ⁷मो. देखिजे.

दोहीं देहांसि देखता भिन्न ॥ *तेवीं जन्म आणि मरण ॥ जीवासि जाण असेना ॥ ५९ ॥ एवं देहासीच जन्म नाश ॥ आत्मा नित्य अविनाश ॥ स्वप्नमनोरथविलास ॥ तैसा बहुवस संसार ॥ ४६० ॥ देहासि जन्म, स्थिति, मरण ॥ यांसि मनचि गा कारण ॥ मनःकल्पित संसार जाण ॥ तेंचि श्रीकृष्ण सांगत ॥ ६१ ॥

॥श्लोक॥ इंद्रियायनसृष्टयेदं त्रैविध्यं भाति वस्तुनि ॥ बहिरंतर्भिदाहेतुर्जनोऽसज्जनकृद्यथा ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ मनें कल्पिली सकळ सृष्टी ॥ +मनःकृत इंद्रियंकामाटी ॥मनें वाढविली त्रिपुटी ॥ कर्मकसवटी विभागें ॥ ६२ ॥ अधिदैव अध्यात्म अधिभूत ॥ हें त्रिविध मनःकृत ॥ वस्तु अखंडचि तेथ ॥ त्रिधा भासत कल्पनें³ना ॥ ६३ ॥ जैसें भांडें कुंभार करी ॥ तेथ नभ दिसे तदाकारी ॥ गगन सर्वथा अविकारी ॥ तें दिसे विकारी भांडयोगें ॥ ६४ ॥ तेवीं आत्मा अविकारी नित्य शुद्ध ॥ तेथ मनःकल्पित त्रिविध ॥ नानापरीच्या त्रिपुटी विविध ॥ वाढविला भेद तो ऐक ॥६५॥ कार्य कर्म आणि कर्ता ॥ ध्येय ध्यान आणि ध्याता ॥ ज्ञेय ज्ञान आणि ज्ञाता ॥ या मनःकल्पिता त्रिविध ॥ ६६ ॥ अ⁴हं को⁵हं सो⁶हं भेद ॥ त्वंपद, तत्पद, असिपद ॥ सत्, चित्, आणि आनंद ॥ हाही संबंध मायिक ॥ ६७ ॥ असंताचिये निवृत्ती ॥ संतत्व प्रतिपादी वेदोक्ती ॥ जडाचिये समाप्ती ॥ चिद्त्व बोलती वस्तूसी ॥ ६८ ॥ करितां दुःखाचा छेद ॥ वस्तूसि ह्मणती परमानंद ॥ एवं सच्चिद आनंद ॥ जाण प्रसिद्ध मायिक ॥६९॥ असंत मिथ्या मायिक पाही ॥ ×तैसें सत्व ठेवी कोणे ठायीं ?॥ जडासीचि ठावो नाहीं ॥तेथ चिद्त्व 3कायी संपादे ? ॥ ४७० ॥ जेथ नाहीं दुःखसंबंध ॥ तेथ कोण ह्मणे आनंद ? ॥ एवं वस्तूच्या ठायीं सच्चिदानंद ॥ मायिक संबंध याहेतू ॥ ७१ ॥ येथ जें भासे संसारभान ॥ तें त्रिगुण-त्रिपुटी विंदान ॥ सर्व मायिक मनःकृत जाण ॥ आत्मा तो भिन्न त्रिगुणातीत ॥ ७२ ॥ आत्मा नित्य मुक्त शुद्ध बुद्ध ॥ तेथ भासे जो त्रिविध भेद ॥ तो मनःकृत गुणसंबंध ॥ जाण प्रसिद्ध मायिक ॥ ७३ ॥ पुरुष श्रोत्रिय सदाचार ॥ त्याची स्त्री करी व्यभिचार ॥ तेणें ※दोषी ह्मणती भ्रतार ॥ तैसा भेदप्रकार आत्म्यासी ॥ ७४ ॥ जेवीं स्वप्नामाजीं नर ॥ एकला होय ०संसार ॥ तो निद्रायोगें चमत्कार ॥ तैसा भेदप्रकार मायिक ब्रह्मीं ॥ ७५ ॥ जडाजड देहभेद ॥ परिच्छिन्नत्वें ⁸जीवभेद ॥ 0हा स्वप्नप्राय आणिक बोध ॥ आत्मा शुद्ध अद्वितीय ॥ ४७६ ॥ ऐसे 1मायाविभेदनिष्ठ जन ॥ त्यांसि वैराग्यसिद्ध्यर्थ जाण ॥ काळकृत जन्म मरण ॥ तेंचि निरूपण हरि बोले ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ नित्यदा ह्यंग भूतानि भवंति न भवंति च ॥ काले नालक्ष्यवेगेन सूक्ष्मत्वात्तन्न दृश्यते ॥ ४२ ॥

---

१ विस्तृत. २ इंद्रियसमूह. ३ कल्पनेनें. ४ मी. ५ कोण मी. ६ तो मी. ७ याच अर्थाची ओवी अमृतानुभव प्रकरण पांच १० वी ओवी आहे. ८ वेदवेत्ता.

*ना. तेंचि जन्म. +मो. मनोकल्पित. ×मो. तेथें सच्चिदत्व कोणे ठाईं. 3मो. काइसें? ※ना. द्वेषी. ०मो. सविस्तर. ⁸मो. देहसंबंध. 0मो. हा स्वप्न मायिक प्रबोध. 1मो. मायाभेदनिष्ठ.

॥ टीका ॥ ह्मणे ऐक बापा उद्धवा ॥ स्थावरजंगमादि देहभावा ॥ काळाचिया काळप्रभावा ॥ लागला नीच नवा जन्ममृत्यू ॥ ७८ ॥ अतिसूक्ष्म काळगतीसीं ॥ काळ ग्रासीतसे जगासी ॥ *या अंगींच्या जन्ममृत्यूसी ॥ नेणवे जीवासी मायामोहें ॥ ७९ ॥ ' निजमाता बाळवयसेंसी ॥ प्रकटावयवीं लाडवी पुत्रासी ॥ तेचि माता प्रौढवयसेंसी ॥ होय त्या पुत्रासी सलज्ज ॥ ४८० ॥ ते बाल्यावस्था काळें नेली ॥ हे प्रौढवयसा नवी आली ॥ यालागीं माता सलज्ज झाली ॥ हे काळें केली घडमोडी ' ॥ ८१ ॥ ऐसा नित्य नाश नित्य जन्म ॥ भूतासि करी काळ सूक्ष्म ॥ परी या जन्ममृत्यूंचें वर्म ॥ नेणती सभ्रम भ्रांत प्राणी ॥ ८२ ॥ जो अवस्थाभाग काळें नेला ॥ त्यासवें तो देहचि गेला ॥ पुढें नवी वयसा पावला ॥ तो काळें आणिला नवा देहो ॥८३॥ ऐसा संभव आणि अभावो ॥ नीच नवा काळकृत पहाहो॥यालागीं त्रिविधविकारी देहो ॥ स्वयें स्वयमेवो देखिजे ॥ ८४ ॥ अतर्क्य काळाची काळगती ॥ भूतें जन्ममृत्यु पावती ॥ ते अलक्ष्यगतीचे अर्थीं ॥ दृष्टांतें श्रीपती दावीत ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ यथार्चिषां स्रोतसां च फलानां वा वनस्पतेः ॥ तथैव सर्वभूतानां वयोऽवस्थादयः कृताः ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ नित्य नूतन दीपज्वाळा ॥ होतां जातां न दिसती डोळां ॥ सवेग ×वाहतां जळकल्लोळा ॥ यमुनाजळा न देखिजे ॥ ८६ ॥ फळ न सांडितां वृक्षदेंठ ॥ कडवट तुरट आंबट ॥ तेंचि गोड होय चोखट ॥ ऐशी अतर्क्य अदृष्ट काळसत्ता ॥ ८७ ॥ तोचि काळ देहासरिसा ॥ नित्य नूतन लागला कैसा ॥ बाल्यतारुण्यवृद्धवयसा ॥ देहदशा पालटी ॥ ८८ ॥ मूढ कुशळ अशक्तता ॥ +अवस्था नाशीत ये अवस्था ॥ तेथ मी तोचि हें तत्त्वतां ॥ स्फुरे सर्वथा कैसेनी ॥ ८९ ॥ ऐसें कल्पील तुझें मन ॥ तेचि अर्थीचें निरूपण ॥ ÷अखंडस्फूर्तीचें कारण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४९० ॥

॥ श्लोक ॥ सोऽयं दीपोऽर्चिषां यद्वत् स्रोतसां तदिदं जलम् ॥ सोऽयं पुमानिति नृणां मृषा गीर्धीर्मृषायुषाम् ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ दीपज्वाळा होती जाती ॥ अग्नि जैसा पूर्वस्थिती ॥ यालागीं तोचि दीपू ह्मणती ॥ ऐशा युक्ती उद्धवा ॥ ९१ ॥ [2]प्रवाह वाहती कल्लोळ ॥ परी अखंड एकचि जळ ॥ यालागीं ह्मणती सकळ ॥ तेंचि जळ या हेतू ॥ ९२ ॥ तेवीं देहीं वयसा होती जाती ॥ आत्मा ०अखंड अनुस्यूती ॥ तोचि मी हे स्फुरे स्फूर्ती ॥ या उपपत्ती उद्धवा ॥ ९३ ॥ ह्मणसी मीपणें अहंकार [3]रूढ ॥ तोही अज्ञानत्वें जडमूढ ॥ त्यासि [4]प्रकाशक आत्मा दृढ ॥ मीपणें अखंड वस्तुत्वें स्फुरे ॥ ९४ ॥ येथ देहासीचि [6]जन्म मरण ॥ आत्मा अखंडत्वें परिपूर्ण ॥ येथ देहात्मबुद्धी जे मीपण ॥ ते वाचा जाण अतिमिथ्या ॥ ९५ ॥ [1]विषयांची विषयसिद्धी ॥ [9]देहीं जे क

१ कालगतीनें. २ आच्छादन नसतां, नग्न असतां. ३ न कळेसा. ४ देहाची अवस्था. ५ कालगतीनें शरीराच्या निरनिराळ्या अवस्था. ६ ओंवळेला एकसारखा.

*मो. परी अंगींच्या. ×ना. पाहतां. +ना. वयसा नाशीत येती अवस्था. ÷मो. ऐक ह्मणे सावधान. [2]ना. प्रवाहीं. ०मो. अखंडत्वें. [3]मो. दृढ. [4]मो. प्रकाशकत्वें आत्मा. [6]मो. मरण. [1]मो. विषयांचीये सिद्धी. [9]ना. हेही.

देहबुद्धी ॥ तेही मिथ्या जाण त्रिशुद्धी ॥ भवबंधीं व्यापक ॥ ९६ ॥ कर्मभूमीं नरदेहाऐसें ॥ निधान लाधलें अनायासें ॥ तेथिचेनिही आयुष्यें ॥ जे विषयविलासें विगुंतले ॥ ९७ ॥ जो अमृत विकूनि कांजी प्याला ॥ रत्नें देऊनि कोंडा घेतला ॥ पर्वत फोडूनि टोळ धरिला ॥ गज विकिला इटेसाठीं ॥ ९८ ॥ डोळे फोडोनि काजळ ल्याला ॥ नाक कापूनि शिमगा खेळला ॥ तैसा नरदेहा नाडला ॥ नाश केला आयुष्याचा ॥ ९९ ॥ वेंचितां धन लक्षकोटी ॥ *आयुष्य क्षणाची नव्हे भेटी ॥ तेंही वेंचिलें विषयासाठीं ॥ हतायु करंटीं अतिमूढें ॥ १०० ॥ मुख्य देहोचि काल्पनिक जाण ॥ तेथील काल्पनिक अभिमान ॥ तें देहबुद्धीचें मीपण ॥ लावी दृढ बंधन ×जगासी ॥१॥ तें सांडितां देहाचें मीपण ॥ कैंचें जन्म कैंचें मरण ॥ तेव्हां संसारूचि नाहीं जाण ॥ भवबंधन मग कैंचें ॥२॥ जैसा मिथ्या बागुलाचा भेवो ॥ ⁂बाळकें सत्य मानिला पहाहो ॥ तैसा मृषा काल्पनिक देहो ॥ +सत्य पहाहो मानिला ॥ ३ ॥ मिथ्या देहो आणि देहबुद्धी ॥ त्यासि पुढें कैसी जन्मसिद्धी ॥ मिथ्या भूतासि नव्हे वृद्धी ॥ तेविखींची विधी हरि बोले ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ मा स्वस्य कर्मबीजेन जायते सोप्ययं पुमान् ॥ म्रियते वाऽमरो भ्रांत्या यथाग्निर्दारुसंयुतः ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ देहात्मवादें देहाभिमान ॥ ०जनीं वासनाबीज गहन ॥ तेणें 7स्वसंकल्पें आपण ॥ मानी जन्ममरण नसतेंची ॥ ५ ॥ तेणें देहाभिमानें आपण ॥ अहंकर्मकर्ता क्रियाचरण ॥ निष्कर्मा कर्मबंधन ॥ अमरा जन्ममरण आरोपी ॥ ६ ॥ थिल्लराचेनि जाहलेपणें ॥ त्यां सूर्याचें जन्मणें ॥ थिल्लरनाशें सूर्याचें जिणें ॥ नासलें ह्मणे बाळक ॥ ७ ॥ तेवीं अजन्म्यासि 6जन्म कर्म ॥ मानिती तो मायिक भ्रम ॥ येचिविषयीं पुरुषोत्तम ॥ दृष्टांत सुगम सांगत ॥८॥ जैसा अग्नि अजन्मा अव्यक्त ॥ त्यासि काष्ठीं जन्मला ह्मणत ॥ दिसे काष्ठाकारें साकारवंत ॥ काष्ठनाशें मानिती नाश त्यासी ॥ ९ ॥ येथ देहासीच जन्मनाश ॥ आत्मा नित्य अविनाश ॥ देह अवस्था नवविलास ॥ स्वयें हृषीकेश सांगत ॥ ११० ॥

॥ श्लोक ॥ निषेकगर्भजन्मानि बाल्यकौमारयौवनम् ॥ वयोमध्यं जरा मृत्युरित्यवस्थास्तनोर्नव ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ देहींच्या अवस्था त्या नव ॥ ऐक तयांचाही स्वभाव ॥ भिन्नविभागवैभव ॥ यथा गौरव सांगेन ॥ ११ ॥ पितृदेहीं पावोनि 0शुक्रत्व ॥ तेथूनि जननीजठर प्राप्त ॥ त्यानांव निषेक बोलिजेत ॥ देहींची हे येथ प्रथमावस्था ॥ १२ ॥ जननीजठरीं रुधिरयुक्त ॥ मुसावोनि खोटी होत ॥ क्षणक्षणां वृद्धि प्राप्त ॥गर्भ तो येथ दुजी अवस्था ॥१३॥ 4प्रसूतिवाताच्या आघातीं ॥ उदरा बाहेर उत्पत्ती ॥ त्या नांव जन्म बोलती ॥ जाण निश्चितीं तिजी अवस्था ॥१४॥

---

१ ठेवा. २ विटेकरितां. ३ मिथ्या. ४ ( बुडबुडयासारखा आकार ) लगड, गोळा.

*मो. आयुष्याची नव्हे. ×ना. देहासी. ⁂मो. बाळक सत्य मानी. +ना. सत्यत्वें पहाहे मानिती. ०मो. जीवीं वासनाबीज. 7ना. संकल्पें. 6मो. मरणजन्म. 0मो. ना. शुक्रत्व. 4मो प्रसूतीच्या आघातीं.

अतिशयें आवडे स्तनपान ॥ मुख्यत्वें माताचि *प्राधान्य ॥ रुदनाचें बळ संपूर्ण ॥ ते चौथी जाण बाल्यावस्था ॥१५॥ मळमूत्रीं लोळे अज्ञान ॥ +मूढ इंद्रियें विवेकशून्य ॥ गोड गोजिरें कल[1] भाषण ॥ पंच हायेन बाल्यावस्था ॥१६॥ इंद्रियीं चेतना ×वाढत॥ परी पोटीं नाहीं विषयस्वार्थ ॥ खेळावरी आसक्तचित्त ॥ ते पांचवी येथ कौमारअवस्था ॥ १७ ॥ याउपरी तरुणपण ॥ इंद्रियसामर्थ्य संपूर्ण ॥ मी शहाणा मी सज्ञान ॥ देहाभिमान मुसमुशी ॥१८॥ तेथ स्त्रीकाम आवडे चित्तीं ॥ धनकामाची अतिप्रीती ॥ देहगेहाची आसक्ती ॥ नांवरूपाची ख्याती लौकिकीं मिरवी ॥१९॥ ०श्रीमदें गर्वितमानस ॥ स्त्रीपुत्रांचा अतिउल्हास ॥ तृष्णा दुर्धर ※अतिसोस॥ कामक्रोधांचा बहुवस बळसा भोंवे ॥ ५२० ॥ नसाहे नोकिलेपण ॥ तूं म्हणतां सांडी प्राण॥ ते सहावी अवस्था जाण ॥ तरुणपण अनर्थ ॥ २१ ॥ पंधरापासोनि पंचवीस ॥ पूर्ण तरुणपणाचा पैस ॥ तेथ नानाविकारी मानस ॥ *नांदवी सावकाश देहाभिमान॥२२॥ चाळिसापासोनी साठीवरी ॥ देहीं उत्तरवयसा पुरी ॥ झुरळी पडों लागे शरीरीं ॥ इंद्रियशक्ति करी प्राशन काळ ॥ २३ ॥ क्षीणपणाचा सुमुहूर्त ॥ काळ आरंभ करी जेथ ॥ ते हे (उत्तरावस्था येथ ॥ जाण निश्चित सातवी ॥ २४ ॥ तिचा हात धरोनि जरा ॥ कांपवीतसे सुभटां नरां ॥ भोग न 6साहे शरीरा ॥ इंद्रियें[10] व्यापारा हरासी ॥ २५ ॥ व्यस्त[11] केले शरीरवेश[12] ॥ दांताळी[13] पाडिली वोस ॥ भेणें पालटले केश ॥ धाकें सीसें[14] कांपत ॥ २६ ॥ शरीर जरा करी क्षीण ॥ तरी 5विषयइच्छा अतिगहन ॥ चिंता अनिवार दारुण ॥ तृष्णा अपूर्ण सर्वदा ॥ २७ ॥ तेज सांडूनि जाय नयना ॥ टोंळी[15] पडोनि ठाती काना ॥ 1मुततां[16] लागे चोरपान्हा ॥ तरी देहाभिमाना वाढवी ॥ २८ ॥ जरा पावलिया निज संधी ॥ अनिवार येती आधिव्याधी ॥ महामोहें व्यापिजे बुद्धी ॥ विवेक विशुद्धीं बुडाला ॥ २९ ॥ पायां पडे वेंगडी[17] ॥ आधार टेंकणी लांकुडी[18] ॥ वाचा लफलफीतें[19] जडत्वें गाढी ॥ हाले होंटाची जोडी उंदिरप्राय ॥ ५३० ॥ डोळां[20] चिपडीं तोंड भरे ॥ नाकींची लोळी वोठीं उतरे ॥ मुखींचे लाळेचिया धारें ॥ थिचथिबिजे उरें चिकटोनी ॥ ३१ ॥ चुंबन 7लागेना तोंडाप्रती ॥ ती[21] 9थुंका म्हणोनि 8दूर पळती ॥ उसंत[22] नाहीं खोकल्या हातीं ॥ 2श्वास कास उठती अनिवार ॥ ३२ ॥ शरीरीं थरकंप उठी ॥ तरी देहाभिमान दृढ पोटीं ॥ अवघ्यांतें म्हणे धाकुटीं ॥ सांगे जुनाट गोष्टी मोठमोठ्या ॥ ३३ ॥ अधोवाताचें वौवधान ॥ अनिवार सुटे जाण ॥ जीवें जितां विटंबन ॥ हें जरा जाण आठवी अवस्था ॥ ३४ ॥ जेवीं सुईमागें दोरा जाण ॥ तेवीं जरेसवें असे मरण ॥ जरा शरीर पाडी

---

१ मंजुळ. २ पांच वर्षें. ३ भोंवरा. ४ फिरे. ५ व्यंगोक्ती, पराभव. ६ विस्तार. ७ सुरकुती. ८ सातवी अवस्था. ९ म्हातारपण. १० इंद्रियांचे व्यापार कमी कमी होत जातात. हरास=ह्रास होणें. ११ विसकळित. १२ शरीराचा आकार, रूप. १३ दांत. १४ शिर, डोकें. १५ कानटाळीं बसतात; बहिरा होतो. १६ मूत्र मधेंच अडकतें, साफ होत नाहीं. १७ वक्रगति. १८ काठी टेकावयाची. १९ गडबडीनें संबंध राहित बोलणें. २० डोळ्यांच्या चिपड्यांनीं. २१ स्त्री. २२ विश्रांती. २३ सोसाटा.

*मो. प्रधान. +ना. दृढ इंद्रिय विवेकशून्य. ×ना. नांदत. ०ना. श्रीमदें. ※मो. असोस. *मो. नादवी सावकाश देहाभिमाने. (मो. उत्तरवयावस्था. 6मो. साहवे. 5मो. इंद्रिय इच्छा अति गहन. 1ना. मुतीं. 7ना. मागेना. 9ना. थू. 8ना. पऱ्हा. 2ना. श्वासोच्छ्वास उठती.

क्षीण ॥ तंव वाजे निशाणें मृत्यूचें ॥३५॥देहींच्या तुटल्या नाडी ॥ *वाचा होंलागे बोबडी ॥ तरी देहाची धरी गोडी ॥ अधिक आवडी स्त्रीपुत्रांची ॥ ३६ ॥ मज मागें हे अनाथें ॥ कोण सांभाळील यांतें ॥ ह्मणोनि पोटासी धरोनि त्यांतें ॥ रडे बहुतें आक्रोशें ॥ ३७ ॥ द्रव्यलोभ अतिकठिण ॥ अंतीं न वेंची आपण ॥ दूरी करूनि इतर जन ॥ सांगे उणखूण ठेव्याची ॥ ३८ ॥ नवल वासनाविंदान ॥ विसरोन देहाचें +स्मरण ॥ सर्वस्वें जे धरिजे आठवण ॥ तेंचि आपण दृढ होय ॥ ३९ ॥ या देहाची निःशेष आठवण ॥ तें नाठवणें सर्वेचि जाण ॥ चेतनासहित जाय प्राण ॥ या नांव मरण देहाचें ॥ ५४० ॥ एवं गर्भादि मरणांता ॥ या देहींच्या नव अवस्था ॥ येथ आत्म्याची अलिप्तता ॥ ×स्वभावतां देहासी ॥ ४१ ॥ देह अवस्था विकारवंता ॥ आत्मा अलिप्त अविकारता ॥ ह्मणसी ※देहविकार जडता ॥ त्यासि विकारता घडे केवीं ॥४२॥ सूर्य थापटूनि जन ॥ कदा नुठवी आपण ॥ तो प्रकाशतांचि जाण ॥ सहजें जन चेतवे ॥ ४३ ॥ त्या जनाची ०कर्मकर्तव्यता ॥ सूर्या *अंगीं नलगे सर्वथा ॥ तेवीं प्रकाशोनि विकारता ॥ 1अलिप्त तत्त्वतां निजात्मा ॥ ४४ ॥ झालिया सूर्यकिरण प्राप्त ॥ जेवीं अग्नि स्रवे सूर्यकांत ॥ तेणें याग कां दावें होत ॥ त्या कर्मा- अलिप्त सूर्य जैसा ॥ ४५ ॥ तेवीं चित्प्रकाशें मन ॥ शुभाशुभकर्में करी जाण ॥ ९त्या मनाचे विकार चिद्वान ॥ अलिप्तपण निजात्मा ॥ ४६ ॥ येथ मनःकृत विकार पूर्ण ॥ मनःकृत कर्माकर्म जाण ॥ मनःकृत जन्ममरण ॥ स्वर्ग नरकगमन मनःकृत ॥ ४७ ॥ मनःकृत लक्ष्यालक्ष्य ॥ मनःकृत बंध मोक्ष ॥ तेंचि निरूपण प्रत्यक्ष ॥ श्रीकृष्ण अध्यक्ष सांगत ॥४८॥

॥ श्लोक ॥ एता मनोरथमयीर्ह्यन्यस्योच्चावचास्तनूः ॥ गुणसंगादुपादत्ते क्वचित्कश्चिज्जहाति च ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ संसारविकाराचें भान ॥ अभिमानयुक्त करी मन ॥ स्वर्ग नरक गमनागमन ॥ देहाभिमान भोगवी ॥ ४९ ॥ आत्मा याहूनि सहजें भिन्न ॥ चिन्मात्रैक चिद्घन ॥ तेथ आतळों नशके मन ॥ शुद्धीं अभिमान असेना ॥ ५५० ॥ मन अभिमान प्रसवे माया ॥ अभिमानें गुण आणिले आयाँ ॥ गुणीं मायिक केली कार्या ॥ विकार सामग्रीयासमवेत ॥ ५१ ॥ जैशी देहापाशीं छाया ॥ तैशी स्वरूपीं मिथ्या माया ॥ जेथ जन्ममरणेंसि काया ॥ रिघावया ठावो नाहीं ॥ ५२ ॥ आत्मा शुद्ध काया मलिन ॥ काया जड आत्मा चिद्घन ॥ अज अव्यय आत्मा परिपूर्ण ॥ जन्ममरण देहासी ॥ ५३ ॥ तिन्ही गुण तिनी अवस्था ॥ कार्य कर्म अहंकर्ता ॥ हें देहाभिमानाचे माथां ॥ आत्मा सर्वथा अलिप्त ॥ ५४ ॥ यापरी विकारांहून ॥ आत्मा चिद्रूपें सहज भिन्न ॥ ह्मणशी जीवास देहाभिमान ॥ तेंही कथन अवधारीं ॥ ५५ ॥ जीव अलिप्त मायागुणीं ॥ ऐक सांगेन ते कहाणी ॥ स्फटिक ठेविजे

१ डंका. २ पालकरहित. ३ गुप्तखूण. ४ ओके. ५ जाळणें. ६ शुद्धब्रह्मीं. ७ व्यक्त केले, आकाराला आणले. ८ देह.

*मो. वाचेसी पडे बोबडी. +ना. मरण. ×मो. सर्वथा जाण देहासी. ※मो. देह विकारी. ०ना. कर्तव्यता. *ना. नातळे सर्वथा. 1मो. अलिप्तता निजात्मा. 9मो. त्या कर्मा अलिप्त चिद्वानु, अलिप्त जाण निजात्मा.

जैशा वर्णी ॥ तद्रूपपणीं तो भासे ॥ ५६ ॥ हो कां तद्रूपपणेंही दिसतां ॥ स्फटिक अलिप्त निजशुद्धता ॥ तेवीं सत्वादिगुणीं क्रीडतां ॥ जीव तत्त्वतां अलिप्त ॥ ५७ ॥ स्फटिक काजळीं दिसे काळा ॥ परी तो काळेपणा वेगळा ॥ तेवीं जो तमोगुणें जीव मैळो ॥ दिसोनि निराळा तमेंसी ॥ ५८ ॥ स्फटिक आरक्तीं आरक्त किळा ॥ दिसोन आरक्ततेवेगळा ॥ तेवीं जो गुणीं राजसलीळा ॥ भोगूनि वेगळा जीवात्मा ॥ ५९ ॥ स्फटिक श्वेतवर्णी दिसे श्वेत ॥ परी तो श्वेतपणासी अलिप्त ॥ तेवीं सत्वीं दिसोनि ज्ञानवंत ॥ गुणज्ञानातीत जीवात्मा ॥ ५६० ॥ *त्रिगुण गुणेंसि अलिप्तता ॥ दाविली जीवशिवाची तत्त्वतां ॥ देहीं असोनि निःसंगता ॥ +ऐक आतां सांगेन ॥ ६१ ॥ जेवीं घटामाजील जीवन ॥ घटीं ×चंद्रबिंब आणी जाण ॥ तेवीं शुद्धासि जीवपण ॥ देहाभिमानें देहीं देख ॥ ६२ ॥ घटनिश्चळत्वें बिंब निश्चळ ॥ घट-चंचलत्वें बिंब चंचळ ॥ तेवीं देहाच्या अवस्था सकळ ॥ मानी केवळ जीवात्मा ॥ ६३ ॥ घटीं कालविल्या अंजन ॥ तरी तें काळें होय जीवन ॥ परी बिंबप्रतिबिंबा जाण ॥ काळेपणा लागेना ॥ ६४ ॥ तेवीं देहाची ※सुखदुःखकथा ॥ कां पापपुण्यादि जे वार्ता ॥ नाहीं जीवशिवांच्या माथा ॥ देह अहंता ते ०भोगवी ॥ ६५ ॥ ये घटींचें जळ ते घटीं भरितां ॥ चंद्रबिंब असे त्याही आंत ॥ तेवीं या देहाचा त्या देहा जात ॥ जीवात्मा ह्मणती या हेतू ॥ ६६ ॥ चंद्र गगनीं अलिप्त असे ॥ तो मिथ्या प्रतिबिंब घटीं आभासे ॥ 7तेवीं वस्तु वस्तुत्वें सावकाशें ॥ जीव हें पिसें देहात्मता ॥ ६७ ॥ त्रिगुणगुणीं गुणातीत ॥ देही देहसंगा अलिप्त ॥ जीवशिव दोनी येथ ॥ तुज म्यां सांगत दाविले ॥ ६८ ॥ *हें नेणोनियां समस्त ॥ देहात्मवादें जाहले भ्रांत ॥ स्वर्ग नरकादि आवर्त ॥ योनी भोगवीत अभिमान ॥ ६९ ॥ द्विजदेह आरंभूनी येथ ॥ परमेष्ठिदेहपर्यंत ॥ 8स्वर्गसुख देह समस्त ॥ भोगवी निश्चित पुण्याभिमान ॥ ५७० ॥ याहूनियां अधोमुख येथ ॥ द्विजत्वाहूनि खालते जात ॥ नाना दुःखयोनी भोगवित ॥ जाण निश्चित पापाभिमान ॥ ७१ ॥ येथ पापपुण्यकर्माचरण ॥ तें वाढविताहे जन्ममरण ॥ यांत विराळा सभाग्य जाण ॥ जन्ममरणच्छेदक ॥ ७२ ॥ ज्यांसि निष्काम पुण्याचिया कोडी ॥ जिहीं स्वधर्म जोडिला जोडी ॥ ज्यांसि भूतदया गाढी ॥ ज्यांसी आवडी द्विजभजनीं ॥ ७३ ॥ जे अहिंसेसि अधिवास ॥ ज्याचें अद्वैतपर मानस ॥ जे सारासारराजहंस ॥ जन्ममरणाचा त्रास घेतला जिहीं ॥ ७४ ॥ जे उपनिषदर्थचातक ॥ जे जीव-जनकाचे शोधक ॥ जे निजात्मतत्त्वसाधक ॥ जे विश्वासक भावार्थी ॥ ७५ ॥ ज्यांसि 2संत-चरणीं सद्भावो ॥ जे गुरुवचनीं विकले पहाहो ॥ त्यांसि देहीं विदेहभावो ॥ मत्कृपें पहाहो पावती ॥ ७६ ॥ तेहिं निजबोधें देहाची बेडी ॥ तोडूनि जन्ममरणांची कोडी ॥ उभवूनि सायुज्याची गुढी ॥ 6परापरथडी पावले ॥ ७७ ॥ त्यांसि संसाराचे आवर्त ॥ सर्वथा गेले नलगत ॥ जेवीं बुडण्याचा संकेत ॥ मृगजळाआंत असेना ॥ ७८ ॥ ऐसे प्राप्तपुरुष येथ ॥ संसारीं

१ मलिन. २ तेज, प्रभा. ३ काजळ ४ उदक. ५ देहात्मतेनें. ६ भोंवरे, फेरे. ७ ब्रह्मदेव. ८राहण्याची जागा. ९ त्यांनीं. १० ध्वज.

*मो. त्रिगुणगुणें. +ना. ते मायिक आतां. ×मो. चंद्रबिंबा. ※मो. सुखदुःखता. ०ना भोगी. 7मो. तेवीं वस्तुत्वें सावकाश. *मो. हें नेणोनि समंत. 8ना. स्वर्गसुखादि हे समस्त. 2ना. गुरुचरणीं. 6ना. परात्परथडी.

नाहींत गा बहुत ॥ हिंडतां अवघ्या जगांत ॥ एखादा कदाचित देखिजे ॥ ७९ ॥ असो देखिल्याही त्यातें ॥ कोण आहे ओळखतें ॥ उद्धवा जाण निश्चितें ॥ आत्मा येथें दिसेना ॥१८०॥ जरी निकटं[1] भेटला ज्ञाता ॥ त्याचा देह देखिजे वर्त्ततां[2] ॥ परी भीतरील निजात्मता ॥ नदिसे सर्वथा कोणासी ॥ ८१ ॥ आत्मा गेला आला ह्मणती ॥ शेखीं येणें जाणें न देखती ॥ तेचिविषयींची उपपत्ती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ आत्मनः पितृपुत्राभ्यामनुमेयो भवाप्ययौ ॥ न भवाप्ययवस्तूनामभिज्ञोऽद्वयलक्षणः ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ ह्मणती पित्याचा आत्मा गेला ॥ यालागीं पितृदेह नासला ॥ परी पैल तो आत्मा गेला ॥ ऐसा नाहीं देखिला कोणीही ॥ ८३ ॥ ह्मणती पुत्रजन्में आत्म्यासि जन्म ॥ करितां पुत्राचें जातककर्म[3] ॥ देखिजे देहाचा संभ्रम ॥ आत्मा दुर्गम दिसेना ॥ ८४ ॥ येथ आत्म्यासि येणें जाणें ॥ सर्वथा नाहीं पूर्णपणें ॥ देहासीचि जन्ममरणें ॥ येणें जाण दृष्टांतें ॥८५॥ प्रत्यक्ष देहासि जन्म नाश ॥ आत्मा साक्षित्वें अविनाश ॥ येचिअर्थीं विशद विलास ॥ स्वयें हृषीकेश सांगत ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ तरोर्बीजविपाकाभ्यां यो विद्वान् जन्मसंयमौ ॥ तरोर्विलक्षणो द्रष्टा एवं द्रष्टा तनोः पृथक् ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ बीजपरिपाकें वाढले वृक्षीं ॥ पर्वत त्या वृक्षाचा साक्षी ॥ तो वृक्षच्छेदनें नव्हे दुःखी ॥ तेवीं द्रष्टा साक्षी देहाचा ॥ ८७ ॥ द्रष्टा साक्षी देहमात्रासी ॥ ते देहधर्म न लगती द्रष्ट्यासी ॥ तो देहीं असोनि विदेहवासी ॥ भवबंध त्यासी स्पर्शेना ॥ ८८ ॥ हा अर्थ नेणोनि अविवेकी ॥ अतिबद्ध जाहले येलोकीं ॥ तोचि अर्थ पांचश्लोकीं ॥ श्रीकृष्ण स्वमुखीं सांगत ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ प्रकृतेरेवमात्मानमविविच्याऽबुधः पुमान् ॥ तत्त्वेन स्पर्शसंमूढः संसारं प्रतिपद्यते ॥ ५० ॥

॥ टीका ॥ कर्माकर्मकर्तेपण ॥ आत्म्यासि सर्वथा नाहीं जाण ॥ येचि अर्थीचें निरूपण ॥ मागां संपूर्ण सांगीतलें ॥१९०॥ आत्मा नातळे तिन्ही गुण ॥ देही देहातीत जाण ॥ प्रकृतीहून पुरुष भिन्न ॥ हें निजात्मज्ञान जो नेणे ॥ ९१ ॥ तो संसाराचा आपण ॥ घरजांवई झाला जाण ॥ देहाभिमानासि संपूर्ण ॥ एकात्मपण मांडिलें ॥ ९२ ॥ विषयभोग तोचि पुरुषार्थ ॥ ऐसें मानूनियां निश्चित ॥ शुभाशुभकर्मीं येथ ॥ भोगवीत नानायोनी ॥ ९३ ॥ विषयभोग अभिमानें जाण ॥ पुढती जन्म पुढती मरण ॥ नानायोनीं आवर्तनें[4] ॥ देहाभिमान भोगवी ॥ ९४ ॥ तें नानायोनीं गर्भदुःख ॥ देहाभिमानें भोगिती मूर्ख ॥ तेंचि नानात्वाचें रूपक ॥ यदुनायक सांगत ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ सत्वसंगादृषीन् देवान् रजसा सुरमानुषान् ॥ तमसा भूततिर्यक्त्वं भ्रामितो याति कर्मभिः ॥ ५१ ॥

---

१ नजीक. २ व्यवहार करीत असलेला. ३ आतकर्मनामकसंस्कार ' पुत्रावण ' ह्मणतात तो. ४ फेरे.

॥ टीका ॥ देहाभिमानाचिये स्थिती ॥ त्रिगुण गुणांचीं *कर्मे होती ॥ तेणें +त्रिविध संसारप्राप्ती ॥ ऐक निश्चितीं उद्धवा ॥ ९६ ॥ न करितां कृष्णार्पण ॥ सात्विक कर्म कीजे आपण ॥ तेणें क्षोभला सत्त्वगुण ॥ उत्तम देह जाण उपजवी ॥ ९७ ॥ सत्वाच्या अतिउत्कर्षगतीं ॥ देवऋषि ब्रह्मऋषि होती ॥ सत्वाच्या समसाम्यस्थितीं ॥ कल्पायु जन्मती अमरदेव ॥ ९८ ॥ सत्वगुणें क्रियायुक्त ॥ स्वर्गीं देव होती स्वर्गस्थ ॥ भोगक्षयें अधःपात ॥ या योनीं जन्मत सत्वगुणें ॥ ९९ ॥ आश्रयूनि राजसगुण ॥ करितां राजसकर्माचरण ॥ तेणें ×क्षोभला रजोगुण ॥ योनि कोण उपजवी ॥६००॥ राजस कर्म ब्रह्मीं अर्पिती ॥ तें दैत्यही भगवद्भक्त होती॥ जे रजउत्कर्षें भोग वांछिती ॥ ते असुर होती महायोद्धे ॥ १ ॥ रजोगुणें स्वकर्माचरण ॥ तेणें कर्में जन्मती ब्राह्मण ॥ रजतारतम्यें जाण ॥ चारी वर्ण जन्मती ॥ २ ॥ तामसाचे संगतीं जाण ॥ करितां तमिष्ठ कर्माचरण ॥ ०तेणें क्षोभला जो तमोगुण ॥ तो नीचयोनि दारुण उपजवी ॥३॥ भूत प्रेत पिशाचक ॥ तिर्यग्योनि ※असंख्य ॥ वृक्ष पर्वत पाषाण देख ॥ या योनी अनेक भोगवी ॥ ४ ॥ आशंका ॥ कर्म त्रिगुणात्मक साचार ॥ परी [1]कर्मफळभोक्ता ईश्वर॥ हा वेदशास्त्रें विचार ॥ केला निर्धार तुवांही ॥ ५ ॥ देहसाक्षित्वें आत्मा निराळा ॥ ऐसा गतश्लोकीं केला निर्वाळा ॥ जें कर्मफळभोक्ता कर्मावेगळा ॥ तें तो कर्मफळा केवीं भोगी ॥ ६ ॥ ऐसें आशंकेचें 7अंतर ॥ जाणोनियां शारंगधर॥ तेचि अर्थींचें उत्तर॥ *विशद साचार सांगत ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ नृत्यतो गायतः पश्यन् यथैवानुकरोति तान् ॥ एवं बुद्धिगुणान्पश्यन्ननीहोप्यनुकार्यते ॥ ५२ ॥

॥ टीका ॥ कळाकुशल सभानायक ॥ त्यापुढें रंग होतां कौतुक ॥ गात्या नाचत्याचे ताळ थाक ॥ स्वयें देख अनुकरे ॥ ८ ॥ सभेसि बैसल्या निश्चळा ॥ रंगींच्या 2अनुकरे थाकताळा ॥ तेवीं 9प्रकृति पुरुष वेगळा ॥ तो प्रकृतीची लीळा 2अनुकरे ॥ ९ ॥ तेंचि अनुकार ह्मणशी कैसें ॥ प्रकृति केवळ जडांशें ॥ जाणपण आत्म्यामाजि असे ॥ येणें विन्यासें 3भोक्ता ह्मणती ॥ ६१० ॥ आशंका ॥ 5प्रकृतिच्छंदें अनुकारता ॥ गुणकर्माचा फळभोक्ता ॥ आत्मा झाला जें तत्त्वता ॥ तें नित्यमुक्तता भंगली ॥ ११ ॥ जो करी कर्मफळस्वादन ॥ त्यासि लागे कर्मबंधन ॥ कर्मास्तव जन्ममरण ॥ आत्म्यासि जाण लागलें ॥ १२ ॥ नित्यमुक्त अविकारी ॥ या गोष्टी राहिल्या दुरी ॥ आत्मा जाहला संसारी ॥ गुणविकारीं अतिबद्ध ॥ १३ ॥ उद्धवा तूं ऐसऐशी ॥ आशंका ह्मणी धरिशी ॥ आत्मा अलिप्त गुणकर्मासी ॥ दृष्टांतेंसी हरि सांगे ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ यथाऽम्भसा प्रचलता तरवोऽपि चला इव ॥ चक्षुषा भ्राम्यमाणेन दृश्यते भ्रमतीव भूः ॥ ५३ ॥

---

१ सत्वातिशयानें. २ निवाडा. ३ शंकेचें. ४ नक्कल करितो. ५ या रीतीनें, ह्मणून.

*मो. कार्मे. +मो. त्रिधा. ×मो. भोगक्षयेंरजोगुण. ०मो. क्षोभला वाढे तमोगुण. ※ना. अशेख. 1ना. कर्मभोक्ता. 7मो. ना. उत्तर. *ना. विषयसार सांगत. 2ना. अनुकारे. 9ना. प्रकृति परवेगळा. 3ना. जाणता ह्मणती. 5मो. प्रकृतिसंगें.

॥ टीका ॥ जेवीं गंगातीरींचे तरू ॥ जळीं *वाहतां देखे नरू ॥ तेवीं +मायागुणीं अनुकारू ॥ भासे विकारू आत्मत्वीं ॥ १५ ॥ ज्याचे डोळां भवंडी सबळ ॥ तो ×भवंतां देखे भूमंडळ ॥ तेवीं मायिक विकारमळ ॥ मिथ्या केवळ आत्म्यासी ॥ १६ ॥ जो अश्वारूढ होऊनि पाहे॥ ०जळ प्रवाहासंमुख राहे ॥ तो 5देखे मी जळीं प्रवाहें ॥ ऐसा मिथ्या होये अनुभव ॥ १७ ॥ तेवीं आत्मा 2नित्य निर्विकार ॥ 1तेथ मायावी गुणसंसार ॥ कल्पनायोगें साचार ॥ मानिती नर मनोमय ॥ १८ ॥ आब्रह्मस्तंबपर्यंत ॥ नानायोनि विकारवंत ॥ कर्म क्रिया फळभाग येथ ॥ जाण निश्चित मनोजन्य ॥ १९ ॥ ❋ऐसें सांगतां हरि सांवळा ॥ तेणें उल्हास उद्धवजीवाला ॥ तया आनंदाच्या कल्लोळां ॥ उद्धवचि लीला पोखित ॥ ६२० ॥ निववावया उद्धवाचा ताप ॥ स्वयें सांगे तो विश्वतोमुख ॥ जेणें उद्धवा बहु हरिख ॥ तेंचि श्रीकृष्ण देख सांगतसे ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ यथा मनोरथधियो विषयानुभवो मृषा ॥ स्वप्नदृष्टाश्च दाशार्ह तथा संसार आत्मनः ॥ ५४ ॥

॥ टीका ॥ आत्मा नित्यमुक्त अविकारी ॥ तो संकल्पें कीजे विकारी ॥ असंसारी परी संसारी ॥ मनेंकरीं मानिजे ॥ २२ ॥ ऐसें दुजयावीण कांहीं ॥ कथा वार्ता सांगतां नाहीं ॥ एक श्रोता दुसरा वक्ता पाहीं ॥ यालागीं येही उपायें ॥ २३ ॥ जेवीं 3एकटा क्रमेना पंथ ॥ 'मी राजा' हे करी मनोरथ ॥ परचक्र कल्पूनि तेथ ॥ होय उद्यत युद्धासी ॥ २४ ॥ तो युद्धआवेश कडकडाट ॥ तेणें सत्राणें उडे उद्भट ॥ अडखळूनि आदळे पोट ॥ ह्मणे मी घायवट पडिलों कीं ॥ २५ ॥ मिथ्या भ्रमें पडला भुली ॥ चालतां चालतां मृगजळीं ॥ उतरावया पैलतीरीं ॥ बुडी वहिली देतसे ॥ २६ ॥ गंधर्वनगरीं प्रचंड ॥ माड्या सोपे उदंड ॥ क्षणामाजीं विरस चंड ॥ वातवितंड करी निर्वाळा ॥ २७ ॥ तेवीं संसार हा काल्पनिक ॥ तेथील सुख आणि दुःख ॥ मिथ्या केवळ मायिक ॥ जाण निष्टंक निजभक्ता ॥ २८ ॥ दाशार्हवंशीं जन्मलासी ॥ तूं एक उत्तम दशा पावलासी ॥ यालागीं ह्मणे हृषीकेशी ॥ उद्धवासी दाशार्ह ॥ २९ ॥ जेवीं कां स्वप्नभोग जाण ॥ स्वप्नीं सत्य मानी आपण ॥ तेवीं संसार हा दीर्घ स्वप्न ॥ मायिक जाण 6मिथ्यात्वें ॥ ६३० ॥ जागा झालिया स्वप्न वृथा ॥ निरहंकारी संसार मिथ्या ॥ हे ब्रह्मज्ञानाची 8मुख्य कथा ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ३१ ॥ संसार तो कल्पनामात्र ॥ आत्मा निर्विकार चिन्मात्र ॥ जेवीं मृगजळ भेरी भास्कर ॥ तेवीं संसार करी आत्मा ॥ ३२ ॥ उद्धवा तूं ह्मणशी आतां ॥ ऐकतां तुझे सुखींची कथा ॥

---

१ भोंवळ, चक्कर. २ घोड्यावर बसून. ३ ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत. ४ सर्वतोमुख. ५ शत्रू व सैन्य वगैरे. ६ बलानें उडी मारी. ७ घायाळ. ८ यदुवंशांतील शाखा. ९ अहंकार गेला कीं संसार मिथ्या. १० उत्पन्न करी, दाखवी.

*मो. वाहती. +ना. मायागुणें अविकारु. ×मो. भ्रमतां. ०ना. जळप्रवाही. 5मो. ह्मणे. 2मो. नित्यमुक्त. 1मो. तेथ गुण संसार. 3ना. एकव्या. 6मो. निश्चित. 8मो. मूळकथा.

❋ २० २१ २३ २६ व २७ ह्या ओंव्या पंढरपूर व पैठण ह्या ठिकाणच्या हस्तलिखित पोथ्यांत नाहींत.

संसार मिथ्या *समस्ता ॥ तरी साधनावस्था कां सोसावी ॥ ३३ ॥ जेवीं वंध्यापुत्राचें लग्न ॥ करावया कोणी न करी यत्न ॥ कां मृगजळीं बांधोनि धरण ॥ पाट जाण कोणी काढीना ॥ ३४ ॥ तेवीं मिथ्या संसारबंधन ॥ तेथ श्रवण मनन चिंतन ॥ विवेक वैराग्य ज्ञान ध्यान ॥ वृथा कां जन सोशिती ॥ ३५ ॥ उद्धवा बागुलाचें भय खोटें ॥ परी बाळकासि सत्य वाटे ॥ तेवीं मिथ्या संसारकचाटें ॥ जीवीं प्रकटे बद्धता ॥ ३६ ॥ तेची अर्थी ×दृष्टांत ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ मिथ्या सांसारिक येथ ॥ भर्मे बाधीत भ्रांतासी ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ अर्थे ह्यविद्यमानेऽपि संसृतिर्न निवर्त्तते ॥ ध्यायतो विषयानस्य स्वप्नेऽनर्थागमो यथा ॥ ५५ ॥

॥ टीका ॥ +विचारें पाहतां मिथ्या स्वप्न॥ तेथील 1विषयसेवन ॥ ०सुखदुःख बाधी गहन ॥ ऐक लक्षण तयाचें ॥ ३८ ॥ स्वप्नीं पुत्रलाभ राजसन्मान ॥ तेणें सुखें ओसंडे आपण ॥ कां झालिया धनहरण ॥ तेणें दुःखें दारुण आक्रंदे ॥ ३९ ॥ त्यासि जागें न करितां ॥ स्वप्नसुखदुःखबाधकता ॥ निवर्तेना सर्वथा ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ६४० ॥ तेवीं विषयासक्त जन ॥ ज्यांसि अखंड विषयध्यान॥ज्यांचें विषयीं सदा मन॥ *देहाभिमानें गोंवित ॥४१॥ ※तयांसि देखावया उपावो ॥ जेयां विषयासक्ति होय वावो ॥ येचि अर्थीचा दृष्टांत पहाहो ॥ स्वयें सांगे देवो उद्धवासी ॥ ४२ ॥ न करितां 4श्रवण मनन ॥ न साधितां विवेकज्ञान ॥ न 3धरितां वैराग्य पूर्ण ॥ भवभय जाण तुटेना ४३ ॥ संसार मिथ्या तोंडें ह्मणतां ॥ न तुटे 2सुखदुःखभवव्यथा ॥ जन्ममरणादि अवस्था ॥ अहंममता सुटेना ॥ ४४ ॥ ऐसे जे अज्ञान जन ॥ तिहीं अवश्य करावें साधन ॥ विवेकवैराग्य धरितां पूर्ण ॥ भवबंधन निवारे ॥ ४५ ॥ यालागीं उद्धवा जाण ॥ सकळसाधनांचें कारण ॥ जेणें हातां चढे ब्रह्मज्ञान ॥ तें वैराग्य पूर्ण साधावें ॥ ४६ ॥ ऐक विरक्तीची मागी ॥ जैशी धडधडीत आगी ॥ तैसें वैराग्य व्हावें अंगीं ॥ तैं प्राप्तीलागीं अधिकारू ॥ ४७ ॥ 5ऐसे मुमुक्षु जे पुरते ॥ परमकृपेचेनि हातें ॥ सद्गुरु थापटोनि त्यातें ॥ करी 0अद्वैतें जागृत ॥४८॥ ज्यासि 7देहादिभेदपुष्टी ॥ 9मिथ्या माया गुणत्रिपुटी ॥ ब्रह्मानंदें कोंदली सृष्टी ॥ स्वप्नवत् दृष्टीं संसारू ॥ ४९ ॥ येव्हडी ही परम प्राप्ती ॥ वैराग्यविवेकें चढे हातीं ॥ तोंचि वैराग्य उद्धवाप्रती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ६५० ॥

॥ श्लोक ॥ तस्मादुद्धव मा भुंक्ष्व विषयानसदिंद्रियैः ॥ आत्माग्रहणनिर्भातं पश्य वैकल्पिकं भ्रमम् ॥ ५६ ॥

॥ टीका ॥ विषयांची जे आसक्ती ॥ ते बाधक परमार्थाप्रती ॥ विषय सांडी सांडी निश्चितीं ॥ परतोनि हातीं नातळे ॥ ५१ ॥ आसक्त वृत्ति इंद्रिययोग ॥ अतिलोलुप्यें विषयभोग ॥ तोचि

१ ज्या उपायानें. २ मुक्त व्हावें अशी इच्छा आहे ज्यांस ते.

*मो. तत्त्वतां. ×मो. सदृष्टांत. +मो. विवेकें पाहतां. 1मो. जें विषयसेवन. ०मो. सुखदुःख बाधा. *ना. देहाभिमान. 4मो. श्रवण मनन कीर्तन. 3ना. करितां. 2मो. संसारभयव्यथा. 5ना. ऐके. 0मो. अद्वैतीं. 7मो. देहबुद्ध्यादिपुष्टी. 9मो. मिथ्यामय गुणत्रिपुटी.

※ ४२ ही ओंवी पंढरपूर व पैठण ह्या ठिकाणच्या हस्तलिखित पोथींत नाहीं.

मुख्यत्वें भवरोग ॥ यालागीं त्याग करावा ॥ ५२ ॥ विखें रांधिलें परमान्न ॥ तें ग्रासमात्र हरी प्राण ॥ विष एकदा मारक जाण ॥ विषय पुनःपुनः मारक ॥ ५३ ॥ ह्मणसी *प्रारब्धें भोग येती ॥ ते त्यागिले केवीं जाती ॥ विषयत्यागाची +युक्ती ॥ वैराग्यस्थिती घडे केवीं ॥ ५४ ॥ ह्मणसी प्रारब्धें विषयभोग येती ॥ ते साधका दुःखरूप होती ॥ ※वणवां मृगें आहाळती ॥ तैशी स्थिती भोगणें ॥५५॥ व्याघ्रमुखीं सांपडे गाये ॥ तैसा भोगी चरफडीत जाये ॥ ऐसेनि अनुतापें पाहे ॥ वैराग्य होये अनिवार ॥ ५६ ॥ वैराग्य जाहलिया धडफुडें ॥ सद्गुरुकृपा हातां चढे ॥ तेणें गुरुकृपा उजियेडें ॥ संसार उडे द्वंद्वेंसी ॥ ५७ ॥ झालिया गुरुकृपा सुगम ॥ सर्वत्र ठसावे परब्रह्म ॥ तेथ जन्ममरण कैचें कर्म ॥ भवभ्रम असेना ॥५८॥ तेथ वातीं लावूनि पाहतां ॥ संसार दिसेना मागुता ॥ जेवीं निभ्रमें पाहों जातां ॥ नलगे हातां रज्जुसर्प ॥ ५९ ॥ भवंडीचेनि वेगवशें ॥ भिंगोरी नीट उभी दिसे ॥ तेवीं भ्रमाचेनि आवेशें ॥ संसार भासे सत्यत्वें ॥ ६६० ॥ केवळ जो निबिड भ्रम ॥ संसार हें त्याचें नाम ॥ येऱ्हवीं निखिल परब्रह्म ॥ तेथ जन्म कर्म असेना ॥ ६१ ॥ ऐसें जरी झालें ब्रह्मज्ञान ॥ तरी प्रारब्ध भोगावें गा जाण ॥ जेवीं कुलालें भांडें नेे आपण ॥ परी चक्रभ्रमण राहेना ॥ ६२ ॥ वृक्ष समूळ उपडल्या जाण ॥ उपडितांचि नवेचे सार्द्रपण ॥ तेवीं होतांचि ब्रह्मज्ञान ॥ प्रारब्ध जाण सोडीना ॥ ६३ ॥ त्या प्रारब्धाचिये गती ॥ विषयभोग जरी येती ॥ तेथ उपावो न करावा निवृत्ती ॥ निजशांतीं साहावें ॥ ६४ ॥ विषयभोग आलियाही जाण ॥ निजशांति धरोनि संपूर्ण ॥ सुखें वर्तती साधुजन ॥ विवेकसंपन्न क्षमावंत ॥ ६५ ॥ हातां आलिया निजशांती ॥ संसार बापुडें तें किती ॥ तेचि शांतीची स्थिती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ६६ ॥ जें निजशांतीचें कल्याण ॥ जेणें जीव पावे समाधान ॥ तें अतिगोड निरूपण ॥ दो श्लोकीं श्रीकृष्ण सांगत ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ क्षिप्तोऽवमानितोऽसद्भिः प्रलब्धोऽसूयितोऽथवा ॥ ताडितः सन्निबद्धो वा वृत्त्या वा परिहापितः ॥ ५७ ॥ निष्ठितो मूत्रितो वाऽज्ञैर्बहुधैवं प्रकंपितः ॥ श्रेयस्कामः कृच्छ्रगत आत्मनात्मानमुद्धरेत् ॥ ५८ ॥

॥ टीका ॥ देहाभिमानी तामस जन ॥ अतिदुष्ट जे दुर्जन ॥ तिहीं साधूंसि करितां छळण ॥ शांतीस्तव सज्जन क्रोधी न होती ॥६८॥ अल्प उपद्रवीं जाण ॥ न येती क्रोधा सज्ञान ॥ तैसें नव्हे अतिनिर्वाण ॥ पीडा दारुण करितांही ॥ ६९ ॥ कायिक वाचिक मानसिक ॥ त्रिविध पीडा देतां देख ॥ साधु निजशांतीं नेटक ॥ जाणोनि विवेक ते साहती ॥ ६७० ॥ उजू बोलतां ०शुद्ध युक्ती ॥ आक्षेपूनि हेडौविती ॥ झिडकावूनियां निर्भर्त्सिती ॥ अपमानिती सभेसी ॥ ७१ ॥ शब्दीं शब्दाचे करूनि छळ ॥ ह्मणती दुष्ट 7दुर्जन दुःशीळ ॥ अपवित्र अमंगळ ॥ नष्ट चांडाळ हा एक ॥७२॥ ऐशा दुर्जनांच्या ×दुष्टोक्ती ॥ साधु साहे निज शांतीं ॥ ते शांतीची उपपत्ती ॥ विवेकस्थिती अवधारी ॥ ७३ ॥ 'पराची जिह्वा होंट हालती ॥ माझ्या अंगीं ते न रुपती ॥

---

१ खीर. २ प्राण हरण करी. ३ वणव्यांत, वणव्यानें. ४ पोळती. ५ दिवा. ६ भ्रमरहित दृष्टीनें. ७ भिंगरी. ८ कुंभार. ९ ओलेपणा, टवटवी जात नाहीं. १० नीट. ११ हेळणा करितात.

*मो. प्रारब्धभोगें विषय येती. +मो. प्राप्ती. ※मो. वणवेन. ०मो. दुरुक्ती. 7ना. दुर्जय. ×मो. दुरुक्ती.

यालागीं क्रोध नये चित्तीं ॥ निजशांती ढळेना ' ॥ ७४ ॥ सभेसि सन्मानें पूजितां । लोटूनि घातला खालता ॥ हाणोनियां चरणघाता ॥ नेला परता अपमानें ॥ ७५ ॥ सन्मानें जेथ पूजूं नेती ॥ तेथ केवळ असे क्षिती ॥ अपमानें जेथ लोटिती ॥ तेथही क्षिती तेचि पैं ॥ ७६ ॥ येथ मान आणि अपमान॥कल्पना मनाची जाण॥ऐसेनि विवेकें सज्जन॥ द्वेषीना *जन निजशांतीं ॥७७॥ प्रलोभू नानायुक्ती ॥ धनें ठकवूनियां निर्भर्त्सिती ॥ धनलोभ केवळ अधःपाती ॥ त्याची निवृत्ती जिहीं केली ॥ ७८ ॥ त्यांसि निंदितांचि जाण ॥ दोषी होइजे आपण ॥ यालागीं क्रोधा न ये मन ॥ शांति संपूर्ण ढळेना ॥ ७९ ॥ शुद्ध बोलती शास्त्रार्थ ॥ अर्थ तितुका अनर्थ ॥ त्या अनर्था जो करी निवृत्त ॥ त्यातें द्वेषीत ते मूर्ख ॥ ६८० ॥ ×सद्गुणीं दोष आरोपिती ॥ नानापरी निंदा करिती ॥ तेणें हित मानी चित्तीं ॥ तारक निश्चितीं हे माझे ॥ ८१ ॥ मातेचे जे करतळ ॥ ते वरीवरी क्षाळिती बाह्य मळ ॥ +जे जनक माझे केवळ ॥ सबाह्य मळ सकळ जिह्वाग्रें धुती ॥ ८२ ॥ ऐशियांचें करितां छळण ॥ हितास नाडिजे आपण ॥ कोणाचे ⚘न बोले दोषगुण ॥ तेणें शांति जाण थोरावे ॥८३॥ जेणें चाले 2जीविकास्थिती ॥ धन धान्य क्षेत्र ०स्थिती ॥ छळें बळें हिरोनि नेती ॥ तेणेंही चित्तीं क्षोभ नुपजे ॥८४॥ येथ लाभालाभ दैवाधीन ॥ त्यासि देतें घेतें तेंचि जाण ॥ यालागीं द्वेषीना जन ॥ शांतीचा गुण न सांडी ॥ ८५ ॥ वृत्ति घेऊनि, उगे नसती ॥ अन्यायी ह्मणोनि बांधिती ॥ एक तोंडावरी थुंकिती ॥ एक माथां मुदती अतिदुष्ट ॥ ८६ ॥ एक ताडिती पाडिती ॥ एक नानापरी गांजिती ॥ तरी अंगींची ढळेना शांती ॥ विवेकसांगाती 6सज्जन ॥८७॥ थुंका आणि जें मूत ॥ तें देहाचिमाजीं उपजत ॥ दोहींचें देहास लागत ॥ क्षोभ तेथ कोण मानी ॥ ८८ ॥ थुंका आणि जें मूत ॥ *जैसें देहीं उपजे देहाचें अपत्य ॥ देहाचें देहावरी खेळत ॥ दुःख तेथ कोणाचें ॥ ८९ ॥ धरितां मारितां ह्मणे देख ॥ देहो तितुका पांचभौतिक ॥ मारिता मारिजता दोन्ही एक ॥ कोणाचें दुःख कोणासी ॥ ६९० ॥ ऐशी सविवेक ज्यासि शांती ॥ चारी मुक्ती त्याच्या दासी होती ॥ त्याचा अंकिला मी श्रीपती ॥ यापरती प्राप्ती ते कायी ॥ ९१ ॥ एवं केवळ जो मोक्षार्थी ॥ तेणें सर्वस्वें पाळावी शांती ॥ ते दुःखसागरावर्ती ॥ होय तारिती सुखरूप ॥ ९२ ॥ वैराग्य योग ज्ञान ध्यान ॥ त्याचें फळ तें शांति जाण ॥ ते शांति साधूनि संपूर्ण ॥ आपणिया आपण उद्धरिती ॥ ९३ ॥ यालागीं उद्धवा जाण ॥ साहोनि द्वंद्वाचें काठिन्य ॥ शांति साधोनि संपूर्ण ॥ ब्रह्म परिपूर्ण पावावें ॥ ९४ ॥ पूर्णब्रह्म पावल्यापाठीं ॥ जन्ममरणाची खुंटे गोठी ॥ परमानंदीं पडे मिठी ॥ भवभयाची तुटी तें होय ॥९५॥ ऐकोनि श्रीकृष्णाचे बोला ॥ उद्धव अत्यंत 8चाकाटला ॥ द्वंद्वबाध जो ऐकिला ॥ तो नवचे साहिला आह्मांसी ॥ ९६ ॥ ऐकिल्या नाहीं ये शांतीच्या गोष्टी ॥ मा केवीं देखिजेल दृष्टीं ॥ ऐशी शांति ज्याच्या पोटीं ॥ तो पुरुष सृष्टीं असेना ॥ ९७ ॥ मागें ऐकिली ना देखिली ॥ ऐशी शांति त्वां कैंची काढिली ॥ हे ऐकतां तुझी बोली ॥ भयें दचकली बुद्धी माझी ॥ ९८ ॥ ऐशी शांति ज्यासि आहे ॥ तो

१ पृथिवी. २ दूर. ३ वृत्ति हिरावून. ४ मारणारा व ज्याला मारतो तो. ५ स्वाधीन. ६चकित झाला.

*मो. जाण. ×ना. सद्रूपीं दोष मो. सद्गुरूसी दोष. +मो. हे सज्जन. ⚘मो. न बोलावे. 2मो. जीविकावृत्ती. ०ना. वृत्ती. 6ना. सज्जना. *मो. देहींचें देहीं अपत्य उपजत ना. देहीं उपजे ते देहाचे आप्त. 8मो. चमत्कारला.

मागें झाला ना पुढें होये ॥ देवो बोलिला निजनिर्वाहें ॥ ते *दुःसह होये आम्हांसी ॥ ९९ ॥ ज्या सांगीतलें द्वंद्वासी ॥ तें अतिदुःसह योगियांसी ॥ केवीं साहवे आम्हांसी ॥ तेंचि देवासी पूसत ॥ ७०० ॥

॥ श्लोक ॥ उद्धवउवाच ॥ यथैवमनुबुद्ध्येयं वद नो वदतांवर ॥ सुदुःसह-
मिमं मन्ये आत्मन्यसदतिक्रमम् ॥ ५९ ॥ विदुषामपि विश्वात्मन् प्रकृतिर्हि
बलीयसी ॥ ऋतेत्वद्धर्मनिरताञ्छातांस्ते चरणालयान् ॥ ६० ॥ इति श्रीभागव-
ते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे द्वाविंशोऽध्यायः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ सांग जे जाणती वेदशास्त्रार्थां ॥ ते वक्ते ह्मणविती तत्त्वतां ॥ त्या वक्त्यांमाजीं तुझी श्रेष्ठता ॥ मुख्य वेदाचा वक्ता तूं होशी ॥ १ ॥ शास्त्रें लाहोनि तुझी युक्ती ॥ तुझी तुज प्रतिपादिती[१] ॥ ×ते परोक्षवादें थोंटावती ॥ श्रुति नेतिनेति[२] परतल्या ॥ २ ॥ त्या तुझे मुखीं-च्या ज्ञानोक्ती ॥ कृपेनें आयकों कृपामूर्ती ॥ श्रवणाचें भाग्य वानूं किती ॥ जे ऐकती ते धन्य ॥ ३ ॥ ऐसऐशिया अतियुक्तीं ॥ उद्धवें प्रार्थिला श्रीपती ॥ हात जोडूनि परमप्रीतीं ॥ ह्मणे विनंती अवधारीं ॥ ४ ॥ स्वामी बोलती अति अगाध ॥ तें बोलणें परम शुद्ध ॥ परी माझे बुद्धीसी नव्हे बोध ॥ पराचे अपराध कोण साहे ॥ ५ ॥ सोसावे पराचे अपराध ॥ तेंही कठिनत्वें अतिविरुद्ध ॥ हा दुःसह ✻महाबोध ॥ कैसेनि द्वंद्व साहवे ॥ ६ ॥ उत्तमें केलिया अपराधा ॥ कोटीमाजीं साहे एखादा ॥ परी नीचाची विरुद्ध बाधा ॥ कोणीही कदा न साहे ॥ ७ ॥ ज्याचें न व्हावें दर्शन ॥ ज्यासि करूंनये नमन ॥ त्याचे मस्तकीं 0वाजतां चरण ॥ साहेल कोण गोविंदा ॥ ८ ॥ ज्याचा निःशेष जाय प्राण ॥ तोंचि साहे हें कठिन ॥ जो होय सचेतन ॥ त्यासि सर्वथा जाण न साहे[३] ॥ ९ ॥ इतरांची कायशी कथा ॥ सज्ञान जे कां तत्त्व-तां ॥ +तेही अतिक्रमूं न साहती अल्पता ॥ मा अपमानता कोण साहे ॥ ७१० ॥ क्षोभ जा-हला कपिलमुनीशी ॥ तेणें भस्म केलें सागरांशीं ॥ नारदें कुबेरपुत्रांशीं ॥ वृक्षत्वाशीं पाववीलें ॥ ११ ॥ दुर्वासाच्या सांगतां गोठी ॥ त्याची कथा आहे मोठी ॥ कोप आला शृंगीचे[४] पोटीं ॥ मेल्या सर्पासाठीं शापिलें ॥ १२ ॥ मुख्यत्वें शांति सनकादिकांशी ॥ द्वारीं आडकाठी केली त्यांशी ॥ वैकुंठीं क्षोभूनि आवेशीं[५] ॥ जयविजयांशीं शापिलें ॥ १३ ॥ सज्ञानाची ऐशी स्थिती ॥ मा इतरांची कोण गणती ॥ ०परापराध सहन शांती ॥ दुर्लभ त्रिजगतीं गोविंदा ॥ १४ ॥ प्रकृति निजगुणीं सबळ ॥ ते अल्पें क्षोभवी तत्काळ ॥ साधु सज्जन केवळ ॥ करी विकळ अशांती ॥ १५ ॥ ज्यासि तुझी पूर्ण भक्ति घडे ॥ त्यासि त्या तुझी पूर्ण कृपा जोडे ॥ जो तुझे चरणीं अखंड जडे ॥ त्याशीच घडे हे शांती ॥ १६ ॥ तूं विश्वात्मा त्रिजगतीं ॥ चोरी नचले तुजप्रती ॥ मज हीं द्वंद्वें नसाहवती ॥ तूंही श्रीपती जाणशी ॥ १७ ॥ परम पावन निजशां-ती ॥ अतिनिंद्य ते अशांती ॥ ऐसें व्याख्यान जे ज्ञाते करिती ॥ तेही नसाहती द्वंद्वांतें ॥ १८

१ प्रतिपादन करितात. २ तें नव्हे, तें नव्हे. ३ इतका त्रास व छल मढें सहन करील, जीवंत मनुष्य सहन करणार नाहीं. ४ शृंगीनामक ऋषीचे. ५ त्वेषानें.

*मो. दुस्तर होय. ×मो. जे अपरोक्षवादें थोंटावती. ✻ना. महाबाध. 0मो. लागतां. +मो. तेही क्रमें साहती अल्पता. ०मो. परापराध साहणें निजशांतीं.

द्वंद्वें दुःसह सर्वार्थीं ॥ तेथें माझा पाड किती ॥ एवं द्वंद्वसहिष्णुतेची युक्ती ॥ मज कृपामूर्ती सांगावी ॥ १९ ॥ सकल साधनें वश्य होती ॥ परी हे सहिष्णुता नये चित्तीं ॥ ते मी लाभें निजशांती ॥ ऐशी कृपा निश्चितीं करावी ॥ ६२० ॥ मी लाभें शांतीचें कल्याण ॥ ऐशी कृपा करावी परिपूर्ण ॥ ह्मणोनि धरिले श्रीचरण ॥ उद्धवें आपण निजभावें ॥२१॥ ऐकोनि उद्धवाची विनंती ॥ संतोषला कृपामूर्ती ॥ जेवीं चातकाचिया तृषार्तीं ॥ गर्जोनि त्रिजगती निववी मेघ ॥ २२ ॥ तेवीं भक्तवचनासरिसा ॥ उल्हासला श्रीकृष्ण कैसा ॥ उद्धवाचिया निजमानसां ॥ शांतीचा ठसा घालील ॥ २३ ॥ उद्धवप्रश्नाचें प्रश्नोत्तर ॥ उदार सुंदर गुणगंभीर ॥ घडोनि शांतीचें भांडार ॥ स्वयें सारंगधर सांगेल ॥ २४ ॥ नवल सांगती ते देवं ॥ युक्तिचातुर्य वैभव ॥ निजशांतीस पडे खेंव ॥ ऐसें अपूर्व सांगेल ॥ २५ ॥ श्रीकृष्णमुखींची ज्ञानोक्ती ॥ ऐकतां स्वयंभ प्रकटे शांती ॥ ते ऐकावया उद्धव चित्तीं ॥ जाहला निश्चितीं सावध ॥ २६ ॥ जेवीं गजग्रहणाविखीं पंचानन ॥ साटोप धरी आपण ॥ तेवीं शांति साधावया जाण ॥ सावधान उद्धव ॥ २७ ॥ जळीं तळपतांचि मासा ॥ कवडा झेलूनि ने आकाशां ॥ तेवीं शांतीचिया *आमिषा ॥ उद्धव तैसा तळपत ॥ २८ ॥ तें भिक्षुगीतनिरूपण ॥ पुढिले अध्यायीं श्रीकृष्ण ॥ निजशांति बाणे संपूर्ण ॥ तेंचि लक्षण सांगेल ॥ २९ ॥ ज्यांसि परमार्थाची चाड ॥ तिहीं सांडूनि साधनकावाड ॥ शांतिश्रवणीं श्रद्धा वाढ ॥ अतिदृढ राखावी ॥ ३० ॥ श्रीकृष्ण सांगेल शांति पूर्ण ॥ उद्धव तया अर्थी सावधान ॥ एका विनवी जनार्दन ॥ श्रोतां अवधान मज द्यावें ॥ ३१ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां द्वाविंशतितमोऽध्यायः ॥ २२ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ मूळ श्लोक ॥६०॥ ओंव्या ॥ ७३१ ॥ एकुणसंख्या ॥ ७९१ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

# अध्याय तेविसावा.

श्रीगणेशाय नमः॥श्रीकृष्णपरमात्मने नमः॥ओंनमो सद्गुरुचित्स्वरूप॥विश्वा सबाह्य तूं विश्वरूप॥तुझें निर्धारितां रूप॥ तूं अरूप अव्यय ॥१॥ चराचर जें सावेव॥तें तुज अरूपाचे अवयव ॥ जीव शिव हे तुझी मावें ॥ अद्वयवैभव पैं तुझें ॥ २ ॥ घृतपुतळी दिसे साकार ॥ घृतपणें तेचि निराकार ॥ तैसा तूं अव्यय अक्षर ॥ जगदाकार भाससी ॥ ३ ॥ ठसावलें जें दिसे जग ॥ तें निर्धारितां तुझें अंग ॥ अंग पाहतां तूं अनंग ॥ अनंगाचा माग तुजमाजीं नाहीं ॥ ४ ॥ जें देखिजे तें तूं नव्हसी ॥ नव्हे तें तूंचि होसी ॥ होणें न होणें नाहीं तुजपाशीं ॥ **ऐसा तूं जगासी जगद्गुरु ॥ ५ ॥ शब्द तुजहूनि दुरी ॥ तूं शब्दा सबाह्याभ्यंतरीं ॥ बोलका तूं चराचरीं ॥ वेदशास्त्रीं तूं वक्ता ॥ ६ ॥ उंसापासूनि गोडी दिसे ॥ उसा सबाह्य गोडीचि असे ॥ गोडियेमाजीं ऊंस नसे ॥ वेदासि तुज तैसें सौजन्य ॥ ७ ॥ वेदांचा वक्ता तूंचि होसी ।

१ मला प्राप्त होईल. २ सांगण्याची रीती. ३ दिसतांच चकाकतांच. ४ पक्षिविशेष. ५ अमिषार्थ ६ दृढ. ७ निर्णीत करितां. ८ साकार. ९ माया. १० क्षर ह्मणजे भूतें त्यांरहित. ११ कामाचा.

*मो. आंविसा. **ना. तो तूं जगेंसी जगद्रूप.

दीं प्रतिपादिजे तुह्मासी ॥ शेखीं वेदांसि नकळसी ॥ निःशब्दवासी गुरुराया ॥ ८ ॥ जेवीं ां अनाहताचा ध्वनी ॥ असे ध्वनिमात्रीं मिळोनी ॥ तो अनाहत वाजविजे जनीं ॥ ऐसें हीं कोणी वाजंत्र ॥ ९ ॥ तेवीं तूं वेदांचा वक्ता ॥ सकळशास्त्रां युक्तिदाता ॥ परी वेदशास्त्र-मता ॥ तुज तत्त्वतां न बोलवे ॥ १० ॥ *ह्मणोनि तूं केवळ निःशब्द ॥ तंव निःशब्द आणि सशब्द ॥ हाही मायिक अनुवाद ॥ तूं एवंविधे न कळसी ॥ ११ ॥ तूं न कळसी तत्त्वतां ॥ शिया युक्तींचा तूंचि ०ज्ञाता ॥ +ज्ञाताचि हें स्थापूं जातां ॥ तंव अज्ञानता असेना ॥ १२ ॥ थ अज्ञानताचि नाहीं ॥ तेथ ज्ञातेपण कैचें कायी ॥ होकां मुख्यत्वें नोवरीचि नाहीं ॥ तें वरा पाठी ह्मणे कोण ॥ १३ ॥ तूं ज्ञाता ना अज्ञाता ॥ तूं बोलता ना नबोलता ॥ तूं बहु ा एकुलता ॥ तुझी अलक्ष्यता लक्षेना ॥१४॥ तूं ²निःशब्द निर्विकार ॥ तूं निर्गुण निरहंकार ॥ ही ह्मणतां पडे विचार ॥ तूं जगदाकार जगदात्मा ॥ १५ ॥ जगदाकारें तूं प्रसिद्ध ॥ तेथ णाचें कोणा बाधे द्वंद्व ॥ परचि नाहीं मा परापराध ॥ अतिविरुद्ध कोणासी ॥ १६ ॥ यापरी ी सद्गुरुनाथा ॥ ❀तुझे चरणीं द्वंद्वसमता ॥ तेणें समसाम्यें निजकथा ॥ श्रीभागवता ालविसी ॥ १७ ॥ तेंचि श्रीभागवतीं ॥ बाविसावे अध्यायाचे अंतीं ॥ उद्धवें पुशिली निज-ांती ॥ द्वंद्वसमाप्ती उपावो ॥ १८ ॥ उद्धवें प्रश्न केला वाड ॥ जेणें *ब्रह्मज्ञानाची पुरे चाड ॥ ो श्रीशुकासि लागला गोड ॥ तेणें पुरे कोड परीक्षितीचें ॥ १९ ॥ ऐकोनि उद्धवाची श्नोक्ती ॥ शुक सुखावला 6आनंदस्फूर्ती ॥ तो ह्मणे सावध परीक्षिती ॥ तुष्टला श्रीपती उद्ध-ासी ॥ २० ॥ ब्रह्मज्ञानाची निर्वाणस्थिती ॥ ते जाण पां मुख्यत्वें शांती॥ते उद्धवें पुशिली अ-तेप्रीतीं ॥ तेणें श्रीपती संतोषला ॥ २१ ॥ तो शांति आणि निवृत्ती ॥ सांगेल चौंअध्यायों-ी ॥ ऐक राया सुमती ॥ ते मी तुजप्रती सांगेन ॥ २२ ॥ ऐक पांडवकुलदीपका ॥ 1कौरव ुळीं कुलतिलका ॥ तूं शांतीसि अधिकारी निका ॥ निजात्मसुखा साधक ॥ २३ ॥ साधा-या ब्रह्मप्राप्ती ॥ तूं त्यक्तोदक श्रवणार्थी ॥ यालागीं शांति आणि निवृत्ती ॥ ऐकें नृपती हरि ांगे ॥ २४ ॥ तेविसावे अध्यायीं निरूपण ॥ दुर्जनीं क्षोभविलें मन ॥ त्या मनासि ये क्षमा ूर्ण ॥ तेंचि श्रीकृष्ण सांगेल ॥ २५ ॥ भिक्षुगीतसंरक्षण ॥ तें मनोजयाचें लक्षण ॥ प्रकृति ज-याचें निरूपण ॥ सांगेल संपूर्ण चोविसावा ॥ २६ ॥ सांगोनि त्रिविध तिन्ही गुण ॥ 4लक्ष-वील निजनिर्गुण ॥ हें गुणजयाचें निरूपण ॥ सुलक्षण पंचविसावा ॥ २७ ॥ सव्विसावा अ-ध्यावो येथ ॥ तो धडधडीत 8विरक्त ॥ सांगोनियां ऐलंगीत ॥ स्त्रियादि समस्त विषयत्याग ॥ २८ ॥ गुण विषय प्रकृति मन ॥ या चहूंचें समाधान ॥ चहूं अध्यायीं विशद जाण ॥ स्व-मुखें श्रीकृष्ण सांगेल ॥ २९ ॥ यापरी परीक्षितीस जाण ॥ करोनियां सावधान ॥ श्रीशुक योगींद्र आपण ॥ कथालक्षण निरूपी ॥ ३० ॥

---

१ या प्रकारचा, असा. २ उत्तम व्यापक. ३ शेवटची, पराकाष्ठेची. ४ चार अध्यायांत. ५ योग्य. ६ सहनशीलता, वैराग्य. ७ जतन, निगा, जपणें. ८ बुधापासून इलेच्या ठिकाणीं झालेला पुरूरवा त्याचें गीत.

*ना. ह्मणो. ×मो. शब्द. ०ना. दाता. +ना. ज्ञानचि. ²मो. निष्टंक निर्विकार. ❀मो. तुझे चरणीं ठेऊनि माथा. *मो. ब्रह्मज्ञानाचें पुरे कोड. 6मो. चित्तीं. 1ना. कुळनायका. 4मो. लक्ष विलक्ष निजनिर्गुण. 8मो. वैराग्य विरक्त.

॥ श्लोक ॥ बादरायणिरुवाच ॥ स एवमाशंसित उद्धवेन भागवतमुख्येन दाशार्हमुख्यः ॥ सभाजयन् भृत्यवचो मुकुंदस्तमाबभाषे श्रवणीयवीर्यः ॥ १ ॥

॥ टीका ॥ शुक ह्मणे परीक्षिती ॥ ऐकोनि उद्धवाची विनंती ॥ वचनें संतोषला श्रीपती ॥ ते उद्धवासी प्रीतीं संबोधी ॥३१॥ कोटिजन्मांतीं केवळ ॥ द्विजत्व पाविजे सत्कुळ ॥ हें महा पुण्याचें निज फळ ॥ तें सफळ तेंचि निष्फळ हरिभक्तिविण ॥ ३२ ॥ सदा सफळ आंब्याचा रूंख ॥ त्यावरी उपजे कांवरुख ॥ तो सफळींहि निष्फळ देख ॥ तैसे उत्तम लोक भजनेंवीण ॥ ३३ ॥ ते स्थिती नाहीं उद्धवापाशीं ॥ उत्तम जन्म यादववंशीं ॥ *सभासदता आल्याही हातासी ॥ श्रीमैंदासी भुलेचिना ॥ ३४ ॥ झालियाही राज्यसंपत्ती ॥ जो ※विसंबेना भगवद्भक्ती ॥ भागवतमुख्यत्वाची प्राप्ती ॥ त्यासीच निश्चितीं महाराजा ॥ ३५ ॥ सगुण सुंदर पतिव्रता ॥ अनुकूल मिनलिया कांता ॥ जो विसंबेना भगवत्पथा ॥ भागवत मुख्यता यानांव ॥ ३६ ॥ इहीं गुणीं अतियुक्त ॥ विवेकेंसी अतिविरक्त ॥ श्रीकृष्णचरणीं अनुरक्त ॥ मुख्य भागवत उद्धव ॥ ३७ ॥ वयें धनें जें श्रेष्ठपण ॥ तें श्रेष्ठत्व अतिगौण ॥ भगवत्प्राप्ती श्रेष्ठ जाण ॥ तेणें भाग्यें परिपूर्ण उद्धव ॥ ३८ ॥ जो श्रीकृष्णाचा विश्वासी ॥ कृष्ण एकांत करी ज्यासी ॥ गुह्य ज्ञान सांगे ज्यापाशीं ॥ त्याच्या भाग्यासी केवीं वानं ॥ ३९ ॥ परब्रह्म जें कां साक्षात् ॥ तें उद्धवासि झालें हस्तगत ॥ त्याच्या बोलामाजीं वर्तत ॥ भाग्यें भाग्यवंत तो एक ॥ ४० ॥ उद्धवभाग्य वानित वानित ॥ शुक झाला सद्गदित ॥ स्वानंदें वोसंडला तेथ ॥ ठेला तटस्थ महासुखें ॥ ४१ ॥ उद्धवभाग्याचा उद्रेकें ॥ सांगतां वोसंडला श्रीशुक ॥ तें देखोनि कुरुनायक ॥ जाहला आत्यंतिक विस्मित ॥ ४२ ॥ ज्याचें निजभाग्य सांगतां ॥ श्रीशुकासिही होतसे अवस्था ॥ उद्धव भाग्याचा सर्वथा ॥ मजही तत्त्वतां मानला ॥ ४३ ॥ तंव शुक ह्मणे रायासी ॥ परमभाग्य तें उद्धवासी ॥ तेणें विनवितां हृषीकेशी ॥ वचनमात्रेंसी तुष्टला ॥ ४४॥ उद्धवास शांतीची चाड ॥ तो प्रश्न श्रीकृष्णासि झाला गोड ॥ त्याचें पुरवावया कोड ॥ निरूपण वाड सांगेल ॥ ४५ ॥ परमशांतीचा अधिकारी ॥ तूंचि एक निजनिर्धारीं ॥ ऐसें उद्धवा प्रेमेंपुरःसरीं ॥ शांति श्रीहरी सांगत ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ बार्हस्पत्य स वै नात्र साधुर्वै दुर्जनेरितैः ॥ दुरुक्तैर्भिन्नमात्मानं यः समाधातुमीश्वरः ॥ २ ॥

॥ टीका ॥ उद्धवा तूं जें बोलिलासी ॥ मीही सत्य मानीं ×त्यासी ॥ दुर्जनीं केल्या अपमानासी ॥ सहावया कोणासी शांति नाहीं ॥ ४७ ॥ देव पादुका वाहती शिर्शी ॥ मुख्य इंद्र लागे ज्याच्या पायांसी ॥ अष्ट महासिद्धि ज्याच्या दासी ॥ ब्रह्मज्ञान ज्यापाशीं वचनांकित ॥ ४८ ॥ ऐसा देवगुरु बृहस्पती ॥ त्याचा शिष्य तूं विवेकमूर्ती ॥ यालागीं शांतीच्या साधक युक्ती ॥ तूंचि निश्चितीं जाणसी ॥ ४९ ॥ शांति आकळावयां उद्धवासी ॥ आदरें सत्कारी

---

१ वृक्ष. २ बांडगूळ. ३ ऐश्वर्यमदास. ४ ईश्वरमार्गास. ५ वचनांत. ६ शब्दरहित. ७ अतिशयता. ८ परीक्षिति. ९ तीव्र उत्कंठा. १० वाटतो. ११ उद्धवाच्या प्रेमास्तव. १२ मस्तकावर. १३ समजावयास.

*मो. सभाग्य सदयता आल्याही. ※मो. विसरेना. ×मो. त्या वचनासी.

हृषीकेशी ॥ अनुमोदूनि त्याचे बोलासी ॥ शुद्धशांतीसी हरी सांगे ॥ ५० ॥ निंदा अवज्ञा हे- ळण॥ दुर्जनीं दिधल्या अपमान ॥ हें साहे तो ईश्वर जाण ॥ निजबोधें पूर्ण तो मद्रूप ॥ ५१ ॥ ज्यासि सर्वभूतीं निजात्मता ॥ दृढ बाणलीसे तत्त्वतां ॥ तोचि दुर्जनाचिया आघाता ॥ साहे सर्वथा यथासुखें ॥ ५२ ॥ जो स्वयें होय अवघें जग ॥ त्यासि लागतां उपद्रव अनेग ॥ उठे- ना क्रोधाची लगबग ॥ साहे अनुद्वेग यथासुखें ॥ ५३ ॥ निजांगीं लागतां निजकर ॥ तुटे क्रोधद्वेषांचा उद्गार ॥ निजात्मा जो देखे चराचर ॥ शांति त्याचें घर स्वयें रिघे ॥ ५४ ॥ उद्ध- वा ऐसा ज्यासि निजबोधू ॥ त्यासि ह्मणिजे सत्य साधू ॥ तोचि साहे पराचा अपराधू ॥ *शांतिनिजशुद्ध तो एक ॥५५॥ नेणोनियां निजबोधातें ॥ इतर जे सज्ञान ज्ञाते ॥ ते न साह- ती द्वंद्वातें ॥ ऐकें तूतें सांगेन ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ न तथा तप्यते विद्धः पुमान्बाणैः सुमर्मगैः ॥ यथा तुदंति मर्म- स्था ह्यसतां परुषेषवः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ तिखयाचे +अतितिखट बाण ॥ जेणें घायें होती विकळ प्राण ॥ त्याहूनि दुर्जना- चे वाग्बाण ॥ अधिक जाण रुपती ॥ ५७ ॥ लोहाचे बाण जेथ लागती ॥ तेचि अंगें व्यथित होती ॥ परी वाग्बाणांची अधिक शक्ती ॥ घायें भेदिती पूर्वज ॥ ५८ ॥ लोहबाणाचे लागलि- या घायें ॥ ते ×पानपाल्या व्यथा जाये ॥परी वाग्बाण रुपल्या पाहे ॥ तें ०शल्य राहे जन्मां- त ॥ ५९ ॥ वर्मस्पर्शाचें बांसटें जाण ॥ विंधितां निंदेचे वाग्बाण ॥ तेणें भेदितांचि अंतःकर- ण ॥ सर्वांगीं पूर्ण भडका उठी ॥ ६० ॥ दुर्जनाचिया दुरुक्ती ॥ अपमानाची ❁उद्धती ॥ सा- हावयालागीं शांती ॥ नव्हे निश्चितीं प्राकृतां ॥ ६१ ॥ ऐशिया रीतीं यथोचित ॥ उद्धवाचें म- नोगत ॥ संरक्षूनि श्रीकृष्णनाथ ॥ शांतीचा निश्चितार्थ सांगोंपाहे ॥ ६२ ॥ पूर्वीं सांगीतलें निजशांतीसी ॥ वेगीं साधी 0ह्मणे उद्धवासी ॥ ते अटक वाटेल तयासी ॥ अतिसंकोचासी पावेल ॥ ६३ ॥ होतें उद्धवाचे मानसीं ॥ हे शांति असाध्य सर्वांसी ॥ जाणोनियां हृषीकेशी॥ सांगे इतिहासेंसी भिक्षुगीत ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ कथयंति महत्पुण्यमितिहासमिहोद्धव ॥ तमहं वर्णयिष्यामि नि- बोध सुसमाहितः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ अशांति 1क्षोभाचे चित्तमळ ॥ क्षाळावया जी तत्काळ ॥ इतिहासगंगा केवळ ॥ अतिनिर्मळ कृष्णोक्ती ॥ ६५ ॥ श्रीकृष्णवदनब्रह्माद्रीं ॥ श्रीभागवतऔदुंबरीं ॥ जन्मली शांति गोदावरी ॥ 9निजमूळाकारीं निर्मळ ॥ ६६ ॥ 4तें गुप्त ओघें नारदगती ॥ उद्वोध गंगाद्वा- रीं व्यासोक्ती ॥ तेचि शुकमुखकुशावर्ती ॥ प्रकटे अवचितीं 6पवित्रपणें ॥ ६७ ॥ तया पवित्र ओघाचिये गती ॥ श्रद्धाधृतीसमरसे भक्ती ॥ त्याचि अरुणा, वरुणा, सरस्वती ॥ हे संगम-

१ तडाक्यास. २ अनेक. ३ पोलादाचे. ४ मर्मभेदक व कठोर भाषणें. ५ वनस्पतिवगैरे ओषधींनें. ६ कालकूट, बाणाग्रींचें विष. ७ ध्यानांत ठेऊन. ८ एका संन्याशाचें गीत. ९ प्रकटपणा.

*ना. शांती ह्मणे शुद्ध. +ना. अतितीक्ष्ण. ×ना. मो. पानपल्या. ०ना. सल. ❁मो. उद्गती. 0मो. ह्मणावें. 1ना. क्षोभ चित्ताचे मळ. 9मो. निजमूळ करी. 4मो. तो गुप्त ओघ नारदगती. 6ना. प्रकटपणें.

प्राप्ती जेथ होय ॥ ६८ ॥ तेणें शांतिगंगेची स्थिती ॥ भरूनि *उथळे अतिउन्नती ॥ तेथ श्रवणार्थी बुडी देती ॥ ते पवित्र होती निजक्षमा ॥ ६९ ॥ ते शांतिगंगा अतिविख्यात ॥ उद्धव करावया पुनीत ॥ प्रकट करी श्रीकृष्णनाथ ॥ भिक्षुगीतविन्यासें ॥ ७० ॥

॥ श्लोक ॥ केनचिद्भिक्षुणा गीतं परिभूतेन दुर्जनैः ॥ स्मरता धृतियुक्तेन विपाकं निजकर्मणाम् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ उद्धवा कोणी एक संन्यासी ॥ दुर्जनीं उपद्रवितां त्यासी ॥ ह्मणे 'क्षयो होय दुष्टकर्मासी' ॥ येणें संतोषें मानसीं क्षमावंत ॥ ७१ ॥ आपुले अंगींचे मळ ॥ पुढिलीं क्षाळितां सकळ ॥ जो क्रोधेंसि करी तळमळ ॥ तो मूर्ख केवळ आत्मघाती ॥ ७२ ॥ लोक ह्मणती ज्यासि दुर्जन ॥ संन्यासी ह्मणे ते माझे सज्जन ॥ माझ्या दोषांचें निर्दळण ॥यांचेनि धर्में जाण होतसे ॥ ७३ ॥ संमुखें कोणी निंदा करिती ॥ तेणें अत्यंत सुखावे चित्तीं ॥ ह्मणे मज तुष्टला श्रीपती ॥ पापाची निवृत्ती सहजें होय ॥ ७४ ॥ ऐसेनि विवेकें तत्त्वतां ॥ शांतीसि ढळोंनेदी सर्वथा ॥ चढोनि ×निजधैर्याचे माथां ॥ गायिली गाथा ते ऐक ॥ ७५ ॥ उद्धवासि ह्मणे श्रीकृष्णनाथ॥ये अर्थी होई सावचित्त॥अतिलोभी तो अतिविरक्त॥झाला तो वृतांत सांगेन॥७६॥

॥ श्लोक ॥ अवंतिषु द्विजः कश्चिदासीदाढ्यतमः श्रिया ॥ वार्तावृत्तिः कदर्यस्तु कामी लुब्धोऽतिकोपनः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ मालवदेशीं अवंतीनगरीं ॥ तेथ ब्राह्मण वसे गृहदारीं ॥ कृषिवाणिज्यवृत्तीवरी ॥ जीविका करी निरंतर ॥ ७७ ॥ गांठीं धनधान्यसमृद्धी ॥ अमर्याद ❀द्रव्यसिद्धी ॥ परी अतिशयें कृपणबुद्धी ॥ पोटाही त्रिशुद्धी नखाय ॥ ७८ ॥ पोटां सदा खाय कदन्न ॥ तेहीं नाहीं उदरपूर्ण ॥ तेथ स्त्रीपुत्रादिदासीजन ॥ जठरतर्पण न पावती ॥ ७९ ॥ न करी नित्यनैमित्य ॥ स्वप्नीं नेणे धर्मकृत्य ॥ देव ब्राह्मण अतिथी तेथ ॥ सदा जात पराङ्मुख ॥८०॥ कवडी एक लाभू पाहे ॥ तें पित्याचें श्राद्ध जरी आहे ॥ तें सांडूनि अंत्यजगृहा जाये ॥ नमनी भय स्पर्शाचें ॥ ८१ ॥ मी उत्तम हा हीनवर्ण ॥ हे धनलोभें गिळी आठवण ॥ हातां येतां देखोनि धन ॥ स्वीकारी अन्न पतिताचें ॥ ८२ ॥ धनकामासाठीं देख ॥ न मनी पाप महादोख ॥ कवडीच्या लोभें केला मूर्ख ॥ नाठवे नरक महापात ॥ ८३ ॥ यापरी तो कर्मभ्रष्ट ॥ अकर्म करी क्रियादुष्ट ॥ अतिवंचक महाशठ ॥ केवळ नष्ट धनलोभी ॥ ८४ ॥ त्या धनलाभाचा अवरोध ॥ होतां देखोनि खवळे क्रोध ॥ गोहत्यादि ब्रह्मवध ॥ करावया सिद्ध स्वयें होय ॥ ८५ ॥ धनकामीं क्रोधाची वस्ती ॥ धनापाशीं पापें असती ॥ धनलोभी ज्याची स्थिती ॥ कदर्यवृत्ती त्यानांव ॥८६॥ ऐसें धन सांचिलें कोडीवाडें ॥ त्याचाही व्यय जैं करणें पडे ॥ तें प्राणांतचि येऊनि घडे ॥ विचार पुढें +असेना ॥ ८७ ॥ वानराचे गालींचे चणे ॥ हातां नयेती जितां प्राणें ॥ तैसा द्रव्याचा व्ययो करणें ॥ तेंचि मरण कदर्या ॥ ८८ ॥

१ शांति हीच गंगा तिची. २ प्रतिपादन, निरूपण. ३ लोकांनीं. ४ धुतले असतां. ५ समक्ष. ६ गाणें. ७ निर्वाह. ८ वाईट अन्न. ९ पोटभर. १० उदरतृप्ति. ११ अन्नावांचून माघारे विमुख. १२ त्या दिवशीं १३ कृपणपणा. १४ अनेक खटपटींनें. १५ वानरानें आंतून गालफाडांत धरलेले. १६ कृपणास.

*मो. उलथे. ×ना. निजधर्माचे. ❀ना. द्रव्य साधी. +मो. सुचेना.

॥ श्लोक ॥ ज्ञातयोऽतिथयस्तस्य वाङ्मात्रेणापि नार्चिताः॥ शून्यावसथ आत्माऽपि काले कामैरनार्चितः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ घरींचा भात वेंचेल कांहीं ॥ यालागीं वैश्वदेव करणेंचि नाहीं ॥ तेथ अतिथि आलिया पाहीं॥ कोण सभर्यीं कोण पूजी ॥ ८९ ॥ अतिथि आलिया जाण ॥ ऐसे बोल बोले आपण ॥ जे वचनमात्रेंच जाती प्राण ॥ त्यासि मागे कोण अन्नोदक ॥ ९० ॥ देखोनि त्याचिया घरासी ॥ ब्रह्मचारी नित्य उदासी ॥ आशा त्यजिली संन्यासीं ॥ जेवीं राजहंसीं गोमयें ॥ ९१ ॥ भिकारीं सांडिलें त्याचें घर ॥ अतिथी डावलिलें निरंतर ॥ पाहुणा दूरी पाहे बिढार ॥ निराशी पितर सर्वदा ॥ ९२ ॥ दारा न ये कोरान्नेंकर ॥ घर सोडूनि गेले उंदीर ॥ काउळीं वोसंडिलें तें घर ॥ चिडिंया चारा नमिळे दाणा ॥ ९३ ॥ मुंग्यांसि पडे नित्य लंघन ॥ तिहीं धरिलें बिढार आन ॥ पोटें नखाय जो आपण ॥ तेथ कथा कोण इतरांची ॥ ९४ ॥ अत्यंत भूक लागल्या पोटीं ॥ चणेही न खाय जेगजेठी ॥ तेथ कायसी सेवकांची गोठी ॥ *काळजी पोटीं स्त्री पुत्रा ॥९५ ॥ जें वमन घडे त्यासी ॥ तें न करी फळाहारासी ॥ अधिक वेंचूं कोण सोशी ॥ यालागीं उपवासी स्वयें पडे ॥ ९६ ॥ तेथ कुळगुरूचा सन्मान ॥ कुळधर्म गोत्रभोजन ॥ त्याही जांवई यांसी वोगमान ॥ धनलोभें जाण कदा नकरी ॥ ९७ ॥ ऋतुकाळें फळें येती पूर्ण ॥ त्यांसि दृष्टिभेटी हाटीं जाण ॥परी जिव्हेसि आलिंगन ॥ प्राणांतीं आपण हों नेदी ॥ ९८ ॥ मातेचें स्तनपान सेविलें ॥ तेंचि क्षीर रसनीं चाखिलें ॥ पुढें दुधचि वर्जिलें ॥ व्रत धरिलें धनलोभें ॥ ९९ ॥ रस रसनेचें माहेर ॥ तेणें वीण ते गादेली थोर ॥ धनलोभ अतिनिष्ठुर ॥ करितां करकर भेटोंनेदी ॥ १०० ॥ वस्त्रें मळकीं अतिजीर्ण ॥ मस्तक सदा मलिन ॥ मुखीं वाख निघती जाण ॥ स्वप्नींही पान न खाय ॥ १ ॥ सणवार दिवाळी दसरा ॥ तें जुने जोंधळे धाडी घरा ॥ अन्नेंवीण पीडी लेंकरां ॥ कदर्यु खरा यानांव ॥ २ ॥ धनलोभी धर्महीन ॥ देखोनि कदर्युवर्तन ॥ विमुख झाले स्वजन ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ दुःशीलस्य कदर्यस्य द्रुह्यंते पुत्रबांधवाः ॥ दारा दुहितरो भृत्या विषण्णा नाचरन् प्रियम् ॥ ८ ॥

॥ टीका ॥ नाहीं स्वधर्मीं निजशीळ ॥ दानधर्म खुंडी सकळ ॥ अत्यंत धनलोभी केवळ ॥ त्यासि दुःशीळ बोलिजे ॥ ४ ॥ अन्नआच्छादनेंवीण ॥ कुटुंबेंसहित आपण ॥ जो कदर्थवी निजप्राण ॥ कदर्यु पूर्ण त्यानांव ॥ ५ ॥ कदर्युनरासी तंव देख ॥ मुख्य स्त्री होय विमुख ॥ स्वजन आणि सेवक ॥ पुत्रही पराङ्मुख होती त्यासी ॥ ६ ॥ आपले जे कां सखे बंधू ॥ तेही करूं लागती विरोधू ॥ द्रव्यविभागाचा संबंधू ॥ कलह सबद्ध आरंभे ॥ ७ ॥ गांठीं असोनि अमितें धन ॥ नकरी ×माहेर बोलवणें ॥ कन्या क्षोभोनियां जाण ॥ शाप दारुण त्या

१ केवळ बोलण्यानेंच. २ शेण. ३ भिक्षेकरी. ४ चिमण्यास. ५ स्वतां मालक. ६ खर्च. ७ डोळ्यानें पाही, खातनसे, कारण पैसे पडतील. ८ बाजारांत. ९ तेवढें काय तें. १० जिभेनें. ११ गांजली, विटली. १२ तोडी, बंदकरी. १३ कष्टवितो. १४ बहुत.

*मो. काजळी पोटीं स्त्रीपुत्रांची. ×ना. माहेर सुन बोळवण.

देती ॥ ८ ॥ गोत्रज सदा चिंतित ॥ हा मरे तैं जेवूं दूधभात ॥ आम्हा ते झाले अनाम्हा ॥ अवघे अनहित वांछिती ॥ ९ ॥ जयाचिया द्रव्यासि जाण ॥ नाहीं धर्माचें संरक्षण ॥ तें काळेंचि होय क्षीण ॥ तेंचि लक्षण हरि सांगे ॥ ११० ॥

॥ श्लोक ॥ तस्यैवं यक्षवित्तस्य च्युतस्योभयलोकतः ॥ धर्मकामविहीनस्य चुक्रुधुः पंचभागिनः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ खाय जेवीं ना लावी हात ॥ ठेव्यापाशीं जैसें भूत ॥ तैसं याचें यक्षवित्त ॥ असे राखत ग्रेह जैसा ॥ ११ ॥ केवळ *धर्मकामरहित ॥ धनलोभी जैसें भूत ॥ त्या नांव बोलिजे यक्षवित्त ॥ जीवाहून आप्तें अर्थ मानी ॥ १२ ॥ स्वशरीरीं भोग नाहीं जाण ॥ तेणें इहलोक झाला शून्य ॥ नाहीं स्वधर्मकर्म पंचमहायज्ञ ॥ परलोक शून्य तेणें झाला ॥ १३ ॥ यज्ञाचे पंच विभागी ॥ यज्ञभाग नपवे त्यांलागीं ॥ ते कोपोनियां पंचविभागी ॥ वित्तनाशालागीं उद्यत ॥ १४ ॥ पावोनि ब्राह्मणजन्म वरिष्ठ ॥ धनलोभें स्वधर्मनष्ट ॥ तो होय उभयलोकभ्रष्ट ॥ पावे कष्ट कृपणत्वें ॥ १५ ॥ करितां अति आयास ॥ जोडला अर्थ बहुवस ॥ त्यासि अधर्मे आला नाश ॥ तोही विलास हरि सांगे ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ तदवध्यानविस्रस्तपुण्यस्कंधस्य भूरिद ॥ अर्थोऽप्यगच्छन्निधनं बह्वायासपरिश्रमः ॥ १० ॥

॥ टीका ॥ पंचयज्ञदेवता सकळ ॥ येणें उपेक्षिल्या केवळ ॥ +तेंही द्रव्यलाभाचें पुण्य मूळ ॥ पुण्यक्षयें तत्काळ छेदिलें ॥ १७ ॥ द्रव्यप्राप्तिपुण्यदिवाकर[५] ॥ अस्तमाना गेला तो भास्कर ॥ मग द्रव्यलोभाचा ×अंधकार ॥ ०अधर्मे थोर दाटला ॥१८॥ प्रयासें संचिली संपत्ती ॥ तीसि ✻अधर्माची ये राती ॥ क्षोभल्या पंचधा यज्ञमूर्ती ॥ पंचधा पावती महानाश ॥ १९ ॥ जो सुखी न करी कुटुंबालागीं ॥ जो निजात्मा निववीना भोगीं ॥ जो द्रव्य न वेंची धर्मालागीं ॥ त्यासि पंचविभागी उठती ॥ १२० ॥ दायाद चोर राजा आगी ॥ अधर्मे रोग संचरे अंगीं ॥ हे पांचजण विभागी ॥ द्रव्यनाशालागीं *पावती ॥ २१ ॥ नाहीं द्विजपूजा श्रद्धायुक्त ॥ नाहीं लौकिक क्रिया उचित ॥ नाहीं दानादि धर्म वेदोक्त ॥ द्रव्यक्षयो तेथ अवश्य ॥ २२ ॥ जेथ नाहीं वडिलांसि सन्मान ॥ जेथ नाहीं पंचमहायज्ञ ॥ जेथ गुरूसि करिती अभिमान ॥ तेथ क्षयो जाण उद्धवा ॥ २३ ॥ ज्यांसि परांचा द्वेष सदा ॥ जे बोलती परापवादा ॥ जे चढती 8धनगर्वमदा ॥ तेथ क्षयो सदा उद्धवा ॥ २४ ॥ त्याच्या द्रव्यक्षयाचें लक्षण ॥ ग्रंथाधारें निरूपण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ दयाळू पूर्ण निजभक्तां ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ ज्ञातयो जगृहुः किंचित् किंचिद्दस्यव उद्धव ॥ दैवतः कालतः किंचित्ब्रह्मबंधोर्नृपार्थिवात् ॥ ११ ॥

---

१ शत्रु. २ उपयोग मुळींच न करितां फक्त रक्षण केलेलें द्रव्य. ३ पिशाच. ४ आवडता. ५ सूर्य. ६ भाऊबंद. ७ आग. ८ दुसऱ्याचे दोष.

*मो. कर्मकामरहित. +ना. तिही द्रव्यलोभियाचें पुण्य समूळ. ×ना. अहंकार. ०ना. अधर्मे. ✻मो. अधर्मे ये अंधाराची राती. *मो. प्रवर्तती. 8मो. गर्वमदा.

॥ टीका ॥ स्त्री पुत्र होऊनि एक ॥ तिहीं ठेवा नेला कित्येक ॥ गोत्रज मिळोन सकाळिक ॥ बलात्कारें देख वांटा नेला ॥ २६ ॥ चोरीं फोडोनियां घर ॥ काढूनि नेलें भांडार ॥ आगी लागोनियां घर ॥ वस्तु अपार जळाल्या ॥२७॥ *हिंसाळ्यानें गेलें शेत ॥ प्रवर्त बुडाला जे-थिचा तेथ ॥ विश्वासू ठेवा घेऊनि जात ॥ +खतखूत हारपलें ॥ २८ ॥भांडीं ठेविला कापूर उडे ॥ समुद्रामाजीं तारूं बुडे ॥ पातिकरावरी घाला पडे ॥ चहूंकडे अपावो ॥ २९ ॥ ठक येऊनि एकांतीं ॥ मुलाम्याचीं नाणीं देती ॥ धनलोभाचे काकुलती ॥ हातींची संपत्ती त्यांसि दे ॥ १३० ॥ स्वचक्र, परचक्र, विरोधधाडी ॥ खणती लावूनि घर ×फोडी ॥ तळघरींचें ठेवे काढी ॥ भरोनि कावडी धन नेती ॥ ३१ ॥ पाणी रिघे पेंवा आंत ॥ तेणें ०धान्य नासे समस्त ॥ 5धाट झोंबोनि हरी शेत ॥ दैवहत तो झाला ॥ ३२ ॥ गोठणीं 0सेऱ्यां रोग पडे ॥ 9निमाले गायीह्मशींचे वाडे ॥ उधारें नेले ठाणबंदी घोडे ॥ तो रणीं पडे महायुद्धीं ॥ ३३ ॥ ‘भूमिनिक्षेप जे करूं जाती ॥ ते आपणियाकडे धूळी वोढिती ॥ तेथ घालूनि निजसंपत्ती ॥ तोंडीं माती स्वयें घाली’ ॥ ३४ ॥ बुद्धि सांगती वाडवेंड ॥ येथूनि तोंडीं घाला दगड ॥ ऐसे ठेवे बुजिले दृढ ॥ त्यांची चाड धरूं गेला ॥ ३५ ॥ ठेवे ठेविले जे अनेक ॥ ते पृथ्वी ११गिळिले निःशेख ॥ भाग्य झालें जें विमुख ॥ झाले अनोळख ते ठायीं ॥ ३६ ॥ अधर्में अदृष्ट झालें क्षीण ॥ विपरीत भासे देहींचें चिह्न ॥ पालटला निजवर्ण ॥ ब्राह्मणपण लक्षेना ॥ ३७ ॥ देखे तो पुसे ※ज्ञाति कोण ॥ तो सांगे जरी मी ब्राह्मण ॥ ऐकत्यांचें नमनी मन ॥ वर्णाग्रेंपण मावळलें ॥ ३८ ॥ एवं निःशेष नासलें धन ॥ 4ब्रह्मवर्चस्व गेलें जाण ॥ म्लानवदन हीन दीन ॥ खेदक्षीण अतिदुःखी ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ स एवं द्रविणे नष्टे धर्मकामविवर्जितः ॥ उपेक्षितश्च स्वजनैश्चिन्तामाप दुरत्ययाम् ॥ १२ ॥

॥ टीका ॥ गेलें शेत, निमाली कुळेंवाडी ॥ घर पाडिलें परचक्रधाडीं ॥ धन नासलें, नाहीं कवडी ॥ अधर्म जोडी हे दशा ॥ १४० ॥ नाहीं स्वधर्मकर्म ना दान ॥ विहित भोग न करी आपण ॥ त्या धनलोभ्याचें नासलें धन ॥ जेवीं कां स्वप्न रंकाचें ॥ ४१ ॥ दैव झालें पराङ्मुख ॥ त्या हतभाग्याची दशा देख ॥ स्त्रीपुत्रें झालीं विमुख ॥ तिहीं निःशेख दवडिला ॥ ४२ ॥ ऐक धनलोभ्याच्याठायीं ॥ इष्ट मित्र 3पूर्वींचि नाहीं ॥ गोत्रजासि त्याचें सुख कायी ॥ दवडिला पाहीं उपेक्षुनी ॥ ४३ ॥ निंदा प्रत्यक्ष करिती लोक ॥ रांडा पोरें थुंकती देख ॥ खावया नाहीं निःशेख ॥ मागतां भीक मिळेना ॥ ४४ ॥ भिकेलागीं जेथ जेथ गेला ॥ ह्मणती काळतोंडा येथें

१ दुष्ट घातकी. २ देव घेव, नाडी दिडीचा व्यापार. ३ खतपत्र. ४ भागीदारावर. ५ धाडी, घाला. ६ कोणी धाट. ७ गोठ्यांत गुरांस रोग आला. ८ खासगी जमीनीचे पिकावर. शेरी=खासगी जमीन. ९ जमीनींत द्रव्य पुरून ठेवणें. १० अधिकाधिक. ११ नाहींसें झालें. १२ प्रतिकूल. १३ ऐकणाराचें. १४ ब्राह्मणपण. १५ ब्रह्मतेज. १६ कुणबावा, व्यापार.

*ना. इसाळ्यानें. +ना. खतखतुत. ×ना. पाडी. ०ना. धान्यनाश समस्त. 5ना. धाड. 0ना. तेल्यारोग. 9ना. तेणें निमाले. ※मो. न्याती. ना. जाती. 4ना. ब्राह्मणत्व. 3ना. पूर्वज नाहीं.

कां आला ॥ होता धनलोभें भुलला ॥ भला नागविला ईश्वरें ॥ ४५ ॥ यापरी धिक्कारिती लोक ॥ धन जाऊनि झाला रंक ॥ चिंतावर्ती पडला देख ॥ *महादुःख पावला ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ तस्यैवं ध्यायतो दीर्घं नष्टरायस्तपस्विनः ॥ खिद्यतो बाष्पकंठस्य निर्वेदः सुमहानभूत् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ धनलोभ्याचें गेलें धन ॥ धनामवें नवेंचेचि आठवण ॥ तें आठवतां फुटताहे मन ॥ तळमळी जाण अतिदुःखें ॥ ४७ ॥ ' कांटा रुतल्या भुजंग कपाळीं ॥ पुच्छ तुटल्या सापसुरळी ॥ हो कां जळावेंगळी मासोळी ॥ तैसा तळमळी अतिदुःखें ' ॥ ४८ ॥ मनें आठवितांचि धन ॥ हृदयीं चालिलें स्फुंदन ॥ अश्रुधारा स्रवती नयन ॥ +मूर्च्छापन्न ※क्षणक्षणां ॥ ४९ ॥ पोटांतुनी अतिचरफडे ॥ धाय मोकलूनियां रडे ॥ उठे बैसे पाहे पडे ॥ लोळे गडबडे आरडत ॥ १५० ॥ मग ह्मणे रे कटकटा ॥ झालों ०एक वेळ करंटा ॥ अहा विधातया दुष्टा ॥ काय अदृष्टा लिहिलेंसे ॥ ५१ ॥ मज ठावो नाहीं कोणीकडे ॥ विचारु संभवेना पुढें ॥ अतिदुःख आलें जी रोकडें ॥ तेणें विचारें रडे महादुःखी ॥५२॥ हें अल्प दुःख पावलों येथें ॥ पुढें थोर दुःख आहे मातें ॥ यम दंडील निष्ठुरघातें ॥ कोण तेथें सोडवील ॥ ५३ ॥ म्यां नाहीं दीधलें दान ॥ मी नाहीं स्मरलों नारायण ॥ मज ×येती नरक दारुण ॥ तेथ कोण सोडवी ॥ ५४ ॥ म्यां नाहीं केले पंचमहायज्ञ ॥ नाहीं दीधलें अतिथींसि अन्न ॥ नाहीं केलें पितृतर्पण ॥ माझें दुःख कोण निवारी ॥ ५५ ॥ म्यां नाहीं केली द्विजपूजा ॥ नाहीं भजलों अधोक्षजा ॥ नाहीं वंदिलें 7वैष्णवराजा ॥माझे दुःखसमाजा कोण 1नाशी ॥५६॥ मी सर्वथा अकर्मकारी ॥ बुडालों 5बुडालों अघोरीं ॥ धांव पाव गा श्रीहरी ॥ मज उद्धरी दीनातें ॥ ५७ ॥ कृष्णा, माधवा, मुरारी, ॥ अच्युतानंता, श्रीहरी ॥ गरुडध्वजा, गोवर्धनधारी, ॥ मज उद्धरी दीनातें ॥५८॥ तुवां रक्षिलें प्रह्लादासी ॥ अंबरीष 0गर्भवासीं ॥ उदरीं 2राखिलें परीक्षितीसी ॥ तैसें मज दीनासी उद्धरी ॥ ५९ ॥ तुवां तारिलें अहल्येसी ॥ उद्धरिलें नष्टा अजामिळासी ॥ उडी घातली 6गजेंद्रासी ॥ तेणें वेगेंसी मज 8तारी ॥ १६० ॥ महादोषांची दोषश्रेणी ॥ नामें तारिली कुंटिणी ॥ तेणें लोंवचें चक्रपाणी ॥ मज दुष्टालागोनी उद्धरी ॥ ६१ ॥ जळोजळो हा धनकाम ॥ गेलें वृथा माझें जन्म ॥ फुकाचें जें रामनाम ॥ तें मी अधम न ह्मणेंची ॥ ६२ ॥ रामनामाच्या प्रतापासाठीं॥जळती महापापांच्या कोटी ॥ थोर अधम मी ये सृष्टीं॥ नाम वाक्पटीं न ह्मणेंची ॥६३॥ ऐसा मानोनि अपराध ॥ अनुतापें करितां खेद ॥ उपजला अतिनिर्वेद ॥ तेंचि गोविंद स्वयें सांगे ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ स चाहेदमहो कष्टं वृथात्मा मेऽनुतापितः ॥ न धर्माय न कामाय यस्यार्थायास ईदृशः ॥ १४ ॥

---

१ न जाई. २ दैवा अरेरे. ३ पातकी. ४ कौतुकानें. ५ वाणीपटानें, तोंडानें.

*मो. महादुःखें. +मो. मूर्छापन्न अर्डातु. ※ना. पुनः पुना. 0मो. एकसरा करंटा. ×मो. होतील नरक. 7ना. वैष्णवरजा. 1मो. सोसी. 5मो. महा अघोरीं. 0मो. गर्भवासासी. 2मो. रक्षिलें. 6ना. गजेंद्रासी. 8मो. पावे.

॥ टीका ॥ हात चुरुनि ह्मणे कटकटा ॥ ब्राह्मणदेहो मोक्षाचा वांटा ॥ तो लाहोनि मी अतिकरंटा ॥ धनलोभचेष्टा नाडलों ॥६५॥ जेणें देहें *लाभे मोक्षसुख ॥ त्या देहासि म्यां दीधलें दुःख ॥ धनलोभी मी परम मूर्ख ॥ मजऐसा आणिक असेना ॥ ६६ ॥ न वेंचितां धर्मकामासी ॥ अर्थ जोडिला सायासीं ॥ त्या अर्थाची दशा ऐसी ॥ अतिदुःखेंसी मज फळली ॥६७॥ बाप धनलोभाचें कवतिक ॥ नाहीं इहलोकना परलोक ॥ थितें अंतरलें मोक्षसुख ॥ भोगवी नरक अनिवार ॥ ६८ ॥ देख नरकाचे ठायीं ॥ अकल्प बुडतां +ठावो नाहीं ॥ धनलोभ घाली तैसेठायीं ॥ तें म्यां नरदेहीं जोडिलें ॥ ६९ ॥ जो जन्मला ब्राह्मणदेहीं ॥ तो पूज्य होय लोकीं तिहीं ॥ मोक्ष लागे त्याच्या पायीं ॥ म्यां अभाग्यें ×तोही नाशिला ॥ १७० ॥ लोभें जें धन सांचिलें ॥ तें निःशेष नासोनि गेलें ॥ परी मजलागीं अतिदुःखी केलें ॥ बांधोनि दीधलें ०महानरका ॥ ७१ ॥ उत्तम देहो झाला प्राप्त ॥ तो धनलोभें केला व्यर्थ ॥ आयुष्य गेलें हातोंहात ॥ अतिसंतप्त अनुतापें ॥ ७२ ॥ धनलोभाचें अचाट ॥ वृथा गेले माझे कष्ट ॥ वैराग्य उपजलें उद्भट ॥ अतिचोखट ❋सविवेक ॥ ७३ ॥ धनलोभी जो कां नर ॥ तो सकळदुःखांचें भांडार ॥ धनवद्धक तो पामर ॥ स्वमुखें साचार निंदित ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ प्रायेणार्थाः कदर्याणां न सुखाय कदाचन ॥ इह चात्मोपतापाय मृतस्य नरकाय च ॥ १५ ॥

॥ टीका ॥ प्रायशां जे धनवद्धक ॥ त्यांसि इहलोकीं नाहीं सुख ॥ ४धनरक्षणीं अतिदुःख ॥ तें जातां देख प्राणांत ॥ ७५ ॥ धनागमनीं अतिकष्ट ॥ धनरक्षणीं कष्ट श्रेष्ठ ॥ धननाशें होय हृदयस्फोट ॥ इहलोकीं कष्ट ०धनलोभ्या ॥ ७६ ॥ २यापरी इहलोकीं दुःख ॥ अधर्मे खुंटला परलोक ॥ मरतां उरीं आदळे नरक ॥ अवश्यक धनलोभ्या ॥ ७७ ॥ जो धर्म करीना स्वयें खाये ॥ तो मजसारिखा कदर्यु होये ॥ त्यासि चढतें वाढतें दुःख पाहे ॥ नाहीं सुखसोये कँदर्या ॥ ७८ ॥ लोभाची वस्ती जियेठायीं ॥ जेथ स्वप्नींही सुख नाहीं ॥ लोभ अतिशयें निंद्य पाहीं ॥ तेंचि स्वमुखें सांगत ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ यशो यशस्विनां शुद्धं श्लाघ्या ये गुणिनां गुणाः ॥ लोभः स्वल्पोऽपि तान् हंति श्वित्रोरूपमिवेप्सितम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ रणीं पडतां मुख्य धुरेसी ॥ जो अंगें ५विभांडी त्या रणासी ॥ खांदीं वाऊनि आणी रायासी ॥ येवढी कीर्ति ज्यासी जोडली ॥ १८० ॥ लोभ संचरोनि ७त्यापाशीं ॥ एक शेत ३मागवी रायासी ॥ तेंचि अपकीर्ति होय त्यासी ॥ ९जग उपहासी मूर्खत्वें ॥ ८१ ॥ त्यासि न मागतां राजा जाण ॥ करूं पाहे आपणासमान ॥ त्यासि लोभें आणोनि नागवण ॥

---

१ द्रव्य. २ अतिश्रमानें. ३ थोर. ४ बोलतां बोलतां. ५ बहुतकरून. ६ द्रव्य प्राप्त होण्यास. ७ कृपणास. ८ पुढारी.

*मो. लाविजे. +मो. थावो. ×ना. पाही. ०ना. महानरकीं. ❋ना. सविवेकी. ४मो. धनक्षीणीं. ०ना. धनलोभें. २मो. यापरी इहलोक. ५मो. विभांडूनि. ७मो. त्यासी. ३मो. मागे. ९मो. जन.

मूर्खपण स्थापिलें ॥ ८२ ॥ " *स्वयें करितां कन्यादान ॥ सकळ कुळ होय पावन ॥ तेथेंही लोभें घेतां धन ॥ अधःपतन +लोभिया ॥ ८३ ॥ दाता देऊनियां दान ॥ दानप्रसंगें उपार्जी धन ॥ तेंचि दात्यासि दूषण ॥ ※लोभ लांछन दानासी " ॥ ८४ ॥ वेदशास्त्रें करूनि पठण ॥ पंडित झाले अतिसज्ञान ॥ तेही ०लोभें छळिले जाण ॥ ज्ञानाभिमान प्रतिष्ठा ॥ ८५ ॥ देहप्रतिष्ठेचिये सिद्धी ॥ पंडित पंडितां वादविधी ॥ नाना छळणोक्तीं विरोधी ॥ ठकिले त्रिशुद्धी ज्ञाते लोक ॥ ८६ ॥ सविवेक सज्ञान ज्ञात्यासी ॥ लोभ आणी 6निंदास्पदासी ॥ इतरांची 8गति काइसी ॥ ते लोभाची दासी होऊनि ठाती ॥ ८७ ॥ लोभ शुद्धासि करी अशुद्ध ॥ लोभ तेथ निंदास्पद ॥ तोचि 1दृष्टांत विशद ॥ ऐक प्रसिद्ध सांगत ॥८८॥ कुलशील अतिसुकुमार ॥ रूपें सर्वांगमनोहर ॥ नाकीं श्वेतता अणुमात्र ॥ निंद्य सुंदरा तेणें होय ॥ ८९ ॥ तेवीं अल्पही लोभाची वस्ती ॥ नाशी गुणौदार्ययशकीर्ती ॥ लोभाऐसा त्रिजगतीं ॥ कर्ता अपकीर्ति आन नाहीं ॥ १९० ॥ धनलोभीं सदा विरोधू ॥ धनलोभ तोडी सखे बंधू ॥ धनलोभाऐसा नाहीं बाधू ॥ 2अति अशुद्ध आणिक असेना ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ अर्थस्य साधने सिद्ध उत्कर्षे रक्षणे व्यये ॥ नाशोपभोग आयासस्त्रासश्चिंता भ्रमो नृणाम् ॥ १७ ॥

॥ टीका ॥ प्रथम शिणावें द्रव्य जोडितां ॥ 0दुसरें शिणावें *तें वाढवितां ॥ द्रव्य जरी झालें उत्कर्षता ॥ तरी लोभ सर्वथा पुरे न ह्मणे ॥ ९२ ॥ द्रव्यालागीं भावार्थतां ॥ जैसे कष्टती सर्वथा ॥ तैसा जरी कोणी कष्टे परमार्था ॥ तें परब्रह्म तत्त्वतां खेळणें होय ॥ ९३ ॥ एवं कष्टीं जोडल्या द्रव्यासी ॥ रक्षणीं अतिचिंता मानसीं ॥ अतिशय लागली जीवासी ॥ अहर्निशीं धुकधुकी ॥ ९४ ॥ स्त्री पुत्र हो मातापिता ॥ त्यांसि पोतेजेना सर्वथा ॥ आपणाहूनि परता ॥ विश्वासू सर्वथा मानेना ॥ ९५ ॥ विसरोनियां निजघाता ॥ चोरापासोनि राखे वित्ता ॥ वित्तरक्षणीं निजचिंता ॥ तिन्ही अवस्था एकाग्र ॥ ९६ ॥ ऐशी एकाग्रता करूनी ॥ जरी लागता भगवद्भजनीं ॥ तरी वश्य होता चक्रपाणी ॥ अर्थरक्षणीं साधका ॥ ९७ ॥ उचितानुचित 4विवाहासी ॥ द्रव्य वेंचितां उदरासी ॥ अतिशय होय कासाविसी ॥ धनव्ययो त्रासासी उपजवी ॥ ९८ ॥ एवं जोडूनि रक्षितां द्रव्यासी ॥ अवचटें नाश होय जें त्यासी ॥ तें अतिभ्रम चढे मानसीं ॥ होती धनपिशीं बद्धक ॥ ९९ ॥ द्रव्योर्जनीं वसे प्रयास ॥ द्रव्यरक्षणीं चिंतेचा वास ॥ द्रव्यव्ययीं 3सबळ त्रास ॥ ×भ्रमाचा रहिवास धननाशीं ॥ २०० ॥ आदिमध्यावसानीं पाहीं ॥ द्रव्य तें समूळ अपायी ॥ तेथ सुखाचा लेश नाहीं ॥ हें ऐसें पाही मज जाहलें ॥ १ ॥ आयासत्रासचिंतेसहित ॥ धनापाशीं भ्रम नांदत ॥ अर्थ तितुका अनर्थयुक्त ॥ तोचि अनर्थ 7स्वयें सांगे ॥ २ ॥

१ निंदेचें स्थल. २ पांढऱ्या कोडाचा डाग. ३ काळजी. ४ विश्वासुक मानित नाहीं. ५ द्रव्य खर्च झालें असतां.

*मो. सकुळीं करितां. +मो. धनलोभ्या. ना. देहलोभ्या. ※मो. लोभें छळणें दात्यासी. ०ना. धनलोभें. 6मो. निंदा स्पर्धा त्यासी. 8मो. मती. 1मो. दृष्टांतें. 2ना. आन अशुद्ध. 0मो. दुसरेन. *मो. अर्थ वाढवितां. 4ना. वेव्हारासी. 3ना. वासना त्रास. ×मो. भ्रमाचा. 7ना. आद्यंत स्वयें.

॥ श्लोक ॥ स्तेयं हिंसाऽनृतं दंभः कामः क्रोधः स्मयो मदः ॥ भेदो वैरम-
विश्वासः संस्पर्धा व्यसनानि च ॥ १८ ॥

॥ टीका ॥ सर्वांगें अनर्थभूत ॥ हें माझें वचन त्रिसत्य ॥ पृथ्वीमाजीं जे जे अनर्थ ॥ ते ते अर्थांत उपजती ॥ ३॥ पुसाल अर्थींचे अनर्थ ॥ ते सांगतां असंख्य अनंत ॥ संक्षेपें सांगेन येथ ॥ पंधरा अनर्थ अर्थापाशीं ॥ ४ ॥ प्रथम अनर्थ अर्थासी ॥ चोरी वसे अर्थापाशीं ॥ अर्थ नाहीं गा जयापाशीं त्यासी ॥ चोरांपाशीं भय नाहीं ॥५॥ द्रव्य नाहीं ज्याच्या हातीं ॥ त्यातें देखोनि चोर भिती ॥ कांहीं मागेल आह्मांप्रती ॥ ह्मणोनि लपती त्याभेणें ॥६॥ अतर्क्य नेत्रांतरें नेणें ॥ कां भ्रांतवादें सर्वस्व घेणें ॥ परस्व भोळयानें बुडवणें ॥ कां *विजनीं हरणें सर्वस्व ॥ ७ ॥ मार्गीं पडलें धन पराचें ॥ स्वयें जाणोनि आमक्याचें ॥ नाहीं देणें त्यासि त्याचें ॥ हेंही चोरीचें लक्षण ॥ ८ ॥ सुवर्णस्तेयें नरकप्राप्ती ॥ ×ऐसे विवेकीही चोरी करिती ॥ मा इतरांची काय-शी गती ॥ चोरीची वस्ती धनापाशीं ॥ ९ ॥ जगीं महापापिणी चोरी ॥ तिसि कोणी बैसों नेदी द्वारीं ॥ ते राहिली सुवर्णामाझारीं ॥ धन तेथ चोरी निश्चित ॥२१०॥ +देखतांचि त्या धनासी ॥ विकल्पी होती संन्यासी ॥ इतरांची कथा काइसी ॥ चोरी धनापाशीं स्वयें नांदे ॥ ११ ॥ प्रथम अनर्थलक्षण ॥ धनापाशीं चोरी जाण ॥ धन हिंसेचें आयतन ॥ तेंही निरूपण अवधारीं ॥ १२ ॥ धनालागीं द्वंद्व दारुण ॥ पुत्रपौत्र मारिती जाण ॥ धनालागीं घेती प्राण ॥ सुहृदपण सांडोनी ॥ १३ ॥ धनलोभाचें कवतिक ॥ कन्या बापासि देतसे विख ॥ पितृघाताचें न मानी दुःख ॥ निष्ठुर देख धनलोभ ॥ १४ ॥ धनलोभें सांडी बापमाये ॥ स्त्री घेऊनि वेगळा राहे ॥ तेथही धनलोभें पाहे ॥ वैर होये स्त्रीपुरुषां ॥ १५ ॥ धनलोभाची नवलपरी ॥ पुत्र पित्यातें जीवें मारी ॥ पिता पुत्रातें संहारी ॥ कठिन भारी धनलोभ ॥ १६ ॥ जे नवमास वाहे उदरांत ॥ जे सदा सोशी नरक मूत ॥ ते मातेचा करी घात ॥ द्रव्यार्थ निजपुत्र ॥ १७ ॥ अभिनव ०धनलोभाची आयी ॥ नवल तें मी सांगों काय ॥ पोटींचा पुत्र मारी माय ॥ ऐसा अनर्थ १आहे धनापाशीं ॥१८॥ एवं हिंसा ते संपूर्ण ॥ हें दुसरें अनर्थलक्षण ॥ आतां असत्याचें विंदान ॥ तेंही निरूपण स्वयें सांगे ॥ १९ ॥ असत्य जन्मलें अर्थाच्या पोटीं ॥ अर्थबळें तें दाटुगें सृष्टीं ॥ अर्थासवें असत्य उठी ॥ असत्याची गांठी अर्थेंसी ॥ २२० ॥ तो अर्थ असे जयापाशीं ॥ कां अर्थअपेक्षा जयासी ॥ तेथ असत्य वसे कुटुंबेंसी ॥ धन तें मिरासी मिथ्यात्वाची ॥ २१ ॥ थोर 4अर्थबळ असत्यासी ॥ मिथ्या बोलवी 0बापापाशीं ॥ धनलोभें १ंकवी मातेसी ॥ सत्य धनापाशीं असेना ॥२२॥ क्रयविक्रयीं धनलोभें जाण ॥ मिथ्या बोलती साधारण ॥ परी वेदशास्त्रही संपन्न ॥ धनार्थ सज्ञान *बोलती मिथ्या ॥ २३ ॥ वेदींचा 7आठव नये पूर्ण ॥ तो संभावनेलागीं जाण ॥ ह्मणवी मी वेदशास्त्रसंपन्न ॥ करावया यजन नीचांचें

१ क्लेशदायक. २ डोळा चुकवून. ३ किमयाची थाप देऊन. ४ दुसऱ्याचें धन. ५ सोनें चोरल्यानें. ६ जागा. ७ युद्ध, कलह. ८ नाश. ९ सत्ता, बल. १० कावा, माव, लाघव. ११ बळकट. १२ वतन. १३ फसवितो. १४ विकत देण्याघेण्यांत. १५ दक्षणेकारितां.

*मो. विसरूनि. ×मो. ऐसे ह्मणती ते विवेकीही. +मो. देतां त्या धनासी. ०मो. धनाची १ना. होय धनलोभीं. 4ना. थोर अनर्थ असत्यासी. 0ना. बापापाशीं. *मो. जल्पती. 7ना. अर्थ नये.

॥ २४ ॥ भाग देऊनि मध्यस्थां ॥ मी चतुःशास्त्र व्याख्याता ॥ ऐसें मिथ्यात्वें छळी पंडितां ॥ राजद्रव्यार्थालागूनी ॥ २५ ॥ विरक्त ह्मणविती परमार्थी ॥ तेथही असत्यें घातली वस्ती ॥ नाथिल्या सिद्धि दाविती ॥ अर्थप्राप्ती लागोनी ॥ २६ ॥ अर्थी असत्याचा बडिवारू ॥ सद्भावें केला जो सद्‌गुरू ॥ त्यासि मिथ्या नास्तिक विचारू ॥ एकांतीं नरू बहुचाळी ॥ २७ ॥ अर्थ नाहीं जयापाशीं ॥ ना अर्थ कल्पना नाहीं जयासी ॥ असत्य स्पर्शेना तयासी ॥ कदाकाळेंसी कल्पांतीं ॥ २८ ॥ अर्थापाशीं असत्य जाण ॥ त्याचें सांगितलें लक्षण ॥ आतां अर्थापाशीं दंभ संपूर्ण ॥ तेही वोळखण अवधारीं ॥ २९ ॥ पोटीं नाहीं परमार्थ ॥ धरोनियां अर्थस्वार्थ ॥ स्वयें ह्मणविती हरिभक्त ॥ या नांव निश्चित भजनदंभू ॥ २३० ॥ धन जोडावया कारणें ॥ टिळे माळा मुद्रा धारणें ॥ शंख लाउनी उपदेश देणें ॥ या नांव जाण दीक्षादंभू ॥ ३१ ॥ देखोनि धनवंत थोरू ॥ त्याचे *उपदेशीं अत्यादरू ॥ नेमूनि गुरुपूजाकरभारू ॥ सांगे मंत्र तो दांभिक ॥ ३२ ॥ जयांपासोनि होय अर्थप्राप्ती ॥ ते समर्थ शिष्य आवडती ॥ दीन शिष्यांतें उपेक्षिती ॥ हे दांभिकस्थिती गुरुत्वा ॥ ३३ ॥ गुरूसि द्यावें तनु मन धन ॥ ऐसें उपदेशूनि जाण ॥ जो द्रव्यसंग्रही आपण ॥ तें दांभिकपण गुरुत्वा ॥ ३४ ॥ जेथ धनलोभ गुरूपाशीं ॥ तो काय तारील शिष्यासी ॥ धनलोभाची जाती ऐसी ॥ करी गुरुत्वासी दांभिक ॥ ३५ ॥ आखाडभूती ऐसा जाण ॥ गुरूपाशील न्यावया धन ॥ उपदेश घेऊनि दीन ॥ तो दांभिक जाण शठ शिष्य ॥ ३६ ॥ ×गुरुउपदेश शिकोनि युक्ती ॥ स्वयें ज्ञानाभिमाना येती ॥ गुरूतें मानी प्राकृतोंस्थिती ॥ तोहि निश्चितीं दांभिकशिष्य॥३७॥मी एक +मधन सज्ञान॥ऐसा सूक्ष्मरूपें ज्ञानाभिमान ॥ करी गुरुआज्ञेचें हेळण ॥ हेंही लक्षण दंभाचें ॥ ३८ ॥ अहं ब्रह्म हेही स्फूर्ती ॥ न साहे जे स्वरूपस्थिती ॥ तेथ 'मी ज्ञाता' हे धोंगडी युक्ती ॥ स्फुरे निश्चितीं सूक्ष्मदंभ ॥ ३९ ॥ जीवा देहाचें 7मध्यस्थान ॥ तेथ दंभाचें अधिष्ठान ॥ त्यासि मिळोनियां मन ॥ ज्ञानाभिमान उपजवी ॥ २४० ॥ नवल दंभाचें कवतिक ॥ आह्मी अग्निहोत्री याज्ञिक ॥ तेंचि जीविका करूनि देख ॥ ०नाडले वेदपाठक धनलोभें ॥ ४१ ॥ सोडोनि परमार्थाची पोथी ॥ ब्रह्मज्ञान सांगे नानायुक्तीं ॥ तेही *ज्ञाते दंभें नाडिजेती ॥ द्रव्यासक्ती धनलोभें ॥ ४२ ॥ मंत्रतंत्रांची कथा कोण ॥ मुख्य गायत्री वेंचिती ब्राह्मण ॥ आह्मी ꙮस्वधर्मनिष्ठापावन ॥ ह्मणवी जाण दांभिक ॥ ४३ ॥ दंभें नाडिले संन्यासी ॥ लौकिक राखणें पडे त्यासी ॥ ज्यालागीं मुंडिले शिरसीं ॥ त्या अर्थासी विसरले ॥ ४४ ॥ दृष्टि सूनि अन्नसन्मान ॥ संन्यासी करिती शौच स्नान ॥ शुद्ध न करवेचि निजमन ॥ वेदव्याख्यान अतिदंभें ॥ ४५ ॥ घ्यावया परद्रव्य परान्न ॥ कां देहप्रतिष्ठेलागीं जाण ॥ मिथ्या दाखवी सात्विकपण ॥ हें दंभलक्षण पैं चौथें ॥ ४६ ॥ द्रव्यापाशीं वसे काम ॥ अतिशयें अतिदुर्गम ॥ द्रव्य तेथ कामसंभ्रम ॥ अतिविषम 8सांगत ॥ ४७ ॥ द्रव्य नसतां अपेक्षाकाम ॥ तो सबाह्य करी अतिश्रम ॥ अनेक कष्टाचें विषम ॥ अतिदुर्गम भोगवी ॥४८॥ धन झालिया उन्मा-

---

१ दलाल. २ वडेजाव, मोठपणा, उत्कर्ष. ३ द्रव्य नियमित घेऊन. ४ ठक, लुच्चा. ५ अज्ञानी. ६ हयगय, दुर्लक्ष. ७ स्थूळ. ८ डोक्याचें मुंडण केलें. ९ पाहून, नजर देऊन. १० उन्मत्त.

*मो. उपदेशासी. ×ना. गुरूपदेशीं. +मो. साधन सज्ञान. 7मो. जन्मस्थान. ०मो. नाडिती. *मो. ज्ञातेपणें नाडिजेती. ꙮमो. स्वकर्मनिष्ठ पावन. 8मो. सायंत.

दकाम ॥ करूं लागे अगम्यागम ॥ उपजवी नाना अधर्म ॥ निंद्य कर्म धनवंता ॥ ४९ ॥ कामु जडलासे धनेंसी ॥ तो सदा छळी धनवंतासी ॥ काम खवळे धनापाशीं ॥ अहर्निशीं मुसमुशित ॥ २५० ॥ धनापाशीं अतिउद्धत ॥ काम पांचवा अनर्थ ॥ काम तेथ निश्चित ॥ क्रोध नांदत सैन्येंसी ॥ ५१ ॥ *कामप्राप्तीसी आडवी काडी ॥ होतां क्रोधाची पडे उडी ॥ खवळला अतिकडाडी ॥ तपाच्या कोडी निर्दाळित ॥ ५२ ॥ जप, तप, निष्ठा, नेम ॥ शिणोनि साधिलें दुर्गम ॥ क्रोध खवळल्या परम ॥ ते करी भस्म क्षणार्धें ॥ ५३ ॥ धनाकडे कोणी दावी बोट ॥ तेथ क्रोध उठी अचाट ॥ वाढवी प्राणांत कचाट ॥ क्रोध अतिदुष्ट ×धनेंसी ॥ ५४ ॥ धनागमनीं +अवरोध ॥ कां धनव्ययाचा संबंध ॥ तेसंधीं खवळे क्रोध ॥ अतिविरुद्ध उन्मत्त ॥ ५५ ॥ धनापाशीं क्रोध समर्थ ॥ हा साहवा अतिअनर्थ ॥ धनापाशीं गर्व अद्भुत ॥ तेंचि निश्चित सांगत ॥ ५६ ॥ धनगर्वाचिये पुष्टी ॥ सखा बाप नाणी दृष्टीं ॥ मातेतें ह्मणे करंटी ॥ इतरांच्या गोष्टी त्या काय ॥ ५७ ॥ सिद्ध, साधक, तापसी ॥ त्यांतें देखोनि उपहासी ॥ ह्मणे करंटे, ‡ते होती संन्यासी ॥ हरिदासासी †विटावी ॥ ५८ ॥ अंगीं धनाचें समर्थपण ॥ त्याहीवरी जें झालें ज्ञान ॥ तें गर्वाचा ताठा चढे पूर्ण ॥ जेवीं अरें धारण गिळिला ॥ ५९ ॥ धनमदज्ञानगर्वाची जाती कैशी ॥ गर्व करी सद्गुरूसी ॥ त्याच्या वचनातें हेळसी ॥ शेखीं हुंकारेंसी निर्भर्त्सी ॥ ६० ॥ धनज्ञानगर्वाचें लक्षण ॥ देखे सद्गुरूचे अवगुण ॥ गुरूसि ठेवी मूर्खपण ॥ मी एक सज्ञान हें मानी ॥ ६१ ॥ जो भ्रांत ह्मणे सद्गुरूसी ॥ ¶गुरु मानी त्यातें द्वेषी ॥ बाप गर्वाची जाति कैशी ॥ देखे गुणदोषांसी °सर्वांच्या ॥ ६२ ॥ नवल गर्वाची पैं काहणी ॥ गुरु सर्वथा सत्य नमानी ॥ दोष पडतांचि कानीं ॥ सत्य मानी निश्चित ॥ ६३ ॥ सात्विक ये गर्वितापुढें ॥ त्यासि सर्वथा मानी कुडें ॥ अतिसात्विकता दृष्टीं पडे ॥ तरी मानी वेडें अबुजें ॥ ६४ ॥ अंगीं भवंडी भरे लाठी ॥ तें भसी लागे ललाटीं ॥ साष्टांग नमावया सृष्टीं ॥ पात्र गर्वदृष्टीं दिसेना ॥ ६५ ॥ तेथें कोण दे सन्मान श्रेष्ठा ॥ कायसी वृद्धाची प्रतिष्ठा ॥ धनगर्वें चढला ताठा ॥ मी एक मोठा ब्रह्मांडीं ॥ ६६ ॥ एक गुरुसेवा विश्वासिक ॥ निजसेवा झाला वश्यक ॥ त्यासि गर्व चढे मी अति सेवक ॥ तो अधिबाधक सेवका ॥ ६७ ॥ ऐसा अतिगर्वें उन्नद्ध ॥ हा सातवा गर्वबाध ॥ आतां धनापाशीं महामद ॥ तोही संबंध द्विज सांगे ॥ ६८ ॥ जयासी चढे धनमद ॥ तो उंघडा डोळां होय अंध ॥ कानीं नायके शब्दबोध ॥ धनमदें स्तब्ध सर्वदा ॥ ६९ ॥ धनमदें अति अहंता ॥ धनमदें उद्धतता ॥ धनमदें *अद्वातद्वता ॥ करी §सर्वथा अधर्म ॥ २७० ॥ धनमद अति अपवित्र ॥ तो चढल्या होय अतिदुस्तर ॥ न ह्मणे पात्र अपात्र ॥ विचरे विचित्र योनीसी ॥ ७१ ॥ जो धनमदा वश होय ॥ तो न मानी कोणाचेंही भय ॥ न जावें तेथ स्वयें जाय ॥ न खावें तें खाय यथेष्ट ॥ ७२ ॥ न धरावा तो संग धरी ॥ न करावें तें कर्म करी ॥ न बोलावें तें उच्चारी ॥ नना-

१ निषिद्ध स्त्री गमन. २ अडचण. ३ संकट. ४ प्रतिबंध. ५ द्रव्य [illegible]
७ लाट, शुष्ककाष्ठ. ८ तऱ्हा. ९ व्यवहारशून्य. १० उन्मत्त. ११ दिसत असतां.

*मो. काम अप्राप्तीची अखंड काडी. ×मो. धनापाशीं. +मो. अविरोध. ‡मो. हे संन्यासी. †ना. विटाये मो. विटंबी. ¶मो. गुरुतें नित्य द्वेषी. °मो. सर्वत्र. *मो. द्वंद्वता. §मो. सर्वदा ना. अधर्मता सदा कर्म.

भीतरीं उद्धत ॥ ७३ ॥ न देखे आपुलें केलें परापवाद स्वयें बोले ॥ नायके बापाचें शिकविलें ॥ वेडें केलें धनमदें ॥ ७४ ॥ शिकविलें तें नायके ॥ वारिलें तें करी अवश्यकें ॥ साधुनिंदा निजमुखें ॥ यथासुखें जल्पत ॥ ७५ ॥ न मानी स्वयाती स्वाचार ॥ न मानी दोष अनाचार ॥ न मानी वडिलांचा विचार ॥ धनमदें थोर मातला ॥ ७६ ॥ आधींच तारुण्यें अतिलाठा ॥ वरी धनमदें चढला ताठा ॥ यापरी मातला मोठा ॥ तो न चाले वाटा सुपंथीं ॥ ७७ ॥ स्त्रीकामें अतिविव्हळ ॥ न विचारी कुलशीळ ॥ न ह्मणे *सवेळ सांजवेळ ॥ विचरे केवळ खरें जैसा ॥ ७८ ॥ अभिलाषूनि परनारी ॥ दिवसांचि विचरे दुपारीं ॥ ×गताळकाही अंगीकारीं ॥ भय न धरी पापाचें ॥ ७९ ॥ जो मातला करूनि मद्यपान ॥ तो मद तत्काळ उतरे जाण ॥ त्याहूनि धनमद दारुण ॥ आल्याही मरण उतरेना ॥ २८० ॥ अकर्म करितां आपण ॥ तेंचि निजघातें वेईल प्राण ॥ हेंही नाठवे आठवण ॥ धनमदें जाण भुलला ॥ ८१ ॥ महाअनर्थी धनमद जाण ॥ हें आठव्या अनर्थाचें लक्षण ॥ आतां धनापाशीं भेद पूर्ण ॥ तेंचि-निरूपण द्विज सांगे ॥८२॥ भेद जन्मला धनाचे कुशीं ॥ धन तेथ भेदाची मिराशी ॥ भेद सहपरिवार धनापाशीं ॥ अहर्निशीं +जागत॥८३॥हातां आलिया बहु धन ॥ मातेहूनि राखे भिन्न ॥ पित्यासि करी वंचनें ॥ स्त्रियेसिही जाण कळोंनेदी ॥८४॥ अर्थ पुत्रासी अतर्क्यता ॥तेथ इतरांची कोण कथा ॥ भेद तो अर्थापरता ॥ जगीं सर्वथा असेना ॥८५॥ माथा साहोनि शस्त्रघात ॥ बंधू बंधूसि रणीं साह्य होत ॥ आप्त तेचि अनाप्त होत ॥ वांटितां अर्थविभाग॥८६॥मित्र मित्रांसी वंचिती प्राण ॥ तेथें प्रवेशोनियां धन ॥ विकल्पीं आणी मित्रपण ॥ भेद दारुण धनापाशीं ॥८७॥ आपणचि गांठीं बांधिलें धन ॥ तें क्षणाक्षणां पाहे आपण ॥ येथवरी धनापाशीं जाण ॥ विकल्प पूर्ण नांदत ॥८८॥ ऐसा धनापाशीं भेद जाण ॥ हें नववें अनर्थलक्षण ॥ आतां अतिशयेंसी निर्वाण ॥ वैर दारुण धनेंसी ॥८९॥ धनापाशीं वैर पूर्ण जाण ॥ हें अंगें भोगूनि आपण॥ सांगे कदर्यु ब्राह्मण ॥ वैरलक्षण धनाचें ॥ २९० ॥ पित्यापुत्रांमाजीं विरोधू ॥ पाडितो हा द्रव्यसंबंधू ॥ वैरी करी अतिसखे बंधू ॥ तो हा प्रसिद्ध धनलोभ ॥ ९१ ॥ आपुल्या कळवळ्याचे सुहृद ॥ त्यांसी धनलोभ पाडी द्वंद्व ॥धनास्तव अति सुबद्ध ॥ वैर ✻विरुद्ध सर्वांसी ॥९२॥ ॥ प्राणाहूनि पढिये मित्र ॥ त्यांसि धनलोभ करी शत्रु ॥ धनलोभ अति अपवित्र ॥ वैरी दुस्तर जगीं हा ॥ ९३ ॥ बंधुकलह धन वांटितां ॥ अधिक न ये आपुल्या हातां ॥ तें वांटा करिती जे धर्मतां ॥ त्यां साधूंसी तत्त्वतां वैर चाळी ॥ ९४ ॥ जिचें उदरीं जन्मला आपण ॥ जिचें सदा केलें स्तनपान ॥ ते मातेसी धनलोभें जाण ॥ वैर संपूर्ण चालवी ॥ ९५ ॥ आपली जे कां निजजननी ॥ अर्थ तीतें करी वैरिणी ॥ बाहेर घाली घरांतूनी ॥ मुख परतोनी पाहेना ॥ ९६ ॥ ज्याचेनि तुटे भवबंधन ॥ ज्याचेनि बोलें होईजे पावन ॥ त्या सद्गुरूसि अबोला जाण ॥ धनाभिमान ०धरवित ॥ ९७ ॥ धनाभिमानाचा बडिवार ॥ *सद्गुरुमाजीं पाडी

---

१ कृत्य. २ परनिंदा. ३ निषेध केलेलें. ४ फार माजलेला. ५ गाढव. ६ विधवा स्त्रीही. ७ मोठा अनर्थ करणारा. ८ वतन. ९ फसविणें. १० न समजणारा. ११ भेद, विरुद्धकल्पना. १२ कृपण. १३ वैर. १४ आवडते. १५ वडेजाव.

*ना. सुवेळ ×मो. गती अवगती कांहीं न विचारी. +मो. नांदत ✻मो. विरोध सर्वांसी. ०ना. करवीतु. *ना. सद्गुरूसी पडे वैर.

वैर ।। धनाभिमानी अणुमात्र ।। नव्हे निर्वैर कोणाशीं ।। ९८।। जें हें सांगितलें निरूपण ।। त्या नांव वैर संपूर्ण ।। हें दहावें अनर्थ लक्षण ।। अविश्वासी धन तें ऐक ।। ९९ ।। धनाभिमानाचा विलास ।। न मानी पित्याचा विश्वास ।। पूर्ण बंधूचा अविश्वास ।। केवीं सुहृदांस पांतेजे ।। ३०० ।। " आत्मा वै पुत्रनामासी " ।। जो साचार धनी सर्वस्वासी ।। त्या पातेजेना निजपुत्रासी ।। अति अविश्वासी धनलोभ ।। १ ।। धर्म अर्थ काम संपूर्ण ।। त्रिसत्य सत्य हें वचन ।। पूर्वजाची भाक निर्वाण ।। देऊनि आपण जे परणी ।। २ ।। जिणें जीव प्राण सर्वस्वेंसी ।। साचार अर्पिला भ्रतारासी ।। ऐशियेही धर्मपत्नीसी ।। अविश्वासी धनलोभ ।।३।। जे उदरीं वाहे नवमासीं ।। जे सर्वदा विष्ठामूत्र सोशी ।। धनलोभाची जाती कैशी ।। तये मातेसीही न विश्वासे ।। ४ ।। धनाभिमान ये जयापाशीं ।। तो विश्वसेना सद्गुरूसी ।। इतरांची कथा कायसी ।। पूर्ण अविश्वासी धन *मानी ।।५।। अविश्वासाचें मुख्य कारण ।। धन आणि दुसरी स्त्री जाण ।। तेथ मोहावलें ज्याचें मन ।। तो ×अतिसंपन्न अविश्वासी ।। ६ ।। जो धनमानी आणि स्त्रीजित ।। त्यासि विमुख होय हृदयस्थ ।। त्यातें सद्गुरूही उपेक्षित ।। परम अनर्थ अविश्वास ।। ७ ।। सकळ दोषां मुकुटमणी ।। अविश्वास बोलिजे पुराणीं ।। जो प्रकटतां अर्धक्षणीं ।। करी धुळधाणी वृत्तीची ।। ८ ।। अविश्वासा अभिमान भेटे ।। तें मुक्ताची मुक्तता तुटे ।। मग विकल्पाचेनि +नेटें ।। ✻घाली उफराटें देहबंदीं ।। ९ ।। अविश्वासें कवळिल्या चित्ता ।। अभिमानें ह्मणे मी ज्ञाता ।। तेव्हां ०उभउभ्यां पळे आस्तिकता ।। देखे नास्तिकता सर्वत्र ।। ३१० ।। अविश्वास येतांचि पहाहो ।। सकुटुंब पळे सद्भावो ।। मग लोकत्रयीं अभावो ।। नांदवी निर्वाहो विकल्पेंकरूनी ।। ११ ।। वाडेंकोडें अविश्वासी ।। विकल्प नांदे अहर्निशीं ।। 6जेथ रिगावा अविश्वासासी ।। विकल्प त्यासी नागवी ।। १२ ।। अंगोंवांगीं अविश्वास ।। परमार्थराष्ट्र पाडी ओस ।। सद्गुरूचेही दावी दोष ।। न मानी विश्वास ब्रह्मयाचा ।। १३ ।। यालागीं सकळदोषांचा राजा ।। अविश्वासाहूनि नाहीं दुजा ।। तो रिगोनियां निजपैजा ।। विभांडी वोजा महासिद्धि ।। १४ ।। जिकडे अविश्वासें चाली केली ।। तिकडे परमार्था पळणी झाली ।। विकल्पाची धाडी आली ।। 3ते संधी नागवली बहुतेकें ।। १५ ।। सिद्धाचें गेलें सिद्धभूषण ।। साधकें संपाईं नागवलीं जाण ।। 7रानभरी झाले साधारण ।। श्रद्धेचें उद्यान छेदिलें ।। १६ ।। यमनियमांचीं नगरें जाळिलीं ।। क्रोधु तापसांची करी होळी ।। मोक्षफळें सफळिता केळी ।। समूळ उन्मळी मोहगज ।। १७ ।। शमदमांचे घरटें ।। खणोनि सांडिलें आव्हांटे ।। वोस विवेकाचे चोहटे ।। कोणी ते वाटे वागेना ।। १८ ।। व्रतंवोव्रतियांचीं साजिरीं ।। निष्काम उपवनें चौफेरीं ।। तीं जाळिलीं उपराउपरी ।। नानापरी विकल्पें ।। १९ ।। ऐशिया अविश्वासासी ।। ज्ञानाभिमानी आले भेटीसी ।। विकल्पें अभय देऊनि त्यांसी ।। आपल्यापा-

१ प्रताप. २ विश्वासे. ३ विनाहित करितो. ४ स्त्रीलंपट. ५ परमात्मा. ६ तत्काल. ७ साफ, सपशेल. ८ रानोमाळ. ९ प्राकृत, इतर. १० बाग. ११ तपी लोकांची. १२ केळ, कदली. १३ उपटी. १४ आडमार्ग, चुकीचा मार्ग. १५ चौक. १६ व्रतें करणारांचीं व्रतें.

*मो. जाण. ×मो. तो अतिशयें जाण अविश्वासी. +ना. मेटें. ✻मो. पडे. ०मो. उठाउठी. 6मो. तेथें रिघावया विश्वासासी. 3मो. तेणें सिद्ध नागविले बहुतेक. 7मो. रानभरी जालीं साधनें.

शीं राहविलें ॥ ३२० ॥ ऐशिया अविश्वासापुढें ॥ परमार्थ काइसें बापुडें ॥ विकल्पाचें बळ गाढें ॥ तो करी कुडें तत्काळ ॥२१॥ पोटांतूनी जो अविश्वासी ॥ तो सदा देखे गुणदोषांसी॥ अखंड द्वेषी परमार्थासी ॥ हा त्यापाशीं स्वभावो ॥२२॥ यापरी अविश्वासासी ॥ बद्धवैर परमार्थासी ॥ यालागीं जो पोटींचा अविश्वासी ॥ हांसोनि त्यापाशीं नवचावें ॥२३॥ सकळदोषांमाजीं समर्थ ॥ सकळ दोषांचें *राजत्व प्राप्त ॥ तो हा अकरावा अनर्थ ॥ असे नांदत ×धनामाजीं ॥२४॥ अकराही इंद्रियांसी ॥ पूर्ण करी ※अविश्वासेंसी ॥ यालागीं अकरावें स्थान यासी ॥ वसित अविश्वासासी +धनामाजीं ॥२५॥ मुख्यत्वें स्पर्धेचें आयतन ॥ बहुविद्या कां *बहुधन ॥ हेंचि स्पर्धेचें जन्मस्थान ॥ येथूनि जाण तें वाढे ॥२६॥ विद्या झालिया संपन्न ॥ पंडित पंडितां ०हेळण ॥ मुख्य गुरूशीं स्पर्धा करी जाण ॥ हें स्पर्धालक्षण 7विद्येचें ॥२७॥ गांठीं झालिया धन ॥ स्पर्धा खवळे दारुण ॥ कुबेर परधनें संपन्न ॥ मी 0स्वसत्ता जाण धनाढ्य ॥२८॥ माझिया निजधनापुढें ॥ गणितां अल्प गंगेचे खडे ॥ माझिये धनाचेनि पडिपाडें ॥ कोण बापुडें उभें राहे ॥२९॥ मग जे जे देखे धनवंत ॥ ते ते हेळसूनि सांडीत ॥ यापरी स्पर्धा अद्भुत ॥ धरूनि अर्थ उल्हासे ॥३३०॥ एवं धरूनियां अर्थ ॥ स्पर्धा बारावा अनर्थ ॥सदा नांदे धनाआंत ॥ तो हा वृत्तांत सांगीतला ॥३१॥आतां तीं अर्थांचा मेळा॥ एके पदीं झाला गोळा ॥ तोही नांदे धनाजवळा ॥ ऐक वेगळा विभाग ॥३२॥ स्त्री द्यूत आणि मद्यपान ॥ या तिहींतें वाढवी धन ॥ हे तीन अनर्थ दारुण ॥ 1धनवंता जाण आदळती ॥३३॥ जो कां पुरुष निर्धन ॥ तो स्त्रियेसि 5चंडीशासमान ॥ देखोनि निर्धनाचें वदन ॥ प्रत्यक्ष जाण स्त्री थुंकी ॥३४॥ धनहीन पुरुषाचे घरीं ॥ कलहो स्त्रीपुरुषांमाझारीं ॥ निर्भर्त्सूनि नानापरी ॥ दवडी घराबाहेरी पुरुषातें ॥३५॥ धनवंता पुरुषासी ॥ स्त्री लखोटवी करी कैशी ॥ कुटका देखोनि शुनी जैसी ॥ हालवी पुच्छासी कुंकातें ॥३६॥ त्या धनाची झालिया तुटी ॥ स्त्री वसवसोनि लागे पाठीं ॥ आतां नावडती तुमच्या गोठी ॥ रागें उठी फडफडोनी ॥३७॥ 6दिवसां पोरांची तडातोडी ॥ रात्रीं न सोसे तुमची वोढी ॥ हातीं नाहीं फुटकी कवडी ॥ जळो गोडी जिण्याची ॥३८॥ ऐसा निस्तेजी कडोविकडीं ॥ निर्भर्त्सूनि दूरी दवडी ॥ निर्धनपुरुषाची आवडी ॥ न धरी गोडी स्वदारा ॥३९॥ यापरी निर्धना पुरुषासी ॥ स्वस्त्री वश्य नव्हे त्यासी ॥ स्त्रीबाधा धनवंतासी ॥ अहर्निशीं अनिवार ॥३४०॥ लक्षूनि धनवंत नर ॥ वेश्या मिरवी शृंगार ॥ हावभाव चमत्कार ॥ त्यांसी थोर धनाढ्य भाळले ॥४१॥ वेश्याकामसंगें जाण ॥ अखंड लांचावलें मन ॥ तद्योगें मद्यपान ॥ करिती सघन धनमदें ॥४२॥ मद्यपानें जो उन्मत्त ॥ तो स्वेच्छा खेळे द्यूत ॥ एवं हे तिन्हीही अनर्थ ॥ जाण निश्चित अर्थेंसी ॥४३॥ अर्थापाशीं पंधरा अनर्थ ॥ ते सांगीतले इत्थंभूत ॥ सुखाचा लेशु येथ ॥ नाहीं निश्चित धनवंता ॥४४॥

१ दुसऱ्याचा द्वेष करण्याचें. २ बरोबरीनें. ३ तीन. ४ जुव्वा. ५ शंकरा सारखा गोसावी. ६ थुंकते. ७ आर्जव. ८ तुकडा. ९ कुत्री. १० कोंकत. ११ त्रास. १२ जगण्याची. १३पाणउतारा करी. १४ अतिशय. १५ स्वतःची बायको.

*मो. राज्य. ×ना. धनमानीं. ※ना. अविश्वासासी. +ना. मनामाजीं. *ना. बहुसालधन. ०ना. अभिमान. 7ना. निंदेचें. 0मो. स्वतंत्र. 1मो. धनवंतासी पूर्ण. 5ना. जडिसा समान. 6ना. दिहा पोरांची.

|| श्लोक || एते पंचदशानर्था ह्यर्थमूला मता नृणाम् || तस्मादनर्थमर्थाख्यं श्रेयोर्थी दूरतस्त्यजेत् || १९ ||

|| टीका || एवं हे पंधराही अनर्थ || मूर्ख अथवा पंडित || जे अर्थसंग्रह करित || अवश्य हे तेथ उठती || ४५ || यासि नाममात्र हा अर्थ || ये॒हवीं मूर्तिमंत अनर्थ || यालागीं श्रद्धार्थी जे हरिभक्त || तिहीं निश्चित त्यागावा || ४६ || जेवीं कां बोळ हुंगेना माशी || ढेंकूण नये *तेलापाशीं || त्रांळेंबा नलगे अग्नीसी || तेवीं जो अर्थासी नातळे || ४७ || जेवीं कां अग्नीमाजीं लवण पडे || तें तडतडोनि बाहेर पडे || तेवीं मोक्षाचिये चाडे || त्यागी रोकडें निजधन || ४८ || नाग॑ मुखीं घालितां आपण || क्षणार्ध दावी गोडपण || तोचि परिपाकीं आणी मरण || तैसा अ॑र्थ जाण अनर्थी ||४९|| यालागीं जो मोक्षार्थी || तेणें अर्थ न धरावा हातीं || कायावाचाचित्तवृत्तीं || अनर्थ निश्चितीं त्यागावा || ३५० || ×अर्थमूळें सकळ भेद || पूर्वीं बोलिला एवंविध || तेचि पुनःपुनः गोविंद || करूनि विशद सांगत || ५१ ||

|| श्लोक || भिद्यंते भ्रातरो दाराः पितरः सुहृदस्तथा || एका स्निग्धाः काकिणिना सद्यः सर्वेऽरयः कृताः || २० ||

|| टीका || इष्टमित्रांचें मित्रत्व मोडी || बंधुबंधूंचा स्नेह विघडी || सुहृदांचें सौजन्य तोडी || फुटकी कवडी अर्थाची || ५२ || पित्यापुत्रांमाजीं विरोध || स्त्रीपुत्रांमाजीं द्वंद्व || तो हा जाण अर्थसंबंध || विभांडी +हार्द्र सुहृदांचें || ५३ || काकिणी ह्मणजे ⁂वीस कवडी || ते आप्तांचे स्नेह तोडी || त्यांतील एक फुटकी कवडी || भेद पाडी सुहृदांसी || ५४ ||

|| श्लोक || अर्थेनाल्पीयसा ह्येते संरब्धा दीप्तमन्यवः || त्यजंत्याशुस्पृधो घ्नंति सहसोत्सृज्य सौहृदम् || २१ ||

|| टीका || अतिअल्प अर्थासाठीं || सुहृदता सांडोनि पोटीं || कोप खवळला उठी || शस्त्रमुष्टी उद्यत ||५५|| तेथें आप्त होऊनियां अनाप्त || परस्परें करिती घात || अर्थी अनर्थी प्राणांत || निजस्वार्थघातक || ५६ || जितां अर्थ अनर्थकारी || मेल्या ने नरकद्वारीं || उत्तम देहाची बोहेरी || अर्थ करी तें ऐक || ५७ ||

|| श्लोक || लब्ध्वा जन्माऽमरप्रार्थ्यं मानुष्यं तद्द्विजाग्र्यताम् || तदनादृत्य ये स्वार्थं घ्नंति यांत्यशुभां गतिम् || २२ ||

|| टीका || कोटिजन्मांचें शुद्ध सुकृत || तेणें कर्मभूमीं नरदेह प्राप्त || तेथेंही वर्णाग्र समर्थ || सत्कुळ प्रस्तुत ब्राह्मणत्वें ||५८|| ऐसें जन्म पावावया येथ || अमरही मरण मागत || इंद्रादि देव जे स्वर्गस्थ || तेही वांछित हें जन्म || ५९ || जे सत्यलोकपर्यंत || ऐश्वर्य पावले अद्भुत || तेही हें जन्म वांछित || उत्कंठित अहर्निशीं ||३६०|| येथ करितां भगवद्भक्ती || पायां लागती चारी मुक्ती || यालागीं हे जन्मप्राप्ती || अमर मागती अहर्निशीं || ६१ || ऐसें उत्तम जन्म

१ वाळवी. २ बचनाग. ३ द्रव्य, धन. ४ द्रव्यामुळें. ५ अंतःकरणांतील प्रेम. ६ वैर. ७ नाश. ८ देवही.

*मो. तापापाशीं. ×ना. अर्थामुळें. +ना. हृदय. ⁂ना. विषयकवडी.

पावोनी ॥ अति अभाग्य मी त्रिभुवनीं ॥ निजस्वार्थातें उपेक्षूनी ॥ भुललों धनीं धनलोभें ॥ ६२ ॥ धनलोभाचिया भ्रांतीं ॥ कां लोकेषणों लौकिकस्थितीं ॥ जो उपेक्षी भगवद्भक्ती ॥ अशुभगती तयासी ॥ ६३ ॥ तेचि कैशी अशुभगती ॥ धनलोभ्यां नरकप्राप्ती ॥ चौऱ्यांशीलक्ष योनींप्रती ॥ गर्भ भोगिती अतिदुःखें ॥ ६४ ॥ जया ब्राह्मणजन्माआंत ॥ स्वर्गमोक्ष सहजें प्राप्त ॥ तेचि अर्थीचा इत्यर्थ ॥ स्वयें सांगत धनलोभी ॥ ६५ ॥

॥ श्लोक ॥ स्वर्गापवर्गयोर्द्वारं प्राप्य लोकमिमं पुमान् ॥ द्रविणे कोऽनुषज्जेत मर्त्योऽनर्थस्य धामनि ॥ २३ ॥

॥ टीका ॥ ब्राह्मण करितां स्वधर्म ॥ वासना झळंबी स्वर्गकाम ॥ तें इंद्रचंद्रादिकांचें धाम ॥ पावे द्विजोत्तम सहजची ॥ ६६ ॥ ज्याचिया यजनाची स्थिती ॥ इतरांसि होय स्वर्गप्राप्ती ॥ एवं स्वर्ग तो ब्राह्मणांच्या हातीं ॥ त्यांसि ते गती सहजची ॥ ६७ ॥ सांडूनि एषणात्रयासी ॥ निष्काम स्वधर्म ज्या द्विजासी ॥ मोक्ष लागे त्याच्या पायांसी ॥ तिष्ठे अहर्निशीं आज्ञाधारी ॥ ६८ ॥ तो अनुग्रहि जयांसी ॥ ते पावती निजमोक्षासी ॥ एवढें सामर्थ्य ब्राह्मणापाशीं ॥ अनायासीं सहजची ॥ ६९ ॥ स्वर्ग जयाची पायरी ॥ मोक्ष ज्याचा आज्ञाधारी ॥ एवढी ब्राह्मणांची थोरी ॥ धनलोभावरी नाशिती ॥ ३७० ॥ ब्राह्मणजन्म पावल्या जाण ॥ निःशेष खुंटे जन्ममरण ॥ तेथ मी नाडलों आपण ॥ जोडूनि धन धनलोभें ॥ ७१ ॥ दुर्लभ येथें मनुष्यपण ॥ त्यामाजीं अतिदुर्लभ ब्राह्मण्य ॥ तेंही पावोनि मी आपण ॥ धनलोभें पूर्ण नागवलों ॥ ७२ ॥ पावोनि ब्राह्मणशरीर ॥ धनें नाडिले थोरथोर ॥ अर्थ अनर्थाचें मुख्य घर ॥ दुःख दुर्धर वाढवी ॥ ७३ ॥ अर्थ अनर्थाचें भाजन ॥ तें निःशेष त्यागावें धन ॥ वैराग्यें तापल्या पूर्ण ॥ स्वयें ब्राह्मण बोलत ॥ ७४ ॥ आशंका ॥ दैवें जोडिले संपत्तीसी ॥ नेऊनि सांडावें दिदीसी ॥ कीं घालावें *जळप्रदेशीं ॥ त्याग अर्थासी तो कैसा ॥ ७५ ॥ तें अर्थत्यागनिरूपण ॥ स्वयें सांगताहे ब्राह्मण ॥ जे असतील सधन ॥ तिहीं +सावधान परिसावें ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ देवर्षिपितृभूतानि ज्ञातीन्बंधूंश्च भागिनः ॥ असंविभज्य चात्मानं यक्षवित्तः पतत्यधः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ दैवें जोडिलियां धन ॥ आचरावे पंचमहायज्ञ ॥ करावें भगवत्पूजन ॥ उल्हासें जाण महोत्सव ॥ ७७ ॥ स्वयें करावें पितृर्पण ॥ षण्णवति श्राद्धें जाण ॥ पितर उद्धरावे आपण ॥ गयावर्जन करोनियां ॥ ७८ ॥ जित्यां पितरां त्रिकाळीं नमन ॥ कदा न करावें हेळण ॥ त्यांची अवज्ञा आपण ॥ प्राणांतीं जाण न करावी ॥ ७९ ॥ त्यांसि गौरवूनि आपण ॥ यथारुचि द्यावें अन्न ॥ यथाशक्तिं देऊनि धन ॥ सेवेनें संपूर्ण सुखी करावीं ॥ ३८० ॥ पिता स्वयमेव नारायण ॥ माता प्रत्यक्ष लक्ष्मी ×आपण ॥ ※ऐसें भावें ज्याचें भजन ॥ सत्पुत्र जाण तो एक ॥ ८१ ॥ ज्याच्या सेवा सुखी पितर ॥ तेंचि पितृतर्पण साचार ॥ जितां अवज्ञा तो अनाचार ॥

१ लोकांनीं चांगलें म्हणावें म्हणून, स्वर्गादि लोक प्राप्तीच्या इच्छेनें. २ बळकट धरी, निमग्न होई. ३ स्थान. ४ दारेषणा, लोकेषणा व वित्तैषणा अशा तीन. ५ कृपा करितो. ६ ब्राह्मणपण. ७ आडगल्लींत. ८ भूतयज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ, ब्रह्मयज्ञ, मनुष्ययज्ञ. ९ षाण्णव. १० गोड लागेल तसें. ११ शक्तीप्रमाणें.

*मो. जळप्रवेशीं. +ना. साधन. ×मो. जाण. ※ना. ऐशीया भावें ज्याचें मन.

मेल्या श्राद्धविचार तो लौकिक ॥ ८२ ॥ जो पितृवचनीं अविश्वासी ॥ त्याचि तेणें केल्य पापराशी ॥ जो पितृवचनविश्वासी ॥ मोक्ष त्यापाशीं वोळगणा ॥ ८३ ॥ जितमृतपितृतर्पण ॥ ते सांगीतली उणखूण ॥ या नांव गा *पितृभजन ॥ ऋषिपूजनें तें ऐक ॥८४॥ सन्मानें आणूनि ब्राह्मण ॥ श्रद्धा कीजे चरणक्षाळण ॥ चरणतीर्था अभिवंदनें ॥ सबाह्य जाण स्वयें कीजे ॥ ८५ ॥ धूप दीप यथोक्त पूजन ॥ यथारुचि तृप्ति सदन्न ॥ यथाशक्ति द्यावें धन ॥ ऋषिपूजन या नांव ॥८६॥ ब्राह्मण तेचि ऋषीश्वर ॥ ×ब्राह्मणमुखें तृप्त सनत्कुमार ॥ ब्राह्मणमुखें शार्ङ्गधर ॥ [1]यांला ठेंकर देतसे ॥ ८७ ॥ बंधु स्वगोत्र +स्वजन ॥ ०त्यांची दरिद्रपीडा दारुण ॥ निरसावी देऊनि धन ॥ हा मुख्य धर्म जाण श्रेष्ठत्वें ॥ ८८ ॥ कुटुंब पीडूनि आपण ॥ अन्यत्रां द्यावें अन्नधन ॥ तोचि अधर्म परिपूर्ण ॥ शुद्ध पुण्य तें नव्हे ॥ ८९ ॥ कुटुंबासि यथोचित ॥ सुखी करूनि समस्त ॥ याहूनि उरला जो अर्थ ॥ तो श्रेयार्थ वेंचावा ॥ ३९० ॥ अतिथि आलिया देख ॥ अन्न द्यावें आवश्यक ॥ ◊तो झालिया पराङ्मुख ॥पुण्य निःशेष हरासे ॥९१॥ सकळ दानांमाजीं7जाण ॥ अतिश्रेष्ठ अन्नदान ॥ दीनास देऊनि सन्मान ॥ द्यावें सदन्न अतिश्रद्धा ॥ ९२ ॥ कुटुंब सुखी करी आपण ॥ स्वेच्छा दे दीनासि भोजन ॥ परी [4]कदर्थवी जो निजप्राण ॥ तोही दारुण अधर्म ॥ ९३ ॥ जैसें कीजे दीनतर्पण ॥ त्यांत आपणही एक दीन ॥ तेथ न करूनि अधिकन्यून ॥ करावें भोजन समभागें ॥ ९४ ॥ पंक्तीमाजीं [5]प्रपंच जाण ॥ तें अन्नदानीं अतिविघ्न ॥ यालागीं करावें भोजन ॥ समभागीं आपण सकळांसी ॥ ९५ ॥ धनाचा सद्व्ययो खरा ॥ द्यावें अनाथप्रेतसंस्कारा ॥ अर्पावें दीनांच्या ❀उद्धारा ॥ धाडावें घरा अयाचिताच्या ॥ ९६ ॥ अंध पंगु मुके दीन ॥ यांसि संरक्षी जो आपण ॥ त्याचेंचि सार्थक धन ॥ शुद्ध पुण्य तयाचें ॥ ९७ ॥ साधुसज्जनां [6]विंटंबु अडी ॥ तो [7]विघंबु जो सधन तोडी ॥ त्याच्या निजधर्मांची गुडी ॥ उभारे रोकडी वैकुंठीं ॥ ९८ ॥ दुर्बळ जो कां भगवद्भक्त ॥ त्यासि संरक्षी जो धनवंत ॥ तेणें [2]तुष्टला भगवंत ॥ त्यातें उद्धरीत भक्ताआधीं ॥ ९९ ॥ सकळमंगळां मंगळ पूर्ण ॥ सकळकल्याणांचें कल्याण ॥ ते हे सद्गुरूचे श्रीचरण ॥ तेथ निजधन जयाचें अर्पे ॥ ४०० ॥ तयाच्या निजधर्मांचें निशाण ॥ सत्यलोकीं [8]लागलें जाण ॥ वैकुंठीं कैलासीं जाण संपूर्ण ॥ भेरी निशाण [9]त्राहाटिलें ॥ १ ॥ स्वधर्में जोडलें निजधन ॥ जो करी सद्गुरूसि अर्पण ॥ तोचि कर्मी निष्कर्म जाण ॥ परम पावन तो एक ॥ २ ॥ जो चढत्या वाढत्या ◊प्रीती ॥ गुरूसि अर्पी निजसंपत्ती ॥ त्यातें अंगीकारूनि लक्ष्मीपती ॥ आपुली निजभक्ती त्यासि दे ॥ ३ ॥ ज्यासि अनन्य गुरुभक्ती ॥ त्याच्या द्वारीं चारी मुक्ती ॥ दासीत्वें उभ्या असती ॥ त्यापासोनि श्रीपती परता नव्हे ॥ ४ ॥ ज्याचें तनु, मन, धन, ॥ गुरुचरणीं अर्पे पूर्ण ॥ त्यासि भवभयाचें भान ॥ कल्पांतीं जाण दिसेना ॥ ५ ॥ दैवें जोडली जे संपत्ती ॥ 3ते जैं वेंचे ऐसा निगुतीं॥ 4अर्थे परमार्थ प्राप्ती॥सभाग्य लाहती निज-

---

१ मस्तकास लावणें. २ तृप्त झालेला. ३ नष्ट होतें. ४ खाण्यापिण्यावांचून क्लेशयुक्त करितो. ५ भेद. ६ संकट. ७ प्रतिबंध करितो. ८ हीं रणवाद्यें आहेत. ९ वाजविलें. १० या रीतीनें.

*मो. पितृतर्पण. ×ना. ब्राह्मणेंतृप्त. +मो. सज्जन. ०मो. यांसी दरिद्रें पीडिल्या दारूण. ◊मो. तो गेलियां विमुख. 7मो. दान. ❀मो. उदरा. ◊ना. भगवत्प्राप्ती. 3ना. ते वेंचुनी ऐशा युक्तीं. 4ना. अर्थ स्वार्थ परमार्थ प्राप्ती.

निष्ठा ॥६॥ ऐसें न वेंचोनि धन ॥ स्वयाति कुटुंब पीडी पूर्ण ॥ जो पोटा न खाय आपण ॥ तें यक्षधन संचित ॥७॥ एवं कदर्थूनि निजप्राण ॥ जें संचिलें यक्षधन ॥ तें अधःपातासि कारण ॥ दुःख दारुण *धनलोभ्या ॥८॥ ह्मणे मीही याचि निष्ठा ॥ यक्षवित्तें झालों करंटा ॥ हातींचा स्वार्थ गेला मोठा ॥ वंचलों ×कैंटा निजमोक्षा ॥ ९ ॥ सांचोनियां यक्षवित्त ॥ म्यांचि माझें केलें अनहित ॥ ऐसा असे खेदयुक्त ॥ असे बोलत निजदुःखें ॥ ४१० ॥

॥ श्लोक ॥ व्यर्थयाऽर्थेहया वित्तं प्रमत्तस्य वयो बलम् ॥ कुशला येन सिद्ध्यंति जरठः किंनु साधये ॥ २५ ॥

॥ टीका ॥ निजभोगविवर्जित ॥ शिणोनि काया वाचा चित्त ॥ कष्टें मिळवावया वित्त ॥ झालों उन्मत्त अविवेकी ॥ ११ ॥ करितां वित्ताचा आयास ॥ गेलें तारुण्य बळ आयुष्य ॥ शरीर क्षीण झालें निःशेष॥तरी वित्ताचा +शोष शमेना ॥१२॥अर्थें अर्थ वाढवितां ॥ अनिवार वाढली चिंता ॥ तेणें विसरलों निजस्वार्था ॥ अर्थलोभता कदर्यू ॥१३॥ जेणें वित्तें ०साचार ॥ भूतदया परोपकार ॥ करूनियां विवेकी नर ॥ भवाब्धिपरपार पावले ॥ १४ ॥ ते मज निर्दैवाचें येथ ॥ वृथा वित्त वृथा २जीवित ॥ आयुष्यही गेलें व्यर्थ ॥ निजस्वार्थ बुडाला ॥ १५ ॥ ह्मणाल असतां जीतें जीत ॥ साधूनि घे निज स्वार्थ ॥ तें आतां न चले येथ ॥ अर्थ सामर्थ्यें दोनी गेलीं ॥ १६ ॥ अधर्मास्तव गेलें वित्त ॥ जरेनें गिळिलें सामर्थ्य ॥ केवळ मी जरठ येथ ॥ दैवहतें उरलों असें ॥ १७ ॥ कटकटा जोडितां अर्थ ॥ लोक नाडले समस्त ॥ ऐसें जाणोनि प्रस्तुत ॥ स्वयें सांगत कदर्यु ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ कस्मात्संक्लिश्यते विद्वान् व्यर्थयाऽर्थेहया सकृत् ॥ कस्यचिन्मायया नुनं लोकोऽयं सुविमोहितः ॥ २६ ॥

॥टीका॥ येथ अज्ञानाची कोण गती॥जे अर्थ अनर्थी ह्मणती ॥ तेही अर्था अर्थी होती ॥ ज्ञाते भ्रमती अर्थासी ॥ १९ ॥ ऐसे भ्रमले जे सज्ञान ॥ तेही अर्जावया धन ॥ युक्तायुक्त प्रयत्न ॥ अनुदिनीं जाण स्वयें करिती ॥४२०॥ सज्ञान भ्रमावया काय कारण ॥ ईश्वराची माया पूर्ण॥ ९अघटितघटी तिचें लक्षण ॥ ※त्या सज्ञान मोहिले ॥२१॥ कृष्णमाया मोहिले पंडित ॥ नव्हे ह्मणाल हा इत्यर्थ ॥ तरी ते जोडिताति अर्थ ॥ निजसुखार्थ भोगेच्छा ॥ २२ ॥ भोगांमाजीं जे ह्मणती सुख ॥ ते जाणावे ¹केवळ मूर्ख ॥ येच अर्थीचा विवेक ॥ कदर्यु देख बोलत ॥ २३

॥ श्लोक ॥ किं धनैर्धनदैर्वा किं कामैर्वा कामदैरुत ॥ मृत्युना ग्रस्यमानस्य कर्मभिर्वोत जन्मदैः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ कटकटा, वर्णाग्र्यें पूज्य पहाहो ॥ त्या द्विजासि भुलवी मायामोहो ॥ भोगीं वा-

१ ज्याचा उपयोग न करितां ज्याचें फक्त रक्षण करावयाचें असें धन. २ संकटांत घालून. ३ हा दैवा. ४ वृद्ध. ५ दुर्दैवी. ६ हायहाय. ७ द्रव्य मागणारे. ८ मिळविण्यास. ९ प्रतिदिवशीं, रोज. १० न घडणारें तें घडवून आणणारी. ११ तिनें.

*मो. धनलोभीं. ×ना. वाटा निजमोक्षाचा. +मो. सोस. ०ना. जितें साचार. 2मो. चित्त. 9ना. अघटघटणी. ※मो. त्याने धनी सज्ञान. 1ना. परममूर्ख.

द्वी जो देहो ॥ तोचि पहाहो नश्वर ॥ २४ ॥ त्या देहासि जे नानाभोग ॥ तोच त्यासि क्षयरोग ॥ धन जोडणें अनेग ॥ तोचि मार्ग *निधनत्वा ॥ २५ ॥ तें धन मिळे ×अनायासीं ॥ यालागीं धनवंत +उपासी ॥ अर्थ जोडोनियां प्रयासीं ॥ भोगितां कामासी सुख काय ॥२६॥ कामसुख कामिनीमेळीं ॥ सुखार्थ स्त्रियेतें प्रतिपाळी ॥ तेचि नानापरी सैळी ॥ देतां किंकळी सुटेना ॥२७॥ ⁂स्त्रीपुत्रकामभोगादिक ॥तेणें देहासि ०यावें सुख ॥ तो देहोचि मरणोन्मुख॥ नित्य अंतकें लागला ॥ २८ ॥ जे जे अतिक्रमे घडी ॥ ते ते काळ वयसा तोडी ॥ येथ कोण भोगाची 7गोडी ॥ धनकामें 6वेडीं सज्ञानें केलीं ॥ २९ ॥ सर्पमुखीं दर्दुर जातां ॥ तो दर्दुर होय माशा 4खाता ॥ तेणें न सुटे 9सर्पग्रासता ॥ जाण तत्त्वतां जयापरी ॥ ४३० ॥ तेवीं नानाभोगमेळें ॥ देहींचा मृत्यु =मागा न ढळे ॥ हें जाणोनिही आंधळे ॥ धनकामें झाले सज्ञान ॥ ३१ ॥ स्वयें कर्ता तोचि मरणधर्म ॥ त्यासि कोण निववी भोगकाम ॥ हा केवळ मायेचा भ्रम ॥ भ्रमले परम महासिद्ध ॥ ३२ ॥ धनें होईल परलोक ॥ तोही भोगु दुःखदायक ॥ 8भोगक्षयें कर्ममूर्ख ॥ येती देख अधःपाता ॥ ३३ ॥ करितां 2भोग्यकाम कर्म ॥ पुढती मरण पुढती जन्म ॥ भोगणें पडे अविश्रमें ॥ ⁂हें दुःख परम धनकामा ॥ ३४ ॥ 1धनकामासि निजसुख ॥ सर्वात्मना नाहीं देख ॥ मीही ऐसाचि होतों मूर्ख ॥ निजभाग्यें देख धन गेलें ॥३५॥

॥ श्लोक ॥ नूनं मे भगवांस्तुष्टः सर्वदेवमयो हरिः ॥ येन नीतो दशामेतां निर्वेदश्चात्मनः प्लवः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ मी पूर्वीं होतों अति अभाग्य ॥ आतां झालों अतिसभाग्य ॥ मज तुष्टला श्रीरंग॥ विवेकवैराग्य पावलों ॥ ३६ ॥ माझें संचित जें कां धन ॥ तेंचि माझें मुख्य अज्ञान ॥ तें हरीनें हरोनि आपण ॥ कृपा पूर्ण मज केली ॥ ३७ ॥ भक्तांचें अज्ञान निरसी हरी ॥ याचिलागीं नांवें तो हरी ॥ तेणें कृपा करूनि पुरी ॥ विवेक अंतरीं उपजविला ॥३८॥ वैराग्य विवेकेंवीण आंधळें॥ विवेक वैराग्यावीण पांगळें॥तें माझे हृदयीं जावळीं फळें॥एकवेळें उपजविलीं ॥३९॥ ऐशी हरीनें कृपा करूनी ॥ माझें धेनेंसी अज्ञान हरूनी ॥ विवेक वैराग्य यें दोनी ॥ माझे हृदयभुवनीं प्रकाशिलीं॥४४०॥परी कोणें काळें कोण देशीं ॥ कोण समय कोण 0विशेषीं ॥ हरी कृपा करितो कैशी ॥ हें कोणासी कळेना ॥४१॥ भक्तांचें हरावया चित्त ॥ हरि हरितो त्यांचें वित्त ॥ 5वित्तत्यागें करूनि सुचित्त ॥ दे विवेकयुक्त वैराग्य ॥ ४२ ॥ ऐसें घेतेंदेतें विंदान ॥ ब्रह्मादिकां अतर्क्य जाण ॥ यालागीं तो भगवंत पूर्ण ॥ त्यासि साही गुण वशवर्ती ॥ ४३ ॥ त्यांचें *अचिंत्या नंतरूप ॥ परी मजलागीं झाला सकृप ॥ माझें धेनेंसि 3निरसूनि पाप ॥ ज्ञानदीप उजळला ॥ ४४ ॥ होकां कृपा उपजली भगवंता ॥ परी म्यां वंचिल्यों यज्ञदेवता ॥

१ प्रार्थी. २ स्त्रियेचे संगतींत. ३ छळी. ४ मृत्यु. ५ जी जी घटका जाते तितके आयुष्य काळ खातो. ६ बेडूक. ७ पुनः. ८ एकसारखें. ९विष्णु. १०जुळीं. ११धनासह. १२ कौशल्य. १३स्वाधीन. १४ठकविलें.

*ना. निर्धनत्वा. ×मो. अनाथासी. +मो. उपहासी. ⁂मो. स्त्रीसुख काम भोगादिक. ०ना. व्हावें सुख. 7ना. जोडी. 6मो. वोढी सज्ञानें. 4मो. कवळिता. 9ना. सर्पग्रस्तता. =मो. कदा न टळे. 8मो. भोगक्षय क्रम मूर्ख. 2मो. भोगकामकर्म. ⁂ना. हें सुखे. 1मो. धनकामी. 0ना. वेळेसी. 5मो. वित्त गेलियां करूनि. *मो. चिदानंदरूप. 3मो. हरूनि पाप.

त्या क्षोभल्या करिती घाता ॥ हेंही सर्वथा घडेना ॥ ४५ ॥ करीं चक्र धगधगीत ॥ ज्याचा पाठिराखा हरि समर्थ ॥ विघ्नाचा वारा *न लागे तेथ ॥ देव वंदीत तयासी ॥ ४६ ॥ देवीं ×वंदूनि प्रह्लादासी ॥शांत करविलें नृसिंहासी ॥तो पाठिराखा +नरहरि ज्यासी ॥विघ्न त्यापाशीं रिघे केवीं ॥ ४७ ॥ जेणें देवांचिया कोडी ॥ क्षणें सोडविल्या बांदोडी ॥ त्याचे भक्तांची *रोम वांकुडी ॥ देवें बापुडीं केवीं करिती ? ॥४८॥ जो सकळदेवांचा नियंता ॥ ज्याचे चरण देव वंदिती माथां ॥ तो भगवंत साह्य असतां ॥ विघ्न सर्वथा बाधीना ॥ ४९ ॥ ज्याचेनि बळें वाढले देव ॥ देव जयाचे अवयव ॥ तो हरि तुष्टला स्वयमेव ॥ तेथ विघ्नसंभव कोणाचा ॥ ४५० ॥ सर्वदेवमय श्रीहरी ॥ इंद्रचंद्ररूपें माझा हरी ॥ ऐशिया मज दीनावरी ॥ विघ्न संसारी ✻असेचिना ॥ ५१ ॥ ऐशिये कृपेचें कारण ॥ ये जन्मीं नाहीं साधन ॥ हें माझें पूर्वील जुनें ऋण ॥ देवापाशीं जाण ठेविलें होतें ॥ ५२ ॥ पूर्वीं कोण जन्मीं कोण देशीं ॥ तीर्थीं क्षेत्रीं कोणे वरुषीं ॥ कोणा आचरलों सत्कर्मासी ॥ तेणें हृषीकेशी तुष्टला ॥ ५३ ॥ मातें अतिदुःखी देखोन ॥ हरि तुष्टला कृपा ०पूर्ण ॥ त्याचे कृपेस्तव जाण ॥ विवेकसंपन्न मी झालों ॥ ५४ ॥ हो कां धनक्षयें दिधलें दुःख ॥ तेणें दुःखें पावलों निजसुख ॥ भवाब्धि तरावया देख ॥ वैराग्य विवेक दृढ तारूं ॥ ५५ ॥ हारिखें वोसंडूनि ब्राह्मण ॥ ह्मणे उरलेनि आयुष्यें जाण ॥ तृथा जात्रोनेदी अर्ध क्षण ॥ करीन निर्दळण सुखदुःखां ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ सोऽहं कालावशेषेण शोषयिष्येऽगमात्मनः ॥ अप्रमत्तोऽखिलस्वार्थे यदि स्यात्सिद्ध आत्मनि ॥ २९ ॥

॥ टीका ॥ काइसा भवभयाचा पाडु ॥ वेंईन कोटिजन्मांचा मूड ॥ नासल्या आयुष्याचा कैवाडें ॥ करीन निर्वाड येणें देहें ॥५७॥ देहासि आली वार्धक्यता ॥ परी वृद्धाप्य नव्हे माझिया चित्ता ॥ तेणें चित्तें चिंतुनी भगवंता ॥ भवबंध आतां छेदीन ॥ ५८ ॥ उरलेनि आयुष्यें येथ ॥ कळिकाळाचे पाडीन दांत ॥ गर्भदुःखाचें खणोनि खत ॥ मरणाचा ᶜघात मीं करीन ॥ ५९ ॥ जेणें देहें ᵋसत्यानृत ॥ कर्म आचरलों समस्त ॥ तें देह मीं शोषीन येथ ॥ विदेहस्थ निजभावें ॥४६०॥ घालूनि निजबोधाची धाडी ॥ फोडीन देहाची बांदवडी ॥ तोडीन सुखदुःखाची बेडी ॥ उभवीन गुढी सायुज्यें ॥ ६१ ॥ आजि वैराग्यविवेकयुक्त ॥ मी निजस्वार्थीं सावचित्त ॥ जो जो साधीन परमार्थ ॥ तो तो हस्तगत मज होय ॥६२॥ मजचि साधे निजस्वार्थ ॥ हाचि नेम नाहीं येथ ॥ जो जो वैराग्यविवेकयुक्त ॥ त्यासि परमार्थ आंदणा ॥ ६३ ॥ वैराग्यविवेकाचें लक्षण ॥ देह गेह स्त्रियादि धन ॥ असतां आसक्त नव्हे मन ॥ वैराग्य पूर्ण या नांव ॥ ६४ ॥ म्यां जो आरंभ केला पहाहो ॥यासि देवोदेवीसमुदावो ॥ येणें सहित देवाधिदेवो ॥ मज साह्य हो हें प्रार्थीत ॥ ६५ ॥

---

१ बंदांतून. २ केश. ३ विशाद, गणना. ४ दोष उडविणें, अभिमान धरणें. ५ निर्णय. ६ फाडीन. ७ चांगलीं किंवा वाईट. ८ घाला, हल्ला. ९ बंधन. १० सावध, हुशार, खबरदार. ११ बक्षीस.

*मो. न निघे, ना. न रिघे. ×मो. वंदिलें. +ना. हरी. *ना. लोंव. ✻मो. उरों नेदी. ०मो. करुनी. ᶜमो. प्रांत. ᵋमो. कृत्याकृत्यें.

॥ श्लोक ॥ तत्र मामनुमोदेरन् देवास्त्रिभुवनेश्वराः ॥ मुहूर्तेन ब्रह्मलोकं खट्वांगः समसाधयत् ॥ ३० ॥

॥ टीका ॥ इंद्रियें अधिष्ठात्री देवता ॥ मज साह्य होतु समस्ता ॥ सिद्धि पावावया परमार्था ॥ इंद्रियजयता मज यावी ॥ ६६ ॥ जो त्रिभुवनेश्वर विख्यात ॥ तो साह्य झालिया भगवंत॥ देवता साह्य होती समस्त ॥ त्या अंतर्भूत हरिरूपीं ॥ ६७ ॥ देवतारूपें भावूनि हरी ॥ सकळ देवांची सेवा करी ॥ साह्य होऊनि दीनोद्धारीं ॥ मज भवसागरीं तारावें ॥ ६८ ॥ ह्मणाल वयसेचा शेवट ॥ केवळ झालासी तूं जरठ॥ वार्द्धकीं हे खटपट ॥ वृथा कष्ट कां करिशी ॥६९॥ ऐसा न *मानावा अर्थ॥ खट्वांगराजा विख्यात ॥मुहूर्तें साधिला परमार्थ ॥ निजस्वार्थ पावला ॥४७०॥ त्याहूनि माझें तंव येथ ॥आयुष्य असेल बहुत ॥ देव साह्य होत समस्त ॥ निमेषें परमार्थ स्वाधीन ॥ ७१ ॥ आजि विवेकवैराग्य जैसें आहे ॥ हें जं निर्वाहलें राहे ॥ तैं कळिकाळ बापुडें काये ॥ म्यां जिंतिला होये संसार ॥ ७२ ॥ हा पूर्वीं कैसा होता येथ ॥ आतां पालटलें याचें वृत्त ॥ झाला ×विवेकवैराग्ययुक्त ॥ हें आश्चर्य सांगत श्रीकृष्ण ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ इत्यभिप्रेत्य मनसा ह्यावंत्यो द्विजसत्तमः ॥ उन्मुच्य हृदयग्रंथीन् शांतो भिक्षुरभून्मुनिः ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ ऐसा तो अवंतीचा ब्राह्मण ॥ अतिकदर्यु होता जाण ॥ त्याच्या हातींचें गेलिया धन ॥ +वैराग्यचिह्न ०पालटलें ॥ ७४ ॥ यालागीं वैराग्यविवेक चित्तीं ॥ झाल्या आंदणी ब्रह्मप्राप्ती ॥ कृष्ण सांगे उद्धवाप्रती ॥ निजात्मस्थिती साधाया ॥ ७५ ॥ पूर्वीं होता ब्राह्मण अधम ॥ धनलोभीं नित्यकर्म ॥ तोचि झाला द्विजोत्तम ॥ विवेक परम वैरागी ॥ ७६ ॥ पूर्वीं केलिया निश्चितार्था ॥ तो मी स्वाधीन सर्वथा ॥ ऐशिया अतिउल्हासता ॥ निजपरमार्था साधक ॥ ७७ ॥ माझिया दुःखाचें कारण ॥ माझा मीचि झालों जाण ॥ धरितां काम लोभ अभिमान ॥ दुःख दारुण मज माझें ॥ ७८ ॥ मज दुःख देऊनि गेलें धन ॥ धन तें दुःखाचें *भाजन ॥ स्त्रीपुत्रार्थ ⁂सलोभी आपण ॥ तिहींच जाण मज दवडिलें ॥ ७९ ॥ धरावा ज्ञातीचा अभिमान ॥ तंव स्वयातीं ⁴मी सांडिलों जाण ॥ मजसी विन्मुख झाले स्वजन ॥ त्यांचा लोभ कोण मज आतां ॥ ४८० ॥ स्त्री पुत्र स्वजन धन ॥ यांच्या लोभाचें मुख्य कारण ॥ माझा मज देहाभिमान ॥ त्यासि माझें नमन साष्टांग ॥ ८१ ॥ नमन स्त्रीपुत्रादिधनांसी ॥ नमन स्वयाति स्वजनांसी ॥ नमन देहाभिमानासी ॥ संबंध तुह्मां आह्मांसी असेना ॥ ८२ ॥ जेवीं कां जळा आणि चंद्रबिंबासी ॥ एकत्र वास दिसे दोहींसी ॥ परी चंद्र अलिप्त जळेंसी ॥ तेवीं संबंध आह्मांसी तुम्हां असेना ॥ ८३ ॥ जेवीं कां अखंड अहर्निशीं ॥ छाया जडलीसे रूपासी ॥ तें रूप ¹न बैसे छायेसी ॥ तेवीं संबंधू तुम्हांसी मज नाहीं ॥८४ ॥ जेवीं

१ इंद्रियांचे ठिकाणीं राहणाऱ्या. २ वयाचा. ३ कायम, निरंतर. ४ प्राप्त झालें. ५ पात्र. ६ मला. ७ सोडिलें.

*मो. ह्मणावा. ×मो. निःशेष वैराग्ययुक्त. +ना. वैराग्यें चिन्ह. ०मो. पावलें. *ना. कारण. ⁂मो. लोभी मी आपण. ⁴मो. मज सांडिलें. ¹ना. नातळे छायेसी.

तारुण्य ये देहापाशीं ॥तेणें तारुण्यें देहो मुसमुशी॥ *शेखीं तारुण्य सांडी देहासी॥ तेवीं म्यां तद्यांसी सांडिलें ॥ ८५ ॥ वनीं वसंताचें रिगवणें ॥ वनश्री शोभा मिरवी तेणें ॥ तो वसंत जेवीं सांडी वनें ॥ तेवीं म्यां सांडणें अहंममता ॥ ८६ ॥ बाप ×सवैराग्य विवेक ॥ त्याग करविला अलोलिक ॥ देहाभिमाना तिळोदक ॥ दीधलें देख ममतेसी ॥ ८७ ॥ जेवीं नंष्टलिया पुत्रासी ॥ पिता घटस्फोटें त्यागी त्यासी ॥ तेवीं त्यागूनि देहाभिमानासी ॥ स्वयें संन्यासी तो झाला ॥ ८८ ॥ जेवीं कां फळ परिपाकातें ॥ +सांडवी जन्मल्या निजदेंठातें ॥ देंठ न धरी त्या फळातें ॥ फळ देंठातें धरीना ॥ ८९ ॥ तेवीं हा न धरी अहंतेसी ॥ अहंता लाजिली नये त्यापाशीं ॥ हाही देहाभिमानासी ॥ सद्भावेंसीं नातळे ॥ ४९० ॥ जळीं जेवीं पद्मिणीपान ॥ असोनि जळेंसी अलिप्त जाण ॥ तेवीं नातळोनि देहाभिमान ॥ संन्यासग्रहण विध्युक्त ॥ ९१ ॥ आन संन्यासी करोनि होम ॥ जाळिला ह्मणती क्रोध काम ॥ शेखीं तिळ तूप होय भस्म ॥ क्रोध काम संचले ॥९२॥ तैशी नव्हेच याची होमस्थिती ॥ जाळिल्या विकल्पाच्या वृत्ती ॥ कामक्रोधांची पूर्णाहुती ॥ केली अहंकृतीसमवेत ॥ ९३ ॥ होमूनि निजस्वभावासी ॥ झाला त्रिदंडी संन्यासी ॥ आज्ञा घेऊनि गुरुपाशीं ॥ सुखें सुखवासी विचरत ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ स चचार महीमेतां संयतात्मेंद्रियानिलः ॥भिक्षार्थं नगरग्रामानसंगोऽलक्षितोऽविशत् ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ जिणोनियां मन पवन ॥ सांडोनियां ※मानाभिमान ॥परमानंदें परिपूर्ण॥ पृथ्वीमाजीं जाण विचरत ॥ ९५ ॥ ज्यासि नावडे देहसंगती ॥ त्यासि कैचा संगु सांगाती ॥ एकला विचरे क्षितीं ॥ आत्मस्थिती निजबोधें ॥ ९६ ॥ अखंड वसे वनांतरीं ॥ भिक्षेलागीं निघे नगरीं ॥ खेट, खर्वट, ग्रामीं पुरीं ॥ भिक्षा करी यथाप्राप्त ॥ ९७ ॥ मी एक भिक्षेसि येता ॥ हा नेम न करी सर्वथा ॥ अलक्ष्य येवोनि अवचितां ॥ जें आलें हातां तेणें सुखी ॥ ९८ ॥ पंचागोर सप्तागार ॥ हाही नेम नाहीं निर्धार ॥ कोणेविषींचा अहंकार ॥ अणुमात्र धरीना ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ तं वै प्रवयसं भिक्षुमवधूतमसज्जनाः ॥ दृष्ट्वा पर्यभवन् भद्र बह्वीभिः परिभूतिभिः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ न करी देहमळक्षाळण ॥ मुसळधौत करी स्नान ॥ यालागीं तो धूसरवर्ण ॥ अवधूतपण या हेतू ॥ ५०० ॥ ऐसा विचरतां पृथ्वीसी ॥ अवचटें आला अवंतीसी ॥ अति वृद्ध आणि संन्यासी ॥ अवधूतवेषी देखिला ॥ १ ॥ संन्यास घेतलिया जाण ॥ पूर्वभूमिका अवलोकन ॥ एक वेळा करावी आपण ॥ पद्धतिलेखन आचार्यांचें ॥२॥ ते नगरींचे ह्मणती जन॥

---

१ प्राप्ति. २ दुष्ट, भ्रष्ट. ३ फळ पिकल्यावर देंठापासून गळून पडतें. ४ कमलाचें पत्र. ५ होम करूनी. ६ मन व प्राण. ७ खेड्यापाड्यांत. ८ नकळेसा. ९ पांच घरें. १०अंग न चोळतां. ११ मलिन. १२सहज, अकस्मात. १३ जन्मभूमी एकवार पहावी.

*मो. तें सांडी सकल इंद्रियांसी. ×ना. वैराग्य सविवेक. +मो. झाडीं जन्मल्या. ※ना. मानापमान.

अरे हा कदर्यु ब्राह्मण ॥ याचें हारपल्या धन ॥ संन्यासी जाण हा झाला ॥ ३ ॥ हें ऐकोनियां अतिदुर्जन ॥ त्यासभोंवतें मीनले जाण ॥ परस्परें दावूनि खूण ॥ विरुद्ध *छळण मांडिलें ॥ ४ ॥ त्यासि बहुसाल उपद्रवितां ॥ क्षणार्ध पालट नव्हे चित्ता ॥ क्रोधा नयेचि सर्वथा ॥ अतिविवेकता महाधीरू ॥ ५ ॥ त्याच्या उपद्रवाची कथा ॥ आणि त्याची सहनशीलता ॥ तुज मी सांगेन तत्त्वतां ॥ सावधानता अवधारीं ॥ ६ ॥ दृष्टि ठेवूनि येथिच्या अर्था ॥ विवेककुशल होय श्रोता ॥ अर्थ धरी भावार्थता ॥ शांति तत्त्वतां तो लाभे ॥ ७ ॥ विवेकचित्तचकोरचंद्रा ॥ भागवतभाग्यें शुद्धमुद्रा ॥ ×शांतिसौभाग्यनरेंद्रा ॥ ऐक सुभद्रा उद्धवा ॥ ८ ॥ आकळावया निजशांतीसी ॥ कृष्ण संबोधी उद्धवासी ॥ ऐसें सावध करोनि त्यासी ॥ ह्मणे दशा ते ऐशी शांतीची ॥९॥ अवरोधितां जीविकेसी ॥ +सन्मान देतां अपमानेंसी ॥ जो सर्वथा न ये क्षोभासी ॥ शांति त्यापाशीं तें एक ॥ ११० ॥

॥ श्लोक ॥ केचित्त्रिवेणुं जगृहुरेके पात्रं कमंडलुम् ॥ पीठं चैकेऽक्षसूत्रं च कंथां चीराणि केचन ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ दुर्जनीं वेढूनि संन्यासी ॥ छळणार्थ लागती पायांसी ॥ तेणें नमनेंप्रसंगेंसी ॥ करिती स्पार्शासी अवघेही ॥ ११ ॥ एक ह्मणती वृद्ध संन्यासी ॥ एक ह्मणती किती ०चातुर्मासी ॥ एक पुसती सांप्रदायासी ॥ कोणें गुरूनें तुह्मांसी मुंडिलें ॥ १२ ॥ एक खुणाविती एकासी ॥ पूर्वभूमी पुसा यासी ॥ एक ह्मणती यापाशीं ॥ धनसंग्रहासी पुसा रे ॥ १३ ॥ एक ह्मणती अहो स्वामी ॥ तुमची कवण पूर्वभूमी ॥ तुह्मी व्यापारी कीं उद्यमी ॥ कोणे ग्रामीं निवासू ॥ १४ ॥ एक ह्मणती *कांहीं आहे धन ॥ एक ह्मणती 2आतां निर्धन ॥एक ह्मणती न करा छळण ॥ विरक्त पूर्ण संन्यासी ॥१५॥ ऐसें करितां छळण ॥ संन्यासी अनुद्वेग जाण॥ ❋निःशब्दवादें धरिलें मौन ॥ कांहीं वचन न बोले ॥ १६ ॥ एक ह्मणती त्रिदंडा कारण ॥ हा पूर्वी होता अति सधन ॥ कोरूनि भरिलें असे धन ॥ हेंचि लक्षण त्रिदंडाचें ॥ १७ ॥ एक ह्मणती सहस्रदोरीं ॥ कंथा केली असे अतिथोरी ॥ एक ह्मणती त्यामाझारीं ॥ धन शिरोवरी खिळिलेंसे ॥१८॥ एक ह्मणती काय पाहतां तोंड ॥ येणें मांडिलेंसे पाखांड ॥ ऐसा निर्भर्त्सितां वितंड ॥ एकें त्रिदंड हरितेला ॥ १९ ॥ एकें हरितलें पाणिपात्र ॥ एकें नेलें पीठ पवित्र ॥ एकें नेलें अक्षसूत्र ॥ काषायवस्त्र तें एकें ॥ १२० ॥ एक ह्मणे हा माझा ऋणाईत ॥ भला सांपडला येथ ॥ ह्मणोनि कंथेसि घाली हात ॥ कौपीनेंयुक्त तेणें नेलें ॥ २१ ॥ ऐसें करितांही दुर्जन ॥ त्याचें गजबजीना मन ॥ कांहीं न बोले वचन ॥ क्षमेनें पूर्ण निजधैर्य ॥ २२ ॥ तो ह्मणे येणें जाणें हीं दोनी ॥ केवळ अदृष्टाअधिनी ॥ यालागीं मागण्याची ग्लानी ॥ 6न करूनि मुनी

१ दैवशाली. २ आडकाठी घालणें. ३ पायां पडण्याच्या निमित्तानें. ४ संन्यास घेऊन वर्षे किती झालीं. ५ पहिली राहण्याची जागा. ६ राहणें. ७ स्वस्थ, शांत. ८ दंड कोरून त्यांत द्रव्य भरलें. ९ कुटिल बुद्धीनें, विनाकारण. १० हिसकावून घेतला. ११ आसन. १२ जपमाळ. १३ कर्जदार. १४ गोधडी. १५ लंगोटी. १६ चिंता.

*ना. लक्षण मांडिलें. ×मो. शांति सौभाग्यमुनेंद्रा. +मो. अपमान करितां सन्मानेंसी. ०मो. चातुर्मास्यें तुह्मांसी. *मो. कायें आहे. 2मो. आतां निधन. ❋मो. निःशब्दवाचें. 6ना. जाणूनि मुनी.

निघाला ॥ २३ ॥ संन्यासी जातां देखोनी ॥ सभ्य सभ्य शठ येऊनी ॥ साष्टांग नमस्कार करूनी ॥ अतिविनीतपणीं विनवित ॥ २४ ॥ मग ह्मणती हरहर ॥ अपराध घडला थोर ॥ *मातले हे रांडपोर ॥ पात्रापात्र न ह्मणती ॥ २५ ॥ स्वामीनीं कोप न धरावा मनीं ॥ वस्त्रें घ्यावीं कृपा करूनी ॥ परतविला पायां लागूनी ॥ पूर्णछळणीं छळावया ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ प्रदाय च पुनस्तानि दर्शितान्याददुर्मुनेः ॥

॥ टीका ॥ संन्यासी आणूनि साधुवृत्ती ॥ दंडकमंडलू पुढें ठेविती ॥ एक वस्त्रें आणोनि देती ॥ एक ते नेती हिरोनी ॥ २७ ॥ एक ते ह्मणती वृद्ध संन्यासी ॥ त्याचीं वस्त्रें द्यावीं त्यासी ॥ एक ह्मणती या शठासी ॥ दंडितां आह्मांसी अतिपुण्य ॥ २८ ॥ वस्त्रें न देती उपहासीं ॥ संन्यासी ×निघे सावकाशीं ॥ एक परतवूनि त्यासी ॥ देऊनि वस्त्रांसी जा ह्मणती ॥ २९ ॥ एक धांवूनि हाणे माथां ॥ वस्त्रें हिरोनि जाय परता ॥ एक ह्मणती यारे आतां ॥ वृद्ध कां वृथा शिणवाल ॥५३०॥ यापरी संन्यासी आपण ॥ गेला वस्त्रें वोसंडून ॥ करोनियां संध्या स्नान ॥ भिक्षार्थ जाण निघाला ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ अन्नं च भैक्ष्यसंपन्नं भुंजानस्य सरित्तटे ॥ ३५ ॥ मूत्रयंति च पापिष्ठाः ष्ठीवंत्यस्य च मूर्द्धनि ॥ यतवाचं वाचयंति ताडयंति न वक्ति चेत् ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ भिक्षा मागोनि संपूर्ण ॥ शास्त्रमार्गें विभागून ॥ सरितातटीं करितां भोजन ॥ देखोनि दुर्जन तेचि आले ॥ ३२ ॥ अरे हा संन्यासी नव्हे साचा ॥ कदर्यु आमुचे गांवींचा ॥ होय नव्हे न बोले वाचा ॥ हा ठकपणाचा उपावो ॥ ३३ ॥ यास बोलविल्यावीण राहे ॥ तो याचाचि दासीपुत्र होये ॥ ऐशी शपथ करूनि पाहे ॥ आले समुदाय तयापाशीं ॥३४॥ एक ह्मणे याचें मौन ॥ उडवीन मी न लागतां क्षण ॥ हा जेणें करी शंखस्फुरण ॥ तो उपावो जाण मी जाणें ॥ ३५ ॥ ते महापापी अतिदुर्मती ॥ जेवितां त्याचे मस्तकीं मुतती ॥ तरी क्रोध नये त्याचे चित्तीं ॥ निजात्मस्थितीं निवाला ॥३६॥ जरी अंतरीं क्रोध आला ॥ तरी तोचि अशांत झाला ॥ बाहेरी न बोलवे बोला ॥ लोकलाजे भ्याला पोटेस्थें ॥३७॥ तैसा नव्हे हा संन्यासी ॥ धोऊनि सांडिलें जनलाजेसी ॥ निजशांतीची दशा कैशी ॥ क्रोध मानसीं +खवळेना ॥ ३८ ॥ आंत एक ※बाह्य एक ॥ या नांव मुख्य दांभिक ॥ तैसा हा संन्यासी नव्हे देख ॥ सबाह्य चोख निजशांती ॥ ३९ ॥ तंव ते दुर्जन ह्मणती ॥ अरे हा न बोले निश्चितीं ॥ सन्मुख मुखावरी थुंकिती ॥ अतिनिंदिती नोकूनी ॥ ५४० ॥ एक हाणिती लाता ॥ एक टोले देती माथां ॥ एक ह्मणती न बोलतां ॥ यासी सर्वथा न सोडा ॥ ४१ ॥

॥ श्लोक ॥ तर्जयंत्यपरे वाग्भिः स्तेनोयमिति वादिनः॥ बध्नंति रज्ज्वा तं केचिद्बध्यतां बध्यतामिति ॥ ३७ ॥

---

१ ढोंग्यास. २ टाकून. ३ यथाशास्त्र विभाग करून. ४ नदीच्या कांठीं. ५ बोंब. ६ क्रोधयुक्त. ७ पोटाचे आशेनें—अवांतर प्राप्ती.

*ना. पातले हे. ×ना. नेघे. +मो. उठेना. ※मो. बाहेरी.

॥ टीका ॥ आणिक एक दुरूनि जाण ॥ वर्मीं विंधिती वाग्बाण ॥ *त्याच्या त्या वर्मस्पर्शाचें लक्षण ॥ आह्मीं संपूर्ण जाणीतलें ॥ ४२ ॥ याचे वेषाचा विचारू ॥ शठ नष्ट दांभिक थोरू ॥ भिक्षामिसें हिंडे हेरू ॥ धरा चोरू हा निश्चितीं ॥ ४३ ॥ ऐसे विकल्पवाक्यें ×गर्जती ॥ एक बांधा बांधा ह्मणती ॥ एक दृढदोरीं बांधिती ॥ दोहीं हातीं +अधोमुख ॥ ४४ ॥

॥ श्लोक ॥ क्षिपन्त्येकेऽवजानंत एष धर्मध्वजः शठः ॥ क्षीणवित्त इमां वृत्ति-

मग्रहीत्स्वजनोज्झितः ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ त्याचे पूर्ववृत्त जे जाणती ॥ ते अपमानूनि निंदिती ॥ पूर्वीं कदर्यूची ख्याती ॥ हा आह्माप्रती संन्यास मिरवी ॥४५॥ येणें सूक्तासूक्त संचिलें धन ॥ तें अधर्में वित्त झालें क्षीण ॥ स्वजनीं सांडिला दवडून ॥ पोटासी अन्न मिळेना ॥ ४६ ॥ अन्न मिळावया पोटासी ॥ झाला कपटवेषी संन्यासी ॥ लाज नाहीं या निर्लज्जासी ॥ योग्यता आह्मांसी दाविती ॥ ४७ ॥ पूर्वींलागूनि हा वंचक ॥ आतां झाला संन्यासी दांभिक ॥ याचें मत नेणे भोळा लोक ॥ महाठक दृढमौनी ॥ ४८ ॥ होका बहुरूप्याचीं सोंगें जैसीं ॥ तेवीं हा उत्तमवेषें संन्यासी ॥ होऊनि ठकूं आला आह्मासी ॥ मारितां यासी दोष नाहीं ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ अहो एष महासारो धृतिमान्गिरिराडिव ॥ मौनेन साधयत्यर्थं ब-

कवत् दृढनिश्चयः ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ हा दांभिकांमाजीं बळी ॥धरिल्या वेषातें प्रतिपाळी ॥आम्हीं पीडितां न डंडळी॥ जेवीं कां वाहटोळीं महामेरू ॥ ५५० ॥ याच्या धैर्याचें शहाणपण ॥ साधावया अन्न आच्छादन ॥ बकाच्या ऐसें धरिलें मौन ॥ स्वार्थ पूर्ण लक्षूनी ॥ ५१ ॥ बक गिळावया मासा ॥ मौन धरोनि राहे जैसा ॥ हाही जाणावा तैसा ॥ भोळ्या माणसां नाडील ॥ ५२ ॥ हा धनलोभार्थे जाणा ॥ पूर्वीं उपद्रव नाणी मना ॥ तेचि झालिसे दृढ धारणा ॥ उपद्रवगणना या नाहीं ॥ ५३ ॥ एक ह्मणती धैर्यमूर्ती ॥ ह्मणोनियां लाता हाणिती ॥ एक ते नाकीं काड्या सुती ॥ याची निजशांती पाहोंपां ॥ ५४ ॥ ऐसऐसे उपद्रविती ॥ नानापरी उपहासिती ॥ तरी द्वेष नुपजे चित्तीं ॥ निजशांतीं निश्चळ ॥ ५५ ॥ जंवजंव देखती त्याची शांती ॥ तंवतंव दुर्जन क्षोभा येती ॥ नाना उपद्रव त्यासि देती ॥ तेंचि श्रीपती सांगत ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ इत्येके विहसंत्येनमेके दुर्वातयंति च ॥ तं बबंधुर्निरुरुधुर्यथा क्री-

डनकं द्विजम् ॥ ४० ॥

॥ टीका ॥ कदर्यु बाणली पूर्ण शांती ॥ ऐसे एक उपहासिती ॥ एक नाकीं चुना लाविती ॥ एक मुख माखिती काजळें ॥ ५७ ॥ एक अतिशठ साचोकारें ॥ पुढां ठाकोनि पाठिमोरे ॥ शर्धा करिती अधोद्वारें ॥ नाकीं तोंडीं भरे दुर्गंध ॥ ५८ ॥ तरी त्याचिया निजस्थिती ॥ अणुमात्र क्षोभ नये चित्तीं ॥ तोचि संन्यासी त्रिजगतीं ॥ ज्याची ढळेना शांती क्षोभविल्याही

१ पाळत ठेवण्याकरितां. २ वाटेल त्या रीतीनें. ३पूर्वीपासून. ४घाबरत नाहीं. ५ वाऱ्याच्या वावटळीनें. ६ फसवील. ७ घालिती. ८ पादणें.

*मो. याच्या वेषाचें. ×मो. जल्पती. +मो. पराङ्मुख.

॥ ६९ ॥ एवं क्षोभेना त्याचें मन ॥ देखोनि खवळले दुर्जन ॥ त्यासि गळां सांखळ निरोधून॥ आणिला बांधून चौबांरा ॥ ९६० ॥ यासि वोळखारे कोणी तुह्मी ॥ हा धनलोभी जो अकर्मी ॥ तो आजि सांपडविला आह्मीं ॥ अति अधर्मी दांभिक ॥ ६१ ॥ जेवीं गारुडी बांधी माकडा ॥ तेवीं संन्यासी बांधिला गाढा ॥ मिळोनियां चहूंकडा ॥ मागां पुढां वोढिती ॥ ६२ ॥ एक वोढिती पूर्वेसी ॥ एक वोढिती पश्चिमेसी ॥ संन्यासी हांसे निजमानसीं ॥ सुख सर्वांसी होय येणें ॥ ६३ ॥ देहप्रारब्ध भोगी जाण ॥ यांचा मजसी संबंध कोण ॥ येणें विवेकें क्षमा पूर्ण ॥ कोणाचें मन दुखवीना ॥ ६४ ॥ जेथ स्वगोत्र सोइरे स्वजन ॥ जिहीं दीधला अतिसन्मान ॥ त्यांदेखतां *अपमान ॥ अनुद्विग्न जो साहे ॥६५॥ त्यापाशीं शांति संपूर्ण ॥ उद्धवा निश्चयेंचि जाण ॥ ज्याचें लोकेषणा लाजे मन ॥ अशांति जाण तेठायीं ॥ ६६ ॥ ऐसा क्षोभवितां पहाहो ॥ क्षोभां न चढे त्याचा भावो ॥ त्या संन्याशाचा अभिप्रावो ॥ स्वयें देवाधिदेवो सांगत ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ एवं स भौतिकं दुःखं दैविकं दैहिकं च यत् ॥ भोक्तव्यमात्मनो दिष्टं प्राप्तं प्राप्तमबुद्ध्यत ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ भिक्षु बोले निजविवेक ॥ त्रिविधप्रारब्धें बांधले लोक ॥ +तो भोग भोगणें पडे आवश्यक ॥ रावो, रंक सुटेना ॥६८॥ 'भूतांची पीडा ते भौतिक ॥ देवांची पीडा ते दैविक ॥ देहीं उपजती ज्वरादिक ॥ हे पीडा देख दैहिक ' ॥ ६९ ॥ यापरी त्रिविध दुःख ॥ प्रारब्ध झालें जनक ॥ तें भोगितां मानी असुख ॥ तो केवळ मूर्ख अतिमंद ॥ ९७० ॥ जे भोग आले प्रारब्धेंसी ॥ तेथें साह्य केलिया हरिहरांसी ॥ भोग न चुकती प्राण्यासी ॥ हें जाणोनि संन्यासी क्षमावंत ॥ ७१ ॥ श्रीकृष्ण साह्य पांडवांसी ॥ ते भोगिती नष्टचर्यासी ॥ सख्य केल्या भगवंतासी ॥ प्रारब्ध कोणासी सुटेना ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ परिभूत इमां गाथामगायत नराधमैः ॥ पातयद्भिः स्वधर्मस्थो धृतिमास्थाय सात्विकीम् ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ दुर्जनांच्या ×उपद्रवाहातीं ॥ निजशांति नसांडीच यती ॥ धरोनियां सात्विकी धृती ॥ स्वधर्मस्थिती नढळेची ॥ ७३ ॥ तेणें भिक्षूनें गायिली गाथा ॥ ते तुज मी सांगेन आतां ॥ उद्धवा अतिसावधानता ॥ तो बोध तत्त्वतां अवधारी ॥ ७४ ॥ तो बोधु धरितां चित्तीं ॥ द्वंद्वसाम्या पावे स्थिती ॥ सहजें उल्हासे निजशांती ॥ सायुज्यमुक्ती घर रिघे ॥ ७५ ॥ जगीं उद्धवाचें भाग्य पूर्ण ॥ त्यासि श्रीकृष्ण करी सावधान ॥ काय बोलिला भिक्षु आपण ॥ हें निरूपण अवधारीं ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ द्विज उवाच ॥ नायं जनो मे सुखदुःखहेतुर्न देवतात्मा ग्रहकर्मकालाः ॥ मनः परं कारणमामनंति संसारचक्रं परिवर्तयेद्यत् ॥ ४३ ॥

---

१ शृंखला अडकावून. २ चव्हाट्यांत, मैदानांत. ३ उदासीन न होतां. ४ मन. ५ राजा अथवा अत्यंत दरिद्री. ६ उत्पन्न होण्यास कारण. ७ धैर्य. ८ उत्कर्षास पावते.

*मो. 'आपण. +ना. तें भोगणें. ×ना. उपद्रवांतीं.

॥ टीका ॥ सुजन दुर्जन साधारण ॥ ऐसे जे त्रिविध जन ॥ माझ्या सुखदुःखांसि कारण ॥ सर्वथा जाण ते नव्हती ॥ ७७ ॥ जन तितुके पांचभौतिक ॥ माझाही देहो तो देख ॥ जनांसि मज सहजें ऐक्य ॥ उपजे सुखदुःख मनापाशीं ॥ ७८ ॥ देवता सुखदुःखदायक ॥ ऐसें *ह्मणावें आवश्यक ॥ तीं दैवतें मनःकल्पनिक ॥ त्याचें सुखदुःख मजसी नलगे ॥७९॥ देवतारूपें मन आपण ॥ मनें कल्पिले देवतागण ॥ ते जैं सुखदुःखें देती जाण ॥ तैं मुख्य कारण मन झालें ॥५८०॥ जेथ जैसा मनाचा +सद्भावो ॥ तेथ तैसा तद्रूपें भासे देवी देवो ॥ जेथ मनाचा विकल्प पहाहो ॥ थितां देवो दिसेना ॥ ८१ ॥ यालागीं समस्त देवता ॥ त्या जाण मनःकल्पिता ॥ त्यांपासाव सुखदुःखव्यथा ॥ ते मनाचे माथां निश्चित ॥ ८२ ॥ आत्मा सुखदुःखासि कारण ॥ हें समूळ मिथ्या वचन ॥ आत्म्याचे ठायीं द्वैतभान ॥ त्रिशुद्धी जाण असेना ॥८३॥ मी एक सुखदुःखाचा दाता ॥ हा एक सुखदुःखाचा भोक्ता ॥ हें आत्म्याचेठायीं तत्त्वतां ॥ जाण सर्वथा असेना ॥ ८४ ॥ जन्मकाळींचे ग्रह दारुण ॥ ह्मणों सुखासि कारण ॥ ग्रहांचा ग्रहो मन आपण ॥ जन्ममरण भोगवी ॥ ८५ ॥ ग्रहांची ग्रहगती देहांतवरी ॥ मनाची ग्रहगती त्याहूनि थोरी॥दुःख भोगवी नानाप्रकारीं॥जन्मजन्मांतरीं सोडीना॥८६॥दुष्टग्रह चारी दिन पीडी ॥ मनाची पीडा जन्मकोडी ॥दुष्टग्रहो भोगूनि सोडी॥मन न सोडी कल्पांतीं ॥८७॥ जैं मन न धरी देहाभिमान ॥ तैं ग्रहांची पीडा मानी कोण ॥ या लागीं सुखदुःखासी कारण ॥ मनचि जाण महाग्रहो ॥ ८८ ॥ येथ निजकर्म दुःखदायक ॥ हेंही ह्मणोंनये देख ॥ ०कर्माकर्मबंधमोचक ॥ तें दुःखदायक घडे केवीं ॥ ८९ ॥ स्वकर्म शुद्ध स्वाभाविक ॥ त्यासि मनें करूनि सकामिक ॥ नानापरी अतिदुःख ॥ योनी अनेक भोगवी ॥ ५९० ॥ होकां कर्माचेनि क्रियायोगें ॥ जैं मनःसंकल्प कर्मीं नलगे ॥ तैं ×सुखदुःखांचीं अनेगें ॥ विभांडी वेगें निजकर्म ॥ ९१ ॥ देह सुखदुःखांतें काय जाणे ॥ आत्मा सुखदुःख सर्वथा नेणे ॥ येथ सुखदुःखांचे गाडे भरणें ॥ मनें भोगणें निजसत्ता ॥ ९२ ॥ येथ सुखदुःखदायक ॥ मनचि झालें असे एक ॥ त्या मना आधीन होऊनि लोक ॥ मिथ्या सुखदुःख भोगिती ॥ ९३ ॥ काळ सुखदुःखाचा दाता ॥ हेंही न घडे गा सर्वथा ॥ मनःसंकल्पें संकेता ॥ काळाची सत्ता लागली ॥ ९४ ॥ अजरामर असतां आपण ॥ मनें घेतलें मज आहे मरण ॥ तेथेंचि काळ लागला जाण ॥ ※क्षणें क्षण निर्दाळित ॥९५॥ आपुलेनि हातें आपण ॥ पंठाडेसी खोंविला दाभण ॥ रात्रीं रुपतांचि तें जाण ॥ सर्पभयें प्राण सांडिला ॥ ९६ ॥ त्यासि सर्प नाहीं लागला ॥ मा विखें केवीं तो घारला ॥ परी निजशंका तो स्वयें निमाला ॥ तैसा काळ लागला जनासी ॥९७॥ एकासि सर्प झोंपला पाठीसी ॥ काय रुपलें ह्मणे सांगातियासी ॥ तो ह्मणे कांटी लागली होती कैसी ॥ ते म्यां अनायासीं उपडिली ॥ ९८ ॥ तो नव्हेचि सर्पा साशंक ॥ यालागीं त्यासि न चढे विख ॥ निजव्यापारीं देख ॥ यथासुखें वर्तती ॥ ९९ ॥ त्यासि सांगोनि बहुकाळें खूण ॥ देतां सर्पाची आठवण ॥ तात्काळ विषें आरंबळोन ॥ आशंका प्राण सांडिला

१ पृथ्वी, अप्, तेजस्, वायु, आकाश यांचा विकार. २ खरा असणारा. ३ कधीं वृद्धत्व व मरण न प्राप्त होणारें. ४ पाठीशीं. ५ त्यास विष चढलें. ६ सोबत्यास. ७ सापाविषयीं. ८ व्यापून.

*मो. न ह्मणावें. +ना. स्वभावो. ०ना. कर्मकर्मा. ×मो. सुखदुःखादि अनेगें ※मो. क्षणक्षणा.

॥ ६०० ॥ तेवीं निर्विकल्पपुरुषा ।। उठी संकल्पआशंका ।। ते काळीं काळ देखा ॥ बांधे आवांका निर्दळणीं ॥ १ ॥ निःशंकपणें साचार ।। ज्याचें मन ह्मणे मी अमर ॥ त्याचें काळ वर्जी घर ।। काळ दुर्धर मनःशंका ॥ २ ॥ जो निर्विकल्प निजनिवाडें ।। काळ सर्वथा न ये त्याकडे ॥ नश्वर नाहीं मा, तयापुढें ॥ काळ कोणीकडे रिघेल ॥३॥ यापरी गा काळ देख ॥ नव्हे सुखदुःखदायक ॥ सुखदुःखांचें जनक ।। मनाचि एक निश्चित ॥ ४ ॥ मनःकल्पित संसार जाण ।। मनें कल्पिलें जन्ममरण ॥ संसारचक्रीं आवर्तन ॥ मनास्तव जाण पुनःपुनः ॥ ५ ॥ *हे साही प्रकार जाण ।। ह्मणती सुखदुःखांसि कारण ।। विचारितां हें अप्रमाण ।। मनोजन्य सुखदुःखें ॥ ६ ॥ नवल लाघवी कैसें मन ॥ ×शुद्धीं उपजवी मीपण ॥ चिद्रूपा लावूनि जीवपण ॥ सुखदुःखें जाण भोगवी ॥ ७ ॥ डोळींचा कणु अल्प एक ॥ तो शरीरासि दे अतिदुःख ॥ तेवीं वासनामात्रें मन देख ।। दारुण सुखदुःख भोगवी ॥८॥ ह्मणाल येथ अविद्या एक ॥ ते होय सुखदुःखदायक ।। अविद्या ब्रह्म असतां +देख ॥ मनेंवीण सुखदुःख कदा नुपजे ।। ९ ॥ अविद्या ब्रह्म असतांही ॥ मन लीन सुषुप्तीचिया ठायीं ॥ तेव्हां सुखदुःखचि नाहीं ।। भोग कोणेंही ०कहीं देखिजेना ॥ ६१० ॥ ※मन दुश्चित जेव्हां पाही ॥ तेव्हां भोग भोगिजे देहीं ॥ तें सुखदुःख न पडे ठायीं ।। स्वयें स्वदेहीं देखिजे ॥ ११ ॥ यालागीं सुखदुःखांचें कारण ॥ मनचि आपण्या आपण ॥ तेणें लावूनि जन्ममरण ॥ 8भोवंडी दारुण भवचक्र ॥ १२ ॥ भवचक्रीं प्रत्यावर्तन ॥ कोणे *रीतीं करवी मन ॥ तेचि अर्थीचें निरूपण ॥ भिक्षु आपण निरूपी ॥ १३

॥ श्लोक ॥ मनो गुणान्वै सृजते बलीयस्ततश्च कर्माणि विलक्षणानि ॥ शुक्लानि कृष्णान्यथ लोहितानि तेभ्यः सवर्णाः सृतयो भवंति ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ मनें संकल्प करोनि निजसत्तें ॥उपजवी नानावृत्तींतें॥ त्याचि त्रिगुणा होऊनि येथें॥ गुण विभागातें गुणवृत्ती ।।१४॥ सत्वरजतमादिगुणीं ॥ सुरनरतिर्यगादि योनी ॥ मनें त्रिभुवन उभवूनी ॥ संसारभुवनीं स्वयें नांदे ॥१५॥ त्या मनाची प्रौढी गाढी ॥ क्षणें रची क्षणें मोडी ॥ मन ब्रह्मादिकां भुली पाडी ॥ इतर बापुडीं ते कायी ॥१६॥ मनाचा बलात्कार कैसा ॥ निर्गुणीं पाडी गुणाचा फांसा ॥ लावूनि जीवपणाचा झांसा ॥ संसारवळसा आवर्ती ॥ १७ ॥ केवळ विचारितां मन ॥ तें जडमूढ अचेतन ॥ त्याचेनि केवीं घडे 2स्पंजन ॥ तेंचि निरूपण सांगत ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ अनीह आत्मा मनसा समीहता हिरण्मयो मत्सख उद्विचष्टे ॥ मनः स्वालिंगं परिगृह्य कामान् जुषन्निबद्धो गुणसंगतोऽसौ ॥ ४५ ॥

१ उमेद. २ नाश करण्याविषयीं. ३ कल्पनारहित ब्रह्म. ४ स्वनिश्चयानें, आत्मप्रतीतीनें. ५ फेरे. ६ खोटें. ७ मनापासून उत्पन्न होणारीं. ८ शुद्ध ब्रह्माचे ठिकाणीं अहंकार उत्पन्न करितें. ९ केवल ज्ञान स्वरूप अशा आत्म्यास. १० गाढनिद्रेंत. ११ परत येणें, फेरा. १२ पशुआदि. १३ धाक, भीती. १४ विचार केला असतां. १५ उत्पत्ति.

*ना. देहासी. ×ना. बुद्धी. +मो. एक, ०मो. कहीं. ※मो. मग दुश्चित्त तेव्हांही. 8मो. भोगवी. *मो. परी. 2ना. श्रवण.

॥ टीका ॥ आत्मा चित्स्वरूप परिपूर्ण ॥ निःसंग निर्विकार निर्गुण ॥ त्यासि संसारबंधन ॥ सर्वथा जाण घडेना ॥१९॥ जो स्वप्रकाशें प्रकाशघन ॥ निजतेजें विराजमान ॥ जो परमात्मा परिपूर्ण ॥ त्यासि क्रियाचरण कदा न घडे ॥ ६२० ॥ विचारितां निजनिवाडें ॥ मनाचें *जडत्वचि जोडे ॥ त्यासिही संसार न घडे ॥ भवबंध घडे तो ऐका ॥ २१ ॥ नवल मनाचें विंदान ॥ शुद्धीं उपजवी मीपण ॥ तेचि +वस्तूसि जीवपण ॥ ×सगुणत्वा जाण स्वयें आणी ॥२२॥ मनःसंकल्पाचें बळ ॥ शुद्धासि करी शबळ ॥ लावूनि ✳त्रिगुणाची माळ ॥ ०भवबंधजाळ स्वयें बांधे ॥ २३ ॥ जेवीं घटामाजील *घटजळ ॥ आकळी अलिप्त चंद्रमंडळ ॥ तेवीं मनःसंकल्पें केवळ ॥ कीजे २शबळें चिदात्मा ॥ २४ ॥ घटींचें हालतां जीवन ॥ =चंद्रमा करी कंपायमान ॥ तेवीं शुद्धासि जन्ममरण ॥ मनोजन्य सुखदुःख ॥ २५ ॥ आत्मा स्वप्रकाश चित्स्वरूप ॥ मन जड कल्पनारूप ॥ तें मानूनि आपुलें स्वरूप ॥ त्याचें पुण्यपाप स्वयें भोगी ॥२६॥ जीवाचा आप्त आवश्यक ॥सुहृद सखा परमात्मा एक ॥तो 9मना जीवाचा नियामक॥ द्रष्टा देव साक्षित्वें ॥२७॥ अविद्या प्रतिबिंबे नेटका ॥ जीव जो कां माझा सखा ॥ तो मनोभ्रमें भ्रमेनि देखा ॥ 0भोगी सुखदुःखा मनोजन्य ॥ २८ ॥ मनाच्या एकात्मता परम ॥ जीवासि पडला थोर भ्रम ॥ आपण असतांही निष्कर्म ॥ कर्माकर्म स्वयें भोगी ॥ २९ ॥ 7मुळीं जीव मनाचा नियंता ॥ 3तोचि मनाच्या एकात्मतां ॥ मनाचिया सुखदुःखव्यथा ॥ आपुले माथां 8नाथिल्या सोशी ॥ ६३० ॥ जेवीं अति 4आप्तता प्रधान ॥ रायासि लावी निजबंधन ॥ मग राजा तो होय दीन ॥ तो भोगवी तें आपण सुखदुःख भोगी ॥ ३१ ॥ ते दशा झाली जीवासी ॥ मनें संसारी केलें तयासी ॥ मग नानाजन्ममरण सोशी ॥ अहर्निशीं सुखदुःखें ॥३२॥ त्या मनासि निग्रहो न करितां ॥ जीवाची न चुके 1व्यथा ॥ मनाचेनि छंदें नाचतां ॥ साधनें सर्वथा व्यर्थ होती ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ दानं स्वधर्मो नियमो यमश्च श्रुतंच कर्माणि च सद्व्रतानि ॥ सर्वे मनोनिग्रहलक्षणांताः परो हि योगो मनसः समाधिः ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ न लक्षितां 5मनोनियमन ॥ सर्वही दिधल्या दान ॥ मी दाता हा होय अभिमान ॥ तेणें दानें मन दाटुगें होय ॥ ३४ ॥ चुकोनि मनोनिग्रहाचें वर्म ॥ आचरतां वर्णाश्रम ॥ तेणें उल्हासे मनोधर्म ॥ माझें स्वकर्म अतिश्रेष्ठ ॥ ३५ ॥ मीचि एक तिहीं लोकीं ॥ 6स्वाचारनिष्ठ स्वयंपाकी ॥ यापरी स्वकर्मादिकीं ॥ मन होय अधिकीं चावटें ॥ ३६ ॥ मनोनियम नाहीं

---

१ आल्यास. २ अविद्यायुक्त. ३ गर्विष्ठ, बळकट. ४ आपल्या आचारांत निपुण. ५ स्वतः अन्न शिजवून भोजन करणारा. ६ चावट.

*मो. जडत्वही न जोडे. +मो. वस्तुत्वीं. ×मो. सगुणत्वें. ✳मो. त्रिगुणाचा मळ. ०मो. भवबंधजाळीं. *मो. जळ. 2ना. सकळ. =मो. चंद्रबिंब दिसे कंपायमान. 9 मो. तो जीवाचा न्यामक. 0मो. सुखदुःखादिकें भोगी. 7मो. मुळीं मनाचा नियंता. 3ना. त्याची मनाची एकात्मता. 8ना. स्वयें सोशी. 4ना. अतिआप्त. 1ना. भवव्यथा. 5मो. मनोनियामन. 6मो. सदाचारनिष्ट.

बुद्धी ॥ तें *यमनियम ते उपाधी ॥ मीचि एक साधक त्रिशुद्धी ॥ हेंचि प्रतिपादी मनोधर्मे ॥३७॥ करितां वेदशास्त्रश्रवण ॥ +गर्वाचें भरतें गहन ॥ ×पांडित्यीं अति अभिमान ॥ मनो-नियमन तेथें कैंचें ॥ ३८ ॥ करूं जातां ❀निजकर्म ॥ कर्मक्रिया अतिदुर्गम ॥ कर्मठतेचा चढे भ्रम ॥ मनाचा नियम घडे केवीं ॥३९॥ कर्म केवळ देहाचे माथां ॥ आत्मा देहीं ०असोनि वि-देहता ॥ 4त्यासि कर्माकर्मबद्धता ॥ कर्मठ मूर्खतां मानिती ॥ ६४० ॥ अनंतव्रतें झाला व्रती॥ तेणें धनधान्य 2वांछिती ॥ 9मनोनिग्रहो नाहीं चित्तीं ॥ सद्व्रतें जाती सुनाटें ॥४१ ॥ व्रत दान स्वधर्म सकळ ॥ यांसि मनोनिग्रहो मुख्य *फळ ॥ तेणेंवीण तीं अवघीं विकळ ॥ साधनें निष्फळ साधकां ॥४२॥ दानादिक सप्त पदार्थ ॥ हे ज्ञानाचे अंगभूत ॥तीं साधनें समस्त ॥नि-ष्फळ येथ केवीं ह्मणा॥४३॥दानादिकें जीं जीं येथें॥जेंजें इहामुत्रं 7फळदातें॥तें फळाचि निष्फळ येथें ॥ जन्ममरणातें वाढवी ॥ ४४ ॥ तेथ साधक होय सज्ञान ॥ फळाशा निःशेष त्यागून ॥ 0दानादि स्वधर्माचरण ॥ चित्तशुद्धीसी जाण उपयोगी ॥ ४५ ॥ 3माझी व्हावी चित्तशुद्धी ॥ ऐशी उपजावया बुद्धी ॥ भगवत्कृपा पाहिजे आधीं ॥ तें 6साधनें सिद्धि पावती ॥४६॥साधनीं मुख्य माझी भक्ती ॥ त्यांत विशेषें नामकीर्ती ॥ नामें चित्तशुद्धि चित्तीं ॥ स्वरूपस्थिती साध-कां ॥ ४७ ॥ नामापरतें साधन ॥ सर्वथा नाहीं आन ॥ नामें भवबंधच्छेदन ॥ सत्य जाण उद्धवा ॥ ४८ ॥ स्वरूपस्थित निश्चळ मन ॥ तेथ लाजोनि जाय साधन ॥ तेथ दानादिकांचें प्रयोजन ॥ सहजचि जाण खुंटलें ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ समाहितं यस्य मनः प्रशांतं दानादिभिः किं वद तस्य कृत्यम् ॥
असंयतं यस्य मनो विनश्येद्दानादिभिश्चेदपरं किमेभिः ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ येथें ज्या पुरुषाचें मन ॥ ठाकी आपुलें जन्मस्थान ॥ त्यासि दानादिकांचें कोण ॥ प्रयोजन साधनीं ॥ ६५० ॥ पूर्णतृप्तापाशीं जाण ॥ वोगरलिया सदन्न ॥ तो जेवीं न पाहे हुं-गोन ॥ तेवीं साधन अमनस्का ॥ ५१ ॥ गंगा उतरावया महापूरीं ॥ अतिप्रयासीं तांफा करी ॥ तोचि पूर वोहटल्या वरी ॥ ताफा आव्हेरी निःशेष ॥ ५२ ॥ तेवीं 5कामक्रोधादिवेग शून्य ॥ ज्याचें 1निर्विकल्पीं निश्चळ मन ॥ त्यासि दानादिकीं प्रयोजन ॥ नाहीं जाण निश्चित ॥५३॥ जेवीं सूर्योदय झाल्यापाठीं ॥ उपेगा न ये लक्ष दिवटी ॥ तेवीं निर्विकल्पता मनीं उठी॥ तें साधनें कोटी सुनाटें ॥ ५४ ॥ एवं समाहित ज्याचें मन ॥ त्यासि दानादि नानासाधन ॥ करावया नाहीं प्रयोजन ॥ कल्पना पूर्ण निमाल्या ॥ ५५ ॥ ज्याचें नेम न मनी चित्त ॥ जें सदा विवेकरहित ॥ जें अनिवार विषयासक्त ॥ त्यासिही 8अनुपयुक्त साधनें ॥ ५६ ॥ जेवीं

---

१ जाणण्यास अत्यंत कठिन. २ अज्ञानानें. ३ व्यर्थ. ४ चित्तवृत्तिनिरोध. ५ हीन दशा पावलेला. ६ साधनें. ७ ह्या लोकीं व परलोकीं. ८ वाढल्यास. ९मनोलय करणारास. १०नावांची सांगड. ११ब्रह्मीं. १२ समाधियुक्त.

*मो. तें नानामतें उपपादी. +मो. सर्वांगीं भरितें गहन. ×मो. पांडित्यपणाचा अभिमान, मनोनियम तेथें कैचा. ❀ना. निःकर्म. ०मो. आत्मा असोनि विदेहता. 4मो. त्याची कर्माची बद्धता. 2मो. वांछाचित्तीं. 9मो. मनोनिग्रहाची नाहीं स्थिती. *मो. मूळ. 7ना. फळ पर्यंत. 0ना. धनादि. 3मो. होवावया चित्तशुद्धी. 6मो. सकल साधनें. 5मो. कामक्रोधादिविहीन. 1मो. निर्विकल्प. 8मो. अनयुक्त ना. अनुयुक्त.

मदगजाच्या लोटीं ॥ सैन्य पळे बारावाटीं ॥ तेवीं *विषयसक्तापाठीं ॥ साधनें हिंपुटीं होऊनि ठाती ॥ ५७ ॥ जो विषयासक्तमना ॥ तो सर्वथा नातळे साधना ॥ करी तैं तेथेंही जाणा ॥ विषयकल्पना संकल्पी ॥ ५८ ॥ स्वयें करितां पैं साधना ॥ जें जें फळ वांछी वासना ॥ तैं तेंचि फळ जाणा ॥ करी उगाणा दानादिकांचा ॥ ५९ ॥ जेवीं कां पूर्ण बळाचा वारू ॥ त्यावरी बैसला निर्बळ नरू ॥ तो त्यासि सर्वथा अनावरू ॥ नव्हे स्थिरू अणुमात्र ॥ ६६० ॥ तैसें त्याचें अतिदुर्मन ॥ सदा कामक्रोधीं परिपूर्ण ॥ तो स्वयें झाला मनाचें दीन ॥ ज्याचा विवेक निमग्न महामोहीं ॥ ६१ ॥ तेथ साधनचि करी कोण ॥ करी तें मोहास्तव जाण ॥ तेणें वाढे तमोगुण ॥ मनोनियमन घडेना ॥६२ ॥ श्रवणादि इंद्रियबंधन ॥ करूनि करितां साधन ॥ तेणें वश्य न होय मन ॥ मनाअधीन इंद्रियें ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ मनोवशेऽन्ये ह्यभवन्स्म देवा मनश्च नान्यस्य वशं समेति ॥ भीष्मो हि देवः सहसः सहीयान् युंज्याद्वशे तं स हि देवदेवः ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ मनें आकळिलें सर्वांसी ॥ परी मन नाकळे कोणासी ॥ मनें छळिलें देवांसी ॥ तें ×केवीं इंद्रियांसी आटोपे? ॥ ६४ ॥ चंद्र अधिष्ठात्री मनासी ॥ मनें छळिलें चंद्रम्यासी ॥ व्यभिचारोनि गुरुपत्नीसी ॥ क्षयरोगी त्यासी मनें केलें ॥ ६५ ॥ ब्रह्मा अधिष्ठात्री बुद्धीसी ॥ मन ब्रह्मयाची बुद्धि भ्रंशी ॥ निजपुत्री वारितां त्यासी ॥ स्वकन्येसी अभिलाषी ॥ ६६ ॥ चित्तीं वासुदेवाचें अधिष्ठान ॥ त्यातेंही हलूच ठकी मन ॥ त्यासी लावूनि वृंदेचें ध्यान ॥ स्मशानीं जाण पाडिला ॥ ६७ ॥ रुद्र अधिष्ठात्री अहंकारीं ॥ त्यातेंही मन सिंतरी ॥ अभिलाषितां ऋषिनारी ॥ शापिला ऋषीश्वरीं लिंगपातें ॥ ६८ ॥ ऐसें देवां दुर्जय जें मन ॥ त्यासि आवरी इतर कोण ॥ म्हणाल इंद्रियें मन ॥ नियमितील तरी मनाधीन इंद्रियें ॥ ६९ ॥ जें इंद्रियें धरोनि हातीं ॥ मन एकाग्र होय जे अर्थीं ॥ तेव्हां इतर इंद्रियांची स्थिती ॥ राहे निश्चितीं सुनाट ॥६७०॥ इंद्रियविषयां होय संगती ॥ तेकाळीं जे दुश्चित्ती मनोवृत्ती ॥ तेव्हां न घडे विषयप्राप्ती ॥ इंद्रियस्फूर्ती स्फुरेना ॥ ७१ ॥ जेव्हां अनासक्त मनोधर्म ॥ तेव्हां इंद्रियांचें नचले काम ॥ मनाअधीन इंद्रियग्राम ॥ इंद्रियां मनोनेम कदा न घडे ॥ ७२ ॥ इंद्रियांचा राजा मन ॥ इंद्रियें न चळती मनेंवीण ॥ पुरुषातेंही मन आपण ॥ वश्य जाण स्वयें करी ॥ ७३ ॥ अतिबळियां बळी मन ॥ तेथ इंद्रियें बापुडीं तें कोण ॥ मनाचें करावया दमन ॥ नव्हें आंगवण वरिष्ठां ॥ ७४ ॥ काळ निजसत्ता सर्व ग्रासी ॥ परी मनाचा °रोम नुपडे त्यासी ॥ करितां उत्पत्ति स्थितिप्रळयांसी ॥ मन काळासी नाटोपे ॥ ७५ ॥ शस्त्रें न तुटे सर्वथा मन ॥ त्यासि विरवूं न शके जीवन ॥ मन जाळूं न शके दहन ॥ मनातें गगन शून्य करूं न शके ॥ ७६ ॥ मनासि लागों न शके व्याधी ॥ मन रोडेजे ऐशी नाहीं व्याधी ॥ मन आकळावया सिद्धी ॥ पाहतां त्रिशुद्धी दिसेना ॥७७॥ मन ब्रह्मादिकांच्या रची कोडी ॥मन ब्रह्मांडें घडी मोडी ॥ मन ※निजकल्पनाकडोडीं ॥ नाचवी +धांदेडी त्रैलोक्या ॥७८ ॥ मन कळिकाळातें छळी ॥ मन प्रळ-

१ कष्टी. २ फेड, निकाल. ३ घोडा. ४ नियामक देवता. ५दूषित करून. ६आपल्या कन्येनें. ७फसवी. ८ इंद्रियांचा समुदाय. ९ सामर्थ्य. १० रोम; कांहीं करवत नाहीं. ११ अग्नि. १२ जोरावर. १३ जबरीनें.

*मो. विषयासक्ती पाठी. ×मो. काय इंद्रियांसी. °ना. लोंव. ※मो. कडोविकडी. +मो. बागडी.

यानळातें गिळी ॥ मन बळियामाजीं अतिबळी ॥ मनातें आकळी ऐसा नाहीं ॥ ७९ ॥ मन देवांसि दुर्धर ॥ भयंकरां भयंकर ॥ मनें आकळिले हरिहर ॥ मनासमोर कोण राहे ॥ ६८०॥ मनाचा अनिवार मार ॥ कोण राहे मनासमोर ॥ मनास परजी ऐसा *थोर ॥ सुर नर असुर दिसेना ॥ ८१ ॥ मनासि मेळवी हातोंफळी ॥ ऐसा त्रिलोकीं नाहीं बळी ॥ मन काळातें आकळी ॥ प्रळयरुद्रातें गिळी न मोखतां दाढ ॥८२॥ ऐसा मनाचा अगाध स्वभावो ॥ यालागीं यातें ह्मणजे देवो ॥ मनाचा भयानक भेवो ॥ यालागीं 'भीष्मदेवो मनातें ह्मणती ॥ ८३ ॥ ऐसी मनाची अनावर स्थिती ॥ यासि आकळावयाची सवर्म युक्ती ॥ साचार सांगेन तुह्मांप्रती ॥ सावधानस्थितीं अवधारा ॥ ८४ ॥ 'जेवीं हिरेंनि हिरा चिरिजे ॥ तेवीं +मनेंचि मन धरिजे ॥ हेंही तैंचि गा लाहिजे ॥ जैं गुरुकृपा पाविजे संपूर्ण स्वयें' ॥ ८५ ॥ मन गुरुकृपेची आंदणी दासी ॥ मन सदा भीतसे सद्गुरूसी ॥ तें ठेवितां गुरुचरणापाशीं ॥ दे साधकांसी संतोष ॥ ८६ ॥ या मनाची एक उत्तम गती ॥ जरी स्वयें लागे परमार्थीं ॥ तरी दासी करी चारी मुक्ती ॥ दे बांधोनि हातीं परब्रह्म ॥ ८७ ॥ मनचि मनाचें घातक ॥ मनचि मनाचें साधक ॥ मनचि मनाचें बाधक ॥ मनाचि घातक मनासी ॥ ८८ ॥ जेवीं वेळु वाढवी, वेळुजाळी ॥ वेळुवेळुवां कांचणीमेळीं ॥ स्वयें पाडूनि इंगळी ॥ समूळ जाळी आपण्यातें ॥ ८९ ॥ ०तेवीं मन मनाचि चिंती मरण ॥ तैं सद्गुरूसि ꙮरिघवी शरण ॥ त्याचे वचनीं विश्वासोन ॥ करवी गुरुभजन निरभिमानें ॥ ६९० ॥ सद्गुरुकृपा झालिया पूर्ण ॥ हें मनचि मनासी दावी खूण ॥ तेणें निजसुखें सुखावोन ॥ मनचि प्रसन्न मनासि होय ॥ ९१ ॥ मन मनासि झालिया प्रसन्न ॥ तेव्हां वृत्ति होय निरभिमान ॥ ऐसें साधकां निजसमाधान ॥ मनें आपण साधिजे ॥ ९२ ॥ पावोनि गुरुकृपेची गोडी ॥ मनोविजयाची निजगुढी ॥ मनें उभवूनि लवडसवडी ॥ दीजे रोकडी साधकां हातीं ॥९३॥ यापरी साधकांसि संपूर्ण ॥ मन आपला विजयो दे आपण ॥ शेखीं सद्गुरुनिजबोधीं पूर्ण ॥ मन होय लीन निजात्मता ॥९४॥ जेवीं कां सैंधवाचा खडा ॥ रिघोनि सिंधूमाजीवडा ॥ स्वयें विरोनियां रोकडा ॥ सिंधूयेव्हडा तो होय ॥९५॥ यापरी साधक जाण ॥ होतांच निरभिमान ॥ स्वयें होती ब्रह्म पूर्ण ॥ मीतूंपण गिळोनी॥९६॥ मग त्याचिया निजदृष्टी ॥ मीचि एक आवघे सृष्टी ॥ मावळली द्वंद्वत्रिपुटी ॥ सुखदुःख पाठीं लागेना ॥ ९७ ॥ तेथें कैचें सुख कैचें दुःख ॥ कैंचा बंध कैंचा मोक्ष ॥ कोण पंडित कोण मूर्ख ॥ ब्रह्म एक एकलें ॥ ९८ ॥ तेथ कोण देव कोण भक्त ॥ कोण शांत कोण अशांत ॥ मावळलें द्वैताद्वैत ॥ वस्तु सदोदित स्वानंदें ॥ ९९ ॥ तेथ उगोगलें क्रियाकर्म ॥ लाजा विराले धर्माधर्म ॥ कैंचें अधम उत्तम मध्यम ॥ परिपूर्ण परब्रह्म कोंदलें ॥ ७०० ॥ तेथ कैंचें शास्त्र कैंचा वेद ॥ कैंची बुद्धि कैंचा बोध ॥ निःशेष ×निमाला भेद ॥ परमानंद कोंदला ॥१॥ यापरी *मनोविजय पहाहो ॥ ऐशिया स्थितीसी पावला भावो ॥ तोचि स्वयें देवादिदेवो ॥ ये

१ प्रळयकालच्या अग्नीस. २ जिंकिले, वश केले. ३ स्वाधीन ठेवी, जिंकी. ४ झोंबीकरी, पैजनें जिंकी. ५ स्पर्श करितां. ६ भय. ७ एक बांबू. ८ बांबूचें बेट. ९ बांबूचें बांबूवर. १० घर्षण झालें असतां. ११ ठिणगी. १२ ऐक्यरूपानें. १३ समुद्रांत. १४ शून्य झालें.

*ना. शूर. +मो. मनातें मनें. ०मो. तेवीं मनेंचि मनासि जरी मारणें. ꙮमो. रिघावें. ×मो. मावळला भेदाभेद. *मो. मनोविजयें. ना. मनोविजयी.

अर्थीं संदेहो असेना ॥२॥ मनोजयाचा सद्भावो ॥ ब्रह्मादिकां अगम्य पहाहो ॥ जो स्वांगें करी स्वयमेवो ॥ तो देवाधिदेवो *निजबोधें ॥३॥ जो निजमनातें जिंकोनी ॥ जनीं पावला जनार्दनीं ॥ तो धन्यधन्य त्रिभुवनीं ॥ त्याचेनि अवनी पवित्र ॥ ४ ॥ तेणेंचि पूर्वज तारिले ॥ तेणें सकळ कुळ उद्धरिलें ॥ तेणेंचि परब्रह्म आंगविलें ॥ जेणें जिंकिलें मनातें ॥ ५ ॥ मनोजय अतिसमर्थ ॥ शांति सर्वस्वें विकिली जेथ ॥ त्यासि सुखदुःखांचे आवर्त ॥ गेले नलगत निजात्मता ॥ ६ ॥ ऐशी भिक्षूची निजवाणी ॥ उल्हासें सांगे सारंगपाणी ॥ उद्धवास ह्मणे संतोषोनी ॥ धन्य त्रिभुवनीं मनोजय ॥ ७ ॥ जेणें निजमनातें जिंकिलें ॥ त्यासि मी किती वानूं बोलें ॥ तेणें मज आपुलें पोसणें केलें ॥ कीं विकत घेतलें उंखितेंची ॥ ८ ॥ मज सुखरूपा त्याचेनि सुखप्राप्ती॥ मज नित्यतृप्ता त्याचेनि तृप्ती ॥ मज अनंता त्यामाजीं वस्ती ॥ मी दाटुगा त्रिजगतीं त्याचेनि ॥ ९ ॥ मी तो या शब्दकुसरी ॥ त्याही जाण बाहेरी ॥ आंतुवट निजविचारीं ॥ मी तोचि तो निर्धारीं निजऐक्यता ॥ ७१० ॥ मनोजयें हे पदवी प्राप्त ॥ तो मनोजय न करूनि येथ ॥ प्राकृत रिपुजयें जे गर्वित ॥ त्यांसि निर्भर्त्सित स्वयें भिक्षु ॥११॥

॥ श्लोक ॥ तं दुर्जयं शत्रुमसह्यवेगमरुंतुदं तन्न विजित्य केचित् ॥ कुर्वंत्यसद्विग्रहमत्र मर्त्यैर्मित्राण्युदासीनरिपून्विमूढाः ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ पार्थिव +शत्रु सबळ येती ॥ तेथ ×सामदानादिका स्थिती ॥ कारणीं लावोनियां ख्याती ॥ जिंकिले जाती निजांगें ॥ १२ ॥ हे प्रकार मनाच्याठायीं ॥ करितां न चलती पाहीं ॥ मनासि करावी शिष्टायी ॥ तरी ते कोणाचें कांहीं ऐकेना ॥ १३ ॥ मनासि यावें विषयदान ॥ परी विषयीं तृप्त नव्हे मन ॥ तेणें अधिकचि °होय दारुण ॥ आवरी कोण तयासी ॥ १४ ॥ न चले सामदानादिप्रकारू ॥ तरी मनासि करावा मारू ॥ तेथ न चले हातियेरू ॥ मारालागीं विचारू स्फुरेना ॥ १५ ॥ यापरी हा मनोवैरी ॥ दुर्जयत्वें कठिण भारी ॥ तो सुखदुःखाच्या भरोवरी ॥ सर्वदा मारी जन्ममरणें ॥ १६ ॥ इतर शत्रु नावरती ॥ तरी पळोंये हातोहातीं ॥ रिघोनियां गडदुर्गाप्रती ॥ वांचतीगती देखिजे ॥ १७ ॥ परी पळावया मनापुढें ॥ पळतां त्रैलोक्य होय थोडें ॥ जेथ लपावें अवघडें ॥ तेथही रोकडें मन पावे ॥१८॥ मनाचे सेनापति शूर ॥ कामक्रोधादि महावीर ॥ त्यांचा मार अतिदुर्धर ॥ घायीं थोरथोर लोळविले ॥ १९ ॥ बाह्यशत्रु ते दूरदेशीं ॥ येतां बहुदिन लागती त्यांसी ॥ मनःशत्रु तो अंगेंसी॥ अहर्निशीं जडलासे ॥७२०॥ आसनीं भोजनीं एकांतीं ॥ जपीं अथवा ध्यानस्थितीं ॥ मनाची उडी पडे अवचितीं ॥ विभांडी सर्वार्थीं वैराकारें ॥ २१ ॥ बाह्यशत्रूचें अल्प दुःख ॥ मनाची पीडा ※परम विशेख ॥ जन्ममरणाचे आवर्त देख ॥ मन आवश्यक भोगवी ॥२२॥ बाह्यशत्रु मरणात्मक ॥ मन मरणासी ही अटक ॥ हा वैरी न जिंकितां देख ॥ जीवाचें अतिदुःख टळेना

१ मिळविलें. २ ऋणी. ३ उक्ते, मोहोगमच, ठोकळ. ४ निंदा करितो. ५ पृथ्वीवरील स्थूल शत्रू. ६ चांगल्या गोष्टी सांगणें. ७ शस्त्र. ८ सामग्रीनें. ९ पळ काढतां येतो. १० किल्ल्यांत शिरून. ११ जीव वांचविण्याचा मार्ग. १२ पाडिले. १३ नाश करितें. १४ फेरे. १५ साक्षात् मरणच.

***ना. निजांगें. +मो. शत्रू बळें येती. ×ना. सामदामादिकी स्थिती. °मो. खवळे दारूण. ※ना. वर्म विशेख.**

॥ २३ ॥ मनाचे सवेगवेगासी ॥ न साहवे सुरनरांसी ॥ कष्टीं न जिंकवे कोणासी ॥ यालागीं *मनासी दुर्जयत्व ॥ २४ ॥ ऐशिया मनातें न जिंकित ॥ बाह्य शत्रु जिणोनि येथ ॥ जे होती अति गर्वित ॥ ते निश्चित जाण महामूढ ॥ २५ ॥ मनेंचि जिंकावें मनासी ॥ हें गतश्लोकीं तुजपाशीं ॥ सांगीतलें +यथार्थेसी ॥ मनोजयासी उपावो ॥ २६ ॥ एवं मनातें ऐशियापरी ॥ न साधवेचि करूनि वैरी ॥ तरी मनासी करावी मैत्री ॥ मन सुखी करी मित्रत्वें ॥ २७ ॥ प्राकृत मित्रांची मैत्री ॥ उपकारीं प्रत्युपकारी ॥ तेही विषयसुखावरी ॥ येरयेर घरीं उचितानुकाळें ॥ २८ ॥ तैशी नव्हे मनाची मैत्री ॥ उपकारेंवीण प्रत्युपकारी ॥ सकळदुःखांतें निवारी ॥ सुखसागरीं नांदवी ॥ २९ ॥ ×प्राकृतीं अतिमित्रत्व ज्यासी ॥ निजदुःख सांगतां त्यापाशीं ॥ सर्वथा निवारेना त्यासी ॥ ह्मणे हें आह्मांसी असाध्य ॥ ७३० ॥ तैसें मित्रत्वीं नव्हे मन ॥ मन वैसवूनि सावधान ॥ करितां निजदुःख निवेदन ॥ जन्ममरणमहाबाधु ॥३१॥ मरणभय असतां चित्तीं ॥ कनककामिनींची आसक्ती ॥ स्त्रिया अतिशयें निर्भर्त्सिती ॥ तरी निर्लज्जवृत्ती लाजेना ॥ ३२ ॥ परदारा परधन ॥ परद्रोहो परनिंदा जाण ॥ लागल्या न सांडिती क्षण ॥ नरक दारुण भोगावया ॥ ३३ ॥ उसंत नाहीं क्षुधेहातीं ॥ द्वंद्वदुःखाची अतिप्राप्ती ॥ नावरे इंद्रियवृत्ती ॥ ऐसें मनाप्रती सांगतां ॥ ३४ ॥ ऐसें ऐकतां स्वयें मन ॥ वैराग्य खवळे पूर्ण ॥ वेंचूनि विवेकाचें धन ॥ दुःखनिर्दळण करूं पाहे ॥ ३५ ॥ 'चोरू भांडारी करितां पूर्ण ॥ चोर चोरातें निवारी जाण ॥ तेवीं मनासि करितां मित्रपण ॥ मनाचे अवगुण मनचि नाशी' ॥ ३६ ॥ अधर्मीं प्रवर्ततां आपण ॥ मनचि मनासि निवारी जाण ॥ असत्याची वाचेसि आण ॥ आपण्या आपण मन घाली ॥ ३७ ॥ ऐशी मनाची मैत्री परम ॥ निःशेष जाळी कर्माकर्म ॥ जोडावया चित्तशुद्धीचें वर्म ॥ स्मरे हरिनाम अहर्निशीं ॥ ३८ ॥ श्रीराम जयराम दों अक्षरीं ॥ महापातका होय बोहरी ॥ नाम न विसंबे क्षणभरी ॥ अखंडाकारीं हरि स्मरे ॥ ३९ ॥ तेव्हां असत्याचें शीर्स तोडी ॥ अधर्माची खाली काढी ॥ कल्पनेचे पाय मोडी ॥ तटकां तोडी आशेचा ॥ ७४० ॥ विकल्पाचा वरटा मोडी ॥ प्रपंचाचे दांत पाडी ॥ अविश्वास तींठायीं तोडी ॥ विश्वासाची गुढी उभवी मन ॥ ४१ ॥ ऐसेनि ०परिपक्क विश्वासीं ॥येऊनि सद्गुरुचरणांपाशीं॥ तनु मन धन सर्वस्वेंशीं॥ 5गुरुवचनाशी विश्वासे ॥४२॥ पूर्णविश्वासाचें लक्षण ॥ होतां गुरुवाक्यश्रवण ॥ परिसीं लोह पालटे जाण ॥ तैसें अंतःकरण पालटे ॥ ४३ ॥ गुरु वचन सांगोनि राहे ॥ परी मनींचें मनन न राहे ॥ कीटकीभ्रमर ऐसा पाहे ॥ तद्रूप होये निजध्यासें ॥ ४४ ॥ तेव्हां काम कामिनी धन ॥ तें देखे विष्ठेसमान ॥ निंदा द्वेष मानाभिमान ॥ हे मनाचे अवगुण मनचि नाशी ॥४५॥ धन्यधन्य मनाची मैत्री ॥ विश्वास धरोनि निर्धारीं ॥ जन्ममरण जीवें मारी ॥ जीवातें करी अजरामर ॥ ४६ ॥ ऐशी मनाशीं करितां मैत्री ॥ मन परम उपकारी ॥ जीवातें धरूनि निजकरीं ॥ स्वानंदसागरीं ❋बुडी दे

---

१ जिंकणें, लय करणें. २ सुवर्ण व स्त्रीची. ३ दुसऱ्याचा द्वेष. ४ अवकाश. ५ नाश, भस्म. ६ शिर ७ साल. ८ संबंध. ९ तीन ठिकाणीं. १० परिसानें. ११ इच्छा करण्यास योग्य.

*मो. ह्मणती दुर्जय. +ना. यथातथ्येसी. ×मो. प्राकृत मित्रांपाशीं. ०मो. परिपूर्ण विश्वासेसी. 5मो. गुरुचरणांसी. ❋ना. बुडी दे स्वयें.

॥ ४७ ॥ तेथ मनाचें मनपण सरे ॥ जीवाचें जीवपण विरे ॥ बंधमोक्षांची धांव पुरे ॥ समूळ वोसरे भवभय ॥ ४८ ॥ मनाचें मित्रत्व यापरी ॥ आपुलें कुळ स्वयें संहारी ॥ आपणही मरे मित्रोपकारीं ॥ मन मित्राचारीं अवंचकें ॥ ४९ ॥ ऐसें मन मैत्रीसि सादर ॥ जवळीं असतां निरंतर ॥ त्यातें वोसंडूनि पामर ॥ प्राकृत नर मित्र करिती ॥ ७५० ॥ *वैर करोनि मन मारावें ॥ ×मित्रत्वें मनें मन साधावें ॥ इयें दोन्हीं जैं न संभवे ॥ तैं उपेक्षावें मनातें ॥५१॥ मन ह्मणेल ०तें न करावें ॥ मनातें हातीं न धरावें ॥ मनातें कहीं नातळावें ॥ जीवें भावें निःशेष ॥ ५२ ॥ मन ह्मणेल जें सुख ॥ तें सांडावें अवश्यक ॥ मन ह्मणेल जें दुःख ॥ तेंही निःशेख त्यजावें ॥५३॥ ऐसें उदास मन देख ॥ जो करी अवश्यक ॥ तरी तो झाला अमनस्क ॥ शांति अलौलिक तेठायीं ॥ ५४ ॥ शत्रु मित्र उदासीन ॥ करूनि वश्य न करी मन ॥ जो धरी देहाभिमान ॥ त्याचें +भवभ्रमण सरेना ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ देहं मनोमात्रमिमं गृहीत्वा ममाहमित्यंधधियो मनुष्याः ॥ एषोऽहमन्योऽयमिति भ्रमेण दुरंतपारे तमसि भ्रमंति ॥ ५० ॥

॥ टीका ॥ आत्मा विदेही चिद्घन ॥ तेथ मी देही हें मानी मन ॥ त्या देहासवें मीमाझेंपण ॥ जन्ममरण सुखदुःख ॥ ५६ ॥ आत्मा नित्यमुक्त विदेही ॥ तो मनाच्या एकात्मता पाही ॥ विदेही ह्मणवी देही ॥ शेखीं देहाच्याठायीं आत्मत्व मानी ॥ ५७ ॥ मी देह हें मानी मन ॥ तेणें दृढ होय देहाभिमान ॥ तेव्हां देहचि होय आपण ॥ मीमाझेंपण तेठायीं ॥ ५८ ॥ मी सच्चिदानंद परिपूर्ण ॥ हें आपलें विसरे आपण ॥ मी वैश्य शूद्र क्षत्रिय ब्राह्मण ॥ मूर्ख सज्ञान मी एक ॥ ५९ ॥ मी रोडका बोडका कुब्जें काणाँ ॥ मी ※धार्टामोठा विचक्षण ॥ हे नाथिले घेऊनि देहगुण ॥ माणुसपण स्वयें मिरवी ॥७६०॥ स्वप्नामाजीं संन्यासी ॥ आपणास देखे ४अंत्यजवंशीं ॥ तो *आतळों भी ब्राह्मणासी ॥ जीवास तैशी दशा झाली ॥६१॥ स्वयें परमात्मा भेदशून्य ॥ तेथ मी माझे स्त्री पुत्र धन ॥ स्वजन दुर्जन उदासीन ॥ त्रिविध भेद पूर्ण सत्यत्वें मानी ॥ ६२ ॥ ऐशी देहात्मभावसिद्धि ॥ सत्य मानितां भेदविधी ॥ जीवाची निजात्मबुद्धी ॥ झाली त्रिशुद्धी आंधळी ॥ ६३ ॥ जैसा स्वप्नींचा मिथ्या वेव्हार ॥ तैसा मनःकल्पित संसार ॥ तो मानितांचि साचार ॥ देहअहंकार दृढ झाला ॥ ६४ ॥ दृढ होतां देहाभिमान ॥ पुढतीं जन्म पुढती मरण ॥ भवचक्रीं परिभ्रमण ॥ निजभ्रमें जाण जीवासी ॥६५॥ जेवीं केवळ अग्निप्रती ॥ घणघाय कदा न लागती ॥ तोचि लोहाचिया संगतीं ॥ घाणावरी घेती सुबद्ध ॥ ६६ ॥ तेवीं नित्य मुक्त परिपूर्ण ॥ तेणें धरितां देहाभिमान ॥ अंगीं लागलें जीवपण ॥ जन्ममरण तेणें सोशी ॥ ६७ ॥ जेवीं डोळे बांधोनि व्यापारू ॥ भंवे तेलियाचा ढोरू ॥ तेवीं अहंकारें अंध नरू ॥ परिभ्रमे थोरू भवचक्रीं ॥ ६८ ॥ तेथ सोशितां जन्ममरण ॥ अतिदुःखी होय आपण ॥

१ दूर होतें. २ मित्राप्रमाणें वागण्यांत. ३ न ठकविणारें. ४ तटस्थ. ५ मन स्वतः. ६ वांकडा. ७ तिरवें पाहणारा. ८ धडधाकट व लठ्ठ. ९ नसलेले खोटे. १० स्पर्श करण्यास भितो. ११ खरा. १२ फिरणें. १३ घण नांवाचें हत्यार त्याचा घाव.

*मो. वैरी करोनि. ×मो. कां मित्रत्वें मन साधावें. ०मो. तें भलतें न करावें. +मो. भवभ्रम सरेना. ※मो. धाकटा मोठा. ४ना. अत्यंजवेशी. *ना. आतळोभे ब्राह्मणासी.

तरी न सांडी देहाभिमान ॥ अंधतमीं जाण तो घाली ॥६९॥ *ज्याचे दुःखें न पविजे पार ॥ जो तरवेना अतिदुस्तर ॥ जो भोग भोगवी अघोर ॥ तो संसार मनोजन्य ॥ ७७० ॥ मनाचि सुखदुःखांसि कारण ॥ हें आठ श्लोकीं निरूपण ॥ भिक्षु बोलोनि आपण ॥ जनादि दुःखकारण साही मिथ्यात्वें दावी ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ जनस्तु हेतुः सुखदुःखयोश्चेत् किमात्मनश्चात्र हि भौमयोस्तत् ॥ जिव्हां क्वचित्संदशति स्वदद्भिस्तद्वेदनायां कतमाय कुप्येत् ॥ ५१ ॥

॥टीका॥ जननीजठरीं ज्यासि जनन॥त्या नांव बोलिजेती जन॥ते सुखदुःखासि कारण॥सर्वथा जाण मज नव्हती ॥७२॥ जन जनासि दे ×दुःखबाधू ॥तेथ आत्म्यासीं काय संबंधू ॥ आत्मा देहातीत शुद्ध ॥ सुखदुःखबाधू त्या नलगे ॥ ७३ ॥ देहें देहासि होईल दुःख ॥ तरी देहो तितुका पांचभौतिक ॥ त्यांसि परस्परें असे ऐक्य ॥ सर्वथा सुखदुःख घडेना ॥ ७४ ॥ जळामाजीं जळ सूतां ॥ जेवीं जळासि नव्हे व्यथा ॥ कां ०दीपू दीपें एकवटतां ॥ दीपासि सर्वथा दुःख न बाधी ॥ ७५ ॥ तेवीं पार्थिवें पार्थिवासी ॥ सुखदुःखबाधा न घडे त्यासी ॥ आत्मा नातळे सुखदुःखांसी ॥ तो देहासी स्पर्शेना ॥ ७६ ॥ ह्मणाल जीव जो देहाचा अभिमानी ॥ सुखदुःखें होती +त्यालागोनी ॥ तरी दुःखभोक्ता दुजेपणीं ॥ पाहतां कोणी दिसेना ॥ ७७ ॥ आपुली जिव्हा आपुले दांतीं ॥ रगडिली होय अवचितीं ॥ तया कोपाची *अतिप्राप्ती ॥ कोणाप्रती करावी ॥ ७८ ॥ तेथील कोपाच्या कडाडीं ॥ दांत पाडी कीं जिव्हा तोडी ॥ तैशी जगीं एकात्मता धडफुडी ॥ कोप यावया सवडी असेना ॥ ७९ ॥ जो पुढिलांचे [5]धक्यांनीं पडे ॥ तो त्यावरी कोपें ※वांडे ॥ जो स्वयें निसरोनि 7पडे ॥ तो लाजिला मागें पुढें 0न पाहतां निघे ॥ ७८० ॥ तेवीं मीचि भूतें भोक्ता ॥ माझ्या सुखदुःखाचा मीचि दाता ॥ जगीं मीच मी एकात्मता ॥ कोणावरी आतां कोपावें ॥ ८१ ॥ माझ्या सुखदुःखांसि कारण ॥ या परी नव्हतीच जन ॥ ह्मणा जरी देवतागण ॥ तेंही प्रमाण घडेना ॥ ८२ ॥

॥ श्लोक ॥ दुःखस्य हेतुर्यदि देवतास्तु किमात्मनस्तत्र विकारयोस्तत् ॥ यदंगमंगेन निहन्यते क्वचित्क्रुद्ध्येत कस्मै पुरुषः स्वदेहे ॥ ५२ ॥

॥ टीका ॥ आता दुसरें 6कारण मतीं ॥ देवांपासोनि दुःखप्राप्ती ॥ देवांची देहामाजीं वस्ती ॥ आत्मा निजस्थितीं विदेही ॥८३॥ 3देहींची इंद्रियविकारीं ॥ देव झाले अधिष्ठात्री ॥ आत्मा 4अखंड अविकारी ॥ सुखदुःखांमाझारीं अलिप्त ॥ ८४ ॥ भूमि सहजें निर्विकार ॥ 9तिची भिंती ते करी सविकार॥तेवीं वस्तु नित्य निर्विकार॥तेथ भासती सविकार अधिष्ठात्री देव ॥ ८५ ॥ भिंती पडल्या भूमीवरी ॥ ते मिळवी आपण्यामाझारीं ॥ तेवीं निर्गुणनिर्वि-

१ मनानें कल्पिलेला. २ देहाहून वेगळा. ३ चालितां. ४ पृथ्वीपासून उत्पन्न झालेला देह. ५ दुसऱ्याचे. ६ धक्यानें. ७ फार. ८ मतांतराप्रमाणें. ९ नियामक देवता.

*मो. ज्या दुःखसागराचा न पाविजे पार. ×ना. सुखदुःखबाधू. ०ना. दीपीं दीप. +ना. त्यापासुनी. *ना. अतिप्रीति. ※ना. वावडे. 7ना. गडबडे. 0ना. न कोपतां. 6ना. कारण ह्मणती. 3मो. देह इंद्रिय विकारीं. 4मो. केवळ अविकारी. 9ना. ते भिंतीवरी साविकार.

कारीं ॥ इंद्रियअधिष्ठात्री येती *ऐक्या ॥ ८६ ॥ स्वदेहीं परदेहीं जाण ॥ इंद्रियअधिष्ठात्री समान ॥ इंद्रियांचें सुखदुःख दारुण ॥ आपुलें आपण भोगिती देव ॥ ८७ ॥ हातें हाणतां तोंडावरी ॥ तेथ ×इंद्र अग्नि अधिष्ठात्री ॥ तेव्हां इंद्रचि अग्नीतें मारी ॥ आत्मा अविकारी +दुःखातीत ॥ ८८ ॥ होकां मुखें डसल्या हातासी ॥ अग्नीनें घाय केलें इंद्रासी ॥ आत्मा अलिप्त इंद्रादिदेवांसी ॥ सुखदुःख त्यासी स्पर्शेना ॥ ८९ ॥ 3परमुखें स्वमुखावरी थुंकिजे ॥ दोन्हीं मुखीं अग्नीनें नांदिजे ॥ तेथ कोणें कोणावरी कोपिजे ॥ आत्मस्वरूपीं दुजें असेना ॥७९०॥ थुंक आणि जे कां मूत ॥ देहीं उपजे ते देहाचे आप्त ॥ तें देहींचें देहावरी लोळत ॥ कोप तेथ कोण कोणा ॥९१॥ *स्वमुखें परमुखा चुंबन दीजे ॥ तेथ अग्नीनें अग्नीस चुंबिजे॥ तेणें सुखें ०कोण फुंजे ॥ आत्मत्वीं दुजें असेना ॥ ९२॥ स्वदेहें परदेहा आलिंगन ॥ उभयस्पर्शी वायूचि जाण ॥ तेणें सुखें सुखावे कोण॥ दुजेपण असेना ॥९३॥ यापरी देवतागण ॥ नव्हे सुखदुःखासी कारण ॥ आत्म्याचे ठायीं 2दैवतें जाण ॥ 7हारपती पूर्ण अभेदत्वें ॥९४॥ देहें 1देहो पीडितां निःशेख ॥ देहाभिमान्या होईल 0दुःख ॥ हें ह्मणती ते अतिमूर्ख ॥ हेंही जो देख घडेना ॥ ९५ ॥ 'पुर' ह्मणजे 'देहो' देख ॥ ते पुरीं जो पुरनिवासक ॥ तो सकळदेहीं पुरुष एक ॥ तेथ कोणाचें दुःख कोण मानी ॥ ९६ ॥ जेवीं संभ्रमें आवेशें वेगीं ॥ निजकर ह्मणतां निजांगीं ॥ तेथील व्यथेचा भागी । कोपावयालागीं आप आपण्या ॥ ९७ ॥ देखतां आपलें एकपण ॥ कोणाची व्यथा मानी कोण ॥ कोण कोणावरी कोपे जाण ॥ आपण्या आपण एकला ॥ ९८ ॥ तेवीं विश्वात्मा मीचि एक ॥ मीचि दैवतें मीचि लोक ॥ तेथ कोण कोणा दुःखदायक ॥ म्यां कोणावरी देख कोपावें ॥ ९९ ॥ यापरी स्वयें विचारितां ॥ देवांपासाव सुखदुःखता ॥ समूळ न घडे सर्वथा ॥ दैविकी व्यथा असेना ॥ ८०० ॥ आत्मा सुखदुःखांसि कारण ॥ मूळीं ※मताचि हें अप्रमाण ॥ आत्म्याच्याठायीं कार्य कारण ॥ सुखदुःख जाण असेना ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ आत्मा यदि स्यात्सुखदुःखहेतुः किमन्यतस्तत्र निजस्वभावः ॥
न ह्यात्मनोऽन्यद्यदि तन्मृषा स्यात्क्रुद्ध्येत कस्मान्न सुखं न दुःखम् ॥ ५३ ॥

॥ टीका ॥ आत्मा केवळ एकला एक ॥ तेथ कैंचें सुख कैंचें दुःख॥आत्मा सुखदुःखदायक ॥ ह्मणती ते मूर्ख अविवेकी ॥ २ ॥ जेवीं विघुरलें घृत जाण ॥ त्यासि नाहीं आकार वर्ण ॥ तेंचि सहजें थिजोनि जाण ॥ दिसे शुभ्रवर्ण कणिकारूपें ॥ ३ ॥ त्या घृतकणिका मिळतां देख ॥ नाहीं परस्परें सुखदुःख ॥ तेवीं निजात्मा एकला एक ॥ तोचि अनेक स्वरूपें ॥ ४ ॥ जळीं जळाच्या लहरी ॥ 8आदळतांही परस्परीं ॥ सुखदुःख नुमटे त्यांमाझारीं ॥ तेवीं चराचरीं परमात्मा ॥ ५ ॥ परमात्मा एकला एक ॥ एकपणेंचि तो अनेक ॥ तेथ विजातीय नाहीं देख ॥ मा सुखदुःख कोणाचें कोणासी ॥ ६ ॥ आत्मा 6सुखरूप अवघा एक ॥

१ नियामकदेवता. २ पुरांत राहणारा. ३ आपला हात. ४ दुसरा आत्म्याहून भिन्नजातीचा.

*मो. ऐक्यें. ×मो. इंद्र अधिष्ठात्री. +ना. सुखदुःखातीत. 3ना. सुखें. *मो. परमुखें स्वमुखा. ०ना. न फुंजिजे. 2ना. देवता. 7ना. ऐक्येंसी पूर्ण. 1ना. देहीं देहो पडतां विशेष. 0ना. सुख. ※मो. मंत्रचि हा. 8मो आंदोलितांही. 6मो. सुखदुःखरूप.

तेथ *आभासे जें अनेक ॥ तें मायामय काल्पनिक ॥ स्वप्नप्राय देख मिथ्यात्वें ॥ ७ ॥ मृग-जळ पाहतां दिसे जळ ॥परी तें कोरडें देख केवळ॥ तेवीं दिसे जें जें जगड्वाळ ॥ तें मिथ्या समूळ मायिक ॥ ८ ॥ जेथ मिथ्या द्वैत मायिक ॥ तेथ परमात्मा एकला एक ॥ तेव्हांचि हरपलें सुखदुःख ॥ कोपावया निःशेख ठावो नाहीं ॥ ९ ॥ जेथ निजात्मता एकपण ॥ तेथ सुखदुःख नाहीं जाण ॥ कोणावरी कोपे कोण ॥ आपल्या आपण +एकला ॥ ८१० ॥ जेथ आत्म्याचा निजानुभवो ॥ तेथ द्वैताचा अभावो ॥ सुखदुःखें झालीं वांवो ॥ कोपासि ठावो असेना ॥ ११ ॥ हे निजात्मता नेणोनि देख ॥ सत्य मानिती जे सुखदुःख ॥ ते होत कां वेदशास्त्रज्ञ लोक ॥ तयां क्रोध देख विंभांडी ॥ १२ ॥ ज्यासि सर्वभूतीं निजात्मता ॥ तेथ कोण कोणा ×दुःखदाता ॥ कोण कोणावरी कोपता ॥ निजात्मता एकली ॥ १३ ॥ आत्मा सुखदुःखांचा दाता ॥ यापरी नव्हे गा तत्त्वतां ॥ आपण्या आपण व्यथा ॥ मूर्खेही सर्वथा न देती ॥ १४ ॥ एथिलेनि चौथें मतें ॥ ※ग्रह मानावे दुःखदाते ॥ तेंही न घडे गा येथें ॥ ऐक निश्चितें सांगेन ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ ग्रहा निमित्तं सुखदुःखयोश्चेत् किमाऽत्मनोऽजस्य जनस्य ते वै ॥
ग्रहैर्ग्रहस्यैव वदंति पीडां क्रुद्ध्येत कस्मै पुरुषस्ततोऽन्यः ॥ ५४ ॥

॥ टीका ॥ जननीउदरीं जन्मे जाण ॥ देहाचें नांव ह्मणती "जन" ॥ ते जन्मकाळीं जें होय लग्न ॥ त्या जन्मापासून ०पूर्ण ग्रहगण लागे ॥ १६ ॥ तेथ द्वादशाष्टमजन्मस्थ ॥ शुभाशुभ जे ग्रह येत ॥ ते सुखदुःखांतें देत ॥ आत्मा अलिप्त ग्रहगतीं ॥ १७ ॥ मुळीं आत्म्यासि जन्म नाहीं ॥ मा 7ग्रह लागे कवणे ठायीं ॥ जेथ शेताचि पेरिलें नाहीं ॥ तेथ उंदिरीं काय [५]करांडावें ॥ १८ ॥ मुख्यत्वें घराचि केलें नाहीं ॥ तेथील माडी जळेल कायी ॥ आत्म्यासि तंव जन्मचि नाहीं ॥ मा ग्रहकर्ती 3काई लागेल ॥ १९ ॥ ग्रहांची ग्रहगती देहापाशीं ॥ आत्मा अलिप्त देहभावासी ॥ जेवीं कावळा न चढे कैलासीं ॥ तेवीं ग्रह आत्म्यासी न लागती ॥ ८२० ॥ जेवीं कां अग्नि न चाखे माशी ॥ घारी झडपीना चंद्रम्यासी ॥ तेवीं लागावया आत्म्यासी ॥ सामर्थ्य ग्रहांसी असेना ॥२१॥ आत्मा सर्वांचा अवघा एक॥ तें ग्रहांचा आत्मा तोचि देख ॥ त्या निजात्म्यासि देतां दुःख ॥ ग्रह पीडी अवश्यक आपआपणा ॥ २२ ॥ देह जड मूढ अज्ञान ॥ तें सुखदुःखाचें नेणे ज्ञान ॥ आत्म्यासि सुखदुःख देतां जाण ॥ तें आपण्या आपण पीडिती ग्रह ॥ २३ ॥ आपणाचि आपणयाप्रती ॥ कदा न देववे दुःखप्राप्ती ॥ यालागीं आत्म्यासि ग्रहगती ॥ जाण कल्पांतीं घडेना ॥ २४ ॥ ग्रहग्रहां-माजीं वैरस्थिती ॥ ग्रह ग्रहांतें पीडा देती ॥ तेही अर्थीची उपपत्ती ॥ यथानिगुती अवधारा ॥ २५ ॥ ज्योतिषशास्त्रसंमती ॥ शनि भौम सूर्या वैरप्राप्ती ॥ गुरु शुक्र दोनी वैरी होती ॥ बुध सोमांप्रती महावैर ॥ २६ ॥ तेथ एकाची ते [६]शीघ्रगती ॥ एक ग्रह मंदगामी होती ॥ अतिचार

१ व्यर्थ. २ जिंकी, पराभव करी. ३ या अध्यायांतील ७७२ ओवी पहा. ४ ग्रहगतीपासून. ५ तोंडानें कुरतडावें. ६ अत्यंत त्वरित गमन करणें.

*मो. आभास जो. +ना. कोपला. ×मो. सुखदाता. ※ना. ग्रह ह्मणावे दुःखातें. ०मो. ग्रहगति लागे. 7मो. ग्रहगती लागे. 3मो. कहीं लागेना.

कां वक्रगती ॥ मंडळभेदें येती एकत्र ।। २७ ॥ वैरी मीनल्या एके राशीं ॥ एके चरणीं एकत्र-वासी ।। तैं राहु गिळी सूर्यासी ।। सूर्यचंद्रांसी कुंद्व करी ।। २८ ॥ ऐसे ग्रहचि ग्रहांसि जाण॥ परस्परें पीडिती आपण ॥ मी आत्मा त्याहूनि भिन्न ॥ सुखदुःख कोण मज त्यांचें ॥ २९ ॥ अलंकार मोडितां जाण ।। सोनें मोडेना आपण ।। तेवीं ग्रहें ग्रहांसि पीडितां जाण ॥ मज आत्म्यासि कोण सुखदुःख ।। ८३० ।। रणभूमीं युद्ध झोटधरणी ॥ होतां घायवटे नव्हे धरणी॥ तेवीं ग्रहपीडेपासूनी ॥ मी अलिप्तपणीं निजात्मा ।। ३१ ॥ रजस्वला चालतां भूमीसी ।। तो विटाळ बाधीना पृथ्वीसी ॥ तेवीं ग्रहीं पीडितां ग्रहांसी ।। *मी सुखदुःखांसी अलिप्त ॥३२॥ एवं +ग्रहानिमित्त जें कांहीं ।। सुखदुःख उमटे देहीं॥ तें मज आत्म्यासि न लगे कहीं ॥ मा कोणासी काय कोपावें ॥३३॥ सुखदुःख तुमटे ×ज्याच्याठायीं ।। त्यासि क्रोधचि नये कहीं ॥ ०एवं ग्रहनिमित्त दुःख पाही ॥ सर्वथा नाहीं याहेतू ।। ३४ ॥ सुखदुःखदातें निजकर्म ॥ ह्मणतां जनांसि पडे भ्रम ।। आत्मा केवळ निष्कर्म ॥ त्यासि 8जड कर्म केवीं बाधी ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ कर्मास्तु हेतुः सुखदुःखयोर्वै किमात्मनस्तद्धि जडाजडत्वे ॥ देह-स्त्वचित्पुरुषोऽयं सुपर्णः क्रुद्ध्येत कस्मै नहि कर्म मूलम् ॥ ५५

।। टीका ॥ कर्म जडत्वें अतिबद्ध ॥ आत्मा चिद्रूपें परम शुद्ध ॥ त्यासि कर्माचा कर्म बाध ।। सर्वथा संबंध धरीना ॥ ३६ ।। रवीसि अंधारीं लपवे ॥ वणवा तृणामाजीं बांधवे ।। गोचिडा-चेनि ꣸सुखलाववें ॥ जरी लागवे दीपासी ॥ ३७ ॥ चंडवातातें तुंष राखे ।। थिल्लरचिखलें चंद्र माखे ।। तैं कर्मजन्य सुखदुःखें ॥ आत्मा यथासुखें बद्धता भोगी ।। ३८ ॥ आत्मा कर्माकर्म संहारी ।। सुखदुःखाची होळी करी ॥ तो कर्मफळांचा फळाहारी ।। मूर्ख गव्हारीं मानिजे ॥ ३९ ॥ स्वप्नींची स्वप्नसंतती ॥ जागृतीं कोणा भेटों येती ।। तरी कर्मांची सुखदुःखप्राप्ती ॥ आत्म्याप्रती बाधक ।। ८४० ।। जेवीं अग्नीवरी मुंगी न चले ।। तेवीं आत्मा नमाखे कर्ममळें ।। आकाश न खोंचे शस्त्रबळें ॥ तेवीं आत्मा कर्मफळें स्पर्शेना ॥ ४१ ॥ कर्म-तितुकें अविद्यक ।। आत्मा अविद्यातीत चोख ।। त्या आत्म्यासि कर्माचें सुखदुःख ॥ मानि-ती मूर्ख देहमोहें ॥ ४२ ।। कर्म अतिजड आत्मा शुद्ध ।। कर्म परिच्छिन्न आत्मा अगाध ॥ कर्म कर्मठतां नित्यबद्ध ॥ आत्मा चिदानंदस्वरूप ॥ ४३ ।। कर्म मिथ्याभूत मायिक ।।आत्मा नित्य अमायिक ॥कर्मांसि ब्रह्म अनोळख॥ब्रह्म तेथ कर्म देख नाहीं ।।४४।। 7दोराचे सर्पीं सर्प नाहीं ॥ मा तो डसोनि चढेल कायी ॥ तेवीं स्वरूपीं कर्म मिथ्या पाही ॥ तें आत्म्यासि कायी बाधील ।। ४५ ॥ वांझराणीचा लाडका नातू ॥ राजबळें जग दंडितू ।। तेवीं कर्मांची सुखदुःख मातू ॥ कर्मठाआंतु दाटुगी ॥ ४६ ॥ एवं कर्मचि मिथ्या एथें ॥ तें केवीं दे सुखदुःखांतें ॥ हें जाणोनियां निश्चितें ।। कोणें कोणातें कोपावें ॥ ४७ ।। कर्म सुखदुःखांचें दातें ॥ यापरी न घडे एथें ॥ ह्मणाल काळ दे सुखदुःखांतें ॥ तेंही निश्चितें घडेना ॥ ४८ ।।

---

१ अमावास्या. २ केशाकेशी. ३ घायाळ. ४ मोठ्या वाऱ्यास. ५ भूस. ६ लिप्त न होय. ७ ब्रह्माची ओळख नाहीं.

*मो. आत्मा सुखदुःखासी. +मो. ग्रहनिमित्यें. ×ना. ज्याच्या देहीं. ०मो. एवं ग्रहा निमित्य पाही, सुखदुःख नाहीं या हेतु. 8ना. निजकर्म. ꣸मो. सुखवेंधवें. 7मो. दोराचा सर्प दोराचि पाही.

॥ श्लोक ॥ कालस्तुहेतुः सुखदुःखयोश्चेत् किमात्मनस्तत्र तदात्मकोऽसौ ॥ नाग्नेर्हि तापो न हिमस्य तत्स्यात्क्रुद्ध्येत कस्मै न परस्य द्वंद्वम् ॥ ५६ ॥

॥ टीका ॥ काळ शीतकाळीं शीतें पीडी ॥ उष्णकाळीं उबारा सोडी ॥ वर्षाकाळीं पर्जन्य धाडी ॥ त्रिमालिकें पाडी धवळारें ॥ ४९ ॥ बैसवूनि सात वांकडीं ॥ अखंड धारा डोळा नुघडी ॥ जीवमात्रातें तेणें पीडी ॥ पडे सांकडी अन्नाची ॥८५०॥ *अन्नाचिया चिंडाणीं ॥ पीडती पशुपक्षिप्राणी ॥ ते काळीं सुखदुःख +मानी कोणी ॥ दुःखदाता जनीं निजकाळू ॥५१ ×अतिताप अतिशीतें ॥ सोडूनियां अतिवात ॥ काळ जगातें खात ॥ जग कांपत काळासी ॥ ५२ ॥ ऐकोनि काळाची गोठी ॥ देव कांपती उठाउठी ॥ इतरांची कायसी गोठी ॥ धाकें पोटीं विधाता ॥ ५३ ॥ अतिवृष्टि अनावृष्टी ॥ जन पीडी नानासंकटीं ॥ शेखीं प्रळयो करी उठाउठी ॥ दुःखदाता सृष्टीं महाकाळ ॥ ५४ ॥ ऐसें बोलती ज्ञाते लोक ॥ ते ज्ञातेपणें झाले मूर्ख ॥ काळ तोचि ईश्वरू देख ॥ ※सुखदायक सर्वांसी ॥ ५५ ॥ ईश्वराहूनि काळ भिन्न ॥ ह्मणे तो मूढ अज्ञान ॥ काळ तोचि ईश्वर जाण ॥ कृपाळु पूर्ण विश्वात्मा ॥ ५६ ॥ काळ सकाळें वर्षोनि जीवन ॥ सुखी करी संतप्त जन ॥ पृथ्वी निववूनियां जाण ॥ नव धान्य वोफवी ॥ ५७ ॥ ते काळीं ०जें शीत न वाहे ॥ तें वाफिलीं धान्यें राख होये ॥ तेव्हां शीतकण वर्षोनि पाहे ॥ करी लवलाहें सफळित धान्यें ॥ ५८ ॥ तीं 3आर्द्रधान्यें भूतांसी ॥ उपेगा न येती संग्रहासी ॥ यालागीं उष्ण काळेंसी ॥ काळ शोषी 4आर्द्रता ॥ ५९ ॥ यापरी शीतोष्णपर्जन्यांसी ॥ काळ 0उत्पादी भूतहितासी ॥ तेंचि कठिण वाटे त्यासी ॥ देहभ्रमासी भुलोनी ॥ ८६० ॥ हिरोनि अतिजीर्ण वस्त्रासी ॥ जो नवीं नेसवी सावेपेंसी ॥ ऐशिया हितकारिया काळासी ॥ वैरी पिशीं[11] ह्मणताती ॥ ६१ ॥ तेवीं जराजर्जरित विकळ ॥ 1तें देह निर्दळी सकाळें काळ ॥ आणिक नवें दे तत्काळ ॥ ऐसा कृपाळू काळ 8जनासी ॥ ६२ ॥ जुनें घेऊनि दे नव्यासी ॥ ऐशा उपकारी काळासी॥अपकारी ह्मणती पिशीं[11] ॥देहमोहेंसी लोभिष्टें॥६३॥जन जैशिया निजभावना ॥जेजे धरी दृढ वासना ॥ काळ कृपाळू तत्क्षणा ॥ तेते देह जाणा त्यासी देत ॥६४॥ महामहोत्सवें पिता पुत्रासी ॥ सांडवूनि जीर्णवासांसी ॥ नवीं वस्त्रें दे तयासी ॥ तेवीं जगासी 2प्रळयकाळू ॥ ६५ ॥ तेवीं प्रळयकाळीं जगासी ॥ काळ जीर्ण देह नाशी ॥ मग नूतन देह सर्वांसी ॥ अतिकृपेंसी गौरवी ॥६६॥ यापरी काळ कृपाळू ॥ त्यासि वैरी ह्मणे जन बरळू ॥ जगाचा 5निजात्मा स्वयें काळू ॥ तो दुःखाचा 6सळू कोणासि नेदी ॥ ६७ ॥ 7जनाचा देहीं दृढ भावो ॥ भाव-

१ करी, देई. २ तीन मजली. ३ घरें. ४ सात दिवस एकसारखी पावसाची झड. ५ पाऊस थांबत नाहीं. ६ अन्न कुजल्यामुळें. ७ ब्रह्मदेव. ८ योग्य काळीं. ९ पेरविती. १० ओलेपणा. ११ वेडे. १२ जुनीं वस्त्रें. १३ श्रमिष्ट.

*मो. अणोजा चीडाणी. +ना. न मानिती. ×मो. अति अत्यंत सित. ※मो. सुखदुःख दायक. ०ना. जें उष्ण वाहे. 3ना. आयितें धान्य. 4ना. रसातें. 0मो. उत्पति. 1मो. तें देह निर्दाळुनी सकाळे. 8मो. जगासी. 2मो. प्रळयीं दे काळ. 5मो. नियंता. 6मो. छळू. 7ना. जनाचे देहीं दृढ भावना भावो

नानुसारें काळ पहाहो ॥ देहापाठीं उपजवी देहो ॥ जन्ममरण निर्वाहो तेणें वाढे ॥ ६८ ॥ जो साचार *वांछी ×विदेहभावो ॥त्याचा काळ निर्दळी अहंभावो ॥निजानंदें विनवूनि स्वयमेवो ॥ जन्ममरणांचा ठावो विभांडी ॥६९॥ जैशी ज्यासि होय बुद्धी ॥ काळ त्यासि तैशी दे सिद्धी॥ हें नेणिजे देहमोहांधीं ॥ काळ त्रिशुद्धी कृपाळू ॥ ८७० ॥ काळ तोचि निजात्मा जनीं ॥ ऐसें जाणे जो +निजज्ञानी ॥ तें कोणाचें दुःख कोण मानी ॥ दुसरें कोणी असेना ॥ ७१ ॥ मी एथें एक दुःखदाता ॥ पैलें तो एक दुःखभोक्ता ॥ हेही नाहीं ०द्वैतकथा ॥ जगेंसि निजात्मता निज-काळ ॥७२॥ काळ ※निजात्मता दोनी एक ॥ तें कोणाचें कोणासि होय दुःख॥कोण कोणाचा मानी शोक ॥ द्वंद्वदुःख असेना ॥७३॥ जेवीं नाममात्र मृगजळ ॥ तेथ नाहीं तिळभरी जळ ॥ तेवीं *आत्मत्वीं जगद्वाळ ॥ तो भ्रम केवळ मनाचा ॥ ७४ ॥ आत्मा एकत्वें अभेद ॥ काळ नामें तोचि प्रसिद्ध ॥ जीव तदंशें चिद्त्वें शुद्ध ॥ त्यासि काळादि द्वंद्व बाधीना ॥७५॥ आगीनें काय आगी जळे ॥ कां उन्हाळेनि सूर्य पोळे ॥ सागरू बुडे लहरीबळें ॥ कीं अंधारातें काळें 7काजळें कीजे ॥७६॥ कीं हिमाचळ 4हिमकणें कांपे ॥ तुपासि मोडशी होय तुपें ॥ 6तें काळ-सत्ता खटाटोपें ॥ आत्मा 2असुपें द्वंद्वें भोगी ॥ ७७ ॥ 8आप आपणियां आपदा ॥ कोणा न करवे विरुद्धा ॥ तेवीं आत्म्यासि द्वंद्वबाधा ॥ काळाचेनि कदा करवेना ॥ ७८ ॥ एवं एकात्मता अभेद ॥ तेथ काळाचा नचले बाध ॥ अभेदीं सर्वथा नाहीं द्वंद्व ॥ कोणावरी क्रोध करावा ॥ ७९ ॥ जीव शिवत्वें मी कवळें ॥ मीचि आत्मा मीचि काळ ॥ मिथ्या द्वंद्वदुःखगोंधळ ॥ क्रोधाचा कल्लोळ कोणावरी करूं ॥ ८८० ॥ काळ सुखदुःखांचा दाता ॥ यापरी नव्हे विचा-रितां ॥ सुखदुःखांची बाधकथा ॥ आत्म्यासि सर्वथा असेना ॥८१॥ सुखदुःखादि हेतुषट्क॥ नायं जनोइत्यादिक ॥ याचा करितां निजविवेकें ॥ नव्हती बाधक आत्म्यासी ॥ ८२ ॥ याही 3वेगळीं बाधकपणें ॥ 1देशैंवासें त्रिगुणगुणें ॥आत्म्यासि बाधावयाकारणें ॥ कोठें कोणी दि-सेना ॥ ८३ ॥ निजात्म्यासि बाधकता ॥ कायसेनि न संभवे सर्वथा ॥ जनासि बाधक देह-अहंता ॥ त्याचि निजार्था भिक्षु बोले ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ न केनचित्क्कापि कथंच नास्य द्वंद्वोपरागः परतः परस्य ॥ यथा-हमः संसृतिरूपिणः स्यादेवं प्रबुद्धो न बिभेति भूतैः ॥ ५७ ॥

॥ टीका ॥ आत्मा गुणातीत शुद्ध ॥ परात्परतर स्वानंद ॥ परिपूर्ण सच्चिदानंद ॥ तेथ द्वंद्व-बाध रिघेना ॥८५॥ द्वंद्व रिघावया आत्मभुवनीं ॥ कैसेंनि कायिसेंनि कोणाचेंनी ॥ कर्म कार्य क्रिया करणी ॥ बाधकपणीं असेना ॥८६॥ अभेदा द्वंद्वबाध ॥ स्वानंदा सुखसंबंध ॥ पूर्णासि कैंचें विरुद्ध ॥ परमानंद एकला ॥ ८७ ॥ आशंका ॥ आत्म्यासि न घडे 9द्वंद्वसंबंध ॥ देहो तंव जडत्वें नेणे द्वंद्व ॥ तरी सुखदुःखांचा महाबाध ॥ कोणासि प्रसिद्ध 0होतसे ॥ ८८ ॥ सुख दुःखभोगासि जाण ॥ सोसावया जन्ममरण ॥ एथ मुख्यत्वें देहाभिमान ॥ तेंही लक्षण 5अ-

१ पलीकडे. २ बर्फाच्या कणानें. ३ अजीर्ण. ४ खरा विचार. ५ मायेच्या पलीकडे.

*मो. भावी. ×ना. विजयभावो. +मो. निजात्मज्ञानी. ०ना. अद्वैत कथा. ※ना. मी एकुलता निजात्म काळ. *मो. आत्मा. 7मो. अंधारें. 4मो. हिमें. 6ना. तेवीं. 2मो. आपणपें. 8मो. आपण. 3मो. वरी बाधकपण. 1मो. दिसे वाटे त्रिगुण गुणे. 9मो. द्वंद्वबाध. 0ना. येतसे. 5मो. अवधारा.

तर्क्य ॥ ८९ ॥ जेवीं असोनि भर्त्तारापाशीं ॥ व्यभिचार *करितां अहेवेसी ॥ पोट वाढल्या परपुरुषीं ॥ तें कोणासी कळेना ॥ ८९० ॥ तैसें अभिमानाचें विंदान ॥ चित्स्वरूपीं जडोनि जाण ॥ मिथ्या दावूनि जीवपण ॥ सुखदुःखें आपण ×स्वेच्छा भोगी ॥ ९१ ॥ जेवीं रायापाशील कुडमंत्री ॥ राजबळें अधर्म करी ॥ प्रजेतें छळी नानापरी ॥ तैसा शरीरीं अभिमान ॥९२॥ कां अग्निसंगें लोह जाण ॥ अग्निप्राय होय आपण ॥ त्यासी हातीं धरूं शके कोण ॥ पोळवी दारुण सर्वांसी ॥ ९३ ॥ तेवीं चिद्रूपीं अभिमान ॥ देहात्मता खवळोनि पूर्ण ॥ सुखदुःखादि जन्ममरण ॥ वाढवितां कोण आवरी ॥ ९४ ॥ स्वप्नींचा देह केवळ मन ॥ त्याही देहासि असे मनपण ॥ तैसा हाही देहो मनचि जाण ॥ अभिमानें कठिण स्थूळ केला ॥ ९५ ॥ कार्यकारणरूपें जाण ॥ संसाराचि 3मानाभिमान ॥ 7वाढवूनि सुखदुःख दारुण ॥ जन्ममरण स्वयें भोगी ॥ ९६ ॥ भोगिलेचि भोग भोगितां ॥ नानापरी पावे व्यथा ॥ तरी न सांडी अहंता ॥ देहात्मता वाढवी ॥ ९७ ॥ ब्रह्मप्रळय होतां जाण ॥ देहअहंता नव्हे क्षीण ॥ प्रळयीं विरेना अभिमान ॥ सुखदुःखें जाण तो भोगी ॥ ९८ ॥ यामाजीं जीव असे कैसा ॥ जपाकुसुमीं स्फटिक जैसा ॥ दिसोन त्या रंगा ऐसा ॥ स्वयें तैसा होईना तो ॥९९॥ आत्मत्वीं सुखदुःख नाहीं ॥ तें प्रत्यक्ष दिसतां देहीं ॥ ※हे अविचाररमणीय पाहीं ॥ कल्पनेच्याठायीं आभासे ॥ ९०० ॥ तें देह माझें ह्मणोनि तत्त्वतां ॥ अभिमान घेऊनि माथां ॥ जन्ममरणादि ओवर्ता ॥ सुखदुःखभोक्ता स्वयें होय ॥ १ ॥ येणेंचि विवेकें निजज्ञानी ॥ प्राप्ततत्त्व गुरुवचनीं ॥ ते वर्ततांही जनीं वनीं ॥ देहाभिमानी कदा नव्हती ॥ २ ॥ ऐसे प्रबुद्ध जे आत्मप्रतीतीं ॥ त्यांसि प्रारब्धाचिये निजगतीं ॥ नानासुखदुःखें देतां भूतीं ॥ आत्मस्थिती ढळेना ॥ ३ ॥ त्यांसि +द्वेष नुपजे भूतीं ॥ कोप सर्वथा न ये चित्तीं ॥ मीचि एक त्रिजगतीं ॥ ०जाणोनि निश्चितीं निर्द्वंद्व ॥ ४ ॥ तो देखोनियां 2विषमासी ॥ भय न धरी मानसीं ॥ पारकें न ह्मणे कोणासी ॥ 8आप्त सर्वांसी निजात्मता ॥ ५ ॥ समविषमभाव ना भेद ॥ ज्ञाता सर्वेरूपें अभेद ॥ तो न मानी कोणाचा भय खेद ॥ सुख स्वानंद सर्वदा ॥ ६ ॥ निंदा उपद्रव अनुद्विग्न ॥ साहोनियां सुखसंपन्न ॥ हें सिद्धाचें मुख्य लक्षण ॥ तेंचि साधन साधकां ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ एतां समास्थाय परात्मनिष्ठामध्यासितां पूर्वतमैर्महर्षिभिः ॥ अहं तरिष्यामि दुरंतपारं तमो मुकुंदांघ्रिनिषेवयैव ॥ ५८ ॥

॥ टीका ॥ 4माझ्या पूर्वापूर्वभाग्योदयें ॥ 0अद्वैतनिष्ठा उपजली 9पाहे ॥ जे निष्ठेचेनि 1समवायें ॥ नानादुःखें साहें निर्द्वंद्व ॥८॥ द्वंद्वसुखदुःसहिष्णुपण ॥ हें सिद्धांचें सहज लक्षण ॥ माझें मुख्यत्वें हेंचि साधन ॥ मनोजयो जाण येणें होये ॥ ९ ॥ हेंचि परमार्थसाधन वरिष्ठ ॥ हेंचि महर्षींची निजनिष्ठा ॥ हेंचि 5निजभजन वैकुंठा ॥ निजात्मनिष्ठा येणें साधे ॥ ९१० ॥ येणें न बाधे द्वंद्वदुःख ॥ येणें पाविजे नित्यसुख ॥ 6दुस्तर संसारतारक ॥ हा निजविवेक आह्मांसी

१ सुवासिनी. २ कपटी, वाईट मंत्री. ३ जास्वंदीचे फुलाचे ठिकाणीं. ४ अविचारानें सुंदर भासणारें. ५ भोंवऱ्यांमध्यें. ६ ज्यांस गुरूपदेशानें आत्मतत्त्व प्राप्त झालें आहे. ७ संकटास.

*मो. करी अहर्निशीं. ×मो. स्वयें. 3ना. देहाभिमान. 7ना. वाढवी. ※मो. हे वाचारमणीय. +मो. द्वैतशून्य पडे भूतीं. ०ना. मानूनि. 2ना. विषयासी. 8ना. सत्य सर्वांसी. 4मो. माझा पूर्ण भाग्योदयो. 0ना. अद्वैत आत्मनिष्ठा. 9मो. पहाहो. 1मो. स्वयमेवो. 5ना. भज्य भजन. 6मो. दुसरें संसारतारक, नाहीं विशेष आह्मासी.

॥११॥दुस्तर तरावया भवसागरू ॥ हा विवेकचि *कल्याणतारु ॥ एथ सद्गुरू कर्णधारू ॥ परात्परपारू पाववी ॥ १२॥ हा विवेक कैसेनि ये हाता ॥ हेही करणें नलगे चिंता ॥ निजभावें एकाग्रता ॥ शरण भगवंता रिघावें ॥ १३ ॥ सांडोनि लौकिकाचे लाजे ॥ सांडोनि अभिमानाचें वोझें ॥ भगवंता शरण रिघिजे ॥ तैं लाहिजे हा विवेक ॥ १४ ॥ तान्हें बाळ जेवीं जननीसी ॥ अनन्यशरण सर्वभावेंसी ॥ ऐशिया अनन्यता अहर्निशीं ॥ शरण हरीसी रिघावें ॥ १५ ॥ हरीसि रिघालिया शरण ॥ मुख न दाखवी जन्ममरण ॥ तेथ बाधूं शके द्वंद्व कोण ॥ हरी रक्षण निजभक्तां ॥ १६ ॥ मोक्षदाता मुकुंद पूर्ण ॥ त्यासि कैसें रिघावें शरण ॥ तो अनंततत्वें निजनिर्गुण ॥ ×तेथ कोण पावेल ॥ १७ ॥ असो +हरिरूप निर्गुण ॥ त्याची मूर्ति चिंतितां सगुण ॥ ध्यानीं स्थिरावल्या संपूर्ण ॥ द्वंद्वदुःखें जाण हारपती ॥ १८ ॥ ध्यानीं मूर्ति नये संपूर्ण ॥ तैं दृढ धरावे हरिचरण ॥ तेणें उठोनि पळे जन्ममरण ॥ आपभयें आपण पळती द्वंद्वें ॥ १९ ॥ जैं न धरवती दृढ चरण ॥ तैं करावें नामस्मरण ॥ ज्याचेनि नाममात्रें जाण ॥ यम, काळ पूर्ण कांपती ॥ १२० ॥ जेथ हरिनामाचा नित्य घोष ॥ तेथ मरणा मरण आलें दे ॥ ⁂जन्माचें होय काळें मुख ॥ लाजोनि निःशेख तें पळे ॥ २१ ॥ रामनामाच्या गजरापुढें ॥ काइसें द्वंद्वदुःख बापुडें ॥ अवघें भवभयचि उडे ॥ नामपवाडे गर्जतां ॥२२॥ अखंड नामें गर्जे वाणी ॥ त्याचे बोलांमाजीं चक्रपाणी ॥ तेथ ऋद्धिसिद्धी वाहती पाणी ॥ मुक्ति ०आंदणी दासी तयाची ॥ २३ ॥ निर्विकल्प[4] भावार्थें आपण ॥ सगुण निर्गुण कां नामस्मरण ॥ भक्तभावार्थें आदरी जाण ॥ तें तें होय पूर्ण [5]सद्भावें ॥ २४ ॥ भावार्थें जे ()भगवत्प्रीती ॥ तेचि जाणावी [9]साचार भक्ती ॥ भावें तुष्टला श्रीपती ॥ दे निजशांति साधकां ॥ २५ ॥ ते निजशांतीच्या पोटीं ॥ हरपती द्वंद्वदुःखकोटी ॥ परमानंदें कोंदे सृष्टी ॥ मी तूं दृष्टीं दिसेना ॥ २६ ॥ ऐसेनि अभेदभावें जाण ॥ सेवितां मुकुंदश्रीचरण ॥ मी आपणिया आपण ॥ तारीन जाण निश्चित ॥ २७ ॥ तारीन म्हणतां उधारू ॥ बोलीं दिसताहे उशिरू ॥ जो झाला हरीचा [1]डिंगरू ॥ त्यासि संसारू असेना ॥ २८ ॥ ऐशी भिक्षूनें गाइली गाथा ॥ ते अत्यंत रुचली श्रीकृष्णनाथा ॥ हरिखें वोसंडोनि चित्ता ॥ [7]उद्धवाचा माथा थापटी ॥ २९ ॥ ऐशी जे हे निजशांती ॥ ॥ माझ्या उद्धवासि व्हावी प्राप्ती ॥ ऐसा कळवळोनि श्रीपती ॥ काय उद्धवाप्रती बोलिला ॥ ९३० ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ निर्विद्य नष्टद्रविणो गतक्लमः प्रव्रज्य गां पर्यटमान इत्थम् ॥ निराकृतोऽसद्भिरपि स्वधर्मादकंपितोऽमूं मुनिराह गाथाम् ॥५९॥

॥ टीका ॥ ज्याचे निःश्वासीं जन्मले वेद ॥ ज्याचे चरणीं गंगा प्रसिद्ध ॥ ज्याचें नाम छेदी भवबंध ॥ तो उद्धवासी गोविंद स्वमुखें बोले ॥ ३१ ॥ यालागीं उद्धवाचें भाग्य थोर ॥ ज्यासि तुष्टोनि सारंगधर ॥ दाखवी निजशांतीचें घर ॥ निरंतर वस्तीसी ॥ ३२ ॥ उद्धवा ऐक

१ नावाडी. २ सूर्यपुत्र. ३ नाशकर्ता. ४ भेदरहित, संशयरहित, कल्पनारहित. ५ उधार, रोख नव्हे, लांबणीचा. ६ लाडका. ७ शार्ङ्गनामक धनुष्य धारण करणारा कृष्ण.

*ना. कल्पतरू. ×ना. नेणे कोण. +ना. हरिरूपें. ⁂ना. जन्मायेणेयाचें. ०ना. आंदणी तयासी. [5]ना. मद्भावें. ()ना. भगवत्प्राप्ती. [9]ना. सारभक्ती. [1]मो. दासि डिंगरू. [7]मो. उद्धवाची पाठी.

सावधान ।। धनलोभ्याचें नासोनि धन ।। तो धननाशु झाला प्रसन्न ।। केला विवेकसंपन्न वैरागी ॥ ३३ ॥ जो धनलोभी न खाता ॥ ज्याचें नांव न घेती सर्वथा ॥ तोचि वैराग्यें केला सरता ।। माझे मुखीं कथा जयाची ॥ ३४ ॥ त्याचें नाम माझे मुखीं जाण ॥ त्याचें कर्म वर्णीं मी आपण ।। तो मज पढियंता *जाण ॥ जो विवेकसंपन्न वैरागी ॥ ३५ ॥ वैराग्यापरतें भाग्य थोर ॥ जगीं नाहीं ×आन सधर ॥ विवेकवैराग्यें जो साचार ।। तो माझें जिव्हार उद्धवा ।। ३६ ॥ जो विवेकवैराग्यें आथिला ।। तो जाण मजमाजीं आला ।। मी अधीन त्याचिया बोला ।। तो मज विकला सर्वस्वें ॥३७॥ लोभ्याचें निःशेष गेलें धन ॥ धनासवें गेले मानाभिमान॥अभिमानासवें जाण॥ 2गेलें द्वंद्व दारुण सुखदुःख॥३८॥धन जातां झाली विरक्ती॥ तेणें नेमस्त झाला यती॥भिक्षार्थ हिंडतां क्षितीं ॥ दुर्जनीं दुरुक्तीं 7निर्भर्त्सिला ॥३९॥पीडितां नानाविकारीं ॥ उपद्रवितां नानापरी॥ न डंडळीचे निजनिर्धारीं ॥ स्वधर्मं धैर्यैकरी निर्द्वंद्व॥९४०॥ संन्याशाचा स्वधर्म पूर्ण ।। मी देहातीत नारायण ॥ साचार ०हरविला देहाभिमाम ।। यालागीं जाण न डंडेळी ।। ४१ ।। जेवीं छायेसि लागतां घावो ।। पुरुषासि नाहीं भय संदेहो तेवीं दुर्जनीं दंडितां देहो ।। नाहीं दुःखभेवो निरहंकारा ॥ ४२ ॥ देहासि होतां नानाव्यथा ।। आपुली जे देहातीतता ॥ तेचि भिक्षूनें गायिली गाथा ।। ते तुज म्यां आतां निरूपिली ॥४३ येथ सुखदुःखांसि कारण ॥ आपला भ्रम आपणासी जाण ॥ येचि अर्थीचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४४ ॥

॥ श्लोक ॥ सुखदुःखप्रदो नान्यः पुरुषस्यात्मविभ्रमः ॥ मित्रोदासीनरिपवः संसारस्तमसः कृतः ॥ ६० ॥

॥ टीका ॥ आविद्यक जें ※निजअज्ञान ।। तेथें मनपणें उठी मन ॥ मनें भेद करोनी पूर्ण ।। सुखदुःखें जाण भोगवी ॥ ४५ ॥ आत्मा केवळ भेदशून्य ।। तेथ शत्रु मित्र उदासीन ।। मनें कल्पूनियां जाण ॥ +मन संपूर्ण स्वयें चाळी ॥ ४६॥ ऐसें भेदीं ठसावलें मन ॥ तेंचि पुरुषाचें अज्ञान ।। तेणें 5द्वंद्वदुःखांसि जाण ॥ संसार दारुण सभ्रांता ।। ४७ ॥ मन सुखदुःखांसि कारण ॥ मनःकल्पित संसार जाण ।। त्या मनाचें निग्रहण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ।। ४८ ॥

॥ श्लोक ॥ तस्मात्सर्वात्मना तात निगृहाण मनो धिया॥ मय्यावेशितया युक्त एतावान् योगसंग्रहः ॥ ६१ ॥

॥ टीका ॥ जो नासूं पाहे संसारदुःख ।। तेणें मन नेमावें अवश्यक ।। मनावेगळें दुःखदायक॥ नाहीं आणिक त्रिलोकीं ।। ४९ ॥ मन अतिशयें चंचळ ।। तें सहसा नव्हे निश्चळ ॥ त्यासि विवेक यावा मोकळ ।। अभेदशील अहर्निशीं ॥ ९५० ॥ मन सिंतरील विवेकासी॥ तयालागीं हातकडिया दोहींसीं ॥ 3करूनियां अहर्निशीं ॥ येरयेरांपाशीं राखावीं ॥ ५१ ॥ मन जेथ

१ पवित्र. २ वर्णन करीं. ३ बळकट, श्रेष्ठ, ४ खरा संपन्न. ५ जिव्हाळा, जीवन. ६युक्त झाला, संपन्न. ७ संन्यासी. ८ पृथ्वीवर. ९ डळमळे, ढळे, हाले. १० जिंकून स्वाधीन ठेवणें. ११ स्वाधीन ठेवावें, नियमांत ठेवावें. १२ बंधन, पहारेकरी. १३ वंचना करील, फसवील. १४ हातविड्या.

*ना. पूर्ण. ×ना. साधन सधर. 2मो. गेलं दारुण द्वंद्वदुःख.7ना. छळियेला. ०ना. हविला. ※मो. निजज्ञान. +मो. वैर प्रेम उपेक्षण मन. 5मो. द्वंद्वदुःख सोसी जाण. 3मो. घालूनियां.

*विकल्पें धांवे ॥ तेथ महामारी विवेकू पावे ॥ मन जेथ अधर्मीं भंवे ॥ तेथ विवेक धांवे हा-किंत ॥ ५२ ॥ मन जाय कामक्रोधापाशीं ॥ विवेक वोढी धरोनि केशीं ॥ मन रिघतां ×र्निंदेपाशीं ॥ विवेक त्यासी बुंकाली ॥ ५३ ॥ मन ह्मणे +विषय सुखासाठीं ॥ विवेक हाणे वैराग्यकाठी ॥ मन धांवतां कल्पनेपाठीं ॥ विवेक उठाउठीं झोंडोळी ॥ ५४ ॥ परदारा परधन ॥ अभिलाषं धांवे मन ॥ तेथ विवेक पावोन ॥ रणकंदनें आरंभी ॥ ५५ ॥ ऐसा मनविवेकांचा झगडा ॥ गाऱ्हाणें आलें सद्गुरुपुढां ॥ तेणें करावया निवाडा ॥ अद्वैतवाडां कोंडिलीं ॥ ५६ ॥ तो दृष्टी देखतांचि ठावो ॥ मनाचा मोडला स्वभावो ॥ देहींचा झाडोनि अहंभावो ॥ विवेकेंसि पहाहो ऐक्य केलें ॥ ५७ ॥ तेथ मनाचें गेलें मनपण ॥ विवेक विसरला आकळण ॥ जीवाचें विरालें जीवपण ॥ वस्तु संपूर्ण अद्वय ॥ ५८ ॥ जेवीं सुवर्णाचीं नागभूषणें ॥ फडा पुच्छ मिरवी नागपणें॥तें न मोडितां नागत्वाचें लेणें ॥ ०सोनें सोनेपणें नागत्व विसरे ॥५९॥ तेवीं जाणोनि वस्तु पूर्ण ॥ न मोडितां 2जग जन ॥ जीव विसरला जीवपण ॥ मनत्वा मन मूकलें ॥६०॥ ऐशिया विवेकयुक्ती जाण ॥ माझे स्वरूपीं प्रवेशे मन ॥ जेथ मनपणें तुटी मन ॥ मनोनिग्रहण या नांव ॥६१॥ ऐक 9चतुरचित्तचिंतामणी ॥ विवेकचक्रवर्तिचूडामणी ॥ उद्धवा भक्तशिरोमणी ॥ मनोनिग्रहणीं 0प्रवर्त ॥६२॥ आवडी भुलला कृष्णनाथ ॥ तो उद्धवासि ह्मणे तात ॥ मनोनिग्रहीं तूं एथ ॥ होईं साक्षेपयुक्त सादर ॥ ६३ ॥ संक्षेपें निग्रहूनि मनासी ॥ जो सांडवी मनोजन्यभेदासी ॥ शांति साडूं नेणे त्यासी ॥ जेवीं तान्हयासी माउली ॥ ६४ ॥ निजशांति बाणल्या शुद्ध ॥ त्यासि न बाधी कोणी द्वंद्व ॥ हाचि योगसंग्रहो प्रसिद्ध ॥ बोलिले सिद्ध महा योगी ॥६५॥ सांडूनि संसारस्फूर्ती ॥ चित्स्वरूपीं जडे वृत्ती ॥ जीवशिव एकत्वा येती ॥ योगसंग्रहस्थिती या नांव ॥ ६६ ॥ ऐशिया योगसंग्रहशांती ॥ ❀साधकां द्वंद्वें न बाधिती ॥ हे असो, भिक्षुगीतीं ज्याची भक्ती ॥ द्वंद्वनिर्मुक्ती त्या लाभे ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ य एतां भिक्षुणा गीतां ब्रह्मनिष्ठां समाहितः ॥ धारयन् श्रावयन् शृण्वन् द्वंद्वैर्नैवाभिभूयते ॥ ६२ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे भगवदुद्धवसंवादे त्रयोविंशोऽध्यायः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ साधावया शांतीची प्राप्ती ॥ कोटिसाधनीं नलभे शांती ॥ हा भिक्षुगीतार्थ धरितां चित्तीं ॥ शांति ओपेती साधकां ॥ ६८ ॥ योगनिष्ठा ब्रह्मज्ञान ॥ तें हें भिक्षुगीत निरूपण ॥ जो हृदयीं धरी सावधान ॥ शांति आंदण तयाची ॥ ६९ ॥ ये भिक्षुगीताचा अर्थ ॥ जो जीवीं धरी समाहित ॥ त्यासि द्वंद्वाचा न बाधी घात ॥ अतिशांत निजबोधें ॥ ९७० ॥ भिक्षुगीतार्थें समाधान ॥ हें सांगतां नवल कोण ॥ जो सादरें करी श्रवण ॥ त्यासि द्वंद्वें जाण न बाधिती ॥ ७१ ॥ परदेशा गेला बहुकाळ भर्ता ॥ त्याचें पत्र सादरें ऐके कांता ॥ तैशिया अ-

---

१ कल्पना करूं लागे. २ नाशकर्ता. ३ धक्के देऊन बाहेर काढितो. ४ शेंडी धरून ओढी. ५ निकराची लढाई. ६ जागा. ७ निरोध, समजणें. ८ सर्पाकार भूषणें. ९ बाप. १० यत्न, खटपट. ११ स्वाधीन, वश, प्राप्त होते. १२ स्वस्थपणें.

*मो. विकल्पें धांवे. ×ना. देहापाशीं. +मो. विवेक सुटी. ०मो सोनेपणें नागत्व विरे. 2ना. जग जनार्दन. 9मो. चतुर चिंतामणी. 0ना. तूं प्रवर्तें. ❀ना. साधकासी विषयद्वंद्वें.

तिएकाग्रतां ॥ भिक्षुगीता ऐकावें ॥ ७२ ॥ निघोनि गेलिया पुत्रासी ॥ त्याची शुद्धि ये मातेपाशीं ॥ ऐकोनियां उणखुणेसी ॥ चरफडी जैसी विव्हळ ॥ ७३ ॥ तीजवळ ज्या सोयऱ्या असती ॥ त्याही स्नेहें कळवळती ॥ परी माता जैशी तळमळी चित्तीं ॥ ते आणिकाप्रती असेना ॥ ७४ ॥ तैसें भिक्षुगीतश्रवण ॥ करितां द्रवें ज्याचें मन ॥ जो सात्त्विकें वोसंडे पूर्ण ॥ तो द्वंद्वासि जाण नाटोपे ॥ ७५ ॥ असो नव्हें सादरें श्रवण ॥ तरी करितां याचें नित्य पठण ॥ भिक्षुगीतप्रतापेंकरून ॥ द्वंद्वें जाण नातळती ॥ ७६ ॥ पडतां पंचाननाची घाणी ॥ मदगजां होय महापळणी ॥ तेवीं *भिक्षुगीतपठणीं ॥ होय भंगणी द्वंद्वाची ॥ ७७ ॥ निर्लोभ होऊनि मानसीं ॥ बैसोनि +साधुसज्जनांशीं ॥ जो निरूपी भिक्षुगीतासी ॥ द्वंद्वें त्यासी नातळती ॥ ७८ ॥अर्थें पाठें श्रवण करितां ॥ द्वंद्व निवारी भिक्षुगीता ॥ हें वर्म कळलेंसे श्रीकृष्णनाथा ॥ तो सांगे हितार्थी उद्धवासी ॥ ७९ ॥ ज्या भिक्षुगीताची फळश्रुती ॥ स्वमुखें सांगताहे श्रीपती ॥ त्या भिक्षुचें भाग्य वानूं किती ॥ धन्य त्रिजगतीं तो एक ॥ ९८० ॥ विवेकवैराग्यसमरसीं ॥ जो ※साहे अतिद्वंद्वांसी ॥ तोचि पढियंता हृषीकेशी ॥ हें उद्धवासी दाविलें ॥८१॥ जगासि उद्धवाचा उपकार ॥ गुह्यज्ञान परात्पर ॥ उघडूनि श्रीकृष्णें भांडार ॥ भिक्षुगीतसार प्रकटिलें ॥ ८२ ॥ उद्धव न पुसता जरी शांती ॥ तरी हें कां सांगता श्रीपती ॥ कृष्णासि उद्धवाची प्रीती ॥ त्यासि नाना उपपत्ती उपदेशी ॥ ८३ ॥ हेंचि जडजीवां उद्धरण ॥ येणें उपायें तरती दीन ॥ जग तारावया जगज्जीवन ॥ उद्धव मिषें *श्रीकृष्ण बोलिला ॥ ८४ ॥ श्रीकृष्ण बोलिला भिक्षुगीत ॥ तें वेदशास्त्रार्थमथित ॥ उपनिषदांचें सारभूत ॥ वोतिकांत रहस्य ॥८५॥ येणें ०आपआपणियां आपण ॥ लागताहे निजात्मलग्न ॥ हें ज्ञानाचें गुह्य ज्ञान ॥ भक्तकृपा श्रीकृष्ण बोलिलों ॥ ८६ ॥ येणें जीवाचें जीवत्व उडे ॥ शिवाचें शिवत्वही बुडे ॥ द्वंद्वाचें बाधकत्व मोडे ॥ स्वानंदाचें उघडे भांडार ॥८७॥ वेदें मौन धरिलें येथ ॥ सशब्दशास्त्रें लाजलीं जेथ ॥ ऐसें अतिरहस्य भिक्षुगीत ॥ तें मी प्राकृत बोलिलों ॥८८॥ जेवीं जळीं बुडतीं पाषाण ॥ ते श्रीरामें तारिले आपण ॥ तेवीं मी जड मूढ अज्ञान ॥ बोलवी ब्रह्मज्ञान जनार्दनकृपा ॥८९॥ अहल्या जे व्यभिचारिणी ॥ ते लागतां श्रीरामचरणीं ॥ तिचेनि नामें पापा धुणी ॥ प्रातःस्मरणीं ×पढविली ॥ ९९० ॥ तेवीं सद्गुरुकृपेची करणी ॥ माझी प्राकृत जड मूढ वाणी ॥ मानिजे साधुसज्जनीं ॥ तैशी बोलणीं बोलविलीं ॥९१॥ सरस्वती ज्यासि वोळे ॥ तें मुकेंही वेदशास्त्र बोले ॥ तैसें जनार्दनें आम्हां केलें ॥ भिक्षुगीत बोलविलें प्राकृत ॥ ९२ ॥ राजमुद्रा चढे ज्याचे हातीं ॥ त्यातें समस्त सन्मानिती ॥ तेवीं माझी १वाणी सरती ॥ केली निश्चितीं जनार्दनें ॥ ९३ ॥ बाळकाची बोबडी वाणी ॥ ऐकोनि संतोषे जननी ॥ तेवीं माझी आरुष वाणी ॥ संतसज्जनीं प्रियकर ॥ ९४ ॥ मी माझें उंच नीच बोलणें ॥ हेंही माथां घ्यावें

---

१ शोधाची बातमी, पत्ता. २ नातेवाइक स्त्रिया. ३ प्रेमयुक्त. ४ सिंहाची. ५ घाण, दर्प वास. ६ नाश. ७ भिक्षुगीताचा अर्थ मनांत धारण केला असतां, अथवा भिक्षुगीताचा पाठ केला असतां, अथवा भिक्षुगीत श्रवण केलें असतां. ८ युक्ति. ९ मुत्रवृत्ति. १० नाश. ११ प्रसन्न होई. १२ राजाचा शिक्का. १३ छांदिष्ट, जड, असमंजस.

*मो. भिक्षुगीतार्थें पठणी. +मो. साधुजनासी. ※ना. स्वयें साहे. *मो. आपण बोलिला. ०मो. आपणा आपण. ×ना. वाढविली. १मो. प्राकृत वाणी सारस्वतीं.

कोणें ॥ मीपण नेऊनि जनार्दनें ॥ ग्रंथकथन कथवित ॥ ९५ ॥ आधींच हें श्रीभागवत ॥ त्या माजीं गूढ एकादशार्थ ॥ त्याहीमाजीं भिक्षुगीत ॥ अतिगुह्यार्थ निर्द्वंद्व ॥९६॥ त्या भिक्षुगीताची टीका ॥ एकला कर्ता नव्हे एका ॥ तेथें एकपण हिरोनि देखा ॥ *ग्रंथार्थलेखा जनार्दन वदवी ॥९७॥ तेथ एक ना अनेक ॥ ऐसें जनार्दनें केलें देख॥त्यावरी द्वंद्वसाम्य कथानक ॥ ग्रंथ सम्यक वाखाणवी ॥ ९८ ॥ एका जनार्दना शरण ॥ जनार्दनु झाला एकपण ॥ ऐसेंनि एकत्वें जाण ॥ केलें संपूर्ण भिक्षुगीत ॥९९॥ माझे निजगुरूचाही गुरू ॥ श्रीदत्त परमगुरू ॥ तो भिक्षुगीतार्थें साचारू ॥योग्यां योगेश्वरू[1] तुष्टला ॥१०००॥ तेणें तोखलेनि अद्भुतें ॥आदरें आश्वासूनि मातें॥ अभय देऊनि निजहस्तें ॥ ग्रंथार्थें डुल्लत् ॥ १ ॥ एका जनार्दना शरण ॥ श्रोतां व्हावें साव-धान ॥ पुढील अध्यायीं श्रीकृष्ण ॥ प्रकृतिपुरुषलक्षण सांगेल ॥२॥ ते प्रकृतिपुरुषांची कथा॥ विवंचूनी[2] हृदयीं धरितां ॥ मी सुखदुःखद्वंद्वापरता ॥ हे निजात्मता ×निजबोधू ॥ ३ ॥ संत-सज्जनां साष्टांग नमन ॥ श्रोतेजनांसि लोटांगण ॥ एका विनवी जनार्दन ॥ अतिगोड निरू-पण पुढें आहे ॥ ४ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकार-टीकायां भिक्षुगीतनिरूपणं नाम त्रयोविंशतितमोऽध्यायः ॥ २३ ॥ ओं० ॥१००४॥ मू० ॥६२॥ एकूण ॥ १०६६ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

# अध्याय चोविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ॐनमोजी गुणातीता ॥ व्यक्तिरहिता, अव्यक्ता ॥ तुजमाजीं नाहीं ※द्वैतकथा ॥ अद्वैतता +रहिवासी ॥ १ ॥ तुझा अद्वैत निजनिर्वाहो ॥ तेथ नाहीं देव, देवी देवो ॥ उदय अस्ताचा अभाहो ॥ रविचंद्रांसी ठावो असेना ॥ २ ॥ तेथ ०स-शब्दें हारपला वेद ॥ बुद्धीसि मिथ्या बोध ॥ तिळभरी नाहीं भेद ॥ अद्वयानंद एकला ॥ ३ ॥ ऐशिये अद्वैतपणीं ॥ प्रकृतिपुरुषांची कहाणी ॥ सांगिजे केवळ अज्ञानीं ॥ ज्ञातेपणीं चातुर्यें ॥ ४ ॥ जेथ मीतूंपणा नाहीं ठावो ॥ तेथ प्रकृतिपुरुषां केवीं निर्वाहो ॥ ज्याचा नाहीं गर्भ-संभवो ॥ त्याचें जातकें[3] पहा हो 4वर्तवी ॥ ५ ॥ जें जन्मलेंचि नाहीं ॥ त्याचें श्राद्ध करावें कायी ॥ हें ज्ञात्यासि पुसतां पाहीं ॥ ठेवितां ठायीं ठाकेना ॥ ६ ॥ वांझेच्या पुत्राचा वि-वाहो ॥ 7समारंभें झाला पहाहो ॥ नेणों साच, जाणा वावो[5] ॥ तैसा निर्वाहो प्रकृति-पुरुषां ॥ ७ ॥ ऐसें नसतेंचि नाथिलें ॥ साचाचेपरी नांदविलें ॥ एकीं अनेकत्व दाविलें ॥ एकपण संचलें न मोडतां ॥ ८ ॥ ऐसा 1एकपणें एकुलता ॥ तोचि आपण आपली झाला कांता ॥ आपुले कांतेचा आपण भर्ता ॥ अतिलाघवतां अतर्क्य ॥९॥ जेवीं अर्धनारीनटेश्वरीं[6] ॥ जो पुरुष तोचि नारी ॥ तेवीं प्रकृतिपुरुष संसारीं ॥ एकाकारीं 5नांदत ॥ १० ॥ तो पुरुष ते

---

१ योगिपुरुषांमध्यें श्रेष्ठ. २ विचारपूर्वक. ३ कथा. ४ जन्मपत्रिका. ५ अज्ञान्यास खरा व ज्ञान्यास खोटा. ६ अर्धस्त्री अर्धपुरुष=शंकर.

*मो. ग्रंथार्थ रेखा. ×मो. निजबोधें. ※मो. द्वंद्वकथा. +मो. रहिवास. ०ना. शब्देंसी. 4मो. वर्तिजे. 7ना. समारंभ केला. 1ना. एकपणेविण. 5मो. जाहली.

पतिव्रता ।। दोघां अनन्यप्रीति एकात्मता ।। येरयेरां वेगळी *कदा ।। पाऊल सर्वथा न घालिती ।। ११ ।। दोघां एकत्र सदा असणें ।। दोघा एकाचि नेसणें ।। दोघां एक सत्ता बैसणें ।। दोघें ×एके प्राणें वर्तती ।। १२ ।। दोघीं एकचि देखणें ।। दोघीं एकाचि चाखणें ।। दोघां एकचि बोलणें ।। दोघाचें करणें एकची ।। १३ ।। कैशी दोघांची प्रीति अलौलिक ।। येरयेरां वीण न घेती विख ।। येरयेरांविण न चाखे उदक ।। येरयेरेंविण देख आंधळीं ।। १४ ।। नवल बाइलेचें करणें ।। +नपुंसका पुरुषत्व इणें देणें ।। मग तिचेनि आधीनपणें ।। पुरुषें ॐनांदणें सर्वदा ।। १५ ।। मग हा तिचेनि डोळां देखे ।। मग हा तिचेनि बोले मुखें ।। *तिचेनि भोगी हा सुखदुःखें ।। बंधमोक्ष चाखे तिचेनि ।। १६ ।। तिचेनि म्हणवी मी ब्रह्म ।। तिचेनि हा करी कर्माकर्म ।। तिचेनि भोगी हा मरण जन्म ।। धर्माधर्मविभागें ।। १७ ।। तिचेनि यासि पाप घडे ।। तिचेनि यासि पुण्य जोडे ।। तिचेनि हा महत्त्वा चढे ।। तिचेनि पडे अधःपातीं ।।१८।। एथवरी अतिप्रीतीं ।। 3वाढविली निजप्रकृती ।। प्रकृति 6पातिव्रत्यस्थिती ।। वश्य निजपती त्या केला ।। १९ ।। नवल दोघांची सोयरिकी ।। दोघें भावंडें होती सखीं ।। तो बाप ते त्याची लेंकी ।। पाहतां विवेकीं तो पुत्र तिचा ।। २० ।। यापरी अगम्यागमन ।। तिहीं दोघीं करूनि जाण ।। वाढविले अनेक जन ।। तिसरेपण नातळतां ।। २१ ।। ऐसा अव्यभिचारी व्यभिचारू ।। करूनि 7वाढविला संसारू ।। तो अतिअतर्क्य अगोचरू ।। अगम्य दुर्धरू शिवादिकां ।। २२ ।। हा निजशक्तिप्रकृतिमेळें ।। भोगी शिवत्वाचे सोहळे ।। 0प्रिया न देखतां तात्काळें ।। सांडी सगळें शिवत्व ।। २३ ।। ज्यासि गांव ठाव 5ना जीवमेळ ।। रूप नांव ना काळ वेळ ।। २ऐसा ही प्रकृती केवळ ।। केला 9सबळ निजगुणीं ।। २४ ।। प्रकृती निजगुणास्तव ।। निजभर्ता केला सावेव ।। वर्णव्यक्ति रूप नांव ।। नाना वैभवविलासें ।। २५ ।। तंव पूर्णत्व लोपोनि शिवें ।। अंगावरी 4वाढविलें शांभवें ।। येरी पतिव्रता अहेवें ।। रूपें नांवें शिव पूजी ।। २६ ।। दोघांपासूनि झालें जग ।। परी न दिसे तिसरा भाग ।। न तुटे 8अनन्यमिळणी योग ।। भिन्न विभाग 1दावितां ।। २७ ।। त्रैलोक्य पाहतां सांग ।। न दिसे तिसरें अंग ।। दोघीं दुमदुमीत जग ।। भरलें चांग दुबंधीं ।।२८।। दोघांची अतिप्रीति कैशी ।। अनन्यमिळणी अनन्यासीं ।। दोघें अणूमाजीं सावकाशीं ।। निजरहिवासी नांदत ।। २९ ।। पतिवीण जे पतिव्रता ।। कुळींचे विरे सर्वथा ।। प्रियेवीण असतेंचि नसता ।। होय, कांहीं नव्हतां, भर्तारू ।। ३० ।। शिव निःसंग जो पैं सदा ।। क्रियाकारणेंवीण नुसधा ।। त्यासि अतिप्रीतीं निज प्रमदा ।। सुखदुःखबाधा भोगवी ।। ३१ ।। यापरी निजनोवरा ।। प्रकृतीं गोविला घराचारा ।। मग घरवातेचा थारा ।। 0त्याच्या शरीरावरी केला ।। ३२ ।। प्रकृति पतिव्रता अवंचक ।। कर्माकर्मीं शिणोनि अनेक ।। सुखदुःखांची परवेडी देख ।। अर्पी अव-

---

१ एकमेकावांचून. २ ज्याबरोबर अथवा जीबरोबर गमन करूं नये अशांशीं गमन. ३ सौभाग्यें करून. ४ दुहेरी. ५ खोटाच. ६ वास्तविक कांहीं एक न होतां. ७घर कामास.८प्रपंचाची कथा. ९अनेक प्रकार.

*ना. तत्वता. ×ना. एकपणें वर्तती. +ना. नपुंसका पुरुषासी पुरुषत्व. ॐना. नाचणें. *मो. तेच भोगी सुखदुःखें. 3मो. वाढली. 6ना. पतिव्रता स्थिती. 7मो. वाढला. 0मो. प्रियेनें देखता. 5मो. नाहींच जिये मूळ. 2मो. ऐसा जो प्रकृतीनें केवळ. 9ना. सकळ. 4मो. वाढविली. 8ना. आनंद मिळणी. 1ना. दाखविल्या. 0ना. त्याचेनी.

श्यक निजकांता ॥ ३३ ॥ नवल तें मीं सांगावें काये ॥ स्त्री जोडी, तें पुरुष खाये ॥ तियेविण तो पाहे ॥ कहीं नलाहे कवडोही ॥ ३४ ॥ प्रकृति पतिव्रताशिरोमणी ॥ कांत वश्य करोनि निजगुणीं ॥ वासना सूक्ष्म *सेवया अनुदिनीं ॥ भोगवी सुगरणी भर्ताराकरवीं ॥ ३५ ॥ तेथ प्रकृतीचेनि ग[3]ंदारोळें ॥ भवाब्धीं जळक्रीडा खेळे ॥ प्रकृति पुरुषातें बुडवी बळें ॥ पुरुष एके काळें प्रकृति बुडवी ॥३६॥ ऐशा प्रकृतीच्या संगाआंत ॥ पुरुषास +लाविलें पंचभूत ॥ जन्ममरणाच्या बुड्यी देत ॥ अवस्थाभूत होऊनि ॥ ३७ ॥ ऐसा प्रकृतीचिया भिडा ॥ पुरुष केवळु झाला वेडा ॥ ❀निजत्व विसरोनि बापुडा ॥ केला गाढा अतिदीन ॥ ३८ ॥ ऐसा विसरोनि पूर्णत्वासी ॥ जीवशिवद्वंद्वें स्वयें सोशी ॥ त्यासि न्यावया निजत्वासी ॥ गुणिया पूर्णांशीं गुरुरावो ॥ ३९ ॥ ×ज्याचे वचनमात्रें पहाहो ॥ जीवाचा हारपे जीवभावो ॥ शिवासी शिवपदीं ठावो ॥ *ज्याचा वचनगौरवो नांदवी ॥ ४० ॥ ज्याची भावार्थें ऐकतां गोठी ॥ अहंकारू निमे उठाउठी ॥ ०जन्ममरणांसि पडे तुटी ॥ न दिसे दृष्टीं भवभय ॥ ४१ ॥ ज्याचिया कृपादृष्टीपुढें ॥ जीवशिवांचें फिटे बिरडें ॥ माया मिथ्यात्वें समूळ उडे ॥ पूर्णत्वाचें उघडे भांडार ॥ ४२ ॥ शिव 1भुलविला शिवत्वासी ॥ तो यावया निजपदासी ॥ आज्ञा पुसे सद्गुरूसी ॥ तैं 8शिवासी शिवत्व ॥ ४३ ॥ एवढी महिमा सद्गुरूसी ॥ वचनें केवीं वानूं त्यासी ॥ तंव वानिते वानणे वानावयासी ॥ वदवी वाचेसी गुरुरावो ॥४४॥ तेथ मी एक वानिता ॥ हें कोणें घ्यावें आपुले माथां ॥ गुरूनें हिरतली अहंता ॥ तेथ मी 6कर्त्ता घडे केवीं ॥ ४५ ॥ तेथ मीपणें घ्यावी अहंता ॥ तंव गुरूचि मीपणा आंतौता ॥ गुरुवेगळा ठाव नाहीं रिता ॥ मीपणाचे माथां गुरुरावो ॥ ४६ ॥ माझें जें कां मीपण ॥ तें सद्गुरु झाला आपण ॥ तेव्हां रूप एक नांवें भिन्न ॥ एका जनार्दन एकत्वें ॥ ४७ ॥ अवघा जनार्दनचि देखा ॥ तोचि उपनांवें झाला एका ॥ तेणें नामें श्रीभागवत देखा ॥ देशभाषा अर्थवी ॥ ४८ ॥ तेवीसावे अध्यायाचे अंतीं ॥ देवो बोलिला उद्धवाप्रती ॥ द्वंद्वभोगाची 0निजप्राप्ती ॥ सहावी शांती धरोनि ॥ ४९ ॥ ज्यांसि बाणली अढळशांती ॥ ते मज अजितातें जिंकिती ॥ तेचि साचार परमार्थी ॥ स्वमुखें श्रीपती बोलिला ॥ ५० ॥ तें ऐकोन कृष्णवचन ॥ उद्धवाचें दचकलें मन ॥ द्वंद्वसहिष्णुता अतिकठिन ॥ कैसेनि आपण सहावी ॥ ५१ ॥ द्वंद्वसहिष्णुतासाधन ॥ पुसतां उबगेलें श्रीकृष्ण ॥ ऐशिया भिडा उद्धव पूर्ण ॥ धरोनि मौन राहिला ॥५२॥ तो उद्धवाचा अभिप्रावो ॥ जाणोनियां देवाधिदेवो ॥ द्वंद्वसहिष्णुता उपावो ॥ समूळ पहाहो सांगत ॥ ५३ ॥ अद्वयत्वें परिपूर्ण ॥ प्रकृतीहूनि पुरुष भिन्न ॥ हें आकळल्या निजज्ञान ॥ द्वंद्वबंधन बाधीना ॥ ५४ ॥ द्वंद्व जिणावया पूर्ण ॥ प्रकृतिपुरुषविवंचन ॥ उद्धवें न करितां प्रश्न ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५५ ॥ ' भक्तअंतरींचें जाणता ' ॥ यालागीं ' अंतर्यामी ' तत्त्वतां ॥

---

१ मिळवी. २ वासना तत् याच शेवया, पक्वान्न. ३ संभ्रमानें. ४ भिडेस्तव. ५ आत्मस्वरूप. ६ ग्रंथीं, गुंती. ७ नेली, नाहींशी केली. ८ एकनाथ. ९ अर्थ सांगे. १० सहन करावी. ११ न जिंकलेला १२ रागावेल, कंटाळेल. १३ प्रकृतिपुरुषांचा विचार.

***मो. सेवावया. +ना. लागले. ❀ना. निजत्वासी. ×ना. ज्याचेनि. *मो. ज्याचा गौरव नांदवी. ०मो. जन्ममरणाची. 1ना. भुलला. 8ना. शिष्यासी शिष्यत्व. 6ना. कविकर्ता. 0ना. निजसमाप्ती.**

तो निजभक्तांचिया स्वार्थी ॥ पूर्ण परमार्थी सांगत ॥ ५६ ॥ निजभक्तांचें मनोगत ॥ जाणो-नियां श्रीकृष्णनाथ ॥ करावया भक्तहित ॥ कृपेनें सांगत कृपाळू ॥५७॥ आशंकेचें निरूपण ॥ उद्धवें *न सांगतांही जाण ॥ हें जाणोनिया श्रीकृष्ण ॥ कृपा निरूपण निरूपी ॥ ५८ ॥ जगीं धन्य भाग्य उद्धवाचें ॥ कृष्णदैवत तिहीं लोकींचें ॥ कृपा वोरसोनियां साचें ॥ प्रकृतिपुरुषांचें निज सांगे ॥ ५९ ॥ कृष्ण ह्मणे ज्यासि तारीन ॥ तो पहिलेचि तरला जाण ॥ करावया जगाचें उद्धरण ॥ कृपा श्रीकृष्ण बोलत ॥६०॥ धेनुवत्साचेनि लोभें ॥ जेवीं घरापुरतें दुभे ॥ तेवीं उद्धवाचेनि वालभें ॥ जग पद्मनाभें उद्धारिलें ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ अथ ते संप्रवक्ष्यामि सांख्यं पूर्वैविनिश्चितम् ॥ यद्विज्ञाय पुमान् सद्यो जह्याद्वैकल्पिकं भ्रमम् ॥ १ ॥

॥ टीका ॥ जो योगियांचा योगींद्र ॥ जो ज्ञानियांचा ज्ञाननरेंद्र ॥ जो ×भक्तचित्तकोरचंद्र ॥ जो यादवेंद्र यदुवंशीं ॥ ६२ ॥ जो प्रकृतिपुरुषांहूनि पर ॥ तो स्वयें बोले शार्ङ्गधर ॥ उद्धवा °द्वंद्वसहनप्रकार ॥ अतिगुह्य विचार अवधारी ॥ ६३ ॥ जें ऐकतांची निरूपण ॥ 'सुखदुःखातीत आपण' ॥ हे संपूर्ण पावे उणखूण ॥ तें गुह्यज्ञान अवधारी ॥ ६४ ॥ मी कपिलरूपें अवतरूनी ॥ प्रकृतिपुरुष विवंचोनि ॥ उपदेशिली निजजननीं ॥ ते जुनी कहाणी सांगेन ॥ ६५ ॥ जे परिसतां सावधान ॥ स्वयें होईजे ज्ञानसंपन्न ॥ पुरुषाहूनि प्रकृति भिन्न ॥ सुख दुःख जाण तीपाशीं ॥ ६६ ॥ सुखदुःख मायिक पूर्ण ॥ ऐसें ज्यासि कळलें ज्ञान ॥ तेव्हां भवभयभ्रम दारुण ॥ तत्काळ जाण तो सांडी ॥ ६७ ॥ जेवीं +मोतियांची कंठमाळा ॥ भ्रमें सर्प भासली डोळां ॥ ते भ्रमांतीं घालितां गळां ॥ नबाधी कांटाळा सर्पभयाचा ॥ ६८ ॥ तेवीं शिवशक्तिविवंचन ॥ तुज मी सांगेन संपूर्ण ॥ जें आकर्णितां सावधान ॥ द्वंद्वें सकारणें हार-पती ॥ ६९ ॥ ब्रह्म सुखरूप एकलेपणीं ॥ तेथ प्रकृतिपुरुष कैंचीं दोनी ॥ द्वंद्वदुःखें ज्यापासोनी ॥ त्रिभुवनीं ✽न समाती ॥ ७० ॥ तेंचि अर्थीचें निरूपण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ प्रकृति-पुरुषांचें जन्म जाण ॥ तें मुख्य कारण सुखदुःखां ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ आसीज्ज्ञानमथो अर्थ एकमेवाविकल्पितम् ॥ यदा विवेकनिपुणा आदौ कृतयुगेऽयुगे ॥ २ ॥

॥ टीका ॥ जेवीं निजेल्या पुरुषाची छाया ॥ पुरुषातळीं जाय लया ॥ तेवीं सविकार गिळोनि माया ॥ब्रह्म एकल्या एकाकी ॥७२॥ ब्रह्म एकाकी परिपूर्ण ॥हेंही ह्मणावया ह्मणतें कोण॥ नाहीं नाम रूप व्यक्ति पूर्ण ॥ ब्रह्मीं ब्रह्मपण स्फुरेना ॥७३॥ तेथ नाहीं युगसंख्या काळ वेळ ॥ नाहीं दिनमान घटिकापळ ॥नाहीं शून्यत्वें शून्य मंडळ ॥ ब्रह्म केवळ परिपूर्णत्वें ॥७४॥ तेथ मी ब्रह्म हें स्फुरे जें स्फुरण ॥ तेंचि मायेचें मुख्य लक्षण ॥ तेंचि प्रकृतिपुरुषाचें जन्मस्थान ॥ जावेंळीं

---

१ पान्हावून २ गुह्य. ३ प्रेमानें. ४ कपिलमहामुनी, सांख्य शास्त्राचा कर्ता. ५ देवहूती, कपिलाची आई. ६ गोष्ट. ७ त्रास. ८ प्रकृतिपुरुषांचा विचार. ९ समूळ. १० जोडीनें.

*मो. न पुसतां. ×मो. भक्तचकोरचंद्र. °मो. द्वंद्व सहिष्ण प्रकार. +ना. सोनयाची. ✽ना. ते न समाती.

फळें जाण जन्मलीं ॥ ७५ ॥ जेवीं कां कवळूनियां कण ॥ निकण कोंडा वाढे आपण ॥ तेवीं पुरुषयोगें पूर्ण ॥ प्रकृति जाण थोरावे ॥ ७६ ॥ धरूनि गोडपणाचा साटा ॥ फणसाअंगीं वाढे कांटा ॥ तेवीं पुरुषयोगें ताठा ॥ चढला मोठा प्रकृतीसी ॥ ७७ ॥ जेवीं कां डोळीयाचेंचि जळ ॥ गोठोनि डोळां होय पडळ ॥ तेवीं ब्रह्मीं *मायामळ ॥ करी सबळ शुद्धासी ॥ ७८ ॥ पडळ डोळा मंद करी ॥ माया निजानंद आवरी ॥ वाढोनि +त्याची त्याचिवरी ॥ वेडे करी पुरुषातें ॥ ७९ ॥ ऐसें कर्तेनवीण आपसैया ॥ कार्यकारण जें आलें आयां ॥ त्यातें कृतयुग ह्मणावया ॥ वेदु त्वलाह्यां उदेला ॥८०॥ अकारउकार मकारेंसी ॥ वेद उपजे प्रकृतिपुरुषीं ॥ जेवीं उगवल्या बीजासी ॥ प्रथम ये त्यासि तिवर्णा डिरू ॥ ८१ ॥ तो वेदींचा अभिप्रावो ॥ ब्रह्म सत्य माया वावो ॥ आपुलेनि अभेदें ब्रह्मभावो ॥ विवेकनिपुण पहाहो जाणती ॥ ८२ ॥ ऐसे वेदविवेकें अभेदयोगी ॥ ते कृतादि होत कां कलियुगीं ॥ वर्त्ततां ते सदा अयुगीं ॥ युग त्यांलागीं असेना ॥ ८३ ॥ कृतयुगादि युगपंक्ती ॥ चराचर ※नानाव्यक्ती ॥ यासि उपजवी प्रकृती ॥ तिची ०उत्पत्ती हरि सांगे ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ तन्मायाफलरूपेण केवलं निर्विकल्पितम् ॥ वाङ्मनोगोचरं सत्यं द्विधा समभवद्बृहत् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ तें बृहत् जें परब्रह्म ॥ जेथ न रिघे रूपनाम ॥ जें मनबुद्धींसी अगम्य ॥ जें दुर्गम इंद्रियां ॥ ८५ ॥ जें निर्गुण निराकार ॥ जें सत्यस्वरूप साचार ॥ जें परेहूनि परात्पर ॥ निर्विकार निजवस्तु ॥ ८६॥ तेथ अतर्क्य मायाचमत्कार ॥ करी दृष्टादृश्यत्वें सविकार ॥ तेंचि प्रकृतिपुरुष साचार ॥ तेणें चराचर वाढवी ॥८७॥जेवीं रूपासवें छायेची व्यक्ती ॥ तेवीं ब्रह्मीं मायेची निज स्थिती ॥ तिणें उपजविली शिवशक्ती ॥ पुरुष प्रकृती द्विधा भेदें ॥८८॥ ब्रह्मांडीं ईश्वरस्वभावो ॥ पिंडीं[13] त्यासीच जीवभावो ॥ ऐसा प्रकृतिपुरुषनिर्वाहो ॥ मायेनें पहाहो द्विधा केला ॥ ८९ ॥ ब्रह्म 'अच्छेद्य' वेदु बोले ॥ तें फाडूनि कैसे द्विधा केलें ॥ जेवीं आरिसां आपण आपुलें ॥ मुख देखिलें सन्मुख ॥ ९० ॥ आपण पूर्वामुख आहे ॥ प्रतिबिंब पूर्वकडे न होये ॥ आपलें आपणा सन्मुख होये ॥ हें लाघव[16] पाहे मायेचें ॥ ९१ ॥ प्रतिबिंब दिसतां सन्मुख ॥ सन्मुख ह्मणतां अतिविमुख ॥ पुरुष पूर्वेकडे देखे ॥ प्रतिबिंबाचें मुख पश्चिमेकडे ॥ ॥ ९२ ॥ तेवीं आत्मदृष्टि ×स्वरूपीं पडे ॥ जीवदृष्टि प्रपंचाकडे ॥ येणें सन्मुखत्व न घडे ॥ विमुखत्व गाढें जीवासी ॥ ९३ ॥ तेवीं ब्रह्मीं *जें स्वरूपस्फुरण ॥ तेंचि मूळमायेचें लक्षण ॥ तेथ ईश्वरत्वें जाण ॥ होय आपण्या आपण संमुख ॥ ९४ ॥ जे अद्वितीय वस्तु शुद्ध ॥ तेथ मिथ्या मायासंबंध ॥ अभेदीं उपजवूनि भेद ॥ केलीं द्विविध शिवशक्ती ॥ ९५ ॥

---

१ गुंडाळून. २ संगत, आश्रय. ३ पडदा. ४ शबळ, कमीदर्ज्याचें. ५ शुद्धब्रह्मास. ६ आपोआप. ७ आकारास. ८ तीन पानांचा. ९ अंकुर. १० असत्य, मिथ्या. ११ अद्वैतानें कालमर्यादा रहित. १२ दर्शन. १३ शरीरांत. १४ व्यवस्था. १५ अभेद्य, ज्याचा भाग करिता येत नाहीं. १६कौतुक.

*मो. मायामेळ. +ना. त्याचीच त्यावरी. ※ना. नानायुक्ती. ०ना. उपपत्ती. ×मो. पुरुषीं. *मो. जें स्फुरण.

॥ श्लोक ॥ तयोरेकतरो ह्यर्थः प्रकृतिः सोभयात्मिका ॥ ज्ञानं त्वन्यतमो भावः पुरुषः सोऽभिधीयते ॥ ४ ॥

॥ टीका ॥ त्या दोहीं भागांमाझारीं ॥ प्रकृतिभाग तो विकारी ॥ पुरुषभाग तो अविकारी ॥ स्वयें श्रीहरी सांगत ॥ ९६ ॥ तेथ आपण आपुली कांता ॥ आपुले कांतेचा आपण भर्ता ॥ *एकपणीं दावूनि द्वैता ॥ ×भिन्नविभागता शिवशक्ती ॥९७॥ जेवीं आपुलें एक अंग ॥ तेथ बोलती वाम सव्य भाग ॥ तेवीं प्रकृतिपुरुषविभाग ॥ जाणावे +सांग मायिक ॥ ९८ ॥ अर्धनारीनटेश्वरीं ॥ जो पुरुष तोचि नारी ॥प्रकृतिपुरुषीं तैशी परी ॥ ०एकशरीरीं एकात्मता॥९९ जें पुरुषविभाग लपवी ॥ तें स्वेच्छा प्रकृति नाचवी ॥ प्रकृति भाग जें लपवी ॥ तें पुरुषाची पदवी प्रकट दिसे ॥ १०० ॥ मधील पडदा जें तोडिती ॥ तें पुरुष ना प्रकृति ॥ तेव्हां प्रकटे निजात्मस्थिती ॥ स्त्रीपुरुषव्यक्ती समूळ मिथ्या ॥ १ ॥ ऐशी मिथ्या मायिक प्रकृती ॥ तीपासव गुणोत्पत्ती ॥ गुणास्तव ✻संसारस्थिती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ तमो रजः सत्वमिति प्रकृतेरभवन्गुणाः ॥ मया प्रक्षोभ्यमाणायाः पुरुषानुमतेन च ॥ ५ ॥

॥ टीका ॥ प्रकृति *गुणमयी पूर्ण ॥ ते लाहोनि पुरुषईक्षण ॥ प्रकट करी तिन्ही गुण ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ॥ ३ ॥ जेवीं 2सूर्यावलोकमेळीं ॥ 8कळी विकाशे कमळदळीं ॥ ते वेगळवेगळी पांकोळी ॥ होती मुळीं कळिकेमाजीं ॥ ४ ॥ तेवीं पुरुषाच्या ईक्षणीं ॥ गुणमयी झाली गुर्विणी ॥ ते तमरजसत्वगुणी ॥ प्रसवली तिन्ही गुणांतें ॥ ५ ॥ जेवीं जळें बीज 4भिजोनी ॥ दोनी दळें 5उपलवूनी ॥ डिरू निघाला त्यांतूनी ॥ तरतरूनी तिर्यगा पैं ॥ ६ ॥ तेवीं परमात्मा मी 6आपण ॥ पुरुषत्वातें पावोनि जाण ॥ प्रकृति क्षोभवूनी 3पूर्ण ॥ तिनी गुण 0प्रकटविलें ॥ ७ ॥ जेवीं कां सूर्याचे किरणीं ॥ सूर्यकांतीं पडे अग्नी ॥ तेवीं पुरुषें प्रकृति क्षोभवूनी ॥ गुण तिनी ते प्रसवे ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ तेभ्यः समभवत्सूत्रं महान् सूत्रेण संयुतः ॥ ततो विकुर्वतो जातो योऽहंकारो विमोहनः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ते तिनी गुण 1भिन्नभिन्न ॥ भिन्नपणें वाढी समान ॥ त्या नांव 'सूत्र प्रधान' ॥ 'क्रियाशक्ती' जाण ती नांव ॥ ९ ॥ क्रियाशक्तीसी जडपण ॥ तेथ चेतनात्मक उपजे ज्ञान ॥ तेंचि 'महत्तत्त्व' नांवें जाण ॥ नामाभिधान या हेतू ॥ १०० ॥ महत्तत्त्व आणि प्रधान ॥ दोहींचें एकचि रूप जाण ॥ तेथ क्रिया आणि स्फुरे ज्ञान ॥ यालागीं नांवें भिन्न दोहींचीं

१ उजवा. २ विशेषत्व, पृथकत्व, व्यक्तता. ३ तिच्यापासून. ४ ईश्वरप्रेरणा पुरुषाचें पाहणें. ५ त्रिगुणात्मिका प्रकृती. ६ गार्भिणी. ७ अंकुर. ८ तिपानी. ९ सूर्यकांतमण्यापासून. १० वेगळें नांव.

*मो. एकपद दावुनी. ×मो. भिन्न भागतो शिवशक्ती. +ना. सोंग. ०मो. असे अभिन्नकुसरी एकात्मता. ✻ना. संसारभ्रांती. *मो. गुणमाईक पूर्ण. 2मो. सूर्यावलोकनीं. 8मो. कमळ विकासे सकळ दळीं. 4ना. क्षोभऊनि. 5ना. उकलुनी. 6मो. नारायण. 3मो. आपण. 0मो. प्रकटिले. 1मो. भिन्नाभिन्न.

॥११॥ क्रियायुक्त जें स्फुरे ज्ञान ॥ तेथ चेतवे अभिमान ॥ *त्रिगुणअहंकार पूर्ण ॥ ते ठायीं जाण उठावे ॥ १२ ॥ अहं[1] खवळल्या दारुण ॥ शिवासि विसरवी शिवपण ॥ देहात्मवादें भुलवी पूर्ण ॥ जन्ममरण भोगवी ॥१३॥ त्या अहंकाराची मोहक शक्ती ॥ भवभ्रमें पाडी भ्रांती ॥ अहंकाराची विकारउत्पत्ती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ वैकारिकस्तैजसश्च तामसश्चेत्यहं त्रिवृत् ॥ तन्मात्रेंद्रियमनसां कारणं चिदचिन्मयः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ अहंकार अतिदुर्धर ॥ गुणानुसारें त्रिप्रकार ॥ गुणअहंतां[2] दृढ ×संसार ॥ +गुणविकार तो ऐसा ॥ १५ ॥ प्रथम अहंभावो तो सात्विक ॥ झाला अंतःकरणद्योतक ॥ तोचि देवताविकारजनक ॥ यालागीं 'वैकारिक' बोलिजे त्यासी ॥ १६ ॥ अहंकार जो राजस ॥ तो ज्ञानकर्मेंद्रियप्रकाश ॥ वाढी रजतेजविलास ॥ यालागीं 'तैजस' बोलिजे ॥ १७ ॥ तामसाहंकाराची सिद्धी ॥ सूक्ष्मभूतांतें उत्पादी ॥ यालागीं म्हणिजे तो 'भूतादि' ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ १८ ॥ नवल अहंकाराची थोरी ॥ सचेतनां अचेतना नोवरी ॥ स्वयें लग्न लावी *प्रीतीवरी ॥ चिदचिद्ग्रंथी पुरी पाडूनी ॥ १९ ॥ चिन्मात्रस्वरूपता जीवासी ॥ लग्न लावी जडदेहेंसी ॥ ओपुण्या एकात्मतेंसी ॥ कर्ता ज्योतिषी अभिमान ॥ १२० ॥ जीव ज्ञानस्वरूप चोखडा ॥ तो करूनि जडमूढ वेडा ॥ दृढ घाली ※हाडांचे खोडां ॥ तो हा धडफुडा अहंकारू ॥ २१ ॥ तोचि सात्विक आणि राजस ॥ होऊनि तिसरा तामस ॥ त्रिविधविकारीं बहुवस ॥ वाढवी असोस संसारू ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ अर्थस्तन्मात्रिकाज्जज्ञे तामसादिंद्रियाणि च ॥ तैजसाद्देवता आसन्नेकादश च वैकृतात् ॥ ८ ॥

॥ टीका ॥ विषय तेचि महाभूतें ॥ तामस प्रसवला ०अपंचीकृतें ॥ विषयास्तव प्रकटती भूतें ॥ ऐक तूतें सांगेन ॥ २३ ॥ शब्दापासाव नभ उद्भवत ॥ स्पर्शापासाव मारुत ॥ रूपापासाव तेज होत ॥ रसास्तव येथ आप उपजे ॥ २४ ॥ गंधापासोनि पृथ्वी कठिण ॥ 5उपजली आपीं आपण ॥ येरयेरांचें अनुस्यूतपण ॥ सर्वथा जाण मोडेना ॥ २५ ॥ शब्द निःशब्दीं जन्मला ॥ तो आकाशातें प्रसवला ॥ आकाशीं सूक्ष्म स्पर्श झाला ॥ 4तो स्पर्श व्याला मारुत ॥ २६ ॥ जन्मल्या मारुता आंत ॥ शब्द स्पर्श दोनी नांदत ॥ 2मारुत रूपातें प्रसवत ॥ त्या रूपांत तेज जन्मलें ॥ २७ ॥ त्या जमल्या तेजाआंत ॥ शब्द स्पर्श रूप नांदत ॥ रूप रसातें प्रसवत ॥ आप रसांत जन्मलें ॥ २८ ॥ जन्मलें आपीं समरस ॥ शब्द स्पर्श रूप

---

१ अहंकार. २ गुणांनीं व अहंतेनें. ३ गुणअहंतेनें. ४ परमाणुरूपभूतांस. ५ उत्पन्नकरी. ६ सचेतनाचें (चिद्रूपी ब्रह्माचें.) अचेतना (जड माया) नवरीशीं अहंकारानें लग्न लाविलें. ७ पूर्ण देऊन, पक्की करून. ८ अर्पण करण्यास. ९ हावरेपणानें. १० वेगवेगळीं, अमिश्रित. ११ आकाश. १२ वायु. १३अग्नि. १४ रसापासून. १५ पाणी. १६ व्याप्ती. एकसारखेंपणा. १७ अहंकारापासून. १८ वायु.

*ना. त्रिगुणी अहंकार. ×मो. संभार. +ना. गुणविस्तार. *मो. प्रीती करी. ※मो. देहाचे. ०मो. पंचीकृतें. 5मो. उपजवी. 4मो. तो स्पर्शला मारुत. 2मो. मारुतरूपें प्रसवत.

रस ॥ नांदताती सावकाश ॥ विषयीं विषयांस प्रवेश ॥ २९ ॥ आपामाजीं जन्मे गंध ॥ गंधापासाव पृथ्वी शुद्ध ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध ॥ पृथ्वी पंचविध विषययुक्त ॥१३०॥ विषयुक्त *पंचीकृतें ॥ पूर्वी लीन होतीं समस्तें ॥ तींचि स्थूळावलीं येथें ॥ महाभूतें प्रसिद्ध ॥३१॥ ज्ञान, कर्म, उभय पंचक ॥ श्रोत्रादि इंद्रियदशक ॥ राजसापासोनि देख ॥ स्वभाविक जन्मलीं ॥ ३२ ॥ सत्व अहंतेचा विकार ॥ चित्तचतुष्टय चमत्कार ॥ मन बुद्धि चित्त अहंकार ॥ अकराही +[1]सुर इंद्रियाधिप ॥ ३३ ॥ महाभूतें अतिजडें देख ॥ इंद्रियें तेथें प्रवर्त्तक ॥ अंतःकरणचाळक ॥ देव प्रकाशक ×कर्माचे ॥ ३४ ॥ त्रिविध अहंकारवृत्ती ॥ ※गुणक्षोभें क्षोभक शक्ती ॥ यापरी झाली उत्पत्ती ॥ ब्रह्मांडस्थितीलागनी ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ मया संचोदिता भावाः सर्वे संहत्यकारिणः ॥ अंडमुत्पादयामासुर्ममायतनमुत्तमम् ॥ ९ ॥

॥ टीका ॥ भूतां परस्परें वैर देख ॥ पृथ्वीतें गिळूं धांवे उदक॥उदकातें आवश्यक ॥ तेज देख निर्दळी ॥३६॥ तेजातें ग्राशी पवन ॥ पवनातें ग्रासी गगन ॥ एवं भूतांसि सौजन्य[3] ॥ सर्वथा जाण असेना ॥ ३७ ॥ तेथ अंतर्यामिरूपें मी जाण ॥ स्वयें प्रवेशोनि आपण ॥ भूतें मेळवूनि पूर्ण ॥ करीं संरक्षण मर्यादा ॥ ३८ ॥ माझे मर्यादेची रेख ॥ पृथ्वी न विरवी उदक ॥ उदकातें तेज देख ॥ नलवी नख शोषाचें[4] ॥ ३९ ॥ तेजातें न ग्राशी पवन ॥ वायु स्वेच्छा विचारतां जाण ॥ सर्वथा ग्रासीना गगन ॥ गतिबंधन करीना ॥१४०॥ यापरी हीं महाभूतें ॥ एकवटूनि समस्तें ॥ सृजिती ब्रह्मांडातें ॥ मज महापुरुषातें वस्तीशीं ॥ ४१ ॥ सप्तावरणेंसि ०प्रचंड ॥ ओवो साधूनि उदंड ॥ निर्माण केलें ब्रह्मांड ॥ मयूरांड आकारें[5] ॥ ४२ ॥

॥ श्लोक ॥ तस्मिन्नहं समभवमंडे सलिलसंस्थितौ ॥ मम नाभ्यामभूत्पद्मं विश्वाख्यं तत्र चात्मभूः ॥ १० ॥

॥ टीका ॥ ऐसें ब्रह्मांड जें विद्यमान[6] ॥त्यामाजीं मी नारायण ॥ [7]लीलाविग्रही *झालों जाण ॥ आपण्या आपण विश्वात्मा ॥ ४३ ॥ माझे नाभीसि नाभिपद्म ॥ विकासलें विश्वधाम[8] ॥ त्याही माजीं उत्तमोत्तम ॥ 'आत्मभू' नाम जन्मला ब्रह्मा ॥ ४४ ॥ नाहीं योनिद्वारें उदरगर्भू ॥ मज आत्म्यापासूनि स्वयंभू ॥ उपजला यालागीं आत्मभू ॥ नामाचा शोभू ब्रह्म्यासी ॥ ४५ ॥ ब्रह्मांड तो विराटदेहो ॥ त्याचा मुख्य ३भाग विग्रहो[9] ॥ माझे नाभिकमळीं पहाहो ॥ ब्रह्मदेवो जन्मला ॥ ४६ ॥ कदावया लोकसर्जन[10] ॥ पद्मनाभाचे नाभीसि जाण ॥ स्वयें जन्मला चतुरानन ॥ रजोगुण प्राधान्यें ॥ ४७ ॥

॥ श्लोक ॥ सोऽसृजत्तपसा युक्तो रजसा मदनुग्रहात् ॥ लोकान् सपालान् विश्वात्मा भूर्भुवःस्वरिति त्रिधा ॥ ११ ॥

---

१ देवता इंद्रिय अधिष्ठात्र्या. २ पंचभूतांत. ३ मैत्री. ४ तेज हें उदकास शोषित नाहीं. ५ आकार. ६ हलीं असणारें. ७ लीलाच आहे शरीर ज्याचें. ८ जगताला आधारभूत. ९ स्थूलशरीर. १० उत्पत्ति.

*मो. पंचीकृतें. +मो. सुरेंद्र इंद्रियाधिप. ×मो. कर्माचा. ※ना. गुणक्षोभ. ०मो. सिंधुप्रचंड. ७ना. लीलाविग्रहें. *मो. आलों. ३ना. भोग विग्रहो.

॥ टीका ॥ ब्रह्मा रजोगुणप्रधान ॥ नाभिकमळीं बैसोनि जाण ॥ मी जन्ममूळीं जो नारायण ॥ त्यासि तो आपण देखेना ॥ ४८ ॥ स्वयें बैसल्या कमळासी ॥ कमळमूळ न कळे त्यासी ॥ देखे एकार्णवजळासी ॥रजोगुणेंसी मोहित॥४९॥ तें कमळमूळ पहावया बुडीं ॥एकार्णवीं घालोनि उडी ॥ बुडतां दिवसांचिया कोडी ॥त्या मूळाची जोडी न लभेचि ब्रह्मा ॥१५०॥ तेथ निबुंजला जळभयें ॥ बाहेरी उसासोनि लवलाहे ॥ *कमळावरी बैसोनि पाहे ॥ करावें काये स्मरेना ॥५१॥ धांव पाव गा अच्युता ॥ निवारी माझी ×जगदांध्यव्यथा ॥ तुजवांचूनि सर्वथा ॥ संरक्षिता मज नाहीं ॥ ५२ ॥ ब्रह्मा माझे पोटीचें बाळ ॥ रजें रजांध झालें केवळ ॥ धरोनि ठेला नाभिकमळ ॥ +कृपा तत्काळ मज आली ॥ ५३ ॥ मज विश्वात्म्याचें अपत्य ॥ जडत्वें राहिलें तटस्थ ॥ म्यां उपदेशिला तेथ ॥ सृष्टिसर्जनार्थ तपनिष्ठा ॥ ५४ ॥ महाकल्पादीची मांडणी ॥ माझिया अशरीरा वाणी ॥ 'तप तपें' या दोंवचनीं ॥ उपदेशिला अग्रणी चतुरानन ॥ ५५ ॥ यथोक्त तप करितां जाण ॥ वृद्धि पावला सत्वगुण ॥ त्याचिया सात्विकता ※पूर्ण ॥ प्रत्यक्ष नारायण मी झालों ॥ ५६ ॥ काळत्रयीं अबाधित ॥ तूंचि विश्वात्मा निश्चित ॥ हें चतुःश्लोकी भागवत ॥ म्यां त्यासि तेथ उपदेशिलें ॥ ५७ ॥ माझिया उपदेशविधीं ॥ होऊनियां समबुद्धी ॥ कल्पकल्पांचिये अवधी ॥ मोह त्रिशुद्धी बाधीना ॥ ५८ ॥ यापरी ब्रह्मा कल्पादि ॥ पावला परम समाधी ॥ प्रकटोनि निजात्मबुद्धी ॥ ०सर्जनसिद्धी तेणें केली ॥५९॥ सुरासुर मानव पन्नगादिक ॥यांचे वसते तिन्ही लोक॥ सप्तपाताळ घरें देख ॥ गोपुरें 7अलोलिक सप्तसंख्या ॥ १६० ॥ भूःशब्दें पाताळलोक ॥ भुवःशब्दें मृत्युलोक ॥ स्वःशब्दें स्वर्गलोक ॥ त्रिलोक देख या नांव ॥ ६१ ॥ चतुर्दश भुवनें सकळ ॥ तेथ वसते लोकपाळ ॥ तेंचि करोनियां विवेळ ॥ सांगे प्रांजळ श्रीकृष्ण ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ देवानामोक आसीत्स्वर्भूतानां च भुवः पदम् ॥ मर्त्यादीनां च भूर्लोकः सिद्धानां त्रितयात्परम् ॥ १२ ॥ अधोऽसुराणां नागानां भूमेरोकोऽसृजत्प्रभुः ॥ त्रिलोक्यां गतयः सर्वाः कर्मणां त्रिगुणात्मनाम् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ मागील श्लोकाचे अंतीं ॥ भूर्भुवःस्वरइति ॥ यापरी त्रिलोकी श्रीपती ॥ जाण निश्चितीं बोलिला ॥६३॥ तेंचि पुढील श्लोकार्था ॥ पाताळ लोक होय चौथा ॥ 1तो मृत्युलोक एकात्मता ॥ जाण तत्त्वतां व्याख्यान ॥६४॥ इंद्रादिसकळदेवांसी ॥ स्वर्ग निजमंदिर त्यांसी ॥ यक्षरक्षभूतगंधर्वांसी ॥ निवासासी अंतरिक्ष ॥ ६५ ॥ जेणें पाविजे निजमोक्षासी ॥ जेथूनि गमन लोकांतरासी ॥ ते कर्मभूमी मनुष्यासी ॥ 6निजभाग्यासी भूलोक ॥ ६६ ॥ त्रिलोकीपरतें जाण ॥ सिद्धि वोळंगती आपण ॥ तें 8सिद्धाचें सिद्धस्थान ॥ वसतें जाण निरंतर ॥६७॥ अतळ वितळ सुतळ ॥ रसातळ महातळ ॥ तळातळ आणि पाताळ ॥ 2अधःसंख्या सकळ

१ म्याला. २ जगत् न दिसणें. ३ सृष्टि उत्पन्न करण्याकरितां. ४ अमूर्त. ५ तपश्चर्या कर. ६ श्रेष्ठ. ७ चारश्लोकाचें मूळचें परिशिष्ट पहा. ८ सर्प. ९ उघड, स्पष्ट. १० आकाश.

*मो कमळासी बैसोनि. ×मो. जगबाधता. +मो. शरण तात्काळ मज आला. ※मो. आपण. ०ना. सृजनविधी तेणें. 7मो. अनेक. 1मो. मृत्युलोकात्मता. 6मो. निजभोगेंसी भूलोक. 8मो. सिद्धीचें. 2मो. सप्त संख्या.

पाताळा ।। ६८ ।। सप्तपाताळीं अधिकारमेळू ।। अतळीं वसे मयपुत्र बळू ।। प्रतापें अति-प्रबळू ।। दैत्यमेळू समुदाय ।। ६९ ।। वितळीं वसे हाटकेश्वरू ।। जो उमाकांत कर्पूरगौरू ।। जेथिले हाटकनदीचा पूरू ।। सुवर्णसंभारूप्रवाहे ।। १७० ।। सुतळीं महावैष्णव बळी ।। ज्याचा द्वारपाळ वनमाळी ।। प्रह्लादही त्याचिजवळीं ।। वैष्णवकुळीं नांदत ।। ७१ ।। त्रिपुर भेदूनि शंकरू ।। रसातळीं स्थापी मयासुरू ।। तो मायालाघवी महावीरू ।। सहपरिवारू वसताहे ।। ७२ ।। महातळीं कद्रूसुत ।। जे विषधर क्रोधयुक्त ।। ते सर्प जाण समस्त ।। तेथ नांदत निजवासें ।। ७३ ।। तळातळीं नांदती दानवें ।। निवातकवची वीर सर्वे ।। *मणी मुख्य राज-गौरव ।। रचना अपूर्व तेठायीं ।। ७४ ।। सातवे पाताळीं वसती नाग ।। शतसहस्र फणिमणि-भोग ।। वासुकिप्रमुख अनेग ।। पद्मिनीभोग भोगिती ।। ७५ ।। स्वर्गीं रंभा उर्वशी सुंदरी ।। कां पाताळीं पद्मिणी नारी ।। त्यांच्या सौंदर्याची थोरी ।। लोकांतरीं वाखाणे ।। ७६ ।। त्या तळीं तीं शतयोजना वरी ।। शेष वसे सहस्रशिरी ।। जयाच्या निजांगावरी ।। निद्रा करीं मी भगवंत ।। ७७ ।। त्याहूनि तळीं आत्यंतिक ।। अंधतामिस्रादि महानरक ।। त्याहीतळीं कूर्म देख ।। अवरणोदक तयातळीं ।।७८।। ज्याचा स्वर्गभोग होय क्षीण ।। अधोभोगाचें उरे पुण्य।। तेणें पुण्यानुक्रमें जाण ।। सप्तपाताळीं जन जन्मती ।। ७९ ।। ज्याचे गांठीं पाप चोख ।। तो भोगी नाना नरक ।। ऐशी त्रिलोकी देख ।। चतुर्मुख स्वयें रची ।। १८० ।। ज्यांसि निष्कामता नाहीं चित्तीं ।। जे स्वप्नीं न देखती विरक्ती ।। त्यांसि ×त्रिलोकीवरती गती ।। नाहीं निश्चितीं उद्धवा ।।८१।। जे न करितीचि माझी भक्ती ।। जे नायकतीचि माझी कीर्ति ।। जे माझें राम-नाम नुच्चारिती ।। भवबंधपंक्तिच्छेदक ।। ८२ ।। त्यांसि पुनःपुनः स्वर्गलोक ।। पुनःपुनः भो-गिती नरक ।। पुनः पाताळ मृत्युलोक ।। नानायोनीं दुःख भोगिती ।। ८३ ।। जे त्रिगुणगुणी सकाम ।। जे सदा करिती काम्य कर्म ।। त्यांसि त्रैलोक्याबाहेरी निर्गम ।। त्रिगुणधर्मे निघों नेदी ।।८४।। सांगीतली पाताळविवंचना ।। आतां ऐक स्वर्गरचना ।। लोकीं लोकांतरगणना ।। समूळ जाणा सांगेन ।।८५।। रविचंद्रप्रभा जेथवरी ।। तेथवरी पृथ्वीची थोरी ।। तळीं पाताळ स्वर्गवरी ।। लोकलोकांतरीं निवास ।। ८६ ।। पायीं +चालिजे तो भूलोक जोडे ।। येथूनि सूर्यो-पैलीकडे ।। ०भुवर्लोक थोरी वाढे ।। तेथ वस्ती घडे यक्षरक्षगंधर्वां ।।८७।। 7भुवर्लोकाहीवरी ।। सूर्यलोकाची वाढे थोरी ।। पृथ्वीपासूनि लक्षावरी ।। जाण निर्धारीं रविलोक ।। ८८ ।। वायु-पासूनि ⁂चक्राकारीं ।। रविचंद्रतारालोककुसरी ।। खेंवणोनियां तयावरी ।। काळ सूत्रधारी भेंवडीत ।। ८९ ।। त्या काळाहीवरी माझी सत्ता ।। माझेनि भेणें काळ तरवतां ।। क्षणलवनि-मिषावस्था ।। अधिकन्यूनता होऊं नेदी ।।१९०।। नवल काळचक्रगती ।। मासां रवि चंद्र समान होती ।। सूर्याआड चंद्राची गती ।। जाण निश्चितीं दिनद्वयें ।। ९१ ।। ते अमावास्याप्रतिपदेसी ।।

---

१ सोन्याची नदी. २ पुष्कळ सोनें ज्यामध्यें अशा प्रवाहाचा. ३ काद्रवेय सर्प. ४ दैत्य. ५ प्रल्हादाचा भाऊ संल्हाद त्याचे पुत्र, हे इंद्रास अजिंक्य होते. या सर्वांचा अर्जुनानें वध केला. भारत, वनपर्व, अ. १६९–७०. ६ महाभयंकर. ७ तिन्ही लोक. ८ ब्रह्मदेव. ९ सप्तपाताळांचा विचार. १० जडित करून. ११ फिरवितो. १२ महिन्यानें.

*मो. पाणी मुख्य. ×मो. त्रिलोकी गती. +मो. चालतां भूलोक. ०मो. भूलोकाची खोली वाढे. 7मो. भूलोकाहीवरी. ⁂मो. चक्रावरी.

चंद्र चंद्रमंडळीं सावकाशीं ।। सूर्यसमभागें गमन त्यासी ।। तें या लोकांसी दिसेना ।। ९२ ।। इतुक्यासाठीं ते दिवशीं ।। जीवें जित्या चंद्राशीं ॥ नष्टत्व स्थापिती ज्योतिषी ॥ तें या लोकांसी सत्य माने।।९३।।रविचंद्र एकासनीं ।।सर्वथा नव्हती *गमनीं ।। +लक्षांतरें वसती दोन्ही ।। मंडळसमानीं मासांतीं गती ॥ ९४ ॥ रविआड गति ज्या ग्रहासी ॥ त्याचा अस्त सांगे ज्योतिषी ॥ तें सत्य माने या लोकांसी ॥ तो ग्रहो दृष्टीसी दिसेना ॥ ९५ ॥ दृष्टिसृष्टीचा जो न्यावो ॥ तो ज्योतिषशास्त्रीं सत्य पहाहो ।। न दिसे त्याचा ×अस्तत्वे भावो ।। दिसे तो पहाहो पूजिती ॥ ९६ ।। अभ्राआड ग्रहण आलें ।। तें देखिलें तेथें पर्व फावलें ॥ न दिसे ते दिवसीं नाहींच झालें ।। येणेंही बोलें वर्तती ॥ ९७ ।। रविचंद्रांहूनि आरतीं ।। राहुकेतूंची असे वस्ती॥ ते जें मंडळाआड येती ।। तैं ग्रासिलें ह्मणती रविचंद्रां ।।९८।। राहु सूर्या ※गिळितां साचें ॥ तें तोंड जळतें राहूचें ॥ मंडळीं मंडळ आड ये त्याचें ।। ०हें सर्व ग्रहाचें संमत ।। ९९ ॥ सूर्य सूर्यमंडळीं राज्य करी ॥ त्याच्या सर्वग्रासाची थोरी ॥ ज्योतिषी सांगे घरोघरीं ।। तें देखोनि 6नरीं महाशब्द कीजे ॥ २०० ।। 2सूर्य सर्वग्रासाचिया गोठी ।। जगीं *एक बोंब उठी ।। शेखीं रविराहूंसि नाहीं भेटी ॥ स्पर्शेही शेवटीं असेना ॥ १ ॥ ग्रहचक्र वेगें चळतां पाही ।। 0रविचंद्रादिकां चाळणें नाहीं ॥ ते निश्चळ निज राज्याच्या ठायीं ॥ 5न चालतां पाही चालती ।। २ ।। रविलोकाहूनि वरी ॥ चंद्रलोक लक्षांतरीं ॥ चंद्रलोकाहूनि दूरी ।। लक्षांतरीं तारालोक ।। ३ ॥ तारालोकाहूनि वरी ॥ बुधलोक दोंलक्षांतरीं ॥ बुधलोकाहूनि वरी ।। दोंलक्षांतरीं शुक्रलोक ।।४।। मिळोनियां दैत्यगण ॥ ज्याच्या चरणां येती शरण ॥ नित्य घालिती लोटांगण ।। तो शुक्राचार्य जाण दैत्यगुरु ॥ ५ ॥ शुक्रलोकाहूनि दोंलक्षांतरीं ॥ भौम लोक वसे वरी ॥ भौमलोकाहूनि दोंलक्षांतरीं ।। देवगुरु करी निजवासू ॥६॥ ज्याचे चरण वंदिती देव ॥ इंद्र चंद्र वरुणादि अर्क ॥ नित्य येती अवश्यक ॥ तो बृहस्पतिलोक गुरूचा ।।७।। 4त्याहीवरी दोंलक्षांहुनी ॥ सूर्यसुत वसे शनी ॥ लक्षांतरें तेथूनी ॥ सप्तऋषिजनीं निवासु ।।८।। सप्तऋषींची ऋषिपंक्ती ।। तेथेंचि वसे अरुंधती ।। त्यावरी असे अमरावती ॥ इंद्रसंपत्ती समवेत ।।९।। जेथ अंगें वसे इंद्र जाण ॥ ऐरावतीं आरोहण ।।पार्षदगण मरुद्गणे ॥सुरसेना जाण जयाची ॥२१०।। उच्चैःश्रवा वारू जाण ॥ कल्पतरूंचें उद्यान ॥ कामधेनूंचें 3गोधन ॥ नंदनवन क्रीडेसी ।।११।। जेथिच्या पायऱ्या चिंतामणी ।। रंभा उर्वशी विलासिनी ॥ अष्टनायिका नाचणी ।। ज्याच्या रंगणीं नांदती ॥ १२ ॥ येणें वैभवें अमरावती ॥ इंद्र तेथील अधिपती ॥ येथूनि स्वर्गाची समाप्ती ॥ त्रैलोक्य निश्चितीं या नांव ॥ १३ ॥ आतां त्रैलोक्याबाहेरी ।। एकलक्ष योजनावरी ॥ भक्तकृपाळु श्रीहरी ।। ध्रुवमंडळ करी कृपेनें ॥ १४ ॥ त्रिलोकीं होतां प्रळयकाळ ॥ ध्रुवासि

१ वेदांतांत एक वाद आहे. २ प्राप्त झालें. ३ अलीकडे. ४ मंगळाचा लोक. ५ बृहस्पति. ६ सूर्य. ७ इंद्रपुरी. ८ सभासद. ९ कश्यप व दितीचे पुत्र. यांस इंद्रानें मारण्याचा यत्न केला. परंतु ते इंद्राकडून मेले नाहींत तेव्हां इंद्रानें त्यांच्याशीं सख्य केलें, हे चालू मन्वंतरांत सप्तविध देवांत आहेत. १० इंद्राचें घोड्याचें नांव. ११ बाग. १२ नाचणाऱ्या.

*मो. गगनीं. +मो. लक्षांतरीं. ×ना. आस्तव्यभावो. ※मो. ग्रासितां साचें. ०मो. हें सकळ ग्रासाचें संमत. 6मो. नरनारीं. 2मो. सूर्यग्रासाचिया. *मो. एक बोल उठी. 0मो. रविचंद्रिं कांचळणें नाहीं. 5मो. नवल पाही चालती. 4मो. त्याहुनि लक्षाहुनि. 3मो. गोठण.

कदा नव्हे चळ ॥ तो सर्वदा अचंचळ ॥ यालागीं अढळ ध्रुवपद ॥ १५ ॥ पृथ्वीपासोनि कोटियोजन ॥ महर्लोक वसे जाण ॥ तेथ वसती कल्पायु जन ॥ तें वसतिस्थान तयांचें ॥१६॥ तेथूनि कोटियोजनें देख ॥ वरुता असे जनोलोक ॥ तेथ वसती सनकादिक ॥ ऊर्ध्वरेते देख महायोगी ॥ १७ ॥ तेथूनि दोनकोटी अधिक ॥ वसताहे तपोलोक ॥ तेथील निवासी अवश्यक ॥ वैराजदेव देख तपस्वी ॥ १८ ॥ तपोलोकाहूनि देख ॥ चौकोटी उंच अधिक ॥ तेथ वसताहे सत्यलोक ॥ तेथील नायक चतुरानन ॥ १९ ॥ तेथ मूर्तिमंत चारी वेद ॥ मूर्तिमंत धर्म प्रसिद्ध ॥ मूर्तिमंत ब्रह्मचर्य शुद्ध ॥ तपही विशद मूर्तिमंत ॥ २२० ॥ गायत्री मूर्तिमंत तेथ ॥ वाचा मूर्तिमंत वर्त्तत ॥ दया मूर्तिमंत नांदत ॥ याग मूर्तिमंत ब्रह्मसदनीं ॥ २१ ॥ तेथ अग्नि तिन्ही मूर्तिमंत ॥ ते एकरूपें *त्रिधा भासत ॥ सत्य सत्यलोकीं मूर्तिमंत ॥ असत्य तेथ असेना ॥ २२ ॥ तेलोकीं वसते कोण लोक ॥ जे गायत्रीमंत्र जापक ॥ जे ब्राह्मणतीर्थ प्राशक ॥ जे यागउपासक निष्काम ॥ २३ ॥ जे ब्राह्मणकार्यीं निमाले ॥ जे गोरक्षणीं जीवें गेले॥ जे परोपकारार्थ वेंचले ॥ ते पावले सत्यलोक ॥ २४ ॥ जे निष्काम द्विजां भजले ॥ जिहीं निष्कामें द्विज पूजिले ॥ जिहीं निष्काम द्विज भोजिले ॥ ते पावले सत्यलोक ॥ २५ ॥ जे कृपाळु दीनार्थ देख ॥ जे कृपाळु बंधमोचक ॥ जे सत्यवादी सात्विक ॥ ते सत्यलोकनिवासी ॥ २६ ॥ जे परापवादीं मूक ॥ परदारानपुंसक ॥ जे परद्रव्या पराङ्मुख ॥ ते सत्यलोकनिवासी ॥ २७ ॥ ऐशी सत्यलोकींची स्थिती ॥ तेथींचा ब्रह्मा अधिपती ॥ ब्रह्मसृष्टि याहीवरती॥ नाहीं निश्चितीं उद्धवा ॥ २८ ॥ ब्रह्मांडाहूनि वेगळा ॥ कैलास निर्माण करी भोळा ॥ वैकुंठ रची घनसांवळा ॥ हे लोक स्वलीळा निर्मित ॥२९॥ होतां ब्रह्मांडा घडामोडी ॥ वैकुंठ कैलासा नलगे वोढी ॥ तेथील वस्तीची अभिनव गोडी ॥ हरिहरभक्त फुडी जाणती ॥ २३० ॥ तेथ नाहीं काळाचें गमन ॥ नाहीं कर्माचें कर्मबंधन ॥ तेथ नाहीं जन्ममरण ॥ हें भक्त अनन्य पावती ॥ ३१ ॥ वैकुंठकैलासरचना ॥ सांगतां मन मुके मनपणा ॥ तेलोकींची लोकलक्षणा॥ ऐक विचक्षणा सांगेन ॥ ३२ ॥ सकळब्रह्मांडाबाहेरी ॥ मायाआवरणाभीतरीं ॥ वैकुंठ कैलास हरहरीं ॥ स्वलीलेकरीं निर्मिले ॥ ३३ ॥ सकळजीवां सुखकरू ॥ कैलासीं वसे शंकरू ॥ जो कां पार्वती परमेश्वरू ॥ जो योगेश्वरू योगियां ॥ ३४ ॥ जटाजूटीं गंगाधर ॥ पिनाकपाणी पंचवक्त्रें ॥ कर्पूरगौर, गोक्षीर ॥ अभयवरदकर निजभक्तां ॥ ३५ ॥त्रिमात्रातीत त्र्यंबक ॥ त्रिपुटीत्रिपुरत्रिपुरांतक ॥ त्रिविधतापउच्छेदक ॥ तिनीलोक सुखकारी ॥ ३६ ॥ नागभूषणीं शोभे लीला ॥ रुद्राक्षयुक्त रुंडमाळा ॥ नीळकंठ, जाश्वनीळा ॥ भस्मोद्धूळीधूसर ॥ ३७ ॥ त्रिशूळडमरांकितकर ॥ त्रिनेत्र व्याघ्राजिनांबर ॥ रामनामीं अतितत्पर ॥ करी निरंतर जपमाळा ॥ ३८ ॥ सहस्रबाहु बळिपुत्र बाण ॥ भृंगी चंडी पार्षद पूर्ण ॥ साठी सहस्र रुद्रगण ॥ कोयत्या त्रिशूळ जाण झेलिती ॥ ३९ ॥ गणेश स्वामिकार्तिक ॥ नंदी पंचमुखासंमुख ॥ वीरभद्र

---

१ एक कल्पवर्ष आयुष्य ज्यांचें असे. २ कधीं रेतस्खलन न होणारे असे. ३ ब्रह्मा. ४ दक्षिणाग्नि, गार्हपत्य, आवहनीय, हे तीन अग्नि. ५ भोजन करविले. ६ दुसऱ्याचे दोष काढण्याविषयीं. ७ शंकर. ८ विष्णु. ९ एकनिष्ठ. १० पिनाकनांवाचें धनुष्य हातांत ज्याच्या असा. ११ पांचमुखांचा. १२अ, ऊ, म्. १३ मनुष्यांच्या शिराच्या माळा. १४ कोयता, विळा. १५ शिवासमोर.

*मो. त्रिविध.

सेनानायक ॥ जेणें लाविली सीके दक्षासी ॥ २४० ॥ भूत प्रेत पिशाचक ॥ महाप्रमथ ज्याचें सैन्यक ॥ अवघे शिवांकित देख ॥ शिवनामघोष गर्जती ॥ ४१ ॥ शंभु शिव शूली शंकर ॥ उमाकांत कर्पूरगौर ॥ *भव शर्व भवानीवर ॥ कपर्दीश्वर महादेव ॥४२॥ ❋वामबाहीं स्वामी कार्तिक ॥ जेणें तारकासुरासी लाविली सिक ॥ तो मयूरारूढ अवश्यक ॥ सकळदेव सन्मुख तिष्ठती ॥ ४३ ॥ हरहरशंकरनामोच्चारीं ॥ धाकें कळिकाळ पळे दूरी ॥ शिवनामें सदा गर्जे गिरी ॥ गिरीश राज्य करी तेठायीं ॥ ४३ ॥ जेथ शिवनामाचा उच्चार ॥ तेथ सुखेंसीं तिष्ठे शंकर ॥ भक्तकृपाळु ईश्वर ॥ भोळा निरंतर भावार्थ्यां ॥ ४४ ॥ निजदासाचे त्रिगुण वैरी ॥ छेदावया त्रिशूळ करीं ॥ निजडमरूच्या गजरीं ॥ पापाची उरी उरोंनेदी ॥४५॥ कैलासीं तृणतरु समस्त ॥ पशु पक्षी जे जे तेथ ॥ ते अवघेचि शिवांकित ॥ सर्वरूपें समस्त शिव नांदे ॥ ४६ ॥ यापरी ब्रह्मांडाबाहेरी ॥ शिव स्वलीला निर्माण करी ॥ नेमूनियां कैलासगिरी ॥ भव राज्य करी भवानीशीं ॥ ४७ ॥ आतां वैकुंठींची स्थिती ॥ ऐक सांगेन तुजप्रती॥ जे ×ऐकतां चित्तवृत्ती ॥ +स्वानंदस्फूर्ती ओसंडे ॥४८॥ ऊंस गाळूनि काढिजे सार ॥ त्याची आळूनि कीजे साकर ॥ तिचेही नाना प्रकार ॥ करिती नानाकार अतिकुशळ ॥ ४९ ॥ तेवीं चैतन्यचि निश्चितें ॥ मुसावूनि श्रीभगवंतें ॥ वैकुंठ रचिलें तेथें ॥ निजसामर्थ्यें नांदावया ॥ २५० ॥ स्वलीला सगुण साकार ॥ सुकुमार अतिसुंदर ॥ घनश्याम मनोहर ॥ मूर्ति चिन्मात्र चोखडी ॥ ५१ ॥ शंख चक्र पद्म गदा ॥ चारी भुजा सायुधा ॥ डोळे लांचावले आनंदा ॥ सगुण गोविंदा देखोनी ॥५२॥ मुकुटकुंडलें मेखळा ॥ कासे मिरवे सोनसळा ॥ कौस्तुभ झळके गळां ॥ आपाद वनमाळा शोभत ॥५३॥ चरणींची गंगा अतिपुनीत ॥ जे जगातें पवित्र करित ॥ ते माथां वाहे उमाकांत ॥ निजस्वार्थ देखोनी ॥ ५४ ॥ त्या श्रीहरीचें पदद्वंद्व ॥ वानितां मुका झाला वेद ॥ अगम्य हरीचें निजपद ॥ महिमा अगाध हरिचरणीं ॥ ५५ ॥ पाहतां मुकुंदाचें श्रीमुख ॥ फिकें झालें जी पीयूख ॥ डोळ्यां झालें परमसुख ॥ धन्य श्रीमुख हरीचें ५६ ॥ ज्याचें निमेषार्ध देखिल्या मुख ॥ हारपे कोटिजन्मांचें दुःख ॥ त्रिलोकीं न समाय हरिख ॥ धन्य श्रीमुख हरीचें ॥ ५७ ॥ ज्याचा देखिलिया वदनेंदु ॥ बाधूं न शके द्वंद्वबाधु ॥ चढता वाढता परमानंदु ॥ स्वानंदकंदु जगाचा ॥ ५८ ॥ जयाची विक्षेपभ्रुकुटी ॥ रची ब्रह्मांडें उठाउठी ॥ ज्याचे रोमकूपीं ब्रह्मांडकोटी ॥ तो हरि वैकुंठीं नांदत ॥५९॥ ज्याची झालिया कृपादृष्टी ॥ अहंकाराची विरे गांठी ॥ दुसरें दिसोंनेदी सृष्टीं ॥ तो हरि वैकुंठीं नांदत ॥ २६० ॥ जया दादुल्याचें नाम ॥ निर्दाळी गा मरण जन्म ॥ समूळ ०उपडी कर्माकर्म ॥ तो पुरुषोत्तम नांदत ॥ ६१ ॥ ते वैकुंठीं पाहतां साचार ॥ अवघे चतुर्भुज नर ॥ घनश्याम पीतांबरधर ॥ शंखचक्र अवघ्यांसी ॥ ६२ ॥ अवघ्यांचें एक स्वरूप ॥ अवघे दिसती एकरूप ॥ जेथ हरि नांदे स्वयें सद्रूप ॥ तेथ कोणी कुरूप दिसेना ॥ ६३ ॥ तेथ नाहीं आधि-

१ शिक्षा. २ शेष. ३ आटवून. ४ दोनी पाय. ५ अमृत ६ रोमाच्या छिद्रांत. ७ समर्थांचें.

*ना. भवभर्ग भवानीहर, मो. भवभंग भवानीवर. ×मो. ऐकतांचि चित्तीं. +मो. स्वानंदस्थिती. ०मो. उडवी.

❋४३ ही ओवी पैठणचे हस्तलिखित प्रतींत आहे, परंतु पंढरपूरचे हस्तलिखित प्रतींत नाहीं.

व्याधी ॥ नाहीं विषयवार्ता उपाधी ॥ *स्त्रीपुरुषां समान बुद्धी ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥६४॥ तेथ नाहीं तहान भूक ॥ नाहीं कामक्रोध द्वंद्वदुःख ॥ नाहीं जन्ममरण निःशेख ॥ ऐसा वैकुंठलोक नांदत ॥ ६५ ॥ लक्ष्मीनें करावें अवलोकन ॥ या लागीं कष्टती सुरगण ॥ ते लक्ष्मी अंगें आपण ॥ करी संमार्जन वैकुंठीं ॥ ६६ ॥ ते वैकुंठीं जगन्नाथ ॥ उद्धरावया निजभक्त ॥ स्वलीला असे नांदत ॥ दीनकृपायुक्त दयाळू ॥ ६७ ॥ अंतीं नाममात्र घेतल्यासाठीं ॥ उद्धरल्या जीवकोटी ॥ तो स्वामी श्रीविष्णु वैकुंठीं ॥ दीनकृपादृष्टी नांदत ॥ ६८ ॥ जैसा ज्यासि भावार्थ ॥ तैसा पुरवी मनोरथ ॥ पदिये ×पंचपुरुषार्थ ॥ तो हरि नांदत वैकुंठीं ॥ ६९ ॥ लोकलोकांतरगणना ॥ ब्रह्मांडसंख्या अवघी जाणा ॥ वैकुंठकैलासरचना ॥ समूळ विवंचना सांगीतली ॥ २७० ॥ लोक सांगीतले भिन्न भिन्न ॥ तेथील प्राप्तीचे कोण +जन ॥ ऐसे कल्पील तुझें मन ॥ ते अर्थींचें निरूपण अवधारीं ॥ ७१ ॥ महर्जनतपःसत्यलोक ॥ वैकुंठरचना अलोलिक ॥ तेथील प्राप्तीचे कोण लोक ॥ ते यदुनायक सांगत ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ योगस्य तपसश्चैव न्यासस्य गतयोऽमलाः ॥ महर्जनस्तपः सत्यं भक्तियोगस्य मद्गतिः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ निश्चळ करावया निजचित्ता ॥ साधिली ⁂प्राणापानसमता ॥ षट्चक्रें भेदूनि तत्त्वतां ॥ पुढें निजात्मता पाववी ॥ ७३ ॥ तंव आयुष्या झालें अस्तमान ॥ निजांगीं आदळलें मरण ॥ ऐसे निमाले जे योगिजन ॥ त्यांसि ऊर्ध्व गमन महर्जनादिलोकीं ॥ ७४ ॥ जो कां नैष्ठिक ब्रह्मचारी ॥ ब्रह्मचर्यनेमें व्रतधारी ॥ जो स्वप्नीं नातळे नारी ॥ जो भिक्षाहारी सर्वदा ॥ ७५ ॥ जो सदा धडधडीतविरक्ती ॥ एक भिक्षा न धरी हातीं ॥ सद्गुरूचिया सेवावृत्ती ॥ आत्मज्ञानप्राप्ती पावावी ॥७६॥ जे संधीं व्हावें आत्मज्ञान ॥ ते संधीसि आलें मरण ॥ ऐशिया ब्रह्मचारियासि जाण ॥ ऊर्ध्व गमन महर्जनादिलोकीं ॥ ७७ ॥ जे गृहस्थाश्रमीं नेटक ॥ जे अग्निसेवें साग्निक ॥ जे स्वधर्मे चित्तशोधक ॥ जे सेवक द्विजदेवां ॥ ७८ ॥ जे भूतदयाळु भाविक ॥ जे सत्यवादी सात्विक ॥ जे निजात्मज्ञानसाधक ॥ जे अवंचक गुरुभजनीं ॥७९॥ गुरुकृपा साधूनि ज्ञान ॥ पावावें ब्रह्म सनातन ॥ तंव वेंचलें आयुष्यधन ॥ अंगीं निधन आदळलें ॥ २८० ॥ तेणें खोळंबली ब्रह्मप्राप्ती ॥ परी ऊर्ध्वलोकीं होय गती ॥ तैशी उपासना विरक्ती ॥ ०तेणें तारतम्यें जाती महर्जनादिलोकीं ॥ ८१ ॥ वनवासी वानप्रस्थ ॥ जे वैराग्यालागीं विरक्त ॥ जे कंदमूळफळीं तृप्त ॥ जे सदा नेमस्त आश्रमधर्मीं ॥८२॥ वर्षाकाळीं आसारीं राहे ॥ हेमंतीं 6जळाशयें ॥ उष्णकाळीं पंचाग्नि *साहे ॥ तपश्चर्या 3आहे अतिनिष्ठ ॥ ८३ ॥ शरीरशोषणाचें पाहे ॥ सर्वथा न धरी भये ॥ स्वार्थाचेनि लवलाहें ॥ तपोनिष्ठा 3साहे दारुण ॥ ८४ ॥ वैराग्य साधूनि पूर्ण ॥ करावें संन्यासग्रहण ॥ साधावया ब्रह्मज्ञान ॥

१ १धर्म, २अर्थ, ३काम, ४मोक्ष, ( १सलोकता, २समीपता, ३स्वरूपता, ४सायुज्यता, ) ५परमप्रेमरूपा–परानुरक्ति–पराभक्ति. हे पांच पुरुषार्थ. ( या अध्यांत ४०१ ओवी पहा. ) २ १आधार, २स्वाधिष्ठान, ३मणिपूर, ४अनाहत, ५विशुद्धाख्य, व ६आज्ञा, हीं योगनिर्दिष्ट सहाचक्रें मनुष्यशरीरांत सांगीतलीं आहेत. ३ महर्लोक, जनोलोक. ४ भिक्षेचा आहार करणारा. ५ निष्कपट. ६ मरण. ७ निरंतर पर्जन्य धारेंत.

*मो स्त्री पुत्र समान. ×ना. पंचम पुरुषार्थ. +ना. कारण. ⁂मो. प्राणायामसमता. ०मो. तेणें रूपें जातीं. 6मो. जळीं सोये. *मो. सोये. 3मो. पाहे.

तेचिकाळीं मरण वोढवलें ॥ ८५ ॥ ऐसेनि देहांतस्थिती ॥ त्यासि ऊर्ध्वलोकीं होय गती ॥ महर्जनतपोलोकप्राप्ती ॥ तारतम्यस्थिती उपासना ॥ ८६ ॥ जो समूळ संकल्पसंन्यासी ॥ लोकलोकांतर न घडे त्यासी ॥ हें नटकेचि जयासी ॥ आणि झाले संन्यासी विधियुक्त ॥ ८७ ॥ जे कां पोटींहून अतिविरक्त ॥ स्वप्नीं धातूसि न लाविती हात ॥ जे यतिधर्मी सदा निरत ॥ जे सदा जपत प्रणवातें ॥ ८८ ॥ अंगीकारिलें आश्रमविधी ॥ उबाॅ न मानी जो त्रिशुद्धी ॥मरणीं डंडळीना बुद्धी ॥त्यासि *गमनसिद्धी सत्यलोकीं ॥८९॥ ऐसे सत्यलोकातें पावती ॥ तेथिल्या भोगाची ज्यां विरक्ती ॥ ते ब्रह्मयासवें मुक्त होती ॥ येर ते येती माघारे ॥ ९० ॥ ज्यांसि सत्यलोकीं भोगासक्ती ॥ ते खेंचोनि माघारे येती ॥ इतरलोकांची कोण गती ॥ पुनरावृत्ती सोडीना ॥ ९१ ॥ जेथवरी भोगासक्ती ॥ तेथवरी पुनरावृत्ती ॥ जेथ भोगाची निवृत्ती ॥ तेथ चारी मुक्ती आंदण्या ॥ ९२ ॥ ज्या लोकीं ज्या भोगविरक्ती ॥ तेथूनि ते पुढारे जाती ॥ जे लोकीं ज्या भोगासक्ती ॥ ते खचोनि पडती भूतळीं ॥ ९३ ॥ तैशी नव्हे माझी भक्ती ॥ भक्तां नाहीं इतर प्राप्ती ॥ मद्भक्तां माझी गती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९४ ॥ जे सकाम माझी सेवा करिती ॥ त्यांसि कामनाफळीं पडे वस्ती ॥ ज्यांसि निष्काम माझी भक्ती ॥ त्यांसि माझी प्राप्ती अनन्य ॥ ९५ ॥ सकाम भक्तांचे पुरवूनि काम ॥ त्यांसि मी करीं नित्य निष्काम ॥ निज भक्तांसि निजधाम ॥ मी पुरुषोत्तम पाववीं ॥ ९६ ॥ यालागीं गोपींची कामासक्ती ॥ म्यांचि आणूनि निष्कामस्थितीं ॥ त्यांसि दियली सायुज्यमुक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९७ ॥ म्यां गोपिकांसि काम केला ॥ कीं निःशेष काम त्यांचा हारिला ॥ न विचारितां या बोला ॥ कृष्ण व्यभिचरला मूर्ख म्हणती ॥ ९८ ॥ सलोकता आवडे भक्तांसी ॥ तैं मी करीं वैकुंठवासी ॥ भक्त मागे समीपतेसी ॥ करीं मी तयासी जिवलग ॥ ९९ ॥ हितगुज आळोंचासी ॥ हृदयींचें गोड सांगावयासी ॥ उद्धवा तूं जैसा आवडशी ॥ तैशीच त्यांशीं करीं प्रीति ॥ ३०० ॥ भक्त मागे सरूपता ॥ त्यासि मी दें चतुर्भुजता ॥ शंखचक्रादि सायुधता ॥ घनश्यामता सुरेख ॥ १ ॥ मुकुटकुंडलें मेखळा ॥ कासे मिरवे सोनसळा ॥ वांकी तोडरू चरणकमळा ॥कौस्तुभ गळां ×मत्सम ॥२॥ ठाणमाण गुण लक्षण ॥ वीर्य शौर्य गांभीर्य पूर्ण ॥ ‡रूप रेखा समसमान ॥ दोघेही अन्यून स्वरूपतां ॥३॥ रमा दोघांसि एकत्र देखे ॥ देवो कोण हें ते नोळखे ॥ पार्षदक्रिया ठकली ठाके ॥ कोणासि सेवकें सेवावें ? ॥ ४ ॥ छत्रधरू +चवके चित्तीं ॥ °कोणावरी धरूं छत्री ॥ चवरधर चवरें हातीं ॥कोणाप्रती विंजोवें ॥ ५ ॥ नमना येती ब्रह्मादिदेव ॥ तेही मानिती अति अपूर्व ॥ दोंमाजीं कोण आदिदेव ॥ त्यांसिही स्वयमेव कळेना ॥ ६ ॥ जेवीं दीपें दीप लाविला ॥ न कळे वडील कोण धाकुला ॥ तेवीं माझी स्वरूपता पावला ॥ नवचे ओळखिला 1आनासी ॥ ७ ॥ जेवीं आरिशाचें प्रतिबिंब ॥ दिसे समरूपें स्वयंभ ॥ तैशी स्वरूपतेची शोभ ॥ सम बिंब दोहींचा ॥८॥ देवा होऊनियां प्रसन्न ॥ आपुली स्वरूपता दे संपूर्ण ॥ हृदयींचा नेदीच

---

१ ओंकार. २ कंटाळा, त्रास. ३ पुण्यक्षय होऊन. ४ दोषी झाला. ५ हळूच कानांत सांगण्यास. ६ शरीराचा बांधा. ७ गणांची सेवा. ८ संशयांत पडे. ९ वारा घालावा. १० डौल; एकतऱ्हा.

*ना. गमन त्रिशुद्धी सत्यलोकीं. ×मो. झळकत. ‡ना. रूपें देखतां समसमान. +मो. चमके. °मो. का छत्र धरू कवणाप्रती. 1मो. आणिकासी.

द्विजचरण ॥ श्रीवत्सलांछन आनासी ॥ ९ ॥ श्रीवत्स चिह्न धावयासि पाही ॥ *विष्णु ह्मणे मज सामर्थ्य नाहीं ॥ तें असे ब्राह्मणाच्या +पायीं ॥ त्याचा चरण हृदयीं ×धरिल्या लाभे ॥ ३१० ॥ स्वरूपतेमाजीं जाण ॥ देवा भक्तांची हेचि खूण ॥ ज्याचे हृदयीं श्रीवत्सलांछन ॥ तो स्वामी श्रीकृष्ण जाण सर्वांचा ॥ ११ ॥ ऐशी स्वरूपता जरी झाली प्राप्त ॥ तरी हा एक देवो मी एक भक्त ॥ हा भिन्नत्वाचा ※भेद किंचित ॥ त्या आंत उरला असे ॥ १२ ॥ देवभक्तांमाजीं भेदू ॥ भिन्न स्वरूपतासंवादू ॥ जंव नाहीं अद्वयबोधू ॥ तंव परमानंदू प्रकटेना ॥१३॥ सांडूनि भिन्न भेदवार्ता ॥ भक्त मागे सायुज्यता ॥ ते गोड निरूपण कथा ॥ तथील स्वादता मी जाणें ॥ १४ ॥ सायुज्याचें गोडपण ॥ माझें मी जाणें आपण ॥ उद्धवा तुज तेंही जाण ॥ सांग संपूर्ण सांगेन ॥ १५ ॥ देह स्वरूपता सारिखेपण ॥ हृदयीं भेद मी तूं भिन्न ॥ ऐशिये मुक्तीशीं जाण ॥ भक्त सज्ञान नातळती ॥ १६ ॥ मी होऊनियां मातें ॥ भजन स्वतःसिद्ध आइतें ॥ तें सांडूनियां भेदातें ॥ निजभक्त चित्तें नातळती ॥ १७ ॥ देवेंसि भक्त अनादि सिद्ध ॥ ठायीं मूळींहून अभेद ॥ तेथ दाटूनी जो धरी भेद ॥ तो भक्तिमंद मायिक ॥१८॥ आर्त जिज्ञासु आणि अर्थार्थी ॥ हे भेद नेले मायिकाभक्ती ॥ जे अभेदभावें मज भजती ॥ सायुज्यमुक्ती तयांसी ॥ १९ ॥ ज्यासि रावो रंक समान ॥ वंद्य निंद्य न मनी मन ॥ जे न धरिती देहाभिमान ॥ सायुज्य जाण तयांसी ॥३२०॥ जैशी आपुली साउली ॥ मिथ्या आपणासवें लागली ॥ तैसी देहबुद्धि ज्यांसि झाली ॥ त्यांसि फावली सायुज्यता ॥ २१ ॥ जन्मूनि छाया सरिसी वाढे ॥ माझी हे ममता नुठी पुढें ॥ ऐसें देहाचें न बाधी सांकडें ॥ सायुज्य रोकडें तयासी ॥२२॥ सांडूनि देहाची विषयासक्ती ॥ जो करी भावें अभेदभक्ती ॥ त्यासीचि सायुज्यमुक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ २३ ॥ ज्यासि देहीं नुठी मीपण ॥ भूतमात्रीं न देखे दूषण ॥ त्यासि सायुज्यमुक्ति जाण ॥ सांग संपूर्ण सांपडे ॥२४॥ जेवढी मज आत्म्याचि ०व्याप्ती ॥ तेवढीच त्याची प्रतीती ॥ त्यासीच सायुज्यता मुक्ती ॥ सहज आपैती उद्धवा ॥२५॥ त्यासि विष्णुस्वरूप व्हावा देहो ॥ हा सर्वथा नुपजे अहंभावो ॥ त्यासि विष्णुसगट स्वदेह वावो ॥ यालागीं सारूप्य पहाहो वांछीना ॥ २६ ॥ निजविवेकें पाहतां ठायीं ॥ देहो तितुका मिथ्या पाहीं ॥ तेथ 4सारूप्यता कोणे ठायीं ॥ सज्ञानीं कायी मागावी ॥ २७ ॥ सायुज्यता आलिया हाता वस्तुवीण ठावो नाहीं रिता ॥ सकळभूतीं एकात्मता ॥ सायुज्य तत्वतां या नांव ॥ २८ ॥ सकळरूपें नांदतें जग ॥ तें जो जाणे आपुलें अंग ॥ आपण सर्वात्मा अभंग ॥ त्यासीच सांग सायुज्य ॥ २९ ॥ मी एक सबाह्याभ्यंतरीं ॥ मी एक जंगमीं स्थावरीं ॥ मीचि आत्मा चराचरीं ॥ जाण त्याचे घरीं सायुज्य नांदे ॥ ३३० ॥ मीचि एक एकला ॥ एकपणेंचि संचला ॥ ज्यासि द्वैताचा दुकाळ पडिला ॥ सत्य पावला सायुज्य ॥३१॥ एवं भावार्थाच्या अतिप्रीतीं ॥ जें जें निजभक्त वांछिती ॥ तें तें मी पुरवीं श्रीपती ॥ चारी मुक्ती भक्तांसी ॥३२॥ या वेगळे माझे प्रियभक्त ॥ भक्तिप्रतापें प्रतापवंत ॥ भजन शौर्य अति अद्भुत ॥ निष्काम 7निरंतर मद्भजनीं ॥ ३३ ॥ आर्त जिज्ञासु अर्थार्थी ॥ या कल्पना न धरोनि हातीं ॥ नित्य निष्काम अति-

---

१ प्राप्त झाली. २ प्राप्त होते.

*मो. कृष्ण ह्मणे. +मो. ठायीं. ×मो. धरिलासे. ※मो. भेदांकित. ०मो. व्यक्ती. 4मो स्वरूपता. 7ना. नेमस्त.

प्रीतीं ॥ मज भजती *महाभाग ॥ ३४ ॥ नेघेती सालोकता सामीपता स्वरूपता ॥ शेवीं मागती सायुज्यता ॥ निष्काम भजती भगवंता ॥ भक्ति तत्त्वतां या नांव ॥ ३५ ॥ नवल भजनाची परवडी ॥ आवडीतें प्रसवे आवडी ॥ क्षणक्षणा चढोवढी ॥ नित्य नूतन गोडी प्रेमाची ॥३६॥ माझिया आवडीं तत्त्वतां ॥ सर्वस्वें वेंचितां जीविता ॥ कदा पालट नव्हे चित्ता ॥ भावार्थता विश्वासी ॥३७॥ मीच एक देवादिदेवो ॥ सर्वभूतीं माझाचि भावो ॥ विकल्प विकारि संदेहो ॥ घालितां पहाहो उपजेना ॥ ३८ ॥ नवल भावार्थाची थोरी ॥ +मद्भावें देखे नरनारी । श्वानसूकरादि ×आकारीं ॥ नमस्कारी मद्भावें ॥३९॥ नवल त्याची भजनख्याती ॥ सायुज्यादि चारी मुक्ती ॥ माझ्या नांवावरूनि ओंवाळिती ॥ भक्ति पदियंती येणें पाडें ॥३४०॥ मांडल्य अतिविघ्नसांकडें ॥ ग्लानी न करिती आणिकांकडे ॥ जाणती रामनामापुढें ॥ विघ्न बापुडें तें कायी ॥ ४१ ॥ गगन पडो पाहे कडाडें ॥ पृथ्वी उलथावया गडगडे ॥ ऐसें मांडलियाही सांकडें ॥ नाम पदे श्रीहरीचें ॥४२॥ ऐशी देखोनि अनन्यप्रीती ॥ मी सर्वस्वें भुललों श्रीपती ॥ मग न पाहतां कुळ जाती ॥ त्याच्या घराप्रती मी धांवें ॥ ४३ ॥ ते न घेती वैकुंठींची वाट ॥ त्यांचें घरचि ⁂मी करीं वैकुंठ ॥ तेथ चिन्मात्र फुटे पांहाट ॥ पिके पेंठ संतांची ॥४४॥ उपनिषदें येती तयापाशीं ॥ स्वधर्म ये सुखवस्तीसी ॥ नारदादिसनकादिकांसी ॥ तया घरासी अतिप्रीती ॥ ४५ ॥ गर्जती नामाचे पवाडे ॥ माझी कीर्ति गाती वाडेंकोडें ॥ माझ्या रामनामापुढें ॥ द्वंद्वाचें उडे बाधकत्व ॥ ४६ ॥ ऐशी देखोनि माझी भक्ती ॥ वोरसोनियां निजशांती ॥ धावोनियां ये तयाप्रती ॥ वोळली मागुती जावों विसरे ॥४७॥ त्यासि छळों ये जें जें दूषण ॥ तें तें त्यासि होय भूषण ॥ माझे भक्तीचें प्रसन्नपण ॥ जाण संपूर्ण या नांव ॥ ४८ ॥ तेथ सायुज्यादि चारी मुक्ती ॥ त्याचे सेवेसि स्वयें येती ॥ ते जेथ विषय सेवूं जाती ॥ तेथ सायुज्यमुक्ती सेवा करी ॥ ४९ ॥ ऋद्धिसिद्धि त्याच्या घरीं ॥ होऊनि राहती कामारी ॥ तरी तो सिद्धींची चाड नधरी ॥ माझे भक्तीवरी निश्चयो ॥ ३५० ॥ ऐशी देखोनि निश्चयें भक्ती ॥ मीही करीं अनन्यप्रीती ॥ भक्त जेउती वास पाहती ॥ तेउता मी श्रीपती स्वयें प्रकटें ॥ ५१ ॥ भक्त स्वभावें बोलोंजाये ॥ त्याचें बोलणें मीचि होयें ॥ त्याचे बोलण्यासबाह्य पाहे ॥ मीचि राहें शब्दार्थीं ॥ ५२ ॥ तो कौतुकें खेळे खडे ॥ ते खडेचि मज होणें घडे ॥ तो कृपा पाहे जयाकडे ॥ त्याचे छेदीं मी गाढे भवबंध ॥ ५३ ॥ तो वासै पाहे जेणें मोहरीं ॥ तेउती मी सुखाची सृष्टी करीं ॥ तो म्हणे जयातें उद्धरीं ॥ तो मी स्वपदावरी बैसवीं ॥ ५४ ॥ त्यासि अल्पही विघ्नबु पावे ॥ तो सर्वांगें मी करूं धांवें ॥ त्याचें नाम जिहीं स्मरावें ॥ त्यांसि म्यां तारावें सर्वथा ॥ ५५ ॥ जेवीं तान्हयालागीं माता ॥ तैसी त्या भक्ताची मज चिंता ॥ त्याची सेवाही करितां ॥ मी सर्वथा लाजेना ॥ ५६ ॥ माता बाळकाचें पुरवी कोड ॥ तैसे ते माझे लळेंवाड ॥ त्याचें प्रेमचि मज गोड ॥ उपचारचाड मज नाहीं ॥ ५७ ॥ मी शरीर तो माझा आत्मा ॥ प्रेमळ असे पढिया आम्हां ॥ प्रेमळावरती सीमा ॥ भक्तीचा महिमा चढेना ॥ ५८ ॥ त्यासि म्हणें काळ संहारी ॥ यालागीं त्या आंतबाहेरी ॥ मी निजांगाचें दुर्ग करीं ॥ ऐशी प्रीति पुरी

१ मोठे भाग्यवान्. २ दीनवाणी प्रार्थना. ३ वाट. ४ मार्गानें. ५ संकट, कष्ट. ६ लाडके. ७ कदाचित्. ८ कोट, किल्ला.

*मो. महाभागवत. +मो. समभावें देखती. ×मो. विकारीं. ⁂मो. मी होय वैकुंठ.

मळाची ॥५९॥ तेथ काळाचेनि हटतटें ॥ लावूनि ब्रह्मस्थितीचे वाटे ॥ माझे भक्त नेटेंपाटें ॥ आपणिया आंतवटें स्वसुखें वसवीं ॥ ३६० ॥ त्याचें स्वभाविक कर्म जाण ॥ तें माझें *प्रीतीचें पूजन ॥ तो देखे तें माझें दर्शन ॥ त्याची चावटी तें स्तवन सुणेचें माझें ॥ ६१ ॥ तो जयें करी आरोगण ॥ तेंचि मज नैवेद्यअर्पण ॥ त्याची निद्रा ते जाण ॥ समाधि संपूर्ण पैं माझी ॥६२॥ त्याचा निमेषोन्मेषांचे व्यापार ॥ ते मज अत्यंत प्रियकर ॥ त्याच्या विश्वासाचे परिवार॥मज अपार सुखावितीं॥६३॥ +भक्तांची शरीरस्वभावस्थिती॥तेणें मी सुखावें श्रीपती॥ ऐसे ※सप्रेम भक्त आवडती ॥ माझी अनन्यप्रीती मद्भक्तां ॥६४॥ चारी पुरुषार्थां नातळती ॥ उपेक्षूनि चारी मुक्ती ॥ सप्रेम करिती माझी भक्ती ॥ मजचि पावती मद्भक्त ॥ ६५ ॥ गंगा सागरीं मीनली मिळे ॥ मिळाली त्याची त्यावरी लोळे ॥ तैसा भक्त मिळोनि भावबळें ॥ माझे भक्तीचे ०सोहळे मजमाजीं भोगी ॥ ६६ ॥ जेवीं कामभरें तरुणांगी ॥ तरुणपण भोगी सर्वांगीं ॥ तेवीं भक्त मिळोनि मजलागीं ॥ माझे भक्तीचें भोगी वैभव ॥ ६७ ॥ कां सैतरावीयें गोडपण ॥ चंद्र जाणे आपुलें आपण ॥ तेवीं मी होऊनि माझें भजन ॥ भक्त सज्ञान जाणती ॥ ६८ ॥ जातिस्वभावें उदक एक ॥ तेंचि गंगा यमुना 5नांवें देख ॥ प्रयागसंगमीं उद्धरी लोक ॥ तेवीं भक्त भाविक मद्योगें ॥ ६९ ॥ तेवीं माझे भक्त माझे मज मिळून ॥ अनन्य करिती माझें भजन ॥ येथ भाविक सात्विक ×अतिदीन ॥ उद्धरती जाण मद्योगें ॥ ३७० ॥ पृथ्वी निधानें भरली आहे ॥ परी पायाळेंवीण प्राप्ति नोहे ॥ तेवीं आत्मा स्वतःसिद्ध आहे ॥ परि जैं गुरुकृपा पाहे तैं प्राप्ती ॥ ७१ ॥ चहूं पुरुषार्थांतें त्यागिती ॥ चारी मुक्ति उपेक्षिती ॥ पंचम पुरुषार्थाची भक्ती ॥ मज पढियंती उद्धवा ॥ ७२ ॥ येचि भक्तीचें मज कोड ॥ हेचि 1भक्त माझे लडिवाड ॥ मज आवाप्तकामा त्याची चाड ॥ ऐसें प्रेम गोड तयांचें ॥ ७३ ॥ आम्हीं प्रेमाचे पाहुणे ॥ भावार्थाचे आंदणे ॥ स्यां अनन्याची सेवा करणें ॥ जीवें प्राणें सर्वस्वें ॥ ७४ ॥ माझें नाम आत्माराम ॥ मी आवाप्तसकळकाम ॥ परी प्रेमळांलागीं सकाम ॥ ऐसें *गोड प्रेम तयांचें ॥ ३७५ ॥ मग आपुलिये संवसाटीं ॥ प्रेमळ घे मी उठाउठी ॥ वरि शरीरें सुखही दें शेवटीं ॥ मज प्रीति मोठी प्रेमाची ॥ ७६ ॥ प्रेमळ 0मजसीं मोलें अधिक ॥ संवसाटीं करितां नव्हे देख ॥ यालागीं त्यासी वरील देतां सुख ॥ न ये तें सेवक सेलेचा होय ॥७७॥ प्रेमाचा जिव्हाळा पूर्ण ॥ भावार्थाची उणखूण ॥ जाणता मी एक श्रीकृष्ण ॥ इतरांसि जाण कळेना ॥ ७८ ॥ मज गोपिकांची कोण गोडी ॥ त्यांच्या प्रेमाची जाति चोखडी ॥ यालागीं मज त्यांची आवडी ॥ अतिगाढी उद्धवा ॥ ७९ ॥ कुब्जा काय सुंदर होती ॥ तिच्या प्रेमाची मज प्रीती ॥ राधा 6प्रार्थी वनाप्रती ॥ काय विषयासक्तीलागूनी ॥ ३८० ॥ कोण भक्ति केली गोपाळीं ॥ काय तीं सांवळीं कीं ओवळीं ॥ त्यांचें उच्छिष्ट कवळ मी गिळीं ॥ प्रेमसन्मेळीं झुलत ॥ ८१ ॥ पांडवांच्या बोचें मी काय

१ भक्षण. २ पापण्या हालवण्याचा. ३ अमृतकलेचें. ४ ठेव्यानें. ५ पायाळू. ६ सोबतीस. ७ उत्तम, श्रेष्ठ. ८ दोलका, निवडक. ९ बापाचें.

*मो. प्रतिमेचें. +मो. भक्ताची स्वाभाविक शरीरस्थिती. ※मो. प्रेमें भक्त. ०मो. लळे. 5मो. मिसें. ×मो. जन. 1मो. भक्ति. *ना. गोडपण तयाचें. 0मो. मजहुनी मोलें. 6मो. प्रार्थितां मी वनाप्रती.

लागें ॥ त्यांचीं *वेवटें सोशीं अनेगें ॥ मी सुदाम्याच्या पायां लागें ॥ काय त्याचेनि पांगें पांगलों ॥ ८२ ॥ मी काय अन्नासि दुकाळलों ॥ तो यज्ञपत्न्यांसी मागों गेलों ॥ मी भावार्थाचा भुकेलों ॥ प्रेमाच्या पावलों पाहुणेरा ॥ ८३ ॥ माझी काय क्षीण झाली शक्ती ॥ मज गोपिका दांवीं बांधिती ॥ त्यांच्या निजप्रेमाचीं जाती ॥ मी स्वयें श्रीपती पोखित ॥ ८४ ॥ मी न लागतां कोणाची कवडी ॥ अर्जुनाचीं धूतसें घोडीं ॥ धर्माघरीं उच्छिष्टें काढीं ॥ मज आवडी प्रेमाची ॥ ८५ ॥ मज प्रेमाची अति आवडी ॥ ते लोकेषणा लाज दवडी ॥ महत्त्वाच्या +विसरवी कोडी ॥ त्यांच्या सेवेची गोडी मजलागीं ॥ ८६ ॥ सकळ अळंकार लेवऊनि माता ॥ निजपुत्र मस्तकीं लाडवितां ॥ त्याच्या कंटाळेना शुंकमुता ॥ तेवीं प्रेमळ सर्वथा मजलागीं ॥ ८७ ॥ ऐसा प्रेमाचेनि अतिपांगें ॥ म्यां पंगिस्त होइजे श्रीरंगें ॥ यालागीं मी तया पुढें मागें ॥ सदा सर्वांगें तिष्ठत ॥ ८८ ॥ उद्धवा यादव समस्त ॥ असतां माझें बहुत गोत ॥ ⁂तूंचि प्रियकर मज जो येथ ॥ माझें प्रेम अद्भुत ×तुजमाजीं ॥ ८९ ॥ हे ऐकोनि देवाची गोठी ॥ उद्धवें पायीं घातली मिठी ॥ देवो सुखावोनि पोटीं ॥ उठाउठीं आलिंगी ॥ ३९० ॥ हृदयीं हृदय झालें संलग्न ॥ देहीं देहा पडिलें आलिंगन ॥ मनोंसि एक झालें मन ॥ स्वानंद पूर्ण वोसंडे ॥ ९१ ॥ देवो विसरला देवपण ॥ भक्ता नाठवे भक्तपण ॥ दोघांचें उडालें दोनीपण ॥ 8स्वानंदीं पूर्ण बुडाले ॥ ९२ ॥ सेव्यसेवकता ०ठेली गोठी ॥ द्वैतभावाची 5खुंटली दृष्टी ॥ भक्तिसाम्राज्याच्या पाटीं ॥ दोघां झाली भेटी निजात्मता ॥ ९३ ॥ स्थूल लिंग आणि कारण ॥ 9इहीं उपलक्षिजे महाकारण ॥ ते देहचतुष्टयाची आठवण ॥ आठवितें कोण तेठायीं ॥ ९४ ॥ तेथ निबिड आणि निघोटें ॥ सुखस्वरूप 0घनदाट ॥ नाहीं आदि मध्य शेवट ॥ तें झालें प्रकट स्वयंभ ॥ ९५ ॥ नवल देवाचें पूर्णपण ॥ तेथही लाघव केलें जाण ॥ मोडों नेदीचि उद्धवपण ॥ ऐसा भक्त आन मज मिळेना ॥ ९६ ॥ उद्धवा ऐसा मजपाशीं ॥ कोण मिळेल आळोंचासी ॥ *माझें निज गोड कोणापाशीं ॥ म्यां सावकाशीं सांगावें ॥ ९७ ॥ मज निजधामा गेलिया जाण ॥ माझें जें निःसीम निजज्ञान ॥ त्यासि उद्धव शुद्ध सांठवण ॥ यालागीं उद्धवपण राखिलें ॥ ९८ ॥ उद्धव स्वानंदीं निमग्न ॥ त्यासि थापटूनि आपण ॥ सावध करी श्रीकृष्ण ॥ येरा भक्तपण आठवलें ॥ ९९ ॥ ह्मणे जयजय श्रीकृष्णनाथा ॥ जें सुख मज दाविलें आतां ॥ तेंचि निर्वाहे सर्वथा ॥ ऐशी कृपा तत्त्वतां करावी ॥ ४०० ॥ तंव श्रीकृष्ण ह्मणे उद्धवा ॥ हा माझा निजगुह्य गोप्य ठेवा ॥ तुज म्यां सांगीतला कणर्वा ॥ पुरुषार्थ पांचवा या नांव ॥ १ ॥ वेदशास्त्रां अगम्य ॥ सकळ देवांसि दुर्गम ॥ जेणें 7लाभें मी पुरुषोत्तम ॥ तें हें 2भक्तिप्रेमरहस्य ॥ २ ॥ मज वश्य करावयाचें वर्म ॥ पोटीं धरावें भक्तिप्रेम ॥ चहूं मुक्तींचा पडे भ्रम ॥ पुरुषार्थांचें काम वोसरे ॥ ३ ॥

---

१ त्रास. २ पाहुणचारास ३ पोषण करितों. ४ लौकिक. ५ पराधीन, ओशाळा. ६ आठवण करणारें. ७ परिपूर्ण. ८ निजगुज सांगण्यास. ९ राहील. १० कृपाळुपणानें. ११ संपे.

*ना. संकटें सोशी आंगें. +ना. विरवी. ⁂मो. परि तूंचि प्रियकर देव अत्यंत. ×मो. तुजलागीं. 8मो. स्वानंद पूर्ण वोसंडे. ०मो. गेली. 5मो. फिटली. 9मो. चौथें तें महाकारण. 0मो. घनवट. *मो. निजगुज कोणापाशीं. 7 ना. लुब्धें मी. 2ना. भक्तप्रेमरहस्य.

त्यासि माझी सप्रेमभक्ती॥त्याचेनि नांवें विघ्नें पळती॥मजवेगळी त्या अन्यथा गती॥ करावया शक्ति कोणाची ॥ ४ ॥ जयासि माझी अनन्यभक्ती ॥ तेथें माझी पूर्ण कृपास्थिती ॥ मद्भक्तां मजवेगळी गती ॥ कदा कल्पांतीं असेना ॥ ५ ॥ वेदविधीं करावया बाध ॥ तो *निःश्वसित माझा वेद ॥ जेथ माझा पूर्ण कृपाबोध ॥ तेथ विधिवाद बाधीना ॥ ६ ॥ जे कां माझे भक्त सकाम ॥ ते फळभोगां होऊनि निष्काम ॥ तेही ठाकिती माझें निजधाम ॥ भक्तां ×अन्य-गमन असेना ॥ ७ ॥ ज्यासि माझें अनन्य भजन ॥ स्वकर्म त्याचे सेवी चरण ॥ विधि वेद वोळगे अंगण ॥ त्यासि अन्यथागमन असेना ॥ ८ ॥ जेथ सप्रेम नाहीं माझी भक्ती ॥ तेथ कर्में अवश्य बाधिती ॥ कर्मास्तव अन्यथा गती ॥ अभक्त पावती उद्धवा ॥ ९ ॥ जेथ माझी साचार भक्ती ॥ तेथ कर्मांची +नचले गती ॥ मद्भक्तां माझी प्राप्ती ॥ सत्य निश्चितीं या हेतू ॥ ४१० ॥ भक्तांसि सर्वभूतीं मद्भावो ॥ तेथ कर्मबंधा कैंचा ठावो ॥ ⁂कर्मानुगती खुंटली पहाहो ॥ मत्प्राप्ति स्वयमेवो मद्भक्तां ॥ ११ ॥ भक्त पाऊल ठेवी अवनीं ॥ परी 'म्यां ठविलें' न धरी मनीं ॥ कर्ता भगवंत सत्य मानी ॥ यालागीं कर्मबंधनीं ०बांधवेना ॥ १२ ॥ भक्तांस नाहीं अन्यथा गती ॥ मद्भक्तां माझी अनन्यप्राप्ती ॥ त्या भक्तभावार्थाच्या युक्ती ॥ विशद श्रीपती स्वयें केल्या ॥ १३ ' न मे भक्तः प्रणश्यति ' ॥ हें बोलिला अर्जुनाप्रती ॥ तें साचार विरुद्ध श्रीपती ॥ तो भक्तां अनन्यगती घडोंचि नेदी ॥ १४ ॥ भक्तशापाची ऐकतां गोठी ॥ देव 7कैवारें सवेग उठी ॥ सुदर्शन लावूनि पाठीं ॥ केला हिंपुटी दुर्वासा ॥ १५ ॥ एका अंबरी-षाकारणें ॥ दहा गर्भवास सोशिले जेणें ॥ तो अनन्य भक्तांसि उणें ॥ कोण्याही गुणें येवों नेदी ॥ १६ ॥ भक्तकैवारी श्रीकृष्ण ॥ हे भावार्थाची निजखूण ॥ एका जनार्दना शरण ॥ भावो प्रमाण भक्तांसी ॥ १७ ॥ शुद्धभावेंवीण जे भक्ती ॥ तेचि दांभिक जाण निश्चितीं ॥ ते अपक्वचि राहे प्राप्ती ॥ जेवीं कांकडे जाती मुगाची ॥ १८ ॥ भक्तियोगस्य मद्गती ॥ हें मूळपदींची पद-स्थिती ॥ तेंचि तें वाढविलें किती ॥ ऐसें श्रोतीं न ह्मणावें ॥ १९ ॥ मद्गती या पदाची व्युत्पत्ती ॥ कोण आहे जाणे किती ॥ हें रहस्य जाणे विरळा क्षितीं ॥ यालागीं क्षमा श्रोतीं करावी ॥ ४२० ॥ होकां भक्ति माझी निजजननी ॥ ज्यां प्रेमपान्हां वाढवूनी ॥ सरता केलों भगवद्भज-नीं ॥ ते म्यां गौण महिमेंनी वानिली ॥ २१ ॥ भगवद्भक्तांचें महिमान ॥ मी केवीं जाणें 6अ-ज्ञान ॥ जें बोलिलों तें सर्वथा गौण ॥ क्षमा पूर्ण करावी ॥ २२ ॥ भक्ति माझी निजमाउली ॥ ते मी आपुल्या बोबडया बोलीं ॥ग्रंथाधारें गौरविली॥सप्रेमभुली 1भुलोनी॥२३॥प्रेमाची निजजाति कैशी ॥ आठवों नेदी आठवणेंसी ॥ एवं विसरवूनि हेतूसी ॥ भक्तिरहस्यासी बोलविलें ॥२४॥ जेवीं कां निजबाळकातें ॥ माउली बोल बोलवी त्यातें ॥ तेवीं भक्तीनें मज केलें येथें ॥ म्यां चुकी कोणातें ठेवावी ॥ २५ ॥ माउलीचें लोभाळूपण ॥ 2प्रकट करी तो मूर्ख जाण ॥ 8याहीपरी मी अज्ञान ॥ चुकलेपण दिसताहे ॥ २६ ॥ उडिदीं 3काळें जेथिच्या तेथें ॥ तेवीं चुकलेपण माझें येथें ॥ चुकीचि मानावी निश्चितें ॥ हेंही गुरुनाथें वारिलें ॥ २७ ॥ चुकलेपणचि मानितां ॥ मी होंपाहें

१ श्वासोच्छ्वासरूप. २ गर्वहीन, दीन. ३ कुचर, चहाड. ४ एकादा. ५ दोष.

*मो. निःश्वासी माझा. ×ना. अन्यगम्य असेना. +मो. नलगे. ⁂ना. कर्मगती. ०मो. बाधीना. 7मो. कैवारी. 6मो. आपण. 1मो. भुललों मी. 2मो. प्रकटकरी तों सुख जाण. 8मो. याहीवरी. 3मो. काळेपण.

कवि कर्ता ॥ मीपण नावडे गुरुनाथा ॥ तेणें तें तत्त्वतां सांडविलें ॥२८॥ सांग झालिया कथा कथन ॥ तेणें श्लाघे नेयावें मीपण ॥ तंव गुरूनीं दावूनि निजखूण ॥ मीतूंपण उडविलें ॥ २९ ॥ हेही बोल बोलता ॥ मी नव्हें नव्हें गा सर्वथा ॥ मी नव्हें कवि कर्ता ॥ हें गुरूचें तत्त्व गुरु जाणे ॥४३०॥ तंव श्रोते ह्मणती चमत्कार ॥ भक्तिसुखाचें सुखसार ॥ भक्ति परमामृतसागर ॥ उघड साचार तुवां केला ॥ ३१ ॥ भागवत मुख्य भक्तिप्रधान ॥ जे भक्तीचें सुख सनातन ॥ तें करतळामळ करूनि जाण ॥ तुवां परिपूर्ण दाविलें ॥ ३२ ॥ तुवां हा थोर केला उपकार ॥ तरावया स्त्रियादिशूद्र ॥ जग व्हावया भजनतत्पर ॥ भागवतनिजसार काढिलें ॥ ३३ ॥ भागवतींचें गुप्त पीयूख ॥ तें त्वां प्रकटिलें भक्तिसुख ॥ तेणें संत सुखावले देख ॥ श्रोते सकळिक निवाले ॥ ३४ ॥ तुज संतोषोनि श्रीपती ॥ दीधली आपली निजभक्ती ॥ यालागीं तुवां भक्तीची कीर्ती ॥ यथास्थितीं वर्णिली ॥३५॥ तुझे भक्तीचा एकेक बोल ॥ ब्रह्मसुखेंसि सखोल ॥ त्याहीमाजीं प्रेमाची वोल ॥ येताति डोल चित्सुखें ॥ ३६ ॥ तुज वाखाणितां निजभक्ती ॥ प्रेमें वोसंडे चित्तवृत्ती ॥ विसरोनियां ग्रंथस्फूर्ती ॥ भक्तीची कीर्ती वानिशी ॥३७॥ निज आवडी वाडेंकोडें ॥ वानितां भक्तीचे पवाडे ॥ तुज नाठवे मागें पुढें ॥ हें प्रेम गाढें जाणवलें ॥ ३८ ॥ जवजंव भक्तीचें निरूपण ॥ अधिकाधिक वाढतां जाण ॥ तंवतंव येतसे स्फुरण ॥ तेथ कोण पुरे ह्मणेल ॥ ३९ ॥ जंवजंव निरूपणाची वाढी ॥ तंवतंव भक्तीची अधिक गोडी ॥ तेणें श्रोत्यांची *आवडी ॥ चढोवढी वाढली ॥४४०॥ करितां भक्तिसुखनिरूपण ॥श्रोते वक्ते लांचावले जाण ॥ होतां अमृताची आरोगण ॥ पुरे कोण ह्मणोंशके ॥ ४१ ॥ यापरी गा अतिप्रीतीं ॥ वाढली निरूपणीं भक्ती ॥ ते आवरूनिया स्फूर्ती ॥ पुढील ग्रंथार्थीं ×प्रवर्त्त ॥४२॥ हें ऐकोनि संतवचन ॥ केलें साष्टांग नमन ॥ भली दीधली आठवण ॥ येरवीं निरूपण नावरतें ॥४३॥ भक्तियोगस्य मद्वृती ॥ये पदाची पदव्युत्पत्ती ॥ निरूपिली +भगवद्भक्ती ॥ जेणें भगवत्प्राप्ती सुलभ ॥ ४४ ॥ 4हे न करितां भगवद्भक्ती ॥ त्रिगुणगुणीं जीवपंक्ती ॥ बांधिल्या संसारीं उन्मज्जती ॥ हेही स्थिती हरि सांगे ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ मया कालात्मना धात्रा कर्मयुक्तमिदं जगत् ॥ गुणप्रवाह एतस्मिन्नुन्मज्जति निमज्जति ॥ १५ ॥

॥ टीका ॥ मुख्य मुळीं मी जगाचा धरिता ॥ स्रष्टृरूपें मीचि स्रजिता ॥ विष्णुरूपें मी प्रतिपाळिता ॥ मीचि संहर्त्ता रुद्ररूपें ॥४६॥ ⁂हे गुण काळाची काळसत्ता ॥ तो मी निजकाळ तत्त्वतां ॥ स्रजिता पाळिता संहर्त्ता ॥ गुणावस्थाविभागें ॥ ४७ ॥ जनांचें वासनाकर्म विचित्र ॥ तेंचि ०काळसत्ता निजसूत्र ॥ तेणें रचिला संसार ॥ चराचर गुणबद्ध ॥ ४८ ॥ गुणकर्मे स्वर्गा चढे ॥ गुणकर्मीं नरकीं ⁸पडे ॥ नानायोनींचें सांकडें ॥ भोगणें घडे गुणकर्में ॥ ४९ ॥ स्वर्ग भोगूनि वाडेंकोडें ॥ महर्जनतपोलोकांपुढें ॥ सत्यलोकवरी वरता चढे ॥ उन्मज्जन घडे या नांव ॥ ४५० ॥ पशुपक्षिस्थावरांत ॥ वृक्षपाषाणकृमित्व प्राप्त ॥ महानरकीं अधःपात ॥ निमं-

१ तळहातांतील आंवळ्याप्रमाणें सर्वांगानीं पूर्णपणें. ६९२ ओवी पहा. २ वृद्धि. ३ भोजन, मेजवानी. ४ उत्कृष्ट दशेला पोहोंचतों. ५ बुडणें.

*मो. अधिक आवडी. ×ना. प्रवेशे. +ना. मद्भक्ती. 4मो. करितां भगवद्भक्ती. ⁂मो. गुणाची काळसत्ता. ०मो. कुलाल सत्ता. ⁸मो. बुडे.

जन एथ या नांव ॥ ५१ ॥ उंचीं चढोनि नीचीं पडणें ॥ भोगवी नाना जन्ममरणें ॥ तें प्रकृति पुरुषांचें साजणें ॥ जीवबंधनें भोगवी ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ अणुर्बृहत्कृशः स्थूलो यो यो भावः प्रसिध्यति ॥ सर्वोऽप्युभयसंयुक्तः प्रकृत्या पुरुषेण च ॥ १६ ॥

॥ टीका ॥ अणु ह्मणिजे अतिसूक्ष्म सान ॥ बृहत् ह्मणिजे विशाळ जाण ॥ कृश ह्मणिजे किरकोळपण ॥ स्थूळ तें पूर्ण *जडावयवीं ॥५३॥ जें जें दृष्टिगोचर झालें॥ जेंजें नांवरूपा आलें ॥ तें तें +उभययोगें केलें ॥ जाण घडलें प्रकृतिपुरुषीं ॥ ५४ ॥ जें उभययोगसंभव ॥ जग ऐसें ज्याचें नांव ॥ तें ×प्रकृतिपुरुषें सावेव ॥ तिसरा भाव असेना ॥ ५५ ॥ या दोहींवेगळें निरवयवें ॥ जेथूनि या दोहींचा उद्भव ॥ तेचि ※सद्वस्तु सर्वी सर्व ॥ देवाधिदेव सांगत ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ यस्तु यस्यादिरंतश्च स वै मध्यं च तस्य सत् ॥ विकारो व्यवहारार्थो यथा तैजसपार्थिवाः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ प्रकृतिपुरुषेंसि साकार ॥ जें दिसताहे चराचर ॥ त्यासि आ[१]दीं अंतीं जें अनश्वर ॥ तेंचि साचार मध्येंही ॥ ५७ ॥ लेण्याआ[२]दीं कनक एक ॥ लेण्याअंतीं तेंचि अवश्यक ॥ मध्येंही लेणेंरूपें देख ॥ भासे कनक अद्वितीय ॥५८॥ न करितां मातीचें गोकुळ॥ पूर्वी मृत्तिकाचि केवळ ॥ गोकुळ मोडल्या सकळ ॥ उरे अविकळ मृत्तिका ॥ ५९ ॥ तेचि गोकुळरूपें असतां ॥ भासे मृत्तिकाचि तत्त्वतां ॥ तेवीं आदिमध्यअवसानता ॥ जें भासे चित्सत्ता अनश्वर ॥४६०॥ ²त्रिगुणगुणें सविकार॥ ⁰जें जें जग दिसताहे साकार ॥ तें मायिक गा ⁸चराचर॥ जेवीं व्यवहार स्वप्नींचा ॥ ६१ ॥ सकळविकारांचें कारण ॥ अंगें अविद्या आपण ॥ ⁹ते विकार सत्य स्थापितां जाण ॥ आलें सत्यपण अविद्येसी ॥ ६२ ॥ अविद्या आपुलेनि नांवें जाण ॥ आपुलें नास्तिक्य[४] सांगे आपण ॥ हें वर्म जाणती सज्ञान ॥ ⁵नेणोनि अज्ञान मानिती सत्य ॥ ६३ ॥ अविद्या अविद्यकत्वें मिथ्या जाण ॥ वस्तु वस्तुत्वें सदासंपन्न ॥ येचि अर्थीचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ यदुपादाय पूर्वस्तु भावो विकुरुते परम् ॥ आदिरंतो यदा यस्य तत्सत्यमभिधीयते ॥ १८ ॥

॥ टीका ॥ प्रकृति अंगीकारें देख ॥ वस्तु[५]पासाव होती लोक ॥ जेवीं निद्रायोगें एक ॥ होती अनेक जीव स्वप्नीं ॥ ६५ ॥ जेवीं तंतूपासाव कोटी पट ॥ कोटिपटीं तंतु एकट ॥ पाहतां आदि मध्य शेवट ॥ द्वैताचें बोट रिघेना ॥ ६६ ॥ तेवीं वस्तूपासोनियां लोक ॥ प्रकृतिपुरुषादि सकळिक ॥ आदिमध्य अवसानीं एक ॥ द्वैतवार्ता देख असेना ॥ ६७ ॥ तंतु सत्य, पट

---

१ निराकार. २ अलंकाराच्या पूर्वी. ३ विकाररहित, पूर्ण. ४ नाहींपणा, अभाव, या न विद्यते सा अविद्या. ५ ब्रह्मापासून.

*मो. जडत्वेंचि. +ना. उभय भोगें. ×मो. प्रकृति पुरुष. ※मो. चिद्वस्तु. ²मो. त्रिगुण गुणासी विकार. ⁰मो. जें जें दिसताहे. ⁸ना. साचार. ⁹ना. ते विकारी सत्यता स्थापितां ⁵मो. अज्ञान जाण मानिती.

मायिक ॥ वस्तु सत्य, अविद्या लैटिक ॥ जें आदिमध्यअवसानीं एक ॥ तें सत्य निष्टंक उद्धवा ॥ ६८ ॥ जेवीं कां काष्ठाची बाहुली ॥ काष्ठावयवें शोभे आली ॥ तेवीं वस्तु वस्तुत्वें एकली ॥ शोभा पावली जगत्त्वें ॥ ६९ ॥ जेवीं कां एकलें देह देख ॥ दिसे अवयवरूपीं अनेक ॥ तेवीं वस्तु एकली एक ॥ आभासे अनेकस्वरूपीं ॥ ४७० ॥ जेवीं कां जळीं क्रीडतां जळा ॥ उपजवी तरंगाच्या माळा ॥ तेवीं वस्तूचिया स्वलीळा ॥ जगदादिमेळा प्रकाशे ॥७१॥ तरंगा आदिमध्यअवसानीं ॥ जेवीं पाणीपणें असे पाणी॥तेवीं उत्पत्तिस्थितिनिदानीं ॥वस्तु वस्तुपणीं अनश्वर ॥ ७२ ॥ ' ब्रह्म सत्य व प्रपंच वावो ' ॥ हा साधकां साधावया निर्वाहो ॥ कार्यकारण अभिन्नभावो ॥ देवादिदेवो बोलिला ॥७३॥ कार्य कारणीं अभिन्न॥ तैं ब्रह्मीं माया कैंची भिन्न ॥ जगद्रूपें ब्रह्म परिपूर्ण ॥ अन्योपदेशें जाण दाविलें ॥ ७४ ॥ ब्रह्म माया काळगती ॥ यें तिन्ही अनादि ह्मणती ॥ तेही न घडे उपपत्ती ॥ येचि अर्थीं हरि बोले ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ प्रकृतिर्ह्यस्योपादानमाधारः पुरुषः परः ॥ सतोऽभिव्यंजकः कालो ब्रह्म तत् त्रितयं त्वहम् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ ब्रह्मावेगळी माया ॥ सर्वथा नये आया ॥ ते ब्रह्माधारें वाढोनियां ॥ गुणकार्या दावी ॥ ७६ ॥ मायानियंतें ब्रह्म आपण ॥ यालागीं यासि पुरुषपण ॥ पुरुषाची प्रिया माया पूर्ण ॥ *प्रकृति अभिधान याहेतू॥७७॥ब्रह्माहून पुरुष भिन्न॥हे सर्वथा मिथ्या वचन॥ब्रह्मपुरुष नामाभिधान ॥ एकासीचि जाण आलें असे ॥ ७८ ॥ मायाप्रकृति अभिधान ॥ दोहीं नांवीं मायाचि पूर्ण ॥ आविद्यक दावी +कार्य भिन्न ॥ अविद्या जाण याहेतू ॥ ७९ ॥ माया ब्रह्मींची शक्ति जाण ॥ तेचि ब्रह्मेंसी असे अभिन्न ॥ वेगळी नव्हे अर्धक्षण ॥ सदा सुलीन ब्रह्मेंसी ४८० जेवीं शूरांची शौर्यशक्ति पूर्ण ॥ शूरांहोनि नव्हे भिन्न ॥ तेवीं ब्रह्मीं मायाशक्ति जाण ॥ ब्रह्मीं सुलीन सर्वदा ॥ ८१ ॥ माया ꙮब्रह्म असतां जाण ॥ क्षोभेंवीण नव्हे सर्जन ॥ मायाक्षोभक काळ पूर्ण ॥ काळास्तव जन जन्मती ॥ ८२ ॥ ब्रह्मींची सत्ता तो काळ जाण ॥ प्रकृति क्षोभवूनि आपण ॥ दावी उत्पत्तिस्थितिनिधन ॥ तो काळही अभिन्न ब्रह्मेंसी ॥ ८३ ॥ जेवीं रायाच्या राजपुत्राशीं ॥ राजाचि दमूं शके त्यासी ॥ तेवीं झालें जें प्रकृतीचे कुशीं ॥ तें निजसत्तेंसी निर्दळी ॥ ८४ ॥ विवेकदृष्टीं पाहतां जाण ॥ काळ परमात्मा दोन्ही अभिन्न ॥ प्रकृति पुरुष काळ जाण ॥ तिहींसी एकपण याहेतू ॥ ८५ ॥ ब्रह्म माया काळसंबंध ॥ हे तिनी मुळींचि अभेद ॥ दिसे जो व्यावहारिक भेद ॥ ०तोही अभेद मिथ्यात्वें ॥ ८६ ॥ वस्तु एकलीचि आपण ॥ प्रकृतिपुरुषें काळरूपें जाण ॥ अखंडत्वें दावितां पूर्ण ॥ तो मी श्रीकृष्ण परमात्मा ॥ ८७ ॥ उत्पत्तिपूर्वीं मी ब्रह्म पूर्ण ॥ उत्पत्तीचें ×मी ब्रह्म आदिकारण ॥ स्थितिकाळीं मी ब्रह्मरूपें जाण ॥ एकीं अनेकपण स्वलीलां दावीं ॥ ८८ ॥ स्वलीला *सृष्टीचे प्रांतीं जाण॥ प्रळयीं उरें मी ब्रह्म परिपूर्ण ॥ तेचि अर्थींचें निरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ८९ ॥

---

१ खोटी, मिथ्या. २ तिला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. ३ नांव. ४ प्रेरणेवांचून. ५ आवरूं. ६ विचारदृष्टीनें. ७ शेवटीं.

*मो. प्रकृती अभिन्न या हेतु. +ना. कर्म भिन्न. ꙮना. ब्रह्मीं असतां. ०मो. तोही अंत मिथ्यत्वें. ×ना. मी जन्मकारण. *मो. सृष्टीची प्राप्ती जाण.

॥ श्लोक ॥ सर्गः प्रवर्त्तते तावत्पौर्वापर्येण नित्यशः ॥ महान् गुणविसर्गार्थः स्थित्यंतो यावदीक्षणम् ॥ २० ॥

॥ टीका ॥ महान् म्हणिजे अतिघोर ॥ पितृपुत्रप्रवाहें संसार ॥ अविच्छिन्न निरंतर ॥ अतिदुर्धर वाढला ॥ ४९० ॥ अतिशयेंसि दुर्धर ॥ कैसेनि वाढला संसार ॥ तेही अर्थींचा विचार ॥ सारंगधर सांगत ॥ ९१ ॥ विषयांचिये आसक्ती ॥ वासनानिष्ठ झाली वृत्ती ॥ ते *देहात्मता अति प्रीतीं ॥ संसारस्थिती +वाढवी ॥९२॥ खवळला जो देहाभिमान ॥ तो शुद्धासि ×लवी जीवपण ॥ नानायोनीं जन्ममरण ॥ विशेषें जाण वाढवी ॥ ९३ ॥ ऐसेन जनीं अतिदुर्धर ॥ स्रष्टेन सृजिला संसार ॥ तो ब्रह्मायुपर्यंत ꙳स्थिर ॥ ब्रह्मप्रळयीं संहार सृष्टीचा ॥ ९४ ॥ एक नित्यप्रळय लागला आहे ॥ एक दैनंदिन प्रळयो पाहे ॥ एक कर्मजन्य प्रळयो आहे ॥ एक तो होये ०अवांतर प्रळयो ॥ ९५ ॥ सकळ प्रळयांच्या शिरीं ॥ ब्रह्मप्रळयाची थोरी ॥ तो सकळसृष्टीतें संहारी ॥ कांहीं संसारीं उरोंनेदी ॥ ९६ ॥ ब्रह्मप्रळयीं नाश सृष्टीसी ॥ पुढती रचावया कल्पादीसी ॥ उंच नीच नाना योनींसी ॥ नव्या करावयासी कारण काय ॥ ९७ ॥ ब्रह्मप्रळयीं सृष्टीचा हरास ॥ परी निःशेष नव्हेचि नाश ॥ उरे वासनाबीजविलास ॥ सुलीन रहिवास अविद्येअंगीं ॥ ९८ ॥ तेंचि बीजें कल्पादि जाण ॥ मीचि स्वरूपें आपण ॥ मज म्यां अनुग्रहूनि पूर्ण ॥ सूक्ष्म कारण लक्षविलें ॥ ९९ ॥ जेवीं वर्षाकाळीं नानातृण ॥ वाढूनि शरत्काळीं होती पूर्ण ॥ तेच उष्णकाळीं बीजकण ॥ होती सुलीनें पृथ्वीसी ॥ ५०० ॥ सुलीन बीजें पूर्ण क्षितीं ॥ परी तीं कोणा व्यक्ती न येती ॥ तेवीं वासनाबीजें प्रळयांतीं ॥ उरे अव्यक्तीं संसारु ॥ १ ॥ जेवीं काळीं वरुपलेनि घनें ॥ बीजें विरूढती सत्राणें ॥ वाढती नानाजाति तृणें ॥ पूर्वलक्षणें यथास्थित ॥ २ ॥ तेवीं उत्पत्तिकाळावरी ॥ सूक्ष्मवासना बीजांकुरीं ॥ नानायोनी चराचरीं ॥ जंगमस्थावरीं जग वाढे ॥ ३ ॥ ब्रह्मयाचे प्रळयाअंतू ॥ निःशेष सृष्टीचा नव्हे अंतू ॥ यालागीं संसारीं अनंतू ॥ वेदशास्त्रार्थू प्रतिपादी ॥ ४ ॥ ऐसा संसार अनंतू ॥ याचा निःशेष होय अंतू ॥ तेचि अर्थीं श्रीकृष्णनाथू ॥ श्लोकींचा पदार्थू बोलिला ॥ ५ ॥ ' स्थित्यंतो यावदीक्षणम् ' ॥ येणें पदें श्रीकृष्ण ॥ अत्यंत प्रळयींचें लक्षण ॥ सूत्रप्राय जाण बोलिला ॥ ६ ॥ ' ईक्षण ' या पदाचा अर्थ जाण ॥ सद्गुरुकृपादृष्टि पूर्ण ॥ तेंचि माझें कृपावलोकन ॥ जेणें ब्रह्मज्ञान प्रकाशे ॥ ७ ॥ पूर्ण प्रकाशल्या ब्रह्मज्ञान ॥ संसार झाला नाहींचि जाण ॥ वस्तु वस्तुत्वें परिपूर्ण ॥ मीतूंपण असेना ॥ ८ ॥ तेथ ध्रुवमंडळाची ठेली मात ॥ वैकुंठकैलासां झाला प्रांत ॥ शेषशायीचाही अंत ॥ ब्रह्मज्ञानांत हो सरला ॥ ९ ॥ हारपलें मीतूंपण ॥ उडालें *देवभक्तभजन ॥ बुडालें 5आकारतेचें भान ॥ ब्रह्म सनातन सदोदित ॥५१०॥ प्रपंच एक झाला होता ॥ हे समूळ मिथ्या वार्ता ॥ पुढें होईल मागुता ॥ कदा कल्पांता घडेना ॥ ११ ॥ हें अत्यंतप्रळयाचें लक्षण ॥ भाग्येंवीण न पाविजे

१ अखंड. २ ब्रह्मयानें. ३ न्हास. ४ अतिसूक्ष्मस्वरूपानें. ५ स्पष्टतेस. ६ मोठ्या जोरानें. ७थोडक्यांत, अतिसंक्षेपानें.

*मो. देहात्म अति प्रीती. +ना. वाढली. ×ना. आणी. ꙳मो. विस्तार. ०मो. अंतर प्रळयो. *मो. देवभक्त जाण. 5ना. संसारतेचें.

जाण ॥ ज्यांसि साचार सद्गुरूचें भजन ॥ ते सभाग्य जन पावती ॥ १२ ॥ अत्यंतप्रळयाची प्राप्ती ॥ न घडे गा समस्तांप्रती ॥ हे परमनिर्वाणगती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १३ ॥ ज्याची अहंममता खुंटे ॥ ज्याची निःशेष कल्पना तुटे ॥ अत्यंत प्रळयो त्यासीच भेटे ॥ *नेटेंपाटें निजात्मता ॥ १४ ॥ देह पडलिया प्रळयो घडे ॥ हें बोलणें सर्वथा कुडें ॥ जितांचि हा प्रळयो जोडे ॥ वाडेंकोडें निजनिष्ठा ॥ १५ ॥ जितांचि हा प्रळयो जाण ॥ येणें संसारबीजदहन ॥ आतां ब्रह्मप्रळय लक्षण ॥ ऐक संपूर्ण सांगेन ॥१६॥ +ब्रह्मांडप्रळयाचा अनुक्रम ॥ तेथ अंतीं उरे पूर्ण ब्रह्म ॥ हें उद्धवें जाणावया वर्म ॥ पुरुषोत्तम बोलत ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ विराण्मयाऽऽसाद्यमानो लोककल्पविकल्पकः ॥ पंचत्वायविशेषाय कल्पते भुवनैः सह ॥ २१ ॥

॥ टीका ॥ चतुर्दशभुवनेंसि ब्रह्मांड ॥ काळें कल्पिलें प्रचंड ॥ तें स्थितिकाळीं पाळूनि अंड ॥ अंतीं नाशाचें बंड आदरी काळ ॥ १८ ॥ तो तूं काळ ह्मणशी कोण ॥ तरी काळात्मा तो मीचि जाण ॥ तेणें काळें म्यां [१]प्रळयईक्षण ॥ केलें जाण सृष्टीसी ॥ १९ ॥ पंचभूतांचे भिन्न भाग ॥ काळसत्ता राखिले विभाग ॥ ते सत्ता म्यां आवरितां सांग ॥ खवळे लगबग पंचत्वासी ॥ २० ॥ जैसा उत्पत्तीचा अनुक्रम ॥ तैसाचि प्रळयाचा उपक्रम ॥ भूतीं भूतलयो सुगम ॥ पुरुषोत्तम सांगत ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ अन्ने प्रलीयते मर्त्यमन्नं धानासु लीयते ॥ धाना भूमौ प्रलीयंते भूमिर्गंधे प्रलीयते ॥ २२ ॥

॥ टीका ॥ म्यां पाहिल्या प्रळयदृष्टीं ॥ पडोनि ठाके अनावृष्टी ॥ तेणें ※अन्न क्षीण होय सृष्टीं ॥ अन्नासाठीं, शरीरें ॥ २२ ॥ येथें अन्नमय प्राण ॥ हें वचन प्रत्यक्ष प्रमाण ॥ तें अन्न होतांचि क्षीण ॥ अन्नासवें प्राण प्राण्यांचे जाती ॥२३॥ ×अन्नवृद्धि खुंटल्या धान्य॥ बीजमात्र राहे आपण ॥ तेंही पृथ्वीसी होय लीन ॥ तत्काळ जाण उद्धवा ॥ २४ ॥ तंव द्वादशादित्यांचा मेळा ॥ एकत्र होय रविमंडळा ॥ तो पीठ करी पर्वतशिळा ॥ तृणशिळा उरोंनेदी ॥२५॥ तेणें तापलें सप्तपाताळ ॥ पोळलें शेषाचें कपाळ ॥ तो वमी विषाग्निकल्लोळ ॥ महाज्वाळ धडधडीत ॥ २६ ॥ तो संकर्षणमुखानळ ॥ पार्थिव जाळी सकळ ॥ ब्रह्मांड जाळोनि तत्काळ ॥ पृथ्वी केवळ भस्म करी ॥ २७ ॥ तेव्हां पृथ्वीचें पृथ्वीपण सरे ॥ तें गंधमात्रें स्वरूपें उरे ॥ तोही गंध जळीं विरे ॥ तेंचि सारंगधरें सांगिजे ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ अप्सु प्रलीयते गंध आपश्च स्वगुणे रसे ॥ लीयते ज्योतिषि रसो ज्योती रूपे प्रलीयते ॥ २३

१ निश्चयेंकरून. २ संहार करण्याच्या इच्छेनें अवलोकन. ३ चूर्ण, भस्म. ४ दर्भ वगैरेस. ५ पृथ्वीचा विकार.

*मो. नेटें बोटें. +मो. ब्रह्मप्रळयाचा. ※ना. अन्नेंवीण होय. ×ना. अन्नदृष्टी खंडल्या धान्य.

॥ टीका ॥ तेव्हां प्रळयमेघांचा मेळा ॥ शुंडादंड धारा प्रबळा ॥ शतवरुषें वर्षतां जळा ॥ सप्तसमुद्रमेळा एकत्र जाहला ॥ २९ ॥ तेणें जळ कोंडलें सुबद्ध ॥ ते जळीं पृथ्वीचा विरे गंध ॥ तेव्हां जळचि एकवद ॥ प्रळयीं प्रसिद्ध उथलें पैं ॥ १३० ॥ सांवर्तकमेघांचें लक्षण ॥ सिंधु एकत्र करी पूर्ण ॥ पृथ्वी विरवूनियां जाण ॥ ते जळीं आपण विरोनि जाती ॥ ३१ ॥ ते काळीं अतिदुर्धर ॥ सांवर्ताग्नी खवळे थोर ॥ तो जळ शोषी सर्वत्र ॥ उरे रसमात्र अवशेष ॥ ३२ ॥ रसमात्र जळ उरे तेंही ॥ लीन होय तेजाचे ठायीं ॥ तेव्हां तेजचि दिशा दाहीं ॥ कोंदोनि पाहीं बोसंडे ॥ ३३ ॥ सांवर्ताग्नीची मातू ॥ जळ शोषूनि राहे निवांतू ॥ जाळिती शक्ति स्वयें जाळितू ॥ या नांव निश्चितू सांवर्तकाग्नी ॥ ३४ ॥ तेणेंचि काळें झंझामारुत ॥ उठी तेजातें शोषित ॥ तें तेज शोषितां समस्त ॥ उरे तेथ रूप मात्र ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ रूपं वायौ स च स्पर्शो लीयते सोऽपि चांबरे ॥ अंबरं शब्दतन्मात्र इंद्रियाणि स्वयोनिपु ॥ २४ ॥

॥ टीका ॥ तेजाचें जें उरे रूप ॥ तें वायु शोषूनि करी अरूप ॥ तेव्हां वायुचि एकरूप ॥ अति अमूप कोंदाटे ॥ ३६ ॥ कोंदाटल्या वायूसी ॥ गगन जेथिचें तेथें ग्रासी ॥ तेव्हां वायू प्रवेशे स्पर्शी ॥ तो उरे अवशेषीं *स्पर्शमात्र ॥ ३७ ॥ उरल्या वायूच्या स्पर्शासीं ॥ लयो तत्काळ होय आकाशीं ॥ आकाश प्रवेशे शब्दासी ॥ उरे अवशेषीं शब्दतन्मात्र ॥ ३८ ॥ ‘ दशेंद्रियांची मंडळी ॥ राजसापासोनि जन्मली ॥ ते निजगुणीं सामावली ॥ जेवीं पंचांगुळी मुष्टीमाजीं ’ ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ योनिर्वैकारिके सौम्य लीयते मनसीश्वरे ॥ शब्दो भूतादिमप्येति भूतादिर्महति प्रभुः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ वैकारिक जो सत्वगुण ॥ त्याला देवता अंतःकरणें ॥ तो ×प्रळयस्वभावें आपण ॥ मनामाजीं जाण प्रवेशे ॥ १४० ॥ सकळ इंद्रियांचा राजा मन ॥ मनःकल्पना जीवशिवपण ॥ श्लोकपदें मनसा ईश्वर पूर्ण ॥ ‡मनाशींच जाण हरि बोले ॥४१॥मनोदेवता अंतःकरण ॥ घेऊनि प्रवेशे सत्वगुण ॥ ज्या कार्याचें जें कारण ॥ तेथ तीं जाण प्रवेशती ॥ ४२ ॥ शब्दतन्मात्र उरलें आधीं ॥ तें मीनलें तामसामधीं ॥ कारणीं कार्यासि अंवधी ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ४३ ॥ त्रिविध गुणी अहंकारू ॥ एकवटला महाथोरू ॥ ऐक त्याचा बडिवारू ॥ तोचि दुर्धरू संसारीं ॥ ४४ ॥ जो शिवातें महत्त्वा चढवी ॥ जीवातें देहात्मता गोवी ॥ अहंममता जग भुलवी ॥ प्रभुत्वपदवी महत्त्वें येणें ॥४५॥ अहंकारू ऐसा आहे ॥ तो जें परमार्थी साह्य होये ॥ तें सोऽहंभावाचेनि लवलाहें ॥ विभांडी पाहे संसारू ॥४६॥ चोर जें विश्वासु मित्र होये ॥ तें चोर चोरां निवारी पाहे ॥ तेवीं अभिमानु जें साह्य होये ॥ तें भवभय बाधीना ॥ ४७ ॥ याहीपरी अभिमान ॥ सामर्थ्यें अतिगहन ॥ यालागीं प्रभुत्वें जाण ॥ केलें व्याख्यान उद्धवा

१ प्रलयकालीच्या मेघांचे २ प्रलयाग्नि. ३ मोठा सोंसाट्याचा वायु. ४ समाप्ति. ५ दुसऱ्या चोरास.

*ना. शेषमात्र. ×ना. ती प्रळयीं संभवे आपण ॥ मनामाजीं जाण प्रवेशली ॥ ‡ना. मनसाचि.

॥ ४८ ॥*त्रिगुणगुणीं गुणाभिमान ॥ एकत्र होऊनियां पूर्ण ॥ महत्तत्त्वीं होय लीन ॥ अति-सुलीन तद्रूपें ॥४९ ॥

॥ श्लोक ॥ स लीयते महान्स्वेषु गुणेषु गुणवत्तमः ॥ तेऽव्यक्ते संप्रलीयंते तत्काले लीयतेऽव्यये ॥ २६ ॥

॥ टीका ॥ तेंही महत्तत्त्व येथ ॥ कारणगुणीं लीन होत ॥ तेंही गुणसाम्यें निश्चित ॥ पावत लया अव्यक्तीं ॥ ५५० ॥ आकार विकार समस्त ॥ हारपोनि जाती जेथ ॥ उरे बीजमात्र अवशेषित ॥ त्या नांव अव्यक्त बोलिजे ॥ ५१ ॥ वटाचा आकार विकार ॥ नसे डाळ मूळ पुष्प पत्र ॥ उरे अवशेष बीजमात्र ॥ तेवीं संसार अव्यक्तीं ॥ ५२ ॥ वटवीज उरलें येथ ॥ तें दृष्टीसि तर्केना निश्चित ॥ तेवीं भवबीज जें अव्यक्त ॥ तें नव्हे व्यक्त ×जीवासी ॥ ५३ ॥ नाना तृणजातिबीजगहन ॥ उष्णकाळीं काळ करी लीन ॥ तेवीं भवबीज अव्यक्त जाण ॥ होय सुलीन काळेंसी ॥ ५४ ॥ पूर्वीं काळें क्षोभोनि अव्यक्त ॥ जगदाकारें केलें व्यक्त ॥ तेंचि काळयोगें अव्यक्त ॥ सुलीन होत काळेंसी ॥ ५५ ॥ या नांव अव्यक्ताचा पहाहो ॥ काळामाजीं बोलती लयो ॥ काळ बोलिजे महाबाहो ॥ त्याचा होय ꣾलयो पुरुषेंसी ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ कालो मायामये जीवे जीव आत्मनि मय्यजे ॥ आत्मा केवल आत्मस्थो विकल्पापायलक्षणः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ पुरुषाची पूर्ण क्षोभकता ॥ तोचि काळ बोलिजे तत्त्वतां ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयांता ॥ तिनी अवस्था काळाच्या ॥ ५७ ॥ तिनी अवस्था लोटल्या ठायीं ॥ काळासि कर्त्तव्यता नाहीं ॥ तो उपरत व्यापारें पाहीं ॥ जीवाचेठायीं सामावे ॥५८॥ अचेतना चेतविता ॥ जडातें जो जीवविता ॥ यालागीं जीव ऐशी वार्ता ॥ जाण तत्त्वतां पुरुषासी ॥५९॥ प्रकृतीचेनि योगें जाण ॥ शुद्धासि बोलिले जें जीवपण ॥ पुरुष ०हेंही अभिधान ॥ त्यासीच जाण बोलिजे ॥ ५६० ॥ करितां प्रकृतिविवेचन ॥ केवळ मृगजळासमान ॥ दिसे परी साचारपण ॥ सर्वथा जाण असेना ॥ ६१ ॥ या मृगजळामाजीं जो पडे ॥ तेथ जळ नाहीं मा कोठें बुडे ॥ तेवीं प्रकृति नसतां जोडे ॥ वाडेंकोडें जीवत्व +कोणा ॥ ६२ ॥ जळीं बुडालें दिसे व्योम ॥ सत्य मानणें तो मूर्खधर्म ॥ तैसें रूप नाम गुण कर्म ॥ हा मिथ्या भ्रम मायिक ॥६३॥ प्रकृतिकाळींही जाण ॥ सत्य नाहीं जीवपण ॥ तेहीअर्थींची निजखूण ॥ उद्धवा संपूर्ण अवधारीं ॥ ६४ ॥ स्वयें अवलोकितां दर्पण ॥ दर्पणामाजीं दिसे आपण ॥ तरी आपुलें वेगळेपण ॥ स्वयें आपण जाणिजे ॥ ६५ ॥ तेवीं प्रकृति कर्म करितां ॥ जरी दिसे प्रकृती आंतौता ॥ तरी मी प्रकृतीपरता ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥ ६६ ॥ दिसे व्योम जळीं बुडालें ॥ परी तें नाहीं वोलें झालें ॥ तेवीं प्रकृतिकर्म म्यां केलें ॥ ꣾनाहीं माखलें ममांग ॥ ६७ ॥ यापरी करितां निर्वाहो ॥ प्रकृतीचा झाला अभावो ॥ तेव्हां जीवशिवनांवें वावो ॥ जीव तोचि पहाहो परमात्मा ॥६८॥

१ प्रकृतींत. २ बाकी. ३ दिसेना, कल्पना करितां येईना. ४ नांव, संज्ञा. ५ प्राप्त होई. ६ आकाश. ७ आरसा. ८ निश्चय, समज.

*मो. त्रिगुणी गुणाभिमान. ×मो. जिवशिवांसी. ꣾना. काळ बोलिला जो महाबाहो, त्याचा होय व्ययो पुरुषेंसी. ०मो. देहीं. +ना. कोण. ꣾना. नाहीं लिंपिलें ममांगा.

जीवाचें गेलिया जीवपण ॥ सहजेंचि उडे शिवपण ॥ दोघे आत्मत्वें जाण ॥ होती परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ६९॥ जीवासि निजस्वरूप आठवो॥ *यानांव जीवाचा परब्रह्मीं लयो ॥ परमात्मा अज अव्ययो ॥ अविनाश अद्वयो अनंत ॥ ५७० ॥ ब्रह्मीं स्फुरेना ब्रह्मपण ॥ तेथ मी तूं ह्मणे कोण ॥ परमानंद परिपूर्ण ॥ उरे जाण उद्धवा ॥ ७१ ॥ +ऐसा परमानंद ह्मणसी कोण ॥ तो मी अज अव्यय श्रीकृष्ण ॥ ×आनंदस्वरूप तो मी जाण ॥मजवेगळें ०स्थान असेना ॥ ७२ ॥ 6ज्या स्वानंदा नांव श्रीकृष्ण ॥ तें तुझें स्वरूप उद्धवा जाण ॥ तेथ नाहीं गा मीतूंपण ॥ परम कारण उर्वरित ॥ ७३ ॥ उद्धवा जीवाचा जीव मी श्रीकृष्ण ॥ मज तुज नाहीं वेगळेपण ॥ यालागीं जीवींची हे निजखूण ॥ परमकारण सांगीतलें ॥७४॥ जगाचा आत्मा मी श्रीकृष्ण ॥ त्या माझा आत्मा उद्धव पूर्ण ॥ हें ऐकोनि श्रीकृष्णवचन ॥ उद्धव जाण गजबजिला ॥ ७५ ॥ कृष्ण मज ह्मणे आपुला आत्मा ॥ परी मी नेणें कृष्णमहिमा ॥ अगाध लीला पुरुषोत्तमा ॥ तो ※केवीं आत्मा आकळे ॥७६॥ नाथिलेंचि उद्धवपण ॥ माझ्या अंगीं जडलें जाण ॥ कृष्ण विवेकें पाहतां पूर्ण ॥ माझें मीपण दिसेना ॥ ७७ ॥ मज उद्धवपण सांडितां ॥ कृष्ण निजधामा जाईल तत्त्वतां ॥ ते न साहवे अवस्था ॥ 1सखेदता सप्रेम ॥ ७८ ॥ हे उद्धवाची अवस्था ॥ कळोंसरली श्रीकृष्णनाथा ॥ तेचि अर्थीची कथा यथार्थता निरूपी ॥ ७९ ॥

॥ श्लोक ॥ एवमन्वीक्षमाणस्य कथं वैकल्पिको भ्रमः ॥ मनसो हृदि तिष्ठेत व्योम्नीवाऽर्कोदये तमः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ प्रकृतिपुरुष विवंचना ॥ आदि मध्य अवसाना ॥ तुज म्यां दाविलें एकपणा ॥ तेथ कां भिन्नपणा कल्पिसी वायां ॥ ५८० ॥ उत्पत्तिआदि ब्रह्म पूर्ण ॥ उत्पत्तीसी तेंचि कारण ॥ जग जन्मलें जें सगुण ॥ तेंही ब्रह्मरूपें जाण दाविलें तुज ॥ ८१ ॥ आणि प्रळयाच्या अंतीं ॥ ब्रह्मचि उरे निजस्थितीं ॥ तेही विश्वींची प्रतीती ॥ तुज म्यां निश्चितीं दाविली ॥ ८२ ॥ 8प्रकृतीहूनि पुरुष भिन्न ॥ प्रकृति स्वतंत्रें मिथ्या जाण ॥ ऐसें प्रकृतिपुरुषें ज्यासि ज्ञान ॥ त्यासि मीतूंपण भासेना ॥८३॥ जेथ नाहीं मीतूंपण ॥ तेथ विकल्प करवी कोण ॥ आदीअंतीं वस्तु परिपूर्ण॥हें 7विवेकज्ञान जयासी॥८४॥ 3जो विवेकी पुरुषप्रकृती॥सांख्य जागे ज्याचे चित्तीं॥ त्यासि विकल्पाची प्राप्ती ॥ नव्हे कल्पांतीं उद्धवा ॥८५॥ सांख्यविवेकगभस्ती ॥ पूर्ण उगवला ज्याचे चित्तीं ॥ तेथ विकल्पाची अंधारी राती ॥ कैसा रीतीं उरेल? ॥ ८६ ॥ ज्यासि 0पठुतर सांख्यज्ञान ॥ 9विकल्प विसरे त्याचें मन ॥ हृदयीं उगवे 5चिद्धान ॥ अज्ञान निशा पूर्ण निरसली ॥ ८७ ॥ जेथ निरसलें अज्ञान ॥ तेथ विकल्पाचें कैंचें स्थान ॥ यापरी सांख्यज्ञान॥ साधकां पूर्ण उपकारी ॥ ८८ ॥ जें साराचें निजसार ॥ जें गुह्यज्ञानभांडार ॥ जें कां विवेकरत्नाकर ॥ तें सांख्य साचार उद्धवा ॥ ८९ ॥

---

१ बाकी, शेष. २ गोंधळला. ३ नसतेंच, खोटें. ४ पुरुषप्रकृतीच्या ज्यास विवेक आहे. ५ ज्याच्या चित्तांत सांख्य शास्त्राचा पुरुष प्रकृति विवेक जागृत आहे. ६ सांख्यशास्त्रांतील विचार हाच कोणीएक सूर्य. ७ विवेकाचा समुद्र.

*ना. या लागीं जीवाचा. +मो. अनादित्वें परिपूर्ण. ×मो. अनंत रूपें तो मी जाण. ०मो. जाण असेना. 6मो. जो मी स्वानंद श्रीकृष्ण. ※ना. तो केवीं आम्हा आकळे. 1ना. सुख देता सप्रेम. 8मो. प्रकृति पुरुष अभिन्न. 7ना. विशेष ज्ञान. 3मो. जे विवेकी प्रकृति स्थिती. 0मो. पाठांतर सांख्यज्ञान. 9मो. विकल्पेंसी विरे त्याचें. 5मो. चिद्घन.

॥ श्लोक ॥ एष सांख्यविधिः प्रोक्तः संशयग्रंथिभेदनः ॥ प्रतिलोमानुलोमाभ्यां परावरदृशा मया ॥ २९ ॥ इति श्रीमद्भागवते एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे चतुर्विंशोऽध्यायः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ मी विवेकाचा विवेक ॥ मी अर्कांचा आदि अर्क ॥ मी ज्ञानियांचा ज्ञानतिलक ॥ *त्या माझा परिपाक तें हें सांख्य ॥५९०॥ ※मी वेदांचा आदिवेद ॥मी बोधाचा आदिबोध॥ मी आनंदाचा निजानंद ॥ त्या माझा प्रबोध तें हें सांख्य ॥ ९१ ॥ तेणें म्यां सर्वज्ञें श्रीकृष्णें ॥ निर्धारोनि निजज्ञानें ॥ सांख्ययोगउपलक्षणें ॥ ब्रह्म अव्ययपणें दाखविलें ॥ ९१ ॥ जैसा गरगरीत वाटोळा ॥ करतळीं दिसे आंवळा ॥तेवीं सांख्ययोगलीळा ॥ब्रह्म तुज ×डोळां दाविलें ॥ ९२ ॥ जो ब्रह्म डोळां देखों जाये ॥ तो सर्वांगें देखणों होये ॥ ऐशी सांख्यज्ञाननिजसोये ॥ तुज म्यां पाहे दाविली ॥ ९३ ॥ हा सांख्ययोग अनुक्रम ॥ अन्वयव्यतिरेकउपक्रम ॥ आलोडितां आकळे वर्म ॥ अखंड ब्रह्म अद्वयें ॥ ९४ ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयांत ॥ ब्रह्म अखंड निज नित्य ॥ हेंचि सांख्ययोग प्राप्त ॥ जाण निश्चित साधकां ॥ ९५ ॥ ज्यासि ब्रह्मज्ञानाचें कोडें ॥ ते ०सांख्ययोग पुरवी चाड ॥ लिंगदेहाचें सदृढ झाड ॥ त्याचें समूळ बूड उन्मळी ॥ ९६ ॥ लिंगदेह अत्यंत कठिण ॥ तें सांख्ययोगापुढें जाण ॥ जेवीं अग्नीमाजीं तृण ॥ तेवीं होय संपूर्ण भस्मांत ॥ ९७ ॥ लिंगदेह सैंधवगिरिवर ॥ सांख्य अत्यंत प्रळयसागर ॥ खवळला विरवूनि करी नीरें ॥ एकाकार निजात्मता ॥ ९८ ॥ खवळल्या अत्यंत चित्सागरा ॥ नानासंशयजळगारा ॥ उरावया नाहीं थारा ॥ निजनिर्धारा उद्धवा ॥ ९९ ॥ सकळ संशयांचें छेदन॥ लिंगदेहाचें +भेदन ॥ करी तें सांख्ययोगज्ञान ॥ उद्धवा जाण निश्चित ॥ ६०० ॥ अनुलोम प्रतिलोम ॥ विवंचना वाढेल दुर्गम ॥ हें न करितां सांख्य सुगम ॥ आकळे तें वर्म सांगेन ऐक ॥ १ ॥ 1सांडूनि आकारविषमता ॥ सर्वभूतीं भगवंतता ॥ जो पावे सद्भावता ॥ सांख्य त्याचे हातां समूळ आलें ॥२॥ कां जैसें होईल कर्माचरण ॥ तैसेंचि सुखें हो आपण ॥ 'मी कर्त्ता' हें तूं न म्हण ॥ इतकेन ब्रह्म पूर्ण तूं होसी ॥ ३ ॥ याही वरती सुगमता ॥ मज दिसेना सर्वथा ॥ उद्धवा तुझे निजहितार्था॥जाण तत्त्वतां सांगीतलें ॥४॥हेंचि *एक माझें वचन ॥ विचारूनियां संपूर्ण ॥ निजहितार्थ आपण ॥ अवश्य जाण करावें ॥ ५ ॥ ऐसें बोलिला देवाधिदेवो ॥ तेथ जडला उद्धवाचा भावो ॥ निःशेष अहं सांडितां पहाहो ॥ ब्रह्म स्वयमेवो सहजचि ॥ ६ ॥ न विचारितां सांख्यज्ञान ॥ जगातें गोंवी अहंपण ॥ 4अहंपाशीं जन्म मरण ॥ दुःख दारुण अहंभावीं ॥ ७ ॥ ऐसा अहंभावो कठिण ॥ सांडितां न संडे आपण ॥ येचि गुंतीचें कारण ॥ सर्वथा जाण कळेना ॥ ८ ॥ हें पुसों जावें देवापाशीं ॥ तेणें विशद सांगीतलें सां-

---

१ सूर्य. २ पूर्णता. ३ प्रत्यक्ष. ४ डोळस. ५ आवड, इच्छा. ६ मिठाचा पर्वत. ७ पाणी. ८ अन्वय. ९ व्यतिरेक. १० ईश्वरबुद्धि.

*मो. त्या ममाज्ञा परिपाळक हें सांख्य. ×ना. जवळा दाखविलें. ०मो. सांख्य पुरवी. +मो. खंडण. 1मो. मोडुनि. *मो. ऐक माझें. 4मो. अहंपणेंशी.

※९१ ही ओवी पैठण व पंढरपूर येथील हस्तलिखित प्रतींत आहे. परंतु कोणत्याही छापील प्रतींत नाहीं.

ख्यासी ॥ आतां आपुली गुंती आपणापाशीं ॥ तेंचि आह्मांसी कळेना ॥ ९ ॥ येचि अर्थी श्रीकृष्ण ॥ पंचविसावे अध्यायीं जाण ॥ सगुणनिर्गुणविभागें पूर्ण ॥ गोड निरूपण सांगेल ॥ ६१० ॥ ते सुरस रसाळ मधुर कथा ॥ जेथ श्रीकृष्णा ऐसा वक्ता ॥उद्धव शिरोमणी श्रोता॥ अनुपम स्वादुता ते ठायीं ॥ ११ ॥ त्या स्वादाचें गोडपण ॥ सांगावया समर्थ श्रीकृष्ण ॥ सभ्य श्रोता अतिसज्ञान ॥ निजभक्त जाण उद्धव ॥ १२ ॥ ते देवभक्तसंवादगोडी ॥ वेदशास्त्रें न जोडे जोडी ॥ आलोडितां ग्रंथकोडी ॥ ते निजगोडी नातुडे ॥ १३ ॥ आतुडावया ते निजगोडी ॥ जैं भावार्थें जोडे जोडी ॥ भावार्थाचे निजआवडीं ॥ जिव्हारींची गोडी देव दे निजभक्तां॥१४॥ एवं भावार्थापरतें कांहीं ॥ देवासि आवडतें नाहीं ॥ तो भावो नाहीं ज्यांचे ठायीं ॥ ते मूर्ख पाहीं बालिश ॥ १५ ॥ त्या बाळकांचा धन्य भावो ॥ खापरें मांडूनि ह्मणती देवो ॥ तेथही प्रकटे देवाधिदेवो ॥ धरिल्या निःसंदेहो विश्वास ॥ १६ ॥ बाळकें दूध मागावयासाठीं ॥ भावार्थें लागला देवापाठीं ॥ कां क्षीराब्धि करूनि वाटी ॥ उपमन्या वोंठीं लाविली ॥ १७ ॥ एवं भाविकू देवाचा लाहणा ॥ देवो भाविकांचा आंदणा ॥ भावेंवीण देवो जाणा॥ कधींही कोणा न भेटे ॥ १८ ॥ यालागीं जेथ भावार्थ ॥ तेथचि जोडे सुख स्वार्थ ॥ भावार्थें तेथ परमार्थ ॥ सांग सांग्रत सांपडे ॥ १९ ॥ ऐसा वाढविल्या भावार्थ ॥ तेणें जोडे निर्गुण निजस्वार्थ ॥ तेंचि अर्थीचा वृत्तांत ॥ पुढिल्या अध्यायांत हरि सांगे ॥ २० ॥ ते कथेचें गोडपण ॥ अमृतास विसरवी जाण ॥ ऐसें रसाळ निरूपण ॥ सादरें श्रीकृष्ण सांगेल ॥ २१ ॥ तें श्रीकृष्णकथा-पीयूख ॥ श्रोत्याचें पावे *श्रवणमुख ॥एका जनार्दनीं ×अतिसुख ॥सकौतुक व्याख्यान॥२२॥ श्रीभागवत अत्यादरें ॥ श्रीकृष्णकथा सविस्तरें ॥ आहेर विस्तारिले साजिरे ॥ परमार्थ अ-ळंकारें साळंकृत ॥ २३ ॥ तेणें संत सज्जन सोयरे ॥ गौरवीन श्रवणादरें ॥ एका जनार्दनकृपाकरें ॥ ०आविष्करें सामर्थ्यें ॥ २४ ॥ गौरविले सोयरे सज्जन ॥ ह्मणाल उपेक्षिले इतर जन॥ जो श्रीभागवतीं सावधान ॥ तो परमार्थें जाण गौरवे ॥ २५ ॥ भावार्थासारिखें गौरवण ॥ एका जनार्दन जाणे जाण ॥ एका जनार्दना शरण ॥ आपणा आपण गौरवी ॥ ६२६ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां प्रकृतिपुरुषसांख्ययोगो नाम चतुर्विंशतितमोऽध्यायः ॥ २४ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ मूळ श्लोक ॥ २९ ॥ ॥ ओंव्या ६२६ एकूण ६५५ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

# अध्याय पंचविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णायन नमः ॥ ओंनमो ꙮदेव निर्गुण ॥ पाहे तंव न देखे गुण ॥ गुणेंवीण निर्गुणपण ॥ सर्वथा जाण +घडेना ॥ १ ॥ सर्वथा न घडे निर्गुणपण ॥ तरी घडों-

१ उत्तम अधिकारी. २ अपूर्व गोडी. ३ लाभ. ४ अवलोकन केले असतां, अभ्यासिले असतां. ५ प्राप्त होत नाहीं. ६ क्षीरसमुद्र. ७ स्वाधीन, आवडता. ८ प्रकट झालें. ९ मोठेपणा देणें.

*मो. श्रवण सुख ×मो. संतोख. ०मो. अविकारें सामर्थ्यें. ꙮना. सद्गुरुदेव. +ना. असेना.

नेदिशी सगुण ॥ नातळशी गुणागुण ॥ अगुणाचा पूर्ण गुरुराया ॥ २ ॥ अगुणाचाचि परी तूं गुणी ॥ करिसी त्रिगुण गुणाची झाडणी ॥ पंचभूतांपासूनी ॥ सोडविता जनीं जनार्दन ॥ ३ ॥ ज्याचेनि जनांसि अर्दन ॥ ज्याचेनि लिंगदेहा मर्दन ॥ जो जीवासि जीवें मारी पूर्ण ॥ तो '*कृपाळु' जनार्दन घडे केवीं ॥४॥ जनार्दनाचें कृपाळूपण ॥सर्वथा नेणती जन॥ नेणावया हेंचि कारण ॥ जे देहाभिमान न सांडिती ॥ ५ ॥ जननीजठरीं जन्म जाण ॥ त्या जन्मास्तव ह्मणती 'जन' ॥ त्या जनजन्मा करी मर्दन ॥ यालागीं जनार्दन नाम त्यासी ॥ ६ ॥ मरण मारूनि वाढवी जिणें ॥ जीव मारूनि जीववणें ॥ देहीं नांदवी विदेहपणें ॥ ऐशी जनार्दनें कृपा कीजे ॥ ७ ॥ निजभावार्थें परिपूर्ण ॥ एकाकी देखूनियां दीन ॥ कृपा करी जनार्दन ॥ कृपाळु पूर्ण दीनाचा ॥ ८ ॥ जे जे भावना भावी जन ॥ ते ते पुरवी जनार्दन ॥ जो मागे परम समाधान ॥ त्याचा देहाभिमान निर्दळी ॥ ९ ॥ हो कां जनार्दना समोर ॥ कैं आला होता अहंकार॥ मा तेणें घेऊनियां शस्त्र ॥ करी शतचूर निजांगें ॥१०॥ जेवीं सूर्याचेनि उजियेडें ॥ अंधारेंसी रात्रि उडे ॥ तेवीं जनार्दन नामापुढें ॥ +अहंकार बापुडें उरे केवीं ॥११॥ ऐकतां गुरुनामाचा गजरू ॥ समूळ विरे अहंकारू ॥ तेथ दुःखदायक संसारू ॥ कैसेनि धीरू धरील ॥ १२ ॥ ज्याचें नाम स्मरतां आवडीं ॥ ×संसारबांदवडी फेडी ॥ जीवाचे जीवबंधन ०सोडी ॥ नामाची ꙮजोडी लाजवी मोक्षा ॥१३॥ निजमोक्षाहीवरतें ॥ ज्याचें नाम करी सरतें ॥ त्याच्या कृपाळुपणातें ॥ केवीं म्यां येथें सांगावें ॥ १४ ॥ नामप्रतापा न करवे सीमा ॥ त्या सद्गुरूचा निजमहिमा ॥ कैशापरी आकळे आह्मां ॥ काय निरुपमा उपमावें ॥ १५ ॥ अगाध कीर्ति गुरूची गहन ॥ गुण गणितां अनंतगुण ॥ काय ध्यावें त्याचें आपण ॥ नित्य निर्गुण निजांगें ॥ १६ ॥ धांव घेऊनि ⁹त्यांपें जावों ॥ तंव त्या नाहीं गांवठावो ॥ त्याचे प्राप्तीसि नचले उपावो ॥ एक सद्भावावांचूनी ॥ १७ ॥ सद्भावें स्मरतां नामासी ॥ गुरु प्रकटे ⁽स्मरणाराशीं ॥ जेवीं सागरू सैंधवासी ॥ ये भेटीसी निजांगें ॥ १८ ॥ सागरा देतां आलिंगन ॥ जेवीं सैंधव होय जीवन ॥ तेवीं वंदितां सद्गुरुचरण ॥ मीतूंपण हारपे ॥ १९ ॥ सद्गुरुकृपा झालिया पूर्ण ॥ जनाचि होय जनार्दन ॥ तेव्हां *जन विजन ॥ भिन्नाभिन्न ³भासेना ॥ २० ॥ जन तेंचि जनार्दन ॥ जनार्दनचि सकळ जन ॥ हेंचि उपनिषत्सार पूर्ण ॥ हेचि निजखूण जनार्दनीं ॥ २१ ॥ येणेंचि अभिप्रायें येथ ॥ सांख्य बोलिला भगवंत ॥ उत्पत्तिस्थितिप्रळयांत ॥ वस्तु सदोदित संपूर्ण ॥ २२ ॥ सांख्य ऐकोनियां उद्धवो ॥ विचारी आपुला अभिप्रावो ॥ संसार वाढवी जो अहंभावो ॥ तो अवश्य पहाहो सांडावा ॥ २३ ॥ अहंकार जडला चित्ता ॥ तो सांडितां नेवचे सर्वथा ॥ हें पुसों जरी श्रीकृष्णनाथा ॥ तेणें सांख्यअर्था निरूपिलें ॥ २४ ॥ सकळप्राप्तीचा अभिप्रावो ॥ सांख्य अनुवादला देवो ॥ अवश्य सांडावा अहंभावो ॥ हेंचि पहाहो दृढ केलें ॥ २५ ॥ माझेनि पराक्रमें तत्त्वतां ॥ माझें मीपण नवचे सर्वथा ॥ लाजिरवाणें कृष्णनाथा ॥ किती आतां पुसावें ॥ २६ ॥ ऐशी उद्ध-

---

१ पीडन. २ नाश. ३ शेंकडो तुकडे, नाश. ४ संसार आधीनता. ५ पूर्णपणें कळे. ६ मोजितां. ७ त्याकडे. ८ पाणी. ९ ब्रह्म. १० न जाई. ११ बोलिला.

*मो. कृष्ण कृपाळू. +ना. अहंबापुडें. ×ना. कोटि संसार बांदवडी. ०ना. तोडी. ꙮमो. गोडी. ⁹मो. त्यापाशीं. ⁽ना. नामापाशीं. *ना तन मन जीवन. ³ना. असेना.

वाची चिंता ॥ कळोंसरली श्रीकृष्णनाथा ॥ आप कृपाळु निजभक्तां ॥ जेणें निवारे अहंता तें निजवर्म सांगे ॥ २७ ॥ आजि उद्धवाचें भाग्य पूर्ण ॥ जगीं उद्धवाचि धन्यधन्य ॥ ज्यासि सदा संतुष्टे श्रीकृष्ण ॥ न करितां प्रश्न निजगुह्य सांगे ॥ २८ ॥ बाळक काय भूक सांगे ॥ मग माता स्तन देऊं लागे ॥ ते कळवळयाचे पांगें ॥ धांवोनि निजांगें स्तनपानीं लावी ॥ २९ ॥ त्याहूनि अति आगळा ॥ श्रीकृष्ण उद्धवाचा कळवळा ॥ तो स्वभक्तांची भजनकळा ॥ जाणोनि जिव्हाला पोखित ॥ ३० ॥ बाळक नेणे आपुली चिंता ॥ परी माता प्रवर्ते त्याच्या हिता ॥ तेवीं उद्धवाचे निजस्वार्था ॥ श्रीकृष्णनाथा कळवळा ॥ ३१ ॥ त्या उद्धवाचें जें जें न्यून ॥ तें तें करावया परिपूर्ण ॥ प्रवर्तलासे श्रीकृष्ण ॥ तो निजनिर्गुण उपदेशी ॥ ३२ ॥ पंचविसावे अध्यायीं जाण ॥ सांगोनि गुणजयोलक्षण ॥ लक्षवील निजगुण ॥ हेंचि निरूपण निजनिष्ठा ॥ ३३ ॥ प्रकृतिपुरुषविवेक ॥ झालियाही बुद्धिपूर्वक ॥ जंव गुणजयो नाहीं निष्टंक ॥ तंव बाधी सुख दुःख अहंभावो ॥ ३४ ॥ तिहीं गुणांस्तव देह झाला ॥ देहीं गुणजयो नवचे केला ॥ मूळउच्छेद आपुला ॥ न करवे वहिला कोणासी ॥ ३५ ॥ दांडा जन्मला वृक्षजातीसी ॥ तो मिळोनियां कुऱ्हाडीसी ॥ समूळ छेदवी वृक्षांसी ॥ तेवीं विवेकासी सत्वगुण ॥ ३६ ॥ विवेका मीनल्या सत्वगुण ॥ समूळ उच्छेदी तिनी गुण । सहजें प्रकटे निजनिर्गुण ॥ तेव्हां गुणच्छेदन तें मिथ्या ॥ ३७ ॥ समूळ मिथ्या तिनी गुण ॥ नित्य सत्य निजनिर्गुण ॥ येचि अर्थींचें निरूपण ॥ स्वमुखें श्रीकृष्ण सांगत ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ गुणानामसम्मिश्राणां पुमान्येन यथा भवेत् ॥ तन्मे पुरुषवर्येदमुपधारय शंसतः ॥ १ ॥

॥ टीका ॥ ज्याचेनि चरणें पवित्र क्षिती ॥ नामें उद्धरे त्रिजगती ॥ ज्याची ऐकतां गुणकीर्ती ॥ क्षयो पावती महापापें ॥ ३९ ॥ ज्याचें *मृदु, मधुर, +अविट, नाम ॥ उच्चारितां निववी परम ॥ तो उद्धवासि पुरुषोत्तम ॥ आवडीं परम बोलत ॥ ४० ॥ सत्व, रज, तम, तिनी गुण ॥ न मिसळतां ‡भिन्नभिन्न ॥ ×पुरुषासी एक केवळ गुण ॥ उपजवी चिह्न तें ऐक ॥ ४१ ॥ निःसंदेह सावधान ॥ निर्विकल्प करूनि मन ॥ ऐकतां माझें वचन ॥ पुरुषोत्तम पूर्ण होईजे स्वयें ॥ ४२ ॥ माझे स्वरूपीं सद्भावता ॥ ते पुरुषाची उत्तमावस्था ॥ माझे वचनीं विश्वासतां ॥ पुरुषोत्तमता घर रिघे ॥ ४३ ॥ ऐशी उत्तमा अतिउत्तम ॥ निर्गुण पदवी निरुपम ॥ तुज मी अर्पितसें पुरुषोत्तम ॥ माझें वचन परम विश्वासल्या ॥ ४४ ॥ भक्तिभावार्थें परम श्रेष्ठ ॥ वचनविश्वासीं अतिवरिष्ठ ॥ यालागीं उद्धवासि पुरुषश्रेष्ठ ॥ स्वमुखें वैकुंठ संबोधी ॥ ४५ ॥ संसारीं योनि अनेग ॥ त्यांमाजीं मनुष्यत्व अतिचांग ॥ तेंही अविकळ अव्यंग ॥ संपूर्ण सांग निर्दुष्ट ॥ ४६ ॥ सकळदेहांमाजीं जाण ॥ ऐसें पुरुषदेहप्राधान्य ॥ त्याहीमाजीं विवेकसंपन्न ॥ वेदशास्त्रज्ञ मुमुक्षू ॥ ४७ ॥ वेदशास्त्रविवेकसंपन्न ॥ त्याहीमाजीं ज्या माझें भजन ॥ भजत्यांमाजीं अनन्यशरण ॥ सर्वस्वें जाण मजलागीं ॥ ४८ ॥ सर्वस्वें जे अनन्यशरण ॥ तेथ माझी कृपा परिपूर्ण ॥ माझे कृपें माझें ज्ञान ॥ पावोनि संपन्न मद्भजनीं ॥ ४९ ॥ येहीं गुणीं विचारितां लोक ॥

---

१ करितां येत नाहीं. २ निर्वृत्तिक. ३ शाश्वत, पुरा, धडका.

*ना. अमृत. +मो. विटंकनाम. ‡मो. भिन्नाभिन्न. ×मो. पुरुषापासीं ऐक्यगुण.

ओंथिला दिसे उद्धव एक ॥ यालागीं यदुनायक ॥ पुरुषत्रयाभिषेक वचनें करी ॥ ५० ॥ ऐसें संबोधूनि उद्धवासी ॥ त्रिगुण गुणस्वभावांसी ॥ सांगतां प्रथम सत्वासी ॥ हृषीकेशी उपपादी ॥ ५१ ॥ उदंड सत्वाचीं लक्षणें ॥ त्यांत पंधरा बोलिलीं श्रीकृष्णें ॥ तेंचि ऐका कोणकोणें ॥ निजनिरूपणें हरि सांगे ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ शमो दमस्तितिक्षेक्षा तपः सत्यं दया स्मृतिः ॥ तुष्टिस्त्यागोऽस्पृहा श्रद्धा ह्रीर्दयादिःस्वनिर्वृतिः ॥ २ ॥

॥ टीका ॥ आपुली जे चित्तवृत्ती ॥ सांडूनि बाह्य स्फूर्ती ॥ अखंड राखणें आत्मस्थिती ॥ शम निश्चितीं त्या नांव ॥ ५३ ॥ बाह्यइंद्रियांची चडफड ॥ शमेंसि करावा गळजोडं ॥ निग्रहणें विषयचाड ॥ दमाचें कोड या नांव ॥५४॥ जेणें हरिख साहणें सुख ॥ त्याचि वृत्तीं साहणें दुःख ॥ तितिक्षा या नांव देख ॥ शुद्धसत्वात्मक उद्धवा ॥ ५५ ॥ मी कोण कैंचा किमात्मकें ॥ निष्कर्म कीं कर्मबद्धक ॥ करणें निजात्मविवेकें ॥ ईक्षा *पारिपाक या नांव ॥५६ ॥ जागृतिस्वप्नसुषुप्ती आंत ॥ भगवत्प्राप्तीलागीं चित्त ॥ झुरणीमाजीं पडे नित्य ॥ तप निश्चित या नांव ॥ ५७ ॥ आवडीं जेवीं नेघवे विख ॥ तेवीं प्राणांतें न बोले लटिक ॥ साचचि बोलणें निष्टंक॥ हें सत्य देख सात्विका ॥ ५८ ॥ भूतांवरी कठिणपण ॥ जो स्वप्नीं न देखे आपण ॥ भूतदया ते संपूर्ण ॥ उद्धवा जाण निश्चित ॥ ५९ ॥ माझा मुख्य निजस्वार्थ कोण ॥ मी काय करितों कर्माचरण ॥ ऐसें जें पूर्वानुस्मरण ॥ स्मृति जाण या नांव ॥६०॥ न करितां अति आटाटी ॥ यथालाभें +सुखी पोटीं ॥ या नांव गा सुखसंतुष्टी ॥ जाण जगजेठी उद्धवा ॥६१॥ जे मिळाले जीविके भाग ॥ त्यांतही सत्पात्रीं दानयोग ॥ विषयममता सांडणें सांग ॥ त्या नांव त्याग उद्धवा ॥६२॥ अर्थ स्वार्थीं इच्छा चढे ॥ अर्थ जोडतां अधिक वाढे ॥ ते इच्छा सांडणें निजनिवाडें ॥ निस्पृहता घडे तेठायीं ॥६३॥ जेथ निस्पृहास मूळ सांग ॥ त्याचि नांव दृढ वैराग्य॥ हें परमार्थाचें निजभाग्य ॥ येणें श्रीरंग सांपडे ॥ ६४ ॥ जो गुरुवाक्यविश्वासीं ॥ सबाह्य विकला सर्वस्वेंसी ॥ तोचि भावार्थ द्विजदेवांसी ॥ श्रद्धा त्यापाशीं समूळ नांदे ॥ ६५ ॥ नरदेहीं लाभे परब्रह्म ॥ ❀तदर्थ न करूनि सत्कर्म ॥ विषयार्थ करी धर्माधर्म ॥ ते लज्जा परम अतिनिंद्य ॥६६॥ जेणें दुःखी होइजे आपणें ॥ तें पुढिलासि नाहीं करणें ॥ दुःख नेदूनि सुख देणें ॥ हे दया म्यां श्रीकृष्णें वंदिजे ॥६७॥ पुढिलासि नेदूनि दुःख ॥ स्वयें भूतमात्रीं देणें सुख ॥ हेचि दया पारमार्थिक ॥ दुसेरेनि देख यालागीं सांगे ॥ ६८ ॥ खातां नांवेंदपुढें पेंडी[११] जैसी ॥ तैसें गौण देखोनि विषयांसी ॥ जो त्रिनटला ब्रह्मसुखासी ॥ स्वनिवृत्ति ×त्यासि बोलिजे ॥ ६९ ॥ रंक बैसल्या पालखीसी ॥ उपेक्षी पूर्वील सुडक्यांसी ॥ तेवीं उपेक्षूनि विषयांसी ॥ जो ब्रह्मसुखासी पडकलें ॥७०॥ कणाची वाढी भुसापाशीं ॥ कण निर्डोरे भुसेंसी ॥ तो कण यावया हातासी ॥ सांडिती भुसासी पांखडूनि ॥७१॥ तेवीं ब्रह्मसुखाचिये चाडे ॥ नरदेहाचा पांगडों

---

१ संपन्न, युक्त. २ प्रतिपादी, सांगे. ३ गट्टी, मैत्री. ४ निरोधणें. ५ किंरूप. ६ आपला आत्मविचार. ७ परिपक्व, पूर्ण. ८ खटपट, श्रम. ९ ब्रह्माकरितां. १० खडीसाखरेपुढें. ११ तिळी, पेंड. १२ फाटकें वस्त्र. १३ नादीं लागणें; सोकावणें. १४ पक्वहोई. १५ अपेक्षा, पराधीनत्व.

*मो. परिपूर्णक या नांव. +मो. सुख. ❀ना. तदर्थी करावें सत्कर्म. ×मो. त्यापासीं.

पडे ॥ तें ब्रह्मसुख जैं हाता चढे ॥ तोचि देहींचें नावडे विषयभूस ॥ ७२ ॥ तेवीं सांडूनि विषय-प्रीति ॥ ज्यासि ब्रह्मसुखीं सुखप्राप्ती ॥ याचि नांव स्वनिवत्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥७३॥ या पंधरा लक्षणांची स्थिती ॥ वर्ते तो शुद्ध सत्वमूर्ती ॥ शोधितसत्वाची सत्ववृत्ती ॥ आदि-शब्दें श्रीपती सांगत ॥ ७४ ॥ सर्वभूतीं अकृत्रिमता ॥ देखे भगवद्भावो तत्त्वतां ॥ या नांव शोधितसत्वता ॥ *गुणावस्थाछेदक ॥ ७५ ॥ ऐशियापरी सत्वगुण ॥ सात्विकापाशीं वर्ते पूर्ण ॥ आतां रजाचें लक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ काम ईहा मदस्तृष्णा स्तंभ आशीर्भिदा सुखम् ॥ महोत्साहो यशः प्रीतिर्हास्यं वीर्यं बलोद्यमः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ काम ह्मणिजे विषयसोस ॥ ॥ जेवीं [1]इंधनीं वाढे [2]हुताशें ॥ तेवीं पुरवितां +कामा-भिलाष ॥ काम असोसें पैं वाढे ॥ ७७ ॥ या नांव काम जाण ॥ कामक्रिया ते ईहा पूर्ण ॥ झालिये विद्येचा दर्प गहन ॥ मदाचें लक्षण त्या नांव ॥ ७८ ॥ झालियाही अर्थप्राप्ती ॥ वासनेसि नव्हे तृप्ती ॥ चढती वाढती आसक्ती ॥ तृष्णा निश्चितीं या नांव ॥ ७९ ॥ ×अतिगर्वें जे स्तब्धता ॥ कोणासी दृष्टीं नाणी सर्वथा ॥ या नांव स्तंभावस्था ॥ जाण तत्त्वतां उद्धवा ॥८०॥ अर्थप्राप्तीकारणें ॥ इष्टदेवता प्रार्थणें ॥ प्रापंचिक सुख मागणें ॥ आशा ह्मणणें या नांव ॥ ८१ ॥ भिदा ह्मणिजे भेद जाण ॥ स्फुरद्रूप प्रपंच लक्षण ॥ माझें तुझें ०प्रपंचवचन ॥ भिदालक्षण या नांव ॥८२॥ राजससुखाचा नवल मार्ग ॥ ⁂विषयसुखभोग जो चांग ॥ तेंचि सुख मानिती 8सांग ॥ सुखप्रयोग या नांव ॥ ८३ ॥ रणीं उत्साह शूरासी ॥ कां पुत्रोत्साह नरासी ॥ विवाहोत्साह सुहृदांसी ॥ महोत्साह त्यासी बोलिजे ॥८४॥ शास्त्रविवादीं जयो घेणें ॥ कां युद्धीं 7शूरां पराभवणें ॥ तें जें ख्याति वाढवणें ॥ यश मिरवणें या नांव ॥८५॥ [5]बंदिजनां हातीं कीर्ती॥स्वयें वाखाणवी दिगंतीं॥या नांव यशःप्रीती॥जाण निश्चितीं उद्धवा ॥८६॥ ऐकोनि [6]वक्रोक्ति [7]छंदें [8]बंधें ॥ उपहासी अतिविनोद ॥ तेथ *राजसा हास्य विशद ॥ जाण प्रसिद्ध उद्धवा ॥ ८७ ॥ वीर्य ह्मणजे केवळ ॥ [9]बलादयता अतिप्रबळ ॥ दाखवणें शारीरबळ या नांव शीळ वीर्याचें ॥ ८८ ॥ राजबळें उद्यम व्यवहार॥ 1अंगदटाचा जो व्यापार ॥ न्याय सांडूनि स्वार्थ फार ॥ बलोद्यमप्रकार या नांव ॥ ८९ ॥ हीं पंधराही लक्षणें ॥ ज्यापें नांदती संपूर्णें ॥ तो राजस वोळखणें ॥ जीवें प्राणें निश्चित ॥ ९० ॥ केवळ अविवेकसंपत्ती ॥ तामसाची तमोवृत्ती ॥ सोळा लक्षणें 5त्यांची स्थिती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ९१ ॥

---

१ निष्कपटपणा. २ लांकडांनीं. ३ अग्नि. ४ अतिशय. ५ स्तुतिपाठक. ६ बोलणाराचा अर्थ एक असावा व दुसऱ्यानें शब्दश्लेषानें अर्थश्लेषानें अथवा ध्वनि विकारानें दुसराच अर्थ उत्पन्न करावा. असें असलें ह्मणजे 'वक्रोक्ती' हा शब्दालंकार होतो ७ कवितांचे निरनिराळे प्रकार; जसें अनुष्टुप्, वसंततिलका वगैरे. ८ एखाद्या कवितेची एका विविक्षित आकृतींत रचना करितात त्यास बंध ह्मणतात. याच्या पद्मबंध, वापीबंध, चक्रबंध वगैरे अनेक तऱ्हा आहेत. ९ बळकट.

*मो. गुणावस्था शोधक.+मो. कामविलास.×मो. अतिगर्वित स्तब्धता. ०ना. प्रपंचभान. ⁂ना. विषयसुख जे भोग सांग. 8ना. चांग. 7ना. शत्रू. *मो. राजस हास्य विनोद. 1ना. आंग अदंट जो. 5ना. साचार स्थिती.

॥ श्लोक ॥ क्रोधो लोभोऽनृतं हिंसा याच्ञा दंभः क्लमः कलिः ॥ शोकमोहौ विषादार्ती निद्राशा भीरनुद्यमः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ क्रोध कामाची अपूर्णावस्था ॥ लोभ ह्मणिजे अतिकृपणता ॥ अनृत ह्मणिजे *असत्यता ॥ हिंसा ते तत्त्वतां परपीडा ॥९२॥ याच्ञा ह्मणिजे लोलंगता ॥ दंभ ह्मणिजे अतिमान्यता ॥ क्लमनामें अति +आयासता ॥ व्यर्थ ❀कलहता कलि जाण ॥ ९३ ॥ शोक ह्मणिजे हाहाकार ॥ मोह ह्मणिजे भ्रमाचा पूर ॥ विषाद ह्मणिजे दुःखसंचार ॥ अभ्यंतर जेणें पोळे ॥ ९४ ॥ आर्ति ह्मणिजे अतिसंताप ॥ निंदा ह्मणिजे असदारोप ॥ आशा ह्मणिजे अतिलोलुप्य ॥ महाभयकंप ' भी ' शब्दें ॥ ९५ ॥ ऐक निद्रेचें निजवर्म ॥ जें आळसाचें निजधाम ॥ जाड्यता सोलींव परम ॥ ते निद्रा निःसीम तामसी ॥ ९६ ॥ सांडूनियां सर्व कर्म ॥ स्तब्धता राहे परम ॥ या नांव अनुद्यम ॥ सुखावलें तम तेठायीं वसे ॥ ९७ ॥ या तमोगुणाच्या सोळा कळा ॥ ज्याचे अंगीं बाणती सकळा ॥ तो तमोरात्रींची चंद्रकळा ॥ विवेकें आंधळा तामस ॥ ९८ ॥ सत्वरजतमोगुण ॥ यांचे वोळखीलागीं जाण ॥ केलें भिन्नभिन्न निरूपण ॥ आतां मिश्रलक्षण तें ऐक ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ सत्वस्य रजसश्चेतास्तमसश्चानुपूर्वशः ॥ वृत्तयो वर्णितप्रायाः सन्निपातमथो शृणु ॥ ५ ॥

॥ टीका ॥ सांगीतली त्रिगुण स्थिती ॥ त्या एकएकाच्या अनंत वृत्ती ॥ त्याही अनंतप्राय होती ॥ जीवासि गुणगुंती येथेंचि पडे ॥ १०० ॥ मस्तकीं केश चिकटले होती ॥ ते ज्याचे त्याचेनि नुगवती ॥ तेवीं त्रिगुणांची गुणगुंती ॥ जीवाहातीं उगवेना ॥ १ ॥ मिळोनि सख्या मायबहिणी ॥ हातीं घेऊनि तेल फणी ॥ उगविती चिकटल्या केशश्रेणी ॥ तेवीं त्रिगुणांची वेणी जीवासी ॥ २ ॥ त्रिगुणांची विभागवृत्ती ॥ जीवसामर्थ्यें जरी होती ॥ तरी ०शुद्धसत्वीं करूनि वस्ती ॥ गुणातीतीं प्रवेशता ॥३॥ ऐसा निजगुणां ×उगवो ॥ जीवाचेनि नोहे निर्वाहो ॥ यालागीं गुरुचरणीं सद्भावो ॥ सभाग्य पहाहो राखिती ॥ ४ ॥ जे सभाग्य भाग्यवंत जनीं ॥ ज्यांसि सद्गुरु सखी जननी ॥ विवेक वैराग्य घेऊन फणी ॥ जो त्रिगुणांची वेणी उगवित ॥५॥ ज्यांची उगविली *गुणगुंती ॥ पुढती गुंती 0न पडे मागुती ॥ यालागीं ते महामती ॥ मुंडूनि सांडिती संन्यासें ॥ ६ ॥ एकाची नवल गती ॥ उद्भट वैराग्याची स्थिती ॥ गुंती 7उगवल्या न रिघती ॥ मुळींचि मुंडिती समूळ ॥ ७ ॥ विवेकफणीचेनि मेळें ॥ वोढितां वैराग्य बळें ॥ जे अशक्त भावबळें ॥ ते मध्येंचि पळे उठूनी ॥ ८ ॥ अशक्तें पळतां देखोनि दूरी ॥ एकें लपालीं मोहआंधारीं ॥ एकें गुंती राखोनि 3शिरीं ॥ गुंतीमाझारीं रिघालीं ॥ ९ ॥ एकें अत्यंत करंटीं ॥ नव्हेचि गुरुमाउलीसी भेटी ॥ ऐशीं संसारीं पोर पोरटीं ॥ गुणदुःखकोटी भोगिती ॥ ११० ॥ द्विपेरार्धायु विधाता ॥ त्याचेनि नोहे गुणभागता ॥ मग इतरांची कोण कथा ॥

---

१ मन. २ खोटा आरोप. ३ स्थान. ४ निर्गुणांत. ५ दोन परार्ध वर्षें आयुष्य ज्याला तो.

*मो. अति असत्यता. +ना. मायासत्ता. ❀मो. हळहळ ते कली. ०मो. शुद्ध सात्त्विकीं. ×ना. उठावो. *ना. त्रिगुणगुंती. 0मो. पडेल मागुती. 7ना. उगवाव्या. 3मो. शरीरीं.

गुण तत्त्वतां निवडावया ॥ ११ ॥ ऐशिया ज्या त्रिगुणवृत्ती ॥ मजही निःशेष न निवडती ॥ यालागीं वर्णितप्राय पदोक्ती ॥ देव श्लोकार्थीं बोलिला ॥ १२ ॥ मागिल्या तीं श्लोकार्थीं ॥ सांगीतल्या त्रिगुणस्थिती ॥ त्रिगुणांची मिश्रित गती ॥ सन्निपातवृत्ती ते ऐका ॥ १३ ॥

॥ श्लोक ॥ सन्निपातस्त्वहमिति ममेत्युद्धव या मतिः ॥ व्यवहारः सन्निपातो मनोमात्रेंद्रियासुभिः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ गुणसन्निपातप्रकार ॥ एकचि जो कां अहंकार ॥ तो गुणसंगें त्रिप्रकार ॥ ऐक विचार तयांचा ॥ १४ ॥ वर्णाश्रमविहित विलास ॥ वेदाज्ञा पाळणें अवश्य ॥ मी आत्मा *जाणें चिदंश ॥ हा अहंउल्हास +सात्विक ॥ १५ ॥ मी स्वधर्मकर्मकर्ता ॥ मी स्वर्गादिसुखभोक्ता ॥ मज पावती नानावस्था ॥ या नांव अहंता राजस ॥ १६ ॥ मी देहधारी सुभट नर ॥ मीचि कर्ता शत्रुसंहार ॥ मी ※सर्वार्थीं अतिदुर्धर ॥ हा अहंकार तामस ॥ १७ ॥ गुणानुसारें ममता जाण ॥ त्रिविधरूपें स्फुरे स्फुरण ॥ तेचि अर्थीचें निरूपण ॥ विशद श्रीकृष्ण सांगत ॥ १८ ॥ माझे हृदयींचा भगवंत ॥ तोचि सर्वभूतीं हृदयस्थ ॥ भूतें माझींच समस्त ॥ हे ममता शोधितसत्वाची ॥ १९ ॥ भक्त संत साधु सज्जन ॥ तेचि माझे सुहृज्जन ॥ ऐशी जे ममता पूर्ण ॥ ते उद्धवा जाण सत्वस्थ ॥ १२० ॥ जीवाहीहून वरती ॥ सद्गुरुचरणीं अतिप्रीती ॥ ऐशी ममतेची जे जाती ॥ ते जाण निश्चितीं सात्विक ॥ २१ ॥ ज्या देवाची उपासकता ॥ शैवी, वैष्णवी, दीक्षितता ॥ देवीं धर्मीं पूर्ण ममता ॥ ते सात्विकता सत्वस्थ ॥२२॥ शैवी वैष्णवी धर्मममता ॥ दंभरहित निष्कामता ॥ ते ते सात्विक ममता॥ ऐक अवस्था रजाची ॥ २३ ॥ निवृत्तिमार्ग मानी लटिक ॥ सत्य साचार लौकिक ॥ लोकेषणेची ममता देख ॥ ते अवश्यक राजसी ॥ २४ ॥ प्रवृत्तिशास्त्रीं अति आवडी ॥ लौकिकाची अत्यंत गोडी ॥ नामरूपाची उभवी गुढी ॥ हे ममता रोकडी राजस ॥ २५ ॥ स्त्रीपुत्रें माझीं अवश्यक ॥ शरीरसंबंधी आप्त लोक ॥ ०द्रव्यदारा यांची ममता निष्टंक ॥ हे बुद्धि वोळख राजस ॥२६॥ ज्या देवांची करितां भक्ती ॥ नांवरूप जोडे संपत्ती ॥ तीं तीं दैवतें आवडती ॥ हे ममता निश्चितीं राजस ॥ २७ ॥ काम्यकर्मीं आवडी देख ॥ आप्त मानी सकामकर्मक ॥ सत्य स्वर्गादिविषयसुख ॥ हे ममता निष्टंक राजस ॥ २८ ॥ हे रजोगुणाची ममता ॥ तुज म्यां सांगीतली तत्त्वतां ॥ तमोगुणाची जे अवस्था ॥ ऐक व्यवस्था सांगेन ॥२९॥ आपुल्या देहासि जो ×हंतूं करी ॥ कां *पूर्वापूर्वजांचा वैरी ॥ त्यांच्या लेंकरांसी वैर धरी ॥ हे बुद्धि निघुरी तामस ॥ १३० ॥ पुढें लेंकुरांचे लेंकुरीं ॥ वृत्तिभूमिजीविकेवरी ॥ आडवा येईल स्वगोत्रीं ॥ त्यासी वैर धरी तामस ॥ ३१ ॥ ऐसे पूर्वापर माझे वैरी ॥ मी निर्दाळीन संसारीं ॥ यालागीं रिघे अभिचारीं ॥ ते ममता खरी तामस ॥ ३२ ॥ अभिचारिकी जे मंत्रज्ञ ॥ ते मानी माझे आप्तस्वजन ॥ शाकिनीडांकिनीउपासन ॥ हे ममता संपूर्ण तामसी ॥ ३३ ॥ असो हे बहुसाल व्युत्पत्ती ॥ एके-

१ संक्षेपतः २ अहंकाराचा प्रकार. ३ योद्धा. ४ भक्ति. ५ लोकलज्जेची. ६ धिक्कार. ७ जारणमारणादिकांत.

*ना. जाणणें. +मो. सात्विकां. ※मो. स्वार्थी. ०ना. द्रव्यदारयाची ममता देख. ×मो. हंतकरी. *मा. पूर्वापर पूर्वजांचा.

कगुणीं अनंतशक्ती ॥ हे तिन्ही जेथ मिश्र होती ॥ सन्निपातवृत्ती त्या नांव ॥ ३४ ॥ कफ वात आणि पित्त ॥ तिन्ही एकत्र जेथ होत ॥ तेथ उपजे सन्निपात ॥ तेवीं सन्निपातें येथ त्रिगुणांचा ॥ ३५ ॥ *संकल्पविकल्पात्मक मन ॥ पंच विषय पंच प्राण ॥ +दशेंद्रियीं व्यवहार संपूर्ण ॥ तेथ उपजे त्रिगुण सन्निपात ॥ ३६ ॥ तेंचि सन्निपातनिरूपण ॥ त्रिगुणांचें मिश्र लक्षण ॥ स्वयें सांगताहे श्रीकृष्ण ॥ मिश्रगुणसन्निपात ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ धर्मे चार्थे च कामे च यदासौ परिनिष्ठितः॥ गुणानां सन्निकर्षोऽयं श्रद्धारतिधनावहः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ पुरुषाच्या ठायीं क्रिया कर्म ॥ क्षण स्वधर्म क्षणें काम ॥ क्षणें वाढवी अर्थोद्यम ॥ हा संक्रम त्रिगुणांचा ॥३८॥गुणसंक्रमण करी काय॥त्रिगुणीं धर्म त्रिविध होय॥ कामही त्रिविध होऊनि ठाय ॥अर्थस्वार्थनिर्वाहें त्रिगुणात्मक ॥३९॥ येथ कर्मासि दोष नाहीं ॥ ×दोष कर्त्याचे बुद्धीच्या ठायीं ॥ तो जे कल्पना करील कांहीं ॥ तें फळ पाही स्वयें भोगी ॥ १४० ॥ सोनें वेंच सोनेपणें ॥ त्याचें स्वयें घडविल्या सुणें ॥ वंद्य तेंचि निंद्य करणें ॥ तेवीं स्वकर्म दूषणें गुणबुद्धी ॥४१॥ भूमि सहजें शुद्ध आहे ॥ जें पेरिजे तें पीक होये ॥ तेवीं ※स्वकर्म शुद्ध स्वयें ॥ फळभोगु लाहे गुणवृत्ती ॥४२॥ वाचा सहज सरळ गोमटी ॥ °रामनामें जोडे ब्रह्मपुष्टी ॥ वृथा जाय करितां चावटी॥भोगी निंदेपाठीं महापाप ॥४३॥ तेवीं स्वधर्म श्रद्धायुक्त ॥ पुरुषास करी विरक्त ॥ तेथ त्रिगुणांचा सन्निपात ॥ श्रद्धा छळित तें ऐक ॥४४॥ स्वधर्मकर्मीं श्रद्धा जोडे ॥ क्षणेकें लागे विरक्तीकडे ॥ क्षणें भोगफळाशा वाढे ॥ क्षणेक पडे ममतेस्पंदीं ॥४५॥ तैशीच कामाचीही रीती ॥ क्षणेक निष्कामीं अतिप्रीति ॥क्षणें स्त्रीभोग आसक्ती ॥ 4क्षणें रती परद्वारीं ॥ ४६ ॥ याचिपरी धनाची जोडी॥ क्षणेक द्रव्याशा सोडी ॥ क्षणेक अर्थाची अतिगोडी ॥ क्षणेक आसुडी परद्रव्य ॥ ४७ ॥ त्रिविध धर्म त्रिविध कर्म ॥ त्रिविधरूपें धनागम ॥ या गुणवृत्तीस्तव स्वधर्म ॥ सांडूनि अकर्म करी प्राणी ॥ ४८ ॥ एवं धर्म अर्थ कामाआंत ॥ गुणसन्निपात अनंत ॥ फोडूनि सांगतां येथ ॥ वाढेल ग्रंथ अनिवार ॥ ४९ ॥ यालागीं गुणसन्निपात ॥ सांगितला संकलित ॥ तेंचि अर्थीं श्रीकृष्णनाथ ॥ असे सांगत संक्षेपें ॥ १५० ॥

॥ श्लोक ॥ प्रवृत्तिलक्षणे निष्ठा पुमान्यर्हि गृहाश्रमे ॥ स्वधर्मे चानुतिष्ठेत गुणानां समितिर्हि सा ॥ ८ ॥

॥ टीका ॥ पुरुषासि जो गृहाश्रम ॥ तो जाणावा केवळ काम्य ॥ तेथ नित्य नैमित्तिक कर्म॥ हा स्वधर्म चित्तशुद्धी ॥५१॥ गृहाश्रमींही पंचसूनें ॥ यालागीं तमोगुण प्रधान ॥ गृहीं स्त्रीभोग पावे जाण ॥ रजोगुण या हेतू ॥ ५२ ॥ नित्य नैमित्य स्वधर्म ॥ हें गृहस्थाचें 2निजकर्म ॥ हें चित्तशुद्धीचें निजवर्म ॥ सत्व सुगम या हेतू ॥ ५३ ॥ गृहाश्रमप्रवृत्ति जाण ॥ सदा मिश्रित

---

१ मिसळण, संगम. २ अर्थाविषयीं उद्योग. ३ संनिपात. ४ कुत्रें. ५ ममतेच्या गतींत. ६ प्रीति. ७हरण करितो. ८ थोडक्यांत. ९ कंडणी, पेषणी, चुली, उदकुंभीच मार्जनी-या पांच हत्या.

*ना. संकल्प विकल्प कल्पक मन. +ना. देहेंद्रिय व्यवहार. ×मो. दोष कृत्यचि बुद्धीचे ठायीं.※ना. स्वधर्म कर्में शुद्ध. °मो. मग नामें.4मो. क्षणें करी वृत्ती परद्वारीं.2मो. नित्यकर्म.

तिनी गुण ।। गुणीं गुणवंत करून ॥ कर्माचरण करविती ॥ ५४ ॥ न रंगतां तेणें रंगें ।। स्फटिक तद्रूप भासों लागे ।। तेवीं गुणात्मा गुणसंगें ।। वर्तों लागे गुणकर्मीं ॥ ५५ ॥ जेवीं कां कसवटी आपण ॥ कसूनि दावी सुवर्णवर्ण ।। तेवीं पुरुषाची क्रिया जाण ॥ दावी गुण-लक्षण विभाग ।। ५६ ॥

॥ श्लोक ॥ पुरुषं सत्वसंयुक्तमनुमीयाच्छमादिभिः ॥ कामादिभी रजोयुक्तं क्रोधाद्यैस्तमसायुतम् ॥ ९ ॥

टीका ॥ इंद्रियनिग्रहो यथोचित ॥ जो शमदमीं सदा क्रीडत ।। शांति वसे जया आंत ॥ तो जाण निश्चित सात्विक ।। ५७ ॥ जो सदा फळकामें कामुक ।। वांछी स्वर्ग संसारभोगसुख ।। द्रव्यार्थी अतिदांभिक ॥ रजोगुणी लोक तो जाण ॥ ५८ ॥ ज्यासि स्वधर्मीं नाहीं रती ।। आवडे अधर्मप्रवृत्ती ।। क्रोधलोभें गिळिली स्फूर्ती ॥ तो जाण निश्चितीं तामस ॥ ५९ ॥ एवं देखोनि *कर्माचरण ।। लक्षिजे पुरुषलक्षण ।। या नांव गा अनुमान ।। विवेकसंपन्न जाणती ॥ ॥ १६० ॥ सामान्यतां तिन्ही गुण ।। सांगीतलें निरूपण ॥ हें नकळे ×म्हणेल मन ॥ गुणवृत्ती भिन्न अवधारीं ॥ ६१ ॥

श्लोक ॥ यदा भजति मां भक्त्या निरपेक्षः स्वकर्मभिः ॥ तं सत्वप्रकृतिं विद्यात्पुरुषं स्त्रियमेव वा ॥ १० ॥

॥ टीका ॥ +स्वकर्मीं वांछित फळ।। तेंचि मायेचें दृढ पटळ।।ते फळाशा सांडोनि केवळ ।। जे भजनशीळ मद्रूपीं ॥ ६२ ॥ करूनि फळाशेचें शून्य ॥ स्वधर्में करिती माझें भजन ॥ पुरुष अथवा स्त्रिया जाण ।। ते सत्वसंपन्न निश्चित ॥ ६३ ॥ देहावयव[१]लिंगदर्शन ॥ तेणें स्त्रीपुरुष नामाभिधान ॥ परि आत्मा आत्मीं नाहीं जाण ।। जीवत्व समान स्त्रीपुरुषीं ॥६४॥ चित्तवृत्ति क्रियाचरण ॥ त्या नांव गा कर्म जाण ॥ जेथ निरपेक्षतें माझें भजन ।। स्वधर्म संपूर्ण या नांव ॥ ६५ ॥ ऐशिया स्वधर्मवृत्ती ॥ जेथ प्रकटे माझी भक्ती ॥ ते ते सात्विक प्रकृति ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥६६॥ आशंका ॥ ※कर्म करितां फळाशा वाढे ॥तो फळभोग भोगणें पडे॥ ०स्वकर्में भक्ति केवीं घडे ॥ कर्म तें [२]कुडें अत्यंत ॥६७॥ कर्म करितां फळ बाधक ॥ न करितां प्रत्यवाय[३] नरक ॥ कर्में कर्मबद्ध लोक ॥ केले देख संसारीं ॥ ६८ ॥ जीव होता जो स्वतंत्र ॥ तो *कर्में केला परतंत्र॥एवढें कर्मांचें चरित्र॥अति विचित्र बाधक ॥६९॥ स्वकर्में भगवद्भक्ती।। म्हणशी घडे कैशा रीतीं ॥ तेचि अर्थीची उपपत्ती ।। स्वयें श्रीपती सांगत ॥ १७० ॥ सर्प धांवोनि धरिल्या तोंडीं ।। तो सर्वांगीं घाली आढी ॥ तेणें धाकें जो सोडी ॥ तरी तो विभांडी महाविखें ॥ ७१ ॥ ते सर्पबाधेची सांकडी ।। निवारी मंत्रवादी गारुडी ॥ तेवीं कर्मीं कर्मबाधा गाढी ॥ निवारी रोकडी श्रीगुरुरावो ॥७२॥ रिघतां सद्गुरूसि शरण॥कर्म करवी ब्रह्मार्पण ।। हेंचि निरपेक्ष[४] लक्षण ।। उद्धवा जाण निश्चित ॥७३॥ ब्रह्म कर्मांचें प्रकाशक ।। कर्म तितुकें ब्रह्म-

---

१ स्त्रीपुंस्त्वादि चिन्ह. २ खोटें. ३ प्रायश्चित्त, अपराध, पाप. ४ कामनारहित.

*मो. कामाचरण. ×मो. म्हणसी लक्षण. +ना. स्वधर्मीं. ※ना. धर्में. ०ना. स्वधर्में. *मो. कर्मीं ठेला परतंत्र.

त्मक ॥इचि मदर्पण चोख ॥माझें भजन देख या रीतीं ॥७४॥ सर्वेंद्रियीं ज्ञानस्फूर्ती॥ते ब्रह्मींची ब्रह्मशक्ती ॥ ऐसेनि निश्चयें कर्मस्थिती ॥ स्वकर्मभक्ती या नांव ॥ ७५ ॥ ऐसोनि स्वकर्में स्वाभाविक ॥ जे मज भजती भाविक ॥ ते ते शुद्ध सात्विक लोक ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ ७६ ॥ स्वधर्म कर्म सर्वथा निष्फळ ॥ ह्मणती ते मूर्ख केवळ ॥ स्वधर्म निरसी चित्तमळ ॥ कर्म समूळ निर्दळी ॥ ७७ ॥ एवढी स्वधर्माची जोडी ॥ सांडूनि वांछिती विषयगोडी ॥ तें तें राजसें बापुडीं ॥ केवळ वेडीं विषयार्थीं ॥ ७८ ॥ विषयफळ वांछितां देख ॥ देह धरणें आवश्यक ॥ देहसंभव दुःखदायक ॥ स्वर्गनरक फळ भोगी ॥ ७९ ॥ यापरी जनीं दुःखदाती ॥ राजसतामसप्रकृती ॥ ऐक त्या दोनी गुणवृत्ती ॥ विशद तुजप्रती सांगेन ॥ १८० ॥

॥ श्लोक ॥ यदा आशिष आशास्य मां भजेत स्वकर्मभिः ॥ तं रजःप्रकृतिं विद्याद्धिंसामाशास्य तामसम् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ जो कां आचरोनि स्वधर्म ॥ वांछी नानाफळकाम ॥ तें तें जाण काम्य कर्म ॥ राजस धर्म या नांव ॥८१॥ जो अभ्यंतरीं अतिसकाम॥ तो जें जें आचरे कर्मधर्म ॥ तें तें अवघेंचि सकाम ॥ फळसंभ्रम निजहेतू ॥ ८२ ॥ स्वरूपीं काम्य कर्म नाहीं ॥ कामना काम्य करी पाहीं ॥ सोनें स्वभावें असे ठायीं ॥ लेणें उपायीं स्वयें कीजे ॥ ८३ ॥ स्वकर्म स्वभावें पवित्र जाण ॥ स्वधर्में माझें शुद्ध भजन ॥ तेथ कामनाफळ कामून ॥ काम्य आपण स्वयें कीजे ॥८४॥ फळकामें जें माझें यजन ॥ तें केवळ फळाचेंचि भजन ॥ सकामें जें स्वधर्माचरण ॥ ते प्रकृति जाण राजस ॥ ८५ ॥ ऐशिये प्रकृतीचा विलास ॥ स्त्री अथवा हो कां पुरुष ॥ ते ते जाण पां राजस ॥ ऐक तामस गुणवृत्ती ॥ ८६ ॥ क्रोधयुक्त अंतःकरण ॥ तेणेंसी ज्याचें स्वधर्माचरण ॥ फळ वांछी *सकाम मन ॥ ते प्रकृति जाण तामस ॥ ८७ ॥ जेथें द्वेषें बांधलें घर ॥ ते ठायीं क्रोध अनिवार ॥ जो भूतमात्रीं निष्ठुर ॥ ज्याचि प्रकृति क्रूर सर्वदा ॥ ८८ ॥ ऐशिया स्वभावावरी ॥ नर अथवा हो कां नारी ॥ ते ते तामस संसारी ॥ निजनिर्धारीं उद्धवा ॥८९॥ जीवस्वरूपें चैतन्य पहाहो ॥ त्यासि ×मातें कां भज ह्मणे देवो ॥ जीवासि कां सेवकभावो ॥ सेव्य देवो कैसेनी ॥ १९० ॥ येच अर्थाचें निरूपण ॥ कृष्ण सांगताहे आपण ॥ सेव्यसेवकलक्षण ॥ मायागुणसंबंधें ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ सत्वं रजस्तम इति गुणा जीवस्य नैव मे ॥ चित्तजा यैस्तु भूतानां सज्जमानो निबद्धयते ॥ १२ ॥

॥ टीका ॥ बांधोनि नाणितां आया ॥ जेवीं देहाधीन असे छाया ॥ तेवीं भगवंताधीन माया ॥ नातळोनियां वर्तवी ॥ ९२ ॥ माया वर्तविता निवर्तविता ॥ स्वामी भगवंत तत्त्वतां ॥ यालागीं माया अध्यक्षता ॥ त्यासीचि सर्वथा वेद बोले ॥ ९३ ॥ सूर्य अंधारातें नाशी ॥ परी तो सन्मुख न ये त्यापाशीं ॥ तेवीं मायानियंता हृषीकेशी ॥ परी माया देवासी ※दृढ नव्हे ॥ ९४ ॥ +माझें जें न देखणेपण ॥ तेंचि मायेचें मुख्य लक्षण ॥ मजपाशीं माया जाण ॥ गु-

---

१ देहाचें जन्म. २ सेव्य ईश्वर–सेवक जीव. ३ ताब्यांत. ४ नाहींशी करणारा. ५ मायेस स्वाधीन. ठेवणारा.

*मं. शत्रू मरण. ×ना. मां भजका ह्मणे देवो. ※ना. दृष्ट. +ना. माझेनि जें देखणेपण.

णाभिमानेंसी नाहीं ॥ ९५ ॥ *मायाबिंब तें चैतन्य ॥ त्यासि बोलिजे जीवपण ॥ त्या जीवासि त्रिगुणीं बांधोन ॥ देहाभिमान दृढ केला ॥ ९६ ॥ जीवासि लागतां देहाभिमान ॥ तो झाला मायाधीन ॥ मायानियंता श्रीनारायण ॥ तो स्वामी जाण जीवाचा ॥ ९७ ॥ जीव गुणाभिमानें बद्धक ॥ यालागीं झाला तो सेवक ॥ आत्मा गुणातीत चोख ॥ बंधमोचक जीवाचा ॥ ९८ ॥ या परी सेव्यसेवकभावो ॥ विभाग दावोनियां पहाहो ॥ त्रिगुणगुणांचा अन्वयो ॥ विशद देवो स्वयें सांगे ॥ ९९ ॥ गुण तिन्ही समसमान ॥ त्यांमाजीं क्षोभोनियां जाण ॥ जो जो वाढे अधिक गुण ॥ तें तें लक्षण हरि सांगे ॥ २०० ॥ ब्रह्म निर्मळत्वें प्रसिद्ध ॥ कर्म शोधकत्वें अतिशुद्ध ॥ येथ कर्मी उपजे कर्मबाध ॥ तो चित्तसंबंध गुणक्षोभें ॥ १ ॥ कर्मब्रह्मीं दोष नाहीं ॥ दोष चित्तवृत्तीच्या ठायीं ॥ तोही गुणक्षोभें पाही ॥ घाली अपायीं पुरुषातें ॥२॥ येचि अर्थाचें निरूपण ॥ सांगितलें मिश्रलक्षण ॥ आतां वाढल्या एकेक गुण॥गुणलक्षण तें ऐक ॥३॥ जो गुण वाढे अति उन्नतीं ॥ इतर त्यातळीं वर्तती ॥ ते काळींची पुरुषस्थिती ॥ उद्धवाप्रती हरि सांगे ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ यदेतरौ जयेत्सत्वं भास्वरं विशदं शिवम् ॥ तदा सुखेन युज्येत धर्मज्ञानादिभिः पुमान् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ समूळ फळाशा त्यागूनी ॥ निर्विकल्प, निरभिमानी ॥ जो लागे स्वधर्माचरणीं ॥ तें रजतम दोनी जिणे सत्व ॥ ५ ॥ जें भाग्याचें भरण उघडे ॥ तें हरिकथाश्रवण घडे ॥ मुखीं हरिनामकीर्ति आवडे ॥ तेणें सत्व वाढे अतिशुद्ध ॥ ६ ॥ कां देवें जोडिल्या सत्संगती ॥ श्रवणीं श्रवण लांचावती ॥ वाचा लांचावे नामकीर्ती ॥ अतिप्रीतीं अहर्निशीं ॥ ७ ॥ ऐसऐशिया ×अनुवृत्ती ॥ रज तम दोनी क्षीण होती ॥ सत्व वाढे +अनुद्वेगवृत्ती ॥ त्या सत्वाची स्थिती समूळ ऐक ॥ ८ ॥ भास्करत्वें प्रकाश बहळे ॥ विशदत्वें अतिनिर्मळ ॥ शिव म्हणिजे शांति सरळ ॥ हें सत्वाचें केवळ स्वरूप मुख्य ॥ ९ ॥ हे सत्वाची सत्ववृत्ती ॥ आतुडे ज्या साधकाहातीं ॥ ते काळींची पुरुषस्थिती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ १० ॥ जें विवेकाचें तारूं आतुडे ॥ वैराग्याचें निजगुज जोडे ॥ सर्वेंद्रियीं प्रकाश उघडे ॥ शिगे चढे स्वधर्म ॥११॥ ते काळीं ※जनअधर्मता ॥ गर्वे अभिमान असत्यता ॥ बळात्कारेंही शिकवितां ॥ न करी सर्वथा अधर्म ॥१२॥ निकट असतां ०दुःखसाधन ॥ सात्विक सदा सुखसंपन्न ॥ बळात्कारें क्षोभवितां मन ॥ सात्विक जाण क्षोभेना ॥ १३ ॥ ऐशिया ◌निजसत्वदृष्टी ॥ 7सुख सुखा येतां भेटी ॥ 0त्यासि स्वानंदें कोंदे सृष्टी ॥ शुद्ध सत्वपुष्टी या नांव ॥ १४ ॥ ऐसें विशद सत्व जयापाशीं ॥ शम दम सेविती तयासी ॥ वैराग्य लागे पायांसी ॥ ते शुद्ध सत्वराशी उद्धवा ॥ १५ ॥ तैसेंचि सत्व तम जिणोन ॥ जें वाढे गा रजोगुण ॥ तें राजसाचें लक्षण ॥ ऐक संपूर्ण हरि सांगेन ॥ १६ ॥

१ जन्ममरणांपासून सोडविणारा. २ संबंध. ३ कर्मांत दोष नाहीं व ब्रह्मांत दोष नाहीं. ४ संकटांत, बंधांत. ५ वासनारहित. ६ सोकावती, कानांस गोडी लागते. ७ उद्वेगशून्यवर्तनानें. ८ तेजोरूपानें. ९ बहुत.

*मो. मायाप्रतिबिंब चैतन्य. ×मो. निवृत्ती. +मो. उद्रेकवृत्ती. ना. उद्योगवृत्ती. ※मो. जाण अधर्मता. ०मो. दुष्टसाधन. ◌ना. निजसत्ववृत्ती. 7ना. सुखदुःख ये भेटी. 0मो त्याही स्वानंदें कोंदाटे सृष्टी.

॥ श्लोक ॥ यदा जयेत्तमः सत्त्वं रजःसंगं भिदा बलम् ॥ तदा दुःखेन युज्येत कर्मणा यशसा श्रिया ॥ १४ ॥

॥ टीका ॥ रजोवृद्धीचें कारण ॥ देहीं उपजे ज्ञानाभिमान ॥ पदोपदीं देखे दोष गुण ॥ वांछी सन्मान प्रतिष्ठा ॥१७॥ नवल रजोगुणाची ख्याती ॥ ज्ञातेपणें कामासक्ती ॥ नाना भोग वांछी चित्तीं ॥ तेणें रजाची प्राप्ती अनिवार ॥ १८ ॥ ऐसेनि रजोगुण वाढोनि वाढी ॥ सत्वतमांतें तळीं पाडी ॥ त्या रजाची स्वरूपमोडी ॥ऐक निरवडी सांगेन ॥१९॥ *श्लोकीं त्रैपदीं प्रबळ॥ रजसंगभिदाबळ ॥ बोलिला रजोगुण केवळ ॥ तेंचि ×विवळ हरि सांगे ॥२२०॥ संग ह्मणिजे देहाभिमान ॥ देह ह्मणिजे मीमाझेंपण ॥ बळ ह्मणिजे काम गहन ॥ आग्रहो पूर्ण प्रवृत्तीचा ॥ २१ ॥ देहाभिमानें दुःख उठी ॥ भेदें भय लागे पाठीं ॥ त्या नश्वरदेहाचिया पुष्टी ॥ काम्य-कामाठी कर्माची मांडी ॥ २२ ॥ ज्या कर्मांचेनि कैवाडें ॥ यश श्री उदंड जोडे ॥ तें तें कर्म वाढवी पुढें ॥ हें रजोगुणें घडे आचरण ॥ २३ ॥ मी एक पवित्र त्रिजगतीं ॥ माझीच उत्तम कर्मस्थिती ॥ प्रवृत्ति मान्यता आसक्ती ॥ ते जाणावी स्थिती राजस ॥ २४॥ रजाचें बळ उद्भट ॥ कर्म आदरी अचाट ॥ वाढवी कर्मकचाट ॥ तो जाण श्रेष्ठ राजस ॥ २५ ॥ बाहेर दिसे +सात्विकस्थिती ॥ अंतरीं कर्मवासना द्रव्यासक्ती ॥ ज्यासि प्रिया आवडे चित्तीं ॥ तो जाण निश्चितीं राजस् ॥२६॥ जेव्हां सत्व रज दोनी गुण ॥ जिणोनि तम वाढे पूर्ण ॥ तेकाळीं पुरुषलक्षण ॥ स्वयें नारायण सांगत ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ यदा जयेद्रजः सत्त्वं तमोमूढं लयं जडम् ॥ युज्येत शोकमोहाभ्यां निद्रया हिंसयाऽऽशया ॥ १५ ॥

॥ टीका ॥ रज सत्व करूनि गूढ ॥ जैं तमोगुण होय रूढ ॥ तैं तो पुरुषातें सदृढ ॥ करी जड मूढ अतिस्तब्ध ॥ २८ ॥ विश्वासूनि वांडेंकोडें ॥ जें परद्रव्य बुडवणें पडे ॥ कां परदारागमन घडे ॥ तैं तेणें वाढे तमोगुण ॥ २९ ॥ स्वमुखें परापवाद बोलणें ॥ स्वयें साधुनिंदा करणें ॥ संतसज्जनां द्वेषणें ॥ तें तमाचें ठाणें अनिवार ॥ २३० ॥ धुईचेनि आलेपणें ॥ पडे सूर्यासि झांकणें ॥ तेवीं विवेकाचें जिणें ॥ तमोगुणें ग्रासिजे ॥३१॥ सत्वगुण प्रकाशक ॥ रज प्रवृत्ति प्रवर्तक ॥ दोहींतें गिळूनि देख ॥ तमाचें ❀अधिक अधर्म वाढे ॥ ३२ ॥ करितां पूज्याचें ०हेळण ॥ साधूचे देखतां दोषगुण ॥ तेणें खवळला तमोगुण ॥ त्याचें स्वरूप पूर्ण तें ऐक ॥ ३३ ॥ तमोगुण वाढल्या प्रौढ ॥ *स्फूर्तिमात्र होय मूढ ॥ लयो उपजवोनि दृढ ॥ करी जड जीवातें ॥ ३४ ॥ कार्याकार्यविवेकज्ञान ॥ ते स्फूर्ति अंध होय पूर्ण ॥ या नांव गा मूढपण ॥ ऐक चिन्ह लयाचें ॥३५॥ जागृतीमाजीं असतां चित्त ॥ अर्थ स्वार्थ परमार्थ ॥ कांहीं स्मरेना कृत्याकृत्य ॥ लयो निश्चित या नांव ॥ ३६ ॥ समस्ताही इंद्रियवृत्ती ॥ अनुक्रमें २स्तब्धगती ॥

---

१ स्वरूपप्रकार. २ कौशल्यानें. ३ स्पष्ट. ४ कारखाना, टांकसाळ घालतो. ५ कारस्थानानें, अहंममत्वानें. ६ अनेक हिकमतीनें. ७ दुसऱ्याचा उणेपणा. ८ धुकें दाट पडल्यानें. ९ करणें कोणतें व न करणें कोणतें याच्या विचाराचें ज्ञान.

*ना. श्लोकीचे पदीं. ×ना. विकळ. +मो. सात्विकवृत्ती. ❀मो. अधिक कर्म वाढे. ०मो. लक्षण. *ना. स्मृतिमात्रें. २मो. स्तब्ध होती.

*निःशेष लोपे ज्ञानशक्ती ॥ जडत्वप्राप्ती या नांव ॥ ३७ ॥ मूढत्वें पावे शोकदुःख ॥ जडत्वें मिथ्या मोह देख ॥ मोहास्तव होय घातक ॥ +अतिविवेक ॐअधर्मी ॥ ३८ ॥ ऐक त्याचें कौतुक ॥ अहोरात्र निद्रा अधिक ॥ निद्रेवेगळें ब्रह्मसुख ॥ नावडे देख तामसा ॥ ३९ ॥ पूर्ण वाढल्या तमोगुण ॥ ऐसें होय पुरुषलक्षण ॥ वाढल्या सत्वादि गुण ॥ फळ कोण हरि सांगे ॥ २४० ॥

॥ श्लोक ॥ यदा चित्तं प्रसीदेत इंद्रियाणां च निर्वृतिः ॥ देहेऽभयं मनोऽसंगं तत्सत्वं विद्धि मत्पदम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ वाढलिया सत्वगुण ॥ चित्त सदा सुप्रसन्न ॥ कामक्रोधलोभाचें स्फुरण ॥ सर्वथा जाण स्फुरेना ॥ ४१ ॥ चित्त वणवणी विषयालागीं ॥ तें उदास होय विषयभोगीं ॥ विषय आदळतांही अंगीं ॥ तें विषयसंगीं विगुंतेना ॥४२॥ जेवीं जळामाजीं जळस्थ ॥ पद्मिणीपत्र[1] जळीं अलिप्त ॥ तेवीं विषयामाजीं चित्त ॥ विषयातीत मद्बोधें ॥ ४३ ॥ सदा मरणभय देहासी ॥ तें मरण आलिया देहापाशीं ॥ भय नुपजे सात्विकासी ॥ भावें मत्पदासी विनटले ॥ ४४ ॥ जंववरी भासे मीतूंपण ॥ तंववरी अवश्य बाधी मरण ॥ सात्विक मत्पदीं अभिन्न ॥ यालागीं मरणभय त्या नाहीं ॥ ४५ ॥ सात्विक मत्पदीं अनन्यशरण ॥ यालागीं बाधीना जन्ममरण ॥ या स्थितीं वर्तवी सत्वगुण ॥ ऐक लक्षण रजाचें ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ विकुर्वन् क्रियया चाधीरनिर्वृत्तिश्च चेतसाम् ॥ गात्रास्वास्थ्यं मनो भ्रांतं रज एतैर्निशामय ॥ १७ ॥

॥ टीका ॥ खवळलिया रजोगुण ॥ विषयचिंता अतिदारुण ॥ कर्मेंद्रियीं क्रियाभरण ॥ नानापरीचें जाण उत्पादी[2] ॥ ४७ ॥ शरीर असतांही स्वस्थ ॥ मन चिंतातुर अतिभ्रांत ॥ वाढावितां विषयस्वार्थ ॥ दुःखी होत सर्वदा ॥ ४८ ॥ असतां पुत्रवित्तसंपत्ती ॥ अधिक स्वार्थ वाढवी चित्तीं ॥ राजसाची चित्तवृत्ती ॥ न मनी निवृत्ती क्षणार्ध ॥४९॥ नसतां विकाराचें कारण ॥ ॐचित्तीं विकार चिंती आपण ॥ हेंचि राजसाचें लक्षण ॥ मुख्यत्वें जाण उद्धवा ॥ २५० ॥ रात्री नोहे पैं प्रबळ ॥ ना दिवस नव्हे सोज्वळ ॥ जैसी झांवळी[3] सांजवेळ ॥ तैसा केवळ रजोगुण ॥ ५१ ॥ सत्वरजांची उणखूण ॥ तुज दाविली वोळखण ॥ आतां ऐक तमोगुण ॥ जड लक्षण तयाचें ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ सीदच्चित्तं प्रलीयेत चेतसो ग्रहणे क्षमम् ॥ मनो नष्टं तमो ग्लानिस्तमस्तदुपधारय ॥ १८ ॥

॥ टीका ॥ चित्तीं चिंता अतिगहन ॥ ते महामोहीं होय निमग्न ॥ कोणेही अर्थाचें ज्ञान ॥ हृदयीं जाण स्फुरेना ॥ ५३ ॥ सुषुप्तीवेगळें अज्ञान ॥ सदा पळे देखोनि ज्ञान ॥ तेथ नवल केसें झालें जाण ॥ त्या ज्ञानातें अज्ञान गिळूनि ठाके ॥ ५४ ॥ जागाचि परी निजेला दिसे ॥ कर्म करी, स्फुरण नसे ॥ जेवीं कां आभाळांतिले ×अंवसे ॥ रात्रीं चाले जैसें आंधळें ॥५५॥

१ कमलपत्र. २ उत्पन्न करणें. ३ गाढझांपेवांचून.

*मो. निःशेष लयेज्ञानशक्ती. +ना. अति अविवेक, मो. अधर्म. ॐना. चित्त विकार. ×मो. असे.

सकळ शरीराचा गोळा ॥ होय आळसाचा मोदळा ॥ हा तमोग्लानीचा सोहळा ॥ पडळ [1] डोळां चित्तवृत्ती ॥ ५६ ॥ *संकल्पविकल्पाची ख्याती ॥ उपजवी सदा मनोवृत्ती ॥ त्य मनाची जड होय स्थिती ॥ संकल्पस्फूर्ती स्फुरेना ॥ ५७ ॥ आणिकही नवलस्थिती ॥ चित्तासि नाठवे चित्तस्फूर्ती ॥ एवढी वाढे तमाची ख्याती ॥ मनोवृत्तीविनाशक ॥ ५८ ॥ यापरी तमाचें बळ होय ॥ तें मनातें +अज्ञान खाय ॥ ते काळीं मन ❀नष्टप्राय ॥ मूर्च्छित राहे मूढत्वें ॥ ५९ ॥ ०मन जें निःशेष नासतें ॥ तें महादुःखें कोण भोगितें ॥ यालागीं तमाचेनि ऐक्यमतें ॥ मन उरे तेथें जडमूढ ॥२६०॥ यापरी जे वर्तती गती ॥ ×तेचि ते अत्यंत दुःखदाती ॥ या नांव गा तमाची स्थिती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ६१ ॥ वाढवितां गुणवृत्ती ॥ कोणे गुणें कोण वाढती ॥ येचि अर्थाची उपपत्ती ॥ स्वयें श्रीपती सांगत ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ एधमाने गुणे सत्वे देवानां बलमेधते ॥ असुराणां च रजसि तमस्युद्धव रक्षसाम् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ दैवी आसुरी राक्षसी स्थिती ॥ हे त्रिगुणगुणांची संपत्ती ॥ जेजे ब्रह्मांडीं *इंद्रियवृत्ती ॥ तेचि स्थिती पिंडींही ॥ ६३ ॥ ब्रह्मांडीं सकळ देव ॥ महापुरुषाचे अवयव ॥ पिंडींही तेचि स्वयमेव ॥ वर्तती सर्व निजऐक्यें ॥ ६४ ॥ उचित स्वधर्मशास्त्रस्थिती ॥ निवृत्तिकर्मीं जे प्रवृत्ती ॥ ऐशी जेथ इंद्रियवृत्ती ॥ ते दैवी संपत्ती सत्वस्थ ॥ ६५ ॥ कामाभिलाष दृढ चित्तीं ॥ आणि स्वधर्मीं तरी वर्तती ॥ ऐशी जे इंद्रियस्थिती ॥ ते आसुरी संपत्ती राजस ॥ ६६ ॥ सलोभमोहें क्रोध चित्तीं ॥ सदा अधर्मीं प्रवृत्ती ॥ ऐशी जे इंद्रियस्थिती ॥ ते राक्षसी संपत्ती तामस ॥ ६७ ॥ क्षणें सकाम क्षणें निष्काम ॥ ऐसा जेथ वाढे स्वधर्म ॥ तेथ देवां असुरां परम ॥ होय संग्राम वृत्तीसी ॥ ६८ ॥ चित्तीं वाढवूनि मोहभ्रम ॥ अधर्माचि मानी स्वधर्म ॥ तें राक्षसाचा पराक्रम ॥ देवांसुरां परम निर्दाळी ॥ ६९ ॥ सकामानिष्काममोहभ्रमेंसी ॥ वृत्ती वर्ते गा जयापाशीं ॥ तेथ देवां असुरां राक्षसांसीं ॥ कलहो अहर्निशीं अनिवार ॥ २७० ॥ क्षणेक रति परमार्थीं ॥ क्षणेक रति अर्थस्वार्थीं ॥ क्षणेक होय अनर्थीं ॥ परदारारती परद्रव्य ॥ ७१ ॥ ऐशिये गा चित्तवृत्तीं ॥ कदा नुपजे निजशांती ॥ मा परमार्थाची प्राप्ती ॥ कैशा रीतीं होईल ॥ ७२ ॥ साधक सर्वदा पुसती ॥ कोण बाधा असे चित्तवृत्तीं ॥ ते बाधकत्वाची स्थिती ॥ विशद तुजप्रती सांगीतली ॥ ७३ ॥ एकाचि गुण जैं पुरता जोडे ॥ तें 3एकविध वृत्ती वाढे ॥ हें तंव सर्वथा न घडे ॥ 7गुण गुणासी भिडे उपमर्दें ॥ ७४ ॥ एकाचि न जोडे गुणावस्था ॥ यालागीं नव्हे एकविधता ॥ तेणें अनिवार भवव्यथा ॥ बाधी भूतां गुणक्षोभें ॥ ७५ ॥ तम अधर्माकडे वाढे ॥ रजोगुण देहधर्माकडे ॥ सत्वगुणासी वाढी नघडे ॥ मुक्तता जोडे कैसेनी ॥ ७६ ॥ रजतमउभयसंधीं ॥ सत्व अडकलें दोहींमधीं ॥ तें वाढों न शकें त्रिशुद्धीं ॥ नैराश्यवृद्धी सत्वगुणें ॥ ७७ ॥ त्रिगुणगुणांची त्रिपुटी ॥ आपण कल्पी आपल्या पोटीं ॥ तेंचि भवभय होऊनि उठी ॥ लागे पाठीं बाधकत्वें ॥७८॥ सत्वें देवांसि प्रबळ बळ ॥

१ अज्ञानाचा व विषादाचा. २ देहांतहि. ३ निष्कामकर्मी.

*ना. सकळ विकल्पाची. +ना. अज्ञानदशा ये, मो. ज्ञान खाये. ❀मो. नष्टप्राय होय. ०ना. निर्दोष जें असतें. ×मो. तें चित्तें. *मो. इंद्रियप्रवृत्ती. 3ना. एकाविधता. 7ना. गुणें गुणासी घडे उपमर्द.

रजोगुणें दैत्य प्रबळ ॥ तमोगुणें केवळ ॥ आतुर्बळ तें असे राक्षसां ॥ ७९ ॥ हे गुणवृद्ध व्यवस्था ॥ समूळ सांगीतली कथा ॥ त्रिगुणांच्या तिनी अवस्था ॥ ऐक आतां सांगेन॥२

॥ श्लोक ॥ सत्वाज्जागरणं विद्याद्रजसा स्वप्नमादिशेत् ॥ प्रस्वापं तमसा जंतोस्तुरीयं त्रिषु संततम् ॥ २० ॥

॥ टीका ॥ सत्वगुणाचिये स्थिती ॥ ०नाडळे स्वप्न आणि सुषुप्ती ॥ जीवीं सदा नांदे जागृत इंद्रियवृत्ती सावध ॥ ८१ ॥ रजोगुणाचेनि आधिक्यें ॥ चित्तवृत्तीतें स्वप्न जिंके ॥ जागृ सुषुप्ति दूरी ठाके ॥ बैसलाही देखे स्वप्नची ॥ ८२ ॥ तमोगुण वाढल्या वाढी ॥ जागृति स दूरी दवडी ॥ मग सुषुप्तीचि अति गाढी ॥ आदळे रोकडी जीवा अंगीं ॥ ८३ ॥ त्यासि र बैसल्या पाहे ॥ बोलत बोलतां डुलकी जाये ॥ जेवित जेवितांही पाहे ॥ झोंपीं जाये डकड ॥ ८४ ॥ क्षणां जागृति क्षणां सुषुप्ती ॥ क्षणेक स्वप्नाची प्रतीती ॥ हे त्रिगुणांची मिश्रित वृत्त जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८५ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ती ॥ तिहीं अवस्थांतें प्रकाशिती ॥ याल गीं तीतें चौथी ॥ तुरीया ह्मणती सज्ञान ॥ ८६ ॥ जे जागृतीतें जागवीत ॥ जे स्वप्नीं स्वप्न तें नांदवीत ॥ जे सुषुप्तीतें ✱निजवीत ॥ त्यातें तुरीया ह्मणत उद्धवा ॥ ८७ ॥ जे तिहीं अवस्थां आंत ॥ असोनि नव्हे अवस्थाभूत ॥ जे निर्गुण +निजनित्य ॥ त्यातेंचि ह्मणत तुरी ॥ ८८ ॥ जेवीं पुत्राचेनि जाहलेपणें ॥ पुरुषें पिता नांव पावणें ॥ तेवीं तिहीं अवस्थागुणें तुरीया ह्मणणे वस्तूसी ॥ ८९ ॥ वस्तूवरी अवस्था भासे ॥ भासली अवस्था सवेंचि नासे *त्या नाशामाजीं वस्तु न नासे ॥ उरे =अविनाशें तुरीये ॥ २९० ॥ तुरीया त्रिकाळीं सतत यापरी जाणावें येथ ॥ आतां गुणवृद्धिभूमिका प्राप्त ॥ तोही वृत्तांत हरि सांगे ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ उपर्युपरि गच्छंति सत्वेन ब्राह्मणा जनाः ॥ तमसाऽधोऽध आमुख्याद्रजसांऽतरचारिणः ॥ २१ ॥

॥टीका॥ सत्वगुणाचें आयतन ॥ मुख्यत्वें ×ब्राह्मण जन॥ ते न करूनि ब्रह्मार्पण॥स्वधर्माचरण जे करिती ॥९२॥त्यांसि स्वधर्माच्या कर्मशक्तीं ॥ ऊर्ध्वलोकीं होय गती॥ लोकलोकांतरप्राप्ती॥ ब्राह्मण पावती तें ऐक ॥ ९३ ॥ स्वर्लोक महर्लोक ॥ कमूनि पावती जनलोक ॥ उल्लंघूनि येथें तपोलोक ॥ पावती सात्विक सत्यलोक पैं ॥ ९४ ॥ वाढलिया रजोगुण ॥ शूद्रादिचांडाळ रण। पुढती जन्म पुढती मरण ॥ अविश्रम जाण भोगवी ॥ ९५ ॥ वाढलिया तमोगुण ॥ पश्वादि योनि पावेल ॥ -दंशें मशक वृक्ष पाषाण ॥ या योनि संपूर्ण भोगवी ॥ ९६ ॥ प्राण्यासि अंत काळीं जाण ॥ देहांतीं जो वाढे गुण ॥ त्या मरणाचें फळ कोण ॥ तेंही श्रीकृष्ण स्वयें सां ॥ ९७ ॥ अनन्य करितां माझी भक्ती ॥ भक्तांसि अंतीं कोण गती ॥ तेहीविषींची उपपत्ती । श्लोकार्थें हरि सांगे ॥ ९८ ॥

॥ श्लोक ॥ सत्वे प्रलीनाः स्वर्यांति नरलोकं रजोलयाः ॥ तमोलयास्तु निरयं यांति मामेव निर्गुणाः ॥ २२ ॥

१ अपार बळ. २ चवथी. ३ घर. ४ चतुष्पादजनावरांचा जन्म. ५ रानमाशी. ६ डांस,चिलट, मच्छर ०ना. नावडे. ✱मो. निववित. +मो. निजें सत्य. *मो. त्या लागीं अवस्थेमाजी वस्तु नसे =ना. अविनाश तुरिया ॥ ×मो. ब्राह्मणभजन.

टीका ॥ संसारीं मुख्यत्वें त्रिगुण ॥ तेथ वाढोनियां सत्वगुण ॥ ज्यासि प्राप्त होय मरण ॥ तो स्वर्गभागीं जाण दिव्यदेह पावे ॥ ९९ ॥ सत्वें निमाल्या सात्विक ॥ ते पावती स्वर्गलोक॥ रजोगुणें निमाल्या देख ॥ त्यासि मनुष्यलोक मानवी ॥ ३०० ॥ अंतीं वाढोनि तमाधिक्य ॥ तमोगुणें निमाल्या देख ॥ ते भोगिती महानरक ॥ दुःखदायक दारुण ॥ १ ॥ सप्रेम करितां माझी भक्ती ॥ माझिया भक्तांसि देहांतीं ॥ हृदयीं प्रकटे माझी मूर्ती ॥ घवघविती निजतेजें ॥ २ ॥ शंखचक्रगदादिसंपूर्ण ॥ पीतांबरधारी श्रीकृष्ण ॥ ध्यानीं धरूनि पावे मरण ॥ तो वैकुंठीं जाण मी होयें ॥ ३ ॥ सर्वभूतीं मी आत्मा पूर्ण ॥ ऐसें ज्याचें अखंड भजन ॥ ते जितांचि तिन्ही गुण ॥ जिणोनि निर्गुण पावती ॥ ४ ॥ त्यांचे देहासि दैवें आलिया मरण ॥ मजवेगळें नाहीं स्थान ॥ ते निजानंदें परिपूर्ण ॥ निजनिर्गुण स्वयें होती ॥ ५ ॥ माझें स्वरूप निजनिर्गुण ॥ अथवा वैकुंठींचें सगुण ॥ दोन्ही एकचि निश्चयें जाण ॥ सगुणीं निर्गुण समसाम्य ॥ ६ ॥ स्वर्ग नरक मनुष्यलोक ॥ प्राप्ति पावले निर्गुण चोख ॥ त्यांच्या साधनाचें कौतुक ॥ स्वयें यदुनायक सांगत ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ मदर्पणं निष्फलं वा सात्विकं निजकर्म तत् ॥ राजसं फलसंकल्पं हिंसाप्रायादि तामसम् ॥ २३ ॥

टीका ॥ सकळ कर्मक्रियाचरण ॥ संकल्पेंवीण आपण ॥ सहजें होय ब्रह्मार्पण ॥ हें निर्गुण साधन शोधितसत्वें ॥ ८ ॥ वर्णाश्रमधर्म सकळ ॥ आचरे परी न वांछी फळ ॥ माझे भक्तीचें प्रेम प्रबळ ॥ हें कर्म केवळ सात्विक ॥ ९ ॥ माझें भजन हाचि स्वधर्म ॥ याचि नांव [1]निजकर्म ॥ ऐसें ज्यासि कळे वर्म ॥ सात्विक कर्म या नांव ॥ ३१० ॥ स्वधर्म आचरोनि सकळ ॥ इंद्रादिदेवां यजनशीळ ॥ जो वांछी [2]इहामुत्रं फळ ॥ हें कर्म केवळ राजस ॥ ११ ॥ जे कर्मीं प्रकट हिंसा घडे ॥ कां [2]आभिचारिक [3]करणें पडे ॥ स्वरूपें जें कर्म कुडें ॥ तें जाण धडफुडें तामस ॥ १२ ॥ जेथ दांभिक कर्माचारू ॥ जेथ साधूंसि अति मत्सरू ॥ जेथ निंदेचा प्रबळ भरू ॥ तो कर्मादरू तामस ॥ १३ ॥ आतां ×त्रिगुण आणि निर्गुण ॥ यांचें चतुर्विध लक्षण ॥ *स्वयें श्लोकीं श्रीकृष्ण ॥ स्वमुखें आपण सांगत ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ कैवल्यं सात्विकं ज्ञानं रजो वैकल्पिकं च यत् ॥ प्राकृतं तामसं ज्ञानं मन्निष्ठं निर्गुणं स्मृतम् ॥ २४ ॥

टीका ॥ देहीं असोनि देहातीत ॥ भूतीं भूतात्मा भगवंत ॥ भूतां [4]सबाह्य सभरोंभरित ॥ हें ज्ञान निश्चित सात्विक ॥ १५ ॥ भिन्न खाणी भिन्नाकार ॥ भिन्न नांवें भिन्न व्यापार ॥ तेथ वस्तु देखे अभिन्नाकार ॥ हें ज्ञान साचार सात्विक ॥ १६ ॥ करूनि वेदशास्त्रपठन ॥ निर्धारितां निजज्ञान ॥ सर्वचि विकल्पी आपण ॥ विकल्प पूर्ण रजाचे ॥ १७ ॥ करूनि वार्तिकांत व्युत्पत्ती ॥ अद्वैत निश्चयो नाहीं चित्तीं ॥ आपण विकल्पी आपुल्या युक्ती ॥ तें ज्ञान निश्चितीं राजस ॥ १८ ॥ करूनि वेदशास्त्रश्रवण ॥ होय शिश्नोदरपरायण ॥ इंद्रियार्थीं श्रद्धा पूर्ण॥ तो केवळ जाण राजस ॥ १९ ॥ एक निश्चयो नाहीं चित्तीं ॥ विकल्प उपजती नेणों किती ॥ हे

---

१ कर्तव्यकर्म. २ या लोकीं व परलोकीं. ३ शत्रुमारणादिक. ४ व्यापक.
२ना. अभिचार. ×मो. सगुण आणि. *ना. साही श्लोकीं.

3रजोगुणाची ज्ञानवृत्ती ॥ ऐक निश्चितीं तमोज्ञान॥३२०॥महामोहो गिळी ज्ञानस्फूर्ति ॥ मी ६ 6अंध मानी निश्चितीं ॥ नश्वरपदार्थी आसक्ती ॥ तें ज्ञान निश्चितीं तामस ॥२१॥ आहार नि भय मैथुन ॥ केवळ पशुप्राय जें ज्ञान ॥ तें निश्चयें तामस जाण ॥ ऐक निर्गुणविभाग ॥ २२ कार्य कर्ता आणि कारण ॥ त्रिपुटी त्रिगुणेंसि करूनि शून्य ॥ केवळ जें चैतन्यघन ॥ निर्गुण ज्ञान उद्धवा ॥ २३ ॥ सत्वाचेनि निजउल्हासें ॥ सर्वेंद्रियीं ज्ञान प्रकाशे ॥ तें ज्ञानां मानी वायसें ॥ मी ज्ञानरूप 8असें अनादि ॥ २४ ॥ +सिंधुजळें सरिता वाहती ॥ त्या अ लिया सिंधूप्रती ॥ तेणें उल्हासेना अपांपती ॥ तेवीं ज्ञानस्फूर्ती श्लाघेना ॥ २५ ॥ रजोगु आलिया सकाम ॥ त्यासि क्षोभूं नशके काम ॥ हाणे 1माझेनि चाले काम कर्म ॥ शेखीं म निष्काम निजांगें ॥ २६ ॥ हो कां काम्यकर्माचा सोहळा ॥ जेवीं सूर्यासी बाधीना उन्हाळा तेवीं काम्यकर्मीं मी जिव्हाळा ॥ माझेनि सोज्वळा काम मिरवे ॥ २७ ॥ तमोगुणाच्या झ डाडा ॥ पहिला महामोहाचा वेढा ॥ न करितां मोहाचा 2निजझाडा ॥ ×मोहनिर्मोहीं गाढ आपणापें आपणा जाणे ॥ २८ ॥ सूर्य न दिसे जिकडे ॥ अंधारू व्यापी तिकडे ॥ तेवें स्वरूपनिष्ठेपुढें ॥ न बाधी सांकडें मोहाचें ॥ २९ ॥ अंगीं आदळतां तिन्ही गुण ॥ जो गज बजीना आपण ॥ ते निष्ठा निजनिर्गुण ॥ उद्धवा जाण निश्चित ॥ ३० ॥ अज्ञानाच्या अव सरीं ॥ ज्ञानाची चाड न धरी ॥ प्रवर्ततां कायाचारीं ॥ निष्कामाचा न करी पांगडा ॥ ३१ ॥ आदळतां मोहाचीं झडें ॥ ज्याचा बोध कदा न पालटे ॥ =त्रिगुणीं निर्गुणत्वें राहाटे ॥ मा झिया निष्ठे मद्भक्त ॥ ३२ ॥ त्रिगुणांचा त्रिविध वास ॥ आणि निर्गुण निजरहिवास ॥ येचि अर्थी हृषीकेश ॥ विशद विलास सांगत ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ वनं तु सात्विको वासो ग्रामो राजस उच्यते ॥ तामसं द्यूतसदनं मन्निकेतं तु निर्गुणम् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ पवित्र आणि तीर्थभूत ॥ विजन वन एकांत ॥ ऐशिये वस्तीं सुखावे चित्त ॥ तो वास निश्चित सात्विक ॥ ३४ ॥ वस्ती व्यवहारीं व्यापारीं ॥ कां सदा सन्मानें राजद्वारीं ॥ विवाहमंडपामाझारीं ॥ ज्यासि प्रीति भारी वस्तीसी ॥ ३५ ॥ ज्यासि आवडे 7धनसंपदा ॥ निकटवासें वस्ती प्रमदा ॥ जो नगरीं ग्रामीं वसे सदा ॥ हे वस्ती संपदा राजस ॥ ३६ ॥ जेथ सन्मान वांछी चित्त ॥ सदा क्षोभें विषयासक्त ॥ ऐसऐशी वस्ती जेथ ॥ ते जाण निश्चित राजस ॥ ३७ ॥ जेथ साधुनिंदा जोडे ॥ जेथ गुणदोषीं दृष्टि वाढे ॥ ऐशिया ठायीं वस्ती आ वडे ॥ तें तामसाचें गाढें निवासस्थान ॥ ३८ ॥ जेथ कलहाचें कारण ॥ जेथ अविवेकी होय मन ॥ वेश्या द्यूत मद्यसदन ॥ हें निवासस्थान तामसा ॥ ३९ ॥ देवालयीं धवधविती ॥ देखो- नि माझी निजमूर्ती ॥ सुखस्वरूप राहे 4चित्तवृत्ती ॥ ते निर्गुण वस्ती उद्धवा ॥ ४० ॥ अभेद भक्तांचें निजमंदिर ॥ 0तें मज निर्गुणाचें निजघर ॥ तेथ सुखत्वें ज्याची *वृत्ती स्थिर ॥ ते वस्ती साचार निर्गुण ॥ ४१ ॥ निर्गुणासि घरठावो ॥ हें बोलणें ह्मणसी वावो ॥ जेथ उपजे

---

१ नाशिवंतवस्तूचे ठिकाणीं. २ व्यर्थ. ३ समुद्र. ४ अपेक्षा, गरज. ५ स्त्री.

3मो. रजोज्ञानाची 6ना. अधम मानी. 8मो. ऐसें. +मो. सिंधुजळ. 1ना. माझें निवालें काम्यकर्म. 2ना. निझाडा. ×ना. मोहनिर्मोह गाढा आपणपा जाणे.=ना. निर्गुणीं. 7ना. जन- संपदा. 4ना. निजवृत्ती. 0मो. तें निज निर्गुणीं निजघर. *ना. वस्ती.

ब्रह्मसद्भावो ॥ ते वस्ती पहाहो निर्गुण ॥ ४२ ॥ विषयातीत निजस्थिती ॥ सुखें सुखरूप राहे वृत्ती ॥ ते निगुणांची निजवस्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ४३ ॥ सांडूनि आकाराचें ज्ञान ॥ ²निराकारीं सुखसंपन्न ॥ वृत्ति स्थिरावे परिपूर्ण ॥ ते वस्ती निर्गुण ⁹जनीं विजनीं ॥ ४४ ॥ त्रिगुणसंगें त्रिविध कर्ता ॥ निर्गुणलक्षणीं लक्षिजे चौथा ॥ चतुर्विध कर्त्यांची व्यवस्था ॥ ऐक आतां सांगेन ॥ ४५ ॥

॥ श्लोक ॥ सात्विकः कारकोऽसंगी रागांधो राजसः स्मृतः ॥ तामसः स्मृतिविभ्रष्टो निर्गुणो मदपाश्रयः ॥ २६ ॥

॥ टीका ॥ 'कांटेनि कांटा फेडितां ॥ जेवीं निवारे ⁰निजव्यथा ॥ तेवीं संगें संगातें छेदितां ॥ सात्विकता असंगी' ॥ ४६ ॥ 'सद्गुरुचरणसत्संगें ॥ सकळ संग छेदी विरागें ॥ सात्विक कर्ता निजांगें ॥ विषयसंगें असंगी' ॥ ४७ ॥ फळाभिलाषेच्या चित्तीं गांठी ॥ तेणें अंध झाली विवेकदृष्टी ॥ राजस कर्ता फळाशेसाठीं ॥ अतिदुःखकोटी स्वयें सोशी ॥ ४८ ॥ निःशेष हारपे विवेकज्ञान ॥ स्मृति सैरा वळघे रान ॥ नाठवे कार्य कारण ॥ ऐसा कर्ता जाण तामस ॥ ४९ ॥ अनन्यभावें हरीसि शरण ॥ कर्मचाळक श्रीनारायण ॥ कदा न धरी कर्माभिमान ॥ हा कर्ता निर्गुण निश्चयें ॥ ३५० ॥ त्रिगुणांची श्रद्धा त्रिविध ॥ निर्गुणाची श्रद्धा शुद्ध ॥ येच अर्थांचें विशद ॥ स्वयें गोविंद सांगत ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ सात्विक्याध्यात्मिकी श्रद्धा कर्मश्रद्धा तु राजसी ॥ तामस्यधर्मे या श्रद्धा मत्सेवायां तु निर्गुणा ॥ २७ ॥

॥ टीका ॥ देह इंद्रिय चेतना प्राण ॥ येणेंसि स्फुरे जें मीपण ॥ तेथ विवेक करूनियां पूर्ण ॥ आपलें मीपण आपण पाहे ॥ ५२ ॥ 'देह नव्हें मी जडमूढत्वें ॥ इंद्रियें नव्हें मी एकदेशित्वें ॥ प्राण नव्हें मी चपळत्वें ॥ मन ⁵चंचळत्वें कदा मी नव्हें ॥ ५३ ॥ चित्त नव्हें मी ⁴चेतकत्वें ॥ बुद्धि नव्हें मी बोधकत्वें ॥ अहं नव्हें मी बाधकत्वें ॥ मी तो आदि अनादिसिद्ध' ॥ ५४ ॥ एवं मीपणाचें निजसार ॥ ॥ विवंचूं जाणे बुद्धिचतुर ॥ ते +अध्यात्मश्रद्धा उदार ॥ सात्विक नर सदा वाहती ॥ ५५ ॥ जें जें मी नव्हें ह्मणत जाये ॥ तें मी देखन्या मीचि आहें ॥ माझ्या मीपणाचे वंदिल्या पाये ॥ मीचि मी ठायें कोंदोनी ॥ ५६ ॥ हे आध्यात्मिकी शुद्ध श्रद्धा ॥ सात्विकापाशीं वसे सदा ॥ आतां राजसाची श्रद्धा ॥ ऐक प्रबुद्धा सांगेन ॥ ५७ ॥ मी एक येथें वर्णाश्रमी ॥ मी एक येथें आश्रमधर्मी ॥ मी एक येथें कर्ता कर्मी ॥ हें मनोधर्मी दृढ ×मानी ॥ ५८ ॥ येणें भावार्थें कर्मतत्पर ॥ कुशमृत्तिकेचा अत्यादर ॥ अतिशयें वाढवी शौचाचार ॥ विधिनिषेधीं थोर आवर्त भंवे ॥ ५९ ॥ दोषदृष्टीच्या रंगणीं ॥ मिरवती गुणदोषांच्या श्रेणी ॥ पवित्रपणाच्या अभिमानीं ॥ ब्रह्मयासि न मनी शुचित्वें ॥ ३६० ॥ देहाभिमान घेऊनि खांदा ॥ सत्य मानणें कर्मबाधा ॥ ते हे राजसाची कर्मश्रद्धा ॥ जाण प्रबुद्धा उद्धवा ॥ ६१ ॥ अविवेक अधिक वाढे ॥ जेणें अकर्म अंगीं घडे ॥ ०अधर्मांची जोडी जोडे ॥ हे श्रद्धा आव-

१ मनास वाटेल तिकडे.

²मो. निर्विकारीं. ⁹ना. जाण उद्धवा. ⁰मो. भवव्यथा. ⁵मो. शून्यत्वें. ⁴मो. चित्तत्वें. +मो. अध्यात्म शुद्ध. ×मो. मती. ०मो. अकर्मांची.

हे तामसी ॥ ६२ ॥ जेथ अपेयाचें पान ॥ स्वेच्छा अभक्ष्यभक्षण ॥ अगम्यादि घडे गम हे श्रद्धा संपूर्ण तामसी ॥ ६३ ॥ अधर्म तोचि मानी धर्म ॥ हें तामसी श्रद्धेचें कर्म ॥ ३ निर्गुण श्रद्धा परम ॥ उत्तमोत्तम ते ऐक ॥ ६४ ॥ सर्वभूतीं भगवंत ॥ ऐशिये श्रद्धा श्रद्धा अनन्यभावें भूतां भजत ॥ तो भजनभावार्थ निर्गुण ॥ ६५ ॥ स्त्री पुत्र वित्त जीवित ॥ म गीं कुरवंडी करीत ॥ अनन्यभावें जे मज भजत ॥ 5ते श्रद्धा निश्चित निर्गुण ॥६६॥ चारी षार्थ त्यागिती ॥ उपेक्षूनि चारी मुक्ती ॥ ऐक्यभावें मज भजती ॥ ते श्रद्धा संपत्ती नि ॥ ६७ ॥ निष्काम नामस्मरण ॥ निर्लोभ हरिकीर्तन ॥ भावार्थें जें जें भजन ॥ ते श्रद्धा नि उद्धवा ॥ ६८ ॥ त्रिगुणांचा त्रिविध आहारु ॥ स्वयें सांगे शारंगधरू ॥ निर्गुण आहार प्रकारु ॥ सखोल विचारु हरि सांगे ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ पथ्यं पूतमनायस्तमाहार्यं सात्विकं स्मृतम् ॥ राजसं चेंद्रियप्रेष्ठं तामसं चार्तिदाशुचि ॥ २८ ॥

॥ टीका ॥ ०पवित्र आणि ×हळवार ॥ सत्ववृद्धीसि हितकर ॥ अप्रयासीं प्राप्ति साचार सात्विक आहार या नांव ॥ ३७० ॥ अल्पाहार या नांव पथ्य ॥ पवित्र ह्मणिजे धर्मार्जित तेहीं अप्रयासें प्राप्त ॥ तो जाण निश्चित सात्विकाहार ॥ ७१ ॥ गोड, खरपूस, आंबट, तळींव, गोळींव, तिखट, ॥ चिरींव, चोळींव, तुरट, ॥ वळींव, वळिवट आळिलें, ॥ ७२ रसीं रसांतर मिळणी ॥ पन्हीं, 7कालवेणीं, शिखरणी,॥कुडकुडं, निपुंस सलवणी॥ आहारभेद राजसा ॥ ७३ ॥ नानापरीच्या आवडी ॥ सडिंवा, सोलिंवा, परवडी ॥ रसनासुखाची अति गोडी ॥ तो आहार निरवडी राजस ॥ ७४ ॥ नानापरीचे आयास ॥ करूनि अतिप्रयास आहार सेविती राजस ॥ ऐक तामस भोजन ॥ ७५ ॥ सेवितां दुर्गंधि उन्मादक ॥ परिपाक करी मूर्ख ॥ अशुचि आणि दुःखदायक ॥ हा आहार देख तामस ॥ ७६ ॥ भगवंताचा शुद्ध प्रसाद ॥ साधुसज्जनांचें शेष शुद्ध ॥ हा निर्गुण आहार प्रसिद्ध ॥ प्रकारें गोविंद बोलिल ॥७७॥ ग्रासोग्रासीं गोविंद ॥ येणें स्मरणें अन्न शुद्ध ॥ हा निर्गुण आहार प्रसिद्ध ॥ प्रकारें गो विंद बोलिला ॥ ७८ ॥ अन्न ब्रह्म अहंच ब्रह्म ॥ पंक्तीकर तोही ब्रह्म ॥ ऐसा ज्याचा भोजनानु क्रम ॥ तो आहार परम निर्गुणत्वें ॥ ७९ ॥ त्रिगुणांचें त्रिविध सुख ॥ निर्गुण सुख अलौलिक त्याही सुखांचा परिपाक ॥ यदुनायक स्वयें सांगे ॥ ३८० ॥

॥ श्लोक ॥ सात्विकं सुखमात्मोत्थं विषयोत्थं तु राजसम् ॥तामसं मोहदैन्योत्थं निर्गुणं मदपाश्रयम् ॥ २९ ॥

॥ टीका ॥ सांडूनि विषयसुखाची स्फूर्ती ॥ आत्मसुखें सुखावे चित्तवृत्ती ॥ ऐशिया निजसु खाची प्राप्ती ॥ तें सुख निश्चितीं सात्विक ॥ ८१ ॥ गंगापूर भरे उंन्नतीं ॥ तेणें अमर्याद वोढे भरती ॥ तेवीं आत्मसुखाचिये प्राप्ती ॥ इंद्रियां तृप्ती स्वानंदें ॥ ८२ ॥ नानाविषयाचें कोड ।

---

१ हलका, मऊ, नाजूक. २ अंब्याचें पन्हें वगैरे. ३ कढी, सार, आमटी वगैरे. ४ केळ्याची शिकरण वगैरे. ५ कुडकुडीत पापड पापड्या वगैरे. ६ खाद्य सामग्री. ७ सडीक. ८ सोलिव. ९प्रकार. १०जिव्हासु खाची. ११ बेफाम करणारा. १२ पुष्कळ. १३ आहोटी–भरती.

5ना. तो भजन भावार्थ निर्गुण. ०मो. पवित्र आहार साचार. ×ना. हळसार.7मो.काळेनि

इंद्रियांचा अतिधुमाड ॥ विषयसुख लागे गोड ॥ तें सुख सदृढ राजस ॥ ८३ ॥ अतिनिंद्य आणि उन्मादी ॥ तेंचि सुख आवडे बुद्धी ॥ तामस सुखाची हे शुद्धी ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ८४ ॥ हृदयीं प्रकटल्या माझी मूर्ती ॥ विसरे संसाराची स्फूर्ती ॥ त्यावरी जे होय सुखप्राप्ती ॥ तें सुख निश्चितीं निर्गुण ॥ ८५ ॥ सर्वभूतीं वसे भगवंत ॥ तोचि मी हा तात्त्विकार्थ ॥ ऐसेनि मदैक्यें सुख प्राप्त ॥ तो निजसुखार्थ निर्गुण॥८६॥देखिल्या निजात्मसुखस्वरूप ॥ स्वयें होइजे सुखरूप ॥ हे निर्गुण सुखाचे *निजदीप ॥ झडल्या पुण्य पाप पाविजे ॥८७॥ आपण सुखरूप सर्वांगीं ॥ सुख सुखरूप स्वयें भोगी ॥ हे निर्गुण सुखाची मागी ॥ भक्ती अंतरंगीं भोगिजे ॥ ८८ ॥ ' कल्पांताचें पूर्ण भरितें ॥ उरों नेदी नदीनदांतें ॥ तेवीं निर्गुण सुख येथें ॥ देहेंद्रियांतें उरोंनेदी ' ॥ ८९ ॥ जेवीं मृगजळीं जळ नाहीं ॥ तेवीं परब्रह्माच्या ठायीं ॥ प्रपंच स्पर्शिलाचि नाहीं ॥ तें सुख निर्वाहीं निर्गुण ॥ ३९० ॥ ज्या सुखाची मर्यादा ॥ करितां न करवे कदा ॥ सुखें सुखरूप होईजे सदा ॥ हे सुखसंपदा निर्गुण ॥ ९१ ॥ सगुण आणि निर्गुण॥ याचें दाविलें भेदलक्षण ॥ आतां त्याचें उपसंहरण ॥ ग्रंथांतीं जाण हरि करी ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ द्रव्यं देशः फलं कालो ज्ञानं कर्म च कारकः ॥ श्रद्धावस्थाकृतिर्निष्ठा त्रैगुण्यः सर्व एव हि ॥ ३० ॥

॥ टीका ॥ द्रव्यशब्दें आहार त्रिविध ॥ ×देशशब्दें वनग्रामभेद॥फळशब्दें सुखउद्बोध ॥+ सत्वसंबंध विभागें ॥९३॥ काळशब्दें भगवद्भजन॥ कैवल्यनिष्ठा या नांव ज्ञान ॥ कर्म ह्मणिजे मदर्पण ॥ कर्ता तो जाण असंगी ॥९४॥ श्रद्धाशब्दें ※आध्यात्मिकी[3] ॥ अवस्थाशब्दें जागरणादिकीं[4] ॥ आकृतिशब्दें उपरिलोकीं ॥ देवतादिकीं क्रीडन ॥ ९५ ॥ जो गुण वाढे देहांतीं ॥ जेणें गुणें होय अंतःस्थिती ॥ त्यानांव निष्ठा ह्मणती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९६ ॥ भिन्न भिन्न भाग अनेक ॥ किती सांगूं एकेक ॥ अवघें जगचि त्रिगुणात्मक ॥ जाण निष्टंक निजभक्ता ॥ ९७ ॥ संसार समस्त त्रिगुण ॥ यामाजीं मी अवघा निर्गुण ॥ हे तुज कळावया निजखूण ॥ गुणनिरूपण म्यां केलें ॥ ९८ ॥

॥ श्लोक ॥ सर्वे गुणमया भावाः पुरुषाव्यक्तधिष्ठिताः ॥ दृष्टं श्रुतमनुध्यातं बुद्ध्या वा पुरुषर्षभ ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ देखिजे अथवा ऐकिजे ॥ कां मनें जें जें चिंतिजे ॥ तें तें अवघेंचि जाणिजे ॥ मायागुणकाजें त्रिगुणात्मक ॥ ९९ ॥ करावया त्रिगुणांचें मर्दन ॥ प्रकृतिनियंता पुरुष भिन्न ॥ तो सर्वदा सर्वांगें निर्गुण ॥ वर्ते निर्गुण निजसत्ता ॥ ४०० ॥ पुरुषावेगळें समस्त ॥ प्रकृतिकार्य मिथ्याभूत ॥ त्यातें बोलिजे गुणवंत ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ १ ॥ नरदेह पावोनियां येथ॥ जे न साधिती गुणातीत ॥ ते नाडले हातोहात ॥ निजस्वार्थ बुडाला ॥ २ ॥ तैसी नव्हे तुझी मती ॥ विनटलासि भगवद्भक्ती ॥ तेव्हांचि तूं गुणातीतीं ॥ जाण निश्चितीं जडलासी ॥ ३ ॥ हरिभक्तांमाजीं वरिष्ठ ॥ यालागीं निजसुखें वैकुंठ ॥ उद्धवासि ह्मणे पुरुषश्रेष्ठ ॥ भाग्यें उत्कृष्ट

१ प्राबल्य. २ शेवट. ३ आत्मसंबंधी. ४ जागृति आदि.

*मो. सुखदीप. ×मो. त्रास शब्दें गुण ग्राम भेद. +मो. सत्वगंध. ※मो. अध्यात्मकीर्ती.

तूं एक ॥ ४ ॥ त्रिगुणगुणीं सविस्तर ॥ दृढ वाढला संसारतर ॥ त्याचा छेदिता कवण प्रकार॥ तो सारंगधर सांगत ॥ ५ ॥

॥ श्लोक ॥ एताः संसृतयः पुंसो गुणकर्मनिबंधनाः ॥ येनेमे निर्जिताः सौम्य गुणा जीवेन चित्तजाः ॥ भक्तियोगेन मन्निष्ठो मद्भावाय प्रपद्यते ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ सत्वादि तिन्ही गुण एथ ॥ केवळ आणि मिश्रित ॥ पुरुषातें संसारी करीत ॥ गुणकर्मीं निश्चित बांधोनी ॥ ६ ॥ त्रिगुणकर्मास्तव जाण ॥ जीवासि झालें दृढ बंधन ॥ जेवीं घटामाजील जीवन ॥ दावी आडकलेपण रविबिंबा ॥ ७ ॥ घटीं भरल्या समळ जळ ॥ त्यामाजीं रवि दिसे समळ ॥ घटींचें डोलतांचि जळ ॥ कांपे चळचळ रविबिंब ॥ ८ ॥ त्रिगुणांचें कर्माचरण ॥ शुद्धासि आणी जीवपण ॥ तें छेदावया जीवबंधन ॥भगवद्भजन साधावें ॥९॥ जिणावया गुणबंधन ॥ रिघावें सद्गुरूसि शरण ॥ तेथ मद्भावें करितां भजन ॥ वाढे सत्वगुण अतिशुद्ध ॥ ४१० ॥ पायीं जडली लोहाची बेडी ॥ ते लोहेंचि लोहार तोडी ॥ तेवीं सत्व गुणाचिया वाढी ॥ त्रिगुणांतें तोडी गुरुरावो ॥ ११ ॥ तेथ प्रवेशावया गुणातीतीं ॥ अवश्य करावी गुरुभक्ती ॥ जे गुरुभजनीं विश्वासती ॥ त्यांसि चारी मुक्ती आंदण्या ॥ १२ ॥ ज्यासि गुरुचरणीं भगवद्भावो ॥ त्याचे सेवेसि ये ब्रह्मसद्भावो ॥ तेथ ब्रह्मसद्भावेंसि पहाहो ॥ मी देवाधिदेवो स्वयें तिष्ठें ॥ १३ ॥ जे गुरुचरणीं अनन्यशरण ॥ ते सहजें होती ब्रह्मसंपन्न ॥ गुरुरूपें करितां माझें भजन ॥ ब्रह्म समाधान अभक्तां ॥ १४ ॥ उद्धवा ऐसें माझें निज भजन ॥ समूळ जाणशी तूं संपूर्ण ॥ यालागीं 'सौम्य' हें विशेषण ॥ स्वमुखें श्रीकृष्ण संबोधी ॥१५॥ भाग्यें नरदेह पावल्या जाण ॥ अवश्य करावें माझें भजन ॥ येचि अर्थींचें निरूपण ॥ स्वमुखें श्रीकृष्ण प्रतिपादी ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ तस्माद्देहमिमं लब्ध्वा ज्ञानविज्ञानसंभवम् ॥ ३३ ॥ गुणसंगं विनिर्धूय मां भजंतु विचक्षणाः ॥

॥ टीका ॥ ज्या नरदेहाकारणें ॥ अमरें उत्कंठित मनें ॥ त्या देहाचेन जाहलेपणें ॥ ज्ञान पावणें निष्टंक ॥ १७ ॥ नरदेह पावल्या जाण ॥ आपणचि नरदेहे ज्ञान ॥ तेथें करावें माझें भजन ॥ देहाभिमान सांडूनी ॥ १८ ॥ करितां माझें अनन्यभजन ॥ सहजें वाढे सत्वगुण ॥ सत्वगुणास्तव जाण ॥ उपजे ज्ञान सविवेक ॥ १९ ॥ विवेकज्ञानाचिये वृत्ती ॥ रज तम दोनी झडती ॥ शोधितसत्वाचिये स्थिती ॥ अभेदभक्ती उल्हासे ॥४२०॥ करितां माझें अभेदभजन ॥ होय स्वानंदाचें स्वादन ॥ त्या नांव बोलिजे विज्ञान ॥ तेथ तिनी गुण मिथ्यत्वें ॥ २१ ॥ नरदेह जोडलिया हातीं ॥ प्राण्यासि एवढी प्राप्ती ॥ यालागीं मनुष्यदेहीं भक्ती ॥ अवश्य समस्तीं करावी ॥ २२ ॥ हें *भागवतींचें अतिगुह्य ज्ञान ॥ मुख्यत्वेंसी अतिप्राधान्य ॥ भावें करितां माझें भजन ॥ स्त्रिया शूद्रजन उद्धरती ॥ २३ ॥ नरदेह जोडल्या जाण ॥ माझी भक्ति करिती विचक्षण ॥ भजनें जिणोनि गुणागुण ॥ ब्रह्म परिपूर्ण स्वयें होती ॥ २४ ॥ पूर्ण ब्रह्माचिया

१ स्वतंत्र, न मिसळलेलें. २ मळकट. ३ देव. ४ आपोआप—कांहीं एक यत्न न करिता—ज्ञान प्राप्त होत नाहीं.

*मो. भगवंताचें.

प्राप्ती ॥ निरपेक्ष माझी भक्ती ॥ तोचि भजनभाव श्रीपती ॥ पुनः पुनः श्लोकार्थी दृढ दावी ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ निःसंगो मां भजेद्विद्वानप्रमत्तो जितेंद्रियः ॥ ३४ ॥ रजस्तमश्चाभिजयेत्सत्त्वसंसेवया मुनिः ॥ सत्त्वं चाभिजयेद्युक्तो नैरपेक्ष्येण शांतधीः ॥३५॥

॥ टीका ॥ करूनि विषयांची विरक्ती ॥ हृदयीं नापेक्षावी मुक्ती ॥ ऐशी निरपेक्ष माझी भक्ती ॥ वाढत्या प्रीतीं करावी ॥ २६ ॥ ऐसें करितां माझें भजन ॥ विस्मरणासि ये मरण ॥ सर्वेंद्रियीं सावधपण ॥ सहजें जाण ठसावे ॥२७॥ तेणें अनिवार सत्वशुद्धी ॥ सर्वभूतीं भगवद्बुद्धी ॥ दृढ वाढे गा त्रिशुद्धी ॥ हे भजनसिद्धी साधकां ॥ २८ ॥ तेव्हां रज तम दोनी गुण ॥ निःशेष जाती हारपोन ॥ शुद्धसत्वाचें जें स्फुरण ॥ तेणें स्वानंद पूर्ण साधकां ॥ २९ ॥ केवळ उरल्या सत्वगुण ॥ साधकीं ऐसें स्फुरे स्फुरण ॥ जगीं मी एक पावन ॥ धन्यधन्य मी एक ॥४३०॥ मी पावलों शुद्ध बोध ॥ मज प्रकटला परमानंद ॥ ऐसा सुखाचा जो स्फुंद ॥ तो सत्वबाध साधकां ॥ ३१ ॥ ऐसा उरला जो सत्वगुण ॥ तो निवारावया साधन कोण ॥ मी स्वयें सुखस्वरूप आपण ॥ मज सुखाचें स्फुरण तें माया ॥ ३२ ॥ गूळ गुळा गोडपणें पांगे ॥ कीं दुधा दूध गोड लागे ॥ तैसा सुखरूप मी सर्वांगें ॥ वृत्ती सुखभोगें जे कां फुंजे ॥ ३३ ॥ ऐशी साधकीं स्फूर्ती स्फुरे ॥ तंव सत्वगुण स्वरूपीं विरे ॥ तेव्हां सुखाचाहि फुंज सरे ॥ सहजें निजसुख उरे निजशांती ॥ ३४ ॥ ऐसे निवारल्या तिनी गुण ॥ केवळ उरे निर्गुण ॥ तेंचि अर्थींचें निरूपण ॥ विशद श्रीकृष्ण सांगत ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ संपद्यते गुणैर्मुक्तो जीवो जीवं विहाय माम् ॥ जीवो जीवविनिर्मुक्तो गुणैश्चाशयसंभवैः ॥

॥ टीका ॥ वाढल्या सत्वगुणाचा हरिख ॥ त्यातें निर्दळी शुद्धसत्वविवेक ॥ पाठीं विवेकेंसि सत्व देख ॥ हारपे निःशेख निजात्मरूपीं ॥३६॥ ऐसे निमाल्या तिनी गुण ॥ निमे कार्य कर्म कारण ॥ लिंगदेह नाशे पूर्ण ॥ जीवासि जीवपण मिथ्या होय ॥३७॥ तेव्हां कार्य कर्म कर्ता॥ भोग्य भोग आणि भोक्ता ॥ ज्ञान ज्ञेय मी एक ज्ञाता ॥ याची वार्ता असेना ॥ ३८ ॥ ऐसें हारपल्या जीवपण ॥ स्वयें सहजें निज निर्गुण ॥ होऊनि ठाके ब्रह्म पूर्ण ॥ अहंसोहंपण सांडूनी ॥ ३९ ॥ यापरी मद्भक्त जाण ॥ ब्रह्म होती परिपूर्ण ॥ तेंचि जाहलेपणाचें लक्षण ॥ श्लोकार्थें श्रीकृष्ण सांगत ॥ ४४० ॥

॥ श्लोक ॥ मयैव ब्रह्मणा पूर्णो न बहिर्नांतरश्चरेत् ॥ ३६ ॥ इति श्रीभागवते महा० एकादशस्कंधे पंचविंशोऽध्यायः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ प्रपंच एक पूर्वीं होता ॥ हे समूळ मिथ्या वार्ता ॥ पुढें होईल मागुता ॥ हेंही सर्वथा असेना ॥४१॥ जैसें आंत बाहेर भाग ॥ नेणें साखरेचें अंग ॥ तैसें सबाह्याभ्यंतर चांग॥ ब्रह्म निर्व्यंग निजानंदें ॥४२॥ ऐसें पावल्या ब्रह्म परिपूर्ण ॥ साधकांसि नये मरण ॥ *प्रारब्धें देह उरल्या जाण ॥ देहाभिमान बाधीना ॥४३॥ बाह्य न देखे दृश्य दर्शन ॥ अंतरीं नाहीं

१ त्याग. २ सद्गदितपणा. ३ फुगे. ४ फुगारा, अभिमान.

*ना. प्रारब्ध देहीं उरल्या.

विषयस्फुरण ॥ देहींचें न देखे देहपण ॥ जीवन्मुक्त लक्षण या नांव ॥ ४४ ॥ बाह्य देखे दृश्य प्रतीती ॥ अंतरीं विषयांची आसक्ती ॥ या नांव अज्ञानाची स्थिती ॥ अविद्याशक्ती बाधक ॥ ४५ ॥ तें निरसावया अविद्याबंधन ॥ अवश्य करावें माझें भजन ॥ हें जाणोनि साधुसज्जन ॥ भक्तीसि प्राण विकिला ॥ ४६ ॥ माझिये भक्तीपरती ॥ आणिक नाहीं उत्तम गती ॥ तेंही भजन अभेदयुक्तीं ॥ नें चारी मुक्ती कामान्[१]या ॥ ४७ ॥ हृदयीं विषयाची विरक्ती ॥ वरी अभेदभावें माझी भक्ती ॥ नें भजन अनन्यप्रीतीं ॥ त्याचा मी श्रीपती आज्ञाधार[२] ॥ ४८ ॥ भक्तिनामाचा इत्यर्थ ॥ माझे स्वरूपीं निजभावार्थ ॥ येणेंचि लाभे परमार्थ ॥ सकळ शास्त्रार्थ या नांव ॥ ४९ ॥ माझिये भक्तीचेनि नांवें ॥ पशु पक्षी उद्धरावे ॥ मा मानवीं भजनभावें ॥ त्यां अवश्य न्यावें निजधामा ॥ ४५० ॥ यालागीं सांडोनि व्युत्पत्ती[३] ॥ जाणतीं[४] नेणतीं[५] या समस्तीं ॥ भावें करावी भगवद्भक्ती ॥ तें निजात्मप्राप्ती अनायासें ॥ ५१ ॥ भावें करितां माझें भजन ॥ स्वयें निवळती तिन्ही गुण ॥ सहजें प्रकटे निजनिर्गुण ॥ हें सत्य श्रीकृष्ण बोलिला ॥ ५२ ॥ जेथ आवळी गुणगुंती[६] ॥ तेथ प्रगटे निजशांती ॥ हेंचि ये अध्यायीं श्रीपती ॥ उद्धवाप्रती बोलिला ॥ ५३ ॥ यालागीं जेथ भगवद्भक्ती ॥ तेथ गुणजयो लाभे हातीं ॥ सहजें प्रकटे *निजशांती ॥ निजात्मप्राप्ती स्वतःसिद्ध ॥ ५४ ॥ ते निजभक्ति माझी जननी ॥ ज्यीं[७] पैठा केलों जनार्दनीं ॥ एका जनार्दनचरणीं ॥ मिळोन, मिळणीं भजतची ॥ ५५ ॥ पुढिले अध्यायीं कथा गहन ॥ ऐलउर्वशीउपाख्यान ॥ ज्या अध्यायाचें करितां पठण ॥ अगम्यागमनदोष हरती ॥ ५६ ॥ ज्या पुरूरव्याची विरक्ती ॥ स्वमुखें वर्णील श्रीपती ॥ वैराग्यें निजात्मप्राप्ती ॥ सभाग्य पावती वैराग्य ॥ ५७ ॥ त्या वैराग्याचें निरूपण ॥ अतिगोड निरूपील श्रीकृष्ण ॥ श्रोतां कृपा करावी पूर्ण ॥ द्यावें अवधान कथेसी ॥ ५८ ॥ जे कथेचेनि अवधानें ॥ दुरित दोष होती दहनें ॥ ब्रह्मीं ब्रह्मत्व पावणें ॥ होऊनि ठाकणें चिन्मात्र ॥ ५९ ॥ एवढ्या निरूपणाची गोडी ॥ पुढिले अध्यायीं आहे फुडी ॥ एका जनार्दन कृपा गाढी ॥ परापरें थडी प्रापक[९] ॥ ४६० ॥ भावें धरितां जनार्दन चरण ॥ बाधूं न शके बाधकपण ॥ एका जनार्दना शरण ॥ रसाळ निरूपण पुढें आहे ॥६१॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे गुणनिर्गुणनिरूपणं नाम पंचविंशोऽध्यायः ॥ २५ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ मूळश्लोक ॥ ॥ ३६ ॥ ॥ ओंव्या ॥ ४६१ ॥ ॥ एवंसंख्या ॥ ४९७ ॥ ॥ ॥ ॥

---

# अध्याय सव्विसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमो देव जगन्मोहन ॥ मोहिनीमोहना आद्यकारण ॥ कार्यकारणातीत चिद्घन ॥ जय जनार्दन +सद्गुरू ॥ १ ॥ जगासि पडे माया-

---

१ दासी. २ आज्ञा पालन करणारा. ३ शब्दज्ञान. ४ ज्ञान्यानीं. ५अज्ञान्यांनीं. ६ गुणत्रयांचा घोंटाळा. ७ जिया, जिच्यायोगानें. ८सरता झालों, वस्ती झाली. ९अलीकडील व पलीकडील तीराला पोंचविणारी.

*ना. निजनीती. +ना. जगद्रूप मो. जगद्गुरु.

मोहन ॥ तें तूं निर्दळिसी ज्ञानघन ॥ जगीं *जगद्रूप जनार्दन ॥ कृपाळु पूर्ण दीनाचा ॥ २ ॥ दीनासि देवमाया स्त्रीरूपें ॥ भुलवी हावभावखटाटोपें ॥ ते स्त्री मोहादिमोहकरूपें ॥ जनार्दनकृपें ×निर्दळिती ॥ ३ ॥ जेथ वैराग्य वाढे संपूर्ण ॥ तेचि जनार्दनाची कृपा पूर्ण ॥ वैराग्य तेथ ब्रह्मज्ञान ॥ सहजें जाण ठसावे ॥ ४ ॥ जीव सहजें ब्रह्मचि आहे ॥ तो मायागुणें जीवत्व +लाहे ॥ जेवीं भद्रीं निजेलेनि रायें ॥ तो स्वप्नींचें लाहे रंकत्व ॥ ५ ॥ त्यासि राजपदा यावया जाण ॥ सेवक करिती थापटण ॥ तेवीं वैराग्य निर्दळी त्रिगुण ॥ जीवासि ब्रह्मपण स्वयंभची ॥ ६ ॥ ऐसें स्वयंभ जोडल्या ब्रह्म पूर्ण ॥ तेव्हां स्त्री पुरुष हें मिथ्या ज्ञान ॥ मृषा दृश्याचें दृश्यभान ॥ भोग्यभोक्तेपण असेना ॥ ७ ॥ एवं साधकासि देवमाया ॥ स्त्रीरूपें ये भुलवावया ॥ तेथ स्मरतां भावें गुरुराया ॥ जाय विलया स्त्रीबाधू ॥ ८ ॥ सद्गुरूचें निज नाम एक ॥ निवारी बाधा महादोख ॥ वैराग्य उपजवी अलोकिक ॥ जेणें होय निजसुख साधकां ॥ ९ ॥ निर्विशेष निजसुखदाता ॥ आम्हां सद्गुरूचि तत्वतां ॥ त्याचे चरणीं ठेवितां माथा ॥ सुखसंपन्नता साधकां ॥ १० ॥ साधकांची निज माउली ॥ शांति निजसुखाची साउली ॥ जनार्दनकृपेच्या ⁂साउलीं ॥ कथा चालिली यथार्थ ॥ ११ ॥ हाता आलिया निजनिर्गुण ॥ साधक होती सुखसंपन्न ॥ तदर्थीं करावें माझें भजन ॥ हें बोलिला श्रीकृष्ण पंचविसावां ॥ १२ ॥ भावें करितां भगवद्भजन ॥ देव दारारूपें करिती विघ्न ॥ तें निर्दळावया जाण ॥ माझें नामस्मरण करावें ॥ १३ ॥ 'अच्युत' हें स्मरतां नाम ॥ प्रतापें निर्दळी कर्माकर्म ॥ सकळ पातका करी भस्म ॥ दादुगें नाम हरीचें ॥ १४ ॥ नामें होइजे विरक्त ॥ नामें निर्मळ होय चित्त ॥ नामें साधे गुणातीत ॥ नामें निर्मुक्त भवपाश ॥ १५ ॥ नामीं लोलिंगत चित्त ॥ भवभय रिघों न शके तेथ ॥ नामीं विश्वास ऐसा जेथ ॥ भगवंत तेथ तुष्टला ॥ १६ ॥ दुष्टसंगें विषयासक्त ॥ जरी झाला लोलिंगत ॥ अनुताप उपजलिया तेथ ॥ होय विरक्त क्षणार्धें ॥ १७ ॥ महादोषासि प्रायश्चित्त ॥ केवळ अनुताप निश्चित ॥ अनुतापेंवीण प्रायश्चित्त ॥ तो जाण ०एथ विटंबू ॥ १८ ॥ अनुतापाएवढा सखा ॥ *जगीं आणिक नाहीं लोका ॥ धडाडिल्या अनुताप देखा ॥ सकळपातकां निर्दळी ॥ १९ ॥ अनुताप चढलिया हात ॥ क्षणार्धें वारी विरक्त ॥ येचि अर्थीं ऐलगीत ॥ हरि सांगत उद्धवा ॥ २० ॥ सव्विसाव्या अध्यायीं येथ ॥ विषयासक्त ज्याचें चित्त ॥ त्यासि व्हावया विरक्त ॥ ऐलगीतप्रस्तावो ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ मल्लक्षणमिमं कायं लब्ध्वा मद्धर्म आस्थितः ॥
आनंदं परमात्मानमात्मस्थं समुपैति माम् ॥ १ ॥

॥ टीका ॥ ब्रह्म लक्षिजे परिपूर्ण ॥ हेंचि कायेचें मुख्य लक्षण ॥ तें हें मानवी शरीर जाण ॥ परम पावन तिहीं लोकीं ॥ २२ ॥ मनुष्यदेहीं अधर्म ॥ करितां 1नातुडे परब्रह्म ॥ तेथ करावें भागवतधर्म ॥ जे कां परम पावन ॥ २३ ॥ भागवतधर्में करितां भक्ती ॥ निर्मळ होय चित्त-

---

१ भद्रासनीं. वैभवांत. २हलवून जागें करणें, उठवणें. ३असत्य,मिथ्या. ४पायीं. ५ स्त्रीरूपें. ६प्रस्ताव, वैराग्य. ७ प्राप्त झाला असतां. ८ ऐलनामकराजाचें गीत. ९ देहाचें.

*ना. जगद्गुरु. ×ना. निर्दाळी. +ना. वाहे. ⁂मो. जनार्दन कृपेची कावली. ०ना. सत्य विटंबु. *मो. जवळी आणिक. 1ना. न भेटे.

वृत्ती ॥ जीव तोचि ब्रह्म निश्चितीं ॥ ऐशी शुद्ध स्फूर्ती ठसावे ॥ २४ ॥ ठसावल्या ब्रह्मस्फूर्ती ॥ होय स्वानंदाची अवाप्ती ॥ तेणें परमानंदीं लीन होती ॥ हे शुद्धप्राप्ती पैं माझी ॥२५॥ माझिये प्राप्तीचें लक्षण ॥ देहीं असतां वर्तमान ॥ सर्वथा नाहीं विषयस्फुरण ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ २६ ॥

॥ श्लोक ॥ गुणमय्या जीवयोन्या विमुक्तो ज्ञाननिष्ठया ॥ गुणेषु मायामात्रेषु दृश्यमानेष्ववस्तुतः ॥ वर्तमानोऽपि न पुमान् युज्यतेऽवस्तुभिर्गुणैः ॥ २ ॥

॥ टीका ॥ जे *मूळ अज्ञानाची खाणी ॥ जे संसारप्रवाहाची श्रेणी ॥ जे तिहीं गुणांची जननी ॥ माया राणी अनादी ॥ २७ ॥ मायागुणयोगें पहाहो ॥ सोळाकळांचा ×संभवो ॥ तो वासनात्मक लिंगदेहो ॥ जिवासि पहाहो दृढ झाला ॥ २८ ॥ ज्या लिंगदेहाचिये प्राप्ती ॥ भोगी नाना सुखदुःखसंपत्ती ॥ पडे स्वर्ग नरक आवर्तीं ॥ +मिथ्यामरणपंक्ती स्वयें भोगी ॥ २९ ॥ वंध्यापुत्राचा वराचार ॥ तैसा जीवासि संसार ॥ देहाभिमानानें केला थोर ॥ अपरंपार अनिवार्य ॥ ३० ॥ तेथ गुरुवाक्यें ज्ञानानुभव ॥ पाहतां मायेचा अभाव ॥ लिंगदेह झाला वाव ॥ जीवासी जीवभाव तो मिथ्या ॥ ३१ ॥ जेवीं उगवलिया गभस्ती ॥ अंधारेंसि हारपे राती ॥ तेवीं गुरुवाक्यें ॐज्ञानप्राप्ती ॥ मायेची स्थिती मावळे ॥ ३२ ॥ एवं नासल्या गुणविकार ॥ जीवन्मुक्त होती नर ॥ जेवीं कुलालचक्र ॥ भ्रमे साचार पूर्वभ्रमणें ॥३३॥ तेवीं प्रारब्धशेषवृत्तीं ॥ ज्ञाते निजदेहीं वर्तती ॥ वर्ततांही देहस्थिती ॥ देहअहंकृती असेना ॥ ३४ ॥ जेवीं कां छाया आपुली ॥ कोणीं गांजिली ना पूजिली ॥ परी कळवळयाची न ये भुली ॥ तेवीं देहींची चाली सज्ञाना ॥ ३५ ॥ तो देहाचेनि ०दैवमेळें ॥ जरी विषयांमाजीं लोळे ॥ परी विकाराचेनि विटाळें ॥ वृत्ति न मैळे अणुमात्र ॥ ३६ ॥ त्यासि विषयाचें *दर्शन ॥ समूळत्वें मिथ्या जाण ॥ करितां मृगजळाचें पान ॥ कदा वोलेपण बाधीना ॥ ३७ ॥ गगनेंकमळांचा आमोद ॥ जे भ्रमर सेवी सुगंध ॥ ¹तें सज्ञाना विषयसंबंध ॥ निजांगीं ²बाधे लागतां ॥३८॥ असो अतर्क्य मुक्तांची स्थिती ॥ परी मुमुक्षांलागीं श्रीपती ॥ नियमाची यथानिगुती ॥ निजात्मप्राप्तीलागीं सांगे ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ संगं न कुर्यादसतां शिश्नोदरतृपां क्वचित् ॥ तस्यानुगस्तमस्यंधे पतत्यंधानुगोऽधवत् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ शिश्नोदरार्थ आसक्त ॥ स्वधर्म त्यागें अधर्मरत ॥ ऐसे जे विषयासक्त ॥ ते जाण निश्चित असाधू ॥ ४० ॥ ऐसे जे असाधु जन ॥ त्यांसी सर्वथा आपण ॥ संगती न करावी जाण ॥ कायावाचामनःपूर्वक ॥४१॥ वोढाळाचे संगती पाहे॥क्षणभरी गेलिया धर्मगाये ॥ त्या क्षणासाठीं पाहे ॥ लोढणें वाहे निरंतर ॥ ४२ ॥ यालागीं दुर्जनाची संगती ॥ क्षणार्धें पाडी अनर्थी ॥ मुमुक्षीं ऐशियाप्रती ॥ अणुमात्र वस्ती नवचावें ॥ ४३ ॥ लोहाची आगिठी जैसी ॥

---

१ प्राप्ती. २ पंक्ति. ३ अथवा. ४ आकाशकमलांचा. ५ चांगली गाय. ६ आगटी.

*ना. समूळ. ×मो. संभावो. +मो. मिथ्या मरणप्राप्ती. ॐमो. नानाप्राप्ती. ०मो. दैवमेळें. ना. दैव बळें. *ना. संचरण. ¹ना. तैसा ज्ञानिया. ²ना. बोध.

सहजें पोळवी भलत्यासी ॥ दुर्जनाची संगति तैशी ॥ पाडी अपभ्रंशीं भाविकां ॥ ४४ ॥ अव-चटें असाधुसंगती ॥ जोडल्या वाढे विषयासक्ती ॥ तेणें उठी अधर्मरती ॥ विवेकस्फूर्तिघातक ॥ ४५ ॥ मावळल्या विवेकवृत्ती ॥ अंध होय ज्ञानस्फूर्ती ॥ आपण आपली न देखे गती ॥ जेवीं *आभाळीं रातीं अवसेची ॥ ४६ ॥ जेवीं अंधें अंध धरिल्या हातीं ॥ दोघां पतन महा-गर्तीं ॥ तेवीं अविवेकाचिया स्थितीं ॥ +अंधतमा जाती विषयांध ॥ ४७ ॥ कुसंगाचा जो सांगात ॥ तणें ओढवे नरकपात ॥ अनुताप सोडविता तेथ ॥ तो ऐलगीत हरि सांगे ॥४८॥

॥ श्लोक ॥ ऐलः सम्राडिमां गाथामगायत बृहच्छ्रवाः ॥ उर्वशीविरहान्मुह्य-न्निर्विण्णः शोकसंयमे ॥४॥

टीका ॥ समुद्रवलयांकित क्षिती ॥ सकळ रायांचा राजपती ॥ पुरूरवा चक्रवर्ती ॥ ज्याची ख्याती पुराणीं ॥४९॥तेज प्रभाव महाशौर्य॥उचित वदान्य गांभीर्य॥महिमा महती अतिवीर्य ॥ धर्म धैर्य पुरूरवा ॥ ५० ॥ राजधर्माचिया नीतीं ॥ स्वधर्में प्रतिपाळी क्षिती ॥ ब्राह्मण तितुका ब्रह्ममूर्ती ॥ हा भाव निश्चितीं रायाचा ॥ ५१ ॥ प्राणांतेंही आपण ॥ न करी ब्राह्मण-हेळण ॥ गायींलागीं वेंची प्राण ॥ करी संरक्षण दीनाचें ॥५२॥ ऐसा धार्मिक ऐल चक्रवर्ती ॥ तोही उर्वशीचे आसक्ती ॥ भुलोनि ठेला भूपती ॥ निजात्मगती विसरला ॥ ५३ ॥ तेणें अनु-तापें गाइली गाथा ॥ ते तुज मी सांगेन आतां ॥ परी त्याची पूर्वकथा ॥ कामासक्तता ते ऐक ॥५४॥ विसरोनि निजमहत्त्वासी ॥अतिदीन झाला वेश्येसी॥काम पिसें लावी मनुष्यासी॥ तें ×ऐलइतिहासासी हरि सांगे ॥ ५५ ॥ ऐल उर्वशीकामासक्ती ॥ सवेंचि अनुतापें विरक्ती ॥ हे कथा बोलली वेदोक्ती ॥ तेचि यदुपती स्वयें सांगे ॥ ५६ ॥ उर्वशीपुरूरव्याचा संबंध ॥ नवमस्कंधीं असे विशद ॥ तेणें जाणोनियां गोविंद ॥ एथ कथा अनुवाद न करीच ॥ ५७ ॥ पूर्वकथासंबंधः ॥ उर्वशी स्वर्गा भूषण ॥नारायण धाडिली आपण ॥ तो उर्वशीसि गर्व पूर्ण॥ श्रेष्ठपण मानुनी ॥ ५८ ॥ तया गर्वाचिये स्थिती ॥ ताल चुकवी नृत्यगती ॥ तेणें ब्रह्मशापाची प्राप्ती ॥ तुज मानवां भोगिती भूतळीं ॥ ५९ ॥ उच्छाप मागतां तिसी ॥ ब्रह्मा सांगे तियेपाशीं ॥ नग्न देखिल्या पुरूरव्यासी ॥स्वर्गा येसी ⚘मेषप्रयोगें॥६०॥ ऐसा लाहोनि ०शापासी ॥ भूतळा आली उर्वशी ॥ देखोनि तिचिया स्वरूपासी ॥ पुरूरवा तिसी भुलला ॥ ६१ ॥ विस-रोनि आपुली महंती ॥ वश्य झाला वेश्येप्रती ॥ रूपा भुलला भूपती ॥ विचारस्फूर्ती विसरला ॥ ६२ ॥ नग्न देखिलिया रायासी ॥ सांडूनि जावें उर्वशी ॥ ऐसी भाक देऊनि तिशी ॥ निज भोगासि आणिली ॥ ६३ ॥ तिणें आपुलिया उच्छापासी ॥ आणिलें दोनी एडक्यांसी ॥ पुत्र-स्नेहें पाळावें त्यासी ॥ तेविखीं भाकेसी दिधली रायें ॥ ६४ ॥ ते उर्वशीचे कामप्राप्ती ॥

१ नाश, भ्रष्टता. २ मोठ्या खळग्यांत. ३ अज्ञानाच्या. ४ अंधतमनामकनरकास. ५ वैवस्वत मनूची कन्या 'इला' हिला बुधापासून पुत्र झाला.त्याचें नांव पुरूरवा यासच ऐल ह्मणतात.यानें गाइलेलें गीत. ही 'इला' पहिल्यानें पुरुष होता. त्याचें नांव 'सुद्युम्न' होतें. त्याची कथा या (२६) अध्यायाचे शेवटीं पहा. ६ पृथिवी. ७ उदार, दाता. ८ थोरपणा. ९ सुटकेकरितां. १० मेंढ्यांस.

*ना. अंधारी. +ना. अंधतमप्राप्ती विषयांधा. ×मो. ऐलगीतेसी. ⚘ना. मेषप्रसंगें. ०ना. उच्छापासी.

*अतिशयें वाढली कामासक्ती ॥ तो नेणे उदयास्तदिवसराती॥ऐशा अमित तिथी लोटल्या ॥ ॥ ६५ ॥ भोगितां उर्वशीकाम ॥ विसरला स्वधर्मकर्म ॥ विसरला नित्यनेम ॥ कामसंभ्रम वाढला ॥ ६६ ॥ तेथ मेषरूपें दोघेजण ॥ झाले अश्विनीकुमार आपण ॥ उर्वशी भोगक्षयाकारण ॥ पहावया इंद्रें जाण पाठविलें ॥ ६७ ॥ पुरूरव्याच्या भोगप्रांतीं ॥ उर्वशी न्यावया स्वर्गाप्रती ॥ दोनी एडके चोर नेती ॥ मध्यरातीं मेंमात ॥६८॥ ऐकोनि मेषांच्या शब्दासी ॥ दुःखें हडबडली उर्वशी ॥ रागें निर्भर्त्सी रायासी ॥ नपुंसक होसी तूं एक ॥ ६९ ॥ वृथा +वलगसी पुरुषबळें ॥ चोरें नेलीं माझीं बाळें ॥ जळो तुझें तोंड काळें ॥ ह्मणोनि कपाळें ते पिटी ॥ ७० ॥ ऐकोनि स्त्रियेचा ×शोक थोरू ॥ शस्त्र घेऊनि सत्वरू ॥ धांवतां फिटला पीतांबरू ॥ तें नृपवरू समजेना ॥ ७१ ॥ पराभवूनि ते चोर ॥ मेष आणितां सत्वर ॥ विद्युल्लता झळकली थोर ॥ तंव नग्न शरीर रायाचें ॥ ७२ ॥ नग्न देखोनि रायासि ॥ सांडूनि निघाली उर्वशी ॥ तिचेनि वियोगें मानसीं ॥ अति शोकासि पावला ॥ ७३ ॥

श्लोक ॥ त्यक्त्वात्मानं व्रजंतीं तां नग्न उन्मत्तवन्नृपः ॥ विलपन्नन्वगाज्जाये घोरे तिष्ठेति विक्लवः ॥ ५ ॥

टीका ॥ पृथ्वीपरिपालनीं वरिष्ठ ॥ स्वधर्म धार्मिक श्रेष्ठ ॥ शत्रुदमनीं अतिसुभट ॥ प्रतापें उद्भट महावीर ॥ ७४ ॥ जाणे वेदशास्त्रविवेक ॥ ज्यासि वंदिती सकळ लोक ॥ तोहि वेश्येचा केवळ रंक ॥ झाला देख निजांगें ॥ ७५ ॥ सुरां असुरां न खालवी मान ॥ जो अल्पही न साहे अपमान ॥ तो वेश्येलागीं झाला दीन ॥ निज सन्मान विसरोनी ॥ ७६ ॥ उर्वशी जातां देखोनि दिठीं ॥ नग्न उन्मत्त उठाउठी ॥ रडत पडत लागे पाठी ॥ स्फुंदतां पोटीं श्वास न रिघे ॥ ७७ ॥ डोळेभरी पाहूंदे दिठीं ॥ सांगेन जीवींच्या गुह्य गोष्टी ॥ प्राण रिघों पाहे उठाउठी ॥ क्षणभर भेटी नेदितां ॥ ७८ ॥ आपुल्या पूर्वजांची आण ॥ कदा नुल्लंघीं तुझें वचन ॥ सत्य मानी माझें प्रमाण ॥ तुज काय कारण रुसावया ॥ ७९ ॥ तुज चालतां लवलाहीं ॥ झणीं खडे रुपती पायीं ॥ तुज जाणें कोणे ठायीं । तरी सवें मीही येईन ॥ ८० ॥ जाऊं नको उभी राहे ॥ परतोनि मजकडे पाहे ॥ ह्मणोनि धरूं धांवे पाये ॥ तंव ते जाये उपेक्षूनि ॥८१॥ ज्यासि राजे मुकुटमणी ॥ सदा येती लोटांगणीं ॥तो लागे वेश्येचे चरणीं ॥ व्याप करणी कामाची ॥८२॥ तुझी मज अति कळवळ ॥ तुजलागीं ॐमन माझें कोमळ ॥ तूं कठिण झालीस केवळ ॥ कोप प्रबळ कां धरिला ॥ ८३ ॥ यापरी रायाचें चित्त ॥ विरहातुर शोकाकुलित ॥ अतिशयें ग्लानियुक्त ॥ ग्लानि सांगत श्रीकृष्ण ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ कामानतृप्तोऽनुजुषन् क्षुल्लकान्वर्षयामिनीः॥ न वेद यांतीर्नायांतीरुर्वश्याकृष्टचेतनः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ उर्वशीकामीं कामासक्त ॥ एकाग्र झालें रायाचें चित्त ॥ नेणे सूर्याचें गतागत ॥ केला भ्रांत कंदर्पें ॥८५॥ भोगिलीचि कामिनी॥भोगितांही अनुदिनीं॥अधिक प्रेम वाढलें मनीं॥

---

१ में में करीत. २ महायोद्धा. ३ उर्वशीने इच्छेनें. ४ अस्तोदय. ५ मदनानें. ६ रोजच्या रोज.

*मो. रायें वाढविली. +मो. बोळगसी. ×मो. नोक. ॐना. चित्त माझें व्याकुळ.

ऐसा तीलागूनी आसक्त ॥ ८६ ॥ भोगितां उर्वशीकामासी ॥ नेणे दिवसमासवर्षांसी ॥ [1]व्ययो झाला आयुष्यासी ॥ हेंही त्यासी स्मरेना ॥ ८७ ॥ जेवीं अग्नीमाजीं घृत पडे ॥ तंव तंव ज्वाळा अधिक वाढे ॥ तेवीं कांता भोगितां वाडेंकोडें ॥ काम पुढें पुढें थोरावे ॥ ८८ ॥ विचारितां स्त्रीकामासी ॥ अतितुच्छत्व दिसे त्यासी ॥ तोही भोगितां अहर्निशीं ॥ विरक्ति रायासी नुपजेची ॥ ८९ ॥ प्रीति गुंतली उर्वशीसी ॥ अतिग्लानी करितां तिसी ॥ परतोनि नयेचि रायापाशीं ॥ निघे वेगेंसी सांडूनी ॥ ९० ॥ उर्वशी न देखूनि पुढें ॥ राजा विरहें मूर्छित पडे॥ पाहोंधांवे इकडे तिकडे ॥ आक्रोशें रडे अति दुःखी ॥ ९१ ॥ अटण करितां दाहीदिशीं ॥ [2]अवचटें आला कुरुक्षेत्रासी ॥ तंव अंतरिक्ष उर्वशी ॥ देखे दृष्टीसी नृपनाथ ॥ ९२ ॥ देखोनि ह्मणे धांव पाव ॥ मजलागीं दे कां वेंगीं खेंव ॥ येरी ह्मणे *मूढभाव ॥ सांडी सर्व विषयांचा ॥ ९३ ॥ आह्मां स्त्रियांची आसक्ती ॥ कदा घड नव्हे गा भूपती ॥ सदा स्त्रियांची दुष्ट जाती ॥ जाण निश्चितीं महाराजा ॥ ९४ ॥ विशेषें आम्ही [5]स्वैरिणी ॥ स्वेच्छा परपुरुषगामिनी ॥ आमुचा विश्वास मनीं ॥ ह्मणें मानी नृपनाथा ॥ ९५ ॥ आह्मां प्रमदांच्या संगतीं ॥ राया ठकले नेणों किती ॥ आतां सांडूनि आमची आसक्ती ॥ होयी परमार्थी विरक्त ॥ ९६ ॥ बहुकाळ भोगितां माझा भोग ॥ अद्यापि नुपजे तुज ×विराग ॥ कामासक्ति सांडूनि सांग ॥ साधीं चांग निजस्वार्थ ॥ ९७ ॥ राजा ग्लानी करी अनेग ॥ एकवेळ निजांगें अंग ॥ मज देई अंगसंग ॥ सुखसंभोग +कामिनी ॥ ९८ ॥ [6]निलाग देखोनि ग्लानीसी ॥ कृपेनें द्रवली उर्वशी ॥ मग ते आपुल्या पूर्ववृत्तांतासी ॥ रायापाशीं निवेदी ॥ ९९ ॥ मी स्वर्गांगना अतिसुरूप ॥ मज घडला ब्रह्मशाप ॥ तूं महाराजा ※पुण्यरूप ॥ संगें निःशाप मी झालें ॥ १०० ॥ तुझेनि संगें मी [7]निर्धूत ॥ शाप निस्तरलें समस्त ॥ मज तुज संग न घडे एथ ॥ मी असें जात स्वर्गासी ॥ १ ॥ ऐकोनि उर्वशीचें वचन ॥ राजा विरहें करी रुदन ॥ तेव्हां कळवळलें तिचें मन ॥ त्या उपाय पूर्ण दाविला ॥ २ ॥ प्रार्थूनियां गंधर्वांसी ॥ [8]अग्निस्थाली दीधली रायासी ॥ यावरी करूनि यागासी ॥ मज पावसी महाराजा ॥ ३ ॥ उर्वशिवियोगें व्यथाभूत ॥ अग्निस्थाली *[9]उपेक्षूनि तेथ ॥ राजा निजमंदिरा येत ॥ शोकाकुलित अतिदुःखी ॥ ४ ॥ उर्वशीची व्यथा रायासी ॥ स्वप्नीं देखिलें तियेसी ॥ त्वरेनें पाहूं आला स्थालीसी ॥ तंव देखे अश्वत्थासी [10]शमीगर्भा ॥ ५ ॥ त्याची [11]अरणी करूनि देख ॥ यज्ञाग्नि पाडिला चोख ॥ यजूनि पावला उर्वशीलोक ॥ कामसुखभोगेच्छा ॥ ६ ॥ भोग भोगितां उर्वशीसी ॥ विरक्ति उपजली रायासी ॥ तो जें बोलिला अनुतापेंसी ॥ तें ऐक तुजसी सांगेन ॥ ७ ॥ अठरा श्लोकांचें निरूपण ॥ राजा बोलिला आपण ॥ आठें श्लोकीं अनुताप पूर्ण ॥ तेंचि श्रीकृष्ण स्वयें सांगे ॥ ८ ॥

॥ श्लोक ॥ ऐल उवाच ॥ अहो मे मोहविस्तारः कामकश्मलचेतसः ॥ देव्या गृहीतकंठस्य नायुःखंडा इमे स्मृताः ॥ ७ ॥

---

१ नाश. २ फिरणें. ३ सहज. ४ आलिंगन. ५ स्वच्छंद गमन करणाऱ्या. ६ अत्यंत, निराश्रित. ७शुद्ध. ८ अग्निपात्र. ९ टाकून. १० शमी आहे गर्भी ज्याच्या. ११ ज्या लांकडाचें मंथन करून अग्नि उत्पन्न करितात, तें लांकूड.

*ना. दृढभाव. ×ना. वैराग्य. +मो. मानिनी. ※मो. पुण्यतप. *ना. विसरोनी.

॥ टीका ॥ ऐलगीताचा अनुताप ॥ नाशी अगम्यागमनपाप ॥ करी श्रोत्यांसि निष्पाप ॥ साधकां कंदर्प बाधीना ॥ ९ ॥ जेवीं मदगज गजीसंगीं ॥ नाना आपत्ति स्वयें भोगी ॥ तेवीं उर्वशीच्या संभोगीं ॥ झाला विरागी पुरूरवा ॥ ११० ॥ जो उर्वशीलागीं अनुरक्त ॥ तोचि तिसी झाला विरक्त ॥ तेणें वैराग्यें अनुतापयुक्त ॥ स्वयें बोलत ऐलराजो ॥ ११ ॥ माझ्या मोहाचा विषयविस्तार ॥ कामासक्त, कामातुर ॥ कुश्चित कंदर्पाचें घर ॥ स्यांचि संचार सेविलें ॥१२॥ उर्वशीकामें अति आसक्त ॥ कामातुर झालें चित्त ॥ तेणें स्यां जोडिला अनर्थ ॥ थितें केलें व्यर्थ आयुष्य ॥ १३ ॥ उर्वशी कंठलग्न शस्त्र ॥ आयुष्यछेदनीं सतेजधार ॥ छेदिलें आयुष्य अपार ॥ तें मी पामर स्मरेना ॥ १४ ॥ कांताआलिंगन *विषवल्ली ॥ स्यां कंठीं घातली सकामभुलीं ॥ तिणें आयुष्याची होळी केली ॥ विवेक समूळीं गिळिला ॥ १५ ॥ कामिनीकाम आलिंगनीं ॥ कंठीं पेटविला दावाग्नी ॥ तो धडाडिला +आयुष्यवनीं ॥ विवेकअवनीं जाळित ॥ १६ ॥ नरदेहीं उत्तमोत्तम ॥ अमूल्य आयुष्य केलें भस्म ॥ जळोजळो माझें कर्म ॥ निंद्य अधम मी एक ॥ १७ ॥ नरदेहींच्या आयुष्यपुष्टी ॥ साधक रिघाले वैकुंठीं ॥ ज्ञाते ब्रह्म होती उठाउठीं ॥ तें स्यां कामासाठीं नाशिलें ॥ १८ ॥

॥ श्लोक ॥ नाहं वेदाभिनिर्मुक्तः सूर्यो वाऽभ्युदितोऽमुया ॥ मुषितो वर्षपूगानां बताहानि गतान्युत ॥ ८ ॥

॥ टीका ॥ नरदेहाचा आयुष्यक्षण ॥ न मिळे देतां कोटी सुवर्ण ॥ तें स्यां नाशिलें संपूर्ण ॥ आपण्या आपण नाडिलें ॥ १९ ॥ साधूंचिया निजस्वार्था ॥ साधूनि यावया उगवे सविता ॥ निमेषोन्मेषें परमार्था ॥ ×साधक तत्त्वतां साधिती ॥ १२० ॥ तोचि सविता सकामासी ॥ ⁂आयुष्य हरी अहर्निशीं ॥ हें न कळे ज्याचें त्यासी ॥ नरकपातासी निजसूळ ॥ २१ ॥ पुढिलांची गोठी ते कायसी ॥ मीच नाडिलों उर्वशीपाशीं ॥ ०न्हास झाला आयुष्यासी ॥ हे हानि कोणासी सांगावी ॥ २२ ॥ जनाचिया हितासि वहिला ॥ सूर्यो अनुदिनीं उगवला ॥ तें मी नेणेंचि दादुला ॥ उर्वशीकामें भुलला उन्मत्त ॥ २३ ॥ सूर्याचा उदोअस्तमान ॥ वर्षेंही लोटल्या नाहीं ज्ञान ॥ करितां उर्वशी अधरपान ॥ तेणें मदें संपूर्ण मातलों ॥ २४ ॥ मद्यमदु उतरे दिनांतीं ॥ धनमदु जाय निधनस्थितीं ॥ तारुण्यमदु जाय क्षीणशक्ती ॥ स्त्रीमदप्राप्ती कदा नुतरे ॥ २५ ॥ नरदेहाची आयुष्यकथा ॥ पुढती दुर्लभ नलगे हाता ॥ जळो हे उर्वशी देवकांता ॥ इणेंचि तत्त्वतां नागविलें ॥ २६ ॥ मी निर्भय रक्षिता सर्वांसी ॥ त्या मज नागविलें उर्वशीं ॥ हे लाज सांगों कोणापाशीं ॥ उकसाबुकसीं स्फुंदत ॥ २७ ॥ माझ्या निजहिताचा चोरू ॥ हे उर्वशी जीवें मारू ॥ सवेंचि उपजला विचारू ॥ *तेथ मीचि पामरू अविवेकी ॥ २८ ॥ मग ह्मणे कटकटा ॥ सृष्टीमाजीं मी करंटा ॥ आयुष्य नाशिलें कामचेष्टा ॥ अपाव मोठा मज झाला ॥ २९ ॥ मग आक्रंदे अतिगर्जोनी ॥ कामें नागविलें आयुष्य हरोनी ॥ याहीहोनि अधिक हानी ॥ पाहतां ये जनीं असेना ॥ १३० ॥

१ उन्मत्तहत्ती. २ हस्तिणीसंगतीं. ३ मलिन, दुर्गंधयुक्त. ४ मदनमंदिर; योनि. ५ सुरस. ६ आलिंगनरूप विषवल्ली. ७ सूर्य. ८ ओष्ठचुंबन. ९ मरणकाळीं.

*मो. विषयवल्ली. +मो. आयुष्यवन्ही. ×मो. साधकत्वता साधिती. ⁂मो. आयुष्य हरणीं अहर्निशीं. ०मो. ह्रास [illegible]

॥ श्लोक ॥ अहो मे आत्मसंमोहो येनात्मा योषितां कृतः ॥ क्रीडामृगश्चक्रवर्ती नरदेवशिखामणिः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ राजे मुकुटांचे प्रतापी पूर्ण ॥ माझ्या चरणां येती शरण ॥ तो मी वेश्येचे घरीं चरण ॥ हें निर्लज्जपण म्यां केलें ॥ ३१ ॥ मज पुरूरव्याचे आज्ञे करीं ॥ राजे नाचती चराचरीं ॥ तो मी वेश्येचे आज्ञेवरी ॥ श्वानाचेपरी वर्तलों ॥ ३२ ॥ जैसें वानर गारुड्याचें ॥ तैसा स्त्रियेचेनि छंदें नाचें ॥ माझ्या चक्रवर्तिपणाचें ॥ अतिनिंद्य साचें फळ झालें ॥ ३३ ॥ सकळ राजे मज देती सन्मान ॥ भूपति सदा वंदिती चरण ॥ तो मी झालों स्त्रियेअधीन ॥ हीन दीन अति रंक ॥३४॥ राखतां स्त्रियेचा रसरंगप्रेम ॥ पायां पडणें हें उचित कर्म ॥ ह्मणती ते जळो जन सकाम ॥ हेचि धाडी परम कामाची ॥ ३५ ॥ मी वलयांकित चक्रवर्ती ॥ तोही योषिता घातलों आवर्तीं ॥ त्याचि आवर्ताची स्थिती ॥ स्वमुखें श्रीपती अनुवादे ॥३६॥

॥ श्लोक ॥ सपरिच्छदमात्मानं हित्वा तृणमिवेश्वरम् ॥ यांतीं स्त्रियं चान्वगमं नग्न उन्मत्तवद्रुदन् ॥ १० ॥

॥ टीका ॥ केवळ साकार मायाभ्रम ॥ यालागीं प्रमदा स्त्रियेचें नाम ॥ संगें ठकिले उत्तमोत्तम ॥ स्त्रीसंभ्रम वाढवितां ॥ ३७ ॥ प्रमदा अंबरें अलंकार ॥ हें मायेचें सोलींव सार ॥ एथ भुलले थोरथोर ॥ मीही पामर स्त्रीसंगें ॥३८॥ माझीच मज करणी ॥ दिसतसे दैन्यवाणी ॥ उर्वशी वेश्या कामचारिणी ॥ जे बहुतीं जनीं भोगिली ॥३९॥ ऐशियेच्या कामासक्तता ॥ मी सर्वस्वें भुललों सर्वथा ॥ ते भुललेपणाची कथा ॥ अनुतापतां स्वयें बोले ॥१४०॥ धर्मपत्नी भोगितां काम ॥ सहसा नासेना स्वधर्म ॥ मज बोडवलेंसें दुष्ट कर्म ॥ वेश्येसि परम भुललों ॥ ४१ ॥ परदारा अभिलाषिती ॥ ते अवश्य नरका जाती ॥ मा स्वदाराकामासक्ती ॥ तेथही अधोगती सोडीना ॥ ४२ ॥ स्त्रियां भुलविले हरिहर ॥ स्त्रियां भुलविले ऋषीश्वर ॥ स्त्रियां भुलविले थोरथोर ॥ मीही किंकर स्त्रियां केलों ॥ ४३ ॥ राज्य आणि राजवैभव ॥ वेश्येअधीन केलें सर्व ॥ याहीहूनि केलें अपूर्व ॥ तीलागीं जीव अर्पिला ॥ ४४ ॥ मी राजवर्या मुकुटमणी ॥ तो दास झालों तिचे चरणीं ॥ बाप कंदर्पाची करणी ॥ केलों कामिनीअधीन ॥ ४५ ॥ ऐशिया मज राजेश्वरातें ॥ वेश्येनें हाणोनि लातें ॥ उपेक्षूनियां तृणवतें ॥ निघाली निश्चितें सांडोनी ॥४६॥ तिसी जातां देखोनि पुढें ॥ मी नागवा धांवें लवडसवडें ॥ लाज सांडोनियां रडें ॥ तरी ते मजकडे पाहेना ॥४७॥ जेवीं कां लागलें महद्भूत ॥ नातरी पिशाच जैसें उन्मत्त ॥ तेवीं नागवा धांवें रडत ॥ तरी तिचें चित्त द्रवेना ॥४८॥ तरी रडत पडत अडखळत ॥ मी निर्लज्ज तीमागें धांवत ॥ माझे मोहाचा अति अनर्थ ॥ अपमानग्रस्त मज झाला ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ कुतस्तस्यानुभावः स्यात्तेज ईशित्वमेव वा ॥ योन्वगच्छं स्त्रियं यांतीं खरवत्पादताडितः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ मी महत्त्वें राजराजेश्वरू ॥ ऐसा गर्व होता अति दुर्धरू ॥ तो मी वेश्येचा अनुचरू ॥ झालों किंकरू निजांगें ॥ १५० ॥ एवढाही मी राजेश्वरू ॥ मागें धांवें होऊनि किंकरू ॥

१ आज्ञेनें. २ तरुण स्त्री, वस्त्रें, व दागिने. ३ लज्जाचे स्त्रीशीं. ४ मदनाची. ५ गवताप्रमाणें. ६ सर्व राजांचा राजा. ७ पाठीमागून गमन करणारा.

तरी ते न करी अंगीकारू॥जेवीं वोसंडी खरू खरी जैशी ॥५१॥ जेवीं खरी देखोनियां खरू॥ धांवोनि करी अभ्यादरू ॥ येरी उपेक्षूनि करी मारू ॥ अतिनिष्ठुर लातांचा ॥ ५२ ॥ तिच्या लाता लागतां माथां ॥ खरू निघेना मागुता ॥ त्या खराऐशी मूर्खता ॥ माझे अंगीं सर्वथा बाणली ॥ ५३ ॥ स्त्री उदास कामदृष्टीं ॥ मी आसक्त *लागें पाठीं ॥ माझ्या समर्थपणाची गोठी ॥ सांगतां पोटीं मी लाजें ॥ ५४ ॥ ऐसें ×स्त्रीकामी ज्याचें मन ॥ त्याचे योगयाग अनुष्ठान ॥ अवघेंचि वृथा जाण ॥ तेंचि निरूपण निरूपी ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ किं विद्यया किं तपसा किं त्यागेन श्रुतेन वा ॥ किं विविक्तेन मौनेन स्त्रीभिर्यस्य मनो हृतम् ॥ १२ ॥

॥ टीका ॥ स्त्रीकाममय ज्याचें मन ॥त्याची वृथा विद्या वृथा श्रवण ॥ वृथा तप वृथा ध्यान॥ त्यागें मुंडण तें वृथा ॥५६॥ वृथा एकांतसेवन ॥ वृथा जाण त्यागाचें मौन ॥ राखेमाजीं केलें हवन ॥ तैसें अनुष्ठान स्त्रीकामा ॥ ५७ ॥ कामासक्त ज्याचें चित्त ॥ त्याचे सकळही नेम व्यर्थ ॥ आपुलें पूर्ववृत्त निंदित ॥ अनुतापयुक्त नृप बोले ॥ ५८ ॥

॥ श्लोक ॥ स्वार्थस्याकोविदं धिङ् मां मूर्खं पंडितमानिनम् ॥ योऽहमीश्वरतां प्राप्य स्त्रीभिर्गोखरवज्जितः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ चहूं पुरुषार्थांचें अधिष्ठान ॥ नरदेह परम पावन ॥ जेणें देहें करितां भजन ॥ ब्रह्म सनातन पाविजे ॥ ५९ ॥ नरदेहींचा क्षणक्षण ॥ समूळ निर्दळी जन्ममरण ॥ स्वभावें करितां हरिस्मरण ॥ महापापें जाण निर्दळती ॥ १६० ॥ त्या नरदेहाची लाहोनि प्राप्ती ॥ नरवर्य झालों चक्रवर्ती ॥ त्या माझी जळो जळो स्थिती ॥ जो वेश्येप्रती भुललों ॥ ६१ ॥ मानी श्रेष्ठ मी सज्ञान ॥ परी अज्ञानांहूनि अज्ञान ॥ नेणेंचि निजस्वार्थसाधन ॥ वेश्येआधीन मी झालों ॥ ६२ ॥ लाहोनि नरदेहनिधान ॥ म्यां देहीं धरिला ज्ञानाभिमान ॥ न करींच निज स्वार्थसाधन ॥ हें मूर्खपण पैं माझें ॥ ६३ ॥ जैसा गाईमागें कामयुक्त ॥ धांवत बैल न मानी अनर्थ ॥ कां खरीमागें खर धांवत ॥ तैसा कामासक्त मी निर्लज्ज ॥ ६४ ॥ खरी खरास हाणी लाताडें ॥ तरी तो धसे पुढें पुढें ॥ तैसाचि मीही वेश्येकडे ॥ कामकैवाडें भूललों ॥ ६५ ॥ कामभोगांतीं विरक्ती ॥ ऐसें मूर्ख विवेक बोलती ॥ ते अधःपातीं घालिती ॥ हे मज प्रती स्वयें झाली ॥ ६६ ॥

॥ श्लोक ॥ सेवतो वर्षपूगान्मे उर्वश्या अधरासवम् ॥ न तृप्यत्यात्मभूः कामो वन्हिराहुतिभिर्यथा ॥ १४ ॥

॥ टीका ॥ सत्ययुगींचें आयुष्य माझें ॥ ऐश्वर्य सार्वभौमराज्य ॥ उर्वशी स्वर्गमंडण कां जें ॥ सर्वभोगसमाजें भोगितां ॥ ६७ ॥ भोगितां लोटल्या वर्षकोटी ॥ परी विरक्तीची नाठवे गोठी ॥ मा वैराग्य भोगाचे शेवटीं ॥ हे मिथ्या चावटी मूर्खांची ॥ ६८ ॥ स्त्रियेचें ह्मणती अध-

१ ज्याप्रमाणें गाढवी गाढवाला टाकते. २ गाढवीण. ३ दान. ४ राजश्रेष्ठ. ५ विषयेच्छेनें. ६ भोगसमुदाय.

*मो. जालों पाठीं. ×ना. स्त्री काममय.

रामृत ॥ तेही मूर्ख गा निश्चित ॥ तें उन्मांद मद्य यथोक्त ॥ अधिकें चित्तभ्रामक ॥ ६९ ॥ वनिता अधरपानगोडी ॥ त्यापुढें सकळ मद्यें, बापुडीं ॥ तत्काळ अनर्थी पाडी ॥ निजस्वार्थकोडीनाशक ॥ १७० ॥ घालितां कोटि घृताहुती ॥ अग्नीसि कदा नव्हे तृप्ती ॥ तेवीं वनिताकामासक्ती ॥ कदा विरक्ती उपजेना ॥ ७१ ॥ ऐसा आठश्लोकीं अनुताप ॥ स्वमुखें बोलोनियां नृप ॥ हृदयीं *उगवला विवेकदीप ॥ जेणें झडे कंदर्प तें स्मरलें ॥ ७२ ॥ सकामासि विषय त्यागितां ॥ ×वासनात्याग नव्हे सर्वथा ॥ कां आदरें विषय +भोगितां ॥ विरक्ति सर्वथा उपजेना ॥ ७३ ॥ ऐशिये अर्थीचा उपावो ॥ विचारोनि बोले रावो ॥ कामत्यागाचा अभिप्रावो ॥ साचार पहावो संबोधीं ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ पुंश्चल्यापहृतं चित्तं को न्वन्यो मोचितुं प्रभुः ॥ आत्मारामेश्वरमृते भगवंतमधोक्षजम् ॥ १५ ॥

॥ टीका ॥ पुरुष सदा स्त्री अनुरागें ॥ परी सहसा न करवे प्रसंग ॥ त्यासि पुंश्चलीचा घडल्या संग ॥ ते बाधी निलांग हावभावीं ॥ ७५ ॥ पुंश्चलीचे कटाक्षगुण ॥ तेंचि पुरुषासि दृढ बंधन ॥ स्त्रीकामबंध सोडवी कोण ॥ एक नारायणवांचूनी ॥ ७६ ॥ कामिनीकामापासूनि निर्मुक्त ॥ कर्ता ईश्वर एक समर्थ॥जो कां आत्माराम भगवंत ॥तोचि निश्चित सोडविता ॥७७॥ मायागुणें कामसंचार ॥ अविद्या वाढवी साचार ॥ मायानियंता जो ईश्वर ॥ तो -:-कामकेर निवारी ॥ ७८ ॥ स्वस्वरूपीं रमण आराम ॥ ऐसा जो कां आत्माराम ॥ तो निवारी सकळ काम ॥ ०करी श्रम निजात्मा ॥७९॥ जो भोग भोगूनि अभोक्ता ॥ त्या शरण रिघाल्या अनंता ॥ बाधूं न शके विषयावस्था ॥ स्त्रीसंगीं सोडविता तो एक ॥ १८० ॥ जो निवारी अधोगती ॥ तो अधोक्षज असतां भक्तपती ॥ त्यासी शरण रिघाल्या निश्चितीं ॥ कामासक्ती निवारी ॥ ८१ ॥ राजा कामासक्तीं अति त्रासला ॥ सबाह्य विषयीं उदास झाला ॥ त्याचा वासनाकाम जो उरला ॥ तो न वचे त्यागिला त्याचेनी ॥ ८२ ॥ सर्वभावेंसि संपूर्ण ॥ हरीसि रिघालिया शरण ॥ 1सकळकामांचें निर्दळण ॥ सहजें जाण स्वयें होय ॥ ८३ ॥ एकाचा मतवाद निश्चितीं ॥ करितां *श्रुतिवाक्यव्युत्पत्ती ॥ यजितां इंद्रादिदेवांप्रती ॥ कामनिवृत्ती हृदयस्थ ॥ ८४ ॥ ऐसें बोलती जे सज्ञान ॥ ते सर्वथा गा अज्ञान ॥ हरीसि न रिघतां शरण ॥ कामसंचरण शमेना ॥ ८५ ॥ इंद्रादिदेव कामासक्तीं ॥ विटंबिले नेणों किती ॥ त्यांचेनि भजनें कामनिवृत्ती ॥ जे ह्मणती ते अतिमूर्ख ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ बोधितस्यापि देव्या मे सूक्तवाक्येन दुर्मतेः ॥ मनोगतो महामोहो नापयात्यजितात्मनः ॥ १६ ॥

॥ टीका ॥ काम्यकर्मी होईल सुख ॥ हें बोलणें समूळ लटिक ॥ काम्यकर्मी अति दुःख ॥ हें नेणती मूर्ख सकाम ॥ ८७ ॥ प्रत्यक्ष स्या याग करून ॥ इंद्रादिदेवांतें यजन ॥ उर्वशीसं-

१ उन्मत्त करणारें. २ स्त्रियेचे चुंबनाची गोडी. ३ नष्ट होय, लोपे. ४ मदन. ५ कामयुक्त, प्रेमी. ६ जारिणी. ७ अत्यंत. ८ मदनवेग. ९ आग्रह.

*मो. उजळला. ×ना. वासना त्यागेना सर्वथा. +मो. सेवितां. -:-ना. कामविकार. ०मो. तारी निर्भ्रम निजात्मता. 1ना. सकळ पापांचें. *मो. श्रुतिवादव्युत्पत्ती.

भोग लाहून ॥ अतिदुःखी जाण मी झालों ॥ ८८ ॥ नारायणऊरूमीं जन्मली ॥ यालागीं उर्वशी नांव पावली ॥ त्याँ मज श्रुतिवाक्यें बोधिली ॥ निष्काम बोली अतिशुद्ध ॥८९॥ ऐकतां श्रुतिनिष्कामबोली ॥ माझी न वचेच सकामभुली ॥ जंव गोविंदें कृपा नाहीं केली ॥ तंव कामाची चाली खुंटना ॥ १९० ॥ भावें हरीसि रिगाल्या शरण ॥ हृदयीं प्रकटे नारायण ॥ तेव्हां सर्व काम सहजें जाण ॥ *जाती पळोन हृदयस्थ ॥ ९१ ॥ उर्वशीकाममंगें जाण ॥ थोर कष्टलों मी आपण ॥ असो तिचा अपराध कोण ॥ मीचि हरिस्मरण विसरलों ॥ ९२ ॥ जरी मी करितां हरीचें स्मरण ॥ तरी काम बापुडें बाधी कोण ॥ मज माझी असती आठवण ॥ तें तुच्छ जाण उर्वशी ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ किमेतया नोऽपकृतं रज्ज्वा वा सर्पचेतसः ॥ रज्जुस्वरूपाविदुषो योऽहं यदजितेंद्रियः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ मूढमतीचा प्रबोध ॥ मानी उर्वशीचा अपराध ॥ विवेकें पाहतां शुद्ध ॥ मीच मतिमंद सकाम ॥ ९४ ॥ उर्वशी देखतां दृष्टीं ॥ मी कामासक्त झालों पोटीं ॥ माझिये लंपटतेसाठीं ॥ मज त्यां शेवटीं नाडिलें ॥ ९५ ॥ जेवीं सांजवेळे पडिला दोरू ॥ भेडा सर्प भासे थोरू ॥ जंव नाहीं केला निर्धारू ॥ तंव महा अजगरू भयानक ॥ ९६ ॥ तेणें सर्पभयें लवडसवडीं ॥ पळों जातां पैं तांतडी ॥ +दुपाउलीं पडली आढी ॥ त्याची कल्पना नाहीं तयासी ॥ ९७ ॥ तेवीं माझिये ×कामभ्रांतीं ॥ उर्वशी सुंदर युवती ॥ पैं माझेया कामासक्तीं ॥ सुरतरतीं भूललों ॥ ९८ ॥ यापरी मी अविवेकात्मा ॥ भुललों उर्वशीच्या कामा ॥ तीवरी कोपणें जें आम्हा ॥ हेंचि अधर्माचें मूळ ॥ ९९ ॥ दृष्टीं देखतां कामिनी ॥ कामासक्त ते अतिरमणी ॥ विवेकिया ÷पोहेंणघाणी ॥ नरकमांथणी ते कांता ॥ २०० ॥ जेवीं सूकरा विष्ठेची प्रीती ॥ तेवीं सकामा कामिनीची रती ॥ विवेकी देखोनि शुंकिती ॥ तेंचि श्लोकार्थीं नृप बोले १ ॥

॥ श्लोक ॥ क्वायं मलीमसः कायो दौर्गंध्याद्यात्मकोऽशुचिः ॥ क्व गुणाः सौमनस्याद्या ह्यध्यासोऽविद्यया कृतः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ स्त्री पुरुष नामाभिधान ॥ केवळ देहासीचि जाण ॥ ते स्त्रीदेहीं पाहतां गुण ॥ मलिनपण अत्यंत ॥ २ ॥ जे नीच नवी विटाळाची खाणी ॥ जे रजस्वलेची प्रवाह न्हाणी ॥ जे कां दुर्गंधाची पोहेणी ॥ जे उतली चिरेणी विष्ठेची ॥ ३ ॥ जे कां दोषाचें जन्मस्थान ॥ जे विकल्पाचें आयतन ॥ जे महादुःखाचें भाजन ॥ अधःपतन जिचेनी ॥ ४ ॥ जे वाढवी अतिउद्वेग ॥ जिचेनि मनासि लागे क्षयरोग ॥ जिचा बाधक अंगसंग ॥ अति निलाग निश्चयें ॥ ५ ॥ जेवीं नीचाचा ०कौंठमोरा ॥ गळां अडकल्या मांजरा ॥ तें रिघोनि शुचीचियें घरा ॥ नानार-

१ नारायणाच्या मांडीपासून. २ ती उर्वशी. ३ मिथ्यास. ४ दोन्ही पायांस विळखा पडला; दोन्ही पायांची आढी पडली. ५ तरुणी. ६ विचारशीलास. ७ घाणीचा पोहो, गटारघाण. ८ विष्ठेची कणंग. ९ पोहो. १० कुपात्र. ११ स्थान. १२ पात्र. १३ अधमाच्या घरचा. १४ मडक्याचा कांठ गळा वगैरे. १५ पवित्र मनुष्याच्या.

*मो. जाती मिळोनि हृदयस्था. +मो. दुपाउलीं पडिला आढीं. ×मो. कर्मभ्रांतीं. ÷मो. पोहाणी घाणी. ०ना. कांठफरा.

सपात्रां विटाळी ॥ ६ ॥ तेवीं *कामिनीची संगती ॥ गळां पडली न निघे मागुती ॥ कामिनीकामेंकामासक्तीं ॥ नेणों किती विटंबिले ॥ ७ ॥ तें मांजर जेथें वाली मुख ॥ तेथ कांठफारा रोंधी देख ॥ तेवीं स्त्रीसंगें अतिदुःख, ॥ मानिती ×सुख सकाम ॥ ८ ॥ ' मृगजळीं कमळ मनोहर ॥ तैसें अंगनावदन सुंदर ॥ सुस्मित, चारु सुकुमार ॥ सकाम नर ※वानिती ॥ ९ ॥ अंगनावदनाची निजस्थिती ॥ निखळशेंबुडाची तेथ वस्ती ॥ तें मुख चंद्रासि उपमिती ॥ जेवीं अमृत ह्मणती त्रिखातें ॥ १० ॥ वनिता अधरीं झरे लाळ ॥ ते ह्मणती अधरामृत केवळ ॥ बाप अविद्येचें बळ ॥ भुलले सकळ सुरासुर ॥ ११ ॥ स्त्रीपुरुषीं आत्मा एक ॥ स्त्रीरूप तेथ अवियक ॥ मिथ्या स्त्रीकामें भुलले लोक ॥ बाप कवतिक मायेचें ॥ १२ ॥ आत्मा भोक्ता ह्मणावा स्त्रीसंभोगीं ॥ तंव तो नित्यमुक्त असंगी ॥ देह भोक्ता ह्मणावा स्त्रीयोगीं ॥ तंव देहाचे अंगीं जडत्व ॥ १३ ॥ तेथ विपयभोगासि कारण ॥ मुख्यत्वें देहाभिमान ॥ त्या देहाभिमानासि जाण ॥ बहुतजण विभागी ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ पित्रोः किं स्वं नु भार्यायाः स्वामिनोऽग्नेः श्वगृध्रयोः ॥ किमात्मनः किं सुहृदामिति यो नावसीयते ॥ १९ ॥

॥ टीका ॥ गर्भधारण पोषण ॥ स्वयें श्रमोनियां आपण ॥ माता करी परिपालन ॥ तो हा देह जाण मातेचा ॥ १५ ॥ एकलेपणें माता ॥ स्वप्नीं न देखे पुत्रकथा ॥ जो निजवीर्यनिक्षेपितां ॥ तो हा देहो तत्त्वतां पित्याचा ॥ १६ ॥ जे अग्निब्राह्मण साक्षी करूनी ॥ भार्या आणिली भाक देवोनि ॥ जे जीवित्व समर्पोनी ॥ सेवेलागोनि विनटली ॥ १७ ॥ जीसि याचेनि सुख शृंगार ॥ जीसी याचेनि ऐहिकपर ॥ ऐसा सूक्ष्म करितां विचार ॥ देहो साचार स्त्रियेचा ॥ १८ ॥ या देहाचीं अवश्यकें ॥ सुहृद बंधू जे कां सखे ॥ देहाचेनि सुखावती सुखें ॥ देह एकें पोखें त्याचाही ॥ १९ ॥ स्वयें घेऊनियां वेतन ॥ देहो विकिला आपण ॥ आज्ञेवीण न वचे क्षण ॥ देहो जाण स्वामीचा ॥ २० ॥ श्वानसृगालगिधांचें खाजें ॥ तरी हा देहो त्यांचा ह्मणिजे ॥ जीवास्तव देहीं कर्म निपजे ॥ यालागीं देह बोलिजे जीवाचा ॥ २१ ॥ पिता माता स्त्रीपुत्र स्वजन ॥ देहाचें अवश्यक करिती दहन ॥ यालागीं देह अग्नीचा पूर्ण ॥ विचक्षण बोलती ॥ २२ ॥ यापरी देहाचे जाण ॥ विभाग असती आठजण ॥ तेथ ' मी भोक्ता ' हा अभिमान ॥ तो केवळ जाण मूर्खत्वें ॥२३॥ एथ एक मी ०विशिष्ट भोक्ता ॥ माझा देह ऐशी ममता ॥ हेचि जाण तत्त्वतां ॥ अधःपाता +नेतसे ॥२४॥

॥ श्लोक ॥ तस्मिन्कलेवरेऽमेध्ये तुच्छनिष्ठे विषज्जते ॥ अहो सुभद्रं सुनसं सुस्मितं च मुखं स्त्रियः ॥ २० ॥

॥ टीका ॥ देहो तितुका अशुचिकर ॥ त्यांत स्त्रीदेह अति अपवित्र ॥ केवळ विटाळाचें पात्र ॥ निरंतर द्रवरूपें ॥ २५ ॥ स्वयें भोक्ता अतिकुंश्चित ॥ ऐसे अविवेकी कामासक्त ॥

१ स्त्रीचें तोंड. २ हास्ययुक्त. ३ मनोहर. ४ वाटेकरी. ५ पतिसंगावांचून. ६आपलें बीजरूपवीर्य सेचन करणारा. ७ शपथ. ८ ह्या व परलोकींचीं सुखें. ९ एकापक्षीं. १० पगार. ११ धन्याचा. १२ कुत्रा, कोल्हा, गिधाड यांचें भक्ष्य. १३ अपवित्र. १४ मलयुक्त, दुर्गंधयुक्त.

*ना. कामाची. ×ना. मूर्ख सकाम. ※मो. वांछिती. ०ना. विषयभोक्ता. +मो. नेताती. मो. भोगिता.

कामिनीकामीं लोलंगत ॥ ते मर्ख *वानीत स्त्रियांतें ॥ २६ ॥ अहो हे सुंदर सुरेख ॥ चंद्रवदना अतिसुमुख ॥ सरळ शोभे नासिक ॥ सौभाग्य देख सुकुमार ॥ २७ ॥ ऐशि-ये सुंदर स्त्रियेतें ॥ पावलों आह्मी सभाग्य एथें ॥ ऐशीं कामासक्तचित्तें ॥ भुललीं भ्रांतें प्रमदांसी ॥ २८ ॥ स्त्रीदेहाचे विवंचनें ॥ विवंचितां वोंकारा ये मनें ॥ जळो स्त्रियेचें निंद्य जिणें ॥ मूर्खीं रमणें तेठायीं ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ त्वङ्मांसरुधिरस्नायुमेदोमज्जाऽस्थिसंहतौ ॥ विण्मूत्रपूये रमतां कृमीणां कियदन्तरम् ॥ २१ ॥

॥ टीका ॥ स्त्रीदेहाचा उभारा ॥ केवळ अस्थींचा पांजरा ॥ त्याचें +आवरण तें स्नायुशिरा ॥ बांधोनि खरा दृढ केला ॥ २३० ॥ तेथ रुधिरमांसाचें कालवण ॥ करूनि पांजरा लिंपिला पूर्ण ॥ अस्थीवरील जें वेष्टण ॥ मज्जा जाण ती नांव ॥ ३१ ॥ अस्थिमाजील रस बद्ध ॥ त्या नांव बोलिजे मेद ॥ वरी चर्म मढिलें सुबद्ध ॥ त्वचा शुद्ध ती नांव ॥ ३२ ॥ त्या देहामाजीं सांठवण ॥ विष्ठा मूत्र परिपूर्ण ॥ ते स्त्रीदेहीं ज्यांचें रमण ॥ ते कृमि जाण नररूपें ॥ ३३ ॥ विष्ठेमाजीं कृमीची रती ॥ तैशी स्त्रीदेहीं ज्यांची आसक्ती ॥ तेही कृमिप्राय निश्चितीं ॥ संदेह ये अर्थीं असेना ॥ ३४ ॥ वनितादेह यापरी एथ ॥ विचारितां अतिकुश्चित ॥ तो वस्त्रालंकारीं शोभिवंत ॥ करूनि आसक्त नर होतीं ॥ ३५ ॥ घेंट पारधी पाश पसरी ॥ त्यावरी तो मृगांतें धरी ॥ पुरुष स्त्रियेतें शृंगारी ॥ त्या पाशाभीतरीं स्वयें अडके ॥ ३६ ॥ यालागीं स्त्रियांची संगती ॥ कदा न करावी विरक्तीं ॥ गृहस्थीं सांडावी आसक्ती ॥ येचि अर्थीं नृप बोले ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ अथापि नोपसज्जेत स्त्रीषु स्त्रैणेषु चार्थवित् ॥ विषयेंद्रियसंयोगान्मनः क्षुभ्यति नान्यथा ॥ २२ ॥

॥ टीका ॥ स्त्रीदेह शोभेनीय असता ॥ तरी वस्त्रलंकारेंवीण शोभता ॥ तो अतिनिंद्य कुश्चितता ॥ ×उघड सर्वथा शोभेना ॥ ३८ ॥ यालागीं वस्त्राभरणीं ॥ देह गुंडिती कामिनी ॥ जेवीं मैंद ब्राह्मणपणीं ॥ विश्वासूनी ÷घातक ॥ ३९ ॥ तैशी स्त्रियांचा संगती ॥ सेवा लावी नानायुक्तीं ॥ शेवटीं संगें पाडी अधःपातीं ॥ तेथ विरक्तीं न वचावें ॥ २४० ॥ जरी स्त्रियेची विरक्तस्थिती ॥ तरी साधकीं न करावी संगती ॥ अग्निसंगें घृतें द्रवती ॥ तेवीं विकारवृत्ती स्त्रीसंगें ॥ ४१ ॥ अमृत ह्मणोनि खातां विख ॥ अवश्य मरण आणी दुख ॥ स्त्री मानूनि सात्विक ॥ सेवितां दुःख भोगवी ॥ ४२ ॥ अग्निमाजीं घृताची वस्ती ॥ जरी बहुकाळ निर्वाहती ॥ तरी स्त्रीसंगें परमार्थी ॥ निजात्मस्थिती पावते ॥ ४३ ॥ घृत वेंचल्या वर्षें झालीं साठीं ॥ तरी अ-

---

१ ओंकारी. २ मूर्खांनीं रमावें. ३ आकार. ४ सांगाडा. ५ खरोखर. ६ मिश्रण. ७ रति. ८ किडे. ९ अतिमलिन. १० गायनादिकांनीं भुलवून मृगास पाशांत पाडणारा पारधी. ११शोभिवंत. १२ झांकिती, वेढिती. १३ फसविणारे, फासेगार. १४ वृत्तीला विकार होतो. १५ टिकती. १६ कुंभातील घृत खर्चून साठ वर्षें झाल्यावर जर तो कुंभ ऊन केला तर त्यात तुपाचा ओलेपणा—वशटपणा प्रकट होईल.

*ना. मानित. +मो. आलेनते. ×ना. उघडा. ÷मो. घात कीजे.

ग्निसंगें द्रव उपजे घटीं ॥ तेवीं प्रमदासंग परिपाठीं ॥ वार्धकींही उठी अतिकाम ॥ ४४ ॥ जरी कापुर अग्नि आंत ॥ नांदोलाहतां न पोळत ॥ तरीच स्त्रीसंगें परमार्थ ॥ पावते समस्त परब्रह्म ॥ ४५ ॥ अग्निपोळी धरितां हातीं ॥ तैशी स्त्रियांची संगती ॥ संगें वाढवी आसक्ती॥ पाडी अनर्थी पुरुषातें ॥ ४६ ॥ स्त्रियेपरीसही स्त्रैण ॥ संगति मीनलिया जाण ॥ कोटि अनर्थांचें भाजन ॥ अधःपतन तत्संगें ॥ ४७ ॥ स्त्रैणासि झाल्या भेटी ॥ ब्रह्मानंद स्त्रीसुखाच्या पोटीं ॥ ऐशा विरक्तांसी प्रबोधी गोठी ॥ करी उठाउठी स्त्रीकाम ॥ ४८ ॥ तेथ स्वदारा आणि परदारा ॥ करूंनेदी विचारा ॥ प्रवर्तवी स्वेच्छाचारा ॥ स्त्रैण खरा अतिघाती ॥ ४९ ॥ स्त्रैण जेथें प्रवेशला ॥ तेथ अनाचार वेलीं गेला ॥ अधर्म सर्वांगीं फुलला ॥ बाधकत्वें फळला अनर्थफळीं ॥ २५० ॥ यालागीं जो परमार्थी ॥ तेणें स्त्री आणि स्त्रैणाची संगती॥ सर्वथा न धरावी हातीं ॥ पाडी अनर्थी तो संग ॥ ५१ ॥ मुख्य स्त्रैणचि वाळिला आहे ॥ तेथें स्त्रीसंग कोठें राहे ॥ हे संगतीचि पाहे ॥ सेव्य नोहे परमार्थी ॥ ५२ ॥ यालागीं साधकीं आपण ॥ स्त्रीनिरीक्षण संभाषण ॥ सर्वथा न करावें जाण ॥ *एकांतशीलन केव्हांही ॥५३॥ ह्मणशी विवेकी जो आहे ॥ त्यासि संग करील काय ॥ स्त्रीसंगास्तव पाहे ॥ सोशिले अपाये सज्ञानीं ॥ ५४ ॥ पराशरासि अर्धवडी ॥ नावेसी मीनली नावाडी ॥ ×ते अर्धघटिकेसाठीं येवढी ॥ अंगीं परवडी वाजली ॥ ५५ ॥ ऋष्यशृंग अतितापसी ॥ तोही वश झाला वेश्येसी॥ इतरांची गोठी कायसी ॥ मुख्य महादेवासी क्षुभविलें ॥ ५६ ॥ विषयइंद्रियांचे संगती ॥ अवश्य क्षोभे चित्तवृत्ती ॥ तेथ सज्ञानही बाधिजती ॥ रा कोण गती अज्ञाना ॥ ५७ ॥ हेही असो उपपत्ती ॥ नसतां स्त्रियांची संगती ॥ काम क्षोभे एकांतीं ॥ तेंचि विशदार्थी बोले॥५८॥

॥ श्लोक ॥ अदृष्टादश्रुताद्भावान्न भाव उपजायते ॥ असंप्रयुंजतः प्राणान् शाम्यति स्तिमितं मनः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ जें देखिलें ऐकिलें नाहीं ॥ ऐशिया विषयाचे ठायीं ॥ पुरुषाचें मन पाहीं ॥ सर्वथ कहीं क्षोभेना ॥ ५९ ॥ जे पूर्वभुक्तविषय असती ॥ तेचि स्मरण झालिया चित्तीं ॥ कामउद्रेकें क्षोभे वृत्ती ॥ नसतां संगती स्त्रियांची ॥ २६० ॥ एवं पूर्वापर विषयासक्ती ॥ पुरुषासि बाधक निश्चितीं ॥ तो बैसल्याही एकांतीं ॥ वासनासंस्कारें वृत्ती सकाम क्षोभे ॥ ६१ ॥ पूर्वदिवशींचीं पक्कान्नें ॥ जीं ठेविलीं अतियत्नें ॥ तीं न करितांही रंधनें ॥ पहांटे भक्षणें स्वयें जेवीं ॥ ६२ ॥ तेवीं वासनासंस्थित काम ॥ पुरुषास करी सकाम ॥ कामक्षोभें पाडी भ्रम ॥ कर्माकर्म स्मरेना ॥ ६३ ॥ एवं वासनाकामसंगतीं ॥ बाधक होय परमार्थी ॥ यालागीं साधकीं समस्तीं ॥ स्त्रीकामासक्ती त्यागावी ॥ ६४ ॥ मनीं क्षोभल्या कामासक्ती ॥ साधकीं तेथें करावी युक्ती ॥ आवराव्या बाह्य इंद्रियवृत्ती ॥ तें मनासि शांती हळहळ होय ॥ ६५ ॥ कर्मेंद्रियीं रोखण ॥ दृढ वैराग्य ठेविलिया जाण ॥ मनीं क्षोभल्या काम पूर्ण ॥ आपल्या आपण

---

१ क्रमानें, संस्कारानें. २ नांदला असतां. ३ स्त्रीलंपट. ४ पात्र. ५ वाढला. ६ अनर्थरूप फळांनीं फळयुक्त झाला. ७ वर्ज केला. ८ नावाड्याची कन्या. ९ दोषांत सांपडतात. १० वासनेंत असणारी कामसंगति. ११ पाहाग.

*ना. एकांत सेवन. ×मो. अंगीं वाजली अपरवडी ॥ अर्धक्षणा कारणें.

उपशमे ॥ ६६ ॥ जेणें पडिजे अनर्थी ॥ ते त्यागावी संगती ॥ संगत्यागाची निजस्थिती ॥ दृढ श्लोकार्थी नृप बोले ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ तस्मात्संगो न कर्तव्यः स्त्रीषु स्त्रैणेषु चेंद्रियैः ॥ विदुषां चाप्यविश्रब्धः षड्वर्गः किमु मादृशाम् ॥ २४ ॥

॥ टीका ॥ जेणें सज्ञाना उठी छळ ॥ सकाम भुलवी तत्काळ ॥ ऐसा स्त्रीसंग अनर्थशीळ ॥ त्याहूनि प्रबळ स्त्रैणाचा ॥ ६८ ॥ यालागीं कर्मेंद्रियांचे स्थितीं ॥ स्त्री आणि स्त्रैणाची संगती ॥ वर्जोनि दावी परमार्थी ॥ जे निजस्वार्थी साधक ॥ ६९ ॥ जरी विषयीं क्षोभेल मन ॥ तरी *इंद्रियें आवरावीं आपण ॥ तरी मनींचा विषयो जाण ॥ मनींचि आपण स्वयें विरे ॥ २७० ॥ निकट विषय स्त्रीसंगती ॥ मन क्षोभे विषयासक्ती ॥ क्षणार्धे स्त्रीसंगप्राप्ती ॥ पडले अनर्थी सज्ञान ॥ ७१ ॥ स्त्रीदर्शनें कामासक्त ॥ देवेंद्र झाला भगांकित ॥ चंद्र कलंकिया एथ ॥ **केला निश्चित गुरुपत्न्या ॥ ७२ ॥ सौभरी तपस्वी तपयुक्त ॥ तो मत्स्यमैथुनास्तत्र एथ ॥ करूनि सांडिला कामासक्त ॥ ऐसा संग अनर्थभूत स्त्रियांचा ॥ ७३ ॥ निजकन्येचिया संगतीं ॥ ब्रह्मा भुलला कामासक्ती ॥ मा इतरांची कोण गती ॥ संग अनर्थी स्त्रियांचा ॥ ७४ ॥ कामिनीसंग अतिदारुण ॥ शिवासि झालें लिंगपतन ॥ प्रमदासंगें सज्ञान ॥ ठकले जाण महायोगी ॥ ७५ ॥ नारदें विनोददृष्टीं ॥ कृष्णपत्नी मागीतल्यासाठीं ॥ +तो नारदी केला गंगातटीं ॥ तेथ जन्मले पोटीं साठी पुत्र ॥ ७६ ॥ कौतुकें स्त्रियांप्रति जातां ॥ सज्ञान पावे बाधकता ॥ मा मजसारिख्या मूर्खांची कथा ॥ कोण वार्ता तेठायीं ॥ ७७ ॥ क्षणार्धे स्त्रियांची संगती ॥ सज्ञान ठकले ऐशा रीतीं ॥ जे स्त्रीसंगा विश्वासती ॥ ते दुःखी होती मजऐसे ॥ ७८ ॥ यालागीं विश्वासतां स्त्रीसंगासी ॥ इंद्रियषड्वर्ग ठकी सर्वांसी ॥ एथ आवरूनि इंद्रियांसी ॥ सर्वथा स्त्रियांसी त्यागावें ॥ ७९ ॥ त्यागूनि स्त्रियांची संगती ॥ उपरमूनि इंद्रियवृत्ती ॥ राजा पावला परमशांती ॥ तेंचि श्रीपती स्वयें सांगे ॥ २८० ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ एवं प्रगायन्नृपदेवदेवः स उर्वशी लोकमथो विहाय ॥ आत्मानमात्मन्यवगम्य मां वै उपारमज्ज्ञानविधूतमोहः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ जो उर्वशीस्वर्गभोग पावोनी ॥ ज्यासि देव मानिती श्रेष्ठपणीं ॥ जो सकळराजचूडामणी ॥ ज्यासि येती लोटांगणीं भूपाळ ॥ ८१ ॥ ऐसा पुरूरवा चक्रवर्ती ॥ लाहोनि उर्वशीभोगप्राप्ती ॥ स्वर्गभोगीं पावला विरक्ती ॥ सभाग्य नृपती तो एक ॥ ८२ ॥ अप्राप्तविषयें योगी ॥ बहुत देखिले विरागी ॥ परी प्राप्तस्वर्गांगनाभोगीं ॥ धन्य विरागी पुरूरवा ॥ ८३ ॥ पुरूरव्या ऐशी विरक्ती ॥ नाहीं देखिली आणिकाप्रती ॥ धन्य पुरूरवा त्रिजगतीं ॥ स्वमुखें श्रीपती वाखाणी ॥ ८४ ॥ तेणें अनुतापाच्या अनुवृत्तीं ॥ निंदोनियां निजात्मस्थिती ॥ क्षाळिली का-

१ पुरूरवाराजा. २ हजार छिद्रांनीं युक्त ३ कलंकयुक्त. ४ देवगुरूची पत्नी तारा, ही चंद्रानें भोगिली त्यामुळें. ५ एक ब्रह्मर्षि, यानें मांधाता राजाच्या सर्व कन्या वरिल्या (भा. ९ स्कं. अ. ६). ६ अनर्थकारण. ७ थट्टेनें. ८ प्रभवादि साठ संवत्सर हे नारदीचे पुत्र. ९ इंद्रियांचे काम, क्रोध इत्यादि सहाधर्म. १० त्रैलोक्यांत.

*मो. विषयें आवरावी. **मो. ठकिला निश्चित. +मो. तो नारद गेला गंगातटीं

मिनीकामासक्ती ॥ धुतला निश्चितीं महामोहो ॥ ८५ ॥ अनुताप आगिठीं अभंग ॥ वैराग्य-पुट देऊनि चांग ॥ विवेकें दमितां सांग ॥ काममोहाचे डाग क्षाळिले तेणें ॥८६॥ जेवीं सोनें पुटीं पडे ॥ तुकें तुटे वानीं चढे ॥ तेवीं निजात्मप्राप्तिनिवाडें ॥ वृत्ति वाडेंकोडें क्षाळिली ॥ ८७ ॥ ऐशिये अतिशुद्धनिजवृत्तीं ॥ विवेकवैराग्यसंपत्ती ॥ पूर्ण अनुतापाचे स्थितीं ॥ माझी कृपाप्राप्ती पावला ॥ ८८ ॥ माझिया कृपेवीण कहीं ॥ कदा अनुताप नुपजे देहीं ॥ शुद्ध अनुताप ज्याच्याठायीं ॥ ते माझी कृपा पाहीं परिपूर्ण ॥ ८९ ॥ माझी कृपा झालिया जाण ॥ जीवचि होय ब्रह्म पूर्ण ॥ निःशेष गळे देहाभिमान ॥ मीतूंपण भासेना ॥ २९० ॥ तेथ कार्य कर्म आणि कर्ता ॥ भोग्य भोग आणि भोक्ता ॥ दृश्य दर्शन द्रष्टृता ॥ हे त्रिपुटी सर्वथा असेना ॥ ९१ ॥ त्रिगुण त्रिपुटीचें कारण ॥ मूळभूत निज अज्ञान ॥ तें सद्गुरुकृपेस्तव जाण ॥ गेलें हरपोन मिथ्यात्वें ॥९२॥ जेवीं दोराचें सापपण ॥ निर्धारितां हारपे पूर्ण ॥ तेवीं गुणेंसि अविद्या जाण ॥ जाय हारपोन गुरुकृपें ॥९३॥ सद्गुरुबोधें पाहतां जाण ॥ दिसेना द्वैताचें भान ॥ तेथ उर्वशी भोगी कोण ॥ राजा स्वानंदीं पूर्ण निवाला ॥ ९४ ॥ राजा निवाला ब्रह्मरसीं ॥ मग सांडूनियां उर्वशी ॥ त्यजोनियां स्वर्गलोकासी ॥ निजबोधेंसीं निवाला ॥ ९५ ॥ इतर ज्ञाते स्त्रिया त्यागिती ॥ परी त्यागेना कामासक्ती ॥ तैसी नव्हे रायाची स्थिती ॥ परम विरक्ती पावला ॥ ९६ ॥ जे परमविरक्तीचे पोटीं ॥ कामिनी कामवार्ता तुटी ॥ ब्रह्मानंदें कोंदली सृष्टी ॥ स्वानंदपुष्टीं निवाला ॥९७॥ ऐसें सुखस्वरूपें सहज ॥ मी होऊनि पावला मज ॥ जिणोनि कल्पना कामकाज ॥ नाचत भोज स्वानंदें ॥ ९८ ॥ ऐसा निश्चयेंसि निश्चित ॥ माझें *निजस्वरूप झाला प्राप्त ॥ तेणें हा इतिहास एथ ॥ निजसुखार्थ गायिला ॥९९॥ अनुताप आवडीं इतिहास ॥ गातां प्रकटे पूर्ण परेश ॥ तेथ सहजें अविद्येचा नाश ॥ निजसुखें क्षितीश निवाला ॥ ३०० ॥ येवढी पावावया निजप्राप्ती ॥ त्यागावी कामिनीकामासक्ती ॥ मुख्यत्वें धरावी सत्संगती ॥ हेंचि उद्धवाप्रती हरि बोले ॥ १ ॥

॥ श्लोक ॥ ततो दुःसंगमुत्सृज्य सत्सु सज्जेत बुद्धिमान् ॥ संत एतस्य छिंदंति मनोव्यासंगमुक्तिभिः ॥ २६ ॥

॥ टीका ॥ अवश्य त्यागावी दुःसंगता ॥ तो दुःसंग कोण ह्मणशी आतां ॥ तरी स्त्री आणि स्त्रैणावरता ॥ दुःसंग सर्वथा असेना ॥ २ ॥ जो मानीना वेदशास्त्रार्था ॥ जो अविश्वासी परमार्था ॥ ज्यामाजीं अतिविकल्पता ॥ तोही तत्त्वतां दुःसंग ॥३॥ जो बोल बोले अतिविरक्त ॥ हृदयीं अधर्म कामरत ॥ ※कामरोधें द्वेषा येत ॥ तोही निश्चित दुःसंग ॥४॥ कां स्वधर्मकर्मी विनीतता ॥ बाह्य दावी सात्त्विकता ॥ हृदयीं दोषदर्शी संतां ॥ हे दुःसंगता अतिदुष्ट ॥ ५ ॥ जो मुखें न बोले आपण ॥ परी देखे साधूंचे दोषगुण ॥ तेंचि +संवादीं दावी उपलक्षण ॥ तो अतिकठिण दुःसंग ॥ ६ ॥ मुख्य आपली जे सकामता ॥ तोचि दुःसंग सर्वथा ॥ तो काम समूळ त्यागितां ॥ दुःसंगता त्यागिली ॥७॥ कामकल्पनेचा जो मार ॥ तोचि दुःसंग दुर्धर ॥

१ अनुतापरूप अग्नीत. २ भट्टींत. ३ वजन. ४ वर्णास, कसास. ५ दोघांच्या यथार्थस्वरूपाचा निश्चय होतांच. ६ स्त्रीविषयाची गोष्ट. ७ राजा. ८ स्त्रीलंपटापेक्षां. ९ नम्रपणा.

*ना. निजधाम स्वरूप. ※ना. कामक्रोध द्वेषा. +ना. संवादिया.

ते कामकल्पना त्यागी जो नर ॥त्यासि संसार सुखरूप॥८॥ कामकल्पना त्यागावया जाण॥ मुख्य सत्संगाचि कारण ॥ संतांचे वंदितां श्रीचरण ॥ कल्पना काम उपमर्दे ॥ ९ ॥ संग सर्वथा बाधक ॥ ह्मणशी त्यजावा निःशेख ॥ तरी सत्संग न धरितां देख ॥ केवीं साधक सुटतील ॥ ३१० ॥ सत्संगेंविण जें साधन ॥ तेंचि साधकां दृढ बंधन ॥ सत्संगेंविण त्याग जाण ॥ तेंचि संपूर्ण पाषांड ॥ ११ ॥ चित्तविषयांचा संबंध ॥ गांठी बैसल्या सुबद्ध ॥ त्यांचा करावया छेद ॥ विवेकें विशद निजसाधू ॥ १२ ॥ संतांच्या सहज गोठी ॥ त्याचि उपदेशांच्या कोटी ॥ देहात्मता जीवगांठी ॥ बोलासाठीं छेदिती ॥१३॥ भावें धरिल्या सत्संगती ॥ साधकां भवपाशनिर्मुक्ती ॥ यालागीं अवश्य बुद्धिमंतीं ॥ करावी संगती संतांची ॥ १४ ॥ त्या संतलक्षणांची स्थिती ॥ अतिसंक्षेपें श्रीपती ॥ आदरें सांगे उद्धवाप्रती ॥ यथानिगुती निजबोधें ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ संतोऽनपेक्षा मच्चित्ताः प्रशांताः समदर्शिनः ॥ निर्ममा निरहंकारा निर्द्वंद्वा निष्परिग्रहाः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ साधूंचे अमितगुण ॥ त्यांत मुख्यत्वें अष्टलक्षण ॥ निवडूनि सांगे श्रीकृष्ण ॥ ते कोण कोण अवधारा ॥ १६ ॥ प्राप्ताप्राप्तलाभावस्था ॥ बाधूं नशके साधूच्या चित्ता ॥ चित्त रातलें भगवंता ॥ निरपेक्षता या नांव ॥ १७ ॥ पैल विषयो मज व्हावा ॥ ऐसा आठव नाठवे जीवा ॥ हा साधूचा निरपेक्ष ठेवा ॥ जाण उद्धवा गुण पहिला ॥१८॥ चित्तें चिंतावें चैतन्य॥ याचि नांवें *मच्चितपण ॥ याचिनांवें निरपेक्षा पूर्ण ॥ इतर चिंतन भवबंधू ॥ १९ ॥ निरपेक्ष व्हावया एथ ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तीं आंत ॥ चिन्मात्रीं जडलें चित्त ॥ या नांव मच्चित्त गुण दुजा ॥३२०॥ देह +झालिया लक्ष्मीयुक्त ॥ अथवा होकां ×आपंयुक्त ॥ चित्त परमानंदीं निश्चित्त ॥ या नांव मच्चित्त उद्धवा ॥२१॥ ०काममलोभादि दोषरहित ॥ परमानंदीं जडलें चित्त ॥ शांति ※सुखवासें वसे तेथ ॥ यालागीं प्रशांत बोलिजे त्यासी ॥ २२ ॥ जरी प्राणांतें केला अपकार ॥ तरी न ह्मणे हा दुष्ट नर ॥ अपकाऱ्या करी उपकार ॥ प्रशांतिप्रकार या नांव ॥ २३ ॥ जरी ठकूनि सर्वस्व नेलें ॥ तरी क्षोभेना *दोष बोले ॥ तें जाण ब्रह्मार्पण झालें ॥ येणें अंगा आलें प्रशांतत्व ॥ २४ ॥ ब्रह्मभावेंचि तत्त्वतां ॥ विश्वासणें सर्वभूतां ॥ कदा विकल्प नुपजे चित्ता ॥ हे प्रशांतता गुण तिजा ॥ २५ ॥ ऐसा प्रशांत गुण ॥ अंगीं बाणावया हेंचि कारण ॥ जगीं देखे समदर्शन ॥ ब्रह्म परिपूर्ण समसाम्यें ॥ २६ ॥ जग पाहतां दिसे विषम ॥ परी विषमीं देखे ⁸सम ब्रह्म ॥ तोचि समदर्शी परम ॥ हा गुण निरुपम पैं चौथा ॥ २७ ॥ हे समदृष्टी यावया हाता ॥ भावें ⁵भजोनि भगवंता॥निःशेष ⁶त्यजिली अहंममता ॥ तेही कथा अवधारी ॥२८॥ देहीं धरितां देहाभिमान ॥ ते अहंता वाढवी मीपण ॥ मीपणें ममता जाण ॥ वाढे संपूर्ण देहसंबंधें ॥ २९ ॥ जे वाढली ⁷अहंममता ॥ ते ²वाढवी महादुःख-

---

१ बोलण्यानें, शब्दानें. २ तो पलीकडचा. ३ संकटयुक्त. ४ जीव घेई तों.

*मो. मच्चिंतन. +मो. लागल्या. ×मो. आपद्रत. ०मो. कां लाभालाभ दोष. ※मो सुरवाडें. *मो. द्वेषबोलें. ⁸ना. परब्रह्म. ⁵मो. भजावें. ⁶मो. त्यजावी. ⁷ना. देहममता. ²ना. वर्तवी.

वार्ता॥तेचि निवारावया निजव्यथा ॥ *सद्भावें माथा गुरुचरणीं॥३३०॥गुरुकृपा झालिया पूर्ण॥ माझें देहींचें जें मीपण ॥ तें उकलोनि दावितां जाण ॥ जग संपूर्ण मी एक ॥ ३१ ॥ जें जें मानें थोर देखे दृष्टीं ॥ तें तें अवघें मीचि सृष्टीं ॥ माझ्या मीपणाची निजपुष्टी ॥ घोंटीत उठी त्रैलोक्य ॥ ३२ ॥ ऐसा मीपणें परिपूर्ण ॥ तेथ मी ह्मणावया ह्मणतें कोण ॥ निःशेष निमालें मीतूंपण ॥ निरभिमान या नांव ॥३३॥ ऐसें माझें मीपण पाहतां ॥ समूळ हारपली ममता ॥ हें माझें ह्मणावया पुरता ॥ ठाव रिता नुरेचि ॥ ३४ ॥ माझें मीपणा बाहिरें ॥ जें ममतास्पद दुजें उरे ॥ तें तेथ पूर्ण ममता स्फुरे ॥ ते स्यां चिन्मात्रें घोंटिली ॥३५॥ तेथ मीपणें मी माझें ॥ नुरेचि तूंपणेंसि तुझें ॥ ऐसे परब्रह्माचेनि जे ॥ झाले सहजें निर्मम ॥३६॥ निर्मम निरभिमान॥ तें हें उद्धवा गा संपूर्ण ॥ पांचवें सहावें लक्षण ॥ संतांचें जाण निजगुह्य ॥ ३७ ॥ ऐसे निर्मम निरहंकार ॥ जे होऊनि ठेले साचार ॥ त्यांसि द्वंद्वदुःख डोंगर ॥ अणुमात्र बाधीना ॥ ३८ ॥ देहअदृष्टाच्या वाटा ॥ लागतां सुखदुःखांच्या झटा ॥ तो ब्रह्मसुखाचे चोहटा ॥ देहाचा द्रष्टा होऊनि वसे ॥३९॥ +देहासि पदवी आली थोरी ॥ तो श्लाघेना जीवाभीतरीं ॥ देह घोसाळितां नरकद्वारीं ॥ तो अणुभरी ×कुंथेना ॥ ३४० ॥ देह व्याघ्रमुखीं सांपडे ॥ तेणें दुःखें तो न सांकडे ॥ देह पालखीमाजीं चढे ॥ तें वाडेंकोडें श्लाघेना ॥ ४१ ॥ छाया विष्ठेवरी पडे ॥ कां पालखीमाजीं चढे ॥ तेणें पुरुषा सुखदुःख न जोडे ॥ मुक्तासि तेणें पाडें देहभोग ॥ ४२ ॥ त्याचे ०दृष्टीखालीं एकाएक ॥ दुःखपणा मुके दुःख ॥ सुखपणा विसरे सुख ॥ निर्द्वंद्व देख या हेतू ॥ ४३ ॥ जो निर्मम निरभिमान ॥ त्यासि नाहीं भेदभान ॥ अभेदीं मिथ्या द्वंद्वबंधन ॥ हा सातवा गुण निर्द्वंद्व ॥ ४४ ॥ जो निर्द्वंद्व निरभिमान पहाहो ॥ त्यासि समूळ मिथ्या निज देहो ॥ तेथ देहसंबंधें परिग्रहो ॥ उरावया ठावो मग कैंचा ॥ ४५ ॥ स्वजनधनस्त्रीपुत्रांसी ॥ नांदोनि तो नातळे त्यांसी ॥ स्वप्नींची घरवार्ता जागृता जैसी ॥ तैसा साधूसी संसारु॥४६॥ एवं परिग्रही असोन ॥ साधु अपरिग्रही पूर्ण ॥ हें आठवें मुख्य लक्षण ॥ अतर्क्य जाण जगामीं ॥ ४७ ॥ साधु परिग्रही दिसती ॥ परी ते परिग्रही नसती ॥ हेचि संतांची यावया स्थिती ॥ त्यांची निजभक्ती करावी ॥ ४८ ॥ हें साधूचें अष्टलक्षण ॥ तें ब्रह्मींचें अष्टांग जाण॥ कीं अष्टमहासिद्धि निर्गुण ॥ ते हे अष्टगुण साधूंचे ॥ ४९ ॥ चैतन्य सरोवरींचें कमळ ॥ विकासलें अष्टदळ ॥ तें हें संतलक्षण केवळ ॥ ÷स्वानंदशील साधूचें ॥३५०॥ ऐसे हे अष्टमहागुण ॥ सकळ भूषणां भूषण ॥ ज्यांचे अंगीं बाणले पूर्ण ॥ ते साधु सज्जन अतिशुद्ध॥५१॥ इतरसंगाचिये प्राप्ती ॥ संग बाधक निश्चितीं ॥ तैशी नव्हे सत्संगती ॥ संगें छेदी *देहसंगा ॥ ॥ ५२ ॥ तेथ उपदेश नलगे कांहीं ॥ संगेंचि देहीं[11] करी विदेही ॥ तेंचि सातें श्लोकीं पाहीं ॥ संतांची नवाई हरि सांगे ॥ ५३ ॥

---

१ आत्मसात्करीत, खात, पीत, गिळीत. २ ममतेचें ठिकाण. ३ गिळिली. ४ क्लेश पावे. ५ ममतारहित. ६ परिवार, पसारा. ७ आसक्त होत नाहीं. ८ संसारसंबंधी कथा. ९ संसारी. १० आठ पाकळ्यांचें. ११ जीवास देह असतांनाच. १२ प्रौढी, वर्णन.

*मो. सद्भावें गुरुनाथा शरण जावें. +मो. जीवासी. ×ना. थुंकेना. ०मो. दृष्टीपुढें. ÷ना. स्वानंदशीळ साधूची. *ना. आसक्ती देहसंगा.

॥ श्लोक ॥ तेषु नित्यं महाभाग महाभागेषु मत्कथाः ॥ संभवंति हि ता नृणां जुषतां प्रपुनंत्यघम् ॥ २८ ॥

॥टीका॥इंद्रपदादिब्रह्मसदन ॥ ये प्राप्ती नांव भाग्य गहन॥तेंही सत्संगासमानं ॥ कोट्यंशें जाण तुकेना ॥५४॥ ऐशी जे कां सत्संगती ॥ सभाग्य भाग्याचे पावती ॥ भगवद्भावें साधु वर्तती ॥ माझी कथा कीर्तिअनुवादें ॥ ५५ ॥ जे कथा अवचटें कानीं ॥ पडतां *कलिमलाची धुणी॥ करूनि सांडी तत्क्षणीं ॥ जे गंगेहूनि पवित्र ॥५६॥ जेथ माझी निजकथा गाती ॥ तीर्थें तेथें पवित्र होती ॥ ऐशिया भगवत्कथाकीर्ति ॥ साधु गर्जती सर्वदा ॥ ५७ ॥ स्वयें आपण भागीरथी ॥ ×सर्वदा ऐसें जीवीं चिंती ॥ कोणी साधु जे ये'मजप्रती ॥ तें माझीं पापें जाती निःशेष ॥ ५८ ॥ पार्वतीचा द्वेष मनीं ॥ तें बद्ध पाप मजलागुनीं ॥ तेंही झडे संतचरणीं ॥ सकळ पापाधुणी सत्संगें ॥ ५९ ॥ कां ज्याचे मुखीं हरिनामकीर्ति ॥ त्याचे पाय जें मजमाजी येती ॥ तें सकळ पापें माझीं =जाती ॥ ऐसें भागीरथी स्वयें बोले ॥ ३६० ॥ ऐसी सत्संगाची संगती ॥ +सदा वांछी भागीरथी ॥ अवचटें गेलिया संतांप्रती ॥ पापें पळती प्राण्यांचीं ॥ ६१ ॥ ते संतमुखींचि माझी कथा ॥ जे अत्यादरें ऐके श्रोता ॥ तें त्याचें निजभाग्य तत्त्वतां ॥ मजही सर्वथा न वर्णवे ॥ ६२ ॥ माझे कथेची अति आवडी ॥ नित्य नूतन नवी गोडी ॥ सादरें ऐकतां पापकोडी ॥ जाळोनि राखोडी उरवीना ॥ ६३ ॥ माझी कथा कां माझें नाम ॥ सकळ पातकां करी भस्म ॥ हेंच चित्तशुद्धीचें वर्म ॥ अति सुगम उद्धवा॥६४॥ नानायोग याग वेदाध्ययन ॥ करितां पवित्र नव्हे मन ॥ तें करितां हरिकथाश्रवण ॥ होय अंतःकरण पुनीत ॥ ६५ ॥ अबद्ध पढतां वेद ॥ दोष बाधिती सुबद्ध ॥ नाम पढतां अबद्ध ॥ ते होती शुद्ध परमार्थता ॥ ६६ ॥ नानायोग याग वेदाध्ययन ॥ तेथ अधिकारी ०द्विज संपूर्ण॥ कथाश्रवणें चारी वर्ण ॥ होती पावन उद्धवा ॥ ६७ ॥ ऐसा लाभ कथाश्रवणीं ॥ तरी कां नाइकिजे सकळ जनीं ॥ तें भाग्य भगवत्कृपेवांचूनी ॥ सर्वथा कोणी लाहेना ॥ ६८ ॥ भगवत्कृपा पावले सांग ॥ त्यांसि ⁂कथा कीर्तनीं अनुराग॥ तेचि निजभाग्यें महाभाग ॥ स्वमुखें श्रीरंग बोलिला ॥ ६९ ॥ जगातें पवित्र करिती ॥ माझी जाण नामकीर्ति ॥ ऐसा कळवळोनि श्रीपती॥उद्धवाप्रती बोलिला ॥३७०॥ ऐशी भगवत्कृपेची प्राप्ती॥केवीं आतुडे आपुले हातीं॥ तेचि अर्थीं श्रीपती ॥ विशद श्लोकार्थीं सांगत ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ ता ये शृण्वंति गायंति ह्यनुमोदंति चादृताः ॥ मत्पराः श्रद्दधानाश्च भक्तिं विंदंति ते मयि ॥ २९ ॥

॥ टीका ॥ आपुलिया गृहकार्यार्था ॥ विषयव्यापारीं जातांजातां ॥ कानीं पडली हरिकथा॥ स्वभावतां प्रसंगें ॥ ७२ ॥ कृष्णकीर्तिकथनाक्षरें ॥ रिघतांचि कर्णद्वारें ॥ भीतरील पाप एकसरें ॥ निघे बाहिरें गजबजोनी ॥ ७३ ॥ जेवीं पंचाननाची आरोळी ॥ करी मदगजां रां·

१बरोबर होत नाहीं. २ गंगा ही पार्वतीचा द्वेष करिते. ३ अशुद्ध, अनन्वित.

*ना. कळिकाळाची. ×मो. सर्वदा असे जिवीं चिंतिती. =मो. जळती. +मो.स्वयें वांछी. ०मो. ब्राह्मण. ⁂ना. भगवत्कीर्तनीं.

गोळी ॥ तेवीं हरिकथेच्या मेळीं ॥ करी रंवंदळी महापापा ॥ ७४ ॥ ऐसा निघाल्या पापाचा केरू ॥ कथेसि उपजे अत्यादरू ॥ कथावधानीं धरितां धीरू ॥ हर्षे निर्भरू नर होय ॥ ७५ ॥ जंवजंव कथारहस्य जोडे ॥ तंव तंव अनुमोदनीं प्रीति वाढे ॥ वाढले प्रीतीचेनि पाडें ॥ *ते कथा कैवाडें स्वयें गाय ॥ ७६ ॥ फेडूनि ०लाजेचें बिरडें ॥ गातां हरिकीर्तिगुणपवाडे ॥ न पाहे तो कर्माकडे ॥ न सांकडे सुहृदांसी ॥ ७७ ॥ निजभावें भगवत्कथा गातां स्वयंभ उपजे सादरता ॥ तेणें अत्यादरें हरिकथा ॥ होय सांगता अतिश्रद्धा ॥ ७८ ॥ जंव जंव कथा सांगे निवाडें ॥ तंव तंव श्रद्धा अधिक वाढे ॥ प्रेमाचा पूर चढे ॥ त्यामाजीं बुडे निज श्रद्धा ॥ ७९ ॥ *कथा कीर्तन अनुकीर्ती ॥ वाढत्या श्रद्धेचिये प्रीतीं ॥ बाधूं न शके विषयासक्ती ॥ तेणें मत्पर स्थिती साधकां ॥ ३८० ॥ न करितां भगवद्भजन ॥ वेदाध्ययन यज्ञ दान ॥ येणेंचि आह्मी जाऊं तरोन ॥ ह्मणती ते जन महामूढ ॥ ८१ ॥ एथ मुख्यत्वें भगवद्भक्ती ॥ हा विश्वास धरितां चित्तीं ॥ भगवत्पर झालियां वृत्ती ॥ सर्वभूतीं मद्भाव ॥ ८२ ॥ ऐसा भाव धरोनि हृदयीं ॥ माझे भक्तीवेगळें कांहीं ॥ सर्वथा स्वयें करणें नाहीं ॥ मत्पर पाहीं या रीतीं ॥ ८३ ॥ ऐशिया मत्परा वृत्ती ॥ सावधान निजस्थिती ॥ तेणें उपजे माझी चौथी भक्ती ॥ तेंचि श्रीपती स्वयें सांगे ॥ ८४ ॥ तेथ न करितां आठवण ॥ अखंड होय हरीचें स्मरण ॥ क्रियामात्रें भगवद्भजन ॥ सहजें जाण सर्वदा ॥ ८५ ॥ जें जें दृष्टीं देखे आपण ॥ थोर अथवा सूक्ष्म सान ॥ तें तें हरीचें निजदर्शन ॥ सहजें भजन अहेतुक ॥ ८६ ॥ जें जें वाचा वदे वचन ॥ तें तें होय हरीचें स्तवन ॥ स्तव्य स्तविता उणखूण ॥ हेही आठवण विसरोनी ॥ ८७ ॥ +शब्दीं शब्दातें वदवितां ॥ ते शब्दरूपें हरीची सत्ता ॥ शब्द बोले ज्या शब्दार्था ॥ ते अर्थग्राहकता हरीची ॥ ८८ ॥ यापरी शब्दश्रवण ॥ श्रवणीं श्रवण होतां जाण ॥ तो शब्दार्थ संपूर्ण ॥ होय ब्रह्मार्पण श्रवणेंसी ॥ ८९ ॥ गंधघ्राणां होतां भेटी ॥ भोक्तेपणें हरीचि उठी ॥ तो घ्रेयें, घ्राता, घ्राण त्रिपुटी ॥ स्वयें घोंटी ×चिदत्वें ॥ ३९० ॥ रस, रसना, रसत्व बोध ॥ तेथ निजभोक्ता गोविंद ॥ तो भोग्य भोक्ता भोजनसंबंध ॥ करी परमानंद निजबोधें ॥ ९१ ॥ शीत, उष्ण, मृदु, कठिण ॥ निजांगीं लागतां जाण ॥ तें अंगेंचि होय आपण ॥ मृदु कठिण मिथ्यात्वें ॥ ९२ ॥ करांची जे कर्तव्यता ॥ तीतें चालवी अकर्तता ॥ यालागीं घेतां देतां ॥ अकर्तात्मता हरिभजन ॥ ९३ ॥ निश्चळ निजरूपावरी ॥ चपळ पाउलांच्या हारी ॥ चालवी जशा लहरी ॥ सूर्यकरीं मृगजळाच्या ॥ ९४ ॥ जागृतिस्वप्नसुषुप्तीं ॥ चिन्मात्रीं जडली वृत्ती ॥ चित्त चित्तत्वाची विसरे स्फूर्ती ॥ या नांव मद्भक्ती उद्धवा ॥ ९५ ॥ हे माझी आवडती भक्ती ॥ इचें नांव ह्मणती चौथी ॥ हें भाग्यें आतुडे ज्याचे हातीं ॥ तें चारी मुक्ती निजदासी ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ भक्तिं लब्धवतः साधोः किमन्यदवशिष्यते ॥ मय्यनंतगुणे ब्रह्मण्यानंदानुभवात्मनि ॥ ३० ॥

---

१ नाश, चुराडा. २ मित्र पाहून लाजत नाहीं. ३ अर्थ ग्रहण करण्याची शक्ति. ४ गंधविषय व घ्राणेंद्रिय या उभयांची. ५ वास घेण्याचा पदार्थ. ६ वास घेणारा. ७ गिळी.

*मो. तो कथा. ०मो. लोक लाजेचें. *मो. काया कीर्तन. +मो. शब्द शब्दातें प्रसवितां. ×ना. चिदात्मा.

॥ टीका ॥ अत्यंत माझी पढियंती ॥ ते हे जाण चौथी भक्ती ॥ निजभाग्यें लागल्या हातीं ॥ चारी मुक्ती तृणप्राय ॥ ९७ ॥ निरपेक्ष जेथ माझी भक्ती ॥ तेथ पायां लागती चारी मुक्ती ॥ त्यांतें भक्त न धरिती हातीं ॥ एथवरी प्रीती मद्भजनीं ॥ ९८ ॥ माझिया *निजभजनप्रीतीं ॥ स्वप्नींही बद्धता नेणिजे भक्तीं ॥ बद्धतेवीण मिथ्या मुक्ती ॥ जाणोनि नवेती निजभक्त ॥ ९९ ॥ जेथ बद्धता समूळ कुडी ॥ तेथ मुक्ति कायशी बापुडी ॥ माझिया निजभजनआवडीं ॥ स्वानंदकोडी मद्भक्तां ॥ ४०० ॥ निरपेक्ष निज प्रीती ॥ भावें करितां अनन्यभक्ती ॥ भक्तांसि +स्वानंदीं प्रीती ॥ भजनस्थितीमाझारीं ॥ १ ॥ जेवीं गर्भेसि वर्ते गुर्विणी[१] ॥ कां तरुणपणेंसि तरुणी ॥ तेवीं स्वानंदाच्या पूर्णपणीं ॥ माझे निजभजनीं मद्भक्त ॥ २ ॥ तेथ सगुण अथवा निर्गुण ॥ उभयरूपें मीचि ब्रह्म पूर्ण ॥ तेथ भावें करितां भजन ॥ ब्रह्मसंपन्न मद्भक्त ॥३॥ भावें करितां माझी भक्ती ॥ भाविकां कोण पां अप्राप्ती ॥ विवेकवैराग्यज्ञानसंपत्ती ॥ पायां लागती मद्भक्तांच्या ॥ ४ ॥ माझेनि भजनें तुटे भेद ॥ स्वयेंचि तेथें प्रकटे अभेदबोध ॥ तेणें वोसंडे परमानंद ॥ स्वानंदकंद स्वयंभ ॥ ५ ॥ माझे स्वस्वरूपा नाहीं अंत ॥ यालागीं नांवें मी अनंत ॥ बाप, भक्तभाव समर्थ ॥ तिहीं मी अनंत आकळिलों ॥ ६ ॥ ऐसें ज्यांचें प्रेम गोड ॥ त्यांचे सेवेचें मज कोड ॥ त्यांचें सोशीं मी सांकड ॥ निचाडा चाड मज त्यांची ॥ ७ ॥ देव सप्रेमें भुलला ॥ ह्मणे मी त्यांचाचि अंकिला ॥ जीवें भावें त्यांसि विकिला ॥ मी त्यांचा जाहलों तिहीं लोकीं ॥ ८ ॥ एथवरी भक्तां माझी प्राप्ती ॥ अवचटें झाल्या सत्संगती ॥ ×मा सद्भावें जे साधु सेविती ॥ त्यांची निजगती न बोलवे ॥ ९ ॥ ऐसा संतमहिमा वानितां ॥ धणी न पुरे श्रीकृष्णनाथा ॥ तोचि संतमहिमा मागुता ॥ होय वानिता चौश्लोकीं ॥ ४१० ॥

॥ श्लोक ॥ यथोपश्रयमाणस्य भगवंतं विभावसुम् ॥ शीतं भयं तमोऽप्येति साधून् संसेवतस्तथा ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ जेवीं वैश्वानर तेजोमूर्ती ॥ त्याची सेवा जे करूं जाती ॥ त्यांचें शीततमभयनिवृत्ती ॥ जो करी निश्चितीं उद्धवा ॥ ११ ॥ शीत निवारी सन्निधी ॥ तम निवारी तेजोवृद्धी ॥ भय निवारी भगवद्बुद्धी ॥ जेवीं विशुद्धी विभावसु[३] ॥ १२ ॥ तैशीच जाण सत्संगती ॥ संगें त्रिविधताप निवारिती ॥ तेचिअर्थींची निजयुक्ती ॥ ऐक उपपत्ती उद्धवा ॥ १३ ॥ शीत ह्मणिजे द्वंद्वबाधू ॥ तो समूळ निवारिती साधू ॥ तम ह्मणिजे अज्ञानांधू ॥ त्यासि करिती प्रबोधू निजज्ञानें ॥१४॥ भयांमाजीं श्रेष्ठ मरण ॥ *भय निवारी साधु विचक्षण ॥ निवारिती जन्ममरण ॥ कृपाळु पूर्ण दीनांचे ॥ १५ ॥ अग्निसमान ह्मणों साधू ॥ हाही बोल अति अबद्ध ॥ अग्नीहूनि अधिक साधू ॥ तोचि प्रबोधू हरी सांगे ॥ १६ ॥ अग्नीपाशीं प्रबळ धूम ॥ साधु निष्कोध निर्धूम ॥ अग्नि पोळी अधमोत्तम ॥ साधु सर्वसम सुखदाते ॥१७॥ साधूंची धन्यधन्य संगती ॥ संगें जडजाड्य तोडिती ॥ कर्मांचें ०कर्मठत्व मोडिती ॥ बुडत्या तारिती निजसंगें ॥१८

१ गर्भिणी. २ आवड. ३ अग्नि. ४ सूर्य.

*मो. निजभजनीं प्रीती. +ना. स्वानंदतृप्ती. ×ना. मद्भावें जे. *मो. भयनिराशी साधूचें लक्षण. ०ना. कर्मत्व.

॥ श्लोक ॥ निमज्ज्योन्मज्जतां घोरे भवाब्धौ परमायनम् ॥ संतो ब्रह्मविदः शांता नौर्दृढेवाप्सु मज्जताम् ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ प्रतिक्षणीं अधिक वृद्धी ॥ अमर्याद वाढे भवाब्धी ॥ तेथ उबगल्या चुबुकल्या त्रिशुद्धी ॥ अधर्मबुद्धी जनासी ॥१९॥ ※अधर्में निमज्जन नरकांत ॥ ०स्वधर्में उन्मज्जन स्वर्गांत॥ ऐसे भोगिती *आवर्त ॥ स्वर्गनरकांत संसारी ॥ ४२० ॥ यापरी संसारीजन ॥ पावती उन्मज्जन निमज्जन ॥ त्यांसि तरावया भवाब्धि जाण ॥ साधु सज्जन दृढ नाव ॥ २१ ॥ पडल्या जळार्णवामाझारीं ॥ जेवीं अछिद्र नांव तरी ॥ तेवीं बुडतां भवसागरीं ॥ सुखरूप तारी सज्जननाव ॥ २२ ॥ कामक्रोधरहित शांती ॥ हेचि नावेची अछिद्र स्थिती ॥ ब्रह्मज्ञानें सपुरती ॥ सुखरूप निश्चितीं याहेतू ॥ २३ ॥ कामक्रोधादिसावजांसी ॥ बळें ध्यावया आविसेंसी ॥ कदा न येववे नावेपाशीं ॥ संगें सकळांसी तारक ॥ २४ ॥ नवल ये नावेची स्थिती ॥ जुनी नव्हे कल्पांतीं ॥ बुडवूं नेणें धारावर्ती ॥ तारक निश्चितीं निजसंगें ॥ २५ ॥ परी ये नावेची नवलगती ॥ वरी चढले ते बुडती ॥ तळीं राहिले ते तरती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ २६ ॥ दीनांचा कळवळा पहाहो ॥ हाचि मुख्यत्वें तरणोपावो ॥ त्या कळवळयाचा अभिप्रावो ॥ स्वयें देवो सांगत ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ अन्नं हि प्राणिनां प्राण आर्तानां शरणं त्वहम् ॥ धर्मो वित्तं नृणां प्रेत्य संतोऽर्वाग्बिभ्यतो रणम् ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ जेवीं अन्नेंवीण प्राण ॥ सर्वथा न वांचती जाण ॥ प्राण्यांचें प्राणपोषण ॥ करावया सामर्थ्य पूर्ण अन्नीं नांदे ॥ २८ ॥ जोडली धर्माची संपत्ती ॥ ते इहलोकीं होय रक्षिती ॥ तेंचि धर्मधन देहांतीं ॥ उत्तम गतीदायक ॥ २९ ॥ संसारीं पीडिले दारुण ॥ त्रिविधतापें तापले पूर्ण ॥ ऐशिया शरणागतां शरण्य ॥ मी नारायण रक्षिता ॥ ४३० ॥ माझें करितां नामस्मरण ॥ सहजें निवारे जन्ममरण ॥ त्या मज रिघालिया शरण ॥ बाधी दुःख कोण बापुडें ॥ ३१ ॥ दुःखभय न ×पावतां आधीं ॥ जिहीं साधु सेविले सद्बुद्धीं ॥ त्यांसि भवभयाची आधिव्याधी ॥ जाण त्रिशुद्धी बाधीना ॥ ३२ ॥ प्राणियांसि होतां पतन ॥ भाग्यें भेटल्या सज्जन ॥ निवारूनि अधोगमन ॥ जन्ममरण छेदितू ॥ ३३ ॥ संसार तरावया जाण ॥ सत्संगतीचि प्रमाण ॥ त्यांचे भावें धरितां चरण ॥ दीनोद्धरण त्यांचेनी ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ संतो दिशंति चक्षूंषि बहिरर्कः समुत्थितः ॥ देवता बांधवाः संतः संत आत्माऽहमेव च ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ जेवीं आंधारेंसि सगळी राती ॥ निजतेजें निरसी गभस्ती ॥ तेवीं सत्संगसूर्यप्राप्ती ॥ अविद्येची निश्चितीं निरसी +निशा ॥ ३५ ॥ बाह्य उगवल्या गभस्ती ॥ चोरभयाची होय निवृत्ती ॥ तेवीं जोडल्या सत्संगती ॥ भवभय कल्पांतीं असेना

१ टांचणें. २ वर येणें. ३ नौका. ४ प्राणी, जंतु. ५ आमिष, मांस. ६ वेगानें वाहणाऱ्या प्रवाहांत व भोंवऱ्यांत. ७ रक्षण करणारा.

※मो. अधर्मनिमज्जन. ०मो. स्वधर्म उन्मज्जन. *अनर्थ. ×ना. पाहतां. +ना. दशा.

॥ ३६ ॥ बाह्यसूर्योदयकाळीं ॥ पक्षी सांडिताती आंविसाळीं ॥ सत्संगसूर्याचे मेळीं ॥ देहाचीं *आंविसाळीं सांडिती जीव ॥ ३७ ॥ बाह्यसूर्याच्या किरणीं ॥ हर्षे विकासे कमळणी ॥ सत्संगसूर्याचे मिळणीं ॥ निर्विकल्पकमळणी विकासे ॥ ३८ ॥ सूर्य उगवलिया गगनीं ॥ चक्रवाकें मिळती मिळणीं ॥ तेवीं सत्संग पावोनी ॥ जीवें शिवें दोनी एकवटती ॥ ३९ ॥ बाह्य सूर्याचे पहांटेसी ॥ पांथिक चालती स्वग्रामासी ॥ सत्संगसूर्याचे प्रकाशीं ॥ मुमुक्षु निजधामासी पावती ॥ ४४० ॥ बाह्यसूर्याचे उदयस्थितीं ॥ कर्मांची चाले कर्मगती ॥ सत्संगसूर्याचे संगतीं ॥ निष्कर्मप्रवृत्ती प्रवर्ते ॥४१॥ सूर्यबिंबाचे उदयसंधीं ॥ अर्घ्यदान दीजे वेदविधी ॥ सत्संगसूर्याचे संबंधीं ॥ दीजे देहबुद्धीसी तिलांजळी ॥ ४२ ॥ सूर्यउदयाचिया प्राप्ती ॥ याज्ञिक होमातें हविती ॥ तेवीं सत्संगसूर्यस्थिती ॥ अहंता हविती ज्ञानाग्नीं ॥ ४३ ॥ सूर्य उगवूनि आकाशीं ॥ जगाची जड निद्रा निरसी ॥ संत उगवूनि चिदाकाशीं ॥ जीवां चित्प्रकाशीं प्रबोधी ॥ ४४ ॥ होकां साधु सूर्यासमान ॥ हें बोलणें निलाग हीन ॥ सूर्यो पावे अस्तमान ॥ साधु प्रकाशमान सर्वदा ॥ ४५ ॥ सूर्यासि आच्छादी आभाळ ॥ साधु सदा निज निर्मळ ॥ सूर्यासि सदा भ्रमणकाळ ॥ साधु अचंचळ भ्रमणरहित ॥ ४६ ॥ ग्रहणकाळाचा लवलाहो ॥ पावतां सूर्यातें ग्रासी राहो ॥ साधु ग्रहांचा पुसोनि ठावो ॥ स्वानंदें पहाहो नांदती ॥४७॥ धुई दाटतां प्रबळ ॥ तेणें आच्छादे रविमंडळ ॥ तम धूम मोहपडळ ॥ साधूसि अळुमाळ बाधीना ॥ ४८ ॥ सूर्य निजकरीं सर्वांतें तावी ॥ साधु निजांगें जग निववी ॥ सूर्य सर्वांतें क्षयो दावी ॥ साधू ×अक्षय करी बोधें ॥ ४९ ॥ सूर्यो साह्य झालिया दृष्टी ॥ दृश्याकारें उपडे सृष्टी ॥ सत्संग +साह्य झालिया दृष्टी ॥ चिन्मात्रसृष्टीं ठसावे ॥ ५० ॥ विवेकें विचारितां देख ॥ सूर्याहूनि साधु अधिक ॥ साधु धरातळीं ज्ञानार्क ॥ भवाब्धितारक ✻निजसंगियां ॥५१॥ पृथ्वीतळीं ०देवता साधू ॥ साधु दीनांचे सखे बंधू ॥ साधुरूपें मी परमानंदू ॥ जाण प्रसिद्ध परमात्मा ॥ ५२ ॥ देवां दीजे *बळिदान ॥ तेव्हां देव होती प्रसन्न ॥ कृपातारक निजसज्जन ॥ दयाळु पूर्ण दीनांचे ॥ ५३ ॥ सुहृद सखे सगोत्र बंधू ॥ द्रव्यलोभें भजनसंबंधू ॥ निर्लोभ कृपाळु साधू ॥ सखे बंधू दीनांचे ॥ ५४ ॥ संत केवळ कृपेचे दीप ॥ संत ते माझें निजस्वरूप ॥ यालागीं सत्संगें फिटे पाप ॥ होती निष्पाप साधक ॥ ५५ ॥ निष्पाप करूनि साधकांसी ॥ ब्रह्मस्वरूपता देती त्यांसी ॥ ऐसें कृपाळुत्व साधूपाशीं ॥ जाण निश्चयेंसी उद्धवा ॥ ५६ ॥ मी निर्गुणत्वें ब्रह्म पूर्ण ॥ साधू चालतेंबोलतें ब्रह्म जाण ॥ साधूंसि रिघालिया शरण ॥ जन्ममरण असेना ॥ ५७ ॥ साधूंसि सद्भावें शरण ॥ रिघालया तुटे जन्ममरण ॥ साधु शरणागतां शरण्य ॥ सत्य जाण उद्धवा ॥ ५८ ॥ भावें धरिलिया सत्संगती ॥ संसारिया होय निर्मुक्ती ॥ हें प्रतिज्ञापूर्वक श्रीपती ॥ उद्धवाप्रती बोलिला ॥ ५९ ॥ सद्भावेंसि सत्संगती ॥ धरितां 0घरां ये ब्रह्मस्थिती ॥ हें निजवर्म उद्धवाप्रती ॥ देवें अध्यायांतीं निरू-

१ घरटीं. २ एक ठिकाणीं. ३ अविद्यासहित आत्मा. ४ अविद्यारहित आत्मा. ५ वाटसरू. ६ ज्ञानरूपप्रकाशानें. ७ अगदीं, आधाररहित. ८ राहू. ९ तापवी. १० पृथ्वीवर. ११ ज्ञानरूप सूर्य.

*मो. आसोलीं. × ना. अभय. + ना. बाह्य. ✻मो. निजसंगें. ०ना. देव तो. *मो. बळी अवदान. 0मो. घर रिघे.

पिलें ॥ ४६० ॥ परम विरक्तीचें कारण ॥ तें हें पुरूरवाप्रकरण ॥ उपसंहारें श्रीकृष्ण ॥ *अध्यायांतीं जाण संपवी ॥ ६१ ॥

|| श्लोक || वैतसेनस्ततोऽप्येवमुर्वश्या लोकनिस्पृहः || मुक्तसंगो महीमेतामात्मारामश्चचार ह ||३५|| इति श्रीमद्भागवते म० एकादशस्कंधे ऐलगीतं नाम षड्विंशोऽध्यायः || २६ ||

॥ टीका ॥ पूर्वीं सूर्यवंश प्रसिद्ध ॥ तेथ सोमवंशाचा संबंध ॥ वैतसेन श्लोकींचें पद ॥ लावूनि गोविंद बोलिला ॥ ६२ ॥ उमावनीं अतिएकांत ॥ तेथ उमा आणि उमाकांत ॥ विगतवासेंसि क्रीडत ॥ स्वानंदयुक्त स्वलीला ॥ ६३ ॥ तेथ शिवाचे दर्शनासी ॥ अवचटें आले सप्तऋषी ॥ लज्जा उपजली पार्वतीसी ॥ तिणें त्या वनासी शापिलें ॥ ६४ ॥ जो पुरुष या वनाआंत ॥ येईल तो हो स्त्रीरूप एथ ॥ ऐसा शाप क्रोधयुक्त ॥ वदली निश्चित जगदंबा ॥ ६५ ॥ तेथ राजा सुद्युम्न सूर्यवंशी ॥ नेणोनियां शापप्रभावासी ॥ पारधी खेळतां आला त्या वनासी ॥ सकळ सेनेसी सन्नद्ध ॥६६॥ रिघतांचि त्या वनाआंत ॥ पुरुषत्व पालटलें तेथ ॥ बाप शापाचें सामर्थ्य ॥ झाले समस्त स्त्रीरूप ॥ ६७ ॥ तेथ पुरुषत्वाची आठवण ॥ निःशेष ×विसरलें मन ॥ आपण पूर्वीं होतों कोण ॥ हेंही संपूर्ण विसरले ॥ ६८ ॥ अश्व झाले अश्विनी ॥ हस्ती झाले हस्तिणी ॥ पुरुष झाले कामिनी ॥ तत्क्षणीं त्या वनांत ॥६९॥ तेथ ❀पुरुषकामें कामासक्ती ॥ अनुकूळ पुरुषांप्रती ॥ स्त्रिया गेलिया त्या समस्ती ॥ अतिकामरती संभोगा ॥ ४७० ॥ राजा सुद्युम्न झाला नारी ॥ अतिसुकुमार सुंदरी ॥ +तो सोमपुत्र बुधातें वरी ॥ अतिप्रीतीकरीं भाळोनि ॥ ७१ ॥ बुधें सुद्युम्न देखोनि नारी ॥ तो भुलला स्त्रीकामिकरीं ॥ एवं अतिप्रीतीं परस्परीं ॥ येरयेरांवरी भाळलीं ॥ ७२ ॥ बुध महाराज चूडामणी ॥ तो सुद्युम्नातें स्त्रीत्वें परणी ॥ केली *पटाची निजराणी ॥ बाप करणी कर्मांची ॥ ७३ ॥ सुद्युम्न बुधवीर्यैंकरीं ॥ पुरूरवा जन्मे त्याचे उदरीं ॥ एवं सूर्यवंशामाझारीं ॥ सोमवंश यापरी संचरला ॥७४॥ हे सोमवंशींची आद्यकथा ॥ एथूनि सोमवंश वाढता ॥ श्रीकृष्ण बोलिला ध्वनितार्थां ॥ तेचि म्यां कथा उपलैंविली ॥ ७५ ॥ सुद्युम्न झाला बुधाची नारी ॥ मागें सूर्यवंशामाझारीं ॥ नाहीं राज्यासि अधिकारी ॥ संकट भारी वोढवलें ॥ ७६ ॥ ते सूर्यवंशींचा कुळगुरू ॥ वसिष्ठ महायोगीश्वरू ॥ तेणें करूनि अत्यादरू ॥ गौरीहरू प्रार्थिला ॥ ७७ ॥ प्रसन्न करूनि पार्वतीसी ॥ मागे सुद्युम्नाच्या उच्छापासी ॥ येरी सांगे महादेवासी ॥ तुह्मी वसिष्ठासी बुझावों ॥ ७८ ॥ जें भवानीचें शापवचन ॥ कदा अन्यथा नव्हे जाण ॥ धरावया वसिष्ठाचें मन ॥ नवल विंदान शिवें केलें ॥ ७९ ॥ शुक्लपक्षीं सुद्युम्नासी ॥ पुरुषत्व प्राप्त होईल त्यासी ॥ कृष्णपक्षीं बुधापाशीं ॥ स्त्रीभावेंसी वर्तेल ॥ ४८० ॥ पक्षें पुरुष पक्ष नारी ॥ ऐशिया उच्छापाची परी ॥ ०शिवें करूनि कृपेंकरीं ॥ केला अधिकारी निजराज्या ॥ ८१ ॥ पुरुषत्व झाल्या सुद्युम्नासी ॥ तें पुरुषत्व नावडे

---

१ पार्वतीच्या क्रीडास्थानांत. २ शंकर. ३ नम्र. ४ शिकारीस. ५ युक्त, तयार. ६ सुद्युम्न. ७ फिदा होऊन. ८ स्त्रीकामें करून. ९ करून. १० उपपादन केली. ११ समजवावें. १२ पंधरा दिवस.

* ना. अध्यायार्थ जाण संपविला. ×मो मावळली जाण. ❀मो. पुरुषकाम. +ना. तो सोमपुत्र तियेतें वरी. *मो. पाटाची. ०मो. शिव कृपेंकरूनि वारी

त्यासी ॥ स्त्रीसंभोगें बुधापाशीं ॥ अतिप्रीतीसीं *लोधला ॥८२॥ स्वर्गअप्सरा आलिया त्यापाशीं ॥ त्याही नावडती सुद्युम्नासी ॥ त्याहूनि प्रीती बुधापाशीं ॥ स्त्रीभावेंसीं अनिवार ॥ ८३ ॥ बुधासिही स्वर्गांगना ॥ संभोगीं न येती मना ॥ ऐशी अतिप्रीति सुद्युम्ना ॥ स्त्रीभोगें जाणा विगुंतली ॥ ८४ ॥ पुरुषीं पुरुषत्वाची रती ॥ भोगूं जाणें मी श्रीपती ॥ इतर बापुडीं तीं किती ॥ स्त्रीदेहासक्तीं भुललीं ॥ ८५ ॥ स्त्रीदेहीं जो आत्मा असे ॥ तो भोगिजे म्यां हृषीकेशें ॥ इतरांसि स्त्रीदेहींचें पिसें ॥ ×विषयावेशें भुललीं ॥८६॥ असो हें सांगावें किती ॥ कामीं निकामतेची रती ॥ त मी जाणें रमापती ॥ कां जाणती निजानुभवी ॥८७॥ पुरुषत्वा परीस कामरती ॥ स्त्रीदेहीं अतिआसक्ती ॥ त्या स्त्रीकामाची निवृत्ती ॥ जाण निश्चितीं सत्संगें ॥८८॥ वसिष्ठाचिये सत्संगतीं ॥ झाली स्त्रीभावाची निवृत्ती ॥ सुद्युम्न पावला पुरुषप्राप्ती ॥ धन्य त्रिजगतीं सत्संग ॥ ८९ ॥ पुरुषत्व पावोनि सुद्युम्न ॥ निजनगरा येतां जाण ॥ स्त्रीभावें नष्टलें सैन्य ॥ एकला आपण स्वयें आला ॥ ४९० ॥ एवं निःशेष विगतसैन्य ॥ यालागीं नांवें वीतसेन ॥ त्या वीतसेनाचा पुत्र जाण वैतसेन ॥ पुरूरवा ॥ ९१ ॥ तेणें निजात्मा अतिविरक्तीं ॥ सांडूनि स्वर्गभोगसंपत्ती ॥ त्यजूनि उर्वशीकामासक्ती ॥ आत्मरामस्थिती पावला ॥ ९२ ॥ आत्मराम निजस्थितीं ॥ मिथ्यादेहसंग +सांघाती ॥ निजात्मबोधें त्रिजगतीं ॥ स्वानंदें नृपती विचरत ॥ ९३ ॥ जेथें जेथें पाउल उठी ॥ तेथें होती सुखाच्या कोटी ॥ स्वानंदें कोंदिली सकळ सृष्टी ॥ ब्रह्मदृष्टीं *विचरत ॥ ९४ ॥ ब्रह्मीं विचरतां ब्रह्मपणें ॥ ब्रह्मरूप झालें जिणें ॥ विसरला जिणें मरणें ॥ पूर्णीं पूर्णपणें परिपूर्ण ॥ ९५ ॥ हें उर्वशीपुरूरवोपाख्यान ॥ जो स्वयें ऐके सावधान ॥ तें दोष जाती अगम्यागमन ॥ विरक्ती संपूर्ण साधकां ॥ ९६ ॥ यापरी वैराग्ययुक्तीं ॥ राजा पावला ०ब्रह्मप्राप्ती ॥ वैराग्य उपजे सत्संगतीं ॥ सत्संगें विरक्ती मद्भजनें ॥ ९७ ॥ सद्भावें करितां माझी भक्ती ॥ साधकां उपजे विरक्ती ॥ ऐसें बोलिला श्रीपती ॥ तें उद्धवें चित्तीं दृढ धरिलें ॥ ९८ ॥ ते भजनक्रियेचा प्रश्न ॥ पुढिले अध्यायीं जाण ॥ उद्धव पुसेल आपण ॥ जेणें श्रीकृष्ण संतोषे ॥ ९९ ॥ उद्धव पुसेल गोड गोठी ॥ जेणें श्रीकृष्ण सुखावे पोटीं ॥ तेणें स्वानंदें निजपुष्टी ॥ भजनहातवटी सांगेल ॥ ५०० ॥ उपासनाकांडरहस्य पूर्ण ॥ मुख्य क्रियायोगनिरूपण ॥ समूळ आगमलक्षण ॥ स्वसुखें श्रीकृष्ण सांगेल ॥ १ ॥ ते कथेसि अवधान ॥ श्रोतां यावें सावधान ॥ एका तुष्टला जनार्दन ॥ स्वानंदघन निजबोधें ॥ ५०२ ॥ इतिश्रीमद्भागवते महापुराणे एकादश स्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकाकारटीकायां ऐलगीतोपाख्यानं नाम षड्विंशोऽध्यायः ॥ २६ ॥ अध्याय ॥ २६ ॥ ओव्या ॥ ५०२ ॥ मूळश्लोक ॥ ३५ ॥ एवंसंख्या ॥ ५३७ ॥ ॥

---

# अध्याय सत्ताविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमो देव सहज निज ॥ तूंचि विश्वात्मा चतुर्भुज ॥

१ विषयोत्कंठेनें, आत्मदृष्टीनें नव्हे. २ स्त्रीपणामुळें. ३ सुद्युम्नाचा. ४ जगणें. ५ ज्या स्त्रीचे ठिकाणीं गमन करूंनये अशा स्त्रीचे ठिकाणीं गमन करणें इत्यादि.

*मो.रातला. ×ना.विषयविषें. 0मो.सद्गुरू. +ना.सांगाती. *ना.विचरतां. ०मो.ब्रह्मस्थिती.

अष्टभुज तूंचि विश्वभुज ॥ गुरुत्वें तुज गौरव ॥ १ ॥ निजशिष्याचिया भावार्थां ॥ तूं गुरुनामें अभयदाता ॥ अभय देऊनि तत्त्वतां ॥ भवभयव्यथा निवारिसी ॥ २ ॥ निवारूनि जन्ममरण ॥ आपण्या *भेटसी आपण ॥ तेव्हां गुरुशिष्यनामीं संपूर्ण ॥ तुझें एकपण ×आभासे ॥३॥ तें एकपण पाहतां दिठीं ॥ एका जनार्दनीं पडे मिठी ॥ गुरुत्वें कोंदें सकळ सृष्टीं ॥ स्वानंदपुष्टीं जग नांदे ॥ ४ ॥ तो स्वानंदकैचिद्घन ॥ जगद्गुरु जनार्दन ॥ एका जनार्दना शरण ॥ ॐएकीं एकपण दृढ केलें ॥ ५ ॥ दृढ केलें जें एकपण ॥ तेंही सद्गुरु झाला आपण ॥ तेथें खुंटलें मीतूंपण ॥ एका जनार्दन एकत्वें ॥ ६ ॥ यापरी एकाकी एकला ॥ एका जनार्दन कवितां केला ॥ तो एकादशाच्या पावला ॥ +अतिसखोला एकत्वबोधा ॥७॥ त्या एकत्वाची निजस्थिती ॥ पावला पुरूरवा भूपती ॥ दृढ अनुतापविरक्ती ॥ भगवद्भक्ती सत्संगें ॥ ८ ॥ हें सव्विसावे अध्यायीं जाण ॥ स्वमुखें बोलिला श्रीकृष्ण ॥ सत्संगें भगवद्भजन ॥ तेणें वैराग्य पूर्ण साधकां ॥ ९ ॥ न करितां भगवद्भक्ती ॥ कदा नुपजे विरक्ती ॥ विरक्तीवीण भगवत्प्राप्ती ॥ नव्हे कल्पांतीं साधकां ॥१०॥ ऐसें बोलिला श्रीकृष्ण ॥ तें उद्धवें जीवीं धरूनि पूर्ण ॥ भगवद्भक्ति पूजाविधान ॥ क्रियायोग जाण पुसत ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ क्रियायोगं समाचक्ष्व भवदाराधनं प्रभो ॥ यस्मात्त्वां ये यथार्चंति सात्वताः सात्वतर्षभ ॥१॥

॥ टीका ॥ निजभक्त अनुग्रहार्थ ॥ सत्यमूर्ती तूं श्रीअनंत ॥ तुझे निजभक्त जे *शाश्वत ॥ ते तुज पूजित कोणे विधीं ॥ १२ ॥ तें साधूचें आराधन ॥ तुझें क्रियायोगें निजपूजन ॥ कृपा करोनियां आपण मज संपूर्ण सांगावें ॥ १३ ॥ ह्मणसी जरी हें आणिकांतें पुसावें ॥ हें माझेनि जाण सर्वथा नव्हे ॥ तुज सांडूनि ०दुजया पुसावें ॥ हे लाज जीवें साहवेना ॥ १४ ॥ मी तुझा दास जीवेंभावें ॥ तुझेनि प्रभुत्वेंगौरवें ॥ मी कळिकाळा नागवें ॥ 0कृपाप्रभावें तुझेनी ॥ १५ ॥ तूं कृपाळु कृपायुक्त ॥ कृपेनें होसी भक्तांचा भक्त ॥ त्या तुझा मी चरणांकित ॥ सलगीं गुह्यार्थ स्वयें पुसें ॥ १६ ॥ इतका करूनि अत्यादर ॥ कां पुससी पूजाप्रकार ॥ तरी हा श्रेष्ठश्रेष्ठीं केला विचार ॥ तो निजनिर्धार अवधारी ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ एतद्वदंति मुनयो मुहुर्निःश्रेयसं नृणाम् ॥ नारदो भगवान् व्यास आचार्योऽगिरसः सुतः ॥ २ ॥

॥ टीका ॥ पूर्वीं ४वेदविचारनिष्ठ ॥ सुरवर्य मुनिश्रेष्ठ ॥ हेंचि अनुवादले स्पष्ट ॥ अतिवरिष्ठ विवेकी ॥१८॥ पूजाविधान प्रसिद्ध ॥ बोलिला देवर्षि नारद ॥ अंगिराचा पुत्र अगाध ॥ देवगुरु 7प्रबुद्ध हेंचि बोले ॥ १९ ॥ जो व्यास सत्यवतीसुत ॥ जो कां नारायण मूर्तिमंत ॥ जेणें प्रकट केला वेदार्थ ॥ जो विख्यात महाकवी ॥ २० ॥ पुराणकर्ता तो सांग ॥ यालागीं

१ अनंतहस्त. २ स्वतःच. ३ कविता करणारा. ४ आपल्या दासावर कृपा करावी ह्मणून. ५ स्वामीच्या बलावर. ६ जिंकितां. ७ मित्रपणानें. ८ बोलले. ९ बृहस्पति.

*मो. भेटविसी ×मो. असे. ॐमो. एका एकपण. +ना. एकपणें भला एकात्मबोध *ना. सात्वत. ०ना. दुरी जावें. 0मो. कृपावैभवें. ४ना. देवेंद्र विचार निष्ठ. 7ना. प्रसिद्ध.

व्यासोच्छिष्टमिदं ' जग ॥ तेणेंही *भगवत्पूजामार्ग ॥ हा क्रियायोग बोलिजे ॥२१॥ असो इतरांची चावटी ॥ जो पितामह सकळसृष्टी ॥ जो जन्मला विष्णूच्या पोटीं ॥ तेणेंही या गोष्टी दृढ केल्या ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ निःसृतं ते मुखांभोजाद्यदाह भगवानजः ॥ पुत्रेभ्यो भृगुमुख्येभ्यो देव्यै च भगवान् भवः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ तुवांचि कल्पाचिया आदीं ॥ हेंचि पूजाविधानविधी ॥ उपदेशिला पुत्रबुद्धीं ॥ स्वयें त्रिशुद्धी विधाता ॥ २३ ॥ तेणेंही ꙮकल्पादीसि आपण ॥ नाभिकमळासनीं बैसोन ॥ भृगुकश्यपादिपुत्रांसि जाण हें पूजाविधान उपदेशी ॥ २४ ॥ श्रीमहादेवही आपण ॥ हें क्रियायोगविधिविधान ॥ ×भवें भवानीसि जाण ॥ केलें निरूपण एकांतीं ॥ २५ ॥

॥ श्लोक ॥ एतद्वै सर्ववर्णानामाश्रमाणां च संमतम् ॥ श्रेयसामुत्तमं मन्ये स्त्रीशूद्राणां च मानद ॥ ४ ॥

॥ टीका ॥ एवं श्रेष्ठपरंपरा ॥ तुवां प्रकट केली दीनोद्धारा ॥ दीनदयाळु तूं खरा ॥ याही विचारा अवधारीं ॥ २६ ॥ आश्रमधर्मविधिविधान ॥ तेथ अधिकारी द्विजन्मे जन ॥ त्यांसि कर्मबाधा +बाधी गहन ॥ गुंतले ब्राह्मण कर्मठत्वें ॥ २७ ॥ तैसें नव्हे तुझें भजन ॥ भजनाधिकारी सर्व वर्ण ॥ दीनोद्धारी भजन पूर्ण ॥ स्त्रिया शूद्रजन उद्धरिले ॥ २८ ॥ कर्मीं गुंतले उत्तमोत्तम ॥ भजनें उद्धरिले अधमाधम ॥ भजनें सर्वांसी सुगम ॥ भजनें स्वधर्म सार्थक ॥ २९ ॥ भजनमहिमा निःसीम ॥ *अधमा पदवी उत्तमोत्तम॥ भजनहीन जे उत्तम ॥ ते अधमाधम स्वयें होती ॥ ३० ॥ सर्व वर्ण आणि आश्रम ॥ भगवद्भजनें गाते उत्तम ॥ हेंचि भक्तचिं निजवर्म ॥ भक्त निष्काम जाणती ॥ ३१ ॥ करूनियां भगवद्भक्ती ॥ भक्त स्वयें भगवद्रूप होती ॥ यालागीं भक्तांतें श्रीपती ॥ अतिप्रीतीं मानिसी ॥ ३२ ॥ तुझें भजन पूजन करितां ॥ तूं निजभक्तांसि होसी त्राता ॥ तूंचि भक्तांसि होसी सन्मानदाता ॥ ते पूजनकथा मज सांग ॥ ३३ ॥

॥ श्लोक ॥ एतत्कमलपत्राक्ष कर्मबंधविमोचनम् ॥ भक्ताय चानुरक्ताय ब्रूहि विश्वेश्वरेश्वर ॥ ५ ॥

॥ टीका ॥ कमळनाभि नारायणा ॥ ०भक्तविश्राम कमळवदना ॥ कमलालया कमलनयना ॥ विनंती श्रीकृष्णा अवधारीं ॥ ३४ ॥ तुवां पाहिल्या कृपादृष्टीं ॥ तत्काळ पैं उठाउठी ॥ सुटती कर्मबंधाच्या गांठी ॥ स्वानंदपुष्टी निजभक्तां ॥ ३५ ॥ जेवीं घृताचें कठिणपण ॥ क्षणें विरवी सूर्यकिरण ॥ तेवीं कर्मबंधा निर्दळण ॥ तुझें कृपावलोकन करी कृष्णा ॥३६॥ कां सैंधवाचा महागिरी ॥ जेवीं विरे सिंधुमाझारीं ॥ तेवीं कर्मबंधा बाहेरी ॥ तुझी कृपा करी श्रीकृष्णा ॥ ३७ ॥ तुझी झालिया कृपादृष्टी ॥ कर्माकर्मांसि पडे तुटी ॥ जेवीं सूर्योदयापाठीं ॥

---

१ शंकरानें. २ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ३ श्रीनिवास.

*मो. भागवतींचा मार्ग. ꙮमो. कल्पादीसी आदि. ×मो. भावें. +ना. बाधीना जाण. *मो. अधम पावती पद उत्तम. ०मो. भक्तविश्रांती.

नातुडे भेटी खद्योता ॥३८॥ 'तमीं दाटती खद्योतकोडी ॥ *तेवीं अज्ञानीं कर्मांची आडाडी॥ तुझा कृपासूर्य जोडल्या ×जोडीं ॥ कर्मे जाती ०बापुडीं विरोनी' ॥ ३९ ॥ ऐशिया निष्कर्म-कृपायुक्त ॥ तुझे नांदती निजभक्त ॥ जे कां विषयीं अतिविरक्त ॥ सदा अनुरक्त ※हरिचरणीं॥४०॥ +तें पूर्णकृपेचें आयतन ॥ तुझें भजन पूजाविधान ॥ तें मज सांग कृपा करून ॥ मी अति-दीन पैं तुझें ॥ ४१ ॥ ह्मणसी तुज हा अधिकार नाहीं ॥ तरी मी शरण आलों तुज पाहीं ॥ शरणागताची तुझ्याठायीं ॥ उपेक्षा नाहीं श्रीकृष्णा ॥४२॥ तुवां उद्धरिलें *पशुगीधगजांसी ॥ गणिके तारिलें कुंटणीसी ॥ तेचि कृपा करीं आह्मासी ॥ हृषीकेशी कृपाळुवा ॥ ४३ ॥ ह्मण-सी ब्रह्मा शिव असतां सृष्टीं ॥ मजचि पुसायाची श्रद्धा मोठी ॥ कैसेनि पां वाढली पोटीं ॥ ऐक ते गोठी सांगेन ॥ ४४ ॥ ब्रह्मा जगाचा कर्ता होये ॥ तोही विसरला निजात्मसोये ॥ तो तुझ्या पोटा येऊनि पाहे ॥ निजज्ञान लाहे तुझेनी ॥ ४५ ॥ शिव पायवणी वाहे माथां ॥ तुझें नाम सदा जपतां ॥ तुझे कृपेस्तव तत्त्वतां ॥ तोही निजात्मता पावला ॥ ४६ ॥ यालागीं तूं ईश्वराचा ईश्वर॥ ॥ नियंत्या नियंता सर्वेश्वर ॥ विश्वीं विश्वात्मा विश्वंभर ॥ विश्वेश्वर तूं कृष्णा ॥ ४७ ॥ यापरी तूं ज्ञाननिधी ॥ पूर्ण बोधाचा उदधी ॥ जेणें होय निजात्मसिद्धी ॥ तेपूजा-विधी मज सांग ॥ ४८ ॥ ऐसा भक्तवचनें तो संतोषला ॥ पूर्ण निजबोधें द्रवला ॥ निजात्मकृपें कळवळला ॥ काय बोलिला श्रीकृष्ण ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ नह्यंतोऽनंतपारस्य कर्मकांडस्य चोद्धव॥ संक्षि-प्तं वर्णयिष्यामि यथावदनुपूर्वशः ॥ ६ ॥

॥ टीका ॥ ज्याचें ऐकतां वचन ॥ वेदवाक्या पडे मौन ॥ ज्याची करितां आठवण ॥ मन मनपणा स्वयें मुके ॥ ५० ॥ जो वेदार्थप्रकाशक ॥ जो अर्कांचा आदि अंक ॥ तो उद्धवासि यदुनायक ॥ स्वमुखें देव बोलत ॥ ५१ ॥ आगमनिगमोक्तप्रकार ॥ माझी पूजाविधि सविस्त-र ॥ सांगतां अनंत अपार ॥ न कळे पार ब्रह्मादिकां ॥ ५२ ॥ उद्धवा ऐक पां तत्त्वतां ॥ मी देवादिदेव झालों वक्ता ॥ तरी पूजाविधानकथा ॥ समूळ सर्वथा न सांगवे ॥ ५३ ॥ जरी झाले अतिसज्ञान ॥ तरी पूजाविधिविधान ॥ सांगावया समर्थपण ॥ सर्वथा जाण न बोलवे ॥ ५४ ॥ एवं पूर्वोक्तप्रकार ॥ आगमनिगमनिजसार ॥ निवडूनि संक्षेपाकार ॥ तुज मी चार सांगेन ॥ ५५ ॥ पूजाविधि निजसार ॥ त्रिविधविधीं त्रिप्रकार ॥ ऐक त्याचाही विचार॥ विधि उपचारत्रिभागें ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ वैदिकस्तांत्रिको मिश्र इति मे त्रिविधो मखः ॥ त्रयाणामीप्सिते-नैव विधिना मां समर्चयेत् ॥ ७ ॥

॥ टीका ॥ वेदींचे मंत्र, वेदींचें अंग ॥ वेदोक्त माझी पूजा सांग ॥ या नांव गा वैदिक मार्ग ॥ आगमप्रयोग तो ऐक ॥५७॥ आगममंत्र आगमचि अंग ॥ माझी आगमोक्त पूजा सांग ॥

१ प्रतिबंध, अटक, गुंतागुंत. २ लाभ. ३ सुग्रीवादि, जटायु, संपाति, गजेंद्र यांस. ४ हरिचरणोदक गंगा. ५ समुद्र. ६ सूर्यांचा. ७ प्रकाशक, प्रकाश देणारा. ८वेदशास्त्रांत सांगितलेला.९विधि,साहित्य वगैरे.

*मो. तेवीं कर्माकर्मांची आटाटी. ×मो. दृष्टी. ०मो उठाउठी विरोनी. ※मो. गुरुचरणीं. +मो. तूं. *गजेंद्रासी.

या नांव गा तांत्रिकमार्ग ॥ *मिश्रप्रसंग सांग ऐक ॥५८॥ वेदींचे मंत्र, ※तांत्रींचें अंग ॥ एवं मिश्रित उभय भाग ॥ माझी पूजा निपजे सांग ॥ मिश्रमार्ग या नांव ॥ ५९ ॥ हे त्रिविधविधि पूजा सांग ॥ तो जाण माझा त्रिविध याग ॥ येणें मी संतोषें श्रीरंग ॥ [1]पार्श्वदेशीं सांग सपरिवारीं ॥ ६० ॥ ऐसें माझें त्रिविध भजन ॥ जेथ ज्याची श्रद्धा पूर्ण ॥ त्या विधीं करित पूजन ॥ मज तृप्ति ×समान भावार्थें ॥ ६१ ॥ भावार्थें जें माझें पूजन ॥ तेणें मी संतृप्त जनार्दन ॥ हा आगमोक्त यज्ञ संपूर्ण ॥ त्रिविध लक्षण समसाम्यें ॥ ६२ ॥ वैदिकादि त्रिविध गती॥ पूजितां तृप्त मी श्रीपती ॥ पूजाधिकाराची स्थिती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ६३ ॥

॥ श्लोक ॥ यदा स्वनिगमेनोक्तं द्विजत्वं प्राप्य पुरुषः ॥ यथा यजेत मां भक्त्या श्रद्धया तं निबोध मे ॥ ८ ॥

॥ टीका ॥ द्विजन्मे जे तिन्ही वर्ण ॥ त्यांचें अधिकारलक्षण ॥ गर्भाष्टमीं उपनयन ॥ तें अधिकारपूर्ण +ब्राह्मण ॥ ॥ ६४ ॥ क्षत्रियांचा अधिकार शुद्ध ॥ ०बारावर्षां व्रतबंध ॥ सोळावर्षां प्रसिद्ध ॥ व्रतबंध वैश्यांसी ॥ ६५ ॥ गायत्रीउपदेश पावोन ॥ दुसरें जन्म उपनयन ॥ यालागीं '0सावित्र जन्म' जाण ॥ 5द्विजन्मे त्रिवर्ग वेदोक्तविधी ॥ ६६ ॥ वेदोक्त अधिकार लक्षण ॥ या नांव उद्धवा जाण ॥ आतां माझें पूजाविधिस्थान ॥ ऐक संपूर्ण 7निजभक्ता॥६७

॥ श्लोक ॥ अर्चायां स्थंडिलेऽग्नौ वा सूर्ये वाऽप्सु हृदि द्विजे ॥ द्रव्येण भक्तियुक्तोऽर्चेत्स्वगुरुं माममायया ॥ ९ ॥

॥ टीका ॥ माझें पूजाधिष्ठान ॥ [6]अष्टविध पूजास्थान ॥ त्याचेंही निजलक्षण ॥ उणखूण ते ऐक ॥ ६८ ॥ 'प्रियप्रतिमा, पूजास्थान ॥ हें प्रथम अधिष्ठान ॥ कां '[7]पृथ्वीतळीं स्थंडिलीं' जाण ॥ पूजास्थान दुसरें ॥ ६९ ॥ 'अग्नीचें तेज' स्वरूप माझें ॥ तें पूजास्थान जाण तिजें॥ 'सूर्यमंडळीं' जे पूजा कीजे ॥ तें चवथें माझें पूजास्थान ॥७०॥ 'उदकीं' जें माझें पूजन॥ तें पांचवें पूजास्थान ॥ 'हृदयीं' जें माझें आवाहन ॥ तें पूजास्थान सहावें ॥ ७१ ॥ शालिग्राम केवळ अचेतन ॥ 'ब्राह्मण,' माझें स्वरूप सचेतन ॥ तें अखंडत्वें ब्रह्मपूर्ण ॥ पूजा सन्मान षोडशोपचारें ॥ ७२ ॥ ब्राह्मणीं ज्याचा ब्रह्मभावो ॥ तो परम भाग्याचा स्वयमेवो ॥ ब्रह्मादिकां पूज्य पहाहो ॥ मी देवाधिदेवो स्वयें वंदीं ॥७३॥ सकळपूजांमाजीं जाण ॥ मुख्यत्वें पूज्य ब्राह्मण ॥ तें सातवें पूजास्थान ॥ उद्धवा जाण अतिश्रेष्ठ ॥ ७४ ॥ सकळपूजा 9पूज्यत्वें पूजा ॥ जो वरिष्ठा वरिष्ठ वोजा ॥ जो 4ज्ञानदाता आत्मा माझा ॥ वंद्य 'गुरुराजा' सर्वांसी ॥७५॥ ज्याचे सद्भावें 1धरितां चरण॥ मी सुखावें ब्रह्म पूर्ण ॥ ज्याचें [8]सद्रूप करितां स्तवन॥ मी परमात्मा जाण उल्हासें ॥७६॥ सद्गुरूचें नामस्मरण ॥ निर्दळी भवभय दारुण॥ निवारी जन्ममरण॥निवत्री संपूर्ण निजबोधें॥७७॥ तो मी परमात्मा नारायण ॥गुरुकृपे प्रकटोनि जाण॥

१ आगमांतील. २ नंद, सुनंद वगैरे पार्षदांसह. ३ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य. ४ गर्भापासून आठवे वर्षी. ५ मुंज. ६ आठप्रकारचें. ७ यथार्थ संस्कारयुक्त केलेली जागा. ८ तिसरें.

*ना. मिश्रमार्ग तो ऐक. ※मो. तांत्रिकांचें. ×मो. समाधान भावार्थें. +ना. ब्राह्मण्या. ०मा. बारावर्षांत. 0ना. नांव गायत्रीजन्म. 5मो. द्विजन्म वेदोक्त वेदविधी. 7मो. निजभक्ती. 9ना. पूजकत्वें. 4मो. न वेठत आत्मा माझा. 1मो. वंदितां. 8ना. मद्रूपें.

परब्रह्माचें पूर्णपण॥शिष्यद्वारा संपूर्ण प्रकाशक ॥७८॥*ब्रह्माचें परब्रह्मपण॥ सद्गुरूचेनि सत्य जाण॥एवढें अगाध महिमान॥अतिगहन गुरूचें ॥७९॥एवं सद्गुरुज्ञानघन ॥ जो हरिहरां वंद्य पूर्ण ॥ तो माझें सद्रूप अधिष्ठान ॥ हें पूजास्थान आठवें ॥ ८० ॥ जें आठवें पूजास्थान ॥ तें अखंड आठवे आठवण ॥ तेणें आठवें सांग संपूर्ण ॥ उद्धवा मी जाण पूजिलों ॥ ८१ ॥ एवं हीं आठ पूजास्थानें ॥ तुज सांगीतलीं सुलक्षणें ॥ तेथलीं पूजेचीं लक्षणें ॥ तेंही ×भिन्नपणें सांगेन ॥८२॥ सकळ अधिष्ठानीं गोडपण ॥ जे पूजनीं होय संपूर्ण ॥ ते पूजेचें मुख्य लक्षण ॥ निजधर्म खूण ते ऐक ॥ ८३ ॥ सांडूनि लोकरंजनव्यापार ॥ त्यजूनि दांभिक उपचार ॥ दवडूनि ⁂शठत्वांचा व्यवहार ॥ भजनतत्पर सद्भावें ॥ ८४ ॥ हीं अष्टौ महापूजास्थानें ॥ येथ +अमायिक जें जें भजन ॥ तें तें ०अतिगोड पूजन ॥ उद्धवा जाण निश्चित ॥ ८५ ॥ एथ निष्कपट जे जे सेवा ॥ ते ते अतिवल्लभ देवाधिदेवा ॥ आतां पूजाविधि आघवा ॥ ऐक बरवा सांगेन ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ पूर्वं स्नानं प्रकुर्वीत धौतदंतोऽङ्गशुद्धये ॥ उभयैरपि च स्नानं मंत्रैर्मृद्ग्रहणादिना ॥ १० ॥

॥ टीका ॥ मळत्याग दंतधावन ॥ यथाकाळीं करूनि जाण ॥ देहशुद्ध्यर्थ करावें स्नान ॥ मृत्तिकाग्रहणपूर्वक ॥ ८७ ॥ ऐसें झालिया मळस्नान ॥ मग करावें मंत्रस्नान ॥ वैदिक तांत्रिक विधान ॥ दीक्षा ग्रहण यथाविधि ॥ ८८ ॥ जैसा सद्गुरूचा संप्रदायो ॥ तैसा चालवावा (अन्वयो ॥ त्या विधिस्नानें करूनि पाहाहो ॥ निर्मळ भावो धरावा ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ संध्योपास्त्यादिकर्माणि वेदेनाचोदितानि मे ॥ पूजां तैः कल्पयेत्सम्यक् संकल्पः कर्मपावनीम् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ वर्णाश्रम निजविधीसी ॥ वेदें संध्या बोलिली जैसी ॥ ते ते वर्णाश्रमीं संध्या तैसी ॥ 1नित्यनेमेंसी करावी ॥ ९० ॥ वेदोक्त आचरावें स्वधर्म ॥ निःशेष त्यागावें निषिद्ध काम्य ॥ या नांव शुद्ध स्वधर्म ॥ उत्तमोत्तम अधिकारू ॥ ९१ ॥ वेदोक्त सांडणें 2स्वधर्म हाचि मुख्यत्वें अतिअधर्म ॥ हाता आलिया परब्रह्म ॥ न त्यागितां कर्म स्वयें सांडे ॥ ९२ ॥ स्वयें स्वधर्म जो सांडणें ॥ तेंचि अधर्मांचें मुख्य ठाणें ॥ स्वधर्में चित्तशुद्धि साधणें ॥ यालागीं त्यागणें 7अहंता ॥ ९३ ॥ तेथें स्वधर्मकर्म आचरतां ॥ ऐसा भाव उपजे चित्तां ॥ मी नव्हें एथ कर्मकर्ता ॥ फळभोक्ता मी नव्हें ॥ ९४ ॥ देह जड मूढ अचेतन ॥ त्यासि चेतवी 8जनार्दन ॥ तेथ माझें 9मीपण कर्तेपण ॥ सर्वथा जाण रिघेना ॥ ९५ ॥ या बुद्धीं जें कर्माचरण ॥ तें भावार्थें भावी ब्रह्मार्पण ॥ यापरी निरभिमान ॥ माझें उपासन साधकां ॥ ९६ ॥ माझी प्रतिमा पूजाविधान ॥ तें प्रथम माझें पूजास्थान ॥ तें प्रतिमाक्रियालक्षण ॥ ऐक संपूर्ण उद्धवा ॥ ९७ ॥

---

१ लोकांस बरें वाटण्याकरितां उद्योग. २ धूर्तपणाचा. ३ अतिशय आवडणारी. ४ दांत घासणें. ५ आपाप थांबतें.

*मो. ब्रह्मासी. ×मो. भिन्नाभिन्नपणें. ⁂ना. अतत्त्वाचा. +मो. मायिक. ०मो. अति कोरडें. (ना. आम्नायो. 1मो. नित्य नैमित्त्येंसी. 2मो. स्वकर्म. 7मो. अहंममता. 8ना. निजजनार्दन. 9मो. मीपण ॥

॥ श्लोक ॥ शैला दारुमयी लौही लेप्या लेख्याच सैकती ॥ मनोमयी मणि-
मयी प्रतिमाष्टविधा स्मृता ॥१२॥

॥ टीका ॥ अष्टधा प्रतिमास्थिती ॥ ज्या पूजितां सद्यः श्रेयें देती ॥ ऐशिया प्रतिमांची जाती ॥ ऐक तुजप्रती सांगेन ॥ ९८ ॥ गंडकर्यादि शिळामूर्ती ॥ *कां दारु ब्रह्मकाष्ठव्यक्ती ॥ अथवा सुवर्णादिधातुमूर्ती ॥ सद्यः फळती साधकां ॥ ९९ ॥ मृत्तिका कापडकीटणमूर्ती ॥ या नांव लेप्या म्हणिजेती ॥ कां स्थंडिलीं लिहिल्या अतिप्रीतीं ॥ त्या लेख्यामूर्ती पूजकां ॥ १०० ॥ वाळुवेची जे केली मूर्ती ॥ ती नांव सिकतामूर्ति म्हणती ॥ तेही पूज्य गा निश्चितीं ॥ सुवर्णमूर्तीसमान ॥ १ ॥ मूर्ती रत्नमय सोज्वळ ॥ हिरा मरकत इंद्रनीळ ॥ पद्मराग मुक्ताफळ ॥ या मूर्ति केवळ अतिपूज्य ॥२॥ मूर्तीमाजीं ※अतिप्राधान ॥ मनोमयी मूर्ति परम पावन ॥ जिचें करितां उपासन ॥ समाधान साधकां ॥३॥ तेंचि प्रतिमापूजाविधान ॥ स्थावरजंगमलक्षण ॥ तेंही अर्थाचें निरूपण ॥ विजद श्रीकृष्ण सांगत ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ चलाचलेति द्विविधा प्रतिष्ठा जीवमंदिरम् ॥ उद्वासावाहने नस्तः
स्थिरायामुद्धवार्चने ॥ १३ ॥

॥ टीका ॥ +अचेतना चेतनाकार ॥ जडातें ×जीवत्री साचार ॥ जीवशब्दें चिन्मात्र ॥ मुख्य परमेश्वर बोलिजे ॥ ५ ॥ एकभावार्थे साचार ॥ त्या जीवाचें निजमंदिर ॥ प्रतिमा जंगम स्थावर ॥ आगमशास्त्रसंमतें ॥६॥ तेथ स्थावरमूर्तिपूजन ॥ साधकें करितां आपण ॥ नलगे आवाहन विसर्जन ॥ तेथ अधिष्ठान स्वयंभ ॥ ७ ॥

॥ श्लोक ॥ अस्थिरायां विकल्पः स्यात् स्थंडिले तु भवेत्द्वयम्॥स्नपनं त्वविले-
प्यायामन्यत्र परिमाजनम् ॥ १४ ॥

॥ टीका ॥ जंगमप्रतिमांच्या ठायीं ॥ आवाहनविसर्जन पाही ॥ एकीं आहे एकीं नाहीं ॥ ऐक तेही विभाग ॥ ८ ॥ शाळग्राममूर्तीसि जाण ॥ स्वयंभ माझें अधिष्ठान ॥ तेथ आवाहनविसर्जन ॥ सर्वथा जाण लागेना ॥ ९ ॥ शाळग्रामाचा कुंटका ॥ ज्याचे पूजेसि आहे फुटका ॥ तेथ परमात्मा निजसखा ॥ सर्वदा देखा नांदत ॥ ११० ॥ इतरमूर्ति जंगमा जाण ॥ तेथ आवाहनविसर्जन ॥ साक्षेपें करावें आपण ॥ हें विधिविधान आगमोक्त ॥ ११ ॥ स्थंडिलीं मूर्ति आवाहन ॥ सवेंचि पूजांतीं विसर्जन ॥ हें उभयभावनाविधान ॥ स्थंडिलीं जाण अवश्यक ॥१२॥ आपुले हृदयींचा चिद्धन ॥ मूर्तीमाजीं कीजे आवाहन ॥ °पूजांतीं करूनि विसर्जन ॥ देव हृदयीं जाण ठेवावा ॥ १३ ॥ एथ आपणचि ब्रह्म परिपूर्ण ॥ हेंचि व्हावया निजस्मरण ॥ आवाहनविसर्जनें जाण ॥ निजात्मआठवण साधकां ॥ १४ ॥ हा आगमींचा निजात्मभावो ॥

---

१ आठप्रकारची. २ तत्काळ. ३ अत्यंत सुख, मोक्ष. ४ शालग्राम शिळेच्या प्रतिमा. ५ लांकूड;देवदार; पितळ. ६ तुतीचें झाड, मांदार. ७ सोन्याच्या मूर्तीसारखी. ८ पाच. ९ माणिक. १० मोति. ११ तुकडा. १२ शास्त्रांतील.

*मो. मांदार ब्रह्मकाष्ठ मूर्ति. ※मो. मूर्तिप्राधान्य. +मो. अचेतनीं. ×मो. चेतविता साचार. °मो. पुढतीं करूनि.

आपलाचि आपण देवो ॥ आपला आपण पूजक पहाहो ॥ हो निजात्म आठवो निजपूजे ॥ १५ ॥ देव होऊनि देव पूजिजे ॥ हे निजात्मता गोड खाजें ॥ उपासनाकांड१राजें ॥ उद्धवासि दीजे श्रीकृष्णें ॥ १६ ॥ हे निजात्मता निजगोडी ॥ प्रतिपदीं नलभतां *रोकडी ॥ उपासना तडातोडी ॥ कोण कोरडी सोशील ॥ १७ ॥ हें ×आगमींचें निजगुह्य जाण ॥ प्रतिपदीं सुखसंपन्न ॥ साधक स्वयें होती चिद्‌घन ॥ तें हें उपासन उद्धवा ॥ १८ ॥ ※ऐसें ऐकतां श्रीकृष्णवचन ॥ उद्धव स्वानंदें झाला पूर्ण ॥ धांवोनि धरिले श्रीकृष्णचरण ॥ ह्मणे समूळ निरूपण मज सांग ॥ १९ ॥ तंव देव ह्मणे स्थिर राहे ॥ जें हें आगमोक्त गुह्य आहे ॥ तें माझें कृपेवीण पाहे ॥ प्राप्त नोहे साधकां ॥ १२० ॥ आगमोक्त गुह्य गहन ॥ +असो हें माझें गुप्तधन ॥ तुवां पुशिलें पूजाविधान ॥ ऐक सावधान उद्धवा ॥ २१ ॥ लेप्या, लेख्या ज्या मूर्ति जाण ॥ त्यांसि करावेना स्नान ॥ इतरां मूर्तींसि स्नपन ॥ यथाविधान करावें ॥२२॥

॥ श्लोक ॥ द्रव्यैः प्रसिद्धैर्मद्यागः प्रतिमादिष्वमायिनः ॥ भक्तस्य च यथालब्धैर्हृदि भावेन चैवही ॥ १५ ॥

॥ टीका ॥ पूजक सकाम होय चांग ॥ तें पूजाद्रव्य व्हावें सांग ॥ पूजासाधन झालिया व्यंग ॥ फळ निर्व्यंग उपजेना ॥ २३ ॥ भक्त निष्काम वाडेंकोडें ॥ तें पूजाद्रव्याचें सांकडें ॥ सर्वथा कांहीं न पडे ॥ भक्तभाव आवडे भगवंता ॥२४॥ तेथ अनायासें जें प्राप्त ॥ तेणें भगवंत होय तृप्त ॥ तोचि पूजायाग यथोक्त ॥ जाण निश्चित उद्धवा ॥ २५ ॥ निष्कामवृत्ती फलमूल ॥ दूर्वांकुर कां निर्मळ जळ ॥ इतकेन पूजा सांग सकळ ॥ होय अविकळ (मद्भावें ॥ २६ ॥ 'जेथ माझा सद्भाव दृढ ॥ तेथ उपचारांचा कोण पाड ॥ भक्तांचा भावाचि मज गोड ॥ सुख सुरवाड मद्भक्त' ॥ २७ ॥ बाह्य उपचार जे कांहीं ॥ ते प्रतिमामूर्ति पूजोंसि पाही ॥ ०मानसपूजेचें तंव ठायीं ॥ वाणी नाहीं उपचारांची ॥२८॥ ' तेथ मनचि होय माझी मूर्ती ॥ मनोमय उपचार संपत्ती ॥ निर्लोभ जे मज अर्पिती ॥ तेणें मी श्रीपती संतुष्ट ' ॥ २९ ॥ प्रतिमादि अष्टौ पूजास्थान ॥ यथोक्त पूजेचें विधान ॥ तुज मी सांग सांगेन ॥ ऐक सावधान उद्धवा ॥ १३० ॥

॥ श्लोक ॥ स्नानालंकरणं प्रेष्ठमर्चायामेव तूद्धव ॥ स्थंडिले तत्त्वविन्यासो वन्हावाज्यप्लुतं हविः ॥ १६ ॥ सूर्ये चाभ्यर्हणं प्रेष्ठं सलिले सलिलादिभिः ॥

॥ टीका ॥ प्रतिमामूर्ति पूजास्थान ॥ ते मूर्तीस जें महास्नपन ॥ या नांव बोलिजे स्नान ॥ सांग भूषण मुकुटादी ॥ ३१ ॥ जे लोकीं उत्तम प्रकार ॥ कां आपणासि जे प्रियकर ॥ जे जे अनर्घ्य अळंकार ॥ तेणें श्रद्धा मी श्रीधर पूजावा ॥ ३२ ॥ स्नान भोजन अलंकार ॥ सांग पूजा परिकर ॥ हा प्रतिमापूजाप्रकार ॥ ऐक विचार स्थंडिलाचा ॥ ॥ ३३ ॥ स्थंडिलीं जें पूजास्थान ॥ तेथ तत्त्वांचें धरोनि ध्यान ॥ ०तें तत्त्वविन्यासलेखन ॥ पूजाविधान या हेतू

---

१ कमी. २ सर्व. ३ कमीपणा, उणीव. ४ अमूल्य.

*ना. कोडी. ×मो. आग्मुचें. ※ऐसें आयकोनी देवाचें वचन ॥ उद्धव झाला आर्त पूर्ण. +मो. ऐसें हें. ना. सद्भावें. (मो. मानसपूजेसि तंव पाही. ०ना. करावे तत्वन्यास तेणें.

॥ ३४ ॥ *आत्मतत्त्वादितत्त्वविवंच ॥ स्थंडिलीं विवंचूनि साच॥हृदय, शिर, शिखा, कवच, ॥ +नेत्र, अस्त्र, दिशंचें निजपूजा ॥ ३५ ॥ अग्नीचे ठायीं जें पूजन ॥ तेथ माझें करूनि ध्यान ॥ आज्यप्लुत हवि हवन ॥ हें पूजाविधान अग्नीचें ॥ ३६ ॥ अग्नि देवाचें वैदन ॥ येणें विश्वासें संपूर्ण ॥ हविर्द्रव्य करितां हवन ॥ अग्निपूजन याहेतू ॥ ३७ ॥ सूर्याच्याठायीं प्रकाशमान ॥ ×मंडळात्मा सूर्यनारायण ॥ तेथ सौरमंत्रें उपस्थान ॥ पूजाविधान याहेतू ॥ ३८ ॥ विचारितां स्मृतीचा अर्थ ॥ आपो नारायण साक्षात ॥ येथ पूजाविधान यथोक्त ॥ जळीं जळयुक्त तर्पण ॥ ३९ ॥ हृदयीं जें माझें पूजास्थान ॥ तेथें मनें मनाचें अर्चन ॥ मनोमय मूर्ति संपूर्ण ॥ पूजाविधान मानसिक ॥ १४० ॥ माझें मुख्यत्वें अधिष्ठान ॥ ब्रह्ममूर्ति जे ब्राह्मण ॥ तेथील जें पूजाविधान ॥ आज्ञापालन दासत्वें ॥४१॥ ब्रह्मासी ज्याचेनि ब्रह्मपण ॥तो सद्‌गुरु माझें पूजास्थान ॥ सर्वार्थी श्रेष्ठ पावन ॥ तेथील पूजन तें ऐक ॥ ४२ ॥ जीवें सर्वस्वेंसि आपण ॥ त्यासि रिघावें अनन्यशरण ॥ त्याच्या वचनासि प्राण ॥ निश्चयें जाण विकावा ॥ ४३ ॥ गुरुची नीचं सेवा सेवन ॥ आवडीं करणें आपण ॥ हेंचि तेथील पूजाविधान ॥ येणें सुखसंपन्न साधक ॥ ४४ ॥ सद्‌गुरुसेवा करितां पाही ॥ ब्रह्मसायुज्य लागे पायीं ॥ गुरुसेवेपरतें कांहीं ॥ श्रेष्ठ नाहीं साधन ॥ ४५ ॥ सद्‌गुरुस्वरूप तें जाण ॥ अखंडत्वें ब्रह्म पूर्ण ॥ तेथें आवाहन विसर्जन ॥ सर्वथा आपण न करावें ॥४६॥ निष्कपटभावें संपूर्ण ॥ सद्‌गुरुसि जो अनन्यशरण ॥ त्याचे मीही वंदीं चरण ॥ येथवरी जाण तो धन्य ॥ ४७ ॥ निर्लोभभावें सहज ॥ पूजितां तोषे अधोक्षज ॥ त्या भावाचें निजगुज ॥ स्वयें यदुराज सांगत ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ श्रद्धयोपाहृतं प्रेष्ठं भक्तेन मम वार्यपि ॥ १७ ॥ भूर्यप्यभक्तोपहृतं न मे तोषाय कल्पते ॥ गंधो धूपः सुमनसो दीपोऽन्नाद्यं च किं पुनः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ माझ्याठायीं अतिप्रीतीं ॥ श्रद्धायुक्त अनन्यभक्ती ॥ भक्त भावें जळ अर्पिती ॥ तेणें मी श्रीपति सुखावें ॥४९॥ तो जळबिंदु यथासुखें ॥ज्यां मुखीं झेलिजे आदिपुरुखें ॥ तंव भक्तिभावाचेनि हरिखें ॥ मी सुखरूपही सुखें देखा ॥ १५० ॥ माझेनि त्रैलोक्यासि सुख ॥ ऐसा मीही सुखरूप देख ॥ त्या मज होय परम संतोख ॥ भाविकांचें उदक सेवितां ॥ ५१ ॥ त्या जळबिंदूचियासाठीं ॥ रमा नावडे गोमटी ॥ ब्रह्मा जन्मला माझे पोटीं ॥ तोही शेवटीं नावडे ॥ ५२ ॥ भाविकांचेनि उदकतोखें ॥ मज वैकुंठही झालें फिकें ॥ शेषशयनींची निद्रासुख ॥ त्याचेनी तुकें उतरेना ॥ ५३ ॥ भाविकांच्या उदकापुढें ॥ मज आणिक कांहीं नावडे ॥ तेथही गंधादिपूजा जोडे ॥ नैवेद्य चोखडे रसयुक्त ॥५४॥ ते पूजेचिये सुखप्राप्ती ॥ उपमा नाहीं त्रिजगतीं ॥ ऐसा भाविकांचिये भक्तीं ॥ मी श्रीपती सुखावें ॥ ५५ ॥ भावें करितां भगवद्भक्ती ॥मी कृतकृत्य झालों निश्चितीं ॥ऐशिया ०निश्चयें जो भावार्थी॥त्याचेनि जळें संतृप्ती

१ आत्मतत्वादिकांचा विचार. २ दिग्बंधन. ३ तोंड. ४ स्तुति. ५ आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नर सूनवः ॥ ता यदस्थायनं पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥१०॥ मनुस्मृति अध्याय १. ६ नित्य. ७ मोठ्या प्रेमानें. ८ तुच्छ. ९ मान, महत्व.

*ना. आत्मस्वादि विवंच. +मो. नेत्र संचा अस्त्रादि निजपूजा. ना. नेत्र अस्त्रादि संच निजपूजा. ×मो. मंडल मध्यवर्ती सूर्य नारायण. ०मो. भावेंसि जो.

मज होय ॥५६॥ येर जो अभक्त दंभस्थितीं ॥ जीवीं द्रव्याशा बाह्य विरक्ती ॥ लौकिकप्रतिष्ठेपुरती ॥ माझी भक्ती जो मिरवी ॥ ५७ ॥ *ऐशिया अभक्ताचिया स्थितीं ॥ छत्र चामर गजसंपत्ती ॥ मज अर्पितांही +अभक्तीं ॥ सुखलेश चित्तीं उपजेना ॥ ५८ ॥ क्षीरनीर निवडी राजहंस ॥ तेथ निसूं दीधला कापुस ॥ तेवीं अभक्तभजनीं संतोष ॥ मी हृषीकेश पावेना ॥५९॥ कोंगाची गायनकळा ॥ जेवीं तोषेना किंनरशाळा ॥ तेवीं अभक्ताची भजनलीला ॥ माझी चित्कळा तोषेना ॥ १६० ॥ जेवीं रजस्वलेचें पक्वान्न ॥ उत्तम परी तें अतिहीन ॥ तेवीं अभक्तांचें भजन ॥ कदा जनार्दन स्पर्शेना ॥६१॥ ज्या भजना नातळे नारायण ॥ ऐसें जें अभक्तांचें भजन ॥ तेणें भजनें जनार्दन ॥ अणुमात्र जाण तोषेना ॥ ६२ ॥ एवं भक्ताभक्त भजनमार्ग ॥ दावूनि अधिकाराचे भाग ॥ आतां समूळ पूजामार्ग ॥ सांग श्रीकृष्ण सांगत ॥६३॥

॥ श्लोक ॥ शुचिः संभृतसंभारः प्राग्दर्भैः कल्पितासनः ॥ आसीनः प्रागुदग्वाऽर्चेदर्चायामथ संमुखः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ करूनि मंगळस्नान आपण ॥ वैदिक तांत्रिक मंत्रस्नान ॥ सारूनि नित्यविधान ॥ शुचित्वपण या नांव ॥ ६४ ॥ मग देवपूजासंभार ॥ शोधूनि करावे पवित्र ॥ यथास्थानीं पूजाप्रकार ॥ गंधादि उपचार ठेवावे ॥ ६५ ॥ श्वेतकंबल चैलाजिन ॥ पूर्वदर्भाग्रीं आसन ॥ पूर्वामुख बैसावें आपण ॥ अथवा जाण उत्तरामुख ॥ ६६ ॥ स्थावरमूर्ति पूजितां देख ॥ आसन करावें मूर्ति संमुख ॥ हा आसनविधि निर्दोख ॥ पूजान्यासादिक हरि सांगे ॥ ६७ ॥

श्लोक ॥ कृतन्यासः कृतन्यासां मदर्चां पाणिना मृजेत् ॥ कलशं प्रोक्षणीयंच यथावदुपसाधयेत् ॥ २० ॥

॥टीका॥ विधियुक्त घालूनि आसन ॥ गुरूसि करावें नमन ॥ परमगुरुपरमेष्ठींसि जाण ॥ करावें अभिवंदन अतिप्रीतीं ॥ ६८ ॥ जो मंत्र प्राप्त आपणास ॥ ×त्या मंत्राचे देहीं करावे न्यास ॥ मंत्रमूर्ति आणोनि ध्यानास ॥ पूजा मानस करावी ॥ ६९ ॥ जे मूर्ती आली ध्यानासी ॥ तेचि आणावया प्रतिमेसी ॥ हातीं धरोनियां अर्चेसी ॥ करावें न्यासांसि प्रतिमा अंगीं ॥ १७० ॥ कलश आणि प्रोक्षणी जाण ॥ साधावी यथाविधान ॥ जळें करोनियां पूर्ण ॥ दूर्वादिचंदन द्रव्योक्त ॥ ७१ ॥

श्लोक ॥ तदद्भिर्देवयजनं द्रव्याण्यात्मानमेवच ॥ प्रोक्ष्य पात्राणि त्रीण्यद्भिस्तैस्तैर्द्रव्यैश्च साधयेत् ॥ २१ ॥

॥ टीका ॥ ते प्रोक्षणपात्रींचें जळ ॥ नखोदकें न करोनि निर्मळ ॥ तेणें पूजासंभार सकळ ॥ कुशाग्रें केवळ प्रोक्षावे ॥ ७२ ॥ तेणेंचि प्रोक्षावें देवसदन ॥ आपणासि करावें प्रोक्षण ॥ प्रो-

---

१ मनांत. २ दूध व पाणी. ३ निवडण्यास. ४ कावळ्याची. ५ पांढरें लोकरीचें आसन. ६ चैल=वस्त्र. अजिन=मृगचर्म, व्याघ्रचर्म. ७ पात्रें. ८ नख ज्यांत घातलें असें.

*मो. ऐशिये भक्तीचिये स्थितीं. +ना. निश्चितीं. ×मो. तो उच्चारूनि सावकाश ॥ आवाहन करूनि देवास ॥

क्षोनि देवपूजास्थान ॥ पूजाविधान मांडावें ॥ ७३ ॥ पाद्य अर्घ्य आचमनीयें ॥ तदर्थ मांडावें पात्रत्रयें ॥ जळें पूर्ण करूनि पाहे ॥ भिन्न द्रव्य आहे पात्रत्रयांसी ॥ ७४ ॥ श्यामाक दूर्वाब्ज विष्णुक्रांता ॥ पाद्यपात्रीं दे द्रव्यशुद्धता ॥ गंध पुष्प फल अक्षता ॥ एवं कुशाग्रता अर्घ्यपात्रीं ॥ ७५ ॥ एळा वाळा जातीफळ ॥ लवंग कर्पूर कंकोळ ॥ आचमनपात्रीं हा द्रव्यमेळ ॥ शुद्ध जळ समयुक्त ॥ ७६ ॥

श्लोक ॥ पाद्यार्घ्याचमनीयार्थं त्रीणि पात्राणि दैशिकः ॥ हृदा शीर्ष्णाऽथ शिखया गायत्र्या चाभिमंत्रयेत् ॥ २२ ॥

॥टीका॥ गुरुमंत्रदीक्षा जैसी ज्यासी ॥ तोचि निजमार्ग शिष्यासी ॥ तेणें पाद्यादि तिहीं पात्रांसी ॥ संप्रदायेंसी मांडावें ॥ ७७ ॥ पाद्य यावें हृदयमंत्रें ॥ अर्घ्य अर्पावें शिरोमंत्रें ॥ आचमन यावें शिखामंत्रें ॥ गुरुसंस्कारें आगमोक्त ॥७८॥ तेंचि तिनी पात्रें जाण ॥ गायत्रीमंत्रें आपण॥ अभिमंत्रोनियां पूर्ण ॥ देवार्पण करावीं ॥ ७९ ॥ गुरुसंप्रदायें नेटक ॥ यालागीं त्यातें देशिकें॥ स्वयें बोलिला यदुनायक ॥ दीक्षा विवेक निजद्रष्टा ॥ १८० ॥ आगमशास्त्रींचा निजमार्ग ॥ भूतशुद्धि, प्राणप्रतिष्ठायोग ॥ तेणेंचि अन्वयें श्रीरंग ॥ श्लोकार्थें सांग सांगत ॥ ८१ ॥

श्लोक ॥ पिंडे वाय्वग्निसंशुद्धे हृत्पद्मस्थां परां मम ॥ अण्वीं जीवकलां ध्यायेन्नादांते सिद्धभाविताम् ॥ २३ ॥

॥ टीका ॥ वायुबीजें आवाहूनी ॥पिंगला प्राण *पूरूनी ॥ तोचि कुंभकें स्तंभूनी॥ मात्राधारणीं धरावा ॥ ८२ ॥ वायु जो धारणा धरावा ॥ तो जंव फुटेना अर्हासव्हा ॥ तंवचिवरी निरोधावा ॥ मग रेचावा शनैः शनैः ॥ ८३ ॥ ऐसें करितां प्राणधारण ॥ स्वयें कल्पावें शरीरशोषण ॥ शरीर शोषलें मानूनि जाण ॥ देहदहन मांडावें ॥ ८४ ॥ आधारस्थित जो अग्नी ॥ तो अग्निबीजें चेतऊनी ॥ तोचि देह दहनीं लावूनि ॥ भस्म मानूनी निजदेह ॥ ८५ ॥ देह दहनें अति संतप्त ॥ तेथ +चंद्रबीजें चंद्रामृत ॥ आणोनि निवावें समस्त ॥ नवा देह तेथ कल्पावा ॥ ८६ ॥ देह कल्पावा जो एथ ॥ पूर्ण पाटव्यें इंद्रिययुक्त ॥ त्याच्या हृदयपद्माआंत ॥ अण्वी जीवकळा तेथ पहावी माझी ॥ ८७ ॥ माझी जीवकळा परम ॥ सूक्ष्माहूनि अतिसूक्ष्म ॥ यालागीं ' अण्वी ' तिचें नाम ॥ विश्रामधाम जगाचें ॥ ८८ ॥ अकार उकार मकार स्थिती ॥ यांतें प्रकाशे अण्वी जीवज्योती ॥ते तंव शब्दाहूनि परती ॥ योगी ×नादांतीं लक्षिजे ॥ ८९ ॥ ते देहीं सबाह्य परिपूर्ण ॥ असोनि सूक्ष्मत्वें अलक्ष्य जाण ॥ तीतें हृत्पद्मीं योगीजन ॥ लक्षिती आसनप्राणायामें ॥ १९० ॥ ते अण्वी जीवकळा अव्यक्त ॥ तीतें करोनियां व्यक्त ॥ योगी निजभावनायुक्त ॥ हृदयीं चिंतित ※महामूर्ती ॥ ९१ ॥ ०नरजीवसमूह जाण ॥ त्याचें जें आयतनस्थान ॥ ते महामूर्ति नारायण ॥ हृदयीं सज्जन चिंतिती ॥ ९२ ॥

---

१ तीन पात्रें. २ सांवे. ३ वेलदोडे. ४ जायफळ. ५ उपदेष्टा, गुरु. ६ संबंधानें. ७ पूर्ण करून. ८ इकडे निकडे. ९ सोडून द्यावा. १० हळुहळु. ११ अग्नीनें. १२ निपुणतेनें. १३ अणुरूप, सूक्ष्म.

*मो. धरूनि. +ना. चंद्रबिंब जें चंद्रामृत. ×ना. नादोक्ती. ※मो. महामुनी. ०ना. नरी.

श्लोक ॥ तयात्मभूतया पिंडे व्याप्ते संपूज्य तन्मयः ॥ आवाह्यार्चादिषु स्थाप्य न्यस्तांगं मां प्रपूजयेत् ॥ २४ ॥

॥ टीका ॥ जेवीं गृह प्रकाशी दीपस्थिती ॥ तेवीं देह प्रकाशी जीवज्योती ॥ ते सांगोपांग माझी मूर्ती ॥ हृदयीं चिंतिती साकार ॥ ९३ ॥ जेवीं तूप तूपपणें थिजलें ॥ तैंचि अवर्ण वर्णव्यक्ती आलें ॥ तेवीं चैतन्य माझें मुसावलें ॥ लीलाविग्रहें[1] झालें साकार ॥ ९४ ॥ ऐशी ते माझी सगुणमूर्ती ॥ चिन्मात्र तेजें दैदीप्ती ॥ तिणें व्यापूनि देहाची स्थिती ॥ चित्तीं निजभक्ती उपजवी॥९५॥देह जड मूढ अचेतन॥तेथ मूर्ति प्रगटोनि चिद्घन॥अचेतना करोनि सचेतन॥करवी निजभजन उल्हासें॥९६॥जेवीं हरणुलीचें सोंग जाण॥हरिणीरूपें नाचे आपण॥ तेवीं भक्त भावें नारायण ॥ भजनपूजन स्वयें कर्ता॥९७ ॥यापरी अभेदभजन ॥ मूर्ति पूजितां चिद्घन ॥ पूज्य पूजक हे आठवण ॥ सहजें जाण मावळे ॥९८॥ मावळल्या हा भजन भेद ॥ उल्हासे भक्तीचा *अभेदबोध ॥ हा गुरुमार्ग अतिशुद्ध ॥ प्रिय प्रसिद्ध मजलागीं ॥९९॥ जेथ माझी अभेदभक्ती ॥ तेथ मी सर्वस्वें श्रीपती ॥ आतुडलों भक्तांच्या हातीं ॥ स्वानंदप्रीतीं उल्हासें ॥ २०० ॥ जेवीं कां अफाट मेघजळा ॥ ×धरण[2] बांधोनि घालिजे तळां ॥ तेवीं मज अनंताचा एकवळा ॥ +अभेदभजनाला आतुडे ॥१॥ ⁂आडीं वर्षलें सैरा[3] जळ ॥ तेणें नुपजेचि उत्तमफळ ॥ तेंचि तळां भरलिया प्रबळ ॥ तेणें पिकती केवळ राजागरें[4] ॥ २ ॥ तैसें माझें स्वरूप वाडेंकोडें ॥ ०अभेदभक्तीमाजीं आतुडे ॥ तें ब्रह्मानंदें गोंधळ पडे ॥ शीग चढे भक्तीसी ॥ ३ ॥ अभेदभक्तांच्या दारापाशीं ॥ तीर्थें येती पवित्र व्हावयासी ॥ सुरनर लागती पायांसी ॥ मी हृषीकेशी त्यांमाजीं ॥४॥ अभेदभक्तांपाशीं देव ॥ सकळ तीर्थें होती निर्दोष ॥ भक्तीचें माहेर तें आवश्यक ॥ मजही सुख त्याचेनी ॥५॥ अभेद जे 2क्रियास्थिती ॥ या नांव माझी उत्तमभक्ती ॥ ऐसा उल्हासें श्रीपती ॥ उद्धवाप्रती बोलत ॥६॥ अभेदभक्ती वाडेंकोडें ॥ श्रीकृष्ण सांगे उद्धवापुढें ॥ कथा राहिली येरीकेंडे[5] ॥ तेंही धडफुडें स्मरेना ॥७॥ देव विसरला निरूपण ॥ तंव उद्धवासि बाणली खूण ॥ तोही विसरला उद्धवपण ॥ कृष्णा कृष्णपण नाठवे ॥ ८ ॥ अभेदभजनाचा हरिख ॥ देव भक्त झाले एक ॥ दोघां पडोनि ठेलें ठक[6] ॥ परम सुख पावले ॥९॥ उद्धव निजबोधें परिपूर्ण ॥ तरी पूजाविधान प्रश्न ॥ एथ करावया काय कारण ॥ ऐशी आशंका मन कल्पील ॥ २१० ॥ तरी उद्धवाच्या चित्तीं ॥ उगा राहतांचि श्रीपती ॥ जाईल निजधामाप्रती ॥ यालागीं प्रश्नोक्ती तो पुसे ॥ ११ ॥ उपासनाकांडगुह्यज्ञान ॥ आगमोक्तपूजाविधान ॥ उद्धवमिषें श्रीकृष्ण ॥ वेदार्थ आपण स्वयें बोले ॥ १२ ॥ सकळ वेदार्थ शास्त्रविधी ॥ ग्रंथीं श्रीकृष्ण प्रतिपादी ॥ जैशी श्रद्धा तैशी सिद्धी ॥ व्हावया शुद्धी साधकां ॥ १३ ॥ असो हे ग्रंथ 3व्युत्पत्ती ॥ ऐकतां अद्वैतभक्ती ॥ उद्धव निवाला निजचित्तीं ॥ तेणें श्रीपती सुखावला ॥ १४ ॥ तेणें संतोषें म्हणे श्रीकृष्ण ॥ उद्धवा होईं सावधान ॥ पुढील पूजा-

१ लीला शरीरानें. २ एकोपा, अभेद. ३ सपाट्यानें. ४ राजभोग तांदूळाचीं शेतें. ५ एकीकडे. ६ बरोबर. ७ भूल, विस्मृति, मोह.

*मो. अभेदभेद. ×मो. धरणी. +मो. अभेद जनाला. ⁂मो. अडवीं वसे सैरा जळ. ०ना. अभेद भक्तांमाजीं. 2ना. क्रियाशक्ती. 3मो. उपपत्ती.

विधान ॥ तुज मी सांगेन यथोक्त ॥ १५ ॥ पूज्यपूज्यक एकात्मता ध्यान ॥ करोनिया दृढ धारण ॥ तेंचि बाह्य पूजेलागीं जाण ॥ करावें अवाहन प्रतिमेमाजीं ॥ १६ ॥ प्रतिमेसंमुख आपण ॥ आवाहनमुद्रा दाखवून ॥ माझी चित्कळा संपूर्ण ॥ प्रतिमेसि जाण भावावी ॥१७॥ तेव्हां मूर्तीचें जडपण ॥ निःशेष न देखावें आपण ॥ मूर्ति भावावी चैतन्यघन ॥ मुख्य आवाहनें या नांव ॥ १८ ॥ गुरुमुखें मंत्र निर्दोष ॥ *तेणें मंत्रें मूर्तीसि न्यास ॥ करावे सर्वांगीं सावकाश ॥ शास्त्रविन्यास आगमोक्त ॥ १९ ॥ एवं आवाहन संस्थापन ॥ सन्निधि सन्निरोधन ॥ +सुमुखीकरण स्वायतन ॥ या मुद्रा आपण दावाव्या ॥ २२० ॥ अवगुंठन संकलीकरण ॥ या अष्टौ मुद्रा दावूनि जाण ॥ मग होऊनि सावधान ॥ पूजाविधान मांडावें ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ पाद्योपस्पर्शार्हणादीनुपचारान्प्रकल्पयेत् ॥ धर्मादिभिश्च नवभिः कल्पयित्वासनं मम ॥ २५ ॥ पद्ममष्टदलं तत्र कर्णिकाकेसरोज्ज्वलम् ॥ उभाभ्यां वेदतंत्राभ्यां मह्यं तूभयसिद्धये ॥ २६ ॥

॥ टीका ॥ स्नानमंडप कल्पूनि जाण ॥ तेथ ×आणावा देव चिद्घन ॥पाद्य अर्घ्य आचमन ॥ मधुपर्क विधान करावें ॥ २२ ॥ अभ्यंग अंगमर्दन ॥ पुरुषसूक्तें यथोक्त स्नान ॥ पीतांबरपरिधान ॥ स्नानमंडपीं जाण देवासी ॥ २३ ॥ इतर यथोक्त पूजन ॥ करावें सिंहासनीं संपूर्ण ॥ तें आसन पीठावरण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ २४ ॥ ※सिंहासनीं आवरणक्रम ॥ आधार प्रकृति कूर्म क्षेम ॥ क्षीराब्धि श्वेतद्वीप कल्पद्रुम ॥ मनोरम भावावा ॥ २५ ॥ त्यातळीं रत्नमंडप नेटक ॥ त्यामाजीं विचित्रपर्यंक ॥ त्या मंचकाचा विवेक ॥ यदुनायक सांगत ॥ २६ ॥ धर्म ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ॥ हेचि [१]माचवे अतिवर्य ॥ अधर्म अज्ञान [३]अनैश्वर्य ॥ अवैराग्येंसि पाहे [२]गातें चारी ॥ २७ ॥ ईश्वरतत्त्व निजसूत ॥ गुणागुणीं वळोनि तेथ ॥ मंचक विणिला अचुंबित ॥ योगयुक्त महामुद्रा ॥ २८ ॥ त्या मंचकावरी शेषपुटी ॥ शोभे अतिशयें गोमटी ॥ सहस्रफणीं मणितेज उठी ॥ छत्राकार उठी झळकत असे ॥२९॥ शेषपुटीमाजीं निर्मळ॥ विकासलें [४]रातोत्पळ ॥सकर्णिका अष्टदळ ॥ शोभे कमळ मनोहर ॥२३०॥ सत्‌शक्ति कमळकंदमूळ ॥ ज्ञाननाळ त्याचें सरळ ॥प्रकृति अष्टधा जे सबळ ॥तेंचि अष्टदळ कमळाचें ॥३१॥ ऐसें कमळ अतिसुंदर ॥ षड्विकार तेचि केसर ॥ वैराग्य कर्णिका सधर ॥ मघमघी थोर सुवासें ॥३२॥ पूर्वादिकमळदळीं जाणा ॥ देवता [५]न्यासाव्यो त्यात्या स्थाना ॥ विमळा उत्कर्षणी ज्ञाना ॥ ०कर्णिका मध्यस्थाना अनुग्रह स्थापावी ॥ ३३ ॥ आत्मा अंतरात्मा परमात्मा ॥ हा *संमुखभाग देवोत्तमा ॥ सत्व रज आणि मोह तमा ॥ पुरुषोत्तमा 2पुष्टिभाग ॥३४॥ ऐसापरी पीठन्यास ॥ आगमोक्त सावकाश ॥ करूनियां हृषीकेश ॥ सिंहासनास आणावा ॥ ३५ ॥ छत्र आणि [६]युग्मचामर ॥ नानावाद्यें जयजयकार ॥ दावूनि पीठ मुद्रा 3सधर ॥ आसनीं श्रीधर

---

१ बोलावणें. २ माच्याचे खूर. ३ ऐश्वर्य नसणें. ४ लालकमल. ५ स्थापन कराव्या. ६ दोन.

*मो. तेणें मंत्रमूर्ति विन्यास. +ना. सुमुखी करावें स्वागतन. ×ना. आवाहनावा देव. ※मो. सिंहासन. ०मो. क्रिया योग प्रसिद्धि सत्या ईशाना ॥ अनुग्रहें स्थापाव्या. *ना. सुखभाग. 2मो. पुष्टिभागीं. 3मो. सुंदर.

बैसवावा ॥३६॥ मज सर्वगतासि आवाहन ॥ मज अधिष्ठानासि आसन ॥ मज निर्विकारासि जाण ॥ दाविती आपण विकारमुद्रा ॥ ३७ ॥ मज चिद्रूपालागीं लोचनें ॥ निःशब्दा कल्पिती श्रवणें ॥ मज विश्वमुखासि वदन ॥ निमासुरें जाण भाविती ॥ ३८ ॥ मी विश्वांघ्री दोंपायीं चालत ॥ मज विश्वबाह्रासि चारी हात ॥ मज सर्वगतातें एथ ॥ स्थान भावित एकदेशी ॥ ३९ ॥ मज निरूपचारासि उपचार ॥ मज विदेहासी अळंकार ॥ मज सर्वसमाना अरि मित्र ॥ भावना विचित्र भाविती ॥२४०॥ मज अकर्त्या कर्मबंधन ॥ अजासि जन्म निधन ॥ नित्यतृप्तासी भोजन ॥ निर्गुणा सगुण भाविती ॥ ४१ ॥ या अवघियांचा अभिप्रावो ॥ उपासनाकांडनिर्वाहो ॥ जैसजैसा *भक्तभावो ॥ तैसा मी देवो तयासी ॥४२॥ मी अवाप्तसकळकाम ॥ परी भक्तप्रेमालागीं सकाम ॥ जैसा भक्तांचा मनोधर्म ॥ तैसा पुरुषोत्तम मी तयांसी ॥ ४३ ॥ भक्त जैसा भावी मातें ॥ मी तैसाचि होय त्यातें ॥ तो जें जें अर्पी भावार्थे ॥ तें अर्पे मातें सहजची ॥ ४४ ॥ मी सर्वत्र भरलों असें ॥ तेथ जो जेथ मज उद्देशें ॥ भक्त भावार्थे अर्पू बैसे ॥ तें अर्पे अनायासें सहजें मज ॥ ४५ ॥ मी सर्वत्र देवादिदेव ॥ तैसा प्राणियांचा नव्हे भाव ॥ यालागीं भक्तांचा जेथ सद्भाव ॥ तेथ मी देव सहजेंची ॥ ४६ ॥ याचि लागीं वाडेंकोडें ॥ भक्तभावार्थ मज आवडे ॥ भक्तभावाहूनि पुढें ॥ वैकुंठ नावडे क्षीराब्धीही ॥ ४७ ॥ भक्तभावार्थाचीं भूषणें ॥ अंगीं बाणावया ×श्रीकृष्णें ॥ म्यां निर्गुणेंही सगुण होणें ॥ भावार्थगुणें भक्तांच्या ॥ ४८ ॥ ꣸यालागीं मी अजन्मा जन्में ॥ अकर्माही करीं कर्में ॥ अनामी धरी नामें ॥ भक्त मनोधर्मे तरावया ॥ ४९ ॥ निर्गुणीं लागल्या मन ॥ मनचि होय चैतन्यघन ॥ सगुणीं ठसावल्या मन ॥ साधक श्रीकृष्ण स्वयें होती ॥ २५० ॥ निर्गुणाचा बोध अटके ॥ यालागीं उपासनाविवेक ॥ सगुणमूर्ति भावूनि देख ॥ तरले साधक अनायासें ॥५१॥ हे आगमोक्त उपासनाविधी ॥ येणें भोग मोक्ष उभयसिद्धी ॥ साधक पावती त्रिशुद्धीं ॥ मी कृपानिधी संतुष्टें ॥ ५२ ॥ तेंचि उपासनविधिविधान ॥ मागां सांगतां पूजन ॥ देव सिंहासनीं बैसल्या पूर्ण ॥ पुढें आवरणपूजा ऐक ॥ ५३ ॥

श्लोक ॥ सुदर्शनं पांचजन्यं गदासीषुधनुर्हलान् ॥ मुसलं कौस्तुभं मालां श्रीवत्सं चानुपूजयेत् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ अग्नी जीवकळेसि देहावरण ॥ सिंहासनीं शक्त्यावरण ॥ सुदर्शनादि +आयुधावरण ॥ आपुलीं आपण हरि सांगे ॥५४॥ सतेजधार सुदर्शन ॥ शंख शोभे 'पांचजन्य' ॥ 'नंदक' तो खड्ग जाण ॥ गदा गहन 'कौमोदकी' ॥ ५५ ॥ 'शार्ङ्गधनुष्य' अतिसबळ ॥ सुवर्णपुंख बाण सरळ ॥ हेंल आणि मुसळ ॥ आयुधें प्रबळ पूजावीं ॥ ५६ ॥ या आठही भुजा सायुधें सरळा ॥ कंठीं कौस्तुभ वनमाळा ॥ कांसे कशिला पिंवळा ॥ घनसांवळा शोभत ॥ ५७ ॥ ब्रह्मण्यदेव रमानाथ ॥ ब्राह्मणाचा चरणघात ॥ हृदयीं अळंकार मिरवत ॥

१ डोळे. २ कान. ३ नितळ, सुंदर. ४ सर्वत्र पाय ज्याला तो. ५ जन्मरहितास. ६ मी आहें असा भाव. ७ अवघड. ८ उपासेचा विचार. ९ सोन्यांची पिसें. १० नांगर, ११ आयुधांसह. १२ लत्ता.

*मो. भजनभाव. ×मो. संपूर्ण. ꣸मो. मज अजन्मा जन्म ॥ अकर्माही कर्म ॥ +मो. आयुधें जाण.

शोभा अद्भुत तेणें शोभे ॥ ५८ ॥ चिद्रत्नाच्या अलंकारीं ॥ गुण काढोनियां बाहेरी ॥ ओंविली वैजयंती कुसरीं ॥ ते हृदयावरी रुळत ॥ ५९ ॥ यापरी साळंकार सायुध ॥ शंखचक्रपद्मेंसि अगाध ॥ ऐसा शोभला स्वयंबोध ॥ नारदादि संनिध तिष्ठती सदा ॥ २६० ॥ यापरी साळंकार सायुध ॥ पूज्य *पूजोनियां गोविंद ॥ मग पूजावे पार्षद ॥ एक विशद सांगेन ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ नंदं सुनंदं गरुडं प्रचंडं चंडमेव च ॥ महाबलं बलं चैव कुमुदं कुमुदेक्षणम् ॥ २८ ॥

॥ टीका ॥ नंद सुनंद देवापाशीं ॥ गरुड सदा तिष्ठे दृष्टीसी ॥ चंड प्रचंड दोहीं +बाहीसी ॥ अहर्निशीं तिष्ठती ॥ ६२ ॥ बल आणि महाबल ॥ सुमुखसंज्ञें अवधानशीळ ॥ कुमुद, कुमुदाक्ष केवळ पाठीसी प्रबळ बळें उभे ॥ ६३ ॥ गरुड दृष्टीं तिष्ठे आपण ॥ येर नंदादि जे अष्टौ जन ॥ तेथ अष्टौ दिशांप्रति जाण ॥ पार्षदावरण हरिनिकटीं ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ दुर्गां विनायकं व्यासं विष्वक्सेनं गुरून् सुरान् ॥ स्वे स्वे स्थाने त्वभिमुखान् पूजयेत्प्रोक्षणादिभिः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ दुर्गा, विनायक जाण ॥ व्यास आणि विष्वक्सेन ॥ चहूं कोनीं चारी स्थापून ॥ करावें पूजन ×देवाभिमुख ॥ ६५ ॥ मूळमूर्तीसी अभिन्नाकारु ॥ गुरु आणि परमगुरु ॥ ⁂परमेष्ठिगुरूसि एकाकारु ॥ पूजाप्रकारु करावा ॥ ६६ ॥ इंद्रादि अष्टौ लोकपाळ ॥ आह्वानूनियां सकळ ॥ स्थापूनि अष्टौ दिशा केवळ ॥ तेही तत्काळ पूजावे ॥ ६७ ॥ गुरुदुर्गादि लोकपाळ ॥ पूजावे सांगोपांग सकळ ॥ ०प्रोक्षणपात्रादि अविकळ ॥ पूजा निश्चळ करावी ॥ ६८ ॥ तेचि पूजेचे पूजोपचार ॥ कोणकोण पैं प्रकार ॥ साहीं श्लोकीं सारंगधर ॥ संक्षेपाकार सांगत ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ चंदनोशीरकर्पूरकुंकुमागुरुवासितैः ॥ सलिलैः स्नापयेन्मंत्रैर्नित्यदा विभवे सति ॥ ३० ॥ स्वर्णघर्मानुवाकेन महापुरुषविद्यया ॥ पौरुषेणापि सूक्तेन सामभी राजनादिभिः ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ एळा, वाळा, कर्पूर, ॥ ǀचंदन, कुंकुम, केशर ॥ त्यांमाजीं मेळवूनि ৪अगर ॥ धूपिलें नीर स्नपनासी ॥ २७० ॥ सुवासित पैरिकर ॥ गंगाजळ अतिपवित्र ॥ शंखमुद्रापुरःसर ॥ शंखीं तें नीर भरावें ॥ ७१ ॥ ऐसें जळ घेऊनि शुद्ध ॥ आपस्तंबशाखेचें प्रसिद्ध ॥ सुवर्णघर्मानुवाकपद ॥ तेणें अभिषेक विशद मज करावा ॥ ७२ ॥ अथवा केवळ पुरुषसूक्त ॥ रुद्राभिषेक विष्णुसूक्त ॥ इहीं मंत्रीं मंत्रोक्त ॥ देवासि यथोक्त स्नान द्यावें ॥ ७३ ॥ त्या सामवेदींचें सामगायन ॥ त्यामाजीं सामनी राजन ॥ तेणेंही करूनियां जाण ॥ देवासी स्नान करावें ॥ ७४ ॥ असल्या वैभवसंपन्न ॥ नित्य द्यावें हें महास्नान ॥ नातरी पर्वविशेषें जाण ॥ करावें

१ माळा. २ कुशलतेनें. ३ बाजूस. ४ समोर. ५ देवाच्या समोर. ६ आवाहन करून, बोलावून. ७ वेलदोडा. ८ कृष्णागुरुचंदन. ९ धूपयुक्त, सुवासिक. १० स्नानास. ११ जात, प्रकार. १२ पाणी.

*मो. पूजनीय. +मो. बाहूसी. ×मो. देवासन्मुख. ⁂मो. पारमेष्ठ्या गुरूसी. ०ना. प्रोक्षण पात्रादि. ǀमो. चंदन सुगंध केशर. ৪ना. अपार.

आपण जयंत्यादिकीं ॥ ७५ ॥ आगमोक्त सुलक्षण ॥ महापुरुषविद्या पूर्ण ॥ तेणेंही करूनि आपण ॥ देवासि स्नान करावें ॥ ७६ ॥ देवासि पूर्ण झालिया स्नान ॥ करावें मंगळनीराजन ॥ मग वस्त्रें ※अलंकार भूषण ॥ देवासि आपण अर्पावीं ॥ ७७ ॥

॥ श्लोक ॥ वस्त्रोपवीताभरणपत्रस्रग्गंधलेपनैः ॥ अलंकुर्वीत सप्रेम मद्भक्तो मां यथोचितम् ॥ ३२ ॥

टीका ॥ देवो स्वरूपें घनसांवळा ॥ कांसे कसावा सोनसळा ॥ हेमसूत्र अर्पूनि गळां ॥ रत्नमेखळा बाणावी ॥ ७८ ॥ वांकी अंदुवांचा गजर ॥ चरणीं नूपुरांचा झणत्कार ॥ मुकुट कुंडलें मनोहर ॥ हृदयीं गंभीर महापदक ॥ ७९ ॥ जडित मोतिलगे पवित्रावळी ॥ अति शोभित दिसे निढळीं ॥ तिलक पिंवळा तयातळीं ॥ कंठीं झळाळी कौस्तुभ ॥ २८० ॥ बाहीं बाहुवटे वीरकंकणें ॥ करीं मुद्रिका रत्नखेवणें ॥ पीतांबर झळके कोणे मानें ॥ रविबिंब तेणें लाजविलें ॥ ८१ ॥ सांवळे अंगीं गोमटी ॥ शुभ्रचंदनाची शोभे उटी ॥ सुमनमाळाविरंगुंठी ॥ होत घरटी मधुकरां ॥ ८२ ॥ वैजयंती वनमाळा ॥ आपाद रुळे गळां ॥ घवघवीत दिसे डोळां ॥ घनसांवळा शोभत ॥ ८३ ॥ एवं वस्त्रालंकाराभरणीं ॥ स्वयें पूजावा शार्ङ्गपाणी ॥ पुजेहूनियां मनीं ॥ श्रद्धा कोटिगुणीं असावी ॥ ८४ ॥ भक्त असो अतिसंपन्न ॥ अथवा हो कां अतिनिर्धन ॥ जेथ शुद्ध श्रद्धा संपूर्ण ॥ तेथ नारायण संतुष्टे ॥ ८५ ॥ सकळ पूजेचें कारण ॥ मुख्य श्रद्धाचि गा प्रमाण ॥ अत्यंत श्रद्धें जो संपन्न ॥ तो देवाचा पूर्ण पढियंता ॥ ८६ ॥

श्लोक ॥ पाद्यमाचमनीयं च गंधं सुमनसोऽक्षतान् ॥ धूपदीपोपहार्याणि दद्यान्मे श्रद्धयार्चकः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ एवं मूर्ति शृंगारिल्या पूर्ण ॥ यावें पाद्य अर्घ्य आचमन ॥ देऊनि मधुपर्क विधान ॥ करावें पूजन श्रद्धायुक्त ॥ ८७ ॥ गंधाक्षता शुद्ध सुमनें ॥ धूप दशांग +दीपदान ॥ दीपावली नीराजन ॥ श्रद्धा ※मदर्चन साधकां ॥ ८८ ॥

॥ श्लोक ॥ गुडपायससर्पींषि शष्कुल्यापूपमोदकान् ॥ संयावदधिसूपांश्च नैवेद्यं सति कल्पयेत् ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ झाल्या धूप दीप नीराजन ॥ देवासि वोगरावें भोजन ॥ नानापरीचें पक्वान्न ॥ अन्न सदन्न रसयुक्त ॥ ८९ ॥ मांडा साकरमांडा गुळवेंरी ॥ शष्कुल्या अमृतफळें क्षीरघारी ॥ दुधामाजीं आळिली क्षीरी ॥ वाढिली परी वळिवेंट ॥ २९० ॥ मधुवडा कोरवडा ॥ लाइतिळवयांचा जोडा ॥ रुची ×आली अंबवडा ॥ ठायापुढां वाढिला ॥ ९१ ॥ पत्रशाकांची प्रभावळी ॥ भात अरुवार जिरेसाळी ॥ ०रूपें सोलींव मुगदाळी ॥ गोघृत परमळी सयस्तप्त ॥ ९२ ॥

---

१ रोहिणी नक्षत्रयुक्त श्रावणकृष्णाष्टमी वगैरे. २ मंगलारती. ३ सोन्याचें यज्ञोपवीत. ४ रत्नखचित कटिदोरा. ५ मोत्याचे हार. ६ कपाळास. ७ रत्नखचित. ८ बद्धकेश. ९ स्थान, ( फेरी ). १० फुलें. ११ वाढावे. १२ गुरवळी. १३ करंज्या. १४ घारगा. १५ गव्हले इत्यादि. १६ पालेभाज्यांचा. १७ हळुवार. १८ नुकतेंच कढविलेलें.

※मो अलंकाराभरणें. +मो. दीप जाण. ※ना. मदर्पण. ×ना. जाला. ०मो. सूप सोलींव.

सांजा जडींव गुळयुक्त ॥ एळा मिरें घालूनि आंत ॥ पाक केला घृतमिश्रित ॥ सेवितां सुखांत अरुवार ॥ ९३ ॥ कथिका तक्राची गोमटी ॥ आम्ररसें भरली वाटी ॥ शिखरणी केळांची वाढिली ताटीं ॥ देखोनि लाळ घोंटी अमरेंद्र ॥ ९४ ॥ दधि दूध साय साकर ॥ नैवेद्य वाढिले परिकर ॥ देव न पाहे उपचार ॥ श्रद्धा श्रीधर तृप्त होय ॥ ९५ ॥ सामर्थ्य असलें करावयासी ॥ तरी हे पैरवडी प्रतिदिवसीं ॥ नैवेद्य अर्पावे देवासी ॥ नातरी पर्वविशेषीं अर्पावे ॥ ९६ ॥ उपास्यमूर्ति जे साचार ॥ ते जयंतीस सविस्तर ॥ पर्वविशेषीं उपचार ॥ पूजा अपार हरि सांगे ॥ ९७ ॥

॥ श्लोक ॥ अभ्यंगोन्मर्दनादर्शदंतधावाभिषेचनम् ॥ अन्नाद्यं गीतनृत्यादि पर्वणि स्युरुतान्वहम् ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ पर्वें बोलिलीं आगमोक्ती ॥ अथवा वार्षिकपर्वें येती ॥ कां निजमूर्तीची जयंती ॥ ते पूजा श्रीपती स्वयें सांगे ॥ ९८ ॥ दंतधावन, उद्वर्त्तन,॥ मूर्तीसि द्यावें अभ्यंगन ॥ पंचामृतें करूनि स्नपन ॥ विचित्राभरणें पूजावी ॥ ९९ ॥ पूजोनि साळंकृत देवासी ॥ नैवेद्य अर्पावे षड्रसीं ॥ देऊनि करोद्वर्त्तनासी ॥मुखवासासी अर्पावें ॥३००॥ देव विसरला देवपणासी ॥ तें देवपण भेटे देवासी ॥ ऐशिया दाखवावें आदर्शासी ॥ तेणें देवासी उल्हास ॥ १ ॥ पर्वविशेषीं जयंतीसी ॥ मेळवूनि संतवैष्णवांसी ॥ करावें गीतनृत्यकीर्तनांसी ॥ अतिप्रेमेंसी अहोरात्र ॥ २ ॥ आगमोक्त दीक्षाहवन ॥ करितां तत्काळ देव प्रसन्न ॥ त्या होमाचें विधि विधान ॥ ऐक सावधान उद्धवा ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ विधिना विहिते कुंडे मेखलागर्तवेदिभिः ॥ अग्निमाधाय परितः समूहेत्पाणिनोदितम् ॥ ३६ ॥ परिस्तीर्याथ पर्युक्षेदन्वाधाय यथाविधि ॥ प्रोक्षण्याऽऽसाद्य द्रव्याणि प्रोक्ष्याग्नौ भावयेत माम् ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ आगमोक्त कुंडविधान ॥ लांबी रुंदी खोली कोण ॥ गणूनि उंचीचें प्रमाण ॥ कुंड संपूर्ण साधावें ॥ ४ ॥ स्वशाखा जें वेदप्राप्त ॥ मेखळायुक्त साधावी गर्त ॥ योनीसकट वेदी तेथ ॥ लक्षणोक्त साधावी ॥५॥ तेथ करूनि *अन्वाधान ॥ प्रतिष्ठिला जो हुताशन ॥ त्यासि करूनि करस्पर्शन ॥ परिसमूहन करावें ॥६॥ दर्भी करावें परिस्तरण ॥ मग करावें पर्युक्षणें ॥ इध्माबर्हिविसर्जन ॥ त्रिसंधानें ठेवावें ॥ ७ ॥ करूनि बर्हीचें आस्तरण ॥ करावें आज्यस्थालीस्थापन ॥ व्याहृतीं समिधाहोम जाण॥ ×अन्वाधान त्यानांव॥८॥प्रोक्षणीपात्रीचें विधान॥ करूनि भरावें जळ पूर्ण ॥ तेणें जळें कुशाग्रें आपण ॥ होम द्रव्यें जाण प्रोक्षावीं ॥ ९ ॥ कुंडीं प्रदीप्त हुताशन ॥ तेथ करावें माझें ध्यान ॥ तें ध्यानमूर्तीचें लक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ३१० ॥

---

१ वेलदोडे. २ कढी. ३ ताकाची. ४ आंब्याच्या रसानें. ५ इंद्र. ६ नानाप्रकारचे. ७ अगत्यानें, प्रकारानें. ८ जन्मतिथीस. ९ सुवासन. १० आरशास. ११ वेदांत सांगितलेलें. १२ खांच. १३ भोंवतालीं पाणी सिंचन करणें. १४ भोंवतीं दर्भ पसरणें. १५ पाणी फिरविणें. १६तीन सांध्यांचें, शुल्ब. १७दर्भांचें. १८ अग्नि.

*पा. अग्निधान ४

॥ श्लोक ॥ तप्तजांबूनदप्रख्यं शंखचक्रगदांबुजैः ॥ लसच्चतुर्भुजं शांतं पद्मकिंजल्कवाससम् ॥३८॥ स्फुरत्किरीटकटककटिसूत्रवरांगदम् ॥ श्रीवत्सवक्षसं भ्राजत्कौस्तुभं वनमालिनम् ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ जैसी तप्तसुवर्णभा ॥ तैशी मूर्तीची अंगप्रभा ॥ चतुर्भुज सांजिरी शोभा ॥ चिन्मात्रगाभा साकार ॥ ११ ॥ शंखचक्रगदाकमळ ॥ कांसे पीतांबर सोज्ज्वळ ॥ लोपूनि अग्निप्रभाज्वाळ ॥ मूर्तिप्रबळ प्रकाश ॥ १२ ॥ मुकुटकुंडलें मेखळा ॥ श्रीवत्स शोभे वक्षस्थळां ॥ आपाद रुळे वनमाळा ॥ झळके गळां कौस्तुभ ॥ १३ ॥

॥ श्लोक ॥ ध्यायन्नभ्यर्च्य दारूणि हविषाभिघृतानि च ॥ प्रास्याज्यभागावाघारौ दत्त्वा चाज्यप्लुतं हविः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ ऐसें सांग माझें ध्यान ॥ अग्निमाजीं भावूनि जाण ॥ करूनि आवाहन पूजन ॥ विध्युक्त हवन मांडावें ॥ १४ ॥ अग्नि विधियुक्त *आह्वाननी ॥ समिधाहोम घृतें अभिघारूनी ॥ आज्यभाग दों अवदानीं ॥ प्रथमहवनीं होमावा ॥१५॥ तेथ तिलाज्य हविर्द्रव्य पूर्ण ॥ घृतप्लुत अवदान ॥ आगमोक्त होमविधान ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ जुहुयान्मूलमंत्रेण षोडशर्चाऽवदानतः ॥ धर्मादिभ्यो यथान्यायं मंत्रैः स्विष्टकृतं बुधः ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ लक्षूनि +सुखबोध देवाचा ॥ मूलमंत्रें होम साधकांचा ॥ कां पुरुषसूक्त सोळा ऋचांचा । हा होमाचा विधिमार्ग ॥ १७ ॥ धर्मादिक पीठार्चन ॥ इतर देवता आवरण ॥ त्यांसिही एकएक अवदान ॥ नाममंत्रें जाण होमावें ॥ १८ ॥ मग स्विष्टकृताचें अवदान ॥ साधकें द्यावें सविधान ॥ ऐसें हें माझें निजभजन ॥ भक्त सज्ञान जाणती ॥ १९ ॥ होमादि मूर्तिभजनविधी ॥ येणें तत्काळ साधकां सिद्धी ॥ भक्त पावती निजपदीं ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ३२० ॥

॥ श्लोक ॥ अभ्यर्च्याथ नमस्कृत्य पार्षदेभ्यो बलिं हरेत् ॥मूलमंत्रं जपेद् ब्रह्म स्मरन्नारायणात्मकम् ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ यापरी होम विधियुक्त अर्चन ॥ करूनि करावें साष्टांग नमन ॥ मग देवाचे जे पार्षदगण ॥ त्यांसि बळिहरण ×करावें ॥ २१ ॥ मग बाह्यप्रतिमापूजास्थान ॥ तेथें येवोनियां आपण ॥ मूलमंत्राचें स्मरण ॥ ध्यानयुक्त जाण करावें ॥ २२ ॥ पूज्य पूजक अभिन्न ॥ परात्पर जो कां नारायण ॥ ते परब्रह्मीं लावूनी मन ॥ घालावें आसन ०सावधानवृत्तीं ॥२३॥ यानीं जंव स्थिरावे मन ॥ तंव स्थिर राखावें ※आसन ॥ तेथूनि उपरमल्या मन ॥ पुढें पूजाविधान हरि सांगे ॥ २४ ॥

१ तापलेल्या सोन्याचें तेज. २ भुगुपद. ३ सिंचन करून. ४ तीळ व तूप. ५ तुपानें भिजलेलें. ६ प्रकृतीहून अन्य, श्रेष्ठ. ७ शांत झाल्यावर.

*मो. आघारूनि. +ना. सुखचंद्र. ×ना. कल्पावें. ०मो. सावधवृत्ती. ※मो. आपण.

॥ श्लोक ॥ दत्वाचमनमुच्छेषं विष्वक्सेनाय कल्पयेत् ॥ मुखवासं सुरभिमत्तांबूलाद्यमथार्हयेत् ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ एवं विसर्जिलिया ध्यान ॥ झालें देवाचें भोजन ॥ ऐसें भावूनि आपण ॥ शुद्धाचमन अर्पावें ॥ २५ ॥ अग्नीमाजील मूर्तिध्यान ॥ प्रतिमा पूजिली ते आपण ॥ दोहीं ठायीं शुद्धाचमन ॥ यथोक्त जाण करावें ॥ २६ ॥ देवाचिया भुक्तशेषासी ॥ भाग द्यावा विष्वक्सेनासी ॥ मग काढूनि उच्छिष्टासी ॥ द्यावें देवासी करोद्वर्तन ॥ २७ ॥ *कापुरें घोळिवा सुपारी फोडी ॥ सुवर्णवर्ण पानांची विडी ॥ काथ सुवासिला परवडी ॥ अभिनव गोडी तांबूला ॥ २८ ॥ एळा लवंगा कंकोळ ॥ अल्प अर्पिलें जातीफळ ॥ सुरंग रंगलें तांबूल ॥ दिसे मुखकमळ साजिरें ॥ २९ ॥ चोवा कस्तूरी बुका सधर ॥ अर्पूनि पुष्पांजळीसंभार ॥ जेणें शीघ्र संतोषे श्रीधर ॥ तें +प्रेम साचार हरि सांगे ॥ ३३० ॥

॥ श्लोक ॥ उपगायन्गृणन्नृत्यन्कर्माण्यभिनयन्मम ॥ मत्कथाः श्रावयन् शृण्वन् मुहूर्तं क्षणिको भवेत् ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ ज्ञान ध्यान उपासकता ॥ हे गौण जाण सर्वथा ॥ देव भावाचा भोक्ता ॥ भावेंचि तत्त्वतां देव भेटे ॥ ३१ ॥ ध्यानीं ×तुटलिया निजमन ॥ करावें माझें नामस्मरण ॥ कां माझ्या गुणांचें श्रवण ॥ आदरें जाण करावें ॥ ३२ ॥ करितां हरिगुणयशश्रवण ॥ तेणें सुखावे अंतःकरण ॥ सुखें सुखावोनि आपण ॥ स्वयें हरिकीर्तन करावें ॥ ३३ ॥ निर्लज्ज नटाचियेपरी ॥ हरिरंगणीं नृत्य करी ॥ हावभावकटाक्षकुसरी ॥ ०अभिनयो धरी कर्मांचा ॥ ३४ ॥ गोवर्धनउद्धरण ॥ अंगें दावावें आपण ॥ कां मांडूनियां दृढठाण ॥ त्र्यंबकभंजन दावावें ॥ ३५ ॥ पूतनाप्राणशोषण॥ कुवलयाचें निर्दळण ॥ दावूनि मल्लमर्दन ॥ हरिकीर्तन करावें ॥३६॥ नवल प्रेमाचा उद्बोध ॥ गद्यपद्यनामप्रबंध ॥ भुजंगप्रयातादि अगाध ॥ गाती स्वानंद स्तुतिस्तोत्रें ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ स्तवैरुच्चावचैः स्तोत्रैः पौराणैः प्राकृतैरपि ॥ स्तुत्वा प्रसीद भगवन्निति वंदेत दंडवत् ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ माझीं स्तुतिस्तोत्रें पुराणें ॥ सादरें करावीं श्रवण ॥ श्रोता मिनलिया आपण ॥ कथानिरूपण सांगावें ॥ ३८ ॥ शुद्ध न ये स्तोत्रपठण ॥ करितां अबद्ध गायन ॥ पाठका दोष नलगे जाण ॥ तेणें होय निर्दळण महादोषां ॥ ३९ ॥ वेदींचें उपनिषत्पठण ॥ कां ऋचामात्रें हरीचें स्तवन ॥ ऐ:ये लोकीं उच्चावचें जाण॥ देवासि *समान निजभावें ॥ ४४० ॥ पुराणींचें श्रेष्ठ स्तोत्र ॥ अथवा पढतां नाममात्र ॥ अर्थें भावार्थें साचार ॥ समान श्रीधर मी मानीं ॥ ४१ ॥ नेणे वेद शास्त्र पुराण ॥ केवळ बाळा भोळा जाण ॥ तेणें करितां प्राकृतें स्तवन ॥

---

१ समाप्त झाल्यानंतर. २ नैवेद्याचा उरलेला. ३ सुगंधित केलेला. ४ नाना प्रकारानें. ५ वेलदोडे. ६ जायफळ. ७ चंदनापासून केलेला एक सुवासिक पदार्थ. ८ अंतरल्यास. ९ शिवधनुर्भंग. १० कुवलयापीड हत्तीचें. ११ मल्लमर्दन. १२ ऋग्वेदमंत्रानें. १३ लहान मोठीं. १४ आपल्या भाषेंत.

*मो. कापुरें घोळीव सुवास फोडी. +मो. नेम. ×ना. तुष्टलिया. ०ना. अभिमान न धरी. :ना. ये लौकिकीं [illegible]

मी जनार्दन संतोषे ॥ ४२ ॥ वेदीं चुकल्या स्वरवर्ण ॥ पाठका दोष बाधी गहन ॥ प्राकृत करितां हरीचें स्तवन ॥ दोषनिर्दळण तेणें होय ॥ ४३ ॥ शास्त्रश्रवण पुराणस्थिती ॥ पाहिजे पंचमीसप्तमीव्युत्पत्ती ॥ प्राकृत अबद्धही नामकीर्ती ॥ *भगवत्प्राप्तिप्रापक ॥ ४४ ॥ संस्कृतवाणी देवें केली ॥ प्राकृत चोरापासून झाली ॥ असोत या पक्षाभिमान बोली ॥ देवाची चाली निरभिमान ॥ ४५ ॥ वेदशास्त्र हो पुराण ॥ कां प्राकृतभाषास्तवन ॥ एथें भावचि श्रेष्ठ जाण ॥ तेणें नारायण संतोषे ॥४६॥ देवासि प्रेमाचें पढियें कोड ॥ न पाहे व्युत्पत्तीचें कावाड ॥ भाविकांचा भावार्थचि गोड ॥ तेणें भक्तांची भीड उल्लंघी देवो ॥ ४७ ॥ एवं भावार्थे करितां स्तवन ॥ देव होय भक्ता आधीन ॥ तेणें भावार्थे करूनि नमन ॥ हरिचरण वंदावे ॥४८॥ मुहूर्त निमेष क्षणेंक्षण ॥ हरिचरणीं सुखावल्या मन ॥ इतर व्यापार तेणें सुखें जाण ॥ सहजें आपण वोसरती ॥ ४९ ॥ जेणें तुटे माझें अनुसंधान ॥ तें कर्म त्यागावें आपण ॥ जेणें स्वरूपनिष्ठ होय मन ॥तें समाधान राखावें ॥३५०॥ सप्रेम करितां नमन ॥ नित्य नूतन समाधान ॥ त्या नमनाचें लक्षण ॥ लोटांगण दंडवत् ॥५१॥ सुटल्या दंडें सव्राणें ॥ सन्मुख विमुख पाहों नेणे ॥ तैशीं घाली लोटांगणें ॥ देहाभिमान अहेतुक ॥ ५२ ॥ असतां देहाचें अनुसंधान ॥ जो मातें करी नमन ॥ त्या नमस्काराचें लक्षण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ५३ ॥

॥ श्लोक ॥ शिरो मत्पादयोः कृत्वा बाहुभ्यां च परस्परम् ॥ प्रपन्नं पाहि मामीश भीतं मृत्युग्रहार्णवात् ॥ ४६ ॥

टीका ॥ मस्तक माझ्या चरणांवरी ॥ उभय बाहु परस्परीं ॥ दोन्ही चरण दोहीं करीं ॥ धरी निर्धारीं भावार्थे ॥ ५४ ॥ संसारसागराच्या पोटीं ॥ मृत्युग्रहें घातली मिठी ॥ चरणीं लागलों उठाउठीं ॥ मज जगजेठी सोडवी ॥ ५५ ॥ भवभयें भ्यालों दारुण ॥ यालागीं तुज आलों शरण ॥ निवारी माझें जन्ममरण ॥ भावें श्रीचरण दृढ धरिले ॥ ५६ ॥ तूं स्वामी असतां शिरीं ॥ मज मृत्यु बापुडें केवीं मारी ॥ भावें लोटांगण घाली चरणांवरी ॥ कृपा उद्धरी कृपाळुवा ॥५७॥ देखोनि साष्टांग नमन ॥ ऐकोनि भयभीतस्तवन ॥ मज तुष्टला नारायण ॥ ऐसें आपण भावावें ॥ ५८ ॥

॥ श्लोक ॥ इति शेषां मया दत्तां शिरस्याधाय सादरम् ॥ उद्वासयेच्चेदुद्वास्यं ज्योतिर्ज्योतिषि तत्पुनः ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ म्यां दीधला शेषप्रसाद ॥ तो शिरीं धरोनि ×स्वानंद ॥स्थावरमूर्ति जेथ प्रसिद्ध ॥ तेथ उद्वाससंबंध न करावा ॥५९॥ जंगम जे प्रतिमामूर्ती ॥ तेथ आवाहिली निजात्मज्योती ॥ ते उद्वासूनियां मागुती ॥ निजात्मस्थितीं ठेवावी ॥ ३६० ॥ मूर्तिमाझारील ज्योती ॥ आणोनियां हृदयस्थितीं ॥ मग निजात्मज्योतीसि ज्योती ॥ यथास्थितीं मेळवावी ॥ ६१ ॥ विस-

---

१ विभक्ति वगैरेंचें ज्ञान २ पक्षपाती. ३ सुटतात. ४ आत्मस्वरूपींच राहणारे. ५ काठी. ६ जोरानें (सुटल्या सुमुख विमुख पाहीं नेणे.) ७ उजव्यानें उजवा, डाव्यानें डावा. ८ काळरूपमगरानें. ९विसर्जन करणें. १० आवाहन केली, बोलावली. ११ विसर्जन करून.

*मो. भगवत्प्राप्ती पाठकां. × मो. सुबद्ध.

जेनांत पूजास्थिती ॥ ऐकोनि उद्धवाचे चित्तीं ॥ साधकां पूज्य कोण मूर्ती ॥ देव ते अर्थीं स्वयें सांगे ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ अर्चादिषु यदा यत्र श्रद्धा मां तत्र चार्चयेत् ॥ सर्वभूतेष्वात्मनि च सर्वात्माऽहमवस्थितः ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ उद्धवा जे मूर्ति ज्या पदियंती ॥ तेचि त्यासि पूज्य मूर्ती ॥ तुवांही अणुमात्र चित्तीं ॥ संदेह ये अर्थीं न धरावा ॥ ६३ ॥ विष्णु विरिंचि[१] सविता जाण ॥ शिव शक्ति कां गजवदन ॥ या मूर्तींमाजीं मी आपण ॥ सर्वीं समान सर्वात्मा ॥ ६४ ॥ सर्वप्रतिमांचें पूजन ॥ करितां मज पूजा समान ॥ भक्तांची जेथ प्रीति गहन ॥ तियेअधीन मी परमात्मा ॥ ६५ ॥ जेवीं बाळकाचेनि मेळें ॥ माता तदनुकूल खेळे ॥ तेवीं भक्तप्रेमाचिये लीळें ॥ म्यां चित्कल्लोळें क्रीडिजे ॥ ६६ ॥ या सर्वभूतांच्या ठायीं ॥ आणि अवतारादिलीलादेहीं ॥ मी सर्वांशीं समान पाहीं ॥ ये अर्थीं नाहीं संदेहो ॥६७॥ उद्धवा मी नाहीं ऐसें ॥ कोणीही ठाव रिता नसे ॥ *परी प्राण्यांचें भाग्य कैसें ॥ त्या मज विश्वासें न भजती ॥६८॥ +जो जेथ मज भजों बैसे ॥ त्या मी तेथ तैसाचि असें ॥ हें उपासनाकांड विशेषें ॥ गुप्त अनायासें प्रकाशिलें ॥ ६९ ॥ उपासनाकांडींचा निर्वाहो ॥ मी सर्वांभूतीं देवाधिदेवो ॥ हा ज्यासि नकळे मुख्य भावो ॥ त्यासि मूर्तिनिर्वाहो ०थोतिलों ॥३७०॥हो कां माझी प्रतिमामूर्ती ॥तेही मी चिदात्मा निश्चितीं॥ तेथ करितां भावें भक्ती ॥ भक्त उद्धरती उद्धवा ॥ ७१ ॥

॥ श्लोक ॥ एवं क्रियायोगपथैः पुमान्वैदिकतांत्रिकैः ॥ अर्चन्नुभयतः सिद्धिं मत्तो विंदत्यभीप्सिताम् ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ एवं क्रियायोगलक्षण ॥ वैदिक तांत्रिक मिश्र जाण ॥ आगमनिगम विस्तार गहन ॥ तो मुख्यार्थ पूर्ण म्यां सांगीतला ॥ ७२ ॥ येणें क्रियायोगभजनमार्गें ॥ भक्त जें भोग मोक्ष मागे ॥ तें उभयसिद्धी ❀लागवेगें ॥ म्यां श्रीरंगें अर्पिजे ॥ ७३ ॥ भक्त निष्काम ×अनन्यभक्ती ॥ तें भोगमोक्षादिसंपत्ती ॥ घेऊनियां मी श्रीपती ॥ त्यांच्या द्वाराप्रती सदा तिष्ठें ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ मदर्चां संप्रतिष्ठाप्य मंदिरं कारयेत् दृढम् ॥ पुष्पोद्यानानि रम्याणि पूजायात्रोत्सवाश्रितान् ॥ ५० ॥

॥ टीका ॥ सांग माझी प्रतिमामूर्ती ॥ करूनि जे प्रतिष्ठा करिती ॥ दृढ देवालय उभारिती ॥ अतिप्रीतीं मद्भावें ॥ ७५ ॥ वन उपवन उद्यान ॥ पुष्पवाटिका लावण्या पूर्ण ॥ नित्यपूजेचें विधान ॥ उत्साहीं जाण महापूजा ॥ ७६ ॥ यात्रा बहुजनसमाजा ॥ वार्षिक पर्व महापूजा ॥ चालवावया अधोक्षजा ॥ उपाय सहजा हरि सांगे ॥७७॥

---

१ ब्रह्मा. २ स्वच्छंदानें. ३ मूर्तिप्रकार. ४ सांगितला. ५वैदिक, तांत्रिक मिळून. ६ स्थापन. ७ उत्साव.

*मो. परी प्राणियांचें भाग्य जैसें ॥ तैसा मी तेथें निरंतर. +मो. सर्वीं सर्वत्र मी असें ॥ हे उपासना कांडाचेनि दोषे ॥ हें गुह्य अनायासें ॥ प्रकाशिलें तुजप्रती ॥३७०॥ ०मो. दाखविला. ❀मो. लगवगें. ×ना. अनन्यगती.

॥ श्लोक ॥ पूजादीनां प्रवाहार्थं महापर्वस्वथान्वहम् ॥ क्षेत्रापणपुरग्रामान् दत्त्वा मत्सार्ष्टितामियात् ॥ ५१ ॥

॥ टीका ॥ नित्यपूजा महापूजा ॥ वार्षिकपूजा चालवाया वोजा ॥ नित्यनिर्वाह करी राजा ॥ ग्रामसमाजा अर्पूनी ॥ ७८ ॥ क्षेत्र ह्मणिजे शेत गहन ॥ हाटउत्पन्नद्रव्य आपण ॥ हाटेवीण तो ग्राम जाण ॥ ऐक लक्षण पुराचें ॥ ७९ ॥ हाटयुक्त तें पुर पाहीं ॥ जे अर्पिती देवालयीं ॥ ते माझें ऐश्वर्य पाहीं ॥ सर्वाहीठायीं पावती ॥३८०॥ मूर्तिप्रतिष्ठा पूजाविधान ॥ देवालय केलिया जाण ॥ कर्त्यासि फळ कोण कोण ॥ तेंही श्रीकृष्ण सांगत ॥ ८१ ॥

॥ श्लोक ॥ प्रतिष्ठया सार्वभौमं सद्मना भुवनत्रयम् ॥ पूजादिना ब्रह्मलोकं त्रिभिर्मत्साम्यतामियात् ॥ ५२ ॥

॥ टीका ॥ जो मूर्तिप्रतिष्ठा करूनि *ठाये ॥ तो सार्वभौम राज्य लाहे ॥ जो देवालय करी स्वयें ॥ तो स्वामी होये तिहीं लोकीं ॥ ८२ ॥ जो करी पूजाविधान ॥ तो पावे ब्रह्मसदन ॥ ये तिनी जो करी आपण ॥ तो मजसमान ऐश्वर्य पावे ॥ ८३ ॥ ऐसे हे तिन्ही साधक ॥ पोटींहूनि सकामुक ॥ कामनेसारखे लोक ॥ ते आवश्यक पावती ॥ ८४ ॥ ज्यासि माझें निष्काम भजन ॥ त्याचे प्राप्तीचें निजलक्षण ॥ तें आदरें श्रीकृष्ण ॥ स्वानंदें पूर्ण सांगत ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ मामेव नैरपेक्ष्येण भक्तियोगेन विंदति ॥ भक्तियोगं स लभते एवं यः पूजयेत माम् ॥ ५३ ॥

॥ टीका ॥ मज मुख्यत्वें जीवीं धरून ॥ ज्यासि माझें निष्काम भजन ॥ निष्कामता जे अनन्य ॥ ते पुरुष जाण मी होती ॥८६॥ तो वर्तमानदेहीं असतां ॥माझें निजरूप होय तत्वतां ॥ त्यां आह्मां आतौता॥भेद सर्वथा असेना॥८७॥करितां निष्काम भजन॥भक्त झाला मजसमान॥ समान ह्मणावया जाण ॥ वेगळेपण असेना ॥ ८८ ॥ एवं भक्त जो मजभीतरीं ॥ मी भक्ता आंतबाहेरीं ॥ ऐसे मिसळलों परस्परीं ॥ निजभजनावरी नांदत ॥८९॥ गुळ जेवीं गोडियेसी ॥ कां कल्लोळ जैसा सागरासी ॥ ऐसा निजभक्तीपाशीं ॥आह्मांनयांसी रहिवास ॥३९०॥ ऐशी निष्काम जो भक्ति करी ॥ तो धन्य धन्य चराचरीं ॥ जो देवाद्विजांची वृत्ति हरी ॥ तो पचे अघोरीं तें ऐक ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ यः स्वदत्तां परैर्दत्तां हरेत सुरविप्रयोः ॥ वृत्तिं स जायते विड्भुग्वर्षाणामयुतायुतम् ॥ ५४ ॥ कर्तुश्च सारथेर्हेतोरनुमोदितुरेव च ॥ कर्मणां भागिनः प्रेत्य भूयो भूयसि तत्फलम् ॥ ५५ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे सप्तविंशोऽध्यायः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ जो देवालयाची वृत्ति हरी ॥ जो ब्राह्मणवृत्तीचा लोप करी ॥ तो अयु-

१ दुकान. २ बाजारगावांचून. ३ ज्यांत बाजार आहे तें पुर. ४ सत्यलोक. ५ मत्स्वरूप. ६ त्याच्यांत व आमच्यांत ७ जीविका. ८ पचत पडे.

*मो. स्वयें.

तायुतवर्षसहस्रीं ॥ योनीं सूकरीं विष्ठाभोगी ॥ ९२ ॥ जो द्विजदेवांची वृत्ति हरी ॥ त्यासि जो होय सहाकारी ॥ कां जो अनुमोदन करी ॥ ते तिघे अघोरीं पचिजेती ॥ ९३ ॥ ते जन्ममरणांच्या आवर्तीं ॥ तेंचि फळें पुढतपुढतीं ॥ मरमरों गा भोगिती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ९४ ॥ माझे प्राप्तीची चाड चित्ता ॥ तरी *नातळावी अधर्मता ॥ अधर्मवंताची कथा ॥ स्वभावें सर्वथा न करावी ॥ ९५ ॥ न देखावें दोषदर्शन ॥ न बोलावें वर्मस्पर्शन ॥ भूतमात्रांचा द्वेष जाण ॥ सर्वथा आपण न करावा ॥ ९६ ॥ नायकावी परनिंदा ॥ न बोलावें परापवादा ॥ अधर्माचिया संवादा ॥ कोणासि कदा न मिळावें ॥ ९७ ॥ त्रिलोकींचें पाप असकें ॥ ज्यास घेणें असेल आवश्यकें ॥ तें साधुनिंदा निजमुखें ॥ यथासुखें करावी ॥ ९८ ॥ 'सकळ दुःखांचिया राशी ॥ अवश्य यावया मजपाशीं ' ॥ ऐसी आवडी ज्याचें मानसीं ॥ तेणें ब्रह्मद्वेषासी करावें ॥ ९९ ॥ सकळ काळ वृथा जावा ॥ ऐसें आवडे ज्याचे जीवा ॥ तेणें सारिपाटादि आववा ॥ खेळ मांडावा अहर्निशीं ॥४००॥ मी हृदयस्थ आत्माराम ॥ स्वतःसिद्ध परब्रह्म ॥ तो मी व्हावया दुर्गम ॥ अधर्म कर्म जनासी ॥ १ ॥ तें निर्दाळावया कर्माकर्म ॥ वर्म आहे गा अति सुगम ॥ अखंड स्मरावें रामनाम ॥ पुरुषोत्तम अच्युत ॥ २ ॥ जेथें हरिनामाचा गजर ॥ तेथ कर्माकर्मांचे संभार ॥ जाळूनि तुरवी भस्मसार ॥ ऐसें नाम पवित्र हरीचें ॥ ३ ॥ नाम निर्दळी पाप समस्त ॥ हें सकळशास्त्रसंमत ॥ जो विकल्प मानी एथ ॥ तो जाण निश्चित ×वज्रपापी ॥ ४ ॥ वज्रपापाचे पर्वत ॥ निर्दळी श्रीमहाभागवत ॥ ते जनार्दनकृपा एथ ॥ झालें प्राप्त अनायासें ॥ ५ ॥ ते भागवतींचा पाहतां अर्थ ॥ हरीचें नाम अतिसमर्थ ॥ वर्णिलेंसें परमाद्भुत ॥ स्वमुखें अच्युत बोलिला ॥ ६ ॥ एथही जो विकल्प धरी ॥ तो अतिअभाग्य संसारीं ॥ महादोषदुःखसागरीं ॥ विकल्पकरीं बुडाला ॥ ७ ॥ संकल्पविकल्पंकरी जाण ॥ जनासि झालें दृढ बंधन ॥ त्या भवबंधाचें छेदन ॥ जनार्दन निजनामें ॥ ८ ॥ जनार्दनाचें निजनाम ॥ निर्दळी भवभय परम ॥ तें नाम स्मरे जो सप्रेम ॥ तो पुरुषोत्तम स्वयें होय ॥ ९ ॥ स्वयें होणें ब्रह्म पूर्ण ॥ ये अर्थीचें गोड निरूपण ॥ अठ्ठाविसावे अध्यायीं जाण ॥ उद्धवासी श्रीकृष्ण सांगत ॥ ४१० ॥ ते कथा जें श्रवणीं पडे ॥ तें जीवीं स्वयंभ सुख वाढे ॥ मग आंत बाहेर दोहींकडे ॥ करी वाडेंकोडें समसाम्य ॥ ११ ॥ जे कथेचें गोडपण ॥ जीव गेल्या न सोडी जाण ॥ ऐसें रसाळ निरूपण ॥ उद्धवासि श्रीकृष्ण सांगेल ॥ १२ ॥ श्रवणें उपजे ब्रह्मभावो ॥ तो हा अठ्ठाविसावा अध्यावो ॥ उद्धवासि देवादिदेवो ॥ निजकृपें पहाहो सांगेल ॥ १३ ॥ अक्षरें भरोनि अक्षररसीं ॥ देव सांगेल उद्धवासी ॥ तें निरूपण अठ्ठाविसाव्यासी ॥ ब्रह्मसुखेंसी लेंगडेल ॥ १४ ॥ ब्रह्मसुखाची सांठवण ॥ तो हा अठ्ठाविसावा जाण ॥ ते उघडूनि उणखूण ॥ उद्धवासी श्रीकृष्ण सांगेल ॥ १५ ॥ तें कृष्ण उद्धव निजज्ञान ॥ एका विनवी जनार्दन ॥ तुमचे कृपेंकरूनि पूर्ण ॥ श्रोतां अवधान मज द्यावें ॥ १६ ॥ श्रोतां दीधल्या अवधान ॥ ग्रंथीं उल्हासे निरूपण ॥ एका जनार्दना शरण ॥

---

१ खोंचून. २ दुसऱ्याचे दोष. ३ अवघें. ४ सोंकट्या इत्यादि. ५ प्राप्त होण्यास कठीण. ६ साधन. ७ संशय. ८ मोठा पातकी. ९ संशयामुळें. १० युक्त होईल, फळानीं दाट भरेल.

*मो. जाळावी. ×ना. वज्रलेपी.

शिरीं श्रीचरण वंदिले ॥ ४१७ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धव-संवादे एकाकारटीकायां सप्तविंशोऽध्यायः ॥ २७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ मूळश्लोक ॥ ५५ ॥ ओंव्या ॥ ४१७ ॥ एकूणसंख्या ॥ ४७२ ॥ ॥ ॥ ॥

# अध्याय अठ्ठाविसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमो सद्गुरु परम[१] ॥ जयजय सद्गुरु पुरुषोत्तम ॥ जयजय सद्गुरु परब्रह्म ॥ ब्रह्मा ब्रह्मनाम तुझेनी ॥ १ ॥ जयजय सद्गुरु चिदैक्यस्फूर्ती ॥ जयजय सद्गुरु चिदात्मज्योती ॥ जयजय सद्गुरु चिन्मूर्ती ॥ मूर्तामूर्तीं[२] चिद्रूप ॥ २ ॥ जजजय सद्गुरु सुक्षेत्रा ॥ जयजय सद्गुरु सत्पात्रा ॥ जयजय सद्गुरु सन्मात्रा ॥ सदैकाक्षरा सद्रूपा ॥ ३ ॥ जयजय सद्गुरु स्वानंदमान ॥ जयजय सद्गुरु स्वानंदपूर्ण ॥ जयजय सद्गुरु स्वानंदघन ॥ आनंदा गोडपण तुझेनी ॥ ४ ॥ जयजय सद्गुरु देवाग्रमणी[३] ॥ जयजय सद्गुरु देव शिरोमणी ॥ सकळ देव लागती चरणीं ॥ देवचूडामणी गुरुराया ॥ ५ ॥ जयजय जीवादिजीवा ॥ जयजय देवादिदेवा ॥ जयजय शिवादिशिवा ॥ जयजय अभिनवा गुरुराया ॥ ६ ॥ जयजय सद्गुरु सुखसंपन्ना ॥ जयजय सद्गुरु सुखनिधाना ॥ जयजय सद्गुरु सुखैकघना ॥ सुखा सुखपणा तुझेनि ॥ ७ ॥ तुझेनि सुखा निजसुख घडे ॥ तुझेनि बोधा निजबोध आतुडे ॥ तुझेनि ब्रह्मा ब्रह्मत्व जोडे ॥ तुझे पडिपाडें तूं एकू ॥ ८ ॥ ऐसा सद्गुरु तूं अनंत ॥ तुझ्या स्वरूपासि नाहीं अंत ॥ तो तूं होऊनि कृपायुक्त ॥ *निजस्वरूप बोधित निजभक्तां ॥ ९ ॥ आपुलें निजरूप बोधून ॥ उरविशी देवभक्तपण ॥ त्याहीवरी निजभजन ॥ अद्वयें पूर्ण करविशी ॥ १० ॥ 'गंगा मिळोनिं सागरीं ॥ मीनली तळपे त्यावरी ॥ तेवीं भक्त मिळोनि तुज माझारीं ॥ तुझें भजन करी तुझेनि ' ॥ ११ ॥ अद्वय करितां तुझी भक्ती ॥ तूं संतोषसी यथास्थिती संतोषोनि शिष्याहातीं ॥ निजात्मसंपत्ती अर्पिशी ॥ १२ ॥ अर्पूनि निजात्मभरभार ॥ शिष्य गुरुत्वें करिशी थोर ॥ हा अतिलाघवी चमत्कार ॥ अतर्क्य विचार तर्केना ॥ १३ ॥ जें अतर्क्य वेदशास्त्रांसी ॥ ज्यालागीं विवादिती[४] अहर्निशीं ॥ तें तूं क्षणार्धें बोधिसी ॥ सच्छिष्यासी निजबोधें ॥ १४ ॥ तुझ्या निजबोधाची हातवटी ॥ पढतां वेदवेदांतकोटी ॥ तरी अलक्ष्य लक्षेना दृष्टीं ॥ सर्वार्थीं गोष्टी अगम्य ॥ १५ ॥ बहुत कळलें कळलें ह्मणती ॥ नानापरीच्या युक्ति चाळिती ॥ परी ते नकळोनि वोसणती[५] ॥ जेवीं शुक[६] बोलती सुभाषितें ॥ १६ ॥ यालागीं तुझी बोधकशक्ती ॥ अगम्य सर्वांशी सर्वार्थीं ॥ तुझी लाधल्या कृपायुक्ती ॥ अगम्य पावती सुगमत्वें ॥ १७ ॥ जें अगम्य श्रीभागवत ॥ त्याहीमाजीं एकादशार्थ ॥ प्राकृत करविला यथार्थ ॥ बाप समर्थ कृपाळु ॥ १८ ॥ दधि मंथूनि समस्त ॥ जेवीं माता काढी नवनीत ॥ तें आयितें बाळकाहातीं देत ॥ तैसें केलें येथ जनार्दनें ॥ १९ ॥ वेदशास्त्रांचें निजमथित ॥ त्यासें

१ श्रेष्ठा. २ साकार निराकार पदार्थीं. ३ देवश्रेष्ठा. ४ वाद करितात. ५ बडबडती. ६ पोपट.
*मो. निजसुख.

कादिलें श्रीभागवत ॥ त्या भागवताचा मथितार्थ ॥ जाण निश्चित एकादश ॥ २० ॥ त्या एकादशाचें गोडपण ॥ सर्वथा नेणें मी आपण ॥ तें जनार्दनें करूनि मथन ॥ सारांश पूर्ण मज दीधला ॥ २१ ॥ तो स्वभावें घालितां तोंडीं ॥ लागली एकादशाची गोडी ॥ त्या गोडपणाच्या आवडीं ॥ टीका चढोवढीं चालिली ॥ २२ ॥ यालागीं एकादशाची टीका ॥ एकला कर्ता नव्हे एका ॥ एकीं एक मिळोनि देखा ॥ ग्रंथ नेटका निर्वाळिलां ॥ २३ ॥ मागें पुढें एक एका ॥ हें एकादशाचें रूप देखा ॥ तेणें एकपणें चालिली टीका ॥ साह्य निजसखा जनार्दन ॥ २४ ॥ जनार्दनें पैं आपुलें ॥ एकीं एकपण दृढ केलें ॥ तेंचि एकादशाचे अर्था आलें ॥ एकीं मीनलें एकत्व ॥ २५ ॥ जेवीं जेवणीं गोड घांस ॥ तेवीं भागवतीं एकादश ॥ त्याहीमाजीं अष्टाविंश ॥ अतिसुरस साजिरा ॥ २६ ॥ सर्वांगीं शिर प्रमाण ॥ तैसा अठ्ठाविसावा जाण ॥ तेथील जें निरूपण ॥ तो स्वानंद जाण सोलींव ॥ २७ ॥ तो हा अठ्ठाविसावा अध्यावो ॥ ब्रह्मसुखाचा निजनिर्वाहो ॥ उद्धवें न पुसतां पहाहो ॥ स्वयें देवाधिदेवो सांगत ॥ २८ ॥ उद्धवें न करितां प्रश्न ॥ कां सांगताहे श्रीकृष्ण ॥ येचि अर्थींचें निरूपण ॥ सावधान परिसावें ॥ २९ ॥ उद्धव कृष्णोक्तीं निजज्ञान ॥ पावोनि झाला *ज्ञानसंपन्न ॥ तेणें येऊं पाहे ज्ञानाभिमान ॥ जाणपण अनिवार ॥ ३० ॥ ' जग मूर्ख, मी ज्ञाता ' ॥ ऐशी चढेल जे अहंता ॥ ते गुणदोषाची कथा ॥ दावील सर्वथा सर्वत्र ॥ ३१ ॥ जेथ गुणदोषांचें दर्शन ॥ तेथ निःशेष मावळे ज्ञान ॥ येथवरी ज्ञानाभिमान ॥ बाधक जाण साधकां ॥ ३२ ॥ अभिमान बाधी सदाशिवा ॥ तोही आणिला जीवभावा ॥ तेथ मनुष्याचा कोण केवा ॥ अहंतें जीवा मुक्तता कैंची ॥ ३३ ॥ यापरी गुणदोष दर्शन ॥ साधका बाधक होय पूर्ण ॥ यालागीं त्याचें निवारण ॥ न करितां प्रश्न हरि सांगे ॥ ३४ ॥ गुणदोषांचें दर्शन ॥ जें ईश्वर देखे आपण ॥ तोही नाडू पावे जाण ॥ इतरांचा कोण पडिपाडू ॥ ३५ ॥ बाळक नेणे निजहिता ॥ तेथ साक्षेपें प्रवर्ते माता ॥ तेवीं उद्धवाचे निजस्वार्था ॥ श्रीकृष्णनाथा कळवळा ॥ ३६ ॥ ज्ञानाभिमानाचें बाधकपण ॥ सर्वथा साधकां नकळे जाण ॥ यालागीं न करितांही प्रश्न ॥ त्यांचें निराकरण हरि सांगे ॥ ३७ ॥ उद्धव जन्मला यादववंशीं ॥ यादव निमती ब्रह्मशापेंसी ॥ तेथ वांचवावया उद्धवासी ॥ संपूर्ण ब्रह्मज्ञानासी हरि सांगे ॥ ३८ ॥ जेथ देहातीत आत्मज्ञान ॥ तेथ न बाधी शापबंधन ॥ हें जाणोनियां श्रीकृष्ण ॥ पूर्ण ब्रह्मज्ञान उपदेशी ॥ ३९ ॥ जेवीं साकरेवरी माशी ॥ तेवीं श्रीकृष्णमूर्तीपाशीं ॥ प्रीति जडली उद्धवासी ॥ भाव एकदेशीं दृढ झाला ॥ ४० ॥ कृष्णापासूनि दुरी जातां ॥ उद्धव प्राण सांडील तत्त्वतां ॥ ते मोडावया एकदेशी अवस्था ॥ ब्रह्मसमता हरि सांगे ॥ ४१ ॥ एकदेशी झालीया भावो ॥ तो कृष्णासी नावडे पहाहो ॥ यालागीं देवाधिदेवो ॥ ब्रह्मसमन्वयो स्वयें सांगे ॥ ४२ ॥ उद्धव असतां कृष्णाजवळी ॥ ब्रह्मशापें होईल होळी ॥ यालागीं त्यासि वनमाळी ॥ सर्वब्रह्मसुकाळीं घालूं पाहे ॥ ४३ ॥ कृष्णावेगळा उद्धव जातां ॥ वियोग बाधीना त्याचिया चित्तां ॥ ऐशी आपुली सर्वगतता ॥ उद्धवासी तत्त्वतां हरि बोधी ॥ ४४ ॥

---

१ निर्मल पूर्ण केला. २ एकावर एक आकरा. ३ निर्मळ. ४ बल, मगदूर. ५ बाधूं पाहे. ६ मरती. ७ ब्रह्मशापापासून. ८ ' सर्वं खल्विदं ब्रह्म ' या बोधाचे सुकाळांत.

*मो. निजसंपन्न.

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ परस्वभावकर्माणि न प्रशंसेन्न गर्हयेत् ॥ विश्व-
मेकात्मकं पश्यन्प्रकृत्या पुरुषेण च ॥ १ ॥

॥ टीका ॥ जो निःशब्दाचा सोलींव शब्द ॥ ज्याचे निःश्वासें जन्मले वेद ॥ उद्धवहितार्थ गोविंद ॥ ज्ञान विशुद्ध स्वयें सांगे ॥ ४५ ॥ संसारीं मुख्य तिन्ही गुण ॥ त्रिगुणास्तव त्रिविधजन ॥ त्यांचें स्वाभाविक कर्म जाण ॥ शांत, दारुण, आणि मिश्र ॥ ४६ ॥ त्या कर्मांचें निंदा स्तवन ॥ सर्वथा न करावें आपण ॥एकाचें वानितां भलेपण ॥ इतरा *कुडेपण तेणेंचि बोलें ॥४७॥ पांचांमाजीं भलेपण ॥ एकाचें वानितां आपण ॥ इतर जे चौवेजण ॥ ते सहजें जाण निंदिले ॥४८॥ वाम सव्य उभयभाग ॥ दों नांवीं एकचि अंग ॥ तेवीं प्रकृतिपुरुषात्मक जग ॥ चिद्रूपें चांग एकत्वें ॥४९॥ जग ×ब्रह्मरूपें परिपूर्ण ॥ यालागीं निंदा आणि स्तवन ॥ भूतमात्रांचें आपण ॥ कदाही जाण न करावें ॥ ५० ॥ सर्वभूतांच्या ठायीं ॥ आत्माराम असे पाहीं ॥ यालागीं निंदा स्तुति कांहीं ॥ प्राणांतींही न करावी ॥ ५१ ॥ उद्धवा निंदास्तुतींची कथा ॥ सांडी सांडी गा सर्वथा ॥ तरीच पावशी परमार्था ॥ निजस्वार्था निजबोधें ॥ ५२ ॥ 'सर्वभूतीं भगवद्भाव' ॥ हा ब्रह्मस्थितीचा निज निर्वाह ॥ यासि कदा नव्हे अपाव ॥ ऐक तो भाव उद्धवा ॥५३॥ जेथूनि येऊं पाहे अपाव॥तेथें दृढ वाढल्या भगवद्भाव॥तेव्हां अपावचि होय उपाव ॥ विघ्नासि ठाव असेना ॥ ५४ ॥ हे स्थिति सांडूनियां दूरी ॥ 'मी ज्ञाता' हा गर्व धरी ॥ निंदास्तुतींच्या ⁑भरोवरी ॥ तो अनर्थामाझारीं निमग्न ॥ ५५ ॥

॥ श्लोक ॥ परस्वभावकर्माणि यः प्रशंसति निंदति ॥ स आशु भ्रश्यते स्वार्था-
दसत्याभिनिवेशतः ॥२॥

॥ टीका ॥ मी एक सर्वज्ञाता पूर्ण ॥ ऐसा धरोनि ज्ञानाभिमान ॥ जगाचे देखे दोषगुण ॥ निंदी ब्राह्मण मुख्यत्वें ॥ ५६ ॥ पराचें स्वाभाविक कर्म ॥ स्वयें निंदणें हाचि अधर्म ॥ हनुमंत ज्ञाता परम ॥ त्यास वांनरी कर्म सोडीना ॥ ५७ ॥ नारद ज्ञातेपणें मोठा ॥ सत्य मानला श्रेष्ठश्रेष्ठां ॥ तोही कळिलावा कळिकांटा ॥ स्वभावचेष्टा अनिवार ॥५८॥ गरुड देवाचें वाहन॥ सदा तिष्ठे हात जोडून ॥ तोही करी सर्वभक्षण ॥ ऐसें कर्म जाण स्वाभाविक ॥ ५९ ॥ विचारितां जग त्रिगुण ॥ गुणानुसारें कर्माचरण ॥ तेथ पाहतां दोषगुण ॥ दोषी जाण पाहे तो ॥ ६० ॥ 'जगीं पहावी एकात्मता' ॥ हे ब्रह्मस्थिति गा सर्वथा ॥ सांडूनि गुणदोष पाहतां ॥ तो निजात्मघाता प्रवर्ते ॥ ६१ ॥ स्वभावें भेटल्या सज्जन ॥ शोधूनि पाहे दोषगुण ॥ यापरी ज्ञानाभिमान ॥ निंदा स्तवन उपजवी ॥ ६२ ॥ अभिमानाची जाती कैशी ॥ अधिक खवळे ज्ञात्यापाशीं ॥ तो दाखवी गुणदोषांसी ॥ निंदास्तवनांशीं उद्बोधी ॥ ६३ ॥ आपुले वृत्तीसी जो समान ॥ त्याचें अळुमाळ करी स्तवन ॥ आपणासि ज्याचा न मने गुण ॥ त्यासि निंदी आपण यथेष्ट ॥ ६४ ॥ निंदा स्तुति उपजे जेथ ॥ भेद क्षोभला उठे तेथ ॥ निःशेष निर्दाळी

---

१ शब्दास अगोचर जें ब्रह्म, त्याचा. २ पांच देवांमध्यें. ३ भरांत. ४ जातिस्वभाव. ५ वानरजातीय. ६ कळी लावणारा. ७ स्वकीय आत्मघाताविषयीं.

*ना. कडूपण. ×मो. ब्रह्मरूप. ⁑ना. परोपरी.

परमार्थ ॥ महाअनर्थ अंगीं वाजे ॥ ६५ ॥ निंदेसाठीं अनर्थ ॥ उंधार लागों नेदी तेथ ॥ रोकडा अंगीं आदळत ॥ निजस्वार्थघातक ॥ ६६ ॥ भेद समूळ मिथ्या येथ ॥ येचि अर्थीचा स्वप्नदृष्टांत ॥ स्वयें सांगे श्रीकृष्णनाथ ॥ दृढ परमार्थ साधावया ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ तैजसे निद्रयापन्ने पिंडस्थो नष्टचेतनः ॥ मायां प्राप्नोति मृत्युं वा तद्वन्नानार्थदृक् पुमान् ॥ ३ ॥

॥ टीका ॥ इंद्रियें जन्मलीं रजोगुणीं ॥ तन्मात्रा विषयो तमोगुणीं ॥ *तो इंद्रियीं विषयसेवुनी ॥ ठेलीं निद्रास्थानीं निश्चळ ॥ ६८ ॥ जागृती विश्व अभिमानी ॥ दोनी जाती ×मावळोनी ॥ तेव्हां मिथ्या प्रपंच स्वप्नीं ॥ तैसेज अभिमानी विस्तारी ॥ ६९ ॥ स्थूळ देह असे निश्चळ ॥ स्वप्नीं मनाचि केवळ ॥ विस्तारी गा भवजाळ ॥ लोक सकळ त्रिलोकी ॥ ७० ॥ त्या स्वप्नामाजिले सृष्टीसि जाण ॥ उत्पत्ति स्थिति आणि +निधन ॥ स्वयें देखतांही आपण ॥ जन्म मरण तें मिथ्या ॥ ७१ ॥ तेवीं हे अविद्या लक्षण दीर्घस्वप्न ॥ वृथा विस्तारी अभिमान ॥ तेथील मिथ्या जन्म मरण ॥ तूं ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ७२ ॥ तुझ्या निजस्वरूपाच्या ठायीं ॥ भेदाची तंव वार्ताही नाहीं ॥ तेथील शुभाशुभ कांहीं ॥ तुज सर्वथा पाहीं स्पर्शेना ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ किं भद्रं किमभद्रं वा द्वैतस्यावस्तुनः कियत् ॥ वाचोदितं तदनृतं मनसा ध्यातमेव च ॥ ४ ॥

॥ टीका ॥ जें जन्मलेंचि नाहीं ॥ तें काळें गोरें सांगू कायी ॥ ग्रहणेंवीण कांहीं ॥ खग्रास पाहीं दिसेना ॥ ७४ ॥ उखरीं भासलें मृगजळ ॥ तें खोल किंवा उथळ ॥ मधुर कीं क्षार केवळ ॥ सांगतां विकळ विवेक ॥ ७५ ॥ तेवीं मिथ्या प्रपंचाचें भान ॥ तेथील दोष आणि गुण ॥ निवडिती जे सज्ञान ॥ ते जाण निमग्न अज्ञानामाजीं ॥ ७६ ॥ जेवीं आंवसेचिये रातीं ॥ आंधारा जोखूं आंधळे येती ॥त्यांसि जोखितां दोहीं हातीं॥ एकही रती तुकेना॥७७॥ तेवीं प्रपंच मिथ्यापणें ॥तेथ कानीं जें ऐकणें ॥ कां डोळां जें देखणें॥ रसना जें चाखणें ०स्पर्शणें अंगें ॥ ७८ ॥ हाताचें घेणेंदेणें ॥ पायांचें जें चालणें ॥ वाचें जें बोलणें ॥ ⁂कल्पणें मनें ॥ ७९ ॥ अहंकाराचा बडिवार ॥ चित्ताचा चिंतनप्रकार ॥ बुद्धीचा *विवेकविचार ॥ हा समूळ व्यवहार मिथ्या तेथ ॥ ८० ॥ 'चित्रीं जळ आणि हुताशन ॥ अंत्यज आणि ब्राह्मण ॥ व्याघ्र आणि हरिण ॥ भासतांही जाण भिंतीचि भासे ॥ ८१ ॥ तेवीं हा प्रपंच द्वैतयुक्त ॥ भासतां भासे वस्तु अद्वैत ॥ शुभाशुभ कैंचें तेथ ॥ ब्रह्म सदोदित परिपूर्ण' ॥ ८२ ॥ केळीचें दिंडें उकलितां ॥ जो जो पदर तो तो रिता ॥ तेवीं देहादि प्रपंच विवंचितां ॥ मिथ्या तत्त्वतां मायिक ॥ ८३ ॥ मिथ्या प्रपंचाच्या ठायीं ॥ विचारितां सत्यत्व नाहीं ॥ शुभाशुभ तें लटिकें पाहीं ॥ सत्यवस्तूच्या ठायीं शुभाशुभ नाहीं अणुमात्र ॥ ८४ ॥ जो शुभाशुभ ह्मणे

---

१ अवकाश लागू देत नाहीं. २ जागृति अवस्था व तिचा अभिमानी विश्व असे दोन्ही. ३ स्वप्नावस्थेचा अभिमानी जो तैजस. ४ बरड जमिनीवर. ५ खांब, दांडा. ६ सूक्ष्मपणें यथार्थ विचार करिता.

*मा. ते इंद्रिय विषय सेऊनि. ×मो. हारपोनी. +मो. निदान. ०ना. घेणें गंध घ्राणें स्पर्शणें अंगें. ⁂ना. कल्पणें मनें तें मिथ्या. *ना. विवेक विस्तार.

आहे ॥ त्याची कल्पना त्यासंमुख होये ॥ निजकल्पना महाभयें ॥ जन्मरण वाहे नसतेंची ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ छायाप्रत्याव्हयाभासा ह्यसंतोऽप्यर्थकारिणः ॥ एवं देहादयो भावा यच्छंत्यामृत्युतो भयम् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ जळीं प्रतिबिंब साच नसे ॥ जो पाहे, तो बिंबला दिसे ॥ मिथ्या प्रपंचाचें रूप तैसें ॥ निजकल्पनावशें भासत ॥ ८६ ॥ तें प्रतिबिंब पाहोनि डोळां ॥ मी म्हणोनि लाविजे टिळा ॥ तेवीं देहाभिमानाचा सोहळा ॥ जीवाच्या कपाळा आदळे ॥ ८७ ॥ कां आपुलींचि उत्तरें ॥ पडिसादा होतीं प्रत्युत्तरें ॥ तें मिथ्याचि, परी साचोकारें ॥ श्रवणीं अक्षरें उमटती ॥ ८८ ॥ निश्चळ दोराचें निजरूप ॥ भ्रमें भासला प्रचंड सर्प ॥ तो मिथ्यापरी भयकंप ॥ महा खटाटोप उपजवी ॥ ८९ ॥ यापरी असत्य देहादिक ॥ देहाभिमानें जीवासि देख ॥ जन्मरणावर्त अनेक ॥ आकल्प दुःख भोगवी ॥ ९० ॥ 'आत्म्यापासोनि देहादिभेद ॥ उपजला हें बोले वेद ॥ वेदरूपें तूं प्रसिद्ध ॥ मिथ्या वेदवाद घडे केवीं ॥ ९१ ॥ ऐसा उद्धवाचा आवांका ॥ वेदवादाची आशंका ॥ समूळ कळली यदुनायका ॥ तेंचि उत्तर देखा देतसे ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ आत्मैव तदिदं विश्वं सृज्यते सृजति प्रभुः ॥ त्रायते त्राति विश्वात्मा न्हियते हरतीश्वरः ॥६॥ तस्मान्नह्यात्मनोऽन्यस्मादन्यो भावो निरूपितः॥ निरूपितेयं त्रिविधा निर्मूला भातिरात्मनि ॥

॥ टीका ॥ प्रपंच प्रत्यक्ष विद्यमान ॥ तेणें भेदयुक्त झालें मन ॥ तेथ बोधी माझें वेदवचन ॥ प्रपंच अभिन्न निजात्मता ॥ ९३ ॥ मूळीं ऊसाचि बीजीं विरूढे ॥ तो ऊंस ऊंसपणें कांडा चढे ॥ तेवीं प्रपंच वस्तुयोगें वाढे ॥ वाढें कोडें तद्रूप ॥ ९४ ॥ जैसें सोनियाचें झालें लेणें ॥ तें वर्ततां वर्ते सोनेपणें ॥ लेणें मोडलियाही सोनें ॥ सोनेंपणें स्वतःसिद्ध ॥ ९५ ॥ तिळाची पुतळी केली ॥ ते तिळावयवीं शोभे आली ॥ ते मोडितां न मोडितां भली ॥ असे संचली *तिळरूपें ॥ ९६ ॥ तेवीं उत्पत्ति आणि स्थिति निधन ॥ प्रपंचासि होतां जाण ॥ तेथ आदि मध्य अवसान ॥ वस्तु परिपूर्ण संचली ॥ ९७ ॥ ×एथ भासलें जें चराचर ॥ +तें मी आत्माचि साचार ॥ मजवेगळा जगासि थार ॥ अणुमात्र असेना ॥ ९८ ॥ एवं सृज्य आणि सजिता ॥ पाल्य आणि प्रतिपाळिता ॥ संहार आणि संहर्ता ॥ मी एकात्मता भगवंत ॥ ९९ ॥ एथ उत्पत्ति स्थिति निधन ॥ त्रिविधरूपें प्रपंच ※अभिन्न ॥ या सर्वांसि मी अधिष्ठान ॥ मज वेगळें जाण असेना ॥ १०० ॥ प्रपंच ०मजवरी आभासे ॥ परी मी प्रपंचामाजीं नसें ॥ जेवीं मृगजळाचेनि रसें ॥ सूर्य काळवंसें भिजेना ॥ १ ॥ त्रिविध प्रपंचाचें जाळ ॥ मजवरी दिसे हें निर्मूळ ॥ जेवीं गगन भासे सुनीळ ॥ परी तेथ अळुमाळ नीळिमा नाहीं ॥ २ ॥ जग प्रत्य-

---

१ जसें अरशांत प्रतिबिंब पाहून गंध लावतो, तसें येथें पाण्यांत प्रतिबिंब पाहून तें प्रतिबिंबच मी असें ठरविणें. २ प्रतिध्वनीनें. ३ खोटा. ४ भेदरहित. ५ उत्पन्न होई. ६ कांहीं कालानंतरही. ७ थोडकाही. ८ निळा रंग.

*मो. तिळपणें. ×ना. पृथक् भासलें. +ना. तें मिथ्या, आत्माचि साचार. ※ना. भिन्न. ०मो. मजमाजीं.

क्ष डोळां दिसे ॥ तें तूं निर्मूळ ह्मणसी कैसें ॥ हें आशंका मानिसी मानसें ॥ ऐक अनायासें तो बोध ॥ ३ ॥

॥ श्लोक ॥ इदं गुणमयं विद्धि त्रिविधं मायया कृतम् ॥ ७ ॥ एतद्विद्वान्मदुदितं ज्ञानविज्ञाननैपुणम् ॥ न निंदति नच स्तोति लोके चरति सूर्यवत् ॥ ८॥

॥ टीका ॥ अध्यात्म अधिदैव अधिभूत ॥ हें त्रिविध जग मायाकृत ॥ नसतें मजमाजीं भासत ॥ जाण निश्चित त्रिगुणात्मक ॥ ४ ॥ उद्धवा मिथ्या ह्मणोनि तूं एथ ॥ ह्मणें होशी उपेक्षायुक्त ॥ येणें मद्वाक्यें साधुसंत ॥ ज्ञानविज्ञानार्थ पावले ॥ ५ ॥ प्रपंचाचें मिथ्या भान ॥ तेंचि ज्ञानाचें मुख्य ज्ञान ॥ येणें ज्ञानें जो सज्ञान ॥ तोचि समान सर्वभूतीं ॥ ६ ॥ यालागीं भूतांचे गुणागुण ॥ कदा न वदे निंदा स्तवन ॥ सूर्याचेपरी जाण ॥ विचरे आपण समसाम्यें॥ ७ ॥ बदरिकाश्रम उत्तर देशीं ॥ सेतुबंध दक्षिणेसी ॥ सूर्य संमुख सर्वांसि ॥ विमुखता त्यासी असेना ॥ ८ ॥ सूर्य संमुख पूर्वेच्यांसी ॥ तोचि विमुख पश्चिमेच्यांसी ॥ नाहीं तेवीं मी सर्वत्र सर्वांसी ॥ विमुखता मजपासीं असेना ॥ ९ ॥ सामर्थ्यें तम दवडूनि जाण ॥ भूतांसि सूर्य भेटे आपण ॥ तेवीं जगाचे दवडूनि दोषगुण ॥ साधु सज्जन विचरती ॥ ११० ॥ जें हें बोलिलें ज्ञानलक्षण ॥ तेंचि सिद्धांचें पूर्णपण ॥ मुमुक्षीं हें अनुसंधान ॥ सावधान साधावें ॥ ११ ॥ हेंचि पाविजे निजज्ञान ॥ तेचि अर्थीचें साधन ॥ उद्धवालागीं श्रीकृष्ण ॥ स्वमुखें आपण सांगत ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ प्रत्यक्षेणानुमानेन निगमेनात्मसंविदा ॥ आद्यंतवदसज्ज्ञात्वा निःसंगो विचरेदिह ॥ ९ ॥

॥ टीका ॥ जें जन्मोनि नाशवंत ॥ ते सर्वही जाण असंत ॥ आसक्ति सांडोनियां तेथ ॥ उदास विरक्त वर्तावें ॥ १३ ॥ सटवेल्याचें बारसें ॥ कोणी न करितीचि उल्हासें ॥ नश्वर देह वाढतां तैसें ॥ मूर्ख मानसें सुखावती ॥ १४ ॥ उत्पत्तिविनाशलक्षण ॥ त्याचें देव सांगतो प्रमाण ॥ नित्य भूतांचें जन्ममरण ॥ देखिलें आपण प्रत्यक्ष ॥ १५ ॥ *अनुमानपरी साचार ॥ जें जें ×देखिजे साकार ॥ मेरुपृथ्व्यादि आकार ॥ तेही ※नश्वर प्रळयांतीं ॥ १६ ॥ येचि अर्थी वेदोक्ती ॥ नाशवंत अष्टधा प्रकृती ॥ जीवभाव नासे गा ०प्रांतीं ॥ गर्जती श्रुती येणें अर्थें ॥ १७ ॥ एथ आपुलाही अनुभव असे ॥ जड विकारी तें तें नासे ॥ हें कळत असे गा आपैसें ॥ जग अनायासें नश्वर ॥ १८ ॥ वडील निमाले देखती ॥ पुत्र पौत्र स्वयें संस्कारिती ॥ तरी मृत्यूची चिंता न करिती ॥ पडली भ्रांती देहलोभें ॥ १९ ॥ पुत्र पितरां पिंडदान देती ॥ उत्तम गति त्यांची चिंतिती ॥ आपुली गति न विचारिती ॥ नश्वर आसक्ती *निजलाभें ॥ १२० ॥ आत्मा केवळ प्रकाशघन ॥ प्रपंच जड मूढ अज्ञान ॥ हें ऐकोनि उद्धवें आपण ॥ देवासि प्रश्न पूसतु २१

१ मिथ्या, असत्य. २ मिथ्या ह्मणून कदाचित् त्याची उपेक्षा करशील. ३ जीवांस, सृष्टीस. ४साहवीनें झपाटला. ५ आपोआप. ६ मेले.

*ना. अनुमान करितां साचार. ×मो. दिसे. ※मो. होती नश्वर. ०ना. प्राप्ती. *ना. देहलोभें.

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ नैवात्मनो न देहस्य संसतिर्द्रष्टृदृश्ययोः ॥ अनात्मस्वदृशोरीश कस्य स्यादुपलभ्यते ॥ १० ॥

॥ टीका ॥ आत्मा नित्यमुक्त चिद्घन ॥ यासि न घडे भवबंधन ॥ देह जड मूढ अज्ञान ॥ त्यासि संसार जाण *घडेना ॥२२॥ एथ भवबंधन हृषीकेशी ॥ सांग पां बाधक कोणासी ॥ जरी तूं संसार नाहीं ह्मणसी ॥ तो प्रत्यक्ष जगासी जडलासे ॥ २३ ॥ आह्मांसि विचारितां जाण ॥ भवबंधासी न दिसे स्थान॥ येचि अर्थींचें +न घडतेपण॥उद्धव आपण सांगत ॥२४॥

॥ श्लोक ॥ आत्माऽव्ययोऽगुणः शुद्धः स्वयंजोतिरनावृतः ॥ अग्निवद्दारुवदचिद्देहः कस्येह संसृतिः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ आत्मा चिद्रूप अविनाशी ॥ गुण निर्गुण नातळे त्यासी ॥ कर्माकर्मपापपुण्यांसी ॥ ठाव त्यापाशीं असेना ॥ २५ ॥ परादिवाचा नव्हे उचार ॥यालागीं ×ह्मणिजे परात्पर ॥ प्रकृतिगुणीं ※अनिवार ॥ प्रकृतिपैर परमात्मा ॥ २६ ॥ जयाच्या स्वप्रकाशदीप्तीं ॥ रविचंद्रादि प्रकाशती ॥ प्रकाशें ०प्रकाशे त्रिजगती ॥ तेजोमूर्ती परमात्मा ॥ २७ ॥ ऐशिया आत्म्याच्या ठायीं ॥ भवबंध नलगे कांहीं ॥ सूर्य बुडे मृगजळाच्या डोहीं ॥ तैं आत्म्यासि पाही भवबंध ॥२८॥ खद्योततेजें सूर्य जळे ॥ बागुलाभेणें काळ पळे ॥ *भुंगीचेनि पांखवळें ॥ जैं उडे सगळें आकाश ॥ २९ ॥ वारा आडखुळिला आडीं पडे ॥ जैं थिल्लरामाजीं मेरु बुडे ॥ तरी भवबंध आत्म्याकडे ॥ सर्वथा न घडे गोविंदा ॥ १३० ॥ देहाकडे भवबंधन ॥ मूर्खही नमानिती जाण ॥ देह जड मूढ अज्ञान ॥ त्यासि भवबंधन कदा न घडे ॥३१॥ जैं दगडाचें पोट दुखे ॥ कोरडें काष्ठ चरफडी भुकें ॥ तैं देहाकडे यथासुखें ॥ भवबंध हरिखें 3लागता ॥ ३२ ॥ जैं डोंगरासि तरळ भरे ॥ मृत्तिका नाहाणालागीं झुरे ॥ कोळसेनि काळें होय आंधारें ॥ तैं 8भवबंधभारें देह दाटे ॥ ३३ ॥ ह्मणसी देहात्मसंगतीं ॥ घडे भवबंधाची प्राप्ती ॥ विचारितां तेहीअर्थीं ॥ न घडे श्रीपती तें ऐक ॥ ३४ ॥ आत्मा स्वप्रकाश महावन्ही ॥ देह तो जड मूढ काष्ठस्थानीं ॥ तो मिळतां आत्ममिळणीं ॥ सांडी जाळूनि तत्काळ ॥ ३५ ॥ जैं अग्निमाजीं संवादें ॥ कापूर आठ प्रहर नांदे ॥ तैं 9देहात्मनिजसंबंधें ॥ 2देह भवबंधें नांदता ॥ ३६ ॥ ह्मणसी काष्ठामाजीं अग्नि असे ॥ परी तो काष्ठचि होऊनी नसे ॥ मथूनि काढिल्या निजप्रकाशें ॥ जाळी अनायासें काष्ठातें ॥३७॥ तेवीं आत्मा देहामाजी असे ॥ परी तो देहचि होऊनि नसे ॥ देहप्रकाशक चिदंशें ॥ भवबंधपिसें त्या न घडे ॥ ३८ ॥ आशंका ॥ ह्मणशी आत्म्याचे निजसंगतीं ॥ जैं जळोनि जाय भूतव्यक्ती ॥ तैं भूतांची वर्तती स्थिती ॥ कैशा रीतीं तें ऐक ॥ ३९ ॥ छायामंडपीं दीपप्रकाशीं ॥ नाचवी कागदांच्या बाहुल्यांसी ॥ तेचि लावितां दीपासी ॥ जाळी अनायासीं त्या व्यक्ती ॥ १४० ॥ तेवीं आत्म्याचे स्वसत्ताशक्तीं ॥ भूतें दैवयोगें

१ मायेपरता. २ काळ. ३ आडांत. ४ अजीर्ण विकारानें होणारी हाग ओक वगैरे विकृती. ५ कोळशानें. ६ संसारबंधरूपपिशाच.

***ना. घडे केवीं. +मो. न होतेपण. ×मो. नांवें परात्पर. ※ना. अविकार. ०मो. प्रकाश त्रिजगतीं. *ना. भृंगीचेनि. 3मो. येवो शके. 8ना. क्रूरबंधभारें. 9ना. देहात्मानिज संबंधें. 2ना. देही भवबंधें नांदत.**

वर्तती ॥ स्वयंभ झाल्या आत्मस्थिती ॥ भूतव्यक्ती उरेना ॥ ४१ ॥ करितां आत्म्याचें अनुसंधान ॥ संसाराचें नुरे भान ॥ तेथ भूताकृति भिन्नभिन्न ॥ केंच्या जाण *अतिबद्ध ॥ ४२ ॥ यापरी भवबंधन ॥ मज पाहतां मिथ्या जाण ॥ भवबंधनालागीं स्थान ॥ नेमस्त जाण असेना ॥ ४३ ॥ आत्म्याच्या ठायीं ना देहीं ॥ उभयसंबंधींही नाहीं ॥ भवबंध मिथ्या पाही ॥ त्यासि ठावो कोठेंही असेना ॥ ४४ ॥ कोपों नको श्रीकृष्णनाथा ॥ माझेनि निर्धारें पाहतां ॥ भवबंध मिथ्या तत्त्वतां ॥ निश्चयें चित्ता मानलें ॥ ४५ ॥ ऐकोनि उद्धवाचें वचन ॥ हरिखें वोसंडला श्रीकृष्ण ॥ माझा उद्धव झाला सज्ञान ॥ निजात्मखूण पावला ॥ ४६ ॥ सत्य मिथ्या भवबंधन ॥ ऐकोनि उद्धवाचें वचन ॥ परमानंदें डोले श्रीकृष्ण ॥ जीवें निंबलोण करूं पाहे ॥४७॥ आत्म्यासी भवबंध नाहीं ॥ शेखीं न दिसे देहाच्या ठायीं ॥ हा विवेक नेणिजे जिहीं ॥ त्यांसि भवबंध पाही हरि सांगे ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ यावद्देहेंद्रियप्राणैरात्मनः संनिकर्षणम् ॥ संसारः फलवांस्तावदपार्थोऽप्यविवेकिनः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ जो वर्णाश्रमांहीपरता ॥ +जो बंधमोक्षां अलिप्तता ॥ जो ×देहद्वंद्वा नातळता ॥ तो उद्धवहितार्था हरि बोले ॥४९॥ मी कृश स्थूळ गौर श्याम ॥ हे देहाचे देहधर्म ॥ मी काणा-मुका बहिरा परम ॥ हे इंद्रियधर्म इंद्रियांचे ॥१५०॥ क्षुधातृषादि अनुक्रम ॥ हा प्राणांचा प्राणधर्म ॥ कामक्रोधादिलोभ संभ्रम ॥ हा मनोधर्म मनाचा ॥ ५१ ॥ ❋सत्वगुणाची जागृति ॥ रजोगुणें स्वप्नस्फूर्ती ॥ तमोगुणें जाड्य सुषुप्ती ॥ जाण निश्चितीं देहयोगें ॥ ५२ ॥ देहासि येतां मरण ॥ मेलों ह्मणती आपण ॥ देहासि जन्म होतां जाण ॥ जन्मलेपण स्वयें मानी ॥ ५३ ॥ इंद्रियें विषयो सेविती ॥ ते म्यां सेविले मानी निश्चितीं ॥ स्वर्गनरकभोगप्राप्ती ॥ सत्य मानिती देहात्मता ॥ ५४ ॥ अन्न आकांक्षी प्राण ॥ त्यातें भक्षी हुताशन ॥ तो साक्षी चिदात्मा आपण ॥ ह्मणे म्यां अन्न भक्षिलें॥५५॥ हे अवघे माझे धर्म॥ ऐसा आत्म्यासि जैं दृढ भ्रम ॥ तंव मिथ्याचि अतिदुर्गम ॥ संसार विषम भ्रमें भोगी ॥५६॥ त्या भोगाचें फळ गहन ॥ ०अविश्रम जन्ममरण ॥ स्वर्ग नरक पाप पुण्य ॥ भ्रमें आपण सत्य मानी ॥ ५७ ॥ संसार मुळीं निर्मूळ ॥ तोही *भ्रमफळें सदाफळ ॥ जो कां अविवेक्यांप्रती प्रबळ ॥ सर्वकाळ 6फळलासे ॥ ५८ ॥ जेथ 2सत्य अर्थ नाहीं ॥ तो 7अपार्थ ह्मणिजे पाही ॥ त्याचा फळभोग तोही ॥ बाळ बागुलन्यायीं[३] भोगावा ॥ ५९ ॥ आशंका ॥ गगनकमळांचीं माळा ॥ जैं वंध्यापुत्र घाली गळां ॥ तैं संसारभोगाचा सोहळा ॥ आत्म्याच्या जवळा देखिजे ॥ १६० ॥ ऐसें न घडे तें केवीं घडे ॥ तेचि अर्थांचें वाडेंकोडें ॥ श्रीकृष्ण उद्धवापुढें ॥ निजनिवाडें सांगत ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ अर्थे ह्यविद्यमानेऽपि संसृतिर्न निवर्तते ॥ ध्यायतो विषयानस्य स्वप्नेऽनर्थागमो यथा ॥ १३ ॥

---

१ स्थूलसूक्ष्मदेहद्वंद्वांत. २ निरुपयोगी, कवडी किमतीचा. ३ मिथ्यारूप.

*मो. अतिबद्ध. +मो. जो देहबंधा अलिप्तता. ×मो. देहद्वया. ❋मो. रजोगुणाची जागृती॥ सत्वगुणाची स्वप्न स्फूर्ति. ०मो. अनिवार जन्ममरण. *मो. भ्रमें फळे. 6ना. फळाशे. 2ना. प्राप्तार्थ. 7ना. अप्राप्तार्थ.

॥ टीका ॥ सत्यार्थ नसतांही संसार ॥ निवर्तेना अतिदुर्धर ॥ येचि अर्थाचा विचार ॥ निजनिर्धार अवधारी ॥ ६२ ॥ वंध्यापुत्राचिया ऐसें ॥ *संसारा असत्यपण नसे ॥ सत्य ह्मणों तरी हा नासे ॥ काळवेशें सहजेंची ॥ ६३ ॥ संसार जैं सत्य होता ॥ तैं ब्रह्मज्ञानेंही न नासता ॥ हा संतीसंत नये ह्मणतां ॥ अनिर्वाच्या कथा पैं याची ॥ ६४ ॥ अविचारितां याचें कोड ॥ +अविवेकें हा अतिगोड ॥ विषयध्यानें वाढे रूढ ॥ संकल्प सदृढ मूळ याचें ॥ ६५ ॥ हा नसताचि परी आभासे ॥ जेवीं निद्रिता स्वप्नीं अनर्थपिसें ॥ तेवीं संसार मायावशें ॥ विषयाध्यासें भोगवी ॥६६॥ जंव जंव विषयसेवन ॥ तंव तंव वाढे विषयध्यान ॥ विषयध्यासें भवबंधन ॥ सदृढ जाण उद्धवा ॥ ६७ ॥ विषयसेवनें भवबंधन ॥ जीवासि झालें दृढ पूर्ण ॥ तैं ×जीवन्मुक्तां विषयभान ॥ दैवयोगें जाण दिसताहे ॥ ६८ ॥ जीवन्मुक्तासि विषयप्राप्ती ॥ तेणें बुडाली त्याची मुक्ती ॥ ऐशी आशंका नधरी चित्तीं ॥ तेंचि श्रीपती विशद सांगे ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ यथा ह्यप्रतिबुद्धस्य प्रस्वापो बह्वनर्थभृत् ॥ सएव प्रतिबुद्धस्य न वै मोहाय कल्पते ॥ १४ ॥

॥ टीका ॥ सज्ञान आणि अज्ञान ॥ यांसि जें विषयसेवन ॥ त्याचा अनुभव भिन्न ॥ तेंही लक्षण अवधारी ॥ १७० ॥ जेवीं स्वप्नींची विषयप्राप्ती ॥ स्वप्नस्थ साचचि मानिती ॥ तेचि विषय जागृती स्फूर्ती ॥ परी सत्य प्रतीती त्या नाहीं ॥ ७१ ॥ तेवीं अज्ञाना विषयसेवन ॥ तेणें विषयासक्त होय मन ॥ तेंचि मुक्ताप्रती ॐविषय जाण ॥ मिथ्या दर्शन विषयांचें ॥७२॥ नटनाट्य लोकाचारीं ॥ संपादी ७स्त्रीपुरुष व्यवहारीं ॥ मुक्तासिही तैशी परी ॥ गृहादारीं नांदतां ॥ ७३ ॥ कां लेकराच्या खेळाप्रती ॥ तुळसीदळ घेऊनि हातीं ॥ वडे मांडे तूप क्षीर ह्मणतीं ॥ एकीं कल्पिती अनेकत्व ॥ ७४ ॥ तेवीं जीवन्मुक्तांसि देख ॥ जगीं विषयो अवघा एक ॥ त्यासि नानात्वें भाविती लोक ॥ परी तो अनेक देखेना ॥ ७५ ॥ दृढ धरोनि देहाभिमान ॥ मी माझें जें विषयस्फुरण ॥ तेंच भवबंधाचें कारण ॥ विशद श्रीकृष्ण सांगत ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ शोकहर्षभयक्रोधलोभमोहस्पृहादयः ॥ अहंकारस्य दृश्यंते जन्म मृत्युश्च नात्मनः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ देहाभिमानाचे पोटीं ॥ अनेक दुःखांचिया कोटी ॥ त्यांची संकळितें गुणगोठी ॥ कृष्ण जगजेठी सांगत ॥ ७७ ॥ देहाभिमानाचें कार्य एथ ॥ अद्वैतीं वाढवी द्वैत ॥ इष्टानिष्ट समस्त ॥ जग व्याप्त तेणें कीजे ॥ ७८ ॥ नश्वरा इष्टाचा नाश देख ॥ तेणें देहअहंता मानी दुःख ॥ यानांव गा 'शोक' ॥ सकळ लोक मानिती ॥ ७९ ॥ नश्वर विषयांची प्राप्ती ॥ तेथें आल्हाद *उपजे चित्तीं ॥ त्यानाव 'हर्ष' ह्मणती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १८० ॥ बळी मिळोनि समर्थ ॥ ९आप्त विषयो विभांडूं पाहत ॥ तेणें कासावीस होय चित्त ॥ 'भय' निश्चित यानांव ॥ ८१ ॥ ३आप्तकामाचें अंतरोधन ॥ ज्याचेनि अणुमात्र होय जाण ॥ त्याचें

१ नाहींसा होतो. २ कांहीं कालानें. ३ सत्यमिथ्या. ४ बोलण्यासही कठीण. ५ प्रसिद्ध. ६ कल्पित मनोरथ. ७ संक्षेपतः थोडक्यांत. ८ गुणकथा. ९ इष्टार्थीचें. १० प्रतिबंधन.

*ना. संसारा असतेपण नसे. +मो. अविकारास्तव. ×मो. जीवन्मुक्तासी विषय भोजन.

करूं धांवे हवेंन ॥ ' क्रोध ' संपूर्ण त्यानांव ॥ ८२ ॥ गांठी झाल्याही धनकोडी ॥ कवडी वेंचितां प्राण सोडी ॥ यानांव ' लोभाची ' जोडी॥कृपण परवंडी पुरुषाची ॥ ८३ ॥ कर्माकर्म हिताहित ॥ इष्टानिष्ट नाठवी चित्त ॥ विवेकशून्य *स्तब्धता प्राप्त ॥ ' मोह ' निश्चित यानांव ॥ ८४ ॥ नित्य करितां विषयसेवन ॥ मनीं विषयइच्छा गहन ॥ अखंड विषयाचें ध्यान ॥ ' स्पृहा ' जाण ती नांव ॥ ८५ ॥ इत्यादि हे ×नानागुण ॥ अथवा कां जन्ममरण ॥ आत्म्यासि संबंध नाहीं जाण ॥ हें +देहाभिमान स्वयें भोगी ॥ ८६ ॥ जागृति आणि देखिजे स्वप्न ॥ तेथ ०वसे देहाभिमान ॥ तेठायीं हे दिसती गुण ॥ सुषुप्तीसी जाण गुण नाहीं ॥८७ ॥ जेथ वृत्ति निरभिमान ॥ तेथ जन्ममरणादि हे गुण ॥ सर्वथा तुटती जाण ॥ गुणासि कारण अभिमान ॥ ८८ ॥ जळीं स्थळीं वायु झगटी ॥ जळीं तरंग, स्थळीं तुटी ॥ तैं तरंगता जळाचे पोटीं ॥ तेवीं शोकादिगुणकोटी अहंतेमाजीं ॥ ८९ ॥ बद्धता झाली अहंकारासी ॥ ह्मणसी मुक्ति व्हावी त्यासी ॥ ते अहंता लागली जीवासि ॥ तेंचि हृषीकेशी सांगत ॥१९०॥ अंत्यजाचा विटाळ ज्यासी ॥ गंगास्नानें शुद्धत्व त्यासी ॥ तें गंगास्नान अंत्यजासी ॥ शुद्धत्वासी अनुपयोगी ॥ ९१ ॥ तेवीं अहंता जडली जीवासी ॥ ते त्यागितां मुक्तत्व त्यासी ॥ परी मुक्तत्व ※अहंकारासी ॥ *कल्पांतेसी घडेना ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ देहेंद्रियप्राणमनोभिमानो जीवोंतरात्मा गुणकर्ममूर्तिः ॥ सूत्रं महानित्युरुधेव गीतः संसार आधावति कालतंत्रः ॥ १६ ॥

॥ टीका ॥ अनंत अपार ज्ञानघन ॥ मायातीत आत्मा पूर्ण ॥ तोचि झाला मायेचें अधिष्ठान ॥ अंतरात्मा जाण यालागीं ह्मणिपे ॥ ९३ ॥ माया व्यापूनि अपार ॥ यालागीं बोलिजे ' परमेश्वर ' ॥ मायानियंता साचार॥यालागीं ' ईश्वर ' ह्मणिपे तो ॥ ९४ ॥ तोचि अविद्येमाजीं प्रतिबिंबला ॥ यालागीं ' जीव ' हें नाम पावला ॥ तोचि देहाध्यासें प्रबळला ॥ ' अहंकार ' झाला याहेतू ॥ ९५ ॥ तो ३संकल्पविकल्पउपाधीनें ॥ स्वयें होऊनि ठेला ' मन ॥' त्या मनासि करावया गमन ॥ दशेंद्रियें जाण तोचि झाला ॥ ९६ ॥ त्या इंद्रियांचा आधार ॥ सुखदुःखभोगांचा निकर ॥ पापपुण्यांचा २चमत्कार ॥ देहाचा आकार तोचि झाला ॥ ९७ ॥ त्या देहाचें जें कारण ॥ सत्व रज तमोगुण ॥ ते तीन्ही गुण जाण ॥ तोचि आपण स्वयें झाला ॥ ९८ ॥ गुणक्षोभाचें निजवर्म ॥ झाला ८पंचविषय परम ॥ विषयभोगादि क्रिया कर्म॥ वेंय ५स्वधर्म होऊनि ठेला ॥९९॥ तिनी गुणांचें जन्मकारण ॥ झाला महत्तत्व सूत्र प्रधान ॥ एवं संसार अवघा जाण ॥ ईश्वर आपण स्वयें झाला ॥ २०० ॥ त्या संसाराची आधावती ॥ ०गुणसाम्यें तेचि प्रकृति ॥ तेचि उत्पत्ति स्थिती प्रळयार्थी ॥ ४क्षोभका शक्ती काळ तो झाला ॥ १ ॥ तो काळ आपल्या सत्ताशक्तीं ॥ उपजवी पाळी संहारी अंतीं ॥ ऐशा पुनः पुनः आवृत्ती ॥ नेणों किती करवीत ॥ २ ॥ एवं संसार तो ब्रह्मस्फूर्ती ॥ ७लीलाविग्रहें साकारस्थिती ॥

---

१ मारण. २ गोष्ट, प्रकार. ३ इच्छा. ४ अहंकारास. ५ समुदाय. ६ आदिहेतु, मूळकारण.

*मो. स्तब्ध. ×मो. नवगुण. +मो. देहाभिमानें. ०मो. प्रवेशे अभिमान. ※ना. अभिमानासी. *ना. कल्पनेसी. ३ना. संकल्प विकल्प पराधीन. २मो. प्रकार. ८मो. पंचविषयोपरम. ५मो. धर्माधर्म. ०मो. गुणसाम्या जे प्रकृति. ४ना. क्षोभक शक्ती. ७मो. बहुधारूपें साकारस्थिती.

मी विश्वेश्वर विश्वमूर्ती ॥ बहुधा व्यक्ती *मी एक ॥ ३ ॥ यालागीं जो जो पदार्थ दिसे ॥ तेणें तेणें रूपें आत्मा भासे ॥ मज वेगळा पदार्थ नसे ॥ हें मानी विश्वासें तो धन्य ॥ ४ ॥ मीचि एक बहुधा व्यक्ती ॥ वेदही साक्षी येचि अर्थीं ॥ विश्वतश्चक्षु यावेदोक्तीं ॥ श्रुति मज गाती सर्वदा ॥५॥ ऐसें असतां नवल कैसें ॥ जीव भुलला कल्पनावशें ॥ अहंता वाढली देहाध्यासें॥ तो ह्मणे देव न दिसे तिहीं लोकीं ॥ ६ ॥ सत्य मानूनि भेदभान ॥ जीव झाला अतिअज्ञान ॥ भुलला +आपण्या आपण ॥ देहाभिमान दृढ झाला ॥७॥ देहाभिमानाचें दृढपण ॥ तेंचि बद्धतेचें लक्षण ॥ देहाभिमानाचें निरसन ॥ मुक्तता जाण तीनांव ॥ ८ ॥ समूळ मिथ्या देहाभिमान ॥ मिथ्या भेदाचें भवभान ॥ त्याचें आद्यंतनिर्दळण ॥ ×होतें लक्षण हरि सांगे ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ अमूलमेतद्बहुरूपरूपितं मनोवचःप्राण शरीरकर्म ॥ ज्ञानासिनोपासनया शितेन छित्वा मुनिर्गां विचरत्यतृष्णः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ भेदरूपें भवभान ॥ मनसा वाचा कर्मप्राण ॥ देहद्वयाचें जें स्फुरण ॥ तें निर्मूळ जाण उद्धवा ॥ २१० ॥ ०भेदरूप भवजाळ ॥ विचारितां तें निर्मूळ ॥ विचित्र भासावया भवजाळ ॥ आत्म्यावेगळें स्थळ असेना ॥ ११ ॥ आत्म्याहूनि संसार भिन्न ॥ ह्मणती ते केवळ अज्ञान ॥ त्यांसि ❀१बहुरूपें भवभान ॥ देहाभिमान वाढवी ॥१२॥ त्या देहाभिमानाचे पोटीं ॥ कर्माकर्माची आटाटी ॥ जन्ममरणांचिया कोटी ॥ दुःखसंकटीं जीव भोगी ॥ १३ ॥ ऐसा दुःखदाता देहाभिमान ॥ समूळ जाणोनियां आपण ॥ त्याचें करावया निर्दळण ॥ अनुतापी पूर्ण जो स्वयें होये ॥ १४ ॥ तेणें आचार्यउपास्ती ॥ लाहोनि ज्ञानखड्गाची प्राप्ती ॥ गुरुवाक्यसाहणेप्रती ॥ *सतेजश्रुती खड्ग केलें ॥ १५ ॥ भववृक्षाचा समूळ कंद ॥ देहाभिमान अतिसबुद्ध ॥ 1अद्वैतसाधनें साधक शुद्ध ॥ तेणें समूळ छेद करावा ॥ १६ ॥ एवं छेदूनि देहाभिमान ॥ उरलेनि आयुष्यें जाण ॥ महीं विचरती सज्जन ॥ निरभिमान निजनिष्ठा ॥ १७ ॥ तेथ इच्छा निंदा द्वेष तृष्णा ॥ सर्वथा नातळे पैं जाणा ॥ मनाचि मुकलें मनपणा ॥ इच्छादि तृष्णा तेथ कैंची ॥१८॥ आशंका ॥ समूळ संसार निर्दळण ॥ करी ऐसें तें ज्ञान कोण ॥ त्या ज्ञानासि कोण साधन ॥ साधल्या ज्ञान फळ काय ॥ १९ ॥ याचें समूळ श्रवण ॥ उद्धवाचें वांछी मन ॥ तें जाणोनियां श्रीकृष्ण ॥ स्वयें निरूपण सांगत ॥ २२० ॥

॥ श्लोक ॥ ज्ञानं विवेको निगमस्तपश्च प्रत्यक्षमैतिह्यमथानुमानम् ॥ आद्यंतयोरस्य यदेव केवलं कालश्च हेतुश्च तदेव मध्ये ॥ १८ ॥

॥ टीका ॥ नित्यानित्य विवेक ॥ यानांव ज्ञान चोख ॥ देहद्वयाचा प्रकाशक ॥ आत्मा सम्यक जाणती ज्ञाते ॥ २१ ॥ सेवावया 3स्वानंदन्हाळी ॥ प्रथम उसांचीं पानें 6साळी ॥ मग ऊंस तोही बळें पिळी ॥ तोही रस आळी तैं शर्करा लाभे ॥ २२ ॥ ते शर्करा परिपाकबळें ॥ ते साकरचि केवळें ॥ केळें आणि नारेळें ॥ 7करी नानाफळें मुळीच्या गोड्या ॥२३॥

१ पुष्कळ प्रकारचा. २ पदार्थ. ३ द्वैतानें. ४ गुरूच्या उपासनेनें. ५ पृथिवीवर. ६ गोडी. ७ सोलणें, पाचोळा काढणें. ८ घट्ट करी.

*मो. मीचि झालों. +मो. आपणा आपण. ×ना. होय तें लक्षण. ०ना. भेद बहुरूप भेदमंडळ. ❀मो. भवरूपें भवमान. *मो. सतेजदीप्ती. 1मो. अद्वैत साधनीं. 3मो. स्वानंदरसन्हाळी. 6ना. सोली. 7मो. सेवी नानाफळें.

तेवीं स्थूळाचें निराकरण ॥ लिंगदेहाचें उपमर्दन ॥ अहंकाराचें निर्दळण ॥ करूनि पूर्ण ब्रह्म पावती ज्ञाते ॥ २४ ॥ तें ब्रह्म निर्गुण निराकार ॥ तद्रूप देखती चराचर ॥ यापरी विवेकचतुर ॥ वस्तूचा निर्धार जाणती ॥ २५ ॥ यापरी गा विचक्षण ॥ जाणती वस्तूचें लक्षण ॥ *यानांव पैं विवेकज्ञान ॥ उद्धवा जाण निश्चित ॥२६॥ वस्तु निःशब्द निर्गुण ॥ तेथ जें श्रुतीचें स्फुरण ॥ इत्थंभूत शब्दज्ञान ॥ वेद तो जाण निगम माझा ॥२७॥ तो मी वेदरूप नारायण ॥ यालागीं वेदवचन प्रमाण ॥ श्रुत्यर्थ शब्दज्ञान ॥ करी पावन पाठकां ॥ २८ ॥ जाणावया निजात्मस्वरूप ॥ देहादिविषयांचा अनुताप ॥ जेणें साधक होती निष्पाप ॥ यानांव तप उद्धवा ॥ २९ ॥ अनुतापें दमितां मन ॥ होय पापाचें क्षालन ॥ तेव्हां श्रुत्यर्थें आपण ॥ कल्पी अनुमान वस्तूचा ॥ २३० ॥ देह जड मूढ अचेतन ॥ तेथ चेतनात्मक नारायण ॥ देहाचें मानूनि मिथ्यापण ॥ अद्वैतीं मन ×सुसावे ॥ ३१ ॥ तें अद्वैतप्राप्तीचें लक्षण ॥ अनन्यभावें आपण ॥ सद्गुरूसि रिघावें शरण ॥ निरभिमान भावार्थें ॥ ३२ ॥ सद्भावें अनन्यशरण ॥ तो गुरुकृपा पावे आपण ॥ पाहोनि अधिकारलक्षण ॥ गुरु गुह्यज्ञान उपदेशी ॥ ३३ ॥ सर्वेही निष्कळ परब्रह्म ॥ हें श्रुतिगुह्य उत्तमोत्तम ॥ एथ भाग्यें जो सभाग्य परम ॥ त्यासीचि सुगम ठसावे ॥ ३४ ॥ गुरुवचन पडतां कानीं ॥ वृत्ति निजात्मसमाधानीं ॥ विनटोनि ठेली +चिद्घनीं ॥ सुखसमाधानीं स्वानंदें ॥ ३५ ॥ तयासि पुढती साधन ॥ अथवा कर्माचें कर्माचरण ॥ तेथ बोलों शके कोण ॥ वेदीं मौन घेतलें ॥ ३६ ॥ तेथ द्वंद्वांची निमाली स्फूर्ती ॥ सकळदुःखांची समाप्ती ॥ देहीं विदेहवस्तु प्राप्ती ॥ प्रत्यक्ष म्हणती या नांव ॥ ३७ ॥ पुसूनियां त्रिसराचा ठावो ॥ आठवेंवीण नित्य आठवो ॥ अखंड स्वरूपानुभवो ॥ ०प्रत्यक्ष पहाहो यानांव ॥३८॥ मी आत्मा स्वानंदकंद ॥ ऐसा अखंडत्वें परमानंद ॥ प्रत्यक्ष पदाचा निजबोध ॥ स्वयें गोविंद बोलिला ॥३९॥ हाचि बोध सभाग्याकडे ॥ श्रवणमात्रें ※आतुडे ॥ एका मननें जोडे ॥ एका सांपडे निजध्यासें ॥२४०॥ एकासि तो प्रत्यगावृत्तीं ॥ हा बोध ठसावे चित्तीं ॥ एका माझिया अद्वैतभक्तीं ॥ मी सगळा श्रीपती आतुडें ॥ ४१ ॥ निजबोध साधावया पूर्ण ॥ उद्धवा हें तीं मुख्य साधन ॥ एवं साधलिया निजज्ञान ॥ फळ कोण तें ऐक ॥ ४२ ॥ *जो मी सृष्टि आदि अनंतू ॥ नित्य मुक्तत्वें अहेतू ॥ तो मी भवमूळा मूळहेतू ॥ सृष्टिस्रजिता अच्युतू स्वलीला ॥ ४३ ॥ तेथ रजोगुणाचिये स्थिती ॥ स्रष्टृरूपें मीचि पुढती ॥ अद्वैतीं दावीं अनेक व्यक्ती ॥ सृष्टीची उत्पत्तिकर्ता तो मी ॥ ४४ ॥ जैसें मुळेंवीण सफळ झाड ॥ वाढविलें निजांगीं गोड ॥ तेवीं सृष्टिसंरक्षणीं कोड ॥ मज निचाडा चाड प्रतिपालनीं ॥ ४५ ॥ जेवीं बुद्धिबळें एका काष्ठाचे पोटीं ॥ तेथ राजा प्रधान पशु प्यादा उठी ॥ त्यांसि पूर्वपुण्य नाहीं गाठीं ॥ तेवीं निष्कर्मसृष्टिप्रकाशिता तो मी ॥ ४६ ॥ निष्कर्में जग समस्त ॥ स्रजिता मीमांसकमत ॥ ठकोनि ठेलें निश्चित ॥ जग सदोदित निष्कर्म ब्रह्म ॥ ४७ ॥ जेवीं बुद्धिबळाचा खेळ ॥ अचेतनीं युद्ध प्रबळ ॥ तेवीं लोकरक्षणीं कळवळ ॥ सृष्टिप्रतिपाळ मी कर्ता ॥ ४८ ॥ प्रकृतीच्या

१ ब्रह्मरूप. २ ज्ञानी. ३ पंडित. ४ मग्न होतें.

*मो. करूनिया संशयाचें छेदन. ×ना. सुखावे. +ना. चिद्गगनीं. ०ना. प्राप्ती पहाहो या नांव. ※ना. त्यां आतुडे. *मो. आद्यंत जो मी श्रुती अनंतु.

जडमूढ *सारी ॥ ×पुरुषाचेनि सचेतन निर्धारी ॥काळफांसे घेऊनि करी॥ खेळविता चराचरीं मी एक विष्णू ॥ ४९ ॥ तेथ अचेतना झुंजारीं ॥ न मरत्या महामारी ॥ एका जैत एका हारी ॥ उभयपक्षांतरीं खेळविता मी ॥२५०॥ सोंगटी निमालियापाठीं ॥ कवण पुण्यात्मा चढे वैकुंठीं ॥ कोण पड नरकसंकटीं ॥ तैसा जाण सृष्टि बंध मोक्ष ॥ ५१ ॥ तेवीं न मोडतां एकपण ॥ त्या खेळाच्या ऐसें जाण ॥ जगाचें करीं मी पालन ॥ दुजेपण नातळतां ॥ ५२ ॥ दोराचा सर्पाकार ॥ सबळ बळें मारी वीर ॥ तैसा सृष्टीसि संहार ॥ मी प्रळय रुद्र पैं कर्ता ॥५३॥ स्वप्नीं भासलें जग संपूर्ण ॥ तेथूनि जागा होतां आपण ॥ स्वप्न निर्दळितां कष्ट कोण ॥ तैसा मी जाण प्रळयकर्ता ॥५४॥ सृष्टीसि उत्पत्तिस्थिति निधन ॥ आत्मा आत्मत्वें अखंड पूर्ण ॥ तेंचि स्वरूप सज्ञान ॥ स्वानुभवें आपण होऊनि ठेले ॥ ५५ ॥ 'तें निजरूप झालों' म्हणणें ॥ हेंहि बोलणें लाजिरवाणें ॥ तें स्वयंभ असतां ब्रह्मपणें ॥ होणें न होणें भ्रममात्र ॥ ५६ ॥ मिथ्या दोराचा सर्पाकार ॥ भासतां तो असे दोर ॥ निवर्तल्या सर्प भरभार ॥ दोर तो दोर दोररूपें ॥ ५७ ॥ तेवीं सृष्टीसि उत्पत्ति होतां ॥ आत्मा जन्मेना तत्त्वतां ॥सृष्टीचा प्रतिपाळकारतां ॥आत्मा सर्वथा वाढेना ॥५८॥ सृष्टीसि महाप्रळय होतां ॥ आत्मा नायके प्रळयवार्ता ॥ उत्पत्तिस्थितिनिदानतां ॥ आत्मा तत्त्वतां अविकारी ॥ ५९ ॥ +एवं साधनीं साधूनि ज्ञान ॥ साधक झाले सज्ञान ॥ ते अबाधित ब्रह्म पूर्ण ॥ स्वयें आपण होऊनि ठेले ॥ २६० ॥ अज अव्ययें स्वानंदघन ॥ साधक झाले ब्रह्म पूर्ण ॥ हें ज्ञानाचें फळ संपूर्ण ॥ उद्धवा जाण निश्चित ॥ ६१ ॥ हें ज्ञानफळ आलिया हाता ॥ उत्पत्ति स्थिति प्रळय होतां ॥ अखंड परिपूर्ण निजात्मता ॥ ते ※सदृष्टांता हरि सांगे ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ यथा हिरण्यं सुकृतं पुरस्तात्पश्चाच्च सर्वस्य हिरण्मयस्य ॥ तदेव मध्ये व्यवहार्यमाणं नानापदेशैरहमस्य तद्वत् ॥ १९ ॥

॥ टीका ॥ मुकुट कुंडलें करकंकणें ॥ न घडितां सोनें सोनेंपणें ॥ त्याचीं करितां नानाभूषणें॥ लेणेंपणें उणें नव्हेचि हेम ॥ ६३ ॥ ते न मोडतां अळंकार ठसे ॥ सोनें अविकार संचलें असे ॥ तेवीं ०उत्पत्तिप्रळयविनाशें ॥ 1माझें स्वरूप चिदंशें अविनाशी ॥ ६४ ॥ माझें स्वरूप शुद्ध परब्रह्म ॥ तेथ नानारूप नानानाम ॥भासतांही जग विषम ॥ 7ब्रह्मसम समसाम्यें ॥६५॥ जेवीं सूर्याचे किरण ॥ सूर्यावेगळे नव्हती जाण ॥ तेवीं जग मजशीं अभिन्न ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ६६ ॥

॥ श्लोक ॥ विज्ञानमेतत्त्रियवस्थमंग गुणत्रयं कारणकार्यकर्तृ ॥ समन्वयेन व्यतिरेकतश्च येनैव तुर्येण तदेव सत्यम् ॥ २० ॥

॥ टीका ॥ सत्वगुणें जागरण ॥ रजोगुणें दिसे स्वप्न ॥ तमोगुणें सुषुप्ति जाण ॥ लागे संपूर्ण गाढ मूढ ॥ ६७ ॥ ऐसें तिहीं अवस्थायुक्त मन ॥ कार्य कर्तृत्व कारण ॥ त्रिविध जग भासे

---

१ सोंगट्या. २ खरोखर. ३ न जाहलेला. ४ नाशरहित. ५ आनंदपूर्ण. ६ सोनें. ७ रूप.

*ना. स्वारी. ×ना. पुरुषाच्या सचेतना निर्धारी. +मो. एवं साधुनी निजज्ञान. ※ना. सुवर्ण दृष्टांता. ०ना. उत्पत्ति स्थिति विनाशें. 1मो. माझें स्वरूप असे अविनाश. 7ना. परब्रह्म

संपूर्ण ॥ ब्रह्म समन्वयें जाण सदोदित ॥ ६८ ॥ मृत्तिकेवेगळा घट न दिसे ॥ तंतुवेगळा पट न प्रकाशे ॥ तेवीं मजवेगळें जग न दिसे ॥ जें भासे तें मद्रूप ॥ ६९ ॥ जो मी तिनी गुणांतें नातळता ॥ अवस्थात्रयातें नाकळता ॥ तिहीं अवस्थांतें प्रकाशिता ॥ तो मी चवथा जाण तुरीय ॥ ७० ॥ तिन्ही अवस्था तिन्ही गुण ॥ दृश्य द्रष्टा आणि दर्शन ॥ त्रिपुटी प्रकाशिता पूर्ण ॥ तो मी चवथा जाण तुरीय ॥ ७१ ॥ जो मी *तुरीय सच्चिद्घन ॥ त्या माझ्याठायीं अवस्थागुण ॥नभीं नीळिमा मिथ्या भान ॥ तैसे नसते जाण भासती ॥७२॥ आशंका॥ तिहीं अवस्थांचें ज्ञान पाहीं ॥ देखिजे समस्तांच्या ठायीं ॥ चवथें ज्ञान तुरीय कांहीं ॥ ऐकिलें नाहीं गोविंदा ॥ ७३ ॥ चौथें ज्ञान तुरीयावस्था ॥ मिथ्या ह्मणसी न विचारितां ॥ ×तेचि विखीं विशदार्था ॥ श्रीकृष्ण तत्त्वतां सांगत ॥ ७४ ॥ व्यतिरेकश्च ॥ देहादिप्रपंचव्यतिरेकता ॥ भूतीं भूतांचा लयो +पाहतां ॥ लीन झालिया गुणावस्था ॥ उरे मी चवथा तुरीय ॥ ७५ ॥ तें एवंविध बोलों जातां ॥ वेदीं मूग आरोगिले सर्वथा ॥ हें अनुभवैकवेद्य तत्त्वतां ॥ शब्दप्रागम्यता सरेना ॥ ७६ ॥ एथ नचले युक्तिप्रयुक्ती ॥ नचले जाणिवेची व्युत्पत्ती ॥ नचले ०लक्ष्य लक्षण स्थिती ॥ गुरुकृपाप्राप्ती तुरीय ॥ ७७ ॥ जागृत्यादि सर्वही सत्ता ॥ सुषुप्ति सर्वही ※असता ॥ त्याचा तुरीय मी प्रकाशिता ॥ मजवीण सर्वथा त्या भासती केवीं ॥ ७८ ॥ जो सुषुप्तीं साक्षित्व पावता ॥ तो मी तुरीय जाण पां चौथा ॥ त्या मज सत्य स्वरूपता ॥ केला निश्चितार्था निश्चयो वेदें ॥ ७९ ॥ त्या स्वरूपावेगळें एथ ॥ जें भासे तें मिथ्याभूत ॥ येचिअर्थी श्रीकृष्णनाथ ॥ असे सांगत निजबोधें ॥ ८० ॥

॥ श्लोक ॥ न यत्पुरस्तादुत यन्न पश्चान्मध्ये च तन्न व्यदेशमात्रम् ॥ भूतं प्रसिद्धं च परेण यद्यत्तदेव तत्स्यादिति मे मनीषा ॥ २१ ॥

॥ टीका ॥ जागृतीमाजीं जें जें दिसे ॥ तें तें जागृतीसवें नासे ॥ स्वप्नीं जें जें आभासे ॥ तें स्वप्नासरिसें मावळे ॥ ८१ ॥ जागृति स्वप्न निजकार्येंसी ॥ दोनी हारपती सुषुप्तीपाशीं ॥ सुषुप्ति हारपे जागृतीसी ॥ यापरी प्रपंचासी सत्यत्व नाहीं ॥ ८२ ॥ प्रपंच सृष्टीपूर्वीं नाहीं ॥ ⁹प्रळयानंतरें नुरेचि कांहीं ॥ मध्येंचि आभासे जो कांहीं ॥ तें मिथ्या पाहीं ⁵असंत ॥ ८३ ॥ प्रपंचाचें वोडंबर ॥ नामरूपाचे उभारी भार ॥ ते प्रत्यक्ष देखों नश्वर ॥ गंधर्वनगर तत्प्राय ॥ ८४ ॥ पित्यादेखतां पुत्र मरे ॥ पुत्रादेखतां पिता झुरे ॥ काळें काळ अवघेंचि सरे ॥ कोणीही नुरे कियेसी ॥ ८५ ॥ सागरीं ⁰लहरी उसासे ॥ ⁷उसासली ते सर्वेंचि नासे ॥ तेवीं नामरूपा आलें दिसे ॥ तें अनायासें नश्वर ॥ ८६ ॥ प्रपंच हें नाममात्र ॥ येरवीं परमात्मा मी स्वतंत्र ॥ एवं संसाराचें जन्मपत्र ॥ नेणोनि दुस्तर ⁸मानिती जीव ॥ ८७ ॥ प्रपंच ज्यापासूनि झाला ॥ जेणें सर्वार्थीं प्रकाशिला ॥ अंतीं ज्यामाजीं सामावला ॥ तो तद्रूप संचला निजात्मा ॥ ८८ ॥ शुक्तिकारजतन्यायें जाण ॥ प्रपंच ब्रह्मेंसी अभिन्न ॥ जें प्रपंचाचें स्फुरे

१ समाधींत भासणारा. २ खाले. ३ आपल्या कार्यासहित. ४ गाढनिद्रेमध्यें. ५ खोटें. ६ आकाशांत दिसणारे ढगांचें नगर. ७ शिंपीवर रुप्याचा भास, या न्यायानें.

*मो. तुरीय शब्दें चिद्घन. ×मो तेचि विशद पदार्था. +मो. होतां. ०मो. लय लक्षण स्थिती. ※ना. अवस्था. ⁹मो. प्रळयांतीं. ⁵मो. असत्य. ⁰मो. लहरीयांचे उसासे. ⁷मो. उसाळती. ⁸ना. भोगिती.

स्फुरण ॥ तें ब्रह्मचि पूर्ण उद्धवा ॥ ८९ ॥ ज्या माझेनि सत्य श्रुति स्मृती ॥ तो मी सत्यप्रतिज्ञ श्रीपती ॥ त्रिसत्य सत्य तुजप्रती ॥ सांगीतला निश्चितीं निजभावार्थ ॥ २९० ॥ ऐकोनि देवाचें वचन ॥ उद्धव आशंकी आपण ॥ एकाचेनि मतें जाण ॥ प्रपंच भिन्न मानिती ॥ ९१ ॥ प्रपंचासि देवो कांहीं ॥ निजांगीं आतळला नाहीं ॥ ऐसें तूं कल्पिसी कांहीं ॥ ऐक तेविषयीं सांगेन ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ अविद्यमानोऽप्यवभासते यो वैकारिको राजससर्ग एषः ॥ ब्रह्म स्वयंज्योतिरतो विभाति ब्रह्मेंद्रियार्थात्मविकारचित्रम् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ मुख्यत्वें मन विकारी पूर्ण ॥ त्यासि मिळूनि तिनी गुण ॥ नसताचि संसार जाण ॥ विचित्राभरण दाखवी ॥ ९३ ॥ मन बुद्धि चित्त अहंकार ॥ आणि अधिष्ठात्री सुर, नर ॥ हे सत्वगुणांचे विकार ॥ जाण साचार उद्धवा ॥ ९४ ॥ रजोगुणांचीं दशेंद्रियें ॥ पंचभूतें पंचविषय ॥ तमोगुणिया जन्म होय ॥ ते जनासि पाहे भुलविती ॥ ९५ ॥ जेवीं डोंबरियेचा[१] खेळ ॥ नसताचि भासे प्रबळ ॥ तेवीं त्रिगुणांचें विचित्र जाळ ॥ मिथ्या निर्मूळ आभासे ॥ ९६ ॥ ब्रह्म स्वयें अकारण ॥ स्वप्रकाशें प्रकाशघन ॥ तेंचि प्रपंचाचें महाकारण ॥ प्रकाशक जाण स्वयें झालें ॥ ९७ ॥ जेवीं छायामंडपींच्या नाना व्यक्ती ॥ *तद्रूप भासे दीपदीप्ती ॥ तेवीं जगदाकारें स्वयंज्योती ॥ भासें मी चिन्मूर्ती परमात्मा ॥ ९८ ॥ एवं प्रपंचाचें जें स्फुरण ॥ तें स्वप्रप्रकाश ब्रह्म पूर्ण ॥ हें हातवसूनि[२] ब्रह्मज्ञान ॥ विकल्पच्छेदन हरि सांगे ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ एवं स्फुटं ब्रह्म विवेकहेतुभिः परापवादेन विशारदेन ॥ छित्त्वात्मसंदेहमुपारमेत स्वानंदतुष्टोऽखिलकामुकेभ्यः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ पूर्वीं बोलिलों यथानिगुती ॥ ब्रह्मज्ञान नानायुक्ती ॥ तें करतैलामलकस्थिती[३] ॥ स्पष्ट प्रतीती प्रमाण ॥३००॥ वेदविवेक अनुमान॥ब्रह्मउपदेशाचें लक्षण॥ज्ञानाज्ञानाचें फळ पूर्ण॥ ×तुज म्यां संपूर्ण सांगितलें ॥१॥ तेथें +देहेंद्रियांचें मिथ्यापण ॥ देहात्मभावाचें निराकरण ॥ ब्रह्म अद्वयत्वें परिपूर्ण॥हें गुह्य ज्ञान प्रकाशिलें॥२॥ म्यां प्रकाशिलें *पूर्ण ज्ञान ॥ जें दुर्लभ दुर्गम ०दुष्प्राप्य जाण ॥ हेंचि सिद्धांचें समाधान ॥ हेंचि साधन साधकां ॥ ३ ॥ जें म्यां सांगीतलें ब्रह्मज्ञान ॥ हेंचि उपदेशशस्त्र तीक्ष्ण ॥ साधक साधूनियां पूर्ण ॥ संशय जाण छेदिती ॥ ४ ॥ म्यां सांगीतलें ब्रह्मज्ञान ॥ तेथ संदेह मानी मन ॥ तेणें संदेहोंसि देहाभिमान ॥ येणें शस्त्रें जाण ※छेदिती ॥ ५ ॥ यापरी संदेहछेदन ॥ करूनि द्वैताची बोळवण ॥ निर्दाळूनियां मीतूंपण ॥ स्वानंदीं निमग्न साधक ॥ ६ ॥ वर्णाश्रम कुळ जाती ॥ जीवशिवादिपदस्थिती ॥ यांची स्फुरेना अहंकृती ॥ या नांव ' उपरती ' उद्धवा ॥ ७ ॥ इहामुत्रादि फळें समस्तें ॥ कोण कामी त्या कामातें ॥ विषयीं विषय भोगातें ॥ सर्वथा तेथ असेना ॥८॥ यापरी नित्य निष्काम ॥

---

१ डोंबाऱ्याचा. २ हस्तगत करून. ३ करतळावर आवळा घेऊन दाखविल्यासारखें. ४ निरसन, परिहार.

*मो. तद्रूपें. ×मो. सांगितलें जाण यथानिगुती. +मो. दशेंद्रियांचें. *मो. निपुणज्ञान.
०मो. [illegible]

साधक झाले आत्माराम ॥ परमानंदीं निमग्न परम ॥ पावले उपरम येणें योगें ॥ ९ ॥ देहें-द्रियें असतां प्राण ॥ कैसेनि *गेला देहाभिमान ॥ उद्धवा ऐसें कल्पील मन ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ३१० ॥

॥ श्लोक ॥ नात्मा वपुः पार्थिवमिंद्रियाणि देवा ह्यसुर्वायुजलं हुताशः ॥
मनोन्नमात्रं धिषणा च सत्त्वमहंकृतिः खं क्षितिरर्थसाम्यम् ॥ २४ ॥

॥ टीका ॥ देह आत्मा नव्हे १पार्थिवपणें ॥ इंद्रियें आत्मा नव्हती येणें गुणें ॥ तीं तंत्र देहाचीं उपकरणें ॥ एकदेशीपणें व्यापार ॥ ११ ॥ इंद्रियअधिष्ठात्री देव ॥ तेही आत्मा नव्हती सर्व ॥ त्यांसि इंद्रियांचा अहंभाव ॥ आत्मपदीं ठाव त्यां कैंचा ॥ १२ ॥ देह चाळिता जो प्राण ॥ तोही आत्मा नव्हे जाण ॥ प्राण केवळ अज्ञान ॥ गमनागमन ×देहसंगें ॥ १३ ॥ प्राण जरी आत्मा होता ॥ तरी तो देहासवें २नवचंता ॥ यालागीं प्राणासि निजात्मता ॥ जाण सर्वथा घडेना ॥ १४ ॥ आत्मा पृथ्वी नव्हे ३जडपणें ॥ जळ नव्हे ४द्रवत्वगुणें ॥ अग्नि नव्हे ५दाहकपणें ॥ ६चंचळपणें नव्हे वायू ॥ १५ ॥ आत्मा ७नभ नव्हे ८शून्यपणें ॥ मन नव्हे ९संकल्पगुणें ॥ अंतः-करण नव्हे नश्वरपणें ॥ चित्त +चिंतनें नव्हे आत्मा ॥१६॥ आत्मा नव्हे अभिमान ॥ १०त्यासि सुखदुःखांचें बंधन ॥ बुद्धी आत्मा नव्हे जाण ॥ ꕥबोधकपण तीमाजीं ॥ १७ ॥ आत्मा नव्हे तिनी गुण ॥ गुणांमाजीं विकार पूर्ण ॥ महत्तत्व गुणाचें कारण ॥ तें आत्मा आपण कदा नव्हे ॥१८॥ प्रकृति जे गुण साम्यावस्था ॥ तेही आत्मा नव्हे तत्त्वतां ॥ आत्मदृष्टीं प्रकृति पाहतां ॥ मिथ्या तत्त्वतां ते होय ॥ १९ ॥ जेथ मूळप्रकृतीच वावो ॥ तेथ प्रकृतिकार्या कैंचा ठावो ॥ यापरी आत्मानुभवो ॥ निःसंदेहो भोगिती ॥ ३२० ॥ यापरी साधूनियां ज्ञान ॥ साधकीं छेदिला देहाभिमान ॥ ऐसे होऊनियां निरभिमान ॥ सदा सुखसंपन्न साधक ॥ २१ ॥ एवं जे नित्य निरभिमान ॥ त्यांसि प्रारब्धें विषयसेवन ॥ करितां न बाधी दोषगुण ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ समाहितैः कः करणैर्गुणात्मभिर्गुणो भवेन्मत्सुविविक्तधाम्नः ॥ वि-
क्षिप्यमाणैरुत किंनु दूषणं घनैरुपेतैर्विगतै रवेः किम् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ ०देहेंद्रियेंवेगळा पाही ॥ अपरोक्ष आत्मा जाणीतला जिहीं ॥ त्यांसि इंद्रियनेमें लाभ कायी ॥ विक्षेपें ३नाहीं हानि त्यांसी ॥ २३ ॥ दोराचा सर्प खिळोनि ११मंत्री ॥ मंत्रवादी निःशंक धरी ॥ ६न खिळितां जो धरी करीं ॥ त्यासिही न करी बाधा तो ॥ २४ ॥ जो मृग-जळीं पोहोनि गेला ॥ तो दैवांचा कडे पडिला ॥ पोहेचिना तो नाहीं बुडाला ॥ कोरडा आला ८ऐलतीरा ॥ २५ ॥ तेवीं देहेंद्रियांचें मिथ्याभान ॥ जाणोनि झाले जे सज्ञान ॥ त्यांसि

१ पृथ्वीचे विकारामुळें. २ न जाता. ३ पृथ्वी आत्मा नव्हे कारण तिच्यांत जडत्व हा गुण आहे आणि आत्मा तर निर्गुण. ४ द्रवगुणयुक्त आहे ह्मणून. ५दहन करण्याचा गुण आहे ह्मणून. ६चंचल आहे ह्मणून. ७ आकाश. ८ तें शून्याकार आहे ह्मणून. ९ संकल्प करणारें ह्मणून. १० अभिमानासि. ११ गती बंद करून, एके ठिकाणीं पक्का डांबून.

*मो. निघेल. ×ना. देहेनसी. +मो. चेतने. ꕥमो. बोधपण. ०मो. देहेंद्रियातीत. ३ना. पाही हानि. ६ना. मा जो खिळितां धरी. ८मो. अरतीरा.

इंद्रियांचें बंधन ॥ सर्वथा जाण अनुपेगी ॥ २६ ॥ जयासि माझें अपरोक्ष ज्ञान ॥ तेणें घालोनियां आसन ॥ अखंड धरितां ध्यान ॥ अधिक उपेग जाण असेना ॥ २७ ॥ जेवीं मी लीलाविग्रहधारी ॥ तेवीं तेही *वर्ततां शरीरीं ॥ ते इंद्रियकर्मांवारीं ॥ भवसागरीं न बुडती ॥२८॥ अथवा तो इंद्रियसंगती ॥ दैवें अनेकविषयप्राप्ती ॥ भोगितांही अहोरातीं ॥ ब्रह्मस्थिती भंगेना ॥ २९ ॥ स्थिति न भंगावया हेंचि कारण ॥ माझें स्वप्रकाश स्वानंदघन ॥ पावले निजधाम ब्रह्म पूर्ण ॥ +तेथ विषयस्फुरण बाधीना ॥ ३३० ॥ जेवीं सूर्य उगवोनि गगनीं ॥ लोक सोडवी निद्रेपासूनी ॥ ते लोक कर्मीं प्रवर्तवोनी ॥ अलिप्त दिनमणी जनकर्मां ॥ ३१ ॥ तेवीं मी परमात्मा स्वयंज्योती ॥ प्रभा ×प्रकाशीं त्रिजगतीं ॥ त्या जनकर्मांच्या क्रियाशक्ती ॥ मी अलिप्त निश्चितीं निजात्मा ॥ ३२ ॥ मुक्तासि स्त्रीपुत्रगृहसंग ॥ तेणें वेष्टला ※देखोनि चांग ॥ ह्मणसी केवीं मानूं निःसंग ॥ तें सांगे श्रीरंग रविदृष्टांतें ॥ ३३ ॥ श्लोकचरण ॥ घनैरुपेतैर्विगतैरवेः किम् ॥ उंच लक्षयोजनें ॥ रविमंडळ ॥ बारा योजनें मेघपडळ ॥ तेणें झांकोळिला केवळ ॥ लोक सकळ मानिती ॥३४॥ परी सूर्या आणि आभाळासी ॥ भेटी नाहीं कल्पांतेंसी ॥ तेवीं इंद्रियकर्म सज्ञानासी ॥ कदाकाळेंसी स्पर्शेना ॥ ३५ ॥ अभ्र आच्छादी जगाचे डोळे ॥ जग ह्मणे सूर्य आच्छादिला आभाळें ॥ ऐसें विपरीत ज्ञान कळे ॥ मायामेळें भ्रांतासी ॥३६॥ तें भ्रम आल्या गेल्यापाठीं ॥ सूर्यासि न पडे ०आटिवेठी ॥ तेवीं गृहदारासंगासाठीं ॥ न पडे संकटीं सज्ञान ॥ ३७ ॥ जेवीं सूर्यातें नातळे आभाळ ॥ तेवीं 2ज्ञात्यासि संग सकळ ॥ इंद्रियकर्मांचा विटाळ ॥ ज्ञात्यासी अळुमाळ लागेना ॥ ३८ ॥ ऐक त्या ज्ञात्याचें रूप परम ॥ तो देही असोनि परब्रह्म ॥ यालागीं त्यासि इंद्रियकर्में ॥ समविषम बाधीना ॥ ३९ ॥ ज्ञाता सर्वार्थीं अलिप्त ॥ तेंचि 7करावया सुनिश्चित ॥ दृष्टांतें श्रीकृष्णनाथ ॥ स्वयें सांगत साक्षेपें ॥ ३४० ॥

॥ श्लोक ॥ यथा नभो वाय्वनलांबुभूगुणैर्गतागतैर्वर्तुगुणैर्न सज्जते ॥ तथाक्षरं सत्वरजस्तमोमलैरहंमतेः संसृतिहेतुभिः परम् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ पृथ्वी जळ अनळ अनिळ ॥ यांसि नभ व्यापक सकळ ॥ परी पृथ्व्यादिकांचा मळ ॥ नभासि अळुमाळ लागेना ॥ ४१ ॥ नभ पृथ्वीरजें कदा न मैळे ॥ धुरंडेजेना धूमकल्लोळें ॥ अग्नीचेनि महाज्वाळें ॥ कदाकाळें जळेना ॥४२॥ वायूचेनि अति झडाडें ॥ आकाश कदाकाळें न उडे ॥ उदकाचेनि अतिचढें ॥ आकाश न बुडे सर्वथा ॥ ४३ ॥ कां सूर्याचे 1निदाघंकिरणीं ॥ नभ घामेजेना उन्हाळेनीं ॥ अथवा (हिमाचे 8हिमकणीं ॥ कांकडोनी हिंवेना ॥ ४४ ॥ पर्जन्य वर्षतां प्रबळ ॥ नभ वोलें नव्हे अळुमाळ ॥ यापरी नभ निर्मळ ॥ लात्रितांही मळ लागेना ॥ ४५ ॥ त्या आकाशा ऐसें अलिप्त ॥ जें क्षराक्षरा अतीत ॥ तें अक्षर परब्रह्म सदोदित ॥ त्रिगुणातीत चिन्मात्र ॥ ४६ ॥ जें अजरामर अविनाशी ॥ जें प्रकाशमान

१ निरुपयोगी. २ प्रत्यक्ष ज्ञान. ३ सूर्य. ४ चार लक्ष कोस. ५ मायेमुळें ६ वेरझार. ७ सोसाट्यानें ८ पुरानें. ९ उष्ण किरणांनीं. १० थंड होईना.

*मो. वर्तती. +मो. तेणें. ×मो. प्रकाशवी.※मो. दिसे.०ना. आडवेठी. 2मो. ज्ञानियासी. 7मो. कळावया. 1मो. कां सूर्याच्या दाघ किरणीं. (ना. हिमाचळाच्या. 8मो. हिमकिरणी

स्वप्रकाशीं ॥ ऐशिये वस्तूची प्राप्ती ज्यासी ॥ अद्वयत्वेंसी पावली ॥ ४७ ॥ जेवीं न मोडितां लागवेगें ॥ सोनटका सोनें झाला सर्वांगें ॥ तेवीं *करणीवीण येणें योगें ॥ जे झाले निजांगें परब्रह्म ॥४८॥ त्यांसि ×गुणाची त्रिगुणमागी ॥ लावितांही नलगे +अंगीं ॥ ०विषयी करितां विषयभोगी ॥ ते विषयसंगीं निःसंग ॥ ४९ ॥ आकाश जाळावयालागीं ॥ घृतें पेटविली महा आगी ॥ आकाश असतां अग्निसंगीं ॥ दाहो अंगीं लागेना ॥ ३५० ॥ घटीं चंद्रबिंब बुडालें दिसे ॥ तें घटासि स्पर्शलें नसे ॥ ओलें नव्हे जळरसें ॥ देहीं जीव असे अलिप्त तैसा ॥ ५१ ॥ ते घटीं कालविल्या शेण ॥ बिंबप्रतिबिंबा नलगे जाण ॥ तेवीं देहींचें पापाचरण ॥ जीवशिवस्थान ठाकीना ॥ ५२ ॥ घटीं कालविल्या कस्तूरी ॥ बिंब प्रतिबिंब सुवास न धरी ॥ तेवीं देहींच्या पापपुण्यांची थोरी ॥ जीवशिवावरी पावेना ॥५३॥ तेवीं गुणाचेनि ✻देहसंगें ॥ योगी वर्ततां येणें योगें ॥ 2ते भोगितांही विषयभोगें ॥ अलिप्त सर्वांगें सर्वदा ॥ ५४ ॥ आकाश असोनि अग्निमेळें ॥ अग्निज्वाळें कदा न जळे ॥ तेवीं ज्ञाता विषयकल्लोळें ॥ कदा काळें विषयी नव्हे ॥ ५५ ॥ हें कळलें ज्या भोगवर्म ॥ तो देहीं असोनि परब्रह्म ॥ त्यासी बाधीना 7भवभ्रम ॥ अक्षर परम स्वयें झाला ॥ ५६ ॥ ते अक्षर झाले ⁵आतां ॥ याही बोलासि ये लघुता ॥ 4जन ज्ञानीं अज्ञानीं वर्ततां ॥ अक्षरता अभंग ॥५७॥ ते विसरोनि ब्रह्मरूपता ॥ मी देही म्हणवी 6देहअहंता ॥ तेथें वाढली विषयावस्था ॥ दृढ बद्धता तेणें झाली ॥ ५८ ॥ ते निवारावया बद्धता ॥ त्यागावी विषयलोलुपता ॥ विषयत्यागेवीण सर्वथा ॥ नित्यमुक्तता वाढेना ॥ ५९ ॥ न जोडतां नित्यमुक्तता ॥ साधक जरी झाला ज्ञाता ॥ तरी तेणें ज्ञातेपणें सर्वथा ॥ विषयासक्तता न 1करावी ॥ ३६० ॥

॥ श्लोक ॥ तथापि संगः परिवर्जनीयो गुणेषु मायारचितेषु तावत् ॥ मद्भक्तियोगेन दृढेन यावद्रजो निरस्येत मनःकषायः ॥ २७ ॥

॥ टीका ॥ स्वरवर्णयुक्त संपूर्ण ॥ चहूं वेदीं झाल्या निपुण ॥ तेणें बळें विषयाचरण ॥ करितां दारुण बाधक ॥ ६१ ॥ सकळ शास्त्रांचें श्रवण ॥ करतळामळ झाल्या पूर्ण ॥ शब्दज्ञानाचें जें मुक्तपण ॥ 8तेंही विषयाचरण बाधक ॥ ६२ ॥ प्राणापानाचिया समता ॥ जरी ³काळवंचना आली हाता ॥ तरी विषयाची विषयावस्था ॥ जाण सर्वथा बाधक ॥ ६३ ॥ शापानुग्रहसमर्थ नर ॥ आम्ही ज्ञाते मानिती थोर ॥ त्यांसही विषयसंचार ॥ होय अपार बाधक ॥ ६४ ॥ आसन उडविती योगबळें ॥ दाविती नानासिद्धींचे सोहळे ॥ त्यांसही विषयाचे भोगलेळे ॥ होती निजबळें बाधक ॥ ६५ ॥ इतरांची कोण कथा ॥ मंत्रें मंत्रमूर्ति प्रसन्न असतां ॥ त्यासिही विषयावस्था ॥ जाण सर्वथा बाधक ॥ ६६ ॥ किंचित् झालिया स्वरूपप्राप्ती ॥ मी मुक्त हें स्फुरे स्फूर्ती ॥ तथापि विषयाची संगती ॥ त्यासिही निश्चितीं बाधक ॥ ६७ ॥ अभिमानाचें

१ एक प्रकारचें. सोन्याचें नाणें. एक पिवळ्या सुवासिक फुलाचें झाड. २ विषयासक्ति. ३ काळास फसविणें. ४ वर उचलती. ५ भोग घेण्याची लालूच. ६ ईश्वरस्वरूपप्राप्ति.

*मो. कारणेंवीण. ×मो. त्रिगुणांची गुणमागी. +ना. जगीं. ०मो. विषय. ✻ना. संदेहसंगें. 2ना. तेवीं विषय भोगितां विषयसंगें. 7मो. भोगभ्रम. 5ना. म्हणतां. 4ना. जगीं ज्ञानी. 6मो. विदेहता. 1ना. धरावी. 8ना. तेणेंही.

निर्दळण ॥ स्वयें करूनि आपण ॥ नित्यमुक्त न होतां जाण ॥ विषयाचरण बाधक ॥ ६८ ॥ जवीं चकमकेची आगी ॥ जाळूं न शके *नांटेलागी ॥ तेवीं ब्रह्मप्राप्ती प्रथमरंगीं ॥ प्रपंच-संगीं विनाशे ॥ ६९ ॥ विषय मिथ्या मायिक ॥ ×ते भोगीं जंव भासे हारिख ॥ तंवतंव विषय बाधक ॥ जाण निष्टंक उद्धवा ॥ ३७० ॥ तें त्यागावया विषयसेवन ॥ निर्दाळावा देहाभिमान॥ याचियालागीं माझें भजन ॥ साक्षेपें जाण करावें ॥ ७१ ॥ व्रत, तप, तीर्थ, दान ॥ करितां योग, याग, यजन ॥ वेदशास्त्रपुराण श्रवण ॥ तेणें देहाभिमान ढळेना ॥ ७२ ॥ भावें करि-तां माझें भजन ॥ समूळ तुटे देहाभिमान ॥ भक्ति उत्तमोत्तम साधन ॥ भक्ताआधीन परब्रह्म ॥ ७३ ॥ ज्ञान वैराग्य निवृत्ती ॥ धृति शांति ब्रह्मस्थिती ॥ त्यांची जननी माझी भक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७४ ॥ चहूं मुक्तीही वरती ॥ उल्हासे नांदे माझी भक्ती ॥ माझे भक्तीची अनिवार शक्ती ॥ +त्या मी निश्चितीं आकळलों ॥ ७५ ॥ माझें ०स्वरूप अनंत अपार ॥ तो मी भक्तीनें आकळलों साचार ॥ यालागीं निजभक्ताचें द्वार ॥ मी निरंतर सेवितसें ॥ ७६ ॥ भक्तीनें आकळलों मी जाण ॥ यालागीं मी भक्ताआधीन ॥ माझिये भक्तीचें महिमान ॥ मजही संपूर्ण कळेना ॥ ७७ ॥ बहुतीं करूनि माझी भक्ती ॥ मज ते मोक्षचि मागती ॥ उपे-क्षूनि चारी मुक्ती ॥ करी मद्भक्ती तो धन्य ॥ ७८ ॥ ऐशी जेथ माझी भक्ती ॥ तेथ पायां लाग-ती चारी मुक्ती ॥ त्यासि सर्वस्वें मी श्रीपती ॥ विकिलों निश्चितीं भावार्थें ॥ ७९ ॥ ते भक्ती मुख्यत्वें ज्यासी साधन ॥ यालागीं मी त्या भक्ताअधीन ॥ त्याचें कदाकाळें वचन ॥ *मी अणुप्रमाण नुलंघीं ॥ ३८० ॥ ते मज ह्मणती होय सगुण ॥ तैं मी सिंहै सूकर होय आपण ॥ त्यांलागीं मी विदेही जाण ॥ होय संपूर्ण देहधारी ॥ ८१ ॥ एका अंबरीषाकारणें ॥ दहा जन्म मज सोसणें ॥ अजत्वाचा भंग साहणें ॥ परी भक्तासी उणें येऊं नेदीं ॥ ८२ ॥ ꙮद्रौपदी नग्न करितां तांतडी ॥ तिळभरी होंनेदींच उघडी ॥ झालों नेसतां वस्त्राच्या कोडी ॥ भक्तसांकडीं मी निवारीं ॥ ८३ ॥ तो मी भक्तकाजसहाकारी ॥ अजन्मा त्यांचेनि जन्म धरी ॥ 1समहि वर्ते अरिमित्रीं ॥ भक्तकैवारी होऊनियां ॥ ८४ ॥ जो माझिया भक्तां हितकारी ॥ तो मज परम मित्र संसारीं ॥ जो माझ्या भक्तांसि वैर करी ॥ तो मी नानापरी निर्दळीं ॥ ८५ ॥ ऐसा मी भक्तसाह्य श्रीकृष्ण ॥ त्या माझें निजभजन ॥ न करूनियां अभाग्य जाण ॥ अधःपतन पावती ॥ ८६ ॥ ह्मणशी पाप असतां शरीरीं ॥ तुझें भजन घडे कैशापरी ॥ सकळ पापां-ची बोहरी ॥ माझें नाम करी निमिषार्धें ॥ ८७ ॥ ऐकोनि नामाचा गजर ॥ पळे महापातकां-चा भार ॥ नामापाशीं महापापासि थार ॥ अणुमात्र असेना ॥ ८८ ॥ माझिया 7निजनामापुढें ॥ सकळ पाप तत्काळ बुडे ॥ तें पाप नामस्मरत्याकडे ॥ केवीं बापुडें येऊं शके ॥ ८९ ॥ अव-चटें सूर्य अंधारीं बुडे ॥ तरी पाप नये भक्तांकडे ॥ भक्तचरणरेणु जेथ पडे ॥ तेथ समूळ उडे पापराशी ॥ ३९० ॥ माझें नाम ब्रह्मास्त्र जगीं ॥ महापाप तें बापुडें मुंगी ॥ नामापुढें उरावया

१ स्थानास. २ पूजन. ३ नृसिंहवतारीं. ४ वराहावतारीं. ५ अजन्मत्वाचा. ६ सत्वर. ७ कोट्यवधि. ८ पायांचा धूळ.

*ना. लांटेलागी. ×मो. ते भोगितां भासे हरिख. +मो. त्यांसी मी. ०ना. सुख अनंत. *मो. मी अणुमात्र लंघीना. ꙮना. द्रौपदीनें स्मरतां तातडी. 1मो. समोहिं वर्ते. 7ना. निज-भक्तापुढें.

लागीं ।। कैस त्याचे अंगीं असेना ।। ९१ ।। माझे नामाचा प्रताप ऐसा ।। माझे भक्तीची कोण दशा ।। माझे भक्तीचा पडलिया ठसा ।। तो नागवे सहसा कळिकाळा ।। ९२ ।। यालागीं माझें भजन ।। निर्दळी देहाभिमान ।। *माझेनि भजनेवीण जाण।। देहाभिमान तुटेना ।।९३।। जेणें तुटे देहाभिमान ।। तें कैसें ह्मणशी तुझें भजन ।। अभेदभावें भक्ति पूर्ण ।। तेणें देहाभिमान निर्दळे ।। ९४ ।। भगवद्भाव सर्वांभूतीं ।। या नांव गा अभेदभक्ती ।। हे आकळिल्या +भजनस्थिती ।। अहंकृती उरेना ।।९५।। माझें नाम ज्याचें वदनीं ।। माझी कीर्ति ज्याचे श्रवणीं ।। माझा भाव ज्याचे मनीं ।। ज्याचे करादिकरणीं क्रिया माझी ।। ९६ ।। जो जागृतीमाजीं पाहे मातें ।। जो स्वप्नीं देखे मज ×एकातें ।। जो मजवेगळें चित्त रितें ।।न राखे निश्चितें निजनिष्ठा ।।९७।। यापरी भजनस्थिती ।। त्रिगुणविकार मावळती ।। तेणें ०अहंकाराची निवृत्ती ।। विषयासक्ति निर्दळे ।। ९८ ।। भक्तांसि विषयसेवन ।। सर्वथा बाधक नव्हे जाण ।। तो विषय करी मदर्पण ।। तेणें बाधकपणा त्यासी ।। ९९ ।। नव्हे नाना साधनि विषयो त्यागिती ।। त्यागितां परमदुःखी होती ।। भक्त विषयो भगवंतीं अर्पिती ।। तेणें ते होती नित्यमुक्त ।। ४०० ।। ग्रासोग्रासीं हरिस्मरण ।। तें अन्नचि होय ब्रह्म पूर्ण ।। त्यासि नाहीं बाधकपण ।। ब्रह्मार्पण सहजेंची ।। १ ।। भक्तांची भजनस्थिती ।। ※विषयो मद्रूपता भाविती ।। तेणें मावळे विषयस्फूर्ती ।। नव्हती या रीतीं बाधक ।।२।। या परी माझें भजन ।। करी मनोमेळक्षाळण ।। विकारेंसि तिन्ही गुण ।। करी निर्दळण देहाभिमान ।। ३ ।। ऐसी न करिता माझी भक्ती ।। न निर्दळितां अहंकृती ।। करणें जे विषयासक्ती ।। ते जाण निश्चितीं बाधक ।। ४ ।। नातुडतां अकर्तात्मबोध ।। आदरूं नये विषयसंबंध ।। विषयांचा विषयद्वोध ।। अतिअशुद्ध बाधक ।। ५ ।। जरी विषय मिथ्या मायिक ।। तरी साधकां अति बाधक ।। येचि अर्थीं यदुनायक ।। विशदार्थें देख सांगत।। ६ ।।

।। श्लोक ।। यथामयोऽसाधुचिकित्सितो नृणां पुनःपुनः संतुदति प्ररोहन् ।।
एवं मनोऽपक्वकषायकर्म कुयोगिनं विध्यति सर्वसंगम् ।। २८ ।।

।। टीका ।। वैद्य नेणे रोगाचें लक्षण ।। नेणे धातु पुष्ट कीं क्षीण ।। नेणे पथ्य ना अनुपान ।। नाडीज्ञान कळेना ।। ७ ।। त्यापासाव वोखद घेतां ।। पुनः पुनः वाढे व्यथा ।। तेवीं *अवैराग्यें त्याग करिता ।। साधकां बाधकता अनिवार ।। ८ ।। हृदयीं नाहीं विषयनिवृत्ती ।। 7बाह्य त्यागें वाढवी विरक्ती ।। ऐसी जे बहिर्मुद्रास्थिती ।। ते जाण निश्चितीं 6कुयोगी ।। ९ ।। सांडोनियां भगवद्भजन ।। वेदविधिमार्गविहीन ।। ऐसें जें कां त्यागलक्षण ।। कुयोग संपूर्ण त्या नांव ।।४१०।। द्रव्यदाराविषयासक्ती ।। दृढ वासना असतां चित्तीं ।। बाह्य त्याग 8मिथ्या विरक्ती ।। कुयोग निश्चितीं या नांव ।। ११ ।। आह्मीं राजयोगी अतिश्रेष्ठ ।। ह्मणोनि विषय भोगी यथेष्ट ।। वोस पडली वैराग्यपेठ ।। कुयोग चोखट या नांव ।। १२ ।। आपुली चोरूनि विषयासक्ती ।।

१ बळ. २ नागविती. ३ हातादि इंद्रियांचे ठायीं. ४ मनोवासनाक्षय.

*मो. माझे निजभजनेवीण जाण. +मो. निजस्थिति. ×मो. एकांतें. ०मो. अहंकारादि निवृत्ती. ※ना. विषयीं. *ना. वैराग्य त्याग. 7ना. बाह्यत्याग वाढवी मिथ्या विरक्ती. 6मो. कुयोग. 8ना. विषयविरक्ती.

बाह्य मिरवी मिथ्या विरक्ती ॥ हेचि कुयोगाची स्थिती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ १३ ॥ ऐशिया कुयोगियांसि जाण ॥ पुढती जन्म पुढती मरण ॥ दुःखावर्तीं पडिलें पूर्ण ॥ सोडवी कोण तयांसी ॥ १४ ॥ नव्हेचि ये लोकींचा विषय भोग ॥ नव्हेचि परमार्थी शुद्ध त्याग ॥ अंतरला उभय प्रयोग ॥ दुःख भोग कुयोग्या ॥ १५ ॥ परमार्थ *त्यागसाधन ॥ करितां अंतराय आलें विघ्न ॥ तयासि अवगती नव्हे जाण ॥ जरी अनुताप पूर्ण स्वयें उपजे ॥१६॥

॥ श्लोक ॥ कुयोगिनो ये विहितांतरायैर्मनुष्यभूतैस्त्रिदशोपसृष्टैः ॥ ते प्राक्तनाभ्यासबलेन भूयो युंजंति योगं नतु कर्मतंत्रम् ॥ २९ ॥

॥ टीका ॥ ब्रह्मज्ञानार्थ +केला त्याग ॥ अभ्यासही मांडिला सांग ॥ मध्येंचि वोढवला उपसर्ग ॥ विघ्नें अनेक साधकां ॥ १७ ॥ उपजे कामाचा अतिवेग ॥ खवळे क्रोधाची लगबग ॥ शिष्यसुहृदांचे उद्वेग ॥ ×मानी उबग स्वहिताचा ॥ १८ ॥ दारारूपें उपसर्ग ॥ देव देती पैं अनेग ॥ ऐसा अंतरायीं योगभंग ॥ होतां अनुराग उद्धरी ॥ १९ ॥ अभ्यास करितां अतिनिगुती ॥ दैवें अंतराययोग छळिती ॥ तेथ निर्वेद उपजल्या चित्तीं ॥ तोचि अभ्यास पुढतीं करी योगी ॥४२०॥ ※निजयोगअभ्यासबळें ॥ जाळी अंतरायदोष बळें ॥ परी कर्माची कमेठ जाळें ॥ योगी कदाकाळें स्पर्शेना ॥२१॥ ०अंतरायीं योग छळितां जाण ॥ जरी योगी पावला मरण ॥ तरी तो नव्हे कर्माधीन ॥ हें श्लोकार्धें श्रीकृष्ण बोलिला स्वयें ॥ २२ ॥

॥ पूर्वश्लोकार्ध ॥ ते प्राक्तनाभ्यासबलेन भूयो युंजंति योगं न तु कर्मतंत्रम् ॥

॥ टीका ॥ पूर्वीं करितां योगसाधन ॥ अदृष्टगतीं ०अंतराय जाण ॥ योगी पावल्याही मरण ॥ 3गति कोण तयासी ॥ २३ ॥ ०अंतरायपरतंत्र ॥ झाल्या योगी पावे जन्ममात्र ॥ तेथही नादरी कर्मतंत्र ॥ पूर्वाभ्यासें स्वतंत्र प्रवर्ते योगी ॥ २४ ॥ मार्गस्था मार्गीं गुंती ॥ पडोनियां 1लागली वस्ती ॥ तो येरे[६] दिवशीं तेचि पंथीं ॥ लागे निश्चितीं 4निजमार्गीं ॥ २५ ॥ यापरी योगी आपण ॥ प्राक्तनसंस्कारें जाण ॥ योगाभ्यास 2करी पूर्ण ॥ परी कर्माधीन कदा नव्हे ॥२६॥ 6साधनीं असतां माझी भक्ती ॥ तैं अणुमात्र नपडे गुंती ॥ मी भक्तकैवारी श्रीपती ॥ राखें अहोरात्रीं निजभक्तां ॥ २७ ॥ जेथ माझे भक्तीची आवडी ॥ तेथ विघ्नें केवीं रिघती बापुडीं ॥ महाविघ्नांचिया कोडी ॥ माझें नाम विभांडी उद्धवा ॥ २८ ॥ 0भजनहीन योगीश्वर ॥ अंतरायें पावे जन्मांतर ॥ तरी तो कर्मी कर्मपर ॥ नव्हे साचार पूर्वसंस्कारें ॥ २९ ॥ जे पावले जीवन्मुक्ती ॥ तेही प्रारब्धें कर्मीं वर्तती ॥ मा योगभ्रष्ट कर्म त्यागिती ॥ घडे कैशा रीतीं ह्मणशील ॥ ४३० ॥ मुक्ताचें जें 5मोक्षस्थान ॥ तेंचि साधकाचें मुख्य साधन ॥ यालागीं त्या 7दोघांही जाण ॥ कर्मबंधन बाधीना ॥ ३१ ॥ मी एक कर्मकर्ता ॥ ऐशी ज्यास नुपजे अहंता ॥ त्यासिही जाण सर्वथा ॥ कर्मबंधकता स्पर्शेना ॥ ३२ ॥

---

१ ज्ञान. २ बाधा, उपद्रव. ३ विघ्नांनीं. ४ वैराग्य. ५ हानि. ६दुसऱ्या. दिवशीं. ७पूर्वजन्मांत केलेल्या संस्कारांनें. ८ नष्ट करी.

*ना. त्यागेंसी साधन. +मो. केवळ त्याग. ×ना. मनीं. ※मो. निजयोगें. ०मो. अंतरायें. 3ना. स्थिति. 1मो. केली. 4ना. तेचि मार्गीं. मो. सुपंथें. 2मो. करितां. 6मो. साधली. 0मो. भजनेंवीण 5मो. मुक्तस्थान. 7मो. दोघांसी.

॥ श्लोक ॥ करोति कर्म क्रियते च जंतुः केनाप्यसौ चोदित आनिपातात् ॥ न तत्र विद्वान् प्रकृतौ स्थितोऽपि निवृत्ततृष्णः स्वसुखानुभूत्या ॥ ३० ॥

॥ टीका ॥ जन्मापासूनि मरणांत ॥ प्राणी जें जें कर्म करित ॥ तेंतें कोणी एक प्राचीन एथ॥ असे वर्तवीत निजसत्तां ॥ ३३ ॥ तेथ सज्ञान आणि अज्ञान ॥ *प्राचीनकर्मे कर्माधीन ॥ अज्ञानासि अहंकर्तेपण ॥ +ज्ञाते निरभिमान वर्तती कर्मीं ॥ ३४ ॥ ह्मणसी देहीं असतां प्राण ॥ केवीं ×तुठी देहाभिमान ॥ ज्ञाता स्वसुखानुभवें पूर्ण ॥ अहंकर्तेपण त्या स्फुरेना ॥ ३५ ॥ दोराचे सर्पाचा महाधाक ॥ दोर जाणितल्या तुपजे देख ॥ तेवीं अनुभविल्या ब्रह्मसुख ॥ ०अहंता बाधक स्फुरेहिना ॥ ३६ ॥ ऐक योगभ्रष्टाचें लक्षण ॥ ☼त्याचा प्राचीनसंस्कार जाण ॥ उपजोंनेदी देहाभिमान ॥ योग संपूर्ण सिद्धयर्थ ॥ ३७ ॥ जे देहीं नित्य निरभिमान ॥ तेचि ब्रह्मसुखें सदा संपन्न ॥ त्यांसि ¹देहींचें कर्माचरण ॥ सर्वथा जाण बाधीना ॥ ३८ ॥ ज्ञाता देहकर्मासि अलिप्त ॥ हेंहीं अपूर्व नव्हे एथ ॥ तो देहीं असोनि देहातीत ॥ तेंचि कृष्णनाथ स्वयें सांगे ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ तिष्ठंतमासीनमुत व्रजंतं शयानमुक्षंतमदंतमन्नम् ॥ स्वभावमन्यत् किमपीहमानमात्मानमात्मस्थमतिर्न वेद ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ देह उभें असतां जाण ॥ ज्ञाता न देखे उभेपण ॥ मा बैसल्या बैसलेपण ॥ मानी कोण देहाचें ॥ ४४० ॥ परिपूर्ण ब्रह्माच्याठायीं ॥ उठणें बैसणें दोनी नाहीं ॥ज्ञाता तेंचि झाला पाही ॥ ऊठ बैस कांहीं जाणेना ॥ ४१ ॥ दोराचा सर्प उपजला ॥ भोग भोगूनि स्वयें निमाला ॥ सत्यत्व नाहीं या बोला ॥ तैसा देहो झाला मुक्तासी ॥ ४२ ॥ देह दैवें असे एकदेशीं॥ ज्ञाता सर्वत्र देखे आपणासी ॥ देह जातां ⁹परदेशासी ॥ ज्ञाता गमनासी देखेना ॥ ४३ ॥ वस्तु वस्तुत्वें परिपूर्णपणें ॥ तेथ कैंचें असणें कैंचें जाणें ॥ ज्ञाता सदा तद्रूपपणें ॥ राहणें जाणें स्पर्शेना ॥ ४४ ॥ ज्ञाता स्वयें रिघे शयनीं ॥ परी शेज बाज न देखे अवनी ॥ मी निजेलों हेंही नमनी ॥ निजीं निजरूपपणीं सर्वदा ॥ ४५ ॥ ज्ञाता जेवूं बैसे निजसुखें ॥ परी ‘ मी भुकेलों ’ हें न देखे ॥ रसने नेणतां सर्व रस चाखे ॥ ⁵जेवीं येणें सुखें निजगोडी ॥४६॥ दिसे यावत्तृप्त जेविला ॥ परी तो धाला ना भुकेला ॥ तो उच्छिष्टही नाहीं झाला ॥ शेवीं आंचवला संसारा ॥ ४७ ॥ जरी तो स्वभावें सांगे गोष्टी ॥ तरी अबोलणें घाली शब्दाच्या पोटीं ॥ बोलीं अतिरसाळ गोडी उठी ॥ तरी न सुटे मिठी मौनाची ॥ ४८ ॥ ‘ मी एक चतुर बोलका ’ ॥ हाही तुठी त्या ओंवांका ॥ बोल बोलूनेणे फिका ॥ बोलोनि नेटका अबोलणा ॥ ४९ ॥ ज्ञाता पाहे निजात्मसुखें ॥ माझें तुझें हेंही वोळखे ॥ परी तो डोळांचि न देखे ॥ देखे आपणासारिखें त्रैलोक्य ॥ ४५० ॥ तो जें दृश्य पाहों बैसे ॥ तें दृश्याचा ठावोचि पुसे ॥ जें देखे तें आपण्याऐसें ॥ निजात्मसौरसें जग देखे ॥ ५१ ॥ करूनि डोळयांचा अंत ॥ ज्ञाता

१ पूर्वजन्मांतलें कर्म. २ देहाभिमान नसलेला, देहानें मर्यादित नसलेला. ३ ब्रह्म. ४ ब्रह्मरूप होऊन गेल्यामुळें. ५ अभिमान. ६ ब्रह्मानंदरसानें.

*मो. प्राचीन कर्माधीन. +मो. ज्ञानी. ×मो. तुटे. ०मो. अहंबाधक स्पर्शेना. ☼मो. त्याचे प्राचीन संस्कारें जाण. ¹मो. देहाचें. ⁹मो. विदेशासी. ⁵मो. जेवणें निजसुखें निजगोडी.

देखणेपणें पाहत ॥ त्या देखण्याचा *निजस्वार्थ ॥ न चढे हात वेदशास्त्रां ॥ ५२ ॥ जाणे शब्दीं-चें शब्दज्ञान ॥ 'मी श्रोता' हें नुठी आठवण ॥ उपेक्षूनियां +देहींचे कान ॥ करी श्रवण सर्वांगें ॥ ५३ ॥ यापरी स्वयें सज्ञान ॥ होऊनियां सावधान ॥ सोलूनियां शब्दज्ञान ॥ करी श्रवण स्वभावें ॥ ५४ ॥ जाणे सुवास ×दुर्वास ॥ भोगीं न धरी ⁂नाकाची आस ॥ सुमनास-बाह्य जो सुवास ॥ तो भोगी सावकाश सर्वदा ॥ ५५ ॥ मृदुकठिणादि स्पर्श जाणे ॥ परी 'मी जाणतों हें स्फुरोंनेणे ॥ अंगा लागे तें निजांग करणें ॥ हा स्पर्श भोगणें सज्ञानीं ॥ ५६ ॥ ज्ञाता चालता दिसे चरणीं ॥ परी तो चालतां स्वयें आचरणीं ॥ स्वेच्छा हिंडतांही अवनीं ॥ तो ठायाहूनी ढळेना ॥ ५७ ॥ हस्तव्यापारीं देतां दान ॥ 'मी दाता' ही नुठी आठवण ॥ *देतें घेतें होय आपण ॥ यापरी सज्ञान वर्तवी कर ॥ ५८ ॥ कायिक वाचिक मानसिक ॥ कर्म निपजतां स्वाभाविक ॥ ज्ञाता ब्रह्मरूपें ०निर्दोख ॥ देहासि देख स्पर्शेना ॥ ५९ ॥ अकर्तात्मनिजसत्ता ॥ 5ज्ञाता सर्वकर्मीं वर्ततां ॥ न देखे कर्म क्रिया कर्तव्यता ॥ निजीं निजात्मता निजबोधें ॥ ४६० ॥ ज्ञाता नित्य निजात्मसुखें ॥ देहीं असोनि देह न देखे ॥ तो देहकर्मीं केवीं आडके ॥ पूर्ण परमात्मसुखें संतुष्ट ॥ ६१ ॥ जगासि लागलें कर्मबंधन ॥ तेथें खातां जेवितां सज्ञान ॥ केवीं न पवे कर्मबंधन ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ६२ ॥

॥ श्लोक ॥ यदि स्म पश्यत्यसदिंद्रियार्थं नानानुमानेन विरुद्धमन्यत् ॥ न मन्यते वस्तुतया मनीषी स्वाप्नं यथोत्थाय तिरोदधानम् ॥ ३२ ॥

॥ टीका ॥ हो कां लौकिकाचेपरी ॥ ज्ञाता वर्ते लोकाचारीं ॥ तोही प्रपंचामाझारीं ॥ कर्में करी लौकिकें ॥ ६३ ॥ ज्ञाता प्रपंचीं वर्ततां ॥ प्रपंचीं दिसे यथार्थता ॥ तेणें प्रपंचामाजीं तत्त्वतां ॥ निजात्मता वश केली ॥६४॥ परी कार्य कर्म कर्तव्यता ॥ हे ज्ञात्यासि नाहीं अहंता ॥ तेणें प्रपंचामाजीं निजात्मता ॥ निश्चयें तत्त्वतां वश्य केली ॥ ६५ ॥ विषयादि प्रपंचभान ॥ सत्य मानिती अज्ञान ॥ तो प्रपंच देखती सज्ञान ॥ ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ६६ ॥ साकरेचा इंद्रावर्ण ॥ घड्ड जाणों गोड, नेणों कडू ॥ तैसा प्रपंचाचा पडिपाडू ॥ लाभ आणि नाडू ज्ञानाज्ञानें ॥६७॥ सुवर्णाची 2केली खोटी ॥ मूर्ख मानिती केवळ गोटी ॥ ज्ञाते घालूनियां मिठी ॥ घेती ज्ञानदृष्टीं बहुमोलें ॥६८॥ तेवीं सांसारिक क्रिया कर्म ॥ मूर्खांमूर्खपणें भासे विषम ॥ तेंचि ज्ञात्यासि परब्रह्म ॥ स्वानंद आत्माराम सर्वदा ॥ ६९ ॥ प्रपंच खाणोनि सांडावा ॥ मग ब्रह्मभाव मांडावा ॥ हेंही नलगे त्या सदैवा ॥ उखितेंचि आघवा परब्रह्म ॥४७०॥ मिथ्या दोराचा सर्पाकार ॥ तेथ मिळोनि अज्ञान नर ॥ नानाअनुमानीं भयंकर ॥ सत्य साचार मानिती ॥७१॥ तेवीं मिथ्या प्रपंचाचें भान ॥ तें बाधक मानिती अज्ञान ॥ तेंचि स्वानुभवें सज्ञान ॥ जाणती पूर्ण परब्रह्म ॥ ७२ ॥ जेवीं स्वप्न साच निद्रिस्ताप्रति ॥ तेवीं प्रपंच साच निजभ्रांतीं ॥ तो निजात्मजागृताप्रती ॥ मिथ्या निश्चितीं निजबोधें ॥ ७३ ॥ मिथ्या प्रपंचाचें भान ॥ जाणोनि

---

१ इच्छा, अपेक्षा. २ पाय नसलेला. ३ पृथ्वीवर. ४ साकरेचा केलेला कडुवृंदावनाचा गुच्छ. ५ माहित असलेल्यास. ६ माहित नसलेल्यास. ७ थोरी, ख्याती. ८ हानि. ९ गोळा, लगड. १० उक्ता, सगळा.

*मो. निजार्थ. +ना. देहाचें भान. ×ना. विलास. ⁂मो. आणिकाची आस. *मो. देतें घेतें दान होय आपण. ०ना. निःशेष, 5मी. ज्ञात्यासी. 2मो. लाखोटी.

झाले जे सज्ञान ॥ त्यांसि सर्वकर्मीं वर्ततां जाण ॥ देहाभिमान कदा नुपजे ॥ ७४ ॥ साधकांचा साधावया स्वार्थ ॥ पूर्वीं *सर्वस्वरूपें भगवंत ॥ +बोलिला तेणें विकारवंत ॥ झाला निश्चित म्हणशील ॥७५॥ वस्तु नव्हे विकारवंत ॥ ते निजसाम्यें सदोदित ॥ तेचि अर्थीं श्रीकृष्णनाथ ॥ असे सांगत निजबोधें ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ पूर्वं गृहीतं गुणकर्मचित्रमज्ञानमात्मन्यविविक्तमंग ॥ निवर्तते तत्पुनरीक्षयैव न गृह्यते नापि विसृज्य आत्मा ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ संसार तो पूर्वदशे ॥ ×अति अतर्क्य मायावशें ॥ शुद्ध वस्तु बहुधा भासे ॥ गुण॰ कर्म विन्यासें बहुरूप ॥ ७७ ॥ नाम रूप व्यक्ति वर्ण ॥ कुळ गोत्र क्रियाचरण ॥ या परी प्रपंच भिन्न ॥सत्य अज्ञान मानिती ॥७८॥प्रपंच वस्तूच्याठायीं अध्यस्त॥यालागीं वस्तु तद्रूप भासत॥ स्फटिक नानारंगीं अलिप्त ॥ परी संबंधें भासत तद्रूप ॥ ७९ ॥ जग पाहतां यापरी ॥ भिन्न भासे अज्ञानेकरीं ॥ ※तेणें आत्मा म्हणती विकारी ॥ नर अविचारी अज्ञानें ॥ ४८० ॥ त्या अज्ञानाची होय निवृत्ती ॥ तैं साधकां माझी सुलभ प्राप्ती ॥ यालागीं माझी निजभक्ती ॥ म्यां यथानिगुतीं प्रकाशिली ॥ ८१ ॥ साधकांचा निजस्वार्थ ॥ जेणें शीघ्र होय हस्तगत ॥ यालागीं सर्वभूतीं भगवंत ॥ हा म्यां निजगुह्यार्थ प्रबोधिला ॥ ८२ ॥ हें धरोनियां अनुसंधान ॥ भावें करितां माझें भजन ॥ तेथ मावळे मीतूंपण ॥ ०अविशेषें अज्ञान समूळ मिथ्या ॥ ८३ ॥ तेथ दृश्य द्रष्टा दर्शन ॥ *त्रिगुणेंसि कार्य कारण ॥ नुरेचि प्रपंचाचें भान ॥ ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥८४॥ तेथ नाम रूप गुण जाती ॥ नाहीं महाभूतें भूतव्यक्ती ॥ चैतन्य पूर्ण सहजस्थिती ॥ ब्रह्मीं ब्रह्मस्फूर्ती असेना ॥८५॥ तें उंच ना ठेंगणें ॥ मोठें ना रोड होणें ॥ 9उजू ना वांकुडेपणें ॥ असों नेणे अविकारी ॥ ८६ ॥ तेथ शीत ना उष्ण ॥ मृदु ना कठिण ॥ कडू ना गोडपण ॥ 5सुखदुःखेंवीण निर्द्वंद्व ॥८७॥ तेथ भेद ना अभेद ॥ बोलतें ना निःशब्द ॥ शाहणें ना मुग्ध ॥ देखणें ना अंध चिद्रूपपणें ॥ ८८ ॥ तें येथें ना तेथें ॥ येतें ना जातें ॥ जवळी ना परतें ॥ सदोदित स्वतःसिद्ध ॥ ८९ ॥ तें खातें ना न खातें ॥ घेतें ना देतें ॥ जीतें ना मरतें ॥ परादिपर तें परात्पर ॥४९०॥ तें बद्ध ना मुक्त ॥ नित्य ना अनित्य ॥ क्षोभेना प्रसन्न होत ॥ वस्तु सदोदित सद्रूपें ॥९१॥ तेथ पाप ना पुण्य ॥ आकार ना शून्य ॥ सगुण ना निर्गुण ॥ स्वानंदें पूर्ण सुखरूप ॥ ९२ ॥ सर्वभूतीं भगवद्भजन ॥ करूनि माझे भक्तजन॥ माझें निजरूप परिपूर्ण ॥ स्वयें आपण होऊनि ठेले ॥९३॥ त्यांसि संत म्हणोनि कांहीं घेणें ॥ अथवा असंत म्हणोनि सांडणें ॥ हें नुरेचि त्यासी वेगळेंपणें ॥ ब्रह्मीं ब्रह्मपणें परिपूर्ण ॥९४॥ बंधकाळीं बद्धता ॥ 0आत्मेनि घेतली नाहीं तत्त्वतां ॥ अथवा मुक्तकाळींची मुक्तता ॥ आत्मा सर्वथा स्पर्शेना ॥ ९५ ॥ आत्मा अविकारी पाहीं ॥ येणें निरूपणें केलें ठायीं ॥ जरी म्हणशी कळों नाहीं ॥ ऐक तेंही सांगेन ॥ ९६ ॥ आत्मा सर्वदा नित्य पाहीं ॥ यालागीं त्यासि उत्प-

१ आरोपित. २ मूर्ख ३ डोळस. ४ स्वयंप्रकाशचैतन्यामुळें. ५ पलीकडे. ६ सत्. ७ असत्, नाशवंत. ८ ब्रह्म व्यतिरिक्त नसल्यामुळें. ९ सिद्ध केलें.

*मो. सर्वरूपी. +मो. बोलिलों तो ना. बोलीला ते. ×मो. प्रति अतर्क्य. ※मो. तेथें आत्मा. ०मो. अवघेंचि. *ना. त्रिगुण त्रिपुटी कार्य कारण. 8ना. तेथें उंच. 9मो. नीट ना. 5मो. सुखदुःख निर्द्वंद्व. 2मो. परावर. 0मो. आत्मा न देखे तत्त्वतां.

त्ति नाहीं ॥ उत्पत्ति नलगे ज्याचे ठायीं ॥ तो गर्भाग्नि पाही स्पर्शेना ॥ ९७ ॥ गर्भ जन्म ज्यासि नाहीं ॥ त्यासि देहाचा अभाव पाही ॥ *देहेंवीण वृद्धि कहीं ॥ त्याचे ठायीं स्पर्शेना ॥ ९८ ॥ जो सर्वदा विदेही ॥ कर्म न रिघे त्याच्याठायीं ॥ कर्मेंवीण बद्धता पाहीं ॥ आत्म्यासि कहीं लागेना ॥ ९९ ॥ जो निरवयव साचार ॥ त्यासि एकही न घडे संस्कार ॥ ज्यासि नाहीं आकार ॥ त्यासि विकार स्पर्शेना ॥५००॥ जो गर्भजन्माअतीत ॥ मरण रिघों नशके तेथ ॥ काळाचाही नलगे घात ॥ क्षयातीत परमात्मा ॥ १ ॥ नलगे जन्म कर्म मरण ॥ त्यासि विकारी करी कोण ॥ वस्तु अविकारी परिपूर्ण ॥ यापरी जाण उद्धवा ॥ २ ॥ निबिड दाटल्या अज्ञान ॥ आत्मा नाहीं न करवे जाण ॥ प्रखर झालिया ज्ञान ॥ आत्मा नवा जाण उपजेना ॥३॥ +ज्ञानाज्ञानीं अलिप्त ॥ आत्मा निर्विकार नित्य ॥ येचि अर्थीं सदृष्टांत॥ असे सांगत श्रीकृष्ण ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ यथा हि भानोरुदयो नृचक्षुषां तमो विहन्यान्न तु सद्विधत्ते ॥एवं समीक्षा निपुणा सती मे हन्यात्तमिस्रं पुरुषस्य बुद्धेः ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ डोळा नादते दृष्टीसी ॥ तम अवरोधी[1] तियेसी ॥ सूर्य उगवूनि तमातें निरसी ॥ परी नवें दृष्टीसी नुपजवी[2] ॥ ५ ॥ तेवीं अविद्या क्षोभोनि सबळ ॥ ×आत्मा नाहीं न करवेच केवळ ॥ पुरुषबुद्धीस आणोनि पडळ ॥ मिथ्या द्वैतजाळ दाखवी ॥ ६ ॥ तेथ पावल्या शुद्ध ज्ञानाशी ॥ अविद्या मळमात्र निरसी ॥ परी नवें उपजावया आत्म्यासी ॥ सामर्थ्य ज्ञानासी असेना ॥ ७ ॥ आत्मा निजप्रकाशेंसी ॥ ज्ञानाज्ञानांतें प्रकाशी ॥ तें ज्ञानाज्ञान परमात्म्याशी ॥ कदाकाळेंसी स्पर्शेना ॥ ८ ॥ ज्ञानज्ञानाचे विकार ॥ अविद्य अंतःपाती[3] साचार ॥ आत्मा अविद्येहूनि परें[4] ॥ नित्य निर्विकार यहित ॥ ९ ॥ रात्रि नाहीं सूर्यासी ॥ मा दिवस काय आहे त्यासी ॥ तेवीं ज्ञानाज्ञान आत्म्यासी॥कदाकाळेंसी स्पर्शेना ॥५१०॥ आत्मा निर्विकार, स्वयंज्योती[5] ॥ अलिप्त ज्ञानाज्ञानस्थिती ॥त्या स्वरूपाची सहज प्राप्ती॥ उद्धवाप्रती हरि सांगे ॥११॥

॥ श्लोक ॥ एष स्वयंज्योतिरजोऽप्रमेयो महानुभूतिः सकलानुभूतिः ॥ एकोऽद्वितीयो वचसां विरामे येनेषिता वागसवश्चरंति ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ एष स्वयंज्योतीचें व्याख्यान ॥ परमात्मा स्वप्रकाशघन ॥ साधक तद्रूप आपण ॥ अभिन्नत्वें जाण सर्वदा ॥ १२ ॥ आत्मा परिपूर्ण निजपूर्णता ॥ त्यासि वेगळीं कैंचीं माता-पिता ॥ यालागीं आत्म्यासि जन्मकथा ॥ जाण सर्वथा असेना ॥ १३ ॥ त्रिगुणांचे त्रिविध मळ । हे मिथ्या मायिक समूळ ॥ आत्म्यासि न लागती अळुमाळ ॥ यालागीं निर्मळ निजात्मा ॥ १४ ॥ अप्रमेय म्हणिजे तें ऐका ॥ ऐसा इतुका तितुका ॥ पैल तो हा अमका तमका ॥ प्रमाण देखा कदा नव्हे ॥ १५ ॥ काळा गोरा सावळा ॥ निळा धवळा पिंवळा ॥ एथ तेथ, दूरी जवळा ॥ या प्रमाणावेगळा परमात्मा ॥ १६ ॥ 'महानुभूति'[6] पदव्याख्यान ॥ आत्मा अ-

१ प्रतिबंध करी. २ उपजवावया. ३ अविद्यांतर्गत, अविद्यागर्भित, अविद्याश्रित. ४ पलीकडला, निराळा. ५ स्वयंप्रकाश. ६ 'महानुभूति' या मुळांतील पदाचा अर्थ.

*मो. देहबुद्धी कांहीं. +मो. ज्ञानाज्ञाना अलिप्त. ×मो. आत्मा नाहीं करूनि केवळ ना.

खंडदंडायमान ॥ निजीं *निजरूपें समसमान ॥ स्वानंदघन सर्वदा ॥१७॥ तेथ देश काळ वर्तमान ॥ ध्येय ध्याता अथवा ध्यान ॥ ज्ञेय ज्ञाता आणि ज्ञान ॥ हेंही जाण असेना ॥ १८ ॥ नाम रूप जाति गोत ॥ क्रियाकर्मांसि अलिप्त ॥ जन्म मरण कैंचें तेथ ॥ वस्तु सदोदित स्वानंदें ॥ १९ ॥ तेथ वृद्धि आणि ऱ्हास ॥ आदिमध्यांतविलास ॥ परिपाकादिविन्यास ॥ यांचाही प्रवेश असेना ॥१२०॥ ह्मणशी ×पूर्वोक्त धर्मस्थिती ॥ तेथ नरिघे कैशारीतीं ॥ सकळानुभूति या +पदोक्तीं ॥ वस्तु सर्वार्थीं अलिप्त ॥२१॥ ※या रीतीं धर्म आणि अधर्म ॥ सकळभूतांचें क्रिया कर्म ॥ ०प्रकाशक मी आत्माराम ॥ यांसि अलिप्त परम परमात्मा ॥ २२ ॥ गंगाजळा आणि मद्यासी ॥ आकाश व्याप्त असोनि त्यांसी ॥ परी तें अलिप्त दोहींसी ॥ तेवीं ज्ञानाज्ञानांसी परमात्मा ॥ २३ ॥ *जेथ ज्ञानाज्ञानाचा अभावो ॥ तेथ ᵞकर्माकर्मा कैंचा ठावो ॥ सकळानुभूति या नांव पहाहो ॥ ¹अभेदान्वयो स्वानंदें ॥ २४ ॥ ऐसा परमात्मा परमानंद ॥ सजातीयविजातीयस्वगतभेद ॥ नसोनियां वस्तु शुद्ध ॥ जाण प्रसिद्ध निजबोधें ॥ २५ ॥ विजातीय भेद मी देह ह्मणणें ॥ सजातीय भेद मी जीवपणें ॥ स्वागत भेद मी ब्रह्म ⁴स्फुरणें ॥ हे तिनी नेणे परमात्मा ॥२६॥ तेथ उणखूण लक्ष्य लक्षण ॥ युक्ति प्रयुक्ति प्रमाण ॥ हेंही सर्वथा न रिघे जाण ॥ ब्रह्म परिपूर्ण एकाकी ॥ २७ ॥ ऐसें एकाकी ⁰परब्रह्म ॥ निजगुह्याचें गुह्य उत्तम ॥ हें जाणे तो सभाग्य परम ॥ त्यासि भवभ्रम कदा न बाधी ॥ २८ ॥ तो देहीं असताचि जाण ॥ त्यासि न बाधी देहगुण ॥ त्यासी न बाधी कर्माचरण ॥ जन्म मरण बाधीना ॥ २९ ॥ ऐकोनि ऐशिया ज्ञानासी ॥ तें स्वरूप स्पष्ट सांग ह्मणसी ॥ तरी तेथ रिगमू नाहीं वाचेसी ॥ श्रुति शब्देंसी परतल्या ॥ १३० ॥ जेथ अतिविवेकसंपन्न ॥ बुद्धि प्रवेशेना आपण ॥ सवेगपणें नपवे मन ॥ ते वस्तु वाचेअधीन सर्वथा नव्हे ॥३१॥ खुंटली शास्त्रांची व्युत्पत्ती ॥ दर्शनें अद्यापि विवादती ॥ श्रुति परतल्या नेतिनेती ॥ तेथ वचनोक्ती विरामु ॥३२॥ धरोनि जाणिवेची हांव ॥ शब्दज्ञानें घेतली धांव ॥ परी वस्तूचें एकही नांव ॥ घ्यावया जाणीवे न सरेची ॥ ३३ ॥ एवं विचारितां साचार ॥ परादिकांचा नव्हे उचार ॥ यालागीं वस्तु परात्पर ॥ क्षराक्षर अतीत ॥ ३४ ॥ ⁵जे सर्वांवयवीं सर्वदा शून्य ॥ शेखीं शून्यही नव्हे आपण ॥ शून्यप्रकाशक चिद्घन ॥ वस्तु परिपूर्ण एकत्वें ॥ ३५ ॥ तेथ रिघावया वचनोक्ती ॥ शब्दें साधिल्या नानायुक्ती ॥ त्या चिदाकाशीं मावळती ॥ जेवीं कां उगवतां गभस्ती खद्योता ॥ ३६ ॥ खद्योत सूर्यासि खेंव देता ॥ तैं वस्तु येती वचनाचे हाता ॥ वस्तुपाशीं शब्दाच्या कथा ॥ जाण तत्त्वतां हारपती ॥ ३७ ॥ सूर्योदय झालिया पाहीं ॥ खद्योत शोधितां न पडे ठायीं ॥ तेवीं वस्तुप्राप्ति पाविजे जिहीं ॥ तैं मागमोस नाहीं शब्दाचा ॥३८॥ हो आंधाराचिये रातीं ॥ ज्यांची दीपें चाले क्रियाशक्ती ॥ तेथ झालिया सूर्योदयप्राप्ती ॥ तेचि उपेक्षिती दीपातें

१ सर्वज्ञता २ १सांख्य. २ योग. ३ न्याय. ४ मीमांसा. ५ वैशेषिक. ६ वेदांत. हीं तत्त्वज्ञानाचीं सहा दर्शनें आहेत. ३ ज्ञान. ४ परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या चारी वाचांनीं. ५ आलिंगन. ६ न सांपडे. ७ ठिकाणा.

*मो. निजरूपीं. ×मो. पूर्वं कर्मस्थिती. +मो. वेदोक्तीं. ※ना. या धर्मांचा धर्म आणि अधर्म. ०ना. प्रकाशोनि मी. *ना. जेथें ज्ञानाचा अभावो. ᵞमो. कर्मधर्मा. ¹मो. अभिधानान्वयो स्वानंदें. ⁴मो ह्मणणें. ⁰मो. परम. ⁵मो. जें सर्वांचें सर्व शून्य. ³मो. ये वचनाच्या. ²मो. वस्तु पाविजे जिहीं.

॥ ३९ ॥ तेवीं *शाब्दिकज्ञानयुक्ती ॥ अनुतापें ब्रह्म विवंचिती ॥ ज्यांसि झालीयां ब्रह्मप्राप्ती ॥ तेंचि उपेक्षिती शब्दातें ॥ ५४० ॥ जंव जंव शब्दाचा अभिमान ॥ तंव तंव दूरी ब्रह्मज्ञान ॥ येचि अर्थीचें ×उपलक्षण ॥ ऐक निजखूण उद्धवा ॥ ४१ ॥ कन्या यावया वरासी ॥ माता पिता बंधु ज्योतिषी ॥ मेळवूनियां सुहृदांसी ॥ कन्या वरासी अर्पिती ॥ ४२ ॥ तेथ भर्तारसंभोग सेजेपाशीं ॥ जवळी माता पिता सुहृदेंसी ॥ +असणं, हाचि अवरोधे तिसी ॥ पतिसुखासी प्रतिबंध ॥४३॥ तेवीं योग्यता चातुर्य जाण ॥ शब्दज्ञानें ज्ञातेपण॥जवळी असतां ब्रह्मज्ञान ॥ सर्वथा जाण होऊ न शके ॥ ४४ ॥ जेवीं डोळां कण न समाये ॥ तेवीं ब्रह्मीं कल्पना न साहे ॥ यालागीं निर्विकल्प पाहे ॥ ब्रह्मज्ञान होय सुटंक ॥ ४५ ॥ समस्तज्ञानाचा उपरम ॥ सकळवचनांचा विराम ॥ तेंचि पाविजे परब्रह्म ॥ ऐसें पुरुषोत्तम बोलिला ॥४६॥ जें नाकळे बुद्धीच्या ठायीं ॥ जें मनासि नातुडे कहीं ॥ जें वचनासि विषयो नव्हे पाहीं ॥ जें प्रमाणाचे ०ठायीं पावलें नवचे ॥ ४७ ॥ यापरी वस्तु न पडे ठायीं ॥ तरी ते वस्तूचि ह्मणशी नाहीं॥ ऐसें उद्धवा कल्पिसी कांहीं ॥ ऐक तेविषयीं सांगेन ॥४८॥ मूळश्लोकींचें पद ॥ येनेषिता वाग-सवश्चरंति ॥ एथें [१]देहेंद्रियप्रमाण ॥ हे जड मूढ अचेतन ॥ त्यांसि चेतवी आत्मा चिद्‌घन ॥ तेंही उपलक्षण अवधारी ॥ ४९ ॥ आत्मप्रभां [३]दृष्टि प्रकाशे ॥ परी आत्मा दृष्टीसि न स्पर्शे ॥ आत्मा दृष्टीसबाह्य असे॥परी दृष्टीसि न दिसे ⁂दृश्यत्वें ॥५५०॥आत्मसत्तां [४]ऐकती श्रवण॥ श्रवणांसि आत्मा नातळे जाण ॥ श्रवणासबाह्य असोनि पूर्ण ॥ श्रवणविषय जाण नव्हेची आत्मा ॥५१॥ वाचा आत्मसत्तां उठी ॥ आत्मा नातळे वाचिका गोठी ॥ वस्तु शब्दाचे पाठीं पोटीं ॥ तो शब्द शेवटीं नेणे वस्तू ॥ ५२ ॥ मन आत्मसत्तें चपळ ॥ मनासबाह्य आत्मा के-वळ ॥ तो मनासि नातळे [५]अकळमाळ ॥ मनासि अकळ निजात्मा ॥ ५३ ॥ चित्त चेतवी चिद्‌घन ॥ चित्सत्तांचि चित्तासी चिंतन ॥ चित्तासबाह्य चैतन्य पूर्ण ॥ ⁴तरी चित्तासि चैतन्य कळेना ॥ ५४ ॥ आत्मसंयोगें अहं उल्हासे ॥ अहंता आत्मा कदा न स्पर्शे ॥ अहंस-बाह्य आत्मा असे ॥ परी तो आत्मा न दिसे अहंकारें ॥ ५५ ॥ ⁶आत्मप्रभा प्रकाशविधीं ॥ प्रकाशिली विवेकबुद्धी ॥ बुद्धी आत्मा नेणे त्रिशुद्धी ॥ आत्मा बुद्धीसबाह्य ॥५६॥ आत्मप्रभां प्राण चळे ॥ परी प्राणासि आत्मा नातळे ॥ प्राणसबाह्य आत्ममेळें ॥ तरी प्राणासि न कळे परमात्मा ॥ ५७ ॥ उद्धवा तूं यापरी पाहे ॥ जग जयाचेनि वर्तताहे ॥ तो आत्मा स्वतःसिद्ध आहे ॥ नाहीं [६]नोहे कल्पांतीं ॥ ५८ ॥ यापरी आत्मा स्वतःसिद्ध ॥ भेद नांदवूनि अभेद ॥ द्वंद्व प्रकाशोनि निर्द्वंद्व ॥ हा निजात्मबोध दृढ केला ॥५९॥ एवं आत्मा निर्द्वंद्व अद्वैत ॥ तो आहे नाहीं ह्मणावया एथें ॥ कोणी तुरेचि गा ह्मणतें ॥ आत्मा निजात्मते परिपूर्ण ॥५६० ॥आत्मा निजात्मता सदोदित ॥ संसार तेथ आरोपित ॥ येचि अर्थी श्रीकृष्णनाथ ॥ असे सांगत श्लोकार्थें ॥ ६१ ॥

---

१ उदाहरण. २ प्रतिबंध. ३ आत्म्याच्या तेजानें. ४ आत्म्याच्या सत्तेनें. ५ न समजणारा, न कळावया जोगा. ६ नष्ट होत नाहीं.

*मो. शब्दज्ञानयुक्ती. ×मो. निरूपण. +मो. असता हाचि ०मो. पायीं पावलें. 9ना. जाण. ⁂ना. अदृश्यत्वें. 7मो. घन. 4मो. परी चित्ता चैतन्य. 6मो. आत्मा स्वप्रकाशविधीं.

॥ श्लोक ॥ एतावानात्मसंमोहो यद्विकल्पस्तु केवले ॥ आत्मन्नृते स्वमात्मान-मवलंबो न यस्य हि ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ आत्मा केवळ नित्यमुक्त ॥ त्रिगुण गुणी गुणातीत ॥ नभाहूनि अलिप्त ॥ सदोदित पूर्णत्वें ॥ ६२ ॥ ब्रह्म अखंड दंडायमान ॥ सर्वदा स्वानंदघन ॥ *ऐसें अ-लिप्तीं प्रपंचभान ॥ तो मिथ्या जाण आरोप ॥ ६३ ॥ आरोपासी अधिष्ठान ॥ स्वयें परमात्मा आपण ॥ यालागीं प्रपंचाचें भान ॥ तेथेंचि जाण आभासे ॥ ६४ ॥ परमात्म्याहूनि भिन्न ॥ प्रपंचासि नाहीं स्थान ॥ यालागीं उत्पत्ति स्थिती निदान ॥ तेथेंचि जाण आभासे ॥ ६५ ॥ जेवीं दोराचा सर्प पाही ॥ दोरावेगळा न दिसे कहीं ॥ दोर सर्प झालाचि नाहीं ॥ तरी त्या-च्याठायीं आभासे ॥ ६६ ॥ तेवीं निर्विकल्प पूर्ण ब्रह्म ॥ +नातळे रूप नाम गुण कर्म ॥ तेंही त्याच्याठायीं ×मनोभ्रम ॥ प्रपंच विषम परिकल्पी ॥ ६७ ॥ जेवीं दोरीं भास मिथ्यासर्प ॥ तेवीं ब्रह्मीं मिथ्या भवआरोप ॥ तेथ सुख दुःख भय कंप ॥ तोही खटाटोप मायिक ॥ ६८ ॥ एवं प्रपंचाचें मिथ्या भान ॥ वस्तु शुद्धत्वें स्वानंदघन ॥ ०हेंचि स्पष्ट केलें निरूपण ॥ ब्रह्म प-रिपूर्ण अद्वय ॥ ६९ ॥ एवं नानायुक्ती सुनिश्चित ॥ ब्रह्म साधिलें अबाधित ॥ हें नमानिती जे पंडित ॥ तें मत खंडित श्रीकृष्ण ॥ ५७० ॥

॥ श्लोक ॥ यन्नामाकृतिभिर्ग्राह्यं पंचवर्णमबाधितम् ॥ व्यर्थेनाप्यर्थवादोऽयं द्वयं पंडितमानिनाम् ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ वेदवेदांतप्रतिपाद्य एथ ॥ सकळशास्त्रांचें 7निजमथित ॥ ब्रह्म 3अद्वय सदोदित म्यां सुनिश्चित नेमिलें ॥ ७१ ॥ तें हें माझें निजमत ॥ उपेक्षूनियां जे पंडित ॥ ज्ञातेपणें अति-उन्मत्त ॥ अभिमानयुक्त ※पांडित्यें ॥ ७२ ॥ त्या पंडितांचें पांडित्यमत ॥ 'प्रपंच प्रत्यक्ष अनुभूत ॥ तो मिथ्या मानोनियां एथ ॥ कैंचें अद्वैत काढिलें' ॥७३॥ अद्वैतासि नाहीं गांवो ॥ जें तेथ जरी पाहों जावों ॥ अद्वैतासि नाहीं नेमस्त ठावो ॥ यालागीं पहावो तें मिथ्या ॥ ७४ ॥ रूप नाम गुण कर्म पंचभूतें भौतिकें विषम ॥ चतुर्वर्ण चारी आश्रम ॥ सत्य परम मानिती ॥ ७५ ॥ सत्य मानावया हेंचि कारण ॥ मनोभ्रमें भ्रमले जाण ॥ ज्ञानाभिमानें *छळिले पूर्ण ॥ आपणा आपण विसरले ॥ ७६ ॥ मुख्य मानिती विषयसुख ॥ विषयार्थ पुण्य करावें चाख ॥ स्वर्ग भोगावा अवश्यक ॥ हें सत्य देख मानिती ॥ ७७ ॥ विषय सत्य मानिती परम देहाभिमानाचें निजवर्म ॥ तेणें 4सज्ञान केले अधम ॥ मरण जन्म भोगवी ॥ ७८ ॥ पुढती स्वर्ग पुढती नरक ॥ पुढती जननी जठर देख ॥ यापरी पंडितलोक ॥ केले ज्ञानमूर्ख अहंमम-ता ॥ ७९ ॥ त्यांचें ज्ञान तें वेदबाह्य ॥ सर्वथा नव्हे तें ग्राह्य ॥ जैसें अंत्यजाचें अन्न पाहे ॥ तैसें तें होय अतित्याज्य ॥ ५८० ॥ ज्ञानाभिमानाचा विचार ॥ तें अज्ञानाचें सोलींव सार ॥ तयाचा जो निजनिर्धार ॥ तो जाण साचार महामोहो ॥ ८१ ॥ तयाचा जो निजविवेक ॥

---

१ सिद्ध केलें. २ अद्वैत मत. ३ दृग्गोचर.

***मो. तेथें लिप्त प्रपंचभान. +ना. मावळे. ×ना. मनोधर्म. ०ना. हें निर्दुष्ट केलें. 7मो. जें मथित. 3मो. एक सदोदित. ※मो. पैं झाले. *मो. मोहिलें पूर्ण. 4ना. अज्ञान.**

इंद्रावणफळाऐसा देख ॥ वरी सोजिरें आंत विख ॥ तैसा परिपाक ज्ञानाभिमानियां ॥ ८२ ॥ नामरूपात्मक प्रपंच ॥ मिथ्या मायिकत्वें अहाच ॥ ज्ञानाभिमानें मानिती साच ॥ वृथा कचकच वाढविती ॥ ८३ ॥ प्रपंचरचनेची कुसरी ॥ आपण जैं मानावी खरी ॥ तैं देहबुद्धि वोजली शिरीं ॥ *दुःखसमुद्रीं निमग्न ॥ ८४ ॥ त्यांची योग्यता पाहतां जाण ॥ गायत्रीतुल्य वेदपठण ॥ सकळ शास्त्रें जाणे पूर्ण ॥ स्मृतिपुराण इतिहास ॥ ८५ ॥ +अति निःसीम वक्तेपण ॥ समयींचें समयीं स्फुरे स्फुरण ॥ तेणें वाढला देहाभिमान ॥ पंडितंमन्य अतिगर्वी ॥ ८६ ॥ नेणे अद्वैतसमाधान ॥ तरी योग्यतागर्वे गहन ॥ निजमताचा मताभिमान ॥ ×प्राणांतें जाण सांडीना ॥ ८७ ॥ पंडितंमन्यांचें बोलणें ॥ अवचटें नायकावें ०दीनें ॥ जे नागवले देहाभिमानें ॥ त्यांचेनि सौजन्यें अधःपात ॥ ८८ ॥ विष खात्याचा पांतीकैर ॥ अत्याग्रहें झाला जो नर ॥ त्यासि अप्रार्थितां मरणादर ॥ अतिदुर्धर ❋जीवीं वाजे ॥ ८९ ॥ यालागीं न धरावी ते संगती ॥ त्यांसी न करावी वदंती ॥ कदा नवचावें त्यांप्रती ॥ ते त्याज्य निश्चितीं जीवेंभावें ॥ ९९० ॥ त्यांचे न लगावें बोलीं ॥ त्यांचे न चालावें चाली ॥ जे ज्ञानाभिमानभुलीं ॥ ⁰चुकले आपुली हितवार्ता ॥ ९१ ॥ ते नाणावे निजमंदिरा ॥ स्वयें नवजावें त्यांच्या *द्वारा ॥ त्यांसि न पुसावें विचारा ॥ जे अभिमानद्वारा नाडले ॥ ९२ ॥ त्यांसी न व्हावी हाटभेटी ॥ कदा न देखावे निजदृष्टीं ॥ ते ⁵त्याज्य गा उठाउठी ॥ जेवीं धर्मिष्ठीं परनिंदा ॥ ९३ ॥ वेदशास्त्रांचा मथितार्थ ॥ जो कां अद्वैत परमार्थ ॥ तो ज्यांसि नावडे निजस्वार्थ ॥ चाविरे अनर्थ त्यांपाशीं ॥ ९४ ॥ यालागीं त्यांची संगती ॥ साक्षेपें सांडावी निश्चितीं ॥ साधकाचे योगस्थिती ॥ अंतरायनिवृत्ती हरि सांगे ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ योगिनोऽपक्वयोगस्य युंजतः काय उत्थितैः॥ उपसर्गैर्विहन्येत तत्रायं विहितो विधिः ॥ ३८ ॥

॥ टीका ॥ योगी प्रवर्तल्या योगाभ्यासीं ॥ योग संपूर्ण नव्हतां त्यांसी ॥ उपसर्ग येती छळावयासी ॥ तेंचि हृषीकेशी सांगत ॥ ९६ ॥ शरीरीं एखादा उठे रोग ॥ कां खवळे विषयाची लगबग ॥ अथवा सभ्रांत उपसर्ग ॥ कां योगभंग विकल्पें ॥ ९७ ॥ ज्ञानाभिमान सबळ उठी। तेणें गुणदोषीं बैसे दृष्टी ॥ परापवादाची चावटी ॥ त्याची एकांत गोष्टी निजगुज ॥ ९८ ॥ देहीं शीतळता उभंडे ॥ कां उष्णता अत्यंत चढे ॥ किंवा वायू अंव्हाटीं पडे ॥ कां क्षुधा वाढे अनिवार ॥ ९९ ॥ विक्षेपकषाय वोढवती ॥ परदारा परद्रव्यासक्ती ॥ इत्यादि उपसर्ग येती ॥ उपाय श्रीपती तदर्थ सांगे ॥ ६०० ॥

॥ श्लोक ॥ योगधारणया कांश्चिदासनैर्धारणान्वितैः ॥ तपोमंत्रौषधैः कांश्चिदुपसर्गान्विनिर्दहेत् ॥ ३९ ॥

---

१ शोभिवंत. २वरवर दृष्टीस खरा भासणारा, पण वास्तविक जो खोटा आहे. ३कौशल्य. ४ आदळली ५ पंडित नसून आपणा स्वतःस गर्वानें पंडित असें मानणारे. ६ स्नेहानें. ७ वांटेकरी. ८ भाषण. ९ बाजारांत भेटणें. १०धर्मांप्रमाणें चालणारांनीं. ११चावण्याची संवय असलेला. १२विघ्न. १३दुसऱ्याचे अपवादाची १४ वाढे. १५ अडसर्थी शिरतो.

*ना. दुःखदरिद्रीं. +मो. अति विशद वक्तेपण. ×मो. प्राणांतें जाण सोडीना. ०मो. श्रवणें. ❋मो. अंगीं वाजे ना. जीवीं वाढे. ⁰मा. झुकले. *मो. घरा. ⁵मो. त्यजावे.

॥ टीका ॥ देहीं शीतळता वाढल्या जाण ॥ त्यासि निवारी अग्निधारण ॥ देहीं उष्मा चढल्या पूर्ण ॥ सोमधारणें ते छेदी ॥१॥ वायु अव्हाटल्या अवचितां ॥ तैं वायु भरावा पुरता ॥ वायु मेळवूनि वायुआंतौता ॥ आणिती निजपंथा अभ्यासबळें ॥ २ ॥ वायु क्षोभोनि सकोप ॥ जैं जठरावरी पडे झडप ॥ तैं क्षुधा खवळे अमुप ॥ तृप्तीचें रूप उठीना ॥ ३ ॥ तेथ मोकळा सांडूनि प्राण ॥ अपान वाढवावा आपण । तो जठरा आलिया जाण ॥ तेथ क्षोभला प्राण सहजचि ये ॥ ४ ॥ तेथ प्राणापानऐक्यता ॥ सहजें ये साधकांच्या हाता ॥ मग षट्चक्र भेदितां ॥ क्षणही सर्वथा लागेना ॥ ५ ॥ तेव्हां सतरावियेचें अमृतपान ॥ साधकांसि पावे संपूर्ण ॥ यापरी क्षुधा निर्दळण ॥ येणें योगें जाण साधिती ॥ ६ ॥ परदारा परद्रव्यासक्ती ॥ हे पापकर्मांची फळप्राप्ती ॥ याची करावया निवृत्ती ॥ तपश्चर्या निश्चितीं उद्धवा ॥ ७ ॥ भावें करितां मंत्रानुष्ठान ॥ तेणें वैराग्य उपजे जाण ॥ वैराग्यें विषयनिर्दळण ॥ सहजें जाण साधकां ॥ ८ ॥ शुद्धमंत्राचें पुरश्चरण ॥ करी विघ्नांचें निर्दळण ॥ तेथ पिशाचबाधासंचरण ॥ घेऊनि प्राण स्वयें पळे ॥ ९ ॥ शरीरीं संचरल्या व्याधी ॥ त्यातें निर्दळी दिव्य औषधी ॥ मनाचा छेदावया आधी योग त्रिशुद्धीं साधावा ॥६१०॥ तेथ साधल्या योगसिद्धी ॥ समूळ निर्दळी आधिव्याधी ॥ सकळ विघ्नांतेंही छेदी ॥ जाण त्रिशुद्धी उद्धवा ॥ ११ ॥ हें किती सांगू भिन्नभिन्न ॥ भावें करितां माझें ध्यान ॥ सकळ उपसर्गां निर्दळण ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ कांश्चिन्ममानुध्यानेन नामसंकीर्तनादिभिः ॥ योगेश्वरानुवृत्त्या वा हन्यादशुभदान् शनैः ॥ ४० ॥

॥ टीका ॥ आधिव्याधींसी सकळ विघ्न ॥ विकल्प विकर्म देहाभिमान ॥ *ज्ञानाभिमानेंसि दहन ॥ ×करी ध्यानेंक्षण उद्धवा ॥ १३ ॥ माझिया ध्यानाचे परिपाठीं ॥ उपसर्ग पळती उठाउठी ॥ शोधितां विघ्न न पडे दृष्टीं ॥ निर्द्वंद्व सृष्टी साधकां ॥१४॥ माझा लागला ध्यानभावो ॥ उपसर्गांचा नुरेचि ठावो ॥ सकळ विघ्नांचा अभावो ॥ +विकल्प वावो स्वयें होती ॥ १५ ॥ क्षणशी घालोनियां आसन ॥ एकाग्र करितां मन ॥ कैं ठसावेल तुझें ध्यान ॥ तैं साधकां विघ्न बाधीना ॥ १६ ॥ असो नटेंके माझें ध्यान ॥ तैं सोपा उपाव आहे आन ॥ 'माझें करितां नामकीर्तन ॥ विघ्ननिर्दळण हरिनामें ॥ १७ ॥ जेथ नामाचा घडघडाट ॥ तेथ उपसर्गां नचले वाट ॥ महाविघ्नांचा कडकडाट ॥ करी सपाट हरिनामें ॥ १८ ॥ अखंड माझी नामकीर्ती ॥ ज्याच्या ※मुखास आली वस्ती ॥ त्या देखोनि विघ्नें पळती ॥ उपसर्ग जाती निःशेष ॥१९॥ माझ्या नामाचा निजगजर ॥ पळवी महापापसंभार ॥ उपसर्गां नुरवी थार ॥ नाम सधर हरीचें ॥ ६२० ॥ अवचटें घेतां माझें नाम ॥ सकळ पातकां करी भस्म ॥ ०जेथ अखंड माझें गुणनामकर्म ॥ तेथ विघ्न भवभ्रम स्पर्शेना ॥ २१ ॥ माझे नामकीर्तीचे पवाडे ॥ ज्याची वाचा अखंड पढे ॥ विघ्नें न येती तयाकडे ॥ जेवीं सूर्यापुढें आंधार ॥ २२ ॥ माझे

---

१ चंद्रधारणा. २ अमृतकला. ३ मानसिक व्यथा. ४ विघ्नाचा. ५ ठरत नाहीं. ६ समुदाय.

*ना. ज्ञानाभिमानेंसि. ×मो. करी जाण क्षणें उद्धवा. +मो. विकल्पासी. ठावो असेना. ※मो. मुखीं असे निश्चितीं. ०मो. जेथें माझें अखंड नाम ॥ तेथें भवभ्रम स्पर्शेना.

नामकीर्तीविण एथें ॥ ज्याचें तोंड न राहे रितें ॥ तो नागवे महाविघ्नांतें ॥ जेवीं पतंगातें हुताशु ॥ २३ ॥ नामकीर्ती दाटुगी होये ॥ हें विश्वासें मानलें आहे ॥ तें नाम मुखीं केवीं राहे॥ करावें काये ह्मणशील ॥ २४ ॥ मुखीं नामनिर्वाह व्हावा ॥ यालागीं करावी साधुसेवा ॥ संतसेवनीं सद्भावो जीवा ॥ तेथ नव्हे रिगावा विघ्नांसी ॥ २५ ॥ सद्भावें धरिल्या सत्संगती ॥ त्या संगाचिये निजस्थिती ॥ मुखीं ठसावे नामकीर्ती ॥ विकल्प चित्तीं स्फुरेना ॥ २६ ॥ मुखीं हरिनामाची गोडी ॥ संतसेवेची अतिआवडी ॥ *तयाची गा प्रतापप्रौढी ॥ उपसर्गकोडी निर्दळी ॥ २७ ॥ साधकांसि पाठिराखा ॥ संत झालिया निजसखा॥ तैं महाविघ्नांचिया मुखा ॥ विभांडी देखा क्षणार्धें ॥ २८ ॥ सेवितां साधूंचें चरणोदक ॥ अतिशुद्ध होती साधक॥ तेणें शुद्धत्वें महादोख ॥ समूळ देख निर्दळी ॥ २९ ॥ साधूंच्या चरणतीर्थापाशीं ॥ सकळ तीर्थें येती शुद्धत्वासी ॥ भावें सेविती त्या तीर्थासी ॥ ते उपसर्गासी नागवती ॥३०॥ वंदितां साधूचे चरणरज ॥ साधकांचें ×सिद्ध होय काज ॥ निर्दळूनि विघ्नांचें बीज ॥ स्वानंद निज स्वयें भोगिती ॥३१॥ निजभाग्यवती अवचितां ॥ संतचरणरेणु पडल्या माथां ॥ तो काळिकाळातें हाणे लाथा ॥ तेथ विघ्नांची कथा ते कोण ॥३२॥ निधडा शूर निजबळेंसी ॥ धुरां निजशस्त्र देऊनि त्यासी ॥ युद्धीं थापटिलियां पाठीसी ॥ तो विभांडी परांसी तेणें उल्हासें॥३३ तेवीं सद्भावें सत्संगती ॥ मुखीं अखंड नामकीर्ती ॥ भावें करितां संतांची भक्ती ॥ महाबाधा निर्दळिती साधक ॥ ३४ ॥ कीर्ति, भक्ति, सत्संगती ॥ हे त्रिवेणी लाभे ज्याप्रती ॥ त्यासि उपसर्ग नातळती ॥ पावन त्रिजगती त्याचेनी ॥ ३५ ॥ माझी भक्ति आणि नाम कीर्ती ॥ यांची जननी सत्संगती ॥ तो सत्संग जोडल्या हातीं ॥ विघ्नें न बाधिती साधकां ॥ ३६ ॥ योग याग आसन ध्यान ॥ तप मंत्र औषधी जाण ॥ साधितां न तुटे देहाभिमान ॥ तो सत्संग जाण निर्दळी ॥ ३७ ॥ योगादि सर्व उपायीं जाण ॥ निवारिती अल्प विघ्न ॥ विघ्नांचा राजा °देहाभिमान ॥ तो त्याचेनि जाण ढळेना ॥ ३८ ॥ तो दुर्धर देहाभिमान ॥ ज्ञातेपणीं अतिदारुण ॥ त्याचें समूळ निर्दळण ॥ सत्संग जाण स्वयें करी ॥ ३९ ॥ नेणपणाचा अभिमान ॥ तत्काळ जाय निघोन ॥ तैसा नव्हे ज्ञानाभिमान ॥चाविरा जाण +जाणिवा ॥ ४० ॥ त्या ॐअभिमानाचें निर्दळण ॥ सत्संग निजांगें करी आपण ॥ यालागीं सत्संगासमान ॥ आन साधन असेना ॥ ४१ ॥ एकाचेनि निजमतें ॥ अजरामर करावें देहातें ॥ तेही योगादिसाधनांतें ॥ मूर्खमतें साधिती ॥ ४२ ॥

॥ श्लोक ॥ केचिद्देहमिमं धीराः सुकल्पं वयसि स्थिरम् ॥ विधाय विविधोपायैरथ युंजंति सिद्धये ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ देहो तितुका प्रारब्धाधीन ॥ त्यासि प्रारब्धें जन्ममरण॥ त्या देहासि अजरामरपण ॥ पामर जन करूं पाहती ॥ ४३ ॥ त्या प्रारब्धाचें सूत्र पूर्ण ॥ सर्वदा असे काळाधी-

---

१ अग्नि. २ कोट्यावधी विघ्नें. ३ पराभव करी. ४ सर्वांच्या पुढें, अघाडीस. ५ शत्रूस. ६ त्रिभुवन, त्रैलोक्य. ७ उत्पत्तिस्थान, कारण. ८ चावण्याची संवय असलेला.

*मो. तयाची गातां प्रौढी. ×मो. सिद्धी पावे काज. °मो. अभिमान. +ना. निज जाणिवां. ॐना. देहाभिमानाचें.

न ॥ यालागीं काळकृत जन्ममरण ॥ सर्वांसि जाण सर्वदा ॥ ४४ ॥ चौदा कल्प आयुष्य जोडी ॥ त्या मार्कंडेयासि काळ झोडी ॥ युगांतीं लोम झडे परवडी ॥ त्या लोमहर्षाची नरडी मुरडिजे काळें ॥४५॥ चतुर्युगसहस्र संख्येसी ॥ तो दिवस गणिजे ब्रह्मयासी ॥ जो स्रजिता सकळ सृष्टीसी ॥ त्यासि काळ ग्रासी सकाळें ॥ ४६ ॥ स्रजित्या ब्रह्मयातें काळ पिळी ॥ पाळित्या विष्णूतें काळ गिळी ॥ प्रळयरुद्राचीही होळी ॥ काळ महाबळी स्वयें करी॥ ४७ ॥ यापरी काळ अतिदुर्धर ॥ नेणोनि अविवेकी नर ॥ वांच्छिती काळजयो पामर ॥ देह अजरामर करावया ॥४८॥ जें जें दिसे तें तें नासे ॥ *हे काळसत्ता जगासि भासे ॥ तरी अजरामरत्वाचें पिसें ॥ मूर्ख अतिप्रयासें वांछिती ॥ ४९ ॥ 'थिल्लरींचा तरंग जाण ॥ वांछी अजरामरपण ॥ तंव थिल्लरासचि ये मरण ॥ तेथ वांचवी कोण तरंगां ॥ ६५० ॥ तेवीं संसारचि नश्वर ॥ त्यांतील देह अजरामर ॥ करूं वांछिती पामर ॥ उपायीं अपार शिणोनी' ॥ ५१ ॥ देह जाईल तरी जावो ॥ ×परी जिव्हा चिरंजीव राहो ॥तदर्थ कीजे उपावो॥ ०तैसें अमरत्व पहाहो नरदेहा ॥ ५२ ॥ देह केवळ नश्वर ॥ त्यातें अविवेकी महाधीर ॥ करूं ह्मणती अजरामर ॥ उपायीं अपार शिणोनी ॥ ५३ ॥ केवळ काळाचें खाजें देहो ॥ तो अमर करावया पहाहो ॥ जो जो कीजे उपावो ॥ तो तो अपावो साधकां ॥ ५४ ॥ एवं मूढतेचे ज्ञानभागी ॥ देहाच्या अमरत्वालागीं ॥ शिणोनि उपायीं अनेगीं ॥ हटयोगी नागवले ॥ ५५ ॥ परकायाप्रवेशार्थ जाण ॥ शिणले साधितां प्राणधारण ॥ एवं धरितां देहाभिमान ॥ योगीजन नाडले ॥ ५६ ॥ देहाचें नश्वरपण ॥ जाणोनियां जे सज्ञान ॥ ते न धरिती देहाभिमान ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ नहि तत्कुशलादृत्यं तदायासो ह्यपार्थकः ॥ अंतवत्त्वाच्छरीरस्य फलस्येव वनस्पतेः ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ विचारितां हा संसार ॥ समूळ अवघा नश्वर ॥ तेथ देहाचा अजरामर ॥ ज्ञाते आदर न करिती ॥ ५८ ॥ देहअजरामरविधीं ॥ ज्ञाता सर्वथा न घाली बुद्धी ॥ देहीं साधिल्या +ज्या सिद्धी ॥ त्या त्रिशुद्धी बाधिका ॥ ५९ ॥ देह तापल्या ज्वरादितापें ॥ तदर्थ मरणभयें कांपे ॥ तेथ ※शीतळ आणिल्याही साक्षेपें ॥ तेणेंही रूपें मरणाची ॥ ६६० ॥ मिथ्या देहींचा देहाभिमान ॥ सदा भोगवी जन्ममरण ॥ तो अजरामर करितां जाण ॥ देहबंधन दृढ झालें ॥ ६१ ॥ साधोनियां योगसाधन ॥ दृढ केलें देहबंधन ॥ देहींच्या सिद्धि भोगितां जाण ॥ अधःपतन चुकेना ॥ ६२ ॥ हो कां ज्ञानार्थ योग साधितां ॥ प्रसंगें सिद्धि आलिया हातां ॥ त्याही त्यागाव्या तत्त्वतां ॥ निजस्वार्थालागूनी ॥ ६३ ॥ ज्याची चाली रायापाशीं ॥ लांच हाता ये तयासी ॥ तेणेंचि पावे अपमानासी ॥ तेवीं साधकासी घातका सिद्धी ॥ ६४ ॥ वृक्षासि मोडूनि आलिया फळें ॥ त्या फळासि वृक्ष नातळे ॥ तेवीं आलिया सिद्धीचे सोहळे॥ वैराग्यबळें त्यागावे ॥६५॥ कोरडेनि वैराग्यबळें ॥ त्याग कीजे तो आंडखळे ॥ त्याग विवेकवैराग्यमेळें ॥ तैं सिद्धींचे सोहळे तृणप्राय ॥ ६६ ॥ आंधळें हतेरूं मातलें ॥ पतन न देखे

१ ऋषीचें नांव. २ प्रवेश, वजन, वशीला. ३ लवेतां; मोडेतां. ४ जयास जात नाहीं. ५ हत्ती.

*मो. हें कळतसे गा आपैसें. ×ना. जिवाची परी जीव राहो. ०मो. तैसा अमरभावो नरदेहीं. +मो. नानासिद्धी, ※मो. शीतळी.

आपुलें ॥ तेवीं अविवेकें त्याग केले ॥ ते ते गेले अधःपाता ॥ ६७ ॥ मुळीं देहचि नश्वर एथ ॥ तेथींच्या सिद्धि काय शाश्वत ॥ ऐसे विवेकवैराग्ययुक्त ॥ होती अलिप्त देहभोगा ॥ ६८ ॥ एथ देह तितुका अनित्य ॥ आत्मा एक नित्य सत्य ॥ हें जाणोनि विवेकयुक्त ॥ जडले निश्चित आत्माभ्यासीं ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ योगं निषेवतो नित्यं कायश्चेत्कल्पतामियात् ॥ तच्छ्रद्दध्यान्न मतिमान्योगमुत्सृज्य मत्परः ॥ ४३

॥ टीका ॥ योग साधितां परमार्थी ॥सिद्धि वश्य झालिया हाता॥ त्यागाव्या तत्त्वतां ॥ निजहितार्थालागूनी ॥६७०॥ सिद्धि त्यागितां न वचती ॥ भोगबळें गळां पडती ॥ तरी ते सांडूनि *योगस्थिती ॥ माझे भजनपंथीं लागावें ॥ ७१ ॥ माझिये भक्तीच्या निजमार्गीं ॥ रिगमू नाहीं विघ्नांलागीं ॥ मी भक्तांच्या प्रेमभोगीं ॥ रंगलों रंगीं श्रीरंग ॥ ७२ ॥ सद्भावें करितां माझी भक्ती ॥ भक्तांसि नव्हे विघ्नप्राप्ती ॥ भक्तसहाय मी श्रीपती ॥ अहोरातीं संरक्षी ॥ ७३ ॥ करितां भगवद्भजन ॥ भक्तांसि बाधीना विघ्न ॥ ते भक्तीचें महिमान ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ७४ ॥

॥ श्लोक ॥ योगचर्यामिमां योगी विचरन् मद्व्यपाश्रयः ॥ नांतरायैर्विहन्येत निस्पृहः स्वसुखानुभूः ॥ ४४ ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे अष्टाविंशोऽध्यायः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ अनन्यप्रीतीं मज शरण ॥ सर्वभूतीं ×मद्भावन ॥ अभेदबुद्धीं माझें भजन ॥ त्यासि सर्वथा विघ्न बाधीना ॥७५॥ माझ्या भक्ताचे उपसर्ग ॥सकळ निर्दाळी मीं श्रीरंग॥ ज्यासि अनन्य भजनयोग ॥ त्यासि माझें निजांग वस्तीसी ॥ ७६ ॥ जेथ विघ्न धांवे भक्तांकडे ॥ तेथ तत्काळ माझी उडी पडे ॥ निवारीं निजभक्तांचें सांकडें ॥ तीं लडिवाडें पैं माझीं ॥७७॥ तीं लडिवाडें ह्मणशी कैसीं ॥ ※त्यांचें सांकडें मी सदा सोशीं ॥ राजा दंडितां प्रह्लादासी ॥ म्यां सर्वथा त्यासी रक्षिलें ॥ ७८ ॥ संकट मांडिलें अंबर्षीसी ॥ तैं म्यां अपमानिलें दुर्वासासी ॥ दहाही गर्भवास मी स्वयें सोशीं ॥ उणें भक्तांसी येऊं नेदी ॥ ७९ ॥ बाधा होतां गजेंद्रासी ॥ म्यां हातीं वैसवूनि सुदर्शनासी ॥उडी घालूनि त्यापाशीं ॥ +निमिषार्धेसी सोडविला ॥ ६८० ॥ द्रौपदीचिये अतिसांकडीं ॥ सभेसि करितां ते उघडी ॥ म्यां निजांगें घालूनि उडी ॥ वस्त्रांच्या कोडी पुरविल्या ॥ ८१ ॥ द्रौपदीचिया वस्त्रघडी ॥ नेसतां दिसेल ते उघडी ॥ यालागीं मी लवडसवडीं ॥ नेसतीं लुगडीं स्वयें झालों ॥ ८२ ॥ दावाग्नीं पीडितां गोपाळ ॥ निजमुखीं म्यां गिळिली ज्वाळ ॥ एथवरी भक्तांची कळवळ ॥ मज सर्वकाळ उद्धवा ॥ ८३ ॥ द्रौण्यस्त्राचे बाधेहातीं ॥ म्यां गर्भीं रक्षिला परीक्षिती ॥ गोकुळ पीडितां सुरपती ॥ म्यां धरिला हातीं गोवर्धन ॥८४॥ वांचवावया अर्जुनासी ॥ दिवसां लपविलें सूर्यासी ॥ हारी पतकरूनि रणभूमीसी ॥ सत्य भीष्मासी म्यां केलें ॥ ८५ ॥ ऐसा मी भक्तसहाकारी ॥ नित्य असतां शिरावरी ॥ भक्तासि विघ्न कोण करी ॥ मी श्रीहरी रक्षिता ॥ ८६ ॥ जे अनु-

१ विघ्न. २ अंबरीषावर. ३ घेऊन. ४ अश्वत्थाम्याचे शास्त्राचे बाधेपासून. ५ इंद्र. ६ पराभव पतकरून, हार खाऊन. ७ करूं लागले.

*मो. भोगस्थिती. ×मो. भगवद्भावन. ※मो. त्यांचीं अरिष्टें स्वयें सोशीं. +मो. क्षणार्धेसी.

सरले मद्भक्तीसी ॥ मी विघ्न लागों नेदीं त्या भक्तांसी ॥ निजांग अर्पोनियां त्यांसी ॥ निजीं निजसुखेंसी नांदवी ॥ ८७ ॥ भावें करितां माझी भक्ती ॥ साधकां स्वसुखाची प्राप्ती ॥ तेथें इच्छेंसी काम लोभ जाती ॥ माझी *सुखस्थिती मद्भक्तां ॥ ८८ ॥ ह्मणसी भक्तांसी देहांतीं ॥ होईल निजसुखाची प्राप्ती ॥ तैशी नव्हे माझी चौथी भक्ती ॥ देहीं वर्तती स्थिती सुखरूप ॥ ८९ ॥ देह राहो अथवा जावो ॥ परी सुखासि नाहीं +अभावो ॥ यापरी मद्भक्त पहाहो ॥ सुखें सुख निर्वाहो भोगिती ॥ ६९० ॥ भक्त वर्ततां दिसती देहीं ॥ परी ते वर्तती माझ्या ठायीं ॥ मी अवघाचि त्यांच्या हृदयीं ॥ सर्वदा पाहीं नांदत ॥ ९१ ॥ भक्त निजबोधें मजभीतरीं ॥ मी निजांगें त्यां आंत बाहेरी ॥ एवं निजसुखाच्या माजघरीं ॥ परस्परीं नांदत ॥ ९२ ॥ मी देव तो एक भक्त ॥ हेंही [१]बाहेरसवडी मात ॥ विचारितां आंतुवटाअर्थ ॥ मी आणि भक्त एकचि ॥ ९३ ॥ तूप थिजलें विघुरलें देख ॥ तेवीं मी आणि भक्त दोनी एक ॥ मज भक्तासि वेगळिक ॥ कल्पांतीं देख असेना ॥ ९४ ॥ मी तो एकचि येथें ॥ हेंही ह्मणावया नाहीं ×ह्मणतें ॥ यापरी मिळोनि मातें ॥ भक्त निजसुखातें पावले ॥ ९५ ॥ तो हा ब्रह्मज्ञानाचा कळस ॥ अध्याय जाण अठ्ठाविस ॥ बाप [२]विंदानीं हृषीकेश ॥ तेणें [३]घडे कळास मेळविला ॥ ९६ ॥ जेवीं अळंकारीं मुकुटमणी ॥ तेवीं अठ्ठाविसावा ब्रह्मज्ञानी ॥ श्रीकृष्ण भक्तांची निजजननी ॥ तो उद्धवालागोनि शृंगारी ॥ ९७ ॥ माता उत्तम अलंकारकोडी ॥ अपत्य शृंगारी अतिआवडीं ॥ तेवीं उत्तमोत्तम ज्ञाननिर्वेडी ॥ [४]कडोविकडीं शृंगारिला ॥ ९८ ॥ मातेसि आवडे [५]निर्पटणें ॥ तेवीं उद्धव वृद्धपणीचें तान्हें ॥ श्रीकृष्ण त्याकारणें ॥ गुह्यज्ञानें शृंगारी ॥ ९९ ॥ माता बाळकातें शृंगारी ॥ तें लेणें मागुतें उतरी ॥ उद्धव शृंगारिला श्रीहरी ॥ तें अंगाबाहेरी निघेना ॥ ७०० ॥ अंगीं लेणें जडलें अलोलिक ॥ तेणें उद्धव झाला अमोलिक ॥ पायां लागती तिन्ही लोक ॥ ब्रह्मादिक पूजिती ॥ १ ॥ निजात्मअळंकारें श्रीपती ॥ उद्धव शृंगारिला ब्रह्मस्थित्ती ॥ तेणें वंद्य झाला त्रिजगतीं ॥ त्यातें पुराणीं पढती महाकवी ॥ २ ॥ गोडीमाजीं श्रेष्ठ अमृत ॥ तेंही फिकें करूनि एथ ॥ उद्धवालागीं परमामृत ॥ श्रीकृष्णें निश्चित पाजिलें ॥ ३ ॥ अमर अमृतपान करिती ॥ ※तेही मरणार्णवीं बुडती ॥ उद्धव अक्षयी केला श्रीपती ॥ कथामृतीं [६]नेवदूनी ॥ ४ ॥ तेणें तो सर्वांगीं निवाला ॥ ०परमानंदीं तृप्त झाला ॥ तेणें उद्धवत्वा विसरला ॥ डोलों लागला स्वानंदें ॥ ५ ॥ तेव्हां स्वानंदउन्मत्तता ॥ दुजें निर्दळी देखतां ॥ संसार हाणोनि [७]लाता ॥ चढे माथां देवांच्या ॥ ६ ॥ चढोनि देवांचिया माथां ॥ [८]शेखीं गिळी देवभक्तता ॥ मग सच्चिदानंदस्वानंदता ॥ निजात्मता स्वयें झाला ॥ ७ ॥ तेथें सच्चिदआनंद ॥ हाही नाहीं त्रिविध भेद ॥ सदोदित परमानंद ॥ *स्वानंद शुद्ध कोंदला ॥ ८ ॥ नश्वर त्यागाचिये स्थिती ॥ अनश्वरातें 'संत' ह्मणती ॥ जडाची करितां निवृत्ती ॥ चिद्रूप ह्मणती वस्तूतें ॥ ९ ॥ जेथ

१ बाहेरल्या दृष्टीनें. २ कुशल, चतुर. ३ चातुर्यानें घुमट मिळविला, अथवा, चातुर्यानें मेळ योग्य मेळ घातला. ४ ज्ञानाच्या कौशल्यानें, युक्तीनें ५ चातुर्यानें, खुमारीनें, युक्तीनें. ६ शेवटचें मूल. ७ मग तें दागिना काढून ठेवते. ८ देव. ९ सद्रूप. १० अमृतानुभव प्रकरण ५ ओवी ९, १०, ११ पहा. ११ अचेतनाची. १२ चैतन्यरूप.

*ना. सुखस्थिती. +मो. अपावो. ×ना. पुरतें. ※ना. तेणें मरणेंचि मरती. ०ना. परमामृतें. *ना. स्वानंदकंद कोंदला.

दुःखाचा नाहीं बाधू ॥त्यातें ह्मणती आनंदू ॥एवं सच्चिदानंदशब्दू ॥जाण संमंधु मायिक॥७१०
वस्तु संत ना असंत ॥ चिद ना नव्हे अचिद ॥ ते सुखदुःखातीत ॥ जाण निश्चित सन्मा
॥ ११ ॥ हा अठ्ठाविशींचा निजबोध ॥ उद्धवासि तुष्टोनि गोविंद ॥ देता झाला स्वानंदकंद
भाग्यें अगाध तो एक ॥ १२ ॥ सांडोनि निजधामा जाणें ॥ स्वयें श्रीकृष्ण ज्याकारणें
देता झाला निजगुह्यठेवणें ॥त्याचें भाग्य वानणें तें किती ॥१३॥ जें नेदीच पित्या वसुदेवासी॥
जें नेदीच बंधु बळभद्रासी ॥जें नेदीच पुत्रा प्रद्युम्नासी॥ तें उद्धवासी दीधलें ॥१४॥ जें नेदी
देवकीमातेसी ॥ जें नेदीच कुंती आतेसी ॥ शेखीं नेदीच यशोदेसी ॥तें उद्धवासी दीधलें ॥१५
ह्मणाल सांगीतलें अर्जुनासी ॥ तोही अत्यंत पढियंता त्यासी ॥ त्याहातीं उतरावया धराभा
रासी ॥ युद्धीं त्वरेंसीं उपदेशिला ॥ १६ ॥ तैसें नव्हे उद्धवाकडे ॥ सावकाश निजनिवाडें ।
गुप्त ठेवणें *फाडोवाडें ॥ अवघें त्यापुढें अर्पिलें ॥ १७ ॥ पित्याचिया निजधनासी ॥ स्वामि
त्व लाभे निजपुत्रासी ॥ तेवीं कृष्णाचिया +गुह्यज्ञानासी ॥ झाला मिरांशी उद्धव ॥१८॥ पांड
वांमाजीं धन्य अर्जुन ॥ यादवांमाजीं उद्धव धन्य ॥ या दोहींच्या भाग्यासमान ॥ न दिसे
आन त्रिजगतीं ॥ १९ ॥ सकळ साराचा निजसारांश ॥ तो हा एकादशीं अठ्ठाविस ॥ जेवीं
यतींमाजीं परमहंस ॥ तेवीं अष्टाविंश भागवतीं ॥ ७२० ॥ जेवीं क्षीराब्धीमाजीं शेषशयन ।
त्याहीवरी जैसा नारायण ॥ तेवीं भागवतामाजीं जाण ॥ ब्रह्म परिपूर्ण अष्टाविंश ॥ २१ ।
एवढ्या महत्त्वाचें वैभव ॥ कृष्णकृपेनें पावला उद्धव ॥ बाप निजभाग्याची धांव ॥ ब्रह्म स्वयमे
व ×स्वयें झाला ॥ २२ ॥ जेवीं वैकुंठ परम पावन ॥ त्यावरी विराजे श्रीभगवान ॥ तेवीं
भागवतामाजीं जाण ॥ विराजमान अष्टाविंश ॥ २३ ॥ उद्धव झाला ब्रह्म पूर्ण ॥ त्यासि कृ
ष्णकृपा प्रमाण ॥ तें मी वाखाणीं अज्ञान ॥ देशभाषेनें प्राकृत ॥ २४ ॥ अंधासि सूर्य प्रसन्न
झालिया देखे तो निधान ॥ तेवीं प्रकटोनि जनार्दन ॥ हें गुह्यज्ञान बोलवी ॥ २५ ।
जनार्दन प्रकटला आतां ॥ हें बोलणें माझी मूर्खता ॥ तो स्वतःसिद्ध सदा असतां ।
हेंही झालों मी जाणता त्याचिया कृपा ॥ २६ ॥ त्याचिया कृपें ऐसें झालें ॥ माझें
मीपण निःशेष नेलें ॥ नेलेपण देखों नाहीं दीधलें ॥ जेवीं सूर्ये केलें अंधारा ॥ २७ ॥
मज कृपा केली जनार्दन ॥ हेंही नेणें मी अज्ञान ॥ तेणें दयाळुवें कृपा करून ॥ हें
गुह्यज्ञान बोलविलें ॥ २८ ॥ निकट असतां जनार्दन ॥ मी नेणें त्याचें महिमान ॥
तेणें आपली महिमा आपण ॥ मज मुखें जाण बोलविली ॥ २९ ॥ मी जें ह्मणे माझें मुख ॥
तेंही जनार्दन झाला देख ॥तेणें मुखें ०निजात्मसुख ॥ बोलवी निष्टंक ※निजात्मसत्ता ॥७३०॥
एवं माझेनि नांवें कविता ॥ परी जनार्दनाचि झाला वक्ता ॥ तेणें वक्तेपणें तत्त्वतां ॥ रसाळ
कथा चालिली ॥ ३१ ॥ ब्रह्मरसें रसाळ कथा ॥ निरूपिलें श्रीभागवता ॥ त्यामाजीं ब्रह्मरस-
तल्लीनता ॥ जाण तत्त्वतां अष्टाविंश ॥ ३२ ॥ अठ्ठाविसाव्याचें निरूपण ॥ तें तत्त्वतां *ब्रह्म
परिपूर्ण ॥ श्रद्धेनें कारितां श्रवण ॥ उद्धव संपूर्ण निवाला ॥ ३३ ॥ उद्धव निवोनियां आपण ॥

---

१ ज्या उद्धवाला. २ ' कुंती ' कृष्णाची आत. ३ स्पष्टपणें. ४ हक्कदार, वारस. ५ परमहंस ह्मणजे यतीमध्यें एक भेद आहे. ६ द्रव्याचा ठेवा.

*ना. वाडेंकोडें. +ना. निजज्ञानासी ×मो. तो झाला. ०मो. निजसुख. ※मो. निजसत्तों. *ना. ब्रह्मचि पूर्ण.

स्वयें विचारिता झाला जाण ॥ ह्मणे हें शुद्ध ब्रह्मज्ञान ॥ परी प्राप्ति कठिण अबळांसी ॥ ३४ ॥ *याचि स्वरूपाची प्राप्ती ॥ सुगम होय साधकांप्रती ॥ पुढिले अध्यायीं येचि अर्थी ॥ उद्धव विनंती करील ॥ ३५ ॥ कडा फोडूनि मार्ग कीजे ॥ कां उंचीं फरशे बांधिजे ॥ तेवीं सुगमें निर्गुणें पाविजे ॥ तो उपाव पुशिजे उद्धवें ॥ ३६ ॥ ब्रह्मप्राप्तीचा सुगम उपावो ॥ स्वयें सांगेल देवाधिदेवो ॥ तो सुरस पुढील अध्यावो ॥ साधकांसि पहाहो परमार्थसिद्धी ॥ ३७ ॥ पव्हणी-परिस पायउतारा ॥ अबळीं उतरिजे भवसागरा ॥ तैसा साधकांलागीं सोपारा ॥ उपाव पुढारा हरि सांगेल ॥ ३८ ॥ सीतेचेनि कृपापडिभरें ॥ सेतु बांधिजे रामचंद्रें ॥ तेथ समुद्र तरती वानरें ॥ जीं वनचरें अतिमंदें ॥३९॥ तेवीं उद्धवप्रश्नप्रीतीसी ॥भवाब्धिसेतु हृषीकेशीं ॥ बांधिला निजभक्तिउपायेंसी ॥ तेथ तरती आपैसीं भाविकें अबळें ॥ ७४० ॥ कृष्णभक्ति सेतु-द्वारें ॥ तरलीं जडमूढ पामरें ॥ ते भक्ति सांगिजेल यादवेंद्रें ॥ श्रोता सादरें पारेसावी ॥ ४१ ॥ एका जनार्दना शरण ॥ तेणें श्रोते ×सुप्रसन्न ॥ पुढील अध्यायाचें कथन ॥ तेणें साधकजन तरतील ॥ ४२ ॥ सांडूनियां एकपण ॥ एका जनार्दना शरण ॥ सुगम साधे आत्मज्ञान ॥ तें भक्तिसाधन हरि सांगे ॥ ७४३ ॥ इति श्रीभागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे परमहंससंहितायां एकाकारटीकायां परमार्थनिर्णयो नाम अष्टाविंशतितमोऽध्यायः ॥ २८ ॥ अध्याय ॥ २८ ॥ ओंव्या ॥ ७४३ ॥ श्लोक ॥ ४४ ॥ एवंसंख्या ॥ ७८७ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥

# अध्याय एकोणतिसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ ओंनमो सद्गुरु दयार्णव ॥ तुझे कृपेसि नाहीं थांव ॥ कृपेनें तारिसी जीव ॥जीवभाव सांडवूनी ॥१॥ सांडवूनि देहबुद्धी॥ निरसोनि +जीवोपाधी ॥ ०भक्त तारिसी भवाब्धीं ॥ कृपानिधी कृपाळुवा ॥ २ ॥ तुझें पाहतां कृपाळूपण॥ ※जीवासि जीवें मारी पूर्ण ॥ नामा रूपा घालिसी शून्य ॥ *जाति गोत संपूर्ण निर्दाळिसी ॥३ ॥ निर्दळू-नि आपेंपरां[11] ॥ निसंतानें[12] करिसी संसारा ॥ तो तूं जिवलग सोयरा ॥ कृपाळु खरा घडे केवीं ॥ ४ ॥ जेवीं आंधारीं नांदते ◌सृष्टी ॥ भासती नक्षत्रें खद्योतकोटी ॥ ९ते आंधारेंसी सूर्य घोंटी[13] ॥ तेवीं तुझी भेटी साधकां ॥५॥ तुझी जेथ साचार भेटी ॥ तुवां केलिया कृपादृष्टी ॥ संसारभेदाची त्रिपुटी ॥ त्रिगुणेंसी सृष्टी दिसेना ॥ ६ ॥ न दाखवूनि गुणादिसृष्टी ॥ दाविसी अद्वय ब्रह्म दृष्टीं ॥ 7त्यासि कदा नव्हे दृष्टिभेटी ॥ भेटीसि तुटी कदा न पडे ॥ ७ ॥ जो कदा

१ विवेकासहित वैराग्याचें ज्यांस बळ नाहीं अशांस. २ पर्वताचा कडा. ३ उंच स्थानास जशा पायऱ्या कराव्या. ४ सहज, अनायासें. ५ ब्रह्म. ६ नावेपेक्षांही पायउतार सोपा. ७ संसाररूपी समुद्रा-वरील पूल. ८ आपोआप. ९ पार, अंत. १० माया. ११ आपले व परके असे भाव. १२ समूळ नाहींसें. १३ गिळी.

*मो. ऐशियाची प्राप्ती. ×ना. सुखसंपन्न. +मो. उपाधी. ०मो. भक्तासि. ※मो. जीव शिव मारिसि संपूर्ण. *मो. जाती गोतपण निर्दाळिसि. ◌मो. दृष्टी. ९मो. ते आंधारेंनिशी. 7मो. तुझी झालिया भेटी.

न देखिजे दृष्टीं ॥ त्यासी केवीं होय भेटी ॥ भेटीसि कदां न पडे तुटी ॥ हेही गोष्टी घडे केवीं ॥८॥ जैसा गर्भ मातेच्या पोटीं ॥ असोनि माउली न देखे दृष्टीं ॥ तरी तिचे भेटीसि *नव्हे तुटी ॥ ×तेवीं तुझे पोटीं साधक ॥ ९ ॥ माता कळवळोनि पाळी तान्हें ॥ शेखीं माउलीतें तें नेणे ॥ तेवीं तुजमाजीं +अज्ञानें ॥तुवां प्रतिपाळणें ※निजबोधें ॥१०॥ जन्मल्या बाळकाकारणें ॥ मातां वाढवी शहाणपणें ॥ तेवीं तुझेनि ०निजज्ञानें ॥ *सज्ञान होणें साधकीं ॥११॥ साधकीं लाहतां तुझें ज्ञान॥ 1थितें नाठवे मीतूंपण॥ जीव 2विसरला जीवपण॥ अद्वय पूर्ण परमात्मा ॥१२॥ असोत या बहुत गोष्टी ॥नव्हतां सद्गुरुकृपादृष्टी ॥करितां उपायांच्या कोटी ॥ नव्हे भेटी 3परमार्थी ॥१३॥ जाहलिया सद्गुरुकृपादृष्टी॥साधनें पळती उठाउठी॥ ब्रह्मानंदें कोंदे सृष्टी ॥ स्वानंदपुष्टी साधकां ॥ १४ ॥ जाहलिया सद्गुरुकृपा प्राप्त ॥ उपनिषदाचा मथितार्थ॥ साधकांचा चढे हात ॥ कृपा समर्थ श्रीगुरूची ॥ १५ ॥ सद्गुरुकृपा समर्थ ॥ त्या गुरुकृपा श्रीभागवत ॥ वाखाणिलें जी प्राकृत ॥ शुद्ध मथितार्थ सोलींव ॥ १६ ॥ श्रीजनार्दन कृपादृष्टीं ॥ माझ्या मराठ्या ओंरुष गोष्टी ॥ रिघाल्या एकादशाचे पोटीं ॥ स्वानंदतुष्टीं निजबोधें ॥ १७ ॥ ' संस्कृतप्राकृत परवंडी ॥ सज्ञान सेविती स्वानंदगोडी ॥ गाय काळी आणि तांबडी ॥ परी दुधीं वाकुडी चवी नाहीं ॥ १८ ॥ तेवीं संस्कृतप्राकृतभाखा ॥ ब्रह्मासि पालट नाहीं देखा ॥ उभय 4अभेदें वदला एका ॥ साह्य निजसखा जनार्दन ' ॥ १९ ॥ जनार्दनकृपेस्तव जाण ॥ अष्टाविंशाचें निरूपण ॥ गुह्य गंभीर स्वानंदघन ॥ तेंही केलें व्याख्यान अतिशुद्ध ॥ २० ॥ तेथें नानाविधा उपपत्ती ॥ निजबोधें साधूनि युक्ती ॥ स्वयें बोलिला श्रीपती ॥ ब्रह्मस्थिती निष्टंक ॥ २१ ॥ ब्रह्म अद्वयत्वें परिपूर्ण ॥ तेथ हेतु मातु अनुमान ॥ न रिघे बुद्धियुक्तीसीं मन ॥ अगम्य जाण सर्वार्थीं ॥२२॥ नाहीं दृश्य द्रष्टा दर्शन ॥ नाहीं ध्येय ध्याता ध्यान ॥ कर्म 5कर्ता कारण ॥ 9मीतूंपण असेना ॥ २३ ॥ 7युक्तीनें सांडिला प्राण ॥ दृष्टांतीं वाहिली आण ॥ प्रमाणें जाहलीं अप्रमाण ॥ 8बोधेंसी क्षीणें विवेक जाहला ॥ २४ ॥ तेथ बोलणें ना मौन ॥ आकार ना शून्य ॥ 6गुण आणि निर्गुण ॥ समूळ जाण असेना ॥ २५ ॥ ऐशी ब्रह्मींची निजस्थिती ॥ कृष्णकृपा उद्धवासि प्राप्ती ॥ अबळांसि अगम्य निश्चितीं ॥ जन कैशा रीतीं तरतील ॥ २६ ॥ ब्रह्मस्थिति अतिदुर्गम ॥ हें उद्धवासि 0कळलें वर्म ॥ साधकांचें साधावया काम ॥ उपावो सुगम पूसत ॥२७॥ कृष्ण निजधामा जाईल आतां ॥ मग Aब्रह्मप्राप्ति न ये हातां ॥ साधक गुंतती सर्वथा ॥ उपाय तत्त्वतां कोण सांगे ॥ २८ ॥ एवं साधकांचिया हिता ॥ उद्धव कळवळोनि तत्त्वतां ॥ सुगमत्वें ब्रह्मप्राप्ती ये हाता ॥ तो उपाय अच्युता पूसत ॥ २९ ॥ एकुणतिसावे अध्यायीं निरूपण ॥ ब्रह्मप्राप्तीचें सुगम साधन ॥ आणि

---

१ छांदिष्ट, पोरकट. २ प्रकार. ३ असमर्थ. ४ इतर साधनें करण्यास असमर्थ अशांस. ५ संसारांतच राहतील.

*मो. न पडे तुटी. ×मो. तेवीं तुझी भेटी साधकां. +मो. अज्ञानें जन. ※ना. निजलोभें. ०ना. जीवपणें. *ना. अद्वयपूर्ण परमात्मा. 1मो. जेथें नाठवे. 2मो. विसरे. 3मो. परमार्थीं. 4ना. अभेद. 5मो. कर्तव्यता कारण. 9मो. जेथें मीतूंपण. 7मो. बुद्धीनें सांडिला. 8ना. बोधेंसी अभेद क्षीण. 6मो. गुण ना निर्गुण. 0मो. कळों सरलें. Aपो. ब्रह्मस्थिती.

सप्रेम भगवद्भजन ॥ तें भक्तिलक्षण हरि सांगे ॥ ३० ॥ सुगम साधनें ब्रह्मप्राप्ती ॥ अबळांसि *लाभे जैशा रीतीं ॥ साश्लोकीं देवासि विनंती ॥ उद्धव तदर्थी करितसे ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ सुदुस्तरामिमां मन्ये योगचर्यामनात्मनः ॥ यथांऽजसा पुमान् सिद्ध्येत्तन्मे ब्रूह्यंजसाच्युत ॥ १ ॥

॥ टीका ॥ पूर्वाध्यायीं ब्रह्मस्थिती ॥ सांगीतली ते दुर्गम गती ॥ भोळयाभाविकां अबळांप्रती ॥ हे ब्रह्मप्राप्ती साधेना ॥ ३२ ॥ वस्तु व्यक्त ना अव्यक्त ॥ शेखीं प्रकट ना नव्हे गुप्त ॥ न कळे मूर्त कीं अमूर्त ॥ केवीं साधकां तेथ प्रवेश ॥ ३३ ॥ जें स्थूळ ना सूक्ष्म होये ॥ जें आहे नाहीं हा शब्द न साहे ॥ जेथ पाहतें पाहणें दोनी जाये ॥ तें साधकां होये केवीं साध्य ॥३४॥ जें दिसे तें ब्रह्म ह्मणावें ॥ तंव ते +माया रूपें नांवें ॥ आतां नाहींचि ह्मणोनि सांडावें ॥ तेणेंही नाडावें साधकीं ॥ ३५ ॥ जें आकार ना नव्हे शून्य ॥ जेथें न रिघे ध्येय ध्यान ॥ ज्यासि लाजे ज्ञेय ज्ञान ॥ ज्यातें साधन स्पर्शेना ॥ ३६ ॥ जें न चढे शब्दाचे हात ॥ जें नातुडे मौना आंत ॥ आंत बाहेर नाहीं जेथ ॥ काय साधकीं तेथ ×धरावें ॥ ३७ ॥ नाहीं आंतबाहेर विचारा ॥ तेथ काय धरावें निर्धारा ॥ ०जेथ निर्धारूही पुरा ॥ धरावया धीरा धीर नव्हे ॥३८॥ साधकीं स्थिर करावया मन ॥ कांहीं न दिसे अवलंबन ॥ तेथें अनात्मे अज्ञान जन ॥ त्यांसि दुस्तर जाण हा योगू ॥ ३९ ॥ यापरी निजात्मप्राप्ती ॥ कदा न चढे अबळांहातीं ॥ मज तंव मानलें निश्चितीं ॥ ※हे आत्मस्थिती दुस्तरू ॥ ४० ॥ ऐशिया 1ब्रह्मींची ब्रह्मप्राप्ती ॥ अज्ञान अप्रयासें पावती ॥ तैशी सुगम साधनस्थिती ॥ सांग श्रीपती कृपाळुवा ॥ ४१ ॥ तुवां निजधामा प्रयाण ॥मांडिलेंसे अतित्वरेन॥येथ तरावया अज्ञान॥सुगम साधन सांगिजे॥४२॥ ह्मणोनि घातलें लोटांगण ॥ धांवोनि धरिले श्रीकृष्णचरण ॥ तुज गेलिया अज्ञान जन ॥ तरावया साधन सुगम सांगे ॥ ४३ ॥ पव्हणियांपरीस पायउतारा ॥ स्त्रियां अबळां अतिसोपारा ॥ तैशिया उपायप्रकारा ॥ सारंगधरा सांगिजे ॥ ४४ ॥ तुझ्या ठायीं सद्भाव पूर्ण ॥ आणि नेणती 2शब्दज्ञान ॥ ऐसे जे अज्ञान जन त्यांसी ॥ तरावया साधन सुगम सांगे ॥४५॥ मनोनिग्रहो अतिकठिण ॥ साधकां नेमवेना संपूर्ण ॥ तेंचि अर्थीचें निरूपण ॥ उद्धव आपण सांगत ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ प्रायशः पुंडरीकाक्ष युंजतो योगिनो मनः ॥ विषीदंत्यसमाधानान्मनोनिग्रहकर्शिताः ॥ २ ॥

॥ टीका ॥ ऐकें कृष्णा कमलनयना ॥ शिणतां साधक साधना ॥ कदा नाकळवे मना ॥ तेही विवंचना अवधारीं ॥ ४७ ॥ निग्रहावया निजमन ॥ 7साधक साधिती प्राणापान ॥ त्यांसीही

---

१ इतर साधनें करण्यास असमर्थ अशांस. २ सहा श्लोकांत. ३ आधार. ४ ज्यांस आत्मज्ञान नाहीं असे. ५ येणार नाहीं. ६ गमन. ७ पोहोण्यापेक्षां, नौकेपेक्षां. ८ स्वाधीन ठेवितां येत नाहीं. ९ विचार.

*मो. फावे. +मो. मायावी रूपें नांवें. ×मो. साधावें. ०मो. जेथ निर्धार नाहीं पुरा ॥ धरावया धीरा धीर कैंचा ॥ ※मो. हे अगम्यगती दुस्तर. 1मो. ब्रह्माची प्राप्ती. 2मो. आत्मज्ञान. 7मो. साधकीं साधितां.

छळोनियां मन ॥ जाय निघोन तत्काळ ॥ ४८ ॥ घालूनियां एकांतीं आसन ॥ मनोनिग्रहीं जे सावधान ॥ त्यांसीही ठकूनियां मन ॥ जाय निघोन चपलत्वें ॥४९॥ मनोनिग्रहीं आह्मी हटी॥ ह्मणोनि रिघाले गिरिकपाटीं ॥ त्यांसि ठकूनि मन शेवटीं ॥ जाय उठाउठी चपलत्वें ॥ ५० ॥ एकीं आकळावया मन ॥ त्यजूनि बैसले अन्न ॥ तंव मनें केलें आनेआन ॥ जागृतिस्वप्न अन्नमय ॥५१॥ मनोनिग्रह करितां देख ॥ मन खवळे अधिकाधिक ॥ मनोनेमी सज्ञान लोक ॥ शिणले साधक साधनीं ॥ ५२ ॥ वारा बांधवेल मोटें ॥ अग्नि प्राशवेल अवचटें ॥ समुद्र घोंटैवेल घोंटें ॥ तरी आत्मनिष्ठ मन नये ॥ ५३ ॥ आकाश करवेल चौघडी ॥ महामेरु बांधवेल पुडीं ॥ शून्याची मुरडवेल नरडी ॥ परी मनाच्या वोढी अनिवार ॥ ५४ ॥ काळ जिंकवेल तत्त्वतां ॥ त्रिभुवनींची *लाभेल सत्ता ॥परी मनोनिग्रहाची वार्ता ॥ तुजवीण अच्युता घडेना तें ॥५५॥ मन तापसां तत्काळ छळी ॥ मन नेमस्तांचा नेम टाळी ॥ मन बळियांमाजीं महाबळी ॥ करी रांगोळी धैर्याची ॥ ५६ ॥ मन इंद्रातें तळीं पाडी ॥ मन ब्रह्मयातें हटेंचि नाडी॥ ऐशी मनाची वोखटी खोडी ॥ आपल्या प्रौढीं नावरे ॥ ५७ ॥ साधनीं साधक शिणतां ॥ मनोजयो नयेचि हातां ॥ तुजवांचोनि अच्युता ॥ मन सर्वथा नावरे ॥ ५८ ॥ अत्यंत साधूनि निरवडी ॥ मनोजयो आणितां जोडी ॥तंव सिद्धींची दाटे आडाडी ॥तेणेंही मन नाडी साधकां ॥ ५९ ॥ तुझी कृपा नव्हतां जाण ॥ ×साधकां कदा नावरे मन ॥ तूं तुष्टल्या जनार्दन ॥ +मनाचें मनपण स्वयें विरे ॥ ६० ॥ सर्वभावें न रिघतां शरण ॥ साधकां कदा नावरे मन ॥ मनोनिग्रहार्थ जाण ॥ तुझिया चरणां शरण रिघावें ॥ ६१ ॥

॥ श्लोक ॥ अथात आनंददुघं पदांबुजं हंसाः श्रयेरन्नरविंदलोचन ॥ सुखं नु विश्वेश्वर योगकर्मभिस्त्वन्माययाऽमी विहता न मानिनः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ कमलापती कमलवदना ॥ कमलालया कमलनयना ॥ नाभिकमळीं कमलासना ॥ तुवां ब्रह्मज्ञाना ⁂अर्पिलें ॥ ६२ ॥ त्या तुझ्या चरणींचें चरणामृत ॥ तुझ्या कृपा ज्यास होय प्राप्त ॥ मनोजय त्याचा अंकित ॥ तो होय विरक्त भवभावा ॥ ६३ ॥ तुझ्या चरणामृताची गोडी ॥ मनोजयातें तत्काळ जोडी ॥ आधिव्याधि भवपाश तोडी ॥ ०स्वानंदकोडी साधकां ॥ ६४ ॥ सकळ साधनांचें निजसार ॥ सांख्ययोगविवेक *सधर ॥ त्या साराचेंही निजसार तुझी भक्ति साचार श्रीकृष्णा ॥ ६५ ॥ जाणोनि भक्तीचें रहस्य ॥ भजनप्रेमा लोधलें मानस ॥ तेंचि विज्ञान राजहंस ॥ भजनसारांश सेविती ॥ ६६ ॥ काया वाचा आणि मन ॥ सद्भावें सदा संपन्न ॥ ऐशिया भक्तां तुझे चरण ॥ स्वानंदें पूर्ण दुभती ॥६७॥ धर्मअर्थकाममोक्षांसी ॥ सांग साधनें सिद्धी त्यांसी ॥ विकळ जाहलिया साधनांसी ॥ ये साधकांसी अपावो ॥ ६८ ॥ तैशी तंव तुझी भक्ति नव्हे ॥ तुज भजतां जीवें भावें ॥ भक्तांसी विघ्न कदा न पवे ॥ शेखीं भक्त नागवे विघ्नांशी ॥ ६९ ॥ जैं सूर्या आणि खद्योतासी ॥ भेटी होय सावकाशीं ॥ तरी

१ दुसरेंच, निराळेंच २ सहज, कदाचित. ३ प्राशवेल. ४ घांवा. ५ खालीं. ६ निग्रह. ७ गर्दी. ८ स्वाधीन. ९ मिळवी. १० पूर्ण स्वानंद देतात.

*मो. लाधेल. ×मो. साधकां आधीन नव्हे मन. +ना. मनपणा मन स्वयें विसरे. ⁂मो. उपदेशिलें. ०मो. स्वानंदगोडी. *मो. चतुर.

विघ्नें भक्तांपाशीं ॥ धीरू यावयासी न धरिती ॥ ७० ॥ पडतां पंचाननाची घाणी ॥ होय मदगजा भंगणी ॥ तेवीं तुझ्या भावार्थभजनीं ॥ होय धूळधाणी विघ्नांची ॥ ७१ ॥ येणेंचि निश्चयें निजसंपन्न ॥ तुझ्या चरणां अनन्यशरण ॥ त्यासि नातळे जन्ममरण ॥ मा इतर विघ्न तें कैंचें ॥ ७२ ॥ येणें भावें जे अनन्यशरण ॥ त्यांसि तुझे निजचरण ॥ स्वानंदें सदा करिती पूर्ण ॥ जेवीं कामधेनु जाण वत्सासी ॥ ७३ ॥ भक्तिसरोवरीं निर्मळ ॥ नवविधरसें रसिक जळ ॥ तेथ तुझें चरणकमळ ॥ विकाशती केवळ भावार्थसूर्यें ॥७४॥ तेथ *स्वानुभवैकभ्रमर ॥ झेंपावोनियां अरुवार ॥ कुंचवों नेदितां केसर ॥ ×आमोदसुखसार सेविती ॥ ७५ ॥ तेथ विवेक परमहंस ॥ ते सरोवरींचे राजहंस ॥ चरणकमळीं करूनि वास ॥ आमोद सुरस सेविती ॥ ७६ ॥ होका आर्तजिज्ञासुअर्थार्थी ॥ हेही ते सरोवरीं वसती ॥ परी कमळआमोद नेणती ॥ तरी ते क्रीडती कमळातळीं ॥ ७७ ॥ ऐशिया भोळ्या भक्तांसी ॥ तूं तारिसी हृषीकेशी ॥ एवं जे जे लागले भक्तीसी ॥ अपावो त्यांसी असेना ॥ ७८ ॥ भावें करितां तुझें भजन ॥ तूं भावार्थें होशी प्रसन्न ॥ +तुझे प्रसन्नते तुझे चरण ॥ स्वानंदपूर्ण वर्षती ॥७९॥ तूं विश्वमूर्ति विश्वेश्वरू ॥ तूं ब्रह्मादिकांचा ईश्वरू ॥ तुझा जाहलिया अभयकरू ॥ भक्तां भवभारू स्पर्शेना ॥८०॥ तुझी भक्ति तें त्यांचें सत्कर्म ॥ तुझा भाव ठायीं तो त्यांचा स्वधर्म ॥ तुज नैवेद्य अर्पणें उत्तम ॥ तोचि याग परम भक्तांचा ॥८१॥ नित्य °स्मरणें तुझें नाम ॥ हाचि भक्तांचा 7जपसंभ्रम ॥ तुझें कीर्तन मनोरम ॥ ते समाधि परम भक्तांची ॥८२॥ एवं भक्त करिती जें जें कर्म ॥ तें तें तूं होसी पुरुषोत्तम ॥ ज्यासि तूं तुष्टसी मेघश्याम ॥ त्यासि भवभ्रम स्पर्शेना ॥८३॥ यापरी भजनमुखें ॥ भक्त तारिसी निजात्मसुखें ॥ तेणें सुखाचेनि हरिखें ॥ अतिसंतोखें डुल्लसी ॥ ८४ ॥ एवं अनपेक्षितां भक्तजन ॥ तूंचि निजसुखें करिशी पूर्ण ॥ तुज न रिघती शरण ॥ ते मायेनें जाण मोहिले ॥ ८५ ॥ जे तुझ्या चरणांशी विमुख ॥ ते स्वप्नींही न देखती सुख ॥ चढतें वोढतें भोगिती दुःख ॥ मायेनें मूर्ख ते केले ॥८६॥ त्यजूनि तुझें चरणध्यान ॥ करितां योग याग क्रिया ❀ज्ञान ॥ तें तें साधकां होय बंधन ॥ खवळे अभिमान 6ज्ञातृत्वें ॥ ८७ ॥

॥ पूर्वश्लोकाचा चरण ॥ त्वन्मायया ऽमी विहता न मानिनः ॥

॥ टीका ॥ हाचि श्लोकींचा 1अंतील चरण ॥ उपक्रमोनियां आपण ॥ पंडितांचा ज्ञानाभिमान ॥ अभक्तपण प्रकाशी ॥ ८८ ॥ आह्मी ज्ञाते आह्मी योगी ॥ आह्मी प्रवर्तक कर्ममार्गीं ॥ आह्मी श्रोत्रिय पवित्र जगीं ॥ आमची मैंगी अतिशुद्ध ॥ ८९ ॥ लोक केवळ अज्ञान ॥ तैसे आह्मी नव्हों आपण ॥ आमचें वचन प्रमाण ॥ सर्वार्थीं जाण सर्वांशीं ॥ ९० ॥ आह्मी ज्ञाते हें मानूनि दृढ ॥ ज्ञानाभिमानें केले मूढ ॥ पांडित्यें होऊनि गर्वारूढ ॥ दुःख दुर्वाड भोगिती ॥ ९१ ॥ अभिमानाऐसा वैरी ॥ आन नाहीं संसारीं ॥ तो हा ज्ञानाभिमानेंकरीं ॥

१ सिंहाचा वास हत्तीस आल्याबरोबर, सिंहाचे तडाक्यांत हत्ती सांपडल्याबरोबर. २ मस्त हत्तीचा गर्व नाहींसा होतो, मस्त हत्तीचा नाश होतो. ३ स्वादु, गोड. ४आत्मस्वरूपानुभव हाच भ्रमर. ५हळूच. ६ धक्का. ७ सुवास. ८ विघ्न. ९ जपाचा उत्सव. १० अधिकाधिक. ११ शेवटचा. १२ आचरण, मार्ग. १३ कधीं न सांपडणारें असें.

*ना. स्वानुभविक भ्रमर. ×मो. आमोद सुरस सेविती. +ना. तुझ्या प्रसन्नता तझे चरण. °मो. स्मरतां. 7मो. जप नेम. ❀मो. साधनें. 6ना. शत्रुत्वें. 1मो. अंतींचा.

घाली दुस्तरीं सज्ञाना ॥ ९२ ॥ असो हे अभक्तांची कथा ॥ जे चुकले भक्तिपंथा ।। यालागीं नानापरीची व्यथा ।। देहअहंता सोशिती ॥ ९३ ॥ जिहीं भक्तीसि विकूनि चित्त ॥ जाहले अनन्यशरणागत ॥ त्यांसि तारिता तूं जगन्नाथ ।। निजसुखें निजभक्त नांदविशी ।। ९४ ।। तुझे जे कां भक्तजन ।। जिहीं भक्तीसि विकिला प्राण ॥ त्यांसि न मागतां ब्रह्मज्ञान ।। सहजें जाण ठसावे ।। ९५ ॥ तुझें करितां निजभजन ॥ भक्तांसि कदा न बाधी विघ्न ॥ सुखें होती *सुखसंपन्न ।। हें नवल कोण गोविंदा ।। ९६ ॥

॥ श्लोक ॥ किं चित्रमच्युत तवैतदशेषबंधो दासेष्वनन्यशरणेषु यदात्मसात्त्वम् ॥
यो रोचयन् सहमृगैः स्वयमीश्वराणां श्रीमत्किरीटतटपीडितपादपीठः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ विघ्न न बाधी तुझ्या भक्तांसी ।। हें नवल नव्हे हृषीकेशी ।। तूं भुलोनि भक्तप्रेमासी ।। भक्ताधीन होशी सर्वदां ॥ ९७ ॥ जे तुज अनन्यशरण ॥ तूं सर्वदा त्यांअधीन ॥ तेचि अर्थीचें निरूपण ।। उद्धव आपण सांगत ॥९८॥ होऊनि निजदासा अधीन ॥ मध्यरात्रीं पुरविशी अन्न ।। शेखीं तुज न मिळे ×भोजन ।। भुकेल्या पान भाजीचें ॥ ९९ ॥ उभयसेनेची [१]दोंहडी ।। शस्त्रें सुटतां अतिकडाडी ।। तेथ सोशिसी रथाची वोढी ॥ शेखीं रथींचीं घोडीं तूं धुशी ॥ १०० ॥ तुझा मुकुट नाकळे वेदांसी ।। तेथ भक्तांचा चाबूक खोंविशी ।।देखतां सकळिकां [२]रायांसी ॥ रणीं घोडे +धुसी निजांगें ।। १ ।। वागोरे धरोनि दांतीं ।। चारी घोडे चहूं हातीं ॥ धुतां न लाजसी श्रीपती ।। भक्ताधीन निश्चितीं तूं ऐसा ॥ २ ।। बंदीहुनी सोडविलें [३]ज्यासी ॥ तो उग्रसेन स्वामी करिसी ।। उच्छिष्टें धर्माघरीं काढिशी ।। शेखीं गायी राखिशी नंदाच्या ॥ ३ ।। असो ते थोर थोरांची मात ।। तूंचि मिळोनि गोपाळांत ॥ उभउभ्यां खासी त्यांचा भात ॥ छंदें नाचत त्यांचेनी ॥ ४ ।। न म्हणसी सोंवळें ववळें ।। प्रत्यक्ष केवळ गोंदळे ।। त्यांचेनि उच्छिष्टकवळें ॥ स्वानंदमेळें डुल्लसी ।। ५ ॥ द्रौपदीचिये अतिसांकडीं ॥ नेसतीं जाहलासि तूं लुगडीं ॥ गोपिकांचिया निजआवडीं ॥ तूं कडोविकडी नाचशी ॥ ६ ॥ [४]पूर्णकलश नेतांपाहीं ।। कांटा मोडला गोपीचे पायीं ।। तो पाय धरूनि ✻हातीं दोहीं ॥ तूं कांटा लवलाहीं काढिशी ।। ७ ॥ खांदीं वाहिलें दुर्वासासी ।। द्वारपाळ तूं बळीपाशीं ॥ ऐसा भक्ताधीन होशी ॥ वचनें वर्तसी दासांच्या ॥८॥ देवा तूं ऐसें म्हणसी ।। गोपाळत्व सत्य मानिसी ॥ तें तुज न घडे हृषीकेशी ॥ तूं पूज्य होसी सुरवरां ॥ ९ ॥

॥ पूर्वश्लोकींचें पद ॥ श्रीमत्किरीटतटपीडितपादपीठः ॥

॥ टीका ॥ इंद्र चंद्र आणि महेंद्र ॥ ब्रह्मा बृहस्पती आणि ०शंकर ॥ ऐसे पूज्य जे कां ईश्वर । तेही तुझे किंकर श्रीकृष्णा ॥११०॥ तुझे आसनाचे पादपीठीं ।। त्यांच्या मुकुटमणींच्या कोटी ॥ घर्षणीं झणत्कार उठी ॥ नमस्कारां दाटी सुरवरां ॥ ११ ॥ तुझी आज्ञा न मानितां ॥ ब्रह्मादिकांचिया माथा ।। [५]सांट [६]वाजे॰ सर्वथा।।मां इतरांची कथा ते कोण।।१२।।तुझे आज्ञेभेणें जाण ॥ वायु वागवी नेमस्त प्राण ॥ सूर्य चालवी दिनमान ॥ तुझे आज्ञेभेण गोविंदा ।। १३ ॥

१ मध्यें. २ सर्व राजांसमोर. ३ कंसाचा बंदींत टाकिलेला बाप, तो कृष्णानें सोडवून राज्यावर स्थापिला. ४ पाण्यानें पूर्ण भरलेली घागर. ५ अग्रभाग. ६ चाबुक, भय.

*मो. ज्ञानसंपन्न. ×मो. जाण. +मो. वागविशी. ✻मो. हृदयीं. ०मो. रुद्र. ॰मो. वाजती.

तुझे आज्ञेचे भयभागीं ॥ समुद्र मर्यादा नुल्लंघी ॥ तुझ्या आज्ञेच्या नियोगीं ॥ वर्षिजे मेघीं जळ काळें ॥ १४ ॥ तुझे आज्ञेची अगाध थोरी ॥ स्वयें मृत्यु वेदी शिरीं ॥ तोही सकाळें प्रळयो करी ॥ आज्ञेबाहेरी कदा न रिघे ॥ १५ ॥ आशंका ॥ ह्मणसी मी तंव नंदाचा खिल्लारी ॥ उग्रसेनाची सेवा करीं ॥ *माझी हे एवढी थोरी॥ +मिथ्या मुरारी ह्मणशील ॥१६॥ तुवां पाडूनि कळिकाळाचे दांत ॥ गुरुपुत्र आणिला एथ ॥ इंद्र केला ×मानहत ॥ गोकुळीं अद्भुत वर्षतां ॥१७॥ इतरांची गोठी कायशी ॥ ※होऊनि वत्सें वत्सपाशीं ॥ वेड लाविलें विधात्यासी ॥ शेखीं गोंवळ होशी नंदाचा ॥१८॥बाणकैवारालागूनी ॥ शिव आला अति कोपोनी॥ तो त्वां जिंकिला अर्धक्षणीं ॥ शार्ङ्गपाणी ईश्वरेश्वरा ॥ १९ ॥ तुझी भेटी घ्यावयाकारणें ॥ उत्कंठा वाहिजे नारायणें॥ब्राह्मणअपत्यद्वारां तेणें॥ तुझी भेटी वांछणें सर्वदा॥२०॥तूं भक्तकाजपंचानन ॥ सत्य करावया अर्जुन ॥ क्षीरसागरीं रिघोनि जाण ॥ कृष्णनारायण भेटले ॥२१ ॥ दोहींचे भेटीची परवडी ॥ संत जाणती आवडीं ॥ दोघां मिठी पडली गाढी ॥ निजात्मगोडी अभिन्न ॥ २२ ॥ कृष्णीं विराला नारायण ॥ कीं ०नारायणामाजीं श्रीकृष्ण ॥ दोघां नाहीं दोनीपण ॥ स्वरूप परिपूर्ण ८एकत्वें ॥ २३ ॥ तेथ अर्जुनाशि जाहली व्यथा ॥ थित्या अंतरलों कृष्णनाथा ॥ तंव शेषशयनीं होय देखता ॥ नारायणता श्रीकृष्णीं ॥ २४ ॥ तो तूं भक्तकाजकैवारी ॥ लीलाविग्रही अवतारधारी ॥ ९अवतार धरिशी नानापरी ॥दीनोद्धारी श्रीकृष्ण ॥ २५ ॥ यापरी गा हृषीकेशी ॥ अगाध महिमा तुझेपाशीं ॥ येचि अवतारीं आह्मांसी ॥ प्रतीती निश्चयेंसी पैं आली ॥२६॥ अखंड ऐश्वर्याची स्थिती ॥ 4अनावृत ज्ञानस्फूर्ती ॥ अद्वयानंदा नाहीं च्युती ॥ अच्युत निश्चितीं यानांव ॥ २७ ॥ ऐसा तूं अनंत अपरंपार ॥ नियंत्या ईश्वराचा ईश्वर ॥ तरी तूं भक्तकरुणाकर ॥ तोही प्रकार अवधारीं ॥ २८ ॥

पूर्वश्लोकींचा चरण ॥ यो रोचयन् सहमृगैः स्वयमीश्वराणाम् ॥

॥ टीका ॥ देवां दुर्लभ जो नमस्कारा ॥ तो तूं रिसां आणि वानरां ॥ खेंव देसी रामचंद्रा॥ लीलावताराचेनि नटनाट्यें ॥ २९ ॥ तुवां बोलावें कृपा करूनि ॥ यालागीं वेद तिष्ठे 0सावधानीं ॥ तो तूं वानरांच्या कानीं ॥ गुज आलोचूनी सांगशी ॥१३०॥ तुझें ज्ञान न कळे वेदशास्त्रां ॥ तो तूं विचार पुससी वानरां ॥ अनुसरोनि त्यांच्या मंत्रा ॥ उपायद्वारा वर्तसी ३१ यज्ञींचीं अवदानें प्रांजळें ॥ कदा न घेसी यज्ञकाळें॥तो तूं वानरां हातींचीं वनफळें ॥खासी 1कृपाबळें सप्रेमें ॥ ३२ ॥ ऐसें भक्तांचें निजप्रेम ॥ तूं प्रतिपाळिसी मेघश्याम ॥ त्या तुजमाजीं नाहीं विषम ॥ तूं आत्माराम जगाचा ॥ ३३ ॥

॥ श्लोकपद ॥ तदशेषबंधो ॥

॥ टीका ॥ तूं अंतर्यामी निजसखा ॥ परमात्मा हृदयस्थ देखा ॥ तुजमाजीं भूतां भौतिकां ॥

---

१ भीतीनें. २ गर्वहीन. ३ गुरे राखणारे, गोप. ४ क्षण न लागतां. ५ भक्ताचें कार्य करण्यास सिंहच. ६ आवर्तें ह्म० भ्रमतद्रहितः निभ्रांत. ७ असवलांस. ८ पाहून, निवडक. ९ हें श्लोकांतील मूळपद.

*मो. त्या मज कां येवढी थोरी. +मो. ऐसें मुरारी. ×मो. गर्वहत. ※मो. तुवां घरूनि वत्स गोपवेशासी. ०मो. नारायणीं. 8मो. पूर्णत्वें. ९मो. अवतरशी नानापरी. 4मो. अनावर ज्ञानस्फूर्ति. 0मो. मौनी. 1मो. कृपामेळें.

भिन्न आवांका असेना ॥ ३४ ॥ तूं जडातें चेतविता ॥ मूढांतें ज्ञानदाता ॥ सकळ जीवां आनंदविता ॥ तुझिया चित्सत्तां जग नांदे ॥३५॥ माता पित्यांचें *सख्यत्व देखा ॥ तो प्रपंचयुक्त आवांका ॥ तूं हृदयस्थ निजसखा ॥ सकळ लोकां सुखदाता ॥ ३६ ॥ ऐसा तूं सकळांचा हृदयस्थ ॥ +सर्वेश्वरत्वें अतिसमर्थ ॥ जाणसी हृदयींचा वृत्तांत ॥ स्वामी कृपावंत दीनांचा ॥ ३७ ॥ यापरी गा हृषीकेशी ॥ दीनदयाळु निजभक्तांसी ॥ ऐशिया सांडूनि स्वामीशी ॥ कोण धनांधासी भजेल ॥ ३८ ॥

॥ श्लोक ॥ तं त्वाऽखिलात्मदयितेश्वरमाश्रितानां सर्वार्थदं स्वकृतविद्विसृजेत को नु ॥ कोवा भजेत् किमपि विस्मृतयेऽनुभूत्यै किं वा भवेन्न तव पादरजोजुषां नः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ विधाता आणि हरिहर ॥ हे मायागुणी गुणावतार ॥ तूं मायानियंता ईश्वर ॥भक्तकरुणाकर सुखदाता ॥ ३९ ॥ त्या तुझी करितां निजभक्ती ॥ चारी पुरुषार्थ चारी मुक्ती ॥ भक्तांसि लोटांगणीं येती ॥ एवढी अर्थप्राप्ती निजभक्तां ॥ १४० ॥ निजभक्तांचें मनोगत ॥ तूं सर्वज्ञ जाणता भगवंत ॥ भक्तहृदयींचें हृद्गत ॥ जाणोनि सर्वार्थ तूं देशी ॥ ४१ ॥ भावार्थाचें भोक्तेपण ॥ जाणतां तूं एक श्रीकृष्ण ॥ तुज वेगळें हें लक्षण ॥ आणिकांसि जाण कळेना ॥ ४२॥ ऐसा स्वामी तूं उत्तमोत्तम ॥ तुझेनि साधकां सुख परम ॥ आणिक नाहीं तुजसम ॥ तूं स्वामी पुरुषोत्तम सर्वांचा ॥४३॥ तूं सर्वांचा स्वामी होसी॥परी कृपाळु निजभक्तांसी॥अग्निविषादिनानाबाधेसी ॥ तुवां प्रल्हादासी रक्षिलें ॥४४॥ तुज भक्तांची कृपा प्रबळ ॥ उत्तानचरणाचें[२] तानें[३] बाळ ॥ ×करोनियां वैराग्यशीळ ॥ ध्रुवासी अढळ तुवां केलें ॥ ४५ ॥ शत्रुबंधु[४] बिभीषण ॥ तुज झाला अनन्यशरण ॥ त्याचे कृपेस्तव जाण ॥ सकुळीं[५] रावण उद्धरिला॥४६॥ छळूनि बांधिलें बळीशी ॥ शेखीं कृपा उपजली कैशी ॥ त्याचे द्वारीं द्वारपाळ होशी ॥ निजलाजेसी सांडूनी ॥ ४७ ॥ ऐशी भक्तकृपा तुजपाशीं ॥ भक्तहृदयस्थ तूं जाणसी ॥ ऐशा सांडूनि निजस्वामीसी ॥ कोण धनांधासी[१] °सेवील ॥४८॥ ※देहेंद्रियां जें सुख भासे ॥ तें तें तुझेनि सुखलेशें ॥ 6तो तूं सकळसुख समावेशें ॥ 8प्रसन्न अनायासें निजभक्तां ॥ ४९ ॥ साधु जाणती तुझा महिमा ॥तूं ज्ञानियांचा अभेदआत्मा ॥ 5भक्तप्रिय पुरुषोत्तमा ॥ तुझा सुखाचा प्रेमा अप्रमेय ॥ १५०॥ तुझे सेवेचेनि संतोखें ॥ भक्त सुखावले निजसुखें ॥ त्यांसि देहद्वंद्वजन्म दुःखें ॥ स्वप्नींही सन्मुखें कदा नव्हती ॥ ५१ ॥ तुझ्या भजनसुखें तुझे भक्त ॥ विषयीं होऊनि विरक्त ॥ ते राज्यं समुद्रवलयांकित[६] ॥ थुंकोनि सांडित तुच्छत्वें॥ ५२ ॥ सकळ भोग वैभवेसी ॥ स्वर्ग आलिया भक्तांपाशीं ॥ ते उपेक्षिती तयाशी ॥ जेवीं 7राजहंसीं थिल्लर[७]॥५३॥ जे विनटले भजनाच्याठायीं ॥ ते तूं सुखरूप करिशी पाहीं ॥ देहीं असतांचि विदेही ॥ सर्वां-

१ धनानें उन्मत्त झालेल्यास. २ उत्तानपाद राजाचें. ३ उत्तानपादाचा मुलगा ध्रुव. ४रावणाचा बंधु. ५ कुळासकट. ६ सार्वभौम. ७ डबकें.

*ना. मुख्यत्व. +मो. सर्वावयवत्वें समर्थ. ×मो. देखोनि भावार्थाचें बळ. °मो. भजेल. ※मो. देहेंद्रियां जो भास भासे. 6मो. तो तूं सकलां समावेशें. 8मो. संपूर्ण अनायासें. 5ना. भक्तिप्रिय मो. भक्तांसि प्रिय तूं. 7मो. राजहंस.

ठायीं समसाम्य ॥ ५४ ॥ ऐसा स्वामी तूं हृषीकेशी ॥ सदा संतुष्ट निजभक्तांसी ॥ कठिणत्व नाहीं सेवेसी ॥ कैसें ह्मणसी तें ऐक ॥ ५५ ॥ जाणें नलगे परदेशासी ॥ अनवसरू नाहीं सेवेसी ॥ भक्तांनिकट अहर्निशीं ॥ तूं हृदयनिवासी निजात्मा ॥ ५६ ॥ सेवेलागीं नलगे धन ॥ शरीरकष्ट न लागती जाण ॥ तुझ्या चरणीं ठेविल्या मन ॥ तूं स्वानंदघन तुष्टसी ॥ ५७ ॥ तूं तुष्टोनि करिशी ऐसें॥ *झाडिसी प्रपंचाचें पिसें ॥त्रिगुणेंसी त्रिपुटी नासे॥अनायासें ×मिथ्यात्वें ॥ ५८ ॥ ऐसा सुसेव्य आणि कृपाळू ॥ +निजस्वामी तूं दीनदयाळू ॥ तुझी सेवा सांडी तो बरळू ॥ मूर्ख केवळू ⁂अतिमंद ॥ ५९ ॥ निमिषोन्मेषांचे व्यापार ॥ तुझेनि चालती साचार ॥ तुझे सेवेसि विमुख नर॥ते ०परम पामर अभाग्य ॥ १६० ॥ तुझी सेवा सुखरूप केवळ ॥ तिसी उपेक्षूनियां बरळ ॥ विषयांचे विषकल्लोळ ॥ जे सर्वकाळ वांछिती ॥६१॥ ज्या विषयांचा विषलेश ॥ थित्या निजसुखा करी नाश ॥ जन्ममरणांचा विलास ॥ दुख असोस भोगवी ॥ ६२ ॥ त्या विषयांचे *विषयदाते ॥ इंद्र महेंद्र कृपणचित्तें ॥ त्यांसि भजती जे विषयस्वार्थें ॥ तेही निश्चितें अभाग्य ॥ ६३ ॥ तुझीया कृपा तुझे भक्त ॥ सुखसंपन्न 7अतिसमर्थ ॥ संसारीं 0होती विरक्त ॥ हें नवल एथ नव्हे देवा ॥ ६४ ॥ तुझें चरणरज जे सेविती ॥ पृथु जनकादि नृपती ॥ त्यांसि इंद्रादिक वंदिती ॥ पायां लागती ऋद्धिसिद्धि ॥ ६५॥ आकल्प करितां तपस्थिती ॥ ज्या सिद्धींची नव्हे प्राप्ती ॥ त्या सिद्धि भक्तां शरण येती ॥ ऐसी श्रेष्ठ भक्ति पैं तुझी ॥६६॥ आणिक साधनें न करितां ॥ तुझे भजनीं 4विकिल्या चित्ता ॥ सर्वसिद्धि होती शरणागता ॥ स्वभावतां भक्तांसी ॥ ६७ ॥ यापरी तुझे उपकार ॥ भक्तांसि घडले अपार ॥ त्यांसि तेंचि वडे प्रत्युपकार ॥ हरिचरणीं साचार जें स्वयें विरे ॥ ६८ ॥ तेंचि विरालेपण ऐसें ॥ जेवीं प्रतिबिंब बिंबीं प्रवेशे ॥ कां घटाकाशींचेनि आकाशें ॥ होइजे जैसें महदाकाश ॥ ६९ ॥ ऐसें तुजमाजीं न विरतां ॥ प्रत्युपकार न ये हातां ॥ जो पुरवी सर्वस्वार्थां ॥ त्यासि विसरतां अधःपातू ॥ १७० ॥

॥ श्लोक ॥ नैवोपयंत्यपचितिं कवयस्तवेश ब्रह्मायुषापि कृतमृद्धमुदः स्मरंतः ॥
योंऽतर्बहिस्तनुभृतामशुभं विधुन्वन्नाचार्यचैत्यवपुषा स्वगतिं व्यनक्ति ॥ ६ ॥

॥ टीका ॥ तुजमाजीं न विरतां साचार ॥ ब्रह्मायु होऊनियां नर ॥ योगयागें शिणतां अपार ॥ प्रत्युपकार कदा न घडे ॥ ७१ ॥ असो सज्ञान ज्ञाते जन ॥ करितां 8नानाविध साधन ॥ तुझिया उपकारा उत्तीर्ण ॥ अणुप्रमाण कदा नव्हती ॥ ७२ ॥ तो उपकार कोण ह्मणशी ॥ निजभक्तांच्या कल्मषांसी ॥ सबाह्याभ्यंतर निर्दळिसी ॥ उभयरूपेंसी कृपाळुवा ॥ ७३ ॥ अंतरीं 2अंतर्यामिरूपें ॥ बाह्य सद्गुरुस्वरूपें ॥ भक्तांचीं सबाह्य पापें ॥ सहित संकल्पें निर्दळिसी ॥ ७४ ॥ अंतर्यामी आणि सद्गुरु ॥ उभयरूपें तूं करुणाकरू ॥ निरसूनि भक्तभवभारू ॥ निजनिर्धारू धरविशी ॥ ७५ ॥ निजनिर्धाराचें लक्षण ॥ सहजें हारपे मीतूंपण ॥ स्वयें विरे

१ सेवेस अवेळ नाहीं. सेवेस सर्वकाल योग्य आहेत. सेवा पाहिजे त्या वेळीं करावी. २ वेड. ३ सोडी. ४ फार, अत्यंत. ५ कल्पपर्यंत. ६ उतराई. ७ थोडेही. ८ पापांस. ९ भक्ताचें संसारओझें.

*ना. सांडविशी प्रपंचाचे पाश पिसें. ×मो. मन निवे. +मो निजदासांलागीं दयाळू. ⁂ना. मतिमंद. ०मो. जितांची पामर. *ना. विषदाते. 7मो. नित्यतृप्त. 0मो. असोनि विरक्त. 4मो. निर्विकल्पचित्ता. 8मो. नाना साधनें जाण. 2मो. अंतरात्मारूपें.

देहाभिमान ॥ जन्मजरामरण मावळे ।। ७६ ॥ गेलिया जन्मजरामरण ॥ सहजें होती स्वानंद- घन ।। ऐसी तुझी कृपा जाण ॥ उपकारें पूर्ण निजभक्तां ।। ७७ ॥ ऐशिया आगुली *स्वरूप- स्थिती ॥ भक्तांसि अर्पिसी कृपामूर्ती ।। तो तूं निजस्वामी श्रीपती ॥ पूज्य त्रिजगतीं त्रिदशां- सी ।। ७८ ॥ ऐसे तुझेनि निजप्रसादें ॥ भक्त सुखी जाले स्वानंदें ॥ ते उरलेनि प्रारब्धें ॥ सदा स्वानंदबोधें वर्तती ॥ ७९ ॥ ते देहीं असोनि विदेही ॥ कर्मे करूनि अकर्ते पाहीं ॥ ऐसे उपकार भक्तांच्या ठायीं ॥ ते कायसेनि उतराई होतील ॥१८०॥ तुज केवीं होइजे उत्तीर्ण ।। तु- झेनि मनासि मनपण ।। तुझेनि बुद्धीसि निश्चयो जाण ॥ इंद्रियां स्फुरण तुझेनी ।। ८१ ॥ नि- मेषोन्मेषांचे व्यापार ॥ तुझेनि चालती साचार ॥ नीच नवे तुझे उपकार ॥ उत्तीर्ण नर कदा नव्हती ॥ ८२ ॥ जें जें करावें साधन ।। तें सिद्धी पावे तुझे कृपेनें ॥ त्या तुज उत्तीर्ण आपण॥ सर्वथा जाण असेना ।। ८३ ।। यापरी करूनि उपकार ।। तुवां उद्धरिले थोरथोर ॥ आतां सुगमोपायें भवसागर ।। तरती भोळे नर तें सांग ।। ८४ ॥ सुगमोपायें स्वरूपप्राप्ती ॥ बाळे भोळे जन पावती ॥ तैसा उपाय श्रीपती ।। कृपामूर्ती सांगावा ।। ८५ ।। तूं गेलिया निजधा- मा ।। दीन तरावया मेघश्यामा ॥ सुगम उपायाची महिमा ।। पुरुषोत्तमा मज सांग ।। ८६ ॥ ह्मणोनि घातलें लोटांगण ।। मस्तकीं ×धरिले श्रीचरण ॥ तरावया दीनजन ॥ सुगम साधन सांगिजे ॥ ८७ ॥ उद्धवें प्रार्थिला श्रीपती ।। अबळें उद्धवराया निश्चितीं ।। त्याचेनि धर्मे त्रिज- गती ॥ त्यासि कृपामूर्ती तुष्टला ।। ८८ ॥ उद्धवें प्रार्थिला श्रीपती ।। तेणें उल्हासला शुकही चित्तीं ॥ उल्हासोनि स्वानंदस्थितीं ॥ ह्मणे परीक्षिती सावध ॥ ८९ ॥ सुगम उपायस्थितीं ॥ तरावया त्रिजगती ॥ उद्धवें विनविला श्रीपती ।। त्यासि कृपामूर्ती तुष्टला ॥ १९० ॥ संसारतर- णोपायबीज ।।ब्रह्मप्राप्तीचें गुह्यगुज ॥ +सुगमें साधे सहज निज॥ तें अधोक्षज सांगेल ॥ ९१॥ अबळ उद्धरावया निश्चितीं ॥ उद्धवें प्रार्थिला श्रीपती ।। त्याचेनि धर्मे त्रिजगती ॥ सुगमस्थि- तीं तरेल ।। ९२ ।। निज धामा गेलिया श्रीकृष्णनाथ ॥ दीनें तरावया समर्थ ॥ उद्धवें सेतु बांधिला एथ ॥ ब्रह्मप्राप्त्यर्थ प्रश्नोक्ती ।। ९३ ।। उद्धवें प्रार्थूनि श्रीकृष्ण ॥ उद्धरावया दीनजन ॥ ब्रह्मप्राप्तीची पव्हे जाण ।। सुगम संपूर्ण घातली ॥ ९४ ॥ एवं ॐउद्धवप्रश्नस्थितीं ।। ०शुक सु- खावे वचनोक्तीं ।। 7तेंचि परीक्षितीप्रती ॥ सुनिश्चितीं सांगत ॥ ९५ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुक उवाच ॥ इत्युद्धवेनात्यनुरक्तचेतसा पृष्टो जगत्क्रीडनकः स्वशक्तिभिः ॥ गृहीतशक्तित्रय ईश्वरेश्वरो जगाद सप्रेममनोहरस्मितः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ जो ज्ञानियांचा शिरोमणी ॥ जो 3ब्रह्मचाऱ्यां मुकुटमणी ॥ जो योगियांमाजीं अग्रगणी ।। जो सिद्धासनीं वंदिजे ॥ ९६ ॥ जो ब्रह्मज्ञानाचा निजनिधी ॥ स्वानंदबोधाचा उदधी ॥ जो भूतदयेचा क्षीराब्धी ॥ तो शुक स्वबोधीं बोलत ।। ९७ ॥ पांडवकुळा उदार की- र्ती ॥ कौरवकुळीं तुझेनि भक्ती ।। धर्मस्थापक त्रिजगतीं ॥ ऐक परीक्षिती सभाग्या ॥ ९८ ॥

---

१ देवांस. २ वैकुंठास. ३ अज्ञानीजनांनीं. ४ संसारांतून मुक्त होण्यास साधन. ५ बालांपासून वृद्धांपर्यंत. ६ पूल. ७ पाणपोई

*मो. सहजस्थिति. ×मो. वंदिले. +मो. सुगम साधनें साधे सहज. ॐमो उद्धव प्रश्नोक्ती. ०मो. शुक संतोषोनि चित्तीं. 7मो. तो. 3ना. मो. ब्रह्मचर्या.

जग जें भासे विचित्रपणें ॥ तें जयाचें लीलाखेळणें ॥ *खेळणेंही स्वयें होणें ॥ शेखीं अलिप्त-पणें खेळवी ॥ ९९ ॥ विचित्र भासे जग जाण ॥ ज्याचेनि अंगें क्रीडे संपूर्ण ॥ जग ज्याचें क्रीडास्थान ॥ जगा जगपण ज्याचेनी ॥ २०० ॥ ऐसा +जगत्क्रीडनक श्रीकृष्ण ॥ ईश्वराचा ईश्वर आपण ॥ मायादि तिन्ही गुण ॥ ज्याचेनि पूर्ण प्रकाशती ॥१॥ मायागुणीं गुणावतार ॥ जे ×उत्पत्तिस्थितिक्षयकर ॥ ब्रह्मा आणि हरिहर ॥ तेही आज्ञाधार जयाचे ॥ २ ॥ ऐशिया कृष्णाप्रती ॥ उद्धवें सप्रेम विनंती॥केली अतिविनीतास्थितीं ॥ तेणें श्रीपती तुष्टला ॥ ३ ॥ बहुतीं प्रार्थिला श्रीकृष्ण ॥ तो आपुल्या कार्यार्थ जाण ॥ उद्धवें केला विनीत प्रश्न ॥ जगदुद्धरण उपकारी ॥४॥ उद्धवाचिया प्रश्नोक्तीं ॥ तोषोनि तुष्टला श्रीपती॥ सुगमोपायें ब्रह्मप्राप्ती॥ ते सा-धनस्थिती सांगेल ॥५॥ बाळेभोळे सात्विक जन ॥ सवेग पावती समाधान ॥ तो उद्धवप्रश्नें श्रीकृष्ण ॥ सोपें ब्रह्मज्ञान सांगत ॥६॥ ज्ञानमार्गींचे कापडी ॥ जीवें सर्वस्वें घालूनि उडी ॥ उद्ध-वप्रश्नाचे आवडीं ॥ ब्रह्म जोडे जोडी सुगमत्वें ॥ ७ ॥ लेऊनियां मोहममतेची बेडी ॥ जे पडिले अभिमानबांदवडीं ॥ त्यांचीही सुटका धडफुडी ॥ उद्धवें गाढी चिंतिली ॥ ८ ॥ उद्धवाचें भाग्य थोर ॥ प्रश्न केला ※जगदुपकार ॥ तेणें तुष्टला सारंगधर ॥ °अतिसादर बोलत ॥ ९ ॥ दीनोद्धाराचा प्रश्न ॥ उद्धवें केला अतिगहन ॥ तेणें संतोषला श्रीकृष्ण ॥ हास्यवदन बोलत ॥ २१० ॥ कृष्णवदन अतिसुंदर ॥ तेंही हास्ययुक्त मनोहर ॥ अतिउल्हासें शार्ङ्गधर ॥ गिरा गंभीर बोलत ॥ ११ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ हंत ते कथयिष्यामि मम धर्मान् सुमंगलान् ॥
यान् श्रद्धयाचरन्मर्त्यो मृत्युं जयति दुर्जयम् ॥ ८ ॥

॥ टीका ॥ जो प्रणवाचें सोलींव सार ॥ जो ज्ञानाचें निजजिव्हार[1] ॥ जो चैतन्याचा चम-त्कार ॥ जो परात्पर परादिकां ॥१२॥ तो [1]मेघगंभीर गर्जोनी ॥ स्वानंदें बोले सारंगपाणी ॥ ह्मणे उद्धवा तुझी धन्य धन्य वाणी ॥ तुझे प्रश्नीं मी निवालों ॥ १३ ॥ बाळ्या भोळ्या ब्रह्म-प्राप्ती ॥ पावावया सुगमस्थितीं ॥ ये अर्थीं दाटुगी माझी भक्ती ॥ जिशी मी श्रीपती सदा वश्य ॥ १४ ॥ माझें करितां अनन्य भजन ॥ मी *सर्वदा भक्ताधीन ॥ तेथ जाति गोत [3]ज्ञा-तेपण ॥ उंच नीच वर्ण मी न ह्मणें ॥ १५ ॥ जेणें घडे भजन परम ॥ ते सांगेन भागवतधर्म ॥ जेणें निरसे कर्माकर्म ॥ मरणजन्मच्छेदक ॥ १६ ॥ जे धर्म स्वयें आचारितां ॥ समूळ [4]उन्म-ळी भवव्यथा ॥ ज्यां [6]धर्मांच्या स्वभावतां ॥ सुखसंपन्नता साधकां ॥ १७ ॥ जे स्वयें धर्म [5]आचरतां ॥ [8]निरसे असत्य दोषकथा ॥ जे धर्म सादरें ऐकतां ॥ विषयावस्था निर्दाळी ॥ १८ ॥ माझे धर्म अतिसुमंगल ॥ दोषदाहककलिमल ॥ मंगळांचेंही परम मंगळ ॥ भजन केवळ पैं माझें ॥ १९ ॥ श्रद्धेनें आचरतां माझे धर्म ॥ माझ्या निजरूपीं उपजे प्रेम ॥ तेणें हारपे भवभ्रम ॥ मरणजन्म असेना ॥ २२० ॥ जो मृत्यु ब्रह्मयाचा ग्रास करी ॥ हरिहरांतें

१ नम्रपणानें. २ वाणी. ३ हृदय, जिव्हाळा.

*मो. खेळवणें. +मो. जगक्रीडन ना. जगक्रीडत. ×मो. प्रलयकर. ※मो. जगदोद्धार. °ना. हास्यवदन बोलत. [1]ना. मेघगीरा गंभीर. *मो. सदा. [3]मो. उत्तमपण. [4]मो. उन्मळे. [6]मो. धर्मचर्चाचिया [5]ना. सेवितां मो. स्तवितां. [8]ना. निरसे दोष असत्य कथा मो. निरसे असत्य दोष सर्वथा.

मृत्यु मारी ॥ मृत्यु दुर्जय संसारीं ॥ सुरासुरीं कांपिजे ॥ २१ ॥ त्या मृत्यूचें खणोनि खात ॥ पाहूनि कळिकाळाचे दांत ॥ अद्वयभजनें माझे भक्त ॥ सुखें नांदत संसारीं ॥ २२ ॥ *जेणें निवारे दुर्जय मरण ॥ ऐसें भजन ह्मणसी कोण ॥ ऐक त्याचेंही लक्षण ॥ तुज मी संपूर्ण सांगेन ॥ २३ ॥ उद्धवा तूं माझा निजसखा ॥ यालागीं निजभजनआवांका ॥ आरंभूनि पूर्वपीठिका ॥ साक्षेपें देखा ×सांगेन ॥ २४ ॥ कोटिशस्त्रें रुपल्या पाहे ॥ तरी +शूर वांचला राहे ॥ तोचि वर्मींचोनि एके घायें ॥ मरण लाहे तत्काळ ॥ २५ ॥ तेवीं करितां नाना साधन ॥ अनिवार्य जन्ममरण ॥ त्यासि संक्षेपें माझें भजन ॥ समूळ जाण निर्दळी ॥२६॥ कृष्ण घनश्याम महाघन ॥ उद्धवचातकालागीं जाण ॥ वर्षला स्वानंदजीवन ॥ तेणें त्रिभुवन सुखी होये ॥ २७॥ लोटलिया वर्षाकाळ ॥ शारदीचें निर्मळजळ ॥ तेवीं सुखाचे ०सुखकल्लोळ ॥ ※भजनें प्रबळ एकुणातिसावा ॥ २८ ॥ =एकादशाचिया अंतीं ॥ सुगमत्वें ब्रह्मप्राप्ती ॥ तदर्थी उत्तमोत्तम भक्ती ॥ स्वमुखें श्रीपती सांगत ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ कुर्यात्सर्वाणि कर्माणि मदर्थं शनकैः स्मरन् ॥ मय्यर्पितमनश्चित्तो मद्धर्मात्ममनोरतिः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ देशाचारें कुलाचारें प्राप्त ॥ *वृद्धाचारादि जे एथ ॥ जे कां वेदोक्त 1नित्यनैमित्य॥ कर्में समस्त या नांव ॥२३०॥ माझेनि उद्देशें कर्म जें एथ ॥ या नांव साधारण मदर्थ ॥ कर्मासवाह्य जे मज देखत ॥ मुख्यत्वें मदर्थ आयास न करितां ॥ ३१ ॥ सकळ 2कर्म माझेनि प्रकाशे ॥ कर्मक्रिया माझेनि भासे ॥ ऐसें 4समूळ कर्म जेथ दिसे ॥ तें अनायासें मदर्थ ॥३२॥ कर्माआदी मी कर्मकर्ता ॥ कर्मी कर्मसिद्धीचा मी दाता ॥ कर्मी कर्माचा मी फळभोक्ता ॥ या नांव कृष्णार्पणता कर्माची ॥ ३३ ॥ सहसा ऐसें नव्हे मन ॥ 5तें शनैः शनैः अनुसंधान ॥ अखंड करितां आपण ॥ स्वरूपीं 6प्रवीण मन होय ॥ ३४ ॥ मनासि नावडे अनुसंधान ॥ तें करावें माझें 7स्मरण ॥ माझेनि स्मरणें मन जाण ॥ धरी अनुसंधान मद्भजनीं ॥ ३५ ॥ 8भजनअभ्यासपरवडी ॥ मनासि लागे निजात्मगोडी ॥ तेथें बुद्धि निश्चयेंसि दे बुडी ॥ देहअहंता सोडी अभिमान ॥३६॥ माझ्या स्वरूपावेगळें कांहीं ॥ मनासि 9निघावया वाडी नाहीं ॥ ऐसें मन 0जडे माझ्या ठायीं ॥ मदर्पण पाहीं या नांव ॥ ३७ ॥ ऐसें मद्रूपीं निमग्न मन ॥ तरी आवडे माझें भजन ॥ माझिया भक्तीस्तव जाण ॥ परम पावन मद्भक्त ॥ ३८ ॥ ह्मणशी विषयैंनिष्ठ मन ॥ कदा न धरी अनुसंधान ॥ तेचि अर्थीचा उपाय पूर्ण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ३९ ॥

॥ श्लोक ॥ देशान्पुण्यान् संश्रयेत मद्भक्तैः साधुभिः श्रितान् ॥ देवासुरमनुष्येषु मद्भक्ताचरितानि च ॥ १० ॥

१ संक्षिप्त. २ मदर्पण. ३ विषयांत लुब्ध झालेलें.

*मो. जेणें आवरे दुर्जय मन. ×मो. सांगत. +मो. रणींशूर. ०मो. सुखकेवळ. ※मो. भजन. =मो. एकोणतिसांवियांप्रति. *मो. वृद्धाचारें कीजे जें येथ. 1मो. नित्यनैमित्यक वेदोक्त. 2ना. धर्म. 3मो. आभासे. 4मो. सकळ. 5मो. तेथ. 6मो. तल्लीन. 7मो. नामस्मरण. 8ना. भजतां. 9मो. रिघावया वाटी. 0मो. जडलें.

॥ टीका ॥ देश पावन कुरुक्षेत्र ॥ अयोध्या देश अतिपवित्र ॥ गंगायमुनेचें *अंतर ॥ पवित्र अपार अर्बुदाचळ ॥२४०॥ कलापग्राम नंदिग्राम ॥ पावन देश बदरिकाश्रम ॥ पंचवटी श्रीरामाश्रम ॥ पावन परम गौतमीतट ॥४१॥ जेथ लागे श्रीरामचरण ॥ तो पावन देश दंडकारण्य ॥ मथुरा गोकुळ वृंदावन ॥ परम पावन ब्रह्मगिरी ॥ ४२ ॥ पावन पांडुरंगाक्षिती ॥ जे कां दक्षिणद्वारावती ॥ जेथ विराजे श्रीविठ्ठलमूर्ती ॥ नामें गर्जती पंढरी ॥ ४३ ॥ निर्दळी सकळपापांसी ॥ पंचक्रोशी जे कां काशी ॥ पुण्य देश वाराणसी ॥ साधकांसी ×अतिसाह्य ॥ ४४ ॥ पुण्य सरिता जेथ वाहती ॥ तेही साधकां +पावन क्षिती ॥ गंगा यमुना सरस्वती ॥ साबरमती वैतरणी ॥४५॥ गंडकी नर्मदा तपती ॥ गोदावरी भीमरथी ॥ कृष्णा वेण्या ※तुंगा गोमती ॥ पावन क्षिती श्रीशैल्य ॥४६॥ कावेरीचें उभय तीर ॥ पवित्र क्षिती चिदांबर ॥ सरिता *प्रतीची पवित्र ॥ जिचेनि जळें नर पावन ॥ ४७ ॥ कृतमाला पयस्विनी ॥ अतिपवित्र ताम्रपर्णी ॥ पवित्र क्षिति नैमिषारण्यीं ॥ साधकांलागोनी सुसेव्य ॥ ४८ ॥ असो पवित्रतेचें महिमान ॥ पावनां पावन आहे आन ॥ जेथें वसले ०भक्तसज्जन ॥ तो देश पावन सर्वार्थी ॥४९॥ जे गांवीं वसती माझे भक्त ॥ 1सत्संगें तो गांव पुनीत ॥ जे देशीं वसले साधुसंत ॥ तो देश पुनीत त्यांचेनी ॥ २५० ॥ भक्तांचा वारा लागे जिकडे ॥ अति पवित्रता होय तिकडे ॥ 2तें सत्संगती ज्यांसि घडे ॥ पवित्रता जोडे तयांसी ॥ ५१ ॥ चंदनाचे संगतीवरी ॥ सुवास होती आरीबोरी ॥ त्यांतें देवद्विज वंदिती शिरीं ॥ तेवीं साधकां करी सत्संग ॥ ५२ ॥ जें केवळ काष्ठ कोरडें ॥ संगें मोल पावलें गाढें ॥ त्याची श्रीमंतां चाड पडे ॥ मस्तकीं चढे हरिहरां ॥ ५३ ॥ जें निजभाग्यांची संपत्ती ॥ तेंचि जोडे सत्संगती ॥ सत्संगें पावन होती ॥ जाण निश्चितीं साधक ॥ ५४ ॥ माझे 3स्वरूपीं ज्याचें चित्त ॥ अखंड जडलें भजनयुक्त ॥ त्यासीच बोलिजे मद्भक्त ॥ तोचि संत सज्जन ॥५५॥ माझे भक्तांचे आचरित ॥ सुर नर असुर वंदित ॥ साधकींही तेंचि पथ ॥ स्वयें निश्चित साधावें ॥ ५६ ॥ श्रेष्ठ विनटले जे भक्तीसी ॥ नारद प्रऱ्हाद अंबऋषी ॥ तेचि भक्ति अहर्निशीं ॥ साधकीं सद्भावेंसी साधावी ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ पृथक् सत्रेण वा मह्यं पर्वयात्रामहोत्सवान् ॥ कारयेद्गीतनृत्याद्यैर्महाराज विभूतिभिः ॥ ११ ॥

॥ टीका ॥ वार्षिकी यात्रा पूर्वपूजा ॥ 4भावें करावी अधोक्षजा ॥ छत्रचामरादि वोजा ॥ गरुडध्वजांकित चिन्हीं ॥ ५८ ॥ ऐशिया महाराजविभूती ॥ देवासि अर्पाव्या 6श्रद्धास्थितीं ॥ भजनालागीं अहोरातीं ॥ उल्हास चित्तीं अनिवार ॥५९॥ अश्वगजादि आरोहण ॥ शेषशयन 7गरुडासन ॥ महामहोत्सव 0नरयान ॥ रथोत्सव जाण 9करावा ॥ २६० ॥ टाळ घोळ निशाण भेरी ॥ 5शंख मृदंग मंगलतुरीं ॥ नाद नसमाय अंबरीं ॥ जयजकारीं 8गर्जती ॥ ६१ ॥

---

१ अबूचा डोंगर. २ नद्या. ३ आचरण. ४ ऐश्वर्यें. ५ पालखी वगैरे.

*मो. उभयतीर. ×मो. अतिसेव्य. +मो. पुण्य. ※मो. तुंगभद्रा. *मो. प्राची. ०मो. भक्तजन. 1मो. तत्संगें. 2मो तो सत्संग जयासी आवडे. 3मो. भजनीं. 4ना. पूजा करावी. 6मो. सहजस्थितीं. 7ना. गरुडवाहन. 0ना. नरवाहन. मो. आपण. 9मो. करावे. 5ना. शंखचक्र मृदंग. 8मो. गर्जावें.

तेथ गीतनृत्यपवाडे ॥ कीर्तन करावें वाडें कोडें ॥ हुंबरलिया आखरें बागडें ॥ देवापुढें करावें ॥ ६२ ॥ तोंड करूनि वांकुडें ॥ *वांकुली दावावी देवाकडे ॥ वर्णावे देवाचे पवाडे ॥ रंगापुढें गर्जत ॥ ६३ ॥ गोपाळकाल्याचा विन्यास ॥ रासक्रीडेचा उल्हास ॥गोपाळवेषाचा विलास॥ मनोहर वेष +दावावा ॥६४॥ दावावी ×मालखडियांची परी ॥ झोंबी घ्यावी ०नानाकुसरी ॥ दंडी भुजपीं उरीं शिरीं ॥ परस्परीं हाणत ॥ ६५ ॥मालविद्येच्या आसुडीं ॥ थडक हाणोनियां गाढी ॥ मालमर्दना परवडी ॥ रंगीं गुढी ※उभवावी ॥ ६६ ॥ कुवलयापीड उन्मत्त ॥ त्याचे उपडूनियां गजदंत ॥ गोपाळवेषें डुल्लत ॥ रंगाआंत मिरवावें ॥ ६७ ॥ वानावी देवाची वाढीवें ॥ करावी देवाची भाटीवें ॥ ऐसे दावूनि हावभाव ॥ महामहोत्सव करावा ॥ ६८ ॥ असल्या सामर्थ्यवैभव ॥ स्वयें करावे सकळ उत्सव ॥ नातरी मिळोनियां सर्व ॥महामहोत्सव करावे ॥६९॥ ऐशिया अनन्यभावडीं ॥ भजन करितां चढोवढी ॥ माझिया भक्तीची लागली गोडी ॥ जोडिलें जोडी हरिप्रेम ॥ २७० ॥ सप्रेम भक्ति करितां जाण ॥ *तेणें मी भक्तांसि तुष्टमान ॥ माझें अंतरंग भजन ॥ मद्भक्त आपण स्वयें लाहे ॥ ७१ ॥ अंतरंगभक्ति ते कोण ॥ तें भक्तीचें निजलक्षण ॥ उद्धवाप्रति श्रीकृष्ण ॥ स्वमुखें आपण सांगत ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ मामेव सर्वभूतेषु बहिरंतरपावृतम् ॥ ईक्षेतात्मनि चात्मानं यथा खममलाशयः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ भावें करितां माझी भक्ती ॥ शुद्ध होय चित्तवृत्ती ॥ तेणें आत्मदृष्टीची स्थिती ॥ गुरुकृपा पावती मद्भक्त ॥ ७३ ॥ पाहतां निजात्मदृष्टीवरी ॥ मीचि सर्वभूतांच्या अंतरीं ॥ 4अंतरींच हा निर्धार धरी ॥ तंव भूताबाहेरीही मजचि देखे ॥ ७४ ॥ जो परापरादि अनंत॥ तो मी भूतां सबाह्य भगवंत ॥ मी तोचि होय माझा भक्त ॥ मिळोनि मजआंत मद्रूप ॥ ७५॥ जैशीजैशी माझी व्याप्ती ॥ तैशीतैशी भक्तांची स्थिती ॥ जें जें देखे भूतव्यक्ती ॥ तेथ सबाह्य प्रतीति ९मद्रूपें ॥ ७६ ॥ जेवीं घटामाजीं घटाकाश ॥ तेंचि घटासबाह्य महदाकाश ॥ तेवीं भूतांसबाह्य मी चिद्विलास ॥ माझा रहिवास निजरूपें ॥ ७७ ॥ निश्चयेंसी निजप्रतीती ॥ भगवद्भाव सर्वांभूतीं ॥ तेचि 0भक्तांची भजती स्थिती ॥ यथानिगुती हरि सांगे ॥ ७८ ॥

॥ श्लोक ॥ इति सर्वाणि भूतानि मद्भावेन महाद्युते ॥ सभाजयन्मन्यमानो ज्ञानं केवलमाश्रितः ॥ १३ ॥

॥ टीका ॥ उद्धवा तुझें भाग्य अपूर्व ॥ तूं ज्ञाननिधि कैवल्यदीप ॥ सर्वभूतीं माझें रूप ॥ चित्स्वरूप सबाह्य ॥ ७९ ॥ यांपरी गा सर्वभूतीं ॥ माझ्या स्वरूपाची 2अनुस्यूति ॥ लक्षोनि जो करी भक्ती ॥नानाव्यक्ती 3समभावें ॥२८०॥ भिन्न रूप भिन्न नाम ॥भिन्न स्थिती भिन्न कर्म ॥ जग देखतांही विषम ॥ मद्भक्तांसम मद्भावें ॥८१॥ भूतें देखतांही भिन्न ॥ भिन्नत्वा नये ज्याचें

१ हुंबरी, गवळ्याच्या मुलांचे खेळ २ अनुकरण. ३ हिसक्यानें, आसडयानें. ४ या नांवाचा हत्ती. ५ उत्कर्ष, पुरुषार्थ, बल. ६ प्रार्थना, वर्णन, स्तुती. ७ प्रसन्न. ८ पुष्कळ. ९ एक सारखी व्याप्ती.

*मो. वाकुल्या दाखवाव्या. +मो. धरावा. ×मो. मालखडांची. ०मो. परिसरी. ※मो. मिरवावी. *मो. तेणें भक्तीनें मी संतुष्टमान. 4मो. ऐसा हा निर्धार धरी. ना. अंतरींच हा निर्धारीं. ९ना. पैं माझी. 0मो. भक्तीची भजनस्थिती. 2मो. अनंतव्याप्ती. 3मो. समसाम्यें.

ज्ञान ॥ *मद्भाव भज समान ॥ त्यासि सुप्रसन्न भक्ति माझी ॥ ८२ ॥ ज्यासि प्रसन्न माझी भक्ती ॥ त्याचा आज्ञाधारक मी श्रीपती ॥ जो भगवद्भावें सर्वभूतीं ॥ सुनिश्चितीं उपासक ॥८३॥ आशंका ॥ तुझी वेदाज्ञा तंव प्रमाण ॥ अतिशयें पूज्य ब्राह्मण ॥ उपेक्षावे असुरजन ॥ चांडाळ जाण अतिनिंद्य ॥ ८४ ॥ कर्मभ्रष्ट जे जे लोक ॥ त्यांचें पाहोंनये मुख ॥ हे वेदमर्यादा देख ॥ तुवांचि निष्टंक नेमिली ॥ ८५ ॥ तेथ सर्वभूतीं समान ॥ केवीं घडे भगवद्भजन ॥ ऐसा विकल्प धरील मन ॥ ऐक महिमान भक्तीचें ॥ ८६ ॥ जंव आंधारेंशी सबळ राती ॥ तंवचि प्रतिष्ठा दीपस्थिती ॥ तेथें उगवल्या गभस्ती ॥ दीपाची दीप्ति असतांचि नाहीं ॥ ८७ ॥ तेवीं जंववरी दृढ अज्ञान ॥ ×तंवचि वेदाज्ञा प्रमाण ॥ज्यासि माझें अभेदभजन॥ तयासि वेद आपण स्वयें वंदी ॥ ८८ ॥ वेद बापुडा तो किती ॥ ज्यासि माझी अभेदभक्ती ॥ त्यासि मी वंदीं श्रीपती ॥ सदा वशवर्ती तयाचा ॥ ८९ ॥ अभेदभक्ति जेथ पुरी ॥ मी नाटिकारू त्याचे घरीं ॥ त्याचा संसार माझे शिरीं॥योगक्षेम करीं मी त्याचा ॥२९०॥ अभेदभक्तीचें महिमान॥ निच्या पायां लागे आत्मज्ञान ॥ तेथ वंद्य निंद्य समसमान ॥विषमींही जाण +विकारेना ॥९१॥

॥ श्लोक ॥ ब्राह्मणे पुल्कसे स्तेने ब्रह्मण्येऽर्के स्फुलिंगके ॥ अक्रूरे क्रूरके चैव समदृक्पंडितो मतः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ ज्याचें वंदितां ०पदरज जाण ॥ पवित्र होइजे आपण॥ ऐसे पुण्य पूज्य जे ब्राह्मण॥ ❀ज्यांचा हृदयीं चरणं हरि वाहे ॥ ९२ ॥ ऐसे अतिवंद्य जे ब्राह्मण ॥ आणि चांडाळांमाजीं *निंद्य हीन ॥ तो पुल्कस द्विजवरांसमान ॥ हरिरूपें जाण भक्त देखे ॥९३ ॥ पुल्कस आणि ब्राह्मण ॥ जातिभेदें विषमपण ॥ आत्मदृष्टीं पाहतां जाण ॥ दोघे समान चिद्रूपें ॥ ९४ ॥ सुवर्णविष्णु सुवर्णश्वान ॥ एक पूज्य एक हीन ॥ विकूं जातां मोल समान ॥ 3वंद्य निंद्य जाण आत्मत्वीं तैसें ॥ ९५ ॥ जेवीं डावा उजवा दोनी हात ॥ 0एक नरकीं एक पुण्यार्थ ॥ हा कर्माकर्म विपरीतार्थ ॥ समान निश्चित ज्याचें त्यासी ॥ ९६ ॥ जो बळेंचि ब्रह्मस्व चोरी ॥ कां जो ब्राह्मणा 9अतिउपकारी ॥ दोघे निजात्मनिर्धारीं ॥ 2सद्रूपें करी समसाम्य भक्तां ॥ ९७॥ जो सर्वस्वें ब्राह्मणांचा दाता ॥ कां जो ब्राह्मणाचा अर्थहरिता ॥ दोंहींसी कर्मांची विषमता ॥ निजात्मता समसमान॥९८॥सूर्य आणि खद्योत॥तेजविशेषें भेद भासत॥ 6निजात्मतेजें पाहतां तेथ ॥ समसाम्य होत दोहींसी ॥९९॥ दावाग्नि आणि दिवा ॥ भेद भासे तेजवैभवा॥ निजतेजें समानभावा॥तेवीं 1तेजप्रभावा आत्मत्वें7समान॥३००॥कर्पूराग्नि सोज्वळ 5कुंडीं॥परी4राईसंगें तो तडफडी ॥ तेवीं सत्वतमपरवडी ॥ शांति आणि गाढी क्रोधावस्था ॥ १ ॥ एक Bसत्ववृत्ति अतिशांत ॥ कां जो क्रूर तामसयुक्त ॥ गुणवैषम्यें भेद भासत ॥ आत्मत्वें निश्चि-

---

१ आंधारानें पूर्ण. २ मोठेपणा. ३ सूर्य. ४ असूनही नसल्याप्रमाणें. ५ दास. ६ अप्राप्ताची प्राप्ति व प्राप्ताचें रक्षण. ७ भृगु इत्यादिकांचे पाय. ८ व्याध, चांडाल. ९ सोन्याचा प्रतिमारूप विष्णु. १० द्रव्य हरण करणारा.

*मो. सद्भावें. ×ना. तंवचिवरी वेद प्रमाण. +ना. विकारवेना. ०ना. पादरजकण. ❀ना. त्याचा. *मो. अतिहीन. 3मो. तेवीं वंद्य निंद्य जाण आत्मत्वीं नाहीं. 0मो. येकी नरकी येक पुनीत. 9ना. अति परोपकारी. 2ना. मद्रूपेंकरी. 6मो. निजात्मदृष्टीं. 1मो. आत्मानुभवातें तैसे. 7ना. समता. 5ना. कुडी. 4मो. लाहीसंगे. Bमो. सत्ववृद्धि.

त समसाम्य भक्तां ॥ २ ॥ एक आपत्काळीं *सर्वसत्ता ॥होय एकाचा प्राणरक्षिता ॥ एक प्राणदात्याच्या घाता ॥ प्रवर्ते क्रूरतां +कृतघ्न जो ॥ ३ ॥ हे पुण्यपापविषमता जाण ॥ ऐसेही ठायीं भक्त सज्ञान ॥ वस्तु देखती समसमान ॥ उभयतां जाण निजात्मबोधें ॥ ४ ॥ वृक्षासि जो प्रतिपाळी ॥ कां जो घाव घाली मुळीं ॥ दोघांही समान पुष्पीं फळीं ॥ तेवीं आत्ममेळीं ०घातकांघाती ॥ ५ ॥ द्विजांचें सोंवळें गोत्र ॥ कां मश्पाचें मलिन वस्त्र ॥ सूत्रदृष्टीं समान सूत्र ॥ ×मद्भक्तदृष्टी आत्मत्वीं तैसी ॥६॥ मशक आणि सृष्टिकर्ता ॥ भजनीं समान मद्भक्तां ॥ हे चौथे भक्तीची अवस्था ॥ अपावो सर्वथा रिघों नशके ॥ ७ ॥ =जेथूनि रिघों पाहे अपावो॥ तेथेंचि देखती भगवद्भावो ॥ जेव्हां अपात्र तोचि उपावो ॥ मद्भक्तां पहाहो मद्भजनीं ॥ ८ ॥ ईश्वर आणि पाषाण ॥ भजनीं मद्भक्तां समान ॥ हें भक्तीचें मुख्य लक्षण ॥ चौथी भक्ति जाण या नांव ॥ ९ ॥ स्वकर्मधर्मवर्णाचार ॥ करितांही निजव्यवहार ॥ ज्यासि ※सर्वभूतीं मदाकार ॥ तो भक्त साचार प्रिय माझा ॥३१०॥ ज्यासि सर्वभूतीं बुद्धि समान ॥ तेचि भक्ति तेंचि ज्ञान ॥ तेचि स्वानंदसमाधान ॥ सत्य सज्ञान मानिती ॥ ११ ॥ असो सज्ञानाची कथा ज्यासि सर्वभूतीं समता ॥ तो मजहि मानला तत्त्वतां ॥ मोक्षही सर्वथा वंदी त्यातें ॥ १२ ॥ ※सर्वभूतीं आत्माराम ॥ऐसें कळलें ज्या निःसीम ॥ तेचि भक्ती उत्तमोत्तम॥ ज्ञानियें परम मद्रूपें ॥ १३ ॥ योग याग ज्ञान ध्यान ॥ सकळ साधनांमाजीं जाण ॥ मुख्यत्वें हेंचि साधन॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ नरेष्वभीक्ष्णं मद्भावं पुंसो भावयतोऽचिरात् ॥ स्पर्धाऽसूयातिरस्काराः साहंकारा वियंति हि ॥ १५ ॥

॥ टीका ॥ जो श्रोत्रिय[1] सदाचार उत्तम ॥ कां जो ⁰जातिस्वभावें अधम ॥ कां अनाचारी ⁵अकर्म ॥ तेथें मद्भावें सम देखे जो वस्तु ॥ १५ ॥ चराचरीं भगवद्भावो ॥ देखणें, हा शुद्ध ⁷स्वभावो ॥ तरी नराच्याच ठायीं देवो ॥ सांक्षेपें पहाहो कृष्ण कां सांगे ॥ १६ ॥ मनुष्यांच्याठायीं जाण ॥ प्रकट दिसती दोषगुण ॥ तेथ सांक्षेपें[2] आपण ॥ ब्रह्म परिपूर्ण पहावें ॥१७॥ चौऱ्याशीं लक्षयोनी अपार ॥ त्यांत त्र्यांशीं लक्ष नव्याणव सहस्र ॥ नवशें नव्याणव योनी साचार ॥ मुक्त निरंतर गुणदोषार्थीं ॥ १८ ॥ परी मनुष्ययोनीच्याठायीं ॥ दोष न देखे जो कांहीं ॥ तोचि देहीं विदेही ॥ अन्यथा नाहीं ये अर्थी ॥ १९ ॥ मनुष्यदेहीं ब्रह्मभावो ॥ देखे तो सभाग्य पहाहो ॥ चहूं मुक्तींचा तोचि ⁹रावो ॥ जगीं निःसंदेहो तो ¹एक ॥ ३२० ॥ सर्वभूतीं भगवद्भजन ॥ ऐसें ज्यासि अखंड साधन ॥ त्या नराचा देहाभिमान ॥ क्षणार्धें जाण

---

१ अग्निहोत्री. २ यत्नानें, खटपटीनें.

*मो. सर्वस्वदेता. +ना. कृतघ्नपणें. ०मो. घाता घातकी. ×ना. मश्यकसृष्टीकर. आत्मत्वी तैसें. =ना. जेथें रिघों शके आपावो. ※ना. सर्वभूतें. ⁽मो. स्वभावें. ना. जातिस्वभाव. ⁵मो. अधर्म. ⁷मो. सद्भावो. ⁹ना. ठावो. ¹मो. जाणावा.

※ १३ही ओंवी पैठण येथील हस्तलिखित पोथींत आहे परंतु पंढरपूर येथील हस्तलिखित पोथींत नाहीं.

स्वयें जाये ॥ २१ ॥ जातां देहींचा अहंकार ॥ निघे सकुटुंब सपरिवार ॥ स्पर्धा असूया तिरस्कार ॥ येणें सत्वर समूळ निघे ॥ २२ ॥ *देहीं ममता तो अभिमान ॥ +आपुल्या ज्ञानेंसी समान ॥ ×त्याचे निर्भर्त्सनेचें ज्ञान ॥ स्पर्धा जाण तीं नांव ॥२३॥ आपणाहूनि अधिक ज्ञान॥ ऐसें जाणोनि आपण ॥ त्याचे ०गुणीं दोषारोपण ॥ करणें, ते जाण असूया ॥ २४ ॥ भाविक जे ※साधक जन ॥ त्यांचें छळूनि सांडी साधन ॥ धिक्कारें *निर्भर्त्सी पूर्ण ॥ तिरस्कार जाण या नांव ॥ २५ ॥ इत्यादि दोषसमुदावो ॥ घेऊनि पळे अहंभावो ॥ सर्वांभूतीं भगवद्भावो ॥ देखतांच पहाहो तत्काळ ॥ २६ ॥ सर्वभूतीं समत्वें भजतां ॥ हेंचि श्रेष्ठ समाधान तत्त्वतां ॥ येणें पूर्ण ब्रह्म लाभेल हातां ॥ हे साधे अवस्था नरदेहीं ॥ २७ ॥ सांडावें ममतेचें काज ॥ सांडावें योग्यतेचें भोज ॥ सांडावी लौकिकाची लाज ॥ ब्रह्मसायुज्य तें लाभे ॥ २८ ॥ सांडावी देहगर्वता ॥ सांडावी सन्मान अहंता ॥ सांडावीं श्रेष्ठत्व पूज्यता ॥ ब्रह्मसायुज्यता तें लाभे ॥ २९ ॥ तत्काळ होईजे ब्रह्म पूर्ण ॥ या प्राप्तीचें सुगम साधन ॥ कोणाही न करवें जाण ॥ लोकेषणा दारुण जनासी ॥ ३३० ॥ सांडावा वर्णाभिमान ॥स्वयें सांडूनि जाणपण॥ अणुरेणूंसीही लोटांगण ॥ घालितां पूर्ण ब्रह्मप्राप्ती ॥ ३१ ॥ जो सांडी लोकेषणेची लाज ॥ त्याचें तत्काळ होय काज ॥ तेचिविखींचें निजगुज ॥ स्वयें अधोक्षज सांगत ॥ ३२ ॥

॥ श्लोक ॥ विसृज्य स्मयमानान् स्वान् दृशं व्रीडां च दैहिकीम् ॥प्रणमेद्दंडवद्भूमावाश्वचांडालगोखरम् ॥ १६ ॥

॥ टीका ॥ सुहृदा देखतां लोटांगण ॥ घालतां हांसतील संपूर्ण ॥ यालागीं [२]विदेशीं आपण॥ घालावें लोटांगण गोखरश्वानां ॥ ३३ ॥ ऐशी लौकिकाची लाज ॥ धरितां सिद्धी नपवे काज॥ लोटांगणाचें निजभोज ॥ नाचवि निर्लज्ज सुहृदापाशीं ॥ ३४ ॥ सासु सासरा जांवयी ॥ इष्टमित्र [१]व्याही भांयीं ॥ ज्यांसि देखतांचि पाहीं ॥ विरिजे देहीं लाजोनी ॥ ३५ ॥ 5त्याचि देखतां आपण ॥ लाज सांडोनियां जाण॥ चांडाळादि हीन जन ॥ गोखरश्वान वंदावे ॥ ३६ ॥ तेंही ऐसें गा वंदन ॥ दंडाचेपरी 0आपण ॥ 3सर्वभूतीं लोटांगण ॥ Kभगवद्भावें जाण घालावें ॥३७॥ तेथ ब्रह्मवेत्ते ब्राह्मण ॥ कां अंत्यजादि जन॥यांच्या ठायीं लोटांगण॥सारिखें जाण सद्भावें ॥ ३८ ॥ गाय गाढव सूकर श्वान ॥ यांच्या ठायीं आपण ॥ दंडवत लोटांगण ॥ सद्भावें संपूर्ण घालावें ॥ ३९ ॥ साधावया निजकार्य पूर्ण ॥ लोकलाज सांडावी खणोन ॥ [३]गी मुंगी मुरकूट जाण ॥ त्यांसिही लोटांगण दंडप्राय ॥३४०॥ भावें वंदितां गोखररजें ॥ प्रकटे भगवद्भजनतेज ॥ त्यजूनि स्वजनाची लाज ॥ वंदी निजभोज Lलोटांगणेंसी ॥ ४१ ॥ Bत्यजूनि निःसंदेह विषमता ॥ लोकलज्जे हाणोनि लाता ॥ भगवद्बुद्धीं सर्वभूतां ॥ घालावें

१ बंधू. २ महारादीकरून. ३ गाईची व गाढवाची पायधूळ. ४ आपल्या आवडीनें.

*मो. देहममता. +मो. आपुलिया ज्ञानासी जो नव्हे समान. ×मो. त्याचें जें कां निर्भर्त्सन. ०ना. मो. गुणदोषारोपण. ※मो. साधु. *मो. निर्भर्त्सन. 2मो. विदेशा जाऊनि आपण. 5ना. त्यासी. 0ना. जाण. 3मो. स्वयें भूतांसि. Kना. सद्भावें. Lमो. लोटांगणें. Bमो. त्यजूनि वदेहविषमता.

तत्त्वतां लोटांगण ॥ ४२ ॥ ह्मणसी ऐसें हें साधन ॥ कोठवरी करावें आपण ॥ तेंचि मर्यादानिरूपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ यावत्सर्वेषु भूतेषु मद्भावो नोपजायते ॥ तावदेवमुपासीत वाङ्मनः-कायवृत्तिभिः ॥ १७ ॥

॥ टीका ॥ आपुला देह वाळोनि पुढें ॥ जें जें भूत दृष्टीं आतुडे ॥ तेथ भगवद्भावें ठसा पडे ॥ वाडेंकोडें निश्चित ॥ ४४ ॥ दृष्टीं पाहतां जेंजें भासे ॥ दृष्टि नातुडतां जेंजें दिसे ॥ तेंतें ज्यासि अनायासें ॥ भासे आपैसें चिद्रूप ॥ ४५ ॥ मनाचे कल्पने जें जें आलें ॥ कां कल्पनातीत जें जें ठेलें ॥ तें तें ज्यासि अनुभवा आलें ॥ स्वरूप आपुलें *मद्रूपत्वें ॥ ४६ ॥ +कायिक कर्माचार ॥ वैदिक लौकिक व्यापार ॥ ते ज्यासि दिसती मदाकार ॥ चराचर मद्रूपें ॥ ४७ ॥ जागृति-स्वप्नसुषुप्तींसी ॥ देखिजे भोगिजे ज्या सुखासी ॥ तें तें मद्रूपें ज्यासी ॥ निश्चयेंसी ठसावे ॥ ४८ ॥ स्वाभाविक जे व्यापार ॥ देहीं निपजती अपार ॥ ज्यासि मद्रूपें साचार ॥ निश्चयें निर्धार ढळेना ॥ ४९ ॥ ऐशी न जोडतां अवस्था ॥ सर्वभूतीं मद्भावता ॥ भजावें गा तत्त्वतां ॥ निजस्वार्थालागूनी ॥ ३५० ॥ हे सांडूनि भजनावस्था ॥ नानासाधनीं प्रयास करितां ॥ माझ्या अनुभवाची वार्ता ॥ न चढे हाता कल्पांतीं ॥ ५१ ॥ ऐसें जाणूनियां आपण ॥ सर्वभूतीं भगवद्भजन ॥ करावें निश्चयेंसि जाण ॥ हे आज्ञा संपूर्ण पैं माझी ॥ ५२ ॥ सांडोनि ×युक्तीची व्युत्पत्ती ॥ धरितां भगवद्भाव सर्वभूतीं ॥ येणेंचि माझी सुगम प्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ५३ ॥ माझिये प्राप्तीचें सुगम साधन ॥ उद्धवा तुवां पुशिलें जाण ॥ तरी सर्वभूतीं भगवद्भजन ॥ तदर्थ जाण सांगितलें ॥ ५४ ॥ हा ब्रह्मप्राप्तीचा उपाव पूर्ण ॥ माझे जिव्हारींची निजखूण ॥ सुगमप्राप्तीलागीं जाण ॥ उत्तम साधन सांगीतलें ॥ ५५ ॥ येणें सुगम ज्ञानस्थिती ॥ येणें सुगम माझी भक्ती ॥ येणें सुगम माझी प्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ५६ ॥ सर्वभूतीं ब्रह्मस्थिती ॥ ज्यासि निश्चयें जाहली प्राप्ती ॥ त्याची उपरमे भजनवृत्ती ॥ तेंचि श्रीपती सांगत ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ सर्वं ब्रह्मात्मकं तस्य विद्ययात्ममनीषया ॥ परिपश्यन्नुपरमेत्सर्वतो मुक्तसंशयः ॥ १८ ॥

॥ टीका ॥ काया वाचा आणि चित्तें ॥ ०सर्वभूतीं भजले मातें ॥ त्यांसि भगवद्रूप सर्वभूतें ॥ सुनिश्चितें ठसावती ॥ ५८ ॥ तेव्हां मी एक एथें ॥ भगवद्रूप ꣸पाहे भूतें ॥ हेही वृत्ति हारपे तेथें ॥ देखे *सभोंवतें परब्रह्म ॥ ५९ ॥ परब्रह्म देखती वृत्ती ॥ तेही विरे ब्रह्माआंतौती ॥ जेवीं घृतकणिका घृतीं ॥ [1]होय सुनिश्चतीं घृतरूप ॥ ३६० ॥ तेव्हां ब्रह्माचि परिपूर्ण ॥ हेही स्फूर्ति नुरे जाण ॥ गिळूनियां मीतूंपण ॥ ब्रह्मीं [6]ब्रह्मपण अहेतुक ॥ ६१ ॥ येथें हेतुमातुदृष्टांत ॥ खुंटला वेदेंसि [0]शास्त्रार्थ ॥ हारपला देवभक्त ॥ अखंड वस्तु अद्वयत्वें ॥ ६२ ॥ गेलिया

१ न प्राप्त झाली असतां. २ नाहींशी होते. ३ पूज्यपूजक भाव.

*ना. चिद्रूपत्वें. +मो. ऐके आतां कर्माचार. ×मो. युक्ती व्युत्पत्ती. ०मो. सर्व भावें. ꣸मो. हें भूतें. *मो. सबाह्य. 4मो. होती. 6मो. ब्रह्मार्पण. 0मो. वेदार्थ.

दोराचें सापपण ॥ दोर दोररूपें परिपूर्ण ॥ होकां भासतांही सापपण ॥ दोरीं दोरपण *अनसुट ॥ ६३ ॥ तेवीं प्रपंच सकारण ॥ गेलिया ब्रह्मचि परिपूर्ण ॥ कां दिसतांही प्रपंचाचें भान ॥ ब्रह्मीं ब्रह्मपण ×अनुच्छिष्ट ॥ ६४ ॥ याचिलागीं सर्व भूतीं ॥ माझी करितां +भगवद्भक्ती॥एवढी साधकांसि होय प्राप्ती॥जाण निश्चितीं उद्धवा॥६५॥तात्काळ पाववया ब्रह्म पूर्ण॥ सांडूनियां दोषगुण ॥ सर्वभूतीं भगवद्भजन ॥ हेंचि साधन मुख्यत्वें ॥ ६६ ॥ याही साधनावरतें ॥ आणिक साधन नाहीं ❀सरतें ॥ हेंचि ०परमसमाधान एथें ॥ मजही निश्चित मानलें ॥ ६७ ॥

॥ श्लोक ॥ अयं हि सर्वकल्पानां सध्रीचीनो मतो मम ॥ मद्भावः सर्वभूतेषु मनोवाक्कायवृत्तिभिः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ सर्वभूतीं भगवद्दृष्टी ॥ हेंचि भांडवल माझे गांठीं ॥ येणें भांडवलें कल्पकोटी ॥ करोनि सृष्टी मी अकर्ता ॥ ६८ ॥ मज पाहतां निजात्मदृष्टी ॥ सर्वभूतीं भगवद्दृष्टी ॥ हेचि भक्ति माझी गोमटी ॥ ब्रह्मांडकोटी तारक ॥ ६९ ॥ हेचि भक्ति म्यां कल्पादी ॥ सर्वभूतीं भगवद्‌बुद्धी ॥ नाभिकमळीं त्रिशुद्धी ॥ *ब्रह्मा याविषीं उपदेशिला ॥ ३७० ॥ व्रत तप करितां दान ॥ योग याग धरितां ध्यान ॥ Zवेदशास्त्रार्थें साधितां ज्ञान ॥ माझ्या भक्तिसमान ते नव्हती ॥ ७१ ॥ नानासाधनांचिया कोटी ॥ साधकीं Iसाधितां अटाटी ॥ माझ्या प्रेमाची नातुडे गोठी ॥ Eमद्भक्तभेटीवांचूनी ॥ ७२ ॥ माझिया भक्तांचे संगतीं ॥ साधकां लाभे माझी भक्ती ॥ Pअभेदभजनें माझी प्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७३ ॥ सर्वभूतीं भगवद्भजन ॥ करी तें ऐक पां लक्षण ॥ विषमें भूतें देखतां जाण ॥ Lमनीं भाव परिपूर्ण ब्रह्मत्वें ॥ ७४ ॥ दुष्ट Bदुरात्मे अनोळख ॥ नष्ट चांडाळ अनामिक ॥ तेथही ब्रह्मभाव चोख ॥ हें मानसिक निजभजन ॥ ७५ ॥ भूतीं भगवंत परिपूर्ण ॥ ऐसें जाणोनि आपण ॥ भूतांसि लागे Gदारुण ॥ तें कठिण वचन न बोले ॥ ७६ ॥ तेथें जातांही निजप्राण ॥ Tपरी भूतांचे न बोले दोषगुण ॥ या नांव गा वाचिक भजन ॥ उद्धवा जाण निश्चित ॥ ७७ ॥ जेणें भूतांसि होय उपकार ॥ ते ते करी देहव्यापार ॥ भेदितांही निजजिंव्हार ॥ जो अपकारा कर उचलीना ॥७८॥ स्वयें साहूनियां अपकार ॥ जो अपकारियां करी उपकार ॥ Kऐसा ज्याचा शरीरव्यापार ॥ तें भजन साचार कायिक ॥ ७९ ॥ यापरी कायावाचामनें ॥ सर्वभूतीं भगवद्भजन ॥ हेंचि मुख्यत्वें श्रेष्ठ साधन ॥ भक्त सज्ञान जाणती ॥ ३८० ॥ब्रह्मप्राप्तीचें परम कारण ॥ हेंचि एक Rसुगम साधन ॥मजही निश्चयें मानलें जाण॥ देवकीची आण उद्धवा ॥ ८१ ॥ हा भजनधर्म अतिशुद्ध ॥ एथें विघ्नांचा संबंध ॥ अल्पही विघ्नीं नशके बाध ॥ तेंचि विशद हरि सांगे ॥ ८२ ॥

---

१ विकाररहित, पूर्ण. २ सरसें. ३ उंच, नीच. ४ कृतघ्न. ५ज्याचें नांव घेऊंनये असा. ६ मर्मभेदक. ७ मर्म, जिव्हाळा.

*मो. अनुच्छिष्ट. ×मो. अनुसुट. +मो. भक्ती. ❀मो. निरुतें. ०मो. परमसाधन. *मो. ब्रह्मयासी बुद्धी उपदेशिली. Zमो. वेदशास्त्र साधितां. Iमो. सोशितां. Eमो. मद्भक्तिभेटी, Pमो. अभेदभजनें. Lना. मानी. Bना. दुराचारी. Gना. अल्पदूषण. Tना. कोणाचे. Kना. ते ते करी देहव्यापार. Rमो. मुख्यत्वें.

॥ श्लोक ॥ नह्यंगोपक्रमे ध्वंसो मद्धर्मस्योद्धवाण्वपि ॥ मया व्यवसितः सम्यङ्निर्गुणत्वादनाशिषः ॥ २० ॥

॥ टीका ॥ *अनेक धर्म नानाशास्त्रार्थीं ॥ मन्वादिमुखें बोलिले बहुतीं ॥ परी सर्वभूतीं भगवद्भक्ती ॥ श्रेष्ठ सर्वार्थीं साधकां ॥ ८३ ॥ ये भक्तीचें हेंचि श्रेष्ठपण ॥ इचे पूर्वारंभीं जाण ॥ साधकांपाशीं अल्पही विघ्न ॥ बाधकपण धरूं नशके ॥ ८४ ॥ येभक्तीचें निजलक्षण ॥ पूर्वारंभीं हे +निर्गुण ॥ एथ रिघावया विघ्न ॥ दादुलेपण धरीना ॥८५॥जेवीं गरुडाचे झडपेतळीं॥ होती सर्पांच्या चिरफाळी ॥ तेवीं ये भक्तीजवळी ॥ विघ्नांची होळी स्वयें होये ॥ ८६ ॥ माझिया नामापुढें ॥ विघ्न राहों नशके बापुडें ॥ तें माझे भक्तीकडे ॥ कोणते तोंडें येईल ॥८७॥ यापरी हे भक्ति सधर ॥ उद्धवा तुझें भाग्य थोर ॥ म्यां ×फोडूनि निजजिव्हार ॥ साराचें सार सांगितलें ॥ ८८ ॥ निष्काम जे माझी भक्ती ॥ तेथ विघ्नांची नपडे गुंती ॥ परब्रह्माची ब्रह्मस्थिती ॥ सुलभत्वें प्राप्ती साधकां ॥ ८९ ॥ हेतुक अहेतुक कर्माचरण ॥ तेंही करी जो कृष्णार्पण ॥ ते उत्तम माझी भक्ति जाण ॥ तेंचि निरूपण हरि सांगे ॥ ३९० ॥

॥ श्लोक ॥ यो यो मयि परे धर्मः कल्पते निष्फलाय चेत् ॥तदायासो निरर्थः स्याद्भयादेरिव सत्तम ॥ २१ ॥

॥ टीका ॥ व्यवहारार्थ जो प्रयास केला ॥ जो नफळतां व्यर्थ गेला ॥ तोही जैं परब्रह्मीं अर्पिला ॥ ⁂तें मद्भजनीं लागला सद्भावें ॥ ९१ ॥ शिमगियाचा महासण ॥ तेथ खेळ °खेळला जो आपण ॥ तोही केल्या कृष्णार्पण ॥ तेही भक्ति जाण मज अर्पे ॥ ९२ ॥ चोराभेणें पळतां वनीं ॥ निधान आतुडे जया लागुनी ॥ तेवीं व्यर्थ कर्मही मदर्पणीं ॥ *तोही मद्भजनीं महालाभ ॥ ९३ ॥ नासलें तें सांडितां क्षितीं ॥ तेंही लागे माझे भक्ती ॥ जरी Cब्रह्मार्पण चित्तीं॥ साधक निश्चितीं दृढ मानी ॥ ९४ ॥ कडू भोपळ्याची क्षिरी ॥ उपेगा नये श्वानसूकरीं ॥ तेही उल्हासें Bकृष्णार्पण करी ॥ Dतेही निर्धारीं ब्रह्मीं अर्पे ॥९५॥ जें हारपलें नदिसे ॥ जें सहजें उडे काळवशें ॥ तेंही लाविल्या मदुद्देशें ॥ होय अनायासें मदर्पण ॥ ९६ ॥ सकळ साराचें सार पूर्ण ॥ कर्ममात्र कृष्णार्पण ॥ साक्षेपें करावें आपण ॥ सद्बुद्धि संपूर्ण या नांव ॥ ९७॥

॥ श्लोक ॥ एषा बुद्धिमतां बुद्धिर्मनीषा च मनीषिणाम् ॥ यत्सत्यमनृतेनेह मर्त्येनाप्नोति मामृतम् ॥ २२ ॥

॥ टीका ॥ पोटांत विषयाची आसक्ती ॥ वरीवरी ब्रह्मार्पण करिती ॥ ते ठकिले बहुतार्थीं॥ तेंचि श्रीपति सांगत ॥ ९८ ॥ एक बुद्धिमंत Tहोती ॥ ते निजबुद्धि घेऊनि हातीं ॥ शेखीं लागले विषयस्वार्थीं ॥ ते ठकिले निश्चितीं देहममता ॥९९॥ एकाची बुद्धि अतिचोखडी ॥ वेदशास्त्रार्थी व्युत्पत्ति गाढी ॥ ते Iअभिमानी कडोकडी ॥ ठकिले Sपडिपाडीं ज्ञानगर्वें ॥४००॥

१ खीर. २ यावत् कर्म. ३ दांभिकपणानें.

*मो. वेदमुखें बोलिला बहुतीं, अनेक धर्म नाना श्रुती. +मो. हें निर्विघ्न. ×मो. उघडूनि. ⁂मो तें भक्त लाधला मद्भजन. °मो. खेळतां. *मो. करितां मद्भजनीं. Cमो. ब्रह्मार्पणभाव चित्तीं. Bना. मो. ब्रह्मार्पण. Dमो. तरी. Tमो. बुद्धिमंतीं. Iमो. अभिमान. Sमो. परवडी.

बुद्धिमंत अभ्यासी जन ॥ अभ्यासें साधिती प्राणापान ॥ ते योगदुर्गीं *रिघतां जाण ॥ ठकिले पूर्ण भोगसिद्धीं ॥ १ ॥ एक मानिती +कर्म श्रेष्ठ ॥ वाढविती कर्म कचाट ॥ विधिनिषेधीं रुंधिली वाट ॥ बुडाले कर्मठ कर्मामाजीं ॥ २ ॥ यापरी नानाव्युत्पत्ती ॥ करितां ठकले नेणों किती ॥ तैशी नव्हे माझी भक्ती ॥ सबाह्य पावती निजभाग्यें ॥ ३ ॥ माझें सर्वभूतीं ज्यासि भजन ॥ त्याचे बुद्धीची बुद्धि ×मी आपण ॥ ते तूं बुद्धि ह्मणसी कोण ॥ कर्म ब्रह्मार्पण महाबुद्धि ॥ ४ ॥ सर्वभूतीं माझें भजन ॥ सर्वकर्म मदर्पण ॥ हे बुद्धीचि महाबुद्धि जाण ॥ येणें ब्रह्म परिपूर्ण स्वयें होती ॥ ५ ॥ चतुराचें चातुर्य गहन ॥ या नांव बोलिजे गा ×आपण ॥ मिथ्या देह करूनि भजन ॥ ब्रह्म सनातन स्वयें होती ॥ ६ ॥ आधीं मायाचि तंव वावो ॥ मायाकल्पित मिथ्या देहो ॥ तें देहकर्म मज अर्पितां पहाहो ॥ ब्रह्म स्वयमेवो स्वयें होती ॥ ७ ॥ मिथ्या देहाचेनि भजनें ॥ सत्य परब्रह्म स्वयें होणें ॥ जेवीं कोंडा देऊनि आपणें ॥ कणाची येणें महाराशी ॥ ८ ॥ देतां फुटकी कांचवटी ॥ चिंतामणी जोडे गांठी ॥ कां ✻इटेच्या सांटोवांटी ॥ जोडे उठाउठी [1]अव्हा शंख ॥ ९ ॥ तेवीं मिथ्या देहाचें कर्माचरण ॥ जेणें जीवासि दृढ बंधन ॥ तें कर्म करितां मदर्पण ॥ ब्रह्म परिपूर्ण स्वयें होती ॥ ४१० ॥ अनित्यदेहाचिया साठीं ॥ ०नित्यवस्तूशी पडे मिठी ॥ हेचि बुद्धिमंतां बुद्धि मोठी ॥ ³ज्ञानसंतुष्टी या नांव ह्मणिजे ॥ ११ ॥ [3]निष्टंकित परमार्थ ॥ स्वमुखें बोलिला श्रीकृष्णनाथ ॥ तो कळसा आणोनियां ग्रंथ ॥ उपसंहारार्थ सांगत ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ एष तेऽभिहितः कृत्स्नो ब्रह्मवादस्य संग्रहः ॥ समासव्यासविधिना देवानामपि दुर्गमः ॥ २३ ॥

॥ टीका ॥ संक्षेप आणि सविस्तरें ॥ सांडूनि नाना मतांतरें ॥ म्यां सांगितलें निजनिर्धारें ॥ ब्रह्मज्ञान खरें अतिशुद्ध ॥ १३ ॥ तुज सांगीतलें करून सुगम ॥ परी हें ⁸ब्रह्मादिदेवां दुर्गम ॥ जें *आलोडिती आगम निगम ॥ त्यांसीहि परम दुस्तर ॥ १४ ॥ तेथें ²नानाशास्त्रशब्दबोध ॥ वस्तु नेणोनि करिती विवाद ॥ ⁴जेथ वेदाचाही ब्रह्मवाद ॥ होय निःशब्द ⁹नेतिवादें ॥ १५ ॥ तें हें आत्मज्ञानाचें निजसार ॥ परमार्थाचें गुह्य भांडार ॥ मज परमात्म्याचें जिव्हार ॥ फोडूनि ¹सुखसार सांगितलें ॥ १६ ॥

॥ श्लोक ॥ अभीक्ष्णशस्ते गदितं ज्ञानं विस्पष्टयुक्तिमत् ॥ एतद्विज्ञाय मुच्येत पुरुषो नष्टसंशयः ॥ २४ ॥

॥ टीका ॥ जेथ वेदशास्त्रांशी कुवाडें ॥ बोलीं ⁰जें बोला नातुडे ॥ तेंचि ज्ञान म्यां तुजपुढें ॥ निजनिवाडें सांगीतलें ॥ १७ ॥ जें सांगीतलें शुद्ध ज्ञान ॥ तें नानायुक्तींकरूनी जाण ॥ दृढ-

---

१ मोबदल्यांत. २ दक्षिणावर्ती, शंख. ३ शुद्ध, निश्चित. ४ समासीस. ५ रोवटचा सारांश. ६ अभ्यासती. ७ समजण्यास कठीण. ८ पूर्ण ठसण्या करितां.

*मो. रिघाले. +मो. स्वधर्म. ×ना. जाण. ✻मो. ईट देतां ना. विटे. ०मो. निजवस्तूसी. ³मो. ज्ञानाची तुष्टी. ⁸मो. ब्रह्मादिकांसि. *ना. मो. आलोडितां. ²मो. नानाशास्त्रबोध ना. नानार्थशब्दबोध. ⁴मो. वेदांचाही वाद. ⁹मो. शब्दें. ¹मो. साचार. ⁰ना. जें बोल बोलतां नातुडे.

तेलागीं निरूपण ॥ तुज पुनः पुनः *म्यां केलें ॥ १८ ॥ बहुत नं लावितां खटपट ॥ तुज न वाटतांही कष्ट ॥ ज्ञान सांगीतलें स्पष्ट ॥ जेणें होती सपाटें संशय ॥ १९ ॥ हें जाणितलिया ज्ञान ॥ सर्वसंशय होती दहन ॥ साधक होय ब्रह्मसंपन्न ॥ स्वानंदपूर्ण सर्वदा ॥ ४२० ॥ म्यां सांगीतलें ब्रह्मज्ञान ॥ एकादशाचें निरूपण ॥ याचें श्रवण पठण मनन ॥ करी तो धन्य उद्धवा ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ सुविविक्तं तव प्रश्नं मयैतदपि धारयेत् ॥ सनातनं ब्रह्म गुह्यं परं ब्रह्माधिगच्छति ॥ २५ ॥

॥ टीका ॥ ज्ञाते तरती हें नवल कोण ॥ परी बाळे भोळे जे अज्ञान ॥ त्यांसि उद्धरावया जाण ॥ उद्धवा तुवां प्रश्न पुशिला ॥ २२ ॥ त्या प्रश्नानुसारें जाण ॥ म्यां संतोषोनि आपण ॥ सांगीतलें गुह्य ज्ञान ॥ परम कारण परब्रह्म ॥ २३ ॥ जेवीं वत्साचेनि हुंकारें ॥ धेनु स्रवतें चाले क्षीरें ॥ तेवीं तुझेनि प्रश्नादरें ॥ मी स्वानंदभरें तुष्टलों ॥ २४ ॥ तेथ न करितांही प्रश्न ॥ होतां तानयाचें अवलोकन ॥ कूर्मी नेत्रद्वारा आपण ॥ अमृतपान करावेत ॥ २५ ॥ ×तेवीं उद्धवा तुझें अवलोकन ॥ होतें माझें हृदयींचें ब्रह्मज्ञान ॥ तें वोसंडलें गा परिपूर्ण ॥ तें हें निरूपण म्यां केलें ॥२६॥ तें येणें निरूपणमिसें ॥ परमामृत सा[१]त कासें ॥ तुज म्यां पाजिलें अनायासें ॥ स्वानंदरसें निजबोधें ॥ २७ ॥ सिंधु मेघा जळपान करवी ॥ तेणें जळें मेघ जगातें निववी ॥ तेवीं +उद्धवाची ब्रह्मपदवी ॥ जडमूढजीवीं उद्धरिजे ॥ २८ ॥ जेवीं वत्साचेनि प्रेमभरें ॥ गाय दुभे तें घरासि पुरे ॥ तेवीं उद्धवप्रश्नादरें ॥ जग उद्धरे अनायासें ॥ २९ ॥ तो हा प्रश्नोत्तर कथानुवाद ॥ माझा तुझा ब्रह्मसंवाद ॥ निरूपणएकादशस्कंध ॥ हा अर्थावबोधें जो राखे ॥ ४३० अथवा हें निरूपण ॥ ०सार्थकें जो का करी श्रवण ॥ तें श्रोते वक्ते उभय जाण ॥ ❀ब्रह्म सनातन पावती ॥३१॥ जगीं ब्रह्म असतां परिपूर्ण ॥ मनबुद्धि इंद्रियां न दिसे जाण ॥ जेथें वेदांसि पडिलें मौन ॥ तें गुह्यज्ञान पावती ॥३२॥ ज्ञान पावलिया पुढती ॥ कदा काळें नव्हे च्युती ॥ एकादशार्थ धरितां चित्तीं ॥ पदप्राप्ती अच्युत ॥३३॥ श्रोते वक्ते एकादशार्थीं ॥ एवढी पदवी पावती ॥ मा मद्भक्तांसि अतिप्रीतीं ॥ जे उपदेशिती हें ज्ञान ॥ ३४ ॥ त्यांच्या फळाची फलप्राप्ती ॥ ज्ञानोपदेशाची शुद्धस्थिती ॥ उद्धवालागीं अतिप्रीतीं ॥ स्वमुखें श्रीपती सांगत ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ य एतन्मम भक्तेषु संप्रदद्यात् सुपुष्कलम् ॥ तस्याहं ब्रह्मदायस्य ददाम्यात्मानमात्मना ॥ २६ ॥

॥ टीका ॥ काया वाचा आणि चित्त ॥ गृह दारा वित्त जीवित ॥ निष्कामता मज अर्पित ॥ अनन्यभक्त ते माझे ॥ ३६ ॥ ऐशिया भक्तांच्या ठायीं जाण ॥ अवश्य उपदेशावें हें ज्ञान ॥

१ साफ नाहींसे. २ पान्हावते, गळते, सांडते. ३ अर्थाची जागृती, अर्थाचें ज्ञान. ४ हलणें, ढळणें.

*मो. जाण सांगीतलें. ×मो. तेवीं उद्धवा तुझेनि अवलोकनें ॥ होतें माझे हृदयीं जें ब्रह्मज्ञान ॥ तें वोसंडलें संपूर्ण ॥ +मो. उद्धवाचिये प्रेमपदवीं. ०मो. सार्थक करी जो आपण. ❀ ब्रह्मसंपन्न स्वयें होती.

त्याही उपदेशाचें लक्षण ॥ *पक्क परिपूर्ण तें ऐसें ॥ ३७ ॥ जेथ जाय साधकाचें मन ॥ तेथें +तेथें ब्रह्म परिपूर्ण ॥ मन निघावया तेथून ॥ रितें स्थान असेना ॥३८ ॥ ऐसें करितां अनुसंधान ॥ ×चैतन्यीं समरसे मन ॥ त्यातें ह्मणिजे पुष्कल ज्ञान ॥ उपदेश पूर्ण या नांव ॥ ३९ ॥ ऐसें समूळ ०ब्रह्मज्ञान ॥ *मद्भक्तांसि जो करी दान ॥ त्याचा ब्रह्मऋणि या मी जाण॥होय संपूर्ण उद्धवा ॥ ४४० ॥ त्याचिया उत्तीर्णत्वासीं ॥ गांठी कांहीं नाहीं मजपासीं ॥ मी निजरूप अर्पीं त्यासी ॥ अहर्निशीं मी त्या जवळी ॥ ४१ ॥ जो शिष्यासि दे ब्रह्मज्ञान ॥ मी परमात्मा त्या अधीन ॥ ब्रह्मदात्याच्या बोलें जाण ॥ स्त्रियादि शद्रजन मी उद्धरीं ॥ ४२ ॥ देऊनियां परब्रह्म ॥ जो मद्भाक्तांसि करी निष्कर्म ॥ त्याचा अंकित मी पुरुषोत्तम ॥ तो प्रिय परम मजलागीं ॥ ४३ ॥ जो ब्रह्मज्ञान दे मद्भक्तां ॥ तयाहूनि आणीक परता ॥ मज आन नाहीं गा पढियंता ॥ जाण तत्वतां उद्धवा ॥ ४४ ॥ तो आत्मा मी शरीर जाण ॥ ❀त्याचा देह मी होय आपण ॥ त्याचें जें जें कर्माचरण ॥ तें संपूर्ण मीचि होय ॥ ४५ ॥ जैसा मी अवतारधारी ॥ तैसाचि तोही अवतारी ॥ त्या आणि मजमाझारीं ॥ नाहीं तिळभरी अंतर ॥ ४६ ॥ जो या ब्रह्मज्ञानाचें करी दान ॥ त्यासि यापरी मी आपण ॥ करीं निजात्मअर्पण ॥ तरी उतीर्ण नव्हेंची ॥ ४७ ॥ यालागीं तो वर्ततांही शरीरीं ॥ मी अखंड त्याची सेवा करीं ॥ निजात्मअर्पण प्रीती ३वरी ॥ मी त्याच्या घरीं सर्वदा ॥४८॥ त्यानें जें जें जडभारी ॥ तेंही मी वाहें आपुलें शिरीं ॥ माझी चैतन्यसाम्राज्यश्री ॥ नांदे त्याचे घरीं सर्वदा ॥४९॥ एकादशाचें ४ब्रह्मज्ञान ॥ बोधूनि मद्भक्तां जो करी दान ॥ त्यासि मी यापरी जाण ॥ आत्मार्पण स्वयें करीं ॥ ४५० ॥ असो नसाधवे ब्रह्मज्ञान ॥ तरी या ६ग्रंथाचेंचि पठण ॥ जो सर्वदा करी सावधान ॥ तो परम पावन उद्धवा ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ य एतत्समधीयीत पवित्रं परमं शुचि ॥ स पूयेताहरहर्मां ज्ञानदीपेन दर्शयन् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ निखळ जें कां ब्रह्मज्ञान ॥ तो हा माझा तुझा संवाद जाण ॥ जो सादरें करी पठण ॥ सावधान श्रद्धाळू ॥ ५२ ॥ चढत्या वाढत्या परवडी ॥ ०शुद्ध सात्विकी श्रद्धा गाढी ॥ पदांपदीं नीच नवी गोडी ॥ अद्भुत आवडी ५पठणाची ॥ ५३ ॥ वाचेचिया टवळ्यांप्रती ॥ श्रद्धा स्नेहाची संपत्ती ॥ निजजिव्हां करूनि वाती ॥ जो हे ज्ञानदीप्ति प्रकाशी ॥ ५४ ॥ एकादशाचे ज्ञानदीप्तीं ॥ एकादश इंद्रियांच्या वाती ॥ उजळूनि जे मज ओंवाळती ॥ ते पवित्र किती मी सांगों ॥ ५५ ॥ यापरी जें ग्रंथपठण ॥ तें माझें २ज्ञाननिरांजन ॥ तेणें ज्ञानदीपें जो जाण ॥ माझें स्वरूप पूर्ण प्रकाशी ॥ ५६ ॥ त्याचे लागले जे संगतीं ॥ त्यांतें ब्रह्मादिक वंदिती ॥

---

१ अखंड भावना. २ तदाकार होतें. ३ श्रेष्ठ. ४ उतराईकरितां. ५ प्रेमास्तव. ६ संकट. ७ तोंडाचीं जाभाडें हींच दिव्याचीं चाडीं किंवा टवळीं. ८ तेजाची, प्रेमाची. ९ ज्ञानाचा दिवा लावतो, प्रकाशतो.

*मो. पुष्कल परिपूर्ण तें ऐक. +मो. होय. ×मो. चिंतनीं. ०ना. पूर्ण ब्रह्मज्ञान. *मो. शिष्यासी. ❀मो. हेही उपमा गौण ॥ ३ना. वाऱ्हीं ४मो. अर्थज्ञान. ६मो. ग्रंथाचें. ०मो. शुद्ध श्रद्धा अतिगाढी. ५मो. प्रेमाची. २मो. निराजन.

*त्यांचेनि पावन त्रिजगती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ५७ ॥ असो ज्यांसि न टॅके पठण ॥ तिहीं श्रद्धेनें करितां श्रवण ॥ त्यांसि न बाधी भवबंधन ॥ तेंही निरूपण हरि सांगे ॥ ५८ ॥

॥ श्लोक ॥ य एतच्छ्रद्धया नित्यमव्यग्रः शृणुयान्नरः ॥ मयि भक्तिं परां कुर्वन् कर्मभिर्न न बध्यते ॥ २८ ॥

॥ टीका ॥ असो न करवे अध्ययन ॥ तरी श्रद्धायुक्त सावधान ॥ करितां एकादशाचें श्रवण ॥ कर्मबंधन बाधीना ॥ ५९ ॥ अतिश्रद्धेनें केलें श्रवण ॥ त्याहूनि दृढ व्हावें मनन ॥ मननेंवीण तें नपुंसक जाण ॥ ब्रह्मप्राप्ति पूर्ण +फळेना ॥४६०॥ संपलिया कथाश्रवण ॥ मनींचें संपावेंना मनन ॥ जैसें लोभियाचें धन ॥ हृदयीं आठवण सर्वदा ॥ ६१ ॥ जैसें जैसें कीजे श्रवण ॥ तैसें तैसें लागे मनन ॥ मननानुसारें भजन ॥ पराभक्ति जाण उल्हासे ॥ ६२ ॥ आर्त जिज्ञासु अर्थार्थी ॥ याची सांडोनियां स्थिती ॥ उल्हासे माझी चौथी भक्ती ॥ जिते परा ह्मणती सज्ञान ॥ ६३ ॥ पराभक्तीचें माझें भजन ॥ क्रियामात्रीं निजात्मदर्शन ॥ यालागीं मद्भक्तांसि जाण ॥ कर्मबंधन बाधीना ॥ ६४ ॥ हें असो अतिगुह्य बोलणें ॥ येणें एकादशाचेनि श्रवणें ॥ मी तरेन ' हा विश्वास जेणें ॥ अंतःकरणें दृढ केला ॥ ६५ ॥ दृढ विश्वास मानूनि पाहीं ॥ जो लोधला श्रवणविषयीं ॥ माझी भक्ति त्याच्याठायीं ॥ दवडितां पाही घर रिघे ॥ ६६ ॥ घर रिघोन भक्ति निष्काम ॥ भक्तांचें निर्दळी सकळ कर्म ॥ या नांव परा भक्ति परम ॥ विश्रामधाम श्रवणार्थ्यां ॥ ६७ ॥ एकादशाचें श्रद्धाश्रवण ॥ करितां एवढा लाभ जाण ॥ श्रवणें उपजे माझें भजन ॥ भजनें भक्तजन निर्मुक्त ॥ ६८ ॥ असो पां इतरांची वार्ता ॥ म्यां तुज निरूपिली जे ज्ञानकथा ॥ ते तुझिया निश्चितार्था ॥ काय तत्त्वतां प्रतिबोधली ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ अप्युद्धव त्वया ब्रह्म सखे समवधारितम् ॥ अपि ते विगतो मोहः शोकश्चासौ मनोभवः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ उद्धवा तुझें देखोनि प्रेम ॥ गुह्य ज्ञान अतिउत्तम ॥ तुज म्यां निरूपिलें परब्रह्म ॥ सांग सुगम अतिशुद्ध ॥४७०॥ हें ज्ञानाचें सोलींव ज्ञान ॥ हें वेदाचें विसावतें स्थान ॥ हेचि अविद्येची बोळवण ॥ समाधान जीवशिवां ॥ ७१ ॥ ऐसेंही जें गुह्य ज्ञान ॥ मनबुद्धिवाचेसि अगम्य जाण ॥ तें म्यां तुज केलें निरूपण ॥ श्रद्धा संपूर्ण देखोनी ॥ ७२ ॥ जेवीं सखा सख्यांप्रती ॥ आपुली वोपी निजसंपत्ती ॥ तेवीं म्यां हे ब्रह्मस्थिती ॥ तुझ्या हातीं वोपिली ॥७३॥ जैसें दीधलें श्रवणाच्या हातीं ॥ तैसें प्रविष्ट जाहलें तुझिया चित्तीं ॥ ×कीं माझारीं कांहीं पडली गुंती ॥ ※विकल्पवस्ती विक्षेप ॥ ७४ ॥ म्यां निरूपिलें सार परम ॥ तें तुज ०कळलें परब्रह्म ॥ नसेल तरी हाचि उपक्रम ॥ पुढती सुगम सांगेन ॥ ७५ ॥ चैतन्य *ठसावोनि चित्तीं ॥ जेथ आकळिली ब्रह्मस्थिती ॥ तेथ मोहममतेची वस्ती ॥ समूळ निश्चितीं नसावी ॥ ७६ ॥ आकळलें जें ब्रह्मज्ञान ॥ त्याची हेचि वोळखण ॥ संकल्प विकल्प विंदान ॥ पुढती जाण

---

१ होत नाहीं. २ असमर्थ, कार्य न करणारें. ३ जिला. ४ लुब्ध झाला. ५ घालवून दिली असतांही. ६ विश्रांति घेण्याचें. ७ देई. ८ दिली. ९ घोंटाळा. १० कारण.

*मो. ते पावन. +ना. फळेना. ×मो. किंवा. ※मो. विकल्पीस्थति विकल्प. ०मो. आकळलें कीं परब्रह्म. *मो. ठसावल्या.

*उपजेना ॥ ७७ ॥ उपजेना मीतूंपण ॥ उपजेना ध्येय ध्यान ॥ नुपजे त्यासि कर्मठपण ॥ ब्रह्म परिपूर्ण जाणीतल्या ॥ ७८ ॥ जेणें जाणीतलें +ब्रह्मज्ञान ॥ त्यासि बाधीना कर्मबंधन ॥ कर्माचें जें कर्माचरण ॥ तें ×जाणे आपण मायिक ॥ ७९ ॥ जेवीं छाया चळे पुरुषाचेनी ॥ परी तियेचा लोभ पुरुष न मानी ॥ तेवीं काया चाळी ब्रह्मज्ञानी ॥ देहाभिमानी तो नव्हे ४८० जेवीं सूर्यापुढें आंधार ॥ अर्धक्षण न धरी धीर ॥ तेवीं ब्रह्मज्ञानीं कर्मादर ॥ अणुमात्र ०उरेना ॥ ८१ ॥ कर्माचें जें कर्म बंधन ॥ तो ※मनोजन्य संकल्प जाण ॥ जेथें मनाचें *मोडे मनपण ॥ तेथें काम चरण 1निर्बीज ॥ ८२ ॥ वस्तु नित्य निर्विकल्प ॥ तेथें नाहीं संकल्पविकल्प ॥ हें परब्रह्माचें निजस्वरूप ॥ हेंचि रूप स्वानुभवासी ॥ ८३ ॥ ऐसें ब्रह्म पावल्या स्वयमेवो ॥ मी एक उद्धव 2होतों पहाहो ॥ त्या उद्धवपणासि नाहीं ठावो ॥ मा शोकमोहो तेथ कैंचा ॥ ८४ ॥ उद्धवपणाचिये वस्ती ॥ शोकमोहाची उत्पत्ती ॥ तें उद्धवपण नाठवे चित्तीं ॥ जरी ब्रह्मप्राप्ति तुज जाहली ॥ ८५ ॥ ऐसें ऐकतां देवाचें वचन ॥ 3उडालें उद्धवाचें उद्धवपण ॥ जाहला स्वानंदीं निमग्न ॥ 4बोलतेपण बुडालें ॥ ८६ ॥ पावतां 5आपुली निजात्मता ॥ 6उडाली उद्धवत्वाची अवस्था ॥ 8बुडाली स्वदेहअहंता ॥ निजनिमग्नता स्वानंदीं ॥ ८७ ॥ तेथें देवें पुसिला जो प्रश्न ॥ त्याचें 9कोण दे प्रतिवचन ॥ कृष्णेंसहित उद्धवपण ॥ गिळोनि (परिपूर्ण उद्धव जाहला ॥ ८८ ॥ देखोनि उद्धवाची अवस्था ॥ हा ब्रह्म पावला निजात्मता ॥ हें कळोंसरलें श्रीकृष्णनाथा ॥ Nहृदयस्था काय न कळे ॥ ८९ ॥ शिष्य साचार अनुभव लाहे ॥ तेणें सद्गुरु सुखाचा मेरु होये ॥ जेवीं तानयाची धेणीं माये ॥ सुखावली राहे स्वानंदें ॥४९०॥ सेवक विभांडी परचक्र ॥ तेणें Fरायासि संतोष थोर ॥ गुढी Aउभारूनि साचार ॥ करी निजगजर स्वानंदें ॥९१ ॥ तानयाचे लळे पुरवणें ॥ Eहे व्यालीची वेदना व्यालीं जाणे ॥ कां शिष्यासि स्वानुभव देणें ॥ हें स्वयें जाणे सद्गुरु ॥ ९२ ॥ निजपुत्रें लाधल्या निधान ॥ पिता संतोषे आपण ॥ तेवीं उद्धवाचेनि अनुभवें जाण ॥ स्वयें श्रीकृष्ण संतोषे ॥ ९३ ॥ Iकृष्णसुखें सुखरूप नित्यता ॥ तोही शिष्यानुभवें सर्वथा ॥ लाहे सुखाची परमावस्था ॥ हे Rगुरुगम्यता अगम्य ॥ ९४ ॥ शिष्यासि बोध करितां ॥ गुरूसि Tनसनी सुखावस्था ॥ तरी उपदेशपरंपरता ॥ Mनव्हे तत्त्वतां इयेलोकीं ॥९५ ॥ गुरु सांगे जें उबगलेसाटीं ॥ Gतें शिष्यासि बोधेना गोष्टी ॥ Yमा निजानुभवाची भेटी ॥ केवीं निजदृष्टीं देखेल ॥ ९६ ॥ जेवीं बाळासि लेणें लेवविता ॥ तें नेणे, परी 7सुखावे माता॥ तेवीं शिष्यासि अनुभव होतां ॥ सुखावे तत्त्वतां गुरुरावो ॥ ९७ ॥ तैसा उद्धवाचा ब्रह्मभावो ॥

---

१ हालवी, कायेनें कर्में करी. २ करून आले. ३ बाळकाची. ४ भूमीनें. ५ मातेची. ६ बाळ.

*मो. उठीना. +मो. ब्रह्मपूर्ण. ×मो. जाणावें. ०मो. उपजेना. ※मो. तें मनोजन्य सकळ जाण. *मो. मोडलें. 1मो. बाधीना. 2मो. हा आठवो. 3मो. बुडालें. 4ना. बोलणेपण. 5ना. पावली. 6मो. बुडाली उद्धवपणाची. 8मो. उडाली. 9मो. कोणें द्यावें. (ना. परिपूर्ण वस्तु. Nमो. त्या हृदयस्था कारणें. Fमो. स्वामीसी. Aना. उभवूनि. Eमो. हें माउलीच जाणे. Iमो. कृष्ण स्वयें सुखरूप तत्त्वतां ॥ Rना. गुरुगुह्यता. Tमो. असतां गुणावस्था. Mमो. जाण तत्त्वतां इहलोक. Gना. तें तो शिष्यासी बोध नव्हे पोटीं. Yमो. तेथें. 7ना. संतोषे.

देखोनि *सुखावे कृष्णदेवो ॥ माझा उद्धव जाहला निःदेहो ॥ यासि ब्रह्मानुभवो आकळला ॥ ॥ ९८ ॥ उद्धवाची ब्रह्मनिष्ठता ॥ अनुभवा आली निजात्मता ॥ हें कळोंसरलें श्रीकृष्णनाथा॥ परोपदेशार्था शिकवित ॥ ९९ ॥ तूं पावलासी ब्रह्मज्ञान ॥ तेथ शिष्योपदेश लक्षण ॥ पात्रशुद्धीचें कारण ॥ तेही वोळखण हरि सांगे ॥ ५०० ॥

॥ श्लोक ॥ नैतत्त्वया दांभिकाय नास्तिकाय शठाय च ॥ अशुश्रूषोरभक्ताय दुर्विनीताय दीयताम् ॥ ३० ॥

॥ टीका ॥ शठ नास्तिक ×दंभयुक्त ॥ अशुश्रुषु आणि अभक्त ॥ +ज्यांची स्थिति दुर्विनीत ॥ ते शिष्य निश्चित त्यागावे ॥ १ ॥ जेणें लोकरूढी होय गहन ॥ तें तें बाह्य कर्माचरण ॥ विपुल धन आणि सन्मान ॥ तदर्थीं जाण अतितृष्णा ॥ २ ॥ ऐसें ज्याचें दांभिक भजन ॥ त्यासि हें एकादशींचें ज्ञान ॥ ꣹ओसंणतां गा आपण ॥ स्वप्नींही जाण नेदावें ॥३॥ मोहममतेचें आधिक्य ॥ तेणें निर्दाळी निजआस्तिक्य ॥ वेदीं शास्त्रीं दृढ नास्तिक्य ॥ देवचि मुख्य नाहीं ह्मणती ॥ ४ ॥ नास्तिक्यवादाचिया बंडा ॥ या ज्ञानाचा ढोरकोंडा ॥ लागोंनेदी त्याचिया तोंडा ॥ ज्याचा भावार्थ कोरडा नास्तिक्यें केला ॥ ५ ॥ नास्तिक्यवादापुढें ॥ ज्ञान कायसें बापुडें ॥ ०अनीश्वरवादाचें बंड गाढें ॥ तें त्यागावें *रोकडें नास्तिक्यवादीं ॥ ६ ॥ अनन्यभावें न रिघे शरण ॥ 1मिथ्या लावूनि गोडपण ॥ धूर्तवादें घेवों पाहे ज्ञान ॥ ते शठ जाण त्यागावे ॥ ७ ॥ शठाची ऐशी निजमती ॥ पुढिलांची 2ठकूनि घे युक्ती ॥ परी आपुली व्युत्पत्ती ॥ पुढिलांप्रती सांगेना ॥ ८ ॥ काया वाचा मन धन ॥ जो 3गुरूशीं करी वंचन ॥ जो गुरूचे देखे दोषगुण ॥ तोही शठ पूर्ण 4त्यागावा ॥ ९ ॥ माझें अतिथोर महिमान ॥ गुरुसेवा केवीं करूं 5आपण ॥ सेवा नकरी महिमेभेणें ॥ तोही शिष्य जाण त्यागावा ॥ ५१० ॥ आपण श्रेष्ठासनीं बैसोनि बरवा॥सेवका हातीं करवी गुरुसेवा॥ तो दांभिक शिष्य जाणावा ॥ तोही त्यागावा ये ग्रंथीं ॥११॥ सद्गुरूशीं समर्थपण ॥ जो आपली मिरवी जाणीव 6जाण ॥ जो सेवा न करी गर्वें 7पूर्ण॥तो शिष्य जाण त्यागावा॥१२॥मी धनदानी अति समर्थ ॥ नीचसेवेसि न लावी हात ॥ ऐसा जो गर्वयुक्त ॥ तोही निश्चित त्यागावा ॥ १३ ॥ जो 8लौकिक लाजेभेण ॥ गुरुसेवा न करी आपण ॥ ज्यासि लौकिकाचा अतिअभिमान ॥ तोही शिष्य जाण 9त्यागावा ॥ १४ ॥ जो गुरुगृहींचें नीचकृत्य ॥ न करी मानूनि मी समर्थ ॥ तो मान्यता अभिमानयुक्त ॥ जाण निश्चित 9त्यागावा ॥ १५ ॥ न करी गुरुसेवा नीचवृत्तीं ॥ आज्ञा अखंड ध्यान हेचि गुरुभक्ती ॥ ऐशी सेवावंचक ज्याची युक्ती ॥ तोही निश्चितीं त्यागावा ॥ १६ ॥ नीचसेवा न करी आपण ॥ ह्मणे 0मागाल तें देईन धन ॥ ऐसा धनगर्वी शिष्य

१ सेवा न करणारा. २ नम्र नमस्कारी. ३ झोंपेंत बोलून. ४ अशुद्धी. ५ तत्काल. ६ फसविणें. ७ स्वतःच्या मोठेपणाच्या भीतीनें. ८ धनदाता. ९ नित्य सेवा.

*मो. तुच्छला. ×मो. दांभिक. +ना. उपहासस्थिती. ꣹ना. मो. वोसणतां. ०मो. नैश्वरवादाचें. *ना. कोरडें. 1मो. मिथ्यावाचें लावुनी. 2मो. ठकूनि युक्ती. 3मो. सद्गुरूसी. 4मो. जाणावा. 5मो. मी आपण. 6मो. पूर्ण. 7मो. भरून. 8मो. लोकलाजेभेण. 9मो. त्यजावा. 0मो. गुरु मागेल तें.

आपण ॥ *सर्वथा जाण न करावा ॥ १७ ॥ धरूनि धनाची आस ॥ गुरु शिष्यासि दे उपदेश ॥ तें ब्रह्मज्ञान ×पडलें वोस॥ +वाढला सोस धनलोभ ॥ १८ ॥ अथवा वेंचूनियां धन ॥ जो घेईन ह्मणे ब्रह्मज्ञान ॥ ऐसा धनाभिमानी शिष्य जाण ॥ सर्वथा ※आपण न करावा ॥ १९ ॥ ०यथाकाळें जाहलीया प्राप्त ॥ *गुरुसेवा जो कालोचित ॥ न करी तो अशुश्रूषु ह्मणत ॥ तोही निश्चित त्यागावा ॥ ५२० ॥ करितां सद्गुरूची भक्ती ॥ मी उद्धरेन निश्चितीं ॥ ऐसा भाव नाहीं ज्याचे चित्तीं ॥ तो शिष्य हातीं न धरावा ॥२१॥ सद्गुरू तोचि ब्रह्ममूर्ती ॥ ऐसा भाव नाहीं निश्चितीं ॥ मुळींच विकल्पाची [1]स्थिती ॥ तोही शिष्य हातीं न धरावा ॥ २२ ॥ गुरूहोनि ब्रह्म भिन्न ॥ ऐसें ज्याचें निश्चित ज्ञान ॥ तो निश्चयेंसि अभक्त जाण ॥ तो शिष्य आपण न करावा ॥२३॥ मनुष्य मानूनि सद्गुरूशीं ॥ जो उल्लंघी गुरुवचनासी ॥ तो जाण पडला [2]अपभ्रंशीं ॥ त्या शिष्यासी त्यागावें ॥ २४ ॥ सद्गुरूहोनि अधिकता ॥ शिष्य आपुली मानी पवित्रता ॥ तो अभक्तांमाजीं पूर्ण सरता ॥ त्यासि तत्त्वतां त्यागावें ॥ २५ ॥ गुरूच्या ठायीं ब्रह्मस्थिती॥ [7]ज्यासि श्रद्धा संपूर्ण नाहीं निश्चितीं ॥ त्याचि नांव गा अभक्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ २६ ॥ ये ग्रंथींचें ब्रह्मज्ञान ॥ ज्यासि निश्चयें नमने जाण ॥ त्यासि केव्हांही आपण ॥ ह्मणें विसरोनि शिष्य करिसी ॥ २७ ॥ ये [4]ग्रंथींची ब्रह्मस्थिती ॥ वक्ता जो मी परब्रह्ममूर्ती ॥ त्या माझ्या ठायीं नाहीं ज्याची भक्ती ॥ तो शिष्य निश्चितीं त्यागावा ॥ २८ ॥ ये ग्रंथींचें आवडे ज्ञान ॥ [8]गुरूच्याठायीं श्रद्धा संपूर्ण ॥ परी ज्याचें उद्धत वर्तन ॥ तो शिष्य जाण त्यागावा ॥ २९ ॥ माझ्या निजमूर्ति संतसज्जन ॥ माझे भक्त माझे जीवप्राण ॥ त्याचें जो करी हेळण ॥ दुर्विनीतपण या नांव ॥५३०॥ माझ्या भक्तांमाजीं रंक जाण॥त्याचे [5]सर्वस्वें वंदावे चरण॥हें ज्यासि नावडे संपूर्ण॥दुर्विनीपण या नांव ॥ ३१ ॥ [0]साधुसज्जनां भेटीं जाये ॥शठनम्रता वंदी पाये ॥ त्याचे गिवसोनि दोषगुण पाहे ॥ दुर्विनीतता राहे तेठायीं ॥ ३२ ॥ दुष्टदुर्बुद्धि जे विनीतता ॥ ती नांव बोलिजे दुर्विनीतता ॥ ऐशी ज्या शिष्याची अवस्था ॥ तो जाण तत्त्वतां त्यागावा ॥ ३३ ॥ ऐसें हें ऐकोनि निरूपण ॥ ह्मणसी मी शिष्य न करीं जाण ॥ [9]जो शुद्ध उपदेशी ब्रह्मज्ञान ॥ तो आत्मा जाण पैं माझा ॥ ३४ ॥ जो उपदेशीं सत्पात्र पूर्ण ॥ त्या सच्छिष्याचें लक्षण ॥ तुज मी सांगेन निरूपण ॥ ऐक सावधान उद्धवा ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ एतैर्दोषैर्विहीनाय ब्रह्मण्याय प्रियाय च ॥ साधवे शुचये ब्रूयाद्भक्तिः स्याच्छूद्रयोषिताम् ॥ ३१ ॥

॥ टीका ॥ उपदेशीं मुख्य अधिकारण ॥ धडधडीत वैराग्य पूर्ण ॥ तेंही पिशाचवैराग्य नव्हे

---

१ हाव. २ नाश; भ्रम. ३ श्रेष्ठ. ४ कदाचित् करशील; तर करूं नकोस हो. ५ दांडगे. ६ अपमान, निंदा. ७ नम्रपणा.

*ना. समर्थ जाण. ×ना. पडे. +मो. वाढला सोस धनलोभाचा. ※मो. जाण त्यजावा. ०मो. अथवा काळ जालिया प्राप्ती. *मो. गुरुसेवा जे कां वंचिती ॥ त्यातें अशुश्रूषु ह्मणती. [1]मो. वस्ती. [7]मो. असतां पूर्ण ज्या श्रद्धा नाहीं चित्तीं. [4]मो. ग्रंथीं. [8]मो. माझ्याठायीं भक्ती पूर्ण. [5]मो. सर्वभावें. [0]मो. साधूसज्जनाचे भेटी जाय ॥ त्यांचे अतिनम्रता वंदो पाय ॥ आणि गुणदोष गिवसूनि पाहे ॥ [9]मो. तरी जो सच्छिष्यासी उपदेशी.

जाण ॥ विवेकसंपन्न शास्त्रोक्त ॥३६॥ दिवसाचारीं वैराग्य केलें ॥ सवेंचि *विषयार्थी लागले ॥ तेथ जेंजें उपदेशिलें ॥ तें सर्पासि पाजिलें दुग्ध जैसें ॥३७॥ जेथ वैराग्य निघोनि जाये ॥ तेथ ज्ञानाभिमान उरला राहे ॥ तेणें अभिमानें ×करी काये ॥ गुणदोष पाहे +श्रेष्ठांचे ॥३८॥ नीच निंदी हेळसून ॥ श्रेष्ठांचे पाहे दोषगुण ॥ जेथ वैराग्य होय क्षीण ॥ तेथें ज्ञानाभिमान चढे ऐसा ॥ ३९ ॥ उद्धवा जगीं दोनी अवस्था ॥ वैराग्य कां विषयासक्तता ॥ तिसरे अवस्थेची कथा ॥ जाण सर्वथा असेना ॥ ५४० ॥ जेथ विवेकें विषयो होय क्षीण ॥ तेथ वैराग्य प्रबळे परिपूर्ण ॥ ※जेथ विवेकेंसी वैराग्य क्षीण ॥ तेथ विषयाचरण ज्ञानाभिमानें ॥४१॥ यालागीं जंव होय ब्रह्मज्ञान ॥ तंव जो वैराग्य राखे पूर्ण ॥ वैराग्यें गुरूशी अनन्यशरण ॥ तें अधिकारत्न उपदेशा ॥ ४२ ॥ गतश्लोकींचें दोषनिरूपण ॥ आतां बोलिलों वैराग्यार्थ जाण ॥ इहीं दोषीं ज्यासि रहितपण ॥ तो अधिकारी पूर्ण ०सच्छिष्य ॥ ४३ ॥ ज्यासि *ब्रह्मत्वें ब्राह्मणभक्ती ॥ अनन्यभावें भजे मूर्ती ॥ 1त्याची आंदणी भक्तिविरक्ती ॥ तो जाण निश्चितीं अधिकारी ॥४४॥ गुरूचा पढियंताही पूर्ण ॥ 2त्यापाशीं असल्याही अभक्तपण ॥ =त्यासि नव्हे ब्रह्मज्ञान ॥ अनन्य भजन जंव नकरी ॥ ४५ ॥ प्रिय आणि भजनशीळ ॥ दोषरहित निर्मळ ॥ 3त्यासि विरक्ति अढळ ॥ त्यासी उपदेशावें हें प्रांजळ गुह्यज्ञान ॥४६॥ स्वदारा आणि स्वधन॥ यांचा लोभ ज्यासि संपूर्ण ॥ त्यासि स्वर्ग ना मुक्तपण ॥ जन्ममरण अनिवार ॥४७॥ परदारा परधन ॥ सर्वथा नातळे ज्याचें मन ॥ ऐसें ज्यापाशीं पवित्रपण ॥ त्यासि हें ज्ञान उपदेशावें ॥ ४८ ॥ जो वैराग्याचा वोतिला ॥ विवेकें पूर्ण वोसंडला ॥ सद्गुरुसेवेसी जिणें विकिला ॥ चरणीं विनटला अनन्यत्वें ॥४९॥ सांडूनि निजमहिमान ॥ श्रीगुरुसेवेलागीं आपण ॥ ज्यासि आवडे रंकपण ॥ ऐसा सेवेसि पूर्ण सद्भाव ॥ ५५० ॥ अमरश्रेष्ठ जे सुरवर ॥ ते मानी सद्गुरूचे किंकर ॥ सद्गुरुहूनियां थोर ॥ हरिहर मानीना ॥५१॥ ज्यासि नाहीं गर्वमद ॥ ज्यासि नाहीं कामक्रोध ॥ ज्यासि 4नावडे 5विकल्पभेद ॥ तो शिष्य शुद्ध 6परमार्थी ॥ ५२ ॥ काया वाचा मन धन ॥ सांडूनि 7समर्थता महिमान ॥ जो सद्गुरूशी अनन्यशरण ॥ तो सच्छिष्य जाण 8साधुत्वें ॥ ५३ ॥ सांडूनि लज्जा लौकिक ॥ जो ब्रह्मज्ञानाचा याचक ॥ सद्गुरुवचनार्थी चातक ॥ तो अवश्यक 9उपदेशी ॥ ५४ ॥ जे कां द्विजन्मांहोनि बाहेरी ॥ वेदें वाळूनि सांडिले दुरीं ॥ जे कां मंत्रार्थी अमंत्री ॥ जे अनधिकारी श्रवणासी ॥ ५५ ॥ ज्यासी नाहीं आश्रमधर्म ॥ ज्यासि नाहीं श्रौत कर्म ॥ ज्यासि नाहीं जपहोम ॥ 0जो वर्णाधम अतिनीच ॥५६॥ ऐसे जे कां शूद्रजन ॥ ऐकोनि ग्रंथींचें ज्ञान ॥ निवाराया जन्ममरण ॥ उपजे दारुण विरक्ती ॥ ५७ ॥ उबगतांच एकसरें चित्तें ॥ मनींहूनि विटे विषयांतें ॥ मग चित्तें वित्तें जीवितें ॥ रिघे सद्गुरूतें अनन्यशरण ॥ ५८ ॥ गुरूसि पुसोनेणे प्रश्न ॥ ह्मणे निवारीं जन्ममरण ॥ भावार्थें

---

१ केलेला, मूर्ति. २ शरण आला. ३ चाकर. ४ लौकिक. ५ ब्राह्मणादि तीन वर्णांबाहेर ६ वगळून. ७ एकदम सर्व चित्तानें.

*ना. विषयस्वार्थी. ×ना. केलें काय. +मो. सज्जनांचे. ※मो. जेथें वैराग्यें विवेक हीन. ०मो. उपदेशा. *मो. ब्रह्मभावें. 1मो. त्यासी आंदणी माझी भक्ती. 2मो. जरी त्यापाशीं. =मो. तरी त्यासी. 3ना. विरक्त करूनि अढळ. 4मो. नाहीं. 5ना विकळ भेद. 6मो. परमार्थी. 7मो. सामर्थ्यें. 8मो. साध्यत्वें. 9मो. उपदेशावा. 0मो. जे वर्णांत अधम.

घाली लोटांगण ॥ शुद्ध *श्रद्धा संपूर्ण परमार्थीं ॥५९॥ते होत कां शूद्रजन॥ त्यांसि उपदेशितां गुह्यज्ञान ॥ उद्धवा कदा न लागे दूषण ॥ हें सत्यवचन पैं माझें ॥ ५६० ॥ जे कां अपेक्षोनियां वित्त ॥ चतुर्वर्णां उपदेश देत ॥ ते धनलोभीं लोलुप्त ॥ नाहीं वेइजेत ×गुरुत्वें ॥६१ ॥ जेथ गुरुशींच सलोभता ॥ तेथ शिष्याची बुडे विरक्तता ॥ ऐशियेठायीं उपदेश घेतां ॥ परमार्थतां अपघात ॥ ६२ ॥ निर्लोभत्वें +कृपेनें पूर्ण ॥ सद्गुरु उपदेशी शूद्रजन ॥ ऐसेनि करी जो दीनोद्धरण ॥ तेथ नलगे दूषण उपदेशा ॥६३॥जेणें =वडकडूनि जाण ॥वैराग्यासि ये मरण ॥ ०जेणें ज्ञात्यासि लागे दूषण ॥ तो स्त्रीसंग आपण न करावा ॥ ६४ ॥ स्त्री देखतांचि अव-चितीं ॥ तत्काळ पाडी अधःपातीं ॥ तिची जाहलिया संगती ॥ कैंची घड गती सज्ञाना ॥६५॥ प्रमादीं पाडी सर्वार्थीं ॥ हे प्रमदानामाची ख्याती ॥ तिची जाहालिया संगती ॥ केवीं परमार्थी तरतील ॥ ६६ ॥ जिचें देखतांचि वदन ॥ काम मोकली कटाक्षबाण ॥ तेथ कायसा उपदेश जाण ॥ आली नागवण परमार्था ॥६७॥ उद्धवा तुज मी हेंचि ✻सांगतों जाण॥ नको स्त्रियांसी संभाषण ॥ नको स्त्रियांचें अवलोकन ॥ नको स्त्रीवचन कानीं घेऊं ॥ ६८ ॥ नको नको स्त्रियांसी मात ॥ नको नको स्त्रियांसी एकांत ॥ नको नको 1स्त्रियांशी संगत ॥ निंद्य लो-कांत सर्वार्थीं ॥ ६९॥ नको नको 2स्त्रियांचा अनुवाद ॥ नको नको स्त्रियांचा Vसंवाद ॥ नको नको स्त्रियांसि करूं बोध ॥ मिथ्यापवाद अंगीं वाजे ॥ ५७० ॥ स्वभावें सात्विक वनिता ॥ गोष्टि सांगों आली परमार्था ॥ तोचि विकल्प तत्त्वतां ॥ सुहृदां समस्तां परिकैलवे ॥ ७१ ॥ यालागीं प्रमदा जन ॥ सर्वथा 3त्यागावा आपण ॥ प्रमदासंगतीं ब्रह्मज्ञान ॥ सर्वथा जाण वाढेना ॥ ७२ ॥ आशंका ॥ 4उपदेशीं त्याज्य स्त्रिया जरी ॥ तरी मागीलीं थोरथोरीं ॥ उप-देशिल्या कैशापरी ॥ तें ऐक निर्धारीं सांगेन ॥ ७३ ॥ श्रेष्ठ याज्ञवल्क्य पाही ॥ तेणें उपनिष-दांच्या ठायीं ॥ उपदेशिली मैत्रेयी ॥ नानायुक्तीं पाहीं 5प्रबोधी ॥ ७४ ॥ स्वयें नारद महामुनी ॥ प्रल्हादाची निजजननी ॥ इंद्रापासूनि सोडवूनी ॥ 6ब्रह्मज्ञानीं उपदेशी ॥७५॥ अवतरोनि 7क-पिलमुनी ॥ बैसोनियां सिद्धासनीं ॥ देवहूतीलागोनी ॥ 8ब्रह्मज्ञानीं प्रबोधी ॥ ७६ ॥ जो यो-गियांचा मुकुटमणी ॥ कैलास राजा शूळपाणी ॥ 9भैव उपदेशी भवानी ॥ ब्रह्मज्ञानीं निज-बोधें ॥ ७७ ॥ इतरांची गोठी कायशी ॥ तुवांचि गा हृषीकेशी ॥ उपदेशिलें यज्ञपत्न्यांसी ॥ ऐसें ह्मणसी उद्धवा ॥ ७८ ॥ 0असो देखोनियां सद्भावा ॥ उपदेश करूं ह्मणशी कणवे ॥ तरी तो अधिकार *वोळखावा ॥ ऐक उद्धवा सांगेन ॥ ७९ ॥ तरी ते ऐक उद्धवा निश्चित ॥ वा-चाळ स्त्री ते अनुचित॥ तेथें उपदेश करणें तें व्यर्थ॥ लागे अपघात गुरुत्वा ॥५८०॥ जेथें स्त्रीस

---

१ रच्छून. २ परमार्थाची हानि करणारा. ३ अनवधानीं चुका. ४स्त्रीच्या प्रमदा या नांवाची. ५टाकी, फेकी. ६ स्त्री. ७ भय, कंप. ८ याज्ञवल्क्य स्त्री. ९ आई कयाधू. १० कपिलमाता. ११ शंकर. १२ पार्वती. १३ कृपेनें, दयेनें.

*मो. श्रेद्धा संपूर्ण सद्भावें. ×मो. गुरुत्वा. +मो. दयेनें. =मो. कडूनि जाण. ०मो. जेणें लागे. ✻मो. मागतों. 1मो. स्त्रियांचा. 2मो. स्त्रियांशीं. Vना. परवादु मो. अनुमोद. 3ना. त्यागावे. 4मो. न उपदेशाव्या स्त्रिया जरी. 5मो. प्रबोधूनि. 6मो. ब्रह्मज्ञान उपदेशिलें. 7मो. कपिल महामुनी. 8मो. ब्रह्मज्ञान प्रबोधिलें. 9मो. तेणें उपदेशिली. 0मो. ऐसा देखोनि. *मो. पहावा.

अति बडबड ॥ ब्रह्मज्ञानें गर्जे तोंड ॥ जेथें विषयाचा धुमाड ॥ परमार्थ गोड परपुरुषीं ॥८१॥ जे स्त्री ब्रह्मज्ञानी धीट ॥ मुखीं अत्यंत वटवट ॥ तिसी उपदेश करूं नये स्पष्ट ॥ अपवादाचें बोट जेणें लागे ॥८२॥ तेथें म्यांहि केली विनंती ॥ श्रीजनार्दन स्वामी प्रती ॥ स्त्रिया शूद्र उपदेशार्थ येती ॥ काय निश्चितीं सांगावें ॥ ८३ ॥ गुरु वेगळा मार्ग नाहीं ॥ ह्मणोनी येती लवलाही ॥ त्यांसि उपदेशावें काइ ॥ हें माझ्या हृदयीं स्मरेना ॥८४॥ हें ऐकोनिया वचन ॥ संतोषले श्रीजनार्दन ॥ जेणें होय चित्ताचें शोधन ॥ तें नाम जाण उपदेशी ॥८५ ॥ चित्तशुद्धि जालिया जाण ॥ वोरसोनि येतें आपण ॥ अनन्य भावें मग शरण ॥ आल्या ज्ञान उपदेशी ॥८६॥ स्त्रीपुरुष अवलोकन ॥ जयाचे *दृष्टीं समसमान ॥ ऐसेंनि अनुभवें जो परिपूर्ण ॥ तोचि स्त्रियांसी जाण उपदेशी ॥ ८७ ॥ तोही अधिकार न पाहतां ॥ उपदेश न करी सर्वथा ॥ त्याही उपदेशाची कथा ॥ ऐक तत्वतां सांगेन ॥ ८८ ॥ ×म्यां ज्या कां निंदिल्या वनिता ॥ त्यांमाजीं सभाग्य सात्विकता ॥ सांडूनियां विषयावस्था ॥ जे परमार्था उद्यत ॥८९॥ त्यजूनियां प्रपंचाची हांव ॥ नावडे विषयाचें नांव ॥ वैराग्यें उठला सद्भाव ॥ घेऊनि धांव परमार्थीं ॥५९०॥ जन्ममरणनिवारणी ॥ जेवीं मनासी नित्य कांचणी ॥माझे भवपाशच्छेदनीं ॥ धर्मदाता कोणी मिळता कां ॥९१॥ सद्गुरुप्राप्तीची अतिआर्त ॥ काया वाचा वित्त जीवित ॥ कुरवंडी करूनि सांडित ॥ +परमार्थातें सद्भावें ॥ ९२॥ अतिथि आणि पतिपुत्रांसी ॥ भोजनीं समता नित्य जिसीं ॥ धनलोभ नाहीं मानसीं ॥ परमार्थासी अधिकारी ॥ ९३ ॥ यापरी निजपरमार्था ॥ सद्भावें जे विनटे वनिता ॥ उद्धवा तिसी हें उपदेशितां ॥ दोष सर्वथा लागेना ॥ ९४ ॥ क्षत्रिय वैश्य शूद्रजन ॥ यांची श्रद्धा दृढ पाहून ॥ उपदेशितां ब्रह्मज्ञान ॥ दोषनिर्दळण ※शिष्याचें ॥ ९५ ॥ उपदेशितां ब्रह्मज्ञान ॥ जें गुरूसीच लागे दूषण ॥ तें शिष्यासि उद्धरी कोण ॥ हें व्याख्यान अबद्ध ॥ ९६ ॥ पहावया पात्रशुद्धता ॥ मी बोलिलों दोषवार्ता ॥ वांचूनि ब्रह्मज्ञान उपदेशितां ॥ दोष सर्वथा असेना ॥ ९७ ॥ हें ज्ञान जाणीतल्यापाठीं ॥ जाणणेंचि सरे सृष्टीं ॥ संसारासि पडे तुटी ॥ तेथ दोषाची गोठी असेना ॥ ९८ ॥

॥ श्लोक ॥ नैतद्विज्ञाय जिज्ञासोर्ज्ञातव्यमवशिष्यते॥ पीत्वा पीयूषममृतं पातव्यं नावशिष्यते ॥ ३२ ॥

॥टीका ॥ ये ग्रंथींचें जाणीतल्या ज्ञान ॥ मुमुक्षु जे ०साधकजन ॥ त्यांसी जाणावया आन ॥ जाणतेपण 6उरेना ॥ ९९ ॥ जेवीं केलिया अमृतपान ॥ पुढें प्राशनासि नुरे आन ॥ तेवीं जाणीतल्या हें ज्ञान ॥ज्ञाते ज्ञातव्यपण समूळ 8नुरे ॥६००॥आशंका ॥ धर्मार्थकाममोक्षांप्रती॥ साधनें असती नेणों किती ॥ तुवां हें एकचि श्रीपती ॥ कैशा9रीतीं प्रतिपादिलें ॥१॥ उद्धवा साधनें 7आनान ॥ तें अभक्त सोशिती आपण ॥ माझ्या भक्तांसि गा जाण ॥ मीच साधन सर्वार्थीं ॥ २ ॥

---

१ उत्कंठित. २ धाक.

*मो. दृष्टीसी. ×मो. स्त्रीपुरुष अवलोकनता, म्यां ज्या उपदेशिल्या वनिता, त्यांमाजीं सात्विकता, सांडूनि विषयावस्था उदित ॥८२॥ +मो. परमार्थीं उद्यत सद्भावें. ※मो. स्त्रियांचे. ०मो. साधूजन. 6मो. असेना. 8ना. नुरवी. 9मो. री. 7मो. आने आन.

॥ श्लोक ॥ ज्ञाने कर्मणि योगे च वार्तायां दंडधारणे ॥ यावानर्थो नृणां तात तावांतेऽहं चतुर्विधः ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ मोक्षालागीं ज्ञान साधन ॥ धर्मालागीं स्वकर्माचरण ॥ स्वामीलागीं दंडधारण ॥ *अर्थोद्यम जाण जीविकावृत्ती ॥३॥ इहामुत्र कामभोग ॥ तदर्थ करिती योग याग ॥ चहूं पुरुषार्थी हा चांग ॥ साधनप्रयोग अभक्तां ॥ ४ ॥ ऐसें सोशितां साधन ॥ सहसा सिद्धि न पवे जाण ॥ अनेक +विकळता दूषण ॥ मांजीं छळी विघ्न देवांचें ॥ ५ ॥ तैसें ×मद्भक्तांसि नव्हे जाण ॥ माझें करितां अनन्यभजन ॥ चारी पुरुषार्थ येती शरण ॥ पायां सुरगण लागती ॥ ६ ॥ उद्धवा जे मज अनन्यशरण ॥ त्यांचा धर्म अर्थ ※मी आपण ॥ त्यांचा काम तोही मीचि जाण ॥ मोक्षही संपूर्ण मी त्यांचा ॥ ७ ॥ अभक्तां भोगक्षयें पुनरावृत्ती ॥ भक्तांसि भोग भोगितां नित्यमुक्ती ॥ एवढी माझ्या भक्तीची ०ख्याती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ८ ॥ ऐशी 7ऐकतां देवाची मात ॥ उद्धव प्रेमें वोसंडला अद्भुत ॥ तेणें प्रेमें लोधला कृष्णनाथ ॥ हर्षें बोलत तेणेंसी ॥ ९ ॥ उद्धवा तुझे चारी पुरुषार्थ ॥ तो मी प्रत्यक्ष भगवंत ॥ ऐसें बोलोनि 8हर्षयुक्त ॥ 6हृदया आंत आलिंगी॥१०॥ ※ऐसें बोलोनि प्रेमयुक्त॥हृदयेंसी उद्धव आलिंगित ॥ परमानंदें आनंदभरित ॥ वेळाइत भक्तांचा ॥ ११ ॥ हर्षें देतां आलिंगन ॥ कृष्ण विसरला कृष्णपण ॥ उद्धव स्वानंदीं निमग्न ॥ उद्धवपण विसरला ॥१२ ॥ कैसें अभिनव आलिंगन ॥ दोघांचें गेलें दोनीपण ॥ पूर्ण चैतन्य स्वानंदघन ॥परिपूर्ण स्वयें झाले ॥१३॥ तेथ 1विरोनि गेला हेतू ॥ Zवेदेंसहित बुडाली मातू॥ Xएकवटला देवभक्तू ॥ IIएक एकांतू एकत्वें ॥१४॥ तेथ मावळले धर्माधर्म ॥क्रियेसहित Yबुडालें कर्म ॥ Aश्रम आणि निश्रम॥ या दोहींचें नाम असेना ॥ १५ ॥ Qभेद वेऊनि गेला अभेदा ॥ बोध घेऊनि गेला निजबोधा ॥ आनंद लाजिला आनंदा ॥ ऐशिया निजपदा उद्धव पावे ॥१६॥ ' मी जाहलों परब्रह्म ॥ हाही मुख्यत्वें Pतेथें भ्रम॥कृष्णालिंगनाचा हा धर्म॥जाहला निरुपम निजवस्तू॥१७॥ Kयापरी Hकृष्ण सर्वज्ञ ॥ सोडोनियां आलिंगन ॥ Oऐक्यबोधें उद्धवासि जाण ॥ Uनिजभक्तपण प्रबोधी ॥ १८ ॥ तेव्हां उद्धव चमत्कारला ॥ अतिशयें टकाचा Cजाला ॥ परमविस्मयें दाटला॥ तटस्थ ठेला ते काळीं ॥ १९ ॥ मग ह्मणे हे निजात्मता ॥ स्वतःसिद्ध जवळीं असतां ॥ जनासि

१ द्रव्य मिळविण्याचा उद्योग. २ मध्येंच. ३ पुण्य व पाप यांच्या फलांचा उपभोगानें क्षय झाल्यानें. ४ पुनः जन्म व मरण. ५ वैनारी. ६ अपूर्व ७ सेव्यसेवकभाव. ८ आश्चर्यचकित.

*मो. अर्थोद्यमें. +मो. विकल्पता. ×मो. मद्भावें. ※मो. मीचि पूर्ण. ०मो. निजख्याति 7मो. आयकोनि. 8मो. प्रेमयुक्त. 6मो. हृदयीं उद्धव आलिंगिला. 1मो. विसरोनी हेतु. Zमो. वेदेंसहित. Xमो. एकवटले. IIमो. एकमेकांत. Yमो. उडालें. Aमो. श्रम आणि विश्राम. Qमो. अभेद घेऊनि गेला भेदा, बोध घेउनि गेला अबोधा. Pमो. जो. Kमो. याहीवरी तो कृपाळु सर्वज्ञ. Hना. कृपाळु. Oना. ऐक्यबोध. Uमो. भक्तपणें. Cना. ठेला.

※ ११ही ओंवी पंढरपूर येथील हस्तलिखित पोथींत आहे, परंतु पैठण येथील हस्तलिखित पोथींत नाहीं.

नकळे सर्वथा ॥ साधकांच्या हाता चढे केवीं ॥ ६२० ॥ तें उद्धवाचें मनोगत ॥ जाणोनियां श्रीकृष्णनाथ ॥ तदर्थींचा सुनिश्चित ॥ असे सांगत उपावो ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ मर्त्यो यदा त्यक्तसमस्तकर्मा निवेदितात्मा विचिकीर्षितो मे ॥ तदामृतत्वं प्रतिपद्यमानो मयात्मभूयाय च कल्पते वै ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ जें बोलिलीं धर्मार्थकाममोक्षार्थ ॥ तें साधनें सांडूनि समस्त ॥ जे अनन्यभावें मज भजत ॥ विश्वासयुक्त *निजभावें ॥ २२ ॥ त्यांसि हे स्वरूपस्थिती ॥ जे त्वां भोगिली आत्मप्रतीती ॥ ते तत्काळ होय प्राप्ती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ २३ ॥ धर्मार्थकामवासना॥ असोनि +लागल्या मद्भजना ॥ तरी तेही पुरवूनियां जाणा ॥ सायुज्यसदना मी आणीं॥२४॥ भक्तांसि स्वधर्म कर्मावस्था ॥ तिहीं लाविल्या भजनपंथा ॥ ×स्वधर्मकर्मीं अकर्मात्मता ॥माझिया ०निजभक्तां उद्धरीं मी ॥ २५ ॥ भक्त वांछी भोगकाम ॥ भोग भोगोनि होय निष्काम॥ ऐशिया निजबोधाचें वर्म ॥ मी आत्माराम उद्धरीं ॥ २६ ॥ भक्त मागे अर्थसंपन्नता ॥ त्याचे ꙮगांठीं धन नसतां ॥ माझी षड्गुणैश्वर्य समर्थता ॥ *बोळगे तत्त्वतां त्यापाशीं ॥ २७ ॥ सर्वभूतीं माझी भक्ती ॥ भक्त भजे अनन्यप्रीतीं ॥ तें चारी मुक्ती शरण येती ॥ मद्भक्ता मुक्ती स्वतःसिद्ध ॥ २८ ॥ वैद्य धडफुडा पंचानन ॥ नानारोगियांची वासना [2]पोखून ॥ मागें तें तें देऊनि अन्न ॥ वांचवी [1]रसज्ञ रसप्रयोगें ॥ २९ ॥ तेवीं धर्मअर्थकामवासना ॥ भक्तांच्या पोखूनियां जाणा ॥मी आणीं सायुज्यसदना ॥ ते विवंचना [4]सांगितली॥६३०॥नाना साधनाभिमान॥[7]सांडूनियां जो ये मज शरण ॥ ०त्यासिही स्वरूपप्राप्ति पूर्ण ॥ उद्धवा जाण सुनिश्चित ॥३१॥भक्त सकाम जरी चिंती ॥तो [3]जें करी अनन्यभक्ती ॥ [N]तें काम पुरवूनि मी दे मुक्ती ॥ भक्तां अधोगती कदा नघडे ॥ ३२ ॥ बाळकें थाशा घेऊनि पाहीं ॥ मिठी घातल्या मातेच्या पायीं ॥ धन वेंचोनि अर्भी तेंही ॥ परी जीवें कांहीं मारीना ॥ ३३ ॥ तेवीं माझी करितां अनन्यभक्ती ॥ जो जो काम भक्त वांछिती ॥ तो तो पुरवूनि मी दें मुक्ती ॥ परी अधोगतीं [E]जावों नेदीं ॥ ३४ ॥ देखोनि बाळकाची व्यथा ॥ जेवीं सर्वस्वें कळवळी माता ॥ तेवीं निजभक्तांची अवस्था ॥ मजही सर्वथा सहावेना ॥ ३५ ॥ काम पुरवूनि यावया मुक्ती ॥ काय माझे गांठीं नाहीं शक्ती ॥ मी भक्तकैवारी श्रीपती ॥ त्यासि अधोगती कदा नवडे ॥ ३६ ॥ माझें नाम [B]अवचटें आल्या अंतीं ॥रंक लाहे सायुज्यमुक्ती॥मा माझी करितां अनन्यभक्ती॥ भक्तां अवगती मग कैंची ॥ ३७ ॥ माझा भक्त जयाकडे कृपेनें पाहे ॥ तोही माझी [M]भक्ति लाहे ॥ मा मद्भक्तां अवगति होये ॥ हा बोल नसोहे मजलागीं ॥ ३८ ॥ सोसूनियां गर्भवासासी ॥ म्यां मुक्त केला अंबरीषि ॥ विदारूनि हिरण्यकशिपूसी ॥ म्यां प्रल्हादासी रक्षिलें ॥३९॥ चक्र घेऊनियां हातीं ॥ म्यां गर्भीं रक्षिला परीक्षिती ॥ तो मी भक्तांसि अवगती ॥ कदा क-

१ उत्तम बोध करितों. २ विवेचन. ३ हट्ट. ४ वाईट गति.

*मो. निजबोधें. +मो. लागले. ०मो. त्यासिही. ×ना. स्वकर्म धर्मीं. मो. स्वधर्मकर्में. ०मो. भक्तां. ꙮमो. ठायीं. *मी. ये. [2]मो. पुरऊन. [1]मो. सज्ञान. [4]मो. अवधारा. [7]मो. सांडूनि मज येती. ०ना. त्याचीही. [3]मो. जे. [N]मो. तो. [E]मो. होऊंनेदीं. ना. जावोंनेदीं. [B]मो. वाचे अवचट. [M]मो. प्राप्ति तत्काळ लाहे.

ल्पांतीं होंनेदीं ॥६४०॥ माझिये भक्ताचेनि नांवें ॥ तृण तेंही म्यां *उद्धरावें ॥मा भक्तां केवीं अव्र-गति पावे ॥ जे जीवें भावें मज भजले ॥४१॥काया वाचा मन धन ॥ अवंचूनि अनन्यशरण ॥ त्यांचा +भोग मोक्षही जाण ॥ मी श्रीकृष्ण स्वयें सोशीं ॥ ४२ ॥ असा ※अनन्यभक्तीचा महिमा ॥ सांगतां ०उत्साह पुरुषोत्तमा ॥ तेणें उद्धवासि लोटला प्रेमा ॥ स्वेदें रोमा स्वरॅवित ॥ ४३ ॥ ऐकोनि ×भक्तीचें महिमान ॥ देखोनि उद्धवाचें प्रेम पूर्ण ॥ श्रीशुक सुखावला आप-ण ॥ स्वानंदें पूर्ण डोलत ॥ ४४ ॥ हारिखें ह्मणे परीक्षिती ॥ धन्य धन्य 5भाक्ति त्रिजगतीं ॥ ज्यासि 1सर्वार्थी मुक्ती ॥ स्वमुखें श्रीपती बोलिला ॥ ४५ ॥ जैसें भक्तीचें महिमान ॥ तैसेंचि उद्धवाचें प्रेम गहन ॥ हें 7उद्धवाचें प्रेमलक्षण ॥ श्रीशुक आपण सांगत ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुकउवाच ॥ स एवमादर्शितयोगमार्गस्तदोत्तमश्लोकवचो निशम्य ॥ बद्धांजलिः प्रत्युपरुद्धकंठो न किंचिदूचेऽश्रुपरिप्लुताक्षः ॥ ३५ ॥ विष्टभ्य चित्तं प्रणयावघूर्णं धैर्येण राजन् बहुमन्यमानः ॥ कृतांजलिः प्राह यदुप्रवीरं शीर्ष्णा स्पृशंस्तच्चरणारविंदम् ॥ ३६ ॥

॥ टीका ॥ जो ज्ञानियांचा ज्ञाननिधी ॥जो निजबोधाचा उदधी ॥ जोAआनंदाचा क्षीराब्धी॥ तो शुक स्वानंदीं तोपला बोले ॥ ४७ ॥ ऐके बापा परीक्षिती ॥ श्रवण सौभाग्यैचक्रवर्ती ॥ ज्यातें सुर नर असुर Sवानिती ॥ ज्याची कीजे स्तुती Pमहासिद्धी ॥ ४८ ॥ ज्यातें Zवेद नित्य गाती ॥ योगिवृंदीं वानिजे कीर्ती ॥तेणें श्रीकृष्णें स्तविली भक्ती ॥ Dपरम प्रीतीं अचुं-बित ॥ ४९ ॥ अनन्यभक्तीपरतें सुख ॥ आन नाहींच विशेख ॥ सर्व सारांचें सार देख ॥ म-द्भक्ती चोख सुरवरादिकां ॥ ६५० ॥ भक्तियोगाचा योगमार्ग ॥ Tसमूळ सप्रेम शुद्ध सांग ॥ Fस्वमुखें बोलिलां श्रीरंग ॥ तें उद्धवें Xचांग अवधारिलें ॥ ५१ ॥ ऐकतां भक्तीचें निरूपण ॥ उद्धवाचें द्रवलें मन ॥ नयनीं अश्रु Nआले पूर्ण ॥ स्वानंदजीवन लोटलें ॥ ५२ ॥ शरीर जाहलें रोमांचित ॥ चित्त जाहलें हर्षयुक्त ॥तेणें कंठीं बाष्प दाटत ॥ Oस्वेदकण येत सर्वांगीं ॥५३॥ प्राण पांगुळला जेथिंचा तेथ ॥ शरीर मंदमंद कांपत ॥ नयन पुंजाळले निश्चित ॥ अर्धोन्मी-लित ते जाहले ॥ ५४ ॥ Bऔत्सुक्याचे अतिप्रीतीं ॥ स्वानंदीं समरसे चित्तवृत्ती ॥ उद्धवदे-हाची विरतां स्थिती ॥ प्रारब्धें निश्चितीं तें राखिलें ॥५५॥ जळीं नाव उलथतां जाण ॥ जेवीं दोर राखे Mआवरून ॥ तेवीं मावळतां उद्धवपण ॥ प्रारब्धें जाण राखिलें ॥ ५६ ॥ धैर्याचेनि अतिसामर्थ्यें ॥ आवरूनि प्रेमाचें भरितें ॥ मी कृतकृत्य जाहलों एथें ॥ हेंही निश्चितें मानलें ॥ ५७ ॥ श्रीकृष्णें उद्धरिलें मातें ॥ ऐशिया मानूनि उपकारातें ॥ काय उतरायी होऊं मी Vयातें ॥ ऐसें Hनिजचित्तें विचारी ॥ ५८ ॥ गुरूसि चिंतामणी देवों आतां ॥ तो चिंता

१ घाम. २ डवडवित. ३ श्रवणरूप ऐश्वर्यानें सर्वांत श्रेष्ठ. ४ पूर्ण. ५ शिथिल झाला. ६ तेजस्वी व गंभीर असे दिसूं लागले.

*मो. तुपेक्षावें. +मो. योगक्षेम जाण ※ना. अनन्यभक्ताचा. ०मो उल्हासें. ×ना. भक्ताचें 5ना. भक्त. 1मो. सर्वदा सर्वार्थी. 7मो. नीचनवें. Aमो. ज्ञानगंभीरक्षीराब्धी. Sमो. वंदिती. Pमो. महावेदीं. Zमो. पुराणें. Dना. प्रेमप्रीतीं. Tना. स्वमुखें सप्रेमें. Fना. स्वयें. Xना. सांग. Nना. जाले Oमो. स्वेदकणिका. Bमो. उत्साहाचिया. Mमो. आपण. Vमो. त्यातें. Hना. निश्चितें.

वाढवी चिंतिलें देतां ॥ *गुरूनें दिधलें अचिंत्यार्था ॥ तेणें उत्तीर्णता कदा न घडे ॥ ५९ ॥ गुरूसि कल्पतरू देवों जातां ॥ तो कल्पना वाढवी कल्पिलें देतां ॥ गुरूनें दीधली निर्विकल्पता ॥ त्यासि उत्तीर्णता Xतेणें नव्हीजे ॥ ६६० गुरूसि देवों +स्पर्शमणी ॥ तो ※सर्व धातु करी सुवर्णी ॥ ब्रह्मत्व ०गुरुचरणस्पर्शनीं ॥त्यासी 7नव्हे उत्तीर्णी परीसही देतां ॥६१॥ गुरूसि कामधेनु देऊं आणोनि ॥ ते कामना वाढवी अर्थ देऊनी ॥ गुरु निष्काम निर्गुणदानी ॥ त्याचे उत्तीर्णी कामधेनु नव्हे ॥ ६२ ॥ त्रिभुवनींची संपत्ति चोख ॥ गुरूसि देतां ते मायिक ॥ जेणें दीधली वस्तु 5अमायिक ॥ Sत्यासि कैसेंनि लोक उतरायी होती ॥ ६३ ॥ Xदेहें उतरायी होऊं गुरूशी ॥ तंव Rनश्वरपण या देहासी ॥ नश्वरें अनश्वरासी ॥ उत्तीर्णत्वासी कदा न घडे ॥ ६४ ॥ जेणें आहाशंख दीधला आवडीं ॥ त्यासि देऊनि फुटकी कवडी ॥ Cउत्तीर्णत्वाची वाढवी गोडी ॥ तैशी परवडी देहभावा ॥ ६५ ॥ जीवें उतरायी Aहोऊं गुरूशीं ॥ तंव जीवत्वचि मिथ्या त्यासी ॥ जेणें दीधलें सत्यवस्तूसी ॥ मिथ्या देतां त्यासी Dलाजचि कीं ॥ ६६ ॥ जेणें दधिलें अनर्घ्य रत्नासी ॥ वंध्यापुत्र देवों केला त्यासी ॥ तेवीं मिथ्यत्व जीवभावासी ॥ Iउत्तीर्णत्वासी कदा न घडे ॥ ६७ ॥ काया वाचा मन धन ॥ गुरूसी अर्पितां Qजीवप्राण ॥ तरी कदा नाव्हिजे उत्तीर्ण ॥ हें उद्धवें संपूर्ण जाणीतलें ॥ ६८ ॥ जेथें अणुमात्र नाहीं दुःख ॥ ऐसें दीधलें Jनिजसुख ॥ त्या गुरूसि उतरायी देख ॥ न होवें निःशेख शिष्यासी ॥ ६९ ॥ यालागीं मौनेंचि जाण ॥ उद्धवें घातलें लोटांगण ॥ श्रीकृष्णाचे श्रीचरण॥ मस्तकीं संपूर्ण वंदिले ॥ १७० ॥ मागां श्रीकृष्णें पुशिलें पहाहो ॥ उद्धवा तुझा गेला कीं शोकमोहो ॥ तेणें उद्धवासि जाहला विस्मयो ॥ उत्तर द्यावया ठावो Wन घडेची ॥ ७१ ॥ आतां वंदोनि श्रीचरण ॥ कृतांजली Oकरोनि जाण ॥ उत्तर द्यावया आपण ॥ श्रीकृष्णवदन अवलोकी ॥ ७२ ॥ जेवीं सवितां Pचंद्रकर ॥ चकोर तृप्तीचे दे ढेंकर ॥ तेवीं कृष्णसुखें उद्धव निर्भर ॥ काय प्रत्युत्तर बोलत ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ उद्धव उवाच ॥ विद्रावितो मोहमहांधकारो य आश्रितो मे तव सन्निधानात् ॥ विभावसोः किन्न समीपगस्य शीतं तमोभीः प्रभवंत्यजाद्य ॥ ३७ ॥

॥ टीका ॥ जो सकळ देवचूडामणी ॥ जो Bयादवांमाजीं अग्रगणी ॥ जो अविद्यारात्रीचा तरणी ॥ जो शिरोमणी Hब्रह्मवेत्यां ॥ ७४ ॥ ऐशिया श्रीकृष्णाप्रती ॥ स्वानंदाचिये Uनिजे-

१ निर्गुणाची प्राप्ति करून देणारा २ फेडीस. ३ उजवाशंख हा लक्ष्मीदायक असतो. ४ ज्यास मोल नाहीं असें. ५ देऊं केला. ६ हात जोडून. ७ चंद्राचे किरण. ८ सूर्य. ९ उद्रेकांत.

*मो. श्रीगुरूनें दिधली अचिंत्यता. Xमो. केवीं घडे. +मो. परिसमणी. ※मो. स्पर्शें धातु. ०मो. पाविजे गुरुचरणीं. 7मो. नव्हिजे उत्तीर्ण. 5ना. अमोलिक. Sमो. त्यासी उतराई देख नव्हिजे तेणें. Xना. देहउतरायी व्हावें गुरूशी. Rमो. नैश्वरता. Cमो. हे उत्तीर्णत्वाची जोडी. Aमो. व्हावें. Dना. लाजेना. Iमो. उत्तीर्ण त्यासि केवीं घडे. Qमो. जाण. Jमो. नित्यसुख. Wमो. असेना. Oश्री. करूनियां. Pना. चंद्रचकोर. Bमो. यादववंशीं. Hमो. ब्रह्मादिकां. Uमो. उन्मेषस्फूर्ती.

मूर्ती ॥ उद्धवें सांगतां निजस्थिती ॥ त्यामाजीं करी स्तुती आद्यत्वें हरीची ॥७५॥ मज तंव विचारितां ॥ ब्रह्मा सर्वांचा आदिकर्ता ॥ तोही *नारायणनाभीं तत्त्वतां ॥ होय जन्मता +अ-जनामें ॥ ७६ ॥ तो तूं ×कमळनाभि नारायण ॥ ※मायासंकलित ब्रह्म जाण ॥ ते मायेचें तूं आद्यकारण ॥ 7आद्यत्व पूर्ण तुज साजे ॥ ७७ ॥ अविद्येच्या महारात्रीं ॥ Sअडकलों होतों मोहअंधारीं ॥ तेथूनि काढावया बाहेरीं ॥ आणिकाची थोरी चालेना ॥ ७८ ॥ तेथ तुझेनि वचनभास्करें ॥ नासोनि शोकमोहअंधारें ॥ मज काढिलें जी Gबाहेरें ॥ चमत्कारें सन्निधीं तुझ्या ॥७९॥ तुझिये सन्निधीपाशीं ॥ ठाव नाहीं Qअविद्येशी ॥तेथ मोह ममता कैसी ग्रासी ॥ हृषीकेशी तुज असतां ॥ ६८० ॥ अंधारी रात्री अतिगहन ॥ तेथ शीतें पीडिला जो संपूर्ण ॥ त्यासि आतुडलिया हुताशन ॥ शीत तम जाण Eतत्काळ पळे ॥८१॥ तो अग्नि सेवितां स्वयें सदा ॥ शीततमाची Uभयबाधा ॥ पुढती बाधूं नशके कदा ॥ तेवीं गोविंदा सन्निधि तुझ्या ॥ ८२ ॥ तेवीं शोकमोहममतेशीं ॥ माया Dजन बांधे भवपाशीं ॥ ते तुझिये सन्निधीपाशीं ॥ जाती आवेसी हारपोनी ॥८३॥ मरणजन्मांचे अपाये ॥ मागां अनेक सोशिले स्वयें ॥ ज्यासि तुझी सन्निधि होये ॥ त्यासि तें Vभवभय समूळ मिथ्या ॥ ८४ ॥ तुझे सन्निधीपाशीं जाण ॥ समूळ मायेचें निर्दळण ॥ तेचि अर्थीचें निरूपण ॥ उद्धव आपण सांगत ॥ ८५ ॥

॥ श्लोक ॥ प्रत्यर्पितो मे भवताऽनुकंपिना भृत्याय विज्ञानमयः प्रदीपः ॥ हित्वा कृतज्ञस्तव पादमूलं कोऽन्यत्समीयाच्छरणं त्वदीयम् ॥ ३८ ॥

। टीका ॥ तुझ्या सन्निधिमात्रें देख ॥ समूळ अज्ञानासि घातक ॥ हेंचि मुख्यत्वें अवश्यक ॥ भक्त सात्विक जाणती ॥ ८६ ॥ Lअसोत इतरांची गोष्टी ॥ Jम्यांही अनुभविलें निजदृष्टीं ॥ अविद्या निरसावया सृष्टीं ॥ सत्संगती लाठी सर्वार्थी ॥८७॥ सत्संगाही माजीं जाण ॥ तुझी संगती अतिपावन ॥ तुवां उद्धरावया दीनजन ॥ हें Fनिजात्मज्ञान प्रकाशिलें ॥ ८८ ॥ माझें निमित्त करूनि जाण ॥ उद्धरावया दीन जन ॥ त्यांचें निरसावया अज्ञान ॥ ज्ञान दीप पूर्ण प्रज्वाळिला ॥८९॥ Oउपदेशार्थ श्रद्धास्थिती ॥ हेंचि टवळें पैं निश्चितीं ॥ तेथें Kबोधका ज्या निजात्मयुक्ती ॥ तें टवळ्यांप्रती स्नेह पूर्ण ॥६९०॥ विवेकवैराग्यधारण ॥ हेंचि तेथील वाती जाण ॥ तेथ प्रज्वळिला ज्ञानघन ॥ चित्प्रभापूर्ण Cमहादीप ॥९१॥ ※नैराश्य तेंचि वैराग्य-धारण ॥ तेथें प्रज्वळती ज्ञानदीप पूर्ण ॥ आशा तेंचि मान्हवण ॥ गडद संपूर्ण पडे तेथें ॥९२॥

१ थंडीनें. २सांपडला असतां. ३अग्नि. ४थंडीची व अंधाराची. ५बळकट, शक्तिवान्. ६दिव्याचें चाडें

*मो. नाभिकमळीं. +मो. अजत्वनामें. ×ना. नाभिकमळीं नारायण. ※मो. हे माया [illegible] बल. ०मो. आद्यत्व जाण. 7मो. आद्य. Sमो. आतुडलों मोहआंधारीं. Zमो. ज्ञानभास्करें. Gमो. निजचमत्कारें, संनिधिमात्रें तुझेनि. Qमो. माया अविद्येसी. Eमो. बाधीना. Uमो. भयबाधा. Dमो. जनासि. Tमो. जाय. Vमो. अपाय. Lमो. आतां कायसी. Jमो. म्याचि. Fमो. गुह्यज्ञान. Oमो. उपदेश. Kमो. आत्मबोध निजयुक्ती, तेंचि निश्चिति स्नेह पूर्ण. [illegible]ना. ज्ञानदीप.

※ ९२ ही ओंवी पैठण येथील हस्तलिखित पोथींत आहे, परंतु पंढरपूर येथील हस्तलिखित पोथींत नाहीं.

तो दीप कर्णद्वारीं ठेविला ॥ *तंव सबाह्य प्रकाश जाहला ।।अज्ञानअंधार निर्दाळिला ।। स्वयें +प्रबळला सद्रूप ।।९३।। तेणें सबाह्य ×सत्प्रकाशें ।। तुझी पदवी प्रकट दिसे ॥ ऐसें निजरूप हृषीकेशें ॥ अनायासें मज अर्पिलें ।। ९४ ।। तुवां ※अंतर्यामित्वें आपुलें ॥ स्वरूप पूर्वींच मज अर्पिलें ॥ तें तुवांच माझारीं आच्छादिलें ।। भजन आपुलें प्रकटावया ।। ९५ ।। तुझ्या निज-भजनाचें लक्षण ।। सर्वभूतीं ०भगवद्भजन ।। *तेणें तूं साचार संतोषोन ।। अर्पिलें =ज्ञान अर्पिशी पुढती ।। ९६ ॥ वाढवूनि 1निजभजन ॥ माझें मज अर्पिशी ज्ञान ।। या नांव 2प्रत्यर्पण ॥ साधु सज्ञान बोलती ॥ ९७ ।। वाढवूनि आपुली भक्ती ॥ माझें ज्ञान दीधलें माझे हातीं ॥ दीधलें तेथ माया पुढती ।। विकल्पवृत्ती स्पर्शेना ॥ ९८ ।। जे दीधली स्वरूपस्थिती ॥ ते आच्छादेना कदा कल्पांतीं ।। यापरी गा श्रीपती ॥ कृपा निश्चितीं तुवां केली ।।९९।। यापरी तूं अतिकृपाळू ॥ निजदासालागीं दयाळू ॥ त्या तुज सांडूनियां बरळू ।। 3आनासि गोंवळू भजों धांवे ।।७००।। त्यजूनि स्वामी हृषीकेशू ।। आनासि भजे तो केवळ पशू ।। पशूंही माजी तो रासभवेशू ॥ ज्यासि नाहीं विश्वासू हरिभजनीं ॥ १ ।। तुवां जनासि केला उपकारू ।। इंद्रियां पाटव्य ज्ञानाधिकारू ।। तो उपकार विसरे जो नरू ॥ तो जाण साचारू कृतघ्न ॥२॥ जे जाणती तुझ्या उपकारातें ।। ते काया वाचा चित्तें वित्तें ।। कदा न भजती आनातें ।। मज निश्चितें मानले ।। ३ ।। मज निमित्त करूनियां जाण ।। जें त्वां 4प्रकाशिलें निजात्मज्ञान । तेणें 5जगाचें उद्धरण ॥ श्रवणमननकीर्तनें ।। ४ ।। 6यापरी तूं कृपाळु पूर्ण ।। माझें छेदिलें भवबंधन ॥ तेंचि अर्थींचें निरूपण ॥ उद्धव आपण स्वयें सांगे ॥ ५ ।।

॥ श्लोक ॥ वृक्णश्च मे सुदृढः स्नेहपाशो दाशार्हवृष्ण्यंधकसात्वतेषु ॥ प्रसारितः सृष्टिविवृद्धये त्वया स्वमायया ह्यात्मसुबोधहेतिना ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ तुवां मायेनें सजिले जन ।। ते सृष्टि व्हावया वर्धमान ॥ स्त्री पुत्र सुहृद 7जन ॥ हा स्नेह संपूर्ण वाढविला ।। ६ ।। मी जन्मलों यादवकुळांत ॥ तेथ वृष्णि, अंधक, सात्वत ॥ इत्यादि सुहृद समस्त ।। अतिस्नेहयुक्त आप्तवें ।। ७ ।। तें सुहृदस्त्रीपुत्रस्नेहबंधन ।। त्या स्नेहपाशाचें छेदन ॥ माझें बाळपणीं त्वां केलें जाण ।। जे खेळतां तुझें ध्यान मज लागलें ॥ ८ ।। जेवीं वेंडंबरी खेळतां खेळ ।। मोहिनीविद्या प्रेरी प्रबळ ॥ विद्येचें 8आवरावया बळ ॥ 9सत्ता केवळ खेळविता ।। ९ ॥ तेवीं तुझी स्वमाया जाण ।। जे कां सदा तुज अधीन ।। तिचे स्नेहपाश दारुण ।।तेणें बांधोनि जन अति बद्ध केले ।।७१०।। ते माझे स्नेहपाश 0जाण ।।

---

१ मध्येंच. २ वृथा बडबड करणारे. ३ अज्ञ, गुरेराख्या. ४ गाढवाचा वेष घेतलेला. ५ शक्ती, कुशलता. ६ गारोड्याचे, मंत्रविद्येचे. ७ समर्थ. ८ गारुडी.

*मो. तो सबाह्याभ्यंतरीं प्रकाशला. +मो. प्रज्वळला. ×मो. चित्. ※मो. अंतर्यामि आपुलें. ०मो. भगवंत जाण. *मो. तें तुवां साचार. =मो. जाण. 1मो. आपुलें भजन. 2मो. प्रत्यय प्रमाण. ना. प्रत्यय पूर्ण. 3मो. आनासि कोण भजेल. 4ना. परिसविलें. 5मो. जगासी. 6मो. यालागीं भक्तकृपाळु तूं पूर्ण. 7मो, जाण. ना. सज्जन. 8मो. आवरण बळ. 9मो. सत्ता केवळ खेळविता. ना. शक्त तूं केवळ खेळ खेळविता. 0मो. दारुण.

त्वां पूर्वींच छेदिले *आपण ॥ जें मज होतें बाळपण ॥ तेंचि कृपापूर्ण ×मज केली ॥ ११ ॥ ते भवबंधच्छेदितें जें शस्त्र ॥ तुवां निजयुक्ती फोडोनि धार ॥ सतेज करूनियां खडतर ॥ मजलागीं स्वतंत्र अर्पिलें ॥ १२ ॥ येणें शस्त्रबळें मी जाण ॥ छेदूं शकें जगाचें बंधन ॥ एवढी मजवरी कृपा पूर्ण ॥ केली आपण दयालुत्वें ॥१३॥ संसारदुःखरूप जो कां एथें ॥ तोचि सुखरूप जाहला +मातें ॥ ऐशिये कृपेचेनि हातें ॥ मज निश्चितें उद्धरिलें ॥ १४ ॥ मी कृतकृत्य जाहलों एथें ॥ परी कांहीं एक मागेन तूतें ॥ ते कृपा करावी श्रीकृष्णनाथें ॥ ह्मणोनि चरणांतें लागला ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ नमोऽस्तु ते महायोगिन् प्रपन्नमनुशाधि माम् ॥ यथा त्वच्चरणांभोजे रतिः स्यादनपायिनी ॥ ४० ॥

॥ टीका ॥ ※नघडे तें घडवी आपण॥ नाथिलें दावीसी विंदान॥ जित्या मेल्या लावूनि लग्न॥ नांदविसी संपूर्ण निजमाया ॥१६॥ जे योगियांसि अतिदुस्तर ॥ जिणें नाडिले स्रष्टा शंकर॥ ते माया तुझी किंकर ॥ तूं परात्पर महा योगी ॥ १७ ॥ त्या तुझ्या कृपेस्तव जाण॥ मी कृतकृत्य जाहलों आपण ॥ न देखें ०भवभयादिदुःखभान ॥ स्वानंदीं निमग्न सर्वदा ॥१८॥ दृश्यद्रष्टा दर्शन ॥ नाहीं त्रिपुटी ना त्रिगुण॥हारपलें मीतूंपण॥स्वानंद पूर्ण निजबोधें ॥१९॥ निजबोधें स्वानंदीं पूर्ण॥हेही बोल मायिक जाण॥परादिवाचा पडिलें शून्य॥यालागीं मौन वेदवादा॥२०॥ कार्य कारण कर्तव्यता ॥ मज उरली नाहीं सर्वथा ॥ तरी कांहीं एक श्रीकृष्णनाथा ॥ तुज मी आतां [1]मागेन ॥ २१ ॥ जेवीं कां बाळकाचा थाया ॥ कळवळोनि पुरवी माया ॥ तेवीं माझिया वचना यया ॥ श्रीकृष्णराया अवधारीं ॥ २२ ॥ हें अंतींचें माझें [2]मागतेपण ॥ देवें अवधारावें सावधान ॥ वंदूनियां श्रीकृष्णचरण ॥ अगम्य विंदान मागत ॥ २३ ॥ मज थोर भ्रम होता चित्तीं ॥ गोड असेल जीवन्मुक्ती ॥ तेथ न देखें तुझी भक्ती ॥ कोरडी मुक्ती मज नलगे ॥ २४ ॥ सद्गुरुकृपावचनोक्ती ॥ शिष्य तत्काळ *लाहे मुक्ती ॥ [5]त्या तुज सद्गुरूची राहे भक्ती ॥ जळो ती मुक्ती मज नलगे ॥ २५ ॥ यालागीं तुज शरण ॥ [3]मागुतेन मी आलों जाण ॥ सायुज्यावरीही पूर्ण ॥ तुझें गुरुभजन मज देईं ॥ २६ ॥ मागां बहुतीं केली भक्ती ॥ आणशी त्यांसि त्वां दीधली मुक्ती ॥ परी कोणी मुक्तीवरल ही भक्ती॥ नाहीं मजप्रती मागीतली॥२७॥मागां जिहीं केली भक्ती ॥ त्यांसि त्वां ठकिलें देऊनि मुक्ती ॥ तें ठकडेपण श्रीपती ॥ नचले मजप्रती सर्वथा॥२८॥ज्यांची अहंकारशून्य वृत्ती॥जाहले आत्माराम सहजगती ॥ तेही अहेतुक भक्ति करिती ॥ ऐशी स्वरूपस्थिती पैं तुझी ॥ २९ ॥

॥ संमत श्लोक ॥ आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे ॥ कुर्वंत्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः ॥

१ लावून. २ ब्रह्मदेव. ३ हट्ट. ४ थांबे, बदं पड. ५ हे श्रीकृष्ण परमात्मन्, हे गुरो. ६ पूर्वी. ७ फसविलें. ८ ठकवणी, फसवेगिरी.

*मो. जाण. ×मो. तुवां. +मो. आमुतें. ※मो. न घडतें घडविसी. ०मो. भवभयाचें भान. [1]मो. सांगेन. [2]मो. मागणें. *मो. पावे. [5]मो. ज्यांत सद्गुरूचि नाहीं भक्ती. [3]मो. मागत आहें मी जाण, सायुज्यावरील तुझें भजन, घडे तें संपूर्ण मज देईं.

॥ टीका ॥ *तेथ त्यजोनियां तुझी गुरुभक्ती ॥ मुक्ति मागणें हेचि भ्रांती ॥ असो तुझी न-लगे मुक्ती ॥ माझी गुरुभक्ती मज देईं ॥ ७३० ॥ ज्यासि आकळली निजमुक्तता ॥ ह्मणसी त्यासि भक्ति नेदवे आतां ॥ हे मजसी बोलोंनको +कथा ॥ तुझी समर्थता मी जाणें ॥ ३१ ॥ तूं न घडे तें घडविशी ॥न चले ते चालविशी ॥ ×नव्हे तें तूं होय करिशी ॥नाहीं सामर्थ्यासी मर्यादा ॥ ३२ ॥ अगम्य सामर्थ्याची गणना ॥ बुडत्या तारूनि पाषाणां ॥ त्यावरी तारिसी वानरसेना ॥ सेतुबंधना श्रीरामा ॥ ३३ ॥ केवळ जे कां वनचर ॥ पालेखाईर वानर ॥ चारी मुक्ती त्यांच्या किंकर ॥ त्यांसि सुरवर वंदिती स्वयें ॥ ३४ ॥ केवळ ज्या व्यभिचारिणी ॥ शेखीं ज्या घुरैटा गौळणी ॥ ०मोक्ष लागे त्यांच्या चरणीं ॥ ये ब्रह्मा लोटांगणीं चरणरजासी ॥ ३५ ॥ तूं परमात्मा परमेश्वर ॥ हें नेणती गौळणी वानर ॥ तरी तुझें भजनमात्र ॥ फळलें साचार परब्रह्मत्वें ॥ ३६ ॥ ऐसें अगाध तुझें भजन ॥ अगम्य भजनाचें महिमान ॥ भक्ति-अधीन तुझें देवपण ॥ मा मोक्षासि कोण ※अधिकाई ॥ ३७ ॥ भक्तीच्या पोटीं जन्मली मुक्ती ॥ वाढली मुक्ती भक्तीतें घाती ॥ ऐसी जे कां मुक्ति मातृहंती ॥ तिसी मी सर्वथा नातळें ॥ ३८ ॥ फिटे मुक्तीचें दूषण ॥ जेणें तें होय अतिपावन ॥ तें मी सांगेन *विंदान ॥ ऐक सावधान श्रीकृष्णा ॥ ३९ ॥ जोडल्याही [1]मुक्तपण ॥ मज यावें तुझें [2]गुरुभजन ॥ तेणें मुक्तिही होय पावन ॥ ह्मणोनि लोटांगण घातलें ॥ ७४० ॥ मस्तकीं धरिले श्रीचरण ॥ उद्धव सर्वथा न सोडी जाण ॥ तेणें ठकार्चा जाहला श्रीकृष्ण ॥ त्यासि संपूर्ण तुष्टला ॥ ४१ ॥ [3]जाणोनि आपुलें मुक्तपण ॥ मी न सांडीं तुझें भजन ॥ ऐशी कृपा करीं पूर्ण ॥ ह्मणोनि श्रीचरण न सोडी ॥ ४२ ॥ मुक्तता बाणल्या संपूर्ण ॥ तें [4]राहोंशके सद्गुरुभजन ॥ हेंही बाधों नशके विघ्न ॥ तैशी भक्ति निर्विघ्न मज सांग॥४३॥ कोटीजन्में शिणतां जाण ॥ ह्मणसी नातुडे मुक्तपण ॥ त्या मोक्षा नांव ठेविसी 'विघ्न'॥ मूर्ख संपूर्ण मज ह्मणसी ॥ ४४ ॥ जेणें सुटे माझें सद्गुरुभजन ॥ तें मी मानीं परम विघ्न ॥ तुझें भक्तिवीण मुक्तपण ॥ अ-लवणी मज जाण गोविंदा ॥ ४५ ॥ माझी न मोडे नित्यमुक्तता ॥ अहेतुक [5]चालवी भक्तिपंथा ॥ ऐशी कृपा करीं श्रीकृष्णनाथा ॥ झणें संकोचता मानिशी ॥ ४६ ॥ ह्मणसी 'म्यां दीधली [0]नित्यमुक्ती' ॥ तरी ते माझी [6]मजपाशीं सिद्ध होती ॥ 'दीधली ह्मणणें हे मिथ्या वदंती ॥ [5]वोंडगी ख्याती दातृत्वाची ॥ ४७ ॥ माझी स्वतःसिद्ध नित्यमुक्तता ॥ त्यावरी भक्ति मी मागतों आतां ॥ ते देशी तरी तूं साचार दाता ॥ उदारता यां नांव ॥ ४८ ते संतोषोनि भक्ति देतां ॥ उल्हास न देखों तुझ्या चित्ता ॥ थोर मांडली कृपणता ॥ कृष्णनाथा मजलागीं ॥ ४९ ॥ [7]जे सांडवी सद्गुरुभक्ती ॥ आह्मां नलगे तुझी जीवन्मुक्ती ॥ मुक्ति ह्मणणें हेही

१ न देववे. २ झाडपाला खाणारे. ३ धागट, ज्यांचे अंगास दूध, दही, ताक, लोणी यांचा ओशट वास येत होता. ४ अधिकत्व, जास्ती मोठेपणा. ५ परिपक्व झालेली मुक्ती. ६ घात करी. ७ आईची हिंसा करणारी. ८ आश्चर्यचकित. ९ फिकें, आळणी. १० व्यर्थ.

*मो ते त्यजूनियां तुझी भक्ती. +मो. सर्वथा. ×मो. न होतें होवविसी. ०मो. त्यासि ब्रह्मा ये लोटांगणीं, मोक्ष चरणीं चरणरज. ※ना. अधिकारी मो. अधिकारू. *ना. विधान. 1मो. मुक्ती जाण. 2मो. भजन. 3मो. जाली असतां मुक्ती जाण. 4मो. नराहे. 5मो. चालें. 0मो. निजमुक्ती. 6मो. मजपाशींच होती. 5ना. वाऊनि. 7मो. जेणें सांडे तुझी भक्ती, ते आह्मासि नलगे मुक्ती, मुक्ती मागणें होचि भ्रांति.

भ्रांती ॥एक श्रीपती सांगेन ॥७५०॥ मुळीं मुख्यत्वें नाहीं बद्धता॥तेथ कैंची वाढिली मुक्तता॥ मिथ्या मुक्ति मी नातळे सर्वथा॥माझी *गुरुभक्तिता मज देईं॥५१॥मागें ज्यांसि त्वां दीधली मुक्ती॥ते ठकिले याच रीतीं ॥तैसें चाळवूं नको श्रीपती ॥ ×मोक्षावरील भक्ती मज देईं॥५२॥ ह्मणोनि घातलें लोटांगण ॥धांवोनि धरिले +दोनी चरण ॥ प्रेमें वोसंडला श्रीकृष्ण॥उद्धवासि संपूर्ण तुटला ॥ ५३ ॥ मोक्षावरील गुरुभक्ती ॥ उद्धवें मागीतली नानायुक्तीं ॥ ❀जे जे चालली उपपत्ती ॥ तेणें सुखें श्रीपती सुखावला ॥ ५४ ॥ सुखें ०सुखावली श्रीकृष्णमूर्ती ॥ डोलों लागला स्वानंदस्थितीं ॥ तेणें संतोषें भक्तिमुक्ती ॥ उद्धवाहातीं अर्पिली ॥ ५५ ॥ जगीं उद्धवाचें शुद्धपुण्य ॥ जगीं उद्धवची धन्यधन्य ॥ ज्यालागीं *सर्वस्व श्रीकृष्ण ॥ मोक्षावरील 1भजन देत ॥ ५६ ॥ गुरुब्रह्म दोनी 2अभिन्न ॥ हेंही सद्गुरु प्रबोधी पूर्ण ॥ यालागीं मोक्षावरील गुरुभजन ॥ नव्हे दूषण सच्छिष्यां ॥ ५७ ॥ मागिलां निजभक्तांप्रती ॥ स्वानंदें तुष्टला श्रीपती ॥ तिहीं मागीतली निजमुक्ती ॥ त्यांसि हे स्थिती अतर्क्य ॥ ५८ ॥ उद्धवें थोर केली ख्याती ॥ मुक्तीचे माथां वाइली भक्ती ॥ अगम्य मागीतली स्थिति ॥ तेही श्रीपती अर्पित ॥ ५९ ॥ उद्धवा मुक्तीवरील जे 4भक्ती ॥ ते मज अवतारांची अवतारशक्ती ॥ 5येणें उत्पत्ति स्थिति प्रलय अंतीं ॥ करूनि श्रीपती मी अलिप्त ॥ ७६० ॥ येणेंचि बळें मी अकर्ता तत्त्वतां ॥ कर्में करूनि अकर्ता ॥ भोग भोगोनि अभोक्ता ॥ जाण सर्वथा येणेंचि योगें ॥६१॥ हा योग न कळे ज्यासी ॥ दुःखरूप संसार त्यासी ॥ 9हा अखंड योग मजपाशीं ॥ मी संसारेंसी 7सुखरूप ॥ ६२ ॥ हा योग सदाशिव जाणे ॥ कां म्यां जाणिजे 8नारायणें ॥ इतरांचें जें जाणणें ॥ तें अगम्यपणें रिघेना ॥ ६३ ॥ ऐशी श्रीकृष्ण सांगे गुह्य गोष्टी ॥ 6ते स्थिति बाणली उद्धवाचे पोटीं ॥ दोघां निजबोधें एकाचि गांठीं ॥ भजनकसवटी कळों सरली ॥ ६४ ॥ 0मुक्तीशीं भक्तीची हातवटी ॥ ते उद्धवासि कळली गोष्टी ॥ तो उल्हास न माये पोटीं ॥ स्वानंदपुष्टीं कोंदला ॥ ६५ ॥ जेवीं बाळकाच्या थायाकारणें ॥ माता लेववी निजभूषणें ॥ तेवीं उद्धवालागीं श्रीकृष्णें ॥ Eनिजभक्ती देणें निश्चित ॥ ६६ ॥ मनाचें नाइकतां कान ॥ बुद्धीचें न देखतां नयन ॥ शेखीं गगनातेंही चोरून ॥उद्धवासि श्रीकृष्ण Aनिजस्थिती अर्पी ॥६७॥ जे ब्रह्मवेत्त्यांसि नकळे ॥ जे वेदानुवादा नाकळे ॥ ते स्थिति उद्धवासि गोपाळें कृपाबळें अर्पिली ॥ ६८ ॥ पूर्वीं श्रीकृष्णें पुसतां पहा हो ॥ उद्धरलों ह्मणे उद्धवो ॥ आतां मागे भजनभावो ॥ हा गूढाभिप्रावो हरि जाणे ॥ ६९ ॥ मुक्तीवरील मागतां भक्ती ॥ श्रीकृष्णाची अवतारशक्ती ॥ माया⁶नियंतृत्वाची पूर्णस्थिती ॥ उद्धवाचे हातीं स्वयें आली ॥ ७७० ॥ जाणोनि मायेचें मिथ्यात्व पूर्ण ॥ तिचें प्रेरण आणि Bआवरण ॥ हें मायानियंतृत्वलक्षण ॥ उद्धवा

१ वाहवा. २ मानिली ३ मुक्तीसह. ४ प्रकार. ५ स्वात्मानुभव. ६ मायेस स्वाधीन ठेवण्याची. ७ प्रवृत्ति करणें.

*मो. गुरुभजनता. ×मो. तुझी निजभक्ती. +ना. श्रीचरण. ❀मो. जे केली विनंती. ०मो. सुखावोनि *मो. स्वानंदें. 1ना गुरुभजन स्वानंदें देत 2ना. एक अभिन्न. 4मो. गुरुभक्ती. 5मो. येणें उत्पत्ति स्थिती, करूनि निश्चितीं मी अकर्ता. 9मो. हा योग असतां मजपाशीं. 7मो. अलिप्त. 8मो. श्रीकृष्णें. 6मो तैसीच स्थिती. 0मो. भक्ति मुक्तीची हातवटी. Eना. अवतारस्थिती देणें. Aमो. निजभक्ती. Bमो. आचरण.

सि श्रीकृष्ण स्वयें अर्पी ॥ ७१ ॥ जैसें *बुद्धिबळाचे पोटीं ॥ पूर्व कर्म नसतां गांठीं ॥ राजा प्रधान पशु प्यादा उठी ॥ निर्धारितां दृष्टीं काष्ठ एक ॥ ७२ ॥ एकचि काष्ठ दोहीं भारीं ॥ तेथ कोण कोणाचा वैरी ॥ +वैर नसतांही झुंझारी ॥ मारामारी ×अचेतना ॥७३॥ ह्मणती हस्ती घोडा प्रधान मेला ॥ तेथ काय त्याचा जीव गेला ॥ प्यादा होता तो प्रधान जाहला ॥ तो काय पावला गजांतलक्ष्मी ॥ ७४ ॥ जीव नसतांही निर्धारीं ॥ मारिलें ह्मणती निजगजरीं ॥ एका जैत[1] एका हारी[2] ॥ हें ज्ञान ०सारी[3] नेणती ॥७५॥ सारी निमाल्या पाठीं॥ कोण धर्मात्मा चढे वैकुंठीं ॥ कोण पडे नरकसंकटीं॥ तेवीं बद्धमुक्तगोठी समूळ मिथ्या ॥७६॥ एवं बुद्धिबळाचिये परी ॥ ज्याची निजदृष्टी संसारीं ॥ तोचि ※अवतारांचा अवतारी ॥ जाण तो निर्धारीं भगवंत ॥ ७७ ॥ समूळ मिथ्या जाणे वेदोक्ती ॥ समूळ मिथ्या जाणे बंधमुक्ती ॥ हें जाणोनि आचरे जो *वेदविहितीं ॥ तोचि निजभक्ती मुक्तीवरील ॥ ७८ ॥ करूनि संसारनिवृत्ती ॥ बहुत पावले नित्यमुक्ती ॥ त्यांसि हे दुर्गम भक्ती ॥ अतर्क्य स्थिती तर्केना ॥ ७९ ॥ ऐशी ।ज्याणशीं माझी स्थिती ॥ तोचि मोक्षावरील करी भक्ती ॥ इतरांसि हे अतर्क्यगती ॥ जाण निश्चितीं उद्धवा ॥ ७८० ॥ उद्धव पावला अगाध गती ॥ त्यासि सर्वलोकोपकारार्थीं ॥ वांचवावया ०ब्रह्मशापाहातीं[4] ॥ उपाय श्रीपती ४स्वयें योजी ॥८१॥ नारदासि ब्रह्मज्ञान ॥ त्यासिही दक्षशापबंधन ॥ एके ठायीं न राहे जाण ॥ करी परिभ्रमण शापास्तव ॥ ८२ ॥ जालियाही ब्रह्मज्ञान ॥ ब्रह्मशाप अतिदारुण ॥ हें जाणोनियां श्रीकृष्ण ॥ उद्धवा जाण दूरी दवडी ॥८३॥ उद्धव जन्मला यादववंशीं ॥ यादव निमती[5] ब्रह्मशापेंसी ॥ तेथ वांचवावया उद्धवासी ॥ बदरिकाश्रमासी स्वयें धाडी ॥ ८४ ॥ ब्रह्मशापाचेनि आघातें[6] ॥ यादव निमती स्वगोत्रघातें ॥ उद्धव वांचवावया तेथें ॥ बदरिकाश्रमातें हरि प्रेरी ॥ ८५ ॥ उद्धवासि जें झालें ज्ञान ॥ त्याहूनि बदरिकाश्रम पावन ॥ हें सर्वथा न घडे जाण ॥ ब्रह्मशापाभेण पळवित ॥ ८६ ॥ उद्धवाऐसें अनर्घ्य रत्न ॥ ९ज्यासि माझी स्थिती जाहली संपूर्ण॥ त्यासि वांचवावया श्रीकृष्ण ॥ पाठवी आपण बदरिकाश्रमा ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ गच्छोद्धव मयाऽऽदिष्टो बदर्याख्यं ममाश्रमम्॥
तत्र मत्पादतीर्थोदे स्नानोपस्पर्शनैः शुचिः॥ ४१ ॥

टीका ॥ गंभीरागिरा बोले श्रीकृष्ण ॥ उद्धवा तुज जाहलें ब्रह्मज्ञान ॥ तुटलें स्नेहपाशबंधन॥ तरी ममाज्ञा करी गमन बदरिश्रमा ॥ ८८ ॥ त्या बदरिकाश्रमाचें माहमान ॥ लोकसंग्रहार्थ श्रीकृष्ण ॥ तरावया जड मूढ जन ॥ स्वसुखें श्रीकृष्ण सांगत ॥ ८९ ॥ तो बदरिकाश्रम माझें स्थान ॥ तेथ नित्य माझें अनुष्ठान ॥ तया स्थानाचें दूरदर्शन ॥ करी निर्दळण कलि[7]कल्मषां ॥ ७९० ॥ ज्या पर्वताचें स्पर्शन ॥ मानवा करी परम पावन ॥जे बदरीचें नामस्मरण ॥ विभां-

१ जय २ पराजय. ३ सोंगटी, बुद्धिबळांतील इसम. ४ ब्राह्मणांच्या शापापासून. ५ मरतील. ६ परस्परांच्या आघातानें. ७ कलिसंबंधीदोषांस.

*मो. बुद्धिबलाकाष्ठाचे पोटीं. ×मो. वैरी. +मो. अचेतनीं. ०मो. स्वारी. ※मो. अवतरांमाजी अवतारधारी *मो. वेदोक्ती. ।मो. जयाची स्थिती. ०मो. ब्रह्मशापोक्ति. ४मो. सांगत. ९मो. ज्यासी बाणली स्थिती पूर्ण.

डी दारुण महादोषां ॥९१॥ तेथेंही माझें पादोदक ॥ अलकनंदा पवित्र देख ॥ जिचेनि स्पर्शमात्रें लोक ॥ होती अलौकिक पावन ॥ ९२ ॥ जेथ श्रद्धायुक्त केलियां स्नान ॥ *जीवाचें तुटे भवबंधन ॥ ज्यासि घडे आचमन ॥ तो उद्धरे जाण पितरेंसी ॥ ९३ ॥ ऐसें बदरिकाश्रम माझें स्थान ॥ अतिशयें परम पावन ॥ ह्मणसी कैं केलें त्वां तें स्थान ॥ तरी ऐक तें कथन उद्धवा ॥ ९४ ॥ ×रजोगुणें सृजिले जन ॥ ते जाहले भोगकर्मीं प्रवीण ॥ भोगासक्तीं +बुडतां पूर्ण ॥ दोंरूपीं जाण मी अवतरलों ॥ ९५ ॥ तम *निरसी रवि चंद्र पूर्ण ॥ तैसा मी जाहलों नरनारायण ॥ बदरिकाचेलामाजीं जाण ॥ केला संपूर्ण नित्योदयो ॥ ९६ ॥ ※भज्यपूज्यत्वें मी नारायण ॥ नररूपें मीचि भक्त जाण ॥ तेथ भक्तिवैराग्य ज्ञान ॥ म्यां आचरोन प्रकाशिलें ॥ ९७ ॥ तो बदरिकाश्रम माझें स्थान ॥ तेथें सर्वदा मी आपण ॥ अद्यापि ०करितों अनुष्ठान ॥ भक्तिज्ञानवैराग्यें ॥ ९८ ॥ नरनारायणस्थितीं ॥ मी अवतरलों जे पर्वतीं ॥ तेथ तोडिले [६]बोरी ऐशी मागुती ॥ माझी निजभक्ती फांपाइली ॥ ९९ ॥ यालागीं ' बदरिकाश्रम ' ॥ त्या स्थळासि म्यां ठेविलें नाम ॥ तेथें फिटेल भवश्रम ॥ यापरी परम पावन तें स्थळ ॥ १०० ॥ त्या बदरिकाश्रमाप्रती ॥ तुवां जावें गा निश्चितीं ॥ ऐसें उद्धवा कल्पिसी चित्तीं ॥ मज काय तीर्थीं विचंबू ॥ १ ॥ मोक्षाहीवरील भक्ति ॥ तुवां अर्पिली माझे हातीं ॥ तेणें मी जाहलों 2कृतार्थी ॥ ह्मणसी मज तीर्थीं चाड नाहीं ॥ २ ॥ तरी मग तुज माझी आज्ञा प्रमाण ॥ अवश्य तेथें करावें गमन ॥ मग उद्धवें धरोनियां मौन ॥ मस्तकीं चरण वंदिले ॥ ३ ॥ 3सद्भावें करूनि नमन ॥ घेतां बदरिकाश्रमदर्शन ॥ तो नर होय नारायण ॥ एवढें महिमान त्या स्थळाचें ॥ ४ ॥ उद्धवा तुझ्याठायीं पूर्ण ज्ञान ॥ 4ज्ञान असोनि माझें भजन ॥ तुझेनि चरणस्पर्शें जाण ॥ होईल पावन बदरिकाश्रम ॥ ५ ॥ ऐसें ऐकोनि श्रीकृष्णवचन ॥ उद्धवासि आलें 6रुदन ॥ धांवोनि वंदिले श्रीचरण ॥ सर्वथा गमन करीत आतां ॥ ६ ॥ ब्रह्मशापाचें निर्दळण ॥ उद्धवाचें चुकवावया जाण ॥ श्रीकृष्णें 7प्रबोधोनि पूर्ण ॥ 8करवी गमन बदरिकाश्रमा ॥७॥ उद्धव 9ज्ञानियांचें ज्ञानरत्न ॥ त्यासि वांचवूनि 0श्रीकृष्ण ॥ विस्तारावया निजज्ञान ॥ करवी गमन बदरिकाश्रमा ॥ ८ ॥ चुकवावया ब्रह्मशाप दारुण ॥ उद्धवासि 1विशाळीं [११] गमन ॥ Lअन्यथा, जाहालिया ब्रह्मज्ञान ॥ Tकृष्ण तीर्थाटन नेमीना ॥ ९ ॥ उद्धवासि भवबंधन ॥ बाळपणींचि नाहीं जाण ॥ हें जाणोनियां श्रीकृष्ण ॥ ब्रह्मशापाभेण तीर्था धाडी ॥ ८१० ॥ तीर्थयात्रेचा अभिप्रावो ॥ हाचि निश्चयें निजभावो ॥ जाणोनि देवादिदेवो ॥ मोकली उद्धवो बदरिकाश्रमा ॥११॥ उद्धवा तुज

---

१ उगमाचे ठिकाणीं गंगेचें नांव. २ अत्यंत. ३ पितरांसुद्धां. ४ दोनरूपांनीं. ५ बद्रिका पर्वतावर. ६ बोरीचे झाडाप्रमाणें. ७ वृद्धिंगत झाली. ८ गरज, चाड. ९ गरज, विचंबू. १० ब्राह्मणांच्या शापानें होणारा नाश. ११ बदरिकाश्रमास. १२ एरव्हीं.

*मो. समूळ तुटे जीवबंधन. ×मो. जयालागीं सृजिले. +मो. होतां. *मो. निवारावया जैसें रविचंद्रमंडळ पूर्ण. ※मो. भजनपूजनत्वें. ०मो. करितसें. 2मो. कृत्यकृतार्थी. 3मो. सद्भावें करून जाण, ना. मद्भावें करूनियां गमन. 4मो. असोनि करीं तेथें गमन. 6मो. स्फुंदन. 7मो. प्रबोधिला. 8मो. करावें. 9मो. ज्ञानियांमाजीं. 0मो. आपण. 1मो. विचारिलें गमन. Lमो. येरवीं. Tमो. आणिकासी कृष्ण.

गेलिया तेथ ॥ थोर *लोकसंग्रह होईल एथ॥तुझेनि धर्मे निश्चित॥दीन समस्त उद्धरती ॥१२॥ ह्मणसी पावल्या तें तीर्थ ॥ म्यां कैसें +वसावें तेथ ॥ तेही अर्थी लोकहितार्थ ॥ तुज ×इत्यर्थ सांगेन ॥ १३ ॥ उद्धवा तुझें जें आचरण ॥ तोचि जनांसि उपदेश जाण ॥ यालागीं वैराग्य ※भक्ति ज्ञान ॥ स्वधर्माचरण सांडूं नको ॥ १४ ॥ त्रिभुवनामाजीं सर्वथा ॥ उद्धवा ०मज नाहीं कर्तव्यता ॥ तोही मी लोकसंग्रहार्था ॥ हो वर्तता निजधर्मी ॥१५॥ *तूं ऐसें ह्मणसी आतां ॥ त्रैलोक्य असे तुझ्या माथां ॥ यालागीं लोकसंग्रहार्था ॥ तूं होसी वर्तता स्वधर्मकर्मी ॥१६॥ मी निजधामा जातां आपण ॥ यालागीं माझी =स्थिती पूर्ण ॥ ते पूर्णता तुज अर्पिली जाण ॥ लोकसंग्रहार्थ ।पूर्ण तूं विरक्त होईं ॥ १७ ॥ अभेदभक्तिवैराग्य ज्ञान ॥ स्वयें आचरोनि आपण ॥ देखीं लावावे इतर जन ॥ 0लोकसंग्रह लक्षण जाण या नांव ॥ १८ ॥

※॥ संमत श्लोक ॥ श्रीभगवद्गीता ॥ न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनां ॥

जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ अ० ३. श्लो. २६. ॥

॥ टीका ॥ उद्धवा माझिये ज्ञानप्राप्ती ॥ तूं वंद्य जाहलासि त्रिजगतीं ॥ तुझी जे आचरती स्थिती ॥ तेचि लोकीं समस्तीं करिजेल ॥ १९ ॥ आतां तुझेनि मिसें जाण ॥ साडेतीं 7श्लोकींचें निरूपण ॥ लोकसंग्रहार्थ सांगेन ॥ तैसेंचि वर्तन करावें तुवां ॥ ८२० ॥ तुज पावलिया बदरिकाश्रमातें ॥ तेथ विद्यमान 4बहुत तीर्थे ॥ परी अलकनंदा मुख्य तेथें ॥ जे नाशी दोषांतें दर्शनमात्रें ॥ २१ ॥

॥ श्लोक ॥ ईक्षयाऽलकनंदाया विधूताशेषकल्मषः ॥ वसानो वल्कलान्यंग व-

न्यभुक् सुखनिस्पृहः ॥ ४२ ॥

॥ टीका ॥ करूनि अलकनंदेचें स्नान ॥करावें विध्युक्त तीर्थविधान ॥ मग तेथें वसावें आपण॥ वसतें लक्ष तें ऐक॥२२॥त्यजूनि 8वस्त्रें आपण॥करावीं वल्कलें परिधान॥Nकरूनि वनफळें भोजन ॥ रहावें Hआपण अनुद्वेग ॥२३॥ आपुली पूर्ण निस्पृहता ॥ दावावी Gलोकसंग्रहार्था ॥ Mनिजसुखें तुज तेथें असतां ॥ द्वंद्वसहिष्णुता दावावी ॥ २४ ॥

॥ श्लोक ॥ तितिक्षुर्द्वंद्वमात्राणां सुशीलः संयतेंद्रियः ॥ शांतः समाहितधिया

ज्ञानविज्ञानसंयुतः ॥ ४३ ॥

---

१ लोकांनीं त्याप्रमाणें आचरण करावें ह्मणून. २ पाहून आचरण करण्यास वळण किंवा लोकांस लावावा. ३ निमित्तानें. ४ साडेतीन. ५ असणारीं. ६मार्गार्था. ७ शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ८ संतोषानें. ९ उष्ण, शीत, सुखदुःख वगैरे द्वंद्व सहन करणें.

*मो. लोकोपकार होईल सत्य. +मो. आचरावें. ×मो. यथार्थ. ※मो. भक्तियुक्त ज्ञान. ०मो. मज उरली नाहीं. *मो. मी निजधामा जातां, यावरी ऐसें ह्मणसी आतां, त्रैलोक्य असे तुझिया माथां, तूं होय वर्तता स्वधर्मकर्मीं. =मो. निजस्थिती जाण, ते तुज म्यां दिधली पूर्ण. 1मो. जाण. 0ना. लोकसंरक्षण यानांव. 7मो. श्लोकीं. 4मो. असती बहु तीर्थें. 8मो. वस्त्र अन्न. Nमो. सेवावे. Hमो. जाण. Gमो. लोकां समस्तां. Mमो. निजसुखीं स्थिती असतां.

※ हा श्लोक पैठणचे प्रतींत आहे.

॥ टीका ॥ तूं ज्ञानविज्ञानसंपन्न ॥ तुज द्वंद्वबाधा न बाधी जाण ॥ तरी द्वंद्वसहिष्णुता पूर्ण ॥ दावावी आपण लोकहितार्था ॥ २५ ॥ तुज नाहीं विषयासक्तता ॥ तरी नेमावें इंद्रियार्था ॥ प्रकट करावी सुशीलता ॥ *निजशांतता दावावी ॥ २६ ॥ निजबुद्धीचें समाधान ॥ सहजें प्रकटवावें आपण ॥ मजपासूनि जें प्राप्त ज्ञान ॥ त्याचें अनुसंधान दावावें ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ मत्तोऽनुशिक्षितं यत्ते विविक्तमनुभावयन् ॥ मय्यावेशितवाक्चित्तो मद्धर्मनिरतो भव ॥

॥ टीका ॥ या स्थितीं तुज असतां जाण ॥ बहुसाल तुज येती शरण ॥ तूं पावलासि माझें ज्ञान ॥ हें सर्वही जन जाणती ॥ २८ ॥ ' पावोनियां ब्रह्मज्ञान ॥ शिष्य उपदेशी आपण॥बोध न करवे परिपूर्ण ॥ हें भेडपण[1] ज्ञात्याचें ' ॥२९॥ एक पावोनि ब्रह्मज्ञान ॥ स्वयें उद्धरला आपण ॥ न करीचि दीनोद्धारण ॥ ते निष्ठाहीन निर्वीर्य ॥ ८३० ॥ शिष्य बोधेंवीण चरफडी ॥ गुरु गुरुत्वें ×बडबडी ॥ घरींच्या घरीं चुकामुकी गाढी ॥हे बोधपरवडी[2] अबद्ध ॥ ३१ ॥ परचित्तप्रबोधकवृत्ती[3]॥हे सामान्य नव्हे स्थिती॥ब्रह्मज्ञानाची पूर्ण +निष्पत्ती[4]॥*या नांव निश्चितीं उद्धवा३२ स्वयें तरोनि जन तारी॥हे ०ज्ञानाची अगाध थोरी॥ते म्यां दीधली तुझ्या करीं॥ 2जन उद्धरी उद्धवा ॥३३॥ शिष्य सुक्षेत्रीं ब्रह्मज्ञान॥ 9ज्याचें नव्हे वर्धमान[5]॥ तंववरी नाहीं पूर्णपण ॥ उद्धवा जाण निश्चित ॥३४॥ जेवीं पिकलिया वृक्षाप्रती ॥ पक्षी ※तुटले स्वयें येती ॥ तेवीं निडारली[6] ब्रह्मस्थिती ॥ तेथ शिष्य पावती =स्वानंद ॥ ३५ ॥ बोलें उपदेशिती ब्रह्मज्ञान ॥ बोध नव्हे तें निर्वीर्य जाण ॥ तें तूं ह्मणसी कांयसेन[7] ॥ ऐक सांगेन उद्धवा ॥३६॥ अनुभवा आलें ब्रह्मज्ञान ॥ तेणें अंगीं ये जाणपण ॥ तेथ संचरे ज्ञानाभिमान ॥ तेणें वीर्य[8] क्षीण ज्ञानाचें ॥ ३७ ॥ जंव जंव 3ज्ञाता निरहंकार ॥ तंव तंव ज्ञानासि वीर्य थोर ॥ 5त्याची होतां कृपामात्र ॥ बोध साचार Pशिष्यासी ॥३८॥ तुज फावलें माझें 6ज्ञान ॥ 7उपदेशी 0शिष्यजन ॥ ते तुज देतील सन्मान ॥ तरी तूं 8ज्ञानाभिमान धरूं नको ॥ ३९ ॥ शिष्य देतील सन्मान ॥ तो ' नेघे ' ह्मणतां, अपक्कपण ॥ घेतां, आला ज्ञानाभिमान ॥ हेंही विघ्न ज्ञात्याशी ॥ ८४० ॥ शिष्य देतील सन्मान ॥ तो अनुद्वेगें घ्यावा आपण ॥ परी न धरावा ज्ञानाभिमान ॥ हें मुख्य लक्षण ज्ञात्याचें ॥ ४१ ॥ तुज माझ्या ज्ञानाची पूर्ण प्राप्ती ॥ तोंचि एकांतीं लोकांतीं ॥ नित्य निरभिमानस्थिती ॥ स्वानंदस्फूर्ती[9] सर्वदा ॥ ४२ ॥ तेचि निरभिमान स्थिती ॥ उपदेशी शिष्यांप्रती ॥ निरभिमानापरती ॥ दशा त्रिजगतीं असेना ॥ ४३ ॥ तोंचि उपदेशलक्षण ॥ वाचेसी माझें नामकीर्तन ॥ शरीरें माझें नित्य भजन ॥ मद्रूपीं Kमननिमग्नता ॥४४॥ ज्ञाता ह्मणतां न धरी श्लाघा ॥ मूर्ख ह्मणतां न यावा राग ॥ स्वयें रहावें अनुद्वेग ॥ हे दशा चांग ज्ञात्याची ॥ ४५ ॥

१ सोदेगिरी, भित्रेपण. २ उपदेशाचा प्रकार. ३दुसऱ्याचें मनावर बोध ठसविणारी वृत्ती. ४परिपक्कता. ५ वृद्धि पावणारें. ६ पूर्णदशेस पावली. ७ कोणत्या कारणानें. ८ शक्ति, बळ. ९ आनंद.

*मो. लोकहितार्थ उद्धवा. ×ना. धडपडी. +मो. उपपत्ती. *मो. जाण निश्चितीं. ०मो ज्ञानीं. 2मो. जगदोद्धारीं. 9मो. ज्याचेनि. ※मो धांवोनि येती. =मो. आनंदें. 3मो. ज्ञानी. 5मो. ऐसियाची. Pना. सच्छिष्यासी. 6ना. ब्रह्मज्ञान. 7मो. उपदेशिसी. 0ना. शिष्य सज्जन. 8मो. तरी तूं न धरी ज्ञानाभिमान, हें विघ्न ज्ञात्यासी. Kना. मन निमग्न सदा.

एवं नित्य निरभिमान ॥ भक्तियुक्त वैराग्य ज्ञान ॥ स्वयें आचरोनि आपण ॥ शिष्यसज्जन उपदेशीं ॥ ४६ ॥ तुज जे शिष्य येती शरण ॥ ते नीच *न ह्मणावे आपण ॥ हें गुरुत्वाचें पूर्णपण ॥ शिष्यही पूर्ण पूर्णत्वें देखें ॥ ४७ ॥ सद्गुरुशीं सर्वभूतीं ॥ सर्वदा ब्रह्मप्रतीती ॥ तेथ शिष्याचिये [1]भूतव्यक्ती ॥ काय ब्रह्मस्थिती पळाली ॥ ४८ ॥ यालागीं +शिष्याचें नीचपण ॥ सर्वथा न देखावें आपण ॥ शिष्य देखावा ब्रह्म पूर्ण ॥ हें मुख्य लक्षण ×गुरुत्वाचें ॥ ४९ ॥ जेवीं तानयालागीं माता ॥ तेवीं शिष्याचिया निजस्वार्था ॥ गुरूसि कळवळा तत्त्वतां ॥ शुद्ध सद्गुरुता या नांव ॥ ८५० ॥ शिष्यलक्षणप्रकार ॥ मागां सांगीतला विचार ॥ तो जेथ देखसी अधिकार ॥ तेथ साचार उपदेशीं ॥ ५१ ॥ तुज जें शिकविलें प्रस्तुत ॥ तें शिष्योपदेश संप्रदायार्थ ॥ तूं ठायींचा गुणातीत ॥ तुज हें समस्त स्पर्शेना ॥ ५२ ॥

॥ श्लोक ॥ अतिव्रज्य गतीस्तिस्रो मामेष्यसि ततः परम् ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ यापरी ज्ञान उपदेशितां ॥ तुझी न मोडे गुणातीतता ॥ ज्यासि उपदेशिसी तत्त्वतां ॥ तेही त्रिगुणावस्था जिंकिती ॥ ५३ ॥ ⁂पूर्वोक्त उपदेशयुक्तीं ॥ जे शिष्य सर्वदा वर्तती ॥ ते त्रिगुणांची त्रिविध वृत्ती ॥ अतिक्रमिती गुरुकृपा ॥ ५४ ॥ त्रिगुणांचें त्रिविधपण ॥ दृश्य द्रष्टा आणि दर्शन ॥ जागृति सुषुप्ति आणि स्वप्न ॥ ज्ञेय ज्ञान पैं ज्ञाता ॥ ५५ ॥ कार्य ०कर्म आणि कर्ता ॥ भोज्य भोजन आणि भोक्ता ॥ शत्रुमित्रउदासीनता ॥ या त्रिगुणावस्था बाधक ॥ ५६ ॥ तेथ येणें उपदेशें जाण ॥ *सच्छिष्य करूनि माझें भजन ॥ त्रिगुणत्रिपुटी निर्दळून ॥ माझें स्वरूप पूर्ण स्वयें होती ॥ ५७ ॥ माझिया ᵟस्वरूपाप्रती ॥ नाहीं ³गुण ना गुणवृत्ती ॥ भक्त [2]सद्भावें गुणातीतीं ॥ सहज पावती Yस्वानंद ॥ ५८ ॥ ऐसा आज्ञापिला उद्धवो ॥ त्याचे अवस्थेचा अभिप्रावो ॥ परीक्षितीप्रती पहाहो ॥ स्वयें शुकदेवो सांगत ॥ ५९ ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुक उवाच ॥ स एवमुक्तो हरिमेधसोद्धवः प्रदक्षिणं तं परिसृत्य पादयोः ॥ शिरो निधायाश्रुकलाभिरार्द्रधीर्न्यषिंचदद्वंद्वपरोऽप्युपक्रमे ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ जो Fनिज मोक्षें नित्य निष्काम ॥ जेणें अनुभविलें परब्रह्म ॥ त्या श्रीशुकासि अतिसंभ्रम ॥ उद्धवाचें प्रेम वर्णावया ॥ ८६० ॥ शुक ह्मणे परीक्षिती ॥ उद्धव आज्ञापिला श्रीपती ॥ त्याच्या प्रेमाची अद्भुत Eस्थिती ॥ ते मी तुजप्रती सांगेन ॥ ६१ ॥ उद्धव जरी झाला गुणातीत ॥ तरी गुरुचरणीं प्रेम अद्भुत ॥ ज्यासि सद्गुरु श्रीकृष्णनाथ ॥ मूर्तिमंत परब्रह्म ॥ ६२ ॥ त्यजूं नशके हरिपदा ॥ हरीचे ठायीं पूर्ण श्रद्धा ॥ यालागीं जाण [4]हरिमेधा ॥ बोलिजे प्रबुद्धा उद्धवातें ॥ ६३ ॥ जो आवडी करी हरीचें ध्यान ॥ त्याचे Jध्यानेंशीं हरि हरी मन ॥ जो विवंची Cश्रीकृष्णसमाधान ॥ त्याचे बुद्धीचें हरण हरि करी ॥ ६४ ॥ जो करी हरिचिंतन ॥ त्याचें

१ जीवपणा. २ मूळचा. ३ अत्यादर. ४ हरीच्याच ठिकाणीं आहे मेधा ह्मणजे बुद्धि ज्याची तो. ५ प्रौढ अशा. ६ हरण करितो.

*ना. न मनावें. +मो. शिष्यासी. ×ना. गुरुत्वा. ⁂मो. पूर्वोक्त उपदेशस्थिती. ०मो. कारण आणि. *मो. सद्भावें करूनि. ᵟमो. स्वरूपाचिये प्राप्ती. ³मो. गुणागुणवृत्ती. Yमो. स्वानंदें. Fमो. निजमोक्ष. Eमो. गति. Jमो. ध्यानें. Cमो. श्रीकृष्णध्यान.

चित्ताचें हरी करी हरण ॥ *जो करी हरीचें स्मरण ॥ त्याचा संसार पूर्ण हरि हरी ॥ ६५॥ ऐशिया हरीच्याठायीं सर्वदा ॥पात्रलियाही +मुक्तिपदा ॥ ×उद्धवाची सप्रेम श्रद्धा ॥ यालागीं हरिमेधा त्यासि ह्मणती ॥ ६६ ॥ जे पावले गुणातीं ॥ त्यांसिही आवडे ज्याची भक्ती ॥ तेणें श्रीकृष्णें उद्धवाप्रती ॥ प्रयाण निश्चितीं नेमिलें ॥ ६७॥ दूरी प्रयाण बदरिकाश्रम ॥ मागुता न भेटे पुरुषोत्तम ॥ तो प्रयाणकाळउपक्रम ॥ जाहला सप्रेम ❀उद्धवासी ॥ ६८ ॥ सर्व सुखदुःखातीत ॥ उद्धव झालासे निश्चित ॥ तोही प्रयाणकाळीं प्रेमयुक्त ॥ प्रदक्षिणा करीत श्रीकृष्णासी ॥६९॥चरणीं मस्तक ठेवितां जाण ॥ आनंदाश्रु लोटले नयन ॥ तेणें श्रीकृष्णाचे चरणक्षाळण ॥ जाहलें संपूर्ण पैदद्वयां ॥ ८७० ॥

॥ श्लोक ॥ सुदुस्त्यजस्नेहावियोगकातरो न शक्नुवंस्तं परिहातुमातुरः ॥ कृच्छ्रं ययौ मूर्धनि भर्तृपादुके बिभ्रन्नमस्कृत्य ययौ पुनःपुनः ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ ०आणिकांचा स्नेह अतिबाधक॥त्यातें सांडवी वेदविवेक॥तैसा कृष्णस्नेह नव्हे देख॥ तो सुखदायक ⁸स्नेहाळू ॥ ७१ ॥ उद्धवासि स्वाभाविक ॥ गुरु परब्रह्म दोनी एक ॥ इतरांसि भावनात्मकें ॥ उद्धवासि देख स्वतःसिद्ध ॥ ७२ ॥ ऐसा श्रीकृष्णस्नेहो अवश्यक ॥ उद्धवासि सुखदायक ॥ त्या श्रीकृष्णासि सांडितां देख ॥ आत्यंतिक विव्हळ ॥ ७३ ॥ निःशेष निमाली *विषयावस्था ॥ जरी दृढ जाहली पतिव्रता ॥ तरी त्यागावा निजभर्ता ॥ हें तिशीं सर्वथा नावडे ॥ ७४ ॥ तेवीं अनुभवूनि परमार्था ॥ उद्धव पावला 2जीवन्मुक्ता ॥ तरी 7सद्गुरु श्रीकृष्ण त्यागितां ॥ अतिविव्हळता गुरुप्रेमें ॥ ७५ ॥ स्नेहें द्वेषें Bसकामसा॥ जे जे वेधले श्रीकृष्णासी ॥ ते ते पावले 9परमानंदासी ॥ त्या श्रीकृष्णासी त्यजी कोण ॥ ७६ ॥

❀॥ संमत श्लोक ॥ दशम स्कंध पूर्वार्ध अध्याय २९ श्लोक ॥ १५ ॥ कामं क्रोधं भयं स्नेहमैक्यं सौहृदमेवच॥नित्यं हरौ विदधतो यांति तन्मयतां हि ते॥१॥

॥ टीका ॥ अविधीं रतलीं श्रीकृष्णासी ॥ ते वंद्य जाहली ब्रह्मादिकांसी ॥ उद्धव विकला गुरुप्रेमासी ॥ केवीं श्रीकृष्णासी त्यजील ॥ ७७ ॥ ⁵ज्यासि परब्रह्मत्वें गुरुभक्ती ॥ त्यासि तृणप्राय जीवन्मुक्ती ॥ जाहलीही मुक्ति उपेक्षिती ॥ विकिले गुरुभक्ती अनन्यत्वें ॥ ७८ ॥ उल्लंघूं नये सद्गुरुवचन ॥ करावें ⁰बदरिकाश्रमीं गमन ॥श्रीकृष्णप्रेमा पढियें पूर्ण॥ तो सर्वथा जाण निर्वाणदी ॥ ७९ ॥ ऐसें ⁶उभयतां अतिसंकट ॥ उद्धवासी वोडवलें दुर्घट ॥ श्रीकृष्णप्रेमें 3उतटे पोट ॥न देखे वाट बदरीची॥८८०॥त्यागोनि जावें जरी कृष्णनाथा॥तरी हा निजधामा

१ बदरिकाश्रमास गमन. २ गहिंवरयुक्त. ३ दोन्ही पायांस. ४ मानल्यामुळें. ५ मिळाली असतांही. ६ दोन्हीं पक्षीं. ७ बदरिकाश्रमाची.

*मो. त्याचिया संसाराचेही हरण, स्वयें जाण हरी करी. +ना. मुक्तपदा. ×ना. उद्धवासी सप्रेम सदा. ❀मो. उद्धव. ०मो. आणिक स्नेह अति बद्धक. 8ना. स्नेहाळुवा. *मो व्यवस्था. 2मो. निजमुक्तता. 7मो. तरी सद्गुरु श्रीकृष्णनाथा, त्यागितां विव्हळता अतिप्रेमें. Bमो. कामेंसी. 9मो. परमपदासी. 5मो. ज्या ब्रह्मभावें गुरुभक्ती. 0ना. बद्रिकाश्रमा मो. बद्रिकाश्रमासी. 3मो. उतटलें.

❀ हा श्लोक पंढरपूरचे प्रतींत आहे.

जाईल आतां ॥ मग मी न देखें मागुता ॥ यालागीं अवस्था अनिवार ॥ ८१ ॥ नवजलद-घनतनू ॥ श्यामराजीवलोचनू ॥ आनंदविग्रही श्रीकृष्णू ॥ *ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ८२ ॥ मुकुटकुंडलें मेखळा ॥ तिलक रेखिला पिंवळा ॥ पदक एकावळी गळां ॥ कंठीं तेजाळा कौस्तुभ ॥ ८३ ॥ वांकीअंदुवांचा गजर ॥ चरणीं गर्जे तोडर ॥ विद्युत्प्राय पीतांबर ॥ तेणें शारंगधर शोभत ॥ ८४ ॥ कासे विराजमान सोनसळा ॥ आपाद रुळे वनमाळा ॥ घवघवीत घनसांवळा ॥ देखतां डोळां ×मन निवे ॥ ८५ ॥ ऐसें श्रीकृष्णदर्शन ॥ पुढती न देखें मी आपण ॥ यालागीं उद्धव जाण ॥ प्रेमें संपूर्ण विव्हळ ॥ ८६ ॥ उद्धव पावला ब्रह्म पूर्ण ॥ त्यासि सगुणाची अवस्था +कोण ॥ तरी श्रीकृष्णप्रभाप्रकाशें चिद्घन ॥ ०आत्मावस्तु पूर्ण श्रीकृष्ण ॥ ८७ ॥ घृत थिजलें कां विघुरलें ॥ परी घृतपणा नाहीं मुकलें ॥ तेवीं ※सगुण Eनिर्गुणत्वें मुसावलें ॥ परब्रह्म Hसंचलें श्रीकृष्ण ॥ ८८ ॥ त्याज्य सगुण, पूज्य निर्गुण ॥ हेही दशा आरती जाण ॥ ज्यासि ब्रह्मरूप तृणपाषाण ॥ त्यासि त्याज्य सगुण कदा न घडे ॥ ८९ ॥ एवं सगुण आणि निर्गुण ॥ उद्धवासि समसमान ॥ गुरुत्वें कृष्णीं प्रेम गहन ॥ तो त्यागितां पूर्ण विव्हळता ॥८९०॥ परी आज्ञा उल्लंघवे Jसर्वथा ॥ ह्मणोनि निघावें Mबदरीतीर्था ॥ तंव श्रीकृष्णासि सांडूनि जातां ॥ Iपरमावस्था उद्धवीं ॥ ९१ ॥ उद्धवें प्रयाण अवसरीं ॥ लोळणी घाली पायांवरी ॥ चरण Dआलिंगी हृदयीं धरी ॥ तरी जावया दूरी धीर नव्हे ॥ ९२ ॥ मज एथोनि गेलिया आतां ॥ मागुती न देखे कृष्णनाथा ॥ तेणें अनिवार अवस्था ॥ पाऊल सर्वथा न घालवे ॥ ९३ ॥ मी निवालों Nकृष्णचरणामृतीं ॥ मज चाड नाहीं महातीर्थीं ॥ Lत्याही माजीं अदृष्टगती ॥ अंतीं श्रीपती त्यागवी ॥ ९४ ॥ सप्रेम चळचळां कांपत ॥ कंठ जाहला सद्गदित ॥ बाष्पें क्षणक्षणा Xस्फुंदत ॥ स्वेदरोमांचित उद्धव ॥९५॥ गमनालागीं अतिउद्यत ॥ पायां लागोनि पर्‍हा जात ॥ सवेंचि येऊनि पायां लागत ॥ विगुंतलें चित्त हरिप्रेमीं ॥ ९६ ॥ पुढती नमन पुढती गमन ॥ पुढती घाली लोटांगण ॥ पुढती वंदी कृष्णचरण ॥ सर्वथा जाण निघवेना॥९७॥देखोनि उद्धवाचा भावो॥परमानंदें तुष्टला देवो॥यासि माझ्याठायीं अतिस्नेहो ॥ Uगुरुत्वें पहा हो अनन्य ॥ ९८ ॥ कृपा उपजली यदुनायका ॥ आपुले चरणींच्या पादुका ॥ उद्धवासि दीधल्या देखा ॥ तेणें निजमस्तका ठेविल्या ॥ ९९ ॥ पादुका ठेवितांचि शिरीं ॥ 'मी जातों कृष्णापासूनि दूरी' ॥ हें नाठवे Zउद्धवाभीतरीं ॥ ऐशियापरी Qप्रबोधिला ॥९००॥ पादुका ठेवितां माथां ॥ स्वयें उपशमे अवस्था ॥ नमस्कारोनि श्रीकृष्णनाथा ॥ होय निघता तदाज्ञा ॥ १ ॥ त्रिवार करोनि प्रदक्षिणा ॥ अवलोकूनि श्रीकृष्णवदना ॥ नमस्कारोनि =श्रीचरणां ॥ उद्धव 0कृष्णाज्ञा निघाला ॥ २ ॥ तृतीयस्कंधींचें निरूपण ॥ उद्धवासि विदुर-

१ उदकानें भरलेल्या नूतन मेघांप्रमाणें श्याम तनू ज्याची. २ कमलनेत्र. ३ प्रेम. ४ अलीकडली. ५ दैवगती. ६ दूर घालवी. ७ तयार. ८ पलीकडे. ९ उपदेशिला. १० उत्कंठा. ११ श्रीकृष्णाच्या आज्ञेनें.

*मो. सबाह्य परिपूर्ण पूर्णत्वें. ×ना. जीव. +ना. पूर्ण. ०मो. आत्मा वस्तुत्वें पूर्ण श्रीकृष्ण. ※मो. निर्गुण सगुणत्वें संचलें. Eना. निर्गुणत्व. Hमो. झालें. Jमो. तत्त्वतां. Mना. बदरीपंथा. Iमो. परमअवस्था उद्धवासी. Dमो. आलिंगूनि. Nमो. श्रीकृष्णचरणतीर्थीं. Lना. त्याही मज. Xमो. दाटत. Uना. गुरुत्व. Zमो. उद्धवाअंतरीं. Qना. प्रबोधी. =ना. श्रीकृष्णचरणां. 0मो. जाण निघाला.

दर्शन ॥ दोघां पडिलें आलिंगन ॥ कुशल संपूर्ण पुशिलें ॥ ३ ॥ तेथ सांगतां *कृष्णनिधन ॥ उद्धव नव्हेचि दीनवदन ॥ तें विदुरासि कळलें चिह्न ॥ हा +ब्रह्मज्ञान पावला ॥ ४ ॥ ' मरता गुरु रडता चेला ॥ दोहींचा बोध वायां गेला ॥ साच मानी जो या बोला ॥ तोही ठकला निश्चित ' ॥ ५ ॥ यासि तुष्टली श्रीकृष्णकृपामूर्ती ॥ निमाली मोहममतावृत्ती ॥ पावला परमानंदप्राप्ती ॥ स्वानंदस्थितीं झुलत ॥ ६ ॥ शब्दा नातळोनि बोल बोले ॥ ×पृथ्वी नातळोनि सहजें चाले ॥ असोनि नामरूपमेळें ॥ नामरूपा नातळे हा एक ॥ ७ ॥ हा रसनेवीण रस चाखे ॥ डोळयांवीण ※आपणपें देखे ॥ इंद्रियांवीण सोलींव सुखें ॥ निजात्मतोखें हा भोगी ॥ ८ ॥ निर्विकल्पनिजबोधेंसी ॥ ०त्यावरी भक्तिज्ञानवैराग्यासी ॥ स्थिति देखोनि उद्धवापाशीं ॥ विदुर मानसीं निवाला ॥ ९ ॥ मग तो [1]विनवी उद्धवाशी ॥ तुज तुष्टला हृषीकेशी ॥ तूं पावलासि ब्रह्मज्ञानासी ॥ तें मज उपदेशी सभाग्या ॥९१०॥ उद्धव ह्मणे तुझें भाग्य धन्य ॥ तुज अंतीं स्मरला Aश्रीकृष्ण ॥ तुज सांगावया ब्रह्मज्ञान ॥ मैत्रेयासि पूर्ण आज्ञापिलें ॥११॥ कृष्ण मज जरी आज्ञा देता ॥ तरी मी तत्काळ बोध करितों तत्त्वतां ॥ तुज सद्गुरु परमार्था॥ जाण सर्वथा मैत्रेय ॥ १२ ॥ ऐकोनि उद्धवाचें वचन ॥ विदुर प्रेमें गहिंवरला पूर्ण ॥ काय बोलिला आपण ॥ सावधान अवधारा ॥ १३ ॥ हें तृतीयस्कंधींचें निरूपण ॥ प्रसंगें एथें आलें जाण ॥ विदुर बोलिला अतिगहन ॥ तेंचि वचन अवधारा ॥ १४ ॥

॥संमत श्लोक ॥ क्वाहं कीटकवत्तुच्छः क्व च कारुण्यवारिधिः ॥तेनाहं स्मारितोऽस्म्यद्य मुमूर्षुः केशवं यथा ॥ १ ॥

॥ टीका ॥ विदुर ह्मणे मी रंक ॥ रंकाहूनि अतिरंक ॥ त्या मज [2]स्मरे यदुनायक ॥ 6कृपा अलोलिक दासांची ॥१५॥ नाठवीच देवकी वसुदेवासी ॥ नाठवी बळिभद्रादिपांडवांसी ॥ तो आठवी मज दासीपुत्रासी ॥हृषीकेशी कृपाळू ॥१६॥ जेवीं Eमरता स्मरिजे नारायण॥ Nतेवीं अंतीं मज स्मरला श्रीकृष्ण ॥ यापरी भक्तकृपाळू जाण ॥ कृपासिंधु पूर्ण श्रीकृष्ण ॥ १७ ॥ आशंका ॥ द्वारकेसि असतां श्रीकृष्ण ॥ तेंचि उद्धवें केलें गमन ॥ त्यासि प्रभासींचें कृष्णनिधन ॥ ह्मणाल संपूर्ण अदृष्ट ॥ १८ ॥ तरी उद्धवविदुरसंवाद खुण ॥ येचि अर्थींचें निरूपण ॥ समूळ सांगेन कथन ॥ तें सावधान अवधारा ॥ १९ ॥ उद्धव जातां मार्गीं आपण ॥ अवचितीं जाहली आठवण ॥ न पाहतां *कृष्णनिधन ॥ मी कां गमन करितों हें ॥ ९२० ॥ श्रीकृष्णचरित्र अति गोड ॥ तें सांडूनि मज तीर्थीं काय चाड ॥ ऐसा विचार करूनि दृढ ॥ 5श्रद्धेनें प्रौढ श्रद्धाळू ॥ २१ ॥ परतोनि श्रीकृष्णापाशीं जातां ॥ तो मज राहोंनेदी सर्वथा ॥ 3कृष्णामागें कळों नेदितां ॥ आला [8]गुप्तता प्रभासेसी ॥ २२ ॥ तेथेंही राहोनियां गुप्त ॥ पाहों लागला कृष्णचरित ॥ तंव यादवकुळाचा घात ॥ देखिला समस्त उद्धवें ॥ २३ ॥ कुळ निर्दळ-

---

१ नाहींशी झाली. २ न पाहिलेलें. ३ प्रभासनांवाच्या क्षेत्रास.

*मो. श्रीकृष्णनिर्याण. +मो. ब्रह्मसंपन्न स्वयें झाला. ×मो. पृथ्वीसि नातळोनिया चाले. ※मो. आपणा देखे. ०मो. भक्ति वैराग्य ज्ञानासी. 1मो. ह्मणे. Aमो. नारायण. 0मो. स्मरला. 6मो. कृपा पूर्ण दासांवरी. Eमो. अंतीं स्मरिजे. Nमो. तेवीं मज स्मरला. *मो. कृष्णनिर्याण. 5मो. श्रद्धाप्रौढ. 3मो. श्रीकृष्णासी. 8मो. मागुता.

नि एकला ॥ कृष्ण अश्वत्थातळीं बैसला ॥ तेथ जराव्याधें बाण विंधिला ॥ चरणीं लागला मृगशंका ॥ २४ ॥ चरणीं लागतांचि घावो ॥ थोरसुखें सुखावला देवो ॥ कृतकार्य जाहलें निःसंदेहो ॥ निजधामा पहाहो जावया ॥ २५ ॥ बाण लागतां भलतेयांसी ॥ घायें होती कासाविशी ॥ ते दशा नाहीं श्रीकृष्णासी ॥ देहत्व त्यासी अतिमिथ्या ॥ २६ ॥ जैसीं घाय लागतां छायेसी ॥ पुरुष नव्हे कासाविसी ॥ तेवीं व्याधें विंधितां बाणेंसी ॥ ग्लानी कृष्णासी असेना ॥ २७ ॥ ते संधीं मैत्रेय आला ॥ त्यासि ज्ञानोपदेश केला ॥ ते काळीं विदुर आठवला ॥ कृपा कळवळला श्रीकृष्ण ॥ २८ ॥ आजि विदुर एथें असता ॥ तरी मी ब्रह्मज्ञान उपदेशितों सर्वथा ॥ मैत्रेया तुज सांगतों आतां ॥ त्यासि तूं तत्वतां उपदेशीं ॥ २९ ॥ पावोनि कृष्णगुह्यज्ञान ॥ मैत्रेयासि परम समाधान ॥ तो ह्मणे कलियुग धन्यधन्य ॥ ब्रह्मवादी जन बहुसाल होती ॥ ८३० ॥

॥ श्लोक ॥ सर्वे ब्रह्म वदिष्यंति संप्राप्ते च कलौ युगे ॥ नैव तिष्ठंति मैत्रेय शिश्नोदरपरायणाः ॥ २ ॥

॥ टीका ॥ वादकत्वें कलियुगाप्रती ॥ बहुसाल ब्रह्मवादी होती ॥ परी न राहती ब्रह्मस्थितीं ॥ जाण निश्चितीं मैत्रेया ॥ ३१ ॥ वदूनियां ब्रह्मज्ञान ॥ होती शिश्नोदरपरायण ॥ जिह्वा शिश्न जो आवरी संपूर्ण ॥ त्यासीच ब्रह्मज्ञान कलियुगीं ॥ ३२ ॥ ऐकोनि मैत्रेयासंवादासी ॥ उद्धव आला श्रीकृष्णापाशीं ॥ प्रदक्षिणा करूनि त्यासी ॥ मग पायांसी लागला ॥ ३३ ॥ ऐकून मैत्रेयाचें ज्ञान॥देखोनि कृष्णाचें निर्याण॥उद्धव निघाला आपण ॥तें ऐक लक्षण परीक्षिती ॥३४॥

॥ श्लोक ॥ ततस्तमंतर्हृदि संनिवेश्य गतो महाभागवतो विशालाम् ॥ यथोपदिष्टां जगदेकबंधुना ततः समास्थाय हरेरगाद्गतिम् ॥ ४७ ॥

॥ टीका ॥ जगाचें विश्रामधाम ॥ जो पुरुषांमाजीं पुरुषोत्तम ॥ तो हृदयीं धरोनि आत्माराम॥ उद्धव सप्रेम निघाला ॥ ३५ ॥ कृष्णाची *पूर्ण कृष्णस्थिती ॥ हृदयीं धरोनि सुनिश्चितीं ॥ उद्धव विशालतीर्थाप्रती ॥ स्वानंदस्थितीं निघाला ॥ ३६ ॥ उद्धव स्वानंदस्थिती पूर्ण ॥ जेथें जेथें करी गमन ॥ ते ते लोक होती पावन ॥ भक्तिज्ञानवैराग्यें ॥ ३७ ॥ जैसजैसी विवेक विरक्ती ॥ तैसतैशी बोधकशक्ती ॥ उपदेशित ज्ञानभक्ती ॥ चालिला त्रिजगती उद्धरित ॥ ३८ ॥ ज्यांसी उद्धवासी जाहली भेटी ॥ त्यांसि हरिभजनीं पडे मिठी ॥ भवभय पळोनि दृष्टी ॥ बोधकजगजेठी उद्धव ॥ ३९ ॥ जेजे भगवद्भक्ति करित ॥ तेते भागवत ×ह्मणिपत ॥ मुक्तीहीवरी भजनयुक्त ॥ महाभागवत उद्धव ॥ ८४० ॥ उद्धवें आदरिली जे भक्ती ॥ तिची किंकर +नित्य मुक्ती ॥ यालागीं महाभागवतस्थिती ॥ बोलिजे निश्चितीं उद्धवासी ॥ ४१ ॥ निजशांतता अति निर्मळ ॥ ✠आत्मानुभवें अति प्रांजळ ॥ मोक्षाहीवरी भजनशीळ ॥ भक्त विशाळ उद्धव ॥ ४२ ॥ ऐशी उध्धवाची विशाळता ॥ तोही पावला विशालतीर्था ॥ विशाल ह्मणावयाची कथा ॥ ऐक आतां सांगेन ॥ ४३ ॥ जेथ श्रद्धामात्रें ०चित्तशुद्धी ॥ श्रवणमात्रें निर्विकल्प

१ जरा नामक व्याध. २ 'मृग' या शंकेनें. ३ दुःख, इजा. ४ ब्रह्मवादी.

***मो. पूर्ण स्थिति. ×मो. ह्मणिजेत. +मो. निजमुक्ती. ✠मो. निजात्मभाव अति प्रबळ. ०मो. अतिशुद्धी.**

बुद्धी ॥ नारायणनामें मोक्षसिद्धी ॥ विशाल *या विधीं बदरिकाश्रम ॥४४॥ जेथ ×जनहिता नारायण ॥ अद्यापि करितो अनुष्ठान ॥ +मोक्षमार्गींची कृपा पूर्ण ॥ यापरी विशाळपण बदरिकाश्रमातें ॥ ४५ ॥ जेथ ०अल्प तप फळें प्रबळ ॥ अल्पध्यानें आकळे सकळ ॥ ॐअल्पविरक्ती मोक्ष फळ ॥ ऐसा फळोनि विशाळ बदरिकाश्रम ॥ ४६ ॥ जो अंतर्यामी गोविंदु ॥ जो जगाचा सुहृद बंधू ॥ जो आत्माराम प्रसिध्दू ॥ ज्याचा निजबोधू उद्धवासी ॥ ४७ ॥ जैसा श्रीकृष्णें केला उपदेश ॥ तैसा बदरिकाश्रमीं रहिवास ॥उद्धवें केला *निजवास ॥ तोचि जनांसि विश्वास [3]परमार्थनिष्ठे ॥ ४८ ॥ जैसी उद्धवाची स्थिति गती ॥ तैशी उध्यवाची [6]ज्ञानशक्ती ॥ जैशी उद्धवाची विरक्ती ॥ [4]तोचि जनाप्रती उपदेश ॥४९॥ जेथ गुरूसि विषयासक्ती॥ तेथें शिष्यासि कैंची विरक्ती ॥ जेथ गुरूसि अधर्मप्रवृत्ती ॥ तेथ शिष्यासि निवृत्ती कदा न घडे ॥९५०॥ यालागीं उध्यवाचें आचरित ॥तेंचि आचरती जन समस्त ॥एवं परोपकारार्थ॥ उद्धव [2]विरक्त बदरिकाश्रमीं ॥ ५१ ॥ जैसें शिकवूनि गेला श्रीकृष्णनाथ ॥ तैसेंचि उद्धव आचरत ॥ त्याचेनि धर्मे जन समस्त ॥ जाहले विरक्त परमार्थीं ॥ ५२ ॥ परब्रह्माची [T]ब्रह्मप्राप्ती ॥ दृढ करूनि गेला श्रीपती ॥ तेचि उद्धवासि ब्रह्मस्थिति ॥ अहोरातीं अखंड ॥ ५३ ॥ बैसतां घालूनि आसन ॥ कां करितां गमनागमन ॥ उद्धवाचें ब्रह्मपण ॥ सर्वथा जाण मोडेना ॥५४॥विरक्ती आणि भोगासक्ती॥दोनी देहावरी दिसती॥या दोहींहूनि परती॥ब्रह्मस्थिती उद्धवीं ॥ ५५ ॥ [S]विरक्तामाजीं नव्हे विरक्त ॥ [F]भोगीं नव्हे भोगासक्त ॥ या दोहींहून अतीत ॥ ब्रह्म सदोदित उद्धव ॥ ५६ ॥ [E]जेथ प्रारब्धक्षय जाण॥ त्या देहासी येतां मरण ॥ उद्धव ब्रह्मीं ब्रह्म पूर्ण ॥ जन्ममरण तो नेणे ॥ ५७ ॥ देहींचा देहात्मभावो ॥ निर्दळूनि निःसंदेहो॥ उद्धवासि ब्रह्मानुभवो ॥ श्रीकृष्ण पहाहो दृढ केला ॥ ५८ ॥ ऐशिया उद्धवासि देहांतीं ॥ विदेहकैवल्याची प्राप्ती ॥ [V]ह्मणणें हें परीक्षिती ॥ दृढ भ्रांती वक्त्याची ॥५९॥ घडितां मोडितां कांकण ॥ घडमोडी नेणे सुवर्ण ॥ तेवीं [L]देहासिच जन्ममरण ॥ [Z]उद्धव परिपूर्ण परब्रह्म ॥९६०॥ उद्धवासि देहीं वर्ततां ॥ तो नित्यमुक्त विदेहता ॥ त्यासि देहांतीं विदेहकैवल्यता ॥ हे समूळ वार्ता लौकिक ॥६१॥ देह राहो अथवा जावो ॥ हा ज्ञात्यासि नाहीं संदेहो ॥ त्यासि [X]निजात्मता ब्रह्मभावो ॥ अखंड पहाहो अनुस्यूत ॥ ६२ ॥ देहासि दैव वर्तवी जाण ॥ देहासि दैव आणि मरण ॥ ज्ञाता ब्रह्मीं [G]ब्रह्म पूर्ण ॥ जन्ममरण तो नेणे ॥६३ ॥ देह असो किंवा जावो आह्मी परब्रह्मचि आहों ॥ दोरी सापपण जावो ॥ दोरचि पहाहो जेवीं होय ॥ ६४ ॥ जेथ मृगजळ आटलें ॥ तेथें ह्मणावें कोरडें जाहलें ॥ जेव्हां होतें पूर्ण भरलें ॥ तेव्हांही ओलें असेना ॥६५॥ तेवीं देहाची वर्तती स्थिती ॥ समूळ मिथ्या प्रतीती ॥ [N]त्या देहाचे देहांतीं॥ विदेहकैवल्यप्राप्ती नवी नघडे ॥ ६६ ॥ यापरी बदरिकाश्रमाप्रती ॥ उद्धवें बहुकाळ करूनि

---

१ पलीकडे. २ विदेहनांवाची मुक्ति. ३ एकसारखा सतत. ४ अमृतानुभव प्रकरण ६ ओंवी ३४ पहा.

*मो. बुद्धी. ×मो. जनहितार्थ. +मो. मोक्षमार्गीं. ०मो. अल्पतपें फळ प्रबळ. ॐमो. विरक्ती मोक्ष केवळ. *मो. सावकाश. [3]मो. परमार्थनिष्ठा. [6]ना. ज्ञानभक्ती. [4]ना. तैसाचि. [2]मो. विचरत. [T]मो. निजप्राप्ती. [S]मो. विरक्तीं. [F]मो. भोगितां भोग नव्हे. [E]मो. देहप्रारब्धक्षयें जाण. [V]मो. ऐसेंही ह्मणणें. [L]मो. देहासि येतां. [Z]ना. उद्धवपण पूर्ण परब्रह्मीं. [X]मो. निजात्मानुभवो. [G]मो. परिपूर्ण. [N]मो. ते देहाचे अंतीं

वस्ती ॥ त्याचि निजदेहाचे अंतीं ॥ भगवद्गति पावला ॥ ६७ ॥ पावला हेही वदंतो ॥ *लौकिक जाण परीक्षिती ॥ तो परब्रह्माचि आथंतीं ॥ सहजस्थिती पावला ॥ ६८ ॥ उद्धवाची भगवद्भक्ती ॥ आणि निदानींचि निजस्थिती ॥ ×तेणें शुक सुखावला चित्तीं ॥ कृष्णकृपा निश्चितीं +वर्णित ॥ ६९ ॥

॥ श्लोक ॥ य एतदानंदसमुद्रसंभृतं ज्ञानामृतं भागवताय भाषितम् ॥ कृष्णेन योगेश्वरसेविताङ्घ्रिणा सच्छ्रद्धयाऽऽसेव्य जगद्विमुच्यते ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ जे योगेश्वर योगस्थिती ॥ जे पावले जीवन्मुक्ती ॥ तेही कृष्णचरण सेविती ॥ ऐशी पूज्य मूर्ती श्रीकृष्णाची ॥१७०॥ पदीं रंगले सनकादिक ॥ संत सज्जन अनेक ॥ ब्रह्मादिक तेथें रंक ॥ ऐसा श्रेष्ठ देव श्रीकृष्ण ॥ ७१ ॥ तेणें श्रीकृष्णें स्वानंदस्थिती ॥ प्रकट केली निजभक्ती ॥ अतिकृपा उद्धवाप्रती ॥ स्वमुखें श्रीपती बोलिला ॥७२॥भगवद्भक्ति महासागर॥ तेथें ÷निजधैर्य तोचि [१]मंदर ॥ गुरुशिष्ययुक्ति सुरासुर ॥ [२]मथनेंतत्पर साटोपें ॥ ७३ ॥ भाव विश्वास दोनी मांजरीं ॥ बोध रविदोर [३]दृढ धरी ॥ [४]प्रत्यगावृत्ति अभ्यासेंकरीं ॥ मंथन निर्धारीं मांडिलें ॥ ७४ ॥ तेथ मथनीं प्रथमदृष्टीं ॥ अहं ज्ञाता हें [५]हालाहल उठी ॥ तें [६]विवेकशिवें धरिलें कंठीं ॥ पुढती अहं नुठी गिळिलें तैसें ॥ ७५ ॥ ०निरभिमान मथूनि मथित ॥ काढिलें भक्तिसारामृत ॥ तें उद्धवालागीं श्रीकृष्णनाथ ॥ कृपेनें निश्चित अर्पिलें ॥ ७६ ॥ धर्म अर्थ काम मुक्ती ॥ चहूं पुरुषार्थांहीवरती ॥ श्रीकृष्णें सारामृत निजभक्ती ॥ उद्धवाहातीं अर्पिली ॥७७॥ निजबोधाचें पात्र जाण ॥ निजानुभवें [७]आसांऊन ॥ तेथें हें सारामृत भरोन ॥ करविलें प्राशन उद्धवासी ॥७८॥ तेणें उद्धव निवाला ॥ त्रिविधतापें सांडवला ॥ Kपरम सुखें सुखावला ॥ परब्रह्मीं जडला ब्रह्मत्वें ॥ ७९ ॥ भक्तिसारामृतप्राशन ॥ उद्धवें करोनियां जाण॥ पावला परम समाधान ॥ Cऐसा कृपाळु श्रीकृष्ण निजभक्तां ॥१८०॥ श्रीकृष्णउद्धवसंवाद पूर्ण ॥ भक्तिसारामृत गुह्यज्ञान ॥ याचें जो करी सेवन ॥ श्रवणमननानिजध्यासें ॥८१॥ ऐसें जो करी Lकथासेवन ॥ Wत्याभेणें पळे भवबंधन ॥ स्वप्नीं न देखे जन्ममरण ॥ हाही नव्हे जाण नवलावो ॥ ८२ ॥ जे Pलागोनि त्याचे संगतीं ॥ [८]दृढावले ये कथेचे भक्तीं ॥ त्यांसि भवभयाची प्राप्ती ॥ न बाधी कल्पांतीं गुरुरांया ॥ ८३ ॥ ज्यासि या कथेची श्रद्धा पूर्ण ॥ ज्यासि या कथेचें अनुसंधान ॥ ज्यासि ये कथेचें अनुष्ठान ॥ तो उद्धरी जाण जगातें ॥ ८४ ॥ जो सूर्याचे घरीं राहिला ॥ त्यासि रात्रीचा [९]यांवा ठेला ॥ मा जो Mत्याचे गांवीं वसला ॥ तोही मुकला [१०]रात्री-

१ समुद्रमथनकालीं मंथास्थानीं योजिलेला पर्वत. २ मंथन करण्यास तत्पर. ३ रवि अडकविण्यास खांबास बांधलेल्या दोन दोऱ्यांचे फास, या फासामुळें रवि मागें पुढें होत नाहीं, तर सरळ राहते. ४ स्वरूपाकार वृत्ति. ५ 'मी ज्ञाता' हा अभिमान हेंच विष. ६विवेकरूपी शिवानें. ७ठेऊन,आशा करून. ८हे परीक्षिते. ९ ध्यास. १०उदय संपला.

*मो. लौकीक रक्षूनि परीक्षिती. ×मो. तेणें सुखें सुखावे चित्तीं. +मो. पावला. ÷मो. निजधैर्याचा मंदर. ०ना. निरभिमानाचें मथनीं माथेत. Kमो. परब्रह्मीं जडला, पूर्ण झाला पूर्णत्वें. Cमो. ऐसा कृष्ण कृपाळु पूर्ण निजभक्तां. Lमो. श्रवण. Wमो. त्या भयें. Pमो. लागले. Mमो. तेथि गांवीं राहिला.

सी ॥८५॥ सूर्यासि रात्री नाहीं ॥ ना दिवस उगवे कहीं ॥ तेवीं स्वरूपाच्या ठायीं ॥ बंधमोक्ष पाहीं अतिमिथ्या ॥ ८६ ॥ तेवीं ये कथेचें अनुसंधान ॥ न घडोनि ज्यासि घडे श्रवण ॥ त्यासिही भवबंधन ॥ सर्वथा जाण बाधीना ॥ ८७ ॥ असो न घडे कथाश्रवण ॥ जो हें आवडीं करी पठण ॥ त्याच्या दुःखदोषाचें अति दहन ॥ श्लोकश्लोकीं जाण *होतसे ॥ ८८ ॥ नव्हे श्रवणपठणआटाआटी ॥ तरी ये ग्रंथींच्या निरूपणगोष्टी ॥ जेणें बांधल्या जीवाच्या गांठीं ॥ तो वंद्य सृष्टी +सुरनरां ॥ ८९ ॥ ये कथेची ज्यासि प्रीती ॥ ये कथेची ज्यासि भक्ती ॥ त्याची ×आवडे ज्यासी संगती ॥ त्यातें वंदिती यम काळ ॥९९०॥ ये ०कथेची श्रद्धा संपूर्ण ॥ येचि कथेचें मुख्य सेवन ॥ जो श्रद्धेनें करी श्रवणमनन ॥ त्यापासूनि श्रीकृष्ण परता नव्हे ॥ ९१ ॥ भाळ्याभोळ्या ऐकतां गोष्टी ॥ ज्यासि ये कथेची श्रद्धा उठी ॥ कृष्ण प्रकटोनि त्याच्या पोटीं ॥ छेदी उठाउठी भवपाश ॥ ९२ ॥ यापरी श्रद्धाळुवां जाण ॥ कृपाळु स्वामी श्रीकृष्ण ॥ *यालागीं श्रीशुक आपण ॥ करी नमन अतिश्रद्धा ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ भवभयमपहंतुं ज्ञानविज्ञानसारं निगमकृदुपजह्रे भृंगवद्वेदसारम् ॥ अमृतमुदधितश्चापाययद्भृत्यवर्गान्पुरुषमृषभमाद्यं कृष्णसंज्ञं नतोऽस्मि ॥ ४९ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे श्रीकृष्णोद्धवसंवादे एकोनत्रिंशो अध्यायः ॥ २९ ॥

॥ टीका ॥ संसारभयें अति ⁑त्रासले ॥ जे श्रीकृष्णासि शरण आले ॥ त्यांचें भवभय हरावया वहिलें ॥ 7जेणें मथन केलें वेदार्था ॥ ९४ ॥ मथूनि उपनिषद्द्वार ॥ काढिलें ज्ञानविज्ञानसार ॥ ज्यालागीं शिणतां ज्ञातेनर ॥ Gतयांसि पैल मेर ४ठाकेना ॥ ९५ ॥ म्हणसी निगम मथितां ॥ Rवेदासि जाहली परम व्यथा ॥ कृष्ण Gवेदांचा आदिकर्ता ॥ तो दुःख सर्वदा होंनेदी ॥९६॥ स्वयें वांसरूं गाय दुहितां ॥ बाहलों नलगे सर्वथा ॥ तेवीं श्रीकृष्णें वेद मथितां ॥ वेदासि व्यथा बाधीना ॥ ९७ ॥ जो सर्वज्ञ हृषीकेश ॥ Qवेदार्थसारराजहंस ॥ तेणें नेदितां दुःखलेश ॥ Cवेदसारांश काढिला ॥ ९८ ॥ Hएवं वेदार्थ निजमथित ॥ ज्ञानविज्ञानसारामृत ॥ कृष्णें काढूनि इत्थंभूत ॥ भृत्यहितार्थ Wकृपा अर्पी ॥ ९९ ॥ जेवीं हळुवारपणें षट्पद ॥ काढी सुमनमकरंद ॥ तेवीं मथूनियां वेद ॥ श्रीकृष्णें सार शुद्ध काढिलें ॥१०००॥ यापरी श्रीकृष्णनाथ ॥ भक्तकृपाळु Vकृपावंत ॥ काढूनि वेदसारामृत ॥ निजभृत्यां देत निर्भय ॥ १ ॥ ऐसें वेदसारामृत पूर्ण ॥ भृत्यासि पाजूनि श्रीकृष्ण ॥ निजभक्तांचें जन्ममरण ॥ निर्दळी संपूर्ण भवभय ॥ २ ॥ जगाचें माया मुख्य कारण ॥ कृष्ण Kमायेचेंही निजकारण ॥ जें स्वरूप सच्चिदानं-

१ खटपट, श्रम. २ दूर, विमुख. ३ सत्वर. ४ पलीकडचा कांठ, तीर. ५ पायदोर. ६ भक्तकल्याणाकरितां. ७ धक्का न लावतां. ८ भ्रमर. ९ फुलांतील मध.

*मो. होईल +मो. सुरवरां. ×मो. घडे आवडे. ०मो. ज्यासी श्रद्धा पूर्ण. *मो. यालागीं स्वयें आपण, करावें श्रवणमनन अतिश्रद्धा. ⁑मो. अतिश्रांतले. 7मो. मथन केलें वेदार्थाचें. Gना. ज्यासी. 4ना. मो. टाकेना. Rमो. देवासी. Gना. वेदांताचा. Qमो. वेदांतसार राजहंस Cमो. वेदांतसारांश. Hमो. एवं वेदांतापासूनि सुनिश्चित. Wमो. उद्धवासि अर्पी. Vमो. निश्चित. Kना. मायेचें निजस्थान.

दघन ॥ त्यासि संज्ञा श्रीकृष्णनामाची ॥ ३ ॥ घेऊनि माया मनुष्यनट ॥ पुरुषांमाजीं पुरुष-श्रेष्ठ ॥ पूर्ण ज्ञानें *ज्ञानघननिष्ठ ॥ वंद्य +वरिष्ठ श्रीकृष्ण ॥ ४ ॥ त्यासि काया वाचा आणि मन ॥ सर्वार्थी अनन्यशरण ॥ यापरी श्रीशुक आपण ॥ करी नमन श्रीकृष्णा ॥ ५ ॥ ऐसें शुकें केलें नमन ॥ तेणें ×परीक्षिती सप्रेम पूर्ण ॥ भक्तकृपाळु ०एक श्रीकृष्ण ॥ दुसरा जाण असेना ॥ ६ ॥ उद्धव पावला ⅏परम निर्वाणें ॥ सरलें ज्ञानकथानिरूपण ॥ जगीं श्रेष्ठ भगवद्भजन ॥ δभक्ताआधीन श्रीकृष्ण ॥ ७ ॥ जें जें भक्तांचें मनोगत ॥ तें तें पुरवी श्रीकृष्णनाथ ॥ शेखीं ᵍनिजपदही देत ॥ कृपा ¹समर्थ भक्तांची ॥ ८ ॥ निजधामा निघतां श्रीकृष्ण ॥ जरी उद्धव न करिता प्रश्न ॥ तरी हें परमामृतकथन ॥ सर्वथा श्रीकृष्ण Bन बोलता ॥ ९ ॥ यालागीं उद्धवाचा Yमहा थोर ॥ Oजगासि जाहला उपकार ॥ भक्तिज्ञानवैराग्यसार ॥ Dज्याचेनि सारंगधर स्वयें वदला ॥१०१०॥ उद्धवाचेनि धर्में जाण ॥ भवाब्धि तरे त्रिभुवन ॥ ऐसें बोलविलें गुह्यज्ञान ॥ तद्युक्त सप्रेम भजन ॥ ११ ॥ उपेक्षूनि चारी मुक्ती ॥ उद्धवें थोराविली हरिभक्ती ॥ Uएवढी उद्धवें केली ख्याती ॥ त्रिजगतीं तरावया ॥ १२ ॥ एकादशाचेनि नांवें ॥ घातली भक्तिमुक्तींची पव्हे ॥ एवढी कीर्ति केली उद्धवें ॥ जडजीव तरावया ॥ १३ ॥ धेनूच्या ठायीं क्षीर पूर्ण ॥ परी हातां नये वत्सेंवीण ॥ तेवीं श्रीकृष्णाचें पूर्ण ज्ञान ॥ Zउद्धवें जाण प्रकट केलें ॥१४॥ कृष्णउद्धवसंवादकथन ॥ तें अतिशयें ज्ञानगहन ॥ तेथ मी Xअपुरतें दीन ॥ केवीं व्याख्यान करवेल ॥१५॥ Wकृष्णउद्धवज्ञानगहन ॥ त्याचें करावया व्याख्यान ॥ साह्य जाहला श्रीजनार्दन ॥ जो सर्वीं सर्वज्ञ सर्वार्थी ॥ १६ ॥ पदपदार्थ संगती ॥ Jज्ञानाची परिपाकस्थिती ॥ Mवैराग्ययुक्त भक्तिमुक्ती ॥ हेही व्युत्पत्ती मी नेणें ॥१७॥ माझें जें कां मीपण ॥ तेंही जाहला जनार्दन ॥ तेव्हां पदपदार्थव्याख्यान ॥ कर्ता जाण तो एक ॥ १८ ॥ तो Pएक एकपणाचेनि नांवें ॥ ऐक्यता Aफावली स्वभावें ॥ एका जनार्दन येणें नांवें ॥ हा ग्रंथ Tदेवें विस्तारिला ॥ १९ ॥ Vमाझे बुद्धीचीही बुद्धी ॥ जनार्दन जाहला अर्थावबोधीं ॥ कवित्वयुक्ती पदबंधीं ॥ वदता विशुद्धीं जनार्दन ॥ १०२० ॥ माझें नाम रूप कर्म गुण ॥ मुळीं पाहतां मिथ्या जाण ॥ परी तेही जाहला जनार्दन ॥ ऐसें एकपण Kपदियेलें ॥ २१ ॥ नांवें भावें एकपण ॥ यालागीं तुष्टला जनार्दन ॥ तेणें माझ्या नांवाऐसें जाण ॥ जगीं एकपण प्रकाशिलें ॥ २२ ॥ एका या नामाचें कौतुक ॥ पढये जनार्दनासि आत्यंतिक ॥ तेणें तो मजशीं जाहला एक ॥ मी तूं देख Iम्हणतांही ॥ २३ ॥ एका या नांवाचें कौतुक ॥ जनार्दनासि

---

१ कैवल्य. २ थोर केली. ३ त्रैलोक्य. ४ पाणपोई. ५ अर्थ जाणण्याविषयीं.

*मो. ज्ञानवरिष्ठ. +मो. वैकुंठ. ×ना. परिक्षितीसि प्रेम पूर्ण. ०मो. श्रीकृष्णासमान. ⅏मो. परमपद निर्वाण. δमो. भक्तिअधीन. ᵍना. निजपदवी. ¹मो. अत्यंत. Bमो. कां बोलतां. Yमो. थोर. Oना. जनासि. Dमो. ज्यासी. Uमो. येवढी थोर केली ख्याती. Zमो. उद्धवालागुनी. Xना. अपुरें. Wमो. कृष्णउद्धव ज्ञानकथन. Jमो. ज्ञानविज्ञानाची. Mना. वैराग्ययुक्त भक्ती. Pमो. एका. Aना. फळली. Tमो. स्वयें. Vमो. जनार्दननांवें माझी बुद्धी ॥ वदता जनार्दन विशुद्धी ॥ जाला तोचि अर्थावबोधीं ॥ कवित्व पदबंधयुक्ती जनार्दन ॥ Kमो. दृढ केलें. Iमो. नुरवुनी.

ऐसें देख ॥ *एकत्वीं प्रकाशी अनेक ॥ ×अनेकीं एकत्व अविकारी ॥२४॥ +नांवें एक भावें एक ॥ त्यासि देवाचें सर्वदा ऐक्य ॥ मग देखतां एकानेक ॥ भिन्न देख असेना ॥ २५ ॥ हें एकत्व जंव न ये हाता ॥ तंव न लभे देवाची प्रसन्नता ॥ एकत्वावांचूनि सर्वथा ॥ अकर्तात्मता कळेना ॥ २६ ॥ जंव कर्तव्याचा अहंभावो ॥ तंव सर्वथा न भेटे देवो ॥ ०अहंपाशीं बद्धतेशीं ठावो ॥ मुक्तता पहाहो तरयागें ॥२७॥ ꣸नावेंरूपें एकपण ॥ हेंचि माझें *अनुष्ठान ॥ तेणें तुष्टला श्रीजनार्दन ॥ माझें मीपण तोचि जाहला ॥ २८ ॥ जेवीं बाहुल्याचें खेळणें ॥ तेथ रुसणें =आणि संतोषणें ॥ हें खेळवित्याचें करणें ॥ बाहुली नेणे तो अर्थ ॥ २९ ॥ तेवीं माझेनि नांवें कविता ॥ करूनि जनार्दन जाहला वक्ता ॥ यालागीं हे ग्रंथकथा ॥ साधुसंतां पढियंती ॥ १०३० ॥ 1देहअहंता ग्रंथ करितां ॥ एकही वोवी नये हाता ॥ एथ जनार्दन जाहला वक्ता ॥ ग्रंथ ग्रंथार्था तेणें आला ॥ ३१ ॥ 'देखोनि मराठी गोठी ॥ न ह्मणावी वृथा चावटी ॥ पहावी निजबोधकसवटी ॥ निजात्मदृष्टीं सज्जनीं ॥ ३२ ॥ संस्कृत वंद्य प्राकृत निंद्य ॥ हे बोल काय होती शुद्ध ॥ हाही 2अभिमानवाद ॥ 3अहंता अशुद्ध परमार्थीं ॥ ३३ ॥ मोलें भूमि खणितां वैरागरीं ॥ अवचटें अनर्घ्य रत्न लाभे करीं ॥ तें रत्न सांपडल्या केरीं ॥ काय चतुरीं उपेक्षावें ॥३४॥ तेवीं संस्कृत आटाटी ॥ 4सायासें परमार्थीं होय भेटी ॥ तेचि जोडल्या मराठीसाठीं ॥ तेथ घालिती मिठी सज्ञान ॥ ३५ ॥ चकोरां चंद्रामृतप्राशन ॥ वायसां तेथें पडे लंघन ॥ तेवीं हा मराठा ग्रंथ जाण ॥ फळाफळपण ज्ञानाज्ञानें ॥ ३६ ॥ देवासि नाहीं 5वाचाभिमान ॥ संस्कृत प्राकृत 6त्या समान ॥ 7ज्या वाणीं जाहलें ब्रह्मकथन ॥ त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे ॥ ३७ ॥ साजुक आणि सुकलीं ॥ सुवर्णसुमनीं नाहीं चाली ॥ तेवीं संस्कृतप्राकृतबोली ॥ ब्रह्मकथनें आली समतया ॥ ३८ ॥ 'संस्कृतभाषा निंदा केली ॥ तरी ते काय पावन जाहली ॥ प्राकृतभाषा हरिकथा केली ॥ ते वृथा गेली 8ह्मणवेना ॥ ३९ ॥ जंव जंव दृढ भाषाअभिमान ॥ 9तंव तंव भक्तासी बाध पूर्ण ॥ ज्या भाषां केलें ब्रह्मकथन ॥ तें होय पावन हरिचरणीं ॥ १०४० ॥ माझी मराठी भाषा 0चोखडी ॥ परी Rपरब्रह्मेंसि फळली गाढी ॥ जे जनार्दनें लाविली गोडी ॥ ते चवी न सोडी Eग्रंथार्थ ॥ ४१ ॥ हे जनार्दनकविता Cवाडी ॥ ब्रह्मरसें रसाळ गाढी ॥ संत सज्जन जाणती गोडी ॥ यालागीं जोडीं जोडिला ग्रंथ ॥४२॥ Kउद्धवव्याजें स्वयें श्रीकृष्ण ॥ वदला पूर्ण ब्रह्मज्ञान ॥ तेणें छेदूनि भवबंधन ॥ दीनजन तरावया ॥४३॥ तो हा एकादशा ऐसा ग्रंथ ॥ जेथ ठाकठोकें परमार्थ ॥ येणें महाकवि समस्त ॥

---

१ ओवी. २ खाणींत. ३ अमूल्य. ४ खटपट. ५ ज्ञात्यांस सफळ अज्ञांस विफळ. ६ सोन्याचीं फुलें. ७ चोख. ८ निमित्तें. ९ रोकडा.

*ना. एकत्वें प्रकाशिले. ×ना. अनेकीं एक अवधारी. +मो. नांव एक भाव एक, त्यासी देवासी सदा ऐक्य, मग देखतांही येकीं अनेक, भिन्नत्व देख असेना. ०मो. अहंतेपाशीं. ꣸मो. नावांरूपा एकपण. *मो. अनुसंधान. =मो. तैसें. 1मो. देहअहंतेनें. 2ना. साभिमानवाद. 3ना. अहंताबंध परमार्थीं. 4मो. करितां परमार्थीं नव्हे भेटी. 5मो. भाषाभिमान. 6मो. दोन्ही समान. 7मो. ज्या भाषा केलें ब्रह्मकथन. 8मो. न ह्मणावी. 9मो. तंव तंव वाक्यासी बाधकता पूर्ण. 0मो. उघडी. Rना. परब्रह्मीं. Eमो. ग्रंथार्थीं. Cमो. वाढी. मो. Kउद्धवाचि उ स्वयें श्री-

निजहितार्थ पावले ॥ ४४ ॥ पक्कफळीं शुक झेंपावे ॥ तेथ मुंगीही *रीग पावे ॥ तेवीं ×महाकवींचीं वैभवें ॥ मीही पावें प्राकृतें ॥ ४५ ॥ महारायांच्या ताटापाशीं ॥ रिगमू नाहीं समर्थाशी ॥ तेथें सुखें बैसे माशी ॥ +तेवीं हा आह्मांसी प्राकृत ग्रंथ ॥ ४६ ॥ भोजनीं धरोनि बापाचा हात ॥ गोड तें आधीं बालक खात ॥ तेवीं महाकवींच्या अनुभवांत ॥ प्राकृतें परमार्थ मीही लाभें ॥ ४७ ॥ मी ॐलाभलों सद्गुरुचरण ॥ तेणें हें चालिलें निरूपण ॥ बाप कृपाळु जनार्दन ॥ ग्रंथ संपूर्ण तेणें केला ॥ ४८ ॥ ह्मणाल पूर्ण जाहला परमार्थ ॥ पुढें आहे महाअनर्थ ॥ तैसा नव्हे गुह्य ज्ञानार्थ ॥ स्वयें श्रीकृष्णनाथ दावील ॥४९॥ माता पिता स्त्री पुत्र जन ॥ जाती गोत सुहृत ०सज्जन ॥ सकळ कुळासि येतां मरण ॥ ममता श्रीकृष्ण कदा न धरी ॥ १०५० ॥ कृष्णआज्ञा काळ वंदी माथां ॥ एवढी हातीं असतांही सत्ता ॥ तरी *कुळरक्षणार्थ ममता ॥ श्रीकृष्णनाथा असेना ॥ ५१ ॥ ज्यासि देहीं निरभिमानता ॥ ज्यासि बाधीना कुळाची ममता ॥ ते देहींची निरहंकारता ॥ श्रीकृष्ण आतां स्वांगें दावी ॥ ५२ ॥ तें ज्ञानपरिपाक निर्वाण ॥ अतिगोडीचें निरूपण ॥ पुढिले दों अध्यायीं जाण ॥ 1श्रीशुक आपण सांगेल ॥ ५३ ॥ ते ज्ञानगुह्य निजकथा ॥ जनार्दनकृपा तत्त्वतां ॥ एकाजनार्दन वक्ता ॥ अवधान श्रोतां मज द्यावें ॥ ५४ ॥ जेथ संत अवधान देती ॥ ते कथा वोडवे परमार्थी ॥ एकाजनार्दनीं विनंती॥अवधान ग्रंथीं मज द्यावें ॥१०५५॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे भगवदुद्धवसंवादे एकाकारटीकायां परमार्थप्राप्तिसुगमोपायकथनोद्धवबदरिकाश्रमप्रवेशो नाम एकोनत्रिंशोऽध्यायः ॥ २९ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ संख्या ॥ श्लोक ॥४९॥ संमत श्लोक ॥ २ ॥ ओंव्या ॥ १०५५ ॥ एकूण ११०४ ॥ ॥ ॥ ॥ ॥ ॥

---

# अध्याय तिसावा.

श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णाय नमः ॥ जयजय सद्गुरु अनादी ॥ जयजय सद्गुरु सर्वादी ॥ जयजय सद्गुरु सर्वसिद्धि॥जय कृपानिधी कृपाळुवा ॥१॥ जयजय वेदवाचका ॥ जयजय वेदार्थप्रकाशका॥ जयजय वेदप्रतिपालका॥जयजय 2वेदात्मका वेदज्ञा ॥२॥ जयजय विश्वप्रकाशका ॥ जयजय विश्वप्रतिपाळका ॥ जयजय 3विश्वविनाशका ॥ अकर्तात्मका अव्यया ॥ ३ ॥ तुझी अव्यय अक्षरं स्थिती ॥ नाहीं नाम रूप वर्ण व्यक्ती ॥ तो तूं नांदसी जाति गोतीं ॥ 4लोकस्थितिव्यवहारें ॥ ४ ॥ तुज जगीं नाहीं दुसरें ॥ तो तूं 9गृहस्थ घरदारें ॥ तूं 0नपुंसक साचारें ॥ कीं 7स्त्रीपुत्रें नांदसी ॥ ५ ॥ अज आणि वंदिसी पिता ॥ अजन्मा कीं वंदिसी मा-

१ झडपघालीं. २ सार्वभौमाच्या. ३ जीमध्यें गुह्यज्ञान आहे अशी. ४ प्रासहोईं. ५ वेद बोलणारा. ६ नाशरहित. ७ जन्मरहित. ८ बापास ( वसुदेवादिकांस. )

*मो. जाऊनि पावे. ×मो. महाकवींचे घेऊनि मागावे, मीही पावें प्राकृत. +मो. उत्तम रस सेवित. ॐमो. लाधलों. ०मो. स्वजन. *मो. कुळरक्षणाची. 1ना. श्रीकृष्ण. 2मो. विवेक वेदज्ञा. 3ना. विश्वनायका. 4मो. कोणे स्थिती. 9मो. नांदसी घरदारें. 0मो. पुरुषना नपुंसक साचोकारें. 7मो. स्त्री पुत्रीं.

ता ॥ जगीं तुझी सर्वसमता ॥ शेखीं अरिमित्रता चाळिसी ॥ ६ ॥ तूं जगन्नाथ जगन्नायक ॥ कीं एकाचा होसी सेवक ॥ तूं परिपूर्ण पूर्णात्मक ॥ कीं मागसी भीक रंकत्वें ॥ ७ ॥ तूं नैष्ठिक ब्रह्मचारी ॥ कीं व्यभिचारें तारिसी नारी ॥ तूं सर्वज्ञ कीं गुरूच्यां द्वारीं ॥ तृणकाष्ठें शिरीं वाहसी स्वयें॥८॥ जो तूं कळिकाळातें ग्रासिसी ॥ तो तूं बागुलाभेणें लपसी ॥ तूं मायानियंता हृषीकेशी ॥ शेखीं माया बांधीजशी उलूखलीं ॥ ९ ॥ तूं आत्माराम नित्यतृप्त ॥ शेखीं गोवळांचा खाशी भात ॥ तुझा ब्रह्मादिकां न कळे अंत ॥ तो तूं उभा रडत यशोदेपाशीं ॥१०॥ त्रैलोक्य दाविसी उदरीं ॥ तो तूं गोपिकांचे कडियेवरी ॥ तूं जगाचा चाळक श्रीहरी ॥ त्या तुज लेंकुरीं शिकविजे चालूं ॥ ११ ॥ जो तूं सर्ववंद्य सर्वेश्वर ॥ तो तूं होसी पांदरा डुकर ॥ एवं करितां तुझा निर्धार ॥ वेदांसि विचार कळेना ॥ १२ ॥ वेदीं घेतलें महामौन ॥ ज्ञाते झाले नेणकोण ॥ योगी वळघले रान ॥ तुझें महिमान कळेना ॥ १३॥ मुख्यत्वें जन्म नाहीं ज्यासी जाण ॥ तो कृष्ण कैसें दावी मरण ॥ तें ऐकावया निरूपण ॥ परीक्षिति पूर्ण श्रद्धाळू ॥ १४ ॥ प्रथमाध्यायीं वैराग्यार्थ ॥ मुसळ बोलिलें शापयुक्त ॥ तेंचि ग्रंथावसानीं एथ ॥ असे पुसत परीक्षिती ॥ १५ ॥

॥ श्लोक ॥ राजोवाच ॥ ततो महाभागवते उद्धवे निर्गते वनम् ॥ द्वारवत्यां किमकरोद्भगवान् भूतभावनः ॥ १ ॥

॥ टीका ॥ जो पांडवकुळीं कुळरत्न ॥ कीं कौरवकुळीं कुळभूषण ॥ जो धर्माचें निजलक्षण॥ कलीचें निग्रहण जेणें केलें ॥ १६ ॥ ऐसा राजा परीक्षिती ॥ धैर्य वीर्य +उदारकीर्ती ॥ तेणें स्वमुखें श्रीशुकाप्रती ॥ केली विनंती अतिश्रद्धा ॥ १७ ॥ उद्धव पावोनि पूर्ण ज्ञान ॥ तो बदरिकाश्रमा गेलिया जाण ॥ मागें द्वारकेसी श्रीकृष्ण ॥ काय आपण करिता झाला ॥ १८ ॥ उत्पत्ति स्थिति निधन ॥ जो इच्छामात्रें करी जाण ॥ तो स्वदेहाचें विसर्जन ॥ कैसेनि श्रीकृष्ण करिता झाला ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मशापोपसंसृष्टे स्वकुले यादवर्षभः॥प्रेयसीं सर्वनेत्राणां तनुं स कथमत्यजत् ॥ २ ॥

॥ टीका ॥ ब्रह्मशापें श्रीकृष्णनाथ ॥ निःशेष निजकुळासि घात ॥ कैसेनि करविला एथ ॥ हें सुनिश्चित सांगावें ॥२०॥जननयन ×आह्लादकर॥कृष्णतनु अतिसुंदर॥ जीसि देखतांचि नेत्र॥ हर्षें निर्भर स्वानंदें॥२१॥ऐशी आह्लादकारी तनु ॥ कैसेनि सांडी श्रीकृष्णु॥ कृष्ण ब्रह्मशापासी ※अभिन्नु॥तो कां निजतनु ०सांडिता झाला ॥२२॥कृष्ण परब्रह्म परिपूर्ण॥ त्यासि बाधीना शापबंधन ॥ तोही सत्य करी ब्रह्मवचन॥ यादववंशीं तनू सांडूनी ॥ २३ ॥ दृष्टीं देखतां श्रीकृष्ण ॥ सुखें सुखावे जीवप्राण ॥ त्याच्या सौंदर्याचें निरूपण ॥ राजा आपण सांगत ॥ २४

---

१ गोपी इत्यादिकांस. २ सांदीपिनीच्या. ३ गवत, लांकडें. ४ आईच्या हातानें. ५ लहान मुलांनीं. ६ चालण्यास. ७ साक्षात् मूर्तीच. ८ पराभव. ९ लोकांच्या डोळ्यांस. १० शरीर.

॥ श्लोक ॥ प्रत्याकृष्टुं नयनमबला यत्र लग्नं न शेकुः कर्णाविष्टं न सरति ततो यत्सतामात्मलग्नम् ॥ यच्छ्रीर्वाचां जनयति रतिं किंनु मानं कवीनां दृष्ट्वा जिष्णोर्युधि रथगतं यच्च तत्साम्यमीयुः ॥ ३ ॥

॥ टीका ॥ ज्याची अकराही इंद्रियां सदा गोडी ॥ भोगिजे तंवतंव प्रीति गाढी ॥ कदा वीट नुपजे *आवडी ॥अवीट गोडी कृष्णाची ॥२५॥ बाळा, प्रौढा, मुग्धा, प्रगल्भा व्यक्ती ॥ ऐशी चतुर्विधा[1] स्त्रियांची जाती ॥ तिहीं देखिल्या श्रीकृष्णमूर्ती ॥ दृष्टी मागुती परतेना ॥ २६ ॥ ज्या धार्मिका धैर्यवृत्ती ॥ ज्या पतिव्रता महासती ॥ तिहीं देखिल्या कृष्णमूर्ती ॥ दृष्टि मागुती परतेना ॥ २७ ॥ ज्या कां अबळा अभुक्तकामा ॥ ज्या अतिवृद्धा अतिनिष्कामा ॥ तिहीं देखिल्या मेघश्यामा ॥ नयन सकामा हरिरूपीं ॥ २८ ॥ जेवीं लवण जळा भेटी ॥ तेवीं श्रीकृष्णीं स्त्रियांची दृष्टी ॥ मिसळलिया उठाउठी ॥ परतोनि मिठी सुटेना ॥ २९ ॥ एवं देखिलिया श्रीकृष्णमूर्ती ॥ स्त्रियांचिया निजात्मशक्ती ॥ दृष्टि परतेना मागुती ॥ ऐशी +नयनां प्रीती हरिरूपीं॥३०॥स्त्रिया बापुड्या त्या किती॥जे कां श्रीसंत विरक्त परमार्थी॥त्यांचे श्रवणीं पडतां कीर्ती ॥ चित्तीं श्रीकृष्णमूर्ती ठसावे ॥३१॥ चित्तीं ठसावोनि श्रीकृष्णमूर्ती॥ ×चित्तचि आणी कृष्णस्थिती ॥ ऐशी कृष्णाची कृष्णकीर्ती ॥ चित्तवृत्ती आकर्षी ॥३२॥ संतांची आकर्षी चित्तवृत्ती ॥ हें नवल नव्हे कृष्णकीर्ती ॥ कीर्ती ऐकतां असंतीं[2] ॥ तेही होती तद्रूप ॥ ३३ ॥ लागतां चंदनाचा पवन ॥ खैर धामोडे[3] होती चंदन ॥ तेवीं कृष्णकीर्ति श्रवण ॥ दे समाधान समसाम्यें ॥ ३४ ॥ भावें ऐकतां श्रीकृष्णकीर्ती ॥ असंतही संतत्वा येती ॥ मग संतासंत दोनी स्थिती ॥ हारपती समसाम्यें ॥ ३५ ॥ महाकवि वर्णितां श्रीकृष्णकीर्ती ॥ पावले परम सौभाग्य स्थिती ॥ ※ते श्रीकृष्णकीर्ती जे वर्णिती ॥ तेही पावती ते शोभा ॥३६॥ ०कवीश्वरां नवरसिकू ॥ नवरंगडा[4] श्रीकृष्ण एकू ॥ जो जो वर्णिजे रसविशेखू ॥ तो तो यदुनायकू स्वयें होय ॥ ३७ ॥ महाकवि आदिकरूनी ॥ *कवीश्वरां कीर्ति जननी ॥ जे विनटले हरिकीर्तनीं ॥ वंद्य वाणी तयांची॥३८॥श्रीकृष्णकीर्तीचे पवाडे॥ज्याची वाणी अबद्धही[5] पडे॥ते वाचा वंदिजे चंद्रचूडें[6]॥त्याच्या पायां पडे यम काळ ॥३९॥जेथे कृष्णकीर्तिकीर्तन ॥ तेथें कर्माकर्मांची 1उजवणं॥होय संसाराची 0बोळवण॥जन्ममरणसमवेत॥४०॥यापरी कीर्तीचें माहिमान॥सर्वार्थीं अगाध जाण ॥ श्रीकृष्णकीर्तीकविता 5जाण ॥ परम पावन तिहीं लोकीं ॥ ४१ ॥ कवीश्वरांची श्रीकृष्णकीर्ती ॥ ऐकतां वाढे श्रद्धा प्रीती ॥ 7तेणें[7] थोरावे कृष्णभक्ती ॥ हे कविताशक्ती अगाध ॥४२॥ ऐशी अगाध श्रीकृष्णकीर्ती ॥ मा त्या कृष्णाची कृष्णमूर्ती ॥ जे अखंड ध्यानीं देखती ॥ ते ते होती तद्रूप ॥ ४३ ॥ ज्यासि अखंड ध्यानीं श्रीकृष्णमूर्ती ॥ ते ते तद्रूपता पावती ॥ हें नवल नव्हे कृष्णस्थिती ॥ जे द्वेषें[8] देखती तेही मुक्त ॥ ४४ ॥ ज्याचे रथीं मेघःश्याम॥

१ चार प्रकारची. २ दुजनांनी. ३ वारा. ४ धावडे. ५नऊ रंगांस शोभा आणणारा,नवा रंग करणारा. ६ व्याकरणदृष्ट्या अशुद्ध. ७ शंकरानें. ८ सर्माास.

*ना. अनावडी. +मो. नयनांसी. ×मो. चित्तासी. ※ना. तेवीं श्रीकृष्णकीर्ती. ०मो. कवीश्वरांत. *मो. कवीश्वरांची. 1मो. बोळवण. 0मो. उजवण. 5ना. जन. 7ना. तेथें.

सारथी झाला पुरुषोत्तम ॥ यालागीं पार्थाचा पराक्रम ॥ मिरवी नाम *विजयत्वें ॥४५॥ सदा जयनशील संपूर्ण ॥ यालागीं ×अर्जुना नाम 'जिष्णू' ॥ ज्याचे युद्धींचा कठिण पणें ॥ सिद्धी श्रीकृष्णू पाववी ॥ ४६ ॥ तैं बैसोनि अर्जुनाचे रथीं ॥ विचरतां युद्धक्षितीं ॥ जेजे देखती श्रीकृष्णमूर्ती ॥ तेते कृष्णस्थिती पावले ॥ ४७ ॥ जेथ कृष्णाचा पडे पदरेणू ॥ तेथें चहूं मुक्तींसि होय सणूं ॥ ऐशी पावन श्रीकृष्णतनू ॥ +कैसेनि श्रीकृष्णू सांडिता झाला ॥ ४८ ॥ ह्मणाल ब्रह्मशापाभेण ॥ शरीर सांडी श्रीकृष्ण ॥ ०हा बोलचि अप्रमाण ॥ कृष्ण ‡ब्रह्म पूर्ण परमात्मा ॥ ४९ ॥ हेळण छळण दुर्वचन ॥ *द्विजां न करावा अपमान ॥ त्यांचा वाढवावया [1]पूर्ण सन्मान ॥ तनुत्यागें श्रीकृष्ण द्विजशाप पाळी ॥ ५० ॥ कृष्णपरमात्मा परिपूर्ण ॥ तेणेंही निजकुळ निर्दळून ॥ सत्य करी ब्राह्मणवचन ॥ विप्रशापें आपण निजतनु त्यागी ॥ ५१ ॥ तो तनुत्यागप्रकार ॥ सांग, समूळ सविस्तर ॥ सांगताहे शुकयोगींद्र ॥ परिसे नरेंद्र त्यक्तोदक ॥ ५२ ॥ पांडवकुळीं कुळदीपक ॥ जन्मला परीक्षितीच एक ॥ जो होऊनि त्यक्तोदक ॥ भागवतपरिपाक सेवित ॥ ५३ ॥ ब्रह्मानारदव्यासपर्यंत ॥ भागवत उपदेश गुह्य गुप्त ॥ तो परीक्षितीनें जगाआंत ॥ केला प्रकटार्थ दीनोद्धारा ॥ ५४ ॥ धर्मवंशीं अतिधार्मिक ॥ जन्मला परीक्षितीच एक ॥ भागवतरसीं अतिरसिक ॥ अति नेटक [2]श्रवणार्थी ॥ ५५ ॥ ऐसा जो कां परीक्षिती ॥ तेणें अत्यादरें केली विनंती । शुक सुखावोनि चित्तीं ॥ काय त्याप्रती बोलिला ॥ ५६ ॥

॥ श्लोक ॥ ऋषिरुवाच ॥ दिवि भुव्यंतरिक्षे च महोत्पातान् समुत्थितान् ॥
दृष्ट्वाऽऽसीनान् सुधर्मायां कृष्णः प्राह यदूनिदम् ॥ ४ ॥

॥ टीका ॥ शुक ह्मणे परीक्षिती ॥ उद्धव गेलिया वनाप्रती ॥ मागें विभ्रंभूत द्वारावती ॥ त्रिविध उत्पातीं अतिव्याप्त ॥ ५७ ॥ दिवि [3]भुवि [5]अंतरिक्षतगत ॥ उठिले गा महोत्पात ॥ दिवसां उल्कापातें होत ॥ भूतें [9]खाखात अंतरिक्ष ॥ ५८ ॥ गगनीं उगवले त्रिविधकेतू ॥ दंडकेतु धूमकेतू ॥ शिखाकेतु अतिअद्भुतु ॥ दिवसांही दिसतू सर्वांसी ॥ ५९ ॥ धरा कांपोनि अतिगजरीं ॥ भूस्फोट झाला नगरद्वारीं ॥ भूकंप तीन दिवसवरी ॥ घरोघरीं आंदोळ ॥६०॥ वारा सुटला अति झडाडे ॥ तेणें समूळ उन्मळती झाडें ॥ द्वारकेमाजीं धुळी उडे ॥ डोळा नुघडे [7]जनाचा ॥ ६१ ॥ अंतरिक्षा नग्न भूतें ॥ धांवती [8]खांखातें किंकातें ॥ रुधिरंवृष्टि होय तेथें ॥ अकस्मातें निरभ्रीं ॥ ६२ ॥ रविचंद्रांचें मंडळ ॥ खळें [6]करी सर्वकाळ ॥ ग्रह भेदिती ग्रहमंडळ ॥ क्रूरग्रहमेळ [0]शत्रुसदनीं ॥ ६३ ॥ सम्मुख आकाशाचे पोटीं ॥ दिग्दाह देखती

---

१ अर्जुनाचा. २ विजय या नांवानें. ३ विजयी, जिंकणारा. ४ जयशील. ५ प्रतिज्ञा. ६ रणभूमीवर फिरत असतांना. ७ आनंदाची वेळ. ८ देहत्यागाची हकीकत. ९ टाकिलें आहे उदकपान ज्यानें असा. १० भागवत हेंच पक्वान्न. ११ तत्पर. १२बहुतकरून विघ्नांनी व्याप्त झालेली. १३नक्षत्रपात. १४ रक्ताचा पाऊस. १५ मेघ नसतां.

*मो. विजयाचें. ×मो. अर्जुना माजीं विष्णु. ना. अर्जुन नामा जिष्णु. +मो. तो कैसेनि आपण सोडिता झाला. ०मो. हें बोलणेंचि. ‡मो. परब्रह्म परमात्मा. *मो. द्विजांसीं न करावें आपण. 1मो. प्रताप पूर्ण. 2ना. सर्वार्थी. 3ना. भ. 5मो. अंतर्गत. 9मो. खाखातीत. 7मो. [illegible]

दृष्टीं ॥ अभ्रेंवीण कडकडाटीं ॥ पडती वितंडी महाविजा ॥ ६४ ॥ घारी झेडपिती सत्राणें । जेवितां पुढील नेती भाणें ॥ दिवसां दिवाभीत घुंघाणें ॥ राजद्वारीं श्वानें *सैंघ रडती ॥६५॥ बैसल्या सुधर्मासभेप्रती ॥ संकल्पविकल्पाची होय निवृत्ती ॥ ते सभेसि वीर +वोसणती । मारी मारी ह्मणती परस्परें ॥ ६६ ॥ तें ऐकतांचि उत्तर ॥ दचकती महाशूर ॥ सुधर्मासभेसि चिंतातुर ॥ यादववीर समस्त ॥६७॥ यादव बैसले सभेसी ॥ छाया देखती वीर्णशिर्सी। सुधर्माधर्मसभेपाशीं ॥ अरिष्टें ऐशीं उठती ॥६८॥ ऐशीं अरिष्टें अनिवार ॥ दुःखमूचकें दुस्तर । देखोनि यादव थोरथोर ॥ विघ्नविचार ×विवंचिती ॥ ६९ ॥ द्वारकेचें विघ्ननिर्दळण ॥ ०करूं ठेविलें सुदर्शन ॥ ते द्वारकेमाजीं महाविघ्न ॥ काय कारण उठावया ॥ ७० ॥ जंव पातयापार्ते लवे ॥ ∻तंव चक्र एकवीसवेळा भंवे ॥ ते द्वारकेसि विघ्न संभवे ॥ देखोनि आघवे अतिचकित ॥ ७१ ॥ सर्वविघ्नांचें आकर्षण ॥ करी या नांव ह्मणिपे कृष्ण ॥ तो कृष्ण एथें असत जाण ॥ उत्पात दारुण कां उठती ॥७२॥ एवं विचाररूढयादवांसी ॥ चिंतातुर देखोनि त्यांसी। बुद्धि सांगावया त्यांपाशीं ॥ काय हृषीकेशी बोलत ॥ ७३ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ एते घोरा महोत्पाता द्वार्वत्यां यमकेतवः ॥
मुहूर्तमपि न स्थेयमत्र नो यदुपुंगवाः ॥ ५ ॥

॥ टीका ॥ जो जगाचा सूत्रधारी ॥ जो मायायंत्रींचा यंत्रकारी ॥ तो यादवांप्रती श्रीहरी । आलोच करी विघ्नांचा ॥ ७४ ॥ यादवकुळासि आला प्रांत ॥ हें जाणे श्रीकृष्णनाथ ॥ यांच द्वारकेसि होऊं नये घात ॥ यालागीं समस्त प्रभासासी धाडी ॥७५॥ द्वारावती सातवी पुरी। येथील मरण 5मोक्षोपकारी ॥ यादव समस्त देवाधिकारी ॥ यालागीं 4ते बाहेरी श्रीकृष्ण काढी ॥ ७६ ॥ कुळनाशाचें मूळ देखा ॥ प्रभासीं निघालीसे एरिका ॥ हाचि कृष्णाचाही आंवांका ॥ तो धाडी सकळिकां प्रभाससी ॥ ७७ ॥ यादवांसि ब्रह्मशाप ॥ घडलासे घोररूप । यालागीं द्वारकेमाजीं संताप ॥ 3उत्पातरूप उठती ॥ ७८ ॥ उत्पात उठले अनेक ॥ हे अनिवार अरिष्टसूचक ॥ अविलंबें तात्काळिक ॥ परमदुःख पावाल ॥ ७९ ॥ यालागीं तुह्मी अवश्यक ॥ एथें न रहावें मुहूर्त एक ॥ स्त्रियापुत्र सुहृद लोक ॥ तात्काळिक निघावें ॥ ८० ॥ ह्मणाल यादववीर उद्भट ॥ आह्मांसि काय करील अरिष्ट ॥ येणें गर्वें अति अनिष्ट ॥ परम कष्ट पावाल ॥ ८१ ॥ ब्राह्मणाचे शापापुढें ॥ कायसें शौर्य बापुडें ॥ तुह्मीं न विचारितां मागें पुढें ॥ आतांचि रोकडें निघावें ॥ ८२ ॥ द्वारकेमाजीं आजि कोणी ॥ सर्वथा पिऊं नये पाणी ॥ स्त्रीपुत्रसुहृदजनीं ॥ परिवेष्टोनी निघावें ॥ ८३ ॥ कुळासि घडला ब्रह्मशाप ॥ तेणें द्वारकेसि उठिला संताप ॥ तें फेडावया कुळाचें पाप ॥ क्षेत्र पुण्यरूप प्रभास ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ स्त्रियो बालाश्च वृद्धाश्च शंखोद्धारं व्रजंत्वितः ॥ वयं प्रभासं यास्यामो यत्र प्रत्यक्सरस्वती ॥ ६ ॥

---

१ अवर्टात, मोक्या. २ पान, ताट. ३ इंद्राची सभा. ४ शिरावांचून. ५ विचार. ६नाशसमय.७ अयोध्यादि सातांपैकीं शेवटली. ८ मुक्ति देणारें. ९ लोढाळा. १० विचार. ११ बरोबर घेऊन.

*मो. स्वयंभ रडती. +मो. वोसणाती. ×ना. मांडिला. ०मो. करूनि ठेलें ∻मो. तंव द्वारकेसि विघ्न संभवे ॥ हें देखोनि आघवे ॥ अतिभयें चकित झाले ॥ 5मो. मोक्षकारी 4मो. तयांसी. 3मो. उत्पातरूपें उठती.

॥ टीका ॥ वस्तीसि अतिगूढ 'शंखोद्धार'[1] ॥ तेथें ठेवावीं स्त्रीवृद्धकुमार ॥ आह्मी समस्त यादववीर ॥ निघावें सत्वर प्रभासेंसी ॥ ८५ ॥ जेथें प्राची सरस्वती ॥ *मिळाली असे सागराप्रती ॥ तेथें जाऊनि समस्तीं ॥ करावें विध्युक्तीं तीर्थविधान ॥ ८६ ॥

॥ श्लोक ॥ तत्राभिषिच्य शुचय उपोष्य सुसमाहिताः ॥ देवताः पूजयिष्यामः स्नपनालेपनार्हणैः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ तेथें वेदोक्त विधान ॥ करावें तीर्थीं तीर्थस्नान ॥ तीर्थविध्यर्थ उपोषण ॥ करावें आपण निराहार ॥ ८७ ॥ तेथें संद्भावें शुचिर्भूत ॥ राहोनियां समस्त ॥ तीर्थदेवता विध्युक्त ॥ निःशापार्थ[2] पूजावी ॥८८॥ स्नान वस्त्रें अलंकार ॥ चंदनादि पूजासंभार ॥ पूजा षोडशोपचार ॥ श्रद्धा हरिहर पूजावे ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ ब्राह्मणांस्तु महाभागान् कृतस्वस्त्ययना वयम् ॥ गोभूहिरण्यवासोभिर्गजाश्वरथवेश्मभिः ॥ ८ ॥

॥ टीका ॥ वेदवेदांगपारंगत ॥ शमदमादितपयुक्त ॥ ब्राह्मण जे स्वधर्मनिरत ॥ विघ्नशांत्यर्थ पूजावे ॥ ९० ॥ व्हावया अरिष्टनिरसन ॥ करिती शांत्यर्थ स्वस्तिवाचन ॥ त्या ब्राह्मणांसि आपण ॥ द्यावें दान श्रद्धायुक्त ॥ ९१ ॥ गोदान, भूदान गजदान ॥ अश्वदान सुवर्णदान ॥ तिळदान वस्त्रदान ॥ द्यावें ग्रहदान अतिश्रद्धा ॥ ९२ ॥ रथीं संजोगोनि अश्विवार ॥ दान द्यावें रहंवर[4] ॥ द्विज सुखी होती अपार ॥ तो तो प्रकार करावा ॥ ९३ ॥ जें जें ब्राह्मणअपेक्षित ॥ तें तें द्यावें श्रद्धायुक्त ॥ ब्राह्मण तुष्टमान जेथ ॥ अरिष्ट तेथ ॥ रिघेना ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ विधिरेष ह्यरिष्टघ्नो मंगलायनमुत्तमम् ॥ देवद्विजगवां पूजा भूतेषु परमो भवः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ जेथ हरीचें देवतार्चन ॥ जेथ +शालग्रामशिलार्चन ॥ जेथ साधुसंतसन्मान ॥ ते ×अरिष्टघ्न महापूजा ॥ ९५ ॥ जेथ ०मद्भावें द्विजपूजन ॥ जेथ भावार्थें गोसुंश्रूषण[5] ॥ जेथ भूतदया संपूर्ण ॥ तेथें कदा विघ्न रिघेना ॥ ९६ ॥ अंध पंगु अशक्त जन ॥ जेथ पावती अवश्य अन्न ॥ जेथ सुखी होती दीन ॥ तेथें कदा विघ्न बाधीना ॥ ९७ ॥ जेथें भूतदया अलौकिक ॥ तें सकळ अरिष्टच्छेदक ॥ परममंगळप्रकाशक ॥ सुखदायक सर्वार्थीं ॥९८॥

॥ श्लोक ॥ इति सर्वे समाकर्ण्य यदुवृद्धा मधुद्विषः ॥ तथेति नौभिरुत्तीर्य प्रभासं प्रययू रथैः ॥ १० ॥

॥ टीका ॥ जो मधुकैटभमर्दन ॥ जो मुरारि मधुसूदन ॥ जो परमात्मा श्रीकृष्ण ॥ तो करी प्रेरण[6] प्रभासे ॥ ९९ ॥ यादवांमाजीं वृद्ध सज्ञान ॥ पुत्र मित्र सुहृद स्वजन ॥ तिहीं श्रीकृष्णाचें वचन ॥ बहुसन्मानें वंदिलें ॥१००॥ सकळ समृद्धि संभारा॥स्त्रीवृद्धादिबाळकुमरा॥ नावां

---

१ स्थलविशेष. २ शापापासून मुक्त होण्याकरितां. ३ जुंपून. ४ रथ. ५ गायीची सेवा. ६ आज्ञा.

*मो. मिनली. +मो [illegible]

भरोनियां समग्रा ॥ शंखोद्धारा न्या ह्मणती ॥ १ ॥ पेलाणोनि रथ कुंजर ॥ चतुरंग सेनासंभार ॥ कृष्णसहित यादववीर ॥ निघाले समग्र प्रभासासी ॥ २ ॥

॥ श्लोक ॥ तस्मिन् भगवतादिष्टं यदुदेवेन यादवाः ॥ चक्रुः परमया भक्त्या सर्वश्रेयोपबृंहितम् ॥ ११ ॥

॥ टीका ॥ यादव प्रभासा पावोन ॥ जैसें होतें श्रीकृष्णवचन ॥ त्याहूनि विशेष जाण ॥ स्नान दान तिहीं केलें ॥ ३ ॥ यादव समस्त मिळोन ॥ केलें पारणविधिभोजन ॥ मग महामद्य आणूनि जाण ॥ मद्यपान मांडिलें ॥ ४ ॥

॥ श्लोक ॥ ततस्तस्मिन्महापानं पपुर्मैरेयकं मधु ॥ दिष्टविभ्रंशितधियो यद्द्रवैर्भ्रश्यते मतिः ॥ १२ ॥

॥ टीका ॥ करूनियां तीर्थविधान ॥ करावें अरिष्टनिरसन ॥ बाप अरिष्टाचें विंदान ॥ तेथें मद्यपान मांडिलें ॥ ५ ॥ ज्याची गोडपणें पडे मिठी ॥ उन्मादता अतिशयें उठी ॥ तें मद्यपान उठाउठी ॥ वडिलीं धाकुटीं मांडिलें ॥ ६ ॥ ज्याचा वास येतांचि घ्रांणीं ॥ उन्माद चढे तत्क्षणीं ॥ तैशिया मद्याचे मद्यपानीं ॥ वीरश्रेणी बैसल्या ॥ ७ ॥ मैरेयकमद्याची थोरी ॥ मधुरता अतिशयें भारी ॥ लागतांचि जिह्वेवरी ॥ भ्रांत करी सज्ञाना ॥ ८ ॥ तें मद्यपान यादववीरीं ॥ आदरिलें स्वेच्छाचारीं ॥ आग्रह करूनि परस्परीं ॥ लहानथोरीं मांडिलें ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ महापानाभिमत्तानां वीराणां दृप्तचेतसाम् ॥ कृष्णमायाविमूढानां संघर्षः सुमहानभूत् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ पूर्वीं *अतिमात्र पोटांत ॥ ते मद्यपानें झाले मत्त ॥ वीर मातले अतिगुप्त ॥ नोकूनि बोलत परस्परें ॥ १० ॥ कृष्णमायां हरिला बोध ॥ अवघे झाले बुद्धिमंद ॥ सांडूनि सुहृदसंबंध ॥ निर्वाण युद्ध मांडिलें ॥ ११ ॥ नोकूनि बोलतां विरुद्ध ॥ अतिशयें चढला क्रोध ॥ शस्त्रें घेऊनि संनद्ध ॥ सुहृदीं युद्ध मांडिलें ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ युयुधुः क्रोधसंरब्धा वेलायामाततायिनः ॥ धनुर्भिरसिभिर्भल्लैर्गदाभिस्तोमरर्ष्टिभिः ॥ १४ ॥

॥ टीका ॥ क्रोधें नेत्र रक्तांबर ॥ वेगें वोढूनि हातियेर ॥ समुद्रतीरीं महावीर ॥ युद्ध घोरांदर ते करिती ॥ १३ ॥ धनुष्यें वोढूनियां जाणा ॥ बाण सोडिती सणसणां ॥ खड्गें हाणिती खणखणां ॥ सुहृदांच्या प्राणां घ्यावया ॥ १४ ॥ एकीं उचलोनियां भाले ॥ परस्परें हाणिते झाले ॥ एकीं गदा उचलोनि बळें ॥ वीर +करवेले पाडिती ॥ १५ ॥ एक तोमरें लवलाहीं ॥ रणीं खवळले भिडती पाही ॥ एक टोणैप्याच्या घायीं ॥ वीर ठायीं पाडिती ॥ १६ ॥

१ सामान घालून, तयार करून. २ निमित्त, कारण. ३ लहानमोठ्यांनी. ४ नाकांत ५ कैफ. ६ यादववीरांच्या पंक्ति. ७ यथेच्छ. ८ अतिगर्विष्ठ. ९ टाकून. १०कवचें घातलेले. ११ आरक्त, लाल, १२ घोर. १३ धरून ताणून. १४ घोडेस्वार. १५ सोट्याच्या. १६ घावानें.

*ना. अरिमित्रत्व. +मी. करलेवरें.

यापरी चतुरंगसेना ॥ मिसळली रणकंदना ॥ आपुलालिया अंगवेणा ॥ गज रथ आणिती ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ पतत्पताकै रथकुंजरादिभिः खरोष्ट्रगोभिर्महिषैर्नरैरपि ॥ मिथः समेत्याश्वतरैः सुदुर्मदान्यहन् शरैर्दद्भिरिव द्विपावने ॥ १५ ॥

॥ टीका ॥ पताकांसि रथ कुंजरें ॥ रणीं पाडिले अपार ॥ पांखरांसि असिवारं ॥ मारिले खरं प्र रणामाजीं ॥ १८ ॥ *ऐसे मारूनियां रणीं ॥ पाडिलिया वीरश्रेणी ॥ जैसे उन्मत्त गज वनीं ॥ +दंतीं खणाणी भीडत ॥ १९ ॥ यापरी यादववीर ॥ रणीं मातले महाशूर ॥ घाय हाणोनि निष्ठुर ॥ रणीं अपार पाडिले ॥२०॥ कृष्णमाया केले भ्रांत ॥ युद्धीं न देखतां स्वार्थ ॥ परस्परें प्राणघात ॥ व्यर्थ करित सुहृदांचा ॥२१॥ रण ×पडिलें अपार ॥ तंव खवळले कृष्णकुमर ॥ ज्यां ज्यांमाजीं प्रीति थोर ॥ ते ÷युद्धातुर चालिले ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ प्रद्युम्नसांबौ युधिरूढमत्सरावक्रूरभोजावनिरुद्धसात्यकी ॥ सुभद्रसंग्रामजितौ सुदारुणौ गदौ सुमित्रासुरथौ समीयतुः १६ ॥

॥ टीका ॥ ज्यां ज्यां माजीं अतिप्रीती ॥ तेते निर्वाण युद्ध करिती ॥ बाप संहार काळगती ॥ सखे मारिती सख्यातें ॥ २३ ॥ प्रद्युम्न सांब अतिमित्र ॥ त्यांसि युद्ध मांडलें ०घोरांदर ॥ अक्रूर भोज दोन्ही वीर ॥ युद्धीं सत्वर मिसळले ॥ २४ ॥ अनिरुद्ध आणि सात्यकी ॥ उठावले क्रोधतवकीं ॥ ⁵बाणीं वर्षोनि अनेकीं ॥ एकमेकीं भीडती ॥ २५ ॥ सुभद्र संग्रामजित दोनी ॥ खवळले रणांगणीं ॥ वर्षोनि तीक्ष्णबाणीं ॥ उन्मत्त रणीं मातले ॥ २६ ॥ कृष्णपुत्र कृष्णबंधू ॥ दोहींचेही नाम गद ॥ त्यांसि समत्सर क्रोधू ॥ युद्धसंबंधू परस्परें ॥ २७ ॥ सुमित्र आणि सुरथ ॥ या दोहींसि द्वेष अद्भुत ॥ परस्परें करावया घात ॥ युद्धाआंत मिसळले ॥ २८ ॥

॥ श्लोक ॥ अन्ये च ये वै निशठोल्मुकादयः सहस्रजिच्छतजिद्भानुमुख्याः ॥ अन्यान्यमासाद्य मदांधकारिता जघ्नुर्मुकुंदेन विमोहिता भृशम् ॥ १७ ॥

॥ टीका ॥ यादवकुळीं बळें अधिक ॥ निशठादि उल्मुकादिक ॥ शतजित्सहस्रजिद्भानुमुख्य ॥ हेही युद्धीं देख खवळले ॥ २९ ॥ मद्यपानें अतिगर्वित ॥ कृष्णमाया हरिलें चित्त ॥ महामोहें केले भ्रांत ॥ सुहृदां घात स्वयें करिती ॥ ३० ॥ ब्रह्मशापाची *केवढी ख्याती ॥ बंधु बंधूतें जीव ⁰घेती ॥ कृष्णमाया ⁶पाडिले भ्रांतीं ॥ युद्ध ⁸स्वयातीमाझारीं ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ दाशार्हवृष्ण्यंधकभोजसात्वता मध्वर्बुदा माथुरशूरसेनाः ॥ विसर्जनाः कुकुराः कुंतयश्च मिथस्ततस्तेऽथ विसृज्य सौहृदम् ॥ १८ ॥

॥ टीका ॥ यादवांची एक जाती ॥ तेचि बारा नामीं ²नामांकिती ॥ त्या बाराही जाती युद्धीं

१ साहाय्यास. २ हत्ती. ३ चिलखतासह. ४ स्वार, राऊत. ५ गाढव, उंट. ६ कृष्णाचे पुत्र. ७ क्रोधाच्या आवेशानें.

*मो. ऐसे. +मो. दांतखणाणी. ×ना रणीं पाडिले. ÷ना. युद्धानुसार. ०मो. घोर. ⁵मो. बाणीं वरषती. *ना. केवढी.

भिडती ऐक परीक्षिती तीं नामें ॥ ३२ ॥ दाशार्ह सात्वत अंधक जाण ॥ अर्बुद माथुर शूरसेन ॥ कुंती कुकुर विसर्जन ॥ मधु भोज वृष्णय बारा नामें ॥ ३३ ॥ पूर्वील यादवांचें साजणें ॥ *ज्ञातीचें अल्पही ऐकतां उणें॥जीवेंसि सर्वस्व वेंचणें ॥ परी वांचवणें स्वयातीसी ॥ ३४ ॥ तेचि यादव पैं गा आतां ॥ सांडोनियां सुहृदता ॥ ज्याचे चरणीं +ठेविजे माथा ॥ त्यांच्या जीवघाता पेटले ॥ ३५ ॥

॥ श्लोक ॥ पुत्रा अयुद्ध्यन्पितृभिर्भ्रातृभिश्च स्वस्रीयदौहित्रपितृव्यमातुलैः॥ मित्राणि मित्रैः सुहृदः सुहृद्भिर्ज्ञातींस्त्वहन् ज्ञातय एव मूढाः ॥ १९ ॥

॥ टीका ॥ कृष्णमाया आकळिलें चित्त ॥ अवघे झाले परम भ्रांत ॥ न कळे आप्त अनाप्त ॥ रणीं उन्मत्त मातले ॥ ३६ ॥ ज्याचे चरण वंदिजे भावार्थी ॥ श्रद्धा घेइजे चरणतीर्था ॥ त्या निजपित्याचिया माथां ॥ पुत्र शस्त्रघाता प्रवर्तले ॥ ३७ ॥ बंधु शिरकल्या रणांगणीं ॥ बंधु बंधूंतें सोडवी निर्वाणीं ॥ तेचि बंधु बंधूंतें रणीं ॥ निर्वाणबाणीं खोंचिती ॥ ३८ ॥ जो लळे पुरवूनि खेळविता ॥ जैसा बाप तैसा चुलता ॥ त्यासि पुतण्या प्रवर्ते घाता ॥ शस्त्रें माथां हाणोनी ॥३९॥ कन्येचा सुत दौहित्र ॥ ज्यासि श्राद्धीं अधिकार ॥ तो अजासि करी मार ॥ घाय निष्ठुर हाणोनी ॥ १४० ॥ मामाभाचे परस्परीं ॥ प्रवर्तले महामारीं ॥ सुहृद सुहृदांच्या शिरीं ॥ सतेजशस्त्रीं हाणिती ॥ ४१ ॥ मित्र मित्रांच्या मित्रतां ॥ वेंचिती अर्थजीविता ॥ ते मित्र मित्रांच्या जीवघाता ॥ सक्रोधतां ऊठिले ॥ ४२ ॥ आयुष्य सरलें निःशेख ॥ चढलें काळसर्पाचें विख ॥ अवघे होऊनियां मूर्ख ॥ ×ज्ञातीसी ज्ञाति देख वधिते झाले ॥ ४३ ॥

॥ श्लोक ॥ शरेषु क्षीयमाणेषु भज्यमानेषु धन्वसु ॥ शस्त्रेषु क्षीयमाणेषु मुष्टिभिर्जह्रुरेरकाः ॥ २० ॥

॥ टीका ॥ युद्ध मांडलें घोरांदर ॥ सरले भातडींचे शर ॥ धनुष्यदंडें येरां येरें ॥ घायें निष्ठुर हाणिती ॥ ४४ ॥ घाय हाणितां अतिबळें ॥ धनुष्यें मोडलीं तत्काळें ॥ क्षीण झालीं शस्त्रें सकळें ॥ हातियेर बळें खुंटलीं ॥ ४५ ॥ ब्रह्मशापाची एरिका ॥ तीरीं निघाली होती देखा ॥ मुष्टीं घेऊनि क्रोधतवका ॥ एकमेकां हाणिती ॥ ४६ ॥

॥ श्लोक ॥ ता वज्रकल्पा ह्यभवन् परिघा मुष्टिना भृताः॥ जघ्नुर्द्विषस्तैः कृष्णेन वार्यमाणास्तु तं च ते ॥ २१ ॥

॥ टीका ॥ ते एरिका घेतांचि हातीं ॥ झाली वज्रप्राय धगधगिती॥अतितीक्ष्ण परिघाकृती ॥ तेणें हाणिती परस्परें ॥ ४७ ॥ नानाशस्त्रें लागतां पाहीं ॥ यादव न डंडळती कहीं ॥ तेही एरिकेच्या घायीं ॥ पडती ठायीं अचेतन ॥४८॥ एरकेच्या निजघायीं ॥ यादवांसि उरी नाहीं॥ दुखंडें ☼तोडूनियां पाहीं ॥ पडती ठायीं परस्परें ॥४९॥ रणीं पाडूनियां इतर ॥ यादव उरले महाशूर ॥ जे कां नेटके जुंझार ॥ निधडे वीर ०निजायुधें ॥ १५० ॥ यादव उरले भद्रजाती ॥

१ मित्रपण. २ सिद्ध झाले. ३ लाड. ४ मित्रत्वास्तव. ५ भात्यांतील. ६ परस्परांस. ७ हातांत. ८ घावरती. ९ अवसान १० शरीर धड वेगळें केलेले. ११ चांगले योद्ध. १२ गज.

*ना. जातीचें. +मो. ठेविती. ×ना. स्वयाती देख. ☼मो. होऊनिया. ०ना. निजयोद्धे.

हे आणिकासी नाटोपती ॥ त्यांसि निर्दळावया निश्चितीं ॥ *निवारणार्थी हरि धांवे ॥५१॥ तों ह्मणे ब्रह्मशापाची एरिका॥हे सर्वथा हातीं धरूं नका॥सांडा युद्धाचा आवांका ॥ शिकविलें ऐका तुह्मी माझें॥५२॥ +धर्मतां निवारी श्रीकृष्ण॥त्यासिही मारूं धांवले जाण॥हें कृष्णमायेचें विंदान ॥ ×न चुकतां मरण पैं आलें ॥ ५३ ॥ एक ह्मणती श्रीकृष्णासी ॥ आधीं झोडोनि पाडा यासी ॥ ठकूं आला आह्मांसी ॥ ह्मणोनि ऐरकेंसी धांविनले ॥ ५४ ॥ एक ह्मणती धरा केशीं॥एक ह्मणती भीड कायशी॥एक ह्मणे मी श्रीकृष्णासी॥एका घायेंसी लोळवीन ॥५५॥

॥ श्लोक ॥ प्रत्यनीकं मन्यमाना बलभद्रं च मोहिताः ॥ हंतुं कृतधियो राजन्नापन्ना आततायिनः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ पैल पैल तो बळिभद्र ॥ हाचि आमुचा मुख्य शत्रू ॥ यासि चला आधीं मारूं ॥ यादवभार लोटला ॥ ५६ ॥ मदमोहें अतिदुर्मती ॥ वज्रप्राय एरिका हातीं ॥ घेऊनि बळिभद्रावरी येती ॥ तेणें तोही निश्चितीं क्षोभला ॥ ५७ ॥

॥ श्लोक ॥ अथ तावपि संक्रुद्धावुद्यम्य कुरुनंदन ॥ एरकामुष्टिपरिघौ चरंतौ जघ्नतुर्युधि ॥ २३ ॥

॥ टीका ॥ शुक ह्मणे कुरुनंदना ॥ यादव टेंकले आत्ममरणा ॥ ते मरावया रामकृष्णा ॥ आततायी जाणा लोटले ॥ ५८ ॥ यादव उठले हननासी ॥ देखूनि रामहृषीकेशी ॥ अतिक्रोध चढला त्यांसी ॥ तेही युद्धासि मिसळले ॥ ५९ ॥ एरिका जे कां परिघाकृती ॥ वज्रप्राय धगधगिती ॥ दोघींजणीं घेऊनि हातीं ॥ यादवां ख्याती लाविली ॥ १६० ॥ रामकृष्णांच्या निजघातीं ॥ यादवांची ०जाती व्यक्ती ॥ अवघेचि रणा येती ॥ कृष्ण काळशक्ती क्षोभला ॥६१ निजकुळाचें निधन ॥ देखोनियां श्रीकृष्ण ॥ कर्तव्यार्थ झाला पूर्ण ॥ ऐसें संपूर्ण मानिलें॥६२॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मशापोपसृष्टानां कृष्णमायावृतात्मनाम् ॥ स्पर्धा क्रोधः क्षयं निन्ये वैणवोऽग्निर्यथा वनम् ॥ २४ ॥

॥ टीका ॥ ब्रह्मशापें छळिलें ※शुचिर्धी ॥ कृष्णमायाकलितबुद्धी ॥ मद्यपानें उन्मादमदीं ॥ क्रोधें त्रिशुद्धी क्षया नेले ॥ ६३ ॥ वेळुवाच्या वेळुजाळीं ॥ जेवीं कांचणीं पडे इंगळी ॥ तेणें वनाची होय होळी ॥ तेवीं यदुकुळीं कुळक्षयो ॥ ६४ ॥

॥ श्लोक ॥ एवं नष्टेषु सर्वेषु कुलेषु स्वेषु केशवः ॥ अवतारितो भुवो भार इति मेनेऽवशेषितः ॥ २५ ॥

॥ टीका ॥ स्वकुळ *नाशूनि श्रीधर ॥ २अशेष धराभार ॥ उतरला मानी चक्रधर ॥ तेणें सुखें थोर सुखावे ॥ ६५ ॥ जेवीं कां अैलें पेरी माळी ॥ निजजीवनें प्रतिपाळी ॥ शेवीं तोचि

१ सिंह, ( कृष्ण ). २ त्वेष, वेग. ३ लव्हाळ्यासह. ४ तो दूर. ५ ज्याच्या हातांत शस्त्रें आहेत असे. ६ मंडलाकार. ७ श्रीकृष्णमायेनें गुंगली आहे बुद्धि ज्यांची. ८ घांसण्यानें. ९अग्नीची ठिणगी.१०पृथ्वीचा भार. ११ सुदर्शन चक्र धारण करणारा श्रीकृष्ण. १२ आलें, आर्द्रक.

*ना. निर्वाणरणार्थी. +मो. ऐसें निवारी. ×मो. अचुक. ०मो. जाती शांती. ※मो. त्रिशुद्धी. *मो. संपवी. २[illegible]

हणे समूळीं ॥ तेवीं यदुकुळीं श्रीकृष्ण ॥ ६६ ॥ यादव निजबळें प्रतिपाळी ॥ त्यांतें स्वयें निजांगें निर्दळी ॥ हें *दाखवितां वनमाळी ॥ ममतामेळीं अलिप्त ॥ ६७ ॥ कृष्ण पाळी यादवां समस्तां ॥ त्यांची दाविली अतिममता ॥ शेवीं करूनि कुळाचे घाता ॥ निरभिमानता हरि दावी ॥ ६८ ॥ +स्त्रीपुत्रेंसि निजजीविता ॥ सकळकुळाच्या होतां घाता ॥ ज्ञात्यासि नुपजे ममता ॥ ते निर्मुक्तता हरि दावी ॥ ६९ ॥ ज्ञात्यासि नाहीं अहंममता ॥ तेंचि दाखवया तत्त्वतां ॥ कुळेंसि होतां पुत्रघाता ॥ स्वप्नींही ज्ञाता ग्लानि नेणे ॥ १७० ॥ ब्राह्मणाचा शाप दारुण ॥ अन्यथा होंनेदी श्रीकृष्ण ॥ निजकुळ निर्दळी आपण ॥ विप्रवचन सत्यत्वा ॥ ७१ ॥ करूनि कुळक्षयाचें काम ॥ सुख मानी पुरुषोत्तम ॥ तें देखोनि ह्मणे बळिराम ॥ अवतारकर्म संपलें ॥ ७२ ॥

॥ श्लोक ॥ रामः समुद्रवेलायां योगमास्थाय पौरुषम् ॥ तत्याज लोकं मानुष्यं संयोज्यात्मानमात्मनि ॥ २६ ॥

॥ टीका ॥ मग बळिभद्रें आपण ॥ समुद्रतिरीं योगासन ॥ दृढ घालोनियां जाण ॥ निर्वाण ध्यान मांडिलें॥७३॥आकर्षूनि देहींचा प्राण॥निःशेष मांडी देहाभिमान ॥मग परमपुरुषध्यान ॥ करितांचि आपण तद्रूप झाला ॥ ७४ ॥ जेवीं घटामाजील गगन ॥ सहजें महदाकाश पूर्ण ॥ तेवीं सांडितां देहाभिमान ॥ झाला संकर्षण बळराम ॥ ७५ ॥ होतें मनुष्यनाट्य अवलंबिलें ॥ तें देह निःशेष त्यागिलें ॥ जें कां पूर्वरूप आपुलें ॥ तें होऊनि ठेले बळिराम ॥ ७६ ॥ समुद्रतीरीं योगासन ॥ तें देह ठेलें अचेतन ॥ हें रामनिर्याण देखोन ॥ स्वयें श्रीकृष्ण सरसावला ७७

॥ श्लोक ॥ रामनिर्याणमालोक्य भगवान् देवकीसुतः ॥ निषसाद धरोपस्थे तूष्णीमासाद्य पिप्पलम् ॥ २७ ॥

॥ टीका ॥ ॥ बळभद्र झाला देहातीत ॥ हें देखोनि देवकीसुत ॥ भगवान् श्रीकृष्णनाथ ॥ स्वयें इच्छित निजधाम ॥ ७८ ॥ तेव्हां धरातळीं धराधर ॥ मौनें अश्वत्थतळीं स्थिर ॥ वीरासनीं शारंगधर ॥ श्यामसुंदर बैसला ॥ ७९ ॥ ज्याच्या स्वरूपाचे आवडीं ॥ शिवविरिंच्यादि झालीं वेडीं ॥ ज्याच्या दर्शनाची गोडी ॥ दृष्टी नोसंडी क्षणार्ध ॥ १८० ॥ दृष्टीनें चवी चाखिली गाढी ॥ तंव तंव रसना चरफडी ॥ तिणें कीर्तनरसें रसगोडी ॥ चवी चोखडी चाखिली ॥८१॥ प्राशनेंवीण ×कृष्णरस ॥रसना सेवी अतिसुरस ॥ तेव्हां विषयरस ते विरस ॥ होय निरस संसार ॥ ८२ ॥ श्रवणीं पडतां कृष्णकीर्ती ॥ त्रिविधतापां उपशांती ॥ ज्याची वर्णितां गुणनामकीर्ती ॥ चारी मुक्ती कामारिया ॥ ८३ ॥ चरणकमलमकरंद ॥ तुळशीमिश्रित आमोद ॥ सेवितां घ्राणीं परमानंद ॥ इतर गंध ते तुच्छ ॥ ८४ ॥ ज्याचा लागतां अंगसंग ॥ देहबुद्धीसी होय भंग ॥ स्वानंदविग्रही श्रीरंग ॥ अंगप्रत्यंगसुखकारी ॥ ८५ ॥ ज्याचे आवडीं वंदितां पाये ॥ समाधि लाजिली मागें ठाये ॥ तो अश्वत्थातळीं पाहे ॥ बैसला आहे निजशो-

---

१ खंग होण्याकरितां. २ शेषावतार. ३ लीलेनें मनुष्यरूप धारण करून मनुष्यासारखें कर्म करणें. ४ स्वीकारिलें. ५ पिंपळाखालीं. ६टाकीत नाहींत. ७दासी. ८सुगंध. ९ आनंदस्वरूप. १० मोठे व लहान अवयव सुख देणारे होते. ११ राहे.

*मो. कौतुक दाखवी. +मो. स्वपुत्रेंसि. ×मो. कृष्णकीर्तिरस.

भा ॥८६॥ तें अंतकाळींचें कृष्णध्यान ॥ शुकासि आवडलें संपूर्ण ॥ तोही स्वानंदें वोसंडून ॥ श्रीकृष्णध्यान वर्णित ॥ ८७ ॥

॥ श्लोक ॥ बिभ्रच्चतुर्भुजं रूपं भ्राजिष्णु प्रभया स्वया ॥ दिशो वितिमिराः कुर्वन् विधूम इव पावकः ॥ २८ ॥

॥ टीका ॥ प्रांतींचें श्रीकृष्णध्यान ॥ पांचां श्लोकीं निरूपण ॥ श्रोता परीक्षिति सावधान ॥ वक्ता ज्ञानघन शुकयोगींद्र ॥ ८८ ॥ पिंपळातळीं प्रकाशघन ॥ ते काळींची मूर्ती जाण ॥ निजतेजें देदीप्यमान ॥ दिशा परिपूर्ण तेणें तेजें ॥ ८९ ॥ 'ना धूम ना इंगळ ॥ आरक्ततेवीण अग्निज्वाळ ॥ तैशी कृष्णमूर्ती तेजाळ ॥ प्रकाश बहळ अतिदीप्ती ॥ १९० ॥ कृष्णमूर्तीचि निजप्रभां ॥ लोपली रविचंद्रांची शोभा ॥ शून्यत्वें ठाव नाहीं नभा ॥ सच्चिदानंदगाभा साकार ॥ ९१ ॥ चैतन्यतेजें *सुसावली ॥ शांतिरसाची वोतिली ॥ चतुर्भुजत्वें रूपा आली ॥ तेणें दिशांची गेली कालिमा ॥ ९२ ॥

॥ श्लोक ॥ श्रीवत्सांकं घनश्यामं तप्तहाटकवर्चसम् ॥ कौशेयांबरयुग्मेन परिवीतं सुमंगलम् ॥२९॥ सुंदरस्मितवक्त्राब्जं नीलकुंतलमंडितम् ॥ पुंडरीकाभिरामाक्षं स्फुरन्मकरकुंडलम् ॥ ३० ॥

॥ टीका ॥ कृष्णमूर्ति ×स्वच्छ स्वयंभ ॥ अंगीं प्रत्यंगीं बिंबलें नभ ॥ तेणें घनश्यामता शोभ॥ अति सप्रभ साजिरी ॥ ९३ ॥ आधींच नेटका श्रीकृष्ण ॥ वरी घनश्यामता बाणली पूर्ण ॥ तेणें सुसावले बरवेपण ॥ लागलें ध्यान नरनारी ॥ ९४ ॥ नरनारी बापुड्या किती ॥ संन्यासी भुलोनि ठाती ॥ विरक्त वेधले परमार्थी ॥ देखोनि मूर्ती कृष्णाची ॥ ९५ ॥ देखतां श्रीकृष्णदर्शन ॥ शिवासि लागलें नित्यध्यान ॥ पार्वत्याही निजमन ॥ कृष्णार्पण स्वयें केलें ॥ ९६ ॥ ऐसें अंगींचें बरवेपण ॥ त्याहीवरी हास्यवदन ॥ साजिरें राजीवलोचन ॥ आकर्ण पूर्ण आरक्त ॥ ९७ ॥ मस्तकींचें नीलालक ॥ सुगंधसुमनीं गुंफिले चोख ॥ कृष्णीं कृष्णरूप मधुकर देख ॥ कृष्णकेशीं विगुंतले ॥ ९८ ॥ स्फुरत्कुंडलें मकराकार ॥ ऐसे वर्णिती कविवर ॥ परी तीं आकारीं निर्विकार ॥ श्रवणें विकार मावळती ॥ ९९ ॥ फावलिया कृष्णश्रवण ॥ आकारविकारां बोळवण ॥ तें श्रीकृष्णश्रवणीं पूर्ण ॥ देदीप्यमान कुंडलें ॥ २०० ॥ तप्तसुवर्णासमान ॥ उभयपीतांबर जाण ॥ एक कासे विराजमान ॥ दुजा प्रावरण शोभत ॥ १ ॥ ब्रह्मण्यदेवो श्रीकृष्ण ॥ लक्ष्मी डावलोनि पूर्ण ॥ दक्षिणांगीं विप्रचरण ॥ श्रीवत्सलांछन गोविंद ॥२॥

॥ श्लोक ॥ कटिसूत्रब्रह्मसूत्रकिरीटकटकांगदैः ॥हारनूपुरमुद्राभिःकौस्तुभेन विराजितम् ॥ ३१ ॥ वनमालापरीतांगं मूर्तिमद्भिर्निजायुधैः ॥ कृत्वोरौ दक्षिणे पादमासीनं पंकजारुणम् ॥ ३२ ॥

---

१ शेवटचें. २ मोठ्या व लहान अवयवांचे ठायीं. ३ मेघाप्रमाणें नीलवर्ण. ४ मूर्तिमत झालें. ५जागचे जागीं तटस्थ राहतात. ६ पार्वतीनेंही. ७ काळे केश. ८ पांघरूण. ९ एकीकडे करून. १० भृगुपद.

*ना. सांवळी. ×ना. स्वस्थ.

ठीं कौस्तुभ सोज्ज्वळा ॥ कटीं मिरवे रत्नमेखळा ॥ ब्रह्मसूत्र रुळे गळां ॥ आपाद ... ळा शोभत ॥ ३ ॥ माथांची मुकुटींची खेंवणें ॥ लखलखीत अनर्घ्ये रत्नें ॥ कीर्तिमुखें बाहुभूषणें ॥ वीरकंकणें विचित्रें ॥ ४ ॥ यंत्रउपास्तीउपासका ॥ तैशा कराग्रीं करमुद्रिका ॥ त्रिकोण षट्कोण कर्णिका ॥ *जडितमाणिका शास्त्रोक्त ॥ ५ ॥ वैजयंतीचा सोहळा । पदक एकावळी गळां ॥ नाना रत्नें हार मुक्ताफळां ॥ तुळशीमाळा सुगंध ॥ ६ ॥ दोनी मोतिलग पदर ॥ रत्नजडित पीतांबर ॥ किंकिणी क्षुद्रघंटिका विचित्र ॥ मनोहर शोभती ॥ ७ ॥ वांकी अंदुवांचा गजर ॥ चरणीं नपुरांचा झणत्कार ॥ रुळे बिरुदांचा तोडर ॥ मनोहर हरिचरणीं ॥ ८ ॥ रातोत्पळां कठिणपण ॥ त्यांहूनि सुकुमारचरण ॥ घवघवीत श्रीकृष्ण ॥ शोभा संपूर्ण शोभत ॥ ९ ॥ शंख चक्र गदा कमळ ॥ मूर्तिमंत आयुधें सकळ ॥ आश्रऊनि पिंपळ ॥ बैसला केवळ वीरासनीं ॥ २१० ॥ त्या वीरासनाचें लक्षण ॥ तळींमूनि दक्षिण चरण ॥ त्याचि मांडीवरी जाण ॥ वामचरण ×लोहितं ॥ ११ ॥ लाजवूनि संध्यारागासी ॥ उणें आणोनि बाळसूर्यासी ॥ चरणशोभा हृषीकेशीं ॥ अतिदीप्तीसी आरक्त ॥ १२ ॥

॥ श्लोक ॥ मुसलावशेषायःखंडकृतेषुर्लुब्धको जरा ॥ मृगास्याकारं तच्चरणं विव्याध मृगशंकया ॥ ३३ ॥

॥ टीका ॥ करूनि निजकुळाची होळी ॥ सरस्वतीतीरीं वनमाळी ॥ टेंकोनि बैसला पिंपळातळीं ॥ चरण नव्हाळी आरक्त ॥ १३ ॥ आरक्त श्रीकृष्णचरण ॥ भावूनि मृगमुखासमान ॥ जराव्याधें विंधिला बाण ॥ अतिसत्राणें भेदिला ॥ १४ ॥ ब्रह्मशापाचें मुसळ घन ॥ यादवीं पिष्ट करितां जाण ॥ उरला अवशेष लोहकण ॥ तो समुद्रीं जाण टाकिला ॥ १५ ॥ तो पडतांचि समुद्रजळीं ॥ त्यातें मीन सगळेंचि गिळी ॥ त्या मीनातें जराव्याध गळीं ॥ +जाळमाळीं आकळित ॥ १६ ॥ व्याध करी मीनविदारण ॥ तंव निघाला तो लोहकण ॥ त्याचा जराव्याधें केला बाण ॥ तेणें कृष्णचरण विंधिला ॥ १७ ॥ मत्स्योदरींचा लोहघन ॥ त्याचा केलिया दृढ बाण ॥ थोर पारधी साधे संपूर्ण ॥ व्याधें जाणोनि बाण तो केला ॥ १८ ॥ भेदावया कृष्णचरण ॥ मूळीं ब्रह्मशापचि कारण ॥ यालागीं जराव्याधाचा बाण ॥ कृष्णचरणीं पूर्ण खडतरला ॥ १९ ॥ व्याधें अवचिता विंधिला ॥ परी कृष्ण नाहीं दचकला ॥ बाण सत्राणें खडतरला ॥ तेणें सुखी झाला श्रीकृष्ण ॥ २२० ॥

॥ श्लोक ॥ चतुर्भुजं तं पुरुषं दृष्ट्वा स कृतकिल्बिषः ॥ भीतः पपात शिरसा पादयोरसुरद्विषः ॥ ३४ ॥

॥ टीका ॥ बाण श्रीकृष्णचरणीं पूर्ण भेदला ॥ जराव्याधाचा हात निवाला ॥ म्हणे म्यां मोठा मृग विंधिला ॥ म्हणोनि धांवला धरावया ॥ २१ ॥ देखोनि चतुर्भुजपुरुषासी ॥ भय सुटलें

१ रत्नजडाव. २ अमूल्य. ३ लालकमळांस. ४ आश्रय करून. ५ खालीं घालून. ६ उजवा. ७ लाल. ८ संध्याकाळच्या अभ्रवर्णास. ९ उदयकालींचे सूर्यास. १० समजून. ११ हरिणाच्या तोंडासारिखे. १२ मोठ्या वेगानें. १३ पीठ. १४ मासा फाडणें. १५ लागला.

*मो. जडित माणिकीं आगमोक्त. ×मो. आलोहित. +मो. लावूनि जाळीं आकळित.

जराव्याधासी ॥ ह्मणे मज घडल्या महापापराशी ॥ परमपुरुषासी विंधिलें ॥ २२ ॥ ह्मणे कट-कंटारे अदृष्टा ॥ आचरविलें कर्मा दुष्टा ॥ ऐशिया मज महापापिष्टा ॥ दुःखदुर्वटा कोण वारी ॥ २३ ॥ जगाचा परमात्मा श्रीहरी ॥ तो म्यां विंधिला बाणेकरीं ॥ माझ्या पापासमान थोरी ॥ नाहीं संसारीं आनासी ॥ २४ ॥ भयें सुटला थोर कंप ॥ मज घडलें महापाप ॥ *जगाचें जें ध्येय स्वरूप ॥ त्यासि संताप म्यां दीधला ॥२५॥ ज्याचे अमर वंदिती चरण ॥ ज्यासि संत येती लोटांगण ॥ त्या कृष्णासि विंधिला बाण ॥ पाप संपूर्ण मज घडलें ॥ २६ ॥ अवचटें +आत्महत्या घडे ॥ तें पाप कदा न झडे ॥ जगाचा आत्मा वाडेंकोडें ॥ ते आत्म-हत्या पडे मस्तकीं माझे ॥ २७ ॥ जगाचें आत्महनन ॥ कर्ता मी एक पापी पूर्ण ॥ त्या पा-पाचें पुरश्चरण ॥ सर्वथा जाण दिसेना ॥ २८ ॥ प्रमादें ब्रह्महत्या घडे ॥ तेणें पापें तो समूळ बुडे ॥ तें पूर्ण ×ब्रह्म म्यां मूढें ॥ बाणें सदृढें विंधिलें ॥ २९ ॥ पापकर्मा मी व्याधरूप ॥ तेणें जोडलें पाप अमूप ॥ कृष्ण परमात्मा चित्स्वरूप ॥ त्यासि संताप म्यां दीधला ॥ २३० ॥ येणें अनुतापें तप्त पूर्ण ॥ धांवोनि घाली लोटांगण ॥ श्रीकृष्णाचे श्रीचरण ॥ मस्तकीं जाण दृढ धरिले ॥ ३१ ॥ मर्दी दैत्यांचा अभिमान ॥ मधुद्वेष्टा मधुसूदन ॥ त्याचे दृढ धरूनि चर-ण ॥ करी रुदन ०अट्टहासें ॥ ३२ ॥ चरणीं घातली परम मिठी ॥ उठवितां कदा नुठी ॥ मज क्षमा करी कृपादृष्टीं ॥ कृपाळु सृष्टीं तूंचि एक ॥ ३३ ॥

॥श्लोक ॥ अजानता कृतमिदं पापेन मधुसूदन ॥ क्षंतुमर्हसि पापस्य उत्तमश्लोक मेऽनघ ॥ ३५ ॥

॥ टीका ॥ अति भयभीत जराव्याध ॥ ह्मणे मी पापात्मा अतिअशुद्ध ॥ नेणतां घडला हा अपराध ॥ लिंगभेदें मज घडला ॥३४॥ जो ईश्वरप्रतिमा इच्छेदी ॥ तो महापापी लिंगभेदी ॥ त्या तुज ईश्वरासि म्यां दुर्बुद्धीं ॥ अदृष्टविधीं विंधिलें ॥ ३५ ॥ ऐसा मी पापी पापकर्मा ॥ महापापी जो पापात्मा ॥ माझा अपराध करावा क्षमा ॥ पुरुषोत्तमा कृपाळुवा ॥ ३६ ॥ तूं कृपाळु त्रिजगतीं ॥ गर्भीं रक्षिला परीक्षिती ॥ गजेंद्राचे अतिआकांतीं ॥ उडी कृपामूर्ती घा-तली ॥३७॥ पांडव जळतां जोहरीं ॥ तुवां काढिलें विवरद्वारीं ॥ [1]शेखीं अर्जुनाचा कैवारी ॥ घेशी जुंझारी भीष्मासी ॥ ३८ ॥ द्रौपदीचे अतिसांकडीं ॥ धांवलासि लवडसवडीं ॥ तिळ-भरी न दिसतां उघडी ॥ *नेसतीं लुगडीं तूं होसी ॥३९॥ ऐशी [ε]कृपाळुत्वाची ख्याती ॥ श्रुति-पुराणें वाखाणिती ॥ तुह्मी उत्तमश्लोक कीर्ती ॥ ऋषि वर्णिती महासिद्ध ॥ २४० ॥ नेणतां ꣸आचरलों दुष्कर्मा ॥ तें मज करावया क्षमा ॥ तूं कृपाळु परमात्मा ॥ पुरुषोत्तमा क्षमाशी-ळा ॥ ४१ ॥ अजामिळ दुराचारी ॥ पुत्रलोभें नाम उच्चारी ॥ त्याचे पापाची झाली बोहेरी ॥ ऐशी निापाप थोरी नामाची ॥ ४२ ॥ नामें निष्पाप दुर्मती ॥ नामें निष्पाप पितृघाती ॥ नामें दुराचारी तरती ॥ हे निष्पाप [7]ख्याती नामाची ॥ ४३ ॥

---

१ हाहारे. २ दैवा. ३ मोठ्या बाणानें. ४ जगदात्म्याचा वध. ५ दूर करण्यास साधन. ६ न कळत, अवचितें. ७ पश्चात्ताप. ८ आक्रोशानें. ९ ईश्वरप्रतिमाभेद. १० दुर्दैवानें. ११ लाक्षागृहीं. १२ लगबगीनें. १३ नाम.

*मो. जगा जें ध्येय स्वरूप. +मो. ब्रह्महत्या. ×ना. ब्रह्महत्या. ०ना. आक्रोशें. [1]मो. होऊनि अर्जुनाचा. *ना. नेसलीं. [ε]मो. [illegible]

श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ मा भैर्जरे त्वमुत्तिष्ठ काम एष कृतो हि मे ॥ याहि त्वं मदनुज्ञातः स्वर्गं सुकृतिनां पदम् ॥ ३९ ॥

॥ टीका ॥ जो वेदार्थांचा मथित बोध ॥ जो जगदादि आनंदकंद ॥ जो स्वरूपें स्वानंद शु तो व्याधेंसि गोविंद स्वकृपा बोले ॥८२॥ तूं जीवघातक पारधी ॥ भय मानिसी ममापरा तुज अभय गा त्रिशुद्धी ॥ माझी कार्यसिद्धी त्वां केली ॥ ८३ ॥ कुमारीं सांब केला स्त्रीरू कपटें ब्राह्मणां आला कोप ॥ कुळासि झाला ब्रह्मशाप ॥ हा त्रिविधें संकल्प माझाची ॥ ८ शापावशेष लोह जाण ॥ त्याचा तुवां करोनि बाण ॥ मृगलोभें विंधिला चरण ॥ यासही रण संकल्प माझा ॥ ८९ ॥ मी बुद्धीची अनादि बुद्धी ॥ मी क्रियेची क्रिया *त्रिशुद्धी ॥ +अहंकर्तृत्वाचे विधीं ॥ तूं वृथा अपराधी म्हणविसी ॥ ८६ ॥ मिथ्या धरूनि देहाभिमा म्हणसी घडलें मज पाप पूर्ण ॥ त्याही पापासि पुरश्चरण ॥ माझें दर्शन मुख्यत्वें ॥ ८७ ॥ ज्यिया नामा एकासाठीं ॥ जळती महापातकांच्या कोटी ॥ त्या मज तुवां देखिलें दृष्टीं ॥ मभाग्यें भेटी घडली तुज ॥ ८८ ॥ माझी घ्यावया क्षणार्ध भेटी ॥ एक रिघाले गिरिकपा एक योगयागसंकटीं ॥ झाले महाहटी नेमस्त ॥ ८९ ॥ एवं ×नानानेमआटाटी ॥ शिणा कल्पकोटी ॥ स्वप्नींही न लभे माझी भेटी ॥ त्या मज त्वां दृष्टीं देखिलें ॥ २९० ॥ माझें हो चि दर्शन॥सकळ पातकां निर्दळण॥ तूं तंव पुण्यात्मा परिपूर्ण॥पापाभिमान धरूं नको॥९ ꣸पापाभिमानें अधोगती॥पुण्याभिमानी स्वर्गा जाती॥निरभिमानें माझी प्राप्ती॥सत्यवचनें पें माझी ॥९२॥ तूं ऐसें मानिसी आपण ॥ परब्रह्म परमात्मा श्रीकृष्ण॥त्यासि विंधिला नि बाण ॥ हें पाप दारुण अनिवार ॥ ९३ ॥ ' लोहपरिसां आलिंगन ॥ तेणें लोह होय सुव त्यासि फोडूं आल्या ०लोहघण ॥ 1आघातें सुवर्ण तो होय ॥ ९४ ॥ तेवीं *भक्तीं घेत माझी भेटी ॥ पातकें 3जाती उठाउठी ॥ 5कां द्वेषें देखिल्या मज दृष्टीं ॥ पातकां तुटी त ळ ' ॥ ९५ ॥ 4लोकां इतरांच्या अपराधता ॥ प्राणी पावे अधःपाता ॥ तोचि अपराध म करितां ॥ नित्यमुक्तता अपराध्यां ॥ ९६ ॥ ममापराधें नरक पावे ॥ तें माझें सामर्थ्य बु आघवें ॥ माझेनि अपराधें सुख पावे ॥ मुक्तवैभवें निर्मुक्त ॥ ९७ ॥ विष म्हणोनि अमृतप केल्या अमरत्व न चुके जाण ॥ तेवीं द्वेषेंही माझें दर्शन ॥ करी पावन प्राण्यासी ॥ ९८ 0जाणोनियां अग्नि लाविला घरीं ॥ तो जाळूनियां सर्वही भस्म करी ॥ 6मा नेणतांही ठे वळचणीवरी ॥ तोही करी तैसेंची ॥ ९९ ॥ तेवीं भावें अथवा द्वेषें पूर्ण ॥ ज्यासि घडे दर्शन ॥ तो तो होय परम पावन ॥ हें सत्य जाण जराव्याधा ॥३००॥ मज ठाकावया निज म ॥ त्वां सिद्ध केलें माझें काम ॥ तेणें तुष्टलों मी आत्माराम ॥ तूं पावन परम 2तिहीं लो

१ तीन प्रकारचा. २ मी कर्ता या बुद्धीनें. ३ माझ्या हातून पाप घडलें [illegible] अभिमान.

꣸मो. शुद्धी. +ना. अहंकर्तृत्वबुद्धी. ×मो. नानामतें नेम. ०मो. लोह आपण. 1मो. ३ सुवर्ण तेंचि होय. *ना. अभक्तीं. 3मो. जळती. 5मो. अथवा द्वेषें ना. द्वेषेंही. 4मो. इत अपराध करितां. 0मो. जाणतां. 6मो. कां नेणतांही पडला वळचणीवरी. 2ना. हृही लोक

꣸ ९२ ही ओंवी पैठण येथील हस्तलिखित पोथींत आहे, परंतु पंढरपूर येथ हस्तलिखित पोथींत नाहीं.

॥ १ ॥ ज्या नांव ह्मणसी पाप पूर्ण ॥ जेणें देहें मज विंधिला बाण ॥ तेणेंचि देहें तूं आपण ॥ होसी स्वर्गभूषण सुरवंद्य ॥ २ ॥ याग करूनि याज्ञिक ॥ पावती सुख पतनात्मक ॥ तैसें तुज न घडे देख ॥ तूं अक्षय सुख पावसी ॥ ३ ॥ माझिया दर्शनाचें पुण्य ॥ दिविभोगें नव्हे क्षीण ॥ यालागीं अक्षय सुख संपूर्ण ॥ तूं सर्वथा जाण पावसी ॥ ४ ॥ तूं विकल्प सांडोनियां पोटीं ॥ जराव्याधा सवेग उठी ॥ मिथ्या नव्हती माझ्या गोष्टी ॥ तूं अक्षय तुष्टी पावसी ॥ ५ ॥ तूं ऐसें जीवीं कल्पिसी ॥ आपण निघालां निजधामासी ॥ मागें म्यां अक्षयसुखासी ॥ कोणापाशीं मागावें ॥ ६ ॥ जैसें बोलती इतर लोक ॥ ममाज्ञा तैसी नव्हे देख ॥ ठाकठोक आतांचि रोख ॥ अक्षय सुख पावसी ॥ ७ ॥ माझे आज्ञेचें लोंढोनि बळ ॥ ध्रुव अद्यापि झाला अढळ ॥ माझी आज्ञा वंदी कळिकाळ ॥ ✱कोणेपरी विकळ करूं न शके ॥ ८ ॥ ऐसें श्रीमुखें आपण ॥ जंव बोलों नुपरे श्रीकृष्ण ॥ तंव ववघवीत विमान ॥ व्याधासि जाण उतरलें ॥ ९ ॥

॥ श्लोक ॥ इत्यादिष्टो भागवता कृष्णेनेच्छाशरीरिणा ॥ त्रिः परिक्रम्य तं नत्वा विमानेन दिवं ययौ ॥ ४० ॥

॥ टीका ॥ जो पूजिजे सुरासुरीं ॥ जो परमात्मा चराचरीं ॥ जो लीलाविग्रही देहधारी ॥ जो योगेश्वरीं वंदिजे ॥ ३१० ॥ ऐसा +अतिवरिष्ठ श्रीकृष्ण ॥ तेणें जराव्याध आज्ञापून ॥ कृष्णइच्छामात्रें विमान ॥ देदीप्यमान जें आलें ॥ ११ ॥ व्याधें देखोनि विमाना ॥ हर्षें निर्भर झाला ×मना ॥ तीन प्रदक्षिणा करूनि कृष्णा ॥ नमूनि विमानां आरूढे ॥ १२ ॥ व्याध आरूढोनि विमानां ॥ ४मूनि इंद्रचंद्रग्रहगणा ॥ अक्षयसुखस्वर्गभुवना ॥ कृष्णकृपा जाणा तो पावला ॥ १३ ॥ जेणें अपकार केला पूर्ण ॥ त्यासि उपकार करावा आपण ॥ हें निज शांतिज्ञान लक्षण ॥ स्वांगें श्रीकृष्ण स्वयें दावी ॥ १४ ॥ ब्रह्मज्ञानाचे बोल बोलती ॥ तैसें नाहीं कृष्णनाथीं ॥ अंगें दावूनियां स्थिती ॥ व्याध निश्चितीं उद्धरिला ॥ १५ ॥ सकळकुळाचें निर्दळण ॥ झाल्याही मोह न धरी श्रीकृष्ण ॥ जेणें निजांगीं विंधिला बाण ॥ तो व्याधही जाण सुखी केला ॥ १६ ॥ समुद्रतीरीं घेऊनि रथ ॥ दारुक उभा होता तेथ ॥ तेणें न देखतां श्रीकृष्णनाथ ॥ गवेषणार्थ निघाला ॥ १७ ॥

॥ श्लोक ॥ दारुकः कृष्णपदवीमन्विच्छन्नधिगम्य ताम् ॥ वायुं तुलसिकामोदमाघ्रायाभिमुखं ययौ ॥ ४१ ॥

॥ टीका ॥ कृष्ण न देखतां दारुक ॥ कासावीस झाला देख ॥ शोधीत श्रीकृष्णपदांक ॥ पृथ्वी सम्यक अवलोकी ॥ १८ ॥ तंव कृष्णकंठींच्या तुळसीमाळा ॥ त्यांचा आमोद गंध दारुका आला ॥ तेणें गंधाभिमुखें निघाला ॥ तंव देखता झाला ✱महातेज ॥ १९ ॥

॥ श्लोक ॥ तत्र तिग्मद्युभिरायुधैर्वृतं ह्यश्वत्थमूले कृतकेतनं पतिम् ॥ स्नेहप्लुतात्मा निपपात पादयोरथादवप्लुत्य स बाष्पलोचनः ॥ ४२ ॥

---

१ ज्या सुखापासून पतन आहे असें सुख. २ स्वर्गभोगानें. ३ संशय. ४ मिळून. ५ पुरें बोलूं पावला नाहीं तोंच. ६ उल्लंघून. ७ या नांवाचा सारथि. ८ शोधाकरितां. ९ कृष्णाचीं पावलें. १० नीट.

✱मो. तो परिकाळ करूं न शके. +मो. दिव्यवरिष्ठ. ×ना. जाणा. ✱ना. शामतेज.

॥ टीका ॥ तंव धगधगी तेजाळा ॥ दिव्य आयुधांचा मेळ ॥ त्यांमाजीं घनसांवळा ॥ श्रीकृष्ण डोळां देखिला ॥३२०॥ अश्वत्थातळीं धरूनि स्थान ॥ घालूनियां वीरासन॥ निजतेजें विराजमान ॥ दारुकें श्रीकृष्ण देखिला ॥२१॥ कृष्ण देखतां लवडसवडीं ॥ रथाखालीं घालूनि उडी ॥ पोटींच्या सप्रेम आवडीं ॥ धरिले तांतडी हरिचरण ॥ २२ ॥ नेत्रीं अश्रूंचिया धारा ॥ अंग कांपे थरथरा ॥ तुजवेगळें शार्ङ्गधरा ॥ *अंधतम नेत्रा दृढ दाटे ॥ २३ ॥

॥ श्लोक ॥ अपश्यतस्त्वच्चरणांबुजं प्रभो दृष्टिः प्रनष्टा तमसि प्रविष्टा ॥ दिशो न जाने न लभे च शांतिं यथा निशायामुडुपे प्रनष्टे ॥ ४३ ॥

॥ टीका ॥ ऐकें स्वामी श्रीकृष्णा ॥ न देखतां तुझिया श्रीचरणां ॥ जगदांध्य पडे नयनां ॥ दिशांची गणना गणी कोण ॥ २४ ॥ ज्ञानेंसि +मावळला विवेक ॥ अणुमात्र न लभे सुख ॥ तुज न देखतां मी देख ॥ जड मूढ मूर्ख होऊनि ठेलों ॥ २५ ॥ जेवीं नष्टचंद्रांचिये रात्रीं ॥ निबिड अंवसेचिये आंधारीं ॥ तेवीं तुजवीण श्रीहरी ॥ दृढ दाटे संसारीं अंधतम ॥ २६ ॥ तुझे देखतांचि श्रीचरण ॥ अंधतमा निर्दळण ॥ जेवीं प्रकटतां रविकिरण ॥ अंधारेंसी जाण निशा ×नासे ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ इति ब्रुवति सूते वै रथो गरुडलांछनः ॥ खमुत्पपात राजेंद्र साश्वध्वज उदीक्षतः ॥ ४४ ॥

॥ टीका ॥ ऐसें विनवी जंव दारुक ॥ तंव परमाश्चर्य कांहीं एक ॥ देखता झाला अलौकिक॥ पांखेंवीण देख उडाला रथू ॥ २८ ॥ चहूं वारुवांसंयुक्त ॥ गरुडध्वजेंसि श्रीकृष्णरथ ॥ ऊर्ध्वगती गगनाआंत ॥ दारुकादेखत उडाला ॥ २९ ॥ शुक म्हणे परीक्षिती ॥ निजधामा जातां श्रीपती ॥ आपुली ऐश्वर्यसंपत्ती ॥ स्वेच्छा ऊर्ध्वगती स्वयें नेत ॥ ३३० ॥ इह लोकीं ठेवूनि कीर्ती ॥ निजवैभवविलाससंपत्ती ॥ आवरूनियां निजशक्ती ॥ स्वयें ऊर्ध्वगती ❀स्वसत्ता नेत ॥ ३१ ॥

॥ श्लोक ॥ तमन्वगच्छन् दिव्यानि विष्णुप्रहरणानि च ॥ तेनातिविस्मितात्मानं सूतमाह जनार्दनः ॥ ४५ ॥

॥ टीका ॥ रथ जातां ऊर्ध्वमंडळ ॥ शंख चक्र गदा कमळ ॥ तदनुलक्षीं तत्काळ ॥ दिव्यायुधें सकळ निघालीं ॥ ३२ ॥ ऊर्ध्वमंडळीं उडाला रथ ॥ दिव्यायुधेंही समस्त ॥ तें देखोनि अतिविस्मित ॥ ठेला तटस्थ दारुक ॥ ३३ ॥ धुरे बैसोनियां नित्य ॥ मी वागवीं श्रीकृष्णरथ॥ तो रथ ऊर्ध्वगतीं कृष्ण नेत ॥ मज कां एथ सांडिलें ॥ ३४ ॥ मज सांडूनियां गोविंदें ॥ नेलीं आपुलीं दिव्यायुधें ॥ मी अभाग्य भाग्यमंद॥ त्यजिलें मुकुंदें निश्चित ॥३५॥ ज्यां उडी घातली रथाखालती ॥ हेचि माझी मंदमती॥ येरवीं मीही जातों ऊर्ध्वगती ॥ कां श्रीपती रुसला ॥३६॥ जेणें चरणीं विंधिला बाण ॥ तो व्याधही उद्धरिला जाण ॥ मी भाग्यें अभागी पूर्ण ॥

१ मोठ्या त्वरेनें. २ अत्यंत काळोख. ३ चंद्र नाहीं अशा. ४ पक्षांवांचून. ५घोड्यांसहित. ६त्यांमागून. ७ चूक.

*ना. अंधत्व नेत्रा दृढ दाटे. +ना. मावळता. ×ना. निरसे. ❀ना. स्वइच्छा.

यालागीं श्रीकृष्ण मज त्यागी ॥ ३७ ॥ नित्य कृष्णदृष्टी पुढें ॥ धुरे बैसोनि वागवी घोडे ॥ तो मी कृष्णावेगळा पडें ॥ भाग्य कुडें पैं माझें ॥ ३८ ॥ मी श्रीकृष्णाचा सारथी ॥ ऐशी त्रिलोकीं झाली ख्याती ॥ तो मी वेगळा पडें अंतीं ॥ कां श्रीपती रुसला ॥ ३९ ॥ यावज्जन्म भोगिलें कृष्णसुख ॥ त्या मज वोडवलें वियोगदुःख ॥ कृष्णा कां झालासि विमुख ॥ मी दीन रंक पैं तुझें ॥३४०॥ माझा बोल अणुभरी ॥नाहीं अव्हेरिला *हरी ॥ त्या +मज तूं श्रीहरी ॥ अंतीं दुर्धरी दुरावसी ॥ ४१ ॥ अपराधिया तारिलें व्याधासी ॥ अश्वध्वजेंसि रथ नेसी ॥ तो तूं मज उद्धरावयासी ॥ कां उबगलासी गोविंदा ॥ ४२ ॥ ऐसा अवस्थाभूत पूर्ण ॥ पाहतां श्रीकृष्णाचें वदन ॥ दारुकासि आलें रुदन ॥ ओसुवीं नयन लोटले ॥४३॥ दीर्घस्वरें देऊनि हांक ॥ दारुक रडे अधोमुख ॥ अंतीं श्रीकृष्ण झाला विमुख ॥ हें अतिदुःख ×मजलागीं ॥४४॥ दुःखें चरफडीत मोठा ॥ करें पिटीत ललाटा ॥ मर मर विधातया नष्टा ॥ वोखटें अदृष्टा काय लिहिलें ॥ ४५ ॥ मग म्हणे श्रीकृष्णनाथा ॥ तुजपुढें बापुडें विधाता ॥ तुजवेगळा मी राहतां ॥ अतिदीनता पावेन ॥ ४६ ॥ तुझेनि बळें श्रीकृष्णा ॥ म्यां कळिकाळा घातला आंकणा ॥ तो मी काळाचा वोळंगणा ॥ कां करिसी पोसणा जगाचा ॥४७॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ नाभी नाभी म्हणे जनार्दन ॥ मग आश्वासूनियां पूर्ण ॥ गुह्य आलोचूनि सांगत ॥ ४८ ॥ आजिच्या काळाचे काळगती ॥ तूं एक उरलासि निकटवर्ती ॥ तुज म्यां राखिलें निजकार्यार्थी ॥ वेगीं द्वारावतीं तूं जाईं ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ श्रीभगवानुवाच ॥ गच्छ द्वारवतीं सूत ज्ञातीनां निधनं मिथः ॥ संकर्षणस्य निर्याणं बंधुभ्यो ब्रूहि मद्दशाम् ॥ ४६ ॥

॥ टीका ॥ तुवां जावोनि द्वारके आंत ॥ यादवांचा निधनवृत्तांत ॥ परस्परें कलहयुक्त ॥ निमाले समस्त हें सांग ॥ ३५० ॥ बळिभद्रें निजात्मस्थिती ॥देहो त्यजिला योगगती ॥ माझीही दशा समस्तांप्रती ॥ यथा निगुतीं सांगावी ॥ ५१ ॥

॥ श्लोक ॥ द्वारकायां च न स्थेयं भवद्भिश्च स्वबंधुभिः ॥ मया त्यक्तां यदुपुरीं समुद्रः प्लावयिष्यति ॥४७॥ स्वं स्वं परिग्रहं सर्वे आदाय पितरौ च नः ॥ अर्जुनेनाविताःसर्व इंद्रप्रस्थं गमिष्यथ ॥ ४८ ॥

॥ टीका ॥ तुवां जाऊनियां त्यांपाशीं ॥ शीघ्र सांगावें समस्तांसी ॥ कोणीं न रहावें द्वारकेसी ॥ निघावें वेगेंसी ममाज्ञा ॥५२॥ द्वारका त्यागावयाचें कारण ॥ तुज मी सांगेन आपण ॥ दारुका तूं अतिसज्ञान ॥ विश्वास पूर्ण मज तुझा ॥ ५३ ॥ यालागीं तुज राहवूनि एथ ॥ अंतकाळींचें गुज सांगत ॥ तुवां जाऊनि द्वारकेंत ॥ बाहेर समस्त काढावे ॥ ५४ ॥ बाहेर काढावयाचें कारण ॥ म्यां द्वारका त्यागिल्या जाण ॥ समुद्र येऊनि आपण ॥ नगर संपूर्ण बुडवील ॥ ५५ ॥ ठेव मागूनि समुद्रापाशीं ॥ म्यां वसविलें द्वारकेसी ॥ मज गेलिया निजधामा-

१ हीन. २ घोर संकटांत दुर्धर प्रसंगीं. ३ दूर टाकितोस. ४ दुःखी, चटका लागलेला. ५ अश्रूंनीं. ६ दाब. ७ दास. ८ भिऊं नकोस. ९ जवळ १० आपोआप. ११ जागा.

*ना. आजवरी. +ना. मजलागोनि श्रीहरी. ×ना. झालें.

सी ॥ तो अवश्येंसी बुडवील ॥ ५६ ॥ यालागीं सत्वर गमन ॥ शीघ्र करावें आपण ॥ माझे माता पिता समस्त जन ॥ द्वारकेहून काढावीं ॥ ५७ ॥ जंव समुद्र बुडविना तो ठावो ॥ तंव आपुलाला समुदावो ॥ घेऊनि सकळ परिग्रहो ॥ शीघ्रतरें पहाहो निघावें ॥ ५८ ॥ आलिंय राज्यलोट ॥ चोराकुळित होईल वाट ॥ कोणी नवजावें येकटें ॥ अवघी एकवट करावी॥५९ अर्जुनाचेनि सांगातें ॥ एकत्र मिळूनि समस्तें ॥ शीघ्र जावें इंद्रप्रस्थातें ॥तो मार्गीं त्यांतें रक्षील ॥ ३६० ॥ ऐसें ऐकतां श्रीकृष्णवचन ॥ दारुकासि आलें रुदन ॥ वचनें सांडूं पाहे प्राण ॥ जळेंवीण मीन जैसा ॥ ६१ ॥ निजकुळासि करूनि घात ॥ गेला गेला रे श्रीकृष्णनाथ ॥ मी काळेंमुखा द्वारकेआंत ॥ जावों हा वृत्तांत सांगावया ॥ ६२ ॥ गिळूनि श्रीकृष्णनिजसुखा ॥ ह्मणती हा कां आला काळमुखा ॥ सकळ जगाचिया दुःखा ॥ सूचक देखा मी होईन ॥६३॥ ऐकतां माझिया वचनासी ॥ प्राणांत होईल सर्वांसी ॥ एवढ्या थावया महादुःखासी ॥ नवचें हृषीकेशी मी तेथें ॥ ६४ ॥ ज्यांसि म्यां सांगावी हे वार्ता ॥ त्यांच्या करावें जीवघाता ॥ एवढी घोर निष्ठुरता ॥ नव्हे कृष्णनाथा माझेनि ॥ ६५ ॥ बहुतां मुंग्यांच्या विवरासी ॥ जेवीं आगि लावावी हृषीकेशी ॥ तेवीं हे वार्ता द्वारकेसी ॥ म्यां सुहृदांपाशीं सांगावी ॥६६॥ जेवीं फळते फुलते वनीं ॥ *भडकोनि लावावा दावाग्नी॥ तैसा भडका हा सुहृदांचे कानीं ॥ कृष्ण निधनाग्नी कोण लावी ॥ ६७ ॥ जेवीं बुडतियाचे माथां ॥ पाषाण न देववे सर्वथा ॥ तेवीं कृष्णें सहित कुळाच्या घाता ॥ मी +नव्हे सांगतां सुहृदांसी ॥ ६८ ॥ सुख थावें सुहृदांसी ॥ तें राहिलें हृषीकेशी ॥ घेऊनियां महादुःखांचिया राशी ॥ सुहृदांपाशीं मी नवचे ॥ ६९ ॥ आशंका॥ ह्मणशी जन्मवरी अवज्ञा ॥ तुवां नाहीं केली अतिप्रज्ञा ॥ तो तूं अंतकाळींच्या वचना ॥ कां अवज्ञा करितोसि ॥ ३७० ॥ कृष्णा अंतकाळींचें तुझें श्रीमुख ॥पाहतां मज अत्यंत सुख ॥ तें सांडूनि जगासि दुःख ॥ थावया देख मी नवचें ॥ ७१ ॥ कुळनिधनाचें घोर दुःख ॥ कृष्णनिधनें संतापक ॥ माझे वचनमात्रें हें विख ॥ जगासि देख न देववे ॥ ७२ ॥ तुझे आज्ञेकरितां देख ॥ जगासि थावें महादुःख ॥ तुझे अवज्ञेचा उल्लेख ॥ नरकदायक मज होय ॥७३॥ ×मा आपणचि घेऊनि विख ॥ तुजपुढें मरतां देख ॥ उत्तम गति अलोलिक ॥ मी निजनिष्टंक पावेन ॥ ७४ ॥ ऐसें ह्मणोनि आपण ॥ दारुकें घातलें लोटांगण ॥ मस्तकीं धरिलें श्रीचरण ॥ सर्वथा जाण सोडीना ॥७५॥ देखोनि दारुकाचा ※भावो ॥ कृपें द्रवला देवाधिदेवो ॥ जेणें निर्दळे शोकमोहो ॥ तें वर्म पहाहो सांगत ॥ ७६ ॥

॥ श्लोक ॥ त्वंतु मद्धर्ममास्थाय ज्ञाननिष्ठ उपेक्षकः ॥ मन्मायारचनामेतां विज्ञायोपशमं व्रज ॥ ४९ ॥

॥ टीका ॥ माझ्या धर्माचें निजलक्षण ॥०दृढ आश्रयितां आपण॥पावोनि माझें ज्ञानविज्ञान ॥ तूं ब्रह्मसंपन्न स्वयें होसी ॥ ७७ ॥ माझें *धर्माचें निजलक्षण ॥ तूं 3ह्मणसी तें कोणकोण ॥

१ बायकामुलें. २ अतिलबकर. ३ एकटें. ४काळतोंड्या. ५नष्ट करून. ६स्मरण करविणारा. ७न जाई, जाणार नाहीं. ८ होणार नाहीं. ९ अवमान. १० उपाय.

*मो. भडका लावावा. +ना. नवचें सांगतां सुहृदांपाशीं. ×मो. आतां आपणाचि. ※मो. सद्भावो. ०मो. तुज ऐकतां आपण. *ना. निजधर्माचें लक्षण. 3मो. ह्मणशील.

ऐक दारुका सावधान ॥ मद्धर्म पूर्ण *ऐसे ॥७८॥ हृदयीं नित्य माझें ध्यान ॥ मुखीं माझें नामकीर्तन ॥ श्रवणीं माझें कथाश्रवण ॥ +करें मदर्चन सर्वदा ॥ ७९ ॥ नयनीं मम मूर्तिदर्शन ॥ चरणीं ×मदालया गमन ॥ रसनै मम तीर्थप्राशन ॥ मत्प्रसादभोजन अत्यादरें ॥३८०॥ साष्टांगें मजचि नमन ॥ आल्हादें ※मद्भक्तां आलिंगन ॥ सप्रेम माझें सेवेविण ॥रिता अर्धक्षण उरोंनेदी ॥ ८१ ॥ ऐसी सेवा करितां पहाहो ॥सर्वभूतीं देखे मद्भावो ॥ सर्वधर्मांमाजीं रावो ॥ येथें अपावो कदा न रिघे ॥ ८२ ॥ सर्वभूतीं माझें दर्शन ॥ तेव्हां वैराग्य वोसंडे पूर्ण ॥ तेथ सहजें ०उठे ब्रह्मज्ञान ॥ देहाभिमानछेदक ॥ ८३ ॥ देहाभिमान होतां क्षीण ॥ अपेक्षेसि पडे शून्य ॥ तेव्हां निरपेक्षता पूर्ण ॥ सहजें जाण ठसावे ॥ ८४ ॥ निरपेक्षतेची दशा कैशी ॥ विषय भेटलिया इंद्रियांसी ॥ उपेक्षा करी त्यांसी ॥ जेवीं मृगजळासि सज्ञान ॥ ८५ ॥ या दृष्टीं पाहतां चराचर ॥ समूळ मिथ्या व्यवहार ॥ जेवीं दोराचा सर्पाकार ॥ तेवीं भ्रमें संसार भासत ॥ ८६ ॥ केवळ दोराचा सर्पाकार ॥ तो श्वेत कृष्ण कीं रक्तांबर ॥ तेवीं विषयीं विषयव्यवहार ॥ मिथ्या संसार मायिक ॥ ८७ ॥ जेवीं शुक्तिकेचा रजताकार ॥ न घडे एकही अलंकार ॥ तेवीं हा आभासे संसार ॥ मिथ्या व्यवहार मायिक ॥ ८८ ॥ मुळीं मिथ्या भवभान ॥ त्याचें ᵌभ्रांतासि भवबंधन ॥ तेथील जें मुक्तपण ॥ हेंही जल्पन मायिक ॥ ८९ ॥ आम्ही सज्ञान पूर्ण ॥ निर्दळूनि भवबंधन ॥ दृढ साधिलें मुक्तपण ॥ हेंही जल्पन मायिक ॥ ३९० ॥ संसार मायिकरचना ॥ हें सत्यत्वें कळलें ज्याच्या मना ॥ तें मनचि लाजे मनपणा ॥ विज्ञान जाणा त्या नांव ॥ ९१ ॥ जागृति सुषुप्ति आणि स्वप्न॥ संसाराचें मिथ्या ज्ञान ॥ हें ज्यासि ठसावलें संपूर्ण ॥ विज्ञान जाण त्या नांवें ॥ ९२ ॥ मुख्य विज्ञानाचें लक्षण ॥ साधक होय ब्रह्म पूर्ण ॥ जगीं न देखे मीतूंपण ॥ उपशम जाण या नांव ॥ ९३ ॥ ऐसा उपशम ज्यासि पूर्ण ॥ त्यासी मजसीं नाहीं भिन्नपण ॥ दारुकें ऐकतां निरूपण ॥ हृदयीं ते खूण चमत्कारिली ॥९४॥ अलंकार सोनें पाहूं गेला ॥ तंव तोचि सोनें होऊनि ठेला ॥ तेवीं मी तंव कृष्णरसें वोतला ॥ वियोग नाथिला देहलोभें ॥ ९५ ॥ मी कृष्णरूप आपण ॥ मज कृष्णेंसि नाहीं भिन्नपण ॥ ऐशी चमत्कारली खूण ॥ मी ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ९६ ॥

॥ श्लोक ॥ इत्युक्तस्तं परिक्रम्य नमस्कृत्य पुनःपुनः ॥ तत्पादौ शीर्ष्ण्युपाधाय दुर्मनाः प्रययौ पुरीम् ॥ ५० ॥ इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे यदुकुलसंक्षयो नाम त्रिंशोऽध्यायः ॥ ३० ॥

॥ टीका ॥ ऐसें ऐकोनि श्रीकृष्णवचना ॥ शिरीं वंदूनि श्रीकृष्णाज्ञा ॥ खेद सांडोनियां मना ॥ कृष्णचरणा लागला ॥ ९७ ॥ करूनि त्रिवार प्रदक्षिणा ॥ पुनःपुनः लागोनि चरणा ॥ चरणीं माथा ठेऊनि जाणा ॥ घेऊनि श्रीकृष्णाज्ञा निघाला ॥ ९८ ॥ ब्रह्म सर्वत्र परिपूर्ण ॥ त्याचा

१ हातानें. २ देवळांत, क्षेत्रांत. ३ जिभेनें. ४ जग. ५ बडबड. ६ मी कृष्णरूपच असतां देहलोभानें मला हा नसता वियोग प्राप्त झाला.

*ना. ऐक. +ना. करी. ×मो. मदेवालया. ※मो. भक्ती कां आलिंगन. ०मो. होय शुद्धज्ञान. ᵌना. भ्रांतासीच बंधन.

*बोधक श्रीकृष्ण ॥ तो निजधामा गेला आपण ॥ तेणें दुर्मन दारुक ॥९९॥ पुढती श्रीकृष्ण-दर्शन ॥ सर्वथा नलभे आपण ॥ यालागीं अतिदुर्मन ॥ करी गमन द्वारकेसी ॥४००॥ दारुक धाडिला द्वारकेसी ॥ तंव मैत्रेय आला कृष्णापाशीं ॥ तोचि +काळीं हृषीकेशी ॥ ब्रह्मज्ञान त्यासी उपदेशी ॥ १ ॥ तो ब्रह्मज्ञान उपदेशविधी ॥ शुक बोलिला तृतीयस्कंधीं ॥ ह्मणोनि तें निरूपण ये संधीं ॥ न प्रतिपादीं पुनरुक्त ॥ २ ॥ पहावया कृष्णनिर्याण ॥ उद्धव गुप्त होता आपण ॥ तेणें ऐकोनि ×ज्ञाननिरूपण ॥ संतोषें नमन करी कृष्णा ॥ ३ ॥ तेचिकाळीं मैत्रेयासी ॥ स्वमुखें बोलिला हृषीकेशी ॥ विदुर येईल तुजपाशीं ॥ त्यासि तूं उपदेशी गुह्यज्ञान ॥ ४ ॥ ❀उपदेशूनि मैत्रेयासी ॥ देवें धाडिला तो स्वाश्रमासी ॥ उद्धवेंही नमूनि हृषीकेशी ॥ तोही बदरीसी निघाला ॥ ५ ॥ दारुक धाडिला द्वारकेसी ॥ मैत्रेय धाडिला स्वाश्रमासी ॥ उद्धव धाडिला बदरीसी ॥ व्याध अधमासी धाडिलें स्वर्गा ॥ ६ ॥ निजरथसहित घोडे ॥ निजायुधेंसि धाडिले पुढें ॥ आतां आपणही वाडेंकोडें ॥ निजधामाकडे निघेल ॥ ७ ॥ निजधामा निघतां श्रीपती ॥ समस्त देव पाहों येती ॥ ते सुरसकथासंगती ॥ पुढिले अध्यायीं अतिगोड ॥ ८ ॥ अजन्मा तो जन्म मिरवी ॥ विदेहा अंगीं देहपदवी ॥ स्वयें अक्षयीं तो मरण दावी ॥ अति लाघवी श्रीकृष्ण ॥ ९ ॥ ज्याचें निजधामगमन ॥ शिवविरिंच्यादिकां अतर्क्य ह्मण ॥ त्याचें सांगेन उपलक्षण ॥ श्रोता अवधान मज द्यावें ॥ ४१० ॥ एकादशाचा कळस जाण ॥ श्रीकृष्णाचें निजनिर्याण ॥ जेथ नाहीं देहाभिमान ॥ तें ब्रह्म पूर्ण ०परिपक्क ॥ ११ ॥ भय नाहीं जन्म धरितां ॥ भय नाहीं देहीं वर्ततां ॥ भय नाहीं देहत्यागितां ॥ हे ब्रह्मपरिपूर्णता हरि दावी ॥ १२ ॥ एका जनार्दना शरण ॥ पुढें ⁹अचुंबित निरूपण॥ संतीं मज द्यावें अवधान ॥ सांगेन व्याख्यान सद्गुरुकृपा ॥ ४१३ ॥ इतिश्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे परमहंससंहितायां एकाकारटीकायां स्वकुलनिर्दळणं नाम त्रिंशत्तमोऽध्यायः ॥ ३० ॥ अध्याय ॥ ३० ॥ ओंव्या ॥ ४१३ ॥ ॥ श्लोक ॥ ॥ ५० ॥ ॥ एवंसंख्या ॥ ४६३ ॥

---

# अध्याय एकतिसावा.

श्रीगणेशाय नमः॥श्रीकृष्णाय नमः ॥ओंनमो श्रीसद्गुरु अच्युता॥ तूं देहीं असोनि देहातीता॥ गुणीं निर्गुणत्वें वर्ततां ॥ देहममता तुज नाहीं ॥ १ ॥ देहममता नाहीं निःशेख ॥ तानेपणीं प्यालासि विख ॥ पूतना शोषिली प्रत्यक्ष ॥ दावाग्नि देख प्राशिला ॥२॥जो तूं *वैकुंठपीठ विराजमान॥त्या तुज नाहीं देहाभिमान ॥ होऊनि 7गोवळांसमान ॥ हुंबरी घालिसी जाण स्वयें ॥ ३ ॥ तुज पावावया कर्मबळें ॥ सदा सोशिती सोंवळें ओंवळें ॥ तो तूं मेळवूनि गोवळे ॥ जेवण खेळे मेळें स्वयें करिसी ॥ ४ ॥ ज्यातें ह्मणती दुराचार ॥ तो तुवां करूनि व्यभिचार॥

१ उदासीन. २ एथें. ३ पुनः बोलून. ४ कृष्णाचें निजधामास जाणें. ५ बदरिकाश्रमास. ६ जराव्याधास. ७ शेवट. ८ अति अद्भुत. ९ विष. १० गुराख्यांसमान. ११गवळ्यांचे मुलांचा एक खेळ आहे.

*मो. बोधकर्ता. +मो. संधीं हृषीकेशी. ×ना. विज्ञाननिरूपण. ❀मो. उल्हासोनि मैत्रेयासी. ०मो. निष्कंप. ⁹मो. अपूर्व. *मो. वैकुंठपीठीं. 7मो. गोवळां आधीन.

केला गोपिकांचा उद्धार ॥ हें अगम्य चरित्र वेदशास्त्रीं ॥ ५ ॥ घरीं सोळासहस्र नारी ॥ नांदसी *एकलक्ष साठीसहस्र कुमरीं ॥ तरी तूं बाळ ब्रह्मचारी ॥ तुज सनत्कुमारीं वंदिजे ॥६॥ तुझे ब्रह्मचर्याची थोरी ॥ शुकनारद वंदिती शिरीं ॥ हनुमंत लोळे पायांवरी ॥ तूं ब्रह्मचारी नैष्ठिक ॥७॥ व्रतबंध नव्हतां आधीं ॥तुवां भोगिलीं गोवळी पैंधीं ॥ तो तूं ×ऊर्ध्वरेता त्रिशुद्धी॥ तुज भीष्म वंदी सर्वदा ॥ ८ ॥ नवलक्ष गोकंठपाशीं ॥ तुज बांधवेना हृषीकेशी ॥ तो तूं भावार्थें +बांधिलासी ॥ रासक्रीडेसी गोपिकीं ॥ ९ ॥जैसें जैसें त्यांचे ※मनोगत ॥ तैसतैसा तूं क्रीडा करित ॥ सामासें रात्रि करूनि तेथ ॥ तत्प्रेमयुक्त विचरसी ॥ १० ॥ तो तूं कामासि नातळत ॥ कामिनीकाम पूर्ण करित ॥ लाजवूनि विधिवेदार्थ ॥ गोपिका समस्त तारिल्या ॥ ११ ॥ गोपी तारिल्या प्रेमाद्भुतें ॥ गायी तारिल्या वेणुगीतें ॥ गौळिये तारिले समस्ते ॥ श्रीकृष्णनाथें निजयोगें ॥ १२ ॥ कंस तारिला ०दुष्टबुद्धि ॥ व्याध तारिला अपराधी ॥ ऐसा कृपाळु तूं त्रिशुद्धी ॥ 2संसार अवधी श्रीकृष्णा ॥ १३ ॥ तुळेंधवे श्रीकृष्णाच्या बोला ॥ यमें गुरुपुत्र आणूनि दीधला ॥ तो श्रीकृष्ण निजतनू त्यागिता झाला ॥ जो नव्हे अंकिला काळिकाळा ॥ १४ ॥ भागवतीं कळसाध्यावो ॥ जेथें निजधामा जाईल देवो ॥ तो अतिगहन अभिप्रावो ॥ सांगे शुकदेवो परीक्षितीसी ॥ १५ ॥ कळसावरतें न चढे काम ॥ तेवीं देवें ठाकिल्या निजधाम ॥ राहिला निरूपणसंभ्रम ॥ कळसोपक्रम याहेतू॥१६॥वेदशास्त्रार्थनिजनिर्वाहो ॥ देहीं नुपजे अहंभावो ॥ तो हा एकतिसावा अध्यावो ॥ जेथ निजधामा देवो स्वेच्छा निघे ॥१७॥ श्रीकृष्णाचें निजधामगमन ॥ ब्रह्मादिकां अतर्क्य जाण ॥ एका जनार्दनकृपा पूर्ण ॥ विशद व्याख्यान सांगेल ॥१८॥ दारुकें द्वारके प्रयाण ॥ केलिया निजधामा श्रीकृष्ण ॥ तें निर्याणकाळींचें दर्शन ॥ पाहों देवगण स्वयें आले ॥ १९ ॥ तेचिअर्थींचें निरूपण ॥ श्रीशुक सांगे आपण ॥ श्रोता परीक्षिती सावधान ॥ श्रीकृष्णनिर्याण श्रवणार्थीं ॥ २० ॥

॥ श्लोक ॥ श्रीशुक उवाच ॥ अथ तत्रागमत् ब्रह्मा भवान्याच समं भवः ॥ महेंद्रप्रमुखा देवा मुनयः सप्रजेश्वराः ॥ १ ॥ पितरः सिद्धगंधर्वा विद्याधरमहोरगाः ॥ चारणा यक्षरक्षांसि किन्नराप्सरसो द्विजाः ॥ २ ॥

॥ टीका ॥ जो व्यासाचें निजजीवन ॥ जो योगियांचें चूडारत्न ॥ तो श्रीशुक स्वयें आपण ॥ श्रीकृष्णनिर्याण निरूपी ॥ २१ ॥ शुक ह्मणे परीक्षिती ॥ निजधामा निघतां श्रीपती ॥ सकल देव दर्शनार्थ येती ॥ विमानपंक्ती सवेग ॥ २२ ॥ ब्रह्मा सत्वर आला तेथ ॥ भंव भवानीसमवेत ॥ इंद्र मुख्यदेव समस्त ॥ स्वगणयुक्त ते आले ॥ २३ ॥ सनकादिकमुनिपंक्ती ॥ आले दक्षादि प्रजापती ॥ अर्यमादिपितर येती ॥ कपिलादि धांवती महासिद्ध ॥ २४ ॥ आले गंधर्व विद्याधर ॥ यक्षचारण किन्नर ॥ बिभीषणादि राक्षस थोर ॥ वेगीं श्रीधर पाहों येती ॥ २५ ॥

---

१ निष्ठावान्. २ गायींच्या गळ्यांतील दाव्यांनीं. ३ सहामहिने. ४ जो कळिकाळाचे ताब्यांत नाहीं. ५ शेवटला अध्याय. ६ शंकर. ७ पार्वतीसहित.

*मो. साठी सहस्र कुमरीं. ×मो. दुर्धर त्रिशुद्धी. +मो. बांधिजेसी. ※ना. मनोरथ. ०मो. दुष्टबुद्धी. 2मो. दयानिधी श्रीकृष्णा.

पहावया श्रीरंग ॥ आले पाताळींचें पन्नगें ॥ ज्यांतें ह्मणती महोरगें ॥ तेही सवेग पैं आले ॥२६॥ द्विज आले दत्तात्रेयादिक ॥ नारद पाहों आला कौतुक ॥ *पक्षी गरुडप्रमुख ॥ सत्वर देख ते आले ॥ २७ ॥ रंभा उर्वशी मेनिका ॥ अप्सरा ज्या अष्टनायिका ॥ कृष्णदर्शना आवांका ॥ धरोनि देखा त्या आल्या ॥ २८ ॥ कृष्णस्वरूप पहावया ॥ नयनीं थोर घेतला थारा ॥ यालागीं देवसमुदाया ॥ येणें लवलाह्यां जाले एथें ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ द्रष्टुकामा भगवतो निर्याणं परमोत्सुकाः ॥ गायंतश्च गृणंतश्च शौरेः कर्माणि जन्मच ॥ ३ ॥

॥ टीका ॥ कृष्ण पहावया आवडी ॥ दृष्टी धांवे लवडसवडी ॥ होत डोळ्या आडाडी ॥ अभिनव गोडी कृष्णाची ॥ ३० ॥ श्रीकृष्णनिर्याण दर्शन ॥ पहावया उत्साहपूर्ण ॥ सत्वर आले सुरगण ॥ पुढती कृष्णदर्शन आह्मां कैंचें ॥ ३१ ॥ सौंदर्याची निजसीमा ॥ घनःश्याम सुंदर प्रतिमा ॥ तो कृष्ण गेलिया निजधामा ॥ दर्शन आह्मां मग कैंचें ॥ ३२ ॥ श्रीकृष्णदर्शनाची गोडी ॥ सुरगणां लागलीसे ×गाँढी ॥यालागीं ते अतितातडीं॥ आले +आवडीं दर्शनार्थ॥३३ कृष्णकर्मे स्वयें वर्णित ॥ कृष्णचरित्रें गीतीं गात ॥ मिळोनि सुरवर समस्त ॥ आले दर्शनार्थ सत्वर ॥ ३४ ॥

॥ श्लोक ॥ ववृषुः पुष्पवर्षाणि विमानावलिभिर्नभः ॥ कुर्वंतः संकुलं राजन् भक्त्या परमया युताः ॥ ४ ॥

॥ टीका ॥ विमानश्रेणी आकाशीं ॥ तेथ दाटलिया चौंपाशीं ॥ संमुख देखोनि हृषीकेशी ॥ जयजयकारासी तिहीं केलें ॥ ३५ ॥ देखोनि श्रीकृष्णनाथ ॥ भक्ति उद्रेक जालें चित्त ॥ दिव्य सुमनांतें वर्षत ॥ मिळूनि समस्त समकाळें ॥ ३६ ॥ दिव्य सुमनांचा रोळी ॥ कृष्णा चौंपाशीं विखुरलें ॥ तेणें श्रीकृष्ण शोभला त्याकाळां ॥ घनश्यामलीळा साजिरी ॥ ३७ ॥

॥ श्लोक ॥ भगवान् पितामहं वीक्ष्य विभूतीरात्मनो विभुः ॥ संयोज्यात्मनि चात्मानं पद्मनेत्रे न्यमीलयत् ॥ ५ ॥

॥ टीका ॥ देव पावले शीघ्रगती ॥ ब्रह्मा देखला सन्मुखस्थिती ॥ सदाशिव सम विभूती ॥ त्यातेंही श्रीपती देखता जाहला ॥३८॥इंद्रादिक निजविभूती ॥ त्यातें देखोनि श्रीपती॥ स्वनेत्र पद्मदळाकृती ॥ ते सहजस्थितीं झांकिले ॥३९॥ झांकिले अथवा उघडे नयन ॥ परी ※स्थिति नाहीं अधिकन्यून ॥ तो आत्मा आत्मत्वें परिपूर्ण ॥ तरी कां कृष्ण नयन झांकी ॥ ४० ॥ देखोनि देवसमुदावो ॥ कांहीं न बोलतां देवो ॥ नेत्र झांकावया कोण भावो ॥ तो अभिप्रावो अवधारा ॥ ४१ ॥ द्वारके असतां श्रीकृष्णनाथ ॥ सुरवर प्रार्थू आले तेथ ॥ तिहीं विनविला

---

१ सर्प. २ मोठे सर्प. ३ हेतू. ४ आग्रह, हट्ट घेतला. ५ लगबगीनें. ६ अपूर्व. ७ अत्यंत. ८अतित्वरेनें. ९ विमानांच्या रांगा. १० चोहों बाजूंनीं. ११ भक्तीच्या पुरानें भरलें. १२ समुदाय. १३ पसरलें. १४ कमळाच्या पाकळीसारखे.

*ना. द्विजपक्षी. ×मो. आवडी. +मो. वेगीं. ※मो. स्थिती.

देवकीसुत ॥ दास समस्त कृपा पाही ॥४२॥ स्वर्लोक लोकपाळ ॥ आम्ही तुझे दास सकळ ॥ निजधामा जातां एकवेळ ॥ आश्रम सकळ पुनीत कीजे ॥ ४३ ॥ त्या समस्तदेवांप्रती ॥ स्वमुखें बोलिला श्रीपती ॥ यदुकुळक्षयाचे अंतीं ॥ येईन निश्चितीं तेणें मार्गें ॥ ४४ ॥ ऐकोनि श्रीकृष्णवदंती ॥ सुरवर संतोषले चित्तीं ॥ आम्हांसि वश्य जाहला श्रीपती ॥ वचनोक्ती तुळ्ळी ॥ ४५ ॥ ते संधीचा ठाकूनि ठावो ॥ आला सुरवरसमुदावो ॥ त्याचा *छळावया अहंभावो ॥ निजनेत्र पहाहो हरि झांकी॥४६॥देवांचा बहुत समुदावो ॥ तेथ मी कोठ कोठें जावो॥ त्यांसि ठकावया पहाहो ॥ नेत्र झांकोनि देवो समाधि दावी ॥ ४७ ॥ नाहीं समाधि आणि व्युत्थानं ॥ कृष्ण परब्रह्म परिपूर्ण ॥ तोही निजनेत्र झांकून ॥ समाधिलक्षण मृषा दावी ॥४८॥ स्वच्छंदमृत्यु योगियांसी ॥ ते स्थिति नाहीं श्रीकृष्णापाशीं ॥ अतर्क्यगति शिवादिकांशी ॥ ते परीक्षितीशीं शुक सांगे ॥ ४९ ॥

॥ श्लोक ॥ लोकाभिरामां स्वतनुं धारणाध्यानमंगलम् ॥ योगधारणयाऽग्नेय्या दग्ध्वा धामाविशत्स्वकम् ॥ ६ ॥

॥ टीका ॥ कळिकाळ जिणोनियां जाण ॥ स्वच्छंदमृत्यु योगिजन ॥ ते अग्निधारणा करूनि पूर्ण ॥ स्वदेह जाळून स्वरूप होती ॥ ५० ॥ घृत थिजलें तें विघुरलें ॥ तैसें सगुण निर्गुणत्वा आलें ॥ या नांव योगाग्निधारण बोलिले ॥ श्रीकृष्णें देह दाहिलें हें कदा न घडे ॥ ५१ ॥ कृष्णस्वरूप परिपूर्ण ॥ तो कां करील योगधारण ॥ त्याचा लीलाविग्रही देह जाण ॥ करावें दहन काशाचें ॥ ५२ ॥ देखतां डोळ्यां लागे ध्यान ॥ संपूर्ण जेथें विगुंते मन ॥ एवढें श्रीकृष्णसौंदर्य संपूर्ण ॥ निजमोहन जगाचें ॥ ५३ ॥ ज्याचें देखतां बरवेपण ॥ मदन पोटा आला आपण ॥ लक्ष्मी भुलली देखोन चरण ॥ चैतन्यघन श्रीकृष्ण ॥ ५४ ॥ ज्याचें योगियां सदा ध्यान ॥ शिवादिकां नित्य चिंतन ॥ सकलमंगलांचें आयतनं ॥ चैतन्यघन श्रीकृष्ण ॥ ५५ ॥ श्रीकृष्ण स्वयें आत्माराम ॥ यालागीं तो जगाचा आराम ॥ लीलाविग्रही घनःश्याम ॥ +ध्यानगम्य चिद्रूप ॥ ५६ ॥ जैशी घृताची पुतळी ॥ थिजोनी जाहली एके काळीं ॥ तैशी चैतन्याची सुसावली ॥ स्वलीला जाली श्रीकृष्णमूर्ती ॥ ५७ ॥ दावाग्नि प्राशिला प्रत्यक्ष ॥ न चढेचि कौळियाचें विख ॥ तो देहाचि नव्हे देख ॥ मा ×मरणात्मक तेथ कैचें ॥ ५८ ॥ कृष्ण प्रकट ज्याचे हृदयीं ॥ तो देहींच होय विदेही ॥ मा त्या कृष्णाच्या ठायीं ॥ देहत्व कायी असेल ? ॥ ५९ ॥ ※कृष्णदेहो नाहीं निमाला ॥ तो आभासाचि सहजत्वा आला ॥ जैसा दर्पणींचा लोपला ॥ प्रतिबिंब आपुला आपुले ठायीं ॥६०॥ ज्याचें करितां नामस्मरण ॥ भक्तांचें निरसे जन्ममरण ॥ तो कृष्ण पावे जैं निधन ॥ तैं भक्तांसि कोण उद्धरी ॥ ६१ ॥ आत्ममायेच्या स्वलीला ॥ कृष्णकृष्णरूपें प्रकटला ॥ ते लीला त्यागोनि संचला ॥ निजरूपीं ठेला निजत्वें ॥ ६२ ॥ काणें देहो नेला ना त्यागिला ॥ तो ०लीलाविग्रहो संचला ॥ भक्तध्यानीं प्रतिष्ठिला ॥

१ पवित्र. २ श्रीकृष्ण वचन. ३ समाधि नसणें, समाधीतून उठणें. ४ व्यर्थ. ५ जाळिलें. ६ सौंदर्य. ७ पात्र, घर. ८ बाग, सुखरूपता. ९ ध्यानानें कळणारा. १० ओतिली. ११ यमुनेंतील काळिया नाग. १२ नष्ट झाला. १३ नाहींसें होतें. १४ मरण.

***मो. सांडावया. +मो. ध्यान अगम्य. ×मो. मरण. ※मो. कृष्णें देहो नेला ना त्यागिला. ०ना. लीलाविग्रही.**

स्वयें गेला निजधामा ॥ ६३ ॥ जैसजैसा भक्तांचा भावो ॥ तैसतैसा होय देवो ॥ तो भक्त ध्यानीं *स्थापूनि देहो ॥ निजधामा पहाहो मवचौनि गेला ॥ ६४ ॥ होकां कृष्णमूर्ति ज सगुण ॥ तरी देहदाह नलगे जाण ॥ कृष्णाश्रयें जग संपूर्ण ॥ तेव्हां होईल दहन जगाचें ॥६ जेणें मायेसि निजपोटीं ॥ दाविल्या ब्रह्मांडांच्या कोटी ॥ त्या श्रीकृष्णदेहदाहापाठीं ॥ जग ची गोठी तुरावी ॥ ६६ ॥ ऐशियाही युक्ति विचारितां ॥ अतिस्थूळ ते योग्यता ॥ श्रीकृष्ण देहचि विदेहता ॥ तेथ दाहकता ते कैंची ॥ ६७ ॥ कृष्णाचें असणें जाणें ॥ हेंहीं श्रीकृष्णा स्वयें जाणे ॥ तेथ वेदांचेंही बोलणें ॥ जाणपणें सरेना ॥ ६८ ॥ हे श्रीकृष्णाची अगम्य गती शिवविरिंच्यादि नेणती ॥ त्यांची कल्पना ऐशी चित्तीं ॥ आम्हांसवें श्रीपती येईल ॥ ६९ ऐसेनि अभिप्रायें पूर्ण ॥ आनंदले सुरगण ॥ अवघे होऊनि सावधान ॥ उल्हास पू मांडिला ॥ ७० ॥

॥ श्लोक ॥ दिवि दुंदुभयो नेदुः पेतुः सुमनसश्च खात् ॥ सत्यं धर्मो धृतिर्भूमेः कीर्तिः श्रीश्चानु तं ययुः ॥ ७ ॥

॥ टीका ॥ उल्हासले सुरगण ॥ दिवि[1] दुंदुभि त्राहाटिल्या जाण ॥ दिव्य सुमनें गगनींहून वर्षले पूर्ण श्रीकृष्णावरी ॥ ७१ ॥ वैकुंठादि +सर्वे संपत्ती ॥ भूलोकां आणिल्या श्रीपतीं ॥ ते येतां निजधामाप्रती ॥ आम्हुच्या आम्हांहातीं देईल वेगीं ॥ ७२ ॥ ऐसेनि देव उल्हासोनी । पुनः पुनः वर्षती सुमनीं ॥ शिवादि पाहती सावधानीं ॥ ×अतर्क्यगमनीं हरि गेला ॥ ७३ । आम्ही सकळ मायेचे नियंते ॥ आम्ही सर्वद्रष्टे सर्वज्ञाते ॥ ऐसा अभिमान होता देवांतें । त्यांसि श्रीकृष्णनाथें लाजविलें ॥ ७४ ॥ अलक्ष्य श्रीकृष्णाची निजगती ॥ शंभु स्वयंभू स्व नेणती ॥ तेणें विस्मित ते होती ॥ आश्चर्य मानिती सुरवर ॥ ७५ ॥ देव परमाश्चर्य जं मानिती ॥ तंव सत्य धर्म धृति कीर्ती ॥ श्रीयेसमवेत निघती ॥ सांडूनि क्षिती कृष्णलक्ष ॥ ७६ ॥ सत्य धर्म श्री धृति कीर्ती ॥ यांची श्रीकृष्णचरणीं नित्य वस्ती ॥ यालागीं कृष्णा सवें त्याही निघती ॥ सांडोनि क्षिती तत्काळ ॥ ७७ ॥ तूं ऐसें मानिशी परीक्षिती ॥ जे स धर्म श्री धृति कीर्ती ॥ निःशेष सांडूनि गेलीं क्षिती ॥ ऐक ते अर्थीं विचार ॥७८॥ मज पाहत श्रीकृष्णमूर्ती ॥ स्थिरावली ज्याचे चित्तीं ॥ तेथ धर्म श्री धृति कीर्ती ॥ साम्राज्यें वसती कुरु राया ॥ ७९ ॥ केवळ भक्तानुग्रही ॥ कृष्ण स्वयें लीलाविग्रही ॥ त्या कृष्णाची गती पाही । न पडे ठायीं ब्रह्मादिकां ॥ ८० ॥

॥ श्लोक ॥ देवादयो ब्रह्ममुख्या न विशंतं स्वधामनि ॥ अविज्ञातगतिं कृष्णं ददृशुश्चातिविस्मिताः ॥ ८ ॥

---

१ न जाऊन. २ शंकर, ब्रह्मदेव आदिकरून. ३ आकाशांत, स्वर्गांत. ४ वाजविल्या. ५ नियमन करणारे. ६ लक्षांत येण्यास कठीण. ७ शंकर व ब्रह्मदेव. ८ पृथ्वी. ९ कृष्णाबरोबर. १० राज्य करितात. ११ परीक्षितिराजा. १२ ठायीं न पडे=समजत नाहीं.

*मी. ठेऊनि. +पा. स्वर्ग. ×पा. अतर्क्यगतीं.

॥ टीका ॥ इंद्र बृहस्पति मुख्यत्वें ब्रह्मा ॥ देव पाहूनि परमभ्रमा ॥ श्रीकृष्ण प्रवेशला निजधामा ॥ अतर्क्य महिमा हरीचा ॥८१॥ अतर्क्य श्रीकृष्णाची गती ॥ देवांसि लक्षेना *निजशक्ती ॥ अतिविस्मय पावोनि चित्तीं ॥ स्वधामाप्रती निघाले ॥ ८२ ॥ देव जातां स्वधामाप्रती ॥ क्षणक्षणां आश्चर्य करिती ॥ अलक्ष्य लक्षेना कृष्णगती ॥ अतर्क्यगती शिवादिकां ॥ ८३ ॥ तेचि कृष्णाची अतर्क्यगती ॥ देवांसि लक्षेना दैवी शक्ती ॥ तेचि विशद दृष्टांतीं ॥ परीक्षितीप्रती शुक सांगे ॥ ८४ ॥

॥ श्लोक ॥ सौदामन्या यथाऽऽकाशे यांत्या हित्वाऽभ्रमंडलम् ॥ गतिर्न लक्ष्यते मर्त्यैस्तथा कृष्णस्य दैवतैः ॥ ९ ॥

॥ टीका ॥ वीज तळपे अभ्रमंडळीं॥ते कोठोनि आली कोठें गेली॥गति नरां ×न लक्षे भूतळीं॥ तैशी कृष्णगती जाली दुर्गम देवां ॥ ८५ ॥ वीज सकळ मनुष्यें देखती ॥ परी नकळे येती जाती गती ॥ तेवीं श्रीकृष्णाची अवतारशक्ती ॥ नकळे निश्चितीं देवांसी ॥८६॥ तेथूनियां येथें येणें ॥ कां येथूनियां तेथं जाणें ॥ हें नाहीं कृष्णास करणें ॥ तो सर्वत्र पूर्णपणें परिपूर्ण सदा ॥ ८७ ॥ यावया आकाशासि विहार ॥ सर्वथा रितें न मिळे घर ॥ तेवीं श्रीकृष्ण परमात्मा +सर्वत्र ॥ गत्यंतर त्या नाहीं ॥ ८८ ॥ कृष्ण गेला निजधामा ॥ परमाद्भुत त्याचा महिमा ॥ अलक्ष्य लक्षेना कृष्णगरिमा ॥ जाणोनि स्वाश्रमा निघाले देव ॥ ८९ ॥

॥ श्लोक ॥ ब्रह्मरुद्रादयस्ते तु दृष्ट्वा योगगतिं हरेः ॥ विस्मितास्तां प्रशंसंतः स्वं स्वं लोकं ययुस्तदा ॥ १० ॥

॥ टीका ॥ आम्ही मायानियंते निजशक्तीं ॥ आम्ही जाणों दुर्गमा योगगती ॥ आम्ही सर्वद्रष्टे त्रिजगतीं ॥ हा अभिमान चित्तीं देवांसी ॥ ९० ॥ तिहीं देखोनि कृष्णगती ॥ गळाली जाणिवेची वृत्ती ॥ लाजें पळाली ⁂अभिमानस्थिती ॥ ०तिहीं मांडिली स्तुति कृष्णाची ॥ ९१ ॥ रुद्र पंचमुखें करी स्तुती ॥ ब्रह्मा चहूं मुखीं वर्णी कीर्ती ॥ देव विस्मयातें पावती ॥ अगाध गती कृष्णाची ॥९२॥ करितां श्रीकृष्णाची स्तुती ॥ देवांसि न बाणे तृप्ती ॥ वर्णित श्रीकृष्णकीर्ती ॥ स्वलोकाप्रती सुर गेले ॥ ९३ ॥ पूर्वीं सांगीतली कृष्णगती ॥ तेचि सांगावया विशदस्थिती ॥ परतोनि परीक्षितिप्रती ॥ अतिप्रीतीं शुक सांगे ॥ ९४ ॥

॥ श्लोक ॥ राजन्परस्य तनुभृज्जननाप्ययेहा मायाविडंबनमवेहि यथा नटस्य ॥ सृष्ट्वाऽऽत्मनेदमनुविश्य विहृत्य चांते संहृत्य चाऽऽत्ममहिनोपरतः स आस्ते ॥ ११ ॥

॥ टीका ॥ ऐक राया परीक्षिती ॥ सकळ कारणां कारण श्रीपती ॥ मायेचीहि चेतनाशक्ती ॥ जाण निश्चितीं श्रीकृष्ण ॥ ९५ ॥ ज्यासि नाहीं व्यक्ति वर्ण ॥ ज्यासि नाहीं रूप

---

१ अत्यंत भ्रमांत. २ कळेना. ३ चकचके. ४ मेघमंडलांत. ५ जाणण्यास कठीण.

*ना. निजस्थिती. ×मो. नलक्षे भुलली, ना. नलभे भूतळीं. +ना. साचार सत्वर. ⁂ना. अभिमानशक्ती. ०मो. मग मांडिली.

गुण ॥ तो स्वलीला श्रीकृष्ण ॥ यदुवंशीं जाण अवतरला ॥ ९६ ॥ जो *सकळवंशवंशज जाण ॥ जो सकळ गोत्र गोत्रज पूर्ण ॥ जो सकळ ×यातीची याती आपण ॥ स्वयें श्रीकृष्ण सर्वादी ॥ ९७ ॥ त्यासि यदुवंशीं जें जन्म ॥ गोवर्धनोद्धारणादि कर्म ॥ कुळक्षयो निधनधर्म ॥ हें स्वलीलाकर्म योगमाया ॥ ९८ ॥ योगमायेचिया सत्ता ॥ मत्स्यकूर्मादि अवतारता ॥ केवीं धरी श्वेतवाराहता ॥ ते अतर्क्ययोग्यता कृष्णाची ॥ ९९ ॥ श्रीकृष्ण नव्हे नव्हे अवतार ॥ हा +अवतार पूर्ण चिन्मात्र ॥ त्याचें अतर्क्य चरित्र ॥ ब्रह्मादिरुद्र नेणती ॥१००॥ जैसें आरिसां प्रतिबिंब बिंबलें ॥ तैसें यदुवंशीं कृष्णजन्म जालें ॥ आरिसां हावभाव पाहिले ॥ तैसें कर्म केलें श्रीकृष्णें ॥ १ ॥ तो आरिसा हातींचा त्यागितां ॥ हारपे पुढील प्रतिबिंबता ॥ त्या नांव कृष्णनिधनता ॥ मिथ्या वार्ता मायिक ॥ २ ॥ जैसा नट धरी नाना वेशे ॥ सवेंचि सांडी त्या वेशास ॥ परी नटासि नाहीं नाश ॥ तैसा पैं हृषीकेश अवतारी ॥ ३ ॥ यदुवंशीं श्रीकृष्णनाथ ॥ सर्वकर्मीं सदा अलिप्त ॥ सृष्टिस्थित्यंतीं नित्यमुक्त ॥ त्यासि परमाद्भुत तें कायी ॥ ४ ॥ न मेळवितां साह्य संगें ॥ कृष्ण सृष्टि स्रजी निजांगें ॥ ते प्रतिपाळूनि यथाभागें ॥ संहारूनि वेगें स्वयें उरे ॥ ५ ॥ श्रीकृष्ण स्रजी पाळी संसारी ॥ हे प्रत्यक्ष जगीं दिसे थोरी ॥ कर्में करूनि तो अविकारी ॥ कदा विकारी नव्हे कृष्ण ॥ ६ ॥ श्रीकृष्ण अंतर्यामी सर्वभूतां ॥ जगकर्मांचा कृष्ण कर्ता ॥ कर्में करूनि तो अकर्ता ॥ विदेहता निजरूपें ॥ ७ ॥ ऐसा अगाध श्रीकृष्णमहिमा ॥ मर्यादा ※न पवे शिवशक्रब्रह्मा ॥ त्याचा देहचि विदेहात्मा ॥ गेला निजधामा तेणें योगें ॥ ८ ॥ येचि अवतारीं श्रीकृष्णनाथें ॥ देहीं दाविलें विदेहकर्मातें ॥ तें मागें परिसविलें तूतें ॥ ऐक मागुतें सांगेन ॥ ९ ॥ सात दिवस गोवर्धन ॥ निजकरीं धरूनि जाण ॥ इंद्राचा हरिला मान ॥ विदेही पूर्ण श्रीकृष्ण ॥ ११० ॥ दावाग्नि प्राशूनि आपण ॥ लाजविला हुताशन ॥ रासक्रीडा करूनि जाण ॥ हरिला मान मदनाचा ॥ ११ ॥ समुद्र सारूनि माघारा ॥ वसविलें निजनगरा ॥ निद्रा न मोडतां मथुरा ॥ द्वारकापुरा आणिली ॥ १२ ॥ सेवूनि भाजीचें पान ॥ तृप्त केले ऋषिजन ॥ श्रीकृष्ण अंतर्यामी आपण ॥ हें निजलक्षण दाविलें ॥ १३ ॥ येणेंचि देहें श्रीकृष्णनाथ ॥ जाहला वत्सें वत्सप समस्त ॥ ब्रह्मा लाजवूनि तेथ ॥ गर्वहत तो केला ॥ १४ ॥

॥ श्लोक ॥ मर्त्येन यो गुरुसुतं यमलोकनीतं त्वां चानयच्छरणदः परमास्त्रदग्धम् ॥ जिग्येऽन्तकान्तकमपीशमसावनीशः किं स्वावने स्वरनयन् मृगयुं सदेहम् ॥ १२ ॥

॥ टीका ॥ श्रीकृष्णें येणेंचि देहेंसी॥जाऊनियां यमलोकासी॥निग्रहूनि यमकाळासी॥निमाल्या °गुरुसुतासी आणिलें ॥१५॥ उत्तरेचिये गर्भस्थितीं ॥ जळतां ब्रह्मास्त्रमहाशक्ती ॥ तुज राखिलें

१ गोवर्धन पर्वत उचलून धरणें. २ आरशांत. ३ पौंगाख, सोंग. ४ कर्मांहून निराळा. ५ सैंग. ६ वत्सें राखणारा. ७ गर्वरहित. ८ याच देहानें. ९ शासन करून. १० मेलेल्या. ११ संदीपनीचे मुलास.

*ना. सकळ वंशें वंशज. ×मा. ज्ञातीची ज्ञाती. +मो. अवतारी. ※मो. नेणे शिव शक्ति ब्रह्मा. °मो. गुरुपुत्रासी.

ओकांतीं ॥ स्वचक्र श्रीपती प्रेरोनी ॥ १६ ॥ तुज राखावया हेंचि कारण ॥ तुझी माता रिघाली शरण ॥ कृष्ण शरणागतां शरण्य ॥ संकटहरण निजभक्तां ॥ १७ ॥ यादवांदेखतां *द्वारकापुरीं ॥ द्विजसुत राखितां सटीचे रात्रीं ॥ अर्जुन नेमेंसि प्रतिज्ञा करी ॥ तंव तो +सशरीरीं हारपला ॥ १८ ॥ ब्राह्मणें निर्भर्त्सिलें त्याशीं ॥ थोर लाज जाहली अर्जुनासी ॥ तेणें कळवळला हृषीकेशी ॥ भक्तसाह्यासी ×पावला ॥ १९ ॥ अर्जुनासहित हृषीकेशी ॥ ०रथेंसी रिघे क्षीरसागरासी ॥ द्विजसुत होते नारायणापाशीं ॥ ते द्वारकेसी आणिले ॥ १२० ॥ एवं भक्तसंकटनिवारण ॥ निजांगें करी श्रीकृष्ण ॥ कृष्णप्रतापाचें महिमान ॥ ऐक सांगेन अलौकिक ॥ २१ ॥ बाणासुराचा कैवारू ॥ करूं आला महारुद्र ॥ सर्वे नंदी भृंगी वीरभद्र ॥ स्वामिकार्तिकेंसी हरु जिंतला कृष्णें ॥ २२ ॥ उग्रासिही अतिउग्र ॥ भयंकराही भयंकर ॥ तो जिणोनि काळाग्निरुद्र ॥ बाणभुजाभार छेदिला ॥ २३ ॥ श्रीकृष्णवचन अति अगाध ॥ जेणें केला अपराध ॥ तो स्वदेहेंसी जराव्याध ॥ स्वर्गी प्रसिद्ध धाडिला ॥२४॥ एवढें सामर्थ्य श्रीकृष्णापाशीं ॥ तो काय राखूं न शके स्वदेहासी ॥ देहीं देहत्व नाहीं त्याशी ॥ गेला निजधामासी निजात्मता ॥ २५ ॥ एवढें सामर्थ्य श्रीकृष्णापाशीं ॥ तरी कां गेला निजधामासी ॥ ये लोकीं तेणेंचि देहेंसी ॥ राहतां त्यासी भय काय ॥ २६ ॥ ऐसा पोटींचा आंवांका ॥ धरून धरिशी आशंका ॥ तरी लोकाभिमान नाहीं यदुनायका ॥ स्वेच्छा देखा स्थिति त्याची ॥ २७ ॥

॥ श्लोक ॥ तथाऽप्यशेषस्थितिसंभवाप्ययेष्वनन्यहेतुर्यदशेषशक्तिधृक् ॥ नैच्छत्प्रणेतुं वपुरत्र शेषितं मर्त्येन किं स्वस्थगतिं प्रदर्शयन् ॥ १३ ॥

॥ टीका ॥ मायादि तिन्ही गुण ॥ इत्यादिकारणांकारण ॥ निजांगें श्रीकृष्ण आपण ॥ स्वयें ❀कारण अनादित्वें ॥२८॥ ब्रह्मांडें कोटी अनंत॥ उत्पत्तिस्थिति *प्रलयावर्त ॥ करूनि श्रीकृष्ण अलिप्त ॥ सामर्थ्यें अद्भुत 7श्रीकृष्णासि ॥ २९ ॥ अशेषांही परम शक्ती ॥ श्रीकृष्णलेशें सामर्थ्यवंती ॥ कृष्ण 9देह विदेहस्थिती ॥ स्वेच्छाशक्तीं स्वधामा गेला ॥ १३० ॥ इहलोकींची आसक्ती ॥ श्रीकृष्णासि नाहीं चित्तीं ॥ निजधामाची अतिप्रीती ॥ तेही निश्चितीं असेना ॥ ॥ ३१ ॥ निजदेहेंही इहलोकीं वस्ती ॥ स्वेच्छा न मानी व श्रीपती ॥ माझ्या देहाची अगम्य गति ॥ तेणें साधकस्थिती भंगेल ॥ ३२ ॥ माझा देह चैतन्यघन ॥ तेथें बाधीना विषयसेवन ॥ हें देखोनि साधकजन ॥ देहसाधन मांडिती ॥ ३३ ॥ वांयो साधूनियां पूर्ण ॥ दृढ करूनि देहधारण ॥ माझ्या ऐसें विषयसेवन ॥ करावया अभिमान वाढेल ॥ ३४ ॥ ऐसा वाढल्या देहाभिमान ॥ माझें मावळेल निजात्मज्ञान ॥ यालागीं विदेह श्रीकृष्ण ॥ गेला निघोन निजधामा ॥ ३५ ॥ माझें 5नाकळतां निजात्मज्ञान ॥ परी माझ्या ऐसें विषयसेवन ॥ करूं लागती योगीजन ॥ यालागीं श्रीकृष्ण निजधामा गेला ॥ ३६ ॥ माझ्या देहाची स्थितिगती ॥ ब्रह्मा स्वयंभू कदा नेणती ॥ मा इतरांसि ते गती ॥ कैशा रीतीं कळेल ॥ ३७ ॥ परी माझे ऐसा

१ नाशाचे वेळीं. २ शंकर. ३ हेतु, शंका. ४ सर्वही. ५ इच्छा, प्रीति. ६ प्राणायामेंकरून. ७ शिव व महादेव.

*मी. द्वारकेभीतरीं. +मा. स्व. ×मी. पातला. ०पो. रथसहित प्रवेशोनी. ❀मा. अकारण. *मो. प्रळयांत. 7मा. श्रीकृष्णासी. 9मी. श्रीकृष्णदेहोचि. 5मा. न.

देहाभिमान ॥ वाढवितील योगीजन ॥ हें जाणोनियां श्रीकृष्ण ॥ विदेहें आपण निजधाम गेला ॥ ३८ ॥ ज्याचे देहाचें दर्शन ॥ देखतां सबाह्य निवे मन ॥ त्याही देहाचें मिथ्यात्व पूर्ण। दावूनि श्रीकृष्ण निजधामा गेला ॥ ३९ ॥ एवं त्यागावया देहाभिमान ॥ कृष्ण निजधाम करी गमन ॥ तरावया साधक जन ॥ कृपाळू पूर्ण दीक्षा दावी ॥ १४० ॥ *एथें वैराग्य निज स्थिती ॥ देहाभिमानाच्या विरक्ती ॥ ×साधावी निजात्मप्राप्ती ॥ हे दीक्षा श्रीपती दावूनि गेला ॥ ४१ ॥ जेणें देहें स्वयें श्रीकृष्ण ॥ आचरला अनेक विंदानें ॥ परी ज्ञात्यासि नलगे दूषण ॥ हें पूर्णत्व पूर्ण प्रकाशलें ॥ ४२ ॥ जैत अथवा आल्या हारी ॥ ज्ञान मैळेना दोहीं परी॥ ज्यासि मिथ्या भास नर नारी ॥ तो सदा ब्रह्मचारी व्यभिचारामाजीं ॥ ४३ ॥ स्त्रीपुत्रादि गृहवासी ॥ असोनि, नित्य संन्यासी ॥ हेंही लक्षण हृषीकेशीं ॥ येणें अवतारेंसी दाविलें ॥ ४४। अंगीं त्राणलें गौंवळेपण ॥ सर्वेचि स्वामित्व आलें पूर्ण ॥ शेखीं सेवकही जाहला आपण ॥ तरी पूर्णपण मैळेना ॥ ४५ ॥ एकाचे घरीं उच्छिष्टें काढी ॥ एकाचीं अंगें धूतसे घोडीं ॥ तरी पूर्णत्वाविषे जोडी ॥ उणी कवडी नव्हेची ॥ ४६ ॥ एकाचीं निमालीं आणिलीं बाळें ॥ एकाचीं समूळ निर्दाळिलीं कुळें ॥ इहीं दोहीं परी ज्ञान न मैळे ॥ हेंही प्रांजळें प्रकाशिलें ॥४७। एकाचा पूर्ण जाहला कैवारी ॥ +एकाचा जाहला पूर्ण वैरी ॥ परी एकात्मता चराचरीं ॥ अणुभरी रुळेना ॥ ४८ ॥ एकीं उद्धरिलीं चरणीं लागतां ॥ तोही एकाचे चरणीं ठेवी माथा॥ बाप ज्ञानाची उदारता ॥ न्यूनपूर्णता तरी न घडे ॥ ४९ ॥ इतर ज्ञाते ज्ञानस्थिती ॥ ✲बोल बोलोनि दाविती ॥ तैशी नव्हे कृष्णमूर्ती ॥ आचरोनि स्थिति दाविली अंगें ॥१५०॥ अतिगुह्य ज्ञानलक्षणें ॥ आचरोनि दाविलीं श्रीकृष्णें ॥ परी ०अणुमात्रही उणें ॥ नेदीच पूर्णपणें अंगीं लागों ॥ ५१ ॥ एवढी ज्या देहाची ख्याती ॥ जेणें देहें दीन उद्धरती ॥ ज्या देहातें *सुर नर वंदिती ॥ ज्या देहाची कीर्ति [8]त्रैलोक्य वर्णी ॥ ५२ ॥ त्या देहाची अहंकृती ॥ निःशेष सांडूनि श्रीपती ॥ गेला निजधामाप्रती ॥ ठेऊनि निजमूर्ति स्वभक्त ध्यानीं ॥ ५३ ॥ कृष्णें देह नेला ना त्यागिला ॥ तो तो [5]लीलाविग्रही संचला ॥ निजभक्तध्यानीं प्रतिष्ठिला ॥ स्वयें निजधामा गेला निजात्मयोगें ॥ ५४ ॥

॥ श्लोक ॥ य यतां प्रातरुत्थाय कृष्णस्य पदवीं पराम् ॥प्रयतः कीर्तयेद्भक्त्या तामेवाप्नोत्यनुत्तमाम् ॥ १४ ॥

॥ टीका ॥ श्रीकृष्णअवताराचे अंतीं॥कृष्णाची जे परमगती॥अतिउत्कृष्ट योगस्थिती॥अतर्क्य निश्चितीं सुरश्रेष्ठां ॥ ५५ ॥ जे गतिहूनि [2]वरती ॥ चढेना अधिक गती ॥ तीतें परापदवी म्हणती ॥ वेदशास्त्रोक्तीं सज्ञान ॥५६॥ हे कृष्णपरमपदवी ॥ जो कोणी भक्तियुक्त सद्भावीं ॥ नित्य नेमस्त धरूनि जीवीं ॥ पढे निजभावीं प्रातःकाळीं ॥५७॥ भक्तियुक्त हृदयकमळीं ॥ या चौदा

---

१ पद्धत, मार्ग. २ लीला. ३ जय. ४ पराजय. ५ स्वतः, जातीनें. ६अभिमान. ७ परमपद. ८ नेमानें.

*ना. येथवरी. ×मो. साधावया. +मो. एकाचा महामहदारी, एकाची सेवा अंगिकारी, परी एकात्मता चराचरीं, अणुमात्र रुळेना ✲मो. बोलें बोलेंचि दाविती. ०मो. अधिक उणें. *ना. सुरवर. 8मो. त्रैलोकीं वर्णिजे. 5मो. लीलाविग्रह. 2मो. वरौती.

श्लोकांची जपमाळी ॥ *जिव्हाग्रें अनुदिनीं चाळी ॥ नित्य प्रातःकाळीं नेमस्त ॥ ५८ ॥ केलिया या नेमासी ॥ सांडणें नाहीं प्राणांतेंसी ॥ ऐशी निष्ठा जयापाशीं ॥ उत्तमत्वासी तो पावे ॥५९॥ कृष्णपदवी गातां गीतीं ॥ पायां लागती चारी मुक्ती ॥ +त्यांचीही उपेक्षूनि स्थिती॥ कृष्णपदवी निश्चितीं स्वयें पावे ॥१६०॥ हे चौदाही श्लोक जाण ॥ चौदा विद्यांचें जन्मस्थान॥ जो प्रातःकाळीं करी पठण ॥ कृष्णपदवी पूर्ण तो पावे ॥६१॥ हे चौदाही श्लोक जाण ॥ चौदा भुवनांचें निजजीवन ॥ कृष्णपदवी पाविजे पूर्ण ॥ नेमस्त पठण केलिया ॥ ६२ ॥ हे चौदाही श्लोक जाण ॥ चौदा इंद्रांच्या जीवां जीवन ॥ इंद्रांचा इंद्र होइजे आपण ॥ नेमस्त पठण केलिया ॥ ६३ ॥ हे चौदाही श्लोक जाण ॥ चौदापदें गयावर्जन ॥ पदीं पिंडा समाधान ॥ नेमस्त पठण केलिया ॥ ६४ ॥ हे चौदाही श्लोक जाण ॥ चौदा कांडें वेद संपूर्ण ॥ वेदवादा समाधान ॥ नेमस्त पठण केलिया ॥ ६५ ॥ हे चौदाही श्लोक जाण ॥ संसाराचें गुण कर्म वर्ण॥ मोडूनि करी ब्रह्म पूर्ण ॥ नेमस्त पठण केलिया ॥ ६६ ॥ प्रातःकाळीं नेमस्त पठण ॥ करितां पाविजे ×ब्रह्मपूर्ण ॥ या त्रिकाळीं जो करी पठण ॥ तो स्वदेहें श्रीकृष्ण स्वयें होय ॥ ६७ ॥ एथ पढोनि जो अर्थ पाहे ॥ तो स्वयें स्वयंभ श्रीकृष्ण होये ॥ श्रीकृष्णाची पूर्ण पदवी पाहे ॥ आंदणी होये ०तयाची ॥६८॥ कृष्णपदवी निजनिर्वाण ॥ श्रवणें पठणें अर्थें जाण ॥ साधकां करी ब्रह्म परिपूर्ण ॥ हें गुह्य निरूपण परमार्थसिद्धि ॥ ६९ ॥ एथ न करितां अतिसाधन ॥ अनायासें ब्रह्मज्ञान ॥ कृष्णपदवी ⁂पाविजे पूर्ण ॥ श्रद्धायुक्त पठण नेमस्त करितां ॥ १७० ॥ तक्षकभय निवृत्ती ॥ देहीं पावावया विदेहप्राप्ती ॥ हे सुगमोपायस्थिती ॥ कृपेनें परीक्षितीप्रति शुक सांगे ॥ ७१ ॥ हे कृष्णपदवी निज निर्वाण ॥ श्रद्धायुक्त नेमस्त पठण ॥ करितां पाविजे *ब्रह्म पूर्ण ॥ हे प्रतिज्ञा पूर्ण श्रीशुकाची ॥ ७२ ॥ ऐशी हे सुगम परी ॥ असतां जो श्रद्धा न धरी ॥ तो बुडाला संसारसागरीं ॥ अविद्येघरीं घरजांवयी तो ॥ ७३ ॥ तोचि अविद्येचा पोसणा ॥ विषयीं प्रतिपाळिला सुणा ॥ अहंधारोळां बैसणा ॥ सर्वदा जाणा वसवसित ॥७४॥ असोत या मूढगोष्टी ॥ रचल्या सुखा पडेल तुटी ॥ या श्लोकपठणासाठीं ॥ होय भेटी परब्रह्मीं ॥ ७५ ॥ कृष्णनिजपदवीव्याख्यान ॥ करावया मी अपुरतें दीन ॥ जनार्दनें कृपा करून ॥ हें निरूपण बोलविलें ॥ ७६ ॥ एका जनार्दना शरण ॥ श्रीकृष्णपदवीनिरूपण ॥ तो हा एकादशाचा कळस पूर्ण ॥ व्यासें जाणोनियां वाइला ॥ ७७ ॥ कृष्णपदवीपरतें ॥ निरूपण न चढे एथें ॥ तो हा कळस एकादशातें ॥ व्यासें निश्चितें निर्वाळिला ॥ ७८ ॥ निर्वाळिलें निरूपण॥ हें जनार्दनकृपा पूर्ण ॥ एका जनार्दना शरण ॥ यापरी श्रीकृष्ण निजधामा गेला ॥ ७९ ॥ येरीकडे द्वारकेशीं ॥ दारुक ⁹पावला विह्वळतेशीं ॥ तेथील वर्तले कथेशी ॥ परीक्षितीशीं शुक सांगे ॥ १८० ॥

---

१ अज्ञानाचे घरचा जांवई म्हणजे महामूर्ख. २ अविद्येनें वाढविलेला मुलगा. ३ कुत्रा. ४ अहंकाररूपी खळग्यांत बसणारा. ५ वर श्रीकृष्ण पदवीच्या सुखाचे वर्णन केलें आहे, त्यांत या मूर्खांचे वर्णनानें कदाचित् विरस उत्पन्न होईल. ६ पूर्णतेस आणिला. ७ चांगलें निर्मळ केलें. ८ दुःखासी.

*मो. जिव्हाग्रीं. +मो. त्यासही उपेक्षूनि चित्तीं. ×मो. ब्रह्म परिपूर्ण. ०मो. तयासी. ⁂मो.

॥ श्लोक ॥ दारुको द्वारकामेत्य वसुदेवोग्रसेनयोः ॥ पतित्वा चरणावस्रैर्न्यषिं-
चत्कृष्णविच्युतः ॥ १५ ॥

॥ टीका ॥ दारुक द्वारका देखत ॥ जैसें प्राणेंवीण प्रेत ॥ कां राजा जैसा दैवहत ॥ तैसी दिसत कळाहीन ॥ ८१ ॥ जेवीं कां वनिता पतिवीण ॥ सर्वार्थीं दिसे दीन ॥ तैशी द्वारावती जाण ॥ कळाहीन आभासे ॥ ८२ ॥ रस पिळिल्या जैसा ऊंस ॥ फळेंवीण फळकट भूस ॥ तैशी कृष्णेंवीण उद्वस ॥ दिसे चौपासं द्वारका ॥ ८३ ॥ दारुक प्रवेशे राजभुवन ॥ देखोनि वसुदेव उग्रसेन ॥ अश्रुधारा स्रवती नयन ॥ आक्रंदोनि चरण धरिले त्यांचे ॥ ८४ ॥ कृष्ण वियोगें तापला पूर्ण ॥ जैसें अतिसंतप्त जीवन ॥ तैसे अश्रुधारा स्रवती नयन ॥ तेणें पोळले चरण वसुदेवाचे ॥ ८५ ॥ उकसाबुकसीं फुंदे पोट ॥ दुःखें होऊं पाहे हृदयस्फोट ॥ जिव्हेसि बोबडी वाळले होठ ॥ सद्‍गदें कंठ दाटला ॥ ८६ ॥ बोल न बोलवे सर्वथा ॥ देखोनि दारुकाची व्यथा ॥ द्वारकेच्या जनां समस्तां ॥ अतिव्याकुलता वोडवली ॥ ८७ ॥ देवकी आणि रोहिणी ॥ आल्या अत्यंत हडबडोनी ॥ अतिव्याकुलता देखोनी ॥ कृष्णपत्नी तेथें आल्या ॥ ८८ ॥ रोणिवसांचिया नरनारी ॥ धांवल्या सभामंडपाभीतरीं ॥ तंव दारुकाची अवस्था भारी ॥ देखोनि जिव्हारीं दचकल्या ॥ ८९ ॥ स्फुंदतां उकसाबुकसीं ॥ श्वास परतेना दारुकासी ॥ सांगतां कृष्णवियोगासी ॥ मूर्च्छा त्यासी पैं आली ॥१९०॥ तेथें वसुदेव उग्रसेन ॥ करूनि त्याचें सांतवन ॥ वृत्तांत पुसतां सावधान ॥ काय तो वचन बोलिला ॥ ९१ ॥

॥ श्लोक ॥ कथयामास निधनं वृष्णीनां कृत्स्नशो नृप ॥ तच्छ्रुत्वोद्विग्नहृदया
जनाः शोकविमूर्च्छिताः ॥ १६ ॥

॥ टीका ॥ दारुक ह्मणे तुह्मी समस्त ॥ पळापळा अर्जुनासमवेत ॥ अर्धक्षण न रहावें एथ ॥ यादव समस्त निमाले ॥ ९२ ॥ यादवीं जाऊनि प्रभासासी ॥ केला तीर्थविधि विधानेंसी ॥ दानभोजनें देऊनि द्विजांसी ॥ मद्यपानासी मांडिलें ॥ ९३ ॥ चढला मद्याचा उन्मादु ॥ यादव सखे स्वगोत्रबंधू ॥ परस्परें युद्धसंबंधू ॥ गोत्रवधू तेथ घडला ॥ ९४ ॥ शस्त्रें करूनि स्वयमेव ॥ कोणी न मरतीच यादव ॥ तेथ घडलें एक अपूर्व ॥ एरिकेनि सर्व निमाले ॥ ९५ ॥ बळिभद्रें त्यागिलें देहासी ॥ श्रीकृष्णही गेला निजधामासी ॥ मज *पाठविलें तुह्मांपाशीं ॥ क्षण द्वारकेसी न रहावें ॥९६॥ हरीनें त्यागिलें द्वारकेसी॥ समुद्र बुडवील शीघ्रतेशीं॥हें कृष्णें सांगीतलें तुह्मांसी॥एथूनि त्वरेंसी निघावें ॥९७॥ ऐकूनि दारुकाची गोठी ॥द्वारकेसि एक बोंब उठी॥ उग्रसेन कपाळ पिटी॥मस्तक आपटी वसुदेव ॥९८॥ एक कुस्करिती दोनी हात ॥ एक अत्यंत चरफडत ॥ एक आक्रोशें आक्रंदत ॥ एकें मूर्च्छित पैं पडलीं ॥ ९९ ॥ एकां रडतां शोकलें कंठ ॥ एकाचे दोनी फुटले ओंठ ॥ एकाचा होऊं पाहे हृदयस्फोट ॥ दुःख आचाट सर्वांशी ॥२००॥ एक स्फुंदती उकसाबुकशीं ॥एक पिटिती हृदयासी ॥ एक तोडिती †कानकेशीं ॥ एकें दुःखें विशीं पैं जाहलीं ॥ १ ॥ एकें देती दीर्घ हाका ॥ एकें पडलीं अधोमुखा ॥

---

१ अभागी. २ चोहोंबाजूंनीं. ३ प्राप्त झाली. ४ घाबरोन. ५ अंतःपुरांतील. ६ अर्जुनासहित. ७ लव्हाळ्यानें. ८ शोषले, वाळले.

*ना. धाडिलें. †प्रती. [illegible]

एकें मीवाच्या ऐसे देख ॥ अत्यंतिका तळमळती ॥ २ ॥ बोंब सुटली नरनारी ॥ शंख करिती घरोघरीं ॥ कोण कोणातें निवारी ॥ *समस्तां सरी समदुःख ॥३॥ देवकी आणि रोहिणी ॥ मूर्च्छित पडल्या धरणीं ॥ सवेंचि उठती आक्रंदोनी ॥ दीर्घस्वरीं विलपती ॥ ४ ॥ कृष्णा विसाविया निजाचिया ॥ वेगीं भेटी देई कां रे कान्हया ॥ कां रुसलासि रे तान्हया ॥ तुझिया पायां लागेन ॥ ५ ॥ कृष्णा तूं माझा कैवारी ॥ कृष्णा तूं माझा सहाकारी ॥ शेवटीं मज सांडोनि दूरी धरी ॥ तूं दूरदेशीं गेलास ॥ ६ ॥ जिंणोनि कंसकेशियांतें ॥ वंदीं सोडविलें आम्हांतें॥ शेवटीं तुवां सांडिलें एथें ॥ निष्ठुर चित्तें जाहलासी ॥ ७ ॥ आणूनि निमाल्या पुत्रांतें ॥ तुवां मज सुखी केलें एथें ॥ ×अंतीं ठाकिलें मातें ॥ श्रीकृष्णनाथें माडिलें ॥ ८ ॥ कृष्णा निरसूनि माझें दुःख ॥ तुवां दीधलें परम सुख ॥ तो तूं निष्ठुर जाहलासि देख ॥ अंतीं निःशेष सांडिलें ॥ ९ ॥ माझिया पुत्रा कृष्णराया ॥ वेगीं ये कां रे कान्हया ॥ माझ्या नाहीं प्राशिलें पान्हया ॥ ह्मणोनि तान्हया रुसलासी ॥२१०॥ जिचें केलें स्तनपान ॥ ते यशोदाही जाहली दीन॥ तुझें न देखतां वदन ॥ कैसेनि प्राण राहतील ॥ ११ ॥ कृष्णा येरे येरे धांवोन ॥ चौभुजीं मज दे आलिंगन ॥ तुझें चुंबीन रे वदन ॥ मीं अतिदीन तुजलागीं ॥ १२ ॥ माझिया श्यामसुंदरा ॥ राजीवलोचना सुकुमारा ॥ चतुर्भुजा शारंगधरा ॥ ये कां रे उदारा श्रीकृष्णा ॥ १३ ॥ तुझे पद्मांकित पाये ॥ मज आठवती पाहे ॥ तेणें हृदय फुटताहे ॥ करूं मी काये श्रीकृष्णा ॥ १४॥ कृष्णा तुजवांचूनि वेगळी ॥ मी जाहलेंरे आंधळी ॥ माझी धरावया आंगोळी ॥ धांव वनमाळी श्रीकृष्णा ॥ १५ ॥ मज अंधाची कृष्ण काठी ॥ कोणें घातलीगे वैकुंठीं ॥ आतां मी मार्गें केवीं कंठी ॥ पात्र जगजेठी श्रीकृष्णा ॥१६॥ पुत्र मातृ वशात ऱ्हो ॥ एके वेळीं जाहली होळी॥ कोणी नुरेचि यदुकुळीं ॥ वक्षस्थळीं पिटिती ॥ १७ ॥ यादव पडलेरे केउते ॥ तुज कोठूनि धाडिलें कृष्णनाथें॥वेगीं न्या रे मज तेथें ॥ पाहीन समस्तें नातुलीं॥१८॥ऐकोनि देवकीचें रुदन ॥ वसुदेवादि उग्रसेन ॥ आक्रंदोनि सकळजन ॥ प्रभासासि जाण निघाले ॥ १९ ॥

॥ श्लोकं ॥ तत्र स्म त्वरिता जग्मुः कृष्णविश्लेषविव्हलाः ॥ व्यसवः शेरते यत्र ज्ञातयोऽघ्नंत आननम् ॥ १७ ॥

॥ टीका ॥ स्त्रिया पुत्र सुहृज्जन ॥ मिळोनि स्वगोत्र स्वजन ॥ शीघ्र प्रभासा गमन ॥ करित रुदन निघाले ॥ २२० ॥ +हाकाबोंबांचे बंबाळ ॥ स्त्रिया करिती कोल्हाळ ॥ कृष्णवियोगें सकळ ॥ दुःखविव्हळ निघालीं ॥ २१ ॥ रणीं पाडिले यादव ॥ प्राणरहित निर्जीव ॥ तेथ पावलीं ते सर्व ॥ बोंबारव खंती करिती ॥ २२ ॥

॥ श्लोक ॥ देवकी रोहिणी चैव वसुदेवस्तथा सुतौ ॥ कृष्णरामावपश्यंतः शोकार्ता विजहुः स्मृतिम् ॥ १८ ॥ प्राणांश्च विजहुस्तत्र भगवद्विरहातुराः ॥ उपगुह्य पतींस्तात चितामारुरुहुः स्त्रियः ॥ १९ ॥

---

१ आमच्या. २ जिंकून. ३ कंस आणि केशि या नांवाचा त्याचा अनुचर. ४ वाहींसें करून. ५कमलानें चिन्हित. ६ कोठें. ७ नातवंडें. ८ गोंगाट, हलकल्लोळ.

*मो. समस्तां शरीरीं समदुःख. ×मो. आतां करूनियां अनर्थ. अंतीं निश्चित सांडिलें. ना.

॥ टीका ॥ देवकी आणि रोहिणी ॥ वसुदेव उग्रसेन दोनी ॥ यादव निमाले रणांगणीं ॥ ते स्थानीं पाहों येती ॥ २३ ॥ दीर्घ शयनें युद्धधरणीं ॥ पडिल्या यादववीरश्रेणी ॥ तेथें रामकृष्ण पुत्र दोनी ॥ पाहतां नयनीं न देखती ॥ २४ ॥ कृष्णविरहें शोकाकुलित ॥ दुःख न संटेचि अतिअद्भुत ॥ चौघेजणें आक्रंदत ॥ पडिलीं मूर्छित अतिदुःखें ॥ २५ ॥ निमाल्या रामकृष्णांचें मुख ॥ आह्मी न देखों निःशेख॥ तेणें उथळलें परमदुःख॥ दुःखासवें देख निमाला प्राण॥२६॥ प्राणें करावें उपक्रमण ॥ त्यांसिही कृष्णदुःख दारुण॥दुःखें निमाले स्वयें प्राण ॥ वांचवी कोण रडत्यासी ॥ २७ ॥ न देखतां रामकृष्ण ॥ ते मूर्च्छेसवेंचि प्राण ॥ चौघीजणीं त्याजिले जाण ॥ अर्ध क्षण न लागतां ॥ २८ ॥ समस्त यादवांच्या स्त्रिया ॥ आपुलाले धरूनि प्रिया ॥ अग्निप्रवेश करावया ॥ चढल्या लवलाह्या चितेमाजीं ॥२९॥ यादवांचिया स्त्रिया बहुतीं ॥ कोण प्रवेशल्या कैशा रीतीं ॥ ते अग्निप्रवेशाची स्थिती ॥ परीक्षितिप्रती शुक सांगे ॥ २३० ॥

॥ श्लोक ॥ रामपत्न्यश्च तद्देहमुपगुह्याग्निमाविशन् ॥ वसुदेवपत्न्यस्तद्गात्रं प्रद्युम्नादीन् हरेः स्नुषाः ॥ कृष्णपत्न्योऽविशन्नग्निं रुक्मिण्याद्यास्तदात्मिकाः ॥ २० ॥

॥ टीका ॥ बळरामाचिया पत्नी ॥ रेवत्यादि मुख्य करूनि ॥ स्वपतीचा देह धरूनि ॥ प्रवेशल्या अग्नीं तद्ध्यानयुक्त ॥ ३१ ॥ निमाल्या देवकी रोहिणी ॥ इतरा ज्या वसुदेवपत्नी ॥ त्याही प्रवेशल्या अग्नी ॥ देह धरूनि स्वपतीचा ॥ ३२ ॥ प्रद्युम्नासवें *रती ॥ प्रवेशली महासती ॥ सांबासवें रूपवती ॥ प्रवेशे निश्चितीं दुर्योधनकन्या ॥ ३३ ॥ अनिरुद्धासवें देखा ॥ प्रवेशे रोचना आणि उखा ॥ एवं कृष्णसुना सकळिका ॥ यादवनायिका प्रवेशल्या अग्नीं ॥ ३४ ॥ अग्निप्रवेश श्रीकृष्णपत्नी ॥ त्यांची अलोलिक करणी ॥ त्यांमाजीं मुख्य रुक्मिणी ॥ सत्या शिरोमणी जगन्माता ॥३५॥ कृष्णानिर्याणें रुक्मिणी ॥ तद्रूप जाहली तत्क्षणीं ॥ जेवीं ज्वाळा मिळे वन्हीं ॥ तेवीं कृष्णपणीं तदात्मक ॥३६॥ कृष्ण गेला जाणोनि रुक्मिणी॥तटस्थ ठेली ते तत्क्षणीं ॥ सांडूनि देहाची गवसणी ॥ कृष्णस्वरूप मिळणीं तदात्मक जाली ॥ ३७ ॥ रुक्मिणीचा देहदहन ॥ करावया त्वरेचि प्रेतपण ॥ कृष्ण पूर्णत्वें स्वयंभ पूर्ण ॥ गति समान दोहींची ॥ ३८ ॥ +येरी पट्ट मुख्या सातजणी ॥ आणिक सोळा सहस्र कामिनी ॥ सर्वे प्रवेशल्या अग्नीं ॥ कृष्णचरणीं तदात्मक ॥ ३९ ॥ जिहीं भोगिलें कृष्णसुरतसुख ॥ त्यांसि गति न्यूनाधिक ॥ बोलतां वाचेसि लागे दोख ॥ जाहल्या चिदात्मक कृष्णसंगें ॥२४० ॥ जो वाचे स्मरे कृष्णकृष्ण ॥ तो तदात्मता पावे पूर्ण ॥ मा जिहीं स्वयें भोगिला श्रीकृष्ण ॥ त्यांची दशा न्यून कदा नघडे ॥ ४१ ॥ ज्यासि लागे कृष्णाचा अंगसंग ॥ त्याच्या लिंगदेहीं होय भंग ॥ त्यासि पूर्ण पदवी अभंग ॥ भोगितां भोग तादात्म्य नित्य ॥ ४२ ॥ ज्याच्या ×ध्यानासि ये कृष्णमूर्ती ॥ त्यासि चारी मुक्ति वंदिती ॥ मा जिहीं स्वयें भोगिला श्रीपती ॥ त्यांसि अन्यगती असेना ॥ ४३ ॥ ज्यांसि इहलोकीं कृष्णसंगती ॥ त्यांसि परलोकीं अन्य

१ यादववीरांच्या पंक्ती. २ न साहे. ३ दुःखाश्रूंनीं. ४ पतीस. ५ लवकर. ६ सर्व सतींस श्रेष्ठ. ७श्रीकृष्णाशीं तादात्म्य होण्याचें सुख, विश्वात्म्याशीं आपला आत्मा एक करण्याचें सुख, आत्मसुख. ८ दोष, पाप. ९ चैतन्यरूप. १० स्थिति. ११ सूक्ष्मदेहाचा. १२ न मोडणारी, अक्षय.

*मो. देवहूति. +मो. जैसीच गती रुक्मिणी, तैशाचि मुख्य पट्टकामिनी, इतरांही सोळा सहस्र राणी. प्रवेशल

गती ॥ बोलतां सज्ञान कोपती ॥ त्यांसि पूर्ण प्राप्ती पूर्णत्वें ॥ ४४ ॥ जो अडखळोनि गंगेसि पडे ॥ त्याचें पातक तत्काळ उडे ॥ मा ज्यासि विध्युक्त स्नान घडे ॥ त्याचें पाप न झडे मग कैसेंनी ? ॥ ४५ ॥ तेवीं कृष्णव्यभिचारसंगतीं ॥ गोपी उद्धरल्या नेणों किती ॥ त्याच्या निजपत्न्यांसि अन्यगती ॥ कैशा रीतीं घडेल ॥ ४६ ॥ तृण वल्ली मृग पाषाण ॥ गायी गोपिका गौळीजन ॥ कृष्णसंगें तरले पूर्ण ॥ त्यांचिया स्त्रियांसी अन्य गती कैशी ? ॥ ४७ ॥ यालागीं कृष्णसंगती ॥ ज्यासि घडे भलत्या रीतीं ॥ ते उद्धरले गा निश्चितीं ॥ जाण परीक्षिति कुरुराया ॥ ४८ ॥

॥ श्लोक ॥ अर्जुनः प्रेयसः सख्युः कृष्णस्य विरहातुरः॥आत्मानं सांत्वयामास कृष्णगीतैः सदुक्तिभिः ॥ २१ ॥

॥ टीका ॥ ज्याचा रथ वागवी आपण ॥ ज्याचा सारथी श्रीकृष्ण ॥ ऐसा प्रियसखा अर्जुन ॥ कृष्णविरहें पूर्ण उद्विग्न जाहला ॥ ४९ ॥ तंव कृष्णगीता सदुक्ती ॥ आठवल्या त्याच्या चित्तीं ॥ मग आपण आपणाप्रती ॥ बोलिला उपपत्ती त्या ऐका ॥ ५० ॥ कृष्ण माझ्या मनाचें मन ॥ कृष्ण बुद्धीचें आयतन ॥ कृष्णप्रभा हें प्रकाशे ज्ञान ॥ तेथ भिन्नपण मज कैचें ॥ ५१ ॥ कृष्णप्रभा दृष्टी देखे ॥ कृष्णावधानें श्रवणें ऐके॥ कृष्णानुवादें बोल बोलके ॥ तेथें मी वेगळिकें वृथा मानीं ॥ ५२ ॥ कृष्ण हृदयस्थ आत्मा अव्यंग ॥ कृष्ण माझ्या अंगाचें अंग ॥ त्या कृष्णासीं मज वियोग ॥ हा मिथ्या प्रयोग मायिक ॥ ५३ ॥ कृष्ण माझ्या जीवाचें जीवन ॥ कृष्ण सबाह्य परिपूर्ण ॥ *कृष्णवियोग मानिजे मीपण।तेंही निमग्न श्रीकृष्णीं ॥५४॥ भिन्नाभिन्न भूताकृती ॥ त्यांमाजीं अभिन्न कृष्णस्थिती ॥ विषमीं समान श्रीपती ॥ त्यासि वियोगप्राप्ती कदा नघडे ॥ ५५ ॥ घट मृत्तिकेसी नव्हे भिन्न ॥ पट नव्हे तंतु त्यागून ॥ तैसा श्रीकृष्ण वेगळा अर्जुन ॥ माझें मीपण निवडेना ॥ ५६ ॥ कृष्णवियोग मी मानीं जेथ ॥ तेथेंही असे श्रीकृष्णनाथ ॥ वियोग मानिती ×जे सत्य ॥ ते केवळ भ्रांत अतिमूर्ख ॥ ५७ ॥ नित्य सर्वगत परिपूर्ण ॥ कृष्ण अखंडदंडायमान ॥ त्यासी मजशीं वेगळेपण ॥ सर्वथा जाण असेना ॥ ५८ ॥ 'नजायते म्रियते' हें वचन ॥ स्वमुखें बोलिला श्रीकृष्ण ॥ त्या कृष्णासि जन्ममरण ॥ ॐमूर्खजन मानिती ॥ ५९ ॥ अक्षरं ब्रह्म परमं ॥ स्वयें बोलिला पुरुषोत्तम ॥ त्या कृष्णासि जन्ममरण ॥ मूर्ख मनोधर्म कल्पिती ॥ २६० ॥ जो क्षराक्षरातीत ॥ उत्तम पुरुष श्रीकृष्णनाथ ॥ त्यासि जन्ममरणादि आवर्त ॥ कल्पिती भ्रांत ०मनोधर्में ॥६१॥ त्या कृष्णाशीं मज वेगळेपण ॥ कल्पांतींही नाहीं जाण ॥ करितां गीतार्थाचें स्मरण ॥ आपुलें आपण पूर्णत्व देखे ॥ ६२ ॥ मी अज, आद्य +अचळ ॥ मी निज नित्य निर्मळ ॥ माझ्या स्वरूपा नाहीं चळ ॥ त्रैलोक्य खेळ पैं माझा ॥ ६३ ॥ जगातें नेमितों वेद ॥ तो निः·

१ नष्ट होतें. २ तर मग. ३ विधीप्रमाणें. ४ पशु. ५ कोणत्याही रीतीनें. ६ दुःखी, खिन्न. ७ युक्ती, योग्य समजूत. ८ घर, स्थान. ९ समज. १० सारखी व्याप्त, अनुस्यूत. ११ श्रीमत् भगवत्गीता अध्याय २ श्लोक २०. १२ श्रीमत् भगवत्गीता अध्याय ८ श्लोक ३. १३ भोवरा, फेरा. १४ अभिष्ट. १५ नेम घालून देणारा, जगाचे नियम करणारा.

*मो. कृष्णवियोगें. × मो. जेथ सत्य. ॐमो. मूर्खधर्म कल्पिती. ०मो. मनोधर्में. +मो.

असित माझा बोध ॥ मी आनंद परमानंद ॥ स्वानंदकंद निजांगें ॥६४॥ मी आपरूपें आप ॥ मी प्रकृतिपुरुषांचा बाप ॥ मी अवतारी अवतरें कृष्णरूप ॥ हा सत्यसंकल्प पैं माझा ॥६५॥ धरोनिया माझ्या स्वरूपाचा आधार॥मीचि कृष्णीं कृष्णरूप अवतार॥करूनि *स्वलीला नाना-चरित्र ॥ अंतीं सामावें साचार +मजमाजीं मीच ॥ ६६ ॥ माझ्या निजस्वरूपाचेनि बळें ॥ मीच कृष्णरूपें खेळ खेळें ॥ अंतीं मजमाजीं मी मिळें ॥ निजात्ममेळें ×निजनिष्ठा ॥ ६७ ॥ एक नर एक नारायण ॥ परस्परें ते जाण अभिन्न ॥ यालागीं पूर्णत्वें अर्जुन ॥ आपण्या आपण स्वयें देखे ॥ ६८ ॥ बाप कृपाळु कृपानिधी ॥ उपदेशिला युद्धसंधीं ॥ परी लाविली जे समाधी ॥ ते न मोडे त्रिशुद्धी कल्पांतकाळीं ॥ ६९ ॥ नाहीं स्थानशुद्धि चोखट ॥ सैंघ रथांचे घडघडाट ॥ सुटतां शस्त्रांचे कडकडाट ॥ लाविली निर्दुष्ट परमात्मनिष्ठा ॥ २७० ॥ कैशी लाविली समाधी ॥ जी मोडेच महायुद्धीं ॥ शेखीं कृष्णावसानअवधी ॥ तोचि बोध उद्बोधी परिपूर्णत्वें ॥ ७१ ॥ ज्यासि गीता उपदेशी श्रीकृष्ण ॥ त्यासि न बाणे पूर्णपण ॥ ऐसें बोलतां वचन ॥ परम दूषण वाचेसी ॥ ७२ ॥ ते वाचा गलितकुष्ठें झडे ॥ तिसी विकल्पाचे पडती किडे ॥ ते वाचाचि समूळ उडे ॥ कृष्णोक्ति न घडे बोध म्हणतां ॥ ७३ ॥ गीताउपदेशें पूर्णपण ॥ नव्हे ऐसें म्हणतां जाण ॥ वाग्देवता कांपे आपण ॥ इतरांचा कोण पडिपाडु ॥ ७४ ॥ गीता ऐके, पाहे, पढे ॥ ज्यासि ※गीतास्मरण घडे ॥ त्यासी पुरि पूर्णत्वस्वयें जोडे ॥ मा उपदेशें नातुडे परिपूर्णत्व कैसें ? ॥ ७५ ॥ गीतार्थाचें पूर्णपण ॥ वक्ता जाणे श्रीकृष्ण ॥ कां श्रोता जाणे अर्जुन ॥ त्यासि ते खूण बाणली ॥ ७६ ॥ सारांश काढुनी वेदार्थां ॥ श्रीकृष्णें प्रकट केली गीता ॥ जेथील अभिप्रावो पाहतां ॥ जोडे आयिता निजमोक्ष ॥ ७७ ॥ परदेशी जाहला होता वेदांत ॥ त्यासि सहाय जाहला गीतार्थ ॥ तेणें बळें मतें समस्त ॥ जिणोनि समर्थ तो जाहला ॥ ७८ ॥ कृष्णनिःश्वासीं जन्मले वेद ॥ गीता श्रीकृष्णमुखें प्रकटली शुद्ध ॥ यालागीं गीतार्थ अगाध ॥ घडौते .द तेणें जाहले ॥ ७९ ॥ वेदें आर्धे केले तिन्ही वर्ण ॥ दुराविले स्त्रीशूद्रादिजन ॥ न शिवेचि त्यांचे कान ॥ हें वेदांसि न्यूनपण पैं आलें ॥ २८० ॥ तें वेदाचें फेडावया उणें ॥ गीता प्रकट केली श्रीकृष्णें ॥ गीतेचेनि श्रवणें पठणें ॥ उद्धरणें समस्तीं ॥ ८१ ॥ अर्जुनाचे प्रीतीकारणें ॥ ०गीतार्थ प्रकाशिला श्रीकृष्णें ॥ ते गीतेचेनि श्रवणें पठणें ॥ उद्धरणें जडजीवीं ॥ ८२ ॥ असो अगाध गीतामहिमान ॥ तेणें गीतार्थें तो अर्जुन ॥ करूनि आपुलें सांत्वन ॥ जाहला सावधान *प्रकृतिस्थ ॥ ८३ ॥

॥ श्लोक ॥ बंधूनां नष्टगोत्राणामर्जुनः सांपरायिकम् ॥ हतानां कारयामास यथावदनुपूर्वशः ॥ २२ ॥

॥ टीका ॥ यादव निमाले कुळवंशेंसी ॥ गोत्रज नाहीं कर्मांतरासी ॥ वैज राहिला द्वारकेसीं ॥

१ उदकरूपानें. २ युद्धाचे वेळीं. ३ चांगली. ४ निर्दोष, शुद्ध. ५ कृष्णावताराचे शेवटचे वेळीं. ६ गणना, कथा. ७ तर मग. ८ श्वासानें. ९ सुशोभित, वस्त्रसहित. १० जवळ केले, कृपापात्र केले. ११ अनिरुद्धपुत्र.

*मो. खेळलों नानाचरित्र +ना. माझे मीचि. ×ना. परमार्थनिष्ठा. ※ना. गीता गीता ऐसें स्मरण घडे. ०मो. श्रीकृष्णें गीता प्रकट करणें. *मो. [illegible]

ते विधी अर्जुनासी करणें पडली ॥८४॥ ' मी पावलों निष्कर्म ब्रह्म ॥ तो मी न करीं अंत्यष्टी कर्म ' ॥ ऐसा ज्ञानगर्वोपक्रम ॥ तोही सूक्ष्म भ्रम अर्जुनीं नाहीं॥८५॥ 'कर्मण्यकर्म यः पश्येत्'॥ हा अर्जुनास बाणला पूर्ण र्वम ॥ तेणें तो अंत्यष्टी कर्मास ॥ स्वयें सावकाश करितां जाहला ॥८६॥प्रथम ज्येष्ठाचें दहन॥पाठीं कनिष्ठाचें जाण ॥ तैसेंच करी पिंडदान॥ तिळतर्पण *सर्वांचें ॥ ८७ ॥ उत्तरक्रिया करूनि संपूर्ण ॥ द्वारकेसि आला अर्जुन ॥ तेथेंही वर्तलें आने आन ॥ समुद्र दारुण क्षोभला ॥ ८८ ॥

॥ श्लोक ॥ द्वारकां हरिणां त्यक्तां समुद्रोऽप्लावयत्क्षणात् ॥ वर्जयित्वा महाराज श्रीमद्भगवदालयम् ॥ २३ ॥ नित्यं सन्निहितस्तत्र भगवान् मधुसूदनः ॥ स्मृत्याऽशेषाशुभहरं सर्वमंगलमंगलम् ॥ २४ ॥

॥ टीका ॥ द्वारका सांडूनि गेला श्रीकृष्ण ॥ तेथ समुद्र येऊनि आपण ॥ बुडविली न लागतां क्षण ॥ पळाले जन हाहाभूत ॥ ८९ ॥ द्वारका बुडविली संपूर्ण ॥ राखिलें भगवंताचें स्थान ॥ जो आला पाताळींहून ॥ कुशनिर्दळण करावया ॥ २९० ॥ तें भगवंताचें स्थान ॥ समुद्र न करीचि निमग्न ॥तेथें हरीचें सन्निधान ॥ नित्य जाण स्फुरद्रूप ॥ ९१ ॥ ज्याचें करितांचि स्मरण ॥ महा पातका निर्दळण ॥ सकळ मंगळांचें आयतन ॥ तें हरीचें स्थान उरलें असे॥९२॥ तै द्वारकेमाजीं नित्यपूजा ॥ अद्यापि होतसे गरुडध्वजा ॥ ऐक परीक्षिती महाराजा ॥ तें अधोक्षजाचें स्थान ॥ ९३ ॥

॥ श्लोक ॥ स्त्रीबालवृद्धानादाय हतशेषान् धनंजयः ॥ इंद्रप्रस्थं समावेश्य वज्रं तत्राभ्यषेचयत् ॥ २५ ॥

॥ टीका ॥ एवं द्वारका जाहलिया निमग्न ॥ उरले बाल वृद्ध स्त्रीजन ॥ त्यांसि घेऊनियां अर्जुन ॥ निघाला आपण इंद्रप्रस्था ॥ ९४ ॥ यादव प्रभासापर्यंत ॥ गेले ते निमाले समस्त ॥ उरले जे द्वारकेआंत ॥ ×वज्रादिकांसमवेत अर्जुन निघे ॥ ९५ ॥ एवं घेऊनियां समस्तांसी ॥ पार्थ आला इंद्रप्रस्थासी ॥ राज्यधर यादववंशीं ॥ तेथ वज्रासी अभिषेकी ॥ ९६ ॥ अनिरुद्धाचा पुत्र वज्र॥यादववंशीं राज्यधर॥अभिषेकूनि अर्जुनवीर॥ रिघे सत्वर धर्माप्रती ॥९७॥

॥ श्लोक ॥ श्रुत्वा सुहृद्वधं राजन्नर्जुनात्ते पितामहाः ॥ त्वां तु वंशधरं कृत्वा जग्मुः सर्वे महापथम् ॥ २६ ॥

॥ टीका ॥ निजधामा गेला श्रीपती ॥ अर्जुनें सांगतां धर्माप्रती ॥ तुज राज्य देऊनि परीक्षिति ॥ लागले महापंथीं तत्काळची ॥ ९८ ॥ निजधामा गेला श्रीकृष्ण ॥ ऐकतां +कुंत्या वर्मीं सांडिला प्राण ॥ द्रौपदीसहित ※पांचही जण ॥ ०महापंथीं जाण निघाले ॥ ९९ ॥

॥ श्लोक ॥ य एतद्देवदेवस्य विष्णोः कर्माणि जन्म च ॥ कीर्तयेत् श्रद्धया मर्त्यः सर्वपापैः प्रमुच्यते ॥ २७ ॥

---

१ श्री. भ. गी. अ. ४ श्लोक १३. २ वर्म पूर्णपणें कळलें होतें. ३ कांहीं निराळेंच. ४ स्थान, घर. ५ श्रीकृष्णाची. ६ समुद्रांत बुडाल्यावर. ७ राज्य करण्यास योग्य. ८ निर्याणीं. ९ कुंतीनें.

॥ टीका ॥ देवाधिदेव सर्वेश्वर ॥ त्याचे मत्स्यकूर्मादि अवतार ॥ जन्मकर्मादि नाना चरित्र ॥ गाती ते पवित्र पुण्यराशी ॥ ३०० ॥ तेंचि चरित्र तत्त्वतां ॥ श्रद्धायुक्त गीतीं गातां ॥ प्रयागादि समस्ततीर्थां ॥ होय पवित्रता त्याचेनी ॥ १ ॥ श्रद्धायुक्त हरिकीर्तन ॥ त्याचे पवित्रतेसमान ॥ आन नाहीं गा पावन ॥ तुझी आण गा परीक्षिती ॥ २ ॥ ते तूं श्रद्धा कोण म्हणशी ॥ जेवीं धनलोभी धनासी ॥ गुळीं आवडी मोंकोडियासी ॥ तैशी कीर्तनासी निज आवडी ॥ ३ ॥ जेवीं शिणतां काळें बहुतें ॥ वंध्या प्रसवे एकोलतें ॥ ते कळवळी जैशी त्यातें ॥ तेवीं कीर्तनातें अतिप्रीती ॥ ४ ॥ जो कीर्तनाचेनि वैभवें ॥ हरिचरित्र गावया सद्भावें ॥ *पतंगाच्या ऐसा पावे ॥ 'श्रद्धा' त्या नांवें कुरुराया ॥ ५ ॥ ऐशिया श्रद्धासंपत्ती ॥ वर्णितां भगवद्गुणकीर्ती ॥ श्रद्धाळुवा परमप्राप्ती ॥ जाण निश्चितीं नृपनाथा ॥ ६ ॥ जरी आपण परमेश्वर ॥ स्वलीला धरी नानावतार ॥ तरी श्रीरामकृष्णचरित्र ॥ अतिगंभीर पावनत्वें ॥ ७ ॥ कृष्णाची चोरी गीतीं गातां ॥ सुवर्णस्तेया पावनता ॥ कृष्णव्यभिचार वर्णितां ॥ गुरुतल्पगता ×हरी दोष ॥ ८ ॥ पूतनापयपानें शोषण ॥ हें चरित्र करितां पठण ॥ सुरापानादि दोष दारुण ॥ +हरी संपूर्ण विश्वासकांचे ॥ ९ ॥ राक्षसकुळींचा रावण ॥ परी तो जातीचा शुद्ध ब्राह्मण ॥ नित्य करी वेदपठण ॥ ब्रह्मयाचा जाण तो पणतु ॥ ३१० ॥ त्याचें सकुळ निर्दळण ॥ श्रीराम करी आपण ॥ तें चरित्र करितां पठण ॥ ब्रह्महत्या जाण नासती ॥ ११ ॥ धर्मसाह्यकारी श्रीकृष्ण ॥ केलें पांडवांचें रक्षण ॥ त्या भारताचेनि श्रवणें जाण ॥ निमाले ब्राह्मण ॐवांचविले ॥ १२ ॥ अठरा ब्रह्महत्या जन्मेजयासी ॥ अठरा पर्वें सांगोनि त्यासि ॥ निमाल्या उठविलें द्विजांसी ॥ कृष्णकीर्ति ऐसी पावन ॥ १३ ॥ ऐकतां श्रीराम कृष्णकीर्ती ॥ महापातकें बापुडीं किती ॥ पायां लागती चारी मुक्ती ॥ श्रद्धासंपत्ति कीर्ती गातां ॥ १४ ॥ श्रद्धेचिया अति संपत्ती ॥ आवडीं गातां कृष्णकीर्ती ॥ सहजें सायुज्यता पावती ॥ देहस्थिती असतांही ॥ १५ ॥ हरिकीर्तिकीर्तन ज्याच्या ठायीं ॥ तोही वर्ततां दिसे देहीं ॥ परी देहीं ना तो हरीच्या ठायीं ॥ हरि त्याचे हृदयीं अवघाची ॥ १६ ॥ तोही अवघा हरिभीतरीं ॥ हरि त्या सबाह्य अभ्यंतरीं ॥ परीक्षिति ऐशियापरी ॥ कीर्तिवंत संसारीं नांदती ॥ १७ ॥ यालागीं हरिकीर्तनापरतें ॥ सुगम साधन नाहीं येथें ॥ जे विनटले हरिकीर्तनातें ॥ ते देहबंधनानें नाकळती ॥ १८ ॥ कृष्णकीर्तनें ०उजळिली स्थिती ॥ ते मैळेना कदा कल्पांतीं ॥ जरी *देह कर्में करिती ॥ तरी जाहली ¹स्थिती मैळेना ॥ १९ ॥ आकाश पर्जन्यें नव्हे वोलें ॥ कां रविबिंब ²थिल्लरजळें ॥ असोनियां तेणें मेळें ॥ कदाकाळें तिंबेना ॥ ३२० ॥ तेवीं ⁴हरिकीर्तनकल्लोळें ॥ जयांची निष्काम दशा उजळे ॥ ते वर्ततां देहकर्ममेळें ॥ देहविटाळें अलिप्त ॥ २१ ॥ निजभक्तांचें शरीरकर्म ॥ स्वयें ⁶चालवी पुरुषोत्तम ॥ यालागीं भक्तांसि कर्मश्रम ॥ अधमोत्तम बाधीना ॥ २२ ॥ भक्तां अभक्तांची कर्मगती ॥ भगवंत चालवी निश्चितीं ॥ तेथ भक्तांची कां अलिप्तस्थिती ॥

---

१ मुंगळ्यांस, डोंगळ्यास. २ एकुलता एक पुत्र. ३ श्रद्धाळु मनुष्यास. ४ सुवर्ण चोरणाऱ्या चोराला. ५ सोनें चोरल्याचें पाप जातें ६ नाहींसा करितें. ७ ब्रह्मदेवाचा मानसपुत्र पुलस्ती, पुलस्तीचा पुत्र विश्रवा, विश्रव्याचा पुत्र रावण. ८ पूर्ण श्रद्धेनें. ९ भिजेना. १० अनासक्त, उदासीन.

*ना. पतंगाच्यापरी ऐसें व्हावें. ×मो. हरति. +मो. हरती संपूर्ण विश्वासकांचे. ॐमो. उठविले. ०मो. उजळे. *ना. देहीं कर्में. ¹ना. ते स्थिती कळेना. ²मो. थिल्लरमळें. ⁴ना. हरिकीर्तनकीर्ती कल्लोळें. ⁶मो. चालविता.

अभक्त कां होती अतिबद्ध ॥२३॥ करितां कृष्णकीर्तिकीर्तन ।। भक्तांचा *निरसे देहाभिमान ॥ यालागीं ते अलिप्त जाण ।। अभक्तां बंधन अहंभावें ।। २४ ॥ हे दशा ×मागितल्या पावती ॥ ऐसें न घडे गा परीक्षिती ।। आवडी गातां कृष्णकीर्ति ॥ सहजें हे स्थिती ठसावे ।। २५ ।। श्रीकृष्णकीर्ति कीर्तनें ॥ बहुतांचें संसारधरणें ॥ उठविलें स्वयें श्रीकृष्णें ।। चरित्रपठणें तुष्टोनी ॥२६॥ कृष्णकीर्तिकीर्तनगोडी ॥ अहंकाराची बांदवडी +फोडी ।। जीवाचें जीवबंधन तोडी ॥ निःसीम आवडी कीर्तन गातां ॥ २७ ॥ एवं कृष्णकीर्तिकीर्तनें ॥ भक्तीं ०कृष्णपद स्वयें घेणें॥ जग उद्धरावयाकारणें ॥ कीर्ति श्रीकृष्णें विस्तारिली ।। २८ ॥ जन्मापासूनि अंतपर्यंत ।।कृष्ण चारित्र परमाद्भुत ।। तुज म्यां सांगीतलें साद्यंत ।। परमामृत निजसार ॥ २९ ॥

॥ श्लोक ॥ इत्थं हरेर्भगवतो रुचिरावतारवीर्याणि बालचरितानि च शंतमानि अन्यत्र चेह च श्रुतानि गृणन्मनुष्यो भक्तिं परां परमहंसगतौ लभेत् ॥ २८ ॥

इति श्रीमद्भागवते महापुराणे एकादशस्कंधे एकत्रिंशोऽध्यायः ॥३१॥ समाप्त एकादशस्कंधः ॥

॥ टीका ॥ जन्मापासूनि ज्ञानघन॥श्रीकृष्णचरित्र अतिपावन ॥ ज्याचे संगतीं गौंवळे जाण ॥ अज्ञानजन उद्धरिले ।। ३३० ॥ ज्याचिया व्यभिचारसंगतीं ।। गोपी उद्धरल्या नेणों किती ॥ कृष्ण श्यामसुंदरमूर्ती ।। अभिलाष चित्तीं दृढ धरितां ॥ ३१ ।। देखोनि सुंदर कृष्णमूर्ती ॥ गायी वेधल्या तटस्थ ❀ठाणीं ॥ पशु उद्धरले कृष्णसंगती ॥ मा गोपी उद्धरती कैसेनि! ॥३२॥ गायीगोपिकांचें नवल कोण ।। वृंदावनींचे तृण तरू पाषाण ।। कृष्णसंगें तरले जाण ।। ऐसा ज्ञानघन श्रीकृष्ण ॥ ३३ ॥ विषें भरोनियां निजस्तन ॥ पूतना घेऊं आली प्राण ।। तेही कृष्ण-संगें जाण॥त्याच क्षण उद्धरली ॥३४॥ कंसादि शिशुपाळादिकांसी ।। द्वेषेंचि तारी हृषीकेशी॥ चंदन लावितां अंगासी ।। अंगसंगें कुब्जेसी तारिलें ।। ३५ ॥ उन्मत्त मदें अतिमूढ ।। मारूं आला कुवलयापीड ।। त्यासि मोक्षाचा सुरवाड ।। उद्धारिला सदृढ कृष्णाभिघातें ॥ ३६ ॥ 6अरिष्ट करूं आला श्रीकृष्णालागीं ॥ तो अरिष्ट तारिला 8धरूनि शिंगीं ॥ अघासुरें गिळितां वेगीं ।।। चिरोनि दोभागीं उद्धरी कृष्ण ॥ ३७ ॥ कृष्णलक्षें लावूनि टाळी ।। बक ध्यानस्थ 7यमुनाजळीं ॥ तोही कृष्णातें 2सवेग गिळी ।। करूनि दोन फाळी तारिला कृष्णें॥३८॥उडवूं आला तृणावर्त ।। त्यासि कृष्णें उडविला आवर्त ॥ अंगसंगें श्रीकृष्णनाथ ॥ कृपावंत वैरियां ॥ ३९ ॥ गोपाळ नेले चोरचोरूं ॥ ठकूं आला व्योमासुरू ॥ त्याचाही केला उद्धारू ।। मोक्षें उदारू श्रीकृष्ण ॥ ३४० ॥ केशिया कंसाचा घोडा ॥ कृष्णें मारूनि तारिला कुडा ॥ मारिले

१ मीपणानें. २ संसाराचा तगादा, संसाररूपी ब्याद. ३ बंधारा. ४ राहती. ५कुब्जानांवाच्या दासीस. ६ सुख. ७ कृष्णावर चाल करून गेला तेव्हां. ८ विघ्न, संकट, इजा. ९ अरिष्टनामक दैत्य. १० समाधी. ११ भाग. १२ कंसाचा अनुचर राक्षस. १३ फसविण्याकरितां. १४ एक राक्षस. १५ एक कंसपक्षाचा राक्षस. यानें घोड्याचें रूप घेतलें होतें. १६ मल्ल, चाणूर वगैरे.

*मो. नाशे. ×मो. सांगीतल्या. +मो. तोडी. ०ना. कृष्णपदवी. ❀ना. स्थिती. 6ना. मारूं. 8ना. युद्धप्रसंगीं. 7मो. यमुनामेळीं. 2मो. जंव सगळें गिळी, तंव करूनि.

मर्दूनि मालखडों ॥ मोक्षाचा उघडा सुकाळ केला ॥ ४१ ॥ काळिया नाथिला विखारू[1] ॥ तृष्टीं उपाडिला वत्सासुरु ॥ भवाब्धीमाजीं श्रीकृष्ण तारूं ॥ सवेग उद्धारू जडमूढां ॥४२॥ जिहीं खेळविला चक्रपाणी ॥ ज्यांचें घरींचें प्याला पाणी ॥ ज्यांचें चोरूनि खादलें लोणीं ॥ त्याही गौळणी उद्धरिल्या ॥ ४३ ॥ रुक्मया तारिला विटंबुनी ॥ बाणें तारिला भुजा छेदोनी ॥ *कुश तारिला निर्दळूनी ॥ मोक्षदानी श्रीकृष्ण ॥४४॥ जेजे मीनले सोयरिकें ॥ जे कां पाहूं आले कौतुकें ॥ तेते तारियेले यदुनायकें ॥ दर्शनसुखें ×निववूनी ॥४५॥ पांडव तारिले पक्ष-पातें ॥ वैरी तारिले अवघातें ॥ यापरी श्रीकृष्णनाथें ॥ उद्धरिलीं बहुतें +निजसंगें ॥ ४६ ॥ वैरी तारिले ०द्वेषवैभवें ॥ भक्त पावले *भजनभावें ॥ गोपी तारिल्या संगानुभवें ॥ ज्या जीं-वेंभावें अनुसरल्या ॥ ४७ ॥ गायी तारिल्या संरक्षणेंसी ॥ मयूर तारिले मोरविशीं ॥ वृक्ष तारिले तुरंबोनी घोषीं ॥ तारक हृषीकेशी पूर्णब्रह्मत्वें ॥ ४८ ॥ पूर्ण ब्रह्म श्रीकृष्णावतार ॥ ज्ञानप्राधान्य लीला विचित्र ॥ त्यांत परमपवित्र बाळचरित्र ॥ वंद्य सर्वत्र सज्ञाना ॥ ४९ ॥ घेऊनि षड्गुणैश्वर्यसंपत्ती ॥ अवतरली श्रीकृष्णमूर्ती ॥ यश श्री औदार्य कीर्ती ॥ ज्ञान वैराग्य स्थिती अभंग ॥ ३५० ॥ इतर अवतारीं अवतरण ॥ तेथें गुप्त केले साही गुण ॥ कृष्णावतार ब्रह्म पूर्ण ॥ पूर्ण षड्गुण प्रकाशिले ॥५१॥ यालागीं कृष्णावतारीं जाण ॥ 6अविच्छिन्न साही गुण ॥ त्याचेनि अंगसंगें उद्धरण ॥ सर्वांसि जाण सर्वदा ॥ ५२ ॥ उद्धरले कृष्णसंगतीं ॥ अथवा कृष्णाचिया अतिप्रीतीं ॥ तरले देखतां श्रीकृष्णमूर्ती ॥ हें नवल निश्चितीं नव्हे एथें ॥ ५३ ॥ हेंचि पैं गा कृष्णकीर्ती ॥ अत्यावडीं गातां गीतीं ॥ उद्धरले नेणों किती ॥ अद्यापि उद्धरती श्रद्धाळू ॥ ५४ ॥ आवडीं गातां श्रीकृष्णकीर्ती ॥ कीर्तिवंता लाभे परमगती ॥ जीतें परा ऐसें ह्मणती ॥ ते चौथी भक्ती घर रिघे ॥ ५५ ॥ आर्त जिज्ञासु अर्थार्थी ॥ त्यांची सहजें राहे स्थिती ॥ अखंड प्रकटे चौथी भक्ती ॥ श्रीकृष्णकीर्ती स्वयें गातां ॥५६॥ आवडीं गातां श्रीकृष्णकीर्ती ॥ सहजें होय विषयविरक्ती ॥ शमदमादिसंपत्ती ॥ पायां लागती सहजची ॥ ५७ ॥ कृष्णकीर्तीची जपमाळी ॥ जो अखंड जपे जिव्हामूळीं ॥ श्रीकृष्ण सर्वकाळीं॥त्या-जवळीं सर्वदा ॥ ५८ ॥ आदरें जपतां श्रीकृष्णकीर्ती ॥ श्रीकृष्ण प्रकटे सर्वभूतीं ॥ सहजें ठसावे चौथी भक्ती ॥ परमात्मस्थितीसमवेत ॥ ५९ ॥ जे भक्तीमाजीं जाण ॥ पूज्य पूजक होय श्रीकृष्ण ॥ ⁂मग पूजाविधि विधान ॥ देवोचि आपण स्वयें होय ॥३६०॥ अन्न गंध धूप दीप जाण॥अवघेंचि होय श्रीकृष्ण⁂॥हें चौथे भक्तीचें लक्षण॥आपणाआपण स्वयें भजे॥६१॥

---

१ लीलेनें. २ नाशिला, मारिला. ३ सर्प. ४ कंसपक्षाचा एक राक्षस. हा वत्सरूपानें वृंदावनांत गेला असतां यास कृष्णानें कवठीच्या वृक्षावर आपटून ठार केला. भागवत स्कं. १०अ. ११. ५ बलीच्या शंभर पुत्रांपैकीं ज्येष्ठ. यांस शंकराचे वरानें सहस्र हात होते. श्रीकृष्णानीं याचे फक्त चार हात ठेवून बाकीचे छेदिले. भागवत स्कं.१०अ. ६२–६३. ६ मोरांचीं पिसें श्रीकृष्ण अलंकारांत घेत असत ह्मणून. ७वृक्षांच्या फुलांच्या घोसांचा वास घेऊन. ८ पूर्ण. ९ मोक्ष. १० केवळ अर्थाचीच इच्छा करणारा.

*मो. शत्रू. ×मो. निवविलीं. +मो. देहसंगें. ०मो. द्वेषभावें. *मो. भजनभावें. 6मा. अनवच्छिन्न.

⁂६०व६१या ओंव्यांतील हीं चरणें हस्तलिखित पोथ्यांत आहेत. छापिलांत नाहींत.

चौथे भक्तीचें विंदान ॥ भोग्य भोक्ता *स्वयें श्रीकृष्ण ॥ कृष्णेंसी वेगळेपण ॥ भक्त अर्धक्षण असेना ॥ ६२ ॥ ते काळीं भक्तांसि जाण ॥ देह गेह होय श्रीकृष्ण ॥ जात गोत श्रीकृष्णचि आपण ॥ संसार संपूर्ण श्रीकृष्ण होये ॥६३॥ ऐशी लाहोनि ×पराभक्ती ॥ परमहंसाची श्रीकृष्ण गती ॥ ते कृष्णस्वरूप स्वयें होती ॥ श्रीकृष्णकीर्ती वर्णितां ॥ ६४ ॥ स्वरूपीं नाहीं च्युती ॥ ते कृष्णस्वरूप निश्चितीं ॥ भक्त तद्रूप स्वयें होती ॥ श्रीकृष्णकीर्ती वर्णितां ॥ ६५ ॥ श्रीकृष्णकीर्तीचें एकएक अक्षर ॥ चहूंवेदांचें निजजिव्हार ॥ सकळशास्त्रांचें परमसार ॥ कृष्णचरित्र कुरुराया ॥ ६६ ॥ जें वेदांचें जन्मस्थान ॥ तें सकळशास्त्रां समाधान ॥ षड्दर्शनां नुझावण ॥ तो आठवा श्रीकृष्ण पूर्णावतार ॥ ६७ ॥ अनंत अवतार झाले जाण ॥ परी कृष्णावतार ज्ञानघन ॥ त्याचें चरित्र अतिपावन ॥ भवबंधन छेदक ॥ ६८ ॥ त्या कृष्णाची कृष्णकीर्ती ॥ आदरें आठवितां चित्तीं ॥होय भवबंधनाची समाप्ती ॥ जाण निश्चितीं नृपनाथा ॥ ६९ ॥ वैभव श्रीकृष्णकीर्तीशीं ॥ वैराग्य श्रीकृष्णकीर्तीपाशीं ॥ श्रीकृष्णकीर्ति वसे ज्या मानसीं ॥ ते कळिकाळासि नागवती ॥३७०॥ आळसें +स्मरतां कृष्णकीर्ती ॥ सकळ पातकें भस्म होती ॥ ते कृष्णकीर्ति जे सदा गाती ॥ त्यांसि चारी मुक्ती आंदण्या ॥ ७१ ॥ श्रीकृष्णकीर्तीचें एकैक अक्षर ॥ निर्दळी महापातकसंभार ॥ ०मोक्ष देऊनि अतिउदार ॥ जगदुद्धारकारक ॥७२॥ ✻बहु अवतारीं अवतरे देवो ॥ परी ये अवतारींचा नवलावो ॥ ज्ञानप्राधान्य लीला पहाहो ॥ अगम्य अभिप्रावो ब्रह्मादिदेवां ॥ ७३ ॥ जन्मापासून जो जो देहाडा ॥ तो तो नीच नवा पवाडा ॥ ब्रह्मसुखाचा उघडा ॥ केला रोकडा सुकाळ ॥ ७४ ॥ अवतारांमाजीं श्रीकृष्ण ॥ 9निजनिष्टंक ब्रह्म पूर्ण ॥ त्याचें चरित्र ज्ञानघन ॥ पठणें पावन जन होती ॥ ७५ ॥ ऐशी पावन कृष्णकीर्ती ॥ पढतां वाचक उद्धरती ॥ श्रद्धेनें जे श्रवण करिती ॥ तेही तरती *भवसिंधू ॥ ७६ ॥ कलियुगीं जन मंदमती ॥ त्यांसि तरावया सुगम स्थिती ॥ श्रीकृष्णपावनकीर्ती ॥ कृपेनें निश्चितीं विस्तारली ॥ ७७ ॥ ऐशी पावन भगवत्कीर्ती ॥ विस्तारली श्रीभागवतीं ॥ त्यांत दशमस्कंधाप्रती ॥ श्रीकृष्णकीर्ती अतिगोड ॥ ७८ ॥ उपजल्यादिवसापासूनी ॥ चढोवढी प्रतिदिनीं ॥ कीर्ति विस्तारी चक्रपाणी ॥ दीनजनीं तरावया ॥ ७९ ॥ धरूनि 2नरनटाचा वेष ॥ अवतरला हृषीकेश ॥ तेथें नानाचरित्रविलास ॥ दिवसेंदिवस विस्तारी ॥३८०॥ त्याहीमाजीं बाळचरित्र ॥मधुर सुंदर अतिपवित्र ॥ माळवडां जें केलें 7क्षात्र ॥ परम पवित्र पावनत्वें ॥ ८१ ॥ जरासंध पराभवून ॥ काळयवनातें निर्दाळून ॥ तें अतिविचित्र विंदान ॥ लाघवी श्रीकृष्ण स्वयें दावी ॥ ८२ ॥ रुक्मया रणीं विटंबून ॥ शिशुपाळादि वीर भांजून ॥ कृष्ण करी 6भीमकीहरण ॥ ते परमपावन हरिलीला ॥ ८३ ॥ 5पट्टमहिषींचें

१ घर. २ भटणें, घटणें, ऱ्हास. ३ काळीज, गाभा. ४ सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा, वेदांत हीं सहा शास्त्रें. ५ समजूत, एकवाक्यता. ६ ओझें. ७ आश्चर्य. ८ जसा जसा देह वाढत गेला. ९ रुक्मिणीहरण. १० रुक्मिण्यादि अष्टनायिकांचें.

*ना. होय. ×ना. चौथी भक्ती. +ना. करितां. ०ना. मोक्षाहूनि अति उदार ॥ ना. जगद्गुरु श्रीकृष्ण. ✻मो. बहुतां. 9ना. नैष्टिक ब्रह्म परिपूर्ण. *ना. भवबंध. 2मो. नरदेहाचा. 7ना. क्षात्र. 6मो. रुक्मिणीहरण. 5मो. पट्टमुखींचें.

वरेंण ॥ भौमासुराचें निर्दळण ॥ पारिजाताचें हरण ॥ पाणिग्रहण सोळासहस्रांचें ॥ ८४ ॥ समुद्रीं वसवूनि द्वारावती ॥ निद्रा न मोडितां निश्चितीं ॥ मथुरा आणिली रातोरातीं ॥ अभिनव कीर्ती कृष्णाची ॥ ८५ ॥ वत्सें वत्सप होऊनि आपण ॥ आपुलें दावी पूर्णपण ॥ ब्रह्मादिकां न कळे जाण ॥ अवतारी श्रीकृष्ण पूर्णांशें ॥ ८६ ॥ खाऊनि भाजीचें पान ॥ तृप्त केलें ऋषिजन ॥ *ऐशीं चरित्रें ज्ञानप्राधान्य ॥ परमपावन आचरला ॥८७॥ ऐशी कृष्णलीला परमाद्भुत ॥ पाठकां करी परमपुनीत ॥ ते दशमामाजीं समस्त ॥ कथा सार्यंत सांगितली ॥ ८८ ॥ एकादशाची नवलस्थिती ॥ मूळापासूनि परमप्राप्ती ॥ ज्ञान वैराग्य भक्ति मुक्ती ॥ स्वमुखें श्रीपती संवादिला ॥ ८९ ॥ प्रथमाध्यायीं वैराग्य पूर्ण ॥ मुख्य अधिकाराचें कारण ॥ नारदवसुदेवसंवाद जाण ॥ भूमिशोधन साधकां ॥ ३९० ॥ तेथ निमिजायंतसंवादन ॥ निर्भयाचें कोण स्थान ॥ उत्तम भागवत कोण ॥ मायातरण ×कर्म ब्रह्म ॥ ९१ ॥ इत्यादि विदेहाचे नव प्रश्न ॥ नवांचीं नवही उत्तरें पूर्ण ॥ तोचि नव +नांगर जाण ॥ क्षेत्रकर्षणें अतिशुद्ध ॥९२ ते पंचाध्यायींच्या अंतीं ॥ देवीं[६] प्रार्थिला श्रीपती ॥ ०कृष्णकुलक्षयाच्या प्रांतीं ॥ निजधामाप्रती ❋निघेल ॥९३॥ हें उद्धवें जाणोनि आपण ॥ निर्वेद केला जो संपूर्ण ॥ तोचि कल्पनाकाशाचें *निर्दळण ॥ पाळ्या 1छेदन विकल्पांच्या ॥ ९४ ॥ कामलोभाचे गुप्त खुंट ॥ आड लागले उद्भट ॥ ते समूळ केले सपाट ॥ अतितिखट अनुतापें ॥ ९५ ॥ क्रोधाचिया अति जोडी ॥ समूळ 3उपडिल्या महापेडी ॥ शांति निवडक चोखडी ॥समूळ उपडी मूळेंसी ॥९६॥ उद्धवचातकआर्तिहरण ॥ वोळला श्रीकृष्णकृपाघन ॥ क्षेत्र वोलावलें सबाह्य पूर्ण ॥ लागलीं संपूर्ण निजबोधवाफ ॥ ९७ ॥ तेथें पूर्ण ब्रह्म निजबीज ॥ चौडें तंतु सर्व परित्यज्य ॥ श्रवणनळें अधोक्षज ॥ पेरिलेंचि सहज स्वयें पेरी ॥ ९८ ॥ यदु अवधूत संवादस्थितीं ॥ चोविसा गुरूंची उपपत्तीं ॥ आंगड खणविला क्षेत्राप्रती ॥ वोढाळ पुढतीं रिघों न शके ॥ ९९ ॥ चिकभरित जाहल्या पिकातें ॥ भोरड्यां वोरबडिती तेथें ॥ ते दशमाध्यायीं श्रीअनंतें ॥ उडविलीं मतें भजनगोफणा ॥ ४०० ॥ आकरावे अध्यायीं जाणा ॥ हुरडा ओंब्या आणि घोळाणा ॥ 4तिळगुळेंसी चाखविलें सुजाणा ॥ मुक्तलक्षणाचेनि हातें ॥ १ ॥ ते 5श्रायेचे भोक्ते एथ ॥ सत्संगती भगवद्भक्त ॥ ते बारावे अध्यायीं सार्यंत ॥ कृपायुक्त सांगीतले ॥२॥ विषयांची विषयावस्था ॥ बाधक नोहे साधकांच्या चित्तां ॥ तेचि त्रयोदशीं कथा ॥ 9जाण निश्चितीं सांगीतली ॥३॥ एवं तेराव्या अध्यायाप्रती ॥ जाहली पिकाची पूर्ण निष्पत्ती ॥ तोचि हंसगीतउपपत्ती ॥ समाधि श्रीपती सांगोनि गेला ॥ ४ ॥ समाधीं 7सांठवलें जें पिक ॥ तें कैसेंनि पावती साधक ॥ तदर्थीं भजनपूर्वक ॥ चौदावा देख निरूपिला ॥५॥ पकि चढतचढतां हातीं ॥ माझारीं

१ लग्न, पाणिग्रहण. २ अपूर्व. ३ गोप. ४ बोलिला. ५ शेत नांगरणें. ६ देवांनीं. ७ शेवटीं. ८ शोक. ९ कल्पनारूपी आकाशाचें. १०तीव्र. ११जाड, बळकट. १२वृक्षमूळ. १३ पाभरीवरील टवळें. १४ टाकून. १५ कान हेच कोणी कळकाचे नळ त्यानें. १६ श्रीकृष्ण. १७ खंदक, भोंवतीं खळगा. १८ या नांवाचीं पांखरें. १९ लिंबूर. २० उत्पात्ति.

*ना. ऐसें हरीचें ज्ञान प्राधान्य. ×ना. ब्रह्मकर्म. +ना. नांगरण. ०मो. कृष्णें. ❋मो. निघावें. *मो. निंदन. 1मो. छेदनें. 3मो. उचाटिल्या. 4मो. अतिसुरस सुजाणा. 5मो. श्रीयेचे. 9मो. हंसगीता सांगीतली. 7मो. सांठवण.

ऋद्धिसिद्धि झडपोनि नेती ॥ ते सिद्धित्यागाची उपपत्ती ॥ पंधराव्याप्रती दाविली ॥ ६ ॥ पीक न माये त्रिजगतीं ॥ तरी त्याच्या सांठवणा किती ॥ त्या षोडशाध्यायीं *विभूती ॥ उद्देशें श्रीपती दावूनि गेला ॥ ७ ॥ क्षेत्र अधिकारी एथें जाण ॥ चारी आश्रम चारी वर्ण ॥ सतरावां अठरावां निरूपण ॥ वांटे संपूर्ण त्रिभागिलें ॥ ८ ॥ एकुणिसाव्या अध्यायीं जाण ॥ करूनि पिकाची [1]संवगणी॥जेणें कोंडेनि +निवडिले कण॥×तो कोंडा सांडूनि जाण कण घ्यावे ॥ ९ ॥ ऐसे निवडिले जे शुद्ध कण ॥ तेथें प्राप्ताप्राप्तीचें लक्षण ॥ त्रिविधविभाग निरूपण ॥ विसावा जाण निरूपिला ॥ ४१० ॥ जे भागा आले शुद्ध कण ॥ ते राखावे आपले आपण ॥ गुणदोषांचे चोरटे जाण ॥ खळें फोडून कण नेती ॥ ११ ॥ सर्वांच्या भागा येताति कण ॥ परी खावों न लाहती चोरांभेण ॥ थोरथोर ※नागविले जाण ॥ यालागीं संरक्षण दृढ कीजे ॥ १२ ॥ गुणदोषांची नवलकथा ॥ मिळणी मिळोनि आप्तता ॥ ठकूनि नेती ०सर्वस्वता ॥ दाणाही हातां नेदिती येवों ॥ १३ ॥ गुणदोष अतुर्बळी ॥ सज्ञानातें तत्काळ [4]छळी ॥ जो गुणदोषांतें निर्दळी ॥ तो महाबळी तिहीं लोकीं ॥ १४ ॥ हे शिकवण उद्धवें ऐकतां ॥ तो म्हणे चोरांचा प्रतिपालिता ॥ तुझा वेदचि गा तत्त्वतां ॥ गुणदोषप्रबळता त्याचेनि अंगें ॥ १५ ॥ मुख्य चोराचा कुरठा ॥ तुझा वेदचि महा खोटा॥त्यामाजीं गुणदोषांचा घरटा ॥ नाना चेष्टा तो शिकवी ॥ १६ ॥ एवं प्रतिपाळोनि गुणदोषांसी ॥ वेद नागवी समस्तांसी ॥ एवं उद्धवें वेदांच्या शिसीं ॥ कुडेपणासी स्थापिलें ॥ १७ ॥ तो वेदानुवाद नव्हे कुडा ॥ ऐसा प्रतिपदीं दीधला झाडा ॥ ते निरूपणीं अतिचोखडा ॥ अध्याय रोकडा एकविसावा ॥ १८ ॥ चोर कोणे मार्गें येती ॥ पिकलें पीक ज्या वाटां नेती ॥ ते मार्ग बुजावया निश्चितीं ॥ तत्त्वसंख्या उपपत्ती बाविसावा ॥ १९ ॥ मुख्य चोराचें चोरटेपण ॥ मनापाशीं असे जाण ॥ तें मनोजयाचें लक्षण ॥ भिक्षुगीतनिरूपण तेविसावा ॥४२०॥ चोर जन्मती जिचे पोटीं ॥ ते मुख्यत्वें प्रकृति खोटी ॥ पिकल्या पिका करूनि लुटी ॥ लपती शेवटीं तीमाजीं ॥ २१ ॥ आदीं निर्गुण अंतीं निर्गुण ॥ मध्यें मिथ्या प्रकृतीशीं त्रिगुण ॥ हें मुख्य पिकाचें संरक्षण ॥ केलें निरूपण चोविसावा ॥ २२ ॥ मोकळें पीक असतां शेतीं ॥ पशुपक्षी चोर रिघों न शकती ॥ ते सहज संरक्षणउपपत्ती ॥ 2निर्गुणोक्ती पंचविसावा ॥ २३ ॥ स्त्रीकामाची धाडी जाण ॥ सकळ पिकासि नागवण ॥ पुरूरवा नागवला आपण ॥ इतरांचा कोण पडिपाडू ॥ २४ ॥ कामासक्ति कारेतां जाण ॥ प्रमदाबंदीं पडिले पूर्ण ॥ त्यांसि अनुताप करी सोडवण ॥ हें केलें निरूपण सव्विसावा ॥२५॥निकोपें पीक लागल्या हातीं ॥ त्याची करावया 3निष्पत्ती ॥ क्रियायोगाची निजस्थिती ॥ सत्ताविसाव्याप्रती प्रकाशिली ॥२६॥ एवं पीक भोगिलें सकळ॥ त्याचा परिपाक पक्वान्न सबळ ॥ अठ्ठाविसावा अमृतफळ ॥ अतिरसाळ निजगोडिया ॥२७॥ मृदु मधुर अति अरुवार ॥ तेणें वासेंचि निवे जेवणार ॥ त्याचा सेवितां ग्रासमात्र ॥ सबा-

१ कापणी, मळणी. २ अतिबलवान्. ३ घरटें, स्थळ. ४ मस्तकावर, शिरावर. ५ कपटास. ६ सोडा. ७ सोमवंशाचा मूळपुरुष. यानें उर्वशी अप्सरेस वरिलें होतें. ८ कथा, विशाद. ९ स्त्रियांच्या बंधनांत. १० अपायरहित. ११ सिद्धी, तयारी. १२ सुंदर, नाजूक.

*मो. भूपती. +मा. वाढले. ×मा. ते सांडुनी निकण कण घ्यावे. ※मा. ठकले. ०मो. सर्वावस्था. 4मो. सळी. 2मो. निर्गुणगुणोक्ति. 3मो. मा. नेपती.

बाह्यांभ्यंतर नित्यतृप्ती ॥ २८ ॥ आकांक्षेसी *निमाली भूक ॥ सुखावरी लोळे तृप्तिसुख ॥ तो हा अठ्ठाविसावा देख ॥ अलोकिक निजगोडया ॥ २९ ॥ अठ्ठाविसाव्याची निजगोडी ॥ चाखावयां अति आवडी ॥ ब्रह्मादिकां अवस्था गाढी ॥ चवी चोखडी अनुपम ॥ ४३० ॥ हें ×जिव्हेवीण जेवण ॥ रसनेवीण गोडपण ॥ अदंताचे दांत पाडूनि पूर्ण ॥ आपुली आपण चवी चाखे ॥३१॥ +श्रीकृष्णें परवडी ऐशी ॥ ताट केलें उद्धवाशी ॥ एका जनार्दनचरणींची माशी ॥ ⁂सुखें त्या रसासी स्वयें सेवी ॥ ३२ ॥ जेथ रिगमू नाहीं थोरथोरांशी ॥ तेथ सुखेंचि रिघे माशी ॥ एवं धाकुटे जे होती सर्वांशीं ॥ कृष्णरस त्यांशी सुसेव्य ॥ ३३ ॥ ०अगम्य योगें योगभांडार ॥ गुह्यज्ञानें ज्ञानगंभीर ॥ परमसुखाचें सुखसार ॥ अतिगंभीर अठ्ठाविसावा ॥ ३४ ॥ या धर्णीं जे धाले नर ॥ त्यांचे तृप्तींच सुखोद्गारें ॥ तो एकुणतिसावा सधर ॥ अतिविचित्र निरूपण ॥ ३५ ॥ एकुणतिसाव्याची स्थिती ॥ दृढ आकळली होय हातीं ॥ तैं सकळभागवताची गती ॥ ये धांवत तयापाशीं ॥ ३६ ॥ एकुणतिसावा अध्यावो ॥ *साध्यसाधना एकात्मभावो ॥ निर्दळोनि अहंभावो ॥ परमानंदें पहाहो उद्गार देत ॥ ३७ ॥ सकळ भोजनां मंडण ॥ तांबूल आणि चंदन ॥तो तिसावा एकतिसावा जाण ॥ कृष्णनिर्याण निजबोधू ॥ ३८ ॥ येणें भोजनें जे नित्य तृप्त ॥ त्यांसि ममताबाध नव्हे प्राप्त ॥ सकळ कुळ निर्दळूनि एथ ॥ निजधामा निश्चित हरि गेला ॥ ३९ ॥ पूर्ण ब्रह्मानुभव ज्यासी ॥ एथवरी ममता नसावी त्यासी ॥ हें स्वांगें दावूनि हृषीकेशी ॥ निजधामासी स्वयें गेला ॥ ४४० ॥ श्रीभागवत महाक्षेत्र ॥ तेथें ब्रह्मा मुख्य बीजधर ॥ नारद तेथ मिरासीकर ॥ पेरणी विचित्र तेणें केली ॥ ४१ ॥ तेथ श्रीव्यासें अतिशुद्ध ॥ बांधोरे घातले दशविध ॥ पीक पिकलें अगाध ॥ 6स्वानंदबोध निर्भरें ॥ ४२ ॥ तेथ शुक बैसला सोंकारा ॥ तेणें फोडिला हरिकथापागोरा ॥ पापपक्ष्यांचा थारा ॥ उडविला पुरा निःशेष ॥४३॥ त्या एकादशीं जाण॥उद्धवें केली सवंगण॥ काढिलें निडाराचे कण ॥ अतिसघन कृष्णोक्तीं ॥४४॥ तेथ नानायुक्तिषडिपाडीं ॥ उत्तमोत्तम प्रश्नपरवडी ॥ केलीं पक्वान्नें चोखडीं ॥ त्यांची नीचें नवी गोडी अविनाशी ॥४५॥ ते अविनाशी निजगोडी ॥ पदोपदीं अतिचोखडी ॥ एकादशामाजीं रोकडी ॥ उद्धवाचिये जोडी उपकार जगा ॥ ४६ ॥ त्या उद्धवाचे मागिले पंक्तीं ॥ त्र्यंबकोदक श्रवणार्थी ॥ शुकमुखें परीक्षिती ॥ 7निजात्मतृप्तीं निवाला ॥ ४७ ॥ त्या समर्थांचिये पंक्ती ॥ भावार्थदीपिका धरोनि हातीं ॥ श्रीधरें दावितां पदपदार्थीं ॥ निजात्मस्थितीं निवाला ॥४८॥ जेथ देशभाषापदपक्षेसी ॥ एका जनार्दनकृपेची माशी ॥ तृप्त होय अवघ्यांसरिशी॥निषेध तिशी असेना ॥४९॥एका जनार्दनीं मांजर वेडें ॥ भावार्थदीपिकाउजियेडें ॥ हे रस देखोनि चोखडे ॥ ताटापुढें पैं आलें ॥४५०॥ ' मॅंयाँ

१ इच्छेसहित. २ भोजनाचा प्रकार. ३ रिघाव, प्रवेश. ४ सहज सेवन करितां येण्यासारखा. ५ ढेंकर. ६ भूषण, अलंकार. ७ स्वतः. ८ शेतकरी. ९ दशस्कंधरूपी. १० पूर्ण होई. ११ राखणारा. १२ हरिकथारूप गोफण. १३ परिपक्व, निवडक. १४ नित्य. १५ उद्धवाबरोबर–उद्धवामुळें. १६ पाणी प्यावयाचें ज्यानें टाकिलें आहे असा. १७ अभिप्राय स्पष्ट दाखविणारी अशा अर्थाची टीका हाच दिवा. १८ भागवतावरील श्रीधरी टीकाकार. १९ देशी (मऱ्हाटी) भाषेची पदें हेच कोणी पंख, त्या पंखांनीं. २० म्यां हा मांजराचा शब्द.

*मो. मिळाली. ×मो. जिव्हेवीण ना. जिव्हेवीण. +ना. मो. श्रीकृष्ण. ⁂ना. सुखें. ०ना. अगम्य योगयागभांडार. *ना. साध्यसाधनें. 6ना. स्वानंदबोधें निजगजरें. 7मो. स्वानंदस्थितीं

मींयों ' करितां स्मरण ॥ कृपेनें तुष्टले सज्जन ॥ शेषप्रसाद देऊनि ण ॥ संतृप्त पूर्ण मज केलें ॥५१॥ एका जनार्दनाचें पोसणें ॥ मीं मांजर जाहलों नीचपणें ॥ चाटितां संतांचें शेषभांणें ॥ त्यां तृप्ति पावणें परिपूर्ण ॥५२॥ हो कां त्या समर्थांच्या ताटीं ॥ ब्रह्मरसें भरली पूण वाटी ॥ ते मीं अत्यंत आवडीं चाटीं ॥ स्वानंदपुष्टी संतोषें ॥ ५३ ॥ जो काया मनें आणि वाचा ॥ सद्भावें विनीत होय नीचा ॥ तो अधिकारी एकादशाचा ॥ हा जनार्दनाचा उपदेश ॥ ५४ ॥ जंव जंव देहीं ज्ञानाभिमान ॥ जंव जंव योग्यता सन्मान ॥ तंव तंव एकादशाचें ज्ञान ॥ सर्वथा जाण अनोळखें ॥ ५५ ॥ सर्वभूतीं भगवद्भजन ॥ *सद्भावें जंव नुपजे पूर्ण ॥ तंववरी एकादशाचें ज्ञान ॥ सर्वथा जाण कळेना ॥ ५६ ॥ यापरी श्रीभागवतक्षेत्र ॥ पीक पिकलें परम पवित्र॥तेथें सुखी होती साधक नर ॥ज्यांसि अत्यादर सर्वभूतीं ॥५७॥एकादश क्षेत्र नव्हे जाण ॥ हा चित्समुद्र परिपूर्ण ॥ येथें जो जैसा होय निमग्न ॥ तो तैसा॥चि आपण रत्नें लाभे ॥५८॥ हा एकादश नव्हे निर्धारीं ॥ जीवगजेंद्राच्या उद्धारीं ॥सवेग वेगें पावला श्रीहरी॥ ×ज्ञानचक्र करीं घेऊनी ॥ ५९ ॥ हेही नव्हे एकादशाची थोरी ॥ अहंहिरण्यकश्यपु विदारी ॥ तो हा प्रकटला नरहरी ॥ भक्तकैवारी +कृपापूर्ण ॥ ४६० ॥ गंगा यमुना दोनी सांग ॥ कृष्ण उद्धव ✻उत्तम चांग ॥ गुप्त सरस्वती ज्ञानबोध ॥ त्रिवेणी प्रयाग एकादश ॥ ६१ ॥ तेथ वैराग्यमाघमासीं जाण ॥ श्रद्धा अरुणोदयीं नित्य स्नान ॥ करितां होऊनि पावन ॥ कृष्णपदवी पूर्ण पावती ॥ ६२ ॥ हेही एकादशाची नव्हे ०गोठी ॥ कृष्ण उद्धवांची गुह्य गोष्टी ॥ हे बहुकल्प कपिलाषष्ठी ॥ पर्वणी गोमटी निजसाधकां ॥ ६३ ॥ ते पर्वकाळीं जे निमग्न ॥ ते तत्काळ पावती कल्याण ॥ बाधूं न शके जन्ममरण ॥ ब्रह्म परिपूर्ण स्वयें होती ॥ ६४ ॥ हा एकादश नव्हे जाण ॥ एकतिसां स्रणांचें वृंदावन ॥ *एथ नित्य वसे श्रीकृष्ण ॥ स्वानंदपूर्ण निजसत्ता ॥ ६५ ॥ एथ पंधाशतें श्लोक ॥ तेचि पानें अत्यंत चोख ॥ माजीं ज्ञानमंजरीचे घोस ॥ अतिसुरेख शोभती ॥ ६६ ॥ तेथ जे घालिती निजजीवन ॥ ते होती परम पावन ॥ स्वयें ठाकती कृष्णसदन ॥ ब्रह्म परिपूर्ण स्वानंदें ॥ ६७ ॥ जे वंदिती मुळींच्या उदका ॥ जे लाविती मूळमृत्तिका ॥ ते वंद्य होती तिहीं लोकां ॥ नित्य निजसखा श्रीकृष्ण जोडे ॥ ६८ ॥ जे पठणरूपें जाणा ॥ प्रत्यगावृत्ति प्रदक्षणा ॥ सद्भावें करिती सुजाणा ॥ ते श्रीकृष्णचरणां विनटती ॥६९॥ ये कथेच्या विचित्रलीला ॥ जे नित्य घालिती रंगमाळा ॥ ते नागवती कळिकाळा ॥ 7सदा त्यांजवळा श्रीकृष्ण ॥ ४७० ॥ हें एकादशाचें वृंदावन ॥ जो श्रवणें करी नित्य पूजन ॥ त्यासि प्रसन्न होऊनि श्रीकृष्ण ॥ देहाभिमान निर्दळी ॥ ७१ ॥ तेथ मननाच्या पुष्पांजली ॥ जो अनुदिनीं अर्पी त्रिकाळीं ॥ तोही पावे हरिजवळीं ॥ निजात्ममेळीं निजनिष्ठा ॥ ७२ ॥ हें श्रीभागवत वृंदावन ॥ मेळवूनि संत सज्जन ॥ ये कथेचें करी जो व्याख्यान ॥ तें महापूजन निरपेक्ष ॥ ७३ ॥ हें देखूनि महापूजन ॥ संतोषे श्रीजनार्दन ॥ श्रोते वक्ते

---

१ मूल. २ उष्टेंपात्र. ३ नम्र. ४ कळणार नाहीं. ५ अहंकाररूप हिरण्यकशिपु. ६ कृष्णस्थान. ७ फार दिवसांनी येणारी. ८ रोज, प्रत्येक दिवशीं.

*ना. सद्भावो जों नुपजे. ×मो. ज्ञानचक्रीं घेऊनियां. +मो. कृपामूर्ति. ✻मो. अतिचांग. ०मो. ठी. *मो. तुळसीरूपें वसे. 7ना. सत्य त्यांजवळा.

जे सावधान ॥ त्यांसि निजात्मज्ञान स्वयें देत ॥ ७४ ॥ श्रवणें पठणें मननें ॥ अर्थावबोध[1] व्याख्यानें ॥ एकादशें समान देणें ॥ *जाणेता नेणत्या नाहीं ॥ ७५ ॥ श्रवण मनन नव्हे पठण ॥ तरी एकादशाचें पुस्तक जाण ॥ ब्राह्मणासि द्यावें दान ॥ विवेकज्ञान तेणें उपजे ॥ ७६ ॥ एकादश द्यावें दान ॥ करावें एकादशाचें पूजन ॥ करितां एकादशाचें स्मरण ॥ पाप संपूर्ण निर्दळे ॥ ७७ ॥ एकादशसंग्रह जो करी ॥ श्रीकृष्ण तिष्ठे त्याचे घरीं ॥ जो एकादशाची श्रद्धा धरी ॥ ज्ञान त्यामाझारीं स्वयें रिघे ॥ ७८ ॥ श्लोक श्लोकार्ध ×पदमात्र ॥ +नित्य स्मरे ज्याचें वैक्त्र॥ तोही होय परम पवित्र ॥अतिउदार एकादश ॥७९॥ अवचटें जातां कार्यांतरीं ॥ दृष्टी पडे एकादशावरी ॥ तें पातकां होय रानभरी ॥ आपधाकें दूरि तें पळती ॥४८०॥ तो एकादश ज्याचे ०करीं ॥ देव वंदिती त्यातें शिरीं ॥ तो निजांगें जग उद्धरी ॥ एवढी थोरी एकादशा ॥ ८१ ॥ सकळपुराणांमाझारीं ॥ हा एकादश वनकेसरी ॥ भवगजातें विदारी ॥ क्षणामाझारीं श्लोकार्थे ॥ ८२ ॥ ' मामेकमेव शरणं ' ॥ याचि श्लोकाचें करितां पठण ॥ मायेचा गळा धरोनि जाण ॥ आपधाकें पूर्ण संसार निमे ॥ ८३ ॥ ' निरपेक्षं मुनिं शांतं ' ॥ हा श्लोक जें चढे हात ॥ तें सेवकां सेवी श्रीकृष्णनाथ ॥ भवभय तेथ उरे कैचें ॥ ८४ ॥ एकादशाचा एकेक श्लोक ॥ होय भवबंधच्छेदक ॥ जेथ वक्ता यदुनायक ॥ तेथ हा विशेखें म्हणोंनये ॥ ८५ ॥ श्रीभागवतामाजीं जाण ॥ एकादश मोक्षाचें स्थान ॥ यालागीं श्लोकार्थमात्रें ॐजाण ॥ भवबंधन निर्दळी ॥ ८६ ॥ श्रीकृष्ण वेदांचें जन्मस्थान ॥ त्याचे मुखींचें हें निरूपण ॥ तेथें सकळवेदार्थ जाण ॥ माहेरा आपण स्वयें येती ॥ ८७ ॥ यालागीं एकादशीं वेदार्थ ॥ माहेरीं सुखावले समस्त ॥ ते साधकासि परमार्थ ॥ स्वानंदें देत संपूर्ण ॥ ८८ ॥ मंथोनि वेदशास्त्रार्थ ॥ व्यासें केलें महाभारत ॥ त्या भारताचा मंथितार्थ ॥ श्रीभागवत हरिलीला ॥ ८९ ॥ त्या भागवताचा सारांश ॥ तो हा जाण एकादश ॥ तेथ वक्ता स्वयें हृषीकेश ॥ परब्रह्मरस ꘡प्रबोधी ॥४९०॥ भागवतामाजीं एकादश ॥ जैसा यतींमाजीं परमहंस ॥ कां देवांमाजीं जगन्निवास ॥ तैसा एकादश अतिवंद्य ॥ ९१ ॥ पक्ष्यांमाजीं राजहंस ॥ रसांमाजीं ॢसिद्धरस ॥ तैसा भागवतामाजीं एकादश ॥ परम सुरस स्वानंदें ॥ ९२ ॥ तीर्थ क्षेत्र वाराणसी ॥ पावनत्वें गंगा जैसी ॥ जीवोद्धारीं एकादशी ॥ महिमा तैसा 7अनिर्वाच्य ॥ ९३ ॥ त्या एकादशाची टीका ॥ जनार्दनकृपा करी एका ॥ 3तो एक-

१ अर्थाचें ज्ञान व्हावें, म्हणून व्याख्यान करणें. २ ज्ञानी व अज्ञान असा एकादशस्कंध भेद करीत नाहीं, तर, दोहोंवर सारखी कृपा करतो. ३ मुख, तोंड. ४ सहज. ५ दुसरें कार्य करित असतां. ६ आपोआप भयानें. ७ पापें. ८ तरुण सिंह. ९ संसाररूपगजास. १०अध्याय १२ श्लोक पंधरा पहा. ११ नाहींसा होतो. १२ अध्याय १४ श्लोक १६ पहा. १३ श्रीकृष्ण. १४ नवल, असंभव. १५ सारांश. १६ कुटीचक, बहूदक, हंस व परमहंस या चार संन्याशांत. १७ विष्णु. १८ अमृत. १९ काशी, बनारस. २०न सांगतां येण्याजोगा. २१ एकनाथ.

*ना. जाणें येणें त्यां नाहीं. ×ना. पादपात्र+मो. स्मरे अखंड ०मो धरी. ॐना. परिपूर्ण. ꘡मो. प्रबोधिला. ॢमो. सुधारस ना. शुद्धरस.7मो. अनिवार. 3ना. त्या एकत्वाचा निजसखा.

त्याच्या निजसुखा ॥ फळे भाविका सद्भावें ॥ ९४ ॥ धरोनि बालकाचा हात ॥ बाप अक्षरें स्वयें लिहिवित ॥ तैसा एकादशाचा अर्थ ॥ बोलविला परमार्थ जनार्दनें ॥ ९५ ॥ कैसा चालवावा ग्रंथ ॥ केवीं राखावा पदपदार्थ ॥ ये व्युत्पत्तीची नेणें मी मात ॥ बोलवी समर्थ जनार्दन ॥ ९६ ॥ जनार्दनें नवल केलें ॥ *मूर्खाहातीं ज्ञान बोलविलें ॥ ग्रंथीं परमार्थरूप आणिलें ॥ वाखाणिलें एकादशा ॥ ९७ ॥ एकादशाचा पदपदार्थ ॥ शास्त्रवक्त्यां अतिगूढार्थ ॥ तोही वाखाणविला पुरुषार्थ ॥ कृपाळू समर्थ जी जनार्दन ॥ ९८ ॥ जनार्दनें ऐसें केलें ॥ माझें मीपण निःशेष नेलें ॥ मग परमार्थ अर्थविलें ॥ बोलवूनि बोलें निजसत्ता ॥ ९९ ॥ खांबसूत्राची बाहुली ॥ सूत्रधार नाचवी भली ॥ तेवीं ग्रंथार्थाची बोली ॥ बोलविली श्रीजनार्दनें ॥ ९०० ॥ अवघा जनार्दनचि देखा ॥ तोचि आडनांवें जाला एका ॥ तेणें नांवें ग्रंथ नेटका ॥ अर्थूनि तात्त्विकां तत्त्वार्थ दावी ॥ १ ॥ कवित्वीं घातलें माझें नांव ॥ शेखीं +नांवाचा नुरवी ठाव ॥ ऐसें जनार्दन वैभव ॥ अतिअभिनव ×अलोलिक ॥ २ ॥ ग्रंथ देखोनियां सज्ञान ॥ ह्मणती ज्ञाता ०एकाजनार्दन ॥ जवळीं जालिया दर्शन ॥ *मूर्ख संपूर्ण मानिती ॥३॥ एका जनार्दनाचा वृत्तांत ॥ एक ह्मणती भला भक्त ॥ एक ह्मणती जीवन्मुक्त ॥ प्रपंची निश्चित मानिती एक ॥४॥ अहो हा एका जनार्दन ॥ नाहीं आसन न देखे ध्यान ॥ मंत्रमुद्रा माळा जपन ॥ उपासकलक्षण या नाहीं ॥५॥ कोण ३मंत्र असे यासी ॥काय उपदेशी शिष्यांसी ॥हें कळों नेदितां कोणासी ॥ भुललीं भाविकें त्यासी अतिभावार्थें ॥ ६ ॥ नुसत्या हरिनामाचे घोष ॥ ※लावूनि भुलविले येणें लोक ॥ ऐसे नानाविकल्प अनेक ॥ जनार्दन देख उपजवी स्वयें ॥७॥ मी जेथ ज्ञाडा देवों जायें ॥ तें बोलणें जनार्दनचि होये ॥ युक्तिप्रयुक्तीचें पाहे ॥ मीपण नराहे मजमाजीं ॥ ८ ॥ एवं माझें मीपण समूळीं ॥ श्रीजनार्दन स्वयें गिळी ॥ आतां माझी हाले जे अंगुळी ॥ ते ते क्रिया चाळी जनार्दन ॥ ९ ॥ निमेषोन्मेषांचे संचार ॥ श्वासोच्छ्वासांचे परिचार ॥ सकळ इंद्रियांचा व्यापार ॥ चाळिता साचार श्रीजनार्दन ॥ ९१० ॥ जेथ मी ह्मणों जायें कविता ॥ ते जनार्दनचि होय तत्त्वतां ॥ माझें मीपण धरावया पुरता ॥ ठाव रिता नुरेचि ॥ ११ ॥ माझें जें कां मीपण ॥ जनार्दन जाहला आपण ॥ एका जनार्दना शरण ॥ ग्रंथ संपूर्ण तेणें केला ॥ १२ ॥ हेही बोल बोलतां जाण ॥ खुणें वारी जनार्दन ॥ ज्ञाडा सुचितां संपूर्ण ॥ वेगळेपण अंगीं लागे ॥ १३ ॥ आतां वेगळा अथवा एक ॥ अवघा जनार्दन स्वयें देख ॥ तेणें ग्रंथार्थाचे लेख ॥ अत्यंत चोख विस्तारिले ॥ १४ ॥ ग्रंथ देशभाषाव्युत्पत्ती ॥ ह्मणोनि नुपेक्षावी पंडितीं ॥ अर्थ पहावा १यथार्थी ॥ ६परमात्मस्थिती निजनिष्ठा ॥ १५ ॥ जरी संस्कृत ग्रंथ पूर्ण ॥ तरी देशभाषाव्याख्यान ॥ मा हें आयतें निरूपण ॥ साधक सज्ञान

---

१ ठिकाण. २ जर त्यांनीं माझे जवळ येऊन मला पाहिलें, तर ते मला मूर्ख ह्मणतील. ३ करी, ...लवी. ४ डोळ्यांची उघडझाकीची क्रिया. ५ व्यापार. ६ रिकामा, जनार्दनावांचून. ७ खुणेनें निवारी, ...णेनें नको ह्मणून सांगे. ८ हिशोब देऊं जातां. ९ प्राकृतभाषेत. १० टाकावा.

*ना. मज मूर्खाहातीं. +ना. जीवाचा. ×मो. अलौकिक केलें. ०ना. [illegible] ...ख संपूर्ण ३ना. ...

नुपेक्षिती ॥ १६ ॥ जे या ग्रंथा आदर करिती ॥ अथवा जे कां उपेक्षिती ॥ केवळ जे कोणी निंदिती ॥ तेही आह्मां ब्रह्ममूर्ती सद्‌गुरुरूपें ॥१७॥ हेंचि शिकविलें जनार्दनें ॥ 'सर्वभूतीं मजचि पाहणें ॥ प्रकृतिगुणांचीं लक्षणें ॥ सर्वथा आपण न मानावीं ॥ १८ ॥ शिष्याचे क्षोभ न साहवती ॥ निंदकांची निंदा न जिरे चित्तीं ॥ तैं तो कोरडाचि परमार्थी ॥ क्षोभें निश्चितीं नागविला ॥१९॥ एवं पराचे प्रकृति गुण ॥ पाहतां सर्वथा क्षोभे मन ॥ ते न पहावे आपण ॥ सर्वभूतीं चैतन्य समत्वें पहावें ' ॥ ५२० ॥ येचि उपदेशीं अत्यादर ॥ जनार्दनें केला थोर ॥ यावेगळा भवाब्धिपार[1] ॥ सज्ञान नर पावों न शके ॥ २१ ॥ येणें निर्धारें ' गुरु तो गुरू ॥ आह्मां शिष्य तोही संवादगुरू ॥ निंदक तो परमगुरू ॥ *निरपराध तो सद्‌गुरु जनार्दनकृपा ॥२२॥ जनार्दनकृपा एथें ॥ गुरुत्वेंगळें नुरेचि रितें ॥ मीपणासहित सकळ भूतें ॥ गुरुत्वा निश्चितें आणिलीं तेणें ॥ २३ ॥ तेणेंचि हे ग्रंथकथा ॥ सिद्धि पावविली परमार्था ॥ माझे गांठीची नव्हे योग्यता ॥ हें जाणीतलें[2] श्रोतां ग्रंथारंभीं ॥ २४ ॥ ग्रंथारंभ प्रतिष्ठानीं[3] ॥ तेथ पंचाध्यायी +संपादूनी ॥ इतरग्रंथांची करणी[4] ॥ आनंदवनीं[5] विस्तारिली ॥ २५ ॥ अविमुक्त महास्मशान ॥ वाराणशी, आनंदवन, ॥ ×एकासीचि नांवें जाण ॥ ऐका लक्षण त्याचेंही ॥ २६ ॥ अतिशयें जेथ मुक्ती ॥ अधमोत्तमां एकचि गती ॥ पुढती[6] नाहीं पुनरावृत्ती[7] ॥ अविमुक्त ह्मणती या हेतू ॥ २७ ॥ जेथें स्मशानीं सांडिल्या प्राण ॥ प्राणी पुढें न देखे मसण ॥ यालागीं हें ' महाश्मशान' ॥ अंतीं ब्रह्मज्ञान शिव सांगे ॥ २८ ॥ मर्यादा श्वेत वरुण असी ॥ मध्यें नांदे पंचक्रोशी ॥ रिगेम नाहीं पातकांशी ॥ यालागीं ' वाराणसी ' ह्मणे पैं इतें ॥ २९ ॥ वरुणा पातकांतें वारी ॥ असी महादोष संहारी ॥ मध्यें विश्वेश्वराची नगरी ॥ ' वाराणसी ' खरी या हेतू ॥ ५३० ॥ जें विश्वेश्वराचें क्रीडास्थान ॥ जेथ स्वानंदें शिव क्रीडे आपण ॥ यालागीं तें ' आनंदवन ' ॥ ज्यालागीं मरण अमरें वांछिती ॥ ३१ ॥ जेथं जितां संदन्नें भुक्ती ॥ मेल्यामागें अचुक मुक्ती ॥ यालागीं ' आनंदवन ' ह्मणती ॥ पार्वतीप्रती सदाशिव सांगे ॥ ३२ ॥ तया वाराणसी मुक्तक्षेत्रीं ॥ मणिकर्णिका महातीरीं ॥ पंचमुद्रापीठामाझारीं ॥ एकादशावरी टीका केली ॥ ३३ ॥ ऐकतां संतोषले सज्जन ॥ स्वानंदें तुष्टला जनार्दन ॥ पंचाध्यायीं संपतां जाण ॥ स्वमुखें आपण वरद वदला ॥ ३४ ॥ ' ग्रंथ सिद्धि पावेल यथार्थीं ॥ येणें सज्ञानही सुखी होती ॥ मुमुक्षु परमार्थ पावती ॥ साधक तरती भवसिंधू ॥ ३५॥ बाळे भोळे विषयी जन ॥ याचें करितां श्रवण पठण ॥ ते हरिभक्त होती जाण ॥ सन्मार्गी पूर्ण बहुत होती ॥ ३६ ॥ हे टीका तरी मराठी ॥ परी ज्ञानदानें होईल लाठी ' ॥ ऐसी निजमुखीं बोलोनि गोठी ॥ कृपावृष्टीं पाहिलें ॥३७॥ तेथ म्यां ही केली विनंती ॥ ' जे ये ग्रंथीं ०अर्थार्थी होती ॥ त्यांसि ब्रह्मभावें ⁂ब्राह्मणभक्ती ॥ नामीं *प्रीती अखंड यावी ॥ ३८ ॥ ते न

१ संसारसमुद्राचे पैलतीरास. २ जाणलें. ३ पैठण गावांत पहिले पांच करून. ४ बाकीच्या ग्रंथाची रचना. ५ काशींत. ६ पुनः. ७ पुनर्जन्म. ८ या नांवाचें तीर्थ. ९ प्रवेश. १० देव. ११ जीवंत असतां. १२ पक्वान्न. १३ भोजन मिळतें. १४ निश्चयानें. १५ पांच अध्याय.

*मो. निपराध. +ना. संपवुनी. ×ना. एकादशीचीं, मो. एकादशाचीं. ०मो. यथार्थभाव धरिती. ⁂ना. ब्राह्मणीं भक्ती. *मो. अतिप्रीती.

व्हावें ब्रह्मद्वेषी ॥ निंदा नातळावी त्यांसी ॥ समूळ क्षय ब्रह्मद्वेषेंसी ॥ निंदेपाशीं सकळ पापें ॥ ३९ ॥ ऐशी ऐकतां विनवण ॥ कृपेनें तुष्टला श्रीजनार्दन ॥ जें जें मागितलें तें तें संपूर्ण ॥ वरद आपण स्वयें *वदला ॥ ५४० ॥ ' ये ग्रंथीं ज्या अत्यंत भक्ती ॥ निंदाद्वेष नरिघे त्याचे चित्तीं ॥ रामनामीं अतिप्रीती ॥ सुनिश्चितीं वाढेल ॥४१॥ ×अविद्यसुविद्यव्युत्पत्ती ॥ न करितां +ब्राह्मणजाती ॥ ब्रह्मभावें होईल भक्ती ॥ तेणें ब्रह्मप्राप्ती अचुक ॥ ४२ ॥ नामापरता Bसाधनस्वभावो ॥ नाहीं Cब्राह्मणापरता आन देवो ॥ तो ये ग्रंथीं भजनभावो ॥ नीचें नवा पहाहो वाढेल ॥ ४३ ॥ ऐसें देवोनि वरदान ॥ हृदयीं आलिंगी जनार्दन ॥ ह्मणे ये ग्रंथीं जया भजनें ॥ त्याचें भवबंधन मी छेदीं ॥४४॥ हेही अलंकारपदवी ॥ स्वयें जनार्दनचि Dबोलवी॥ एवं कृपा केली जनार्दनदेवीं ॥ हे ठेवाठेवी मी नेणें ॥ ४५ ॥ थोर भाग्यें मी पुरता ॥ पूर्ण कृपा केली ✻श्रोतां ॥ समूळ सांभाळिलें ०ग्रंथा ॥ *अर्थ परमार्था समसाम्य ॥४६॥ पुढें ' या ग्रंथाचें व्याख्यान ॥ जेथ होईल कथा कथन ॥ तेथ यावें अवधान ॥ [1]हें प्रार्थन दीनाचें ॥ ४७ हे ऐकोनि प्रार्थन ॥ संतोषले [2]श्रोतेजन ॥ ' हे कथा आमुचें निजजीवन ॥ जेथ व्याख्यान तेथ आह्मी , ॥ ४८ ॥ ऐसे [3]संतुष्टले श्रोतेजन ॥ वरदें तुष्टला श्रीजनार्दन ॥ एका जनार्दना शरण ॥ ग्रंथ संपूर्ण जाहला ॥ ४९ ॥ [4]जन जनार्दन एक ॥ [5]जाणे तो सुटला निःशेख ॥ हेंचि नेणोनियां लोक ॥ गुंतले अनेक निजात्मभ्रमें ॥ ५५० ॥ वाराणसी महामुक्तिक्षेत्र ॥ विक्रमशक वृष संवत्सर ॥शके सोळाशें तिसोत्तर ॥ [6]टीका एकाकार [7]जनार्दनकृपा ॥५१॥ [8]महामंगळ कार्तिकमासीं ॥ शुक्लपक्षपूर्णिमेसीं ॥ सोमवाराशिवयोगेंसी ॥ टीका एकादशीं समाप्त केली ॥ ५२ ॥ स्वदेशींचा शक संवत्सर ॥ दंडकारण्य [9]श्रीरामक्षेत्र ॥ प्रतिष्ठान गोदातीर ॥ तेथील उच्चार तो ऐका ॥ ५३ ॥ शालिवाहनशकवैभव ॥ संख्या चौदाशें पंचाण्णव ॥ श्रीमुख संवत्सराचें नांव ॥ टीका अपूर्व तें जाहली ॥ ५४ ॥ एवं एकादशाची टीका ॥ जनार्दनकृपां करी एका ॥ ते हे उभयदेश औवांका ॥ लिहिला नेटका शकसंवत्सर ॥ ५५ ॥ पंचाशतें श्लोक सुरस ॥ एकतीस अध्याय ज्ञानरहस्य ॥ स्वमुखें बोलिला हृषीकेश ॥ एकाकी एकादश [0]दुजेनाविण ॥५६॥एकादश ह्मणिजे एकएक ॥तेथ दुजेपणाचा न रिघे[11] अंक ॥ तेंचि Aएकादशइंद्रियीं सुख ॥ एकत्वें अलौकिक निर्डारलें पूर्ण ॥ ५७ ॥ त्या एकादशाची टीका ॥ एकरसें

---

१ प्रार्थना. २ पेक्षां, ब्राह्मणाहून. ३ नित्य. ४ आस्था, भक्ति. ५ संसाररूपबंधन. ६ मुक्त झाला. ७ काशीक्षेत्र. ८ अपेक्षेनें, अगत्यानें. ९एकावर एक आकरा. १०प्रविष्ट होत नाहीं. ११परिपक्वदशेस आलें.

*मो. दिधला. ×मो. अविद्या सुविद्या. +मो. ब्राह्मण पूजिती. Bना. साधकां सद्भावो. Cमो. ब्राह्मणावरता. Dना. वदवी. ✻ना. समस्त श्रोतां. ०मो ग्रंथार्था. *मो. परमार्थो समसाम्य. 1मो. हे प्रार्थना मज दीनाची. 2ना. श्रोते सज्जन. 3मो. संतोषले. 4मो. जनार्दन एक. 5ना. जाण. 6मो. टीका एकाकारें एकाजनार्दनकृपां केली. 7ना. जनार्दनकृत. 8मो. महामंगळमूर्तीसी, कार्तिक शुक्लपक्ष पौर्णिमासी. 9ना. महाक्षेत्र. 0मो. दुजेवीण. Aना. एकादश इंद्रियां.

करी एका[1] ॥ *ते एकत्वाच्या निजसुखा ॥ +फळेल साधकां जनार्दनकृपा ॥ ५८ ॥ हा ज्ञानग्रंथ चिद्रत्न ॥ ×यथार्थ अर्थिला संपूर्ण ॥ माझेनि नांवें श्रीजनार्दन ॥ ग्रंथकर्ता आपण स्वयें जाहला ॥ ५९ ॥ एका जनार्दना शरण ॥ जनार्दना पदियें एकपण ॥ जेवीं कां सूर्याचे किरण॥ सूर्यतेजें पूर्ण निरसी तम ॥५६०॥ तेवीं जनार्दनतेजें जाण ॥ प्रकाशलें एकपण ॥ ❀तेणें प्रकाशें ग्रंथ संपूर्ण ॥ जनार्दन एकरूपेंसी[2] ॥ ५६१ ॥ इति श्रीभागवते महापुराणे परमहंससंहितायां एकादशस्कंधे एकाकारटीकायां मौसलोपाख्यानं नाम एकत्रिंशोऽध्यायः ॥ ३१ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक ॥ २८ ॥ ओंव्या ॥ ५६१ ॥ एकूण ॥ ५८९ ॥ ॥ ॥

१ एकनाथ. २ नाहींसा करी.

*ना. त्या. +ना. फळे. ×मो. यथार्थिलों संपूर्ण. ❀मो. तेथें करी ग्रंथ संपूर्ण, जनार्दन एक निजात्मभावें.



# श्रीएकनाथकृत आनंदलहरी.

श्रीगणेशाय नमः ॥ ॐ नमो सच्चिदानंदघना ॥ ॐ नमो सकळ सुखांचिया निधाना ॥ ॐ नमो परात्पर निर्गुणा॥जगज्जीवना मूळबीजा ॥१॥ ॐ नमो सकळ व्यापका॥आनंदा आनंद तुझेनि देखा ॥ सकळातें तूंचि प्रतिपाळिता ॥ तो तूं लोकां प्रेतक्ष ॥ २ ॥ ॐ नमो अव्यक्त परब्रह्मा ॥ सर्व सुखांचिया धामा ॥ ॐ नमो भक्तांच्या कल्पद्रुमा ॥ तुज उपमा आनु नाहीं ॥ ३ ॥ ॐ नमो आदिपुरुषा आदिदेवता ॥ ॐ नमो उत्पत्ति प्रळय रहिता ॥ पाहतां तूं सकळांचा नियंता ॥ सकळभूतां सत्ता तुझी ॥ ४ ॥ ॐ नमो ज्ञानसागरा ॥ ॐ नमो त्रैमूर्ती अवतारा ॥ ॐ नमो मोक्षाचिया निजघरा ॥ विश्वंभरा तुज नमो ॥ ५ ॥ तुझें निजरूप पाहतां दृष्टीं ॥ निजानंद न समाये दृष्टी ॥ तुटल्या जन्ममरणाच्या गांठी ॥ निर्भय पोटीं मी जालों ॥ ६ ॥ बंधमुक्तीची अटाअटी ॥ संचरली होती माझ्या पोटीं ॥ होतां तुझी कृपादृष्टी ॥ उठाउठी पळाली ॥७॥ तुझें निजरूप पाहतां कांहीं॥बद्धमुक्त दोन्ही नाहीं॥ व्यापक तूं सर्वां देहीं ॥ आनंदडोहीं जेवीं तरंग ॥ ८ ॥ बद्धमुक्तीची कहाणी ॥ ऐकिली होती जेवीं स्वप्नीं ॥ जागृतीमाजीं येउनी ॥ साच मानी कोण तीतें ॥ ९ ॥ स्वर्गनर्क दोन्ही बंध ॥ हा अज्ञानाचा अनुवाद ॥ सद्गुरुकृपा जालिया बोध ॥ जालें सर्व चैतन्य ॥ १० ॥ सगुण आणि निर्गुण ॥ हें शब्दाचेंचि लाघव जाण ॥ जेथ शब्दा पडिलें मौन ॥ गुणागुण उरले कोठें ॥ ११ ॥ तुझी इच्छा जे मायाशक्ति ॥ जाली अनंत ब्रह्मांडें रचिती ॥ करी पंचभूतांची व्यक्ति ॥ संतति जैसी वांझेची ॥१२॥ जैसा कल्पनेचा विस्तारू ॥ हृदयीं करितु अपारू ॥ पाहतां न दिसे साचारू ॥ तैसा विचारू मायेचा ॥ १३ ॥ आहर्निशीं तुझ्या स्वरूपीं असती ॥ तयांसी कळली मायेची स्थिती ॥ सकळ मिथ्यात्वें देखती ॥ अज्ञान भ्रांती तयां नाहीं ॥१४॥ बंधमुक्तीचा वळसा॥तेचि अज्ञानाची दशा॥निद्रिस्त घोसणाये जैसा ॥भ्रांतीचा फांसा पडिलासे ॥१५॥ ज्यातें तुझी कृपा झाली॥त्याची भ्रांति निरसली॥कल्पना विरोनि गेली ॥ वृत्ती बुडाली तुझ्या रूपीं ॥ १६ ॥ परिस लागलियां लोहातें ॥ दूरी केलें काळीमेतें ॥ श्रेष्ठत्व आणिलें नीचातें ॥ परी अळंकारातें न मुके ॥ १७ ॥ पूर्वकर्म जें घडलें ॥ तेणें तें नांव पावलें ॥ लोहोपणासी मुकलें ॥ न मोडतां झालें सुवर्ण ॥ १८ ॥ तैसें त्वां कृपावंतें ॥ निरसिलें भ्रांति काळिमेतें ॥ निरसुनि ज्ञानाअज्ञानातें ॥ निजसुखातें मेळविलें ॥ १९ ॥ वरी देहाचिये माथां ॥ आहे कर्मरेखेची सत्ता ॥ ते न चुकेगा गुरुनाथा ॥ सुखदुःख भोगवी ॥ २० ॥ पूर्वीं कर्म जें घडलें ॥ तें अळंकारातें आटिलें ॥ तें नांवपणासी मुकलें ॥ केवळ जालें सुवर्ण ॥ २१ ॥ जैसा

---

१ प्रत्यक्ष. २ स्थान, घर ३ दुसरी. ४ खटपट. ५ लाट. ६ कौशल्य. ७ प्रकटपणा. ८ रात्रंदिवस. ९ फेरा. १० बरळतो. ११ नाहींशी झाली १२ [illegible]

वृक्ष छेदिलिया समूळ ॥ आर्द्रता न तुटे तात्काळ ॥ आंगीं असोनि अल्पकाळ ॥ मग केवळ काष्ठ होय ॥ २२ ॥ घालुनी आशेचा पाश ॥ हिंडवी नाना देश ॥ हिंपुटी करूनी देहास ॥ संचित तैसें भोगवी ॥२३॥ पत्रें आणि पुष्पें फळ॥सहित वाळला समूळ ॥ अग्निसंगें केवळ ॥ भस्म होय ॥२४॥ तैसी सद्गुरुकृपा होय ॥ तोडी विवेकाचेनि घायें॥देहे वृक्ष पाडिला पाहे ॥ आर्द्रता राहे संचिताची ॥ २५ ॥ जैसा अनुभवें तो वाळतु ॥ संचित क्रियमाणासहितु ॥ वृक्षांची खुंटली मातु ॥ पावलियां देहांतु शून्य होये ॥ २६ ॥ भस्म जालिया नंतरें ॥ वृक्षाचाही ठाव नुरे ॥ तैसा देह अनुभवें विरे ॥ पुढें वोसरे जन्ममरण ॥ २७ ॥ तैसें देह पावलिया लय ॥ पूर्वकर्म सहजेंचि जाय ॥ संचितासि नुरे ठाय ॥ सहजें होय सुखरूप ॥ २८ ॥ पूर्वकर्माचिये ऐशी परी ॥ गुरुभक्त नेघे आपणावरी ॥ राहोनि आनंदाभीतरीं ॥ साक्षित्वें व्यवहारीं वर्तत ॥ २९ ॥ जैसे जळामाजीं पद्मपत्र ॥ जळीं असोनि अलिप्त ॥ तैसा मुक्त व्यवहारीं वर्तत ॥ सुखें भोगित स्वानंदें ॥ ३० ॥ भवभ्रमातें निरसिलें ॥ जन्ममरणातें चुकविलें ॥ देहीं असतां मुक्त केलें ॥ स्वरूपीं मेळविलें आपुलिया ॥ ३१ ॥ तुझिया स्वरूपाचा अनुभव ॥ जाणती संत सज्जन प्रभव ॥ निसरूनि देहाचा देहभाव ॥ स्वानुभव भोगिती ॥ ३२ ॥ जो अमृताचे सागरीं ॥ अहर्निशीं क्रीडा करी ॥ जन्ममरणाचें भय धरी ॥ हें कैशापरी घडेल ॥३३॥ जेथ जन्ममरण जालें वावो ॥ तेथें बंधमुक्त कैचा ठावो ॥ जीव गिळूनि आपुला उगवो ॥ विसरला पाहाहो दुजेपण ॥ ३४ ॥ ऐसी तुझे कृपेची करणी ॥ भवभ्रम निरसिला तत्क्षणीं ॥ निद्रिस्त वोसणावे स्वप्नीं ॥ तया उठवूनी सावध केलें ॥ ३५ ॥ पुरुषोत्तम नाम पंचाक्षर ॥ जो भावें भजे निरंतर ॥ तेथें कैचें भवभय संचार ॥ न चले व्यापार पंचभूतांचा ॥ ३६ ॥ सद्गुरुचरणीं जयाचा भावो ॥ तया बंधमुक्तता जाल्या वावो ॥ त्यातें काळ विसरला पाहाहो ॥ तया ठावो ब्रह्मपदीं ॥ ३७ ॥ भावार्थी जे निजें गडे ॥ तयां बद्धमुक्तता कैंचीं घडे ॥ यमपुरी वोस पडे ॥ ह्मणोनी रडे प्रेतनाथ ॥ ३८ ॥ जैं पतंग भक्षी वडवानळासी ॥ दर्दुरीं गिळिजे शेषासी ॥ जैं खद्योतें गिळिजे रविबिंबासी ॥ तैं गुरुभक्तासी बद्धता ॥ ३९ ॥ जें वायसें युद्ध कीजे खगपतीसी ॥ पिपिलिका सप्तसागर शोषी ॥ कीं मुंकुटें गिळिजे ब्रह्मांडासी ॥ तैं गुरुभक्तांसी बद्धता ॥ ४० ॥ जें चित्रींचिया हुताशनें ॥ दग्ध होती महावनें ॥ कीं रज्जुसर्पाचिया पानें ॥ मृत्यु पावे कृतांतू ॥४१॥ किं मक्षिकाचेनि धडकें ॥ महागिरी पडौशके ॥ किंवा प्रेताचेनि धाकें ॥ झडपशिके महाकाळ ॥ ४२ ॥ किंवा वांझेचेनि सुतें ॥ रणीं जिंकिजे इंद्रातें ॥ किंवा कांसवीचेनि घृतें ॥ कुंभकर्णासीं तरळ होय ॥४३॥ हेंहि ईश्वर इच्छा घडे ॥ परी गुरुभक्तांसी बद्धता न घडे ॥ जन्ममरणाचें फिटलें कोडें ॥ तुटलें बिरडें मायेचें ॥ ४४ ॥ जे मायीं त्रिभुवनें व्यापिलीं ॥ निमिषमात्रें ब्रह्मांडें रचिलीं ॥ सगुणत्वें विस्तारिलीं॥

१ ओलेपणा. २ लांकूड. ३ कष्टी. ४ देहरूपी वृक्षाची गोष्ट संपली. प्रारब्धभोगानंतर हलींचा देह पडला कीं पुढें जन्ममरण नाहीं, शून्य झालें. ५ संतसज्जन आदिकरून. ६आरंभ. ७बडबडतो. ८मिथ्या. ९ आपलेभक्त. १० ओसाड. ११ यम. १२ समुद्रांतील अग्नि. १३ बेडकांनीं. १४ नागांचा राजा जो शेष, त्यास. १५ काजव्यानें. १६ कावळ्यानें. १७ गरुडाबरोबर. १८ मुंगी. १९ चिलटानें. २० अग्नीनें. २१ जळलेलीं. २२ नुसत्या (विषाचा दांत खोचल्याशिवाय) चावण्यानें. २३ काळ. २४ माशीच्या. २५ टकरीनें, धडकेनें. २६ मोठापर्वत, हिमालय. २७ तुपानें. २८ अजीर्णविकार. २९ संकट. ३० गांठ. ३१ ज्या मायेनें. ३२ डोळ्याचे उघडझापेस वेळ लागेल, तितक्या काळांत.

सृष्टी केली स्वइच्छा ॥४५॥ तयेचा नेणती पोरूं ॥ ब्रह्मादी हरिहरू ॥उत्पत्ति स्थिति संहारू ॥ हा व्यापारू मायेचा ॥ ४६ ॥ त्रिमूर्तींची जे सत्ता ॥ जे मूळमायेची प्रतापता॥शक्तीवीण कार्य कर्ता ॥ हें सर्वथा न घडेचि ॥ ४७ ॥ अगाध मायेचें करणें ॥ रचूनि नाना विंदानें ॥ करूनि अवघेंचि विसर्जनें ॥ अदृश्यपणें वर्तत ॥ ४८ ॥ जें स्वरूपीं इच्छा जाली ॥ तें हे माया नांव पावली ॥ सकळ भूतांतें प्रसवली ॥ सृष्टी निर्मिली पळमात्रें ॥ ४९ ॥ शिवा आणुनी जीवपण ॥ तयासी लाविलें जन्ममरण ॥ सुखदुःखादि भोग दारुण ॥ करूनि आपण निराळी ॥ ५० ॥ ऐसी ये माया सबळ ॥ एवढें रचिलें जगड्वाळ ॥ तें गुरुभक्तापुढें केवळ । मिथ्या मृगजळ होऊनि ठेली ॥ ५१ ॥ शिव विरंची नारायण ॥ आणि साधूसंत योगीजन ॥ हे स्वरूपीं जाले निमग्न ॥ यातें माया वदनं दाऊं नशके ॥ ५२ ॥ जेथ अज्ञानाचा सुकाळ ॥ तेथें मायेचा गोंधळ ॥ जो ज्ञाता अनुभवी केवळ ॥ तेथ विटाळ मायेचा ॥ ५३ ॥ जरी ह्मणाल मायेचा विटाळ ॥ तरी कां देह धरिला स्थूळ ॥ ऐसें ह्मणती ते केवळ ॥ अज्ञानी समूळ जाणावे ॥ ५४ ॥ मायेसी नाहीं स्वतां चळणं ॥ इसी चाळिता आदिनारायण ॥ मायापटळें आड लावून ॥ भूतातें आपण चेष्टवी ॥ ५५ ॥ जैसा छायामंडपाभीतरीं ॥ एकला बैसोनि सूत्रधारी । वस्त्र लावूनि माझारीं ॥ प्रभा अंतरीं दीपाची ॥ ५६ ॥ नाना अचेतन पुतळियां ॥ स्वइच्छा नाचवी तयां ॥ हावभाव दाऊनिया ॥ जन भुलवावया खेळतु ॥ ५७ ॥ एक एकानें मारवित ॥ आपणचि शंखध्वनी करित ॥ काय जालें ह्मणोनि पुसत ॥ आणि हांसत आपणचि ॥ ५८ ॥ भंडेउभंडातें दावी ॥ नाना पातकें करवी ॥ गाईपाठीं व्याघ्र लावी॥ आणि मारवी तयेतें ॥ ५९ ॥ अनंत पुतळीयांतें दावित ॥ संहार स्वइच्छा करीत ॥ अज्ञानातें साच दिसत ॥ नसे मेले जीत ते ठाईं ॥ ६० ॥ दाखवी नाना सुखदुःखातें ॥ हें होय कवण कवणातें ॥ एकाविण दुजें नाहीं तेथें ॥ पापपुण्य ठाव कैचा॥६१॥ तैसा भगवंत लीलावतारी ॥ चिदाकाशींचा मंडपाभीतरीं ॥ माया पट लाउनी माझारीं ॥ प्रभा अंतरीं स्वरूपाची ॥६२॥ नानायाती नानावर्ण ॥ नानाकर्मं पापपुण्य ॥ सुखदुःखादि भोग दारुण ॥ करूनि आपण निराळा ॥ ६३ ॥ तो जैसें जैसें चेष्टवित ॥ तैसीं तैसीं भुतें नाचत ॥ सर्वही करविता भगवंत ॥ पापपुण्य हें कवणासी ॥ ६४ ॥ पापपुण्य बोलणें ॥ जैसें शेतामाजीं बुजवणें ॥ तेथें नसे साचपणें ॥ वृथा भिणें वनचरीं ॥ ६५ ॥ तैसे ते अज्ञानी जन ॥ तयांसी दिसे पाप पुण्य ॥ जे जीवन्मुक्त सज्ञान ॥ तयांसी त्रिभुवन मुक्त दिसे ॥ ६६ ॥ जो केवळ जाणता ॥ तो मायेचा नेणता ॥ साधु भगवंताच्या ये समता ॥ ह्मणोनि बद्धता न घडे त्यासी ॥ ६७ ॥ त्यासी माया मिथ्या कळली पाही ॥ तो देहीं असोनी विदेही ॥ जन्ममरणाचें भय नाहीं ॥ सच्चिदानंदडोहीं क्रीडतु ॥ ६८ ॥ जयासी नाहीं आत्मज्ञान ॥ तयासी देहाचें बंधन ॥ नाना दुःखें भोग दारुण ॥ जन्ममरण भोगवी ॥ ६९ ॥ जे सद्गुरूचे अंकित ॥ तयांसी देह दुर्लभ बहुत ॥ स्वरूपीं होऊनियां रत ॥ सुखें भोगित

१ पलीकडला कांठ. २ कौशल्य. ३ ही. ४ ब्रह्मांड. ५ ब्रह्मदेव. ६ लीन. ७ तोंड. ८ हालचाल किंवा चेष्टा करण्याची शक्ती. ९ हालविता, चेष्टविता. १० वस्त्र, पडदा. ११ मध्ये. १२ निर्जीव. १३ निरर्थक वाचाळपणातें. १४ नाश. १५ बुजगावणें. १६ खरेपणा. १७ पशूंनी. १८ शरण आलेले. १९ त्यांस पुनः

स्वानंद ॥ ७० ॥ जैसे द्रव्याचेनि गुणें ॥ एकीं विष घेऊनी भक्षणें ॥ एकीं उपभोग भोगणें ॥ एक दानधर्म करिती ॥ ७१ ॥ तेथ द्रव्यासी नाहीं दूषणें ॥ आपुलें संचित भोगणें ॥ तैसें देहाचेनि गुणें ॥ बद्धमुक्तपण भोगिजे ॥ ७२ ॥ जे नाना पातकें करित । त्यांसी देह काय करा ह्मणत ? ॥ कां जो श्रीहरीसी शरणागत ॥ तयासी सांगत देह काई ॥७३॥ देह पाहतां अचेतन ॥ देहासी कैचें दूषण ॥ जो देहासी चेष्टवी जाण ॥ सुखदुःख भोग त्यालागीं ॥ ७४ ॥ जैसी काष्ठाची पुतळी केली ॥ सर्व इंद्रियें निर्मिलीं ॥ परी चाळितेविण जाली ॥ प्रेतरूप ॥ ७५ ॥ चाळिता बैसे अंतरीं ॥ वोढी इंद्रियाची दोरी ॥ मग प्रवर्ते व्यापारीं ॥ सत्रानुक्रमें ॥ ७६ ॥ तेथ सुखदुःख अवस्था ॥ कैसी घडे पुतळ्यांचया माथां ॥ जो अंतरीं चेटविता ॥ तोचि कर्ता सर्वही ॥ ७७ ॥ तैसे देह अचेतन ॥ त्यातें चालवितें मन ॥ सर्वइंद्रियें त्याचे आधीन ॥ स्वामी जाण तयांचा ॥ ७८ ॥ पापपुण्याची कल्पना ॥ संकल्पविकल्प उठती मना ॥ विसरोनि आत्मज्ञाना ॥ जन्ममरण भोगिती ॥ ७९ ॥ ज्यासी सद्गुरुकृपा होय ॥ त्याचें मनपण विरोनि जाय ॥ संकल्पविकल्पां नुरे ठाय ॥ मिरासी होय मोक्षाचा ॥ ८० ॥ *सद्गुरूचे कृपेवीण ॥ नव्हे मोक्षाचें साधन ॥ जन्ममरणाचें बंधन ॥ नचुके जाण सर्वथा ॥ ८१ ॥ एक गुरुभक्तांतें निंदिती ॥ एक गुरु ह्मणजे काय ह्मणती ॥ जे जे गुरुतें सेविती ॥ तयांसी प्राप्ती काय जाली ॥ ८२ ॥ सद्गुरुभजनीं लाधलें सुख ॥ तें नेणती अज्ञान मूर्ख ॥ विषयसुखें मातले देख ॥ जन्ममरणाचें दुःख भोगिती ॥ ८३ ॥ जैसी नपुंसकासी पद्मिणी ॥ आलिया सुख नुपजे अंतःकरणीं ॥ किंवा उल्लूकास दिनमणी ॥ देखतां नयनीं सुख काय ? ॥ ८४ ॥ गर्भांधासी लावण्यता ॥ गर्दभासी सुगंधता ॥ सुकरू मिष्टान्न भोक्ता ॥ हें सर्वथा नघडेचि ॥ ८५ ॥ श्वानासी शेज सुमनाची ॥ बधिरांसी गोडी कीर्तनाची ॥ रोगियासी मिष्टान्नाची ॥ लागे रुची हें न घडेचि ॥ ८६ ॥ तैसी अभक्तांसी गुरुभक्ती ॥ हें नघडे हो कल्पांतीं ॥ अनंता जन्माचीं पुण्यें फळतीं ॥ तरीच प्राप्ती सद्गुरुभजन ॥ ८७ ॥ मूर्खासी सद्गुरुभजन ॥ हे सर्वथा नघडे जाण ॥ जन्ममरणाचें अधिष्ठान ॥ संचितस्थान पापाचें ॥ ८८ ॥ मुके शब्दाची चातुर्यता ॥ अंधसा होईल पुराणवक्ता ॥ किंवा पांगुळ जाईल तीर्था ॥ हें सर्वथा न घडेचि ॥ ८९ ॥ मर्कटासी सिंहासन ॥ किंवा काकासी अमृतपान ॥ वांझेसी वीरमायपण ॥ सर्वथा जाण न घडेचि ॥ ९० ॥ जे जीव तदंश होती ॥ तेचि पावती सद्गुरुभक्ती ॥ निजसुखातें भोगिती ॥ इतरा भ्रांती जन मूढां ॥ ९१ ॥ श्रोतीं नमानावा खेद ॥ म्यां आपुल्या मनासी केला बोध ॥ भावें भजावा आनंदकंद ॥ मोक्षाचें पद पावावया ॥ ९२ ॥ सुख धरोनी प्रपंचाचें ॥ संचित होतसे पापाचें ॥ भरतें दाटे भवसिंधूचें ॥ जन्ममरणाचें भय थोर ॥ ९३ ॥ प्रपंचीं जरी सुख जोडे ॥ तरी कां सेविती गिरीकंडे ॥ राज्य टाकुनी गेले थोडे ॥ ते काय वेडे ह्मणावे ? ॥ ९४ ॥ भर्तृहरीनें राज्य टाकिलें ॥ तेणें श्रीगोरखातें पुसिलें ॥ राज्य टाकुनि मुंडितें

१ जड. २ दोष. ३ हलविणाऱ्या सूत्रधाराशिवाय. ४ हलविणारा, सूत्रधार. ५ स्वाधीन, ताब्यांत. ६ विरघळत, नाहींसें होतें. ७ वतनदार ८ सुंदर स्त्री. ९ घुबडास. १० सूर्य. ११ जन्मापासून आंधळ्याला. १२ सौंदर्य. १३ गाढवास. १४ डुकर. १५ कुत्र्याला. १६ फुलाची. १७ बहिऱ्याला १८ माकडाला. १९ कावळ्याला. २० नवऱ्या मुलाची आई असण्याचा मान. २१ डोंगरांतील गुहा. २२ संन्याशी.

* ही ओवी हस्तलिखित प्रतींत नाहीं, छापील प्रतींत आहे.

जाले ॥ कितेक गेले भूपती ॥ ९५ ॥ मग श्रीगोरक्षनाथ बोलती ॥ नव्याणव कोटी भूपती ॥ इतरांची नाहीं गणती ॥ योगाप्रती निघाले ॥ ९६ ॥ भवसिंधूच्या डोहीं ॥ त्रिपथाच्या गळ घातला पाहीं ॥ काळ लेखी दिशा दाही ॥ जीव सर्वही भक्षावया ॥ ९७ ॥ जो सद्गुरूसी शरण जाये ॥ तो काळाचाही काळ होये ॥ काळ तयासी शरण जाये ॥ ऐसें बोलताहे वेदांत ॥९८॥ नलगे योगयाग साधन ॥ नलगे व्रत तीर्थ अनुष्ठान ॥ नलगे वैराग्य तप दान ॥ एक सद्गुरुभजन करावें ॥ ९९ ॥ अनेक कर्में केलीं पाहे ॥ तपें राज्य प्राप्त होये ॥ राज्यांतीं नर्क होय ॥ ॥ ऐसें बोलताहे वेदशास्त्र ॥ १०० ॥ स्वर्गीं काय सांगों सुख ॥ पुण्य सरलियां लोटिती देख ॥ मागुती पाहावया मृत्युलोक ॥ स्वर्गनर्क भोगावया ॥ १०१ ॥ नर्क म्हणजे गर्भवास ॥ गर्भीं पचावें नवमास ॥ नाना दुःखें होती जिवास ॥ त्याहूनि विशेष दुःख काय ॥ १०२ ॥ जेणें मृत्यूचें मूळ तुटे ॥ जन्म मरणाचें खत फाटे ॥ पापपुण्याची वाढी खुंटे ॥ धरणें उठे काळाचें ॥ ३ ॥ ऐसा होवावया एक उपावो ॥ भावें भजावा सद्गुरुरावो ॥ जन्ममरणा पुसी ठावो ॥ स्वरूपीं जीव मेळवी ॥ ४ ॥ येथून नाहीं जीव नेला ॥ आणि स्वरूपीं मेळविला ॥ देहीं असतां मुक्त केला ॥ उगव दाविला जीवासी ॥ ५ ॥ जीव आपुला उगव पाहे ॥ इंद्रियांसहित तल्लीन होय ॥ तेथें काळ करील काय ॥ जन्ममरण अपाय खुंटले ॥ ६ ॥ जैसे भूपतिचिया बाळें ॥ अनिवार अन्याय केले॥तें मातेपुढें जाऊनि बैसलें ॥ मग काय चाले कोणाचें ॥ ७ ॥ तैसा जीव स्वरूपींची असे ॥ नाना कर्में केली बहुवसें ॥ तो स्वरूपीं जालिया समरसें ॥ तेथें काळासी रीघ कैचा ॥ ८ ॥ स्वरूप अखंडदंडायमान ॥ सर्वा ठाईं परिपूर्ण ॥ तेथें जिवासी कैंचें जीवपण ॥ समरसोनि एक जालें ॥ ९ ॥ जैसें सागरीहूनी लवण ॥ जळापासूनि निर्माण ॥ सगुणत्वें जालें कठीण ॥ म्हणोनि भिन्न नघडे त्यासी ॥१०॥ तेंचि जळामाजीं घालितां ॥ जळचि होय तत्त्वतां ॥ तें परतोन येईल हाता ॥ हें सर्वथा न घडेचि ॥ ११ ॥ यालागीं सद्गुरूचें भजन ॥ सर्वांहूनि वरिष्ठ जाण ॥ अवतारादिक आपण ॥ सद्गुरूसी शरण रिघावें ॥ १२ ॥ रामराम स्मरतां घोष ॥ तेणें तुटती भवपाश ॥ तोहि शरण श्रीवसिष्ठास ॥ गुरुभक्तीस सादर ॥ १३ ॥ पूर्णब्रह्म श्रीकृष्णनाथ ॥ तोहि म्हणवी गुरुभक्त ॥ दुर्वास ऋषीची सेवा करित ॥ नित्यमुक्तीलागीं ॥१४॥ मुक्तपद आलें हातां ॥ भय न धरी कर्म करितां ॥ भोग भोगोनि अभोक्ता ॥ कर्में करूनि अलिप्तता यालागीं ॥१५॥ ब्रह्मपदाचा अधिकारी ॥ म्हणोनि विश्वातें उद्धरी ॥ स्मरणमात्रें दुरितें हरी ॥ तो श्रीहरी गुरुभक्त ॥ १६ ॥ जैसी कासवीची उत्पत्ती ॥ गर्भाध जाली संतती ॥ ते चक्षुविण वाढती ॥ कल्पांतीं घडेना॥१७॥तैसें सद्गुरु कृपेवीण ॥ पावले मोक्षाचें सदन ॥ भूत भविष्य वर्तमान ॥ ऐकिलें नाहीं जनीं कोठें ॥ १८ ॥ नामया शरण भगवंतासी ॥ भगवंत तरी प्रत्यक्ष त्यासी ॥ हरी शिकवी नामयासी ॥ सद्गुरुविण सुखासी न पाविजे ॥ १९ ॥ तेणें मानूनिया वचन ॥ रिघाला सद्गुरूसी शरण ॥ रूप पाहावया निर्गुण ॥ पंढरीनाथाचें ॥ २० ॥ तेणें खेचरविसा

---

१ राजे. २ पाही. ३ मूळ. ४ प्रवेश. ५ नेहमीं असणारें. ६ मीठ. ७ उत्पन्न झालेलें. ८ खड्याच्या आकारानें. ९ त्याहून भिन्न नाहीं. १० राम. ११ नामदेवास देव साक्षात् भेटत होते. १२ विसोबा खेचर नामदेवरायांचा गुरू.

केला गुरू ॥ तेव्हां जाला साक्षात्कारू ॥ तेणें केला ब्रह्मपूर्णपरू ॥ निजसुखाचें घरू पावला ॥२१॥ एक सद्गुरुकृपेवीण ॥ न तुटे जिवाचें बंधन ॥ सद्भावी जे भाविक जन ॥ तयांसी हें वचन मानलें ॥२२॥ जे या वचनातें मानिती ॥ भावें सद्गुरूतें वंदिती ॥ त्यांचे घरीं चारी मुक्ती ॥ दास्य करिती अनायासीं ॥ २३ ॥ बहुत बोलोनियां काय ॥ ज्याचे पदरीं पुण्य होय ॥ तोचि सद्गुरूसी शरण जाय ॥ मुक्ती लाहे येचि देहीं ॥ २४ ॥ याचि देहीं याच डोळां ॥ भोगिजे मुक्तीचा सोहळा ॥ ऐसा कोणीएक विरळा ॥ तोचि जिव्हाळा स्वरूपाचा ॥ २५ ॥ त्यासी देखिल्या दृष्टीं ॥ मुक्ती लाहिजे उठाउठीं ॥ मा त्यासी पडल्या गांठी ॥ आनंद सृष्टीं न समाये ॥ २६ ॥ तो म्यां देखिला जनार्दन ॥ देखतांच गेला भवभ्रम ॥ सुख जालें अनुपम्य घन ॥ पावलों सदन मोक्षाचें ॥ २७ ॥ मस्तकीं लागतां तयाचा करू ॥ न मोडतां सृष्टीचा वेव्हारू ॥ सर्व जालें शून्याकारू ॥ तेजें अंबर दाटलें ॥ २८ ॥ तया तेजाचा पारू ॥ नेणती ब्रह्मा हरि हरू ॥ वेद राहिले मौन्याकारू ॥ श्रुतीसी विचारू पडिलासे ॥ २९ ॥ तयातें काय वानावें ॥ कवणा उपमेतें आणावें ॥ त्यावीण दुजें देखावें ॥ तरी सांगावें साक्षित्वें ॥ ३० ॥ जो निर्गुण निराकार ॥ निरुपम्य निराधार ॥ परब्रह्म निर्विकार ॥ विश्वंभर अव्यक्त ॥ ३१ ॥ अखंडतेजें सदोदित ॥ उत्पत्तिप्रळया विरहित ॥ व्यापुनी सर्वांसी अलिप्त ॥ त्यावीण रितां ठांव नाहीं ॥ ३२ ॥ जो कां वस्तु परात्पर ॥ सगुण निर्गुणाचें उदर ॥ वेदां नकळे जयाचा पार ॥ शब्दाचा विचार खुंटला ॥ ३३ ॥ मनें जयातें देखिजे ॥ तयातें शब्दें वानिजे ॥ जेथें मनें मनपणा मुकिजे ॥ तो शब्दें बोलिजे कवणे परी ॥ ३४ ॥ मन सकळांतें चाळितें ॥ तेथें ठाव नाहीं मनातें ॥ यावरी कैंचे इंद्रियांतें ॥ देखतां स्वरूपातें पावतील ॥ ३५ ॥ जरी ह्मणाल स्वरूप निराकार ॥ तरी कोठूनि जाला विस्तार ॥ या शब्दाचा विचार ॥ श्रोतीं सादर परिसावा ॥ ३६ ॥ जरी उपसाहित्यें सांगावें ॥ तरी साहित्य कवणातें यावें ॥ त्याचिया समता दुजें देखावें ॥ तरी बोलावें साहित्य ॥ ३७ ॥ परी बोलतों अल्पमती ॥ भावें परिसावें सज्जन श्रोतीं ॥ रविकिरणापुढें काडवाती ॥ तैसें मतीं बोलतों ॥ ३८ ॥ जैसें पाहतां वटबिजासी ॥ सूक्ष्मत्वें नये दृष्टीसी ॥ निराकार असतां तयासी ॥ तेथें द्रुमासी ठाव कैंचा ॥ ३९ ॥ बिजामाजीं असतां अंकुर ॥ बिजीं होता बीजाकार ॥ सूक्ष्मत्वें निघाला बाहेर ॥ मग अपार वाढला ॥ ४० ॥ त्वचा काष्ठ फळें पत्रें ॥ बिजीं होतें बीजाकारें ॥ तोचि महावृक्ष विस्तारे ॥ मग पसरे स्वइच्छा ॥ ४१ ॥ नाहीं ह्मणतां विस्तारला ॥ आहे ह्मणां तरी नाहीं देखिला ॥ बीजामाजीं होता संचला ॥ तोचि विस्तारला सगुणत्वें ॥४२॥ तैसें निर्गुण स्वरूपा माझारीं ॥ अनंतब्रह्मांडांची भरोवरी ॥ स्वरूपाकार असतां अंतरीं ॥ तेंचि बाहेरीं निघाले ॥ ४३ ॥ बीजें व्यापिलें वृक्षासी ॥ तैसें निर्गुणें व्यापिलें सगुणासी ॥ शब्दें आणिलें भिन्नपणासी ॥ जैसें कनकासी अलंकारनामें ॥ ४४ ॥ माया स्वरूपीं तदंश होती ॥ ते इच्छेगुणें आणिलें व्यक्ती ॥ सर्व गुणांतें जाली प्रसवती ॥ करी मूर्ती त्रिगुणाची ॥ ४५ ॥

---

१ सहज. २ कश्चित्. ३ काळीज. ४ घर, ठिकाण. ५ हात. ४ व्यवहार. ७ आकाश. ८ अंत, पलीकडला काठ, ९ न बोलणारे. १० वर्णन करावें. ११ रिकामा. १२ स्थान, जागा. १३ विचारानें समजतें. १४ स्वरूपीं मनास जागा नाहीं. १५ इंद्रियें. १६ दुसऱ्या अलंकारानें. १७वडाच्या बीजाला. १८ वृक्षाला.

करी नाना रचनेतें ॥ परी भिन्नत्व नाहीं स्वरूपातें ॥ स्वरूपें व्यापिलें सर्वांतें ॥ जैसें अलंकारातें सुवर्ण ॥ ४६ ॥ ऐसा स्वरूपाचा विस्तारू ॥ होऊनि उरला अपारू ॥ तया स्वरूपाचा विस्तारू ॥ ब्रह्मादिहरिहरू वेडावले ॥४७॥ त्यांतें मौन्येंचि पाहिजे ॥ रसनेंवीण गोडी घेइजे॥ भाग्येंवीण सुख भोगिजे ॥ पद पाविजे गुरुखुणें ॥ ४८ ॥ आतां बोलणें खुंटलें ॥ शब्दाचें चातुर्य राहिलें ॥ दृष्टीचें देखणें उरलें ॥ तेंहि निमालें शेवटीं ॥ ४९ ॥ सद्गुरूचे निजदास ॥ तेचि पावती ये खुणेस ॥ परिसतां नावडे येरांस ॥ जैसे पक्षियासी नारेळ ॥ ५० ॥ सकळां साष्टांगनमन ॥ तुह्मीं जावें सद्गुरूसी शरण ॥ चुकवावें जन्ममरण ॥ पावावें सुख मोक्षाचें ॥ ५१ ॥ सद्गुरुमंत्र उपदेशतत्त्वता ॥ मोक्ष तत्काळ पावे त्वरिता ॥ ऐसें असे यथार्थता ॥ सद्गुरूसी मान नाहीं सत्यत्वें॥५२॥मन असतां आनंदाभीतरीं ॥ उठती सुखाचिया लहरी ॥ ह्मणोनि वदली वैखरी ॥ प्रेम आनंदलहरी या नांव ॥ ५३ ॥ एकाजनार्दनीं एकनाथ ॥ एक ह्मणती विश्वभरित ॥ तो होउनी कृपावंत ॥ प्रेम आनंद लहरी वदविली ॥ ५४ ॥ इतिश्री आनंदलहरी समाप्ता ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

१ नाहींसें झालें. २ इतरास. ३ नारळ. ४ घर. ५ आनंदांत. ६ लाटा. ७ वाचा.



# श्रीएकनाथकृत स्वात्मसुख.

॥ श्रीगणेशाय नमः ॥ श्रीकृष्णपरमात्मने नमः ॥श्रीगुरुभ्यो नमः॥ॐ नमोजी सच्चिदानंदा॥ जय जय जगदादि आनंदकंदा ॥ निजांगें अभयवरदा ॥ श्रीगुरुराया ॥ १ ॥ जयाचेनि अवलोकनें ॥ हारपे एका एकपणें ॥ केलें सर्वांगचि देखणें ॥ अनंगें देवें ॥२॥ एकपणीं अनेक ॥ अनेकीं दावी एक ॥ नकळे कैसें कवतुक ॥ दुजेनविण ॥ ३ ॥ जेथें दुजेंचि नाहीं ॥ तेथें स्तुतिस्तव्य तें काई ॥ शब्दासीचि ठावें नाहीं ॥ मा स्तवन तें काइसें ॥ ४ ॥ पहातां रूपाचा दुकाळ ॥ नामाचा विटाळ ॥ तेथें स्तवनाचा गोंधळ ॥ रिघेल कोठें ॥ ५ ॥ तेथें एकपणेंवीण एका ॥ जो कां जनार्दन निजसखा ॥ स्तवावया देखा ॥ निःशंक ऐसा ॥६॥ जैसें वेदें आपुलें आपण ॥ सामर्थ्यें कीजे निरूपण ॥ ते स्तवनीं दुजेपण ॥ लागेल कैंचें ॥७॥ नातरी शब्दाची पदवी ॥ शब्देंचि लागे बोलावी ॥ कां जीवाची एकोपजीवी॥जीवचि जाण॥८॥आतां गुरुशिष्य दोन्ही ॥ आणोनि एकपणीं ॥ रिघालों जी स्तवनीं ॥ स्तवावया ॥ ९ ॥ तरी देऊनी आपुली पुष्टी ॥ मज सामाविलें आपुला पोटीं ॥ याहीवरी कृपादृष्टी ॥ याचिलागीं करी ॥ १० ॥ जे आपुली स्वरूपस्थिती ॥ ते वानावी अभिनव कीर्ती ॥ जेणें संतसज्जन होती ॥ संतुष्ट सदा ॥ ११ ॥ आतां संतांच्या मनोगतीं ॥ तेंचि बोलावें प्रस्तुती ॥ तरी सांगों स्वरूपस्थिती ॥ सुनिश्चित ॥ १२ ॥ तरी कठिणांशु करूनि वेगळ ॥ पहातां जैशी स्फटिकशीळ ॥ तैसें जाण सकळ ॥ स्वरूप असे ॥ १३ ॥ सांडूनी आर्द्रतेचा रोहो ॥ नाडळत भरला डोहो ॥ तैसी ते वस्तु पहाहो ॥ सर्वत्र असे ॥१४॥ जडत्व सांडूनि निश्चळ ॥ सुधा जैसी पुष्कळ ॥ तैसें ज्ञेय सकळ ॥ सकाळिक असे॥१५॥गगन सर्वांसी स्पर्शे॥परी स्पर्शिलें हें न दिसे॥आत्मा तैसा सन्निध असे॥आडळेविण ॥१६॥शून्यत्व सांडूनि गगनें ॥ सर्वत्र जेवीं असणें ॥ आत्मा तैसा पूर्णपणें ॥ सर्वदा सर्वीं ॥ १७ ॥ जें नाडळें स्पर्शनीं ॥ घसवटेना जनघसणीं ॥ शून्या शून्यत्व करोनी ॥ संविती असे ॥१८॥ जेवीं वर्ततांही जगीं ॥ नाडळत आडळे आंगीं ॥ अंगा अंगत्व संयोगीं॥दुरावोनि असे॥१९॥सद्रूपाची निजात्मगती ॥ सांगितली स्वरूपस्थिती॥ आतां चिद्रूपाची उपपत्ति ॥ सहज दृष्टांतें सांगेन ॥ २० ॥ सांडूनि ज्वाळा काजळा ॥ दीप प्रकाश उमाळा ॥ असे, तैसी आत्मकळा ॥ कळातीत ॥ २१ ॥ कां रविबिंब अस्तां जाये ॥ आणि प्रभा तैशीचि राहे ॥ तैसी आत्मप्रभा पाहे ॥ उष्णातीत ॥ २२ ॥ नातरी आंधारें सूनि पोटीं ॥ उष्ण चांदणें दोन्ही घोटी ॥ तयावरी जे दशा उठी ॥ ते आत्मप्रभा

---

१ ज्यास स्थूल सूक्ष्मादि शरीरें नाहींत असा जो देव त्यानें. २ जागा. ३ दुष्काळ. ४ अपूर्व, उत्तम. ५ ओलेपणाचा. ६ वाढ, विस्तार. ७ पृथ्वी. ८ प्रतिबंध, अडचण. ९ न सांपडे, न समजे. १० ज्ञान. ११ समजण्याची युक्ती. १२ घालून.

॥ २३ ॥ कां डोळां सांडोनि मागें ॥ दिसतें दवडूनि वेगें ॥ माजीं देखणेपण सर्वांगें ॥ सर्वत्र
वस्तू ॥ २४ ॥ अक्षर घालुनी माघारी ॥ शब्द न निघतां बाहेरी ॥ माजीं अर्थु असे जया-
परी ॥ तैसी ते वस्तू ॥ २५ ॥ आडळ सांडोनि आरसा ॥ सन्मुख गगनाएवढा जैसा ॥ तो
असताचि नाहीं होय जैसा ॥ आत्मा तैसा पैं असे ॥२६॥ सद्रूप चिद्रूप दोन्ही ॥ निरोपिलीं
उपलेउनी ॥ आतां स्वानंद सांगेन चिन्हीं ॥ जें आयकतां मन निवे ॥ २७ ॥ साखर करूनि
वेगळी ॥ गोडीचि कीजे निराळी ॥ माजीं स्वादु सर्वांगीं सकळीं ॥ तैसा स्वानंदु जाणा
॥ २८ ॥ नातरी रतीच्या अंतीं ॥ जे होय सुखप्राप्ती ॥ तें सर्वदा सर्वांगें भोगिती ॥ सांडुनी
रतिसंबंधू ॥ २९ ॥ कां रसनेवीण फुडी ॥ ते सदां सर्वांगें गोडी ॥ भोगी जेवीं आवडीं ॥
तेवीं स्वानंदसुख ॥ ३० ॥ कां कामिनेविण कामसुख ॥ वीर्य सबळवीण देख ॥ उपजे
तोषेंवीण संतोष ॥ तैसें स्वात्मसुख जाणा ॥ ३१ ॥ सत् चित् आनंद ॥ हा
अद्वय वृत्तीचा भेद ॥ वस्तु नव्हे त्रिविधं ॥ एकविध एकली ॥ ३२ ॥ ✱मृदु तिख
आणि मिरकुळी ॥ तीं नांवें एक चापकळी ॥ तेवीं सच्चिदानंद बोलीं ॥ वस्तु एकली
एकत्वें ॥ ३३ ॥ जैसें आपलेंच मुख ॥ तें नव्हे आपणा सन्मुख विन्मुख ॥ तैसें नहोनी
सुखदुःख ॥ सहजें सुख सदोदित ॥ ३४ ॥ सद तेंचि चिद ॥ चिद तेंचि आनंद ॥ वस्तु नव्हे
त्रिविध ॥ ते एकपद एकत्वें ॥ ३५ ॥ जेथें दुजेवीण जाण ॥ नुपजतां एकपण ॥ सुख सुखत्वें
संपूर्ण ॥ तें स्वसंवेद्य ॥ ३६ ॥ जेथें ध्यान अवघें सरे ॥ ध्येयपण वेगळें नुरे ॥ ध्याता सर्वांगें
विरे ॥ विरालेपणेंसी ॥ ३७ ॥ दृश्य द्रष्टेनसिं मिळे ॥ तेथें द्रष्टेपण तत्काळ गळे ॥ दर्शन एकले-
पणें मावळे ॥ निर्विशेषीं ॥ ३८ ॥ ज्ञाता ज्ञेयीं ज्ञेयत्वें जडे ॥ तेथें ज्ञान लाजिलें फुडें ॥ वस्तू
वस्तुत्वें अंगा जडे ॥ वेदें नेणवे ॥३९॥ प्रमाता प्रमाण ॥ दोन्ही जाहलीं अप्रमाण ॥ प्रमेयेंसि
कारण ॥ अकारण जालें ॥ ४० ॥ ऐसें सिद्ध स्वरूप असतां ॥ तें जेणें प्रकारें ये हाता ॥ तें
साधनही तत्त्वतां ॥ सांगेन आइका ॥ ४१ ॥ सुमनें सांडूनि सकळें ॥ गुणेंवीण गुंफिजे प-
रिमळें ॥ तैसें आत्मसाधन केवळें ॥ स्वात्मासिद्धीचें ॥ ४२ ॥ लहरियां लहरी आलिंगिजे ॥
ते आलिंगनीं नाडळे दुजें ॥ तैसें आत्मसाधन जाणिजे ॥ स्वात्मासिद्धीचें ॥ ४३ ॥ अलंकार
सोनिया मिळे ॥ तेथें मिळणीं दुजें नाडळे ॥ ऐसी वृत्ती अखंड फळे ॥ आत्मसाधनीं ॥ ४४॥
जेथें आतळों न शके ज्ञान ॥ तेथें कैचें ध्येय ध्याता ध्यान ॥ येथ वस्तूचें साधन ॥ वस्तूचि
होय ॥ ४५ ॥ सुवर्ण धन ॥ कां धनें सुवर्ण ॥ तैसें वस्तूचें साधन ॥ वस्तूचि होय ॥ ४६ ॥
लोहकामे लोहखडें घडे ॥ तैसी वस्तू वस्तुत्वें जोडे ॥ जैसें सूर्याचेनि उजियेडें ॥ सूर्यचि दिसे
॥ ४७ ॥ वायुवीण खेवें ॥ प्राणेंवीण धांव ॥ मनेंवीण भाव ॥ भावना जेथ ॥ ४८ ॥ शब्देंवी-
ण बोली ॥ चरणेंवीण चाली ॥ दृष्टीवीण आली ॥ दर्शन शोभा ॥ ४९ ॥ क्रियेवीण कर्म ॥
दानेंवीण धर्म ॥ धारणेवीण उपशम ॥ मांडला दिसे ॥ ५० ॥ जेवीं एकपणें तंतू ॥ अनेक
पट तोचि होतू ॥ तैसी एकात्मता जगा आंतू ॥ लक्षिजे[12] तें आत्मसाधन ॥ ५१ ॥ वृत्तीसी
अखंडता न घडे ॥ तंव साधनीं साध्य कैचें जोडे ॥ जैसें भंगलें पात्र कोरडें ॥

१ विस्तार करून, स्पष्ट. २ तीन प्रकारची. ३ भेदरहित व गुणरहित नव्हे. ४ जाणण्याशिवाय. ५ फुलें. ६ दोऱ्याशिवाय. ७ लाटेनें. ८ स्पर्शों. ९ लोखंडाचा पदार्थ. १० आलिंगन. ११ वस्त्र. १२ पहाती.
✱३३ ते ३५ ह्या ओव्या छापील प्रतींत आहेत. हस्तलिखित

भरितांही तोय ॥ ५२ ॥ घटाकाशींचेनि आकाशीं ॥ सदा महदाकाशीं वसे ।
घटभंगीं अभंग असे ॥ जेथिचें तेथें ॥ ५३ ॥ तो घट जैं दैववशें फुटे ॥ मग
घटाकाश लागे नीट वाटे ॥ तेंच महदाकाश भेटे ॥ येऱ्हवीं चुके ॥ ५४ ॥ तैसी आकार नि-
राकारीं ॥ वृत्ति अखंडत्व धारणा धरी ॥ तैं साध्याच्याही साक्षात्कारीं ॥ कार्यसिद्धि ॥५५॥
तया नांव साधन ॥ आत्मसाक्षात्कारींचें अंजन ॥ जें हातां बैसलिया निधान ॥ होइजें स्वयें
॥५६॥ सूर्यें केला दिवसू ॥ जळबिंदु करी पावसु ॥ पृथ्वी करी पांशू ॥ स्वात्मत्वाचा ॥ ५७॥
तैसें साध्याचि साधना ॥ जंव नये अनुसंधाना ॥ तंव वांचूनि मना ॥ सद्भाव नाहीं ॥ ५८ ॥
जेथें स्वस्वरूपाची नास्तिक ॥ ते येणें साधनें देख ॥ तेथेंचि आणिली आस्तिक्य ॥ आत्म-
त्वाची ॥ ५९ ॥ जेथें जग हें ब्रह्म नव्हे ॥ तेंचि ब्रह्मत्वें उभें राहे ॥ तरी कवण पां न पाहे ॥
सर्वार्थ मात्रें ॥ ६० ॥ चिंतामणीचा हिरा ॥ जरी तेजरूप खरा ॥ मिनलिया अलंकारा ॥
नमने कवणा ॥६१॥ आकाशाचा दर्पण ॥ सन्मुख जोडला संपूर्ण ॥ तरी स्वस्वरूपा कवण ॥
पाहों विसरे ॥ ६२ ॥ तेथें पहातां स्वरूप भासे ॥ विस्मरणामाजीं तेंचि दिसे ॥ कर्मक्रियेही
सरिसें ॥ लागलें सदा ॥ ६३ ॥ तें सांडितां सांडिलें न जाये ॥ डोळे झांकितां अधिक होये ॥
देहाचा भ्रम निःशेष जाये ॥ सहजान्वयें स्वभावें ॥ ६४ ॥ कां मुक्ताफळाचा परिसू ॥ जोड-
लिया स्वप्रकाशू ॥ तरी भ्रुकुटीं वाणितां उल्हासु ॥ न करी कवण ॥ ६५ ॥ कां कल्पतरूचें
झाड ॥ सुवास सुंदर आणि गोड ॥ मीनलिया इंद्रियांचें कोड ॥ न पुरवी कवण ॥ ६६ ॥
तैसा परमात्मा परेश ॥ सर्वरूपें रूपस ॥ जोडलियां कां डोळस ॥ डोळे
झांकी ॥ ६७ ॥ यापरी जे जे प्रतिमा ॥ तेथें प्रगटे परमात्मा ॥ हे गोष्टी आत्मयारामा ॥
निर्मनें रमवी ॥ ६८ ॥ जैसें सूर्याचीं किरणें ॥ सूर्यापुढें धांवती जाण ॥ तेणें प्रकाशे
सूर्यपण ॥ अधिकाधिक ॥ ६९ ॥ कां रत्नाची कीळ ॥ रत्नावरी वाढे प्रबळ ॥ तेणें
रत्नासीचि केवळ ॥ प्रबळता आणी ॥ ७० ॥ कां चंदनाचा वासू ॥ चंदनाहुनी चौपैसू ॥
यात्रे तेणें अतिसुवासु ॥ चंदना आणी ॥ ७१ ॥ कां अग्नीच्या ज्वाळा ॥ अग्नीवरी वाढती
सबळा ॥ तेणें अतिरूप अनळा ॥ आणिलें जैसें ॥ ७२ ॥ तैसें विश्वप्रकाशितया गभस्ती ॥
त्याचें किरणें नानाव्यक्ती ॥ तेथें नास्तिकता जे देखती ॥ ते मूर्ख मृगतृष्णिका ॥ ७३ ॥ हीं
कां चिद्रत्नाची कळा ॥ तें हें चराचर सकळा ॥ ऐसी कैंळा न दिसे ते समळा ॥ पडळ
दृष्टी ॥ ७४ ॥ असो हे सुवर्ण सोटी ॥ करूनि घातली वधूच्या कंठीं ॥ तेणें ते गोमटी ॥
दिसेल काई ! ॥ ७५ ॥ मा त्याचें करूनि भूषण ॥ अंगें प्रत्यंगीं जाण ॥ बैसविल्या सुंदर-
पण ॥ शोभेसी ये ॥ ७६ ॥ तैसें स्वस्वरूपें निर्विकार ॥ त्याचें सर्वांग भूषण मनोहर ॥ तेणें-
से अलंकारिलें चराचर ॥ स्वरूपचि भासे ॥ ७७ ॥ चंदनाचेनि संनिधीं झाडें ॥ न मोडती
चंदनत्व घडे ॥ तैसा वस्तूचेनि अंगें प्रपंच वाढे ॥ तद्रूपतेसी ॥ ७८ ॥ सुवर्ण आणि भूषण ॥
तेथ काई असे दोनीपण ॥ प्रगट पहातां कांकण ॥ सोनेंचि असे ॥७९॥ स्वयंभ पट पहातां-
चि दिठी ॥ तंतूसीचि होय भेटी ॥ तैसी अवलोकितां सकळ सृष्टी ॥ स्वरूपचि भासे ॥८०॥

१ न फुटणारें. २ हस्तगत झालिया. ३ खजिना, ठेवा. ४ धुरळा. ५ आरसा. ६ मोत्याच्या. ७ वाखाणितां. ८ किरण, तेज, प्रकाश. ९ आसपास, सर्वबाजूंस. १० अग्नीस. ११ सूर्य. १२ प्रकाश, तेज. वर पडळ आलेला डोळा. १३ लगड. १४ दागिना. १५ लहान मोठ्यां अवयवांवर. १६ घातल्या. १७ जवळ.

